# भारतीय संस्कृतिकोश

## —चौथा खंड—

तंत्रशास्त्र ते नाणी

संपादक :

**पं. महादेवशास्त्री जोशी**

सहसंपादक :

**तर्कतीर्थ सौ. पद्मजा होडारकर, एम्. ए.**



**भारतीय संस्कृतिकोश मंडळ**

४१०, शनिवार पेठ, पुणे ३०.

प्रकाशक :
**पं. महादेवशास्त्री जोशी**, कार्यवाह
भारतीय संस्कृतिकोश मंडळ,
४१० शनिवार पेठ,
पुणे ४११०३०

□

प्रथमावृत्ती : इ. स. १९८७
पुनर्मुद्रण : इ. स. १९८८

□



मुद्रक :
**श्री. का. गं. सोनार**
लोकसंग्रह छापखाना,
१७८६, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ००२.

□




फोटो प्रोसेसिंग :
**ब. शं. दाते**
कलाप्रतिमा, भिकारदास मारुती मंदिराजवळ,
पुणे ४११ ०३०

□

वितरक :
**अनमोल प्रकाशन,**
६८३ बुधवार पेठ,
अप्पा बळवंत चौक,
पुणे ४११००२



**मूल्य २५० रुपये**

# प्रस्तावना

भारतीय संस्कृतिकोशाचा चौथा खंड गेले वर्ष दीडवर्ष दुर्मिळ झाला होता. ती उणीव पुनर्मुद्रणाने आज भरून निघत आहे.

कोशाचा संकल्प, योजना आणि व्याप्ती यांविषयी प्रथमखंडाच्या प्रस्तावनेत सविस्तर लिहिलेच आहे. म्हणून त्याची पुनरुक्ती इथे टाळीत आहे. मात्र काही गोष्टींचा खुलासा दुसऱ्या व तिसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेत केला आहे. तोच इथे पुन्हा उद्धृत करणे आवश्यक ठरते.

**शुद्धलेखन**–कोशाच्या पहिल्या खंडात महाराष्ट्र साहित्य परिषदेने केलेले शुद्धलेखनाचे नियम आम्ही पाळले. त्यानंतर मराठी साहित्य महामंडळाने शुद्धलेखनाचे नवे नियम केले आणि ते महाराष्ट्र राज्य सरकारने मान्य केले. त्या नियमांना अनुसरून दुसऱ्या खंडाचे मुद्रण केले आहे. तेच नियम या चवथ्या खंडाच्या मुद्रणातही पाळले आहेत. तत्सम ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त शब्द प्रथमेत दीर्घान्त लिहावे, पण ते समासात पूर्वपदी असता ऱ्हस्वान्तच लिहावे असा महामंडळाचा नियम आहे. त्यामुळे कोशाच्या विषयानुक्रमात अपरिहार्यपणे बदल करावा लागला आहे. उदा० तिथी हा विषय पाहा. पूर्वीच्या नियमांप्रमाणे हा शब्द ऱ्हस्व इकारान्त असल्यामुळे कोशात प्रथम येत होता आणि तिथिचक्र, तिथिदोहद व तिथियुगलव्रत हे मुख्यविषयाशी संबंधित असलेले विषय अनुक्रमाने नंतर येत होते. पण शुद्धलेखनाच्या नव्या नियमाप्रमाणे तिथी हा शब्द दीर्घान्त ठरल्यामुळे तो पुढे गेला व समासातला तिथी शब्द ऱ्हस्व राहत असल्यामुळे संबंधित विषय आधी घ्यावे लागले.

**जाती जमातींची माहिती** – गेल्या शतकात व चालू शतकाच्या प्रारंभी अनेक पाश्चात्य संशोधकांनी भारतातील बहुसंख्य जाती-जमातींचे संशोधन करून मोठमोठे ग्रंथ लिहून ठेवले आहेत. अशा अनेक ग्रंथांचा उपयोग करून आम्ही जाती-जमातींची माहिती संकलित करून तिचा उपयोग केला आहे. पण त्यातली बरीच माहिती आता जुनी झाली आहे. काल-मानाप्रमाणे बहुतेक जाती-जमातींच्या व्यवसायात, राहणीत व चाली-रीतींत पुष्कळ फरक पडले असणे शक्य आहे. पण त्यांची प्रत्यक्ष पहाणी करून त्यांच्याविषयी अद्ययावत माहिती मिळवणे आम्हाला शक्य झाले नाही. अर्थात प्रत्येक गोष्टीची समक्ष पाहणी करून एखादा ज्ञानकोश निर्माण करणे शक्यच नसते. त्याला उपलब्ध ग्रंथाच्या आधारेच आपला कार्यभाग साधावा लागतो. आम्हीही तेच आणि तसेच केले आहे.

मात्र शक्य होतील तेवढे अलिकडील ग्रंथ मिळवून आम्ही त्यांचा उपयोग केला आहे. इ. स. १९६१ च्या जनगणनेचे अहवाल आणि भारतातील अनेक जिल्ह्यांचे जिल्हानामे (गॅझेटिअर्स) यांचाही शक्य तेवढा उपयोग केला आहे.

गेले वर्ष दीड वर्ष भारतीय संस्कृतीकोशाचा तिसरा व चौथा हे खंड दुर्मिळ झाले होते. ग्राहकांना पुरता संच मिळत नव्हता. हे दुर्मिळ खंड पुनर्मुद्रित करावयाचे तर त्यासाठी लागणारी मदत मिळविण्यासाठी मला अनेक उदार दात्यांकडे याचना करण्यासाठी भ्रमंती करावी लागली असती, पण माझ्या उतारवयामुळे आणि शारीरिक दुर्बलतेमुळे मला हे काम सर्वथैव अशक्य होते. माझी ही परिस्थिती लक्षात घेऊन अनमोल प्रकाशनचे श्री. पद्माकर नांदुरकर, कलाभुवन पुणे या संस्थेचे श्री. ब. शं. दाते हे माझे मित्र कोशाचे हे खंडित झालेले काम पुढे चालवण्यासाठी माझ्या मदतीला आले आणि त्यांनी सर्व आर्थिक जबाबदारी उचलण्याचे ठरवून खंड तिसरा व चौथा पुनर्मुद्रित करण्याचे काम तडीला नेले. याच क्रमाने उर्वरित सर्व खंड संपतील तसतसे ते पुनर्मुद्रित करण्याचा मनोदयही त्यांनी व्यक्त केला आहे. तसेच लोकसंग्रह छापखाना (ऑफसेट) विभाग पुणे, या संस्थेचे श्री. का. ग. सोनार यांनी छपाईची जबाबदारी घेतली. त्यांच्या या उदार साहाय्याबद्दल मी कोश मंडळातर्फे त्यांचे हार्दिक आभार मानतो. वरील दोनही सद्गृहस्थांच्या या सहकार्यामुळे आता ग्राहकांना कोशाचा समग्र संच उपलब्ध होऊ शकेल.

सर्वांचा नम्र

**महादेवशास्त्री जोशी**

संपादक व कार्यवाह

प्रकाशक :
पं. महादेवशास्त्री जोशी, कार्यवाह
भारतीय संस्कृतिकोश मंडळ,
४१० शनिवार पेठ,
पुणे ४११ ०३०

□

प्रथमावृत्ती : इ. स. १९८७
पुनर्मुद्रण : इ. स. १९८८

□

मुद्रक :
श्री. का. गं. सोनार
लोकसंग्रह छापखाना,
१७८६, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ००२.

□

फोटो प्रोसेसिंग :
ब. शं. दाते
कलाप्रतिमा, भिकारदास मारुती मंदिराजवळ,
पुणे ४११ ०३०

□

वितरक :
अनमोल प्रकाशन,
६८३ बुधवार पेठ,
अप्पा बळवंत चौक,
पुणे ४११ ००२

मूल्य २५० रुपये





# प्रस्तावना

भारतीय संस्कृतिकोशाचा चौथा खंड गेले वर्ष दीडवर्ष दुर्मिळ झाला होता. ती उणीव पुनर्मुद्रणाने आज भरून निघत आहे.

कोशाचा संकल्प, योजना आणि व्याप्ती यांविषयी प्रथमखंडाच्या प्रस्तावनेत सविस्तर लिहिलेच आहे. म्हणून त्याची पुनरुक्ती इथे टाळीत आहे. मात्र काही गोष्टींचा खुलासा दुसऱ्या व तिसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेत केला आहे. तोच इथे पुन्हा उद्धृत करणे आवश्यक ठरते.

**शुद्धलेखन**–कोशाच्या पहिल्या खंडात महाराष्ट्र साहित्य परिषदेने केलेले शुद्धलेखनाचे नियम आम्ही पाळले. त्यानंतर मराठी साहित्य महामंडळाने शुद्धलेखनाचे नवे नियम केले आणि ते महाराष्ट्र राज्य सरकारने मान्य केले. त्या नियमांना अनुसरून दुसऱ्या खंडाचे मुद्रण केले आहे. तेच नियम या चवथ्या खंडाच्या मुद्रणातही पाळले आहेत. तत्सम ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त शब्द प्रथमेत दीर्घान्त लिहावे, पण ते समासात पूर्वपदी असता ऱ्हस्वान्तच लिहावे असा महामंडळाचा नियम आहे. त्यामुळे कोशाच्या विषयानुक्रमात अपरिहार्यपणे बदल करावा लागला आहे. उदा० तिथी हा विषय पाहा. पूर्वीच्या नियमांप्रमाणे हा शब्द ऱ्हस्व इकारान्त असल्यामुळे कोशात प्रथम येत होता आणि तिथिचक्र, तिथिदोहद व तिथियुगलव्रत हे मुख्यविषयाशी संबंधित असलेले विषय अनुक्रमाने नंतर येत होते. पण शुद्धलेखनाच्या नव्या नियमाप्रमाणे तिथी हा शब्द दीर्घान्त ठरल्यामुळे तो पुढे गेला व समासातला तिथी शब्द ऱ्हस्व राहत असल्यामुळे संबंधित विषय आधी घ्यावे लागले.

**जाती जमातींची माहिती** – गेल्या शतकात व चालू शतकाच्या प्रारंभी अनेक पाश्चात्य संशोधकांनी भारतातील बहुसंख्य जाती-जमातींचे संशोधन करून मोठमोठे ग्रंथ लिहून ठेवले आहेत. अशा अनेक ग्रंथांचा उपयोग करून आम्ही जाती-जमातींची माहिती संकलित करून तिचा उपयोग केला आहे. पण त्यातली बरीच माहिती आता जुनी झाली आहे. कालमानाप्रमाणे बहुतेक जाती-जमातींच्या व्यवसायात, राहणीत व चाली-रीतींत पुष्कळ फरक पडले असणे शक्य आहे. पण त्यांची प्रत्यक्ष पहाणी करून त्यांच्याविषयी अद्ययावत माहिती मिळवणे आम्हाला शक्य झाले नाही. अर्थात प्रत्येक गोष्टीची समक्ष पाहणी करून एखादा ज्ञानकोश निर्माण करणे शक्यच नसते. त्याला उपलब्ध ग्रंथाच्या आधारेच आपला कार्यभाग साधावा लागतो. आम्हीही तेच आणि तसेच केले आहे.

मात्र शक्य होतील तेवढे अलिकडील ग्रंथ मिळवून आम्ही त्यांचा उपयोग केला आहे. इ. स. १९६१ च्या जनगणनेचे अहवाल आणि भारतातील अनेक जिल्ह्यांचे जिल्हानामे (गॅझेटिअर्स) यांचाही शक्य तेवढा उपयोग केला आहे.

गेले वर्ष दीड वर्ष भारतीय संस्कृतीकोशाचा तिसरा व चौथा हे खंड दुर्मिळ झाले होते. ग्राहकांना पुरता संच मिळत नव्हता. हे दुर्मिळ खंड पुनर्मुद्रित करावयाचे तर त्यासाठी लागणारी मदत मिळविण्यासाठी मला अनेक उदार दात्यांकडे याचना करण्यासाठी भ्रमंती करावी लागली असती, पण माझ्या उतारवयामुळे आणि शारीरिक दुर्बलतेमुळे मला हे काम सर्वथैव अशक्य होते. माझी ही परिस्थिती लक्षात घेऊन अनमोल प्रकाशनचे श्री. पद्माकर नांदुरकर, कलाभुवन पुणे या संस्थेचे श्री. ब. शं. दाते हे माझे मित्र कोशाचे हे खंडित झालेले काम पुढे चालवण्यासाठी माझ्या मदतीला आले आणि त्यांनी सर्व आर्थिक जबाबदारी उचलण्याचे ठरवून खंड तिसरा व चौथा पुनर्मुद्रित करण्याचे काम तडीला नेले. याच क्रमाने उर्वरित सर्व खंड संपतील तसतसे ते पुनर्मुद्रित करण्याचा मनोदयही त्यांनी व्यक्त केला आहे. तसेच लोकसंग्रह छापखाना (ऑफसेट) विभाग पुणे, या संस्थेचे श्री. का. ग. सोनार यांनी छपाईची जबाबदारी घेतली. त्यांच्या या उदार साहाय्याबद्दल मी कोश मंडळातर्फे त्यांचे हार्दिक आभार मानतो. वरील दोनही सद्गृहस्थांच्या या सहकार्यामुळे आता ग्राहकांना कोशाचा समग्र संच उपलब्ध होऊ शकेल.

सर्वांचा नम्र
**महादेवशास्त्री जोशी**
**संपादक व कार्यवाह**

# संदर्भ ग्रंथ संक्षेप

अं. यु. भा. — अंधकारयुगीन भारत, काशीप्रसाद जायस्वाल, १९५७.

अ. अ. — अभिधान अनुशीलन, विद्याभूषण विभु, १९५८.

अ. अ. र. — अक्षर अमर रहे, वाचस्पति गैरोला, १९५९.

अँ. अँ. रा. — Annals and Antiquities of Rajasthan, J. Tod.

अँ. इं. — Anthropology In India, Aiyyar Ratanam, 1961.

अँ. ओ. रि. म. व्हॉ. १६ — Annals of Oriental Research, University of Madras, Vol XVI 1959-60.

अ. च. को. — अर्वाचीन चरित्र कोश, सि. वि. चित्राव, १९४६.

अ. द. हिं. क. — अकबरी दरबारके हिंदी कवि, सरयूप्रसाद अग्रवाल, १९५१.

अँ. भा. ओ. रि. इं. — Annals of the Bhandarkar Oriental Research Institute, Poona 4.

अ. सा. — अपभ्रंश साहित्य, हरिवंश कोछड, १९५६.

अ. सु. अ. — अथर्ववेदाचा सुबोध अनुवाद, पं. सातवळेकर.

अ. स्क. म. ग. म्यु. — Amaravati Sculptures in the Madras Government Museum.

अ. हि. नॉ. इ. — Early History of North India, Sudhakar Chattopadhyaya, 1958.

आं. सा. इ. — आंध्रका सामाजिक इतिहास, सुरवरम प्रताप रेड्डी, अनु-आर्. वेंकटराव, १९५७.

आ. आ. दे. — आर्योंका आदिदेश, संपूर्णानंद, १९५७.

आँ. इ. ओ. कॉ. — Proceedings and Transactions of the All India Oriental Conference, Annamalainagar, 1955.

आ. फ. शि. — Agra and Fatehpur Sikri, Publications Division, Government of India, New Delhi, 1958.

आ. ब्रॉ. — Icons in Bronze, D. R. Thaper, 1961.

आ. भा. — आदिवासी भारत, योगेश अटल, १९६५.

आ. म. क. म. — आद्य मराठी कवयित्री महदंबा, संपा. वा. ना. देशपांडे.

आ. मा. आ. अ. — आपला मान-आपला अभिमान, यदुनाथ थत्ते, १९६१.

आ. सं. मू. — आर्य संस्कृतिके मूलाधार, बलदेव उपाध्याय.

इं. अँ. — Indian Antiquary.

इं. आ. (इ.) — Indian Architecture (Islamic Period), P. Brown.

इं. इं — Immortal India, J. H. Dave, 1957.

इं. गॅ. इं. — Imperial Gazetteer of India.

इं. त. शा. — Introduction to Tantra – Shastra, John Woodroffe, 1956.

इं. बु. इ. — The Indian Buddhist Iconography, Benoytosh Bhattacharya, 1958.

इं. वे. क. सू. — India of Vedic Kalpasutras, Ram Gopal 1959.

इं. सा. — Indian Sadhus, G. S. Ghurye, 1953.

इं. स्ट. पा. प्रे. — Indian Studies Past and Present, Calcutta.

उ. अ. — उपनिषदांचा अभ्यास, के. वि. वेलसरे, १९६५.

उ. प्र. लो. — उत्तर प्रदेशमें लोकनृत्य, भगवती शरण सिंह.

उ. भा. सं. प. — उत्तरी भारतकी संत परंपरा, परशुराम चतुर्वेदी, १९५२.

उ. यो. द. — उमेश योगदर्शन, उमेशचंद्रजी, अनु. प्रभाकर रानडे, १९५९.

उ. र. — उपनिषद्रहस्य, रा. द. रानडे, १९३८.

ऋ. आ. — ऋग्वेदिक आर्य, राहुल सांकृत्यायन, १९५७.

ऋ. द. — ऋग्वेद दर्शन, रा. गो. कोलंगडे, १९५४.

ऋ. ब्र. स. — ऋग्वेदीय ब्रह्मकर्म समुच्चय.

ऋ. वे. श्रे. — ऋषियोंके विज्ञानकी श्रेष्ठता, के. अ. पटवर्धन, १९५६.

ए. इं. – मजु. – Ancient India, R. C. Majumdar, 1960.

ए. के. हि. तु. — Ancient Karnatak, Vol–1, History of Tuluv, B. A. Saletore, 1936.

ए. द. १ — एकनाथ दर्शन, भाग १ ला प्रकाशक – एकनाथ संशोधन मंदिर, औरंगाबाद १९५२.

एन्सा. ब्रि. — Encyclopaedia Britanica.

एन्सा. मुंडा. — Encyclopaedia Mundarica, Haufman, 1950.

एन्सा. रि. — An Encyclopaedia of Relegion, Virgilius Ferm.

एन्सा. रि. ए. — Encyclopaedia of Religion and Ethics, James Hastings, 1955.

एन्सा. हिं. आ. — Encyclopaedia of Hindu Architecture, Prasannakumar Acharya, 1946.

एस्. इं. — Essays on Indology, Satyavrat Shastree, 1963.

ए. सि. ए. हिं. — The Educational System of the Ancient Hindus, S. K. Das, 1930.

ए. से. ए. इं. — Ethnic Settlements in Ancient India, Sashi Bhusan Chaudhari, 1955.

ए. हो. रा. — एक होता राजा, सरोजिनी वावर, १९६४.

ओ. इ. इं. — Original Inhabitants of India, G. Oppert.

ओ. नि. सं. — ओझा निबंध संग्रह, गौरीशंकर हीराचंद ओझा, १९५४.

ओ. स्प्रे. त. — Origin and Spread of the Tamils, V. R. Dixitar 1947.

क. अ. वि. प्र. — कदीम अग्रवाल विवाह प्रथा, किरणकुमारी, १९५४.

क. को. प्र. — कथा कोश प्रकरण, संपा.- जिनविजयमुनि, १९४९.

क. कौ. — कविता कौमुदी, रामनरेश त्रिपाठी, १९४६.

क. नृ. का. — कलचुरी नृपति आणि त्यांचा काळ, वा. वि. मिराशी, १९५६.

क. म. — Customs of Mankind, Lilian Eichler.

क. स. सा. — कथासरित्सागर (हिंदी रूपांतर) संपा. – विष्णु प्रभाकर, १९५९.

क. हिं. वा. पु. — Cultural History From The Vayu Purana, Devendrakumar Patil, 1946.

क. हे. इं. — Cultural Heritage of India, Sunitikumar Chatterji, 1958.

का. ट्रा. स. इं. — Castes and Tribes of Southern India, Thurston.

का. दे. सं. — काश्मीर : देश व संस्कृति, शिवदानसिंह चौहान, १९५०

कॉं. सा. हे. इं. — Contribution of South to the Heritage of India, Publications Division Govt. of India, 1963.

की. पॉ. — The Keys of Power, J. Abbot, 1932.

कृ. का. भ्र. — कृष्णकाव्य में भ्रमरगीत, श्यामसुंदरलाल दीक्षित, १९५८.

कृ. जो. ब्र. श. — कृषक जीवनसंबंधी व्रजभाषा शब्दावली, अम्बाप्रसाद 'सुमन', १९६०.

को. क. वे. बें. — The Koras and Some Little Known Communities of West Bengal, Amal Kumar Das, 1964.

कौ. अ. — कौटिलीय अर्थशास्त्र, देवदत्त शास्त्री, १९५७.

कौं. अ. प्र. — कौटिलीय अर्थशास्त्र प्रदीप, गो. गो. टिपनीस, १९२३.

क्रि. स्ट. ले. उ. — A Critical study of the Later Upanishadas, S. G. Desai.

खं. वै. — खंडहरोंका वैभव, मुनि कांतिसागर.

ग. लो. — गढवाली लोकगीत, गोविंद चातक, १९५६.

गां. गा. — गांवगाडा, त्रिंबक नारायण आत्रे, १९५९.

गा. दै. — गाजती दैवते, पं. महादेवशास्त्री जोशी, १९५९.

गॉं. नॉं. बु. — The Gods of Northern Budhism.

गा. पं. — गाथा पंचक, संपा.– त्र्यंबक हरी आवटे, १९०८.

गा. म. वि. — गायत्री महाविज्ञान, पं. श्रीराम शर्मा आचार्य, १९५९

गी. र. — गीतारहस्य, बा. गं. टिळक.

गु. सा. इ. — गुप्त साम्राज्यका इतिहास, वासुदेव उपाध्याय, १९३९.

गो. को. व्हॉं. — P. K. Gode Commemoration Volume, 1960.

गो. गौ. ब्रा. कु. — गोमंतकातील गौड सारस्वत ब्राह्मण आणि त्यांचे कुलदेव, वि. र. शेळडेकर.

गो. च. प. — श्रीगुरु गोरक्षनाथ चरित्र आणि परंपरा, रा. चिं. ढेरे, १९५९.

गो. ज. — Golden Germ, F. D. K. Bosch, 1960.

गो. तु. — गोस्वामी तुलसीदास, शिवनन्दन सहाय, १९६१.

गो. शु. इ. — गोमांतक शुद्धीचा इतिहास, शंकर धोंडो क्षीरसागर, १९३०.

ग्रा. सा. — ग्रामसाहित्य, संपा. –रमेश त्रिपाठी, १९५१.

ग्रे. वी. इं. — Great Women of India, Swami Madhavananda 1953.

ग्लो. उ. प्र. — Glories of Uttar Pradesh, Nandalal Chatterji, 1957

ग्लो. स्मृ. लि. — A Glossary of Smriti Literature, Sures Chandra Banerji, 1963.

चंपा. गॅझे. — Gazetteer of India, Champaran District, P. C. Roy Choudhury, 1960.

च. भा. नि. — चतुर्दश भाषा निबंधावली, बिहार राष्ट्रभाषा परिषद, १९५७.
च. व. चिं. — चतुर्वर्गचिन्तामणि.
चिं. न. च. — चिंतन के नये चरण, देवदत्त शास्त्री, १९६०.
चै. म. व्र. सा. — चैतन्य मत और व्रज साहित्य, प्रभुदयाल मीतल, १९६२.
ज. अँ. सो. — Journal of the Anthropological Society of Bombay.
ज. आं. हि. रि. सो. — Journal of the Andhra Historical Research Society.
ज. स्मा. ग्रं. — विहार जयंति स्मारक ग्रंथ, शिवपूजन सहाय, १९४२.
जा. का. भा. सं. — जातककालीन भारतीय संस्कृति, पंडित मोहनलाल महतो 'वियोगी,' १९५८.
जॉ. पु. — The Geography of the Puranas, S. Muzfer Ali, 1966.
जै. इ. — The Jain Iconography, B. C. Bhattacharya.
जै. क. — Jain Community– A Social Survey, V. A. Sangve, 1959.
जै. ध. — जैनधर्म, कैलाशचंद्र शास्त्री, १९५५.
जै. भ. पृ. — जैन भक्तिकाव्य की पृष्ठभूमि, प्रेमसागर जैन, १९६३.
जै. व्र. वि. सं. — जैनव्रत–विधान–संग्रह, वारेलाल जैन राजवैद्य, १९५२.
जै. सा. इ. — जैन साहित्य और इतिहास, नाथूराम प्रेमी, १९६३.
जै. सि. भा. — जैन सिद्धांत भास्कर, त्रैमासिक, प्रका. जैन–सिद्धान्त–भवन, आरा (बिहार)
टॉ. टॅ. — Totem and Taboo, Sigmund Freud, 1960.
टॅ. ली. आं. प्र. — Temples and Legends of Andhra Pradesh, N. Ramesan, 1962.
टॅ. ली. बि. — Temples and Legends of Bihar, P. C. Roy Chaudhury, 1965.
ट्रा. ए. इं. — Tribes in Ancient India, Editor– Bimal Churn Law, 1943.
ट्रा. का. बाँ. — Tribes and Castes of Bombay.
ट्रा. का. सें. प्रॉ. इं. — Tribes and Castes of the Central Provinces of India, R. V. Russel, Rai Bahadur Hiralal.
ट्रा. के. — Tribes of Keral, A. A. D. Luiz, 1962.
ट्रा. मि. ओ. — Tribal Myths of Orisa, Verrier Elwin, 1954.
ट्रा. ला. गु. — Tribal Life in Gujrat, P. G. Shah, 1964.
डा. इं. — Dance of India, Projesh Banerji, 1956.
डा. शि. — Dance of Shiv, Anand Coomaraswamy, 1952.
डि. इ. — Dictionary of Islam, T. P. Hughes, 1935.
डि. क्ला. सा. कॅ. — Depressed Classes of South Kanara, R. G. Kakade, 1949.
डि. सा. इं. म्यु. म्यु. — A Dictionary of South Indian Music and Musicians, P. Sambamoorthy.
डि. सिं. — A Dictionary of Symbols, J. E. Girlot, 1938.
डे. रि. सा. इं. — Development of Religion in South India, Nilakant Sastri, 1963.
डे. हिं. इ. — The Development of Hindu Iconography, Jitendra Nath Banarjee, 1956.
तं. स्ट. रि. लि — The Tantras : Studies on their Religion and Literature, Chintaharan Chakravarti, 1963.
त. उ. सा — तमिळ और उसका साहित्य, पूर्ण सोमसुंदरम.
त. ए. हं. इ. अँ. — The Tamils 1800 Years Ago, Kanaksabhe.
त. प्र. हिं. कृ.— आळवार भक्तोंका तमिलप्रबन्धम् और हिन्दी कृष्ण-काव्य, मलिक मोहम्मद, १९६४.
त. सा. सं.— तमिळ साहित्य और संस्कृति, अवधनंदन, १९५८.
तां. बौ सा. सा. — तांत्रिक बौद्ध साधना और साहित्य, नागेंद्रनाथ उपाध्याय, १९३९.
तां. वा. शा. दृ. — तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि, म. म. गोपीनाथ कविराज, १९६३.
तां. सा. — तांत्रिक साधना, माधव पुंडलिक पंडित, रूपांतर – देवदत्त, १९६४.
ती. म. — तीर्थरूप महाराष्ट्र– महादेवशास्त्री जोशी, १९५६.
तु. च. — तुकारामाचे चरित्र, पु. मं. लाड, १९५७.
तु. झा. क. — तुका झालासे कळस, रा. चिं. ढेरे, १९६०.
ते. उ. सा. — तेलुगु और उसका साहित्य, हनुमच्छास्त्री 'अयाचित'.
ते. वा. — तेलुगू वाङ्मय, परशा, १९३२.
त्रिचूर गॅझे. — Trichur District Gazetteer, A. Sreedhara Menon, 1952.
त्रि. दे. दै. — त्रिलिंग देशाची दैनंदिनी, कृष्णाकुमार, १९४३.
त्रि. लिं. — त्रिभुवनेश्वर लिंगराज, आनंदयात्री, १९६१.
द. आ. स्मा. — दत्तोपंत आपटे स्मारक ग्रंथ, संपा.–शं. ना. जोशी, १९४७.

द. दे. —— दक्षिणद्वार देवगिरी, बालशंकर देशपांडे, १९६१.
द. व. इं. —— Origin and Development of Dattatraya Worship in India, Hariprasad Shivaprasad Joshi, 1965.
दा. चं. —— दानचंद्रिका.
दे. ऋ. ब्रा. प. —— देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण परिचयग्रंथ, सि. वि. चित्राव, १९४४.
दे. भा. —— देवीभागवत, भाषांतरकार वा. गो. उपासनीशास्त्री, १९२६.
दे. मा. —— देवीमाहात्म्यम्, वासुदेव शरण अग्रवाल, १९६३.
दे. लि. स्व. वि. स. —— देवनागरी लिपी-स्वरूप, विकास और समस्याएँ, संपा — न. चि. जोगळेकर, भगवानदास तिवारी, १९६२.
द्र. गॉ. मॉ. हिं. —— Dravidian Gods in Modern Hinduism, W. T. Elmore.
ध. तं. शि. —— धन्वन्तरितन्त्रशिक्षा, कन्हैयालाल मिश्र, १९५३.
ध. शा. वि. —— धर्मशास्त्रविचार, पां. वां. काणे, १९३५.
ध. सिं. —— धर्मसिंधु.
धी. ब. गं. —— धीरे बहो गंगा, देवेंद्र सत्यार्थी, १९४८.
ध्या. सं. —— ध्यानसंप्रदाय, भरतसिंह उपाध्याय.
न. च. प. —— नरसिंह सरस्वती – चरित्र आणि परंपरा, रा. चिं. ढेरे, १९५८.
ना प्र. प. —— नागरी प्रचारिणी पत्रिका, नागरी प्रचारिणी सभा, काशी.
ना. भा. प. द. —— नाटचशास्त्रकी भारतीय परंपरा और दशरूपक, द्विवेदी, १९६३.
ना. सं. —— नाथ संप्रदाय, हजारीप्रसाद द्विवेदी, १९५०.
नि. उ. सा. —— निमाडी और उसका साहित्य, कृष्णलाल हंस, १९६०.
नि. सिं. —— निर्णयसिंधु.
ने. नॉ. इं. —— Natives of Northern India, W. Crooke, 1907.
न्या. को. —— न्यायकोश, भीमाचार्य झळकीकर, १९२८.
न्यू इं. अँ. —— New Indian Antiquary, Ed- Katre, Gode, Bombay.
पं. का. —— Punjab Castes, Denzil Ibbetson.
पं. जी. सा. —— पंजाब जीवन और साहित्य, मनसराम शर्मा, १९६१.
पं. ज्यो. —— पंचांगातील ज्योतिषशास्त्र, त्र्यं. गो. ढवळे, १९५८.
पं. हिं. सा. इ. —— पंजाब प्रांतीय हिन्दी साहित्यका इतिहास, चंद्रकांत बाली, १९६२.
प. का. भा. —— पतंजलिकालीन भारत, प्रभुदयाळ अग्निहोत्री, १९६२.
पा. का. भा. —— पाणिनिकालीन भारतवर्ष, वासुदेवशरण अग्रवाल, १९५५.
पॉ. रि. फो. नॉ. इं. —— Popular Religion and Folk-lore of Northern India, Crooke, 1894.
पा. वा. ते. भि. र. —— पाली वाङ्मयातील तेरा भिक्षुणी रत्ने, भागवत, १९५३.
पा. सा. इं. —— पालि साहित्यका इतिहास, भरतसिंह उपाध्याय, १९५१.
पी. के. गो. को. —— P. K. Gode Commemoration Volume, Ed.- Hariyappa, Patkar, 1960.
पु. इं. —— Purana Index, V. R. Ramachandra Dikshitar, 1955.
पु. चिं. —— पुरुषार्थ चिंतामणी.
पु. त. नि. —— पुरातत्त्व निबंधावली, राहुल सांकृत्यायन, १९३७.
पू. म. भा. —— पूर्व-मध्यकालीन भारत, वासुदेव उपाध्याय, १९५३.
पु. वि. —— पुराणविमर्श, बलदेव उपाध्याय, १९६५.
पे. पु. —— पेरिय पुराण.
पै. सा. रा. —— पैठणचे सातवाहन राजकुल, पं. वि. रानडे, १९६५.
पो. को. व्हॉ —— Prof. D. V. Potadar Commemoration Volume, 1950.
पो. वी. हिं. सि. —— Position of Women in Hindu Civilization, A. S. Altekar, 1956.
प्रा. च. को. —— प्राचीन चरित्र कोश, सि. वि. चित्राव, १९३२.
प्रा. पं. क. —— प्राचीन पंडित और कवि, महावीरप्रसाद द्विवेदी, १९२६.
प्रा. भा. अ. दं. —— प्राचीन भारतमें अपराध और दंड, हरिहरनाथ त्रिपाठी, १९६४.
प्रा. भा. न. न. जी. —— प्राचीन भारतमें नगर तथा नगर – जीवन, उदय नारायणराव, १९६५.
प्रा. भा. म. —— प्राचीन भारतीय मनोरंजन, मन्मथ राय, १९५७.
प्रा. भा. लो. —— प्राचीन भारतीय लोकधर्म, वासुदेवशरण अग्रवाल, १९६४.
प्रा. भा. वि. —— प्राचीन भारतीय विद्यापीठे, ना. गो. तवकर, १९५०.
प्रा. भा. व्या. —— प्राकृत भाषाओंका व्याकरण, पिशल व हेमचंद्र जोशी, १९५८.
प्रा. भा. शा. प. —— प्राचीन भारतीय शासनपद्धति, अ. स. अळतेकर, १९५१.
प्रा. भा. सं. —— प्राचीन भारतीय संस्कृति, स. का. दीक्षित, १९६०.
प्रा. भा. सां. —— प्राचीन भारतकी सांग्रामिकता, पं. रामदीन पांडेय, १९५७.
प्रा. भा. सां. कें. —— प्राचीन भारत के सांस्कृतिक केंद्र, सुखवीरसिंह गहलोत, १९५९.
प्रा. भा. हिं. का. —— प्राचीन भारत-हिंदु काल, राजबली पाण्डे.
प्रा. म. —— प्राचीन महाराष्ट्र, श्री. व्यं. केतकर, १९६३.

# भारतीय संस्कृतिकोश

## खंड चौथा

**तंत्रशास्त्र** ( तिसऱ्या खंडामधील अपूर्ण विषय पुढे चालू ) **तंत्राचार्य** – तंत्रग्रंथांची संख्या जशी अवाढव्य, तसेच तंत्रे रचणारे आचार्य किंवा गुरू हेही अगणित आहेत. त्या सर्वांची नावे सांगणे दुर्घट आहे. पण तंत्रसाहित्यात ज्यांनी मोलाची भर घातली व जे तंत्राचार्य म्हणून तांत्रिक संप्रदायात मान्यता पावले, त्यांची नावे व ग्रंथ पुढीलप्रमाणे –

गौडपादाचार्य – सुभगोदयस्तुती व श्रीविद्यारत्नसूत्र.
लक्ष्मणदेशिक – शारदातिलक, ताराप्रदीप, इ.
शंकराचार्य – प्रपंचसार, सौंदर्यलहरी, इ.
पृथ्वीधराचार्य – भुवनेश्वरीरहस्य.
चरणस्वामी – श्रीविद्यार्थदीपिका, प्रपंचसारसंग्रह, इ.
राघवभट्ट – शारदातिलकावर टीका.
पुण्यानंद – कामकलाविलास.
अमृतानंदनाथ – सौभाग्यसुभगोदय.
सुंदराचार्य – ललितार्चनचंद्रिका.
विद्यानंदनाथ – शिवार्चनचंद्रिका, क्रमरत्नावली, इ.
सर्वानंदनाथ – सर्वोल्लासतंत्र.
ब्रह्मानंद – शाक्तानंदतरंगिणी व ताराहस्य.
पूर्णानंद – श्रीतत्त्वचिंतामणी, श्यामारहस्य.
गोरक्ष – महार्थमंजरी, परास्तोत्र, पादुकोदय, इ.
सुभगानंद – षोडशनित्या.
प्रकाशानंद – विद्योपास्तिमहानिधी.
कृष्णानंद – तंत्रसार.
महीधर – पंचमहोदधी.
गौडीय शंकर – तारारहस्यवृत्ती व शिवार्चनमाहात्म्य.
भास्करराय – सौभाग्यभास्कर, सौभाग्यचंद्रोदय, इ.
प्रेमनिधी – अनेक टीकाग्रंथ व दीपप्रकाश.
उमानंद – हृदयामृत व नित्योत्सवनिबंध.
रामेश्वर – सौभाग्योदय.
शंकरानंद – सुंदरीमहोदय.
अप्पय्य दीक्षित – सौभाग्यकल्पद्रुम.
देवनाथ ठाकूर – सप्तकौमुदी, मंत्रकौमुदी, तंत्रकौमुदी, इ.
काशीनाथ तर्कालंकार अथवा शिवानंद – श्यामासपर्याविधी, तंत्रराजटीका, तंत्रसिद्धांतकौमुदी, मंत्रराजसमुच्चय, इ.
ग्रीवानेंद्र – प्रपंचसारसंग्रह.
रघुनाथ तर्कवागीश – आगमतत्त्वविलास.
यदुनाथ चक्रवर्ती – पंचरत्नाकर व आगमकल्पलता.
नरसिंह ठाकूर – ताराभक्तिसुधार्णव.
गोविंदन्यायवागीश – मंत्रार्थदीपिका.

**तांत्रिक देवता** – शैव, शाक्त, गाणपत्य, सौर, वैष्णव, इ. विविध संप्रदायांच्या तांत्रिक देवताही वेगवेगळ्या आहेत.

शैव तंत्रांत आदिनाथ महाकाल हा मुख्य आहे. वर्ण हिमगौर, चतुर्भुज, वरच्या दोन हाती परशू व हरिण, खालचे दोन हात वरद व अभय मुद्रेत, पंचमुख, त्रिनेत्र, मस्तकी चंद्रकला, कमलासन व भोवती शिवगण असे या आदिनाथ महाकालाचे तंत्रोक्त रूपवर्णन आहे. शैव तंत्रांत याला आदिदेव आणि विश्वबीज मानलेले आहे. या आदिदेव शिवाची विविध रूपेही पूज्य आहेत. त्यांतही क्षेत्रपाल व भैरव यांचे विशेष माहात्म्य आहे. तांत्रिक पूजेत मुख्य पूजेच्या आधी क्षेत्रपालाची पूजा आवश्यक असते. काही तंत्रांत या क्षेत्रपालाला भाताचा पिंड व मांसबलीही देण्यास सांगितले आहे. क्षेत्रपाल ही लोकदेवता आहे. बंगालमध्ये बायका क्षेत्रपालाची व्रतेही करतात. भैरवांची संख्या आठ सांगितलेली आहे. ते शिवस्वरूपी आणि शिवसदृशच आहेत. पंचाक्षरी किंवा षडक्षरी मंत्राने त्यांची पूजा होते. काही ठिकाणी भैरव हा कालीसह पूजिला जातो. बंगालमध्ये भैरवाचे वटुकभैरव हे रूप लोकप्रिय आहे.

गाणपत्य तंत्रांत महागणपती, विरिगणपती, शक्तिगणपती, विद्यागणपती, हरिद्रागणेश, उच्छिष्टगणेश, लक्ष्मीविनायक, हेरंब, वक्रतुंड, एकदंत, महोदर, गजानन, लंबोदर, विकट व विघ्नराज ही गणपतीची रूपे उपास्य ठरली आहेत (मेरुतंत्रप्रकाश). यांतली काही रूपे अभिचारकर्मासाठी उपासिली जातात. यांपैकी कित्येक गणपती त्यांच्या स्त्रियांसह रतिक्रीडेच्या अवस्थेत असतात. गणपतीचे वाहन उंदीर; पण हेरंबाचे सिंह आहे. महागणपतीच्या हाती रत्नकुंभ असतो. तो

आपल्या भक्तांवर रत्नवर्षाव करतो, अशी समजूत आहे. विरि-गणपतीच्या हाती मद्यपूर्ण नरकपाल असते.

सौर तांत्रिक देवतांत विशेषशी विविधता नाही. चंद्र, मार्तंड-भैरव आणि अग्नी हे तीन देव सूर्याशी संबंधित असतात. चंद्र हा नीलजटाधारी आहे. मार्तंड हा चतुर्मुख, त्रिनेत्र, अष्टभुज व कपालधारी असून, त्याच्या अर्धांगी त्याची स्त्री असते. अग्नी हा अष्टभुज व त्रिनेत्र असतो. सूर्य हा चतुर्भुज, कमलधारी व रक्तकमलावर अधिष्ठित असतो.

वैष्णव तंत्रांत विष्णूचे अनेक अवतार व अनेक रूपे या देवता ठरल्या आहेत. शारदातिलक आणि तंत्रसार या ग्रंथांत त्यांचे तपशीलवार वर्णन आलेले आहे. लक्ष्मीवासुदेव किंवा लक्ष्मी-नारायण हे वैष्णव तंत्रांतले विष्णूचे प्रमुख रूप होय. हरिहर-रूपही त्या खालोखाल प्रचलित आहे. विष्णूच्या अवतारांपैकी नृसिंह, राम व कृष्ण हे विशेष रूढ आहेत. याशिवाय पुढील रूपेही पूज्य मानलेली आहेत —

दधिवामन — याच्या हातात दोन सुवर्णकुंभ असतात. एकात शुद्ध जल आणि दुसऱ्यात दहीभात असतो.

हयग्रीव — धड मानवाचे व शिर घोड्याचे असे हे रूप आहे याच्या वरच्या दोन हातांत रथचक्र व शंख असतात; तर खालचे दोन हात ढोपरावर ठेवलेले असतात.

गोपालकृष्ण—हा वृंदावनाच्या पार्श्वभूमीवर गोप-गोपींच्या घोळक्यात असतो. एका गोपीने याला आलिंगन दिलेले असते. द्वारकेच्या पार्श्वभूमीवर हाच अष्टनायिकांसह असतो.

शाक्त तंत्रात विद्या व नित्या असे देवतांचे दोन प्रमुख प्रकार मानलेले आहेत. मुंडमाला तंत्रांत विद्यादेवतांची अर्थात दश महाविद्यांची नावे सांगितली आहेत, ती अशी —

**काली तारा महाविद्या षोडशी भुवनेश्वरी ।**
**भैरवी छिन्नमस्ता च विद्या धूमावती तथा ।।**
**बगला सिद्धविद्या च मातङ्गी कमलात्मिका ।**
**एता दश महाविद्याः सिद्धविद्याः प्रकीर्तिताः ।।**

दुसऱ्या एका ठिकाणी या विद्यादेवतांची संख्या २७ मानलेली आहे.

नित्या नामक १६ देवतांची नावे नित्याषोडशिकार्णव या ग्रंथात सांगितली आहेत, ती अशी—

**तत्रादौ प्रथमा नित्या महात्रिपुरसुन्दरी ।**
**ततः कामेश्वरी नित्या नित्या च भगमालिनी ।।**
**नित्या क्लिन्नाभिधा नित्या भेरुण्डा वह्निवासिनी ।**
**महाविद्येश्वरी दूती त्वरिता कुलसुन्दरी ।।**
**नित्या नीलपताका च विजया सर्वमङ्गला ।**
**ज्वालामालिनिका चित्रेत्येव नित्यास्तु षोडश ।।**

शाक्त तंत्रात कालीचे अनेक भेद सांगितले आहेत. दक्षिणा-काली, भद्रकाली, स्मशानकाली, क्रामकलाकाली, धनकाली, सिद्धकाली, चंडीकाली, इ. त्यांची नावे आहेत. विद्यादेवतांपैकी त्रिपुरा या प्रमुख देवतेचीही बाला, पंचदशी, षोडशी, षट्संभव-परमेश्वरी, इ. विविध रूपे आहेत.

शाक्त तंत्रात कुमारीपूजेलाही महत्त्व असते. कुमारी म्हणजे सर्व शक्तिदेवतांचे मूर्त रूप होय. तिच्या पूजेमुळे पूजकाचे कल्याण होते व तिची पूजा न केल्यास देवीच्या पूजेचे फल मिळत नाही, असे अन्वयव्यतिरेकाने सांगितले आहे. प्राणतो-षिणी तंत्रात कुमारीविषयी पुढील श्लोक लिहिला आहे —

**देवीबुद्ध्या महाभक्तस्तस्मात्तां परिपूजयेत् ।**
**सर्वविद्यास्वरूपा हि कुमारी नात्र संशयः ।।**

अर्थ — म्हणून महाभक्ताने देवीबुद्धी धारण करून कुमारीची पूजा करावी. कुमारी ही सर्वविद्यास्वरूप आहे, यात संशय नाही.

विविध आधिभौतिक व आध्यात्मिक शक्तींच्या प्राप्तीसाठी शक्तिदेवतेच्या या विविध रूपांची उपासना करतात. या सर्व शक्तिदेवता म्हणजे आदिशक्तीने विश्वाच्या उत्पत्ति-स्थिति-लय या प्रक्रिया चालू असताना किंवा दैत्यनिर्दालनासाठी धारण केलेली विविध रूपे होत.

**जैन तंत्रे** — जैन धर्म हा निवृत्तिवादी असल्यामुळे त्या धर्मात तांत्रिक साधनेची शक्यता नव्हती. परंतु तरीही मंत्रसाधनेच्या द्वारा चमत्कार दाखविण्याची प्रवृत्ती जैन धर्मात हळूहळू बळा-वली आणि त्यासाठी अनेक देवदेवतांची उपासनाही रूढ झाली. या देवींना तीर्थंकरांच्या सेविका मानल्यामुळे तीर्थंकरांचा मान राखला गेला आणि मंत्रसाधनेचीही सोय होऊ शकली.

जैन तांत्रिकही शक्तिसिद्धान्त मानतात. प्रत्येक पदार्थात शक्ती आहे आणि आत्मा अक्षय व अपरिमित शक्तीचा कोश आहे. मनुष्याच्या विचारातही अद्‌भुत शक्ती आहे. जर ध्यानाच्या द्वारा ती शक्ती विकसित केली, तर तिच्या बळावर अद्‌भुत कृत्ये करता करविता येतात. कोणत्याही देव-देवतेचे अथवा वस्तूचे ध्यान केले असता, ती देवता अथवा वस्तू मनात मूर्तरूप होते आणि मग त्या मनोमय मूर्तीतून शक्तीचा प्रवाह उत्पन्न होतो, असे जैन तांत्रिकांचे मत आहे.

जैन तांत्रिक हे शाक्त आणि शैव तांत्रिकांप्रमाणे सर्वात्म-वादी नाहीत; पण त्यांनी मानवाच्या मानसिक शक्तींचे विश्लेषण करून तंत्रसाधनेच्या द्वारा त्या शक्ती विकसित करण्याचा प्रयत्न केला आहे. विचाराचा भावाशी संगम झाल्यास तो अधिक शक्तिशाली आणि व्यापक बनतो, याचेही भान त्यांना होते. त्यामुळेच जैन साधकांनी देवीच्या उपासनेत ध्यान, विचार व भाव या तीन गोष्टींवर भर दिला आहे.

जैन तंत्र आणि अन्य तंत्रे यांत अनेक गोष्टी समान आहेत. उभय तंत्रांत भक्तीवर भर दिलेला असून, जाती आणि लिंग यांचा भेद मानलेला नाही. याशिवाय आचारक्षेत्रातील गुरूचे माहात्म्य, मंत्र, बीज, यंत्र, मुद्रा, न्यास, भूतशुद्धी, कुंडलिनीयोग, मंदिरनिर्मिती, मूर्तिनिर्मिती, चर्या, उत्सव, इ. बाबी इतर तंत्रांप्रमाणेच जैन तंत्रातही आहेत. मात्र जैन तंत्रात पंच मकारांचा प्रयोग तेवढा सर्वस्वी वर्ज्य मानलेला आहे. त्या दृष्टीने जैन तांत्रिक हे दक्षिणमार्गी आहेत. मात्र काही चैत्यवासी साधकांत गुप्त रूपाने गुह्यसाधनेचे प्रयोग चालत असावे, असे मानण्यास आधार आहे.

आत्यंतिक वैराग्याच्या द्वारा कैवल्य प्राप्त करणाऱ्या तीर्थंकरांना जैन धर्मात दिव्ययोगी म्हणतात, तर तंत्रसाधनेच्या द्वारा सिद्धी आणि भुक्ती प्राप्त करणाऱ्या चैत्यवासियांना मुक्तियोगी म्हणतात. दिव्ययोगी पूर्ण अभौतिक अशी दिव्य आनंदाची अवस्था प्राप्त करतो, तर मुक्तियोग्याला दिव्यानंदाचे केवळ ओझरते दर्शन घडते.

जैन परंपरेनुसार जैन तंत्राची प्राचीनता पार्श्वनाथाच्या काळाइतकी मागे जाते. जैनांच्या 'पूर्व' ग्रंथांपैकी विद्यानुप्रवाद नामक ग्रंथात मंत्र आणि विद्या यांची चर्चा आहे. हा ग्रंथ पार्श्वनाथकालीन मानला जातो. जैन मंत्रसाधकांत पार्श्वनाथाच्या पूजेला विशेष स्थान आहे, ते यामुळेच. भद्रबाहूने स्मरणमंत्राच्याद्वारा पार्श्वनाथाचे आवाहन केले होते. भद्रबाहू हा जैन तंत्रसाधनेच्या आद्याचार्यांपैकी एक मानला जातो.

इ. स. च्या पहिल्या शतकापासून जैन मंत्रसाधकांच्या चमत्कारकथा प्रसृत व्हायला प्रारंभ झालेला दिसतो. इ. स. च्या तिसऱ्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत मानवदेवसूरी (लघुशांतिमंत्र), वादिवैताल शांतिसूरी (बृहत् शांतिमंत्र), सिद्धसेन दिवाकर, मानतुंगसूरी (भक्तामरस्तोत्र), हरिभद्रसूरी, सीलगुणसूरी, बापाभट्टिसूरी, वीरमणी, शांतिसूरी आणि सुराचार्य या जैन तंत्राचार्यांनी मंत्रविद्येचा प्रचार केला.

इ. स. च्या अकराव्या शतकानंतर यशोभद्रसूरी, अभयदेव, वीराचार्य, जिनदत्त, वादिदेव, मलयगिरी, सागरचंद्र, धर्मघोष, पूर्णकलशगणी, जिनप्रभ, मेरुतुंगसूरी, जिनचंद्र, शांतिचंद्र, यशोविजय, मेघाविजय, वीरविजय, इ. जैन मंत्रज्ञ होऊन गेले. आधुनिक काळात मोहनलाल, शांतिविजय आणि जयसिंहसूरी यांची नावे विशेष उल्लेखनीय आहेत.

जैन तांत्रिकांचे सर्व बीजमंत्र ह्‍ या अक्षराने सुरू होत असल्यामुळे जैन तंत्रमताला ह्रादीमत म्हणतात. त्यांच्या सर्व मंत्रांत परमेष्ठीमंत्र हा पवित्रतम मानला जातो. याला जैन तंत्रपरंपरेत गायत्री मंत्राची प्रतिष्ठा लाभली आहे. जैन मंत्रांत सरस्वतीच्या मंत्रांची संख्या सर्वांत जास्त आहे.

जैनांच्या तांत्रिक देवता पुढीलप्रमाणे आहेत – सरस्वती, अंबिका, कुबेरा, पद्मावती, सिद्धायिका, इंद्राणी, विधिप्रभा, अक्षुप्ता आणि चक्रेश्वरी. यांतली चक्रेश्वरी परमेष्ठी मंत्राशी संबंधित आहे. पद्मावतीचा संबंध पार्श्वनाथाशी असून, सिद्धायिका ही महावीराशी संबंधित मानली जाते. दिगंबर जैन तांत्रिकांत ज्वाला, मालिनी आणि महाज्वाला या देवतांचे माहात्म्य विशेष आहे.

इ. स. च्या अकराव्या शतकात मल्लिश्रेणिसूरीने रचलेल्या 'भैरवपद्मावतीकल्प' या ग्रंथात जैन तंत्राचे जे स्वरूप प्रकट झाले आहे, ते बह्वंशी जैनेतर तंत्रमार्गांशी जुळणारे आहे. या काळातल्या जैन तंत्रग्रंथांतल्या मंत्रांचे स्वरूपही अन्य तंत्रमार्गियांच्या मंत्रांसारखेच आहे.

जैन तंत्रात अभिचारावर अधिक भर दिसतो. याला अपवाद इ. स. च्या बाराव्या शतकातला प्रसिद्ध जैन ग्रंथकार हेमचंद्र याच्या योगशास्त्राचा. त्याने ध्यानप्रक्रियेचे आणि हठयोगाचे गंभीर वर्णन केले आहे. तसेच रामसिंह, देवसेन आणि जोइंदू या तीन जैन सिद्धांच्या ग्रंथांतही अनेक श्रेष्ठ विचार आणि गूढ आध्यात्मिक अनुभव व्यक्त झालेले आहेत. त्यांच्या ग्रंथांचा हिंदी संतसाहित्यावर विशेष प्रभाव पडलेला दिसतो.

**बौद्ध तंत्रे** – बौद्ध धर्मात तांत्रिक तत्त्वांचा विकास होण्याची दोन कारणे दिसतात– (१) बौद्ध धर्मातील कठोर साधनेविरुद्ध सहज जीवनाची प्रतिक्रिया आणि (२) अलौकिक शक्तींच्या प्रदर्शनाचा मोह. यांतील पहिले कारण सिद्धांत आणि साधना यांच्या व्यावहारिकतेशी संबद्ध असून, दुसरे कारण धर्माचा प्रचार आणि प्रभाववृद्धी यांच्याशी संबद्ध आहे.

बौद्ध साधना कठीण असल्यामुळे भिक्षुसंघाच्या विकासाबरोबरच संघजीवनात गुह्यसमाज या नावाने गुप्त संघटना सुरू झाल्या आणि त्या संघटनांनी निर्वाणप्राप्तीसाठी भोगमय जीवनाचा स्वीकार केला. त्याबरोबरच काही बौद्ध आचार्य लोकांना आकर्षित करण्यासाठी आणि आपला वैयक्तिक महिमा वाढविण्यासाठी लोकोत्तर शक्तींचे प्रदर्शनही करू लागले.

डॉ. विनयतोष भट्टाचार्य यांच्या मते स्वतः गौतम बुद्ध हाही तांत्रिक तत्त्वांचा पुरस्कर्ता होता. बुद्धाने इद्धींची (सिद्धींची) प्राप्ती करून घेणे उचित आहे, असे सांगून त्यांच्या प्रदर्शनाला तेवढा विरोध केला होता, असे साधनमालेवरून दिसते. तत्त्वसंग्रहाचा कर्ता शांतरक्षित आणि टीकाकार कमलशील यांनी स्पष्टपणे बुद्धाला तंत्रप्रवर्तक म्हटले आहे.

सैद्धान्तिक दृष्टचाही बुद्धाची विचारपद्धती विशिष्ट मर्यादिपर्यंत रहस्यमय होती. त्याने अनेक प्रश्नांची उत्तरे मौनानेच

दिली आहेत. या मौनातून बौद्ध मताला सर्वस्वी विरोधी अशा मतांचा आविष्कार महायानपंथियांनी केलेला दिसतो. त्यांनी बुद्धजीवनाचे गृहत्यागापूर्वीचे भोगमय जीवन आणि नंतरचे भिक्षुजीवन असे दोन भाग केले आणि दोन्ही भाग भावी भिक्षूंना दोन दृष्टींनी आदर्शवत मानले. तांत्रिकांनी बुद्धाच्या कपिलवस्तूमधील भोगमय जीवनाचे तात्त्विक समर्थन करून आपल्या मार्गाला अधिष्ठान म्हणून त्याचा उपयोग केला.

इ. स. च्या प्रारंभीच्या कालात बौद्ध साहित्यात तांत्रिक तत्त्वांची विशेष चर्चा सुरू झालेली दिसते. बौद्ध तंत्रमार्गाच्या अनेक अंगांचे विवरण करणारा पहिला महत्त्वपूर्ण ग्रंथ मंजूश्रीमूलकल्प हा होय. हा ग्रंथ शाक्यमुनी आणि मंजूश्री यांच्या संवादातून प्रकट झाला आहे. त्यात मंत्रसाधना, यक्ष–यक्षिणी, साधनेतील स्त्रीचे महत्त्व, मुद्रा, मंडल, अभिषेक, अभिचार, इ. बाबींचे विवेचन आहे. या ग्रंथातील अनेक उल्लेखांवरून हे स्पष्ट दिसते, की बौद्ध तंत्रावर प्रारंभापासूनच शैव प्रभाव होता.. बौद्ध तांत्रिकांनी विष्णू आणि रुद्र या दोन्ही देवांचा स्वीकार केलेला आहे. या ग्रंथात शाक्यमुनीने स्पष्टपणे म्हटले आहे, की 'पूर्वकल्पांमध्यें शिवाने ज्या मार्गाचा उपदेश केला आहे, त्याचाच उपदेश मी करीत आहे. वस्तुतः शैव तंत्रांतही माझाच उपदेश ग्रथित आहे.'

मंजूश्रीमूलकल्प, सद्धर्मपुंडरीक, इ. आद्य तांत्रिक ग्रंथांनंतरचा महत्त्वपूर्ण तांत्रिक ग्रंथ म्हणजे तथागतगुह्यकतंत्र अथवा गुह्यसमाजतंत्र हा होय. इ. स. च्या चौथ्या शतकापूर्वी हा ग्रंथ तयार झाला. या ग्रंथात शून्यवाद आणि विज्ञान यांच्या अधिष्ठानावर तांत्रिक बौद्धमताचे स्वरूप निश्चित केलेले दिसते. यानंतर या परंपरेत अनेक शास्त्रकार झाले. त्यांनी शेकडो ग्रंथ निर्माण करून तंत्रसाधनेच्या अंगोपांगांचे सूक्ष्म विवरण केले. पुढे या बौद्ध साधकांत काही तात्त्विक व आचारात्मक भेद प्रबल झाले व त्यातून वज्रयान, सहजयान, कालचक्रयान, इ. तंत्रसंप्रदाय उत्पन्न झाले. इ. स. १००० च्या आगेमागे उदयाला आलेल्या सिद्धांच्या आणि नाथांच्या आचारमार्गावर, तसेच तदुत्तरकालीन संतांच्या मतांवरही बौद्धांच्या विविध तंत्रसंप्रदायांनी विलक्षण प्रभाव गाजविला आहे.

बौद्ध तांत्रिकांनी रचलेली तंत्रे अनेक आहेत. हिंदू तंत्रे जशी शिवोक्त समजली जातात, तशी बौद्ध तंत्रे बुद्धोक्त समजली जातात. बौद्ध तंत्रे संस्कृत भाषेतच रचलेली आहेत. बौद्ध तंत्रांतील प्रमुख तंत्रांची नावे अशी –

प्रमोदमहायुग, परमार्थसेवा, पिंडीक्रम, संपुटोद्भव, हेवज्र, बुद्धकपाल, संबर अथवा संबरोदय, वाराही अथवा वाराहीकल्प, योगांबर डाकिनीजाल, शक्लयमारी, कृष्णयमारी, पीतयमारी, रक्तयमारी, श्यामयमारी, क्रियासंग्रह, क्रियाकंद, क्रियासागर, क्रियाकल्पद्रुम, क्रियार्णव, अभिधानोत्तर, क्रियासमुच्चय, साधनमाला, साधनसमुच्चय, साधनसंग्रह, साधनरत्न, साधनपरीक्षा, साधनकल्पलता, तत्त्वज्ञान, ज्ञानसिद्धी, गुह्यसिद्धी, उड्यान, नागार्जुन, योगपीठ, पीठावतार, कालवीर अथवा चंडरोषण, वज्रवीर, वज्रसत्त्व, मरीची, तारा, वज्रधातू, विमलप्रभा, माणिकर्णिका, त्रैलोक्यविजय, संपुट, मर्मकालिका, कुरुकुल्ला, भूतडामर, कालचक्र, योगिनी, योगिनीसंचार, योगिनीजाल, योगांबरपीठ, उड्डामर, वसुंधरासाधन, नैरात्म, डाकार्णव, क्रियासार, यमांतक, मंजुश्री, तंत्रसमुच्चय, क्रियावसंत, हयग्रीव, संकीर्ण, नामसंगीती, अमृतकर्णिकानामसंगीती, गूढोत्पादनामसंगीती, मायाजाल, ज्ञानोदय, वसंततिलक, निष्पन्नयोगांबर आणि महाकाल.

याशिवाय हिंदू तांत्रिकांच्या कवचांप्रमाणे बौद्ध तांत्रिकांचे असंख्य धारणीसंग्रह आहेत. बौद्ध तंत्रांपैकी बहुतेकांचा चिनी आणि तिबेटी भाषांत अनुवाद झालेला आहे.

**तंत्रसाधनेची मूलतत्त्वे** – तंत्रशास्त्र हे वास्तवात एक साधनशास्त्र आहे. तंत्रातही अनेक संप्रदाय आहेत. त्यांच्या आचारपद्धतीतही बरेच भिन्नत्व आहे. मात्र सर्व संप्रदायांनी कोरड्या शास्त्रचर्चेपेक्षा प्रत्यक्ष साधनेलाच महत्त्व दिलेले आहे. प्रत्येक संप्रदाय हा मानवप्रकृती लक्षात घेऊन तदनुसार आपापल्या साधनेचे रूपपरिवर्तन करताना आढळतो. त्यामुळे तंत्रशास्त्र हे अनेक दालने व अनेक मजले असलेले असे एक विशाल भवनच बनले आहे. मात्र असे असले, तरी तांत्रिक साधनेची काही मूलतत्त्वे सर्व संप्रदायात समान आहेत. गुरू, मंत्र व देवता, ही ती तीन मूलतत्त्वे होत.

गुरू – साधकाला सर्वप्रथम कशाची मुख्य आवश्यकता असेल तर ती गुरूची. तंत्रसाधनेचा सर्वश्रेष्ठ गुरू म्हणजे आदिनाथ शंकर हा होय. पण सर्व साधकांना साक्षात त्या गुरूचा लाभ होणे दुष्कर. म्हणून तंत्रशास्त्रात मानवी गुरूला शंकराचा पृथ्वीवरचा प्रतिनिधी अथवा आविष्कार मानले आहे. आदिनाथ महाकाल हा मानवी गुरूत प्रवेश करून त्याच्या मुखाने साधकाला उपदेश करतो, अशी तांत्रिकांची धारणा आहे. याविषयी योगिनीतंत्रांत म्हटले आहे, ते असे –

मन्त्रप्रदानकाले हि मानुषे नगनन्दिनि ।
अधिष्ठानं भवेत्तत्र महाकालस्य शङ्करि ॥

अर्थ – ( शिव म्हणतो ) हे पार्वती, साधकाला मंत्रप्रदान करण्याच्या वेळी मानवी गुरूच्या ठिकाणी महाकालाचे अधिष्ठान असते.

गुरू हे दीक्षेचे मूळ, दीक्षा हे मंत्राचे मूळ, मंत्र हे देवतेचे

मूळ आणि देवता हे सिद्धीचे मूळ अशी ही सोपानपरंपरा आहे. या परंपरेत गुरू पहिला येतो. हा गुरू केवळ आगमादी शास्त्रे जाणणारा असूनच चालत नाही; तर तो योगमार्गी, साक्षात्कारी आणि आपली साक्षात्करणशक्ती शिष्याला देण्याचे सामर्थ्य असलेला असा हवा. असा गुरू भेटला, की साधकाने मार्गदर्शनासाठी आणि सिद्धिलाभासाठीही त्याच्यावर निर्भर राहावे. गुरू हा दीक्षार्थी साधकाची प्रकृती आणि त्याच्यावरचे संस्कार यांचा सूक्ष्म अभ्यास करून त्याला कोणती साधना योग्य होईल ते ठरवतो. तदनुसार त्याला इष्ट देवतेचा मंत्र सांगतो. तंत्रशास्त्रात स्त्रीलाही गुरू व्हायला हरकत नसते. साधकाला तिनेही मंत्रदीक्षा दिली तरी चालते.

तंत्रशास्त्र सांगते, की शिष्याने गुरूला भगवत्स्वरूप मानावे आणि तो ईश्वर आणि ईश्वरी शक्ती यांचा प्रतिनिधी आहे, असे समजावे. गुरूच्या माध्यमातूनच आपल्यावर भगवत्कृपा होईल अशी श्रद्धा ठेवावी. गुरूला माता, पिता व परब्रह्म मानून त्याचा आदर करावा. गुरूला कधीही क्रोध येऊ देऊ नये. गरू हा शिवाच्या क्रोधापासून साधकाचे रक्षण करू शकतो; पण गरूच्या क्रोधापासून मात्र कोणीही रक्षण करू शकत नाही.

शुद्ध वंश, शुद्ध आत्मा आणि पुरुषार्थी वृत्ती हे शिष्याचे प्रमुख गुण आहेत. चित्तशुद्धी झालेला आणि इंद्रियांवर विजय मिळवलेला शिष्य हाच श्रेष्ठ साधक समजावा. कामुकता, परदारगमन, पापकर्मांकडे प्रवृत्ती इ. दोषांनी युक्त असलेला शिष्य दीक्षा घेण्याला निरुपयोगी होय. गुरूने अशा साधकाला जवळ करू नये. एकदा दीक्षा दिल्यानंतर मग गुरूने शिष्याला आपल्या जीवनाचाच एक भाग मानावे, साधनयात्रेत त्याचे संरक्षण करावे, त्याचे ज्ञान उत्तरोत्तर विकसित करावे आणि त्याला सिद्धी प्राप्त होईपर्यंत कधीही मार्गभ्रष्ट व पराभूत होऊ देऊ नये.

काही तांत्रिक संप्रदायांत गुरू हा शिष्याला दीक्षेच्या वेळी सतत तीन दिवस आपल्या सन्निध ठेवून घेतो. तो जणू त्या कालात शिष्याला आपल्या गर्भात प्रविष्ट करतो आणि पुनश्च पुत्ररूपाने जन्म देतो. साधकाला सिद्धी प्राप्त होताच गुरुशिष्यातले द्वैत मावळते. मग शिष्याचे शिष्यपण आणि गुरूचे गुरुपणही सामरस्यात विलीन होते.

मंत्र —' मननात् त्रायत इति मन्त्रः ' (मननाने जो तारतो तो मंत्र होय) अशी मंत्र शब्दाची व्याख्या आहे. नाद किंवा ध्वनी हा सृष्टीचा आद्य स्पंद असून तोच पुढे सृष्टिरचनेच्या कार्यात अग्रेसर होतो, असे तांत्रिक मानतात. ध्वनी हा जीवाच्या चिच्छक्तीचाच एक सूक्ष्म भाग असतो. ज्याप्रमाणे आकाशात वायूच्या संचारामुळे ध्वनीच्या लाटा उत्पन्न होतात, त्याचप्रमाणे जीवाच्या देहात प्राणवायूच्या संचारामुळे ध्वनीच्या लाटा उत्पन्न होतात. या ध्वनीतून वर्णात्मक शब्द उत्पन्न होतो. त्यातूनच पुढे मंत्र निर्माण होतो. मंत्राच्या ठिकाणी अचिंत्य शक्ती वास्तव्य करते. प्रत्येक मंत्रात प्रणव, बीज व देवता अशी तीन तत्त्वे विहित असतात. प्रणवतत्त्वात भगवंताचे विश्वमय व विश्वातीत रहस्य साठवलेले असते. बीजतत्त्वाच्या योगाने आपले प्रकृत स्वरूप काय आहे, आपला व भगवंताचा संबंध कशा प्रकारचा आहे आणि आपल्या अंतरात कोणती अव्यक्त शक्ती व्यक्त होण्यासाठी प्रयत्न करीत आहे, हे कळून येते. देवतातत्त्वाच्या ज्ञानाने भगवंताची कोणती इच्छा आपल्या द्वारे सफल व्हायची आहे, ते कळते.

गुरू ज्या मंत्राची दीक्षा देतो, त्या मंत्राच्या जपाने इष्ट देवतेची सिद्धी होते. पूजा, पाठ, स्तव, होम, ध्यान, धारणा, समाधी व दीक्षामंत्र यांचा सिद्धिप्राप्ती हा एकच उद्देश असला, तरी दीक्षामंत्र हाच सर्वांत अधिक प्रभावी असतो. पूजापाठादिकांत साधकाची फक्त साधनशक्ती कार्यप्रवण होते, तर मंत्रदीक्षेत साधनशक्तीसह मंत्रशक्ती कार्यप्रवण होते. दीक्षाविधीच्या वेळी ज्या मंत्राचा साधकाला उपदेश केला जातो, तो सामान्यत्वे बीजमंत्र असतो. बीजमंत्राला नेहमीच्या भाषेत काही अर्थ नसतो; पण तो त्या विशिष्ट देवतेचे स्वरूपच असतो. ते बीज हृदयात पडताच वाढू लागते. मग त्याला संध्या, न्यास, इ. फांद्या फुटतात, स्तव व वंदना ही पानेफुले येतात आणि शेवटी सिद्धिरूप फल उत्पन्न होते.

मंत्र हे सौर व सौम्य, तसेच पुं, स्त्री व नपुंसक असे असतात. सौरमंत्र हे पुंलिंगी असून सौम्यमंत्र स्त्रीलिंगी असतात. ज्यांच्या अंती ' नमः ' असते, असे पौराणिक मंत्र नपुंसक होत. पुं व नपुंसक या मंत्रांना मंत्र म्हणतात; तर स्त्रीमंत्रांना विद्या म्हणतात. पुं मंत्रांच्या शेवटी हुं, फट् हे वर्ण येतात, तर स्त्री मंत्रांच्या शेवटी ठं, स्वाहा हे वर्ण येतात.

नित्या तंत्रात एकाक्षरी मंत्राला पिंड, द्व्यक्षरी मंत्राला कर्तरी, तीन ते नऊ अक्षरे असलेल्या मंत्राला बीज, दहा ते वीस अक्षरे असलेल्या मंत्राला मंत्र व विसापेक्षा जास्त अक्षरे असलेल्या मंत्राला माला अशी वेगवेगळी नावे दिलेली आहेत. मात्र सामान्यतः एकाक्षरी मंत्रालाच बीजमंत्र म्हटले जाते. प्रत्येक देवतेला स्वतःचे असे एक बीज असते; उदा० क्रीं हे कालीचे, ह्रीं हे मायेचे, रं अग्नीचे व ऐं योनीचे बीज होय. बीजाशिवाय प्रत्येक देवतेचा एक मूलमंत्रही असतो. मूल या शब्दाने त्या देवतेचा कामकलानामक सूक्ष्म देह सूचित होतो, असे काहीजण मानतात.

मंत्राचे पुरश्चरण करण्यापूर्वी साधकाला स्वतःच्या देहेंद्रियावर मुखशोधन, जिव्हाशोधन, अशौचभंग, कुल्लूक, निर्वाण,

सेतू, निद्राभंग व मंत्रजागरण हे संस्कार करावे लागतात. याशिवाय मंत्राचेही काही संस्कार असतात, ते वेगळेच.

या सर्वांत मंत्रार्थ व मंत्रचैतन्य या दोहोंना विशेष महत्त्व आहे. मंत्र हा अर्थावर ध्यान देऊन जपणे व तो अर्थ देहातल्या सर्व तत्त्वांच्या ठिकाणी संचालित करून संपूर्ण देह त्या अर्थाने भारून टाकणे म्हणजे मंत्रार्थ होय. मंत्र, मंत्राचा अर्थ व मंत्राची देवता या तीहींचे एकीकरण करणे, याला मंत्रचैतन्य म्हणतात.

**मन्त्रार्थं मन्त्रचैतन्यं यो न जानाति साधकः ।**
**शतलक्षप्रजप्तोऽपि तस्य मन्त्रो न सिद्धयति ।।**

अर्थ – जो साधक मंत्रार्थ व मंत्रचैतन्य जाणत नाही, त्याने त्या मंत्राचा शंभर लक्ष जप केला, तरी त्या जपाने त्याला सिद्धी प्राप्त होत नाही.

देवता – तंत्रशास्त्रात साधकाने देवतांशी संबंध जोडणे, त्यांचे आवाहन करणे आणि त्यांची मदत मिळवणे, या गोष्टींचा विविध प्रकारे विचार केलेला आहे. देवता या परमेश्वर किंवा परमेश्वरी यांच्या विशिष्ट शक्ती असतात. साधकाने त्यांच्याशी मंत्राच्या द्वारे संबंध प्रस्थापित करायचा असतो. सत्य, ज्ञान आणि आनंद यांच्याकडे जाण्यासाठी देवता या साधकाला साहाय्य करतात व साधकाची इच्छा असली, तर त्याला आद्याशक्तीच्या कृपाछत्राखाली नेऊन त्याला मुक्तही करतात. सर्व देवतोपासनेचा अंतिम उद्देश भगवंताच्या परमानंदस्वरूपाशी सायुज्य मिळवणे हाच असतो.

प्रत्येक देवतेला तिचे एक वेगळे स्वरूप असते. तिचे ध्यान, तिचा वर्ण व तिचे वाहन या गोष्टीही ठरलेल्या असतात. तिचा एक परिवारही असतो. एवंगुणविशिष्ट देवतास्वरूप हे साधकाच्या दिव्य दृष्टीचे उन्मीलन झाल्यानंतर त्याच्या प्रतीतीला येते. तंत्रशास्त्राच्या द्रष्ट्यांनी देवतेचे हे नाम–रूप–गुण स्वतःच्या दिव्य दृष्टीने जाणून नंतर साधकवर्गासाठी मूर्तिविज्ञान, मंत्रविज्ञान इत्यादींच्या द्वारे त्यांचे प्रतिपादन करून ठेवले आहे.

एतावता गुरू, मंत्र आणि देवता ही तांत्रिक साधनेची मूलतत्त्वे ठरतात. तंत्रशास्त्र म्हणते, की 'गुरुदेवतामन्त्राणामैक्यम्' (=गुरू, देवता आणि मंत्र ही तीनही मिळून एकच होत). म्हणून ज्ञानार्णवतंत्रात म्हटले आहे, ते असे—

**गुरौ मानुषबुद्धिस्तु मन्त्रे चाक्षरबुद्धिकम् ।**
**प्रतिमासु शिलाबुद्धिः कुर्वाणो नरकं व्रजेत् ।।**

अर्थ – गुरूच्या ठिकाणी मानुषबुद्धी, मंत्राच्या ठिकाणी अक्षरबुद्धी व प्रतिमांच्या ठिकाणी शिलाबुद्धी जो धारण करील, तो नरकाला जाईल.

भावत्रय – तंत्रमार्गात साधकाचे पशुभाव, वीरभाव आणि दिव्यभाव असे तीन भाव मानलेले आहेत. हे तीन भाव म्हणजे त्याच्या मनोवस्थाच होत. ज्या जीवाच्या ठिकाणी अविद्येचे आवरण दाट असते व जिथे अद्वैतज्ञानाचा लेशमात्रही उदय झालेला नसतो, त्या अवस्थेला पशुभाव म्हणतात. असे जीव पशूप्रमाणेच अज्ञानरज्जूच्या द्वारे संसारात बद्ध राहतात. ते सदा बहिर्मुख असतात. वासनाविकारांचा संयम करणे त्यांना जमतच नाही. म्हणून अशा साधकांना तामसिक म्हटले आहे. संसारमोहात गुंतून पडणारा तो अधम पशू व सत्कर्मपरायण असा भक्त तो उत्तम पशू होय.

ज्या जीवाला अद्वैतज्ञानाचा काही साक्षात्कार झाला आणि ज्याला त्या अद्वैतामृताच्या डोहातले बिंदुमात्र का होईना, अमृत चाखायला मिळाले, तो साधक पशुभावातून वीरभावात प्रविष्ट होतो. या भावातले साधक चंचल, उचंबळणारे, उग्र अतएव राजसिक असतात, असे म्हटले आहे.

वीरभाव पुष्ट झाल्याने द्वैतभाव दूर व्हायला मदत होते. मग तो साधक उपास्यदेवतेच्या अस्तित्वात आपले अस्तित्व विलीन करू शकतो. ही अवस्था दिव्यभावाची होय. या अवस्थेत साधकाला अद्वैतानंदाचा आस्वाद घेता येतो. असे साधक सुसंस्कृत व गंभीर असतात. बुद्धीच्या प्रकाशात ते आपला साधनमार्ग आक्रमितात. यांची प्रकृती सात्त्विक असते.

साधक ज्या भावाचा असेल, त्याला अनुसरून तंत्रमार्गातली उपासनापद्धतीही भिन्न असते. हे तीन भाव म्हणजे एक प्रकारे अधिकारभेदच समजावे.

**सात आचार** – तंत्रशास्त्रात सात प्रकारचे आचार सांगितले असून, ते उत्तरोत्तर श्रेष्ठ मानले आहेत. याविषयी एक श्लोक कुलार्णव तंत्रात आहे, तो असा –

**सर्वेभ्यश्चोत्तमा वेदा वेदेभ्यो वैष्णवं महत् ।**
**वैष्णवादुत्तमं शैवं शैवाद्दक्षिणमुत्तमम् ।।**
**दक्षिणादुत्तमं वामं वामात् सिद्धान्तमुत्तमम् ।**
**सिद्धान्तादुत्तमं कौलं कौलात् परतरं न हि ।।**

अर्थ – सर्वांत वेद अर्थात वेदाचार उत्तम. वेदाचारापेक्षा वैष्णवाचार, शैवाचार, दक्षिणाचार, वामाचार, सिद्धांताचार, कौलाचार हे क्रमाक्रमाने श्रेष्ठ होत. आणि कौलाचाराहून श्रेष्ठ असे काहीही नाही.

वेदाचाराचे वर्णन पुढीलप्रमाणे–

**वेदाचारं प्रवक्ष्यामि शृणु सर्वाङ्गसुन्दरि ।**
**ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय गुरुं नत्वा स्वनामभिः ।।**
**आनन्दनाथ शब्दान्तैं पूजयेदथ साधकः ।**
**सहस्रारम्बुजे ध्यात्वा उपचारैस्तु पञ्चभिः ।।**
**प्रजप्य वाग्भवं बीजं चिन्तयेत् परमां कलाम् ।।**

अर्थ – हे सर्वांगसुंदरी, मी तुला वेदाचार कथन करतो तो ऐक. ब्राह्ममुहूर्ती उठावे. स्वनामोच्चारपूर्वक गुरूला अभिवादन करावे. तसे करताना गुरूच्या नामापुढे आनंदनाथ हा शब्द लावावा. देवाची पंचोपचारांनी पूजा करावी. सहस्रार कमलात ध्यान करावे. वाग्भवबीजाचा जप करावा आणि परमकलारूप शक्तीचे चिंतन करावे.

वैष्णवाचाराचे वर्णन पुढीलप्रमाणे –

वेदाचारक्रमेणैव सदा नियमतत्परः ।
मैथुनं तत्कथालापं कदाचिन्नैव कारयेत् ।।
हिंसां निंदां च कौटिल्यं वर्जयेन्मांसभोजनम् ।
रात्रौ मालां च यन्त्रं च स्पृशेन्नैव कदाचन ।।

अर्थ – वेदाचारविधीप्रमाणेच सर्वदा नियमतत्पर असावे. मैथुन आणि सद्विषयक चर्चा कधीही करू नये. हिंसा, निंदा, कौटिल्य व मांसभोजन या गोष्टी वर्ज्य कराव्या. रात्रीच्या वेळी माला व यंत्र यांना कधीही स्पर्श करू नये.

शैवाचाराचे वर्णन पुढीलप्रमाणे –

वेदाचारक्रमेणैव शैवे शाक्ते व्यवस्थितम् ।
तद्विशेषं महादेवि ! केवलं पशुघातनम् ।।

अर्थ – शैव आणि शाक्त यांचे आचार वेदाचाराप्रमाणेच असतात. हे महादेवी, केवळ पशुहिंसा करणे एवढाच शैवाचाराचा विशेष आहे.

दक्षिणाचाराचे वर्णन पुढीलप्रमाणे –

वेदाचारक्रमेणैव पूजयेत् परमेश्वरीम् ।
स्वीकृत्य विजयां रात्रौ जपेन्मन्त्रमनन्यधीः ।।

अर्थ – दक्षिणाचारात वेदाचाराचाच क्रम स्वीकारायचा असतो. यात साधकाने परमेश्वरीची पूजा करावी व रात्री विजयेचे (भांग) सेवन करून अनन्य चित्ताने मंत्राचा जप करावा.

वामाचाराचे वर्णन पुढीलप्रमाणे –

पञ्चतत्त्वैः खपुष्पं च पूजयेत् कुलयोषितम् ।
वामाचारो भवेत् तत्र वामा भूत्वा यजेत् पराम् ।।

अर्थ – साधकाने पंच मकारांनी रजस्वलेचे रज व कुलस्त्री यांची पूजा करावी. असे केल्याने वामाचार होतो. ही पूजा आपण स्वतः वामा (शक्तिदेवता) आहो, या भावनेने करायची असते.

सिद्धांताचाराचे वर्णन पुढीलप्रमाणे –

देवपूजारतो नित्यं तथा विष्णुपरो दिवा ।
नक्तं द्रव्यादिकं सर्वं यथालाभेन चोत्तमम् ।।
विधिवत् क्रियते भक्त्या स सर्वं च फलं लभेत् ।।

अर्थ – साधकाने नित्य देवपूजारत असावे. दिवसा विष्णुपरायण राहावे. रात्री यथालाभ उत्तमद्रव्यांनी विधियुक्त आणि भक्तियुक्त अशी जो पूजा करतो, त्याला सर्व फलांचा लाभ होतो.

कौलाचाराचे वर्णन पुढीलप्रमाणे –

दिक्कालनियमो नास्ति तिथ्यादिनियमो न च ।
नियमो नास्ति देवेशि महामन्त्रस्य साधने ।।
क्वचित् शिष्टः क्वचित् भ्रष्टः क्वचित् भूतपिशाचवत् ।
नानावेशधराः कौला विचरन्ति महीतले ।।
कर्दमे चन्दनेऽभिन्नं मित्रे शत्रौ तथा प्रिये ।
श्मशाने भवने देवि तथैव काञ्चने तृणे ।
न भेदो यस्य देवेशि स कौलः परिकीर्तितः ।।

अर्थ – हे पार्वती, कौलाचाराला दिक्कालाचा, तिथ्यादिकांचा व महामंत्रसाधनेचाही नियम नाही. कधी शिष्ट, कधी भ्रष्ट तर कधी भूतपिशाचसमान असे नानावेषधारी कौल (साधक व सिद्ध) पृथ्वीतलावर संचार करतात. हे प्रिये, चिखल व चंदन, शत्रू व मित्र, स्मशान व गृह, तृण व सुवर्ण असले भेद ज्याच्या अंतरातून नष्ट झाले, त्याला कौल असे म्हटले आहे.

दीक्षा—तांत्रिक साधना करू इच्छिणाऱ्या साधकाला प्रथम गुरूकडून मंत्रदीक्षा घ्यावी लागते. शिष्याला दीक्षा देताना गुरूने प्रथम परात्पर गुरूची प्राणशक्ती आपल्या अंतरात अधिष्ठित करायची असते. दीक्षेच्या पूर्व दिवशी शिष्य गुरूपुढे कुशासनावर बसतो. गुरू त्याला सुप्त मंत्र कानात सांगतो आणि त्याचा शिखाबंध करतो. मग शिष्य त्या मंत्राचा जप करतो. शेवटी गुरूला साष्टांग प्रणाम करतो. दुसऱ्या दिवशी शुचिर्भूत होऊन तो पुढे आला, की गुरू योग्य अशा मंत्राचा त्याला उपदेश करतो व पुरश्चरणाचे आणि साधनेचे विधिनिषेधही सांगतो. मंत्रदीक्षेमुळे गुरूच्या अंतरातली दैवी शक्ती त्या मंत्राच्या द्वारे शिष्याच्या अंतरात संचरते.

काही तंत्रांत कित्येक मंत्र शूद्र आणि स्त्रिया यांच्यासाठी वर्ज्य मानले आहेत; पण काही तंत्रग्रंथांत शूद्रांनाही प्रणवसहित सर्व मंत्रांचा अधिकार दिलेला आहे. शूद्रांनी प्रणवाचा जप करायलाही हरकत नाही, पण त्यांनी तो मंत्राच्या आरंभी किंवा अंती एकदाच करावा, असे कालिका पुराणात सांगितले आहे. त्रैवर्णिकांना मात्र मंत्राच्या आद्यंती प्रणवाचा प्रयोग करण्याचा अधिकार आहे.

शिष्याला ज्या मंत्राची दीक्षा द्यायची तो मंत्र शिष्याच्या बाबतीत स्वकुल (अनुकूल) आहे का अकुल (प्रतिकूल) आहे, याचा प्रथम विचार करावा लागतो. त्यासाठी शिष्याच्या जन्मराशीचा कुलचक्रादी अनेक चक्रांशी मेळ घालून ती गोष्ट ठरवतात.

तंत्रसाधनेत दीक्षा ही साधकाला अपरिहार्य ठरवलेली

आहे. दीक्षेवाचून मंत्रजप, पूजा, होमहवन, इ. सर्व गोष्टी निष्फळ ठरतात. दीक्षेचेही सामान्य आणि विशेष असे दोन मूलभेद आहेत. सामान्य दीक्षेला समयदीक्षा आणि विशेष दीक्षेला निर्वाणदीक्षा म्हणतात. समयदीक्षेत गुरू आपल्या शिष्याला रुद्रपदाच्या ठिकाणी प्रयुक्त करतो. समयदीक्षा मिळाल्यावर साधकाला समयधर्माचे पालन करावे लागते. सिद्धांत–शैवमतात या समयधर्मपालनाला दासमार्ग असे म्हटले आहे. गुरुने आशीर्वादाच्या रूपात शिष्याच्या मस्तकावर शिवहस्त ठेवणे, हा समयदीक्षेचा मुख्य विधी आहे. ही दीक्षा श्रद्धा–भक्तियुक्त अशा कोणत्याही साधकाला देता येते. हीच दीक्षा तंत्रमार्गात सर्वत्र प्रचलित आहे. ही दीक्षा घेऊन समयधर्माचे पालन करणाऱ्या साधकाला मुक्ती मिळते; या जन्मी नाही मिळाली तरी, पुढच्या काही जन्मांत ती अवश्यमेव मिळते, असे शिवधर्मोत्तर तंत्रात सांगितले आहे.

शिष्याच्या अंतरात शक्तिपात झाल्यानंतर त्याला निर्वाण-दीक्षेचा अधिकार प्राप्त होतो. यात गुरू शिष्याला शिवपदाच्या ठिकाणी प्रयुक्त करतो. निर्वाणदीक्षेनंतर संन्यास घेण्याची व्यवस्था आहे. या दीक्षेच्या प्रभावाने शिष्याला सर्वज्ञत्व प्राप्त होते व त्याच्या अंतरात षाड्गुण्यादी भगवद्धर्माची अभिव्यक्ती होते.

निर्वाणदीक्षा ही सबीज व निर्बीज अशी उभयविध असते. सबीजदीक्षा ही कष्ट सोसण्यास समर्थ आणि विद्वान अशा साधकाला देतात. या दीक्षेत समयाचाराचे पालन आवश्यक असते. सबीजदीक्षेने साधकाला वागीश्वरीच्या गर्भात दुसरा जन्म मिळविण्याचा अधिकार प्राप्त होतो. याला अप्राकृत जन्म असे म्हणतात. आचार्य हाच हा द्वितीय जन्म देणारा पिता ठरतो. ही सबीजदीक्षा मिळणाऱ्या पुरुषाला पुत्रक असे म्हणतात. म्हणूनच या दीक्षेला पुत्रकदीक्षा किंवा आचार्यदीक्षा अशीही अन्य नावे आहेत.

निर्बीजदीक्षा ही बालक, मूर्ख, वृद्ध, स्त्री, व्याधिग्रस्त, इ. लोकांच्यासाठी सांगितली आहे. जे लोक शास्त्रविचारात कुशल नसतात, त्याचप्रमाणे व्रतचर्यादी क्लेश सोसण्यासही समर्थ नसतात, अशा सर्वांसाठी निर्बीज दीक्षा विहित आहे. या दीक्षेत समयधर्माच्या पालनाची आवश्यकता नसते. त्यांनी केवळ गुरूलाच परमेश्वर मानून त्याचीच भक्ती आणि सेवा करायची असते. या गुरुभक्तीनेच असे साधक संसार तरून जातात.

आगमग्रंथांत एकूण अकरा प्रकारच्या दीक्षा सांगितल्या आहेत, त्या अशा— कला, एकतत्त्व, त्रितत्त्व, पंचतत्त्व, नवतत्त्व, छत्तीसतत्त्व, पद, मंत्र, वर्ण, भुवन व केवलभुवन.

**अभिषेक**— दीक्षेच्या नंतर अभिषेकाचे स्थान येते. अभिषेक म्हणजे गुरूने शिष्याच्या मस्तकावर व शरीरावर जलसिंचन करणे. अभिषेकाचे पुढील आठ प्रकार उत्तरोत्तर श्रेष्ठ मानलेले आहेत—

**शाक्ताभिषेक**— या अभिषेकाच्या वेळी गुरू शिष्याला शक्तिरहस्य सांगतो. ते समजल्यामुळे साधकाला अंतरातल्या दुष्ट शक्तींचे निवारण करून साधनेला उपयुक्त ठरणाऱ्या नव्या शक्ती मिळविता येतात.

**पूर्णाभिषेक** — गुरूपदिष्ट मंत्राचे पुरश्चरण केल्यानंतर साधकाला या अभिषेकाची योग्यता प्राप्त होते. पुढील खडतर साधनेची प्रक्रिया इथूनच सुरू होते.

**क्रमदीक्षाभिषेक** — हा झाल्यावर साधनेची तीव्र अवस्था सुरू होते. या साधनेत यज्ञोपवीताची निवीती करायची असते. ही अवस्था चालू असता साधकाला निरनिराळ्या दिव्यांतून जावे लागते.

**साम्राज्याभिषेक व महासाम्राज्याभिषेक** — मागील अभिषेकातून सुरू केलेल्या साधनेत यश मिळविल्यानंतर हे अभिषेक क्रमाने होतात.

**योगदीक्षाभिषेक** — हा अभिषेक झाल्यावर साधक गुरूच्या मार्गदर्शनाखाली प्राणायामापासून समाधीपर्यंत पंचांग योगाची साधना करतो.

**पूर्णदीक्षाभिषेक व महापूर्णदीक्षाभिषेक** — हे दोन्ही अभिषेक साधनेची पूर्णता झाल्यावर केले जातात. मग तो साधक आपले जीवच्छ्राद्ध करतो. शिखा व यज्ञोपवीत यांची पूर्णाहुती देतो. या अवस्थेत आल्यावर साधक हा सिद्ध होतो. त्याला 'सोऽहं' ज्ञानाचा अनुभव घडतो. हिला जीवन्मुक्त अवस्था असे म्हटले आहे. या पदावर पोचताच गुरु-शिष्य हे नाते संपते व त्या दोघांचे श्रेष्ठ ज्ञानाच्या भूमिकेत सामरस्य होते.

**साधनाक्रम** — तंत्रशास्त्रात नित्य–नैमित्तिक साधना कशी करावी त्याचा बारीक सारीक खूप तपशील आहे. तो सगळाच विषय, जटिल आहे. त्याचे सामान्य विधान पुढीलप्रमाणे आहे—

ब्राह्ममुहूर्ती उठावे. सहस्रारचक्रात गुरूचे ध्यान करावे. त्याची मानसपूजा करावी. दहा किंवा शंभर वेळा 'ऐं' या बीजमंत्राचा जप करावा व जपफल गुरूला समर्पित करावे. मग पुढील मंत्राने गुरूला प्रणाम करावा —

भवपाशविनाशाय ज्ञानदृष्टिप्रदर्शिने ।
नमः सद्गुरवे तुभ्यं भुक्तिमुक्तिप्रदायिने ।।
नराकृतिपरब्रह्मरूपायाज्ञानहारिणे ।
कुलधर्मप्रकाशाय तस्मै श्रीगुरवे नमः ।।

अर्थ— भवपाश तोडणारा, ज्ञानदृष्टी देणारा व भुक्तिमुक्ति-

प्रदायक अशा हे सद्गुरो, तुला नमस्कार असो. अज्ञानहारक, नररूपानें (साक्षात्) परब्रह्मच व कुलधर्माचा प्रकाशक अशा त्या श्रीगुरूला नमस्कार असो.

मग इष्ट देवतेचे ध्यान व तिची मानसिक पूजा करावी. मलमंत्राचा जप करून जपफल इष्ट देवतेला समर्पित करावे.

स्नानविधी– स्नानासाठी जलाशयावर जावे. नाभीपर्यंत खोल पाण्यात उभे राहून आचमन करावे. जलपृष्ठावर कुलयंत्र रेखून त्यात मूलमंत्र लिहावा. त्याचा जप करावा. सूर्याला त्रिवार अर्घ्य द्यावे. जलात बुडी मारून स्नान करावे. धूतवस्त्र नेसून आसनावर बसावे. गायत्री मंत्राने शेंडीला गाठ द्यावी. कपाळी भस्म व सिंदूर लावावा. तांत्रिक संध्या करावी– 'ॐ ह्रीं हंसः घ्रिणि सूर्य इदम् अर्घ्यं तुभ्यं स्वाहा ।' या मंत्राने सूर्याला अर्घ्य द्यावे. गायत्रीचे ध्यान करून तिलाही तीन अर्घ्ये द्यावी. गायत्रीचा यथाशक्ति जप करावा. गुरू, देव आणि पितर यांचे तर्पण करावे. तर्पणजलाला 'वं' बीजाच्या उच्चाराने अमृतमय करावे. तर्पणानंतर जलाशयाला नमस्कार करावा. मग घट भरून घेऊन घरी यावे.

नित्यार्चन– पूजागृहाच्या द्वारात अर्घ्यपात्राची स्थापना करावी. त्या पात्रजलात गंगा-यमुनादीं पवित्र नद्यांना आवाहन करावे. मग त्या पात्रातले जल पूजेसाठी वापरावे. पूजागृहात प्रवेश करून अर्घ्यपात्रातील जलाने ते संप्रोक्षित करावे. चंदन, अगरू, इ. सुगंधी द्रव्ये जाळून पूजास्थान सुगंधित करावे. प्रथम वास्तुपुरुषाची पूजा करावी. समचतुष्कोण मंडलात त्रिकोण बनवन त्यावर आसन पसरावे. आसनावर वीरासन किंवा पद्मासन घालून पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख बसावे.

विजयाग्रहण – विजया म्हणजे भांग होय. तिचे पात्र साधकाने आपल्या संमुख स्थापित करावे. 'ॐ ह्रीं अमृते अमृतोद्भवे अमृतवर्षिणि अमृतम् आकर्षय आकर्षय सिद्धि देहि (अमुक) इष्टदेवतां मे वशमानय स्वाहा ।' या मंत्राने विजयेला शुद्ध करावे. मूलमंत्राचा जप करून ती मस्तकी लावावी. ती गुरू व इष्ट देवता यांना समर्पित करावी. मग 'ऐं वद वद वाग्वादिनि मम जिह्वाग्रे स्थिरीभव सर्वसत्त्ववशङ्करि स्वाहा' या मंत्राने तिचे प्राशन करावे. हात धुवून दिग्बंधन करावे. उजव्या हाताची तर्जनी व मध्यमा यांनी डाव्या तळहातावर फट् मंत्राने तीन वेळा आघात करावा. मग भूतशुद्धी करावी.

भूतशुद्धी – तांत्रिक साधनेत भूतशुद्धीला अत्यंत महत्त्व आहे–

भूतशुद्धि विना कर्म जपहोमार्चनादिकम् ।
भवेत् तु निष्फलं सर्वं प्रकारेणाप्यनुष्ठितम् ॥
(मत्स्यसूक्त १५)

अर्थ – भूतशुद्धी केल्यावाचून जप, होम, अर्चन, इ. कर्मे सर्व प्रकारे आचरिली तरी ती निष्फल होतात.

या भूतशुद्धीचें विधान असे– साधकाने आपल्या दोन्ही हातांचे तळवे मांड्यांवर उताणे ठेवावे. मूलाधारचक्राचे ध्यान करून 'हुं' बीजाने कुंडलिनीला जागृत करावे. पृथ्वीतत्त्वासह त्या कुंडलिनीला हंस मंत्राच्या द्वारे स्वाधिष्ठानचक्रात आणावे. कुंडलिनी तिथे आल्यावर जन्य तत्त्व हे जनकतत्त्वात लय पावू शकते. म्हणून साधकाने पृथ्वीतत्त्वाचा गंध व घ्राणेंद्रिय यांच्यासह जलतत्त्वात लय करावा. जलतत्त्वाचा स्वादू रस व स्वादू इंद्रिय यांच्यासह अग्नितत्त्वात लय करावा. अग्नितत्त्वाचा दृष्टी, रूप व नेत्र यांच्यासह वायुतत्त्वात लय करावा. वायुतत्त्वाचा स्पर्श व स्पर्शेंद्रिय यांच्यासह आकाशतत्त्वात लय करावा. आकाशतत्त्वाचा शब्दगुणासह अहंकारात लय करावा. अहंकाराचा महत्तत्त्वात, महत्तत्त्वाचा प्रकृतीत आणि प्रकृतीचा ब्रह्मात लय करावा.

तत्त्वलय झाल्यानंतर साधकाने अशी कल्पना करावी, की आपल्या उदरात डाव्या कुशीत अंगुष्ठमात्र उंचीचा एक कृष्णपुरुष अधोमुख उभा आहे. तो क्रुद्ध असून त्याचे डोळे लाल आहेत. त्याची जटा-दाढी वाढलेली आहे. त्याच्या हातात ढाल तलवार आहे. तो पापपुरुष आहे. साधकाने अशा या पापपुरुषाचे ध्यान करून 'यं' या बीजमंत्राने त्या पापपुरुषाचा देह शुद्ध करावा. 'रं' बीजाने कुंभक करावा. त्या वेळी त्या बीजाचा जपही करावा. जपातून उत्पन्न होणाऱ्या अग्नीने मग त्या पापपुरुषाला दग्ध करावे. मग 'वं' बीजाचे ध्यान करून रेचक करावा. ते बीज जपताना अशी कल्पना करावी की, आपल्या अंतरात अमृतसदृश जल वाहत आहे. मग ते जल कल्पनेने पापपुरुषाच्या दग्धदेहावर ओतावे. त्याच जलाने साधकाने काल्पनिक स्नान करावे. मग अशी कल्पना करावी, की आता आपले शरीर देवतामय बनले आहे आणि आता आपल्याला देवपूजेचा अधिकार प्राप्त झालेला आहे.

भूतशुद्धी दोन प्रकारांनी करावी लागते. स्वतःला भूतांच्या अधिकारातून शुद्ध करणे, मुक्त करणे व स्वरूपाच्या ठिकाणी प्रतिष्ठित करणे आणि त्यानंतर सर्व भूतांविषयी भगवद्भावना धारण करून त्यांना स्वस्थितीपासून वर उचलणे, हा पहिला प्रकार होय. भूतांमधला अभौतिक (विकृत) अंश दूर करून त्यांना भौतिक अंशाने परिपूर्ण करणे, अर्थात भूतांना विविध संस्कारांनी विजातीय भावातून मुक्त करून योग्य भूतभावाच्या ठिकाणी स्थापन करणे, हा दुसरा प्रकार होय.

यावरून भूतशुद्धीची अभावात्मक व भावात्मक अशी द्विविध कार्यें ठरतात. अग्राह्य अशा शक्तींना बाहेर हुसकावून देणे, हे अभावात्मक आणि त्या अग्राह्य शक्तींनी मोकळ्या

केलेल्या जागी शुद्ध व कार्यानुकूल शक्तींना भरून घेणे हे भावात्मक कार्य होय. भूतशुद्धी म्हणजे एक प्रकारे कायमनः-शुद्धीच आहे. ही शुद्धी केल्याने देवता किंवा देवसमुदाय आपल्या आविष्कारासाठी त्या शरीररूप मंदिराचा स्वीकार करतात.

न्यास – भूतशुद्धी झाल्यानंतर साधकाने अंग, कर, मातृका, ऋषी हे न्यास करावे. त्यानंतर व्यापक न्यास करावा. ज्याचे जे स्थान नाही, तिथे हट्टाने बसलेल्याला त्या स्थानापासून हटवून तिथे त्या स्थानाचा जो स्वामी असेल, त्याला आणून बसवणे, याला न्यास म्हणतात. न्यासात शरीरातल्या विविध अवयवांच्या ठिकाणी त्या त्या अवयवांच्या देवतेची स्थापना केली जाते.

अंगन्यास – अंग म्हणजे देहाचे अवयव होत. अंगन्यासाच्या द्वारे देहातल्या विविध अवयवांच्या देवतांना त्या त्या ठिकाणी आणून बसवायचे असते. आपले शरीर हे आपले नसून ते विविध देवतांच्या द्वारे भगवंताचे आहे, अशी कल्पना करणे, हा अंगन्यासाचा उद्देश असतो. याच्या द्वारे देहविषयक अनासक्ती अंगी बाणते.

करन्यास – या न्यासात अं, कं, खं, इ. मातृकांचा उच्चार करून अंगुष्ठ, तर्जनी, मध्यमा, अनामिका, कनिष्ठिका व करतल-करपृष्ठ, यांना स्पर्श करायचा असतो.

मातृकान्यास – याचे अंतर्मातृका व बहिर्मातृका असे दोन प्रकार आहेत. अंतर्मातृकान्यास हा षट्चक्रांच्या ठिकाणी मातृकांचे ध्यान करणे या स्वरूपाचा आहे. बहिर्मातृकान्यास हा पाच बोटे व करतल यांच्या योगाने शरीराच्या विविध अवयवांना स्पर्श करणे, या स्वरूपाचा असतो.

ऋषिन्यास – यात साधकाने मंत्रकर्त्या ऋषींच्या भावांशी एकरूप होऊन त्यांच्या संगतीत राहिल्यासारखी भावना करायची असते.

व्यापकन्यास – सर्व भूतांच्या ठिकाणी सर्वव्यापी भगवंताची सत्ता, त्याची कार्यप्रणाली आणि त्याचा आनंद यांची अनुभूती घेणे अर्थात हे स्थावर-जंगमात्मक जगत भगवन्मूर्तीच आहे, सर्वत्र त्याचीच सत्ता असून त्याचीच लीला चालू आहे, असा अनुभव घेणे, हा व्यापकन्यासाचा उद्देश असतो.

मग इष्ट देवतेची मानसपूजा करावी. यंत्रराजांची स्थापना करावी. साधक कालीकुलातला असेल, तर त्याने आधी विशेष पात्राची स्थापना करून मग यंत्रस्थापना करावी. तो श्रीकुलातला असेल, तर कलशस्थापना करून त्याच्या पूजेच्या वेळी यंत्रस्थापना करावी.

काली, तारा, रक्तकाली, भुवनेश्वरी, महिषमर्दिनी, त्रिपुरा, दुर्गा व प्रत्यंगिरा या आठ मिळून कालीकुल बनते. सुंदरी भैरवी, बाला, बगला, कमला, धूमावती, मातंगी व स्वप्नावती या आठ मिळून श्रीकुल होते.

विशेषपात्रस्थापना – साधकाने आपल्या समोर डाव्या हाताला 'ह्रीं' बीजयुक्त त्रिकोण बनवून त्यावर विशेष पात्राची स्थापना करावी. या पात्राचा तीन चतुर्थांश भाग मद्याने व एक चतुर्थांश भाग सामान्य अर्घ्याच्या जलाने भरावा. मूलमंत्राने पात्राची पूजा करावी. त्या पात्रातल्या मद्ययुक्त जलाने पूजासाहित्याचे प्रोक्षण करावे.

यंत्रराजस्थापना – साधकाने सोने, चांदी किंवा तांबे यांच्या पत्र्यावर लिहिलेले इष्ट देवतेचे यंत्र आपल्या सन्मुख स्थापन करावे. त्या वेळी 'हसौः सदाशिवमहाप्रेतपद्मासनाय नमः' हा मंत्र म्हणावा. आपल्या डाव्या अंगी सिंदूर किंवा रक्तचंदन यांनी एक षट्कोनचक्र काढावे. त्यावर मूलमंत्राचा पाठ करीत कलश स्थापावा. तो मद्याने भरावा. त्याची पूजा करावी. मग कुशाग्रांनी त्याच्या शिरोभागावर आघात करावा. कलशाला अभिषेक करावा. मग त्यातील मद्याचे शोधन करावे. विशिष्ट मंत्र म्हणून त्या मद्याला शुक्रशापातून व ब्रह्महत्येच्या पापातून मुक्त करावे. मग सुरादेवीचा गायत्री मंत्र म्हणावा-

ॐ ऐं ह्रीं श्रीआनन्देश्वराय विद्महे ।
सुरादेव्यै च धीमहि । तन्नोऽर्धनारीश्वरः प्रचोदयात् ॥

अर्थ – आम्ही आनंदेश्वराचे ज्ञान मिळवावे. सुरादेवीचे ध्यान करावे. तो अर्धनारीश्वर आम्हाला प्रेरणा देवो.

या मंत्राने मद्याचे तीन वेळा अभिमंत्रण करावे. आनंदभैरव व आनंदभैरवी यांचे ध्यान करावे. कलशातील मद्यात त्या दोघांची पूजा करावी. ते मद्य देवतामय होण्यासाठी 'वं' हे सुधाबीज व मूलमंत्र यांचा आठ वेळा जप करावा.

श्रीपात्रस्थापना - मग श्रीपात्राची स्थापना करावी. कलशातले द्रव्य तीन भाग व सामान्य अर्घ्यपात्रातले जल एक भाग घेऊन ते श्रीपात्र भरावे. त्यावर चंद्राच्या सोळा कलांचे पूजन करावे. याशिवाय गुरुपात्र, भोगपात्र, शक्तिपात्र, योगिनीपात्र, वीरपात्र, बलिपात्र, पाद्यपात्र व आचमनीयपात्र अशी अन्य आठ पात्रे श्रीपात्राच्या जवळ स्थापावी. ती पात्रे कलशस्थ द्रव्यांनी भरावी. मग निरनिराळ्या पात्रातले द्रव्य घेऊन गुरू, इष्टदेवता, इ. चे तर्पण करावे. मद्यमांसासहित अन्नाचा वटुकादी भैरवांना बळी द्यावा.

इष्ट देवतेची पूजा – एवढी सर्व सिद्धता झाल्यावर मूर्ती, लिंग, शालीग्राम, यांच्यापैकी इष्ट ते प्रतीक किंवा यंत्र यांच्या रूपाने इष्ट देवतेची पूजा करावी. त्यासाठी प्रथम गंधपुष्प हाती घेऊन ते आपल्या हृदयाला लावावे व तिथल्या हृत्कमलात इष्ट देवतेचे ध्यान करावे. मग आवाहन आणि स्थापन करून

इष्ट देवतेची प्राणप्रतिष्ठा करावी. त्यासाठी पुढील मंत्र तीन वेळा म्हणावा–

( अमुक ) देवतायाः पञ्चप्राणाः इह स्थिताः । जीव इह स्थितः । सर्वेन्द्रियाणि इह स्थितानि । वाङ्मनस्त्वक्चक्षुःश्रोत्रघ्राणप्राणा इहागत्य सुखं चिरं तिष्ठन्तु स्वाहा ।

अर्थ – अमुकदेवतेचे पंचप्राण इथे स्थित आहेत. जीव इथे स्थित आहे. सर्व इंद्रिये इथे स्थित आहेत. वाणी, मन, त्वक्, चक्षु, श्रोत्र, घ्राण व प्राण इथे (मूर्तीच्या प्रतीकाच्या वा यंत्राच्या ठिकाणी) येऊन सुखाने राहोत.

तांत्रिक उपासनेत प्राणप्रतिष्ठा हा एक महत्त्वाचा विधी आहे. प्राणप्रतिष्ठा याचा अर्थ मूर्तीच्या ठिकाणी प्राणतत्त्वाचा प्रवेश करणे व स्वतःला प्राणांच्या ठिकाणी स्थित करणे असा आहे. प्राण ही भगवंताची शक्ती आहे. त्या शक्तीच्या द्वारे जीव आणि जगत यांची सृष्टी होते. जीव आणि जगत या त्या महाप्राण परमेश्वराचीच घनीभूत मूर्ती होत. मानवाचा व्यष्टिप्राण त्या समष्टिगत महाप्राणाचा अंश आहे. तोच शरीरातल्या एकेका रक्तबिंदूच्या आत राहून देहाला पुष्ट, परिणत व कार्यक्षम बनवतो. देहाची परिणती आणि मनाची वृत्ती या दोन्ही गोष्टी म्हणजे त्या महाप्राणाचा खेळ आहे. प्राणप्रतिष्ठेचा विधी करून साधकाने इष्ट देवतेच्या मूर्तीत प्राणांचा संचार झाला आहे, ती देवता जिवंत आणि सत्य स्वरूपात आपल्यासमोर उपस्थित आहे, ती आपल्या सर्व क्रिया पाहत आहे, सर्व मनोभाव जाणत आहे व अंतर्बाह्य स्थित होऊन सर्व क्रियाकलाप चालवीत आहे, असे अनुभवायचे असते.

प्राणप्रतिष्ठेनंतर इष्ट देवतेची पुढील उपचारांनी पूजा करावी – आसन, स्वागत, पाद्य, अर्घ्य, आचमन, पुनराचमन, मधुपर्क, स्नान, वसन, आभरण, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य व वंदन असे हे सोळा उपचार आहेत. मग तीर्थपात्र देवतेला समर्पण करावे. श्रीपात्राने देवतेचे त्रिवार तर्पण करावे. प्रार्थना करून आवरणपूजा करावी.

तांत्रिक पूजेचे रहस्य समजावून सांगताना म. म. गोपीनाथ कविराज यांनी पुढीलप्रमाणे विवेचन केले आहे –

तंत्रशास्त्रात देवतेच्या पूजेचे उत्तम, मध्यम व अधम असे तीन प्रकार मानलेले आहेत. यांनाच कुठे कुठे परा, परापरा व अपरा असे म्हटले आहे. अपरा ही सर्वांत खालच्या कोटीची पूजा आहे. या पूजेत आध्यात्मिक दृष्टी नसते. ती एक बाह्य उपचारांनी केलेली बाह्य साधना असते. परापूजा ही खरी पूजा होय. परमशिवाशी स्वतःच्या अभेदाचा अनुभव घेणे म्हणजेच परापूजा होय. या परमशिवालाच भक्त लोक भगवान, भगवती, परब्रह्म, परामाया, इ. विभिन्न नामांनी संबोधतात. तंत्रशास्त्रात परमशिव आणि पराशक्ती या दोन्ही मिळून एक अभिन्न, अखंड वस्तू मानलेली आहे. ती प्रकाशरूप आहे. विश्वात व्याप्त असूनही ती विश्वातीत आहे. साधकाने या अभेदाचा अनुभव घेण्याचा सतत प्रयत्न केला पाहिजे. जेव्हा तो स्वतःला मायाधीन न मानता मायातीत परमेश्वरस्वरूप समजू लागतो व तशा अद्वैताचा अनुभव घेतो, तेव्हाच तो महाशक्तीचा सर्वश्रेष्ठ उपासक ठरतो.

न पूजा बाह्यपुष्पादिद्रव्यैर्या प्रथिताऽनिशम् ।
स्वे महिम्न्यद्वये धाम्नि सा पूजा या परा स्थितिः ।।
(संकेतपद्धती)

अर्थ – बाह्य पुष्पादी द्रव्यांनी नेहमी जी पूजा केली जाते, ती खरी नव्हे. आत्म्याची, स्वतःच्या महिम्याच्या ठिकाणी व अद्वैत धामात जी स्थिती, ती परापूजा होय.

मध्यमश्रेणीच्या अर्थात परापरा नामक पूजेतही अद्वैतानुभूती असते. पण ती विशुद्ध स्वरूपात नसते व स्थिरही नसते. चक्र, आवरण, इत्यादींची रचना करून केलेल्या बाह्य पूजेत भेदज्ञान सार्वकाल राहते. पण साधनमार्गात दाखल होणाऱ्या साधकाला या बाह्य पूजेपासूनच सुरवात करावी लागते. या पूजेतूनच त्याला पुढील पूजांचा अधिकार प्राप्त होतो. बाह्य पूजेतले भेदज्ञान मध्यम पूजेत थोडेसे कमी होते आणि अभेदज्ञानाचा तात्कालिक अनुभव घडतो. उत्तमपूजेत मात्र हे भेदज्ञान पूर्णपणे नष्ट होते.

पशुबली – पूजेनंतर साधकाने एखाद्या निरोगी पशूला इष्ट देवतेपुढे बली द्यावे. याविषयी महानिर्वाण तंत्रातला श्लोक असा–

मृगश्छागश्च मेषश्च लुलापः शूकरस्तथा ।
शल्लकी शशको गोधा कूर्मः खड्गी दश स्मृताः ।।
अन्यानपि पशून् दद्यात् साधकेच्छानुसारतः ।

अर्थ – हरिण, बकरा, मेंढा, रेडा, डुकर, साळू, ससा, घोरपड, कासव व गेंडा हे दहा पशू बली देण्यास योग्य होत. पण साधकाने स्वेच्छेनुसार अन्य पशूही बली दिले, तरी चालतील.

होमविधी – बलिदानानंतर होमविधी सांगितला आहे. त्यासाठी साधकाने एक हात लांब–रुंद असे वाळूचे स्थंडिल करावे. मग त्यावर तीन आडव्या व तीन उभ्या रेषा काढाव्या. त्या रेषांवर मुकुंद, ईश, पुरंदर, ब्रह्मा, वैवस्वत व चंद्रमा यांची पूजा करावी. त्या वेदीवर यंत्र ठेवावे. यंत्रावर सरस्वतीचे ध्यान–पूजन करावे. मग यंत्राच्या ठिकाणी अग्नीचे स्थापन व पूजन करावे. मूलमंत्राने अग्नीला पंचवीस आहुती द्याव्या. त्याचबरोबर अंगदेवतांनाही अकरा आहुती द्याव्या. तिल, घृत, मध, पुष्प किंवा बिल्वपत्र ही हविर्द्रव्ये असावी. शेवटी पूर्णाहुती द्यावी. अग्नीचे विसर्जन करून उर्वरित तुपात भस्म मिसळून ते भ्रूमध्यात लावावे व हवन समाप्त करावे.

**मंत्रजप** – होम-हवनानंतर साधकाने मूलमंत्र प्रणवाने संपुटित करून सात वेळा जपावा. नंतर तोच मातृकांनी संपुटित करून सात वेळा स्मरावा. प्राणायाम करावा. माळेची पूजा करावी. स्थिरचित्त होऊन कमीत कमी १०८ वेळा मूलमंत्र जपावा. मग पुढील मंत्राने जपफल इष्ट देवतेला समर्पण करावे –

**गुह्यातिगुह्यगोप्त्री त्वं गृहाणास्मत्कृतं जपम् ।**
**सिद्धिर्भवतु मे देवि त्वत्प्रसादान्महेश्वरि ।।**

अर्थ – हे महेश्वरी, तू गुह्य व अतिगुह्य अशा वस्तूंचे गोपन करणारी आहेस. मी केलेल्या जपाचे तू ग्रहण कर. हे देवी, तुझ्या प्रसादाने मला सिद्धी प्राप्त होवो.

**पुरश्चरण** – जपाचा दुसरा एक प्रकार म्हणजे पुरश्चरण. विशिष्ट संख्येचा संकल्प करून केलेल्या जपाला पुरश्चरण म्हणतात. पुरश्चरणासाठी विशिष्ट मापाचा मंडप घालावा. त्यात एक वेदी निर्माण करावी. त्या वेदीवर बसून साधकाने पुरश्चरण करावे. स्नान, सावित्रीमंत्राचा जप व ब्राह्मणभोजन या गोष्टी पुरश्चरणकर्त्याने पापनिरसनार्थ आधी कराव्या. त्यानंतर गणपती व क्षेत्रपाल यांची पूजा, पंचगव्यप्राशन, सूर्य, चंद्र व इष्टदेवता यांचे आवाहन व मंडलावर अष्टदल काढून त्यावर घटस्थापना करावी. या गोष्टी झाल्यावर शिखाबंधपूर्वक आसनबंध करून जपाला बसावे. जप एकाग्र चित्ताने केला असता, त्या मंत्रात चैतन्य येते. त्याचे फलही संपूर्ण मिळते. पुरश्चरणकालात हविष्यान्नावर किंवा भिक्षान्नावर निर्वाह करावा, इंद्रियदमन आणि मनोनिग्रह करून पवित्रपणे राहावे.

मग इष्ट देवतेचे स्तोत्र, कवच, सहस्रनाम, इत्यादींचे पठन करून इष्ट देवतेला प्रदक्षिणा करावी. अंती आत्मसमर्पण करून क्षमायाचना करावी. मग हृदयकमलात देवतेचे विसर्जन करावे. त्यानंतर निर्माल्यवासिनी देवीची पूजा करावी. महाप्रसाद ग्रहण करावा. शेवटी पुढील मंत्राने आपल्या ललाटी तिलक लावावा –

**यं यं स्पृशामि पादेन यं यं पश्यामि चक्षुषा ।**
**स एव दासतां यातु यदि शक्रसमो भवेत् ।।**

अर्थ – हे देवी, मी ज्याला ज्याला पदस्पर्श करीन, ज्याला ज्याला डोळ्यांनी पाहीन, तो तो जरी इंद्रासारखा सामर्थ्यशाली असला, तरी माझा दास होवो.

**पंच तत्त्वे** – तंत्रशास्त्रात मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा व मैथुन या पाच प्रकारांना पंच मकार किंवा पंच तत्त्वे असे म्हणतात. हे पंच मकार उपयोगात आणून इष्ट देवतेची तांत्रिक पूजा करायची असते. विशेषतः वाममार्गी शाक्त आपल्या पूजोपासनेत पंच मकारांचा उपयोग करतात. दक्षिणमार्गी तो करीत नाहीत. पंच मकार हे एकांतात व्यक्तिगत रूपाने व चक्रात सामुदायिक रूपाने उपयोगात आणतात. पंच मकारांवाचून केलेली पूजा निष्फळ होते, काली किंवा तारा यांचा मंत्र ग्रहण करून लोक मद्यसेवन करीत नाहीत, ते कलियुगात पतित होता[त] आणि तांत्रिक जप-होमादी कार्यात त्यांना अधिकार मिळ[त] नाही, असे वामाचारी तांत्रिक म्हणतात. त्यांनी पृथ्वीवर मदि[]रेला एकमात्र मुक्तिदायिनी मानले आहे, तिचे नाव तीर्थ ठेवले आहे आणि मैथुनाला लतासाधन म्हटले आहे. या पंच मका[]रांच्या सेवनाचे फल सांगितले आहे, ते असे–

**अष्टैश्वर्यपरं मोक्षं मद्यपानेन शैलजे ।**
**मांसभक्षणमात्रेण साक्षान्नारायणो भवेत् ।।**
**मत्स्यभक्षणमात्रेण काली प्रत्यक्षतामियात् ।**
**मुद्रासेवनमात्रेण भूसुरो विष्णुरूपधृक् ।।**
**मैथुनेन महायोगी मम तुल्यो न संशयः ।।**

अर्थ – हे पार्वती, मद्यपान करण्याने अष्टैश्वर्य व परममो[क्ष] प्राप्त होतो. केवळ मांसभक्षणाने साधक साक्षात नारायण[] होतो. मत्स्यभक्षण करताक्षणीच कालीचे दर्शन होते. मुद्रेच्[या] सेवनानेच केवळ साधक विष्णुरूपधारक होतो आणि मैथुना[ने] तो महायोगी शिवसदृश होतो, यात संशय नाही.

मात्र हे पंच मकार पूजेत प्रयुक्त करताना त्यांचे प्रथम शोध[न] करावे लागते. तसे न करता मद्यादी व्यवहार केल्यास का[र्य]हानी होते व देवीही क्रुद्ध होते, असे सांगितले आहे.

तंत्रशास्त्रात साधकाचे पशू, वीर व दिव्य असे तीन व[र्ग] केलेले आहेत. पशुवर्गातला साधक हा निम्नकोटीतला असत[ो]. त्याला वरील पंच मकारांचे वास्तव रूपात सेवन वर्ज्य असू[न] त्याने ते वास्तव स्वरूपात न घेता त्यांचे अनुकल्प वापरा[वे] असे सांगितले आहे. वीरवर्गातील साधकाने मात्र त्यांचा वास्त[व] स्वरूपातच उपयोग केला पाहिजे, असा नियम आहे.

ब्रह्मसायुज्य हेच तांत्रिक पूजेचे उद्दिष्ट असते. त्यासा[ठी] अंतरातले वासना-विकार नष्ट व्हावे लागतात. विषाला वि[ष] मारक ठरते, या नियमानुसार वीरसाधकाने पंच मकारांच[ा] गुरूच्या देखरेखीखाली योग्य रीतीने उपयोग करून विकारांव[र] विजय मिळवायचा असतो.

वीरसाधकांच्याही वरचे दिव्यसाधक होत. तेही पंच मका[र] वास्तव स्वरूपात स्वीकारीत नाहीत. ते त्यांचा अर्थ प्रतीकात्म[क] समजतात. अध्यात्माला धरून त्या पाचही पदार्थांचा अर्थ ते पुढीलप्रमाणे मानतात व तदनुसार आचरण करतात–

**व्योमपङ्कजनिष्यन्दसुधापानरतो नरः ।**
**मधुपायी समः प्रोक्त इतरे मद्यपायिनः ।।**

(कुलार्णवतंत्र)

अर्थ – ब्रह्मरंध्राच्या ठिकाणी असलेल्या सहस्रदल कमळा[]तून जो द्रव गळतो, तो मद्य म्हणून प्राशन करणारा मनु[ष्य]

खरा मधुपायी म्हटला गेला आहे. इतर सगळे मद्यपी होत.

पुण्यापुण्यपशुं हत्वा ज्ञानखड्गेन योगवित् ।
परे लयं नयेच्चित्तं मांसाशी स निगद्यते ।।

(कुलार्णवतंत्र)

अर्थ – जो साधक ज्ञानरूपी खड्गाने पुण्य-पापरूप पशूचा बळी देतो व जो परतत्त्वाच्या ठिकाणी चित्ताचा लय करतो, त्यालाच मांसभक्षक म्हणावे.

गङ्गायमुनयोर्मध्ये मत्स्यौ द्वौ चरतः सदा ।
तौ मत्स्यौ भक्षयेद्यस्तु स भवेत् मत्स्यसाधकः ।।

(आगमसार)

अर्थ – इडा व पिंगला या दोन नाड्या अनुक्रमे गंगा व यमुना म्हटल्या जातात. त्यात प्रवाहित होणारे श्वास व प्रश्वास हेच दोन मत्स्य होत. त्यांचे नियमन करून त्यांना सुषुम्नेत प्रवाहित करणे, म्हणजेच मत्स्यभक्षण होय.

सत्सङ्गेन भवेन्मुक्तिरसत्सङ्गेषु बन्धनम् ।
सत्सङ्गमुद्रणं यत्तु तन्मुद्राः परिकीर्तिताः ।।

(विजयतंत्र)

अर्थ – सत्संगाने मुक्ती व असत्संगाच्या ठिकाणी बंधन होते. म्हणून सत्संगाच्या ज्या गोष्टी असतील, त्या करणे यांना मुद्रा म्हटले आहे.

सुषुम्नाशक्तिरुद्दिष्टा जीवो यस्तु परः शिवः ।
तयोस्तु सङ्गमो देवैः सुरतं नाम कीर्तितम् ।।

(मेरुतंत्र)

अर्थ – योगशास्त्रात सुषुम्नेला शक्ती व जीवाला परशिव म्हटले आहे. या शिवशक्तींचा संगम म्हणजे मैथुन होय, असे देवांनी म्हटले आहे.

पंच मकारांचा भौतिक अर्थही महानिर्वाण तंत्रात सांगितला आहे, तो असा –

आद्यतत्त्वं विद्धि तेजो द्वितीयं पवनं प्रिये ।
अपस्तृतीयं जानीहि चतुर्थं पृथिवी शिवे ।।
पञ्चमं जगदाधारा वियद्विद्धि वरानने ।
इत्थं ज्ञात्वा कुलेशानि कुलतत्त्वानि पञ्च च ।।
आचारं कुलधर्मस्य जीवन्मुक्तो भवेन्नरः ।।

(महानिर्वाण. ७.१०९–१११)

अर्थ – हे प्रिये, मद्य म्हणजे तेज, मांस म्हणजे वायू, मत्स्य म्हणजे आप, मुद्रा म्हणजे पृथ्वी आणि मैथुन म्हणजे जगताला आधारभूत असलेले आकाश असे जाण. हे देवी, पंच कुलतत्त्वे अशा प्रकारे जाणून जो मनुष्य कौलधर्म आचरतो, तो जीवन्मुक्त होतो.

वरील श्लोकांत पंच मकारांनी केलेली शक्तीची पूजा म्हणजे पंच महाभूतांच्या रूपाने केलेली परमशिवाची पूजा होय, इतका व्यापक अर्थ घेतलेला आहे.

पंच मकारांचे प्रत्यक्ष, अनुकल्प व दिव्य या प्रकारांनी होणारे अर्थ पुढीलप्रमाणे–

मद्य– मदिरा (प्रत्यक्ष); नारळाचे पाणी (अनुकल्प); ज्याच्या योगे साधक बाह्य जगाच्या विषयात ज्ञानशून्य बनतो ते भगवंताचे उन्मादन ज्ञान (दिव्य).

मांस – पशुमांस (प्रत्यक्ष); लसूण, आले, मीठ, तीळ व गव्हाच्या लोंब्या (अनुकल्प). सर्व वस्तू अंतर्यामी ईश्वराला समर्पण करणे (दिव्य).

मत्स्य– मासा (प्रत्यक्ष); लाल मुळा, वांगे, इत्यादी (अनुकल्प); श्वास व प्रश्वास या दोन मत्स्यांचे नियमन करून त्यांना सुषुम्नेत प्रवाहित करणे (दिव्य).

मुद्रा – भाजलेल्या धान्याच्या लाह्या (प्रत्यक्ष); तांदूळ (अनुकल्प); सत्संगाच्या ज्या गोष्टी असतील त्या करणे (दिव्य).

मैथुन – परस्त्रीशी साक्षात रतिकर्म (प्रत्यक्ष); मीलनाला उपयुक्त होईल अशा डोळेमोडीने पुष्पसमर्पण (अनुकल्प); कुंडलिनीच्या जागृतीनंतर सहस्रारचक्रात शिव-शक्तींचे मीलन (दिव्य).

एवंच पंचमकारपूजा ही रहस्यात्मक असून, स्थूल दृष्टीने तिचा अर्थ लावणे योग्य नव्हे, असे तंत्राचार्यांचे मत आहे. पंच मकारांचा वाममार्गी साधकांनी दुरुपयोग केला, ही गोष्ट निस्संशय खरी असली, तरी त्यावरून तंत्रशास्त्रावर ठपका ठेवणे हे योग्य ठरणार नाही. ज्ञानी लोक तत्त्वज्ञानाचे रहस्य सांगताना कित्येकदा लौकिक प्रतीके वापरतात. पण अज्ञानी लोक आचरणात त्यांचा दुरुपयोग करतात, हा अनुभव सार्वत्रिक आहे.

चक्रपूजा– तांत्रिक साधनेतला हाही एक महत्त्वाचा विधी असतो. पूर्णिमा, संक्रांती, चतुर्दशी, अष्टमी, इ. पर्वांच्या रात्री सामूहिक रूपाने ही पूजा केली जाते. या पूजेत साधक (पुरुष) आणि शक्ती (स्त्रिया) विशिष्ट जागी वर्तुळाकार बसतात. या वर्तुळालाच चक्र असे म्हणतात. चक्रात बसणाऱ्या या स्त्री-पुरुषांना भैरव आणि भैरवी अशीही नावे आहेत. भैरवाच्या डाव्या अंगाला भैरवीने बसायचे असते. चक्रस्वामी किंवा चक्रेश्वर हा आपल्या शक्तीसह चक्राच्या मध्यभागी बसतो. त्याच्याजवळ मद्यकुंभ आणि इतर पूजासाहित्य ठेवलेले असते. या चक्रात बसून साधक आणि त्यांच्या शक्ती यांचे खानपानादी व्यवहार चालतात.

सुरापान करण्यापूर्वी साधक सुरा-पात्र आपल्या उजव्या हाती घेऊन सुरादेवीचे पुढीलप्रमाणे ध्यान करतात–

**समुद्रे मथ्यमाने तु क्षीराब्धौ सागरोत्तमे ।**
**तत्रोत्पन्ना सुरा देवी कन्यकारूपधारिणी ।।**
**गोक्षीरसदृशाकारा कुलामृतसमुद्भवा ।**
**अष्टादशभुजैर्युक्ता नीरजायतलोचना ।।**
**आनन्दशिखरे जाता आनन्दश्च महेश्वरः ।**
**तयोर्योगे भवेद् ब्रह्मा विष्णुश्च शिव एव च ।।**
**तस्मादिमां सुरां देवीं पूर्णोऽहं तां पिबाम्यहम् ।**

**अर्थ–** सागरश्रेष्ठ क्षीराब्धी मथिला जात असता कन्यारूपधारिणी मदिरादेवी तिथे उत्पन्न झाली. ती दुधासारखी गोरी, कुलामृतसंभूत, अठरा भुजांनी युक्त व कमललोचन अशी आहे. ती आनंदशिखराच्या ठिकाणी उत्पन्न झाली आणि महेश्वर हा तर साक्षात आनंदच. त्या दोघांच्या संगमातून ब्रह्मा–विष्णू–शिव उत्पन्न झाले. म्हणून अशा या सुरादेवीचे मी प्राशन करतो.

नंतर साधक मंडळी चक्रेश्वराला अभिवादन करून व त्याची अनुमती घेऊन, तसेच 'जुहोमि' असा शब्द उच्चारून त्या सुरेचे प्राशन करतात.

ही चक्रपूजा पशुभावातील साधकाला वर्ज्य असून, वीरभावातील साधकांनीच करायची असते.

रुद्रयामल तंत्रात विविध कामनांसाठी विविध चक्रे सांगितली आहेत, ती अशी–

**राजचक्रे राज्यदं स्यात् महाचक्रे समृद्धिदम् ।**
**देवचक्रे च सौभाग्यं वीरचक्रे च मोक्षदम् ।।**

**अर्थ–** राजचक्र हे राज्य देणारे असते. महाचक्राच्या साधनेने समृद्धी, देवचक्राच्या साधनेने सौभाग्य व वीरचक्राच्या साधनेने मोक्ष मिळतो.

महानिर्वाण तंत्रात ब्रह्मचक्र व भैरवचक्र अशी दोन चक्रे सांगितली आहेत. 'ब्रह्मार्पणं ब्रह्महविः' हा ब्रह्मचक्राचा मंत्र होय. ब्रह्मचक्रपूजेचा अधिकार दिव्यभावातील साधकावाचून इतरांना नाही. या चक्रपूजेत वर्णभेद नाही–

**ब्रह्मचक्रे महेशानि वर्णभेदं विवर्जयेत् ।**
**न देशकालनियमो न पात्रनियमस्तथा ।।**

(महानिर्वाण. ८.२१७)

**अर्थ–** हे पार्वती, ब्रह्मचक्रात वर्णभेद वर्ज्य मानावा. त्याला देश, काल आणि पात्र यांचाही नियम नाही.

ब्रह्मचक्रात बसून चक्रेश्वराने सर्व साधकांसह जातीपातीचा विचार न करता खान–पान करावे, तसेच शक्तीचे व वीर साधकाचे उच्छिष्टही खावे, असा वरील श्लोकाचा भावार्थ आहे.

भैरवचक्रातही जातीपातींचा विचार व उच्छिष्टादी विवेक नाही. आनंदभैरवी या आपल्या शक्तीसह आनंदभैरव हा त्या चक्राचा अधिपती असतो. शव तांत्रिकाने आपला विवाह भैरवचक्रातच करावा, असे सांगितले आहे.

**पर्वप्रकरण–** साधकाने इष्ट देवतेची पूजा नित्य करणे श्रेष्ठ, प्रत्येक पर्वकाळी करणे हे मध्यम आणि महिन्यात एखाद्या वेळी करणे हे अधम होय, असे निरुत्तर तंत्रात सांगितले आहे. भाद्रपद शुद्ध षष्ठी, आश्विन कृष्ण पंचमी, कार्तिक शुद्ध नवमी, मार्गशीर्ष पौर्णिमा, पौष कृष्ण चतुर्दशी, माघ शुद्ध चतुर्थी, फाल्गुन कृष्ण नवमी, चैत्र शुद्ध चतुर्दशी, अक्षय तृतीया, ज्येष्ठ कृष्ण चतुर्दशी, आषाढ कृष्ण नवमी व श्रावण कृष्ण पंचमी या सर्व तिथींना देवपर्व म्हटले आहे. या दिवशी मध्यरात्री देवीची पूजा मद्य–मांसादी उपचारांनी करावी, असे समयाचारात सांगितले आहे.

शुक्ल–कृष्ण नवमी, अष्टमी, एकादशी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावास्या, व्यतीपातयोग, सूर्यसंक्रांती व ज्या तिथीस साधकाला अभिषेक झाला असेल तो दिवस, या सर्व दिवशी पंचमकारांसह देवीची पूजा करावी, असे कुलावलीत म्हटले आहे.

फाल्गुन कृष्ण एकादशीला महारात्री, ज्येष्ठ शुद्ध दशमीला शुक्रवार असून, रात्री एकादशी लागल्यास तिला दिव्यरात्री, अमावास्येस मंगळवार असून, त्याच दिवशी संक्रांती व ग्रहण आल्यास तिला भावरात्री, चैत्र अष्टमीस संक्रांती आल्यास तिला सिद्धरात्री, वैशाख शुद्ध तृतीयेस कुलनक्षत्र आले असता तिला दारुणरात्री, दिवाळीच्या चतुर्दशीचा अमावास्येशी योग आल्यास तिला कालरात्री, कृष्णजन्माष्टमीला मोहरात्री, चैत्र शुद्ध नवमीला क्रोधरात्री, मार्गशीर्ष कृष्ण अष्टमीला घोररात्री आणि चतुर्दशी मंगळवारी कुलनक्षत्राने युक्त असता तिला वीररात्री म्हणतात. या सर्व पर्वरात्रींच्या वेळी देवीची पूजा विशेष फलप्रद होते, असे स्वतंत्र तंत्रांत सांगितले आहे.

**तांत्रिक दर्शन–** पिंड-ब्रह्मांडाची रचना, स्थूल-सूक्ष्मादी देह, पंचकोश, जीवात्मा-परमात्मा, शिवशक्तीचे सामरस्य, नाद, बिंदू, नाडी, चक्रे यांचे रहस्य, इ. गोष्टी तांत्रिक दर्शनात येतात. तांत्रिक दर्शन हे आस्तिक दर्शन असून, ते साधनाप्रधान आहे. या दर्शनाविषयी म. म. गोपीनाथ कविराज यांनी आपल्या ग्रंथांत सांगोपांग आणि सरहस्य विवेचन केले आहे. त्याचा सारांश असा–

**सृष्टीची उभारणी-संहारणी –** पिंड-ब्रह्मांडरूप सृष्टीच्या मुळात एकच व्यापार आहे. समग्र जगताच्या मुळाशी जी अखंड एकरस अशी सत्ता आहे, तीच या विश्वाचे उपादान व निमित्त कारण आहे. ती सत्ता निर्विकार आहे. तिला कधी ऱ्हास नाही, कधी वृद्धी नाही. ती अनादी, अनंत, स्वप्रकाश व चिदानंदरूप आहे. ती सत्ता शिवरूपात निष्क्रिय, उदासीन व द्रष्टा

असून, शक्तिरूपात तीच भावी विश्वाचे उपादान कारण आहे. शिवशक्ती अभिन्न असूनही शिव तटस्थ आहे व शक्ती संकोच-प्रसरणशील आहे.

पराशक्ती जेव्हा परमशिवाचे स्फुरण पाहण्याची इच्छा करते, तेव्हा सृष्टीचा उदय होऊ लागतो. याला विसर्गक्रिया असे म्हणतात. या महाशक्तीच्या गर्भात समग्र विश्व हे तिच्याशी अभिन्नरूपात विद्यमान असते. विश्वाला महाशक्तीहून स्वतंत्र किंवा पृथक सत्ता नाही. शक्तीमध्ये तिचे कार्य अविभक्त-रूपाने विद्यमान असणे हा बिंदुव्यापार होय. विसर्ग आणि बिंदू हे सृष्टिरचनेच्या मुळाशी असतात. प्रकाश किंवा शिवांश आणि विमर्श किंवा शक्त्यंश जेव्हा समभावाने असतात, तेव्हा त्या गोष्टीला बिंदू असे नाव आहे. हा एकच बिंदू सृष्टीच्या प्रारंभी इच्छा, ज्ञान व क्रिया अशा स्वरूपात त्रिधा विभक्त होतो. हे तीन बिंदूच मूल त्रिकोणाचे तीन बिंदू असतात. मूलबिंदू हा या मूलत्रिकोणाचा मध्यबिंदू असतो. परमात्मा किंवा सदाशिव हे याच मूलबिंदूच्या विशिष्ट अवस्थेचे नाव आहे. मूलबिंदूला परावाक् म्हटले आहे. पुढचे तीन बिंदू हे क्रमशः पश्यंती, मध्यमा व वैखरी या नावाचे आहेत. या त्रिकोणाला योनिस्वरूप विश्वमातृका असे म्हणतात. योगी व शब्दब्रह्माचे ज्ञाते याच योनिस्वरूप त्रिकोणाची उपासना करतात.

पृथ्वीपासून मायेपर्यंत जो हा पसारा दिसतो त्याला भव किंवा संसार असे म्हणतात. याच्या मुळाशी छत्तीस तत्त्वे आहेत. हे सर्व मायाजगत आहे. मायेचा भेद झाल्यावर भव-भेद होऊन साधकाचा अभवामध्ये प्रवेश होतो. अभव हाही एक संसारच आहे. फरक एवढाच की, तो अशुद्ध नसून शुद्ध संसार आहे. शुद्ध विद्येला धरून सदाशिवतत्त्वापर्यंत जितकी भुवने आहेत, तितकी सारी अभव नामक संसाराच्या अंतर्गत आहेत. गुरू, मंत्र, देवता व सिद्ध यांची जितकी पदे व स्थाने आहेत, ती सगळी अभव होत. सर्वांच्या मुळाशी असणारे शिव-शक्तींचे जोडपे भव आणि अभव या दोहोंहूनही अतीत आहे. त्या अतीतपणाला अतिभव संसार असे म्हणतात.

शुद्ध जगत हा शुद्ध विद्यामय असा शुद्ध अध्वा ( मार्ग ) आहे. कोणी कोणी या मार्गाला महामाया असेही म्हणतात. तो मायेच्या वरच्या भागी स्थित आहे. त्यालाच विद्या किंवा वागीश्वरी असे म्हणतात. अशुद्ध जगत हे मायिक असून, कालाग्निभुवनापासून कलाभुवनापर्यंत त्याचा विस्तार आहे. कलाभुवन हे कलेच्या ऊर्ध्वभागी स्थित आहे. गहनेश हा त्याचा अधिष्ठाता आहे. हा अशुद्ध मायिक संसार कलेच्या योनीतून उद्भूत झाल्यामुळे त्याला सकल असे म्हणतात.

" ब्रह्मांडात सर्वांच्या खाली कालाग्निभुवन आहे. ते अग्निमय रुद्रांनी परिवेष्टित आहे. जेव्हा परमेश्वराच्या संहार-शक्तीची प्रेरणा होते, तेव्हा कालाग्नीचे तेज उद्दीपित होते. कालाग्निभुवनावर धूमराशी असतो. त्याच्यावर नरक लोक असतात. किरणागमाच्या मतानुसार नरकांची संख्या १४० असून, त्यांतले ३२ नरक मुख्य आहेत. नरकांच्या वरच्या भागी दूर अंतरापर्यंत शून्यस्थान आहे. त्याला कूष्मांडपुर म्हणतात. त्यावर सप्त पाताल आहेत. पाताळांच्या उर्ध्वभागी हाटकेश्वराचे सुवर्णमय भुवन आहे. हाटकेश्वर हा सप्त पातालांचा अधिष्ठाता होय. सप्त पातालांच्या ऊर्ध्वभागी भूपृष्ठ आहे. त्यावर पर्वत, नद्या, समुद्र व द्वीपे आहेत. यालाच ब्रह्मांड म्हणतात. याच्या दशदिशांना इंद्रादी दिक्पालांचे लोक आहेत. रुद्रगण हे या लोकपालांचे अधिष्ठाते होत. प्रत्येक दिशेला दहा अशी रुद्रांची एकूण संख्या शंभर आहे. रुद्रांच्या परिवारात त्यांचे असंख्य अनुचर आहेत. शतरुद्रांच्या नंतर भद्रकालीचे भुवन आहे. तिच्यावर वीरभद्राचे स्थान आहे. भद्रकालीपासून वीरभद्रापर्यंत तेरा भुवने होतात. जलतत्त्वाच्या प्रारंभी भद्रकाली व त्याच्या अंती वीरभद्र असतो.

त्यानंतर तेजतत्त्व येते. ते शिवाग्नीचे स्थान आहे. अष्ट-भैरव हे त्या स्थानाचे अधिष्ठाते होत. त्यांच्यावर वायुतत्त्व असते. त्यात आठ भुवने असतात. त्यावरच्या आकाशतत्त्वातही आठ भुवने आहेत. त्यांच्यावर सूर्य, चंद्र आणि वेद यांची मंडले आहेत. त्यांचे अधिष्ठाते अनुक्रमे रुद्र, महादेव आणि उग्र हे आहेत. त्यांच्यावर कर्मेंद्रियांची मंडले असतात. इथून सर्व देह-धारी प्राण्यांच्या कर्मदेवांची प्रवृत्ती होते. वाणीचा अग्नी, हाताचा इंद्र, पायांचा विष्णू, पायूचा ( गुदद्वार) मित्र व उपस्थाचा (जननेंद्रिय) ब्रह्मा हे कर्मदेव होत. त्यांच्यावर प्रकाश-मय असे ज्ञानेंद्रियांचे मंडल आहे. तिथूनच ज्ञानेंद्रियांची प्रवृत्ती होते. त्याच्यावर असते मनोमंडल. सोम हा याचा अधिष्ठाता होय. या मंडलामुळे प्राण्याची पंचविषयांत प्रवृत्ती होते. त्यावर अहंकारमंडल आहे. त्यावर बुद्धिमंडल आहे. बुद्धिमंडलात पिशाचादी आठ देवयोनींची भुवने असतात. हे सर्व देवयोनीतले घटक बुद्धीतल्या आपल्या भुवनात राहून आपल्या अंशांनी पृथ्वीवर अवतीर्ण होतात. पृथ्वीच्या वरच्या भागी गुणतत्त्वाचे स्थान आहे. प्रकृतीच्या क्षोभाला गुण म्हणतात. ईश्वराच्या इच्छेने प्रकृती क्षुब्ध होऊन गुणभाव धारण करते व बुद्धीला उत्पन्न करते. क्षुब्ध गुणांच्या ऊर्ध्वभागी अव्यक्ताचे स्थान आहे. त्यात आठ भुवने व तितकेच भुवनेश्वर आहेत. प्रकृतीच्या ऊर्ध्वभागी पुरुषतत्त्वाचे स्थान आहे. तिथे अंबादी नऊ तुष्टी, तारादी व अणिमादी अष्ट सिद्धी वास्तव्य करतात. त्यांची स्वतंत्र भुवने असतात. अणिमादींच्या ऊर्ध्वभागी गुरुशिष्यांच्या

तीन पंक्ती असतात. पहिल्या पंक्तीत सनत्कुमारापासून भदन्तापर्यंत २२, दुसऱ्या पंक्तीत जुहूपासून चारुपर्यंत २५ व तिसऱ्या पंक्तीत हरापासून ध्रुवापर्यंत २० गुरुंचे स्थान आहे. पहिली व तिसरी या गुरुपंक्ती असून, मधली पंक्ती ही शिष्य-पंक्ती आहे. या पंक्तींच्या वर नाडीरूप आठ विद्यांची स्थाने आहेत. त्यांच्यावर विग्रहाष्टक आहे. या अष्टकात सूक्ष्म शरीराचे आरंभक असे उपादान कारण विद्यमान असते. विग्रहाष्टकाच्या वर पुरुषतत्त्वाच्या अंतर्गत अहिंसा, सत्य, अस्तेय, इ. दहा देहधर्मांची भुवने असतात. पुरुषाच्या वर ऊर्ध्वभागी क्रमशः नियती, काल, राग, अशुद्ध विद्या, कला व माया यांची स्थाने आहेत. मायामंडलात आठ चक्रे व महातेजादी आठ मंडलेश्वर राहतात. त्यांच्या वर अनंताचे स्थान आहे. अनंत हा मायेच्या भगद्वाराचा रक्षक आहे. माया ही जगद्योनी आहे. मायातत्त्व विभू, गहन व सूक्ष्म आहे. समग्र विश्व सूक्ष्म रूपाने मायातत्त्वातच विलीन राहते, म्हणूनच मायेला विश्वाचे विलयपद म्हटले आहे. मायेच्या वर मायाशक्तीचे स्थान आहे. ही मायाशक्ती जीवमोहिनी आहे. हिच्याच प्रभावामुळे जीवांची बुद्धी भ्रांत होते. हिचा अतिक्रम करणे अत्यंत कठिण आहे. तिच्या अतिक्रमणाचा एकमात्र उपाय म्हणजे परमेश्वराचा अनुग्रह हा होय. हा अनुग्रह ज्ञानरूपाने किंवा क्रियारूपाने अभिव्यक्त होऊन आपले कार्य करतो.

मायाशक्तीच्या वर शुद्ध महाविद्येचे स्थान आहे. हिला मातृका किंवा वागीश्वरी असे म्हणतात. तिच्या वामा, ज्येष्ठा, इ. नऊ शक्ती आहेत. सात कोटी मुख्य मंत्रांचा निवासही या महाविद्येच्या अंतर्गत असतो. तिच्या ऊर्ध्वभागी ईश्वरतत्त्व असते. त्याच्या अंतर्गत अष्टभुवनांचा सन्निवेश आहे. त्यावर सदाशिवतत्त्व आहे. यात शुद्ध विद्या, शक्ती, इ. चौदा आवरणे आहेत. शेवटच्या आवरणात सदाशिवाचे मुख्य भवन आहे. त्याचे आसन कमलाकार असून त्याला असंख्य दले आहेत. त्यावर बिंदू हेही कमलाकारच आवरण आहे. त्याची प्रभा चंद्रप्रभेसारखी आहे. तिथे शांत्यतीत शिव आणि शांत्यतीत शक्ती यांचे स्थान आहे. बिंदूच्या ऊर्ध्वभागी अर्धचंद्र आहे, तो वस्तुतः बिंदूचाच प्रसर आहे. त्याच्या पाच कला आहेत. त्यावर महानाद आहे. तो मंत्र महेश्वराने परिवेष्टित आहे. महानादावर सौषुम्नभुवन आहे. सुषुम्ना ही त्या भुवनाच्या अधिपतीची शक्ती आहे. त्याच्या एका अंगी इडा व दुसऱ्या अंगी पिंगला आहे. सुषुम्नेच्या वर ब्रह्मरंध्र नावाचे आवरण आहे. त्यावर ऊर्ध्व कुंडलिनीशक्तीचे स्थान आहे. या कुंडलिनीचा आकार वेटोळे घालून निजलेल्या सर्पासारखा आहे. ही कुंडलिनी वरील समस्त भुवनांना आधाररूप आहे.

अशा असंख्य सृष्टी विद्यमान आहेत. सृष्टी जशा असं[ख्य] तसे त्यांचे प्रलयही असंख्य आहेत. संहार व प्रलय हे दोन्ही [श]ब्द समानार्थक आहेत. देहादी जन्य पदार्थांचे आपल्या कारणात ली[न] होणे याचेच नाव संहार होय. प्रारब्धकर्मांचा क्षय होताच स्थू[ल] शरीराचा नाश होतो. विज्ञान, योग, संन्यास, इ. उपायांनी [सं]कर्मांचा क्षय झाल्यावर सूक्ष्मदेहाचाही प्रलय होतो. पण व्यक्ती[च्या] हा देहांतरूप प्रलय झाला तरी त्या वेळी त्रैलोक्याचा मात्र प्रल[य] होत नाही. पण कालांतराने तोही होतो. त्या वेळी अशुद्ध ज[ग]ताचा मायाशक्तीच्या ठिकाणी लय होतो व शुद्ध जगताचा कुं[ड]लिनीत लय होतो. कालाग्नी हा त्रैलोक्याचा प्रलयंकर होय. [या] प्रलयाच्या वेळी भुवनेश्वर रुद्र आपापले स्थान टाकून सूक्ष्म शरी[र]राने परमेश्वरस्वरूपात प्रविष्ट होतात. बाकीचे सर्व काही सू[क्ष्म] देहातून जनलोकात प्रविष्ट होऊन तिथे अचेतन अवस्थेत स्थि[र] राहते. महर्लोकनिवासीही त्या वेळी जनलोकात प्रवेश कर[ून] राहतात.

**देहविज्ञान** – तंत्रशास्त्रात मानवशरीरशास्त्राला ब्रह्मपूर अ[से] म्हटले आहे. विश्वाचा मध्यबिंदू जसा ईश्वर, तसा देहाच[ा] मध्यबिंदू जीव होय. नरदेह हा धर्मसाधनाला अत्यंत उपयु[क्त] आहे. त्याच्यावाचून कर्म होऊच शकत नाही. यद्यपि नरदेह [हा] भोगायतन अर्थात प्राक्तन पाप–पुण्यांच्या फलभोगाचे स्था[न] असला, तथापि तो प्रधानरूपाने कर्मदेहच आहे. या देहाच्या द्वारे शुभकर्मांचा संचय करायचा असतो. त्यायोगेच तो देवदे[ह] किंवा अन्य प्रकारचा अतिमानुष्य देह प्राप्त करून त्याच्या द्वा[रे] पूर्णत्वाच्या मार्गावर अग्रेसर होतो. म्हणून केवळ भोगासा[ठी] नव्हे; तर कर्मद्वारे परमार्थसिद्धीसाठी मानवदेहाचे महत्त्व असा[] मान्य आहे.

व्यष्टी व समष्टी असे देहाचे दोन भेद आहेत. व्यष्टिदेहा[ला] पिंड व समष्टिदेहाला ब्रह्मांड असे म्हणतात. ब्रह्मांडात जे काही असते, ते सर्वच्या सर्व अंशरूपाने छोटयाशा नरदेहातही अस[ते.] म्हणून नरदेहाचे यथायोग्य ज्ञान झाल्यास ब्रह्मांडाचे ज्ञान[ही] सुलभ होते.

मनुष्यशरीरात साडेतीन कोट नाडया असल्याचे सांगितले आहे. नाडी म्हणजे शक्तीचा स्रोत होय. त्यांतल्या १४ नाडया प्रमुख असून त्यांतही इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन महत्त्वाच्या होत. सुषुम्ना ही सर्वश्रेष्ठ नाडी आहे. ती मेरुदंडाच्या पोकळीत असते. ती तिथून निघून मूलाधारचक्रातून ब्रह्मरंध्रापर्यंत व[र] जाते. ही सर्व तेजोमयी व वह्निरूपिणी आहे. हिचा वर्ण र[क्त] आहे. सुषुम्नेच्या अंतर्भागात चित्रा नाडी आहे. शरीरातल्या विविध चक्रांतली कमले चित्रा नाडीवर लोंबती असतात. [ती] चंद्रस्वरूपिणी व सर्वदेवमय आहे. चित्रा नाडीच्या आत आनंद[]

**प्रा. म. क.** — प्राचीन मराठी कविपंचक, दत्तात्रय सिताराम पंगु, १९४४.
**प्रा. म. को. ले.** — प्राचीन मराठी कोरीव लेख, शं. गो. तुळपुळे, १९६३.
**प्रा. म. धा. इ.** — प्राचीन महाराष्ट्राचा धार्मिक इतिहास, र. म. भुसारी, १९६५.
**प्रा. मौ. बि.** — प्राङ्मौर्य विहार, देवसहाय त्रिवेदी, १९५४.
**प्रा. यु. वि.** — प्राचीन युद्ध विद्या, कृ. वि. वझे. १९३४.
**प्रा. सा. इ.** — प्राकृत साहित्य का इतिहास, जगदीशचंद्र जैन, १९६१.
**प्रि. तं.** — Principles of Tantra, Arthur Avalon, 1960.
**प्रि. इं.** — Primitive India, Vitold De Golish, 1954.
**फो. गु. को.** — Folklore of Gujarath and Konkan, Jackson.
**फो. डा. म.** — Folk Dance of Maharashtra – A. G. Agarkar. 1950.
**बं. उ. सा.** — बंगला और उसका साहित्य, हंसकुमार तिवारी.
**बं. सा. क.** — बंगला साहित्य की कथा, भोलानाथ शर्मा, १९५७.
**बं. सा. सं. इ.** — बंगला साहित्यका संक्षिप्त इतिहास, सत्येंद्र, १९६१.
**बाँ. बे. क्रा.** — Bombay Beggars and Criers.
**बि. हो. बु.** —Bihar, the Homeland of Budhism, R. K. Choudhari 1956.
**बी. सी. लॉ को. व्हॉ.** — B. C. Law Commemoration Volume, Ed, D. R. Bhandarkar, 1946.
**बु. भा. स.** — बुद्धकालीन भारतीय समाज, ना. गो. कालेलकर, १९३६.
**बृ. शु. मा. ब्रा. इ.** — बृहन्महाराष्ट्रातील शुक्लयजुर्वेदीय माध्यंदिन ब्राह्मणांचा इतिहास, शं. गो. जोशी, १९५०.
**बृ. स्तो. र.** — बृहत्स्तोत्ररत्नाकर.
**बौ. द. मी.** — बौद्ध दर्शन मीमांसा, पं. बलदेव उपाध्याय, १९५४.
**बौ. ध. द.** — बौद्ध धर्म दर्शन, आचार्य नरेंद्र देव, १९५६.
**बौ. ध. बि.** — बौद्धधर्म और विहार, हवलदार त्रिपाठी, १९६०.
**बौ. सा. सां. झ.** — बौद्ध साहित्यकी सांस्कृतिक झलक, परशुराम चतुर्वेदी, १९५८.
**ब्र. कृ. मा. भ.** — ब्रजभाषा के कृष्ण-काव्य में माधुर्य भक्ति, रूपनारायण, १९६२.
**ब्र. सां. इ.** — ब्रजका सांस्कृतिक इतिहास, प्रभुदयाल मीतल, १९६६.
**ब्रा. भि. वि.** — ब्राह्मणांतील भिन्न शाखीय विवाह, पं. महादेवशास्त्री दिवेकर, १९४५.
**भ. ध्व. रा.** — भगव्या ध्वजाचे राष्ट्रीयत्व, रामचंद्र चिंतामण पेंडसे.
**भ. ना.** — भरतमुनीचे नाट्यशास्त्र, गोदावरी केतकर, १९६३.
**भ. ना. शा.** — भरतमुनीचे नाट्यशास्त्र, गोदावरी केतकर, १९६३.
**भा. आ.** — भारतके आदिवासी, जनक अरविंद, १९५७.
**भा. इ. रू.** — भारतीय इतिहासकी रूपरेखा, जयचंद्र विद्यालंकार, १९३३.
**भा. कृ. क.** — भारतीय कृष्टिका कम, जयचंद्र विद्यालंकार, १९५५.
**भा. कौ.** — Bharat Kaumudi, Radhakumud Mukarjee, 1945.
**भा. जा. भे.** — भारतवर्षमें जातिभेद, क्षितिमोहन सेन, १९५२.
**भा. ज्यो. शा.** — भारतीय ज्योतिषशास्त्र, शं. बा. दीक्षित, १९३१.
**भा. त. रा.** — भारतीय तत्त्वज्ञान व राष्ट्रधर्म, पु. ग. सहस्रबुद्धे, १९६५.
**भा. त. वि.** — भारतीय तत्त्वविद्या, पं. सुखलालजी संघवी, १९६०.
**भा. द.–उपाध्याय** — भारतीय दर्शन, पं. बलदेव उपाध्याय, १९५७.
**भा. द.–मिश्र** — भारतीय दर्शन, उमेश मिश्र, १९५७.
**भा. द. सं.** — भारतीय दर्शन संग्रह, द. वा. जोग, १९५८.
**भा. धा. पु.** — भारतीय धार्मिक पुनर्जागरण, रामवृक्ष सिंह, उमाशंकर सिंह, १९५७.
**भा. न. क.** — भारतीय नदियोंकी कहानी, भगवतशरण उपाध्याय, १९५५.
**भा. ना. सा.** — भारतीय नाट्य साहित्य, संपा. – नगेंद्र.
**भा. नें. हिं. से.** — भारतीय नेताओंकी हिन्दी की सेवा, ज्ञानवती दरबार, १९६१.
**भा. प्र. वि.** — भारतीय प्रतीक विद्या, जनार्दन मिश्र, १९५९.
**भा. प्रा. लि.** — भारतीय प्राचीन लिपिमाला, पं. गौरीशंकर हिराचंद ओझा, १९५९.
**भा. ब्रा. जा. प्र.** — भारतीय ब्राह्मण-जाति-प्रदीपिका, इंद्रदेव नारायणसिंह, १९५८.
**भा. भा. स.** — भारतका भाषा सर्वेक्षण उदयनारायण तिवारी, १९५९.
**भा. मा. शा.** — भारतीय मानसशास्त्र अथवा सार्थ आणि सविवरण पातञ्जल योग दर्शन, कृष्णाजी केशव कोल्हटकर, १९५९.
**भा. मौ. ए.** — भारतकी मौलिक एकता वासुदेवशरण अग्रवाल, १९५५.
**भा. रा. प्र.** — भारतीय राज्यशास्त्र प्रणेता, श्यामलाल पाण्डेय, १९६४.
**भा. लो. नृ.** — भारतके लोकनृत्य, लक्ष्मीनारायण गर्ग, १९६१.
**भा. वा. शा. प्र. वि.** – भारतीय वास्तुशास्त्र – प्रतिमाविज्ञान, द्विजेंद्रनाथ

शुक्ल, १९५६.

**भा. वा. शा. हिं. प्रा.** — भारतीय वास्तुशास्त्र हिंदू प्रासाद, द्विजेन्द्रनाथ शुक्ल, १९५८.

**भा. वि. प.** — भारतवर्षमें विवाह और परिवार, के. एस. कापडिया, १९६३.

**भा. व्र.** — भारतीय व्रतोत्सव, पुरुषोत्तमशर्मा चतुर्वेदी, १९५७.

**भा. शा. शा. क.** — भारतीयांच्या शासनपद्धती व शासनविषयक कल्पना, प. म. लिमये, १९२८.

**भा. सं. जै. यो.** — भारतीय संस्कृति में जैन धर्म का योगदान, हिरालाल जैन, १९६२.

**भा. सं. म.** — भारतके संत महात्मा, रामलाल, १९५७.

**भा. सं. सा.** — भारतीय संस्कृति और साधना, गोपीनाथ कविराज.

**भा. सा.** — भारतसावित्री, वासुदेवशरण अग्रवाल, १९५७.

**भा. सा. इ.** — भारतवर्षका सामाजिक इतिहास, विमलचंद्र पाण्डेय, १९६०.

**भा. सा. शा.** — भारतीय साहित्यशास्त्र, ग. त्र्यं. देशपांडे, १९५८.

**भा. सि.** — भारतीय सिक्के, वासुदेव उपाध्याय, १९४८.

**भो. उ. सा.** — भोजपुरी और उसका साहित्य, कृष्णदेव उपाध्याय.

**भो. क. का.** — भोजपुरीके कवी और काव्य, दुर्गाशंकर प्रसाद सिंह, १९५८.

**मं. म.** — मंत्रमहोदधि.

**म. क. च.** — महाराष्ट्रीय कविचरित्र, ज. र. आजगावकर.

**म. गाँ.** — Mother Goddess, S. K. Dixit.

**म. ग्रा. स.** — महाराष्ट्राची ग्रामीण समाजरचना, दांडेकर-जगताप, १९५७.

**म. च. को.** — मध्ययुगीन चरित्रकोश, सि. वि. चित्राव, १९३७.

**म. चा. दै.** — महाराष्ट्राची चार दैवते, ग. ह. खरे, १९५८.

**म. छं. र.** — मराठी छंदोरचना, ना. ग. जोशी, १९५५.

**म. छं. वि.** — मराठी छंदोरचनेचा विकास, ना. ग. जोशी, १९६४.

**म. ज. अ. ग्रं.** — मध्यभारत जनपदीय अभिनंदन ग्रंथ, सत्यदेव विद्यालंकार, १९५४.

**म. जि.** — **उस्मानाबाद** — महाराष्ट्राचे जिल्हे, उस्मानाबाद.

**म. जि.-जळगाव** — महाराष्ट्राचे जिल्हे, जळगाव.

**म. जि. – सांगली** — महाराष्ट्राचे जिल्हे, सांगली.

**म. जी.** — महाराष्ट्र जीवन, संपा. – गंगधर बाळकृष्ण सरदार, १९६०.

**म. झो. शि.** — महर्षि झोरोस्टर व त्याची शिकवण, रा. गो. कोलंगडे, १९६३.

**म. ध. शु.** — मध्ययुगातील धर्मान्तर आणि शुद्धिकरण, श्रीराम शर्मा.

**म. ध. सा.** — मध्यकालीन धर्मसाधना, हजारीप्रसाद द्विवेदी, १९५२.

**म. प्र. इ.** — मध्यप्रदेश का इतिहास, हीरालाल, १९४०.

**म. भा. इ.** — मध्यभारत का इतिहास, द्विवेदी, १९५६.

**म. भा. उ.** — महाभारताचा उपसंहार, चिं. वि. वैद्य, १९२१.

**म. भा. उ. वि.** — मराठी भाषा – उद्गम व विकास, कृ. पां. कुलकर्णी, १९५७.

**म. भा. व्य.** — महाभारतातील व्यक्तिदर्शन, शं. के. पेंडसे, १९६४.

**म. भा. व्या.**– महाभारतावरील व्याख्याने, बाळशास्त्री हरदास, १९६१.

**म. म. वा.** — महानुभावीय मराठी वाङ्मय, य. खु. देशपांडे, १९६०.

**म. मा. नि.** — मध्यभारत मार्ग निर्देशिका, प्रकाशक – नूतन प्रकाशन मंदिर, ग्वाल्हेर, १९५२.

**म. लॅ. टॅ.** — Madras – the Land of Temples, Govt. of Madras.

**म. लो. उ.** — मराठी लोकसंस्कृतीचे उपासक, रा. चिं. ढेरे, १९६४.

**म. लो. त.** — मराठी लोककला–तमाशा, नामदेव व्हटकर, १९५९.

**म. लो. मा.** — महाराष्ट्र लोकसाहित्यमाला, महाराष्ट्र लोकसाहित्य समिती, १९५९.

**म. लो. सं.** — मराठी लोकांची संस्कृती, इरावती कर्वे, १९५१.

**म. लो. सा. ३** — महाराष्ट्र लोकसाहित्यमाला, पुष्प ३, महाराष्ट्र लोकसाहित्य समिती, १९५९.

**म. वा. इ. २** — मराठी वाङ्मयाचा इतिहास भाग २, ल. रा. पांगारकर, १९३५.

**म. शा. वा.** — मराठी शाहिरी वाङ्मय, म. ना. सहस्रबुद्धे, १९६१

**म. सं.** — मऱ्हाटी संस्कृति, शं. बा. जोशी, १९५२.

**म. स. द.** — मराठेकालीन समाजदर्शन, शं. ना. जोशी, १९५०.

**म. स. प.** — मराठी संतवाङ्मयातील परमार्थमार्ग, रा. द. रानडे, १९६५.

**म. सा.** — महाराष्ट्र सारस्वत, वि. ल. भावे, १९५१.

**म. सा. अ.** — मध्यकालीन साहित्य में अवतारवाद, कपिलदेव पाण्डेय, १९६३.

**म. हिं. क.** — मध्यकालीन हिन्दी कवयित्रियाँ, सावित्री सिन्हा, १९५३.

**म. हिं. का. तां. पृ.** — मध्यकालीन हिन्दी काव्य की तांत्रिक पृष्ठभूमि, विश्वम्भरनाथ उपाध्याय, १९६३.

**म. ज्ञा. को.** — महाराष्ट्रीय ज्ञानकोश, श्री. व्यं. केतकर.

**मा. गु. लि.** — Milestones in Gujrati Literature, K. M. Jhaveri, 1934.

**मा. पु. सां. अ.**— मार्कंडेय पुराण— एक सांस्कृतिक अध्ययन, वासुदेवशरण अग्रवाल, १९६१.
**मा. री.** — मारवाडके रीतिरस्म.
**मी. द.** — मीमांसा दर्शन, मंडनमिश्र शास्त्री, १९५५.
**मु. इं.** — Observations on the Mussulmauns of India, Mrs. Meer Hassan Ali, 1917.
**मुं. इ. जा.** — मुंबई इलाख्यातील जाती, गो. मं. कालेलकर, १९२८.
**मु. चिं.** — मुहूर्तचिंतामणि.
**मु. रि.** — मुसलमानी रियासत, गो. स. सरदेसाई, १९२७.
**मू. वि.** — मूर्तिविज्ञान, ग. ह. खरे
**मे. टें. द.** — Medieval Temples of the Dakhan, Cousens, 1931.
**मे. मि. इं** — Medieval Mysticism in India, Kshitimohan Sen.
**मै. ट्रा. का.** — Mysore Tribes & Castes, Nanjundayya, Iyer, The Mysore University.
**मै. लो.** — मैथिली लोकगीत, राकेश राम इकबाल सिंह, १९३९.
**म्यु. इं.** — The Music of India, Herbert A. Popley, 1921.
**यं. चिं.** — यंत्रचिंतामणि.
**या. का. म** — यादवकालीन महाराष्ट्र, मु. ग. पानसे, १९६३.
**यु. ए. अन्नमलाई** — The University Environs, Annamalai University, 1957.
**यो. सो. पू.** — योगसोपान पूर्वचतुष्क, ह. ना. घमंडे, १९५१.
**रं. ऐ. को. व्हां.** — R. V. Rangaswami Aiyangar Commemoration Volume.
**रत्ना. गॅझे.** — Gazetteer of India, Ratnagiri District, Setu Madhav Rao, 1962.
**रा. अ. ग्रं.** — राजर्षि अभिनंदन ग्रंथ, स्नातक, व्यास, १९६०.
**रा. क.** — श्रीरामदासांची कविता, सत्कार्योत्तेजक सभा, धुळे, १९०८.
**रा. जा.**— राजस्थानकी जातियाँ, १९५४.
**रा. दे. टा.** — Rashtrakutas and Their Times, A. S. Altekar, 1934.
**रा. भा. सा.** — राजस्थानी भाषा और साहित्य, मोतीलाल मेनारिया, १९५२.
**रा. सं. सि. सा.** — राधावल्लभ संप्रदाय सिद्धांत और साहित्य, विजयेंद्र स्नातक, १९५८.
**रि. इं.** — The Religions of India, A. P. Karmarkar, 1950.
**रू. र.** — रूपकरहस्य, श्यामसुंदरदास, १९५१.
**रे. क. इं** — Races and Cultures of India, D. N. Majumdar, 1958.
**ल. वि. सो.** — लग्नविधी आणि सोहळे, ना. के. अलोनी, १९०४.
**लो. ना. प.** — लोकनाटयाची परंपरा, संपा.– वि. कृ. जोशी, १९६१.
**लो. सा. भू** — लोकसाहित्यकी भूमिका, कृष्णदेव उपाध्याय, १९५७.
**लो. सा. रू.** — लोकसाहित्याची रूपरेखा, दुर्गा भागवत, १९५६.
**लौ. दं.** — लौकिक दंतकथा, गो. मं. कालेलकर, १९३४.
**लौ. नी.** — लौहित्य और नीलाचल, हेम बरुआ, १९६१.
**वा. टी. टि.**— वाङमयीन टीका व टिप्पणी, वा. ल. कुलकर्णी
**वा. पु. स्ट.** — Vaman Puran – A Study, Vasudeosaran Agrawal, 1964.
**वा. रा. को.** — वाल्मिकी रामायण कोश, रामकुमार राय, १९६५.
**विं. प्र. लो.** — विंध्यप्रदेश के लोकगीत, श्रीचंद्र जैन.
**वि. ध. द.** — विश्व धर्म दर्शन, सांवलिया विहारीलाल वर्मा, १९५३.
**वि. मुं. रा. प.** — विशाल मुंबई राज्य परिचय, प्रसाद प्रकाशन, १९६०.
**वि. सा. इ.** — विजयनगर साम्राज्यका इतिहास, वासुदेव उपाध्याय, १९४५.
**वि. स्मा. ग्रं.** — विजयनगर स्मारक ग्रंथ, संपा. – द. प. करमरकर, रा. वि. ओतूरकर, १९३७.
**वि. स्मृ. ग्रं.** — विक्रम स्मृतिग्रंथ, १९४५.
**वी. शै. र.**— वीरशैवरहस्य.
**वे. इं** — Vedic Index of Names and Subjects, Macdonell and Keith, 1954.
**वे. ए.** — Vedic Age, Ed. – R. C. Majumdar, 1957.
**वे. रा. द.** — वेदांतील राष्ट्रदर्शन, बाळशास्त्री हरदास १९५५.
**वे. वि. नि.** — वेदविद्या निदर्शन, भगवदत्त, १९५९.
**वै. आ. ज्यो. वै. दे. पु.** — वैदिक आर्यांचे ज्योतिर्विज्ञान आणि वैदिक देवतांचे पुनर्दर्शन, अ. ज. करंदीकर, १९६२.
**वै. को.** — वैदिक कोश.
**वै. दे. अ. द.** — वैदिक देवतांचे अभिनव दर्शन, रा. ना. दांडेकर, १९५१.
**वै. नि.** — वैदिक निबंध, ना. गो. चापेकर.
**वै. मा.** — वैदिक माइथॉलॉजी, एम. ए. मैकडोनेल, १९६१.
**वै. वि. भा. प.** — वैज्ञानिक विकास की भारतीय परंपरा, सत्यप्रकाश, १९५४.
**वै. शै. म. व.** — The Vaishnava sects, the Shaiva sects, Mother worship, Swami Tattvananda.
**वै. सं. वि.** — वैदिक संस्कृतीचा विकास, लक्ष्मणशास्त्री जोशी, १९५१.
**वै. सा.** — वैदिक साहित्य— पं. रामगोविंद त्रिवेदी, १९६०.
**वै. सा. सं.** — वैदिक साहित्य और

संस्कृति, बलदेव उपाध्याय, १९५८.
व्या. ज्ञा. को. — व्यायाम ज्ञानकोश, सरदार मुजुमदार, बडोदे.
व्र. ति. नि. — व्रततिथि – निर्णय, नेमिचंद्र शास्त्री, १९५६.
व्र. प. — व्रतपरिचय, हनुमान शर्मा, १९५७.
श. क. — शब्दकल्पद्रुमः, राधाकांत देव.
शां. क. — शांतिकमलाकर.
शि. इ. — शिखांचा इतिहास, न. वि. गाडगीळ, १९६३.
शि. नि. — शिवाजी निबंधावली, प्रका.- श्रीशिवचरित्र कार्यालय, पुणे, १९३०.
शी. त. म्यु. — Sheaves from Tamil Muse, Edi. – P. Sri. Acharya, 1959.
शृं. ना. — शृंगार नायिका, स. आ. जोगळेकर, १९५५.
श्री. क. या. — श्रीपात्रदेव कदली यात्रा.
श्री. गो. भ. ह. — श्री. गोदे भवताप हरी, रा. चिं. ढेरे, १९५८.
श्री. म. त. — श्रीमन् मध्वाचार्य व त्यांचे तत्त्वज्ञान, रा. वा. अवधानी, १९४८.
सं. क. द. – संतकवि दरिया : एक अनुशीलन, धर्मेंद्र ब्रह्मचारी शास्त्री, १९५४.
सं. का. स. — संतकाव्यसमालोचन, गं. व. ग्रामोपाध्ये, १९३९.
सं. कौ. — संस्कार कौस्तुभ – वेंकटाचार्य गजेंद्रगडकर, १९१४.
सं. चा. अ. — संस्कृति के चार अध्याय, रामधारीसिंह दिनकर, १९५६.
सं. ना. सौं. — संस्कृत नाटच सौंदर्य, के. ना. वाटवे, १९६२.
सं. प्र. — संस्कृतीची प्रतीके – महादेवशास्त्री जोशी, १९५२.
सं. मि. — संशोधकाचा मित्र, गणेश हरी खरे, १९३१.
सं. मु. — संशोधन मुक्तावलि, वा. वि. मिराशी.
सं. र. — संगीत रत्नाकर, संपा.– एस्. सुब्रह्मण्य शास्त्री.
सं. वि. — संस्कृती आणि विज्ञान, द. के. केळकर.
सं. शा. — संगीत शास्त्र, के. वासुदेव शास्त्री, १९५८.
सं. शा. क. इ. — संगीत शास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास, लक्ष्मण दत्तात्रेय जोशी, १९३५.
सं. स. — संस्कृति – समवाय, वत्सला भाटे, १९६०.
सं. सा. इ. — संस्कृत साहित्यका इतिहास, बलदेव उपाध्याय.
सं. सा. इ. — कीथ – संस्कृत साहित्यका इतिहास, कीथ, अनुवादक – मंगलदेव शास्त्री, १९६०.
सं. सा. शा. इ. — संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास, पां. वा. काणे, १९३१.
सं. सा. सो. इ. — संस्कृत साहित्याचा सोपपत्तिक इतिहास, विनायक वामन करंबेळकर, १९५४.
स. गा. — समर्थांचा गाथा; संपादक – अनंतदास रामदास
स. द. सं. – अभ्यंकर — सर्वदर्शनसंग्रह, म. म. वासुदेवशास्त्री. अभ्यंकर, १९२४.
स. भा. प्र. व. — सचित्र भारत प्रवास वर्णन, बाळासाहेब घोरपडे, १९१२.
स. सं. — सभ्यता और संस्कृति, हजारीप्रसाद द्विवेदी, १९६०.
स. सा. वा. ३ — समग्र सावरकर वाङ्मय, खंड ३, निबंध, प्रकाशक – महाराष्ट्र प्रांतिक हिंदुसभा, पुणे, १९६४.
सा. इं. गॉ. — South Indian Gods – Bartholomaeus Ziegeubalg.
सा. इं. इ. गॉ. गॉ. — South Indian Images of Gods and Goddesses.
सा. इं. फे. — South Indian Festivities, P. V. Jagadisa Ayyar, 1921.
सा. इं. (म. आं.) — South India (Madras and Andhra Pradesh), Publications Division, New Delhi, 1957.
सा. नि. – साहित्य निबंधावली, राहुल सांकृत्यायन, १९६४.
सा. भा. वि. — सामान्य भाषा विज्ञान, बाबूराम सक्सेना, १९४३.
सा. र. — सारस्वत-रत्नमाला, ग. र. शर्मा, १९१०.
सि. इ. — सिख इतिहास, ठाकूर देशराज, १९५४.
सि. सा. — सिद्ध साहित्य, धर्मवीर भारती, १९५५.
सो. इं. (म. आ.) — See India (Madras and Andhra Pradesh), Publications Division Govnerment of India, New Delhi, 1957.
सु. वि. को. — सुलभ विश्वकोश, य. र. दाते, चिं. ग. कर्वे.
सु. स्तो. सं. — सुबोध स्तोत्र संग्रह म. म. पां. ग. गोस्वामी.
सू. ब्र. सा. — सूरपूर्व ब्रज भाषा और उसका साहित्य, शिवप्रसाद सिंह १९५८.
से. इं. — Census of India.
सो. क. मु. ए. — Society and Culture in Mugal Age, P. N. Chopra, 1955.
सो. चें. म. — Social Change in Malbar, M. S. A. Rao, 1957
सो. ला. रा. — Social Life in Rajasthan, T. S. Katiyar, 1947.
स्ट. इं. — Studies in Indology V. V. Mirashi, 1962.
स्ट. इं. क. हि. — Studies in Indian Cultural History, P. K. Gode 1961.
स्ट. उ. — Studies in the Upapuranas, R. C. Hazra 1958.

स्ट. ओ. फो. — A Study of Orissan Folk Lore, Kunjbihari Das, 1953.

स्ट. जॉ. ए. मे. इं. — Studies in the Geography of Ancient and Medieval India, D. C. Sircar, 1960.

स्ट्रॉ. इं. — Strongholds of India, Sidney Toy, 1957.

ह. क. — Mystic Teachings of the Haridasas of Karnatak, A. P. Karmarkar and N. B. Kalamdani, 1939.

ह. च. सां. अ. — हर्षचरित – एक सांस्कृतिक अध्ययन, वासुदेवशरण अग्रवाल, १९५३.

ह. प्रा. लो. — हमारे कुछ प्राचीन लोकोत्सव, मन्मथ राय, १९५३.

हिं. अ. मी. — हिंदूंच्या अवनतीची मीमांसा, पं. रघुनाथशास्त्री कोकजे, १९४४.

हिं. कॅ. इ. पे. — Hindu Canons of Iconography and Painting D. V. Shukla, 1958.

हिं. क. को. — हिंदी कथाकोष, हिंदुस्तानी एकेडमी, इलाहाबाद, १९५४.

हिं. क. भ. तु. अ. — हिन्दी और कन्नड में भक्ति–आंदोलनका तुलनात्मक अध्ययन, हिरण्मय, १९५९.

हिं. जै. भ. क. — हिंदी जैन भक्तिकाव्य और कवी, प्रेमसागर जैन, १९६४.

हिं. ध. स. — हिंदुधर्माची समीक्षा, लक्ष्मणशास्त्री जोशी, १९४२.

हिं. ना. — हिन्दी नाटक – उद्‌गम और विकास, दशरथ ओझा, १९५४.

हिं. नी. वि. — हिन्दीमें नीतिकाव्यका विकास, रामसरूप, १९६२.

हिं. प. मी. — हिंदु परिवार मीमांसा, हरिदत्त वेदालंकार, १९५५.

हिं. मा. रि. — A Classial Dictionary of Hindu Mythology and Religion etc. John Dowson, 1957.

हिं. मे. लो. — हिंदुस्थानातील मेंढपाळ लोक, शंकर बाबुराव लांडे, १९४५.

हिं. रा. तं. — हिंदुराज्य-तंत्र, काशीप्रसाद जायस्वाल, १९५२.

हिं. वि. को. — हिंदी विश्वकोश, संपादक धीरेन्द्र वर्मा, भगवतशरण उपाध्याय, गोरखप्रसाद, नागरी प्रचारिणी सभा, वाराणसी.

हिं. व्र. त्यो. — हिन्दुओंके व्रत और त्योहार, कुंवर कन्हैयाजू, १९४७.

हिं. व्र. प. त्यौ. — हिन्दुओंके व्रत, पर्व और त्यौहार, रामप्रताप त्रिपाठी, १९५७.

हिं. शि. — हिंदी शिल्पशास्त्र, कृष्णाजी विनायक वझे, १९२८.

हिं. सं. — हिंदु संस्कार, राजबली पांडेय, १९५७.

हिं. सं. प्र. — हिंदुसंस्कृतिप्रदीप, पं. महादेवशास्त्री दिवेकर, १९४६.

हिं. स. व्र. — हिन्दू सण व व्रतें, बाळ कृष्णतनय, १९३४.

हिं. सं. सा. — हिंदी संत साहित्य, त्रिलोकी नारायण दीक्षित, १९६३.

हिं. सा. इ. — हिंदी साहित्यका इतिहास, रामचंद्र शुक्ल, १९६२.

हिं. सा. को. — हिंदी साहित्यकोश, संपा.– धीरेंद्र वर्मा, १९५९.

हिं. सा. बि. — हिंदी साहित्य और बिहार, संपा -शिवपूजन सहाय, १९६०.

हिं. सा. बृ. इ. — हिंदी साहित्यका बृहत् इतिहास, संपा.–राजबली पांडेय

हिं. हॉ. से. — Hindu Holidays and Ceremonials, B. A. Gupte, 1916.

हि. इं. फि. — A History of Indian Philosophy, Surendranath Dasgupta, 1957.

हि. ओ. लि. — History of Oriya Literature, Mayadhar Mansinha, 1962.

हि. क. इं. पी. — History and Culture of the Indian People, Bharatiya Vidya Bhavan.

हि. कै. मा. — History of Kailash Mansarovar, Pranavanand, 1949.

हि. जॉ. ए. इं. — Historical Geography of Ancient India, Bimla Churn Law, 1954.

हि. जै. मो. — History of Jain Monachism, S. B. Deo, 1956

हि. डे. इं. म्यु. — Historical Development of Indian Music – Swami Prajnanananda, 1960

हि द. — हिमालय दर्शन, शं. स. दाते, १९५१.

हि. ध. — History of Dharma Shastra, P. V. Kane.

हि. बें. लँ. लि. — History of Bengali Language and Literature, Dinesh Chandra Sen, 1954.

हि. सा. इं. — A History of South India, Nilakanta Sastri, 1955

हि. हिं. सि. — History of Hindu Civilization, R. N. Bose, 1894

हे. व्र. — हेमाद्रीचा चतुर्वर्ग चिंतामणि, व्रतखंड.

व्हि. गॉ. सा. इं. — The Village Gods of South India, Henry Whitehead, 1921.

# संदर्भ ग्रंथ सूची


अष्टविनायक — सदानंद चेंदवणकर, १९६४.

आंध्रभारती — बाल शौरि रेड्डी, १९५९.

आचारेन्दु — त्र्यंबक माटे, १९०९.

आर्य संस्कृति — बलदेव उपाध्याय, १९५३.

आज्ञापत्र — संपा.–रा. चिं. ढेरे, १९६०.

उपनिषदर्थव्याख्या — केशव लक्ष्मण दफ्तरी १९५९.

कंकावटी — झवेरचंद मेघाणी, १९५१.

कविश्रीमाला — गंगाधर मेहेर, १९६२.

कामकल्प — Kama Kalpa or the Hindu Ritual of Love, P. Thomas, 1959.

काव्यप्रकाश — मंगरूळकर व अर्जुनवाडकर, १९६२.

कुमाऊँ — राहुल सांकृत्यायन, १९५९.

केरळ — पं. महादेवशास्त्री जोशी, १९६०.

खंडोबा — रा. चिं. ढेरे, १९५९.

गया गॅझे. — Gazetteer of India-Gaya District, P. C. Roy Choudhury, 1957.

चित्पावन — ना. गो. चापेकर, १९३८.

जीवनलीला — काका कालेलकर, १९५८.

जैन धर्मामृत — पं. हिरालाल जैन, १९६०.

ज्योतिर्वैभव — त्र्यं. गो. ढवळे, १९५६.

तंत्रविज्ञान — अरुण कुमार शर्मा, १९६५.

तमिळनाडु — पं. महादेवशास्त्री जोशी, १९६०.

तर्पण — ना. गो. चापेकर, १९४८.

तांबूलमंजरी — Tambulamanjari, J. S. Pade, 1958.

थेरगाथा — भिक्षु धर्मरत्न, १९५५.

दयाळनाथांची कविता — वैदर्भकवी दयाळनाथ यांची कविता : संपा.- अ. सी. साठे.

दासविश्रामधाम — संपा.– शंकर श्रीकृष्ण देव.

दासोपंतांची पासोडी — संपा.– न. शे. पोहनेरकर.

दि योग उपनिषदाज — A. Mahadeo Sastri, 1920.

देवनाथाची कविता — देवनाथ महाराज-कृत कवितासंग्रह. संपा.–वा. दा. ओक, १८९६.

धम्मपद — संपा.–भिक्षु धर्मरक्षित, १९५३.

धर्मरहस्य — के. ल. दप्तरी, १९६५.

धर्मशास्त्रविचार — पांडुरंग वामन काणे, १९३५.

नवद्वीप — श्री चैतन्यलीलाधाम नवद्वीप, आनंदयात्री, १९६१.

नवयुगधर्म – १ — नवयुगधर्म प्रथमखंड, स. कृ. फडके, १९२७.

नागपंचमीवर्णन — वि. धों. चिजकर, १९०८.

नाथद्वारादर्शन — भगवतीप्रसाद देवपुरा, १९५९.

पूजातत्त्व — गोपीनाथ कविराज, १९५८.

पूना गॅझे. — Gazetteer of the Bombay Presidency, Poona District, 1884.

प्रवास — शं. गो. तुळपुळे, १९६४.

भावमुद्रा — दुर्गा भागवत, १९६०.

मंत्रशास्त्र — श्री योगेश्वरानंदतीर्थ, १९५७.

मणिकांचन — सेतुमाधवराव पगडी १९६१.

मदुरा गॅझे. — Gazetteer of India, Madurai District, B. S. Baliga, 1960.

मुजफ्फर गॅझे. — Gazetteer of India, Muzaffarpur Dist. P. C. Roy Choudhary, 1958.

रज:कण — ना. गो. चापेकर.

राजस्थान — महादेवशास्त्री जोशी, १९६३.

रामकथा — कामिल बुल्के, १९६२.

लीळाचरित्र — संपा. ह. ना. नेने.

लोकहितवादी — ग. ह. केळकर, १९२३.

वछाहरण — संपादक वि. भि. कोलते, १९५३.

वाममार्ग — वंशीधर सुकुल वैद्यराव, १९५२.

विवेक आणि साधना — केदारनाथ.

व्रतचंद्रिका — गौरीशंकर उपाध्याय, १९५२.

व्रतराज — विश्वनाथ शर्मा, १९५३.

शंकराचार्य — बलदेव उपाध्याय, १९५०.

शतपत्रे — ना. रा. इनामदार.

शिवलिंगोपासना — स. कृ. फडके, १९५४.

शिवपुराण — का. अ. जोशी, १९६०.

शृंगार-हाट — मोतीचंद्र, अग्रवाल, १९५९.

शैवमत — यदुवंशी, १९५५.

श्रीगुरुदत्तयोग — श्री. शं. खानवेलकर, १९५७.

श्रीचक्रधरचरित्र — वि. भि. कोलते, १९५२.

श्रीविद्यार्णवतंत्र — Iconography of

Shri Vidyarnava Tantra, S. Shrikantha Shastri.
संतसुधासार — वियोगी हरी, १९५३.
संगीतशास्त्र — वासुदेव शास्त्री, १९५८.
संस्कृतिसंगम — क्षितिमोहन सेन, १९५२
सप्तशती — संपा. कृ. वि. सोमण, १९४७.
समर्थचरित्र — न. र. फाटक, १९५१.
समर्थहृदय — शं. श्री. देव, १९४९.
सरस्वतीमंडल — रा. मि. गुंजीकर, १८९४.
सह्याद्रि — स. आ. जोगळेकर, १९५२.
सारण गॅझे. — Gazetteer of India, Saran Dristrict, P. C. Roy Choudhury, 1960.
सुरत गॅझे. — Gazetteer of India, Surat District, 1962.
सूर्यकुल — शं. ना. हरीप, १९५२.
स्मृतिस्थळ — वा. ना. देशपांडे, १९३९.
हिंदुत्व — रामदास गौड, १९३९.

# स्थूल शुद्धिपत्र

| पान | स्तंभ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ८३ | २ | ३ | सिरिया | इराकमधील करबला |
| १७७ | २ | २५ | अगोदर पन्नास वर्षे | नंतर पाउणशे वर्षांनी |
| २०६ | २ | ४–५ | बंगालमधील...वसवली | हे वाक्य गाळावे |
| ४३० | १ | २९–३१ | मराठ्यांच्या ..शकली नाही | या वाक्याच्या जागी पुढील वाक्य वाचावे– इ. स. १७६० मध्ये उद्गीरच्या तहाप्रमाणे देवगिरी (दौलताबाद) शहर मराठ्यांना मिळाले. नारायणराव पेशव्याच्या वधानंतर निजामाचे साहाय्य मिळवण्यासाठी मराठ्यांनी ते निजामाला दिले. |
| ४६६ | १ | शीर्षक | दवातिथी | देवातिथी |
| ६०३ | १ | २० | जहांगीरचा सेनापती महावतखान... | हे शब्द गाळावे |
| ७१४ | १ | १ | नर्ऋत्यकर्म | नैर्ऋत्यकर्म |
| ७१४ | २ | १ | ोतात | होतात |

एक नाडी आहे, तिला ब्रह्मनाडी म्हणतात. ही सूर्यस्वरूप असून आकाराने कमलतंतूसारखी आहे. या तीन नाड्यांमुळे सुषुम्नाही त्रिगुणात्मक बनली आहे.

इडा व पिंगला या सुषुम्नेच्या डाव्या–उजव्या अंगी असतात. इडा ही शुक्लवर्ण, चंद्ररूपिणी, शक्तिरूप व मूर्तिमान अमृत आहे. पिंगला ही सूर्यरूपिणी व रक्तवर्ण आहे. इडेचे वहिर्गमन डाव्या नाकपुडीतून होते, तर पिंगलेचा अंतःप्रवेश उजव्या नाकपुडीतून होतो. इडेला गंगा, पिंगलेला यमुना व सुषुम्नेला सरस्वती असे म्हणतात. त्या आज्ञाचक्रात एकत्र होतात, म्हणून त्याला त्रिवेणी म्हटले आहे. सुषुम्नेचे मूलाधारातले जे द्वार, ते ब्रह्मद्वार होय. ते कुंडलिनीच्या वेटोळ्याने बंद असते.

मानवशरीरात अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय असे पाच कोश आहेत. जीव हा पाच कोशांनी किंवा आवरणांनी आवृत आहे. अन्नमय कोशात तो आत्मकेंद्रित असतो व स्वतःला काळा–गोरा, उंच–ठेंगू, तरणा–म्हातारा मानतो. प्राणमय कोशात तो क्षुधा–तृषादी अनुभवतो. मनोमयात तो मनन करतो. विज्ञानमयात जाणिवेचे व्यवहार करतो व आनंदमयात आनंद अनुभवतो. जीव हा सर्वव्यापी ईश्वराचाच अंश खरा; पण तो पंच कोशांच्या उपाधीत सापडून मर्यादित बनतो.

सुषुम्नामार्ग हा सहा केंद्रांनी युक्त आहे. या प्रत्येक केंद्रात एकेक चक्र निर्दिष्ट आहे. ब्रह्माची शक्ती जेव्हा अव्यक्त व अप्रकट असते, तेव्हा त्या अवस्थेला निर्गुण म्हणतात. त्याचप्रमाणे ती शक्ती जेव्हा प्रकाश व सृष्टी यांच्याकडे धाव घेते अर्थात जेव्हा लीलारत होते, तेव्हा त्या अवस्थेला सगुण म्हणतात. शक्तीच्या अंतरात केंद्रातिग व केंद्रानुग अशी द्विविध गती परिलक्षित होते. या दोन गतींच्या क्रिया–प्रतिक्रियेतून शक्तीच्या गतीला जे अल्पकाल वृत्ताकार अर्थात भोवऱ्यासारखे वळण येते, त्याला चक्र असे म्हणतात. या सर्व चक्रांचे अधिष्ठान समवेदक स्नायुमंडलामध्ये असते. ही सहा चक्रे पुढीलप्रमाणे आहेत—

(१) मूलाधार – हे सर्वांत खालचे चक्र असून, ते लिंगाच्या मध्यभागी अधोमुख असते. याचा वर्ण अतिरक्त आहे. याच्या ठिकाणी डाकिनी शक्ती व सद्योजात (ब्रह्मा) यांचे वास्तव्य असते. हे चक्र पृथ्वीतत्त्वाचे आहे. साडेतीन वलयांची कुंडलिनी याच ठिकाणी निद्रित असते. हे चतुर्दल चक्र असून त्याची चार दले जन्म, मृत्यू, जरा व व्याधी यांची द्योतक आहेत. याच्या बीजकोशात एक त्रिकोण असून तो इच्छा–ज्ञान–क्रियात्मक आहे.

(२) स्वाधिष्ठान – लिंगमूलात याचे स्थान आहे. यात चतुर्भुज नारायण व त्याची शक्ती डाकिनी यांचे वास्तव्य असते. हे चक्र जलतत्त्वाचे असून याला कामभूमी असे म्हटले आहे. सामान्य जीवाचे मन इथे जीवात्मरूपात अधिष्ठित राहते, म्हणून

मा. सं. को....२

याला स्वाधिष्ठान म्हणतात. हे षट्दल चक्र असून त्याची सहा दले षड्रिपूंची द्योतक आहेत.

(३) मणिपूर – याचे स्थान नाभीत आहे. याची ज्योती मणिप्रभेलाही परास्त करते. म्हणून याला मणिपूर हे नाव पडले आहे. हे चक्र तेजस्तत्त्वाचे आहे. या ठिकाणी रुद्र व त्याची शक्ती लाकिनी यांचे वास्तव्य असते. हे दशदल चक्र आहे.

(४) अनाहत – हे चक्र हृदयदेशात असून द्वादशदल आहे. ईशानरुद्र व त्याची शक्ती काकिनी यांचे हे स्थान आहे. हे चक्र वायुतत्त्वाचे आहे. या ठिकाणी अनाहत ध्वनी ऐकू येतो, म्हणून याला हे नाव मिळाले आहे. हे स्थान ईश्वराची लीलाभूमी आहे. इथे चित्त स्थिर झाल्याने ईश्वर कशा प्रकारे आपले देहयंत्र चालवितो, त्याचे ज्ञान होते. या चक्राला जीवात्म्याचे स्थान असेही म्हटले आहे.

(५) विशुद्ध – हे षोडशदल चक्र कंठदेशात आहे. हे आकाशतत्त्वाचे असून, सदाशिव व त्याची शक्ती शाकिनी यांचे निवासस्थान आहे.

(६) आज्ञा – हे द्विदल चक्र भ्रूमध्यात आहे. या ठिकाणी शिव आणि त्याची शक्ती हाकिनी यांचे वास्तव्य आहे. इथे द्रष्टा व दृश्य, भोक्ता व भोग्य, यांचा भेद पहिल्याच प्रथम लक्षित होतो. हे चक्रही भगवंताची लीलाभूमी आहे.

सहस्रार चक्र – शिरोदेशात सर्वांच्या वर हे सहस्रदलयुक्त चक्र अधोमुख आहे. याला सहस्रारकमल असेही म्हणतात. या कमलाच्या मध्यबिंदूतून निरंतर अमृतस्राव होत असतो. पण खालची चक्रे किंवा कमले सुप्त असल्याने ती हे अमृत साठवून पुष्टी मिळवू शकत नाहीत. त्यामुळे परिणाम असा होतो, की हे अमृत निरंतर कालाग्निकुंडात पडत राहते आणि त्यामुळेच जीवाला आपल्या देहाच्या ठिकाणी जरा–मृत्यू भोगावे लागतात. सहस्रारकमल हे प्रियस्थान आहे. ही पुरुषोत्तमाची अधिष्ठानभूमी आहे. हिला अद्वैतभूमी असेही म्हणतात. इथे जीव स्वस्वरूपात निमग्न होऊन सामरस्याचा अनुभव घेतो. मूलाधारापासून सहस्रारापर्यंत व सहस्रारापासून मूलाधारापर्यंत एक विद्युत्प्रवाह सतत जात येत असतो. या स्रोताच्या गतीचा अनुभव घेणे, या गोष्टीला स्रोतापन्न होणे, असे म्हणतात. सृष्टिकाली या स्रोताची गती सहस्राराकडून मूलाधाराकडे आणि लयकाळी ती मूलाधारापासून सहस्राराकडे असते.

सहा चक्रांपैकी मणिपूर, अनाहत व आज्ञा या तीन चक्रांना अनुक्रमे ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी व रुद्रग्रंथी असे म्हणतात. या तीन ग्रंथी पुत्रैषणा, वित्तैषणा व लोकैषणा या नावांनीही ओळखल्या जातात. संन्यास घेण्याच्या वेळी या तीन एषणांचा त्याग करण्यास सांगितले आहे. यालाच ग्रंथिभेद असे म्हणतात.

ब्रह्मग्रंथीच्या भेदाने कामादी दुष्ट प्रवृत्ती जिंकल्या जातात. विष्णुग्रंथीच्या भेदाने वैष्णवी मायेवर विजय मिळतो व धन, ऐश्वर्य, इत्यादींचे प्रलोभन नाहीसे होते. रुद्रग्रंथीच्या भेदाने प्रतिष्ठामोह दूर होतो व तीन्ही बंधने गळून पडतात.

वर जी षट्चक्रे सांगितली, त्यांचा भेद करून साधकाने पुढे जायचे असते. तोवर त्याला पूर्णत्वाची प्राप्ती होत नाही. तांत्रिक परिभाषेप्रमाणे ज्ञानचक्षूंचे उन्मीलन झाल्याशिवाय देहात्मभाव नष्ट होत नाही. या प्रज्ञाचक्षूंचे उन्मीलन करण्याची प्रक्रिया म्हणजेच षट्चक्रभेद होय. षट्चक्रातल्या प्रत्येक चक्रात एकेक बिंदू असतो. तेच त्या चक्राचे केंद्र असते. चक्राधिष्ठाता चक्रेश्वर त्याच बिंदूवर अधिष्ठित असतो. प्रत्येक चक्राचे बहिरंग वर्णमय असते. अं, यं, रं, लं, इ. हे वर्ण होत. या वर्णांना कुंडलिनीच्या साहाय्याने विगलित करून नादामध्ये परिणत करायचे असते. तसे केल्याने साधकाला चक्रस्थ बिंदूची प्राप्ती होते. हा बिंदू ज्ञानात्मक ज्योतिःस्वरूप असतो. त्यानंतर ब्रह्मनाडीच्या स्वभावसिद्ध ऊर्ध्वमुख स्रोतातून त्याची ऊर्ध्वगती होत असते. अशा प्रकारे सहाही चक्रांतल्या बिंदूंची ऊर्ध्वगती होऊन भ्रूमध्याच्या किंचित् वर प्रज्ञाचक्षूंचे उन्मीलन होते. या अवस्थेत साधकाला विशुद्ध ज्ञानस्वरूप अशी ज्योती प्राप्त होते. त्यानंतर त्याला समष्टिराज्यात प्रवेश मिळतो. मग तो ब्रह्मांडाचा अभिमानी होऊन क्रमशः ऊर्ध्वगती मिळवू लागतो. या प्रक्रियेने त्याचा समष्टीतून महासमष्टीत म्हणजेच ज्ञानराज्यातून महाज्ञानराज्यात प्रवेश होतो. ज्ञानाच्या या विकासाला पूर्णज्ञान असे म्हणतात.

कुंडलिनी – ही एक दिव्य शक्ती आहे. ती मूलाधार चक्रात निद्रित असते. तिला विविध उपायांनी जागृत करणे आवश्यक असते. वज्रासनादी आसने, शक्तिचालनादी मुद्रा, ब्रह्मचर्यादी नियम, प्राणायामादी क्रिया, इ. साधनांनी कुंडलिनी जागृत होते. हे उपाय कठिण आहेत आणि गुरूच्या देखरेखीखाली आचरले, तरच ते फलद्रूप होऊ शकतात. कुंडलिनी जागृत होणे म्हणजे तिने आपले वेटोळे सोडून सरळ होणे होय. जागृत झालेली ही कुंडलिनी सर्पाप्रमाणे वर उठायला लागते आणि प्रत्येक चक्र किंवा कमल जे मिटलेले असते, त्याला उमलवीत उमलवीत ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन पोचते. त्या ठिकाणी कुंडलिनीरूप महाशक्तीचे परमपुरुषाशी मीलन होते. तसे झाल्याने साधकाला दिव्यानंदाची अनुभूती घडते.

म. म. गोपीनाथ कविराज कुंडलिनीजागृतीचे रहस्य निराळ्या परिभाषेत पुढीलप्रमाणे सांगतात—

कुंडलिनी ही जीवदेहात श्वासक्रियेच्या रूपाने प्रवाहित राहून जीवधारणाला साहाय्यक होते. जीवाचे मन व प्राण यांच्याशी कुंडलिनीचा निकटतम संबंध आहे. जीवदेहात प्रा आणि मन यांचा संबंध अतिमधुर असा आहे. मन जिथे जा तिथे प्राण स्वतः उपस्थित होण्याचा प्रयत्न करतो. प्राण जि क्रिया करतो त्या ठिकाणी मन गेल्यावाचून राहत नाही. म मन-प्राणांचे ऐक्य करणे म्हणजेच कुंडलिनी जागृत करणे होय मनाला भगवंताची इच्छाशक्ती व प्राणाला भगवंताची क्रिया शक्ती म्हटले आहे. मन अथवा इच्छाशक्ती ही संस्कारवशा वक्रतेला प्राप्त होऊन आपल्याबरोबर प्राणशक्तीलाही व करून षट्चक्रांमध्ये फिरवते. त्यामुळे स्वच्छ व सरळ असलेल्य ज्ञानावरही आवरण पडून ते सुप्तावस्थेत परिणत होते. मनाल सरळ करण्याने प्राणही सरळ होतो व ते प्राणसहित म सुषुम्नामार्गात प्रविष्ट होते, म्हणून मन म्हणजेच मूलाधारात सुप्त व वक्र अशी कुंडलिनी शक्ती होय. मनोरूप कुंडलिनी सरळ करून तिला चिच्छक्तीत परिणत करणे, याचा अर्थ कुं लिनी जागृत करणे असा होतो. त्यासाठी सर्वप्रथम मना बाह्य विषयांपासून खेचून घेऊन मूलाधार प्रदेशात जखडू ठेवण्याचा प्रयत्न करावा लागतो. या मनोयोगाच्या साधनेमु पुढे हळूहळू मेरुदंडाच्या निम्नप्रदेशात एक प्रकारचे स्पंदन प्र याला येऊ लागते. त्यातून पुढे शक्तीची क्रिया स्पष्टपणे जाण लागते. त्या वेळी साधकाला असे वाटते, की एक विद्युत्प्रवा मूलाधारातून सहस्राराकडे चाललेला आहे आणि त्याच्या बरो वरच मनही ऊर्ध्व गतीने जात आहे. या अनुभवानंतर का कालाने साधकाला नाद ऐकू येऊ लागतो. मन त्या नादाच्या स्रोतात वाहत वाहत अलक्ष्याच्या ठिकाणी लीन होऊ लाग त्याचा परिणाम म्हणून पुढे महाज्ञानाचा आविर्भाव होतो. आविर्भाव प्रथम स्थायी नसून चंचल असतो; पण अविच्छि दीर्घकालीन साधना केल्याने मनावरचे संस्कार व मल होऊन तो महाज्ञानाचा आविर्भाव स्थिर होतो. त्याचबरो मनाच्या सर्व बाह्य प्रवृत्तीही शांत होतात.

शिवशक्ती – तंत्रशास्त्रात परमेश्वराला परब्रह्म, परशि पूर्ण, इ. शब्दांनी संबोधितात. तो सर्वव्यापी आणि सर्वा आहे. तो गुप्तरूपात मानवी शरीरातही आहे. तो पिंडा असूनही ब्रह्मांडात आहे. पिंडापासून अलग करून त्याचे व करता येत नाही. निष्कल, सकल, इ. तत्त्वे त्याच्या ठिका आहेत. या परमशिवाच्या ठिकाणी जेव्हा इच्छेचा आविर्भा होतो, तेव्हा त्याच्यामध्ये शक्तीचा आविर्भाव होतो. योगि म्हणतात, की परमशिवाच्या ठिकाणी जी पराशक्ती आ तिच्याशी परशिवाचा जो अभिन्न संयोग आहे, त्यातू चिच्छक्तीचा आविर्भाव होतो. चिच्छक्ती विश्वजननी आहे

एका अंगी शिव आणि त्याची शक्ती आहे व दुसऱ्या अं

जीव आणि त्याची शक्ती आहे. जीव-शिव आणि त्यांच्या शक्ती यांचे मीलन, त्यांचे ऊर्ध्व मार्गाने गमन होत असता, प्रत्येक थराच्या ठिकाणी घडत असते. सर्वांच्या अंती मग सामरस्याचा उदय होतो. त्या वेळी जीवाची भक्तिरूप शक्ती शिवाच्या चिच्छक्तीशी मिळून जाते. श्रद्धा, निष्ठा, अवधान, अनुभव आणि आनंद यांच्या नंतर हा समरसभाव उदित होतो. जीव त्या वेळी जीव राहूनही शिवसमान बनतो. जीव शिवात लीन होत नाही. जीवाची भक्तीही शिवाच्या शक्तीत लीन होत नाही. सर्व राहतात. जीव हा शिव होऊनही जीवच असतो. भक्ती ही शक्ती होऊनही भक्तीच राहते. यालाच म्हणतात सामरस्य. या अवस्थेत बंधन राहत नाही, तशी मुक्तीही राहत नाही. राहते ते स्वयंप्रकाश अद्वयरसतत्व. इथेच परमेश्वराच्या महाप्रसादाचा उदय होतो. त्या वेळी समग्र विश्व आत्मरूपाने प्रतिभासित होते. या अवस्थेचे वर्णन पुढीलप्रमाणे केलेले आहे–

कर्ता कारयिता कर्म करणं कार्यमेव च ।
सर्वमात्मतया भाति प्रसादात् पारमेश्वरात् ।।
भोक्ता भोजयिता भोग्यो भोगोपकरणानि च ।
सर्वमात्मतया भाति प्रसादात् पारमेश्वरात् ।।
जीवात्मा परमात्मा च तयोर्भेदश्च भेदकः ।
सर्वमात्मतया भाति प्रसादात् पारमेश्वरात् ।।

अर्थ – परमेश्वराचा प्रसाद झाला म्हणजे कर्ता, करविता, कर्म, कारण, कार्य, भोक्ता, भोजयिता, भोग्य, भोगोपकरणे, जीवात्मा, परमात्मा, त्यांचा भेद आणि भेदक तत्त्व, हे सर्व आत्मरूपाने भासते.

ही सामरस्याची प्रक्रिया आगममार्गात सविस्तर वर्णित आहे. त्या वर्णनाचा सारांश असा–

परमशिवावस्थेत शिवाचा शक्तीशी पूर्ण योग असतो. त्या अवस्थेत दोन्ही समप्रधान असात. दोहीत दोन्ही राहूनही एकरस असतात. त्या अवस्थेत सदाशिवापासून पृथ्वीपर्यंत हे समस्त तत्त्वमय विश्व विश्वातीत शिवाशी अभेदाने स्फुरित होते. एकमात्र परमशिवच अनंत, विचित्र आकारांनी स्फुरित होत आहे, असे त्या वेळी अनुभवाला येते. जाणणे-नेणणे तोच आहे, अणू-महान् तोच आहे, अध-ऊर्ध्व तोच आहे आणि शिव-शक्तीही तोच आहे, अशी ही सामरस्याची अनुभूती असते. हे सामरस्य हीच पूर्ण स्थिती, हाच परमप्रसाद होय. या प्रसादाच्या प्राप्तीने सर्व काही आत्ममय होऊन जाते. [तं. स्ट. रि. लि.; वाममार्ग; म. हिं. का. तां. पृ.; तां. बौ. सा. सा.; हिंदुत्व; तां. सा.; इ. तं. शा.; तां. वा. शा.; प्रि. तं.– तंत्रविज्ञान; श्री. अरुण कुमार शर्मा, १९६५; रि. इं.; म. ज्ञा. को.; आर्य संस्कृति ]

**तंदन** एक जात. या जातीची वस्ती केरळ प्रदेशात आहे. तंदन हा शब्द दंडनम् या संस्कृत शब्दापासून बनला असावा. तंदनांना तच्छन म्हणजे सुतार असेही पूर्वी म्हणत. कारण पूर्वी जेव्हा करवती नव्हत्या, तेव्हा तंदन लोक आपल्या जवळच्या ओबड धोबड हत्यारांनी लाकूडकाम करीत.

केरळात प्राचीन काळी गुन्हेगारांना झालेल्या शिक्षा अमलात आणण्याचे काम तंदन करीत असत. आता ताडी काढणे, सुंभाच्या दोऱ्या करणे, इ. धंदे ते करतात. गावात गस्त घालण्याचे काम यांच्यांतले जे लोक करीत, त्यांना उराळी अशी संज्ञा होती. उर म्हणजे गाव व उराळी म्हणजे गावाचे रक्षण करतो तो. तंदनांनी पुढे सैनिकी पेशा पत्करला. या पेशामुळे तिथल्या राजांनी त्यांना काही जमिनी इनाम दिल्या. या इनामदारीत तंदनांकडे ग्रामरक्षणाचे काम आले.

तंदन लोकात इलंजी, पुवर, इरूनेल्ली आणि निलुक्कुत्ती या चार पोटजाती असून, त्यांचा आपसात रोटीबेटीव्यवहार होतो.

यांच्या स्त्रिया तांबड्या व काळसर मण्यांच्या माळा घालतात व नायर लोक वापरतात तसला सोन्याचा ग्नाट्टू नावाचा दागिना वापरतात. त्या नाकापासून वर कपाळावर एक उभी रेघ गोंदून घेतात. हातावरही कमळ, नाग, चक्र, शंख, इ. आकृती गोंदवतात. बायकांप्रमाणे पुरुषही कपाळावर गोंदून घेतात.

भद्रकाली ही तंदनांची मुख्य देवता होय. भद्रकालीची मंदिरे केरळात अनेक ठिकाणी आहेत. चैत्र महिन्यातला भरणी नक्षत्राचा दिवस, वैशाखातला पत्तामुदयम् आणि कार्तिकातला कृत्तिका नक्षत्राचा दिवस हे त्यांचे देवीच्या उत्सवाचे मुख्य दिवस होत. पौष महिन्यातल्या पहिल्या रविवारी ते सूर्याला खिरीचा नैवेद्य दाखवतात. तंदनांच्या पुरोहितांना कुरुप्पू असे म्हणतात व ते न्हावी जातीचे असतात.

**विवाहप्रथा** – हे आते–मामे बहिणीशी लग्न करतात. मुलीचा ताळीबंधनविधी तिच्या वयाच्या सात ते बारा वर्षांच्या अवधीत होतो. लग्न मात्र ऋतुस्नात झाल्यावरच करतात. यांच्यांत बहुपतित्वाची चाल आहे.

**मर्तिकप्रथा** – कुटुंबातला सर्वांत वडील माणूस मेल्यास त्याचे दहन करतात व इतर मृतांना पुरतात. दहा दिवस सुतक पाळतात व वार्षिक श्राद्ध समुद्रकाठी करतात. देवी आलेला इसम मरण पावला, तर भद्रकालीला मेवामिठाई व ताडी अर्पण करतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**तंदुरो** एक तंतुवाद्य. हे वाद्य राजस्थानात आढळते. वीणो, चौतरो किंवा निशाण अशी याची अन्यही नावे आहेत. तंबोऱ्याप्रमाणे या वाद्यालाही चार तारा असतात व त्या उजवी-

कडून डावीकडे छेडल्या जातात. तंबोऱ्याच्या उलट पद्धतीने या वाद्याचे स्वर असतात. बलाई, दसनामी, बीसनामी, इ. लोकांच्या भजनात या वाद्याची साथ असते. [श्री. कोमल कोठारी– परंपरा, लोकगीत विशेषांक, एप्रिल १९५६]

**तंपुरान कुंचिक्कुट्टन** (१८६४–१९०८ इ. स.) केरळातला एक कवी. याचे खरे नाव रामवर्मा असे होते. पण आईबाप त्याला प्रेमाने कुंचिक्कुट्टन असे म्हणत. पुढे हा केरळव्यास या नावाने प्रसिद्ध झाला. याचा जन्म कोडंगल्लूरच्या राजघराण्यात झाला. याच्या कुटुंबातील पुरुष संस्कृतपंडित आणि कला व शास्त्रे यांचेही ज्ञाते होते.



तंपुरान कुंचिक्कुट्टन

याचा मामा मोठा विद्वान होता. त्याने याला लहानपणीच तर्क, व्याकरण, अलंकार, काव्य, नाटक, इ. विविध विषय शिकविले.

तंपुरानने संस्कृत व मलयाळम् या भाषांत एकूण पन्नास पुस्तके लिहिली आहेत. संस्कृत शब्दांचा उपयोग न करता याने मलयाळम् भाषेत दक्षयागम्, तुप्पलकोलांपी, इ. काव्ये रचली, हे याचे वैशिष्टय होय. स्यमन्तकम्, सीतास्वयंवरम्, इ. नाटकेही याने लिहिली आहेत. मित्रमंडळींचा पत्रव्यवहार, व्याख्याने, समस्यापूर्ती, व्यक्तिचित्रण, इ. गोष्टींसाठी त्याने किती स्फुट श्लोक रचले, त्याची तर गणतीच नाही. पण याने महाभारताचा वृत्तानुवृत्त अनुवाद केला आहे, तो याचा सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ होय. हा अनुवाद त्याने फक्त ८७४ दिवसांत पुरा केला. त्यामुळेच त्याला केरळव्यास ही उपाधी मिळाली. हा अनुवाद लिहून घेण्यासाठी एका वेळी तो सहा जणांना बसवीत असे व एकेकाला एकेक श्लोक रचून सांगत असे, असे सांगतात. हा ग्रंथ सुबोध व रसाळ उतरला आहे.

तंपुरानला इतिहासाची फार आवड होती. त्याने केरल नामक एक ऐतिहासिक काव्य लिहायला सुरवात केली होती. पण त्याच्या अकालमृत्यूमुळे ते काव्य अर्धवटच राहिले. त्याचे जे पाच सर्ग पुरे झाले, त्यांत केरळाच्या उत्पत्तीपासून शंकराचार्यांच्या अवतारापर्यंतचा इतिहास आलेला आहे.

तंपुरान हा चांगला गद्य लेखकही होता. रसिकरंजिनी नामक एका मासिकाचा तो संपादक होता. बुद्धिबळे हा याचा आवडता खेळ होता. हा खेळ चालू असताना एकीकडे हा कविता लिहीत असे. [युगप्रभात– १ सप्टें. १९६४]

**तंबल** दक्षिणेतल्या पुरोहितांचा एक वर्ग. यांची वस्ती आंध्र प्रदेशात आहे. आद्य शंकराचार्य आंध्र प्रदेशात संचार करीत असताना त्यांनी तिथल्या शिवमंदिरातल्या पूजे-अर्चेसाठी तमिळनाडमधून काही ब्राह्मण आणविले, तेच हे तंबल होत. तमिळनाडमधून आले म्हणून त्यांना स्थानिक लोक तंबल म्हणू लागले. तंबलांपैकी काही लोक लिंगायतही झाले आहेत. तंबल लोक शैव असून ते पडघम, ढोल आणि मृदंग वाजवितात. आपली संस्कारादी धर्मकृत्ये ब्राह्मणांकरवी करतात. शूद्र तंबलही यज्ञोपवीत घालतात. [का. ट्रा. स. इं.]

**तंबुरान** क्षत्रियांचा एक वर्ग. यांची वस्ती केरळमधील त्रिवांकुर भागात आहे. तंबुरानांची सात कुळे आहेत. त्या कुळांची नावे तिथल्याच निरनिराळ्या स्थानांवरून पडली आहेत. उत्तर मलबारमधील कोलत्तुनात हे तंबुरानांचे मूळ स्थान होय. तिथून ते इ. चे १३ वे ते १८ वे शतक या कालखंडात त्रिवांकुरमध्ये थोड्या थोड्या संख्येने येत राहिले होते. त्यांचे सर्वांत मोठे स्थलांतर इ. स. च्या १८ व्या शतकात मलबारवर टिपूने स्वारी केली तेव्हा झाले.

हे लोक यजुर्वेदी असून बौधायन सूत्रानुसार आपली धर्मकृत्ये करतात. परशुराम व भार्गव ही यांची गोत्रे आहेत. त्यांची सर्व कुळे आपली सर्व धार्मिक कृत्ये ब्राह्मणांप्रमाणेच करतात. त्यासाठी ते ब्राह्मण पुरोहिताला बोलावतात. उपनयनानंतर चौथ्या दिवशी मुलाची सोडमुंज करतात व मग त्याला लष्करी शिक्षण देण्यास प्रारंभ करतात.

तंबुरान मुलीचा ताळीबंधनसमारंभ कोईल-तंपुरान पुरुषांच्या हस्ते होतो व ती दोघे पति-पत्नी म्हणून राहतात.

तंबुरानांची जातपंचायत असते. पण त्या पंचायतीवर नंपूतिरी ब्राह्मणांचे वर्चस्व असते. [ का. ट्रा. स. इं. ]

**तंबोरा** एक तंतुवाद्य. याला तानपुरा असेही म्हणतात. प्राचीन ग्रंथांत याच वाद्याला तुंबरूवीणा असे नाव दिलेले आहे. या वाद्याचे दोन भाग असून, ते एकमेकांस जोडलेले असतात. तळाचा भाग वाटोळा असतो व सामान्यतः तो कडू भोपळ्याचा बनवलेला असतो. दुसरा भाग म्हणजे लाकडाची निमगोल दांडी असते. ती दांडी पोकळ व सुमारे पाच-सहा बोटे रुंद असते. या दांडीची एक बाजू सपाट असते. त्याचप्रमाणे भोपळ्याचीही एक बाजू सपाट लाकडाने झाकलेली असते. उत्तम तंबोऱ्याचा भोपळा बराच मोठा व लाकूड पोखरून केलेला असतो. दांडीच्या वरच्या टोकाजवळ हस्तिदंताच्या दोन अटी एक एक बोट अंतरावर बसवलेल्या असतात. दांडीच्या वरच्या भागाला अटीवर तारा लावण्यासाठी अंगठ्याएवढ्या जाडीच्या दोन खुंट्या बसवतात. त्यांना जोडाच्या खुंट्या म्हणतात. दांडीच्या दोन्ही कुशींवर तशाच प्रकारची एकेक खुंटी बसवितात. त्यांपैकी एकीला पंचमाची खुंटी व दुसरीला खर्जाची खुंटी म्हणतात. भोपळ्यावर मध्यभागी हस्तिदंती किंवा रक्तचंदनाची दोन बोटे उंच व तीन बोटे रुंद अशी एक घोडी असते. या घोडीला तारा बसविण्यासाठी खाचा असतात. भोपळ्याच्या बुडाशी मध्यावर चार बोटे लांब व बोटभर रुंद अशी तारदान नावाची हस्तिदंती पट्टी बसवितात. या पट्टीला चार छिद्रे असतात. त्यातून मुदणीने तारा ओवून त्या घोडीवरून दांडीच्या टोकाशी असलेल्या अटीत पुन्हा ओवून घेतात व खुंट्यांना गुंडाळतात.

तंबोऱ्याला चार तारा असतात. त्यांपैकी मधल्या दोन तारांना जोडाच्या तारा असे म्हणतात. त्या पोलादी असून सारख्या जाडीच्या असतात. तारांचा आवाज गोड निघावा म्हणून घोडीवर तारेखाली थोडा पिंजलेला कापूस घालतात. त्याला जव्हारी असे म्हणतात. प्रत्येक तारेत भोपळ्यावर एक मणी ओवलेला असतो. तो तारदान व घोडी यांच्यामध्ये खालीवर केल्याने स्वर हवा तेवढा कमी किंवा जास्त करता येतो.

गायकी तंबोऱ्यात सामान्यतः तीस इंच घेराचा भोपळा व तीन फूट लांबीची दांडी असते. तंबोरा उभा धरून मधल्या बोटाने पंचमाची तार व तर्जनीने जोडाच्या दोन व खर्जाची


तंबोरा वाजवणारी स्त्री

एक अशा तीन तारा, सारख्या अवकाशाने वाजवितात. गायकाला स्वराची साथ देण्यासाठी या वाद्याचा फार मोठा उपयोग होतो. काही गायक बांबूच्या किंवा नारळाच्या लहान तुकड्याने तारा दाबून वीणेप्रमाणे तंबोरा वाजवतात. दक्षिण भारतात अशा वाद्याला कोट्टू वाद्यम् किंवा बालसरस्वती असे म्हणतात. लहान तंबोऱ्याला तंबोरी असे म्हणतात. तिची सारी बनावट तंबोऱ्याप्रमाणेच असते. [ म. ज्ञा. को.; म्यु. इं.; श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**तंवर** एक जात. यांची वस्ती राजस्थानात आहे. तंवर हे तोमर या संस्कृत शब्दाचे अपभ्रष्ट रूप आहे. तंवर लोक आपल्याला युधिष्ठिराचे वंशज मानतात. दिल्लीचे राजसिंहासन बराच काळ तोमर वंशाच्या ताब्यात होते.

यांच्यांत रामदेव तंवर नामक एक शूर पुरुष होऊन गेला. मुसलमान लोक या रामदेवालाच रामशाहपीर असे म्हणतात.

दिल्लीत या रामशाहपीराची समाधी आहे. दरवर्षी याच्या पुण्यतिथीच्या निमित्ताने इथे एक यात्रा भरते.

तंवरांच्या साऱ्या चालीरीती भाट व राजपूत यांच्याप्रमाणे आहेत. शेतकी व नोकरी हे यांचे प्रमुख व्यवसाय होत. यांच्यांत बरेच मुसलमानही आहेत. राजस्थानात गेल्यावर त्यांना तिथे एखादे राज्य स्थापता आले नाही. [रा. जा.]



तंवर पुरुष

**त** त वर्गातील प्रथम वर्ण आणि वर्णमालेतील सोळावे व्यंजन. या अक्षराचे सर्वांत जुने रूप अशोकाच्या शिलालेखात (सनपूर्व ३ रे शतक), दुसरे भट्टिप्रोलू येथील स्तूपावरील लेखात (सनपूर्व २ रे शतक) व तिसरे चंबा राज्यातील सराहा येथे सापडलेल्या प्रशस्तीमध्ये (इ. स. चे १० वे शतक) दिसते

त = ⅄ ꞇ त त

त च्या रूपाचा विकासक्रम

चतुर्भुज, अत्यंत शांत, महामोक्षप्रद, सदैव सोळा वर्षांची लाल वस्त्र व विविध अलंकार धारण करणारी आणि सर्व सिद्धिप्रद अशा तकाररूपी देवतेचे ध्यान करून तिचा मंत्र दह' वेळा जपावा, असे सांगितले आहे (वर्णोद्धारतंत्र).

हा दंत्य वर्ण आहे. [म. ज्ञा. को.; श. क.]

**तई पुसम** तमिळनाडमधील एक सण व उत्सव. तई (पौष) मासात ज्या दिवशी पुष्य नक्षत्र येते, त्या दिवशी हा सण साजरा करतात. पौषात हे नक्षत्र पौर्णिमेच्या सुमारास येते. गुरू ही या नक्षत्राची देवता होय. त्या दिवशी एखाद्या पवित्र नदीत स्नान करून मग गुरूची पूजा करतात. तिरुविदै मरुथुर या क्षेत्रात हा पूजोत्सव विशेष प्रमाणात होतो. या उत्सवाच्या मागे ज्या कथा आहेत, त्या अशा–,

द्वापरयुगाच्या शेवटी चोळ देशात हंसध्वज नावाचा राजा राज्य करीत होता. तो अत्यंत धार्मिक होता. एके दिवशी न कळत त्याच्या हातून ब्रह्महत्या घडली. ती कृत्येच्या रूपाने त्याच्या पाठीस लागली. तिच्या जाचातून कसे मुक्त व्हावे, हा प्रश्न त्याने भार्गवऋषीला विचारला. भार्गवाने राजाला तीर्थाटन करण्याचा उपदेश केला. त्याप्रमाणे राजा तीर्थयात्रेला निघाला. ती ब्रह्महत्याही त्याच्या पाठीमागे जाऊ लागली. शेवटी तो तिरुविदै मरुथुर या क्षेत्रात आला. तिथे सिद्धतीर्थ कूपात स्नान करून पक्षद्वाराने तिथल्या मंदिरात शिरला. त्या क्षणी त्याच्या पाठीची ती ब्रह्महत्या अदृश्य झाली. तई पुसम या दिवशी ही घटना घडली, म्हणून राजाने तिथल्या मंदिराला मोठी देणगी दिली व दरवर्षी तिथे या तिथीला मोठा उत्सव करण्यास सांगितले.

तंपर बरणी या नदीच्या काठी बसून पार्वती शिवाच्या प्रसन्नतेसाठी तपश्चर्या करीत होती. तई पुसमच्या दिवशी शिव तिच्यावर प्रसन्न झाला व त्याने तिला इच्छित वर दिला. ही नदी तिनेवेल्ली जिल्ह्यातून वाहते. तई पुसमच्या दिवशी या नदीत स्नान करणे पुण्यप्रद मानतात, ते या कथेमुळेच.

इंद्राला अहल्येशी जारकर्म केल्यामुळे जे पाप लागले, ते याच दिवशी तिरुविदै या क्षेत्रात आल्याने नष्ट झाले. या उत्सवाच्या माहात्म्याचे हेही एक कारण मानले जाते.

वैदीश्वरन्कोइल व पळणी या दोन्ही क्षेत्रांत या दिवशी सुब्रह्मण्याचा पूजोत्सव करतात. सुब्रह्मण्याच्या हातातले अमोघ खड्ग त्याला पार्वतीकडून तई पुसमच्या दिवशी प्राप्त झाले, अशी कथा आहे. त्या दिवशी या दोन्ही क्षेत्रांत मोठी यात्रा भरते. तंजाऊर जिल्ह्यातल्या तिरुवेदी कुदी व तिरुवादी या क्षेत्रांतही हा उत्सव मोठ्या प्रमाणात साजरा होतो. तमिळनाडमध्ये दसऱ्याच्या खालोखाल हा दिवस शुभ समजला जातो. मुलाच्या विद्यारंभासाठीही हा दिवस प्रशस्त मानतात. [सा. इं. फे.]

**तऑल** ओडिसामधली एक जमात. अंगुल जिल्ह्यात तालमूल नावाचे जे एक गाव आहे, ते यांचे मूलस्थान असून, यावरूनच त्यांना तऑल हे नाव पडले, असे म्हणतात. ही जमात खोंड जमातीतून निर्माण झाली आहे. हे लोक पूर्वी सैनिकी पेशाने जगत. या सर्व जमातीचे नाग हे एकच गोत्र असून, कुळे मात्र वेगवेगळी आहेत. हे समान कुळात लग्नसंबंध करीत नाहीत.

कालपाश हे त्यांचे मुख्य दैवत असून, तालमूल येथे त्यांचे स्थान आहे. हे लोक नवान्न भक्षणाच्या दिवशी कालपाशाला

बोकडाचा बळी देतात. गुरे हाकण्याची काठी हे त्यांच्या व्यवसायाचे प्रतीक आहे. म्हणून त्याच दिवशी हे काठीचीही पूजा करतात. नागाला मान देतात. मृतांना पुरतात किंवा जाळतात. पुरल्या जागी जांभळीची फांदी पुरतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**तक वंश** भारतावर आक्रमण करून भारतातच राहिलेली सिथिक वंशाची एक प्रमुख शाखा. संस्कृत साहित्यात या वंशाला तक्षक असे नाव दिलेले आढळते. राजस्थानात सापडलेल्या पाली भाषेतील शिलालेखात तक्षक, तुस्ता व तक या नावांनी या वंशाचा उल्लेख अनेकवार आलेला आहे. आर्यांशी शत्रुत्व करणाऱ्या तक्षक नागाची जी कथा पुराणात येते, ती या तक्षक वंशाविषयीच आहे, असे तज्ज्ञांचे मत आहे.

हा वंश भारतात अडीच हजार वर्षांपूर्वीच प्रविष्ट झाला असावा. शिकंदराने भारतावर स्वारी केली, तेव्हा त्याला पारोपामिजान टेकड्यात परिटाके नामक पहाडी तक लोक आढळले होते. शिकंदराचा एक मित्र ताक्सिलीज् हा तकांचा नायक होता. जैसलमेरच्या भाट्टी राजांविषयी अशी कथा प्रचलित आहे, की त्यांना झाबुलीस्तानातून हाकलून दिल्यावर ते सिंधू नदीच्या प्रदेशात आले व त्यांनी तकांना तिथून घालवून तिथे आपले राज्य स्थापिले. सलभानपुरा ही त्या काळी तकांची राजधानी होती. सलभान हा तक वंशातला एक पराक्रमी राजा होता. त्याच्याच नावाने ही नगरी वसली होती.

पुढे काश्मीरातून दक्षिणेकडे येऊन तकांनी राजस्थानात आपले आसन दृढ केले. चितोडचे राज्य गुहिलोतांपूर्वी तकांकडे होते. चितोडवर गुहिलोत वंश राज्य करू लागल्यावरही असरगड येथे तकांचे राज्य टिकून होते. चितोडवर मुसलमानांची धाड आली असताना चितोडच्या रक्षणाच्या कामी असरगडचे राजे अग्रभागी राहिले होते. असरगडावर तकांनी दोन शतके राज्य केले. असरगडचा एक राजा पृथ्वीराज चौहानाचा उजवा हात होता, असे चंदबरदाईने लिहून ठेवले आहे.

फिरोज तुग़लुक़ाच्या काळात तुग़लुक़ांचे स्वामित्व झुगारून देऊन गुजरातेत स्वतंत्र राज्य स्थापणारा सुलतान झफीरखान हा मूळचा तकवंशीयच होता. त्याचा पिता शेहरन तक याने मुसलमान धर्म स्वीकारून वजी–उल्–तुल्क असे नाव धारण केले. गुजरातेत तकांनी इस्लाम धर्म स्वीकारल्यानंतर राजस्थानच्या इतिहासात त्यांचे नाव लुप्त झाले. [ अं. अं. रा. ]

**तख़्त** शीखांचे पुढील चार मुख्य गुरुद्वारे तख़्त या नावाने प्रसिद्ध आहेत – (१) श्री अकाल तख़्त – हे अमृतसर येथे असून, तिथे शीखांचे सुप्रसिद्ध हरिमंदिर आहे. (२) पटनासाहब – हे पाटणा येथे आहे. इथे गुरू गोविंदसिंघ यांचा जन्म झाला. (३) आनंदपुरसाहब – हे पंजाबात असून इथे गुरू गोविंदसिंघ यांचे वास्तव्य होते. (४) हुजूरसाहब – हे स्थान मराठवाड्यात नांदेड येथे असून इथे गुरू गोविंदसिंघ यांचा अंत झाला. ही चारही ठिकाणे शीख संप्रदायात तीर्थ पदवीला प्राप्त झाली आहेत. [ अ. अ. ]

**तगर** महाराष्ट्रातील एक प्राचीन नगर. धाराशिव (उस्मानाबाद) जिल्ह्यातील सध्याचे तेर हे गाव म्हणजेच प्राचीन तगर होय, असे मत प्रत्यक्ष निरीक्षणावरून प्रथम श्री. कझिन्सने इ. स. १९०२ मध्ये मांडले आणि ते पुढे सर्वमान्य झाले. हे गाव तेरणा नदीच्या काठावर वसलेले आहे.

गावाच्या दक्षिणेला आणि नदीच्या पैलतीरावर प्राचीन अवशेषांनी युक्त अशा अनेक गढ्या आणि टेकड्या आहेत. या टेकड्यांच्या आसपास प्राचीन विटांचे आणि खापरांचे हजारो तुकडे विखुरलेले आहेत. प्राचीन मणी आणि नाणीही इथे सापडतात. जुन्या घरांचे भग्नावशेष आजही त्या प्राचीन नगराची कल्पना देऊ शकतात.

इथे सापडलेल्या प्राचीन वस्तूंच्या संभारात एक सात इंच उंचीची आकर्षक बाहुली आहे. या बाहुलीची वेषभूषा आणि केशरचना या नगराचा प्राचीन ग्रीक–रोमन संस्कृतीशी संबंध आला असल्याचे दाखवते.

तगर हे सुमारे दीड-दोन हजार वर्षांपूर्वीपासून दक्षिणेतील एक मोठे व्यापारी केंद्र होते. सातवाहनकालात या नगरातून तलम मलमल, रेशमी कापड, गोमेद, हस्तिदंत, इ. मूल्यवान वस्तू भरुचमार्गे परदेशात जात असत. सातवाहनकालात हे नगर दक्षिणेतील प्रतिष्ठान (पैठण), यवननगर (जुन्नर), इ. प्रमुख नगरांशी हमरस्त्यांनी जोडलेले होते. सातवाहनांपूर्वी मौर्यकालातही हे एक पुढारलेले स्थान होते, हे इथे मिळालेल्या चकचकीत काळी झिलई असलेल्या मातीच्या भांड्यांवरून सिद्ध होते. इथे एक नवाश्मयुगीन दगडी कुऱ्हाडही सापडली आहे. इथे मिळालेल्या अवशेषांपैकी रोमन पात्राशी साम्य असलेले रांजण व सुरया, तसेच रोमन दिनार नाण्यांसारखे दिसणारे मातीचे भाजलेले ताईत पाहता, एके काळी या नगराचा रोमन साम्राज्याशी घनिष्ठ व्यापारी संबंध होता, याची खात्री पटते. पेरिप्लसने आणि पुढे टॉलेमीनेही तगरचा एक मोठे व्यापारी केंद्र म्हणून उल्लेख केलेला आहे.

तगर ही शिलाहारांची मूलभूमी होती. उत्तर कोकणाचे आणि कोल्हापूरचे शिलाहार आपणांस तगरपुरवराधीश्वर असे म्हणवून घेत असत. महालक्ष्मी ही शिलाहारांची कुलदेवता

होती. महालक्ष्मीला दोन हत्ती आपल्या सोंडांनी स्नान घालीत आहेत, असे दृश्य खोदलेल्या मुद्रा आणि नाणी इथे उपलब्ध झाली आहेत.

इ. स. च्या अकराव्या शतकातील जैन मुनी कनकामर याच्या करकंडचरिउ नामक ग्रंथात तगरचा उल्लेख तेरापूर या नावाने केलेला असून, तेथील जैन लेण्यांचे विस्तृत वर्णन केले आहे. सध्या ही लेणी 'धाराशिव लेणी' म्हणून ओळखली जातात. ( धाराशिव पाहा )

सध्या तेर इथे प्राचीन मंदिरशिल्पाचेही काही उत्कृष्ट नमुने आढळतात. त्रिविक्रममंदिर म्हणून ओळखले जाणारे सध्याचे वैष्णवमंदिर हे प्राचीन बौद्ध चैत्याचेच एक बदललेले रूप आहे. हा चैत्य हत्तीच्या पाठीसारखा आहे. बांधकाम मोठ्या आकाराच्या पक्क्या विटांनी केलेले असून, त्याची लांबी २६ फूट, रुंदी १२ फूट आणि उंची ३० फूट आहे. विटांचे थर थोडे थोडे पुढे आणून वरचे कमानी छत निमुळते बनवले आहे. आतील बौद्ध स्तूपाच्या जागी त्रिविक्रममूर्ती विराजमान झालेली असली, तरी इथे पडलेल्या स्तूपाच्या अवशेषांवरून या वास्तूचे बौद्ध स्वरूप स्पष्ट कळते. येथील स्तूपांवरील कमलांच्या आकृती सांची आणि अमरावती येथील स्तूपांवरील आकृतींसारख्या आहेत. या चैत्याचे छप्पर बाहेरून लाकडाचे केलेले असून, त्याचे प्राचीन बौद्ध चैत्याशी साम्य आहे. त्यावरून विद्वानांनी असा कयास केला आहे की, हे चैत्यमंदिर इ. स. च्या चौथ्या–पाचव्या शतकाइतके प्राचीन असावे. दक्षिणेतला बौद्ध धर्माचा प्रभाव ओसरताच याचे वैष्णव मंदिरात रूपांतर केले गेले, असे दिसते. या मूळ चैत्याचे मंदिरात रूपांतर करताना त्याला पुढे मोठ्या आकाराचा मंडप जोडला गेला. हा मंडप चार स्तंभांवर उभा असून, त्याला पूर्व आणि उत्तर या दिशांना द्वारे आहेत. या मंडपाचे छत लाकडी आहे.

गुप्तकालीन वास्तुशिल्पाचा हा नमुना म्हणजे भारतातील मंदिरशिल्पाच्या विकासातला एक महत्त्वपूर्ण टप्पा आहे.

या मंदिराशिवाय उत्तरेश्वरमंदिर आणि कालेश्वरमंदिर ही आणखी दोन उत्कृष्ट प्राचीन मंदिरे इथे आहेत. ही मंदिरेही त्रिविक्रममंदिराप्रमाणेच मोठ्या आकाराच्या विटांनी बांधलेली असून, दोहोंचीही शिखरे द्राविड पद्धतीची आहेत. त्यांच्या दर्शनी भागांवर गिलावा केलेला आहे. उत्तरेश्वराचे मंदिर पूर्वाभिमुख असून, त्यावरील कलाकुसरीची मकर-तोरणे कालौघात विद्रूप झाली असली, तरी ती अत्यंत आकर्षक वाटतात. या मंदिराच्या छतावर उठावाने कोरलेल्या देवदेवतांच्या मूर्ती आणि त्याखालचे स्वैर हंस रेखीव आहेत.

या मंदिराच्या मूळ बांधणीत दगड मुळीच वापरलेला नाही. दारे आणि तुळया लाकडाच्या आहेत. बारा-तेरा शतकांपूर्वीच्या या मंदिराची लाकडी चौकट कोरीव नक्षीने सुशोभित बनवलेली आहे. चालुक्यकालीन काष्ठशिल्पाचा हा एक उत्कृष्ट नमुना समजला जातो. या मूळ मंदिरापुढे नंतर उभारलेला एक दगडी मंडप आहे. कालेश्वराचे मंदिर नदीच्या पैलतीरावर असून तेही तितकेच जुने आहे.

गोराकुंभार हा संत याच गावचा होय. त्याची समाधी इथे तेरणा नदीच्या काठी असून, त्या ठिकाणी प्रतिवर्षी चैत्र वद्य एकादशी ते अमावास्या आणि कार्तिक शुद्ध एकादशी या दिवशी यात्रा भरते. [श्री. अ. वि. नाईक – न्यू इं. अँ., व्हॉ. १ जुलै–डिसेंबर १९४७ ; श्री. म. के. ढवळीकर – प्रतिष्ठान ऑक्टोबर १९५८; म. जि. – उस्मानाबाद ]

## तडवी

एक जमात. यांची वस्ती सातपुड्याच्या पायथ्याशी अशिरगडापासून चोपड्यापर्यंत आहे. मुसलमान व भिल्ल यांच्या संकरातून ही जमात निर्माण झाली असावी, असे मानतात. औरंगजेबाच्या कारकीर्दीत या जमातीने मुसलमान धर्म स्वीकारला. तडवी लोक उंच, सुदृढ व इतर भिल्लांपेक्षा गोरे असतात. यांचा पोशाख खानदेशी कुणब्यांप्रमाणे असतो.

तडवींमध्ये तडवीपठाण व खानदेशी तडवी असे स्थलपरत्वे दोन पोटभेद आहेत. हे लोक मुसलमान असूनही त्यांच्यावर हिंदू धर्माचा प्रभाव आहे. त्यांची भाषा अहिराणी– मराठी मिश्रित आहे. परंतु तिच्यात मधून मधून उर्दू शब्दही आढळतात. गुढी पाडवा, सर्वपित्री, नागपंचमी, दिवाळी, मोहरम, रमजान, बकरी-ईद हे त्यांचे मुख्य सण आहेत. हे मांसाहारी असले, तरी गोमांस निषिद्ध मानतात. बऱ्याच तडवींच्या घरी खंडोबा, बहिरोबा यांचे टाक असतात. त्यांच्यांत पीरपूजेचे प्रस्थही बरेच आहे. हे राजूरच्या देवीला जाऊन मुलांचे जावळ करतात. जावळानंतर काही दिवसांनी काजीला बोलावून मुलांची सुंता करतात. तडवींची गाणी पाहिली असता हे लोक मुसलमान आहेत, असे वाटतच नाही. त्यांपैकी एक गाणे असे –

**आखाजीचा सण आला, मुऱ्हाळी आला ।। धृ. ।।**
**किती दिस ऱ्हाशी सांग सये माहेराला ।।**
**पंचमीचा झोका खाऊ पोळ्याची मौज पाहू ।**
**गाडी जुंपून येईन ग दसऱ्याला ।।**
**होळी बाईला निवद दावू पाडव्याच्या गुढीवर तांब्या ठेवू ।**
**जगदंबेची यात्रा पाहू पुनवेला मग जाऊं आपल्या सासऱ्याला ।।**

**विवाहप्रथा–** ही जमात मुसलमानांशी रोटीव्यवहार करते पण बेटीव्यवहार करीत नाही. या लोकांत मामे बहिणीशी लग्न करतात, पण मुसलमानांप्रमाणे मावस बहिणीशी वा चुलत

बहिणीशी करीत नाहीत. लग्नाची तिथी ठरविण्यासाठी ब्राह्मणाला बोलावतात. सगाई पक्की झाल्यावर आप्तेष्टांना दूधभात व गूळ यांचे जेवण देतात. पंचांच्या साक्षीने नवऱ्या मुलाला शेलापागोटे व नवरीला एक चिरडी देतात. नंतर नवरीच्या गळयात एक काळी पोत बांधतात. त्यानंतर वधू-वर मशिदीत जातात व तिथे काजी कलमा वाचून त्यांचे लग्न लावतो.

**प्रसूतिप्रथा** – स्त्री प्रसूत झाल्यावर पाचव्या दिवशी सटवीची पूजा करतात. रेती व खडे आणून बाळंतीण त्यावर हळद-कुंकू वाहते. मुलाचे बारसे करतातच असे नाही.

कोणी अनैतिक आचरण केल्यास जमातीचे पंच त्याला बहिष्कृत करतात. अपराधी मनुष्य पंचांना शरण गेल्यास किंवा त्याने दंड भरल्यास त्याला परत जातीत घेतात.

तडवी स्त्रिया सकच्छ लुगडी नेसतात, अंगात चोळी घालतात व चांदीचे दागिने घालतात. त्या कुंकू मात्र लावीत नाहीत.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात. तिसऱ्या दिवशी मृताच्या कबरीजवळ दुधाची बोंडली भरून ठेवतात. [ म. जि. – जळगाव; म. लो. सा.३; म. ज्ञा. को.; श्री. जा. सं. तडवी-सर्वोदय, आदिवासी विशेषांक, जानेवारी १९६० ]

**तडागोत्सर्ग** जलाशय व सरोवर यांना तडाग असे म्हणतात. लोकांच्या उपयोगासाठी वापी, कूप व तडाग निर्माण करणे धर्मशास्त्राने पुण्यप्रद मानले आहे. तडाग निर्माण करून मग त्याचा सर्व लोकांच्या उपयोगासाठी उत्सर्ग करावा, असे सांगितले आहे. त्याचा विधी असा –

कुंड– मंडप करून होमहवन करावे. यजमानाने ब्रह्मा-विष्णु-महेशांची पूजा करावी. ब्राह्मणांकरवी जप करावा. तलावात सुवर्णालंकृत गायीला उतरवून तिचे सामगायक ब्राह्मणाला दान द्यावे. तलावात सोन्याचे मासे व कासव करून टाकावे. नंतर तलावाचा उत्सर्ग करून ब्राह्मणभोजन घालावे. असा तडागोत्सर्ग करणारा मनुष्य अनेक कल्प शिवलोकी वास्तव्य करतो (मत्स्य पु. ५८). नारद पुराणातही तलाव खोदण्याचे पुण्य विशेष असल्याचे सांगितले आहे. तिथे त्याविषयी कथा दिली आहे, ती अशी–

गौड देशात वीरभद्र नावाचा एक राजा होता. एके दिवशी तो मंत्रिजनांना बरोबर घेऊन शिकारीसाठी वनात गेला. दुपारपर्यंत त्याने खूप शिकार केली. मग त्याला तहान लागली. जवळच त्याला एक लहानसा तलाव दिसला. पण जवळ जाऊन पाहतो तर, तो कोरडा पडला होता. त्या वेळी बुद्धिसागर नावाचा राजाचा मंत्री पुढे झाला. त्याने तलावात उतरून हातभर खड्डा खोदला. त्या खड्ड्यात पाणी लागले. ते पिऊन सर्वांनी तहान भागवली.

मग राजाने बुद्धिसागराला त्या लहानशा तलावाचे मोठे सरोवर बनवण्याची आज्ञा दिली. त्याप्रमाणे बुद्धिसागराने चहू बाजूंनी विस्तृत खोदून तलाव खूप मोठा केला. त्याला पाळ बांधली. तलावात पाणीही विपुल साठले. त्या दिवसापासून पशुपक्षी आणि पांथस्थ त्या सरोवराचे पाणी पिऊन आपली तृष्णा शमवू लागले. त्या पुण्यकृत्याचा प्रेरक म्हणून राजा तर स्वर्गलोकी गेलाच; शिवाय बुद्धिसागरालाही त्या कार्यामुळे स्वर्ग मिळाला. [ कल्याण–संक्षिप्त नारद-विष्णू पुराणांक ]

**तत वाद्ये** चतुर्विध वाद्यांपैकी एक विभाग. 'ततं वीणादिकं वाद्यम्' (अमर.) तारा व ताती ताणून बनवलेली वाद्ये ततवर्गात मोडतात. उदा० तंबोरा, वीणा, सूरसोटा, सतार, बीन, एकतारी, सरोद, दिलरुबा, ताऊस, फिडल, सारंगी, स्वरमंडल, तुणतुणे, इत्यादी.

**तत्त्वं** विविध दर्शनांत येणारा एक महत्त्वाचा शब्द. वस्तुस्थिती, सत्य, यथार्थ स्वरूप, मूलघटक, ब्रह्म, मन, शरीर, देवता, तात्पर्य, इ. तत्त्व शब्दाचे अनेक अर्थ आहेत. 'सतश्च सद्भावः असतश्चासद्भावः' (= सत् आणि असत् हे जसे ग्रहण केले असेल, तसे असणारे आणि तद्विरुद्ध न होणारे ते तत्त्व होय). निरनिराळया दर्शनांत तत्त्वांची संख्या निरनिराळी दिलेली आहे.

वेदांती चिन्मात्र ब्रह्म हे एकमेव तत्त्व मानतात. शंकराचार्यांनी तत्त्व या शब्दाची व्याख्या केली आहे, ती अशी– 'तदिति सर्वनाम, सर्वं च ब्रह्म तस्य नाम। तद्भावस्तत्त्वं ब्रह्मणो याथात्म्यम्' (= तत् हे सर्वनाम; सर्वनाम म्हणजे विश्वातील सर्व पदार्थांना लागू पडणारे नाव; ब्रह्म हे व्यापक असल्यामुळे सर्व पदार्थांना व्यापून आहे. म्हणून त्याचे तत् हे नाव होय. त्याला भाव या अर्थी त्व प्रत्यय लागून तत्त्व शब्द बनला. तत्त्व म्हणजे ब्रह्माचे स्वरूप होय.)

शून्यवादी बौद्ध शून्य हेच एकमेव तत्त्व मानतात.

द्वैतवादी स्वतंत्र व अस्वतंत्र, आर्हत ( जैन ) हे जीव आणि अजीव, तसेच रामानुज हे द्रव्य व अद्रव्य अशी दोन तत्त्वे मानतात.

पाशुपत हे पती, पशू व पाश ही तीन तत्त्वे मानतात.

चार्वाकवादी हे पृथ्वी, आप, तेज व वायू अशी चार तत्त्वे मानतात.

शाक्त तांत्रिक हे मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा व मैथुन आणि

वैष्णव तांत्रिक हे गुरू, मंत्र, मन, देव व ध्यान अशी पाच तत्त्वे मानतात.

शैव हे कला, काल, नियती, विद्या, राग, प्रकृती व गुण अशी सात तत्त्वे मानतात.

कापिल सांख्य हे आकाश, वायू, तेज, आप, पृथ्वी, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, श्रोत्र, त्वक्, चक्षू, जिव्हा, प्राण, मन, आत्मा, पुरुष, प्रकृती, महत्, अहंकार, मुख, पाणी, उपस्थ व पायू अशी पंचवीस तत्त्वे मानतात.

योगी हे वरील पंचविसात ईश्वर हे एक तत्त्व अधिक मिळवून सव्वीस तत्त्वे मानतात.

त्या त्या दर्शनांत त्या त्या दर्शनकारांनी स्वीकारलेल्या तत्त्वांच्या आधारावरच तत्त्वज्ञानाची उभारणी केलेली असते. [श. क.; न्या. को.]

**तत्त्वन्यास** तांत्रिक विष्णुपूजा कर्तव्य असता प्राणायामाच्या पूर्वी निरनिराळ्या अवयवांच्या ठिकाणी भिन्न तत्त्वांचा न्यास करतात, त्याला तत्त्वन्यास असे म्हणतात. 'मादिकान्त' बीजमंत्राचा उच्चार करून, तसेच जीव व प्राण हे शब्द त्यांच्यापुढे उच्चारून हा सर्वांगन्यास करायचा असतो. उदा०–

**मं नमः पराय जीवतत्त्वात्मने नमः ।**

**भं नमः पराय प्राणतत्त्वात्मने नमः ।**

हे दोन मंत्र म्हणून सर्व अवयवांना स्पर्श करतात. त्यानंतर बं, फं, पं, नं, धं, दं, थं, तं, णं, ढं, डं, ठं, टं, ञं, झं, जं, छं, चं, ङं, घं, गं, खं, कं या बीजमंत्रांनी अनुक्रमे हृदयापासून पायापर्यंतच्या अवयवांना स्पर्श करतात (तंत्रसार). याचे फल पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**तत्त्वन्यासं ततः कुर्यात्साधकः सिद्धिहेतवे ।**

**कृतेन येन देवस्य रूपतामेव यात्यसौ ।।**

(गौतमीयतंत्र)

**अर्थ** – त्यानंतर सिद्धी मिळावी या उद्देशाने साधकाने तत्त्वन्यास करावा. जो केला असता हा (साधक) देवरूपतेला जातो.

**तत्त्वबोधिनी सभा** महर्षी देवेंद्रनाथ ठाकूर यांनी स्थापन केलेली एक धार्मिक संस्था. देवेंद्रनाथांनी ही संस्था तत्त्वरंजिनी सभा या नावाने आपल्या वयाच्या बाविसाव्या वर्षी इ. स. १८३९ मध्ये स्थापन केली. उपनिषदातील ज्ञानाचा प्रसार करावा आणि धर्मजिज्ञासा वाढवावी, असे या संस्थेचे हेतू होते. या संस्थेच्या साप्ताहिक व मासिक सभा भरत. संस्थेच्या पहिल्या सदस्यांत देवेंद्रनाथांचे बंधू आणि आप्त अशी घरचीच दहा तरुण माणसे होती. पण पुढे अवघ्या दोनच वर्षांत सदस्यांची संख्या पाचशेवर गेली. इतकेच काय; पण बंगालमधील काही राजे-महाराजे, जमीनदार व अनेक विद्वानही या संस्थेचे सदस्य बनले. ही संस्था उत्कर्ष पावताच देवेंद्रनाथांनी तिचे आचार्यपद पंडित रामचंद्र विद्यावागीश यांच्याकडे दिले आणि त्यांच्याच सूचनेवरून संस्थेचे तत्त्वबोधिनी सभा असे नवे नाव ठेवले. पंडित रामचंद्र विद्यावागीश हे या आचार्यपीठावरून प्रवचने करीत असत. प्रवचनाच्या प्रारंभी ते तत्त्वबोधिनी सभेच्या तत्त्वज्ञानाचे सार असलेला पुढील श्लोक म्हणत असत –

**रूपं रूपविवर्जितस्य भवतो ध्यानेन यद् वर्णितम् ।**

**स्तुत्या निर्वचनीयताखिलगुरो दूरीकृता यन्मया ।।**

**व्यापित्वं च विनाशितं भगवतो यत्तीर्थयात्रादिना ।**

**क्षन्तव्यं जगदीश तद्विकलतादोषत्रयं मत्कृतम् ।।**

**अर्थ** – भगवन्, अरूप असा जो तू, त्या तुझ्या रूपाचे मी ध्यानाच्या मिषाने वर्णन केले. (त्याचप्रमाणे) हे सर्वगुरो, तुझी स्तुती करून मी तुझ्या अनिर्वचनीयतेला बाध आणला. (तद्वतच) तीर्थयात्रादी करून तुझ्या सर्वव्यापित्वाचीही हानी केली. एकंदरीत माझ्या हातून घडलेल्या या तीन अपराधांबद्दल हे जगदीशा, तू मला क्षमा कर.

या संस्थेने एक वैदिक शाळाही चालवली होती. श्री अक्षयकुमार दत्त हे तिथे अध्यापनाचे काम करीत. या संस्थेचा उत्कर्ष चालू असताना ब्राह्मसमाजातील निष्ठा आणि शिस्त ओसरू लागली होती. ब्राह्मसमाजाचे संस्थापक राजा राममोहन रॉय हे देवेंद्रनाथांच्या वडिलांचे मित्र व सहकारी होते. स्वतः देवेंद्रनाथांचे शिक्षण राम मोहन रॉय यांच्याच शाळेत झाले होते. या जिव्हाळ्याच्या संबंधामुळे राम मोहन रॉय यांच्या कार्याबद्दल देवेंद्रनाथांच्या मनात अत्यंत श्रद्धाभाव वसत होता. त्यांनी स्थापन केलेल्या संस्थेची दुरवस्था पाहून देवेंद्रनाथ पुढे झाले आणि त्यांनी इ. स. १८४२ मध्ये तत्त्वबोधिनी सभा ब्राह्मसमाजात विलीन करून समाजाचे नेतृत्व स्वतःकडे घेतले. या घटनेने ब्राह्मसमाजाचा पुनरुद्धार घडला आणि त्याच्या उत्कर्षाला शाश्वती आली, असे ब्राह्मसमाजाचे इतिहासकार शिवनाथ शास्त्री यांनी गौरवाने म्हटले आहे. [नवयुगधर्म – १; सं. चा. अ.]

**तत्त्ववेत्ता** (इ. स. च्या १५ व्या शतकाची अखेर) एक संत कवी. हा निंबार्क संप्रदायातला होता. राजस्थानातल्या जोधपूर जिल्ह्यातील जैतारण या नगरात हा राहत असे. हा छैन्याती ब्राह्मण होता. तत्त्ववेत्ता ही याची उपाधी आहे. त्याच्या खऱ्या नावाचा मात्र पत्ता लागत नाही.

याचा कवित्त नामक एक ग्रंथ पिंगल भाषेत आहे. त्यात राम, कृष्ण, नारद, जनक, इ. महापुरुषांचे माहात्म्य गायिले आहे. याने अनेक चमत्कार करून दाखवले, असे म्हणतात. त्याच्या-भोवती शेकडो शिष्य गोळा झाले होते. त्यांपैकी तीन-चार शिष्यांच्या गाद्या आजही अजमेर, जयपूर, जैतारण, इ. गावी चालत आहेत. [ रा. भा. सा. ]

## तत्त्वज्ञान

सुधारलेल्या मानव समाजाच्या जीवनाचे रहस्य त्याच्या तत्त्वज्ञानात प्रकट झालेले दिसते. सुधारलेल्या मनुष्यांनी निर्माण केलेल्या संस्कृतींचा किंवा सामाजिक संस्थांचा अर्थ त्यांच्या तत्त्वज्ञानात भरलेला असतो. विशेषत: त्यांची मानसिक मूल्ये व बौद्धिक प्रयत्न हे तत्त्वज्ञानाचे मूर्तिमंत आविष्कार होत. तत्त्वज्ञानात फरक पडला म्हणजे मानवी जीवनातही फरक पडतो. मानवी ध्येये आणि मानसिक मूल्ये यांच्या क्षेत्रांत तत्त्वज्ञानाचे प्रभावी स्वरूप अधिक दृग्गोचर होत असते. धर्म, नीती, कला आणि विज्ञान हे ध्येयांचे आणि मानसिक मूल्यांचे प्रमुख क्षेत्र होय. त्यात मानवी आत्मा आपल्या स्वरूपाचा अनुभव घेत असतो. राजकारण आणि कायदा यांच्यांत ही ध्येये आणि मूल्ये संमिश्र व संकुल स्वरूपात प्रतीत होतात; म्हणून तत्त्वज्ञानाचा त्यांच्याशी साक्षात संबंध दाखवणे अधिक कष्टाचे असते. प्रकाशात काम करणाऱ्याला प्रकाशाचे प्रकट भान पुष्कळ वेळा नसते; तशीच तत्त्वज्ञानातील व्यापक विचारांच्या संबंधाची स्पष्ट जाणीव लोकांना नसते. परंतु त्यांचा प्रभाव सुधारलेल्या समाजाच्या व्यवहारावर पडलेला असतो, हे मात्र नक्की. कारण मनुष्याचे शक्तिसर्वस्व ज्यात खर्चिलेले असते, त्या सामाजिक संस्था व ती मूल्ये म्हणजे मानवी आत्म्याच्या उच्चतम शक्तीचा बहर आणि तत्त्वज्ञान म्हणजे त्या शक्तीचे परमसार होय.

ज्ञानाशिवाय मानवी प्रयत्न सफल होत नाहीत. तत्त्वज्ञान हे सुधारलेल्या मनुष्याच्या ज्ञानसाधनेचे एक महत्त्वाचे साधन आहे; किंबहुना ज्ञाननिर्मिती ही तत्त्वज्ञानाच्या सामर्थ्याची कसोटीच होय. ज्या समाजातील ज्ञाननिर्मिती मंदावलेली असते, तो समाज ज्ञानाच्या क्षेत्रात मागसलेला असतो. त्या समाजाच्या मनावर प्रभाव टाकणारे तत्त्वज्ञान हे सत्यापासून अधिक दूर गेलेले असते. तत्त्वज्ञानाची व्याख्या अशी —

विश्ववस्तूचा म्हणजे मानवी जीवनासह सर्व विश्वाचा अर्थ सांगणाऱ्या सामान्य व मूलभूतकल्पनांची सुसंगत व तर्कशुद्ध मांडणी म्हणजे तत्त्वज्ञान होय.

हे लक्षण जडवाद आणि चैतन्यवाद यांना सारखेच लागू पडते. कारण अद्वैत जडवादाला जड विश्वात मानवाचे स्थान कोणते ते सांगावे लागते आणि नैतिक मूल्यांची उपपत्तीही मांडावी लागते. त्याचप्रमाणे अद्वैत चेतनावादालाही मानवी आत्म्याच्या जगात निसर्गाचे स्थान कोणते ते निश्चित करावे लागते. जडाचा आणि आत्म्याचा कार्यकारणभावात्मक किंवा इतर प्रकारचा तार्किक संबंध निश्चित करण्यावरच जडवादी आणि चेतनावादी तत्त्वज्ञानाचे यश अवलंबून असते. ध्येयात्मक जगत आणि जड जगत यांचा सांधा तर्कदृष्ट्या निश्चित न करता आल्यामुळेच जडवादी व अध्यात्मवादी तत्त्वज्ञाने पराभूत होतात. त्यांचा पराभव केवळ बौद्धिक क्षेत्रातच होत नाही, तर त्यांचा प्रभाव ज्या सामाजिक संसारावर असतो, त्यातही तो होतो. अद्वैतवादाने या संबंधाची समाधानकारक उपपत्ती लागत नाही, असे वाटल्यावर द्वैतवादी व बहुत्ववादी दर्शने जन्माला येतात. द्वैतवादी व बहुत्ववादी दर्शने जड आणि चेतन या दोघांचे स्वतंत्र अस्तित्व मान्य करतात आणि त्यांचा परस्परांवर काय परिणाम होतो, त्यांचा संबंध कशा प्रकारचा असतो, याचे कोडे उकलीत असता थकून जातात.

मानवाच्या प्रत्येक अनुभवाची उपपत्ती लावणे, हे तत्त्वज्ञानाचे कार्य आहे. तत्त्वज्ञानाच्या व्यापक साच्यात अनुभव बसवता आला पाहिजे. जे जे काही आपण अनुभवतो, पाहतो, जाणतो, भोगतो, अपेक्षितो, ते ते तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त सिद्ध करण्यासाठी उपयुक्त वाटले पाहिजे. आपल्या संस्था, आपले पराक्रम, आपली ध्येये व आपल्या कला यांचे योग्यत्व वा अयोग्यत्व तत्त्वज्ञानाच्या योगाने आपणास पारखता आले पाहिजे. आपला अनुभव बदलला, ध्येये जीवनाच्या क्षितिजावर दिसू लागली, पराक्रम पूर्वीपेक्षा अधिक विस्मयजनक वाटू लागले आणि प्रतिभा अभिनव–निर्मितीचा कलात्मक विलास करू लागली, की या सर्व गोष्टींचा अर्थ व महत्त्व पटवण्यासाठी आवश्यक त्या मानसिक सामर्थ्याचा अखंड पुरवठा तत्त्वज्ञानाने केला पाहिजे. तत्त्वज्ञानामध्ये असे कार्य करण्याचे सामर्थ्य असते, हे ज्ञानाच्या इतिहासाने दाखवून दिले आहे.

नवा अनुभव, नवी ध्येये, नवे पराक्रम ह्यांचा अर्थ दाखवण्याचे आपले सामर्थ्य अपुरे पडते असे दिसल्यावर, जे तत्त्वज्ञान विकास पावते आणि पूर्वी स्वीकारलेले सिद्धांत दुरुस्त करायला तयार होते, त्याचा मूळ पाया अनुभव हाच असतो. जे तत्त्वज्ञान स्वयंसिद्ध किंवा स्वत:प्रमाण अशा मूलभूत कल्पनांवर आधारलेले असते, ते स्वत: विकास न पावता मानवी प्रगतीवर बंधन घालते. नव्या अनुभवाचा समाधानकारक अर्थ सांगता न आल्यामुळे ते खोटचा समर्थनाला बळी पडते किंवा गूढवादाचा आश्रय घेऊन आपल्या सत्यस्वरूपावर आवरण घालते. अनुभवनिष्ठ तत्त्वज्ञान प्रवाही स्वरूपाचे असते. उलट

स्वयंसिद्ध कल्पनांवर आधारलेले तत्त्वज्ञान सर्व बाजूंनी कडेकोट बंदोबस्त केल्याप्रमाणे असते.

वस्तुतः कोणतेही तत्त्वज्ञान हा अनुभवाचा आणि अज्ञानाचा निष्कर्ष असतो. आपल्या विचारात आणि विज्ञानात कल्पना कळत किंवा नकळत आधारभूत म्हणून धरलेल्या असतात, त्यांची व्यवस्थित चर्चा व मांडणी तत्त्वज्ञान करीत असते. अनुभव, विचार व विज्ञाने ही मानवी संस्था आणि कला यांच्या रूपाने मूर्तिमंत स्वरूप धारण करतात. याकरिता अद्ययावत अशा संस्थांच्या व कलांच्या रूपाने संचित झालेल्या अनुभवांची व विचारांची मीमांसा करीत असता तत्त्वज्ञान वाढत जाते.

तत्त्वज्ञानाला दुसरी एक महत्त्वाची जबाबदारी पार पाडावी लागते; ती म्हणजे पुरातन व समकालीन तत्त्वज्ञानांची समीक्षा करणे ही होय. प्रमाणांच्या मक्कम आधारावर बुद्धिवादाच्या आश्रयानेच कोणतेही तत्त्वज्ञान अस्तित्वात येते. त्याशिवाय तत्त्वज्ञान ही पदवी कोणत्याही विचारसरणीला लाभत नसते. पुरातन व समकालीन तत्त्वज्ञानांची आधारभूत प्रमाणे व बुद्धिवादी चर्चा यांचे महत्त्वमापन करून त्यांचा निकाल लावावा लागतो. तो निकाल तीन पद्धतींनी लागत असतो– (१) विरोधी तत्त्वज्ञानाच्या मूलभूत वा प्राणभूत तत्त्वांचे खंडन करून मिथ्या कल्पना म्हणून त्यांचा त्याग करणे. (२) विचारेतिहासातील एक महत्त्वाची पायरी म्हणून त्यांना तत्त्वज्ञानाच्या इतिहासात जमा करणे व (३) आपल्या तत्त्वज्ञानाच्या विशाल रचनेची एक वस्तू म्हणून त्या विरोधी तत्त्वज्ञानाला साफसूफ करून, सुधारून किंवा त्यात बदल करून त्याला स्थान देणे.

पुराणप्रतिष्ठा मिळविलेली दर्शने इतर दर्शनांचा प्रथम पद्धतीने प्रतिवाद करूनच आत्मसमर्थन करतात. तत्त्वज्ञान हा सामाजिक विकासक्रमाचा एक भाग आहे, असे मानणारे इतिहासवादी दुसरी पद्धत स्वीकारतात. शंकराचार्यांचा वेदान्त आणि हेगेलचे आत्मदर्शन यांनी तिसरी पद्धत स्वीकारली आहे.

उदात्त दार्शनिक विचार हे मानवजातीच्या मंद गतीने चाललेल्या चढणीच्या प्रवासात मानसिक सामर्थ्य निर्माण करून मानवी प्रगतीला मदत करू शकतात.

प्रगल्भ अवस्थेला पोहोचलेला धर्म तत्त्वदर्शनाची विशाल पार्श्वभूमी अर्थात विश्वरचनाशास्त्र प्रथम निर्माण करतो. ऐतिहासिकदृष्ट्या तत्त्वदर्शने ही धर्मविचारांचा वारसाहक्क आपणाकडे घेऊन धर्माचे उत्तराधिकारी बनतात. संपूर्ण विश्वाच्या मननात तन्मय करण्याचे सामर्थ्य प्रगल्भ अवस्थेला पोचलेल्या धर्माच्या ठायी असते. विज्ञानयुगापूर्वी धर्मामुळेच विश्वाची भावनापूर्ण खोल संवेदना धार्मिक मनुष्याच्या मनाला आकृष्ट करीत असे. अनंत विश्वाचे आकलन करण्याची प्रबल जिज्ञासा उत्पन्न झाल्याशिवाय बौद्धिक अधिष्ठानावरचे तात्त्विक संशोधन सुरू होऊ शकत नाही. विश्वरहस्याचा शोध घेण्यास प्रवृत्त करणाऱ्या या जिज्ञासेला आवश्यक असलेल्या आकांक्षा प्रथम मानवाच्या धर्मात प्रकट होतात.

**वेदांतील तत्त्वचिंतन** – भारतीय तत्त्वज्ञान प्रथम वैदिक धर्माच्या वातावरणात जन्मले. उपनिषदांतील प्रौढ तत्त्वज्ञानाची बाल्यावस्था वेदांतील धर्मात प्रत्ययाला येते. उपनिषदांतील अनेक प्रगल्भ तत्त्वे पूर्वकालीन वाङ्मयात वाढीस लागलेली दिसतात. विश्वाची सुसंगत रचना वैदिक ऋषींच्या मनाला विस्मय, आदर व पूज्यबुद्धी यांनी भारून टाकताना दिसते. विश्वाच्या विशालतेने व सौंदर्याने त्यांचे मन मोहून गेलेले दिसते. त्यांच्या अगणित कामना तृप्त करण्याचे अनंत सामर्थ्य त्यांना विश्वशक्तीत प्रतीत होत असलेले आढळते. विश्वाच्या शक्ती त्यांच्या दृष्टीने देव आहेत व देव अमर आहेत. मनुष्याच्या आत्म्याला अमर करण्याचे सामर्थ्यही त्यांच्या ठिकाणी आहे, असे त्यांना वाटते. 'मी मर्त्य, त्या अमर अग्नीला आवाहन करतो,' (ऋ. ८. १९. २५) असे वैदिक ऋषी म्हणतो. ऐहिक जीवनाची स्वर्गाइतकी किंवा त्यापेक्षा जास्त महती वैदिक ऋषींना वाटते. त्यांच्या दृष्टीने स्वर्ग आणि भूलोक हे सारखेच पवित्र आहेत. स्वर्गाचे व इहलोकाचे रहस्य त्यांच्या दृष्टीने एकच आहे.

अशा प्रकारे अद्वैतवादाची संपूर्ण सामग्री व पूर्वतयारी उपनिषदांपूर्वीच्या वैदिक वाङ्मयात तयार झालेली आढळते. विश्वाच्या उत्पत्तीचे गहनत्व वैदिक ऋषींना गंभीर भावनेने भारून टाकते. पुराण–कथांच्या स्वरूपात व देवतांच्या जीवनचरित्राच्या रूपात विश्वोत्पत्तीचे व विश्वरचनेचे गूढ उकलण्याचा प्रयत्न वैदिकांनी प्रथम केला. परंतु तरीही त्याबद्दल बौद्धिक असंतोष कायमच राहिला. याचेही उदाहरण वेदांत आढळते. अग्नी, तारकामय आकाश, प्रकाश, वायू, जल, पृथ्वी सूर्य, चंद्र, पर्जन्य, समुद्र, इ. वस्तू व शक्ती या निरनिराळ्या देवता होत, असे वैदिक ऋषी मानतात. परंतु सर्व देवता एकाच मातेच्या अर्थात अदितीच्या पोटी जन्मल्या आणि सकल विश्व म्हणजे त्यांचाच संसार होय, असेही त्यांना वाटते. एकातूनच 'अनेक' जन्माला येते हे तत्त्व वेदाला प्रथमपासून मान्य दिसते. मनुष्य हा त्या विश्वशक्तिरूप देवतांच्याच समुच्चयाने बनलेला पिंड आहे व त्या विश्वशक्तीच मानवातील सूक्ष्म इंद्रियसामर्थ्ये होत, ही कल्पना उपनिषत्पूर्व वाङ्मयात रूढ झाली. सूर्याचा चक्षू बनला, वायूचा प्राण बनला, पृथ्वी

शरीर बनले, अशा तऱ्हेच्या विविध कल्पना मानवरचनेबद्दल वैदिक ऋषींनी केल्या आहेत.

ऋग्वेदातील नंतरच्या विभागांत आणि इतर वेदांत विश्व ही सजीव शरीराप्रमाणे संघटना आहे, या कल्पनेलाही महत्त्व आलेले दिसते. विश्व हा प्रजापती आहे. तो प्रजापतीच प्रथम सूक्ष्म व नंतर स्थूलरूप धारण करतो, तसेच सजीव सृष्टीच्या रूपाने, मनुष्यरूपाने व समाजरूपाने तोच जन्मतो, अशा कल्पना वेदांत वारंवार सापडतात. परंतु विश्व हे मुळात कसे असावे याबद्दच्या कल्पना मात्र अनेक प्रकारे मांडलेल्या दिसतात. त्यासंबंधी सर्व वेदांमध्ये सुसंगती व ऐकमत्य स्थापन करण्याचा प्रयत्न केला, तरी तो चांगल्या रीतीने यशस्वी होऊ शकत नाही. काही- ठिकाणी अग्नितत्त्व किंवा उष्णता मूलभूत मानून विश्व हे अग्नीचेच व्यक्तरूप मानले आहे; तर काही ठिकाणी अग्नीच्या ऐवजी वायू मूलभूत मानून त्यातून सर्व देवता आणि सर्व पदार्थ बाहेर आले, असे सांगितले आहे. जल हे आदितत्त्व आहे, ही कल्पनाही वारंवार आढळते. भौतिक सूक्ष्म तत्त्वांचाच व्यक्त आविर्भाव होऊन निर्जीव व सजीव सृष्टी झाली आहे; अशा कल्पना मांडल्यावर किंवा त्यांच्या समकालीच दुसऱ्याही काही तुल्यबळ कल्पना मांडलेल्या सापडतात. काम, प्राण, मन, वाणी, आकाश, काल, सत्, असत् ही व अशी अनेक तत्त्वे विकल्पाने विश्वाचे मूळ अधिष्ठान म्हणून ऋषींनी कल्पिली आहेत. पण त्यांतही समाधान न पावून 'विश्वाच्या आरंभाविषयीचा प्रश्न कोणीच सोडवू शकत नाही', असे म्हणण्यापर्यंत एक ऋषी आला आहे (ऋ. १०. १२९).

**उपनिषदांतील तत्त्वज्ञान**-- उपनिषदांच्या पूर्वी झालेल्या वैदिक वाङ्मयातील विचारांचे स्वरूप बौद्धिक ननासारखे नाही. त्यातील प्रश्नांचे व संशयांचे स्वरूप तार्किक नाही. त्यांवर गाढ धार्मिक श्रद्धेचे प्रभुत्व दिसते. उपनिषदांत मात्र त्या श्रद्धेला व दैवतशास्त्राला बदलून टाकणारा बौद्धिक विचार प्रकट झाला. ज्ञान हे ईश्वराने आणि ईश्वरी प्रसाद झालेल्या दिव्य दृष्टीच्या व्यक्तींनी प्रकट केले आहे, या कल्पनेची छाप त्यात क्वचित आढळते. पण उपनिषदांतील विचार हे निरनिराळ्या पातळ्यांवरचे आहेत, हे मात्र समजले पाहिजे.

मात्र तत्त्वज्ञानाची पातळी ही त्यातली मुख्य व महत्त्वाची आहे आणि ती एकदम ध्यानातही भरते. प्रत्यक्ष सूक्ष्म अनुभवाला उपनिषदांत उच्च दर्जाचे स्थान आहे; परंतु तार्किक पद्धतींशी उपनिषदांचा विरोध नाही. बौद्धिक अन्वेषण आणि तार्किक निर्णय यांचा तिथेच प्रथम प्रारंभ झाला असल्यामुळे औपनिषदिक विचार हे सुसंघटित दर्शनाच्या पदवीला मात्र पोचले नाहीत. उपनिषदे ही संघटित दर्शनाची पूर्वावस्था आहे. त्यातूनच पुढे सुप्रसिद्ध प्राचीन संघटित दर्शने उगम पावली.

प्राचीन उपनिषदांतील विचार अद्वैत-जडवाद व अद्वैत-चेतनावाद यांच्या सीमेवर उभे असून, ते दोन्ही दर्शनांच्या अंतःप्रदेशात खोलवर व दूरवर प्रकाश टाकीत आहेत. वेदांतील 'देवता' ही कल्पना उपनिषदांतील तत्त्वांच्या भोवती अस्पष्ट तेजोवलयासारखी रेंगाळत आहे. पुष्कळ ठिकाणी परंपरेची गौण पार्श्वभूमी म्हणूनच तिचे समर्थन करता येते. उपनिषदे जडवादपर आहेत, असे प्रतिपादन करणारा एक संप्रदाय पूर्वी अस्तित्वात होता. म्हणूनच बादरायणाच्या ब्रह्मसूत्रामध्ये प्रतिवादी म्हणून जडवादी सांख्यांचे मत मांडले आहे. त्यावरून व त्यावरील शंकराचार्यांच्या भाष्यावरून असे सांगता येते, की जडवादी सांख्य दर्शन ब्रह्मसूत्रांच्या पूर्वी अस्तित्वात आले होते आणि त्या दर्शनात उपनिषदांच्या आधारे जडवादाची उपपत्ती समन्वय करून सिद्ध केली होती. उपनिषदांतील ब्रह्मतत्त्व म्हणजे भौतिक प्रकृती होय, असा सिद्धांत प्राचीन सांख्यांनी स्थापित केला होता. या विधानाला पूरक प्रमाणे महाभारतातील शांतिपर्वात आणि चरकसंहितेत मिळतात. सध्या प्रसिद्ध असलेले सांख्यदर्शन प्रकृती आणि पुरुष अशी भिन्न मूलतत्त्वे मानणारे आहे. केवळ जड प्रकृती हे एकच तत्त्व मानून तेवीस तत्त्वांचा विस्तार मानणारे अद्वैत जडवादी सांख्यदर्शन ब्रह्मसूत्रांपूर्वी अस्तित्वात होते. नैसर्गिक धर्मातून निर्माण झालेल्या उपनिषदांतील कल्पनांचा जडवादी अर्थ होणे, हे सहज तर्कप्राप्त होय.

जडवाद सूचित करणारे अत्यंत महत्त्वाचे विचार उपनिषदांत विखुरलेले सापडतात. उदा० छांदोग्यातील ब्रह्मप्रकृतिविचार. छांदोग्याचा सहावा अध्याय हा उपनिषद्वाङ्मयातील विचारांची बौद्धिक उंची दाखविणारा महत्त्वाचा टप्पा आहे. 'तत् त्वमसि' =(तेच तू आहेस) हा निष्कर्ष त्यात सांगितला आहे. ते म्हणजे विश्वतत्त्व तिथे सत् या शब्दाने बोधित केले आहे. तेच जगाचे संपूर्ण कारण आहे, तेच जगत आहे आणि जगताचा लयही त्यातच होतो, असे तिथे म्हटले आहे. यात सत् तत्त्वाची मीमांसा करताना घेतलेले अनेक दृष्टांत उपादान (प्रकृतिरूप) कारणाचे आहेत. उपादान कारण आणि कार्यही एकच आहेत, ही जाणीव सगळ्या वेदांमध्ये भरून राहिलेली प्रत्ययास येते. त्यामुळे उपनिषदांवर आधारलेले बहुतेक वेदान्ती संप्रदाय ईश्वराला प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे विश्वाचे उपादान कारण समजतात. ईश्वर हा विश्वाची प्रकृती आणि कर्ता असा दोन्हीही आहे, असे समजून व कार्य आणि कारण एक मानून ते अद्वैतवाद सर्वस्वी किंवा अंशतः स्वीकारतात.

प्राण हा जलमय आहे आणि मन हे अन्नाचे बनले आहे, असे अत्यंत विशद रीतीने छांदोग्यात म्हटले आहे. हाही विचार

स्वयंसिद्ध कल्पनांवर आधारलेले तत्त्वज्ञान सर्व बाजूंनी कडेकोट बंदोबस्त केल्याप्रमाणे असते.

वस्तुत: कोणतेही तत्त्वज्ञान हा अनुभवाचा आणि अज्ञानाचा निष्कर्ष असतो. आपल्या विचारात आणि विज्ञानात कल्पना कळत किंवा नकळत आधारभूत म्हणून धरलेल्या असतात, त्यांची व्यवस्थित चर्चा व मांडणी तत्त्वज्ञान करीत असते. अनुभव, विचार व विज्ञाने ही मानवी संस्था आणि कला यांच्या रूपाने मूर्तिमंत स्वरूप धारण करतात. याकरिता अद्ययावत अशा संस्थांच्या व कलांच्या रूपाने संचित झालेल्या अनुभवांची व विचारांची मीमांसा करीत असता तत्त्वज्ञान वाढत जाते.

तत्त्वज्ञानाला दुसरी एक महत्त्वाची जबाबदारी पार पाडावी लागते; ती म्हणजे पुरातन व समकालीन तत्त्वज्ञानांची समीक्षा करणे ही होय. प्रमाणांच्या भक्कम आधारावर बुद्धिवादाच्या आश्रयानेच कोणतेही तत्त्वज्ञान अस्तित्वात येते. त्याशिवाय तत्त्वज्ञान ही पदवी कोणत्याही विचारसरणीला लाभत नसते. पुरातन व समकालीन तत्त्वज्ञानांची आधारभूत प्रमाणे व बुद्धिवादी चर्चा यांचे महत्त्वमापन करून त्यांचा निकाल लावावा लागतो. तो निकाल तीन पद्धतींनी लागत असतो– (१) विरोधी तत्त्वज्ञानाच्या मूलभूत वा प्राणभूत तत्त्वांचे खंडन करून मिथ्या कल्पना म्हणून त्यांचा त्याग करणे. (२) विचारेतिहासातील एक महत्त्वाची पायरी म्हणून त्यांना तत्त्वज्ञानाच्या इतिहासात जमा करणे व (३) आपल्या तत्त्वज्ञानाच्या विशाल रचनेची एक वस्तू म्हणून त्या विरोधी तत्त्वज्ञानाला साफसूफ करून, सुधारून किंवा त्यात बदल करून त्याला स्थान देणे.

पुराणप्रतिष्ठा मिळविलेली दर्शने इतर दर्शनांचा प्रथम पद्धतीने प्रतिवाद करूनच आत्मसमर्थन करतात. तत्त्वज्ञान हा सामाजिक विकासक्रमाचा एक भाग आहे, असे मानणारे इतिहासवादी दुसरी पद्धत स्वीकारतात. शंकराचार्यांचा वेदान्त आणि हेगेलचे आत्मदर्शन यांनी तिसरी पद्धत स्वीकारली आहे.

उदात्त दार्शनिक विचार हे मानवजातीच्या मंद गतीने चाललेल्या चढणीच्या प्रवासात मानसिक सामर्थ्य निर्माण करून मानवी प्रगतीला मदत करू शकतात.

प्रगल्भ अवस्थेला पोहोचलेला धर्म तत्त्वदर्शनाची विशाल पार्श्वभूमी अर्थात विश्वरचनाशास्त्र प्रथम निर्माण करतो. ऐतिहासिकदृष्ट्या तत्त्वदर्शने ही धर्मविचारांचा वारसाहक्क आपणाकडे घेऊन धर्माचे उत्तराधिकारी बनतात. संपूर्ण विश्वाच्या मननात तन्मय करण्याचे सामर्थ्य प्रगल्भ अवस्थेला पोचलेल्या धर्माच्या ठायी असते. विज्ञानयुगांपूर्वी धर्मामुळेच विश्वाची भावनापूर्ण खोल संवेदना धार्मिक मनुष्याच्या मनाला आकृष्ट करीत असे. अनंत विश्वाचे आकलन करण्याची प्रबल जिज्ञासा उत्पन्न झाल्याशिवाय बौद्धिक अधिष्ठानावरचे तात्त्विक संशोधन सुरू होऊ शकत नाही. विश्वरहस्याचा शोध घेण्यास प्रवृत्त करणाऱ्या या जिज्ञासेला आवश्यक असलेल्या आकांक्षा प्रथम मानवाच्या धर्मात प्रकट होतात.

**वेदांतील तत्त्वचिंतन** – भारतीय तत्त्वज्ञान प्रथम वैदिक धर्माच्या वातावरणात जन्मले. उपनिषदांतील प्रौढ तत्त्वज्ञानाची बाल्यावस्था वेदांतील धर्मात प्रत्ययाला येते. उपनिषदांतील अनेक प्रगल्भ तत्त्वे पूर्वकालीन वाङ्मयात वाढीस लागलेली दिसतात. विश्वाची सुसंगत रचना वैदिक ऋषींच्या मनाला विस्मय, आदर व पूज्यबुद्धी यांनी भारून टाकताना दिसते. विश्वाच्या विशालतेने व सौंदर्याने त्यांचे मन मोहून गेलेले दिसते. त्यांच्या अगणित कामना तृप्त करण्याचे अनंत सामर्थ्य त्यांना विश्वशक्तीत प्रतीत होत असलेले आढळते. विश्वाच्या शक्ती त्यांच्या दृष्टीने देव आहेत व देव अमर आहेत. मनुष्याच्या आत्म्याला अमर करण्याचे सामर्थ्यही त्यांच्या ठिकाणी आहे, असे त्यांना वाटते. 'मी मर्त्य, त्या अमर अग्नीला आवाहन करतो,' (ऋ. ८. १९. २५) असे वैदिक ऋषी म्हणतो. ऐहिक जीवनाची स्वर्गाइतकी किंवा त्यापेक्षा जास्त महती वैदिक ऋषींना वाटते. त्यांच्या दृष्टीने स्वर्ग आणि भूलोक हे सारखेच पवित्र आहेत. स्वर्गाचे व इहलोकाचे रहस्य त्यांच्या दृष्टीने एकच आहे.

अशा प्रकारे अद्वैतवादाची संपूर्ण सामग्री व पूर्वतयारी उपनिषदांपूर्वीच्या वैदिक वाङ्मयात तयार झालेली आढळते. विश्वाच्या उत्पत्तीचे गहनत्व वैदिक ऋषींना गंभीर भावनेने भारून टाकते. पुराण–कथांच्या स्वरूपात व देवतांच्या जीवनचरित्राच्या रूपात विश्वोत्पत्तीचे व विश्वरचनेचे गूढ उकलण्याचा प्रयत्न वैदिकांनी प्रथम केला. परंतु तरीही त्याबद्दलचा बौद्धिक असंतोष कायमच राहिला. याचेही उदाहरण वेदांतच आढळते. अग्नी, तारकामय आकाश, प्रकाश, वायू, जल, पृथ्वी, सूर्य, चंद्र, पर्जन्य, समुद्र, इ. वस्तू व शक्ती या निरनिराळ्या देवता होत, असे वैदिक ऋषी मानतात. परंतु सर्व देवता एकाच मातेच्या अर्थात अदितीच्या पोटी जन्मल्या आणि सकल विश्व म्हणजे त्यांचाच संसार होय, असेही त्यांना वाटते. एकातूनच 'अनेक' जन्माला येते हे तत्त्व वेदाला प्रथमपासूनच मान्य दिसते. मनुष्य हा त्या विश्वशक्तिरूप देवतांच्याच समुच्चयाने बनलेला पिंड आहे व त्या विश्वशक्तीच मानवातील सूक्ष्म इंद्रियसामर्थ्ये होत, ही कल्पना उपनिषत्पूर्व वाङ्मयात रूढ झाली. सूर्याचा चक्षू बनला, वायूचा प्राण बनला, पृथ्वीचे

शरीर बनले, अशा तऱ्हेच्या विविध कल्पना मानवरचनेबद्दल वैदिक ऋषींनी केल्या आहेत.

ऋग्वेदातील नंतरच्या विभागांत आणि इतर वेदांत विश्व ही सजीव शरीराप्रमाणे संघटना आहे, या कल्पनेलाही महत्त्व आलेले दिसते. विश्व हा प्रजापती आहे. तो प्रजापतीच प्रथम सूक्ष्म व नंतर स्थूलरूप धारण करतो, तसेच सजीव सृष्टीच्या रूपाने, मनुष्यरूपाने व समाजरूपाने तोच जन्मतो, अशा कल्पना वेदांत वारंवार सापडतात. परंतु विश्व हे मुळात कसे असावे याबद्दच्या कल्पना मात्र अनेक प्रकारे मांडलेल्या दिसतात. त्यासंबंधी सर्व वेदांमध्ये सुसंगती व ऐकमत्य स्थापन करण्याचा प्रयत्न केला, तरी तो चांगल्या रीतीने यशस्वी होऊ शकत नाही. काही ठिकाणी अग्नितत्त्व किंवा उष्णता मूलभूत मानून विश्व हे अग्नीचेच व्यक्तरूप मानले आहे; तर काही ठिकाणी अग्नीच्या ऐवजी वायू मूलभूत मानून त्यातून सर्व देवता आणि सर्व पदार्थ बाहेर आले, असे सांगितले आहे. जल हे आदितत्त्व आहे, ही कल्पनाही वारंवार आढळते. भौतिक सूक्ष्म तत्त्वांचाच व्यक्त आविर्भाव होऊन निर्जीव व सजीव सृष्टी झाली आहे; अशा कल्पना मांडल्यावर किंवा त्यांच्या समकालीच दुसऱ्याही काही तुल्यबळ कल्पना मांडलेल्या सापडतात. काम, प्राण, मन, वाणी, आकाश, काल, सत्, असत् ही व अशी अनेक तत्त्वे विकल्पाने विश्वाचे मूळ अधिष्ठान म्हणून ऋषींनी कल्पिली आहेत. पण त्यांतही समाधान न पावून 'विश्वाच्या आरंभाविषयीचा प्रश्न कोणीच सोडवू शकत नाही', असे म्हणण्यापर्यंत एक ऋषी आला आहे (ऋ. १०. १२९).

**उपनिषदांतील तत्त्वज्ञान**— उपनिषदांच्या पूर्वी झालेल्या वैदिक वाङ्मयातील विचारांचे स्वरूप बौद्धिक ननासारखे नाही. त्यातील प्रश्नांचे व संशयांचे स्वरूप तार्किक नाही. त्यांवर गाढ धार्मिक श्रद्धेचे प्रभुत्व दिसते. उपनिषदांत मात्र त्या श्रद्धेला व दैवतशास्त्राला बदलून टाकणारा बौद्धिक विचार प्रकट झाला. ज्ञान हे ईश्वराने आणि ईश्वरी प्रसाद झालेल्या दिव्य दृष्टीच्या व्यक्तींनी प्रकट केले आहे, या कल्पनेची छाप त्यात क्वचित आढळते. पण उपनिषदांतील विचार हे निरनिराळ्या पातळ्यांवरचे आहेत, हे मात्र समजले पाहिजे.

मात्र तत्त्वज्ञानाची पातळी ही त्यातली मुख्य व महत्त्वाची आहे आणि ती एकदम ध्यानातही भरते. प्रत्यक्ष सूक्ष्म अनुभवाला उपनिषदांत उच्च दर्जाचे स्थान आहे; परंतु तार्किक पद्धतींशी उपनिषदांचा विरोध नाही. बौद्धिक अन्वेषण आणि तार्किक निर्णय यांचा तिथेच प्रथम प्रारंभ झाला असल्यामुळे औपनिषदिक विचार हे सुसंघटित दर्शनाच्या पदवीला मात्र पोचले नाहीत. उपनिषदे ही संघटित दर्शनाची पूर्वावस्था आहे. त्यातूनच पुढे सुप्रसिद्ध प्राचीन संघटित दर्शने उगम पावली.

प्राचीन उपनिषदांतील विचार अद्वैत-जडवाद व अद्वैत-चेतनावाद यांच्या सीमेवर उभे असून, ते दोन्ही दर्शनांच्या अंतःप्रदेशात खोलवर व दूरवर प्रकाश टाकीत आहेत. वेदांतील 'देवता' ही कल्पना उपनिषदांतील तत्त्वांच्या भोवती अस्पष्ट तेजोवलयासारखी रेंगाळत आहे. पुष्कळ ठिकाणी परंपरेची गौण पार्श्वभूमी म्हणूनच तिचे समर्थन करता येते. उपनिषदे जडवादपर आहेत, असे प्रतिपादन करणारा एक संप्रदाय पूर्वी अस्तित्वात होता. म्हणूनच बादरायणाच्या ब्रह्मसूत्रामध्ये प्रतिवादी म्हणून जडवादी सांख्यांचे मत मांडले आहे. त्यावरून व त्यावरील शंकराचार्यांच्या भाष्यावरून असे सांगता येते, की जडवादी सांख्य दर्शन ब्रह्मसूत्रांच्या पूर्वी अस्तित्वात आले होते आणि त्या दर्शनात उपनिषदांच्या आधारे जडवादाची उपपत्ती समन्वय करून सिद्ध केली होती. उपनिषदांतील ब्रह्मतत्त्व म्हणजे भौतिक प्रकृती होय, असा सिद्धांत प्राचीन सांख्यांनी स्थापित केला होता. या विधानाला पूरक प्रमाणे महाभारतातील शांतिपर्वात आणि चरकसंहितेत मिळतात. सध्या प्रसिद्ध असलेले सांख्यदर्शन प्रकृती आणि पुरुष अशी भिन्न मूलतत्त्वे मानणारे आहे. केवळ जड प्रकृती हे एकच तत्त्व मानून तेवीस तत्त्वांचा विस्तार मानणारे अद्वैत जडवादी सांख्यदर्शन ब्रह्मसूत्रांपूर्वी अस्तित्वात होते. नैसर्गिक धर्मातून निर्माण झालेल्या उपनिषदांतील कल्पनांचा जडवादी अर्थ होणे, हे सहज तर्कप्राप्त होय.

जडवाद सूचित करणारे अत्यंत महत्त्वाचे विचार उपनिषदांत विखुरलेले सापडतात. उदा० छांदोग्यातील ब्रह्मप्रकृतिविचार. छांदोग्याचा सहावा अध्याय हा उपनिषद्वाङ्मयातील विचारांची बौद्धिक उंची दाखविणारा महत्त्वाचा टप्पा आहे. 'तत् त्वमसि' = (तेच तू आहेस) हा निष्कर्ष त्यात सांगितला आहे. ते म्हणजे विश्वतत्त्व तिथे सत् या शब्दाने बोधित केले आहे. तेच जगाचे संपूर्ण कारण आहे, तेच जगत आहे आणि जगताचा लयही त्यातच होतो, असे तिथे म्हटले आहे. यात सत् तत्त्वाची मीमांसा करताना घेतलेले अनेक दृष्टांत उपादान (प्रकृतिरूप) कारणाचे आहेत. उपादान कारण आणि कार्यही एकच आहेत, ही जाणीव सगळ्या वेदांमध्ये भरून राहिलेली प्रत्ययास येते. त्यामुळे उपनिषदांवर आधारलेले बहुतेक वेदान्ती संप्रदाय ईश्वराला प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे विश्वाचे उपादान कारण समजतात. ईश्वर हा विश्वाची प्रकृती आणि कर्ता असा दोन्हीही आहे, असे समजून व कार्य आणि कारण एक मानून ते अद्वैतवाद सर्वस्वी किंवा अंशतः स्वीकारतात.

प्राण हा जलमय आहे आणि मन हे अन्नाचे बनले आहे, असे अत्यंत विशद रीतीने छांदोग्यात म्हटले आहे. हाही विचार

जडवाद दर्शित करतो. दुसरी एक कल्पना अशाच प्रकारची आहे, ती अशी–

विश्व हे प्राण्यांचे व मनुष्यांचे अन्न आहे; परंतु त्याबरोबरच प्राणी व मनुष्य हेही स्वतःच अन्न आहेत. भोग्य आणि भोक्ता तत्त्वतः भिन्न नाहीत, असे जे तैत्तिरीय उपनिषदात म्हटले आहे, तेही जडवादसूचकच आहे. भूतवस्तूंचे सार पृथ्वी, पृथ्वीचे जल, जलाचे अन्न, अन्नाचे माणूस आणि भाषेचे सार वेद होय, असे जे छांदोग्यात व बृहदारण्यकात म्हटले आहे, त्यातून जडवादी भावार्थ निघू शकतो.

उपनिषदांमधले सर्वांत प्रभावी असे दर्शन म्हणजे आत्मविषयक दर्शन होय. 'आत्मज्ञ हा सर्वज्ञ होतो; म्हणून आत्म्याला जाण. त्यातच तुझे परम कल्याण आहे,' असा संदेश मनुष्याला त्यांनी दिला आहे. आत्मविषयक तत्त्वज्ञान हे विचार करता करता अत्यंत गहन अशा विचारकांतारात शिरून गूढवादी बनते. तसा गूढवाद उपनिषदांमध्येही काही ठिकाणी स्पष्टपणे दिसून येतो; परंतु आत्म्याचा प्रश्न हासुद्धा बौद्धिक प्रश्न आहे, असे पुष्कळ ठिकाणी दिसते. 'आत्मपूजक मनुष्य हा देवपूजकापेक्षा श्रेष्ठ आहे; देवपूजक हा देवांचा भारवाही पशू आहे. आत्म्याचे ज्ञान मनुष्यांना होऊ नये, अशी दुष्ट इच्छा देवांना असते; कारण त्यामुळे माणसे आपले दास्य करणार नाहीत असे भय त्यांना वाटत असते' असे उपनिषदात म्हटले आहे. आत्मविषयक संशोधनाला या विचारापासूनच खरी सुरवात होते.

सर्वच विश्व आत्मा आहे, असा सिद्धांत उपनिषदांनी काढला आहे. तो आत्मा तर्कबुद्धीला अगम्य आहे, असे तत्त्वज्ञ म्हणतात; परंतु त्यात बुद्धीचा प्रवेश होऊ शकत नाही, असा त्यांचा आशय दिसत नाही. बुद्धि वादाने जड देहाहून अन्य असा आत्मा सिद्ध करू पाहणारी प्राचीन तार्किक दर्शने आपली साधक प्रमाणे उपनिषदांतूनच उचलतात, असा शंकराचार्यांचा त्यांच्यावर आक्षेप आहे. यावरून आत्मविद्या ही तर्कशास्त्राच्या मर्यादेच्या संपूर्णपणे अतीत आहे, हे म्हणणे बरोबर नाही, असे म्हणता येते. उदाहरणार्थ, शंकराचार्यांनी बृहदारण्यकोपनिषदातील सर्व अध्याय गौतमाच्या तर्कशास्त्रातील पंचावयव न्यायाकारात मांडून दाखवले आहेत. काही आत्मविषयक मूलभूत कल्पनाही बुद्धिगम्य स्वरूपाच्या सापडतात–(१) इंद्रिये आणि मन यांच्या कार्याची संगती राखणारे आणि त्याकरिता जाणिवेच्या रूपाने प्रकट होणारे तत्त्व म्हणजे आत्मा होय. (२) शरीरातील सर्व प्रवृत्तींचे प्रवर्तक तत्त्व म्हणजे आत्मा होय. (३) शरीरधारणार्थ व ध्येयसिद्ध्यर्थ आवश्यक असलेले नवे नवे बदल करून अनिष्ट अशा विद्यमान व भूतपूर्व घटनांपासून अलिप्त राहण्याचा प्रयत्न करून त्यात यश मिळवणारे तत्त्व म्हणजे आत्मा होय. (४) सतत बदलणाऱ्या अशा शरीरात भूत, वर्तमान व भविष्य अशा तीन्ही काळी एकत्व व व्यक्तित्व राखणारे तत्त्व म्हणजे आत्मा होय.

इंद्रिये, जीवनशक्ती आणि मन यांच्यासह हे शरीर ज्या विश्वात उत्पन्न झालेले आहे, तेही विश्व शरीरातील आत्मतत्त्वाचेच स्वरूप आहे, असे उपनिषदांतील युक्तिवाद सांगतो. विश्वातील नियमबद्धता किंवा सृष्टिव्यापाराची सुसंगती हे विश्वाची मौलिक एकता म्हणजेच आत्मरूपता सिद्ध करते. विश्वातील सृजनशक्ती सारखीच आहे, म्हणून सृजनशक्तीचे दोन्ही ठिकाणचे अधिष्ठान एकच असले पाहिजे आणि ते आत्मा होय. द्रष्टा व दृश्य यांचा मौलिक भेद उपनिषदे मानीत नाहीत, त्याचप्रमाणे कर्ता व कार्य यांचाही मौलिक भेद मानीत नाहीत आणि म्हणूनच देह व आत्मा आणि विश्व व परमात्मा यांचाही मौलिक भेद ती मान्य करीत नाहीत. जड व चेतन हे वस्तुतः एकच आहेत, असा उपनिषदांचा निष्कर्ष आहे.

**उपनिषदे व नीतिशास्त्र** – प्राचीन उपनिषदांतील विचारांची अगदी सामान्य रूपरेखा वर दिग्दर्शित केली आहे. उपनिषदांतील मनुष्याच्या निःश्रेयसाचे आणि नीतितत्त्वाचे प्रतिपादनसुद्धा बुद्धिवादी आहे, असे निश्चित म्हणता येते.

विश्वाचे नियम हे देवांच्या वर्तनाचे नीतिनियम होत. विश्व हे नियमांवर अधिष्ठित आहे, म्हणजे नीतीवर अधिष्ठित आहे. विश्वाच्या मूलभूत नियमांचा गाभा म्हणजे ऋत होय, हा वेदांचा सिद्धान्त उपनिषदांच्या नीतिशास्त्राची पार्श्वभूमी आहे. किंबहुना उपनिषदांचे तत्त्वज्ञान हे अत्यंत व्यापक अर्थाने नीतिशास्त्रच होय. मानवाच्या अंतिम ध्येयाशीच या तत्त्वज्ञानाची सर्व बाजूंनी सांगड घातलेली दिसून येते. अंतिम ध्येयाचा विचार उपनिषदांच्या प्रत्येक तात्त्विक चर्चेत प्रतिबिंबित झाला आहे. औपनिषदिक नीतिशास्त्राचे सिद्धान्त पुढीलप्रमाणे आहेत–

(१) मनुष्य काममय आहे. कामनेची तृप्ती होण्याकरिता त्याचा प्रयत्न आहे. ज्याच्या योगानें इष्टलाभ होईल आणि अनिष्ट टळेल, अशी स्थिती त्याला हवी असते. ही स्थिती म्हणजेच संपूर्ण स्वातंत्र्याची आनंदमय स्थिती होय. स्वातंत्र्य म्हणजे उपनिषदांच्या भाषेत 'यथाकामचारिता' किंवा 'अल्पकामता' हे आहे.

(२) मनुष्याची सर्व कामना वस्तुतः त्याच्या स्वतःच्या ठिकाणी केंद्रित झाली आहे. त्याच्या संपूर्ण प्रेमाचा विषय त्याचा स्वतःचा आत्मा हा आहे. पती, पत्नी, पुत्र, वित्त, गुरू, शूर पुरुष, देव, वेद, प्राणिमात्र व सर्व विश्व यांवर मनुष्याचे जे प्रेम असते, त्याचे निरुपाधिक आलंबन म्हणजे स्वतःचा आत्मा हेच होय. ते सर्व प्रेम म्हणजे आत्मप्रेमच आहे.

(३) उपनिषदांना द्वैतवाद संमत नसल्यामुळे त्यांच्या दृष्टीने आपल्या शरीराच्या गरजासुद्धा आत्म्याच्याच गरजा आहेत. आरोग्य, दीर्घायुष्य, संपत्ती, संतती, स्वामित्व, इ. ऐहिक सुखांचाही अंतर्भाव आत्मसुखात होतो. बुद्धिमत्ता (मेधा), विद्वत्ता (ब्रह्मवर्चस्), शहाणपण (पांडित्य), मधुर वाणी (सूनृता वाक्) या गुणांचीही त्यांना महती वाटते. परंतु सत्यनिष्ठा, अहिंसा, ऋजुता, दया, औदार्य, तप, इ. गुण आत्मप्रेमाच्या अंतिम विकासाची लक्षणे होत आणि असत्य, हिंसा, मायावीपणा, वक्रता ही आत्मद्रोहाची चिन्हे होत, असे त्यांनी मानले आहे.

(४) सर्व कर्मांचे उगमस्थान आणि सर्व प्रयोजनांचा आश्रय स्वतः आत्मा म्हणजे जाणिवेचे अधिष्ठान असलेली व्यक्ती होय. सर्व भूते, देव व पितर यांचा हाच लोक होय. सर्व कर्तव्यांचा निकष आत्मा हाच आहे. म्हणूनच संसारात अलिप्तपणे शंभर वर्षेपर्यंत कर्मे करीत औदार्याने जे जगू इच्छीत नाहीत, ते आत्मविरोधी आत्मघातक होत, असे ईशोपनिषदात म्हटले आहे. मनुष्याचे वरिष्ठ ध्येय आत्मप्राप्ती हेच होय. कारण त्यातच सगळी वासना तृप्त होते. आत्म्याच्या बाहेर सर्वत्र पारतंत्र्य राहते आणि आत्म्याच्या क्षेत्रातच स्वातंत्र्य असते. कारण आत्माच स्वतंत्र आहे. म्हणून आत्म्यातच सर्व जगत आहे असे सिद्ध करता आले व तसे समजले गेले, तरच संपूर्ण स्वातंत्र्य उपभोगता येईल. आत्मप्राप्ती म्हणजे आत्मज्ञान होय. मनुष्याचे श्रेष्ठ ध्येय परलोकात नाही, तर ते याच जगात आहे. देव किंवा स्वर्ग यांच्यापेक्षा आत्मा हे अधिक मोठे सत्य व श्रेष्ठ आहे. तो आत्मा म्हणजेच ब्रह्म होय. त्या आत्म्याचे सत्य हे स्वरूप आहे. तो जीवनात रमतो व मनात म्हणजे मानसिक सृष्टीत आनंदाचा उपभोग घेतो. शक्ती हे त्याचे वैभव आहे व ज्ञान हे त्याचे अमृत आहे. त्याच्या ठायी, त्याच्या हृदयात वसत असलेला आनंद जगाचे राज्य करणाऱ्या तरुण, विद्वान व निरोगी सम्राटाच्या आनंदाइतका मोठा आहे. तो विश्वरूपी शरीर धारण करणाऱ्या परमेश्वराच्या हृदयातील आनंदाइतका मोठा आहे.

(५) वरिष्ठ ध्येयाकडे जाण्याकरिता बुद्धी हा सारथी, आत्मा हा रथी, शरीर हा रथ, मन हा लगाम, इंद्रिये हे अश्व आणि ज्ञेय विश्व हा मार्ग होय. बुद्धिरूपी सारथी मिळाला नाही, तर शरीररूपी रथ खड्ड्यात जाऊन पडतो आणि प्रवासी आत्म्याचा विनाश होतो.

उपनिषदामध्ये (बृहदारण्यक, छांदोग्य व मुंडक) निराशावादी, निवृत्तिपर नीतिशास्त्रही आहे. परंतु वरील सिद्धांतांना त्याच्यामुळे बाध येत नाही. कारण निवृत्तिवाद हा उपनिषदांतील प्रभावी विचार नव्हे. तो तिथे नुकताच उदय पावत आहे. त्याला प्रभावी स्वरूप प्राप्त झाले, ते उपनिषदांच्या नंतरच्या वाङ्मयात. काही अपवाद सोडल्यास उपनिषदांनंतरची आतापर्यंतची सर्व जीवनविषयक भारतीय दृष्टी निवृत्तिवादीच आहे. त्या विचारसरणीत ऐहिक जीवनाबद्दलच्या औदासीन्याला अग्रस्थान मिळाले आहे.

**सांख्य तत्त्वज्ञान** – उपनिषदांच्या तत्त्वज्ञानातून प्रथम सांख्य विचारसरणी वाढीस लागली. उपनिषत्कालाच्या उत्तरार्धात सांख्यविचार उत्कर्षाला पोचला आणि त्याचे पडसाद कठोपनिषदात आणि विशेषतः श्वेताश्वतरोपनिषदात उमटले. उपनिषदांतील तत्त्वे आणि सांख्य दर्शन यांची हिंदुधर्मात कायमची सांगड झालेली दिसून येते. भगवद्गीता, महाभारत, योगवासिष्ठ, भागवत, इ. ग्रंथांत आणि इतर वेदांतविषयक ग्रंथांत त्याचे प्रत्यंतर मिळते.

वेद व उपनिषदे यांच्यांतील ज्या बीजभूत अशा मुख्य दोन कल्पनांच्या आधारे सांख्य दर्शन वाढले, त्या कल्पना अशा– (१) त्रिकालाबाधित आणि सर्वव्यापी 'सत्' हे विश्वाचे उपादान कारण आहे आणि त्याचेच विश्व बनले असून, त्याच्यातच त्याचा विलय होतो व (२) ते मूलतत्त्व व दृश्य विश्व ही दोन्ही एकच आहेत.

पहिल्या कल्पनेतून जड प्रकृती विश्वाचे मूल कारण होय, ही कल्पना निर्माण होऊन तिचा विस्तार झाला. दुसऱ्या कल्पनेतून कार्य आणि कारण एकच होत, ही कल्पना निर्माण होऊन तिचा विस्तार झाला. मूळ कारणातून विश्वाचा विकास होतो; म्हणजे ते मूळ कारणच कार्यरूप बनते. कार्य हे उत्पत्तीपूर्वी कारणात अव्यक्त वा तिरोभूत असतेच. ते उत्पन्न होते म्हणजे आविर्भूत होते. कारणात असते तेच उघडकीस येते. नाश कशाचाच होत नाही. जे नष्ट म्हटले जाते ते केवळ कारणात झाकले जाते.

विश्वाचे मूळ कारण प्रवृत्ती होय. त्या कारणाच्या स्वरूपाचे विशदीकरण करताना सांख्याचार्यांनी अंकांनी मूल तत्त्वे मोजण्याची कल्पना मांडली. मूळ कारणाचे धर्म नेमके विशिष्ट संख्येचेच असले पाहिजेत, असे त्यांनी निश्चित केले. म्हणून त्या तत्त्ववेत्त्यांना सांख्य म्हणू लागले. ते मूलभूत धर्म म्हणजे गुण होत. ते सत्त्व, रज आणि तम असे तीन आहेत. मनुष्य व विश्व हे एकाच मूळ त्रिगुणात्मक प्रकृतीचे भाग असल्यामुळे सुख, दुःख व मोह हे मानवी अनुभवाचे घटक कारणरूपाने मूळ प्रकृतीत व विश्वात आहेत, असे सांख्यशास्त्र म्हणते.

उपनिषदांतील दुसऱ्या एका सिद्धान्ताचा मात्र सांख्यदर्शन स्वीकार करू शकले नाही. 'जगाला कारणीभूत असलेली मूळ वस्तू आत्मा ही होय,' हा तो सिद्धांत होय. कारण आत्मा

मानवी देहातच प्रत्ययाला येतो. तो विश्वाचा भोक्ता असूनही विश्वाच्या घडामोडीतून व तदंगभूत पापपुण्यातून बाहेर पडून मुक्त होऊ इच्छितो. पण विश्ववस्तू व आत्मा एकच असेल, तर विश्वाच्या व्यापातून अलिप्त होण्याची त्याला इच्छा उत्पन्न झाली नसती व अलिप्त होणे शक्यही झाले नसते. म्हणून प्रकृतीहून भिन्न असा पुरुष सांख्यांनी मानला. उपनिषदांतील अन्य सर्व विचार थोडेबहुत वैचारिक संस्कार करून सांख्यांनी स्वीकारले आहेत. सांख्यशास्त्र म्हणजे औपनिषदिक तत्त्वज्ञानाची संघटित स्वरूपातील परिणती होय.

विश्ववस्तू ही अखंड, शाश्वत व एकच आहे; जगातील बदल म्हणजे जे जे त्या वस्तूच्या गर्भात झाकलेले असते ते ते बाहेर येणे आणि पुनश्च आच्छादित होणे होय. या व अशा प्रकारच्या उपनिषदातील विचारांनी चिकित्सा व संशोधन सुरू होऊन भारतात प्रचंड वैचारिक चळवळी उत्पन्न झाल्या. बुद्धाचे तत्त्वज्ञान ही त्यातील एक महत्त्वाची चळवळ होय.

**वैचारिक चळवळी**–बुद्धाची विचारसरणी ही जगाच्या इतिहासातील कोणत्याही धर्मसंस्थापकाच्या वा धार्मिक महात्म्याच्या विचारसरणीपेक्षा विलक्षण आणि विस्मयजनकही आहे. इतर धर्मसंस्थापक व महात्मे पुरातन कालापासून आजपर्यंत सांगत आले आहेत, की 'आम्हांला मिळालेल्या दिव्य आदेशात, अनुभवात वा साक्षात्कारात दिसणारे सत्य चिकित्सा न करता तुम्ही स्वीकारा, त्यावर श्रद्धा ठेवा.' याच्या उलट बुद्धाने म्हटले, की 'मी सांगत आहे म्हणून किंवा मी श्रेष्ठ आहे म्हणून हे सत्य तुम्ही स्वीकारू नका. सुवर्णपरीक्षेप्रमाणे परीक्षा करून ते स्वीकारा.' इतर धर्मसंस्थापक व महात्मे यांनी सांगितले आहे, की या जगतापेक्षा परलोक व परमात्मा हेच सत्य व श्रेयस्कर होत हे जाणले पाहिजे. याच्या उलट बुद्धाने निक्षून आदेश दिला, की 'मानवी मनाची पोच जिथे नाही, अशा पारलौकिक वा ईश्वरविषयक गोष्टींची चर्चा करण्यात कालक्षेप करू नका; तर या जीवनातील अपरिहार्य व अत्यंत कठीण अशा समस्यांचाच विचार करा.' इतर धर्मसंस्थापकांनी व महात्म्यांनी नैतिक मूलतत्त्वांच्या इतकीच परलोकादी गूढ तत्त्वांची, तपश्चर्येची, कर्मकांडाची अथवा मंत्र, यज्ञ, प्रार्थना वा भजन यांची श्रेष्ठता उच्च रवाने प्रतिपादली. त्याच्या उलट बुद्धाने गूढवादाला आणि तज्जन्य विधिविधानाला झिडकारून गणितासारखी स्पष्ट आणि गूढतेचा स्पर्शही नसलेली सरळ आर्य सत्ये सर्व मानवांना उपदेशिली. त्याने सर्वांना संयमाचा मध्यम मार्ग दाखविला. परलोक, देवता व परमेश्वर यांच्या ऐवजी मानवी जीविताचे मूल्य वरिष्ठ आहे, हे उघड केले. तलवार व रक्तपात यांना साधन म्हणून मानवी जीवनात कुठेही स्थान असता कामा नये, म्हणून त्यांचा सार्वभौम निषे[ध] तर बुद्धाने केलाच; परंतु सांप्रदायिक धर्मश्रद्धेच्या (वा शब्द-प्रामाण्याच्या) पोटी हटवादीपणा आणि परमताबद्दलची असहिष्णुता जन्माला येते, हे जाणून सूर्यप्रकाशवत निश्चि[त] होणारी नीतितत्त्वे यांना महत्त्व देणारा धर्म त्याने स्थापला. पुढे त्यातूनच अनेक सुंदर दर्शने जन्मली.

अनात्मवादाचा जोराचा पुरस्कार बुद्धाने केला, असे त्रिपिटकातील वचनावरून सिद्ध होते. 'बदलणाऱ्या दृश्याच्या मुळाशी असलेले आणि न बदलणारे, अखंड, शाश्वत, व्यापक व स्वयं[भू] तत्त्व म्हणजे आत्मा होय. आत्मरूपाने विश्व हे शाश्वत आहे' या विचारापेक्षा अगदी भिन्न विचार बुद्धाने सांगितला. प्रत्येक सद्वस्तू क्षणिक आहे, अणुरूप आहे. कारणाचा विनाश होऊनच कार्य अस्तित्वात येते. विश्व म्हणजे विनाशपरंपरा आहे. प्रतिक्षणी कारण नष्ट होऊन कार्य त्याची जागा घेते व ते पुढील क्षणाच्या जन्माचे कारण बनते. अनेक वस्तूंच्या सहकार्याने कार्य बनते; म्हणून 'विश्वातील कारणवस्तू नित्य व एकच आहे,' हे उपनिषदांचे मत अग्राह्य आहे. व्यापकता स्थिरता व शाश्वतता हे आत्म्याचे वैशिष्टच दाखवणारे धर्म सद्वस्तूत राहूच शकत नाहीत; म्हणून आत्मा नाही. अनेक पदार्थांच्या समुदायाचा रथ बनतो, त्याप्रमाणे शरीरातील आत्मा (अहंकार ?) हा समुदायाचा परिणाम आहे. शरीरात स्थिर व अखंड असा आत्मा (अहंता ?) आहे, ही कल्पना केवळ भ्रम होय. सर्व शाश्वत, व्यापक व सामान्यविषयक कल्पना भ्रमरूप आहेत. या शरीरातील स्थिर आत्म्याच्या (अहंतेच्या ?) भ्रमातूनच तृष्णा किंवा कामना उत्पन्न होते आणि दुःखात्मक संसाराचे बंधन उत्पन्न करते. आत्मकल्पनेच्या निरासाशिवाय कामना नष्ट होत नाही आणि त्याशिवाय दुःखनाश होत नाही.

अशा तऱ्हेने उपनिषदांच्या वस्तुविषयक शाश्वतवादापेक्षा अत्यंत भिन्न असा वस्तुविषयक क्षणभंगवाद बुद्धाने उत्पन्न केला.

बुद्धाचे तत्त्वज्ञान पुनर्जन्माचा सिद्धांत मानते; त्यामुळे बुद्धाचा अनात्मवाद पुनर्जन्मवादाशी विसंगत दिसतो. त्यामुळे अनेक प्रख्यात पुरातत्त्ववादी घोटाळ्यात पडले आहेत. परंतु उपनिषदातील आत्मकल्पना लक्षात घेतली, तर ही विसंगती टाळता येते. न बदलणारे, दृश्य जगाच्या मुळाशी असलेले आणि व्यापक असे तत्त्व म्हणजे आत्मा होय. पण बुद्ध ते मानीत नाही. प्रवाहरूपाने असलेला, समुदायाने बनलेला व सतत बदलणारा जीवात्मा बुद्धाला मान्य आहे. त्या जीवात्म्याला पुनर्जन्म आहे, असे कदाचित म्हणता येईल.

बुद्धाच्या काळी किंवा तत्पूर्वीच उपनिषदांतील तत्त्वज्ञानाला विरोधी असी शुद्ध पाखंडी अनात्मवाद जन्मला. तोच चार्वाकाचा जडवाद होय. त्याचे हे थोर जडवादी व पाखंडी बंड मोडण्याकरिता त्याचे व त्याच्या संप्रदायाचे शुद्ध बुद्धिवादी ग्रंथ धार्मिकांनी बुडविले. त्यांची परंपरा फार पूर्वीच नष्ट झाली; परंतु धार्मिक दार्शनिकांच्या ग्रंथांतून पूर्वपक्ष म्हणून या शुद्ध जडवादाची मांडणी पाहायला सापडते. चार्वाकाला पुनर्जन्म मुळीच मान्य नाही. त्याच्या मते मनुष्याचे व्यवहार यशस्वी रीतीने चालविण्यास धर्मसंस्थेची गरज नाही. अर्थशास्त्र आणि राजकारण यांच्याच आश्रयाने लोकसंस्थेची व्यवस्था उत्तम चालू शकते, असा या तत्त्वज्ञानाचा सिद्धांत होता. इंद्रियजन्य ज्ञानच व्यवहारोपयोगी म्हणून खरे होय. अनुमान हे निश्चयात्मक प्रमाण नव्हे; त्याचे प्रामाण्य संभावनात्मक आहे. ज्ञानाच्या प्रामाण्याबद्दल नेहमी सावधच राहिले पाहिजे. धर्मग्रंथ शाश्वत सत्याच्या बुरख्याखाली असत्याचाच प्रसार करीत असतात, अशी चार्वाकाची मते होती.

बुद्ध व चार्वाक यांच्या अनात्मवादी आणि जडवादी बौद्धिक चळवळींवरोबरच दुसरी एक स्वतंत्र वैचारिक चळवळ निर्माण झाली; ती म्हणजे वैशेषिक व जैन तत्त्वज्ञानांची. उपनिषदांप्रमाणे विश्ववस्तू केवळ शाश्वतही नाही आणि बौद्धांप्रमाणे सर्वस्वी क्षणभंगुरही नाही; तर ती शाश्वत व अशाश्वत किंवा स्थिर व क्षणभंगुर अशी द्विविध आहे. त्याचप्रमाणे आत्मरूप वस्तू जशी आहे, तशी अनात्मरूपही वस्तू आहे. अशा तऱ्हेने वैशेषिक व जैन यांनी बहुत्ववादी तत्त्वज्ञान निर्माण केले. जैन तत्त्वज्ञान जैन धर्माच्या धार्मिक चळवळीत पुष्कळ काळपर्यंत लुप्तप्राय राहिल्यामुळे त्याची प्रभावी वाढ लवकर झाली नाही.

**कणादाचे तत्त्वज्ञान** – वैशेषिक दर्शन हे ज्ञानाची शाखा या दृष्टीने परिणामकारक रूप धारण करू शकते. परमाणुवाद प्रथम वैशेषिकांनी शोधून काढला. त्या परमाणुवादाची छाया बौद्ध व जैन विचारसरणीवर प्रथमपासूनच पडली. वैशेषिकांच्या दृष्टीने भूमितीतील बिंदूप्रमाणे असलेले अनंत व शाश्वत परमाणू हा दृश्य विश्वाचा पाया आहे. त्या परमाणूंच्या संयोगातून दृश्य जगत् होते. वस्तूंची समानता आणि वैशिष्ट्ये ही दोन्ही तत्त्वे गृहीत धरल्याशिवाय भेदयुक्त जगाचा अर्थ समजत नाही. वस्तूंची भौतिक वैशिष्ट्येसुद्धा त्यांच्या समानत्वाइतकीच महत्त्वाची आहेत. वस्तूंच्या मूलभूत वैशिष्ट्याला व विशेषाला म्हणजे भेदाला कणादाने महत्त्व दिल्यामुळे कणादाच्या तत्त्वज्ञानाला वैशेषिक दर्शन म्हणतात. विश्वातील दृश्य फरक हा केवळ बाह्य देखावा नसून वस्तूच्या स्वभावातच विशेष-तत्त्व भरून राहिले आहे. मूलद्रव्यरूप कारणातच भेद आहे. म्हणूनच कार्ये भिन्न होतात. अशा रीतीने उपनिषदांच्या विचारसरणीच्या विरुद्ध कणाद ऋषीने विचार सांगितला. विश्वाची (द्रव्यरूप) मूळ कारणे नित्य म्हणजे शाश्वत आहेत; परंतु कार्ये अनित्य आहेत. त्या नित्य मूलभूत कारणांचे परमाणुरूप व विभू द्रव्ये असे दोन विभाग वैशेषिकांनी पाडले. आकाश, दिक्, काल आणि आत्मे ही विभू द्रव्ये होत.

परमाणुवाद आणि पदार्थविज्ञान ही कणादाच्या तत्त्वज्ञानाची दोन वैशिष्ट्ये होत. विश्ववस्तूचा अर्थ समजण्यासाठी कणादाने भाषेच्या गाभ्यात दृष्टी फेकली. कारण मनुष्याच्या अनुभवाचे व ज्ञेयाचे सार; तसेच बुद्धीचे नियम आणि ज्ञानाची सामान्य रचना, ही भाषेत सामावलेली असतात. प्रत्येक विशेष अनुभवाचा अर्थ भाषेतील अर्थतत्त्वांच्या म्हणजेच पदार्थांच्या योगाने उलगडता येईल, असे कणादाने ठरवले. अर्थशास्त्रदृष्टचा शब्दांच्या तीन प्रकारच्या राशी व्याकरणशास्त्राने सांगितल्या आहेत, त्या अशा – द्रव्यदाचक पदे, गुणवाचक पदे आणि क्रियावाचक पदे. त्यांचे पुन्हा सामान्य वाचक व विशेषवाचक असे दोन वर्ग होतात. वाक्याने त्यांचा संबंध सूचित केलेला असतो. वैशेषिक दर्शनातील पदार्थपद्धती द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष आणि समवाय संबंध या सहांची बनली. तिच्यात सर्व विश्ववस्तू अंतर्भूत केली आहे. या पद्धतींत अभाव हा सातवा पदार्थ कालांतराने घातला गेला. त्याचे सूक्ष्म विवेचन कणादाच्या सूत्रांमध्ये आलेले आहे. परंतु स्वतंत्र पदार्थ या अर्थाने त्याचे परिगणन केलेले नाही. अभावाची कल्पना ही भारतीय तत्त्वज्ञानातील विरोध-पद्धतीची मुख्य मेढ आहे. भारतीय तर्कशास्त्रात, विशेषतः नव्यन्यायात हा अभाव फार गाजला.

**प्रमाणविद्या व तर्कशास्त्र** – वैशेषिक दर्शनालाच जोडून भारतीय तर्कशास्त्र निर्माण झाले. भारतीय तर्कशास्त्राची स्थापना एक स्वतंत्र दर्शन म्हणून गौतमाने केली. तत्त्वज्ञानातील सर्व प्रश्न ज्ञानविद्येचे किंवा प्रमाणविद्येचे भाग मानून त्यांची चर्चा गौतमाच्या न्याय दर्शनात केलेली आहे. प्रमाणविद्येच्या दृष्टीने सर्व तात्त्विक मुद्यांचा उलगडा करण्याची पद्धती गौतमाने काढल्यानंतर तिचा परिणाम म्हणजे प्रमाणविद्या आणि तर्कशास्त्रे स्वतंत्र रीतीने वाढीस लागली. विश्ववस्तूबद्दलच्या विचारसरणीचा परिणाम प्रमाणविद्या व तर्कशास्त्र यांच्यावरही होतो. विश्ववस्तूबद्दलच्या दृष्टिकोणाला अनुसरून तदनुरूप भिन्न प्रमाणविद्या व तर्कशास्त्र बनते. आज सांख्य, वेदान्त व पूर्वमीमांसा यांचीही निरनिराळी प्रमाणविद्या असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते, याचे हेच कारण होय.

प्रमाणविद्या व तर्कशास्त्र यांच्या स्वतंत्र वाढीमुळे सर्वच

भारतीय दर्शने अत्यंत सुसंघटित व बौद्धिक व्यवस्थेने संपन्न बनली. गूढ अनुभव किंवा साक्षात्कार यालासुद्धा त्यांच्या तार्किक व्यवस्थेच्या रचनेतच स्वतःकरिता एक स्थान पाहावे लागले. शंकराचार्य, रामानुज, मध्वाचार्य इत्यादिकांची तत्त्वज्ञानेसुद्धा व्यापक अर्थाने तर्कशास्त्राच्या व्यवस्थेचा आश्रय करून राहिली आहेत. बौद्धिक मननाची प्रवृत्ती सर्व भारतीय तत्त्वज्ञानांच्या मध्ये अत्यंत खोल रुजलेली दिसते. याला कारण गौतम व कणाद यांची प्रमाणविद्या व तर्कशास्त्र हेच होय.

भारतीय प्रमाणविद्येवर गणितज्ञानाचा काहीच परिणाम झालेला दिसत नाही, हे एक आश्चर्य आहे. कारण हिंदुस्थान ही बीजगणिताची मूळ जन्मभूमी आहे. अंकगणित भारतातच चांगल्या तऱ्हेने वाढले. तरीही गणितज्ञानाची उपपत्ती हा भारतीय प्रमाणविद्येचा विषय होऊ शकला नाही. गणितविषयक ज्ञानाची उपपत्ती हा पाश्चात्य प्रमाणविद्येचा मध्यवर्ती प्रश्न झाला आहे.

बौद्धिक संस्कृती आणि तिचा आधार असलेले विचारस्वातंत्र्य हा भारतीय दर्शनांचा पुरातन वारसा आहे. यामुळेच ब्रह्मसूत्रांच्या पूर्वी संपूर्ण जडवादी सांख्य दर्शन उत्पन्न झाले होते व त्यामुळेच गौतमाच्या प्रस्तुत उपलब्ध होणाऱ्या तर्कशास्त्रापूर्वी जडवादी तर्कशास्त्र उत्पन्न झाले होते, असा पुरावा इतिहासात सापडतो. वैदिक धर्माचे कट्टे अनुयायी जे पूर्वमीमांसक त्यांच्यांतही जडवादी पूर्वमीमांसा दर्शन वाढीस लागले होते, असे कुमारिलभट्टांनी पूर्वमीमांसावार्तिकात म्हटले आहे. या जडवादी दर्शनाच्या सर्व शाखा आज नष्ट झाल्या आहेत. परंतु बुद्धिवादाचे व विचारस्वातंत्र्याचे दुसरे एक महत्त्वाचे लक्षण अनेक भारतीय दर्शनांत अजूनही शिल्लक राहिलेले दिसते, ते म्हणजे अनीश्वरवाद हे होय. सांख्य दर्शन, पूर्वमीमांसा, वैशेषिक सूत्रे, जैन दर्शन आणि बौद्ध दर्शन ही ईश्वराचे अस्तित्व मानीत नाहीत.

भारतीय दर्शनांची ग्रंथसंपत्ती मोठी आहे. तिचे आलोडन केल्यास त्यातून टिकाऊ व स्फूर्तिदायक विचार व तत्त्वे सापडू शकतील. नीतिशास्त्र, मानसशास्त्र, तर्कशास्त्र, प्रमाणविद्या इत्यादिकांसंबंधी पुष्कळ सामग्री कच्च्या मालाच्या स्वरूपात त्यात साठलेली आहे. अलिकडे भारतीय विद्यांच्या पुनरुद्धाराची चळवळ सुरू झाली आहे. अलिप्ततायुक्त बौद्धिक दृष्टिकोण न ठेवता, अंधश्रद्धा आणि गूढवाद यांचा आश्रय करून हे काम केले व त्या कामी ममत्वबंधनाची बाधा होऊ दिली, तर त्या पुरातन जराजीर्ण विचारांच्या ओझ्याखाली आपले बौद्धिक सामर्थ्य दडपले जाईल. या बाबतीत सावध राहिले पाहिजे. [ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी– नवभारत, मे १९४८ ]

**तथता** एक बौद्ध दार्शनिक संज्ञा. तथा (वस्तू जशी असेल, तशीच तिची स्थिती असणे) याचा भाव. तथता याचा अर्थ अविकारी तत्त्व किंवा परमार्थभूत सत्य असा आहे. विश्वाच्या समग्र धर्मांचा नित्य स्थायी धर्म म्हणजे तथता होय. विज्ञानवाद्यांचे हेच परमतत्त्व आहे. याला पुढील पर्याय-शब्द आहेत–

(१) भूतकोटी – भूत = सत्य म्हणजे अविपरीत पदार्थ. कोटी = अंत अर्थात सत्यवस्तूंचे पर्यवसान.

(२) अनिमित्त – सर्व निमित्तांनी विहीन.

(३) परमार्थ – लोकोत्तर ज्ञानाच्या योगे ज्याचा साक्षात्कार होतो, असे तत्त्व.

(४) धर्मधातू – सम्यक् दृष्टी, सम्यक् व्यायाम, इ. श्रेष्ठ धर्मांचे कारण.

सर्व विचार व क्रिया यांपासून मुक्त होणे, ही तथतेची मुख्य कल्पना आहे. हीच अंतिम अवस्था होय. प्रसिद्ध बौद्ध पंडित व महाकवी अश्वघोष याने या तथतेचे तत्त्वज्ञान विवरून सांगितले आहे. [ हि. इं. फि.; बौ. द. मी. ]

**तथागत** एक बौद्ध उपाधी. 'यथा पुनरावृत्तिर्न भवति तथा, तेन प्रकारेण गतः = ' (ज्या प्रकाराने गेल्यामुळे पुनर्जन्म संभवत नाही, तशा प्रकाराने गेलेला, वागलेला तो तथागत होय) अशी त्याची व्याख्या दिलेली आहे. ज्यांनी निर्वाणपद प्राप्त करून घेतले, अशा बुद्धांना ही उपाधी लावतात. साधनमालेत तथागत शब्द पाच ध्यानी बुद्धांना लावलेला आहे.

बुद्ध हे बहुसंख्य आहेत व त्यांच्यामध्ये श्रेष्ठ–कनिष्ठ भावही आहे. प्रत्येक, श्रावक, सम्यक्, संबुद्ध, जिन, अर्हत् आणि तथागत हे बुद्धाचे प्रकार उत्तरोत्तर श्रेष्ठ होत. यावरून तथागत हा सर्वश्रेष्ठ बुद्ध ठरतो. त्याला चार शाश्वत सत्यांचे आकलन झालेले असते व त्या सत्यांचा अनुभव घेण्याचा मार्गही त्याने शोधून काढलेला असतो. भावना, कल्पना व विचार यांवर त्याचे प्रभुत्व असते. त्याने षड्विकारांवरही ताबा मिळविलेला असतो. त्यामुळे बाह्य जगातल्या घटनांचा किंवा वस्तूंचा त्याच्या मनावर व इंद्रियांवर परिणाम होत नाही. तथागत स्वतः तर आसक्तीच्या पार गेलेला असतोच; शिवाय इतरांनाही तो तशा प्रकारचा मार्ग दाखवितो.

बत्तीस लक्षणांनी युक्त असे तथागताचे गर्भस्वरूप प्रत्येक प्राण्यात विद्यमान असते; पण ते राग–द्वेषांनी आवृत असते. ते आवरण दूर झाले, की सामान्य मनुष्यालाही तथागत पदवीला जाता येते. [ एन्सा. रि. ए.; इं. बु. इ.; गॉ. नॉ. बु. ]

**तथीर** अशुद्ध वस्तू शुद्ध (स्वच्छ) करणे, याला मुसलमान लोक तथीर असे म्हणतात. एखादे भांडे, कपडा किंवा पायतण विटाळले, तर ते पाण्याने, वाळूने किंवा मातीने शुद्ध करतात. मशिदीत विटाळ झाला, तर तिथे पाणी शिंपडतात व कुराणातील एक सुरा म्हणतात. [ डि. इ. ]

**तन्मात्रा** एक दार्शनिक संज्ञा. 'तदेवेति'=(तेच म्हणजे तन्मात्रा) किंवा 'सा मात्रा यस्य'=(तीच ज्याची मात्रा ते) अशी या शब्दाची व्याख्या आहे. अपंचीकृत असे रूप, रस, गंध, स्पर्श व शब्द यांना तन्मात्रा म्हणावे, असे वेदान्तसार या ग्रंथात सांगितले आहे.

'पृथिवी च पृथिवीमात्रा च आपश्च आपोमात्रा च' असा तन्मात्रांचा उल्लेख प्रश्नोपनिषदात आला आहे. वायू पुराणात आकाशादी पंच महाभूतांच्या गुणांना तन्मात्रा म्हटले आहे (१०२.९) महाभूतांच्या पूर्वी भूततन्मात्रा उत्पन्न झाल्या. [ वे. वि. नि.; श. क. ]

**तप** देह आणि मन यांना क्लेश देऊन जे अभीष्ट ते साध्य करून घेण्याचा एक उपाय. तपाची व्याख्या अशी – 'तपति तापयति वा' (=जे तापते किंवा तापवते ते तप होय) (श. क.). तपाचे दुसरे लक्षण असे– 'क्षुत्पिपासाशीतोष्णादिद्वन्द्वसहनम् (= भूक–तहान, शीत– उष्ण, इ. द्वंद्वे सहन करणे म्हणजे तप होय) (सर्वलक्षणसंग्रह).

प्राचीन काळापासून भारतात तपाची महती मानलेली आहे. यज्ञ, दान आणि तप ही भारतीय संस्कृतीची तीन प्रधान अंगे होत. तपाच्या अग्नीत तापवून निघाल्याशिवाय मानवाचे जीवन निर्मळ होत नाही. त्याचप्रमाणे त्याच्या कामनांची सिद्धीही तपावाचून होत नाही, असे सांगितले आहे. तप या कल्पनेचा संबंध चतुर्विध पुरुषार्थ व चार आश्रम या कल्पनांशी निगडित आहे.

चारही वेदांत व ब्राह्मण-ग्रंथातही तपाविषयी फार थोडेच उल्लेख आढळतात. अथर्ववेदात (१.१३.२) फक्त एका ठिकाणी मन, शरीर, ब्रह्मचर्य इत्यादींची तपे सांगितली आहेत. या तपाचा जेवढा मोठा साठा असेल, तितके उच्च स्थान मनुष्याला प्राप्त होते, असे तिथे म्हटले आहे. उपनिषदांत मात्र तपाविषयी बरेच विवेचन आहे. उपनिषदांनी चार आश्रमांपैकी वानप्रस्थाश्रमाचे एक अविभाज्य अंग म्हणून तप मानलेले आहे –

तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये
शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्यां चरन्तः ।
सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति
यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ।।
(मुण्डक. १. ११)

अर्थ– जे शांत व विद्वान पुरुष वनात राहून भिक्षावृत्तीने निर्वाह करतात आणि श्रद्धापूर्वक तप आचरतात, ते पापरहित होऊन सूर्यद्वाराने अमर्त्य व अव्यय अशा पुरुषाकडे पोचतात.

महानारायणीय उपनिषदात तपाचे व्यापक स्वरूप सांगितले आहे, ते असे –

ऋतं तपः सत्यं तपः श्रुतं तपः शान्तं तपो दमस्तपः ।
शमस्तपो दानं तपो यज्ञं तपो भूर्भुवस्सुवर्ब्रह्मैतदुपास्यैतत्तपः ।।

अर्थ– ऋत हे तप आहे, सत्य हे तप आहे, श्रुत हे तप आहे, शांत हे तप आहे, दम हे तप आहे, शम हे तप आहे, दान हे तप आहे, यज्ञ हे तप आहे व सच्चिदानंदस्वरूप ब्रह्माची उपासना करणे, हेही तपच आहे.

तैत्तिरीय उपनिषदात (३.२) तर 'तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व, तपो ब्रह्म (= तपामुळे ब्रह्माचे ज्ञान करून घे; तप हेच ब्रह्म आहे.) असा तपाचा गौरव केला आहे. 'तपसि सर्वं प्रतिष्ठितं तस्मात् तपः परमं वदन्ति'(= तपामध्येच सर्व प्रतिष्ठित आहे. त्यामुळे तप हे श्रेष्ठ आहे) असे महानारायणीय उपनिषदात (१७.२) म्हटले आहे. मनूने वानप्रस्थातील या तपाचा बराच तपशीलही सांगितला आहे.

पापाच्या निष्कृतीसाठीही तप करावे, असे धर्मसूत्रांनी सांगितले आहे. पापाचे स्वरूप जसे असेल, त्या प्रमाणात एका दिवसापासून एका वर्षापर्यंत तप करावे असे गौतम धर्मसूत्रात (१९.१७) म्हटले आहे. तपाने उपपातके व महापातकेही नष्ट होतात असे मनूनेही (११.२३९) म्हटले आहे.

ग्रीष्म ऋतूत पंचाग्निसाधन, पावसाळ्यात उघड्या आकाशाखाली बसणे आणि हेमंत ऋतूत ओले वस्त्र पांघरणे, असे ऋतुपरत्वे तपाचे प्रकारही मनूने (६.२३) सांगितले आहेत. माणसाने प्रत्येक आश्रमातील आपापली कर्तव्ये पार पाडणे, हेही एक प्रकारचे तपच होय, असे मनू म्हणतो (११.२३५).

भगवद्गीतेत तपाचे कायिक, वाचिक व मानसिक असे तीन प्रकार सांगितले आहेत, ते असे–

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ।।
अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ।।
मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत् तपो मानसमुच्यते ।।
(गीता १७.१४–१७)

अर्थ – देव, ब्राह्मण, गुरू व विद्वान यांची पूजा, शुद्धी, ऋजुत्व, ब्रह्मचर्य व अहिंसा हे शारीर तप होय. उद्वेग न आणणारी वाणी, सत्य व प्रिय भाषण आणि स्वाध्याय हे वाचिक तप होय. मनाची प्रसन्नता, सौम्यता, मौन, आत्मनिग्रह व भावसंशुद्धी हे मानसिक तप होय.

त्यापुढे गीतेने सात्त्विक राजस व तामस असे तपाचे गुणभेदानेही प्रकार सांगितले आहेत, ते असे – श्रद्धापूर्वक आणि फलाशा न धरता केलेले तप ते सात्त्विक; सत्कार, पूजा, सन्मान, इ. हेतूंनी व दांभिकपणे केलेले तप ते राजस व मूर्खपणाने स्वतःला कष्टवून किंवा दुसऱ्याला त्रास देण्याच्या इच्छेने केलेले तप, ते तामस होय.

तपाचे महत्त्व सांगणारी अनेक वचने वैदिक वाङ्मयात आढळतात. 'तपो वा अग्निः' (तप म्हणजे अग्नी होय), 'तपो दीक्षा' (तप म्हणजे दीक्षा होय), 'तपसा वै लोकं जयन्ति' (तपाने लोकावर विजय मिळवतात), असे शतपथात म्हटले आहे. (श. ब्रा. ३.४.३.२; ३.४.३.२; ३.४.४.२७). 'तस्मात्तप्यमानस्य भूयसी कीर्तिर्भवति भूयो यशः (म्हणून तप करणाऱ्या मनुष्याला पुष्कळ कीर्ती व पुष्कळ यश मिळते) असे जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणात म्हटले आहे (२.१.१३). या आणि अशाच सर्व वचनांचे सार सांगणारा मनूचा श्लोक असा—

यद् दुस्तरं यद् दुरापं यद् दुर्गं यच्च दुष्करम् ।
सर्वं तत् तपसा साध्यं तपो हि दुरतिक्रमम् ॥
(मनु. ११.२३८)

अर्थ – जे दुस्तर, दुष्प्राप्य, दुर्गम व दुष्कर आहे, ते सर्व तपाने साध्य होते; तपाचे अतिक्रमण मात्र कोणालाही करता येत नाही.

तप हा भारतीय संस्कृतीचा मेरुदंड आहे. तपानेच चिंतन हे शक्तिमान व रसमय होते. ज्ञानाची वृद्धीही तपानेच होते. व्यासांच्या प्रचंड तपातूनच तत्कालीन सर्व वाङ्मयाचा संग्रह झाला. शिव, बुद्ध, नरनारायण, भगीरथ, अर्जुन, इत्यादींच्या जीवनात तपाचेच सौंदर्य प्रतीत होते. तीन पिढ्यांच्या तपानंतर भगीरथाला गंगा पृथ्वीवर आणणे शक्य झाले. पुराणवाङ्मयात देव, दानव, मानव हे सगळेच तप करताना दिसतात. विश्वामित्रानेही कठोर तप करूनच ब्रह्मर्षी ही उपाधी मिळविली.

तपाचे महत्त्व याहूनही आगळे असल्याचे भागवतावरून कळते. विश्वसृष्टीची रचना करण्यासाठी भगवान् विष्णूने ब्रह्मदेवाला उत्पन्न केले व त्याला तसा आदेश दिला. पण सृष्टी कशी रचावी, तेच ब्रह्मदेवाला कळेना. म्हणून मग तो भगवंताला शरण गेला. भगवंताने त्याला तपाचा आदेश दिला. त्याने दिव्य शतवर्षे तप केले व त्या तपातून त्याला सृष्टिनिर्मितीचा मार्ग सापडला (भाग. पु. ३.९).

शिवाला प्रसन्न करून घेण्यासाठी पार्वतीनेही तपाचाच मा[illegible] अनुसरला होता. कालिदासाने कुमारसंभवात तिच्या पंचाग्नि साधनेचे वर्णन करताना पुढील श्लोक लिहिला आहे–

शुचौ चतुर्णां ज्वलतां हविर्भुजां
शुचिस्मिता मध्यगता सुमध्यमा ।
विजित्य नेत्रप्रतिघातिनीं प्रभा–
मनन्यदृष्टिः सवितारमैक्षत ॥
(कु. सं. ५.२[illegible]

अर्थ – मंद स्मित करणारी, कृशकटी अशी पार्वती ग्रीष्म ऋतूत प्रज्वलित अशा चार अग्नींच्या मध्यभागी राहून डो[illegible] दिपवणाऱ्या सूर्यप्रकाशावर मात करून सूर्यबिंबाकडे एकट[illegible] पाहू लागली.

तपाने असाध्य ते साध्य होत असल्यामुळे सर्वसामान्य मा[illegible] सेही कामनांच्या पूर्तीसाठी आपापल्या परीने तप करता[illegible] संतती, संपत्ती व ऐहिक सुखोपभोग यांची इच्छा करणारे [illegible] व दैवी अनुग्रह प्राप्त व्हावा, अशी तळमळ असणारे स्त्री–पु[illegible] हे आपापल्या कल्पनेप्रमाणे अनेक प्रकारची तपे आचर[illegible] असतात.

एक किंवा दोन्ही बाहू उभारून अखंड उभे राहणे, ए[illegible] पायावर उभे राहणे, सदैव जागे राहणे, मौन पाळणे, सतत चा[illegible] राहणे, दंडवत घालीत तीर्थयात्रा करणे, अशा प्रकारची [illegible] देहदंडनात्मक तपेही जुन्या काळी कित्येक लोक करीत आणि[illegible] तपाची पराकाष्ठा समजली जाई. अन्नग्रहणावर नियंत्रण ठे[illegible] हे तपाचे महत्त्वाचे अंग मानले जाई. त्यामुळे काही तपस्वी के[illegible] पाणी पिऊन तर काही वारा पिऊन राहत असत. काही[illegible] उंञ्छवृत्तीने प्राण धारण करीत.

आजही असे अनेक तपस्वी भारताच्या सर्व भागांत [illegible] विशेषतः तीर्थे, क्षेत्रे व पहाडी गुहा यांत आपली तपःसा[illegible] करताना आढळतात.

बौद्ध धर्मात तपाचा संबंध कर्मवादाशी मानलेला आ[illegible] पूर्वीची कर्मे तप आचरून नष्ट करावी असे एके ठिका[illegible] सांगितले असले, तरी बुद्ध हा तपाला अनुकूल न[illegible] तपस्येतले आत्मक्लेश व उपवासादी देहदंडनाचे मार्ग त्या[illegible] अतिरेकी वाटत होते. त्याचा स्वतःचा अनुभवही तपाच्या बा[illegible] तीत उलटच होता. प्रारंभी ज्ञानप्राप्तीसाठी त्याने तपाचा मार्ग अनुसरला होता व खडतर तप करून आपला देह अ[illegible] पंजर करून टाकला होता. पण मग त्याच्या लक्षात आले, अशा आत्मक्लेशातून आपल्याला ज्ञान प्राप्त होणार नाही. [illegible] याहून ज्ञानप्राप्तीचा एखादा वेगळा मार्ग असला पाहिजे, [illegible]

विचार करून त्याने शरीर सुस्थित केले व एकांत स्थळी चिंतनाचा मार्ग स्वीकारला. त्यातूनच तो बुद्ध झाला. नैतिक आचरण, ध्यान व अंतर्मुखता या गोष्टी माणसाला उच्च ध्येयाप्रत नेतात, असे बुद्धाने संयुत्त निकायात ( १.१०३ ) सांगितले आहे. त्यावरून तपाकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोन समजून येईल.

जैन धर्माने मात्र कायक्लेशरूप तपाला आत्यंतिक महत्त्व दिले. संचित कर्म नष्ट करणे याला जैन धर्मात कर्मनिर्जरा असे म्हटले आहे व कर्मनिर्जरेचे प्रमुख साधन तप मानले आहे.

जैन धर्माने तपाचे बाह्य व आभ्यंतर असे दोन भेद केले आहेत. अवमोदर्य, उपवास, रसपरित्याग, वृत्तिपरिसंख्यान विविक्तशय्यासन, इ. बाह्य तपाचे सहा भेद असून, स्वाध्याय, शोधन किंवा प्रायश्चित्त, वैयावृत्त्य, व्युत्सर्ग, विनय व ध्यान हे आभ्यंतर तपाचे भेद जैनांनी सांगितले आहेत. [ श. क.; प. का. भा.; एन्सा. रि. ए.; आर्यसंस्कृति; जैनधर्मामृत. ]

(२) एक दिव्य लोक. याला तपोलोक असेही म्हणतात. हा जनलोकांच्या वर चार कोटी योजने दूर आहे. ऋभू, सनत्कुमार, व मन्वंतरांचे प्रणेते या लोकात निवास करतात. या लोकाच्या वर सत्यलोक अर्थात ब्रह्मलोक आहे. [ पु. इं. ]

**तपागच्छ** श्वेतांबर जैन संप्रदायातील एक उपपंथ. जगच्चंद्र सूरी (इ. स. चे १३ वे शतक) याने या गच्छाची स्थापना केली. या गच्छाला प्रारंभी बृहद्गच्छ असे नाव होते; पण मेवाडच्या राजाने जगच्चंद्र सूरीला तपा ही उपाधी दिली, तेव्हापासून हा गच्छही तपागच्छ या नावाने प्रसिद्ध झाला. गुजरातचा राजा वीरधवल याचा मंत्री वस्तुपाल हा जगच्चंद्र सूरी व त्याचे शिष्य यांचा भक्त होता. त्यामुळे गुजरातेत तपागच्छाचा पुष्कळ प्रसार झाला. श्वेतांबर संप्रदायात हा गच्छ सर्वांत महत्त्वाचा मानला जातो. या गच्छाचे अनुयायी महाराष्ट्र, गुजरात, पंजाब, राजस्थान, तमिळनाड, इ. प्रदेशांत आढळतात.

जगच्चंद्र सूरीचे देवेंद्र सूरी व विजयचंद्र सूरी या नावाचे दोन शिष्य होते. त्यांनीही तपागच्छाचा पुष्कळ प्रसार केला. पण विजयचंद्र सूरीने कठोर आचाराचे माहात्म्य कमी करून आचारशैथिल्याला मान्यता दिली. त्यामुळे त्यांच्यांत मतभेद निर्माण झाला. या गच्छातील एक आचार्य पार्श्वचंद्र (इ. स. चे १५ वे शतक) याने पुढे तपागच्छाची वेगळीच शाखा स्थापन केली, तिला पार्श्वचंद्रगच्छ म्हणतात. पार्श्वचंद्राने कर्मविषयक नवा सिद्धान्त सांगितला. तो निर्युक्ती, भाष्य, चूर्णी व छेद या ग्रथांना प्रमाण मानीत नसे. पाहा–गच्छ. [ क. को. प्र.; जै. ध. ]

**तप्तकुंभ** एक नरक. या नरकात उकळते तेल आणि लोखंडाचे चूर्ण यांनी भरलेले कुंभ ठेवलेले असतात. विश्वासघातकी सरकारी नोकर, तुरुंगाचे दुष्ट अधिकारी आणि स्त्रियांचा विक्रय करणारे व अगम्यागमन करणारे लोक या नरकात जातात. तप्तकुंड, तप्तपाषाणकुंड, तप्तलोक, ही नावेही याच स्वरूपाच्या नरकाची आहेत. [ श. क.; पु. इं. ]

**तप्तकृच्छ्र** एक व्रत. जेव्हा महापातकासाठी प्रायश्चित्त म्हणून हे व्रत करायचे असते, तेव्हा ते बारा दिवस करावे लागते. त्यात तीन दिवस कढत पाणी, तीन दिवस कढत दूध व तीन दिवस कढत तूप प्यावे आणि नंतरचे तीन दिवस उपवास करावा; आणि उपवासकाने कढत हवा किंवा वाफ नाकावाटे घ्यावी, रोज एकदाच स्नान करावे व संयमाने राहावे असे सांगितले आहे, (मनु. ११.२१४; वि. ध. सू. ४६. ११; बौ. ध. सू. ४. ५.१०). मिताक्षरेत या व्रताला महातप्तकृच्छ्र म्हटले असून, तिथे दोन दिवसांच्या तप्तकृच्छ्राचाही उल्लेख आहे. त्या दोन दिवसांच्या व्रतात पहिल्या दिवशी कढत पाणी, दूध व तूप घ्यायचे आणि दुसऱ्या दिवशी संपूर्ण उपवास करायचा असतो.

याज्ञवल्क्यस्मृतीत (३.३१७) चार दिवसांचे तप्तकृच्छ्र सांगितले आहे. त्यात एक दिवस कढत पाणी, एक दिवस कढत दूध व एक दिवस कढत तूप पिऊन, चौथ्या दिवशी उपवास करायचा असतो हे चार दिवसांचे व्रत लहान पातकांसाठी करायचे असते, असे प्रायश्चित्तप्रकाशात म्हटले आहे.

हे व्रत आचरताना किती पाणी, दूध व तूप प्यावे, याविषयी पराशराने सांगितले आहे, ते असे–

षट्पलं तु पिबेदम्भस्त्रिपलं तु पयः पिबेत् ।
पलमेकं पिबेत् सर्पिस्तप्तकृच्छ्रं विधीयते ॥

(परा. स्मृ. ४. ८)

अर्थ – सहा पले पाणी प्यावे, तीन पले दूध प्यावे व एक पल तूप प्यावे, (अशा प्रकारे) तप्तकृच्छ्र केले जाते. (१ पल = ३ किंवा ४ तोळे).

पाणी संध्याकाळी, दूध सकाळी व तूप दुपारी प्यावे असे ब्रह्म पुराणात म्हटले आहे.

प्रायश्चित्तप्रकाशात २१ दिवसांच्या तप्तकृच्छ्राचा उल्लेख आढळतो. तिथे ब्राह्मणाने तीळ, तिळाचे तेल, दही, मेण, मीठ, द्राक्षे, मद्य, अन्न, पशू, सुगंधी द्रव्ये, इ. पदार्थांची विक्री केल्यास, त्याला पाप लागते असे सांगून, त्यासाठी त्याने वर्षभर तप्तकृच्छ्र करावे, असेही सांगितले आहे. [ हिं. ध. ]

**तप्तमाषक** एक दिव्य. ज्याच्यावर एखादा आळ आला असेल, त्याला आपले निरपराधित्व सिद्ध करण्यासाठी हे दिव्य करायला लावीत. याचा विधी असा–

लोखंडाचे, तांब्याचे किंवा मातीचे सोळा अंगुळे परिघ असलेले व चार अंगुळे खोल असे पात्र बनवावे. त्यात वीस पलभार तेल व तूप घालून ते चांगले तापल्यावर त्यात सोन्याचा उडीद टाकावा. मग दिव्य करणाऱ्या व्यक्तीला अंगठा व तर्जनी यांचे साहाय्याने तो उडीद बाहेर काढायला लावावा. तसे करताना बोटे भाजली नाहीत किंवा त्यांवर फोड आले नाहीत, तर ती व्यक्ती निरपराध आहे, असे समजावे. सोन्याच्या उडीदाऐवजी अंगठीही टाकण्याची पद्धत होती. [ श. क. ]

**तप्तमुद्रा** वैष्णव पंथाचे काही लोक शंख, चक्र, इ. आयुधांच्या धातूच्या आकृत्या तप्त करून आपल्या देहांवर मुद्रा उठवतात, त्यांना तप्तमुद्रा म्हणतात. आश्विन किंवा कार्तिक शुद्ध एकादशीच्या दिवशी अशा मुद्रा उठवून घेणे पुण्यप्रद मानले जाते. ब्राह्मणाने उजव्या हातावर सुदर्शन चक्र धारण करावे आणि डाव्या हातावर शंख धारण करावा, असे अग्नी पुराणात सांगितले आहे. वैष्णव जनांनी आषाढ शुद्ध द्वादशीला तप्तमुद्रा धारण कराव्या, असे वायू पुराणात सांगितले आहे. तप्तमुद्रांमुळे विष्णुपद मिळते असे म्हणतात. [ हि. ध.; श. क.; भा. द. सं. ]

**तबला-डग्गा** एक चर्मवाद्य. लाकूड कोरून तबल्याचे खोड तयार करतात. त्याच्या तोंडावर बकऱ्याचे कातडे चढवतात, त्याला पुड असे म्हणतात. पुडावर मधोमध शाई भरतात व तिचे थरावर थर घोटून पक्के करतात. पुडाच्या कडेने एक चामड्याचा वाटोळा गजरा बसवतात. या गजऱ्यातून एक वादी ओवून घेतात व ती घट्ट करण्यासाठी खोडाच्या खालच्या अंगाला लोखंडाचे कडे बसवतात. या पुडाला ताण देण्यासाठी वादीच्या खाली लाकडी गठ्ठे बसवतात. हे गठ्ठे खाली वर करून तंबोऱ्याच्या स्वराशी तबला जुळवतात. तबला उजव्या हाताने वाजवितात.

याचा दुसरा भाग लाकडाचा, तांब्याचा, पितळेचा, जर्मन-सिल्व्हरचा किंवा क्वचित मातीचाही करतात, त्याला डग्गा असे नाव आहे. डग्गा डाव्या हाताने वाजविला जातो म्हणून त्याला बाया असेही म्हणतात. डग्ग्याच्या तोंडावर कातडे चढवतात व त्यावर मध्यापासून किंचित एका अंगाला दीड-दोन इंच व्यासाच्या भागावर वर्तुळाकार शाई घोटून बसवतात. डग्ग्याच्या तोंडाशी गजरा बसवतात व त्यात ओवलेली वादी बुडाशी बसविलेल्या लोखंडी कड्यातून ओवून पक्की आवळतात. तबला-डग्गा हे गाण्याच्या साथीचे एक प्रमुख वाद्य आहे.

सुमारे अडीचशे वर्षांपूर्वी या वाद्याचा जन्म झाला, असे सांगतात. दिल्लीत सुधारखाँ धाडी नावाचा एक पखवाजी होता. त्याने हे वाद्य बनवले असे म्हणतात. दिल्लीतच भगवानदास नावाचा दुसरा एक पखवाजी होता. त्याची व सुधारखाँची पखवाजवादनात नेहमी स्पर्धा चालत असे. परंतु सुधारखाँ हा भगवानदासाला कधीच पराजित करू शकला नाही. त्यामुळे एके दिवशी सुधारखाँने चिडून पखवाजाचे दोन तुकडे केले. पुढे या दोन तुकड्यांतूनच तबल्या-डग्ग्याची कल्पना निघाली, अशी आख्यायिका सांगतात. काहींच्या मते अमीर खुस्रव हा या वाद्याचा जनक होय.



तबला–डग्गा

भेरी, दुंदुभी, इ. वाद्यांचे निरनिराळे भाग घेऊन तबला हे वाद्य निर्माण केले गेले, अशी माहिती कालिका पुराणातल्या सातव्या पटलात आली आहे.

हे वाद्य मुळात भारतीय नसावे असे म्हणतात. संगीतोपनिषत्सारोद्धार या ग्रंथाच्या चौथ्या वाद्याध्यायात 'तथैव म्लेच्छवाद्यानि ढोलतब्लामुखानि तु' असा श्लोक असून त्यात तबल्याला म्लेच्छ वाद्य म्हटले आहे.

जलतरंगाप्रमाणे तबलाही सप्तस्वरात वाजवता येतो. त्याला तबला-तरंग असे म्हणतात. गाण्याच्या साथीशिवाय स्वतंत्रपणेही तबलावादनाची प्रथा अलिकडे पडली आहे. गाण्याच्या मैफलीत तबला हा गायकाच्या उजव्या हाताला असतो. [ म. ज्ञा. को.; श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**तम** (१) एक नरक. याला लोकपृष्ठ असेही म्हणतात. हा अत्यंत शीत व दारुण अंधकाराने भरलेला आहे. वर्णाश्रमधर्मापासून भ्रष्ट झालेले लोक या नरकात पडतात. क्षुधा, तृषा यांनी संत्रस्त होऊन त्यांना तिथे काल कंठावा लागतो.

(२) प्रकृतीच्या त्रिगुणांपैकी एक. पाहा – गुण.

**तमसा** एक नदी. हिंदीत तमा व तौंस अशी लोकप्रचलित नावे आहेत. मध्यप्रदेशात नगौधाच्या दक्षिणेला असलेल्या महियर गावी तमसा उगम पावते आणि रीव्याच्या उत्तर भागातून वाहत जाऊन प्रयागच्या आग्नेयीस सुमारे अठरा मैलांवर गंगेला मिळते.

या नदीला रामायणकालापासून तीर्थाचे पावित्र्य लाभलेले आहे. तमसेचे वर्णन करताना वाल्मीकी म्हणतो –

अकर्दममिदं तीर्थं भरद्वाज निशामय ।
रमणीयप्रसन्नाम्बु सन्मनुष्यमनो यथा ।।
न्यस्यतां कलशस्तात दीयतां वल्कलं मम ।
इदमेवावगाहिष्ये तमसातीर्थमुत्तमम् ।।
(वा. रा. १. २. ४–६)

अर्थ– हे भारद्वाजा, हे तीर्थ कर्दमरहित आहे. सज्जनांच्या मनाप्रमाणे या नदीचे उदक स्वच्छ व रमणीय आहे. यास्तव हे भरद्वाजा, तू तुझ्या (मस्तकावरचा) कलश खाली ठेऊन मला परिधान करण्याकरिता माझे वल्कल दे. मी या उत्कृष्ट तमसा तीर्थामध्येच स्नान करतो.

वाल्मीकीचा आश्रम याच नदीच्या काठी होता व इथेच त्याने रामायणाची रचना केली, असे सांगतात.

कालिदासाने रघुवंशात (९.२०) तमसेचा उल्लेख केला आहे. दशरथाने तमसा व सरयू या दोन्ही नद्यांची तीरे यज्ञस्तूप उभा करून सुशोभित केली, असे तो म्हणतो. [ हि. जॉ. ए. इं.; वा. रा. को.; पु. इं. ]

**तमाशा** महाराष्ट्रातील लोकनाटयाचा एक प्रकार. तमाशा करून दाखविणाऱ्यांना तमासगीर म्हणतात. सात-आठ किंवा त्याहून अधिक तमासगिरांचा एक संच असतो. अशा संचाला फड म्हणतात. फडाचा जो मुख्य असतो, त्याला सरदार किंवा नाईक म्हणतात. हा नाईक म्हणजे तमाशातील सर्व नाटयदर्शनाचा नायकच असतो. याशिवाय नायिकेची भूमिका करणारा नृत्यकुशल असा, स्त्रीवेषधारी नाच्या किंवा नाची (नाचणारी) स्त्री; शब्दांवर कोटया करून, वेडेवाकडे अंगविक्षेप करून व प्रसंगी अचकट–विचकट बोलून हास्य–निर्मिती करणारा हजरजबाबी सोंगाडया (विदूषक); ढोलकी व तुणतुणे वाजविणारे साथीदार आणि मागे उभे राहून ' जी जी, जी ग जी, जी र जी ' हे लावणीतील चरणांच्या अंती येणारे सूर ओढणारे सुरत्ये किंवा झीलकरी, असे हे फडाचे घटक असतात.

खेडयांतील यात्रा–जत्रांत आणि होळीसारख्या सणाउत्सवांत तमाशाच्या कार्यक्रमांना विशेष महत्त्व असते. तमाशाला रंगमंचाची जरूरी नसते. पारासारख्या उंचवटयाच्या जागी किंवा उघडया माळावर कुठेही तमाशाचा फड उभा राहतो.



तमाशातील साथीदार

नेपथ्याच्या केवळ शाब्दिक सूचना वापरून तमाशात प्रेक्षकांची कल्पनाशक्ती जागृत केली जाते व अपेक्षित परिणाम साधला जातो. रॉकेलचे हिलाल पेटवून त्यांच्या प्रकाशात तमाशाचे कार्यक्रम होतात.

प्राधान्याने शृंगारप्रधान लावण्या म्हणणे आणि त्यांच्या अनुषंगाने शृंगारहास्यात्मक अशी करमणूक करणे, हे तमाशाचे स्थूल स्वरूप होय.

तमाशाचा उदय नेमका केव्हा आणि कोणत्या परिस्थितीत झाला, याविषयी विद्वानांत मतभेद असले, तरी तमाशाला परिणत स्वरूप लाभले, ते पेशवाईतच यात संदेह नाही. विशेषतः उत्तर पेशवाईत सवाई माधवराव व दुसरा बाजीराव यांच्या कारकीर्दीत तमासगीर शाहिरांना राजाश्रय लाभल्यामुळे तमाशाचा विशेष उत्कर्ष झाला. रामजोशी, अनंत फंदी, होनाजी बाळा, सगनभाऊ, प्रभाकर व परशुराम हे प्रमुख शाहीर याच काळात गाजले.

पेशवेकालीन तमाशाला ढोलकीचा तमाशा म्हणत. कवने करणारा शाहीरच बहुधा तमाशाचा फड काढीत असे. त्या काळात तमाशाचा मुख्य भर नाचगाण्यावर होता. सरदार, सोंगाडया आणि नाच्या या त्रयीवरच तमाशाचे यश अवलंबून असे. नाच्या पोऱ्याऐवजी नाचीची–नाचणाऱ्या स्त्रीची–योजना पेशवाईअखेरच झाली.

गण, गौळण, लावण्या, मैदिक कवने आणि मुजरा ही पेशवेकालीन तमाशाची पाच अंगे होती. आजच्या तमाशात या पाच

अंगांशिवाय उत्तरार्धात वग नामक नाट्यप्रकार सादर केला जातो.

गण – गण म्हणजे गणेशनमनाची गीते. तमाशाचा प्रारंभ गणाने होतो. प्रथमतः ढोलकी–तुणतुणे वाजविणारे अन्य साथीदारांसह प्रेक्षकांपुढे येतात आणि गण गातात. बहुतेक शाहीरांनी गण रचले आहेत. पेशवाईतील प्रसिद्ध शाहीर प्रभाकर याने रचलेला एक गण असा–

रंगराज आज महाराज गणपती ।। ध्रु ।।
एकदंत वक्रतुंड ।
हास्यवदन सरळ शुंड ।
फरशांकुश करिं प्रचंड ।
दूर्वांकुर गंडस्थळिं दिव्य मिरवती ।।
नमूं नाथ आदिविरा ।
शूळपाणि खड्गधरा ।
जनन मरण नाहिं जरा ।
शरण त्या मि शंकरास भावें निश्चितीं ।।
टाळ–विणे मोरचंग ।
वाजतात बिन–मृदंग ।
गर्जतात कवी जंग ।
सभारंगणांत गात गंगु हैबती ।।

गणेशाने गीतरचनेला व गीतगायनाला स्फूर्ती द्यावी आणि कार्यक्रमाला यश द्यावे, हा गणगायनाचा हेतू असतो.

गौळण – गणानंतर गौळणी गायिल्या जातात. गौळणी म्हणजे गोपी आणि कृष्ण यांच्या लीलांविषयीची गीते. अशा गौळणी संतांनीही रचल्या आहेत. तमाशात या गौळणींचे केवळ गायन होत नाही, तर त्या साभिनय व संवादासह सादर केल्या जातात. दही–दूध घेऊन राधा आणि तिच्या मैत्रिणी मथुरेच्या बाजाराला निघतात आणि कृष्ण व त्याचे सौंगडी त्यांना वाटेत अडवून छेडतात, हा या कार्यक्रमातला मुख्य भाग होय. कृष्णाचा प्रतिनिधी पेंद्या आणि राधेची प्रतिनिधी मावशीबाई यांच्या विनोदी संवादाने या कार्यक्रमाला विशेष रंग चढतो. कृष्ण आणि गोपबालक यांना दाद न देता गौळणी पुढे जाऊ लागताच कृष्ण राधेचा पदर धरतो. मग राधा त्याला विनवते

श्रीरंगा कमलाकांता, हरि पदरातें सोड ।।
व्रजललना नारी । जात असो कीं, बाजारी......

कृष्ण गोपींजवळ दह्यादुधाचे दान मागतो. पेंद्याच्या भूमिकेतील सोंगाड्या त्यांची आणखी थट्टा करतो. शेवटी त्या आश्वासन देतात –

येऊं आम्ही, ईश्वर ग्वाही ।
दान देऊन कांहीं मग जाऊं अपुले ठावीं ।

शाहिरांनी गोपी–कृष्णांच्या संबंधातले असे नाना प्रसंग गुंफून गौळणी रचलेल्या आहेत. अलिकडच्या काळातील एक प्रसिद्ध शाहीर पठ्ठे बापूराव यांनी रचलेल्या गौळणींपैकी एक गौळण अशी –

धरूं नको रे वाट माझी । मला जाऊं दे बाजारीं ।। ध्रु० ।।
साऱ्या गौळणी गेल्या निघुनी । उशीर झाला मला भारी ।।
विक्रीला वेळ झाला । दहीदूध येईल माघारीं ।। १ ।।
नंदनंदना कंसकंदना । करूं नको मस्करी ।
जावा नणंदा वेळ तिंदा । घरीं मला छळती बहू परी ।। २ ।।
पठ्ठे बापुराव म्हणे गोकुळीं । खेळे गिरिधारी ।
गौळयाघरीं क्रीडा करी । श्रीहरि आठव्या अवतारीं ।। ३ ।।

गोपी–कृष्णांच्या लीलांवर आधारलेल्या गौळणी श्रोत्यांच्या व प्रेक्षकांच्या नित्य परिचयाच्या असल्या, तरी त्यांचा अभिनय करताना तमासगीर त्यांत नित्य नवा रंग भरतात. गौळणींचा संपूर्ण कार्यक्रम पूर्वी फार मोठा असे; पण हल्लीच्या तमाशात त्याला फार वेळ देत नाहीत.

लावण्या – गौळणीनंतर विविध प्रकारच्या, विशेषतः शृंगारिक लावण्या गाण्याचा कार्यक्रम होतो. या लावण्या गाताना नाच्या किंवा नाची लावणीतील आशयाला उत्तान नृत्याभिनयाने उठाव देते. आजच्या तमाशात संगीत लावणी, रंगबाजी आणि छक्कड अशा त्रिविध लावणीगायनाने हा कार्यक्रम गाजतो. संगीत लावणीच्या नावाखाली नाटक-सिनेमातील लोकप्रिय शृंगारिक गीतेही गातात. रंगबाजी म्हणजे आशुक–माशुकांच्या उत्तान शृंगारचेष्टांचे वर्णन करणारी लावणी होय. त्या गाताना नर्तक-नर्तिका जो अभिनय करतात, तो उत्तान स्वरूपाचा असतो. कित्येकदा तो अश्लीलतेतही परिणत होतो. छक्कड म्हणजे नाट्यगीताच्या किंवा द्वंद्वगीताच्या स्वरूपाची लावणी होय. पठ्ठे बापूरावाने अशी छक्कड-रचना बरीच केली आहे. त्यानेच तमाशात छक्कड गाण्याचा प्रकार लोकप्रिय केला. त्याच्या एका छकडीचा नमुना असा –

तो– हे रूपसुंदरी राजसबाळी ।
नको पुढें जाउं भराभरा ।।
वेडा मी झालों पाठिं लागलों ।
नको मनामधिं धरूं कुर्रा ।।
ती– जरा बेतानं वाग, सदा माझ्या मागं ।
कशासाठीं हिंडतोस गरागरा ।
रे खट्याळ आहे माझा नवरा ।।
कुणितरी येईल, अवचित पाहील ।
सांगत जाईल माझ्या दिरा ।
रे खट्याळ आहे माझा नवरा ।।

शृंगारप्रिय प्रेक्षकांच्या कानामनाची धणी पुरविणारा हा रंगबाजी–छकडीचा भागच आजवर पांढरपेशा समाजाने आक्षेपार्ह मानला होता. तमाशात अश्लीलता येते, ती या भागातच. ग्रामीण भागातील श्रोत्यांच्या तमाशावर उडया पडतात, त्या अशा शृंगारातिरेकाच्या दर्शन-श्रवणासाठीच !

पेशवाईतील तमाशात अखेरीस भेदिक कवने (आध्यात्मिक कूटांवरील गीते) गाण्याची प्रथा सुरू झाली.

**वग** – वग म्हणजे एक प्रकारचे नाटकच. हरदासी कीर्तनात जसा आख्यानात्मक उत्तररंग असतो, तसाच आधुनिक तमाशाचा उत्तररंग म्हणजे वग होय. साधारपणे कथानक ठरवून ठेवायचे, भाषणांची रूपरेखा आखून घ्यायची, परंतु प्रत्यक्ष शब्दयोजना मात्र प्रत्येक पात्राने स्वयंस्फूर्तीने व प्रसंगानुरूप अशी करायची, असे वगाचे स्वरूप असते. वगाला आधारभूत अशी एक कथात्मक लावणी असते. अशी लावणी मधल्या निवेदनाप्रमाणे वापरली जाते. वगातले काही सवाद गद्यात, तर काही पद्यातही असतात. म्हणजे वग हे एक प्रकारचे चंपूनाटचच असते. गद्य भागाला वतावणी किंवा सपातनी (संपादणी) अशी संज्ञा आहे.

वग हे बहुधा मध्ययुगीन सरदार, दरकदार, राजे–राजकन्या, सावकार–रखेली किंवा शिलेदार आणि त्याला परदेशात आढळलेली नार यांसंबंधीचे असतात. मिठ्ठाराणी, मोहना–बटाव, जाईराणी, खापऱ्या चोर, हे आधुनिक तमाशांत गाजलेले अद्‌भुतरम्य वग आहेत. खेड्यातील भाऊबंदकी, दोन बायकांचा नवरा, इष्कबाजीचे दुष्परिणाम, दारूबाजी यांसारख्या सामाजिक विषयांवरही वग झालेले आहेत.

अशा वगांतील हर्षामर्षाचे प्रसंग तमासगीर आपल्या संवादकौशल्याने, लावण्यांच्या रसानुकूल चाली वापरून व ढोलकीतुणतुण्याची तदनुकूल साथ देऊन प्रेक्षकांपुढे उठावदारपणे सादर करतात.

तमाशात नाट्यात्मकता प्रथमपासूनच होती. परंतु संपूर्ण नाटकासारखे वग सादर करण्याची प्रथा मात्र एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात सुरू झाली. इ. स. १८४३ साली विष्णुदास भाव्यांनी जुन्या दशावतारी खेळात सुधारणा करून सांगली भागात पौराणिक नाटके सुरू केली. त्यानंतर लवकरच इ. स. १८६५ च्या सुमाराला त्याच भागातील एक तमासगीर उमाजी सावळजकर व त्याचा सहकारी बाबाजी मांग यांनी भाव्यांच्या नाटकांच्या अनुकरणातून मोहना–बटाव हा पहिला वग रचला. त्यानंतर पठ्ठे बापूराव आणि दत्तोबा साळी या शाहिरांनी रचलेले वग फार गाजले. पठ्ठे बापूरावांचा मिठ्ठाराणी हा रोमहर्षक आणि करुणरम्य वग आजही समाजाच्या सर्व थरांतील प्रेक्षकांच्या मनाची पकड घेतो.

स्वातंत्र्योत्तर काळात तमाशाला लोकनाट्याची प्रतिष्ठा लाभली. त्यानंतर सर्वश्री पु. ल. देशपांडे, वसंत बापट, ग. दि. माडगूळकर, व्यंकटेश माडगूळकर, इ. प्रथितयश साहित्यिकांनी उत्तमोत्तम वग लिहिले आणि त्यांचे स्वतंत्र प्रयोगही करविले. सध्या शाहीर साबळे यांचा संच तर वगांसाठीच प्रसिद्ध आहे.

**मुजरा** – नाटकातील भरतवाक्याप्रमाणे तमाशाच्या शेवटी मुजरा गाण्याची पद्धती होती. मुजऱ्यात निरनिराळ्या शाहिरांना वंदन करण्यात येऊन त्यांचा आशीर्वाद मागण्यात येई. तसेच साधू, संत, बैरागी, अवलिये यांनाही वंदन करण्यात येई. सध्या फक्त मराठवाड्यातील तमासगीरच मुजरा गातात.

**तमाशाची उत्पत्ती** – हा शब्द अरबी असून, त्याचा अर्थ प्रेक्षणीय दृश्य असा आहे. तमाशा संस्थेच्या शिल्पकारांना असलेली शाहीर ही संज्ञाही मूळ शायर किंवा शाइर या अरबी शब्दापासूनच बनलेली आहे. तमाशा संस्थेचे आणि तिच्या शिल्पकारांचे नाव अरबी असल्यामुळे ही संस्था मुसलमानांच्या प्रभावातून उदय पावली असावी, असा काही विद्वानांचा कयास आहे. या संदर्भात श्री. के. नारायण काळे यांचे मत असे –

"तमाशाची परंपरा उत्तर पेशवाईच्या कालापेक्षा फारशी अधिक जुनी नसावी, असे त्यात वापरले जाणारे जे लावणीवाङ्मय उपलब्ध आहे, त्यावरून वाटते. परंतु लोकांच्या धार्मिक व सामाजिक जीवनाशी प्रत्यक्ष संबंध नसलेले व केवळ करमणुकीच्या दृष्टीने पैशाच्या मोबदल्याने खेळले जाणारे तमाशासारखे काही मनोरंजनाचे प्रकार त्यापूर्वीही अस्तित्वात असावे, असे मानण्यास जागा आहे. मुसलमान लोक व मुसलमानी संस्कृती यांचा महाराष्ट्रीय जनता व महाराष्ट्रीय संस्कृती यांच्याशी संपर्क आल्यानंतर या प्रकारच्या बाजारी करमणुकीच्या प्रकारांची महाराष्ट्रात आवक झाली असावी व पुढे भागवत संस्कृतीच्या विकासप्रक्रियेत त्या गारुडांची मारुडे बनली असावीत. बाजारी करमणुकीचे हे खेळ म्लेंच्छांच्या वस्तीत, अरण्यात, जिथे धर्मकार्य करण्यास बंदी आहे अशा ठिकाणी, चव्हाट्यावर अथवा छावणीत होत असावेत. संध्याकाळच्या किंवा रात्रीच्या वेळी ते खेळले जात असावेत. दौलतजादा करण्याचा जो प्रघात अलिकडच्या तमाशात दिसून येतो, तो या प्रकारातही चालू असावा. मांग, गारुडी, कंजारभाट वगैरे जातीचे लोक त्यात भाग घेत असावेत. तरुण रूपवती स्त्रिया त्यात हावभाव करून नाचत व गात असाव्यात. आणि कदाचित या खेळांबरोबर जुगाराचा अड्डाही चालत असावा. आणि इतर ऐषारामाच्या गोष्टींचीही तेथे तरतूद होत असावी. ज्ञानेश्वरांनी ताभसदानाची उदाहरणे देण्याच्या निमित्ताने जे वर्णन केले आहे, त्यावरून हे अनुमान केले आहे. ते वर्णन–

मग म्लेंछांचे वसोटे । दांगाणे हन कैकटे ।
का शिबिरे चोहटे । नगरींचे ते ।।
तेही तेही ठाईं मिळणी । समयो सांजवेळु कां रजनी ।
तेव्हा उदार होणे धनी । चोरियेचा ।।
पात्रे भाट नागारी । सामान्य स्त्रिया का जुवारी ।
जिथे मूर्तिमंतें भुररीं । भुले तया ।।
रूपानृत्याची पुरवणी । ते पुढी डोळे भारणी ।
गीत भाटीव तो श्रवणी । नाग कर्णजपु ।।
तयाहीवरी अळुमाळु । जें घे फुलांगंधाचा गुगुळु ।
तंव भ्रमाचा तो वेताळु । अवतरे ।।
तेथ विभांडुनिया जग । आणिले पदार्थ अनेग ।
तेणे घालूं लागे मातंग । गवादीसी ।।
एवं ऐसेनि जें जें देणें । ते तामसदान मी म्हणे ।
आणि घडे दैवगुणे । आणिकही एक ।।

(ज्ञाने. १७. २९४-३००)

तमाशातील नाचीचे इराण–अरबस्तानातील साकी या पात्राशी साम्य आहे, ही वस्तुस्थिती वरील अनुमानाला पोषक आहे. परंतु हे मत निरपवाद नाही. तमाशातला गण पूर्वीपासून गोंधळात चालू होता. ढोलकी-तुणतुणे ही दोन्ही मुख्य वाद्येही इथलीच. संतांनी गौळणी तर शेकडयांनी रचलेल्या आहेत. पवाडांचा म्हणजे पराक्रमाच्या कृत्यांचा गौरव गाणारे पवाडे आणि लवणम् किंवा लावणी नृत्यावरोबर गायिली जाणारी लावणी गीते, हीही खास महाराष्ट्राच्या सांस्कृतिक वातावरणातून उद्भवलेली आहेत. म्हणूनच केवळ तमाशा आणि शाहीर या दोन विदेशी संज्ञांमुळे या संस्थेचे मूळ मुसलमानी प्रभावात शोधण्याचे कारण नाही, असा एक मतप्रवाह आहे.

सूक्ष्मपणे पाहणी केल्यावर असे दिसून येते, की दोन्ही मतांत काही अंशी तथ्य आहे. श्री. नामदेव व्हटकरांनी तमाशाच्या उदयाच्या पार्श्वभूमीविषयी जे अनुमान केले आहे, त्यात या उभय मतांचा समन्वय आहे. ते म्हणतात, 'औरंगजेबाच्या कारकीर्दीत सुखासीन बनलेल्या फौजांचे हजारो-लाखोंचे तळ ज्या वेळी दक्षिणेत पंचवीस–तीस वर्षे पडत गेले, त्या वेळी त्यांना करमणुकीची साहजिकच गरज पडली. पुन्हा फौजी शिपायांची एक विशिष्ट मनोवृत्ती बनलेली असते. लढाईत केव्हाही मृत्यू येईल, म्हणून मिळेल तेवढी चैन आजच करून घ्यावी, असे त्याला वाटत असते. धार्मिक नीतिनियम त्याने अशा वेळी धाब्यावर बसवलेले असतात. घर सोडून दूरदेशी लढाईवर गेलेल्या शिपायांना वैषयिक अतृप्तीत दीर्घ काळ काढावा लागतो. त्यामुळे जीत शृंगार आणि विषयवासना यांना उतारा मिळेल, अशा स्वरूपाच्याच करमणुकीची गरज त्यांना अधिक भासते. दिल्लीपासून हजारो मैल दूर आलेल्या या फौजी लोकांना करमणुकीसाठी आपल्या सोबत ताफे घेऊन येणे शक्य नव्हते. त्यांनी इथलेच खेड्यापाड्यातले गाणारे जमा केले, त्यांच्या ताफ्यांना आश्रय दिला. महाराष्ट्रात गोंधळी, डौरी, कोल्हाटी, डुगडुग्ये, महार वगैरे गाणे–बजावणे करणाऱ्या जमाती होत्याच. त्यांना ही बरी मिळकत आली. उत्तरेत नायकिणी नाचवण्याचा षौक दांडगा. या फौज्यांनी इकडच्या कलावंतांना आपल्या ताफ्यात बायकी नाच्येही ठेवायला लावले. या फौज्यांनी या ताफ्यांना आपल्या भाषेतले नाव दिले– तमाशा ! '

शाहीर हा शब्द महिकावतीच्या बखरीत आढळतो. यावरून असे म्हणायला हरकत नाही, की शाहीर आणि त्यांची तमाशा संस्था शिवशाहीच्या आगे–मागे उदयास आली आणि पेशवाईतील स्वस्थतेच्या वातावरणात ती बहरली. पेशवे दप्तरात शाहिरांना दिलेल्या मुशाहिऱ्याचे अनेक उल्लेख मिळतात. पुण्यात होळीच्या सणात तमाशांचे कार्यक्रम सतत होत असत. त्या कार्यक्रमांना पेशवे आणि इतर अनेक मातबर सरदार-दरकदार उपस्थित राहत. पेशव्यांतर्फे तमासगिरांची चांगली संभावनाही होत असे. दुसऱ्या बाजीरावाच्या काळात तमासगिरांची चांगलीच चलती होती.

पेशवाई बुडाल्यानंतर तमासगिरांना संस्थानिकांनी––विशेषतः बडोद्याच्या गायकवाडांनी––आश्रय दिला. परशुराम, प्रभाकर, सगनभाऊ, सवाई फंदी, रामा गोंधळी, बाकेराव इत्यादिकांचा बडोदकर महाराजांनी चांगला परामर्श घेतला. 'एवढेच विश्रांतिला राहिले, स्थळ पश्चमच्या रहाळांत !' असे कृतज्ञतेचे उद्‌गार शाहीर प्रभाकराने काढले आहेत.

**बदलते स्वरूप** – इंग्रजी अमलात तमासगिरांचा राजाश्रय तुटत चालला. इ. स. १८५० पर्यंत पेशवाईत गाजलेले सर्व शाहीर मृत्यू पावले. याच सुमारास विष्णुदास भाव्यांनी मराठी नाटकाचा पाया घातला. त्यामुळे करमणुकीचे नवे सुसंस्कृत युग अवतरले. मग तमाशा हा केवळ ग्रामीण असंस्कृत जनांच्या करमणुकीचाच विषय म्हणून राहिला. मराठी नाटकातील गाण्यांवर तमाशातील लावणी-संगीताचा जसा प्रभाव पडला, तसा तमाशात नाटकांच्या प्रभावातून वगाचा प्रादुर्भाव झाला. तमाशात अश्लीलता क्रमाने वाढत गेली. उत्तान हावभाव करीत आणि उत्तान गाणी गात नाचणाऱ्या केवळ स्त्रियांची 'संगीत बारी' तमाशा संस्थेत लोकप्रिय बनली. तबलजी, पेटीवाला, सळीचा त्रिकोण वाजवणारा सुरत्या आणि सोंगाड्या यांच्या साथीने नाचणाऱ्या संगीत बारीतील स्त्रिया जुन्या शृंगारिक लावण्यांबरोबर अलिकडच्या मराठी बोलपट-

तील लोकप्रिय शृंगारिक गाणीही गाऊ लागल्या आहेत.

तमाशातील या उत्तानतेला दौलतजाद्याची जोड मिळाली. किंबहुना दौलतजादा हा प्रकार अश्लीलतेला आवाहन करण्यासाठीच जन्मला, असे म्हणायला हरकत नाही. तमाशा पाहणाऱ्या कोणाही श्रोत्याने एखादे नाणे (बहुशः चवली–दोन आणे किमतीचे चौकोनी नाणे) हातात घेऊन ते नाचीला देऊ



तमाशातील नाची

करायचे व ते घेण्यासाठी ती आली म्हणजे तिच्या कोणत्याही अंगाला स्पर्श करून तिला आपल्या आवडीची लावणी म्हणायला सांगायचे, या प्रकाराला दौलतजादा असे म्हणतात.

स्वातंत्र्योत्तर काळात मुंबई सरकारने इ. स. १९४८ मध्ये तमाशा सुधारणा समिती स्थापून तमाशातील अनिष्ट प्रकारांना आळा घालण्याचा प्रयत्न सुरू केला. त्यानंतर महाराष्ट्र तमाशा परिषद ही संस्था स्थापन झाली. या संस्थेतर्फे तमाशाचे लोकाभिमुख स्वरूप राखून, त्यातील सर्व अनिष्ट प्रकार नष्ट व्हावे, याविषयी प्रयत्न चालू आहेत. दरवर्षी या संस्थेची अधिवेशने होतात; तसेच सरकारी प्रोत्साहनाने तमाशामहोत्सवही अनेक शहरांतून साजरे केले जातात.

तमाशाचा लोकमानसावरील प्रभाव ध्यानी घेऊन अनेक सामाजिक व राजकीय संस्थांनी प्रचारासाठी या संस्थेचा भरपूर उपयोग करून घेतला आहे. सत्यशोधक समाजाचे तमाशे झंझावती प्रचाराच्या दृष्टीने खूप गाजले. आजही राजकीय पक्षांची जी कलापथके आहेत, तीही एक प्रकारचे तमाशेच करतात.

गेली सुमारे तीन शतके अनेक स्थित्यंतरांतून आलेली ही संस्था मराठी लोकजीवनात विलक्षण लोकप्रियता पावली आहे आणि आज लोकाश्रय व राजाश्रय यांच्या आधारावर ती नवे वैभव प्राप्त करीत आहे. पाहा–लावणी, पोवाडा, कलगीतुरा. [म. शा. वा.; लो. ना. प.; म. लो. त.; म. जी. २; लोकसत्ता–दिवाळी अंक १९५७]

**तमिळनाडू** सध्याच्या मद्रास राज्याचे जुने नाव तमिळनाडू असे आहे. नाडू म्हणजे देश. तमिळ भाषा बोलणाऱ्यांचा प्रदेश म्हणून त्याला तमिळनाडू म्हणू लागले. उत्तरेस तिरुपती (वेंगडम्) पर्वतापासून दक्षिणेस कन्याकुमारी पर्यंत आणि पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंतचा प्रदेश तमिळनाडच्या क्षेत्रात येतो. आजचा केरळ प्रदेश प्राचीन काळी तमिळनाडमध्येच समाविष्ट होता. तमिळ साहित्यात या सर्व प्रदेशाचा तमिळहम् या नावाने उल्लेख येतो. या प्रदेशात कित्येक हजार वर्षांपूर्वीपासून द्रविड लोक वसलेले आहेत. द्रविड या शब्दापासूनच तमिळ हा शब्द उगम पावला आणि तोच पुढे स्थिर झाला, असे मानतात.

भूप्रदेश–तमिळनाडची भूमी सर्व जगात प्राचीनतम मानली जाते. पूर्वाश्मयुगापासून तिथे मानवाची वसती आहे. मानवी संस्कृतीचा जन्म तिथेच झाला, असेही काही पुरातत्त्ववेत्त्यांचे मत आहे.

प्राचीन तमिळ प्रदेशाचे पाच विभाग मानलेले होते व कुरिंजी, पालै, मुल्लै, मरुदम व नेदियल अशी त्यांची नावे होती. पहाडी प्रदेशाला कुरिंजी म्हणत. त्यातील जंगली जमाती शिकार व कंदमुळे यांवर जीवन चालवीत. पालै ही मरुभूमी होय. तिथले लोक चोरी-वाटमारी करून निर्वाह करीत. मुल्लै म्हणजे सखल वनप्रदेश होय. तिथे वास्तव्य करणाऱ्या जमाती पशुपालक होत्या. मरुदम म्हणजे कावेरी व ताम्रपर्णी या नद्यांच्या काठची समतल भूमी होय. इथे राहणारे लोक शेतीवर उपजीविका करीत. शेतीमुळेच त्यांचे जीवन स्थायी स्वरूपाचे बनले होते. समुद्रकिनाऱ्यालगतच्या प्रदेशाला नेदियल म्हणत. समुद्र हेच तिथल्या लोकांचे उपजीविकेचे साधन होते.

या प्रदेशातील पूर्व घाट व पश्चिम घाट या दोन पर्वतराजी

पूर्व व पश्चिम समुद्रकिनाऱ्यांशी समांतर असून, त्यांच्यामुळे सर्व प्रदेशाचे तीन भाग पडले आहेत. कर्नाटकाच्या दक्षिणेस नीलगिरी पसरलेला आहे. त्याचे सर्वांत उंच शिखर ९,६९९ फूट उंच आहे. कावेरी, ताम्रपर्णी, पेरियार, वैगाई, पलार, इ. नद्या या प्रदेशातून वाहत जाऊन पूर्व समुद्राला मिळतात. कावेरी व ताम्रपर्णी या त्यांतील प्रमुख नद्या होत.

पूर्वी तमिळहम्‌चे पांड्यनाडू, चोळनाडू, चेरनाडू, कोंगुनाडू व तोंडैनाडू असे पाच राजकीय विभाग होते. तमिळ प्रदेशाचा प्राचीन इतिहास अज्ञात आहे. मात्र एवढे निश्चित कळते, की आर्य लोक भारतात येण्यापूर्वीच तमिळनाडमध्ये द्रविडांचे वास्तव्य होते व त्यांच्या संस्कृतीचा पुष्कळच विकास झाला होता. इतिहासपूर्वकाळीच आर्यावर्त व दक्षिणापथ यांचा दळणवळणाचा संबंध येऊ लागला होता. अगस्त्य ऋषीने द. भारतात जाऊन तमिळनाडमध्ये आर्यांची पहिली वसाहत स्थापली. पण त्यापूर्वीच द्रविड लोक संस्कृतिविकासाच्या अनेक पायऱ्या चढून गेले होते. त्यांची स्वतंत्र भाषा होती. ते शिल्पकलेत, तसेच घरे व नगरे निर्माण करण्यातही कुशल होते. ते शेती करीत व समुद्रमार्गे परदेशांशी मोठा व्यापारही करीत. कलिंग व पांड्यनाडू यांच्यांत सुती कापडाचा व्यापार चालत होता, असे अर्थशास्त्रादी ग्रंथांवरून कळते. तमिळनाडमधून उत्तम मोत्येही उ. भारतात पाठवली जात होती.

**इतिहास** – अशोकाच्या वेळी तमिळनाडमध्ये पांड्य, चोळ व चेर या वंशांची स्वतंत्र राज्ये नांदत होती. अगदी दक्षिणेस वल्लरू नदीपर्यंत पांड्यांचे राज्य होते. त्याच्या उत्तरेला पूर्व किनाऱ्यावर कावेरीच्या खोऱ्यात चोळांचे व पश्चिम किनाऱ्यावर चेरांचे राज्य होते. हे तीन्ही राजवंश द्रविड होते. आर्य लोक द. भारतात गेले, तेव्हा त्यांच्या संस्कृतिप्रसाराच्या कामी या राजांनी त्यांना खूप साहाय्य केले. म्हणून मग आर्य ब्राह्मणांनी त्यांना क्षत्रियत्व बहाल करून कोणाला सूर्यवंशी, तर कोणाला चंद्रवंशी ठरवले. अशोकाच्या शिलालेखात स्वतंत्र मित्रराष्ट्रे म्हणून त्यांचा उल्लेख आढळतो.




तमिळनाडू

तमिळ साहित्यात या तीन्ही वंशांसंबंधी काही माहिती मिळते. त्यांचा कालक्रमानुसार संपूर्ण इतिहास उपलब्ध नसला, तरी त्यांतील महापराक्रमी राजांची कर्तबगारी, त्यांच्या राज्याचा विस्तार, त्यांची युद्धे, इ. गोष्टींची वर्णने प्राचीन तमिळ कवींनी केलेली आहेत. या तीन्ही राजवंशांची सत्तास्पर्धा सतत चालू होती. सनपूर्व १०० च्या सुमारास चोळ राजवंशाने पांड्य व चेर या वंशांवर आपले वर्चस्व प्रस्थापित

केले होते, असे दिसते. हे त्यांचे वर्चस्व २०० ते २५० वर्षे चालू होते. त्या कालखंडांत करिकाल चोळ हा राजा महापराक्रमी निघाला. त्यानंतर पांड्य वंश सरसावला व त्याने काही काळ-पर्यंत तमिळनाडवर राज्य केले. पुढे चेर वंशाने तिथे सत्ता गाजवली. पण त्या वंशाचे राज्य मुख्यत: केरळ व कोंगू या प्रदेशावरच होते. चेर राजांनी इतर राजवंशांशी राज्यविस्ताराच्या बाबतीत विशेष स्पर्धा केली नाही.

तमिळनाडच्या उत्तरेकडील सीमाप्रदेशात कलवार नावाचे अनार्य व अर्धवन्य लोक वसलेले होते. आंध्रांच्या आक्रमणामुळे ते तमिळनाडमध्ये घुसले आणि त्यांनी तिथल्या लोकांवर वर्चस्व प्रस्थापित केले. इ. स. च्या ३ ऱ्या शतकात पल्लव लोकही तमिळनाडच्या तोंडैमंडलम् या भागात येऊन स्थायिक झाले आणि त्यांनीही तिथे आपले राज्य स्थापले. कांची ही त्यांची राजधानी होती. इ. स. च्या ४ थ्या शतकात कोंगू देशावर रट्ट वंशाची सत्ता होती. ५ व्या शतकात तिथे गंग वंशाचे राज्य सुरू झाले व ते सुमारे ५०० वर्षे टिकले. ६ व्या शतकात पांड्य वंशातील कडुंगोन राजाने कलवारांचा पराभव करून कावेरीच्या दक्षिणेकडील प्रदेशात आपली सत्ता पुन्हा प्रस्थापित केली. त्या वंशाने पुढे मोठे साम्राज्यच स्थापले. या राजवंशात अनेक महापराक्रमी व प्रजावत्सल राजे होऊन गेले. त्यांचे साम्राज्य इ. स. १३०० पर्यंत मोठ्या वैभवाने नांदले. पुढे मुसलमानी आक्रमणामुळे ते साम्राज्य दुर्बळ झाले व इ. स.च्या १४ व्या शतकात विजयनगरच्या साम्राज्यात समाविष्ट झाले.

इ. स. च्या ८ व्या शतकापर्यंत कावेरीच्या उत्तरेकडील प्रदेशावर (तोंडैमंडल व चोळमंडल) पल्लवांचे राज्य होते. त्या वंशाच्या राजवटीत तमिळनाडमध्ये अद्‌भुत अशी धर्म-जागृती झाली. आर्यांचा वैदिक धर्म याच काळात दक्षिणेत पूर्णपणे प्रतिष्ठित झाला. पुढें इ. स. ८५० च्या सुमारास चोळ वंशाने आपले सामर्थ्य वाढवले व तंजाऊर येथे स्वतंत्र राज्य स्थापले. त्या वंशाचे साम्राज्य पांड्यांच्या साम्राज्यापेक्षाही विशाल व वैभवशाली होते; पण इ. स. च्या १३ व्या शतकात पांड्य राजवंशाने ते नष्ट केले.

इ. स. च्या १४ व्या शतकात सर्व तमिळनाड विजयनगर साम्राज्याचा एक भाग बनला. विजयनगरच्या सम्राटांनी आपल्या साम्राज्याचे अनेक विभाग पाडून, त्यांवर राजघराण्यातील पुरुषांना अधिपती किंवा नायक म्हणून नेमले होते. ते केंद्राची सत्ता मानीत; पण स्वतंत्रपणे राज्यकारभार करीत. पुढे केंद्रसत्ता दुबळी झाल्यानंतर इ. स. च्या १६ व्या शतकात हे नायक पूर्णपणे स्वतंत्र राजे बनले. त्यामुळे तमिळनाडमधील मदुरा, तंजाऊर इ. राज्ये स्वतंत्र झाली व तिथे नायकांची सत्ता प्रस्थापित झाली. काही भाग मुसलमानांनी जिंकला व तिथे त्यांनी आपली सत्ता स्थापली. त्यानंतर इंग्रज, फ्रेंच व मराठे यांचीही सत्तास्पर्धा त्या भागात सुरू झाली. मात्र संपूर्ण तमिळनाडवर कोणीही सत्ता स्थापन करू शकला नाही. इ. स. १८०० च्या सुमारास इंग्रज बळावले व त्यांनी तंजाऊर, अर्काट वगैरे राज्ये जिंकून घेतली.

**देव-धर्म**– प्राचीन द्रविड लोकांचा धर्म कोणता होता व ते कोणत्या देवांना पूजीत होते, याविषयी निश्चित माहिती मिळत नाही. मात्र ते मुळात निसर्गपूजक होते आणि त्यांची काही ग्रामदैवतेही होती, असे तमिळ साहित्यावरून दिसून येते. त्यांच्यामध्ये नागपूजा विशेष प्रचलित होती. ते वृक्षदेवतांनाही भजत व भुताखेतांसाठी बळी देत. चरुबली व पशुबली ही त्यांच्या उपासनेची प्रमुख अंगे होती. पुष्करणी, तळी, झरे यांच्या ठिकाणी दैवी सामर्थ्य असते, असा त्यांचा विश्वास होता. आकाशकन्निगे नावाच्या जलदेवतांना ते मानीत. त्यांच्या ग्रामदेवता म्हणजे मारीदेवता होत. गावाबाहेर एखाद्या गडग्यात, झाडाखाली किंवा लहानशा खोपटात या देवतांची स्थापना करीत. गावात जरीमरी उत्पन्न करून लोकांना उपद्रव देणें, हे या देवतांचे कार्य असे. म्हणून द्रविड लोक त्यांना शांत करण्यासाठी वर्षातून एकदा जत्रा भरवून त्यांना पशुबळी व अन्नबळी अर्पण करीत. त्यांचे पुजारीपण स्त्रियांच्याकडे होते. कालांतरानें त्यांच्यांत एका सर्वशक्तिमान परमेश्वराची कल्पना निर्माण झाली व ते त्याची भक्ती करू लागले.

द्राविड व आर्य संस्कृतींचे मीलन झाल्यानंतर आर्यांच्या अनेक देवता द्रविड लोकांनी स्वीकारल्या. त्यामुळे तमिळ महाकाव्यात आर्य व द्राविड अशी दोन्ही प्रकारची दैवते आढळतात. पण शिव हाच तिथल्या सर्व लोकांचा आराध्य देव होता. तोच त्यांचा परमेश्वर होता. प्रागैतिहासिक काळापासून तिथे त्याची लिंगरूपात पूजा प्रचलित आहे. महेंद्रगिरी हे त्याचे निवासस्थान मानले जाते. आर्यांचा रुद्र व द्रविडांचा शिव हे पुढे एकरूप झाले. याच संयुक्त शिवस्वरूपाला धरून पुढे दक्षिणेत शैव पंथ स्थापन झाला आणि शिवभक्ती सार्वत्रिक करण्याचा मान त्याने मिळवला.

द्रविडांचा एक पर्जन्यदेवही होता व त्याचे गुणधर्मही इंद्रासारखेच होते. मात्र तो सोमरसाऐवजी पोंगळ म्हणजे तांदुळाची खीर पीत असे. या साधर्म्यामुळे आर्यांचा इंद्र द्रविडांनी खुशीने स्वीकारला व ते त्याच्यासाठी याग करू लागले. वैदिकांचा यम हा मूळचा एक सामान्य देव होय. त्याला आजचे उग्र स्वरूप दक्षिणेतच मिळाले असावे. दक्षिणेत यम ही

मृत्यूची देवता ठरली व तिची मंदिरे नगराच्या बाहेर स्मशान-भूमीत बांधली जाऊ लागली.

वैदिक आर्यांचा पूशा नावाचा एक पशुरक्षक देव होता. त्यावरून तमिळ लोकांनी मायोन या देवाची कल्पना केली. तो बाळकृष्णाप्रमाणेच सावळा असून, मुरली वाजवून सारा वनप्रदेश नादमय करतो, असे त्याचे वर्णन आहे.

कुरिंजी प्रदेशाचा देव शेयोन हा होय. मुरुगन व सुब्रह्मण्य ही त्याचीच अन्य नावे आहेत. गणपतीप्रमाणे हा वर्णाने लाल आहे. तो प्रेमाचा देव मानला गेला असून, उपवर कन्या इष्ट



पल्लवांचे मंदिरशिल्प – महाबलिपुरम

वरप्राप्तीसाठी त्याची पूजा करतात. हा देव वीरवृत्तीचा असून, त्याच्या हाती भाला असतो. त्याचे स्थान डोंगरावर असते. द्रविड लोक याला कोरंवाईचा मुलगा मानतात. स्कंदषष्ठीच्या दिवशी त्याची जत्रा भरते. पार्वतीचा पुत्र कार्तिकेय याच्याशी शेयोन किंवा मुरुगन याचे पुष्कळच साधर्म्य दिसते.

कोरंवाई ही तमिळनाडची प्राचीन स्त्रीदेवता आहे. पालै प्रदेशातील जमातींची ही कुलदेवी वृत्तीने क्रूर, रक्तपिपासू व मद्यमांसाची भोक्ती होती. तिचे भक्त वाटमारी करण्यापूर्वी तिची पूजा करीत आणि मनासारखी शिकार साधली, की तिला पशुबळी व नरबळीही देत. पुढे हीच देवी कालीच्या रूपाने पुराणांत प्रविष्ट झाली, असे मानतात.

संघम्‌कालीन तमिळ साहित्यात तमिळनाडूमध्ये त्या काळी प्रस्थापित झालेल्या धर्मसंप्रदायांचीही माहिती मिळते. त्या प्राचीन काळातही तिथे शैव आणि वैष्णव संप्रदायांबरोबरच बौद्ध व जैन हे धर्मही निर्वैर नांदत होते. प्रत्येक धर्मपंथाला आपापला मतप्रचार करायला तिथे पूर्ण वाव होता. त्या काळच्या राजांनीही सर्व धर्मपंथांना समानतेने वागवले, सर्वांचा योगक्षेम चालवला आणि सर्व धर्मांच्या तत्त्वज्ञानांचा अभ्यास करण्याचीही सोय करून दिली. त्या काळातील धार्मिक सहिष्णुतेची उदाहरणे शिलप्पधिकारम् वगैरे काव्यग्रंथांत सापडतात.

**सण-उत्सव** – तमिळनाडमधले दोन प्रमुख उत्सव म्हणजे वैकुंठ एकादशी व पोंगळ, हे होत. पहिला धार्मिक उत्सव आहे, तर दुसरा सामाजिक लोकोत्सव आहे. मार्गशीर्ष मासातील शुद्ध एकादशीला विष्णू एका असुराचा निःपात करण्यासाठी वैकुंठाहून पृथ्वीवर अवतरला, म्हणून या एकादशीला वैकुंठ किंवा मुक्कोडी एकादशी म्हणतात. त्या दिवशी तमिळनाडमधील लोक श्रीरंगम्‌ची यात्रा करतात.

पोंगळ म्हणजे मकरसंक्रांतीचा सण होय. तो पौष महिन्यात येतो व तीन दिवस चालतो. भोगीच्या दिवशी इंद्राची पूजा करतात. संक्रांतीच्या दिवशी नदीत स्नान करणे, पुण्यप्रद मानतात. घरोघर सूर्य, वायू व वास्तुदेव यांची पूजा करतात. त्यांना व ग्रामदेवतांना पोंगळाचा (तांदुळाची खीर) नैवेद्य दाखवतात. तिसऱ्या दिवशी गाईंची पूजा करतात.

याव्यतिरिक्त तिरुकल्याणम्, गजपर्व, कोलुवू, इ. उत्सवही तमिळनाडमध्ये साजरे होतात. तिरुकल्याणम् हा देवाचा विवाहसमारंभ असतो. गजपर्व हा ऐरावताचा उत्सव असून, तो कार्तिकात होतो. कोलुवू हा स्त्रियांचा नवरात्रातील उत्सव होय.

**नृत्य** – तमिळनाडमधले कुरव लोक प्राचीन काळापासून नृत्याचे भोक्ते होते. प्रत्येक जत्रेत ते आपले बेहोष नृत्य दाखवून लोकांना प्रसन्न करीत. या नृत्य-नाट्याला कुरवंजी म्हणत. हेच नृत्य-नाट्य पुढे तमिळनाडमधल्या देवदासींनी उचलले. त्यातील संवादात्मक नाट्य तेवढे वगळून त्याच्या बाकी सर्व अंगांचा त्यांनी स्वीकार केला. त्यातूनच पुढे भरतनाट्यम् या शास्त्रीय नृत्याचा जन्म झाला. भरतनाट्यम् ही भारतीय संस्कृतीला तमिळनाडने दिलेली मोठी देणगी होय.

**शिल्प** – आर्यपूर्व काळात द्रविड लोक मृतांना पुरीत आणि त्या जागी एखादा मोठा दगड स्थापून त्याच्या भोवती लहान दगडांची रास रचीत. पुढे त्या दगडी स्मारकांच्या रूपाने तमिळनाडमध्ये पितरांची पूजा सुरू झाली. नंतर अशा जागी स्तूपाच्या आकाराची समाधी बांधली जाऊ लागली. कालांतराने स्तूपाच्या भोवती भिंती व समोर सभामंडप उभारले गेले. पुढे आर्यांच्या

प्रभावामुळे त्याच पद्धतीवर मंदिरे निर्माण होऊ लागली व त्यांत उपास्य देवतांच्या ओबडधोबड मूर्तींची स्थापना होऊ लागली.

तमिळनाडमधली अतिप्राचीन मंदिरे लाकूड व विटा यांची होती. इ. स. च्या १ ल्या व ३ ऱ्या शतकात अशी मंदिरे असल्याचे कळते. पण ती कालप्रवाहात पूर्णपणे नष्ट झाली आहेत. त्यानंतर खडक पोखरून मंदिरे बनवण्याचा अभिनव उपक्रम प्रथमतः पल्लव राजांनी सुरू केला. त्या वंशात महेंद्रवर्मा व नरसिंहवर्मा हे कलाप्रेमी पिता-पुत्र इ. स. च्या ७ व्या शतकात होऊन गेले. त्यांनीच शिल्पकलेचे पल्लवयुग सुरू केले. महाबलिपुरम् येथे त्यांनी अनेक शिल्पे निर्माण केली. ती मंडप व रथ अशा स्वरूपाची असून, त्यांवर अनेक सुंदर मूर्ती कोरलेल्या आहेत. या शिल्पांजवळच पुराणातील काही प्रसंगही खडकात कोरलेले दिसतात. दक्षिणेतील हे सर्वांत प्राचीन शिल्पवैभव अजूनही चांगल्या स्थितीत आहे.

इ. स. च्या ६ व्या शतकात पल्लव राजांनी पाषाणाची मंदिरे उभारण्यास प्रारंभ केला. कांची नगरीत अशी अनेक मंदिरे आहेत. ८ व्या व ९ व्या शतकात त्यांनी त्या कलेचा डोळ्यात भरण्याजोगा विकास केला. पल्लवांनी बांधलेली मंदिरे आकाराने लहान असली, तरी द्राविड शिल्पाची सर्व अंगोपांगे त्यात दिसून येतात. पल्लवांच्या राजवटीतच द्राविड शिल्पशैलीचा पाया घातला गेला, असे मानतात.

पल्लवांची ही शिल्पपरंपरा चोळ राजवंशाने पुढे चालू ठेवली. त्यांनी पल्लवांप्रमाणेच प्रथम लहान लहान मंदिरे बांधली. मात्र त्यांच्या रचनेत एक वेगळेच नाविन्य व चैतन्य



रथ-मंदिरे — महाबलिपुरम

दिसत होते. त्यामुळे त्यांची ही शिल्पशैली चोळशैली या नावाने प्रसिद्ध झाली. इ. स. च्या ११ व्या शतकात चोळ राजांनी बांधलेली मंदिरे व गोपुरे अत्यंत भव्य आहेत. तंजाऊरचे (राजराजेश्वर) मंदिर व गंगैकोंडपुरम्‌चे तसलेच मंदिर ही दोन



बृहदीश्वरमंदिर — गंगैकोंडचोळपुरम

मंदिरे चोळ शिल्पकलेची उत्कृष्ट उदाहरणे होत. त्या कालखंडात चोळांची राजसत्ता व शिल्पकला वैभवाच्या शिखराला पोचली होती.

चोळांच्या नंतर तमिळनाडवर पांड्य राजवंशाची सत्ता स्थापन झाली. त्यांच्या दोन शतकांच्या राजवटीत द्राविड शिल्पकलेचा थोडासा विकास झाला असला, तरी चोळांची भव्य परंपरा खंडित झाली. मात्र इ. स. च्या १२ व १३ या शतकांत गोपुरांच्या रचनेत पुष्कळ सुधारणा झाली. पांड्य राजांनी अनेक जुन्या मंदिरांची पुनर्रचना करून त्यांचा विस्तारही वाढवला.

इ. स. १३५० पासून १५६५ पर्यंत तमिळनाड हा विजयनगरच्या साम्राज्याचा एक भाग होता. त्यामुळे तमिळनाडमध्ये त्या काळात जी मंदिरे निर्माण झाली, त्यांचे शिल्पकाम अगदी वेगळ्या धर्तीचे आहे. ती मंदिरे भव्य नाहीत, पण त्यांतील नक्षीकाम मात्र अत्यंत नाजूक व मनोहर आहे. अशा प्रकारची अनेक मंदिरे कांजीवरम्, कुंभकोणम्, श्रीरंगम्, इ. नगरांत पाहायला मिळतात.

विजयनगरचे साम्राज्य दुर्बळ झाल्यानंतर इ. स. च्या १६ व्या शतकात मदुरा येथे नायक वंशाने आपले राज्य स्थापले. त्यांच्या राज्यकाळात द्राविड शिल्पशैलीला जे रूप प्राप्त झाले, तेच साधारणपणे आजतागायत कायम राहिले आहे. जुन्या

मंदिरांचा जीर्णोद्धार व विस्तार करण्याची पांड्य वंशाची परंपराच नायक वंशाने पुढे चालू ठेवली. या कालखंडात गोपुरांच्या रचनेत बरीच सुधारणा झाली आणि स्तंभयुक्त मंडपांची संख्याही खूप वाढली. मदुरेचे मीनाक्षीमंदिर हे इ. स. च्या १७ व्या शतकातील द्राविड शिल्पशैलीचे उत्तम उदाहण आहे.



मीनाक्षीमंदिर – मदुरा

श्रीरंगम्, जंबुकेश्वर, चिदंबरम् येथेही अशा प्रकारची मंदिरे आहेत. तंजाऊरच्या बृहदीश्वरमंदिराच्या प्राकारात जे सुब्रह्मण्यमंदिर आहे, ते इ. स. च्या १८ व्या शतकात बांधलेले आहे. त्याची रचना पाहता त्या कालापर्यंत द्राविड शिल्पकारांचे कसब मुळीच कमी झाले नव्हते, ही गोष्ट कळून येते. हे मंदिर द्राविड शिल्पशैलीच्या मंदिरांतील एक रत्नच मानले जाते.

**संगीत**– तमिळनाडमध्ये प्राचीन काळापासून संगीतकलेचा विकास होत आला आहे. त्यागराज, मुथुस्वामी दीक्षितार, श्यामशास्त्री यांच्यासारखे महान संगीतरचनाकार या प्रदेशात होऊन गेले. त्यांनी कर्नाटक संगीताच्या विकासाला पुष्कळच हातभार लावला. वीणा, मृदंग, नागस्वरम् ही तमिळनाडमधील प्रसिद्ध वाद्येही कर्नाटक संगीताचा विकासच दर्शवितात.

**तीर्थक्षेत्रे** – तमिळनाडमध्ये अगणित तीर्थक्षेत्रे आहेत. त्यांतील कांची, कालहस्ती, चिदंबरम्, तंजाऊर, जंबुकेश्वरम्, कुंभकोणम्, महाबलिपुरम्, मदुरा, रामेश्वरम्, कन्याकुमारी, श्रीरंगम्, तिरुवण्णामलै, तिरुपल्लैवन, तिरुवल्लुर, तिरुवडमरुदूर, तिरुवंदिपुरम्, तिरुवैयारू, तिरुवारूर, तेन्काशी, पक्षितीर्थ, मधुरांतकम्, शुचींद्रम् ही स्थाने प्रमुख होत. या व्यतिरिक्त या प्रदेशात आणखीही पुष्कळ पवित्र क्षेत्रे आहेत.

**प्रेक्षणीय स्थळे** – मद्रास हे द. भारतातील सर्वांत मोठे शहर आहे. त्याचा विस्तार ५५ चौ. मैलांपेक्षा जास्त असून, त्यात मधून मधून हिरवीगार शेती–बागायती फुललेली दिसते. नदीमुळे या नगराचे दोन भाग झालेले आहेत. ही राज्याची राजधानी आहे.

मैलापोर हा मद्रास शहराचा दक्षिण भाग असून, महाकवी तिरुवल्लुवर याचा जन्म त्याच भागात झाला. ५०० वर्षांपूर्वी पोर्तुगीज लोकांनी तिथे एक वखार उभ... सेंट थॉमसच्या समाधिस्थानी सॅन थोम हे कॅथेड्रलही ... पुढे इ. स. च्या १७ व्या शतकात इंग्लिश लोकांनी म... पटनम् येथे एक वखार घातली व तिथेच सेंट जॉर्ज ... किल्ला बांधला. हा किल्ला मद्रासच्या उत्तर भागात ... या किल्ल्यात सेंट मेरीचे चर्च आहे. हे भारतातले पहिले ... चर्च होय. इ. स. १६८० साली ते बांधले गेले.

मैलापोरपासून जवळच अडयार हे उपनगर अडयार न... तीरावर वसलें आहे. तिथे थिऑसॉफिकल सोसायटीचे ... केंद्र आहे. त्या संस्थेच्या ग्रंथालयात ताडपत्रावर लिहि... जुन्या ग्रंथांचा बहुमोल संग्रह आहे. इतरही अनेक दुर्मिळ ... तिथे जमा केलेले आहेत. अडयारपासून उत्तरेकडे पस... समुद्रकिनारा अतिशय सुंदर दिसतो.

उंच गोपुरे, मंदिरे व मनोरे यांमुळेही मद्रास शहराचे ... वाढले आहे. प्राचीन काळी हे शहर दक्षिण वृंदावन या ... प्रसिद्ध होते. त्याच्या तिरुवल्लिकेनी या भागात पार्थसा... स्वामीचे मोठे मंदिर आहे. त्या मंदिरात कृष्ण, रुक्मिणी, ... राम, यांच्या मूर्ती आहेत. मैलापोर भागातील शिव... कपालेश्वर या नावाने प्रसिद्ध आहे.

**वेदंथंगल**— मद्रासपासून सुमारे ५० मैलांवर हे ... आहे. दरवर्षी पावसाळ्यानंतर इथे विविध जातींचे ... पक्षी येऊन वसतात. कधी कधी त्यांची संख्या इतकी ... असते, की ते ज्या झाडांवर बसतात, त्या झाडांची पानेही ... शकत नाहीत.

**जिंजी** – इथला किल्ला इतिहासप्रसिद्ध आहे. त्याची ... तीन डोंगरांवर पसरलेली असून, ती ७०० वर्षांपूर्वी बां... आहे. विजयनगरच्या साम्राज्यात याला बरेच महत्त्व हो... तिथे नायकांनी आपली सत्ता स्थापली. शिवाजीमहारा... तो किल्ला जिंकला होता. औरंगजेबाच्या स्वारीच्या ... शिवाजीचा पुत्र राजाराम ह्या तिथून आपले राज्य चा... होता. पण झुल्पिकारखानाने तो किल्ला जिंकून घेतला.

**वेल्लोर** – हे ठिकाण उ. अर्काट जिल्ह्यात, पलार न... तीरावर आहे. तिथे एक दुर्ग आहे. तो इ. स. च्या १... शतकात बांधलेला असून, तो लष्करी स्थापत्याचा ... नमुना समजला जातो. त्याच्या भोवती एक खंदक आहे.

जलंधरेश्वराचे मुख्य व विशाल मंदिर आहे. त्याचे शिल्पकामही सुंदर आहे. तिथले गोपुर सातमजली आहे.



जलंधरेश्वरमंदिर व दुर्ग – वेल्लोर

तिरुचिरापल्ली (त्रिचनापल्ली) – तंजाऊरपासून ३५ मैलांवर, कावेरीच्या तीरी हे नगर वसले आहे. चोळ वंशाची प्राचीन राजधानी उरैयूर म्हणजे या नगराचे एक उपनगर होय. तथापि सांप्रतच्या नगराचा बहुतेक भाग मदुरेच्या नायक राजांनी बांधला आहे, असे सांगतात.

या शहराचे सर्वांत मोठे आकर्षण म्हणजे तिथला पहाडी दुर्ग हे होय. तो दुर्ग २७३ फूट उंच अशा उभ्या पहाडावर बांधलेला आहे. त्यात एक हजारखांबी मंडप होता; पण तो



पहाडी दुर्ग – तिरुचिरापल्ली

आता ढासळला आहे. दुसरा शंभरखांबी मंडप मात्र अजून उभा आहे. तिथेच मथ्रुभुतेश्वराचे मंदिर आहे. त्यातील शिवलिंग स्वयंभू असून, ते खडकातूनच निर्माण झाले, असे म्हणतात.

पहाडाच्या माथ्यावर एक गणेशमंदिर आहे. त्या पहाडात पल्लव राजांनी खोदलेली तीन गुहामंदिरे आहेत. त्यांतील कोरीव काम सुबक असून, गंगाधराची मूर्ती डौलदार आहे.

या खडकाच्या पायथ्याजवळ टेप्पकुलम् नावाचे एक विशाल सरोवर असून, त्याच्या मध्यभागी एक सुंदर मंडप बांधलेला आहे. इथून जवळच श्रीनिवासनल्लुर या गावी कोरंगनाथाचे सुंदर मंदिर आहे. चोळ राजा परांतक याने इ. स. १० व्या शतकात ते बांधले. त्याच्या भिंती व विमान यांवर चोळ-शैलीचे उत्कृष्ट कोरीव काम पाहायला मिळते.

त्रिचनापल्लीपासून जवळच एका चोळ राजाने इ. स. च्या ११ व्या शतकात कावेरी नदीवर बांधलेले दगडी धरण अजून सुरक्षित आहे.



कावेरी नदीवरील जुने धरण

श्रीपेरुंबुदुर – हे रामानुजांचे जन्मस्थान होय. हे मद्रास व कांची यांच्यामध्ये आहे. इथे भाष्यकरस्वामींचे मंदिर असून, त्याच्या समोरच एका शंभरखांबी मंडपात रामानुजांची मूर्ती बसवलेली आहे. तिथल्या भिंतीवर रामानुजांच्या ९५ शिष्यांच्याही प्रतिमा कोरलेल्या आहेत.

गंगैकोंडचोळपुरम् – राजेंद्र चोळ याने इ. स. च्या ११ व्या शतकाच्या पूर्वार्धात ही नगरी वसवली व तिथे आपली राजधानी स्थापली. त्याने तिथे बांधलेले बृहदीश्वरमंदिर तंजाऊरच्या राजराजेश्वरमंदिरासारखेच पण त्याहून अधिक सुंदर आहे. हे नगर मात्र आता उजाड झाले आहे.

नागोर – तंजाऊरपासून जवळच हे मुसलमानांचे पवित्र स्थान आहे. इथे एका मुस्लिम साधूची कबर असून, तिच्यावर सुंदर मशीद बांधलेली आहे. इथे डिसेंबर महिन्यात जत्रा भरते.

**वेलंकनी** – हे कॅथॉलिक ख्रिस्ती लोकांचे यात्रास्थान आहे. इथे 'अवर लेडी ऑफ हेल्थ' चे चर्च आहे.

**कुत्तालम्** – तिरुनेलवेली जिल्ह्यात, पश्चिम घाटाच्या पळणी पर्वतराजीत, तेन्काशीपासून चार मैलांवर हे स्थान आहे. इथे चित्तर नदी ३०० फूट उंचीवरून खाली कोसळते. मात्र ती एकदम खाली येऊ शकत नाही. तिला या प्रपातात आणखी दोन उड्या माराव्या लागतात. या धबधब्याचे पाणी उत्साहवर्धक असल्यामुळे अनेक लोक तिथे स्नानासाठी जातात.

**पेरियर धरण** – मदुरेपासून ८७ मैलांवर व समुद्रसपाटीपासून २७०० फूट उंचीवर मद्रास-त्रावणकोर सीमेवर हे धरण बांधलेले आहे (इ. स. १८८९ – ९५). पश्चिम घाटातून अरबी समुद्राकडे वाहणाऱ्या नदीला तिथे बांध घातल्यामुळे हा १० चौरस मैलांचा विशाल तलाव तयार झाला आहे. जवळच्या डोंगरात दीड मैल लांबीचा बोगदा खोदून, त्यातून या तलावाचे पाणी मद्रास राज्यात सोडलेले आहे.

**मेट्टूर** – हे ठिकाण सेलमपासून ३२ मैलांवर आहे. इथे कावेरी नदीवर एक दगडी धरण बांधलेले असून, त्याची लांबी १ मैल व उंची २२० फूट आहे. हे जगातील अत्यंत मोठे धरण आहे.

**सित्तन्नवासल व नरथमलै** – ही स्थाने मद्रासपासून ९ मैलांवर आहेत. तिथे जैनांच्या गुहा असून, त्यांत जुनी भित्तिचित्रे व शिलालेख पाहायला मिळतात. प्राचीन काळी त्या गुहांमध्ये जैन साधू वास्तव्य करीत होते, असे सांगतात.

**आदिचनल्लुर** – तिरुनेलवेली जिल्ह्यातील श्रीवैकुंठम्‌जवळ हे ठिकाण आहे. तिथल्या उत्खननात प्राचीन काळची शवपात्रे सापडली आहेत; त्यावरून तिथे प्रागैतिहासिक काली मानवाची वसती होती, असे दिसते. तिथे प्राचीन रोमन नाणीही सापडली आहेत.

**आदिवासी** – तमिळनाडमध्ये मुख्य वसती द्रविड लोकांची असली, तरी इतरही काही जाती-जमाती त्या प्रदेशात प्राचीन काळापासून वसलेल्या आहेत. तोळकाप्पियरने आपल्या व्याकरणग्रंथात तमिळनाडमधील मक्कळ, देवर व नकरर या तीन प्रमुख जमातींचा उल्लेख केला आहे. मक्कळ म्हणजे शुद्ध द्रविड, देवर म्हणजे आर्य ब्राह्मण आणि नकरर म्हणजे तिथले वनवासी व गिरिवासी जन होत. या प्रदेशात तोड, मखर, कुरुंब, काणिक्कर, उरळी, माडिग इ. अनेक आदिवासी जमाती राहतात. त्यांनाच तोळकाप्पियरने नकरर हे सामान्य नाव दिले आहे.

**तमिळ संस्कृती** – तमिळनाड हा भारताचा अगदी दक्षिणेकडील भाग असल्यामुळे, उत्तरेकडून आलेल्या आक्रमणापासून तो सुरक्षित राहिला होता. त्यामुळे तिथल्या प्राचीन परंपरा बव्हंशी अबाधित राहिल्या आहेत. प्राचीन द्राविड संस्कृतीचे दर्शन याच प्रदेशात होते. त्याचप्रमाणे वैदिक संस्कृतीचे पुराणरूपही इथेच दृष्टीस पडते. द्राविड व आर्य संस्कृतींचे संमिश्रण होऊन जी हिंदू संस्कृती निर्माण झाली, ती मूळ रूपात पाहायची असेल, तर तमिळनाडमध्येच जायला हवे, असे म्हणतात.

तमिळ लोकांनी प्राचीन परंपरांचे जतन केले असले, तरी त्यांचे अंधानुकरण मात्र केले नाही. तिरुवण्णामलै येथील आश्रमात श्री. रमण महर्षी हे अद्वैत सिद्धान्ताचे नवीन पद्धतीने प्रतिपादन करीत होते. त्याचप्रमाणे पाँडेचरी येथील अरविंदाश्रमात पाश्चिमात्य व भारतीय जीवनपद्धतींचा समन्वय करण्याचा प्रयत्न चालू आहे. अरविंदाश्रम म्हणजे एक आंतरराष्ट्रीय विश्वविद्यालय असून, तिथे विश्वसंस्कृतीच्या विकासाविषयी संशोधन आणि प्राचीन भारतीय ग्रंथांचे नवीन दृष्टीने अध्ययन केले जाते. [ रं. ऐ. को. व्हॉ.; त. सा. सं.; तमिळनाडु; सा. इं. (म. आं); म. लँ. टें.; ए. इं.- मजु. ]

## तमिळ भाषा व साहित्य

तमिळ भाषा ही द्राविड भाषापरिवारातील सर्वांत अधिक विकसित आणि समृद्ध भाषा आहे. ही जगातील प्राचीन मूलभूत भाषांपैकीही एक भाषा आहे. इ. स. पूर्व कित्येक शतकांपासून या भाषेचे सुसंस्कृत आणि सुव्यवस्थित असे रूप आढळते. प्रचलित भारतीय भाषांत तमिळ ही एकच अशी भाषा आहे, की जी संस्कृताच्या साहाय्यावाचून सर्व प्रकारच्या विचारांची समर्थ अभिव्यक्ती करू शकते. गेल्या काही शतकांपासून तमिळ भाषेवर संस्कृताचा प्रभाव पडलेला असला, तरी अन्य द्राविड भाषांच्या तुलनेने तो अत्यल्प आहे. थोड्या शब्दांत जोरकस अर्थ व्यक्त करण्याच्या बाबतीत तमिळ भाषेचा हात धरणारी दुसरी भाषा क्वचितच असेल, असे मत रे. पर्सीव्हलने व्यक्त केले आहे.

तमिळभाषी प्रदेशाचे क्षेत्रफळ- सुमारे पन्नास हजार चौरस मैल असून, तो मद्रासपासून कन्याकुमारीपर्यंत पसरला आहे. याशिवाय सिलोनच्या उत्तर भागातही तमिळभाषिकांची संख्या खूप मोठी आहे. तसेच ओडिसा, ब्रह्मदेश, मॉरिशस बेटे आणि अन्य ब्रिटिश वसाहती यांमध्येही तमिळभाषिक लहानमोठ्या संख्येने विखुरले आहेत. सध्या तमिळभाषिकांची संख्या सुमारे तीन कोटी असून, त्यांपैकी सुमारे सव्वा कोटी लोक सिलोनमध्ये राहत आहेत.

इरूल, कसुब, कोरव, कैकाडी आणि बरगंडी या तमिळच्या पाच बोली आहेत. यांपैकी पहिल्या दोन बोली बोलणाऱ्या

काही अल्पसंख्य जमाती नीलगिरी विभागात आहेत आणि उरलेल्या तीन बोली काही मटक्या जाती-जमातींत प्रचलित आहेत. शेन् (पूर्ण अथवा साधू) व कोडुन (ग्रामीण अथवा असाधू) अशी तमिळ प्रमाण भाषेची दोन रूपे आहेत. यांतील पहिले रूप साहित्याचे माध्यम असून, दुसरे लोकांच्या नित्याच्या वापरात आहे.

**तमिळ लिपी** – तमिळ लिपी ही प्राचीन ब्राह्मी लिपीच्या एका विशिष्ट दाक्षिणात्य शैलीपासून उगम पावलेली आहे. हिचे कोळ एळुत्तु आणि वट्टेळुत्तु असे दोन प्रकार आहेत.

कोळ म्हणजे काठी. ज्या लिपीतील रेषा काठीसारख्या सरळ असतात, ती कोळ एळुत्तु लिपी होय. शिळांवर लेख कोरण्याच्या सोयीसाठी या विशिष्ट वळणाचा उगम झालेला दिसतो. दगडावर लेख कोरताना गोलाकार किंवा वक्र वळणे टाळून सरळ रेषेत लिहिणे सोपे असते. म्हणून कोळ एळुत्तु लिपीत गोलाकार किंवा मोडून लिहिणे टाळले आहे. चोळ आणि पल्लव राजांनी या लिपीचा विशेष पुरस्कार केलेला दिसतो. हिचा ग्रंथ आणि मलयाळम या लिप्यांशी फार जवळचा संबंध आहे.

दुसरी वट्टेळुत्तु लिपी गोलाकार वळणांची आहे. वट्टे म्हणजे गोलाकार. ही एक प्रकारची मोडी लिपीच आहे. या लिपीत अनेक प्राचीन हस्तलिखिते लिहिलेली आहेत. या लिपीचा उगम ताडपत्रांवर लिहिण्याच्या सोयीसाठी झालेला आहे. ताडपत्रावर सरळ रेषांनी लिहिले तर ते फाटते. म्हणून वळणापुढे वळणे काढीत लिहिण्याची ही पद्धती प्रचारात आली. या पद्धतीने लिहिताना लेखकाचे श्रम आणि वेळ ही दोन्ही वाचतात, हे खरे असले, तरी हे लेखन वाचणे मात्र अवघड असते. या लिपीचा पुरस्कार चेर आणि पांडय राजांनी केला.

तमिळ भाषेतले अगदी प्रारंभीचे शिलालेख ब्राह्मीच्या दाक्षिणात्य शैलीत आहेत. या शैलीत विशिष्ट तमिळ वर्णांना स्वतंत्र चिन्हे आहेत. उदा० तमिळमध्ये ळ सारखा उच्चार असणाऱ्या विशिष्ट वर्णाला इंग्रजी इटॅलिक लिपीतल्या मोठ्या वळणदार जी सारखे चिन्ह आहे. देवनागरीतल्या दंत्य आणि मूर्धन्य वर्णांखेरीज जे दंतमूलीय वर्ण आहेत, त्यांनाही या दाक्षिणात्य शैलीत स्वतंत्र चिन्हे आहेत. अशोककालीन ब्राह्मी लिपीत एक उभी रेघ दुसऱ्या आडव्या रेघेच्या मधोमध काढली की न वर्णाचे चिन्ह (T) तयार होत असे. प्राचीन दाक्षिणात्य लिपीत दंतमूलीय न चे चिन्ह ब्राह्मीतील दंत्य न सारखेच आहे. परंतु ब्राह्मी न पासून याचे वेगळेपण दाखविण्यासाठी दंत्य न च्या उभ्या रेषेवरून उजवीकडे खाली उतरणारी एक वर्तुळाकृती रेषा काढण्यात आली. कालांतराने या अर्धवर्तुळाचे पूर्ण वर्तुळ तयार झाले आणि पुढे हे चिन्ह दोन वर्तुळाकृतींचे बनून सध्या प्रचारात असलेला तमिळ न तयार झाला.

ब्राह्मीतील क, ख, इ. वर्णदर्शक चिन्हे नुसत्या व्यंजनांची नसून, स्वरयुक्त व्यंजनांची आहेत. परंतु ही चिन्हे दाक्षिणात्य शैलीत केवळ व्यंजनांसाठी वापरली जाऊ लागली. व्यंजने स्वरांनी युक्त दाखवावयाची असत तेव्हा त्यांच्या डोक्यावर कमीजास्त लांबीची आडवी रेषा काढू लागले.

आ, इ, ई, स्वरांच्या चिन्हांतही असेच बदल झाले. उदा० ब्राह्मी लिपीत 'आ'कार दर्शविण्यासाठी व्यंजनाच्या चिन्हावर एक आडवी रेषा काढीत. ही आडवी रेषा पुढे व्यंजनापासून बाजूला सरकून व्यंजनाशेजारी आजच्या कान्याच्या स्वरूपात उभी राहिली. परंतु दाक्षिणात्य शैलीत मात्र ती उलटचा ठेवलेल्या नामासारखी बनली.

ब्राह्मी लिपीचे तमिळ व अन्य दक्षिण भारतीय लिप्यांत परिवर्तन होताना असे अनेक फेरफार घडले. साध्या रेषा वळणदार बनल्या व कोनांचे आकार वक्र बनले. ब्राह्मीत जी चिन्हे उभी राहिल्यासारखी दिसत, ती दाक्षिणात्य शैलीत आडवी झाली.

तमिळनाडच्या दक्षिण भागातील लेण्यांतून आढळलेल्या शिलालेखांचा काळ सनपूर्व दुसरे-तिसरे शतक असा मानला जातो. या लेखांची लिपी ही प्राचीन तमिळ लिपी आहे. यावरून या लिपीची प्राचीनता दोन हजार वर्षांहूनही मागे जाते.

काही विद्वानांच्या मते वट्टेळुत्तु ही लिपी सनपूर्व ५०० च्या सुमारास निर्माण झाली व ग्रंथ लिपी सनपूर्व २ ऱ्या शतकात आर्य ब्राह्मणांनी सुरू केली. सध्याची तमिळ लिपी त्या दोन्हींच्या मिश्रणाने बनली आहे.

सध्याच्या तमिळ लिपीत बारा स्वर आणि अठरा व्यंजने एवढेच वर्ण आहेत. क ते प या पाच वर्गांत एकूण दहाच वर्ण आहेत. नागरीतल्याप्रमाणे मधले तीन वर्ण या लिपीत नाहीत. उदाहरणार्थ क वर्गात ख, ग, घ हे तीन वर्ण नाहीत; त्यामुळे 'क' लाच संदर्भानुसार ख, ग, घ या वर्णांचे काम करावे लागते. या दहा वर्णांशिवाय ऴ (Zha), ळ (Lia), ऱ् (Rra) आणि ऩ (Nna) हे चार विशेष वर्ण या लिपीत आहेत. यातील पहिला ऴ वर्ण हा तमिळचा प्राण समजला जातो.

तमिळवर संस्कृताचा प्रभाव पडू लागल्यानंतर वर्णमर्यादेमुळे संस्कृत शब्दांचे लेखन करणे कठीण जाऊ लागले. त्यामुळे ग्रंथलिपी नामक एक नवी लिपी तयार करण्यात आली. ही लिपी आकार-प्रकारात द्राविड भाषांच्या लिप्यांशी मिळती-जुळती असली, तरी उच्चारण आणि क्रम या बाबतीत ती नागरी लिपीला धरून आहे. परंतु तमिळ साहित्यक्षेत्रात ही लिपी

प्रचलित होऊ शकली नाही. केवळ धार्मिक ग्रंथांचेच लेखन या लिपीत होत राहिले. या लिपीतून ज, स, ष, ह हे चार वर्ण आधुनिक तमिळ लिपीत प्रविष्ट झाले. या चार वर्णांची भर पडूनही आधुनिक तमिळ लिपी सर्व प्रकारच्या ध्वनींचे लेखन करायला समर्थ बनू शकली नाही.

**साहित्य** – तमिळ साहित्याचा इतिहास प्राचीन आणि विशाल आहे. त्या साहित्यात व्याकरण, छंद, अलंकार, ज्योतिष, आयुर्वेद, खगोल, रसायन, संगीत, शिल्पकला, इ. अनेक विषयांवर विपुल संख्येने ग्रंथनिष्पत्ती झाली आहे. त्यात धर्म, नीती, युद्ध व प्रेम ही चारही अंगे परिपुष्ट दिसतात. प्राचीन तमिळ साहित्य हे बव्हंशी पद्यमय आहे. त्यातले बरेचसे ग्रंथ नष्ट झाले असले, तरीही जे उपलब्ध आहेत, त्यांवरून तमिळ साहित्याची समृद्धी व प्राचीनता कळून येते. वाङ्मयातील अंतर्गत पहिल्या शतकाच्या अखेरीपर्यंतचा कालखंड.

(२) महाकाव्यकाल – इ. स. च्या दुसऱ्या शतकाच्या प्रारंभापासून सहाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत.

(३) भक्तिकाल – सहाव्या शतकाच्या प्रारंभापासून आठव्या शतकापर्यंत.

(४) कंबनकाल – नवव्या शतकाच्या प्रारंभापासून चौदाव्या शतकापर्यंत.

(५) मध्यकाल – चौदाव्या शतकापासून अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत.

(६) आधुनिक काल – एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून चालू काळापर्यंत.

**संघम्काल** – तमिळ पुराणांवरून कळते, की अतिप्राचीन काळातच तमिळनाडमधल्या पांड्य राजांनी साहित्याच्या

तमिऴ्

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| அ | ஆ | இ | ஈ | உ | ஊ | எ | ஏ | ஐ | ஒ | ஓ |
| अ | आ | इ | ई | उ | ऊ | ऎ | ए | ऐ | ऒ | ओ |
| ஔ | க | ங | ச | ஞ | ட | ண | த | ந | ன | ப |
| औ | क,ग | ङ | च,ज | ञ | ट,ड | ण | त,द | न | न | प,ब |
| ம | ய | ர | ற | ல | வ | ள | ழ | ஜ | ஷ | ஸ |
| म | य | र | ऱ | ल | व | ळ | ऴ | ज | ष | स |
| ஹ | க்ஷ | க | | | | | | | | |
| ह | क्ष | ज्ञ | | | | | | | | |

प्रचलित तमिळ लिपी (श्री. नरवणे यांच्या भारतीय व्यवहारकोशावरून)

पुराव्यांची छाननी केल्यावर संशोधकांचे असे मत झाले आहे की, सनपूर्व पाचशे ते सहाशे वर्षे किंबहुना त्याच्याही पूर्वी तमिळ भाषेत साहित्यरचनेला प्रारंभ झाला होता. प्राचीन काळापासून तमिळनाडमध्ये समृद्धी नांदत होती. भौतिक उत्कर्षाबरोबरच वाङ्मयीन चळवळीलाही तिथे उत्तेजन मिळाले. राजे, व्यापारी, वैद्य, शेतकरी, कारागीर, इ. अनेक पेशांचे लोक त्या काळी वाङ्मयनिर्मिती करीत होते, असे दिसते.

प्राचीन तमिळ विद्वानांनी साहित्याची इयल (काव्य), इशै (संगीत) व नाटकम् अशी तीन अंगे मानली होती. पण प्राचीन तमिळमधले फक्त पहिल्या अंगाचेच ग्रंथ तेवढे मिळतात; पुढील दोन अंगांचे मिळत नाहीत.

तमिळ साहित्याचे कालखंड सामान्यत: पुढीलप्रमाणे पडतात–

(१) संघम्काल – सनपूर्व ५०० च्या पूर्वीपासून इ. स. च्या अभिवृद्धीसाठी विद्वानांचा एक संघम् स्थापून तो सुसंघटित केला. संघम्चे कार्य असे, की तत्कालीन निर्माण झालेल्या प्रत्येक ग्रंथाची कठोर परीक्षा करून त्या परीक्षेत जो टिकेल त्याचे प्रामाण्य उद्‌घोषित करणे. संघम्चे सदस्य हे त्या त्या काळातले प्रतिभाशाली कवी आणि पारंगत विद्वान असत. अशा विद्वानांनी पुरस्कृत केलेल्या ग्रंथांचा देशात मोठा आदर होत असे. त्या ग्रंथांना तत्कालीन राजदरबारातून पुरस्कारही मिळत असे. तमिळनाडमध्ये एकामागून एक असे तीन संघम् निर्माण झाले आणि त्यांनी प्रदेशाच्या साहित्यवृद्धीला फार मोठा हातभार लावला. या तीन्ही संघम्ची माहिती अहप्पोरुळ या ग्रंथाच्या नक्कीररकृत भाष्यात विस्तृतपणे आढळते.

पहिल्या संघम्चा शुभारंभ दक्षिण मदुरेत अगस्त्य मुनींच्या हस्ते झाला. या संघम्चे नाव तलैच्चंगम् असे होते. त्याचे ५४९

सदस्य होते. या संघम्पुढे ४४४९ कवींनी आपापल्या रचना परीक्षेसाठी पाठवल्या. या संघाला ८६ राजांनी आश्रय दिला होता. त्यांपैकी ७ राजे स्वतः कवी होते. या संघम्चा प्रमाणभूत व्याकरणग्रंथ अगत्तियम् हा होता. तो अगस्त्यमुनीने रचल्याचे सांगतात. या संघांविषयी पौराणिक आख्यायिका आहे ती अशी—

दक्षिण मदुरा ही पांड्यांची पहिली राजधानी होय. दुर्दैवाने सागराला उधाण येऊन त्यात ती बुडाली. या जल-प्रलयानंतर पांड्य राजे तिथून उत्तरेस आले आणि त्यांनी कवाटपुरम् येथे आपली नवी राजधानी उभी केली. तमिळ साहित्याचा दुसरा संघम् इथे स्थापित झाला. याचे नाव इडैच्चंगम् असे होते. या संघाचे ५६ सदस्य होते. तोळकाप्पियर हा अगस्त्य मुनीचा तमिळनाडमधील अग्रगण्य शिष्य होता. त्याने तोळकाप्पियम् नावाचा एक व्याकरणग्रंथ रचला आणि तो प्रस्तुत दुसऱ्या संघम्चा प्रमाणभूत ग्रंथ ठरला. ३६०० कवींनी या संघम्कडे आपापली काव्ये पाठवली. मापुराणम्, इशैनुणुक्कम्, भूतपुराणम्, इ. ग्रंथ त्यांमध्ये प्रमुख होते. वेंदर चोलियनपासून मुदत्तिरुमारन्पर्यंत ५६ राजांनी या दुसऱ्या संघम्चे संरक्षण केले. त्यांपैकी ५ राजे स्वतः कवी होते. पण पांड्यांची कवाटपुरम् ही राजधानीही समुद्राला बघवली नाही. त्याने लाटांचे डोंगर लोटून तिला आपल्या उदरात रिचवले. राजधानी बुडाली तसा दुसरा संघम्ही संपला.

सनपूर्व १५० च्या सुमारास तिसरा संघम् मदुरेत स्थापन झाला. त्याचे कार्य इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अखेरीपर्यंत चालू होते, असे मानतात. या संघाचे सदस्य ४६ होते. नक्कीरर, शिरुमेदावियार इ. कवी या संघात प्रमुख होते. नक्कीरर हा या संघाचा अध्यक्ष होता. या संघाच्या कालखंडात ४४९ कवींनी आपल्या रचना संघापुढे पाठवल्या, असे म्हटले आहे. ४९ राजांनी या संघाचे संरक्षण केले होते. हा काल तमिळ साहित्याच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण होता. या कालातले काव्य प्रेम, भक्ती, नीती आणि वीरता या भावनांनी ओतप्रोत आहे. या काळातली पद्यरचना बहुतांशी मुक्तक या स्वरूपाची आहे. मात्र या कालातली बहुतेक काव्यरचना सांप्रत उपलब्ध नाही. म. म. डॉ. स्वामिनाथ अय्यर यांनी पुष्कळ परिश्रम करून प्रस्तुत कालातले तीन ग्रंथ प्रकाशात आणले आहेत. एट्टुतोगै, पत्तुप्पाट्टू व पदिनेण्कीलकणक्कू अशी त्यांची नावे आहेत.

एट्टुतोगै — यामध्ये आठ संग्रहग्रंथ समाविष्ट आहेत. त्यांची नावे अशी — कलित्तोगै, परिपाडल, ऐंगुरुनूरु, पदिट्रुप्पुत्तू, अहनानूरु, पुरनानूरु, नट्रिणै व कुरुंतोगै.

"कलित्तोगै मधली गीते सुनीतासारखी आहेत. परिपाडलात दीर्घ व अवडंबरयुक्त गीतांचा संग्रह आहे. ऐंगुरुनूरु व पदिट्रुप्पुत्तू या दोन संग्रहांत चेर राजवंशाची प्रशस्ती आहे. अहनानूरु ही भावगीते आहेत. पुरनानूरुमध्ये बाह्य जगताचे वर्णन आहे. नट्रिणै व कुरुंतोगै यांमध्ये प्रेमगीतांचा संग्रह आहे.

पत्तुप्पाट्टू — यात दहा दीर्घ कवितांचा संग्रह आहे. त्यांची नावे अशी— पोरुनराट्रुप्पडै, पट्टिनप्पालै, मुल्लैप्पाट्टू, पेरुम्पाणाऱ्रुप्पडै, शिरुपाणाऱ्रुप्पडै, नेडुनलवाडै, कुरिंजिप्पाट्टू, मदुरैक्कांजी, मलैपडुकडाम् व तिरुमुरुगाऱ्रुप्पडै.

यातील शेवटचा संग्रह भगवान मुरुगन अर्थात कार्तिकेय याच्या स्तुतिपर आहे. नक्कीरर हा याचा कर्ता होय जिथे जिथे मुरुगनाची मंदिरे आहेत, त्या त्या स्थानांचे वर्णन या संग्रहात आहे. तमिळनाडमधले शैव लोक या संग्रहाला धर्मग्रंथ मानतात. बाकीच्या नऊ संग्रहांत निरनिराळे राजे, त्यांचे औदार्य, व्यापार, युद्ध, पर्वतीय दृश्ये व लोकजीवन यांचे वर्णन आहे.

पदिनेण्कीलकणक्कू — हा अठरा सूक्तिग्रंथांचा संग्रह आहे. या सर्व काव्यांत नीती आणि शील यांना प्राधान्य दिलेले आहे. यांतल्या कित्येक सूक्ती संस्कृत सुभाषितांसारख्या आहेत. या संग्रहातला अठरावा ग्रंथ तिरुवल्लुवररचित कुरळ हा आहे. त्याला तमिळवेद असे समजतात. विद्वानांनी या ग्रंथाची मुक्तकंठाने प्रशंसा केलेली आहे. (कुरळ पाहा)

महाकाव्यकाल — इ. स. च्या पहिल्या—दुसऱ्या शतकातच जैन व बौद्ध हे दोन्ही धर्म तमिळनाडमध्ये प्रविष्ट झाले होते. त्या देशातल्या अनेक राजांनी त्यांना आश्रयही दिला होता. इ. स. च्या सहाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत या दोन्ही धर्मांचा तमिळनाडमध्ये जोर होता.

जैन-बौद्धांनी आपल्या ऊर्जित कालात तमिळ भाषेत बरीच ग्रंथरचना केली. संघम् कालातच या दोन्ही धर्मांचे वाङ्मयही निर्माण होत होते. सहाव्या शतकापर्यंत ते पुष्कळच वाढले. म्हणूनच या कालाला काही संशोधक जैन—बौद्धकाल असेही म्हणतात. या कालात जैन—बौद्धांनी विशेषेकरून महाकाव्यांची रचना केली. शिलप्पधिकारम्, मणिमेखलै, जीवकचिंतामणी, वलयापती व कुंडलकेशी ही त्या महाकाव्यांची नावे होत. याच कालात काही लघुकाव्येही निर्माण झाली. त्या कवींनी काव्यकथा वर्णीत असता तिच्या जोडीने धार्मिक विचार, नियम, रूढी, श्रद्धा यांचीही त्यांत गुंफण केली आहे. या काव्यांच्या परिशीलनाने तत्कालीन तमिळनाडचे सामाजिक, आर्थिक व धार्मिक चित्र मनश्चक्षूंपुढे उभे राहते.

शिलप्पधिकारम् हे नाटयमय शैलीने लिहिलेले सर्वांगसुंदर महाकाव्य आहे. इळंगोअडिगळ हा याचा कर्ता होय. यात कोवलन नामक एक वणिक्पुत्र व कण्णकी नामक त्याची भार्या

यांची विविध घटनांनी भरलेली रोमहर्षक कथा आहे. मणिमेखलै हे महाकाव्य शिलप्पधिकारम्‌चाच उत्तरार्ध आहे. यात कोवलनला माधवी नामक गणिकेपासून झालेल्या मणिमेखला या नायिकेची रसपूर्ण कथा आहे. कूलवाणिगन् शात्तनार हा याचा कर्ता होय. जीवकचिंतामणी हे महाकाव्य तिरुतक्कदेवर या जैन महाकवीने रचले. या काव्यात जीवक नावाच्या राजकुमाराचे चरित्र वर्णित आहे. यात शृंगाररसाला प्राधान्य देऊनही कवीने जैन धर्माचा प्रचार मोठ्या मार्मिक पद्धतीने केला आहे. वलयापती व कुंडलकेशी ही दोन महाकाव्ये उपलब्ध नाहीत. त्यांच्या कथांचा सारांश अन्य ग्रंथांत आलेल्या अवतरणांवरून जाणून घ्यावा लागतो.

याच कालखंडात पेरुंकदै नामक आणखी एक महाकाव्य रचले गेले. या महाकाव्यात उदयनाची कथा वर्णिलेली असून, ती गुणाढ्याच्या बृहत्कथेवरून घेतलेली आहे. या काव्यात जैन धर्माच्या अनेक सिद्धांतांचे प्रतिपादन आहे. या महाकाव्याचा बराचसा भाग नष्ट झालेला आहे. पण जो उरला आहे, त्याच्याच सोळा हजार पंक्ती भरतात. यावरून प्रस्तुत काव्याच्या विशालतेची कल्पना येऊ शकेल.

नीलकेशी, चूळामणी, यशोधरकाव्यम्, नागकुमारकाव्यम् व उदयणकदै ही या कालखंडातली लघुकाव्ये होत. ही काव्येही जैन–बौद्ध कवींनीच रचलेली आहेत. मदुरेतल्या विद्यापीठाने ज्यां तमिळ जैन ग्रंथांना मान्यता दिली, त्यांपैकी काहींची नावे अशी– नालडियार, नन्मणीक्कदीकयी, इनियवईनर्पतु, इन्ननर्पतु, करनर्पतु, कुरळ व पलमोली.

भक्तिकाल – या कालात शिव आणि विष्णू यांच्या भक्तीचे अनेक काव्यग्रंथ रचले गेले. या कालखंडाच्या उदयापर्यंत तमिळनाडमध्ये जैन व बौद्ध यांनी आपला चांगलाच जम बसवला होता. तत्कालीन साहित्यावर आणि जीवनावरही जैन–बौद्धांचीच छाप बसली होती. वैदिक धर्माच्या वृक्षाला आतून पोखरण्याचे काम त्यांनी चालवले होते. वैदिक आणि पौराणिक भावनांची पाळेमुळे खणून काढण्याचा त्यांनी जणू चंग बांधला होता; पण या काळात असे काही प्रबळ आणि समर्थ शैव–वैष्णव कवी उदयाला आले, की त्यांनी तमिळनाडमधून जैन–बौद्धांना पुरते परास्त करून टाकले. त्यांनी शिव–विष्णूंच्या भक्तीची काव्यधारा तमिळनाडच्या भूमीवर खळाळून वाहविली सान–थोर, राव–रंक या सर्वांना त्यांनी त्या भक्तीच्या प्रवाहात डुंबवून टाकले. म्हणूनच आजही तमिळनाडमधली जनता त्या शैव भक्त कवींना ईश्वरी अवतार समजून भजते, पूजते.

दुसऱ्या दृष्टीने पाहायचे, तर जैन–बौद्धांच्या कालात तिथला समाज खऱ्या जीवनाला विन्मुख झाला होता. सर्वत्र नैराश्य व निरसुटलेपणा यांचे वातावरण पसरले होते. नाट्य, नृत्य, संगीत या ललितकला तुच्छ आणि हीन बनल्या होत्या. अशा वेळी या कविश्रेष्ठांनी गेय छंदात दैवी प्रेमाच्या कविता रचून गायिल्या आणि लोकांचे अंतःकरण तृप्त केले. त्यांनी प्रेमकाव्याला नवजीवन तर दिलेच; शिवाय तिकडच्या शैव–वैष्णव मंदिरांतून नृत्याची एक परंपराही निर्माण केली. त्यांनी जनतेला आपल्या काव्याच्या द्वारे जो संदेश दिला, त्याचे सार पुढील थोडक्याच वाक्यांत सांगता येईल –

हे विश्व जड आहे, तसेच ते चेतनही आहे. ही दैवी प्रकृतीची छाया आहे. छाया म्हणजे सत्य नव्हे, हे खरे; पण सत्यरूप प्रकाशाचीच ती छाया आहे, हे विसरता कामा नये. अमूर्त सत्य या छायेत लपलेले आहे. ते शोधून काढणे हे मानवी जीवनाचे ध्येय आहे. जीवन हे त्या महान ध्येयाच्या पूर्तीचे साधन आहे. म्हणूनच ते पवित्र आहे, सुंदर आहे, तसेच विलोभनीय आहे. त्याची निंदा किंवा हेटाळणी करणे योग्य नव्हे.

नायन्मार – तमिळनाडमधल्या शिवभक्तांना नायन्मार असे म्हणतात. हे संख्येने त्रेसष्ट होते. मणिक्कवाचकर, ज्ञानसंबंधर, अप्पर व सुंदरर हे चौघे त्यांपैकी प्रमुख होत. मणिक्कवाचकर हा कालमानाने सर्वांत पहिला आहे. हा प्रथम पांड्य राजांचा अमात्य होता; पण पुढे अधिकारत्याग करून त्याने शैव धर्माच्या प्रचाराला स्वतःला वाहून घेतले. कित्येक जैन–बौद्धांचे मतपरिवर्तन करून त्याने पुनश्च त्यांना हिंदू धर्मात आणले. तिरुवाचकम् हा त्याच्या पद्यांचा संग्रह आहे. त्याने लोकगीतांच्या धर्तीवर ही पदे रचली आहेत. त्यांत गूढतम आध्यात्मिक तत्त्वे सुबोध भाषेत सांगितली आहेत. शिवाची करुणा आणि दीनवत्सलता या गुणांचे वर्णन करताना त्याची कविता अत्यंत हृदयंगम झाली आहे. त्याच्या एका पद्याचा नमुना असा –

अम्मैये अप्पा, ओप्पिला मणिये
अन्पिनिल् विलैन्द आरमुदें
पोय्मैये पेरुक्की प्पोलुदिनै शुरुक्कुम्
पुलुत्तलै पुलैयनेन तनुक्क
च्चेम्मैये आय शिवपदम अलित्त
शेल्वमे शिवपेरुमाने
इम्मैये उन्नै शिक्केन पिडित्तेन
एंगेलुन्दरुलुवदिनिये

अर्थ – हे प्रेमळ व अमृतमय शंकरा, तू माझा माता–पिता आहेस. तू अद्वितीय मणी आहेस. मी एक क्षुद्र जीव असून, असत्याच्या आधारावर आपले जीवन व्यतीत करीत आहे. तू मजवर कृपा करून मला शाश्वत शिवपद दिलेस. मी या जीवनात मोठ्या निर्धाराने तुला प्राप्त करून घेतले. तू माझ्या मनात

सार्वकाल विराजित राहण्याची कृपा कर.

अप्पर, सुंदरर व ज्ञानसंबंधर यांच्या काव्यसंग्रहाला तेवारम अशी संज्ञा आहे. तेवारम् हा १०।१० कवितांचा एक एक गुच्छ आहे. त्याच्या प्रत्येक दशकात एखादा भाव तरी असतो किंवा एखाद्या क्षेत्राचे वर्णन तरी असते. अप्परची कविता रहस्यवादी आहे. त्याला सारे विश्व शिवशक्तीच्या स्वरूपातच दिसते. सुंदररची कविता सख्यभक्तीने ओथंबलेली आहे. अर्जुन आणि श्रीकृष्ण यांचा जो सख्यसंबंध, तोच स्वतःचा आणि शिवाचा, असे तो मानतो. ज्ञानसंबंधरची कविता ज्ञानमय तशीच भावमधुरही आहे. तेवारम् हा पद्यसंग्रह तमिळनाडमधल्या शैवांचा वेद आहे. तेवारम्च्या द्वारे तमिळनाडमध्ये शिवभक्तीचा महिमा विस्तृत प्रमाणावर वाढला.

अशा प्रकारे दक्षिणेत शिवभक्ती वाढली खरी; पण शैव सिद्धांतांचे तर्कशुद्ध विवेचन करणारा ग्रंथ भक्तिकालात निर्माण न होता तो पुढे इ. स. च्या बाराव्या शतकात झाला. शिवज्ञानबोधम् हे त्या ग्रंथाचे नाव असून, मेयकंडदेव हा त्याचा कर्ता आहे. शैव मताला दार्शनिक स्वरूप पहिल्याप्रथम यानेच दिले. म्हणूनच याला गौरवाने 'तमिळ व्यास' असे म्हणतात.

आळवार– नायन्मार हे शैव, तसे आळवार वैष्णव होते. आळवार म्हणजे भगवंताचा साक्षात्कार झालेले ज्ञानी संत यांची संख्या बारा आहे. कालक्रमानुसार यांचे तीन गट पडतात. या आळवारांचे आराध्य दैवत म्हणजे श्रीविष्णू हे होय. तमिळ भाषेत त्याला पेरुमळ म्हणतात. आळवारांच्या भक्तीचे स्वरूप म्हणजे संपूर्ण शरणागतीच्या स्वरूपाचे आहे. या आळवारांनी विष्णुभक्तीने रंगलेली, करुणेने आर्द्र झालेली आणि प्रेमाने ओथंबलेली हजारो गीते रचून आणि गाऊन तमिळनाडमधल्या जनतेला प्रेमधर्माची शिकवण दिली. याच प्रेमधर्मामुळे आळवार संत हे तिथल्या जनतेचे देव बनले आहेत. त्यांच्या गीतांचा जो संग्रह झाला आहे, त्याला नालायिर दिव्यप्रबंधम् असे नाव आहे. हा संग्रह तयार करण्याचे काम इ. स. च्या १० व्या शतकात नाथमुनी या एका वैष्णवाचार्याने केले. रामानुजाचार्य हे याच नाथमुनीचे पणतू होत. उपनिषदांतला वैष्णव धर्म आणि आळवारांचा शरणागतिप्रधान भक्तिमार्ग यांचा समन्वय करून रामानुजाचार्यांनी आपल्या विशिष्टाद्वैतमताची स्थापना केली.

कंबनकाल – महाकवी कंबन हा नवव्या शतकात जन्मला आणि त्याने तमिळ भाषेत वाल्मीकिरामायणाच्या आधारावर रामायणाची रचना केली. हे रामायण कंबरामायण या नावाने प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ वृत्त–छंदात लिहिला आहे. कंबनच्याही पूर्वी तमिळ भाषेत वृत्त-छंदात्मक काव्याच्या रचनेला प्रारंभ झाला होता; पण कंबनने आपल्या रचनेत जे सर्वांगीण कौशल्य आणि सौंदर्य दाखवले, त्यामुळे त्याच्या मागचे सगळे कवी फिके पडले. म्हणूनच समकालीन सर्व कवींनी कंबनला कविचक्रवर्ती म्हटले. कंबनचे वैशिष्टच हे, की त्याने तमिळ व संस्कृत या उभय काव्यशैलींचा समन्वय केला. आपले बहुभाषाज्ञान आणि अगाध पांडित्य यांच्या बळावर कंबनने तमिळ भाषेला एक नवे सौंदर्य व सौष्ठव प्राप्त करून दिले. तमिळ भाषेची अभिव्यंजनशक्ती त्याने शतपटींनी वाढवली. पुढच्या तीन चार शतकांत जे कवी आणि साहित्यकार झाले, त्या सर्वांवर कंबनची सुस्पष्ट छाप दिसून येते. म्हणूनच या कालखंडाला कंबनकाल असे विद्वानांनी नाव दिले आहे.

कंबनच्या समकालीन कवींत पुगलेंदु या कवीचे नाव उल्लेखनीय आहे. याने नळवेण्बा नावाचे ४२४ कवितांचे एक लघुकाव्य रचले असून, ते महाभारतातल्या नलोपाख्यानावर आधारित आहे.

कंबनकालातल्या काव्यग्रंथांत पेरियपुराणम् या ग्रंथाला एक विशिष्ट स्थान आहे. शेक्कीळार नावाच्या एका कवीने ते रचले. हा ग्रंथ तमिळनाडमधल्या शिवभक्तांचा अनमोल ठेवा आहे. या काव्यात कवीने त्रेसष्ट नायन्मार कवींची जीवनचरित्रे वर्णिली आहेत.

याच कालखंडातला दुसरा एक लोकप्रिय ग्रंथ म्हणजे कंदपुराणम् हा होय. कच्चियप्प शिवाचार्य हा याचा कर्ता आहे. या पुराणात सुब्रह्मण्याचे चरित्र त्याच्या अद्भुत कृत्यांसह विस्ताराने वर्णिले आहे. तमिळनाडमध्ये हा ग्रंथ धार्मिक म्हणून मान्यता पावला आहे. अनेकांच्या घरी त्याचे यथाशक्ति नित्य वाचन होत असते.

इ. स. च्या दहाव्या शतकात शयंगोंडार या कवीने कलिंगत्तुपरणि नामक खंडकाव्य रचले. हे काव्य कुलोत्तुंग चोळाच्या वर्णनपर आहे. परणि हे तमिळ काव्यातील एका विशिष्ट शैलीचे नाव आहे. युद्धात विजयी झालेल्या एखाद्या राजाची विजयगाथा अशा काव्यात वर्णिलेली असते. अशा काव्यात वीररस असतो; पण त्याला दुय्यम महत्त्व असते. बीभत्स व भयानक हे दोन रस प्रामुख्याने त्यात असतात. भूत–प्रेत–पिशाच गणांचा अशा काव्यात बराच धुडगूस असतो. परणिकाव्ये राजदरबारात राजासमोर म्हटली जात. त्यांचा गर्भित हेतू असा असे, की 'हे राजा तुला युद्धात विजय मिळाला हे खरे; पण त्यामुळे हजारो तरुणी विधवा झाल्या आणि हजारो मुलेबाळे अनाथ झाली. ही गोष्ट काय चांगली आहे? तेव्हा यापुढे तरी युद्धोन्माद कमी करून तू शांतीचा मार्ग अनुसरावास.'

शैव-वैष्णव संतांच्या प्रभावामुळे मागची चार-पाच शतके तमिळनाडमध्ये जैनांचे वर्चस्व संपुष्टात आले होते; पण इ. स. च्या बाराव्या शतकात कित्येक जैन ग्रंथकार पुनश्च उदयाला आले. कांचीजवळ राहणाऱ्या वामन नामक जैन मुनीने या शतकात मेरुमंदारपुराणम् या ग्रंथाची रचना केली. त्याने काव्य, नीती, व्याकरण, निघंटू, इ. अनेक विषयांवर ग्रंथलेखन केले. याप्पिलक्कणम्, वीरशोलियम्, नेमिनाथम्, नान्नूल अशी त्याच्या ग्रंथांची नावे आहेत.

**मध्यकाल** – इ. स. १४ व्या शतकाच्या अखेरीस तमिळ साहित्याच्या नवनिर्मितीत खंड पडलेला दिसतो. विल्लिपुत्तुरार याचा महाभारतानुवाद वगळल्यास वाङ्मयीन गुणांनी समृद्ध असे उच्च कोटीचे काव्य त्या काळात निर्माण झाले नाही. मात्र या कालात अनेक टीकाग्रंथ रचले गेले आणि त्यामुळे प्राचीन साहित्य समजण्याच्या कामी रसिकांना साहाय्य मिळाले. प्रस्तुत कालखंडात इलाम्बुरणर, परिमेल्लगर, नच्चिनार्किनियर, पेरियवाच्चन पिळ्ळै, इ. अनेक टीकाकार पंडित निर्माण झाले.

चौदाव्या शतकानंतर तमिळनाडमध्ये मोठ्या प्रमाणावर राजकीय उलाढाली झाल्या. हळूहळू पुरातन तमिळ राज्ये इतिहासजमा होऊन त्यांच्या जागी मुसलमान, मराठे यांच्या सत्ता प्रबळ होऊ लागल्या. त्या कालात ज्या लढाया आणि धालमेली झाल्या, त्यांनी समाजजीवनातले स्थैर्य लोपले. गृह, सुत, धन, दारा यांपैकी कशाचीच शाश्वती उरली नाही. लोकांच्या मनात निराशेचे साम्राज्य पसरले. त्या नैराश्यातून एका फसव्या अध्यात्मवादाचा उदय झाला. त्यात पुरुषप्रयत्नाला कमी लेखून वैराग्यालाच महत्त्व दिले गेले. समाजाची ही मनोवृत्ती तत्कालीन साहित्यातही उमटल्यावाचून राहिली नाही. त्या काळात सिद्ध कवींचा एक नवाच संप्रदाय पुढे आला. त्याने योग आणि वैराग्य यांचीच तळी उचलून धरली. सिद्ध या नावाने ओळखले जाणारे हे कवी संख्येने अठरा होते, अशी जनश्रुती आहे.

हे सिद्ध हिंदू तसेच बौद्ध व जैनही होते. त्यांपैकी तिरुमूलर, शिववाक्कियर, पट्टिनत्तार, भद्रगिरियर पाम्फट्टिसिद्धर, पंबही व इदलकट्टू हे प्रसिद्ध आहेत. तिरुमूलर हा या सकल सिद्धांचा मुकुटमणी समजला जातो. प्रतीकात्मता, विषयभोगाविषयी तीव्र जुगुप्सा, सामान्य लोकांना अनाकलनीय अशी रहस्यात्मक भाषा ही तमिळनाडमधल्या सिद्धसाहित्याची वैशिष्टे होत. तत्कालीन ब्राह्मणांनी विधि-विधानांचे अवडंबर माजवून बहुजनसमाजाला धर्मज्ञानापासून वंचित केले होते. सिद्धांनी या ब्राह्मणी धर्माविरुद्ध बंड उभारले आणि भक्ती व अध्यात्म या गोष्टी विशिष्ट वर्गाच्या मिरासदारीतून मुक्त करून समाजाच्या सर्व थरांत त्यांचा प्रसार केला. यापुढच्या काळात तमिळनाडमध्ये विशेषत्वाने अध्यात्मपर ग्रंथांची निर्मिती झाली. शैवसिद्धान्त, शिवज्ञानबोधम् व कैवल्यनवनीतम् हे अशा ग्रंथांपैकी नावाजते ग्रंथ होत.

सतराव्या शतकाच्या मध्यभागी कुमरगुरुपर नावाचा एक विद्वान कवी तमिळनाडमध्ये निर्माण झाला. त्याने मिनाक्षी पिळ्ळैत्तमिळ्, तिरुमलै मुरुगन् पिळ्ळैत्तमिळ्, तिरुवारूर नान्मणि मालै, नीदिनेरि विळकम्, इ. प्रबंधकाव्ये लिहिली.

अठराव्या शतकाच्या प्रारंभीचा प्रसिद्ध संत तायुमानवर हा होय. हा अद्वैतवादी आणि विश्वप्रेमाचा प्रचारक असा कवी होता. याच शतकात फादर बेस्की हा एक विदेशी कवी पुढे आला. त्याने तमिळ भाषेचे सखोल अध्ययन केले आणि तेंबावाणी नावाचे एक महाकाव्य रचून त्यात येशू ख्रिस्ताची जीवनकथा गायिली. त्या काळात इतरही अनेक मिशनऱ्यांनी तमिळ गद्यसाहित्याचा विकास केला. वीरमामुनिवर या पाद्र्याने परमार्थ गुरुकथै नावाच्या हास्यकथा लिहिल्या.

भारतीय भाषांत सर्वांत प्रथम तमिळमध्ये बायबलाचे भाषांतर झाले. धर्मप्रसाराचे काम सुलभ व्हावे, म्हणून ख्रिस्ती मिशनऱ्यांनी धर्मविषयक लहान लहान पुस्तके छापून ती प्रसिद्ध केली. रॉबर्ट डी नोबिली या रोमन कॅथॉलिक मिशनऱ्याने मदुरेत राहून ख्रिस्ती धर्माची बरीच पुस्तके तमिळ भाषेत लिहिली. रेव्ह. सीजबेस हा जेसुईट मिशनरी सतराव्या शतकात भारतात आला. त्यानेही तमिळ भाषेचा व वाङमयाचा बराच अभ्यास केला. त्याने तेवीस ग्रंथ तमिळभाषेत लिहिल्याचे सांगतात.

तमिळनाडमधील मुसलमान कवींनीही गद्य-पद्यात्मक लेखन करून तमिळ साहित्याच्या अभिवृद्धीला हातभार लावला आहे. त्यांचे बरेचसे ग्रंथ धर्मविषयक आहेत. आइर्मसल, सिरकीर्तनम्, पेनपुत्तिमलै, वैत्तियरातकम् इ. त्यांची नावे आहेत.

**शास्त्रीय ग्रंथ** – संस्कृत भाषेतील तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचा परिणाम तमिळ भाषेतील तशा ग्रंथावर पडलेला दिसतो. त्यांच्या बहुतेक तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांना प्रथम एक प्रस्तावना जोडलेली असते आणि तिच्यात ग्रंथकाराने अवलंबिलेल्या तर्कपद्धतीचा परिचय करून दिलेला असतो. तमिळ दार्शनिक ग्रंथांत जग, ईश्वर, आत्मा, मन, इंद्रिये, इ. विषय संस्कृत ग्रंथांना अनुसरूनच विवेचिले आहेत. तर्कशास्त्र, अतींद्रियविज्ञान व नीतिशास्त्र या विषयांवरही तमिळ भाषेत ग्रंथ आहेत. तर्कसंगकिरकम् हा ग्रंथ संस्कृत तर्कशास्त्रावरून अनुवादित केलेला आहे. नीतिशास्त्राच्या ग्रंथांत कुरळ हा ग्रंथ सर्वश्रेष्ठ असून, नीतिचूडामणी, गोविंदशतकम्, कुमारेशशतकम्, इ. अनेक नीतिपर

ग्रंथ तमिळ भाषेत निर्माण झाले आहेत.

वैद्यकशास्त्र हा तमिळनाडमधल्या लोकांचा आवडता विषय आहे. डॉ. ग्रीन या गृहस्थाने ११७ तमिळ वैद्यकग्रंथांची यादी प्रसिद्ध केली आहे. हे वैद्यकग्रंथ भ्रामक समजुतींनी भरलेले असून, जादूटोणा व मंत्रतंत्र या गोष्टीही त्यांत असतात, असे त्याने म्हटले आहे.

तमिळ भाषेतले पहिले व्याकरण अगस्त्य ऋषीने लिहिले असे म्हणतात; पण ते उपलब्ध नाही. त्याचा शिष्य तोळकाप्पियर याने लिहिलेले तोळकाप्पियम् नावाचे व्याकरण मात्र उपलब्ध आहे आणि ते सर्वांत जुने आहे. पवनंती याचे नंदुल नावाचे व्याकरणही उपलब्ध असून, त्यात ४६२ सूत्रे आहेत. हे व्याकरण इ. स. च्या दहाव्या शतकाच्या सुमारास लिहिले गेले.

कोशग्रंथ निर्माण करण्याकडेही तमिळ पंडितांचे प्राचीन काळीच लक्ष गेले होते, असे दिसते. शूळामणिनिघंटू हा तमिळ शब्दकोश इ. स. च्या नवव्या शतकात गुणभद्राचा शिष्य मंडलपुरुष याने निर्माण केला. तमिळमधले गणित, वैद्यक, व्याकरण, शब्दकोश, इ. विषयांवरचे प्राचीन ग्रंथ कविताबद्ध आहेत. त्यांवरचे भाष्यग्रंथ मात्र गद्यात्मक आहेत.

तमिळ पुराणे – तमिळ भाषेतील काही पुराणे सांप्रत उपलब्ध असलेल्या सर्वांत जुन्या संस्कृत पुराणांपेक्षाही जुनी आहेत. भागवत आणि सूतसंहिता (स्कंद पुराणाचा एक भाग) ही दोन पुराणे तमिळ भाषेत फार प्राचीन काळी अनुवादिली गेली. तमिळ भारत तर संघम्कालातलेच आहे. संघम्साहित्यात, विशेषतः परिपाडलमध्ये पौराणिक कथांचे बीज दिसते. सुंदरमूर्ती याने लिहिलेला त्रेसष्टसंतचरित्रे हा ग्रंथ पुराण म्हणूनच गणला जातो. पुराणसागर नावाचा एक जैन ग्रंथ इ. स. च्या ११ व्या शतकाच्या सुमारास रचला गेला. बाराव्या शतकात कुलोत्तुंग चोळाच्या कारकीर्दीत एका कवीने अष्टादशपुराण नावाचा ग्रंथ रचला. संस्कृतमधील पुराणांची तमिळ भाषांतरे झाली, ती मात्र विजयनगरच्या साम्राज्याची स्थापना झाल्यानंतर. त्या बाबतीत शैव पंथाने पुढाकार घेतला.

आधुनिक काल – एकोणिसाव्या शतकातला नाव घेण्याजोगा कवी म्हणजे रामलिंगस्वामी हा होय. तिरुअरुळ्पा (कृपागीत) या नावाचा त्याचा काव्यसंग्रह आहे. याच्या काव्याचा खूप बोलबाला झाला. तमिळ जनतेने नवा वेद म्हणून त्याचा स्वीकार केला. तिकडच्या मंदिरांत रामलिंगस्वामीचे काव्य देवाच्या आराधनेसाठी गायिले जाते. हा जरी शैव होता, तरी त्याचे मत आग्रही नव्हते. खरे म्हणजे तो हरि-हरांचा समन्वय सांगणारा होता. त्याने जो नवा उपासनामार्ग प्रवर्तित केला, तो समरससन्मार्गम् या नावाने प्रसिद्ध आहे.

या शतकात मीनाक्षीसुंदरम् पिळ्ळै व गोपालकृष्ण भारती नावाचे दोन मोठे कवी होऊन गेले. पिळ्ळैने २० हून अधिक लघुकाव्ये रचली आणि तोलामोलाचे शिष्यही निर्माण केले. गोपालकृष्ण भारतीने नंदनचरित्रम् हे काव्य लिहिले. हरिजन संत नंदनार याच्या चरित्रावर हे काव्य आहे. या काव्यात कवीने लोकगीतांची शैली आणि ग्रामीण भाषा यांचा आश्रय केल्यामुळे तो समस्त ग्रामजनतेचा कंठमणी बनला आहे. नंदनचरित्रम्मधल्या चार ओळी तरी ज्याला मुखोद्गत नाहीत असा माणूस त्या भागात मिळणे कठीण आहे. पुढच्या कालात तमिळ काव्यसृष्टीत जे नवे युग निर्माण झाले, त्या युगाचा गोपालकृष्ण भारती हा अरुणोदय समजला जातो.

एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी तमिळ भाषेत छोटी-मोठी बरीच काव्ये निर्माण झाली. काही नाटकेही लिहिली गेली. महाकाव्यांची रचना मात्र थांबली. कित्येक संस्कृत ग्रंथांचे या काळात अनुवाद झाले. आरुमुखनावलर, नागनाथपंडितर, दामोदरम् पिळ्ळै, इ. विद्वान हे लंकानिवासी होते. त्यांनीही कित्येक ग्रंथ रचून तमिळ भाषेच्या अभिवृद्धीला



सुब्रह्मण्य भारती

हातभार लावला. डॉ. स्वामिनाथ अय्यर व वेदनायकम् पिळ्ळै हे मीनाक्षीसुंदरम् पिळ्ळैचे शिष्य होत. सूर्यनारायण शास्त्री,

राजम् अय्यर, माधवय्या हेही या काळातले खंदे लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत.

कविता – आधुनिक कवितेच्या क्षेत्रात सुंदरम् पिळ्ळै व कृष्ण पिळ्ळै ही नावे अग्रगण्य आहेत. त्यांच्या पश्चात सुब्रह्मण्य भारती हे राष्ट्रभक्त कवी अवतरले. त्यांच्या काळात देशामध्ये राष्ट्रभावना जागृत झाली होती. सुब्रह्मण्य भारतींनी या भावनेला असामान्यपणे चेतवले. त्यांनी तमिळ भाषेचे पंडिती वळण झुगारून दिले आणि लोकप्रिय अशा नव्या छंदात व लोकांच्या सरळ बोलचालीच्या भाषेत आपली कविता निर्माण केली. त्यांनी भारताची सांस्कृतिक आणि ऐतिहासिक एकात्मता स्फूर्तिदायक शब्दांत गायिली आहे. त्याचा एक नमुना असा –

भारत समुदायम वालकवे – वाल्क वाल्क।
भारत समुदायम वालकवे – जय जय जय।
मुप्पतु कोटी जनंगालिन संघ मुलुमैक्कुम पोतु उडैमै।
ओप्पिलाद समुदायम उलगत्तुक्कोरू पुदमै – वाल्क।
मनि रुणवै मनितर परिक्कुम वलक्कम इनियुण्डो ?
मनितर नाहे मनितर पार्कुमवालक्कु इनियुण्डो ?
पुतनिल। वाल्क्कै इनियुण्डो – नम्मिलन्द
वाल्क्कै इनियुण्डो ? – वाल्क॥

भावार्थ – भारतसंघाचा जय असो. हा भारतसंघ तीस कोटी जनतेची संपत्ती आहे. हा अद्वितीय देश साऱ्या जगाला एक नवी वस्तू म्हणून प्रतीत होईल. माणसाने माणसाचे अन्न तोडणे, ही गोष्ट काय भविष्यकालातही चालू राहील ? एक माणूस दुःख भोगीत असता दुसरा काय त्याला पाहतच राहील ? नाही, नाही, कदापि नाही, ही गोष्ट यापुढे होणार नाही. आम्ही असे नियम निर्माण करू आणि त्यांचे पालन करू, की एकालाही पोटभर खायला मिळाले नाही, तर आम्ही साऱ्या जगात क्रांती करून सोडू. आम्ही भारतवासी एका वर्णाचे, एका वंशाचे आहो. आम्ही एका तोलाचे व एका मोलाचे आहो. आम्ही सगळे या देशाचे शासक आहो.

सुब्रह्मण्य भारतींनी कुयिलपाट्टू व पांचालीशपथम् या नावाची खंडकाव्येही लिहिली आहेत. भारतींच्या परंपरेत देशिक विनायकम् पिळ्ळै, भारती दासन्, नामक्कल रामलिंगम् पिळ्ळै, शुद्धानंद भारती, इ. अनेक कवी निर्माण झाले.

भारतीदासन् हे तमिळनाडचे निसर्गकवी; तर कंबदासन् हे प्रेमकवी होत. शुद्धानंद भारती हे भारतशक्ती या खंडकाव्याचे कर्ते असून, त्यांनी स्फुट कविताही शेकडो रचल्या आहेत. ते बहुभाषापंडित असून, ओजस्वी शैलीत लिहिणारे गद्य–पद्य लेखक आहेत.

कादंबरी – १९ व्या शतकात तमिळ भाषेत बऱ्याच कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. प्रतापमुदलियारचरित्रम्, पद्मा[वती] चरित्रम्, जटावल्लभर, इ. त्यांची नावे आहेत. आरणी [कुप्पु]स्वामी मुदलियार यांनी इंग्रजी कथावस्तूंच्या आधारावर [अनेक] रहस्यप्रधान कादंबऱ्या लिहिल्या. वड्डुवुर, दुरैस्वामी अय्यं[गार] व रंगराज यांनी कित्येक सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. [रा...] अय्यर यांची कमलांबाळचरित्रम् ही एकच कादंबरी; प[ण] खूप गाजली. वेंकटरमणी हे २० व्या शतकातले एक सु[प्रसिद्ध] कादंबरीकार होत. त्यांच्या मुरुगन् – एक काश्तकार व [देश]भक्तन् कंदन् या कादंबऱ्या लोकप्रिय ठरल्या. सुधारणा[वादी] कादंबरीकारांत कल्की याचे नाव अग्रगण्य आहे. त्यांच्या क[ळ्‌व]नीन् कादली (चोराची प्रेमिका), शोलै मलै इळवरशी ([डोंगर]मलैची राजकन्या) व अलै ओशै (लहरींची साद), इ. [का]दंबऱ्या उच्च कोटीच्या मानल्या जातात. तमिळमध्ये ऐतिहा[सिक] कादंबरीचा श्रीगणेशाही त्यांनीच केला. शिवकामिनीयश[पथम्] (शिवकामिनीची शपथ), पार्तिवन् कनवु (राजाचे स्व[प्न]) अशा दोन कादंबऱ्या त्यांनी पल्लवकालीन इतिहासावर लिहि[ल्या] आहेत. याशिवाय देवन्, पी. एम्. कण्णन्, जी. एस्. म[णी] लेखकही कादंबरीकार म्हणून गाजले. लक्ष्मी, गुहप्रिया, [सर]स्वती अम्माळ, अनुत्तमा या तमिळनाडमधल्या महिला कादं[बरी]कार प्रसिद्ध आहेत.

कथा – तमिळमध्ये आधुनिक ढंगाने कथालेखनाचा [प्रारंभ] वे. सुब्रह्मण्य अय्यर यांनी केला. भारती, के. एस्. [वेंकट]रमणी व माधवय्या हे एकोणिसाव्या शतकातले कथा[कार] आहेत. चालू शतकात अनेक लेखकांनी सामाजिक, मनो[वैज्ञा]निक, भावात्मक व विनोदी कथा लिहिल्या. विनोदी [कथा]लेखनात कल्की हे सिद्धहस्त आहेत. तमिळ कथाकारांत [चक्र]वर्ती राजगोपालाचारी यांचे स्थान फार वरचे आहे. [त्यां]च्या कथांची तुलना टॉलस्टॉयच्या कथांशी केली जाते. त्यांची [भाषा]शैली कलापूर्ण आणि खुमासदार आहे. ती. ज. रंगना[थन्] मनोवैज्ञानिक कथालेखनात कुशल आहेत. बी. एस्. रा[मय्या], श्री. राजगोपालन् पुदुमैपित्तन्, देवन्, जगन्नाथन्, कृष्ण[...], अखिलन्, रंगनाथन्, सरस्वती अम्माल, पिच्चमूर्ती, [...] तमिळ भाषेतले लोकप्रिय कथाकार आहेत.

वृत्तपत्रे–तमिळनाडमध्ये शेकडो नियतकालिके प्रसिद्ध हो[तात]. त्यांतली कलैमगल, अमुदसुरभी, कावेरी ही मासिके; [आनंद] विकटन, कल्की, स्वदेशमित्रन, कदिर ही साप्ताहिके व [दिन]मणी, स्वदेशमित्रन ही दैनिके फार लोकप्रिय आहेत. [...] सा.; च. भा. नि.; म. ज्ञा. को.; व्ही. राघवन् – पुराणम् [...] १९६०; श्री. मीनाक्षीसुंदरम् यांचे भाषण – श्री. केंद्र[...] आकाशवाणी, पुणे यांच्या सौजन्याने ]

## तमिळ रंगभूमी

तमिळनाडमध्ये सुस्थिर आणि विकासशील अशी नाट्यसंस्था निर्माण झाल्याला सांप्रत साठ वर्षे उलटून गेली आहेत. त्यापूर्वी ती अगदीच प्राथमिक अवस्थेत होती. तिथून तिला आजचा प्रगतीचा टप्पा गाठायला पुरी पाच तपे लागली. प्राचीन तमिळ वाङ्मयात नाटकांचा विचार केलेला आढळतो. अगत्तियम् या अगस्त्य-लिखित व्याकरणग्रंथाचा एक भाग नाटकाच्या विवेचनासाठी खर्ची पडला आहे. अगस्त्यशिष्य तोळकाप्पियर याने आपल्या तोळकाप्पियम् या व्याकरणग्रंथात नाटकांचा निर्देश केला आहे. शिल्पधिकारम् व मणिमेखला या महाकाव्यांत नाटक व नृत्यकला यांचे कित्येक प्रसंग आढळतात. आदियाक्कुनल्लार या शिल्पधिकारम्वरील टीकाकाराने नाटकावर लिहिलेल्या अनेक प्राचीन ग्रंथांचा उल्लेख केला आहे. इतरही अनेक टीकाकारांच्या ग्रंथांवरून तमिळमध्ये नाट्यविषयक शास्त्रीय ग्रंथांची निर्मिती झाली असल्याचे कळते. वशइकूत्तू (उपहासात्मक नाटक), पुगळकूत्तू (प्रशंसापर नाटक), वेत्तियळकूत्तू (राजनाटक), पोदुवियलकूत्तू (लोकनाटक), वरिकूत्तू (संगीत नाटक), वरिचंडिककूत्तू (देवतांच्या प्रसादासाठी लिहिलेले नाटक), विनोदकूत्तू (विनोदी नाटक), आर्यकूत्तू (आर्यजनांसाठी लिहिलेले खास नाटक), इयल्बुकूत्तू (प्रकृतिनाटक) अशी नाटकांची वर्गवारीही प्राचीन टीकाग्रंथांतून केलेली आढळते. वल्लुवरने आपल्या कुरळ ग्रंथात नाट्यशालेचाही उल्लेख केला आहे. तिकडील देवस्थानांतून नाटके करण्यासाठी एक स्वतंत्र दालन निर्माण केले जात असे. निरनिराळ्या राजांच्या राजवाड्यांतूनही नाटकांसाठी रंगमंच निर्माण केलेले असत. पण आश्चर्याची गोष्ट ही, की अशा प्रकारचे नाट्यविषयक विवेचन प्राचीन ग्रंथांत आढळत असूनही, प्राचीन काळातले एखादे नाटक किंवा त्याचा एखादा अंशही अद्यापि उपलब्ध झालेला नाही.

तमिळनाडमध्ये नृत्यनाट्याला कूत्तू असे म्हणतात. (कूत्तू पाहा.) या कूत्तूंची परंपरा फार जुनी आहे. कूत्तू नृत्यनाट्य सादर करणाऱ्या नटांना कूत्तार किंवा कूत्तनार आणि नटचांना विरलियर असे म्हणत. हे स्त्री-पुरुष नट राजेरजवाडे आणि मंडलेश्वर यांच्यापुढे नृत्यनाट्यांचे प्रयोग करून आपला चरितार्थ चालवीत. याशिवाय, कुरवंजी नामक एक नृत्यनाट्य इथे प्रचलित आहे. कुरव किंवा कुरवर ही तमिळनाडमधली एक जमात आहे. हे लोक प्राचीन काळापासून नृत्यनाट्यांचे छंदी आहेत. त्यांच्या नृत्यनाट्याला त्यांच्यावरूनच कुरवंजी असे नाव पडले आहे. (कुरवंजी पाहा). जिथे जिथे जत्रा भरेल, तिथे तिथे जाऊन हे लोक कुरवंजीचे प्रयोग करतात.

प्राचीन काळातली ही नृत्यनाट्ये छंदोबद्ध असत. त्यांत संवादात्मक गद्य भाग येत असे; पण तो लिखित नसे. गद्य संवादांच्या बाबतीत नटांना स्वातंत्र्य असे. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरपर्यंत लिहिली गेलेली तमिळ नाटके सगळी पद्यात्मकच आहेत. सतराव्या शतकात नोंडीनाटक नावाचे एक नाटक लोकप्रिय होते. अठराव्या शतकाच्या प्रारंभी पळणिनोंडीनाटकम्, शेयक्कडीनोंडीनाटकम्, तिरुक्कायिर-नोंडीनाटकम्, इ. नाटके लिहिली गेली. अशा नाटकांतला नायक हा स्वच्छंदी व दुराचरणी असतो. त्यामुळेच त्याला कित्येक शारीरिक व मानसिक आपत्ती भोगाव्या लागतात. अखेरीस त्याला आपल्या दुराचरणाचा पश्चात्ताप होतो व तो सन्मार्गाकडे वळतो.

तंजाऊरवर मराठी राज्यसत्ता असताना तमिळमध्ये मदन-सुंदरपुरादन-सनादन-विलासम्, पुरूरवचक्रवर्तीनाडगम्, शार्ङ्ग-धरनाडगम्, पंडिकेलीविलासम्, सुभद्राकल्याणम्, हरिश्चंद्र-नाडगम्, सिरत्तोंडनाडगम् अशी अनेक नाटके लिहिली गेली. यांपैकी शेवटची दोन नाटके तिकडील रंगभूमीवर त्या काळात लोकप्रिय ठरली होती. तंजाऊरच्या सरस्वतीमहाल या ग्रंथालयात या नाटकांच्या हस्तलिखित प्रती आढळतात. मद्रासमधील हस्तलिखित-ग्रंथालयातही हिरण्यसंहारनाडगम्, रामनाडगम्, उत्तररामायणनाडगम्, कंदरनाडगम्, कात्तवरायननाडगम् व जामदग्निनाडगम् या नाटकांच्या हस्तलिखित प्रती ठेवलेल्या आहेत.

स्थानिक देवी-देवतांच्या उत्सवासाठी लिहिलेलीही बरीच नाटके आहेत. वार्षिक उत्सवप्रसंगी अशा नाटकांचे प्रयोग होत असत. त्या त्या नाटककारांच्या वंशजांच्या घरी व नटांच्या घरी अशा नाटकांच्या हस्तलिखित प्रती सापडतात. अशा नाटकांपैकी कुरल्लकुरवंजी हे नाटक प्रसिद्ध आहे. या नाटकाची नायिका मानवी आत्म्याचे प्रतीक म्हणून चित्रित केलेली आहे. पल्लू नावाचीही काही नाटके आहेत. त्यांत शैववैष्णवांचे झगडे वर्णिलेले असतात. त्यांपैकी एकाचे कथानक असे—

एका शेतकऱ्याला दोन बायका असतात. एक शैव आणि दुसरी वैष्णव. दोघींमध्ये कडाक्याची भांडणे होतात. थोरली बायको आपल्या पतीवर चोरी व अन्य काही पापकृत्ये यांचा आळ आणते. त्यासाठी जमीनदार त्या शेतकऱ्याला दंड करतो. धाकटी बायको आपल्या पतीला शिक्षा होऊ नये, म्हणून जमीनदाराला गळ घालते, पण त्याचा काही उपयोग होत नाही. शेतकऱ्यावर पुढे अनेक आपत्प्रसंग येतात आणि त्याचे कारणही घरगुती भांडण हेच असते. शेवटी त्या दोघींना पश्चात्ताप होतो व मग दोघीही प्रेमाने वागू लागतात. त्यामुळे

त्यांच्या कुटुंबात सुख व समाधान निर्माण होते.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत तमिळनाडमध्ये उत्सवादी प्रसंगी जी नाटके होत, ती बहुश: पौराणिक असून, महाराष्ट्रातल्या दशावतारी नाटकाप्रमाणे होत. नाटकासाठी चार फळ्या टाकून हातभर उंचीचा रंगमंच तयार करीत. उजेडासाठी दोन बाजूंना तेलवात करून दोन ठाणदिवे उभे करीत. रंगभूमीवर आच्छादन काहीच नसे. हरिश्चंद्र, कोवलन, सावित्री, राम-रावणयुद्ध, द्रौपदीवस्त्रहरण, इ. पौराणिक आख्यानांवर नाटकांची उभारणी करीत. ही सगळी नाटके संगीतप्रधान असत. साध्या सेवकानेसुद्धा पद म्हणायला हवे, असा दंडक असे. रंगभूमीवर एक पात्र पद म्हणू लागले, की त्याच्या बरोबरीचे दुसरे पात्र खुशाल रंगपटात निघून जाई आणि पद संपायच्या वेळी परत रंगभूमीवर येई. अशा नाटकांचे संवाद ग्राम्य आणि अशुद्ध असत. ज्याला कोणाला हातवारे करण्याची लकब आणि आरडाओरड करण्याची ताकद असेल, तो नट उत्तम समजला जाई. वेषभूषा नित्याचीच असे. जेमतेम राजाराणीचे कपडे तेवढे जरीचे असत. नट हळद आणि इतर काही उटणी यांचे मिश्रण तोंडाला लावून रंगभूषा करीत. दाढीमिश्यांसाठी तेलात कालवलेली कोळशाची भुकटी वापरीत. अशा नाटकांचा प्रेक्षकवर्गही ग्रामीण आणि अशिक्षितच असे. नाटक प्रहररात्रीनंतर सुरू होई आणि उजाडेपर्यंत चाले.

गेल्या शतकाच्या अखेरीस तमिळनाडमध्ये खऱ्या अर्थाने ज्याला नाटक म्हणता येईल, अशा नाटकाची पहिली नांदी म्हटली गेली. तमिळमध्ये दंभाचारिविलासम् नावाचे पहिले सामाजिक नाटक श्रीकाशीविश्वनाथ मुदलियार या लेखकाने लिहिले. रंगभूमीवर ते यशस्वीही ठरले. नाटकाचे अनेक अंकांत आणि अंकांचे अनेक प्रवेशांत विभाजन करणे, हे तमिळमधल्या जुन्या नाटचलेखकांना ठाऊक नव्हते. इंग्रजी अमदानी सुरू होऊन जेव्हा तिकडील लेखक शेक्सपियरच्या नाटकांचा अभ्यास करू लागले, तेव्हा त्यांना ही गोष्ट समजली. त्या दृष्टीने मनोन्मणीयम् हे नाटक उल्लेखनीय आहे. शेक्सपियरच्या धर्तीवर आणि अंकांची रचना करून लिहिलेले हे पहिले पाचअंकी नाटक होय. इ. स. १८९१ साली श्री. पी. सुंदरम् पिळ्ळै यांनी हे नाटक लिहिले. अशा प्रकारे नव्या धर्तीने आणि नव्या विचारप्रणालीने लिहिलेल्या नाटकांमुळे तमिळ रंगभूमीवर एक नवे युग अवतरले. पण या नवजात नाटचकलेला बाळसे यायला मात्र बराच काळ लागला. याचे कारण नाटक या वस्तूविषयीच तमिळनाडमधल्या वरिष्ठ वर्गात तिरस्कार वसत होता, हे होय. नाटक ही कला खरी; पण तिचा दर्जा निकृष्ट समजला जाई. त्यामुळे त्या काळातील प्रतिष्ठित लोक नट आणि नाटकमंडळ्या यांच्याशी संबंध ठेवण्याचे टाळीत.

अशाही स्थितीत एक नाटचाचार्य तमिळ रंगभूमीला लाभला आणि त्याने नाटचकलेचे दुर्दिन पालटून टाकले. या रसिक सुशिक्षित अशा नाटचाचार्याचे नाव पी. संबंध मुदलियार असे आहे. त्यांनी नाटचकलेच्या उत्कर्षासाठी आपली उभी हयात खर्ची घातली. सगुणविलाससभा नावाची नाटचसंस्था निर्माण करून त्यांनी तमिळनाडमध्ये नव्या नाटकाचा पाया घातला. मुदलियार हे नट, दिग्दर्शक आणि नाटककार अशा तीन्ही अधिकारांनी गाजले. त्यांनी स्वत: सुमारे ६० नाटके लिहिली. त्यांतल्या कित्येक नाटकांचे त्यांनी प्रयोगही घडवून आणले. नाटचाची आवड असलेले कैक सुसंस्कृत तरुण त्यांनी आपल्याभोवती गोळा केले, त्यांना आधुनिक नाटचकलेचे शिक्षण दिले आणि त्यांच्याकरवी अखंड लोकरंजन केले. सगुणविलाससभेच्या पहिल्या पंचविशीतच तिला अमाप कीर्ती मिळाली. तमिळनाडमध्येच नव्हे, तर केरळात आणि लंकेतही तिने दौरे काढले. तिचे अनुकरण मग आणखी बऱ्याच नाटचसंस्थांनी केले. पी. संबंध मुदलियार यांच्या जोडीने आचार्य सूर्यनारायण शास्त्रियार हेही नाटचक्षेत्रात उतरले. त्यांनी रूपावती, कलावती, इ. अनेक गद्यपद्यात्मक नाटके लिहिली.

इतर ठिकाणांप्रमाणेच तमिळ रंगभूमीलाही बोलपटाचा जमाना सुरू होताच त्याच्यापुढे हतबल व्हावे लागले. रंगभूमीवरचे शेकडो नट एकामागून एक चित्रपटक्षेत्राकडे धावले. पण पाचदहा वर्षांतच त्या कलावंतांचा भ्रमनिरास झाला. त्यांपैकी कित्येक चांगले नट पुनश्च रंगभूमीकडे वळले. हळूहळू पुन्हा नव्या नव्या नाटचसंस्था निर्माण होऊ लागल्या. अशातच १९४७ साली भारत स्वतंत्र झाला आणि मग देशाच्या सर्वच कल्पना पालटल्या. वरिष्ठ वर्गानेही नाटचसंस्थेविषयीची आपली जुनी अढी काढून टाकली. देशाच्या सांस्कृतिक उत्कर्षात नाटचकलेला महत्त्वाचे स्थान आहे, हे वरिष्ठ आणि सुशिक्षित समाजाला पटले. अशांपैकी काही वजनदार नाटचप्रेमी गृहस्थांनी मद्रास सरकारला नाटकांवरचा कर रद्द करायला भाग पाडले. त्यामुळे सांप्रत होतकरू आणि जिद्दीचे तरुण तमिळ रंगभूमीवर लोकाराधना करताना दिसू लागले आहेत. तमिळ रंगभूमी त्यांच्या आधारे आज आपले क्षेत्र वाढवीत आहे. [ तमिळनाडू; मा. ना. सा.; श्री. व्ही. सी. गोपालन– मार्च ऑफ इंडिया, फेब्रुवारी १९५८ ]

**तरंग** कोकणातल्या ग्रामदेवतांचे प्रतीक. हे तयार करण्या-साठी चार ते पाच हात लांबीचा वाटोळा खांब घेऊन त्याला धोतरे किंवा लुगडी गुंडाळतात आणि त्याच्या माथ्या

वर देवीचा मुखवटा, पितळेचा पंजा अगर कळस बसवतात. या खांबालाच तरंग म्हणतात. गोमंतकातील कित्येक ग्रामदेवतांची असे तरंग दसऱ्याच्या दिवशी नाचवीत, वाजतगाजत कळंबाच्या झाडाखाली नेतात व तिथे कळंबासह त्यांची पूजा करतात. मग सुतार व धोबी हातांत खंजीर घेऊन, 'भले रे भले' असे म्हणत, ओणव्याने त्यांना प्रदक्षिणा घालतात.

तरंग घेणारा माणूस गुरव, न्हावी, परीट, भंडारी किंवा सुतार, यांपैकी एखाद्या जातीचा असतो. त्याला मोड म्हणतात. त्याच्या अंगात त्या त्या देवाचा संचार होतो व तो लोकांच्या



तरंग

भूतबाधेवर उपाय सांगतो. भूतनाथ व पावणाई या दोन दैवतांच्या तरंगांमध्ये अंतरपाट धरून मंगलाष्टके म्हणतात, त्याला शिवलग्न अशी संज्ञा आहे.

हे तरंग गावातील लोकांकडे किंवा परगावीही कौल द्यायला जातात व लोक त्यांचा पाहुणचार करतात. [ गो. गौ. ब्रा. कु; श्रीरवळनाथ आणि कोंकणांतील देवस्की–श्री. बेहेरे ]

## तरगळ

एक जात. या जातीची वस्ती गुजरातेत आहे. पाहा– भावैया.

## तरणतारण

शिखांचे एक तीर्थस्थान. तरणतारण म्हणजे भवसागर तरून नेणारा तराफा. हे तीर्थ म्हणजे एक तलाव असून, तो अमृतसर जिल्ह्यात आहे. इ. स. १५९० मध्ये गुरू रामदासाच्या सन्मानार्थ पाचवा गुरू अर्जुनदेव याने हा तलाव बांधला. याची लांबी ९९९ फूट व रुंदी ९९० फूट आहे. या तलावाच्या काठी अर्जुनदेवाने एक मंदिर बांधले असून, पुढे रणजितसिंघाने हे मंदिर तांब्याने मढवून त्यावर नक्षीकाम केले आहे. इ. स. १५९६ मध्ये अर्जुनदेवाने याच नावाचे इथे एक शहरही वसविले.

या तलावातल्या पाण्याने महाव्याधीही दूर होतात, अशी शिखांची श्रद्धा आहे. या तीर्थात स्नान करण्यासाठी वैशाख मासात इथे यात्रा भरते. तलावाच्या मध्यभागी एक गुरुद्वारा आहे. [ सि. इ.; म. ज्ञा. को.; शि. इ.; कल्याण–तीर्थांक ].

## तरवाड

केरळ प्रदेशात नायर लोकांची मातृसत्ताक पद्धतीने चालणारी जी कुटुंबे आहेत, त्यांना तरवाड असे म्हणतात. तरवाडमधली सर्व माणसे ही एकाच स्त्रीचे वंशज असतात. तरवाडच्या मालमत्तेची विभागणी केली जात नाही. तरवाडातला सर्वांत ज्येष्ठ पुरुष कुटुंबाचा कारभार चालवतो; त्याला कारणवान असे म्हणतात. तो सर्व मालमत्तेचा विश्वस्त म्हणून काम करतो. तरवाडातील प्रत्येक व्यक्तीचे पालनपोषण करण्याची जबाबदारी त्याच्यावर असते. त्याचप्रमाणे सर्वांना योग्य वळण लावण्याचा आणि गैरवर्तनाबद्दल शिक्षा करण्याचा अधिकारही त्याला असतो. त्यामुळे सर्व जण त्याला योग्य तो मान देतात व भितातही.

तरवाडच्या निवासस्थानाची रचना त्याच्या पसाऱ्याला साजेशीच असते. त्यातील घरे एखाद्या किल्ल्याप्रमाणे भव्य व विस्तीर्ण असतात. घराभोवती अंगण व बगीचा असून, आवारात तळे, देऊळ, गोठा, कोठार, इ. गोष्टी असतात. त्यामुळे प्रत्येक घर स्वयंपूर्ण असते. घरात अनेक दालने व खोल्या असून, मध्यभागी एक खोली पूर्वजांची पूजा करण्यासाठी राखून ठेवलेली असते.

तरवाडमधील मुलांना वडील मंडळींकडून नैतिक व व्यावहारिक शिक्षण मिळते. त्यांना पुस्तकी शिक्षण देण्यासाठी एक शिक्षक नेमलेला असतो. कुटुंबातील प्रत्येक माणसाला तो संस्कृत व मलयाळम् या भाषा शिकवतो. मुलींनाही त्यांचे ताळिकेट्टुकल्याणम् होईपर्यंत अशा प्रकारचे शिक्षण दिले जाते. त्यानंतर मात्र त्यांना केवळ गृहशिक्षणच देतात.

मुलगी वयात येण्यापूर्वी तिचा ताळिकेट्टुकल्याणम् समारंभ होतो. वयात आल्यानंतर ती आपल्या पसंतीच्या पुरुषाशी लग्न (संबंधम्) करते. संबंधम् झाल्यानंतरही मुली पतिगृही जात नाहीत; तर त्यांचे पतीच त्यांच्याकडे रात्री मुक्कामाला येतात. त्यामुळे तरवाडाचा पसारा फारच वाढत जातो. म्हणून मग सर्वांच्या संमतीने त्याचे लहान लहान भाग पाडण्याची प्रथा निर्माण झाली. या लहान कुटुंबात स्त्री व तिची मुलेबाळे

एवढाच परिवार असतो. त्याला तावझी असे म्हणतात. मूळ तरवाडाचे सर्व नियम अशा छोटया कुटुंबांनाही लागू असतात.

आधुनिक विचारांच्या प्रभावामुळे ही मातृसत्ताक कुटुंब-संस्था आता नष्ट होत चालली असून, लग्नानंतर पतिपत्नी स्वतंत्रपणे संसार करू लागली आहेत. तरवाड संस्थेत पुरुषाचे पत्नीशी व मुलांशी जिव्हाळयाचे संबंध निर्माण होत नसत. पण आता नवीन कुटुंबपद्धतीमुळे ते निर्माण होऊ लागले आहेत. [सो. चें. म.; भा. वि. प.]

**तराणा** हिंदुस्थानी संगीतातील एक गानप्रकार. याला तिल्लाना असेही नाव आहे. तराण्यात स्वरावर्ती-प्रमाणेच अस्ताई व अंतरा हे दोन्ही अवयव असतात. तराणा म्हणजे निरनिराळया रागांत व तालांत गायकीची कसरत करण्याकरिता बांधलेला तालांच्या अथवा वाद्यांच्या बोलांचा रचनात्मक प्रबंध होय. [श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे]

**तराळ** महाराष्ट्रातील ग्रामव्यवस्थेत ग्रामरक्षणाचे काम करणारा एक वर्ग. पाहा – महार.

**तरिगोंड वेंकमांबा** (इ. स. चे १८ वे शतक). एक तेलुगू संतकवयित्री. चित्तूर जिल्ह्यातील तरिगोंड या गावातल्या नरसिंह नामक देवतेला तिने आपली सर्व काव्यरचना अर्पण केली, असे सांगतात.

कृष्णय्य नामक ब्राह्मणाची ही कन्या होती. लहानपणीच तिला वैधव्य आले. मग तिने आपले मन धर्म व तत्त्वचिंतन यांत गुंतवले. योगाची तिला विशेष आवड होती. त्या विषयावर तिने बरेच लेख लिहिले आहेत. भागवत, राजयोगसार व वेंकटाचलमाहात्म्य हे तिचे ग्रंथ उपलब्ध आहेत. राजयोगसार या ग्रंथात योगदर्शनाचा परिचय असून, त्या ग्रंथामुळेच तिला लोकप्रियता लाभली.

तिने पुष्कळ काव्यरचना केली आहे. तिची रचना कलापूर्ण नसली, तरी भाषा मात्र मधुर आहे. [ग्रे. वी. इं.]

**तर्जनीमुद्रा** एक बौद्ध मुद्रा. तर्जन म्हणजे दटावणे होय. या मुद्रेत बौद्ध देवतांचा चेहरा क्रुद्ध असतो, उजव्या हाताची तर्जनी नाकासमोर वर उचललेली असते आणि बाकीची बोटे तळव्याला चिकटलेली असतात. ज्या वेळी तर्जनीभोवती पाश गुंडाळलेला असतो, त्या वेळी त्याला तर्जनीपाश असे म्हणतात. जेव्हा घट्ट आवळलेल्या मुठीत वज्र धरून तर्जनी वर उचललेली असते, तेव्हा तिला वज्रतर्जनी म्हणतात. [इं. बु. इ.]

**तर्पण** तृप् = संतुष्ट करणे, या धातूवरून हा शब्द निघाला आहे. तर्पण शब्दाची व्याख्या अशी–'देवर्षिपितृमनुष्याणां जलाञ्जलिदानेन तृप्तिसम्पादनम्।' (= देव, ऋषी, पितर व मनुष्य यांना जलांजली देऊन तृप्त करणे, म्हणजे तर्पण होय).

ऋग्वेदात तृप्ती हा शब्द उदक या अर्थाने आला आहे. अथर्ववेदातही 'तृप्त्या तर्पयति' = उदकाने तृप्त करतो, असे वचन आहे (९.५.९). ग्यावरून तृप् धातूचा मूळ अर्थ उदक देणे, असाच असण्याची शक्यता आहे.

ज्यांच्या नावांचा उल्लेख करून उदक दिले जाते, त्या देवपितरांनी आपले कल्याण करावे, हा तर्पण करण्याचा हेतु असतो. तर्पणाच्या शेवटी 'एवमादयः स्वस्ति कुर्वन्तु तर्पिताः।' (= ज्यांचे तर्पण केले ते देवादिक कल्याण करोत), असे म्हणण्याचा प्रघात आहे. त्यावरूनही तर्पणाचा हेतू स्पष्ट होतो. मृतांचा संतोष हा तर्पणाचा अवश्यंभावी परिणाम आहे. नरकात दुःख भोगीत असलेल्या पितरांचा तर्पणाने उद्धार होतो, अशी आणखी एक कल्पना तर्पणाच्या मुळाशी आहे.

तर्पणात देव, ऋषी, इ. येत असले तरी तर्पणाचा मुख्य संबंध पितरांशी आहे. देव, ऋषी यांच्याप्रमाणे पितरांचाही एक समाज होता आणि तो जलहीन प्रदेशात राहत असल्यामुळे त्याला पाणी पाजणे हे पुण्यप्रद समजले जाणे साहजिक आहे, असे श्री. ना. गो. चापेकर म्हणतात. तर्पणात, वस्त्र पिळून ते पाणी मेलेल्या निपुत्रिक गोत्रजांना देण्याची प्रथा आहे. त्यावरून



तर्पणविधी

तर्पणाची कल्पना पाण्याचा दुष्काळ असलेल्या प्रदेशात प्रथम उगम पावली असावी, असे वाटते.

तर्पणात देव, ऋषी, आचार्य, मनुष्य व पितर इतक्यांचा समावेश केलेला असतो; मात्र या संबंधात एकवाक्यता नाही. देवतर्पणात प्रजापती, ब्रह्मा, व्याहृती, सावित्री, यज्ञ, द्यावापृथिवी, सिद्ध, गंधर्व, यक्ष, नद्या, समुद्र, इत्यादींचा समावेश असतो. ऋषितर्पणात शर्तचिन, माध्यम, गृत्समद विश्वामित्र, इ. ऋषींचा समावेश असतो. आचार्यतर्पणात सुमंतु, जैमिनी, वैशंपायन, इ. धर्माचार्यांचा समावेश असतो. मनुष्यतर्पणात सनक, सनंदन, सनातन, कपिल, आसुरी, पंचशिख, इत्यादी व्यक्तींचा समावेश असतो.

स्वपितृतर्पणात पितृत्रयी, मातृत्रयी, सापत्नमाता, मातामह, सपत्नीकत्रयी, पत्नी, पुत्र, कन्या, पितृव्य (चुलता), मातुल, भ्राता, पितृभगिनी (आत्या,) मातृभगिनी (मावशी) आत्म-भगिनी, श्वशुर, गुरू व शिष्य यांचा समावेश असतो. पिता, पितामह व प्रपितामह यांना क्रमाने वसू, रुद्र व आदित्य या स्वरूपात मानतात. त्यांच्या नामांबरोबरच गोत्रांचाही उल्लेख करतात. नावाचा द्वितीयान्त उच्चार करून 'स्वधा नमस्त-र्पयामि' असे म्हणून उदक देतात. देव-ऋषींना द्वितीयान्त नावापुढे 'तृप्यतु' म्हणतात. कहोळ, कौषीतक, इ. आचार्यांना द्वितीयान्त नावापुढे 'तर्पयामि' असे म्हणतात.

देव, ऋषी व पितर यांना हाताच्या कोणत्या भागावरून उदक द्यावे, याविषयीचा नियम असा – बोटांच्या अग्रभागी असलेल्या दैवतीर्थाने देवांना उदक द्यावे. अनामिका, कनिष्ठिका यांच्या मुळातून ऋषींना उदक द्यावे. तर्जनी व अंगठा यांच्या मध्यभागातून पितरांना उदक द्यावे.

तर्पणाला कुश किंवा दर्भ यांची आवश्यकता असते. त्या-विषयीचा श्लोक असा–

कुशाग्रैस्तर्पयेद्देवान् मनुष्यान् कुशमध्यतः।
द्विगुणीकृत्य मूलाग्रैः पितृन् सन्तर्पयेद् द्विजः॥

अर्थ – द्विजाने कुशाच्या अग्रावरून देवांचे, कुशमध्यावरून मनुष्यांचे आणि कुश दुमडून त्यांवरून पितरांचे तर्पण करावे.

देवांना प्रत्येकी एक, सनकादिकांना दोन व पितरांना तीन अंजली द्याव्या. स्त्रीला एकच अंजली द्यावी.

जानवे नेहमी डाव्या खांद्यावर असते. त्या अवस्थेला सव्य म्हणतात. ते उजव्या खांद्यावर घेतले, की त्या अवस्थेला अप-सव्य म्हणतात. माळेसारखे गळ्यात लोंबवले, की त्याला निवीत म्हणतात. देवांचे तर्पण सव्याने, ऋष्यादिकांचे निवीताने व पितरांचे अपसव्याने करावे, असा नियम आहे.

देव–ऋषितर्पण पूर्वाभिमुख, मनुष्यतर्पण पश्चिमाभिमुख व पितृतर्पण दक्षिणाभिमुख होऊन करायचे असते.

पितृतर्पणात दर्भाबरोबर तीळ घ्यावेत, असे सांगितले आहे. ते न मिळाल्यास त्यांच्याऐवजी सोने किंवा रुपे वापरावे. जीवत्पितृकाला पितृतर्पणाचा निषेध आहे.

तर्पण नदीवर करावे, असे बौधायनाने सांगितले आहे–

स्रवन्तीष्वनिरुद्धासु त्रयो वर्णा द्विजातयः।
प्रातरुत्थाय कुर्वीरन् देवर्षिपितृतर्पणम्॥
(बौ. ध. सू. २.३.६)

अर्थ – त्रैवर्णिकांनी प्रातःकाळी उठून न अडवलेल्या वाहत्या नद्यांच्या ठिकाणी देव-ऋषि-पितृतर्पण करावे.

नदीवर तर्पण करायचे ते नदीमध्ये नाभिमात्र उदकात उभे राहून किंवा नदीच्या काठी बसून करावे, असे सांगितले आहे. त्रैवर्णिकांप्रमाणेच शूद्रांनाही तर्पण विहित आहे. कात्यायन-शाखेनुसार त्यांनी तर्पण करावे, असे शूद्रकमलाकर या ग्रंथात म्हटले आहे.

ब्रह्मयज्ञांग, स्नानांग, श्राद्धांग अशी अनेक विधींची अंग-भूत तर्पणे असतात व ती त्या त्या प्रसंगी करायची असतात. स्नानांगतर्पणात शेवटी यक्ष्मतर्पण करायचे असते.

**संक्षिप्त तर्पण** – सर्व तर्पण करण्यास मनुष्य असमर्थ असेल, तर त्याच्यासाठी पुढीलप्रमाणे संक्षिप्त तर्पण सांगितले आहे–

आब्रह्मस्तम्बपर्यन्तं देवर्षिपितृमानवाः।
तृप्यन्तु पितरः सर्वे मातृमातामहादयः॥
अतीतकुलकोटीनां सप्तद्वीपनिवासिनाम्।
आब्रह्मभुवनाल्लोकादिदमस्तु तिलोदकम्॥
ये के चास्मत्कुले जाता अपुत्रा गोत्रिणो मृताः।
ते गृह्णन्तु मया दत्तं सूत्रनिष्पीडनोदकम्॥

अर्थ – ब्रह्मदेवापासून तृणकाडीपर्यंत देव, ऋषी, पितर, मानव, तसेच माता, मातृपिता, इ. स्वपितरही तृप्त होवोत. कुल-कोटींच्या पलिकडे आणि सप्तद्वीपांत निवास करणारे यांना ब्रह्मभुवनापासून मृत्युलोकापर्यंत (ते जिथे असतील तिथे) मी दिलेले हे तिलोदक प्राप्त होवो. तसेच आमच्या कुलात जन्मलेले गोत्रज अपुत्र मृत झाले असतील, ते मी वस्त्र पिळून दिलेले उदक ग्रहण करोत.

असे म्हणून तीनदा तिलोदक द्यावे आणि नंतर अंगावरचे वस्त्र पाण्यात बुडवून ते जमिनीवर पिळावे.

**जैन तर्पण**–जैनांमध्येही तर्पणविधी आहे. तो पंचदशमंत्रात्मक असून, त्यांच्या संध्येचाच एक भाग आहे. यात अर्हत, सिद्ध, सूरी, पाठक, साधू, इ. व्यक्तींना चतुर्थ्यन्त नावापुढे 'स्वाहा' असा शब्द उच्चारून उदक दिले जाते. पाहा – ब्रह्मयज्ञ, पितर.

[तर्पण श्री. ना. गो. चापेकर; ऋ. ब्र. स.; ध. सिं.; श. क.]

**तर्पणमुद्रा** मूर्तिकलेतील एक मुद्रा. या मुद्रेत मूर्तीचा हात खांद्याजवळ उभा असतो, तळवा आतल्या अंगाला वळवलेला असतो व बोटे खांद्याकडे किंचित वाकवलेली असतात.



तर्पणमुद्रा

पूर्वजांच्या सन्मानासाठी ही मुद्रा करायची असते. ही मुद्रा नामसंगीती या बौद्ध देवतेचे अभिज्ञानचिन्ह आहे. [इं. बु. इ.]

**तर्पणव्रत** एक ज्वरनाशनव्रत. ज्वरग्रस्त मनुष्याने सप्तमीला किंवा दशमीला तांब्याच्या पात्रात पाणी, तिळ, अक्षता व लाल फुले ठेवावीत आणि दर्भाच्या आसनावर पूर्वाभिमुख बसावे आणि ओंजळीत पाणी घेऊन १०८ वेळा तर्पण करावे, असे सांगितले आहे. उष्णज्वर असेल, तेव्हा तर्पणाच्या वेळी पुढील मंत्र म्हणतात–

योऽसौ सरस्वतीतीरे कुत्सगोत्रसमुद्भवः ।
त्रिराज्यज्वरदाहेन मृतो गोविन्दसंज्ञकः ।
ज्वरापनुत्तये तस्मै ददाम्येतत्तिलोदकम् ॥

अर्थ – हा जो सरस्वतीच्या तीरी कुत्स गोत्रातला गोविंद नामक पुरुष त्रिराज्यज्वराच्या दाहाने मृत झाला, त्याला मी माझा ज्वर शमवण्यासाठी हे तिलोदक देत आहे.

शीतज्वर असेल, तेव्हा पुढील मंत्र म्हणतात–

गङ्गाया उत्तरे कूले अपुत्रस्तापसो मृतः ।
रात्रौ ज्वरविनाशाय तस्मै दद्यात्तिलोदकम् ॥

अर्थ – गंगेच्या उत्तर तीरावर (जो) त्रिपुत्रिक तपस्वी रात्रौ मृत झाला, त्याला ज्वरनाशनासाठी तिलोदक द्यावे.

ज्वर विशेष प्रकारचा असेल किंवा दीर्घ काल राहिला असेल, तेव्हा एक हजार एक किंवा दहा हजार एक तिलांजली देतात. अशा प्रकारे तीन, पाच किंवा सात दिवस एकभुक्त राहून हे व्रत करायचे असते. [व्र. प.]

**तलकड** एक नगर. हे म्हैसूरच्या पूर्वेस सुमारे तीस मैलांवर आहे. या नगराच्या उत्पत्तीसंबंधी एक कथा आहे ती अशी–

तल आणि कड नावाचे दोन शिकारी होते. त्यांना एकदा शिवाने दर्शन दिले व आपले एक लिंग जमिनीत कुठे दडलेले आहे ते सांगितले. मग त्या दोघा शिकाऱ्यांनी ते शिवलिंग उकरून काढले व वैद्येश्वर या नावाने तिथेच त्याची स्थापना केली. तेव्हापासून त्या नगराला तलकड हे नाव पडले.

प्राचीन काळी हे एक वैभवशाली नगर होते. वैद्येश्वराच्या मंदिरासभोवती चार शिवमंदिरे आहेत. या सर्वांना मिळून पंचलिंग म्हणतात. त्यांतील मल्लिकार्जुनाचे मंदिर हे दक्षिणी शिल्पाचे एक उत्तम उदाहरण आहे. वैद्यनाथाच्या मंदिराचा जीर्णोद्धार चोळ राजांनी केला, असे सांगतात. या मंदिराच्या प्रवेशद्वाराजवळ गणेशाची मूर्ती असून उत्तरेस मनोन्मनी (पार्वती)चे लहानसे मंदिर आहे. कार्तिकात तिथे जो उत्सव होतो, त्याला पंचलिंगदर्शन म्हणतात. [एम्. एस्. सिद्धराजय्या, इलस. वीकली, २० डिसें. १९५९]

**तलयारी** पहारेकऱ्यांचा एक वर्ग. यांची वस्ती दक्षिणेत आहे. यांना तलारी किंवा उद्दारी असेही म्हणतात. हा बिनसरकारी पोलिस शिपाई असतो. चोरीला गेलेल्या गुरांना शोधून आणणे, चौकीत अटकेत ठेवलेल्या इसमांवर पहारा करणे, लहानसहान गुन्ह्यांची चौकशी चालू असताना गावच्या सरपंचाला मदत करणे, माल जप्त करणे, इ. अनेक कामे याला करावी लागतात. मोठ्या गावात एकाच्या जागी दोन किंवा तीन तलयारी असतात.

पहाऱ्याची ही पद्धती प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. इंग्रजी अमदानीत त्या सरकारने आपले पोलिसदल उभारल्यावर तलयारी हे सरकारी कामात निरुपयोगी ठरले, पण तरीही खाजगी रीत्या ते ग्रामोपयोगी कामे करीतच राहिले. कालांतराने इंग्रज सरकारने पुनश्च त्यांना सरकारी कामगार म्हणून कामावर घेतले. तसे करताना गावपोलिस म्हणून त्यांना सरकारी बिल्ले व लाठ्याही दिल्या. [का. ट्रा. स. इं.]

**तलवकार** एक सामवेदी आचार्य. याने सामवेदाची एक शाखा स्थापन केली. केनोपनिषदाचे दुसरे नाव तलवकारोपनिषद असे आहे. हा जैमिनीच्या पूर्वी होऊन गेला, असे कळते. [ तर्पण– श्री. ना. गो. चापेकर ]

**तलवंडी** शिखांचे एक तीर्थस्थान. हे गाव पंजाबातील पतियाळा जिल्ह्यात आहे. इथे गुरू गोविंदसिंघ बराच काळ राहिला होता. हे स्थान गुरुकाशी या नावाने प्रसिद्ध आहे. या ठिकाणी एक सरोवर आहे. इथली व्यवस्था दीपसिंघाच्या वंशजांकडे आहे. संत अतरसिंघ याने इथे मोठे विद्यालय स्थापले होते. इथे गु नानक यांचा जन्म झाला. [ सि. इ. ]

**तलवार** एक प्राचीन शस्त्र. धनुर्वेदात शस्त्रांची मुक्त, अमुक्त, यंत्रमुक्त आणि यंत्रयुक्त अशी चतुर्विध विभागणी आहे. त्यांत तलवार ही अमुक्त शस्त्रांत गणली जाते. कारण ती हातापासून वेगळी करून चालवता येत नाही. संस्कृत साहित्यात तलवारीला खड्ग, नितृम्प, विशयन, खंग, तीक्ष्णधार,




(१) तलवार– भरहुत (सनपूर्व २०० वर्षं)
(२) दक्षिणेत प्रचारात असलेली (इ. स. चे १० वे शतक)
(३) मुगलकालीन तलवार (४) नागांची तलवार

दुरासद, श्रीगर्भ, विजय अशी अनेक नावे आहेत. ही सर्व नावे तिच्या विविध वैशिष्ट्यांवरून पडलेली आहेत. या शस्त्राची अग्नी ही देवता असून, रुद्र हा त्याचा प्रथम धारणकर्ता होता, असे पुराणांतरी सांगितले आहे.

हरदोई, विथूर, हैद्राबाद, वगैरे जागी केलेल्या उत्खननात शुद्ध तांब्याच्या तलवारी सापडल्या आहेत. त्या हडप्पा संस्कृतीशी समकालीन आहेत, असे म्हणतात. पंजाबात फोर्ट मुनरो इथे एक काशाची तलवार मिळाली आहे, ती आधुनिक तलवारीचे मूळ रूप मानता येईल. ती सनपूर्व १२०० च्या सुमाराची




(१) सर्वसामान्य तलवार (२) गुप्तकालीन तलवार

आहे. त्यानंतरच्या लोहयुगात या शस्त्राचा हळूहळू विकास होत गेला. धातूचा पत्रा कापून काही तलवारी बनवल्या जात; पण बहुतेक तलवारी पोलादाचा रस मातीच्या साच्यात ओतून तयार करीत. भारतीय तलवारींची परदेशी निर्यात होत असे. कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात तीन प्रकारच्या तलवारींचे सविस्तर वर्णन केले आहे.

भरहूतच्या शिल्पकामात शुंगकालीन तलवारी पाहायला मिळतात. त्या रुंद व दुधारी आहेत. काही तलवारी आखूड पण अधिक रुंद आहेत. कनिष्क राजाच्या हातातली तलवार सर्वात प्रसिद्ध आहे. पुढे गुप्तयुगात तलवारीचा अधिक विकास झालेला दिसतो. त्यानंतरच्या शिल्पकामातही अनेक ठिकाणी तलवारी पाहायला मिळतात. अजंटा येथील चित्रांतही पुष्कळ जागी तलवारीचे चित्र आहे. जफरनामा, बाबरनामा, हुमायूंनामा, इ. ग्रंथांत त्या वेळच्या तलवारींचे वर्णन आहे.

शिवाजीमहाराजांजवळ तुळजा व भवानी या नावाच्या दोन तलवारी होत्या. त्यांपैकी भवानी ही विशेष प्रसिद्ध आहे. सावंत आडनावाच्या एका माणसाला तीनशे होन व पोशाख वगैरे देऊन त्यांनी ती विकत घेतली. पुढे त्यांनी तिला भवानी असे नाव दिले. तिच्यामुळे त्यांना पुष्कळ यश लाभले, म्हणून ते तिची नित्यनेमाने पूजा करीत.

सांप्रत ही तलवार सातारा येथील जलमंदिरातील देवघरात आहे. अद्यापि बाळंतीण अडल्यास हिचे तीर्थ दिल्याने तिची ताबडतोब सुटका होते, अशी समजूत साताऱ्याच्या लोकांत प्रचलित आहे. पाहा – खड्ग. [ श्री. गायत्रीनाथ पंत – सा. हिंदुस्थान, ३७ ऑक्टोबर १९६३; म. ज्ञा. को. ]

**तवनिधी** एक जैन क्षेत्र. हे बेळगाव जिल्ह्यातल्या निपाणी शहराच्या दक्षिणेस सुमारे २ मैलांवर आहे. हे नाव तवनिधी, स्तवनिधी, तवंदी, तवदी अशा निरनिराळ्या प्रकारांनी लिहिलेले आढळते. हे खेडेवजा गाव टेकडीच्या माथ्यावर वसले आहे.

खालच्या दरीत एक प्रचंड दगडी इमारत असून तिच्यात रांगेने पाच मंदिरे आहेत. त्यांच्या प्राकाराभोवती भव्य दगडी तट असून त्याला लागून ओवऱ्यांची रांग आहे. मध्यवर्ती मंदिरासमोर एक मानस्तंभ आहे. जवळच एक पाण्याचे टाके आहे. आवाराच्या बाहेर, पण याच क्षेत्राचा एक भाग म्हणून गणले गेलेले ब्रह्मनाथ नावाचे एक स्थान समोरच्या टेकडीच्या उतारावर आहे. तिथे एक सरोवर असून, त्याच्याजवळ पद्मावतीचे छोटेसे मंदिर आहे.

तवनिधीतली पाचही मंदिरे पूर्वाभिमुख आहेत. मध्यमंदिरात पार्श्वनाथाची उभी मूर्ती आहे. ती बरीच छिन्नविच्छिन्न झालेली आहे. तिला नवखंड पार्श्वनाथ असे म्हणतात, ते तिच्या खंडित अवस्थेला अनुलक्षूनच असावे. पण तिचे खरे नाव चिंतामणी पार्श्वनाथ असे आहे. त्या नावाला अनुलक्षून काही लोककथाही निर्माण झाल्या आहेत. इथे कन्नड भाषेतले काही शिलालेख आढळतात.

सांप्रत तवनिधी या क्षेत्राची प्रसिद्धी तिथल्या ब्रह्मनाथामुळे झालेली असून, तीही गेल्या सुमारे १०० वर्षांतलीच आहे, असे तिथले वृद्ध लोक सांगतात. पण इ. स. ११।१२ साली नयसेनाने कन्नड भाषेत धर्मामृत नावाचा जो ग्रंथ रचला, त्यात तवनिधीच्या पार्श्वनाथाचा उल्लेख आढळतो. त्यावरून हे क्षेत्र बरेच प्राचीन असल्याचे कळते. सांप्रत प्रत्येक महिन्याच्या अमावास्येस कर्नाटकाच्या उत्तर व महाराष्ट्राच्या दक्षिण भागातून अनेक जैन यात्रेकरू या ठिकाणी येतात. वर्षातून एकदा मोठी जत्रा भरते, त्या वेळी तर दूरदूरच्या ठिकाणांहूनही यात्रेकरू येतात.

या नावाची दोन स्थाने असून, एक शिमोगा जिल्ह्यात पुष्पगड्डीजवळ व दुसरे पूर्वीच्या निजामीतील नेरे या गावाजवळ असल्याचे श्री. श्रीकंठशास्त्री यांनी प्रतिपादले आहे. [ जै. सि. भा., जाने. १९४५, जुलै १९४५, जाने. १९४६ ]

**तवैफ** एक जात. या लोकांची वस्ती उत्तर प्रदेशात आहे. या जातीची पंचायत असते. शिवाय बायकांची स्वतंत्र पंचायत असते. या पंचायतीत एक चौधरीण नेमली जाते व इतर सभासद निवडले जातात. चौधरीण त्याच गावात जन्मलेली असावी लागते. हीन यातींच्या घरी जाऊन नाच करणे, वेश्येने दिलेल्या मेजवानीच्या प्रसंगी उपस्थित न राहणे, इ. गुन्ह्यांची चौकशी पंचायतीमार्फत होते. [ म. ज्ञा. को. ]

**तस्बीह** मुसलमानांची जपमाळ. भारत, पाकिस्तान आणि इराण या देशांतील मुसलमान लोक साधारणपणे ९९ मण्यांची जपमाळ उपयोगात आणतात. या माळेचे तीन समान मणी आकार आणि रंग या बाबतींत दुसऱ्याहून वेगळे असतात. ज्या मण्याला हिंदू लोक सुमेरू म्हणतात, त्याला मुसलमान इमाम म्हणतात. काही जपमाळा १०१ अथवा ३३ मण्यांच्याही असतात. तस्बीहच्या साहाय्याने जप केला असता सबाब (पुण्य) प्राप्त होते आणि गुनाह (पाप) क्षय पावतो, अशी मुसलमानांची श्रद्धा आहे.

तस्बीहमधील मणी वेगवेगळ्या पदार्थांपासून बनवतात. तरी प्रायः काष्ठमणी वापरण्याची प्रथा आहे. मक्केतील मातीच्या मण्यांची तस्बीह विशेष पुण्यप्रद समजली जाते. हाज यात्रेसाठी जाणारे लोक मण्यांसाठी मक्केतील माती आवर्जून आणतात. शियापंथी लोक कर्बलामधील मातीचे विशेष महत्त्व मानतात. याशिवाय भांगेचे बी, उंटाची हाडे, खजुराच्या बिया, मौल्यवान पाषाण यांचेही मणी तस्बीहसाठी वापरतात.

तस्बीहचा उपयोग बौद्धांच्या प्रभावामुळे सुरू झाला, असे काही अभ्यासक मानतात; परंतु त्याला सबळ पुरावा नाही. इस्लामच्या पूर्वीपासून अरबस्तानात अशा प्रकारची जपमाळ वापरण्याची प्रथा होती. पाहा – जपमाळ. [ हिं. वि. को. ]

**तहारा** इस्लाम धर्मातील शुद्धिविधान. विविध कारणांमुळे येणारे अशुचित्व घालविण्यासाठी मुसलमान जे विधी करतात, त्या प्रत्येकाला स्वतंत्र नाव असले, तरी त्या सर्वांना मिळून तहारा असे म्हणतात. मासिक रजोदर्शन, अकाली स्त्रीसमागम व मृताचा स्पर्श या गोष्टींसाठी इस्लाममध्ये स्नान आवश्यक मानले आहे. शुक्रवारी किंवा सणावारी नमाज पढण्यापूर्वीही स्नान करावे लागते. स्नानाला घुस्ल असे म्हणतात. रोजचा नमाज पढण्यापूर्वी तोंड व हातपाय धुवावे लागतात, त्याला वजू हे नाव आहे. पाण्याचे दुर्भिक्ष असेल, तर वाळू किंवा माती यांनी वजू केला तरी चालतो. या वजूला तय्यम्मुम म्हणतात. इस्तिजा म्हणजे गुह्येंद्रिय स्वच्छ करणे होय. हे काम डाव्या हाताने करतात. मिस्वाक म्हणजे दंतधावन होय. प्रार्थनेच्या वेळी पादत्राणे पायांत असली तरी चालतात; पण ती स्वच्छ असली पाहिजेत, असा संकेत आहे. त्यांच्या साफसफाईला मसह म्हणतात. भांडी, कपडे इ. वस्तू स्वच्छ करणे याला तथीर असे नाव आहे. [ डि. इ. ]

**तळी भरणे** खंडोबाच्या उपासनेतला एक प्रकार. चंपाषष्ठी व माघी, चैत्री इ. पौर्णिमा या तळी भरण्याच्या तिथी होत. महाराष्ट्रात देशस्थ ब्राह्मण, मराठे व अन्य अनेक जाती यांचे खंडोबा हे कुलदैवत आहे. या दैवताचा कुळधर्म असतो, त्या प्रसंगीही ही तळी भरावी लागते. या कृत्याचा विधी असा–

एका थाळीत नारळ, सुपारी, विड्याची पाने, फळे, भंडार (हळद), इ. पदार्थ ठेवतात. थाळीच्या शेजारी एका कलशावर नारळ ठेवून त्याची पूजा करतात. तसे केल्याने त्या कलशात खंडोबाचे तेज येते, असे समजतात. मग तुपाचा दिवा थाळीत ठेवून ती थाळी कलशाभोवती तीनदा ओवाळतात. नंतर पाच माणसे कलशावरचा तो नारळ थाळीत ठेवून ती थाळी उचलतात व कपाळाला लावतात. त्या वेळी 'येळकोट येळकोट घे' असा उद्घोष करतात. असे तीनदा केल्यावर तो नारळ फोडून प्रसाद म्हणून सर्वांना खोबरे वाटतात. काही ठिकाणी नारळाच्या ऐवजी खोबऱ्याची वाटी वापरण्याचीही पद्धत आहे. [खंडोबा; दे. ऋ. ब्रा. प. ग्रं.; रत्ना. गंझे; म. चा. दै.]

**तक्षक** (१) एक प्रमुख नाग. हा कश्यप व कद्रू यांचा पुत्र आणि सुतलातील क्रोधवश नामक नागसंघाचा प्रमुख होता. याला अश्वसेन व श्रुतसेन असे दोन पुत्र होते. अर्जुनाने ज्या वेळी खांडववन अग्नीला दिले, त्या वेळी तिथे तक्षकाची पत्नी व पुत्र अश्वसेन ही दोघे होती. खांडववन जळू लागताच ती दोघे आकाशमार्गाने तिथून पसार व्हायला निघाली; पण अर्जुनाने बाण मारून तक्षकपत्नीचा शिरच्छेद केला. अश्वसेनही अर्जुनाच्या हातून मरण पावेल हे ध्यानी येताच तक्षकाचा मित्र इंद्र याने अर्जुनाविरुद्ध उभे राहून त्याला वाचवले. त्या वेळी तक्षक कुरुक्षेत्रात होता. पुढे तक्षकाने अर्जुनाच्या वंशातील परीक्षिती राजाला दंश करून ठार मारले.

परीक्षितीचा पुत्र जनमेजय याला आपल्या पित्याच्या मृत्यूचे वृत्त मंत्र्याकडून समजल्यावर त्याला तक्षक आणि त्याचे समग्र नागकुल यांविषयी अत्यंत क्रोध आला. त्याने तक्षककुलाच्या संहारासाठी सर्पसत्रच सुरू केले. या सत्रात तक्षकाची अठरा कुळे नष्ट झाली. शेवटी तक्षकावर अग्नीत आहुती म्हणून पडण्याची पाळी आली असता, इंद्राने त्याला पाठीशी घातले. जनमेजयाला हे समजताच त्याने इंद्रासहित तक्षकाचे आवाहन करण्याविषयी ब्राह्मणांना सांगितले. तदनुसार ब्राह्मणांनी त्यांना बोलावले असता इंद्राने तक्षकाचा त्याग केला. तक्षक बळी पडतो आहे, असे पाहिल्यावर इंद्राने मनसेकडे धाव घेतली. मनसेने जनमेजयाचे मन वळविण्यासाठी आपला पुत्र आस्तिक याला प्रवृत्त केले. आस्तिकाने यज्ञमंडपात जाऊन आपल्या प्रभावी भाषणाने जनमेजयाला प्रसन्न केले आणि त्याच्याकडून सर्पसत्र थांबविण्याचा वर मागून घेतला.

जनमेजयाने सर्पसत्र थांबविले, तो दिवस नंदिवर्धिनी नामक पंचमीचा होता. म्हणून ती पंचमी नागांना अतिशय प्रिय आहे, असे भविष्य आणि ब्रह्म या पुराणांत म्हटले आहे. पद्म पुराणानुसार काश्मीरमधील वितस्ता नदी (झेलम) हे तक्षकाचे निवासस्थान होय. काश्मिरातील जेवन गावाजवळ असलेल्या तळ्याकाठी तक्षकाची पूजा आजही प्रचलित आहे. [प्रा. च. को.; हि. ध.; पु. इं.]

(२) प्राचीन भारतातील एक जात. हिला तक्षन् असे दुसरे नाव आहे. पाणिनीच्या अष्टाध्यायीतील उल्लेख पाहता ही जात सुतारकाम करणारी होती, असे दिसते. तक्षन् म्हणजे (लाकडे) तासणारा. कुलिश किंवा परशू हे त्याचे हत्यार होते. वैदिक वाङ्मयात हे काम करणाऱ्यांचे अनेक उल्लेख येतात. राजप्रासाद आणि राजसभागृह अशा महत्त्वाच्या वास्तूंचेही लाकडी काम हे लोक करीत असत.

पातंजल महाभाष्यात तक्षन् हा शूद्र व लोहाराच्या योग्यतेचा मानलेला आहे. त्याला यज्ञ करण्याचा अधिकार दिलेला नाही. शतपथ ब्राह्मणात तक्षनाला अमेध्य मानून त्याच्या स्पर्शाने यज्ञपात्रे अपवित्र होतात, असे सांगितले आहे. उशनाच्या मते ही संकरज जात आहे. ब्राह्मण स्त्री आणि सूचिक पुरुष यांच्या संबंधातून ही जात उत्पन्न झाली, असे त्याने म्हटले आहे. ब्राह्मणाने तक्षकाच्या हातचे अन्नग्रहण करू नये, असे बृहस्पतीने सांगितले आहे. [पा. भा.; हि. ध.]

**तक्षशिला** एक प्राचीन नगरी व विद्यापीठ. ही भारताच्या वायव्येकडील गांधार देशाची राजधानी होती. ऋग्वेदात गांधार देशाचा उल्लेख मिळतो; परंतु तक्षशिलेचा मिळत नाही. गांधार देशातील शत्रूंचा नाश करण्यासाठी रामचंद्रांच्या आज्ञेने भरत तिकडे गेला. वाल्मीकिरामायणात या विषयी उल्लेख आहे, तो असा–

> हतेषु तेषु सर्वेषु भरतः कैकयीसुतः ।
> निवेशयामास तदा समृद्धे द्वे पुरोत्तमे ॥
> तक्षं तक्षशिलायां तु पुष्कलं पुष्कलावते ।
> गन्धर्वदेशे रुचिरे गान्धारविषये च सः ॥
>
> (वा. रा. उत्तर १०१.१०-११)

अर्थ– याप्रमाणे सर्व शत्रूंचा नाश केल्यावर कैकेयीपुत्र भरताने त्या सुंदर अशा गांधार देशात तक्षशिला व पुष्कलावती या नावांची धनधान्यसमृद्ध व उत्कृष्ट अशी दोन पुरे वसविली

व आपल्या तक्ष नामक पुत्राची तक्षशिलेत व पुष्कल नामक पुत्राची पुष्कलावतीत नियुक्ती केली.

तक्षशिलेवर रघुवंशी राजांचे राज्य किती काळ राहिले, हे निश्चित सांगता येत नाही. भारतीय युद्धानंतर परीक्षितीच्या वंशजांनी इथे काही काळ राज्य केले आणि जनमेजयाने सर्पसत्रही इथेच केले, असे महाभारतावरून (स्वर्गारोहणपर्व, अ. ५) दिसते.

गौतम बुद्धाच्या वेळी येथील राजा पुक्कुसाती याने मगधराजा बिंबिसाराकडे राजदूत पाठविले होते. सनपूर्व सहाव्या शतकात इराणचा शासक कुरुष याने या प्रदेशावर आक्रमण करून त्याचा ताबा मिळविला. त्याच्या उत्तराधिकाऱ्यांनी सुमारे दोनशे वर्षे इथे राज्य केले असावे. शिकंदराच्या काळी तक्षशिला हे विशाल, सुशासित आणि धनधान्याने समृद्ध असे नगर होते, असे स्ट्रॅबो या इतिहासकाराने म्हटले आहे. शिकंदराच्या स्वारीच्या वेळी इथे जो राजा होता, त्याला ग्रीकांनी बॅसिलियस अथवा टॅक्सिलीज या नावाने उल्लेखिले आहे. त्याने आणि त्याचा पुत्र आंमी याने शिकंदराशी स्नेहसंबंध राखले होते.

पुढे लौकरच चंद्रगुप्त मौर्याने शिकंदराच्या सैनिक–प्रतिनिधींना पराभूत करून तक्षशिलेवर ताबा मिळविला आणि ती नगरी आपल्या उत्तरापथ प्रांताची राजधानी बनविली. चंद्रगुप्तानंतर बिंदुसार, सुसीम, अशोक आणि कुणाल या त्याच्या वंशातील पुरुषांनी तक्षशिलेत राज्य केले.

मौर्य साम्राज्याचा ऱ्हास सुरू झाल्यानंतर क्रमाने बॅक्ट्रियन, शक व कुशाण या आक्रमकांनी तक्षशिलेवर अधिकार गाजविला. शक-कुशाणांच्या काळात या नगराची आणि येथील विद्याकेंद्राची अवनती सुरू झाली आणि इ. स. च्या पाचव्या शतकात हूण टोळचांनी तक्षशिलेचा संपूर्ण विध्वंस केला. चिनी प्रवासी फाहियान आणि युआन च्वांग यांनी या स्थळाला भेट दिली, तेव्हा त्याची स्थिती शोचनीय असल्याचे त्यांना दिसले.

तक्षशिला नगराबरोबरच येथील विद्यापीठही प्रसिद्ध आहे. जगातील कोणत्याही राष्ट्राच्या इतिहासात या विद्यापीठासारखे १०००-१२०० वर्षे टिकलेले दुसरे कोणतेही विद्यापीठ दाखविता येत नाही. म्हणून या विद्यापीठाला आद्य व श्रेष्ठ विद्यापीठ म्हणणे योग्य ठरेल. विविध शास्त्रांतले पारंगत विद्वान या विद्यापीठात ज्ञानदानाचे कार्य करीत. ते विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण उन्नतीसाठी रात्रंदिवस झटत. त्यामुळेच चहू दिशांकडून या विद्यापीठाकडे विद्यार्थ्यांची रीघ लागे.

आर्य चाणक्य व आयुर्वेदाचार्य जीवक यांनी कित्येक वर्षे इथे अध्यापनाचे काम केले होते. पाणिनीसारखे वैयाकरण, तसेच धौम्य व आरुणी यांच्यासारखे ऋषी याच विद्यापीठात शिकून तयार झाले होते. बौद्ध वाङ्मयात या विद्यापीठा शेकडो उल्लेख मिळतात.

या तक्षशिला विद्यापीठात श्रीमंत विद्यार्थ्यांकडून एक ह सोन्याची नाणी इतके विद्याशुल्क घेतले जाई. गरीब विद्यार्थ्या मात्र विनाशुल्क शिकवीत. त्यांच्यासाठी रात्रीच्याही वे अध्यापन चाले. इथे वेद, वेदांगे, व्याकरण, वैद्यक, स्थाप युद्धशास्त्र, इ. अठरा मुख्य विषय शिकवले जात. त्यांच्या अ षंगाने इतरही अनेक विषय शिकवीत. सर्व विषय ऐच्छि असल्यामुळे ज्याला त्याला आपापल्या आवडीप्रमाणे शिक्ष घेण्याची मुभा असे. सर्व विद्यांचे तात्त्विक आणि प्रात्यक्षिक उभयविध शिक्षण इथे देत. इथल्या अभ्यासक्रमात कलांचा समावेश होता.

सनपूर्व ८०० ते इ. स. ४०० एवढ्या कालखंडात विद्यापीठाने अविच्छिन्न ज्ञानसत्र चालवले. पुढे भारताबाहेर आलेल्या रानटी आक्रमकांच्या टोळचांनी नगरासह विद्या पीठाची धूळधाण करून टाकली.

या प्राचीन नगरीचे अवशेष शोधून काढण्याचा पहि प्रयत्न जनरल कनिंगहॅमने केला. परंतु या बाबतीत मह काम मात्र सर जॉन मार्शलच्या नेतृत्वाखाली इ. स. १९ मध्ये भारतीय पुरातत्त्वविभागाने केले. रावळपिंडीच्या प सरातील भीर, सिरकप आणि सिरमुख या ठिकाणी झाले उत्खननात या नगरीतील वास्तूंचे तीन थर सापडले आहे या अवशेषांवरून तक्षशिलेचा इ. स. च्या पहिल्या शत पर्यंतचा इतिहास अभ्यासता येतो. इथे मिळालेल्या अवशे अनेक स्तूपांचे आणि विहारांचे अवशेष आहेत. [ प्रा.भा.वि ए. सि. ए. हिं.; प्रा. भा. सां. कें.; हिं. वि. को. ]

## तांगसा

एक जमात. नेफाच्या तिरप विभागाच्या पूर्व भारत-ब्रह्मदेश सीमेवरच्या पर्वतश्रेणींवर लोकांची वस्ती आहे. तांगसा या शब्दाचा अर्थ डोंगरी लोक आहे. या जमातीत अनेक उपजमाती असून, त्यांपैकी लुंग योग्ली, मोसांग, रोन्-रांग, खेमसिंग, मोकलुम, लोंगफी, सु लुंग्री, इ. प्रमुख आहेत.

तांगसांची वस्ती मुख्यत्वे तिरप आणि नामचिक या नद्यां खोऱ्यात आहे. नामचिक नदीच्या पलिकडे भारत-ब्रह्मदे सीमेपर्यंत रोन्-रांग, मोसांग, खेमसिंग, लुंग्री आणि योग्ली पाच उपजमाती राहतात.

नामचिक नदीच्या पलिकडे सीमेपर्यंतचा सर्व प्रदेश पर्व पर्वतश्रेणींनी व्यापलेला असून, त्यात घनदाट जंगले आहेत. बांबूच्या अनेक जाती उगवतात. वाघ, चित्ते, हत्ती, अस्व

माकडे, हरणे, साळू, इ. अनेक पशू व नानाविध रंगीबेरंगी पक्षी त्या रानात राहतात., डोंगराच्या पायथ्याचे हवामान दमट व उष्ण आणि डोंगरमाथ्यावरचे थंड असते. वर्षाचे अनेक महिने या विभागात खूप पाऊस पडतो.

ब्रह्मदेशाच्या पूर्वेला असलेल्या मसोई सिन्‌रापुम नामक एका डोंगरात एका अतिमानवी शक्तीपासून आपली उत्पत्ती झाली व अनेक दुर्गम दऱ्याखोरी व पर्वतरांगा ओलांडून आपण सांप्रतच्या ठिकाणी आलो, असे तांगसा सांगतात.

तांगसा लोक मध्यम बांध्याचे व बळकट असतात. बहुतेक लोकांचा वर्ण पिवळट गोरा असतो. काही लोक मात्र सावळचा वर्णाचे आढळतात.

**घरेदारे** – तांगसा लोकांची खेडी डोंगर-उतारावर वसलेली असतात. दुसऱ्या टोळीवाल्यांच्या हल्ल्याची भीती वाटत असल्यामुळे पूर्वी ते टेहेळणीची घरे व संरक्षक मोर्चे उभारून आपल्या खेड्याची मांडणी करीत; पण आता तसे काही कारण उरले नाही. आजची सर्वसाधारण तांगसा खेडी ही डोंगरात दाट जंगलांनी वेढलेली असतात. प्रत्येक खेड्याची शेतीसाठी स्वतंत्र जमीन असते.

तांगसांची घरे खांबावर उभारलेली असून, ती लाकूड, बांबू व वेत यांची असतात. त्यांवरचे छप्पर गवताचे असते. घरापुढे पडवी असते. घराचे मुख्यत: तीन भाग असतात. पुढची खोली सर्वांच्या वापरासाठी असते. तिच्यात शेकोटी असते. मधल्या भागात अनेक लहान खोल्या असतात व त्यांच्यासमोर मोकळी



तांगसांचे घर

जागा असते. प्रत्येक खोलीत चूल असते. लग्न झालेली जोडपी, मुली व म्हातारी माणसे या खोल्यात झोपतात. प्रत्येक खोलीला लहान मोरी असते. यांपैकीच एका खोलीत घरातल्या सर्व माणसांसाठी स्वयंपाक करतात. घराच्या मागच्या भागात भात कांडण्याचे उखळ असते. एखाद्या वेळी तिथेच एका बाजूला कोंबड्याही ठेवलेल्या असतात. कुटुंबात ज्या मानाने माणसे असतील, त्या मानाने त्यांच्या घरांची लांबी वाढत जाते.

घराजवळच धान्य साठवण्यासाठी एक स्वतंत्र झोपडी असते. गावाच्या एका बाजूला मुलींसाठी शयनगृह असते. त्याच्या मध्यभागी शेकोटी व सभोवती झोपण्यासाठी ओटे असतात. गावात जेव्हा अविवाहित तरुण मुली बऱ्याच असतात, तेव्हाच हे सामुदायिक शयनगृह बांधतात.

पूर्वी प्रत्येक तांगसा खेड्यात तरुणांचे एक सामुदायिक शयनगृह असे. गावाच्या प्रवेशद्वाराशीच ते उभारीत. त्यात अविवाहित तरुण रात्रीच्या वेळी झोपायला जात. गावाचे रक्षणही याच तरुणांना करावे लागे. ही शयनगृहे शस्त्रास्त्रांनी सुसज्ज असत. सांप्रत अशी शयनगृहे अस्तित्वात नाहीत.

नवीन घरात राहायला जाण्यासाठी महिन्याचा पहिला, अकरावा किंवा एकविसावा दिवस शुभ मानतात. रोन्‌-रांग लोक त्या दिवशी पुढीलप्रमाणे विधी करतात –

एक वृद्ध हातात बंदूक व दुसरा एकजण हातात कुत्रे धरतो आणि दोघे घराभोवती तीन प्रदक्षिणा घालतात. मग बंदूकधारी पुरुष बंदुकीची एक फैर झाडतो. नंतर डाओने (मोठी तलवार) कुत्र्याचे मस्तक उडवतात व एक टोकदार लांब बांबू त्याच्या मस्तकात खुपसून तो घरासमोर उभारतात. यानंतर जुन्या घरातले सर्व सामान या नवीन घरात आणतात. मग आप्तेष्टांना मेजवानी देतात.

**वेषभूषा** – तांगसा पुरुष घरी विणलेली, हिरव्या-काळचा रंगाच्या चौकटी असलेली लुंगी नेसतात व वर गिरणीच्या कापडाचा सदरा घालतात. स्त्रिया साधारणपणे ३९ इंच लांब व १२ इंच रुंद एवढा वेलपत्ती घालून विणलेला कपडा कमरेभोवती गुंडाळतात. याशिवाय ३४ इंच लांब व १८ इंच रुंद असे दोन तुकडे निळचा रंगात विणलेले असतात. त्यातला एक पुढे छातीवर व दुसरा पाठीवर बांधतात.

सांप्रत नव्या पिढीतील तांगसा स्त्रिया नव्या धर्तीचा पोषाख करतात. त्या कमरेभोवती गुडघ्यापर्यंत किंवा काही वेळा घोटचापर्यंत पोचणारा काळा कपडा गुंडाळतात. वर चोळी घालतात व तिच्यावर उत्तरीय पांघरतात. डोक्याभोवती पांढरे फडके गुंडाळतात. तांगसा स्त्रिया पूर्वी स्वत: कापड विणून ते वापरीत. अलिकडेही त्या कापड विणतात; पण ते आसामच्या मैदानी प्रदेशात नेऊन विकतात आणि स्वत: गिरणीचे स्वस्त कापड वापरतात.

तांगसा स्त्री-पुरुष खूप दागिने अंगावर घालतात. पुरुष तांब्याच्या तारेत रंगीत मणी ओवून ते कानात घालतात. स्त्रिया कानात स्फटिकासारख्या एका दगडाची कर्णभूषणे व गळचात रंगीबेरंगी मण्यांच्या माळा घालतात. नाण्यांचे व विशेषत: पावल्यांचे गळेसर त्यांना फार आवडतात. त्यांच्या

बांगडया धातूच्या असतात. त्या पायालाही मणी बांधतात.

**उद्योगधंदे** – शेती हा तांगसांचा प्रमुख व्यवसाय आहे. ते झूम पद्धतीने शेती करतात व भात, मिलेट, मका व भाजीपाला पिकवतात. ते टोकण पद्धतीने भात पेरतात.



तांगसा स्त्री

तांगसा लोकांना शिकारीचा नाद आहे. काही वेळा गावातले अनेक लोक मिळून शिकारीला जातात. निघण्यापूर्वी ते शकुन पाहातात. भाले, डाओ व बंदुका यांच्या साहाय्याने ते सावजे मारतात. शिकार सर्वजण सारखी वाटून घेतात. ज्याने जनावर मारले असेल, त्याला त्याचे शिर देतात. ते सापळे लावून पक्षीही पकडतात. नामचिक, तिरप व त्यांच्या उपनद्या यांत ते मच्छिमारीही करतात. नदीच्या प्रवाहात बांध घालून ते पाणी अडवतात व त्यात सा नामक एका विषारी वेलीचा रस टाकतात. तो खाल्ल्याने माशांना गुंगी येते. मग ते हातांनी किंवा जाळे घालून मासे पकडतात. पकडलेले मासे सर्व गावकरी वाटून घेतात.

व्यापार हाही तांगसांचा एक महत्त्वाचा उद्योग आहे. ब्रह्मदेशातील पत्कोई श्रेणींतील ब्रह्मी लोकांशी ते व्यापार करतात. त्यांना हातमागाचे कापड, चहा, मीठ आणि मणी देऊन त्याबदली ते डाओ, भाले, मासे पकडण्याची जाळी, चाकू, अफू, इ. वस्तू घेतात. काही वेळा चहाने भरलेली बांबूची नळकांडी हे त्यांचे विनिमयद्रव्य असते. मध्यम आकाराच्या मासे पकडायच्या जाळयाला आठ नळकांडी आणि डाओ किंवा भाला याला चार नळकांडी देण्याची पद्धत असे. पण हल्ली ते व्यापारात पैशांचा उपयोग करू लागले आहेत. यांशिवाय आसामच्या मैदानी प्रदेशात जाऊन ते धान्य, शेळचा, कोंबडचा, हातमागा[चे] कापड, इ. वस्तू विकून मीठ, सूत, मणी, गिरणीचे कापड, इ[.] वस्तूंची खरेदी करतात.

पूर्वी तांगसा लोक आसपासच्या खेडचांशी युद्धे व भांड[णे] करीत. एका गावाची जमीन दुसऱ्या गावाने बळकवल्यामु[ळे] बहुधा ही युद्धे होत. गावातील वृद्धांची पंचायत कोणत्या गावावर हल्ला करायचा, याचा निर्णय घेत असे. वायक[ा] मुले, अपंग व वृद्ध सोडून सर्व पुरुष लढाईत भाग घेत. [जो] निधडया छातीचा शूर असेल त्याला पुढारी करीत. [त्याने]



तांगसांचे शस्त्र – डाओ – ( नेफा–शिलाँग यांच्या सौजन्या[ने])

आघाडी सांभाळी. दुसऱ्या एकाला उपनेता निवडीत. [तो] पिछाडी संभाळी. मग पहाटेच्या वेळी अचानकपणे ते एका[…]

गावाला वेढा घालीत. हाती लागलेल्या स्त्री-पुरुषांचा शिरच्छेद करीत. मुलांना कैदी म्हणून आपल्या बरोबर आणीत. धान्यांची कोठारे वगळून सगळचा गावाला आग लावीत. काही वेळा एखादे बलाढ्य गाव दुसऱ्या गावाला सरळ सरळ युद्धाचे आव्हान देई. किंवा युद्धसूचक असे बाणाच्या टोकावर लटकावलेले कोंबडचाचे शिर गावाच्या हद्दीत टाकी.

युद्धाला निघण्यापूर्वी ते डुकराच्या मांसाचे भोजन करीत व खूप मद्यपान करीत. युद्धाचा पुढारी एक कोंबडे मारून त्यावरून शकून पाही. तो जर अशुभ ठरला, तर स्वारीचा बेत रद्द करीत.

लढाई संपल्यावर ते विजयोत्सव करीत. गावाच्या हद्दीबाहेर एका मोठ्या शिळेजवळ ते शत्रूची मुंडकी व पंजे पुरून ठेवीत. सातव्या दिवशी त्या वस्तू गावात आणीत. मग गावातले सर्व लोक त्यांना भात व मद्य अर्पण करीत. योद्धयांना पदके वाटीत. पंजाची हाडे गावातल्या इतर लोकांना देत. ते



जाळे दुरुस्त करणारा तांगसा पुरुष

ती आपल्या घरात ठेवीत. सर्व मुंडकी नेत्याला मिळत. मग मोठें गावजेवण होई. अशी युद्धे केल्याने गावात समृद्धी येते, अशी तांगसांची समजूत होती. त्यामुळे युद्धे नेहमी होत.

तांगसा लोक कलाकुसरीत प्रवीण आहेत. पानाफुलांच्या व त्रिकोण–चौकोनाच्या सुंदर आकृती गुंफून ते कापड विणतात. तांबडा, काळा व हिरवा हे रंग त्यांना विशेष प्रिय आहेत. वांबू व वेत यांच्या सुंदर टोपल्या व परडचा ते विणतात.

तांगसांची हिशेब ठेवायची पद्धत अभिनव आहे. खरेदीविक्रीच्या प्रत्येक व्यवहारासाठी ते बांबूच्या कडयांची एक साखळी बनवतात. प्रत्येक कडे हे नाणे किंवा वस्तू यांचे द्योतक असते. उधारीने एखादी खरेदी केली, तर विक्रेता व इतर काही प्रतिष्ठित नागरिक यांच्या समक्ष खरेदीदार वांबूच्या कडयांची साखळी बनवतो व आपल्या घरी ठेवून देतो. हप्त्याने पैसे देताना तेवढी कडी तो साखळीतून काढून जाळून टाकतो. सर्व पैसे फिटले, की साखळी नाहीशी होते. अशा अनेक साखळचा तांगसांच्या घरात भिंतीवर लोंबत असतात.

भात हे तांगसांचे मुख्य अन्न आहे. इतर पहाडी जमातींप्रमाणे तांगसा लोक एकदा सकाळी सूर्योदयापूर्वी व सायंकाळी सूर्यास्तानंतर भात व भाजी यांचे भोजन करतात. मधल्या वेळी ते उकडलेले बटाटे, रताळी, मक्याची कणसे किंवा लाह्या यांसारखे पदार्थ खातात. कोंबडीचे आणि डुकराचे मांस त्यांना फार आवडते. रेडचांचे आणि माकडाचेही मांस ते खातात. दोन्ही जेवणांनंतर व इतरही अनेक वेळा ते चहा पितात. त्यांच्या काही गावांत चहाचे लहान मळे असतात. तांगसा लोकांना अफूचे व्यसन असते. तंबाकूच्या विडचा ओढण्याचे व्यसनही स्त्री-पुरुषांत सर्रास आढळते.

**कुटुंबपद्धती –** तांगसा लोकांत एकत्र कुटुंबपद्धती आहे. प्रत्येक दांपत्याला घरात एक स्वतंत्र खोली असते. सर्वांनाच भरपूर काम करावे लागते. भल्या पहाटे उठून स्त्रिया भात कांडतात. त्यानंतर पाणी आणणे, स्वयंपाक करणे व सर्वांना जेवायला वाढणे, ही कामे उरकून त्या शेतात जातात आणि संध्याकाळी भाजीपाला, सरपण वगैरे घेऊन परत येतात. घरी आल्यावर पुन्हा संध्याकाळचे स्वयंपाकपाणी करतात. सर्व कामे आटोपल्यावर घरातली सर्व माणसे शेकोटीभोवती बसून गप्पा करतात व रात्री उशिरा झोपी जातात.

तांगसांची एक स्वतंत्र बोली आहे. पण त्यांना हिंदी व असमिया या भाषाही बोलता येतात. हल्ली हे लोक आपल्या मुलांना आवर्जून शाळेत पाठवतात.

**विवाहप्रथा –** तांगसा लोकांत अनेक कुळचा व गोत्रे आहेत. एकाच कुळात व गोत्रात लग्ने होत नाहीत. मुलींची लग्ने त्या वयात आल्यावर होतात. सर्वसाधारणपणे मुलींची लग्ने १५ ते २५ व मुलांची २५ ते ३० या वयोमर्यादेत होतात. काही पोट-

जमातींत आते-मामेभावंडांत लग्ने होतात, तर काहींत ती निषिद्ध मानतात. मोठ्या भावाच्या विधवेशी लहान भावाला लग्न करता येते.

पुष्कळदा मुलगा एखादी मुलगी आधी पसंत करतो आणि मग ती गोष्ट कोण्या आप्तेष्टामार्फत आईबापांच्या कानावर घालतो. मग मुलाचे आईबाप मुलीच्या आईबापांशी लग्नासंबंधी बोलणी करतात. प्रेमविवाहात मुलीच्या आईबापांची संमती आवश्यक असते; परंतु ती त्यांनी दिली नाही, तर मुलाला खूप देज द्यावे लागते. तांगसांच्या लग्नात खरे महत्त्व देजाला असते. सर्वसाधारणपणे शंभर रुपये आणि एक रेडा एवढे देज देण्याची पद्धत आहे. निरनिराळ्या पोटजमातींतले लग्नविधी सारखे नसतात. विवाह-समारंभ साधारणपणे तीन दिवस चालतो. पहिल्या दिवशी नवरा मुलगा आप्तेष्टांसह वधू-गृही जातो. वधूच्या आईबापांना भेट म्हणून तो एक डुक्कर व थोडे मद्य देतो. त्याच दिवशी तो वधूला घेऊन आपल्या घरी परततो. दुसऱ्या दिवशी नवऱ्या मुलाचे आईबाप वधू-वरांसह वधूगृही जातात व देज देतात. याच दिवशी वधूपिता वधू-वरांच्या हातात कंकण बांधतो. त्या वेळी तो 'आजपासून माझी मुलगी तुमची झाली' असे वराला सांगतो. संध्याकाळी वरपक्ष नव्या दांपत्यासह आपल्या घरी येतो. तिसऱ्या दिवशी वधू-वर वधूगृही येतात व तो दिवस तेथे घालवतात. जेवणावळ वगैरे झाल्यावर नूतन दांपत्य आपल्या घरी परतते.



बांबूच्या नळचांत पाणी वाहणारी तांगसा स्त्री
( नेफा–शिलाँग यांच्या सौजन्याने )



तांगसा स्त्री

पूर्वी तांगसा लोकांची पंचायत होती. गावातील भांडणतंटे मिटवून गावात कायदा आणि सुव्यवस्था प्रस्थापित करणे, हे पंचायतीचे मुख्य काम असे. प्रत्येक पोटजमातीची स्वतंत्र पंचायत असे. सर्व गुन्ह्यांना दंडाची शिक्षा दिली जाई. हल्ली अशा पंचायतींचे अस्तित्व संपले आहे.

**देवधर्म** – तांगसा एका सर्वश्रेष्ठ देवाचे अस्तित्व मानतात. या देवाला ते सिकिआ, प्रा किंवा रांग काउ हावा, अशी नावे देतात. त्यानेच हे जग निर्माण केले असून, तो अदृश्यपणे आकाशात निवास करतो आणि तिथूनच मानवाचे भले चिंतितो, अशी त्यांची धारणा आहे. असे असले, तरी तांगसा लोक या देवाची पूजा करीत नाहीत किंवा त्याला बळीही देत नाहीत. पूजा व बलिदान हे भुताखेतांसाठी असते.

तांगसा लोक सूर्यप्रकाश मिळावा आणि पाऊस पडवा यासाठी सूर्याची समारंभपूर्वक पूजा व प्रार्थना करतात.

उत्सव– शेतीशी संबंधित असे तांगसांचे तीन उत्सव असतात भात पिकून तयार झाले, की कापणीपूर्वी ते आपल्याकडील नवान्नभक्षणासारखा समारंभ करतात. भाताची रोपे एक फूट उंच वाढतात, तेव्हा ते त्यांची हिरवी पाने तोडण्याचा समारंभ करतात.

पेरणीपूर्वी ते जो उत्सव करतात, त्याचा विधी असा– पहिल्या दिवशी प्रत्येक घरातली एक स्त्री साळी, मद्य, शिजवलेला भात व डुकराचे मांस घेऊन शेतात जाते. तिथे ती थोडी जमीन साफ करते आणि मग तिच्यात समारंभपूर्वक साळी पेरते. त्या वेळी ती चांगले पीक यावे म्हणून देवतेची प्रार्थना करते. मग तो दिवस आणि दुसरा दिवस खानपानात घालवतात. मोसुंग लोक हा समारंभ तीन दिवस करतात.

शेतीसंबंधीचा आणखी एक उत्सव प्रत्येक खेडचात ऑगस्ट-मध्ये साजरा होतो. गावातील वृद्ध त्या समारंभाचा दिवस ठरवतात. समारंभापूर्वी आठ दिवस गावातील सर्व स्त्रिया एकत्र जमून भातापासून दारू तयार करतात. डुक्कर खरेदी करण्यासाठी गावातील लोकांकडून वर्गणी गोळा करतात. गावाच्या प्रवेशद्वाराजवळ हा समारंभ करतात. मुले तिथली जागा स्वच्छ करतात. तिथे एक दरवाजा उभारतात व त्याच्या दोन्ही बाजूंना बांबूचे दोन लहान चौथरे बांधतात. दुसऱ्या दिवशी प्रत्येक घरातली स्त्री शेतात जाते व भाताच्या रोपटचांचा भारा घेऊन येते. ते सर्व भारे द्वाराजवळ एकत्र ठेवतात. मग एक डुक्कर मारून त्याचे रक्त त्या भाऱ्यांवर शिंपडतात. नंतर बायका आपापला भारा घेऊन घरी जातात. त्या दिवशी बायकांच्या ऐवजी मुले स्वयंपाक करतात. या जेवणाला गावातले सर्व लोक हजर असतात. दुसरा दिवस सर्व लोक गावातच राहून मजेत घालवतात. त्यानंतर ते भाताच्या कापणीला सुरवात करतात.

पूर्वी तांगसांपैकी रोन्-रांग लोक मानवाच्या कल्याणासाठी दावान नामक एक फार मोठा धार्मिक उत्सव करीत व त्यात नरबळीही देत. पण पंचवीस वर्षांपूर्वी सरकारने त्यांच्या या उत्सवाला बंदी केली. आपली परिस्थिती तेव्हापासूनच बिघडली, असे रोन्-रांग सांगतात. हा दावान उत्सव कशा प्रकारे होत असे, त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे–

डिसेंबर हा या उत्सवाचा महिना होय. त्या आधी महिनाभर गावातील पुरोहित व वृद्ध लोक उत्सवाचा दिवस ठरवीत. मग आसपासच्या रोन्-रांग खेडचांना त्याची माहिती देत. नंतर प्रत्येक घरातून वर्गणी गोळा करीत. उत्सवापूर्वी आठ दिवस डुकरे, गायी व रेडे यांची खरेदी करीत. नरबळीसाठी तीनशे रुपये, एक बंदूक, दीडशे मणी व एक घंटा एवढचा वस्तू देऊन एक पुरुष विकत घेत. तीन दिवस भरपूर पुरेल एवढे मद्य तयार करून ठेवीत. उत्सवासाठी गावाजवळच एक जागा साफसूफ करून घेत. उत्सवाच्या आदल्या दिवशी बळीला खूप मद्य पाजून त्याला गुंगी आणीत. उत्सवाच्या दिवशी बळीला एका खांबाला बांधून ठेवीत. गावातले अविवाहित तरुण त्याच्यावर प्रथम भाले चालवीत. नंतर एक तरुण धडापासून त्याचे शिर वेगळे करी. दुसरा एक माणूस ते शिर घेऊन जमलेल्या लोकांभोवती तीन फेऱ्या घाली. त्या वेळी तो सर्व लोकांना सुखी ठेवण्याबद्दल देवाची प्रार्थना करी. नंतर ते शिर रानात नेऊन त्यावरचे केस व मांस एका विशिष्ट झाडाखाली पुरीत व त्यावर दोन मोठे दगड ठेवीत. कवटी परत आणून त्याचे दोन तुकडे दोघेजण वाटून घेत. शरीराची हाडे बाहेर काढून तीही लोकांना वाटीत. लोक ती जपून ठेवीत.

बळी देऊन झाल्यावर त्यात भाग घेणारे लोक हाताला अंडचातील पांढरा बलक लावून हात धूत. त्या दिवशी ते स्वतःच्या हाताने काही खात नसत. दुसऱ्या व तिसऱ्या दिवशी डुकरे व रेडे मारीत आणि त्यांची मेजवानी करीत.

**मृतकप्रथा**– हे लोक सर्वसाधारणपणे प्रेते पुरतात. काही उपजमातींत प्रेते जाळण्याचीही प्रथा आहे. पुरण्यापूर्वी कोंबडे मारून ते थोडचा तांदुळांवरोबर शिजवतात व बाहेर एका खांबावर भांडचात मृतासाठी म्हणून ठेवून देतात. योग्ली जमातीत मृताच्या सर्व वस्तू बाहेर एका खांबावर टांगण्याची प्रथा आहे. मृतासाठी घरासमोरच थडगे करतात. तीन ते सात दिवस सुतक पाळतात. [ दि तांगसाज् – पारुल दत्त, १९५९ ]

## तांडव नृत्य

एक प्राचीन नृत्यप्रकार. हे पुरुषनृत्य असून ते शिवाने प्रवर्तित केले, अशी पारंपरिक समजूत आहे. संगीतरत्नाकरात (७.५–६) तांडवनृत्याची उत्पत्ती दिलेली आहे, ती अशी–

प्रयोगमुद्धतं स्मृत्वा स्वप्रयुक्तं ततो हरः ।
तण्डुना स्वगणाग्रण्या भरताय व्यदीदृशत् ।।
लास्यमस्याग्रतः प्रीत्या पार्वत्या समदीदृशत् ।
बुद्ध्वाथ ताण्डवं तण्डोर्मर्त्येभ्यो मुनयोऽवदन् ।।

अर्थ– नंतर शिवाने आपण पूर्वी केलेले उद्धत नृत्य आठवून ते आपल्या गणांतील अग्रणी असलेल्या तंडूकरवी भरतमुनीला दाखविले. तसेच लास्य हे नृत्यही पार्वतीकरवी मोठ्या आवडीने भरतापुढे करून दाखविले. तंडूने करून दाखविले ते तांडव, असे जाणून भरतादी मुनींनी ते नृत्य मानवांना शिकविले.

या नृत्याचे सात प्रकार आहेत, ते असे– (१) आनंदतांडव (२) संध्यातांडव (३) कालिकातांडव (४) त्रिपुरतांडव (५) गौरीतांडव (६) संहारतांडव व (७) उमातांडव. हे

तांडव नृत्य

सातही प्रकार नटराज शिवाला प्रिय होते, असे सांगितले आहे.

या सात प्रकारांपैकी संध्यातांडवाचे वर्णन शिवप्रदोष-स्तोत्रात आले आहे, ते असे– 'जेव्हा शिव नृत्यासाठी सिद्ध होतो, त्या वेळी सरस्वती वीणा वाजविते, इंद्र बासरीतून स्वर छेडतो, ब्रह्मा ताल देतो, लक्ष्मी गाणे गाते, विष्णू मृदंग वाजवितो आणि सर्व देवदेवता मोवती उभ्या राहून हा नृत्यदर्शनाचा सोहळा अनुभवतात.' या नृत्यात शिवाचे स्वरूप द्विभुज असते आणि त्याच्या पायांखाली दैत्य चिरडला जात असल्याचे दृश्य नसते.

वरील सात प्रकारांपैकी गौरीतांडव आणि उमातांडव ही दोन्ही उग्र स्वरूपाची नृत्ये आहेत. या नृत्यांत शिव हा भैरव अथवा वीरभद्र या स्वरूपांत असतो, त्याच्या बरोबर उमा अथवा गौरी असते आणि तो जळत्या चितांनी युक्त अशा स्मशान-भूमीत भूतगणांच्या साथीने ही भयानक नृत्ये करतो.

शैव आणि शाक्त संप्रदायाचे लोक या नृत्यांना विशिष्ट तत्त्वांची प्रतीके मानतात. त्यांच्या मते अशा संहारक उग्र



शिवाचे तांडव नृत्य

नृत्यांच्या वेळी शिव केवळ जगताचा प्रलय घडवून थांबत नाही, तर तो जीवांचे बंधही नष्ट करतो. जिथे जीवांचा अहं-कार भस्मसात होतो, अशा अवस्थेचे प्रतीक म्हणजे स्मशान-भूमी होय. म्हणून तिथे हे नृत्य केले जाते.

शिव तांडव नृत्य करीत असताना त्याला साथ देण्यास देव आणि असुर सारखेच उत्सुक असतात. बाणासुराने एका तांडवाच्या वेळी वाद्य वाजवून शिवाला प्रसन्न केले आणि त्याच्याकडून वर प्राप्त केला, अशी कथा भागवताच्या दशम स्कंधात आहे.

अष्ट किंवा दश भुजांनी युक्त असलेल्या शिवाच्या तांडव नृत्यातल्या मूर्ती घारापुरी, वेरूळ, भुवनेश्वर, इ. ठिकाणच्या शिल्पसंभारात दिसतात.

मध्ययुगीन शैव-शाक्त ग्रंथांत तांडवाचे ढंगदार वर्णन अनेक ठिकाणी आढळते. डॉ. आनंद कुमारस्वामी यांच्या मते देव आणि दैत्य हे दोन्ही अंश ज्याच्यात होते, अशा एका अनार्य देवापासून तांडव नृत्याची उत्पत्ती झाली आहे. हा अनार्य देव अंधाऱ्या रात्री नाचत कुदत सर्वत्र फिरत होता, अशा काही लोक–कथा प्रचलित आहेत. कालांतराने हे नृत्य शिवाशी जोडण्यात आले. पाहा– नटराज. [ सं. र.; डा. शि.; डा. इं.; म. सा. अ.; हिं. वि. को. ]

## तांड्य ब्राह्मण

सामवेदाचे एक ब्राह्मण. हे तांडिशाखेशी संबद्ध असल्यामुळे तांड्य, आकाराने मोठे असल्यामुळे महाब्राह्मण आणि पंचवीस अध्यायांचे असल्या-मुळे पंचविंश ब्राह्मण अशा तीन नावांनी ओळखले जाते. साम-वेदीय ब्राह्मणग्रंथांत हे विशेष प्रसिद्ध आहे. यात साम आणि सोमयाग हा प्रमुख वर्ण्यविषय आहे. एक दिवसापासून सहस्र संवत्सरांपर्यंत चालणाऱ्या सत्रांचा तपशील यात दिलेला आहे. या सर्व यज्ञांत व्रात्ययज्ञाचाही समावेश आहे. यातील यज्ञ-प्रक्रियेच्या अनुषंगाने आलेल्या अनेक आख्यायिका आणि स्फुट उल्लेख यांवरून तत्कालीन समाजस्थितीवर प्रकाश पडतो. कुरुक्षेत्र व सरस्वतीमंडल हे या ब्राह्मणाचे भौगोलिक क्षेत्र आहे. कुरुक्षेत्रापासून नैमिषारण्यापर्यंतचा प्रदेश ही यातील यज्ञ-भूमी आहे. [ हिंदुत्व; वै. सा. सं.; म. ज्ञा. को. ]

## तातवा

एक जात. हे लोक बंगाल, बिहार आणि आसाम या प्रदेशांत आढळतात. हे व्यवसायाने विणकर आहेत. यांना तंती असेही म्हणतात. आपला पूर्वज विश्वकर्मा-पासून एका शूद्र स्त्रीच्या पोटी जन्मला, असे हे समजतात. अत्यंत बारीक सूत काढण्याविषयी तांतवांची ख्याती आहे.

## तांदूळ

एक धान्य. भात कांडून जे दाणे मिळतात, त्यांना तांदूळ म्हणतात. भारतातील आर्यपूर्व रहिवाशांना हे धान्य माहीत होते. ते भारताच्या आग्नेय भागात पिक-

असावे. ऋग्वेदात तांदुळाचे उल्लेख सापडत नाहीत, त्यावरून आर्यांना प्रारंभी हे धान्य माहीत नसावे. पुढे आर्य लोक सर्व भारतात पसरले व स्थायिक झाले, तेव्हा त्यांना तांदुळ माहीत झाले. नंतरच्या वैदिक वाङ्मयांत तंडुल, व्रीही हे तांदुळवाचक शब्द आढळतात (अथर्व १०.९.२६; ११.१.१८; मै. सं. २.६.६.; ऐ. ब्रा. १.१; तै. ब्रा. ३.८.१४.३; श. ब्रा. १.१.४.३; छां. उ. ३.१४.३). पुढे मनूच्या वेळी तांदूळ हेच आर्य लोकांचे मुख्य अन्न झाले होते.

शिकंदराच्या स्वारीच्या वेळी भारतात आलेल्या ग्रीक लोकांनी इथल्या भाताच्या रोपांचे वर्णन केले आहे.

द्रविड लोक भात नुसते पेरीत असत. पण आर्य लोक भात पेरून उगविलेली-रोपे दुसऱ्या जागी लावून ती वाढवीत असत. एका दंतकथेत असे सांगितले आहे, की पेरणी हे विश्वकर्म्याचे काम आहे; तर लावणी ही स्वतः ब्रह्मदेवाने शोधून काढलेली प्रक्रिया आहे. त्यामुळे रोपे लावून पिकलेला तांदूळच देव-धर्माच्या कार्याला योग्य मानला जातो.

प्राचीन काळी धान्याचे दोन वर्ग मानले जात–(१) शूक-धान्यवर्ग व (२) शिंबिधान्यवर्ग. तांदूळ हे शूकधान्यवर्गातले धान्य आहे. वाग्भटप्रभृती प्राचीन ग्रंथकारांनी तांदुळांच्या अनेक प्रकारांची नावे दिली असून, काहींच्या गुणधर्मांचेही वर्णन केले आहे. रक्तशाली, महाशाली व कलम हे तांदुळाचे प्रकार त्या काळी चांगले मानले जात. त्यांतही रक्तशाली हा सर्वोत्तम प्रकार होय. यादवांचा प्रधान हेमाद्री याने रक्तशाली तांदूळ मृदू, मधुर, शुभ्र, कांतिमान, स्थूल (टपोरा) व आयत (लांबट) असतो, असे म्हटले आहे. हेमाद्रीने असेही सांगितले आहे, की हे गुण ज्या तांदुळांत आढळतील तो तांदूळ उत्तम समजावा; मग त्याचे नाव कोणतेही असो.

हेमाद्रीच्या पूर्वी दोन-अडीचशे वर्षे चक्रपाणिदत्त नामक एक पंडित होऊन गेला. त्याने चरकसंहितेवरील टीकेत म्हटले आहे, की महाशाली हा तांदूळ उत्तम असून, तो मगध देशातला म्हणून प्रसिद्ध आहे. युआन च्वांग या चिनी प्रवाशानेही मगधातील उत्कृष्ट तांदुळाचे वर्णन केले आहे, ते असे – या तांदुळाचा दाणा चांगला मोठा असून, तो शिजल्यावर त्याला घमघमीत वास येतो व त्याचा भात तजेलदार दिसतो. हा तांदूळ केवळ मगधातच उत्पन्न होतो आणि फक्त राजे व धर्मपीठाचे आचार्य हेच तो वापरतात.

कालिदास व भारवी यांच्या काव्यांत कलम जातीच्या तांदुळाचेच उल्लेख आढळतात.

मुताखेतांना पळवून लावण्याचे सामर्थ्य तांदुळात असते, अशी समजूत असल्यामुळे धर्मकार्यात तांदुळाच्या अक्षतांचा उपयोग केला जातो. शिवलिंगाला शंभर महाप्रस्थ तांदूळ अर्पणकेल्याने चंद्रलोक प्राप्त होतो, असेही सांगितले आहे. पाहा – अक्षता [वे. इं.; सु. वि. को.; नवभारत, जून १९६२]

## तांबट

कासार पाहा.

## तांबूल

काथ, चुना, सुपारी, इ. पदार्थ घालून केलेला नागवेलीच्या पानांचा विडा. विडा हा त्रयोदशगुणी असावा, असा संकेत आहे. विडाचे हे तेरा गुण असे –

ताम्बूलं कटुतिक्तमुष्णमधुरं क्षारं कषायान्वितम्।
वातघ्नं कृमिनाशनं कफहरं दुर्गन्धिनिर्णाशनम् ॥
वक्त्रस्याभरणं विशुद्धिकरणं कामाग्निसन्दीपनम्।
ताम्बूलस्य सखे त्रयोदश गुणाः स्वर्गेऽपि ते दुर्लभाः ॥
(योगरत्नाकर)

अर्थ – तांबूल हा कटू (तिखटसर), तिक्त (कडवट), उष्ण, मधुर, खारट व तुरट आहे. तो वातहारक, कृमिनाशक, कफहारक असून दुर्गंधी नाहीशी करणारा आहे. तसेच तो मुखाची अशुद्धी नाहीशी करून मुखाला शोभा आणतो आणि कामाग्नी उद्दीपित करतो. हे मित्रा, तांबूलाचे हे तेरा गुण तुला स्वर्गातसुद्धा दुर्लभ आहेत.

तांबूलाचे गुणवर्णन करताना वराहमिहिराने बृहत्संहितेत म्हटले आहे, की 'तांबूल काम उद्दीपित करतो, रूप खुलवितो, सौंदर्य व प्रेम यांची वृद्धी करतो, मुख सुगंधित करतो, जोम उत्पन्न करतो आणि कफाचे विकार नाहीसे करतो.'

इ. स. च्या अठराव्या शतकातील योगरत्नाकर या वैद्यक ग्रंथात विडाचे घटक म्हणून पुढील पदार्थ सांगितले आहेत – नागवेलीची पिवळी पाने, सुपारी, कात, चुना, कापूर, कस्तुरी, लवंग व जायफळ या सर्व पदार्थाबरोबर तंबाखूचाही उल्लेख आहे. तंबाखू ही दंतरोगाचे शमन करणारी आणि कृमी व कंड यांचा नाश करणारी आहे, असे योगरत्नाकराचे म्हणणे आहे.

विडा खाण्याची प्रथा भारतात दोन हजार वर्षांपूर्वीपासून चालत आलेली आहे. स्कंद पुराणात नागवेलीला अमृतोद्भव मानले आहे, त्यासंबंधीची कथा अशी – मोहिनीने अमृताची वाटणी केल्यानंतर उरलेले अमृत इंद्राच्या नागराज नामक हत्तीच्या खुंटाजवळ ठेवून दिले. काही काळानंतर त्या अमृतातून एक अद्भुत वेल उगवली. त्या वेलीच्या प्रभावाने सर्व देवगण धुंद झाला. विष्णूने धन्वंतरीकडून त्या वेलीची तपासणी केल्या-वर असे आढळून आले, की तिची पाने अत्यंत मादक आहेत. मग विष्णू आपल्या इष्टजनांना ही पाने भेट म्हणून देऊ लागला. ती त्यांना अतिशय रुचकर लागली.

विडा खाण्याची प्रथा भारताप्रमाणेच इंडोचीन, सुमात्रा, मलाया, मालदीव, निकोबार, दक्षिण अरबस्तान, इ. देशांतही बऱ्याच, प्राचीन काळापासून आढळते. काही संशोधकांच्या मते गुप्तकाळात भारताचे जावा, सुमात्रा, इ. आग्नेयीकडील द्वीपांशी जे सागरी दळणवळण वाढले, त्यातून विड्याचा – विड्याची पाने व विड्याला लागणाऱ्या जिनसा यांचा – भारतात प्रवेश झाला असावा. या अनुमानाला भाषाशास्त्राचाही आधार मिळतो. तांबूल हा शब्द ऑस्ट्रो–एशियाटिक भाषावर्गातला आहे. परंतु तांबूलमंजरी या ग्रंथाचे संपादक श्री. पदे यांच्या मते तांबूल खाण्याची प्रथा खास भारतीय असून, तंत्रपरंपरेत ती वेद-पूर्वकाळापासून रूढ असावी. तांत्रिक आणि तंत्रप्रभावित उपासनेत, तसेच अन्य धर्माचारांत विड्याचे विशेष महत्त्व आहे. त्या परंपरेतील वाङ्मयात विड्याचे उल्लेख अनेकवार आढळतात. पुढच्या काळात वैदिकांनी तांत्रिकांपासून विड्याचा स्वीकार केलेला दिसतो.

तांबूल कामोद्दीपक आणि मुखसौंदर्यवर्धक असल्यामुळे प्रणयाराधनेत तांबूलाचे विशेष महत्त्व मानले गेले. भारतातील कामशास्त्रीय ग्रंथांत आणि काव्यनाटकांतील शृंगारवर्णनांत तांबूलाच्या या प्रणयपोषक प्रभावाचा उल्लेख वारंवार आढळतो. एका प्रेमिकाने आपल्या प्रियेपाशी तांबूल मागताना तांबूलाचे वर्णन केले आहे, ते असे–

त्वन्नेत्राञ्चलवत्प्रदीपितमदं त्वन्मध्यवन्मुष्टिना ।
ग्राह्यं त्वत्कुचकुम्भवन्नखमुखव्यापारलीलास्पदम् ॥
त्वच्चेतोवदमन्दरागजननं त्वन्मूर्तिवत्कामदम् ।
स्वादिष्टं च तवौष्ठवत् तरुणि मे ताम्बूलमानीयताम् ॥

अर्थ – तुझ्या नेत्रकटाक्षाप्रमाणे मद उद्दीपित करणारा, तुझ्या कटीप्रमाणे मुठीत मावणारा, तुझ्या कुचकुंभाप्रमाणे नखाग्रांच्या चाळाला योग्य, तुझ्या हृदयाप्रमाणे उत्कट राग प्रसवणारा, तुझ्या अंगयष्टीप्रमाणे कामोद्दीपक आणि तुझ्या ओठाप्रमाणे स्वादिष्ट असा तांबूल, हे तरुणी, तू घेऊन ये.

प्रणयाराधनाशिवाय अन्य सामाजिक व्यवहारांत आणि धर्माचारांतही विड्याचे महत्त्व आहे. राजवाड्यात तांबूल-करंकवाहिनी (तांबूलाचे साहित्य असलेला डबा वाहणाऱ्या) सेविका नेमलेल्या असत. अशा सेवक-सेविकांचे उल्लेख प्राचीन संस्कृत व प्राकृत वाङ्मयात शेकड्यांनी आढळतात. राजाला, राज्याधिकाऱ्यांना, गुरुजनांना आणि अन्य आदरणीय व्यक्तींना सन्मानदर्शक विडा देण्याची पद्धत होती.

मंगल कार्यात निमंत्रितांना पानसुपारी देतात. पूजोपचारांत देवतेपुढे नागवेलीच्या दोन पानांवर अखंड सुपारी ठेवतात, देवाला तांबूल समर्पिताना पुढील मंत्र म्हणतात–

पूगीफलं महद्दिव्यं नागवल्ल्या दलैर्युतम् ।
कर्पूरैलासमायुक्तं ताम्बूलं प्रतिगृह्यताम् ॥

अर्थ – नागवेलीची पाने आणि त्यांत महादिव्य अशा सुपारीबरोबर वेलची व कापूर टाकून तयार केलेला हा तांबूल (देवा ! ) तू ग्रहण कर.

मूल अडीच महिन्यांचे झाल्यावर त्याला विडा खायला देण्याचा एक लौकिक संस्कारही आहे. एखादे अवघड कार्य करून दाखविण्याची प्रतिज्ञा करताना पैजेचा विडा उचलण्याची प्रथा इतिहासकाळात आढळते. प्रिय व्यक्तीच्या मुखातील विडा खाण्याचे महत्त्व जसे प्रणयाच्या क्षेत्रात आहे, तसेच गुरूच्या मुखातील विडा प्रसाद म्हणून भक्षण करण्याचे महत्त्व गुरुशिष्यसंबंधात आहे. महानुभावांच्या लीळाचरित्र या ग्रंथात चक्रधरांनी आपल्या शिष्यांना प्रसाद म्हणून उष्टा विडा दिल्याचे अनेक उल्लेख आहेत. विधवा स्त्रिया, यती व ब्रह्मचारी यांना विडा निषिद्ध आहे.

भारतीयांच्या वैयक्तिक व सामाजिक जीवनात तांबूलाला लाभलेले हे स्थान पाहता हे स्पष्ट होते, की तांबूल हे भारतीय लोकांच्या उल्हसित वृत्तीचे एक रंगदार प्रतीक आहे. [ डॉ. प. कृ. गोडे– नवभारत, जुलै १९६०; तांबूलमंजरी ]

**तांबूलसंक्रांतिव्रत** एक स्त्रीव्रत. या व्रतात वर्षभर प्रत्येक महिन्यातील संक्रांतीच्या दिवशी रात्री ब्राह्मणाला विडा खाण्यास देतात. उद्यापनाच्या दिवशी ब्राह्मण दांपत्याची पूजा करून त्याला सुवर्णाचे कमलाकार पानपुड, अडकित्ता, चुन्यासुपारीसाठी डब्या आणि विड्याचे साहित्य दान करतात. फल– सौभाग्य, समृद्धी व पतिपुत्रादिकांसह दीर्घायुष्य यांची प्राप्ती.

मकरसंक्रमणाच्या दिवशी या तांबूलदानाचे विशेष महत्त्व सांगितले आहे. हा तांबूल बत्तीस पानांचा करतात. उद्यापनाच्या दिवशी रात्रीच्या पहिल्या प्रहरात गणपती, लक्ष्मीनारायण, उमामहेश्वर, ब्रह्मासावित्री, मदनरती व लोकपाल यांची यथाविधि पूजा करून व होमहवन करून पाच अथवा सात ब्राह्मण दांपत्यांना भोजन घालतात आणि नंतर त्यांना शक्त्यनुसार तांबूल–साहित्याने भरलेली सुवर्णाची, चांदीची अथवा पितळेची पात्रे दान करतात. [ व्रतराज; हि. ध. ]

**तांबोळी** एक जात. तांबूल या संस्कृत शब्दावरून तांबोळी हा शब्द आला आहे. हे लोक विड्याची पाने विकण्याचा व्यवसाय करतात म्हणून यांना तांबोळी म्हणतात. हे भारतात सर्वत्र आढळतात. महाराष्ट्रातल्या तांबोळ्यांत

लिंगायत, मराठा व मुसलमान असे तीन पोटभेद आहेत. शंभर सव्वाशे वर्षांपूर्वी हे गुजरात व पंजाब या प्रदेशांतून महाराष्ट्रात आले, असे सांगतात. नागवेलीची पाने विकणे व गायी-म्हशी पाळणे हे यांचे प्रमुख धंदे होत. यांच्यापैकी काहीजण अद्यापि गुजराती भाषा बोलतात व गुजराती पोषाखही करतातात. हे आपली धर्मकृत्ये ब्राह्मण व जंगम पुरोहितांच्या करवी करतात.

राजस्थानातील तांबोळचांत चौरासी, पनगारिया, महोबिया, जैस्वार, गंगपारी व परदेशी असे पोटभेद आहेत. यांच्यांत बालविवाहाची पद्धत आहे. जातीतल्या एखाद्या तरुणाने एखाद्या मुलीला फूस लावून तिच्याशी लग्न केले, तर त्या लग्नाचा दंड म्हणून न्हावी त्या मुलीची एक बट एखाद्या जलाशयाच्या काठी कापतो. मुलीला त्या दिवशी उपवास करावा लागतो. तिच्या कुटुंबाकडून त्या दिवशी जातीला मेजवानी मिळते.

मुलाचे बारसे सहाव्या अथवा बाराव्या दिवशी करतात.

यांच्यांत नागपंचमीला नागाच्या पूजेचे विशेष महत्त्व असते. याबाबत एक कथा प्रचलित आहे, ती अशी——

प्राचीन काळी पृथ्वीवर विडयाचे पान नव्हते. पांडवांनी हस्तिनापुरात अश्वमेध यज्ञ केला, तेव्हा त्यांना विडयाचे पान हवे होते. म्हणून पांडवांनी ते आणण्यासाठी आपल्या दूताला वसुकी या नागांच्या राणीकडे पाताळात पाठविले. तिने आपल्या करंगळीचा थोडा भाग त्याला कापून दिला. पृथ्वीवर आणून त्याने तो भाग जमिनीत पुरताच त्यातून नागवेल उगवली आणि तेव्हापासून विडयाच्या पानांना नागवेलीची पाने असे नाव पडले.

वराई जातीच्या लोकांची अशी समजूत आहे, की तांबोळयांना नाग कधीही डसत नाही. [ म. ज्ञा. को.; मुं. इ. जा.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**ताईत** एक अलंकार व संरक्षक वस्तू. हा शब्द कन्नड भाषेतून आला आहे. ताई = माता व एतु = संरक्षण; यावरून मातेप्रमाणे संरक्षण करणारा, तो ताईत होय. दगड, धातू, लाकूड, इ. पदार्थांचे ताईत बनवतात. त्यांचे आकारही विविध असतात. ताईत हा मंत्राने भारून गळयात, दंडावर, मनगटावर किंवा कमरेला बांधतात. भुताखेतांपासून संरक्षण व्हावे आणि रोगांचे व इतर संकटांचे निवारण व्हावे, हा त्याचा उद्देश असतो. शक्ती, बुद्धी, विद्या, धन, विजय, सिद्धी, इ. गोष्टींच्या प्राप्तीसाठीही ताईत उपयोगी पडतात, अशी समजूत आहे. सज्जनांची व देवतांची कृपा संपादन करण्यासाठीही ताईत वापरतात. कित्येकदा एखाद्या देवतेची लहानशी प्रतिमाच ताइतासारखी गळयात अडकवतात. शीतळादेवीची प्रतिमा ताइतासारखी बांधली, तर देवीच्या साथीपासून रक्षण होते, असे समजतात. लहान मुलांना दृष्ट लागू नये, म्हणूनही त्यांच्या गळयात ताईत बांधतात.

दगड, धातू व लाकूड यांवर मंत्र किंवा यंत्र कोरून ताईत बनवतात. कागदावर किंवा भूर्जपत्रावर मंत्र किंवा कवच लिहून अथवा एखादे यंत्र काढून तो कागद किंवा ते भूर्जपत्र धातूच्या पेटिकेत घालून ती पेटिका गळयात बांधणे, असा ताइताचा दुसरा प्रकार आहे. ताईत तयार करण्याचे व अंगावर घालण्याचे एक शास्त्र आहे. ताइतासंबंधी मौन पाळले, तर तो अधिक प्रभावी ठरतो. लोकर, कवडया, शंख, शिंपला, मोती, शिंग, बिया, या वस्तूही ताइताच्या जागी वापरतात. राखी हाही एक प्रकारचा ताईतच होय.

एखाद्या बलिष्ठ प्राण्याचे अवशेषही ताइतात ठेवतात. त्याचा हेतू असा असतो, की त्या प्राण्याचे काही गुण ताईत वापरणाऱ्या माणसाच्या अंगात उतरावे: वाघाची नखे, दाढा, मिशांचे केस, इ. वस्तू या दृष्टीने अत्यंत प्रभावी मानल्या जातात. डुकराचे सुळेही गळयात बांधण्याची चाल वन्य लोकांत आहे. अरबी भाषेतील तावीज़ या शब्दाचा अर्थ ताईत असाच आहे. कुराणातली किंवा मुहंमदाची वचने कागदावर लिहून, तो कागद चांदीच्या छोटया डबीत ठेवून, ती पेटी गळयात बांधण्याची चाल मुसलमानांत आहे.

ताईत हा प्रतीकात्मक जादूचा एक प्रकार आहे. मध्य भारतातील वन्य जमातींचे लोक पोटशूळ थांबवण्यासाठी रुग्णाच्या कमरेभोवती एक मुळी बांधतात. तिचा प्रभावही जादूसारखाच होतो, असे म्हणतात.

भारतात व इतर देशांतही ताईत बांधण्याची प्रथा प्राचीन काळापासून प्रचलित आहे. पुरातत्त्ववेत्त्यांना उत्खननांत किंवा अन्यत्र अनेक प्रागैतिहासिक ताईत सापडले आहेत. [ हिं. वि. को.; सु. वि. को.; डि. इ.; आं. सा. इ. ]

**ताऊस** एक तंतुवाद्य. ताऊस = मोर, हा मूळ अरबी भाषेतला शब्द आहे. ताऊस हे सतारीसारखे वाद्य असून, त्याच्या बुडाशी लाकडी मोर बसवितात. या मोराच्या पाठीवर कातडयाने मढवलेली एक चौकोनी पेटी असते. तिच्या मध्यावर एक घोडी असते. तिच्या जवळच दुसरी एक घोडी असते. पेटीवर एक दांडी असते. खुंटया, अट, पडदे वगैरे व्यवस्था सतारीतील व्यवस्थेप्रमाणेच असते. ताउसाच्या मुख्य तारा चार असतात. त्यांतून सा, प, सा, म असे स्वर मिळतात. तर्फांकरिता सतारीत जशा उजव्या बाजूला रेजा देऊन त्यांत

अकरा खुंट्या बसविलेल्या असतात, तशा यातही असतात. तारा व तर्फा जुळविण्याची पद्धतीही सतारीप्रमाणेच असते;



ताऊस

पण वाजविण्यात मात्र फरक असतो. सतार बोटात नखी घालून वाजवितात, तर ताऊस घोड्याच्या केसांनी ताणलेल्या धनुकलीने वाजवितात. या धनुकलीची लांबी सुमारे पावणेदोन फूट असते. या वाद्यात वीस पडदे असतात. हे वाद्य स्वतंत्रपणे वाजविले जाते. [ म. ज्ञा. को.; हिं. सा. बृ. इ. ]

**ताज** ( इ. स. चे १७ वे शतक ) एक भक्तकवयित्री. ही धर्माने मुसलमान होती. ती करौली नावाच्या गावी राहत असे. गावातल्या कृष्णमंदिरात जाऊन देवदर्शन केल्याशिवाय ती अन्नग्रहण करीत नसे. कृष्णभक्तीने रंगलेली तिची शेकडो गीते उपलब्ध आहेत. त्यांपैकी एक गीत असे –

सुनो दिलजानी, मेरे दिलकी कहानी,
तुम दस्तही बिकानी, बदनामी भी सहूँगी मैं ।
देवपूजा ठानी, मैं निवाज हूँ भुलानी,
तजे कलमा कुरान सा गुनन गहूँगी मैं ।।

अर्थ – हे प्रियतमा, माझ्या हृदयाची कहाणी ऐक. मी तुझ्या हाती विकली गेले आहे. मी सर्व बदनामी सहन करीन. मी नमाज पढण्याचे सोडून देवपूजा स्वीकारली आहे. मी कलमा आणि कुराण यांचा त्याग करून केवळ तुझेच गुण गाईन.

तिच्या कृष्णभक्तीची उत्कटता दाखविणाऱ्या अनेक आख्यायिका प्रचलित आहेत. [ म. हिं. क. ]

**ताजमहाल** एक जगप्रसिद्ध सुंदर वास्तू. ही इमारत आग्रा शहरापासून सुमारे तीन मैलांवर यमुनेच्या पश्चिम तीरावर आहे. ताजमहाल म्हणजे भारतीय शिल्पसौंदर्याची एक उत्तम साक्ष होय.

इ. स. १६३१ च्या प्रारंभी मोगल सम्राट शहाजहान याची आवडती बेगम अर्जुमंदबानू उर्फ मुमताजमहाल ही मरण पावली. तिच्या मृत्यूने बादशहाला फार दुःख झाले. पुढे तिचे एक भव्य स्मारक करावे, असे त्याच्या मनाने घेतले. त्यासाठी आग्र्याच्या दक्षिणेस राजा जयसिंगाच्या मालकीची एक जागा होती, ती त्याने विकत घेतली, तिथे मुमताजचे दफन केले व तिच्यावर ही सुंदर इमारत निर्माण केली. या इमारतीच्या बांधकामासाठी वीस हजार माणसे २२ वर्षे खपत होती, असे उल्लेख आढळतात. तिच्या बांधकामाचा खर्च सहा कोटी रुपये आला, असे सांगतात. पण त्या बाबतीत बरीच मतभिन्नता आहे. ताजमहालाचे बांधकाम पूर्ण झाल्यावर शहाजहानाने त्याच्या व्यवस्थेच्या खर्चासाठी एक लाख रुपये उत्पन्नाची तीस गावे लावून दिली होती.

ताजमहालाच्या भोवती एक उंच कोट बांधलेला असून, त्याच्या दक्षिण बाजूच्या मध्यभागी तीन मजली भव्य प्रवेशद्वार आहे. त्या दरवाज्यावर कुराणातील आयते व सुंदर नक्षी कोरलेली आहे. आतील विशाल प्रांगणात शोभिवंत उद्यान



ताजमहाल

केलेले असून, त्याच्या मध्यभागातून एक जल–प्रवाह वाहता ठेवलेला आहे. प्रवेशद्वारापासून महालापर्यंत रस्त्याच्या दोन्ही अंगी हिरवळ व सुरूची झाडे लावलेली आहेत.

तिथून पुढे एक विस्तीर्ण चौथरा लागतो. त्याचा खालचा काही भाग लाल पाषाणांचा असून, वरचा भाग शुभ्र संगमरवरी आहे. खालचा चौथरा खूप लांब असून, त्याच्या दोन्ही टोकांशी दोन मशिदी आहेत. वरचा चौकोनी चौथरा २२ फूट उंच असून, त्याच्या मध्यभागी ताजमहालाची भव्य वास्तू उभी

आहे. तिच्या भोवती काळ्या व पांढऱ्या चौकोनी पाषाणांची फरसबंदी आहे. या चौथऱ्याच्या चारही कोपऱ्यांवर तीन मजली मनोरे आहेत. त्यांच्या बैठकी अष्टकोनी असून, वरचा भाग गोल आहे. प्रत्येक मनोऱ्याचा घेर ६०–६५ फूट व उंची १३० फूट आहे. माथ्यावर छत्राकार घुमटी आहे.

ताजमहालात प्रवेश करताना ९२ फूट उंचीची एक भव्य कमान लागते. तिच्यावर शेवाळी रंगाचे दगड बसवून त्यांत कुराणांतील आयते कोरलेले आहेत. त्यांच्या भोवती सुंदर नक्षीकामही आहे. कुराणातील शब्दांचा आकार अशा प्रकारे वाढवीत नेलेला आहे की जवळची व दूरची सर्वच अक्षरे सारखी दिसावी.

या कमानीतून आत गेल्यावर प्रशस्त दालन लागते. त्याच्या मध्यभागी एका उंच चबुतऱ्यावर मुमताजमहाल व शहाजहान यांच्या कबरी जवळ जवळ आहेत. या ठिकाणी सर्वत्र अतिशय नाजूक व सुंदर नक्षीकाम दिसते. भिंतीवरील नक्षीकामात निरनिराळ्या रंगांचे दगड वापरून फुले व पाने निर्मिली आहेत. या दालनाच्या चारी बाजू शुभ्र संगमरवरी पाषाणाच्या पण जाळीदार केलेल्या आहेत. त्या जागी पूर्वी सोन्याचे रत्नजडित मखर होते असे म्हणतात.

या दोन्ही कबरी केवळ दर्शनी आहेत. त्यांच्या बरोबर खाली तळघरात त्या दोघांच्या खऱ्या कबरी आहेत. या दालनाच्या वर ताजमहालाचा मुख्य घुमट आहे. त्याचा घेर ५८ फूट व उंची ७४ फूट आहे. दालनाच्या भोवती काही अंतरावर दुसरी जाळीदार संगमरवरी भिंत असून, त्या दोन्ही जाळ्या अशा प्रकारे बसवल्या आहेत, की त्यांतून बाहेरचा प्रकाश सहज दालनात यावा. या इमारतीच्या चारही कोपऱ्यांवर चार लहान घुमट आहेत. हे सर्व भव्य शिल्पकाम शुभ्र संगमरवरी पाषाणाचे असून, तो पाषाण निरनिराळ्या वेळी निरनिराळ्या रंगच्छटा धारण करतो.

या इमारतीची छोटी नमुनाकृती कोणी निर्माण केली याबद्दल बरेच वाद आहेत. जेरोनिमू, व्हेरोनेव, ऑस्टिन, द बोर्दो, उस्ताद इसा, उस्ताद अहमद लाहोरी, इ. स्थापत्यविशारदांची नावे या संबंधात घेतली जातात. स्लीमन हा इतिहासकार म्हणतो, की ताजमहालाची नमुनाकृती बोर्दोची आहे. बोर्दो हा नामवंत फ्रेंच सोनार होता. मयूर सिंहासनाच्या निर्मितीत त्याचा संबंध होता, यावरून तो उत्तम कारागीर होता हे सिद्ध होते. परंतु वास्तुशास्त्रज्ञ म्हणूनही तो तेवढ्याच दर्जाचा होता की काय, हे अजून सिद्ध झालेले नाही. याचा मथितार्थ हा, की ताजमहालाची छोटी आकृती अनेक देशी व विदेशी कलाकारांनी तयार केली असावी. पण इथल्याच एखाद्या वास्तुशास्त्रज्ञाची आकृती शहाजहानाला मंजूर झाली असावी, असे दिसते

ही वास्तू शहाजहानाने स्वतंत्र नवी बांधली नसून, राजपूत वास्तूत आवश्यक ते फेरफार करून तिला मकबऱ्याचे स्वरूप दिले आहे, असे श्री. पु. ना. ओक यांचे मत आहे. आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ त्यांनी पुढील प्रमाणे दिलेली आहेत –

(१) ताजमहाल हे नाव राजप्रासादांचे सूचक असून, मकबऱ्याला ते शोभत नाही.

(२) ताजमहाल बांधण्यासाठी शहाजहानाने जयसिंहाकडून त्यांच्या मालकीची जागा भरपूर मोबदला देऊन खरेदी केली, असे मुसलमान इतिहासकारही मान्य करतात. आपल्या प्रभुत्वाखाली असलेल्या राजपूत सरदारांकडून केवळ भूमीचा तुकडा खरीदण्यासाठी बादशहा शहाजहानाने भरपूर मोबदला देणे ही गोष्ट शक्य दिसत नाही. त्या ठिकाणी जयसिंहाने उभारलेला भव्य प्रासाद मुळातलाच असावा.

(३) ताजमहालापासून यमुनेच्या घाटाकडे व किल्ल्याकडे जाणारे जे भुयारी मार्ग आहेत, त्यांच्या अस्तित्वाचे समर्थन करायचे, तर ताजमहाल हा मूळचा राजप्रासाद होता, असेच मानावे लागते. मकबऱ्याला अशा भुयारी मार्गाची गरज नाही.

(४) ताजमहाल ज्या भागात आहे, तो भाग आजही जयसिंहपुरा या नावाने ओळखला जातो.

(५) ताजमहालाचा अष्टकोनी आकार हिंदू स्थापत्यपरंपरेतला आहे.

(६) ताजमहालाच्या स्तंभपीठाच्या कोपऱ्यांवर असलेले चार शिखरस्तंभ राजस्थानी वास्तुकलेचे सर्वसाधारण अंगविशेष आहेत.

(७) ताजमहालविषयक फारसी कागदपत्रांतून संदिग्धता आणि विसंगती आहे. तसेच कोण्याही विधर्मी माणसाला ताजमहालातील खऱ्या कबरी असलेल्या ठिकाणी प्रवेश करण्यास जुन्या काळी बंदी होती. ही वस्तुस्थिती लक्षात घेता सत्य लपविण्याचा उद्देश स्पष्ट होतो.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी ताजमहालाच्या शिल्पस्वरूपासंबंधी केलेले विवेचनही श्री. पु. ना. ओकांच्या मताला पुष्टी देणारे आहे. ते म्हणतात–

जगातील अन्य इस्लामी इमारतींपेक्षा ही इमारत भिन्न प्रकारची आहे. हिंदू शिल्पशास्त्राच्या सिद्धांतांचे पालन करून ही निर्मिती केली आहे. मध्ये मोठा घुमट पाहिल्यावर पंचरत्नांची कल्पना येते. घुमटाच्या मुळाशी कमळाच्या पाकळ्या आहेत. शिखराजवळ उपडे कमळ दाखविले आहे. शिखरावर त्रिशूळ आहे.

ताजमहालाचा निर्माता वा कल्पक कोणीही असो; पण

अभिजात रसिकांना ती वास्तू पाहताक्षणी मोहिनी घालते एवढे खरे. शुक्लपक्षात विशेषतः पौर्णिमेच्या रात्री ताजमहाला-वर जेव्हा चांदण्याची बरसात होते, तेव्हा तो जणू चंदेरी स्वप्नासारखा भासतो. म्हणूनच ताजमहाल हे जगातील प्रवाशांचे एक आकर्षणस्थान ठरले आहे. [ म. ज्ञा. को.; आ. फ. शि.; इं आ. (इ.); ग्लो. उ. प्र.; वै. सं. वि. ]

**ताडपत्र** लेखनाचे एक प्राचीन साधन. ताडपत्र ज्या ताड वृक्षाच्या पानांपासून तयार करतात, ते वृक्ष भारतात, विशेषतः दक्षिण आणि पूर्व भारतात, विपुल प्रमाणात आहेत. लेखनोपयोगासाठी ताडाच्या पानांचे एक ते चार इंच रुंदीचे लांबट तुकडे करून ते वाळवीत. वाळलेले तुकडे पुन्हा पाण्यात उकळून वाळवीत. त्यानंतर ते शंख किंवा कवडी या-सारख्या गुळगुळीत वस्तूने घोटून सफाईदार बनवीत. मग त्यावर शाईने लिहीत. अशा काही प्राचीन पोथ्या उपलब्ध झालेल्या आहेत. परंतु शाईने लिहिलेली अक्षरे टिकत नाहीत, असा अनुभव आल्यावर लोखंडाच्या तीक्ष्ण लेखणीने अक्षरे कोरून त्या अक्षरांत काजळाची शाई भरण्याची प्रथा सुरू झाली. अशा प्रकारे कोरून लिहिलेल्या पानांना मध्ये भोक पाडून आणि खाली-वर फळ्या ठेवून ती सर्व पाने दोरीने एकत्र बांधून ठेवीत.

भारतीय लेखनविद्येतील बहुतेक शब्द ताडपत्रांवर पोथ्या लिहिण्याच्या पद्धतीतूनच आलेले आहेत. स्कंध, कांड, शाखा, वल्ली हे ग्रंथविभागासाठी वापरले जाणारे शब्द वृक्षवेलींशी संबद्ध आहेत. सूत्रांत पाने ओवून ती एकत्र बांधणे (ग्रथ्) यावरून ग्रंथ हा शब्द वापरात आलेला आहे. पर्ण किंवा पत्र हा पोथीच्या पानांचा वाचक शब्द ताडपत्रामुळेच प्रचलित झाला. लेखन, लेखणी हे शब्द लिख् = कोरणे, या धातूवरूनच बनलेले असून, ते ताडपत्रावर कोरून लिहिण्याच्या पद्धतीतूनच प्रचारात आले आहेत. या गोष्टींवरून या पद्धतीची प्राचीनता आणि व्यापकता दिसून येते.

ताडपत्रांवर लिहिलेल्या दुसऱ्या व तिसऱ्या शतकांतील काही पोथ्या काश्मीरमध्ये उपलब्ध झालेल्या आहेत. त्यांतल्या काही पोथ्या सोनेरी अक्षरांच्या होत्या आणि त्यांच्यावरील फळ्यांवर उत्तम चित्रे काढलेली होती, असे त्यासंबंधीच्या पौराणिक उल्लेखांवरून दिसते. बाराव्या–तेराव्या शतकांत गुजरातेत जैनाचार्य हेमचंद्र आणि राजा कुमारपाल यांच्या प्रोत्साहनाने ताडपत्रांवर लिहिलेल्या श्वेतांबर जैनांच्या पोथ्याही अशाच सचित्र आहेत.

ताडपत्रांवर लिहिलेली प्राचीनतम उपलब्ध हस्तलिखिते पाशुपताचार्य रामेश्वरध्वजकृत कुसुमांजलिटीका आणि प्रबोध-सिद्धी या ग्रंथांची आहेत. या दोन हस्तलिखितांचा लेखनकाल अनुक्रमे इ. स. चे पहिले व दुसरे शतक असा आहे. इ. स. च्या तिसऱ्या शतकात लिहिलेल्या एका नाटकाचे हस्तलिखित अंशतः उपलब्ध झाले आहे. सनपूर्व पाचव्या शतकात राजगृह-जवळ सप्तपर्णगुंफेत भरलेल्या बौद्ध संगीतीने त्रिपिटक हा ग्रंथ ताडपत्रांवर लिहविला होता, असा प्राचीन उल्लेख आढळतो. इ. स. च्या सातव्या शतकानंतरची अनेक ताडपत्रलिखिते उपलब्ध झाली आहेत.

बंगालमध्ये दुर्गापाठ लिहिण्यासाठी, रामेश्वराच्या व जग-न्नाथाच्या मंदिरांत देणग्यांच्या पावत्या देण्यासाठी आणि दक्षिण भारतात प्राथमिक शाळांतील लेखनासाठी अद्यापही ताड-पत्रांचा उपयोग केला जातो. पाहा – ग्रंथ. [ सु. वि. को.; अ. अ. दा. ]

**तातुवेदी ब्राह्मण** द. भारतातील ब्राह्मणांची एक पोटजात. हे लोक कपाळावर आडवे गंध लावतात व अंगावर मुद्रा घेतात. हे वैष्णवपंथी असून, यांचे धर्मपीठ सावनूर येथे आहे. यांच्यांतही आणखी पोटभेद आहेत.

**तानसेन** (१५०६ – १५८९ इ. स.) एक श्रेष्ठ गायक. ग्वाल्हेरपासून १८ मैलांवर असलेले बेहट हे यांचे मूळ गाव. त्याचे वडील मकरंद पांडे हे गौड ब्राह्मण होते. आपली मुले जगत नाहीत, म्हणून ते ग्वाल्हेरचा प्रसिद्ध सूफी साधू महंमद गौस याला शरण गेले. महंमद गौसच्या आशी-र्वादाने त्यांना जो मुलगा झाला, तोच तानसेन होय. याचे मूळ नाव रामतनू असे होते. रामतनूचे वडील हे संस्कृतपंडित व उत्तम गायक होते. त्यामुळे रामतनूला लहान वयातच संगी-ताची गोडी लागली. त्याचे थोरले काका रामदासस्वामी हे हरिदासस्वामींचे शिष्य होते. रामतनूचा गोड गळा व त्याचे संगीतप्रेम पाहून रामदासस्वामींनी त्याला संगीताच्या शिक्षणा-साठी हरिदासस्वामींच्या स्वाधीन केले.

हरिदासस्वामी वृंदावनात राहत होते. रामतनूने त्यांच्या-कडे राहून बारा वर्षे गुरुसेवा केली व संगीतविद्येत प्रावीण्य मिळवले. मग गुरूंचा आशीर्वाद घेऊन तो तिथून निघाला आणि देशातील विविध संगीतकेंद्रांना भेटी देत हिंडत राहिला. त्या यात्रेत तो ग्वाल्हेरला गेला असता तिथला राजा विक्रमा-जित याने त्याचे ध्रुपदगायन ऐकले. राजा त्याच्यावर प्रसन्न झाला व त्याने रामतनूला तानसेन ही पदवी दिली.

त्यानंतर तानसेन रीवानरेश रामचंद्र याच्याकडे गेला. हा राजा हरिदासस्वामींचा अनन्य भक्त होता. त्याने तानसेनाचे मधुर गायन ऐकताच त्याला आपल्या राज्यातला प्रमुख गायक

बनवले. तानसेन वयाच्या पन्नाशीपर्यंत रामचंद्राच्या राजसभेत राहिला. या काळात त्याच्या गायनाची कीर्ती अकबराच्या कानांपर्यंत पोचली आणि अकबराने राजा रामचंद्राकडे तानसेनाची मागणी केली. रीवाचा राजा आणि प्रजानन यांच्यावर



तानसेन

अकबराचा रोष होऊ नये म्हणून तानसेनाने अकबराकडे जाण्याचे मान्य केले. तो इ. स. १५५६ मध्ये अकबराच्या दरबारात प्रविष्ट झाला. अकबराने तानसेनाचे संगीतातील प्रावीण्य पाहून त्याला आपल्या दरबारातील नवरत्नांत स्थान दिले.

तानसेनने हुसैनी नावाच्या एका मुसलमान मुलीशी विवाह केला होता व त्या प्रसंगात मुसलमान धर्माचाही स्वीकार केला होता, असे म्हणतात. पण काही अभ्यासकांच्या मते त्याच्यावर मुसलमानी संस्कारांचा प्रभाव असला, तरी तो मुसलमान झाला नसावा. त्याला सुरतसेन, सरतसेन, तरंगसेन व विलासखाँ हे चार पुत्र आणि सरस्वती नामक कन्या अशी पाच अपत्ये होती. ही नावे हिंदू पद्धतीची आहेत. तो जर मुसलमान झाला असता, तर त्याने आपल्या मुलांची नावे इस्लामी पद्धतीची ठेवली असती हे अगदी उघड आहे.

तानसेन हा केवळ गायक नव्हता, तर कवीही होता. त्याला ध्रुपदरचनेचे पाठही हरिदासस्वामींकडूनच मिळाले होते. ध्रुपदसंगीतात तानसेनाची बरोबरी करणारा दुसरा गायक झाला नाही. त्याच्या संगीतमाधुरीने वृक्षवेली आणि शिलाखंडही प्रभावित होत असत. त्याने दीपराग आळविला, की दिवे उजळत असत आणि मेघमल्हाराच्या ताना छेडल्या, की आकाशात मेघ जमून ते वृष्टी करू लागत, अशा आख्यायिका सांगतात.

तानसेनाने संगीतसार आणि रागमाला हे संगीतविषयक दोन ग्रंथ लिहिले आणि ध्रुपदशैलीतील गायनासाठी हिंदी भाषेत शेकडो पदे रचली. त्याच्या पदांपैकी सुमारे तीनशे पदे उपलब्ध झाली आहेत. त्यांत जसा आश्रयदात्यांचा गौरव आहे, तसाच परमेश्वराविषयीचा उत्कट भक्तिभावही आहे. वर्षाकालात प्रियविरहाने व्यथित होणाऱ्या प्रेमिकेच्या मनोव्यथा शब्दबद्ध करणारी अनेक गीते तानसेनाने रचली आहेत. या गीतांतून त्याच्या जिवाला लागलेली शिवाच्या मीलनाची उत्कंठा सूचित होते. आपण प्रभुसंकीर्तनाऐवजी राजसेवेसाठी संगीतविद्येला राबवतो, याची जाणीव तानसेनाच्या मनात सदैव जागी होती. एकदा अकबराने त्याला विचारले. 'या देशात तुझ्याहून श्रेष्ठ गायक कोणी आहे काय?' त्यावर तानसेनाने उत्तर दिले. 'होय आहे; माझे गुरू हरिदासस्वामी हे माझ्याहून अनेक पटींनी श्रेष्ठ आहेत. याशिवाय त्यांच्यामाझ्यांत दुसराही एक फरक आहे. मी माणसांना प्रसन्न करण्यासाठी गातो आणि स्वामीजी परमेश्वराला प्रसन्न करण्यासाठी गातात.'

एका विरहिणीची मनोव्यथा व्यक्त करणारे तानसेनाचे एक गीत आहे, ते असे—

बादर आए री,
लाल पिया बिन लागे डर पावन।
एक तौ अँधेरी कारी, बीजुरी चमकत,
उमडि–घुमडि बरसावन ।।
जब तें पिया परदेस गवन कीन्हौं,
तब तें बिरहा भयौ मो तन तावन।
सावन आयौ, अति झर लायौ,
तानसेन न आये मन–भावन ।।

अर्थ – हे सखी, आकाशात मेघ भरून आले आहेत. रात्र अंधारी आहे. विजा चमकत आहेत. धो धो पाऊस पडत आहे. अशा वेळी प्रियतम जवळ नसल्यामुळे मला भय वाटत आहे. जेव्हापासून प्रियतमाने परदेशी गमन केले, तेव्हापासून विरहाने माझ्या तनूचा दाह होत आहे. श्रावण आला आहे,

पावसाची झड लागली आहे; परंतु हे सर्व माझ्या मनाला काही रुचत नाही.

तानसेनाने अशी अनेक भावस्पर्शी गीते रचलेली असूनही त्याची कीर्ती कवी म्हणून न होता गायक म्हणूनच झाली.

तानसेनाचा मृत्यू इ. स. १५८९ च्या सुमारास दिल्ली येथे झाला. त्याने मृत्यूपूर्वी प्रदर्शित केलेल्या इच्छेनुसार अकबराने त्याचे शव ग्वाल्हेरला पोचविले. तिथे महंमद गौसच्या कबरी



तानसेनाची समाधी – ग्वाल्हेर

शेजारीच त्याची समाधी बांधण्यात आली. या ठिकाणी तानसेनाच्या पुण्यतिथीच्या प्रसंगी प्रतिवर्षी अनेक गायक जमतात आणि या अमर गायकाच्या स्मृतीला श्रद्धापूर्वक स्वरांजली वाहतात.

तानसेनादी नवरत्नांच्या चिरवियोगाने कलाक्षेत्रात जी पोकळी निर्माण झाली, तिचे वर्णन करण्यासाठी स्वतः अकबराने रचलेला एक दोहा प्रसिद्ध आहे, तो असा –

**पीथलसों मजलिस गई, तानसेनसों राग ।**
**हँसिबौ रमिबौ बोलिवौ गयौ बीरबल साथ ।।**

अर्थ – पीथल कवीबरोबर मैफल गेली; तानसेनाबरोबर संगीतातील रागरागिण्या गेल्या आणि बिरबलाबरोबर हसणे खेळणे-बोलणे (काव्यशास्त्रविनोद) गेले.

तानसेनाच्या संगीताचा अपरिमित प्रवाह वर्णिताना महाकवी सूरदासाने उद्गार काढले, ते असे –

**भलो भयो विधि ना दियो शेषनाग के कान**
**धरा मेरु सब डोलते तानसेनकी तान ।।**

अर्थ – विधीने शेषाला कान दिले नाहीत, हे ठीकच झाले. नाहीतर तानसेनाची तान ऐकून शेष डोलायला लागला असता आणि त्याच्या मस्तकावरील पृथ्वी आणि मेरू पर्वत हे सर्व अस्थिर बनले असते, डगमगू लागले असते.

आपल्या लोकोत्तर गायकीमुळे तानसेन ह्या आजवर गायकांचा परम आदर्श बनून राहिला आहे. [ सं. स. ता.; स. ना. दीक्षित– नवभारत, फेब्रु. १९६५ ]

**तान्व** एक सूक्तद्रष्टा. याच्या नावावर ऋग्वेदातले १०... हे सूक्त आहे. त्या सूक्तात याने इंद्र, रुद्र, मित्र, ... देवतांची स्तुती केली आहे. स्वतःच्या सूक्ताबद्दल अभि... व्यक्त करताना तो म्हणतो—

**एतं मे स्तोमं तना न सूर्ये–**
**द्युतद्यामानं वावृधन्त नृणाम् ।**
**संवननं नाश्व्यं तष्टेवानपच्युतम्**

अर्थ – तेजोमार्गातील किरणाला जसे सूर्यामध्ये नेऊन ... वावे, त्याप्रमाणे माझ्या सूक्तावलीला मित्रांच्या मालिकेने ... संवर्धित केले आहे. ( माझा ) तो सूक्तसमूह एक प्रकार... संघच आहे. सुतार ( रथाच्या ) अश्वासाठी जशी अ... तुटणारी जुपी तयार करतो, तशीच ही सूक्तमालिका आहे.

त्या सूक्ताबद्दल आपल्याला पाचशे घोडे दान ... मिळाल्याचा याने उल्लेख केला आहे.

**तापत्रय** मानवाला जीवनात नाना प्रकारची शारीरिक, मानसिक दुःखे भोगावी लागतात. परमार्थ... रात अशा दुःखांना ताप असे म्हटले आहे. आध्यात्मिक, आ... भौतिक व आधिदैविक या नावांनी त्या तापांची विभा... केलेली आहे. समर्थ रामदासस्वामींनी या त्रिविध ता... सविस्तर वर्णन केले आहे, ते असे–

**देह इंद्रिय आणि ताप । यांचेनि योगे आपण ।**
**सुख दुःखे सिणे जाण । या नाव आध्यात्मिक ॥**
**देहामधून जें आलें । इंद्रियें प्राणें दुःख जाले ।**
**ते आध्यात्मिक बोलिले । तापत्रईं ।।**

(दास. ३.६.१३-...

चिंता, व्याधी, वृद्धपणीच्या आपदा, शोक, इ. गोष्टी आध्यात्मिक तापात येतात.

चोऱ्या, दरवडे, लुटालूट, आग लागणे, अवर्षण, अति... विद्युत्पात, अपशकून इ. गोष्टी आधिभौतिक तापात येतात.

मरणोत्तर पापी जीवाला ज्या यमयातना भोगाव्या लाग... त्या सर्वांचा समावेश आधिदैविक तापात केलेला आहे.

**तापी** पश्चिम भारतातील एक प्रसिद्ध नदी. ही ... पर्वतात उगम पावते. हिचे उगमस्थान मध्य प्रदे... बैतुलनजिक मूलतापी ( मूलताई ) या नावाचे आहे. हे ...

अत्यंत पवित्र मानले जाते. हिच्या प्रवाहाची लांबी सुमारे साडे-चारशे मैल आहे. प्रारंभीचा दीडशे मैलांचा प्रवाह सातपुड्याच्या डोंगरी भागातून वाहतो. बऱ्हाणपूरच्या पुढे ही खानदेशात प्रवेश करते आणि नंदुरबारच्या पुढे गुजरातेत प्रविष्ट होऊन सुरत जिल्ह्यात समुद्राला मिळते.

ही नदी तपती, ताप्ती, तापिका व तापिनी या नावांनी पुराणांत उल्लेखिलेली आहे. महाभारताच्या आदिपर्वांत तिच्या विषयी लिहिले आहे, ते असे– तापी ही सूर्यकन्या असून, तिचा विवाह संवरण राजाबरोबर झाला होता. कुरुवंशाचा संस्थापक कुरू हा तिचा पुत्र होय. बलरामाने तीर्थयात्राप्रसंगी तापीचे दर्शन घेतले होते.

तीर्थप्रकाश नामक ग्रंथात तापीचा महिमा वर्णन करताना म्हटले आहे, की ' तापीच्या केवळ स्मरणाने सर्व पापांचा नाश होतो व जे हिच्याकाठी देहत्याग करतात, त्यांना सर्वोत्तम गती प्राप्त होते. '

हिच्या काठी १०८ तीर्थे आहेत, असे सांगितले आहे. भुसावळजवळ तापी–पूर्णा संगमावर चांगदेव नावाचे प्रख्यात तीर्थक्षेत्र आहे. धुळ्यापासून २५ मैल अंतरावर असलेले प्रकाशे हे क्षेत्रही तापीच्या काठीच आहे. या गावाच्या पूर्वेस गौतमेश्वराचे मंदिर आहे. इथे व सुरत जिल्ह्यातल्या बहुधान गावी दर बारा वर्षांनी सिंहस्थ यात्रा भरते. याशिवाय धारोलीमध्ये ध्वारेश्वर तीर्थ, मोरा गावात मुक्तेश्वर, बहुधानामध्ये गोमतेश्वर, कमरेजमध्ये कोटेश्वर, खोलवनात क्षिप्रवट, अन्नामा नगरात अंबरीषेश्वर, सुरतजवळ कतरगामात कांतारेश्वर, फुलपाडा गावात गुप्तेश्वर, रामनाथघेला येथे रामेश्वर, नरसाना गावात दरमेश्वर, तापी–समुद्रसंगमापासून जवळच मोरा नामक गावात जरत्कारेश्वर आणि हजीरा गावाजवळचा तापी–सागर संगम, इ. पवित्रस्थाने तापी तीराच्या अनुषंगाने आहेत.

एके काळी मोगलांच्या दक्षिण सुभ्याचे मोठे केंद्र असलेले मध्य प्रदेशातील बऱ्हाणपूर, खानदेशातील व्यापारी केंद्र भुसावळ, धुळे जिल्ह्यातील शिरपूर तालुक्यात असलेला इतिहासप्रसिद्ध थाळनेरचा किल्ला आणि अडीच हजार वर्षांपूर्वीच्या इतिहासस्मृती सांभाळणारे दक्षिण गुजरातेतील रांदेर नगर ही तापीकाठची आणखी काही महत्त्वाची स्थाने आहेत.

तापी नदीचा जन्म आषाढ शु. सप्तमीला झाला, असे तापीमाहात्म्यात म्हटले आहे. प्रतिवर्षी या दिवशी तापीचा जन्मोत्सव साजरा करण्याची प्रथा तापीच्या तीरावरील तीर्थक्षेत्रांत आजही रूढ आहे. या दिवशी तापीच्या तीरावर जल आणि धान्य यांनी भरलेले कुंभ दान केल्याने विशेष पुण्य लाभते, असे मानले जाते. [ म. ज्ञा. को.; पु. इं.; भारती ]

**ताबूत** मुसलमान लोक मृत मनुष्याला दफनभूमीकडे नेण्यासाठी जी शवपेटी किंवा तिरडी वापरतात, तिला ताबूत म्हणतात. सिरिया येथील लढाईत मारला गेलेल्या हुसेनच्या कबरीची प्रतिकृती मुहर्रमच्या सणासाठी करतात, तिलाही ताबूत म्हणतात. पाहा – मुहर्रम. [ डि. इ. ]

**तामस** चौथा मनू व मन्वंतराचा अधिपती. स्वराष्ट्र नावाच्या राजाला उत्पलावतीपासून हा झाला. उत्पलावती मेल्यावर ती हरिणयोनीत जन्मली व स्वराष्ट्राच्या कामुक स्पर्शापासून त्या हरिणीला हा पुत्र झाला (मार्कं. पु. ७१.४६). हा आपल्या मातेला तामसयोनी प्राप्त झाल्यावर झाला म्हणून याला तामस असे म्हणू लागले. तामसाला नर आणि ख्याती असे दोन पुत्र होते (विष्णु पु. ३.१.६).

तामसमनू स्वपराक्रमाने सार्वभौम राजा बनला. याने नर्मदेच्या दक्षिण तीरी महेश्वराची आराधना केली, कामराजकूटाचा जप केला, वसंत व शरद या ऋतूंत नवरात्राची पूजा केली. श्रीविष्णूने गजेंद्रमोक्ष याच्याच मन्वंतरात केला. तामस मन्वंतरात अग्नी, कपी, काव्य, चैत्र, ज्योतिधर्मा, धाता व पृथू हे सप्तर्षी होते; वीर, वैधृती, सत्य, सुधी, सुरूप व हरी हे देवगण होते; शिखी हा इंद्र होता; हरी अर्थात हरिमेध व हरिणी यांचा पुत्र हा अवतार होता. [ प्रा. च. को.; पु. इं. ]

**तामसी माया** एक शक्ती. हिच्या प्रभावाने सर्व जग गडद अंधाराने झाकून टाकता येते, असे स्कंद पुराणाच्या अवंती खंडात सांगितले आहे. पराशर ऋषीने मत्स्यगंधेशी समागम करण्यापूर्वी तामसी मायेचा प्रयोग करूनच ते समग्री द्वीप धुक्याने आच्छादून टाकले होते (म. भा. आदि. ६३.७३). त्याचप्रमाणे रुरू दैत्य देवीशी लढत असता त्यानेही तामसी मायेचा प्रयोग केला होता; पण देवीने त्याची ती माया निरस्त करून त्याला समुद्रात ढकलून दिले, अशीही कथा पुराणांत सांगितली आहे. [प्रा. भा. म.]

**तामिस्र** एक नरक. जो इसम परस्त्रिया, मुले आणि त्यांची मालमत्ता यांचा अपहार करतो, त्याला या नरकात पडावे लागते, असे भागवत (३.३०.२८; ४.६.४५) व विष्णू (३.११.१०४) या पुराणांत सांगितले आहे. [पु. इं.]

**ताम्र** एक धातू. हिंदू व मुसलमान लोक सोन्याप्रमाणेच तांब्यालाही शुद्ध धातू मानतात. ग्रहणकाली तांबे दान देण्याची प्रथा आहे. सर्व पापांचा नाश व्हावा म्हणून ताम्रपात्रदान

करतात. धर्मकार्यात ताम्रमुद्रा आवश्यक मानलेली आहे. त्याचप्रमाणे ती सर्व देवांनाही वाहण्याचा प्रघात आहे. अर्घ्यपात्र, ताम्हन, पळी, पंचपात्री वगैरे उपकरणी प्रामुख्याने तांब्याचीच करतात. मृताच्या और्ध्वदेहिकात व श्राद्धकर्मात वापरायची सर्व भांडी तांब्याचीच असली पाहिजेत, असा नियम आहे. आयुर्वेदातही ताम्रपात्राला बरेच महत्त्व आहे.

## ताम्र-कांस्य-युग

विज्ञानावर आधारलेल्या आधुनिक युग-कल्पनेतील एक कालखंड. अश्मयुगानंतर या युगाचा उदय झाला. अश्मयुगाच्या अखेरीस मानव शेती करू लागला होता. अश्मयुगाच्या या कालखंडाला नवाश्मयुग अशी संज्ञा आहे. नाईल, युफ्राटिस व सिंधू या नद्यांच्या काठी कृषि-प्रधान नवाश्मयुगीन संस्कृती नांदत होती. याच ठिकाणी कुठे तरी दगडाची उपकरणे बनवीत असताना मानवाला कधी वर-वरच्या थरात, तर कधी भूगर्भात तीस-चाळीस फूट खोलीवर एक नवीनच पदार्थ सापडला. इतर पाषाणांप्रमाणे हाही एक निराळा पाषाणच आहे, असे तत्कालीन मानवाला वाटले. त्याने मग त्या पदार्थाची दगडी उपकरणासारखी उपकरणे बनविली. हा नवा पदार्थ म्हणजे तांबे होय. तांबे प्रथम कुठे सापडले, हे निश्चयाने सांगता येत नाही; पण नवाश्मयुगीन मानवाचा दूरदूरच्या प्रदेशांशी व्यापार-व्यवहार चालत असल्यामुळे त्याचा प्रसार मात्र एका प्रदेशातून दुसऱ्या प्रदेशात झपाट्याने झाला, असे दिसते.

या नव्या पाषाणाला अर्थात तांब्याला अग्नीच्या साहाय्याने हवा तो आकार देण्याची कला अवगत झाल्यानंतर मानवी संस्कृतीच्या इतिहासात आश्चर्यकारक बदल घडून आले. मानवी संस्कृतीचा प्रवाह शतमुखांनी आणि अधिक वेगाने वाहू लागला. या गतिमान युगाला ताम्रयुग अशी संज्ञा आहे. सन-पूर्व सुमारे ४५०० ते ४००० या काळात एका खोऱ्यातून दुसऱ्या खोऱ्यात अशी ही ताम्रयुगीन संस्कृती झपाट्याने पसरली, असे दिसून येते.

भारतात व अन्यत्र काही ठिकाणी मानव ज्या गारगोटीच्या पाषाणाचा मोठ्या प्रमाणात वापर करीत असे, त्याच पाषा-णाच्या थरांच्या शिरांमध्ये सोने उपलब्ध होत असे. या वस्तु-स्थितीमुळे ताम्रयुगीन संस्कृतीत सोने प्रारंभापासूनच सर्वत्र आढळते. धातू वितळविण्याची कला हस्तगत झाल्यावर मानवाने निरनिराळे धातू मिसळविण्याचे प्रयत्न केले. सोने व चांदी यांच्या मिश्रणापासून बनविलेला श्वेततार किंवा शुल्ब हा धातू प्राचीन जगात बराच प्रचारात होता. सोन्यात किंचित प्रमाणात तांबे मिसळले म्हणजे सोन्याचे काठिण्य व टिकाऊपण वाढते; तसेच तांब्यात विशिष्ट प्रमाणात कथिल मिसळले, की तांब्याचेही काठिण्य व टिकाऊपण बऱ्याच प्रमाणात वाढते, असे मानवाला आढळून आले. तांबे व कथिल यांच्या मिश्रणापासून जो एक नवा धातू उत्पन्न झाला, तो कांसे होय. या कांशापासून बनविलेली हत्यारे व उपकरणे अधिक उपयुक्त ठरू लागल्यावर तांब्याच्या वस्तूंची जागा कांशाच्या वस्तूंनी घेतली.

तांब्यानंतर कांशाचा शोध फार थोडचा अवधीत लागला आणि कांसे सर्वत्र मोठ्या प्रमाणात प्रचारात आले. त्यामुळे ताम्रयुगानंतर अगदी थोडचाच काळात कांस्ययुग सुरू झाले. कित्येक ठिकाणी तर नवाश्मयुगानंतर ताम्रयुग असे स्वतंत्र युगच सापडत नाही; किंवा ते सापडले, तर फारच थोडा काळ टिकले असे दिसते. सामाजिक व आर्थिक दृष्टचाही ताम्रयुग व कांस्ययुग यात मूलभूत फरक आढळत नाही. त्यामुळे ही दोन्ही युगे स्वतंत्र न मानता ताम्र-कांस्य-युग असे संयुक्त युग मानण्याची संशोधकांची प्रथा आहे.

या नव्या युगात नवाश्मयुगीन दगडी कुदळींची जागा तांब्याच्या फाळांनी घेतली. पुढे हा नांगर चालविण्याकरिता घोडा, रेडा, बैल या पशूंचा वापर सुरू झाला. फाळाप्रमाणे इतर शेतीची अवजारे व संसारोपयोगी अनेक वस्तू तांबे व अन्य धातू यांपासून बनविण्यात येऊ लागल्या. धातूंची उपकरणे बनविणे, शेतीसाठी त्यांचा वापर करणे आणि शेतीला उपयोगी पडणाऱ्या पशूंना काबूत ठेवणे, ही कामे स्त्रियांना झेपणारी नव्हती. त्यामुळे समाजात पुरुषांचे प्राबल्य वाढू लागले. हळूहळू जुनी मातृप्रधान समाज-व्यवस्था मोडून पितृप्रधान व्यवस्था अस्तित्वात आली.

खाणीतून धातू काढणे, त्यांची हत्यारे–अवजारे बनविणे, भांडीकुंडी किंवा दागदागिने तयार करणे, नव्या उपकरणांच्या साहाय्याने सुतारकाम, चांभारकाम, शेती, इ. उद्योग करणे, इ. साऱ्या गोष्टी कोण्या एकाला स्वत: एकटचानेच करणे शक्य नव्हते. त्यामुळे या युगात ही वैशिष्टचपूर्ण कामे करणारे स्वतंत्र वर्ग उत्पन्न झाले. संपत्तीची जसजशी वाढ होत गेली, तसतशी लोकसंख्याही वाढत गेली. नवाश्मयुगातील झोपडचांच्या लहान समूहांची जागा ग्रामांनी घेतली. मातृप्रधान गणांच्या जागी पितृप्रधान गण निर्माण झाले. धनधान्याच्या समृद्धीबरोबर त्याच्या संरक्षणासाठी शस्त्रास्त्रांची व ती वापरण्याच्या कलेची प्रगती होत गेली.

अशी ही नवी व सुधारलेली शस्त्रास्त्रे हाती आल्यावर दुसऱ्याच्या संपत्तीचा अपहार करण्याची प्रवृत्तीही गणप्रमुखांच्या ठिकाणी उत्पन्न झाली. या प्रवृत्तीतून ग्रामराज्ये किंवा गणराज्ये यांचे आपापसात संघर्ष वाढले. या संघर्षात प्रभावी ठरलेल्या

गणांनी हळूहळू आपला विस्तार करीत गणराज्यातून साम्राज्ये निर्माण केली.

ग्रामप्रमुख, गणप्रमुख, राजेरजवाडे, इ. बलिष्ठ सत्ताधीशांनी आपल्या साधनसंपत्तीच्या व शस्त्रास्त्रांच्या जोरावर आपल्या



तांब्याची हत्यारे

स्वतःच्या, आपल्या अनुयायांच्या आणि आपल्या प्रदेशात व्यापार-उदीम करणाऱ्या वर्गाच्या मालमत्तेचे संरक्षण करण्याचे काही नियम केले. व्यापारी वर्गाकडून विक्रीकर, जकातकर, इ. रूपांनी आणि जमीनदारांकडून जमिनीवरील कर, खंडणी, इ. रूपांनी अगणित धन जमा करून हे बडे सत्ताधीश आपली संपत्ती व सामर्थ्य वाढवू लागले. वेठबिगार, लूटमार हेही संपत्ती वाढविण्याचे मार्ग ठरले. अशा प्रकारे या श्रेष्ठांनी आपल्याकडे संपत्तीचा संचय केला. मग त्या संपत्तीच्या व शस्त्रांच्या जोरावर त्यांनी माणसे काही काळाकरिता अथवा कायमची विकत घेण्याची पद्धत सुरू केली. या पद्धतीत विकत घेतलेल्या माणसांची मुलेही धन्याच्या मालकीची ठरू लागली. त्यांतूनच ताम्र-कांस्य-युगात भारताबाहेर गुलामपद्धती निर्माण होऊन तिच्यावर आधारलेली एकतंत्री राज्ये-साम्राज्ये उत्पन्न झाली. याच युगात भारतात दासपद्धती व गणराज्ये उत्पन्न झाली. मात्र भारताबाहेरील गुलामांच्या मानाने भारतातल्या दासांची स्थिती पुष्कळच चांगली राहिली.

ताम्र-कांस्य-युगात जी सामाजिक वैशिष्ट्ये उत्पन्न झाली, त्यांचाच पुढे लोहयुगात विकास झाला. लोहयुगात कोणतेही क्रांतिकारक परिवर्तन घडले नाही, असे दिसून येते.

भारतात ताम्रयुगाची परिणती कांस्ययुगात फार लवकर घडून आली व कांस्ययुगाची प्रगतीही झपाट्याने झाली. सिंधू नदी व तिला पूर्वेकडून व पश्चिमेकडून मिळणाऱ्या नद्या यांच्या खोऱ्यात आढळणारी सुप्रसिद्ध सिंधु-संस्कृती हीच कांस्ययुगीन भारतीय संस्कृती होय. हडाप्पा व मोहेंजोदडो येथील उत्खननात वेणीत घालायचे आकडे, नर्तकीची मूर्ती, खेळण्यातली गाडी, दौत, चक्र, काठीची मूठ, इ. अनेक कांशाच्या वस्तू सापडल्या आहेत. या ठिकाणी सापडलेल्या वस्तू आणि वास्तू पाहता भारतात ताम्र-कांस्य-युगात संस्कृतीची विशेष प्रगती झाली होती, असे दिसून येते. या संस्कृतीचे अवशेष उ. भारतात अनेक ठिकाणी सापडले आहेत. द. भारतात मात्र ताम्र-कांस्य-युगीन संस्कृतीचे अवशेष अगदी तुरळकच आढळतात. उ. भारताच्या सुपीक मैदानी प्रदेशातच या संस्कृतीचा विकास झाला असला पाहिजे. पाहा– कांस्यकला; सिंधुसंस्कृती.
[प्रा. भा. सं.; वे. ए.– हि. क. इं. पी.]

**ताम्रदीक्षा** उपनयनासारखा एक संस्कार. हा बंगालमधील रामाई पंडिताच्या वंशापुरताच मर्यादित आहे. बारा ते पंधरा या वयोमर्यादेत मुलाचा हा संस्कार करतात. प्रथम मुलाचे मुंडन करून मग गणेशपूजा, घटस्थापना, आभ्युदयिक श्राद्ध व पंचशतहोम ही कृत्ये करतात. एवढे झाल्यावर तो बटू ब्राह्मण सदृश होतो. मग त्याला बंगालमधील छत्तीस प्रकारच्या नीच जातींचे पौरोहित्य करण्याचा आणि धर्मदेवतेची पूजा करण्याचा अधिकार प्राप्त होतो. पाहा– धर्मठाकूर.

**ताम्रपट** ज्यावर लेख कोरलेला आहे, असा तांब्याचा पत्रा. भारतात कोरीव लेखांसाठी तांबे हा धातू प्राचीन काळापासून सर्वांत अधिक वापरलेला दिसतो. कोरीव ताम्रलेखांना ताम्र, ताम्रपट, ताम्रपत्र, ताम्रशासन अशी नावे असून, त्यांचे आकार दोन ते पाच चौरस फुटांपर्यंत निरनिराळे आढळतात. ताम्रपटांवर सामान्यतः राजाज्ञा आणि दानपत्रे कोरून ठेवण्याची प्रथा होती. परंतु क्वचित यंत्रे आणि मोठमोठे ग्रंथही तांब्याच्या पत्र्यांवर कोरलेले आढळतात. बौद्धांचे काही धर्मग्रंथ, तसेच सायणभाष्यही ताम्रपटांवर कोरलेले होते, असे सांगतात. मौर्यकाळात राजाज्ञा ताम्रलिखित करण्याची प्रथा होती, हे सोहगौरा (जि. गोरखपूर) येथील ताम्रपत्रावरून स्पष्ट होते.

ताम्रलेख जसे एकपत्री असतात, तसेच बहुपत्रीही असतात. पत्रांची संख्या कोरायच्या मजकुराच्या कमीअधिक प्रमाणावर अवलंबून असते. इ. स. ७४० मधील पल्लववंशी नंदिवर्मा

याचा लेख अकरा पत्रांचा आहे. लंडन विद्यापीठाच्या संग्रहात ठेवलेला राजराजेंद्र चोळाचा एक ताम्रपट एकवीस पत्रांचा आहे. पत्रसंख्या एकाहून अधिक असल्यास त्यांतून एक तांब्याची कडी ओवीत असत आणि त्या कडीवर अधिकृतिदर्शक राजमुद्रा उमटविलेली असे. या राजमुद्रेवर त्या त्या राजवटीचे चिन्ह किंवा लांछन (उदा. सिंह, व्याघ्र, गरुड, वृषभ, इ.) असे. कधी कधी लेखाचा अधिकृतपणा राजांच्या स्वाक्षरीने, परंतु 'स्वहस्तम्' असा शब्द कोरून दर्शविला जाई. क्वचित मुद्रेऐवजी लांछनदर्शक मूर्ती करून ती कडीवर बसविण्यात येत असे. इ. स. १२७२ मधील पैठण-ताम्रपटाच्या कडीवर अशा प्रकारची गरुडमूर्ती आहे. या ताम्रपटाचे वजन ३५ शेरांहून अधिक आहे.

बहुतेक सर्व ताम्रपट दानपत्रांच्या स्वरूपाचे असून, स्मारकपर ताम्रपटांची संख्या फार थोडी आहे. ताम्रपटांचे स्वरूप हे असे असल्यामुळेच ते व्यक्तींच्या खासगी संग्रहात उपलब्ध होतात. शिवाय ते स्वरूपतःच जंगम असल्यामुळे त्यांचे स्थलांतरही होऊ शकते. अर्थातच ताम्रपट ज्या स्थानी मिळाला, त्या स्थानी तो ताम्रपट देणाऱ्या राजाची राजवट होती, असे निश्चयाने म्हणता येत नाही. कधी कधी एखादा ताम्रपट, त्याचा ज्या गावाशी यत्किंचितही संबंध नाही, अशा गावीही सापडतो.

ताम्रलेख बहुधा तीक्ष्ण शस्त्राने कोरलेला असतो. परंतु क्वचित ताम्रपटावर शाईने लिहिलेला लेखही आढळतो. भोजराज शिलाहाराने शके ११११३ मध्ये गोविंदभट्ट पटवर्धन यांना दिलेल्या ताम्रपटाची, तीन सुटचा ताम्रपत्रांवर लाखेच्या शाईने लिहिलेली एक प्रतिकृती राजापूर (जि. रत्नागिरी) येथे आहे.

प्राचीन इतिहासाची विश्वसनीय साधने म्हणून ताम्रपटांचे महत्त्व विशेष आहे. [प्रा. म. को. ले.; सु. वि. को.]

**ताम्रपर्णी** द. भारतातील एक नदी. ही नदी मद्रास राज्यातील तिनेवेल्ली जिल्ह्यातून वाहते. ही पश्चिम घाटात अगस्त्यमलै नावाच्या शिखराजवळून निघाली आहे. पापनाशनम् आणि वनतीर्थ ही हिच्या प्रवाहातील प्रमुख तीर्थे होत. ही मानारच्या आखातात समुद्राला मिळते. हिला बांधलेल्या बंधाऱ्यामुळे एक लाख एकर जमिनीला पाणी मिळते. या नदीचे खोरे अत्यंत सुपीक आहे.

प्राचीन संस्कृत ग्रंथांत आणि पुराणांत या नदीविषयीचे अनेक उल्लेख आढळतात. ही मलय पर्वतात उगम पावून चंदनवृक्षांच्या प्रदेशातून वाहत जाते, असा भागवत पुराणात उल्लेख आहे. सागराशी हिचा जिथे संगम होतो, तिथे शंख, शिंपले आणि मोती उत्पन्न होतात, ही वायू पुराणातली माहिती वस्तुस्थितिनिदर्शक आहे. हिच्या मुखाजवळ असलेल्या कोरकै गावातील तिघा भावांनी चोळ, चेर आणि पांड्य ही तमिळनाडमधील तीन प्राचीन राज्ये स्थापली, अशी आख्यायिका आहे. सीतेच्या शोधासाठी वानरांना लंकेकडे पाठवताना रामाने त्यांना जो दक्षिणेचा मार्ग सांगितला, त्या मार्गातील विशेष गोष्टींच्या वर्णनात वाल्मीकीने ताम्रपर्णीचे वर्णन केले आहे, ते असे–

ततस्तेनाभ्यनुज्ञाताः प्रसन्नेन महात्मना ।
ताम्रपर्णीं ग्राहजुष्टां तरिष्यथ महानदीम् ।।
सा चन्दनवनैश्चित्रैः प्रच्छन्नद्वीपशालिनी ।
कान्तेव युवती कान्तं समुद्रमवगाहते ।।

अर्थ – (हे वानरांनो,) नंतर तुम्ही (मलयपर्वतावर राहणाऱ्या) त्या महात्म्याचा (अगस्त्याचा) निरोप घेऊन ताम्रपर्णी नामक महानदी तरून जाल. ही नदी जलचरांचे निवासस्थान असून, तिच्यातली द्वीपे चंदनवनांनी आच्छादिलेली आहेत. समुद्राला मिळणारी ही ताम्रपर्णी नदी सुंदर वस्त्र लेऊन पतीला भेटणाऱ्या युवतीप्रमाणे दिसते.

ताम्रपर्णीच्या पावित्र्याचा महिमा अनेक पुराणांनी गायिला आहे. [सु. वि. को.; पु. इं.; मदुरा गॅझे.]

**ताम्रलिप्ती** एक प्राचीन नगर. सांप्रत याला तामलुक असे म्हणतात. हे बंगालमधील मिदनापूर जिल्ह्याच्या पूर्वभागात रूपनारायण आणि हुगळी या नद्यांच्या संगमापासून बारा मैल अंतरावर आहे. हे नगर कपिशा नदीच्या काठावर वसले आहे, असे कालिदासाने रघुवंशात म्हटले आहे (४.३८). कपिशा म्हणजे मिदनापूर जिल्ह्यातली सध्याची कसै नदी होय, असे पार्जिटरचे मत आहे. मौर्य वंशाच्या साम्राज्यात ताम्रलिप्तीचा समावेश झालेला होता. इथे बिंदुवासिनी देवीचे मंदिर असल्याचा उल्लेख दंडीच्या दशकुमारचरितात आहे. फाहियान आणि युआन च्वांग यांनी या नगराला भेट दिली होती. युआन च्वांग ताम्रलिप्ती बंदरातूनच जलमार्गे लंकेला गेला. इथे १० बौद्ध मठ आणि १००० बौद्ध भिक्षु असल्याची नोंद त्याने करून ठेवली आहे. इत्सिंगने इथल्या वराह नामक बौद्ध मठात काही काल निवास केला होता.

पुराणकाळी ताम्रलिप्ती अथवा दमलिप्ती ही मयूरध्वज आणि त्याचा पुत्र ताम्रध्वज यांची राजधानी होती. इथेच त्यांचे कृष्णार्जुनांशी युद्ध झाले, अशी पुराणकथा आहे. कथासरित्सागरात एक बंदर म्हणून ताम्रलिप्तीचा उल्लेख आढळतो. इ. स. च्या चौथ्या शतकापासून बाराव्या शतकापर्यंत हे स्थान मोठे व्यापारी केंद्र होते. ब्रह्म पुराणात उल्लेखिलेल्या

वर्गभीमा नामक देवीचे मंदिर इथे आजही अस्तित्वात आहे. पूर्वी तिथे एक विहार होता. जैनांच्या प्रज्ञापना नामक धर्मग्रंथात ताम्रलिप्तीचा उल्लेख आहे. अशोकाने लंकेमध्ये पाठविलेल्या बौद्ध प्रचारकांनी आपल्या प्रवासाचे प्रस्थान इथूनच ठेवल्याचे सांगतात.

अशोकाने बांधलेला २०० फूट उंचीचा स्तंभ इथे होता. इ. स. १९४० मध्ये पुरातत्त्वविभागाने इथे उत्खनन केले. त्या उत्खननात काही चमत्कारिक आकाराची मातीची मांडी आणि अन्य प्राचीन वस्तू सापडल्या आहेत. या उत्खनित वस्तूंच्या निरीक्षणातून संशोधकांनी असा निष्कर्ष काढला आहे, की प्राचीन काळी ताम्रलिप्तीचा इजिप्तशी व्यापारी संबंध होता.

समतल भूमी, सुंदर वृक्षवेलींनी आल्हादक बनलेली उपवने, निर्मळ जलाशय आणि वैभवशाली भवने यांमुळे हे नगर प्रवाशांचे, व्यापाऱ्यांचे व धर्म प्रचारकांचे आकर्षण बनून राहिले होते, असे उल्लेख मिळतात. ताम्रलिप्ती या नावाचे एक विशाल जनपदही होते, असे कळते.

हे स्थान एक शक्तिपीठही आहे. इथे सतीचे डावे अंग गळून पडले होते, असे सांगितले आहे. इथे रूपनारायण नदीच्या काठावर देवीचे मंदिर असून, मंदिरात शिवाच्या वामांकावर वसलेली देवीची मूर्ती आहे. मंदिराभोवती साठ फूट उंचीचा तट असून, आवारात केलिकदंब नावाचा एक पवित्र वृक्ष आहे. त्या वृक्षाच्या दर्शनाने निपुत्रिकांना पुत्रप्राप्ती होते, अशी समजूत आहे. [ हि. जॉ. ए. इं.; म. ज्ञा. को.; कल्याण—तीर्थांक ]

**ताम्रेश्वरी** आसामातील एक देवी. या देवीचे स्थान आसामच्या ईशान्य सीमेवर आहे. मंगोलांच्या चुटिया नामक टोळीतले व त्यांचे संबंधी लोक या देवीची उपासना करतात. जुन्या काळी या देवीला वर्षातून एकदा विधिपूर्वक नरबली दिला जात असे. त्यामुळे स्थानिक लोक तिला 'केचाइ खाती' (कच्चे मांस खाणारी) या नावाने ओळखतात. या देवीच्या मंदिराचे छत तांब्याच्या पत्र्याने मढविलेले असल्यामुळे तिला ताम्रेश्वरी हे नाव पडले असावे. हिच्या पूजेची व्यवस्था ज्या डोंगरी लोकांकडे असे, त्यांना देवरी किंवा दउरी असे म्हणत. सध्या हे मंदिर भग्नावस्थेत आहे. [ लौ. नी. ]

**तायुमानवर** (इ. स. चे अठरावे शतक) एक सुप्रसिद्ध तमिळ संत. तंजाऊर जिल्ह्यातील वेदारण्यम् हे याचे मूळ गाव होय. याच्या पित्याचे नाव केडिलियप्प पिळ्ळै असे होते. केडिलियप्पाने आपला पहिला पुत्र थोरल्या भावाला दत्तक दिला होता आणि दुसरा पुत्र लाभावा, म्हणून तो तायुमानवराची (शिवाची) उपासना करीत होता. पुढे तायुमानवराच्या कृपाप्रसादाने त्याला जो मुलगा झाला, त्याचे नाव त्याने तायुमानवर असेच ठेवले. पित्याच्या सहवासात या मुलाला बालपणापासूनच शिवभक्तीचा छंद जडला.

तिरुचिरापल्लीचा नायक राजा विजयरघुनाथ चिक्कलिंगम याच्या पदरी केडिलियप्पा हा नोकरी करीत होता. त्याच्या मृत्यूनंतर राजाने तायुमानवराला त्याच्या जागी नेमले. परंतु काही केल्या त्याचे मन राजकारणात रमेना. एके दिवशी तो नित्याप्रमाणे मंदिरात शिवदर्शनासाठी गेला असता, त्याला मौनगुरुस्वामी नामक एका साधूचे दर्शन घडले. तायुमानवराने त्याच्याकडे गुरूपदेशाची याचना केली. परंतु त्याने सांगितले, की 'तू काही काळ राजसेवा कर आणि गृहस्थाश्रमाचाही स्वीकार कर. मी यात्रेहून परत आल्यावर तुला उपदेश देईन.' तायुमानवराने गुर्वाज्ञेचा मान राखण्यासाठी आपली राजसेवा चालू ठेवली.

काही काळाने राजा मरण पावला. राजाला मूलबाळ नव्हते. राणी मीनाक्षीने तायुमानवराबरोबर पुनर्विवाह करण्याची इच्छा प्रदर्शित केली. परंतु त्याने राणीच्या या इच्छेला प्रतिसाद न देता राजधानी सोडून रामेश्वराकडे प्रयाण केले. पुढे हे वृत्त तायुमानवराच्या थोरल्या भावाला समजताच त्याने तायुमानवराला राणीशी विवाह करण्यास प्रवृत्त केले. त्याने भावाच्या आदेशानुसार राणीशी विवाह केला. या मीनाक्षी राणीच्या पोटी त्याला जो मुलगा झाला, त्याचे नाव कनकसभापती असे ठेवण्यात आले.

पुढे मौनगुरुस्वामी यात्रेहून परतल्यानंतर तायुमानवराकडे आला आणि त्याने त्याला आत्मज्ञानाचा उपदेश करून संन्यासदीक्षा दिली. संन्यास घेतल्यावर तायुमानवर पूर्णपणे शिवभक्तीत रंगून गेला. त्याची भक्तिभावना त्याच्या अनेक भक्तिगीतांतून ओसंडून वाहू लागली. तायुमानवराने शिवभक्तिपर अशी जी अनेक गीते लिहिली, त्यांतले एक गीत असे —

किळि विडुतुदु !
आरुम् आरियामल् एन्नै अन्तरङ्गमाहवन्दु
शेरुम् पडिइरै कूकुच् चेप्पि वा पैङ्गिळिये.
ऊरुम् इलार् पेरुम् इलार् उरार् पेरारुडने
आसम् इलार् एन्ने आरिवारो पैङ्गिळिये
कान्तम् इरुम्बैकू केवरन्दु इलुत्ताल् एन्न अरुळ्
वेन्दन् एमै इलुत्तु मेवुवनो पैङ्गिळिये
शोल् इरन्दु निन्र शुकरूपम् पेम्मानै
अल्लुम् पहलुम् विण उरङ्गुम् मरुंउळ एलाम् उरङ्गुम्
कण् उरङ्गेन एम् इरेवर् कावलाल् पैङ्गिळिये

उळ्ळत्तिन् उळ्ळे ओळित्तिरन्दु एन् कळ्ळम् एल्लाम्
वळ्ळल् अरिन्दाल एनक्कु वायुम् उण्डो पैंङ्गिळिये
कळ्ळत् तलैवत अवर् कैकाट्टिप् पेशामल्
उळ्ळत्तिळ् वन्द उपायम् एन्नो पैंङ्गिळिये

अर्थ – हे नाजूक पोपटा, तुझ्या वेगवान पंखांच्या बळावर उडून व प्राणनाथाकडे जाऊन तू माझा गुप्त संदेश त्याच्या कानात सांगशील का ? माझ्या संकेतस्थळी यायला त्याला सांगशील का ? तो अनामिक माझ्यासारख्या एकाकी व्यक्तीला ओळखील का ? ज्याप्रमाणे लोहचुंबक लोखंडाला आकर्षून घेतो, त्याप्रमाणे तो कृपाळू राजपुत्र मला आपल्या प्रिय हृदयाशी धरील का ? जो शब्दांची बंधने तोडून मुक्त होतो, त्या माझ्या प्रियकराला मी कायम माझ्या हृदयाशी आवळून धरू का ? भूलोक व स्वर्लोक हे शांत व मधुर निद्रेत गुरफटलेले आहेत. पण प्रेमाने विद्ध झाल्यामुळे मला झोप येत नाही. माझे नेत्र दुःखाने व्याकूळ होत आहेत. माझा प्राणनाथ अदृश्यपणे माझ्या आत्म्याच्या सर्व कपटी कृती पाहत आहे; त्यामुळे त्याच्या समोर जाण्याचा मला धीर होत नाही. माझा जीवितेश्वर म्हणजे चोरांचा राजाच आहे. तो काही न बोलता, न कळू देता माझ्या आत्म्यात प्रवेश करतो. त्याची गुप्त कारस्थाने तुला माहीत आहेत का? माहीत असली तर, हे कोमल विहंगा, मला सांग.

प्रस्तुत गीतात कवीने विरहिणीची भूमिका घेतली आहे. तायुमानवराच्या भाषेत संस्कृतप्रचुरता असली, तरी आत्मानुभूतीच्या प्रकर्षामुळे त्याची गीते मधुर आणि प्रसादपूर्ण झाली आहेत. [ त. उ. सा.; शी. त. म्यू.; त. सा. सं. ]

## तारक

(१) एक मंत्र. याला तारकब्रह्म असेही नाव आहे. ॐ हे ब्रह्माचे प्रतीक मानलेले असून त्यालाच तारकमंत्र म्हटले आहे (तै. उ. १.१.८; गीता ८.१३). पद्म पुराणाच्या उत्तरखंडात 'ॐ रामायनमः' किंवा 'ॐ श्रीरामरामराम' हे दोन तारकमंत्र म्हणून दिले आहेत. तारसारोपनिषदांत 'ॐ नमो नारायणाय' असा तारकमंत्र सांगितला आहे. या मंत्रांचा जप केल्याने सर्व दुःखांचा परिहार होऊन पापी माणसालाही मुक्ती मिळते असे सांगितले आहे. [श. क.; हि. ध.]

(२) ओंकाराच्या चार मात्रा, बिंदू व कला मिळून तारक नावाचे तत्त्व होते. या तारकाच्या साहाय्याने आळविली असता देवता त्वरित प्रसन्न होते. हाही एक तंत्राचाच माग आहे.

## तारक द्वादशी

एक व्रत. हे मार्गशीर्ष शु. द्वादशीला सुरू होऊन वर्षभर चालते. हे व्रत सूर्य आणि ग्रह यांच्या प्रीत्यर्थ असते. व्रत सुरू झाल्यानंतर प्रत्येक महिन्यात विविध प्रकारच्या अन्नभोगांनी ब्राह्मणांना संतुष्ट करतात आणि ग्रहांना अर्घ्य देतात. फल – पापनाश. [ हि. ध. ]

## तारंगा

एक प्राचीन जैन क्षेत्र. गुजरात राज्याच्या महीकांठा जिल्ह्यातील तारंगाहिल नामक रेल्वेस्टेशनापासून तीन मैल अंतरावरच्या एका डोंगरावर हे स्थान आहे. इथून वरदत्तादी साडेतीन कोटी मुनी मुक्तीला गेले, असे सांगितले आहे. इथे दिगंबर व श्वेतांबर या दोन्ही पंथांची अनेक मंदिरे व घुमटचा आहेत. [ जैनधर्म – पं. कैलाशचंद्र शास्त्री, १९५५ ]

## तारणपंथ

एक जैन पंथ. पाहा – तारणस्वामी.

## तारणस्वामी

(१४४८ – १५१५ इ. स.) एक जैन आचार्य आणि सुधारक. याच्या वडिलांचे नाव गढा साव असे होते. याचा जन्म पुष्पावती नगरीत झाला व शिक्षण श्रुताचार्य मुनीजवळ झाले. तारणस्वामी हा अध्यात्मवादी आणि योगाभ्यासी होता. बाह्य कर्मकांडावर त्याचा मुळीच विश्वास नव्हता. तो आपल्या मताचे प्रतिपादन पुढीलप्रमाणे करीत असे-

जर हृदयात पवित्र भावना नसेल, तर जड मूर्तींच्या पूजे काय लाभ होणार ? वास्तविक आत्मा हेच सर्वस्व आहे. ज आम्ही त्याला योग्य बनविले, तर तोच परमात्मा आहे, अ आपल्या प्रत्ययास येईल.

तारणस्वामीने या विचारांचा प्रचार सुरू करताच सनातन कर्मठ जैनांनी त्याला कडाडून विरोध केला.

तारणस्वामी मल्हारगडाजवळ बेतवा नदीच्या काठच्या जंग लात राहत असे. बेतवा नदीवर नावेतून माणसांची ने–आण कर णारा चिदानंद चौधरी नामक एक नावाडी कधी कधी तारण स्वामीलाही आपल्या नावेतून ऐल–पैल तीरावर पोचवीत असे एके दिवशी तारणस्वामीच्या विरोधकांनी चिदानंदाला फितवि आणि तारणस्वामीला नदीत बुडवण्यास सांगितले. त्याने त तीन वेळा प्रयत्न केला; परंतु प्रत्येक वेळी तारणस्वामी जमिनी वर उभा राहिल्याप्रमाणे नदीत उभा राहिला, अशी आख्यायि सांगतात.

हा चमत्कार पाहून चिदानंद नावाडी तारणस्वामीला शरण आला आणि त्याचा शिष्य बनला. त्याचे माहात्म्य जसजसे प्रत्ययाला येऊ लागले, तसतसा विरोधकांचा विरोध मावळ आणि हजारो लोक त्याचे अनुयायी बनले. आपल्या हयाती त्याने ५५३५१९ लोकांना दीक्षा दिली. या शिष्यांत चिदानं चौधरी, लक्ष्मण पांडे, परमानंद विलासी, सुल्य शाह तेली आणि लुंकमान शाह हे प्रमुख होते. हिंदू आणि मुसलमान हे दोघे

समाज तारणस्वामीला पूज्य मानीत असत, असे म्हणतात.

तारणस्वामीने अपभ्रंश भाषेत श्रावकाचार, मालाजी, पंडितपूजा, कमलबत्तीसी, न्यायसमुच्चयसार, उपदेशशुद्धसार, त्रिभंगीसार, ममलपाहू, सुन्नस्वभाव, सिद्धस्वभाव, छद्मस्थ वाणी, नाममाला, इ. पंधरा ग्रंथ लिहिले आहेत. या सर्व ग्रंथांत अध्यात्माचे आणि जैन सिद्धान्तांचे सुंदर विवेचन आहे.

तारणस्वामीचे निर्वाण मल्हारगड येथे झाले. त्याच्या निर्वाणाच्या वेळी तिथे पाच हजार शिष्य जमले होते. त्यांना अखेरचा धर्मोपदेश करून स्वामीने देहत्याग केला.

तारणपंथ – तारणस्वामीचे अनुयायी त्याच्या निर्वाणानंतर आपणास तारणपंथी म्हणवून घेऊ लागले. या पंथाला मानणाऱ्या सहा जैन जाती आहेत, त्या अशा– चरणागर, समैया, असेठी, अयोध्यावासी, गोलापूरब आणि दोसके. या जाती सांप्रत जवळजवळ एकरूप झाल्या आहेत. त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार सर्रास होतो.

तारणपंथियांची संख्या सुमारे दहा हजार आहे. त्यांची वस्ती प्रामुख्याने मध्य प्रदेशात आहे. हे लोक मूर्तिपूजेचे विरोधक आहेत. यांची चैत्यालये असतात; परंतु त्यांत मूर्तीऐवजी तारणस्वामीने लिहिलेल्या शास्त्रग्रंथांची पूजा होते. मल्हारगड, सेमरखेडी आणि सूखानितई ही तारणस्वामीच्या निवासाने पुनीत झालेली स्थाने तारणपंथियांची तीर्थक्षेत्रे ठरली आहेत. [जै. सि. भा., जानेवारी १९४७, जानेवारी १९४८; जै. ध.]

**तारपे-नृत्य** तारपे हे वारली लोकांचे एक वाद्य आहे. सुकलेला लांबट दुध्या भोपळा, बांबूच्या दोन नळ्या आणि ताडाची पाने यांच्या साहाय्याने हे वाद्य बनवतात. ते गारुड्याच्या पुंगीसारखे दिसते. या तारप्याच्या सुरावर वारली लोक दिवाळीत नृत्य करतात. यात स्त्री–पुरुष दोघेही भाग घेतात आणि फेर धरून नाचतात. तारपे वाजवणाऱ्याने सूर बदलले, की नृत्याचा प्रकारही बदलतो. कित्येकदा या नृत्याच्या निमित्ताने एकत्र येणाऱ्या मुला–मुलींची पुढे लग्नेही जमतात.

**तारसारोपनिषद** एक नव्य उपनिषद. हे शुक्ल यजुर्वेदाचे आहे. याचे तीन पाद असून, त्यांत भगवान विष्णूच्या रामावतारासंबंधी काही मंत्र दिलेले आहेत. जनकाच्या दरबारातील पंडितांना वादविवादात हरविल्यावर याज्ञवल्क्य ऋषीने जनकाला परब्रह्मविद्या सांगितली, तो विषय यात आला आहे.

कुरुक्षेत्र हे देवांचे देवघर व भूतमात्राचे ब्रह्मसदन आहे. कुरुक्षेत्र म्हणजे अक्षय परब्रह्म होय. त्याचे ज्ञान झाल्यावर पुनर्जन्म नाही. प्राण्याच्या मृत्यूनंतर रुद्रदेव त्याला तिथेच तारकब्रह्माचे ज्ञान उपदेशितो व त्यामुळे प्राणी मुक्त होतो, असे पहिल्या पादातच सांगितले असून, पुढे तारकमंत्राचे वर्णन आहे.

दुसऱ्या पादाच्या प्रारंभी अ, उ, म, बिंदू, नाद, कला, कलातीत व कलातीतपर अशी प्रणवाची चार सूक्ष्म व चार स्थूल रूपे सांगितली आहेत. या आठ रूपांशी ब्रह्मा (जांबवान), उपेंद्र (हरिनायक), शिव (हनुमान), ईश्वर (शत्रुघ्न), शंख (महाप्रभू भरत), कलापुरुष (लक्ष्मण), कलातीता (सीता) व कलातीतपर (श्रीराम पुरुषोत्तम) या देवता अनुक्रमे संबंधित आहेत.

तिसऱ्या पादात याज्ञवल्क्याने परमात्मा ज्या मंत्रांनी संतुष्ट होतो, ते मंत्र सांगितले असून, ते प्रणवतत्त्वाचे प्रतिपादक आहेत. त्यांत श्रीराम म्हणजेच विष्णू व तोच परब्रह्म, असा तिघांचा अभेद सांगितला आहे. [श्री. सी. ग. देसाई]

**तारा** बौद्धांची एक तांत्रिक देवता. तॄ – तर् = तरणे या धातूवरून हा शब्द बनला आहे. संसारसागर तरून जायला मदत करणारी देवता, ती तारा होय. इ. स. च्या सहाव्या शतकात तारेची बौद्ध धर्मात देवतांच्या मालिकेत स्थापना झाली. प्रज्ञा किंवा प्रज्ञापारमिता या नावाने संबोधून तिला सर्व बुद्धांच्या मातृपदी बसवण्यात आले. अवलोकितेश्वराची सहचरी आणि मैत्री व करुणा यांची साक्षात मूर्ती असे तिचे वर्णन केलेले आहे. हिंदू तंत्रशास्त्रातील शिव व शक्ती या द्वंद्वाशी जुळणारी अशी ही तारा–अवलोकितेश्वर या द्वंद्वाची कल्पना आहे.

इ. स. च्या बाराव्या शतकापर्यंत तिची लोकप्रियता सारखी वाढत गेली. तिची कित्येक मंदिरेही निर्माण झाली. उ. भारतात त्या काळी तारेची मूर्ती नाही, असे घरच नव्हते. हा तिकडील जनतेवरचा बौद्ध तांत्रिक प्रभाव होता.

अमिताभ या ध्यानी बुद्धाच्या नेत्रातून जो निळा किरण निघाला, त्यातून तारा उत्पन्न झाली, असे समजतात. तारेच्या इतरही अनेक उत्पत्तिकथा प्रचलित आहेत. पाच रंगांच्या पाच तारा या पाच ध्यानी बुद्धांच्या शक्ती मानलेल्या आहेत. तारांची संख्या १०८ आहे. तिबेटात त्यांचे माहात्म्य विशेष आहे. किंबहुना तारेची कल्पना मुख्यत्वे तिबेटीच आहे. तिथून ती बौद्ध व हिंदू तंत्रांत प्रविष्ट झाली. सर्व तारांच्या चित्रांचा संग्रह तिबेटात झालेला आहे. तारा या बहुतकरून बसलेल्या स्थितीत चितारतात. अवलोकितेश्वराबरोबर असतात, तेव्हा मात्र त्या उभ्या दाखवतात.

पाच रंगांच्या पाच तारांचे अनेक प्रकार आहेत. खदिरवनी,

वश्यतारा, आर्यंतारा, महत्तरी, वरद, दुर्गोत्तारिणी, धनद, जांगुली व पर्णशवरी हे हरित तारेचे प्रकार; अष्टमहाभय,



तारेची पाषाणमूर्ती– तिबेट

मृत्युवंचना, चतुर्भुज, षड्भुज, विश्वमाता, कुरुकुल्ला व जांगुली हे गौर तारेचे प्रकार; वज्र, जांगुली, पर्णशवरी, भ्रुकुटी व प्रसन्नतारा हे पीत तारेचे प्रकार; आणि एकजटा व महाचीन हे नील तारेचे प्रकार होत. कुरुकुल्ला ही रक्ततारा आहे. तारा ही उजव्या हाताची वरदमुद्रा दाखवते आणि डाव्या हातात कमल धारण करते.

बौद्ध तांत्रिकांनी तिची अनेक वर्णांची अनेक उग्र व सौम्य रूपे कल्पिली असून, विविध उद्देशांसाठी त्यांची उपासना रूढ केली आहे.

महाप्रत्यंगिराधारिणी या ग्रंथात तारेचा प्रथम उल्लेख येतो. तिथे तिचे वर्णन श्वेतवर्णा, उदात्तमुखी, वज्रमालाधरा व वज्रहस्ता असे दिलेले आहे. पुढे तंत्रसाहित्यात तारा ही पूजेतील अग्रदेवता मानली गेली. व्याधिग्रस्त लोकांनी आपल्या व्याधीचा परिहार व्हावा, म्हणून प्रामुख्याने तारेचे पूजन करावे, असे मंजुश्रीमूलकल्प या ग्रंथात सांगितले आहे. त्या ग्रंथात भृकुटी, लोचना, मामिका, श्वेता, पांढरवासिनी व सुतारा अशी तिची निरनिराळी नावे दिली आहेत व त्यांचे महामुद्रा म्हणून वर्णन केले आहे. तारा ही करुणामयी असून, सर्व प्राण्यांच्या दुःखांचा परिहार करणारी आहे; तसेच तिचे कार्यक्षेत्र विशेषतः भारताचा पूर्वभाग हे असले, तरी तिचा संचार सर्व जगभर असतो, असेही तिथे म्हटले आहे.

तारा ही तांत्रिकांच्या दश महाविद्यांपैकी एक आहे. महाकालकृत कर्पूरतारिणीस्तोत्रात या तारेचे ध्यान पुढीलप्रमाणे दिले आहे.––

**शवासीना कण्ठाकलितनृकरोटीपरिलसत्**
**कपालासिश्यामोत्पलरुचिरकर्त्रीं त्रिनयनाम् ।**
**नवाम्भोदश्यामां प्रकटरदभीमां पृथुकुचां**
**सदैव त्वां ध्यायन् जननि च जडो वाक्पतिसमः ॥**

अर्थ– प्रेतावर बसलेल्या, गळ्यात नररुंडांची माळा घातलेल्या, कपाल, खड्ग, नील कमल व सुंदर कात्री या वस्तू धारण करणाऱ्या, त्रिनेत्र, नवीन मेघाप्रमाणे श्यामवर्ण, बाहेर आलेल्या दातांमुळे भयंकर दिसणाऱ्या व मोठे स्तन असणाऱ्या, अशा तुझे नेहमी ध्यान करणारा मनुष्य मतिमंद असला, तरी बृहस्पतीप्रमाणे (वक्ता) होईल.

तारेच्या मस्तकावर मुकुटाच्या जागी पाच मुंडांची माला असते. ती पाच मुंडे पंचब्रह्म, पंचप्रेत व पंचरुद्र यांची प्रतीके मानलेली आहेत.

**तारामंत्र–** तारेचे काही मंत्र आहेत, ते पुढीलप्रमाणे– (१) ओं तारे तुत्तारे तुरे स्वाहा । (२) ह्रीं स्त्रीं हुँ फट् । (३) ओम् ह्रीं स्त्रीं हुँ फट् । (४) श्रीं ह्रीं स्त्रीं हुँ फट् ।

साधकाने यांपैकी कोणत्याही मंत्राची आपल्या इच्छेनुसार साधना करावी, असे सांगितले आहे. विशेषतः संपत्ती, पांडित्य, कीर्ती व पुत्रपौत्र यांच्या प्राप्तीसाठी साधक तारामंत्राची साधना करतात.

मंत्रजपासाठी स्मशान, ओसाड घर, निर्जन स्थळी असणारे देवालय किंवा घनदाट अरण्यातील एखादी जागा पसंत करतात. तिथे युद्धात शत्रूने मारलेल्या एखाद्या माणसाच्या प्रेतावर किंवा सहा महिन्यांच्या मृत बालकावर बसून मंत्राचा जप करतात. जपाच्या दशांश संख्येने दुधातुपात भिजवलेल्या रक्त कमलांचे हवन करतात. मग स्त्रीची पूजा करतात. नंतर चव्हाटयावर जाऊन बलिदान करतात. तेव्हा मंत्र सिद्ध होतो.

मंत्र सिद्ध झाल्यावर मग त्याचा प्रयोग करतात. मूल जन्मल्यावर दोन दिवसांत सुवर्णाच्या शलाकेने त्याच्या जिभेवर हा सिद्ध मंत्र लिहिला असता आठव्या वर्षीच तो मुलगा गाढा पंडित होतो, अशी तारापूजकांची श्रद्धा आहे. या सिद्ध मंत्राच्या योगाने साधकाच्या सर्व मनःकामना पुऱ्या होतात, असे सांगितले आहे.

तारायंत्र– तारेचे यंत्र तयार करतांना गोरोचनाने किंवा केशराने ‘ ओं आः सुरेखे वज्ररेखे ओं फट् स्वाहा ’ हा मंत्र लिहितात. त्याच्या खाली अष्टदल पद्मात त्रिकोण व बाहेर वर्तुळ काढून त्याच्या बाहेर चतुर्द्वारयुक्त चौरस भूपुर काढतात. त्रिकोणात ‘ ॐ ऐं ह्लीं क्रीं हुं फट् ’ हा मंत्र लिहितात. मग त्या यंत्राची यथाविधि पूजा करून जप, होम, इ. कृत्ये करतात. [ ध. तं. शि.; मं. म.; भा. प्र. वि.; गॉ. नॉ. बु.; इं. बु. इ. ]

**तारानाथ** ( इ. स. चे १४ शतक ) एक तिबेटी लामा. याचे खरे नाव सुखसार असे होते. याच्या बापाचे नाव नम्–ग्यल पोंत्सागुस असे असल्याचे श्री. वेडेल सांगतो. बुद्ध गुप्तनाथ हे याच्या गुरूचे नाव होय. तारानाथ हा बहुश्रुत पंडित होता. याने अनेक ग्रंथ लिहिले आहेत. ‘ भारतमें बौद्ध धर्मका इतिहास ’ हा त्यांपैकीच एक ग्रंथ आहे. या ग्रंथात त्याने तिबेटी परंपरेला धरून अनेक सिद्धांच्या कथा ग्रथित केलेल्या आहेत. गोरक्षनाथ हा बौद्ध तांत्रिक होता, असे त्याचे मत आहे. याशिवाय तारानाथाने अनुभूती स्वरूपाचार्याच्या सारस्वत नामक ग्रंथाचाही अनुवाद केलेला आहे.

हा मंगोलिया देशात मरण पावला. [ बौ. सं.; ना. सं. ]

**तारापूर** एक जैन क्षेत्र. इथे वराग, सागरदत्त, वरदत्त, इ. साडेतीन हजार जैन मुनींचे निर्वाण झाले, अशी जैन कथा आहे. बच्छराज नावाच्या एका राजाने इथे बौद्धांच्या तारादेवीचे एक मंदिर बांधले, म्हणून या क्षेत्राला तारापूर हे नाव पडले, असे सोमप्रभाचार्यांच्या कुमारपालप्रतिबोध नामक ग्रंथात सांगितले आहे. पुढे या मंदिरावर दिगंबर जैनांनी ताबा मिळविला. इथे दिगंबर जैनांची आणखीही दोन मंदिरे आहेत. त्यांतील एक मंदिर सोळाव्या शतकातले व दुसरे एकोणिसाव्या शतकातले आहे. [ जै. सा. इ.; जै. सि. भा., मार्च १९३९ ]

**तारायोगिनी** काही तांत्रिक देवतांचे सामान्य नाव. यांची नावे अशी – महाबली, रुद्राणी, भया (उमा), भीमा, घोरा, भ्रमरी, महारात्री, सप्तमी, अष्टमी व भैरवी. [ श्रीविद्यार्णव तंत्र ]

**ताराव्रत** एक स्त्रीव्रत. बंगाली स्त्रिया माघ मासात हे व्रत करतात. सूर्य, चंद्र व तारे यांची सायंकाळी पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. व्रतकाळी मुली आपल्या पावलांवर चंद्र, सूर्य व तारे यांच्या आकृत्या काढतात. व्रताच्या दिवशी संध्याकाळी अंगणात सोळा ताऱ्यांची रांगोळी काढून तिच्यावर दूर्वा वाहतात. तारे उगवायला लागले, की वस्त्राची एकेक गाठ मारीत जातात आणि ‘ मी एक तारा बांधला; दोन तारे बांधले, ’ असे तोंडाने म्हणतात. अशा रीतीने सोळा तारे बांधल्यावर मुली घरात जातात व मग रात्रभर बाहेर येत नाहीत. घरातूनही ताऱ्यांकडे बघत नाहीत.

चौथ्या वर्षी व्रताचे उद्यापन करतात. व्रतफल– शिवासारखा पती, कार्तिकेय व गजानन यांसारखे पुत्र, लक्ष्मी व सरस्वती यांसारख्या मुली आणि श्रृंगी–भृंगीसारखे नोकर यांची प्राप्ती.

गुजराती स्त्रियाही सर्व कार्तिक मासभर हे व्रत करतात. पहाटे उठून एका ताऱ्याकडे पाहून मग नदीत स्नान करणे असा त्यांच्या व्रताचा विधी आहे. [ सुरत गॅझे.; इं. फो. लो. ]

**तारू** महाराष्ट्रातील एक जात. तारू (नाव) चालविण्याच्या व्यवसायावरून या जातीला हे नाव पडले आहे. आपण मुळचे मराठे आहो, असे हे लोक सांगतात. यांच्यांत कुळे व देवके आहेत. यांचे सर्व आचारविचार मराठ्यांप्रमाणेच आहेत.

**तारोद्भव कुरुकुल्ला** एक बौद्ध देवता. कुरुकुल्ला देवीचे हे दुसरे रूप आहे. तारेपासून उत्पन्न झाली म्हणून तिला हे नाव मिळाले. ही देवी रक्तवर्ण व चतुर्भुज असून, वज्रपर्यंक हे तिचे आसन आहे. राहू नामक राक्षसावर कामदेव व त्याची पत्नी बसलेली असून, त्या दोघांच्यावर ही देवी आरूढ झालेली आहे. हिच्या मस्तकावर अमिताभ बुद्धाची प्रतिमा असते. ही तरुण असून, शृंगारभाव व्यक्त करणारी आहे. [ इं. बु. इ. ]

**ताल** (१) ‘ तालः कालक्रियामानम् ’ (गीत, वाद्य व नृत्य यांच्या) क्रियेच्या गतीचे नियमित प्रमाण ज्याच्या योगाने दाखवले जाते, त्याला ताल असे म्हणतात (अमर). एक, दोन, तीन, इ. मात्रांच्या उच्चारणाने नियमित अशा कालाचा परिच्छेद दाखवणे म्हणजे ताल होय, अशी मधू नामक ग्रंथकाराने तालाची दुसरी व्याख्या दिली आहे. याचाच अर्थ विशिष्ट कालाच्या अंतराने व दोन्ही हातांच्या संयोगाने जी टाळी दिली जाते, तिलाही ताल म्हणतात. शिवाच्या नृत्याला तांडव व गौरीच्या नृत्याला लास्य असे नाव आहे. तांडव आणि लास्य

यांची आद्याक्षरे घेऊन ताल हा शब्द बनला आहे, असे संगीत-शास्त्रात म्हटले आहे. कुणी तो तल् या प्रतिष्ठार्थक धातूपासून उत्पन्न झाला, असे मानतात. ताल शब्दाचा अर्थ कोणी शिव-शक्ती ( ता = शिव, ल = शक्ती ) असाही मानतात. काल व मान ( प्रमाण ) या दोहोंच्या योगाने ताल उत्पन्न होतो. तालात सशब्द किंवा निःशब्द क्रियांनी कालाचे मोजमाप करतात. ताल हा स्पंदरूप आहे.

प्राचीन काळापासून लघू, गुरू व प्लुत यांच्यावर ताल आधारलेला आहे. यावरून तालाची उत्पत्ती छंदापासून झाली असावी, असे वाटते. तालासंबंधीचे अनेक ग्रंथ प्राचीन काळीच निर्माण झाले होते. भरताचे नाट्यशास्त्र (अ. ३२), आदिभरतम्, दत्तिलम्, भरतार्णवम्, संगीतरत्नाकर, तालसमुद्र, इ. ग्रंथांतही तालासंबंधी माहिती मिळते. तमिळ भाषेतही तालासंबंधी अनेक ग्रंथ रचलेले होते, असे सांगतात. पण त्यांपैकी बहुतेक नष्ट झाले आहेत.

भरताच्या नाट्यशास्त्रातील तालाध्यायात चच्चत्पुटादी प्राचीन ताल, १०८ ताल व ध्रुवादी सात सालगसूडक ताल यांचे उल्लेख आहेत. पण त्यात १०८ तालांची नावे किंवा विवरण नाही. दत्तिलम् या ग्रंथात नाट्यशास्त्रातीलच विवरण थोडक्यात दिलेले आहे. संगीतरत्नाकरात नाट्यशास्त्र, आदिभरतम् व इतर संगीतविषयक ग्रंथ यांतील माहिती एकत्र करून एक तालाध्याय लिहिलेला आहे. आदिभरतम् व भरतार्णवम् या ग्रंथांत आढळणाऱ्या १०८ तालांची नावे सारखीच आहेत. मात्र वरील ग्रंथांत सांगितलेले बरेचसे ताल सांप्रत प्रचलित नाहीत.

द. भारतातील सालगसूडक नामक एका प्रबंधात ध्रुवा, मठ्य, झंपा, अड्ड, त्रिपुट, रूपक व एकताल असे सात ताल दिलेले आहेत. पण तिकडील संगीताला हे सात ताल पुरेसे नव्हते. म्हणून तालातील प्रत्येक अंग तिप्पट, चौपट, पाचपट, सहापट व नऊपट करून सात तालांचे पस्तीस ताल बनवण्यात आले. पण त्यामुळे अशी अडचण निर्माण झाली, की अर्धमात्रा असणाऱ्या अंगाला तीन, पाच, इत्यादींनी गुणले की $1\frac{1}{2}$, $2\frac{1}{2}$ अशी अपूर्ण संख्या येऊ लागली. ही अपूर्ण संख्या तालात दाखवता येईना. मग ही अडचण दूर करण्यासाठी अर्धमात्रांना तीन, इ. विषम अंकांनी गुणायच्या ऐवजी त्यांना चारांनी गुणण्याची परंपरा निर्माण झाली. द. भारतात आज हीच पद्धत रूढ आहे.

तालाला आवश्यक असलेल्या विशेष गोष्टींना प्राण असे नाव आहे. काल, मार्ग, क्रिया, अंग, ग्रह, जाती, कला, लय, यती व प्रस्ताव असे तालाचे दहा प्राण आहेत. त्यांचे वर्णन पुढीलप्रमाणे—

**काल** – कालाची गणना क्षण, लव, कला, त्रुटी किंवा अनुद्रुत, द्रुत, लघू, गुरू, प्लुत, काकपाद यांच्या द्वारे केली जाते; तर तालातील कालाची गणना अनुद्रुत, द्रुत, लघू, गुरू, प्लुत व काकपाद यांच्या द्वारे केली जाते. लघू अक्षराचा काल एक मात्रा मानलेला आहे. त्यावरून अनुद्रुत = $\frac{1}{4}$ मात्राकाल, द्रुत = $\frac{1}{2}$ मात्राकाल, गुरू = २ मात्राकाल, प्लुत = ३ मात्राकाल व काकपाद = ४ मात्राकाल असे मानलेले आहे.

**अंग** – तालामध्ये कालमापनासाठी अनुद्रुत, द्रुत, द्रुतविराम, लघू, गुरू, इ. जी प्रमाणे वापरली जातात, त्यांना अंग असे नाव आहे.

**क्रिया** – तालातील आनंदजनक शक्ती क्रियेत आहे. सशब्द व निःशब्द असे क्रियेचे दोन प्रकार आहेत. सशब्द क्रियेचे ध्रुवा=चुटकी वाजवणे, शंपा= उजव्या हाताने आघात करणे, ताल = डावा हात उंच करून त्याने आघात करणे व सन्निपात = टाळी वाजवणे, असे चार भेद आहेत.

निःशब्द क्रियेचेही आवाप, निष्क्राम, विक्षेप व प्रवेश असे चार भेद होतात. हात वर उचलणे व बोटाचे आकुंचन-प्रसारण करणे, या गोष्टींशी ते संबद्ध आहेत.

**मार्ग** – चित्र, वार्तिक व दक्षिण असे मार्गाचे तीन प्रकार भरताने दिले आहेत. चित्रमार्गात कलेच्या दोन मात्रा, वार्तिक मार्गात चार मात्रा व दक्षिणमार्गात आठ मात्रा मानलेल्या आहेत.

**जाती** – त्र्यस्र व चतुरस्र अशा तालाच्या दोन जाती आहेत. लघूचा जो अक्षरकाल किंवा मात्राकाल, त्याला जाती असे म्हणतात.

**कला** – कला म्हणजे भाग. कला हे एका कालप्रमाणाचे नाव आहे. आदिकालात चच्चत्पुट, चाचपुट, षट्पितापुत्रक, इ. पाच ताल होते. मग त्या प्रत्येक तालाचे अंग दुप्पट, चौपट, आठपट, इ. करून नवे ताल बनवण्यात आले.

**ग्रह** – गीताचा आरंभ व तालाचा आरंभ हे दोन्ही एकाच वेळी किंवा मागेपुढे होणे, याला ग्रह असे नाव आहे. गीत व ताल एकाच वेळी सुरू झाल्यास त्याला समग्रह, गीतामागून ताल सुरू झाल्यास त्याला अतीतग्रह व गीताआधी ताल सुरू झाल्यास त्याला अनागतग्रह असे म्हणतात.

**लय** – दोन क्रियांमधील अवकाशाला लय असे नाव आहे. विलंबित, मध्य व द्रुत असे लयीचे तीन प्रकार आहेत.

**यती** – द्रुत, मध्य व विलंबित या तीन लयींचा गीतामध्ये सुंदर मेळ घालणे, याला यती असे म्हणतात. यतीचे समा, स्रोतोगता व गोपुच्छ असे तीन प्रकार आहेत.

**प्रस्तार** – भिन्न भिन्न रूपांनी तालाच्या अंगांची जी कल्पना करतात, तिला प्रस्तार असे म्हणतात.

'गानं तालेन धार्यते ' ( = गायन हे तालावर अवलंबून असते) असे भरताने म्हटले आहे. शाङ्‌र्गदेवाने देशी तालांची संख्या १२० मानलेली आहे. काहीजण ती २२४, तर काही जण १०८ मानतात. या १०८ तालांपैकी काही प्रमुख तालांची नावे पुढीलप्रमाणे–

चच्चत्पुटम्, चाचपुटम्, षट्पितापुत्रकम्, उद्धट्टम्, आदिताल, दर्पणताल, चच्चरी, सिंहलीला, कंदर्प, सिंहविक्रम, श्रीरंग, रतिलीला, परिक्रम, गजलीला, त्रिभिन्न, राजचूडामणी, राजताल, हंसनाद, जयमंगल इत्यादी.

सांप्रत हिंदुस्थानी संगीतात त्रिताल, झपताल, रूपकताल, दादरा, धमार, केरवा, झूमरा, दीपचंदी, इ. ताल प्रचलित आहेत.

कर्नाटक संगीतात ध्रुवताल, मठचताल, रूपकताल, झंपाताल, त्रिपुटताल, अड्डताल व एकताल हे ताल प्रचारात आहेत. [श. क.; सु. वि. को.; सं. शा.; हि. डे. इं. म्यु. ]

(२) शिल्पशास्त्रातील एक परिमाण. बारा अंगुळे म्हणजे एक ताल होय. मूर्तीची उंची मोजण्यासाठी या परिमाणाचा उपयोग करतात. तालाची वितस्ती, मुख, यम, अर्क, राशी, जगती, इ. अन्य नावे आहेत.

बृहत्संहितेवरील उत्पलाच्या टीकेत व प्रतिमालक्षण नामक ग्रंथात या परिमाणांचा निर्देश नाही; परंतु त्यानंतरच्या बहुतेक सर्व ग्रंथांत तो आहे.

वैखानसागम, शिल्परत्न, इ. ग्रंथांत उत्तमदशताल, मध्यमदशताल, अधमदशताल, नवताल, अष्टताल व सप्तताल, अशा मूर्तींचे वर्णन आहे.

कोणत्या मूर्ती किती ताल उंचीच्या असाव्या, यांचेही नियम वरील ग्रंथांत दिलेले आहेत. ब्रह्मा, विष्णू व महेश यांच्या मूर्ती उत्तमदशताल; श्री, उमा, सरस्वती यांच्या मध्यमदशताल; इंद्र, सूर्य, चंद्र व लोकपाल यांच्या अधमदशताल; कुबेर, नवग्रह व इतर देवता यांच्या नवार्धताल, राक्षस, असुर यांच्या नवताल व मानवाच्या अष्टताल असाव्या, असे त्यांत सांगितले आहे.

मत्स्य पुराणात ( २५८.१९ ) यासंबंधी पुढील श्लोक आढळतो–

स्वकीयाङ्‌गुलिमानेन मुखं स्याद् द्वादशाङ्‌गुलम् ।
मुखमानेन कर्तव्या सर्वावयवकल्पना ।।

अर्थ – मूर्तीची अंगुली हेच परिमाण धरून तिचे मुख १२ अंगुळे (=१ ताल) असावे. मुखाची उंची हे परिमाण धरून मूर्तीचे सर्व अवयव करावे.

मूर्तीची उंची जेव्हा मुखाच्या उंचीच्या दसपट असते, तेव्हा तिला दशताल मूर्ती असे म्हणतात. (मानसार ६०.६.३५)

हाताचा अंगठा व मधले बोट ताणून धरले असता जे अंतर होते, त्यालाही ताल म्हणतात. हेच माप प्रमाण मानणे अधिक सयुक्तिक वाटते. [ डे. हिं. इ.; पु. इं.; एन्सा. हिं. आ. ]

(३) एक नरक. जो माणूस त्रैवर्णिकांची हत्या करतो किंवा जो गुरुपत्नीशी व्यभिचार करतो, तो माणूस या नरकात जातो, असे सांगितले आहे. [ पु. इं. ]

**तालचित्र नृत्य** आंध्र प्रदेशातील एक नृत्य. हे मनोवेधक असले, तरी करायला अवघड आहे. कौस्तुभम् नावाच्या भक्तिगीतांच्या तालासुरावर हे नृत्य करतात. गणपतिकवाटम् हे त्यांतलेच एक गीत आहे. ते विनायकतालाच्या बहात्तर मात्रांचे आहे. अशीच आणखी अनेक गाणी या नृत्यासाठी वापरतात. या नृत्यातले पदन्यास जरी ठराविक असले, तरी सर्वसामान्य नृत्यातल्या पदन्यासांहून ते पूर्णपणे वेगळे आहेत. जी नर्तकी हे नृत्य करते, ती नृत्यापूर्वी आपल्या पायांना रंग चोपडते. त्यामुळे ज्या देवाच्या गाण्याच्या तालावर ती नाचते, त्या देवाचे चित्र तिच्या पदन्यासातून व्यासपीठावर विकसत जाते. वेलमा जमीनदारांच्या उत्तेजनाने या नृत्याचा विकास झाला, असे सांगतात. [ श्री नटराज रामकृष्ण – दि मार्च ऑफ् इंडिया, डिसेंबर १९५७ ]

**तालनवमी** एक स्त्रीव्रत. यात भाद्रपद शु. नवमीच्या दिवशी दुर्गेची पूजा करायची असते. या दिवशी स्त्रियांनी लक्ष्मी–नारायणाची पूजा करून व्रतकथेचे श्रवण करावे, असे भविष्य पुराणात सांगितले आहे. आपण पतीला प्रिय व्हावे म्हणून सत्यभामेने एका मुनिश्रेष्ठाच्या सांगण्यावरून हे व्रत आचरले, अशी कथाही भविष्य पुराणात आहे. या व्रतातील पूजोपचारांत तालवृक्षाच्या पानांचे विशेष महत्त्व असल्यामुळे 'तालोपहारनवमी' या अर्थाने या व्रताला तालनवमी असे म्हणतात. [ हि. ध.; श. क. ]

**तालप्पिली** केरळातील एक उत्सव. हा माघ ते वैशाख या महिन्यांतल्या भरणी नक्षत्रावर दुर्गा किंवा महाकाली यांच्या मंदिरात साजरा होतो. कुठे कुठे देवीला प्रिय असलेल्या मंगळवारी आणि शुक्रवारीही हा उत्सव करतात. या उत्सवात देवीची हत्तीवरून मिरवणूक काढतात तेवढ्या पितळी पणत्या हाती घेऊन अनेक स्त्रिया त्या हत्तीपुढे चालतात. मिरवणुकीत त्या जागोजाग देवीला ओवाळून तिची पूजा करतात.

**ताशा** एक चर्मवाद्य. हे टोपलीच्या आकाराचे असून तांब्याचे बनविलेले असते. याचे तोंड चामडयाने मढविलेले असते. स्वर चढविण्यासाठी चामडे ताणता यावे म्हणून याला स्क्रू पिळण्याची योजना केलेली असते. हे वाद्य दोन्ही हातांत वेताच्या छड्या घेऊन त्यांनी वाजवितात. ग्रामीण भागांतील लोक ग्रामदेवतेच्या उत्सवात, धार्मिक समारंभात आणि मंगलकार्यातही ताशा वापरतात. ताशाच्या साथीला सनई असते. [सु. वि. को.]

**तास** एक घनवाद्य. हे वाद्य म्हणजे सुमारे सहा इंच व्यासाचा आणि अर्धा तसू जाडीचा कांशाचा किंवा पंचरसी धातूचा गोल तुकडा असतो. याच्या एका कडेला दोन भोके पाडून हे वाद्य दोरीनें टांगते ठेवतात आणि लाकडाच्या मोगरीनें वाजवितात. देवळात आरतीच्या वेळी या वाद्याचा उपयोग करतात. शाळेत, कचेरीत किंवा चर्चमध्ये तास संपल्याचे कळण्यासाठीही या वाद्यावर टोल देण्याची प्रथा होती. [सु. वि. को.]


तास

**तासगाव** एक गणेशस्थान. हे गाव सांगलीपासून पंधरा मैलांवर आहे. इथे उजव्या सोंडेच्या गणेशाचे सुंदर मंदिर आहे. हे मंदिर पेशव्यांचे प्रसिद्ध सेनानी आणि गणेशभक्त श्रीमंत परशुरामभाऊ पटवर्धन यांनी सुमारे पावणे-दोनशे वर्षांपूर्वी बांधले. मंदिरासमोर दक्षिणी पद्धतीचे सात-मजली गोपुर बांधलेले आहे. या गोपुरावर खालपासून वरपर्यंत विविध देवतांच्या मूर्ती आहेत. मंदिरात प्रवेश करताना उजव्या बाजूला गणेशाचा मोठा रथ आहे. गणेशोत्सवाच्या वेळी या रथातून गणेशाची उत्सवमूर्ती मिरवीत नेतात. त्या वेळी शेकडो माणसे हा रथ भक्तिभावाने ओढतात. महाराष्ट्रात कुठेही न आढळणाऱ्या वैशिष्टयपूर्ण गोपुरामुळे हे गणेशमंदिर प्रख्यात बनले आहे. [म. जि. सांगली; सु. वि को.]

**तालिकेट्टुकल्याणम्** नायर जातीतला एक कन्यासंस्कार. मुलगी वयात येण्यापूर्वी तिच्या गळयात सोन्याची ताळी बांधणे हा त्यातील मुख्य विधी असतो. स्थलपरत्वे ताळीचे विविध प्रकार आढळतात. काही लोक लांबट चौकोनी व चपटी तबकडी वापरतात; तर काही लोक गोल, खोलगट वाटीसारखी किंवा चपटी पुतळी वापरतात. केरळी लोक लांबट गोल ताईतासारखी ताळी बनवतात. सोन्याच्या १०८ बारीक तारा एकमेकींत गुंफून ही विशिष्ट प्रकारची ताळी बनवतात. आता काही वेगळे नक्षीदार प्रकारही प्रचारात आले आहेत.

या विधीसाठी लग्नविधीप्रमाणेच अष्टमांगल्याची आवश्यकता असते. त्यात गहू, तांदूळ, शुभ्र वस्त्र, बाण, प्रदीप, आरसा, मोहाचे फूल, इ. वस्तूंचा समावेश असतो. या समारंभासाठी मुलीला नवी वस्त्राभरणे देतात.

ताळी बांधण्यासाठी इणंगुमधील योग्य मुलाची निवड काळजीनें केली जाते. त्याला मलवालन् असे म्हणतात. त्याची पत्रिका मुलीच्या पत्रिकेशी जुळणे आवश्यक असते. वराप्रमाणे त्याचे स्वागत केले जाते. गावातील प्रतिष्ठित व्यक्तींच्या समक्ष तो मुलगा मुलीच्या गळयात ताळी बांधतो. त्यानंतर भोजन, नृत्य, गायन, इ. कार्यक्रम होतात. अशा प्रकारे हा समारंभ चार दिवस मोठया थाटात चालतो.

काही सनातन वृत्तीची मंडळी या संस्काराला लग्नविधीच समजतात आणि त्यामुळेच मुलीचें कौमार्य संपते व ताळी बांधणाऱ्या मलवालन्शी तिचे पतीचे नाते जुळते असे मानतात. पुढे मुलगी वयात आल्यानंतर तिला त्याच्याशी लग्न करावे लागते किंवा दुसऱ्या पुरुषाशी लग्न करण्यापूर्वी त्याची संमती घ्यावी लागते. मलवालन् मरण पावला, तर तिला पंधरा


ताळीचे भिन्न प्रकार

दिवस सुतकही पाळावे लागते. काही ठिकाणी तालिकेट्टुकल्याणम् समारंभात चौथ्या दिवशी त्या दोघांचा संबंध तोडण्याचा विधीही करतात. मग ती मुलगी आपल्या पसंतीच्या तरुणाशी लग्न करू शकते. तो तिचा दुसरा विवाह ठरतो.

सामान्यपणे या संस्काराला लग्नविधी मानले जात नाही. पूर्वी तरवाडातील, मुलामुलींचे परस्पर संबंध जरा स्वैर होऊ लागल्यामुळे, त्यांना आळा घालण्यासाठी हा संस्कार सुरू करण्यात आला, असे म्हणतात. पण त्यामुळे विशेष सुधारणा अशी काही झाली नाही; उलट तशा संबंधांना धार्मिक मान्यताच मिळू लागली. कालांतराने तर हा संस्कार इतका आवश्यक होऊन बसला, की मुलगी वयात येण्यापूर्वी तो केला नाही, तर ती दोषास्पद ठरून, तिला व तिच्या कुटुंबाला जातिबहिष्कृत करण्यात येऊ लागले.

केरळमधील नायरांप्रमाणे इतर काही जातींतही हा संस्कार करतात. [ का. ट्रा. स. इं.; सो. चें. म.; भा. वि. प. ]

**तिंदुकाष्टमी** एक व्रत. या व्रताचा आरंभ ज्येष्ठ वद्य अष्टमीला करून ते वर्षभर करतात. या व्रतात विष्णूची पहिले चार महिने कमळांनी, त्यापुढील चार महिने धोतऱ्याच्या फुलांनी आणि शेवटचे चार महिने शतपत्रांनी (दिवसा उमलणाऱ्या कमलांनी) पूजा करतात. फल – विष्णुलोकाची प्राप्ती. [ हिं. ध. ]

**तिक्कन्न सोमयाजी** (१२२० ते १२९० इ.स.) एक तेलुगू कवी. हा गौतमगोत्री आणि आपस्तंबसूत्री ब्राह्मण होता. याचे पूर्वज प्रथम कृष्णा जिल्ह्यातील वेल्लतूर या गावी राहत असत. याच्या आईचे नाव अन्नांबा आणि पित्याचे नाव कोम्मन्न असे होते. नेल्लोरजवळच्या रंगनाथस्वामीच्या मंदिराजवळ हा राहत असे. अन्नांबाचे माहेर नेल्लोर हे असल्यामुळे नेल्लोरचा राजा मनुमसिद्धी याच्याशी तिक्कन्नाचा संबंध आला. तिक्कन्नाची अलौकिक प्रतिभा आणि असामान्य बुद्धिमत्ता पाहून मनुमसिद्धीने त्याला सपरिवार आश्रय दिला. तिक्कन्नाला त्याने आपल्या राजसभेत मंत्री, सेनापती आणि राजकवी अशा तीन्ही पदांवर चढवले.

मंत्री आणि सेनापती अशा दोन्ही नात्यांनी तिक्कन्नाने मनुमसिद्धीची चांगली सेवा बजावली, असा आंध्र देशाच्या इतिहासात उल्लेख आहे. एकदा नेल्लोरवर शेजारच्या राजाचे आक्रमण झाले असता तिक्कन्नाने वरंगळच्या गणपती काकतीय या राजाकडे जाऊन त्याची मदत मिळवली आणि आलेले आक्रमण परतवून लावले. तिक्कन्नाने एकदा सोमयाग केला होता. त्यामुळे लोक त्याला सोमयाजी म्हणू लागले. एकदा हनुमकोंडा येथे गणपती काकतीय याच्या पुढाकाराने एक वादसभा भरली होती. तिक्कन्नाने त्या सभेत भाग घेऊन बौद्ध आणि जैन पंडितांचा पराभव केला व वैदिक धर्माचे श्रेष्ठत्व सिद्ध करून दाखवले. मनुमसिद्धीच्या मृत्यूनंतरही तो हयात होता. त्याने नेल्लोर कधीच सोडले नाही. त्याने स्वतः अनेक कवींना व विद्वानांना राजाश्रय मिळवून दिला होता.

संस्कृत आणि तेलुगू या दोन्ही भाषांवर तिक्कन्नाचे प्रभुत्व होते. त्याने वेदोपनिषदे, इतिहास, पुराणे आणि षड्दर्शने यांचा उत्तम व्यासंग केला होता. निर्वचनोत्तर रामायण, आंध्रमहाभारत, कविवाग्बंधम्, विजयसेनम् आणि कृष्णशतकम् असे पाच ग्रंथ तिक्कन्नाने रचले. यांपैकी शेवटचे दोन ग्रंथ सांप्रत उपलब्ध नाहीत.

निर्वचनोत्तर रामायण हा ग्रंथ त्याने रामायणाच्या उत्तरकांडाच्या आधारे रचलेला आहे. यापूर्वीची कांडे तिक्कन्नाचा पितामह भास्कर (भास्कररामायणाचा कर्ता) याने रचली होती. उत्तरकांडावर तेलुगूत रचना करणारा तिक्कन्न हा पहिलाच कवी होय. त्याने हा ग्रंथ मनुमसिद्धीला अर्पण केला आहे.

आंध्रमहाभारत हे तिक्कन्नाचे महाकाव्य तेलगू भाषेचे भूषण ठरले आहे. तिक्कन्नापूर्वी महाकवी नन्नय्याने महाभारताच्या वनपर्वाच्या पूर्वार्धापर्यंत ग्रंथरचना केली होती. वनपर्वाचा उरलेला भाग यर्राप्रगडाने पूर्ण केला होता. तिक्कन्नाने विराटपर्वापासून स्वर्गारोहणपर्वापर्यंतची पुढली पंधरा पर्वे लिहून या आंध्रमहाभारताची परिपूर्ती केली. हा ग्रंथ त्याने नेल्लोरच्या हरिहरनाथ देवाला अर्पण केला आहे.

तिक्कन्नाचे आंध्रमहाभारत हे संस्कृत महाभारताचा केवळ अनुवाद नसून, त्याने त्यात स्वतःची प्रतिभा ठायी ठायी दाखवली आहे. भीष्माची निष्कपट वृत्ती, द्रोणाचार्यांचे पांडवांवरील प्रेम, कर्णाची राजभक्ती, शकुनीची कपटनीती, अर्जुनाचा पराक्रम, अभिमन्यूचे व्यूहभेदनकौशल्य, इ. गोष्टींचे तिक्कन्नाने घडवलेले दर्शन रसिकांना मंत्रमुग्ध करून टाकते. या ग्रंथात कथाकथनसौंदर्याबरोबरच विचारसौंदर्यही व्यक्त झाले आहे. तिक्कन्नाने एके ठिकाणी राजधर्माचा महिमा गाताना म्हटले आहे–

लोकमुलु लोकधर्मंबु लुनु नृपाल ।
राज मूलमुलु राजविरहित सैन ॥
पुडमि जनुलकु निंकिन मडुकलोनि ।
जलचरं बुलु बडु पाटु संभविल्लु ॥

अर्थ – हे राजा, लोक आणि लोकधर्म हे सर्व राजावर अवलंबून आहेत. राजाच्या अभावी प्रजेची स्थिती सुकलेल्या जलाशयातील जलचरांप्रमाणे होते.

तिक्कन्नाच्या आंध्रमहाभारताचे काव्यवैभव आणि विचारवैभव पाहून उत्तरकालीन आंध्र साहित्यिकांनी तिक्कन्नाला कविब्रह्म या बिरुदाने गौरवले आहे. [ पंचामृत; श्री. यशोदादेवी– ज. आं. हि. रि. सो., खंड २६, १९६०–६१ ]

**तिगळ** (१) एक जात. या लोकांना तिळगर अथवा तिळवी असेही म्हणतात. हे मूळचे तमिळनाडमधील आहेत. सांप्रत त्यांची वस्ती मुख्यत्वें कर्नाटकात व महाराष्ट्रात आढळते. तमिळनाडमध्ये यांना शूद्र समजले जाते; पण हे लोक आपण क्षत्रिय आहो, असे सांगतात व जानवेही घालतात. अग्निबन्निराय नावाच्या अग्निसंभव पुरुषाचे आपण वंशज आहो, अशी ते आपल्या जातीची उत्पत्ती सांगतात. तोतदेवरू, दोड्डुदेवरू दोड्डनरसराय, मुद्दन्न, दोड्डनंजप्प, सिद्दैदेवरू अशा यांच्या पोटजाती आहेत. शेती हा यांचा प्रमुख व्यवसाय असून, ते पानमळेही करतात.

**विवाहप्रथा**– यांच्यांत आते–मामे बहिणीशी लग्नसंबंध होतो. देज देण्याची चाल आहे. विधवांना पुर्नविवाह करता येतो; पण तो मृत पतीच्या नातलगांशी करता येत नाही. विधवाविवाहाचे पौरोहित्य विधवाच करतात. असा विवाह रात्रीच्या वेळी होतो. विधुरांना लग्न करायचे असल्यास ते विधवेबरोबरच करावे लागते. एखाद्या स्त्रीचा स्वजातीच्या किंवा उच्च जातीच्या परपुरुषाबरोबर अनैतिक संबंध घडला, तर तिचा विवाह विधवाविवाहाप्रमाणे लावतात व नीच जातीच्या पुरुषाशी संबंध आल्यास तिला जातिबहिष्कृत करतात.

तिगळ हे वैष्णव पंथाचे आहेत. राम, हनुमान, रंगनाथ आणि भैरव या चार प्रमुख देवतांना हे भजतात. गुरुनाथम्म ही यांची कुलदेवता असून, म्हैसूर व कारगल येथे तिची मंदिरे आहेत. हे लोक आश्विन मासात तिरुपतीची व चैत्रात उडुपीची यात्रा करतात. यात्रेच्या वेळी देवतांना बकऱ्याचा बळी देतात.

**मर्तिकप्रथा**– ज्याने मुद्रा घेतलेल्या आहेत, असा मनुष्य मृत झाल्यास त्याला जाळतात. श्राद्ध करीत नाहीत. भाद्रपद अमावास्येला पितरांप्रीत्यर्थ घटाची पूजा करतात.

मुंबईत स्थायिक झालेले तिगळ एब्बार नावाची मोडकी तोडकी तमिळ भाषा बोलतात. हे हेल किंवा जुने तिगळ यांच्याशी रोटीबेटीव्यवहार करीत नाहीत.

(२) महाराष्ट्र व कर्नाटक या प्रदेशांत तिगळ किंवा त्रिगुळ या नावाची एक ब्राह्मण जातही आहे. आंध्र देशातील सप्तगोदा, राजमहेंद्री, मच्छलीपट्टण व विजयवाडा या भागात त्यांचे मूळ वास्तव्य होते. कोण्या प्राचीन काळी दुष्काळाच्या आपत्तीमुळे त्यांना देशांतर करावे लागले, असे सांगतात. हे यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचे आहेत. ते पूर्वी तिगळ नावाची भाषा बोलत म्हणून त्यांना तिगळ म्हणू लागले. श्री. राजवाडे यांच्या मते त्रैकूटक या शब्दावरून त्रिगुळ किंवा तिरगुळ हे नाव आले असावे.

आंध्र प्रदेशातून देशांतर केल्यावर या ब्राह्मणांनी आपद्धर्म म्हणून शेतीचा व्यवसाय सुरू केला. पानमळा करणे हे शेतीपूरक ही विशेष फायद्याचे असल्यामुळे त्यांनी त्या धंद्यात लक्ष घातले. त्यामुळेच इतर ब्राह्मण त्यांना कमी लेखू लागले. त्यांच्यावर ग्रामण्येही झाली; पण कालांतराने त्यांचे इतर ब्राह्मणांशी संबंध प्रस्थापित झाले.

मध्वाचार्यांचे गुरू श्रीसुब्रह्मण्यतीर्थ हे त्रिगुळ ब्राह्मण होते, असा स्पष्ट उल्लेख मध्वविजयात आढळतो.

यांची सर्व धर्मकृत्ये आपस्तंब सूत्रानुसार होतात. सण, उत्सव, व्रतवैकल्ये, इ. गोष्टी हे अन्य ब्राह्मणांप्रमाणेच करतात. हे बहुतेक स्मार्त असून शांकरमतानुयायी आहेत. पण दक्षिणेकडे व कर्नाटकात मात्र हे सर्व वैष्णव बनले आहेत. तिरुपतीचा व्यंकटेश, कोल्हापूरची महालक्ष्मी, तुळजापूरची भवानी, जेजुरीचा खंडोबा, मैलारची मंगसुळी ही त्यांची कुलदैवते आणि राम, कृष्ण, गणपती, शिव, विठ्ठल, दत्त, बलभीम ही उपास्य दैवते आहेत. [ का. ट्रा. स. इं.; मुं. इ. ज.; म. ज्ञा. को.]

**तित्तिरी** एक ऋषी. हा आंगिरस कुलातील तैत्तिरी प्रवराचा व तैत्तिरीय शाखेचा होता. हिरण्यकेशी लोकांच्या पितृतर्पणात याचा निर्देश असतो. पाणिनी आणि पतंजली या दोघांनीही याचा उल्लेख केला आहे. पाहा – तैत्तिरीय संहिता. [ प्रा. च. को.; प. का. भा. ]

**तिथिचक्र** प्रयाणाला निघताना शुभाशुभ फल पाहण्यासाठी तयार केलेले तिथींचे कोष्टक. पौष मासापासून याचा प्रारंभ धरलेला आहे. हे चक्र पुढीलप्रमाणे तयार करतात–

पौष शु. प्रतिपदेपासून द्वादशीपर्यंतच्या तिथी क्रमाने लिहितात. पुढे माघ, फाल्गुन, इ. मासांच्या तिथी द्वितीया, तृतीया, इ. अनुक्रमाने लिहितात. त्रयोदशीचे फल तृतीयेप्रमाणे, चतुर्दशीचे चतुर्थीप्रमाणे आणि पौर्णिमेचे पंचमीप्रमाणे समजतात. या सर्व तिथींची फले पूर्वादी दिशांना प्रयाण करण्याच्या कामी निरनिराळी होतात. उदा. पौष शु. प्रतिपदेस पूर्व दिशेला गमन केले असता त्याचे फल सौख्य, दक्षिणेचे क्लेश, पश्चिमेचे भय आणि उत्तरेचे द्रव्यप्राप्ती असे आहे.

पुढील कोष्टकामध्ये ज्या महिन्यात ज्या तिथीवर ज्या दिशेला प्रयाणाचे शुभ फल दिले असेल, त्या दिशेला प्रयाण करावे, असे सांगितले आहे. [ मु. चिं. ]

**तिथिदोहद** शुक्ल व कृष्ण पक्षांतील प्रतिपदादी तिथींचे दोहद पदार्थ सांगितले आहेत, ते असे– प्रतिपदा – रुईचे पान, द्वितीया – धुवण, तृतीया – तूप, चतुर्थी–

पातळ भात, पंचमी – मुगाचे अन्न, षष्ठी – सोन्याचे पाणी, सप्तमी – घारगे, अष्टमी – महाळुंग, नवमी – पाणी, दशमी – गोमूत्र, एकादशी – यवान्न, द्वादशी – पायस, त्रयोदशी – गूळ, चतुर्दशी – रक्त आणि पौर्णिमा – खिचडी. [ मु. चिं. ]

**तिथियुगलव्रत** एक व्रत. प्रत्येक महिन्याच्या दोन सप्तमी, दोन अष्टमी, दोन द्वादशी, दोन चतुर्दशी, अमावास्या व पौर्णिमा या तिथींना हे व्रत करतात. या दिवशी उपास करायचा असतो. हे व्रत काम्य आहे. व्रतावधी – एक वर्ष. फल – आरोग्य व सुख यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**तिथी** चांद्रमाना चा दिवस किंवा चांद्रमासाचा तिसावा भाग. 'तनोति विस्तारयति चन्द्रकलाम्, तन्यते चन्द्रकलया इति वा' (= चंद्रकलेची वृद्धी करते ती, किंवा चंद्रकलेने जिचा विस्तार होतो, ती तिथी होय) अशी तिची व्याख्या आहे (वर्णविवेक).

तिथीची दुसरी व्याख्या पुरुषार्थचिंतामणी या ग्रंथात दिली आहे, ती अशी –

आदित्याद् विप्रकृष्टस्तु भागद्वादशकं यदा।
चन्द्रमाः स्यात्तदा राम तिथिरित्यभिधीयते ।।

अर्थ – सूर्यापासून बारा अंश दूर जायला चंद्राला जेवढा काळ लागतो, तेवढ्या काळाला हे राम, तिथी असे म्हणतात.

तिथी हा शब्द वेदांत आढळत नाही. कारण ब्राह्मणकाळापर्यंत लोकांना तिथी माहीत नव्हती. एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंत एक दिवस होतो, एवढीच कल्पना त्या काळी रूढ होती. सूत्रवाङ्मयापासून तिथी हा शब्द आढळू लागतो.

पौर्णिमेपासून पौर्णिमेपर्यंतची किंवा अमावास्येपासून अमावास्येपर्यंतची अवस्था येण्यास चंद्राला २९.५३०५८८ दिवस लागतात. याला एक मास असे नाव आहे. मासाचा तिसावा भाग म्हणजे तिथी होय. किंवा दुसऱ्या भाषेत सांगायचे तर नक्षत्रचक्रातून सूर्याभोवती ३६०° चा फेरा पुरा करायला चंद्राला २९.५३०५८८ दिवस लागतात. त्यांतला १२ अंशांचा ($360° \times \frac{1}{30} = 12°$) भाग पुरा करायला त्याला जो अवधी लागतो, त्याला तिथी म्हणायचे.

पण सूर्यापासून बारा बारा अंशांच्या पटीत दूर जाताना चंद्र नेहमी सारखाच काळ घेतो, म्हणजे त्याला सुमारे $\frac{२९.५}{३०}$ दिवस एवढाच नियमित अवधी लागतो, असे नाही. पृथ्वीप्रदक्षिणेचा चंद्राचा मार्ग जर वर्तुळाकृती असता, तर पृथ्वीपासून चंद्र नेहमी एका ठराविक अंतरावर राहिला असता आणि बारा अंशांचे अंतर काटायला त्याला नेहमी ठराविकच वेळ लागला असता. पण चंद्राचा हा मार्ग विवृत्ताकृती किंवा थोडा लांबट गोल आहे. या मार्गावर चंद्र जेव्हा पृथ्वीच्या विशेष जवळ येतो, तेव्हा त्याची गती सरासरीपेक्षा थोडी जलद असते आणि जेव्हा तो पृथ्वीपासून लांब जातो, तेव्हा त्याची गती सरासरीपेक्षा मंद असते. त्यामुळे बारा अंशांचे अंतर काटायला त्याला कधी जास्त, तर कधी कमी अवधी लागतो. हा अवधी ५० घटिकांपासून ६८$\frac{१}{२}$ घटिकांपर्यंत असतो. मात्र या तीस तिथींच्या काळाची बेरीज सुमारे २९.५ दिवसच भरते. कमी-अधिक अवधीची ही कल्पना बहुधा अलिकडची असावी. त्यापूर्वीची तिथी ही केवळ सरासरी मानाचीच होती. नाक्षत्र दिवस जसा आरंभ–अखेरीच्या आडनिडेपणामुळे रोजच्या व्यवहाराला निरुपयोगी ठरतो, तशाच तिथीही निरुपयोगी आहेत. भारतात त्या टिकून राहिल्या आहेत, त्या केवळ धार्मिक

तिथिचक्राचे कोष्टक

| पौ. | मा. | फा. | चै. | वै. | ज्ये. | आ. | श्रा. | भा. | आ. | का. | मा. | पूर्व | दक्षिण | पश्चिम | उत्तर |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | सौख्य | क्लेश | भीति | अर्थागमं |
| २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | शून्य | निःसत्व | निःसत्व | मिश्रता |
| ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | द्रव्यक्लेश | दुःख | इष्टाप्ति | अर्थलाभ |
| ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | लाभ | सौख्य | मंगल | वित्तलाभ |
| ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | लाभ | द्रव्याप्ति | धन | सौख्य |
| ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | भीति | लाभ | मृत्यू | अर्थागम |
| ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | लाभ | कष्ट | द्रव्यलाभ | सुख |
| ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | कष्ट | सौख्य | क्लेशलाभ | सुख |
| ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | सौख्य | लाभ | कार्यसिद्धि | कष्ट |
| १० | ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | क्लेश | कष्टासिद्धि | अर्थ | धन |
| ११ | १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | मृत्यू | लाभ | द्रव्यलाभ | शून्य |
| १२ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | शून्य | सौख्य | मृत्यू | अतिकष्ट |

व्यवहारासाठी. उपवास, व्रतवैकल्ये आणि इतर धार्मिक कार्ये ही तिथींवरच अवलंबून असतात, हे त्या टिकण्याचे कारण होय.

वैदिक काळी तिथीचा उपयोग सावन दिवसासारखाच होई. निसर्ग हा चंद्रकलांच्या रूपाने दिवसांचा हिशेब दाखवीत असल्यामुळे तीस तीस दिवसांचा एकेक गट मोजायला प्राचीन काळच्या लोकांना चंद्राचा उपयोग होई. थोडे बारकाईने पाहिल्यावर तत्कालीन शोधकांच्या ध्यानात येऊ लागले, की पौर्णिमेपासून अमावास्या किंवा अमावास्येपासून पौर्णिमा कधी कधी चौदा दिवसांनी येते. त्यावरून कळले, की चंद्रामुळे घडणारी तिथी निराळी आणि सूर्यावर अवलंबून असणारा दिवस निराळा. म्हणूनच २९½ दिवसांचा तिसावा भाग म्हणजे एक तिथी हा संकेत रूढ झाला.

आपल्या पंचांगातील दिवसाची सुरवात सूर्योदयाबरोबर होते. तसाच नवा वारही सूर्योदयालाच सुरू होतो. सूर्योदयाच्या क्षणी जी तिथी चालू असेल, ती त्या संबंध दिवसाची तिथी मानतात.

एका महिन्याच्या तीस तिथी असतात. प्रतिपदा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी, अष्टमी, नवमी, दशमी, एकादशी, द्वादशी, त्रयोदशी, चतुर्दशी व पौर्णिमा अशी त्यांची नावे आहेत. त्यानंतर पुन्हा प्रतिपदा ते चतुर्दशी या तिथी येतात. आणि तिसावी तिथी ती अमावास्या होय. प्रत्येक तिथी ही किती घटका व किती पळे असते, ते पंचांगांत लिहिलेले असते. तिथींची क्षय-वृद्धीही होत असते. उदा० अष्टमी तिथी गुरुवारी सूर्योदयापासून ५७ घटिका २ पळे आहे. म्हणजे इंग्रजी पद्धतीप्रमाणे ती शुक्रवार पहाटेपर्यंत आहे. त्यानंतर नवमी लागते, ती शनिवारी सकाळी सूर्योदयानंतर १ घटिका २० पळांपर्यंत आहे. म्हणजे शुक्रवार आणि शनिवार या दोन्ही दिवशी नवमी हीच तिथी आली. अशा वेळी नवमीची वृद्धी झाली, असे म्हणतात. वाढलेली तिथी तीन वारांना स्पर्श करते, म्हणून तिला त्र्यहस्पृक् असे नाव आहे. काही वेळा एखाद्या तिथीचा क्षय होतो. उदा० वद्य त्रयोदशी ही तिथी बुधवारी सूर्योदयापासून १ घ. १२ पळांपर्यंत आहे. म्हणजे सूर्योदयाच्या वेळी त्रयोदशी चालू आहे. म्हणून त्या दिवसाची तिथी त्रयोदशी हीच ठरली. सूर्योदयानंतर १ घटिका १२ पळांनी चतुर्दशी लागते, ती बुधवारी ५५ घटिका २८ पळांनी म्हणजे इंग्रजी पद्धतीप्रमाणे गुरुवारी पहाटे, सूर्योदयापूर्वी संपते. त्यानंतर गुरुवारच्या सूर्योदयाला अमावास्या चालू होते. म्हणून गुरुवारची तिथी अमावास्या हीच ठरली. या ठिकाणी वास्तविक चतुर्दशी ही तिथी होऊन गेलेली आहे. सूर्योदयाचा जी तिथी तीच त्या संबंध दिवसाची तिथी, या संकेतानुसार बुधवारी चतुर्दशी असूनही त्या दिवशी त्रयोदशी मानतात आणि चतुर्दशीचा क्षय झाला असे म्हणतात.

ज्योतिषशास्त्रात प्रत्येक तिथीचा एकेक स्वामी मानले आहे. त्यासंबंधीचा श्लोक असा –

> तिथीशावग्निकौ गौरी गणेशोऽहिर्गुहो रविः।
> शिवो दुर्गान्तको विश्वे हरिः कामः शिवः शशी ॥

अर्थ – प्रतिपदा – अग्नी, द्वितीया – ब्रह्मा, तृतीया – गौ… चतुर्थी – गणेश, पंचमी – सर्प, षष्ठी – गुह, सप्तमी – र… अष्टमी – शिव, नवमी – दुर्गा, दशमी – यम, एकादशी… विश्वेदेव, द्वादशी – विष्णू, त्रयोदशी – काम, चतुर्दशी – … आणि पौर्णिमा (व अमावस्या) – पितर हे तिथिस्वामी हो…

याशिवाय प्रत्येक तिथीला आणखी एक निराळी सं… दिलेली आहे. त्यासंबंधीचा श्लोक असा–

> नन्दा च भद्रा च जया च रिक्ता
> पूर्णेति तिथयोऽशुभमध्यशस्ताः
> सितेऽसिते शस्तसमाधमाः स्युः
> सितज्ञभौमार्किगुरौ च सिद्धाः ॥

अर्थ– शुक्ल पक्षातील प्रतिपदा ते पंचमी, षष्ठी ते द… व एकादशी ते पौर्णिमा, या गटांतील पाच तिथींना अनु… नंदा, भद्रा, जया, रिक्ता व पूर्णा अशा संज्ञा आहेत. त्यां… पहिल्या पाच अशुभ, दुसऱ्या पाच मध्यम व तिसऱ्या पाच … समजल्या जातात. कृष्ण पक्षातील तिथींनाही अनुक्रमे … संज्ञा आहेत. मात्र त्यांतील पहिले पंचक शुभ, दुसरे मध्य… तिसरे अशुभ मानतात. शुक्रवारी नंदा, बुधवारी भद्रा, मं… वारी जया, शनिवारी रिक्ता व गुरुवारी पूर्णा तिथी आल… त्या सिद्धिप्रद होतात, असे मानलेले आहे.

[ श. क.; वे. इं.; मु. चिं. ; पं. ज्यो. ]

**तिथीशपूजन** एक व्रत. प्रतिपदादी तिथींचे अग्नी, ब्रह्मा… स्वामी सांगितले आहेत. त्या त्या तिथी… तिच्या स्वामीची पूजा करणे हा या व्रताचा विधी आहे. … साठी वेदीवर लाल वस्त्र अंथरून त्यावर अक्षतांचे अष्ट… कमळ काढतात. मग त्यावर त्या तिथीच्या स्वामीची सु… प्रतिमा ठेवून तिची पूजा करतात. फल – हर्ष, उत्सा… आरोग्य यांची प्राप्ती. [ व्र. प. ]

**तिथ्यादिगंडांतशांती** तिथिगंड व लग्नगंड यांच्या … रार्धात जन्म झाला असता, … शांती करावी, असे सांगितले आहे. पूर्णा व नंदा तिथीं… संधींच्या ज्या दोन घटिका म्हणजे पंचमीची शेवटची … षष्ठीची पहिली घटिका यांना तिथिगंडांत म्हणतात. …

प्रयाण, विवाह व व्रतबंध यांसाठी हे अशुभ असते. कर्क व सिंह, वृश्चिक व धन, मीन व मेष यांच्या संधीची अर्धी अर्धी घटिका मिळून एक घटिका याला लग्नगंडांत म्हणतात. ते मृत्युकारक मानले आहे.

जननाशौच संपण्याच्या दिवशी किंवा अन्य शुभ दिवशी ही शांती करतात. ही शांती होईपर्यंत पित्याने पुत्राचे मुख पाहू नये असा नियम आहे. तिथिगंडांती जन्म झाला असता बैल, नक्षत्रगंडांती जन्म झाला, तर गाय व लग्नगंडांती जन्म झाला असता सुवर्ण यांचे दान करतात. पित्याला बाधक अशा गंडांताच्या पूर्वार्धात जन्म झाला असता पिता, माता व बालक यांना अभिषेक करतात व इतर वेळी बालक व माता या दोघांनाच तो करतात. त्याशिवाय भाद्रपदा नक्षत्री तिलपात्र व पुष्य नक्षत्री सुवर्ण, यांचे दान करतात. [ सं. कौ. ]

**तिबेट** भारताच्या उत्तरेकडील एक देश. हा हिमालयाच्या उत्तरभागी, मध्य आशियाच्या एका पठारावर वसलेला आहे. प्राचीन भारतीय वाङ्मयात या देशाचा उल्लेख बऱ्याच वेळा येतो. महाभारतात (भीष्म. ७.२–१४) त्याला उत्तरकुरू म्हटले असून, आर्यविद्यासुधाकर या ग्रंथात त्रिविष्टप म्हटले आहे. तिबेट हा त्रिविष्टपाचाच अपभ्रंश होय. याला किन्नर खंड, किंपुरुष खंड, स्वर्गभूमी, अशीही अन्य नावे आहेत.

तिबेटातील लोक मात्र आपल्या देशाला पो, बोद किंवा भोट असे म्हणतात व स्वतःला बोदपा किंवा भोपा असे म्हणतात.

तिबेटच्या पठाराची समुद्रसपाटीपासून उंची १६ ते १८ हजार फूट असून, त्याचे क्षेत्रफळ सुमारे ५ लक्ष चौरस मैल आहे. त्या मानाने त्याची लोकसंख्या मात्र अगदीच कमी आहे. ती सुमारे पस्तीस लाख एवढीच भरेल.

पूर्वेला चीन, पश्चिमेला काश्मीर, दक्षिणेला नेपाळ, भूतान व सिक्किम आणि उत्तरेला चिनी तुर्कस्थान, अशा तिबेटच्या चतुःसीमा आहेत. तिबेटचा बराचसा भाग पर्वतराजींनी व्यापलेला आहे. भौगोलिक दृष्ट्या तिबेटचे पुढील तीन भाग पडतात–

(१) उत्तरेकडचा चांग थांग प्रदेश. हा दऱ्याखोऱ्यांनी व्यापलेला आहे.

(२) दक्षिणेकडील ब्रह्मपुत्रा (सांगपो), सिंधू, सतलज, कर्नाली, इ. नद्यांच्या खोऱ्यांचा प्रदेश. हा भाग फार सुपीक असून, याच भागात ल्हासा हे तिबेटच्या राजधानीचे शहर वसलेले आहे. हे शहर क्यीचू नदीच्या काठी असून, त्याची उंची १२,८९० फूट व लोकसंख्या सुमारे पन्नास हजार आहे. शिगत्से आणि ग्यांत्से ही दुसरी मुख्य शहरेही याच भागात असून, त्यांची लोकसंख्या प्रत्येकी सुमारे पंचवीस हजार आहे.

(३) पूर्व तिबेट किंवा खाम. या प्रदेशात देर्जे येथे लामांचा मोठा मठ आहे.

तिबेटची हवा अत्यंत थंड व कोरडी आहे. उन्हाळ्यात मात्र काही ठिकाणी उष्णतामान ८५° ते १००° फॅ. इतके चढते. इथे पाऊस सुमारे चौदा इंच पडतो. पण तो पडतो तेव्हा मुसळधार पडतो.

तिबेट हा नद्या व सरोवरे यांचा देश आहे. चीनमधील यांगत्सी क्यांग व हॉंग हो या मोठ्या नद्यांचा उगम तिबेटातच झाला आहे. मानस सरोवर व राक्षसताल ही हिंदूंची पवित्र सरोवरे तिबेटातच आहेत. याशिवाय गरम पाण्याचे अनेक झरेही या भागात आहेत.

पूर्व व दक्षिण भागांत बार्ली, बकव्हीट ही धान्ये आणि जर्दाळू, अक्रोड, पेअर, पीच, सफरचंद वगैरे फळे पिकतात.

तिबेटातील खनिज संपत्तीचे फारसे संशोधन व उत्खनन झालेले नाही. पूर्व तिबेटात सोने, रुपे, तांबे, लोखंड, कथिल व बोरॅक्स या खनिजांच्या खाणी आहेत. पश्चिमेकडील नद्यांच्या खोऱ्यांतही सुवर्णाचे कण सापडतात.

तिबेटी जनतेचे सर्वसाधारणपणे श्रीमंत, व्यापारी, शेतकरी व मेंढपाळ असे चार वर्ग आहेत. सरदार व जमीनदार हे



तिबेटी सरदार

श्रीमंत वर्गात मोडतात. मठातील लामा व इतरही धनिक लोक दूरवरचा प्रवास करून व्यापार–उदीम करतात. पुरुष बाहेर-

गावी गेल्यावर स्त्रिया त्यांची दुकाने चालवतात. मेंढपाळ लोक उत्तरेकडील डोंगरांच्या आश्रयाने राहतात. ते आपल्या मेंढ्या,



तिबेटातील मेंढपाळांचा प्रमुख

तट्टे, याक व इतर सामान घेऊन भटकत असतात. त्यामुळे ते शस्त्रसज्जही असतात. काही वेळा ते यात्रेकरू व व्यापारी यांना लुटतात आणि जवळपासच्या डोंगरात पळून जातात. त्यांना मेंढ्यांपासून खूप लोकर मिळते. दरवर्षी हजारो मण लोकर तिबेटातून भारतात येते.

मेंढ्यांशिवाय याक, घोडे, खेचरे, गाई, बैल, शेळ्या हे पशूही तिबेटात पुष्कळच आहेत. गाई व शेळ्या यांच्यापासून दूध, लोणी, चीज वगैरे पदार्थ फार मोठ्या प्रमाणावर मिळतात. उंच डोंगराळ भागात सामान वाहून नेण्यासाठी याकाचा उपयोग होतो. तिबेटात हंस व कस्तुरीमृगही मोठ्या संख्येत आढळतात. तिबेटातून चीन व भारत या देशांत कस्तुरीची बरीच निर्यात होते. एका मृगापासून अर्धा ते अडीच तोळे इतकी कस्तुरी मिळते.

**इतिहास** – इ. स. च्या ७ व्या शतकापूर्वीचा तिबेटचा इतिहास अज्ञात आहे. तथापि तिबेटी दंतकथांवरून तो थोडासा समजतो. सनपूर्व १ ल्या शतकात मगध देशाच्या एका राजपुत्राने तिबेटात जाऊन आपले राज्य स्थापले होते व त्याच्या ३२ वंशजांनी तिथे राज्य केले, अशी एक कथा आहे. कोसल देशाचा राजा प्रसेनजित याचा एक वंशज तिबेटावर राज्य करीत होता, अशीही कथा एका तिबेटी ग्रंथात आढळते. दुसऱ्या एका ग्रंथात वत्स देशाचा राजा उदयन याचा वंशज तिबेटावर राज्य करीत होता, असा उल्लेख आहे. इ. स. ६२० च्या सुमारास तिबेटवर राज्य करणारा सोङ् चेन गम पो नामक राजा फार बलाढ्य होता. चीनच्या राजाने त्याच्यावर स्वारी केली, तेव्हा गम पोने त्याचा पराभव केला व त्याची राजकन्या वेन चेन हिचे पाणिग्रहण केले. एका नेपाळी राजकन्येशीही त्याचा विवाह झाला होता. याच राजाने ल्हासा नगर वसवले. त्याच्याच कारकिर्दीत बौद्ध धर्माचा तिबेटात प्रवेश झाला असे म्हणतात. काश्मीरचा राजा ललितादित्य (इ. स. ६९९-७३५) याने तिबेटवर स्वारी करून पश्चिम तिबेटचा लडाखसह बराच भाग आपल्या राज्याला जोडला होता. त्या वेळी काश्मिरातून बरेच बौद्ध पंडित धर्मप्रचारासाठी तिबेटात गेले. पुढील २०० वर्षांत तिबेटात अनेक पराक्रमी राजे होऊन गेले. त्यांचे चीनशी सतत संग्राम चालू होते. इ. स. च्या ११ व्या शतकात भारतीय बौद्ध पंडितांनी तिबेटवर आपले धार्मिक वर्चस्व स्थापले. इ. स. १२५० च्या सुमारास चीनच्या कुबलाईखानाने पूर्व तिबेट पादाक्रांत केला. पण नंतर त्याने बौद्ध धर्माची दीक्षा घेतली व सर्व तिबेटवर शाक्य वंशातील बौद्ध भिक्षूंची सत्ता मान्य केली. त्यांनी इ. स. १३४५ पर्यंत आपले वर्चस्व टिकवले. त्यानंतर तिबेटी धर्मगुरूं



याक–पाळ

तिथल्या राजघराण्याला दूर सारून राजकीय सत्ता आपल्या हाती घेतली. पण या भिक्षूंच्या आपसांतील भांडणामुळे चीनला त्यांच्या राज्यकारभारात हस्तक्षेप करण्यास वाव मिळाला. इ. स. च्या १६ व्या शतकाच्या उत्तरार्धात ल्हासाजवळच्या गुळडन मठाचा अधिपती सोडनाम रियाम-सो याला चीनच्या राजाने वज्र दलाई लामा ही पदवी देऊन दलाई लामाचे पीठ स्थापन केले. इ. स. १६४० च्या सुमारास चीनमधील गुहारीखान याच्या मदतीने दलाई लामा सर्वसत्ताधीश झाला. चीनच्या गुरखा सैन्याने तिबेटवर स्वारी केली, त्या वेळी चीनच्या सैन्यानेच तिबेटचे रक्षण केले. तोपर्यंत ईस्ट इंडिया कंपनीने तिबेटशी मोठा व्यापार सुरू केला होता. पण इंग्रजांच्या प्रेरणेमुळेच नेपाळने तिबेटवर स्वारी केली, अशा समजुतीने तिबेटने हिंदुस्थानशी आपले सर्व दळणवळण बंद केले.

पुढे जम्मूचा राजा गुलाबसिंघ याचा सेनापती झोरावरसिंघ याने इ. स. १८४१ मध्ये तिबेटावर स्वारी करून तिथले अनेक किल्ले जिंकले आणि सिंधूच्या उगमापर्यंत मजल मारली.




तिबेटचा नकाशा

मंगोल व मांचू वंशी राजांनी बौद्ध धर्म स्वीकारला होता. ते दलाई लामाला आपला धर्मगुरू मानीत होते.

त्यानंतरचे अनेक दलाई लामा अल्पायुषी ठरले. शेवटी इ. स. १७१८ मध्ये चीनने स्वतःच्या पसंतीच्या दलाई लामाला गादीवर बसवून चिनी अंबन लोक त्याच्या राज्यकारभारावर नियंत्रण ठेवण्यासाठी नेमले.

इ. स. १७५० मध्ये तिबेटी लोक व चिनी अंबन यांचा मोठा संग्राम झाला. त्या वेळी चीनच्या सम्राटाने सैन्य पाठवून तिबेटवर आपली सत्ता दृढ केली. इ. स. १७९२ साली नेपाळी

इंग्रज सरकारने तिबेटशी व्यापारी संबंध स्थापन करण्याचे पुष्कळ प्रयत्न केले. पण लामांनी त्याला मुळीच प्रतिसाद दिला नाही. इंग्रजांना तिबेटवर स्वामित्व नको होते; तर तिथे फक्त आपला व्यापार वाढावा अशी त्यांची इच्छा होती. पण एका रशियन धर्मगुरूने तिबेटात जाऊन तेराव्या दलाई लामावर विलक्षण पगडा बसवला होता आणि तोच ही गोष्ट घडू देत नव्हता. शेवटी हिंदुस्थानचा व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन याने इ. स. १९०३ साली व्यापारी आणि लष्करी असे एक मिशन तिबेटात पाठवले. पण लामा सरकार त्या मिशनशी वाटाघाटी

करण्यासही राजी होईना. तेव्हा मग त्या मिशनने सरळ ल्हासावर चाल केली. दलाई लामा घाबरला व कसलाही प्रतिकार न करता चीनमध्ये पळून गेला. मग ब्रिटिश मिशनने लामाच्या अधिकाऱ्यांना आपल्याला हवा तसा तह करण्यास भाग पाडले. पण रशिया व चीन यांना इंग्रजांची ही दंडेली आवडली नाही. म्हणून या तहाची अंमलबजावणी कधीच केली गेली नाही. उलट इ. स. १९०६ साली हिंदुस्थान–सरकारने चीनशी एक करार करून तिबेटवर चीनची सत्ता मान्य केली. पुढे इ.स. १९०९ साली दलाई लामा ल्हासा येथे परत आला. त्यानंतर १९१० मध्ये चीनने मोठे सैन्य पाठवून तिबेटवर आपली सत्ता प्रस्थापित केली. तेव्हा दलाई लामा तिथून पळाला, तो भारताच्या आश्रयाला आला. तो इकडे दोन वर्षे राहिला. पण त्या अवधीत तिबेटी लोकांनी बळ बांधले व १९१२ मध्ये त्यांनी चिनी सैन्याचा पराभव करून त्याला पिटाळून लावले. चिनी सैन्य मागे हटले. पण तिबेटचा पूर्व भाग असलेला खाम हा प्रदेश मात्र त्याने सोडला नाही. जून १९१२ मध्ये दलाई लामा ल्हासाला परत गेला व त्याने स्वातंत्र्य पुकारले.

इ. स. १९१४ साली सिमला येथे हिंदुस्थान, चीन व तिबेट यांच्यांत सरहद्दीविषयी एक करार झाला. त्यात तिबेट व हिंदुस्थान या देशांमधील सीमारेषा निश्चित करण्यात आली. तीच मॅकमोहन रेषा म्हणून प्रसिद्ध आहे. या करारावर चीनच्या प्रतिनिधीची सही असूनही, चीनच्या सरकारने तो करार पुढे धुडकावून लावला. त्यानंतर तिबेट काबीज करण्याचे अनेक प्रयत्न चीनने केले; पण ते सर्व व्यर्थ ठरले.

इ. स. १९३३ मध्ये १३ वा दलाई लामा मरण पावला. त्यानंतर १९४० त एका ५ वर्षांच्या मुलाला १४ वा दलाई लामा म्हणून गादीवर बसवण्यात आले. त्याचे राज्य इ. स. १९५० पर्यंत अगदी स्वतंत्रपणे चालू होते. इ. स. १९४९ मध्ये चीनवर साम्यवादी पक्षाची सत्ता प्रस्थापित झाली आणि त्या सरकारने तिबेटही आपल्या सत्तेखाली घेण्याचे ठरवले. आक्टोबर १९५० मध्ये चिनी सैन्याने तिबेटवर आक्रमण सुरू केले. एका वर्षाच्या आतच चीनने संपूर्ण तिबेट पादाक्रांत करून तिथे आपली सत्ता स्थापन केली व तिबेटी सरकारला एक १७ कलमी करार मान्य करायला भाग पाडले. त्या करारात तिबेटला अंतर्गत स्वायत्तता व धार्मिक स्वतंत्रता बहाल केली होती. १३ व्या दलाई लामाचा विश्वासू सहकारी व तिबेटी जनतेचा नेता साटांग-सा-पे याला चिनी आक्रमण ही एक दुर्दैवी पण स्वागतार्ह घटना वाटली. कारण ज्या सुधारणा लामांच्या राजवटीत होऊ शकल्या नव्हत्या, त्या आता निश्चितपणे घडून येतील व त्या होणे आवश्यक आहे, असे त्याला वाटत होते. इतर अनेक मुत्सद्यांचेही तसेच मत होते. त्याप्रमाणे चीनने तिबेटची अनेक प्रकारे सुधारणा घडवून आणली हे खरे; पण त्याचबरोबर चीनने तिबेटातील संस्कृती, वंश व धर्म यांचा नि:पात करण्यासाठी लामा, भिक्षू व सामान्य जनता यांच्यावर अनन्वित अत्याचार सुरू केले व आजही ते अत्याचार चालूच आहेत. तिबेटात चीनने अनेक लहानमोठे रस्ते बांधले व लष्करी तळ निर्माण केले. लाखो चिनी लोक व सैनिक तिबेटात येऊन स्थायिक झाले आणि त्यांनी तिबेटी लोकांचे जीवन ग्रासून टाकले. लामाची सत्ता नामधारी होती. चीनने आपली लष्करी सत्ताच तिबेटवर लादली होती. तिच्या विरुद्ध काही तिबेटी तरुण लोकांनी बंडे केली, पण ती निर्दयपणे मोडून काढण्यात आली आणि शेवटी मार्च १९५९ मध्ये चिनी लष्कराने दलाई लामाच्या 'पोटाला' राजवाड्यावरच तोफा डागल्या. हे आक्रमण असह्य होऊन दलाई लामा मागील दाराने निसटून गुप्तपणे भारतात पळून आला. त्याच्या मागे चिनी सैन्याने ल्हासा शहर, त्यातील राजवाडे, मठ, मंदिरे, शाळा, घरे सर्व उद्ध्वस्त केले व लाखो तिबेटी लोकांचा छळ करून त्यांना ठार मारले.

मानववंशशास्त्रज्ञांच्या मते तिबेटी लोक चिनी लोकांहून अगदी भिन्न आहेत. ते मंगोलियन वंशाचे आहेत असे म्हणतात. त्यांच्या चेहऱ्याची व शरीराची ठेवण वेगळी आहे, त्यांची भाषा व लिपी वेगळी आहे; तसाच त्यांच्या संस्कृतींतही फार फरक आहे. त्यांच्या मनाची घडणही वेगळी आहे.

तिबेट हा चीनचा एक भाग कधीही नव्हता किंवा तिबेटवर कधी चीनची सार्वभौम सत्ताही नव्हती. चीनचा तसला दावा अगदी व्यर्थ आहे. तिबेट हे स्वतंत्र राष्ट्र आहे, हे चीननेही पूर्वी मान्य केले होते. परंतु चालू शतकाच्या प्रारंभी ब्रिटन व रशिया यांनी तिबेटवर चीनची सत्ता असल्याचे मान्य केल्यापासून चीनने तसे ठासून म्हणण्यास सुरवात केली आणि त्यानंतरचे सर्व करार ठोकरून देऊन तिबेटवर स्वामित्व मिळवले.

सांप्रत तिबेट हा स्वतंत्र देश म्हणून अस्तित्वात नाही. चीनच्या विशाल साम्राज्याचा तो एक भाग बनला आहे. अजूनही तिबेटमध्ये चीनचे दमनसत्र चालूच आहे. तिबेटी धर्म, संकेत, परंपरा, समाजरचना, इतिहास या सर्व गोष्टी मुळासकट उखडून टाकून, तिबेटला संपूर्ण चिनी साम्यवादी वळण देण्याचा चीनने चंग बांधला आहे. तिबेटी जनतेला जगात आज कोणीही त्राता उरलेला नाही. तेव्हा सांप्रत तिथे काय परिस्थिती आहे, हे जगाला नेमके कळायला काही मार्ग नाही.

**तिबेटी भाषा व लिपी** – इ. स. च्या सातव्या शतकापूर्वी तिबेटी भाषेला लिपी नव्हती. तसेच त्या भाषेत साहित्यही नव्हते. तिबेटच्या वेगवेगळ्या प्रदेशांत वेगवेगळ्या बोली प्रचलित होत्या. सातव्या शतकात तिबेटमध्ये सोङ् चेन गम पो नामक एक राजा होऊन गेला. त्याने सर्व तिबेट आपल्या अमलाखाली आणला होता. इतकेच नव्हे; तर चीन व नेपाळ यांच्यावरही स्वारी करून त्यांचाही बराच प्रदेश त्याने आपल्या कबजात आणला होता. तिबेटी भाषेला लिपी नसल्यामुळे या सर्व प्रदेशाचा कारभार करणे त्या राजाला जड जाऊ लागले. पुढे त्याचा भारताशी संबंध आला आणि त्याला भारतातील विद्या, धर्म, साहित्य व संस्कृती यांची बरीच माहिती मिळाली. त्यामुळे इ. स. ६४० च्या सुमारास त्याने आपला एक मंत्री थोन मि संभोट याला भारतीय लिपी, संस्कृत भाषा व बौद्ध शास्त्र यांचा अभ्यास करण्यासाठी नालंदा विद्यापीठात पाठवले.

क ख ग ङ - च छ ज ञ

त थ द न प फ ब म

च्छ छ ज़ व श़ स़ ऽ य

र ल श स ह अ

ट ठ ड ण ष क्ष

तिबेटी लिपी
(धर्मयुग ३१ जानेवारी १९६५ वरून)

तिथे बरीच वर्षे अध्ययन करून तो तिबेटात परत गेला. मग भारतात त्या वेळी प्रचलित असलेल्या देवनागरी लिपीच्या आधारे त्याने दोन प्रकारची लिपी तयार केली– एक वू-चेन (शिरोरेखा असलेली) व दुसरी वू-मे (शिरोरेखा नसलेली). वू-चेन लिपी पुढे छापण्यासाठी उपयोगात आणली जाऊ लागली आणि वू-मे लपेटीने लिहिण्यासाठी वापरली जाऊ लागली. छपाईची ही लिपी इ. स. च्या सातव्या शतकात मगधात प्रचलित असलेल्या कुटिलाक्षरांवरून बनवलेली असून, लिहिण्याची लिपी काश्मिरात प्रचलित असलेल्या शारदा लिपीच्या आधारे विकसित केली गेली.

तिबेटी लिपीत ३० व्यंजने व ४ स्वर आहेत. नागरी लिपीतील सर्व स्वरांची आवश्यकता न वाटल्यामुळे अ ची गणना त्यांनी स्वरात न करता व्यंजनात केली आहे. इ, उ, ए व ओ हे चार स्वर तिबेटी लिपीत आहेत. प्रत्येक वर्गातील चौथे अक्षर, ट वर्ग व मूर्धन्य ष ही अक्षरे त्या लिपीत नाहीत.

इ. स. ६३४ ते ६४५ या दरम्यान तिबेटात ही लिपी प्रचलित झाली. लिपी बनवल्यावर थोन मि याने तिबेटी भाषेचे व्याकरणही तयार केले. तिबेटचा राजा सोङ् चेन याने ल्हासामधील लोह पर्वताच्या एका गुहेत बसून तिबेटी लिपी, व्याकरण व थोन मीने अनुवाद केलेल्या संस्कृत ग्रंथांचे अध्ययन केले. राजाच्या चिनी व नेपाळी अशा दोन्ही राण्या बौद्ध धर्माच्या अनुयायी होत्या. त्यांच्या प्रभावाने राजानेही पुढे बौद्ध धर्माचा स्वीकार केला. त्याने संस्कृत ग्रंथांचे तिबेटी अनुवाद करण्यासाठी भारतीय पंडित कुमार तुन, नेपाळी पंडित शीलमंजू, चिनी भिक्षू महादेव, इ. विद्वानांची नेमणूक केली. त्यानंतरच्या सात-आठशे वर्षांत संस्कृत, पाली, अपभ्रंश व हिंदी या भाषांतील हजारो ग्रंथांचे तिबेटी भाषेत अनुवाद झाले.

तिबेटी लोक व्यक्ती व स्थाने यांच्या नावांचेही भाषांतर करतात. उदा॰ बुद्धाला ते सङ्गे, सारिपुत्ताला सारिबू व शुद्धोदनाला शे-चङ् असे म्हणतात.

प्राचीन काळी तिबेटात बरेच लोक संस्कृत भाषेचे अध्ययन करीत असत. आजही सर्वसाधारण लोक संस्कृत भाषा न जाणताही त्या भाषेतील श्लोक व मंत्र पूजेच्या वेळी म्हणत असतात. संस्कृत भाषेला ते देववाणी मानतात व तिचा आदर करतात.

तिबेटी भाषा ही अत्यंत समृद्ध भाषा आहे. तिची शब्दशक्ती अपरिमित आहे. तिबेटी भाषेची वाक्यरचना हिंदी वाक्यांप्रमाणे असते. आधुनिक विज्ञानाची परिभाषाही त्या भाषेत तयार केलेली आहे.

**पोषाख**– तिबेटी पुरुष लोकरीचा लांब अंगरखा घालतात व कमरेला एक पट्टा बांधतात. त्यांच्या पायांत गुडघ्यापर्यंत पोचणारे लोकरी बूट असतात. मठ–मंदिरात जातानाही त्यांना ते

काढावे लागत नाहीत. हिवाळ्यात ते मेंढीच्या कातड्याचे कोट, विजारी व टोप्या घालतात. स्त्रियांचा पोषाख पुरुषांच्या पोषाखासारखाच असतो. मात्र तिबेटी स्त्रिया कमरेला पुढच्या बाजूला पट्टू असलेला लोकरीचा तुकडा पायापर्यंत बांधतात



तिबेटी स्त्रिया

त्यांच्या पाठीवर बकऱ्याचे कमावलेले कातडे बांधलेले असते. तिबेटी बायका लोकरीचे कापड घरीच विणतात. पुरुष डोक्याला फेल्ट हॅट घालतात. श्रीमंत, अधिकारी आणि लामा उंची किनखाबी व रेशमी वस्त्रे वापरतात. स्त्रियांना दागिन्यांची फार हौस असते. पुरुष आपल्या केसांची एकच, तर स्त्रिया अनेक वेण्या घालतात. भिक्षू व भिक्षुणी जांभळट लाल अंगरखा घालतात. व काही भिक्षू–भिक्षुणी डोक्यावरचे केस काढून टाकतात.

**अन्न** – तिबेटी लोकांचे मुख्य अन्न म्हणजे मांस होय. शिवाय जवाच्या लाह्यांच्या पिठापासून बनवलेला त्सांपा नामक पदार्थ, तसेच तूप, लोणी, चीज, दूध, मुळा, टोमॅटो, बटाटे वगैरे कंद व फळे हा त्यांचा पूरक आहार होय. चहा हे त्यांचे अत्यंत आवडते पेय आहे. चहा करण्याची त्यांची पद्धत आपल्यापेक्षा निराळी आहे. ते चहा बराच वेळ उकळतात व त्यात लोणी, मीठ व सोडा घालून तो मोठ्या लाकडी नळकांड्यात घुसळतात. तिबेटी माणूस ऐपतीप्रमाणे एका दिवसात पन्नास ते दीडशे कप चहा पितो. जवांपासून तयार केलेले छांग नामक सौम्य मद्य हे त्यांचे राष्ट्रीय पेय आहे.

**विवाहप्रथा** – तिबेटात बहुपत्नीकत्व, बहुपतिकत्व व एकपत्नीकत्व असे विवाहाचे सर्व प्रकार अस्तित्वात आहेत. पूर्वी आईबाप लग्न ठरवीत असत. आता मुलेच आपापला जोडीदार निवडतात. साधारणपणे मुलीचे सोळाव्या व मुलाचे अठराव्या वर्षी लग्न होते. लग्नानंतर मुलीच्या बापाला मुलाकडून काही रक्कम मिळते. काही वेळा एकच पुरुष, पुत्रसंतती नसलेल्या घरातील सर्व मुलींशी लग्न करतो. घराण्याच्या संपत्तीची विभागणी होऊ नये, हा त्यामागचा हेतू असतो. काही वेळा घरातील मोठ्या मुलाची बायको हीच त्याच्या लहान भावांचीही पत्नी होते. या सर्वांचा परिणाम म्हणजे अनेक शतकांपूर्वी तिबेटात जेवढी घरे व कुटुंबे अस्तित्वात होती, तेवढीच आजही आहेत. त्यांत मुळीच वाढ झालेली नाही.

तिबेटी लोकांत विधवा व विधुर यांच्यांत नियोगपद्धती रूढ आहे. नियोगजन्य मुलांनाही इतर मुलांप्रमाणे समाजात प्रतिष्ठा मिळते. त्यांचे कायदेशीर हक्कही अबाधित राहतात. विधवाविवाह रूढ आहे, पण घटस्फोट क्वचितच होतात.

तिबेटची लोकसंख्या आज शतकानुशतके जवळजवळ तेवढीच राहिली आहे. याचे प्रमुख कारण तिबेटातील अनेक स्त्रीपुरुष मठवासी बनून ब्रह्मचर्याने राहतात, हे होय. याशिवाय बहुपतिकत्व आणि बालमृत्यूचे मोठे प्रमाण हीही लोकसंख्या मर्यादित राहण्याची आणखी कारणे आहेत.

तिबेटच्या सामाजिक जीवनात स्त्रियांचा दर्जा मोठा आहे. त्या स्वतंत्रपणे हिंडतात, फिरतात, घर सांभाळतात व व्यापारउद्योगही करतात. सरदारांच्या व अधिकाऱ्यांच्या बायकांचा वेळ मात्र उंची वस्त्रे व दागिने घालून मिरवण्यातच खर्च होतो. अशा स्त्रिया बाजारात जाताना आपल्याबरोबर संरक्षणासाठी नोकर घेऊन जातात.

एखाद्याला आदर दाखवायची किंवा मान द्यायची तिबेटी लोकांची रीत विचित्र आहे. अशा वेळी ते थोडेसे वाकतात, जीभ बाहेर काढतात आणि तोंडाने खमजमभो किंवा नुसते खमजन असे म्हणतात.

एखाद्या अधिकाऱ्याला, भिक्षूला, मित्राला किंवा देवाला भेटायला जाताना उपहार म्हणून लोकरी गळपट्टा देण्याची पद्धत आहे. असे न करणे उद्धटपणाचे मानतात.

**प्रसूतिप्रथा** – प्रसूतीच्या वेळी जाणत्या स्त्रिया गरोदर स्त्रीला मदत करतात. प्रसूतीनंतर थोड्याच दिवसांत स्त्रिया कामधंदा करायला लागतात. जास्त मुले असणे ही अभिमानाची

बाब समजतात. सरदाराच्या घरी मूल जन्माला आले, की मोठा समारंभ करतात. त्याचे नाव काय ठेवायचे ते लामा पत्रिका पाहून सांगतात. तिबेटी लोकांत एका मुलाला अनेक नावे ठेवण्याची पद्धत आहे. मुलगा जिवावरच्या दुखण्यातून बरा झाला, तर त्या वेळीही त्याला नवे नाव ठेवतात..

**लोकजीवन**– तिबेटात सामाजिक व्यवहारावरही धर्माची छाप असते. तिथे उन्हाळा व हिवाळा सुरू झाल्याबद्दल सरकारी घोषणा होत असतात. त्या झाल्यावर मगच लोकांनी तलम किंवा गरम कपडे घालायचे असतात.

उन्हाळयाच्या शेवटी तिबेटी लोक पाऊस पडावा म्हणून प्रार्थना करतात. उन्हाळचात झरे आटले, की सरकारकडून एक फतवा निघत असतो, की प्रत्येकाने रस्त्यावर पाणी शिंपडावे. मग सर्व ल्हासा शहर बादल्या घेऊन त्या कामासाठी



तिबेटी भगत – लामा

बाहेर पडते. तिथले सरदार-दरकदारसुद्धा या कार्यक्रमात भाग घेतात. या वेळी सर्व लोक एकमेकांच्या अंगावरही पाणी उडवतात. त्यांचे पाऊस पाडणारे व गारांचा वर्षाव थोपवून धरणारे असे वेगवेगळे लामा असतात. त्यांच्या अंगात संचार होतो व ते घुमताघुमता पावसाचे भविष्य सांगतात.

तिबेटी लोक पाहुण्याचे आदरातिथ्य करण्यात फार तत्पर असतात. मित्रांना भेटायला जाणे व त्यांना निरोप द्यायला जाणे, हे त्यांना फार आवडते. जेव्हा एखादा माणूस गावाला जायला निघतो, तेव्हा त्याचे मित्र गावापासून काही मैल अंतरावर त्याच्या वाटेवर एक तंबू ठोकतात व त्याच्यासाठी जेवण तयार करून त्याची वाट बघत बसतात. तो आला, की त्याला जेवायला घालून व पांढरे गळपट्टे बक्षीस देऊन त्याची रवानगी करतात. तो गावाहून परत येतानाही त्याचे असेच स्वागत होते.

तिबेटी लोक विडीसिगारेट ओढणे हे वाईट समजतात. त्यामुळे कचेच्या, रस्ते व सार्वजनिक समारंभ या ठिकाणी कोणी धूम्रपान करीत नाहीत. बहुतेक तिबेटी पुरुष तपकीर मात्र ओढतात. प्रत्येकजण आपापली तपकीर तयार करतो. दोघे तिबेटी भेटल्यावर प्रथम आपल्या तपकिरीच्या डब्या बाहेर काढतात आणि त्यांतली चिमूटभर तपकीर दुसऱ्याला देतात.

तिबेटातील पत्रे पाठविण्याची पद्धत अजूनही पुरातनच आहे. त्यासाठी मोठ्या रस्त्यांवर चार चार मैलांवर डाक बसवलेली असते. पत्रे नेणाऱ्या माणसांजवळ घंटा अडकवलेला भाला असतो. वेळप्रसंगी त्याचा हत्यारासारखाही उपयोग होतो. तिबेटातील टपाल-कचेरीत पाच प्रकारची तिकिटे विकत मिळतात.

तिबेटात आधुनिक वैद्यकशास्त्राचा अद्याप प्रवेश झाला नाही. ब्रिटिश व चिनी असे काही डॉक्टर तिथे आहेत; पण त्यांना सल्ल्यासाठी बोलावल्यास तिथल्या भिक्षूंना ते आवडत नाही. तिबेटात दोन वैद्यकीय शाळा आहेत. प्रत्येक मठातून हुशार भिक्षू या शाळांत वैद्यकीय अभ्यासासाठी पाठवले जातात. तिथला शिक्षणक्रम दहा ते पंधरा वर्षांचा असतो. ज्ञानी व वृद्ध भिक्षू चित्रांच्या साहाय्याने विद्यार्थ्यांना शिकवतात. शरद ऋतूत सर्व विद्यार्थी औषधी–वनस्पतींच्या शोधार्थ डोंगरदऱ्यांतून हिंडतात आणि खूप वनस्पती गोळा करून आणतात. त्या वनस्पती ट्रा येर्पा इथल्या एका देवळात जमा करून त्यांचे वर्गीकरण करतात व मग वाळवून चूर्ण करून हवाबंद बाटल्यांत भरून ठेवतात. त्यांचे वनौषधिविज्ञान बरेच प्रगत होते, असे म्हणतात. ल्हासा येथील वैद्यकीय शाळेचा मुख्य आचार्य हा दलाई लामाचा वैद्य असे. ही जागा मानाची तशीच जबाबदारीचीही होती. तेरावा दलाई लामा वारला, तेव्हा लोकांनी त्याच्या मृत्यूविषयी अनेक संशय व्यक्त केले आणि त्यामुळे मुख्य आचार्याला त्या जागेवरून तात्काळ कमी करण्यात आले.

तिबेटात शस्त्रक्रियेच्या ज्ञानाचा मात्र सर्वस्वी अभाव आहे.

दलाई लामाच्या वैयक्तिक वापराच्या वस्तूंतही खात्रीचे औषधी गुणधर्म असतात, अशी तिबेटी लोकांची श्रद्धा आहे.

**देवधर्म** – तिबेटी लोक अत्यंत धार्मिक असून, त्यांचे सर्व भौतिक जीवनही धर्माने व्यापलेले असते. बौद्ध धर्माच्या महायान शाखेचा तिबेटात फार प्रसार होता. इ. स. च्या सातव्या शतकात राजा सोङ् चेन गम पो याच्या कारकिर्दीत तिबेटात बौद्ध धर्माचा प्रथम शिरकाव झाला. त्याला थोड्याच काळात राजाश्रयही मिळाला. त्यामुळे त्याचा प्रसारही झपाट्याने झाला. इ. स. च्या नवव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंतच्या कालखंडात भारतातल्या नालंदा विद्यापीठातून शांतरक्षित, विक्रमशीला विद्यापीठातून पद्मसंभव, तसेच दीपंकर श्रीज्ञान आणि इतर अनेक बौद्ध आचार्य तिबेटात गेले आणि त्यांनी तिथे बौद्ध धर्माबरोबरच बौद्ध तत्त्वज्ञानाचाही प्रचार केला. संस्कृत व पाली भाषेतील अनेक ग्रंथांचा त्यांनी तिबेटी भाषेत अनुवाद केला. तिबेटी बौद्ध धर्मावर शाक्त आणि तांत्रिक पंथाचा व तिबेटात आधी प्रचलित असलेल्या बोन धर्माचा बराच प्रभाव आहे. बोन धर्मात भुताखेतांच्या पूजेचे फार माहात्म्य होते. प्रत्येक कुटुंबातील एक किंवा दोन मुले वयाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या वर्षी भिक्षू होण्यासाठी मठात दाखल करीत. एकूण लोकसंख्येच्या एक तृतीयांश किंवा एक चतुर्थांश स्त्री-पुरुष तिबेटात भिक्षुवृत्तीने जगणारे आहेत. त्यांची नीतिमत्ता मात्र फारशी श्रेष्ठ दर्जाची नाही.

तिबेटात बौद्ध धर्माचे एकूण दहा पंथ अस्तित्वात आहेत. त्यांपैकी निंगपा, उर्ग्येनपा, कंडपा व शाक्यपा या पंथांचे भिक्षू तांबड्या टोप्या घालतात. उर्ग्येनपा पंथाचा मुख्य मठ मध्य तिबेटातील साम्ये येथे आहे. मध्य तिबेटातील शाक्य गोंपातून श्री. राहुल सांकृत्यायनांनी बरीच संस्कृत हस्तलिखिते भारतात आणली. या पंथाच्या भिक्षूंना लग्न करायची परवानगी असते. गेलुक्पा किंवा गँडेनपा पंथाचा मुख्य मठ गँडेन येथे असून या पंथाचे अनुयायी सर्वांत जास्त आहेत. तीन पंथांचे लोक पिवळ्या टोप्या वापरणारे आहेत. पिवळ्या टोप्या घालणाऱ्या भिक्षूंनी मात्र आजन्म अविवाहित राहायचे असते. एखाद्याने लग्न केल्यास त्याला त्याच्या मठाला जबर दंड द्यावा लागतो. दुकपा पंथाचे लोक तंत्रमार्गाचे अनुयायी असून, सेरा इथे त्यांचा मुख्य मठ आहे. मठाबाहेर भिक्षु-भिक्षुणी अत्यंत मोकळेपणाने वागत असतात. त्यांना उघडपणे लग्न मात्र करता येत नाही.

**गोंपा किंवा मठ** – बहुतेक तिबेटी भिक्षू मठांतच राहतात. तिबेटी मठांना गोंपा असे नाव आहे. गोंपामध्ये मंदिर, मठ आणि धर्मशाळा या तीन्हींचा अंतर्भाव असतो. तिबेटातील पहिला मठ इ. स. ८२३ ते ८३५ या काळात ल्हासाच्या आग्नेयीला तीस मैलांवर साम्ये या गावी बांधला गेला. भारतातील ओदंतपुरी विद्यापीठाच्या धर्तीवर त्याची उभारणी करण्यात



मठवासी भिक्षू

आली होती. ड्रेपुंग येथील मठात काही काळापूर्वी दहा हजार भिक्षू राहत होते, असे सांगतात. जगातील हा सर्वांत मोठा मठ होय. ल्हासाच्या उत्तरेला दोन मैलांवर असलेल्या सेरा येथील मठात सात हजार भिक्षूंची राहण्याची सोय आहे. हे दोन व गँडेन येथील एक असे तीन मठ तिबेटचे तीन आधारस्तंभ मानण्यात येतात.

बहुतेक सर्व मठांत प्राथमिक शिक्षण दिले जाते. उच्च शिक्षणासाठी मात्र भिक्षूंना ल्हासा वगैरे ठिकाणच्या मोठ्या मठांत जावे लागते. धार्मिक शिक्षणाशिवाय व्याकरण, साहित्य, वैद्यक, मूर्ती तयार करणे, कोरीव काम, रंगकाम, छपाई, इ. गोष्टीही तिथे शिकवतात. या सर्व मठांच्या खर्चासाठी त्यांना जमिनी लावून दिलेल्या असतात. याशिवाय मठातले काही भिक्षू व्यापारधंदा करूनही पैसे मिळवतात. उच्च शिक्षण देणाऱ्या मठांतील निम्मे भिक्षू विद्यार्थी व बाकीचे नोकर, व्यवस्थापक, व्यापारी वगैरे असतात. एका काळी लडाख, भूतान, सिक्किम, द. रशिया, सैबेरिया, चीन, इ. दूरदूरच्या प्रदेशांतून तिबेटात विद्यार्थी येत असत.

मठातील भिक्षूंचे लामा व दाबा (सर्वसाधारण) असे दोन प्रकार असतात. दलाई लामा हा सर्व भिक्षूंचा प्रमुख असतो. धार्मिक व कर्मकांडात्मक ग्रंथांचे अनेक वर्षे अध्ययन केल्यानंतर मगच एखाद्या भिक्षूला लामा ही पदवी प्राप्त होते

लामांतही कनिष्ठ, मध्यम व उच्च अशा श्रेणी आहेत. लामांसह सर्व भिक्षूंना मद्य-मांस चालते. तिबेटी मठ हे कोणत्याही धर्माच्या लोकांना दर्शनासाठी खुले असतात.

देवदेवतांच्या पूजेसाठी डमरू, शंख, ढोलकी, झांजा, घंटा, बासरी, इ. वाद्ये मठात ठेवलेली असतात. जलपात्रे, धूपदाण्या, नीरांजने, इ. पूजेची उपकरणेही असतात. याशिवाय अनेक यंत्रे व मंडले काढून त्यांची आणि त्सांपा व लोणी यांनी बनवलेल्या रंगीत देवमूर्तींची तिथे पूजा चालते. पूजाविधी तांत्रिक पद्धतीने चालतो. विशिष्ट पूजोत्सव तीन ते तीस दिवसपर्यंत चालतात. शेवटच्या दिवशी मोठे हवन होते. मूर्तींच्या दालनात मोठमोठे ध्वजही उभारलेले असतात.

तिबेटी धर्मग्रंथांचे कंजूर आणि तंजूर असे दोन भाग आहेत. कंजूरचे १०८ भाग असून, त्यांत भगवान बुद्धाच्या मुखांतून निघालेल्या वचनांचा संग्रह आहे. तंजूरचे २३५ भाग असून, त्यांत निरनिराळी दर्शने, काव्ये, व्याकरण, ज्योतिषशास्त्र, खगोलशास्त्र, देवतासाधना, तंत्र, मंत्र, इ. विषय आलेले आहेत. याशिवाय त्यांत आर्यदेव, दिङ्नाग, धर्मरक्षित, चंद्रकीर्ती, शांतरक्षित, कमलशील इत्यादींच्या ग्रंथांचाही समावेश आहे.



प्रार्थनाचक्र

इ. स. च्या चौदाव्या शतकाच्या आरंभी रिंचेन दुब याने हे सर्व ग्रंथ गोळा केले आणि पुढे सातव्या दलाई लामाच्या कारकिर्दीत त्याने मोठ्या प्रयत्नाने ते प्रथमच छापून काढले.

तिबेटातले स्त्री, पुरुष व मुलेही 'ॐ मणि पद्मे हुम्' या मंत्राचा नेहमी जप करीत असतात. अनेकदा या मंत्राच्या पुढे



हेरंब गणपती – तिबेट

ह्री = हृदय हे अक्षर पल्लव म्हणून जोडतात. त्याचा अर्थ या मंत्राचा जप हृदयकमलात करावा असा होतो. अवलोकितेश्वर हा या मंत्राचा ऋषी असल्याची समजूत आहे. या मंत्राच्या जपाने पुनर्जन्म टळतो व निर्वाणप्राप्ती होते, असे तिबेटी लोक मानतात. हा मंत्र दगडावर कोरून तो महत्त्वाच्या जागी बसवतात. तो कागदाच्या कपटचांवर लिहून एखाद्या नळकांड्यासारख्या चक्रात ठेवतात व ते चक्र हाताने फिरवतात. त्यायोगे जितक्या वेळा चक्र फिरविले तितक्या वेळा मंत्राचा जप केल्याचे पुण्य मिळते, अशी त्यांची धारणा आहे. अशी अनेक नळकांडी मठाच्या दारात आणि आतल्या भागातही बसवलेली असतात. आणि तिथे येणारे यात्रेकरू ती फिरवीत असताना दिसतात.

शंकर, पार्वती, गणपती, षडानन, इ. दैवतांची उपासनाही तिबेटमध्ये केली जाते. निनद येथे एका मंदिरात शिवलिंग असून, त्या मंदिराच्या प्रवेशद्वारावर गणपतीची मूर्ती आहे. तिथल्या अनेक देवळांच्या व बौद्ध मंदिरांच्या प्रवेशद्वारांवर हेरंब-गणपतीचे चित्र आढळते. गणेश हा विघ्नहर्ता आहे, अशी तिथल्या लोकांची श्रद्धा आहे, हेच त्याचे कारण होय.

**सण-उत्सव**– तिबेटात वर्षभर अनेक सण व उत्सव चालू असतात. प्रत्येक पौर्णिमा व प्रतिपदा या तिथींना मठांत पूजा-अर्चा चालते. वर्षप्रतिपदेचा उत्सव ल्हासा शहरात फार मोठ्या प्रमाणावर साजरा होतो. तो तीन आठवडे चालतो. या तीन आठवड्यांत तिबेटची सर्व सत्ता लामांच्या हातात असते. पौर्णिमेच्या दिवशी ल्हासा शहरात मोठी मिरवणूक निघते. तिच्यात दलाई लामाही भाग घेतो. या सणाच्या निमित्ताने खेळांच्या, घोड्यावर बसण्याच्या, धावण्याच्या, वगैरे शर्यती होत असतात.

**मर्तिकप्रथा**– मनुष्य मेल्यावर त्याला निर्वाण प्राप्त होते, अशी तिबेटी लोकांची धारणा नसून, त्याचा आत्मा स्वर्गात जातो, अशी त्यांची श्रद्धा असते. मृताचा आत्मा नीटपणे स्वर्गात जावा, मृत्युदेवाकडून त्याच्या नातेवाइकांना त्रास होऊ नये व आत्मा स्वर्गात न जाता भूतयोनीत गेला तर त्याचा उपसर्ग पोचू नये, या उद्देशाने अंत्यसंस्कार केले जातात.

मृताच्या आत्म्याला त्याच्या देहातून बाहेर पडण्यासाठी भिक्षूची मदत घ्यावी लागते. अशा भिक्षूला पो-वो म्हणतात. तो काही मंत्र म्हणून मृताच्या टाळूचे थोडे केस जोराने उपटून काढतो. त्या छिद्रातून आत्मा बाहेर पडतो, अशी समजूत आहे.

त्यानंतर ज्योतिषी अंत्यसंस्काराला योग्य दिवस शोधून काढतो. त्यासाठी जागा व पद्धती तोच ठरवतो. मृतदेह दुमडून, त्याचे तोंड गुडघ्यांमध्ये येईल व हात पायाखाली येतील अशा तऱ्हेने बांधतात व कातड्याच्या किंवा लोकरीच्या पोत्यात घालून तो एका खोलीत ठेवतात. अंत्यदिनापर्यंत त्या खोलीत दिवे लावून ठेवतात आणि भिक्षू मंडळी प्रार्थना व मंत्र म्हणत बसतात. नातेवाईक बाहेर बसून मृताला अन्नपाणी देतात.

ठरलेल्या दिवशी मृताच्या देहाला सर्वजण वंदन करतात व मग तो एका चौकोनी पेटीत घालतात. प्रेतयात्रेत पुढे भिक्षू-मंडळी मंत्र म्हणत चालतात; त्यांच्या मागे शिंग, ढोल, घंटा, इ. वाद्ये वाजवणारे; मग नातेवाईक व शेवटी शवपेटी असते. पेटीला एक लोकरीचा पट्टा बांधतात व त्याचे दुसरे टोक मुख्य भिक्षूच्या हाती देतात.

अंत्यविधीचे पाच प्रकार तिबेटात फार पूर्वीपासून प्रचलित आहेत, ते पुढीलप्रमाणे–

(१) एका खडकावर प्रेत ठेवून त्याची वस्त्रे दूर करतात व भिक्षू मंत्र म्हणून चाकूने त्याच्या मांसाचे तुकडे कापून दूर फेकतात. गिधाडे, कुत्री, डुकरे, वगैरे प्राणी ते मांसखंड खाऊन टाकतात. गिधाडाने प्रेतभक्षण करणे अधिक मंगलप्रद मानले जाते. उरलेली हाडे नंतर पुरून टाकतात. मृत मनुष्य धनवान असेल, तर त्याचे स्मारक म्हणून एखादा ओटा किंवा मनोरा बांधला जातो. अंत्यविधीची ही चाल फार प्राचीन असून, तिचा बौद्ध धर्माशी काही संबंध नाही.

(२) वरीलप्रमाणे मांसभक्षण झाल्यानंतर उरलेल्या हाडांचे चूर्ण करून ते इतर पदार्थांत मिसळून कुत्री व गिधाडे यांना खायला देतात.

(३) गुन्हेगार, कुष्ठरोगी, अपघातात मेलेला माणूस यांची प्रेते नदीत किंवा ओसाड जागी फेकून देतात. गरीब मनुष्याच्या नशिबी असाच अंत्यविधी असतो.

(४) दहन– लामाच्या प्रेतांचे दहन करतात. सर्पण मुबलक व सहज मिळत असेल तर इतर माणसांची प्रेतेही जाळतात. बुद्धाप्रमाणे बसलेल्या स्थितीत प्रेत चितेवर ठेवून अग्नी देतात व मग त्यावर तूप ओततात. दहनानंतर राख व अस्थी नेतात व अस्थींची पूड करून ती राख, माती व पाणी यांत कालवून लहान लहान चैत्य तयार करतात. हे चैत्य मृत्युस्तंभांच्या कोनाड्यांत ठेवतात किंवा त्यावर स्वतंत्र स्तंभ उभारतात.

(५) ल्हासा येथील सर्वसत्ताधीश लामांचा मृतदेह मीठ वगैरे संरक्षक पदार्थ घालून जतन केला जातो. देहावर लामाची वस्त्रे तशीच ठेवून त्याला बुद्धाप्रमाणे एका तांब्याच्या पात्रात बसवतात व त्याचे पूजासाहित्य त्याच्या भोवती ठेवतात. मग ते पात्र राजवाड्याच्या एका दालनात ठेवून त्याच्या समोर दिवे लावतात व अन्नपाणी ठेवतात. नंतर त्याच्यावर मनोरा उभा केला जातो. कालांतराने भक्त त्याची पूजा करू लागतात.

अंत्यविधीनंतर सर्वांना मेजवानी देण्यात येते.

इ. स. च्या ८ व्या शतकापर्यंत राजा किंवा सरदार यांच्या मृत्यूनंतर नरबळी देण्याची प्रथा तिबेटात होती. मृताच्या हाता-खालच्या अधिकारी वर्गातील ५–६ पुरुष त्याचे खास मित्र म्हणून निवडले जात व ते स्वत: प्राणार्पण करीत. त्यांचे देह मालकाच्या देहाजवळ पुरण्यात येत. मृताबरोबर त्याचे कपडे, त्याची हत्यारे व इतर वस्तूही पुरण्याची चाल होती. त्या जागी मातीचा चौथरा बांधीत.

प्रेताचे दहन वा दफन झाल्यानंतर दोन दिवसांच्या आत मृत्युदेवाला पशुबळी देऊन संतुष्ट करावे लागते. त्यावाचून तो निघून जात नाही असे समजतात. त्यानंतर मृताच्या आत्म्यासाठी ४९ दिवसांपर्यंत प्रार्थना करावी लागते. अन्यथा तो आत्मा मुक्त होत नाही, अशी कल्पना आहे. घरातून प्रेत बाहेर नेल्यावर मृत मनुष्याची एक प्रतिकृती घरात करून ठेवतात व तिच्यासमोर बसून भिक्षू प्रार्थना म्हणतात. ४९व्या दिवशी पुन्हा मेजवानी होते.

तरुण मनुष्य मेला तर ३ ते ४ महिने आणि एखादा वृद्ध मनुष्य मेला असता वर्षभर सुतक पाळले जाते. त्या अवधीत तोंड धुणे, केस विंचरणे व रंगीत कपडे घालणे वर्ज्य असते.

**दलाई लामा** – दलाई लामा हा तिबेटचा धार्मिक व राजकीय सर्वसत्ताधीश असतो. त्याला लोक देवच समजतात. प्रत्येक दलाई लामाने वयात येण्यापूर्वी द्रीबंग व सेरा या ठिकाणच्या मठात जाऊन तिथे शास्त्रचर्चेत भाग घेतला पाहिजे असा नियम असतो.



चौदावा दलाई लामा

सांप्रतचा १४ वा दलाई लामा अत्यंत बुद्धिमान असल्याचे सांगतात. तो चौदा वर्षांचा असताना द्रीबंग मठात दोन हजार भिक्षूंच्या उपस्थितीत त्याच्या ज्ञानाची परीक्षा घेण्यात आली. तो त्या कसोटीला पूर्णपणे उतरला.

या परीक्षेच्या वेळीच दलाई लामाचे भवितव्य ठरत असे. तो खऱ्या अर्थाने देशावर व जनतेवर स्वामित्व गाजवणार, का आपल्या गुरूंच्या हातचे बाहुले बनून राहणार, हे त्या वेळी कळून येई. आजवरच्या दलाई लामांच्या परंपरेत पाचवा आणि तेरावा दलाई लामा हे तेवढे आपल्या इच्छेप्रमाणे व अंगभूत सामर्थ्याने राज्यकारभार करणारे निघाले. बाकीचे फक्त नामधारी होते.

दलाई लामा कधी मरत नसतो; तर तो एका देहाचा त्याग करून दुसऱ्या कोणाच्या तरी देहात प्रवेश करतो, अशी तिबेटी लोकांची समजूत आहे.

एका दलाई लामाच्या निर्वाणानंतर श्रेष्ठ अधिकार असलेल्या व्यक्तींचे एक मंडळ नवीन दलाई लामाचा शोध करण्यास निघते. त्या मंडळाला मृत दलाई लामाकडून मार्गदर्शन होत असते. त्याने सूचित केलेल्या गावातील लहान मुलांची पाहणी करण्यात येते व विशिष्ट लक्षणांनी युक्त अशा मुलाची निवड केली जाते. नंतर सरकारी व्यवस्थेखाली त्या मुलाचे पालन पोषण व शिक्षण झाल्यावर त्याला गादीवर बसविले जाते.

ल्हासा येथील पोटाला राजवाडा हे दलाई लामाचे नेहमीचे वास्तव्यस्थान होय. उन्हाळ्यात मात्र तो स्थलांतर करी व समारंभाने वाजत गाजत तिथून दोन मैलांवरच्या नोरबुलिंक येथील राजवाड्यात राहायला जाई. मिरवणुकीच्या अग्रभागी शिंगे व तुताऱ्या वाजवणारे असत. त्यांच्या मागे दलाई लामाच्या तैनातीत असलेले भिक्षू चालत. नंतर मोठमोठे अधिकारी, दलाई लामाच्या घरातील लोक, मठाधिकारी, त्यांच्या दोन्ही बाजूंना त्याचे शरीरसंरक्षक व मठाधिकाऱ्यांच्यामागे लष्कराचे प्रमुख असत. त्यांच्यामागून हिरवे अंगरखे घातलेल्या छत्तीस पुरुषांनी वाहिलेली दलाई लामाची पालखी असे. तिच्यावर मोरचेल धरलेले असे. सर्व देखावा रंगीबेरंगी आणि भव्य असे.

दलाई लामाचा ल्हासा येथील राजवाडा देवांनी बांधला, अशी तिबेटी लोकांची समजूत आहे. इतिहास मात्र असा, की सुमारे तीनशे वर्षांपूर्वी पाचव्या दलाई लामाने तो बांधला व एका प्रमुख अवलोकितेश्वराच्या पवित्र स्थानाच्या स्मृतिप्रीत्यर्थ पोटाला हे नाव त्या प्रासादाला दिले. राजवाड्याच्या छपरावर त्या दलाई लामाचे अवशेष ठेवलेले आहेत. हा राजवाडा बाहेरून भव्य व प्रशस्त दिसतो; पण त्याच्या अंतर्भागात मात्र सर्वत्र अंधार आहे.



पोटाला राजवाडा

दलाई लामा म्हणून एखाद्याची निवड झाल्यावर त्याला एकट्याला त्याच्या कुटुंबापासून दूर पोटाला राजवाड्यात राहावे लागते. पोटाला हा त्याच्या वाट्याला सोन्याचा पिंजराच असतो. दिवसाचे अनेक तास त्याला प्रार्थना करण्यात व धार्मिक ग्रंथांच्या अध्ययनात घालवावे लागतात.

नव्या वर्षाच्या उत्सवात लोक पोटाला राजवाड्यात दलाई लामाचे आशीर्वाद घेण्यासाठी जात असत. त्या वेळी किनखाबी सिंहासनावर अनेक तास बुद्धासारखा बसून दलाई लामा लोकांना आशीर्वाद देत असे. सिंहासनाच्या पायाशी लोकांनी अर्पण केलेल्या पैशांच्या थैल्या, रेशमी कापड आणि पांढरे गळपट्टे यांचे ढीग जमत असत.

पंचेन लामा— याचा अधिकार दलाई लामाच्या खालोखाल असून, तो अमिताभ बुद्धाचा एक अवतार मानला जात असे. मात्र तिबेटच्या राजकारणात त्याला मुळीच सत्ता नव्हती. तिबेटमधील शिगालो शहरी याची गादी होती. त्या भागात पंचेन लामाची थोडीशी सत्ता चालत होती. इ. स. १९१० मध्ये १३ वा दलाई लामा भारतात आला होता, तेव्हा चिन्यांनी पंचेन लामाला हाताशी धरून त्याला काही अधिकार दिले. पुढे तिबेटी लोकांनी चिनी सैन्याचा पराभव केला, तेव्हा त्या सैन्याबरोबरच पंचेन लामा पूर्व तिबेटात पळाला होता. तो इ. स. १९३७ साली तिथेच मरण पावला. पुढे इ. स. १९५० मध्ये चिनी सरकारने एका दहा–बारा वर्षांच्या तिबेटी मुलाला पंचेन लामा ठरवले व त्याला साम्यवादी पद्धतीचे शिक्षण देऊन तयार केले. तेव्हापासून हा पंचेन लामा चिनी सरकारच्या हातातले बाहुले म्हणून नांदत आहे. [ म. ज्ञा. को.; एन्सा. रि. ए.; हि. कै. मा.; हिं. वि. को.; सेव्हन इयर्स इन तिबेट– हायनरिख हारर, १९५६; तिबेट अँड इट्स हिस्टरी– एच्. इ. रिचर्डसन, १९६२; विट्रेयल ऑफ तिबेट– जे. पी. मित्तर, १९६४; बायोनेट्स टु ल्हासा– पीटर फ्लेमिंग, १९६१ ]

**तिबेटी रामायण** तिबेटी भाषेतील रामायण. भारतात जसा सर्वत्र रामकथेचा प्रसार झाला, तसाच तो भारताबाहेरही झाला. भारताच्या उत्तरेकडील देशांत रामकथा पोचविण्याचे काम बौद्धांनी केले. तिबेट हेही बौद्धांच्याच कक्षेत येते. तिथे रामायणाच्या अनेक हस्तलिखित प्रती उपलब्ध झाल्या आहेत. त्या इ. स. च्या आठव्या किंवा नवव्या शतकातील आहेत. वाल्मीकिरामायणापेक्षा तिबेटी रामायणाची कथा भिन्न आहे. त्यात सीता ही रावणाच्या पट्टराणीची कन्या असून, तिची जन्मपत्रिका पित्याला अशुभ असल्यामुळे तिला समुद्रात फेकून देण्यात आले, असे सांगितले आहे. या रामायणानुसार दशरथाला दोनच राण्या होत्या. त्यांपैकी कनिष्ठ राणीच्या पोटी स्वतः विष्णूने जन्म घेतला व त्याला रामन असे नाव मिळाले. ज्येष्ठ राणीच्या पोटी विष्णुपुत्राने जन्म घेतला व त्याला लक्ष्मण असे म्हणू लागले. या दोन पुत्रांपैकी कोणाला राज्य द्यावे, असा दशरथापुढे पेच पडला असता रामनने लक्ष्मणाला राज्य द्यायला लावले आणि तो तप करण्यासाठी अरण्यात निघून गेला. समुद्रातून वर काढलेली सीता किंवा लीलावती नावाची एक कन्या आसपासच्या शेत-कऱ्यांनी तप करणाऱ्या रामनला अर्पण केली आणि तिच्याशी विवाह करण्याची त्याला विनंती केली. त्याप्रमाणे रामनने तिचे पाणिग्रहण केले व त्यानंतर अयोध्येत जाऊन आपले राज्य मिळवले.

या रामायणातील रावण सीतेचे हरण करतो; पण तिच्या अंगाला स्पर्शही करीत नाही. नंतर रामनकृत सीतेचा शोध, वानरांशी मैत्री, इ. रावणवधापर्यंतच्या घटना वाल्मीकीच्या पद्धतीने वर्णन केलेल्या आहेत.

या रामायणात रावणाचा अंगठा हे त्याचे मर्मस्थान असल्याचे सांगितले आहे.

पुढे रजकाच्या बोलण्यावरून राम सीतेचा त्याग करतो; पण त्याआधीच सीता प्रसूत होऊन लव–कुशांचा जन्म झालेला असतो.

या तिबेटी रामायणावर गुणभद्राचे उत्तर पुराण व बृहत्कथा यांचा बराच प्रभाव आहे. [ रामकथा ]

**तिम्मण्ण** एक कन्नड कवी. हा विजयनगर येथे कृष्णदेवरायाच्या राजसभेतील कवी होता. कन्नड महाभारताचा कर्ता कुमारव्यास याचे काव्य वाचून याला स्फूर्ती झाली आणि त्याने कन्नड भाषेत महाभारताच्या अखेरच्या सात पर्वांवर काव्यरचना केली. तिम्मण्णाने कुमारव्यासाच्या अपुऱ्या कृतीची परिपूर्तीच केली म्हटले तरी चालेल. तिम्मण्णाच्या महाभारताचे नाव कृष्णराजभारत असे आहे. हा भागवत-संप्रदायी होता. [ हिं. क. भ. तु. अ. ]

**तियन** केरळातील एक जात. मलबार, कोच्चिन आणि त्रिवांकुर या भागात यांची वस्ती आहे. मुळात हे लोक लंकेमधून मलबारमध्ये आले व येताना त्यांनी आपल्या-बरोबर नारळाचे झाड आणले, असे सांगतात.

तियन पुरुष कपाळावर, छातीवर आणि खांद्यांवर भस्माचे पट्टे ओढतात. त्यांच्या कानांत सोन्याची एक किंवा दोन वळे असतात. बोटांत एक लोखंडाची आणि दोन चांदीच्या अंगठ्या असतात. चांदीच्या एका अंगठीत हत्तीच्या शेपटीचा बारीक केस असतो. ते गुडघ्यापर्यंत पोचणारी लुंगी नेसतात. पूर्वी तियन स्त्रियाही तेवढेच रंगीत किंवा पट्ट्यापट्ट्यांचे कापड कमरेभोवती गुंडाळीत. त्यांचा कमरेवरचा भाग उघडाच असे. फक्त सुतकाच्या दिवसांत तेवढा तो वस्त्राने झाकून घेत. प

हल्ली शहरातील तियन स्त्रिया छातीचा भाग वस्त्राने झाकून घेतात. त्या कानांत कर्णफुले आणि गळयात खोटया खडयांच्या माळा घालतात.

**उद्योगधंदे** – ताडी काढणे हा तियन पुरुषांचा प्रमुख व्यवसाय आहे. याशिवाय ते शेती व व्यापारही करतात. काही तियन विणकाम करतात, काही गूळ तयार करतात, तर काही माडांच्या बागा लावतात. त्यांच्या स्त्रिया काथ्याच्या दोऱ्या तयार करतात. काही लोकांनी काथ्यापासून चटया व तशाच प्रकारच्या इतर वस्तू तयार करण्याचे कारखानेही काढले आहेत.

**प्रसूतिप्रथा** – गरोदर स्त्रीच्या पाचव्या व सातव्या महिन्यात भुताखेतांनी गर्भाला त्रास देऊ नये, म्हणून एक विधी करतात. त्यासाठी अंगणात केळीचे मखर तयार करतात. मखरातल्या व बाजूच्या जमिनीवर भाताच्या तुसाची काळी राख पसरून त्यावर पांढरे, तांबडे, हिरवे व पिवळे चौकोन आखतात. भुतांना बोलावण्यासाठी हे चौकोन असतात. गरोदर स्त्री व इतर सहा स्त्रिया हातांत दिवे घेऊन मखराला सात प्रदक्षिणा घालतात व सातव्या प्रदक्षिणेला जळत्या वाती


तियन स्त्री

मखरात टाकून मखराच्या पश्चिमेकडे पूर्वाभिमुख उभ्या राहतात. मग धोबी गाणे गाऊन भुतांना आवाहन करतो. त्या वेळी जोराने थाळचा वाजवतात. रात्रभर हा कार्यक्रम चालतो. शेवटी एक जिवंत कोंबडा तिच्या कपाळाजवळ धरून मंत्र म्हणतात. तिला जर त्यामुळे मूर्च्छा आली, तर कोंबडयाचे मुंडके उडवतात. अन्यथा कोंबडयाला बाजूला करतात. दुसऱ्या दिवशी सकाळी स्त्रीला चिंचेच्या पानांचा रस प्यायला देण्याचा समारंभ होतो.

मूल जन्मले, की मुलाचा मामा अंगणात जाऊन माडाचे वाळलेले चुडत तीनदा जमिनीवर आपटतो. मुलगा झालेला असल्यास मामाला कापड व मुलगी असल्यास कापड आणि काशाची थाळी मिळते. जननाशौच नऊ किंवा अकरा दिवस पाळतात. ते संपल्यावर सर्व घर शेणाने सारवतात व वापरातले सर्व कपडे धोबिणीला देतात. घरातल्या सर्व स्त्रिया अंगाला तेल लावून तळयावर आंघोळीला जातात. धोबीण त्यांना आपल्याजवळची धूत वस्त्रे देते.

मुलाचे नाव सहाव्या महिन्यात ठेवतात. मोठ्या मुलाला नेहमी पैतृक आजोबाचे नाव ठेवतात.

**ताळीबंधन** – मुलगी वयात येण्यापूर्वी तिला ताळी बांधण्याचा समारंभ होतो. हा समारंभ तीन दिवस चालतो. पहिल्या दिवशी चुडतांचे मखर तयार करून ते सजवतात. मुलीचे लग्न ठरलेले असेल, तर तिचा भावी पतीच तिच्या गळयात ताळी बांधतो. अन्यथा हे काम मुलीची काकी करते. काही वेळा एखाद्या तरुणाकडूनही ताळीबंधन केले जाते.

मुलीला प्रथम रजोदर्शन होताच ती चार दिवस घरातील उत्तरेकडच्या खोलीत राहते. ती खोली माडांच्या पात्यांच्या तोरणांनी सजवितात. तिच्या झोपायच्या चटईभोवती भात, तांदूळ व नारळी-पोफळीची फुले यांची रेघ काढतात. तिच्या जवळ समई तेवत ठेवतात. त्याचप्रमाणे भुतांखेतांपासून रक्षण व्हावे, म्हणून तिच्याजवळ एक सुरीही ठेवतात. पहिल्या दिवशी रजस्वला स्त्रीची काकू किंवा रजस्वला विवाहित असल्यास तिची नणंद तिच्या डोक्यावर एक सोन्याचे नाणे ठेवते व त्यावर तेल ओतते. त्या दिवशी तिला गूळभात खायला देतात. त्या रात्री धोबीण आपल्याकडचे धूत वस्त्र तिला देऊन तिचे वस्त्र घेऊन जाते.

**विवाहप्रथा** – पूर्वी उत्तर मलबारमध्ये मातृसत्ताक व द. मलबारमध्ये पितृसत्ताक कुटुंबपद्धती होती. त्यामुळे द. मलबारातील तियन मुलगी व उ. मलबारातला मुलगा यांचे लग्न होत नसे. तियन लोकांत आतेभावाचा मामेबहिणीवर अग्रहक्क असतो. त्याचा हा हक्क डावलल्यास त्याला त्याबद्दल नुकसानभरपाई मिळते. लग्न ठरवण्यापूर्वी पत्रिका पाहण्याचा समारंभ होतो. मुलीच्या घरी, तंदान जातीच्या पुरोहिताकरवी हा विधी होतो. वधू-वरांच्या पत्रिका जुळल्यावर कांजी पिण्याचा समारंभ होतो. त्याचा विधी असा –

दारासमोर पडवीत एक चटई अंथरून तिच्यावर पुन्हा गवती चटई व धुतलेले पांढरे वस्त्र घालतात. जवळच एक समई, एका थाळीत तांदुळाने भरलेले माप, पाण्याचे एक भांडे व पांढरे कापड ठेवतात. नवरा मुलगा, त्याचा मेहुणा व पुरोहित हे पूर्वेकडे तोंड करून त्या चटईवर बसतात. मग मुलीकडचा पुरोहित त्यांना कांजीच्या थाळया देतो. तिघेही कांजी पितात

व मागाहून गूळ खातात. त्यानंतर सर्वांना विडे देतात. मग मेजवानी झाल्यावर लग्नाचा मुहूर्त ठरवतात.

त्यानंतर अक्षत देतात. त्यासाठी वराच्या घरी त्याच्या मित्रांना बोलावतात. नवरा मुलगा नवीन वस्त्र नेसतो. त्याचा पुरोहित त्याच्या उजव्या हातात सोन्याचे कंकण घालतो. मग कमरेला मेखला बांधून सोन्याची किंवा चांदीची मूठ असलेला एक चाकू त्या मेखलेत अडकवतो. दुपारी गोडधोड जेवण झाल्यावर सर्वजण तंदानच्या घरी जातात. तिथे पुन्हा जेवण होते. नंतर तीन, पाच किंवा सात घरी जाऊन लग्नाचे बोलावणे करतात.

लग्नाच्या दिवशी न्हावी नवऱ्या मुलाची व त्याच्या दोन मित्रांची हजामत करतो. नंतर नवरा मुलगा स्नान करून, गंध लावून नवे वस्त्र नेसतो व अलंकार घालतो. तंदान त्याच्या हातात तलवार देतो. मग नवरा मुलगा मिरवणुकीने वधूगृही जातो. मिरवणुकीपुढे तलवारी घेऊन नाचणारे काही लोक असतात.

वधूगृही वधूमातेला वस्त्रे अर्पण करण्याचा विधी होतो. मग वधू-वरांना भात वाढतात. वधूची आई त्यातले तीन घास वराच्या ओठापर्यंत नेऊन परत आणते. वराची वहीण वधूलाही तसेच करते. नंतर वधू-वरांवर अक्षता टाकल्यावर विवाहविधी संपतो व मग वरात निघते.

**देवधर्म** – तियन हे शक्तीचे उपासक आहेत. याशिवाय ते भगवती, सुब्रह्मण्य, कोटियूर, इ. देवतांनाही भजतात. भगवतीच्या मंदिरातील पुजारी तियन जातीचाच असतो.

**मृतकप्रथा** – माणस मरायला टेकला, की नातेवाईक त्याला खाटेवरून जमिनीवर ठेवतात. सर्वसाधारणपणे मोठी माणसे आणि तरवाडातील मुख्य व्यक्ती यांना जाळतात व बाकीच्यांना पुरतात. सुतक अकरा किंवा तेरा दिवस पाळतात. वार्षिक श्राद्ध करतात. याशिवाय, मृताची एक रौप्यप्रतिमा करून ती एखाद्या देवळात ठेवतात व तिच्या पूजेअर्चेची व्यवस्था करतात. तिरुनेल्ली आणि तिरुनवयी इथल्या मंदिरांत तियनांच्या अशा बऱ्याच प्रतिमा आहेत. [ का. ट्रा. स. इं. ]

**तियार** एक जात. हे लोक द्रविड असून बंगाल, बिहार, ओडिसा, मध्यप्रदेश, इ. प्रदेशांत आढळतात. मच्छिमारी किंवा शेती हा यांचा व्यवसाय आहे. तियार किंवा तियर हा शब्द धीवर या संस्कृत शब्दावरून आला असावा. धीवर म्हणजे मच्छिमार होत. हे लोक वैष्णवपंथी आहेत. यांचे धार्मिक विधी शेवरीच्या झाडाखाली होतात. बुराबुरी, मनसा, गंगा, झलरकुमारी, इ. यांची दैवते आहेत. संकटप्रसंगी या दैवतांना ते साकडे घालतात. हे लोक नापित आणि धोबी यांच्याकडची कामे करीत नाहीत. यांचे पौरोहित्य पतित ब्राह्मण करतात. बिहारमधील तियारांच्या चालीरीती अन्य प्रांतांतील तियारांच्या चालीरीतींहून भिन्न आहेत.

चैत्र आणि भाद्रपद या दोन महिन्यांतील प्रत्येक मंगळवारी हे लोक उपवास करतात आणि आपल्या हुकांची व जाळचांची पूजा करतात.

**विवाहप्रथा** – वधूची पसंती वरपिता करतो. ती झाल्यावर वधू-वरांच्या जन्मपत्रिका पाहतात. त्या जुळत नसतील, तर वराचे मूळ नाव बदलून वधूच्या पत्रिकेशी जुळेल असे नवे नाव ठेवतात. एखाद्या अविवाहित तरुणाला विधवेशी लग्न करायचे असले, तर त्याला प्रथम पुष्पगुच्छाशी विवाह करावा लागतो.

यांच्यांत अपराधाबद्दल ज्या अनेक शिक्षा दिल्या जातात, त्यांपैकी एक गोचरणव्रत नामक शिक्षा असते. या शिक्षेचा प्रकार असा —

अपराधी इसमाने एकवीस दिवस एखाद्या गायीबरोबर अष्टौप्रहर राहायचे असते. गाय बसली की बसायचे, उभी राहिली की उभे राहायचे व ती चरायला गेली, की तिच्याबरोबर जायचे. शिक्षेची मुदत संपली, की एका विशिष्ट गावी तीर्थयात्रेला जायचे आणि परत आल्यावर गोमूत्रप्राशन करून ज्ञातिभोजन घालायचे.

मध्य प्रदेशातील तियारांच्या काही पोटजाती आहेत. त्यांची प्रधान, दास, गुरू, इ. व्यवसायवाचक आडनावे आहेत.

ओडिसातल्या तियारांना तियोरो म्हणतात. हे लोक कमळपत्राच्या पत्रावळी बनवून विकतात. तोरै, घोदै, आर्तिय आणि कुलोदोंदिया अशा त्यांच्या चार पोटजाती असून, त्यांचा परस्परांत लग्नसंबंध होत नाही. [ से. इं. १९५१; ट्रा. का. इं. प्रॉ. इं.; का. ट्रा. स. इं. ]

**तिरमाळी** भिक्षेकऱ्यांची एक जात. यांना तिरमल असेही म्हणतात. यांचे मूलस्थान आंध्र असून, यांचा संचार महाराष्ट्र व मध्य प्रदेश या भागांतही आहे. यांची मातृभाषा तेलुगू आहे; परंतु महाराष्ट्रात हे मोडके तोडके मराठी बोलतात. हे लोक सजवलेले नंदीबैल बरोबर घेऊन सहकुटुंब गावोगाव हिंडतात, गुब्गुबू असा आवाज करणारे गुबगुबी नावाचे वाद्य वाजवून नंदीबैलाचा खेळ करून दाखवितात आणि भिक्षा मागतात. तसेच ते काशीहून गंगोदक आणून ते लहान लहान काचेच्या वाटल्यांतून दक्षिणेत विकतात, म्हणून त्यांना काशीकापडी असेही म्हणतात. त्यांच्या जातीचे तेलुगू नाव गंगेड्डू आणि तमिळ नाव एंदंदी असे आहे. या दोहें

नावांचा अर्थ 'नंदीबैल गावोगावी, घरोघरी फिरवून भिक्षा मागणारे लोक' असाच आहे.

हे लोक जिथे जातात, तिथे गावाबाहेर तंबू ठोकून त्यांत मुक्काम करतात. नंदीबैलाच्या खेळाशिवाय जानवीजोड, रुद्राक्षांच्या व तुळशीच्या माळा, धार लावण्याच्या सहाणा, चंदनाची खोडें, इ. वस्तू विकण्याचा व्यवसायही ते करतात. त्यांच्या बायका गोधड्या शिवून देतात आणि पोत, सुया, दाभण, इ. वस्तू विकतात. काही लोक तिरमाळी ही स्वतंत्र जात न मानता तिला दासरी या दक्षिणी जातीची पोटजात मानतात. तिरुपती हे यांचे प्रमुख तीर्थक्षेत्र आहे. तिथेच त्यांचा गुरूही राहतो.

हे लोक आपले गोत्र काश्यप असे सांगतात. बालाजी व अंबाबाई ही त्यांची दैवते आहेत. त्यांची जातपंचायत असते. सर्व सामाजिक तंटयांचे निवाडे ज्ञातपंचायतीतर्फे होतात.

यांच्यांत विवाह सामान्यतः श्रावण महिन्यात होतात. कारण त्या वेळी पावसाळा असतो म्हणून हे फेरी संपवून घरी आलेले असतात. सगोत्र विवाह रूढ आहेत. परंतु एकच आडनाव असलेल्या कुटुंबांत विवाहसंबंध होत नाही.

**प्रसूतिप्रथा** –– मूल जन्मल्यानंतर पाचव्या दिवशी सूर्यास्त झाला, की सटवाईची पूजा करतात. त्या दिवशी रात्रभर जागरण करतात आणि भुताखेतांपासून नवजात बालकाचे रक्षण व्हावे म्हणून त्याच्या उशाखाली पादत्राण ठेवतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात अथवा पुरतात. मृताशौच दहा दिवस पाळतात. दहाव्या किंवा अकराव्या दिवशी ब्राह्मणांना व गावातील सर्व ज्ञातिबांधवांना भोजन घालतात. पाहा –– गंगेड्डू. [ पूना गॅझे.; बॉं. बे. क्रा.; गांवगाडा; ट्रा. का. सें. प्रॉं. इं. ]

## तिरश्ची

एक सूक्तद्रष्टा. हा आंगिरस कुलातला आहे. त्यामुळे याला तिरश्ची आंगिरस असे म्हणतात. याच्या नावावर ऋग्वेदातील ८.९५ हे सूक्त आहे. त्यात इंद्राची स्तुती आहे. आपण एक सिद्धहस्त सूक्तकार असल्याचे त्याने सांगितले आहे. त्याची एक ऋचा अशी–

इन्द्र यस्ते नवीयसीं गिरं मन्द्रामजीजनत् ।
चिकित्विन्मनसं धियं प्रत्नामृतस्य पिप्युषीम् ॥
(ऋ. ८.९५.५)

अर्थ – हे इंद्रा, या तिरश्चीने (तुझ्या प्रीत्यर्थ) एक अपूर्व आणि उल्हासकारक कवन केले आहे. जिच्या योगाने मनाला सारासार ज्ञान होते, जी पुरातन आहे, जिच्यामुळे सद्धर्माचे ज्ञान होते, अशी ध्यानपद्धतीही त्याने योजिली आहे.



## तिरहुत

एक प्राचीन देश. उत्तरेस हिमालय, दक्षिणेस गंगा, पूर्वेस कोसी आणि पश्चिमेस गंडक नदी अशा याच्या सीमा होत्या. सांप्रत या प्रदेशात चंपारण्य, मुजफ्फरपूर व दरभंगा या जिल्ह्यांचा आणि तराईच्या एका पट्टीचा अंतर्भाव होतो.

तिरहुत हा तीरभुक्ती या शब्दाचा अपभ्रंश आहे. तीरभुक्ती म्हणजे नदीकाठचा प्रदेश होय. भुक्ती याचा अर्थ जुन्या काळी प्रांत असा होता, असे तत्कालीन शिलालेखांवरून कळते.

प्राचीन काळात या प्रदेशात तीन मोठे यज्ञ झाले, अशी आख्यायिका आहे. त्यांपैकी एक यज्ञ सीतेच्या जन्माच्या वेळी सीतामढी येथे, दुसरा हिमालयाच्या पायथ्याशी रामाने जिथे शिवधनुष्याचा भंग केला, त्या धनुख गावात व तिसरा मिथिला देशाची राजधानी जनकपूर (हल्ली नेपाळात) येथे सीतेच्या विवाहाच्या वेळी झाला. [ मुजफ्फर. गॅझे. ]

## तिरुआतिरा

केरळातील स्त्रियांचा एक व्रतोत्सव. आतिरा म्हणजे आर्द्रा नक्षत्र होय. पौषातल्या आर्द्रा नक्षत्रावर साजरा केला जाणारा सण, म्हणून याला तिरुआतिरा म्हटले आहे. महाराष्ट्रातल्या स्त्रियांच्या हरतालिकाव्रतासारखेच हे व्रत आहे.

पार्वतीच्या तपाने प्रसन्न होऊन शिवाने या नक्षत्रावर नवा जन्म घेतला व तिचे पाणिग्रहण केले, या पौराणिक कथाप्रसंगावर या व्रतोत्सवाची उभारणी झाली आहे. शिवाने केलेल्या कामदहनाच्या घटनेशीही या उत्सवाचा संबंध लावतात. आर्द्रा नक्षत्र ज्या दिवशी असेल, त्याच्या आधी दहा दिवस सर्व स्त्रिया ब्राह्ममुहूर्तावर उठतात व मंगलगीते गात गात नदीवर स्नानाला जातात. या गीतांपैकी एक गीत असे––

धनुमासत्तिल तिरुआतिरा। भगवान्टे तिरुनाळल्लो
भगवति तिरुनोयम्ब। उण्णरुते उरङ्ङरुते
आटणमपोल पाटणमपोल। तुटिक्कणमपोल कुळिक्कणमपोल

अर्थ –– पौष मासातला तिरुआतिरा हा शिवाचा जन्मदिन आहे. हे भगवतीचे महाव्रत आहे. म्हणून सर्वजणी उपास करा, नाचा व गा. सकाळी उठून पाण्यात बुडी मारा आणि पाणी वर उडवा.

स्नान करताना दोन्ही हातांनी पाणी वर उडवणे, हे या व्रताचे मुख्य अंग होय. स्त्रिया स्नानोत्तर कपाळी मंगल तिलक लावतात व केसांत 'दशपुष्प' माळतात. हे दहा दिवस रोज रात्री बायका जे नृत्य करतात, त्याला तिरुआतिराकळी असे म्हणतात. शेवटच्या दिवशी रात्री जागरण करतात, नाचतात, गातात व उंझिजाल नामक वेळूच्या झोपाळयांवर झोके घेतात.

हे झोपाळे झाडांच्या फांद्यांना टांगतात. या रात्री स्त्रियांना पातिराप्पुवू नामक फूल वेणीत माळावेच लागते आणि पार्वतीप्रमाणे १०१ पानेही भक्षण करावी लागतात.

या सर्व व्रतोत्सवात पुरुषांनी फक्त पूजासाहित्य जमवून देण्यापुरताच भाग घ्यायचा असतो. [ केरळ ]

**तिरुकल्याणम** तमिळनाडमधील एक उत्सव. तमिळ भाषेत विवाहाला कल्याण असा शब्द आहे. तिरुकल्याणम हा शिव–पार्वतींच्या विवाहाचा उत्सव आहे. दक्षिणेतील अनेक शिवमंदिरांत विशिष्ट तिथींना हा उत्सव होत असतो. रामेश्वर क्षेत्री आषाढ कृष्ण अष्टमीपासून श्रावण शुद्ध पंचमीपर्यंत हा उत्सव चालतो. श्रावण शुद्ध चतुर्थीच्या दिवशी पार्वती आपल्या मंदिरातून निघून रामकुंड तीर्थावर जाते आणि तिथे एका मंडपात तपाला बसते. तिथे यात्रिकांची गर्दी जमलेली असते. अनेक स्त्रिया उपास करणाऱ्या पार्वतीपुढे केळीची पाने मांडून त्यांवर तिच्यासाठी फळे मांडतात, मोवती फुलांच्या रांगोळ्या काढतात आणि धूपदीप लावतात.



तिरुआतिराकळी

त्याच दिवशी मध्यान्हीच्या सुमारास तपस्विनी पार्वतीला भेटण्यासाठी शिवही मंदिरातून बाहेर पडतो. सुवर्णाच्या नंदीवर विराजमान झालेली शिवाची उत्सवमूर्ती पालखीतून मिरवणुकीने वाजत-गाजत रामकुंडाकडे जाते. मिरवणुकीत अग्रभागी सजवलेला हत्ती असतो. मिरवणुकीच्या मागून ब्राह्मण चारही वेदांचे मंत्रघोष करीत जातात आणि त्यामागे टाळ आणि फिडल यांच्या साथीने तेवारम गाणारे भजनी मेळे चालतात.

नागपंचमीच्या दिवशी दुपारी रामनाथपुरममधील [illegible]पान्यांतर्फे एक ब्राह्मण पार्वतीसाठी मंगळसूत्र व रेशमी [illegible] घेऊन हत्तीवरून मिरवत मंदिरात येतो. नंतर मंदिराच्या पूर्वद्वाराला लागून असलेला लग्नमंडप फुलांनी सुशोभित करतात. होमाचे कुंड सारवून ठेवतात. अशा मंगल वातावरणात हजारो भक्तांच्या उपस्थितीत गोरज मुहूर्तावर शिव–पार्वतींचे लग्न लागते. त्यानंतर लाजाहोमादी विधी होतात. पुढे चार दिवसांनी शिव एक मैल अंतरावर असलेल्या गंधमादन टेकडीवर पार्वतीसह सासुरवाडीला म्हणून जातो आणि तिथला सत्कार अनुभवून परत मंदिरात येतो.

तमिळनाडमधील काही मंदिरांत हा उत्सव आठ–नऊ दिवस चालतो. उत्सवाच्या प्रारंभी मुख्य पुरोहित अष्ट दिक्पालांची स्थापना करतो आणि ध्वज उभारून ध्वजाची पूजा करतो. मग निरनिराळे मंत्र म्हणून होमहवन केले जाते. रोज भिन्न देवतांच्या मूर्तींची मिरवणूक निघते. अखेरच्या दिवशी एका मोठ्या शृंगारलेल्या मंचकावर शिव–पार्वतींच्या प्रतिमा ठेवून, त्यांपुढे करमणुकीचे कार्यक्रम केले जातात. उत्सव समाप्त होताच दिक्पालांचे विसर्जन करून ध्वज खाली उतरवतात. दुसऱ्या दिवशी देवदासींच्या नृत्याचा खास कार्यक्रम होतो. [ तमिळनाडु; सा. इं. गाँ.]

**तिरुच्चेन गोड** एक क्षेत्र. तमिळनाडमध्ये मद्रास–मंगलोर लोहमार्गावर शंकरीदुर्ग स्टेशनपासून सात मैलांवर सेलम जिल्ह्यात एका पर्वतावर हे क्षेत्र आहे. तेथील अर्धनारीश्वरमंदिर प्रसिद्ध आहे. इथल्या देवतीर्थात पार्वतीने तपश्चर्या केली, अशी कथा आहे. या पर्वताचे नाव नागाचल असून, तो मेरूचा एक खंड मानला जातो. मंदिराच्या मार्गावर ३५ फूट उंचीचा सर्प बनविलेला आहे. सुब्रह्मण्य आणि नंदी यांच्याही मूर्ती तिथे आहेत. [ कल्याण–तीर्थांक ]

**तिरुत्तणी** द. भारतातील एक क्षेत्र. मद्रास–रायचूर मार्गावरील अरकोणमपासून आठ मैलांवर हे स्थान

आहे. इथे कार्तिकेयाचे विशाल मंदिर आहे. द. भारतात असलेल्या सहा प्रसिद्ध कार्तिकेय–क्षेत्रांत याचा समावेश होतो. इथे प्रत्येक महिन्यात मोठी यात्रा भरते. [ कल्याण–तीर्थांक ]

**तिरुनालईप्परवार** तमिळनाडमधील एक नायन्मार. हा जातीने अंत्यज होता. चिदंबरम येथील शिवलिंगाचे दर्शन व्हावे, म्हणून बाहेर तिष्ठत असता त्याला अग्निप्रवेश करण्याचा दृष्टांत झाला. त्याने अग्निप्रवेश करताच तो ब्राह्मण-रूपाने बाहेर पडला. मग सर्वांनी त्याचा जयजयकार करून त्याला मंदिरात नेले. [ पे. पु. ]

**तिरुपती–तिरुमलै** एक वैष्णव क्षेत्र. हे स्थान आंध्र प्रदेशामध्ये चित्तूर जिल्ह्यातल्या चंद्रगिरी तालुक्यात शेषाचल पर्वतावर आहे. या डोंगराला सात शिखरे असल्यामुळे तो सात फणांनी युक्त असा साक्षात आदिशेषच आहे, अशी पुरातन काळापासून समजूत आहे. पुराणकथांच्या मते हा मेरू पर्वताचा तुकडा आहे. व्यंकटेशाच्या मंदिरामुळे या डोंगराला वेंकटाचल या नावानेही ओळखतात. दक्षिणेत हा तिरुमलै (श्रीपर्वत) या नावाने प्रसिद्ध आहे.

शेषाचलावरील व्यंकटेशाचे स्थान आणि पायथ्याशी वसलेले गाव या दोहोंना मिळून तिरुपती म्हणतात. तिरू म्हणजे श्री. तिरुपती म्हणजे श्रीपती = विष्णू. व्यंकटेश हे विष्णूचेच एक रूप समजले जाते. महाराष्ट्रातील विठ्ठल जसा बालकृष्ण समजला गेला आहे, तसाच तिरुपतीचा व्यंकटेशही बालाजी



गोपुर व ध्वजस्तंभ– तिरुपती

याच नावाने लोकप्रिय झाला आहे. महाराष्ट्रातील लोक तिरुपतीला गिरीचा बालाजी म्हणूनच ओळखतात.

तिरुपतीच्या माहात्म्याविषयीच्या कथा बहुतेक सर्व पुराणांत आहेत. त्यांतील प्रमुख कथा अशी–

मनूने एकदा यज्ञ केला असता तिथे जमलेल्या ऋत्विजांत ब्रह्मा–विष्णु–महेशांच्या श्रेष्ठतेविषयी वाद निर्माण झाला.



पद्मावती– तिरुचानूर

त्या बाबतीत एकमत होईना. म्हणून वादाचा निर्णय करण्याचे काम भृगू ऋषीवर सोपविण्यात आले. भृगू त्या मोहिमेवर गेला असता शिव आणि ब्रह्मा यांनी त्याची उपेक्षा केली. शेवटी तो विष्णूकडे गेला. विष्णू गाढ झोपलेला होता. भृगूने त्याला लाथ मारली. विष्णूने जागृत होताच भृगूला विचारले, की तुमच्या पायाला लागले तर नाही ना ? विष्णूच्या या सौजन्यपूर्ण वर्तनाने भृगू प्रसन्न झाला आणि त्याने परत येऊन ‘ तीन्ही देवांत विष्णूच श्रेष्ठ ’ अशी सर्वांना ग्वाही दिली. विष्णूने भृगूच्या लाथेची खूण श्रीवत्सलांछन म्हणून आपल्या वक्षःस्थळावर कायम वागविली.

भृगूने विष्णूला लाथ मारल्यामुळे लक्ष्मी मात्र भृगूवर रुष्ट झाली. भृगूला शासन करण्याऐवजी विष्णूने उलट त्याला आदरानेच वागविले, म्हणून ती विष्णूवरही रागावली आणि वैकुंठ सोडून निघून गेली. तिच्या विरहाने विष्णूला एकटाचाला

वैकुंठात करमेनासे झाले, म्हणून तोही पृथ्वीवर आला आणि शेषाचलावर वस्ती करून राहिला.

**इतिहास** – इथे व्यंकटेशाजवळ लक्ष्मी नाही. तिचे मंदिर डोंगराखाली तिरुचानूर नावाच्या ग्रामवस्तीत आहे. इथे तिला पद्मावती किंवा अलमेलुमंग असे म्हणतात. तिरुचानूरला अलमेलुमंगपुरम असेही नाव आहे. हे नाव दीड–दोन हजार वर्षांइतके प्राचीन आहे. येथील उपलब्ध शिलालेखांपैकी सर्वांत प्राचीन शिलालेख इ. स. ७९० चा आहे. चोळ, पांडय, पल्लव आणि तुळुव या दक्षिणेतील प्रमुख घराण्यांतील अनेक राजे व्यंकटेशाचे भक्त होते. त्यांनी या स्थानाचे वैभव अनेक प्रकारांनी वाढविल्याच्या खुणा आजही इथे आढळतात. सुंदर पांडयाने इ. स. १२६२ मध्ये व्यंकटेशाच्या मंदिरावरील कळसाला सोन्याचा मुलामा दिला. वीरनरसिंह यादवराय याने इथे आपली सुवर्णतुला करून त्या सोन्याने देवाचे अलंकार घडविले. कृष्णदेवराय तर वारंवार इथे दर्शनासाठी येत असे. त्याने एकदा देवाला कनकाभिषेक केला होता. अलिकडच्या काळात नागपूरचे श्रीमंत रघूजी भोसले यांनी येथील नित्य पूजेची व्यवस्था करून देवाला एक मूल्यवान पाचूचा खडा अर्पण केला. हे स्थान मूर्तिभंजकांपासून सुरक्षित राहिलेल्या अपवादात्मक स्थानांपैकी एक आहे.

इ. स. १८४३ मध्ये इंग्रजांनी या देवस्थानाची व्यवस्था येथील हाथीरामजी महंताच्या मठाकडे सोपविली होती; परंतु पुढे या महंताच्या कारभारात अव्यवस्था आढळून आल्यामुळे इ. स. १९३३ मध्ये मद्रास सरकारने एक कायदा करून तिरुपतीसाठी स्वतंत्र देवस्थान–समितीच निर्माण केली. त्या समितीचा प्रमुख म्हणून एका सरकारी कमिशनरची नेमणूक करण्यात आली. इ. स. १९५१ पासून 'तिरुमल तिरुपती देवस्थानम' या नावाची विश्वस्त संस्था देवस्थानाचा कारभार पाहू लागली आहे. या विश्वस्त संस्थेतील कार्यकारी अधिकारी सरकारतर्फेच नियुक्त केला जातो.

**शिल्पकला** – व्यंकटेशाचे मंदिर म्हणजे विभिन्न कालखंडांतील द्राविड वास्तुशिल्पांचा मनोहर संगम आहे. त्याच्या गर्भगृहावरील विमान पूर्णपणे सोन्याने मढविलेले आहे. त्याला आनंदनिलयम असे म्हणतात. हे मंदिर पूर्वाभिमुख आहे. मंदिराभोवती तीन प्राकार आहेत. पहिल्या प्राकाराचे नाव संपंगीप्रदक्षिणम असे आहे. उंच गोपुराने युक्त अशा महाद्वारातून आत प्रवेश करतानाच कृष्णदेवराय, वेंकटपतिराय आणि अच्युतराय या तुळुव राजपुरुषांचे पुतळे तिथे दिसतात. याच प्राकारात अकबराचा मंत्री तोडरमल व त्याची पत्नी यांचेही पुतळे आहेत; तसेच सुवर्णाने मढविलेला उंच ध्वजस्तंभ आहे. त्याच्या आतील विमानप्रदक्षिणम नामक दुस प्राकारात पाकशाला, यागशाला, कल्याणमंडप आणि देव वाहने ठेवण्याच्या खोल्या; तसेच योगनरसिंह, वरद



व्यंकटेशाची हुंडी – तिरुपती

रामानुज, सेनाधिपती आणि गरुड यांची मंदिरे आहेत. आतल्या प्राकाराला वैकुंठप्रदक्षिणम असे नाव आहे. हा प्रा फक्त वैकुंठ एकादशीच्या दिवशीच (मार्गशीर्ष शु. ११) असतो. येथून मंदिरात जाण्याचे द्वार असून, ते सोन्या पत्र्याने मढविलेले आहे. गाभाऱ्यासमोर असलेल्या रंगमं द्रव्यालंकारादी अर्पावयाच्या वस्तू टाकण्यासाठी हुंडी ( पिशवी) टांगलेली असते.

या मंदिरातील व्यंकटेशाची मूर्ती उभी असून, तिची सात फूट आहे. देवाच्या चार हातांपैकी तीन हातांत चक्र आणि कमळ असून, एका हाताने पृथ्वीकडे निर्देश के आहे. मूर्तीच्या मस्तकावर जटा आणि खांद्यावर नागबंध दिसतो. ही दोन्ही शैव लक्षणे आहेत. त्यांवरून संशोधक असे अनुमान काढले आहे, की पूर्वी हे शिवस्थान असून, कालौघात वैष्णवीकरण झाले असावे. या वैष्णवीकरण प्रक्रिया पुढे रामानुजांनी पूर्णतेला नेली. याविषयी इथे प्र असलेली एक कथा अशी –

ही मूर्ती विष्णूची आहे की शिवाची, याविषयी वाद झाला असता स्थानिक राजाने निवाडयासाठी रामानुजाचा बोलावून घेतले. त्यांनी अनेक जाणकार व्यक्तींशी त्या सं

चर्चा केली. पण त्या चर्चेतून काहीच निर्णय होत नाही, असे दिसून आल्यावर त्यांनी एक युक्ती योजली. त्यांनी मंदिराच्या गाभाऱ्यात विष्णूची आणि शिवाची आयुधे ठेवली आणि देवाला प्रार्थना केली. 'हे प्रभो, जी आयुधे तुमची असतील, ती धारण करून आम्हांला दर्शन द्या.' दुसऱ्या दिवशी सकाळी दरवाजा उघडून पाहतात, तो मूर्तीच्या हाती शंख व चक्र ही आयुधे दिसली. या चमत्काराने ही मूर्ती विष्णूची ठरली. आजही मूर्तीच्या हाती असलेली शंख व चक्र ही आयुधे मूळची नसून, नंतर हाती दिलेली व सोन्याची आहेत.



व्यंकटेश्वर – तिरुपती

अनेक आळवार संतांनी आणि वैष्णव आचार्यांनी या स्थानाचे माहात्म्य वर्णिले आहे. हे श्रीवैष्णव संप्रदायाचे एक प्रमुख केंद्र आहे. येथील पूजा-अर्चा–उपासना रामानुजाचार्यांनी आखून दिल्याप्रमाणे चालते.

**मंदिराची श्रीमंती** – इथे रोज पाच हजारांवर यात्रेकरू दर्शनासाठी येतात. उत्सवांच्या वेळी तर ही संख्या कितीतरी पटींनी वाढते. आश्विनात होणाऱ्या ब्रह्मोत्सवासाठी दहा लाखांवर यात्रा जमते. देवाच्या रोजच्या दर्शनाच्या वेळा ठरलेल्या आहेत. देवाला आरती करण्यापासून विशिष्ट प्रकारची पूजा बांधण्यापर्यंत किंवा उत्सव घडवून आणण्यापर्यंत सर्व गोष्टींचे शुल्क इथे ठरलेले आहे. एक रुपयापासून दोन हजार रुपयांपर्यंत हे शुल्क आहे. दर्शन झाल्यानंतर प्रत्येक यात्रिकाला शिजवलेल्या भाताचा भरपूर प्रसाद मिळतो. देवस्थानाचे वार्षिक उत्पन्न सव्वा कोटींहून अधिक आहे. येथील कल्याणकुट्टमंडपात लोक आपले मुंडन करून घेतात. ते केस विकून देवस्थानाला प्रतिवर्षी सहा लाख रुपये मिळतात. देवस्थानाच्या भांडारात कित्येक मण सोने आणि हिरेमाणके आहेत. देवाच्या अंगावर रोज घालण्याचे दागिने साडे आठ मण वजनाचे आहेत. या सर्व दागिन्यांत हिरे-माणके बसवलेली आहेत.

देवस्थानाच्या या प्रचंड उत्पन्नाचा विनियोग अनेक सांस्कृतिक आणि लोकोपयोगी कामांसाठी केला जातो. देवस्थानातर्फे अनेक प्राथमिक व माध्यमिक शाळा, एक बालकमंदिर, संस्कृत पाठशाळा, प्राच्यविद्या संशोधन मंदिर, प्रकाशनसंस्था, मुद्रणालय, गोशाळा, विद्यापीठ, इ. अनेक संस्था उत्तम प्रकारे चालविल्या जातात. देवस्थानाची स्वतःची बस-सर्व्हिस आहे. गावात आणि डोंगरावर यात्रिकांसाठी अनेक धर्मशाळा बांधलेल्या आहेत.

तिरुपती हे गाव तिरुमलैच्या पायथ्याशी आहे. गावापासून व्यंकटेशमंदिर डोंगरातील पायवाटेने सात मैल आणि नव्याने बांधलेल्या घाटातील मोटार–मार्गाने चौदा मैल अंतरावर आहे. तिरुपती गावाचे क्षेत्रफळ दीड चौरस मैल असून, लोकसंख्या चाळीस हजार आहे. गावात अनेक मंदिरे आहेत. त्यांतले गोविंदराजमंदिर अत्यंत प्रसिद्ध आहे. या मंदिराचे उत्तुंग गोपुर दुरूनच नजरेत भरते. हे मंदिर रामानुजांनी उभारले असून, या मंदिरातील वैष्णव भक्तांच्या मूर्तींपैकी आंडाळची मूर्तीही त्यांनीच स्थापलेली आहे, असे म्हणतात. या मंदिराशिवाय कोदंडराममंदिर, कपालेश्वरमंदिर आणि काही आळवार संतांची मंदिरेही इथे आहेत.

तिरुचानूर येथे व्यंकटेशाची पत्नी पद्मावती हिचे मंदिर आहे. या मंदिराशेजारी पद्मसरोवर नामक तीर्थ आहे. या तीर्थातील कमळातूनच पद्मावती उद्‌भवली, अशी कथा सांगतात.



वराहस्वामीचे मंदिर– तिरुपती

तिरुमलै डोंगरावर आणि त्याच्या परिसरात स्वामीपुष्करिणी, आकाशगंगा, पापविनाशनम, वैकुंठतीर्थ, पांडवतीर्थ, जाबालीतीर्थ, गोगर्भतीर्थ, इ. अनेक तीर्थे आहेत. स्वामीपुष्करिणी हे तीर्थ तिरुमलैवर असून, ते अत्यंत पवित्र मानले जाते.

त्याच्या जवळच व्यंकटेशाहूनही प्राचीन समजले जाणारे वराह-स्वामीचे मंदिर आहे. विष्णू प्रथम आदिवराहाच्या रूपाने इथे प्रकट झाला, असे पुराणात सांगितले आहे. म्हणूनच व्यंकटे-शाच्या दर्शनापूर्वी वराहस्वामीचे दर्शन घेण्याची प्रथा आहे.

व्यंकटेश हा अनेक घराण्यांचा कुलस्वामी असल्यामुळे इथे सर्व बाजूंनी यात्रिक येतात आणि धार्मिक कार्ये करतात. [ इ. इं.–१; टें. ली. आं.; तिरुपती; कल्याण–तीर्थांक ]

**तिरुपती-वेंकटेश्वर** ( इ. स. चे २० वे शतक ) तेलुगू कवींची एक जोडी. तेलुगू भाषेत या दोघांना झंटकवी ( संयुक्त रचना करणारे कवी ) म्हणतात. यांची सर्व रचना संयुक्त कर्तृत्वाची आहे; त्यामुळे त्यांचा नेहमी एकत्र निर्देश केला जातो. पोलरचे जमीनदार भूपती कृष्णाराव यांचा यांना आश्रय होता. यांचे काव्यग्रंथ बरेच आहेत. त्यांपैकी श्रवणानंदप्रबंध, बुद्धचरित्र, तेलुगू देवीभागवत, जातकचर्या ( आत्मचरित्र ), कामेश्वरीशतकम, गीरतकाव्य (औपरोधिक) व नानाराजसंदर्शन हे प्रसिद्ध आहेत. याशिवाय त्यांनी मृच्छकटिक व मुद्राराक्षस या दोन संस्कृत नाटकांची तेलुगू भाषांतरे केली असून, पांडवविजयम नावाचे एक स्वतंत्र नाटकही लिहिले आहे. सरस्वती नावाचे मासिक सुरू करून अनेक अप्रकाशित तेलुगू ग्रंथ यांनी प्रकाशात आणले.

या कवींची समग्र काव्यरचना एकूण आठ खंडांत प्रकाशित झालेली आहे. यांच्या काव्याचे वळण जुने असले, तरी भाषा रसाळ आणि ओघवती आहे. [ त्रि. दे. दै. ]

**तिरुपल्लैवन** एक शैव क्षेत्र. हे तमिळनाडमधील चिंगल-पुट जिल्ह्यात आहे. हे क्षेत्र म्हणजे पळ्ळै नामक वृक्षांचे वन होय. इथे पूर्वी ती झाडे विपुल प्रमाणात होती. अशाच एका झाडाला चोळ राजाचा एक हत्ती बांधलेला होता. तो हत्ती एकाएकी मेला; म्हणून राजा रागावला व त्याने ते झाडच तोडून टाकायचे ठरवले. पण झाडावर जसजसे कुऱ्हाडीचे घाव बसू लागले, तसतसे त्या झाडाच्या बुंध्यातून रक्त वाहू लागले. या चमत्काराचा शोध घेता असे आढळले, की एका शिवलिंगाला या झाडाने वेष्टिले आहे आणि कुऱ्हा-डीच्या घावाने लिंगाच्या माथ्यावर भेग पडल्यामुळे तिच्यातून रक्त वर उसळत आहे. राजाने मग ते झाड तोडण्याचे थांबवले व त्या शिवलिंगावर पाचमजली मंदिर उभारले. तेच सध्याचे अमृतेश्वरमंदिर होय.

या मंदिराच्या प्राकारात इतर अनेक मंदिरे आहेत. शिवाय प्रदक्षिणेच्या वाटेवर अंजनेयर, नवग्रह व चंडेश्वर यांच्या मूर्ती ठेवलेल्या आहेत. मंदिराच्या गाभाऱ्यात ७१ शिलालेख आहे त्यांपैकी ६५ तमिळ, ३ तेलुगू, २ संस्कृत व १ कन्नड भाषेत आहे. [ अॅ. ओ. री. म. व्हॉ. १६ ]

**तिरुप्परंकुन्रम** एक क्षेत्र. हे मदुरेच्या दक्षिणेला ५ मैलां असून, तिथे पहाडात खोदलेले सुब्रह्मण्या मंदिर आहे. त्याचे गोपुर खूप उंच आहे. आत अनेक मोठे मं आहेत व मुरुगनदेवाची भव्य मूर्ती आहे. याच ठिकाणी मु गनाचा विवाह झाला, असे म्हणतात.

द. भारतात सुब्रह्मण्याची अशी आणखी पाच मंदिरे ति चेंडुर, पळणी, अलगरमलै, स्वामिमलै व तिरुत्तणी या ठिका आहेत. त्यांतील पळणी हे देवस्थान अत्यंत जागृत आहे, म्हणतात. तिथला देव बालसुब्रह्मण्य या रूपात असून, तो न साला पावतो व त्याच्या अभिषेकाचे तीर्थ रोगनाशक अ अशी भाविकांची श्रद्धा आहे. [ म. लँ. टें. ]

**तिरुप्पाण आळवार** (इ. स. चे ८ वे शतक) तमिळना मधील एक संतकवी. याला मुं वाहन अथवा पाणपेरुमाळ अशीही अन्य नावे होती. अयोनिज होता, अशी समजूत आहे. मद्रासमध्ये कावेरी नदी काठी उरैयूर नावाचे एक गाव आहे. तिथल्या एका शे पाणन कुळातील एका अस्पृश्य माणसाला हा सापडला, सांगतात. त्यानेच त्याचे पालनपोषण केले व त्याला धार्मि शिक्षण दिले. तिरुप्पाण बालपणापासूनच संगीतनिपुण हो पुढे तो संगीतसार्वभौम या नावानेच प्रसिद्ध झाला.

तिरुप्पाण अस्पृश्याच्या घरी वाढला म्हणून लोक त्याल अस्पृश्य समजू लागले. त्यामुळे त्याला मंदिरात प्रवेश मि नसे. म्हणून मग तो नदीकाठी बसूनच भजन करी.

एके दिवशी प्रातःकाली लोकसारंग नावाचा एक पुजा विष्णूच्या अभिषेकासाठी कावेरीचे जल घेऊन येत अ त्याला हा वाटेत भेटला. लोकसारंगाने त्याला मार्गातून होण्यास सांगितले; पण तो भजनात रंगून गेलेला असल्या लोकसारंगाचे शब्द त्याला ऐकूच आले नाहीत. तो आप अवज्ञा करीत आहे, असे समजून लोकसारंगाने त्याला द मारला. त्या माराने तिरुप्पाण भानावर आला व क्षमाया करून त्याच्या मार्गातून दूर झाला. त्या रात्री लोकसारंगा स्वप्नात येऊन विष्णूने त्याला सांगितले. ' तू तिरुप्पाणाला मे लेल्या दगडाने माझ्या डोक्याला जखम झाली आहे. ते त्याचे प्रायश्चित्त म्हणून तू तिरुप्पाणाला खांद्यावर घेऊन मंदिरात ये.' देवाची ती आज्ञा लोकसारंगाने शिरोधार्य मा

व तिरुप्पाणाला खांद्यावरून मंदिरात आणले. मंदिरातील मूर्तीचे दर्शन होताच तिरुप्पाणाला परमानंद झाला. त्याने त्या वेळी भगवद्वर्णनपर काही श्लोक रचले व शेवटच्या श्लोकात देवाला प्रार्थना केली, की 'ज्या माझ्या नेत्रांनी या शाश्वत सौंदर्याचे दर्शन घेतले, त्या नेत्रांनी इतःपर दुसरे काहीही पाहू नये.'

यानंतर लगेच तिरुप्पाण अंतर्धान पावला, असे सांगतात. त्या वेळी त्याचे वय पन्नास वर्षांचे होते. [त. प्र. हिं. कृ.]

**तिरुप्पावै** तमिळनाडमधील सुप्रसिद्ध आळवार संत आंडाळ हिच्या भक्तिगीतांचा हा संग्रह आहे. आंडाळने ही गीते मुख्यतः पावै व्रतासाठी रचलेली आहेत. पावै व्रत म्हणजे कात्यायनी व्रत होय. रंगनाथ (श्रीकृष्ण) पती मिळावा म्हणून तिने गोकुळातल्या गोपींप्रमाणे हे व्रत आचरले होते. हे व्रत अद्यापही तमिळनाडमधल्या कुमारी इष्ट वर लाभावा म्हणून करतात आणि त्या वेळी तिरुप्पावैमधील गाणी गातात. या संग्रहात एकूण तीस पद्ये आहेत. त्यांतील पहिली पाच पद्ये भूमिकास्वरूप आहेत. त्यांपुढील दहा पद्यांत आंडाळने सख्यांना जागे करण्याचा भाव व्यक्त केला आहे आणि अखेरच्या चौदा पद्यांत श्रीकृष्ण परमात्म्याचे प्रबोधन घडविले आहे. तिसावे पद्य फलश्रुतीचे आहे.

तिरुप्पावैचे पारायण मार्गशीर्ष महिन्यात करतात. रोज एक पद्य याप्रमाणे महिनाभर या ग्रंथाचे पारायण चालते. या ग्रंथावर अनेक टीका झालेल्या आहेत. रामानुजाचार्यांनी तिरुप्पावैमधील पद्यांची फार प्रशंसा केली आहे. [श्री. चंद्रकांत मुदलियार – दक्षिण भारत, नोव्हेंबर १९५८]

**तिरुमंगै आळवार** (इ. स. चे ८–९ वे शतक) तमिळनाडमधला एक संतकवी. हा नीलन, कलियन, अरुळमारी, परकालन, इ. नावांनी ओळखला जातो. हा जातीने कल्लर असून तिरुकरैयलूर ही याची जन्मभूमी होती.

तिरुमंगै हा युद्धविद्यानिपुण होता. याचा बाप चोळ राजाचा सेनापती होता. बापाच्या मृत्यूनंतर तिरुमंगै हाही चोळांचा सेनापती बनला. त्याच्या शौर्यावर चोळ राजे खूष झाले व त्याला त्यांनी तिरुमंगै नामक प्रदेशाचा सामंत बनवले.

तिरुमंगैच्या लग्नासंबंधी पुढील आख्यायिका प्रसिद्ध आहे. तिरुवेल्लकुळम नावाच्या एका गावी एक वैद्य राहत होता. त्याला कुमुदवल्ली नावाची एक मुलगी होती. ती अत्यंत रूपवती असल्यामुळे मोठमोठे राजे तिला मागणी घालायला आले. तिरुमंगैनेही तिला मागणी घातली. परंतु कुमुदवल्लीने दोन अटींवर तिरुमंगैशी लग्न करण्यास संमती दिली. तिरुमंगैने वैष्णव बनले पाहिजे, ही पहिली अट व त्याने रोज १००८ वैष्णवांना भोजन घातले पाहिजे, ही दुसरी अट होय. तिरुमंगैने त्या दोन्ही अटी मान्य करून तिच्याशी विवाह केला. पुढे वैष्णवांना नित्य भोजन देत असता तिरुमंगैचा खजिना रिकामा झाला. त्यामुळेच तो चोळ राजाला वार्षिक खंडणी पाठवू शकला नाही. खंडणी न आल्यामुळे राजाने त्याला पदच्युत तर केलेच; शिवाय कैदेतही ठेवले.

पुढे एके दिवशी दैवी साक्षात्काराने तिरुमंगैला भूमिगत धनाचा पत्ता लागला. त्याने ते धन आणून राजाच्या खजिन्यात भरले व स्वतःची मुक्तता करून घेतली. पुनश्च त्याचा १००८ वैष्णवांच्या नित्य भोजनाचा कार्यक्रम सुरू झाला. पण थोड्याच दिवसांत पुनश्च त्याचे द्रव्य संपले. मग तो दरोडे घालून द्रव्य जमवू लागला. देवाला वाटले, की आपल्या भक्ताची ही प्रवृत्ती बरी नव्हे. म्हणून मग त्याला ताळ्यावर आणण्यासाठी देवाने एक युक्ती योजली. त्याने एका धनिक ब्राह्मणाचे रूप घेतले व तो तिरुमंगैच्या मार्गावर येऊन उभा राहिला. तिरुमंगैने त्याला पाहिले व त्याचे सारे धन लुटले. परंतु चमत्कार असा झाला, की ते लुटलेले धन त्याला त्या जागेवरून हालवताच येईना. त्यावरून त्याला उमगले, की हा ब्राह्मण म्हणजे साक्षात परमेश्वरच आहे. म्हणून मग तिरुमंगै त्याला शरण गेला. तेव्हापासून त्याच्या जीवनात परिवर्तन घडले व तो आपला निंद्य मार्ग सोडून श्रेष्ठ भगवद्‌भक्त बनला. नंतर त्याने आपले सारे उर्वरित आयुष्य वैष्णवधर्माच्या प्रचारात घालवले.

तमिळनाडमधून जैन–बौद्धांना परास्त करण्यात याचा मोठा वाटा आहे. असे सांगतात, की नागपट्टिनम येथील बुद्धाची सुवर्णमूर्ती याने तोडली व त्या द्रव्याने श्रीरंगम येथील मंदिराचा तिसरा मजला बांधला. हा वयाच्या १०५ व्या वर्षी तिरुकुरंडी या गावी मरण पावला.

तिरुमंगै हा तमिळ व संस्कृत या भाषांचा पंडित होता. प्रसिद्ध शैव संत तिरुज्ञानसंबंधर याचा त्याने धार्मिक चर्चेत पराभव केला, असे सांगतात. हा कवीही होता. तमिळ भाषेतील आशू, मधुरम, चित्तम, विस्तारम, इ. काव्यप्रकार याने अत्यंत सफाईने हाताळले आहेत. म्हणूनच त्याला 'नालू कवी पेरुमाळ' (काव्याचार्य) अशी पदवी प्राप्त झाली. नालायिर दिव्यप्रबंधम या ग्रंथातील पदांत तिरुमंगै आळवाराचीच पदे सर्वांत अधिक आहेत. पेरिय तिरुमोळी, तिरुक्कुरुन्ताडकम, तिरुनेडुन्ताडकम, तिरुवेलुकूतिरुक्कै, चिरियतिरुमडल व पेरियतिरुमडल हे त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. तमिळ वैष्णवांत त्याचे हे ग्रंथ वेदांगे म्हणून प्रसिद्ध आहेत. [त. प्र. हिं. कृ.]

**तिरुमलपाद** एक जात. राजांची सेवा करणारा अथवा राजघराण्यातला मनुष्य असा या शब्दाचा अर्थ आहे. यांची वस्ती त्रिवांकुरमध्ये आहे. हे आपल्याला क्षत्रिय समजतात, जानवे घालतात आणि ब्राह्मणांप्रमाणे धर्मकृत्ये व पोषाख करतात. मध्ययुगात तिरुमलपाद हे सैन्यात शिपाई व अधिकारी असत. यांच्या मुली नंपूतिरी पुरुषांशी विवाह करणे अधिक पसंत करतात. यांच्यांत मातृसत्ताक कुटुंबपद्धती प्रचलित आहे.

श्रीपुरोगम तिरुमलपाद व औद्वाहिक तिरुमलपाद अशा यांच्या दोन पोटजाती आहेत. श्रीपुरोगम हे राजसेवकाचे काम करतात व औद्वाहिक हे विवाहादी विधींचे पौरोहित्य करतात.

हे लोक पूर्वी आपल्या नावापुढे वर्म हे उपपद लावीत; पण सांप्रत ते मंडारत्तिल हे उपपद लावतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**तिरुमलार्य** (१६४५ – १७०६ इ. स.) एक कन्नड कवी. हा कौशिकगोत्री होता. याच्या पित्याचे नाव अळसिंगार्य व मातेचे सिंगम्म असे होते. याचा जन्म श्रीरंगपट्टण येथे झाला. हा चिक्कदेवराज व मदुरेच्या नायकाची पत्नी मंगम्म यांचा मंत्री होता. अप्रतिमवीरचरित, चिक्कदेवरायविजय, चिक्कदेवराजशतक, इ. ग्रंथ याने रचले आहेत. हा रामानुजसंप्रदायातला होता. [ सु. वि. को; म. च. को. ]

**तिरुमळिशै आळवार** (इ. स. चे ६–७ वे शतक) द. भारतातील एक वैष्णव संत. याचा जन्म कांचीजवळच्या तिरुमळिशै ( महीशपूर ) या गावी झाला. रामानुजसंप्रदायात याला विष्णूच्या चक्राचा अवतार मानतात. याच्या जन्मासंबंधी एक कथा प्रचलित आहे, ती अशी—

भार्गव मुनी व कनकांगी नामक अप्सरा यांच्या संबंधातून तिरुमळिशैंचा जन्म झाला. जन्मताच याच्या मातेने याचा त्याग केला. एका जंगलात तो तिरुवाळन नावाच्या एका व्याधाला सापडला. त्यानेच याचे पालनपोषण केले. बालपणी हा स्तनपान करीत नसे, म्हणून हा कोणी तरी अवतारी पुरुष आहे, असे समजून एक वृद्ध पुरुष त्याला दररोज गाईचे दूध पाजी. त्याचे फलित म्हणून त्या वृद्ध पुरुषाला एक मुलगा झाला.

तिरुमळिशै हा प्रथम शैव होता. शिववाक्य असे त्याचे नाव होते. याने शैव संप्रदायावर ग्रंथरचनाही केली होती. एकदा पेयाळवारावरोवर याचा वाद होऊन तो त्या वादात हरला. मग त्याने पेयाळवाराचे शिष्यत्व पत्करले. तो शैव होता, तो वैष्णव बनला. त्यानंतर त्याने शैव, जैन व बौद्ध यांच्याशी अनेक वादविवाद करून त्यांना जिंकले. पुढे एकदा शिवाने त्याची परीक्षा घेण्याचे ठरविले. शिव त्याच्यापुढे प्रकट झाला व त्याला ' वर माग ' म्हणाला. तिरुमळिशैने शिवाला मोक्षप्राप्तीचा व आयुष्यवृद्धीचा वर मागितला. शिव म्हणाला, ' हे दोन वर सोडून दुसरे काहीही माग. ' ते ऐकून तिरुमळिशै तुच्छतादर्शक हसला. शिवाला त्याचे हे हास्य अपमानास्पद वाटले. शिवाने त्याला जाळून भस्म करायचे ठरवले; परंतु विष्णुभक्ती जाज्वल्य असल्यामुळे शिव त्याचे काहीही वाकडे करू शकला नाही. अखेर शिवाने प्रसन्न होऊन त्याला भक्तिसार असे नाव दिले व तो अदृश्य झाला.

तिरुमळिशैने आपल्या आयुष्यात अनेक चमत्कार केले, असे सांगतात. त्यांतील एक चमत्कार असा—

तिरुमळिशैने आपल्या सेवेत असलेल्या एका वृद्ध स्त्रीला सुंदर तरुणी बनविले. मग तिच्या त्या सौंदर्यावर मोहित होऊन पल्लव राजाने तिच्याशी विवाह केला. पुढे दिवसेंदिवस त्या युवतीचे तारुण्य वाढीसच लागले. तो चमत्कार पाहून राजाने तिरुमळिशैंचा शिष्य कणिकन्नन याला त्याचे रहस्य विचारले. कणिकन्ननाने सांगितले, की ' हा तिरुमळिशैंचा प्रभाव आहे.' राजाला वाटले, की आपणही आपल्या पत्नीप्रमाणे चिरतरुण व्हावे. म्हणून त्याने तिरुमळिशैला कणिकन्ननमार्फत बोलावणे धाडले. परंतु तिरुमळिशै आला नाही. त्यामुळे राजा कणिकन्ननावर रागावून त्याला हद्दपार करायला निघाला. कणिकन्नानाने ही सारी हकीकत आपल्या गुरूला सांगितली. तेव्हा गुरूनेही त्याच्याबरोबर राज्यत्याग करायचे ठरविले. दोघे राज्यातून निघताच तिथला श्रीरंगनाथही त्यांच्याबरोबर निघाला. ते तिघेही बाहेर गेल्यावर नगरात सर्वत्र अंधार पडला. राजाला ही गोष्ट समजल्यावर तो तिरुमळिशैला शरण गेला व त्या सर्वांना त्याने परत राजधानीत आणले.

तिरुमळिशै हा कवी होता. त्याच्या पदांवरून त्याने रामायण-महाभारताचा चांगला अभ्यास केला होता, असे दिसते. सांख्य, न्याय, वैशेषिक, पातंजल, इ. दर्शनांचाही त्याचा उत्तम अभ्यास होता. नानमुखन तिरुवंतादी व तिरुचंद विरुत्तम हे त्याचे दोन ग्रंथ होत. नानमुखन ग्रंथात १०० पदे आहेत. त्यात विष्णूला परमात्मा मानून शिव व ब्रह्मा यांना त्यानेच निर्माण केल्याचे सांगितले आहे. तिरुचंद विरुत्तममध्ये १२० पदे असून, त्याच्या पूर्वार्धात वेद, उपनिषदे यांचे सार सांगितले आहे; उत्तरार्धात विरहिणीच्या रूपाने परमेश्वराच्या मीलनासंबंधीची आतुरता व्यक्त केली आहे. त्याचे हे दोन्ही पद्यग्रंथ प्रबंधम् या ग्रंथामध्ये समाविष्ट केलेले आहेत. [ त. प्र. हिं. कृ. ]

**तिरुमुक्कुडल** एक गात्र व प्राचीन विद्यापीठ. हे ठिकाण तमिळनाडमध्ये चिंगलपुट तालुक्यात आहे. इथे इ. स. च्या ११ व्या शतकात एक विद्यापीठ होते व ते इथल्या मंदिराशी संलग्न होते. इथे साठ विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय होती. या विद्यापीठाची आर्थिक स्थिती चांगली नसल्यामुळे बहुतेक अध्यापक इथे ठराविक विषय शिकविण्यासाठी ठराविक वेळी बाहेरून येत. विद्यार्थ्यांना प्रवेश देण्याच्या बाबतीतही विषयानुसार संख्यानिर्बंध होता. उदा० ऋग्वेदाचे अध्ययन करण्यासाठी दहा विद्यार्थी, तर व्याकरणासाठी वीस विद्यार्थी घेत. सर्व शिक्षण निःशुल्क तर असेच; शिवाय विद्यार्थ्यांच्या खाण्यापिण्याची आणि कपडचालत्त्याची व्यवस्थाही विद्यापीठातर्फे होत असे. दर शनिवारी मुलांना स्नानापूर्वी अंगाला लावण्यासाठी तेल दिले जाई. आजारी विद्यार्थ्यांची शुश्रूषा चांगल्या प्रकारे केली जाई. [ प्रा. मा. वि.]

**तिरुमूलर** (इ. स. चे सहावे-सातवे शतक) तमिळ शैव संत व त्रेसष्ट नायन्मारांपैकी एक. हा तीर्थयात्रा करीत असता याला एकदा असे दृश्य दिसले, की मूलन नावाचा एक गुराखी मरून पडला आहे आणि त्याच्या गायी भोवती गोळा होऊन त्याच्या शवाला हुंगीत आहेत. या दृश्याने तिरुमूलर व्यथित झाला आणि त्याने योगबलाने आपला देह बाजूला ठेवून मूलनच्या देहात प्रवेश केला. मूलन जिवंत होताच गाई-गुरे आनंदाने नाचू लागली.

सायंकाळी मूलनच्या रूपाने तिरुमूलरने गायी घरी पोचविल्या, त्या वेळी मूलनची पत्नी त्याला परत जाऊ देईना. तिरुमूलरने तिला सर्व वस्तुस्थिती समजावून दिली आणि गावातील एका मठाचा आश्रय घेतला. त्या ठिकाणी दीर्घकाल प्रभुसेवेत मग्न राहून त्याने तिरुमंत्रम नावाचा एक ग्रंथ रचला. तमिळ भाषेतील शैव वाङ्मयात हा प्राचीनतम ग्रंथ आहे.

तिरुमूलरने दुष्ट रूढींना आणि भावशून्य कर्मकांडाला तीव्र विरोध केला. शुद्ध भक्तीच्या प्रसारासाठी त्याने भारतभर भ्रमण केले. त्याच्या तिरुमंत्रम या ग्रंथात एकूण तीन हजार पद्ये असून, हा ग्रंथ नऊ तंत्रांत विभागलेला आहे. या ग्रंथात यौगिक सिद्धान्तांचे अत्यंत सरळ विवेचन आहे. यात शिवप्राप्तीचे चर्या, क्रिया, योग आणि ज्ञान हे चार मार्ग सांगितले आहेत. तिरुमंत्रममधील एक रूपकात्मक पद्य असे—

मेलै निलत्तिनाळ् वेदपेण् पिळ्ळै
मूलनित्तिल् एळुकिन्र मूर्त्तियै,
एल एळुप्पि इवनुडन् संधिक्कप्
पालनुम् आवान् पार नन् दि आणैये ।

अर्थ—मूलाधारात एक युवक राहत आहे. कपालप्रदेशात पराशक्ती नामक युवती राहत आहे. मूलाधारात राहणारा युवक जर ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन त्या युवतीला भेटला, तर त्याला नवतारुण्य प्राप्त होईल.

अशा प्रकारे गूढतम आध्यात्मिक तत्त्वांचे रूपकांच्या द्वारा स्पष्टीकरण करण्यात तिरुमूलरने आपले वैशिष्टच प्रकट केले आहे. त्याच्या भाषेत उपनिषदांची सूत्रमयता आणि अर्थघनता आढळते. त्याचमुळे त्याच्या या ग्रंथाला स्तोत्रग्रंथ आणि शास्त्रग्रंथ अशी उभयविध प्रतिष्ठा लाभली आहे. या ग्रंथाने उत्तरकालीन सर्व तमिळ शैव संतांना स्फूर्ती दिली. [ पे. पु.; त. उ. सा.; श्री. चंद्रकांत मुदलियार—दक्षिण भारत, डिसेंबर १९५८; हिं. वि. को. ]

**तिरुवडमरुदूर** एक शैव क्षेत्र. याला मध्यार्जुनक्षेत्र असेही म्हणतात. हे स्थान तमिळनाडमध्ये कुंभकोणमपासून पाच मैल अंतरावर कावेरीच्या तीरावर आहे. इथे महालिंगेश्वर या शिवाचे मंदिर आहे. दक्षिण भारतात या शिवस्थानाचे महत्त्व चिदंबरम या शिवक्षेत्राइतके मानले जाते. एकशे आठ शैव दिव्य देशांत याचा समावेश होतो.

महालिंगेश्वराचे मंदिर विशाल आहे. याच्या प्रदक्षिणामार्गाला अश्वमेधप्रदक्षिणम असे नाव आहे. या मार्गावर अनेक देवतांच्या मूर्ती आहेत. ही प्रदक्षिणा केल्याने संपूर्ण भारताची प्रदक्षिणा केल्याचे पुण्य लाभते, अशी समजूत आहे. मानसिक रोगांनी ग्रस्त झालेले अनेक लोक रोगनिवारणासाठीही या क्षेत्रात येऊन राहतात.

कोण्या एका चोळ राजाच्या हातून ब्रह्महत्या घडली होती. त्या पापातून मुक्त होण्यासाठी त्याने अनेक मंदिरे उभारली आणि तीर्थयात्राही केल्या. परंतु जोवर तो क्षेत्रस्थानी राहत असे, तोपर्यंतच त्याची ब्रह्महत्येची पीडा टळत असे. मध्यार्जुनक्षेत्रात निवास केल्यानंतर मात्र तो ब्रह्महत्येपासून कायमचा मुक्त झाला, अशी कथा इथे प्रचलित आहे. महालिंगेश्वरमंदिराच्या द्वितीय द्वारावरील गोपुरावर चोळ राजाकडून घडलेल्या ब्रह्महत्येच्या प्रसंगाचे शिल्प आजही पाहायला मिळते. [कल्याण—तीर्थांक]

**तिरुवण्णामलै** तमिळनाडमधील एक शैव क्षेत्र. हे शहर उ. अर्काट जिल्ह्यात, मद्रासपासून १२० मैलांवर अरुणाचल नामक पर्वताच्या पायथ्याशी वसलेले आहे. हा पर्वत सुमारे तीन हजार फूट उंच आहे. स्कंद पुराणात या पर्वताचे माहात्म्य वर्णिले आहे, ते असे —

अस्ति दक्षिणदिग्भागे द्रविडेषु तपोधन ।
अरुणाख्यं महाक्षेत्रं तरुणेन्दुशिखामणेः ॥
योजनत्रयविस्तीर्णमुपास्यं शिवयोगिभिः ।
तद्भूमेर्हृदयं विद्धि शिवस्य हृदयं मम ॥
तत्र देवः स्वयं शम्भुः पर्वताकारतां गतः ।
अरुणाचलसंज्ञावानस्ति लोकहितावहः ॥

अर्थ – हे तपोधना ! दक्षिण दिशेकडील द्रविडदेशात भगवान शिवाचे अरुणाचल नामक एक महान क्षेत्र आहे. त्याचा विस्तार तीन योजने आहे. हे स्थान शिवयोग्यांना उपास्य आहे. हे क्षेत्र पृथ्वीचे हृदय, असे तू जाण. शिव त्याला आपल्या हृदयात धारण करतो. लोककल्याणासाठी साक्षात भगवान शंकर इथे अरुणाचल पर्वताच्या रूपाने प्रकट झाला आहे.

पार्वतीने शिवाच्या प्राप्तीसाठी याच पर्वतावर तप केले, असे म्हणतात. तिकडील लोक या पर्वताला पवित्र मानतात व त्याची परिक्रमा करतात. कार्तिकी पौर्णिमेला इथे कार्तिकैदीपम नावाचा उत्सव होतो. त्या उत्सवात या पर्वतावर एक मोठा दिवा लावला जातो.

या पर्वताच्या पायथ्याशी अरुणाचलेश्वराचे मंदिर आहे. त्यात तेजोरूप शिवलिंग आहे. हे मंदिर विजयनगरच्या कृष्णदेवरायाने इ. स. च्या १६ व्या शतकात बांधले. देवालयाचा विस्तार २५ एकर आहे. त्याच्या चारी दिशांना चार गोपुरे आहेत. त्यांतले मुख्य गोपुर बारा मजल्यांचे असून, त्याची उंची २०० फुटांपेक्षा अधिक आहे. इतर गोपुरे दहा मजल्यांची आहेत. आतल्या भागातही आणखी अनेक लहान गोपुरे आहेत. देवालयाचा उंच परकोट, सहस्रस्तंभ मंडप व कोरीव शिल्पकाम हे सर्वच प्रेक्षणीय आहे. मुख्य मंदिरातील आठ स्तंभांवर अष्टलक्ष्मीच्या सुंदर प्रतिमा आहेत. पुराणातील लिंगोद्भव नामक प्रसंगाचे चित्रही एका भिंतीवर कोरलेले दिसते.

या नगरापासून जवळच रमण महर्षींचा आश्रम व समाधीही आहे. पाहा – रमण महर्षी. [ त. सा. सं; सा. इं. (म. आं.); कल्याण–तीर्थांक ]

**तिरुवल्लूर** एक वैष्णव तीर्थक्षेत्र. हे मद्रास-अरकोणम लोहमार्गावर मद्रासपासून २६ मैलांवर आहे. इथले वरदराजमंदिर तमिळनाडमधील सर्व मंदिरांत अतिविशाल आहे. त्याला तीन उंच परकोट आहेत. इथला वरदराज हा विष्णू आहे. त्याला वीरराघव असेही म्हणतात. ही विष्णुमूर्ती शेषशायी स्वरूपात आहे. विष्णूचे मस्तक दक्षिणेकडे, मुख पूर्वेकडे, चरण उत्तरेकडे आणि उजवा हात शालिहोत्र ऋषींच्या मस्तकावर आहे. या मंदिरातच श्रीलक्ष्मीचे वेगळे मंदिर आहे. इथे लक्ष्मीला कनकवल्ली किंवा वसुमती म्हणतात.

या क्षेत्राला पुण्यावर्तक्षेत्र असेही म्हणतात. इथे वरदराज मंदिराजवळ हृत्तापनाशनतीर्थ या नावाचे एक सरोवर आहे. या सरोवराजवळ शिव-पार्वतीचे एक भव्य मंदिर आहे.

या क्षेत्राच्या निर्मितीविषयीची कथा अशी –

सत्ययुगात शालिहोत्र नामक ब्राह्मणाने इथे वर्षभर उपवास करून तप केले. पारण्याच्या दिवशी त्याने थोडे तांदूळ मिळवून भात शिजवला. देवाला नैवेद्य दाखवून तो पारणे करणार इतक्यात विष्णू अतिथीच्या रूपाने तिथे आला. शालिहोत्राने त्या अतिथीचे स्वागत करून शिजवलेले सर्व अन्न त्याला वाढले. जेवण झाल्यावर विष्णूने शालिहोत्राला विचारले, की 'आता मी विश्रांती कुठे घेऊ ?' शालिहोत्राने त्याला आपली पर्णकुटी दाखवली. अतिथी तिच्यात जाऊन झोपला. थोड्या वेळाने शालिहोत्र आत जाऊन पाहतो, तो तिथे साक्षात शेषशायी विष्णू विराजमान आहे, असे त्याला दिसले. त्या वेळी विष्णू शालिहोत्राला म्हणाला, की 'तुला हवा तो वर माग.' त्यावर शालिहोत्राने मागितले, की 'प्रभो, तुम्ही याच वरदरूपात इथे निरंतर वास करावा.' विष्णूने ते मान्य केले.

वीक्षारण्याचा राजा धर्मसेन नावाचा होता. त्याच्या घरी लक्ष्मीने कन्यारूपाने जन्म घेतला. राजाने तिचे वसुमती हे नाव ठेवले. वसुमती विवाहयोग्य होताच साक्षात वीरराघवाने एका राजकुमाराचे रूप घेऊन तिचे पाणिग्रहण केले. विवाहानंतर वधूवर वीरराघव-मंदिरात दर्शनार्थ आली आणि सर्व लोकांच्या देखत आपापल्या मूर्तीत विलीन झाली. वीरराघव आणि वसुमती यांच्या या अद्‌भुत विवाहाची स्मृती साजरी करण्यासाठी इथे प्रतिवर्षी पौष महिन्यात तिरुकल्याण नावाचा मोठा उत्सव होतो. [ कल्याण–तीर्थांक ]

**तिरुवारूर** एक शैव क्षेत्र. हे तंजाऊरपासून ३५ मैलांवर आहे. येथील मंदिरातल्या शिवाला त्यागराज आणि पार्वतीला नीलोत्पलांबिका असे म्हणतात. त्यागराजाची मूर्ती सुंदर असून, ती अजपानटनम नृत्यमुद्रेत आहे. चोळवंशी मुचकुंद नामक राजाने स्वर्गातून ही मूर्ती आणली, असा लोकांची समजूत आहे. या मंदिराचे गोपुर द. भारतातील सर्व गोपुरांत अधिक रुंद असल्याचे सांगतात.

शिवमंदिरात शंखतीर्थ नावाचे पवित्र कुंड आहे. समोरच्या भागात तेहतीस एकर विस्ताराचे कमलालय तीर्थ आहे. या तीर्थाला चारही बाजूंनी उत्तम दगडी घाट बांधलेले आहेत. तीर्थाच्या मध्यभागी बांधलेल्या मंडपाला मायामंडप म्हणतात.

ज्ञानसंबंधर, अप्पर आणि सुंदरर या नायन्मारांनी त्याग-



त्यागराज – तिरुवारूर

राजाची स्तोत्रे रचली आहेत. [ कल्याण–तीर्थांक; त. सा. सं. ]

## तिरुवेंदिपुरम

तमिळनाडमधील एक वैष्णव क्षेत्र. हे स्थान पांडिचेरीपासून १९ मैल अंतरावर आहे. वैष्णवांच्या १०८ दिव्य देशांत याची गणना होते. औषधगिरी नावाचा डोंगर आणि गरुड नामक नदी या दोहोंच्या मध्यभागी हे लहानसे गाव वसले आहे. हा पूर्वी अग्रहार असल्यामुळे इथे बहुतेक वस्ती ब्राह्मणांचीच आहे.

इथे देवनायकाचे प्रशस्त मंदिर आहे. देवनायक म्हणजे ब्रह्मा आणि शिव यांना स्वत:मध्ये सामावून घेणारा विष्णू होय. या मंदिरावर चोळ कलेचा प्रभाव आहे. आतली मूर्ती शंख-चक्र-गदा-पद्मधारी असून, तिने शिवाचा तृतीय नेत्र आणि ब्रह्म्याच्या उत्पत्तीचे स्थान असलेले कमल ही दोन प्रतीकेही धारण केली आहेत. मंदिराच्या विमानावर गरुडाऐवजी सिंह आहे. इथली उपासना तिरुपती व चिदंबरम या स्थानांतल्याप्रमाणे वैखानस आगमानुसार चालते.

या मंदिराजवळ शेषतीर्थम नावाची विहीर आहे. तिचे पाणी पवित्र आणि रोगहारक आहे, असे म्हणतात.

तिरुवेंदिपुरममध्ये एक देवीमंदिरही असून, देवीची मूर्ती मनोहर आहे. हे देवीचे स्थान शक्तिपीठांपैकी एक मानले जाते. औषधगिरीवर ज्ञानावतार हयग्रीवाचे स्थान आहे. बाराव्या शतकात याच स्थानी बसून वेदान्तदेशिकाने तप केले आणि त्याला साक्षात हयग्रीवाने गरुडमंत्राचा उपदेश करून साधनेचा मार्ग दाखवला, अशी कथा आहे.

तिरुवेंदिपुरम या स्थानाच्या निर्मितीविषयी पुढील पुराण-कथा प्रचलित आहे. मार्कंडेयमुनी आणि भूदेवी यांच्या तपाने प्रसन्न होऊन विष्णू इथे अवतीर्ण झाला. लगोलग त्याला तहान लागली. पण पाणीच कुठे गवसेना. म्हणून त्याने शेष आणि गरुड यांना पाणी आणायला सांगितले. शेषाने आपली शेपटी जमिनीत घुसवून एक कूप निर्माण केला, तेच आजचे शिव-तीर्थम होय. गरुडाने एका ऋषीच्या कमंडलूतील पाणी चोचीतून आणले. आणताना त्यातले काही थेंब खाली पडून जो प्रवाह निर्माण झाला, तीच आजची गरुड नदी होय.

पूर्वी हे केवळ वैष्णवस्थान होते. इ. स. च्या ९ व्या शतकात तंजाऊरचा चोळवंशी राजा आदित्य याने शिवभक्तीचा अतिरेक करून सर्व विष्णुमंदिरांचे शिवमंदिरांत रूपांतर करण्याचे



देवनायक मंदिराचे विमान – तिरुवेंदिपुरम

सत्र आरंभिले. त्यासाठीच तिरुवेंदिपुरममध्येही तो सैन्या-सह आला. तेव्हा विष्णूने देवनायकरूप धारण करून त्याला

ब्रह्मा-विष्णु-महेशांच्या एकरूपतेचा साक्षात्कार घडविला, अशी आख्यायिका सांगतात. मंदिर आणि मूर्ती यांचे स्वरूप पाहता या माहितीत काही ऐतिहासिक तथ्य असावे, असे दिसते.

**तिरुवैयारू** एक शैव क्षेत्र. सध्याचे नाव तिरुवादी. हे तमिळनाडमधील तंजाऊर जिल्ह्यात तंजाऊर-पासून ७ मैलांवर कावेरी नदीच्या काठी आहे. तिरुवैयारू याचा अर्थ पाच पवित्र नद्या असा आहे. या स्थानापासून सहा मैल अंतरावर कोलेरून, कावेरी, कोमुरुत्ती, वेत्तर आणि वेन्नर या पाच नद्या समांतर वाहतात, म्हणून या स्थानाला तिरु-वैयारू असे नाव पडले आहे. इथे पंचनदीश्वर किंवा पंचनाथे-श्वर या नावाच्या शिवाचे प्रमुख मंदिर आहे. स्थानिक लोक



पंचनाथेश्वरमंदिराचे गोपुर – तिरुवैयारू

याला अय्यारप्पर म्हणतात. अय्यारप्परच्या मंदिरातील ताम्रमूर्ती सुरेख आहेत. दक्षिणामूर्ती आणि आलकोंडार (एक द्वारपाल) यांच्या मूर्ती तर अत्यंत सुंदर आहेत. मंदिराचे शिल्प चालुक्यकालीन असून, चोळ राजांनी त्याचा अनेकवार जीर्णोद्धार केला आहे, असे तिथल्या शिलालेखांवरून कळते. या मंदिराच्या डाव्या–उजव्या बाजूंना दक्षिण कैलास आणि उत्तर कैलास या नावांची आणखी दोन मंदिरे आहेत. जवळच एक पवित्र कुंड आणि धर्मसंवर्धिनी देवीचे मंदिर आहे.

इथे प्रतिवर्षी चैत्र महिन्यात सप्तस्थान पालखी उत्सव मोठ्या प्रमाणात होतो. या प्रसंगी तिरुवैयारूमधील अय्यारप्पर शिवाची उत्सवमूर्ती पालखीत ठेवून ती पालखी तिरुवैयारूच्या अवती-भवती असलेल्या तिरुप्पानम, तिरुचोर, तिरुवेडे, तिरु-वेंकडी, तिरुकंडय्यूर, तिरुपनतुरै आणि तिरुनेयत्तानम या सात शिवस्थानांत नेतात. नंतर मुख्य पालखीच्या बरोबर अन्य सात स्थानांच्या पालख्याही तिरुवैयारूमध्ये नदीकाठी एकत्र जमतात.

प्रसिद्ध शैव संत अप्पर हा कैलासयात्रेला निघाला असता, प्रत्यक्ष शिवाने ब्राह्मणवेषात दर्शन देऊन त्याला वाटेतून परतवले आणि तिरुवैयारू येथे आणले, अशी आख्यायिका आहे. म्हणूनच दक्षिणेत या स्थानाचा महिमा काशी किंवा कैलास यांच्या बरोबरीचा मानला जातो. संत त्यागराजाचे वास्तव्य इथेच होते व त्याने देहही इथेच ठेवला. त्यामुळे या स्थानाचे महत्त्व अधिकच वाढले आहे.

सुंदरमूर्ती, अप्पर इ. शिवभक्तांनी तिरुवैयारूच्या शिवाची स्तोत्रे रचली आहेत. [ म. ज्ञा. को.; एन्सा. रि. ए. ]

**तिरुवोरियुर** तमिळडनाडमधले एक मंदिर व विद्यापीठ. इ. स. च्या १३ व्या शतकात हे विद्यमान होते. मद्रासराज्यात चिंगलपुटजवळ हे क्षेत्र आहे. हे शंकराचे मूलस्थान मानले जाते. इथे एक वारुळरूपी शिवलिंग आहे. इथले मुख्य मंदिर रविवीर चोळ तक्षन याने राजेंद्र चोळ (प्रथम) याच्या आश्रयाने बांधले, असे एका शिलालेखात म्हटले आहे. मंदि-राच्या आवारात दोन सुंदर मंडप आहेत. त्यांपैकी एकाचे नाव तिक्कनिक–मंडप व दुसऱ्याचे व्याकरण–मंडप असे आहे. तिक्कनिकमडपात पूर्वी सभा भरत व विविध शास्त्रीय विषयां-वर चर्चा चालत. व्याकरणमंडपात व्याकरण शिकविले जाई. इथे देवाला पशुबली देण्याची प्रथा होती, ती आद्य शंकराचार्यांनी बंद पाडली, असे सांगतात.

इथे विद्यार्थ्यांची राहण्याची सोय मंदिरांच्या निरनिराळ्या भागांत व जवळच्या मोठ्या सभागृहात केली जाई.

अन्य मंदिरविद्यापीठांपेक्षा हे विद्यापीठ मोठे असावे; त्याच्या खर्चासाठी राजेरजवाड्यांनी मोठमोठ्या जमिनी लावून दिलेल्या होत्या. हे विद्यापीठ जवळ जवळ १०० वर्षे टिकले असे कळते. [ प्रा. भा. वि. ]

**तिर्गर** एक जात. हे लोक गुजरातेत आहेत. तीर म्हणजे बाण बनविणे, या व्यवसायावरून यांना तिर्गर हे नाव पडले असावे. सांप्रत हे लोक शेती करतात. यांच्यांत आठ कुळे आहेत. यांच्यांत आते–मामे–मावस बहिणींशी लग्ने होत नाहीत. हे लोक बिजपंथी असून कृष्णाला भजतात. चामुंडा ही यांची कुलदेवी होय. हे मृतांना जाळतात किंवा पुरतात. [ मुं. इ. जा. ]

**तिलक** कुंकुमादी द्रव्यांनी कपाळावर जो ठिपका लावतात त्याला तिलक म्हणतात. भारताच्या सांस्कृतिक परंपरेत तिलकाला फार महत्त्व आहे. पूजा-अर्चा, संस्कार व मंगलकार्ये या सर्व प्रसंगी यजमानाच्या कपाळावर कुंकवाचा तिलक लावून त्यावर अक्षता चिकटवतात. धार्मिक कार्याच्या




सांप्रदायिक तिलक – (१) शैव (२) कबीरपंथी (३) शाक्त

प्रारंभी व कार्य संपल्यावर निरोप घेताना पुरोहित यजमानाच्या कपाळी तिलक लावतो. भाऊबिजेच्या दिवशी बहीण भावाच्या मस्तकी तिलक लावते व त्याला ओवाळते.




वैष्णव पंथांचे भिन्न प्रकारचे तिलक

शोभेसाठीही कपाळावर तिलक लावण्याची प्रथा आहे. जादूविद्येत वशीकरणासाठीही विशिष्ट द्रव्यांचा तिलक सांगितला आहे. पूजेच्या वेळी देवाला चंदनाचा, केशराचा किंवा कुंकवाचा तिलक लावतात व त्यावर फूल चिकटवतात.

पूर्वी गोरोचन, हरताळ व मनशीळ या द्रव्यांचा तिलक लावण्याची पद्धत होती. सौंदर्यासाठी पांढऱ्या अभ्रकाचा चुरा करून तो डिंकाने किंवा मेणाने कपाळावर चिकटवीत असत. संस्कृत ललित साहित्यात अशा प्रकारच्या तिलकांचे अनेक उल्लेख आढळतात.

शैव व वैष्णव संप्रदायांतील लोक संप्रदायचिन्ह म्हणून विशिष्ट प्रकारचे तिलक लावतात. हे तिलक कस्तुरी, कुंकुम, चंदन, गंगेतली माती, तुळशीच्या मुळातली माती, साधूचे चरणरज, गोपीचंदन, तुलसीकाष्ठ, गोरोचन, वारुळाची माती, इ. द्रव्यांचे असतात. शरीरावर बारा ठिकाणी हे तिलक लावायचे असतात. श्राद्ध, यज्ञ, जप, होम, वैश्वदेव व देवपूजा ही कृत्ये करताना प्रथम भस्म धारण करावे आणि देवाची पूजा व महानैवेद्य झाल्यावर मग चंदनाचा तिलक लावावा, असे सांगितले आहे. पाहा– ऊर्ध्वपुंड्र, त्रिपुंड्र. [ भा. प्र. वि.; ज. हृ. दवे– भारती, ३१ ऑगस्ट १९५८ ]

**तिलककामोद** एक राग. यात निषाद कोमल व शुद्ध आणि बाकीचे सर्व स्वर शुद्ध लागतात. याची जाती औडव संपूर्ण आहे. वादी – षड्ज. संवादी – पंचम. आरोह– सा, रे, म, प, सा. अवरोह – सा, नि, ध, प, म, ग, सा, रे, ग, सा. पकडस्वर– सा, रे, प, म, ग, सा, रे, ग, सा. गानसमय– रात्रीचा दुसरा प्रहर.

**तिलकदासी** बंगालमधील एक संप्रदाय. मुरादपुरच्या सद्गोप या पुरुषाने या संप्रदायाची स्थापना केली. त्यापूर्वी तो कर्ताभाजा संप्रदायाचा अनुयायी होता; पण नंतर त्याने आपण स्वतः विष्णू व शिव यांचा अवतार असल्याचे जाहीर केले या संप्रदायात देवाचा दोलोत्सव केला जातो. सद्गोप हा दोलोत्सवाच्या वेळी एका टोपलीत वांगी भरीत असे आणि टोपलीजवळ बसून आपल्या अंगावर व त्या वांग्यांवर केशरी पाणी शिंपडीत असे, अशी आख्यायिका सांगतात. [ वै. शै. म. व. ]

**तिलकवती** (इ. स. चे ७ वे शतक) एक योगिनी. ही वेळ्ळाळ जातीची होती. कलिप्पगै नावाच्या एका सैनिकाबरोर तिचा विवाह ठरला होता; पण तो युद्धात मारला गेला आणि त्यामुळे ती जन्मभर कुंवारच राहिली. तिने आपले सर्व आयुष्य शिवोपासनेत व्यतीत केले. तिरुतोंडर पुराणममध्ये हिचा उल्लेख आहे. हिची शिवभक्ती अत्यंत प्रखर होती. अप्पर नामक तिच्या भावाने जैन धर्म स्वीकारल्यामुळे

तिला फार दुःख झाले. पुढे त्याला पोटशूळ जडला. जैन साधूंना त्याचा हा रोग बरा करता येईना. शेवटी तो आपल्या बहिणीला शरण गेला. तिने त्याला शिवाची प्रार्थना करण्यास सांगितले. तसे करताच तो व्याधिमुक्त झाला व पुढे शैव बनला.

तिरुवदिगै येथील मंदिरात तिलकवतीची एक मूर्ती आहे. तमिळनाडमध्ये हिला तिलकवडियार असेही म्हणतात. पाहा– अप्पर. [ ग्रे. वी. इं. ]

**तिलकव्रत** चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी हे व्रत करायचे असते. त्यासाठी नदीच्या तीरावर, तळ्याच्या काठी किंवा घरात सुगंधी द्रव्याने पुरुषाकृती वत्सराची (विष्णूची) आकृती काढतात व त्याची पूजा करतात. मग त्याला वस्त्र व त्या ऋतूत उपलब्ध असलेली फळे-मुळे अर्पण करतात. नंतर त्याची पुढील मंत्राने प्रार्थना करतात –

**भगवंस्त्वत्प्रसादेन वर्षं क्षेममिहास्तु मे ।**
**संवत्सरोपसर्गा मे विलयं यान्त्वशेषतः ॥**

अर्थ – हे भगवन, तुझ्या कृपेने माझे वर्ष सुखाचे जावो आणि वर्षातील सर्व (संभाव्य) आपत्ती समूळ नष्ट होवोत.

मग कपाळी चंदनाचा तिलक लावतात. स्त्री व पुरुष या दोघांनाही हे व्रत उक्त आहे. या व्रताची कथा अशी––

शत्रुंजय नावाचा एक राजा होता. त्याला चित्रलेखा नावाची पत्नी होती. तिने तिलकव्रत घेतले होते. त्यामुळे राजाला मारण्याच्या हेतूने जो जो शत्रू येई, तो तो चित्रलेखेच्या कपाळावरील तिलकाच्या प्रभावाने त्याचा मित्र होऊन जाई. एकदा राजाला हत्तीने पाडले आणि राजा मरणोन्मुख झाला. तेव्हा त्याचे प्राण नेण्यासाठी यमदूत आले. पण राजाच्या शेजारी बसलेल्या चित्रलेखेच्या कपाळावरचा तिलक दृष्टीस पडताच ते भ्याले व पळून गेले. पुढे राजाने राणीसह अनेक वर्षे सुखोपभोग घेतला. [ व्रतराज; हिं. ध. ]

**तिलकाचार्य** ( ११८०–१२४० इ. स. ) एक जैन तार्किक व ग्रंथकार. हा श्वेतांबरपंथी चंद्रगच्छातील आचार्य होता. चंद्रप्रभसूरीच्या मालिकेत धर्मघोष, चक्रेश्वर व शिवप्रभ यांच्या नंतर याचा क्रम लागतो. याने तर्कशास्त्रावर व अन्य विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले आहेत. आवश्यक लघुवृत्ती व प्रत्येकबुद्धचरित हे याचे प्रसिद्ध ग्रंथ होत. [ म. च. को. ]

**तिलंग** एक रागिणी. हिच्यात ऋषभ व धैवत हे दोन स्वर वर्ज्य असतात. निषाद शुद्ध व कोमल असा उभयविध लागतो. षड्ज, गंधार, मध्यम, पंचम हे शुद्ध लागतात. हिची जाती औडव आहे. वादी – गंधार. संवादी – निषाद.



तिलंग रागिणीचे चित्र – बसौली शैली

आरोह स्वर – नि, सा, ग, म,प, नि, सा. अवरोह स्वर – सा, नि, प, म, ग, सा. पकडस्वर – सा, ग, म, प, नि, प, म, ग. गानसमय – रात्रीचा दुसरा प्रहर. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**तिलचतुर्थी** माघ शुक्ल चतुर्थीला तिलचतुर्थी असे नाव आहे. या दिवशी नक्तव्रत करतात, गणपतीची पूजा करतात, तिल व आज्य या द्रव्यांनी हवन करतात व तिलमिश्रित गुळाच्या लाडवांचे सेवन करतात. त्या रात्री जागरणही करतात. हिला कुंदचतुर्थी असेही नाव आहे. या दिवशी कुंदपुष्पांनी सदाशिवाची पूजा करून जो नक्तभोजन करतो, त्याला लक्ष्मी प्राप्त होते, असे कूर्म पुराणात सांगितले आहे. [ हि. ध.; नि. सिं.; व्रतराज ]

**तिलतर्पण** तिलमिश्र जलाने केलेल्या तर्पणाला तिलतर्पण म्हणतात. जेवढ्या पितरांना उद्देशून श्राद्ध केलेले असेल, तेवढ्यांनाच उद्देशून श्राद्धांग तिलतर्पण करायचे असते. दर्शश्राद्ध असता त्याच्या पूर्वी व प्रतिसांवत्सरिक श्राद्ध असता त्याच्या दुसऱ्या दिवशी तिलतर्पण करतात. इतर श्राद्धांत ते श्राद्धानंतर लगेच करतात. वृद्धिश्राद्ध, सपिंडी, इ. काही श्राद्धांत तिलतर्पण करीत नाहीत. [ ध. सिं. ]

**तिलदान** (१) तीन द्रोणपरिमाणे म्हणजे सुमारे पाच मण तीळ ब्राह्मणाला दान दिल्याने सर्व पापांचा नाश होतो, असे म्हटले आहे. [दा. चं.]

(२) अर्धोदय पर्वाच्या वेळी ब्रह्मा, विष्णू व शिव यांच्यासाठी प्रत्येकी तीनशे द्रोणभार तीळ घेऊन त्यांचे पर्वत करतात आणि त्या पर्वतांवर वरील देवतांच्या प्रतिमांची स्थापना व पूजा करतात. मग घृतमिश्रित तिळांचे हवन करतात. एक गाय व तीन शय्यांसह त्या तीन प्रतिमा ब्राह्मणाला दान देतात. फल– ईप्सितफलाची प्राप्ती. [दा. चं.]

**तिलदाहीव्रत** एक तिथिव्रत. पौष वद्य एकादशीला हे व्रत करतात. या दिवशी उपवास करतात. पुष्य नक्षत्राच्या दिवशी गायीचे शेण गोळा करून व त्यात तिळ मिसळून त्याच्या गोवऱ्या तयार करतात. मग त्या गोवऱ्यांचे अग्नीत हवन करतात. विष्णू ही या व्रताची देवता आहे. फल – सौंदर्य व इच्छित वस्तू यांची प्राप्ती. [हिं. ध.]

**तिलद्रोणदान** वैशाख पौर्णिमेला मधासह तिळांचे दान दिल्याने सर्व पापे नष्ट होतात, ज्येष्ठ पौर्णिमेला तीळ दान दिल्याने अश्वमेध यज्ञ केल्याचे फल मिळते व माघ मासात दिल्याने नरकवास चुकतो, असे आदित्य पुराणात सांगितले आहे. या तिलद्रोणदानाचा विधी असा–

कृष्णाजिनावर एक द्रोण (३२ शेर) तिळांचा एक ढीग घालतात. त्याच्यावर सुवर्ण, मध व तूप ठेवून त्यावर वस्त्र आच्छादितात आणि मग त्या तिळांचे दान करतात. [दा. चं.]

**तिलद्वादशी** माघ वद्य द्वादशीला श्रवण नक्षत्र आल्यास तिला तिलद्वादशी म्हणतात. या दिवशी तिळांचा कल्क लावून स्नान, तिळांचा होम, तिळमिश्रित मिष्टान्नांचा नैवेद्य, तिळाच्या तेलाचे दिवे, तिलमिश्रित जलदान व तिलदान या गोष्टी करतात. आणि वासुदेवाची पूजा करतात. फल – ईप्सितफलप्राप्ती. [हिं. ध.]

**तिलधक** एक बौद्ध विहार. हा मगधात होता. इत्सिंगच्या माहितीप्रमाणे हा नालंदेपासून दोन योजने अंतरावर होता. युआन च्वांगनेही याचा उल्लेख केला आहे. सध्याचे नालंदेच्या पश्चिमेला असलेले तिल्लार म्हणजेच प्राचीन तिलधक होय, असे तज्ज्ञांचे मत आहे. इत्सिंगने या विहाराला भेट दिली, तेव्हा इथे ज्ञानचंद्र हा प्रसिद्ध बौद्ध पंडित आणि धर्मशास्त्रज्ञ राहत होता. [ए. सि. ए. हिं.]

**तिलधेनू** एक दान. त्यासाठी तिळांची गाय व तिळांचेच वासरू तयार करतात. गाय व वासरू यांचे पाय उसाचे, दात फुलांचे, नाक गंधाचे व जीभ गुळाची करतात. त्या सवत्स धेनूची कृष्णाजिनावर स्थापना करून पूजा करतात आणि पंचरत्ने व औषधी यांसह तिचे दान देतात. फल– अन्नधान्याची सुबत्ता व सर्व मनकामनांची पूर्ती. [श. क.]

**तिलपात्रदान** संक्रांतीच्या दिवशी धातूची दोन पात्रे घेऊन त्यांपैकी एक तिळाने व दुसरे पायसाने भरून ब्राह्मणाला दान देतात. दानाचा मंत्र असा–

**तिलाः कश्यपसम्भूतास्तिलाः पापहराः शुभाः।**
**तिलपात्रप्रदानेन अतः शान्तिं प्रयच्छ मे ।।**

अर्थ – तिळांची उत्पत्ती कश्यपापासून झाली असून, तीळ हे पापहारक व शुभ आहेत; म्हणून या तिलपात्राच्या दानाने (हे प्रभो) मला शांती दे.

याशिवाय, ताम्रपात्रात एक प्रस्थ (= ३२ मुठी) तीळ घालून ते पात्र सुवर्णदक्षिणेसह माघ महिनाभर दान दिल्याने पापांचा नाश होऊन दात्याला परमगती मिळते, असे ब्रह्म पुराणात सांगितले आहे. [व्रतराज; दा. चं.]

**तिलपूर्ण करकदान** करक म्हणजे कमंडलू, गाडगा किंवा नारळाचा बेला होय. हा करक तिळांनी पूर्ण भरून त्रिकोणी मंडलावर ठेवतात. मग त्याची आणि अग्निस्वरूप शिवाची कण्हेरीच्या फुलांनी व रक्तचंदनाने पूजा करून त्याचे दान करतात. तिलकरकाच्या दानाबरोबर आरसा व चार दिवेही दान देतात. फल – नेत्रदोषांमुळे होणाऱ्या पापाचा नाश व तीन कल्पेपर्यंत शिवलोकात वसती. [दा. चं.]

**तिलपूर्ण कांस्यपात्रदान** मातेच्या ऋणातून मुक्त होण्यासाठी हे करायचे असते. माघ पौर्णिमा, अमृतसिद्धियोग असलेला दिवस, चंद्राच्या वा सूर्याच्या ग्रहणाचा दिवस, संक्रांती किंवा युगादी तिथी, या दिवशी तिलपूर्ण कांस्यपात्राचे दान करतात. त्यासाठी पंचवीस पलभाराचे कांस्यपात्र करतात. ते तिळांनी भरतात. त्यावर सुवर्ण ठेवून ते वस्त्राने आच्छादतात. गोमयाने स्वच्छ सारवलेल्या जागी कुंकवाने बारा पाकळ्यांचे कमळ काढून त्यावर त्या कांस्यपात्राची स्थापना व पूजा करतात. त्याच्यापुढे स्थंडिल घालून आज्य व तीळ यांचे १०८ हवन करतात. मग बहुपुत्र ब्राह्मणाला बोलावून मातृश्राद्ध करतात. माता हयात असेल तर तिला वस्त्रालंकार देऊन तिची पूजा करतात. नंतर

कांस्यपात्राचे दान देतात. आज्यहोम व ब्राह्मण-भोजन झाल्यावर दानसमाप्ती करतात. [ दा. चं. ]

**तिलाचलदान** तिळांच्या पर्वताचे दान. दहा द्रोणपरिमाणांचा तिळांचा पर्वत रचणे हे उत्तम, पाच द्रोणपरिमाणांचा पर्वत हे मध्यम व तीन द्रोणपरिमाणाचा पर्वत हे कनिष्ठ होय. मधल्या मेरू पर्वताच्या द्रोणपरिमाणांच्या चतुर्थांश द्रोणपरिमाणे घेऊन चारही बाजूंना चार पर्वत रचतात. मेरूच्या माथ्यावर कल्पतरू व चारही बाजूंना मंदार, पारिजात, हरिचंदन व संतान हे वृक्ष सोन्याचे करून उभारतात. त्यांच्यावर मोती, गोमेद, पुष्पराग इ. रत्ने जडवतात. याशिवाय चारही बाजूंना ब्रह्मा, विष्णू, रुद्र आणि सूर्य यांच्या सुवर्णप्रतिमा स्थापन करतात. तसेच पक्षी, मुनी व इंद्रादी लोकपाल यांच्या सुवर्ण वा रौप्य प्रतिमा करून त्याही स्थापन करतात. नंतर तिलाचलाची पूजा करून पुढील मंत्राने त्याची प्रार्थना करतात—

हव्यकव्येषु यस्माच्च तिलैरेवाभिरक्षणम् ।
भवादुद्धर शैलेन्द्र तिलाचल नमोऽस्तु ते ॥

अर्थ – ज्या अर्थी हव्यकव्यांच्या वेळी तिळांपासूनच रक्षण होते, त्याअर्थी हे शैलेंद्रा, तू संसारातून माझे उद्धरण कर. हे तिलाचला, तुला नमस्कार असो.

मग तो तिलपर्वत ब्राह्मणाला दान देतात. फल – सकलपापनाश व अक्षय्य वैष्णवपदप्राप्ती. [ दा. चं. ]

**तिलोक ऋषी** (१८४७ – १८८३ इ. स.) एक जैन साधू. याचा जन्म माळव्यातील रतलाम या गावी झाला. तिलोक हा आपल्या मातापित्यांचे कनिष्ठ अपत्य होता. याने वयाच्या दहाव्या वर्षीच अयवंत नामक साधूची प्रवचने ऐकून प्रव्रज्या घेतली व त्यालाच आपला गुरू केले. अयवंत साधू मरण पावल्यावर त्याच्या शिष्यांनी तिलोकालाच अयवंताच्या गादीवर बसविले.

प्रवचने करणे, जिज्ञासूंचे शंकासमाधान करणे, इ. अनेक गोष्टींतून राहिलेल्या वेळात तिलोक ऋषीने ग्रंथरचना केली आहे. या सर्वांत श्रेणिकचरित्र हा काव्यग्रंथ मोठा आहे. त्याचे ८४ भाग असून, त्यात ३२५० गाथा आहेत. याशिवाय धन्ना शालिभद्रचरित्र, गजसुकुमारचरित्र, अमरकुमारचरित्र, चौवीस जिनस्तवन, ऋषभदेव जिनस्तवन, महावीरस्वामीचरित्र, पंचपरमेष्ठी स्तवन, नरकदुःखवर्णन, श्रावक छत्तिसी, तिलोक बावनी ( भाग ३ ), इ. त्याचे प्रमुख काव्यग्रंथ होत.

तिलोक ऋषी हा चित्रकारही होता. त्याने आपली चित्रकला धर्मोपदेशाच्या कामीच वापरली आहे. एका चित्रात त्याने बऱ्याच गाथा निरनिराळ्या प्रकारे लिहून त्यातून हत्तीचे चित्र निर्माण केले आहे. त्यात जुन्या पैशाचे नाणे बसेल एवढ्या जागेत याने ६५ हत्ती चितारले असून ते सर्व स्पष्ट दिसतात. चित्रकलेप्रमाणेच तिलोक ऋषीची लेखनकलाही सुरेख होती. एका पोस्टकार्डाच्या पाऊण भागावर याने जैन धर्मग्रंथांपैकी दशवैकालिक सूत्र हा सबंध ग्रंथ लिहिला आहे व राहिलेल्या भागात २५६ गाथांचे पुञ्छीसूणसूत्र लिहिले आहे. [ जीवन विकास, मार्च १९६२ ]

**तिलोपा** (इ. स. चे दहावे शतक) एक सिद्ध. चौऱ्यांयशी सिद्धांपैकी हा बाव्वीसावा सिद्ध होय. भृगुनगर या गावी याचा जन्म झाला. हा जातीने ब्राह्मण असून, पूर्व भारतात जन्मला असे तारानाथाचे मत आहे. तिबेटी बौद्ध ग्रंथात याला राजवंशी असे म्हटले आहे. याने बौद्ध धर्म स्वीकारल्यानंतर याला प्रज्ञाभद्र असे नाव मिळाले. बौद्ध संघात याच्याकडे तीळ कुटण्याचे काम होते, म्हणून याला तिलोपा हे



तिलोपा

नाव मिळाले असे म्हणतात. विजयपाद अथवा अंतरपाद हा याचा गुरू असून, नारोपा हा याचा शिष्य होय.

एका तेलीण योगिनीशी याचा संबंध आल्यावर याला सिद्धी प्राप्त झाली, अशी कथा सांगतात. तंजूरमध्ये याच्या नावाचे बारा ग्रंथ मिळतात. त्यांतील काही ग्रंथ मागधी हिंदीत आहेत. अंतर्बाह्य विषयनिवृत्तिभावनाक्रम, करुणाभावनाधिष्ठान, दोहाकोष, महामुद्रोपदेश, चर्यागीत, इ. त्यांची नावे आहेत. [ सि. सा.; पु. त. नि.; म. च. को. ]

**तिलोशिका** एक बौद्ध विहार. हा विहार नालंदेपासून पश्चिमेला वीस मैलांवर होता. बिंबिसार राजाच्या अखेरच्या वंशजाने हा विहार बांधला, असे सांगतात. या विहारात तीनमजली दालनांचे चार चौक, उंच गच्च्या आणि रुंद वाटा होत्या. इथे सर्व ठिकाणांहून बौद्ध पंडित येऊन राहत असत. युआन च्वांग इथे आला असता त्याला प्रज्ञाभद्र हा बौद्ध पंडित आणि अन्य एक हजार महायानी बौद्ध भिक्षू भेटले होते. [ सु. वि. को. ]

**तिष्यव्रत** एक काम्य व्रत. तिष्य म्हणजे पुष्य नक्षत्र होय. या व्रताचा प्रारंभ उत्तरायणात शुक्ल पक्षातल्या पुष्य नक्षत्रावर करतात. धनाधिपती कुबेर ही या व्रताची देवता आहे. या व्रतात प्रत्येक महिन्याच्या पुष्य नक्षत्राच्या दिवशी कुबेराची पूजा करायची असते. व्रतावधी – एक वर्ष. फल – ऐश्वर्यप्राप्ती. [ हि. ध. ]

**तिसुआ सोमवार व्रत** एक काम्य व्रत. जगन्नाथपुरीची यात्रा करून आलेल्या व्यक्तींच्याच घरी हे व्रत करतात. चैत्र महिन्यातल्या चारही सोमवारांना तिसुआ सोमवार म्हणतात. प्रत्येक सोमवारी हे व्रत करायचे असते. या व्रतात मध्याह्नकाळी जव, आंब्याचा मोहोर आणि पळसाचे फूल वाहून वेताच्या तीन काठ्यांचे षोडशोपचारांनी पूजन करतात. या काठ्यांना जगन्नाथपुरी येथील जगन्नाथ, बलराम आणि सुभद्रा यांची प्रतीके मानतात. फल— धनधान्याची समृद्धी.

**तिळीव्रत** कुमारिकांचे एक व्रत. गुजरात व सौराष्ट्र या प्रदेशांतील कुमारिका आपल्याला चांगला पती मिळावा, आपले सौभाग्य अभंग राहावे व आपल्याला वैधव्य येऊ नये म्हणून हे व्रत करतात. सूर्याची पूजा करून त्याची प्रार्थना करणे, हा या व्रताचा विधी आहे.

**तीज** राजस्थानातील स्त्रियांचा एक उत्सव. श्रावण शुक्ल तृतीयेच्या दिवशी हा उत्सव करतात. या वेळी सासुरवाशिणी माहेरी येतात. आईवडील मुलींना लाल साड्या भेट देतात. सर्व स्त्रिया आणि मुली लाल वस्त्रे परिधान करून झोपाळ्यावर झोके घेतात, नाचतात आणि गीते गातात. त्या दिवशी गौरीची प्रतिमा उच्चासनावर ठेवून तिची पूजा करतात आणि तिच्या स्तुतीची गाणी म्हणतात. या उत्सवाच्या निमित्ताने उदयपूर व जयपूर येथील राजे आपल्या सरदार-दरकदारांना लाल वस्त्रे भेट देतात आणि उत्सव पाहण्यासाठी



तीज उत्सवातील झोपाळा – राजस्थान

आपल्या लवाजम्यासह जातात. [ लोककला त्रै.; अँ. अँ. रा. ]

**तीट** गंधाप्रमाणे कपाळी लावण्याचा काळा पदार्थ. लहान मुलांना दृष्ट लागू नये म्हणून स्नानानंतर त्यांच्या गालाला काजळ आणि कपाळी तिटीचा लहान टिळा लावण्याची प्रथा आहे. तांदूळ किंवा अन्य धान्य जाळून त्यापासून तीट तयार करतात. बाभळीच्या शेंगा वाळवून त्यांच्या चूर्णापासूनही तीट बनवतात. मराठी बाळगाण्यात तीट लावण्याचा पुढीलप्रमाणे उल्लेख आहे—

अडगुळं मडगुळं सोन्याचं कडगुळं
रुप्याचा वाळा, तान्ह्या बाळा तीट लावूं !

**तीन** दोन व चार यांच्या मधला एक अंक. भारतीय परंपरेत या अंकाशी अनेक धार्मिक व सामाजिक कल्पना निगडित असून, त्या शुभ व अशुभ अशा उभयविध आहेत. ऋग्वेदकालापासून तीन या अंकाचे लोकांना आकर्षण असल्याचे दिसून येते. ऋग्वेदात तीन या संख्येच्या किती तरी गोष्टी सांगितल्या आहेत. हिरण्यस्तूप या ऋषीचे एक सूक्त तीन या आकड्याला धरूनच रचलेले आहे. त्याचा सारांश असा—

हे अश्वींनो, तुम्ही प्रातः, माध्याह्न व सायं या तीन सवनप्रसंगी आमच्याकडे या. तुमच्या रथाला तीन चाके, तीन धावा आणि तीन धिरे आहेत. अश्वींनो, तुम्ही त्यात बसून दिवसा व रात्रौ त्रिवार परिभ्रमण करता. तुम्ही दिवसात तीन वेळा

भक्तांची पातके नाहीशी करता. तुम्ही आमच्याकडे त्रिकाल संपत्ती घेऊन या. स्वर्ग, पृथ्वी आणि उदके या तीन्ही ठिकाणांतून तुम्ही तीन प्रकारची औषधे तीन वेळा आमच्यासाठी आणा. तुम्ही आमच्या यज्ञभूमीत आगमन करा. इथे तुमच्यासाठी तीन पात्रांत तीन प्रकारचा हवी सिद्ध करून ठेवला आहे, इत्यादी. ( ऋ. १.३४ )

भारतीय दर्शनात जागृती, स्वप्न व सुषुप्ती या जीवाच्या तीन आणि बाल्य, तारुण्य व वार्धक्य या देहाच्या तीन अवस्था मानल्या आहेत. सत्त्व, रज व तम असे गुण आणि पुत्र, वित्त व लोक अशा एषणाही तीनच आहेत. वेदान्तात विषयानंद, वासनानंद व ब्रह्मानंद असे तीन आनंद; तसेच कर्म, भक्ती व ज्ञान असे तीन योग मानले आहेत. धर्मशास्त्रात देवऋण, ऋषिऋण व पितृऋण अशी तीन ऋणे सांगितली आहेत. साहित्यशास्त्रात वाच्य, लाक्षणिक व व्यंग्य असे तीन अर्थ व जातकात देव, मनुष्य आणि राक्षस असे तीन गुण मानलेले आहेत. पुराणांत स्वर्ग, मृत्यू व पाताळ असे तीन लोक; ब्रह्मा, विष्णू व महेश असे तीन देव आणि सृष्टी, स्थिती व प्रलय अशा विश्वाच्या तीन अवस्था सांगितल्या आहेत. सूर्य तीन वेळा पृथ्वीचे आक्रमण करतो व वामनाने बळीकडे भूमी मागितली तीही तीन पावलांइतकीच. श्राद्धांत पितरांचीही त्रयीच असते. अशा तीन या संख्येने दाखवलेल्या कितीतरी गोष्टी भारतीय संस्कृतीच्या विविध अंगांमध्ये आढळतील.

तीन या आकड्याविषयीच्या लौकिक समजुती आणि रूढीही बऱ्याच आहेत. एखादी गोष्ट दोनदा झाली; तर ती तिसऱ्यांदा होणारच, अशा समजुतीने मराठीत ' इजा, बिजा, तिजा ' अशी म्हण पडली आहे. एखाद्या शुभकार्यासाठी तीन ब्राह्मणांनी समवेत जाऊ नये, या अर्थाचे ' न गच्छेद् ब्राह्मणत्रयम् ' असे एक वचन आहे. वाङ्निश्चयाच्या वेळी वधूपिता तीन वेळा कन्यादानाची घोषणा करतो. कोणत्याही प्रतिज्ञेचा सामान्यत्वे त्रिवार उच्चार केला जातो. एखाद्याची दृष्टबाधा घालवण्यासाठी तीन वेळा त्याच्यावरून उतारा करतात व तो तिवाठ्यावर नेऊन ठेवतात.

या त्रिकाच्या आवडीतूनच मूर्तिकलेत त्रिमूर्तीचे शिल्प निर्माण झाले. बौद्ध धर्मात बुद्ध, धर्म व संघ अशी त्रयी महत्त्व पावली आहे. ख्रिस्ती धर्मातही पिता, पुत्र व पवित्र आत्मा अशी त्रयीच श्रेष्ठ मानलेली आहे. इस्लाम धर्मातही तीन या संख्येला बरेच महत्त्व दिलेले आहे. मुसलमान लोक कुराणातले काही मंत्र तीन वेळा म्हणतात. तीन मुसलमान एका थाळीत जेवायला बसतात, तेव्हा अल्ला त्यांना बरकत देतो, अशी त्यांची बळकट श्रद्धा आहे. [ की. पॉ. ]

**तीनचौबीसी** एक जैन व्रत. हे व्रत भाद्रपद वद्य तृतीये दिवशी करतात. या दिवशी उपवास करा असतो. तीन वर्षांनंतर उद्यापन करतात. [ जै. व्र. वि. सं. ]

**तीयां** पंजाबातील स्त्रियांचा एक सण. तीयां म्हणजे तृती हा सण श्रावण शुक्ल तृतीयेपासून सुरू होतो. सणात स्त्रिया गावाबाहेर पिंपळाच्या झाडाखाली अथवा या तच मोकळ्या जागी जमून चंद्रप्रकाशात गिद्धा नृत्य करत अलिकडे हा सण शहरांतूनही पाळला जातो. पंजाबातील घरमध्ये आणि अन्य काही शहरांत या सणाच्या निमित्त स्त्रियांची जत्रा जमते. [ पं. जी. सा. ]

**तीर-तलवारींचा नाच** भिल्लांचे एक नृत्य. बाजार जत्रा भरतात, तिथे भिल्ल हे नृत्य करतात. यात ढोल-नगाऱ्यांच्या साथीवर ते तलवारी व तिरकमठे हातांत घेऊन नाचतात. [ लोककला ]

**तीर्थ** पवित्र स्थान. या शब्दाचे अर्थ असे – ' निपानागम स्तीर्थमृषिजुष्टे जले गुरौ । ' ( = जलस्थान, शास्त्र, ऋषींनी सेवन केलेले स्थल, जल व गुरू इतके शब्दाचे अर्थ आहेत.) (अमर.) ' तीर्थं योनौ जलावतारे ( = योनी = जलाशयाजवळचे अरत्निमात्र स्थान व जिथे आहे असा जलप्रवाह म्हणजे तीर्थ होय.) (हलायुध) = वेद गत ब्राह्मणालाही मनूने तीर्थ म्हटले आहे (मनु. ३.१३०)

तीर्थ शब्दाच्या व्याख्या अशा– ' तरति पापादिकं यस्मा ( = ज्याच्यामुळे पापादिकांतून तरून जाता येते, ते होय.) (श. क.) ' तीर्यते अनेन इति । ' ( = ज्याच्या तरून जाता येते, ते तीर्थ होय.)

कर्मभूमी, धर्मस्थान, धर्मकृत्य यांनाही काही ठिकाणी म्हटले आहे. ' तीर्थरूपा हि साधवः ' ( = संतसज्जन हे ती असतात, असेही म्हणतात.) स्कंद पुराणात तीर्थ शब्दाचा थोडा विस्तृत अर्थ सांगितला आहे, तो असा—

**आश्रयाः सन्मुनीन्द्राणां देवानां च तथा प्रिये ।**
**भूमिभागाः पर्वताः स्युस्तत्कीर्त्यं तीर्थमित्युत ॥**

अर्थ – हे प्रिये, मुनिश्रेष्ठ व देव यांची निवास (पवित्र) भूमिभाग व पर्वत, यांना तीर्थ असे म्हणावे.

राजाच्या मंत्रिप्रभृती अठरा अधिकाऱ्यांनाही तीर्थ आहे. याविषयी नीतिशास्त्रातला श्लोक असा–

**मन्त्री पुरोहितश्चैव युवराजश्च भूपतिः ।**
**पञ्चमो द्वारपालश्च षष्ठोऽन्तर्वंशिकस्तथा ॥**

कारागाराधिकारी च द्रव्यसञ्चयकृत्तथा ।
कृत्याकृत्येषु चार्थानां नवमो विनियोजकः ।।
प्रदेष्टा नगराध्यक्षः कार्यनिर्माणकृत्तथा ।
धर्माध्यक्षः सभाध्यक्षो दण्डपालस्त्रिपञ्चमः ।।
षोडशो दुर्गपालश्च तथा राष्ट्रान्तपालकः ।
अटवीपालकान्तानि तीर्थान्यष्टादशैव तु ।।

अर्थ – मंत्री, पुरोहित, युवराज, राजा, द्वारपाल, राजाचा खासगी कारभारी, तुरुंगाधिकारी, समाहर्ता (द्रव्य गोळा करणारा), कृत्य व अकृत्य कोणते ते ठरवून त्याप्रमाणे योजना करणारा, सेनाधिकारी, नगराध्यक्ष, खाणी, कारखाने इत्यादिकांची निर्मिती करणारा, धर्माध्यक्ष, सभाध्यक्ष, दंडधारक, दुर्गपाल, सीमापाल व अरण्यपाल या अठरा जणांना तीर्थे असे म्हणावें.

थोडयाफार फरकाने कौटिल्यानेही ही अठरा तीर्थे सांगितली आहेत. महामात्यपदाला कौटिल्याने मुख्य तीर्थ म्हटले आहे.

मात्र सर्वसामान्यपणे तीर्थ शब्दाचा पवित्र जलाशीच संबंध मानला जातो. तीर्थ शब्द ऋग्वेदापासून प्रचलित आहे. ऋग्वेदात त्याचा अर्थ मार्ग व नदीतील उतार असा दिलेला आहे. वेदकालापासून जल हे अत्यंत पवित्र व देवतास्वरूप मानले गेले आहे. ऋग्वेदात त्याविषयी पुढील ऋचा आहे–

या आपो दिव्या उत वा स्रवन्ति
खनित्रिमा उत वा याः स्वयञ्जाः ।
समुद्रार्था याः शुचयः पावका-
स्ता आपो देवीरिह मामवन्तु ।।
(ऋ. ७.४९.२)

अर्थ– ज्या उदकधारा आकाशातून पाझरतात अथवा भूमी खोदली असता तिथून झुळझुळ वाहतात किंवा ज्या स्वतः स्वच्छ राहून इतरांना पवित्र करीत समुद्राला जाऊन मिळतात, अशा सर्व आपोदेवी इथे माझे रक्षण करोत.

ऋग्वेदाचे वरील सर्व सूक्त आपोदेवींच्या प्रशंसेचेच आहे. त्यात पुढे म्हटले आहे, की आपोदेवींच्या ठिकाणी वरुण, सोम, विश्वेदेव व वैश्वानर अग्नी वास्तव्य करतात.

'आपो वै सर्वा देवताः।' (= जले ही सर्व देवतात्मक आहेत), असे तैत्तिरीय संहितेतही म्हटले आहे (२.६.८.३). अथर्ववेदातही आपोदेवींच्या पावकत्वाची प्रशंसा करणारे एक समग्र सूक्त आहे. त्यातील एक मंत्र असा–

शिवेन मा चक्षुषा पश्यतापः
शिवया तन्वोपस्पृशत त्वचं मे ।
घृतश्चुतः शुचयो याः पावका–
स्ता न आपः शं स्योना भवन्तु ।।
(अथर्व. १.३३.४)

अर्थ – हे आपोदेवींनो, तुम्ही मंगलदृष्टीने मजकडे पाहा. शुभकारक शरीराने माझ्या त्वचेला स्पर्श करा. ज्या तेज देणाऱ्या शुद्ध व पावक अशा आपोदेवी आहेत, त्या आमचे मंगल करणाऱ्या होवोत.

ऋग्वेदात सरस्वती, शरयू, सिंधू, इ. सुमारे वीस नद्यांचे उल्लेख येतात. वैदिक ऋषींना या सर्व नद्या पवित्र वाटत होत्या. या सर्व नद्यांत सरस्वतीला पावक, तसेच उत्तम वाणी व उत्तम विचार देणारी असे म्हणून गौरविले आहे (ऋ. १. ३.१०-११). अरण्ये व पर्वत यांनाही वेदकालापासूनच पवित्र देवतास्थाने असे मानले गेले आहे. सर्व पर्वत, सर्व वाहत्या नद्या, डोह, ऋषींची निवासस्थाने व गायींचे गोठे, ही पुण्यप्रद तीर्थे आहेत, असे गौतम, वसिष्ठ व बौधायन यांनीही म्हटले आहे. वायू पुराण व पद्म पुराण यांनीही वरील म्हणण्याला दुजोरा दिला आहे, तो असा–

सर्वं पुण्यं हिमवतो गङ्गा पुण्या च सर्वतः ।
समुद्रगाः समुद्राश्च सर्वे पुण्याः समन्ततः ।।
(वायू पु. ७६.११७)

अर्थ – हिमालयाचा सर्वच प्रदेश पुण्यकारक. गंगाही उगमापासून समुद्रमिळणीपर्यंत पुण्यकारक. तसेच समुद्राला मिळणाऱ्या सर्व नद्या व सर्व समुद्र हे सर्व बाजूंनी पुण्यकारक होत.

प्रभावादद्भुताद् भूमेः सलिलस्य च तेजसः ।
परिग्रहान्मुनीनां च तीर्थानां पुण्यता स्मृता ।।
(पद्म पु. उत्तर. २३७)

अर्थ – भूमी, जल व तेज यांच्या अद्‌भुत प्रभावामुळे व ऋषि-मुनींच्या निवासामुळे तीर्थांना पुण्यकारक म्हटले आहे.

मत्स्य पुराणात साडेतीन कोटी तीर्थे सांगितली आहेत, तर ब्रह्म पुराणात ती साठ कोटी हजार व साठ कोटी शेकडे इतकी सांगितली आहेत (मत्स्य पु. ११०.७; ब्रह्म पु. १७५.८३).

तीर्थात स्नान करताना अरत्निमात्र (कोपरापासून मध्यमांगुलीच्या अग्रापर्यंतचे माप) अंतर सोडून पाण्यात जावे व पाणी उचलून न घेता बुडी मारून स्नान करावे, असे आदित्य पुराणात सांगितले आहे.

तीर्थ शब्दाचा जो पुढे अतिव्यापक अर्थ झाला, त्यात ब्राह्मणांच्या चरणजलाला व ब्राह्मणाच्या उजव्या कानालाही तीर्थ अशी संज्ञा प्राप्त झाली आहे. माणसाच्या हाताच्या ठिकाणीही पुढील तीन तीर्थे मानली आहेत–

अङ्गुल्यग्रे तीर्थं दैवं स्वल्पाङ्गुल्योर्मूले कायम् ।
मध्येऽङ्गुष्ठाङ्गुल्योः पैत्रं मूले त्वङ्गुष्ठस्य ब्राह्मम् ।।
(अमरकोश)

अर्थ – अंगुलीच्या अग्रांच्या ठिकाणी दैव, कनिष्ठिका व

अनामिका यांच्या मूलभागी काय, अंगठ्याजवळच्या दोन बोटांच्या मध्यभागी पैत्र व अंगुष्ठाच्या मूलभागी ब्राह्म तीर्थ असते.

युगभेदाने तीर्थाचे विशेष श्रेष्ठत्व पद्म पुराणात पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

**कृते तु पुष्करं तीर्थं त्रेतायां नैमिषं तथा ।**
**द्वापरे तु कुरुक्षेत्रं कलौ गङ्गां समाश्रयेत् ।।**

अर्थ – कृतयुगात पुष्कर, त्रेतायुगात नैमिषारण्य व द्वापरयुगात कुरुक्षेत्र ही श्रेष्ठ तीर्थे होत. कलियुगात गंगेचा (श्रेष्ठ तीर्थ मानून )आश्रय करावा.

**तीर्थप्रकार**– जंगम, मानस व स्थावर असे तीर्थांचे तीन प्रकार मानले आहेत. ब्राह्मण हे जंगमतीर्थ; सत्य, क्षमा, इंद्रियनिग्रह, दान, दम, संतोष, ब्रह्मचर्य, भूतदया, आर्जव, ज्ञान व धैर्य ही मानसतीर्थे आणि भूमीवरची अरण्ये, पर्वत, जलाशय, नद्या, इ. स्थावर तीर्थे होत.

स्थावर किंवा भौम याचे आणखी चार प्रकार मानले आहेत, ते असे–

(१) धर्मतीर्थ– प्रजेमध्ये धर्मपालनाची आवड उत्पन्न व्हावी म्हणून ज्या ठिकाणी धर्म, नीती, सदाचार यांचे शिक्षण दिले जाते व वरील गोष्टींचा प्रचार केला जातो, असे ठिकाण.

(२) अर्थतीर्थ– नदीच्या तीरी आणि त्यांच्या संगमावर जिथे व्यापारधंदा मोठ्या प्रमाणावर चालतो, असे ठिकाण.

(३) कामतीर्थ– जिथे विविध कलांची उपासना चालते व हस्तव्हेच्या सुंदर कलात्मक वस्तू बनतात, असे ठिकाण.

(४) मोक्षतीर्थ– विद्या, ज्ञान आणि अध्यात्म यांची पीठे ज्या ठिकाणी आहेत, अशी क्षेत्रे.

जिथे वरील चारांचाही समवाय असतो आणि ज्या ठिकाणी जीवनाच्या बहुमुखी प्रवृत्ती खळाळताना दिसतात, त्या स्थानांना महापुरी अशी संज्ञा दिलेली आहे. उदा० काशी, प्रयाग, मथुरा, उज्जयिनी, कांची, इत्यादी.

ब्रह्म पुराणात तीर्थांचे वेगळे चार प्रकार मानले आहेत, ते पुढीलप्रमाणे –

(१) दैव – गोदावरी, तुंगभद्रा, गंगा, काशी, पुष्कर, प्रयाग, इ. ही दैव (देवांनी निर्मिलेली) तीर्थे होत.

(२) आसुर– गया हे असुरनिर्मित तीर्थ आहे.

(३) आर्ष– प्रभास, नरनारायण, बदरिकाश्रम, इ. तीर्थे ही आर्ष (ऋषिनिर्मित) तीर्थे होत.

(४) मानुष– अंबरीष, मनू, पुरू, इ. राजांनी निर्माण केलेली तो मानुष तीर्थे होत.

पद्म पुराणात लाक्षणिक अर्थाने गुरू, माता, पिता, पती, पत्नी, इ. व्यक्तींनाही तीर्थे म्हटले आहे. गुरू आपल्या शिष्याचा अज्ञानरूपी अंधकार नष्ट करतो; म्हणून शिष्याला गुरू हा तीर्थरूप आहे. माता–पिता आपल्या पुत्रांचे इह–परलोकी भले व्हावे, म्हणून प्रयत्न करतात, त्यासाठी मुलाला ती दोघे तीर्थरूप होतात. पत्नीला पती हा सर्व तीर्थांच्या जागी आहे. पतीचे इह–परलोकी कल्याण व्हावे, म्हणून सदैव झटणारी पत्नी आणि ज्ञानगुणांनी संपन्न अशी सदाचरणी पतिव्रता ही सर्वांना तीर्थाच्या जागी आहे. अशी पतिव्रता ज्या घरात वास्तव्य करते, त्या घरालाही तीर्थाची योग्यता प्राप्त होते. भागवत पुराणात भगवद्भक्तांनाही तीर्थ म्हटले आहे, कारण ते आपल्या आचरणाने इतरांना सन्मार्गाला लावतात.

भारतातील सर्वसामान्य व विशिष्ट धर्म–पंथांची तीर्थक्षेत्रे पुढीलप्रमाणे आहेत –

**पौराणिक तीर्थक्षेत्रे** – पुराणांत ज्यांची माहात्म्ये वर्णित आहेत, अशी क्षेत्रे–

काशी, प्रयाग, गया, ही त्रिस्थळी. जगन्नाथपुरी, रामेश्वर, द्वारका व बदरीकेदार ही चार धामे. अयोध्या, मथुरा, माया, इ. सप्त पुऱ्या. गंगा, यमुना, गोदा, कृष्णा, कावेरी, इ. नद्या. सोमनाथ, श्रीशैल, विश्वेश्वर, रामेश्वर, त्र्यंबकेश्वर, इ. बारा ज्योतिर्लिंगे. करवीर, तुळजापूर, कामाख्या, इ. शक्तिपीठे.

**बौद्ध तीर्थक्षेत्रे** – महापरिनिर्वाण–सूत्रात लुंबिनी( बुद्धाचे जन्मस्थान ), गया (बुद्धाला बोधी प्राप्त झाली ते ठिकाण), सारनाथ (बुद्धाने सर्वप्रथम धर्मचक्रप्रवर्तन केले, ते स्थान) व कुशीनगर ( बुद्धाचे निर्वाणस्थान ) ही चार स्थाने तीर्थरूप मानलेली आहेत. बुद्ध धर्मचक्रप्रवर्तनासाठी व वर्षावासासाठी जिथे जिथे गेला आणि राहिला, ती ती स्थानेही बौद्धांनी तीर्थरूप मानली आहेत. उदा०सांकाश्य, श्रावस्ती, राजगृह, कौशांबी, वैशाली, मंकुल पर्वत, सुंसुमारगिरी, पारिलेयक, नालंदा, इत्यादी. निर्वाणानंतर बुद्धाच्या अस्थी ज्या वेगवेगळ्या आठ ठिकाणी ठेवल्या गेल्या व ज्यांच्यावर स्तूप उभारले गेले अशी कुशीनगर, वैशाली, कपिलवस्तू, रामग्राम, पावागढ, राजगृह, बेटद्वारका व अल्लकप्प ही आठ स्थले बौद्धांना तीर्थरूप ठरली आहेत. बुद्धाच्या चितेतले अंगार घेऊन पिप्पलीवनात त्यांच्यावर अंगारस्तूप बनवला गेला, ते ठिकाण व कुशीनगर येथे बुद्धाच्या अस्थी कुंभात ठेवून त्यांवर कुंभस्तूप उभारला गेला ते ठिकाण, ही दोन्ही स्थळे बौद्धांची पुण्यक्षेत्रे आहेत. जिथे जिथे विहार, स्तूप व चैत्य उभारले गेले, ती ती सर्व स्थळे बौद्ध लोक तीर्थरूप मानतात.

**जैन तीर्थक्षेत्रे**– जैनांची तीर्थे सर्व भारतभर पसरली आहेत. जैनांनी सिद्ध क्षेत्रे व अतिशय क्षेत्रे असे आपल्या क्षेत्रांचे दोन

विभाग मानलेले आहेत. ज्या ठिकाणांहून तीर्थंकर, सिद्ध व साधू हे निर्वाणाला गेले, ती सिद्ध क्षेत्रे आणि मंदिरे, मूर्ती किंवा विशिष्ट घटना यांच्यामुळे जी धर्माचरणाला उपयुक्त ठरली आहेत, अशी ठिकाणे ही अतिशय क्षेत्रे होत. सर्वप्रथम कुंदकुंदा-चार्यांच्या ग्रंथात जैन तीर्थांचा निर्देश आढळतो. जिनप्रभसूरीच्या विविध तीर्थकल्प या ग्रंथात व उत्तरकाली निर्माण झालेल्या तीर्थमाला या ग्रंथांत जैन तीर्थयात्रेचे विवरण आढळते. अष्टापद, संमेदशिखर, मंदारगिरी, गिरनार व पावापूर ही जैनांची पाच प्रमुख सिद्ध क्षेत्रे असून, ती दिगंबर व श्वेतांबर या दोन्ही पंथांना मान्य आहेत. याशिवाय कोटिशिला, गुणाखा, गुलजारबाग, द्रोणगिरी, रेशंदिगिरी, मुक्तागिरी, गजपंथ, कुंथलगिरी, मांगी-तुंगी, पावागढ, तारंगा, चूलगिरी, सिद्धवरकूट, सोनागिरी व चौरासी हीही जैनांची सिद्ध क्षेत्रेच होत. अयोध्या, रतनपूर, हस्तिनापूर, कौशांबी, सौरीपूर, वाराणसी, सिंहपूर, चंद्रपूर, श्रावस्ती, किष्किंधा, राजगृह, चंपापूर, कुंदलपूर ही तीर्थंकरांची जन्मस्थाने, तसेच प्रयाग, प्रभास, अहिच्छत्रा, कपिला, इ. तीर्थंकरांची तपःस्थाने जैनांनी तीर्थ-स्वरूप मानली आहेत. श्रवणबेळगोळ, करकंडू, बावानगर, अंतरिक्ष, मातकुली, विजोलिया, केशरिया, श्री महावीर, कुंडलपूर, अबू, अचलगढ, चंदेरी, देवगढ, टीकमगढ, खजुराहो, कारंजा, विजापूर, वेरूळ, तवंदी, वदामी, उम्मच, वरांग, कारकल, मुडबिद्री, वेन्नूर, वेलूर, हळेवीड, खंडगिरी, इ. स्थळांना जैन धर्माच्या व जैन स्थापत्यकलेच्या इतिहासात फार महत्त्व असल्यामुळे जैन लोक त्यांना यात्रास्थळे मानतात. चांदखेडी, ऊन, पपौरा, पचराई, रामटेक, कालुबा, इ. ठिकाणी जैन मंदिरे असल्यामुळे तीही जैनांची तीर्थस्थले बनली आहेत.

**शीख तीर्थक्षेत्रे**– गुरू नानकाने आपल्या जपजी या ग्रंथात ६८ तीर्थांचा उल्लेख केला असून, ती सर्व तीर्थे पौराणिकच आहेत. याशिवाय अमृतसर, आनंदपूर, पटनासाहेब व नांदेड ही चार प्रमुख तख्ते शिखांची प्रमुख तीर्थस्थाने ठरली आहेत. त्याचबरोबर हिमालयातले हेमकुंड, अमृतसर येथील तरणतारण सरोवर, वेदरचा नानकझीरा, नानकानासाहेब, पंजासाहेब, इ. अनेक स्थळांना शीख लोक तीर्थे मानतात व त्यांची यात्रा करतात.

**इस्लामी तीर्थक्षेत्रे**– मक्का, मदिना व करबला ही मुसलमानांची प्रमुख क्षेत्रे असून, ती भारताच्या बाहेर आहेत. प्रतिवर्षी भारतातले हजारो मुसलमान त्यांच्या यात्रेला जातात. भारतात अजमीर येथील ख्वाजा मोइनुद्दिन चिस्ती याचा मकबरा, गोरखपूर व बहिराइच येथील गाजीमियाची स्थळे, मकनपूर येथील शाहमदार याचे ठिकाण, दिल्लीतील निजामुद्दीन अवलियाचा दरगा, तसेच पीर, अवलिया, शहीद आणि गाजी यांचे मकबरे व दरगे, ही मुसलमानांची यात्रास्थळे होत. मुस्लिम संतांच्या समाधिस्थलांनाही पुण्य क्षेत्र मानून मुसलमान लोक त्यांची यात्रा करतात.

**ख्रिस्ती तीर्थक्षेत्रे**– बेथेलहेम, नाजरेथ व येरुशलेम ही ख्रिस्ती लोकांची प्रमुख पुण्य क्षेत्रे असून, ती भारताच्या बाहेर आहेत. दक्षिणेतील वैलंगानी, मद्रासजवळचे मैलापूर व गोव्यातले बॉं जेझुस चर्च ही ख्रिस्ती लोकांची भारतातली तीन पुण्य-क्षेत्रे आहेत. मैलापूर येथे संत थॉमसची समाधी व बॉं जेझुस-मध्ये फ्रान्सिस झेवियर याचे शव आहे.

## तीर्थंकर

एक जैन संज्ञा. तीर्थंकर शब्दाची व्याख्या पुढील-प्रमाणे–'तीर्थं धर्मं करोति प्रकटयति इति तीर्थंकरः।' ( = तीर्थ म्हणजे धर्म; त्याचे प्रकटीकरण करतो तो तीर्थंकर होय.) ; किंवा 'तीर्यते संसारसागरो येन तत्तीर्थम्। तीर्थं करोतीति तीर्थंकरः।' ( = ज्याच्या योगाने संसारसागर तरून जाता येतो, ते तीर्थ होय. तीर्थ उत्पन्न करणारा तो, तीर्थंकर होय.) धनंजयाने बारा अंगांना, श्रुतसागराने रत्नत्रयाला, जोइंदूने आत्म्याला व शांतिसूरीने चतुर्विध संघाला तीर्थ म्हटले आहे. तीर्थंकर म्हणजे देवत्वाचेही अतिक्रमण करून वर गेलेला धर्माध्यक्ष किंवा केवलज्ञानी संत होय. तीर्थंकरालाच जिन, अर्हंत, सर्वज्ञ, वीतराग, केवली, इ. संज्ञा आहेत. तीर्थंकरांच्या जिन या नावावरून त्यांच्या धर्माला जैन असे नाव मिळाले आहे.

जैनांनी चौवीस तीर्थंकर मानलेले आहेत. हे चौवीस तीर्थंकर म्हणजे चौवीस आत्मे होत. अनेक योनींतून फिरत असता आध्यात्मिक प्रगती करीत शेवटी ते मानवयोनीत आले व त्या योनीत श्रेष्ठ प्रकारचे ज्ञान मिळवून तीर्थंकर बनले.

तीर्थंकरांना मती, श्रुती, अवधी, मनःपर्यय व केवल अशी पाच ज्ञाने होतात. यांपैकी पहिली तीन ही जन्मतःच असतात आणि पुढची दोन क्रमाने होत असतात. केवलज्ञान हे क्षायिक असते. ते झाल्यावर बाकीची ज्ञाने लोपतात.

तीर्थंकर हे चतुर्विध संघाची स्थापना करतात. तीर्थंकर गर्भात आला असता त्याच्या मातेला सोळा प्रकारची स्वप्ने पडतात आणि त्यांत ती ऐरावत, वृषभ, सिंह, लक्ष्मी, पूर्णचंद्र, उगवणारा सूर्य, दोन सुवर्णकलश, इ. मंगल गोष्टी पाहते. तीर्थंकर गर्भात आल्यापासून तो मोक्षाला जाईपर्यंत, त्याचे पाच प्रकारचे उत्सव होतात, त्यांना पंचकल्याणिक अशी संज्ञा आहे.

तीर्थंकराला केवलज्ञान झाल्यावर कुबेरादी देव इंद्राच्या आज्ञेने त्याच्यासाठी समवसरणाची रचना करतात. समवसरण म्हणजे एक दिव्य सभामंडप होय. या मंडपात मध्यभागी सिंहा-

सनावर बसून तीर्थंकर सर्वांना चौदा पूर्वे व बारा अंगे यांचा उपदेश करतात. दिव्य छत्र, अशोक वृक्ष, दिव्य ध्वनी, सिंहासन, दुंदुभी, पुष्पवृष्टी, चौसष्ट चामरे व भामंडल अशी तीर्थंकरांची आठ प्रातिहार्ये असतात.

जैनांनी देवांपेक्षाही तीर्थंकरांना श्रेष्ठ मानले असून, देवदेवतांना त्यांचे सेवक बनवले आहे. जैनांची अशी कल्पना आहे, की तीर्थंकरांच्या सभोवती बारा सभा असून, त्यांत गणधर, मुनी, कल्पवासी देवी, आर्यिका व स्त्रिया, भवनवासी देवी, ज्योतिषवासी देवी, इंद्रासह कल्पवासी देवी, इंद्रासह भवनवासी देव, इंद्रासह व्यंतरवासी देव, मनुष्य व तिर्यञ्च ( पशुपक्षी ) असे बारा सभासद असतात.

तीर्थंकरांचे जैन पुराणांतले वर्णन अद्‌भुत असून, ते पुढीलप्रमाणे आहे– तीर्थंकरांच्या मुखाभोवती सूर्यापेक्षा सहस्रगुण प्रभा असते. त्यांचे प्रतिबिंब पडत नाही. त्यांच्या पायांखाली सुवर्णकमले उगवतात. एक कोटी देव त्यांच्या परिवारात असतात. ते जिथे जातात, तिथे सुगंधित जलवृष्टी होते. भूमीवरचे कंटक अधोमुख होतात. त्यांच्यावर आकाशात धर्मचक्र फिरत असते. त्यांच्या शरीरांत घर्मादी मल नसतात. त्यांच्या पापण्या मिटत नाहीत. ते आकाशातून संचार करतात. ते जिथे वास्तव्य करतात, तिथे अवर्षण, अतिवृष्टी, दुष्काळ व परचक्र यांचे भय राहत नाही.

भूत, वर्तमान व भविष्य अशा तीन्ही कालांत प्रत्येकी चौवीस तीर्थंकर होतात. जंबुद्वीपाच्या भरतक्षेत्रातील चौवीस तीर्थंकरांचे संपूर्ण विवरण तिलोयपण्णत्तीत दिलेले आहे. भारताच्या वर्तमान कालातील चौवीस तीर्थंकरांमध्ये ऋषभदेव हा पहिला आणि महावीर हा शेवटचा तीर्थंकर आहे. या चौवीस तीर्थंकरांविषयी जैन ग्रंथांत माहिती दिली आहे, ती अशी–

(१) **ऋषभ किंवा आदिनाथ** – आईबाप – मरुदेवीनाभिराज. जन्मस्थान– अयोध्या. वय – ८४ लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – गोमुखचक्रेश्वरी. निर्वाणस्थान – कैलास पर्वत. लांछन – वृषभ. दीक्षास्थान – वट वृक्ष. वंश– इक्ष्वाकू.

(२) **अजितनाथ** – आईबाप – विजयादेवीजितशत्रू. जन्मस्थान – अयोध्या. वय – ७२ लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – महायक्षरोहिणी. निर्वाणस्थान– पारसनाथ पर्वत. लांछन– हत्ती. दीक्षास्थान– सप्तच्छद (सातवीण) वृक्ष. वंश– इक्ष्वाकू.

(३) **संभवनाथ** – आईबाप– सेनाजितारी. जन्मस्थान – श्रावस्ती. वय – ६० लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – त्रिमुखप्रज्ञाप्ती. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – अश्व. दीक्षास्थान – शाल वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(४) **अभिनंदननाथ** – आईबाप – सिद्धार्थासंवर. जन्मस्थान – अयोध्या. वय – ५० लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – यक्षेश्वरवज्रशृंखला. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – वानर. दीक्षास्थान – सरल वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(५) **सुमतिनाथ** – आईबाप – सुमंगलामेघप्रभ. जन्मस्थान – अयोध्या. वय – ४० लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – तंबुरुवज्रांकुशा. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – क्रौंच. दीक्षास्थान – प्रियंगू वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(६) **पद्मप्रभ** – आईबाप – सुशीमाधरण. जन्मस्थान – कौशांबी. वय – ३० लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – मातंग अप्रतिचक्रेश्वरी. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – कमल. दीक्षास्थान – प्रियंगू वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(७) **सुपार्श्वनाथ** – आईबाप – पृथिवीसुप्रतिष्ठ. जन्मस्थान – काशी. वय– २० लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – विजयपुरुषदत्ता. निर्वाणस्थान–पारसनाथ पर्वत. लांछन– नंद्यावर्त. दीक्षास्थान – शिरीष वृक्ष. वंश – उग्र.

(८) **चंद्रप्रभ** – आईबाप – लक्ष्मणामहासेन. जन्मस्थान– चंद्रपुरी. वय – १० लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – अजितमनोवेगा. निर्वाणस्थान–पारसनाथ पर्वत. लांछन – अर्धचंद्र. दीक्षास्थान – नाग वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(९) **पुष्पदंत**– आईबाप –रमासुग्रीव. जन्मस्थान – काकंदी. वय – २ लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – ब्रह्मकाली. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – मकर. दीक्षास्थान – बेहडा वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(१०) **शीतलनाथ** – आईबाप – सुनंदादृढरथ. जन्मस्थान – भद्रिकापूर. वय – १ लक्ष पर्व. यक्षयक्षिणी – ब्रह्मेश्वरज्वालामालिनी. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – स्वस्तिक. दीक्षास्थान – प्लक्ष (पिंपरी) वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(११) **श्रेयांसनाथ**– आईबाप – विष्णुश्रीविष्णू. जन्मस्थान– सिंहपुरी. वय – ८४ लक्ष वर्षे. यक्षयक्षिणी – कुमार व महाकाली. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – गेंडा. दीक्षास्थान – पलाश वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(१२) **वासुपूज्य** – आईबाप – विजयावसुपूज्य. जन्मस्थान– चंपापुरी. वय – ७२ लक्ष वर्षे. यक्षयक्षिणी – षण्मुखगौरी. निर्वाणस्थान – चंपापुरी. लांछन – महिष. दीक्षास्थान – तिंदुक वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(१३) **विमलनाथ** – आईबाप – सुरम्याकृतवर्मन. जन्मस्थान – कांपिल्य. वय – ६० लक्ष वर्षे. यक्षयक्षिणी – पाताल व गांधारी. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – रानडुक्कर. दीक्षास्थान – पाटल वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(१४) **अनंतनाथ** – आईबाप – सर्वयशासिंहसेन. जन्म-

स्थान– अयोध्या. वय – ३० लक्ष वर्षे. यक्षयक्षिणी – किन्नर व वैरोटी. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – अस्वल. दीक्षास्थान – पिंपळी वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(१५) **धर्मनाथ**– आईबाप – सुवर्तामानू. जन्मस्थान – रत्नपुरी. वय – १० लक्ष वर्षे. यक्षयक्षिणी – किंपुरुषसोलसा. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन– वज्र. दीक्षास्थान – दधिपर्ण वृक्ष. वंश– कुरू.

(१६) **शांतिनाथ** – आईबाप – आचिराविश्वसेन. जन्मस्थान – हस्तिनापूर. वय – १ लक्ष वर्षे. यक्षयक्षिणी – गरुड व अनंतमती. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – हरिण. दीक्षास्थान – नंदी वृक्ष. वंश – कुरू.

(१७) **कुंथुनाथ** – आईबाप – श्रीदेवीसूर्य. जन्मस्थान– हस्तिनापूर. वय – ९५००० वर्षे. यक्षयक्षिणी – गंधर्वमानसी. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – मेष. दीक्षास्थान – तिलक वृक्ष. वंश – कुरू.

(१८) **अरहनाथ** – आईबाप – मित्रासुदर्शन. जन्मस्थान- हस्तिनापूर. वय – ८४००० वर्षे. यक्षयक्षिणी- कुबेरमहामानसी. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – तगरकुसुम (मच्छ). दीक्षास्थान – आम्र वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(१९) **मल्लीनाथ** – आईबाप – रक्षिताकुंभ. जन्मस्थान – मिथिलापुरी. वय – ५५००० वर्षे. यक्षयक्षिणी – वरुणजया. निर्वाणस्थान– पारसनाथ पर्वत. लांछन – कुंभ. दीक्षास्थान – अशोक वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(२०) **मुनिसुव्रतनाथ** – आईबाप – पद्मावतीसुमित्र. जन्मस्थान – कुशाग्रनगर. वय – ३०००० वर्षे. यक्षयक्षिणी – मृकुटी व विजया. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – कूर्म. दीक्षास्थान – चंपक वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(२१) **नमिनाथ** – आईबाप – वप्राविजय. जन्मस्थान – मिथिलापुरी. वय – १०००० वर्षे. यक्षयक्षिणी– गोमेधअपराजिता. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – इंदीवर (निळेकमळ). दीक्षास्थान– वकुल वृक्ष. वंश– इक्ष्वाकू.

(२२) **नेमिनाथ** – आईबाप – शिवादेवीसमुद्रविजय. जन्मस्थान – सौरीपूर. वय – १००० वर्षे. यक्षयक्षिणी – मातंग व कूष्मांडी. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – शंख. दीक्षास्थान – मेषशृंग वृक्ष. वंश – इक्ष्वाकू.

(२३) **पार्श्वनाथ** – आईबाप – वामा व अश्वसेन. जन्मस्थान – काशी. वय – १०० वर्षे. यक्षयक्षिणी – मातंग व कूष्मांडी. निर्वाणस्थान – पारसनाथ पर्वत. लांछन – नाग. दीक्षास्थान – धवल वृक्ष. वंश – उग्र.

(२४) **महावीर अथवा वर्धमान** – आईबाप – प्रियकारिणी व सिध्दार्थ. जन्मस्थान – कुंडपूर. वय – ७२ वर्षे. यक्षयक्षिणी – गुह्यकसिद्धायनी. निर्वाणस्थान – पावापुरी. लांछन – सिंह. दीक्षास्थान – शाल वृक्ष. वंश – नाथ.

भविष्यकाली होणाऱ्या चौवीस तीर्थंकरांची नावे, त्यांच्या मातापित्यांची नावे, त्यांची जन्मस्थाने, इ. माहितीही प्राचीन आगम-ग्रंथांत मिळते. समवायांग–सूत्रात लिहिले आहे, की मगधाचा सम्राट श्रेणिक ( बिंबिसार ) हा पहिला तीर्थंकर होईल. तसेच महावीराची परम भक्त असलेली सुलसा नामक स्त्री सोळावी व कृष्ण एकविसावा तीर्थंकर होईल.

जैन वाङ्मयात तीर्थंकरांच्या कथा वर्णन करणारी चरिते आणि पुराणे पुष्कळ आहेत. पण चौवीसही तीर्थंकर या ऐतिहासिक व्यक्ती होत्या, असे मानता येत नाही. पहिला तीर्थंकर ऋषभदेव, तेविसावा पार्श्वनाथ व चौविसावा महावीर हे पुरुषश्रेष्ठ मात्र ऐतिहासिक असल्याचे आता सिद्ध झाले आहे. तीर्थंकरांची चौवीस ही संख्याही प्रमाणित नाही. पौराणिक आणि बौद्ध परंपरांत चौवीस या संख्येला अवतारांच्या दृष्टीने महत्त्व आहे, असे समजल्यावर त्या दोन्ही धर्मांशी आपले संवादित्व दर्शविण्यासाठी जैनांनी तीर्थंकरांची संख्या चौविसांवर नेली असावी, असे एक मत आहे. एकेका तीर्थंकराचे आयुर्मान जैनांनी लक्षावधी वर्षांचे मानलेले आहे. फक्त पार्श्वनाथ १०० वर्षे व महावीर ७२ वर्षे इहलोकी राहिला. एका तीर्थंकराचा काल संपून दुसऱ्याचा सुरू होईपर्यंत कोटयवधी वर्षे जातात, असे जैन समजतात. या प्रचंड वर्षसंख्येचा विचार केला, तर तीर्थंकरप्रणीत धर्मसंस्थेचा उगम वेदकालापूर्वीही कोटयवधी वर्षे न्यावा लागतो आणि तो संशोधकांना मान्य करता येत नाही. काही जैन पंडित काही तीर्थंकरांची नावे वेदांतही आढळत असल्याचा दावा करतात; पण वैदिक संशोधकांना ती गोष्ट मान्य झालेली नाही.

एक गोष्ट मात्र खरी, की तीर्थंकर या अभिधानाची कल्पना सर्वस्वी जैनांची असून, ती अभिनव आहे. सर्व तीर्थंकरांनी क्षत्रियकुलात आणि राजवंशात जन्म घेतला आहे. वासुपूज्य, नेमी व पार्श्व हे तिघे सोडले, तर बाकीचे सगळे प्रथम गृहस्थाश्रमी होते व त्यातूनच पुढे ते मोक्षमार्गाला लागले आहेत.

**तीर्थंकरमूर्ती** – चौवीस तीर्थंकरांच्या मूर्ती भारतात सर्वत्र मोठ्या प्रमाणावर सापडतात. श्वेतांबर आणि दिगंबर या पंथभेदानुसार तीर्थंकरांच्या मूर्तींतही फरक पडलेला आहे. श्वेतांबरांच्या मूर्ती सवस्त्र आणि सालंकार असतात; तर दिगंबरांच्या विवस्त्र व निरलंकार असतात. चौवीस तीर्थंकरांच्या चौवीस यक्ष-यक्षिणींशिवाय सोळा विद्यादेवताही असतात. प्रत्येक तीर्थंकराचे चंद्र, नाग, हत्ती, इ. विशिष्ट चिन्ह असते.

या सर्व गोष्टी त्या त्या मूर्तिशिल्पात दाखवलेल्या असतात. त्यावरून मूर्ती कोणत्या तीर्थंकराची आहे, ते ओळखता येते. काही मूर्ती चतुर्मुखही आढळतात. काही तीर्थंकरांच्या छातीवर स्तनाग्रांऐवजी चक्राकृती दाखवलेल्या असतात. काहींच्या हातांच्या तळव्यांवर चतुर्दल पुष्प कोरलेले असते. काही मूर्तींची प्रभावळ व सिंहासन यांवर विशेष कारागिरी केलेली आढळते.

मध्य प्रदेशात वडवानी नगराच्या जवळ चूलगिरी पर्वत-श्रेणीच्या तळवटी एक ८४ फूट उंचीची तीर्थंकराची खड्गासन-प्रतिमा सापडली आहे. ती बावनगजा या नावाने प्रसिद्ध आहे.

काळ्या व पांढऱ्या दगडात तीर्थंकरमूर्ती आढळतात, तशा त्या धातूच्याही आढळतात. राजस्थानातील वसंतगढ या ठिकाणी धातूची एक सवस्त्र मूर्ती मिळाली आहे. ती आदिनाथाची असून, तिच्यावर इ. स. ६८७ चा लेख आहे. इ. स. च्या १४ व्या शतकापासून पितळेच्या जिनमूर्तींचाही प्रचार सुरू झाला. अबूच्या पहाडावरील पित्तलहर मंदिरात आदिनाथाची १०८ मण वजनाची पितळी मूर्ती आहे, ती पद्मासनात असून आठ फूट उंच आहे. [मू. वि.; भा. सं. जै. यो.; जै. इ.; जै. म. पृ.; म. ज्ञा. को.]

**तीर्थंकरबेला व्रत** एक जैन व्रत. या व्रतात २४ बेला व २४ पारणा असतात. या कालात 'ओं ह्रीं वृषभादिचतुर्विंशतितीर्थंकरेभ्यो नमः' या मंत्राचा जप करतात. व्रतावधी – सहा महिने. [जै. व्र. वि. सं.]

**तीर्थग्रहण** एक धार्मिक आचार. देवाचे किंवा गुरूचे पादोदक किंवा अभिषेकजल म्हणजे तीर्थ होय. पूजा व आरती झाल्यावर भोजनाच्या पूर्वी देवाचे तीर्थ घेतात. ते घेताना पुढील मंत्र म्हणतात–

अकालमृत्युहरणं सर्वव्याधिविनाशनम् ।
विष्णुपादोदकं तीर्थं जठरे धारयाम्यहम् ।।

अर्थ – अकाली मृत्यू हरण करणारे व सर्व रोगांचा नाश करणारे असे विष्णूचे पादोदक तीर्थ मी पोटात धारण करतो.

शिवलिंगाचे तीर्थ घेऊ नये व नैवेद्यही सेवन करू नये, असे धर्मशास्त्राचे वचन आहे. [आह्निकसार]

**तीर्थमलै** एक पर्वत. मद्रास-मंगलोर लोहमार्गावर जालारपेटपासून ३४ मैलांवर मोरप्पूर नावाचे एक स्टेशन आहे. तिथून पूर्वेकडे १७ मैलांवर हा पर्वत आहे. त्याच्या शिखरावर रामनाथाचे मंदिर आहे. तिथे जवळच एक मोठा धबधबा आहे. त्याला तीर्थ मानून लोक त्याच्याखाली स्नान करतात व मग रामनाथाच्या दर्शनाला जातात. पर्वताच्या पायथ्याला तीर्थमलै नावाचे गावही आहे. [कल्याण–तीर्थांक]

**तीर्थयात्रा** स्नान, देवदर्शन, श्राद्ध, दान, इ. धार्मिक कृत्यांसाठी पवित्र स्थळी जाणे, याला तीर्थयात्रा म्हणतात. प्रत्येक सश्रद्ध माणसाला आपल्या आयुष्यात एकदा तरी तीर्थयात्रा घडावी, असे वाटते. ती न झाल्यास आपल्या हातून घडलेल्या लहान-मोठ्या पातकांचा निरास होणार नाही आणि आपल्याला स्वर्ग व मोक्ष मिळणार नाहीत, अशीही त्यांची भावना असते. तीर्थावर जाऊन पितरांचे श्राद्ध न केल्यास त्यांचा उद्धार होत नाही, अशी आणखी एक समजूत आहे. ही समजूत दृढ करायला पुराणे आणि तीर्थमाहात्म्ये यांनी हातभार लावून मदत केली आहे. म्हणूनच भारतात म्हातारीकोतारी अशक्त-दुर्बळ माणसेही जिवाच्या करारानें काशी-रामेश्वराची यात्रा करताना दिसतात. आजमितीस वाहनांच्या सोयी मोठ्या प्रमाणात उपलब्ध असल्यामुळे तीर्थयात्रा बरीच सुगम झाली आहे; पण जुन्या काळी वाहनांची सोय पुरेशी नसताही आणि मार्गात अनेक अडचणी व गैरसोयी पदोपदी येत असतानाही त्या काळची माणसे तीर्थयात्रा करीत असत.

आपल्या खंडप्राय देशात हजारो तीर्थे आहेत. त्या सर्वांची यात्रा करणे कोणत्याही समर्थ व सधन माणसाला शक्य नाही. पण बहुतेक माणसे काशी-रामेश्वर, चार धामे, बारा ज्योतिर्लिंगे व सप्त पुऱ्या यांची यात्रा करतात. हिंदू धर्मात अनेक पंथभेद असले, तरी त्या सर्वांनी तीर्थयात्रेला प्राधान्य दिले आहे. बहुतेक तीर्थे सर्व पंथांना समान आदरणीय आहेत. त्यामुळे सर्वांच्या अंतःकरणात भारताच्या मूलभूत एकात्मतेची भावना प्राचीन काळापासून जोपासली गेली आहे. तीर्थक्षेत्रातील धार्मिक वातावरण, विद्वान व साधुपुरुष यांचे दर्शन, तिथला नियमबद्ध जीवनक्रम आणि त्या त्या ठिकाणी घडलेल्या पौराणिक घटनांचे संस्मरण, यामुळे तीर्थयात्रेला एक आध्यात्मिक स्वरूप प्राप्त होते. सामान्य प्रापंचिक जीवनातून काही काळ तरी बाजूला होऊन मनाला पारमार्थिक विचारांचा संस्कार घडविणे आणि जीवनाला आध्यात्मिक उदात्तता प्राप्त करून देणे, ही गोष्ट तीर्थयात्रेमुळे घडून येते. म्हणूनच स्कंद पुराणात म्हटले आहे–

तीर्थानामुत्तमं तीर्थं विशुद्धिर्मनसः पुनः ।
(स्कंद पुराण १.१.३०)

अर्थ,– मनाची विशुद्धी म्हणजेच मनावर सुसंस्कार, हे सर्व तीर्थांमधले उत्तम तीर्थ होय.

महाभारतात तीर्थयात्रा ही यज्ञापेक्षाही श्रेष्ठ मानली आहे. मात्र अशा यात्रेत नैतिक व आध्यात्मिक मूल्ये मनात रुजून ती वाढीस लागली पाहिजेत. यज्ञ हा पुण्यप्रद व स्वर्गप्रद आहे. यज्ञाचे निरनिराळे पुष्कळ प्रकार आहेत; पण हे सर्व यज्ञ मोठ्या खर्चाचे, मोठ्या तयारीचे व अनेक अवधाने सांभाळून करायचे असतात. राजे-रजवाडे किंवा शेठ-सावकार यांनाच ती गोष्ट साध्य असते. सामान्य लोकांना यज्ञसंस्था दुरापास्तच म्हटली पाहिजे. अशा स्थितीत त्यांच्या पुण्यप्राप्तीची व स्वर्गप्राप्तीची सोय काय, हा प्रश्न ऋषींच्या मनात उत्पन्न झाला आणि त्यांनी सर्व प्रकारे विचार करून असे ठरविले, की तीर्थयात्रा हे राव-रंक, सबळ-दुर्बळ, या सर्वांच्या पापनिरासाचे आणि पुण्यप्राप्तीचे श्रेष्ठ साधन होय.

वनपर्वातल्या भीष्म-पुलस्त्यसंवादात पुलस्त्याने हा विचार मांडला असून, शेवटी म्हटले आहे, ते असे–

तीर्थाभिगमनं पुण्यं यज्ञैरपि विशिष्यते ।

(म. भा. वन. ८२.१७)

अर्थ– तीर्थयात्रा ही यज्ञापेक्षाही विशेष पुण्यकारक आहे.

ब्रह्म पुराणातल्या तीर्थकल्पात तीर्थयात्रेचे विधान पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

यात्रेचा दिवस निश्चित झाल्यावर त्याच्या आदल्या दिवशी यात्रेकरूने इंद्रियसंयमपूर्वक उपवास, गणेशादी देवतांचे पूजन, पितरांना वंदन, पार्वण श्राद्ध, सत्पात्र ब्राह्मणांचा सत्कार व यात्रासंकल्प या गोष्टी कराव्या. यात्रेहून परत आल्यावरही तसेच करावे. यात्रेला निघण्यापूर्वी मुंडन आवश्यक असते, असे पद्म व स्कंद या पुराणांत सांगितले आहे. मुंडन, उपवास व स्नान हा सर्व तीर्थांतला मुख्य विधी आहे, असे स्कंद पुराण सांगते. तीर्थयात्रा वाहनात बसून न करता पायी केल्याने श्रेष्ठ पुण्य लागते, असे तीर्थप्रकाश या ग्रंथात म्हटले आहे. दुसऱ्याला तीर्थयात्रेच्या कामी साहाय्य केले, तर यात्रेचे चतुर्थांश पुण्य लागते. दुसऱ्याकरिता तीर्थयात्रा करणाऱ्याला षोडशांश (१६ वा हिस्सा) फल लाभते व प्रसंगोपात्त ज्याला तीर्थयात्रा घडते, त्याला अर्धे पुण्य लाभते. स्कंद पुराणात सांगितले आहे, की–

यश्चान्यं कारयेच्छक्त्या तीर्थयात्रां तथेश्वरः ।
स्वकीयद्रव्ययानाभ्यां तस्य पुण्यं चतुर्गुणम् ॥

अर्थ– एखादा धनिक आपल्याजवळचे द्रव्य व वाहन देऊन दुसऱ्याला तीर्थयात्रा घडवतो, तेव्हा त्याला स्वतः तीर्थयात्रा केल्याच्या पुण्याहून चौपट फल मिळते.

या व अशाच पुराणांतल्या वचनांवर श्रद्धा ठेवून भारतातल्या राजांनी व धनिकांनी पुण्यसंचयाच्या हेतूने निरनिराळ्या तीर्थक्षेत्रांत पुष्कळ धन खर्च करून घाट, धर्मशाळा, अन्नछत्रे, इ. साधनांनी यात्रेकरूंची सुखसोय करून ठेवली आहे.

तीर्थक्षेत्रात गेल्यानंतर तिथे कोणत्या गोष्टी कराव्या, याविषयी सामान्य विधान स्कंद पुराणाच्या काशीखंडात सांगितले आहे, ते असे–

न परीक्ष्यो द्विजस्तीर्थेष्वन्नार्थी भोज्य एव हि ।
सक्तुभिः पिण्डदानं च चरुणा पायसेन च ॥
कर्तव्यमृषिभिर्दृष्टं पिण्याकेन गुडेन च ।
श्राद्धं तत्र तु कर्तव्यमर्घ्यावाहनवर्जितम् ॥
अकालेप्यथवा काले तीर्थश्राद्धं तु तर्पणम् ।
अविलम्बेन कर्तव्यं नैव विघ्नं समाचरेत् ॥
यदह्नि तीर्थप्राप्तिः स्यात्ततोऽह्नः पूर्ववासरे ।
उपवासश्च कर्तव्यः प्राप्तेऽह्नि श्राद्धदो भवेत् ॥
तीर्थोपवासः कर्तव्यः शिरसो मुण्डनं तथा ।
शिरोगतानि पापानि यान्ति मुण्डनतो यतः ॥
तीर्थं प्राप्य प्रसङ्गेन स्नानं तीर्थे समाचरेत् ।
स्नानजं फलमाप्नोति तीर्थयात्राश्रितं न तु ॥

अर्थ–तीर्थक्षेत्रातल्या ब्राह्मणाची परीक्षा करू नये. जो अन्नार्थी तो भोज्य समजावा. ऋषींनी सांगितल्याप्रमाणे सातू, चरू, पायस, पेंड, गूळ यांनी पिंडदान करावे. अर्घ्य व आवाहन हे उपचार वगळून श्राद्ध करावे. काल, अकाल न पाहता तीर्थाच्या ठिकाणी श्राद्ध करावे. लगेच तर्पण करावे. यात विघ्न आणू नये. तीर्थात पोचण्याच्या आदल्या दिवशी उपवास करावा. तीर्थक्षेत्रात गेल्यादिवशीच श्राद्ध करावे. त्या दिवशीही उपवास करावा. मुंडन करावे. कारण मुंडनामुळे मस्तकाच्या ठिकाणची सर्व पापे नष्ट होतात. प्रसंगाने तीर्थात जाणे झाले, तर तिथे स्नान करावे. त्यामुळे तीर्थयात्रेचे फल मिळाले नाही, तरी स्नानाचे फल मिळते.

तीर्थयात्रा ही आपल्या मातृभूमीविषयीच्या उत्कट प्रेमाची अभिव्यक्ती असते. तीर्थयात्रेच्या मिषाने धार्मिक भावनेला बल मिळते आणि भौगोलिक जाणीवही वाढते. तीर्थयात्रेपासून मिळणाऱ्या पुण्याच्या मागे अन्य कितीतरी लाभ दडलेले असतात. तीर्थयात्रेनिमित्त जे भ्रमण होते, त्यात निरनिराळ्या प्रदेशांचे निसर्गसौंदर्य, जागोजागचे शिल्प आणि स्थापत्य, तसेच देवतांची निरनिराळ्या प्रकारची मंदिरे, इ. गोष्टींचा परिचय घडतो. चारी धामांच्या यात्रा करणाऱ्याला भारतप्रदक्षिणाही सहजपणे घडून जाते.

महाभारताच्या वनपर्वात तीर्थयात्रा नामक एक उपपर्व आहे. या पर्वात त्या काली मानल्या जाणाऱ्या तीर्थांचे वर्णन तपशीलवार दिलेले आहे. या उपपर्वाचा उपक्रम झाला आहे, तो असा–

युधिष्ठिर आपल्या वनवासासाठी काम्यक वनात मुक्काम

करून राहिला होता. अर्जुन दिव्य अस्त्रांच्या प्राप्तीस्तव तप करण्यासाठी हिमालयात निघून गेला होता. त्याच्या विरहाने युधिष्ठिरादी बंधू कष्टी झाले होते. अशा प्रसंगी नारद युधिष्ठिराकडे आला आणि त्याच्या मनाची ग्लानी दूर करण्यासाठी त्याने भारतवर्षातील तीर्थांचे वर्णन केले. त्याच्या पाठोपाठ पांडवांचा पुरोहित असलेला धौम्यमुनी तिथे आला आणि त्यानेही तीर्थपरिक्रमेचे वर्णन केले.

या वर्णनातली धौम्यवर्णित तीर्थयात्रा संक्षिप्त आहे. या तीर्थयात्रेत पूर्वेस गया, दक्षिणेस कन्याकुमारी, पश्चिमेस पुष्कर आणि द्वारका आणि उत्तरेस गंगा-यमुना-संगम या तीर्थांचा उल्लेख आहे.

महाभारतात पुलस्त्य-भीष्म संवादाच्या रूपाने आणखी एक तीर्थयात्रा वर्णिली आहे. या तीर्थयात्रेत भारतीय भूगोलाचे क्षेत्र अधिक विस्तृत झाले आहे. धौम्यतीर्थयात्रेत नसलेली कितीतरी नवी नावे पुलस्त्यतीर्थयात्रेत आलेली आहेत. पुलस्त्यवर्णित तीर्थयात्रेचे क्षेत्र पूर्वेस आसामपर्यंत आणि पश्चिमेस सिंधुसागरापर्यंत वाढले आहे.

तीर्थयात्रा कोट्यवधी लोक करतात; पण तिचे फल कोणाला मिळते याविषयी पुलस्त्य सांगतो –

**यस्य हस्तौ च पादौ च मनश्चैव सुसंयतम् ।**
**विद्या तपश्च कीर्तिश्च स तीर्थफलमश्नुते ॥**
**प्रतिग्रहादपावृत्तः संतुष्टो येन केनचित् ।**
**अहंकारनिवृत्तश्च स तीर्थफलमश्नुते ॥**
**अकल्कको निरारम्भो लघ्वाहारो जितेन्द्रियः ।**
**विमुक्तः सर्वपापेभ्यः स तीर्थफलमश्नुते ॥**
**अक्रोधनश्च राजेन्द्र सत्यशीलो दृढव्रतः ।**
**आत्मोपमश्च भूतेषु स तीर्थफलमश्नुते ॥**
(म. भा. वन. ८२.९–१२)

अर्थ– ज्याचे हात, पाय व मन सुसंयत (स्वाधीन) आहेत, ज्याच्या ठिकाणी विद्या, तप व कीर्ती या गोष्टी आहेत, त्याला तीर्थाचे फल मिळते. अपरिग्रही, आत्मसंतुष्ट, आणि अहंकारहीन अशा पुरुषाला तीर्थाचे फल प्राप्त होते. जो निर्दोष, निवृत्त, स्वल्पाहारी, जितेंद्रिय व सर्वपापविमुक्त असा असेल, त्याला तीर्थाचे फल प्राप्त होते. जो क्रोधरहित, सत्यशील, दृढव्रत आणि सर्व भूतांना आत्मौपम्य बुद्धीने पाहणारा असेल, त्याला तीर्थाचे फल प्राप्त होते.

तीर्थयात्रेच्या प्रवासात कार्पटी वेष धारण करावा, असे सांगितले आहे. ताम्रमुद्रा, ताम्रकंकण आणि काषाय वस्त्र धारण करणे म्हणजे कार्पटी वेष धारण करणे होय (तीर्थप्रकाश). [ हि. ध.; श. क.; भा. मौ. ए.; हिं. वि. को. ]

## तीर्थराम

एक संतकवी. हा मारवाडांतल्या गूढा गावाचा रहिवासी व जातीने ब्राह्मण होता. क्षेत्रोपाध्यायाच्या वृत्तीवर याने अमाप पैसा मिळविला; पण मनाने कृपण असल्यामुळे त्या धनाचा त्याने कधीच उपभोग घेतला नाही. पुढे रामराय नामक एका साधूच्या संगतीत आल्यानंतर त्याच्या वृत्तीत परिवर्तन झाले व तो सर्वसंगपरित्याग करून वृन्दावनात जाऊन राहिला. त्यानंतर त्याने चैतन्यमताचा स्वीकार केला. द्रव्यदोष, त्यागतरणी, श्रीहरिलीला, रसिकाचार्यचर्चा, व्रजवास हे त्याचे ग्रंथ आहेत. त्याच्या काव्याचा एक नमुना असा –

**द्रव्यसे भेंट किये दुख आवत, विद्या की भारीसी हानी भई ॥**
**भक्तन को संग छुटि गयौ मन लुब्ध भयौ यह कहानी भई ॥**
**साधू की साधूता भाग गई जब द्रव्य की चित्त चहानी भई ।**
**तीरथ चारु आचार भयौ जब श्री गुरुदेव की बानी भई ॥**

अर्थ– द्रव्याची संगत केल्यामुळे दुःख प्राप्त झाले. विद्येची मोठी हानी झाली. भक्तांची संगत सुटली. मन केवळ द्रव्यातच गढून गेले. ज्याचे चित्त द्रव्यावर आसक्त झाले आहे, अशा साधूंची साधुताही निघून जाते. परंतु तीर्थरामाला जेव्हा गुरूपदेशाचा लाभ झाला, तेव्हा त्याचे आचरण सुधारले.

तीर्थरामाच्या काव्याची भाषा प्रसन्न आहे. [ चै. म. व्र. सा. ]

## तीव्रव्रत

एक व्रत. स्वतःचे पाय तोडून काशीवास करावा, असे या व्रताचे स्वरूप आहे. पाय तोडून घेण्याचा हेतू हा, की आमरण काशीतच राहता यावे; अन्यत्र जाण्याची इच्छा झाली, तरी जाता येऊ नये. 'काश्यां तु मरणान्मुक्तिः' ( काशीत मरण आल्याने मोक्ष मिळतो ) या व अशा अनेक वचनांवरून प्रस्तुत व्रताची कल्पना निघाली आहे. [ हि. ध. ]

## तीळ

एक गळिताचे धान्य. याला धर्मकृत्यांत बरेच महत्त्व आहे. त्याचे वर्णन धर्मग्रंथांत आढळते, ते असे–

(१) शंकराला तीळ प्रिय आहेत. शिवलिंगाला तीळ वाहिल्याने वायुलोक प्राप्त होतो, असे नव्य उपनिषदांनी म्हटले आहे.

(२) तीळ हे विष्णूच्या घामापासून उत्पन्न झाले, असे विष्णुधर्मोत्तर पुराणात म्हटले आहे (१.१३९.१२).

(३) मनुष्याने आपल्या वाढदिवसाच्या दिवशी तिळांचा उपयोग कसा करावा, ते तिथितत्त्व या ग्रंथात पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**तिलोद्वर्ती तिलस्नायी तिलहोमी तिलप्रदः ।**
**तिलभुक् तिलवापी च षट्तिली नावसीदति ॥**

अर्थ – तिळांचा कल्क अंगाला लावणे, तिलमिश्रित जलाने स्नान करणे, तिलहोम, तिलदान, तिलसेवन व तिळांची पेरणी करणे अशा सहा प्रकारांनी तिळांचा उपयोग करणाऱ्याला दुःख बाधत नाही.

(४) पिशाचांनाही तीळ आवडतात, असे ब्रह्मांड पुराण सांगते ( ३.७.३८९ ). तिळांचा व्यापार करणारा नरकात जातो, असेही त्यात म्हटले आहे ( ब्रह्मांड पु. ४.२.१६४ ).

(५) पितरांना तीळ प्रिय आहेत. श्राद्धात पितरांच्यासाठी तीळ वापरतात. तिळांचा उपयोग केल्याने असुर श्राद्धविघात करीत नाहीत. श्राद्धाच्या दिवशी घरभर तीळ पसरावे, निमंत्रित ब्राह्मणांना तिलमिश्रित जल द्यावे व तिळांचे दान द्यावे, असे जैमिनीय गृह्यसूत्र (२.१), बौधा. धर्मसूत्र (२.८.८) व बौधा. गृह्यसूत्र या ग्रंथांत सांगितले आहे. संक्रांतीच्या दिवशी गुडमिश्रित पांढरे तीळ वाटून तो कल्क अंगाला लावून स्नान करावे, असे सांगितले आहे.

(६) और्ध्वदेहिकात प्रेताला तिलमिश्र उदकाची तिलांजली देतात. तिचे फल सांगितले आहे, ते असे –

**प्रेतमुद्दिश्य यो दद्यात् हेमगर्भास्तिलान्नृप ।**
**यावन्तस्ते तिलाः स्वर्गे तावत्कालं स मोदते ॥**

( शुद्धितत्त्व )

अर्थ– प्रेताला उद्देशून जो कोणी हेमगर्भ तीळ देईल, त्या तिळांच्या संख्येइतकी वर्षे तो मृत मनुष्य स्वर्गात राहील.

तिळांची उत्पत्ती प्रथम भारतात झाली, असे सांगतात. अतिप्राचीन काळापासून भारतात तिळांची शेती होत असे. अथर्ववेद (२.८.३; १८.३.६९), तैत्तिरीय संहिता (७.२.१०.२), मैत्रायणी संहिता (४.३.२), वाजसनेयी संहिता (१८.१२), शतपथ ब्राह्मण (४.१.१.३), इ. वैदिक वाङ्मयात तिळांचा उल्लेख आलेला आहे. तिळांपासून तेल काढीत व त्याच्या रोपट्यांचा सर्पण म्हणून उपयोग करीत, असेही कळते.

वैदिक काळात तीळ शिजवून तिलौदन म्हणून खाण्याची पद्धत होती. तिळांचे काळे व पांढरे असे दोन भेद असून, काळे तीळ श्राद्धप्रसंगी वापरावे, असे म्हटले आहे.

तिळांचे तेल काढून उरलेल्या ढेपीला तिळकूट असे म्हणत. आरंभी तिळांपासून निघणाऱ्या स्निग्ध पदार्थालाच तैल अशी संज्ञा होती. नंतरच्या काळात मात्र मोहरी, हिंगणबेट इ. च्या स्निग्ध पदार्थांनाही तैल असे म्हणू लागले. तीळ हे पौष्टिक द्रव्य असल्यामुळे महाभारतकाळी तीळ खाण्याचा खूप प्रचार होता. महाभारताच्या अनुशासन पर्वातील कित्येक अध्यायांत तिल व तिलदान यांची महती सांगितलेली आहे. [ श. क.; हि. ध.; पु. इं.; वे. इं.; प. का. भा.; म. ज्ञा. को.; म. भा. उ. ]

## तीक्ष्णकांता

एक देवी. हिला उग्रतारा असेही म्हणतात. एके काळी आसामात हिची उपासना लोकप्रिय होती. गौहाटी येथे हिचे मंदिर असून, तिथे ती उग्रतारा या नावानेच ओळखली जाते. नवरात्रोत्सवात तिला रेडे, बकरी, वगैरेंचे बळी देतात. ही एके काळी सौम्य देवता होती; परंतु वसिष्ठाच्या शापाने ती उग्र बनली, असे समजतात. तिची पूजा डाव्या हाताने करण्याची प्रथा आहे. कालिका पुराणात तिचे वर्णन आहे, ते असे–

ही देवी चतुर्भुज आणि कृष्ण वर्णाची असून, तिच्या गळ्यात नरमुंडांची माला आहे. तिच्या उजव्या दोन हातांत खड्ग आणि चामर असून, डाव्या दोन हातांत कात्री आणि खापर आहे. तिच्या जटा लांब आहेत. तिच्या वक्षःस्थलावर नागांचा हार रुळत आहे. तिचे डोळे तांबारलेले आहेत. तिने कृष्णवस्त्र आणि व्याघ्राजिन परिधान केले आहे. तिने आपला डावा पाय प्रेताच्या छातीवर ठेवलेला असून, उजवा सिंहाच्या पाठीवर ठेवलेला आहे.

तीक्ष्णकांता हे तारेप्रमाणेच मंगलचंडीचेही एक रूप समजले जाते. पाहा– उग्रतारा, कामाख्या. [ गो. को. व्हॉ. ]

## तुंगनाथ

हिमालयातील एक शिवक्षेत्र. हे स्थान बारा हजार फूट उंचावर आहे. बदरीकेदाराच्या मार्गावरील उखीमठापासून हे स्थान सुमारे २१ मैल अंतरावर आहे. फार उंचावर असल्यामुळे तिथे जाणाऱ्या यात्रिकांची संख्या अत्यल्प असते.

तुंगनाथ हे स्थान पंचकेदारांत तिसरे असून, ते शिवाच्या बाहूंच्या ठिकाणी कल्पिलेले आहे. उंच चढण चढून जाणे ज्यांना शक्य नसते, अशा लोकांच्या सोयीसाठी, चढण सुरू होते त्याआधी एका चुळक्यावर तुंगनाथाची भोगमूर्ती ठेवलेली आहे. शिखरावरचे तुंगनाथाचे मंदिर मोठे आहे. मंदिराचे आवार प्रशस्त असून, शिखर पागोडा पद्धतीचे आहे. मंदिरातील शिवलिंग आकाराने लहान आहे. मंदिराजवळ पंड्यांशिवाय अन्य कोणाची वस्ती नाही. तुंगनाथाच्या शिखरावरून हिमालयाच्या हिमाच्छादित शिखरांचे हृदयंगम दर्शन घडते.

या स्थानी भृगू ऋषीने तप केले होते, असे सांगतात. त्यामुळे त्याला भृगुतुंग असेही नाव पडले आहे. हे स्थान श्राद्धादी विधींसाठी विशेष पवित्र मानले जाते. महाभारतात आणि ब्रह्मांड पुराणात याचे उल्लेख आहेत. [ हि. द.; हिं. वि. को. ]

## तुंगभद्रा

द. भारतातील एक मोठी नदी. म्हैसूर प्रदेशातील कडूर जिल्ह्याच्या सीमेवर पश्चिम घाटात गंगा-

मूल या ठिकाणी तुंगा आणि भद्रा या दोन नद्या उगम पावतात. पुढे कूडलीजवळ त्यांचा संगम होऊन त्या संयुक्त प्रवाहाला तुंगभद्रा हे नाव प्राप्त होते. तुंगा आणि भद्रा यांचा उगम ज्या पर्वतातून झाला आहे, त्याला पुराणात वराह पर्वत म्हटले आहे. बुडत्या पृथ्वीला आपल्या सुळक्यांनी पाण्यातून बाहेर काढल्यानंतर भगवान वराहाने इथे विश्रांती घेतली; म्हणून याला वराह पर्वत असे नाव पडले असावे. आदिवराह इथे विसावला असता त्याच्या दोन्ही सुळक्यांतून पाणी ठिबकू लागले. डाव्या सुळक्यातून ठिबकणाऱ्या पाण्याची तुंगा बनली आणि उजव्या सुळक्यातून ठिबकणाऱ्या पाण्याची भद्रा बनली, अशी दुसरी कथा आहे. तुंगेच्या काठी तीर्थहळ्ळी आणि भद्रेच्या काठी बेंकिपूर ही प्रमुख स्थाने आहेत.

कूडलीच्या पुढे चारशे मैल वाहत जाऊन तुंगभद्रा कुर्नूलच्या पलीकडे नंदीकोटकुरच्या उत्तरेस कृष्णेला मिळते. कूडली ते कुर्नूल या दरम्यान तुंगभद्रेला कुमुद्वती, वरदा, हरिद्रा आणि वेदावती या नद्या येऊन मिळतात. हरिहरजवळ तुंगभद्रेवर दोन पूल आहेत. ही नदी जिथे कृष्णेला मिळते, त्या ठिकाणच्या तुंगभद्रेच्या मोठ्या धरणाचे पाणी कुर्नूल-कडाप्पा कालव्याला मिळते.

उगमापासून कृष्णेशी संगम होईपर्यंत हिच्या काठी शृंगेरी, तीर्थहळ्ळी, कूडली, हरिहर, हंपी, किष्किंधा ( आनेगुंदी ), इ. पवित्र स्थाने आहेत. पुराणांनी हिचा महिमा मुक्त कंठाने गायिला आहे. 'गंगास्नान .व तुंगापान' अशी जुनी म्हणच आहे. हिचे पाणी रुचकर आहे. ही नदी हरिहरात्मक समजली जाते. हिच्या काठच्या किष्किंधानगरीत रामचंद्राला वानरांचे सहकार्य लाभले. बुद्धोत्तर काळात अशोकाने आपल्या धर्मशासनांचे चार शिलालेखसंच हिच्या परिसरात कोरून ठेवले. आद्य शंकराचार्यांनी आपल्या कार्याचे शृंगेरी हे प्रधानपीठ हिच्या तीरावरच स्थापले आणि विद्यारण्यांच्या प्रोत्साहनाने उभे राहिलेले विजयनगरचे वैभवशाली साम्राज्यही हिच्या काठीच नांदले. हंपीमधील भग्नावशेष आजही त्या साम्राज्याचे स्मरण करून देतात.

तुंगभद्रा ही भारतीय संस्कृतीची एक महान प्रतिनिधी आहे. आजही वेदपाठी लोकांत तुंगभद्रेच्या काठी वसणाऱ्या ब्राह्मणांचे वेदोच्चार आदर्श आणि प्रमाणभूत मानले जातात. [ जीवनलीला; म. ज्ञा. को.; स. भा. प्र. व.; हि. जॉ. ए. इं.]

## तुंगीगिरी

एक जैन क्षेत्र. हे क्षेत्र नाशिकपासून सुमारे ८० मैलांवर आहे. या क्षेत्राच्या नजिकच दोन पर्वत आहेत. त्यांतील एकाचे नाव मांगी व दुसऱ्याचे तुंगी असे आहे. मांगी पर्वतापेक्षा तुंगी पर्वताची उंची अधिक असल्यामुळे त्या पर्वताला तुंगी हे नाव मिळाले असावे. तुंगीच्या मागचा म्हणून वाच्यार्थाने दुसरा पर्वत मांगी ठरला असावा.

मांगी पर्वताच्या गुंफेत साडेतीनशे जैन प्रतिमा आहेत आणि तुंगीच्या गुंफेत तीस आहेत. या दोन्ही स्थानांचा एक विशेष असा, की इथल्या प्रत्येक प्रतिमेमागे एकेक कमंडलु असून, नजिकच्या शिलेवर त्या व्यक्तीचे नाव खोदलेले आहे.

या दोन पर्वतांमध्ये एका जागी बलरामाने श्रीकृष्णाला अग्निसंस्कार केला, अशी माहिती जैनपरंपरेत आढळते; पण निर्वाणकांडातल्या माहितीप्रमाणे ते बलरामाचे निर्वाणस्थान समजले गेले आहे. [ जै. सि. भा.– मार्च १९३९; जै. सा. इ.]

## तुंचन परंपू

केरळमधील एक क्षेत्र. तुंचत्तु रामानुज एडुताच्छन याचे जन्मस्थान. या कवीला संक्षेपाने तुंचन म्हणतात आणि तृकंडियूर या गावात असलेल्या त्याच्या जन्मस्थानाला तुंचन परंपू असे म्हणतात. तुंचन हा केरळमधील सर्वश्रेष्ठ भक्तकवी आणि महान आचार्य असल्यामुळे केरळमधील सर्व धर्मांचे लोक त्याला केरळी संस्कृतीचा पिता मानतात. त्यामुळे त्याचे जन्मस्थान हे एक क्षेत्र बनले आहे.

केरळी लोकजीवनातील तुंचन परंपूचे हे माहात्म्य लक्षात घेऊन सुमारे साठ वर्षांपूर्वी तिथल्या काही साहित्यिकांनी



स्मारक मंडप – तुंचन परंपू

तुंचन-स्मारक उभारण्यासाठी एक समिती स्थापन केली होती. तिने प्रस्तुत संकल्पाच्या परिपूर्तीसाठी दीर्घकाळ

प्रयत्न केले; पण तिला फारसे यश आले नाही. स्वातंत्र्योत्तर काळात केरळ सरकारलाच त्या बाबतीत आवाहन करण्यात आले आणि सरकार, साहित्यिक आणि नागरिक यांच्या सहकार्याने इ. स. १९६४ च्या जानेवारीत तिथे तुंचनचे स्मारक उभे झाले. त्यासाठी एक सभागृह, बारा स्तंभांवर उभा असलेला एक स्मारकमंडप आणि सरस्वती, गणपती व कार्तिकेय या तुंचनपूजित देवतांचे एक मंदिर, अशा तीन वास्तू निर्माण केलेल्या आहेत. सभागृहात रंगमंच आहे आणि तुंचनचे ग्रंथ आणि मलयाळम भाषा व साहित्य यांचा अभ्यास करण्यासाठी एक समृद्ध ग्रंथालयही आहे.

तुंचन परंपूमध्ये आजही तुंचनची स्मृती जिवंत ठेवणारे दोन वृक्ष, एक विहीर, एक पुष्करिणी आणि तुंचनने ज्यांच्या साहाय्याने ताडपत्रांवर आपल्या अमर कृती कोरल्या, अशा दोन लोखंडी लेखण्या पाहायला मिळतात. पाहा – एडुताच्छन् [श्री. रमेश – युगप्रभात, १६ डिसेंबर १९६३; युगप्रभात, १६ एप्रिल १९६५; श्री. द्रविडदास – युगप्रभात, १६ जानेवारी १९६४; युगप्रभात, १ फेब्रुवारी १९६४ ]

**तुंबरू** (१) एक गंधर्व. तुंबरूचे तोंड घोड्याचे होते, अशी समजूत आहे. हा कश्यप आणि प्राधा यांचा पुत्र होय. हा मधू आणि माधव (चैत्र आणि वैशाख) या दोन महिन्यांचा अधिपती समजला जातो. चैत्र महिन्यात हा सूर्याबरोबर त्याच्या रथात असतो असे समजतात. हा इंद्र व कुबेर यांच्या राजसभेतला प्रमुख गायक होता. विशिष्ट प्रसंगी त्याचा मृत्युलोकातही संचार होत असे. याच्या पत्नीचे नाव रंभा असून, याला मनोवती व सुकेशा अशा दोन कन्या होत्या. रंभेवर अत्यंत आसक्त राहिल्यामुळे कुबेराने याला शाप देऊन विराध नामक राक्षस बनवले. पुढे रामाच्या हातून मारला गेल्यावर याला आपले मूळ रूप प्राप्त झाले.

भारद्वाज ऋषीच्या सांगण्यावरून याने भरतापुढे गायन केले होते. हिरण्यकशिपूच्या सामर्थ्याचाही याने आपल्या गायनाने गौरव केला होता. हा ब्रह्मसभेत नारदाबरोबर कृष्णाचे गुणगान करीत असे. प्राचीन मराठी वाङ्मयातील विठ्ठलवर्णनातही 'नारद तुंबरू हे । सामगायन करिती' असा उल्लेख आढळतो. तुंबरू हा वीणावादक म्हणूनही प्रसिद्ध होता. त्याच्या वीणेचे नाव कलावती असे होते. तंबोरा हे सध्याचे वाद्य याच्याच नावाने प्रसिद्ध झालेले आहे, असे म्हणतात. [ प्रा. च. को.; वा. रा. को.; पु. इं. ]

(२) एक रुद्र. हा चतुर्मुख, लाल रंगाचा, चपट्या नाकाचा आणि चतुर्भुज असून, याच्या उजव्या वरच्या हातात अंकुश, उजव्या खालच्या हातात खट्वांग, डाव्या वरच्या हातात पाश आणि डाव्या खालच्या हातात कपाल, अशी आयुधे असतात. शिवाय हा अष्ट शक्तींनी युक्त असतो. [ श्रीविद्यार्णव तंत्र ]



गंधर्व तुंबरूचे काल्पनिक चित्र

## तुंबरू शाखा

कृष्ण यजुर्वेदाची एक शाखा. या शाखेचे केवळ व्याकरणग्रंथच उपलब्ध आहेत. त्या ग्रंथांवरून पाहता ही कलापी शाखेची उपशाखा असावी असे दिसते. ही तुंबरू ऋषीने रचली आहे. [ पुराणम– जुलै १९६५ ]

**तुका पांडुरंगदास** (इ. स. चे १८ वे शतक) एक मराठी संतकवी. हा मूळचा सातारा जिल्ह्यातील अडगूण ( ता. खटाव ) गावचा अथर्ववेदी ब्राह्मण होय. याच्या पित्याचे नाव भास्कर आणि आडनाव पुरंदरे होते. तो बालवयापासूनच देवीची आणि दत्ताची उपासना करीत असे. त्याच्या या भक्तिवेडामुळे वडिलांनी त्याला घरातून घालवून दिले. त्यानंतर तो खडर्याजवळ बेलेश्वर या ठिकाणी जाऊन राहिला. तिथे एकवीस दिवसांच्या अनुष्ठानानंतर त्याला दत्तदर्शन घडले. त्याचा गुरू पांडुरंग हा खडर्याजवळच्या मोहरी या गावच्या क्षीरसागर घराण्यांतील होता.

तुका पांडुरंगदास हा वयाच्या अवघ्या बत्तिसाव्या वर्षी इ. स. १७५३ मध्ये बेलेश्वर येथे समाधिस्थ झाला. त्या ठिकाणी त्याच्या समाधीशेजारी त्याच्या उपासनेतील देवी आणि एकमुखी षड्भुज दत्त आहे. खडर्याचा सरदार सुलतानजी

निंबाळकर हा याचा शिष्य होता. केवळ नामसादृश्यामुळे देहूकर तुकारामाच्या नावावर पडलेला गीतेचा अभंगात्मक अनुवाद यानेच केलेला आहे. याने त्या ग्रंथात ‘श्रीगुरु पांडुरंगा पायीं । गुरुदास ठेवी डोई ॥’ असा आपल्या गुरूचा स्पष्ट उल्लेख अनेकवार केलेला आहे. त्याच्या गीतानुवादातील एक अभंग असा–

कामक्रोध भयाविण । तोच साधु पूर्ण जाण ॥
ध्याननिष्ठ मदाश्रित । त्यासि आ॰॰हो म्हणों संत ॥
बहुत ज्ञानतपें शुद्ध । जाणावा तो महासिद्ध ॥
जे पावले स्वस्वरूपीं । तुकया शरण त्या चिद्रूपीं ॥

तुका पांडुरंगदासाने गीतेच्या सातशे श्लोकांचा अनुवाद सातशेच अभंगांत केला आहे. मुळातील आशय सुलभतेने स्पष्ट करण्यात ग्रंथकाराने आपले कौशल्य उत्तम प्रकारे प्रकट केले आहे. [रा. चिं. ढेरे– भा. इ. सं. मं. त्रैमासिक ४३·१–४; मा. पं. बहिरट– महाराष्ट्र साहित्यपत्रिका, अंक क्र. १५२]

## तुका ब्रह्मानंद

(इ.स. चे सतरावे शतक) एक मराठी संत–कवी. हा साताऱ्याचा रहिवासी होता. याच्या वडिलांचे नाव नागनाथ आणि आडनाव कर्मार असे होते. हा जातीने विश्वब्राह्मण (सुवर्णकार) होता. याने उपनयनानंतर आपल्या पित्याजवळच वेदोपनिषदे, व्याकरण, अलंकारशास्त्र, आणि देवशिल्प या विषयांचा अभ्यास केला. याच्या बापाकडे पोतदारीचे सरकारी काम होते. बापाच्या मृत्यूनंतर ते काम याच्याकडे आले. सरकारी चाकरी बजावीत असता हा आपली धार्मिक नित्यकर्मेही कटाक्षाने आचरीत असे. पण पुढे आपल्या धर्माचरणाला नोकरीचा अडथळा येत आहे, असे दिसताच याने ती नोकरी सोडून देऊन ब्रह्मानंदस्वामींकडून संन्यास घेतला. तुका ब्रह्मानंद हे त्याचे चतुर्थाश्रमातले नाव होय.

हा कालिकादेवीचा उपासक होता. शिवाजीमहाराजांशी याचा घनिष्ठ संबंध असावा, असे याच्या चरित्रातील अनेक चमत्कारकथांवरून दिसते. त्यांच्यासाठी याने तयार केलेली देवीची सुवर्णमूर्ती अद्यापही साताऱ्यात आहे, असे म्हणतात. याने साताऱ्याजवळ माहुली येथे कृष्णावेण्या संगमावर समाधी घतली. त्याची समाधी, तिथला घाट व मंदिर या वास्तू स्वतः शिवाजी महाराजांनीच बांधल्या आहेत, असे समजतात.

तुका ब्रह्मानंदाने शांकरभाष्यटीका, वेदान्तरहस्य, शतकत्रयावरील समश्लोकी टीका, सप्तशतीटीका, प्रणवाष्टक, नाटकरामायण, गीतगोविंदावरील समश्लोकी टीका, विश्वकर्ममाहात्म्य, इ. अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्याच्या शतकत्रयावरच्या टीकेतील एक श्लोक असा आहे–

भोगीं रोगभयें, सुखीं असुखता, वित्तीं नृपाचीं भयें ।
मानीं दैन्यभयें, बळीं रिपुभयें, रूपीं जरेचीं भयें ॥
शास्त्रीं वादिभयें, गुणीं खळभयें, देहीं यमाचीं भयें ।
वस्तू सर्वभयान्विता, नर धरो वैराग्य भी ना भयें ॥

हा योगविद्येतही प्रवीण होता, असे म्हणतात. [म. क. …

## तुकाराम

(१६०८–१६४९ इ. स.) एक महान मराठी … आणि कवी. पुण्याजवळ देहू येथे मोरे … आंबिले आडनावाच्या घराण्यात याचा जन्म झाला. हे … मराठा–कुणबी असून, त्याचा पिढीजात व्यवसाय वा… होता. तसेच या घराण्याकडे देहू गावाची महाजनकीही … याच्या पित्याचे नाव बोल्होबा आणि आईचे नाव कनका… होते. या घराण्याचा मूळपुरुष विश्वंभर (इ. स. चे … शतक) हा विठ्ठलाचा उपासक असून, त्याने आपल्या … जवळच विठ्ठलाचे मंदिर बांधले होते. त्यामुळे विश्वंभरा… बोल्होबापर्यंत विठ्ठलभक्तीचा वारसा त्या घरात अ… चालत आला होता.

अशा भक्तियुक्त वातावरणात वाढलेल्या तुकारा… मनावर बाळपणापासूनच शुभ संस्कार घडले. ‘विठ्ठल … दैवत’ किंवा ‘पंढरीची वारी आहे माझे घरीं’ अशा … तून या परंपरागत संस्कारांचा तुकारामाने अभिमानाने … केला आहे. ‘शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं’ हे …



तुकाराम

वचन त्याच्या बाबतीत पूर्णपणे लागू पडते. महाज… वृत्तीमुळे लिहिणे व वाचणे तो लहानपणीच शिकला … संस्कृताचाही त्याने परिचय करून घेतला होता. वे… त्याला अधिकार नव्हता; परंतु गीता-भागवतादी दे…

त्याने सखोल चिंतन केले होते. कथा-कीर्तनांतून आणि भजनांतून सतत कानी येणाऱ्या संतवाणीने तो बहुश्रुत बनला होता. सदाचाराची बैठक ढळू न देता व्यवहार कसा करावा, हे त्याला घरीच शिकायला मिळाले होते.

तुकाराम १३ वर्षांचा होताच त्याच्या वृद्ध पित्याने सावकारी, व्यापार व महाजनकी यांचा सर्व व्यवहार क्रमाक्रमाने तुकारामावर सोपविला. तुकारामाचा थोरला भाऊ सावजी हा प्रथमपासूनच वृत्तीने विरक्त होता आणि धाकटा भाऊ कान्होबा त्या वेळी लहान होता. त्यामुळे वयाच्या तेरा ते सतरा वर्षांपर्यंत पित्याच्या मार्गदर्शनाखाली तुकारामाने घरचे सर्व व्यवहार जबाबदारीने पार पाडले.

या पाच वर्षांच्या काळात तुकारामाची दोन लग्ने झाली. पहिली पत्नी रखमा ही त्याच्या मामाच्याच घरची होती; पण ती दमेकरी निघाली. तिच्या हातून संसाराचा गाडा रेटला जाणार नाही, असे समजून तुकारामाच्या बापाने पुण्याच्या अप्पा गुळवे नामक श्रीमंताच्या मुलीशी तुकारामाचे दुसरे लग्न लावून दिले. हिचे माहेरचे नाव आवडी आणि सासरचे नाव जिजा असे होते.

तुकारामाने काही काळपर्यंत एकत्र कुटुंबाचा घरचा व्याप आणि बाहेरची सावकारी, महाजनकी व व्यापार यांचा त्याहूनही मोठा व्याप अतिशय कुशलतेने सांभाळला. या व्यवहाराचे संस्कार तुकारामाच्या मनावर आणि भाषेवरही मोठ्या प्रमाणात झालेले दिसतात. पुढे विठ्ठलाशी सलगीने प्रेमसंवाद करणारा तुकाराम देवाशी ऋणको-धनकोचे भांडण यासारख्या भाषेतही बोलताना आढळतो. सावकारी परिभाषेतील त्याचा एक अभंग असा-

> भक्तिऋण घेतले माझे । चरण गाहाण आहेत तुझे ।।
> प्रेम व्याज देईं हरी । माझा हिशेब लवकर करीं ।।
> माझें मी न सोडीं धन । नित्य करितों कीर्तन ।।
> तुझे नाम आहे खत । सुखें करीं पंचाईत ।।
> तुका म्हणे गरुडध्वजा । यासी साक्ष श्रीगुरुराजा ।।

तुकारामाच्या सुखी संसारावर त्याच्या वयाच्या सतराव्या वर्षी दुःखाची कृष्णछाया पसरू लागली. प्रथम त्याचा बाप वारला, त्यापाठोपाठ माता आणि थोरल्या भावाची पत्नी निवर्तली आणि आधीच विरक्त बनलेला त्याचा भाऊ पत्नीच्या निधनानंतर घर सोडून तीर्थयात्रेसाठी कायमचा निघून गेला.

हे दुर्दैवाचे आघात झेलीत असतानाच इ. स. १६३० च्या सुमारास सर्वत्र मोठा दुष्काळ पडला आणि लोकांची दुरवस्था झाली. त्यामुळे तुकारामाचा व्यापार घटला, सावकारी संपली, घेणेकऱ्यांनी घरणे धरले आणि देणेकरी हात झटकून मोकळे झाले. अशातच त्याची पहिली पत्नी आणि तिच्यापासून झालेला मुलगा यांनाही काळाने हिरावून नेले. घरची गुरेढोरेही मेली आणि अखेर नाइलाजाने तुकारामाला व्यवसायाचे दिवाळे काढावे लागले. स्वतः तुकारामाने या परिस्थितीचे वर्णन केले आहे, ते असे-

> संवसारें जालों अति दुःखें दुःखी ।
> मायबाप सेखीं क्रमिलिया ।।
> दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान ।
> स्त्री एकी अन्न करितां मेली ।।
> लज्जा वाटे जीवा, त्रासलों या दुःखें ।
> वेवसाय देखें तुटी येतां ।।

या परिस्थितीत तुकारामाचे मन अंतर्मुख बनू लागले. त्याचे भक्तिसंस्कार जागे झाले आणि 'विठो तुझें माझें राज्य। नाहीं दुसऱ्याचें काज' या निश्चयाने भक्तिसुख अनुभविण्यासाठी त्याने घरचे विठ्ठलमंदिर दुरुस्त केले. दुष्काळाने विस्कटलेली संसाराची घडी पुनश्च नीट बसविण्याइतके कौशल्य अंगी असूनही, या विपरीत काळात वित्त व जीवित यांची असारता प्रत्ययाला आल्यामुळे त्याची वृत्ती संसारातून मुरडली आणि विठ्ठलचरणी स्थिरावू लागली. तुकारामाने आपल्या भक्तिसाधनेचा स्थूल आलेख एका आत्मचरित्रपर अभंगात रेखाटला आहे, तो असा-

> देवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ।।
> आरंभीं कीर्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ।।
> कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनिया ।।
> गाती पुढें त्यांचें धरावें धृपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ।।
> संतांचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ।।
> टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ।।
> वचन मानिलें नाहीं सुहृदाचें । समूळ प्रपंचें वीट आला ।।
> सत्य-असत्यासी मन ठेलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमता ।।

पुढे मोक्षाची इच्छा तीव्र झाल्यानंतर तुकारामाने देहूजवळच्या भामनाथ पर्वतावरील एकांतात ईश्वरसाक्षात्कारासाठी निर्वाण मांडले. तिथे पंधरा दिवसपर्यंत अखंड एकाग्रतेने नामस्मरण केल्यानंतर त्याला 'दीपकीं कर्पूर कैसा तो विराला । तैसा देह जाला तुका म्हणे' अशा प्रकारचा दिव्य अनुभव प्राप्त झाला. त्यानंतर तो अधूनमधून भामनाथ आणि भंडारा या डोंगरांवर वृक्षवेलींच्या सहवासात चिंतन, मनन आणि नामस्मरण करण्यात दिवसाचे दिवस घालवीत असे. या एकांतातील चिंतनाच्या काळात त्याने ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, नामदेव व एकनाथ यांच्या अभंगगाथा आणि इतर अनेक संतांची वचने मनी-मुखी धारण केली आणि त्यांचा आपल्या अनुभूतींशी

मेळ घालण्याचा अविश्रांत प्रयत्न केला. या स्थितीत पुनश्च धनाचा मोह उत्पन्न होऊ नये, म्हणून त्याने निग्रहपूर्वक आपल्या सावकारीच्या सर्व वह्या इंद्रायणीत बुडवून टाकल्या.

तुकारामाची ही परमार्थाची वाटचाल सुरू असताना त्याला व्यावहारिक वृत्तीच्या कुटुंबियांप्रमाणेच समाजातील नानाविध वृत्तींचे लोक नाना प्रकारे नावे ठेवू लागले. परंतु जननिंदेची तमा न बाळगता त्याने आपला 'स्वहिताचा धंदा' निष्ठेने चालूच ठेवला. ज्याच्यावर विसंबून परमार्थाची वाट सुरक्षितपणे चोखाळता येईल, असा कोणी वाटाड्या तुकारामाला भेटला नाही. 'संतांची उत्तरें' पाठ करता करता तो आपल्याच मनाशी संवाद करीत असे. अशाच अवस्थेत एक अद्‌भुत अंतःप्रेरणेचा क्षण आला आणि त्याच्या मुखातून अभावितपणे अभंगवाणी बाहेर पडू लागली. या अंतःप्रेरणेच्या क्षणाचे तुकारामाने जे वर्णन केले आहे, ते असे–

**नामदेवें केलें स्वप्नामाजीं जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥**
**सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥**
**माप टाकी सळ धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ॥**
**प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी । उरले शेवटीं लावी तुका ॥**

नामदेवाकडून कवित्वाचा स्वप्नदृष्टान्त झाल्यानंतर तुकारामाने 'संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हें' अशा विनम्र वृत्तीने अभंग रचायला प्रारंभ केला.

तुकारामाला कवित्वाची प्रेरणा जशी स्वप्नात लाभली, तसा गुरूपदेशही स्वप्नातच मिळाला. चैतन्यपरंपरेतील बाबाजी चैतन्य नामक सत्पुरुषाने माघ शु. दशमी गुरुवार, शके १५६१ (दि. २३–१–१६४०) या दिवशी तुकारामाला स्वप्नात उपदेश केला. तुकारामाने या घटनेचे वर्णन केले आहे, ते असे –

**सद्‌गुरुरायें कृपा मज केली ।**
**परी नाहीं घडली सेवा कांहीं ।**
**सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना ।**
**मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥**
**भोजना मागती तूप पावशेर ।**
**पडिला विसर स्वप्नामाजीं ॥**
**कांहीं कळहो उपजला अंतराय ।**
**म्हणोनियां काय त्वरा जाली ॥**
**राघव चैतन्य केशव चैतन्य ।**
**सांगितली खूण माळिकेची ॥**
**बाबाजी आपुलें सांगितलें नाम ।**
**मंत्र दिला रामकृष्णहरी ॥**
**माघ शुद्ध दशमी पाहूनी गुरुवार ।**
**केला अंगीकार तुका म्हणे ॥**

त्यावरून राघव चैतन्य – केशव चैतन्य – बाबाजी चैतन्य – तुकाराम अशी त्याची परंपरा ठरते. सद्‌गुरूने स्वप्नात येऊन आपल्याला उपदेश केला आणि पूर्वीपासून आपल्या आवडीचा असलेला 'रामकृष्णहरी' हाच मंत्र दिला, हे पाहून तुकारामाला समाधान लाभले. त्याच्या पूर्वीच्या भक्तीवर गुरूने शिक्कामोर्तब केल्यामुळे तो अंतरी सुखावला.

तुकारामाचे हे प्रसन्न आणि प्रासादिक कवित्व पाहून काही उच्चवर्णीय सनातनी मंडळींना त्याचा हेवा वाटू लागला. रामेश्वरभट्ट व मंबाजीबुवा हे त्या हेवादावा करणाऱ्यांत प्रमुख होते. वेदाधिकाराला वंचित झालेली एक शूद्र व्यक्ती 'वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । इतरांनीं वहावा भार व्यर्थ ॥' अशा आत्मविश्वासाने बोलत आहे आणि समाजाच्या सर्व थरांतील लोक त्या व्यक्तीची वचने वेदतुल्य मानून मनी-मुखी घोळवीत आहेत, या वस्तुस्थितीने त्या लब्धप्रतिष्ठितांना अस्वस्थ करून सोडले. त्यांनी मग सत्ताबळाचा आश्रय घेऊन तुकारामाच्या विरुद्ध निवाडा मिळविला आणि त्याला आपल्या अभंगांच्या वह्या स्वहस्ते इंद्रायणीत बुडवायला भाग पाडले. वह्या बुडविल्यानंतर तुकारामाने तेरा दिवसपर्यंत निरन्न उपवासपूर्वक देवाजवळ धरणे धरले आणि अखेर देवाने प्रसन्न होऊन त्याच्या वह्या कोरड्या स्थितीत नदीतून वर काढल्या, अशी कथा प्रचलित आहे. ही कथा खरी असो वा नसो; परंतु तुकारामाची अभंगवाणी त्याच्या हयातीत साऱ्या महाराष्ट्रभर पसरली होती आणि शेकडो कोस अंतरावर असलेले मराठी लोक ते अभंग मिळवून मुखोद्‌गत करीत होते. ही वस्तुस्थिती ध्यानी घेता केवळ अभंगांच्या वह्या बुडवून ती अभंगवाणी नष्ट करणे सर्वस्वी अशक्य होते व हास्यास्पदही होते, असे म्हटले पाहिजे.

या घटनेनंतर रामेश्वरभट्ट, मंबाजीबुवा, इ. विरोधकांचा विरोध शमला. रामेश्वरभट्ट तर तुकारामाचा शिष्यच बनला. मग तुकारामाच्या साधुत्वाचा आणि कवित्वाचा डंका सर्वत्र वाजू लागला. त्याचे सर्व जीवितच उजळून निघाले, आनंदमय झाले. 'आनंदाचे डोहीं आनंद-तरंग । आनंदचि अंग आनंदाचें' असे त्या आनंदमयतेचे वर्णन त्याने केले आहे. आता त्याला स्वतःकरिता काहीही प्राप्त करायचे नव्हते. 'तुका म्हणे आतां उरलो उपकारापुरता' असे या अवस्थेत तो म्हणतो.

अशा स्थितीत त्याच्या वयाची ४१ वर्षे उलटली. आपले जीवित आता सफल आणि कृतार्थ झाले आहे, असा त्याला प्रत्यय आला. आता देहत्याग करायला हरकत नाही, असे त्याने मनाने घेतले. मग एके दिवशी सर्व लोक कीर्तनात रंगलेले असताना प्रसन्न मनःस्थितीत त्याने जगाचा अभावितपणे निरोप

घेतला. 'अंतकाळी विठो आम्हांसी पावला । कुडीसहित जाला गुप्त तुका' असे उद्‌गार प्रत्यक्ष तुकारामानेच आपल्या निर्याणाविषयी काढले आहेत. ही घटना शके १५७१ फाल्गुन व. द्वितीया (इ. स. १६४९) या दिवशी घडली.

तुकारामाचे निर्याण घडले, त्या वेळी शिवाजीचे स्वराज्य-प्रयत्न नुकतेच सुरू झाले होते. साधुसंतांविषयी स्वभावतःच प्रीती बाळगणाऱ्या शिवाजीने तुकारामाचे दर्शन घेतले व मागाहून भेटीदाखल बरेच द्रव्य त्याच्या घरी पाठविले. परंतु त्या निरिच्छ व निर्लोभ संताने ते द्रव्य जसेच्या तसे परत पाठविले, अशी कथा सांगतात.

तुकारामाची सर्व रचना अभंग छंदात आहे. त्याचे सुमारे पाच हजार अभंग उपलब्ध आहेत. तुकारामाच्या पाच हजार अभंगांची ही गाथा म्हणजे त्याची 'वाङ्‌मयी श्रीमूर्ती'च होय. त्याच्या वाणीत त्याच्या समग्र जीवनाचे प्रतिबिंब पडले आहे. त्याची अभंगवाणी म्हणजे रसरसलेल्या अनुभवांची खाणच



तुकारामाची मूर्ती – देहू

आहे. वेदाध्ययनाचा अधिकार प्राप्त झालेला नसला, तरी ती उणीव त्याने संतांची उत्तरे पाठ करून भरून काढली. 'वेद आम्हांवरी रुसोनियां गेला । आम्हीं त्याच्या बाला धरिलें कंठीं ।' या त्याच्या उद्‌गारात परमेश्वराविषयीची त्याची अनन्य निष्ठा दिसून येते.

'ज्ञान्याचा एका आणि नाम्याचा तुका' या वारकरी वचनात तुकाराम हा नामदेवाचा पारमार्थिक वारसदार असल्याचे सूचित केलेले आहे. परंतु खरे म्हणजे त्याने ज्ञानेश्वर, नामदेव व एकनाथ या संतत्रयीचे सर्व अनुभवामृत पचविले असून, ते स्वतःच्या अनुभवाच्या पाकात मुरविले आहे, असे दिसून येते. एकनाथी भागवत आणि एकनाथाचे अभंग यांचे अध्ययन त्याने इतक्या सूक्ष्मतेने आणि तन्मयतेने केले होते, की स्वतःचे अनुभव व्यक्त करतानाही त्याच्या मुखातून अभावितपणे एकनाथाची शब्दावली प्रकटली. या मराठी संतत्रयीबरोबरच तुकारामाच्या वाणीत कबीरवाणीचे पडसादही ऐकू येतात. तुकाराम हा कबीरासारखाच मुक्त चिंतक असल्यामुळे आणि कबीर हा आपला समानधर्मा वाटल्यामुळे त्याने कबीराची वचने आस्थेने अभ्यासिली असावी. 'अंतरीचें धावे स्वभावें बाहेरी' या प्रक्रियेने प्रगट होणाऱ्या आपल्या वाणीचे स्वरूप स्वतः तुकारामानेच सांगितले आहे, ते असे–

अनुभवें आलें अंगा । ते या जगा देतसें ।।
नव्हती हाततुके बोल । मूळ ओल अंतरींची ।।
उतरुनी दिसे कसी । शुद्ध रसीं खरे तें ।।
तुका म्हणे दुसरे नाही । ऐसी ग्वाही गुजरली ।।

एका साध्या संसारी माणसाचा आत्मसाक्षात्कारी संत कसा झाला, याचा सविस्तर चित्रपट तुकारामाच्या काव्यात पाहायला मिळतो. या काव्यात तीव्र अंतःक्षोभ आहे. त्याचे मन आणि अंतर्बाह्य जग यांत रात्रंदिवस जे युद्ध चालू होते, त्यातूनच हा क्षोभ उसळला आहे. तुकारामाची अंतर्मुख वृत्ती, त्याचे कठोर आत्मपरीक्षण, सखोल भावना, डोळस श्रद्धा आणि वाणीतील परखडपणा, यांमुळे त्याच्या सहजोद्‌गारांनाही श्रेष्ठ कवित्वाची उंची लाभली आहे. 'घात करी मन माझें मज' या अवस्थेपासून 'शेवट तो भला । माझा बहु गोड झाला' या धन्यतेच्या क्षणापर्यंत तुकारामाने परमार्थपथावर केलेल्या वाटचालीचे तीन टप्पे दिसतात, ते असे–

पहिला टप्पा साधक दशेचा. या अवस्थेत त्याने प्रपंचविन्मुख बनून परमार्थपथावर पहिलीवहिली पावले टाकायला प्रारंभ केला. परंतु लौकरच आपण प्रपंच आणि परमार्थ या दोहीनाही मुकलो आहो, असे त्याला समजून चुकले. या दुसऱ्या अवस्थेचे वर्णन 'आत्म्याची काळोखी रात्र' या शब्दांनी करायला हरकत नाही. तुकारामाने आपल्या मनाला विवेकाचा अंकुश सतत लावलेला होता. त्यामुळे ही काळोखी रात्र लौकरच संपली आणि नित्य नवा जागृतीचा दिवस त्याला दिसला. एवढेच नव्हे; तर 'नकळे दिवस रात्री । अखंड लागलीसे ज्योती' असा प्रकाशाचा सोहळा त्याच्या अंतरी प्रकटला. या प्रकाशमय स्थितीचा लाभ झाल्यानंतर, ज्ञानेश्वरांप्रमाणे तुकारामानेही आत्मविश्वासाचे जे उद्‌गार काढले, ते असे–

घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं।
मुक्ता आत्मस्थिती सांडवीन ॥
ब्रह्मभूत काया होते ही कीर्तनीं।
भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥
तीर्थभ्रामकासी आणीन आळस।
कडू स्वर्गवास करीन भोग ॥
सांडवीन तपोनिधा अभिमान।
यज्ञ आणि दान लाजवीन ॥
भक्तिभाग्य प्रेमा साधीन पुरुषार्थ।
ब्रह्मीचा जो अर्थ निज ठेवा ॥
धन्य म्हणवीन इहलोकी लोकां।
भाग्य आम्हीं तुका देखियला ॥

सिद्धावस्था प्राप्त झाल्यानंतर तुकारामाने लोकांच्या मनातील अविवेकाची काजळी झटकण्यासाठी लोकांना नाना प्रकारे उपदेश केला. 'बुडती हे जन देखवेना डोळां' अशी तळमळ त्याने अनेकवार व्यक्त केली आहे. या तळमळीतूनच त्याने कधी मातेच्या ममतेने, तर कधी पित्याच्या कठोरतेने लोकांना सावरण्याचा प्रयत्न केला आहे. पाखंडखंडनाच्या बाबतीत मात्र त्याच्या शब्दांना शस्त्रांची तीक्ष्णता आलेली दिसते. साधू हा दयेचा सागर असतो हे खरे; परंतु 'भूतांच्या पाळणा' बरोबरच 'कंटकाचें निर्दाळण' हेही दयेचेच कार्य असल्यामुळे मेणाहून मऊ असलेला हा विष्णुदास पाखंडखंडनाच्या प्रसंगी वज्राहूनही कठोर बनला आहे.

एका आधुनिक समीक्षकाने म्हटल्याप्रमाणे आपले वाङ्मयधन हे लोकधनाच्या पदवीला नेऊन पोचविण्याचे भाग्य तुकारामाला विशेष लाभलेले आहे. तुकारामाची अभंगवाणी ही गेल्या तीनशे वर्षांच्या काळात महाराष्ट्रवाणीचा एक अविभाज्य घटक बनलेली आहे. तुकारामाबद्दल मराठी मनाला दूरत्वाची किंवा परकेपणाची भावना स्पर्शही करीत नाही. ते मन तुकारामाबरोबर नाचाबागडायला, हसायला आणि रडायला सदैव तयार असते. तुकाराम हा आपल्यापैकीच एक आहे, तो पुष्कळदा आपलेच विचार–विकार बोलून दाखवीत आहे, आपल्याचसारखा वैतागत आहे, संतापत आहे, मधूनच प्रसन्न होत आहे, जे आपल्याला काही केल्या साधत नाही ते त्याने साधलेले असले, तरी ते साधताना त्यालाही आपल्यासारखेच अतोनात कष्ट पडलेले आहेत, हे सामान्यांच्याही मनाला जाणवते व तुकाराम हा त्याला अगदी जवळचा वाटतो. तुकारामाच्या अभंगांतील किती तरी चरण, अर्धचरण, शब्दप्रयोग, कल्पना व भाषाप्रयोग मराठी माणसाच्या हरघडीच्या बोली भाषेत अवतरले आहेत. मोजक्या शब्दांत केवळ खूपसा अर्थ, नव्हे, विश्वव्यापक अनुभव व्यक्त करण्याची शक्ती तर त्या वाणीमध्ये आहेच; शिवाय छंदोबद्ध असल्यामुळे तिला सुभाषितासारखी तालबद्धताही प्राप्त झाली आहे.

मराठी भक्तिपरंपरेत आणि कविमंडळातही तुकारामाचे स्थान अनन्यसाधारण आहे. 'अणुरणीया थोकडा' असलेला तुकाराम विवेकबळाने आकाशाएवढा बनला आणि ज्ञानेश्वरांनी ज्याचा पाया रचला, त्या भागवतधर्ममंदिरावरचा कळस होऊन शोभत राहिला, ही घटना तुकारामाला चिरंजीव पद देणारी आहे. [ तु. च.; पा. सं. क.; म. सा.; वा. टी. दि.]

## तुकारामबावा वर्दे

(जन्म इ. स. १५७१) एक मराठी संतकवी. याचा पिता अमृतराव हा सारस्वत ब्राह्मण असून गोमंतकातल्या जुवे बेटात राहत असे. कवळ्याची शांतादुर्गा ही याची कुलदेवता होय. लहानपणापासूनच याची वृत्ती परमार्थप्रवण होती. तशातच वयाच्या अवघ्या बाविसाव्या वर्षी त्याचे आईवडील लागोपाठ वारले आणि त्यानंतर लौकरच त्याची पत्नी दुर्गाबाई हीही निधन पावली. या कौटुंबिक आघातांमुळे तुकारामबावा पूर्ण विरक्त बनला व कवळे येथे जाऊन राहिला. तिथे शांतादुर्गेच्या संनिध कालक्रमणा करीत असतानाच त्याची कवित्वशक्ती जागृत झाली. पुढे उतारवयात तो काशीवासाला गेला. त्याचा अंत केव्हा आणि कुठे झाला; त्याची माहिती मात्र उपलब्ध नाही.

तुकारामबाबाने केलेली अनेक भक्तिपर पदे गोमंतकीय लोकांच्या मनी–मुखी आहेत. त्याचा सुभाषितरत्नावली (शतकत्रयावरील समश्लोकी टीका) हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यातील एक श्लोक असा–

लोखंडावरि तापल्या जळ पडे त्याचे नुरे नामही।
मोत्याच्या परि तेंच पंकजदलीं शोभेस ये सर्वही॥
स्वातीचे उदधींत शुक्तिपुटकीं मोतींच होतें स्वयें।
.ऐसे हे गुण, नीच, मध्यम, बरे, जीवास संगान्वयें॥

सुभाषितरत्नावली समश्लोकी असूनही तिच्यात मूळ अर्थाला यत्किंचित धक्का लागलेला नाही. [ म. क. च.]

## तुका विप्र

(१७२९–१७९१ इ. स.) एक मराठी कवी. हा मूळचा सातारा जिल्ह्यातील रहिमतपूरचा रहिवासी होय. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता. त्याची वृत्ती जोशी-कुलकर्ण्याची होती. याचे पूर्ण नांव तुकाराम यशवंत विपट असे होते. याने प्रारंभी कृष्णेच्या काठी असे

तारगावच्या बोरवनात तपश्चर्या केली आणि त्यामुळेच याच्या वंशजांना बोरवनकर असे उपनाम प्राप्त झाले आहे. याचे मातामह विप्रनाथ हेच याचे गुरू होते. ते नाथांच्या चुलत घराण्यातील होते. गुरूपदेशानंतर याला तुका विप्र असे नाव प्राप्त झाले. याने महाराष्ट्रभर संचार करून कीर्तनभक्तीचा प्रसार केला. याने आत्मसिंधू हा ग्रंथ, तसेच सुदामचरित्र, भानुदासचरित्र, कालियामर्दन ही प्रकरणे आणि अनेक स्फुट अभंग व पदे रचली आहेत. याची समाधी बीड जिल्ह्यात अंजनवती या गावी आहे. तिथे त्याचा मठ असून, त्या मठात त्याचे वंशज राहतात. त्यांनी रचलेल्या एकनाथस्तोत्रातील दोन श्लोक असे–

श्रीएकनाथा घरि आवडीने ।
पाणी आणी श्रीहरि कावडीने ।
धोत्रे धुतो गंध उगाळुनीया ।
पाणी आणी श्रीहरी गाळुनीया ।।
श्रीभानुदासा कुळी एकनाथ ।
ही विष्णुमूर्ती उघडी कलींत ।
दिसे जना मानव शुद्ध भोळा ।
वदे तुका विप्र अभंग लीला ।।

ज्ञानेश्वरीच्या संशोधनात महत्त्व पावलेली सिद्धनाथाची प्रत तुका विप्राच्याच संग्रहात होती. तुका विप्राचा शिष्य बापू विप्र याचा मठ पंढरपुरात आहे. [ म. सा.; म. च. को. ]

## तुका सुंदरदास

( इ. स. चे सतरावे शतक ) एक मराठी संतकवी. याच्या गुरूचे नाव सुंदरभारती असे होते. हा आपल्या गुरूचा उल्लेख सुंदरराम किंवा संक्षेपाने राम या नावानेही करतो. या सुंदररामाची काही स्फुट कविता उपलब्ध आहे.

तुका सुंदरदासाने नासिकेतोपाख्यान नावाचा एक ओवीबद्ध ग्रंथ रचलेला आहे. या ग्रंथाचे एकवीस अध्याय असून ओवी-संख्या १७२५ आहे. ग्रंथाचा विषय महाभारतातून निवडलेला आहे. त्याच्या काही गुरुस्तुतिपर ओव्या अशा –

तो कृपाळू सुंदरभारती । अज्ञाननिशीचा गभस्ती ।।
तारावया त्रिजगतीं । अव्यक्त व्यक्ती स्वयें आला ।।
दुष्ट वासना निर्दाळून । सुखी करावया दीन जन ।।
यालागीं निर्गुण ते सगुण । जाहला आपण गुरुनाथ ।।
कलीमाजीं कल्यंशभूते । जाणोनिया श्रीगुरुनाथें ।।
भूतदयाळू कृपावंतें । धर्मकथेतें प्रगटिलें ।।

(नासिकेत. २१.६८–७० )

या संतकवीच्या चरित्राविषयीची काहीच माहिती उपलब्ध नाही. [ भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिक १२.४ ]

## तुगलुक राजवंश

(१३२० ते १४१२ इ. स.) हे घराणे तुर्की वंशाचे होते. खिलजी घराण्यातील शेवटला सुलतान मुबारक शाह याचा खून करून त्याचा वजीर खुस्रूखान याने दिल्लीचे तख्त बळकावले. तो मूळचा हिंदू होता. खुस्रूखानाचा द्वेष करणारे काही मुसलमान सरदार होते. दीपालपूरचा सुभेदार गाजीबेग हा त्यांचा पुढारी होता. या गाजीबेगने संधी साधून दिल्लीवर स्वारी केली व खुस्रूखानास ठार मारून तो स्वतः दिल्लीच्या तख्तावर बसला (इ. स. १३२९). त्या प्रसंगी त्याने गियासुद्दीन तुगलुक शाह ही पदवी धारण केली.

गियासुद्दिनाने सुमारे पाच वर्षे दिल्लीचे राज्य केले. तो निर्व्यसनी होता; तसाच उत्तम शासकही होता. राज्यकारभाराचे त्याने काही नवे नियम तयार केले व त्यांना कुराणाचा आधार देऊन कायद्यांचा एक नवीन ग्रंथ बनवला. जुने किल्ले व वाडे दुरुस्त करून आणि काही नवे बांधून त्याने राज्याचा व सरहद्दीचा चांगला बंदोबस्त केला. दिल्लीजवळ एक भक्कम किल्ला बांधून गियासुद्दिनाने त्याला तुगलुकाबाद असे नाव दिले. या किल्ल्यातच तो राहत असे.

गियासुद्दिनाचा मुलगा उलुगखान किंवा जौनखान हा होय. त्याने द. भारतावर स्वारी करून वरंगळ व मदुरा ही राज्ये जिंकली. वरंगळच्या राजाला कैद करून त्याने दिल्लीला नेले होते; पण गियासुद्दिनाने त्याला मुक्त करून परत पाठवले.

पुढे बंगालमध्ये बंडाळी झाली तेव्हा गियासुद्दीन याने स्वतः बंगालवर स्वारी करून तिथे आपली सत्ता पक्की केली. परत येताना त्याने तिरहूतचे राज्यही जिंकले. त्या स्वारीच्या वेळी उलुगखान दिल्लीत राहून राज्यव्यवस्था पाहत होता. विजय मिळवून परत आलेल्या गियासुद्दिनाचा त्याने शहराबाहेर मुद्दाम बांधलेल्या एका लाकडी मंडपात मोठा सत्कार केला. त्याच प्रसंगी तो मंडप अचानक कोसळला आणि गियासुद्दिन त्याच्या खाली सापडून मरण पावला (इ. स. १३२५). उलुगखानानेच हे कपटकारस्थान रचले होते असे म्हणतात.

**मुहंमद तुग़लुक** – त्यानंतर उलुगखान हा मुहंमद बिन तुगलुक हे नाव धारण करून तख्तावर बसला. त्याला अरबी व फारसी या दोन्ही भाषांचे चांगले ज्ञान होते. कायदा व युनानी तत्त्वज्ञान यांचा तो पंडित होता. वैद्यकशास्त्राचीही त्याला बरीच माहिती होती. त्याची स्मरणशक्ती अत्यंत तीव्र होती. तो धर्मनिष्ठ, शूर व उदार होता. तो दारूला कधी स्पर्शही करीत नसे. पण त्याच्या अंगी इतके चांगले गुण असू-

नहीं, लहरीपणा, उतावळेपणा, रागीटपणा अदूरदृष्टी, क्रूरता, इ. दुर्गुणांमुळे त्याच्या राज्याची व प्रजेची दुर्दशाच झाली.

मुहंमद तुगलुक हा महत्वाकांक्षी असल्यामुळे त्याने सबंध हिंदुस्थानावर आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा चंग वांधला होता. वरंगळ व मदुरा ही राज्ये त्याने पूर्वीच जिंकली होती. सुलतान झाल्यावर त्याने कांपिली व होयसळांचा बराच प्रदेश जिंकून तो आपल्या राज्याला जोडला. हळूहळू काश्मीर, ओडिसा व राजस्थान सोडून सर्व हिंदुस्थानावर त्याची सत्ता प्रस्थापित झाली. या विशाल साम्राज्याचा कारभार तो कुशलतेने पाहत होता. मात्र त्यासाठी जो अवाढव्य खर्च होत असे, तो भागवण्यासाठी त्याने प्रजेवर जबर कर लादले. दुआवातील शेतसारा त्याने अनेक पटींनी वाढवला व त्यांचे अधिकारी तो सक्तीने वसूल करू लागले. त्यामुळे लोक हैराण झाले व त्यांनी शेतीभाती सोडून देऊन दरोडेखोरी सुरू केली. त्या विरुद्धही सुलतानाने कडक उपाय योजले व अशा हजारो दरोडेखोरांची कत्तल केली. याच्या भरीसभर म्हणून अवर्षणही पडले. सर्व उ. हिंदुस्थान दुष्काळग्रस्त झाला. हा दुष्काळ अनेक वर्षे चालू होता व त्यात हजारो लोक प्राणास मुकले. या दुष्काळाच्या संकटातून मुक्त व्हावे म्हणून मुहंमदशहाने आपली राजधानी दिल्लीतून हालवून देवगिरी येथे नेली व त्या शहराला दौलताबाद हे नाव दिले. तिथल्या किल्ल्याच्या आधारे दक्षिणेचा बंदोबस्त सहज करता येईल अशी त्याची कल्पना होती. त्याने दिल्लीच्या सर्व रहिवाशांना दिल्ली सोडून दौलताबादला जाण्याचा हुकूम केला. लोक निघाले; पण त्या प्रवासात त्यांचे अतोनात हाल झाले. नव्या राजधानीत सर्वांची नीट सोय लागेना; त्यामुळेही पुष्कळ लोक मरण पावले. तिकडे दिल्ली ओस पडली. पण पुढे सुलतानाची लहर फिरली व त्याने सर्वांना दिल्लीला परत जाण्यास फर्मावले. त्या परतीच्या प्रवासातही हजारो लोक दगावले. अशा प्रकारे मुहंमदाच्या या अतिरेकी लहरींमुळे हजारो कुटुंबांची वाताहात झाली.

दौलताबादला गेल्यावर मुहंमदशहाने पुण्याजवळचा कोंडाणा किल्ला जिंकला. त्याच सुमारास मंगोलांनी पंजाबवर स्वारी केली. त्यांच्याशी मुकाबला करायचा, तर सुलतानाची फौज दक्षिणेत अडकून पडली होती. त्यामुळे मंगोलांना बरेच द्रव्य देऊन मुहंमदाला त्यांच्याशी तह करावा लावला.

हिंदुस्थानभर सत्ता प्रस्थापित झाली, तरीही सुलतानाची महत्त्वाकांक्षा त्याला स्वस्थ बसू देईना. त्याला वाटले, की आपण खुरासानवर स्वारी करावी. म्हणून मग त्याने त्यासाठी एक प्रचंड सैन्य तयार केले. पण तशी स्वारी करणे कठीण आहे, हे काही काळाने ध्यानात आल्यामुळे त्याने त्या सैन्याला रजा दिली. एक वर्षभर त्या सैन्याने स्वस्थ बसून पग[illegible] मोकळे झाल्यावर ते सैनिक देशभर दरोडेखोरी करू [illegible] तेव्हा सुलतानाने त्यांची धरपकड करून त्यांना अतिक्रूर शिक्षा ठोठावल्या.

इ. स. १३३७ साली सुलतानाने कांगडामधील नागरकोट-वर स्वारी करून ते जिंकले. नंतर त्याने एक मोठी फौज हिमालयातील कुराचल (कूर्माचल) पर्वताकडे पाठवली. ती फौज जिद्य गावापर्यंत पोचली. आपल्यावर परचक्र आले असे पाहताच त्या प्रदेशातील बहुतेक लोक रानावनात पळून गेले. त्यांपैकी काहींनी उलटून सुलतानाच्या फौजेवर छुपे हल्ले सुरू केले. मग ती फौज परत फिरली; पण वाटेत वारा, पाऊस, व थंडी यांच्या तडाख्यात सापडून व उपासमार होऊन ती नाश पावली. अशा अनेक साहसी व अविवेकी कृत्यांमुळे मुहंमद तुगलुक हा 'वेडा मुहंमद' म्हणून इतिहासात ओळखला जातो.

सुलतानाच्या अशा अविचारी वर्तनामुळे राज्यात सर्वत्र अंदाधुंदी माजली. त्याने अनेक मुल्लामौलवींनाही कडक शिक्षा फर्मावल्या. त्यामुळे धार्मिक क्षेत्रातही असंतोष निर्माण झाला. मुल्ला मौलवी विरुद्ध गेले तरी आपण खलिफाचा पाठिं[illegible] मिळवू, अशा ईर्षेने मुहंमदाने आपला प्रतिनिधी कैरोला पाठवला. इ. स. १३४३ मध्ये खलिफाने सुलतानाला एक मानपत्र व पोषाख पाठवला. या सन्मानामुळे आपली प्रतिष्ठा वाढेल व जरबही बसेल अशी त्याची कल्पना होती; पण ती फोल ठरली.

त्याच्या कारकीर्दीच्या शेवटी बंगाल, कर्नाटक, वरंगळ, मलबार, इ. प्रांतांत बंडे उद्भवली. द. भारतात दौलताबाद शिवाय बाकीचे प्रदेश स्वतंत्र झाले. मग सुलतान मुहंमद स्व[illegible] मोठे सैन्य घेऊन दौलताबादला आला. तिथे थोडा बंदोबस्त करतो न करतो, तोच गुजरातेत बंडाळी सुरू झाली. ती [illegible] वण्यासाठी त्याला लगोलग तिकडे कूच करावे लागले. त[illegible] मोहिमेतच त्याला ताप येऊ लागला व इ. स. १३५१ साली तो सिंध प्रांतात ठठ्ठा येथे मरण पावला.

**फीरूज़ तुगलुक** – मुहंमदशाहानंतर त्याचा चुलत भा[illegible] फीरूज़शाह तख्तावर बसला. त्याने बंगालवर दोनदा स्वारी केली व तिथल्या बंडखोर सुभेदाराचा पराभवही केला. पण त्या[illegible] कडून खंडणी मिळाल्यावर सुलतानाने त्याचे स्वातंत्र्य मा[illegible] केले. दुसरी स्वारी संपवून परत येताना इ. स. १३६० सा[illegible] त्याने ओडिसावर अचानक धाड घातली व पुरीच्या जगन्नाथा[illegible] मंदिर उद्ध्वस्त करून मूर्तीचीही विटंबना केली. इ. स. १३[illegible] मध्ये त्याने कांगडामधील नागरकोटवर स्वारी करून ति[illegible] ज्वालामुखीचे मंदिर नष्ट केले. तिथून सिंधवर चाल क[illegible] त्याने गुजराथपर्यंत मजल मारली. तिथली बंडे मोडण्यात [illegible]

यश आले असले, तरी कच्छच्या रणात त्याच्या फौजेचे अतोनात हाल झाले. त्यामुळे पुन्हा असल्या मोठ्या मोहिमा काढायच्या नाहीत, असे त्याने ठरवले. त्याला मनातून लढाईचा तिटकाराच होता; पण तरीही त्याला किरकोळ लढाया शेवटपर्यंत लढाव्या लागल्या. इ. स. १३७७ त त्याने एटावाच्या जमीनदाराचे बंड मोडले. इ. स. १३८० साली त्याने कटेर (रोहिलखंड) वर स्वारी करून हजारो हिंदूंची कत्तल केली.

इ. स. १३७४ मध्ये फीरूज़शाहाचा मोठा मुलगा फत्तेखान मरण पावला. त्याच्यावर सुलतानाचे फार प्रेम होते. त्याच्या मृत्यूमुळे फीरूज़च्या मनावर विलक्षण आघात झाला व त्याचे लक्ष राज्यकारभारातून उडाले. त्याने सर्व कारभार खानजहान नामक आपल्या वजिरावर सोपवला. पण खानजहान याने फीरूज़चा दुसरा मुलगा मुहंमदखान याला मारण्याचा प्रयत्न केल्यामुळे सुलतानाने त्याला पकडून ठार मारले व मुहंमदखान याला तख्तावर बसवले. पण दुर्दैवाने तो नालायक व स्वैराचारी निघाला. तेव्हा सरदारांनी त्याला बाजूला सारून फीरूज़चा नातू गियासुद्दीन (दुसरा) याला तख्तावर बसवले (इ. स. १३८८). त्याच वर्षी फीरूजशाह मरण पावला.

फीरूज़शाहाला आपले साम्राज्य वाढवावे असा हव्यास नव्हता. आपले राज्य नीट संभाळून प्रजेला सुखी करावे, एवढीच इच्छा तो बाळगी. त्याने जनहिताची अनेक कामे केली. ३० पाठशाळा, १०० धर्मशाळा, १०० रुग्णालये, १० मोठ्या विहिरी, ३० मोठे तलाव, ५ मोठे कालवे, १५० पूल व अनेक धरणे त्याने बांधली. याशिवाय राजवाडे, मनोरे, मशिदी व स्नानगृहे अशा अनेक सुंदर वास्तूही त्याने उभारल्या. शिवाय दिल्ली जवळचे फीरूज़ाबाद हे शहरही त्यानेच वसवले. जौनखानाच्या स्मरणार्थ त्याने गोमती नदीच्या तीरावर जौनपूर वसवले.

फीरूज़शाह आपल्या राज्यात फिरून रयतेची जातीने दाद घेत असे. त्याने अनेक जाचक कर बंद केले व शेतसारा कायमचा ठरवून दिला. त्यामुळे लोकांची स्थिती पुष्कळच सुधारली. क्षुल्लक कारणासाठी हातपाय तोडणे, नाक कापणे, डोळे काढणे, कातडे सोलणे, जिवंत जाळणे अशा अघोरी शिक्षा देण्याचा प्रघात त्याच्या काळी होता, तो त्याने बंद केला.

फीरूज़शाह स्वतः विद्वान व विद्येचा भोक्ता होता. त्याने शिक्षणाच्या प्रसारासाठी पुष्कळ सोयी केल्या व इतिहासलेखनाला प्रोत्साहन दिले. या सुलतानाची कीर्ती इजिप्तच्या खलिफापर्यंत पोचली व खलिफाने एक पोषाख व सर्व हिंदुस्थानचे वहालपत्र त्याच्याकडे पाठवून दिले (इ. स. १३५६).

फीरूज़शाह इस्लामचा पक्का अभिमानी होता. मुस्लीम पंडित व संत यांच्यावर त्याची फार श्रद्धा होती. त्यांच्या विचारानेच तो सर्व कारभार करी. त्याची सर्व कृत्ये मुसलमान लोकांच्या कल्याणासाठी असत. हिंदू धर्माविषयी त्याला फार द्वेष होता. इस्लामच्या प्रसारासाठी कोणतेही निंद्य कृत्य केले तरी ते क्षम्य मानावे, असे त्याचे मत होते. त्यामुळे त्याने हजारो हिंदूंना बाटवून गुलाम केले व हजारोंची कत्तल केली. पूर्वीच्या सुलतानांनी ब्राह्मणांना जिझिया कर माफ केला होता, तो त्याने पुन्हा लादला. त्याने अनेक देवालये, त्यांतील मूर्ती व ग्रंथसंग्रह यांचा विध्वंस केला.

**फीरूज़नंतरचे अराजक** – फीरूजशाहाचा नातू गियासुद्दीन याने ५ महिनेच राज्य केले. पुढे त्याचा भाऊ अबू बक्र याने गियासुद्दिनाला ठार मारून स्वतः दिल्लीचे तख्त बळकावले पण दरबारी मंडळींनी त्याला मान्यता दिली नाही. त्यांनी अबू बक्र याला नालायक ठरवून राज्यभ्रष्ट केले व फीरूज़चा मुलगा मुहंमद यालाच पुनश्च गादीवर बसवले. त्याने इ. स. १३९० ते १३९४ पर्यंत राज्य केले. तो मरण पावल्यावर त्याचा मुलगा हुमायून राज्यावर आला; पण तो लवकरच मरण पावला. मग मुहंमदशाहाचा दुसरा मुलगा महमूद हा सुलतान झाला. पण तोही नालायकच निघाला. त्यामुळे राज्यात सर्वत्र अराजक माजले. राज्याचे सर्व प्रांत स्वतंत्र झाले. राजधानीतही दंगेधोपे माजले. त्याच वेळी समरकंदचा तुर्की बादशाहा तीमूरलंग याने मोठ्या फौजेनिशी हिंदुस्थानवर स्वारी केली (इ. स. १३९८). वाटेत मनसोक्त लुटालूट व कत्तल करीत तो दिल्लीवर येऊन धडकला. महमूदशाहाचा वजीर मल्लू इक्बालखान याने त्याला खूप प्रतिकार केला; पण त्याचा या जबरदस्त आक्रमणापुढे टिकाव लागला नाही. ही अवस्था येताच महमूदशाहा गुजरातकडे पळून गेला. मग तीमूरलंगाने सतत पंधरा दिवस दिल्लीत भयंकर कत्तल व लुटालूट केली. अशा प्रकारे सार्वत्रिक विध्वंस करून तीमूरलंग परत गेला. जातांना खिज़रखान नामक सरदाराला त्याने मुलतान, पंजाब व दीपालपूर या प्रदेशांवर आपला सुभेदार नेमले.

त्यानंतर दोन महिने दिल्ली शहरात अराजकच होते. दुष्काळ व रोगांच्या साथी यांमुळेही कहर गुदरला होता. मग इक्बालखानाने तिथे थोडी शांतता प्रस्थापित केली. दिल्ली शहराप्रमाणे दुआब प्रांतही त्यांच्या ताब्यात होता. बाकी सर्व प्रदेश मात्र निरनिराळ्या अंमलदारांनी बळकावले होते. थोडे स्थिरस्थावर झाल्यावर इक्बालखानाने महमूदशाहाला परत बोलावले; पण दिल्लीवरची आपली सत्ता मात्र त्याच्या हाती दिली नाही. मुहमूदला ती गोष्ट आवडली नाही. त्याने दिल्लीत राहण्याऐवजी कनोजची सुभेदारी पत्करली.

पुढे इक्बालखान व पंजाबचा सुभेदार खिज्रखान यांची लढाई होऊन तिच्यात इक्बालखान मारला गेला ( इ. स. १४०५ ). मग दौलतखान लोदी नावाच्या एका अफगाण सरदाराने महमूद तुगलुक याला कनोजहून परत बोलावून त्याला पुनश्च दिल्लीच्या गादीवर बसवले. त्याने इ. स. १४१२ पर्यंत राज्य केले खरे; पण दौलतखान हाच खरा सत्ताधीश होता. मात्र त्याचा अंमल स्थिर झाला नाही. कारण खिज्रखान त्याला सतत उपद्रव देत राहिला होता. शेवटी इ. स. १४१२ साली महमूदशाहा मरण पावला व त्याच्या मृत्यूने तुगलुक घराण्याचा अंत झाला. [ मु. रि.; हि. क. इं. पी.]

**तुडग वडर** एक जात. ही जात मामटा या नावाने ओळखली जाते. पाहा – मामटा.

**तुणतुणे** एक तंतुवाद्य. या वाद्यातून 'तुण् तुण्' असा आवाज निघत असल्यामुळे याला हे नाव पडले आहे. सुमारे दोन विती उंचीचे आणि वीतभर व्यासाचे पोकळ लाकडी भांडे घेऊन त्याच्या खालच्या बाजूला कातडे मढवलेले असते. कातड्याच्या मध्यातून बारीक तार वर घेतलेली असते. लाकडी भांड्याला बांबूची एक दांडी तिरकस बसवतात. दांडीच्या वरच्या टोकाजवळ असलेल्या खुंटीला ही तार गुंडाळतात. स्वर हवा तितका खालीवर करण्यासाठी खुंटी पिळून तारेला कमी अधिक ताण देतात.



तुणतुणे

दांडी उजव्या हातात धरून त्याच हाताच्या आंगठ्याजवळच्या बोटाने तारेवर आघात करतात अथवा डाव्या हाती तुणतुणे धरून उजव्या हातातील काडीने आघात करूनही हे वाजवतात.

हे वाद्य गोंधळी, भुत्ये, पोवाडे म्हणणारे शाहीर ही मंडळी वापरतात. तमाशात गाण्याला साथ देण्यासाठीही ढोलकीबरोबर तुणतुणे असते. दक्षिणेत त्याला तुंतिण असे म्हणतात. यल्लम्मादेवीचे उपासक असलेल्या जोगतीजोगतिणींच्या हाती जे चौंडके नावाचे वाद्य असते, ते एक प्रकारे तुणतुणेच होय. पाहा – गोंधळ. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे; म. लो. त.; लो. ना. प.; म. लो. उ. ]

**तुतारी** एक सुषिर वाद्य. हे पितळेचे बनवितात. याचे एक टोक लहान व निमुळते असून, दुसऱ्या टोकाला



तुतारी

लहानसा कर्णा बसविलेला असतो. या वाद्याची नळी सरळ किंवा बाकदार असते. हे वाद्य धार्मिक व मंगल प्रसंगी, मिरवणुकीत किंवा देवालयांत वाजवले जाते. पूर्वी युद्धातही याचा उपयोग करीत. याला ततूरी, तुरही अशीही अन्य नावे आहेत. पुराणांत याचा उल्लेख तूर्य या नावाने आढळतो. [ म्यु. इं.]

**तुन्ना** एक वाद्य. याला तूरना असेही म्हणतात. उत्तर भारतात कोलंजनपद क्षेत्रामध्ये कार्तिक वद्य द्वितीयेच्या पहाटे पितळेच्या किंवा लोखंडाच्या नळीचा बाजा वाजवीत एक कोळी पुरुष गोधन जागविण्यासाठी घरोघर जात असतो. त्याला गुधनजगा म्हणतात आणि त्याच्या वाद्याला तुन्ना किंवा तूरना म्हणतात. नागा साधूंजवळ असणारे नरसिंगा हे वाद्यही याच्यासारखेच असते. [ कृ. जी. ब्र. श. ]

**तुर कावषेय** एक वैदिक ऋषी. शतपथ ब्राह्मणाच्या दहाव्या कांडाच्या अखेरीला दिलेल्या गुरुशिष्यपरंपरेत याचे नाव आहे. त्या कांडातली तत्त्वे याने

प्रतिपादिली आहेत. हा जनमेजय पारिक्षिताचा पुरोहित असून, यानेच त्याला राज्याभिषेक केला, असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे. बृहदारण्यक व खिल यांमध्ये त्याचा पुरातन मुनी म्हणून उल्लेख आढळतो. ओल्डेनबर्ग व मॅक्डोनेल यांच्या मते हा वैदिक कालाच्या शेवटी होऊन गेला असावा. पंचविंश ब्राह्मणात उल्लेखिलेला देवमुनी तुर आणि कावषेय हे एकच असावेत. [ म. ज्ञा. को.; प्रा. च. को. ]

**तुरगसप्तमी** एक व्रत. हे चैत्र शुद्ध सप्तमीला करतात. या दिवशी उपवास करून रवी, निकुंभ, अरुण, यम, यमुना, शनी, रविपत्नी छाया, सप्तछंद, धाता, अर्यमा, इ. देवतांची पूजा करतात. उद्यापनाच्या वेळी घोडा दान देतात. फल – आरोग्य व सामर्थ्य यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**तुरसीदास** ( इ. स. चे सोळावे शतक ) उत्तर भारतातील एक संत. हा निरंजनी संप्रदायाचा एक प्रमुख संत होय. शेरपूर या गावी हा राहत असे. स्वामी लालदासजी हा याचा गुरू होता. तुरसीदासाचे विचारही कबीराप्रमाणेच बाह्य कर्मकांडाला सक्त विरोध करणारे आहेत. अंतःशुद्धी आणि गुरुभक्ती यांना तुरसीदासाने अत्यंत महत्त्व दिले आहे. सगुणोपासनेला विरोध करताना त्याने जे उद्गार काढले आहेत, ते असे–

तनमंदिरमें रमि रह्या अलखनिरंजन देव ।
तुरसी ताहि विसारि नर करत कृत्रिमकी सेवा ।।

अर्थ– अलक्ष निरंजन असा देव देहरूपी मंदिरातच नांदत आहे. लोक मात्र त्याला विसरून, कृत्रिम देव (मूर्ती) बनवून त्याची सेवा करीत राहतात.

याने ४२०२ साख्या, ४६१ पदे, अनेक श्लोक आणि सबद्या रचल्या आहेत; तसेच चौअक्षरी, करणीसारजोग, साधसुलच्छन व तत्त्वगुणभेद हे याचे चार छोटे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याच्या ग्रंथांत निरंजनी संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाची बहुतेक अंगे विशद झालेली आहेत. याने नवविधाभक्तीचा अद्वैतानुकूल अर्थ लावून दहावी पराभक्ती म्हणून प्रेमभक्तीचा पुरस्कार केला आहे. परब्रह्माच्या विरहाचे आणि मीलनाचे भाव व्यक्त करणारी याची पदे सरस आहेत. त्यांतले एक पद असे–

बिचालै नदी बहैजी अब पीव क्योंकरि आऊं पार ।
बहै बिचालै नदी अपरबल ऊंडी गहरगभीर ।
में अबला तिरि नां सकूं गहूं किसि बिधि तीर ।।
तामहि मगर मच्छ बहुतेरा, केती उठहिं तरंग ।
पैली पार मेरा पीव बसै, होय कहो क्यों संग ।।
है कोऊ तारु ततवेता पार उतारै मोंहि ।
सांई सूं मेला करै पै बड़ उपगारी सोय ।।
कामी तलफै काम कूं ज्यूं निरधन धनकी पांहि ।
जन तुरसी तलफै दरस कूं जैसे चात्रिग घनकी चाहि ।।

अर्थ– मध्ये नदी वाहत आहे. आता हे प्रिया, मी पलिकडे कशी येऊ ? मध्ये नदी वाहत आहे; प्रवाह खोल आणि पाण्याची धारा वेगवान आहे; मी अबला पोहून जाऊ शकत नाही. अशा स्थितीत कोणत्या उपायाने पैलतीर गाठू ? प्रवाहात मगर, मत्स्य, इ. अनेक जलचर प्राणी आहेत. उंच उंच लाटा उसळत आहेत. पैलतीरावर माझा प्रियकर राहत आहे. त्याची भेट कशी होईल? मला पलिकडे तारून नेऊ शकेल असा कोणी तत्त्ववेत्ता नावाडी आहे काय ? जो माझे माझ्या प्रियकराशी मीलन घडवील, त्याचे माझ्यावर अनंत उपकार होतील. कामी मनुष्य कामतृप्तीसाठी व निर्धन धनासाठी जसा तळमळतो, तसा तुरसी निरंजनाच्या दर्शनासाठी तळमळत आहे.

तुरसीदासाची सर्व पदे विविध रागरागिण्यांत रचलेली आहेत. पाहा– निरंजनी संप्रदाय. [ नि. सं. तु. नि. ]

**तुरा** एक शिरोभूषण. पूर्वी राजेरजवाडे व सरदारदरकदार यांच्या शिरस्त्राणावर तुरा लावण्यात येत असे. प्रत्येकाचा तुरा स्वतंत्र आकाराचा असे. त्यामुळे त्या त्या सरदाराची ओळख चटकन पटत असे. पुढे शिरस्त्राणे प्रचारातून गेल्यावर हा तुरा हारावर, मुकुटावर, टोपीवर किंवा ढालीवरही बसविण्यात येऊ लागला. इतिहासकाळात तुरा हा राजचिन्हांत समाविष्ट झाला होता. मराठी शाहिरी परंपरेतील तुरेवाले शाहीर आपल्या डफावर तुरा लावतात. [ सु. वि. को. ]

**तुरायण** एक याग. पौर्णमासेष्टी ही या यागाची प्रकृती आहे. शांखायन ब्राह्मणात तुरायण यागाला स्वर्गकामाचा यज्ञ असे म्हटले आहे. कात्यायन श्रौतसूत्रात याला सत्र असे म्हटले असून, चैत्र किंवा वैशाख यांच्या शुद्ध पंचमीला या सत्राचा आरंभ करून ते वर्षभर करावे, असे सांगितले आहे. तुरायणाला द्वादशाहाची विकृती मानीत व तो करणाऱ्या यजमानाला तौरायणिक म्हणत. [ पा. का. मा.; प. का. मा. ]

**तुरी** (१) एक आदिवासी जमात. हे लोक छोटा नागपूर, बिहार व आसाम या प्रदेशांत राहतात. बांबूपासून सुपे, पंखे व टोपल्या विणणे हा यांचा मुख्य व्यवसाय आहे.

चेहऱ्याची ठेवण, चालीरीती, भाषा व धर्म या बाबतींत त्यांचे मुंडा आदिवासींशी बरेच साम्य आहे. बहुधा तुरी ही

मुंडांचीच एक शाखा असावी, असे रिस्ले याचे मत आहे.

तुरी जमातीत किसान तुरी, ओर, डोम व डोग्रा असे चार



तुरी पुरुष – टोपली विणताना

पोटभेद आहेत. या सर्व लोकांचा धंदा सामान्यपणे टोपल्या विणणे, हा असला तरी त्यात फरक आहे. किसान तुरी हे पूर्वी शेती करीत असत. पण आता बहुतेक टोपल्या विणण्याचे काम करतात. डोम आणि डोग्रा हे छोट्या टोपल्या विणतात. त्यांच्या स्त्रियांना सुपे, पंखे व शिपतरे विणायला बंदी आहे. हे लोक हिंदी भाषा बोलतात. यांचे उ. बिहारमधील डोंबांशी पुष्कळ साम्य आहे. ओर तुरी संख्येने फार कमी आहेत. बांबूचे काम करण्यात ते निष्णात आहेत.

मुंडांप्रमाणे तुरींमध्येही पक्षी, जनावरे व झाडे अशी देवके आहेत. त्यांना ते गोत्र असे म्हणतात. नाग, जोजो (चिंचेचे झाड), बागवार (चित्ता), केर्केट्टा (खाटिक पक्षी), टिर्की (पारवा) आणि आइंद (मासा) ही त्यांची प्रमुख गोत्रे आहेत. गोत्राचे नाव असलेले जनावर किंवा पक्षी ते खात नाहीत. एकाच गोत्रात लग्न होत नाही.

**विवाहप्रथा**— वरपक्षाकडील मध्यस्थ मुलीच्या घरी येऊन तिच्या बापाला म्हणतो, की 'तुझ्या घरात एक सुवासिक फूल उमलले असून मी ते खुडायला आलो आहे.' यावर मुलीचा बाप उत्तर देतो, की 'जर वास उडून गेल्याबर तू या फुलाला फेकून देणार नसशील, तर तू हे फूल खुशाल घेऊन जा.' नंतर मुलीला वस्त्र देऊन देऊन तिच्या पायावर थोडे शिंपडले जाते. विवाहसमारंभ वधूच्या किंवा वराच्या होतो. त्यासाठी साल वृक्षांच्या झावळ्यांचा मांडव उभारत वराच्या घरी समारंभ असल्यास वधूला डोलीतून वा पालखी तून तिथे नेतात. वधूच्या घरी समारंभ असल्यास वर होडी किंवा घराच्या आकाराच्या पालखीतून वधूगृही जातो. वधू-वरांच्या बाजूचे लोक परस्परांच्या कपाळी शेंदूर तात. लग्नाला जमलेल्या लोकांपैकी वधू-वरांशिवाय अन्य असलेला एखादा इसम लग्नाचे पौरोहित्य करतो. हा वराच्या उजव्या हाताचे बोट धरून ते शेंदरात बुडवतो त्याने वधूच्या भांगात शेंदूर लावतो. नंतर तो वधूचे हाताचे बोट शेंदरात बुडवून वराच्या कपाळी त्याचा लावतो. वधू-वरांना दृष्ट लागू नये म्हणून हा शेंदूरविधी वाच्या एका कोपऱ्यात पडद्याआड करतात. हाच विवाहा मुख्य विधी होय.

वरपिता वधूपित्याला देज देतो, ते बहुधा गुरांच्या स्वरू असते. मुलीची भावंडे व इतर नातेवाईक यांच्यासाठीही पित्याला कपडे आणि इतर वस्तू भेटीदाखल द्याव्या लागता

तुरींमध्ये बहुपत्नीत्वाची चाल आहे. विधवेला दि लग्न करता येते.



तुरी स्त्री

**प्रसूतिप्रथा** –
जननाशौच
दिवस पाळता
आठव्या दि
मुलाचे जाव
काढतात व
बांबूच्या बे
किंवा केळी
वनात टाकून दे
त्या दिवशी मु
आई-बाप उप
करतात. श
पाहून मुलाचे
ठेवतात. त्यास
तांदुळाच्या म
भरलेल्या ए
पितळी भांड
तांदुळाचे तीन
टाकतात. त्यांपैकी एक दाणा मुलाचा व दुसरे दोन त्या

जवळच्या नातेवाइकांचे असतात. मुलाचा दाणा ज्या नातेवाइकाच्या दाण्यांबरोबर पात्राच्या तळाशी जाईल, त्या नातेवाइकाचे नाव मुलाला ठेवतात. मग मुलाचे पाय पात्रातील मद्याने धुतात. ज्याचे नाव मुलाला ठेवले असेल, ती व्यक्ती मग ते मद्य पिते.

**देवधर्म**– तुरी लोकांत इतर धार्मिक विधींसाठी जे पुरोहित असतात, त्यांना पहान असे म्हणतात. पहानाचा अधिकार वंशपरंपरागत चालतो. त्या कामासाठी त्याला एक शेत दिलेले असते. तुरी हे भुताखेतांना भजतात. ती चांगली आणि वाईट अशा दोन्ही प्रकारची असतात, असे ते मानतात. सणाच्या दिवशी पहान त्यांना कोंबडया–बकऱ्यांचा बळी देतो. पहान दुष्ट भुतांचे पारिपत्य मात्र करू शकत नाहीत. ते काम जादूगार आणि मांत्रिक असतील ते करतात. बऱ्याच तुरींनी शिवनारायणी-पंथ स्वीकारला आहे.

**मर्तिकप्रथा** — हे लोक मृतांना पुरतात. पुरताना प्रेताच्या हातात थोडे पैसे ठेवतात आणि खड्डयात त्याच्या शेजारी त्याची ताटवाटी ठेवतात. फाल्गुनातल्या शेवटच्या दिवशी श्राद्ध करतात. [ सें. इं. १९५१; ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

(२) तुर किंवा भेरी वाजवणाऱ्यांची एक जात. यांची वस्ती बहुधा गुजरातेत आहे. आपण भाटांचे वंशज असल्याचे हे सांगतात. हे उमिया व हर्सिध या देवतांना भजतात. [ मुं. इ. जा.; म. ज्ञा. को. ]

## तुरीय

वेदान्तातील एक संज्ञा. या शब्दाची व्याख्या अशी– 'अज्ञानतदुपहितचैतन्ययोराधारभूतम् अनुपहितचैतन्यम्' = अज्ञान आणि तदुपहित ( झाकळलेले ) चैतन्य यांना आधारभूत असे अनुपहित ( न झाकळलेले ) चैतन्य म्हणजे तुरीय होय. व्यष्टीच्या जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या अवस्थांच्या अपेक्षेने आत्म्याला अनुक्रमे विश्व, तैजस व प्राज्ञ अशी नावे दिलेली आहेत, समष्टीच्या दृष्टीने ती विराट किंवा वैश्वानर, हिरण्यगर्भ किंवा प्राण आणि ईश्वर अशी आहेत. आत्म्याच्या या तीन्ही अवस्थांहून वेगळा व सर्वांना आधारभूत असा जो शुद्ध आत्मा त्याला तुरीय असे म्हणतात. तुरीयाला अव्याकृत किंवा शुद्धब्रह्म असेही म्हणतात. सर्व उपाधींनी रहित असे साक्षी चैतन्य तुरीयावस्थेत भासते. झोपेतून जाग आल्यावेळी किंवा झोप लागण्यापूर्वी एक क्षण असा असतो, की ज्यात अहंकारादी विकारांचा अभाव असतो; तसेच ज्ञाता व ज्ञेय यांचाही लय झालेला असतो. केवळ ज्ञानस्वरूप अशी ती अवस्था असते, हीच तुरीयावस्था होय. तुरीय हे प्रपंचाचा उपशम करणारे आहे. [ वै. शां. अ.; श. क. ]

## तुरीयातीतोपनिषद

एक नव्य उपनिषद. हे शुक्ल यजुर्वेदाशी संबंधित आहे. हे आदिनारायणाने ब्रह्मदेवाला सांगितले. यात सर्वसंगपरित्यागी अवधूताचे वर्णन केलेले आहे. अवधूतअवस्था ही दुर्लभ असून ती परमहंसाच्याही वरची आहे, असे यात सांगितले आहे. यातील तुरीयातीत अर्थात अवधूत पुरुषाचे वर्णन असे—

अवधूत पुरुष दंड, कमंडलू, उपवीत, इ. बाह्योपाधींचा त्याग करतो. तो दिगंबररूपाने जगात हिंडत असतो. मुंडन, अभ्यंगस्नान, ऊर्ध्वपुंड्र, इ. गोष्टींचा त्याला विधि–निषेध नसतो. तो सर्व बंधनांच्या पलिकडे गेलेला असतो. त्याने वासना जिंकून षड्रिपूंचे दहन केलेले असते. तो आपले शरीर प्रेतवत मानतो. सर्व विश्वात आपणच भरून राहिलो आहो, अशी त्याची अनुभूती असते. बाह्यात्कारी तो वेडाखुळा दिसत असला, तरी तो परमज्ञानी असतो. [ सी. ग. देसाई ]

## तुरीयोपनिषद

एक नव्य उपनिषद. सुमारे पंचवीस वाक्यांचे हे अगदी छोटेसेच उपनिषद आहे. प्रणवाची महती व स्वरूप सांगणे, हा याचा प्रतिपाद्य विषय आहे. यात प्रणवाच्या विराट रूपाची कल्पना केलेली असून, त्याच्या सोळा मात्रा सांगितल्या आहेत. प्रणवाच्या विराट रूपाचे ६४ भेद मानलेले आहेत. हा प्रणव सगुण व निर्गुण असा उभयविध आहे. [ सी. ग. देसाई ]

## तुरुष्क

एका जमातीचे नाव. तुरुष्क हे तुर्क या शब्दाचे संस्कृत रूप असावे. भारतावर तुर्कांचे आक्रमण इ. स. च्या दहाव्या शतकाच्या उत्तरार्धात सुरू झाले; त्यानंतरच भारतीय वाङ्मयात तुर्कांचा उल्लेख येणे शक्य आहे. परंतु स्मिथच्या मते तुरुष्क हे अरबांना दिलेलेच एक नाव असावे. अरबांचा भारताशी फार प्राचीन काळापासून संबंध होता. भागवतात तुरुष्कांचा उल्लेख आहे. कथासरित्सागराच्या रत्नप्रभलंबकात तुरुष्कांचे राज्य मुरवारनामक राजाच्या नेतृत्वाखाली वितस्तेच्या म्हणजे झेलमच्या अलिकडे होते, अशी माहिती आली आहे. या ग्रंथात तुरुष्क आणि ताजिक अशी दोन नावे एकाच जमातीसाठी आलेली आहेत. ताजिक म्हणजे अरब. तेव्हा तुरुष्क हेही अरबांचेच नाव असण्याची शक्यता आहे. भारताचार्य वैद्यांच्या मते इ. स. ८०० नंतर अरबांच्या तर्फे जे तुर्क लोक भारतावर आक्रमण करण्यास आले, त्यांना आणि त्यानंतर स्थूलपणे सर्वच परकीयांना तुरुष्क हे नाव दिले गेले असावे. तुरुष्क वंशात एकूण चौदा राजे झाल्याचा उल्लेख भागवतात आहे. [ प्रा. म.; म. ज्ञा. को.; हिं. क. को. ]

**तुर्वश** ऋग्वेदकालीन पंचजनांपैकी एक जन. ही वैदिक आर्यांचीच एक पोटशाखा होती. तुर्वश जनांच्या राजालाही तुर्वश असेच म्हणत. हा जन पंजाबातील रावी व चिनाब या दोन नद्यांच्या दुआबातील सुपीक प्रदेशात वसला होता. ऋग्वेदात यांचा उल्लेख यदूंच्या जोडीने येतो. यदू आणि तुर्वश या दोन जनांची उत्तम मैत्री होती, असे दिसते. देवातिथी कण्व हा तुर्वशांचा पुरोहित होता. भरत आणि पुरू यांनी ज्याप्रमाणे अनार्य शत्रूंशी युद्ध करून त्यांचा पराजय केला, त्याचप्रमाणे यदु–तुर्वशांनीही तेच कार्य करून आपले नाव पंचजनांत दाखल करून घेतले.

तुर्वश हा इंद्र, अग्नी व अश्विनी या देवतांचा भक्त होता. इंद्राने तुर्वशाला अनेक प्रसंगांतून वाचवल्याचे उल्लेख ऋग्वेदात आहेत. पण पुढे मात्र तुर्वशाचे आणि इंद्राचे बिनसले, कारण तुर्वशाचे सृंजयाशी वितुष्ट येऊन त्या दोघांत लढाई जुंपली असता, इंद्राने सृंजयाचा पक्ष घेऊन तुर्वशाचा पराभव केला व त्याला सृंजयाच्या स्वाधीन केले (ऋ. ६.२७.७).

तुर्वश आणि भरत यांचेही वैमनस्यच होते. दिवोदास हा त्यावेळी भरतांचा राजा होता. एकदा त्या दोघांत लढाई जुंपली आणि त्याही वेळी इंद्राने दिवोदासाचा पक्ष घेऊन तुर्वशांचा पराभव केला (ऋ. ९. ६१. २). या घटनेमुळे तुर्वशांचे आणि भरतांचे कायमचे वैर निर्माण झाले. दाशराज्ञयुद्धात तुर्वश हा दिवोदासपुत्र सुदास याच्याविरुद्ध लढला आणि तिथेही पराभूत झाला (ऋ. ७. १८. ६).

भरतांनी साऱ्या सप्तसिंघू प्रदेशावर आपले स्वामित्व प्रस्थापित करण्याचा जो उद्योग केला, त्याला विरोध होता.

कालांतराने तुर्वश जन पांचालात विलीन झाले. वृचीवंत, वरशिख आणि पार्थव यांचा तुर्वशांशी निकटचा संबंध दिसतो. कदाचित हे लोक तुर्वशांपैकीच असावेत. [ऋ. द.; प्रा. च. को.]

**तुलसी** एक पूजनीय वनस्पती. हिचे झाड दोन तीन हात वाढते. काळी व पांढरी अशा हिच्या दोन जाती आहेत. तुळशीला उभ्या मंजिऱ्या येतात. या मंजिऱ्यांतच तुळशीची बारीक बारीक फुले असतात.

हिचे मूळ नाव तुळस असावे आणि तुलसी हे त्या नावाचे संस्कृतीकरण असावे, असें व्युत्पत्तिकोशात म्हटले आहे. नावाचे संस्कृतीकरण झाल्यावर तुलसी शब्दाच्या व्युत्पत्त्या देण्याचाही प्रयत्न झाला आहे. ब्रह्मवैवर्त पुराणातली व्युत्पत्ती अशी–

नरा नार्यश्च तां दृष्ट्वा तुलनां दातुमक्षमाः
तेन नाम्ना च तुलसीं तां वदन्ति पुराविदः ।।
(ब्र. वै. प्रकृतिखंड १५)

अर्थ – नरनारींनी त्या वनस्पतीला पाहिले आणि त्यांना तिची कोणत्याही वनस्पतीशी तुलना करता येईना. म्हणून पुरातत्त्ववेत्ते तुलसी या नावाने तिला संबोधू लागले.

तुलसीच्या पौराणिक व लोककथात्मक उत्पत्तिकथा पुढीलप्रमाणे आहेत –

(१) समुद्र–मंथनाच्या वेळी त्यातून जे अमृत निघाले, त्याचे काही थेंब जमिनीवर सांडले व त्यातून तुळस निघाली आणि पुढे ती ब्रह्मदेवाने विष्णूला दिली (स्कं. पु. २४८).

(२) धर्मध्वज नावाचा एक राजा होता. माधवी नावाची त्याची पत्नी होती. या दंपतीला एक मुलगी झाली. ती अप्रतिम सुंदर होती; म्हणून लोक तिला तुलसी म्हणू लागले. तिने बदरीवनात विष्णूच्या प्राप्तीसाठी तप केले. त्या वेळी तिला ब्रह्मदेव प्रसन्न झाला. ती ब्रह्मदेवाला म्हणाली–

'पूर्वजन्मी मी तुलसी नावाची गोपी असून, कृष्णाची प्रियसखी होते. एके दिवशी मी श्रीकृष्णाच्या सहवासाचे सुख भोगीत असता राधेने मला पाहिले व मत्सरग्रस्त होऊन शाप दिला, की 'तू मानवयोनीत जन्म घेशील.' कृष्णाला त्या शापाबद्दल वाईट वाटले. तो म्हणाला, की 'भिऊ नकोस. त्या मानवजन्मातही तुला माझी प्राप्ती होईल.'

तुलसीच्या तोंडून ही हकीगत ऐकल्यावर ब्रह्मदेव तिला म्हणाला. 'या मानवजन्मात तुला विष्णूची प्राप्ती होईल; पण त्याआधी तुला शंखचूड दैत्याची पत्नी व्हावी लागेल. तो दैत्यही पूर्वजन्मीचा एक गोपच असून, त्यालाही राधेच्या शापामुळेच दैत्यजन्म प्राप्त झाला आहे. पूर्वजन्मी त्याचे तुझ्यावर प्रेम होते. ते या जन्मी तू सफल कर.'

मग ब्रह्मदेवाने तुलसीला षोडशाक्षरी राधिकामंत्र उपदेशून त्याचे पुरश्चरण करण्यास सांगितले. तुलसीने तसे केले. मग एके दिवशी तिला शंखचूड भेटला. त्याने गांधर्वविधीने तुलसीचे पाणिग्रहण केले. दोघांनी बराच काल सुखाने संसारसुख उपभोगले.

पुढे तो दैत्य माजला. त्याने देवलोकावर स्वारी केली. देव पराजित झाले. त्यांनी शंकराकडे जाऊन आपले गाऱ्हाणे सांगितले. ते ऐकताच शंकर शंखचूडाचे पारिपत्य करायला निघाला. त्या दोघांचे तुंबळ युद्ध झाले. पण शंखचूड काही केल्या मरेना. कारण तुलसीच्या पातिव्रत्याच्या प्रभावाने तो अजिंक्य व अमर ठरला होता. मग विष्णूने कपट केले. तो शंखचूडाचे रूप घेऊन तुलसीकडे गेला. आपला पती विजय मिळवून परत आला, असे समजून तुलसी त्याच्याशी रममाण झाली. पण थोड्याच वेळात तिला कळले, की जवळ आहे तो आपला पती नव्हे. मग ती त्याला म्हणाली. 'माझ्या पतीचे रूप घेऊन

आलेला तू कोण आहेस ते मला सांग'. विष्णूने तिला आपले नाव सांगितले. त्यावर तुलसीने विष्णूला शाप दिला, की 'तू पाषाणरूप होशील.' त्यावर विष्णू तिला म्हणाला, 'तू माझ्या प्राप्तीसाठी तप केले होतेस, म्हणून मीं शंखचूडाच्या रूपाने तुझ्याशीं समागम केला. या पुढे तुला दिव्य देह मिळेल आणि तू मला लक्ष्मीइतकीच प्रिय होशील. तुझ्या या तडकलेल्या शरीरातून गंडकी नावाची नदी निर्माण होईल. तुझ्या केसातून एक झाड उगवेल. लोक त्यालाही तुलसीच म्हणतील व त्याची पूजा करतील. तू मला पाषाण होण्याचा शाप दिलास म्हणून मी गंडकीच्या तीरावरचा शालिग्राम नावाचा पाषाण होईन. त्या पाषाणाला लोक माझे प्रतीक म्हणून पूजतील व त्यावर तुलसीपत्र वाहतील. तुझा पती शंखचूड हा शंखाच्या रूपाने माझ्या पूजेत दाखल होईल.' त्या शंखातून माझ्यावर पाणी घातल्याने मी प्रसन्न होईन (दे. भा. ९; ब्र. वै. पु. प्रकृतिखंड).

(३) जलंधराची भार्या वृंदा हिच्या शरीरातून निघालेल्या घामातून तुळस उत्पन्न झाली.

(४) जलंधर दैत्याची वृंदा नावाची पत्नी होती. देवांचे जलंधराशी युद्ध चालू असता विष्णूने जलंधराचे रूप घेऊन तिचे पातिव्रत्य भ्रष्ट केले. ते समजताच तिने चिताप्रवेश केला. विष्णूला तरीही तिच्याविषयीचे प्रेम आवरता आले नाही. तो तिच्या चितेजवळच बसून राहिला. त्यामुळे देवांना काळजी उत्पन्न झाली. देवांनी महादेवाला यावर उपाय विचारला. महादेव म्हणाला, की 'तुम्ही महामायेला शरण जा.' देवांनी तसे केले, त्याच क्षणी महामाया प्रकट होऊन देवांना म्हणाली. 'तुम्ही पार्वती, लक्ष्मी आणि सरस्वती या तीन देवींना शरण जा.' देवांनी त्या तीन्ही देवींची स्तुती करताच त्या प्रकट होऊन म्हणाल्या. 'देवहो! आम्ही देतो ती तीन बीजे घ्या आणि वृंदेच्या चितेवर पेरा, म्हणजे तुमचा कार्यभाग होईल.' देवांनी तसे केले. त्या तीन बीजांपासून धात्री, मालती आणि तुलसी अशी तीन रोपे उगवली. तुलसी व धात्री यांनी विष्णूकडे प्रेमाने पाहिले, म्हणून त्या दोघी त्याला प्रिय झाल्या. मालतीने ईर्षेने पाहिले, म्हणून ती निंद्य ठरली. मग तुलसीचे रोपटे हे वृंदेचे प्रतीक मानून ते घेऊन विष्णू वैकुंठात गेला (पद्म पुराण व शिव पुराण).

(५) तुलसी ही एक ब्राह्मणकन्या होती. तिला ब्राह्मणाने आपल्या घरातून हाकलून दिले. मग ती विठोबाच्या आश्रयाला गेली. त्या दोघांचे एकमेकांवर प्रेम जडले. रुक्मिणीला ते आवडले नाही. तिने तुलसीचा घात करण्यासाठी कपट केले. तिने तुलसीच्या मनात विठोबाच्या प्रेमाविषयी शंका निर्माण केली. त्यामुळे त्या दोघांत दुरावा उत्पन्न झाला. पुढे ती शंका फिटली. तरीही तुलसीने विठोबाला जवळ केले नाही. ती सीतेप्रमाणे भूमीत गुप्त झाली. पुढे वनस्पतीच्या रूपाने तिने जन्म घेतला. मग विठोबाचे व तुलसीचे लग्न लागले.

**तुलसीमाहात्म्य**—तुलसीचे केवळ दर्शनही पापनाशक असून, तिची पूजा मोक्षदायक आहे. तुलसी ही वृंदावनात राहते. ती विष्णूला परमप्रिय आहे. तुलसीच्या दलाशिवाय विष्णूची पूजा केल्यास ती व्यर्थ ठरते. पद्म पुराणात म्हटले आहे—

मणिकाञ्चनपुष्पाणि तथा मुक्तामयानि च।
तुलसीदलपत्रस्य कलां नार्हन्ति षोडशीम्॥

अर्थ—सुवर्णाची, रत्नांची आणि मोत्यांचीही फुले असली (विष्णूला वाहिली) तरी त्यांना तुलसीपत्राच्या सोळाव्या कलेचीही सर येणार नाही.

तुलसीपत्र ठेवल्यावाचून किंवा तुलसीपत्राने प्रोक्षण केल्यावाचून विष्णू नैवेद्य भक्षण करीत नाही. कार्तिकमासात तुलसीदलांनी केलेल्या विष्णुपूजेचे माहात्म्य विशेष आहे. तुलसीचे दर्शन, स्पर्श, ध्यान, नमन, पूजन, रोपण व सेवन या गोष्टी युगायुगांची पातके नष्ट करतात. तुलसीच्या वनस्पतीत मुळापासून अग्रापर्यंत सर्व देवता वास्तव्य करीत असतात, असे सांगितले आहे.

तुलसीकाननं चैव गृहे यस्यावतिष्ठते।
तद् गृहं तीर्थभूतं हि नायान्ति यमकिङ्कराः॥

अर्थ—ज्या घरीं तुलसीचे बन आहे, ते घर तीर्थासारखे पवित्र होय. त्या घरात यमदूत येत नाहीत.

तुलसीचे बन ज्या ठिकाणी असते, त्याच्या परिसरातील कोसभर जमीन गंगेसारखी पवित्र बनते, असेही म्हटले आहे. तुलसीपत्र हातात घेऊन जो कोणी खोटी शपथ घेईल, तो यावच्चन्द्रदिवाकरौ नरकात जातो, असे सांगितले आहे. तुलसीचे पान खुडण्याविषयी पुढील निषेध सांगितले आहेत—वैधृती, व्यतिपातादी योग, मंगळ, शुक्र आणि रवी हे वार, विविध पर्वे, रात्र आणि उभयसंध्या या योगांवर तुलसी खुडू नयेत. तसेच तैलाभ्यंग केल्यावर, अशुची असताना, पारोशा वस्त्राने व आशौच कालात तुलसी खुडू नयेत. तसे केल्यास, विष्णूचे शिर तोडल्यासारखे होते. तुलसी खुडण्याच्या वेळी पुढील श्लोक म्हणून तिची प्रार्थना करण्यास सांगितले आहे—

तुलस्यमृतजन्मासि सदा त्वं केशवप्रिये।
केशवार्थे विचिन्वामि वरदा भव शोभने॥
(आह्निकसार)

अर्थ—हे तुलसी, तू अमृतापासून जन्मली आहेस. तू विष्णूला सर्वकाल प्रिय आहेस. मी विष्णूसाठी तुला खुडतो. हे शोभने, तू मला वर देणारी हो.

प्रत्येक हिंदूच्या अंगणात तुळस असायलाच हवी, असा संकेत

आहे. अंगणात सुशोभित चौथरा तयार करून त्यात तुळस लावतात, त्याला वृंदावन म्हणतात. सणावाराला तुळशीचे वृंदावन सारवून त्यावर आणि त्याच्या पुढे रांगोळ्या काढतात.



तुलसीवृंदावन

रोज सकाळी तुळशीला पाणी घालतात. चैत्र-वैशाखात तुळशीच्या मुळात गळती लावतात. तिन्हीसांजा तिच्यापुढे वात लावतात. तुळशीची पूजा व प्रदक्षिणा हा कित्येक स्त्रियांचा नेमधर्मच असतो. तुळशीचे संस्कृत स्तोत्र आहे. त्याचप्रमाणे स्त्रियांनी रचलेल्या कित्येक ओव्याही आहेत. त्यांपैकी काही ओव्या अशा–

**तुळशीला पाणी घाली । तुळस कोवळी**
**पुत्र मागते सावळी । उषाताई**
**तुळशी ग बाई । तुझा जन्म रानीं वनीं**
**बैस अंगणात । जागा देते वृंदावनीं**
**तुळशी ग माये । तुझ्या मंजुळ्या झळकती**
**तेथे कृष्णनाथ खेळती । सारीपाट**
**काशी काशी म्हणून । लोक जाती ग धावत**
**काशी माझ्या अंगणात । तुळसा देवी**
**तुळशी ग बाई । तुझी कातर कातर पाने**
**येता जाता गोविंदाने । विडा नेला**

स्त्रियांना तुळस ही सर्वश्रेष्ठ देवता किंवा त्याहूनही वात्सल्यमयी माता वाटते. स्त्रिया आपल्या आधि-व्याधी तुळशीपुढे मोकळ्या मनाने व्यक्त करतात आणि कौटुंबि कल्याणासाठी तिची आळवणीही करतात.

सांजसकाळ सर्वांनीच तुलसीदर्शन करावे, असे सांगि आहे. या तुलसीदर्शनाचा मंत्र असा–

**तुलसि श्रीसखि शुभे पापहारिणि पुण्यदे ।**
**नमस्ते नारदनुते नारायणमनःप्रिये ॥**

अर्थ – हे तुळसी, तू लक्ष्मीची मैत्रीण, शुभदा, पापहारि आणि पुण्यदा आहेस. नारद तुझी स्तुती करतो. तू नारायणा मनाला अत्यंत आवडतेस. तुला नमस्कार असोत.

विष्णूच्या, कृष्णाच्या किंवा पांडुरंगाच्या पूजेच्या वे तुळशीचा घवघवीत हार करून त्याच्या गळ्यात घालता वैष्णव लोक किंवा वारकरी तुळशीच्या काष्ठमण्यांची म तयार करून ती नेहमी आपल्या गळ्यात ठेवतात. या का माळेविषयी एक श्लोक प्रसिद्ध आहे, तो असा–

**तुलसीकाष्ठनिर्माणमालां गृह्णन्ति ये नराः ।**
**पदे पदेऽश्वमेधानां लभन्ते निश्चितं फलम् ॥**

(ब्र. वै. पु. प्रकृति

अर्थ – तुलसीच्या काष्ठांची बनवलेली माला जे धारण क तात, त्यांना पावलापावलाला अश्वमेधाचे फल निश्चित मि

वारकरी स्त्रिया पंढरीच्या वारीला जाताना डोक्याव पितळेचे तुळशीवृंदावन नेतात. मृत्यूसमयी माणसा मुखात, कपाळावर व दोन्ही कानांवर तुळशीपत्र ठेव तुळशीच्या मुळातील माती कपाळी लावण्याचीही पद्धत प्रवासाला निघताना तुळशीला उजवी घालून मार्गस्थ हो सर्व देवांच्या पूजेत तुलसीपत्र उक्त आहे; पण गणे मात्र ते निषिद्ध आहे. गणेशाने तुलसीला तसा शाप दि कथा ब्रह्मवैवर्त पुराणातल्या गणेशखंडात आली आहे.

**तुलसीचा वसा** – ओडिसा प्रदेशातील कुमारिका एक किंवा व्रत करतात, त्याला जन्हीओसा असे नाव आहे. म्हणजे वृंदावनातली तुळस होय. तिला वृंदावती असेही तात. या व्रतात कुमारिका आश्विन पौर्णिमेस उपास तुळसीची व तिच्या जवळच चंद्राची पूजा करतात. त्या त्या मुली चंद्राच्या सौंदर्याची गीते गातात. ओडिसात तुळ सगळ्या देवतांची प्रतिनिधी मानली जाते. कोणत्याही देव नावाने तुळशीच्या मुळात अर्पण केलेली वस्तू त्या त्या दे प्राप्त होते, अशी तिकडल्या लोकांची समजूत आहे.

वृंदावती ही देवता ओडिसात उग्र मानली ती लहानशा अपराधाचीही क्षमा करीत नाही. सक्तीने सगळ्या कुमारिकांना आपला वसा करायला ला तिच्या व्रतात जो कोणी विघ्न आणील, त्याला

कठोर शासन करते अशा अनेक कथा-कहाण्या तिकडे प्रचलित आहेत.

केरळातील नायरांच्या तरवाडात तुलसीवृंदावन हमखास असते. ते लोक तुळशीच्या फांदीवर पाणी ओतून ते हातात घेतात व प्राशन करतात. नायर पुरुष स्नानानंतर तुळशीची मंजिरी आपल्या उजव्या कानावर ठेवतो. बायका तसे करीत नाहीत. नायर लोकांच्या मते तुळस ही शिवाला प्रिय आहे.

**तुलसी उपनिषद्** एक नव्य उपनिषद. याचा ऋषी नारद, छंद अथर्वांगिरस, देवता अमृता तुलसी, शक्ती वसुधा व कीलक नारायण आहे. या उपनिषदाचा सारांश असा–

तुलसी ही श्यामवर्ण, ऋग्यजु:स्वरूप, अमृतोद्भव, विष्णुवल्लभा व जन्ममृत्यूंचा नाश करणारी आहे. तिच्या दर्शनाने पापनाश व सेवनाने रोगनाश होतो. तुलसीप्रदक्षिणेमुळे दारिद्रय नष्ट होते. तिच्या मुळात सर्व तीर्थे, मध्यात ब्रह्मा व अग्रभागी वेदशास्त्रे वास करतात. विष्णू तिच्या मुळाशी व लक्ष्मी तिच्या छायेत वास करते. यज्ञ, दान, जप, देवपूजा, श्राद्ध, इ. कृत्ये तुलसीदलावाचून केल्यास ती निष्फळ ठरतात.

या उपनिषदात तुलसीचा गायत्री मंत्र दिला आहे, तो असा–

श्रीतुलस्यै विद्महे । विष्णुप्रियायै धीमहि ।
तन्नो अमृता प्रचोदयात् ।।

या उपनिषदाची प्रस्तावना गद्यात असून, पुढचा भाग श्लोकबद्ध आहे. [ सी. ग. देसाई ]

**तुलसीकाष्ठमालाधारण** वैष्णवांचा एक विधी. तुळशीच्या मण्यांची माळ विष्णूच्या प्रसन्नतेसाठी भक्ताने गळयात घालावी, असे सांगितले आहे. या विधीला कार्तिक मास उक्त आहे. विष्णुभक्ताने प्रथम ती माळ भगवंताला निवेदन करून मग पुढील मंत्राने ती धारण करावी –

तुलसीकाष्ठसम्भूते माले कृष्णजनप्रिये ।
बिभर्मि त्वामहं कण्ठे कुरु मां कृष्णवल्लभम् ।।

अर्थ– हे माले, तू तुलसीकाष्ठाची बनलेली असून, वैष्णवांना प्रिय आहेस. मी तुला कंठी धारण करतो. मी कृष्णाला प्रिय होईन असे तू कर.

या मालाधारणविधीचे फल– कोटी कल्पपर्यंत स्वर्गवास व महापापाचा नाश. [ व्रतराज ]

**तुलसीदास** (१५३२ – १६२३ इ.स.) उत्तर भारतातील एक महान संत आणि हिंदी भाषेतील महाकवी. बांदा जिल्ह्यातील राजापूर या गावी एका ब्राह्मण कुळात दुबे घराण्यात भाद्रपद शु. एकादशीस याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव आत्माराम आणि मातेचे नाव हुलसी असे होते, अशी पारंपरिक माहिती आहे. याच्या जन्मकाळी मूळ नक्षत्र लागले होते व ते माता-पित्यांस अशुभ असल्यामुळे त्यांनी या



गोस्वामी तुलसीदास

बालकाचा त्याग केला, अशी आख्यायिका सांगतात. तुलसीदासांना बालपणीच माता-पित्यांचा वियोग घडला असावा, असे त्याच्याही काही उद्‌गारांवरून दिसते. लहान वयातच याला भटकण्याचा छंद जडला. या भ्रमंतीत तो भिक्षा मागून आपला निर्वाह करी. पुढे काशीत गेल्यावर तिथल्या एका मारुतीच्या मंदिरात त्याला आश्रय मिळाला व तिथल्या अन्नछत्रात त्याच्या निर्वाहाची सोय झाली.

काशीत असतानाच शेष सनातन नावाच्या एका महापंडिताशी याची गाठ पडली. त्या पंडिताकडेच तुलसीदासाने वेद–वेदांगे, दर्शने व पुराणे यांचे अध्ययन केले. त्यानंतर दीनबंधू पाठक यांच्या रत्नावली नामक रूपवती कन्येशी याचा विवाह झाला.

प्रारंभी तुलसीदास आपल्या पत्नीच्या रूपावर एवढा आसक्त होता, की त्याला एक क्षणभरही तिचा वियोग सहन होत नसे. त्याच्या या आत्यंतिक पत्नी–प्रेमाविषयी एक आख्यायिका प्रचलित आहे, ती अशी—

विवाहानंतर दीर्घकाळपर्यंत तुलसीदासाने रत्नावलीला माहेरी पाठविले नाही, म्हणून तिचा भाऊ एक दिवस तिला

न्यायला आला. पण तुलसीदास तिला पाठवायला तयार होईना. अखेरीस तो बाजारात गेला असताना रत्नावलीचा भाऊ तुलसीदासाच्या संमतीविनाच तिला घेऊन निघून गेला. घरी आल्यावर तुलसीदासाला ते समजले. तो तत्काळ सासुरवाडीला जायला निघाला. वाटेत होती यमुना नदी. पावसाळचाचे दिवस असल्यामुळे तिला पूर आलेला होता. रात्रीची वेळ असल्यामुळे नावाडीही निघून गेलेला होता. आता काय करावे, अशी त्याला चिंता उत्पन्न झाली. एवढचात नदीतून एक प्रेत वाहत येऊन ते कडेला लागले. अंधार असल्यामुळे तुलसीदासाला ते प्रेत म्हणजे लाकडाचा ओंडका वाटला. त्या प्रेताला कवटाळून तो यमुनेच्या पैलतीराला गेला. सासऱ्याच्या घराजवळ जातो, तो वाडचाचे दार बंद झाले होते. त्याच्या पत्नीची झोपण्याची खोली माडीवर होती आणि योगायोगाने त्या भागाच्या छपरावरून एक लांब साप खाली लोंबत होता. तुलसीदासाला अंधारात तो साप दोरासारखा वाटला. त्याला धरून तो वर चढला आणि छप्पर उलगडून पत्नीच्या खोलीत उतरला.

अशा अपरात्री आपला पती अकल्पितपणे तिथे आलेला पाहून रत्नावली स्तंभित झाली. तो कोणकोणत्या संकटांना कवटाळून आपल्यापर्यंत पोचला हे समजून तिला त्याच्याविषयी राग व तिरस्कार उत्पन्न झाला. पतीची आपल्याविषयीची आत्यंतिक आसक्ती तिला मुळीच आवडली नाही. त्यामुळे तिने त्याचे स्वागत करण्याऐवजी त्याची निर्भर्त्सनाच केली. तिचे ते निर्भर्त्सनेचे उद्‌गार कोणी तरी दोन दोह्यांत ग्रंथित केले आहेत, ते असे—

**लाज न लागत आपको, दौड़े आयहु साथ ।**
**धिक धिक ऐसे प्रेमको, कहा कहहुँ मैं नाथ ।।**
**अस्थिचर्ममय देह मम, ता में जैसी प्रीति ।**
**तैसी जो श्रीराम महँ होति न तौ भवभीति ।।**

अर्थ— हे नाथ, तुम्ही माझ्या मागोमाग धावत आलात, तुम्हांला लाज नाही का वाटत ? तुमच्या या असल्या प्रेमाचा धिक्कार असो ! काय म्हणू तुम्हांला ! माझ्या या अस्थिचर्ममय देहाच्या ठायी तुम्ही जेवढी प्रीती बाळगता, तेवढी जर श्रीरामाच्या ठायी बाळगली असती, तर तुमचे संसारभय नाहीसे झाले असते.

रत्नावलीच्या या उद्‌गारांनी तुलसीदासाला पश्चात्ताप झाला. त्याने लगेच संसार आणि विषयासक्ती या दोहोंचाही झडझडून त्याग केला. त्यानंतर तो रामचंद्राची आराधना करू लागला. पुढे त्याने चित्रकूट क्षेत्रात जाऊन कठोर तपही आचरले. नंतर नरहरिदास नामक एक साधू त्याला गुरू म्हणून भेटला. तुलसीदासाने त्या गुरूचा नामनिर्देश एका ठिकाणी सूचकतेने केला आहे, तो असा—

**बंदौ गुरुपदपंकज, कृपासिंधु नररूप हरि ।**
**महामोहतमपुंज, जासु बचन रविकरनिकर ।।**

अर्थ— जो नररूप धारण केलेला कृपासिंधू हरीच आहे आणि ज्याची रविकिरणांच्या समूहासारखी वचने महामोहाच्या अंधकार-राशीचा नाश करतात, त्या गुरूच्या पदकमळांना मी वंदन करतो.

अयोध्येपासून जवळच घाघरा व शरयू या नद्यांच्या संगमावर वाराहक्षेत्र नामक एक स्थान आहे. तिथे नरहरिदासाचे वास्तव्य होते.

चित्रकूट, अयोध्या आणि काशी ही तीन तुलसीदासाची वास्तव्यस्थाने होत. त्यांपैकी काशीत त्याचे वास्तव्य सर्वांत अधिक झाले. तिथे तो असी घाटावर राहत असे. सध्या त्या घाटाला तुलसी घाट असेच म्हणतात. काशीत त्याने स्थापिलेली रामपंचायतन व संकटमोचन हनुमंताची मूर्ती आजही दाखवतात.



वराहमंदिर – वाराहक्षेत्र

तात. तसेच त्याच्या निवासाच्या अन्य खुणाही तिथे पाहायला मिळतात. काशी येथेच तुलसीदासाला हनुमंताचे व श्रीरामाचे दर्शन घडले आणि काशीतच श्रावण कृष्ण तृतीया शके १५४५ या दिवशी त्याचे देहावसान झाले.

तुलसीदासाच्या संतपणाची ख्याती झाल्यानंतरही त्याला काशीमध्ये काही काळ कर्मठ पंडितांचा विरोध सहन करा

लागला. पण प्रसिद्ध कृष्णभक्त अब्दुर्रहीम खानखाना, महाराजा मानसिंग, मदैनीचा जमीनदार टोडर, संतचरित्रकार नाभाजी आणि आचार्य मधुसूदन सरस्वती अशा काही मोठ्या व्यक्ती मात्र तुलसीदासाविषयी स्नेह व आदर बाळगून होत्या. मधुसूदन सरस्वती यांनी तुलसीदासाचा गौरव करण्यासाठी एक श्लोक रचला आहे, तो असा—

आनन्दकानने कश्चिज्जङ्गमस्तुलसीतरः ।
कवितामञ्जरी यस्य रामभ्रमरभूषिता ।।

अर्थ – ज्याच्या कविता–मंजरीवर साक्षात श्रीराम भ्रमररूपाने रुंजी घालीत आहे, असा एक चालता तुलसी वृक्ष काशी क्षेत्रात वास्तव्य करून आहे.

तुलसीदासाने विपुल ग्रंथरचना केली आहे. रामचरितमानस, दोहावली, कवित्त रामायण, गीतावली व विनयपत्रिका हे पाच मोठे आणि रामललानहछू, पार्वतीमंगल, जानकीमंगल, बरवै रामायण, वैराग्य संदीपनी, कृष्णगीतावली व रामाज्ञा प्रश्नावली हे सात छोटे असे एकूण बारा ग्रंथ त्याने रचले आहेत. याशिवाय हनुमानबाहुक हाही त्याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. रामसतसई, कुंडलिया रामायण, संकावली, भरत–मिलन, इ. आणखी सत्तावीस ग्रंथ त्याच्या नावावर आहेत.

रामचरितमानस हा त्याचा सर्वश्रेष्ठ ग्रंथ होय. हा ग्रंथ केवळ हिंदी साहित्यालाच नव्हे, तर संपूर्ण भारतीय साहित्यालाच भूषणभूत ठरलेला आहे. अवधी भाषेत आणि प्रामुख्याने



नरहरिदासाची कुटी – वाराह क्षेत्र

चौपाई व दोहा या छंदांत हा ग्रंथ रचलेला आहे. या ग्रंथात रामकथा विस्ताराने आणि रसाळपणे सांगितलेली आहे. उ. भारतात हा ग्रंथ घरोघरी अत्यंत श्रद्धेने वाचला जातो. यात काव्य, भक्ती आणि तत्त्वज्ञान यांचा त्रिवेणी संगम झालेला आहे. जनमानसावर रामकथेचा शुभ संस्कार घडविण्यात या ग्रंथाचा फार मोठा वाटा आहे. नाभाजीने तुलसीदासाविषयी जे उद्‌गार काढले आहेत, ते रामचरितमानसाचा प्रभाव पाहता यथार्थ वाटतात. ते उद्‌गार असे—

संसार अपार के पार को सुगमरूप नौका लियो ।
कलिकुटिल जीव निस्तार–हित वाल्मीकि तुलसी भयो ।।

अर्थ— कलीने गांजलेल्या जीवांना या अपार संसारसागरातून तरून नेण्यासाठी ( रामभक्तीची ) सुगम नौका बरोबर घेऊन प्रत्यक्ष वाल्मीकीच तुलसीदासाच्या रूपाने अवतरला.

रामललानहछू या लघुग्रंथात त्याने रामाच्या विवाहप्रसंगाचे वर्णन लोकगीतांच्या धर्तीवर केले आहे. यात सोहर छंदातील १३ चतुष्पद्या आहेत. रामाज्ञा प्रश्नावली हा शकुनविषयक ग्रंथ रामकथेच्या सूत्रात गुंफलेला आहे. हे दोन्ही ग्रंथ तुलसीदासाच्या प्रारंभिक रचनेपैकी आहेत. जानकीमंगल आणि पार्वतीमंगल हे अनुक्रमे सीता आणि पार्वती यांच्या विवाहप्रसंगांवरील काव्यग्रंथ असून, ते सोहर छंदातच रचलेले आहेत.

गीतावली हा रामकथाविषयक ३२८ गीतांचा संग्रह आहे. ही गीते तुलसीदासाने व्रजयात्रेनंतर रचली असावीत. कारण यात प्रारंभी कृष्णलीलांच्या पद्धतीने रामाच्या बाललीलांचे व हिंडोला, होळी, इ. क्रीडांचे मधुर वर्णन आहे. सीतावियोगाने व्यथित झालेल्या रामाची व्यथा वर्णन करणारे त्यातील एक गीत असे—

आस्रम निरखि भूले द्रुम न फले न फूले ।
अलि खग मृग मानो कबहूँ न हे ।
मुनि न मुनिबधूटी उजरी परन कुटी ।
पंचवटी पहिचानी ठाढेइ रहे ।। १ ।।
उठी न सलील लिये प्रेम प्रमुदित हिये ।
प्रिया, न पुलकि प्रिय बचन कहे ।
पल्लव सालन हेरी प्राण बल्लभा न टेरी ।
बिरह बिथकि लखि लखन गहे ।। २ ।।
देखे रघुपति-गति बिबुध बिकल अति ।
तुलसी गहन बिनु दहन दहे ।
अनुज दियो भरोसो, तौलौं हैं सोचु खरोसो ।
सिय समाचार प्रभु जौलौं न लहे ।। ३ ।।

अर्थ— श्रीरामाने आश्रम पाहिला, तेव्हा आश्रमातील उदास वातावरण पाहून तो दिङ्मूढ झाला. झाडे जणू फळा-फुलांना आंचवली होती. भुंगे, पक्षी आणि हरणे आपले अस्तित्वच हरवून बसली होती. मुनी आणि मुनिभार्या यांच्याविना उजाड

बनलेली पंचवटीतील ती पर्णकुटी पाहून तो निःस्तब्ध झाला. प्रियवचन ऐकून आनंदित होणारी, प्रसन्न अंतःकरणाने पाणी आणण्यासाठी जाणारी आणि तरुवेलींचा फुलोरा पाहून वल्लभाला बोलावणारी प्रिया तिथे नव्हती. तसेच श्रांत आणि विरहव्यथित असा लक्ष्मण त्याने पाहिला, तेव्हा तो अत्यंत व्याकूळ झाला. तुलसी म्हणतो, अनुजावर विश्वास टाकला आणि अग्नीच्या अभावीही रघुपतीला घोर ताप सहन करावा लागला. जोपर्यंत प्रभूला सीतेचा समाचार मिळत नाही, तोपर्यंत चिंताच आहे.

तुलसीदासाने ही जशी रामगीतावली रचली आहे, तशीच कृष्णचरित्रात्मक कृष्णगीतावलीही रचली आहे. कृष्णगीतावलीत एकूण ६१ पदे आहेत. या गीतांवर सूरसागराचा प्रभाव आहे; परंतु इथेही सूरदासापेक्षा तुलसीदास वेगळा आणि संयत वाटतो. बरवै रामायण आणि दोहावली या दोन ग्रंथांची रचना तुलसीदासाने जीवनाच्या अखेरच्या कालखंडात केलेली असावी. या दोन ग्रंथांना त्यांचा कर्ता अखेरचे रूप देऊ शकला नसल्यामुळे त्याचे अनेक पाठ प्रचारात आहेत. कवितावली आणि हनुमानबाहुक या दोन काव्यग्रंथांत शरीरपीडेतून मुक्त होण्यासाठी केलेल्या काही प्रार्थना आहेत. तुलसीदासाच्या बाहूंना काही पीडा सुरू झाल्यामुळे त्याने तिच्या निरसनार्थ हनुमानबाहुकाची रचना केली, हे स्पष्ट आहे. तुलसीदासाचे चरित्र जाणून घेण्याच्या दृष्टीने या दोन ग्रंथांचे महत्त्व विशेष मानले जाते.

तुलसीदासाचा विनयपत्रिका हा ग्रंथ रामचरितमानसाच्या खालोखाल ख्याती पावलेला आहे. आत्मनिवेदनपर अशा सुमारे २५० भक्तिगीतांचा हा संग्रह व्रजभाषेत रचलेला आहे. रचना आणि विचारांची प्रौढता या दृष्टीने हा ग्रंथ रामचरितमानसाच्या तोडीचा बनला आहे. कथात्मक प्रबंधकाव्यांच्या क्षेत्रात जसे रामचरितमानस, तशीच भक्तिपर गीतिकाव्यांच्या क्षेत्रात विनयपत्रिका मानाचे स्थान पावली आहे. आत्मनिवेदनात्मक काव्य म्हणून विनयपत्रिकेचे माहात्म्य विश्वसाहित्यातही विशेष मानावे लागेल, असे काही विदेशी विद्वानांचेही मत आहे. या ग्रंथातील एक गीत असे–

**जाउँ कहाँ तजि चरन तुम्हारे।**
**काको नाम पतित-पावन जग,**
**केहि अति दीन पियारे ।। १।।**
**कौनें देव बराइ बिरद-हित,**
**हठि हठि अधम उधारे।**
**खग, मृग, व्याध, पषान, बिटप जड,**
**जवन कवन सुर तारे।। २।।**
**देव, दनुज, मुनि, नाग, मनुज, सब**
**माया-बिबस बिचारे।**
**तिनके हाथ दास तुलसी प्रभु,**
**कहा अपनपौ हारे ।। ३ ।।**

अर्थ– हे नाथ ! आपल्या चरणांना सोडून मी कुठे जाऊ? या विश्वात दुसऱ्या कुणाचे नाव पतितपावन असे आहे? दीन-दुःखी लोकांना प्रिय मानणारा आपल्यासारखा दुसरा कोण आहे? आजवर अन्य कोणत्या देवतेने आपले ब्रीद राखण्यासाठी मुद्दाम होऊन नीच जनांना निवडून निवडून त्यांचा उद्धार केला आहे? अन्य कोणत्या देवतेने पक्षी (जटायू), पशू (ऋक्ष, वानर, इ.), व्याध (वाल्मीकी), पापा[illegible] (अहल्या), जड वृक्ष (यमलार्जुन) आणि यवन (कालयवन) यांचा उद्धार केला आहे. सर्व देव, दानव, मुनी, नाग, मनुष्य हे मायेने बांधलेले आहेत. (जे स्वतः बद्ध आहेत, ते इतरांना मुक्त कसे काय करणार?) हे प्रभो, हा तुलसीदास स्वतःला त्यांच्या स्वाधीन करून काय करणार?

तुलसीदासाची प्रतिभा सर्वतोमुखी होती. त्याने त्याच्या काळात प्रचलित असलेल्या सर्व रचनापद्धतींत काव्यरचना केली; एवढेच नव्हे तर त्या सर्व पद्धतींवर त्याने असामान्य प्रभुत्व प्रस्थापित केले. व्रज आणि अवधी या दोन्ही भाषांवर त्याचा सारखाच अधिकार होता. व्रज भाषेचे जितके माधुर्य सूरसागरात आढळते, तितकेच माधुर्य तुलसीदासाच्या राम-कृष्ण-गीतावलींत आढळते आणि अवधीचे जे वैभव जायसीच्या पद्मावतात दिसून येते, तेच तुलसीदासाच्या जानकी-पार्वती-मंगलात अनुभवाला येते. त्याने विद्यापती आणि सूरदास यांच्याप्रमाणे सुंदर व मधुर अशा स्फुट गीतांचीही रचना केली आहे. तुलसीदासाचे आणखी एक वैशिष्ट्य असे, की त्याच्या ग्रंथसंभारात रचनानैपुण्य पुरेपूर असूनही शब्दचमत्कृतींचे प्रदर्शन मात्र यत्किंचितही नाही. प्रसाद हा त्याच्या कवितेचा अंगभूत गुण ठरला आहे.

तुलसीदास हा केवळ कवी नव्हता, तर तो मुख्यत्वे भक्त होता. आपल्या रामभक्तीच्या अभिव्यक्तीसाठीच त्याने ग्रंथरचना केली. त्याची रामभक्ती मानवतेच्या अतिविशाल अधिष्ठानावर उभी आहे. त्याचमुळे मानवतेच्या कल्याणासाठी त्यागमय जीवन जगणाऱ्या रामचंद्राचे मर्यादापुरुषोत्तम हे स्वरूप तुलसीदासाने आपल्या समाजापुढे प्रकर्षाने मांडले. लोकमंगलाची उत्कट भावना हा तुलसीदासाच्या जीवनाचा आणि वाणीचाही गाभा आहे. त्याच्यामुळेच जगातील सर्व भाषांत हिंदीला मानाचे स्थान लाभले आहे. पाहा– रामचरितमानस.
[गो. तु.; तु. उ. यु.; तुलसीदास; हिं. सा. इ.; हिं. वि. को.;]

**तुलसीलक्षपूजा** एक पूजाप्रधान काम्य व्रत. एक लक्ष तुलसीपत्रांनी विष्णूची पूजा करणे, हा या व्रतातला प्रमुख भाग आहे. मुख्यत्वे स्त्रियाच हे व्रत आचरतात. मात्र पुरुषांना त्याचा निषेध नाही. या पूजेत पहिल्या दिवशी जितकी तुलसीपत्रे पूजेसाठी घेतलेली असतील, तितकीच पुढे दर दिवशी घेऊन लक्ष संख्या पुरी करायची असते. ही तुलसीपत्रे किडकी, अस्वच्छ व फाटकी-तुटकी असू नयेत, असे सांगितले आहे. जितकी पत्रे रोज वहिली असतील, तितक्याच वातींनी देवाची आरती करणे, हा या व्रतातला विशेष आहे.

पौष व भाद्रपद हे दोन महिने वर्ज्य करून इतर कोणत्याही महिन्यात दिनशुद्धी पाहून या व्रताचा प्रारंभ करतात. याचा विधी असा –

देवघरातील जागा सारवून स्वच्छ करावी. व्रतकर्त्या स्त्रीने अथवा पुरुषाने स्नान करून धूत वस्त्र नेसावे. चार ब्राह्मणांच्या-करवी स्वस्तिवाचन करावे. नांदीश्राद्ध करून मग पूजेचा संकल्प करावा. नंतर पुढील मंत्राने व्रताचा नेम घ्यावा–

**गृहीतेऽस्मिन् व्रते देव पञ्चत्वं यदि मे भवेत् ।**
**तदा भवतु सम्पूर्णं त्वत्प्रसादाज्जगद्गुरो ॥**

अर्थ – या व्रताचा नेम स्वीकारल्यानंतर (ते पूर्ण होण्याच्या पूर्वी) माझा मृत्यू झाल्यास हे जगद्गुरो, तुझ्या प्रसादानें ते व्रत संपूर्ण ठरो.

नंतर शाळिग्रामाची षोडशोपचार पूजा करावी. विष्णु-सहस्रनामातील प्रत्येक नावाने तुलसीपत्र देवाला वाहावे. ज्या दिवशी लक्ष संख्या पुरी होईल, त्याच दिवशी व्रताचे उद्यापन करावे. त्यासाठी लक्ष्मीनारायणाची सुवर्णप्रतिमा करून तिची पूजा करावी. मग विष्णुसहस्रनामाच्या मंत्रांनी मध व लाह्या मिश्रित केलेल्या तिळांचे एक लक्ष हवन करावे व पूर्णाहुती करावी. नंतर प्रतिमेचे पुढील मंत्राने दान करावे –

**जलशायी ब्रह्मपिता पद्मगर्भः सनातनः ।**
**अनन्तभोगशयनः प्रीयतां मे जनार्दनः ॥**

अर्थ – जलात शयन करणारा, ब्रह्मदेवाचा पिता, ज्याच्या नाभीतून कमल उत्पन्न झाले आहे असा, सनातन व अनंत नागावर शयन करणारा, असा जनार्दन मजवर प्रसन्न होवो.

त्यानंतर यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालून व्रताची समाप्ती करतात. फल – सर्व पातकांचा नाश व मोक्षप्राप्ती. [ व्रतराज ]

**तुलसीलक्षप्रदक्षिणा** एक व्रत. याचा विधी असा– अंगणात किंवा उपवनात स्वच्छ जागी तुळस लावून तिच्या भोवती लहानसा ओटा बांधतात. तुळस वाढल्या-वर वैशाख, कार्तिक किंवा माघ या महिन्यात आणि विशेषतः चातुर्मास्यात तुळशीला लक्ष प्रदक्षिणा घालण्याचे व्रत स्वीकारतात. विशेषतः स्त्रियाच हे व्रत करतात. व्रताचा संकल्प केल्यावर तुळशीचे पुढील मंत्राने ध्यान करतात –

**ध्यायामि तुलसीं देवीं श्यामां कमललोचनाम् ।**
**प्रसन्नां पद्मकल्हारवराभयचतुर्भुजाम् ॥**
**किरीटहारकेयूरकुण्डलादिविभूषिताम् ।**
**धवलांशुकसंवीतां पद्मासननिषेदुषीम् ॥**

अर्थ – श्यामवर्ण, कमललोचन, प्रसन्न, चतुर्भुज, दोन हाती पद्म व कमल धारण करणारी, दोन हात वरद व अभय मुद्रेत ठेवणारी, किरीट, हार, केयूर, कुंडल, इ. अलंकारांनी शोभलेली, शुभ्रवस्त्र नेसलेली आणि पद्मासनावर बसलेली अशा तुलसी-देवीचे मी ध्यान करते.

मग तुलसीची षोडशोपचार पूजा करतात व तिला प्रदक्षिणा घालताना पुढील मंत्र म्हणतात –

**देवैस्त्वं निर्मिता पूर्वमर्चितासि मुनीश्वरैः ।**
**नमो नमस्ते तुलसि पापं हर हरिप्रिये ॥**

अर्थ – हे तुलसी, तू विष्णूला प्रिय आहेस. पूर्वी देवांनी तुला निर्मिले व मुनीश्वरांनी पूजिले. तू माझे पाप हरण कर. तुला नमस्कार असो.

रोज ठराविक संख्येने प्रदक्षिणा घालून लक्ष संख्या पुरी करतात. मग व्रताचे उद्यापन करतात. त्या वेळी विष्णु-लक्ष्मीसह तुळशीची पूजा करतात. वडे, खीर व फळे यांचा नैवेद्य दाखवतात. रात्रौ जागरण करून कथा-पुराण ऐकतात. दुसऱ्या दिवशी तीळ, तूप व खीर यांचे हवन करतात. आचार्याला गोप्रदानासह दक्षिणा देतात. यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालून व्रताची समाप्ती करतात. फल – सर्व पातकांचा नाश, सर्व कार्यांत सिद्धी व अंती मोक्षाची प्राप्ती. [ व्रतराज ]

**तुलसीविवाह** एक पूजोत्सव. विष्णूचा ( बाळकृष्णाच्या मूर्तीचा ) तुळशीशी विवाह लावणे, असा याचा विधी आहे. तुलसीविवाहाचे अनेक काल सांगितले आहेत. पण बहुधा तो कार्तिक शुद्ध एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत एखाद्या दिवशी करतात. त्यासाठी विवाहाच्या पूर्वदिवशी तुलसीवृंदा-वन सारवून सुशोभित करतात. वृंदावनात ऊस व झेंडूची पुष्पित झाडे उभी करतात. तुळशीच्या मुळात चिंचा व आवळे ठेवतात. हा विवाहसोहळा संध्याकाळी करतात.

श्रीविष्णू आषाढ शुद्ध एकादशीला शयन करतो व कार्तिक शुद्ध एकादशीला जागा होतो. विष्णूच्या या जागृतीचा जो उत्सव करतात, त्याला प्रबोधोत्सव असे नाव आहे. हा प्रबोधोत्सव आणि तुलसीविवाह हे दोन्ही उत्सव एकतंत्राने करण्याची रूढी

आहे. त्याचा धार्मिक विधी पुढीलप्रमाणे आहे –

कर्त्याने स्नान करून सोवळयाचे वस्त्र नेसावे. बाळकृष्णाच्या प्रतिमेसह तुळशीची पूजा स्नान या उपचारापर्यंत करावी. मग मंगलवाद्ये वाजवून बाळकृष्णाच्या मूर्तीला व तुळशीला तेल-हळद लावावी. दोघांनाही उष्णोदकाने मंगलस्नान घालावे. नंतर बाळकृष्णाला वस्त्र, यज्ञोपवीत, इ. उपचार व तुळशीला हळदकुंकू, मंगळसूत्र, इ. उपचार समर्पण करावेत. नंतर घंटादी वाद्यांचा गजर करून, 'यो जागारतमृचः कामयन्ते ।' इ. मंत्रांनी देवाला जागे करावे. त्यानंतर पुढील पौराणिक मंत्र म्हणावे–

**ब्रह्मेन्द्ररुद्राग्निकुबेरसूर्यसोमादिभिर्वन्दित वन्दनीय ।**
**बुध्यस्व देवेश जगन्निवास मन्त्रप्रभावेण सुखेन देव ।।**
**इयं तु द्वादशी देव प्रबोधार्थं विनिर्मिता ।**
**त्वयैव सर्वलोकानां हितार्थं शेषशायिना ।।**
**उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविन्द त्यज निद्रां जगत्पते ।**
**त्वयि सुप्ते जगन्नाथ जगत्सुप्तं भवेदिदम् ।।**
**उत्थिते चेष्टते सर्वमुत्तिष्ठोत्तिष्ठ माधव ।**
**गता मेघा वियच्चैव निर्मलं निर्मला दिशः ।**
**शारदानि च पुष्पाणि गृहाण मम केशव ।।**

अर्थ – हे जगन्निवासा, देवाधीशा, तू वंदनीय आहेस. ब्रह्मा, इंद्र, रुद्र, अग्नी, कुबेर, सूर्य, सोम, इ. देवांनी तू वंदित आहेस. हे देवा, तू या मंत्राच्या प्रभावाने सुखाने जागा हो. हे देवा, ही द्वादशी तिथी शेषशायी अशा तू, तुझ्या जागृतीसाठी आणि लोकांच्या हितासाठी उत्पन्न केली आहेस. हे जगत्पते, गोविंदा, ऊठ ऊठ. (आता) निद्रा सोडून दे. हे जगन्नाथा, तू झोपी गेलास, की हे सर्व जग झोपते. तू उठलास, की जगाचा व्यवहार चालू होतो. म्हणून हे माधवा, ऊठ, ऊठ. मेघ नष्ट झाले. आकाश निर्मळ झाले. दिशाही निर्मळ झाल्या. हे केशवा, मी अर्पिलेली शरद ऋतूतली पुष्पे तू ग्रहण कर.

अशा प्रकारे जागृतिमंत्र व श्लोक म्हटल्यावर बाळकृष्णाचे मुख तुळशीकडे वळवावे. देव व तुळस यांच्यामध्ये अंतरपाट धरून मंगलाष्टके म्हणावीत. मग तुळशीची फांदी देवाच्या अंगाला लावावी. देवाला तुळशीचे कन्यादान करावे. मग गोड पदार्थांचा नैवेद्य दाखवून आरती व मंत्रपुष्प करावे. आचार्याला यथाशक्ति दक्षिणा देऊन व्रताची सांगता करावी. या विवाह-विधीच्या वेळी तुळशीच्या भोवती दीपाराधना करावी.

काही ठिकाणी तुळशीचे कन्यादान केल्यावर यथाविधि विवाहहोम करण्याचाही प्रघात आहे.

कार्तिक शुद्ध द्वादशीस तुलसीविवाह झाल्यानंतर चातुर्मासात जी व्रते घेतलेली असतील, त्या सर्वांची समाप्ती करतात व चातुर्मास्यात जे पदार्थ वर्ज्य केले असतील, ते पदार्थ ब्राह्मणाला दान देऊन मग स्वतः सेवन करतात. [ नि. सिं.; व्रतराज]

**तुलसीव्रत** एक काम्य व्रत. हे व्रत कार्तिक शुद्ध नव... पासून एकादशीपर्यंत तीन दिवस करायचे अ... या तीन दिवसांत विष्णूची सुवर्ण–प्रतिमा व तुलसी यां... पूजा करायची असते. नवमीच्या दिवशी श्रीविष्णू व तुळ... यांचा विवाह करणे, हे या व्रताचे वैशिष्टय आहे. हा वि... केल्याने कर्त्याला कन्यादानाचे फल मिळते, असे सांगि... आहे. हे व्रत तुलसीवनात करणे हे विशेष पुण्यप्रद मानले आ... फल – सौभाग्य, संतती, संपत्ती, विद्या इ. गोष्टींची प्राप्ती... रोगनिवारण. या व्रताची कथा अशी –

कांची नगरीत कनक नावाचा एक क्षत्रिय होता. तो वै... वृत्तीने जगत असे. त्याला नवस–सायासांनी एक कन्या झा... तिचे नाव त्याने किशोरी असे ठेवले. एके दिवशी तिची प... पाहून एक ज्योतिषी त्याला म्हणाला, की 'या मुलीचे ल... ज्याच्याशी होईल, तो तरुण अंगावर वीज पडून मरेल.'... भविष्य ऐकून कनकाला फार दुःख झाले. किशोरीने कुं... राहूनच आपले सर्व आयुष्य ब्राह्मणसेवेत घालवावे, असे ... ठरविले.

पुढे एके दिवशी एक ब्राह्मणाने किशोरीला द्वादशा... विष्णुमंत्र उपदेशिला. रोज त्या मंत्राचा जप करावा, तुळ... वन लावून त्यांची जोपासना करावी आणि कार्तिक शु... नवमीला विष्णू आणि तुळशी यांचा विवाह लावावा, असे ... व्रतही त्याने तिला सांगितले. किशोरीने त्याप्रमाणे सर्व के...

दिवसेदिवस किशोरीच्या सौंदर्याच्या कळा वाढू लाग... एके दिवशी एका गंध्याची तिच्यावर नजर गेली. तो ति... सौंदर्याने वेडापिसा झाला. तिच्या प्राप्तीसाठी त्याने अ... उपाय केले, पण ते सर्व निष्फळ ठरले. शेवटी त्याला ए... माळीण भेटली. तिला त्याने आपली मनोव्यथा सांगितली. ... त्या दोघांनी मिळून एक कारस्थान रचले. माळिणीने गंध्या... स्त्रीवेष दिला. त्याला घेऊन ती किशोरीकडे आली आणि ति... म्हणाली. 'ही माझी मुलगी, कालच सासरहून आली ... ही विविध पुष्परचना करण्यात तरबेज आहे. हिला तू आप... कडे ठेवून घे म्हणजे ही तुझ्या देवासाठी नाना प्रकारचे पु... लंकार बनवून देईल.'

किशोरीला तिचे हे कपट उमगले नाही. तिने त्या स... वेषधारी गंध्याला आपल्या घरात ठेवून घेतले.

त्याच वेळी दुसरीकडे आणखी एक गोष्ट घडली. कां... नगरीच्या राजाला मुकुंद नावाचा एक मुलगा होता. तो ... पासक होता. एके दिवशी सहजगत्या किशोरी त्याच्या दृ...

पथात आली. तिच्या अप्रतिम लावण्याने तोही मोहित झाला. त्याने त्याच क्षणी ठरवले, की किशोरीला आपली पत्नी करायचे. पण सूर्याने स्वप्नात दृष्टान्त देऊन त्याला विरोध दर्शवला. 'किशोरीचे भविष्य वाईट आहे. तिला जो वरील तो वीज पडून मरेल. तेव्हा तू तिचा नाद सोड.' सूर्याने असा दृष्टान्त दिला तरीही मुकुंदाचा हट्ट कायमच राहिला. त्याने सूर्यदेवाला साकडेच घातले. तो म्हणाला. 'हे सूर्यदेवा, किशोरीचे वैधव्य टाळणे ही गोष्ट तुझ्यासारख्या सर्वसमर्थ देवाला अशक्य नाही. मी तुला निर्वाणीचे सांगतो, जर किशोरी मला लाभली नाही, तर मी प्रायोपवेशन करून मरून जाईन.'

त्यावर सूर्यदेवाचा निरुपाय झाला. त्याने किशोरीचा बाप कनक याला दृष्टान्त दिला, की 'तू राजपुत्राला आपली मुलगी दे.' कनकाला ही गोष्ट अकल्पित वाटली. दुसऱ्याच दिवशी राजाचा मंत्री कनकाकडे किशोरीला मागणी घालण्यासाठी आला. किशोरीचे भवितव्य माहीत असूनही कनकाला ती मागणी मान्य करणे भाग पडले. मग उभयपक्षी विचारविनिमय होऊन द्वादशी ही लग्नतिथी ठरली. सुमुहूर्ताच्या वेळी उभय पक्ष एकत्रित झाले. किशोरी अंत:पुरात विष्णू व तुलसी यांच्या चिंतनात निमग्न होती. राजपुरोहिताने सांगितले, की 'किशोरी आता राजाची सून होणार असल्यामुळे तिच्यावर अन्य कोण्या पुरुषाची नजर पडता कामा नये.' तदनुसार राजदूतांनी सर्व पुरुषांना किशोरीच्या घरातून बाहेर काढले. पण गंधी मात्र तिथून निघाला नाही. कारण तो स्त्रीवेषात होता. आपले सारे उपाय व्यर्थ ठरले आणि किशोरी आपल्या हातची गेली, हे समजून गंध्याच्या मनाचा चडफडाट झाला. त्याने ठरवले, की किशोरी लग्नमंडपात जाण्यापूर्वी एकदातरी तिचा हात धरायचाच. त्या दुष्ट हेतूने तो टपून बसला. एवढ्यात बाहेर वादळ झाले. मेघ गडगडले. विजाही चमकल्या. लोकांचे डोळे दिपले. ही संधी बरी आहे, असे पाहून गंधी झटकन पुढे झाला व त्याने किशोरीचा हात धरला. आणि काय आश्चर्य सांगावे! त्याचक्षणी गंध्याच्या डोक्यावर वीज पडली आणि तो तिथल्या तिथे मरून गेला.

अशा प्रकारे किशोरीचे अशुभ भविष्य खरे झाले. मग राजपुत्र मुकुंद व किशोरी यांचा विवाह थाटामाटाने पार पडला. तुलसीव्रताच्या प्रभावाने किशोरीचे वैधव्य टळले. [व्रतराज]

**तुलसीसाहेब** (१७६०–१८४२ इ. स.) एक निर्गुणोपासक संत आणि साहेबपंथाचा प्रवर्तक. याचे मूळ नाव श्यामराव असून, हा दुसऱ्या बाजीरावाचा थोरला भाऊ होता, अशी समजूत आहे; पण तिला इतिहासाचा आधार मिळत नाही. असे सांगतात, की हा बाराव्या वर्षीच विरक्त बनला आणि घर सोडून हाथरस-येथे जाऊन राहिला. आचार्य क्षितिमोहन सेन यांच्या मते हा प्रथम आवापंथात होता आणि नंतर संतमतात प्रविष्ट झाला.

घटरामायण, शब्दावली, रत्नसागर आणि पद्मसागर (अपूर्ण) हे चार ग्रंथ याने लिहिले. पिंडब्रह्मांडाची एकता, सृष्टिरहस्य, ज्ञान, योग, भक्ती, वैराग्य, कर्मवाद, सत्संगमहिमा इ. विषयांची चर्चा त्याच्या ग्रंथांत आहे.

याने कोणाही व्यक्तीला गुरू न करता, हृदयस्थ कंजगुरूलाच (हृदयकमलातील आत्मा) गुरू मानले आहे. याने संतमताला सांप्रदायिक अवडंबरापासून मुक्त करण्याचा प्रयत्न केला. त्याने हिंदू आणि मुसलमान यांच्या अनेक भ्रममूलक कल्पनांवर कठोर आघात केले आहेत.

एकदा एक ब्राह्मण गंगेत स्नान करीत असता शेजारी स्नान करणाऱ्या शूद्राला म्हणाला. 'दूर हो, तुझ्या स्पर्शाने मला विटाळ होईल!' त्या ब्राह्मणाचा हा उद्‌गार ऐकताच तुलसीसाहेब त्याला म्हणाला. 'अरे, तुझे शास्त्र चमत्कारिकच दिसते. विष्णूच्या चरणांपासून जिचा उगम झाला, ती गंगा जर पवित्र आहे, तर त्याच विष्णूच्या चरणांपासून उद्‌भवलेला शूद्र अपवित्र कसा ठरतो?'

तुलसीसाहेबाच्या विचारात प्रखरता आहे; परंतु भाषेत मात्र सहजता नाही. [हिं. सा. को.; मे. मि. इं.]

**तुला** (१) बारा राशींपैकी सातवी राशी. चित्रेचे दोन चरण, स्वाती व विशाखेचे तीन चरण मिळून तुला राशी बनते. तराजू हातात घेतलेला पुरुष असे या राशीचे रूप दाखवतात. ही राशी पुरुष, विषम, चर, वायुतत्त्वाची व अल्पप्रसव आहे. हिचा स्वामी शुक्र आहे. या राशीत शनी उच्च व रवी नीच असतो. या राशीचा अंमल कटी व मूत्राशय यांवर चालतो. या राशीची माणसे चंचल, गर्विष्ठ, बुद्धिमान, व्यासंगी व ललितकलांविषयी आवड बाळगणारी असतात.

(२) एखादा पदार्थ घेऊन त्याने स्वत:चे वजन तोलणे याला तुला करणे असे म्हणतात. पाहा – तुलापुरुषदान.

**तुलापुरुषकृच्छ्र** एक प्रायश्चित्त. हे आठ दिवसांचे असते. यात पहिल्या दिवशी पेंड, दुसऱ्या दिवशी भातावरची पेज, तिसऱ्या दिवशी ताक, चौथ्या दिवशी पाणी व पाचव्या दिवशी सातूचे पीठ सेवन करून, पुढचे तीन दिवस उपास करायचा असतो. प्रत्येक पदार्थ दोन, तीन किंवा चार दिवस खाऊन शवटी उपास करणे, असाही याचा दुसरा पर्याय आहे.

एवढे झाल्यावर प्रायश्चित्त करणाऱ्याने गवताच्या दोन आत्म-प्रतिमा करून त्या सोन्याचांदीच्या तराजूत वाळूच्या खड्यां-बरोबर तोलाव्या आणि नंतर उमा-महेश्वरांची पूजा करावी असे प्रायश्चित्तसार या ग्रंथात सांगितले आहे. [ हि. ध. ]

## तुलापुरुषदान

सोळा महादानांपैकी एक महादान. सोने, चांदी किंवा अन्य कोणताही पदार्थ घेऊन स्वतःची तुला करणे, असे या महादानाचे स्वरूप आहे. याचा विधी पुढीलप्रमाणे--

कर्ता प्रथम महादान नावाचा याग करतो. चतुष्कोण मंडप घालून त्याच्या मध्यभागी वेदी तयार करतो. चारही द्वारांवर तोरणे लावतो. मंडपाच्या पुढे ध्वज उभारतो. दोन खांब पुरून त्यांवर आडवी तुळई बसवतो. त्या तुळईला तराजू टांगतो. त्याला पुष्पमालांनी सुशोभित करतो. तराजूच्या मधल्या काट्यावर विष्णूची प्रतिमा बांधतो.

एवढी तयारी झाल्यावर स्नान करून यजमान शुभ्र वस्त्रे परिधान करतो. मग ऋत्विजांकरवी पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध, होम, इ. गोष्टी करतो. ऋत्विज देवतांच्या सूक्तांचे पठण कर-तात. मग यजमान ओंजळीत फुले घेऊन त्या तुलेला (तराजूला) तीन प्रदक्षिणा घालतो. पुष्पांजली वाहताना पुढील मंत्रांनी तो तुलेची प्रार्थना करतो--

**नमस्ते सर्वदेवानां शक्तिस्त्वं सत्यमाश्रिता ।**
**साक्षीभूता जगद्धात्री निर्मिता विश्वयोनिना ॥**
**एकतः सर्वसत्यानि तथा भूतशतानि च ।**
**धर्माधर्मकृतां मध्ये स्थापितासि जगद्धिते ॥**
**त्वं तुले सर्वभूतानां प्रमाणमिह कीर्तिता ।**
**मां तोलयन्ती संसाराद्धुद्धरस्व नमोऽस्तु ते ॥**

अर्थ-- हे तुलादेवी, तू सर्व देवांची शक्ती आहेस. तुला सत्याचा आश्रय आहे. तू खऱ्या-खोट्याची साक्षी व जगताचे धारण करणारी आहेस. तुला ब्रह्मदेवाने निर्मिले. एका बाजूने सर्व सत्य गोष्टी आणि दुसऱ्या बाजूने शेकडो भूते; एका बाजूने धर्म व दुसऱ्या बाजूने अधर्म या दोहोंच्या मध्ये हे जगताचे हित करणाऱ्या तुले, तुझी स्थापना झालेली आहे. हे तुले, तू या पृथ्वीवर सर्व भूतांना प्रमाण म्हणून वर्णित आहेस. तू मला तोल व या संसारातून माझा उद्धार कर. तुला नमस्कार असो.

प्रार्थनेनंतर पुष्पांजली अर्पण केल्यावर दाता आपल्या दोन हातांत सूर्य व यम यांच्या प्रतिमा घेऊन मुठी आवळतो व तुलेच्या एका पारड्यात बसतो. बसल्यावर मधल्या काट्या-वरच्या विष्णुप्रतिमेकडे तो आपली दृष्टी लावतो. मग दुसऱ्या पारड्यात सोने, रुपे, इ. तोलनीय वस्तू घालतात. त्या ... भाराने यजमानाच्या पारड्यापेक्षा वस्तूचे पारडे खाली ... लागते. मग यजमान गोदोहनाला जेवढा वेळ लागेल, ... वेळ पारड्यात बसतो व नंतर खाली उतरतो. ... अर्धे द्रव्य आचार्याला देतो व बाकीचे इतरांना वाटतो. ... ब्राह्मणभोजन घालून व दक्षिणा देऊन दानविधीची ... करतो. दानाचे फल-- रोगनाश व वैकुंठप्राप्ती.

सोन्याचांदीप्रमाणे तांबे, कांसे, लोखंड, शिसे, तूप, ... मध, इ. वस्तूंनीही तुलाभार करण्यास सांगितले आहे. ... भिन्न वस्तूंच्या तुलाभारांची फलेही भिन्न भिन्न असतात.

जन्मोजन्मी कृष्ण हाच पती मिळावा, म्हणून ... श्रीकृष्णाचा तुलाभार केला, अशी एक कथा आहे. ... काळात मोठमोठे राजेरजवाडे आपला तुलाभार करून ते ... ब्राह्मणांना वाटीत. कित्येक संस्थानांत राजवाड्यापुढे ...



तुलाभाराची दगडी कमान

भारासाठी उभ्या केलेल्या दगडी कमानी आजही ... शिवाजीमहाराजांना राज्याभिषेक झाल्यावर तदनुषंगिक ... धर्म झाला, त्यात शिवाजीमहाराजांची सुवर्णतुला ... आली होती. त्याचबरोबर क्लेशनिवारणार्थ चांदी, ... इतर अनेक खाद्यपदार्थ यांनीही महाराजांचा तुलाभार ... आला होता.

कित्येक लोक इष्ट कामना सिद्ध व्हावी, म्हणूनही ... भाराचा नवस करतात. काही लोक व्यवसायात ... यशाची कृतार्थता म्हणूनही स्वतःचा तुलाभार करून ...

तुलाभार करण्याची कल्पना चालू काळातही प्रचलित आहे. [ श. क.; दा. चं; दानसागर ]

**तुपार** एक प्राचीन राजवंश. पुराणांत या वंशाविषयी अनेक उल्लेख आढळतात. या वंशात एकूण चौदा राजे झाले आणि त्यांनी १०५ वर्षे राज्य केले, असे मत्स्य पुराणात म्हटले आहे. वायू पुराणात त्यांचा राज्यकाल ५०० वर्षांचा दिला आहे. पुराणांच्या मते तुपार हे आर्येतर होते, असे दिसते. कारण त्यांचा उल्लेख शक, बर्बर, पल्लव या लोकांबरोबर केलेला आहे. अभ्यासकांच्या मते हे इतिहासप्रसिद्ध युएची जमातीपैकी असून, यांचे मूलस्थान पामीर आणि बडाखस्तान यांच्यामधल्या ऑक्सस पट्टयात होते. भारतात यांचे राज्य वायव्य भागात होते. त्यांच्या सत्तेमुळे त्या भागाला तुपार देश असेच नाव पडले होते. काश्मीरच्या इतिहासातही तुपाराचा संबंध येतो. काही विद्वानांच्या मते हे शक वंशाचीच एक शाखा असून, याच शाखेत कनिष्कादी सम्राट होते. [ शृंगारहाट; ट्रा.ए.इं; ओ. नि. सं.; पुराणम, जाने. १९६३ ]

**तुपित** देवांचा एक गण. यांची संख्या बारा असून हे ऋतू व तुपिता यांचे पुत्र आहेत. यांची नावे पुढीलप्रमाणे—

**तोषः प्रतोषः सन्तोषो भद्रः शान्तिरिडस्पतिः ।**
**इध्मः कविर्विभुः स्वह्नः सुदेवो रोचनो द्विषट् ।**

( भाग. पु. ४.१.७ )

अर्थ – तोप, प्रतोप, संतोष, भद्र, शांती, इडस्पती, इध्म, कवी, विभू, स्वह्न, सुदेव आणि रोचन असे हे तुषित देव होत. हेच तुपित देव पुढे वैवस्वत मन्वंतरात बारा आदित्य म्हणून प्रसिद्धी पावले.

**तुपुव्रत** एक स्त्रीव्रत. हे व्रत प. बंगालमधील कुमारी आणि नवविवाहित मुली करतात. याला तुस, तुसली व तोपला अशीही नावे आहेत. आपल्या कुटुंबात आणि देशात सुखसमृद्धी निर्माण व्हावी व अन्नधान्य विपुल पिकावे, या उद्देशाने हे व्रत करायचे असते. मार्गशीर्षातील अमावास्येच्या दिवशी या व्रताचा प्रारंभ होतो आणि पुढे ते पौष महिनाभर चालते.

मुली सामुदायिक रीत्या हे व्रत आचरतात. प्रथम त्या आपल्यापैकी एका मुलीच्या घरी जमतात. मग एका मातीच्या परातीत एक पान ठेवून त्यावर शेणाचे बारा गोळे ठेवतात आणि त्यांना रंग देतात. किंवा जितक्या मुली एकत्र पूजा करणार असतील, तितकी बोळकी पाण्याने भरून परातीत ठेवतात. मग ती परात एका चौरंगावर मांडून बोळक्यांसह तिची पूजा करतात. हिला तुषुलक्ष्मी किंवा तोषला लक्ष्मी किंवा तोषला राधा असे म्हणतात. तुषुलक्ष्मीची पूजा करण्याआधी एका मोडक्या सुपात अलक्ष्मीची पूजा करतात.

सायंकाळच्या वेळी व्रत करणाऱ्या मुली एकत्र जमून तुषुलक्ष्मीची गीते गातात. या गीतात तिला समृद्धीची देवता म्हटले असून, ती अत्यंत सुंदर, सुदृढ, उंची वस्त्र नेसलेली, उन्नत वक्षःस्थल असलेली आणि डोक्यावर छत्र व हाती शंखपद्म धरणारी असल्याचे वर्णन आहे. तुषुलक्ष्मी तांदूळ सडते आणि हळद दळते, अशी बंगालमधील स्त्रियांची समजूत आहे.

व्रतकाळात मुली सकाळीच उठून भाताच्या शेतात जातात. या वेळी शेते भराला आलेली असतात. मुली शेतांच्या बांधावरून नाचत बागडत हिंडतात आणि त्याही वेळी देवीची गाणी म्हणतात. त्यांपैकी एक गाणे असे –

**कोदाल काटा धान पाबो**
**गोहाल आलो गोरू पाबो**
**दरबार आलो बेटा पाबो**
**सभा आलो जमाई पाबो**
**आडिमापा सिंदूर पाबो**
**घर कोरबो नगरे**
**मरबो गिये सागरे**
**तोमार काछे मांगे एई बर**

अर्थ–(हे तुषुलक्ष्मी,) आम्हांला फावड्याने ढकलता येईल इतके धान्य दे. गोठा सुशोभित करणारी गाय दे. दरबारात चमकणारा मुलगा दे. सभापंडित जावई दे आणि सिंदुराच्या राशी (सौभाग्य) दे. तसेच आमचे घर नगरात असावे आणि आम्हांला गंगा-सागर-संगमावर मरण यावे. एवढाच वर आम्ही तुझ्याकडे मागतो.

या व्रताच्या काळात मासे आणि तांदुळाची कांजी हे पदार्थ खायचे असतात. [ श्री. सुधीर करण – इं. फो. लो. ]

**तुळजापूर** एक क्षेत्र. हे क्षेत्र महाराष्ट्र राज्यातील उस्मानाबाद (धाराशिव) जिल्ह्यात बालाघाट डोंगराच्या एका पठारावर वसले आहे. महाराष्ट्रातील देवीच्या औट पीठांपैकी हे एक पीठ आहे. तुळजापूर येथील तुरजादेवीविषयीची एक पुराणकथा अशी––

कृतयुगामध्ये दंडकारण्याच्या तपोभूमीत कर्दम नावाचा एक ऋषी राहत होता. त्याच्या पत्नीचे नाव अनुभूती असे होते. पतीच्या मृत्यूनंतर ती सहगमनाला निघाली. पण त्या वेळी ती गर्भवती असल्यामुळे लोकांनी तिला सहगमन करू दिले नाही.

पुढे तिला मुलगा झाला. तो मोठा झाल्यावर त्याला गुरुगृही पोचवून ती तपश्चर्येसाठी मेरू पर्वतावर गेली. तिथे तिने स्वतःला उलटे टांगून घेऊन अग्निसाधन केले. या तपाच्या तेजाने ती अत्यंत तेजस्वी बनली आणि तिचे रूपही अधिकच सुंदर दिसू लागले.

एके दिवशी कुकुर नावाचा एक दैत्य शिकारीसाठी त्या पर्वतावर आला असता ती त्याच्या नजरेस पडली व तो दैत्य तिच्या रूपावर मोहित झाला. त्याने तिच्या शरीराला आसक्तीने स्पर्श केला असता तिची समाधी भंग पावली. त्या दैत्याला पाहून ती भयभीत झाली. तिने मग आपल्या मदतीसाठी आदिशक्तीचा धावा केला. त्या क्षणी आदिशक्ती पार्वती तिथे प्रगट झाली. तिने अष्टभुज तुरजादेवीचे रूप धारण करून त्या कुकुर दैत्याला ठार केले. अनुभूतीने मग त्या देवीची प्रार्थना केली– हे तुरजे देवी, माझे संकट जसे तू त्वरित दूर केलेस, तशीच अनेक भक्तांची संकटे निवारण्यासाठी तू याच रूपाने इथे राहा.'

देवीने अनुभूतीची ती प्रार्थना मान्य केली आणि तिथल्या गिरिदरीत आपल्या भैरवगणांसह वास्तव्य केले. तिने जिथे ठाण मांडले तेच आजचे तुळजापूर क्षेत्र होय.

इथल्या मुख्य मंदिरात जाण्यासाठी सुमारे ९० पायऱ्या दोन टप्प्यांनी उतराव्या लागतात. पहिल्या टप्प्याच्या डाव्या हाताला कल्लोळतीर्थ आहे. सर्व तीर्थांनी इथे एकदम कल्लोळ केला म्हणून याचे नाव कल्लोळतीर्थ पडले, असे सांगतात. या तीर्थाचा आकार ४०×१६ फूट असून त्याची बांधणी भक्कम आहे. उजव्या हाताला गोमुखतीर्थ लागते. गोमुखतीर्थात पाच-सहा फूट उंचीवरून एका गोमुखातून एक जलधारा सतत वर्षत असते. या तीर्थाचा उगम वरच्या बाजूला असलेल्या मंकावतींच्या तळ्यात आहे. क्षेत्रस्थांची अशी समजूत आहे, की हा साक्षात गंगेचा प्रवाह आहे.

गोमुखतीर्थाजवळ गणेशतीर्थ, अमृतकुंड, इ. तीर्थे आणि सिद्धिविनायक, विठ्ठल, दत्तात्रेय, इ. देवतांची मंदिरे आहेत. दुसऱ्या टप्प्याच्या बऱ्याच पायऱ्या उतरून गेल्यावर भवानीच्या मुख्य मंदिराचा प्राकार दिसू लागतो.

या मंदिराभोवती भव्य प्रांगण असून, बाजूला प्रशस्त ओवऱ्या आहेत. प्रांगणात एक मोठे होमकुंड आहे. या होमकुंडासमोर दोन दीपमाळा आहेत. त्या दीपमाळा शिवाजीमहाराजांनी बांधल्या, असे सांगतात.

मुख्य सभामंडप व मंदिराचा गाभारा हेमाडपंती शैलीचा आहे. या गाभाऱ्याभोवतीचे बांधकाम २०० वर्षांपूर्वीचे आहे. या मंदिरावर हत्ती, घोडे, मोर, इ. पशूंच्या व यक्ष, गंधर्व, किन्नर, इ. अतिमानवी देवतांच्या मूर्ती आहेत. मंदिराचे शिखर बीड येथील श्री. ठिगळे यांनी सुमारे १०० वर्षांपूर्वी चढविले आहे. मुख्य गाभाऱ्यात अष्टभुजा भवानीची मूर्ती आहे.

या मूर्तीची दररोज चार वेळा पूजा होते. वर्षातून तीन वेळा देवीची निद्रा असते. भाद्रपद कृष्ण अष्टमी ते अमावास्या हा पहिला, आश्विन शुद्ध एकादशी ते पौर्णिमा हा दुसरा आणि पौष शुद्ध प्रतिपदा ते अष्टमी हा तिसरा निद्राकाल होय. या निद्राकालाशिवाय इतर सर्व काली देवी अहोरात्र जागृत असते, असे म्हणतात. गुढीपाडवा, शिराळषष्टी, ललितापंचमी, बलिप्रतिपदा, मकरसंक्रांत आणि रथसप्तमी या दिवशी तिची महापूजा करतात.

देवीच्या सर्व उत्सवांत नवरात्राचा उत्सव मोठा असतो. त्या नऊ दिवसांत नित्य महापूजा होते. प्रत्येक रात्री वाहन बदलून देवीचा छबिना काढतात. आश्विन शुद्ध अष्टमी–नवमीला चंडीहोम होतो. या दिवशी बलिदानाचा कार्यक्रम असतो. रात्री पलंगाची व पालखीची मिरवणूक काढतात. ही पालखी दसऱ्याच्या दिवशी पहाटे देवीपुढे आणतात. त्या वेळी एक मानकरी तेली आपली करंगळी कापून देवीला रक्ताचा टिळा लावतो. मग देवी पालखीतून शिलंगणाला जाते. सीमोल्लंघनाहून परत आल्यावर देवी शयन करते. कोजागरीस ती पुनश्च जागृत होते.

या मंदिराच्या दक्षिणाभिमुख पितळी दरवाजावर एक लेख कोरलेला असून, त्यात जगदेव परमाराने केलेल्या आत्मसमर्पणाची माहिती दिली आहे.

भवानीच्या समोरच भवानीशंकराचे लहानसे मंदिर आहे. मंदिराच्या मध्यभागी देवीसन्मुख स्फटिकाचा सिंह आहे. हेच त्या देवीचे वाहन होय. देवीपुढे मोठा सभामंडप असून, तिथे गोंधळ, जागरण, इ. कार्यक्रम होतात.

इथल्या परिसरात आधारवाडी म्हणून एक वाडी आहे. इथे भारतीबुवांचा एक मठ आहे. देवी नेहमी या मठात भारतीबुवांबरोबर सारीपाट खेळायला जाते व पूजेच्या वेळी हाक मारल्यावर सकाळ–संध्याकाळ मुख्य मंदिरात येते, अशी आख्यायिका सांगतात.

तुळजापूरच्या दक्षिणेस एक प्रचंड शिळा आहे. तिला घाटशिळा म्हणतात. सीतेचे रूप घेऊन आलेली पार्वती याच शिळेवर बसून रामाशी बोलली व तिनेच रामाला लंकेचा मार्ग दाखवला, असे सांगतात. हिचे मंदिर रामदरीत आहे. तिथून पूर्वेकडे थोड्या अंतरावर एक प्रचंड स्नानकुंड आहे. त्याला मंकावती तीर्थ म्हणतात. या तीर्थात देवी दर प्रदोषकाळी जलविहारासाठी येते, अशी समजूत आहे. याशिवाय अमृतकुंड

सूर्यकुंड, चक्रतीर्थ, इ. अनेक तीर्थे या क्षेत्राच्या परिसरात आहेत. पाहा– तुळजाभवानी. [ म. चा. दै.; ज. भ. ]

**तुळजाभवानी** महाराष्ट्रात लोकप्रिय असलेले देवी भवानीचे एक रूप. हिला त्वरिता, त्वरजा, तुरजा, तुकाई अशी आणखीही काही नावे आहेत. त्वरजा किंवा तुरजा या संस्कृत नावापासून तुळजा हे नाव बनले असावे अथवा याउलट तुळजा या देश्यनावाचे संस्कृतीकरण झाले असावे. तुकाई हे नाव तुक्क म्हणजे शुक्र या द्रविड शब्दापासून बनलेले दिसते. शुक्रवार हा देवीच्या उपासनेतला महत्त्वाचा वार आहे. 'शुक्रवारची देवी' या अर्थाने तुकाई हा शब्द साधलेला दिसतो.

तुळजाभवानीचे मुख्य स्थान महाराष्ट्रातल्या उस्मानाबाद (धाराशिव) जिल्ह्यातील तुळजापूर या गावी आहे. तिथल्या मंदिरातील तुळजाभवानी मूर्तीचे ध्यान आहे ते असे – देवीची सुमारे तीन फूट उंचीची प्रभावळीसह पण सुटी अशी काळ्या पाषाणाची मूर्ती उंच सिंहासनावर उभी आहे. मस्तकीच्या मुकुटावर सयोनिलिंग असून, मुकुटाखालून केसांच्या बटा बाहेर आलेल्या आहेत. ही अष्टभुजा असून, हिच्या हातांत उजव्या खालच्या हातापासून बिचवा, बाण, चक्र, शंख, धनुष्य,



भवानीची स्वयंभू मूर्ती – तुळजापूर

पानपात्र व राक्षसाची शेंडी या वस्तू आहेत. पाठीवर बाणांचा भाता आहे. हिच्या मुखाच्या उजव्या–डाव्या अंगांना चंद्र–सूर्य आहेत. उजवा पाय महिषासुरावर असून, त्याच्या उजवीकडे सिंह आणि त्याखाली मार्कंडेय ऋषी आहे. डावा पाय जमिनीवर



तुळजाभवानीमंदिर – खाटमांडू

असून. दोन पायांमध्ये तुटलेले महिषमस्तक आहे. या मूर्तीचे सौष्ठव पाहता, ती सतराव्या–अठराव्या शतकातील असावी, असे श्री. ग. ह. खरे यांचे मत आहे.

भारतात महिषमर्दिनी अष्टभुजेची उपासना प्राचीन असली, तरी तुळजाभवानी या नावाने महाराष्ट्रात तिची उपासना नेमकी केव्हा सुरू झाली, ते निश्चयाने सांगता येत नाही. इ. स. च्या अकराव्या शतकात परमार उपनावाचे एक राजघराणे कर्नाटकातून मिथिलेत गेले. त्या घराण्यातील हरिसिंहदेव नामक राजाने इ. स. १३२४ मध्ये आपली कुलदेवता म्हणून तुळजाभवानीची मंदिरे उभारली अशी माहिती मिळते. भाटगाव आणि खाटमांडू या ठिकाणी तुळजाभवानीची मंदिरे आहेत. हा इतिहास पाहता तुळजाभवानीची प्राचीनता इ. स. च्या अकराव्या शतकाच्याही मागे जाते आणि तिची उपासना महाराष्ट्रातल्याप्रमाणे कर्नाटकातील घराण्यांतही प्रचलित असल्याचे दिसते. गुरुचरित्र, शिवभारत, इ. ग्रंथांत आणि ऐतिहासिक कागदपत्रांत तुळजाभवानीचे आणि तुळजापूरचे उल्लेख आढळतात, पण ते इ. स. १३०० नंतरचे आहेत.

रावणाचे पारिपत्य करण्यासाठी निघालेल्या रामाला हिने विजयाचा वर दिला, म्हणून हिला रामवरदायिनी असे नाव पडले, अशी कथा एकनाथांनी भावार्थरामायणात दिलेली आहे. शिवाजीमहाराजांचे विरोधक असलेले जावळीचे मोरे यांची ही कुलदेवता होती. मोऱ्यांच्या उपासनेतील रामवरदायिनीचे स्थान प्रतापगडाच्या पायथ्याशी असलेल्या पार गावी आहे. मोऱ्यांचा बीमोड केल्यावर शिवाजीमहाराजांनी प्रतापगडावर या देवीची स्थापना केली. अफझलखानाच्या वधानंतर त्यांनी देवीचे मंदिर बांधले आणि नेपाळातून गंडकी शिळेची मूर्ती आणवून तिची नव्याने प्रतिष्ठापना केली. पुण्याजवळ सिंहगडाच्या पायथ्याशी कोंढणपूर येथेही तुकाईचे एक मंदिर आहे.

तुळजाभवानी ही जशी शिवाजीमहाराजांची कुलदेवता होती, तशीच ती समर्थ रामदासांचीही होती. रामदासांनी तुळजाभवानीची अनेक स्तोत्रे रचलेली आहेत. प्रतापगडावरील देवीची स्थापना त्यांच्याच हस्ते झाली, असे म्हणतात. रामदासांनी रचलेल्या एका स्तोत्रातील काही पंक्ती अशा–

**श्रेष्ठांचा नौस जो होता । तो मी फेडी नसें म्हणे ।**
**पुण्य देउनि उतराई । ऐसें हे कल्पिलें मनीं ॥**
**तुळजापूर ठाकेना । चालिली पश्चिमेकडे ।**
**पारघाटीं जगन्माता । सद्य येउनी राहिली ॥**
**ऐसें हें ऐकलें होतें । हेत तेथेंचि पावला ।**
**पुष्पाची कल्पना होती । तेथें पुष्पची दिधलें ॥......**
**येकचि मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।**
**तुझा तूं वाढवी राजा । सीघ्र आह्मांचि देखतां ॥**
**दुष्ट संहारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों ।**
**परंतु रोकडे कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवी ॥**
**देवांचीं राहिलीं सत्त्वें । तूं सत्त्व पाहसी किती ।**
**भक्तांसी वाढवी वेगीं । इच्छा पूर्ण परोपरी ॥**
**रामदास म्हणे माझें । सर्व आतुर बोलणें ।**
**क्षमावे तुळजे माते । इच्छा पूर्णचि ते करी ॥**

शिवाजीमहाराज व रामदास यांनी उपासलेली ही देवी महाराष्ट्रातील हजारो घराण्यांची कुलदेवता आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनात एक प्रेरक शक्ती म्हणूनही तिचा महिमा गाजत आहे. [ म. चा. दे.; श्री. रा. चिं. ढेरे–इंद्रायणी, नोव्हेंबर १९६२; रा. क. १ ]

## तुळशीदास

( इ. स. चे अठरावे शतक ) एक मराठी शाहीर. तानाजीने कोंडाण्यावर गाजविलेल्या पराक्रमासंबंधी याने पंचावन्न चौकांचा एक पोवाडा रचलेला आहे. हा शिवाजी महाराजांच्या काळातला असून, पुण्यास मंडईच्या बाजारात राहत असे, अशी पारंपारिक माहिती आहे. आपणास पंतोजीकाकाने (दादाजी कोंडदेव) पुण्याहून बोलावून घेतले, आपण पोवाडा रचला आणि त्याबद्दल एक हजार रुपयांचा सोन्याचा तोडा आपल्याला बक्षीस मिळाला, असे त्याने पोवाडयाच्या शेवटी म्हटले आहे. परंतु हा शिवकालीन नसून पेशवेकालीन आहे, असा निवाडा म. म. पोतदारांनी पोवाडयाचे अंतरंग तपासून दिला आहे.

'शूर मर्दाचा पोवाडा । शूर मर्दाने ऐकावा ॥' हे सुप्रसिद्ध वचन शाहीर तुळशीदासाचेच आहे. त्याच्या या पोवाड्यातील काही पंक्ती अशा–

**आम्ही जातो सिंहगडाला ।**
**आमचा रायबा संभाळा ॥**
**जर आलो सिंहगडाहून ।**
**लगीन करीन रायबाचे ॥**
**जर गेलों तिकडे मेलों ।**
**लगीन करा रायबाचे ॥**
**मज बापाची सरदारी ।**
**द्यावी रायबा बेटयाला ॥**
**दिवटी बुधलीची जहागीर ।**
**द्यावी रायबा बेटयाला**
**डोणज गांव । द्यावा पानसुपारीला ॥**
**मालुसऱ्याचा दंड । द्यावा इनाम खायाला ॥**

सरळ, साध्या भाषेत प्रसंगाचे प्रत्ययकारी चित्र रेखाटण्यात हा शाहीर यशस्वी ठरला आहे. [ म. सा. ]

## तुळुवग्रामपद्धती

एक प्राचीन ग्रंथ. या ग्रंथात सांप्रत कानडा जिल्ह्यात असलेल्या तुळुव गावातल्या ग्रामव्यवस्थेचे स्वरूप सांगितले आहे. हा ग्रंथ ताडपत्राच्या चाळीस पृष्ठांवर पाठपोट लिहिलेला आहे. त्यात ग्रामव्यवस्थेचे नियम, प्रसिद्ध घराण्यांची नामावली, सामाजिक चालीरीती व इतर अनेक प्रकारची उपयुक्त माहिती आढळते. प्रारंभी स्कंद पुराणाच्या सह्याद्रिखंडातील विषय दिलेले असून त्यांची २६ प्रकरणे आहेत. परशुरामाने भूमि निर्माण केल्याची कथा, कदंब घराण्याची उत्पत्ती, जयंतीपुर नगराची स्थापना, जातिबहिष्काराची माहिती, अशी ... प्रकरणांची विभागणी आहे.

या ग्रंथात काही दंतकथाही आहेत. याशिवाय मध्वाचार्यांचे चरित्रही त्यात सांगितले आहे. त्यामुळे या ग्रंथाला ऐतिहासिक महत्त्व मिळाले आहे. हा ग्रंथ म्हणजे ...

भारताच्या प्राचीन इतिहासाचे एक उत्तम साधन आहे, असे अनेक विद्वान समजतात.

**तुळुवनाडू** कर्नाटकातील संपूर्ण द. कानडा व उ. कानडाचा काही भाग या सर्व प्रदेशाचे हे प्राचीन नाव आहे. तुळुव राज्य गोकर्णापासून पेरुंपुळापर्यंत पसरले होते, असे केरळोत्पत्ती नामक ग्रंथात म्हटले आहे. काही शिलालेखांवरूनही वरील सीमा बरोबर ठरतात. याला तुळुव हे नाव कसे मिळाले ते मात्र निश्चितपणे सांगता येत नाही. भोज नावाच्या एका राजाने ब्राह्मणांना सुवर्णाचे तुलादान केले, म्हणून त्याला तुलादेशाधिपती हे नाव प्राप्त झाले. त्यावरूनच पुढे त्याच्या प्रजेला तुळू लोक व राज्याला तुळुवनाडू म्हणू लागले, अशी एक दंतकथा आहे. दुसऱ्या एका दंतकथेवरून समजते, की तुलुमन पेरुमाळ नामक राजावरून त्याच्या राज्याला तुळुवनाडू हे नाव मिळाले. पण या कथांत फारसे तथ्य नाही.

हळे कन्नड भाषेत तुळू या क्रियाधातूचा अर्थ आक्रमण करणे असा आहे. या प्रदेशात राहणारे प्राचीन लोक अत्यंत पराक्रमी व आक्रमक होते. त्यामुळेच कर्नाटकातील लोकांनी त्यांना तुळुव हे नाव दिले असावे. त्यापूर्वी हा प्रदेश आळवखेड या नावाने ओळखला जात होता. परशुरामाने जी भूमी सागराकडून मिळवली, तिच्यातच या प्रदेशाचा अंतर्भाव होतो. तुळुवनाडूमध्ये पुत्तूर, कुंजारू, कण्णरपाडी व इंद्राळी या गावांत दुर्गा भगवतीची जी प्राचीन मंदिरे आहेत, त्यांतील मूर्ती परशुरामाने स्वतः स्थापन केल्या, अशी समजूत आहे. त्याने उडिपीच्या आसपास चार नागालयेही स्थापली होती. कुंजारगिरी येथील रेणुकेचे मंदिरही परशुरामानेच निर्माण केले, असे म्हणतात.

रामायण, महाभारत व पुराणे या ग्रंथांत तुळुवनाडूचा उल्लेख आढळत नाही. या प्रदेशातील अनेक स्थाने, नद्या व पर्वत यांचे वर्णन व उल्लेख मात्र सदर वाङ्मयात आहेत. इ. स. च्या प्रारंभीच्या शतकांतील शिलालेख व त्या काळातील परकीय प्रवाशांनी लिहिलेले वृत्तान्त यांत प्रथमच तुळुव प्रदेशाचा स्वतंत्र उल्लेख सापडतो. स्कंद पुराणाच्या सह्याद्रिखंडात परशुरामाने सप्त कोकणे निर्माण केली, त्यांतील एका कोकणाचे नाव तुळुंग असे दिले आहे. हे तुळुंग म्हणजेच तुळुवनाडू होय.

**इतिहास** – इ. स. च्या २ ऱ्या शतकापासून मध्ययुगापर्यंत तुळुवनाडूवर आलुप वंशाचे राज्य होते. इ. स. च्या ६ व्या शतकापर्यंतचा त्यांचा इतिहास उपलब्ध नाही. इ. स. ५७५ च्या सुमारास चालुक्यांपैकी कीर्तिवर्मा याने आलुप राजा मारम्म आळवरस याचा पराभव करून आळवखेडवर सत्ता स्थापन केली. तेव्हापासून सुमारे २०० वर्षे आलुप वंशाने चालुक्यांचा सामंत म्हणून तुळुवनाडूवर राज्य केले. त्यानंतर कर्नाटकावर राष्ट्रकूटांचे सुमारे २०० वर्षे राज्य होते. इ.स.च्या १० व्या शतकाच्या अखेरीस चालुक्यांनी पुन्हा त्या प्रदेशावर आपली सत्ता प्रस्थापित केली. या कालावधीत आलुप वंश चालुक्यांचा मांडलिक म्हणूनच तुळुवनाडूवर राज्य करीत होता. इ. स. १२ व्या शतकाच्या अखेरीस चालुक्य वंशाची सत्ता क्षीण झाल्यामुळे आलुप वंशाने आपले स्वतंत्र राज्य सुरू केले. मात्र त्याला होयसळांच्या अनेक स्वाऱ्यांना तोंड द्यावे लागले. इ. स. च्या १४ व्या शतकात तुळुवनाडूवर होयसळांचे अधिराज्य प्रस्थापित झाले आणि त्या शतकाच्या अखेरीस ते राज्य विजयनगरच्या साम्राज्यात विलीन झाले.

**देवधर्म**– तुळुवनाडूमध्ये शैव, जैन, बौद्ध, इ. अनेक धर्मपंथांचा प्रसार झाला असला, तरी तिथल्या मूळ रहिवाशांचा धर्म अजूनही नष्ट झालेला नाही. हा धर्म वृक्षपूजा, नागपूजा व भूतपूजा या स्वरूपात आजही तिथे प्रचलित आहे. त्यातील भूतपूजा होलेय, पोंबद, नालके, परब, मोगेर, बिल्लवर आणि बुंत या जमातीत विशेष रूढ आहे. भूत म्हणजे त्यांच्या मते शिवगण होत. त्यांतील कलकुड, करलुट्टी, बोबरिये व कोडब हे गण जास्त भयप्रद आहेत. त्यांच्या प्रदेशात अशा भूतांची लहान देवळे असून, त्यांत मनुष्यासारख्या किंवा पशूसारख्या पितळी मूर्ती ठेवलेल्या असतात.

या प्रदेशात बौद्ध धर्माचा प्रसार झाला होता व त्याचे काही अवशेष अजूनही तिथे आढळतात. पुढे जैन व शैव पंथांच्या प्रसारामुळे तिथला बौद्ध धर्म नामशेष झाला.

आलुप वंशातील राजे मुख्यतः शैवपंथी होते. शिवहळ्ळी हे तुळुवनाडूतले तीर्थक्षेत्र फार पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. त्याचा उल्लेख अनेक शिलालेखांतही आढळतो.

तुळुवनाडूमध्ये जैन धर्माचा प्रवेश इ. स. च्या ९ व्या शतकात झाला, असे दिसते. कूटक, कारकल, मूडबिद्री वगैरे ठिकाणी जैनांची वसती आहे. मात्र इ. स. च्या १३ व्या शतकात जैन धर्माला तिथे राजाश्रय मिळाला नव्हता, असे दिसते. त्या शतकात मध्वाचार्यांचा वैष्णव पंथ तिथे बराच प्रसार पावला. त्यामुळेच तुळुवनाडूमध्ये जैन व शैव या दोन्ही पंथांची पीछेहाट झाली.

**व्यवसाय** – शेती हाच या प्रदेशातील सर्व लोकांचा मुख्य व्यवसाय आहे. मात्र प्राचीन काळी अरब लोकांनी या भागात येऊन वसाहती स्थापल्या आणि मोठ्या प्रमाणावर परदेशांशी व्यापार सुरू केला. त्यामुळे हा प्रदेश बराच समृद्ध झाला

त्यामुळेच या प्रदेशात इस्लामचा प्रसार फार लवकर झाला.

केरळ देशाप्रमाणेच तुळुवनाडूत मातृसत्ता प्रचलित होती. केळदी नायकांची सत्ता सुरू होण्यापूर्वी तिथे अनेक स्त्रियांनी उत्तम प्रकारे राज्यकारभारही केला होता, असे कळते. शंकरदेवी, विठलदेवी, पदुमळदेवी, अब्बकदेवी, चेन्नम्मादेवी, मप्पुरक्कदेवी, सोमलदेवी, इ. त्या प्रदेशातल्या अनेक स्त्रिया शासन व युद्ध या दोन्ही क्षेत्रांत चमकल्या. [ए. क. हि. तु.; श्री. रसिक पुत्तिगे– युगप्रभात, १६ ऑगस्ट १९६१]

**तुळुव राजवंश** विजयनगरवर राज्य करणारा एक राजवंश. हे तुळुव घराणे मूळचे तुळुवनाडूमधले होते. तिथून ते पूर्वेकडे जाऊन स्थायिक झाले. उत्तर अर्काट जिल्ह्यात यांचे लहानसे राज्य होते. साळुवं नृसिंहराय हा विजयनगरचा सम्राट होण्यापूर्वी चंद्रगिरीचा राजा होता. त्या वेळी तुळुव नरसा नायक त्याचा मांडलिक होता. नृसिंहराय विजयनगरचा सम्राट झाल्यावर नरसा नायक त्याचा मंत्री व मुख्य सेनापती झाला. नृसिंहरायाने आपल्या राजवटीच्या अखेरीस नरसा नायकाला आपल्या दोन राजपुत्रांचा संरक्षक नेमले होते. त्या राजपुत्रांपैकी धाकटा इम्मादी नरसिंह याला इ. स. १४९३ साली नरसा नायकाने सिंहासनावर बसवले. मात्र सर्व सत्तासूत्रे त्याने आपल्या हाती ठेवली. इ. स. १५०२ मध्ये इम्मादी मरण पावल्यानंतर नरसा नायक स्वतःच सम्राट झाला. हाच तुळुव वंशातील पहिला राजा होय. याने कावेरीच्या दक्षिणेकडील प्रदेशावर आपली सत्ता स्थापली आणि उत्तरेकडील मुसलमान सुलतानांचाही पराभव केला.

इ. स. १५०५ मध्ये नरसा नायकाच्या मागून त्याचा पुत्र वीर नृसिंहराय सम्राट झाला. त्याने आपल्या साम्राज्याचे रक्षण व शासन उत्तम प्रकारे केले. त्याच्या कारकीर्दीत त्याचा भाऊ कृष्णदेवराय याने खूप पराक्रम करून राजाला साहाय्य केले व विजयनगरचे साम्राज्य वाढवले. वीर नृसिंहरायाच्या मृत्यूनंतर इ. स. १५०९ मध्ये कृष्णदेवराय सिंहासनावर बसला. हाच या वंशातला सर्वश्रेष्ठ सम्राट होय. त्याच्या मृत्यूनंतर विजयनगरचे साम्राज्य दुर्बल होऊ लागले. इ. स. १५३० साली त्याचा सावत्र भाऊ अच्युतदेवराय गादीवर आला. पण तो कर्तबगार नसल्यामुळे खरी सत्ता त्याचा मेहुणा तिम्मय्या याच्या हाती राहिली. अच्युतदेवाने इ. स. १५४२ पर्यंत राज्य केले. त्या काळात बहुतेक सर्व नायक स्वतंत्र झाले. अच्युतदेवाच्या मृत्यूनंतर कृष्णदेवरायाचा जावई रामराय याने तिम्मय्याचा पराभव करून कृष्णदेवरायाचा पुत्र सदाशिवराय याला गादीवर बसवले. पण सदाशिवराय हा केवळ नामधारीच राजा राहिला. इ. स. १५६५ मध्ये तालिकोटची प्रसिद्ध लढाई झाली, तिच्यात रामराय मारली गेला. त्याचा भाऊ तिरुमलराय सदाशिवरायाला घेऊन पेनुकोंडा येथे पळून गेला व तिथे राज्य चालवू लागला. इ. स. १५६८ साली सदाशिवरायही मारला गेला व अशा प्रकारे तुळुव राजवंशाचा शेवट झाला. [ वि. स्मा. ग्रं.; वि. सा. इ. ]

**तुळू** द्राविड परिवारातील एक भाषा. कर्नाटकातल्या चंद्रगिरी व कल्याणपुरी या दोन नद्यांच्या प्रदेशात ही भाषा बोलली जाते. तुळू शब्दाचा अर्थ मृदू अगर नम्र असा आहे. यावरून तुळू हे नाव प्रथम तेथील लोकांना लावण्यात आले असावे आणि नंतर त्यांच्या भाषेला हे नाव मिळाले असावे, असे वाटते. तुळू ही मलयाळम् भाषेची एक पोटभाषा असावी, असा काही काळापूर्वी अभ्यासकांचा समज होता. पण ती स्वतंत्र भाषा असल्याचे आता सिद्ध झाले आहे.

इ. स. च्या दुसऱ्या शतकात झालेल्या काही ग्रीक नाटकांमध्ये तुळू शब्दांचा वापर केलेला आहे, असे अलिकडेच कळून आले आहे. त्याचप्रमाणे तुळू भाषेतही ग्रीक शब्दांचा बराच भरणा आहे, असेही आढळले आहे. यावरून ही भाषा बरीच प्राचीन असावी असे दिसते. तुळू भाषेची लिपी ही तमिळ लिपीला जवळची असून, ती सुमारे चौदाशे वर्षांपूर्वी बनली असे सांगतात.

या भाषेत वाङ्मय असे फारच थोडे आहे. ब्रिगेल नामक एका युरोपियन पंडिताने तुळू भाषेचे व्याकरण लिहिले आहे. तुळू भाषा मलयाळम् अगर तमिळ भाषेहून भिन्न असून, तिचे कानडीशी अल्पसे साम्य आहे, असे ब्रिगेलने आपल्या ग्रंथात म्हटले आहे. [ म. ज्ञा. को.; भा. भा. स. ]

**तृचाकल्प नमस्कार** सूर्यनमस्कारांची एक पद्धती. प्रथम संकल्प करतात. एका पंचपात्रीत पाणी घालून त्यात गंधाक्षतपुष्पे घालतात. ते पात्र समोर ठेवतात. मग पुढील मंत्राने सूर्याचे ध्यान करतात—

**ध्येयः सदा सवितृमण्डलमध्यवर्ती**
**नारायणः सरसिजासनसन्निविष्टः।**
**केयूरवान् मकरकुण्डलवान् किरीटी**
**हारी हिरण्मयवपुर्धृतशङ्खचक्रः॥**

अर्थ– सूर्यमंडलाच्या मध्यवर्ती असलेला, कमलासनावर बसलेला, केयूर, मकर, कुंडले, किरीट व हार धारण करणारा, शंख, चक्र धारण करणारा, सुवर्णकांतीचा देह असलेला असा जो (सूर्य) नारायण त्याचे सदैव ध्यान करावे.

मग 'ॐ मित्राय नमः, ॐ रवये नमः, 'ॐ सूर्याय नमः' असे म्हणून सूर्याला त्याच्या बारा नावांनी नमस्कार घालतात. मित्र, रवी, सूर्य, भानू, खग, पूषन, हिरण्यगर्भ, मरीची, आदित्य, सवितृ, अर्क व भास्कर ही ती बारा नावे होत.

तृचाकल्प नमस्कार हे वरील सूर्यनावांच्या आगे मागे ऱ्हां, ऱ्हीं, ऱ्हूं, ऱ्हैं, ऱ्हौं, ऱ्हः ही बीजे प्रणवासह सरळ व उलट क्रमाने लावून, तसेच 'उद्यन्नद्यमित्रमह' इथपासून पुढल्या तीन मंत्रांचा विनियोग करून घालायचे असतात--

**उद्यन्नद्य मित्रमह आरोहन्नुत्तरां दिवम् ।**
**हृद्रोगं मम सूर्य हरिमाणं च नाशय ॥**
**शुकेषु मे हरिमाणं रोपणाकासु दध्मसि ।**
**अथो हारिद्रवेषु मे हरिमाणं नि दध्मसि ॥**
**उदगादयमादित्यो विश्वेन सहसा सह ।**
**द्विषन्तं मह्यं रन्धयन् मो अहं द्विषते रधम् ॥**
( ऋ. १·५०. ११-१३ )

प्रथम एक बीज, एक चरण व एक सूर्यनाम घेऊन बारा नमस्कार घालतात. उदा. ॐ ऱ्हां उद्यन्नद्यमित्रमहः ऱ्हां ॐ सूर्याय नमः ।

मग दोन बीजे, दोन चरण व मित्र-रवी अशी दोन दोन नावे एकत्र करून सहा नमस्कार घालतात. उदा० ॐ ऱ्हां ऱ्हीं उद्यन्नद्यमित्रमह आरोहन्नुत्तरां दिवम् ऱ्हां ऱ्हीं ॐ मित्र-रविभ्यां नमः । नंतर चार बीजे, एक मंत्र व चार नावे एकत्र घेऊन तीन नमस्कार घालतात. शेवटी सर्व बीजे, तीन मंत्र व सर्व नावे घेऊन एक नमस्कार घालतात. हे एकूण बाव्वीस नमस्कार होतात. याप्रमाणे तीन वेळा नमस्कार घातल्याने तो तृचाकल्प होतो. मग पुढील मंत्राने अरुणाची प्रार्थना करून त्यालाही एक नमस्कार घालतात –

**विनतातनयो देवः कर्मसाक्षी सुरेश्वरः ।**
**सप्ताश्वः सप्तरज्जुश्च अरुणो मे प्रसीदतु ॥**

अर्थ–विनतेचा पुत्र, देव, देवेश्वर, कर्मांचा साक्षी, सात अश्व आणि सात रज्जू धारण करणारा असा अरुण मला प्रसन्न होवो.

त्यानंतर सूर्याची प्रार्थना करून समोरच्या पंचपात्रातले पाणी तीर्थ म्हणून प्राशन करतात. [ ऋ. ब्र. स. ]

**तृचार्घ्यपद्धती** एक सूर्यविषयक विधान. यात प्रथम तीन वेळा गायत्रीमंत्र म्हणून, नंतर 'उद्यन्नद्य मित्रमह' 'शुकेषु मे हरिमाणं' व 'उदगादयमादित्यो' या तीन मंत्रांनी ( ऋ. १.५०.११–१३ ) सूर्याला शक्य तेवढ्या संख्येची अर्घ्ये द्यायची असतात. याचा विधी असा–

प्रथम संकल्प, भूशुद्धी, भूतशुद्धी व षडंगन्यास करावा. मग सूर्यमूर्तीची स्थापना करावी व पुढील मंत्राने आवाहन करावे–

**एहि सूर्य सहस्रांशो तेजोराशे जगत्पते ।**
**अनुकम्पय मां भक्त्या प्रसीद परमेश्वर ॥**

अर्थ – हे सहस्रकिरण, तेजोराशी व जगत्पती अशा सूर्या, ये. माझ्यावर भक्तीनं दया कर व हे परमेश्वरा, प्रसन्न हो.

मग षोडशोपचार पूजा करावी आणि एका ताम्रपात्रात पाणी भरून त्यात रक्तचंदन, रक्तपुष्प, रक्ताक्षता, दूर्वा, यव व तीळ या वस्तू टाकाव्या. मग ते पात्र दोन्ही हातांनी मस्तका-पर्यंत उचलून सूर्याचे चिंतन करीत 'ॐ ऱ्हां उद्यन्नद्यमित्रमहः मित्राय नमः इदमर्घ्यं समर्पयामि' असे म्हणून ते ताम्रपात्रातले पाणी सूर्यप्रतिमेच्या मस्तकावर ओतावे. अशा प्रकारे वर उल्लेखिलेले तीन मंत्र म्हणून अर्घ्ये द्यावी. मग त्याच पात्रात पाणी घेऊन सूर्यगायत्री म्हणावी व ते पाणी प्राशन करावे. 'सविता पश्चात्तात्' इ. प्रार्थनामंत्र म्हणावे. फल – रोगनिरसन व आरोग्यप्राप्ती. [ आचारेंदू ]

**तृतीया** शुक्ल व कृष्ण अशा दोन्ही पक्षांतील तिसरी तिथी. चंद्राच्या तिसऱ्या कलेने उपलक्षित होणाऱ्या कालाला तृतीया असे म्हणतात. हेमाद्रीने तृतीयेचे रूपध्यान पुढील-प्रमाणे दिले आहे –

**तृतीया वृषगा गौरी शूलपात्रधरा मता ।**

अर्थ – तृतीया ही वृषभवाहना, गोरी आणि शूल व पात्र धारण करणारी आहे.

तृतीयेच्या दिवशी जन्मलेले मूल हे गुणवान, परोपकारी, सत्यवादी व विद्याव्यासंगी निपजते, असे कोष्ठीप्रदीपात म्हटले आहे. [ श. क. ]

**तृत्सू** ऋग्वेदकालीन एक जनसमूह. यांची वसती परुष्णीच्या ( रावीच्या ) पूर्वेला होती. तृत्सू हे मोठे पराक्रमी होते व दाशराज्ञ युद्धात ते सुदासाच्या बाजूने लढले होते. सुदासाने शत्रूचे सात दुर्ग उद्ध्वस्त केले, तेव्हा तृत्सूंना त्यांतली बरीच संपत्ती मिळाली होती.

तृत्सू आणि भरत यांच्या संबंधाबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. लुडविगच्या मते तृत्सू व भरत हे एकच होते. तृत्सू हे भरतांचे पुरोहित होते आणि म्हणूनच तृत्सू व वसिष्ठ हे एकच होत, असे ओल्डेनबर्गने प्रतिपादन केले आहे.

गेल्डनरच्या मते ऋ. ७.१८.१३ या ऋचेत तृत्सू हा शब्द एकवचनात योजला आहे, म्हणून तिथे त्याचा अर्थ तृत्सूंचा राजा म्हणजे सुदास असा करायला हवा. यावरून दिवोदास व

सुदास हे राजे तृत्सूंच्या वंशातील होते, असे त्याचे मत दिसते. [ वे. इं. ; वै. सा. सं. ]

## तृश्शूर पूरम

केरळमधील एक उत्सव. पूरम हे पूर्वा फाल्गुनीचे मलयाळम भाषेतील नाव आहे. म्हणून हा उत्सव त्या नक्षत्रावर करतात.

तृश्शूर हे एक मध्य केरळमधले ऐतिहासिक शहर आहे. इथे अनेक प्राचीन मंदिरे आहेत. त्यात तृश्शूर या नावाचेच एक मंदिर आहे. प्राचीन साहित्यात हे मंदिर तेन कैलास या नावाने ओळखले जाते. या मंदिरातच वरील उत्सव होत असतो.

हा उत्सव मुळात अशोकाच्या आदेशानुसार सुरू झाला, अशी समजूत आहे. आद्य शंकराचार्यांच्या नंतर नंपूतिरी ब्राह्मण या उत्सवात भाग घेऊ लागले. मुळात हे मंदिर म्हणजे एक बौद्ध विहार होता. त्याचे पुढे नंपूतिरी ब्राह्मणांनी मंदिरात रूपांतर केले, असेही म्हणतात.

या उत्सवाच्या वेळी हत्तींना सजवितात, त्यांच्यावर देवदेवतांच्या मूर्ती ठेवतात आणि वाजत गाजत त्यांची मिरवणूक काढून ती तृश्शूर मंदिरासमोरील एका मैदानावर घेऊन जातात. नंतर तिथे निरनिराळ्या प्रकारच्या स्पर्धा होतात. [ श्री. रवी वर्मा – धर्मयुग, २५ मार्च १९६२ ]

हत्तीवरून देवांची मिरवणूक

## तेग बहादर

(१६२१–१६७५ इ. स.) शिखांचा नववा गुरू. हा हरगोविंद या सहाव्या गुरूचा पाचवा पुत्र होय. याचा जन्म अमृतसर येथे गुरूच्या महालात झाला. याचे मूळचे नाव त्यागमल असे होते. ' हा मोठा तलवारबहाद्दर होईल व धर्माच्या बाबतीत मोठी कामगिरी बजावील ' असे त्याच्या पित्याने भविष्य वर्तविले होते. त्यावरून पुढे त्याचे नाव तेग बहादर असे ठेवण्यात आले. हा सुंदर, शूर, विद्वान आणि मुत्सद्दी होता. लहापणापासूनच त्याला वैराग्य प्राप्त झाले होते. गुरुपदाचा त्याला मुळीच लोभ नव्हता. करतारपूर येथे राहणाऱ्या लालनंद नावाच्या गृहस्थाची गुजरी नावाची मुलगी होती. तिच्याशी तेग बहादराचा विवाह झाला. गुरू हरगोविंद याच्या मृत्यूनंतर तेग बहादर बकाला या गावी जाऊन राहिला. गृहस्थाश्रमी असूनही विरक्त वृत्तीने तो त्या ठिकाणी राहत असे.

शिखांचा आठवा गुरू हरकिशन हा होय. त्याची कारकीर्द अवघी तीन वर्षेच झाली. देवी आल्याने त्याचा मृत्यू झाला. मृत्यूपूर्वी ' पुढचा गुरू कोण ?' म्हणून त्याला विचारले असता ' बाबा बकाला ' एवढेच शब्द त्याने उच्चारले. त्यावरून शीखां समजले, की पुढचा गुरू बकाला या गावी आहे.

हरकिनशच्या निर्याणानंतर शीख लोक बकाला गावी पुढच्या गुरूच्या शोधार्थ निघाले. त्या काळी शीखांची गुरुगादी ही सत्तावैभवाची मिराशी झाली होती. त्यामुळे 'बाबा बकाला' हे आठव्या गुरूच्या मुखातून निघालेले शब्द ऐकताच २२ सोढी खत्री बकाला गावी जाऊन राहिले व आपणच गुरू असे लोकांना सांगू लागले. त्यामुळे अनुयायांची पंचाईत झाली. खरा गुरू कोण हे त्यांना कळेना. या गोंधळातून एका व्यापाऱ्याने मार्ग काढला. त्याचे जहाज समुद्रात बुडत असता ' जगलो तर गुरूला ५०० मोहरा देईन ' असा नवस तो बोलला होता. तो नवस फेडण्यासाठीच सांप्रत तो बकाला गावी आला होता. तिथे पाहतो, तर साराच गोंधळ. मग त्याने गुरू म्हणवणाऱ्या प्रत्येकाकडे जाऊन दोन दोन मोहरा त्यांच्यापुढे ठेवल्या. ते तोतये गुरू तेवढ्यावरच संतुष्ट झाले. एवढ्यात त्याला कोणीतरी तेग बहादराचे नाव व ठिकाण सांगितले. व्यापारी तिथे गेला आणि त्याने तेग बहादराच्या पुढेही दोनच मोहरा ठेवल्या. त्यावर तेग बहादर अंतर्ज्ञानाने सर्व गोष्टी जाणून त्या व्यापाऱ्याला म्हणाला, ' मला फसवतोस काय ? तू गुरूला ५०० मोहरांचा नवस केला होतास. '

तेवढ्यावरून त्या व्यापाऱ्याला खरा गुरू व तोतये यांतील भेद उमगला. त्याने तेग बहादराच्या घरावर झेंडा फडकवून ' हा पाहा गुरू ! शीख हो, या आणि याला गादीवर बसवा ' असा उद्‌घोष केला. मग सर्वांनी तिथे जमून तेग बहादराचा जयजयकार केला व त्याला गादीवर बसवले. इ. स. १६६४ साली वयाच्या ४३ व्या वर्षी तेग बहादर हा गुरुगादीवर आला.

तेग बहादराला गुरुगादी मिळाली; पण त्याच्या ...

शांती मात्र नष्ट झाली. चोहोबाजूंनी त्याला विरोध होऊ लागला. खुद्द त्याचा भाऊ धीरजमल याने जुन्या मसंदांना (धर्मप्रचारक) हाताशी धरून तेग बहादराशी संघर्ष सुरू केला. मग तेग बहादर काही दिवस बकाला येथे राहून पुढे अमृतसरच्या यात्रेला निघाला. तिथे गेल्यावर त्याला दिसले, की मसंदांनी तिथल्या हरमंदिराचा ताबा घेतला आहे आणि तिथे नाना तऱ्हेचे भ्रष्टाचार चालवले आहेत. पण त्या गोष्टी पाहूनही तो त्या मसंदांचा बंदोबस्त करू शकला नाही.



गुरू तेग बहादर

अमृतसरला काही दिवस राहून तेग बहादर आपल्या वडिलांच्या कीरतपूर या गावी गेला. तिथेही त्याला मसंदांनी व भाऊबंदांनी खूप त्रास दिला. अशा प्रकारे स्वतःच्या गावीही जगणे अशक्य झाल्यावरून त्याने स्वतःसाठी शिवालिक पर्वतराजीत एक नवे नगर वसवले. तेच पुढे आनंदपूर या नावाने प्रसिद्ध झाले. तेग बहादराने आपली गुरुगादी तिथे स्थापली. तिथून मग तो धर्मप्रचारासाठी भारतयात्रेला निघाला. कुरुक्षेत्र, वाराणसी, पाटणा, ढाका, आग्रा, प्रयाग, इ. नगरांतून संचार करून त्याने लोकांना धर्मोपदेश केला. पाटणा येथे असता त्याची पत्नी प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झाले. हाच मुलगा पुढे गुरू गोविंदसिंघ या नावाने शिखांचा दहावा गुरू झाला. आसामपासून काश्मीरपर्यंतच्या पट्ट्यात तेग बहादराने धर्मप्रचार केला. अनेक हिंदूंना व मुसलमानांनाही त्याने शीख बनवले. तेग बहादराचे हे तेज व धर्मवैभव औरंगजेबाला सहन झाले नाही. त्याने काश्मीरच्या सुभेदाराला हुकूम धाडला, की 'काश्मीरातल्या सर्व हिंदूंना ताबडतोब मुसलमान कर अणि त्यांनी ते न मानल्यास त्यांना ठार मार.'

तो हुकूम जारी होताच सर्व काश्मीरी ब्राह्मण भयभीत झाले आणि 'आम्हांला या धर्मांतरापासून वाचवा' म्हणून तेग बहादराला शरण गेले. तेग बहादराने त्या पंडितांना म्हटले. 'बाबांनो, तुम्ही वळी पडू नका. त्या कामासाठी आता कोण्यातरी मोठ्या व्यक्तीने पुढे झाले पाहिजे.' त्या वेळी त्याचा नऊ वर्षांचा मुलगा गोविंदराय त्याच्या जवळच होता. त्याने बापाच्या गळचाला मिठी मारून म्हटले. 'बाबा, तुमच्याहून मोठा कोण आहे?' त्यावर तेग बहादर जे काही उमगायचे ते उमगला. त्याने हिंदूंच्या धर्मरक्षणासाठी स्वतःचे बलिदान करायचे ठरवले. तो त्या काश्मीरी ब्राह्मणांना म्हणाला. 'तुम्ही औरंगजेबाकडे जा आणि त्याला सांगा, आमचा धर्मगुरू तेग बहादर नानकाच्या गादीवर बसला आहे. तो हिंदू धर्माचा संरक्षक आहे. प्रथम तू त्याला मुसलमान कर. मग आम्ही खुषीने मुसलमान होऊ.'

काश्मीरी ब्राह्मणांनी तसे केले. औरंजेबाने ताबडतोब त्याला धरणे पाठवले. तेग बहादर प्रवासात असता आग्रा येथे त्याला पकडण्यात आले. तिथून दिल्लीस आणून त्याला तुरुंगाच्या कोठडीत ठेवण्यात आले. तुरुंगात असताना औरंगजेबाने त्याला निरोप पाठवला, की ''एकतर तुझ्या धर्माचा साक्षात्कार दाखव, नाहीतर इस्लाम धर्म स्वीकार'. पण तेग बहादर त्यांतील एकाही गोष्टीला तयार झाला नाही. शेवटी औरंगजेबाने त्याला दिल्लीच्या चांदणी चौकात आणून तिथे त्याचे शिर धडापासून वेगळे केले. जैता नावाच्या एका भंग्याने मोठ्या धाडसाने तेग बहादराचे शिर तेवढे पळवले व आनंदपूर येथे आणले. अशा प्रकारे तेग बहादराची जीवनगाथा समाप्त झाली. ज्या ठिकाणी तेग बहादराचा वध झाला, ते दिल्लीतले ठिकाण आजही शीशगंज या नावाने प्रसिद्ध आहे. तेग बहादराच्या या बलिदानाने सारा पंजाब खवळून उठला. हिंदूंच्या संरक्षणासाठी गुरूने हौतात्म्य स्वीकारले, ही वार्ता गावोगावी पसरली. त्याचा परिणाम असा झाला, की स्वधर्म आणि स्वाभिमान यांच्या संरक्षणासाठी प्रसंगी प्राणार्पण करण्याच्या प्रतिज्ञेने हजारो शीख वीर पुढे आले. तेग बहादराच्या या बलिदानाबद्दल गुरू गोविंदसिंघाने आपल्या विचित्रनाटक या ग्रंथात म्हटले आहे, की 'सिर दिया ; सर न दिया' (तेग बहादराने आपले शिर दिले; पण आपले स्वत्व दिले नाही). डॉ. नारंग यांच्या शब्दात सांगायचे, तर 'तेग बहादराने आपल्या जीवनांत जे काही केले, त्यापेक्षा त्याने आपल्या मृत्यूने अधिक काही करून दाखवले.'

तेग बहादर वीर आणि साहसी होता ; पण त्याचे हृदय मात्र अत्यंत कोमल होते. तो स्वभावतःच क्षमाशील होता. क्षमेबद्दल तो म्हणतो, 'क्षमा ही दानाशी तुल्य आहे. क्षमेसारखे पुण्य नाही. क्षमेसारखे मोक्षप्राप्तीचे दुसरे साधन नाही.

क्षमा हे संतांचे अमूल्य धन आहे. ते कोणी विकू शकत नाही किंवा चोरू शकत नाही.'

तेग बहादराने विविध विषयांवर ११६ पद्ये रचली आहेत. ही पद्ये पुढे गुरू गोविंदसिंघाने गुरुग्रंथात दाखल करून घेतली. त्याच्या कवितेचा आशय व उपदेश सारांशरूपाने सांगता येईल तो असा– 'जन हो, स्वतःला विसरा; पण परमेश्वराला विसरू नका. जेव्हा तुम्ही दान द्याल, तेव्हा जगातल्या सर्वश्रेष्ठ दात्याला विसरू नका.'

तेग बहादराची कवने ऐकताना मन प्रसन्न होऊन ते उच्च वातावरणात जाते. [श्री. ईश्वरसिंघ ठाकूर]

**तेज** पंचमहाभूतांपैकी तिसरे. याचे लक्षण असे–'उष्णस्पर्शवत्तेजः'=उष्ण स्पर्श हा तेजाचा असाधारण धर्म होय (तर्कसंग्रह). शब्द, स्पर्श व रूप हे तेजाचे तीन गुण होत. तेज हे जगताचे एक मूलतत्त्व मानलेले आहे. मूळ सत्पासून उत्पन्न झालेले पहिले महद्भूत म्हणून छांदोग्य उपनिषदात अग्नीचा अथवा तेजाचा उल्लेख आलेला आहे (६. ८. ४).

तेज हे चकचकीत शुभ्र रूपाचे (भास्वरशुक्लरूपवत्) आहे, असे न्यायशास्त्राचे म्हणणे आहे; परंतु छांदोग्य उपनिषदात तेजाचा रंग तांबडा मानला असून, तो स्थूल अग्नी, सूर्य, चंद्र किंवा वीज यांच्या ज्योतीत आहे, असे म्हटले आहे (६.४). तांबडी म्हणजे तेजोरूपी, पांढरी म्हणजे जलरूपी आणि काळी म्हणजे पृथ्वीरूपी अशी तीन रंगांच्या तीन तत्त्वांची जी ही अजा म्हणजे बकरी तिच्यापासूनच नामरूपात्मक सृष्टीचा पसारा उत्पन्न झाला, असे काव्यमय वर्णन श्वेताश्वतर उपनिषदाने केले आहे (४.५). या उपनिषदानुसार मानवी देहातील अस्थी, मज्जा व वाणी हे तेजाचे अनुक्रमे स्थूल, मध्यम व सूक्ष्म परिणाम आहेत.

अध्यात्मशास्त्रात तेज हे ब्रह्माचे प्रतीक मानले गेले आहे. तेजाने ज्ञान आणि सद्गुण यांचेही सूचन होते. ब्रह्म हे तेजोरूप असून, साधकाला त्याचा त्या रूपातही साक्षात्कार होतो, असे उपनिषत्काळापासून अनेक साक्षात्कारी संतांनी सांगितले आहे. अत्यंत देदीप्यमान व सुवर्णमय अशा तेजोमंडळात चमकत असलेले निष्कलंक शुभ्र ब्रह्म सर्व तेजांपेक्षा श्रेष्ठ असून, ते आत्मज्ञानी पुरुषाला दिसते, असे मुंडकोपनिषदात म्हटले आहे (२.२.९). हा संसारसेतू ओलांडून गेल्यावर मनुष्य अंध असला, तरी त्याला काही दुःख होत नाही आणि त्याच्या डोळ्यांपुढे तेजोमय ब्रह्म सदैव तळपत राहिल्यामुळे त्याला रात्रदेखील दिवसाप्रमाणेच प्रकाशमय होते, असे छांदोग्य उपनिषदाचे म्हणणे आहे (८.४.२). श्वेताश्वतरोपनिषदात (४.१८) असे म्हटले आहे, की दिवस व रात्र सत् व असत् ही दोन्ही नाहीशी झाल्यावर आत्मज्ञान्याला केवळ तेजोरूप ब्रह्मच राहते.

तेजोरूपाने होणाऱ्या ब्रह्मसाक्षात्काराचे अनुभव मध्ययुगातील बहुतेक संतांच्या वाङ्मयात व्यक्त झालेले दिसतात. ज्ञानेश्वरांनी परमेश्वराच्या विराट रूपाचे तेजोमय वर्णन केले आहे, ते असे–

**तिये अंगप्रभेचा देवा। नवलावो काइसयासारिखा सांगावा।**
**कल्पांतीं एकुची मेळावा। द्वादशादित्यांचा होय ॥**
**तैसे ते दिव्यसूर्य सहस्रवरी।**
**जरी उदयजती का एके चि अवसरीं।**
**तऱ्ही तया तेजाची थोरी। उपमूं नये ॥**
**आघवयाचि विजूंचा मेळावा कीजे।**
**आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे।**
**तेवींचि दशकुही मेळविजे। महातेजांचा ॥**
**तऱ्ही तिये अंगप्रभेचेनि पाडे।**
**हे तेज कांहीं कांहीं होईल थोडे।**
**आणि तयाऐसें कीर चोखडे। त्रिशुद्धी नोहे ॥**

(ज्ञाने. ११.२३७-२४०)

ज्ञानेश्वरांच्या अभंगांतही या अनुभवाच्या अनेक छटा दिसतात. अनुपम तेजाने सर्व विश्व धवळले आहे, असे ते म्हणतात. आत्मप्रकाशापुढे सूर्य उणा वाटतो आणि दिवस व रात्र दोन्ही उरत नाहीत, असा त्यांचा अनुभव आहे. ज्ञानेश्वराप्रमाणेच तुकारामानेही 'न कळे दिवसराती। अखंड लागली ज्योती' असा त्या परमज्योतीचा अनुभव व्यक्त केला आहे. [उ. र.; गी. र.; म. सं. प. १–२]

**तेजपूर** आसाममधल्या दरांग जिल्ह्याचे प्रमुख ठिकाण. हे ब्रह्मपुत्रा नदीच्या उजव्या तीरावर वसले आहे. पौराणिक राजा बाणासुर याची राजधानी असलेले शोणितपूर ते हेच होय, अशी इथल्या लोकांची समजूत आहे. ते बाणासुराच्या राजवाड्याची जागाही इथे दाखवतात. इथे वल्लभदेवाचे पाच ताम्रपट सापडले आहेत. इथे पाल वंशाची राजधानी होती. [म. ज्ञा. को.; हि. जॉ. ए. इं.; हिं. वि. को.]

**तेजःसंक्रांतिव्रत** एक काम्यव्रत. प्रत्येक महिन्यातल्या सूर्यसंक्रांतीच्या दिवशी हे व्रत करतात. याचा विधी असा – व्रताच्या दिवशी एकभुक्त राहून सूर्याची पूजा करतात. एका मातीच्या घड्यात तांदूळ घालून त्यावर एक दिवा पेटवून ठेवतात. मग तो घडा ब्राह्मणाला दान देतात.

त्यानंतर पुढील मंत्राने सूर्याला अर्घ्य देतात–

**कालात्मा सर्वभूतात्मा वेदात्मा विश्वतोमुखः।**
**व्याधिमृत्युजराशोकसंसारभयनाशनः॥**

अर्थ–(भगवान सूर्य हा) कालरूप, सर्वभूतांचा आत्मा, वेदांचा आत्मा, ज्याला सर्व बाजूंनी मुखे आहेत असा व व्याधी, मृत्यू, वार्धक्य, शोक आणि संसाराचे भय यांचा नाश करणारा आहे.

अशा प्रकारे वर्षभर केल्यानंतर मग व्रताचे उद्यापन करतात. त्या वेळी तांब्याच्या घडचात सोन्याचा दिवा पेटवून तो घडा व गाय ब्राह्मणाला दान देतात. फल– कोटी सुवर्णनाणी दान दिल्याचे पुण्य, सूर्यासारखे तेज व वायूसारखे बल यांची प्राप्ती.

**तेजाजी** मारवाडातील एक शूर पुरुष. हा मृत्यूनंतर देव बनला व लोक त्याला भजू लागले. मारवाडातल्या नागोर परगण्यातील खडनाल नामक गावात याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव वरवता आणि आईचे नाव लछमा असे होते. एके दिवशी मेर लोक गुजरांच्या गाई पळवून नेत असलेले त्याला दिसले. त्या गाईंना सोडविण्यासाठी तेजाजी त्यांच्यावर चालून गेला. त्याने गायी सोडवल्या; पण तो मात्र घायाळ होऊन पडला. तो जमिनीवर लोळत असतानाच त्याला सर्पदंश होऊन तो मरण पावला. त्याची पत्नी त्याच्याबरोबरसती गेली.

भाद्रपद शुद्ध दशमी ही तेजाजीच्या मृत्यूची तिथी मानून जाट लोक त्याच्या मृत्युस्थानी मोठी यात्रा भरवतात. त्या यात्रेत गाई-बैलांचा बाजारही भरतो. तेजाजीची यात्रा परबतसर या गावीही एका तलावाच्या काठी भरते. तिथे एका चबुतऱ्यावर तेजाजीची घोड्यावर स्वार असलेली मूर्ती आहे. त्या मूर्तीच्या एका हातात भाला असून गळ्याभोवती सर्पवेष्टन आहे.

मारवाडातले लोक तेजाजीला सर्पाचे भय दूर करणारा देव समजतात. [ मरु-भारती, ऑक्टो. १९५५ ]

**तेजोबिंदूपनिषद्** एक नव्य उपनिषद. हे कृष्ण यजुर्वेदाशी संबंधित आहे. यात ६ अध्याय व ४६२ श्लोक आहेत. सर्व नव्य उपनिषदांत हे प्रदीर्घ असून, ते काव्यमय भाषेत लिहिलेले आहे. पहिल्या अध्यायात ५० श्लोक असून, त्यात तेजोबिंदूच्या ध्यानाबद्दल सविस्तर विवेचन आहे. तेजोबिंदू हा विश्वात्म्याच्या हृदयात असून तो व्यक्ताव्यक्ताच्या पलिकडचा आहे, असे तिथे म्हटले आहे. या उपनिषदात योगाची आठाऐवजी पंधरा अंगे सांगितली आहेत, ती अशी–

**समो हि नियमस्त्यागो मौनं देशश्च कालतः।**
**आसनं मूलबन्धश्च देहसाम्यं च दृक्स्थितिः॥**
**प्राणसंयमनं चैव प्रत्याहारश्च धारणा।**
**आत्मध्यानं समाधिश्च प्रोक्तान्यङ्गानि वै क्रमात्॥**

(तेजोबिंदू उप. १.१४-१६)

त्यानंतर समाधीच्या मार्गात आड येणाऱ्या विघ्नांचे वर्णन केलेले आहे. खऱ्या ब्राह्मी स्थितीला कोण पोचू शकतात, हे पुढील श्लोकात सांगितले आहे–

**येषां वृत्तिः समा वृद्धा परिपक्वा च सा पुनः।**
**ते वै सद्ब्रह्मतां प्राप्ता नेतरे शब्दवादिनः॥**

(तेजोबिंदू उप. १.४५)

अर्थ– ज्यांची वृत्ती सम, परिपुष्ट आणि परिपक्व झालेली असते, ते खऱ्या ब्राह्मी स्थितीला पोचतात. इतर शब्दवादी पोचत नाहीत.

दुसऱ्या अध्यायात परब्रह्माच्या चिन्मय स्वरूपाचे वर्णन आहे. तिसऱ्या अध्यायात आत्मानुभूतीचे विवेचन असून 'अहं ब्रह्मास्मि' या मंत्राचा ७ कोटी जप केल्याने त्वरित मोक्षप्राप्ती होते, असे सांगितले आहे. चौथ्या अध्यायात जीवन्मुक्त व विदेहमुक्त यांचे वर्णन आहे. पाचव्या अध्यायात आत्मा व अनात्मा यांचा भेद स्पष्ट केलेला आहे. सहाव्या अध्यायात चिदात्म्याचे सत्स्वरूप ॐ कार असल्याचे सांगितले आहे. या सर्व वर्णनाला या उपनिषदात शांकरीय महाशास्त्र असे म्हटले आहे. [ सी. ग. देसाई ]

**तेजोविद्या** उपनिषदातील एक विद्या. याज्ञवल्क्य हा या विद्येचा प्रवर्तक होय. या विद्येचा स्पष्ट नामोल्लेख बृहज्जाबालोपनिषदात आलेला आहे (१.१). जीवाचे वाहक तत्त्व कोणते असावे, याविषयी या विद्येत काही उपपत्ती सांगितली आहे. हिला वैश्वानरविद्या असेही म्हणतात. ही विद्या पुढे इतकी महत्त्वाची ठरली, की तो औपनिषदिक तत्त्वज्ञानाचा परमोच्च बिंदूच मानला गेला.

या विद्येचा उगम जीवसृष्टीत प्रत्यक्ष दिसून येणाऱ्या एका गोष्टीतून झाला आहे. शरीर जिवंत आहे, तोवर त्यात प्राणाची खूण म्हणून उष्णता किंवा ऊब असते. मृत्यूनंतर ती नाहीशी होते. जीवनाला ऊब देणाऱ्या या शक्तीला ऋषींनी वैश्वानर अग्नी असे नाव दिले व त्यालाच समग्र जीवनशक्तीचा आधार मानले. या वैश्वानर अग्नीचे छांदोग्यातील वर्णन पुढीलप्रमाणे––

**यत्रैतदस्मिञ्छरीरे संस्पर्शेनोष्णिमानं विजानाति तस्यैषा श्रुतिः। यत्रैतत्कर्णावपिगृह्य निनदमिव नदथुरिवाग्नेरिव ज्वलत उपशृणोति तदेतद् दृष्टं च श्रुतं च॥** (छांदो. ३.१३)

अर्थ– पुरुषाच्या शरीरात जी ज्योती (तेज) आहे, तिच्या-

मुळेच शरीरातल्या उष्णतेचे स्पर्शाने ज्ञान होते. त्यामुळेच कान बंद केले असताही आत रसरसणाऱ्या अग्नीचा आवाज ऐकू येतो.

वैश्वानर अग्नीचे आणखी एक महत्त्वाचे कार्य शतपथात पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

**अयमग्निर्वैश्वानरः । योऽयमन्तःपुरुषे येनेदमन्नं पच्यते ।**

(श. ब्रा. १४.८.१०.१)

अर्थ – पुरुषाच्या ( माणसाच्या ) अंतरात असणारा हा वैश्वानर अग्नी अन्न पचवतो.

श्रीकृष्णानेही हाच आशय 'अहं वैश्वानरो भूत्वा' या श्लोकात व्यक्त केला आहे (गीता १५.१४).

हा वैश्वानर अग्नी मानवाला सूर्यापासून मिळतो, अशी कल्पना केलेली आहे. सूर्यापासून शुक्ल, पिंगल, नील, पीत, रक्त असे बहुरंगी किरण निघून सृष्टीवर पडतात. त्याचप्रमाणे मानवाच्या हृदयातूनही अनेक सूक्ष्मातिसूक्ष्म नाड्या बाहेर निघून सूर्यकिरणात येऊन मिळतात. माणसाचा व सूर्याचा अशा प्रकारे संबंध येऊन जीवाचा वाहक असलेला वैश्वानर अग्नी मानवशरीरात प्रवेश करतो. मृत्यूनंतर तोच अग्नी पुनश्च सूर्याला जाऊन मिळतो. सूर्य हा दिव्य तेजोलोकाचे द्वार आहे. ज्या जीवाला ब्रह्मज्ञान झाले असेल, तो पुनर्जन्मापासून मुक्त होऊन या सूर्यद्वारातून पलिकडच्या दिव्य तेजोगोलात जातो व तिथे शाश्वत आनंद अनुभवतो.

अशा प्रकारे उपनिषदातल्या ऋषींनी मोक्ष व पुनर्जन्म याविषयींच्या कल्पनांचाही तेजोविद्येत अंतर्भाव केला आहे.

तत्त्वविचाराच्या प्रारंभकालात ज्ञान आणि प्रकाश यांची सांगड घातलेली दिसून येते. त्यातूनच ज्ञान हे स्वयंप्रकाश असून ते इतरांना प्रकाश देते, हा विचार उत्पन्न झाला. आत्मा हा स्वयंज्योती असून, तो वाणी, नेत्र, इ. इंद्रियरूपी जीवनशक्तीत प्रवेश करून त्या इंद्रियांना ज्ञानसामर्थ्य व कार्यक्षमता देतो, असे वर्णन उपनिषदात आलेले आहे.

तेजोविद्येने निद्रेचीही उपपत्ती लावली आहे व ती लावताना एका जुन्या कल्पनेचा आश्रय घेतला आहे. डोळ्यात जी छोटी मानवाकृती बाहुली असते, तिच्याविषयी प्राचीनतम मानवाची अशी कल्पना होती, की ही बाहुली म्हणजे मानवाचा आत्मा किंवा जीव होय. बाह्य सृष्टीत जसा सूर्य, तसाच मानवसृष्टीत हा डोळ्यातील जीवपुरुष आहे. याच्या पुढची कल्पना अशी, की उजव्या डोळ्यातली बाहुली हा पुरुष व डाव्या डोळ्यातली बाहुली ही त्याची पत्नी होय. माणूस जेव्हा निद्रावश होतो, तेव्हा ही दोघे पतिपत्नी हृदयाकाशात प्रवेश करून एकत्र येतात व रममाण होतात. मग त्या गाढ निद्रेत माणसाची जाणीव नष्ट होऊन तो केवळ परमानंद अनुभवतो.

स्वप्न आणि निद्रा या दोन अवस्थांतला जो फरक आहे, त्याचीही उपपत्ती तेजोविद्येत लावलेली आढळते. विश्वातील सर्व पदार्थ ज्यात सामावले आहेत, अशा महान पोकळीला आकाश म्हटले आहे. मानवी शरीरातही असे आकाश आहे, त्याला हृदयाकाश म्हणतात. या हृदयाकाशातही महाकाशाप्रमाणे द्यावा–पृथ्वी, अग्नी, सूर्य, चंद्र, वीज, इ. आहेत. माणूस जेव्हा निद्रावश होतो, तेव्हा त्याचा प्रकाशमय आत्मा या हृदयाकाशात प्रवेश करून तिथे अनेक इच्छापूर्तींचा अनुभव घेत असतो. हीच स्वप्नस्थिती होय. जेव्हा मनुष्य गाढ व निःस्वप्न निद्रा घेतो, तेव्हा त्याचा आत्मा हृदयातल्या हृदयात परानाडीत प्रवेश करतो व माणसाची या जगाविषयीची जाणीव संपूर्णपणे नष्ट होते.

**सुषुप्तिकाले सकले विलीने तमोऽभिभूतः सुखरूपमेति ।**

(कैवल्योपनिषद १.१३)

अर्थ – सुषुप्तिकाली संपूर्ण (बाह्यविश्व) विलीन झाले असता जीव अज्ञानाने अभिभूत होत्साता सुखरूपत्वाला प्राप्त होतो.

या तेजोविद्येतूनच पुढे अनेक तात्त्विक कल्पना निघून त्यांचा विकास झाला आहे.

**तेनारी** एक तीर्थ. हे सरोवर मलबारमध्ये पालघाटपासून आठ मैल पूर्वेकडे आहे. या तीर्थाच्या काठी वसलेले गावही तेनारी या नावानेच ओळखले जाते. असे सांगतात की श्रीराम वनवासात असताना इथे येऊन गेला होता. त्याच्या आगमनाच्या खुणा आजही तिथे दाखवतात. तेनारी तीर्थाच्या नजीकच लक्ष्मणतीर्थ नावाचे एक तीर्थ आहे. तिथे स्नान करण्यापूर्वी किंवा स्नानानंतर लोक काही वस्तू त्यात टाकतात अथवा राम-लक्ष्मण असा उद्घोष करतात.

या तीर्थासंबंधी एक आख्यायिका सांगतात, ती अशी—

एक दिवस प्रभुरामचंद्राने इथल्या तलावात स्नान केले आणि लक्ष्मणाला धूतवस्त्रे आणण्यास सांगितले; पण लक्ष्मणाने ते नाकारल्यामुळे रामाने स्वतःच वस्त्रे आणून ती परिधान केली. ते पाहून लक्ष्मणाला पश्चात्ताप झाला व त्याने रामाची क्षमा मागितली. केल्या पापाचे प्रायश्चित्त म्हणून लक्ष्मणाने गंगास्नानाला जायचे ठरवले. रामचंद्राने त्याला तसे न करण्याविषयी परोपरीने विनवले; पण लक्ष्मणाने आपला हेका सोडला नाही. लक्ष्मण गंगास्नानासाठी उत्तरेस जाणार आणि त्यामुळे त्याचा व आपला वियोग होणार, ही कल्पनाच रामाला सहन होईना. म्हणून मग रामाने आपल्या दिव्य अस्त्रांच्या साहाय्याने गंगेचे जल या तीर्थात आणले. मग लक्ष्मणाने तिथे स्नान करून आज्ञाभंगाचे प्रायश्चित्त घेतले.

या तीर्थासंबंधी एक उल्लेखनीय गोष्ट अशी, की पावसाळ्यात याचे पाणी कमी होते व उन्हाळ्यात ते वाढते. हे पाणी नेहमी गरम असते. दर अमावस्येला इथे यात्रा भरते आणि आश्विनी अमावस्येला मोठा उत्सव होतो. [ ए. एम्. नीलकण्ठ शास्त्री – दक्षिण भारत, डिसें. १९५८ ]

**तेन्काशी** तमिळनाडमधील एक क्षेत्र. हे तिरुनेलवेल्लीनगरापासून २५ मैलांवर आहे. या क्षेत्राला दक्षिण-काशी असे म्हणतात. इथे काशी-विश्वनाथाचे मंदिर आहे. सांप्रत या मंदिराच्या गोपुरांचा काही भाग पडलेला आहे. या मंदिराच्या प्राकारात वीरभद्र, भैरव, कामदेव, रती, वेणुगोपाल (कृष्ण), नटराज, तांडवनृत्याच्या अवस्थेतील काली व शिव, तसेच कालीच्या दोन सहचरी यांच्या सुंदर मूर्ती आहेत. या शिवमंदिराच्या मागे पार्वतीचे भव्य मंदिर असून, त्यात पार्वतीची मूर्ती आहे. [ कल्याण-तीर्थांक ]

**तेन्नालीराम** ( इ. स. चे १५ वे किंवा १६ वे शतक ) एक तेलुगू कवी व चतुर पुरुष. याचे मूळ नाव रामलिंग असे होते. हा कौंडिण्यगोत्री ब्राह्मण होता. याच्या बापाचे नाव रामय्या व आईचे लक्षम्मा असे होते. कृष्णा जिल्ह्यातील तेन्नाली हे याचे जन्मग्राम होय. वयाच्या बाराव्या वर्षीच हा पढिक पंडित बनला व संस्कृत आणि तेलुगू या दोन्ही भाषांत काव्य करू लागला. तेन्नालीराम हा शैव होता. तो शंकराचा अवतार आहे, असे त्या गावचे लोक समजत.

तरुणपणी तो व्यंकटपतीराय नामक राजाकडे आश्रयार्थ राहिला. व्यंकटपतीराय हा वैष्णव होता. त्याची मर्जी संपादन करण्यासाठी तेन्नालीरामाने वैष्णव पंथ स्वीकारला व आपले रामलिंग हे मूळ नाव बदलून तेन्नाली रामकृष्ण असे नवे नाव धारण केले, अशीही कथा आहे.

तेन्नालीराम हा केवळ कवी नसून मोठा थट्टेखोर, चतुर व हजरजबाबी होता. त्याच्या चतुरपणाविषयीची एक कथा सांगतात ती अशी––

विजयनगरचा राजा कृष्णदेवराय याची वृद्ध माता एकदा आजारी झाली. त्या आजारात तिला आंबा खाण्याची इच्छा झाली. राजाने आंबे आणण्यासाठी सेवकांना पाठवले; परंतु ते आंबे घेऊन परतण्यापूर्वीच तिला मरण आले. त्यामुळे राजाला मोठे दुःख झाले. त्याने ब्राह्मणांना बोलावून आणून झाला प्रकार निवेदिला आणि मृत मातेच्या इच्छापूर्तीसाठी काय उपाय करावा, असे विचारले. त्यावर ब्राह्मणांनी त्याला सुवर्णाची आम्रफले ब्राह्मणांना दान देण्यास सांगितले. राजाने ती गोष्ट तत्काळ पार पाडली. पण राजाच्या दरबारी असलेल्या तेन्नालीरामाला ब्राह्मणांची ही स्वार्थी वृत्ती आवडली नाही. त्याने त्या धूर्त ब्राह्मणांची खोड मोडण्याचे ठरविले.



दुसऱ्या दिवशी त्याने त्याच ब्राह्मणांना आपल्या घरी बोलावून तापलेल्या सांडसाने डाग दिले. ब्राह्मण रडत–ओरडत राजाकडे गेले. राजाने तेन्नालीरामाला त्या कृत्याचा जाब विचारला. त्यावर तेन्नाली म्हणाला. 'महाराज, माझ्या आईला मरण्यापूर्वी हाता-पायांना झटके येत होते. त्यावर उपाय म्हणून वैद्याने तिला डागण्या द्यायला सांगितले होते. आईचीही त्याला संमती होती. पण तिची इच्छा पुरी होण्या-अगोदरच ती मरण पावली. मग मी विचार केला, की ब्राह्मणाना सुवर्णाची आम्रफले देऊन जर तुमच्या मृत मातेची इच्छापूर्ती होते, तर ब्राह्मणांना डागल्याने माझ्या मृत मातेचा आजार का बरा होऊ नये ?' तेन्नालीचे हे चातुर्य पाहून कृष्णदेवराय मनापासून हसला.

तेन्नालीरामाने पांडुरंगमाहात्म्य नावाचा ग्रंथ लिहिला आहे. तेलुगू लिंगपुराण हेही त्यानेच लिहिले आहे, असे मानतात; पण ती गोष्ट विश्वसनीय नाही. त्याच्या कालासंबंधीही मतभेद आहेत. काहींच्या मते तो अप्पय्य दीक्षिताचा समकालीन होता. अप्पय्याचा काल म्हणजे विजयनगरच्या कृष्ण-देवरायाचा काल होय. व्यंकटरामस्वामी याने आपल्या कवि-चरित्रात त्याला कृष्णदेवरायाच्या दरबारातील अष्टदिग्गजांपैकी एक म्हटले आहे. चंद्रगिरीचा व्यंकटपतीराय हा तेन्नाली-रामाचा आश्रयदाता होता असेही काही पंडित म्हणतात. हे जर सत्य मानले, तर तो कृष्णदेवरायाच्या अगोदर पन्नास वर्षे होऊन गेला, असे म्हणावे लागते. [ ते. वा. ]

**तेय्यम** केरळमधील एक धार्मिक लोकनृत्य. काली ही केरळमधील लोकांची कुलदेवी आहे. तिथले आदिवासी लोक कालीला संतुष्ट करण्यासाठी जे नृत्य करतात त्याला कालियाट्टम किंवा कळियाट्टम असे नाव आहे. कालीप्रमाणेच शिव आणि विष्णू यांच्या उपासनेतही पुढे या नृत्याचा प्रवेश झाला व त्याबरोबरच त्याचा विकासही झाला. या विकसित कळियाट्टमला तेय्याट्टम अथवा संक्षेपाने तेय्यम असे नाव पडले. तेय्यम म्हणजे विणकाम होय. तेय्याट्टम नृत्य करणारे लोक हे ताडाच्या पानांच्या छत्र्या, चटया, इ. वस्तू विणीत असत, म्हणून या नृत्याला तेय्याट्टम असे नाव पडले, असे म्हणतात.

वण्णान, वेलन आणि मलयन या जाती तेय्यम नृत्यासाठी प्रसिद्ध आहेत. यक्ष-यक्षिणी, भूतपिशाच आणि वन्यपशू यांचे

वेष परिधान करून हे नृत्य करतात. संसर्गजन्य रोगाची साथ सुरू झाल्यावर तिचा उपद्रव शमावा म्हणूनही तेय्यम करतात. या वेळी एक नर्तक रसरसलेल्या निखाऱ्यांवरून एकशे एक वेळा उलट-सुलट चालत जातो. हे अद्‌भुत कृत्य करणाऱ्या नर्तकाला मग एक कडे बक्षीस देतात. ज्याला हे कडे बक्षीस मिळते, त्याला पणिक्कर ( आज्ञा देणारा ) असे बिरुद प्राप्त होते. हा पणिक्कर नर्तक नंतर अन्य नर्तकांना निखाऱ्यांवर लोळण्याची आज्ञा देऊ शकतो.

तेय्यमच्या वेषभूषेचे एक शास्त्रच बनले आहे. तेय्यम करणारे नर्तक खळीचे जाडेभरडे कापड वापरतात, कंबरेला माडाच्या पात्या घागऱ्याप्रमाणे गुंडाळतात, डोक्यावर कांबटचांचा मुकुट घालतात, मुखाला रंगाने उग्रता आणतात आणि अंगावर काचेचे अलंकार घालतात.

या नर्तकांचे वन्यमूर्ती, ग्राममूर्ती व उभयमूर्ती असे तीन



निखाऱ्यांवरून चालणारा नर्तक

प्रकार असतात. वन्यमूर्ती नृत्य सुरू करण्यापूर्वी कोंबडचांचे वा बकऱ्यांचे उष्ण रक्त पितात, ग्राममूर्ती मद्य पितात आणि उभयमूर्ती रक्त व मद्य या दोहोंचेही प्राशन करतात. प्रस्तुत नृत्याची आंगिक, व्याक्षेपक आणि वाचिक अशी तीन अंगे



तेय्यम नर्तक–वन्यमूर्ती

आहेत. अनुग्रह, आशीर्वाद वगैरेंच्या ज्या मुद्रा आहेत, त्यांना आंगिक म्हणतात. नृत्य चालू असताना तालावर जे पद्यबद्ध संभाषण चालते, त्याला वाचिक म्हणतात आणि मधून मधून ज्वा, ग्वा, हुएय्, ह् ह् ह्, ही ही ही, इ. गर्जना करतात, त्यांना व्याक्षेपक म्हणतात. या नृत्याला साथ देण्यासाठी जे वाद्यवादन चालते, त्याचीही पद्धती ठरलेली आहे. [ श्री. सी. एम्. एस्. चंतेरा – युगप्रभात, १ व १६ नोव्हेंबर १९६५ ]

**तेरहताली नृत्य** कमार स्त्रियांचे एक नृत्य. यात दोन अथवा तीन स्त्रिया जमिनीवर बसतात. त्यांनी आपल्या शरीरावर निरनिराळ्या ठिकाणी मंजिरी नावाचे वाद्य बांधलेले असते व डोक्यावर घडे घेतलेले असतात. नृत्यसमयी त्या चेहऱ्यावरून पदराचे अवगुंठन घेतात आणि दातांमध्ये एक लाकडी तलवार धरतात. नाचताना नर्तकीच्या दोन्ही हातांतील मंजिऱ्या त्यांच्या अंगावरील अन्य मंजिऱ्यांवर आपटतात आणि त्यांतून ताल निघतो. हातांतल्या या मंजिऱ्यांनी दुसऱ्या मंजिऱ्यांवर आघात करण्याचे एकूण तेरा प्रकार असल्याने या नृत्याला तेरहताली असे नाव

पडले. नृत्य चालू असता नर्तकी दुग्धदोहन, दळण, कांडण यासारख्या घरगुती क्रियांचे हावभाव करतात. मोवताली पुरुष



तेरहताली नृत्य

उभे असतात, ते मंजिऱ्या वाजवून गीते गातात. [ मा. लो. नृ. ]

**तेरापंथ** जैन धर्मातील एक उपपंथ. भट्टारक युगात जैन-धर्मियांमध्ये निर्माण झालेले आचारशैथिल्य नाहीसे करण्यासाठी या पंथाची निर्मिती झाली, असे सांगतात. दिगंबर संप्रदायाचाच हा एक उपपंथ आहे. इ. स.च्या १७ व्या शतकात राजस्थानातील आचार्य भिक्षूने या पंथाची स्थापना केली. आग्रा येथील पं. बनारसीदास हा या पंथाचा प्रमुख आचार्य होता. तेरापंथ या नावाने जेव्हा हा पंथ प्रचलित झाला, तेव्हा भट्टारकांच्या जुन्या पंथाला वीसपंथ असे म्हणू लागले. या पंथाला तेरापंथ हे नाव कसे मिळाले यासंबंधी अजूनही समाधानकारक खुलासा मिळत नाही. या पंथाचे उपासक भट्टारकांना अथवा परिग्रहधारी मुनींना आपले गुरू मानीत नाहीत व त्यांची पूजा करीत नाहीत.

हा उपपंथ दिगंबर पंथातून निघाला असला, तरी त्या दोहोंत कोणत्याही प्रकारचे वैमनस्य निर्माण झाले नाही. सांप्रत वीसपंथाचे अनुयायी व तेरापंथाचे अनुयायी वीस अधिक तेरा या आकड्यांची बेरीज करून त्याच्या निम्मे करतात आणि स्वतःला साडेसोळापंथी म्हणवतात. ही गोष्ट त्या उपपंथांच्या ऐक्याची सूचक आहे. [ जै. ध. ]

**तेल** एक स्निग्ध द्रवपदार्थ. भावप्रकाशात 'तिलादिस्निग्ध-वस्तूनां स्नेहस्तैलमुदाहृतम्' (= तीळ, इ. स्निग्ध वस्तूंच्या स्नेहाला तेल असे म्हणतात ), अशी तेलाची व्याख्या दिलेली आहे. संस्कृतात तेलाला स्नेह, म्रक्षण, अभ्यंजन, इ. पर्यायनामे आहेत. खनिज, प्राणिज व वनस्पतिज अशी तीन प्रकारची तेले असतात. खनिज तेले प्रामुख्याने ज्वलनासाठी उपयोगी असून, प्राणिज तेलांचा औषधे म्हणून वापर करतात. वनस्पतिज तेलांपैकी काहींचा खाण्यासाठी, काहींचा सुगंधी द्रव्ये म्हणून, तर काहींचा औषधे म्हणून उपयोग करतात.

आयुर्वेदावरील प्राचीन ग्रंथांतून कषायत्व, मधुरत्व, उष्णत्व, इ. तेलाचे गुण सांगितले असून, त्याच्यामुळे ( विशेषतः तिळाच्या तेलामुळे ) मेधा, अग्नी व बल यांची वृद्धी होऊन वातविकार नाश पावतात, असे म्हटले आहे. 'नास्ति तैलात् परं किंचिद् भेषजं मारुतापहम्' (= वातविकार नष्ट करणारे तेलाहून चांगले असे दुसरे औषध नाही ), असे तेलाचे औषधी महत्त्व राजनिघंटात सांगितले आहे. धर्मशास्त्रात अंगाला तेल लावण्याविषयी काही विधि-निषेध सांगितले आहेत, ते असे— प्रातःस्नानाच्या वेळी आणि व्रत, श्राद्ध, ग्रहण व द्वादशी या दिवशी तेल अंगाला लावणे, हे मद्यलेपासारखे निषिद्ध मानले आहे. वर्षप्रतिपदा, दीपावली, इ. सणांच्या दिवशी व मांगलिक कार्यांच्या प्रारंभी मात्र तैलाभ्यंग अवश्य करावे, असा विधी आहे.

तिळाच्या तेलाचा उल्लेख अथर्ववेद (१.७.२) व शांखायन आरण्यक (११.४) यांत आलेला आहे. पतंजलीच्या महाभाष्यात तीळ, मोहरी व इंगुदी यांच्या तेलांचा उल्लेख आहे. कौटल्याने अर्थशास्त्रात अनेक सुगंधी तेलांचा निर्देश केला आहे. रघुवंश, शाकुंतल, उत्तररामचरित, इ. ग्रंथांतही इंगुदी हे नाव आढळते.

भारतात आणि चीन, इजिप्त, इ. देशांत फार प्राचीन काळापासून तेलांचा उपयोग चालू आहे. प्राचीन काळी स्निग्ध पदार्थ रगडून अथवा त्यांवर भार देऊन त्यांचे तेल काढीत. खाद्य, सुगंधी व औषधी अशा सर्व प्रकारच्या तेलांची निर्मिती व उपयोग यांविषयीची तपशीलवार माहिती भारतातील अनेक प्राचीन ग्रंथांत आढळते.

**तेलंगण** द. भारतातील एक प्रदेश. हा श्रीशैल पर्वतापासून चोळांच्या राज्यापर्यंत पसरलेला होता. या प्रदेशातील डोंगरांवर कालेश्वर, श्रीशैलम व भीमेश्वर ही तीन शिवतीर्थे असल्यामुळे याचे मूळ नाव त्रिलिंग असे होते. तेलंगण हा त्या नावाचा अपभ्रंश आहे. सांप्रत आंध्र राज्यात या प्रदेशाचा समावेश होतो. पाहा – आंध्र, तेलुगू भाषा व साहित्य.

**तेलंग न्या. काशिनाथ त्र्यंबक** (१८५० – १८९३ इ. स.) महाराष्ट्रातील एक प्राच्यविद्यासंशोधक, सुधारक व राष्ट्रीय सभेचे एक संस्था-

पक. एकोणिसाव्या शतकाच्या सुमारास जी सारस्वत ब्राह्मणांची घराणी गोव्यातून मुंबईस आली, त्यांत यांचे घराणे प्रमुख होते. शाळा–कॉलेजात अत्यंत हुषार विद्यार्थी म्हणून तेलंगांची ख्याती होती. वयाच्या अकराव्या वर्षी यांना मिडलस्कूलच्या परीक्षेत इंग्रजी भाषेतल्या प्रावीण्याबद्दल एक बक्षीस मिळाले होते. इंग्रजीबरोबरच यांनी संस्कृताचाही अभ्यास केला होता. इ. स. १८६४ मध्ये संस्कृत ही दुसरी भाषा घेऊन ते मॅट्रिकच्या परीक्षेत उत्तीर्ण झाले. संस्कृत विषय घेऊन बसणारे हेच पहिले विद्यार्थी होत.

त्यांनी आपले विश्वविद्यालयीन शिक्षण शिष्यवृत्त्या मिळवून पुरे केले. एम्. ए. व एल्‌एल्. बी. या पदव्या मिळवल्या-



न्यायमूर्ती तेलंग

नंतर त्यांनी काही काळ एका शाळेत नोकरी केली. पुढे चॅटफील्डसाहेबांनी त्यांना एल्फिन्स्टन कॉलेजात फेलो म्हणून घेतले. तिथे अध्यापन करीत असतानाच त्यांनी हायकोर्टात ॲडव्होकेट परीक्षेच्या टर्म्स भरण्यास सुरवात केली. १८७२ साली ते ही परीक्षा उत्तम प्रकारे उत्तीर्ण झाले. पुढे त्यांनी वकिली सुरू केली. संस्कृत भाषेवरील असामान्य प्रभुत्व व अस्खलित वक्तृत्व या गुणांमुळे यशस्वी कायदेपंडित म्हणून यांची लवकरच ख्याती झाली. पुढे यांना हायकोर्टात जज्जाची जागा देण्यात आली. हिंदू कायद्यात सुधारणा करण्याचा त्यांनी जो प्रयत्न केला, त्यामुळे ते लोकांच्या विशेषच लक्षात राहिले.

न्या. तेलंग हे इंडियन नॅशनल काँग्रेसच्या संस्थापकांपैकी असून, इ. स. १८८५–८९ पर्यंत तिचे ते सेक्रेटरीही होते. तिच्या अंतर्गत योजनेत त्यांचा मोठा वाटा होता. काँग्रेसच्या अधिवेशनांतून त्यांनी महत्त्वाच्या ठरावांवर विद्वत्तापूर्ण व मार्गदर्शनपर भाषणे केली. सर ऑकलं कॉल्विन व लॉर्ड डफरिन या काँग्रेसविरोधकांनी काँग्रेसवर केलेल्या टीकेला त्यांनी समर्पक उत्तरे दिली.

न्या. तेलंगांना समाजसुधारक म्हणूनही लोक ओळखत. त्यांच्या वेळी ‘स्टूडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी’ व ‘हिंदू युनियन क्लब’ या दोन संस्था समाजसुधारणेची चळवळ करण्यात प्रमुख होत्या. या दोन्ही संस्थांशी तेलंगांचा निकटचा संबंध होता. इ. स. १८७२ ते १८८९ पर्यंत स्टू. सोसायटीचे तेलंग हे सेक्रेटरी होते. या मुदतीत त्यांनी स्त्री-शिक्षणाच्या बाबतीत पुष्कळच कामगिरी केली. शास्त्र व रूढी यांच्या बलाबलाविषयी विचार व सामाजिक सुधारणा-संबंधी तडजोड हे त्यांचे मराठीतील दोन निबंध त्यांच्या प्रगमनशील विचारांचे द्योतक आहेत. कालमानानुसार बदल करण्याची योजना आपल्या इतिहासाने आपणांस शिकविली आहे; ती आपण सोडल्यास आपल्या धर्मातील जिवंतपणाच नाहीसा होईल, असे विचार त्यांनी पहिल्या निबंधात मांडले आहेत. दुसऱ्या निबंधात त्यांनी विचारस्वातंत्र्याचे महत्त्व प्रतिपादिले आहे.

या सर्व गोष्टींपेक्षा न्या. तेलंगांची महत्त्वाची कामगिरी म्हणजे डॉ. वेबरच्या रामायणविषयक लेखाला त्यांनी दिलेले उत्तर ही होय. भारतातील प्राचीन समजल्या जाणाऱ्या ग्रंथांचा काल ख्रि. पू. तीन चार शतकांच्या मागे जात नाही व होमरच्या इलियडची दाट छाया रामायणावर पडली आहे, हे डॉ. वेबरचे दोन प्रमुख मुद्दे होते. तेलंगांनी त्या दोन ग्रंथांतील फरक स्पष्ट करून वेबरच्या मताचा फोलपणा सिद्ध केला व रामायणाचा काळ ख्रि. पू. अनेक शतके असल्याचे सिद्ध केले. पुढील संशोधकांनीही त्यांच्या या मताला मान्यता दिली.

भगवद्‌गीता ही बायबलावरून बनवली आहे, या टीकेच्या आरोपालाही त्यांनी मुद्देसूद व सप्रमाण उत्तर दिले.

आद्य शंकराचार्य हे पश्चिम मगधाचा राजा पूर्णवर्मा राज्य करीत असता उदयास आले, हा न्या. तेलंगांचा महत्त्वाचा शोध होय. तेलंगांनी इ. स. ५९० हा शंकराचार्यांचा जन्मकाल ठरविला आहे. पण तो सर्वमान्य झाला

आमचे राष्ट्रीय ग्रंथ हे काळाच्या दृष्टीने अर्वाचीन आहेत व मजकुराच्या दृष्टीने परपुष्ट आहेत, असा दावा पाश्चात्य पंडित करतात. या प्रवृत्तीचा स्पष्ट निषेध करताना तेलंग म्हणतात– "आमच्या काही प्राचीन ग्रंथांचे काल अद्यापि अनिश्चित स्थितीत आहेत व ते काल निश्चित करण्याच्या कामी उपयोगी पडणारी वरीच साधने कालचक्रामुळे नष्ट झाली आहेत. अशा वेळी काही पाश्चात्य पंडित लोक दुराग्रहमूलक विधाने करून आमच्या प्राचीन ग्रंथांचे अगर मतांचे काल अगदी अलीकडे ओढून आणण्याच्या कामी गुंतलेले आहेत. त्यांच्या मनाने एकदा एक गोष्ट गृहीत धरली, म्हणजे तिच्या आधाराला त्यांना अगदी कच्चा पाया अगर एखादी संशयात्मक गोष्टही चालते. मग ते असल्या भुसभुशीत पायावर मोठमोठे मनोरे उठवितात व मोठमोठे सिद्धांत रचतात. त्याचा परिणाम असा झाला आहे, की आमच्या काही प्राचीन ग्रंथांचे काल अगदी अलिकडे ओढून सोडले गेले आहेत. ज्यांनी प्राच्यभाषाग्रंथसंशोधन चालविण्याचे आपल्या हाती कंकण बांधले आहे व ज्यांना तशा संशोधनास शास्त्र हे प्रतिष्ठित व गंभीर नाव देणे गोड वाटते, त्यांनी तरी निदान असली पूर्वग्रहदूषित क्रिया न घडू देण्याबद्दल जपले पाहिजे."

तेलंगांच्या या निर्भीड आघातातून प्रो. माक्स म्यूलरही सुटलेले नव्हते. पण त्याचा परिणाम असा झाला, की माक्सम्यूलरने तेलंगांना विनंती करून त्यांच्या करवी भगवद्गीता, सनत्सुजातीय व अनुगीता या महाभारतातल्या भागांची भाषांतरे करवून ती आपल्या 'प्राच्यधर्मग्रंथमाले'तील आठवे पुष्प म्हणून प्रसिद्ध केली. अशा तऱ्हेचा मान हिंदी पंडितांपैकी फक्त तेलंगांनाच मिळाला आहे.

न्या. तेलंगांनी मराठी भाषा व मराठी वाङ्मय यांच्या समृद्धीसाठी काही खास प्रयत्न केले. हिंदू युनियन क्लबमध्ये एक स्वतंत्र मंडळ निर्माण करून 'महाराष्ट्र भाषासंवर्धक मंडळी' असे त्या मंडळाला त्यांनी नाव दिले. मराठी भाषेत विशेषकरून ऐतिहासिक, चरित्रात्मक, बोधपर व इतर उपयुक्त विषयांवर सुलभ व मनोरंजक ग्रंथसमूह वाढवावा, असा त्या मंडळाचा उद्देश जाहीर झाला होता.

न्या. तेलंगांची वाङ्मयसंपदा मोठी आहे. भर्तृहरीची नीती व वैराग्य ही शतके आणि मुद्राराक्षस हे त्यांचे संपादित ग्रंथ होत. त्यांनी इंग्रजी भाषेत गीतेचा गद्यपद्यात्मक अनुवाद केला आहे. शहाणा नाथन व स्थानिक स्वराज्यव्यवस्था हे त्यांचे भाषांतरित ग्रंथ आहेत. त्यांची अनेक व्याख्यानेही पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आहेत. याशिवाय अनेक ताम्रपटांची भाषांतरेही त्यांनी प्रसिद्ध केली आहेत. [अ. च. को.; हिं. वि. को.; तेलंग–चरित्र– श्रीनिवास नारायण कर्नाटकी, १९३१]

**तेलंगस्वामी** (१६०७–१६८० इ. स.) एक योगी व संत. द. भारतातील होलिया या गावी याचा जन्म झाला. तेलंगधर हे याचे मूळ नाव होय. याच्या जन्मानंतर थोड्याच दिवसांत त्याचा बाप मरण पावला. त्यामुळे त्याचे पालनपोषण त्याच्या आईलाच करावे लागले. पुढे थोड्याच कालावधीत त्याची आईही मरण पावली. आईच्या मरणाचे त्याला खूप दुःख झाले. ज्या ठिकाणी त्याच्या आईचा अंत्यसंस्कार झाला होता, त्याच ठिकाणी बसून याने काही काळ तपःसाधना केली. नंतर तो तीर्थयात्रेला गेला. मार्गात पुष्करक्षेत्री भगीरथस्वामीकडून याने गुरूपदेश घेतला. तिथून पुढे तो नेपाळात गेला. तिथल्या वास्तव्यात त्याने योगसाधना करून अनेक सिद्धी मिळवल्या. आयुष्याचे अखेरचे दिवस त्याने प्रयागक्षेत्री घालविले. मृत्यूपूर्वी दोन वर्षे याने आपल्या आश्रमात एक शिवलिंग स्थापले होते. त्याच्या अंतिम इच्छेप्रमाणे त्याचे शव एका संदुकेत घालून ती संदूक गंगेच्या प्रवाहात सोडून देण्यात आली.

महावाक्यरत्नावली नावाचा याचा एक ग्रंथ आहे. आपण जर स्वतःला जाणू शकलो नाही, तर आपण परमेश्वरालाही जाणू शकणार नाही, असे या ग्रंथाचे सार आहे. [भा. सं. म.]

**तेलन** एक विवाहविधी. खानदेशात लग्नाच्या आदल्या रात्री हा विधी करतात. या वेळी घरातील सर्व स्त्रिया एकत्र जमतात आणि चाळणीत दिवा ठेवून ती चाळणी निरनिराळ्या वस्तूंवर धरतात. ही एक प्रकारची आरतीच असते. या वेळी चूल, तांब्याचा कलश, पाटा, दिवा, घुसळखांब, उंबरठा, मूर्ती इ. वस्तूंवर तेलनाची चाळण धरून बायका त्या त्या वस्तूंच्या स्तुतिपर गाणी गातात. [म. ज्ञा. को.]

**तेलफळ** महाराष्ट्रातील लग्नविधीतला एक लोकाचार. हा ब्राह्मण जातीत रूढ आहे. वर–प्रस्थानापूर्वी वरपक्षाकडून वधूकडे अंगाला लावण्यासाठी सुवासिक तेल, इतर मांगलिक द्रव्ये, ओटीचे साहित्य, पाच प्रकारच्या मुंडावळ्या आणि काही खाद्य पदार्थ उपायन म्हणून नेतात, त्याला तेलफळ म्हणतात. [ल. वि. सो.]

**तेलफळादेवी** महाराष्ट्रातील एक देवी. या देवीचे मूळ नाव आई–आदिपुरुष असे आहे. हे अर्धनारीनटेश्वराचेच एक रूप आहे. आई म्हणजे जगन्माता भवानी

आणि आदिपुरुष म्हणजे जगत्पिता शिव. या देवीच्या उत्सवात प्रसाद म्हणून बाजरीच्या रव्याची फळे आणि तेल देतात, यावरून हिला तेलफळादेवी असे नाव पडले आहे.

इ. स. च्या सोळाव्या शतकातील एक मराठी संत विठा रेणुकानंदन याने आई आदिपुरुषाची उपासना रूढ केली. त्याबाबतची आख्यायिका अशी– विठा रेणुकानंदन हा रेणुकेचा भक्त होता. त्याला एकदा देवीचा स्वप्नदृष्टान्त झाला. त्यावरून त्याने सहस्रचंडीयाग केला. त्याच्या पूर्णाहुतीच्या वेळी होमकुंडातून देवी अर्धनारीनटेश्वराच्या रूपात प्रकटली आणि तिने विठा रेणुकानंदनाला आज्ञा केली. 'तू माझ्या या मूर्तीची स्थापना कर आणि तिची पूजा–अर्चा कर.' मग विठा रेणुकानंदनाने पौषपौर्णिमेच्या दिवशी या देवीची स्थापना आपल्या देवघरात केली. देवीचे हे मूळ स्थान गोलटगाव (जि. औरंगाबाद) येथे आहे. याशिवाय सोमठाणे येथे (जि. औरंगाबाद) आणि पुण्यातल्या भवानी पेठेतही या देवीची स्थाने आहेत. या ठिकाणी पौषपौर्णिमेला प्रतिवर्षी उत्सव होतो. पुण्यातील तेलफळादेवीच्या उत्सवाचे उल्लेख पेशवेकालीन कागदपत्रांत आढळतात. विठा रेणुकानंदनाची पुण्यतिथी पौष शुद्ध चतुर्दशीला असते. त्यामुळे त्याच्या पुण्यतिथीचा आणि देवीच्या प्रतिष्ठापनेचा असे दोनही उत्सव जोडूनच करतात.

औंधच्या पंतप्रतिनिधी घराण्याचा मूळ पुरुष परशुराम त्र्यंबक हा रेणुकेचा उपासक होता. त्याला कदाचित रेणुकानंदनाच्या परंपरेतील एखाद्या सत्पुरुषाचा उपदेश लाभला असावा. कारण त्याने विठा रेणुकानंदनाच्या परंपरेतल्याप्रमाणे रेणुकेचे आई आदिपुरुष हेच नाव स्वीकारले होते. पंतप्रतिनिधींच्या देव्हाऱ्यात आई आदिपुरुषाचे दोन मुखवटे आहेत. त्यांच्या शिक्क्यातही आई आदिपुरुष हे नाव श्रीकाराच्या ठिकाणी असते. परशुराम त्र्यंबकाच्या कवितेत आई आदिपुरुष म्हणजे शक्तियुक्त शिव, ही कल्पना स्पष्टपणे व्यक्त झालेली आहे. शिवस्तुतिपर एका अभंगात त्याने शिवाचा आदिपुरुष या नावाने उल्लेख केला आहे तो असा–

**आदिपुरुष तू सांब ईशा । कृपाळू भवतांच्या ईशा**
**कर्तृत्वमूळ जे मूळमाया । हेचि आहे तुज जाया ।।**

तसेच रेणुकेच्या स्तुतिपर पद्यातही त्याने शिवशक्तीच्या अभिन्नतेची कल्पना मांडली आहे, ती अशी––

**तुझा अंबे शंभू प्रिय म्हणुनिया ध्यास धरिला ।**
**दुजा अर्थे नाहीं इतर भर हा आणि भरला ।।**
**विभक्तीही नेणें तुज अणिक शंभूसहि दुरी ।**
**कृपा पूर्वी जैशी मजवरिल आहे तशि करी ।।**

गोलटगावी आई–आदिपुरुषाचे स्थान ज्या घरात आहे ते घर 'आईचा वाडा' या नावाने ओळखले जाते. गोलटगावच्या या देवस्थानाच्या व्यवस्थेसाठी मुसलमान आणि मराठे राज्यकर्त्यांनी अनेक इनामे दिली आहेत. पाहा– विठा रेणुकानंदन [विठा रेणुकानंदन–श्री. रा. चिं. ढेरे, प्रसाद, जानेवारी १९...]

**तेलवण** महाराष्ट्रातील लग्नविधीतला एक लोकाचार. ब्राह्मणेतर जातींत विवाहाच्या आदल्या दिवशी वधूच्या अंगाला तेल-हळद लावतात आणि उरलेली तेल-हळद (उष्टी हळद) घेऊन वधूपक्षाकडील मंडळी वराकडे जातात. नंतर एक परटीण ती हळद आंब्याच्या पानांनी गुडघे, खांदे व कपाळ या क्रमाने वराच्या अंगाला लावते. काही ठिकाणी वरमाता व काही सुवासिनी मिळून वराला तेल-हळद लावतात.

आगरी लोकांत तेलवणाचा विधी वेगळा आहे. लग्नमध्ये देवक बसविल्यानंतर एका तांबड्या वस्त्रावर ... ठेवतात आणि त्याची पूजा करून त्याला कोंबडा किंवा ... बळी देतात. नंतर स्त्रिया गाणी गातात आणि ... वर अथवा वधू यांच्यावर थोडे थोडे तेल सोडतात.

दैवज्ञ ब्राह्मणांत विड्याच्या पानाला भोक पाडून ते ... डोक्यावर ठेवतात आणि त्यातून तेल सोडतात. [ल. वि. ...]

**तेली** एक जात. यांची वस्ती भारतात सर्वत्र आहे. ... तेल गाळणे व विकणे हा व्यवसाय करतात. ... उत्पत्ती शनीपासून झाली, असे सांगतात. करडासुर, ... करलासुर, जवसासुर व तिलासुर अशा पाच ... मारण्यासाठी शिवाने यांची उत्पत्ती केली, अशी दुसरी ... आहे. ही असुरांची नावे म्हणजे गळिताच्या धान्यांची ... होत.

महाराष्ट्रातील तेल्यांचे आचारविचार मराठ्यांच्या ... आहेत. त्यांच्यांत तेरा पोटभेद आहेत, ते असे– (१) ... किंवा लिंगायत, (२) कानडे, (३) लाड, (४) गुजर, (५) ... अयार, (६) कडू अथवा अकरमासे, (७) कंडी, (८) ... (९) शुक्रवारी, (१०) राठोड, (११) परदेशी, (१२) ... वण, (१३) गंधी. या भेदांपैकी तिळवण अगर मराठे ... यांची संख्या सर्वांत अधिक आहे. सोमवारी काम करीत नाहीत म्हणून यांना सोमवार तेली असेही म्हणतात. शनवार तेली ... बेने इस्राएल म्हणजे ज्यू आहेत.

यांच्या स्त्रियांचा पोषाख ब्राह्मणांच्या बायकांसारखा असतो. हे स्मार्तपंथी असून, गणपती, मारुती इ. देवता ...

भजतात. देशस्थ ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात. आमले, बेंद्रे, भागवत, भिसे, भोज, चव्हाण, दळवे, देशमाने, दिवकर,



तेलाचा घाणा

डोळसे, गायकवाड, झगडे अशी यांची आडनावे आहेत. यांच्या देवकांत पहार व घाणा असतो. काही ठिकाणी उंबर, कळंब, आपटा, इ. झाडांची पानेही असतात.

मराठे व कुणबी लोक यांच्या हातचे अन्न खातात; पण तेली मात्र त्यांच्याकडे जेवीत नाहीत. नाशिककडचे तेली फक्त ब्राह्मणांच्याच हातचे अन्न खातात.

यांच्यांत जातपंचायत असते व जातीतील भांडणांचा निर्णय जातपंचायतीमार्फत होतो.

छत्तीसगड भागातील तेल्यांचे हालिया, झाडिया व एकबादिया असे तीन वर्ग आहेत. यांना विवाहासाठी ब्राह्मण पुरोहित लागतो. एकबादियांच्या बायका एका हातात काचेच्या व दुसऱ्या हातात धातूच्या बांगड्या घालतात. याशिवाय यांचे माडपोतवा, कोसल व छोटे तेली असे आणखी तीन वर्ग आहेत.

नागपुरात एकबैले, दोनबैले अथवा तराणे व एरंडे असे तेल्यांचे वर्ग आहेत. यांच्या बायका एक मूल झाल्यावर चोळी घालणे बंद करतात.

वर्ध्याकडील सावतेली हे प्रतिष्ठित गणले जातात. यांच्यांत एकाच कुळातील मुलाचा वा मुलीचा विवाह निषिद्ध मानतात. पत्नी जिवंत असताना तिच्या धाकट्या बहिणीबरोबर लग्न करता येते, पण मोठ्या बहिणीबरोबर मात्र करता येत नाही.

पंजाबातील तेली मुसलमान आहेत. यांचा सामाजिक दर्जा कोष्ट्यांप्रमाणे आहे. मुलतान व मुझफरगड येथे तेल्यांना चाकी व काश्मीरमध्ये तेलवाणी अशी संज्ञा आहे. हे हिंदू व मुसलमानही आहेत. बैलांवरून ओझी वाहणे, हा यांचा धंदा असतो.

ओडिसातील तेल्यांमध्ये होलोदिया, बोलोदिया आणि खदी अशा तीन पोटजाती आहेत. होलोदियांचा मूळ व्यवसाय शेतकी होता. शिवाय ते हळदीचाही व्यापार करीत असत. होलोदी व्यापारी आपली ओझी बैलांवर लादीत नाहीत. बोलोदी म्हणजे बैल होय. बोलोदिया व्यापारी बैलांच्या पाठीवर ओझी लादून व्यवसाय करतात. खदी तेली मुख्यतः तेल गाळण्याचा धंदा करतात.

हे सर्व तेली कश्यिकेश्वरगोत्री आहेत. यांचा सामाजिक दर्जा शेतकऱ्यांच्या बरोबरीचा आहे. यांच्यांत जातपंचायत असते. हे जहाजातून प्रवास करीत नाहीत. तसा प्रवास करणे, हा गुन्हा समजतात. एखाद्या कुटुंबात दाव्याला बांधलेली गाय मेली तर ते कुटुंब भ्रष्ट झाले, असे मानतात. त्या दोषातून मुक्त होण्यासाठी त्या कुटुंबाला तीर्थयात्रा करावी लागते. होलोदी तेली गायीचा गोरा किंवा खोंड आपल्या घरी पाळीत नाहीत व बैलाला खच्ची करीत नाहीत.

हे गौडीय वैष्णव संप्रदायाचे अनुयायी आहेत. यांच्यांत काही स्मार्तही आढळतात. हे सर्वजण ठाकुराणी या ग्रामदेवतेला भजतात. [का. ट्रा. स. इं. ; म. ज्ञा. को.]

**तेलीराज** हिंगलाज देवीच्या उपासकांचा एक वर्ग. हे लोक महाराष्ट्रात आढळतात. भविष्य सांगणे हा यांचा प्रमुख व्यवसाय होय. तेलीराज उद्योगासाठी बाहेर निघतो, तेव्हा त्याच्याबरोबर त्याचा सेवकवर्ग असतो. तो कमरेभोवती व डोक्याला एकेक वस्त्र गुंडाळतो आणि अंगात पायघोळ अंगरखा घालतो.

तेलीराज एखाद्याच्या घरी गेला, की त्याचे सेवक घरमालकाला त्याच्या डोक्यावर थोडे तेल घालायला सांगतात. तेल डोक्यावर घातले, की तेलीराज भविष्यकथनाला प्रारंभ करतो. अशा प्रकारे तो भविष्य सांगत अनेक घरे हिंडतो. रस्त्यावरून चालताना त्याच्या अंगावरील तेल रस्त्यावर ओघळत असते. हिंगलाज देवीला तेल फार प्रिय असते म्हणून लोक तेलीराजाच्या अंगावर तेल घालतात व त्याची पूजा करतात. [बाँ. बे. ऋा.]

**तेलुगू गौड** एक जात. यांची वसती कर्नाटकातील कडूर तालुक्यातल्या ३८ गावांत व हसन जिल्ह्याच्या काही भागात आहे. हे लोक शेतीवर उपजीविका करणारे

असून अत्यंत कष्टाळू आहेत. यांच्या स्त्रिया दोर विणतात.

येल्लम्म देवरू ओक्कलू, मैलारी देवरू ओक्कलू, मुदलिगिरी थिम्मप्प ओक्कलू, पसलू वट्टे रायरू आणि मिदलुगुडली रायरू असे यांचे पाच पोटभेद आहेत. यांच्यांत बेडगू किंवा कुळे आहेत. मुंडगुडी, मुथिन सेट्टी, अस्वररू व पशुहत्तीरायरू ही त्यांची चार मुख्य कुळे होत. हे लोक समान कुळांत लग्नसंबंध करीत नाहीत.

**विवाहप्रथा** – अलिकडे यांच्यात प्रौढ वयात लग्ने होतात व आईबापच लग्ने ठरवतात. विवाहाचा मुहूर्त ठरल्यावर मेजवानी होते. त्या वेळी एक दिवा पेटवून ठेवतात. जेवताना तो दिवा गेला किंवा मांजरे मांडू लागली, तर ते अशुभ समजून ठरलेले लग्न मोडतात.

लग्नमंडप १२ खांबांचा उभारतात. देवकाचा खांब ( हालू कंब ) मामा आणतो. तो मांडवात मध्यभागी पुरून लग्नाआधी त्याची पूजा करतात. त्याच वेळी पितरांचीही पूजा करतात. मग सुवासिनी स्त्रिया जलाशयावर जाऊन गंगापूजा करतात व दोन नव्या घागरी भरून आणून मंडपात सहज दिसतील अशा जागी ठेवतात. मुहूर्ताच्या वेळी नवरा मुलगा वधूच्या गळचात ताळी बांधतो. त्याच वेळी वधू-वर एकमेकांना पाहतात.

मुलीला प्रथम रजोदर्शन झाले, की तिला एका तात्पुरत्या तयार केलेल्या झोपडीत ठेवतात. तिच्याबरोबर एखादी मोठी बाई किंवा तिच्या बहिणी असतात. त्या मुदतीत तिला वस्त्रालंकारांनी सजवतात. नातेवाईक स्त्रिया तिला गोडाधोडाचे वाढणे आणतात. नवव्या दिवशी तिला स्नान घालतात. मग ती झोपडी गावाबाहेर नेऊन जाळून टाकतात.

जननाशौच नऊ दिवस पाळतात. दहाव्या दिवशी बाळंतिणीला ब्राह्मणाच्या हातचे पाणी प्यायला देतात. ४० दिवसांपर्यंत तिला स्वयंपाकघरात जायला बंदी असते. दहाव्या दिवशी मुलाचे नामकरण करतात.

**देवधर्म**– हनुमान, येल्लम्म, मरिअम्म, चिदुवम्म, गट्टू अम्म ही यांची प्रमुख दैवते होत. यांच्यांतले थिम्मप्प व मैलारी देवरू हे तिरुपतीच्या व्यंकटरमणाला भजतात. याशिवाय भुताखेतांची पूजाही यांच्यांत प्रचलित आहे.

यांच्यांत जातपंचायत असते. तिच्यात कट्टे गौड, बुद्धिवंत आणि कोलकर असे तीन अधिकारी असतात. कट्टे गौड हा पंचायतीचा अध्यक्ष असतो. गावातील तंटे-बखेडे आणि सामाजिक बाबी यांचा निवाडा पंचायतीत होतो.

**मृतकप्रथा** – मैलारी देवरू ओक्कलू हे प्रेते बसलेल्या स्थितीत पुरतात. ज्यांना मुले असतात, अशा मृतांना जाळतात. दहा किंवा पंधरा दिवस सुतक पाळतात. तिसऱ्या किंवा पाचव्या दिवशी क्रिया करणारा मनुष्य स्मशानात जाऊन मृतासाठी प्रार्थना करतो. ११ व्या वा १५ व्या दिवशी स्मशानात मृताला अन्न देतात. त्या वेळी मृताचे नातेवाईक तिथे जमतात. तिथले काम आटोपल्यावर स्नान करून घरी परततात. मग ब्राह्मणपुरोहिताच्या हातचे पाणी घेऊन शुद्ध होतात. त्यानंतर ज्ञातिभोजन घालतात. [ मै. ट्रा. का. ]

## तेलुगू भाषा व साहित्य

दक्षिणेतल्या पाच भाषांपैकी तेलुगू ही एक भाषा आहे. आंध्र प्रदेशातल्या सुमारे ३॥ कोटी लोकांची तेलुगू ही मातृभाषा आहे.

तेलुगू हा शब्द त्रिलिंगवरून आला आहे, असे विद्यानाथाच्या प्रतापरुद्रयशोभूषण या ग्रंथात म्हटले आहे. त्रिलिंग या शब्दातली तीन लिंगे म्हणजे श्रीशैलावरचा मल्लिकार्जुन, कालेश्वर आणि द्राक्षारामम येथील भीमेश्वर ही होत. ही तीन लिंगे ज्या प्रदेशात आहेत, त्या प्रदेशाला पूर्वी त्रिलिंग असे नाव होते. त्रिलिंगवरून तिलिंग व तेलिंग हे अपभ्रंश उत्पन्न झाले. तेलिंगावरून पुढे तेलुगू हा शब्द आला. न आणि ल यांच्या अभेदामुळे तेनुगू व तेलुगू असे दोन्ही अपभ्रंश रूढ झाले. मात्र काही विद्वानांच्या मते तेलुगू हा शब्द त्रिकलिंग या शब्दावरून आला आहे. गुणगविजयादित्याच्या शिलालेखात तो शब्द आढळतो. उच्चारसुलभतेसाठी त्यातला क लुप्त होऊन त्रिलिंग शब्द राहिला व पुढे त्याचाच तेलिंग शब्द बनला.

तेलुगू याचा अर्थ मधुर असाही होतो. त्या भाषेच्या माधुर्यामुळे तिला तेलुगू म्हणू लागले असावे, असाही एक तर्क आहे. तेलुगू भाषा ही श्रुतिमधुर आहे. प्रसिद्ध व्याकरणतज्ज्ञ श्री. हेन्री मॉरिस याने सर्व भारतीय भाषांत एका तेलुगूलाच कर्णप्रिय असे म्हटले आहे.

तेलुगूच्या उत्पत्तीविषयीही भाषाशास्त्रज्ञांत मतभेद आहेत. समस्त द्राविड भाषांचे तुलनात्मक व्याकरण लिहिणारा श्री. काल्डवेल हा तेलुगूला द्राविड कुटुंबातली भाषा मानतो. त्याच्या या मताशी अनेक विद्वान सहमत आहेत. पण श्री. चिलुकुरी नारायणराव यांच्या मते तेलुगू ही आर्य परिवारातली भाषा आहे. ते म्हणतात, की इ. स. च्या पूर्वीची व इ. स. च्या नंतरची काही शतके, एवढ्या कालखंडात आंध्रामध्ये प्राकृत भाषा प्रचलित होती. तिच्यापासूनच पुढे तेलुगू उत्पन्न झाली. 'आद्यप्रकृतिः प्रकृतिश्चाद्ये विकृतिः' म्हणजे तेलुगू ही प्राकृत भाषेची विकृती आहे, असे आंध्रशब्दचिंतामणीत नन्नय्यभट्टानेही म्हटले आहे. तेलुगूचे मूळ प्राकृत भाषेतच शोधले पाहिजे, असे ओल्डेनबर्गचेही मत आहे. तेलुगूला अन्य द्राविड

भाषांहून वेगळे असे स्वतंत्र स्थान आहे, असे ग्रियर्सनचे मत आहे. तेलुगूभाषाभूषणम् नावाच्या एका प्राचीन ग्रंथाचीही या मताला पुष्टी मिळते. त्यातला तो श्लोक असा––

तल्ली संस्कृतम्ब–एल्ला भाषलाकुन
दानिवलना गोंता गाना बडिये
गोंतादान गलीगे–नंतुयुनेकर्मे
तेनुगू भाषनगाविनुतिकक्के ।।

अर्थ – संस्कृत ही सर्व भाषांची माता होय. प्राकृत भाषा तिच्यापासून उत्पन्न झाली. काही भाषा प्राकृत भाषेपासून निघाल्या आणि त्या सर्वांच्या समन्वयातून तेलुगू भाषा उत्पन्न झाली.

तेलुगू भाषा ही प्राकृतापासून वेगळी केव्हा झाली व तिचा स्वतंत्र विकास कोणत्या काळापासून सुरू झाला, हे निश्चित लिहिलेले शिलालेख आढळून येतात. हे शिलालेख चोळ आणि पूर्वचालुक्य या राजघराण्यांनी लिहवलेले आहेत. या राजांच्या संस्कृत शिलालेखांत देखील दान दिलेल्या गावाच्या चतु:सीमा तेलुगू भाषेत आहेत. मात्र शिलालेखांतली ही तेलुगू भाषा साहित्याच्या दृष्टीने विशेष महत्त्वाची नाही. त्यांपैकी काही लेख वीरपुरुषाचे गुणवर्णन करणारेही आहेत; पण त्यांतली भाषा स्थिर स्वरूपाची वाटत नाही. एकाच शब्दाची व प्रत्ययाची भिन्न भिन्न रूपे आढळतात. त्यावरून त्या काळात तेलुगू भाषा नुकती बनत चालली होती, असे म्हणावे लागते. भाषेचे हे अस्थिर स्वरूप अकराव्या शतकापर्यंत दृष्टीस पडते. त्या शतकात नन्नय्यभट्ट नावाचा महाकवी निर्माण झाला आणि त्याने केलेल्या महाभारताच्या अनुवादानंतर मात्र तेलुगूला स्थिर व निश्चित असे स्वरूप प्राप्त झाले.

| | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| అ | ఆ | ఇ | ఈ | ఉ | ఊ | ఋ | ౠ | ఌ | ౡ | ఎ | ఏ | ఐ | ఒ | ఓ | ఔ | | |
| अ | आ | इ | ई | उ | ऊ | ऋ | ॠ | ऌ | ॡ | ऎ | ए | ऐ | ऒ | ओ | औ | | |
| ం | ః | క | ఖ | గ | ఘ | ఙ | చ | ఛ | జ | ఝ | ఞ | ట | ఠ | డ | ఢ | | |
| अनुस्वार | विसर्ग | क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ | ञ | ट | ठ | ड | ढ | | |
| ణ | త | థ | ద | ధ | న | ప | ఫ | బ | భ | మ | య | ర | ల | వ | శ | ష | స |
| ण | त | थ | द | ध | न | प | फ | ब | भ | म | य | र | ल | व | श | ष | स |
| హ | ళ | క్ష | | | | | | | | | | | | | | | |
| ह | ळ | क्ष | | | | | | | | | | | | | | | |

तेलुगू लिपी (श्री. नरवणे, संपादक, भारतीय व्यवहार कोश, यांच्या सौजन्याने)

सांगता येत नाही. तथापि इ. स. च्या पहिल्या शतकात तिला स्वतंत्र अस्तित्व प्राप्त झाल्याचे तुरळक पुरावे आढळतात. अमरावती येथील स्तूपावर 'नागबु' असा शब्द आहे, तो तेलुगू वळणाचा आहे. हालाच्या गाथासप्तशतीतही काही तेलुगू शब्द आढळतात. 'शालिवाहन राजाला सहा महिन्यांत संस्कृत पंडित बनवण्याच्या कामी शर्ववर्म्याला जर यश आले, तर मी संस्कृत, प्राकृत व देश्य भाषांत बोलणे सोडून देईन' अशी गुणाढ्याने प्रतिज्ञा केली होती. या प्रतिज्ञेतली देश्य भाषा ही तेलुगूच होय, असे त्या भाषेचे जाणकार म्हणतात. अशा काही पुराव्यांवरून इ. स. च्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकाच्या सुमारास तेलुगूला स्वतंत्र अस्तित्व लाभले होते, असे म्हणणे शक्य आहे.

इ. स. च्या ६ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून मात्र तेलुगूच्या विकासाच्या खुणा स्पष्ट दिसू लागतात. या काळापासून तेलुगूत

**तेलुगू लिपी** – बहुतेक सर्व ध्वनींसाठी तेलुगूत लिपिचिन्हे उपलब्ध आहेत. तेलुगू वर्णमाला ही शास्त्रीय व संपूर्ण आहे. तिच्यात छप्पन्न अक्षरे आहेत. या वर्णमालेत ए व ओ या स्वरांचे ऱ्हस्व व दीर्घ असे दोन उच्चार असून, त्या दोघांसाठी स्वतंत्र लिपिचिन्हे आहेत. याशिवाय अर्धानुस्वारासाठीही एक वेगळे चिन्ह आहे. रकार दोन प्रकारचे आहेत. त्यांपैकी एकाला रेफ व दुसऱ्याला शकटरेफ असे म्हणतात. मराठीप्रमाणे तेलुगूमध्येही च व ज यांचे दन्त्य व तालव्य असे दोन स्वतंत्र उच्चार आहेत. तेलुगू भाषेचे सर्व शब्द स्वरान्त आहेत. त्यामुळे ही भाषा संगीताला अत्यंत उपयुक्त ठरली आहे. कर्नाटक संगीताच्या सर्व वाग्गेयकारांनी याच भाषेत आपल्या कृती रचल्या आहेत.

तेलुगू लिपीचे कन्नड लिपीशी बरेचसे साम्य आहे. कित्येक लोक असे मानतात, की सुमारे ४०० वर्षांपूर्वीपर्यंत तेलुगू

व कन्नड या दोन्ही भाषांची लिपी एकच होती. तेलुगू लिपी ही ब्राह्मीच्या दाक्षिणात्य शैलीतून उगम पावली आहे. पश्चिमेकडील वनवासीचे कदंब, बदामीचे पहिले चालुक्य, पूर्वेकडील वेंगीचे पहिले चालुक्य आणि शालंकायन या राजघराण्यांच्या शिलालेखांत या लिपीचे प्राचीन रूप आढळते. इ. स. च्या सातव्या शतकापर्यंत या लिपीत फारसे प्रांतिक भेद आढळत नाहीत. या काळापर्यंत तिचे ब्राह्मी लिपीशी विशेष साम्य आढळते.

इ. स. च्या सातव्या शतकाच्या मध्यापासून पुढे तीन शतके बदामीचे चालुक्य, मान्यखेटचे राष्ट्रकूट, गंगवाडीचे गंग, वेंगीचे चालुक्य आणि त्यांचे मांडलिक या राजघराण्यांच्या शिलालेखांत या लिपीची मध्यकालीन अवस्था दिसते. या काळात हिचे स्वरूप स्थूलपणे बदलत गेले आहे. अक्षरांना उभे आणि चौकोनी वळण लागणे, व्यंजनांचे दीर्घत्व व्यक्त होणे, स्वरदर्शक खुणा व्यंजनांच्या खाली करण्याऐवजी पुढे उजवीकडे करणे, यांसारखे, कन्नड आणि ग्रंथ या दोन लिप्यांहून भिन्नत्व दर्शविणारे बदल या काळातच झाले आहेत.

द. भारतातील अनेक प्राचीन शिलालेखांत या लिपीचा वापर केलेला असला, तरी त्या शिलालेखांची भाषा मात्र बहुतांशी संस्कृत आहे. तेलुगू भाषेतील सर्वांत जुने शिलालेख अनंतपूर व कडप्पा जिल्ह्यांत असून, ते तेरेनाडच्या चोळांचे आहेत. त्यांचा काळ इ. स. चे सहावे ते आठवे शतक हा आहे.

इ. स. च्या अकराव्या शतकाच्या सुमारास पूर्वेकडील चालुक्यांच्या लेखांत आणि त्यानंतरच्या काळात पश्चिमेकडील गंगांच्या लेखांत तेलुगू–कानडी लिपीचे जे स्वरूप आढळते, ते अर्वाचीन तेलुगू व कानडी लिप्यांहून फारसे भिन्न नाही. तेलुगू–कानडी लिपीच्या या परिणत स्वरूपातूनच इ. स. च्या तेराव्या शतकापासून तेलुगू व कानडी या दोन लिप्या थोड्याशा प्रादेशिक भेदाने वेगळ्या बनत गेल्या. याच काळात होऊन गेलेल्या मंचना नामक तेलुगू कवीने तेलुगू लिपीचा 'आंध्रलिपी' म्हणून उल्लेख केला आहे.

या काळात, मध्ये येणारा स्वर कानडी लिपीत व्यंजनाच्या उजव्या बाजूला त्याच ओळीत लिहिला जाऊ लागला. महाप्राण व्यंजनातील हकाराला स्वतंत्र चिन्ह लाभले. अनुस्वार, बिंदूऐवजी पोकळ टिंबाने दाखवले जाऊ लागले. रेफयुक्त व्यंजनांचे स्वरूप कानडीत तेव्हापासून जे रूढ झाले, तेच आजही कायम आहे. तेलुगूत मात्र गेल्या शतकात ते नाहीसे झाले आहे. इ. स. च्या एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी मुद्रणकला अस्तित्वात आल्यानंतर या दोन लिप्यांतील फरक दृढमूल झाले आणि त्यांना निश्चित असे स्वतंत्र अस्तित्व लाभले. परंतु त्यांचे उत्पत्तिस्थान एकच असल्याने आणि त्यांच्यांतील फरक फारसे तीव्र नसल्याने ज्याला [...] एक लिपी वाचता येते, त्याला दुसरी लिपी वाचणे कठीण [...] नाही.

**तेलुगू व्याकरणे** – अकराव्या शतकात होऊन गेलेल्या नन्नय भट्टाला तेलुगू व्याकरणाचा जनक मानतात. याच्या व्याकरणाचे नाव आंध्रशब्दचिंतामणी असे आहे. पाणिनीप्रमाणे नन्नय भट्टानेही तेलुगू भाषेची सूत्रे संस्कृतात लिहिली आहेत. पाणिनीच्या व्याकरणाच्या धर्तीवरच नन्नय्यभट्टाने आपल्या व्याकरणाची रचना केली आहे. त्यानंतर अथर्वणाचार्य नावाच्या पंडिताने विकृतिविवेक या नावाने व्याकरणकारिका रचल्या. पुढे अहोबलपंडिताने नन्नय्यभट्टाच्या व्याकरणावर भाष्य रचले. आधुनिक कालात श्री. कॅम्बेल यानेही एक तेलुगू व्याकरण रचले आहे. त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत श्री. एलिस याने तेलुगूचा पहिला व्याकरणकार म्हणून कोण्या कण्वमुनीचा नामोल्लेख केला आहे. हा व्याकरणकार नन्नय्यभट्टाच्याही पूर्वीचा [...] असे त्याने म्हटले आहे.

**साहित्य** – तेलुगू भाषेच्या इतिहासकारांनी तिच्या सा[हित्याचे] त्याचे पुढीलप्रमाणे कालखंड कल्पिले आहेत –

(१) अज्ञातकाल — इ. स. ५०० ते १००० पर्यंत.

(२) पुराणकाल–– इ. स. १००० ते १४०० पर्यंत.

(३) काव्य-प्रबंधकाल—इ. स. १४०० ते १६५० पर्यंत.

(४) ऱ्हास-काल––इ. स. १६५१ ते १८५० पर्यंत.

(५) आधुनिककाल—इ. स. १८५१ ते आजतागायत.

(१) अज्ञातकाल — तेलुगू लिपीचा प्रादुर्भाव इ. स. [च्या] सातव्या शतकाच्या आगेमागे झाला. त्यामुळे त्यापूर्वीचे तेलुगू साहित्य लिपिबद्ध स्वरूपात आढळत नाही. मात्र [...] तेलुगूत साहित्यनिर्मिती झालीच नव्हती, असा याचा अर्थ [नव्हे]. त्या युगातले साहित्य हे वीरगाथा व ग्रामगीते या स्वरूपात होते व मौखिक परंपरेने एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे [जात] होते. तुम्मेदपदमुलू (भ्रमरगीत), गोब्बिपदमुलू, यक्षगान[मुलू], मेलुकोलुमुलू, सद्दूलू अशासारखी लिपिपूर्व काळा[तील] लोकगीते तेलुगू भाषेत निर्माण झालेली आहेत.

(२) पुराणकाल –– या कालखंडाच्या प्रारंभी चालु[क्य] नरेश राजराज हा आंध्र प्रदेशावर राज्य करीत होता. नन्नय्यभट्ट हा महाकवी त्या राजाचा कुलगुरू होता. राज[राज] जेव्हा गादीवर आला, तेव्हा त्याला दिसले, की [...] प्रजाजन विकृत धर्मकल्पनांच्या आहारी गेले आहेत; [...] धर्माची श्रेष्ठ तत्त्वे आणि नैतिक मूल्ये यांचा त्यांना [विसर] पडला आहे. या विचाराने सचिंत होऊन त्याने नन्नय्यभट्ट[ाला]

सल्ला विचारला, की 'लोकांची ही धर्मग्लानी घालवण्यासाठी काय करावे ?' त्यावर नन्नय्यभट्ट म्हणाला, की 'तेलुगू भाषेत महाभारताचा अनुवाद करावा. जनांना खऱ्या धर्माचे ज्ञान देण्याच्या कामी तो ग्रंथ अलौकिक आहे'.

त्यावर राजा नन्नय्यभट्टाला म्हणाला, की 'तर मग तुम्हीच महाभारताचा अनुवाद सुरू करा.' नन्नय्यभट्टाने लगेच त्या कार्याला प्रारंभ केला. परंतु सभा आणि अर्धे वनपर्व एवढ्या भागाचाच अनुवाद त्याच्या हातून पुरा झाला आणि त्याचा मृत्यू ओढवला. त्यामुळे ते कार्य अपुरे राहिले; पण झाला तेवढाच अनुवाद इतका सरस उतरला, की ते जणू तेलुगू भाषेला वरदानच ठरले. त्यामुळेच नन्नय्यभट्टाला तेलुगू भाषेचा आदिकवी ही उपाधी लाभली.

महाभारताची थोरवी गातांना नन्नय्यभट्ट पुढील उद्‌गार काढतो—

**धर्मतत्त्वज्ञुलु धर्मशास्त्रंबनि अध्यात्मविदुलु वेदांतमनियु**
**नीतिविचक्षणुलु नीतिशास्त्रंबनि कविवृषभुलु महाकाव्यमनियु**
**लाक्षणिकुलु सर्वलक्ष्यसंग्रहमनि ऐतिहासिकुलितिहासमनियु**
**परमपौराणिकुलु बहु पुराणसमूच्चयंबनि महिगोनियाडुचुंड ।**

अर्थ—या पृथ्वीतलावर धर्मतत्त्ववेत्ते धर्मशास्त्राच्या रूपात, अध्यात्मवेत्ते वेदान्ताच्या रूपात, नीतिविशारद नीतिशास्त्राच्या रूपात, कविश्रेष्ठ महाकाव्याच्या रूपात, लक्षणवेत्ते सर्वलक्ष्य-संग्रहाच्या रूपात, इतिहासवेत्ते इतिहासाच्या स्वरूपात व पौराणिक पुराणसंग्रहाच्या स्वरूपात महाभारताचा महिमा वर्णितात.

नन्नय्यभट्टाने एका ठिकाणी शरद ऋतूचे वर्णन करताना पुढील पंक्ती लिहिल्या आहेत—

**शारद रात्रुलुज्वल लसत्तर तारक हार पंक्तुलंजारु तरंबुलय्ये**
**विकसन्नवकैरवगन्धबन्धुरोदार समीर सौरभमु दाल्चि**
**सुधांशुविकीर्यमाणकर्पूरपराग पांडुरुचिपूरमुलम्बर पूरितम्मुलै**

अर्थ—शरदातल्या रात्री नक्षत्ररूपी हारपंक्तींनी रम्य व उज्ज्वल झाल्या आहेत. प्रफुल्ल कमलांच्या सुगंधाने भरलेला वारा सर्वत्र संचार करतो आहे. चांदण्याची छटा अशी आहे, की जणू चंद्र आपल्या किरणांनी कापराचे चूर्णच पृथ्वीवर छिडकीत राहिला आहे.

हे वर्णन नन्नय्यभट्टाच्या कवितेलाही यथार्थपणे लागू पडते. तिचा काव्यसौरभ आजही आंध्र प्रदेशात दरवळत राहिला आहे.

नन्नय्यभट्टाच्या या अपुऱ्या अनुवादाचे काम पुढे तेराव्या शतकात तिक्कन्न सोमयाजी याने सुरू केले. हाही एक तेलुगू भाषेचा महाकवीच होय. याला नेल्लोरचा राजा मनुमसिद्धी याचा आश्रय होता. प्रस्तुत अनुवादकार्याची पात्रता लाभावी म्हणून प्रथम त्याने सोमयाग केला. वनपर्व हे अशुभ पर्व आहे व ते अनुवादाला घेतल्यामुळेच नन्नय्यभट्ट अकाली मृत्युमुखी पडला, अशी तत्कालीन विद्वानांची समजूत होती. त्यामुळे तिक्कन्नाने ते अर्धवट वनपर्व तसेच सोडून दिले आणि आपल्या अनुवादाला विराटपर्वापासून प्रारंभ केला. योग्य कालावधीत त्याने समग्र महाभारत पुरे केले. ते पाहून मनुमसिद्धी तिक्क-न्नावर खूष झाला आणि त्याने तिक्कन्नाला कविब्रह्म अशी पदवी दिली. परंतु पुढे अनेक राजकीय उलाढाली झाल्यामुळे तिक्कन्नाला ते अर्धवट राहिलेलें वनपर्व मात्र पूर्ण करता आले नाही.

ते काम पुढे इ. स. च्या १४ व्या शतकात यर्राप्रगड या कवीने पुरे केले. या कवीला अन्नवेम्मा रेड्डी या राजाचा आश्रय होता. यर्राप्रगडाने वनपर्व पुरे केले खरे; पण त्याने आपली रचना श्लोकबद्ध न करता प्रबंधरूपाने केली. तेव्हापासून यर्राप्रगडाला प्रबंधपरमेश्वर अशी पदवी लाभली. या पूर्ण तेलुगू महाभारतामुळे नन्नय्य, तिक्कन्न व यर्राप्रगड हे तीन महाकवी आंध्रात कवित्रय म्हणून ओळखले जाऊ लागले.

कवित्रय हे केवळ महाभारताचे अनुवादकच नाहीत; या तिघांची स्वतंत्र आणि मौलिक अशी वेगळी ग्रंथरचनाही आहे. नन्नय्यभट्टाने इंद्रसेनविजयमू व चामुंडिकाविलासमू ही काव्ये; तिक्कन्नाने निर्वचनोत्तररामायण, कविवाग्बंधनमू, विजयसेनमू व कृष्णशतकमू ही काव्ये आणि यर्राप्रगडाने रामायणमू, लक्ष्मीनृसिंहपुराणमू, हरिवंशमू, इ. काव्ये रचली आहेत.

महाभारताप्रमाणेच रामायणाचा अनुवादही याच काल-खंडात झाला. भास्कर हा कवी व त्याचे अनेक शिष्य यांनी मिळून चंपूपद्धतीने रामकथा लिहून पुरी केली. या रामायणाला भास्कररामायण असे म्हणतात. आंध्रात गावोगावच्या मंदिरां-तून व घरोघर हे रामायण वाचले-गायले जाते. बुद्धरड्डी या कवीने याच कालखंडात आणखी एक रामायण लिहिले, ते रंगनाथरामायण या नावाने प्रसिद्ध आहे.

याच कालखंडात आणखीही काही प्रसिद्ध कवी होऊन गेले आणि त्यांनी तेलुगू भाषा संपन्न केली. त्यांपैकी पालकुरिती सोमनाथ हा कवी बाराव्या शतकात जन्मला. वरंगळच्या प्रतापरुद्र राजाचा त्याला आश्रय होता. हा कवी वीरशैव होता. याने पंडिताराध्यचरित्रमू व बसवपुराणमू हे दोन ग्रंथ लिहून वीरशैव पंथ आंध्रात लोकप्रिय केला. प्रस्तुत कवीने आपले दोन्ही ग्रंथ द्विपदा नामक छंदात लिहिले आहेत.

मार्गपरंपरा व देशीपरंपरा अशा दोन परंपरा तेलुगू साहि-त्यात मानतात. पुराण व प्रबंध हे साहित्य मार्गपरंपरेत येते;

तर द्विपदा साहित्य हे देशीपरंपरेत येते. देशीपरंपरेत द्विपदा छंदाला सर्वोच्च स्थान आहे. मुख्यत्वे प्रस्तुत कालखंडात जे वीरशैव कवी झाले, त्यांनी द्विपदा छंदाचाच आश्रय केला आहे. पालकुरिती सोमनाथ हा देशीपरंपरेचा आधारस्तंभ मानला जातो.

रविपाटी तिप्पन्न, नाचन सोमन्न, गौरन्न मंत्री, नन्नें चोडकवी, वेमुलवाड भीमकवी, भद्रभूपती, केतन्न, मारन्न, इ. अनेक कवींनी प्रस्तुत कालखंडात पौराणिक साहित्यावर स्वच्छंद अनुवादात्मक असे अनेक ग्रंथ रचले.

तेलुगू भाषेत शतकसाहित्याचा उगमही याच कालखंडात झाला. ही शतककाव्यांची रचना इ. स. च्या अकराव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंत चालू असल्याचे दिसून येते. तेलुगूचे हे शतकसाहित्य इतके समृद्ध आहे, की त्या भाषेचे ते एक वैशिष्टय म्हणूनच सांगावे लागेल. तेलुगूच्या बहुतेक, सुप्रसिद्ध कवींनी शतककाव्य लिहिलेले आहे. ही शतककाव्ये शृंगार, भक्ती, नीती व सामान्य उपदेश अशा विविध विषयांवर आहेत. संशोधकांचे असे सांगणे आहे, की तेलुगूत सुमारे अडीच हजार शतककाव्ये रचली गेली आहेत. त्यांतल्या एक हजार शतकांचा आतापर्यंत पत्ताही लागला आहे. या सर्वांत भद्रभूपतीचे सुमतिशतक हे सर्वपरिचित आहे. यातले एखादे तरी पद्य ज्याला येत नाही, असा माणूस आंध्रात शोधूनही मिळणार नाही. त्यातील एक पद्य असे--

**एप्पुडु संपद गलिगिन नप्पुडु बंधुवुलु वत्तुरदि येद्लनिनन्**
**देप्पलुग जेरुवुनिंडिन गप्पलु पदिवेलु जेरु गदरा सुमती।**

अर्थ – जेव्हा धनदौलत जमा होते, तेव्हा आप्तबंधू चहूकडून आपल्या घरी जमतात. पाण्याने भरलेल्या तलावात जसे हजारोंच्या संख्येने बेडूक जमा होतात तसे.

(३) काव्य-प्रबंधकाल – या कालखंडाचा मुकुटमणी शोभेल असा महाकवी म्हणजे श्रीनाथ हा होय. तिक्कन्नानंतर हा एकच त्या तोडीचा रससिद्ध कवी झाला. याला मुख्यत्वे राजमहेंद्रीच्या रेड्डी राजाचा आश्रय होता. पल्नाटी वीरचरितम हे याचे द्विपदाछंदात लिहिलेले अमरकाव्य होय. आंध्र प्रदेशातले राजवंश ही या काव्याची वर्ण्य वस्तू आहे. यात वीररसाचा परिपाक उत्तम साधला आहे. कवीच्या उज्ज्वल प्रतिभेचे अनेक गुणविशेष या काव्यात दिसतात. श्री. हनुमंतशास्त्री म्हणतात, की 'श्रीनाथाची कविता ही शिवाच्या जटेतून निघालेल्या गंगेसारखी पवित्र वाटते आणि तिच्यात अवगाहन करीत असताना मन प्रसन्न होते.' प्रस्तुत काव्याशिवाय मरुत्तराटचरित, शालिवाहनसप्तशती, शृंगारनैषध, हरविलासमू, भीमपुराण, काशीखंड, इ. आणखीही काही काव्ये त्याने लिहिली आहेत.

या कालखंडातला दुसरा मोठा कवी वेमन्न हा होय. वेमन्नाने पुष्कळ लिहिले आहे असे म्हणण्यापेक्षा तो पुष्कळ बोलला आहे, असेच म्हटले पाहिजे. तो दौत–लेखणी घेऊन कधी लिहायला बसलाच नाही. तो मुक्तपणे बोले तेच मुळी पद्यबद्ध असे. त्याचे शिष्य त्याची ही मुक्तवाणी लिहून घेत. याची सर्व रचना सरळ, सुबोध आणि संक्षिप्त आहे. पंडिती शैलीपासून तो फार दूर राहिला आहे. आटवेलदी व कंद हे दोन छोटे छंद त्याला विशेष प्रिय होते. याच्या सूक्ती आंध्र प्रदेशात सर्वत्र लोकोक्तीसारख्या वापरल्या जातात. वेमन्नाचा एखादा छंद ज्याच्या जिभेवर नाही, असा मनुष्य आंध्रात मिळणे दुर्लभ!

वेमन्न हा योगी व निर्गुणोपासक होता. त्याला व्रत, तप, उपवास, मूर्तिपूजा, इ. गोष्टी मान्य नव्हत्या. तो म्हणतो–

**हृदयमुननुन्न ईशुनि तेलियक**
**शिलल केल्लम्रोक्कु जीवुलार**
**शिलल नेमियुंडु जीवु लंदे काक–**
**विश्वदाभिराम विनुर वेम**

अर्थ – मूर्ख मनुष्य हृदयस्थ ईश्वराला न ओळखून दगडांची पूजा करीत सुटतो. त्या दगडांत काय ठेवले आहे ? परमेश्वर तर प्रत्येक प्राण्याच्या हृदयात निवास करतो.

अन्नमाचार्य हाही याच कालखंडातला एक उल्लेखनीय कवी होय. याने तिरुपतीच्या व्यंकटेशाची स्तुती करणारी आणि त्याच्या विविध लीला वर्णन करणारी ३२,००० पद्ये लिहिली असे सांगतात. त्यांपैकी १३,००० पद्ये सांप्रत उपलब्ध आहेत. ही सर्व पद्ये मुळात ताम्रपत्रावर लिहिलेली होती. अन्नमाचार्यांची कविता बहुतांशी शृंगारिक आहे. पण तो शृंगार सोज्वळ आणि उच्च अभिरुचीचा आहे. याचे सर्व काव्य लोकांच्या साध्या बोलचालीच्या भाषेत आहे. व्यंकटेशाचा भक्त असूनही त्याच्या अंतःकरणात सांप्रदायिक अभिनिवेश नव्हता. तो एका पद्यात स्पष्टच म्हणतो–

**एव्वरि गोलिचिन नेमि गोरत मरि**
**येव्वरि वलचिन नेमि,**
**अव्वलिव्वल श्रीहरिरुपुगानि वा**
**रेव्वरुलेरनि येरुक दोचिनजालु।**

अर्थ – कोणत्याही देवदेवतेची उपासना करा. त्यात कोणताही दोष नाही. भक्ताने हे जाणावे, की अंतर्बाह्य जगात हरिरूपावाचून अन्य काहीही नाही.

अन्नमाचार्यांची विशिष्ट पद्यात्मक रचना स्वीकारून भागवतासारख्या महान ग्रंथाचा अनुवाद करणारा याच्या पुढचा श्रेष्ठ कवी म्हणजे बम्मेर पोतन्न. याचा भागवतानुवाद हा ग्रंथ म्हणजे तेलुगू साहित्यातले एक देदीप्यमान रत्न समजतात

हा कवी वैष्णव होता. त्याचे अंत:करण परमभक्ताचे होते. ते विष्णूवाचून अन्यत्र कुठेही रमत नसे. याच आशयाचे त्याचे एक पद्य आहे, ते असे–

मंदारमकरंदमाधुर्यमुन देलु
मधुपंबु वोनुने मदनमुलकु
निर्मलमंदाकिनीवीचिकल दूगु
रायंच जनुने तरंगिणुलकु
ललितरसालपल्लव खादियै चोक्कु
कोयिल सेरुनै कुटजमुलकु
पूर्णेन्दुचन्द्रिकास्फुरितचकोरकं
बरुगुने सान्द्र नीहारमुलकु
अम्बुजोदरदिव्यपादारविंद
चिन्तनामृतपानविशेषमत्त
चित्त मेरीति नितरंब जेर नेर्चु
विनुतु गुणशील माटलु वेयनेल ।

अर्थ – मंदारपुष्पातल्या मकरंदाचे माधुर्य ज्याने चाखले, असा भ्रमर कधी कडुलिंबाच्या झाडाकडे जाईल काय? मंदाकिनीच्या निर्मल लहरींवर तरंगणारा हंस तिला सोडून कधी लहान नदीकडे पाय वळवील काय? कोमल आम्रमंजरीचे सेवन करून मदमत्त झालेला कोकिळ कधी मामुली वृक्षाकडे वळेल काय? पूर्णिमेच्या पूर्ण चंद्राचा शीतल किरण टिपणारा चकोर कधी दवबिंदूवर आसक्त होईल काय? त्याचप्रमाणे श्रीविष्णूच्या चरणकमलातले अमृत ज्याने आस्वादिले असे मन कधी दुसऱ्या विषयांवर आसक्त होईल काय? कधीही नाही.

पोतन्नाच्या या भागवतात तीस हजार पद्ये आहेत. त्याने मूळ कथा संस्कृत भागवतातून घेतली; पण अनुवाद मात्र स्वतंत्र प्रज्ञेने केला. मूळ भागवतातली अनेक स्थळे आणि आख्याने पोतन्नाच्या मधुर काव्यशैलीने अत्यंत हृदयंगम झाली आहेत. एक गजेंद्रमोक्षाचे आख्यानच पाहिले, तरी या गोष्टीचा प्रत्यय येईल. सप्तमस्कंध हा भागवताचा प्राण समजला जातो. कारण त्या स्कंधात प्रल्हादाचे भावपूर्ण आख्यान आहे. पोतन्नाने या स्कंधाचा अनुवाद अतिसुरस केला आहे. तिक्कन्नाने महाभारताचे विराटपर्व लिहिताना आपल्या प्रतिभेचा जो अलौकिक साक्षात्कार दाखवला, तोच साक्षात्कार पोतन्नाने भागवताच्या सप्तमस्कंधात दाखवला आहे. म्हणूनच वसुराय याच्यासारखा एक कवी म्हणतो, की 'अठरा विश्वे दारिद्र्याचे विष पिऊन पोतन्नाने भागवतासारखे अमृत निर्माण केले.' आंध्र प्रदेशात भक्तीचा मळा पोतन्नानेच फुलवला.

प्रस्तुत कालखंडाचा उत्तरार्ध म्हणजे विजयनगर साम्राज्याचा उत्कर्षकाल होय. या कालखंडात कृष्णदेवराय या सम्राटाची सत्ता गाजत होती. विक्रमादित्य, भोज, इ. विद्वान आणि विद्वानांचे आश्रयदाते असे जे थोडेच राजे भारतात होऊन गेले, त्यांत कृष्णदेवरायाची गणना होते. दक्षिणेतले कवी त्याला आंध्रभोज असेच म्हणतात. याच्या कारकिर्दीत दक्षिणेत साहित्य आणि कला यांनी उत्कर्षाची परमावधी गाठली. आंध्रातही तसेच झाले. कृष्णदेवरायाने संस्कृत भाषेत काही काव्ये व नाटके रचली आहेत; पण त्याचे उल्लेखनीय प्रबंधकाव्य म्हणजे आमुक्तमाल्यदा हे होय. ते त्याने तेलुगू भाषेत रचले आहे. या काव्यात अनेक राजनैतिक सिद्धान्तांची महत्त्वपूर्ण चर्चा केलेली आहे. त्यामुळेच हा ग्रंथ तत्कालीन अन्य राजांनाही मार्गदर्शक बनला. कृष्णदेवरायाला तेलुगूचा फार अभिमान होता. 'देशभाषलंदु तेलुगू लेस्स' म्हणजे सर्व देशी भाषांत तेलुगू भाषा चांगली, असे त्याने एका ठिकाणी म्हटले आहे. याच्या दरबारात आठ कवी होते, त्यांना अष्टदिग्गज असे म्हणत. त्यांची नावे अशी– अलसानी पेदन्न, नंदी तिमन्न, धूर्जटी, मदयागारी मलयन्न, रामभद्र, रामराजुभूषणमू, पिंगळी सूरन्न व तेन्नाली रामकृष्ण.

पैकी पहिले सहा कवी कृष्णदेवरायाचे समकालीन होते, हे आता सिद्ध झाले आहे. शेवटचे दोघे मात्र कृष्णदेवरायाच्या नंतर ६०–७० वर्षांनी उदयाला आले, असे ग्रंथांतरीच्या प्रमाणांवरून निश्चित होते.

अलसानी पेदन्न याने मनुचरित्र नावाचे काव्य लिहिले. यातली कथा त्याने मार्कंडेय पुराणातून घेतली आहे. कल्पकता, वर्णनशैली आणि रसपरिपोष या तीन्ही गोष्टींत पेदन्नाचे मनुचरित्र अप्रतिम वठले आहे. त्यात अनेक प्रसंगांची आणि प्रदेशांची वर्णने आली आहेत. त्यांपैकी त्याने केलेल्या हिमालयवर्णनाचा एक नमुना असा––

पसुपु निग्गुल देरु पापजन्निद मोप्प
ब्रमाथाधिपति यिट्टिपट्टैरिंगे
शचिकौत गरपुचु जदलेट सुरराजु
जलकेळि सर्वरिंचु चेलु वैरिंगे
नदनुतो जेपि चन्नविसि योषधुल
मन्मोदवु कोंडल केल्ल बिडुक नेरिगे
वेल्पु टिंटुलल्लोन विरिवीगुचु मेन
नवरत्न रचनल खण मेरिगे
बरिपरि विधंपु जन्नंपु बरिकरंपु
सोंपू संपद निखिल निर्लिप सभयु
नप्पटप्पटिकिनि जिह्व त्रुप्पुडुल्ल
वामेत लरिंगे नी तुहिनाद्रि कतन

अर्थ–नैष्ठिक ब्रह्मचारी असलेल्या शिवाला हिमाचलाने आपली कन्या देऊन गृहस्थ बनवले. हिमाचलाने गंगेला धारण केले; म्हणूनच देवेंद्राला त्या नदीत जलक्रीडा करण्याचे भाग्य लाभले. गोरूपी पृथ्वीचा वत्स बनून हिमाचलाने ओषधिरूप दूध शोषून घेतले व ते सर्व पहाडांवर विखरून टाकले. हिमाचल हा मेनेचा पती आहे. हिमाचल नवरत्नांनी भरलेला आहे. म्हणूनच मेनेच्या अंगावर रत्नजडित अलंकार असतात आणि ती सर्व देवस्त्रियांत डौलाने मिरवते. वेळोवेळी राजे–महाराजे यांचे यज्ञयाग याच पर्वतावर होत राहिले आहेत आणि त्यामुळेच इथे स्वर्गातल्या देवांना मिष्टान्नांच्या मेजवान्या मिळत राहिल्या आहेत.

अलसानी पेद्दन्नाचे असे हे अलौकिक काव्यगुण पाहून कृष्णदेवरायाने 'आंध्रकवितापितामह' अशी पदवी त्याला दिली आणि त्याचा सन्मान केला.

त्याच्या नंतर नंदी तिम्मन्नाने पारिजातापहरण नावाचे एक रसाळ काव्य लिहिले. तिम्मन्नाची कविता निसर्गतःच मधुर आहे. तेलुगू व संस्कृत या दोन्ही भाषांतील मृदुमधुर शब्द निवडण्याची त्याची हातोटी विलक्षण होती. धूर्जटीने कालहस्तीमाहात्म्यमू या नावाचे एक काव्य रचून दुसरे एक शतककाव्यही निर्मिले. मादयागिरी मलन्न याने राजशेखरचरित्र हे काव्य लिहिले. अय्यल राजू रामभद्र याने रामाभ्युदयमू हे काव्य लिहून कृष्णदेवरायाच्या सकलकथासारसंग्रह नामक संस्कृत पुस्तकाचा अनुवादही केला. पिंगळी सूरन्न याच्या राघवपांडवीयमू या काव्याचे वैशिष्टय हे, की ते समग्र काव्य द्व्यर्थी आहे. त्यातला एक अर्थ रामायणाला लागतो, तर दुसरा महाभारताला. त्यातल्या कवितेचा एक नमुना असा–

एंडु वेट रारे इतरुले मनसुतो दार संग सुखमु दप्प द्रोचि
तकट पांडुराज यशमेन्न वेंर्तति क्रूर दशरथेय कुलमु रोय

अर्थ–- दशरथ राजा एके दिवशी अरण्यात शिकारीसाठी गेला असता त्याने चुकून एका ऋषिकुमाराची हत्या केली. नंतर त्याने घायाळ कुमाराला (श्रावण) उचलून त्याच्या वृद्ध व अंध आईबापांच्या पुढे नेऊन ठेवले. दशरथाने घडलेला वृत्तान्त सांगताच त्या दोघांनी दशरथाची निर्भर्त्सना केली.

प्रस्तुत पद्याचा भारतविषयक अर्थ असा –

एकदा पंडू राजा शिकारीसाठी गेला असता एक मुनी व त्याची स्त्री मृगरूपात विहार करताना त्याने पाहिली. अजाणता पंडूने त्यांच्यावर बाण मारला. मरता मरता त्यांनी पंडुराजाची निर्भर्त्सना केली.

पिंगळी सूरन्नाचे दुसरे एक मोठे प्रबंधकाव्य कळापूर्णोदयमू हे होय. ही एक असाधारण वस्तू आहे. शृंगार व अद्भुत या दोन रसांचे एक आगळेच मिश्रण यात दिसून येते. तेलुगू साहित्याच्या इतिहासात हे प्रबंधकाव्य म्हणजे एक विजयपताकाच समजली जाते.

तेन्नाली रामकृष्ण हाही एक असाच विचक्षण साहित्यकार होऊन गेला. याने पांडुरंगमाहात्म्य व उद्भटाराध्यचरित्र अशी दोन काव्ये लिहिली. त्याच्याविषयी आंध्रात अनेक आख्यायिका प्रचलित आहेत. त्याला विकट कवी असेही म्हणतात. त्याची समयसूचकता बिरबलासारखी अलौकिक होती.

कुम्मर मोल्ल ही या कालखंडातली प्रसिद्ध कवयित्री होय. हिने रामायणावर काव्य रचले असून ते प्रासादिक आहे. बालकमंडळींचे हे फार आवडते आहे. चेमकूर वेंकट कवी यानेही बरेच नाव मिळवले. विजयविलासमू व सारंगधरचरित्रमू अशी दोन प्रबंधकाव्ये याने लिहिली. विजयविलासमू हे अर्जुन व सुभद्रा यांच्या विवाहप्रसंगावर आधारलेले आहे. त्यात म्हणी व वाक्प्रचार सर्वत्र विखुरलेले असून, त्याची संवादशैली अप्रतिम आहे. तेलुगूतले हे शेवटचे प्रबंधकाव्य समजले जाते.

प्रस्तुत कालखंडाचे वैशिष्टय हे, की या कालखंडात नाव घेण्याजोगे बरेच कवी झाले. या कालखंडाच्या उत्तरार्धात कित्येक कवींनी अनुवादाचा मोह टाकून स्वतंत्र काव्ये रचण्यास प्रारंभ केला. त्याचबरोबर कित्येक कवींनी कवितेच्या द्वारे आपल्या पांडित्यप्रदर्शनाचीही हौस भागवून घेतली. शतकसाहित्यही खूप निर्माण झाले. या कालखंडात विजयनगर, गोवळकोंडा, नंदियाळ, पेनुगोंडा व चंद्रगिरी ही शहरे तेलुगू साहित्याची महत्त्वाची केंद्रे ठरली.

(४) ऱ्हासकाल– या कालखंडात विजयनगरचे साम्राज्य मोडले. आंध्र प्रदेश छोटचा छोटचा राज्यांत छिन्नभिन्न झाला. त्यामुळे समाजाला अवकळा आली. राष्ट्रीय नैतिक जीवन अवनतीकडे झुकू लागले. मोगल, मराठे, इंग्रज, फ्रेंच व म्हैसूरकर या लोकांच्या परस्पर कटकटी सुरू झाल्या. देशात बेबंदशाही माजली. विद्या व कला यांना दैन्याचे दिवस आले. साहित्यात हीन व विकृत अभिरुचीला प्राधान्य मिळाले. साहित्यातली सजीवता नष्ट होऊन ते कृत्रिम व तकलुपी बनले. उत्तान शृंगाराला भरती आली. पूर्वी भूषणकाव्ये लिहिली जात असत, पण या कालात एखाद्या राजाने एखाद्या कवीला आश्रय देण्याचे नाकारले, तर तो कवी त्या राजावर दूषणंकाव्य लिहू लागला. कूचिमंची जग्ग कवी याने चंद्ररेखाविलापमू नावाचे काव्य लिहून दूषणकाव्याचा श्रीगणेशा केला. पुढे अडिदमुसुर, पिंडिप्रोलू, लक्ष्मण, इ. कवींनी ती परंपरा पुढे चालवली.

तेलुगूतले पहिले गद्य पौराणिक आख्यानांच्या आधारे अवतरले. जैमिनीभारतमू हा वेंकट कृष्णप्प याचा गद्यग्रंथ पहिला

व उत्कृष्ट समजला जातो. क्षेत्रय्य व त्यागराज हे पद्यसाहित्याचे धुरीण होत. क्षेत्रय्याने हजारो पद्ये रचून गोपाळकृष्णाच्या मधुराभक्तीचे मंडण केले. त्यागराज हा रामोपासक वैष्णव होता. त्याने शेकडो कीर्तने रचून तेलुगू भाषेत रामभक्तीचा सुकाळ केला. लिंगमूर्ती हाही याच काळातला कवी होय. त्याच्या कवितेत वेदान्ताचे गंभीर प्रतिपादन आढळते. प्रस्तुत कालखंडात तेलुगूमध्ये उत्तान शृंगाराची सरोवरे जागोजाग उत्पन्न झाली. या सरोवरात क्षेत्रय्य, त्यागराज व लिंगमूर्ती हे तीनच कवी निर्मल आणि शुभ्र कमलासारखे दिसतात.

प्रस्तुत कालखंडाच्या अखेरीस आंध्रावर इंग्रजांचा अंमल सुरू झाला. त्यांच्याबरोबरच ख्रिस्ती मिशनरीही तिथे आले व आंध्रात सर्वत्र पसरले. या मिशनऱ्यांनी व इंग्रज अधिकाऱ्यांनी आपल्या धर्मप्रसाराच्या बाबतीत काही उणे अधिक केलेले असो; पण त्यांनी तेलुगू भाषेच्या अभिवृद्धीला मात्र मोलाची मदत केली. तेलुगू पंडितांना हाताशी धरून त्यांनी व्याकरण, छंदःशास्त्र, इ. विषयांवर ग्रंथ निर्माण केले. सुप्रसिद्ध कवी वेमन्न याच्या कवितांचे इंग्रजी भाषांतर करून त्यांनी पाश्चात्यांना तेलुगू वाङ्मयाची ओळख करून दिली. मिशनऱ्यांनी बायबलाचे तेलुगूत भाषांतर केले. पिंगळ यल्लय्य हा मूळचा जंगम; पण पुढे ख्रिस्ती झाला. त्याने तेलुगू भाषेत ख्रिस्तचरित्र लिहिले.

(५) आधुनिककाल – वर सांगितल्याप्रमाणे आंध्र प्रदेशात ख्रिस्ती मिशनऱ्यांची चळवळ सुरू झाली. तिच्या पाठोपाठ आंध्रात बंगालमधल्या धार्मिक व सामाजिक चळवळींचे वारे वाहू लागले. बंगालमध्ये स्थापन झालेल्या ब्राह्म समाजाचे लोण आंध्रातही थोड्याच काळात पोचले. समाजातले दुर्गुण नष्ट व्हावे, अंधश्रद्धा नाहीशी व्हावी, दुष्ट रूढी मोडल्या जाव्या, आधुनिक शिक्षणाचा प्रसार व्हावा, स्त्रियांची उन्नती व्हावी, सर्व समाज संघटित व्हावा, या दृष्टीने ब्राह्म समाजाची जी चळवळ बंगालमध्ये चालू झाली होती, तीच आंध्रातही सुरू झाली. अशा चळवळीचे कंकण हाती बांधून आयुष्यभर जे समाजसुधारणेसाठी झटले, त्यांत श्री. वीरेशलिंगम पंतलू यांचे नाव अग्रगण्य आहे. आंध्रातल्या आधुनिक सुधारणेचे, तसेच आधुनिक तेलुगू भाषेचेही ते जनक ठरले आहेत. कथा, कादंबऱ्या, नाटके, प्रहसने, निबंध, काव्य, इतिहास, विज्ञान, इ. विविध साहित्यक्षेत्रांत त्यांनी विपुल लेखन केले आहे. हे सर्व लेखन त्यांनी सामाजिक उद्देश डोळ्यांपुढे ठेवूनच केले. स्त्रीशिक्षण व विधवाविवाह यांचा जीव तोडून पुरस्कार केला, तोही त्यांनीच. त्यासाठी सनातनी पंडितांच्या प्रखर विरोधाशी त्यांना सतत मुकाबला करावा लागला.

राजशेखरचरित्र या नावाची त्यांची एक कादंबरी आहे. पुष्कळांच्या मते तेलुगूतली पहिली कादंबरी तीच होय.



वीरेशलिंगम पंतलू

त्यांनी केलेले शाकुंतलाचे तेलुगू भाषांतर अप्रतिम वठले आहे. त्यांनी आंध्र कवींची चरित्रे तर लिहिलीच; शिवाय आत्मचरित्रही लिहिले. आंध्रातले पहिले पत्रकारही तेच होत. विवेकवर्धिनी नावाचे एक मासिक त्यांनी समाजसुधारणेसाठीच चालवले. हे सर्व लक्षात घेऊन इ. स. १८७०–१९०० या कालखंडाला पंतलुयुग असे म्हणतात. त्यांनी एकूण लहानमोठी १३० पुस्तके लिहिली. त्यांच्या समग्र वाङ्मयाचे प्रकाशन राजमहेंद्रीच्या हितकारिणी सभेने बारा खंडांत केले आहे.

आदिपूडी सोमनाथ राव हे स्वतःला वीरेशलिंगमचे शिष्य समजत. आर्यसमाजाकडे त्यांचा ओढा होता. त्या समाजाचे बरेचसे वाङ्मय त्यांनी तेलुगूत आणले. चिलकमर्ती लक्ष्मीनरसिंह हे आधुनिक तेलुगूच्या निर्मात्यांपैकीच एक होत. त्यांनी नाटककार व कादंबरीकार म्हणून लौकिक मिळविला. पानुगंटी लक्ष्मीनरसिंह राव यांनी निबंधलेखनाच्या द्वारे समाजसुधारणेचा पुरस्कार केला. त्यांची लेखणी उपहास आणि उपरोध यांत वाकबगार होती. तेलुगू गद्याला नवे वळण त्यांनीच लावले. मंडपाक पार्वतीश्वर हे शीघ्र कवी म्हणून प्रसिद्ध होते. त्यांची ऐंशीच्या वर पुस्तके सध्या उपलब्ध आहेत. वेदम वेंकटराय शास्त्री यांनी अनेक संस्कृत नाटकांचे

तेलुगू अनुवाद केले. संस्कृत कथासरित्सागरही त्यांनी तेलुगूत आणला. श्रीपाद कृष्णमूर्ती शास्त्री यांनी महाभारताचा तेलुगू अनुवाद करून कविसार्वभौम ही पदवी मिळविली.

श्री. विश्वनाथ सत्यनारायण हे त्यांच्या नंतरच्या काळातले कविसम्राट होत. तेलुगू साहित्यात यांचे स्थान अनन्यसाधारण



विश्वनाथ सत्यनारायण

आहे. त्यांच्या आगमनाने तेलुगू भाषेत जणू वसंतच वहरला. महाकाव्य, खंडकाव्य, कथा, कादंबरी, नाटक, टीका, इ. अनेक साहित्यप्रकारांत त्यांच्या लेखणीने असामान्य यश मिळविले. आंध्रप्रशस्ती, शृंगारवीथी, शशीदूतमू, तेलुगू ऋतुमुल व किन्नेरसानि पाटलू ही त्यांची काव्ये आणि वेइपडगलू, चेलि यालिकट्ट व एकवीरा या त्यांच्या कादंबऱ्या सुप्रसिद्ध आहेत.

रायप्रोलू सुब्बाराव हे तेलुगू भावकवितेचे अग्रदूत होत. तृणकंकण नामक त्यांच्या काव्याने अनेक नव्या कवींना प्रेरणा मिळाली. आपल्या कित्येक कवितांच्या द्वारे त्यांनी आंध्र प्रदेशाच्या पुरातन वैभवाचे यशोगान केले आहे. नोरी नरसिंह शास्त्री हे ऐतिहासिक कादंवरीकार म्हणून गाजले. अडिवी वापिराजू हे काव्य आणि कादंबरी या दोन्ही क्षेत्रांत सव्यसाची ठरले. ऐतिहासिक काव्ये लिहिणाऱ्यांमध्ये कासे सर्वप्प, कुमार धूर्जटी व अदुगुल वेंकय्य हे जुन्या काळातले प्रमुख कवी होत. गाडियारम व्यंकट शेषशास्त्री, राजशेखर शतावधानी व विश्वनाथ सत्यनारायण या तिघांनी आधुनिक काळात ती प पुढे चालवली. व्यंकट शेषशास्त्रींनी शिवाजीमहारा जीवनावर शिवभारतमू नावाचे एक महाकाव्य लिहिले. भाषांतील आधुनिक महाकाव्यांत या काव्याची गौर गणना करतात. शतावधानी यांनी राणा प्रतापावर मह रचले; तर विश्वनाथ सत्यनारायण यांनी झाशीच्या रा काव्यविषय बनवले.

याच परंपरेतले एक अनभिषिक्त साहित्यसम्राट श्री. गुरजाड आप्पाराव हे होत. इ. स. १८६१-१९१ त्यांचा जीवितकाल होता. ते कवी, नाटककार, निबं कथाकार सर्वच काही होते. त्यांची ग्रंथसंख्या अल्प तरी प्रत्येक साहित्यकृती वैशिष्ट्यपूर्ण आहे. नव्या महाकवी म्हणून आंध्रात त्यांचा गौरव होतो. भाषेच्या जंजाळात गुरफटलेल्या तेलुगूला मुक्त करून त्यांनी आबालसुबोध केले. वीरेशलिंगम् पंतलू यांनी आंध्राच्या नात मूलभूत क्रांती व्हावी म्हणून प्रयत्न केले, तसेच ते रावांनीही केले. आप्पारावांचे वैशिष्ट्य हे, की ते स लेखणीचे आघात न करता त्याला चुचकारून, समजावून ण्याचा प्रयत्न करीत. आंध्र साहित्याला राष्ट्रीय ओप देऊन जनतेच्या अंतःकरणात देशाभिमानाची ज्यो लित करणारे आप्पाराव हे अग्रगण्य साहित्यकार म्हणतात—

देशाभिमानम् नाकु कद्दनि, वोट्टि गोप्पलु चेप्पु कों  
सोंत लाभम् कोंत मानुक ! पोरुगु वानिकि तोडु प  
पूनि येदैनानु वोक मेल कूर्चि जनुलकु चूपवोय !  
देश मनियेडि दोड्डु वृक्षम् प्रेमलनु पूलेत्त वलेनोय

अर्थ— देशाभिमानाची भावना माझ्यात भरून राहि अशी व्यर्थ वल्गना करू नकोस. थोडासा तरी स्वार्थत्या शेजाऱ्याला साहाय्य दे. देश हा एक महान वृक्ष आहे. वर प्रेमाची फुले येऊन तो पुष्पित होऊं दे.

आप्पारावांच्या या कवितेचा आंध्रात सर्वत्र प्रचार आंध्राचे ते जणू राष्ट्रगीतच ठरले. राष्ट्रीयतेबरोबर श्योद्धारासाठी त्यांनी आपल्या कवितेला खूप राब मानवतेचे महान उपासक होते. एका ठिकाणी ते म्हण

मनिषि चेसिन-रायि रप्पकु  
महिम कदलानि-सागी मोक्कुनु  
मनुष लंटे-रायि रप्पल  
कन्न कनिष्ट-गानु चूस्ता  
वेला ! वेला !

अर्थ — दगडाची मूर्ती माणसानेच बनवली आहे. हे

त्या मूर्तीतच देव आहे, असे मानून तू तिच्यापुढे माथा नमवतोस आणि जित्याजागत्या माणसाला दगडाहून तुच्छ लेखतोस, हे योग्य नव्हे.

कन्याशुल्क नावाचे आप्पारावांचे एक नाटक खूप गाजले. त्या नाटकात कन्याविक्रय आणि जरठ-कुमारीविवाह या गोष्टींवर त्यांनी भरपूर टीका केली आहे. तेलुगू साहित्याची ती एक अमर कृती ठरली आहे. आप्पारावांच्या लघुकथाही नव्या वळणाच्या आहेत. त्यांच्या कविता गेय असतात. मुत्यालरसमू नावाचे त्यांचे एक काव्य आहे. त्यात त्यांनी एक नवाच छंद निर्माण करून तो वापरला आहे.



गुरजाड आप्पाराव

आप्पारावांच्या नंतरच्या काळात अनिसेट्टी सुब्बाराव, रामदास, आरुद्र, कालोजी नारायण राव, कुंदुत्ती आंजनेयुलू, देशिराजू कृष्णशर्मा आणि अगदी अलिकडच्या काळात श्रीमती वरलक्ष्मम्मा व लक्ष्मीकांतम्मा, इ. अनेक कवींनी तेलुगू काव्याचे दालन समृद्ध केले आहे.

विश्वनाथ सत्यनारायण, अडिवी बापिराजू, कुन्नवू लक्ष्मीनारायण, नोरिरसिंह हे तेलुगूचे प्रथितयश कादंबरीकार होत. स्त्री कादंबरीकारांत मल्लादी वसुंधरा ही विशेष लोकप्रिय आहे.

नरसिंह राव, चिंतादीक्षितुलू, चलम, कमिडी पातिकामेश्वर राव, कोडिवटिगंटी कुटुंब राव, पालगुम्मी पद्मराजू, मल्लादी रामकृष्ण शास्त्री, श्रीपाद सुब्रह्मण्य शास्त्री, श्रीमती मालती चंदुरू ही मंडळी लघुकथालेखक म्हणून प्रसिद्ध आहेत.

वैज्ञानिक साहित्यनिर्मिती करणाऱ्यांत वसंतराव वेंकटराव, हरिआदिशेषुवू, नारायण राव ही तीनच नावे अग्रगण्य आहेत.

तेलुगू भाषेत आधुनिक पद्धतीने समीक्षा लिहिणारे पहिले लेखक कट्टमंची रामलिंग रेड्डी हे होत. कवित्वतत्त्वविचारमू हा त्यांचा समीक्षाग्रंथ प्रसिद्ध आहे. राल्लपल्ली अनंतकृष्ण शर्मा, नडपुडुती वीरराजू पंतुलू, विश्वनाथ सत्यनारायण, वेटुरी प्रभाकर शास्त्री हे रामलिंग रेड्डींच्या नंतरचे समीक्षालेखक होत. अलिकडील तरुण समीक्षालेखकांत ओटलपल्ली सीताराम राव, पिल्लमर्री हनुमंत राव, इंद्रकंटी हनुमंत शास्त्री हे लेखक सुप्रसिद्ध आहेत.



निबंधलेखकांत अनंतकृष्ण शर्मा व मट्नूरी कृष्णराव या दोघांचे स्थान सर्वोच्च आहे. युवक निबंधकारांत पुट्टपर्ती नारायणाचार्यलू व हनुमंतराव या दोघांनी मानाचे स्थान मिळवले आहे.

तेलुगू भाषेतले पहिले प्रसिद्ध मासिक म्हणजे शारदा हे होय. कौता श्री रामशास्त्री यांच्या संपादकत्वाखाली ते निघत असे. काशीनाथ नागेश्वर राव यांनी इ. स. १९२४ साली भारती नावाचे मासिक सुरू केले. आजमितीसही ते मासिक आपली प्रतिष्ठा टिकवून आहे. सखी, उषा, वीणा, उदयिनी व जयंती अशी अनेक मासिके त्यानंतर निघाली; पण ती अल्पजीवी ठरली. गृहलक्ष्मी, हिंदुसुंदरी, आंध्रमहिला, इ. मासिके महिलांच्या प्रगतीला वाहिलेली आहेत. वर्तमान मासिकांत संस्कृती, किन्नेरा व आंध्रज्योती ही मासिके लोकप्रिय ठरली आहेत. साप्ताहिक वृत्तपत्रात पहिले नाव कृष्णापत्रिकेचे. तिच्या मागून आंध्रपत्रिका व आंध्रप्रभा ही उल्लेखनीय ठरतात. स्वतंत्र, जागृती, कृषी, जमीनरयतू यांचाही उल्लेख करायला हवा. आंध्रपत्रिका व आंध्रप्रभा ही तिकडील दोन सुप्रसिद्ध दैनिकेही आहेत.

आंध्रामध्ये अनेक साहित्यसंस्था आहेत. त्यांतल्या प्रमुख पुढील प्रमाणे––

(१) आंध्रसाहित्य परिषद – ही काकिनाडा येथे स्थापन झाली असून, तिने आजवर अनेक अप्रकाशित ग्रंथांचे प्रकाशन केले आहे. हैद्राबाद येथेही दुसरी एक आंध्र साहित्य परिषद आहे. हिच्या अनेक शाखा असून, हिच्यामार्फत तेलुगूच्या परीक्षा घेतल्या जातात.

(२) साहितिसमिती – ही संस्था रेप्पल्ले या ठिकाणी आहे. या संस्थेने अनेक कवींना प्रेरणा देऊन उदयाला आणले आहे.

(३) नव्य साहित्य परिषद – ही गुंटूर येथे काम करते. हिच्या द्वारा बरेच ग्रंथ प्रकाशित झाले आहेत.

(४) तेलुगू भाषा समिती – हिची स्थापना मद्रास येथे झाली आहे. हिच्या द्वारा तेलुगू भाषेचा एक महाकोश निर्माण होत आहे. [ते. उ. सा.; म. ज्ञा. को.; हिं. सा. को.; आंध्र-भारती; पंचामृत; ते. वा.; सामान्य भाषाविज्ञान; श्री. के. व्ही. राव – पुणे आकाशवाणी; त्रि. दे. दै.; च. मा. नि. ]

**तेलुगू रंगभूमी** यक्षगान हे आंध्र–कर्नाटकातील प्राचीन नाट्य होय. त्यात संगीत व नृत्य यांचाही समावेश होत असे. भारत, भागवत, रामायण यांतील एखादे आख्यान घेऊन त्यावर यक्षगानाची रचना करीत. आंध्र प्रदेशात अशी शतसहस्र यक्षगाने लिहिली गेली आहेत. कुचिपुडी या नृत्यनाट्याचे स्वरूपही बरेचसे यक्षगानासारखेच आहे. त्यातही प्रल्हादचरित्रम, मामाकलापम, कृष्णलीला, इ. प्रसंग नृत्यरूपाने सादर केले जातात.

एकोणिसाव्या शतकाच्या चौथ्या चरणापर्यंत आंध्रात याच प्रकारची नृत्यनाट्ये होत असत. इ. स. १८८१ मध्ये धारवाड कंपनी नावाची नाटकमंडळी आंध्रात गेली व तिने नव्या धर्तीची नाटके करून आंध्र समाजाला आधुनिक नाट्यकलेचे दर्शन घडवले. मुंबई येथील आल्फ्रेड थिएटर नावाची एक पारशी नाटकमंडळीही त्यानंतर आंध्रात गेली आणि तिनेही तेलुगू समाजाला आपल्या अभिनव नाट्यकलेने आकृष्ट केले.

तिथून पुढे आंध्रात आधुनिक नाट्यकलेची उपासना सुरू झाली. मच्छलीपट्टणम, राजमहेंद्री, गुंटूर, इ. शहरांत आंध्रातल्या लोकांनी स्वतःचे नाट्यसमाज स्थापन केले; पण त्या काळापर्यंत नव्या धर्तीची नाटके तेलुगू भाषेत लिहिलीच गेली नव्हती. त्यामुळे पूर्वीच्या यक्षगानांच्या स्वरूपाचीच आख्याननाटके करून त्या नाटकमंडळ्यांना रसिकांचे रंजन करावे लागले. त्यानंतर काही काळाने तेलुगू लेखकांनी संस्कृत नाटकांचे तेलुगूत अनुवाद करायला सुरवात केली. त्या पाठोपाठ इंग्रजी नाटकांचेही अनुवाद सुरू झाले. बेळ्ळारीच्या श्री. कृष्णमाचार्युलू यांनी अठ्ठावीस नाटके लिहिली व स्वतःच्या सरसविनोदसभा नामक नाट्यसंस्थेच्या द्वारे ती रंगभूमीवरही आणली. त्यांच्या सर्वच नाटकांवर संस्कृत–इंग्रजी नाटकांचा प्रभाव प्रकर्षाने जाणवतो. कृष्णमाचार्युलू हे उत्तम नटही होते. त्यांच्या अभिनयावर खूष होऊन गद्वाल नरेशाने त्यांना 'आंध्रनाटकपितामह' अशी पदवी दिली होती. विषादसारंगधर या नावाचे तेलुगूतले पहिले दुःखान्त नाटक त्यांनीच लिहिले.

कृष्णमाचार्युलूंचे प्रतिस्पर्धी श्री. श्रीनिवासराव यांनीही एक नाटकसमाज स्थापन करून त्याच्या द्वारे स्वलिखित अशी तीस नाटके रंगभूमीवर आणली. त्यांचे विजयनगरराज्यपतनम हे ऐतिहासिक नाटक विशेष गाजले.

त्यानंतर श्री. चिलकमर्ती लक्ष्मीनरसिंह नावाचे एक नाटककार रंगभूमीवर गाजले. त्यांनी स्वतः नाटके लिहिली आणि हिंदू नाटकसमाज या संस्थेच्या द्वारे ती रंगभूमीवरही आणली. त्यांच्या गयोपाख्यान या नाटकाने लोकप्रियतेचे शिखर गाठले.

श्री. वेंकटराय शास्त्री यांची प्रतापरुद्रीयम् व बोब्बिलियु[द्धम्] ही दोन ऐतिहासिक नाटके फार गाजली. श्री. लक्ष्मीनरसि[ंह] यांनी विनोदी नाटके लिहून तेलूगू समाजाचे मनोरंजन केले.

या सुरवातीच्या काळात केवळ मनोरंजन हाच तेलुगू ना[टकां]चा उद्देश होता; पण पुढे समाजसुधारणेच्या उद्देशाने [अनेक] नवे विषय नाट्याच्या रूपाने रंगभूमीवर येऊ लागले. श्री. वीरेशलिंगम पंतलु, गुरजाड आप्पाराव, इ. सुप्रसिद्ध लेखकांनी हुंड्याची चाल, बालाजरठविवाह, विधवाविवाह, इ. विषयां[वर] प्रभावी अशी नाटके लिहिली व ती फार लोकप्रिय ठरली.

विसाव्या शतकाच्या आरंभापासून तेलुगू नाट्यतंत्रात सुधा[र]णा होऊ लागल्या. अभिनय, नेपथ्य, निर्मिती, इ. अनेक बा[बीं]तीत स्वाभाविकता आणण्याचे प्रयत्न सुरू झाले. नटनटीं[च्या] गाण्यांची संख्या कमी करून पार्श्वसंगीतावर अधिक [भर] देण्यात येऊ लागला.

म. गांधींनी असहकारितेची चळवळ सुरू करताच ते[लुगू] रंगभूमीवरही तिचे पडसाद उमटले. गांधीविजय, स्वराज्य, नंदनार, पांचालीपराभव, इ. त्या काळची नाटके राष्ट्रीय आंदोलनाचा पुरस्कार करणारी होती. पुढे सामाजिक सु[धार]णांना अग्रस्थान देणारी नाटके रंगभूमीवर येऊ लागली. [अनेक] नाट्यसंस्थांनी अशा नाटकांचे हजारो प्रयोग करून [सारा] आंध्रप्रदेश गाजवून सोडला.

इ. स. १९२९ सालीं आंध्रात नाट्यकला–परिषद स्था[पन] झाली. तिने नटांना आणि नाटककारांना अनेक प्रकारे उत्ते[जन] दिले व रंगभूमीच्या सुधारणेचे बहुविध प्रयोग केले. त्या[नंतर]च्या काळात मालक–मजूर, जमीनदार–शेतकरी व ऋणको–धनको या द्वंद्वांवर साम्यवादी विचारसरणीने लिहिलेली [नाटके] केही रंगभूमीवर येऊ लागली. श्रीवासी रेड्डी, भास्कर[राव], शंकर सत्यनारायण हे वरील विचारसरणीचे नाटककार हो[त]. या कालातच समाजातील मध्यम वर्गाच्या जीवनाचे द[र्शन] घडवणारीही बरीच नाटके निर्माण झाली. त्यापुढच्या का[ळात] मनोविश्लेषणात्मक नाटकांची निर्मिती होऊ लागली. श्री. [...] नारायण श्रीवास्तव व आनिशेट्टी सुब्बाराव हे अशा ना[टक]कारांत प्रमुख मानले जातात. [ आंध्रभारती ]

**तेलुगू लोकसाहित्य** तेलुगू भाषेत लोकगीतांना पल्ले[...] किंवा जानपदगीतमुलू म्ह[णतात]. तेलुगूतली प्राचीन गीते ही गेय अशा मात्रिक छंदात आढ[ळतात]. [का]ही गीते एखाद्या खंडकाव्याइतकी दीर्घ असतात. या [प्र]संभारात धर्मांगदचरित, बालनागम्माकथा लक्ष्मम्मा[कथा], देशिगुराजुकथा, बोब्बिलीराजुकथा ही गीते प्रसिद्ध व लोक[प्रिय] [...]

आहेत. बालनागम्माकथा या गीताचा सारांश असा—

बालनागम्मा ही पानगल्लू येथील एका श्रीमंत जमीनदाराची बायको असते. एक काळा फकीर तिच्यावर आसक्त होतो आणि मंत्रप्रयोग करून तिला पळवतो. घरी नेऊन तिला तो एका कोठडीत बंद करून ठेवतो व तिच्या शीलावर घाला घालू पाहतो. पण ती खंबीर स्त्री त्याला बधत नाही. थोड्या दिवसांत तिचा नवरा तिचा शोध करीत करीत तिथे येतो. फकिराची आणि त्याची गाठ पडते व लढाई होते. लढाईत फकीर त्याला ठार करतो. त्यामुळे बालनागम्मा तशीच बंदिवासात राहते. कालांतराने तिचा पुत्र तिच्या शोधार्थ निघतो. त्यालाही अनेक संकटांशी झुंजावे लागते; कारण त्या फकिराचे प्राण निरनिराळ्या वस्तूंत अडकलेले असतात. त्या सर्व वस्तू नष्ट केल्यावर मग त्याला फकिराचा जीव घेणे शक्य होते. शेवटी तो आपल्या आईला सोडवण्यात यश मिळवतो.

धर्मांगदचरितात एका पतिव्रता स्त्रीचे चरित्र वर्णिले आहे; तर लक्ष्मम्माच्या कथेत एका वंध्या स्त्रीचे दुःख चित्रित केले आहे.

बोब्बिलीराजुकथा ही एक वीरगाथा आहे. पापाराव हे त्या कथेच्या नायकाचे नाव. त्याने सुमारे अडीचशे वर्षांपूर्वी फ्रेंचांशी घनघोर युद्ध केले होते. त्या युद्धात त्याचा पाडाव झाला खरा; पण त्याचे शौर्य मात्र काव्याचा विषय बनले.

दुसरी वीरगाथा देशिंगुराजू याची. हा जिंजीचा राजा होता. अर्काटचा नवाब सादुल्लाखान याने त्याच्याजवळ खंडणी मागितली; पण त्याने ती गोष्ट नाकारली. त्यामुळे दोघांचे घोरांदर युद्ध झाले व त्या युद्धात देशिंगुराजू मारला गेला.

सर्वायिपापडिकथा ही आणखी एक लोकप्रिय वीरगाथा होय. सर्वायिपापडी हा मूळचा दारू विकणारा कलाल होता. अंगी पराक्रम असल्यामुळे त्याने सैन्य जमा करून वरंगळ, गोवळकोंडा, इ. किल्ले जिंकले व त्यांतली धनदौलत लुटली. त्याला मरणही लढाईतच आले. त्याच्या पराक्रमाविषयी प्रस्तुत वीरगाथेतल्या काही पंक्ती अशा—

**अब्बा अब्बा पापनि पेरूचे पिते**
**ऊरू पिच्चुक पोलमु बारदु**
**पोट्टि पिच्चुक यूरू चेरदु**
**पसि बिड्डलु पालु तागरुगा-बाडिपेरटे**
**गोलकोंड बस्ती लोंणकु**
**नेल्लूरू बस्ती लोणकु**

अर्थ —पापडिचा केवढा पराक्रम! त्याचे नाव घेताच जगातले सारे प्राणी थरथरा कापू लागत. खेड्यातले लोक शेतात जायला घाबरत. तान्ही मुले आईचे दूध पिताना दचकत. घोडे दाणा-पाणी वर्ज्य करीत. त्याच्या केवळ नावाने गोवळकोंड्याच्या वसतीवर वीज पडल्यासारखी होत असे व नेल्लूर शहराची जणू नाडीच बंद होत असे.

ऊर्मिलेची झोप या नावाचे एक प्रदीर्घ स्त्रीगीत आंध्रात प्रचलित आहे. बऱ्याच बायका एकत्र जमून ते गातात. चौदा वर्षांच्या वनवासानंतर श्रीराम परत अयोध्येत आला आहे आणि सिंहासनावर विराजमान झाला आहे, इथून या गीताचा प्रारंभ होतो.

राम सिंहासनावर आरूढ होताच सीता तिथे येऊन रामप्रभूला म्हणते. 'महाराज, लक्ष्मण भावोजींना त्यांची पत्नी ऊर्मिला हिच्याकडे जाण्याची परवानगी द्या. ती बिचारी चौदा वर्षे अन्नपाणी वर्ज्य करून पलंगावर झोपून राहिलेली आहे.'

ते ऐकून रामाला लक्ष्मणाची व ऊर्मिलेची कणव येते व तो लक्ष्मणाला तिला भेटण्याची आज्ञा करतो. लगेच लक्ष्मण आपल्या पत्नीकडे जातो.

**वच्चे लक्ष्मणुड चलवा सत्रम्पु वाकिल्लु गडचिवच्ची**
**केलि गृहमु जोचियू लक्ष्मन्ना कीरवाणिनि जचेनू**
**कोमली पान्पु पंइना तोडावत्ति कोका सवरिञ्चि वेगा**
**तोडगुला घरिञ्चि वेगा चल्लनी तल्लु पूरिञ्चि मेना**
**प्राणनायिकि पान्पुना कूर्चुण्डि भाषिञ्चे विरहम्मुना**
**कोम्मनी मुद्दु योगमू, सेविम्पा गोरिनाडे चन्द्रडू**
**ताम्बूलमेडावासिना वोप्पेने नगुमोवि चिगरू कोनगा**
**अमृतधारलु कुरियगा, पलुकवे आत्मा चल्लना सेयवे**
**चिंटितामरलु बोलेडी पादमुला कोलिञ्चवे स्वर्णमू**

अर्थ —'संगमरवरी दालने व अंगणे ओलांडून लक्ष्मण ऊर्मिलेच्या शयनगृहात आला. त्याने शुकासारखी जिची वाणी आहे, अशा आपल्या पत्नीला पाहिले. (ती झोपली होती.) तो त्या कोमलांगीच्या पलंगावर बसला. त्याने तिचे पाय दाबून तचे नेसते वस्त्र ठीक केले. मग तत्कालयोग्य असे वस्त्र स्वतः धारण करून त्याने (ऊर्मिलेला जागी करण्यासाठी) तिच्या शरीरावर शीतल जलाचा शिडकाव केला. तो तिच्या पलंगावर बसून विरहवेदनेने विव्हल होत तिला म्हणाला. 'हे प्रिये, मी तुझे चुंबनयोग्य असे मुख पाहण्यासाठी आतुर झालो आहे. तू विडा खाल्ल्याला बहुत समय लोटला आहे खरा; पण तरीही तुझा अधरोष्ठ नवपल्लवासारखा आरक्त दिसतो आहे. हे अमृतमयी, तू माझ्याशी बोल आणि माझा विरहतप्त आत्मा शांत कर. तुझी पावले छोट्या कमलासारखी आहेत. त्या पावलांवर तू सुवर्णालंकार चढव.'

चौदा वर्षांनंतर झालेली ही पति-पत्नींची भेट होय. त्यामुळे ऊर्मिला प्रथम लक्ष्मणाला ओळखतच नाही. तो कोणी

परपुरुषच आहे, असे समजून ती त्याची निर्भर्त्सना करते. शेवटी मोठ्या प्रयासाने लक्ष्मण आपली ओळख तिला पटवतो. मग कौसल्या, सुमित्रा, शांता, इ. वडिलधाऱ्या स्त्रिया त्या दोघांचे अनेक प्रकारे कोडकौतुक करतात.

तेलुगू लोकसाहित्यावर शैव वाङ्मयाचा बराच प्रभाव आहे. सारंगधरूमीकथा, नवनाथचरित्र, गंगाविवाह, गंगा–गौरी-संवाद, इ. लोकगीते शिवाशी संबंधित आहेत. गंगाविवाह या गीताचा प्रारंभ झाला आहे, तो असा––

कल्मषंबुलु लेनि गंगाभवानि
अखिल पावनियेंन इटुवंटि तल्लिकिनि
जालरि कुलमुंद्रु जन्मेटी गल्गिनेनी ?

अर्थ –– निर्मल व अखिल लोकपावनी गंगामाता मच्छीमार कोळयाच्या घरी कशी जन्माला आली ?

ती कथा घडली ती अशी ––

ब्रह्मकल्पांताच्या वेळी चौदा भुवनांना आपल्या पोटात सामावून घेऊन गंगा गर्विष्ठ झाली. तिला वाटले, की आता आपली बरोबरी करणारी कोणतीही व्यक्ती या जगात नाही. शिवाला गंगेच्या या गर्वाचा राग आला आणि त्याने तिला शाप दिला. 'तू दुर्गंधियुक्त मच्छीमार कोळयाच्या घरी जन्म घेशील.' तो शाप ऐकून गंगा भयभीत झाली. तिने उःशापासाठी शिवाची प्रार्थना केली. त्यावर शिवाने तिला सांगितले. 'तुझ्या गर्वाबद्दल तुला दिलेली ही शिक्षा आहे. पण घाबरू नकोस. त्या जन्मात मी तुझ्याशी लग्न करीन.' त्यामुळे गंगेला त्यातल्या त्यात बरे वाटले. ती कोळयाच्या घरी जन्माला आली. ती तारुण्यात आल्यावर नारदाने शिवाला तिच्याविषयी जाणीव दिली. शिवाने तिच्याकडे येऊन तिच्याशी लग्न केले; पण त्याच वेळी शिवाला, गौरी आपल्यावर व गंगेवरही रुष्ट होईल, अशी भीती वाटली. म्हणून त्याने गंगेला आपल्या जटेत लपवून कैलासावर नेले. पण पार्वतीला तो प्रकार कळल्यावाचून राहिला नाही. तिने गंगेला शिवाच्या जटेतून खाली उतरायला सांगितले. गंगा त्या गोष्टीला तयार झाली नाही. मग दोघींचे कडाक्याचे भांडण झाले. गंगेच्या रागाने गौरी माहेरी निघून गेली. या गोष्टीचा गंगेलाही राग आला. तिने क्रुद्ध होऊन पृथ्वीवरील साऱ्या नद्या व सरोवरे आटवून टाकली. त्यामुळे सर्वत्र निर्जल झाले. माहेरी गेलेली गौरी तहानेने व्याकुळ झाली व धावत धावत शिवाकडे आली. शिवाने तिला गंगेचा राग शांत करण्यास सांगितले. तिने तसे केले. मग त्या दोघी सवती सुखाने शंकराजवळ नांदल्या.

तेलुगू लोकसाहित्यात यक्षगान नावाचा एक प्रकार असून त्याचे साहित्य विपुल आहे. यक्षगान हे गीत व नाट्य अशा उभय स्वरूपांत प्रचलित आहे. यक्षगानाची आख्याने पौराणिक कथांवर आधारित असतात. त्यांची रचना एललू, जोललू, कंदार्थमुलू, तुम्मेदपदमुलू इ. देशी छंदांत असते. सुग्रीवविजयमू, प्रल्हादभक्तविजयमू, नौकाविजयमू, विराटपर्वनाटकमू, हरिश्चंद्रमहाराजचरित्रमू, सारंगधरचरित्रमू इ. यक्षगानाची आख्याने प्रसिद्ध आहेत.

आंध्र विद्यापीठाच्या ग्रंथालयात कित्येक यक्षगानांची आख्याने ताडपत्री पोथ्यांच्या स्वरूपात पडून आहेत. ही यक्षगाने हा एक वाङ्मयीन संशोधनाचा विषय आहे, असे तिकडील साहित्यिक मानतात.

बुर्रकथा हा तेलुगू लोकगीतांचा आणखी एक प्रकार होय. जंगम जातीचे लोक ही गीते गाऊन लोकांचे मनोरंजन करतात. ही गीते गाणारा तीन लोकांचा संघ असतो. एक गायक,



बुर्रकथागीते गाणारा संघ

दुसरा तंबोरावादक व तिसरा ढोलक्या. कांभोजराज, हरनाथ, वसवदेव, रुद्रमदेवी, इत्यादींची आख्याने त्या गीतांत असतात. हरिकथा हा बुर्रकथेचा दुसरा एक पर्याय होय. हे वाङ्मयही विपुल आहे. द्रौपदीपरिणयमू, रुक्मिणीविवाहमू, मामाविलासमू, रतिमन्मथविवाहमू, इ. आख्याने हरिकथेमधील प्रमुख गीते होत.

स्त्रीगीतांत मातृत्वाचा गौरव करणारी अनेक गीते आहेत. त्यात संततीसाठी स्त्रियांनी केलेले व्रतोपवास, वंध्या स्त्रीचे दुःख, बालकाचे कौतुक, इ. गोष्टींचे प्रकटन असते. विवाहगीतांत वधू–वरांना राम–सीता मानून गायिली जाणारी

अनेक गीते आहेत. मुलाला पाळण्यात निजवताना म्हणायच्या ओव्याही खूप आहेत. नांगरणी, पेरणी, कापणी, इ. सर्व प्रकारांवर कृषिगीतेही भरपूर आहेत.

आंध्रात वनिलू, त्रिरन्नलू, जंगमलू, दासरुलू, पिच्चकगुंटलू, वीरमुष्टिक, इ. अनेक जाती लोकगीते गाण्याबद्दल प्रसिद्ध आहेत. [ धी. ब. गं.; त्रि. दे. दै.; आंध्रभारती; अजंता–जून १९५३, ऑगस्ट, सप्टें., ऑक्टो., १९५८ ]

## तेवारम

तमिळ भाषेतील काही भक्तिगीतांचा संग्रह. परमेश्वराच्या चरणी भक्तिभावाने अर्पण केलेली सुमनमाला, असा तेवारमचा अर्थ आहे. ज्ञानसंबंदर, अप्पर व सुंदरर या तीन शैव कवींनी रचलेली ही शिवस्तोत्रे आहेत. या संग्रहात ८२५० पद्ये आहेत. ही पद्ये इ. स. च्या ७ ते ९ या शतकांत निर्माण झाली आहेत.

हा कालखंड धार्मिक आंदोलनांचा होता. इ. स. च्या ६ व्या शतकापर्यंत तमिळनाडमध्ये जैन धर्माचे प्राबल्य होते; पण ७ व्या शतकात ज्ञानसंबंदर व सुंदरर यांनी शिवभक्तीचा पुरस्कार करून तमिळ जीवनात व धार्मिक क्षेत्रात क्रांती घडवून आणली. त्यांची ही शिवस्तवने प्रत्येक मंदिरात गायिली जाऊ लागली. जे स्थान महाराष्ट्राच्या जीवनात ज्ञानेश्वर, नामदेव व तुकाराम यांना आहे, तेच स्थान तमिळनाडच्या जीवनात या शैव आचार्यांना आहे.

तेवारम भक्तिगीतांचे सांस्कृतिक मोल बहुविध आहे. त्यांत केवळ वैयक्तिक आणि आध्यात्मिक उन्नतीचाच उपदेश नसून, परमेश्वराचा व मानवाचा संबंध, माणसा–माणसांचा संबंध व प्रत्येक मानवाचा जगाशी संबंध यांविषयीही विचार मांडलेले आहेत. आत्म्याचे अमरत्व, जन्म–मरणाचे चक्र, विश्वाची उभारणी व संहारणी यांचा विचारही या गीतांतून केलेला आढळतो. विश्वाचे नियामक तत्त्व, आत्म्याचे कार्य आणि परमेश्वराचे स्वरूपही त्यांत विशद केलेले दिसते. अशा व्यापकपणामुळेच तेवारम गीतांना तमिळनाडमध्ये वेदमंत्रांची योग्यता प्राप्त झालेली आहे. या तेवारममधली दोन गीते अशी––

वाळ्ळ अंदणर् वानवर् आनिनम् ।
वीळ्ळ तण्पुनल् वेंदनम् ओंगध ॥
आळ्ळ थीयदल्लां अरं नाम मे ।
शूळ्ळ वैय्यहमुं तुयर् तीर्धवे ॥

भावार्थ –– पार्वती-परमेश्वराचे नाव उच्चारताच देवता, सज्जन व धेनू समृद्धी पावोत, वैगाई नदीचा पूर उतरो, नृपतींची उन्नती होवो आणि जगातला दुष्टपणा नष्ट होऊन हे जग सुखी होवो.

अरियानै अंदणर्तं सिंदयानै अरुमरइन् ।
अहत्तानै अणुवै याकुं ।
तिरियाद तत्तुवनै ते नैप्पालै तिघ
लोळीयै देवहळ् तंकोनै मत्तै ॥
करि यानै नान्मुहनै कनलैक्काटै कनै
कडलै कुलवरथैक्कलंद निंद ।
पिरियानै प्पिरुंपट्ट पुलियुरानै पेरसाद
नाळल्लां पिरवानाळे ॥

भावार्थ – देवा, तू दुर्लभ असलास, तरी सज्जनांच्या हृदयात तुझा वास असतो. तू वेदांचा अर्थ व भाष्यविवरण आहेस. देवा, तू अणुहून लहान आहेस. तुला जाणण्याचा यत्न करू जाता पंडितांचीही बुद्धी पांगुळते. तू मधुर मद्य आहेस, रसाळ दूध आहेस व तेजोरूप आहेस. तू देवांचा देव आहेस. नारायण तूच, ब्रह्मदेवही तूच. तू अग्नी, वायू, पर्वत, सागर यांना व्यापून राहणारा आहेस. तू अंतर्यामीही आहेस. तू श्रेष्ठांचा श्रेष्ठ असून, सांप्रत चिदंबरम येथील मंदिरात तुझा वास आहे. हे देवदेवा, जो मनुष्य तुझे नामस्मरण करीत नाही, त्या पामराचा जन्म व्यर्थ होय.

वरील गीते अनुक्रमे ज्ञानसंबंदर व अप्पर यांची आहेत.

या गीतांची गणना विदग्ध तमिळ साहित्यात होते. प्रत्येक गीतात दहा कडवी असतात. ही गीते प्राचीन तमिळ रागांत रचलेली आहेत. ती तमिळनाडमधल्या शिवमंदिरांतील उत्सवांत गायिली जातात. तेवारमचे अध्ययन व अध्यापन करणे हे तमिळनाडमध्ये एक पुण्यकर्म मानले जाते. तिकडच्या अनेक देवस्थानांत व मठांत तेवारम शिकवण्याच्या पाठशालाही आहेत. तेवारम गाणाऱ्या गायकांना ओदुवार अशी संज्ञा आहे. [ त. उ. सा.; श्री. पी. मीनाक्षीसुंदरम – पंचधारा त्रैमासिक, कार्तिक, शके १८८० ]

## तेहतीस देव

बारा आदित्य, अकरा रुद्र, आठ वसू, इंद्र व प्रजापती ( अन्यमते दोन विश्वेदेव ) मिळून तेहतीस देव मानले आहेत. पाहा – देव.

## तैत्तिरीय आरण्यक

कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचे आरण्यक. तैत्तिरीय ब्राह्मणाच्याच काही भागाला तैत्तिरीय आरण्यक अशी संज्ञा आहे. याचे दहा प्रपाठक असून, प्रत्येक प्रपाठकाची काही अनुवाकांत विभागणी केलेली आहे. सर्व अनुवाकांची संख्या १७० एवढी आहे. याच्या सात ते नऊ या प्रपाठकांना तैत्तिरीयोपनिषद असे नाव आहे.

तैत्तिरीय आरण्यकात काशी, पांचाल, मत्स्य, कुरुक्षेत्र

खांडव, अहल्या, शुनःशेप इत्यादींचे वर्णन आहे. एका ठिकाणी (१.२०.१) नरकांचे वर्णन आहे. या ग्रंथात तपस्वी पुरुषाला श्रमण म्हटले आहे. (२.७.१) बौद्धांनी इथूनच हा शब्द उचललेला दिसतो.

तैत्तिरीय आरण्यकात यज्ञोपवीताचा प्रथमच उल्लेख आहे, तो असा—

**प्रसृतो ह वै यज्ञोपवीतिनो यज्ञः ।**
**यत्किञ्च ब्राह्मणो यज्ञोपवीत्यधीते यजत एव तत् ।।**
(तै. आ. २.१.१)

अर्थ—यज्ञोपवीत धारण करणाऱ्याच्या यज्ञाचा प्रसार होतो. यज्ञोपवीतधारी ब्राह्मण जे काही अध्ययन करतो, तो त्याचा यज्ञच होय.

याशिवाय यज्ञासंबंधी बरेच विषय यात आलेले आहेत. [ वै. सा.; म. ज्ञा. को.; हिंदुत्व ]

## तैत्तिरीय उपनिषद

कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचे उपनिषद. या उपनिषदाचे तीन मुख्य भाग असून, त्यांना वल्ली असे म्हणतात. पहिल्या शिक्षावल्लीत बारा, दुसऱ्या ब्रह्मानंदवल्लीत नऊ व तिसऱ्या भृगुवल्लीत दहा अनुवाक आहेत. शिक्षावल्लीत निरनिराळ्या शिक्षा ( वर्णोच्चाराचे प्रकार ) वर्णिल्या आहेत. ब्रह्मानंदवल्लीत ब्रह्मज्ञान व त्यापासून होणारा आनंद यांचे वर्णन आहे. भृगुवल्लीत तेच ज्ञान संवादरूपाने सांगितले आहे.

शिक्षावल्लीच्या तिसऱ्या अनुवाकात वेदार्थाचे अधिलोक, अधिज्योतिष, अधिविद्य, अधिप्रज व अध्यात्म असे पाच दृष्टिकोन सांगितले आहेत. पृथिवी, अंतरिक्ष व द्यौ ही अधिलोक दृष्टी होय. विराट विश्वात व मानवी देहात या तीन लोकांची सत्ता आहे. अग्नी, आदित्य व विद्युत या तीन ज्योती होत. अधिविद्य दृष्टिकोन हा ब्रह्मविद्येच्या अध्ययन–अध्यापनासंबंधी आहे. अधिप्रज दृष्टिकोन हा जीवविज्ञानासंबंधी असून माता, पिता व पुत्र हे त्याचे सूत्र होय. पाचवा दृष्टिकोन अध्यात्मासंबंधी आहे. याचा संबंध मनुष्याच्या शरीराशी आहे. मानवदेह हा ब्रह्मांडाचा हुबेहूब नमुना असून, त्यालाच तिथे पुरुषप्रजापती असे म्हटले आहे.

पाचव्या अनुवाकात वेदविद्येसंबंधी व्यापक दृष्टिकोन स्वीकारलेला आहे. यात भूः, भुवः, स्वः व महः या चार व्याहृतींची लोकात्मक, देवात्मक, वेदात्मक व प्राणात्मक अशी चार प्रकारे व्याख्या केली आहे.

सहाव्या अनुवाकात, शरीरात मनोबलरूपाने राहणाऱ्या ब्रह्मतत्त्वाचे विवेचन आहे. हीच अमृतशक्ती असून, मेंदूच्या मध्यभागी जो स्तनासारखा भाग दिसतो, त्यामध्ये ती राहते व तेच ब्रह्मज्ञान होण्याचे द्वार होय. हे द्वार जिथून केस उगवतात तिथपर्यंत पसरलेले आहे. ज्ञानी पुरुष मस्तकाची कपाले फोडून ब्रह्माशी एकरूप होतो.

आठव्या अनुवाकात एकंदर ब्रह्मविद्येतील ओंकाराचे महत्त्व वर्णिले आहे. 'ओमिति ब्रह्म । ओमितीदं सर्वम् ।' ( = ॐ म्हणजेच ब्रह्म व ॐ म्हणजेच हे सर्व ) असे सांगितले आहे.

प्राचीन काळी अध्ययनसमाप्तीनंतर आचार्य आपल्या शिष्याला जो उपदेश करीत, तो अकराव्या अनुवाकात दिला आहे. 'सत्यं वद । धर्मं चर ।' इ. ती वाक्ये आहेत. (उपदेश पाहा)

ब्रह्मानंदवल्लीत ब्रह्माच्या स्वरूपाचे वर्णन आहे, ते असे—

**सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म । यो वेद निहितं गुहायां**
**परमे व्योमन् । सोऽश्नुते सर्वान् कामान् ।**

अर्थ — ब्रह्म हे सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप आणि अनंत असे आहे. सूक्ष्म अशा हृदयाकाशामध्ये राहणारे ब्रह्म जो जाणतो, तो ब्रह्माशी एकरूप होऊन पूर्णकाम होतो.

यानंतर पंचकोशांचे वर्णन आहे. यापुढे रस हेही ब्रह्माचे रूप आहे, हे 'रसो वै सः' ( = रस म्हणजेच ब्रह्म ) अशा शब्दांत सांगितले आहे. रसाचा लाभ झाल्यावर मनुष्य आनंदी होतो. या रसाचा आस्वाद घेणे, म्हणजेच ब्रह्म जाणणे होय, असेही सांगितले आहे.

याच आनंदमय व रसमय ब्रह्माचा दुसरा पक्ष म्हणजे भीषण मृत्यू होय. त्याच्याच भयाने वारा वाहतो व सूर्य उगवतो. अग्नी जाळतो व इंद्र पाणी देतो. याच्या भीतीने मृत्यूही आपले काम करतो, असे सांगितले आहे.

यानंतर आत्मानंदाची मीमांसा केलेली आहे. 'स यश्चायं पुरुषे । यश्चासावादित्ये स एकः' ( = माणसाच्या ठिकाणी जो आनंद आहे, तोच सूर्याच्या ठिकाणी आहे ) असे सांगून पुढे म्हटले आहे– 'आनंद सर्व ठिकाणी एकच आहे. याप्रमाणे सर्वव्यापी आनंदाचे ज्ञान ज्याला होते, तो मनुष्य मृत्यूनंतर पंचकोशांच्या पलिकडे जाऊन आत्म्याशी एकरूप होतो.' या आत्मानंदाविषयी आणखीही म्हटले आहे, ते असे—

**यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह ।**
**आनन्दं ब्रह्मणो विद्वान् । न बिभेति कुतश्चनेति ।**

अर्थ–मन आणि वाणी जिथपर्यंत पोचण्याचा प्रयत्न करतात व ते अप्राप्य म्हणून परत येतात, अशा त्या आत्मानंदाचा साक्षात्कार ज्याला होतो, त्याला कसलेही भय उरत नाही.

भृगुवल्लीत एक कथा सांगितलेली आहे, ती अशी– वरुणाचा मुलगा भृगू आपल्या बापाकडे गेला आणि त्याने

ब्रह्म म्हणजे काय, ते बापाला विचारले. वरुणाने त्याला प्रथम अन्न, प्राण, चक्षू, श्रोत्र, मन, वाणी, प्राण, मन, बुद्धी ही सर्व ब्रह्म आहेत, असे सांगितले; पण त्याला ते पटले नाही. मग त्याने पुष्कळ तप केले, तेव्हा त्याला ब्रह्माचे खरे स्वरूप कळले, ते असे--

स तपस्तप्त्वा । आनन्दो ब्रह्मेति व्यजानात् । आनन्दाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । आनन्देन जातानि जीवन्ति ।
आनन्दं प्रयन्त्यभिसंविशन्ति इति ।

अर्थ — भृगूने तप केल्यावर आनंद हे ब्रह्म आहे, असे ज्ञान त्याला झाले. आनंदापासून सर्व प्राणी उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर आनंदानेच जगतात आणि मृत्यूनंतर आनंदातच विलीन होतात.

या आनंदाच्या मीमांसेलाच भार्गवी विद्या किंवा वारुणी विद्या असे म्हटले आहे.

यानंतर अन्नाची स्तुती केली आहे. कारण प्राण हा अन्नावर अवलंबून आहे. म्हणून अन्न मिळवा, चांगले व भरपूर अन्न द्या आणि अन्नाची निंदा करू नका, असा उपदेश केला आहे. [ वै. सा. सं.; उ. र.; उपनिषदर्थव्याख्या; उ. अ; श्री. वासुदेव-शरण अग्रवाल– साप्ता. हिंदुस्तान, ५ जुलै १९६४ ]

**तैत्तिरीय प्रातिशाख्य** कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय संहितेशी संबद्ध असलेले प्रातिशाख्य. याचे दोन प्रश्न अथवा खंड असून, प्रत्येक प्रश्नात बारा अध्याय आहेत. पहिल्या प्रश्नात वर्णसमाम्नाय, शब्दांचे स्थान, शब्दांच्या उत्पत्तीचे प्रकार, स्वरसंधी, विसर्गसंधी, इ. विषयांचे विवेचन असून, दुसऱ्या प्रश्नात अनुनासिक, त्याचे भेद, स्वरित-भेद, इ. अनेक विषयांचे संक्षिप्त वर्णन आहे. यात विषयाच्या प्रतिपादनासाठी लागणारी उदाहरणे तैत्तिरीय संहितेतून घेतलेली आहेत. [ वै. सा. सं. ]

**तैत्तिरीय ब्राह्मण** कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचे ब्राह्मण. हे बरेच मोठे असून, त्यात ३ कांडे, २५ प्रपाठक व ३०८ अनुवाक आहेत. शतपथ ब्राह्मणा-प्रमाणेच या ब्राह्मणाचा पाठही स्वरयुक्त मिळतो. त्यावरून हे ब्राह्मण प्राचीन असावे, असे अनुमान निघते. या ब्राह्मणामध्ये काही छंदोबद्ध भंग असून, संहितेमध्ये आलेल्या भंग भागाचेही विवेचन यात केले आहे.

याच्या प्रथम कांडात अग्न्याधान, गवामयन, वाजपेय, सोम व राजसूय या यागांचे वर्णन आहे. द्वितीय कांडात अग्निहोत्र, उपहोम, सौत्रामणी या यागांचे व बृहस्पतिसव, वैश्यसव, इ. सवांचे विवरण आहे. तृतीय कांडात प्रथम नक्षत्रेष्टींचे विस्तृत वर्णन असून, चौथ्या प्रपाठकात पुरुषमेधासाठी लागणाऱ्या पशूंचे वर्णन आहे. पुरुषमेधाचे वर्णन प्रथम इथेच आढळते. या कांडाच्या दहा ते बारा या शेवटच्या तीन प्रपाठकांना काठक असे म्हणतात. कदाचित, हा भाग काठक शाखेच्या ब्राह्मणाचा असावा आणि काही विशेष उद्देशाने तो इथे घेतला असावा.

या ब्राह्मणाने सामवेदाला सर्वश्रेष्ठ वेद मानले आहे. यात सर्वत्र वर्णव्यवस्थेबद्दल आदर दाखवलेला आहे. पुराणांत आलेल्या अनेक अवतारांच्या कथांची बीजे यात आढळतात. वराह अवताराचा तर स्पष्ट उल्लेखच आहे. वेदकालीन ज्योतिः-शास्त्राबद्दलचीही थोडी माहिती यात आलेली आहे. यात शुद्ध जल हे रोगविनाशक म्हणून सांगितले आहे ( ३. ३. २. १२ ). 'अथो अर्द्धो वा एष आत्मनः यत्पत्नी' ( ३. ३. ३. ५ ), असे म्हणून पत्नीला पुरुषाची अर्धांगी मानले आहे. स्त्री ही लक्ष्मीरूप असते, असेही सांगितले आहे. पत्नीहीन पुरुषाला यज्ञाचा अधिकार नाही, असे तर स्पष्टच म्हटले आहे ( २. २. २. ६ ).

वेद अनंत आहेत, यासंबंधी एक कथा यात आली आहे, ती अशी--

भरद्वाज ऋषीने जन्मभर वेदाध्ययन व तप केले. तेव्हा इंद्राने प्रसन्न होऊन त्याला विचारले, की 'तुला आणखी एक जन्म मिळाला, तर त्या जन्मात तू काय करशील ?' भरद्वाजाने उत्तर दिले, की 'त्या जन्मातही मी वेदाध्ययनच करीन' त्यावर तिथे एकाएकी तीन पर्वत निर्माण झालेले दिसले. हे पर्वत म्हणजे मूर्तिमंत वेदच होते. इंद्राने त्यांपैकी एकातून मूठ-भर माती हातात घेतली आणि भरद्वाजाला म्हटले. 'आतापर्यंत वेदाध्ययन करून तू जे ज्ञान मिळवलेस आणि अन्य जन्मात जे मिळवशील, ते सर्व या पर्वतांच्या तुलनेने मुठीइतके आहे.'

या ब्राह्मणावर सायणाचार्यांचे भाष्य उपलब्ध आहे. [ वै. सा.; वै. सा. सं.; हिंदुत्व; वेदविद्या ]

**तैत्तिरीय शाखा** कृष्ण यजुर्वेदाची एक शाखा. तित्तिरी ऋषी हा या शाखेचा प्रवर्तक होय. पाणिनीने याच्या नावाचा उल्लेख केला आहे. पतंजलीनेही तित्तिरीचा आणि त्याच्या लोकांचा निर्देश केला आहे. महाभारतात ( शांति. ३४४.९ ) याला वैशंपायनाचा मोठा भाऊ म्हटले असून, तो युधिष्ठिराच्या दरबारात होता, असेही सांगितले आहे. यावरून तित्तिरी हाच या शाखेचा प्रवर्तक होता, असे ठरते.

पुराणांत मात्र तित्तिरीविषयी अशा काही कथा सांगितल्या आहेत, की त्यांवरून त्याच्या अस्तित्वाविषयीच शंका निर्माण

व्हावी. पुराणांनी सर्व कृष्ण यजुर्वेदालाच तैत्तिरीय असे नाव दिले आहे. याविषयी विष्णू पुराणातला एक श्लोक असा–

यजूंष्यथ विसृष्टानि याज्ञवल्क्येन वै द्विज।
जगृहुस्तित्तिरा भूत्वा तैत्तिरीयास्तु ते ततः॥
(विष्णू पु. ३. ५. १२)

अर्थ – हे ब्राह्मणा, (वैशंपायनाने शिकवलेल्या) यजुर्मंत्रांचे याज्ञवल्क्याने वमन केले आणि त्याच्या शिष्यांनी तित्तिर पक्ष्यांचे रूप घेऊन त्यांचे ग्रहण केले, म्हणून त्यांना तैत्तिरीय असे म्हणू लागले.

मॅक्स म्यूलरने, तित्तिरी हा एक ऋषी असून, तो यास्काचा शिष्य होता, असे सांगितले आहे. तैत्तिरीयांचा रामायणात उल्लेख आहे. त्याचप्रमाणे सत्याषाढ गृह्यसूत्रातील ब्रह्मयज्ञांग ऋषितर्पणातही तित्तिरी ऋषीचा उल्लेख आहे. तैत्तिरीय शाखा कुरु–पांचाल देशात सुरू झाली आणि पुढे ती दक्षिणेत प्रसार पावली. तैत्तिरीय शाखेचे औखेय आणि खांडिकेय असे दोन भेद आहेत. या शाखेचे संहिता, ब्राह्मण, आरण्यक व उपनिषद असे चारही प्रकारचे ग्रंथ आहेत. [श्री. गंगासागर राय – पुराणम, जुलै १९६५; पु. इं.; म. ज्ञा. को.]

## तैत्तिरीय संहिता

कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेची संहिता. यजुर्वेदात तैत्तिरीय हा एक मुख्य पंथ असून, त्यात ही संहिता शिकवीत असत, असे ज्ञानकोशात म्हटले आहे. ही संहिता म्हणजे यज्ञसंस्थेतील अध्वर्यू नामक ऋत्विजाची कर्मदर्शक पोथीच होय. या संहितेत ७ कांडे, ४४ प्रपाठक आणि ६५१ अनुवाक असून, त्यात पुढीलप्रमाणे विषयांची मांडणी आहे––

प्रथम कांडात दर्शपूर्णमास, अग्निष्टोम, अग्निहोत्र, अग्न्याधान, राजसूय, इ. यज्ञांत लागणारे मंत्र दिलेले आहेत. दुसऱ्यात काम्यपशू व काम्येष्टींचे विधान आहे. तिसरे कांड गद्यपद्य मिश्रित असल्यामुळे त्यास औपानुवाक्य असे नाव आहे. चौथ्या कांडात चयनासंबंधीचे मंत्र असून, पाचव्यात त्यांचे विधान–ब्राह्मण आहे. सहाव्यात अहीनयाग व अश्वमेध यांचे विधान आहे.

मधूनच कुठे कुठे वर्णाश्रमधर्माचे प्रतिपादन व नित्याचारांचेही वर्णन आले आहे. तैत्तिरीय संहितेची भाषा गद्यरूप असून, ती विस्तृत आणि पुनरुक्तिप्रधान आहे. यात पद्यभागही आहे व तो ब्राह्मणातून घेतलेला आहे, असे म्हणतात. तैत्तिरीय संहितेत संहिता व ब्राह्मण हे ग्रंथ एकमेकांत मिसळले आहेत, असा याचा अर्थ आहे. या संहितेतले छंदोबद्ध मंत्र दुसरीकडून उतारे म्हणून घेतलेले असावे. पाहा– कृष्ण यजुर्वेद. [म. ज्ञा. को.; वेदशास्त्रदीपिका; श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

## तैप्पूयम

केरळातली एक मोठी जत्रा. ही अर्णाकुलमजवळच्या सुब्रह्मण्यमंदिरात भरते. शेकडो लोक या दिवशी खांद्यावर कावडी घेऊन नाचत नाचत तिथल्या मंदिरात जातात व कावडी देवाला अर्पण करतात. कावडीत दूध, साखर, गूळ, गुलाबपाणी, भस्म, इ. वस्तू असतात. कित्येक लोक सुब्रह्मण्याला कावड घालण्याचा नवसही करतात.

## तोंटद सिद्धलिंग

(इ. स. चे १५ वे शतक) एक कन्नड संतकवी. याचा षट्स्थलज्ञानसारामृत नावाचा एक ग्रंथ आहे. या ग्रंथात सातशे एक वचने असून, ती सात वृत्तछंदांत रचली आहेत. याने आपल्या काव्यात महालिंग-गुरुशिव–सिद्धेश्वर–प्रभू अशी समाप्तिमुद्रा वापरली आहे. आत्मानुभूतीची सरस व मुग्धोत्र अभिव्यक्ती हा या काव्याचा विशेष होय. [हिं. क. भ. नु. अ.]

## तोंडरडीपोडी

(इ. स. चे. ८ वे शतक) द. भारतातील एक आळवार संत. याचा जन्म कावेरी नदीच्या काठी तिरुमंडनकुडी नामक गावी एका ब्राह्मण कुळात झाला. विप्रनारायण हे याचे मूळ नाव होते. तमिळ आणि संस्कृत या दोन्ही भाषांवर याचे प्रभुत्व होते. बालपणापासूनच हा ईश्वरचिंतनात निमग्न राही. पुढे तो पूर्ण विरक्त बनला व श्रीरंगमजवळ एका तुळशीवनात राहू लागला. तुळशीच्या माळा करून त्या रंगनाथाला वाहणे, ही याची तिथली दिनचर्या होती. हा भगवद्भक्तांची सेवा हीच भगवत्सेवा मानीत असे. म्हणून याला लोक तोंडरडीपोडी (भक्तांच्या चरणांची धूळ) असे म्हणू लागले. याच्याविषयी एक कथा प्रचलित आहे, ती अशी––

एके दिवशी प्रातःकाळी हा तुळशीच्या वनात पाणी घालीत असता देवदेवी नावाची एक गणिका राजवाड्यातून आपल्या घरी चालली होती. वाटेत ती आपल्या सखीसह तुळशीवनात थोडा वेळ विसावली. तिथे तोंडरडीपोडीची व तिची दृष्टादृष्ट झाली. गणिकेला तो पुरुष आवडला. परंतु तिच्या सौंदर्याचा मात्र तोंडरडीपोडीवर अणुमात्रही परिणाम झाला नाही. त्याच्या मुद्रेवरील तिरस्काराचा भाव पाहून देवदेवी मनोमन चिडली व तिने त्याला वश करण्याचा निश्चय केला. त्यासाठी भगवी वस्त्रे लेवून ती त्याच्याजवळ गेली आणि त्याला म्हणाली, 'महाराज, मी वेश्या आहे. पण मला आता माझ्या जीवनाबद्दल घृणा उत्पन्न झाली आहे. आपण माझा उद्धार करावा

म्हणून मी आपणाला शरण आले आहे. रंगनाथाच्या सेवेत उर्वरित आयुष्य घालवावे, अशी माझी इच्छा आहे. तरी आपण मला तशी संधी द्या.'

तिच्या या बोलण्याने मृदू मनाच्या तोंडरडीपोडीला तिची दया आली. त्याने तिला तुळशीवनात राहण्याची परवानगी दिली. एके दिवशी प्रातःकाळी देवदेवी फुले वेचीत असता मुसळधार पाऊस पडू लागला. तशाही स्थितीत ती तिथेच फुलं वेचीत राहिली. तोंडरडीपोडीने तिला भिजताना पाहिले व आपल्या झोपडीत नेले. ही संधी बरी आहे, असे पाहून देवदेवीने त्याला आपला स्वीकार करण्याची विनंती केली. तोंडरडीपोडीच्या मनातही कामभावना जागृत झाली व त्याने तिचा स्वीकार केला. पुढे हा परमेश्वराची सेवा सोडून तिचीच सेवा करू लागला. काही दिवसांनंतर देवदेवी त्याचा त्याग करून तिथून निघून गेली. त्यामुळे तोंडरडीपोडीची अवस्था दयनीय झाली. आपल्या भक्ताची ही शोचनीय दशा पाहून रंगनाथाने एके रात्री देवदेवीकडे जाऊन द्रव्याने भरलेली एक सोन्याची थाळी तिला दिली. त्यामुळे देवदेवी खूष झाली. तिने तोंडरडीपोडीला परत आपल्याकडे बोलाविले. तो तिच्याकडे गेला. पण त्याच वेळी दुसरा एक प्रकार घडला. देवदेवीला दिलेली ती थाळी राजवाड्यातली होती. ती हरवली, असे समजताच शोधाशोध सुरू झाली. कोणीतरी सांगितले, की थाळी तोंडरडीपोडीकडे आहे. शिपाई तिथे गेले आणि त्यांनी त्या थाळीसह तोंडरडीपोडीला पकडले. लगेच राजाने त्याला बंदीत टाकले. पण श्रीरंगाने राजाला स्वप्नदृष्टांत देऊन त्याची मुक्तता केली. तोंडरडीपोडीला आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप झाला व देवदेवीचा त्याग करून तो पुनश्च ईश्वरभक्तीकडे वळला.

तिरुमाळै व तिरुपळ्ळी एलच्ची हे तोंडरडीपोडीचे दोन ग्रंथ आहेत. तिरुमाळै म्हणजे पवित्रमाळ. या काव्याला गीतांजली असेही दुसरे नाव आहे. या संग्रहात एकूण पंचेचाळीस पदे असून, त्यातील बरीचशी आत्मनिवेदनपर आहेत. त्यांत भक्तीबरोबरच काव्यसौंदर्यही प्रत्ययाला येते. तिरुपळ्ळी एलच्ची हा ग्रंथ तर अनेकांच्या नित्यपाठातला आहे. त्यात एकूण दहा पदे असून, प्रत्येक पदात प्रातःकालीन निसर्गवर्णन आहे. ही देवाला जागवण्याची पदे आहेत. [ त. प्र. हिं. कृ. ]

**तोंती** द. भारतातील एक जात. या लोकांचे मूळ वसतिस्थान बंगालमध्ये होते; पण सांप्रत हे लोक ओडिसातील गंजाम जिल्ह्यात येऊन स्थायिक झाले आहेत. यांच्यांत बिस्वालो, दस्सो, पालो, बोनो, छांदो, परिमनिको, कोनोरो, बेहर व महापात्रो अशा पोटजाती असून, त्यांचे आपसांत लग्नसंबंध होत नाहीत. पांढरे जाडेभरडे कापड विणणे, हा यांचा पिढीजात धंदा आहे. हे आपले गोत्र काश्यप सांगतात. विवाहसमारंभ ओडिसातील पद्धतीने करतात. चौथ्या दिवशी न्हाव्याला एक नवे मडके, त्यात तांदूळ व गूळ घालून देतात. त्या पदार्थांची लगेच विक्री होते आणि विकून आलेली किंमतही न्हाव्यालाच मिळते. [ का. ट्रा. स. इं. ]

**तोगत** द. भारतातील एक जात. हे लोक तेलुगू कोष्टी आहेत. जाडेभरडे कापड विणणे, हा या लोकांचा व्यवसाय आहे. अलिकडे कित्येक तोगत शेतीही करतात. यांच्या उत्पत्तीसंबंधी एक आख्यायिका प्रचलित आहे, ती अशी—

एकदा एक राजा आपल्या राणीसह काशीयात्रेस निघाला. वाटेत राजाकडून नकळत एक अनाचार घडला. काशीत गेल्यावर, आपणास प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घ्यावे, अशी त्याने काशीच्या ब्राह्मणांना विनंती केली. त्यासाठी त्या ब्राह्मणांना आपले अर्धे राज्य दक्षिणा म्हणून देण्याचेही त्याने कबूल केले. पण ब्राह्मणांनी शपथपूर्वक तसे वचन देण्याबद्दल राजाकडे आग्रह धरला. तेव्हा राजाने तिथून नजीकच असलेल्या छोडेश्वरी देवीची शपथ घेऊन त्यांना तसे वचन दिले. नंतर राजाचा शुद्धिसमारंभ झाला. मग राजा आपल्या गावी परत आला. काही काळाने काशीकर ब्राह्मण दक्षिणेत आले व त्यांनी राजाला आपल्या वचनाचे स्मरण दिले. पण राजा म्हणाला, की 'आपण असे वचन कधी दिलेच नाही.' तेव्हा ते सर्व ब्राह्मण काशीला परत गेले आणि त्यांनी छोडेश्वरी देवीलाच राजाकडे चलण्याची विनंती केली. देवीने त्यांना अट घातली, की 'ब्राह्मणांनी पुढे चालावे आणि इष्ट स्थळी पोचेपर्यंत मागे वळून पाहू नये.' ब्राह्मणांनी ती अट मान्य केली. मग त्या सर्वांचा प्रवास सुरू झाला. पण देवी मागाहून येते की नाही, याविषयी ब्राह्मणांना शंका होती. म्हणून त्यांनी थोडे अंतर चालून गेल्यावर नंदवरम गावानजीक मागे वळून पाहिले. ब्राह्मणांनी असा वचनभंग केलेला पाहून देवी तिथेच थांबली. त्यामुळे काशीचे ब्राह्मणही तिथेच राहिले व पुढे त्याच जागी स्थायिक झाले. त्यांचे जे वंशज तेच आजचे तोगत होत.

तोगतांच्या अनेक उपजाती आहेत. त्यांपैकी चौदा उपजाती प्रमुख आहेत. पाथ ( जुनी ), कंभपू ( खांब ), निलि ( नीळ), मदक ( नांगर ), बन ( भांडे ), जीलकर, अन्नम् ( खाद्यपदार्थ ), मेकल ( बकरा ), गोपलम् (भिक्षा), सामंथी, गुर्लम् ( घोडा ), पेरुमाळ ( देव ), बंदारी व

गुद्दिती अशी त्यांची नावे आहेत. या सर्व उपजातींत विवाह-संबंध होतात.

छोडेश्वरी देवीचे वास्तव्य कडुलिंबाच्या वृक्षात असते. म्हणून त्या वृक्षाची किंवा त्या वृक्षाच्या बुंध्याशी स्थापन केलेल्या पाषाणमूर्तीची हे लोक पूजा करतात. ही पूजा वर्ष-प्रतिपदेला होते. पूजेच्या वेळी पशुबळी देतात. याशिवाय ते पोलेरम्मा, एल्लम्मा, कोटम्मा व इतर देवतांनाही भजतात.

तोगत लोक वैष्णवपंथी असून, ते जानवे घालतात. जन्म, विवाह, अंत्यक्रिया, श्राद्ध व नूतन वास्तूचे बांधकाम या वेळी ते ग्रामजोशाला पुरोहित म्हणून बोलावतात.

हे लोक मृतांना पुरतात. सुतकाच्या शेवटल्या दिवशी शुद्धीकरणासाठी पुरोहिताकडून मद्य घेतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**तोटक** एक संस्कृत छंद. 'वद तोटकमब्धिसकारयुतम् !' ( = चार स-गणांनी युक्त अशा छंदाला तोटक म्हणावे ), असे याचे लक्षण आहे. याच्या प्रत्येक पादात बारा अक्षरे येतात. याचे एक उदाहरण असे ––

**यमुनातटमच्युतकेलिकलालसदङ्घ्रिसरोरुहसङ्गरुचिम् ।**
**मुदितोऽट कलेरपनेतुमघं यदि चेच्छसि जन्म निजं सफलम् ।।**

अर्थ–– ( हे मानवा ) कलीतले पाप दूर करण्यासाठी आणि आपला जन्म सफल करण्यासाठी तू, श्रीकृष्णाने क्रीडा केल्यामुळे त्याच्या पदकमलांच्या स्पर्शाने ज्याला पावित्र्य लाभले आहे, त्या यमुनातटावर आनंदाने संचार कर.

या श्लोकात तोटक छंदाचे नाव गोवलेले आहे. [ श. क. ]

**तोटकाचार्य** ( इ. स. चे ८ वे शतक ) एक अद्वैत-वेदान्ती ग्रंथकार. हा आद्य शंकराचार्यांचा चौथा शिष्य होय. याचे मूळ नाव आनंदगिरी असे होते. पुढे हा गिरी या नावानेच ओळखला जाऊ लागला. शांकरभाष्याचे व्याख्याकार आनंदगिरी व हा आनंदगिरी हे दोघे भिन्न आहेत. याच्याविषयी आख्यायिका सांगतात, ती अशी –

आनंदगिरी हा शंकराचार्यांचा एकनिष्ठ सेवक खरा; पण तो बुद्धीने मंद होता. तथापि शंकराचार्यांची त्याच्यावर खूप मर्जी होती. एकदा हा आपली कफनी धुण्यासाठी तुंगभद्रा नदीवर गेला असता, तिथून परत यायला त्याला उशीर झाला. इकडे आचार्य पाठ देण्यासाठी बसले होते, ते त्याची वाट पाहू लागले. ही गोष्ट पद्मपादादी तल्लख बुद्धीच्या शिष्यांना आवडली नाही. आचार्यांनी ते मनोमन जाणले आणि आपल्या अलौकिक सामर्थ्याने आनंदगिरीच्या ठिकाणी त्यांनी चौदा विद्या संक्रांत केल्या. नदीवरून परत येताच आनंदगिरीने तोटकवृत्तात अध्यात्माच्या विवेचनाला सुरुवात केली. या घटनेने सारे शिष्य आश्चर्यचकित झाले. तेव्हापासून त्याला तोटकाचार्य असे नाव मिळाले. नंतर आचार्यांनी त्याला ज्योतिर्मठाचा पीठाधिकारी नेमले.

तोटकाचार्याच्या नावावर अनेक ग्रंथ मिळतात. तोटकश्लोक ही त्याची प्रमुख रचना होय. कालनिर्णय हा ग्रंथही याचाच म्हणून सांगतात. त्याच्या श्रुतिसारसमुद्धरण या ग्रंथात १७९ तोटके आहेत. त्या ग्रंथात त्याने अत्यंत सुबोध रीतीने अद्वैत-वेदान्ताचे प्रतिपादन केले आहे. [ श्रीशंकराचार्य ]

**तोड** एक आदिवासी जमात. द. भारतातील नीलगिरी पर्वताच्या तीन ते पाच हजार फूट उंच पठारावर यांची वस्ती आहे. प्रामुख्याने कुन्नूर व उटकमंड तालुक्यात हे आढळतात. एखाद्या झऱ्याच्या काठी हे आपल्या झोपड्या उभारतात. सांप्रत यांची संख्या अवघी पाचशेच्या घरात आहे. म्हशी पाळणे हा यांचा प्रमुख व्यवसाय होय. तोडांच्या उत्पत्तीची एक कथा आहे, ती अशी–

ईश्वराने एकदा पर्वतशिखरावर एक मोती टाकला. त्या मोत्यापासून जगताची अधिष्ठात्री अशी तियाकिर्जी देवी प्रकट झाली. देवीचा ओन नावाचा धाकटा भाऊ होता. तो एका वेताने पृथ्वीला झोडपीत असता जो धुरळा उडाला, त्यातून सोळाशे म्हशी उत्पन्न झाल्या. शेवटच्या म्हशीची शेपटी धरून जो माणूस आला, तोच तोडांचा मूळ पुरुष होय. त्याच्या एका फासळीतून एक स्त्री निर्माण झाली. मग या जोडप्याने एका आठवड्याच्या अवधीत शंभर प्रजा निर्माण केली.

प्रत्येक वस्तीत तोडांच्या पाच ते सहा झोपड्या असतात. त्यांपैकी एका झोपडीत गावाचे दुग्धालय असते. त्यांच्या झोपड्या वांबूच्या असून, त्यांवर गवताचे छप्पर असते. त्यांची लांबी सुमारे अठरा फूट, रुंदी नऊ फूट व उंची दहा फूट असून, आकार अर्धवर्तुळाकार असतो. झोपड्यांना दारे किंवा खिडक्या नसतात. आत जाण्यासाठी अडीच–तीन फूट उंच व दीड–दोन फूट रुंद असे प्रवेशद्वार असते. त्यातून त्यांना रांगत आत जावे लागते. झोपडीत एका बाजूला ओटा घातलेला असतो. त्यावर चटई किंवा म्हशीचे कातडे अंथरून ते झोपतात. दुसऱ्या बाजूला स्वयंपाकाची व्यवस्था असते.

हल्ली मात्र तोड लोक इतरांसारखी दगड, माती, चुना, लाकूड, कौले, इत्यादींच्या साहाय्याने घरे बांधू लागले आहेत. घराची जागा निश्चित करताना तोड लोक आपल्या पुरोहिताचा सल्ला घेतात. घराचा मुहूर्त करायच्या दिवशी सकाळी ते मंदिरात जाऊन धर्मर देवाची पूजा करतात आणि झोपडी

बांधायच्या जागेवर मध्यभागी झाडाची एक फांदी पुरतात. मग संकल्पित घराच्या आखलेल्या चतुःसीमेवर काही नाणी ठेवून त्यांवर खिळे ठोकतात. घर बांधून झाल्यावर प्रथम त्यांच्या स्त्रिया गृहप्रवेश करतात.

तोड पुरुष गव्हाळी' वर्णाचे, उंच, बांधेसूद व दणकट असतात. त्यांच्या डोक्यावर दाट केस असतात. ते लांब दाढी ठेवतात. ते कमरेला एक लंगोटी लावतात आणि गळ्या-पासून पायापर्यंत सर्व अंग पुटकुळी नामक एका पांढऱ्या वस्त्राने झाकून घेतात. त्या वस्त्रावर निळ्या, काळ्या व तांबड्या धाग्यांनी कशिदा काढलेला असतो.

तोडांच्या स्त्रिया सुंदर असून, त्यांचा वर्ण तांबूस गोरा असतो. त्या आपल्या केसांना लोणी लावून ते विंचरतात आणि त्यांच्या बटा वळवून त्या पाठीवर व खांद्यावर सोडतात. गळ्यात अर्कोट नामक नाण्यांची माळ, उजव्या दंडात आणि डाव्या मनगटात चांदीची वलये, डाव्या हाताच्या बोटांत पितळेच्या व उजव्या हाताच्या बोटांत चांदीच्या आंगठ्या, कानांत कुंडले आणि हातांत काचेच्या किंवा पितळेच्या



तोड स्त्री

बांगड्या, असे त्यांचे अलंकार असतात. दिव्याच्या काजळीने त्या डाव्या हातावर, खांद्यावर, व गळ्याखाली गोंदून घेतात. स्वयंपाक करणे, मुलांना संभाळणे, पाणी आणणे व भात कांडणे ही त्यांची रोजची कामे असतात.

ताकात शिजवलेला भात, तांदळाची गूळ घालून केलेली खीर, सालम मिश्री घालून आटवलेले दूध, तसेच ताक, लोणी व तूप हे त्यांच्या रोजच्या आहारातले पदार्थ होत. याशिवाय रानात उगवणाऱ्या फळभाज्या व पालेभाज्याही ते खातात. वर्षातून एकदा उत्सवप्रसंगी ते म्हशीच्या रेडकाला बळी देतात व त्या वेळी त्याचे मांस खातात.

राहाण्याच्या झोपड्यांपासून थोड्या अंतरावर त्यांचे पवित्र दुग्धालय बांधलेले असते. त्याचे दोन भाग असतात. आतल्या भागात दूध, दही वगैरे ठेवलेले असते व बाहेरच्या भागात दुग्धालयाचा पुजारी राहतो.

तोड लोकांचे टारथरोल व ताइवलिओल असे दोन भेद आहेत. टारथरोल स्वतःला ताइवलिओलांपेक्षा उच्च समजतात. आपल्याजवळ सर्वोच्च दुग्धालये व पवित्र म्हशी असतात, असे ते समजतात. टारथरोलांच्या दुग्धालयातले पुजाऱ्याचे काम मात्र ताइवलिओल पुरुषांकडे असते. त्यांच्या दोन्ही पोटजातींची काही गोत्रे आहेत. एकाच पोटजातीत पण भिन्न गोत्रांत विवाहसंबंध होतो. आते–मामे भावंडांचे लग्न प्रशस्त मानले जाते.

**विवाहप्रथा** –– यांचा विवाहविधी अत्यंत साधा असतो. विवाह लहानपणीच होत असले, तरी वयात येईपर्यंत मुलगी बापाच्या घरी राहते. ती वयात आली, की अन्य गोत्रातील एका सुदृढ तरुणाशी तिचा समागम घडवून आणतात. मुलीला पुढे जन्मभर दांपत्यसुख मिळावे, या उद्देशाने तोड लोक हा संस्कार करतात व तो आवश्यक मानतात.

तोड लोकांत बहुपतिप्रथा आहे. तोड मुलीचे एका पुरुषाशी लग्न झाले, तरी त्याचे भाऊही तिचे पती मानले जातात. काही वेळा, पतीचे दूरचे भाईबंदही तिचे पती होतात. जेव्हा सर्व पती एकाच घरात राहत असतील, तेव्हा जो पुरुष पत्नी-बरोबर एकांतात असेल, तो घराबाहेर एक लाकूड व आपले पुटकुळी नामक वस्त्र ठेवतो. त्यावरून घरात पत्नीबरोबर कोणीतरी तिचा पती आहे, हे इतरांना कळते. पण जर पती वेगवेगळ्या घरांत राहत असतील, तर पत्नी आळीपाळीने त्यांच्या घरी जाते.

तोड स्त्री–पुरुषांचे लैंगिक व्यवहार विवाहसंबंधापुरतेच मर्यादित नसतात. तोडांच्या दोन पोटजातींत विवाहसंबंध होत नसले, तरी त्यांतील स्त्री–पुरुषांना दांपत्यधर्माने वागता येते. मात्र अशा संबंधातून उत्पन्न झालेली संतती त्या स्त्रीच्या कायदेशीर पतीच्या स्वाधीन करावी लागते. त्याचप्रमाणे एखाद्या प्रियकराला त्याच्या प्रेयसीच्या पतीची अनुमती मिळवून तिच्याशी संबंध ठेवता येतो. पत्नीच्या विवाहपूर्व संततीलाही पती आपली संतती मानतो. परपुरुषाशी संबंध

ठेवणे हे तोड लोकांत अनैतिक मानले जात नाही. स्त्रीला पाहिजे तितक्या पुरुषांशी संबंध ठेवता येतो. या बाबतीत पतीने प्रतिबंध केल्यास ते निंद्य समजतात. विधुर पुरुष दुसऱ्या पुरुषाच्या पत्नीला विकतही घेऊ शकतो. पण त्यापूर्वी त्याला त्या स्त्रीची, तिच्या पतीची व पित्याची संमती मिळवावी लागते.

स्त्रीला अनेक पती असल्यामुळे तिच्या अपत्याचा खरा पिता ओळखणे, हे कठीण असते. पण सामाजिक दृष्टीने मुलाचा बाप ठरवणे मात्र आवश्यक असते. त्यासाठी तोड लोक पुरसुटपिमी नावाचा एक संस्कार करतात. त्याचा विधी असा—

गर्भवती स्त्री पाचव्या किंवा सातव्या महिन्यात आपला पती व आप्तेष्ट यांच्यासह जवळपासच्या रानात जाते. तिथे तिच्या भावी अपत्याचा पिता होऊ इच्छिणारा पुरुष तिच्या बापाकडे रानातून धनुष्य-बाण आणण्याविषयी परवानगी मागतो. मग तो झाडाची एक फांदी तोडून त्याचे लहान लहान धनुष्य-बाण तयार करतो. त्यापूर्वी एका झाडाच्या खोडात एक खोबण तयार करून त्यात दिवा लावून ठेवतात. तो विझेपर्यंत गर्भवती स्त्री त्याच्याकडे एकटक पाहत राहते. पतीने तिला धनुष्य-बाण आणून दिल्यावर ती ते उचलून आपल्या मस्तकावर घेते व मग खाली ठेवते. मग धनुष्य-बाण आणून देणारा पती हा तिच्या भावी अपत्याचा सामाजिक पिता ठरतो. त्यानंतर ज्ञातिभोजन होते. मग जमलेले लोक परततात आणि पति-पत्नी संध्याकाळपर्यंत तिथे राहून मग घरी जातात. विवाहित स्त्री अपत्य न होता मरण पावल्यास, स्वर्गात तरी तिला अपत्यप्राप्ती व्हावी, या हेतूने तिचा पतीही वरील संस्कार करतो व धनुष्य-बाण तिच्या मृत देहाजवळ ठेवतो.

गर्भवतीला पाचव्या महिन्यात तिच्या हाताच्या बोटांच्या सांध्यांवर व मनगटांवर तेलात बुडवलेली चिंधी पेटवून डाग देतात. त्यानंतर एक महिना ती एका वेगळ्या झोपडीत राहायला जाते.

**प्रसूतिप्रथा** – प्रसूतीच्या वेळी स्त्री पतीच्या छातीवर डोके टेकून बसते. त्या वेळी कोण्याही व्यक्तीला तिच्याजवळ उपस्थित राहता येते. दुसऱ्या, तिसऱ्या वेळी एखाद्या स्त्रीला मुलगी झाली, तर तोड लोक त्या मुलीचे नाक-तोंड दाबून तिला मारून टाकीत असत. पण या गोष्टीला कायद्याने बंदी आल्यामुळे सांप्रत ही प्रथा नष्ट झाली आहे.

तोड लोकांत बहुपतिप्रथा अस्तित्वात का आली असावी, याबद्दल विद्वानांनी काही कारणे दिली आहेत. त्यांपैकी कुटुंबातील मालमत्ता अविभक्त राहावी हे एक कारण होय. प्रत्येक भावाने स्वतंत्र बायको केली असती, तर तो वेगळा राहिला असता व त्याने मालमत्तेतला आपला हिस्सा तोडून मागितला असता. समाजात जर विवाहयोग्य मुली सुलभपणे मिळू लागल्या असत्या, तर सांप्रत जे सर्व भाऊ एकाच पत्नीवर अवलंबून राहतात, ते तसे राहिले नसते व त्यातून विभक्तपणा आला असता. हे टाळण्यासाठी मुलींना जन्मताक्षणी मारण्याची प्रथा सुरू झाली असावी.

पण या सर्व गोष्टी आता इतिहासजमा झाल्या आहेत. सांप्रत तोड लोकांत बहुपतिप्रथा अस्तित्वात नाही. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला इंग्रजांनी त्यांच्या कन्याहत्येला कायद्याने बंदी केली. त्यामुळे आता मुलींच्या संख्येत बरीच वाढ झाली आहे. त्याचा परिणाम म्हणून प्रत्येक तोड पुरुष स्वतंत्रपणे एका मुलीशी लग्न करू लागला आहे. मात्र कुटुंबातील इतर भावांच्या बायकांवरही पती म्हणून त्याचा हक्क अबाधित राहिला आहे.

तोडांची जातपंचायत असते. विवाह व दुग्धव्यवसाय यांसंबंधीचे विधी केव्हा व कसे करावे हे ठरविणे, हे पंचायतीचे काम असते.

**उद्योगधंदे** – म्हशी पाळणे व त्यांचे दूध काढणे हा तोड पुरुषांचा मुख्य धंदा आहे. याहून दुसरा व्यवसाय करण्याची त्यांना मनापासून आवडच नाही. पण जातीतला माणूस मरण पावल्यावर अनेक रेडे बळी देण्याची त्यांची पद्धत असल्याने त्यांच्या म्हशींची व रेड्यांची संख्याही आता कमी होऊ लागली आहे. त्यामुळेच काही तोडांना आता पहारेकरी, शिपाई, शिक्षक असे व्यवसाय पत्करावे लागत आहेत.

तोडांच्या एका गावात एकाच गोत्राच्या लोकांची वस्ती असते. गावातील सर्व जमिनीवर सर्व गावकऱ्यांची मालकी असते. म्हशी आणि रेडे यांवर मात्र ते व्यक्तीची मालकी मानतात. गावातील दुग्धालयात फक्त पवित्र म्हशींचे दूध साठवतात आणि गावातील प्रत्येकजण आपल्या रोजच्या उपयोगासाठी तिथून ताक घेऊन जातो. पवित्र दुग्धालयातील लोणी लोकांना वाटून उरले, तर ते उटकमंडच्या आणि इतर पासच्या बाजारात नेऊन विकतात.

तोडांनी या म्हशी पाळण्याच्या धंद्याभोवती बरेच विधिविधान निर्माण केले आहे. त्यांनी म्हशींचे पवित्र व सामान्य असे दोन प्रकार कल्पिले आहेत. पवित्र म्हशींना होणाऱ्या पारड्याही ते पवित्र मानतात. रेड्याला मात्र ते पवित्र समजत नाहीत. पवित्र म्हशींच्या दुग्धालयाला टी असे नाव आहे. त्यातील पुजाऱ्याला पलोल म्हणतात. तो नार्थ्योल कुळाचा सदस्य असतो. पलोल बनण्यापूर्वी, त्याला जिवंत आपल्या गोत्रातील पुरुषाशी संपर्क केला नाही, असा

रोल वृद्ध स्त्रीच्या हातचे जेवण जेवावे लागते. जेवताना तो विवस्त्र होऊन जेवतो. एकदा पलोल बनल्यावर त्याला आपल्या पत्नीशी संबंध ठेवता येत नाही व घरीही जाता येत नाही. त्याला कडक ब्रह्मचर्य पाळावे लागते. अठरा वर्षे तो या अधिकारावर राहतो. त्यानंतर त्याला टारथरोल वर्गातील कोणत्याही स्त्रीशी केव्हाही समागम करायची परवानगी असते. पलोलच्या मदतीला एक मुलगा असतो, त्याला काल्ट-मोख म्हणतात. पलोलला अनेक कामे असतात. सकाळी उठून तो टी दुग्धालयाच्या गोठयाचे दार उघडतो आणि म्हशींचे कल्याण व्हावे; तसेच अपघातांपासून व जंगली जनावरांपासून त्यांचे रक्षण व्हावे, म्हणून प्रार्थना करतो. नंतर तो म्हशींचे दूध काढतो आणि आदल्या दिवसाच्या विरजणाचे ताक करतो. पवित्र म्हशींचे ताकच तेवढे तोड लोक पितात. दूध पीत नाहीत. दुग्धालयात परकी माणसाने प्रवेश करणे, हे अशुभ मानतात.



तोडांचे मंदिर

याशिवाय प्रत्येक घराचाही एकेक गोठा असतो. घरचे पुरुष त्यातील म्हशींचे दूध काढतात. मुलगा बारा–तेरा वर्षांचा झाला, की त्याच्या उजव्या खांद्यावर डाग देतात. त्यामुळे दूध काढताना हात दमत नाही, अशी त्यांची समजूत आहे.

वर्षातून एकदा गावातल्या टी दुग्धालयातल्या म्हशींना दूर कुठेतरी चारायला नेतात. याच वेळी तोड लोक काही धार्मिक स्थळांची यात्राही करतात. प्रथम जाण्याचा मार्ग निश्चित करतात. त्या मार्गावरून स्त्रियांना जायला बंदी असते. काही कारणामुळे जाणेच भाग असेल, तर पुरुष त्यांना उचलून घेऊन पलिकडे पोचवतात.

**देवधर्म** – तोडांच्या देवाबद्दलच्या कल्पना अगदी साध्या आहेत. तियाकिर्जी आणि ओन या त्यांच्या प्रमुख देवता होत. तियाकिर्जी ही स्त्री असून, ती इहलोकावर आधिपत्य करते, तर ओन हा पुरुषदेव मृतांच्या लोकावर सत्ता चालवतो. याशिवाय तोड लोक बेट्टकरस्वामी, रंगस्वामी, करमदाई, मरिअम्म, श्रीकंठेश्वर, पार्वती, इ. देवतांनाही भजतात.

तोडांची एक स्वतंत्र बोली आहे. तिचे कन्नड व तमिळ भाषांशी साम्य आहे.

**मर्तिकप्रथा** – तोड लोक मृतांना जाळतात. स्त्रिया व पुरुष यांच्यासाठी त्यांची वेगवेगळी स्मशाने असतात. तोडांचा अंत्यसंस्कार हा कित्येक महिने चालतो. मेल्यानंतर लगेच मृताला जाळतात, तो पहिला संस्कार. त्यानंतर काही दिवसांनी दुसरा दाहसंस्कार करतात.

अविवाहित मुलगी मरण पावल्यावर तिचा एखादा नातेवाईक असलेला अविवाहित मुलगा थोडे गवत व काड्या तिच्या हातात ठेवतो आणि तिच्या पुटकुळीत (उपवस्त्रात) तांदूळ, गूळ, इ. वस्तू ठेवतो. नंतर त्या मुलाला आपादमस्तक पुटकुळीत गुंडाळून झोपडीच्या बाहेर नेतात. अविवाहित मृताच्या बाबतीतही त्याची आते किंवा मामे बहीण असाच विधी करते. विवाहित मृत स्त्रीच्या अंगावर चार वस्त्रे घालतात. गुह्यांगावर काळे वस्त्र, त्यावर पुटकुळी, त्यावर पांढरे व सर्वांत वर लाल वस्त्र असते.

अंत्यसंस्कारात रेडे बळी देणे हे आवश्यक असते. बलिदानानंतर पुरुष नृत्य करतात. मृताच्या बरोबर गूळ, तांदूळ, काठ्या, बांबूची भांडी, धनुष्यबाण, सुरी, ताडपत्री, छत्री, इ. वस्तू जाळतात. मृताचे केस दुसऱ्या दाहसंस्कारासाठी काढून ठेवतात.

हा दुसरा दाहसंस्कार काही महिन्यांनी करतात. त्या वेळी त्याच्या कवटीचा भाग, अस्थी, केस वगैरे अवशेष जाळतात. या वेळीही पुन्हा रेडे बळी देतात. मग ज्ञातिभोजन व नृत्य होते. त्यानंतर येणाऱ्या पौर्णिमेच्या दिवशी शुद्धिसंस्कार करतात. एवढे झाल्यावर मृत व्यक्ती अम्नोडर नामक देवांच्या एका लोकात जाते व बळी दिलेले रेडे तिथे त्या मृत व्यक्तीच्या बरोबर राहतात, असे समजतात. नीलगिरीच्या एका उंच शिखरावर अम्नोडर लोक आहे, असा तोडांचा विश्वास आहे. [का. द्रा. स. इं.; आ. भा.; प्रि. इं.; भा. वि. प.; दू साउथ

इंडियन ट्राइब्ज – एस्. आर्. वेंकटरामन; एन्सा. रि. ए. ]

**तोडगा** जादूचा एक प्रकार. इष्टप्राप्ती आणि अनिष्ट-निवारण या दोन्ही गोष्टींसाठी तोडगे करण्याची प्रथा जगातील सर्व समाजांत आहे. आदिवासी आणि असंस्कृत लोक आजही रोगनिवारणासाठी वैद्यकीय उपायांऐवजी तोडग्यांचा वापर करतात. उदा० एखाद्याच्या अंगावर फोड आले, तर ज्वारीचे थोडे दाणे हळदीने पिवळे करून ते त्याच्या अंगावरून तीनदा ओवाळतात आणि मग त्यांची एका चिंधीत पुरचुंडी करून रस्त्यावर टाकतात. जो माणूस ही पुरचुंडी ओलांडून जाईल, त्याच्याकडे तो रोग जातो, अशी समजूत आहे. रोगनिवारणासाठी झाडावर चिंध्या बांधण्याची प्रथा जगाच्या सर्व भागांत आढळते. मिर्झापूर विभागातील कोरवा, बैगा, इ. लोक झाडाला चिंध्या बांधतात. त्या चिंध्यांची सावली ग्रामदेवतेच्या मंदिरावर पडल्याने ती संतुष्ट होते आणि भक्तांना आरोग्य व भाग्य देते, अशी त्यांची श्रद्धा आहे. वऱ्हाडात जुन्नरदेवजवळ अशीच एक चिंध्यादेवी आहे. तिला वस्त्र वाहिले, की नवे वस्त्र प्राप्त होते, असा समज आहे. घरातले माणूस परगावी अथवा बाहेर गेले असले आणि ते वेळेवर परत आले नाही, तर उंबऱ्यावर भांडे पालथे घालून ठेवणे अथवा लाटणे पाण्यात घालून ठेवणे; मुलाला दृष्टबाधा झाली, तर मीठमोहऱ्या ओवाळून चुलीत टाकणे; उसण भरली असेल, तर त्या जागी दाराची कडी तीन वेळा घासणे; इ. तोडगे आपल्या समाजात सर्रास केले जातात. पाहा – जादूविद्या. [ पॉ. रि. फो. नॉ. इं. ]

**तोडरमल** (१) (१५२३–१५८९ इ. स.) अकबर बादशाहाचा एक मंत्री. हा खत्री जातीचा होता. अयोध्या प्रांतातील टंडन नावाच्या कुळात याचा जन्म झाला. हा प्रथम अकबराच्या दरबारात एक साधा कारकून होता. पण त्याची बुद्धिमत्ता पाहून अकबराने त्याला सैन्यात अधिकारपद दिले. इ. स. १५६७ मध्ये तोडरमलाने अयोध्या प्रांताचा सुभेदार शिकंदरशाहा याचा पराभव केला. पुढे ओडिसा, बंगाल, बिहार, गुजरात, इ. प्रांतांत उद्‌भवलेली बंडाळी मोडण्याची कामगिरीही अकबराने त्याच्याकडेच सोपवली व प्रत्येक स्वारीत त्याने विजय मिळवून दाखवला. इ. स. १५८४ मध्ये तोडरमलाने बंगालचा बहुतेक भाग मोगल साम्राज्यात समाविष्ट केला. या कामगिरीबद्दल अकबराने तोडरमलाला राजा ही पदवी देऊन त्याला बंगालचा सुभेदार नेमले.

तोडरमल विशेष प्रसिद्ध आहे, तो त्याने घालून दिलेल्या जमीनमहसुलाच्या पद्धतीमुळे. 'असल–इ–जमा–इ' असे ... नाव होते. त्याने प्रथम सर्व जमिनीची पाहणी व मोजणी ... तिचे वर्ग पाडले आणि सुपीक, मध्यम व वरड अशी ... प्रतवारी लावून जमीनधारा ठरवला. बंगालमधील ... धान्याची पद्धत ही त्यानेच बसवली. वहीखाते व हुंडी ... प्रचलित केली.

वसूलपद्धतीप्रमाणेच तोडरमलाने टांकसाळीतही सुधा... केली आणि मोहरा व रुपये यांची नवीन नाणी पाडली. ... सर्व राज्यकारभारात हिंदी भाषेऐवजी फारसी भाषेचा ... सुरू केला.

त्याच्या पराक्रमापेक्षा मुत्सद्देगिरीबद्दलच तो इति... प्रसिद्ध आहे. त्याचा स्वभाव फार करारी असून, वृत्ती ... होती. स्वधर्मावर त्याची निष्ठा असून, तो नेमधर्म ... पाळीत असे. तो नित्य भजन करी व दानधर्मही ... करी.

त्याने रचलेल्या काही नीतिपर कविता उपलब्ध असून ... हिंदीत आहेत. त्याच्या प्रेरणेनेच तोडरानंद नामक ... ज्ञानकोश तयार करण्यात आला. या ज्ञानकोशाचे ... व्यवहार, दान, श्रद्धा, विवेक, प्रायश्चित्त, इ. विभाग ... [ म. ज्ञा. को; हिं. ध.; हिं. नी. वि. ]

(२) (१७४०–१७७२ इ. स.) राजस्थानातील ... वाल जातीतला एक जैन पंडित. याचा जन्म जयपूर... झाला. याच्या पित्याचे नाव जोगीदास असे होते. याने ... व प्राकृत ग्रंथांतील जैन तत्त्वज्ञान सामान्य लोकांना ... अशा हिंदी भाषेत लिहिले. याचा सर्वांत प्रसिद्ध ग्रंथ ... गोम्मटसारवचनिका हा होय. नेमिचंद्राच्या गोम्मटसार... ही टीका आहे. त्याचा दुसरा ग्रंथ त्रैलोक्यसारवचनिका ... एका प्राकृत ग्रंथाचा अनुवाद आहे. त्यात जैन मता... पृथ्वीचे व खगोलाचे वर्णन दिलेले आहे. गुणभद्रस्वा... आत्मानुशासन नामक आध्यात्मिक संस्कृत ग्रंथाचा हिंदी ... वादही याने केला आहे. याव्यतिरिक्त पुरुषार्थसिद्ध्यु... वचनिका व मोक्षमार्गप्रकाशक हे दोन अपुरे ग्रंथही ... नावावर आहेत. [ म. ज्ञा. को; श्री. सौभागमल जैन-... राजस्थान, जानेवारी १९५७ ]

**तोडी** एक रागिणी. हिच्यात ऋषभ, गंधार व धैवत ... कोमल, मध्यम, तीव्र आणि बाकीचे स्वर शुद्ध ... तात. आरोहात पंचम वर्ज्य असतो. याची जाती षाड... आहे. वादी– धैवत. संवादी– गंधार. आरोह – नी, रे, ग, ... नि, सा. अवरोह – सा, नि, ध, प, म, ग, रे, ग, रे, सा ...

स्वर – ध, नि, रे, ग, म, रे, ग, रे, सा. गानसमय – सका-



तोडी रागिणी – पहाडी चित्रशैली

ळचा दुसरा प्रहर. हा राग भक्तिरसाला अनुकूल आहे. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**तोत्तियन** तेलुगू शेतकऱ्यांची एक जात. यांची वसती तमिळनाडमध्ये आहे. विजयनगरच्या राज्यातील सैनिक हे आमचे पूर्वज आहेत, असे हे सांगतात. श्रीकृष्णाच्या गोपस्त्रियांचे आम्ही वंशज आहो, असेही काही लोकांचे म्हणणे आहे. ते वैष्णव आहेत.

तोत्तियन लोक मूळचे तुंगभद्रेच्या उत्तरेकडील रहिवासी होते. तिथून त्यांनी स्थलांतर केले. या स्थलांतरासंबंधी एक आख्यायिका सांगतात, ती अशी––

तोत्तियन लोक तुंगभद्रा नदीच्या उत्तरेस राहत असता तिथे मुसलमानांची आक्रमणे सुरू झाली, म्हणून सर्व तोत्तियन समाज तुंगभद्रेच्या दक्षिणेकडे पळून गेला. त्या प्रसंगी नदीच्या दोन्ही तीरांवर असलेले पोंगू नावाचे वृक्ष नदीत आडवे पडले. त्या वृक्षांवरून तोत्तियन लोक नदीच्या पलिकडे गेले व लगेच आडवे झालेले ते वृक्ष पुन्हा ताठ उभे झाले. त्यामुळे पाठलाग करीत आलेल्या मुसलमानांना नदी ओलांडून पलिकडे जाणे अशक्य झाले.

ऐन वेळी पोंगू वृक्षांनी आपल्याला मदत केली म्हणून हे लोक त्या दिवसापासून त्या वृक्षाला पवित्र मानू लागले आणि लग्नमंडपासाठीं त्या वृक्षाचेच खांब उभारू लागले.

निरनिराळ्या जिल्ह्यांत या जातीच्या निरनिराळ्या पोटजाती आहेत. तिन्नेवेल्ली इथे यांच्या थोकल, छिल्ल, कोल्ल, नरसिल्ल, कांथिकोल्ल आणि पाल अशा सहा पोटजाती आहेत. त्यांत पाल व छिल्ल यांचे एकमेकांशी विवाहसंबंध होतात; पण इतर चार जाती आपल्यांतच सोयरीक करतात. मदुरा जिल्ह्यातील नेल्लकोटच्या आसपास राहणाऱ्या तोत्तियनांच्या रेवळ, गोल्लवीरप्प, कंब्ली-नयुडी, करडी, उडुम, छील आणि गेलिपिथी अशा पोटजाती आहेत. या पोटजाती आपसांत लग्नसंबंध न करता गुंडगल, बूसल, मन्नी, सुक्क, अलिवीरप्प, सिक्क आणि माध या पोटजातींतल्या लोकांशी तो करतात.

तोत्तियन लोक जादूटोणा करण्यात प्रवीण असतात. त्यामुळे इतर जाती त्यांना फार भितात. हे लोक परगावच्या माणसाला पादत्राणे घालून, घोड्यावर बसून किंवा छत्री घेऊन आपल्या गावात प्रवेश करू देत नाहीत. कारण त्यामुळे देव कोपतो, अशी त्यांची समजूत आहे.

**विवाहप्रथा –** यांच्यांत आते-मामेबहिणीशी विवाह होतो. मुलगी मुलापेक्षा वयाने मोठी असली तरी चालते. तोत्तियन कुटुंब कितीही श्रीमंत असले, तरी त्यांना लग्नसमारंभात चणे खावे लागतात. त्यांच्यातल्या एका पोटजातीचा विवाहविधी असा––

विवाहाच्या दिवशी सकाळी वधू-वर बोहल्यावर बसतात व तिथे जमलेले लोक त्यांच्यावर दूध शिंपडतात. दुपारी नवरा मुलगा पुन्हा लग्नमंडपात जातो. मुलीचा मामा मुलीला उचलून घेऊन तिथे येतो. मग जातिप्रमुख त्या दोघांच्या करांगुली एकत्र बांधतो आणि त्यांना अंगठ्यांची अदलाबदल करण्यास सांगतो. एवढे झाले, की लग्न पुरे होते.

जक्कमा आणि बोम्मक्का या नावाच्या दोन स्त्रिया पूर्वी सती गेल्या होत्या, त्याच पुढे तोत्तियनांच्या संरक्षक देवता बनल्या. त्यांच्या जातिदेवाचे नाव पेरुमाळ असे आहे. पाटावरवंटा हे त्याचे प्रतीक होय.

**मृतकप्रथा –** मृतांना जाळतात. मृताच्या चितेला त्याचा पुत्र अग्नी देत नाही; तर मृताच्या पत्नीचे नातेवाईक ते काम करतात. दहनभूमीवर एक चिरा ठेवतात. आशौचाच्या शेवटच्या दिवशी हा चिरा पुरून त्याची पूजा करतात. दर

बारा वर्षांनी अशा अनेक चिन्यांची एकत्रित पूजा करतात, त्याला मालेपूजा असे म्हणतात. या दिवशी गावातले लोक एकेक बैल घेऊन येतात. त्यांची पूजा केल्यावर त्यातला एक बैल पोळ म्हणून सोडतात. ज्याचा बैल मालेपूजेच्या दिवशी प्रथम येईल, त्याला हा मान मिळतो. बैलाच्या मालकाला वस्त्र, पैसे वगैरे देणग्या मिळतात. हे लोक मृत पितरांना भाताचे पिंड व मद्य अर्पण करतात. [ मदुरा गॅझे; का. ट्रा. स. इं. ]

**तोफाराय** ( इ. स. चे १९ वे शतक ) एक हिंदी कवी. हा बिहार प्रदेशातल्या सारण जिल्ह्यातील हथुआ राज्याचा राजकवी होता. हा शीघ्रकवी म्हणून प्रसिद्ध होता. कुँअरपचासा हा याचा काव्यग्रंथ होय. त्या ग्रंथात कुँवरसिंह व इंग्रज कप्तान व्हिन्सेंट आयर यांच्यामध्ये झालेल्या युद्धाचे आणि कुँवरसिंहाच्या विजयाचे वर्णन आहे. त्या काव्यातला एक नमुना असा–

**एक एक पेड पीछे एक एक बीर ज्वान**
**नेजा संगीन खाँडां गहि छिपि बइठल नू ।**
**दन्न – दन्न गोली चले धाँई–धाँई घहरे तोप**
**झम पानी पडि मेघ गहरि लौका लडकल नू ।।**
**भैल घमासान फिरंगी सेना आगे बढलि**
**मार संगीन सुरू होखल नेजा चमकल नू ।**
**बनि आइल रंग तब बीर कुँअर गरजल जब**
**बिजली अस तरुआरि चमचमाइ तरजल नू ।।**

अर्थ – सेना जंगलात पोहोचल्यावर एकेका झाडाच्या मागे एकेक सैनिक हातात बंदूक व तलवार घेऊन दडून बसला होता. तिकडे ( इंग्रज सेनेचा ) बंदुकींच्या गोळ्यांचा वर्षाव व तोफांचा भडिमार सुरू होता. मुसळधार पाऊस पडत होता. मेघ गर्जत होते आणि विजांचा लखलखाट चालू होता. घनघोर युद्ध सुरू झाले आणि इंग्रज सेना पुढे सरकू लागली. संगिनींचा मारा सुरू झाला. भाले–बरच्या चकाकू लागल्या. कुँवरसिंह घोड्यावर बसून आपल्या सैनिकांना इशारे देत देत जयघोष करून आपली विजलीप्रमाणे चमकणारी तलवार फिरंग्यांच्या मानेवर फिरवू लागला, तेव्हा युद्धात निराळाच रंग भरला.

हा प्रतिभासंपन्न कवी भाट वंशातला होता. [ मो. क. का. ]

**तोमतोम** एक चर्मवाद्य. टोपलीच्या आकाराच्या कुंडीवर चामडे चढवून हे वाद्य बनविलेले असते. ते दोन लाकडी काठ्यांनी वाजवितात. हे ताशासारखे असून, दवंडी पिटण्यासाठी याचा उपयोग केला जातो. [ म्यु. इं. ]

**तोमर** एक प्राचीन अस्त्र. याचे स्वरूप वैशंपायनाने दिले आहे, ते असे–

**तोमरः काष्ठकायः स्यात् लौहशीर्षः सुपुच्छवान् ।**
**हस्तत्रयोन्नताङ्गश्च रक्तवर्णस्त्ववक्रगः ।।**

अर्थ – तोमराचा दांडा लाकडाचा असून, तोंड लोखंडाचे असते. त्याला ( मागे ) चांगले पंख बसवलेले असतात. त्याची उंची तीन हात असते, रंग तांबडा असतो व गती सरळ असते.

याचे तोंड बलाच्या तोंडासारखे असे, असे काहींचे म्हणणे आहे; तर गुस्ताव्ह ओपर्टच्या मते ते पुष्पगुच्छासारखे असे. दांड्याला पंख बसविल्यामुळे याची गती वाढत असे. [कल्याण-संस्कृतिअंक; क. म.; श. क. ]

**तोमर राजवंश** पंजाबातील हरियाणा प्रदेशावर राज्य करणारा एक राजपूत वंश. त्याची राजधानी दिल्लिका हीच सांप्रतची दिल्ली होय. इ. स. ८ व्या शतकात तुआर लोकांनी ही नगरी वसवली, अशी आख्यायिका आहे. तुआर हे तोमर या शब्दाचे अपभ्रष्ट रूप होय. जयपूर राज्यात या घराण्याची एक लहानशी जहागीर होती. या घराण्यातील अनंगपाल नामक वीर पुरुषाने दिल्ली येथे लहानसे राज्य स्थापिले. पुढील दोनशे वर्षांत त्या राज्याचा बराच विस्तार व उत्कर्ष झाला. मात्र ते राज्य कनोजच्या प्रतीहारांचे मांडलिक म्हणूनच चालत होते. इ. स. १० व्या शतकात तोमर राजांनी प्रतीहारांचे वर्चस्व झुगारून देऊन आपली स्वतंत्र सत्ता उद्घोषित केली. पंजाबमधील कर्नाल-पर्यंत तोमरांची सत्ता चालत होती. त्यांनी मुस्लीम आक्रमणांचा बराच प्रतिकार केला.

दिल्लीचे तोमर व सांबरचे चाहमान यांचे हाडवैर असून त्यांच्यांत सतत संघर्ष चालू होता. शेवटी इ. स. च्या १२ व्या शतकात चाहमान राजा विग्रहराज (तिसरा) याने तोमरांचा पराभव करून दिल्ली जिंकली व तिथे चाहमानांची सत्ता प्रस्थापित केली. [ म. ज्ञा. को.; ए. इं.–मजु.; पू. म. भा. ]

**तोरण** ‘ तोरणो ऽस्त्री बहिर्द्वारम् ’ ( = बाहेरचे द्वार म्हणजे तोरण होय ), असे अमर म्हणतो. सामान्यपणे मंगलकार्ये, तसेच धार्मिक किंवा सामाजिक समारंभ अशा प्रसंगी मंडपाच्या प्रवेशद्वारावर आंब्याची पाने, फुलांच्या माळा वगैरे बांधून जी सजावट करतात, तिला तोरण असे म्हणतात. तोरण हे मंगलकारक मानले जाते. अशा तोरणांचा उल्लेख संस्कृत वाङ्मयात अनेक ठिकाणी आढळतो. या

साध्या तोरणाचाच पुढे विकास होऊन कालांतराने कमानी-सारखी तोरणे बांधण्याची प्रथा सुरू झाली.



सर्वप्रकारक तोरण

सिंहासने, रथ, प्रवेशद्वारे अशा ठिकाणी ही तोरणे कोरलेली किंवा बांधलेली आढळतात. अर्थात ही तोरणे शोभेसाठी



जालतोरण

असतात. वर्तुळाकार, अर्धवर्तुळाकार, त्रिकोणी, धनुष्याकार असे त्यांचे विविध आकार आढळतात. तोरणे बनविण्याचे तंत्र व त्यांची मापे मानसार या ग्रंथात सविस्तर दिलेली आहेत. तिथे तोरणांचे चार वर्ग दिलेले आहेत, ते असे--(१) पत्र-तोरण (२) पुष्प-तोरण (३) रत्न-तोरण व (४) चित्र-तोरण. तोरणांवर पाने, फुले, रत्ने, देवता, यक्ष-किन्नर, मकर, मासे, सर्प, सिंह, इ. आकृती कोरल्या जातात. त्यावरून त्यांना वरील नावे मिळाली आहेत.

दोन स्तंभांवर तिहेरी कमानी बांधून, त्यांच्या मधल्या जागेत जाळीदार नक्षी केलेली असते, त्याला जाल-तोरण म्हणतात. अशा तोरणाचा उल्लेख रामायणात आहे.

सांची व भरहूत येथील स्तूपांच्या भोवती ज्या वेदिका आहेत, त्यात अनेक तोरणे बांधलेली दिसतात. त्यांवर बुद्धाच्या जीवनातील प्रसंग आणि जातकातील व इतिहासातील घटना कोरलेल्या आहेत. बुद्धाची मूर्ती मात्र त्यांत कुठेही दिसत नाही. बुद्धाचे चरण, आसन, बोधिवृक्ष, धर्मचक्र, ही त्याची प्रतीके मात्र आढळतात.

जैन तीर्थंकरांच्या मूर्तींच्या वर जी त्रिकोनी कमान असते, तिलाही तोरणच म्हणतात. ती दोन स्तंभांवर आधारित असून, तिच्यावर कोरीव काम असते. या तोरणावर नेहमी कळस असतो. [ एन्सा. हिं. आ.; न्यू इं. अँ., नोव्हें. १९३९; भा. इ. रू. ]



**तोरणमाळ** महाराष्ट्रातील एक नाथपंथी क्षेत्र. हे स्थान सातपुडा भागातील अक्राणी महालात, धुळ्यापासून ८० मैल अंतरावर व समुद्रसपाटीपासून ३४०० फूट उंच डोंगरावर वसलेले आहे. या डोंगरावर १६ चौरस मैलांचे विस्तीर्ण पठार असून, इथे यशवंत या नावाचा एक तलाव आहे. या तलावाच्या परिसरात अनेक जुन्या मंदिरांचे अवशेष दिसतात. हे पूर्वी मांड घराण्याच्या राजधानीचे स्थान होते, असे सांगतात.

गोरक्षनाथ इथे राहिला होता, अशी नाथपंथियांची श्रद्धा आहे. नाथपंथातील गणेश उपासी शाखेचा प्रवर्तक कंथडीनाथ हा होय. त्याची गादी या डोंगरावर आहे. या डोंगराच्या दक्षिण भागी जैनांचे पार्श्वनाथमंदिर आहे. तिथे प्रतिवर्षी आश्विन महिन्यात यात्रा भरते. डोंगरावर भिल्लांची थोडी वसती आहे. [ म. ज्ञा. को.; म. जि.– धुळे ]

**तोरणवंदना** राजस्थानी विवाहातील एक विधी. विवाहाच्या दिवशी वधूच्या घराच्या मुख्य दरवाज्यावर एक लाकडी रंगीत तोरण बांधतात. लग्नासाठी नवरामुलगा वधूगृही येतो, तेव्हा तो घरात प्रवेश करण्यापूर्वी त्या तोरणावर तलवारीने सात वार करतो. याला तोरणवंदना किंवा तोरण मारणे, असे नाव आहे. प्राचीन काळी स्वयंवरासाठी जमलेले

राजे आणि राजपुत्र यांच्यांत वधूनिमित्त संघर्ष निर्माण होऊन तलवारींचा खणखणाट होत असे, त्याचे प्रतीक म्हणून तोरणबंदना हा विधी केला जातो, असे म्हणतात. [मा. री.; श्री. शंभुसिंह भादवा– मरुभारती, एप्रिल १९५९]

**तोरेय** एक जात. यांची वसती मद्रास राज्यातील कोईंबतूर व सेलम या दोन जिल्ह्यांत आणि म्हैसूरच्या द. भागात आहे. महाभारतातील मत्स्यगंधा नामक स्त्रीच्या काचेच्या बांगड्यांपासून आपली उत्पत्ती झाली, असे हे लोक सांगतात.

मासेमारी हा यांचा मूळ धंदा होय. परंतु अलिकडे बहुतेक तोरेय लोक शेती व पानमळे करू लागले आहेत. काही लोकांनी कापडाचा व्यवसाय सुरू केला आहे व काही पोलीस व ठेकेदारही बनले आहेत.

एलै (पानमळेवाले), छुनम (चुनाभट्टीवाले) आणि गाझुल (काचेबांगडीवाले) अशा यांच्या तीन पोटजाती आहेत. या प्रत्येक जातीचे विवाहसंबंध त्या त्या पोटजातीपुरतेच मर्यादित असतात.

या व्यतिरिक्त मिश्रविवाह करणाऱ्या त्यांच्या तेरा पोटजाती पुढीलप्रमाणे आहेत– (१) बेल्ली– हे लोक पायात चांदीची जोडवी घालीत नाहीत, (२) नाग– हे विवाहप्रसंगी वारूळाचे पूजन करतात, (३) अलवर, (४) छिन्नम, (५) कन्सुगजे, (६) उरकथी, (७) वंजिर, (८) वसिष्ठ, (९) मोगिल, (१०) ओन्ने– हे लोक ओन्ने नावाच्या वृक्षाचा चीक कपाळाला लावीत नाहीत, (११) कुझ्हल– पावा, पुंगी व नाग बाळगणारे हे लोक जेवताना या वाद्यांचा आवाज ऐकत नाहीत, (१२) राक्षस– ही जात दिवाळीतली नरक चतुर्दशी करीत नाहीत व (१३) एरुमै.

**जातपंचायत** — तोरेय जातीत जातपंचायत आहे. पंचायत प्रमुखाला एजमन असे म्हणतात. त्याला दलवयी नावाचा एक मदतनीस असतो. यांच्या जासुदाला (निरोप्या) कोंडीकर असे म्हणतात. हे तीन्ही अधिकार वंशपरंपरेने चालतात. पंचायतीची बैठक मंदिरात भरते. एजमन हा तिचा अध्यक्ष असतो. प्रत्येक कुटुंबातला वयाने ज्येष्ठ असलेला पुरुष हा पंचायतीचा सभासद असतो. सभासदाला सभेत यायला उशीर झाला, तर त्याला सभेला साष्टांग नमस्कार घालावा लागतो.

**विवाहप्रथा** — विवाहविधी वधूच्या घरी न होता वराच्या घरी होतो. पूर्वी एकदा तोरेय जातीच्या एका राजपुत्राला विवाहासाठी वधूगृही नेल्यावर तिथे त्याला ठार मारण्यात आले होते, अशी आख्यायिका आहे. यामुळे लग्न वराच्या घरी करण्याची चाल सुरू झाली. लग्नसमारंभ पाच दिवस चालतो. पहिल्या दिवशी वरपिता वधूच्या घरी जातो आणि देज, वस्त्रे व अलंकार देऊन पाच सुवासिनींना भोजन घालतो. वराकडील व वधूकडील पाच पाच सुवासिनी वधू – वरांच्या घरी जाऊन तांदूळ सडतात. दुसऱ्या दिवशी अशाच पाच पाच स्त्रिया एका तलावातले पाणी आणून वधू–वरांना स्नान घालतात. नंतर या दहा स्त्रिया कुंभाराकडे जाऊन त्याच्याकडून रंगवलेली पाच मडकी आणतात. त्यांपैकी तीन मडकी तलावातल्या पाण्याने भरून घेतात. तिसऱ्या दिवशी वर व त्याची बहीण उरलेली दोन मडकी तलावाच्या पाण्याने भरून आणतात. मग पाचही मडकी लग्नमंडपात ठेवतात व त्यांना घरातील देवतांच्या प्रतिमा समजतात. वराचे नातलग निरनिराळे बारा अलंकार, एक नवे वस्त्र, फुले, इ. जिन्नस घेऊन प्रथम एजमनच्या घरी जातात व मग त्याच्यासह वधूगृही जातात. तिथे वधूला स्नान घालून मग तिला आणलेले वस्त्रालंकार देतात. पुरोहित सोन्याच्या पत्र्याचे बाशिंग वधूच्या कपाळावर बांधतो. हे झाल्यावर वधूला मिरवीत वराच्या घरी नेतात. वराच्या कपाळावरही असेच बाशिंग बांधतात. वर जानवे घालतो आणि हातात कटचार घेऊन लग्नमंडपात जाऊन बसतो. त्याच्यासमोर अंतरपाट धरलेला असतो. वधू त्या अंतरपाटाभोवती तीन प्रदक्षिणा घालते व त्याच्या आड उभी राहते. नंतर पुरोहित वधू–वरांची पूजा करून त्यांना उपदेश करतो व अंतरपाट खाली करतो. एकमेकांना हार घालून झाल्यावर नवरा मुलगा नवरीच्या गळ्यात ताळी बांधतो. चवथ्या दिवशी वधू-वरांना मंडपात बसवतात. त्या वेळी शिजलेल्या भाताची मुटकी करून ती तबकात ठेवतात. त्यांवर पांढरा, तांबडा, पिवळा, हिरवा व काळा असे रंग शिंपडतात. मग त्या मुटक्यांवर जळके काकडे खोचून त्यांनी वधू–वरांना ओवाळतात. नंतर पाच विवाहित पुरुष व पाच सुवासिनी आणि हातात पिंपळाची डहाळी घेतलेला वधूचा भाऊ इतके सर्वजण मिळून नवरा-नवरीभोवती वर्तुळ करून उभे राहतात. नवरदेव आपल्या हाताची ओंजळ करतो. त्या ओंजळीत, तसेच त्याच्या डोक्यावर, खांद्यांवर, कोपरांच्या खळग्यात व गुडघ्यावर तांदुळांच्या पिठाची एकेक भाकरी ठेवतात. मग वधू–वरांना स्नान घालतात. स्नानानंतर त्यांच्या हातात पानाचा विडा देऊन उभयतांना पृथ्वीच्या चारी दिशांना नमस्कार करायला सांगतात. यानंतर लग्नमंडपाची पूजा होते.

या विधीनंतर सर्वजण वधूगृही जातात. तिथे वधूची बहीण नवरा-नवरीला दारात अडवते आणि त्यांच्याकडून पुढील अभिवचन घेते– 'तुम्हांला मुलगा झाला, तर त्याला माझी मुलगी

करून घेतली पाहिजे आणि मुलगी झाली, तर ती माझ्या मुलाला दिली पाहिजे.' मग वधू तलावाचे पाणी आणून त्या पाण्याने वराचे पाय धुते. नंतर वधू-वर एकमेकांना दूध-भाताचा घास देऊन भोजन करतात. हात धुतल्यावर वधूचा भाऊ वराला एक अंगठी देतो. भोजनानंतर वर आपल्या वस्त्रात तीन ओंजळी सुपाऱ्या व पाने बांधून मंदिरात जातो व देवाची पूजा करतो. पाचव्या दिवशी लग्नमंडपातील मडकी नदीवर नेऊन ठेवतात. तिथून घरी परतल्यावर पाच सुवासिनींना भोजन घालतात. सायंकाळी ते नवदांपत्य वधूच्या घरी जाते. तिथे ते एकमेकांना तेल लावून हळदीच्या पाण्यात स्नान करतात. दुसऱ्या दिवशी ते दांपत्य वरगृही जाते.

**देवधर्म**– राम हे यांचे आराध्य दैवत आहे. हे लोक शिव व विष्णू यांनाही भजतात. शिवाय ते कोटिअम्मालाही कोंबड्या-बकऱ्यांचा बळी देतात.

**मर्तिकप्रथा**– हे लोक प्रेते पुरतात. ते प्रथम रुई किंवा शेर यांचे खांब आणि नारळाच्या झावळ्या यांनी एक मंडप तयार करतात व त्यात प्रेत ठेवून त्याच्यावर काही संस्कार करतात. प्रेत पुरल्या जागी मातीचा उंचवटा करून त्याच्या तीन कोपऱ्यांवर रुईच्या डहाळ्या ठेवतात, पण ईशान्य कोपरा मोकळा ठेवतात. प्रत्येक डहाळीजवळ मयताचा पुत्र एकेक नाणे ठेवतो. मग अंत्यसंस्कार करणारा माणूस पाण्याचे मडके व कोलीत घेऊन त्या थडग्याभोवती प्रदक्षिणा घालतो. कर्त्याचा मामा त्या मडक्याला भोक पाडतो. प्रेत पुरल्यावर मयताचा पुत्र व इतर नातलग लोणी व इतर साहित्य घेऊन मंदिरात जातात. मंदिरातील ब्राह्मण पुजारी देवाची पूजा करून देवळाचे दरवाजे बंद करतो. नंतर मयताचा पुत्र थोडे लोणी दरवाज्यावर फेकतो. मग पुजारी मंदिराचा दरवाजा उघडतो. या प्रमाणे हा विधी तीन वेळा करतात. सातव्या दिवशी घरात तीर्थ शिंपडतात. एवढे झाल्यावर सुतक संपते. त्यानंतर ज्ञातिभोजन घालतात. हे लोक श्राद्धही करतात. [का. ट्रा. स. इं.]

## तोलांगुलासन

एक योगासन. हे आसन करताना प्रथम पद्मासनाच्या अवस्थेत बसतात. नंतर पाठीच्या आधारावर जमिनीवर उताणे पडून दोन्ही नितंबांखाली दोन्ही हातांच्या मुठी ठेवतात. मग पाठीचा भाग हातांच्या आधाराने जमिनीवरून उचलून मस्तक उंच ठेवतात व पायांची मांडीही वर उचलतात. हे आसन करताना मस्तक आणि पाय तराजूच्या पारड्यांप्रमाणे सम पातळीत ठेवणे आवश्यक असते. तसेच शरीर सैल न सोडता श्वासोच्छ्वास चालू ठेवणे आणि डोळे उघडे ठेवणे या गोष्टीही आवश्यक असतात.

या आसनाच्या अभ्यासाने नाभिस्थानी असलेले मणिपूरचक्र सतेज होते, भूक वाढते, वातरोग नष्ट होतो, कंठमणी मजबूत



तोलांगुलासन

होतो, आवाजात माधुर्य येते आणि हात व खांदे यांमध्ये नवी शक्ती निर्माण होते, असे सांगितले आहे. [उ. यो. द.]

## तोलूकोल्लन

एक जात. यांची वसती केरळात आहे. कातडे कमावणे व ते रंगवणे, हा यांचा प्रमुख व्यवसाय होय. पूर्वी हे लोहारकी करीत; पण नंतर तो धंदा सोडून ते चर्मकार बनले. बूट, म्याने, कातडी पिशव्या, लाकडी तळ असलेली कातडी पादत्राणे, या वस्तू ते उत्तम बनवतात.

या जातीत दोन किंवा अधिक भावांची मिळून एकच बायको असते. अत्यंत दारिद्र्य हे त्याचे कारण असावे. सुस्थितीतला माणूस तेवढा एकट्यासाठी एक बायको करतो. [का. ट्रा. स. इं.]

## तोषमणी

(इ. स. १७ वे शतक) एक हिंदी कवी. हा चतुर्भुज शुक्लाचा मुलगा होय. हा अलाहाबाद जिल्ह्यातील सिंगरौर येथील रहिवासी होता. सिंगरौर म्हणजेच रामायणकालीन शृंगवेरपुर होय. याने सुधानिधी नामक एक रीतिग्रंथ रचला आहे. त्यात नवरस, भाव, भावोदय, रसाभास, रसदोष, नायिकाभेद, इ. विषयांचे विवेचन आले आहे. याशिवाय विनयशतक व नखशिख हे दोन ग्रंथही याचे म्हणून सांगितले जातात. याच्या सर्व काव्यात प्रतिभा व विद्वत्ता यांचा संगम आढळतो. [हिं. सा. इ.; म. च. को.; क. कौ.]

## तोसली

एक प्राचीन नगर. ओडिसातील भुवनेश्वराजवळचे शिशुपालगड म्हणजेच प्राचीन तोसली नगर होय, असे काही विद्वानांचे मत आहे. अशोकाच्या शिलालिखित आज्ञापत्रांपैकी कलिंगातील पहिल्या आज्ञापत्रात या नगराचा उल्लेख आहे. कलिंगाचा प्रशासक म्हणून अशोक याच ठिकाणी

राहत होता. इथे झालेल्या उत्खननात कोटाच्या भिंतींचे प्रचंड अवशेष, दोन उद्ध्वस्त द्वारे, इमारतींचे चौथरे, टेहळणीचे बुरुज, प्राचीन भांड्याचे तुकडे, इ. अवशेष सापडले आहेत. त्यांवरून हे नगर सनपूर्व तिसऱ्या–चौथ्या शतकात भरभराटलेले होते, असे दिसते. शिशुपालगडाच्या पश्चिमोत्तर बाजूस गंधवती या नावाचा प्रवाह वाहत आहे. त्याला सध्या गंगुआ म्हणतात.

भारतातील दोन प्राचीन प्रदेशांचेही नाव तोसल असे होते. एक द. तोसल आणि दुसरा उ. तोसल. यांपैकी उ. तोसलामध्ये तोसली नगर मोडत होते. काही विद्वानांच्या मते सध्याचे पुरी जिल्ह्यातील धौली हे गावच प्राचीन तोसली नगर होय. पाहा— धौली. [ त्रि. लिं.; हि. जॉ. ए. इं. ]

**तोळकाप्पियम** तमिळ भाषेतील एक प्राचीन व्याकरणग्रंथ. अगस्त्याचा शिष्य तोळकाप्पियर हा त्याचा कर्ता होय. या ग्रंथाचे तीन भाग आहेत. पहिल्या भागात शब्द आणि ध्वनी यांची चर्चा, दुसऱ्या भागात शब्दोत्पत्ती, शब्दसंधी व वाक्यरचना यांचे विवेचन आणि तिसऱ्या भागात समकालीन सामाजिक रीतिरिवाज व आचारविचार यांची माहिती दिलेली आहे. त्यामुळे हा ग्रंथ केवळ व्याकरणशास्त्रापुरताच मर्यादित राहिलेला नसून, सांस्कृतिक दृष्टचाही त्याला महत्त्व प्राप्त झाले आहे. उपलब्ध तमिळ वाङ्मयातला तो आद्य ग्रंथ समजला जातो.

तोळकाप्पियममध्ये तमिळ आणि संस्कृत भाषा, तसेच आर्य आणि द्रविड संस्कृती यांचा मनोहर संगम झालेला आहे. या ग्रंथाच्या दुसऱ्या भागात संस्कृत शब्दांना तमिळ भाषेत आत्मसात करण्याची प्रक्रिया विशद केलेली आहे. अक्षरम् → अक्करम्, वर्त→वर्तई, रूपम्→उरूवम्, क्षणम्→कणम्, इ. अनेक उदाहरणे देऊन ही प्रक्रिया स्पष्ट केलेली आहे.

तोळक्काप्पियमच्या तिसऱ्या भागातील समाजस्थितीचे वर्णन पाहता असे स्पष्ट दिसून येते, की त्या काळात द्रविड संस्कृतीने आर्य संस्कृतीतील अनेक सत्त्वांशांचा स्वीकार करून दक्षिणेत संस्कृतिसंगमाचा एक आदर्श निर्माण केला होता. हे संस्कृतिसंगमाचे दृश्य भाषा, वाङ्मय, तत्त्वज्ञान, सामाजिक नीतिनियम, राज्यशासन, इ. सर्व जीवनक्षेत्रांत आढळते. जैन विचारांचाही या ग्रंथावर बराच प्रभाव आहे.

काव्यदृष्टचाही तोळकाप्पियम हा ग्रंथ सुंदर आहे. त्यातील सूर्यस्तुतिपर काही पंक्ती अशा—

विरितिरैप्पेरुङ्कडल् अमिलवत्तन्न
ओरुमुदर्कडवुळ्, निर्परवुदुम् 'तिरुवोडु'
शुरंम् तलीई, कुरंम् नीक्कि,
तुन्बम् तोडरा इन्बम् एयदि,
कूरूत्तलै पनिक्कुम् आरंल् शान रु,
कलिपेरुञ्ञ शिरप्पिन् वलिवलि पेरुहि,
नंन्ररि पुलवर् नाप्पण्
वेनरियोडु विळङ्गि मिकुकम् याम् एनवे.

अर्थ – ज्याप्रमाणे समुद्रमंथनामुळे अमृत वर येते, त्याप्रमाणे हे सूर्या, तू सागरातून वर येतोस. हे आदिदेवा, आम्ही तुझी उपासना करतो. आम्हांला विपुल संपत्ती आणि प्रेमळ आप्तजनांचा सुखद सहवास प्राप्त होऊ दे. आम्हांला दुष्कृत्यांपासून परावृत्त कर. आम्हाला विशुद्ध आनंद लाभो आणि आमच्या अंगी अशी शक्ती येवो, की जिच्यामुळे आम्ही मृत्यूवरसुद्धा जय मिळवू. सुज्ञांच्या मेळाव्यात मध्यभागी विजयी मुद्रेने बसण्याचे भाग्य आम्हांला लाभो.

तोळकाप्पियमच्या या अंतर्गत सौंदर्याचा उत्तरकालीन तमिळ भाषा, वाङ्मय व संस्कृती यांवर प्रभाव पडल्यावाचून राहिला नाही. पाहा—तोळकाप्पियर. [ शी. त. म्यू; भा. कौ.]

**तोळक्काप्पियर** आद्य तमिळ ग्रंथकार. हा जमदग्नीचा वंशज आणि अगस्त्याचा पट्टशिष्य होता. याचे मूळ संस्कृत नाव तृणधूमाग्नी असे होते. याने अगस्त्यापाशी तमिळ भाषेचा आणि व्याकरण शास्त्राचा अभ्यास केला आणि तोळकाप्पियम नावाचा एक ग्रंथ रचला. या ग्रंथाच्या निर्मितीविषयी तमिळनाडमध्ये एक दंतकथा प्रचलित आहे, ती अशी–

एकदा अगस्त्य दक्षिणेत भ्रमण करीत असताना चंदन पर्वताकडे गेला. जाताना त्याने तोळकाप्पियरला सांगितले, की 'तू लोपामुद्रेला बरोबर घेऊन मागून ये.' पण त्याच वेळी त्याने तोळकाप्पियरला अशी एक अट घातली, की त्याने लोपामुद्रेपासून चार काठ्या अंतर ठेवूनच चालावे. ही अट तोळकाप्पियरने बराच प्रवास संपेपर्यंत कटाक्षाने पाळली. परंतु मदुरेजवळची वैगाई नदी ओलांडताना मात्र त्याचा नाइलाज झाला. कोणाच्या तरी आधारावाचून त्या नदीतून पैलपार जाणे, ही गोष्ट लोपामुद्रेला अशक्य होती. म्हणून तोळकाप्पियरने आपल्या हातातील काठीचे एक टोक लोपामुद्रेला धरायला सांगून तिला पलिकडच्या तीरावर नेले. अगस्त्याला हे समजताच तो क्रुद्ध झाला आणि त्याने तोळकाप्पियरचा धिक्कार केला.

या घटनेने तोळकाप्पियर रागावला व गुरूला सोडून निघून गेला. त्याने पुढे अगस्त्याच्या व्याकरणाहूनही श्रेष्ठ दर्जाचे तमिळ व्याकरण रचले. या ग्रंथाची कीर्ती अगस्त्याच्या कानावर जाताच त्याला आपल्या एके काळच्या या शिष्याविषयी अ-

उत्पन्न झाली. त्याने अंदगोट्टासन नामक आपल्या एका शिष्याला सांगितले, की 'तूं तोळकाप्पियरचा ग्रंथ वाच आणि त्यावर कडक टीका लिही.' अंदगोट्टासनानें गुर्वाज्ञेवरून तो ग्रंथ वाचला आणि त्याला तो फार आवडला. त्यानें त्या ग्रंथावर कडक टीका करण्याऐवजी त्याची मुक्त प्रशंसाच केली.

तोळकाप्पियरच्या व्याकरणग्रंथामुळे अगस्त्याचा ग्रंथ मागे पडला आणि तमिळनाडमधील सर्व साहित्यशास्त्रज्ञांनी तोळकाप्पियरच्या ग्रंथालाच मुक्त मनाने मान्यता दिली.

तोळकाप्पियरने आपले सर्व जीवन ऋषि-मुनीप्रमाणे ज्ञानसाधनेत व्यतीत केले. [ त. उ. सा. ]

**त्यागराज** (१७६७ – १८४७ इ.स.) एक तेलुगू संत, कवी आणि संगीताचार्य. याचा जन्म तमिळनाडमधील तिरुवारूर या क्षेत्रात झाला. याचा पिता तेलुगू ब्राह्मण असून, त्याचे नाव रामब्रह्म असे होते. याच्या आईचे नाव शांतम्मा. ती गिरिराज नावाच्या एका पुरुषाची मुलगी होती. 'गिरिराजसुता' याच नावाने त्यागराज तिचा उल्लेख करतो.

त्यागराज होऊन गेल्याला फार काळ लोटलेला नाही. पण तरीही त्याचे अधिकृत असे चरित्र उपलब्ध होत नाही.



त्यागराजाचे जन्मस्थान – तिरुवारूर

आख्यायिका मात्र पुष्कळ आहेत. त्या आख्यायिका आणि अधिकृत माहितीचे कण गोळा करून त्यागराजाचे चरित्र मांडले गेले आहे, ते पुढीलप्रमाणे–

रामब्रह्मला त्यागराजाच्या अगोदर झालेला जप्येश नावाचा एक मुलगा होता. पण तो सामान्यच निपजला. रामब्रह्मच्या कुळात रामोपासना परंपरेने चालत आलेली होती. ती चालवणारा रामभक्त असा एक कुलदीपक पुत्र आपल्या पोटी जन्माला यावा, म्हणून रामब्रह्मने तिरुवारूरच्या त्यागराज नामक देवाची ( शिवाची ) उपासना सुरू केली. थोड्याच काळात त्यागराजाने रामब्रह्मचा मनोरथ पूर्ण केला. त्यागराजाच्या कृपेने जन्मलेला म्हणून रामब्रह्मने त्या मुलाचे नावही त्यागराज असेच ठेवले.

त्यागराज लहानपणापासूनच तल्लख बुद्धीचा होता. तेलुगू ही त्याची मातृभाषा होती. उपनयन होताच त्याने संस्कृत व तेलुगू या भाषांत प्रावीण्य मिळवले. त्याची संगीताची आवडही अभिजात होती. त्या शास्त्रात त्याने बरीच प्रगती करून घेतली. वयाच्या १८ व्या वर्षी पार्वती नावाच्या एका मुलीशी त्याचे लग्न झाले. पण ती त्याची पत्नी थोड्याच दिवसांत मरण पावली. पाठोपाठ त्याचे आईवडीलही निवर्तले. कुटुंबात एकामागून एक असे तीन मृत्यू घडलेले पाहून त्यागराजाच्या मनावर जबरदस्त आघात झाला. त्याचे मन संसाराविषयी विरक्त बनले आणि ते रामभक्तीकडे अधिकाधिक झुकू लागले. एका रामावाचून आपला कोणी त्राता नाही, आपंगिता नाही, तोच एक तेवढा सत्य आणि शाश्वत आहे, असे त्याच्या मनाने घेतले. तो म्हणतो–

> **नीवाडनेगान निखिललोक निदान !**
> **निमिष मोर्वगलना**
> **देवादिदेव ! भूदेव वरपक्ष ! राजीवाक्ष !**
> **साधुजनजीवन ! सनातन !**
> **सत्यम्बु नित्यम्बु सन्दरमुन शौर्यम्बु**
> **नत्यन्त रूपम्बु नमित बलमु**
> **नित्योत्सवम्बुगलनीकु निजदासुडनि**
> **तथ्यम्बु बल्कु श्रीत्यागराजार्चित**

भावार्थ – हे विश्वोद्धारका श्रीरामा ! हे साधुजनजीवना सनातना ! जेव्हापासून मी तुझा झालो, तेव्हापासून मला तुझा वियोग निमिषभरही सहन होऊ शकत नाही. तू सत्य आहेस, सनातन आहेस, तू समरातले शौर्य आहेस आणि नेत्रांना आल्हाद देणारे सौंदर्य आहेस. जे सत्य आणि तथ्य आहे तेच मी सांगतो. हे प्रभो, मी तुझा एकनिष्ठ सेवक आहे.

त्यागराजाचे हे वैराग्य त्याच्या नातेवाइकांना रुचले नाही. त्यागराजाला त्या वैराग्यातून बाहेर काढावे आणि त्याला संसारात रमवावे, अशा उद्देशाने त्यांनी बळेबळे त्यागराजाचे दुसरे लग्न लावून दिले. या मुलीचे नाव कमलांबा असे होते व ती त्याच्या पूर्वपत्नीची धाकटी बहीणच होती. तिच्या संगतीतही त्यागराज सांसरिक गोष्टींत रमू शकला नाही. रामाची पूजा-अर्चा, उपासना आणि प्रार्थना यांतच तो आपला सारा वेळ घालवी. कमलांबेने आपल्या पतीची ही भक्तिप्रवण वृत्ती

ओळखली. तिच्या संसारसुखाच्या आकांक्षेत विरजण पडले खरे; पण ती त्याच्या मार्गात कधीही आड आली नाही. उलट ती त्यागराजाच्या पारमार्थिक जीवनात त्याला सर्वभावे उपकारकच ठरली.

त्यागराजाला प्रतिभेचे देणे अभिजात होते. तो सहजपणे कविता रचीत असे. त्याच्या सर्व कविता तेलुगू भाषेत रचलेल्या आहेत. त्या कविता किंवा कृती निरनिराळ्या रागांत बसवून तो त्यांचे रामप्रभूपुढे गायन करी. ते काव्य आणि ते गायन लोकांना फार आवडे. होता होता त्याच्या कवित्वाची आणि संगीतविद्येची कीर्ती सर्वत्र पसरली. तंजाऊरच्या राजाने त्याला आपल्या दरबारात येण्याविषयी बोलावणेही पाठवले. त्याचा थोरला भाऊ जप्येश याला त्या गोष्टीचा फार आनंद झाला. त्यागराजाला राजदरबारी धन आणि मान मिळाल्यास



त्यागराज – एक प्रसिद्ध काल्पनिक चित्र

त्यापासून आपल्यालाही फायदा होईल, अशी त्याच्या मनाची हाव होती. पण त्यागराजाने ती गोष्ट साफ नाकारली. त्याने भावाला स्पष्टच सांगितले, की 'माझ्या वाणीला मी नरस्तुतीचा विटाळ लागू देणार नाही. मी कृती रचीन, त्या माझ्या रामासाठीच आणि त्यांचे गायन करीन, तेही त्याच्यासाठीच.'

जप्येशाला त्यागराजाच्या या उत्तराचा संताप आला आणि त्याने त्यागराजाच्या पूजेतली राममूर्ती उचलून ती कावेरीच्या प्रवाहात फेकून दिली. त्या गोष्टीने त्यागराजाचे मन व्याकुळ झाले. कावेरीला पूर आलेला असताही तो प्रवाहात उतरून त्या मूर्तीचा शोध करू लागला. तसे करीत असतांना त्याच्या मुखातून अनेक करुणोदात्त गीते बाहेर पडली. कावेरीचा पूर ओसरल्यावर ती राममूर्ती त्यागराजाच्या हाताला लागली आणि जणू त्याचा गेलेला जीव-प्राण त्याला परत मिळाला.

जप्येश तेवढ्यावरच थांबला नाही. त्याने त्यागराजाला घरातूनही बाहेर घालवले. रामाची मूर्ती आणि तंबोरी या दोन वस्तू घेऊन तो आपल्या पत्नीसह बाहेर पडला. एका चंद्रमौळी झोपडीत त्याने आपला भक्तीचा संसार उभा केला.

त्यागराज प्रातःकाळी उठे आणि कावेरीवर स्नानाला जाई. कावेरीचे स्नान व कावेरीचे दर्शन त्याला अत्यंत प्रिय होते. चोळ देशाला धन-धान्यसमृद्ध करणाऱ्या आणि बुद्धि-वैभवाचेही दान करणाऱ्या कावेरीचे गुणगान त्याने एका पद्यात केले आहे, ते असे–

सारीवेन्दलिन कावेरिनी जूदरे
वारु वीरनुचु जूदक तानव्वारिगाभीष्टमुल नोसंगुचु
दुरमुन नोक तावुन गरजन भीकर मोक
तावुन निंदु करुनतो
निरतमुग नोक तावुन नदुचुचु
वर कावेरी कन्यकामणि
वेडुकगा कोकिललु त्रोयगनु
वेदुचु रंगेसुनि जूचि मारि इरेडु
जगमुलकु जीवनमैन
मूडु रेंडु नडि नाथुनि जूड
राजराजेश्वरी यनि पोगडुचु
जूचि सुममुल धरायरगनमुलु
पूजालिरुगडल सेयग त्यागराज सन्नुतुरलै मुड्डप

भावार्थ – ही कावेरी नदी आपली जलसंपदा घेऊन समुद्राला भेटायला चालली आहे. जाता जाता ती कोणत्याही तऱ्हेचा भेदभाव न धरता उभय तीरांवरील जनतेच्या इच्छा पुऱ्या करते. घटकेत हिचा वेग खूप वाढतो, घटकेत हिचा खळखळाट प्रचंड होतो, तर घटकेत ही शांत आणि सौम्य बनते. हिच्या एका तीरावर कोकिळ कूजन करीत आहेत; तर दुसऱ्या तीरावर देवदर्शन करणारे भक्त देवाला पुष्पांजली वाहत आहेत. काही लोक कावेरीचीही पूजा करीत आहेत आणि काही लोक राजराजेश्वरी म्हणून हिची स्तवने गात आहेत. अशी ही कावेरी वाहत आहे; तिच्याकडे पाहा.

कावेरीचे स्नान आटोपून परत आल्यावर त्यागराज आपली सारी सकाळ रामाच्या पूजे-अर्चेत घालवी. मध्यान्ही तो रामाची भजने गात गावात हिंडून मधुकरी मागे. भोजन झाल्यावर

उरलासुरला वेळ तो श्रीरामाच्या भजनरंगात रंगून जाई.

एके दिवशी त्यागराजाकडे कृष्णानंद नावाचा एक योगी आला. त्याने त्यागराजाला राममंत्राचा दहा कोटी जप करण्यास सांगितले. त्यागराजानें त्याप्रमाणे दहा कोटी जप करताच त्याला वाचासिद्धी प्राप्त झाली. पण सर्व ऐहिक वैभव आणि यौगिक सिद्धी यांच्याविषयी निरिच्छ असल्यामुळे त्यागराजाने जपव्रताच्या उद्यापनाच्या दिवशी ती वाचासिद्धीही श्रीरामचरणी समर्पित केली.

आणि त्यानंतर एके दिवशी त्यागराजाला साक्षात रामदर्शन घडले. आपल्या चंद्रमौळी झोपडीत प्रत्यक्ष रामप्रभू येईल आणि आपल्याला दर्शन देईल, अशी त्याला सुतराम कल्पना नव्हती. पण जे अकल्पित ते घडले होते. कोदंडधारी, घनसावळा रामप्रभू त्याच्या दृष्टीपुढे उभा ठाकला होता. त्याला पाहून त्यागराजाचे भानच हरपले. काही क्षण असे दर्शन देऊन श्रीराम एकाएकी अदृश्य झाला आणि त्यानंतर त्यागराज भानावर आला. देव आपल्या झोपडीत आला; पण आपण त्याचे शाब्दिक स्वागतही केले नाही, या गोष्टीचे त्याला अत्यंत दुःख झाले. त्या आत्यंतिक दुःखाने त्याच्या कंठातून जो उद्रेक बाहेर पडला, त्यातून करुणरम्य अशा काही काव्यकृतींचा जन्म झाला. त्यांतील एक पद असे–

**ननु पालिम्प नडचि वच्चितिवो ? ना प्राणनाथ**
**वनजनयन मोमुनु जूचुट जीवनभनि**
**नेनरुनमनसु सर्ममुदेलिसि**
**सुरपती नीलमणि निभ तनुवुतो**
**नुरमुन मुत्यपु सरुल चयमुतो**
**करमुल शर कोदण्ड कान्तितो**
**धरणि तनयतो; त्यागराजार्चित**

भावार्थ – हे माझ्या जीवितेश्वरा ! तू मला आशीर्वाद देण्यासाठी अयोध्येपासून इथवर चालत आलास ना ! माझ्या हृदयात अशी एक सुप्त आकांक्षा सदैव वसत होती, की कमलनयन अशा तुझे दर्शन घडावे आणि माझे जीवन कृतार्थ व्हावे. ती आकांक्षा तू जाणलीस का देवा ? प्रभो, तू अत्यंत कनवाळू आहेस. मेघश्याम असा तुझा तेजस्वी वर्ण आहे, तुझ्या गळयात मोत्यांचा हार आहे, हातात धनुष्यबाण आणि पार्श्वभागी सीता आहे, अशा मनोज्ञ स्वरूपात आज तू मला दर्शन दिलेस.

त्यागराजाच्या गायनाची मोहिनी साक्षात नारदमुनीलाही पडली, असे म्हणतात. याविषयी एक आख्यायिका सांगतात, ती अशी– नारद एका वृद्धाचे रूप घेऊन त्यागराजाच्या दारी आला. 'तुझ्या संगीताचा मी भुकेला आहे आणि म्हणूनच मी इथवर येण्याचे कष्ट घेतले,' असे म्हणून त्यागराजाला नारदाने गायला लावले. त्यागराज गायला व नारद प्रसन्न झाला. त्याच्या काखेत स्वरार्णव नावाचा एक संगीतशास्त्राचा ग्रंथ होता, तो त्याने त्यागराजाला दिला. एवढे करून तो अंतर्धान पावला. त्यागराजाने त्या ग्रंथाचे अध्ययन केले. त्यातील दिव्यज्ञानामुळे त्याचे मूळचे स्वरज्ञान अधिकच प्रकाशले. कर्नाटक संगीत नावाच्या एका वेगळयाच संगीतशाखेचा प्रणेता म्हणून जाणकार लोक मग त्याचा गौरव करू लागले.

पुढे त्याच्याकडे गायन शिकण्यासाठी अनेक शिष्य येऊ लागले. त्यागराज प्रत्येकाच्या कुवतीप्रमाणे त्यांना उदार मनाने संगीत शिकवू लागला. त्याच्या सर्व शिष्यांत सुंदर भागवतार, कृष्ण भागवतार व राम अय्यंगार हे तिघे प्रमुख शिष्य ठरले. त्यांनी त्यागराजाची संगीतविद्या सेवा आणि श्रम या गुणांच्या बळावर आत्मसात करून घेतली. उमैयालपुरम, थिल्लै स्थानम व वलजपेट या तीन ठिकाणी आजही त्यागराजाच्या शिष्यशाखा स्वतंत्रपणे चालत आहेत.

त्यागराजाने आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात आंध्र व तमिळनाड या प्रदेशांतील महत्त्वाच्या क्षेत्रांच्या यात्रा केल्या. त्यागराज तिरुपती येथे वेंकटस्वामीच्या दर्शनासाठी गेला असता, का कोण जाणे, पण तिथल्या पुजाऱ्याने देवापुढे पडदा सोडला. त्यामुळे त्यागराजाला देवाचे दर्शन अंतरले. त्याला त्या गोष्टीचे परमदुःख झाले. पण त्यातून एक आध्यात्मिक अर्थ घेऊन त्यागराजाने तत्काळ एक पद रचून म्हटले, ते असे–

**तेर तीयग रादा ? लोनि, तिरुपति वेंकटरमण ! मत्सरमनु**
**परम पुरुष ! धर्मादि मोक्षमुल पार दोलुच्चुन्नादि, नालोनि**

भावार्थ – हे वेंकटरमणा ! मी आणि खरा धर्म व मोक्ष यांच्यामध्ये राग-द्वेषांचा पडदा उभा झाला आहे. हे परमपुरुषा, तुला हा पडदा दूर करता येणार नाही का ?

त्याच्या या तीर्थक्षेत्रांच्या यात्रेत त्याला आपल्या संगीतनैपुण्याची कीर्ती सर्वत्र कशी पसरली आहे, याचा साक्षात्कार झाला. या साक्षात्काराने त्यागराजाचे मन सुखावले, तृप्त झाले. ही सर्व रामाची कृपा आहे, असे मानून कृतज्ञता व्यक्त करणारी एक कृती त्याने निर्माण केली–

**दाशरथी ! नीरुणमु दीर्प ना दरमा ? परमपावन नाम !**
**आशदीर दूर देशमुलनु प्रकाशिम्प जेसिन रसिक शिरोमणि**

भावार्थ – हे रामप्रभो ! तू माझा खरा रक्षक आहेस. तू रसिकशिरोमणी आहेस. माझ्या संगीताचे खरे मूल्य आणि मर्म तू ओळखलेस आणि देशोदेशी त्याचा सुगंध पसरवलास. तू जे मला हे देणे दिलेस, ते मला कधीतरी फेडता येईल का ?

त्यागराज आपल्या यात्रा संपवून तिरुवैयारू या गावी

मुक्कामाला आला. आता त्याचे शरीर हळू हळू थकू लागले. वार्धक्याने त्याला सर्वांगी ग्रासले. तो आयुष्याच्या नव्वदीपर्यंत येऊन ठेपला. अशा स्थितीत त्याची पत्नी कमलांबा ही एके दिवशी इहलोक सोडून गेली. वृद्ध आणि जर्जर अशा त्यागराजाला तो आघात असह्य झाला. कमलांबेच्या निर्याणाबरोबरच त्याची काव्यशक्तीही अस्ताला गेली. थोडयाच कालात इहलोकीची यात्रा संपवून तोही रामचंद्राच्या चरणी विलीन झाला.

**त्यागराजाचे वाङ्मय**—त्यागराजाची संगीतरचना विपुल असून, ती विविध गुणांनी नटलेली आहे. भाविकांच्या मते त्यागराजाने वाल्मीकिरामायणावर २४ हजार व श्रीरामाच्या लीलागुणांवर २४ हजार अशा एकूण ४८ हजार कृती रचल्या आहेत. पण आजमितीस त्याच्या फक्त ८०० कृतीच उपलब्ध आहेत. आणि तेवढ्यांचाच अभ्यास केला, तरी त्यागराजाच्या गानविद्येचा परमोत्कर्ष त्यांत आढळतो. कमीत कमी शब्दांत त्याने आपल्या कृतीत काव्यकल्पनांचा फुलोरा निर्माण केला आहे. त्याच्या प्रत्येक कृतीत रचनेची विविधता व रागतत्त्वाचे सूक्ष्म ज्ञान दिसून येते. त्याच्या सर्वच कृतींना लयबद्धता आहे. पल्लवी, अनुपल्लवी आणि चरणम अशा तीन प्रकारांत त्याने आपल्या कृतींची गुंफण केली आहे.

श्रीरामाच्या षोडशोपचार पूजेवर त्याने एक गीतमाला रचली आहे. त्याच्या काळी तंजाऊर व त्याच्या आसपासचा प्रदेश या ठिकाणच्या भजनमठांमध्ये राधाकल्याणम व सीताकल्याणम असे दोन उत्सव मोठ्या प्रमाणात साजरे होत. त्या उत्सवांसाठी उत्सवसंप्रदायकीर्तन व दिव्यनामसंकीर्तन अशा दोन गीतमाला त्यागराजाने रचल्या. त्याच्या काळी तिकडील काही मंदिरांत भक्तमंडळी संगीतप्रधान नाटके करीत. जयदेवाचे गीतगोविंद व नारायणतीर्थांची कृष्णलीलातरंगिणी या काव्यांवर ही नाटके आधारलेली असत. त्यागराजाच्या समकाली व्यंकटराम भागवतार नावाचा एक मोठा संगीतरचनाकार होऊन गेला. त्याने प्रल्हादचरित्र नावाची एक संगीतिका रचून आपल्या संप्रदायात लोकप्रिय केली होती. त्यागराजाने त्याच्यापासून स्फूर्ती घेऊन प्रल्हादभक्तिविजय व नौकाचरित्र अशा दोन भक्तिपूर्ण संगीतिका निर्माण केल्या. वर्णनात्मक गीते, पद्यमय संवाद, परिचयात्मक श्लोक आणि काही गद्यभाग अशी या दोन्ही संगीतिकांची रचना आहे. त्याच्या या संगीतिका रंगभूमीवर आल्या नाहीत; पण भक्तमंडळीत भजनरूपाने आजमितीसही त्या गायिल्या जातात. दक्षिणेत त्यागराजाच्या कृतींचा प्रचार गायक, भजनी मंडळे व हरिदास यांच्यामार्फत झाला.

एक सर्वश्रेष्ठ भक्त आणि संगीतज्ञ कवी म्हणून त्यागराजाचा दक्षिणेत आजही गौरव होत आहे. उत्तरेत जे स्थान कबिराचे, कर्नाटकात जे स्थान पुरंदरदासाचे, तेच स्थान आंध्र व तमिळनाडमध्ये त्यागराजाचे आहे. तत्कालीन कविमंडळात गुरुकवी म्हणून तो चमकला. त्याच्यावर पुरंदरदासाच्या वाणीचा बराच प्रभाव आहे. पुरंदरदास हा त्यागराजाच्या गुरुस्थानीच आहे, असे म्हटले तरी चालेल. तुलसीदासाच्या कवित्वानेही तो प्रभावित झाला होता. ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव, भद्राचल रामदास, नारायणतीर्थ यांच्या विचारांशीही तो परिचित होता.

त्यागराजाच्या कृती या त्याच्या जीवनानुभूतीची साक्ष देणाऱ्या आहेत. त्या केवळ संगीत रचनाच नाहीत; तर त्यांत आध्यात्मिक विचारही जागोजाग व्यक्त झालेले आहेत. त्याच्या सहजसुंदर भाषेला विलक्षण गोडवा आहे. कर्मकांड आणि निष्फळ रूढी यांचा त्याग करून मनुष्याने रामभक्तीच्या द्वारे आपले आध्यात्मिक कल्याण साधावे, असा त्याच्या विचारांचा रोख आहे. तो परमार्थमार्गात जातीपातींचा भेद मानणारा नाही. तुकोबांनी ज्याप्रमाणे 'या रे या रे लहान थोर' असे म्हणून सर्वांना हरिभक्तीच्या मंदिरात येण्याचे आवाहन



त्यागराजाची समाधी— तिरुवैयारू

केले, त्याचप्रमाणे त्यागराजही म्हणतो की, 'या या, झाडून सारे या आणि माझ्या कृतींचे गायन करून रामप्रभूचा आशीर्वाद मिळवा.'

तिरुवैयारू या गावी त्यागराजाची समाधी बांधलेली आहे. तिथे प्रतिवर्षी त्याच्या पुण्यस्मृतीसाठी संगीतमहोत्सव होतो व दक्षिण भारताच्या कानाकोपऱ्यातून तिथे आलेले गायकवादक त्यागराजाला आपली संगीतसेवा सादर करतात. पाहा— कर्नाटक संगीत. [ दि स्पिरिच्युअल हेरिटेज ऑफ त्यागराज —श्री. सी

रामानुजाचारी व डॉ. व्ही. राघवन; आंध्रभारती; श्री. टी. माधवराव – युगप्रभात, १६ जानेवारी १९६३]

**त्रयी विद्या** ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तिघांना मिळून त्रयी विद्या अशी संज्ञा आहे. या तीन्ही वेदांत पारंगत असलेल्यांना त्रैविद्यवृद्ध म्हणतात.

**त्रयोदशपदार्थवर्जनसप्तमी** एक व्रत. उत्तरायण संपल्यानंतर ज्या सप्तमीला रविवार आणि पुल्लिंगी नक्षत्र (उदा. हस्त, पुष्य, मृगशीर्ष, इ.) असेल, त्या दिवशी या व्रताचा आरंभ करतात. हे सूर्याचे व्रत असून, याचा अवधी एक वर्षाचा आहे. या व्रतात सातू, यव, गहू, तीळ, उडीद, मूग, इ. तेरा पदार्थ वर्ज्य करतात. फल– आरोग्य व संतती यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**त्रयोदशी** शुक्ल-कृष्ण पक्षातली तेरावी तिथी. धर्मशास्त्रात त्रयोदशीची अनेक व्रते सांगितली आहेत हेमाद्रीने तिचे ध्यान सांगितले आहे, ते असे– त्रयोदशी ही धनुष्यबाण धारण करणारी, मगरीवर बसलेली व गोरी आहे.

**त्रयोदशीव्रत** हे व्रत कोणत्याही महिन्याच्या त्रयोदशीला करतात. त्यासाठी सोने, चांदी, तांबे किंवा चिकणमाती यांचे एक पात्र घेऊन त्यात गायीच्या लोण्याचा कवठाएवढा गोळा ठेवतात. नंतर त्या गोळ्यावर फुलांनी एक कमळ तयार करतात आणि त्या कमळावर विष्णू व लक्ष्मी यांची स्थापना करतात. मग त्या गोळ्याचे दोन भाग करून त्यांना उद्देशून विष्णू व लक्ष्मी यांचे मंत्र उच्चारतात. एवढे झाल्यावर व्रत करणारा प्रथम विष्णूचा भाग आणि नंतर लक्ष्मीचा भाग आपल्या पत्नीला खायला देतो. देवी पुराणात या व्रतांची देवता रति-मदन म्हणून सांगितली आहे. फल– अनेक पुत्रांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**त्रसदस्यू** एक सूक्तद्रष्टा. पुरुकुत्स हा याचा पिता व पुरुकुत्सानी ही माता होय. त्रसदस्यू हा एक आर्यवीर होता. याला दौर्गह म्हटले आहे. त्यावरून हा दुर्गह वंशात जन्मला असावा, असे वाटते. याला गौरीक्षित असेही म्हटले आहे. त्याचा अर्थ पर्वतीय दुर्गात राहणारा असा होतो. कदाचित बियास व सतलज या दोन नद्यांच्या मध्ये असलेल्या पर्वतश्रेणीत त्रसदस्यूचा हा गिरिदुर्ग असावा. याला पुरूंचा राजा असेही म्हटले आहे (ऋ. ४.३८. १). दाता म्हणूनही याची कीर्ती होती. याने सोभरी काण्वाला दोनशे दहा गायी व पन्नास वधू दान दिल्या, असा उल्लेख आहे. (ऋ. ८.१९. ३६-३७). या पन्नास वधू म्हणजे कदाचित पहाडी मुलखातल्या दासी असाव्या. अर्धदेव व कुरुश्रवण अशी याच्या पुत्रांची नावे आढळतात.

प्राचीन कालातला प्रसिद्ध यज्ञकर्ता म्हणूनही याचा उल्लेख आला आहे (तै. सं. ५. ६. ५. ३). [ ऋ. आ.; प्रा. च को.; ऋ. द.; म. ज्ञा. को. ]

**त्राटक** योगविद्येतील एक क्रिया. हे ध्यानाचेच एक अंग आहे. याचे आंतर त्राटक आणि बाह्य त्राटक असे दोन प्रकार आहेत. दोहोंचा उद्देश मनाला एकाग्र बनविणे, हाच आहे. डोळे बंद करून कोणत्याही एका वस्तूवर भावना स्थिर करणे आणि त्या वस्तूला आंतरिक दृष्टीने पाहत राहणे, याला आंतर त्राटक म्हणतात. मोहिनी विद्येचा अभ्यास करणारे साधक आंतर त्राटकात एका प्रकाशबिंदूवर मन केंद्रित करतात. योगी मात्र इष्ट देवतेवर मन केंद्रित करण्यासाठीच आंतर त्राटकाचा उपयोग करतात.

कोणत्याही एखाद्या बाह्य साधनावर दृष्टी स्थिर ठेवून मनाला एकाग्र बनविण्याच्या क्रियेला बाह्य त्राटक म्हणतात. बाह्य त्राटकाचे योगशास्त्रीय लक्षण असे–

निरीक्षेन्निश्चलदृशा सूक्ष्मलक्ष्यं समाहितः ।
अश्रुसम्पातपर्यन्तमाचार्यैस्त्राटकं स्मृतम् ।।

अर्थ – डोळ्यांतून पाणी येईपर्यंत एखाद्या सूक्ष्म लक्ष्यावर दृष्टी केंद्रित करण्याला आचार्य (बाह्य) त्राटक असे म्हणतात.

मनाची शक्ती प्राधान्याने नेत्रद्वारा बाहेर येते. दृष्टी कोणत्याही एखाद्या वस्तूवर स्थिर केल्यामुळे मनाची शक्तीही एकत्र संचित होते आणि दृष्टीचे प्रवाहचुंबकत्व वाढते. अशा दृष्टीला वेधक दृष्टी म्हणतात. त्राटकाचे शरीरावर होणारे परिणाम असे –

मोचनं नेत्ररोगाणां तन्द्रादीनां कपाटकम् ।
यत्नतस्त्राटकं गोप्यं यथा हाटकपेटकम् ।।

अर्थ – त्राटकाने सर्व नेत्ररोग नाहीसे होऊन तंद्रा, आलस्यादी नष्ट होतात. ही क्रिया प्रयत्नपूर्वक सुवर्णाच्या पेटीसारखी गुप्त ठेवावी.

वेधक दृष्टीमुळे दुसऱ्याच्या मनाची अंतःस्थिती जाणता येते, अज्ञात आणि अप्रकट वस्तूंचा शोध लावता येतो आणि इतरांना प्रभावित करून आपल्या इच्छेनुसार वागायला लावता येते, असे अनेकांचे अनुभव आहेत. काही लोक वेधक दृष्टीचा दुरुपयोग करून इतरांना नाडण्याचाही प्रयत्न करतात.

बाह्य त्राटकाची क्रिया अशी— एक हात लांब व एक हात रुंद कागद किंवा पुठ्ठा घेऊन त्याच्या मधोमध रुपयाएवढ्या आकाराचे काळे वर्तुळ काढतात. त्या वर्तुळाच्या अगदी मध्यभागी मोहरीएवढी कोरी जागा सोडून तिच्यात पिवळा रंग भरतात. मग हा कागद भिंतीवर टांगून त्याच्या समोर चार हात अंतरावर बसतात आणि त्या मोहरीएवढ्या पिवळ्या बिंदूवर दृष्टी स्थिर करितात.

या क्रियेला सकाळची वेळ योग्य समजली जाते. त्राटक करून उठल्यावर गुलाबपाण्याने किंवा ताज्या गाळलेल्या पाण्याने डोळे धुतात. [ यो. सो. पू.; गा. म. वि. ]

**त्रिंगलवाडी लेणे** महाराष्ट्रातील एक जैन लेणे. हे लेणे नाशिक जिल्ह्यात इगतपुरीच्या वायव्येला सहा मैल अंतरावर असलेल्या त्रिंगलवाडी या गावी आहे. गावापासून मैलभर दूर असलेल्या एका डोंगराच्या पायथ्यातच हे लेणे खोदलेले आहे. यात मध्यमागी ३५ फूट लांबी-रुंदीचा प्रशस्त मंडप आहे. त्यातल्या चार स्तंभांपैकी सांप्रत एकच चांगल्या स्थितीत राहिलेला आहे. या स्तंभावरचे कोरीव काम उत्तम आहे. मंडपाच्या मागील भिंतीत मध्यभागी सुमारे १५ × १५ फुटाचा गाभारा खोदलेला असून, त्यापुढे अरुंद असा प्रवेशमंडप आहे. मुख्य मंडपापुढे ३५ × १५ फुटांचे प्रांगण आहे. या भागावर छत नाही. प्रांगणातून मुख्य मंडपात प्रकाश येण्यासाठी प्रवेशद्वाराच्या डाव्या-उजव्या बाजूंना दोन खिडक्या खोदलेल्या आहेत. या खिडक्यांच्या उभ्या-आडव्या पट्ट्यांवर उत्तम नक्षी कोरलेली असून, त्यांच्या सांध्यांवरील कोरीव कमळे अतिशय नाजूक आहेत.

गाभाऱ्यातील तेरा फूट उंचीची जिनमूर्ती सध्या अगदी भग्न स्थितीत आहे. एके काळी उत्तम लेणे म्हणून ज्याची गणना व्हायची, ते हे लेणे हवेच्या दीर्घकालीन परिणामांनी सध्या अगदी दुर्दशा पावले आहे. [ मे. टें. द. ]

**त्रिककुद** एक प्राचीन पर्वत. याला तीन ककुद (वशिंडे किंवा शिखरे) असल्यामुळे हे नाव पडले आहे. इथे एक विशिष्ट प्रकारचे अंजन तयार होत असे; त्याला त्रैककुद अंजन असे म्हणत. वैदिक वाङ्मयात या पर्वताचा आणि तेथील अंजनाचा उल्लेख अनेकवार आलेला आहे.

कीथच्या मते उ. पंजाब व काश्मीर यांच्या मध्यमागी असलेले हिमालयाचे तिकोट नावाचे शिखर म्हणजेच प्राचीन त्रिककुत होय. डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांनी असे दाखवून दिले आहे, की त्रिककुत हा सुलेमान पर्वताचा एक भाग होता. सुलेमानला समांतर आणि झोब (यव्हवती) नदीच्या पूर्वेस एक पर्वतशृंखला आहे. तिच्या मागे टोबा आणि काकड या दोन पर्वतशृंखला आहेत. या तिहेरी पर्वतमय भागाला त्रिककुत हे नाव यथार्थपणे शोभते. हा भाग आजही अंजनासाठी (सुरम्यासाठी) प्रसिद्ध आहे. सुलेमानचा सुरमा सिंध-पंजाबात दूरपर्यंत जात असतो. बाहीक (पंजाब) देशातील गोऱ्या स्त्रिया आपल्या तेजस्वी डोळ्यांत हे अंजन घालीत असत, असे महाभारतात म्हटले आहे. याची आवक उ. सिंध ( सौवीर ) भागातून होत असल्यामुळे सिंधमधील लोक त्याला सौवीरांजन असे म्हणत.

या पर्वतात जातवेदस शिला या नावाचा एक खोल भाग होता. त्यातून सतत ज्वाला उसळत असत, असे म्हटले आहे. इथल्या जातवेदस तीर्थात सात द्रष्टयांनी स्नान केले, इथे सोनेरी यूप होते व इथल्या शिवालयात असलेला नंदी दुर्जनांना दिसत नाही, अशी वर्णने ब्रह्मांड, मत्स्य व वायू या पुराणांत आहेत. [ पा. का. भा.; पु. इं.; वे. इं.; हि. ध. ]

**त्रिक दर्शन** काश्मीरीय शैव दर्शनाच्या अनेक नावांपैकी हे एक नाव आहे. पाहा— काश्मीरीय शैवदर्शन.

**त्रिकप्रसवशांती** तीन मुलांच्या नंतर मुलीचा अथवा तीन मुलींच्या नंतर मुलाचा जन्म झाला, तर ते अशुभ मानतात आणि त्याच्या परिहारासाठी ही शांती करतात. शांतिसर्वस्वामध्ये यासंबंधी एक श्लोक आहे, तो असा—

सुतत्रये सुता चेत् स्यात् तत्त्रये वा सुतो यदि ।
मातापित्रोः कुलस्याऽपि तदानिष्टं महद् भवेत् ॥

अर्थ — तीन पुत्रांनंतर कन्या जन्मास आली अथवा तीन कन्यांनंतर पुत्र जन्मास आला, तर ते मातापित्यांना आणि कुलालाही अत्यंत अनिष्टकारक होते.

या शांतीचा विधी असा— प्रथम संकल्प करून आचार्यवरण करतात. मग नवग्रहांची व त्यांच्या उत्तरेला पाच कलश मांडून त्यावर ब्रह्मा, विष्णू, महेश, इंद्र व रुद्र यांची स्थापना करतात. नंतर ग्रह व देवता यांची पूजा झाल्यावर आनोभद्रीयसूक्त, रुद्राध्याय, इ. शांतिसूक्तांचा पाठ करतात. त्यानंतर अग्नीची स्थापना करून प्रधान होमापर्यंतचे कर्म झाल्यावर प्रधान देवतांसाठी व नवग्रहांसाठी समिधा, आज्य, तीळ व भात या हविर्द्रव्यांनी एक हजार आठ किंवा एकशे आठ हवन करतात. मग बलिदान, पूर्णाहुती व यजमानाला त्याच्या कुटुंबियांसह अभिषेक करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**त्रिकाय** (त्रि = तीन + काय = देह) एक बौद्ध संज्ञा. बौद्ध धर्मात बुद्ध आणि बोधिसत्त्व यांचे निर्माणकाय, संभोगकाय व धर्मकाय असे तीन काय म्हणजे देह मानतात.

निर्माणकाय म्हणजे स्थूल देह. बुद्धाने हा देह केवळ परोपकारासाठीच धारण केला होता. सचेतन प्राण्यांचे सर्व धर्म याच देहाशी संबद्ध आहेत. या देहाला अंत नाही. परार्थाची सिद्धी ज्या ज्या शरीरांच्या द्वारे होते, त्या त्या-सर्व शरीरांना बुद्धाने निर्माणकायाच्या द्वारेच धारण केले आहे.

संभोगकाय म्हणजे सूक्ष्म देह. हा देह केवळ बोधिसत्त्वच धारण करू शकतात. लंकावतारसूत्रात याला निष्यंदबुद्ध किंवा धर्मतानिष्यंदबुद्ध अशी संज्ञा दिलेली आहे. बोधिसत्त्व या सूक्ष्म देहाच्या द्वाराच धर्मोपदेश करतात. पृथ्वीतलावरील गृध्रकूट या पवित्र स्थानी संभोगकाय उत्पन्न होतो, अशी बौद्धांची समजूत आहे.

धर्मकाय हा बुद्धाचा वास्तविक परमार्थ भूतदेह आहे. निर्माणकाय आणि संभोगकाय या दोहींचाही हा आधार आहे. महायानसूत्रालंकारात याला स्वभावकाय म्हटले आहे. हा अनंत आणि अपरिमेय असून सर्वव्यापक आहे. असंगाने याचे वर्णन केले आहे, ते असे—

समः सूक्ष्मश्च तच्छिष्टः कायः स्वाभाविको मतः ।
सम्भोगविभुताहेतुर्यथेष्टं भोगदर्शने ।।

अर्थ – स्वभावकाय अथवा धर्मकाय हा सर्व बुद्धांचा एकच असतो. हा अत्यंत सूक्ष्म असतो. निर्माणकाय आणि संभोगकाय यांच्याशी हा संबद्ध असतो. संभोग आणि विभुता यांचे कारण हाच असतो आणि याच्यामुळेच संभोगकाय आपले कार्य सिद्ध करू शकतो.

बुद्धांचे संभोगकाय भिन्न भिन्न असतात; परंतु त्यांचा धर्मकाय मात्र एकच असतो.

बौद्ध धर्मात या त्रिकाय कल्पनेचा विकास अनेक शतके होत होता. प्रारंभी महायान पंथियांनी रूपकाय आणि धर्मकाय असे दोनच काय मानले होते. पुढे विज्ञानवादी बौद्धांनी रूपकायाचे स्थूल आणि सूक्ष्म असे भेद मानले व त्यांना निर्माणकाय आणि संभोगकाय अशा संज्ञा दिल्या. या दोन देहांना स्वतंत्र प्रतिष्ठा प्राप्त करून देऊन विज्ञानवाद्यांनी त्रिकायकल्पना पूर्णतेला नेली. [ बौ. द. मी.; गॉ. नॉ. बु. ]

**त्रिकूट** एक प्राचीन पर्वत. याला तीन शिखरे असल्यामुळे त्रिकूट हे नाव मिळाले. याच्या एका शिखरावर लंका नगरी वसलेली होती, असे वर्णन रामायणात आहे. अगस्त्याच्या शापाने इंद्रद्युम्न राजा हत्ती बनून याच पर्वतावर राहिला होता. हे एक शक्तिपीठ असून, इथे शक्ती रुद्रसुंदरीच्या रूपाने वास्तव्य करते, असा उल्लेख देवी भागवतात आहे. हा पर्वत नाना तरुवेलींनी, फुलाफळांनी आणि यक्ष-गंधर्व-किन्नरांच्या निवासस्थलांनी सुशोभित झालेला आहे, असे वर्णन वामन पुराणात आढळते. [ वा. रा. को.; हिं. क. को.; श. क.; हिं. सा. को. २ ]

**त्रिकोण** तीन कोन असलेली आकृती. एक तांत्रिक प्रतीक. नाद-बिंदू, त्रिकोण, त्रिशूल, योनी व कामकला ही सर्व एकाच शक्तितत्त्वाची निरनिराळी नावे आहेत. त्रिकोणाच्या तीन रेखांना वामा, ज्येष्ठा व रौद्री अशी नावे असून, त्यांच्या व्याख्या पुढील श्लोकात सांगितल्या आहेत –

वामा विश्वस्य वमनात् ज्येष्ठा शिवमयी यतः ।
द्रावयित्री रुजं रौद्री दोग्ध्री चाखिलकर्मणाम् ।।
( कामकलाविलास )

अर्थ – विश्वाचे वमन केल्यामुळे वामा, शिवमय असल्यामुळे ज्येष्ठा व सर्व कर्मांचे प्रदान करणारी व रोगांचा परिहार करणारी असल्यामुळे रौद्री होय.

'त्रिकोणरूपा योनिस्तु' (=त्रिकोण हे योनीचे प्रतीक आहे), असे ज्ञानार्णव तंत्रात म्हटले आहे (अ. १०). योनीलाच भग अशी दुसरी संज्ञा असून, तिचे वर्णन पुढीलप्रमाणे केलेले आहे–

त्रिकोणं भगमित्युक्तं वियत्स्थं गुप्तमण्डलम् ।
इच्छाज्ञानक्रियाकोणं तन्मध्ये चिञ्चिनीक्रमम् ।।
( तंत्रालोक, ९४ श्लोकावरील टीका )

अर्थ –'अवकाशात जे गुप्त त्रिकोणमंडळ आहे, त्याला भग असे नाव आहे. इच्छा, ज्ञान व क्रिया हे त्याचे तीन कोन आहेत. त्याच्या मध्यभागी चिंचिनी शक्तीचे स्पंदन होते.

ब्रह्मा, विष्णू, महेश व इतर सर्व देवता त्रिकोणात असतात, असे म्हटले आहे. बौद्ध तांत्रिक साधनेत त्रिकोण हे वस्तुमात्रांचे उगमस्थान मानलेले आहे. त्रिकोण हा महासुखाचे निधान असून, त्याचे सिंहासन बनवून जो त्याच्यावर आरूढ होतो, त्याला भगवान असे म्हणतात. त्रिकोणाला वज्रालय किंवा वज्रासन असेही दुसरे नाव आहे.

ध्यानमुद्रेत बसलेला बुद्ध एक पूर्ण त्रिकोण निर्माण करतो आणि तो त्याच्या मातेच्या गर्भाशयाचे प्रतीक समजला जातो. त्रिकोण हे बौद्धधर्मियांच्या त्रिरत्नांचे (बुद्ध, धर्म व संघ यांचे) प्रतीक व प्रज्ञा नामक शक्तीचे प्रतीक आहे. पाहा – कामकला. [ भा. प्र. वि.; गॉ. नॉ. बु.; तां. बौ. सा. सा.; म. गॉ. ]

**त्रिकोणासन** एक योगासन. याची पद्धती अशी – दोन्ही पायांत थोडे अंतर ठेवून जमिनीवर सरळ उभे राहावे. उजवा पाय गुडघ्यात वाकवून डावा पाय सरळ ठेवावा. कमरेच्या वरचा भाग उजव्या बाजूला झुकवून उजव्या



त्रिकोणासन

हाताने उजव्या पायाचा अंगठा धरावा. डावा हात उचलून सरळ रेषेत धरावा. डोळे उघडे ठेवावे आणि श्वासोच्छ्वास चालू ठेवावा. सर्व शरीर ताणलेल्या स्थितीत ठेवावे. छाती फुगवून समोर आणावी. इतके झाल्यावर या आसनाचा अर्धा भाग पुरा झाला, असे समजावे. अशाच प्रकारे दुसऱ्या बाजूच्या अंगाने करावे म्हणजे हा आसनबंध पुरा होतो. या आसनाच्या अभ्यासाने मूत्रावरोध दूर होऊन उंचीही वाढू शकते. अल्प श्रमात साध्य होणारे असे हे आसन आहे. [ उ. यो. द. ]

**त्रिगतिसप्तमी** एक व्रत. हे व्रत सूर्याचे असून, याचा काल एक वर्षाचा आहे. फाल्गुन शु. सप्तमीला याचा प्रारंभ होतो. त्या दिवशी हेली या नावाने सूर्याची पूजा करतात. फाल्गुन ते ज्येष्ठ या चार महिन्यांत हंस या नावाने, आषाढ ते आश्विन या चार महिन्यांत मार्तंड या नावाने आणि कार्तिक ते माघ या चार महिन्यांत भास्कर या नावाने सूर्याची पूजा करायची असते. फल – पृथ्वीवर स्वामित्व, इंद्रलोकातील सुखोपभोग आणि सूर्यलोकात निवास यांची प्राप्ती.

या व्रतात येणारे सूर्याचे हेली हे नाव हेलिऑस (= सूर्य) या ग्रीक शब्दापासून बनलेले आहे. गुप्त काळात सूर्योपासना करणारा एक संप्रदाय इराणमधून भारतात आला, त्याच्या बरोबर हे नाव आलेले आहे, असे दिसते. [ हि. ध. ]

**त्रिगर्त** एक प्राचीन देश. या देशातील लोकांनाही त्रिगर्त असेच म्हणत. हा प्रदेश रावी, बियास आणि सतलज या तीन नद्यांच्या खोऱ्यात असल्यामुळे त्याला त्रिगर्त असे नाव पडले. महाभारतात याला पंजाबचा भाग मानलेले असून, राजतरंगिणीत हा काश्मीरच्या जवळ असल्याचा उल्लेख आहे. आजचा कांगडा प्रदेश पूर्वी त्रिगर्तात समाविष्ट होता आणि जालंदर ही त्याची राजधानी होती. त्याचमुळे त्याला जालंधरायण असे पर्यायनाम मिळाले होते. महाभारताच्या काळी इथे सुशर्मा नावाचा राजा राज्य करीत होता. तो जरासंधाचा मित्र होता. गोमंत पर्वताला जरासंधाच्या सैन्याने वेढा घातला, त्यात सुशर्मा जरासंधाच्या बाजूने होता. त्रिगर्तातले लोक आयुधजीवी होते. महाभारतात त्यांना संसप्तक गण असे म्हटले आहे. हे संसप्तक योद्धे भारतीय युद्धात दुर्योधनाच्या बाजूने लढले आणि पांडवांकडून पराभूत झाले. संसप्तक या नावावरून हा सात लहान गणांचा सुदृढ असा संघ असावा, असे दिसते.

पाणिनी आणि पतंजली यांनी इथल्या सहा संघराज्यांचा त्रिगर्तषष्ठ या संज्ञेने उल्लेख केला आहे. काशिकेमध्ये कौंडोपरथ, दांडकी, क्रौष्ठकी, जालमानी, ब्राह्मगुप्त आणि जानकी अशी या सहा संघांची नावे दिलेली आहेत. पाणिनीच्या काळी त्रिगर्तात गणराज्य होते. सनपूर्व दुसऱ्या शतकांतील त्रिगर्त नाण्यांवर 'त्रकटजनपदस' अशी अक्षरे ब्राह्मी लिपीत कोरलेली आहेत.

त्रिगर्तांचे राज्य पर्वतमय प्रदेशात असल्याचा उल्लेख भागवतात आहे. बलराम तीर्थयात्रा करीत असता त्रिगर्तात गेला होता. [ पा. का. भा.; प. का. भा.; अ. हि. नॉ. इं.; हि. जॉ. ए. इं.; ए. से. ए. इं.; ट्रा. ए. इं. ]

**त्रिगुणसारव्रत** एक जैन व्रत. हे व्रत ४१ दिवसांत पूर्ण केले जाते. यात तीस उपवास व अकरा पारणी असतात. [ जै. व्र. वि. सं. ]

**त्रिचूर** केरळमधील एक प्राचीन तीर्थक्षेत्र. या नगराच्या मध्यभागी एका टेकडीवर वदक्कुंनाथन नावाचे प्रसिद्ध शिवमंदिर आहे. या मंदिराचा विस्तार बराच मोठा आहे. त्याच्या भोवती दगडी कोट असून, त्याला चार गोपुरे आहेत. हे मंदिर केरळी शिल्पशैलीचे उत्कृष्ट उदाहरण समजले जाते. मुख्य मंदिराभोवती अनेक मंदिरे असून, सर्वत्र लाकडावर सुंदर नक्षीकाम केलेले आढळते. इथे इ. स. च्या १६ व्या व १७ व्या शतकातील काही भित्तिचित्रेही पाहायला मिळतात.

हे मंदिर परशुरामाने स्वतः बांधले व लोकांना त्याचे शेवटचे दर्शन इथेच झाले, अशी आख्यायिका आहे. शंकराचार्यांच्या मातापित्यांनी मुलासाठी अनुष्ठान केले, ते या मंदिरातच होय. वैशाख महिन्यात इथे पूरम नावाचा वार्षिक उत्सव थाटाने साजरा करतात. त्या प्रसंगी हत्तींच्या मिरवणुका काढतात.

त्रिचूर हे सिरियन ख्रिश्चनांचे एक महत्त्वाचे केंद्र आहे. इ. स. च्या १६ व्या शतकात कोच्चिन संस्थानचे राजे या नगरात राहत होते. [ त्रिचूर गॅझे. ]

**त्रित आप्त्य** एक वैदिक देवता. ऋग्वेदात या देवतेच्या वर्णनासाठी एखादे स्वतंत्र सूक्त नाही. पण निरनिराळ्या एकोणतीस ऋचांत मिळून चाळीस वेळा त्रिताचा उल्लेख आला आहे. त्यांत त्रिताला अनेक वेळा आप्त्य हे विशेषण लावलेले आहे. त्रित हा स्वर्गात राहतो (ऋ. ५. ९. ५.), त्याचे वसतिस्थान गुप्त आहे ( ऋ. ९. १०२. २. ), ते दूर आहे, त्रिताने इंद्राकरता सोम कुटला ( ऋ. ८. ३२. २ ), त्याने सोम देऊन सूर्याला तेजस्वी केले, इंद्राच्या प्रेरणेने युद्ध केले व त्वाष्ट्राला मारून धेनूंची मुक्तता केली, इ. त्रिताची कृत्ये त्यांत सांगितली आहेत.

त्रित हा कूपात पडला आहे व तो मदतीसाठी देवांची प्रार्थना करीत आहे, असाही प्रसंग एका ठिकाणी आहे (ऋ. १. १०५. १७). बृहस्पतीने त्याची ती प्रार्थना ऐकली व त्याला कूपातून वर काढले. त्रित कूपात का पडला, याविषयी सायणाचार्यांनी शाट्यायन ब्राह्मणातील एका कथेचा हवाला दिला आहे, ती कथा अशी—

एकत, द्वित आणि त्रित असे तीन भाऊ होते. एकदा त्रित विहिरीवर पाणी पिण्याकरता गेला असता दुसऱ्या भावांनी त्याला विहिरीत ढकलून दिले व विहीर बंद करून ते निघून गेले. तेव्हा त्रिताने सुटकेसाठी देवांची प्रार्थना केली.

हे तीनही बंधू म्हणजे अग्नीला उदकापासून झालेले पुत्र होते. त्रिताच्या आप्त्य या विशेषणाचा अर्थही सायणाचार्यांनी उदकपुत्र असा केला आहे.

महाभारतात त्रितासंबंधी थोड्या—फार फरकाने हीच कथा आली आहे, तिचा सारांश असा —

एकत, द्वित व त्रित हे तिघे गौतमाचे पुत्र होते. धाकटा त्रित हा सर्वांत अधिक विद्वान असल्यामुळे लोक त्याला फार मान देत. ते त्याच्या दोघा भावांना आवडत नसे. एकदा त्यांनी त्रिताच्या साहाय्याने यज्ञ केला व पुष्कळ गाई मिळवल्या. गाई घेऊन ते सरस्वतीच्या तीरावरून चालले होते. त्रित सर्वांत पुढे होता. तेवढ्यात समोरून एक लांडगा आला. त्याच्या भीतीने त्रित थोडा बाजूला सरकला आणि एका विहिरीत पडला. त्याने मदतीसाठी खूप आक्रोश केला; पण त्याचे दोघे भाऊ तिकडे दुर्लक्ष करून गाई घेऊन निघून गेले. मग त्रिताने विहिरीत लोंबणाऱ्या एका वल्लीला सोम कल्पून ती देवांना अर्पण केली. त्यामुळे देव प्रसन्न झाले आणि त्यांनी त्याला बाहेर काढले.

ऋग्वेदात त्रित आप्त्य ही मुख्यतः पर्जन्यसंबंधी देवता आहे. त्रित ही इंद्राच्याही पूर्वीची देवता होती. पण इंद्राचे महत्त्व वाढल्यावर त्रिताचे महत्त्व कमी होत गेले. पुढे इंद्र हीच पर्जन्यदेवता मानली जाऊ लागली.

ग्रीसमध्येही प्राचीन काळी त्रितोस नामक एक पर्जन्यदेव होता आणि ग्रीकांचा इंद्र झेउस हा पुढे आल्यावर त्रितोस हा मागे पडला.

त्रित हा हस्त नक्षत्रातील एक उपेक्षित तारा असून इंद्र हा दक्षिणायनाच्या आरंभस्थानाची देवता असल्याचे श्री. अ. ज. करंदीकर यांनी सांगितले आहे. त्रित हा पर्जन्यदेव असला तरी तो नक्षत्रचक्रातील पर्जन्यदेव असून, इंद्र हा ऋतुचक्रातील पर्जन्यदेव आहे, असा त्या दोघांतला फरक त्यांनी सांगितला आहे. [प्रा. च. को.; वै. दे. अ. द.; वै. आ. ज्यो. वै. दे. पु.]

**त्रितयप्रदानसप्तमी** एक व्रत. हस्तनक्षत्रयुक्त माघ शुद्ध सप्तमीला या व्रताचा प्रारंभ करतात. या व्रतात वर्षभर प्रत्येक महिन्याच्या शुद्ध सप्तमीला सूर्यपूजा, उपवास आणि तूप-भात, जव, सोने, इ. आठ पदार्थांचे दान या गोष्टी करायच्या असतात. फल— उत्तम कुळात जन्म; तसेच आरोग्य व संपत्ती यांचा लाभ. [ हि. ध.; व्र. प. ]

**त्रिदंडी** संन्यासाचा एक प्रकार. हे संन्यासी आपल्या उजव्या हाती एकत्र बांधलेले तीन दंड धारण करतात, म्हणून यांना त्रिदंडी असे म्हटले आहे. हे तीन दंड मन, वाणी आणि देह यांच्या निग्रहाचे द्योतक समजले जातात. याविषयी मनुस्मृतीत एक श्लोक आहे, तो असा—

वाग्दण्डोऽथ मनोदण्डः कायदण्डस्तथैव च ।
यस्यैते निहिता बुद्धौ त्रिदण्डीति स उच्यते ॥
( मनु. १२.१० )

अर्थ— वाग्दंड, मनोदंड आणि कायदंड हे ज्याने आपल्या बुद्धीच्या आधीन ठेवले आहेत, त्याला त्रिदंडी म्हणतात.

हा संन्यासाचा एक गौण प्रकार समजला जातो अशा प्रकारचा संन्यास घेणाऱ्याला शिखा, सूत्र व कच्छ यांचा त्याग

करावा लागत नाही आणि हवा तेव्हा परत गृहस्थाश्रमही स्वीकारता येतो, अशी समजूत आहे. सुभद्राहरणापूर्वी अर्जुन अशाच प्रकारचा संन्यास धारण करून चार महिने द्वारकेत राहिला होता, अशी कथा महाभारतात आहे

बौद्ध वाङ्मयात त्रिदंडी संन्याशांना तेदंडिक म्हटले आहे. त्रिशूळ धारण करणाऱ्या शैव गोसाव्यांचा एक वर्गही त्रिदंडी या नावाने ओळखला जातो. [ ग्लॉ. स्मृ. लि.; श. क.; हिं. सं. ]

**त्रिपाठी चिंतामणी** (इ. स. चे १७ वे शतक) एक हिंदी कवी. हा भूषण कवीचा जेष्ठ बंधू असून, शहाजीचा आश्रित होता. काव्यविवेक, कविकुलकल्पतरू काव्यप्रकाश, रामायण असे याचे ग्रंथ व्रज भाषेत आहेत. विविध छंदांत त्याने ते रचले आहेत. याची विषयवर्णनाची हातोटी मनोहर आहे. याला रुद्रसाही सोळंखी, शहाजहान व जैनदी अहमद यांनी खूप मदत केली होती, असे कळते.

**त्रिपादमरणशांती** कृत्तिका, पुनर्वसू, उत्तरा, विशाखा, उत्तराषाढा आणि पूर्वाभाद्रपदा या नक्षत्रांना त्रिपाद नक्षत्रे मानतात. या नक्षत्रांपैकी एखाद्या नक्षत्रावर एखाद्याचा मृत्यू झाला, तर ते अनिष्ट मानतात आणि त्याच्या निवारणासाठी शांती करतात. या शांतीचे स्वरूप शांतिसारात सांगितले आहे, ते असे–

स्मशानात प्रेत नेल्यावर दर्भाच्या तीन प्रतिमा करून त्यांना लोकर गुंडाळतात. मग त्यांना गंध-फूल वाहून त्या क्रमाने प्रेताच्या मस्तकावर, हृदयावर आणि बेंबीवर मंत्रोच्चारपूर्वक ठेवतात. चितेला अग्नी लावल्यानंतर या प्रतिमांवर तुपाच्या आहुती देतात. अकराव्या व बाराव्या दिवशी शांतीचा विधी करतात. अग्निमुख करून प्रधान होमाच्या वेळी यम, मृत्यू, तक्षक, वैवस्वत व चित्रगुप्त या देवतांना चरूच्या आहुती देतात. स्विष्टकृतादी कर्म केल्यावर काळे वस्त्र, सुवर्ण, इ. दाने देतात. ही शांती न करता पर्याय म्हणून केवळ दाने देण्याचीही पद्धत प्रचलित आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**त्रिपादविभूतिमहानारायणोपनिषद** एक नव्य उपनिषद. हे अथर्ववेदाशी निगडित मानले जाते. याची दोन कांडे असून प्रत्येक कांडात चार अध्याय आहेत. हे समासप्रचुर आणि पांडित्यपूर्ण गद्यात रचलेले आहे. अद्वैतवेदान्तपर वैष्णव उपनिषदांत याचे स्थान प्रमुख आहे. परमतत्त्वाचे रहस्य जाणण्याकरिता ब्रह्मदेवाने देवांची हजार वर्षे तप केल्यावर विष्णू त्याला प्रसन्न झाला. त्यानंतर ब्रह्मदेवाने त्याची स्तुती करून, परमतत्त्वाचे रहस्य सांगण्याबद्दल त्याला विनंती केली. ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून विष्णूने जे तत्त्वज्ञान सांगितले, तेच या उपनिषदाचा विषय झाले आहे.

अविद्या, विद्या, आनंद व तुरीय हे ब्रह्माचे चार पाद, ब्रह्माची सगुण–निर्गुण रूपे, मायेची उत्पत्ती व तिचा विलय, ब्रह्मरहस्य, मुक्तिमार्ग, महानारायणयंत्र, इ. विषय या उपनिषदात प्रामुख्याने विवरिले आहेत. आठव्या अध्यायात या सर्व विषयांचा उपसंहार करताना म्हटले आहे, की विष्णूखेरीज इतर काहीही सत्य नसून, जे जे दृश्य आहे, ते ते विष्णूचेच भासमान स्वरूप आहे. गुरुपदेशपूर्वक विष्णूचे ध्यान केल्याने विष्णू संतुष्ट होतो आणि तो पित्याच्या वात्सल्याने भक्ताचा उद्धार करतो.

या उपनिषदात अद्वैताधिष्ठित भक्तीवर विशेष भर दिलेला आहे. [ श्री. सी. ग. देसाई ]

**त्रिपिटक** बौद्ध धर्मग्रंथांचा एक प्राचीन संग्रह. तीन पेटाऱ्यांत किंवा विभागांत हे ग्रंथ संग्रहित केले गेल्यामुळे त्यांच्या समूहाला त्रिपिटक असे नाव पडले. विनयपिटक, सुत्तपिटक आणि अभिधम्मपिटक ही त्या तीन पिटकांची नावे होत. विनयपिटकात एकूण पाच ग्रंथ समाविष्ट असून, त्यात बौद्ध संघाच्या व्यवस्थेचे नियम संकलित केलेले आहेत. सुत्तपिटकात बुद्धाचा सामान्य उपदेश एकूण पाच संकलनात समाविष्ट आहे. अभिधम्मपिटकात एकूण सात ग्रंथ समाविष्ट असून, त्यात बौद्ध दर्शनाचे वैज्ञानिक पद्धतीने प्रतिपादन केलेले आहे. हे ग्रंथ पाली भाषेत आहेत.

बुद्धाच्या जीवनकालात त्याचा उपदेश ग्रंथनिविष्ट झाला नव्हता. त्याच्या परिनिर्वाणानंतर त्याचे प्रमुख शिष्य राजगृह येथे एकत्र जमले आणि त्यांनी त्याच्या उपदेशाला ग्रंथस्वरूप दिले. राजगृहात भरलेल्या या पहिल्या संगीतीत ( परिषदेत ) उपाली आणि आनंद हे दोन प्रमुख बुद्धशिष्य होते. या दोघांपैकी उपालीने बौद्ध भिक्षू व बौद्ध संघ यांच्याविषयीचे नियम ( विनय ) एकत्र करून विनयपिटकाची निर्मिती केली आणि आनंदाने बुद्धाची समग्र वचने ( सुत्त ) एकत्र करून सुत्तपिटकाची रचना केली. या दोन पिटकांत बुद्धाची मूलवचने संग्रहित झालेली असल्यामुळे त्यांना बौद्ध धर्माचे श्रुतिग्रंथ मानतात. तिसरे अभिधम्मपिटक बरेच उत्तरकालीन ( मनपूर्व चौथ्या व तिसऱ्या शतकांतले ) आहे. या पिटकातला कथावत्थू हा ग्रंथ सम्राट अशोकाचा गुरू महातिष्य याने रचला, असे काही विद्वानांचे मत आहे. पाहा –विनयपिटक, सुत्तपिटक, अभिधम्म. [ आर्य–संस्कृति; बौ. द मी.; आजकल, डिसें. १९५६ ]

**त्रिपिंडी श्राद्ध** तीर्थाच्या ठिकाणी पितरांना उद्देशून जे श्राद्ध करतात, त्याला त्रिपिंडी श्राद्ध असे म्हणतात. आपल्या कुळातील दुर्गतीला गेलेले आणि कुळातील लोकांना पीडा देणारे जे पितर असतील, त्यांचे प्रेतत्व दूर होऊन त्यांना सद्‌गती मिळावी, म्हणून त्रिपिंडी करण्याची पद्धत आहे. त्याचा विधी असा:—

प्रथम तीर्थात स्नान करून श्राद्धाचा संकल्प करतात. नंतर महाविष्णूची व श्राद्धासाठी बोलावलेल्या ब्राह्मणांची श्राद्धविधीने पूजा करतात. यव, व्रीही आणि तिल यांचा एकेक पिंड तयार करतात. दर्भ पसरून त्यावर तिलोदक शिंपडतात व पिंडदान करतात. पिंडांवर साखर, मध व तूप एकत्र मिसळून घालतात, त्याला मधुरत्रय असे नाव आहे. पितृवंशातील व मातृवंशातील ज्या मृतांची उत्तरक्रिया झाली नाही, ज्यांना संतती नसल्याने पिंडदान केले गेले नाही किंवा जन्मतःच जे अंध-पंगू होते, अशा पितरांना त्यांचे प्रेतत्व नष्ट होऊन सद्‌गती मिळण्यासाठी यवपिंड देतात. याला धर्मपिंड असे नाव आहे. मधुरत्रययुक्त व्रीहीपिंड दिल्याने अंतरिक्षात असलेल्या पितरांना सद्‌गती मिळते; तर पृथ्वीवर क्षुद्र योनीत राहून इतरांना पीडा देणाऱ्या पितरांना तिलपिंडाने सद्‌गती प्राप्त होते, असे सांगितले आहे. या तीन्ही पिंडांवर तिलोदक देतात. मग पिंडांची पूजा करून अर्घ्य देतात. विष्णूसाठी तर्पण करतात. ब्राम्हणभोजन घालून त्यांना दक्षिणा म्हणून वस्त्र, पात्र, पंखा पादत्राण, इ. वस्तू देतात. [ ऋ. ब्र. स. ]

**त्रिपुंड्र** तिलकाचा एक प्रकार. शैवपंथी लोक कपाळावर गंधाच्या किंवा भस्माच्या आडव्या तीन रेषा ओढून त्याच्या मधोमध एक बिंदू लावतात, त्याला त्रिपुंड्र म्हणतात. या तीन रेघांपैकी पहिली रेघ ही ॐकारातील अ हा वर्ण, गार्हपत्याग्नी, क्रियाशक्ती, ऋग्वेद आणि प्रातःसवन यांचे प्रतीक असून, महेश्वर ही त्याची देवता आहे. दुसरी रेघ ॐकारातील उ हा वर्ण, दक्षिणाग्नी, सत्त्व, अंतरिक्ष, अंतरात्मा, इच्छाशक्ती, यजुर्वेद आणि माध्यंदिनसवन यांचे प्रतीक असून, सदाशिव ही त्याची देवता आहे. तिसरी रेघ ॐकारातील म हा वर्ण, आहवनीयाग्नी, द्युलोक, परमात्मा, ज्ञानशक्ती सामवेद आणि सायंसवन यांचे प्रतीक असून, महादेव ही त्याची देवता आहे. ब्रम्हचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी या सर्वांना त्रिपुंड्र धारण करण्याचा अधिकार आहे. वासुदेवोपनिषदात त्रिपुंड्राला त्रिमूर्ती, तीन व्याहृती, तीन छंद, इत्यादींशी एकरूप मानलेले आहे. त्रिपुंड्राच्या माहात्म्याविषयी तिथ्यादितत्त्व या ग्रंथात एक श्लोक दिलेला आहे, तो असा—

विना भस्मत्रिपुण्ड्रेण विना रुद्राक्षमालया ।
पूजितोऽपि महादेवो न स्यात्तस्य फलप्रदः ।।
तस्मान्मृदापि कर्तव्यं ललाटेऽपि त्रिपुण्ड्रकम् ।

अर्थ – भस्माचा त्रिपुंड्र आणि रुद्राक्षांची माळ धारण न करता शिवाची पूजा केल्यास ती फलप्रद होत नाही. म्हणून ( भस्माचा शक्य नसेल तर ) मातीचाही त्रिपुंड्र कपाळी लावावा.

त्रिपुंड्र धारण करणाऱ्याची सर्व पापे नष्ट होतात आणि तो शिवाशी एकरूप होतो, अशी त्याची फलश्रुतीही सांगितली आहे. [ क्रि. स्ट. ले. उ.; मा. प्र. वि. ]

**त्रिपुरज्वलनव्रत** हे व्रत पूजाप्रधान असून, शिव ही याची देवता आहे. याचा कालावधी एक वर्षाचा आहे. कार्तिकी पौर्णिमेला याचा प्रारंभ करतात आणि पुढच्या वर्षाच्या कार्तिकी पौर्णिमेस व्रताचे उद्यापन करतात. प्रत्येक महिन्यातील पौर्णिमेला शिवापुढे निरनिराळ्या प्रकारच्या ७५० वाती लावणे, निरनिराळी दीपपात्रे दान देणे, नैवेद्यासाठी निरनिराळे पदार्थ करणे आणि शिवाच्या निरनिराळ्या नावांचा निर्देश करून ते पदार्थ शिवाला अर्पण करणे, असा या व्रताचा विधी आहे. यात पौर्णिमेच्या दुसऱ्या दिवशी एका दांपत्याला भोजन घालून, त्याची वस्त्रालंकारांनी संभावना करायची असते.

उद्यापनाच्या दिवशी संकल्पपूर्वक ब्रह्मादी मंडलदेवतांची स्थापना व कलशावरील पूर्णपात्रात शिवाची सुवर्णप्रतिमा ठेवून तिची पूजा करतात. नंतर पितळेच्या दीपपात्रात अठरा धाग्यांनी बनविलेल्या ७५० वाती तुपात भिजवून त्यांनी देवाची आरती करतात. रात्री जागरण करून दुसऱ्या दिवशी समिधा, तीळ, पायस व आज्य या हविर्द्रव्यांनी हवन करतात. शेवटी गोदान व पीठदान करून बारा दांपत्यांना यथाशक्ति वस्त्रालंकार व सौभाग्यवायने देतात. [ व्रतराज ]

**त्रिपुरभैरवी** एक तांत्रिक देवता. धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांची प्राप्ती करून देणारी ही देवता मानली जाते. ही शिवलिंग भेदून बाहेर आली आहे. कालिका पुराणात हिचे ध्यान दिले आहे, ते असे—

चतुर्भुजां रक्तवर्णां रक्तवस्त्रविभूषिताम् ।
दक्षिणोर्ध्वे स्रजं चाधो बिभ्रतीं पुस्तकोत्तमम् ।।
अभयं वामहस्ताभ्यां वरं च दधतीं तथा ।
सहस्रसूर्यसङ्काशां त्रिनेत्रां गजगामिनीम् ।।
पीनोत्तुङ्गस्तनयुतां सितप्रेतासनस्थिताम् ।

स्मितप्रभिन्नवदनां सर्वालङ्कारसंयुताम् ॥
तिसृभिर्मुण्डमालाभिः शिरोवक्षःकटीषु च ।
त्रिगुणं त्रिगुणीभूतैः प्रत्येकं परिभूषिताम् ॥
मदिराघूर्णनयनां रक्तदन्तच्छदद्वयाम् ।
चिन्तयेद् वरदां देवीमेवं त्रिपुरभैरवीम् ॥

अर्थ – चतुर्भुज, तांबड्या वर्णाची, तांबडे वस्त्र परिधान केलेली, उजव्या वरच्या हातात माळ आणि खालच्या हातात उत्तम पुस्तक धारण करणारी, डाव्या दोन हातांनी अभय व वर देणारी, सहस्र सूर्यांप्रमाणे तेजस्वी असलेली, त्रिनेत्रा, गजगामिनी, पुष्ट आणि उत्तुंग स्तनांनी युक्त अशी, शुभ्र प्रेतासनावर बसलेली, हसण्यासाठी तोंड उघलेली, सर्व अलंकारांनी नटलेली, शिर, वक्षःस्थल आणि कटी यांवर मुंडांच्या तीन माळा धारण करणारी, जिचे डोळे मदिरापानाने धुंद आहेत व जिचे ओठ लाल आहेत अशी, भक्तवरदायिनी त्रिपुरभैरवी, हिचे चिंतन करावे.

श्रीविद्यार्णवतंत्रात हिचे वर्णन अर्धचंद्र व ब्रह्मा–विष्णु–महेशांच्या मुंडांची माला धारण करणारी, असे केले आहे. [ श. क; श्रीविद्यार्णवतंत्र; डे. हिं. इ. ]

**त्रिपुरसुंदरी** एक तांत्रिक देवता. हिच्या नावावर एक पंथ प्रचलित आहे. त्या पंथाची दीक्षा घेतल्यावरच त्रिपुरसुंदरीची उपासना करता येते, असे त्या पंथाचे मत आहे. ही उपासना तीन प्रकारांनी होते. देवी महापद्मवनात शिवाच्या मांडीवर बसलेली आहे, असे कल्पून तिचे ध्यान, पूजन करणे, हा पहिला प्रकार. श्रीचक्राच्या रूपाने देवीची पूजा करणे, हा दुसरा प्रकार. याला भावयाग असे नाव आहे. आणि पंथाच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणे, हा तिसरा प्रकार होय.

त्रिपुरसुंदरीची वेगवेगळी तीन रूपे आहेत. त्यांपैकी एक रूप असे—

सिन्दूरपुञ्जसङ्काशां त्रिनेत्रां तु चतुर्भुजाम् ।
वामोर्ध्वे पुष्पकोदण्डं धृत्वाऽधः पुस्तकं तथा ॥
दक्षिणोर्ध्वे पञ्चबाणानक्षमालां दधात्यधः ।
चतुर्णां कुणपानां तु पृष्ठेऽन्यत् कुणपान्तरम् ॥
निधाय तस्य पृष्ठे तु समपादेन संस्थिताम् ।
जटाजूटार्धचन्द्रेण समाबद्धशिरोधराम् ॥
नग्नां त्रिवलिभेदेन चारुमध्यां मनोहराम् ।
सर्वालङ्कारसम्पन्नां सर्वाङ्गसुन्दरीं शुभाम् ॥

अर्थ – ती शेंदुराच्या राशीसारखी लाल, त्रिनेत्र व चतुर्भुज आहे. तिच्या वरच्या डाव्या हातात पुष्पधनुष्य व खालच्या हातात पुस्तक आहे. तसेच तिच्या उजव्या वरच्या हातात पंच बाण व खालच्या हातात अक्षमाला आहे. चार प्रेतांवर ठेवलेल्या एका प्रेतावर ती दोन्ही पाय जोडून उभी आहे. तिने जटाजूट धारण केला असून, त्यात अर्धचंद्र आहे. ती नग्न असून, तिच्या पोटावर तीन वळ्या आहेत. ती सर्वालंकारयुक्त असून, तिच्या रेखीव अवयवांमुळे सुंदर दिसत आहे.

त्रिपुरसुंदरीला कदंबपुष्प फार प्रिय आहे. शंकराचार्य हे त्रिपुरसुंदरीचे अनन्य भक्त होते. त्यांची त्रिपुरसुंदरी, ललिता-



त्रिपुरसुंदरी

पंचरत्न व सौंदर्यलहरी ही सर्व स्तोत्रे तिचेच गुणगान करणारी आहेत. त्यांच्या त्रिपुरसुंदरीस्तोत्रातील दोन श्लोक असे–

कदम्बवनमध्यगां कनकमण्डलोपस्थितां
षडम्बुरुहवासिनीं सततसिद्धसौदामिनीम् ।
विडम्बितजपारुचिं विकचचन्द्रचूडामणिं
त्रिलोचनकुटुम्बिनीं त्रिपुरसुंदरीमाश्रये ॥

अर्थ – कदंबवनात वास करणाऱ्या, सुवर्णाच्या श्रीचक्राच्या मंडलावर विराजमान झालेल्या, (सर्वांच्या देहात असणाऱ्या) षट्कमलांमध्ये (म्हणजे मूलाधारादी सहा चक्रांत) वास करणाऱ्या, सिद्धांच्या अंतःकरणात सतत विद्युल्लतेप्रमाणे प्रकाश देणाऱ्या, जास्वंदीच्या फुलाप्रमाणे अंगकांती असलेल्या, उगवत्या

चंद्र मस्तकी धारण करणाऱ्या, अशा या शिवपत्नी त्रिपुरसुंदरी-देवीच्या चरणांचा मी आश्रय करतो.

पुरन्दरपुरन्ध्रिकाचिकुरबन्धसैरन्ध्रिकां
पितामहपतिव्रतापटुपटीरचर्चारताम् ।
मुकुन्दरमणीमणीलसदलङ्क्रियाकारिणीं
भजामि भुवनाम्बिकां सुरवधूटिकाचेटिकाम् ।।

अर्थ – इंद्रपत्नी शची ही दासीप्रमाणे जिची वेणी घालीत आहे, ब्रह्माणी जिच्या अंगाला चंदनाची उटी लावण्यात मग्न आहे, लक्ष्मी जिच्या अंगावर तेजस्वी अलंकार घालण्याचे कार्य करीत आहे, देवस्त्रिया जिचे दास्य करीत आहेत, अशा त्या त्रिभुवनजननीला मी भजतो.

त्रिपुरसुंदरीने अर्जुनाला धनुर्विद्या शिकवली अशी कथा आहे. आलमोडा शहरात हिचे एक मंदिर आहे. [ सुबोधस्तोत्र–संग्रह २; हिं. सा. को. २; क्रि. स्ट. ले. उ.; पी. के. गो. को. ]

**त्रिपुरसुंदरीश्रीविद्यामंत्र** तंत्रशास्त्रातील एक मंत्र. या मंत्राला सर्व मंत्रांचा जनक मानतात. यात तीन कूटे असून, त्यांना वाग्बीज, कामबीज व शक्तिबीज अशा संज्ञा आहेत. या मंत्राचा ऋषी दक्षिणामूर्ती, छंद पंक्ती, देवता त्रिपुरसुंदरी, बीज ऐं, शक्ती सौः व कीलक क्लीं हे आहे. हा मंत्र पुढीलप्रमाणे– 'श्रीं ऱ्हीं क्लीं ऐं सौः ॐ ऱ्हीं श्रीं क्एईल्ऱ्हीं ह्स्क्ह्ल्ऱ्हीं स्क्ल्ऱ्हीं सौः ऐं क्लीं ऱ्हीं श्रीं.'

प्रथम षडंग, संमोहन, संहार, वाग्देवता, इ. न्यास करून झाल्यावर देवीला प्रिय असणाऱ्या संक्षोभ, द्रावण, आकर्षण, वश्य, इ. नऊ मुद्रा दाखवतात. नंतर पूजेसाठी एक यंत्र तयार करतात. त्याची व इष्ट देवतेची पूजा करतात. मग मूलमंत्राचा एक लक्ष जप करून साखर, मध व तूप यांनी युक्त अशा करवीर पुष्पांचे अयुत संख्येने हवन करतात. नंतर अग्निपूजा करतात. एवढे विधान केल्याने हा मंत्र सिद्ध होतो. मग इष्ट हेतुसाठी त्याचा प्रयोग करतात.

या मंत्राचा नऊ लक्ष जप केल्याने जपी साक्षात रुद्ररूप बनतो आणि जाई, मोगरी, चाफा व पाटल यांची फुले, तसेच कापूर, कस्तुरी, बोकडाचे मांस, इ. द्रव्यांनी हवन केल्यास वाक्पांडित्य, सौंदर्य, आरोग्य, यश, धन, सिद्धी, सत्ता, इ. विविध फले प्राप्त होतात, असे सांगितले आहे. [ मं. म. ]

**त्रिपुरसूदनव्रत** उत्तरानक्षत्रयुक्त रविवारी सूर्यमूर्तीला तूप, दूध, उसाचा रस यांनी स्नान घालणे आणि नंतर केशर लावून तिची पूजा करणे, असा याचा विधी आहे. फल– बल व धन यांची प्राप्ती (हे. व्र. २.५२५). [ हिं. ध. ]



**त्रिपुरा** देवीचे एक रूप. त्रिपुरा शब्दाची व्याख्या अशी– 'त्रीन् धर्मार्थकामान् पुरति पुरतो ददातीति' ( = धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांना जी साध्य करून देते, ती त्रिपुरा होय ). ( श. क. ).

त्रिपुरेची अनेक रूपे असून, प्राचीन काळी त्या सर्वांची उपासना होत असे. त्रिपुरा प्रथम कुमारी म्हणून अवतीर्ण झाली आणि नंतर तिने आपली त्रिपुराबाला, त्रिपुरभैरवी आणि त्रिपुरासुंदरी किंवा त्रिपुरसुंदरी अशा तीन रूपांत विभागणी केली. याशिवाय गौरी, रामा, भारती, काली, चंद्रिका, दुर्गा, भगवती, कात्यायनी, परा, ललिता, षोडशी, श्रीविद्या, इ. नावेही त्रिपुरेचीच असल्याचे तंत्रशास्त्रात सांगितले आहे.

तंत्रसारात त्रिपुरा शब्दाचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे दिले आहे ते असे—

त्रिमूर्तिसर्गाच्च पराभवत्वात् त्रयीमयत्वाच्च परैव देव्याः ।
लये त्रिलोक्यामपि पूरणत्वात् प्रायोऽम्बिकायास्त्रिपुरेति नाम ।।
( तंत्रसार )

अर्थ – त्रिमूर्तींची उत्पत्ती केल्यामुळे, परा शक्तीपासून निर्माण झाल्यामुळे, परा देवी त्रयीमय असल्यामुळे व प्रलयानंतर तीन्ही लोक पूर्ण केल्यामुळे प्रायः अंबिकेला त्रिपुरा असे नाव मिळाले असावे.

तिच्या नावाचे आणखी एक स्पष्टीकरण असे –

ब्राह्मी रौद्री वैष्णवीति शक्तयस्तिस्र एव हि ।
पुरं शरीरं यस्यां सा त्रिपुरेति प्रकीर्तिता ।।
( पुरश्चर्यार्णव )

अर्थ– ब्राह्मी, रौद्री व वैष्णवी या तीन शक्ती जिची पुरे म्हणजे शरीरे आहेत, तिला त्रिपुरा असे नाव आहे.

कालिका पुराण आणि त्रिपुरारहस्य या ग्रंथांत तिच्या विविध रूपांची आणि पूजाप्रकारांची माहिती दिलेली आहे.

सर्व रूपांत भैरवी हे त्रिपुरेचे प्रभावी रूप समजले जाते. तिची पूजा डाव्या हाताने करतात. तिला लाल रंग फार आवडतो. रक्तवर्ण मदिरा, लाल फुले, लाल वस्त्रे व शेंदूर या वस्तू तिला प्रिय आहेत. (त्रिपुरभैरवी पाहा).

त्रिपुराबाला प्रेतावर बसलेली असून, तिच्या हातात फुलांचे धनुष्य आणि पाश ही आयुधे असतात.

भारतात तांत्रिकांचे प्राबल्य होते, त्या काळात त्रिपुरभैरवीची उपासना तांत्रिक पद्धतीने होत असे. विशेषतः आसाम व बंगाल या देशांत अशा पूजेचा विशेष प्रचार होता. या उपासनेतील सर्वांत महत्त्वाचा विधी म्हणजे बलिदान हा होय. देवीला पशुबळीपेक्षा नरबळी देण्याकडे तांत्रिकांचा विशेष ओढा होता. नरबळी मिळविण्यासाठी ते हरतऱ्हेचे प्रयत्नही करीत.

कालिका पुराणात सांगितले आहे, की देवीला एक नरबळी दिल्यास ती एक हजार वर्षे व तीन नरबळी दिल्यास एक लक्ष वर्षेपर्यंत संतुष्ट राहते.

नंतरच्या काळात आणि विशेषतः द. कर्नाटक व तमिळनाड या प्रदेशांत ती त्रिपुरसुंदरी किंवा ललिता या स्वरूपात लोकप्रिय झाली. [भा. प्र. वि.; बी. के. बरुआ. – पी. के. गो. को.; श्री. पांडुरंग देसाई – नवभारत, नोव्हें. १९५७]

**त्रिपुरांतकमूर्ती** शिवमूर्तीचा एक प्रकार. शंकराने त्रिपुरासुराला त्याच्या तीन पुरांसह नष्ट केले, या कथेच्या आधारावर त्रिपुरांतक हे शिल्प निर्माण झाले आहे. ही मूर्ती सोळा हातांची असावी, असे मत्स्य पुराणात सांगितले



त्रिपुरांतक शिव– चिदंबरम ( अन्नमलाई विद्यापीठाच्या सौजन्याने )

आहे. श्री. गोपीनाथराव यांनी दिलेल्या त्रिपुरांतक शिवमूर्तीच्या चित्रात शिव रथात बसून त्रिपुरदहन करीत आहे, त्याच्या रथाला दोन घोडे आहेत, ब्रह्मा त्याचा सारथी आहे आणि रथापुढून राक्षस पळत आहेत, असा तपशील दिसतो. चिदंबरम येथील शिवमंदिराच्या गोपुरावरील शिल्पात शिव युद्धवेषात रथावर आरूढ झालेला असून, त्याच्याजवळ उमा उभी आहे. पाहा– त्रिपुरी पौर्णिमा. [ मू. वि. ].

**त्रिपुरातापिनी उपनिषद** एक नव्य उपनिषद. हे अथर्ववेदाशी संबंधित मानले जाते. याचे पाच छोटे भाग असून, त्या प्रत्येकाला उपनिषद अशीच संज्ञा आहे. त्रिपुरादेवीची तांत्रिक उपासना हा या उपनिषदाचा विषय आहे. त्रिपुरादेवीचे स्वरूप, शिव-शक्तींच्या मीलनातून जगाची उत्पत्ती, देवीचे ध्यान, तिला संतुष्ट करण्याकरिता म्हणायचे मंत्र, शिव-शक्तींसंबंधी विविध विद्या, देवीचक्र, मुद्रा, इ. विषयांची चर्चा यात आहे. अखेरच्या भागात अद्वैत तत्त्वज्ञानानुसार ब्रह्माचे वर्णन केलेले असून, शब्दब्रह्मात प्रावीण्य मिळविणारा पुरुष परब्रह्माकडे जातो, असे सांगितले आहे. [ श्री. सी. ग. देसाई ]

**त्रिपुरी** (१) एक प्राचीन नगर. सांप्रत जबलपुरापासून सहा मैलांवर असलेले तेवर शहर हीच पूर्वीची त्रिपुरी होय. ही कलचुरी राजा वामराजदेव याची राजधानी होती. त्रिपुरी हे फार प्राचीन नगर होते. महाभारतात या नगराचा उल्लेख आला आहे. दिग्विजयप्रसंगी सहदेवाने त्रिपुरीच्या राजाचा पराभव केला होता (म. भा. सभा. ३१).

इ. स. च्या दुसऱ्या वा तिसऱ्या शतकातली या नगराच्या नावाने पाडलेली तांब्याची नाणी सापडली आहेत. सांप्रत इथे अधिक उत्खनन चालू आहे.

राजशेखर हा संस्कृत साहित्यिक काही काळ इथे राहिला होता, असे सांगतात. या नगराच्या मध्यभागी त्रिपुरेश्वराचे मंदिर आहे. त्यात अनेक मूर्तीही आहेत. (खं. वै.; क. नू. का.)

(२) एक जमात. भारताच्या ईशान्येस त्रिपुरा नामक पर्वतश्रेणीत ही जमात राहते, म्हणून हिला त्रिपुरी म्हणतात. या जमातीच्या १८ टोळ्या आहेत. त्रिपुरी लोकांचा इंडो-मंगोलाइड भाषेच्या बोडोभाषी समूहात अंतर्भाव होतो. हे लोक अर्धजंगली अवस्थेत राहतात.

बऱ्याच प्राचीन काळापासून त्रिपुरी टोळ्यांचा बंगाली व आसामी लोकांशी संबंध चालत आलेला आहे. त्यांच्या आचार-विचारांवर हिंदू धर्माचा बराच प्रभाव दिसतो; याचे कारण बंगाली–आसामी लोकांशी आलेला त्यांचा संपर्क हेच होय. बंगाली व संस्कृत या भाषांचा त्यांनी धार्मिक व सांस्कृतिक भाषा या नात्याने स्वीकार केला आहे. हिंदू प्रभावापूर्वीच्या त्यांच्या काही खास चालीरीतीही ते अजून पाळतात.

त्रिपुरींच्या मुख्य १४ देवता आहेत. प्रत्येक देवतेचे विशि-

विधान स्वतंत्र आहे. प्राचीन काळी या देवतांना हे लोक नरबळीही देत असत. सांप्रत ती प्रथा बंद आहे. त्यांच्या पुरोहितांना चुंताई म्हणतात. चुंताईंचा एक खास वर्गच बनलेला आहे. मुख्य चुंताई त्यांच्या पुराणप्रथेप्रमाणे सोन्याचे जानवे घालतो व वर्षातून तीन दिवस राज्य करतो. या तीन दिवसांच्या त्याच्या राज्यकाळाला केर म्हणतात. या काळात या पुरोहितवर्गाची दान–दक्षिणा देऊन संभावना केली जाते. पाहा–बोडो. [फो. लो. ऑगस्ट १९६५]

**त्रिपुरी पौर्णिमा** कार्तिक पौर्णिमेस हे नाव आहे. या दिवशी रात्री घरात, देवळात आणि घराबाहेरही दिवे लावावेत, दीपदान द्यावे, गंगास्नान करावे आणि कार्तिकस्वामीचे दर्शन घ्यावे, असा विधी आहे. निरनिराळ्या देवस्थानांत ज्या दगडी दीपमाळा असतात, त्याही या दिवशी पाजळतात. या दीपोत्सवाला त्रिपुर पाजळणे, असे म्हणतात. या दीपोत्सवाचा मंत्र असा—

कीटाः पतङ्गा मशकाश्च वृक्षा
जले स्थले ये विचरन्ति जीवाः।
दृष्ट्वा प्रदीपं न च जन्मभागिनो
भवन्ति नित्यं श्वपचा हि विप्राः।

अर्थ – कीटक, पतंग, घुंगुरटी, वृक्ष, जलात व स्थलात संचार करणारे जीव, हे (त्रिपुरी पौर्णिमेचा) पाजळलेला दिवा पाहून पुनर्जन्मातून मुक्त होतात व चांडालही ब्राह्मण योनीत जन्म घेतात.

त्रिपुरी पौर्णिमेची कथा अशी – त्रिपुर नावाचा एक असुर होता. त्याने प्रयाग तीर्थाच्या ठिकाणी एक लक्ष वर्षे उग्र तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येने ब्रह्मदेव त्याला प्रसन्न झाला आणि म्हणाला, 'वर माग.' त्रिपुराने देवता, मनुष्य, निशाचर, स्त्री किंवा रोग यांच्यापासून आपणांस अभय असावे, असा वर मागितला. ब्रह्मदेवाने 'तथास्तु' म्हटले. त्या वरामुळे त्रिपुरासुर मलताच माजला. त्याची तीन पुरे होती व ती आकाशसंचारी होती. त्रिपुर त्या पुरांत बसून त्रैलोक्याला त्रास देऊ लागला. त्याच्या त्रासामुळे सर्व देव गांजले व शिवाला शरण गेले. शिवाने त्याची तीन्ही पुरे जाळून त्याला ठार केले. ही घटना कार्तिक पौर्णिमेच्या दिवशी घडली. त्यामुळे तिला त्रिपुरी असे नाव मिळाले. लोकांनी त्या दिवशी सर्वत्र दीपोत्सव करून त्रिपुरसंहाराचा आनंद व्यक्त केला.

त्रिपुरीच्या कथेचा दुसरा पर्याय असा – ताराक्ष, कमलाक्ष व विद्युन्माली असे तारकासुराचे तीन पुत्र होते. मयासुराने त्यांच्यासाठी तीन पुरे बनविली व ती या तिघांना दिली (लिंग पु. १.७०). मयासुराने त्या वेळी त्या असुरांना बजावले, की 'तुम्ही कधीही देवांच्या वाटेला जाऊ नका व त्यांचा अनादरही करू नका.' पण त्या पुराधिपतींची बुद्धी चळली व ते देवांना त्रास देऊ लागले. पुढे शंकराने त्यांच्याशी युद्ध करून त्रिपुरांचे दहन केले व त्यातच ताराक्ष, कमलाक्ष व विद्युन्माली या तीन्ही असुरांचा अंत झाला (म. भा. द्रोण. २०२).

उ. प्रदेशात हा दिवस स्कंदजयंती म्हणून मानतात व त्या दिवशी स्कंदमूर्तीची पूजा करतात. कार्तिक पौर्णिमेस कृत्तिका नक्षत्र असताना स्कंदाचे दर्शन घेणारा, धनवान व वेदपारंगत होतो. दक्षिणेत या दिवशी कृत्तिकामहोत्सव असतो. त्यात शिवपूजा करून, एका उंच स्तंभावर अग्नी प्रज्वलित करतात.

**त्रिपुरोपनिषद्** एक नव्य उपनिषद. हे ऋग्वेदाशी संबंधित आहे. स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन्ही शरीरांत वास करणारी चिच्छक्ती म्हणजेच त्रिपुरादेवी असून, कर्म, उपासना व ज्ञान यांच्या साहाय्याने साधकाला आपल्या हृदयात तिचा साक्षात्कार अनुभवता येतो, असे या उपनिषदाचे प्रतिपाद्य आहे. पंच मकारांनी योनिपूजा केल्याने परम सुखाचा लाभ होतो, हे शाक्तमत यात गौण मानले आहे. निष्काम साधकांनाच श्रीविद्येची सिद्धी होते; सकामांना ती कधीही होत नाही, असे यात स्पष्ट म्हटले आहे. देवीच्या निःस्वार्थ पूजेने मोक्षप्राप्ती कशी होते, हे या उपनिषदात सांगितले आहे. [श्री. सी. ग. देसाई]

**त्रिपुष्करयोग** मंगळवार, शनिवार व रविवार यांपैकी कोणत्याही वारी द्वितीया, सप्तमी किंवा द्वादशी यांपैकी कोणतीही तिथी असेल आणि त्याच दिवशी कृत्तिका, पुनर्वसू, उत्तरा, विशाखा, उत्तराषाढा व पूर्वाभाद्रपदा या नक्षत्रांपैकी एखादे नक्षत्र येत असेल, तर तो त्रिपुष्करयोग होतो. तसेच, त्याच वारी त्याच तिथींना मृग, चित्रा व धनिष्ठा यांतले एकादे नक्षत्र येत असेल, तर तो द्विपुष्करयोग होतो. त्रिपुष्कर व द्विपुष्कर या योगांवर एखादी शुभ किंवा अशुभ घटना घडल्यास ती अनुक्रमे त्रिवार व द्विवार घडते, असे सांगितले आहे. [मु. चिं.]

**त्रिभुवनचंद्र** (इ. स. चे सतरावे शतक) एक हिंदी जैन कवी. हा आग्र्याचा रहिवासी होता. याच्या चरित्राविषयी काहीही माहिती उपलब्ध नाही. रूपचंद्र पांडे आणि बनारसीदास हे याचे समकालीन होते. याने अनित्यपंचाशत, षड्द्रव्यवर्णन, चंद्रशतक, प्रास्ताविक दोहे आणि

स्फुट कवित्त एवढी रचना हिंदी भाषेत केली आहे. यांपैकी पहिले दोन ग्रंथ संस्कृतमधून अनुवादलेले असून, बाकीची रचना स्वतंत्र आहे. प्रौढ विचार आणि सुंदर भाषाशैली यांमुळे याच्या रचनेला साहित्यिक महत्त्व लाभले आहे. याच्या अनित्यपंचाशतमधील काही पंक्ती अशा –

जहाँ है संजोग तहाँ होत है वियोग सही,
जहाँ है जनम तहाँ मरण कौ बास है।
संपति विपती दोऊ एकही भवन दासी,
जहाँ वसै सुष तहाँ दुष कौ विलास है।
जगतमें बारबार फिरैं नाना परकार,
करम अवस्था झूठी, थिरता की आस है।

अर्थ – जिथे संयोग आहे, तिथे वियोग खात्रीने आहे. जिथे जन्म आहे, तिथे मरणाचाही निवास आहे. संपत्ती आणि विपत्ती या एकाच भवनातील दोन दासी आहेत. जिथे सुखाची वसती आहे, तिथे दुःखाचाही विलास आहे. या जगात नाना प्रकारे पुनः पुनः फिरवणारी कर्मावस्था खोटी आहे. म्हणून स्थिरतेची आशा धरायला हवी.

त्रिभुवनचंद्राने आपल्या सर्व कृतींत चंद्र असे आपले नाव दाखवले आहे. [ हिं. जै. भ. क. ]

**त्रिमुख** एक जैन यक्ष. मुंगूस हे याचे चिन्ह आहे. हा संभवनाथाचा सेवक आहे. संभवचरित या ग्रंथात याचे वर्णन आहे, ते असे–

त्रिनेत्रस्त्रिमुखः श्यामः षड्बाहुर्बर्हिवाहनः।
दक्षिणैर्नकुलधरो गदाभृदभयप्रदः।
युगो वामैर्भुजैर्मातुलिङ्गदामाक्षसूत्रिभिः ॥

अर्थ – याला तीन तोंडे, तीन डोळे आणि सहा हात आहेत. याचा वर्ण सावळा असून वाहन मयूर आहे. तीन हातांपैकी उजव्या हातांत याने मुंगूस आणि गदा ही धारण केलेली असून, याचा एक हात अभय मुद्रेत आहे. डाव्या तीन हातांत महाळुंग, दोर आणि जपमाळ या वस्तू आहेत.

वसुनंदीच्या मते चक्र, खड्ग, अंकुश, दंड, त्रिशूळ आणि खंजीर ही याची आयुधे होत. [ जै. इ. ]

**त्रिमुखशुद्धी** एक व्रत. सकाळ, दुपार व संध्याकाळ अशा तीन्ही वेळी अन्नग्रहण करण्यापूर्वी दारात उभे राहून सत्पात्र अतिथीची वाट पाहायची आणि तो आल्यावर त्याला अन्नदान केल्यानंतरच स्वतः अन्नग्रहण करायचे, असे या व्रताचे स्वरूप आहे. फळ– दीर्घायुष्य, आरोग्य व स्वर्गलोक यांची प्राप्ती. [ व्र. ति. नि. ]

**त्रिमूर्तिव्रत** एक तिथिव्रत. ज्येष्ठ शु. तृतीयेला याचा प्रारंभ करतात. वायू, सूर्य व चंद्र या रूपांत विष्णूची पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. व्रतावधी तीन वर्षे. फल– दीर्घायुरारोग्य व सुख यांची प्राप्ती. [ हिं. ध. ]

**त्रिमूर्ती** ब्रह्मा, विष्णू व महेश यांच्या संयुक्त मूर्तीला सामान्यपणे त्रिमूर्ती असे म्हणतात. त्रिमूर्तिकल्पना ही फार पुरातन आहे. तिची बीजे वेदांतही सापडतात. सूर्य, वायू व अग्नी या तीन देवता मिळून एक त्रिक असल्याचे उल्लेख ऋग्वेदात अस्पष्टपणे मिळतात. यासंबंधीची ऋग्वेदातील एक ऋचा अशी—

सूर्यो नो दिवस्पातु वातो अन्तरिक्षात्।
अग्निर्नः पार्थिवेभ्यः ॥

( ऋ. १.१५८.१ )

अर्थ – सूर्य आकाशातून, वायू अंतरिक्षातून व अग्नी भूप्रदेशातून आमचे रक्षण करो.

त्रिमूर्तिकल्पनेचा विकास उपनिषदांच्या कालखंडात झालेला दिसतो. ब्रह्मा, शिव व हरी या तिघांच्या संयुक्त रूपाला परमात्मा म्हणावे, असे महानारायणोपनिषदात सांगितले आहे.



एकपाद त्रिमूर्ती ( शैव )– तिरुवोट्टियूर

गुणांच्या अनुषंगाने त्रिमूर्तींचा विचार मैत्रायणी उपनिषदात पुढीलप्रमाणे सांगितला आहे –

प्रजापतिस्तस्य प्रोक्ता अग्र्यास्तनवो ब्रह्मा रुद्रो विष्णुरिति
अथ यो ह खलु वावास्य राजसोंऽशोऽसौ स योऽयं ब्रह्मा
अथ यो ह खलु वावास्य तामसोंऽशोऽसौ स योऽयं रुद्रः
अथ यो ह खलु वावास्य सात्त्विकोंशोऽसौ स एव विष्णुः
स वा एष एकस्त्रिधा भूतः ।

( मै. उप. ४.५ )

भावार्थ – ब्रह्मा, रुद्र व विष्णू या प्रजापतीच्या श्रेष्ठ तनू (मूर्ती) होत. त्याचा रजोगुणी अंश तो ब्रह्मा, तामस अंश रुद्र व सात्त्विक अंश तो विष्णू होय. तो प्रजापतीच अशा प्रकारे त्रिमूर्ती बनला आहे.

महाभारतात एका ठिकाणी ब्रह्मा, विष्णू व रुद्र ही प्रजापतीची उत्पादक, संरक्षक व संहारक रूपे असल्याचे म्हटले आहे ( म. भा. वन. २७२.४६ ).

त्रिमूर्तींची ही कल्पना पुढे बहुतेक सर्व पुराणांनी स्वीकारली. फरक असेल, तर तो एवढाच, की भिन्न संप्रदायांनी भिन्न देवतेला श्रेष्ठत्व दिले. उदा० शैव संप्रदायात शिवाला, तर वैष्णव संप्रदायात विष्णूला प्राधान्य मिळाले. सरस्वती, लक्ष्मी व उमा या वरील तीन देवांच्या पत्नी व शक्ती असल्यामुळे कालांतराने त्यांच्याही त्रिमूर्तीची कल्पना उदय पावली.

बौद्धांच्या महायान पंथातही त्रिमूर्तिकल्पनेचा स्वीकार केलेला आहे. मंजुश्री, अवलोकितेश्वर व वज्रपाणी ही बौद्धांची त्रिमूर्ती होय. कामिकागमात त्रिमूर्तीचे रूपध्यान आहे, ते असे–

रक्तवर्ण, चतुर्भुज, एका हाती परशू, दुसऱ्या हाती मृग, उरलेले दोन हात अभय व वरद मुद्रेत, मध्ये शिवमुख, त्याच्या डाव्या अंगी ब्रह्मा व उजव्या अंगी विष्णू.

त्रिमूर्तिकल्पना पुराणातून मूर्तिकलेतही प्रविष्ट झाली. त्रिमूर्तीची शिल्पे भारतीय मूर्तिसंभारात अनेक आहेत. घारापुरी येथील त्रिमूर्तिशिल्प अत्यंत भव्योदात्त आहे. मात्र त्यातील तीन मुखांचा संकेत वेगळा आहे. (घारापुरी पाहा.)

भारतीय संस्कृतीला त्रिकाचे विशेष कौतुक आहे. पुराणांत, दर्शनांत, नीतिशास्त्रांत सर्वत्र त्रिकाची महत्ता मानलेली आहे. उदा० तीन लोक, तीन मार्ग, तीन गुण, तीन ऋणे इत्यादी. या त्रिकाने विश्व तर व्यापले आहेच आणि मानवी जीवनातही स्थान मिळवले आहे.

विश्वाचे स्वरूप त्रिगुणात्मकच आहे. सुख व प्रकाश हा सत्त्व गुणाचा परिणाम, प्रवृत्ती व धडपड हा रजोगुणाचा परिणाम आणि आवरण, प्रतिबंध, मोह व अज्ञान ही तमोगुणाची परिणती आहे. त्रिगुण हेच विश्वाचे मूळ कारण आहे. त्यांच्या मिश्रणातूनच हा विश्वप्रपंच उभा झाला आहे. त्रिमूर्तिकल्पनेविषयी डॉ. वासुदेव शरण अग्रवाल पुढीलप्रमाणे लिहितात —

भारतीय कलेने आपल्या अर्थाच्या अभिव्यक्तीसाठी अनेक मनोहर सूत्रे निर्माण केली आहेत. त्रिमूर्ती हे एक त्यापैकीच



त्रिमूर्ती – देवांगन (राजस्थान)

सूत्र होय. या कल्पनेच्या मागे दार्शनिक चिंतनाचा रहस्यमय असा संकेत आहे. प्रणवापासून त्रैगुण्यापर्यंतच्या विराट भावांच्या अभिव्यक्तीसाठी भारतीय कलावंतांनी त्रिमूर्ती हे एक प्रतीक निर्माण केले. त्यामुळे त्रिमूर्ती ही भारतीय दर्शनाची प्रतिमाच बनली. [ मू. वि.; एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को.]

**त्रिरत्न** एक बौद्ध कल्पना. बुद्ध, धर्म आणि संघ या त्रयीला बौद्ध वाङ्मयात त्रिरत्न म्हणतात. बुद्ध हे आध्या-



त्रिरत्न – धर्म, बुद्ध व संघ ( स्त्रीरूपात )

त्मिक तत्त्व असून, ते सर्व गोष्टींचे मूलकारण होय. धर्म हे भौतिक तत्त्व असून, ते जगांचे घटनात्मक कारण आहे. संघ हे

बुद्ध व धर्म यांचे मिश्रण असून, ते विश्वाचे गुणात्मक कारण होय. प्रत्येक बौद्धाने सकाळ-संध्याकाळ नियमाने त्रिरत्नवंदना करावी असे सांगितले आहे. ही वंदना केल्याने चित्ताला शांतता लाभते, मनाला समाधान मिळते आणि पुण्यप्राप्ती होते, असे मानतात.

बुद्धं सरणं गच्छामि
धम्मं सरणं गच्छामि
संघं सरणं गच्छामि

हा त्रिरत्नवंदनेचा मंत्र आहे. [ गॉ. नॉ. बु.; बौद्धचर्याविधि ]

**त्रिरात्रतुलसीव्रत** कार्तिक शुद्ध नवमीपासून तीन दिवस हे व्रत करतात. लक्ष्मी-नारायणांच्या सुवर्णमूर्तीची तुळशीखाली पूजा, विष्णुहोम, विष्णुश्राद्ध, दांपत्य-पूजा व द्वादशीला व्रताची सांगता, असा याचा विधी आहे. फल – संतती, संपत्ती व स्वर्ग यांची प्राप्ती.

**त्रिरात्रव्रत** नवविवाहित दंपतीसाठी एक व्रत. हे काम्य आहे. विवाह झाल्यावर पतिपत्नींनी तीन रात्री जमिनीवर एकाच शय्येवर शयन करावे; पण समागम मात्र करू नये, असे याचे विधान आहे. त्या अवधीत केवळ दहीभात भक्षण करावा, मीठ व तिखट घातलेले पदार्थ खाऊ नयेत आणि सकाळ-संध्याकाळ विवाहाग्नीची सेवा करावी, असेही गृह्यसूत्रात सांगितले आहे. या काळात पुत्रप्राप्तीसाठी पत्नीने पुढील मंत्र म्हणून अग्नीत पहिली आहुती द्यावी, असे शांखायन गृह्यसूत्रात (१. १७. ९) सांगितले आहे–

पुमांसौ मित्रावरुणौ पुमांसावश्विनावुभौ ।
पुमानिन्द्रश्चाग्निश्च पुमांसं वर्धतां मयि ॥

अर्थ – मित्र व वरुण हे दोघे पुरुष आहेत, दोघे अश्विन पुरुष आहेत, इंद्र व अग्नी हेही पुरुष आहेत. माझ्या गर्भात पुत्र वाढो. तेजस्वी पुत्राच्या प्राप्तीसाठी हे व्रत सांगितले आहे.

उपनयनविधीनंतर बटूनेही एक त्रिरात्रव्रत करायचे असते. पाहा – उपनयन. [ इं. वे. क. सू. ]

**त्रिलोकतीज** एक जैन व्रत. या व्रताचा कालावधी तीन वर्षांचा असतो. प्रतिवर्षी भाद्रपद शु. तृतीयेला उपवास करणे व 'ओं ऱ्हीं त्रिलोकसम्बन्धिअकृत्रिमजिन-चैत्यालयेभ्यो नमः ।' या मंत्राचा त्रिकाल जप करणे असा याचा विधी आहे. या व्रताची कथा अशी–

कुरुजांगल देशातील हस्तिनापूर नगरात कामंदुक नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या पत्नीचे नाव कमललोचन आणि मुलाचे नाव विशाखदत्त असे होते. त्या राजाचा वरदत्त नावाचा प्रधान होता. त्याच्या पत्नीचे नाव विशालाक्षी आणि मुलीचे नाव विजयसुंदरी असे होते. विजयसुंदरीचा विवाह विशाखदत्ताशी झाला होता. काही काळानंतर कामंदुक राजा मरण पावला आणि विशाखदत्त राज्यावर आला. पित्याच्या मृत्यूमुळे विशाखदत्त उदास होऊन बसला असता, ज्ञानसागर नामक जैन मुनीने त्याला धर्मोपदेश करून धीर दिला. राणी विजयसुंदरीने मानसिक शांतीसाठी अर्जिका देवतेकडून त्रिलोकतीज हे व्रत समजावून घेतले आणि त्या व्रताचे पालन करून देहत्यागानंतर सोळाव्या स्वर्गात स्थान मिळविले.

नंतर तिने मगध देशातील कांचनपूर नगरात पिंगल राजाच्या घरी सुमंगल या नावाने पुरुषाचा जन्म घेतला. सुमंगल एकदा आपल्या मित्रांसह वनक्रीडेसाठी गेला असता तिथे एका दिगंबर मुनीला पाहून त्याच्या मनात मोह निर्माण झाला. त्याने मुनीला वंदन करून आपल्या मनात मोह निर्माण होण्याचे कारण विचारले. मुनीने त्याला त्याच्या पूर्वजन्माचे वृत्त समजावून सांगितल्यावर त्याला जगताची असारता पटली आणि त्याने जिनेश्वरी दीक्षा घेऊन तपश्चर्येने मोक्षप्राप्ती करून घेतली. [ जै. क.; जै. व्र. वि. सं. ]

**त्रिलोकनाथ** कुलू खोऱ्यातील एक शैव क्षेत्र. इथले त्रिलोकनाथाचे मंदिर छोटे, परंतु सुंदर आहे. त्रिलोकनाथाची मूर्ती शुभ्र संगमरवराची आहे. या मूर्तीच्या मस्तकावर आणखी एक पद्मासनस्थ मूर्ती आहे, तिला अनाज (अनादी) गुरू म्हणतात.

या देवासमोर तुपाच्या दोन ज्योती अखंड जळत असतात. दोन्ही ज्योतींना मिळून एका वर्षात बारा मण तूप लागते, असे सांगतात. त्रिलोकनाथाच्या दर्शनाला येणारे लोक या ज्योतींसाठी तूप आणतात. [ कल्याण–तीर्थांक ]

**त्रिलोकप्रज्ञप्ती** एक जैन शास्त्रग्रंथ. यतिवृषभ हा या ग्रंथाचा कर्ता होय. करणानुयोगावरील हा प्राचीन ग्रंथ प्राकृत भाषेत असून, त्यात एकूण आठ हजार श्लोक आहेत. हा ग्रंथ दिगंबर जैनांच्या प्राचीनतम श्रुतांगाशी संबंधित आहे. त्रिलोकप्रज्ञप्ती म्हणजे त्रिलोकासंबंधीचे ज्ञान हाच या ग्रंथाचा विषय आहे. यात सामान्यलोक, नारकलोक, भवनवासीलोक, मनुष्यलोक, तिर्यग्लोक, व्यन्तरलोक, ज्योतिर्लोक, देवलोक आणि सिद्धलोक असे नऊ विभाग आहेत. या ग्रंथात प्राधान्याने भूलोक आणि खगोल यांचे वर्णन केलेले असून, प्रसंगवशात जैन सिद्धांत, पुराणे आणि इतिहास यांवरही प्रकाश

टाकलेला आहे. विवेचनाच्या ओघात आलेल्या सूक्ती मार्मिक आहेत. त्यांपैकी एक सूक्ती अशी—

अंधो णिवडइ कूवे बहिरो ण सुणेदि साधु उवदेसं ।
पेच्छंतो णिसुणंतो णिरएजं पडइ तं चोज्जं ।।

अर्थ – आंधळा मनुष्य विहिरीत पडतो आणि बहिरा मनुष्य साधूचा उपदेश ऐकत नाही, यात काहीच आश्चर्य नाही. परंतु आश्चर्याची गोष्ट ही, की ज्याला पाहता आणि ऐकता येते, असा जीवही नरकात जाऊन पडतो.

या ग्रंथात आग्रायणी, परिकर्म, लोकविभाग व लोकविनिश्चय या प्राचीन ग्रंथांचे उल्लेख आहेत. [ प्रा. सा. इ. ]

**त्रिलोकसार** एक जैन धार्मिक ग्रंथ. हा करणानुयोगाचा सुप्रसिद्ध ग्रंथ असून, यात एकूण १०१८ परंपरागत प्राचीन गाथांचा संग्रह केलेला आहे. या ग्रंथाची रचना चामुंडरायासाठी झालेली आहे. यात सामान्यलोक, भवनवासीलोक, व्यंतरलोक, ज्योतिर्लोक, वैमानिकलोक आणि तिर्यग्लोक यांचे वर्णन आहे. [ प्रा. सा. इ. ]

**त्रिलोचन** ( इ. स. चे तेरावे–चौदावे शतक ) एक वैष्णव संत. फर्कहरने याचे जन्मवर्ष इ. स. १३२४ असे दिले आहे. हा मूळचा महाराष्ट्रीय असून, नामदेवाच्या प्रमुख शिष्यांपैकी एक होता. पण याची मराठी काव्यरचना उपलब्ध नाही. नामदेव आणि त्रिलोचन यांच्यामध्ये झालेल्या आध्यात्मिक चर्चेसंबंधी काही हिंदी दोहे उपलब्ध आहेत. हा काही काळ पंढरपुरात राहत होता; परंतु पुढे तो नामदेवाबरोबरच पंजाबात गेला असावा. याची चार हिंदी पदे गुरुग्रंथसाहेबात समाविष्ट आहेत. त्यांपैकी एक पद असे –

अन्तकालि जो लछमी सिमरै,
ऐसी चिन्तामहि जो मरै ।
सरप जोनि बलि बलि अउतरै ।।१।।
अरी बाई ! गोविन्द नाम मति बीसरै ।। धृ ।।
अन्तकालि जो इस्त्री सिमरै,
ऐसी चिन्तामहि जो मरै ।
वेसवा जोनि बलि बलि अउतरै ।।२।।
अन्तकालि जो लडिके सिमरै,
ऐसी चिन्तामहि जो मरै ।
सूकर जोनि बलि बलि अउतरै ।।३।।
अंतकालि जो मंदिर सिमरै,
ऐसी चिन्तामहि जो मरै ।
प्रेत जोनि बलि बलि अउतरै ।।४।।
अंतकालि जो नारायण सिमरै,
ऐसी चिन्तामहि जो मरै ।
बदत त्रिलोचन ते नर मुक्ता,
पीतांबर वाके हृदय बसै ।।५।।

अर्थ – जो अंतकाळी गोविंदाचे नाम विसरून लक्ष्मीचे स्मरण करीत मरतो, त्याला निश्चयाने सर्पयोनी प्राप्त होते. जो अंतकाळी स्त्रीचे स्मरण करीत मरतो, त्याला निश्चयाने वेश्यायोनी प्राप्त होते. जो अंतकाळी मुलांचे स्मरण करीत मरतो, त्याला डुकराची योनी प्राप्त होते. जो अंतकाळी घराची चिंता करीत मरतो, त्याला पिशाचयोनी प्राप्त होते. त्रिलोचन म्हणतो, की जो अंतकाळी नारायणाचे स्मरण करीत मरतो, तो नर मुक्त समजावा. त्याच्या हृदयात पीतांबरधारी विष्णू निवास करतो.

याच्या पदांची भाषा शुद्ध व्रज नाही. तिच्यामध्ये रेख्ता शैलीच्या हिंदीचे प्राधान्य आहे. नाभाजीच्या मते हा विष्णुस्वामीच्या रुद्रसंप्रदायाचा अनुयायी होता. याच्या घरी भगवान सेवक बनून राहत होता, अशी एक दंतकथा प्रचलित आहे. [ सू. व्र. सा.; हिं. सा. को.; हिं. क. को.; श्री. रा. वा. चिटणीस–इंद्रायणी, मार्च – एप्रिल १९६४ ]

**त्रिलोचनाष्टमी** एक व्रत. हे व्रत ज्येष्ठ वद्य अष्टमीला करतात. या दिवशी त्रिलोचनाची म्हणजे शिवाची पूजा केल्याने शिवलोकाची प्राप्ती होते, असे भविष्य पुराणात आणि उत्तरकामाख्या तंत्रात म्हटले आहे. [ श. क. ]

**त्रिविक्रम** (तीन विक्रम = आक्रमणे ज्याची असा) विष्णूचे एक रूप. विष्णूच्या चौवीस नामांत याचा समावेश केलेला आहे. तीन वेळा पृथ्वीला आक्रमिणाऱ्या विष्णूचा उल्लेख ऋग्वेदात आलेला आहे, तो असा —

त्रिर्देवः पृथिवीमेष एतां वि चक्रमे शतर्चसं महित्वा ।
प्र विष्णुरस्तु तवसस्तवीयान् त्वेषं ह्यस्य स्थविरस्य नाम ।।
वि चक्रमे पृथिवीमेष एतां क्षेत्राय विष्णुर्मनुषे दशस्यन् ।
ध्रुवासो अस्य कीरयो जनास उरुक्षितिं सुजनिमा चकार ।।
(ऋ. ७·१००·३–४)

अर्थ – शेकडो ज्वालामुखींनी परिवेष्टित अशा या पृथ्वीचे या देवाने आपल्या महिम्याने तीनदा आक्रमण केले, म्हणूनच ज्या ज्या विभूती प्रभावशाली आहेत, त्यांच्यामध्ये विष्णू अत्यंत प्रभावशाली ठरला. त्यामुळेच या पुराणपुरुषाचे नाव तसेच प्रखर आहे. मनुष्यांना राहण्यासाठी आणि कृषिकर्मासाठी (पृथ्वी योग्य व्हावी म्हणून) विष्णूने या पृथ्वीचे तीन वेळा आक्रमण केले. त्या योगाने त्याचे उद्यमशील भक्तजन निश्चिंत झाले.

पवित्र कीर्तीच्या विष्णूने त्यांची निवासस्थाने प्रशस्त केली.

काही अभ्यासकांच्या मते सूर्याच्या उदय, मध्यान्ह व अस्त या तीन अवस्थांचे हे वर्णन आहे. काही टीकाकारांचे म्हणणे असे की पृथ्वी, वातावरण व आकाश या तीन ठिकाणी आढळणारी अग्नी, वायू व सूर्य ही तीन रूपेच वरील ऋचांत वर्णिलेली आहेत. ऋग्वेदात उल्लेखिलेल्या या त्रिविक्रमरूपी विष्णूवरूनच पुराणातील वामनकथेचा उगम झालेला आहे. दोन पावलांनी स्वर्ग व पृथ्वी व्यापून, तिसऱ्या पावलाने बळीला पाताळात दडपणाऱ्या वामनाच्या विराट रूपाची अनेक वर्णने पुराणांत आढळतात. म्हणून वायू पुराणात त्रिविक्रमाला ब्रह्मपुरुषोत्तम असेच म्हटले आहे. वैखानस आगमात त्रिविक्रममूर्तीचा विस्तृत तपशील दिलेला आहे.

मूर्तिविद्येत त्रिविक्रमाचा डावा पाय वर उचललेला असावा, असे सांगितले आहे. परंतु होयसळ शिल्पात त्रिविक्रममूर्तीचा उजवा पाय वर उचललेला असतो.

भारतात त्रिविक्रमाच्या अनेक प्राचीन व उत्कृष्ट मूर्ती अस्तित्वात आहेत. महाबलिपुरम येथील मूर्ती वैखानस आगमातील वर्णनाप्रमाणे आहे. तिथल्या मूर्तीला आठ हात असून, एक पाय स्वर्ग व्यापायला उभा झाला आहे. बदामीच्या आणि वेरूळच्या लेण्यांतील भव्य त्रिविक्रममूर्ती प्रेक्षणीय आहेत. खानदेशातील शेंदुर्णी (ता. जामनेर, जि. जळगाव) या गावी जमिनीत सापडलेली तीन फूट उंचीची काळ्या पाषाणाची त्रिविक्रममूर्ती मूर्तिशिल्पाच्या दृष्टीने उत्कृष्ट आहे. या मूर्तीला अंगचीच प्रभावळ असून, तिच्यावर अनेक देवतांच्या लहान लहान मूर्ती कोरलेल्या आहेत. पाहा – वामन. [डे. हिं. इ.; हिं. कॅ. इ. पें.; पु. इं.; मू. वि.; हिं. मा. रि.; श्री. के. ना. पदे – पुरुषार्थ, ऑक्टो. – नोव्हें. १९६३]

**त्रिविक्रम पंडित** (इ. स. चे १३ वे शतक) एक द्वैती आचार्य. हा द. भारतात काकमठ येथे राहत असे. सुब्रह्मण्यभट्ट हे याच्या वडिलांचे नाव होते. श्रीविष्णूच्या उपासनेने त्यांना उतारवयात हा मुलगा झाला. त्रिविक्रम हा लहानपणापासूनच बुद्धिमान होता. त्याचे सारे अध्ययन बापापाशीच झाले. काव्यशास्त्राचे अध्ययन पूर्ण झाल्यावर त्याने अद्वैतवेदान्ताचा अभ्यास सुरू केला. पण त्या दर्शनातील कित्येक सिद्धान्त त्याला पटनात; म्हणून मग वडिलांच्या परवानगीने तो भक्तिमार्गाकडे वळला.

पुढे एकदा मध्वाचार्यांशी त्याचा वादविवाद झाला. त्या वादात त्रिविक्रमाचा पराजय झाला. मग त्याने मध्वाचार्यांचे शिष्यत्व पत्करून त्यांच्यापाशी द्वैतमताचा अभ्यास सुरू केला. थोडयाच कालात तो माध्वमताचा मोठा पंडित बनला. मग मध्वाचार्यांच्या आज्ञेवरून त्याने त्यांच्या भाष्यावर तत्त्वप्रदीप नावाचा टीकाग्रंथ रचला. तो पाहून मध्वाचार्यांना परम संतोष झाला.

उषाहरण नावाचे एक काव्यही याने रचले आहे. ते कालिदासाच्या शाकुंतलासारखे लोकप्रिय झाले. आयुष्यभर हा माध्वमताचा प्रसार करीत राहिला. [श्री. म. त.]

**त्रिविक्रमभट्ट** (इ. स. चे दहावे शतक). एक संस्कृत ग्रंथकार. हा शांडिल्यगोत्री ब्राह्मण होता. याच्या पितामहाचे नाव श्रीधर आणि पित्याचे नाव नेमादित्य असे होते. हा राष्ट्रकूटांचा दरबारी पंडित होता. याने मदालसाचंपू व नलचंपू असे दोन चंपूग्रंथ रचले आहेत.

नलचंपूच्या निर्मितीविषयीची एक आख्यायिका त्या ग्रंथावरील विवृती नामक टीकेत दिलेली आहे, ती अशी—

त्रिविक्रमाचा पिता नेमादित्य हा राजाच्या पदरी सभापंडित म्हणून असताना त्याला एकदा परगावी जावे लागले. एवढ्यात कोणी एक पंडित दिग्विजयाच्या लालसेने त्या दरबारात आला आणि त्याने राजसभेतील पंडितांशी शास्त्रचर्चा करण्याची इच्छा प्रदर्शित केली. हे वृत्त त्रिविक्रमाच्या कानी येताच त्याने त्या पंडिताशी शास्त्रार्थ करण्याचे ठरवले. त्या वेळी सभेत जाताना त्याने सरस्वतीची प्रार्थना केली, की 'माझ्या पित्याची आणि आश्रयदात्या राजाची प्रतिष्ठा टिकवण्याचे सामर्थ्य मला दे.' सरस्वतीने त्याला आशीर्वाद दिला, की 'जोवर तुझा पिता इथे उपस्थित होत नाही, तोवर मी तुझ्या जिव्हाग्री वास करीन.'

सरस्वतीकडून हे वरदान मिळवून त्रिविक्रम राजसभेत गेला आणि त्याने त्या विद्वानाला शास्त्रचर्चेत पराभूत केले. त्यानंतर लगेच त्याने नलचंपू हा ग्रंथ रचायला प्रारंभ केला. परंतु त्याचा सातवा उच्छ्वास पुरा होतो आहे, एवढ्यात नेमादित्य घरी परत आला. तो येताच त्रिविक्रमाची प्रतिभा लुप्त झाली.

त्रिविक्रम हा सुप्रसिद्ध ज्योतिर्गणिती भास्कराचार्य याचा सहावा पूर्वज होय. त्याला कविचक्रवर्ती असे बिरुद लाभले होते, असे भास्कराचार्यांचा नातू चंगदेव याच्या पाटण शिलालेखावरून दिसते. त्रिविक्रमाचे घराणे सह्यपर्वताश्रित विज्जलविड नामक गावी नांदत होते. त्याच्या घराण्यात ज्ञानोपासनेची परंपरा सात–आठ पिढ्यांपर्यंत चालू राहिल्याचे दिसते.

नलचंपू हा संस्कृत चंपूवाङ्मयातील एक उत्तम ग्रंथ आहे. त्याला दमयंतीकथा असे दुसरे नाव आहे. ग्रंथारंभी कवीने शिवस्तुती, कविप्रशंसा व खलनिंदा करून वाल्मीकी, व्यास बाण आणि गुणाढ्य या कविश्रेष्ठांचा गौरव केला आहे. हा

ग्रंथ श्लेषबद्ध आहे. यात संक्षिप्त कविचरित्रही दिलेले आहे. त्रिविक्रमाच्या मदालसाचंपूविषयी काहीच माहिती मिळत नाही. पाहा – चंपूवाङ्मय. [ सं. सा. इ.; भा. ज्यो. शा. ]

**त्रिविक्रमव्रत** एक काम्य व्रत याचे निरनिराळे पर्याय आहेत. ते असे– (१) कार्तिक, मार्गशीर्ष व पौष या तीन महिन्यांत विष्णू व सूर्य यांची पूजा करणे, असा याचा विधी आहे. या व्रतात एक वेळ जेवतात व दुसऱ्या वेळचे अन्न ब्राह्मणाला वाढतात. व्रतावधी तीन वर्षे. फल – त्रिविध तापांचा नाश.

(२) कोणत्याही महिन्याच्या शुद्ध तृतीयेला या व्रताचा आरंभ करतात. त्रिविक्रम आणि लक्ष्मी यांची पूजा व 'त्रिविक्रमाय नमः' या मंत्राने होम करणे, असा याचा विधी आहे. व्रतावधी – तीन किंवा बारा वर्षे. फल – आरोग्य व धन यांचा लाभ.

(३) ज्येष्ठ शुद्ध द्वितीयेला उपवास आणि तृतीयेला सकाळी अग्नीची पूजा व सायंकाळी सूर्याची पूजा करून नंतर नक्त व विष्णूच्या तीन पावलांची पूजा करतात. व्रतावधी – एक वर्ष. फल – विष्णुलोकप्राप्ती.

(४) मार्गशीर्ष शुद्ध नवमीला आरंभ करून तीन दिवस व तीन रात्री उपवास आणि वासुदेवाची पूजा. प्रत्येक महिन्यात दोनदा, अशी १०० त्रिरात्रव्रते करण्यास चार वर्षे व दोन अधिक मास लागतात. फल – स्वर्गप्राप्ती. [ हि. ध. ]

**त्रिवृत्करण** सृष्ट्युत्पत्तीची एक प्रक्रिया. याची व्याख्या अशी –'त्रिवृतस्त्र्यवयवस्य करणं मिश्रीकरणम्' (= तीन अवयवांचे मिश्रण करणे म्हणजे त्रिवृत्करण होय). उपनिषदात सृष्टीच्या उत्पत्तीविषयी अनेक मते आढळतात. प्रस्तुत मत छांदोग्योपनिषदात आरुणीने श्वेतकेतूला सांगितले आहे, ते असे—

सृष्टीच्या प्रारंभी जे काही होते, ते भावरूप व अद्वितीय होते. या भावरूप सत्तत्त्वापासून क्रमाने तेज, आप व पृथ्वी ही भूते उत्पन्न झाली. तेज, आप व पृथ्वी या तीन तत्त्वांच्या मिश्रणाने म्हणजेच त्रिवृत्करणाने सर्व सृष्टी निर्माण झाली.

या त्रिविध प्रकृतीला 'तेजोऽबन्नात्मिका' (= तेज, आप व अन्न एतद्रूप) म्हटले आहे. तिची प्रक्रिया अशी—

तेजोजलक्षितयः प्रत्येकं द्वेधा विभज्य
एकस्मिन् अर्धे स्वेतरयोः अर्धार्धं प्रक्षिपेत् ।
( मोक्षधर्मटीका )

अर्थ – पृथ्वी, आप व तेज या महाभूतांचे प्रत्येकी दोन समान भाग करावे. अर्धा भाग तसाच ठेवावा. राहिलेल्या अर्ध्या भागाचे दोन पोटभाग करावे. नंतर प्रत्येक द्रव्याचा मूळ अर्धा भाग घेऊन तो शेष दोन द्रव्यांच्या पोटभागांबरोबर (चतुर्थांशाबरोबर) मिसळावा.

'असे केल्याने प्रत्येक द्रव्यामध्ये त्याचा स्वतःचा अर्धा भाग आणि इतर दोन द्रव्यांचे चतुर्थांश असतात. याची मांडणी अशी– प्रत्येकी $\frac{1}{4}$ (पृथ्वी व आप) + $\frac{1}{2}$ तेज = स्थूल तेज. प्रत्येकी $\frac{1}{4}$ (पृथ्वी व तेज) + $\frac{1}{2}$ आप = स्थूल आप. आणि प्रत्येकी $\frac{1}{4}$ (तेज व आप) + $\frac{1}{2}$ पृथ्वी = स्थूल पृथ्वी.

वैदिक ग्रंथांत त्रिवृत्करणाचा उल्लेख आहे; पण पंचीकरणाचा नाही. पुढील कालात त्रिवृत्करण मागे पडून पंचीकरण प्रस्थापित झाले. पण वाचस्पती आणि अमलानंद हे पंचीकरणापेक्षा त्रिवृत्करणालाच प्राधान्य देतात. त्यांच्या मते आकाश आणि वायू यांत अन्य द्रव्यांचे भाग (परमाणू) आहेत, असे म्हणता येत नाही. पण काहींच्या मते भ्रमात्मक ज्ञानाच्या बाबतीत त्रिवृत्करणसिद्धान्त तितकासा उपकारक नाही. कारण त्रिवृत्करणामुळे भूतांच्या मिश्रणाचे स्पष्टीकरण करता येते, पण भौतिकांचे, किंवा पाच द्रव्यांचे विविध पदार्थांत रूपांतर कसे होते, याचे स्पष्टीकरण करता येत नाही.

निम्बार्काचार्यांच्या द्वैताद्वैतदर्शनात त्रिवृत्करणाचा उल्लेख आहे. तदनुसार शरीराची उत्पत्ती सांगताना पृथ्वीपासून विष्ठा, मांस आणि मन; जलापासून मूत्र, रक्त आणि प्राण व तेजापासून हाडे, मज्जा आणि वाक् ही शरीरात निर्माण होतात, असे तिथे म्हटले आहे (वेदान्तपारिजातसौरभ). पाहा– पंचीकरण. [ उ. र.; भा. द.–मिश्र; हि. इं. फि.; उपनिषत्सार ]

**त्रिवेणी** एक राग. याला तिरवन असेही म्हणतात. हा पूर्वीमेलातून निघाला आहे. यात श्री रागाचे अंग असून, देसकार, पूर्वी व गौरी या रागांचे मिश्रण आहे. म्हणूनच याला त्रिवेणी म्हणतात. याची जाती षाडव आहे. वादी – कोमल ऋषभ आरोहावरोहात मध्यम स्वर वर्ज्य. याशिवाय आरोहात निषाद व अवरोहात धैवत हेही वर्ज्य असतात. अवरोहात गंधार व पंचम यांची संगती मधुर लागते. क्वचित मध्यमही लावून संपूर्ण जाती करतात. पकडस्वर – प, ग, रे – रे, ग, प. गानसमय – सायंकाल. या रागाची वृत्ती श्रांत व मलूल आहे. [श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**त्रिवेणीघाट** एक तीर्थ. बिहारमधील चंपारण्य जिल्ह्याच्या वायव्येला गंडकी, पंचनद व शोण या नद्यांचा संगम झालेला आहे. या संगमावर एक घाट आहे. या

घाटाची एक बाजू नेपाळातील त्रिवेणी या गावाला लागून आहे. म्हणून या ठिकाणाला त्रिवेणीघाट असे म्हणतात.

भागवतातील गजेंद्रमोक्षाची कथा या संगमाच्या ठिकाणी घडली, अशी तिथल्या लोकांची समजूत आहे. जिथे ही लढाई झाली, तिथे सांप्रत हत्तीची व मगरीची पावले उमटलेली दाखतात. पंचनद नदीच्या दुसऱ्या किनाऱ्यावर एक नेपाळी देवालय आहे. त्याचप्रमाणे शोण नदीच्या तीरावर एक सीतेचे मंदिर आहे. रामचंद्र व त्याचे पुत्र लव–कुश यांच्यांत युद्ध झाले, ते सीतेने या ठिकाणी बसून पाहिले, अशी या मंदिराबद्दल आख्यायिका सांगतात.

माघ महिन्यात इथे मोठी यात्रा भरते. त्या वेळी हजारो लोक या संगमात स्नान करतात.

पंचनद व शोण या दोन्ही नद्यांच्या संगमात सोने सापडते, म्हणून सदर प्रवाहांना लहान लहान बांध घालून त्यातून सोने काढण्याचा धंदा काही लोक करतात. [ चंपा. गँझे. ]

**त्रिवेणीसंगम** प्रयाग पाहा.

**त्रिवेंद्रम** केरळातील एक प्राचीन नगर आणि वैष्णव क्षेत्र. याचे मूळ नाव तिरुअनंतपुरम असे आहे. तिरुअनंतपुरम म्हणजे अनंताचे पवित्र नगर होय. इथे अनंतपद्मनाभ अथवा अनंतशयन या नावाने शेषशायी विष्णूचे मंदिर आहे.

केरळातले हे सर्वांत मोठे नगर असून, ते समुद्र किनाऱ्यापासून दोन मैल अंतरावर आहे. इथे एक किल्ला आहे. या किल्ल्याच्या परकोटाच्या आत अनंतपद्मनाभाचे मंदिर आहे. हे मंदिर विशाल असून, त्याचे प्रवेशद्वार पूर्वाभिमुख आहे. गर्भगृह काळ्या कसोटीच्या दगडांनी बांधलेले आहे. गर्भगृहात शेषशायी विष्णूची प्रचंड मूर्ती असून, त्याच्या नाभीतून निघालेल्या कमळावर ब्रह्मा विराजमान आहे. विष्णूचा उजवा हात शिवलिंगावर ठेवलेला आहे. गर्भगृहाला समोरच तीन द्वारे आहेत. डाव्या द्वारातून मूर्तीच्या श्रीमुखाचे दर्शन होते. मधल्या द्वारातून वक्षःस्थल आणि नाभिकमल दिसते आणि उजव्या द्वारातून चरणांचे दर्शन घडते.

महाभारतात या क्षेत्राचा उल्लेख आहे. अनेक पुराणांत या क्षेत्राच्या माहात्म्यकथा ग्रथित आहेत. त्यांपैकी एक कथा अशी –

प्राचीन काळी इथे अनंतवन नावाचे एक अरण्य होते. त्या अरण्यात पुलया नावाचे आदिवासी लोक राहत असत. इथून जवळच्याच एका नगरात कोणी दिवाकर नावाचा विष्णुभक्त राहत होता. त्याच्या भक्तीवर मोहित होऊन भगवान विष्णू एका बालकाच्या रूपाने त्याच्या घरी राहू लागला. काही दिवसानंतर तो बालक अंतर्धान पावला. त्या वेळी त्याने दिवाकराला म्हटले, की ‘ माझे पुनश्च दर्शन घ्यायचे असेल, तर अनंतवनात ये.’

आपल्या घरी साक्षात भगवान विष्णूच बालकाच्या रूपाने राहत होता, हे समजल्यावर दिवाकर त्याच्या शोधासाठी अनंतवनाकडे निघाला. इकडे एका कनकवृक्षाखाली देव बालकाच्याच रूपाने प्रकट झालेला होता. तिथे एक पुलया स्त्री त्याला रोज नारळाच्या करवंटीतून तांदुळाची खीर पाजीत असे. दिवाकर अनंतवनात येऊन पोचला, तोच त्याला तो बालक कनकवृक्षाच्या ढोलीत प्रवेश करताना दिसला. त्या बालकाने आत प्रवेश करताच तो वृक्ष कोसळून पडला आणि आश्चर्य असे, की त्या कोसळलेल्या वृक्षाच्या जागी दिवाकराला शेषशायीची सहा कोस लांब अशी विराट मूर्ती दिसली. दिवाकराने त्या विराट रूपाचे दर्शन घेऊन त्याला लघुरूप स्वीकारण्याची विनंती केली.

त्या विराट रूपाच्या नाभिकमळाचे दर्शन ज्या ठिकाणी झाले, त्या ठिकाणी दिवाकराने मोठे मंदिर उभारले आणि त्या मंदिरात त्या कोसळलेल्या कनकवृक्षाच्या लाकडाचीच मूर्ती बनवून तिची स्थापना केली.

कालांतराने ते मूळचे मंदिर आणि काष्ठमूर्ती जीर्ण झाल्यावर इ. स. १०४९ मध्ये सध्याचे विशाल मंदिर बांधले गेले. इ. स. ११६५ मधील इथल्या एका शिलालेखात या जीर्णोद्धाराचा उल्लेख मिळतो. याच वेळी बारा हजार शाळिग्राम आत ठेवून कटुशर्करायोगाने अनंतपद्मनाभाची मूर्ती बनविण्यात आली.

या मंदिरातले पूजोपचार आगमोक्त पद्धतीने होतात. बालरूपी विष्णूला पुलया स्त्री नारळाच्या करवंटीतून खीर पाजीत असे, अशी पुराणकथा असल्यामुळे आजही नैवेद्याची तीच प्रथा चालू आहे. इथे वर्षातून दोन उत्सव साजरे होतात. एक मीन राशीत सूर्य गेल्यावर फाल्गुनात आणि दुसरा तूळ राशीत सूर्य गेल्यावर अश्विनात. हे उत्सव नऊ दिवस चालतात. उत्सवाच्या पहिल्या दिवशी ध्वज उभारतात. याला दक्षिणेत कोडियेन्नम असे म्हणतात. नवव्या दिवशी देवाची मोठी मिरवणूक निघते. या मिरवणुकीत त्रावणकोरचा राजा भाग घेतो. अनंतपद्मनाभ हा त्रावणकोरच्या राजघराण्याचा कुलदेवच आहे.

इ. स. १७५० मध्ये मार्तंडवर्मा नामक त्रावणकोरच्या राजाने आपले राज्य समारंभपूर्वक अनंतपद्मनाभाच्या चरणी

अर्पण केले. तेव्हापासून या राजघराण्यातील लोक आपणांला श्रीपद्‌मनाभदास म्हणवून घेऊ लागले. आपले राज्य हे देवाचे राज्य असून, आपण केवळ त्याचे प्रतिनिधी आहो, अशा समजुतीने ते राज्य चालवीत. [ श्री. ज. ह. दवे – भारती, मार्च १९५९; कल्याण – तीर्थांक. ]

**त्रिव्यर** एक पुण्यक्षेत्र. तंजाऊरपासून आठ मैलांवर हे स्थान आहे. इथल्या पंचनद तीर्थात स्नान करण्यासाठी दरवर्षी लाखो लोक जमतात. इथले मंदिर न्यमिसर नावाच्या ऋषीने बांधले, असे सांगतात. या क्षेत्रासंबंधी एक दंतकथा आहे, ती अशी–

त्रिशूली नामक एक ब्राह्मण होता. बालपणी तो एकदा खेळत असता एक ऋषी भिक्षेसाठी तिथे आला. खेळाच्या नादात त्रिशूलीने ऋषीला दगडाची भिक्षा घातली. ऋषी काही न बोलता तिथून निघून गेला. पुढे त्रिशूली वयात आल्यावर त्याचे लग्न झाले; परंतु त्याला संतती मात्र होईना. मग एके दिवशी त्या ऋषीने त्याच्या स्वप्नात जाऊन त्याला त्याच्या बालवयातील अपराधाची जाणीव दिली. त्यामुळे त्रिशूलीला पश्चात्ताप झाला. त्याने त्या अपराधाचे प्रायश्चित्त म्हणून दगडाचा आहार सुरू केला. ते पाहून लोक त्याला शिलाधरण असे म्हणू लागले. पुढे त्याच्या तपश्चर्येने देव प्रसन्न झाला. त्याने त्रिशूलीला वर दिला, की 'तुला एका पवित्र स्थानी एक मूल सापडेल.' तदनुसार शिलाधरण त्या मुलाचा शोध घेत हिंडू लागला. शेवटी ते मूल त्याला त्रिव्यर येथे सापडले. हे मूल म्हणजेच नंदी होय. त्याचे धड माणसाचे व शिर बैलाचे होते. त्याच्या बापाने जन्मताच त्याला टाकले होते. शिलाधरणाने त्या नंदीचा चांगल्या प्रकारे प्रतिपाल केला. पुढे शिवाने त्या मुलाला आपल्या गणांचा अधिपती नेमले.

या नंदीच्या नावानेच त्रिव्यर येथील उत्सव असतो. इथे जवळूनच कावेरी नदी वाहते. उत्सवाच्या वेळी कावेरीच्या जलाने नंदीला अभिषेक करतात. [ इं. अॅं. ]

**त्रिशिखिब्राह्मणोपनिषद** एक नव्य उपनिषद. हे शुक्ल यजुर्वेदाशी निगडित आहे. यात एकूण १६४ श्लोक आहेत. याचा श्रोता त्रिशिखी नामक ब्राह्मण असून, त्याला आदित्याने शरीर, प्राण, मूलकारण, आत्मा, इ. विषयांसंबंधीचे ज्ञान सांगितले आहे.

पंचीकरण व अष्टांग योग यांची विशेष चर्चा या उपनिषदात केलेली आहे. यात स्वस्तिकासनादी सतरा योगासने आणि त्यांच्या अभ्यासाने शरीरक्रियेवर होणारे परिणाम यांची सविस्तर माहिती दिलेली असून, कुंडलिनी जागृत करून मनोजय कसा साधावा, तेही स्पष्ट केले आहे. सगुण ब्रह्माची उपासना केल्यानेही मुक्ती मिळणे शक्य आहे, असे या उपनिषदाचे मत आहे. योगाभ्यास करणाऱ्यांना हे उपनिषद फार उपयुक्त आहे. [ श्री. सी. ग. देसाई ]

**त्रिशिरस त्वाष्ट्र** एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदातील १० व्या मंडलातले ९ वे सूक्त याच्या नावावर आहे. आपोदेवींची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. ही स्तुती करताना त्रिशिरस म्हणतो –

इदमापः प्रवहत यत् किञ्च दुरितं मयि ।
यद्वाहमभिदुद्रोह यद्वा शेप उतानृतम् ॥
आपो अद्यान्वचारिषं रसेन समगस्महि ।
पयस्वानग्न आगहि तं मा सं सृज वर्चसा ॥

(ऋ. १०. ९. ८–९)

**अर्थ** – हे आपोदेवींनो, माझ्यामध्ये जे जे पातक असेल, ते ते सर्व धुवून टाका. मी कोणाचा द्रोह केला असेल, कोणाला शाप दिला असेल किंवा काही खोटे बोललो असेन, तर तेही सर्व धुवून टाका. हे पाहा, तुम्हासन्निध मी प्राप्त झालो आहे; तर तुमच्या रसाशी आमचा योग घडेल असे करा. उदकातल्या अग्निदेवा, तू ये आणि मला आपल्या ओजस्वितेने युक्त कर.

जल हे सर्वरोगनिवारक आहे, हे वैद्यकशास्त्राचे मत या सूक्तात सांगितले आहे. त्रिशिरस म्हणतो – सोमाने मला असे सांगितले, की यच्चयावत् औषधे उदकात असतात. सर्वमंगल जो अग्नी तोही त्यात आहे. [ प्रा. च. को. ]

**त्रिशूल** एक प्राचीन आयुध. याला लांब दांडा आणि पुढे तीन टोके असतात. हे प्रामुख्याने शिवाचे आयुध समजले जाते. त्वष्ट्याने सूर्याचे वैष्णव तेज कानशीने घासून त्रिशूल तयार केला, असे मत्स्य आणि विष्णू या पुराणांत म्हटले आहे. त्रिशूल हे फार प्रभावी आयुध असून, ते प्रथम मोठ्या



त्रिशूल (शस्त्र)

आवेशाने फिरवून नंतर प्रतिस्पर्ध्याच्या अंगात खुपसतात, असा उल्लेख रामायणात आहे (वा. रा. ५. २४. ३९).

एक प्रतीक म्हणूनही त्रिशूल वापरला गेला आहे. अनेक देवतांच्या हाती त्रिशूल हे आयुध असते. शैव तंत्रात त्रिशूलाला महत्त्वाचे स्थान आहे. मोहेंजोदडोच्या उत्खननात त्रिशूल सापडला आहे. त्रिशूल हा तीन ज्वाळा असलेल्या अग्नीसारखा दिसत असल्यामुळे त्याचा ब्रह्ममूलाशी संबंध जोडतात. बौद्धांच्या त्रिरत्न आणि बोधिवृक्ष या प्रतीकांचे त्रिशूलाशी साम्य आहे. भरहूत, सांची व अमरावती येथील बौद्ध शिल्पांत स्तंभावर त्रिशूल कोरलेले आहेत. जुन्नर, भाजे, बेडसे, कुडा व कार्ले येथील लेण्यांतही त्रिशूल हे चिन्ह आढळते. रांचीच्या पश्चिमेला



त्रिशूल (शैव आयुधपुरुष)

११२ मैल अंतरावर असलेल्या टांगीनाथ या शैव क्षेत्रात एक प्रचंड लोखंडी त्रिशूल आहे. त्याचे मधले टोक मोडून पडले आहे. त्या मोडलेल्या टोकाचेच वजन तीन मण आहे.

पूर्वेकडील अनेक देशांत प्राचीन काळी आयुध आणि प्रतीक म्हणून त्रिशूलाचा वापर केला जात होता. [इं. बु. इ.; गया गॅझे.; पु. इं.; अ. स्क. म. ग. म्यु.; गो. ज.]

**त्रिशूलदान** सत्पात्र ब्राह्मणाला दान स्वीकारण्यासाठी निमंत्रण करून त्याला दान न देताच परत पाठविणाऱ्याला मनुष्यहिंसेइतके पाप लागते आणि या पापाचा परिणाम म्हणून त्याला पोटशूळ जडतो, अशी समजूत आहे. या पापाच्या परिमार्जनासाठी त्रिशूलदान करतात. हे दान कृष्णपक्षातील अष्टमी किंवा चतुर्दशी या दिवशी करायचे असते.

त्यासाठी बारा निष्क सुवर्णाचा एक त्रिशूल बनवतात. एका तांब्याच्या पात्रात तीळ भरून ते पात्र दान देणाऱ्याच्या नाभीवर ठेवतात. मग त्यात सुवर्णाच्या त्रिशूलाची स्थापना करतात. शिवपंचाक्षरी मंत्राने, रुद्रसूक्ताने किंवा 'त्रिशूलाय नमः' या नाममंत्राने त्रिशूलाची पूजा करतात. नंतर करतलावर विष्णूक्षाच्या सुवर्णप्रतिमेची स्थापना करून तिचीही पूजा करतात. एवढे झाल्यावर ब्राह्मणाला त्या त्रिशूलाचे दान करतात. त्यावेळी जो दानमंत्र म्हणतात, तो असा—

> भगवन् भगनेत्रघ्न दक्षयज्ञप्रमर्दन ।
> तवायुधप्रदानेन पापं नश्यतु शङ्कर ॥
> येन दग्धं क्षणार्धेन त्रिपुरं सुरदुर्जयम् ।
> तेन पाशुपतेनाशु मम शूलं विनाशय ॥

अर्थ – इंद्राचा नाश करणाऱ्या आणि दक्षयज्ञाचा विध्वंस करणाऱ्या भगवान् शंकरा, तुझ्या आयुधाच्या दानाने माझे पाप नष्ट होवो. ज्या पाशुपताने तू देवांनाही अजिंक्य ठरलेली त्रिपुरे क्षणार्धात जाळलीस, त्या त्रिशूलाने तू माझ्या (उदरातील) शूलाचा सत्वर नाश कर.

अशा प्रकारे प्रार्थना केल्यानंतर ब्राह्मणाला भोजन व दक्षिणा देऊन दान समाप्ती करतात. [दा. चं.]

**त्रिशोक काण्व** एक सूक्तद्रष्टा. याच्या नावावर ऋग्वेदातल्या ८ व्या मंडलातले ४५ वे सूक्त आहे. इंद्रस्तुती हा त्या सूक्ताचा विषय आहे. इंद्राच्या शौर्याचो महती गाताना तो म्हणतो –

> विद्मा हि त्वा धनञ्जयमिन्द्र दृळ्हा चिदारुजम् ।
> आदारिणं यथा गयम् ॥
> ककुहं चित् त्वा कवे मन्दन्तु धृष्णविन्दवः ।
> आ त्वा पणिं यदीमहे ॥
>
> (ऋ. ८.४५.१३-१४)

अर्थ – हे इंद्रा, शत्रूंचे धन जिंकून ते (भक्तांना) देणारा तू आहेस हे आम्ही जाणतो. त्यांचे किल्ले कितीही कठीण असले तरी पूर्वी तू 'गय' हा किल्ला फोडून टाकलास त्याप्रमाणे तेही फोडून टाकतोस, हेही आम्ही जाणतो. हे सर्वोन्नता, हे स्फूर्तिदात्या, हे धडाडीने हल्ला चढविणाऱ्या देवा, तुला हे सोमबिंदू प्रसन्न करोत. तुझा असा पणच आहे, म्हणून आम्ही तुझी विनवणी करीत आहो.

त्रिश्लोक काण्व याच्या नावाचे एक सामही आहे. (पं. ब्रा. ८.१). [प्रा. च. को.]

**त्रिषष्टिमहापुरुष** जैन लोक चौवीस तीर्थंकर, बारा चक्रवर्ती, नऊ वासुदेव, नऊ प्रतिवासुदेव आणि नऊ बलभद्र मिळून त्रेसष्ट महापुरुष मानतात. जैन साहित्यात सलोकपुरुष म्हणून ग्रंथारंभी त्यांना वंदन केलेले असते. हेमचंद्राच्या त्रिषष्टिशलाकापुरुषचरितात या त्रेसष्ट महापुरुषांच्या कथा दिलेल्या आहेत. या सर्व कथा जैन पुराणांतून घेतलेल्या आहेत.

**तीर्थंकर**– तीर्थंकर व जैनधर्म पाहा.

**बारा चक्रवर्ती** – भरत, सगर, मघवा, सनत्कुमार, शांतिनाथ, कुंथुनाथ, अरनाथ, सुभौम, पद्मनाथ, हरिषेण, जयसेन व ब्रम्हदत्त यांनी पृथ्वीमंडळ पूर्ण केले, असे जैन पुराणात सांगितले आहे.

**नऊ वासुदेव** – त्रिपृष्ठ, द्विपृष्ठ, स्वयंभू. पुरुषोत्तम, नरसिंह, पुंडरीक, दत्त, नारायण व कृष्ण.

**नऊ प्रतिवासुदेव** – अश्वग्रीव, तारक, मेरक, मधू, निशंभू, बली, प्रल्हाद, रावण व जरासंध.

**नऊ बलभद्र** – अचल, विजय, भद्र, सुप्रभ, सुदर्शन, आनंद, नंदन, पद्म व बलराम.

वरील बारा चक्रवर्तींपैकी बरेच पौराणिक राजे असून, बाकीचे महापुरुष म्हणजे विष्णूच्या पौराणिक अवतारांची जैन रूपे होत. [भा. सं. जै. यो.]

**त्रिष्टुभ** एक वैदिक छंद. 'त्रिष्टुभो रुद्राः' (= त्रिष्टुभ छंदाच्या प्रत्येक पादात ११ अक्षरे असतात) असे याचे लक्षण छंद या वेदांगात सांगितले आहे. याची व्युत्पत्ती अशी – 'त्रिषु स्थानेषु स्तुभ्यते जडीक्रियते इति' (= तीन स्थानांच्या ठिकाणी जडवला जातो, तो त्रिष्टुभ होय.) त्रिष्टुभ म्हणजे तीन स्तुभांनी (खंडांनी) युक्त, असाही याचा अर्थ करतात.

त्रिष्टुभ छंदाचे चार पाद असतात. प्रत्येक पादाच्या शेवटी थोडा विराम घेण्याची पद्धत असते. शेवटचा विराम ऋचेच्या शेवटी असल्याने तो मोजण्याची आवश्यकता नसते, म्हणून हा छंद तीन स्तुभांनी (= खंडांनी) युक्त होतो, असे मानतात.

या छंदात ४४ अक्षरे असून प्रजापतीच्या मांसापासून त्याची उत्पत्ती झाली, असे भागवतात म्हटले आहे (३. १२.२९). ऋग्वेदात याचा सर्वांत जास्त वापर केला असून, त्यातील ४२५३ ऋचा त्रिष्टुभ छंदात आहेत. या छंदाचे एक उदाहरण असे–

अनारम्भणे तदवीरयेथा ।
अनास्थाने अग्रभणे समुद्रे ।
यदश्विना ऊहथुर्भुज्युमस्तं ।
शतारित्रां नावमातस्थिवांसम् ॥
(ऋ. १. ११६. ५)

इंद्र व मरुत यांची बहुतेक सूक्ते या छंदात आहेत. हा एक महत्त्वाचा छंद आहे. [श. क.]

**त्रिसुपर्ण** जेवणापूर्वी ब्राह्मण पानावर बसून 'ब्रह्ममेतु मां । मधुमेतु मां ।' (= ब्रह्म मला प्राप्त होवो, मधू मला प्राप्त होवो) इ. जे वैदिक मंत्र म्हणतात, त्यांना त्रिसुपर्ण असे म्हणतात. हे मंत्र महानारायणीयोपनिषदात सांगितलेले आहेत. (म. ना. उप. ४८–५०)

हे त्रिसुपर्ण मंत्र न मागताच ब्राह्मणाला शिकवावे आणि या त्रिसुपर्णाच्या पठनाने ब्रह्महत्या, भ्रूणहत्या व वीरहत्या या पापांचे क्षालन होते, असे सांगितले आहे. त्रिसुपर्णमंत्राची फलश्रुती सांगताना म्हटले आहे, ते असे ––

ये ब्राह्मणास्त्रिसुपर्णं पठन्ति । ते सोमं प्राप्नुवन्ति ।
आसहस्रात्पङ्क्तिं पुनन्ति ।

अर्थ – जे ब्राह्मण त्रिसुपर्णाचे पठन करतात त्यांना सोम प्राप्त होतो आणि ते हजारोंच्या पंक्ती पावन करतात.

या वचनांतील पंक्ती या शब्दामुळेच हे मंत्र भोजनाच्या वेळी म्हणण्याची प्रथा पडलेली दिसते. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील ११४ व्या सूक्तातल्या तीन ते पाच या मंत्रांनाही त्रिसुपर्ण असे म्हणतात. [सु. वि. को.; श. क.]

**त्रिस्थळी** प्रयाग, काशी व गया या तीन क्षेत्रांना त्रिस्थळी म्हणतात. इ. स. १५८० च्या सुमारास झालेल्या नारायणभट्ट नामक पंडिताने 'त्रिस्थलीसेतू' नावाचा एक ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथात त्याने वरील तीन्ही ठिकाणच्या तीर्थयात्रांचे विस्तृत वर्णन केले आहे. पाहा – काशी, गया, प्रयाग. [हि. ध.]

**त्रिहोत्र ब्राह्मण** सारस्वत ब्राह्मणांचे पर्याय नाम. गोमंतकातील सारस्वत ब्राह्मण हे मूळचे पूर्व भारतातील असून, ते त्रिहोत्रपुराहून म्हणजे तिरहूतहून यऊन गोमंतकात स्थायिक झाले, अशी समजूत आहे. तिच्याबद्दल मतभेदही आहेत. पाहा – सारस्वत ब्राह्मण.

**त्रुटितवल्लीदान** वेलीप्रमाणे अविच्छिन्न संततिविस्तार व्हावा, या हेतूने संक्रांतीच्या दिवशी तिळाच्या चूर्णात गूळ घालून ते पाच मठी मिश्रण ब्राह्मणाला दान देतात, त्याला वरील नाव आहे. दान देताना पुढील मंत्र म्हणतात –

तिलचूर्णकृतं द्रव्यं सगुडं मुष्टिपञ्चकम् ।
ददामि तेन मे भूयाद्वंशवृद्धिः प्रतानयत् ॥

**त्रेतायुग** कृतादी चार युगांपैकी दुसरे. कार्तिक शु. नवमीच्या दिवशी या युगाचा आरंभ झाला, असे मानतात. या युगात वामन, परशुराम व दाशरथी राम हे तीन अवतारझाले. या युगाची वैशिष्टये अशी – पुण्य – त्रिपाद, पाप – एकपाद, तीर्थ – पुष्कर, ब्राह्मण – साग्निक, प्राण – अस्थिगत, मानव देह – चौदा हस्त परिमित, आयुष्य – दहा हजार वर्षे, व्यवहार्य पात्र – रुप्याचे, राजे – (सूर्यवंशातील) बाहुक, सगर, अंशुमान, असमंजस, दिलीप, भगीरथ, अज, दशरथ, रामचंद्र व कुशीलव.

हे युग १२ लक्ष ९६ हजार वर्षांचे आहे. या युगातील ब्राह्मण वेदवेदांगपारंगत, सत्यप्रिय, जितेंद्रिय, तपोनिष्ठ, दाते व विष्णुभक्त होते. सर्व स्त्रिया पतिव्रता होत्या व पुत्र पित्याची सेवा करणारे होते. या युगात पाऊस वेळेवर पडत असे आणि पृथ्वीवर विपुल धान्य पिकत असे. या युगातील तारकब्रह्म मंत्र असा–

राम नारायणानन्त मुकुन्द मधुसूदन ।
कृष्ण केशव कंसारे हरे वैकुण्ठ वामन ॥

या युगाच्या आरंभी ब्रह्मदेवाने वर्णाश्रमव्यवस्था सुरू केली, असे वायू पुराणात सांगितले आहे. [श. क.; पु. इं.]

**त्रैधातवीयेष्टी** अभिचारकर्म करायचे असल्यास, पशुधन वाढावे अशी इच्छा असल्यास किंवा 'याग करीन' असे म्हणून तो न केल्यास, अशा निरनिराळ्या कारणांसाठी त्रैधातवीयेष्टी करावी, असे सांगितले आहे. या इष्टीत इंद्राविष्णू ही देवता असते. तांदुळाच्या पिठाचे दोन व यवाच्या पिठाचा एक असे तीन पुरोडाश बारा कपालांवर भाजतात. खाली तांदुळाचा लहान पुरोडाश, त्यावर यवाचा आणि त्यावर पुन्हा तांदुळाचा मोठा पुरोडाश ठेवतात. तीन्ही पुरोडाश मिळून एक हवी होतो. प्रधान यागाच्या वेळी तीन्ही पुरोडाशांतून एकदम अवदान घेतात. सुवर्ण, तार्प्य वस्त्र आणि एक धेनू एवढी या इष्टीची दक्षिणा सांगितलेली आहे. हिचे बाकी सर्व तंत्र दर्शपूर्णमासाप्रमाणेच आहे. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**त्रैपणक्रियाव्रत** एक जैन व्रत. या व्रताचा कालावधी दोन वर्षे, दोन महिने आणि एक पक्ष एवढा असतो. पण प्रत्यक्ष व्रताचे दिवस त्रेपन्नच असतात, म्हणून याला त्रैपणक्रियाव्रत असे नाव पडले आहे. व्रताच्या दिवशी त्रिवार णमोकारमंत्राचा जप करायचा असतो. [जै. व्र. वि. सं.]

**त्रैलोक्यमोहन गणेश** गणेशमूर्तींचा एक तांत्रिक प्रकार. हा श्वेतवर्ण, शशिकलाधर, त्रिलोचन व चतुर्भुज असून, याच्या चार हातांपैकी डाव्या वरच्या हातात दोरी, उजव्या वरच्या हातात अंकुश, उजवा खालचा हात वरद मुद्रेत आणि डाव्या खालच्या हातात उसाचे कांडे असते. एका हातात कमळ धारण करणारी आणि दुसऱ्या हाताने लिंगाला स्पर्श करणारी त्याची शक्ती त्याला आलिंगन देत असते आणि गणेश आपल्या शुंडाग्राने तिच्या योनीला स्पर्श करीत असतो. काही ठिकाणी पद्म, अंकुश आणि रत्नकलश ही याची आयुधे आहेत, असे सांगितलेले असून, एका हाताने हा आपल्या शक्तीच्या योनीला स्पर्श करीत आहे, असे वर्णन केलेले आढळते. [श्रीविद्यार्णवतंत्र]

**त्रैलोक्यमोहनगौरीमंत्र** एक तांत्रिक मंत्र. याची ६१ अक्षरे आहेत. सदर मंत्र असा– ह्रीं, नमो ब्रह्मश्रीराजिते राजपूजिते जयविजये गौरीगान्धारि त्रिभुवनवशंकरि सर्वलोकवशंकरि सर्वस्त्रीपुरुषवशंकरि सुसुदुदु घेघेवावा ह्रीं स्वाहा ।'

या मंत्राचा ऋषी अज, छंद निचृद्गायत्री, देवता त्रैलोक्यमोहिनीगौरी, बीज ह्रीं व शक्ती स्वाहा ही आहे. मूल मंत्रातील चौदा, दहा, आठ, आठ, दहा व अकरा अशा अक्षरांचा एकेक पद तयार करतात व त्याच्या आरंभी क्रमाने ह्रां, ह्रीं, ह्रूं, ह्रैं, ह्रौं व ह्रः ही बीजे लावून षडंगन्यास करतात. मग मूलमंत्राने व्यापक न्यास करून गौरीचे मंत्रध्यान करतात. नंतर अष्टदल कमल व त्याच्या बाहेर चार द्वारांनी युक्त असे चतुर भूगृह काढून त्यावर देवीची स्थापना व यथाविधि पूजा करतात. नंतर मूलमंत्राचा दहा हजार जप व घृतमिश्र पायसाच्या सहस्र आहुती देऊन हवन करतात. त्यामुळे देवी प्रसन्न होते व साधकाला सुखसंपत्तीची प्राप्ती होते, असे सांगितले आहे.

अशा रीतीने मंत्र सिद्ध केल्यानंतर त्याचा प्रयोग करतात. तीन दिवस रोज मूलमंत्राचा एकशे आठ जप करतात व तिलमिश्र तांदूळ, मधुमिश्रित लवण, फळे किंवा रक्त कमळे यांचे एकशे आठ हवन करतात. यामुळे चारही वर्णांचे लोक वश होऊन दास बनतात, असे मंत्रमहोदधीत म्हटले आहे.

**त्रैलोक्यमोहना** एक शाक्त देवता. ही षड्भुज असून, अष्टदल कमळावर विराजमान असते. हिच्या हातांत डाव्या वरच्या हातापासून क्रमाने पाश, अंकुश, कल्पवल्ली, कपाल आणि वीणा ही आयुधे असतात. नृसिंहाने निर्माण केलेली त्रैलोक्यमोहिनी या नावाची एक देवता मत्स्य पुराणाने उल्लेखिली आहे. [ श्रीविद्यार्णवतंत्र; पु. इं. ]

**त्रैलोक्यवशंकर** लोकेश्वर या बौद्ध देवतेचे एक रूप. याला उड्डियान लोकेश्वर असेही म्हणतात. उड्डियान हे बंगालमधील गाव मध्ययुगात तांत्रिकपंथाचे मोठे केंद्र होते. साधनमालेत या लोकेश्वराचे वर्णन आहे, ते असे —



त्रैलोक्यवशंकर

उत्कट कामभावनेमुळे याचे शरीर रक्तवर्ण झाले आहे. हा एकमुख, द्विभुज, त्रिनेत्र व जटामुकुटधारी असून, त्याच्या हातांत पाश आणि वज्रांकित अंकुश ही आयुधे आहेत. तो रक्त कमलावर वज्रपर्यंकासन घालून बसलेला आहे. दिव्य वस्त्रालंकारांनी त्याचा देह सुशोभित झालेला आहे. नेपाळमध्ये याची कांस्यमूर्ती आढळते. [ इं. बु. इ. ]

**त्रैलोक्यविजय** (१) एक बौद्ध देव. हा नीलवर्ण, चतुर्मुख व अष्टभुज असून भयानक दिसतो. हा प्रत्यालीढ आसन घालून बसतो. हुंकारातून याचा जन्म झाला. शिव व गौरी ही याची वाहने होत. [ इं. बु. इ.; गॉ. नॉ. बु. ]

(२) हे एक कवच आहे. ते शिवाने परशुरामाला दिल्याची कथा आहे. या कवचाचा जप केल्याने राजसूय आणि वाजपेय यज्ञ केल्याचे फल मिळते. [ पु. इं. ]

**त्रैलोक्यसंमोहन** विष्णुमूर्तींचा एक प्रकार. श्रीविद्यार्णवतंत्रात याला पुरुषोत्तम आणि चतुर्भुज म्हटले आहे. अग्नी पुराणातील वर्णनात हा अष्टभुज असून, चक्र, खड्ग, मुसल, अंकुश, शंख, शाङ्ग, गदा व पाश ही आयुधे धारण करणारा आहे. त्याच्या दोन्ही बाजूंना लक्ष्मी व सरस्वती असून, त्यांच्या हाती अनुक्रमे पद्म व वीणा असते. [ श्रीविद्यार्णवतंत्र; डे. हिं. इ. ]

**त्रैलोक्यस्तंभनी** एक शाक्त देवता. ही चतुर्भुज असून, हिच्या उजव्या खालच्या हाती मुद्‌गर, उजव्या वरच्या हाती पाश, डाव्या वरच्या हाती वज्र आणि डाव्या खालच्या हाती जिह्वा ही आयुधे असतात. हिने पिवळे वस्त्र परिधान केलेले असून, ही सुवर्णसिंहासनावर बसलेली असते. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**त्रैलोक्योच्चाटनयंत्र** अभिचार-कर्माचा एक प्रकार. काळ्या कोंबड्याचे रक्त घेऊन त्याने एका भूर्जपत्रावर हे यंत्र काढतात. ज्या व्यक्तीचे उच्चाटन करायचे असेल, त्या व्यक्तीचे नाव लिहून त्याच्या भोवती प्रथम एक त्रिकोण काढतात. त्याच्या बाहेर दुसरा त्रिकोण व त्याच्याभोवती वर्तुळ काढतात. नंतर या यंत्राची यथाविधि पूजा करून, ते एका कुत्र्याच्या गळ्यात बांधतात. तो कुत्रा इतस्ततः भटकू लागला, की इच्छित व्यक्तीचे उच्चाटन होऊ लागते, असा या यंत्राचा प्रभाव सांगितला आहे. [यंत्रचिंतामणी]




त्रैलोक्योच्चाटनयंत्र

**त्रोटक** संस्कृत वाङ्मयातील दशरूपकांपैकी एक. त्रोटकातील अंकांची संख्या पाच, सात, आठ किंवा नऊ असते. त्यातील पात्रे दिव्य व मानुष अशी दोन्ही प्रकारची

असतात. त्यात विदूषक असतो आणि प्रत्येक अंकात त्याला स्थान असते. शृंगार हा त्रोटकातला प्रमुख रस असतो. स्तम्भितरम्भम हे त्रोटकाचे एक उदाहरण असून, त्याचे सात अंक आहेत. कालिदासाचे विक्रमोर्वशीयम हेही एक त्रोटकच आहे. ते पाच अंकी आहे. उर्वशी व चित्रलेखा ही यातील दिव्य पात्रे असून, बाकीची सर्व पात्रे मानुष आहेत. यातील विदूषक मात्र प्रत्येक अंकात नाही. तो दुसऱ्या, तिसऱ्या व पाचव्या अंकात तेवढा दिसतो. [ सं. ना. सौं. ]

**त्र्यंबकराज** ( इ. स. चे सोळावे शतक ) एक मराठी संत-कवी. हा सांतत्यगोत्री माध्यंदिनशाखीय यजुर्वेदी ब्राह्मण होता. याच्या पित्याचे नाव भैरव होते. भैरवाला तुळजाभवानीच्या कृपेने नृसिंह, त्र्यंबक व कौंडण्य असे तीन पुत्र झाले. त्र्यंबकाच्या हातावर जन्मतःच त्रिशूळाचे दैवी चिन्ह होते. ते पाहून आपला मुलगा महायोगी होणार, असे भैरवाला वाटले. त्यामुळे त्याने त्र्यंबकाला शिक्षणही दिले नाही आणि त्याच्या विवाहाचाही प्रयत्न केला नाही.

मात्र पित्याच्या निधनानंतर त्र्यंबकाने विवाह केला. नंतर ज्येष्ठ बंधू नृसिंह आणि कमळाकर नामक एक सद्गृहस्थ यांच्याकडून काही ज्ञानही मिळविले. पुढे तेवढ्या ज्ञानाने त्याच्या मनाची तळमळ कमी होईना, म्हणून त्याने चंडीची उपासना सुरू केली. पंधरा दिवसपर्यंत अखंड अनुष्ठान मांडल्या-नंतर सोळाव्या रात्री पाच वर्षांच्या कुमारीच्या रूपाने देवी प्रकट झाली आणि तिने त्र्यंबकराजाला सप्तशृंगावर जायला सांगितले. त्र्यंबकराजाने तसे केले. तिथे जाऊन ध्यानस्थ बसल्यावर तिसऱ्या रात्री देवीने प्रसन्न होऊन त्र्यंबकराजाला ब्रह्मज्ञान दिले. त्यानंतर तिथे साक्षात सिद्धेश्वर शिव ब्राह्मण-रूपाने प्रकटला आणि त्याने त्र्यंबकराजाला पाच वचने सांगितली. ब्रह्मज्ञानाचा उपदेश झाल्यानंतर त्याने आपल्या अवस्थेचे जे वर्णन केले आहे, ते असे–

पाठीं प्रकाशु करूनि । काही येक दाविलें लोचनीं ।
जे भरले दिसे आझुनी । दृष्टी सृष्टी ।।
मनसहित इंद्रियें सकळें । जालिं सुखपात्रें निर्मळें ।
याचा वेचु कोण्हें काळें । नाहि तया ।।
प्रसन्न करितां भवानी । अवचित जोडले शूळपाणी ।
फिटली सर्व सिराणी । अप्रयासें ।।

त्र्यंबकराजाने हे सर्व आत्मचरित्र आपल्या बालबोध अथवा चिदादित्यप्रकाश नामक ग्रंथाच्या उपसंहारात दिले आहे. हा ग्रंथ त्याने फाल्गुन शुद्ध ५ शके १४९४ ते चैत्र शुद्ध १ शके १५०२ या काळात लिहून पुरा केला. ग्रंथ पुरा झाल्यावर तो एका संन्याशाने मागून नेला आणि तो परत दिलाच नाही. त्यामुळे त्र्यंबकराजाला पुनश्च सर्व ग्रंथ रचावा लागला. या ग्रंथाचे आद्यखंड, मध्यखंड व उत्तरखंड असे तीन खंड असून, प्रत्येक खंडात पंधरा कथने आहेत. सर्व ग्रंथाची एकूण ओवी-संख्या ५२४० आहे.

हा ग्रंथ निगुर्णोपासनेचा असून, त्यात वेदान्ताचा उपदेश सुबोध आणि अनुभवी वाणीने केलेला आहे. त्यात प्रणवाचे स्वरूप, पंचीकरण, सृष्टीची उत्पत्ती व प्रलय, देहाची उत्पत्ती, षट्चक्रांचे विवरण, अष्टदेहनिरसन, जीवब्रह्मैक्यप्रतिपादन, अष्टांगयोग, माया–अविद्यालक्षण, ब्रह्मचतुष्टय, ब्रह्मसाक्षात्कार, इ. विषयांचे विवेचन आहे.

उत्तरखंडाच्या मंगलाचरणात त्र्यंबकराजाने परमेश्वराच्या स्वरूपाची सर्वव्यापकता सांगितली आहे, ती अशी–

तुझें स्वरूप गहन । कोण घेते प्रमाण ।
देवा ! जी तुजवाचून । कांहींची नसे ।।
तूं विश्वरूप साचार । ऐसें देखे निरंतर ।
अगा, हे तुझेंचि शरीर । अनेक जालें ।।
वर्तुळ लंब सान वाड । कुब्ज पीन घन रोड ।
स्थिर जंगमादि जड । रूप तुझें ।।
ऐसें रूप नानाकार । जों मी पाहे साकार ।
तों आश्चर्य थोर । जालें येक ।।
या स्वरूपा अंतर्गत । देखिलें निर्गुण सदोदित ।
एवं उभयमिश्रित । तूंचि होसीं ।।

त्र्यंबकराजाचा उपदेशक साक्षात सिद्धेश्वर असल्याने त्याच्या परंपरेला सिद्धेश्वर संप्रदाय असे नाव मिळाले. [ म. वा. इ. २]

**त्र्यंबकव्रत** एक शिवव्रत. हे व्रत प्रत्येक महिन्याच्या वद्य चतुर्दशीला करतात. त्या दिवशी नक्त भोजन करायचे असते. एक वर्ष पूर्ण झाल्यावर उद्यापन म्हणून एक वाय दान देतात. फल– शिवपदाची प्राप्ती. [ हि. ध. ]

**त्र्यंबकेश्वर** एक महान क्षेत्र. हे महाराष्ट्रात नासिकपासून अठरा मैल अंतरावर आहे. इथे ब्रह्मगिरी नावाच्या डोंगरावर गोदावरी नदीचे उगमस्थान असून, पाय-थ्याशी त्र्यंबकेश्वराचे मंदिर आहे. त्र्यंबकेश्वर हे बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक आहे. या क्षेत्राच्या उत्पत्तीविषयीची पुराण-कथा अशी–

एकदा ब्रह्मदेवाच्या मनात असा विचार आला, की 'मी सृष्टिकर्ता असल्यामुळे शिवमहिमा काय तो मलाच माहीत आहे.' हे विष्णूला कळताच त्याने विनयाने कबुली दिली

की 'मी पुष्कळ तप केले; परंतु मला अजूनही शिवाचे ज्ञान झाले नाही.' शेवटी ब्रह्मा आणि विष्णू यांच्यांत असे ठरले, की ब्रह्मदेवाने शिवाच्या मस्तकाचा शोध लावावा आणि विष्णूने त्याच्या चरणांचा शोध लावावा. त्याप्रमाणे ते दोघे निघाले. पुष्कळ काळ शोध घेऊनही कोणाला त्यात यश येईना. तेव्हा ब्रह्मदेवाने एक कारस्थान रचले. त्याने केतकीपुष्प आणि गाय निर्माण करून, त्यांची खोटी साक्ष आपल्या बाजूने तयार केली. मग ब्रह्मा देवलोकी जाऊन म्हणाला, की 'मी शिवाच्या मस्तकाचा शोध लावला असून, त्याची दुग्धाभिषेकाने आणि केतकीपुष्पाने पूजाही केली आहे.'

ते ऐकून इंद्रादी देवांना शंका आली आणि तिचे निराकरण करण्यासाठी ते शिवलोकी गेले. शिवाने ब्रह्मदेवाचे कपट ओळखले आणि त्याला शाप दिला, की 'आजपासून भूतलावर तुझी कोणी पूजा करणार नाही.' शिवाने त्याच वेळी केतकीपुष्पही आपल्या पूजेसाठी निषिद्ध ठरविले. शिवाने गायीलाही शाप दिला, की 'ज्या मुखाने तू खोटी साक्ष दिलीस, ते तुझे मुख सदैव अपवित्र राहील!'

शिवाच्या या शापाने ब्रह्मदेव क्रुद्ध झाला. त्याने शिवाला प्रतिशाप दिला, की 'तू भूतलावर पर्वत होऊन राहशील.' रागाचा हा आवेग ओसरल्यावर ब्रह्मदेवाला पश्चात्ताप झाला आणि पुनश्च शिवकृपा संपादण्यासाठी त्याने मग शिवाची स्तुती केली. ब्रह्मदेवाचे मन निवळलेले पाहून भोळा शिव प्रसन्न झाला. त्याने भूतलावर पर्वताचे रूप घेतले व त्याचे नाव ब्रह्मदेवावरून ब्रह्मगिरी असे ठेवले. या ब्रह्मगिरीच्या पायथ्याशी त्र्यंबकेश्वराचे मंदिर असले, तरी मूळ त्र्यंबकेश्वर ब्रह्मगिरीच्याच रूपाने उभा आहे, असे समजतात.

सुमारे पाच शतकांपूर्वीपर्यंत इथे वसती नव्हती. पुढे देवळाच्या जवळच त्र्यंबक याच नावाने एक लहानसे खेडे वसले. पेशवाईत मात्र या स्थानाची विशेष भरभराट झाली. नानासाहेब पेशव्याने पूर्वीच्या जीर्ण मंदिराच्या जागी त्र्यंबकेश्वराचे सध्याचे भव्य मंदिर उभारले आणि जोगळेकर नावाच्या गृहस्थांना त्या देवस्थानचे कारभारी म्हणून नेमले. त्याने देवाच्या नित्य पूजेची उत्तम व्यवस्था केली. पेशव्यांच्या आश्रयामुळे त्र्यंबक खेड्याची वसती वाढली आणि मंदिराच्या परिसरात माणसांची वर्दळ सुरू झाली. पुढे होळकरांचे फडणीस श्री. पारनेरकर यांनी आठ लाख रुपये खर्चून त्याच क्षेत्रातल्या कुशावर्त या तीर्थकुंडाची सुंदर बांधणी केली.

त्र्यंबकेश्वराच्या मंदिराभोवती चिरेबंदी तट आहे. मंदिर श्रीयंत्राकार असून, त्याचा विस्तार २६५ × २१८ फूट एवढा आहे. शिवासमोर शुभ्र पाषाणाचा नंदी आहे. मंदिराच्या मागील बाजूला अभिषेकजलासाठी पुष्करिणी आहे. मंदिराचे महाद्वार पूर्वाभिमुख आहे. या मंदिराच्या घडणीत लोखंडी



त्र्यंबकेश्वराचे मंदिर

ओतीव कामासारखी सफाई असून, देवळाच्या भिंती बाहेरून अनेक सुंदर शिल्पाकृतींनी सजविलेल्या आहेत. पक्षद्वारांच्या घुमटींना बाहेरच्या बाजूने कोरलेली कमळे जणू सजीव वाटावी, इतकी सुंदर आहेत.

त्र्यंबकेश्वराचे लिंग शाळुंकेच्या वर नसून कळशीभर पाणी मावेल इतक्या खोलगट जागी आहे. त्र्यंबकेश्वर हा ब्रह्मा-विष्णु-महेशात्मक असल्याची समजूत आहे. या शिवलिंगावर लहानशी चीर असून, तिच्यातून सारखे पाणी झिरपत असते. शिवलिंगाच्या खोलगट भागातून कधी कधी सिंहाच्या गर्जनेसारखे आवाज निघतात आणि ज्वाळाही वर येतात, असे सांगतात.

त्र्यंबकेश्वर देवस्थानचे वार्षिक उत्पन्न कित्येक हजारांचे आहे. मंदिराला पाच सोन्याचे कळस आहेत. लिंगाला सुवर्णाचा पंचमुखी मुखवटा आहे आणि सणासुदीला व उत्सवदिवशी घालण्यासाठी रत्नखचित किरीट आहे. हा किरीट मूळचा म्हैसूरचा आहे. मुसलमानांनी तो दिल्लीला नेला आणि पेशव्यांनी दिल्लीच्या जामदारखान्यातून लुटून आणून तो त्र्यंबकेश्वराला अर्पण केला.

त्र्यंबकेश्वराच्या परिसरात गंगा, श्रीकृष्ण, परशुराम, श्रीराम, लक्ष्मीनारायण, इ. देवदेवतांची मंदिरे आहेत. गावाच्या उत्तरेला अर्ध्या मैलावर नीलपर्वत नावाची टेकडी असून, तिच्यावर नीलांबिका देवीचे मंदिर व गोसाव्यांचा आखाडा आहे. ब्रह्मगिरीच्या पायथ्याशी गंगासागर तलावाच्या पश्चिम तीरावर निवृत्तिनाथांचे समाधिमंदिर आहे. इथे प्रतिवर्षी ज्येष्ठ वद्य द्वादशीला त्यांच्या पुण्यतिथीनिमित्त मोठी यात्रा भरते. कुशावर्त तीर्थ हे इथले पवित्रतम तीर्थ होय. हे

८१ × ७४ फूट विस्ताराचे चौकोनी कुंड असून, त्यात उतरण्याला चहू बाजूंनी पायऱ्या बांधलेल्या आहेत. ब्रह्मगिरीच्या उतारावर नाथपंथियांचा प्राचीन त्र्यंबकमठ आहे. दर बारा वर्षांनी कुंभ मेळ्याच्या निमित्ताने नाथपंथाच्या बाराही शाखांचे जोगी इथे जमतात. पाहा – कुशावर्त. [ तीं. म. १; श्री. गो. म. इ.; श्री. क. या. ]

**त्र्यरुण** एक सूक्तद्रष्टा ऋषी. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील सत्ताविसावे सूक्त याच्या नावावर आहे. या सूक्ताच्या पहिल्या ऋचेत त्याच्या नावाचा उल्लेख असून, त्याला त्रिवृष्णीचा पुत्र म्हटले आहे. अश्वमेघ यज्ञ करणाऱ्या एका राजाने त्याला दहा हजार वृषभ अर्पण केल्यामुळे संतुष्ट होऊन, तो अग्नीचे स्तोत्र गात आहे, असा या सूक्ताचा विषय आहे. या सूक्तातील एक ऋचा अशी ––

**यस्य मा परुषाः शतमुद्धर्षयन्त्युक्षणः ।**
**अश्वमेधस्य दानाः सोमा इव त्र्याशिरः ।।**
(ऋ. ५·२७·५)

अर्थ – ज्या चित्रविचित्र रंगांच्या शेकडो वृषभांनी मला मनापासून हर्ष उत्पन्न केला, त्यांची देणगी ही त्या अश्वमेघ करणाऱ्या राजाची आहे. त्याने दिलेल्या देणग्या तीन प्रकारच्या सुगंधी पदार्थांनी बनविलेल्या सोमरसाच्या पेयाप्रमाणेच हर्षप्रद होत.

त्रसदस्यू हाही या सूक्ताचा विकल्पाने द्रष्टा आहे. पाहा – त्रसदस्यू. [ म. ज्ञा. को. ]

**त्वरिता** एक तांत्रिक देवता. हिच्या मस्तकावर मोराची पिसे व मोरपिसांचेच छत्र असते. तिच्या गळ्यात गुंजांची माळ असते व एक हात अभयमुद्रेत असतो.

ब्रह्मांडपुराणात अक्षरादेवी म्हणून तिचा उल्लेख आहे. हिने भंडाचा सेनापती पुंड्रकेतू याला ठार मारले, अशी कथा आहे (ब्रह्मांड पुराण ४.१९.५८). त्वरिता हे तुळजाभवानीचेही एक नाव आहे. [ श्रीविद्यार्णवतंत्र; पु. इं. ]

**त्वष्टा** एक वैदिक देवता. ऋग्वेदात त्वष्टयाचे स्वतंत्र असे एकही सूक्त नाही. पण त्याचा उल्लेख मात्र जवळजवळ पासष्ट वेळा आला आहे. त्यांवरून त्याच्यासंबंधी माहिती मिळते, ती अशी – विश्वरचनेच्या कार्यात तो एक सर्वोत्तम कुशल कारागीर असून, देवांना लागणारी विविध पात्रे तयार करण्याची कामगिरीही त्याच्याकडेच असते. त्याने इंद्रासाठी एक लोखंडी वज्र बनवले होते. त्याला एक हजार प्रखर धारा व शंभर तीक्ष्ण अग्रे होती. या वज्राच्या साहाय्यानेच इंद्राने युद्धात शत्रूंचा नाश केला. त्यामुळे त्या वज्राला श्रेष्ठ आयुध अशी संज्ञा मिळाली. त्वष्टा हा कारागिरीत निष्णात होता; सामर्थ्यसंपन्न असूनही सत्यनिष्ठ होता. तो प्रजांचा निर्माता व पोषकही होता, असे पुढील ऋचेत म्हटले आहे–

**देवस्त्वष्टा सविता विश्वरूपः पुपोष प्रजाः पुरुधा जजान**
(ऋ. ३. ५५. १९)

अर्थ – त्वष्टा देव विश्वरूप आहे. त्याने विविध प्रजा निर्माण करून त्यांचे पोषण केले.

त्वष्टयाने देवांना सोमपान करण्यासाठी एक सुंदर चमसपात्र तयार केले होते. त्वष्टयाला त्या पात्राचा फार अभिमान वाटू लागला. पुढे एका प्रसंगाने ते चमसपात्र ऋभूंच्या दृष्टीस पडले. ऋभूही कुशल कारागीर होते. त्यांनी तसे चार चमस तयार केले. त्यांचे ते चमस पाहून त्वष्टाही संतुष्ट झाला.

त्वष्टयाचे एक वैशिष्टय असे, की तो गर्भाशयातील गर्भ विकसित करतो आणि मनुष्य व पशू यांना रूप व आकार देतो. अथर्ववेदात (२.२६) व शतपथ ब्राह्मणातही (११.४.३) त्याला विशिष्ट आकारांचा कर्ता असे म्हटले आहे. पशुगण त्याच्या अधीन असतात, असेही सांगितले आहे (श. ब्रा. ३.७.३). ऋग्वेदात त्वष्टयाचा दिव्य स्त्रिया किंवा देवपत्नी यांच्याशी घनिष्ठ संबंध दर्शविलेला आहे. त्याचप्रमाणे त्याचा पूषा, सविता, धाता, प्रजापती, इ. देवतांच्या बरोबरही उल्लेख आलेला आहे. महाभारतात व कौशिकसूत्रात यालाच अनुक्रमे सविता व प्रजापती आणि मार्कंडेय पुराणात विश्वकर्मा व प्रजापती असे मानले आहे; तर भागवत पुराणात त्याला सूर्याचे एक रूप मानले आहे.

अग्नी हा त्वष्टयाचा पुत्र आणि वायू हा त्याचा जामात होय. याशिवाय त्याची सरण्यू नावाची एक कन्या विवस्वानाला दिली होती. तिच्या उदरी यम व यमी आणि अश्विनौ यांनी जन्म घेतला (ऋ. १०.१७.१–२).

त्वष्टयासंबंधीचे ऋग्वेदातील स्वरूपवर्णन स्पष्ट नाही. याचे कारण पाश्चात्य पंडित केगी याने असे सांगितले आहे, की त्रिताप्रमाणेच त्वष्टा ही प्राचीन [illegible] असावी आणि नंतरच्या देवतांनी त्याच्यावर मात करून त्याला मागे सारले असावे. हिलेब्रांटच्या मते त्वष्टा हा पौराणिक क्षेत्रातून वैदिक वाङ्मयात आला आहे. लुडविगने त्याला पर्जन्यदेवता मानले आहे.

ऋग्वेदातील त्वष्टा हा दासांचा देव आहे, असे श्री. प्र. रा. देशमुख मानतात. त्वष्टा हा आर्यपूर्व लिंगपूजकांचा सर्वश्रेष्ठ देव होता. त्याचे लैंगिक महत्त्व ऋग्वेदातील ऋचांत कायम राखण्यात आले आहे, असे त्यांचे प्रतिपादन आहे.

नक्षत्रविद्येत त्वष्टा हा चित्रा नक्षत्राचा अधिपती मानलेला आहे.

निरनिराळ्या पुराणांत त्वष्टयाविषयी अधिक माहिती आलेली आहे. ती अशी– ब्रह्मांड पुराणात (३.१.८७) त्वष्टा हा शुक्र व गौ यांचा पुत्र मानलेला असून, त्याच्या पत्नीचे नाव वैरोचिनी यशोधरा होते, असे सांगितले आहे. याला त्रिशिरा, विश्वरूप व विश्वकर्मा असे तीन पुत्र होते. विश्वकर्मा हा देवांचा आचार्य होता, पण इंद्राने त्याला ठार मारले. तेव्हा इंद्राचा नाश करण्यासाठी त्वष्टयाने एक यज्ञ केला. त्या यज्ञातून वृत्र निर्माण झाला. त्वष्टयाने त्याला इंद्रावर सोडले. (भाग. पुराण ६.९)

सुंदोपसुंदांच्या वधासाठी याने तिलोत्तमा नावाची सुंदर स्त्री निर्माण केली. त्याचप्रमाणे त्रिपुरासुराला मारण्यासाठी त्याने आकाश, तारांगण, इत्यादींच्या साहाय्याने शंकराला एक रथ बनवून दिला. धर्मराजाच्या राज्याभिषेकाच्या प्रसंगी इंद्राच्या आज्ञेवरून त्वष्टयानेच इंद्रप्रस्थ नगरी निर्माण केली असे महाभारतात सांगितले आहे (आदि २२७.५९). [ श. क.; पु. इं.; ऋ. द.; प्रा. च. को.; वै. मा.; वै. आ. ज्यो. वै. दे. पु. ]

**त्साकल** एक जात. हिला साकल व छाकल अशीही नावे आहेत. या लोकाची वसती आंध्रामध्ये असून, ते कपडे धुण्याचे काम करतात. गावातील देवतांच्या मिरवणुकीत मशाल धरणे आणि पालखी वाहणे, ही कामेही हेच लोक करतात.

यांच्यांतील सामान्य लोकांना बाण त्साकल म्हणतात. आणि उच्च दर्जाच्या लोकांना गुण किंवा वेलम त्साकल म्हणतात. बाण म्हणजे धोव्याचे कपडे उकळण्याचे मोठे भांडे होय. गुण त्साकल हे कपडयांना रंग देण्याचे काम करतात.

त्साकल लोकांची छिमल (मुंगी) गुम्मडी, मगिली पुल, थंत्रल्ल, इ. गोत्रे असून, त्यांच्यांत परस्पर विवाहसंबंध होतात. यांच्या रेड्डी, मूमी, मुरिकिटानी, पाकनाटी, देस आणि गोलकोंड अशा पोटजाती आहेत.

त्साकल लोक मशाली तयार करतात. प्रेतवस्त्र दान म्हणून घेतात. बळी दिला जाणाऱ्या कोंबडयाला किंवा बोकडाला मारण्याचा हक्क यांनाच असतो.

या जातीचा पुरोहित लिंगायत असतो. त्याला मैलारी असे म्हणतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**थंड पुलयन** एक जात. ही पुलयन जातीची शाखा आहे. या लोकांची वसती केरळ प्रदेशात आहे. थंड म्हणजे लव्हाळा होय. हे लोक लव्हाळयाचे वस्त्र वापरीत, म्हणून यांना थंड पुलयन हे नाव मिळाले आहे. सांप्रत हे लोक लव्हाळयाची वस्त्रे वापरीत नाहीत. हे लोक ठेंगणे व काळे असतात.

यांचे पूर्वेकडील पुलयन व पश्चिमेकडील पुलयन असे दोन भेद आहेत. पूर्वेकडील पुलयनांनी भारतीय युद्धात दुर्योधनाचा पक्ष घेतला; त्यामुळे त्यांची अधोगती होऊन त्यांना आता केवळ शेतमजुरी करून राहावे लागते, असे हे लोक सांगतात.

हे लोक कुडाच्या झोपडयात राहतात. यांच्या झोपडया माडांच्या चुडतांनी किंवा गवताने शाकारलेल्या असतात. इतर जाती थंड पुलयनांना अस्पृश्य मानतात व त्यांना बाजारात हिंडण्यास मनाई करतात.



थंड पुलयन पुरुष

थंड पुलयन मुलगी सात आठ वर्षांची झाली, की एक शुभ मुहूर्त पाहून तिला वस्त्र नेसवण्याचा समारंभ करतात. त्या वेळी जमलेल्या आप्तेष्टांना भात, कढी व मासे यांचे जेवण देतात व ताडी पाजतात.

**विवाहप्रथा** – यांच्या मुलींची लग्ने बहुधा त्या वयात आल्यावर होतात. परंतु वाङ्‌निश्चय मात्र वयाच्या सातव्या किंवा आठव्या वर्षी होतो. नवरीला दोन साडया देऊन तिच्या गळयात ताळी बांधली, की लग्नाचा मुख्य विधी संपतो. मग वराला तीन दिवस वधूच्या घरी राहायला आणतात. तिथे वधू–वर एक शंख उभा धरून तो फिरवितात. नंतर तो शंख वर फेकतात. उत्तर, पूर्व व पश्चिम यांपैकी कोणत्याही दिशेला शंख पडला, तर ते शुभ चिन्ह मानतात आणि दक्षिणेस पडला तर अशुभ समजतात.

**देवधर्म** – हे लोक सूर्योपासक असल्यामुळे सकाळ-सायंकाळ सूर्याची पूजा करतात. सूर्याची शपथ घेतल्यास ती मोडीत नाहीत. ती मोडल्यास अंधत्व येते किंवा वीज पडून डोके फुटते, अशी यांची समजूत आहे. जादूटोण्यावर यांचा बराच विश्वास आहे. एखादा इसम आजारी पडल्यास त्याला भूतबाधा झाली,

असे समजून मंत्रोपचार करतात व कोंबडे-बकरे बळी देतात.

**मर्तिकप्रथा–** हे लोक मृताला पुरतात. एखाद्याला अपघाती मरण आल्यास त्याच्या खड्ड्यात प्रथम एका माणसाला उभे



थंड पुलयन स्त्री

करतात. नंतर दुसरा माणूस हातात एक कोंबडे, तलवार व मशाल घेऊन त्या खड्ड्यामोवती तीन प्रदक्षिणा करतो. एवढे झाल्यावर खड्ड्यातला तो माणूस बाहेर येऊन दूर निघून जातो. मग तिथे मयताला पुरतात. सुतक चौदा दिवस पाळतात. ते संपेपर्यंत प्रत्येक दिवशी पुरल्याजागी तिळासह भाताचा पिंड ठेवतात. सोळाव्या दिवशी आप्तेष्टांना भोजन देतात.

यांच्यांत व्यभिचार, चोरी वगैरे गुन्ह्यांची चौकशी जात पंचायतीमार्फत होते. [ का. ट्रा. स. इं.; रजःकण ]

**थ** त वर्गातील दुसरा वर्ण आणि वर्णमालेतील सतरावे व्यंजन. याच्या विकासाच्या पाच अवस्था असून, पहिली

थ=०θ१८थ

थच्या रूपाचा विकासक्रम

अशोकाच्या गिरनारच्या शिलालेखात, दुसरी व तिसरी राजा यशोधर्म्याच्या मंदसोर शिलालेखात (इ. स. ५३२) आणि चौथी लल्ल, भोज व उदयादित्य यांच्या अनुक्रमे देवल (इ. स. ९९२), धार (इ. स. चे ११ वे शतक) व उज्जैन (इ. स. चे ११ वे शतक) येथील लेखांत आढळते. यापुढची अवस्था म्हणजेच या वर्णाचे सध्याचे रूप होय.

वर्णोद्धार तंत्रात याचे स्त्रीरूपी ध्यान वर्णिले आहे, ते असे-

नीलवर्णां त्रिनयनां षड्भुजां वरदां पराम् ।
पीतवस्त्रपरीधानां सदा सिद्धिप्रदायिनीम् ॥
एवं ध्यात्वा थकारं तु तन्मन्त्रं दशधा जपेत् ॥

**अर्थ–** नीलवर्णाची, त्रिनेत्र, षड्भुज, वरदायिनी, श्रेष्ठ, पिवळे वस्त्र परिधान केलेली आणि सदैव सिद्धी देणारी अशा थ देवतेचे ध्यान करून तिच्या मंत्राचा दहा वेळा जप करावा.

थ हा दन्त्य वर्ण आहे. [ म. श. को.; म. ज्ञा. को.; श. क.]

**थम्माडी** कर्नाटकातली एक जात. यांची भाषा कानडी आहे. बहुतेकजण आपल्या नावाच्या शेवटी ऐसा हा शब्द जोडतात. शिवमंदिरातील पूजेसाठी फुले पुरवणे, हा यांचा व्यवसाय असतो. काही लोक शेतीही करतात.

कोंडे नावाचे झाड हे यांचे देवक आहे. त्याला हे अतिशय पवित्र मानतात व त्याची पूजा करतात. स्त्रिया त्या झाडाची चित्रे शरीरावर गोंदवून घेतात.

**देवधर्म –** हे लोक कडवे शिवभक्त आहेत. ते विष्णूच्या मंदिरात कधीही जात नाहीत. सोमवारी उपवास करतात.

**विवाहप्रथा –** पूर्वापार संबंध असलेल्या कुळांशीच हे लग्नसंबंध करतात. थोरल्या बहिणीच्या मुलीशी किंवा मामाच्या मुलीशी लग्न करणे यांना अधिक पसंत असते. एखाद्या मुलीचे लग्न जमत नसेल तर खंजिराशी तिचे लग्न लावतात. मग ती बापाच्या घरी राहू शकते.

कुळाच्या देवकाची पूजा हा लग्नातला मुख्य विधी असतो. लक्ष्मीपूजन, कलशपूजन, इ. विधीही लग्नात करतात.

**मर्तिकप्रथा –** हे लोक मृतांना पुरतात. प्रेत नेताना त्याचे डोके गावाकडे केलेले असते. पुरण्यापूर्वी प्रेताची पूजा करून त्याच्या गळ्यात शिवलिंग बांधण्याची चाल या लोकांत आहे. क्रियाकर्मांतर काहीही करीत नाहीत. १२ दिवसांनंतर जंगमाला दानदक्षिणा देतात. [ मै. ट्रा. का. ]

**थाचनदेन** केरळमधील एक जमात. यांची वसती प्रामुख्याने कालिकत जिल्ह्यात आहे. थाचनाड या त्यांच्या मूळ गावावरून थाचनदेन हे नाव आले असावे. त्यांचे पूर्वीचे नाव कुडान असे होते.

शेतात मजुरी करणे हा यांचा मुख्य व्यवसाय आहे. हे भात

गोळा करण्याचेही काम करतात. शेताजवळच्या डोंगरउतर-णीवर यांची घरे असतात. पाड्यातील (वस्तीतील) त्यांच्या झोपड्या मात्र जवळ जवळ असतात. जमातीच्या प्रत्येक पाडीत दोन पुरुष प्रमुख असतात. ते सर्व महत्त्वाच्या प्रसंगी उपस्थित राहून जमातीला मार्गदर्शन करतात. त्यांतला एक पुजारी आणि मांत्रिकही असतो. कुलक्कथ ही त्यांची प्रमुख देवता होय.

मुली वयात येण्यापूर्वी त्यांचा विवाह करण्याकडे यांची प्रवृत्ती असते. ताळीबंधन हा विवाहातला महत्त्वाचा विधी असतो. यांच्यांत अनेक बायका करण्याची पद्धत आहे.

हे लोक मृतांना पुरतात. पुरण्यापूर्वी प्रेताला स्नान घालून नवे वस्त्र गुंडाळतात. अत्यंत वृद्ध मनुष्याला मात्र जाळतात. तिसऱ्या दिवशी अस्थी गोळा करून त्या पुरतात. चौदा दिवस आशौच पाळतात. [ ट्रा. कें. ]

**थान** (संस्कृत स्थान) सौराष्ट्रातील एक क्षेत्र. पूर्वी याचा समावेश लख्तर संस्थानात होत असे. हे खेडे असून याच्याभोवती जुना कोट आहे. गावाबाहेर त्रिनेत्रेश्वर नामक सूर्याचे प्रसिद्ध देवालय असून, जवळच पापनाशन कुंड व वासुकी आणि मंडक यांची मंदिरे आहेत. द्रौपदी याच गावी जन्मली, अशी समजूत आहे. इथ श्रीकृष्ण रुक्मिणीसह आला होता आणि रुक्मिणीने इथल्या दोन तलावांत स्नान केले होते, त्यामुळे त्या तलावांना प्रियतमा व कमला अशी नावे पडली, असे सांगतात. स्कंद पुराणात या क्षेत्राचे माहात्म्य वर्णिलेले आहे. पूर्वी हे एक समृद्ध नगर व राजधानीचे ठिकाण होते. तिथून जवळच सोनगड नावाचा किल्ला आहे. [ म. ज्ञा. को. ]

**थापे** ओल्या रांगोळीचा किंवा भित्तिचित्रकलेचा एक प्रकार. हा शब्द स्थापना या शब्दावरून बनला असून, त्याला थापा, थाप, छाप, छीप, छप्पा, इ. अनेक नावे आहेत. सण, उत्सव, विशिष्ट व्रते व विवाहादी मंगल कार्ये या वेळी उजवा तळवा रंगात बुडवून त्याचा भिंतीवर किंवा भूमीवर जो छाप उमटवला जातो, त्याला थापा असे म्हणतात. ही एक पुरातन लोकप्रथा असून, तिचा प्रचार राजस्थान, मध्य प्रदेश व उत्तर प्रदेश या भागांत आहे. तिकडच्या ग्रामीण जीवनात थाप्याला फार महत्व आहे.

तांदूळ किंवा गहू यांचे पीठ पाण्यात मिसळून व त्यात हळद किंवा रंग टाकून त्या लेपाने थापे उठवतात. काही थापे लाल व शुभ्र रंगाचे असतात; तर काही मिश्र रंगाचेही असतात. भिन्न भिन्न जाती आणि प्रदेश यांमध्ये थाप्यांच्या आकृतीत आणि संकेतांत फरक असतो. तो संबंधसूचकही असतो.

विवाहासाठी मांडव घालताना वेळूचे खांब पुरण्यापूर्वी भावी वधू त्या वेळूंवर थापे उठवते. पर्वतीय प्रदेशात दिवाळीच्या वेळी रंगीत द्रवात मूठ बुडवून जमिनीवर तिचे थापे उठवतात. हे थापे लक्ष्मी घरात येण्याचा मार्ग सूचित करतात. भोजपुरी प्रदेशात कार्तिक महिन्यात कुंवार मुली एक व्रत करतात. त्यात तांदुळाची मुटकुळी भिंतीवर चिकटवतात व त्यांच्या भोवती थापे उठवतात. नागपंचमी, श्रावणी पौर्णिमा, अहोई, दिवाळी, कार्तिकी एकादशी, इ. व्रतोत्सवांतही थापे मारतात, त्यांत त्या त्या व्रतोत्सवांच्या दर्शक अशा विविध आकृती असतात; तशीच देव-देवतांची चित्रेही असतात. या थापाप्रथेतूनच पुढे भित्तिचित्रकलेचा विकास झाला आहे.

सुवासिनी स्त्रिया व कुमारिका यांनाच थापे उठवण्याचा अधिकार असतो. काही मंगल कार्यांत न्हाव्याच्या स्त्रीलाही तो अधिकार देतात. रजस्वला व कुष्ठरोगी स्त्रियांनी थापे उठवणे निषिद्ध मानले आहे. थापे उठवणाऱ्या स्त्रीने तत्पूर्वी स्नान करणे व धूत वस्त्र परिधान करणे आवश्यक असते. थाप्याचे काम पूर्ण झाल्यानंतर त्या स्त्रीला 'आखत' देतात. आटा किंवा तांदूळ सुपात घालून देणे, याला आखत म्हणतात. थापे उठवण्याच्या वेळी अनेक स्त्रिया एकत्र जमून मांगलिक गीतेही गातात. [ श्री. राहुल सांकृत्यायन– संमेलनपत्रिका, लोकसंस्कृति विशेषांक १९५३; त्रिपथगा, नोव्हेंबर १९६२ ].

**थारू** एक आदिवासी जमात. उत्तर प्रदेशातील नैनिताल जिल्ह्यात तराई नामक भागात या जमातीची प्रामुख्याने वसती आहे. हिमालयाच्या पायथ्याशी पसरलेला हा ९० मैल लांबीचा अरुंद पट्टा घनदाट जंगले व दलदल यांनी व्यापलेला आहे. त्याचे क्षेत्रफळ ९२१ चौ. मैल असून, तियली जमीन गाळामुळे अत्यंत सुपीक बनलेली आहे.

थारूंची लोकसंख्या सुमारे पंधरा हजार आहे. इ. स. च्या १८ व्या शतकाच्या शेवटपर्यंत तराई प्रदेशावर थारू लोकांचे राज्य होते. याशिवाय सात ते दहा हजार थारू लोक बिहार, नेपाळ, इ. प्रदेशांतही वास्तव्य करून आहेत. नेपाळमध्ये त्यांना सवर्ण हिंदू समजतात. काही थारू लोकांच्या बोलीत थार या शब्दाचा अर्थ जंगली मनुष्य असा आहे. त्यावरूनच थारू हे नाव आले असावे.

थारू लोक थारूहाटी नामक एक बोली बोलतात. ती हिंदी, उर्दू, कमौनी, कनौजी व व्रज यांच्या मिश्रणाने बनलेली असून, व्रज भाषेला अधिक जवळची आहे.

थारू लोक बहुतांशी मंगोलियन वंशाचे आहेत. त्यांचा वर्ण

गव्हाळी असून, डोळे कलते व नाक मोठे असते. नेपाळी लोकांच्या चेहऱ्याशी या लोकांच्या चेहऱ्यांचे बरेच साम्य आहे.

तराई भागातील थारूंची गावे दूरदूर वसलेली आहेत. पूर्वी या लोकांना वरचेवर वसती उठवून दुसरीकडे जावे लागे. नद्यांचे पूर, रानटी हत्तींची धाड, रोगांची साथ, अशा अनेक कारणांमुळे त्यांची गावे उद्ध्वस्त होत असत. या भटकेपणामुळे त्यांच्या जीवनाला स्थैर्य व समृद्धी कधीही लाभली नाही. त्यामुळे नवीन गाव वसवताना ते लोक उंच व कोरडी जागा, सुपीक जमीन आणि रानटी श्वापदांच्या हल्ल्यांपासून संरक्षण, या गोष्टी विचारात घेत आणि मग गाव वसवीत.

थारूंच्या गावाची रचना सुबद्ध असते. एका लहान रस्त्याच्या दोन्ही अंगांना पण दूरदूर अशी त्यांची घरे असतात. घरामोवती शेती व बागाईत असते. गावाभोवती दगडी खांब रोवलेले असतात. गावाच्या सीमेवर भूमसेन नामक ग्रामदेवतेचे स्थान असते.

घर बांधण्यापूर्वी त्या जागेवर होमहवन करून देव-देवतांना आणि भुता-खेतांना ते संतुष्ट करतात. घरासाठी बांबूचे खांब उभे करून त्यावर गवताचे जाड छप्पर घालतात. छपरे उतरती असतात. भितीही गवताच्या असून, त्यांवर माती, शेण व गव्हाचे तूस कालवून त्याचा गिलावा करतात. कुटुंब मोठे असेल, तर घरात अनेक खोल्या असतात. घरापुढचे अंगण मोठे असून त्यात गोठा, पाणघर व देवांचा ओटा असतो. थारूंची घरे आतून व बाहेरून स्वच्छ असतात. ते आपल्या भितीवर घोडेस्वार, हत्ती व इतर प्राणी यांची सुंदर चित्रे काढतात.

घरात लागणारी मातीची लहानमोठी भांडी, वेताच्या पेट्या, टोपल्या, चटया, सुपे, पंखे, खाटा; तसेच मासे व शिकार पकडण्यासाठी जाळी व सापळे; शेतीसाठी नांगर, कुळव, इ. अवजारे, बैलगाड्या वगैरे वस्तू ते स्वतःच बनवतात. धातूची भांडी मात्र ते इतरांकडून विकत घेतात.

**पोषाख** – गेल्या शतकाच्या अखेरीपर्यंत थारू स्त्री-पुरुष फार कमी कपडे वापरीत. पुरुष कमरेला एक लंगोटी लावीत व खांद्यावर एक घोंगडी घेत. सांप्रत धोतर, जाकीट किंवा सदरा व टोपी असा त्यांचा पोषाख असतो. स्त्रिया काळा घागरा नेसतात, अंगात चोळी घालतात व डोक्याला काळे फडके गुंडाळतात. सुधारलेल्या स्त्रिया हल्ली साडीही नेसू लागल्या आहेत.

थारुहा हे त्यांचे जातीय नृत्य असते. त्या नृत्याच्या वेळी पुरुष स्त्रियांचा पोषाख व दागिने घालतात. लग्नाच्या वेळी नवरा-मुलगा पायजमा, अंगरखा, पगडी व कमरेला शेला असा पोषाख करतो.

थारू स्त्रियांना दागिन्यांची फार आवड असून, शक्य असल्यास त्या डोक्यापासून पायापर्यंत सर्व शरीर चांदीच्या दागिन्यांनी मढवतात. बिंदी, नथुनी, नानाविध, कर्णफुले



खुंका स्त्री (थारूंची पोटजात)

चांदीच्या पुतळ्यांची व रंगीबेरंगी मण्यांची माळ, सर्व बोटांत अंगठ्या, हातात तऱ्हेतऱ्हेच्या बांगड्या व पायात साखळ्या असे अनेक अलंकार त्या वापरतात. त्या शोभेसाठी गोंदूनही घेतात. काही पुरुषही गोंदून घेतात.

**उद्योगधंदे** – पूर्वी शिकार करणे, मासे पकडणे व गुरे पाळणे व रानातली कंदमुळे, फळे गोळा करणे हे थारू लोकांचे जीवन-व्यवसाय होते. हल्ली हे लोक सुधारलेल्या पद्धतीने, निरनिराळी अवजारे वापरून व जमिनीची मशागत करून शेती करू लागले आहेत. खरीप व रब्बी अशा दोन्ही हंगामांत ते तांदूळ, ज्वारी, गहू, मसूर, मका, कडधान्ये, इ. धान्ये व कांदे, बटाटे, सुरण, भाज्या, ताग, इ. पिके उत्तम प्रकारे काढतात. स्वतःच्या मालकीची थोडीबहुत जमीन असणे, हे थारू लोक मानाचे समजतात. शेतीच्या हंगामात सवड सापडली, की ते शिकारीला किंवा मासे मारायला जातात. ते जाळी व सापळे लावून मासे पकडतात व ते वाळवून ठेवतात. तांदूळ हे थारू लोकांचे मुख्य अन्न असून, सर्व प्रकारचे मांस, मासे व फळेमुळे

हे पूरक अन्न असते. मद्यपानाची त्यांना अत्यंत आवड असून, समारंभांत मद्यासाठी त्यांचा सर्वांत अधिक खर्च होतो.

थारू जमातीचे उच्च व कनिष्ठ असे दोन वर्ग आहेत. त्या दोन्ही वर्गांत पुन्हा पाच किंवा सहा उपजाती आहेत. यथा, बिर्तिया, बद्वैत, दहैत, महनुम्, व रावत या उच्च वर्गातील उपजाती असून, बुक्सा, खुंका, रजिया, संसा, जुगिया व डंग्रा ही कनिष्ठ वर्गातील उपजातींची नावे आहेत. पण अलिकडे उच्च वर्गातील सर्व उपजातींचे लोक स्वतःला राणा ठाकूर म्हणवून घेतात व राणाप्रतापचे वंशज समजतात. सर्व उपजमातींची आपसांत लग्ने होऊ शकतात.

थारू जमातीत पितृसत्ताक कुटुंबपद्धती आहे. कुटुंबाच्या मालमत्तेवर घरातील सर्व पुरुषांचा समान हक्क असतो. स्त्रियांना मात्र मालमत्तेतला वाटा मिळत नाही. ते वारसाहक्कासंबंधीचे सर्व तंटे खास पंचायत नेमून सोडवतात.

प्रत्येक गावात पधान हा त्यांचा मुख्य अधिकारी असतो. त्याचा अधिकार वंशपरंपरेने चालतो. त्याचप्रमाणे भरार



खुंका पुरुष (थारूंची पोटजात)

नामक एक पुरुषही प्रत्येक गावात असतो. त्याच्या अंगात दैवी शक्ती असते, अशी समजूत आहे. गावातील कोणतेही धार्मिक, सामाजिक किंवा कौटुंबिक कार्य भराराच्या साहाय्याशिवाय पार पडत नाही. देवतांची पूजा, भुताखेतांचे निवारण, जादूटोण्याचे उच्चाटन व रोगांचे निर्मूलन ही सर्व कार्ये आपल्या मंत्रसामर्थ्याने तो करतो. गुरूच्या मार्गदर्शनाखाली अत्यंत कठोर व्रतांचे पालन करूनच भराराला ही मंत्रविद्या प्राप्त करावी लागते. प्रत्येक कुटुंबाकडून दर सहामाहीत त्याला त्याबद्दल ठराविक तांदूळ मिळतात.

दृष्ट लागण्याची थारू लोकांना फार भीती वाटते. त्यासाठी ते गालबोट लावणे, मंतरलेले ताईत गळयात बांधणे, मंत्र म्हणणे, इ. उपाय करतात.

सर्वसाधारणपणे थारू लोक काटक असून, त्यांच्या अंगात रोगप्रतिकारक शक्ती बरीच असते. त्यामुळेच तराई प्रदेशातील रोगट व हिवतापाला अनुकूल अशा हवामानाला त्यांनी चांगल्या प्रकारे तोंड दिले आहे. चालू शतकात मात्र देवी, पटकी व शीतज्वर यांच्या साथींमुळे त्यांची हजारो माणसे मृत्युमुखी पडली. भूतपिशाचांमुळे सर्व रोग होतात, अशी पूर्वी त्यांची समजूत होती. कोणता रोग कोणत्या भुताच्या कोपामुळे झाला आहे, हे भराराला ओळखता येत असे व त्या भुताला कोणती वस्तू देऊन संतुष्ट करायला पाहिजे, हेही तो सांगत असे. हल्ली ही अंधश्रद्धा हळूहळू कमी होत आहे.

**देवधर्म** – भूतपिशाचे या दुष्ट शक्ती, पितरांचे आत्मे व भूमसेन यांना शरण जाणे व पशुपक्ष्यांचा बळी देऊन त्यांना संतुष्ट करणे, हाच थारू लोकांचा सर्वसाधारण धर्म होय.

ठाकूर किंवा भगवान नामक एक सर्वश्रेष्ठ देव ते मानतात. त्याच्या खालोखाल ते भूमसेन नामक ग्रामदेवाला मान देतात. भूमसेन सर्व गावाचे रक्षण करतो आणि लोकांना सुख व समृद्धी देतो, अशी त्यांची समजूत आहे. गावाच्या सीमेवर पिंपळाच्या किंवा कडुलिंबाच्या झाडाखाली या भूमसेनाची स्थापना केलेली असते. त्यांच्या पितरांचे आत्मे हे त्या त्या कुळाचे रक्षण करतात, म्हणून सणासुदीच्या दिवशी प्रथम त्यांची पूजा केली जाते या आत्म्यांचे स्थान घरातच असते. याशिवाय ते दुर्गा, काली, पार्वती, महादेव, विष्णू, इ. देवता, मुसलमानांचे पीर व शिखांचे गुरू यांनाही भजतात.

**सण व उत्सव** – थारू लोक होळीचा उत्सव फार उत्साहाने साजरा करतात. तो माघात सुरू होतो व पुढे दोन महिने चालू असतो. चैत्र महिन्यात रब्बी हंगामाच्या अखेरीस 'बरि चराई' नामक उत्सव झाला, की त्यांचा होलिकोत्सव समाप्त होतो. या उत्सवात अश्लील गाणी व उखाणे यांना ऊत येतो. खाण्यापिण्याची लयलूट असते. याशिवाय, आषाढ महिन्यात आषाढी नामक एक उत्सव ते करतात. त्या वेळी भूमसेनाला गूळ-तुपाचा नैवेद्य दाखवतात व कोंबडा किंवा बकरे बळी देतात. त्या दिवशी सगळे लोक उपास करतात व घरातील देव-

देवतांसाठी होमहवन करतात. कार्तिक महिन्यात नवीन पिक-लेल्या भाताचे पदार्थ घरातील देवता व पितरांचे आत्मे यांना अर्पण करून संतुष्ट करतात. या सणाला औंथ असे नाव आहे. दिवाळीच्या दिवशी थारू लोक वर्षी नावाचा विधी करतात. हे मृतांचे वार्षिक श्राद्ध असते. त्या दिवशी सर्व घर झाडून सारव-तात. अंगणात मांडव घालतात. पुरुष क्षौर करतात. घरात विविध मिष्टान्ने बनविली जातात. मांडवात पाच जलकलशांवर पणत्या पेटवून ठेवतात. जवळ मिष्टान्नांची ताटे, मद्य, रामाय-णाची प्रत, ढोल, झांजा, इ. वस्तू ठेवतात. मग पुरोहित कुश गवताची एक प्रतिमा करतो आणि तिच्यावर सर्वजण फुले वाह-तात. मृतांसाठी वाढलेली ताटे गावाच्या दक्षिण सीमेवर नेऊन ठेवतात. मग कोंबडी व बकरी यांच्या मांसाचा प्रसाद सर्वांना वाटतात. रात्री मृतात्म्यांसाठी अन्न व त्यांना झोपण्यासाठी पलंग ठेवतात. मग रात्रभर नाच-गाण्याचा कार्यक्रम चालतो. मृतात्म्यांच्या मनोरंजनासाठी परमार्थपर गीते गायिली जातात.

**विवाहप्रथा**—पूर्वी थारू जमातीत मुलीला पळवून नेऊन तिच्याशी लग्न करण्याची प्रथा होती. पण आता ही पद्धत मागे पडली आहे. त्याचप्रमाणे मोठी रक्कम घेऊन मुलगी देण्याचे प्रकारही आता कमी झाले आहेत. सांप्रत एक ते पाच वर्षे वयाच्या मुलामुलींचे विवाह त्यांचे आईबाप ठरवून ठेवतात. त्या वेळी कुलशील, गणगोत्र, आर्थिक परिस्थिती, आरोग्य, भूतबाधा वगैरे गोष्टींचा विचार करतात. त्यानंतर मुलीकडचे लोक मुलाच्या घरी जातात व तिथे मुलीचा बाप मुलाच्या कपाळाला हळद व तांदूळ लावतो. मुलाचे वडील सर्वांना मद्य, मांस व मिठाई वाटतात. त्या रात्री नाचगाण्याचाही कार्यक्रम होतो. या समारंभाला दिखनौरी असे नाव आहे. एखाद्याने पुढे हा करार मोडला, तर त्याला नुकसानभरपाई द्यावी लागते. मुले दहा ते सोळा वर्षांची झाली, की त्यांचे लग्न करतात. मुख्य लग्नसमारंभ नेहमी माघ महिन्यातील गुरुवारी किंवा रविवारी होतो. समारंभ अनेक दिवस चालतो. त्यात तेलहळद, मेज-वान्या, अहेर, नाचगाणे, इ. विविध प्रकारचे कार्यक्रम होतात. शेवटी वरपक्षाकडील लोक वधूगृही येऊन भंवर किंवा सप्त-पदीचा विधी करतात. एवढे झाले, की लग्न पूर्ण होते.

पहिल्या वेळी वधू वरगृही एकच रात्र राहते. नंतर दोन–तीन महिन्यांनी चाला नामक समारंभ करून तिला सासरी घेऊन जातात. थारू लोकांत विधवाविवाह रूढ आहे. मात्र अशा वेळी नवीन नवरा विधवेच्या मृत पतीच्या कुटुंबियांना काही रक्कम देतो. काही गरीब पुरुष विधवेशी लग्न केल्यावर तिच्या घरीच राहायला जातात. अशा माणसाला घरबैठा म्हणतात. मात्र अशा पुरुषाला समाजात फारशी प्रतिष्ठा नसते. धाकट्या दिराशी किंवा धाकट्या मेहुणीशी लग्न करणे, हे प्रतिष्ठितपणाचे मानले जाते. एका पुरुषाने एका वेळी दोन बायका करणे, यालाही त्यांच्या समाजात मान्यता आहे. थारू कुटुंबात स्त्रियांचे वर्चस्व फार असते. त्या किरकोळ कारणावरूनही काडीमोड घेतात; कारण त्यांना दुसरा घरोबा मिळण्याची सहज शक्यता असते.

थारू स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीने बहुतेक सर्व कामे करतात. बाजारहाट करायला तर त्या नेहमीच पुढे असतात. घरातील धान्य, गुरेढोरे, स्वतःचे दागिने, कपडे, इ. वस्तूंवर त्यांची पूर्ण मालकी असते. यावरून पूर्वी केव्हातरी या जमातीत मातृसत्ताक कुटुंबपद्धती प्रचलित असावी, असे वाटते. थारू कुटुंबात स्त्रियांचे वर्चस्व का आले, याबद्दल एक दंतकथा सांगतात, ती अशी ––

प्राचीन काळी या तराई प्रदेशावर राज्य करणाऱ्या एका राजावर परचक्र आले. त्यात त्याचा पराभव झाला. त्या वेळी शत्रूच्या हाती सापडण्यापेक्षा पळून गेलेले बरे, असा विचार करून राजघराण्यातल्या स्त्रिया रानात पळून गेल्या. त्यांच्या-बरोबर सईस आणि चमार हे राजवाड्यातील नोकरही होते. पुढे त्यांच्यापैकी चमार आणि राजस्त्रिया यांच्या संकरातून उत्पन्न झालेल्या संततीला थारू असे नाव मिळाले. स्त्रिया राज-घराण्यातील असल्यामुळे आणि पुरुष त्यांचे नोकर असल्यामुळे साहजिकच कुटुंबात स्त्रियांचे वर्चस्व चालू राहिले.

थारू लोक हे स्वतःला राजस्थानातील राजपुतांचे वंशज समजतात. याविषयी एक आख्यायिका सांगितली जाते, ती अशी –

इ. स. १५६७ मध्ये अकबराने चितोडवर हल्ला करून तिथल्या राजपुतांचा पराभव केला, तेव्हा राजघराण्यातील स्त्रियांनी जोहार करायचे ठरवले. पण आयत्या वेळी त्यांचे पुरोहित शत्रूला फितूर झाले आणि त्यांनी या स्त्रियांना पकडून शत्रूच्या स्वाधीन करायचा बेत आखला. तेव्हा काही राजपूत रक्षकांच्या मदतीने त्या स्त्रिया राजवाड्यातून निसटल्या आणि या प्रदेशात येऊन राहिल्या. त्या राजपूत रक्षकांनी केलेल्या या मदतीबद्दल त्या स्त्रियांनी आपल्या मुली त्यांना दिल्या. त्या राजकन्यांशी विवाह केल्यावरही त्या पुरुषांनी त्यांचा राण्यांप्रमाणेच मान ठेवला. आजही थारू लोक नववधूला राणी असेच म्हणतात.

**प्रसूतिप्रथा**—स्त्रीला पहिल्या बाळंतपणासाठी माहेरी न पाठ-वता सासरीच तिचे बाळंतपण करतात. सुवेर पाच दिवस पाळ-तात. सहाव्या दिवशी छट्टी समारंभ होतो, तेव्हा सर्वजण स्नान करून शुद्ध होतात. या समारंभाला सर्व गावकरी जमतात.

त्यांना त्या दिवशी मासळीची मेजवानी दिली जाते. सर्वजण मग बालकाला अहेर करतात.

**मैत्रीप्रथा** — रक्ताच्या नात्याव्यतिरिक्त मित्रत्वाचे नाते सुरू करण्याची एक प्रथा थारू लोकांत रूढ आहे. दोन पुरुषांची किंवा स्त्रियांची गाढ मैत्री झाली, तर एखाद्या शुभ दिवशी समारंभपूर्वक त्यांचे नाते जोडतात. अशा पुरुषांना परस्परांच्या बायकांचा उपभोगही घेता येतो. या व्यक्ती मग परस्परांच्या कुटुंबांशी निगडित होतात आणि सर्व कार्यांत परस्परांचा सल्ला घेतात.

**मर्तिकप्रथा** – थारू लोकांचा असा विश्वास आहे, की मनुष्य मेल्यावर त्याचा आत्मा निजधामाला जातो. हे धाम कुठे आहे, याची मात्र त्यांना काही कल्पना नाही. अनैसर्गिक मृत्यू घडतात ते भुताखेतांच्या कोपामुळे, असाही त्यांचा समज आहे. ते मृत्यूच्या वेळी त्या व्यक्तीच्या तोंडात गंगाजल घालतात. मृताच्या शरीराला तूप व हळद लावून त्याला नवीन कपडे घालतात. थारू लोकांत मोठमोठ्याने शोक करून दुःख-प्रदर्शन करण्याची चाल आहे. चंपारण्य व मुझफ्फर जिल्ह्यातील थारू लोक मृत्यूनंतर विशेष उत्सव करतात. त्या वेळी नाच-गाणेही होते.

पूर्वी मृताला पुरण्याची चाल होती; पण सांप्रत जाळण्याची प्रथा सुरू झाली आहे. मात्र लहान मुले, प्रसूतीच्या वेळी मेलेली स्त्री, अपघाताने किंवा रोगाच्या साथीत मेलेली व्यक्ती यांना तेवढे पुरतात. पुरण्यापूर्वी प्रेताला स्नान घालतात आणि त्याचे कपडे, थोडे अन्न व पैसे त्याच्याबरोबर पुरतात. पुढच्या प्रवासात या वस्तू मृताला उपयोगी पडतात, अशी थारूंची समजूत आहे. पूर्वी चार दिवस सुतक पाळीत, आता दहा दिवस पाळतात. तोपर्यंत रोज मृतात्म्याला अन्न अर्पण करतात. मृताच्या अस्थी एका मडक्यात घालून गावाच्या सीमेवर पुरतात व राख नदीत टाकतात. पुरुष त्यानंतर क्षौर करून स्नान करतात. नंतर गावजेवण घालतात.

सर्वसाधारणपणे थारू लोक साधेभोळे, प्रामाणिक व आतिथ्य-शील आहेत. त्यांच्यांत गुन्हेगारीची प्रवृत्तीही कमीच आढळते. एखाद्या वेळी हातून गुन्हा घडल्यास ते लगेच तो कबूल करतात. ते शब्दाला जागणारे असून, कर्जाची परतफेड करण्यात दक्ष असतात. आता मात्र इतर जातींशी संपर्क वाढल्यामुळे त्यांच्यांत काही दुर्गुण शिरू लागले आहेत.

थारू लोक रसिक व कलाकुसरीत प्रवीण आहेत. भिंतीं-वरील सुंदर चित्रे, वेतकामातील कल्पकता, कोरीव कामातील सुबकता, संगीत व नृत्य अशा अनेक प्रकारे त्यांच्यातील कलेचा आविष्कार झालेला दिसतो. त्यांच्या लोकगीतांत व नृत्यांत त्यांच्या सर्व कौटुंबिक व वैयक्तिक भावनांचे प्रतिबिंब उमटलेले आढळते. थारू स्त्रिया होळीच्या वेळीच तेवढ्या नाचतात. त्या वेळी त्या उत्तम वस्त्रे लेवून अलंकारही घालतात. नाचताना त्या गाणीही म्हणतात. पुरुषांच्या नाचाला ढोल व झांजा यांची साथ असते. [ चंपा. गॅझे.; पु. त. नि.; दि थारूज– एस्. के. श्रीवास्तव, १९५८; भा. आ.; कुमाऊं ]

## थालीपीठ

एक खेळ. हा महाराष्ट्रातील मुली खेळतात. खेळणाऱ्या मुली दोन गट बनवून दोन ओळींत समोरासमोर बसतात. समोरासमोरच्या दोन दोन मुली प्रथम डाव्या बाजूच्या मुलींप्रमाणे जमिनीवर हात ठेवतात आणि नंतर हात उचलून आपल्या मांडीवर आपटतात. त्यानंतर उजव्या मुलींप्रमाणे हात समोर धरून एकमेकींच्या हातावर मारतात. हा खेळ खेळताना गाणे म्हणतात, ते असे –

**तिखट मीठ । फोडणीचे पोहे । थालीपीठ ।।**

वरील क्रिया पुनः पुनः करीत राहणे, अशा रीतीने हा खेळ चालतो. [ व्या. ज्ञा. को. ]

## थाळी नृत्य

याला थरिया नृत्य असेही म्हणतात. हे नृत्य जौनसार बावर, गढवाल, कुमाऊं, हिमाचल प्रदेश इ. भागांत करतात. हे स्त्री-पुरुषांचे संमिश्र नृत्य आहे. पुरुष ढोल, तुतारी, डमरू इ. वाद्ये वाजवितात आणि स्त्रिया हाताच्या बोटांवर थाळ्या धरून त्या फिरवीत फिरवीत नाच-तात. नाचताना गाणीही म्हणतात. काही काही वेळा स्त्रिया थाळीवर पाय ठेवून नाच करतात. [ भा. लो. नृ. ]

## थिऑसफिकल सोसायटी

आधुनिक काळातील एक धार्मिक आंदोलन. या आंदो-लनाचा जन्म अमेरिकेत होऊन विस्तार मात्र भारतात झाला. थिऑसफी हा शब्द थिऑस (ईश्वर) आणि सोफिया (ज्ञान) या दोन ग्रीक शब्दांच्या संयोगाने बनलेला असून, त्याचा अर्थ ब्रह्मविद्या अथवा गूढविद्या असा आहे. या आंदोलनाची जन्म-दात्री श्रीमती हेलेना पेट्रोव्हना ब्लॅव्हॅट्स्की या नावाची एक रशियन स्त्री होती. तिबेटच्या अज्ञात भागात राहणाऱ्या काही आचार्यांकडून तिने धर्मज्ञान प्राप्त केले आणि गुरूच्या आदेशा-वरून त्या ज्ञानाचा प्रसार करण्यासाठी जगात भ्रमण सुरू केले. तिबेटमधून कैरो, पॅरिस या क्रमाने भ्रमण करीत करीत इ. स. १८७४ मध्ये ती अमेरिकेत गेली.

त्या वेळी अमेरिकेत अतींद्रिय ज्ञान आणि गूढविद्या याविषयी विशेष चर्चा चालू होती. कर्नल हेन्री स्टील ऑल्कॉट नामक

एका अमेरिकन गृहस्थाने याविषयी खोल संशोधन करून 'परलोकातील जीव' (People from the other world) या नावाचे एक पुस्तकही प्रसिद्ध केले होते. ब्लॅव्हॅट्स्कीने ऑल्कॉटची भेट घेऊन आपले विचार त्याच्यापुढे मांडले. त्या विचारांनी ऑल्कॉट प्रभावित झाला आणि गूढविद्येचे संशोधन



मादाम ब्लॅव्हॅट्स्की

व प्रसार करण्यासाठी त्या दोघांनी मिळून न्यूयॉर्क येथे ७ सप्टेंबर १८७५ या दिवशी थिऑसफिकल सोसायटी या संस्थेची स्थापना केली. ऑल्कॉट हे त्या सोसायटीचे अध्यक्ष झाले आणि ब्लॅव्हॅट्स्की ही कार्यवाह बनली.

पहिली तीन वर्षे सोसायटीच्या कामाला विशेष गती मिळू शकली नाही. या काळात सोसायटीच्या सदस्यांची बैठक ब्लॅव्हॅट्स्कीच्या निवासस्थानीच होत असे. या प्रारंभीच्या काळातच सोसायटीचे धुरीण आणि भारतातील श्री. दयानंद सरस्वती यांचा पत्रव्यवहार झाला आणि सोसायटी व आर्य-समाज यांनी सहकार्याने वैदिक ज्ञानाचा पुनरुद्धार व प्रसार करावा, अशी योजना ठरली. पण सोसायटी व समाज यांचे सहकार्य केवळ दोनच वर्षे टिकले.

याच सुमारास ब्लॅव्हॅट्स्कीला तिबेटातील महात्म्यांचा असा गुह्य आदेश प्राप्त झाला, की तिने भारताला आपले कार्यक्षेत्र मानावे. या आदेशानुसार ब्लॅव्हॅट्स्की आणि ऑल्कॉट ही दोघेही १६ फेब्रु. १८७९ रोजी मुंबईस आली. मुंबईत झालेल्या त्यांच्या सत्कारसमारंभात ऑल्कॉटने शिक्षणसुधारणा आणि संस्कृत विद्येचा पुनरुद्धार असा दुहेरी कार्यक्रम लोकांपुढे मांडला. त्याच वेळी भारतीय समाजाचे राष्ट्रीय पातळीवर संघटन करून ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या प्रचाराला पायबंद घालण्याची निकडही त्यांनी स्पष्ट केली.

यानंतर वर्षभराने ती दोघे सीलोनमध्ये गेली. तिथे त्यांनी बौद्ध धर्माचा स्वीकार करून प्राचीन बौद्ध धर्माच्या ग्रंथांचा व विचारांचा पुनरुद्धार करण्याचा प्रयत्न केला.

इ. स. १८८२ मध्ये संस्थेचे कार्यालय मुंबईहून मद्रास जवळील अडयार येथे गेले. त्याच ठिकाणी १८ डिसेंबर १८९० या दिवशी थिऑसफिकल सोसायटीच्या अंतर्गत भारताच्या राष्ट्रीय शाखेची स्थापना झाली. इ. स. १८९५ मध्ये राष्ट्रीय शाखेचे कार्यालय वाराणसीला गेले. श्री. मूळजी ठाकरसी हे या राष्ट्रीय शाखेचे पहिले भारतीय सदस्य होते.

**पौर्वात्य विचारधारा** – ब्लॅव्हॅट्स्की काही वर्षांनी इंग्लंड-मध्ये गेली आणि तिथे तिने इ. स. १८८८ मध्ये 'दि सिक्रेट डॉक्ट्रीन' नावाचा ग्रंथ लिहिला. पाश्चिमात्य जगाला प्राचीन काळातील दर्शनांचे रहस्य प्राप्त करून देणे, हा या ग्रंथाचा उद्देश होता. याच ग्रंथाने प्रभावित होऊन डॉ. ॲनी बेझंट ही ब्लॅव्हॅट्स्कीची शिष्या बनली. लंडनमध्ये ब्लॅव्हॅट्स्कीच्या शिष्यांची संख्या हळूहळू वाढू लागली आणि ती आपल्या शिष्यांना गुह्य साधनेचे सिद्धान्त शिकवू लागली. हिमालयात अदृश्यपणे वास्तव्य करणाऱ्या धर्माचार्यांशी आपल्या शिष्यांचा साक्षात संबंध प्रस्थापित करणे, हा तिचा उद्देश होता. ब्लॅव्हॅट्स्कीने सुरू केलेल्या या गूढवादी विचारधारेला थिऑसफीची पौर्वात्य विचारधारा असे म्हणतात. ही विचारधाराच पुढे थिऑसफीची आधारशिला बनली.

**साधना** – तरुण सदस्यांना प्रयोगात्मक गुह्यसाधनेचे रहस्य समजावून सांगण्याचे काम त्यांच्या कक्षाभवनात एखाद्या मंत्र्याच्या नेतृत्वाखाली होते. या साधनेची दीक्षा घेण्यासाठी प्रत्येक सदस्याला पुढील दोन व्रते पाळावी लागतात – थिऑसफीच्या सिद्धान्ताचे पालन व प्रसार करणे आणि कक्षाभवनात प्राप्त झालेल्या ज्ञानाची गुप्तता राखणे. अशा वेळी प्रत्येक सदस्याला एका धर्माचार्यांच्या चित्राची एक प्रत देतात. त्या चित्रासमोर बसून साधकाने आपले चित्त एकाग्र करायचे असते. ब्लॅव्हॅट्स्कीने इंग्लंडमध्ये गुह्यसाधनेचे पाठ द्यायला प्रारंभ केल्यावर ऑल्कॉटने तिच्याशी आपला मतभेद व्यक्त केला आणि तो तिला प्रत्यक्ष भेटण्यासाठी भारतातून इंग्लंडला गेला. परंतु तिथे पाऊल ठेवताच रहस्यमय रीतीने हिमालयातील धर्माचार्यांचे पत्र त्याच्या हाती पडले. त्या पत्रात असा आदेश होता, की 'ऑल्कॉटचे क्षेत्र केवळ सोसाय-

टीच्या संघटनकार्यापुरते मर्यादित आहे. गुह्यसाधनेच्या प्रचाराचा अधिकार केवळ ब्लॅव्हॅट्स्कीकडेच राहील.' ऑल्कॉटने हा आदेश मानला. त्यानंतर ब्लॅव्हॅट्स्कीने आपल्या मृत्यूपर्यंत (इ. स. १८९१) गुह्य साधनेच्या कार्याचे नेतृत्व केले. तिच्या मृत्यूनंतर तो अधिकार अॅनी बेझंटकडे आला.

**अॅनी बेझंटचे नेतृत्व** – जन्माने आयरिश आणि विवाहसंबंधाने इंग्लिश बनलेली अॅनी बेझंट आपण पूर्वजन्मी हिंदू असल्याचे समजत असे. ती भारताला आपली मातृभूमी मानी आणि भारतीय लोक आपले देशबंधू आहेत, असे समजे. इ. स. १८९३ च्या नोव्हेंबरात ती भारतात आली आणि केवळ थिऑसफीच्या क्षेत्रातच नव्हे; तर भारताच्या सर्वांगीण उद्धाराच्या कार्यात तिने आपल्या सर्व शक्ती पणास लावल्या. तेजस्वी प्रज्ञा, प्रभावी वक्तृत्व, प्रकांड पांडित्य, निष्कलंक चारित्र्य आणि भारताच्या उद्धाराची तळमळ या गुणांमुळे तिने भारतीय जनमानसावर विलक्षण प्रभाव पाडला आणि त्यायोगे थिऑसफीच्या आंदोलनाचीही प्रगती साधली. इ. स. १८९८ मध्ये ऑल्कॉट मृत्यू पावल्यावर थिऑसफिकल सोसायटीचे अध्यक्षपद तिच्याकडे आले व तिने ते अखेरपर्यंत सांभाळले.

**उद्देश** – प्रारंभी सोसायटीचा उद्देश 'विश्वाला संचलित करणाऱ्या नियमांचे ज्ञान प्राप्त करणे' हा होता. पण पुढे इ. स. १८७५ पासून १८९६ पर्यंतच्या काळात सोसायटीच्या उद्देशात अनेकवार बदल झाले. इ. स. १८९६ मध्ये मात्र तिच्या उद्देशांना निश्चित स्वरूप प्राप्त झाले, ते पुढील प्रमाणे –

(१) जात, धर्म, लिंग, वर्ण इ. सर्व भेदांना दूर सारून मानवजातीत सार्वभौम भ्रातृत्वाची प्रतिष्ठापना करणे.

(२) विविध धर्म, दर्शने व विज्ञान यांच्या अध्ययनाला उत्तेजन देऊन, तौलनिक अध्ययनातून मूलभूत एकत्व शोधून काढणे.

(३) सृष्टीच्या अज्ञात नियमांचे आणि मानवातील अंतःस्थ शक्तीचे संशोधन करणे.

सत्याचा शोध हे सोसायटीचे मूलभूत व प्रधान लक्ष्य होय. शांती हा तिचा मूलभूत मंत्र आहे आणि 'सत्यान्नास्ति परो धर्मः।' (सत्याहून श्रेष्ठ असा अन्य धर्म नाही) हे तिचे घोषवाक्य आहे.

व्यक्तिगत मोक्षावर अथवा निर्वाणावर भर न देता सोसायटी समाजसेवेला प्राधान्य देते. सत्य आणि करुणा यांची मूर्ती असलेला बुद्ध आणि परदुःखाने व्याकुळ होणारा रंतिदेव यांची चरित्रे सोसायटीला आदर्शभूत वाटतात. मानवांचा कर्मभार हलका करण्यासाठी सतत झटत राहणे, हीच सोसायटीच्या सदस्यांची परम साधना समजली जाते.

थिऑसफिकल सोसायटीचे एक वशिष्ट्य असे, की संस्थापकांपासून आजच्या अध्यक्षांपर्यंत कोणीही संस्थेच्या सदस्यांवर आपली मते लादण्याचा प्रयत्न केला नाही. तिथे सर्वांना संपूर्ण विचारस्वातंत्र्य आहे. प्रत्येकाने आपली विवेकबुद्धी वापरून संस्थेच्या उद्दिष्टांचे परीक्षण करावे आणि जे उचित वाटेल, त्याचाच केवळ स्वीकार करून, अनुचिताचा निःसंकोचपणे त्याग करावा, अशी संस्थेची अपेक्षा असते. संस्थेचा मूलाधार असलेले वरील तीन उद्देश मान्य केल्यावर प्रत्येक सदस्य विचार आणि आचार या उभय क्षेत्रांत संपूर्ण स्वतंत्र असतो. वरील तीन मुख्य उद्देशांशी संवाद राखून प्रत्येकजण धर्म, दर्शन, गुरू, संस्था या बाबतीत आपल्या आवडीनुसार निवड करायला मोकळा असतो. इ. स. १९२४ आणि १९५० साली संस्थेच्या जनरल कौन्सिलने या विचारस्वातंत्र्याचा निःसंदिग्ध शब्दांत पुरस्कार केला आहे.

**संघटन आणि विस्तार** – संस्थेच्या सर्वांत लहान भागाला 'लॉज' म्हणतात. कमीतकमी सात सदस्यांचा थिऑसफिकल लॉज बनतो. अशा कमीतकमी सात लॉजचा समूह झाला, की नॅशनल सोसायटी बनू शकते. जगातील सर्व देशांतील नॅशनल सोसायटयांची जनरल सोसायटी बनते. संपूर्ण सोसायटीचे नियंत्रण करणाऱ्या मंडळाला जनरल कौन्सिल म्हणतात. जनरल कौन्सिलमध्ये एक अध्यक्ष, एक उपाध्यक्ष, एक कोषाध्यक्ष, एक प्रमुख मंत्री, नॅशनल सोसायटयांचे मंत्री आणि त्यांनी निवडलेले आणखी पाच सदस्य असतात.

ही संस्था आंतरराष्ट्रीय आहे. जगातील सर्व देशांत मिळून या संस्थेच्या १४०० शाखोपशाखा असून, सदस्यांची संख्या ३५ हजारांवर आहे. कर्नल ऑल्कॉट, अॅनी बेझंट, अरुंडेल व सी. जिनराजदास ही आजवर होऊन गेलेल्या सोसायटीच्या अध्यक्षांची परंपरा आहे. श्री. नीलकंठन श्रीराम हे विद्यमान अध्यक्ष आहेत.

संस्थेचे प्रधान कार्यालय मद्रासजवळ अडचार येथे आहे. तिथे संस्थेच्या मालकीची २६६ एकर जमीन असून, त्या ठिकाणी अनेक इमारती उभारलेल्या आहेत. संस्थेचे ग्रंथालय जगातील सर्वोत्कृष्ट ग्रंथालयांपैकी एक समजले जाते. त्यात ताडपत्रांवरील १२००० हस्तलिखिते, कागदांवरील ६००० प्राचीन हस्तलिखिते आणि ६०,००० च्या वर उत्तमोत्तम मुद्रित ग्रंथ आहेत. हे ग्रंथ प्रामुख्याने भारतीय व पाश्चिमात्य धर्म, दर्शन व विज्ञान या विषयांवरील आहेत. या संस्थेने आपल्या धुरीणांच्या ग्रंथांबरोबरच भारतीय दर्शन व योगशास्त्र या विषयांवरील अनेक प्रमाणग्रंथ उत्तम रीतीने संपादून प्रकाशित केले आहेत. हे संस्थेच्या समन्वयशीलतेचे द्योतक आहे.

**सिद्धान्त** – भारतीय वेदान्त्यांप्रमाणेच एकमेवाद्वितीय ब्रह्मच सत्य आहे, असे थिऑसफी मानते. हे ब्रह्म जगदुत्पत्तीसाठी पुरुष आणि प्रकृती यांच्या रूपाने द्विधा होऊन संयोग पावते. जीवाला ब्रह्मैक्य प्राप्त होईपर्यंत अनेक योनींतून प्रवास करावा लागतो. मनुष्याच्या विचारानुरूप कर्मे घडतात आणि कर्मानुरूप त्याला भाग्य लाभते.

मानवी जीवाच्या परलोकनिवासाचा विशेष तपशील थिऑसफीने दिलेला आहे. थिऑसफीच्या मते जीवाला स्थूल देह व छायादेह असे दोन देह असतात. या दोन्ही देहांचा घनिष्ट संबंध असतो. दोहोंचा नाशही एकदमच होतो. छायादेह नष्ट होताच जीव भुवर्लोकात जातो. तिथे भूलोकातील द्रव्याने बनलेली एकही वस्तू नसते. भुवर्लोक वासनांचे मुक्त स्थान असते. जीव स्थूल शरीरातून मुक्त झालेला असल्यामुळे त्याच्या वासनांचा आवेग वाढतो; परंतु स्थूल इंद्रियांच्या अभावामुळे त्याला त्यांची तृप्ती मात्र करता येत नाही. ही परिस्थिती असह्य होऊन त्याला अखेरीस आत्मसंयमनाची कास धरावी लागते. अशा प्रकारे पाच ते चाळीस वर्षेपर्यंत भुवर्लोकात यातना सहन केल्यानंतर जीवाला पुनर्जन्म लाभतो. मग तो स्वाभाविकपणेच आपल्या पूर्वजन्मीच्या दुष्ट प्रवृत्तींना आळा घालण्याचा प्रयत्न करतो. जे पुण्यात्मे असतात, ते भुवर्लोकात न जाता सरळ स्वर्गलोकात जातात. तिथे त्यांच्या समस्त वासना तृप्त व शांत होतात. मग ते आध्यात्मिक प्रगतीला पात्र ठरतात. स्वर्गातील जीवन अगदी थोड्या वर्षांपासून साडे एकवीसशे वर्षांपर्यंत असते.

मनुष्यजन्म लाभूनही जो भगवंताची कास धरीत नाही, त्याला चौऱ्यांयशी लक्ष योनींतून भ्रमण करावे लागते, अशी हिंदू पुराणांची धारणा आहे. परंतु थिऑसफीच्या मते अनेक योनींतून उत्क्रांत होत होत मनुष्ययोनीत आलेला जीव परत खालच्या योनीत जात नाही. मनुष्याचा पुनर्जन्म मनुष्ययोनीतच होतो आणि तो कोणत्याही देशात आणि कोणत्याही धर्मात होऊ शकतो. तसेच, पुनर्जन्माच्या वेळी पूर्वजन्मीचे लिंगवैशिष्टच राहतेच असेही नाही. जीवाच्या क्रमशः विकासासाठी आवश्यक तो देह आणि आवश्यक ती परिस्थिती त्याला पुनर्जन्मात लाभत जाते.

कर्मव्यवस्थेच्या बाबतीत थिऑसफीच्या कल्पना वेगळ्या आहेत. हिंदू पुराणांच्या मते चित्रगुप्त हा मानवी प्राण्यांच्या पाप-पुण्यात्मक कृत्यांचा हिशोब ठेवीत असतो. थिऑसफीच्या मतानुसार प्रत्येकाच्या कर्माचा हिशोब ठेवण्याचे काम एका उच्च श्रेणीच्या देवतेकडे असते. प्रत्येकाला आपल्या कर्माचे पुरेपूर फळ भोगावे लागते हे खरे; परंतु जीवाला जेवढे सहन करवेल आणि त्याच्या क्रमविकासाला बाधक ठरणार नाही एवढ्या प्रमाणातच त्याचे शुभाशुभ कर्म प्रारब्धकर्मात समाविष्ट होते.

हिंदूंचा अवतारवादही थिऑसफीने स्वीकारला आहे. जीवनाच्या ज्या श्रेणीत जीव राहत असतात, त्याच श्रेणीतील देह धारण करून परमेश्वर जीवांचा उद्धार करतो, असे थिऑसफी म्हणते. दशावतारकल्पना म्हणजे उत्क्रांतीचे सारतत्त्व आहे, असे थिऑसफीचे मत आहे.

ऋषिसंघाची कल्पना हे थिऑसफीचे खास वैशिष्ट्य आहे. या जगताचे आध्यात्मिक संचालन करणारे काही ऋषी अथवा महात्मे असून, त्यांचे केंद्र हिमालयात आहे. मनुष्याला स्थूल देहाने तिथे जाता येत नाही; परंतु सूक्ष्म देहाने अनेक अधिकारी व्यक्ती तिथे जाऊन आलेल्या आहेत, असे थिऑसफी सांगते. ऋषिसंघात सर्वोच्च स्थान सनत्कुमारांकडे आहे.

या ऋषिसंघातील एका ऋषीकडे जगद्गुरुपद असते. सध्या मैत्रेय नामक ऋषी जगद्गुरू आहे. बुद्धाच्या परिनिर्वाणापासून तोच जगद्गुरू राहिला आहे. त्यापूर्वीचा जगद्गुरूच आपल्या अंतिम जन्मात बुद्ध होऊन अवतरला होता. बुद्धत्व हे जगद्गुरुपदाहून उच्च पद आहे.

ब्लॅव्हॅट्स्की, ॲनी बेझंट आणि अन्य काही थिऑसफिस्ट साधक यांनी हिमालयस्थ महात्म्यांशी अदृश्य संबंध प्रस्थापित केले होते, असे त्यांनी आपापल्या ग्रंथात लिहून ठेवले आहे.

आचार-विचारांची शुद्धता राखली, तर प्रपंचात राहूनही माणसाला मुक्त होता येते, असे हिंदू धर्माप्रमाणेच थिऑसफीचेही स्पष्ट मत आहे.

**सोसायटीचे बोधचिन्ह** – एकमेकांत गुंतलेल्या दोन समभुज त्रिकोणांनी बनलेली षट्कोनी नक्षत्राकृती हे थिऑसफिकल सोसायटीचे बोधचिन्ह आहे. हे चिन्ह सोसायटीच्या उद्दिष्टांचे द्योतक आहे. उत्तरेकडे शिर असलेला त्रिकोण आध्यात्मिक जगताचे आणि दक्षिणेकडे शिर असलेला त्रिकोण भौतिक जगाचे प्रतीक आहे. या नक्षत्राकृतीला भारतात विष्णूची मुद्रा म्हणतात आणि पाश्चिमात्य देशात सॉलोमनची मोहर असे




सोसायटीचे बोधचिन्ह

इंद्रियांची मुद्रा म्हणतात. याच्या भोवती असलेले सर्पाचे मंडळ अमरत्वाचे प्रतीक ,आहे. या सर्पाने आपलीच शेपटी आपल्या मुखात पकडली आहे. हा ज्ञानाचा सर्प आहे. वर सर्पाच्या मुखाजवळच्या वर्तुळात असलेले स्वस्तिक हे अनंताच्या ज्ञानाचे प्रतीक आहे.

त्यातील क्रॉस ( † ) हा विकासाचे माध्यम सुचवितो. याचाच दुसरा अर्थ सुळावर चढणे अथवा इंद्रियांवर ताबा मिळवणे असा आहे. सिद्धी प्राप्त झाल्यानंतर क्रॉसचे स्वरूप (☥) असे होते. हे चिन्ह असे सुचवते, की ' कर्मफल माणसाच्या हाती नाही; त्या ज्ञानमार्तंडाकडे दृष्टी ठेवून पुढे चालावे'. काही ठिकाणी क्रॉसऐवजी स्वस्तिकाचाही वापर करतात.

या बोधचिन्हाच्या डोक्यावर ओं हे अक्षर असून, खाली 'सत्यान्नास्ति परो धर्म: ' हे वचन आहे.

मूल्यमापन – थिऑसफी हा एखादा स्वतंत्र धर्म नाही; तर ती एक सर्वधर्मसमावेशक विचारसरणी आहे. थिऑसफीत सर्व धर्मांचा समन्वय अपेक्षित आहे. हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन, यहुदी, इ. धर्मांतील कोणीही व्यक्ती थिऑसफिस्ट होऊ शकते. त्यासाठी तिला आपला धर्म सोडावा लागत नाही. उलट आपल्या धर्माचे प्राणतत्त्व ओळखून त्यावर अधिक निष्ठा ठेवणाराच खरा थिऑसफिस्ट बनू शकतो. कोणत्याही धर्माचे प्राणतत्त्व त्याच्या बाह्याचारात नसून, अंतिम सत्यावरील निष्ठेत आहे, अशी थिऑसफीची धारणा आहे. सर्व धर्मांच्या अनुयायांत ही अंतिम सत्यावरील निष्ठा जेवढ्या प्रमाणात जागृत होईल, तेवढ्या प्रमाणात धर्मसमन्वय वाढीला लागेल आणि बाह्याचारांच्या क्षुद्र भेदांतून निर्माण होणारे संघर्ष टळतील. या दृष्टीने पाहिले तर मुसलमान धर्मातील सूफी, ख्रिश्चन धर्मातील नॉस्टिक्स आणि हिंदू धर्मातील ब्रह्मवादी हे वास्तविक थिऑसफिस्टच आहेत.

भारतात थिऑसफीचा प्रवेश झाला, त्या वेळी इथे हिंदू, मुसलमान व ख्रिश्चन या धर्मांचा संघर्ष चालू होता. थिऑसफीमुळे हा संघर्ष टळू शकला नाही; अथवा त्याची तीव्रता कमी झाली असेही नाही; परंतु या तिन्ही धर्मांतील काही व्यक्तींना थिऑसफीने प्रभावित केले आणि धार्मिक कट्टरपणात मानवतेची हानी असून, धर्मसमन्वयानेच माणसाचे खरे कल्याण होऊ शकेल, असा विश्वास त्यांच्या ठायी निर्माण केला. थिऑसफीच्या विविध उद्दिष्टांपैकी परलोकसंशोधनावर अनेकांचा विश्वास नसला, तरी विश्वबंधुत्व व धर्मसमन्वय ही दोन उद्दिष्टे जगातील सर्व विचारवंतांना प्रिय झालेली आहेत.

थिऑसफिस्टांची संख्या फारशी नसली, तरी त्यांतील बहुतेक जण श्रेष्ठ विचारवंत व सामाजिक प्रतिष्ठा पावलेले आहेत. शिवाय ही संस्था आंतरराष्ट्रीय आहे. त्यामुळे भारताविषयीचे परदेशांतील अपसमज दूर होऊन त्याच्याबद्दल आस्था निर्माण होण्यास थिऑसफीचा फार उपयोग झाला. थिऑसफीच्या द्वारा अनेक विदेशी लोकांनी आत्म्याची अमरता व पुनर्जन्म हे दोन हिंदू धर्माचे सिद्धान्त स्वीकारल्यामुळे हिंदूंच्या मनातील स्वधर्माविषयीची अनास्था व शंकाकुलता दूर होण्यास मदत झाली. [ मा. घा. पु.; सं. चा. अ.; वि. ध. द.; हिं. वि. को.]

**थुंकी** मागसलेल्या व सुधारलेल्या अशा दोन्ही प्रकारच्या समाजांत थुंकीविषयी अनेक विलक्षण समजुती प्रचलित आहेत. मनुष्याचा प्राण जसा त्याच्या रक्तात असतो, तसाच काही अंशी त्याच्या थुंकीतही असतो, अशी एक कल्पना आहे. मनुष्याचे अंगभूत सामर्थ्य त्याच्या थुंकीत उतरते आणि ज्या वस्तूवर ती थुंकी पडते, तिच्यावर त्याचा प्रभाव पडणे संभवनीय असते. थुंकणाऱ्याच्या मनात चांगली भावना असते, तेव्हा त्याच्या थुंकीमुळे हित होते; पण मनुष्य दुष्ट बुद्धीने थुंकला, तर त्याचा परिणाम वाईट होतो.

सामान्यत: थुंकी ही अपवित्र मानली जाते. त्यामुळेच एखाद्याचे उष्टे अन्नपाणी घेणे निषिद्ध समजतात. घरात थुंकू नये, असा संकेत आहे. थुंकीवर पाय पडणे हे अरिष्टकारक असते. हीन वर्णाच्या व्यक्तीने उच्च वर्णाच्या व्यक्तीवर थुंकणे हे महापाप असून, राजाने अशा अपराध्याचे ओठ कापून टाकावे, असे मनुस्मृतीत सांगितले आहे (८.२८२). ब्राह्मणाने थुंकल्यावर चूळ भरून टाकायची असते (मनु. ५.१४५). एखाद्या पवित्र वस्तूच्या दिशेला थुंकणे, हेही पाप मानले गेले आहे. पारशी लोक नदीत किंवा अग्नीत कधीही थुंकत नाहीत. काही लोक देवपूजा करताना तोंडावर वस्त्र बांधतात, त्यातही देवावर थुंकी उडू नये हाच उद्देश असतो. ज्या वस्तूत दैवी सामर्थ्य असते, त्या वस्तूवर थुंकले असता, थुंकणाऱ्या व्यक्तीवर संकट येते, असे भाविक माणसांना वाटते. भूतबाधा झालेल्या माणसावर थुंकल्यास, थुंकणाऱ्याला भूतबाधा होण्याची शक्यता असते. गोठ्यात किंवा उकिरड्यावर थुंकल्यास पशूचे रोग होतात.

थुंकीचा चांगला परिणामही होऊ शकतो, ही कल्पना सर्वत्र आढळते. थुंकीमुळे गर्भधारणा झाल्याच्या दंतकथा पुराणांत आहेत. अग्नी पाण्यात थुंकला, तेव्हा एकत, द्वित व त्रित यांचा जन्म झाला, अशी पुराणात कथा आहे. बंगालमधील छापोता जातीचे लोक समजतात, की शिवाने विड्याचे पान चघळून टाकले, त्यातून आपला मूळ पुरुष उत्पन्न झाला. नोस्तू नावाची देवता पाण्यातील कमळे व वनस्पती यांवर थुंकली आणि त्यामुळे जमीन निर्माण झाली, अशी कथा गारो लोक सांगतात.

अवतारी पुरुषांची थुंकी ही अत्यंत प्रभावी मानली जाते. येशू ख्रिस्त एकदा समुद्रात थुंकला, तेव्हा त्या थुंकीपासून एक मासा उत्पन्न झाला, अशी कथा आहे. मातंगी देवीचा अवतार मानली गेलेली एक स्त्री अंगावर थुंकली, तर शरीर शुद्ध होते, अशी तमिळनाडमध्ये समजूत आहे. द. भारतातील वैष्णव लोक गुरूच्या उष्टया अन्नपाण्याचे भक्तिपूर्वक सेवन करतात, ते याच श्रद्धेमुळे.

सुवासिनी स्त्री डाळिंबाच्या झाडावर थुंकली, तर त्याला लगेच चांगला मोहोर येतो व फळे धरतात; कारण तिची जननक्षमता थुंकीवाटे झाडाला प्राप्त होते, अशी कल्पना आहे. निपुत्रिक स्त्रिया आपल्याला मूल व्हावे, या हेतूने लहान मुलांची लाळ खातात, असेही काही ठिकाणी आढळते.

इडापिडा टळावी किंवा दृष्ट लागू नये या हेतूनेही तेल किंवा पाणी यात थुंकी मिसळून लहान मुलाच्या अंगाला लावण्याची प्रथा अनेक ठिकाणी आहे. मूल चालताना पडले, तर तिथली चिमूटभर माती घेऊन ती त्या मुलाभोवती तीनदा ओवाळतात आणि त्या मुलाला मातीवर थुंकायला सांगून ती माती फेकून देतात. चेटूक, जादूटोणा यांपासून संरक्षण व्हावे, म्हणून स्वतः-च्या किंवा दुसऱ्याच्या अंगावर थुंकण्याची चाल काही ठिकाणी आढळते. भुताखेतांपासून रक्षण व्हावे, म्हणून बाप्तिस्माच्या विधीत ख्रिस्ती पुरोहित मुलांच्या कानाला व नाकपुडीला थुंकी लावतो. उ. भारतात कापूस वेचताना ते काम करणाऱ्या स्त्रिया भाजलेले तांदूळ तोंडात ठेवून मग ते थुंकून टाकतात. त्यामुळे अधिक कापूस हाती लागतो, अशी समजूत आहे. केस विंचरताना जे गुंतवळ निघतात, ते टाकून देण्यापूर्वी त्यावर थुंकले, तर केस लवकर व लांब वाढतात, अशी कल्पना आहे.

तमिळनाडमध्ये उत्सवप्रसंगी देवाचा रथ हालत नसेल, तर त्याच्या चाकावर ताडी व एरंडेल यांच्या चुळा थुंकण्याची प्रथा आहे. त्यामुळे रथ चालू होतो, असे समजतात.

मंत्रतंत्रातही थुंकीचा बराच उपयोग करतात. एखाद्या मनुष्यावर जादूटोणा करण्यासाठी त्याचे केस, नखे किंवा थुंकी मिळवून ती एका नारळात ठेवतात व त्यावर मंत्रप्रयोग करतात.

मानवेतर प्राण्यांच्या थुंकीतही काही गुण असतात, अशी समजूत आहे. म्हशीची लाळ तळपायाला लावली, तर म्हशीचा सुस्तपणा अंगात शिरतो व चांगली झोप लागते, असे म्हणतात.

शत्रुत्व किंवा तिरस्कार व्यक्त करण्यासाठी तोंडावर थुंकणे, ही चाल जगात सर्वत्र रूढ आहे. [एन्सा. रि. ए.; की. पॉ.]

**थुप्पा** मृत सवतीची प्रतिमा. पंजाबमधील ज्या जातींत बहुपत्नीकत्वाची चाल आहे, त्या जातींतील स्त्रिया आपल्या मृत सवतीने भूतपिशाच्च बनून आपल्याला त्रास देऊ नये, म्हणून तिची रुप्याची अथवा सोन्याची प्रतिमा करून तिची पूजा करतात. जेवणाच्या वेळी बायका पहिला घास त्या प्रतिमेला अर्पण करतात; तसेच नवे वस्त्र, अलंकार, इ. वस्तू स्वतः वापरण्यापूर्वी त्या प्रतिमेच्या पुढे ठेवतात.

**थूपवंस** (संस्कृत स्तूपवंश) एक बौद्ध ग्रंथ. सिंहली भिक्षू सारिपुत्त याचा शिष्य वाचिस्सर हा या ग्रंथाचा कर्ता आहे. हा ग्रंथ पाली भाषेत असून, त्याची रचना इ. स. च्या तेराव्या शतकाच्या प्रारंभी झालेली आहे. या ग्रंथात बुद्धावशेषांवर उभारल्या गेलेल्या स्तूपांचा इतिहास ग्रथित आहे. बुद्धाच्या महापरिनिर्वाणानंतर त्याच्या अवशेषांवर आठ मोठे स्तूप उभारले गेले होते. त्यानंतर लंकेचा राजा दुट्ठगामणी यानेही लंकेत महास्तूपादी अनेक विशाल स्तूप उभारले. बुद्धाच्या परिनिर्वाणापासून दुट्ठगामणीच्या कालापर्यंत उभारल्या गेलेल्या सर्व प्रमुख स्तूपांचा क्रमबद्ध इतिहास वाचिस्सराने थूपवंसामध्ये मांडला आहे. ग्रंथकाराने या इतिहासाची सामग्री निदानकथा, समंतपासादिका, महावंस आणि महावंसटीका, इ. ग्रंथांतून घेतली आहे.

या ग्रंथाचे तीन भाग आहेत. पहिल्या भागात गौतम बुद्धापूर्वीच्या चौवीस बुद्धांचे वर्णन आहे, दुसऱ्या भागात गौतम बुद्धाचे जन्मापासून महापरिनिर्वाणापर्यंतचे चरित्र आहे आणि तिसऱ्या भागात ग्रंथाचा मुख्य विषय असलेल्या स्तूपांचा इतिहास आहे.

लंकेच्या धार्मिक इतिहासात या ग्रंथाला विशेष महत्त्व आहे. आज भग्नावशेषांच्या रूपात असलेल्या किंवा जमिनीत गाडल्या गेलेल्या प्राचीन बौद्ध वास्तूंचे वृत्त या ग्रंथात सुरक्षित आहे. लंकेच्या बुद्धभक्तीचे एक स्मारक असलेला हा ग्रंथ भारत आणि लंका यांच्या पुरातन स्नेहसंबंधाची स्मृती कायम जागृत ठेवील असा आहे. [पा. सा. इ.]

**थेऊर** महाराष्ट्रातील एक गणेशस्थान. हे देवस्थान पुणे-सोलापूर लोहमार्गावर लोणी स्टेशनपासून तीन मैलांवर मुळा-मुठा नदीच्या काठी आहे. पुण्याहून हे गाव सुमारे तेरा मैलांवर येते. इथल्या गणपतीला चिंतामणी असे नाव आहे. अष्टविनायकांत याची गणना होते.

हे गणेशक्षेत्र अतिप्राचीन आहे, असे म्हणतात. या देवस्थानासंबंधी अनेक कथा प्रचलित आहेत, त्यांपैकी एक अशी-

एकदा ब्रह्मदेवाने आपल्याला सिद्धी प्राप्त व्हावी, म्हणून अनुष्ठान केले. त्याची ती इच्छा पूर्ण झाली. आपल्याप्रमाणेच

आपली पत्नी सावित्री व भारती यांनाही विनायकाचा वर मिळावा, म्हणून त्याने विनायकाची आराधना सुरू केली.



चिंतामणी – थेऊर

त्यामुळे विनायक प्रसन्न झाला आणि त्याने त्या दोघींनाही वर दिले. मग ब्रह्मदेवाने त्या ठिकाणी चिंतामणी गणेशाची स्थापना केली. ही घटना जिथे घडली, तेच आजचे थेऊर होय.

इथल्या मंदिराचा मुख्य दरवाजा उत्तराभिमुख असून, श्रीची मूर्ती पूर्वाभिमुख आहे. मोरया गोसाव्यांचे पुत्र चिंतामणी देव यांनी सुमारे चाळीस हजार रुपये खर्चून हे मंदिर बांधले. यानंतर पुढे सुमारे शंभर वर्षांनी थोरले माधवराव पेशवे यांनी देवालयाचा सभामंडप बांधला आणि मंदिराचा विस्तार केला. पेशव्यांचे सरदार हरिपंत फडके यांनीही या मंदिराची दुरुस्ती केली होती. थोरले माधवराव पेशवे याच मंदिरात दि. १८ नोव्हेंबर १७७२ रोजी निधन पावले. त्यांची पत्नी रमाबाई इथेच नदीकाठी सती गेली. त्या जागी एक वृंदावन बांधण्यात आलेले आहे. दर साल या क्षेत्रात वरील दिवशी रमा-माधव स्मृतिदिन साजरा होतो.

चिंचवडचे मोरया गोसावी यांनी या थेऊरच्याच अरण्यात तपश्चर्या केली. त्यांना गणेश प्रसन्न झाला; पण त्याने त्यांना व्याघ्ररूपाने दर्शन दिले, अशी भाविकांची श्रद्धा आहे.

थेऊरच्या श्रीचिंतामणीचा उत्सव भाद्रपद शुद्ध चतुर्थीला मोठ्या प्रमाणात साजरा होतो. [अष्टविनायक]

**थेरगाथा** एक बौद्ध ग्रंथ. हा ग्रंथ त्रिपिटकांपैकी सुत्त पिटकातील खुद्दकनिकायात समाविष्ट आहे. थेर हा शब्द स्थविर या संस्कृत शब्दापासून बनलेला असून, त्याचा अर्थ वृद्ध, अनुभवी व ज्ञानी पुरुष असा आहे. बौद्ध वाङ्मयात हा शब्द आद्य भिक्षूंचा वाचक बनला आहे. थेरगाथेमध्ये अशा २५५ थेरांच्या १२७९ गाथा समाविष्ट आहेत.

या ग्रंथातील अधिकांश गाथांमध्ये निर्वाणाची ओढ आणि त्याच्या प्राप्तीचा आनंद व्यक्त झालेला आहे. काही गाथांमध्ये साधनेला साहाय्यक ठरणाऱ्या प्रेरणांचा उल्लेख आहे, तर काही गाथांमध्ये परमपदावर आरूढ झालेल्या थेरांनी नवसाधकांना व सामान्य जनांना केलेला उपदेश आहे.

थेरगाथेत बौद्ध संघाचे उत्कृष्ट चित्र पाहायला मिळते. त्यात एका बाजूला पूर्वाश्रमी दीन, दुःखी व पतित असलेले थेर आहेत; तर दुसऱ्या बाजूला कपिलवस्तू, वैशाली, श्रावस्ती, राजगृह, इ. राजधान्यांतून बाहेर पडून भिक्षू बनलेले राजपुरुष आहेत. बुद्धाचे अनुयायी बनल्यानंतर त्यांच्यामध्ये श्रेष्ठ–कनिष्ठ भाव उरलेला नाही. इथे पूर्वाश्रमी राजगृहातले रस्ते साफ करणाऱ्या सुनीत नामक थेराला बिंबिसार राजा वंदन करताना दिसतो; तर पूर्वाश्रमी दरोडे घालणाऱ्या अंगुलीमालाची कोशलाधीश प्रसेनजित सेवा करताना दिसतो. अशा सर्व थेरांतून आलेल्या या थेरांच्या गाथांमध्ये शांत व गंभीर भाव भरलेला आहे. नंद नामक थेराच्या दोन गाथा अशा—

परे च नं पसंसन्ति अत्ता चे असमाहितो ।<br>
मोघं परे पसंसन्ति अत्ता हि असमाहितो ।।<br>
परे च नं गरहन्ति अत्ता चे सुसमाहितो ।<br>
परे च नं गरहन्ति अत्ता हि सुसमाहितो ।।

(थेरगाथा १५९–१६०)

अर्थ – चित्त समाधिमग्न नसेल आणि दुसरे त्याची प्रशंसा करीत असतील, तर ती दुसऱ्यांनी केलेली प्रशंसा व्यर्थ आहे. चित्त उत्तम प्रकारे समाधिमग्न असेल आणि दुसरे त्याची निंदा करीत असतील, तर दुसऱ्यांनी केलेली ती निंदा व्यर्थ आहे.

या सर्व थेरांच्या वचनांचा एक विशेष असा, की त्यात निसर्गसौंदर्याविषयी उत्कट प्रेम व्यक्त झालेले आहे. निसर्गातील प्रसन्न रमणीय वातावरणात या थेरांची साधना प्रफुल्लित झालेली असल्यामुळे त्यांनी निसर्गाविषयी कृतज्ञता व्यक्त करणे स्वाभाविकच आहे. वर्षाकालीन सृष्टिसौंदर्याची नानाविध रूपे या गाथांमध्ये प्रकटली आहेत. वर्षेच्या सौंदर्याचे वर्णन करणाऱ्या सप्पक थेराच्या काही गाथा अशा—

यदा बलाका सुचिपण्डरच्छदा<br>
कालस्स मेघस्स भयेन तज्जिता ।

पलेहिति आलयमालयेसिनी
तदा नदी अजकरणी रमेति मं ॥
यदा बलाका सुचिपण्डरच्छदा
कालस्स मेघस्स भयेन तज्जिता ।
परियेसतिलेन मलेन दस्सिनी
तदा नदी अजकरणी रमेति मं ॥
कन्न तत्थ न रमेन्ति जम्बुयो उभतो तहिं ।
सोभेन्ति आपगा कूलं महालनेस्यपच्छतो ॥
तामतमदसं घसुप्पाहीना भेका
भेका मन्दवती पनादयन्ति ।
नाज्ज गिरिनदी हि विप्पवाससमयो
खेमा अजकरणी सिवा सुरम्माति ॥
(थेरगाथा ३०७–३१०)

अर्थ – जेव्हा स्वच्छ पांढऱ्या पंखांचे बगळे मेघगर्जनेने भयभीत होऊन आपल्या घरट्यांचा शोध घेत हिंडतात, त्या वेळी पुरामुळे घोंगावत जाणारी ही नदी मला किती प्रिय वाटते ! जेव्हा स्वच्छ पांढऱ्या पंखांचे बगळे मेघगर्जनेने भयभीत होऊन आपल्या घरट्यांचा शोध घेत हिंडतात आणि वर्षेच्या अंधाराने त्यांची घरटी झाकून जातात, त्या वेळी पुरामुळे घोघावत जाणारी ही नदी मला किती प्रिय वाटते ! या नदीच्या दोन्ही तीरांवर जांभळीची झाडे आहेत, तिथे माझे मन कसे रमणार नाही ! महामार्गाच्या मागे नदीकिनारी आणखी अनेक सुंदर निर्झरिणी आहेत. जागे झालेले बेडूक मृदू आवाज करीत आहेत. आज गिरी आणि नदी यांच्यापासून दूर होण्याची वेळ नाही. पुरामुळे घोंघावणारी ही नदी किती सुरम्य, शिव आणि क्षेमकारी आहे !

त्याचप्रमाणे हिरवळलेले डोंगर, सुंदर, स्वच्छ व शीतल जलाशय, नक्षत्रखचित रात्री, इ. निसर्गदृश्यांची वेधक चित्रे या गाथांत आढळतात.

थेरगाथेचे ऐतिहासिक महत्त्वही कमी नाही. भारताच्या अनेक भागांतून व अनेक सामाजिक थरांतून आलेल्या या थेरांच्या उद्गारांत तत्कालीन भारताच्या सांस्कृतिक इतिहासाला उपयुक्त असे अनेक उल्लेख आढळतात.

या गाथा म्हणजे साधनेच्या उच्चतम शिखरावर पोचलेल्या महान साधकांचे अनुभवरूप शब्द होत. भारतीय साहित्याच्या इतिहासात त्यांचे स्थान विशेष आहे. [ थेरगाथा; पा. सा. इ. ]

**थेरवाद** एक प्राचीनतम बौद्ध संप्रदाय. थेर म्हणजे स्थविर किंवा वृद्ध होय. लक्षणेने त्याचा अर्थ परंपरावादी, सनातनी, परिवर्तनविरोधी असा बनला. प्राचीन मूलसिद्धान्तांचा सनातनी स्वरूपात पुरस्कार करणाऱ्या या संप्रदायालाच पुढे हीनयान अशी संज्ञा प्राप्त झाली.

बुद्धाच्या निर्वाणानंतर शंभर वर्षांनी वैशालीमध्ये जी द्वितीय बौद्ध संगीती (धर्मपरिषद) भरली, तीत वात्सीपुत्रीय भिक्षूंनी आचार आणि अध्यात्म या विषयीच्या अनेक महत्त्वपूर्ण सिद्धान्तांविरुद्ध बंड उभारले. त्यामुळे या संगीतीपासून बौद्ध संघात फूट पडून थेरवाद आणि महासांघिक या दोन संप्रदायांचा उदय झाला. यांपैकी थेरवादी हे सनातनी अर्थात परिवर्तनविरोधी होत. पुढील शतकभराच्या काळात या दोन संप्रदायांमध्ये सिद्धान्तविषयक अनेक सूक्ष्म मतभेद निर्माण होऊन त्यातून अठरा विभिन्न संप्रदाय बनले. त्यांना निकाय अशी संज्ञा आहे. त्यांपैकी महीशासक, सर्वास्तिवादी, काश्यपीय, सांक्रांतिक, सौत्रान्तिक, धर्मगुप्तिक, इ. निकाय थेरवादाच्या अंतर्गत होते. अशोकाच्या काळानंतर या निकायांमध्येही अंतर्गत मतभेद निर्माण होऊन आणखी पोटभेद वाढत गेले.

अवंतीचा महाकात्यायन हा थेरवादाचा प्रवर्तक समजला जातो. याची कार्यक्षेत्रे कौशांबी आणि अवंती ही होती. त्याने या प्रदेशांत प्रचलित असलेल्या पाली भाषेचाच पिटकांची भाषा म्हणून स्वीकार केला.

या संप्रदायाचे सर्वच ग्रंथ पाली भाषेत आहेत. हे सर्व ग्रंथ गुप्तपूर्व काळातले असून, त्यांच्यावरील प्रख्यात टीकाग्रंथ गुप्तकाळात लिहिले गेले. बुद्धघोष, बुद्धदत्त आणि धम्मपाल या गुप्तकालीन तीन आचार्यांचे टीकाग्रंथ अत्यंत प्रसिद्ध आहेत. त्यांची महती केवळ थेरवादाच्याच नव्हे, तर बौद्धांच्या इतिहासातही विशेष मानली गेली आहे. बुद्धघोषाने विसुद्धिमग्ग, सामंतपासादिका, कंखावितरणी, सुमंगलविलासिनी, इ. अकरा ग्रंथ रचले. बुद्धदत्ताने अभिधम्मावतार, रूपारूपविभाग, विनयविनिश्चय, उत्तरविनिश्चय आणि मधुरत्थविलासिनी हे पाच ग्रंथ रचले आणि धम्मपालाने वेतवत्थुटीका, थेरीगाथाटीका, थेरगाथाटीका, इ. आठ ग्रंथांची रचना केली.

पाली भाषेच्या विकासात या संप्रदायाचा वाटा मोठा आहे.

पाहा – हीनयान. [ भा. द. मिश्र; म. भा. इ.; – अ. अ. र.]

**थेरीआट्टम** एक लोकनृत्य. हे नृत्य केरळात ग्रामदेवांच्या आराधनेसाठी करतात. नृत्याच्या वेळी नर्तकांच्या अंगांत देवाचा संचार होतो, अशी श्रद्धा असल्यामुळे ग्रामदेवाच्या उत्सवापूर्वी अनेक दिवस नर्तक लोक उपास व प्रार्थना करून स्वतःला पवित्र बनवतात. ज्या देवाचा उत्सव असेल, त्याचे मंदिर अनेक प्रकारांनी सजवितात. रात्रीच्या वेळी दिवे पाजळून रोषणाई करतात. कधी कधी मशालींची

मिरवणूकही काढतात. ग्रामदेवतांचा हा उत्सव थीरा या नावाने प्रसिद्ध आहे.



एक ग्रामदेव – थेरीआट्टम

थेरीआट्टम दोन ते चार दिवसांपर्यंत चालते. या नृत्यात लालित्यापेक्षा प्रभावोत्पादनावर भर असल्यामुळे नर्तकाची वेषभूषा चित्रविचित्र करतात. नर्तक डोक्यावर लाल व सोनेरी रंगांनी रंगविलेला एक भव्य किरीट चढवितो; तोंडावर, हातांवर आणि इतर उघड्या अवयवांवर चित्रविचित्र नक्षी काढतो; दंडात सोन्याचे बाहुबंध घालतो; मनगटांत सोन्याची कडी घालतो; कमरेला एक रुंद व आकर्षक पट्टा बांधतो आणि रंगीबेरंगी कपड्यांचा घागरा नेसतो. नर्तकाच्या या घागऱ्याला रेशमी गोंडे आणि घुंगरे असतात. नर्तकाच्या पायांतही अनेक घुंगरांचे चाळ असतात. नर्तक लोक वीरन, कंदाकरन, चामुंडी,



भैरव – थेरीआट्टम

भगवती, थमपुरती, इ. अनेक ग्रामदेवतांची भयंकर रूपे घेतात. कंदाकरन देवीचा वेष तर अत्यंत भयानक असतो. ही रूपे घेणारे विशिष्ट लोक असतात, त्यांना पेरुवन्नन व मलायार म्हणतात. या लोकांना ग्रामव्यवस्थेत विशेष अधिकार असतात.

हे नृत्य कधी एकेकट्याचे, तर कधी दोघांचे असते. त्याला ढोलाची साथ असते. त्यात तीव्र आवेग असतो. नृत्याची गती क्रमाक्रमाने वाढत जाते आणि त्याबरोबरच ढोलाचा आवाजही चढत जातो. नर्तक अधून मधून नाचायचा थांबला, की गाणारे लोक नृत्याचा विषय असलेल्या पुराणकथेचे गायन करतात.

नर्तक कित्येक तास नाचत राहतात आणि अखेरीस देहभान विसरतात. त्या वेळी त्यांच्या अंगांत देवाचा संचार झाला आहे, असे समजून त्यांना उच्चासनावर बसवतात. आसनावर बसल्यानंतरही नर्तक थरथर कापत असतात. या अवस्थेत त्यांच्या मुखांतून प्रकटणारे शब्द हे देवाचेच शब्द होत, असे लोक समजतात. मग भाविक लोक नर्तकाला आपल्या भविष्याबद्दल प्रश्न विचारतात व काही अनिष्ट असल्यास त्यावर उपायही विचारून घेतात. त्याबद्दल त्याला दक्षिणाही देतात.

**थेरीगाथा** एक बौद्ध ग्रंथ. थेरी म्हणजे वृद्ध, अनुभवी व ज्ञानी अशी स्त्री. बौद्ध साहित्यात ही संज्ञा आद्य भिक्षुणींना लावतात. थेरीगाथेत अशा ७३ थेरींच्या ५२२ गाथांचा संग्रह केलेला आहे. या सर्वच गाथांची शैली काव्यात्मक असून, त्यांतील भावना अत्यंत उत्कट आहेत.

या गाथांची रचना करणाऱ्या सर्व थेरी बुद्धाच्या साक्षात शिष्या होत्या. यांतील सर्वांत जेष्ठ थेरी म्हणजे बुद्धाची मावशी महाप्रजापती गौतमी ही होय. शुद्धोदन राजाच्या मृत्यूनंतर बुद्धाने तिला भिक्षुणी होण्याची अनुमती दिली. तिच्याबरोबर पाचशे शाक्य स्त्रियांनी प्रव्रज्या घेतली. कालांतराने बौद्ध संघात भिक्षुणीचा स्वतंत्र संघ बनला. पुढे संसाराच्या कटू व दाहक अनुभवांनी वीतराग बनलेल्या अनेक स्त्रिया भिक्षुणी बनून या संघात प्रविष्ट झाल्या. त्यांच्यापैकी काहींनी आपले जीवनानुभव आणि बुद्धाच्या संपर्कामुळे आपल्याला मिळालेली परमशांती शब्दबद्ध केली आहे.

इ. स. च्या पाचव्या शतकात धम्मपालाने परमत्थदीपनी या नावाची थेरीगाथाटीका लिहिली असून, तिच्यात त्याने सर्व थेरींच्या चरित्रकथा दिलेल्या आहेत. त्यांवरून या थेरींच्या वैराग्याची पार्श्वभूमी कळून येते. या थेरींपैकी कुणी प्रपंचाची असारता बुद्धीने जाणून प्रव्रज्या घेतली, तर कुणी प्रियजनांच्या चिरवियोगाने व्यथित होऊन घर सोडले. कुणी पतीच्या विपरीत वर्तनाला विटून बुद्धाचा आश्रय घेतला, तर कुणी आपल्या

संन्यस्त पतीचे अनुसरण करून बुद्धचरणांची जवळीक धरली. या सर्व थेरी स्वतःला 'बुद्धाच्या हृदयातून उत्पन्न झालेल्या कन्या' (ओरसा धीता बुद्धस्स) असे समजतात. अंबपाली ही प्रसिद्ध गणिकाही पुढे थेरी बनली. तिने आपल्या विरक्तीचे वृत्त ज्या दोन गाथांत व्यक्त केले आहे, त्या गाथा अशा—

कालका भमरवण्णसदिसा वेल्लितग्गा मम मुद्धजा अहुं।
ते जराय साणवाकसदिसा सच्चवदिवचनम' नञ्ञथा ॥
वासितो 'व सुरभिकरण्डको पुप्फपूरं समुत्तमङ्गभू।
तं जराय ससलोमगन्धिकं सच्चवादिवचनम' नञ्ञथा ॥
(थेरीगाथा २५२–२५३)

अर्थ – माझे कुरळे केस मुंग्यांसारखे काळे होते, ते आता वार्धक्यामुळे तागाच्या वाखंडीसारखे झाले आहेत. सत्यवादी बुद्धाचे म्हणणे शेवटी खरे ठरले. फुलांनी नटलेले माझे मस्तक सुगंधी फुलांच्या करंडीसारखे दिसे; त्याला आज वार्धक्यामुळे सशांच्या केसांसारखी दुर्गंधी येत आहे.

अंबपालीच्या या गाथांचे ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायातील, जरेचे वर्णन करणाऱ्या ओव्यांशी आश्चर्यकारक साम्य दिसते. या सर्व गाथांमध्ये भिक्षुणींच्या अंतःकरणातून उफाळणारा उद्वेग व्यक्त झालेला आहे. मात्र त्या उद्वेगाला परमशांतीचा मंद सुगंध लाभलेला आहे. या सर्वच भिक्षुणींनी आपल्या अनुभवांशी अत्यंत प्रामाणिक राहून या गाथा रचलेल्या असल्यामुळे त्या स्वाभाविकपणेच शुद्ध भावकाव्याच्या पातळीवर गेल्या आहेत. केवळ बौद्ध साहित्यातच नव्हे; तर सर्व भारतीय साहित्यात थेरीगाथांना त्यांच्या आंतरिक सौंदर्यामुळे उच्च स्थान प्राप्त झाले आहे. [पा. सा. इ.; केसरी, २१ नोव्हें. १९५४]

## थैन

एक जमात. या लोकांची वसती मध्य प्रदेशातील बिलासपूर जिल्ह्यात आहे. बैगा जमातीपासून या जमातीची उत्पत्ती झाली असल्याचे सांगतात. जादूटोणा करणे हा यांचा आजचा व्यवसाय असला, तरी पूर्वी हे बिलेगड भागात राज्याधिकारी होते असे इतिहासावरून दिसते. फुलजपूर ही पूर्वी त्यांची राजधानी होती. एकदा गोंड लोकांनी फुलजपुरावर स्वारी केली. आपल्यावर आक्रमण होत आहे, असे समजताच थैनांनी तळघराचा आश्रय घेतला. थैन लोकांचे हे आश्रयस्थान गोंडांना समजताच त्यांनी त्या तळघरालाही आग लावली. काही लोक त्या आगीत जळाले, पण बरेच पळून गेले. तेव्हापासून थैन लोकांनी फुलजपुरात जाणे वर्ज्य केले आहे. कारण ती दारुण घटना अद्यापही त्यांच्या मनांत घर करून राहिली आहे.

या जमातीचे लारिया, युरिया, झांत्यार व गंत्यार असे पोटभेद आहेत. हे लोक हिंदी भाषा बोलतात.

नकटीदेवी ही यांची प्रमुख देवता आहे. या देवीला ते कोंबडीचा बळी देतात.

या जमातीत परजातीतल्या पुरुषांना प्रवेश नसतो; पण एखाद्या थैन पुरुषाने जर परजातीच्या स्त्रीशी संबंध ठेवला, तर त्या स्त्रीला हे लोक आपल्या जमातीत प्रवेश देतात.

एखाद्याचे वाईट व्हावे असे त्यांना वाटू लागले, की हे लोक त्या माणसाची प्रतिमा तयार करतात, ती हिंगुळाने रंगवून तिची पूजा करतात, तिला बकरा बळी देतात व मग ती प्रतिमा जाळून टाकतात.

थैन लोकांचे कावर लोकांशी जवळचे संबंध आहेत. त्यांचे एकमेकांत रोटीबेटीव्यवहारही होतात. हे लोक मुलामुलींचे विवाह मोठेपणी करतात. पंधरा ते वीस रुपये एवढाच लग्नखर्च करतात.

हे मृताला जाळतात किंवा पुरतात. [ट्रा. का. सें. प्रॉ. इं.]

## थोगमलै कोरव

एक गुन्हेगार मानली गेलेली जमात. या लोकांची वसती तमिळनाडच्या दक्षिण भागांत आहे. चोरी हा जणू यांचा व्यवसायच आहे. हे लोक आपल्या जमातीत बाहेरच्या लोकांना प्रवेश देतात व इतर जातींच्या मुलांना दत्तक घेतात. यांच्या स्त्रिया इतर जातींच्या पुरुषांशीही लग्न करतात. [का. ट्रा. स. इं.]

## दंड

(१) दांडा किंवा सोटा. याच अर्थाने हा शब्द ऋग्वेदात आला आहे (ऋ. ७.३३.६). पुढच्या काळात राजसत्तेचे प्रतीक असा निराळा अर्थ त्या शब्दाला आला. शतपथ ब्राह्मणांत राज्याभिषेकाच्या प्रसंगी दंडाचा उपयोग करण्यास सांगितले आहे, ते त्यामुळेच होय. हा दंड राक्षस, भूत-प्रेत, इ. दुष्ट शक्तींना हाकलण्यासाठी राज्याभिषेकाच्या वेळी उभा धरायचा असतो (श. ब्रा. ३२.१.३२). सोमयागासारख्या यज्ञांची दीक्षा घेताना यजमानाच्या हाती दंड देतात. उपनयनाच्या प्रसंगी बटूच्या हातातही दंड देतात. त्याचा उपयोग ब्रह्मचाऱ्याला मार्गक्रमण करीत असता संरक्षण मिळावे, हा असतो. संन्यासीही दंडधारी असतो. संन्याशाचा दंड हा त्याच्या इंद्रियदमनाचे प्रतीक मानला गेला आहे. पाहा– दंडनीती. [श. क.]

(२) राजाने अपराध्याला केलेली शिक्षा किंवा शत्रूला पराभूत करण्यासाठी त्याच्यावर केलेला बलाचा प्रयोग, या अर्थानेही दंड शब्द राजनीतीत येतो. राजकारणात प्रवीण असलेल्या पंडितांच्या आणि मुत्सद्द्यांच्या सल्ल्यानुसार व कालमानाला अनुसरून राजाने हा दंड वापरावा, असे मत्स्य पुराणात म्हटले आहे (१२२.४४; १४८.६६–६७). पाहा – दंडविधान.

**दंडकारण्य** दक्षिणेतील एक प्राचीन अरण्यमय प्रदेश. हे अरण्य विंध्य पर्वतापासून कृष्णातीरापर्यंत पसरले होते. याला दंडकारण्य असे नाव का पडले, याविषयी रामायणात कथा आहे, ती अशी —

इक्ष्वाकूचा सर्वांत धाकटा पुत्र दंड हा जन्मापासून मूढ व उन्मत्त होता. त्याला काही दोष असल्यामुळे पित्याने त्याला आपल्या राज्यापासून दूरच्या विंध्य व शैवल या दोन पर्वतांमधील प्रदेशाचे राज्य दिले. विंध्याच्या दोन शिखरांमध्ये मधुमंत नावाची नगरी वसवून तिथे तो राहू लागला. त्याने शुक्राचार्याला आपला पुरोहित केले. तो अनेक वर्षेपर्यंत जितेंद्रिय राहिला होता; परंतु शुक्राचार्यांच्या आश्रमात गेला असता त्याला तिथे गुरूची ज्येष्ठ कन्या अरजा ही दिसली. तो तिच्या सौंदर्यावर भाळला. मागचा-पुढचा विचार न करता त्याने तिच्यावर बलात्कार केला. मग त्याला भीती वाटली, की शुक्राचार्य आपल्याला शाप देईल. म्हणून तो लगोलग पळून आपल्या राजधानीत गेला. ही घटना घडली, त्या वेळी शुक्राचार्य आश्रमात नव्हता. तो परत आल्यावर त्याला घडलेला प्रकार समजून तो खवळला. त्याने दंडाला शाप दिला, की 'तुझ्या राज्यात इंद्र धुळीची वृष्टी करील आणि तीत तू एका आठवड्याच्या आत बल आणि कोश यांसहित नष्ट होशील!'

शुक्राचार्यांच्या शापानुसार दंडाच्या शंभर योजने पसरलेल्या राज्यात इंद्राज्ञेने धुळीची वृष्टी झाली आणि त्या वृष्टीत राजा व प्रजा नष्ट होऊन तो सर्व प्रदेश अरण्यमय झाला. या ठिकाणी पूर्वी दंडाचे राज्य असल्यामुळे पुढे याला दंडकारण्य असे नाव पडले.

रामाचा वनवास याच अरण्यात घडल्यामुळे याची विशेष प्रसिद्धी झाली. रामायणात दंडकारण्याची अनेक वर्णने आढळतात. इथे अगस्त्यादी अनेक ऋषींचे आश्रम होते. राक्षसांचाही इथे संचार असे आणि ते ऋषींना पीडा देत असत. याच अरण्यात लक्ष्मणाने शूर्पणखेचे नाक-कान कापले आणि राम-लक्ष्मणांनी खर-दूषणांसहित चौदा हजार राक्षसांचा संहार केला. या अरण्यात वानरांची वसती होती. राम दंडकारण्यात राहत असतानाच रावणाने सीतेचे हरण केले व वानरांनी सीताशुद्धीच्या कामी रामाला साहाय्य केले.

हे अरण्य गोदावरीच्या मुखापर्यंत पसरले होते, असे महाभारतात म्हटले आहे (सभा. ३०; वन. ८५). बलरामाने तीर्थयात्रा करीत असता या अरण्याला भेट दिली होती, असा भागवतात उल्लेख आहे. पद्म पुराणात पवित्र तीर्थांच्या यादीत याचा समावेश आहे. याला जनस्थान असेही म्हणत. पाहा – जनस्थान. [वा. रा. को.; प्रा. च. को.; हि. जॉ. ए. इं.]

**दंडनीती** एक विद्या. राजाने राज्य कसे चालवावे, याचे शास्त्र. 'दण्डनीतिं चार्थशास्त्ररूपामर्थयोगक्षेमोपदेशिनीम्' (= दंडनीती म्हणजे अर्थशास्त्ररूप अर्थात अर्थ व योगक्षेम यांच्या प्राप्तीचा उपदेश करणारी विद्या होय), असे कुल्लूकभट्ट म्हणतो (मनु. ७.४३ वरील टीका). या शब्दाची निरुक्ती अशी–

दण्डेन नीयते चेदं दण्डं नयति वा पुनः ।
दण्डनीतिरिति ख्याता त्रींल्लोकानतिवर्तते ।।
(म. भा. शांति. ५९.७८)

अर्थ– दंडाच्या बळावर प्रजेला योग्य मार्गाने नेणे आणि शासनव्यवस्था सुनियंत्रित राखणे म्हणजे दंडनीती होय. दंडनीती ही त्रैलोक्याच्याही पलिकडची अर्थात त्रैलोक्याला व्यापून राहणारी आहे.

महाभारताच्या शांतिपर्वातील राजधर्म प्रकरणात दंडनीतीचा विस्तृत विचार केलेला आहे. त्या काळी राजाचे मुख्य कर्तव्य प्रजापालन व प्रजेला न्याय देणे, हे मानलेले होते. राजाच्या अधिकाराला दंड अशी संज्ञा प्राप्त झाली होती. दंड हा प्रजापतीने प्रजेच्या संरक्षणाकरिता उत्पन्न केला व तो क्षत्रियांनाच दिला, असे महाभारतात म्हटले आहे. दंडाचा योग्य रीतीने सदैव उपयोग केला असता धर्म, अर्थ व काम यांची प्रवृत्ती होते. हा दंड समबुद्धीने व रागद्वेषरहित होऊन उपयोगात आणावा, असे सांगितले आहे.

अमात्य, राष्ट्र, दुर्ग, बल आणि कोश या पंचवर्गांची लक्षणे, सर्व प्रकारचे गुप्त विचार, संधिविचार, परराज्यावर स्वारी, सैन्याची आठ अंगे, शत्रू, मित्र व उदासीन यांची लक्षणे, नाना प्रकारचे व्यूह, विविध युद्धतंत्रे, शत्रूला भयभीत करण्याचे व शत्रुसैन्यात वैमनस्य उत्पन्न करण्याचे प्रकार, मित्रराष्ट्राच्या उत्कर्षासाठी प्रयत्न, नोकरांचे वेतन, योगक्षेम, धनाचा उपयोग, इ. राजकारणविषयक सर्व विषयांचा अंतर्भाव महाभारतात दंडनीती या संज्ञेत केलेला आहे. दंडाचे श्रेष्ठत्व महाभारतात अनेक ठिकाणी वर्णिले आहे; त्यांतील एक श्लोक असा—

दण्डेन रक्ष्यमाणा हि राजन्नहरहः प्रजाः ।
राजानं वर्धयन्तीह तस्माद्दण्डः परायणम् ।।
(म. भा. शांति. १२१.३५)

अर्थ– हे राजा, दंडनीतीने पाळलेली प्रजा ही राजाच्या अभिवृद्धीला सदैव कारणीभूत होते; म्हणून दंड हाच राज्यरक्षणाच्या कामी श्रेष्ठ होय.

दंडनीतीमुळेच चारही वर्णांचे लोक आपापली कर्तव्ये योग्य प्रकारे करतात व अधर्मापासून दूर राहतात (शांति. ६९.७६–७७). राजा जेव्हा दंडनीतीला अनुसरून वागतो, तेव्हा कृतयुग

निर्माण होते, असे भीष्माने म्हटले आहे ( शांति. ६९.८० ). दंडनीतीवाचून जग चालणार नाही; ते उच्छृंखल होईल, असे हनुमंताने भीमसेनाला सांगितले आहे ( वन. १५०.३२ ). पाहा – राजधर्म. [ हि. ध.; श. क. ]

**दंडपाठ** एक वेदविकृती. जटा या विकृतीच्या एका विरामात सहा पदे असतात; पण तीन पदांचाच त्या विकृतीत व्युत्क्रम होत असतो. दंडविकृतीत मात्र एका विरामात हा क्रम-व्युत्क्रम वाढत्या पदसंख्येने अर्ध्या ऋचेपर्यंत केला जातो. मूळ अर्धी ऋचा अशी —

गायन्ति त्वा गायत्रिणोऽर्चन्त्यर्कमर्किणः ।

(ऋ. १·१०·१)

वरील अर्ध्या ऋचेचा दंडपाठ खाली दिल्याप्रमाणे —

गायन्ति त्वा । त्वा गायन्ति ।
१ २ २ १
गायन्ति त्वा । त्वा गायत्रिणः । गायत्रिणस्त्वा गायन्ति ।
१ २ २ ३ ३ २ १
गायन्ति त्वा । त्वा गायत्रिणः । गायत्रिणो ऽर्चन्ति ।
१ २ २ ३ ३ ४
अर्चन्ति गायत्रिणस्त्वा गायन्ति ॥
४ ३ २ १
गायन्ति त्वा । त्वा गायत्रिणः गायत्रिणो ऽर्चन्ति ।
१ २ २ ३ ३ ४
अर्चन्त्यर्कम् । अर्कमर्चन्ति गायत्रिणस्त्वा गायन्ति ।
४ ५ ५ ४ ३ २ १
गायन्ति त्वा । त्वा गायत्रिणः । गायत्रिणोऽर्चन्ति । अर्चन्त्यर्कम् ।
१ २ २ ३ ३ ४ ४ ५
अर्कमर्किणः । अर्किणोऽर्कमर्चन्ति गायत्रिणस्त्वा गायन्ति ।
५ ६ ६ ५ ४ ३ २ १
गायन्ति त्वा । त्वा गायत्रिणः । गायत्रिणोऽर्चन्ति । अर्चन्त्यर्कम् ।
१ २ २ ३ ३ ४ ४ ५
अर्कमर्किणः । अर्किण इत्यर्किणः ॥
५ ६ ६ ६

जटापाठापेक्षा ही विकृती म्हणण्यास बरीच कठीण असल्यामुळे ती वैदिकांच्या नेहमीच्या पाठात नसते. पाहा – वेदविकृती. [ वे. मू. भालचंद्रभट्ट करबेळकर ]

**दंडविधान** सामाजिक वा राजकीय नियमांचे उल्लंघन करणाऱ्या व्यक्तीला शिक्षा देण्यासाठी केलेले विधिनियम. दंड ही एक शक्ती असून, तिच्या द्वारे राजा प्रजेचे शासन व रक्षण करीत असतो. दंडसत्तेमुळेच प्रजेचे धर्म, अर्थ व काम यांचे रक्षण होते. मनुष्य नियमांचे पालन करतो, ते दंडभयामुळेच. दंड नसता तर सर्वत्र अराजक माजले असते. दुष्टांना सन्मार्गावर आणण्यासाठी दंडविधानाची आवश्यकता असते. महाभारतात भीष्मांनी दंडविधान कसे उत्पन्न झाले, ते सांगितले आहे. प्रारंभी राजा नव्हता, राज्य नव्हते; तसेच दंडव्यवस्थाही नव्हती. त्या वेळी धर्मामुळेच प्रजेचे रक्षण होत असे. कालांतराने लोकांवर कामक्रोधादी विकारांचा प्रभाव पडून धर्माचा ऱ्हास झाला. ते पाहून मग ब्रह्मदेवाने प्रजेच्या रक्षणासाठी दंडविधान निर्माण केले ( म. भा. शांति. ५९.१४–१७,२९ ).

मानवी समाज प्राथमिक अवस्थेत असताना अपराधाबद्दल शिक्षा करण्याची सामाजिक व्यवस्था नव्हती. ती व्यक्तिगत समस्या मानली जाई आणि पीडित व्यक्ती अपराधी मनुष्याला आपल्या कुवतीप्रमाणे कमीअधिक शिक्षा करून मोकळी होई. कालांतराने सामाजिक जीवनाचा विकास झाला आणि अपराधाबद्दल योग्य ती शिक्षा करण्याचा अधिकार समाजाला प्राप्त झाला. पुढे समाजाचे संरक्षण व न्यायदान करण्याची जबाबदारी राजाने पत्करली व तो नैतिक वा सामाजिक नियमांचे उल्लंघन करणाऱ्या व्यक्तीला त्याच्या अपराधाचे स्वरूप पाहून सौम्य किंवा कडक शिक्षा करू लागला. त्यातूनच पुढे दंडविधान निर्माण झाले.

न्यायाधिशाने दिलेली शिक्षा अशा अर्थाने दंड या शब्दाचा उपयोग वेदांत आढळत नाही. वैदिक समाज स्वयंसंचालित असल्यामुळे त्या वेळी दंडव्यवस्थेची आवश्यकता भासली नसावी. ब्राह्मणकालामध्ये त्या स्थितीत बदल होऊ लागला. समाजात दस्यू, दास, किरात, कोल, पुलिंद. इ. विभिन्न अवैदिक लोकांचा समावेश झाला. त्यामुळे त्यांच्यापासून वैदिक समाजाचे संरक्षण करण्याचा प्रश्न उत्पन्न झाला. त्याचबरोबर समाजाचे स्वास्थ्य अबाधित राहावे, या हेतूने शासनव्यवस्था व न्यायदानांत दंडाची आवश्यकताही निर्माण झाली. त्यातूनच पुढे सूत्रकालात दंडनीतीच्या विभिन्न अंगांचा विकास झाला.

महाभारताच्या काळापर्यंत राज्यांचा बराच विस्तार झाला होता व समाजात विविध प्रकारचे विचारप्रवाह सुरू झाले होते. धर्म, नीती, सदाचार व संपत्ती यांच्या रक्षणासाठी म्हणजेच राष्ट्राच्या विशुद्धीसाठी दंडशक्तीचा अवलंब करणे आवश्यक आहे, असे तत्कालीन समाजशास्त्रज्ञांनी मानले व त्यामुळेच दंडाच्या बाबतीत शासनव्यवस्थेत कठोरताही साहजिकपणेच निर्माण झाली.

दण्डश्चेन्न भवेल्लोके विनश्येयुरिमाः प्रजाः ।
जले मत्स्यानिवाभक्ष्यन् दुर्बलान् बलवत्तराः ॥

( म. भा. शांति १५·३० )

अर्थ – जगात दंडशक्ती नसेल, तर ही प्रजा नाश पावेल. जलात मोठे मासे जसे छोट्या माशांना खातात, तसे दंडशक्तीच्या अभावी बलवान लोक दुर्बलांना खाऊन टाकतील.

कौटिल्याच्या अर्थशास्त्रात दंडविधानासंबंधी पुष्कळ विवेचन आहे. दंडाच्या साहाय्यानेच राजा लोकांना वर्णाश्रमधर्माच्या नियमांचे पालन करायला लावतो. मात्र तो मन मानेल तसा दंडाचा उपयोग करू लागेल, तर त्याचा नाश होईल, असे कौटिल्याने सांगितले आहे ( अर्थ. १.६.६-८ ).

बौद्ध धर्माच्या प्रसारामुळे कौटिल्याच्या काळी दंडविधानावर अहिंसेचा प्रभाव पडला होता, असे म्हणतात. दंड असावा; पण तो मृदू असावा, असे काही बौद्ध लोक म्हणू लागले होते. पण काही बौद्ध आचार्य तीव्र दंडाचेही समर्थक होते. कौटिल्याने त्या दोन्ही मतांचा समन्वय करून यथोचित दंडाचा सिद्धान्त प्रस्थापित केला ( अर्थ. १.४. ८–१२ ). प्रजेचे सुख हाच दंडविधानाचा मुख्य उद्देश असावा, असे कौटिल्याने स्पष्ट म्हटले आहे ( अर्थ. १.१९).

त्यानंतरच्या स्मृती, धर्मशास्त्रे व पुराणे यांतही कौटिल्यासारखेच विचार आढळतात. सज्जनांचे दुष्टांपासून रक्षण करणे, दुराचाराला आळा घालून सदाचाराला प्रोत्साहन देणे, अपराध्याला शिक्षा करून राष्ट्राची शुद्धी करणे, हाच दंडविधानाचा हेतू आहे. अपराध्याला अशा रीतीने शिक्षा द्यावी, की ती पाहून अन्य कोणी अपराध करायला प्रवृत्तच होऊ नये. दंड हाच प्रजेचे शासन व रक्षण करतो. त्याच्यामुळेच वर्णाश्रमधर्माचे पालन होते. धर्माचे रक्षणही तोच करतो. राजधर्मापासून च्युत होणारा राजाही दंडाच्या प्रभावानेच नाश पावतो, असे धर्मशास्त्र व पुराणे यांनी सांगितले आहे

**दंडाचे प्रकार**– शास्त्रकारांनी दंडाचे चार मुख्य प्रकार मानले आहेत, ते असे–

(१) प्रतिकारात्मक – अपराधी व्यक्तीला पीडित व्यक्तीने जशास तशी शिक्षा करणे. समाजाच्या प्राथमिक अवस्थेत अशी दंडव्यवस्था प्रचलित होती. सांप्रत सामाजिक व शासकीय दंडविधान प्रस्थापित झालेले असले, तरी हा प्रकार पूर्णपणे बंद झालेला नाही. न्यायव्यवस्थेतही पीडित व्यक्तीला नुकसानभरपाई देण्याची सोय केलेली आहे.

(२) प्रतिरोधक – कोणी अपराध करू नये व इतरांनाही तसा इशारा मिळावा, या हेतूने अपराध्याला शिक्षा देणे. या प्रकारात मृत्युदंड, अंगच्छेद, देशनिर्वासन, आमरण कारावास, इ. शिक्षांचा समावेश होतो.

(३) निरोधक – अपराधाची पुनरावृत्ती होणार नाही, अशा प्रकारे परिस्थिती बदलणे. अर्थात लोककल्याणाला बाधक अशा गोष्टी दूर करून दुराचाराची शक्यता नाहीशी करणे.

(४) सुधारात्मक – अपराधी मनुष्यावर चांगले संस्कार करून त्याची मनोवृत्ती बदलणे. सुसंस्कृत समाजातच या दंडप्रकाराचा अवलंब करणे शक्य असते. अर्थशास्त्र व शुक्रनीतिसार या ग्रंथात त्यासंबंधी पुष्कळ विवेचन आहे. अपराध्याला योग्य प्रकारची शिक्षा देऊन, त्याला सन्मार्ग दाखवणे व त्याचा नैतिक विकास करणे, हे उद्दिष्ट त्यात प्रतिपादले आहे. प्रायश्चित घेऊन पापक्षालन करण्याच्या प्रथेत हीच कल्पना होती, असे म्हणता येईल.

वाग्दंड, धिग्दंड, अर्थदंड, देहदंड व मृत्युदंड असे शिक्षेचे प्रकार आहेत. वैदिक काळी वाग्दंड व धिग्दंड यांचा प्रयोग विशेषेकरून होत असे. अपराधी मनुष्याला त्याचा दोष दाखवून, पुन्हा असले दुष्कृत्य करू नको, असे बजावणे, याला वाग्दंड म्हणतात. दुष्कृत्य करणाऱ्या व्यक्तीचा धिक्कार करणे, म्हणजे धिग्दंडहोय. हे दोन प्रकार स्मृतिकाळातही प्रचलित होते. त्यांचा उपयोग सामान्यतः ब्राह्मणांच्या सामान्य अपराधांसाठी केला जाई. त्याकाळी अर्थदंड व मृत्यदंड हे प्रकारही सुरू झाले होते.

अर्थदंडाचे तीन पोटभेद सांगितले आहेत– (१) प्रथमसाहस– १०० पणांपर्यंत दंड. (पण = एक प्रकारचे नाणे ) (२) मध्यमसाहस– २०० ते ५०० पण दंड व (३) उत्तम साहस– ६०७ ते १००० पण दंड. बहुतेक स्मृतिग्रंथांत हे पोटभेद दिलेले आहेत. मात्र त्यांत पणांची संख्या भिन्न भिन्न सांगितली आहे ( मनु. ८. १३८. याज्ञ. १. ३२६; नारद. ७–८; वि. ध. सू. ४.१० ). उत्तमसाहसात सर्वस्वाचे अपहरणही समाविष्ट होते. सामान्यतः अपराधाच्या तीव्रतेप्रमाणे अर्थदंड दिला जात असे.

हात, पाय, कान, नाक, जीभ, इ. अवयव तोडणे, फटके मारणे, मुंडन करणे, असे देहदंडाचे विविध प्रकार आहेत. चोरी करणाऱ्याचे हातपाय कापण्याची प्रथा होती. ब्राह्मणाला लाथ मारणाऱ्याचा पाय तोडीत. शूद्राने वेदपठण करणे किंवा राजाला शिवी देणे, याबद्दल त्याची जीभ कापीत. व्यभिचारी स्त्रीचे शिरोमुंडन करीत ( मनु. ८.२७९; मनु. ९.२७६-२७७; याज्ञ. २.२७४ ). कानात तप्त तेल घालणे, तोंडात तापलेली सळई खुपसणे, अशा प्रकारच्या शिक्षाही दिल्या जात. काही अपराधांसाठी सश्रम कारावासाची शिक्षा देण्याचीही व्यवस्था होती (शुक्र. ४.१.८८; १०९२, १०८-१०९). अशा कैद्यांना सार्वजनिक रस्ते दुरुस्त करायला लावीत.

मृत्युदंड हा अगदी अंतिम उपाय होय. मृत्युदंड द्यावा, की देऊ नये, यासंबंधी विस्तृत चर्चा महाभारतात केली आहे. त्या काळातील बहुतेक पंडितांचे व आचार्यांचे असे मत होते, की मृत्युदंड सहसा देऊ नये. परंतु तदितर शिक्षा देऊनही अपराधांची संख्या व प्रवृत्ती वाढतच जाते, असे दिसून आल्या-

मुळे मृत्युदंड आवश्यक मानला गेला. धर्मशास्त्रात महापातकांसाठी व नीतिग्रंथांत राजद्रोहासाठी मृत्युदंड सांगितला आहे. मनुष्याने आपल्या अपराधाबद्दल प्रायश्चित्त घेतले नाही, तर त्याला मृत्यूची शिक्षा द्यावी, असे मनूने सांगितले आहे ( मनु. ९.२३६). उच्च वर्णाच्या स्त्रीशी हीन पुरुषाने समागम केल्यास त्याला मृत्युदंड द्यावा, असेही मन्वादी स्मृतिकार सांगतात. अपराध्याला मृत्युदंड देऊ नये, असे कामंदक व शुक्र यांचे मत होते. ब्राह्मणाची हत्या करणाऱ्याला मृत्युदंड द्यावा, असे विष्णुधर्मसूत्रात सांगितले आहे. पण कोणत्याही वर्णाच्या मनुष्याच्या वधासाठी मृत्युदंड द्यावा, असे कौटिल्य सांगतो.

मृत्युदंड देण्याचे अनेक प्रकार पूर्वीपासून प्रचलित आहेत. विष पाजणे, जाळणे, पाण्यात बुडविणे, हत्तीच्या पायी देणे, अंगच्छेद करणे, कुत्र्यांच्या तोंडी देणे, बैलांच्या शिंगांनी मारणे, असे विविध मृत्युदंडाचे प्रकार स्मृती व पुराणे यांत सांगितले आहेत. बौद्ध जातकांत तर यांपेक्षाही भीषण प्रकारांचे वर्णन आढळते. त्यांतील काही प्रकार असे –( १ ) शंखमुंडिका – डोक्याचे चामडे सोलून डोके शंखासारखे बनवणे. (२) राहुमुख– कानांपर्यंत तोंड फाडणे, (३) ज्योतिमल्लिका – तेलाने भिजवलेले कपडे देहाला गुंडाळून आग लावणे, (४) एरकवर्तिका– शरीराचे चामडे सोलून शरीर जमिनीवर घासणे, ( ५ ) ऐणेयक – हातापायात खिळे ठोकून जमिनीला खिळवून आग लावणे, (६) खारापतच्छिका – देह चिरून त्यात मीठ घालणे.

बौद्ध धर्माच्या प्रभावाने दंडाची क्रूरता कमी झाली, असे काही पंडितांचे मत आहे; पण वरील वर्णने त्या मताला पुष्टी देत नाहीत. शिवाय अशोकाच्या काळातही क्रूर शिक्षा देण्याची प्रथा चालू होती.

वेदविरोधी लोकांना कठोर शिक्षा करावी, असे मनूने सांगितले आहे. मात्र अपराधी रुग्ण, अल्पवयी, वृद्ध, स्त्री, इ. असल्यास त्याला सौम्य शिक्षा करावी, असे तो म्हणतो. मनूच्या काळी शिक्षा देताना अपराधाचे स्वरूप, अपराध्याचा हेतू, त्याचे वय व त्याचा सामाजिक दर्जा इत्यादींचाही विचार केला जात असे.

वैदिक आर्यांनी अनार्य लोकांना आपल्या समाजात समाविष्ट केल्यानंतर त्या समाजात अनेक भेदप्रभेद उत्पन्न झाले व त्यापाठोपाठ विषमताही आली. न्यायदानावरही या विषमतेचा प्रभाव पडला. त्रैवर्णिकांसाठी एक न्याय व इतरांसाठी वेगळा न्याय अशी पद्धत सुरू झाली. मूळ वैदिक जनांचे श्रेष्ठत्व व प्रभुत्व कायम टिकावे म्हणून त्यांच्या विरोधी कृत्ये करणाऱ्या अन्य जातींसाठी कठोर दंडव्यवस्था केली गेली. वर्ण व जाती यांच्यांतील भेद जसजसे वाढत गेले, तसतसे दंडविधानही अधिकाअधिक विषम बनले. क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना समान अपराधासाठी क्रमशः वाढती शिक्षा धर्मशास्त्रात सांगितली आहे, ते या विषम दंडविधानाचे ठळक उदाहरण होय. धर्मसूत्रांन्वये ब्राह्मणाच्या हत्येबद्दल नुकसानभरपाई म्हणून १००० गायी, क्षत्रियवधाबद्दल ५०० गायी, वैश्यवधाबद्दल १०० गायी व शूद्राच्या हत्येसाठी १० गायी द्याव्या लागत (बौधा. १.१०.१९.१, आप. १.९.२४). ब्राह्मणाने अशीच हत्या केल्यास त्याला दंड होत असला, तरी त्याचे प्रमाण कमी असे.

महान अपराधाबद्दल मात्र ब्राह्मणालाही कठोर शिक्षा देण्याची व्यवस्था होती. कधी कधी त्याला मृत्युदंडही दिला जात असे. (मनु. ८.३३५; याज्ञ. १.३५८) उच्च वर्णातील व्यक्तींना कधी कधी देशनिर्वासनाचीही शिक्षा देत.

प्राचीन वाङ्मयात जी कठोर दंडव्यवस्था वर्णिलेली आहे, ती गुन्हेगारीला आळा घालण्याच्या हेतूने निर्माण झाली होती व तो हेतू बहुतांशी सफलही झाला होता. क्रूर शिक्षा देण्याचे प्रसंग क्वचितच येत. अपराधांची संख्या अत्यल्पच होती. गुप्तयुगात व हर्षवर्धनाच्या काळात म्हणजे इ. स. च्या ७ व्या शतकाच्या अखेरपर्यंत सामान्यपणे अशी स्थिती होती. त्यानंतरच्या काळात मात्र दुराचार वाढला आणि त्यामुळे कठोर शिक्षा करण्याचे प्रसंग अधिकाधिक उद्‌भवू लागले, असे दिसते. मध्ययुगात तर सर्वत्र अंदाधुंदी माजली. शासनव्यवस्थेत वारंवार होणारी उलथापालथ व आक्रमकांचे भयानक अत्याचार यांमुळे प्रजा हैराण झाली. अशा परिस्थितीत गुन्हेगारी प्रवृत्ती वाढणे अगदी साहजिक होते. मग शांतता व सुव्यवस्था राखण्यासाठी कडक उपाययोजना करणे मध्ययुगातील राज्यकर्त्यांना भाग पडले. धर्मप्रणीत दंडविधानाप्रमाणे अपराध्याला शिक्षा देणारे राजे मात्र थोडेच होते. अनेक सुलतान आपल्या लहरीप्रमाणे एखाद्याला अत्यंत क्रूर शिक्षा देत. दंडव्यवस्थेत स्वपरधर्मानुसार पक्षपातही केला जाई. त्या काळी अपराधाच्या मानाने शिक्षा हे तत्त्व पार विसरले गेले होते. बहुतांशी शिक्षा सूडबुद्धीने व दुष्टाव्याने दिल्या जात. निरपराध लोकांनाही कित्येकदा छळवाद सोसावा लागे. [ प्रा. भा. शा. प.; प्रा. भा. अ. दं.; जा. का. भा. सं.; श. क.; एन्सा. रि. ए. ]

**दंडासी** एक जात. हे लोक ओडिसातल्या गंजाम जिल्ह्यात आढळतात. त्यांच्यापैकी बरेच लोक पूर्वी चोरीचा धंदा करीत असत. हा आपला पिढीजात व्यवसाय आहे, असे ते मानीत व त्यात त्यांना काही गैर वाटत नसे. पांडवांना लक्षागृहातून गुप्तपणे निसटण्यासाठी आपल्या पूर्वजांनी भुयार खणून देऊन त्यांना मदत केली, अशी प्रौढी हे मिरवतात आणि

त्यातूनच आपल्या चौर्यकर्माचा उगम झाला, असे सांगतात. रावंच्या एका दूताला कृष्णापासून जो मुलगा झाला, त्याचे हे वंशज होत, अशी दंतकथाही प्रचलित आहे. जन्मलेले मूल तीन किंवा पाच दिवसांचे झाले, की पूर्वी त्याला चोरीच्या व्यवसायाची दीक्षा देत असत. त्यासाठी भिंतीला फट पाडून तिच्यातून मुलाला आत-बाहेर करणे, असा त्या दीक्षेचा विधी होता. तो विधी त्यांच्या जातिप्रमुखाच्या हस्ते होत असे.

यांच्यांत संतरासी, किललेंडीदियासी, एकोपोथिरिय, इ. पोटभेद आहेत.

या लोकांत मुलगी प्रथम ऋतुमती झाली, की सात दिवस तिचा विटाळ पाळतात. जर तिचा वाङ्निश्चय झालेला असेल, तर सातव्या दिवशी तिचा भावी सासरा दागिने व पैसे देतो.

**विवाहप्रथा**– मुली वयात आल्यावर त्यांची लग्ने करतात. लग्नाच्या आदल्या दिवशी कुंभाराकडून सात घट आणतात व ते तळ्यातील पाण्याने भरतात. संध्याकाळी वारुळाजवळ एक कोंबडे बळी देतात. त्याच दिवशी वराच्या बहिणीचा नवरा वराची हजामत करतो. मग सात घरांतून पाणी आणून ते एका घटात भरतात व तो लग्नवेदीवर टांगून ठेवतात.

लग्नाच्या दिवशी वधू-वर वोहल्यावर बसल्यावर त्यांच्या हातांत अडकित्ता, सुपारी व थोडे तांदूळ ठेवून ते सगळे पिवळ्या दोऱ्याने बांधतात. घटातले पाणी दोघांच्या हातांवर घालतात. मग वधूचा भाऊ अडकित्ता काढून घेतो व वराला टप्पल मारून निघून जातो. दंडासींचा लग्नविधी एवढाच असतो.

**देवधर्म** – हे संकैथुनी, कुल्लडंकुनी, कोंबेसरी, कालीमुकी, इ. ग्रामदेवतांना भजतात. हंगामात प्रथम मोहाच्या कळ्या किंवा आंबे खाताना काही होम-हवन करतात. त्याचप्रमाणे नवीन धान्याच्या ढिगासमोर कोंबडे व बकरा बळी देऊन मग ते धान्य वापरतात.

**मृतिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात. प्रेत जाळलेल्या जागी मृताची एक प्रतिमा करून तिला अन्न अर्पण करतात. दहाव्या दिवशी मडक्याचे दहा तुकडे घेऊन त्यांवर मृतासाठी अन्न ठेवतात. [का. ट्रा. स. इं.]

**दंडी** (इ. स. चे ६ वे व ७ वे शतक) एक प्रख्यात संस्कृत कवी आणि काव्यशास्त्रज्ञ. याने आपल्या ग्रंथांत महाराष्ट्री प्राकृताची स्तुती केली आहे, वैदर्भी रीतीला श्रेष्ठ मानले आहे आणि आंध्र, चोळ, कलिंग व विदर्भ या दक्षिणेतील देशांचे विपुल वर्णन केले आहे. त्याच्या काव्यात कावेरी नदीचा व दक्षिणी चालीरीतींचाही अनेकवार उल्लेख येतो. यावरून विद्वानांनी असा निष्कर्ष काढला आहे, की दंडी हा दाक्षिणात्य असावा. त्याच्या प्रपितामहाचे नाव दामोदर, पितामहाचे मनोरथ, पित्याचे वीरदत्त व आईचे गौरी असे होते, अशी माहिती अवंतिसुंदरीकथेत दिलेली असून, तो कांची येथे पल्लवांच्या राजसभेतील कवी होता, असेही म्हटले आहे. त्याच्या काळाविषयी विद्वानांत मतभेद आहेत; परंतु बहुसंख्य अभ्यासकांच्या मते तो इ. स. ६०० च्या सुमारास होऊन गेला असावा.

दंडीच्या नावावर अनेक ग्रंथ आहेत; परंतु त्यांतील काव्यादर्श व दशकुमारचरित हे दोनच ग्रंथ उपलब्ध आहेत. यांपैकी पहिला काव्यशास्त्रविषयक असून, दुसरा गद्यकाव्यरूप आहे.

**काव्यादर्श** – हा ग्रंथ स्वतंत्र काव्यचर्चेच्या सुरवातीच्या काळातला आहे. त्यामुळे तो संस्कृत साहित्यशास्त्राच्या इतिहासात महत्त्वाचे स्थान पावलेला व विद्वानांच्या आदरालाही पात्र झालेला आहे. या ग्रंथाची श्लोकसंख्या ३६० असून, त्याचे तीन परिच्छेद आहेत. प्रथम परिच्छेदात काव्याची व्याख्या करूनत्याचे गद्य, पद्य व मिश्र असे तीन विभाग सांगितले आहेत. त्यानंतर महाकाव्याची व्याख्या केली आहे. आख्यायिका व कथा असे गद्यकाव्याचे प्रकार सांगून त्यात वस्तुतः काही भेद नाही, असे म्हटले आहे. नंतर संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व मिश्र असे वाङ्मयाचे चार भाग सांगितल्यावर वैदर्भी व गौडी हे भाषाशैलीचे प्रकार व काव्याचे दहा गुण यांचे विवेचन केले आहे. पुढे कवी होण्याला कोणते गुण आवश्यक आहेत, याचे विवेचन करून, प्रतिभा म्हणजे कल्पनाशक्ती, श्रुत म्हणजे विद्वत्ता आणि अभियोग म्हणजे सतत परिश्रम या तीन गोष्टींमुळे कवित्वशक्ती प्राप्त होते, असे सांगितले आहे.

दुसऱ्या परिच्छेदात अलंकारांची व्याख्या केल्यावर पस्तीस अलंकारांची लक्षणे सोदाहरण दिली आहेत.

तिसऱ्या परिच्छेदात यमकांसंबंधाने सविस्तर विवेचन केल्यावर चित्रबंधांच्या व्याख्या व उदाहरणे सांगून, प्रहलिकेचे सोळा प्रकार आणि दोषांचे दहा प्रकार वर्णिले आहेत.

ग्रंथारंभी दंडीने वाणीचा महिमा गायिला आहे, तो असा—

इदमन्धतमःकृत्स्नं जायेत भुवनत्रयम् ।
यदि शब्दाह्वयं ज्योतिरासंसारं न दीप्यते ।।

(काव्यादर्श १.४)

अर्थ – जर शब्द नामक ज्योती संपूर्ण जगताला व्यापून तेवत राहिली नसती, तर हे त्रैलोक्य पूर्णपणे अंधकारमय झाले असते.

अशा वाणीतून जन्माला येणाऱ्या काव्याचे अंतिम प्रयोजन उच्च आनंदाची प्राप्ती हेच होय, असे दंडी म्हणतो. काव्यरचनेसाठी कवीला जशी साधना आवश्यक आहे, त्याच-

प्रमाणे काव्याचा आस्वाद घेण्यासाठी रसिकानेही वाणीची विदग्धता संपादन करायला हवी, हे त्याने आवर्जून सांगितले आहे. त्याच्या मते विदग्ध अशा सहृदयांचे सुसंस्कृत व अभिरुचिसंपन्न मत, हेच काव्याच्या खरेखोटेपणाचा निवाडा करण्याचे न्यायालय होय. काव्याकडे केवळ काव्य दृष्टीने पाहावे, शास्त्रीय दृष्टीने पाहू नये, यावर दंडीचा कटाक्ष आहे. जितक्या व्यक्ती तितक्या रीती, हे त्याचे रीतिविषयक मत शैलीविषयीच्या नवसिद्धांताशी जुळणारेच आहे.

काव्यविषयक परिशुद्ध भूमिका व्यक्त करणारा दंडीचा हा काव्यादर्श खरोखरच काव्याचा आदर्श आहे, यात संशय नाही.

**दशकुमारचरित** – संस्कृत गद्यात लिहिलेल्या या ग्रंथात दहा कुमारांच्या साहसी जीवनाची अद्‌भुत कथा गुंफलेली आहे. या ग्रंथाचे दोन भाग आहेत. दोन्ही भाग मिळून २१ उच्छ्वास आहेत. पैकी पहिल्या भागातील प्रारंभीची ५ उच्छ्वासांची पूर्वपीठिका व दुसऱ्या भागातील अखेरची ८ उच्छ्वासांची उत्तरपीठिका मागाहून कोणी तरी त्या ग्रंथाला जोडलेली आहे, हे आता सर्वमान्य झालेले आहे. म्हणजे मधले केवळ ८ उच्छ्वासच दंडीने रचलेले आहेत, असे ठरते.

दशकुमारचरित या नावावरूनच कळते, की दंडीला दहा कुमारांची कथा सांगायची होती. परंतु सध्याच्या आठ उच्छ्वासांत आठच कुमारांची कथा आहे. म्हणजे दंडीच्या हातून हा ग्रंथ अपुरा राहिलेला दिसतो. दशकुमारचरिताची कथा संक्षेपाने सांगता येईल, ती अशी–

मालव देशाचा राजा मानसार याने मगधावर स्वारी करून मगधाधिपती राजहंस याचा पराभव केला व तो स्वत: मगधाचा राजा झाला. राजहंस राजाचा सारथी मारला गेला व राजा रथातच मूर्च्छित पडला असता, रथाचे घोडे उधळले व रथासह विंध्यारण्यात शिरले. राजहंसाची गर्भवती राणी वसुमती आधीच त्या अरण्यात गुप्तपणे जाऊन राहिली होती. तिथे त्या दोघांची भेट झाली. यथावकाश राणीने एका पुत्राला जन्म दिला. त्याचे नाव राजवाहन असे ठेवले गेले.

त्याच सुमारास राजहंसाच्या चौघा मंत्र्यांनाही पुत्र झाले. त्यांची नावे प्रमती, मित्रगुप्त, मंत्रगुप्त व विश्रुत अशी होती. हे सर्व कुमार अरण्यातच राजवाहनाबरोबर वाढू लागले. त्यांच्याच वयाचे आणखी पाच कुमारही योगायोगाने तिथे आले व त्यांचे मित्र बनले.

या दहा कुमारांचे सर्व शिक्षण राजाने फार काळजीपूर्वक पूर्ण केले आणि ते वयात आल्यावर त्याने त्यांना दिग्विजयार्थ पाठवले. ते विंध्यारण्याच्या मध्यभागी पोचले, तेव्हा त्यांना मातंग नावाचा एक ब्राह्मण भेटला. त्याने इतर कुमारांच्या नकळत राजवाहनाला एका गुहाद्वाराने पाताळात नेले.

इकडे ते नऊ कुमार राजवाहनाच्या शोधासाठी विभिन्न दिशांना गेले. सर्वांनी शेवटी कोठे जमायचे ते त्यांनी ठरवले होते.

काही काळानंतर मातंगाचा निरोप घेऊन राजवाहन भूलोकी परत आला व आपल्या मित्रांच्या शोधार्थ हिंडू लागला. अखेरीस त्या सर्वांची संकेतस्थळी भेट झाली. त्यानंतर त्यांनी दिग्विजय करून सर्व शत्रूंना जिंकले. मालवाधिपती मानसार याचाही पराभव करून त्यांनी त्याला ठार मारले. त्यांच्या दिग्विजयामुळे आनंदित झालेल्या राजहंस राजाने त्या सर्वांना एकेक देश वाटून दिला; पुष्पपूर (मगध) व उज्जयिनी (माळवा) ही राज्ये राजवाहनाला दिली आणि स्वत: वानप्रस्थाश्रम स्वीकारला.

एक धूर्ताख्यान म्हणून दशकुमारचरिताची ख्याती आहे. त्या दहा साहसी कुमारांना देशाटनात आलेले विचित्र अनुभव सांगण्याच्या निमित्तानें दंडीने कपट, साहस, चोरी, जादू, चमत्कार, द्यूत, मद्य, युद्ध, खून, प्रणय वगैरे गोष्टींची प्रत्ययकारी चित्रे प्रस्तुत ग्रंथात केली आहेत. दंडीची दृष्टी वास्तववादी असून, त्याने समाजाच्या सर्व थरांचे बारकाईने निरीक्षण केले होते, असे त्याच्या विविध प्रसंगांच्या वर्णनांवरून स्पष्ट कळते.

दंडीने हा गद्यग्रंथ वैदर्भी शैलीत लिहिलेला असून, त्यातील पदलालित्य रसिकांना मुग्ध करणारे आहे. म्हणूनच ' दण्डिनः पदलालित्यम् ' असा त्याच्या शैलीचा गौरव संस्कृत रसिकांनी केला आहे. [ सं. सा. सो. इ.; सं. सा. शा. इ. ]

## दंडेश्वर

महादेवाचे एक स्वयंभू स्थान. सांगली-पंढरपूर रस्त्यावर सांगलीपासून २० मैलांवर एका डोंगरात हे स्थान आहे. या डोंगराला दंडोबाचा डोंगर असे म्हणतात व तिथल्या महादेवाला दंडेश्वर म्हणतात. तिथे श्रावण महिन्यात तिसऱ्या सोमवारी मोठी यात्रा भरते. दंडोबावर वीज चमकू लागली, की निश्चतपणे पाऊस पडणार अशी तिथल्या लोकांची श्रद्धा आहे. [ म. जि.–सांगली ]

## दंतकथा

लोककथेचा एक प्रकार. ही संज्ञा स्थानिक किंवा ऐतिहासिक आख्यायिकांना लावतात. ही संज्ञा संस्कृत वा प्राकृत वाङ्मयात आढळत नाही. मराठीत मात्र श्रीधरस्वामी नाझरेकरांनी तिचा पुढीलप्रमाणे उल्लेख केला आहे–

**जैमिनीअश्वमेघ पाहोन । कथा त्याच कथिल्या संपूर्ण।**
**वाउग्या दंतकथा ऐकोन । नाहीं लिहिल्या ग्रंथीं या ।**

( पांडवप्रताप ६३.४६ )

ज्यांना लिखित व प्रतिष्ठित ग्रंथांचा आधार नाही, अशा तोंडोतोंडी चालत आलेल्या कथा म्हणजे दंतकथा होत, हा श्रीधरस्वामींचा भाव या प्रकारच्या कथांचे यथार्थ स्वरूप सूचित करणारा आहे. संस्कृतात वार्ता या अर्थानेे उदंत असा शब्द आहे. उदा० 'कान्तोदन्तः सुहृदुपगतः सङ्गमात्किञ्चिदूनः ।' (=स्त्रियांना सुहृदांनीं सांगितलेल्या त्यांच्या पतींची वार्ता प्रत्यक्ष भेटीहून किंचितशीच उणी वाटते. ) या मेघदूतातील पंक्तीत (उत्तर मेघ.४०) हा शब्द वापरलेला आहे. या शब्दावरून उदंतकथा म्हणजे तोंडोतोंडी चालत आलेली कथा, असा शब्द निघाला असावा. या शब्दातील आद्य 'उ' चा लोप होऊन दंतकथा हा शब्द बनला असणे शक्य आहे.

अभ्यासकांनी दंतकथांचे पुढील दोन वर्ग पाडले आहेत–

(१) प्रसृत दंतकथा–जैमिनिभारतात समाविष्ट झालेली चंद्रहासकथा हे प्रसृत कथेचे उत्कृष्ट उदाहरण आहे. ही कथा जगाच्या सर्व भागांत पसरली आहे. तशीच भारतातील हंसकन्याकथाही जगभर पसरलेली आढळते. जगातील कित्येक देशांत आढळणारी ही कथा प्रथम शतपथ ब्राह्मणात अंशतः सांगितली गेली आहे (११.५.१). हा पुरूरवा–उर्वशी-संबंधीचा कथाभाग आहे. पुन्हा याचे मूळ ऋग्वेदातील पुरूरवा उर्वशीच्या संवादसूक्तात आढळते ( १०.९५ ). अशा अनेक प्राचीन भारतीय कथा जगभर पसरलेल्या आढळतात.

(२) स्थानिक कथा– यांचा पसारा तर फारच मोठा आहे. त्यांचे पुढील चार प्रमुख वर्ग पडतात– (१) ऐतिहासिक व्यक्तींचा व घटनांचा संबंध सांगणाऱ्या कथा, (२) स्थलांच्या आख्यायिका, (३) पुरलेल्या धनाविषयीच्या कथा आणि (४) भुताखेतांच्या, झपाटलेल्या घरांच्या व झाडांच्या आख्यायिका. स्थानिक दंतकथांपैकी काही त्या त्या गावीच प्रसिद्ध असतात, तर काही प्रांतभर पसरलेल्या असतात.

दंतकथा म्हणजे विपर्यस्त किंवा असंबद्ध व बहुशः विस्मृत असा इतिहास होय, असे लोकसाहित्यविशारद मानतात. दंतकथेत इतिहासाचा, अगदी सूक्ष्म का असेना, धागा हा असतोच. दंतकथेचा उगम वस्तुस्थितीत असला, तरी त्या वस्तुस्थितीला उठाव यावा म्हणून, ज्या व्यक्तीशी तिचा संबंध असेल, त्या व्यक्तीला देवतास्वरूप देण्याचा प्रयत्न परंपरा करते. याचमुळे पुष्कळ वेळा दंतकथा व दैवतकथा यांच्यांतील सीमारेषा ठरवणे कठीण होते. प्राचीन भारतातील अगस्त्याचे कार्य असेच दंतकथेची मर्यादा ओलांडून दैवतकथेत परिणत झाले आहे. परशुरामाची तर अवतारांतच गणना झाली आहे. वामनावतार व बळिराजा, तसेच राम आणि कृष्ण यांच्या इतिहासाचीही अशीच दंतकथांतून दैवतकथांत परिणती झाली असावी. आबाजी सोनदेवाने कल्याणच्या सुभेदाराची सून पकडून आणली असता, शिवछत्रपतींनी तिचा मातेप्रमाणे सन्मान करून तिला परत पाठवले, हीही एक दंतकथाच आहे; परंतु या कथेतून सूचित होणारी शिवछत्रपतींची परस्त्रीविषयीची पवित्र दृष्टी, हे मात्र ऐतिहासिक सत्य आहे. म्हणूनच अशा दंतकथांचा इतिहासरचनेत काही मर्यादेपर्यंतच उपयोग होऊ शकतो. [ लो. सा. रू.; म. लो. मा. ३– प्रस्तावना ]

## दंतकार

एक प्राचीन जात. हे लोक हस्तिदंताच्या वस्तू बनवीत म्हणून त्यांना दंतकार असे नाव पडले. जातकांत यांचा उल्लेख अनेकवार आलेला आहे. हस्तिदंतापासून विविध कला–कुसरीच्या वस्तू बनवून, त्या विकण्याचा उद्योग हे लोक नगरानगरांतून हिंडून करीत असत. मोठमोठ्या नगरांत यांची व्यवसायकेंद्रे होती. जातकांत दंतकारवीथीचाही (दंतकार पेठ) उल्लेख आहे. त्यावरून त्यांचे व्यावसायिक संघटन असावे, असे दिसते. [ भा. सा. इ. ]

## दंतजननशांती

मूल आठ महिन्यांचे होण्यापूर्वी त्याला दात आल्यास अथवा जन्मतःच दात आलेले असल्यास ते अशुभ समजून शांती करतात. या शांतीचा विधी पुढीलप्रमाणे —

प्रथम मुलाला अभ्यंगस्नान घालतात. नंतर एका कलशावर पूर्णपात्र ठेवून, त्यात सुवर्णप्रतिमांवर धाता, अग्नी, सोम, वायू, पर्वत व केशव या देवतांचे आवाहन करतात. ग्रहांची स्थापना व पूजा करतात. प्रधान होमाच्या वेळी धातृदेवतेसाठी भाताच्या आणि अग्न्यादी पाच देवतांसाठी तुपाच्या आहुती देतात. मग प्रायश्चित्तहोम, बलिदान, पूर्णाहुती, इ. विधी नित्याप्रमाणे करून अभिषेक करतात.

सहाव्या अथवा आठव्या महिन्यात दात आल्यास जी शांती करतात, तिची प्रधान देवता बृहस्पती असते. या शांतीच्या विधीत दही, मध व तूप यांत भिजविलेल्या पिंपळाच्या समिधांनी बृहस्पतीसाठी प्रधान होम करतात. [ सं. कौ. ]

## दंतधावन

दात स्वच्छ करणे म्हणजे दंतधावन होय. रोज सकाळी दंतधावन करण्याची प्रथा भारतात फार प्राचीन काळापासून प्रचलित आहे. दंतधावनासाठी एखाद्या झाडाची काटकी घेऊन तिचे टोक चावून कुंचलीसारखे करतात व त्याने दात घासतात. ज्या वनस्पतीचे दातवण घेतलेले असेल, तिला उद्देशून पुढील मंत्र म्हणायचा असतो —

आयुर्बलं यशो वर्चः प्रजां पशून् वसूनि च ।
ब्रह्म प्रज्ञां च मेधां च त्वं नो देहि वनस्पते ॥
( गोभिलस्मृती १·१४० )

अर्थ – हे वनस्पते, तू आम्हांला आयुष्य, बल, यश, तेज, संतती, पशू, धन, ज्ञान, बुद्धी व धारणा दे.

धर्मशास्त्रात या क्रियेचे अनेक विधि–निषेध सांगितलेले आहेत. ज्या झाडांना काटे असतात वा फांदी मोडली असता ज्यातून चीक निघतो, अशा झाडांची काटकी दंतधावनाला योग्य मानलेली आहे. उदा० खदिर, करंज, कळंब, वड, चिंच, वेणुपृष्ठ, आंबा, निंब, अपामार्ग (आघाडा), बेल, रुई, उंबर, बोर, मालती, ककुभ, शिरीष, तिंदुक इत्यादी. काडीची चव खारट, तुरट किंवा कडवट असावी. मधुर किंवा आंबट असू नये. तिची लांबी किती असावी, याबद्दल मतभेद आहेत. ती आठ अंगुळे किंवा एक वीत लांब असावी, असे नृसिंह पुराणात सांगितले आहे. चार वर्ण व स्त्रिया यांच्यासाठी ती अनुक्रमे १०, ९, ८, ७ व ४ अंगुळे लांब असावी, असे गर्ग सांगतो.

शौच आणि आचमन यानंतर, सूर्योदयापूर्वी दंतधावन करायचे असते. त्यासंबंधी काही नियम असे – दंतधावन करताना पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड करावे. वरच्या दातापासून प्रारंभ करून वर्तुळाकार गतीने सर्व दातांवर कुंचली फिरवून दात स्वच्छ करावे. मग त्याच वृक्षाच्या दुसऱ्या काडीने जीभही स्वच्छ करावी. मग ती काडी धुवून नैर्ऋत्य दिशेला टाकावी. नंतर पाण्याने बारा चुळा भराव्या व शेवटी आचमन करावे. सकाळप्रमाणे जेवल्यानंतरही दात घासावे, असे विष्णुधर्मसूत्रात सांगितले आहे.

प्रतिपदा, दर्श, षष्ठी व नवमी या दिवशीं दंतकाष्ठ न घेता पाने चावून दात स्वच्छ करावे, असे सांगितले आहे. पर्वतिथींना, लग्न, श्राद्ध किंवा पक्ष, उपवास किंवा व्रत आणि यज्ञकर्म असेल त्या दिवशी, यजमानाने दंतधावन करू नये. पती परदेशी गेला असता स्त्रीने दात घासू नयेत, असेही धर्मशास्त्रात सांगितले आहे.

दंतकाष्ठ मिळत नसेल तेव्हा आणि निषिद्ध तिथींच्या दिवशी पाण्याने चुळा भरून दंतधावन करावे. त्यासाठी अनामिका व अंगठा यांचा उपयोग करणे प्रशस्त होय. मध्यमा व कनिष्ठिका यांचा विकल्प सांगितला आहे. तर्जनीचा उपयोग मात्र सर्वथा निषिद्ध होय.

आचार्यांसमोर दात घासू नयेत, असे आपस्तंब धर्मसूत्रात सांगितले आहे (१·२·८·५). ब्रह्मचाऱ्याने दात घासू नयेत, केवळ चुळा भरून दात स्वच्छ करावे, असाही नियम पूर्वी होता (गौ. ध. सू. २.१९). [ हि. ध.; आचारेन्दु; आन्हिकसार ]

**दंतपूर** एक प्राचीन नगर. इथे कलिंग देशाची राजधानी होती. जातके व दीघनिकाय या ग्रंथांत या नगराचा उल्लेख अनेक वेळा आला आहे. महाभारतात याला दंतकूर असे म्हटले आहे (म. भा. उद्योग. ४८.६).

दंतपूर म्हणजे दातांचे नगर. या नगरातून गौतम बुद्धाचा एक दात लंकेत नेण्यात आला, असे म्हणतात. दंतवक्क (सं. दंतवक्र) हा दंतपूरचा राजा होता, असे जैनांच्या आवश्यकनिर्युक्ती नामक ग्रंथावरून कळते. जगन्नाथपुरीलाच पूर्वी दंतपूर म्हणत, असेही काही पंडितांचे मत आहे. [ हि. जॉ. ए. इं. ]

**दंतेश्वरी** एक देवी. मध्य प्रदेशातील बस्तर जिल्ह्यात दंतेवाडा या ठिकाणी हिचे स्थान आहे. तिथल्या गोंड आदिवासींचे ते एक प्रमुख धार्मिक केंद्र आहे. दंतेश्वरी ही प्राचीन काळच्या नागवंशी राजांची आराध्य देवता होती. नागराजांनीच या देवीचे मंदिर बांधले आणि तिच्या पूजाअर्चेची व्यवस्था केली. त्यानंतर बस्तरच्या अन्य राजांनीही ही प्रथा पुढे चालू ठेवली. दंतेश्वरीला मानकेश्वरी असे दुसरे नाव आहे. गोंड लोक तिला सीतेचे प्रतिरूप समजतात. बस्तरचे संस्थान विलीन होण्यापूर्वी दसऱ्याच्या दिवशी दंतेश्वरी देवीची डोली बस्तरची राजधानी जगदलपूर या ठिकाणी आणली जात असे. त्या वेळी नृत्यगीतांचे बहारदार कार्यक्रम होत. जगदलपूर येथे एक लाकडी रथ आहे. या रथात दंतेश्वरीला बसवीत व तिथला राजाही देवीबरोबर त्या रथात बसे. मग या रथाची राजधानीत मिरवणूक निघे.

छत्तीसगढ प्रदेशात दंतेश्वरीची मंदिरे अनेक ठिकाणी आहेत. बमलाई नामक एका देवीच्या सात बहिणी होत्या; त्यांपैकी दंतेश्वरी ही एक बहीण असल्याचे सांगतात. प्राचीन काळी दंतेश्वरीला नरबळी देण्याचीही प्रथा होती, असे कळते.

**दंदशूक** अठ्ठावीस नरकांपैकी एक नरक. क्रूर व निर्दय माणसांना या नरकात पडावे लागते. तिथे त्यांना सर्पदंशादी घोर यातना सोसाव्या लागतात, असे भागवतात सांगितले आहे. तैत्तिरीय ब्राह्मणात दंदशूक नामक एका सर्पभेदाचा उल्लेख आहे (३.१.४.७). त्यावरूनच या नरकाला हे नाव मिळाले असावे. [ पु. इं. ]

**दंपती** पती व पत्नी यांचे जोडपे. 'जाया च पतिश्च दम्पती (पत्नी व पती मिळून दंपती होतात) असा [illegible] शब्दाचा विग्रह आहे. यातील जाया व पती हे दोन्ही शब्द समान योग्यतेचे आहेत. ऋग्वेदात हा शब्द आढळतो. [illegible]

मॅकडोनेल यांच्या मते हा शब्द ऋग्वेदकालीन स्त्रियांच्या उच्च स्थितीचा बोधक आहे. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातले ३१ वे सूक्त हे दंपतीसूक्त आहे. त्यावरून असे स्पष्ट कळते, की त्या काळी पती व पत्नी यज्ञादी धार्मिक कृत्ये व संसाराची कामे संयुक्तरूपाने आणि समान अधिकाराने करीत असत.

पुढील काळात अनेक व्रतांच्या प्रसंगी दंपतीपूजन व दंपती-भोजन आवश्यक म्हणून सांगितले आहे. लक्ष्मी-नारायणांच्या प्रीतीसाठी ते करायचे असते. पाहा – पति-पत्नी.

**दंपतीपूजन** एक व्रत. चैत्र, वैशाख, श्रावण, कार्तिक, मार्गशीर्ष व माघ या महिन्यांत ज्या दिवशी युगादितिथी, मन्वादितिथी, संक्रांत, व्यतीपात व वैधृती हे योग येतील, त्या दिवशी किंवा कोणत्याही द्वादशीस हे व्रत करतात. या व्रताचा विधी असा –

लक्ष्मी-नारायणांची सुवर्णमूर्ती करावी. नंतर एखाद्या तीर्थाच्या ठिकाणी जाऊन किंवा मंदिरात, गाईच्या गोठ्यात वा उद्यानात गोमयाने सारवलेल्या व सुशोभित केलेल्या जागी तांदुळांचे अष्टदल कमल तयार करून, तिथे एका कलशावर तिची स्थापना करून पूजा करावी. नंतर एका दांपत्याला लक्ष्मी-नारायण कल्पून त्यांचीही पूजा करावी. मग त्या सुवर्णप्रतिमेचे आचार्याला दान करावे. फल – ऐहिक सुखोपभोगांची प्राप्ती व अंती मोक्षलाभ. [ व्रतराज ]

**दंवाली** काश्मीरी लोकनृत्य. या नृत्यात केवळ पुरुषच भाग घेतात. हे नृत्य प्रामुख्याने लालबावासाहेब या साधूच्या पुण्यतिथीच्या निमित्ताने गांदरवल या गावी होते. ते पाहण्यासाठी दूरदूरचे लोक जमा होतात. या नृत्यातील नर्तकांना दंवाली फकीर म्हणतात. हे लोक उत्सवापूर्वी गावागावातून हिंडतात, घरोघर जाऊन अंगणात नाचतात आणि लोकांकडून पैसे, कपडे व धान्य गोळा करतात. काश्मीरी स्त्रिया त्यांना फार मानतात. त्या आपली मुले या नर्तकांच्या हाती देतात. आणि नर्तक त्या मुलांना हातांवर झेलून अथवा खांद्यावर घेऊन नाचतात. या प्रकाराने मुलांचे आयुष्य वाढते, अशी काश्मीरी स्त्रियांची श्रद्धा आहे.

दंवाली नृत्य एका मोठ्या वर्तुळात होते. त्याला ढोलाची साथ असते. ढोलाचा आवाज जसजसा वाढत जातो, तसतसा नर्तकांचा आवेशही वाढतो. कधीकधी नर्तक हाती काठ्या घेऊन परस्परांवर आघातही करतात. पूर्वी हे लोक लाठीऐवजी हातात तलवार घेत असावे, असे अनुमान केले जाते. [ श्री. अली मुहम्मद लोन – योजना, ऑगस्ट–सप्टेंबर १९६२ ]

**द** वर्णमालेतील अठरावे व्यंजन आणि त वर्गातील तिसरा वर्ण. याच्या विकासाच्या एकंदर सात अवस्था आहेत. पहिली अवस्था अशोकाच्या गिरनारच्या लेखात, दुसरी पभोसा येथील लेखात (ख्रिस्तपूर्व पहिले शतक), तिसरी महाक्षत्रप शोडास याच्या काळातील मथुरेतल्या जैन लेखात, चौथी मथुरा येथील कुशाणकालीन लेखात (इ. स. चे पहिले–दुसरे शतक), पाचवी राजा यशोवर्म्याच्या काळातील मंदसोर येथील लेखात (इ. स. ५३२) व सहावी जपानमधील होर्युंजी येथील मठात सापडलेल्या ताडपत्रांवरील 'उष्णीषविजयधारी' या ग्रंथाच्या शेवटी दिलेल्या संपूर्ण वर्णमालेत (इ. स. चे सहावे शतक) सापडते. या वर्णाची शेवटची अवस्था पहिल्या अवस्थेच्या अगदी उलट बनलेली आहे. हा दंत्य वर्ण आहे.

दच्या रूपाचा विकासक्रम

वर्णोद्धार तंत्रात याचे स्त्रीरूपी ध्यान वर्णिले आहे, ते असे –

ध्यानमस्य दकारस्य वक्ष्यते शृणु पार्वति ।
चतुर्भुजां पीतवस्त्रां नवयौवनसंस्थिताम् ।।
अनेकरत्नघटितहारनूपुरशोभिताम् ।
एवं ध्यात्वा दकारं तु तन्मन्त्रं दशधा जपेत् ।।

अर्थ – हे पार्वती, मी दकाराचे ध्यान सांगतो, ते ऐक. चतुर्भुज, पिवळे वस्त्र नेसलेली, नवयौवना, अनेक रत्नांनी युक्त असे हार व नूपुरे ल्यायलेली अशा द वर्णाच्या देवतेचे ध्यान करून तिच्या मंत्राचा जप दहा वेळा करावा.

पत्राच्या माथ्यावर द हे अक्षर लिहिण्याची प्रथा पूर्वी होती. ब्राह्मणेतर वर्णातील व्यक्तीने ब्राह्मणाला लिहिलेल्या पत्राच्या माथ्यावरील द दंडवताचा सूचक व ब्राह्मणाने अन्यवर्णीय व्यक्तीला लिहिलेल्या पत्राच्या माथ्यावरील द आशीर्वादाचा द्योतक असे. [ श. क.; म. श. को.; म. ज्ञा. को. ]

**दक्खिनी भाषा व साहित्य** दक्खिनी भाषा हे हिंदीचेच एक प्रादेशिक रूप असले, तरी तिला स्वतंत्र भाषेची प्रतिष्ठा लाभलेली आहे. ही भाषा दक्षिण भारतात आकाराला आली आणि दक्षिणेतील भाषांचेच तिच्यावर विशेष संस्कार झाले. त्यामुळेच तिला दक्खिनी

हिंदी किंवा नुसतेच दक्खिनी असे नाव प्राप्त झाले.

**इतिहास** — मुसलमानांनी दिल्ली जिंकण्याच्या आधीपासून दक्खिनी ही दक्षिण भारतात प्रचलित होती. जैन अपभ्रंश हे हिंदीचे मूल रूप होय. त्याचा विकास करणाऱ्यांत अनेक दक्षिणी, विशेषतः महाराष्ट्रीय, ग्रंथकारांचा हात होता. याशिवाय ज्या सिद्धांनी आपले अनुभव अपभ्रंश भाषेत ग्रथित केले, त्यांचा वारसा चालविणारा नाथसंप्रदाय प्रारंभापासूनच दक्षिणेत प्रभावी ठरला होता. त्यामुळे इ. स. च्या अकराव्या-बाराव्या शतकापासूनच द. भारतात हिंदीचा वापर सुरू झाला. अर्थात त्या हिंदीवर स्थानिक लोकांच्या भाषेचा प्रभाव विशेष प्रमाणात पडणे अपरिहार्य होते. यादवकालीन महानुभाव कवी दामोदरपंडित याने एका नाथपंथी जोग्याचे खंडन करण्यासाठी अनेक हिंदी चौपद्या लिहिल्या आहेत. त्यांतील पुढील पंक्ती पाहिल्यावर या स्थानिक प्रभावाचे स्वरूप स्पष्ट होईल —

**सार असार निर्वाळित प्रभु आदिनाथकी वाणी ।**
**नागदेव म्हणे हसे रंगलों, चक्रस्वामिचां चरणीं ।।**

कालदृष्ट्या हे दक्खिनी हिंदीचे आद्य रूप ठरते. याला अरबी-फारसीचा यत्किंचितही स्पर्श नाही.

इ. स. १३२७ च्या सुमारास मुहंमद तुगलुकाने आपली राजधानी दिल्लीहून देवगिरीला आणली. तेव्हा मुहंमद तुगलुकाबरोबर दौलताबादला येऊन राहिलेले लोक प्रामुख्याने पंजाबचा पूर्वभाग आणि दिल्ली-मेरठचा परिसर येथून आलेले होते. त्यांची भाषा हिंदी ( हिंदीच्या मेवाती, बांगडू व खडीबोली या बोली) होती. ही नवागतांची हिंदी आणि सिद्धनाथांच्या संपर्कामुळे महाराष्ट्रात प्रचलित असलेली मराठीप्रभावित हिंदी यांचा व्यवहारसौकर्यासाठी मेळ घडून आला आणि मुसलमान शासकांच्या प्रभावामुळे या हिंदीवर अरबी–फारसीचाही काही प्रमाणात पगडा बसला. मुसलमानांना स्थानिक भाषेपेक्षा ही संमिश्र भाषा जवळची वाटल्यामुळे मुसलमान शासकांनी तिला उत्तेजन देऊन राजभाषेचे स्थान दिले. त्यामुळे दक्षिणेतील मुसलमान शासकांच्या आश्रयाने या दक्खिनी हिंदीत साहित्यनिर्मिती सुरू झाली.

पुढे बहामनी राज्याची पाच शकले झाल्यानंतर विजापूर, बिदर आणि गोवळकोंडा या तीन ठिकाणी दक्खिनी हिंदीचा विशेष विकास घडून आला. या ठिकाणच्या मुसलमान राजांनी दक्खिनी हिंदीला राजभाषा तर बनविलीच; शिवाय दक्खिनीच्या अनेक उपासकांना आश्रय देऊन स्वतःही दक्खिनीत ग्रंथरचना केली. सतराव्या शतकात औरंगजेबाने या पाच शाह्या नष्ट केल्यानंतर दक्खिनीच्या उपासकांचा आश्रय तुटला आणि त्यांची वाताहात झाली. त्यांतील काही पुढे हैद्राबादला जाऊन राहिले. अठराव्या शतकापासून, ते संस्थान विलीन होईपर्यंत हैद्राबाद हे दक्खिनीचे एकमेव आश्रयस्थान होते.

दक्खिनीच्या विकासाचा हा इतिहास पाहता, तिचे तीन कालिक भेद दिसून येतात — तिचे आद्य रूप अपभ्रंशाने प्रभावित होते. मुसलमानांच्या आक्रमणानंतर सुमारे शंभर-दीडशे वर्षे ती केवळ घरगुती बोलभाषेच्या स्वरूपात टिकून राहिली. हे तिचे दुसरे कालिक रूप होय. पुढे चौदाव्या शतकाच्या उत्तरार्धापासून मुसलमान राज्यकर्त्यांच्या आश्रयाने तिला पुनश्च साहित्यिक प्रतिष्ठा लाभली आणि मराठी, कन्नड व तेलुगु या स्थानिक भाषांबरोबरच अरबी–फारसीचाही तिच्यावर प्रभाव पडला. हे दक्खिनीचे तिसरे आणि पूर्ण विकसित असे रूप होय.

भाषिक दृष्ट्या दक्खिनीची घरगुती व साहित्यिक अशी दोन रूपे आढळतात. घरगुती बोलभाषेवर स्थानिक भाषांचा विशेष प्रभाव दिसतो. औरंगाबाद–देवगिरीकडच्या भाषेवर मराठीचा, तर गुलबर्गा–विजापूरकडे कन्नडचा प्रभाव अधिक दिसतो. गोवळकोंडा व हैद्राबाद या भागांतील दक्खिनीवर तेलुगूची छाया जाणवते. मद्रास वगैरे अतिदक्षिणेकडील भागात दक्खिनीचा प्रचार तुरळक असला, तरी भाषिक दृष्ट्या तिचे तिकडचे रूप वेगळेच आहे. साहित्यिक दृष्टीने विजापूर व गोवळकोंडा येथील शैली अधिक परिष्कृत आहे.

**लिपी व भाषिक स्वरूप** — दक्खिनीचा उदय दक्षिणेत मुसलमान येण्यापूर्वी झालेला असला आणि प्रारंभी दक्खिनी कवितेचे लेखन देवनागरीत होत असले, तरी तिचा मुसलमानांनी स्वीकार केल्यानंतर तिची लिपी स्वाभाविकपणेच अरबी–फारसी बनली. वास्तविक दक्खिनी बोलणाऱ्यांत हिंदूच पुष्कळ होते आणि ज्यांनी नव्याने मुसलमानधर्माचा स्वीकार केला होता, असेही पुष्कळ लोक होते. परंतु मुसलमान हे जेते होते आणि त्यांच्या शासनव्यवस्थेत मुल्ला–मौलवींचे विशेष प्रस्थ असल्यामुळे दक्खिनीची लिपी देवनागरीऐवजी अरबी-फारसी, विशेषतः फारसी, बनली.

बहामनी कालापासून दक्खिनीतील सर्व ग्रंथ फारसी लिपीत लिहिलेले आढळतात. या लिपीच्या स्वीकारामुळे दक्खिनीतील फारसी–अरबी शब्द सामान्यतः अविकृत स्वरूपात राहिले आहेत. फारसीत लिहिलेल्या शब्दांचे लिखित रूप एक होते आणि उच्चारित रूप दुसरेच होते. उदा० 'तोय' या शब्दाचा उच्चार 'ते' आणि 'से' या शब्दाचा उच्चार 'सीन' असा होतो.

हिंदी बोलभाषेतील अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऍ (ऱ्हस्व ए), ए, ऑ (ऱ्हस्व ओ), ऐ, ओ, औ हे सर्व स्वर दक्खिनीत आहेत. आ चा उच्चार सर्वत्र दीर्घ नसतो. याशिवाय, डॉ. कादिरीच्या

मते उकार व ओकार यांच्या मधला एक स्वर दक्खिनीत आहे. तसेच, हिंदी बोलभाषेतील सगळी व्यंजने दक्खिनीत असून, शिवाय फारसी–अरबीची ख़, ज़, ग़, फ़ ही व्यंजनेही आहेत.

दक्खिनीच्या विकासात दिल्लीच्या परिसरातून दक्षिणेत आलेल्या लोकांचा विशेष वाटा असल्यामुळे, तिच्यामध्ये दिल्लीच्या परिसरातील ग्रामीण बोलभाषेत आढळणारे अनेक शब्द वापरात आहेत. तिची साहित्यिक शैली मात्र शब्दावली व आशय या उभय दृष्टींनी उत्तर भारतातील संत साहित्याच्या शैलीसारखी आहे. दक्खिनी साहित्याची निर्मिती करणारे ग्रंथकार बहुसंख्येने मुसलमान होते; त्यांचा अरबी–फारसीचा व्यासंग होता आणि त्यांनी रचलेले अनेक दक्खिनी ग्रंथ फारसी ग्रंथांचे अनुवाद होते; त्यामुळे दक्खिनीमध्ये अरबी–फारसी शब्दांची आवक काही प्रमाणात झाली. गोवळकोंड्याच्या कुतुबशाहीच्या काळात अनेक गुजराती लोक दक्षिणेत आले आणि त्यांनी दक्खिनीचा स्वीकार करून तिच्यात ग्रंथरचना केली; त्यामुळे दक्खिनीवर थोडा गुजरातीचा संस्कारही जाणवतो. या गुजराती लोकांच्या संपर्कामुळे दक्खिनीला गूजरी असे पर्यायनाम लाभले होते. मराठी, कन्नड व तेलुगू या दक्षिणेतील स्थानिक भाषांनी तर दक्खिनीला दक्खिनीपण प्राप्त करून दिले आहे. त्यामुळे त्यांचा प्रभावही तिच्यावर आढळतो.

दक्खिनीत देशी–विदेशी शब्दांचा संकर अनेक ठिकाणी दिसतो. परंतु हा संकर देशी शब्दांबरोबर विदेशी शब्द वापरण्याच्या आग्रहातून घडलेला नसून, ग्रंथकारांवरील अरबी–फारसीच्या प्रभावामुळे, अभिव्यक्तीच्या गरजेतून स्वाभाविकपणेच झालेला आहे. अंबर, अखंड, अवतार, उत्तम, मास, छंद, दानी, सेवक, देह, नारी, इ. अनेक संस्कृत शब्द दक्खिनीत तत्सम स्वरूपात आढळतात, त्याचप्रमाणे अपछरी, अछरी (अप्सरा), अदिक, अदिख (अधिक), अम्रीत (अमृत), औलखन (अवलक्षण), कश्त (कष्ट), रैन (रजनी), अरत (अर्थ), इ. अनेक संस्कृत शब्दांची तद्भव रूपेही वापरली जातात. तसेच एकच शब्द तत्सम व तद्भव अशा उभय स्वरूपांतही आढळतो.

फारसी–अरबी व भारतीय शब्दांचे गंगाजमनी समास हा दक्खिनीचा एक विशेष म्हणायला हवा. उदा० गुलबाडी (फुलवाडी), खुशलखन (सुलक्षण), इत्यादी.

दक्खिनीत असे किती तरी शब्द आहेत, की जे उत्तर भारतातील साहित्यिक हिंदीत आढळत नाहीत. उदा० अॅपडना (पहुँचना), अडनाव (उपनाम), उधान (ज्वारभाटा), झाड (वृक्ष), दडी मारना (चुपचाप बैठे रहना), पेलाड (दूर), रावाँ (तोता), इत्यादी. हे शब्द मराठीतून दक्खिनीत आलेले आहेत, हे स्पष्ट आहे. उचाना (ऊपर उठाना), हेरना (खोजना), सादना (प्राप्त करना, साधणे), गमना (बीतना, चलना), इ. साहित्यिक हिंदीत न आढळणारी क्रियापदेही दक्खिनीत आहेत.

उत्तर भारतातल्या हिंदी बोलभाषेत जिथे एकाच शब्दात दोन मूर्धन्य ध्वनी जवळजवळच्या अक्षरांत येतात, तिथे दक्खिनी हिंदीत प्रथम दंत्य ध्वनी असतो. उदा० ताँटा (टंटा), थंडी (ठंडी), घूँडते (ढूंडते), दंडल (डंठल). दक्खिनीमध्ये महाप्राण उच्चार बहुधा अल्पप्राण होतात. उदा० –
ख चा क – देक (देख), लाक (लाख), मूरक (मूरख), इत्यादी. तसेच झ चा ज –समज (समझ), मुजको (मुझको), इत्यादी.

शब्दाच्या मधला ह् कधी कधी लुप्त होतो, विशेषतः धातूच्या रूपांत. कता (कहता), ठैरते (ठहरते), पैछान कर (पहचान कर). या ठिकाणी ह चा उच्चार लुप्त असून क्वचित पुढच्या अक्षरात मिसळला आहे. साहित्यिक खडी बोलीत जशी शब्दाची द्विरुक्ती होते, तशीच दक्खिनीमध्ये होताना पहिल्या शब्दाच्या शेवटी ए, एँ हे प्रत्यय जोडतात. जसे – घरे घर (घर घर), राते रात (रात रात). खडी बोलीचे काही शब्द दक्खिनीमध्ये लिंगपरिवर्तन करून वापरले जातात. उदा० शराब, सूरत, आवाज, इमारत, हालत, बात हे शब्द पुल्लिंगात वापरलेले दिसतात. संख्यावाचक शब्दांचीही काही रूपे अशी मिळतात, की जी खडी बोली मान्य करीत नाही. एक या शब्दाचे एकस व पद्यात यक हे प्राचीन मराठी वळणाचे रूप वापरलेले दिसते. दो साठी दोइ, दोय; ग्यारह साठी एग्यारह; निन्यानवे यासाठी नवद, नौ इत्यादी. गुजरातीचा हिंदीवरील प्रभाव सांगताना डॉ. कादिरींनी सोय शब्दाचा उपयोग केलेला दाखवला आहे. उदा० निहायत सोय. साहित्यिक खडी बोलीत संबंधवाचक विभक्तिप्रत्यय फक्त का, की, के हे आहेत; तर दक्खिनीत यांच्याशिवाय कर, केरा, केरी ही रूपेही आहेत. उदा० 'अजब तेरे कुदरत केरे नाम है ।'

आजच्या खडी बोलीत आणि दक्खिनीत महत्त्वाचा फरक क्रियापदांचा आहे. हिंदीच्या कर्मणी प्रयोगात क्रियापदाचे लिंग–वचन कर्माप्रमाणे बदलते, तर दक्खिनीत ते कर्त्याप्रमाणेच राहते. उदा०–

मैं तो यो बात नें किया हूँ। काम बहोत खास किया हूँ।

दक्खिनीत क्रियापदाची आकारान्त रूपे याकारान्त वापरतात. उदा०– जान्या (जाना), बोल्या (बोला), पहचान्या (पहचाना), देख्या (देखा), पूछ्या, रख्या, लग्या, इत्यादी.

दक्खिनीमध्ये क्रियाविशेषणादी अव्ययांची रूपे खडी बोलीपेक्षा वेगळी मिळतात. उदा० बाहर शब्दासाठी बहार, मार, ब्रहेर; आगे साठी आगे, आघे. काही शब्दांची रूपे वेगळी मिळतात; उदा० संग = संगात, पास = कने, तरह = निमन, नीचे = तल, नज़दीक = नजीक, बहुत = बहोत. निषेधवाचक न साठी ना, नै, नको हे शब्द येतात. बिना या शब्दासाठी बाज वापरतात. हिंदीतील ही या शब्दयोगी अव्ययाऐवजी च या मराठी शब्दयोगी अव्ययाचा वापर हे दक्खिनीचे एक व्यवच्छेदक लक्षण मानले जाते.

दक्खिनी साहित्यिक हिंदीत रूपांची जी विविधता दिसते, तिचे कारण या भाषेत अनेक भाषांचे मिश्रण झाले आहे. भविष्यकाळाची सी प्रत्ययाने बनलेली रूपे पंजाबीचा परिणाम दर्शवतात. केरा, केरी हे प्रत्यय आणि स्त्रीलिंगाच्या जागी पुल्लिंगाचा वापर हा पूरबी भाषेच्या प्रभावाचा द्योतक आहे. असे अनेक भेद लक्षात घेऊनही शेवटी निष्कर्ष हाच निघतो, की दक्खिनी हे खडी बोलीचेच पूर्वकालीन रूप आहे.

हिंदीचे प्राचीनतम गद्य दक्खिनी हिंदीत लिहिले गेले. याच शैलीचा प्रभाव उत्तर भारतावर झाला. याचे श्रेय वली ओरंगाबादीला जितके दिले जाते, त्याहीपेक्षा जास्त श्रेय औरंगजेबाबरोबर दक्षिणेत आलेल्या सैनिकांना आहे. कारण ते अनेक वर्षे इथे राहून मग दिल्लीस गेले.

**साहित्य** – इ. स. १३५० ते १७५० हा काळ दक्खिनी साहित्याच्या विकासाच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरला आहे. या चार शतकांच्या प्रदीर्घ काळात अनेक नामवंत कवींनी हा विकास घडवून आणला. दक्खिनीच्या उपासकांत विलासी कवी आहेत; मुस्लिम राज्यकर्ते आहेत; सूफी प्रचारक आहेत; तसेच हिंदू संतही आहेत. या कालखंडात दक्खिनी काव्याच्या परंपरेला कधीही खंड पडला नाही; परंतु दुर्दैव असे, की या असंख्य कवींपैकी कित्येक नावानिशी लुप्त झाले आहेत, कित्येक केवळ नामशेष राहिले आहेत आणि काहींची अत्यल्पच रचना आपल्याला उपलब्ध झाली आहे.

ख्वाजा बंदानेवाज (इ. स. १३१८–१४२३) हा दक्खिनीचा आद्य कवी समजला जातो. याचे मूळ नाव सय्यद मुहंमद हुसैनी असे होते. ख्वाजा नसीरुद्दीन चिरागे दिल्ली हा प्रसिद्ध सूफी साधू याचा गुरू होय. गुरूच्या निधनानंतर बंदानेवाज त्याच्या गादीचा अधिकारी झाला. इ. स. १३९८ मध्ये तैमूरलंगाने दिल्लीत हाहा:कार उडवल्यामुळे हा ऐंशी वर्षांचा वृद्ध कवी दक्षिणेत दौलताबादला आला. याने फारसी आणि दक्खिनी या दोन्ही भाषांत ग्रंथरचनाकेली आहे. त्याचे चक्कीनामा हे काव्य आणि मेराजनामा व से: पारा हे दोन आद्य ग्रंथ दक्खिनीत आहेत. से: पारा या ग्रंथात त्याने श्रद्धेचे अलंकारिक वर्णन केले आहे, ते असे–

ईमानका जीव कुरान । ईमान की जड़ तोबा ।
ईमान की डाल्याँ सो बंदगी । ईमान की बात
परहेज गारी । ईमानका तुख्म सोइल्म । ईमान का पोस्त
सो शर्म । ईमानका वतन सो मोमिन का दिल है ।

अर्थ – कुराण हा श्रद्धेचा प्राण आहे. पश्चात्ताप हे श्रद्धेचे मूळ आहे. भक्ती ही श्रद्धेची शाखा (अभिव्यक्ती) आहे. संयम हे श्रद्धेचे एक आवश्यक अंग आहे. ज्ञान हे श्रद्धेचे बीज आहे. लज्जा हे श्रद्धेचे आवरण आहे. श्रद्धाळू भक्ताचे हृदय हे श्रद्धेचे स्थान आहे.

बंदानेवाजचा प्रशिष्य शाह मीराँजी हा पंधराव्या शतकातील प्रसिद्ध दक्खिनी ग्रंथकार होय. दक्षिणेतील सूफी संतांत याचे स्थान श्रेष्ठ दर्जाचे आहे. याने खुशनाम, खुशनग्ज़ व शहादतुल्-हकीकत हे तीन काव्यग्रंथ आणि शाहमर्गू वुकुल्‌ब व सबरस हें दोन गद्यग्रंथ रचले. 'मुहब्बत सों बंधा अपना काम मे मशगूल रह किससों नको झगड' (कुणाशीही झगडा न करता, चढत्या वाढत्या प्रभुप्रेमात रंगून जाऊन आपल्या व्यवहारात मग्न राहा) असा याचा संदेश आहे. याच्या भाषेत नको आणि च ही दोन मराठी अव्यये वारंवार वापरलेली आढळतात.

अशरफ, फीरोज, बुरहानुद्दीन जानम व शाह अली हे सोळाव्या शतकातील प्रसिद्ध ग्रंथकार होत. अशरफने इ. स. १५०३ मध्ये रचलेले नौसिरहार हे काव्य इमाम हुसैनवर आलेल्या संकटाचे वर्णन करणारे आहे. 'यक यक बोल यह मानिक मोल' (आपला एकेक बोल हा माणकाच्या मोलाचा आहे), असे याने आपल्या कवितेविषयी म्हटले आहे. हा आपल्या भाषेला हिंदवी म्हणतो. याच्या शैलीत भारतीयत्व स्पष्टपणे आढळून येते.

फीरोज हा गोवळकोंड्यास इब्राहीम कुतुबशहाच्या आश्रयाला होता. विजापूरचा सूफी संत मख्दूमजी हा याचा गुरू होय. याने आपल्या गुरूचे माहात्म्य गाण्यासाठी तौसिफनामा नावाचे एक काव्य रचले आहे. त्यात तो गुरूला उद्देशून म्हणतो–

वही फूल जिस फूलकी बास तूं ।
वही जीव जिस जीवकी आस तूं ॥
सो तूं रुख है दीनका बारदार ।
जो तुझ छाँवतल जग है पकडचा करार ॥

अर्थ– ज्याचा सुगंध तू आहेस, ते फूल मी आहे. ज्याची आशा तू आहेस, तो जीव मीच आहे. तूच धर्माचा फलसमृद्ध वृक्ष आहेस. तुझ्या छायेखाली हे जग विश्वासाने विसावले आहे.

बुरहानुद्दीन जानम हा शाह मीराँजीचा पुत्र आणि पारमार्थिक उत्तराधिकारी होय. सुखसुहेला आणि इरशादनाम हे दोन सुंदर काव्यग्रंथ याने रचले. हा आपल्या भाषेला हिंदी म्हणतो.

शाह अली हा अहमदाबादचा सूफी संत होता. त्याला माशूक-अल्ला (भगवत्प्रियतम), असे म्हणत असत. जवाहर-उल्-इस्रारे-अल्ला (भगवद्रहस्यसार) या नावाने त्याचे उपदेश शिष्यांनी संग्रहित केले आहेत. त्यातील एक उद्गार असा—

ढूंढ़न निकली पीव कूँ, अपस गई सो खोय।
जिधर देखूँ सो एक हूँ, मुंज बिन और न कोय ।।

अर्थ – प्रेयसी प्रियकराला शोधायला निघाली आणि स्वतःला स्वतःच हरवून बसली. (कारण तिच्या असे अनुभवास आले, की) जिकडे पाहावे तिकडे मीच एकटी भरून राहिले असून, माझ्याशिवाय अन्य काहीच अस्तित्वात नाही.

या काळात सूफी संतकवींप्रमाणेच हिंदू संतांनीही दक्खिनीत रचना केलेली दिसते. या संत मंडळीत एकनाथांचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यांनी अनेक पदे, भारूडे व हिंदु–तुर्क संवादासारखी स्फुटे दक्खिनीत रचली आहेत.

सतराव्या शतकाच्या प्रारंभी वजही नामक कवीने दक्खिनीचे साहित्यवैभव कळसाला पोचवले. हा गोवळकोंडा येथे इब्राहीम कुली कुतुबशहाच्या कालातच कविता करू लागला होता, परंतु त्याची प्रारंभीची रचना उपलब्ध नाही. त्याच्या ग्रंथसंभारातील दोनच ग्रंथ उपलब्ध आहेत. एक कुतुबमुश्तरी आणि दुसरा सबरस. कुतुबमुश्तरी हा काव्यग्रंथ असून, त्यात युवराज मुहंमद कुली कुतुबशहा आणि बंगालची राजकुमारी मुश्तरी यांच्या काल्पनिक प्रीतीची कथा आहे.

वजहीला दक्खिनीचा फार अभिमान होता. दक्खिनीला तो 'मीठी वात' (मधुर भाषा) म्हणतो. वजहीचा सबरस हा गद्यग्रंथ म्हणजे दक्खिनीचे पहिले गद्यकाव्य आहे. याची रचना इ. स. १६३५ मध्ये झाली. वजहीने हा ग्रंथ फताहीच्या 'हुस्न व दिल' या फारसी ग्रंथाच्या आधारे लिहिलेला आहे, परंतु त्याने तसा उल्लेख मात्र केला नाही. या ग्रंथात संस्कृत प्रबोधचंद्रोदयाप्रमाणे रूपकाच्या द्वारे तत्त्वज्ञान सांगितले आहे. या ग्रंथाची शैली नादमधुर आहे. उप-संहारातील ग्रंथ-गौरवाची पुढील काही वाक्ये वजहीच्या तालबद्ध शैलीची कल्पना देऊ शकतील——

जो किताब पादशाह कूँ मजलिस में फिरे;
मोतिया के दरिया में तिरे,
आशिकाँ का दिल बहलाता,
माशूकाँ कूँ तपाता।
सबके दिल कूँ इससो काम,
बहुत इसमें अकल बहुत इसमें काम।
जाँ यो अछै वाँ दिलगीरी ना आवै,
सुहबत इसको सबकूँ भावै

भावार्थ – जो ग्रंथ राजसभेत गौरव पावतो, तो मोत्यांच्या सागरात प्रवेश करतो. त्याला मोत्यांचे मोल प्राप्त होते. हा ग्रंथ प्रियकरांच्या हृदयांना सुखवतो आणि प्रेयसींना व्यथित करतो. सर्वांच्या हृदयांना हा हवासा वाटतो. यांत विपुल बुद्धिविलास आहे आणि सौंदर्याचा रंगही आहे. ज्यांनी हा ग्रंथ जवळ केला आहे, त्यांना दुःख प्राप्त होत नाही. त्यामुळे सर्वांनाच या ग्रंथाची संगत आवडते.

उत्तरकालीन दक्खिनी साहित्यिकांवर वजहीने विशेष प्रभाव गाजवला आहे. जौकीने वसालुल आशिकीन हे काव्य (इ. स. १६९७) आणि मुजुमी शाह वैरुल्ला बीजापुरीने गुलशने जश्न दिल ही मस्नवी (इ. स. १६७५) वजहीच्या सबरसच्याच आधारे रचली.

वजहीचा आश्रयदाता मुहंमद कुली कुतुबशहा (इ. स. १५६४–१६१२) हा कवींची कदर करणारा रसिकश्रेष्ठ आणि रात्रंदिवस मदिरा, मदिराक्षी व मदिर कविता यांच्या धुंदीत रंगलेला कवी होता. तेलुगू, संस्कृत आणि अन्य भारतीय साहित्य यांच्याविषयी त्याला आस्था होती. गोवळकोंड्याजवळच्या चंचलम नामक गावची हिंदू नर्तकी भागमती हिच्यावर त्याचे प्रेम जडले होते. तिच्या सौंदर्यावर व तिच्या सान्निध्यातील मधुर क्षणांवर त्याने अनेक कविता रचल्या आहेत.

मुहंमद कुलीच्या कवितेत संस्कृत शब्दांचाही आढळ होतो. त्याने वसंत, वर्षा आणि शरद या ऋतूंचे सौंदर्य अनेक कवितांतून वर्णिले आहे. त्याच्या सर्व कविता दीवान या संग्रहात अकारान्त क्रमाने संग्रहित केलेल्या आहेत. त्यांची लिपी अरबी असली, तरी प्रत्यक्ष लेखनात हिंदी वर्णांच्या गरजांनुसार काळजीपूर्वक स्वरचिन्हे टाकलेली आहेत. मुहंमद कुलीच्या काव्योद्यानात विहरणाऱ्या एका नायिकेचे प्रणयोद्गार पुढीलप्रमाणे आहेत——

तेरे दरसन कि मैं हूँ साईं माती।
मुजे लाओ पिया छातीसों छाती।
पियारे हात धर सभालो मुंज कूँ।
कि तिल-तिल दूती तुज–माती डरती।
पेरेम प्याला पिलाओ मुंजकूँ दमदम।
कि तूँ है दो जगत में मुंज संगाती ।।
न राखूँ तुज नयन में राखुं दिल में।
कि तूँ मेरा पियारा जिउका साथी ।।

पिया के ध्यान सों मैं मस्त हूँ मस्त ।
मुंजे बिरहे के बैनाँ के सुनाती ।
अगर यक तिल पडे अंतर पिया सों ।
नयन जलसों सपत समदर भराती ॥

भावार्थ—हे नाथ, मी तुझ्या दर्शनाने धुंद झाले आहे. तू मला उराउरी भेट. तुझ्यावर आसक्त असलेली माझी सवत मला क्षणोक्षणी भिववीत आहे, म्हणून मला तू हाती धरून संभाळ. मला तू क्षणोक्षणी प्रेमाचा प्याला पाज. कारण तूच दोन्ही जगांतील माझा सांगाती आहेस. तू माझ्या जिवाचा सांथी असल्यामुळे मी तुला केवळ माझ्या डोळ्यांतच नाही; तर हृदयातही साठवून ठेवीन. मी प्रियकराच्या ध्यानाने मस्त झाले आहे. अशा वेळी सखी, तू मला विरहाची वर्णने का ऐकवतेस ? प्रियकराचा एक पळभर जरी वियोग घडला, तर मी अश्रूंनी सप्तसागर भरते.

मुहंमद कुली कुतुबशहा आणि त्याचा दरबारी कवी वजही यांच्या नंतर दक्खिनी हिंदीला समृद्ध करणारे अनेक कवी होऊन गेले. गौवासी हा त्यांमधला सर्वश्रेष्ठ कवी होय. मुहंमद कुली कुतुबशहा, वजही आणि गौवासी ही दक्खिनी हिंदीची त्रिमूर्ती होय.

विजापूरच्या अब्दुल गनीने इ. स. १६०३ मध्ये इब्राहिम आदिलशहासंबंधी लिहिलेले इब्राहिमनामा हे काव्य वाङ्मयीन आणि ऐतिहासिक अशा उभय दृष्टींनी महत्त्वपूर्ण आहे. विजापूरचाच आणखी एक कवी अमीन याचे बहराम व हुस्नबानू हे अपूर्ण राहिलेले काव्य इ. स. १६३८ मध्ये दौलत नामक कवीने पुरे केले. गोवळकोंड्याच्या एका मशिदीत राहणारा सूफी संत मीराँ हुसेमी याचे ' मस्नवी बशीरतुल् ' हे काव्य त्या कवीच्या साधुत्वामुळे रंकापासून राजापर्यंत आदराचा विषय बनले.

महंमद कुली कुतुबशहाचा नातू ( मुलीचा मुलगा ) अब्दुल्ला कुतुबशहा याची कारकीर्द (इ. स. १६२६–१६६२) दक्खिनी साहित्याच्या निर्मितीला अत्यंत पोषक ठरली. तो स्वतः श्रेष्ठ दर्जाचा कवी नसला, तरी तो कवींचा चाहता होता. त्याच्या दरबारात गौवासीप्रमाणेच निशातीसारखी अन्य अनेक कविरत्ने झळाळत होती. निशाती हा अब्दुल्लाच्या दरबारात एक उच्च पदाधिकारी होता. त्याचे फूलवन हे काव्य दक्खिनीतील मस्नवी काव्यांत सर्वश्रेष्ठ समजले जाते. हे काव्य बिसाते नामक फारसी मस्नवीच्या आधारे रचलेले असले, तरी त्यात निशातीच्या स्वतंत्र प्रतिभेचा विलास प्रकर्षाने पाहायला मिळतो. या काव्यात कुतुबशाही शासनकाळातील समाजजीवनाचे प्रतिबिंब स्पष्टपणे पडलेले आहे.

सतराव्या शतकाच्या पूर्वार्धात सनअती, खुशनूद, मुकीमी, कुतुबी, इ. अनेक कवी होऊन गेले. परंतु या काळात गौवासी इतका दुसरा श्रेष्ठ कवी कोणीही झाला नाही. त्याने वजहीच्या काळातच काव्यरचनेला आरंभ केला होता. परंतु वजहीच्या झगझगाटात त्याचे तेज पडले नाही. पुढे अब्दुल्ला कुतुबशहाच्या शासनकाळात त्याला राजाश्रय लाभला आणि त्याची कीर्ती चहूकडे पसरली. गौवासीचे तूतीनामा हे काव्य दक्खिनी हिंदीचे एक भूषण ठरले आहे. तूतीनामा वाचल्यावर मेरा दिल खजीना जो मामुर है । वचन के जवाहर सों भरपूर है ' ( माझे हृदय खजिन्यासारखे समृद्ध असून, त्यात असंख्य वचनरत्ने साठलेली आहेत) हा गौवासीचा उद्‌गार अक्षरशः खरा असल्याचे प्रत्ययाला येते.

सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात नस्रती, मीराँजी खुदानुमा, तगई, गुलामअली, इश्रती जईफी, मुहंमद अमीन, वज्दी, इ. अनेक कवी होऊन गेले. नस्रती हा या काळातील सर्वश्रेष्ठ कवी होय. एक प्रकारे तो दक्खिनीचा अखेरचा श्रेष्ठ कवी मानला गेला आहे. नस्रती हा विजापूरच्या अली आदिलशहाचा समवयस्क मित्र होता. त्याने गुल्शने इश्क या काव्यात मनोहर व मधुमालती यांची प्रेमकथा गायिलेली असून, अलीनामा व नौ कसीदे या दोन ग्रंथांत वीररसाचा उठाव केला आहे.

वली औरंगाबादी अथवा वली दक्खनी (इ. स. १६६८–१७३०) हा दक्खिनीचा अखेरचा कवी आणि उर्दूचा पहिला कवी होय. त्याचा जन्म औरंगाबादमध्ये झाला. अहमदाबादचा सूफी साधू वजीहउद्दीन गुजराती हा त्याचा गुरू होता. औरंगजेबाच्या काळात वली औरंगाबादी हा दिल्लीला गेला आणि तिथल्या कविमंडळात सुप्रसिद्ध बनला. दिल्लीच्या दरबारात त्या काळापर्यंत फारसीचीच प्रतिष्ठा होती. लोकव्यवहारात हिंदीचा वापर होत असला, तरी साहित्याचे माध्यम म्हणून फारसीचे स्थान अविचल राहिले होते. परंतु वली दिल्लीत पोचताच त्याच्या दक्खिनी गजलांनी दिल्लीतील कवी मुग्ध झाले आणि त्यांनी दक्खिनीचा निःसंकोच मनाने स्वीकार केला. दक्खिनीच्या या दिग्विजयाचा परिणाम मात्र असा झाला, की तिच्यात अरबी-फारसी शब्दांचे प्रमाण खूप वाढले. त्यामुळे तिचे स्वत्व नाहीसे होऊन तिचे हे फारसी प्रभावित नवे रूप पुढे उर्दू या नावाने ओळखले जाऊ लागले.

वलीच्या गजलांत मात्र भारतीय शब्द पुष्कळ प्रमाणात आढळतात. त्याचा दीवान ( कवितासंग्रह ) ४००० पंक्तींनी युक्त आहे. वलीपूर्वी दक्खिनीत मस्नवींची ( कथा-काव्यांची) रचना होत असे. वलीने ही जुनी सरणी सोडून गजल रचले आणि त्यामुळे त्याला अमाप लोकप्रियता लाभली. वलीपूर्वी

महंमद कुली कुतुबशहाने काही गजल रचले होते; पण गजलांचे खरेखुरे वैभव वलीनेच प्रकट केले. त्याच्या दीवान-मधील काही पंक्ती अशा–

मत गुस्सेके शोले सों जलते कूँ जलाती जा।
टुक मेहके पानी सों यह आग बुझाती जा॥
तुज इश्कमें दिल,चलकर जोगी की लिया सूरत।
यकबार अरे मोहन छाती सों लगाती जा।
तुज घरकी तरफ सुंदर आता है वली दायम्।
मुश्ताक है दर्शन का टुक दरस दिखाती जा॥

अर्थ– हे मोहिनी, माझ्या जळणाऱ्या हृदयाला कोपाच्या अंगारांनी तू आणखी जाळू नकोस. थोडचा कृपेच्या जलाने माझ्या हृदयातील आग विझव. तुझ्या प्रीतीपायी मी जोग्याचे रूप धारण केले आहे. एक वेळ मला हृदयाशी कवळून धर. हे सुंदरी, हा वली तुझ्या घराकडे वारंवार येतो, कारण हा तुझ्या दर्शनासाठी उत्कंठित झाला आहे. त्याला तू ओझरते तरी दर्शन दे.

वलीनंतर दक्खिनीची साहित्यधारा उर्दू साहित्यप्रवाहात लुप्त झाली आणि दक्खिनी ही दक्षिणेतील काही लोकांची (प्राधान्याने मुसलमानांची) केवळ बोलभाषा राहिली. आजही दक्खिनीत अल्पस्वल्प साहित्य निर्माण होत असले, तरी त्याला दक्खिनी साहित्याच्या इतिहासात प्रतिष्ठा लाभू शकलेली नाही.

दक्खिनी साहित्यातील सर्व मोठचा कृती मुसलमान ग्रंथ-कारांनी निर्माण केल्या; त्यांचे लेखन अरबी-फारसी लिपीत झाले आणि अलिकडच्या काळात त्यांचा अभ्यास फारसी जाणणाऱ्या पंडितांनीच केला. त्यामुळे दक्खिनी साहित्याचा इतिहास लिहिणाऱ्यांनी दक्खिनीच्या हिंदू उपासकांची उपेक्षाच केली आहे. विशेषतः एकनाथोत्तर मराठी संतांनी दक्खिनीत विपुल स्फुट रचना केलेली असूनही, दक्खिनी साहित्याच्या इतिहासकारांनी तिची हवी तेवढी दखल घेतलेली नाही. [दक्खिनीका पद्य और गद्य– श्रीमान शर्मा; दक्खिनी हिंदी काव्यधारा– श्री. राहुल सांकृत्यायन १९५९; दक्खिनी हिंदी– श्री. बाबूराम सक्सेना, १९५२]

**दग्धयोग** जातकातील एक अशुभ योग. रविवारी द्वादशी, सोमवारी एकादशी, मंगळवारी पंचमी, बुधवारी तृतीया, गुरुवारी षष्ठी, शुक्रवारी अष्टमी व शनिवारी नवमी अशा तिथी आल्या, तर तो दिवस अशुभ मानतात. मंगळवारी दशमी, शुक्रवारी द्वितीया, शनिवारी सप्तमी व इतर वारी वरीलप्रमाणे तिथी आल्या असताही दग्धयोग होतो, असे मुजबल-निबंध या ग्रंथात सांगितले आहे. [हि. ध.; मु. चिं.]

**दत्त उपाध्याय** (१२७५–१३१० इ. स.) एक धर्म-शास्त्रकार. हा मिथिलेचा रहिवासी होता. याने धर्मशास्त्रावर आचारादर्श, छांदोगाह्निक, पितृभक्ती, शुद्धिनिर्णय, श्राद्धकल्प, समयप्रदीप, व्रतसार, इ. अनेक संस्कृत ग्रंथ लिहिले आहेत. छांदोगाह्निक व श्राद्धकल्प हे ग्रंथ सामवेदी लोकांसाठी असून, त्यांत त्यांच्या नित्यकर्माची माहिती आहे. पितृभक्ती व आचारादर्श हे ग्रंथ यजुर्वेदी लोकांसाठी आहेत. पितृभक्ती या ग्रंथातील अनेक उतारे रुद्रधराने घेतलेले आहेत. समयप्रदीप व व्रतसार या ग्रंथांत व्रते, व्रततिथी वगैरेंचे विवेचन केलेले आहे. [आ. सं. मू.]

**दत्तकपुत्र** बारा प्रकारच्या पुत्रांमधला एक. 'दद्यान्माता पिता वा यं स पुत्रो दत्तको भवेत्।' = माता किंवा पिता ज्याला दुसऱ्याचा पुत्र म्हणून देतात, तो पुत्र दत्तक होतो अशी याची व्याख्या याज्ञवल्क्याने दिली आहे. दत्तक कोणी आणि कशासाठी घ्यायचा, ते दत्तकमीमांसेतील पुढील श्लोकात सांगितले आहे–

अपुत्रेणैव कर्तव्यः पुत्रप्रतिनिधिः सदा।
पिण्डोदकक्रियाहेतोर्यस्मात्तस्मात्प्रयत्नतः॥

अर्थ–मेल्यानंतर आपल्याला तर्पणाचे उदक व पिंडदान मिळावे या उद्देशाने निपुत्रिकानेच हर प्रयत्न करून औरस पुत्राचा प्रतिनिधी म्हणून दत्तक पुत्र घ्यावा.

प्रत्येक सज्ञान व विवेकी पुरुषाला औरस पुत्र, नातू व पणतू यांपैकी कोणी नसेल, तर दुसऱ्याचा मुलगा दत्तक घेण्याचा अधिकार आहे. औरस पुत्र असूनही तो जर जन्मांध, मुका किंवा बहिरा असेल, तर दत्तक घेण्याचा अधिकार प्राप्त होतो, असे दत्तसिद्धांतमंजरीत म्हटले आहे. तसेच पुरुष ब्रह्मचारी असो, विधुर असो किंवा त्याची पत्नी जिवंत असून गर्भवतीही असो, त्या पुरुषाला दत्तक घेण्याचा अधिकार असतो. स्त्रीला मात्र ती निपुत्रिक असल्यास वैधव्यावस्थेतच दत्तक घेता येतो.

मुलगा दत्तक देण्याचा पूर्ण अधिकार पित्याला असतो, तर मातेला तो पतीच्या संमतीने असतो. 'तस्य प्रदानविक्रय-त्यागेषु मातापितरौ प्रभवतः' = मुलाच्या दान, विक्रय व त्याग या गोष्टींचा आईबापांना अधिकार असतो, असे वसिष्ठाने म्हटले आहे (वसिष्ठ ध. सू. १. ५. १). पती जिवंत नसल्यास किंवा संमती देण्याच्या अवस्थेत नसल्यास, तसेच तो पंगू किंवा संन्यासी झालेला असल्यास, मुलाची आई आपल्या अधिकारात मुलाला दत्तक देऊ शकते. आई–बापांव्यतिरिक्त मात्र कोणालाही दत्तक देण्याचा अधिकार असत नाही.

दत्तकपुत्र देण्याघेण्याविषयीचे, तसेच दत्तकाचे वय काय असावे, याविषयीचे विधिनिषेध बरेच आहेत. त्यांपैकी काही पुढीलप्रमाणे —

सर्वांत मोठ्या मुलाला किंवा एकुलत्या मुलाला दत्तक देऊ नये. दोन पुरुषांनी एकाच मुलाला दत्तक घेऊ नये. मुलीचा, बहिणीचा व मावशीचा मुलगा दत्तक घेऊ नये. बंधू, चुलता व मामा यांनाही दत्तक घेऊ नये. दत्तक घेण्यात पुतण्या सर्वांहून अधिक योग्य होय. त्यानंतर सगोत्र-सपिंड, असगोत्र–सपिंड, सगोत्र–असपिंड व शेवटी सगोत्र नसला, तर स्वजातीचा पुत्र दत्तक घ्यावा. असगोत्र मुलाचे जन्मदात्या कुटुंबात उपनयन झाले असले, तरी त्याला दत्तक घेण्यास हरकत नाही. दत्तक मुलगा लग्न झालेला किंवा मुले झालेला असला तरी चालेल, असे व्यवहारमयूखात म्हटले आहे. पण त्याविषयी शास्त्रकारांत मतभेदही पुष्कळ आहेत.

मुलगा तीन वर्षांचा व्हायच्या आत त्याला दत्तक घेणे प्रशस्त होय. तीन ते पाच वर्षे हा काळही दत्तकग्रहणाला योग्य समजावा. पाच वर्षांनंतर मात्र त्या मुलाला दत्तक घेऊ नये (दत्तकमीमांसा). त्रैवर्णिक मुलाला उपनयनापर्यंत आणि शूद्र मुलाला त्याचे लग्न होईपर्यंत दत्तक घ्यायला हरकत नाही (दत्तकचंद्रिका). दत्तकाच्या वयाच्या बाबतीत कालिका पुराणातील पुढील श्लोक महत्त्वाचे मानतात —

पितुर्गोत्रेण यः पुत्रः संस्कृतः पृथिवीपते ।
आचूडान्तं न पुत्रः स पुत्रतां याति चान्यतः ।।
चूडोपनयनसंस्कारा निजगोत्रेण वै कृताः ।
दत्ताद्यास्तनयास्ते स्युरन्यथा दास उच्यते ।।

अर्थ – पित्याच्या गोत्रात असताना जर मुलावर चूडाकर्मापर्यंतचे संस्कार झालेले असतील, तर अशा मुलाला दत्तक घेता येत नाही. दत्तक पित्याने जर आपल्या गोत्रात मुलाचे चौल व उपनयन हे संस्कार केले, तरच तो मुलगा पुत्र ठरतो; अन्यथा तो दास समजावा.

जर पुत्राचे चौल व इतर संस्कार दत्तक घेणाऱ्याच्या कुटुंबात झाले, तर तो मुलगा दत्तक पित्याच्या गोत्राचा होतो; पण दत्तक मुलाचे फक्त उपनयन तेवढे दत्तक घेणाऱ्याच्या कुटुंबात झाले किंवा उपनयन झाल्यानंतर मुलगा दत्तक घेतला गेला, तर तो मुलगा दोन्ही गोत्रांचा राहतो. हा नियम वंदन, श्राद्ध, इ. कर्मांनाच लागू आहे. अशा मुलाचा विवाह ठरवतांनाही दोन्ही कुटुंबाचे गोत्र-प्रवर वर्ज्य मानतात.

दत्तकाचा आणखी एक प्रकार आहे, त्याला द्व्यामुष्यायण असे म्हणतात. जेव्हा एखादा गृहस्थ आपला एकुलता मुलगा दत्तक देताना दत्तक घेणाऱ्याला अशी अट घालतो, की सदर मुलगा हा दोघांचाही पुत्र मानला जावा, अशा वेळी त्या दत्तक पुत्राला द्व्यामुष्यायण असे म्हणतात.

**वारसाहक्क** – दत्तक पुत्राला दत्तक बापाची सर्व संपत्ती वारसाहक्काने प्राप्त होते. पुत्र दत्तक घेतल्यानंतर जर घेणाऱ्या पुरुषाला औरस पुत्र झाला, तर दत्तक व औरस या दोघांना पितृधनाचा समसमान वाटा मिळतो. दत्तक घेणाऱ्या बापाने दत्तक पुत्राचे उपनयनापर्यंतचे सर्व संस्कार केले असतील, तर हा नियम लागू आहे. पण दत्तक घेणाऱ्याने दत्तकाचे काही संस्कार व शेवटचा उपनयन संस्कार एवढेच केले असतील, तर औरस पुत्र झाल्यानंतर अशा दत्तकाला पितृधनाचा फक्त एक चतुर्थांश मिळतो. दत्तकाचा उपनयनसंस्कार जन्मदात्या कुटुंबात झाला असेल आणि त्यानंतर दत्तक पित्याला औरस पुत्र झाला असेल, तर दत्तक पुत्राचा वारसाहक्क नष्ट होतो. फक्त दत्तक पुत्राच्या विवाहासाठी जो खर्च येईल, तो तेवढा दत्तक बापाच्या मिळकतीतून त्याला मिळू शकतो.

**इतिहास** – वैदिक वाङ्मयात दत्तकाचे काही उल्लेख आढळतात. अत्रीने आपला पुत्र और्वाला दत्तक दिला होता, असे तैत्तिरीय संहितेत सांगितले आहे (७. १. ८. १). विश्वामित्राने शुनःशेपाला दत्तक घेतल्याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणात आहे (३३.३). मात्र वैदिक वाङ्मयात दत्तकपुत्राला विशेषसे महत्त्व दिलेले दिसत नाही. स्वतःचा औरस पुत्र असावा, हीच तीव्र आकांक्षा आर्यांच्या मध्ये प्राचीन काळापासून दिसून येते. ऋग्वेदात तर दत्तकपुत्राला स्वतःच्या मुलाप्रमाणे समजू नये, असेच म्हटलेले आहे (७. ४. ७–८). सूत्रे व स्मृतिग्रंथ यांतही दत्तकाच्या व्याख्येव्यतिरिक्त अधिक माहिती सापडत नाही. फक्त वसिष्ठ धर्मसूत्रात तेवढी दत्तकासंबंधी चर्चा आहे.

साधारणपणे मुलालाच दत्तक घेण्याची प्रथा होती व आहे. कारण तोच मृत पित्याला पिंड देऊ शकतो व त्याचा वंश चालवू शकतो. परंतु मुलीलाही दत्तक घेतल्याची काही उदाहरणे प्राचीन वाङ्मयात आहेत. दशरथकन्या शांता हिला लोमपाद राजाने आणि शूरकन्या पृथा हिला कुंतिभोज राजाने दत्तक घेतले होते. 'दत्तकश्च पुमानेव भवति न कन्या' = दत्तक हा पुरुषच होऊ शकतो; कन्या नाही, असे व्यवहारमयूखात म्हटले आहे; पण शास्त्रोक्त विधीने मुलीचाही दत्तककन्या म्हणून स्वीकार करायला हरकत नाही, असे संस्कारकौस्तुभात सांगितले आहे. धर्मसिंधू व संस्कारकौमुदी यांनीही मुलगी दत्तक घेण्याला मान्यता दिलेली आहे. ही दत्तक घेतलेली कन्या दत्तक घेणाऱ्याला पत्नी नसल्यास त्याच्या धनाची वारस होते, असेही संस्कारकौस्तुभात म्हटले आहे.

दत्तकविधान– पुत्र दत्तक घेण्याच्या वेळी जे विधान करावे लागते, त्याला दत्तकविधान असे म्हणतात. हे विधान पुढील प्रमाणे असते—

दत्तक घेणारा पुरुष (किंवा स्त्री) या विधानासाठी आप्तेष्टांना व ज्ञातिबांधवांना निमंत्रण करतो. आचार्य व इतर ब्राह्मण यांनाही बोलावतो. नंतर संकल्प करून आचार्यद्वारा अग्निमुख करतो. मग दात्याजवळ जाऊन 'पुत्रं देहि' अशी त्याच्याकडे याचना करतो. नंतर दानकर्ता 'ये यज्ञेन...' इ. पाच मंत्र म्हणून पुत्राचे दान करतो. नंतर दत्तक घेणारा 'देवस्य त्वा...' या मंत्राने दोन्ही हातांनी पुत्राला धरून 'अङ्गादङ्गात्...' या ऋचेचे पठन करतो, पुत्राच्या मस्तकाचे अवघ्राण करतो व त्याला वस्त्रे–भूषणे लेववून त्याच्यावर छत्री धरतो. नंतर वाद्यांच्या गजरात स्वस्तिवाचनपूर्वक त्या दत्तकपुत्राला घेऊन घरी येतो. मग हातपाय धुवून आचमन करतो. नंतर दत्तकपुत्राला त्याच्या दत्तकमातेच्या मांडीवर बसवून तिला आचार्याच्या पश्चिमेस बसवतो. यजमान स्वत: आचार्याच्या दक्षिणेस बसतो. मग विधिपूर्वक अग्नी व सूर्यासावित्री या देवतांसाठी चरूचे हवन करतो. नंतर विष्णुपूजा करून ब्राह्मण व बांधव यांना भोजन घालतो व कर्म समाप्त करतो.

मुलाला दत्तक घेण्यापूर्वी त्याचे संस्कार झालेले नसल्यास दत्तक पिता दत्तक घेतल्यानंतर पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध, इ. पूर्वकृत्ये करून मग जातकर्मादी उपनयनान्त संस्कार करतो. [सं. को.; नि. सिं.; ध. सिं.; हि. ध.]

**दत्तजयंती** एक सांप्रदायिक जन्मोत्सव. मार्गशीर्ष पौर्णिमेच्या दिवशी मृगनक्षत्रावर सायंकाळी दत्ताचा जन्म झाला, म्हणून त्या दिवशी दत्ताचा जन्मोत्सव सर्व दत्तक्षेत्रांत होत असतो. त्या दिवशी गुरुचरित्राचे पारायण, सायंकाळी जन्माचे कीर्तन, इ. कार्यक्रम होत असतात. महाराष्ट्रात औदुंबर, नरसोबाची वाडी, गाणगापूर, इ. दत्तक्षेत्रांत या उत्सवाला विशेष महत्त्व असते. तमिळनाडमध्येही दत्तजयंतीची प्रथा आहे. काही ब्राह्मण कुटुंबांत या उत्सवानिमित्त दत्तनवरात्र पाळले जाते व त्याचा प्रारंभ मार्ग० शुद्ध अष्टमीपासून होतो.

**दत्तनाथ** (इ. स. चे १९ वे शतक) एक मराठी संतकवी. हा राक्षसभुवन येथे राहणारा असून, माध्यंदिन शाखेचा भारद्वाजगोत्री यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण होता. नारायण व लक्ष्मीबाई हे याचे आईबाप होत. त्या दंपतीला बरेच दिवस मूल होईना, म्हणून त्यांनी एकनाथांच्या परंपरेतील अंतोबादादा ऊर्फ अनंतनाथ या साधूची सेवा केली. पुढे त्यांना जो मुलगा झाला, तोच हा दत्तनाथ होय. त्याच्या वयाला सहा वर्षे होताच आईबापांनी त्याला अनंतनाथाच्या स्वाधीन केले. पुढे दत्तनाथाला आणखी दोन भाऊ झाले. या दोन्ही पुत्रांनाही अनंतनाथालाच अर्पण करण्याचा नारायणाने विचार केला होता. परंतु 'ही माझी ठेव तुमच्यापाशी असू दे' असे म्हणून अनंतनाथाने ती मुले बापापाशीच राहू दिली.

दत्तनाथ गुरुगृही राहून लेखन, वाचन व योगविद्या यांत निष्णात झाला. तो चौवीस वर्षे गुरूजवळ राहिला. त्यानंतर गुरूच्या आज्ञेने त्याने विवाह केला. अनंतनाथाने समाधी घेतल्यावर दत्तनाथाने राक्षसभुवन येथील मठाची व्यवस्था आपल्या बंधूंकडे सोपवली व तो तीर्थयात्रेला गेला. प्रवासात तो कीर्तन करून आपला उदरनिर्वाह चालवीत असे. दत्तनाथाचा उज्जयिनी इथे मुक्काम असता, महादजी शिंद्यांची व त्याची गाठ पडली. महादजी त्याच्या कीर्तनावर इतके संतुष्ट झाले, की त्यांनी दत्तनाथाला आपल्या जवळच राहण्याचा आग्रह केला. त्यानुसार दत्तनाथ काही दिवस उज्जयिनी इथे राहिला. यानंतर तो परत उज्जयिनीस येण्याच्या अटीवर काशी, प्रयाग, इ. क्षेत्रांच्या यात्रेला गेला. दत्तनाथाच्या चरितार्थासाठी महादजीने कित्येक हजारांची नेमणूक देऊ केली होती. परंतु या निरपेक्ष पुरुषाने तिचा स्वीकार केला नाही.

दत्तनाथ हा मोठा सिद्ध पुरुष असून, भूत-भविष्य जाणणारा होता, असे सांगतात. एखाद्या मोहिमेवर जायचे झाले, की महादजी प्रथम दत्तनाथाचा सल्ला विचारीत असे.

दत्तनाथाची बरीच कविता मराठी व हिंदी या उभय भाषांत प्रसिद्ध आहे. याने काही संतचरित्रेही लिहिली आहेत. त्याची कविता फटक्यासारखी आहे. दत्तनाथाच्या कवितेचा एक नमुना असा—

प्रकृति पुरुषाहूनि पर । ब्रह्म जें कां निरंतर ॥ १ ॥
ऊर्ध्व मूळाचें जें सार । ब्रह्म जें कां निरंतर ॥ २ ॥
क्षेत्रक्षेत्रज्ञाहूनि दूर । ब्रह्म जें कां निरंतर ॥ ३ ॥
सर्व निरासीजे पर । ब्रह्म तेचि निरंजन ॥ ४ ॥
ब्रह्म ग्रासोनि ब्रह्मीं उरे । सहजीं सहज दत्ता तूं रे ॥ ५ ॥

उत्तर हिंदुस्थानात मराठेशाही स्थापन झाल्यावर ज्या महाराष्ट्रीय संतकवींनी धर्मजागृतीची कामगिरी बजावली, त्यांपैकी दत्तनाथ हा प्रमुख होय. [म. क. च. भाग ६]

**दत्त संप्रदाय** दत्तात्रेयाच्या उपासनेचा संप्रदाय. या संप्रदायाचे प्रवर्तन नरसिंह सरस्वती नामक महाराष्ट्रीय विभूतीने इ. स. च्या पंधराव्या शतकाच्या पूर्वार्धात

केले. नरसिंह सरस्वतींपूर्वी महाराष्ट्रात आणि अन्यत्रही दत्तोपासना काही प्रमाणात चालू होती. इ. स. च्या पहिल्या सहस्रकाच्या अखेरीस दत्तदेवतेला विपुल पुराणप्रसिद्धी लाभली होती; परंतु तिची उपासना लोकप्रिय झाल्याचे ऐतिहासिक पुरावे उपलब्ध नाहीत. दत्ताच्या प्राचीन मूर्तीही उपलब्ध झालेल्या नाहीत. यादवपूर्व काळातील शेकडो शिलालेखांत तत्कालीन अनेक उपास्यांचे उल्लेख आढळतात; परंतु त्यांत कुठेही दत्तात्रेयाचे मंदिर उभारले गेल्याचा वा अन्य प्रकारचा दत्तोपासनाविषयक उल्लेख आढळत नाही.

पुराणांतील यदू, आयू, अलर्क, सहस्रार्जुन व परशुराम हे दत्तशिष्य क्षत्रिय असून, त्यांनी दत्तकृपेच्या बळावर वर्णाश्रम–धर्माची प्रतिष्ठा राखण्याचे कार्य केले, असे पुराणकारांचे सांगणे आहे. मार्कंडेय पुराणात दत्तात्रेयाचे वेगळे स्वरूप दिसते. त्यातला दत्त हा अत्याश्रमी, उन्मत्तवत वर्तन करणारा, विधि-निषेधातीत वृत्तीचा व अवधूत आहे. तसेच शांडिल्योपनिषदादी पाच अर्वाचीन उपनिषदांत दत्त हा गुरुतत्त्वाचा आदर्श आणि योगाचा उपदेष्टा आहे. पुढे विकास पावलेल्या दत्तोपासनेच्या क्षेत्रात हे तीनही प्रवाह स्पष्टपणे दृग्गोचर होतात.

**इतिहास** – पुराणांचे क्षेत्र सोडून इतिहासाच्या भूमीवर पाऊल टाकल्याबरोबर आपणांस दत्तोपासनेचा आढळ होतो, तो नाथ संप्रदायात. परमपदाच्या प्राप्तीसाठी योगसाधनेचा स्वीकार आणि गुरुसंस्थेची महनीयता ही दत्तस्वरूपातील दोन मोठी वैशिष्टचे नाथ संप्रदायाच्या सिद्धान्तांत आणि साधनेत स्वीकृत आहेत. दत्तात्रेय अवधूत जोगी आहे आणि नाथ संप्रदाय हा अवधूत संप्रदाय आहे. दत्तप्रणीत अवधूतगीता आणि गोरक्षप्रणीत सिद्धसिद्धान्तपद्धती यांतील अवधूतावस्थेचा विचार समान आहे. नाथ संप्रदायाच्या उत्तरकालीन ग्रंथांत दत्त–गोरक्षसंबंधाच्या अद्‌भुत कथा आणि त्यांच्यांतील तात्त्विक संवाद अनेकवार विवरिले आहेत. 'गोरख–दत्त–गुष्टी' हे आर्ष हिंदीतील प्रकरण नाथ संप्रदायात प्रसिद्ध आहे. गिरनार आणि नेपाळातील भटगाव येथील दत्तस्थाने नाथ संप्रदायाने प्रभावित आहेत.

नाथ संप्रदायाप्रमाणेच महानुभाव संप्रदायानेही दत्ताचे महिमान वाढविण्यात विशेष वाटा उचललेला आहे. महानुभाव संप्रदाय हा दत्त संप्रदायच आहे. त्याची परंपरा दत्तात्रेय–चांगदेव राऊळ – गुंडम राऊळ – चक्रधर अशी दत्तात्रेयादीच आहे. 'या मार्गासि श्रीदत्तात्रेयप्रभु आदिकारण' असे प्रत्यक्ष पंथसंस्थापक चक्रधरानेच म्हटले आहे. महानुभावांच्या पंच-कृष्णांत दत्तात्रेयाचा समावेश आहे. परंतु त्यांचा दत्तात्रेय हा विष्णूचा अथवा देवतात्रयीचा अवतार नसून, साक्षात परब्रह्माचा अवतार आहे. कारण त्यांच्या मते ब्रह्मा–विष्णू–महेश या गौण देवता आहेत. त्यांचा दत्त हा एकमुखी व चतुर्भुज आहे. त्याने 'गर्भीचा अवतार' स्वीकारून परावर शक्तींचा स्वीकार केलेला आहे. त्याचा अवतार चारही युगांत आहे. त्याची वाणी अमृतवर्षिणी असून, त्याचे दर्शन अमोघ आहे. तो सदैव अदृश्य-पणे वावरतो. त्याला निरंतर पारधीचे व्यसन आहे आणि तो नेहमी नाना रूपे धारण करून अधिकारी जीवांना मधून मधून दर्शन देत असतो.

चक्रधरोक्त सूत्रपाठात दत्तात्रेयाच्या महिमानाविषयी चार सूत्रे आहेत ( विचार २८२ – २८५ ). चक्रधर पांचाळेश्वरी गेला असता 'हे देखिलें गा : दत्तात्रेयप्रभूचें गुंफास्थान' असे आनंदोद्‌गार त्याने काढले होते. त्याने आपल्या अनुयायांना सांगितलेल्या दत्तकथा लीळाचरित्रात सैहाद्रलीळा म्हणून प्रसिद्ध आहेत. महानुभावांच्या 'साती ग्रंथां'त रवळोवासकृत सैह्याद्रि-वर्णन हा ग्रंथ दत्तमाहात्म्यपर आहे. या ग्रंथातील प्रारंभीच्या काही दत्तमाहात्म्यपर ओव्या अशा ––

कीं चैतन्यकनकाचा लांबणदिवा। अत्रिवंश आनंद कुळैवा।
कीं स्वयंप्रकाश अखंड लाखैवा। जीवोद्धरणाचा॥
कीं सर्वशक्तींचा मेळीं। परज्ञानचक्रगोंदळीं।
आनंद प्रकटला भूतळीं। जीवा उदो करीतु॥
कीं अनसूयागर्भगगनीं तापनाशक। उदैला आनंदमृगांक।
त्रिभुवन धवळिता एकु। तृप्त जीवचकोरा॥

(सैहाद्रवर्णन २३-२५)

महानुभाव संप्रदायाच्या प्रसाराबरोबरच दत्तात्रेयाचा जय-जयकारही पंजाब–पेशावरपर्यंत घुमत राहिला.

नाथ आणि महानुभाव यांखेरीज अन्य संप्रदायांनीही दत्तात्रेयाविषयीचा श्रद्धाभाव व्यक्त केला आहे. महाराष्ट्रात वारकरी संप्रदायाचे पायाभरण करणाऱ्या ज्ञानदेवांनी 'दत्तात्रेय योगिया'ला आपल्या अंतरात स्थान दिले आहे. एकनाथांनी रचलेली 'त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा' ही आरती दत्तसंप्रदायातील नित्योपासनेत अढळ स्थान पावली आहे. तुकोबांनीही 'तीन शिरे सहा हात' असलेल्या दत्तात्रेयाला भक्तिभावाने दंडवत घातले आहे. चैतन्य संप्रदायातील आद्य सत्पुरुष राघव चैतन्य यांनी गिरनारवर तप करून दत्तात्रेयाची कृपा संपादन केली होती. आनंद संप्रदायाचा आदिगुरू दत्तात्रेय असल्यामुळे त्याला दत्त संप्रदायच म्हणायला हवे. समर्थांना दत्ताने दर्शन दिल्याची कथा सांप्रदायिक ग्रंथांत आढळते.

पुढे दत्तोपासनेचा एक विशिष्ट संप्रदाय बनला, तो नरसिंह सरस्वतींच्या प्रभावाने. श्रीपाद श्रीवल्लभ हे साधू दत्तात्रेयाचे इतिहासकाळातील पहिले अवतार समजले जातात. आणि

दत्तोपासनेचे संजीवक अशी ज्यांची ख्याती आहे, ते नरसिंह सरस्वती दत्तात्रेयाचे दुसरे अवतार मानले जातात.

नरसिंह सरस्वतींच्या महासमाधीनंतर एका शतकाच्या आतच महाराष्ट्रात दत्तोपासनेचा प्रभाव सर्वव्यापी ठरला. इ. स. च्या सोळाव्या शतकात जनार्दनस्वामी, एकनाथ आणि दासोपंत या त्रिमूर्तींने दत्तभक्तीचा आश्रय करून दत्तोपासनेची परंपरा अधिक समृद्ध केली. गेल्या पाचशे वर्षांत दत्तोपासनेच्या क्षेत्रात अनेक महातपस्वी निर्माण झाले. त्यांपैकी काही उन्मुक्त चिंतनाने भारलेले व विधिनिषेधातीत अशा अवधूत वृत्तीने रंगलेले होते; तर काही कर्मकांडाचा पुरस्कार करणारे आणि आचारधर्माला व उपासनातंत्राला प्राधान्य देणारे असे होते. एकनाथ-दासोपंतांनंतर मुक्तेश्वर, निरंजन रघुनाथ, नारायण-महाराज जालवणकर, माणिकप्रभू, अक्कलकोटचे स्वामी, वासुदेवानंद सरस्वती, पंतमहाराज बाळेकुंद्रीकर, विष्णुदास, दीक्षितस्वामी, इ. अनेक दत्तभक्त होऊन गेले. आजही दत्तोपासनेची परंपरा चालविणारे काही सत्पुरुष विद्यमान आहेत.

नरसिंह सरस्वतींच्या प्रभावामुळे दत्तोपासनेचा जो प्रवाह सुरू झाला, तोच दत्त संप्रदाय म्हणून ओळखला जातो. या मुख्य प्रवाहाशिवाय दत्तोपासनेच्या क्षेत्रात अन्य काही प्रवाहही चालू राहिले होते; परंतु त्यांचे स्वरूप व्यापक नसल्यामुळे आणि ते त्या त्या दत्तोपासकाच्या प्रभावळीपुरतेच मर्यादित राहिल्यामुळे त्यांना स्वतंत्र संप्रदायाचे स्वरूप लाभले नाही. नरसिंह सरस्वतींच्या दत्त संप्रदायातही गुरु-शिष्यसंबंधांची अखंड साखळी आढळत नाही.

दत्त संप्रदायाच्या स्वरूपावर दत्तदेवतेच्या मूलस्वरूपाचा प्रभाव विशेष आहे, हे तर खरेच; परंतु त्याच्या घडणीत व आचार-विचारांत दत्तावतारी महापुरुषांचाही मोठा वाटा आहे. दत्तात्रेयाच्या उपासनेच्या क्षेत्रात वर्णाश्रमोचित आचार-धर्माचे काटेकोर आचरण करणे, हा महत्त्वाचा भाग ठरला आहे. नरसिंह सरस्वती हे शांकर परंपरेतले संन्यासी होते. त्यामुळे त्यांच्या मनावर शंकराचार्यांच्या विचारांचा पगडा होता. त्यानंतरच्या काळात अनेक स्थित्यंतरे घडली; परंतु दत्तोपासनेच्या क्षेत्रातले हे वैशिष्टय प्रभावी राहिले. अक्कलकोटच्या स्वामींसारखी एखादी अवधूतवृत्तीची विभूती अथवा माणिकप्रभूंसारखे हिंदु-मुसलमानांना दत्तोपासनेत समानतेने सामावून घेणारे सत्पुरुष सोडले, तर दत्तसांप्रदायिकांच्या सनातन श्रद्धांना फारसा धक्का लागलेला दिसत नाही.

दत्त संप्रदायाचे उपास्य असलेला दत्तात्रेय हा एक योगी असल्यामुळे दत्तोपासनेत योगालाही प्राधान्य लाभले. चांगदेव राउळांपासून आजपर्यंत झालेले प्रायः सर्व महान दत्तोपासक योगी होते. चांगदेव राऊळ हे हातातील खराटा मारून शिष्यांना शक्तिदान करीत असत. अक्कलकोटच्या स्वामींच्या चरित्रातही अशाच शक्तींचे अस्तित्व आढळते. नरसिंह सरस्वतींनी आपल्या अमोघ शक्तींनी अनेक आर्तांची त्रिविध दुःखे दूर केल्याच्या कथा गुरुचरित्रात वर्णिलेल्या आहेत.

दत्तोपासनेच्या बळावर सिद्ध पुरुषांना अशा शक्ती प्राप्त होतात आणि त्या शक्तीच्या प्रभावाने ते जनांची दुःखे दूर करून त्यांना साधनेच्या मार्गावरूनही सांभाळून नेऊ शकतात, अशी जी भावना सर्वसामान्य लोकांच्या मनात रुजत गेली, त्या भावनेतच दत्त संप्रदायाच्या लोकप्रियतेचे रहस्य दडलेले आहे.

**दत्तगुरू** – दत्त हा गुरुदेव आहे. त्याची उपासना गुरुस्वरूपातच करायची असते. 'श्रीगुरुदत्त' किंवा 'गुरुदेवदत्त' हा त्याचा जयघोष आहे. त्याचमुळे गुरुसंस्थेला प्राधान्य असलेल्या सर्व साधनाप्रणालींत दत्तात्रेयाची पूज्यता रूढ झाली. परमार्थात गुरुसंस्थेचे महत्त्व स्वयंसिद्ध आहे. दत्तात्रेय हा 'परम गुरू' असल्यामुळे पथप्रदर्शक गुरू आणि गुरूच्या मार्गदर्शनाने होणारी परमपदप्राप्ती हे दोन्ही विशेष त्याच्या स्वरूपात सामावले आहेत. दत्तात्रेयाचे स्वरूप असे असल्यामुळे दत्त संप्रदायात गुरु-शिष्यांच्या मानवी परंपरांचे सातत्य राहिले नाही आणि संप्रदायाची संघटित बांधणीही होऊ शकली नाही. साधकांना प्रत्यक्ष दत्तात्रेयाकडूनच बोध मिळाल्याच्या कथा रूढ आहेत. अशा स्थितीत सिद्धावस्थेला पोचलेले पुरुष आपापल्या विचारांचा व साधनापद्धतींचा पृथक पृथक उपदेश करीत आणि त्यांच्या विभूतिमत्त्वाने भारावलेले शिष्य किंवा सर्व-साधारण उपासक आपापल्या गुरूच्या आदेशानुसार वेगवेगळे आचार व उपासना पाळीत. दत्त संप्रदायात साधकांसाठी सांप्रदायिक अनुशासन रूढ असूनही, त्या अनुशासनाच्या कक्षेबाहेर नांदणारे अनेक उपासक आढळतात, ते यामुळेच. दत्त संप्रदायात प्रत्येक दत्तसाक्षात्कारी व दत्तावतारी सत्पुरुषाच्या नावाने स्वतंत्र अशा सांप्रदायिक परंपरा रूढ आहेत. माणिकप्रभूंचा 'सकलमतसंप्रदाय,' पंत महाराजांचा 'अवधूत संप्रदाय,' अक्कलकोटच्या स्वामींचा विधिनिषेधातीत असा साधनामार्ग, वासुदेवानंद सरस्वती व नारायण महाराज केडगावकर यांच्या वर्णाश्रमोचित कर्मावर जोर देणाऱ्या परंपरा, इ. पृथगात्म प्रवाह आजही दत्त संप्रदायाच्या कक्षेत चालू आहेत.

**समन्वयाचे प्रतीक** – दत्तात्रेय हे समन्वयाचे प्रतीक आहे. त्यामुळे दत्त संप्रदायात शैव आणि वैष्णव परंपरांचा जसा समन्वय साधला गेला, तसाच हिंदु-मुसलमानांच्या समन्वयाचाही प्रयत्न झाला. या प्रयत्नांचा मूळ आरंभ श्री नरसिंह सरस्वतींच्या चरित्रात झालेला दिसतो. त्यानंतर जनार्दनस्वामी

व एकनाथ यांनीही दत्तोपासनेच्या पार्श्वभूमीवर हिंदु-मुस्लिम समन्वयाचा प्रयत्न केला. जनार्दनस्वामींचे गुरू चांद बोधले हे सूफींच्या कादरी या उपपंथातले होते आणि चांद बोधल्यांचा एक मुसलमान शिष्य शेख महंमद हा योग व भक्ती यांचे विवरण करणारे ग्रंथ मराठीत लिहीत होता. जनार्दनस्वामी यवनांचे सेवक असूनही, त्यांच्या दत्तभक्तीचा प्रभाव मुसलमानांवर व मुस्लिम राज्यकर्त्यांवरही पडला होता. जनार्दनस्वामींनी आपल्या गुरूचे समाधि-मंदिर देवगिरीच्या किल्ल्याच्या दर्शनी भागी बांधवले.. माणिकप्रभूंच्या सकलमत संप्रदायात तर मुसलमानांचा भरणा विशेष आहे. परंतु हा समन्वयाचा प्रयत्न दुर्दैवाने यशस्वी होऊ शकला नाही. जो मुसलमानवर्ग दत्तसंप्रदायाच्या कक्षेत वावरत असे, तो संप्रदायाचे तत्त्वज्ञान पटल्यामुळे नव्हे; तर दत्तोपासक सिद्ध पुरुषांच्या भोवती चमत्कारांचे आणि अद्भुत सिद्धींचे जे एक गूढ वलय निर्माण झाले होते, त्यामुळेच. त्या त्या सिद्ध पुरुषांच्या पूजेशिवाय अन्य बाबतीत आपल्या विधर्मी गुरुबंधूंशी त्यांनी कुठल्याही प्रकारे समन्वय घडवून आणला नाही. श्री नरसिंह सरस्वतींच्या चरित्रातही हीच गोष्ट दिसून येते. माणिकप्रभू तर स्वतःच या परिस्थितीने विषण्ण झाले होते, असे त्यांच्या चरित्रावरून दिसते. या समन्वयाच्या प्रयत्नासाठी दत्त संप्रदायात मुसलमानांचे काही आचार, विशेष उपासना म्हणून रूढ झाले. दत्तभजनात संगीताला मिळालेले प्राधान्य ही सूफींची उसनवारी होय. धुपासारख्या सुगंधी द्रव्यांचा वापरही मुस्लीम धर्मस्थानातील वातावरणाचे अनुकरण सुचवितो. जनार्दनस्वामी व एकनाथ यांना दत्तात्रेयाने मलंगवेषाने भेट दिली, तर निरंजन रघुनाथांचे शिष्य नारायणमहाराज जालवणकर यांना गिरनारवर फकिराच्या रूपाने दत्तात्रेयाने दर्शन दिले. हिंदूंच्या या देवतेला यवनरूप घेऊन येण्याची आवश्यकता भासावी, यात हिंदूंची समन्वयाची पोटतिडीकच प्रतिबिंबित झालेली दिसते.

**तत्त्वज्ञान** – त्रिपुरारहस्याचा ज्ञानखंड, दत्तप्रबोध व दत्तमाहात्म्य या ग्रंथांत दत्त संप्रदायाचे तत्त्वज्ञान ग्रथित झाले असून, गुरुचरित्र हा ग्रंथ संप्रदायाच्या आचारधर्माचे विवरण करणारा आहे. त्याशिवाय अवधूतगीता, जीवन्मुक्तगीता आणि गुरुगीता यांतूनही संप्रदायाचे सिद्धान्त विवेचिले आहेत. वामनबोवांनी दत्तप्रबोधात दत्त-अनसूया-संवादाच्या मिषाने जीव, जगत व जगदीश्वर यांच्याविषयी जे सिद्धान्त मांडले आहेत, ते संक्षेपाने असे––

( १ ) ब्रह्म हे अखिल, अभंग, निरुपाधिक, निसंग, करून अकर्ते, भोगून अभोक्ते, शुद्ध, शांत, निर्गुण, निरामय, नित्यानंद व मनाला अगोचर आहे. तेच जगद्‌रूपाने नटले आहे. ते ज्ञानदृष्टीने जाणता येते.

( २ ) मूळ परब्रह्माची त्याहून भिन्न नसणारी जी इच्छाशक्ती, तीच प्रकृती होय. तिचे स्वरूप अपरिमेय असून, तिच्यातूनच त्रिगुणात्मक माया, भूतसृष्टी व तीन्ही लोक उत्पन्न होतात.

( ३ ) जे मूळ परब्रह्मस्वरूप आहेत, परंतु भिन्न भिन्न देह धारण केल्यामुळे भिन्न भिन्न दिसतात, ते जीव होत.

वासुदेवानंद सरस्वतींच्या दत्तमाहात्म्य या ग्रंथात संप्रदायाचे सिद्धान्त सुलभ स्वरूपात विवरिले आहेत. त्यात सहस्रार्जुनाला कर्मयोगाचा उपदेश करताना दत्तात्रेय म्हणतो ––

श्रीदत्त म्हणे अर्जुना । अंगिकारावें माझ्या वचना ।
लावूनि स्वरूपीं मना । बाह्याचरणा करावे ॥
जरी अवशिष्ट नसे कृत्य । तरी आचारा सेवी अगत्य ।
स्वतःचे नसतांही कृत्य । होईल सत्य परोपकार ॥
धर्म आहे सनातन । त्याला न द्यावा सोडून ।
स्वयें धर्म आचरून । जनां शिक्षण ते लावावें ॥
येणें होयें परोपकार । ना तरी सिद्धा पाहूनि इतर ।
वागतील जरी अनाचार । होईल संहार संकरानें ॥
लोकबाधा न व्हावी म्हणून । लोक जातील भुलोन ॥
असे दाखवावें बाहेरून । विपरीताचरण जनांमाजी ॥
तू गृहस्थ असती । न टाकी वर्णाश्रमासी ।
करी त्रिविध कर्मासी । सक्ति मानसीं न धरितां ।
जे असती मुक्त । ते कोठेही न होती सक्त ।
त्यांना करी अनुरक्त । असी वस्तु जगीं नाहीं ॥

अशा प्रकारे वर्णाश्रमोचित अशा क्रिया आचरून आणि सगुणोपासना व योगमार्ग यांच्या साहाय्याने वाटचाल करून अंतिम उद्दिष्ट प्राप्त करता येते, असे सांप्रदायिक ग्रंथांत सांगितले आहे.

दत्त संप्रदाय आणि मराठी भक्तिपरंपरा यांत सगुणोपासना आणि गुरुभक्ती हे समान विशेष आहेत. परंतु दत्तात्रेयाच्या सगुण साक्षात्कारासाठी दत्तोपासक अत्यंत कठोर अनुष्ठानं आचरतात, कायक्लेश करून घेतात व प्रसंगी आत्महत्येलाही प्रवृत्त होतात. निरंजन रघुनाथांनी गिरनारवर दगडावर डोके आपटून प्राण देण्याचा प्रयत्न केला होता, तर त्यांचे शिष्य नारायणमहाराज जालवणकर यांनी १४ दिवस अन्नपाणी वर्ज्य केले होते, असे त्यांच्या चरित्रावरून कळते.

दत्त संप्रदायात ध्यानासाठी दत्तात्रेयाचे सगुणरूप जरी स्वीकारले गेले असले, तरी पूजोपचारासाठी मूर्तीऐवजी पादुका प्रशस्त मानलेल्या आहेत. औदुंबर, वाडी आणि गाणगापूर

तीनही ठिकाणी दत्तात्रेयाच्या पादुकाच आहेत. मूर्ति-मंदिरांचा विध्वंस करणाऱ्या यवनांच्या अत्याचारापासून आपल्या श्रद्धास्थानांना सुरक्षित ठेवण्यासाठी आणि त्यांच्या उपास्यप्रतीकाशी काहीसे साम्य दाखविण्यासाठी, शिलाखंडावर निर्माण केलेल्या पादुकांची उपासना दत्त संप्रदायातील मोठ्या व्यक्तींनी हेतुपूर्वक रूढ केली असावी, असे वाटते.

माहूर, पांचाळेश्वर, औदुंबर, नरसोबाची वाडी, गाणगापूर, लाडकारंजे, कुरगुड्डी, गिरनार ही दत्तसांप्रदायिकांची प्रमुख क्षेत्रे होत.

महाराष्ट्राइतका दत्त संप्रदायाचा प्रभाव अन्यत्र कुठेही नाही. गाणगापूरपरिसरातील कानडी मुलखात आणि दासोपंतांच्या एका तेलुगू शिष्यशाखेमुळे आंध्रातील काही भागांत दत्तोपासना रूढ आहे. किनाराम अघोरीसारखा एखाददुसराच दत्तोपासक उत्तरेच्या भक्तिपरंपरेत नाव घेण्यासारखा दिसतो.
[न. च. प.; द. व. इं.; भा. सं. सा. १]

**दत्तात्रेय** एक देव. हा विष्णूच्या चौवीस अवतारांपैकी सहावा ( क्वचित चौथा वा सातवा ) अवतार समजला जातो. हा अत्री ऋषी आणि अनसूया यांचा पुत्र होय. याच्या जन्माविषयी पुराणांत विविध कथा आहेत. त्यांपैकी एक लोकप्रिय कथा अशी–

एकदा नारदाने अनसूयेच्या सतीत्वाचा गौरव केल्यामुळे ब्रह्मा-विष्णू-महेश यांच्या पत्नींच्या मनांत तिच्याविषयी असूया निर्माण झाली. मग त्या तिघींनी अनसूयेचे सत्त्वहरण करण्यासाठी आपल्या पतींना अतिथिवेषाने तिच्याकडे पाठविले. तीन्ही देव अत्रीच्या आश्रमात आले. त्या वेळी अत्री आश्रमात नव्हता. अनसूयेने त्या अतिथींचे स्वागत केले आणि त्यांना भोजनाची विनंती केली. परंतु सत्त्वहरणाच्या हेतूने आलेल्या देवांनी तिला सांगितले, की 'तू विवस्त्र होऊन भोजन वाढीत असशील, तरच आम्ही भोजन स्वीकारू.' अतिथी विन्मुख जाऊ देणे हे गृहस्थाश्रमाचे दूषण होय, हे लक्षात आणून अनसूयेने ती गोष्ट मान्य केली व पतिस्मरण करून त्या तीन्ही देवांवर तीर्थ शिंपडले. त्या क्षणी तीन्ही देवांची लहान बालके बनली आणि मग अनसूयेने विवस्त्र बनून त्यांना मातेच्या ममतेने अन्न भरविले.

उमा, रमा, सावित्री या देवभार्या आपल्या पतींची वाट पाहून थकल्या आणि पतिशोधार्थ अत्री ऋषीच्या आश्रमात आल्या. तिथे येऊन पाहतात तो त्यांना असे आढळले, की अनसूयेने आपल्या सतीत्वाच्या प्रभावाने आपल्या पतींची लहान बालके बनविली आहेत. त्या अद्‌भुत घटनेने देवभार्या दुःखित झाल्या. त्यांची ती अवस्था पाहून अनसूयेने त्या देवांना पुन्हा पूर्वरूप दिले. नंतर अनसूयेच्या सत्त्वसाक्षात्काराने चकित झालेल्या देवांनी तिच्या इच्छेनुसार तिच्या उदरी जन्म घेण्याचे मान्य केले. कालांतराने अनसूयेला विष्णूच्या अंशाने दत्त, शिवाच्या अंशाने दुर्वास आणि ब्रह्मदेवाच्या अंशाने सोम (चंद्र) असे तीन पुत्र झाले.

**दैवतेतिहास** – दत्तात्रेय अवताराची प्राचीनता इसवी सनाच्या मागे जाऊ शकत नाही. महाभारतातील वन पर्वात (११५.२), शांती पर्वात (४९.३६–३७) आणि अनुशासन पर्वात (१५२.५ व १५३.१२) दत्तात्रेयाने कार्तवीर्य सहस्रार्जुनावर केलेल्या कृपेचे उल्लेख आहेत; परंतु हे सर्व उल्लेख महाभारताच्या अखेरच्या संस्करणातले असल्यामुळे त्यांना अतिप्राचीन म्हणता येत नाही. अनुशासन पर्वात (९१.४–५) त्याला अत्रिपुत्र न म्हणता अत्रिवंशज म्हटले आहे. त्या ठिकाणी त्याच्या निमी नामक पुत्राचा आणि श्रीमान नामक नातवाचाही उल्लेख आहे. पण अन्य कोणत्याही पुराणात त्याच्या गृहस्थाश्रमाचे यत्किंचितही सूचन आढळत नाही, हे विशेष होय. अग्नी पुराणात कार्तवीर्यचरित्राच्या संदर्भात दत्ताचा उल्लेख आहे, तो असा–

दत्तोऽर्जुनाय तपते सप्तद्वीपमहीशताम् ।
ददौ बाहुसहस्रं च ह्यजेयत्वं रणे तथा ।।
(अग्नी. पु. २७५.५)

अर्थ – तप करणाऱ्या कार्तवीर्य अर्जुनाला दत्तात्रेयाने सप्तद्वीपांकित पृथ्वीचे राज्य, सहस्र बाहू आणि युद्धात अजेयत्व दिले.

याच संदर्भात विष्णुधर्मोत्तर पुराणात म्हटले आहे, की कार्तवीर्याने दत्तात्रेयाकडून प्राप्त केलेल्या वराच्या बळावर राज्य निष्कंटक बनविले आणि आर्यावर्तातील भूमी निर्म्लेच्छ केली (१.२५.१६). मार्कंडेय पुराणात (१७.१७–२४) मात्र दत्तात्रेयाचे चरित्र विलक्षण स्वरूपात चित्रित केलेले आहे, ते असे– दत्तात्रेयाच्या तेजस्वी स्वरूपामुळे मुनिकुमारांचा मेळा त्याच्या भोवती सतत वावरत असे. त्यांना टाळून एकांतवास मिळविण्यासाठी दत्ताने एका सरोवरात बुडी मारली. पण ते मुनिकुमार त्या महात्म्याच्या पुनर्दर्शनाची वाट पाहत दीर्घ काळपर्यंत सरोवराच्या तीरावरच बसून राहिले. ते आपली प्रतीक्षा करण्याचे सोडीत नाहीत, असे पाहून मग दत्तात्रेय मुनी दिव्य वस्त्रे परिधान केलेल्या एका सुंदर तरुणीसह जळातून बाहेर आला. आपल्या बरोबर एक सुंदर स्त्री आहे, हे पाहून मुनिकुमार आपला त्याग करतील आणि आपल्याला पुनश्च असंगस्थितीत राहता येईल, अशी दत्तात्रेयाची कल्पना होती.

परंतु तशाही अवस्थेत मुनिकुमार त्याला सोडून जाईनात. मग त्याने दुसरी युक्ती केली. तो त्या तरुणीसह मद्यपान करू लागला. परंतु 'जो योगेश्वर आहे, त्याला सुरापान वा वनिताभोग यांच्या संसर्गाने दोष लागत नाही,' असा विचार करून ते मुनिकुमार त्याच्याजवळच राहिले.

त्या विष्णुस्वरूप दत्तात्रेयाने योगस्थ बनून विषयांचा उपभोग घेतला, असेही याच पुराणात दुसऱ्या एका ठिकाणी म्हटले आहे (१७.१५).

मार्कंडेय पुराणातील वरील वर्णन दत्तात्रेयाचा तंत्रसाधनेशी संबंध सूचित करणारे आहे. अन्य कोणत्याही पुराणात अशा प्रकारचा उल्लेख नाही. ब्रह्म पुराणात दत्तात्रेयाचे अवतारकार्य सांगितले आहे, ते असे–

**भूयो भूतात्मनो विष्णोः प्रादुर्भावो महात्मनः ।**
**दत्तात्रेय इति ख्यातः क्षमया परया युतः ।।**
**तेन नष्टेषु वेदेषु प्रक्रियासु मखेषु च ।**
**चातुर्वर्ण्ये च सङ्कीर्णे धर्मे शिथिलतां गते ।।**
**अतिवर्धति चाधर्मे सत्ये नष्टेऽनृते स्थिते ।**
**प्रजासु शीर्यमाणासु धर्मे चाकुलतां गते ।।**
**सयज्ञाः सक्रियाः वेदाः प्रत्यानीता हि तेन वै ।**
**चातुर्वर्ण्यमसङ्कीर्णं कृतं तेन महात्मना ।।**
(ब्रह्म पु. २१३.१०६–१०९)

अर्थ – जो सर्व भूतमात्रांचा अंतरात्मा, अशा त्या विष्णूचा दत्तात्रेय नामक क्षमाप्रधान अवतार झाला. वेद, कर्मकांड आणि यज्ञप्रक्रिया यांचा लोप होऊ लागला असताना, चातुर्वर्ण्याला विस्कळितपणा आला असताना, धर्म शिथिल बनून अधर्म वाढला असताना आणि सत्य नष्ट होऊन असत्य स्थिर होत असताना, प्रजा ऱ्हास पावू लागल्या असता आणि धर्म व्याकुळ झाला असता, त्याने वेदांना, कर्मकांडाला व यज्ञांना पुनः प्रतिष्ठा मिळवून दिली आणि चातुर्वर्ण्याला सुसंघटित स्वरूप दिले.

ब्रह्म पुराणानुसार शंकर हा दत्तात्रेयाचा गुरू होय. त्याने अत्रीच्या आदेशावरून गौतमीच्या तीरावर शंकराची आराधना करून त्याच्याकडून ब्रह्मज्ञान प्राप्त केले. भागवताच्या एकादशस्कंधात सांगितलेले अवधूताचे चौवीस गुरू पुढे, अवधूताचे दत्तात्रेयाशी ऐकात्म्य कल्पिले गेल्यानंतर, दत्ताचे चौवीस गुरू म्हणून ओळखले जाऊ लागले. ही ओळख प्रथम एकनाथी भागवतात व्यक्त झाली आणि पुढे हे अवधूताचे चौवीस गुरू कायमचेच दत्तचरित्रात समाविष्ट झाले.

कार्तवीर्य सहस्रार्जुनाशिवाय भार्गव परशुराम, यदू, अलर्क, आयू आणि प्रल्हाद हे दत्तात्रेयाचे पौराणिक शिष्य होत. यांच्यावर दत्ताने केलेल्या कृपेचे विस्तृत वृत्तांत पुराणात आढळतात. हे सर्व दत्तशिष्य क्षत्रिय आहेत. अवधूतोपनिषद आणि जाबालदर्शनोपनिषद यांमध्ये योगसाधना आचरणारा सांकृती नामक एक ब्राह्मणही दत्तशिष्य म्हणून उल्लेखिलेला आहे.

दत्तात्रेयाचा आश्रम सिंहाचलाजवळ प्रयाग वनात असे. तो स्वेच्छाविहारी आणि स्मर्तृगामी (स्मरण करणाऱ्याला सत्वर भेटणारा) आहे, अशी भक्तांची समजूत आहे. माहूर, पांचाळेश्वर आणि कोल्हापूर ही त्याची विहारस्थाने आहेत. तो पांचाळेश्वरी स्नान करतो, कोल्हापुरी भिक्षाटन करतो आणि माहूरगडाच्या शिखरावर शयन करतो, असे म्हणतात.

**दत्ताचे अवतार** – दत्तात्रेयाने निरनिराळ्या निमित्तांनी सोळा अवतार घेतले. त्या सोळा अवतारांची नावे आणि जन्मतिथ्या पुढीलप्रमाणे आहेत – (१) योगिराज (कार्तिक शु. १५), (२) अत्रिवरद (कार्तिक कृ. १), (३) दत्तात्रेय (कार्तिक कृ. २), (४) कालाग्निशमन (मार्गशीर्ष शु. १४), (५) योगिजनवल्लभ (मार्गशीर्ष शु. १४), (६) लीलाविश्वंभर (पौष शु. १५), (७) सिद्धराज (माघ शु. १५), (८) ज्ञानसागर (फाल्गुन शु. १०), (९) विश्वंभर (चैत्र शु. १५), (१०) मायामुक्त (वैशाख शु. १५), (११) मायामुक्त (ज्येष्ठ शु. १३), (१२) आदिगुरू (आषाढ शु. १५), (१३) शिवरूप (श्रावण शु. ८), (१४) देवदेव (भाद्रपद शु. १४), (१५) दिगंबर (आश्विन शु. १५) आणि (१६) कृष्णश्यामकमलनयन (कार्तिक शु. १२).

वासुदेवानंद सरस्वतींनी 'श्रीदत्तात्रेयषोडशावताराः' या ग्रंथात सोळाही अवतारांच्या कथा दिलेल्या आहेत. दासोपंतांच्या परंपरेतील उपासनेत या सोळाही अवतारांचे जन्मोत्सव पाळले जातात. शिवाय दासोपंतांना दत्ताचा सतरावा सर्वज्ञावतार मानून त्यांचाही जन्मोत्सव साजरा करतात. इतिहासकाळातील श्रीपाद श्रीवल्लभ, नरसिंह सरस्वती, अक्कलकोटचे स्वामी आणि माणिकप्रभू या सत्पुरुषांनाही दत्तावतार मानतात.

पुराणांप्रमाणेच शांडिल्योपनिषद, भिक्षुकोपनिषद, अवधूतोपनिषद, जाबालदर्शनोपनिषद व दत्तात्रेयोपनिषद या पाच नव्या उपनिषदांतही दत्तात्रेयाचे उल्लेख आहेत. या उल्लेखांनुसार दत्त हा मुक्त विहरण करणारा अवधूत दिगंबर योगी, योगविद्येचा उपदेष्टा आणि विश्वगुरू आहे. यांपैकी शांडिल्योपनिषदात दत्तात्रेयाचे ध्यान वर्णिले आहे, ते असे–

**दत्तात्रेयं शिवं शान्तमिन्द्रनीलनिभं प्रभुम् ।**
**आत्ममायारतं देवमवधूतं दिगम्बरम् ।।**
**भस्मोद्धूलितसर्वाङ्गं जटाजूटधरं विभुम् ।**
**चतुर्बाहुमुदाराङ्गं प्रफुल्लकमलेक्षणम् ।।**

ज्ञानयोगनिधिं विश्वगुरुं योगिजनप्रियम् ।
भक्तानुकम्पिनं सर्वसाक्षिणं सिद्धसेवितम् ॥
एवं यः सततं ध्यायेद् देवदेवं सनातनम् ।
स मुक्तः सर्वपापेभ्यो निःश्रेयसमवाप्नुयात् ॥

अर्थ – कल्याणकारक शांत, इंद्रनीलमण्यासारख्या कांतीचा, आत्ममायेच्या ठायी रत असलेला, अवधूत, दिगंबर, सर्वांगी भस्म चर्चिलेला, जटाजूटधर, विभू, चतुर्भुज, विशालदेही, प्रफुल्ल कमलनयन, ज्ञानयोगाचा निधी, विश्वाचा गुरू, योगिजनांना प्रिय, भक्तांवर कृपा करणारा, सर्वसाक्षी आणि अनेक सिद्धपुरुषांनी सेवित अशा या सनातन आणि देवश्रेष्ठ दत्तात्रेयाचे जो सतत ध्यान करील, तो सर्व पापांतून मुक्त होऊन मोक्ष मिळवील.

वरील ध्यानातील दत्त चतुर्भुज व एकमुखी आहे; तर अग्नी पुराणातील दत्ताचे ध्यान थोडे निराळे आहे, ते असे--

वामपादो धृतः शेषे दक्षिणः कूर्मपृष्ठगः ।
दत्तात्रेयो द्विबाहुः स्याद् वामोत्सङ्गे श्रिया सह ॥
(अग्नी पु. ४९. २७)

अर्थ– डावा पाय शेषावर, उजवा पाय कूर्मपृष्ठावर, डाव्या मांडीवर लक्ष्मी बसलेली व द्विभुज अशी दत्तमूर्ती असावी.

दत्तात्रेयकल्पानुसार दत्ताचा वर्ण गौर असून, तो एकमुख व चतुर्भुज आहे. त्याचा एक हात व्याख्यानमुद्रेत, एक गुंडघ्यावर ठेवलेला, दोन हातांत कमळे आणि नेत्र अर्धोन्मीलित आहेत. विष्णुधर्मोत्तर पुराणातील दत्त तपोमग्न, शांत, फार कृशही नाही आणि फार स्थूलही नाही व जटाभाराने युक्त असा आहे. या वर्णनात वर्ण, मुख, भुजा, आयुधे, वाहन, यांपैकी कशाचाच उल्लेख नाही.

आजचे त्रिमुखी, षड्‌भुज दत्तस्वरूप प्राचीन ग्रंथांत आढळत नाही. त्रिकाची आवड असणाऱ्या भारतीय परंपरेत ब्रह्मा-विष्णुमहेशात्मक त्रिमूर्तीची लोकप्रियता वाढल्यानंतर इ. स. १००० च्या सुमारास किंवा त्यानंतर दत्तात्रेयाला त्रिमुखी स्वरूप देण्यात आले आणि दत्त हा केवळ विष्णूच्या अंशाने जन्मास आलेला नसून, त्याच्या ठायी ब्रह्मा-विष्णु-महेश या तिघांचेही अंश प्रकटले आहेत, असे मानले जाऊ लागले. अशा या दत्तमूर्तीचे सर्वमान्य प्रचलित ध्यान तुकारामाने पुढील अभंगात व्यक्त केले आहे–

तीन शिरें सहा हात । तया माझे दंडवत ॥
काखे झोळी पुढे श्वान । नित्य जान्हवीचें स्नान ॥
माथा शोभे जटाभार । अंगी विभूती सुंदर ॥
शंखचक्रगदा हातीं । पायीं खडावा गर्जती ॥
तुका म्हणे दिगंबर । तया माझा नमस्कार ॥

या दत्ताच्या मागे एक गाय आणि आजूबाजूस चार कुत्रे असतात. गाय ही पृथ्वीची प्रतिनिधी असून, चार वेद कुत्र्यांच्या रूपाने, त्याचे परिचर बनले आहेत, अशी समजूत आहे.



दत्तात्रेय

अशा प्रकारे त्रिमुखी व षड्‌भुज दत्त लोकप्रिय बनल्यानंतरही अनेक दत्तभक्तांच्या उपासनेत एकमुखी दत्तात्रेयालाच महत्त्व दिले असल्याचे आढळते. महानुभावांचा दत्त एकमुखी चतुर्भुज असून, दासोपंत व निरंजन रघुनाथ यांचा दत्त एकमुखी षड्‌भुज आहे. वासुदेवानंद सरस्वतींच्या पूजेतील दत्तमूर्ती एकमुखी द्विभुज आहे. नासिक, पंढरपूर, मिरज व पुणे येथे एकमुखी षड्‌भुज दत्ताची मंदिरे आहेत.

दत्तात्रेय हा योग आणि तंत्र या क्षेत्रांतील आचार्य मानला जातो. अवधूतोपनिषद आणि जाबालदर्शनोपनिषद यांतील बोध दत्तप्रणीत आहे. अवधूतगीतेचा वक्ता दत्तच आहे. त्रिपुरोपास्तिपद्धती या नावाचा त्रिपुरोपासनेविषयीचा तंत्रग्रंथ दत्तात्रेयाने केला असल्याची कथा त्रिपुरारहस्य या ग्रंथात आलेली आहे. परशुरामकल्पसूत्र हा ग्रंथही दत्तप्रणीत असून, यात तंत्रशास्त्राचे सार सांगितलेले आहे, असे मानले जाते.

दत्तात्रेयाचा वास औदुंबर वृक्षाच्या तळी असतो, अशी समजूत असल्यामुळे दत्तोपासकांत औदुंबर पवित्र मानला जातो. औदुंबराखाली अनुष्ठान करण्याचे अथवा गुरुचरित्राच्या पारायणाचे विशेष महत्त्व सांगतात.

दत्तात्रेयाची उपासना दक्षिणेत, विशेषतः महाराष्ट्रात फार मोठ्या प्रमाणात आजही चालू आहे. त्याच्या उपासनेचा स्वतंत्र संप्रदाय मराठी जनमनावर आजही प्रभाव गाजवीत आहे. तसेच महानुभाव, नाथ, वारकरी व समर्थ या चारही संप्रदायांत त्याच्याविषयी उत्कट श्रद्धाभाव आहे. त्याच्या उपासकांत मुसलमानांनाही स्थान आहे. धर्म, जाती, संप्रदाय, इ. सर्व भेदांना उल्लंघून समन्वयाचे व गुरुतत्त्वाचे प्रतीक बनलेला दत्तात्रेय ही भारतीय संस्कृतीच्या विकासातील एक अद्‌भुत निर्मिती आहे. [ न. च. प.; द. व. इं.; गा. दै. ]

## दत्तात्रेय उपनिषद

एक नव्य उपनिषद. याचे स्वरूप तांत्रिक आहे. यात प्रारंभी दत्ताच्या तांत्रिक मंत्रांची चर्चा आहे. त्यात दं किंवा दां या ॐ कारसदृश दत्तबीजाक्षराचे वर्णन केलेले असून, नंतर सहा, आठ, बारा आणि सोळा अक्षरांचे दत्तमंत्र व दत्तात्रेय अनुष्टुभु मंत्र हे मंत्र दिले आहेत.

या उपनिषदाचे तीन लहान खंड असून, पहिल्या खंडात वरील मंत्र, दुसऱ्या खंडात दत्तमाला मंत्र आणि तिसऱ्या खंडात फलश्रुती सांगितली आहे.

दुसऱ्या खंडातील दत्तमाला मंत्र फार प्रभावी असून, त्याच्या जपाने स्वतःला भूतपिशाचबाधा होत नाही आणि दुसऱ्याला झाली असल्यास ती दूर करता येते. हा मंत्र असा—

ॐ नमो भगवते दत्तात्रेयाय स्मरणसन्तुष्टाय महाभयनिवारणाय महाज्ञानप्रदाय चिदानन्दात्मने बालोन्मत्तपिशाचवेषाय महायोगिने अवधूताय अनसूयानन्दवर्धनाय अत्रिपुत्राय सर्वकामफलप्रदाय ॐ। भवबन्धमोचनाय ह्रीम्। सकलविभूतिदाय क्रोम्। साध्याकर्षणाय सौः। सर्वमनःक्षोभणाय श्रीम्। महोम्। चिरंजीविने वषट्। वशीकुरु वशीकुरु वौषट्। आकर्षयाकर्षय हुम्। विद्वेषय विद्वेषय फट्। उच्चाटय उच्चाटय ठठ। स्तम्भय स्तम्भय खख। मारय मारय नमः। सम्पन्नाय नमः। सम्पन्नाय स्वाहा। पोषय पोषय परमन्त्रपरयन्त्रपरतन्त्रांश्छिन्धि छिन्धि। ग्रहान्निवारय निवारय व्याधीन्निवारय निवारय दुःखं हरय हरय दारिद्र्यं विद्रावय विद्रावय देहं पोषय पोषय चित्तं तोषय तोषय सर्वमन्त्रसर्वयन्त्रसर्वतन्त्रसर्वपल्लवस्वरूपाय ॐ नमः शिवाय। इत्युपनिषत्।

हे उपनिषद अथर्ववेदान्तर्गत आहे. [ श्री. सी. ग. देसाई. ]

## दत्तात्रेय मंत्र

तंत्रसाधनेशी संबंधित असे दत्तात्रेयाचे अनेक मंत्र आहेत. ते पुढीलप्रमाणे—

**एकाक्षरी मंत्र** – दां हे दत्ताचे बीज असून, तो त्याचा एकाक्षरी मंत्र आहे. या मंत्राचा छंद गायत्री, ऋषी सदाशिव आणि देवता दत्तात्रेय आहे. हा तारकमंत्र असून, सर्व विश्व या मंत्रात प्रतिष्ठित आहे, असे म्हटले आहे.

**षडक्षरी मंत्र** –'दां ॐ ह्रीं, क्लीं, ग्लौं, द्रां' हा षडक्षरी मंत्र होय. याचा जप केल्याने योगसिद्धी प्राप्त होतात असे म्हटले आहे.

**अष्टाक्षरी मंत्र** – 'दं ( द्रा किंवा द्रां ) दत्तात्रेयाय नमः।' हा अष्टाक्षरी मंत्र होय. या मंत्रात दत्तात्रेयाय हे कीलक व बीज असून, नमः ही शक्ती आहे.

**द्वादशाक्षरी मंत्र** – 'ॐ आं, ह्रीं, क्रों एहि दत्तात्रेय स्वाहा' हा द्वादशाक्षरी मंत्र होय. या मंत्राचा छंद गायत्री, ऋषी सदाशिव, देवता दत्तात्रेय, बीजाक्षर ओम्, स्वाहा शक्ती आणि दत्तात्रेय हे कीलक आहे.

**षोडशाक्षरी मंत्र** – 'ॐ ऐं क्रों क्लीं क्लूं ह्रां ह्रीं ह्रूं सौः दत्तात्रेयाय स्वाहा।'

**अनुष्टुभ मंत्र** –

दत्तात्रेय हरे कृष्ण उन्मत्तानन्ददायक।
दिगम्बर मुने बाल पिशाच ज्ञानसागर।

**दत्तगायत्री** – इतर देवतांप्रमाणेच दत्तात्रेयाची गायत्री आहे, ती अशी–

दत्तात्रेयाय विद्महे। योगीश्वराय धीमहि।
तन्नो दत्तः प्रचोदयात्।

या मंत्राचा ऋषी शबर, छंद गायत्री व देवता दत्तात्रेय आहे. [ क्रि. स्ट. ले. उ.; मंत्रशास्त्र ]

## दत्तिलाचार्य

( सनपूर्व ४ थे शतक ) एक प्राचीन संगीताचार्य. भरताच्या एका पुत्राला याने संगीत शिकविले, असा उल्लेख आहे. भरताने आपल्या ग्रंथात याचा उल्लेखही केलेला आहे. दत्तिलम या नावाचा याचा एक संगीतशास्त्रावर संस्कृत भाषेत ग्रंथ आहे. यात बावीस श्रुती; षड्जग्राम, मध्यग्राम, वादी, संवादी, अनुवादी, विवादी हे स्वर; तसेच तान, जाती, इ. विषय चर्चिलेले आहेत. [ सं. शा. क. इ.; डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## दत्ती

जैन भिक्षेचा एक प्रकार. जैन साधू भिक्षेला गेल्यावर एकाच वेळी आणि मधे न थांबता जी भिक्षा मिळवितो, त्या भिक्षेला दत्ती असे म्हणतात. प्रत्येक वेळी दत्ती किती

मागायची हे प्रत्येक साधू ठरवून घेत असे. [ हि. जै. मो. ]

**ददरिया गीते** छत्तीसगडातील सर्व सुवासिनी ददरिया देवीची पूजा करतात. त्या वेळी तिच्या नावाने जी गीते गायिली जातात, त्यांना ददरिया गीते असे म्हणतात. या गीतांना बनभजन असेही दुसरे नाव आहे. दादर या शब्दाचा अर्थ उंच स्थान असा आहे. त्यावरून उंच जागी चढून उच्च स्वरात गायिलेल्या गीतांना ददरिया हे नाव मिळाले. झाडावर चढून पाने व फळे तोडताना, माचावर उभे राहून पाखरांना हाकलताना किंवा डोंगरावर जाऊन लाकडे तोडताना आदिवासी लोक श्रमपरिहारासाठी ही गीते गातात. प्रेमी युवक-युवती आपली प्रणयभावना व्यक्त करण्यासाठीही या गीतांचा आश्रय घेतात. त्यांचे एक उदाहरण असे–

**आमाके कांही बेंदरा झूली जाय।**
**जानी सूनीके डौकी काबर भूली जाय ॥**
**सहज सिलौना सुलंगी घौरा।**
**वाट छोड देरे डौकी फिरावूं भौरा ॥**

अर्थ– आंब्याच्या झाडावर वानरे झोके घेत आहेत. अग मुली, जाणून बुजून मला विसरल्याचा बहाणा करतेस काय! आपल्या प्रीतीला साक्षी असलेले हे सरळ सोट असे घौऱ्याचे झाड जवळच उभे आहे. अग पोरी, माझ्या वाटेतून दूर हो; मला भोवरा फिरवायचा आहे.

काही आदिवासी लोक नृत्य करतानाही ददरिया गीते गातात. विवाहसमारंभात ही गाणी गाणाऱ्यांची स्पर्धा लागते. रागदारीच्या दृष्टीने ददरिया गीतांचे अनेक प्रकार संभवतात. त्यांतील पठारी व कछारी हे दोन प्रकार विशेष प्रसिद्ध आहेत. [ लो. सा. रू.; श्री. के. एल्. श्रीवास्तव – प्रसारिका, जाने-जून १९५४; वि. प्र. लो. ]

**दधिकृच्छ्र** एक प्रायश्चित्त. यात एक महिनाभर केवळ दही खाऊन राहायचे असते (विष्णुध. पु.). [ हि. ध. ]

**दधिक्रावा** मरीचिगर्भ देवांपैकी एक. या शब्दाचा एक अर्थ असा – 'दधि – दधत्+क्राः – क्रामति' =स्वाराला पाठीवर धारण करून जाणारा. दुसरा अर्थ खिंकाळणारा व स्वार पाठीवर बसल्याने मान आकुंचित होऊन ज्याच्या सर्व अवयवांना आकार आला आहे, असा आहे. वरील दोन्ही अर्थ निरुक्तात दिले आहेत (२.२६).

ऋग्वेदात दधिक्राव्याला उद्देशून एक सूक्त आहे. त्यात त्याची अश्वरूप आणि मानववीररूप अशी दोन रूपे दिसून येतात. 'तो दधिक्रावा मानेत, खांद्यात आणि तोंडात जखडला असताही चौखूर उड्या मारीत दौडत जातो' (ऋ. ४.४०.४), हे त्याचे अश्वरूप आहे. त्याला रथांच्या अग्रभागी चालणारा प्रथम अश्व व रथांचा पराभव करणारा, असे काही ठिकाणी म्हटले आहे (ऋ. ७.४४.४; ४.३८.३). हा अश्वराज दुर्गम मार्गांही सहजपणे पार करतो (ऋ. ४.४०.४). त्याला पंख आहेत. तो श्येन पक्ष्यासारखा दिसतो (ऋ. ४.३८.५).

याला प्रकाशात राहणारा हंस, वायूच्या ठिकाणी राहणारा वसू, पुरोहित व गृहातला अतिथी असेही म्हटले आहे (ऋ. ४.४०.५). ही सर्व विशेषणे ऋग्वेदात अग्नीच्या विविध रूपांसाठी योजलेली आहेत. त्यावरून दधिक्रावा म्हणजे अग्नीचेच एखादे रूप असावे असे अनुमान काहींनी केले आहे. उषेच्या आगमनाच्या वेळी अग्नी प्रज्वलित केला जात असता, उषेसह दधिक्राव्याचेही आवाहन केलेले आहे. काही विद्वानांच्या मते दधिक्रावा हा अश्वरूपात सूर्यमंडलाचे प्रतिनिधित्व करतो. दधिक्राव्याचा उषेशी संबंध व त्याचे पक्षिरूप या दोन गोष्टी त्याचा सूर्याशी संबंध दाखवायला पुरेशा ठरू शकतात.

दधिक्राव्याचे वीरयोद्धा असे दुसरे रूपही ऋग्वेदात दिसते. तो दस्यूंचा पराभव करतो आणि विजय मिळवतो. जेव्हा तो हजार लोकांच्या विरुद्ध युद्ध करतो, तेव्हा त्याचे शत्रू त्याला पाहून चीत्कार करतात. हा पंचजनांना आपल्या शक्तीने व्यापून टाकतो (ऋ. १०.४). [ प्रा. च. को.; वै. मा. ]

**दधिग्रहपात्र** एक यज्ञीय पात्र. सोमयागात दही भरून घेण्यासाठी (दधिग्रह) हे वापरतात. हे उंबराच्या लाकडाचे व चौकोनी करतात. दह्याच्या ऐवजी सोम व आज्यही या पात्रात घेतात. अंशू व अदाभ्य नावाच्या दोन होमांसाठी हे पात्र घ्यावे, असेही सांगितले आहे (आप. श्रौ. सू. १२.२. १–२). [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**दधिधेनुदान** दह्याची धेनू व वत्स तयार करून त्यांचे दान करावे, असे वराह पुराणात सांगितले आहे. त्याचे विधान असे – शुभ दिवशी गोमयाने भूमी सारवून तिच्यावर दर्भ अंथरावे. सभोवती फुले लावावी. त्यावर दधिधेनूची (दधिकुंभाच्या रूपाने) स्थापना करावी. मग तिची पूजा करून 'दधिक्राव्णो अकारिषम् ...' या मंत्राने तिचे दान करावे. कर्त्याने त्या दिवशी दह्याचा आहार आणि तोही एकदाच घ्यावा. फल – या दानामुळे कर्त्याला अश्वमेधाचे पुण्य व विष्णुलोक यांची प्राप्ती होते. [ श. क. ]

**दधिमंथदान** दही घुसळण्याची रवी व घुसळणासह डेरा यांचे दान. या दानाचा विधी असा– मकर संक्रांतीच्या दिवशी सकाळी स्नान करून दानाचा संकल्प करावा. सारवून स्वच्छ केलेल्या जागी स्वस्तिक काढून त्यावर चार पायली गव्हांची रास घालावी. त्यावर दह्याचे भांडे ठेवून, त्याच्या जवळ लाल वस्त्रात गुंडाळलेली रवी ठेवावी. भांड्यावर यशोदा-कृष्णांची प्रतिमा ठेवून तिची व रवीच्या दांड्यावर देवी व सूर्य यांची कल्पना करून त्यांची पूजा करावी. भोवती आठ दिवे पाजळून ठेवावे. लाह्या, उसाचे करवे, पोहे व लाडू यांचा नैवेद्य दाखवावा. पुढील मंत्रांनी प्रार्थना करावी–

पूजितासि मया देवि दधिमन्थनभाजने ।
यशोदे सुमहाभागे पुत्रं देहि मनोरमम् ।।
श्रीकृष्ण परमानन्द संसारार्णवतारक ।
पुत्रं देहि मनोज्ञं मे ऋणत्रयविमोक्षणम् ।।

अर्थ – हे महाभाग्यशाली यशोदे देवी, मी दही घुसळण्याच्या भांड्यावर तुझी पूजा केली आहे. (तू) मला सुंदर पुत्र दे. हे संसारसमुद्र तारून नेणाऱ्या परमानंदरूप श्रीकृष्णा, मला ऋणत्रयाची फेड करणारा मनाजोगता मुलगा दे.

मग बोलावलेल्या ब्राह्मणाला सूर्य मानून दहीहंडा व रवी यांच्या सकट सर्व वस्तू त्याला दान द्याव्या. या व्रताची कथा अशी–

द्रोणाचार्यांची भार्या कृपी. तिला बरेच दिवस पुत्र नव्हता. त्यामुळे ती कष्टी होती. एके दिवशी दुर्वास ऋषी तिच्याकडे आला. कृपीने आपली मनोव्यथा त्याला सांगितली. दुर्वासाने मग तिला दधिमंथदान करायला सांगितले. कृपीने ते दान दुर्वासालाच दिले. त्या दानाच्या प्रभावामुळे तिला अश्वत्थामा हा पुत्र झाला.

घरात गोधनाची वृद्धी व्हावी या उद्देशाने दही घुसळण्याचे भांडे (घुसळणासह) त्यात सुवर्ण घालून ब्राह्मणाला दान द्यावे, असेही सांगितले आहे. [व्रतराज]

**दधिमथी माता** एक देवी. राजस्थानमधील नागौर गावात हिचे मंदिर आहे. ही तिथल्या दाहिमा ब्राह्मणांची कुलदेवी आहे. आश्विन शुद्ध अष्टमीला हिची इथे मोठी यात्रा भरते. राजस्थानात या देवीसंबंधी अशी समजूत प्रचलित आहे, की ही अथर्वण मुनीची कन्या व दधीची ऋषीची बहीण होय. वृत्रवधासाठी इंद्राला आपल्या अस्थी देऊन दधीची मृत्यू पावला. त्यानंतर त्याचा मुलगा पिप्पलाद याचा हिनेच सांभाळ केला. [मरु-भारती– ऑक्टोबर १९५५]

**दधिवामन** विष्णुमूर्तीचा एक प्रकार. सारसंग्रहात याचे वर्णन आलेले आहे, ते असे– हा श्वेतवर्ण असून, शुभ्र कमलावर बसलेला आहे. भू व श्री या देवींनी त्याला आलिंगिले आहे. याच्या डाव्या हातात दहीभात व उजव्या हातात अमृतकलश आहे. याच्या मस्तकावर शुभ्र छत्र आहे.

**दधिव्रत** श्रावण शुद्ध द्वादशीला हे व्रत करतात. या दिवशी दही खाऊन राहतात व कृष्णाला पाळण्यात घालून डोलवतात. त्यामुळे पंचमहायज्ञांचे फल मिळते. [व्र. प.]

**दधिसंक्रांतिव्रत** मकरसंक्रांतीला या व्रताला प्रारंभ करून एक वर्ष हे व्रत करतात. प्रत्येक महिन्याच्या सूर्यसंक्रांतीला लक्ष्मी-नारायणाला दह्याने स्नान घालणे व 'ॐ नमो नारायणाय' या मंत्राने त्याची पूजा करणे, असा याचा विधी आहे. फल–आरोग्य, दीर्घायुष्य आणि विष्णुलोक यांची प्राप्ती. [हि. ध.]

**दधीच ब्राह्मण** एक जात. यांची वस्ती गुजरातमधील भडोच आणि खेडा या जिल्ह्यांत आहे. आपण औदीच्य ब्राह्मणांपैकी आहो, असे यांचे म्हणणे आहे. पण देहपान या गावाजवळील दधीची ऋषीच्या आश्रमाजवळ हे राहू लागले, म्हणून यांना दधीच ब्राह्मण असे नाव मिळाले. हे लोक पाटीलकी व सावकारी करतात. काही जण शेतीही करतात. [मुं. इ. जा.; वि. मुं. रा. प.]

**दध्यश्च** एक वैदिक ऋषी. दध्यङ्, दध्यच्, दधीची, दधीच ही सगळी याचीच नावे आहेत. दध्यञ्च शब्दाचा अर्थ दह्यावर प्रेम करणारा किंवा दही रक्षण करणारा, असा आहे. बर्गेन म्हणतो, की दध्यञ्च याचा संबंध सोमाशी असला पाहिजे. मॅक्डोनेलच्या मते दध्यञ्च हा मुळात अग्नीच्या विद्युद्रूपाचा प्रतिनिधी असावा. मानवरूपात तो अथर्व्याचापुत्र आहे (ऋ. ६.१६.१४; १.११६.१२). याचा उल्लेख प्रामुख्याने नवव्या व दहाव्या मंडलात येतो. हा द्रष्टा असून, अग्नी प्रज्वलित करणारा (पुरोहित) होता (ऋ. ६.१६.१४). अंगिरस, मनू, प्रियमेध, कण्व व अत्री या याज्ञिकांच्या बरोबर याचे नाव आले आहे (ऋ. १.१३९.९). याचा व अश्वीदेवांचा संबंध पुढीलप्रमाणे सांगितला आहे–

आथर्वणायाश्विना दधीचेऽश्व्यं शिरः प्रत्यैरयतम् ।
स वां मधु प्र वोचदृतायन् त्वाष्ट्रं यद् दस्रावपिकक्ष्यं वाम् ।।
(ऋ. १.११७.२२)

अर्थ – हे अश्वीहो, अथर्व्याचा पुत्र जो दध्यञ्च त्याला तुम्ही अश्वाचे शिर लावले आणि (नंतर) केवळ त्वष्ट्याने शोधून काढलेली जी मधुविद्या, ती त्या सत्यधर्मी दध्यञ्चाने तुम्हांला कथन केली.

याच लहानशा कथाबीजातून दध्यञ्चाची जी कथा विस्तारली, तिचे वैदिक व पौराणिक पर्याय पुढीलप्रमाणे—

इंद्राने याला प्रवर्ग्यविद्या व मधुविद्या अशा दोन विद्या शिकवल्या होत्या. 'या विद्या तू कोणाला शिकवता कामा नयेस; शिकवल्यास मी तुझा शिरच्छेद करीन,' असे इंद्राने त्याला बजावले होते. पण ही गोष्ट अश्वींना समजली. त्यांना मधुविद्या आपणास मिळावी, अशी इच्छा उत्पन्न झाली. ते त्या उद्देशाने दधीचाकडे आले. दधीचाने त्यांना इंद्राची अट सांगितली. अश्वींनी त्यातूनही एक मार्ग काढला. ते म्हणाले. 'आम्ही तुझे मस्तक तोडून त्या जागी घोडयाचे मस्तक जोडू. त्या अश्वमुखाने तू आम्हांला विद्या शिकव.' दधीचाने ते मान्य केले. मग अश्वींनी ठरल्याप्रमाणे केले. दधीचाने त्यांना मधुविद्या शिकवली. पुढे ही वार्ता इंद्राला समजली. इंद्र तिथे आला आणि त्याने दधीचाचे अश्वमस्तक तोडून टाकले. पाठोपाठ अश्वीही तिथे आले आणि त्यांनी दधीचाचे मानवमस्तक पुनश्च त्याच्या धडाला जोडले.

ही कथा ऋग्वेदात आणि तैत्तिरीय ब्राह्मणात आली आहे.

सायणाचार्यांनी हाच कथाभाग शाटयायन ब्राह्मणाला अनुसरून थोडा वेगळया प्रकारे दिला आहे, तो असा—

दधीच जिवंत होता, तोवर त्याला पाहूनच असुरांचा पराभव होत असे; पण तो मेल्यावर असुर सारखे वाढू लागले. इंद्राला दधीचाचा मृत्यू झाला, हे माहीत नव्हते. तो जेव्हा दधीचाचा शोध करायला निघाला, तेव्हा त्याला शर्यणावत या सरोवरात दधीचाचे अश्वशिर सापडले. ते घेऊन इंद्र असुरांवर चालून गेला आणि त्याने असुरांचा पराभव केला (ऋ. १. ११६. १२ वरील सायणभाष्य).

हा स्वायंभुव मन्वंतरात जन्मला. याच्या आई-बापांची नावे अथर्वण व चित्ती किंवा शांती अशी होती. जन्मतःच हा अश्वमुख होता (भाग. पु. ४. १). ब्रह्मांड पुराणात याचा जन्म वैवस्वत मन्वंतरात झाल्याचे सांगितले असून, त्याला च्यवन व सुकन्या यांचा पुत्र म्हटले आहे (३. १. ७४). याने शंकराच्या कृपेने वज्रास्थित्व, अदीनत्व व अवध्यत्व या गोष्टी प्राप्त करून घेतल्या. क्षुप व दधीच या दोघांत ब्राह्मण श्रेष्ठ की क्षत्रिय श्रेष्ठ, असा वाद झाला असता, त्यात दधीचाचा पराभव झाला. दधीच हा ब्राह्मणश्रेष्ठत्वाचा पुरस्कर्ता होता. कालांतराने त्याने आपले हे मत सिद्ध केले (लिंग पु. १.३६).

इंद्र, दधीच व अश्वी यांची वर दिलेली कथा देवी भागवतात विस्ताराने आली आहे (७.३६), ती पुढीलप्रमाणे —

याच्या पत्नीला देव भीत असत. एकदा ते युद्धात पराभव पावून दधीचाकडे आले. त्या वेळी याची पत्नी आश्रमात नव्हती. देवांनी आपल्याजवळची सर्व अस्त्रे दधीचाच्या आश्रमात टाकली व ते तिथून पसार झाले. मागाहून याची पत्नी आश्रमात आली व तिने तो शस्त्रसंभार पाहिला. ती दधीचाला म्हणाली, की 'तुम्ही ही अस्त्रे ठेवून घेऊ नका'. पण दधीचाने ते ऐकले नाही. पुढे देवांचा पाठलाग करीत दैत्य येत आहेत, असे दिसताच ती अस्त्रे त्यांच्या हाती लागू नयेत, म्हणून दधीचाने ती सर्व गिळून टाकली.

दुसऱ्या ठिकाणी त्या अस्त्रांचे पाणी करून दधीचाने ते पिऊन टाकले, अशीही कथा आहे.

पुढे वृत्रासुर माजला व देवांना अजिक्य ठरला. त्याचा पराभव कसा करावा, ते विचारण्यासाठी सर्व देव विष्णूकडे गेले. विष्णू म्हणाला, की 'दधीचाची हाडे मागून घ्या, त्वष्टयाकरवी त्याचे वज्र करवून घ्या आणि त्या वज्राने वृत्राला मारा.' मग इंद्रासह सर्व देव दधीचाकडे आले. त्यांनी अस्थी देण्याबद्दल दधीचाची प्रार्थना केली. दधीचाने योगबलाने प्राणत्याग करून देवांची ती इच्छा पुरी केली. मग त्या अस्थींचे त्वष्टयाने षट्कोनी वज्र बनवून ते इंद्राला दिले. त्या वज्राचा उपयोग करून इंद्राने वृत्राला मारले.

त्याही वेळी दधीचाची पत्नी आश्रमात नव्हती. ती परत आल्यावर तिने हा सर्व प्रकार पाहिला. आपल्या पतीने देवांच्यासाठी प्राणत्याग केलेला पाहून तिला परम दुःख झाले. तिने देवांना शाप दिला, की 'तुमचा वंश वाढणार नाही.' मग तिने सहगमन करायचे ठरवले. त्यावेळी तिच्या उदरात गर्भ वाढत होता. तिने स्वहस्ते पोट चिरून तो गर्भ बाहेर काढला व एका पिंपळाच्या झाडाखाली ठेवला. नंतर ती सती गेली.

दधीचाचा आश्रम सरस्वतीच्या तीरावर होता, असे महाभारतात सांगितले आहे व तो गंगातीरावर होता, असे ब्रह्म पुराणात म्हटले आहे. याला अश्वशिर नामक ब्रह्मकवच व नारायणकवच विदित होते. मत्स्य व वायू या पुराणांच्या मते दधीच हा भार्गव गोत्रातला मंत्रकार होता. [प्रा. च. को.; पु. इं.]

**दप्तरदार विठोबा अण्णा** (१८१३ – १८७३ इ. स.) एक महाराष्ट्रीय कवी. यांचा जन्म बेंदरे उपनामक शांडिल्यगोत्री देशस्थ ब्राह्मण घराण्यात कऱ्हाड येथे झाला. हे घराणे मूळचे बेंदरचे; परंतु यांच्या आजोबांनी पेशव्यांकडे कऱ्हाड विभागाची दप्तरदारी पत्कर-

ल्याने ते कऱ्हाडला स्थायिक झाले आणि दप्तरदार याच आडनावाने ओळखले जाऊ लागले.

विठोबा अण्णांची शरीरप्रकृती लहानपणापासूनच उत्तम होती. त्यांनी वयाच्या अकराव्या वर्षी शिकायला प्रारंभ केला. अल्पकाळात बाळबोध व मोडी लिहिणे-वाचणे ते शिकले. वयाच्या बाराव्या वर्षी त्यांचा विवाह झाला. त्यानंतर त्यांनी अप्पा पुराणिक नामक विद्वान गृहस्थांजवळ संस्कृत विद्येचा



विठोबा अण्णा दप्तरदार

उत्तम व्यासंग केला. पुढे ते गुरूची पाठशाळा स्वतःच चालवू लागले. संस्कृतातील पंचमहाकाव्यांच्या सूक्ष्म अभ्यासावरोबरच त्यांनी प्राचीन मराठीतील कविश्रेष्ठांच्या ग्रंथांचेही आलोडन केले. ते पुराणही रसाळवाणीने सांगत. आपल्या वक्तृत्वाला संगीताची जोड देऊन त्यांनी कीर्तनकलेतही प्रावीण्य संपादन केले होते.

विठोबा अण्णांना शीघ्रकवित्वाची जन्मजात देणगी होती. या शक्तीला संस्कृत व मराठी वाङ्मयाच्या व्यासंगाची जोड मिळाली आणि त्यांनी मुख्यत्वे संस्कृतामध्ये अनेक काव्ये रचली. विठोबा अण्णा हे रामाचे उपासक होते. त्यांनी आपली रामभक्ती आपल्या काव्यातून अनेक प्रकारे प्रकट केली आहे. गजेंद्रचंपू, सुरलोकलाघव, हेतुरामायण, प्रबोधोत्सवलाघव, साधुपार्षदलाघव, इ. दहा बारा संस्कृत ग्रंथ त्यांनी रचले आहेत. त्यांच्या मराठी काव्यावरही संस्कृताचा फार प्रभाव आहे. त्यांनी रामजन्माविषयी लिहिलेल्या एका मराठी पदातील काही पंक्ती अशा—

भक्तकामकल्पद्रुम तो प्रभु करुणरसे पूर्ण द्रवला।
श्रीमदयोध्यानगरीं दशरथराजगृहीं हरि अवतरला ॥ ध्रु.॥
सान्द्रपयोधर श्याममनोहर रूप जया मन्मथ लाजे।
हिरेजडित शिरपेच तुरा वरि शिरिं किरीट बरवा साजे।
भाळिं तिलक कविजना न वदवे कुटिलालककृत शोभा जे।
मकराकृति कुंडलें श्रवणयुगिं सुप्रसन्न लोचनजल जें ॥
इंदुवदन नवकुंदरदन शुचि मंदहास अधरीं भ्राजे।
ग्रामत्रय मधुरिमार्थ कंठीं जडला जणुं रेखाव्याजें ॥
मौक्तिकहार उदार सुशोभित मध्यें कौस्तुभमणि रुळला।
श्रीमदयोध्यानगरीं दशरथराजगृहीं हरि अवतरला ॥

विठोबा अण्णांचे वय तिशीच्या सुमारास असतानाच त्यांचे आईबाप आणि पत्नी यांचा मृत्यू झाला. त्यानंतर लवकरच तेही पक्षघाताने आजारी पडले. ते स्वतःच जाणते वैद्य असल्यामुळे त्या दुखण्यातून पुष्कळसे सावरले आणि उर्वरित सर्व जीवन त्यांनी रामोपासनेत व ग्रंथरचनेत सार्थकी लावले.

विठोबा अण्णांनी वयाच्या साठाव्या वर्षी चैत्र वद्य एकादशीच्या दिवशी सकाळी, नित्याचे सर्व पूजोपचार उरकल्यावर प्रसाद भक्षण करून, रामनामाचा उच्चार करीत करीत कृतार्थ मनाने देह ठेवला. श्री. आजगावकर यांनी विठोबा अण्णांविषयी पुढीलप्रमाणे गौरवाने लिहिले आहे–

विठोबा अण्णांनी उत्तम प्रकारे संसार केला, बुद्धिप्रभावाने गुरूसही लाजविले, कीर्तनांतील रंगदेवतेने मुमुक्षुजनांच्या नयनांत प्रेमाश्रू आणले, कवित्वशक्तीने रसिकजनांना आनंदभरात डोलावयास लावले आणि शेवटी एकनिष्ठ भक्तीने भगवंताला वश करून घेतले.

महाराष्ट्रातील कीर्तनकार विठोबा अण्णांच्या संस्कृत व मराठी कवितांचा उपयोग करून आपली कीर्तने आजही रंगवितांना दिसतात. [ म. क. च. ३. ]

**दमन** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील सोळावे सूक्त याच्या नावावर आहे. मात्र ऋग्वेदात याचा कुठेही नामोल्लेख नाही.

दमनाने आपल्या एका मृत आप्ताच्या कलेवराला जाळणाऱ्या स्मशानातील अग्नीला उद्देशून हे सूक्त रचलेले आहे. मृताच्या देहाचा कोणताही भाग इकडे तिकडे जाऊ न देता व्यवस्थित दग्ध करून त्याला पितरांच्या लोकात नेऊन सोडावे, अशी त्याने अग्नीची प्रार्थना केली आहे. मृत जीवाला

उद्देशून त्यानंतर दमन ऋषी म्हणतो—

**सूर्यं चक्षुर्गच्छतु वातमात्मा द्यां च गच्छ पृथिवीं च धर्मणा ।**
**अपो वा गच्छ यदि तत्र ते हितमोषधीषु प्रति तिष्ठा शरीरैः ॥**
**( ऋ. १०. १६. ३ )**

अर्थ – (हे मृत जीवा,) तुझे नेत्र (तेज) सूर्यामध्ये जाऊन मिळोत. तुझा प्राण वायूत जाऊन मिसळो. तुझ्या धर्मकर्मानुरूप तू आकाशात जा, पृथिवीत जा, उदकात जा किंवा तुला आवडत असेल, तर (नूतन) शरीरासह वनस्पतीतही वास्तव्य कर.

अग्नीने ज्या मृताच्या देहाला दग्ध केले, त्याच्यासाठी दमनाने शेवटी असे आश्वासन मागितले आहे, की 'दहनभूमी-वर पुनः दूर्वांकुरांची हिरवळ आणि वेलींची आल्हादक शीत-लता पसरावी'.

हे सूक्त अशा प्रकारे मृत आप्ताविषयीच्या प्रेमभावनेने ओथंबलेले असल्यामुळे त्याला विलक्षण काव्यात्मकता लाभ-लेली आहे. दमन हा यमपुत्र समजला जातो. [ मं. ज्ञा. को. ]

**दमनकारोपण** एक व्रत. चैत्र शुद्ध प्रतिपदा ते पौर्णिमा हा या व्रताचा कालावधी आहे. या कालात निरनिराळ्या तिथींस दवणा वाहून पुढील दैवतांची पूजा कर-तात. प्रतिपदेला उमा, शिव व अग्नी; द्वितीयेला ब्रह्मा; तृतीयेला देवी व शिव आणि चतुर्थीपासून पौर्णिमेपर्यंत अनुक्रमे गणेश, नाग, स्कंद, भास्कर, मातृदेवता, महिषमर्दिनी, धर्म, ऋषी, विष्णू, काम, शिव व शचीसह इंद्र. फल – आरोग्य, समृद्धी व संतती यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**दमनकोत्सव** एक पूजोत्सव. दमनक म्हणजे दवणा होय. हे रोपटे सुगंधी असून, ते सुमारे एक फूट उंच वाढते. दवणा हा विष्णूला व शिवालाही प्रिय आहे. रामनवमीच्या दिवशी रामालाही दवणा वाहतात. दवण्याने विष्णूची पूजा करण्याचा उत्सव चैत्र शु. द्वादशीला करतात. शिवाच्या पूजेसाठी चैत्र शु. चतुर्दशी घेतात. या उत्सवाचा विधी असा—

चैत्र शु. एकादशीच्या दिवशी प्रथम दवणा विकत घ्यावा. त्याची गंधाक्षतांनी पूजा करून 'श्रीविष्णूच्या पूजेसाठी मी तुला नेत आहे' अशी प्रार्थना करावी. मग दवणा घरी आणून पंचगव्य व शुद्धोदक यांनी प्रक्षालित करावा व तो देवापुढे ठेवावा. त्यानंतर दवण्याच्या ठिकाणी अशोक, काल, वसंत आणि काम या देवतांची किंवा केवळ कामदेवाची पंचोपचार पूजा करावी आणि पुढील मंत्राने दवण्याची प्रार्थना करावी –

**कामभस्मसमुद्‌भूत रतिबाष्पपरिप्लुत ।**
**ऋषिगन्धर्वदेवादिविमोहक नमोऽस्तुते ।**

अर्थ – हे दमनका, तू कामदेवाच्या राखेतून उत्पन्न झाला आहेस. रतीच्या अश्रु-बिंदूंनी तू भिजला आहेस. ऋषी, गंधर्व, देव, इत्या-दींना तू मोह घालतोस. तुला नमस्कार असो.



दवणा

त्या रात्री विष्णूच्या अग्रभागी सर्वतोभद्र-मंडलावर कलशस्थापना करावी. त्यावर वेळूचे पात्र ठेवून त्यात दवणा ठेवावा. मग त्याची पूजा करावी. जागरण करावे. दुसऱ्या दिवशी सकाळी विष्णूची पूजा करून दूर्वा, गंध व अक्षता यांच्यासह दवणा विष्णूला अर्पण करावा. पूजा झाल्यावर विष्णूची पुढील मंत्राने प्रार्थना करावी, असे सांगितले आहे –

**वनमालां यथा देव कौस्तुभं सततं हृदि ।**
**तद्वद्दामनकीं मालां पूजां च हृदये वह ॥**

अर्थ – हे विष्णो, ज्याप्रमाणे तू तुझ्या हृदयावर वनमाला व कौस्तुभ मणी सतत धारण करतोस, त्याप्रमाणे (मी केलेली ही) दवण्याची माला व पूजा तू हृदयाच्या ठिकाणी धारण कर.

नंतर उरलेला दवणा ब्राह्मणांना द्यावा व स्वतः धारण करावा. इष्टमित्रांसह पारणा करावी.

या उत्सवाचा गौणकाल श्रावणमासापर्यंत असतो. हा उत्सव अधिक मासात; तसेच गुरुशुक्रांच्या अस्तात करू नये; असे सांगितले आहे.

पार्वतीच्या शापामुळे शिवनेत्राग्नीचा दमनक वृक्ष झाला. पण, शिवाने त्याला असा वर दिला, की वसंत व मदन यांच्या-सह त्याची पूजा केल्यास कर्त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. चैत्र शुद्ध चतुर्दशीच्या दिवशी काशीच्या कुशध्वज राजाने शिव-प्रीतीसाठी दमनक-उत्सव सुरू केला, असे वेंकटाचलमाहात्म्यात म्हटले आहे (९.२३-२४). या दिवशी शिवाची सुवर्ण-प्रतिमा करून तिला दवण्याने सजवतात. [ हि. ध. ]

**दमनचतुर्दशी** एक व्रत. चैत्र किंवा श्रावण महिन्याच्या शुद्ध चतुर्दशीला हे व्रत करतात. एकवीरा व भैरव या प्रस्तुत व्रताच्या प्रमुख देवता होत. या दोन देवतांच्या बरोबरच रात्री संचार करणाऱ्या इतरही शक्तिदेवता असतात. त्यांच्याही प्रीत्यर्थ हे व्रत करायचे असते. म्हणून या व्रतातली पूजा रात्री करतात. त्या पूजेत शिवाला दुधाचा व उसाच्या रसाचा अभिषेक करतात. दवणा, बेल व मरवा यांनी देवाची पूजा बांधतात. नैवेद्यानंतर तांदळाच्या पिठाचे पाच किंवा नऊ दिवे करतात व ते काशाच्या पात्रात ठेवून देवाची आरती करतात. शक्य असल्यास रात्री देवाची रथयात्रा काढतात. शेवटी शिवभक्तांची पूजा करून त्यांना भोजन देतात. फल – पुण्य व सौख्य यांची प्राप्ती. [ व्रतराज ]

**दमोदर** (इ. स. च्या १६ व्या शतकाचा उत्तरार्ध) पंजाबातील एक हिंदी महाकवी. हा गुलाटीवंशीय असून, झंग येथे राहणारा होता. दमोदर हा हीरच्या ( पंजाबातील एक प्रेमिका ) वडिलांकडे नोकरीला होता. याने एक प्रबंधकाव्य रचले असून, हीर आणि तिचा प्रियकर रांझा यांचे आत्यंतिक प्रेम हा त्या काव्याचा वर्ण्य विषय आहे. याने प्रस्तुत काव्यात ग्रांथिक भाषेऐवजी लोकभाषेचा उपयोग केलेला आहे. या विषयावर निर्माण झालेल्या उत्तरकालीन सर्व काव्यांवर दमोदराचा प्रभाव दिसून येतो. [ पं. हिं. सा. इ. ]

**दयानंद सरस्वती** ( १८२४– १८८३ इ. स. ) आधुनिक भारतातील एक महापंडित, महान वक्ते आणि धर्मसुधारक. यांचा जन्म काठियावाडातील मोरवी राज्यात एका शैव ब्राह्मण कुळात झाला. यांचे मूळ नाव मूलशंकर आणि यांच्या पित्याचे अंबाशंकर असे होते. वयाच्या पाचव्या वर्षीच यांच्या संस्कृत अध्ययनास प्रारंभ झाला. चौदाव्या वर्षापर्यंत त्यांनी संपूर्ण यजुर्वेद व अन्य तीन वेदांचा बराच भाग यांचे अध्ययन केले. तसेच तेवढ्या कालात त्यांनी साहित्य, व्याकरण व तर्कशास्त्र यांचेही सूक्ष्म ज्ञान प्राप्त केले.

वयाच्या चौदाव्या वर्षी मूलशंकराच्या जीवनात एक क्रांतिकारक घटना घडली. शिवरात्रीच्या दिवशी रात्री शिवमंदिरात जागरण करीत असताना शिवाच्या पिंडीवर एक उंदीर वावरत असलेला त्यांनी पाहिला. त्यासरशी ' मूर्तीत जर देव आहे, तर त्याच्या माथ्यावर उंदीर कसा वावरू शकतो ? ' असा प्रश्न त्यांच्या मनात तरळला. त्यांनी वडिलांना झोपेतून उठवून त्यांना हा प्रश्न विचारला. परंतु श्रद्धाळू मनाच्या वडिलांकडून त्यांना समाधानकारक उत्तर मिळू शकले नाही. त्या क्षणापासून त्यांच्या चित्तात देव आणि धर्म यांच्या स्वरूपाविषयी विचारमंथन सुरू झाले.



दयानंद सरस्वती

मूलशंकरांची ही बदललेली वृत्ती त्यांच्या वडिलांच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. आपला मुलगा कदाचित विरक्त बनून गृहत्याग करील, अशा भीतीने वडिलांनी त्याच्या विवाहाचा घाट घातला. परंतु मूलशंकर लग्नघटिका भरण्यापूर्वीच घर सोडून गेले आणि त्यांनी इ. स. १८४५ मध्ये संन्यासाश्रम स्वीकारून दयानंद हे नाव धारण केले.

त्यानंतर पंधरा वर्षे त्यांनी विंध्य आणि हिमालय या पर्वतांच्या दऱ्याखोऱ्यांत परिभ्रमण केले. त्या काळात त्यांनी केवळ कंदमुळे आणि दूध यांवर निर्वाह करून वेदान्त आणि योग यांचा सूक्ष्म अभ्यास केला व अनेक साधुसंतांच्या भेटीही घेतल्या. परंतु इ. स. १८६० मध्ये मथुरेच्या विरजानंदांची भेट होईपर्यंत त्यांचे पूर्ण समाधान कुठेच होऊ शकले नाही.

विरजानंद अंध होते; परंतु ते मोठे विचक्षण होते. त्यांचे प्रगाढ ज्ञान, असामान्य व्यक्तिमत्त्व, मूर्तिपूजेविषयी व प्रचलित शिक्षणपद्धतीविषयी त्यांच्या मनात वसत असलेली घृणा आणि भारताच्या इतिहासातील वेदकाळाविषयी वाटत असलेला अभिमान यांचा दयानंदांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. या गुरूच्या सान्निध्यात राहून त्यांनी अडीच वर्षे अध्ययन केले. गुरूने त्यांच्याकडून अशी प्रतिज्ञा करवली, की ' सत्याचा प्रचार, पौराणिक हिंदू धर्माचे उच्चाटन आणि वैदिक ज्ञानाची पुन:स्थापना करण्यासाठी मी माझे सर्व जीवन अर्पण करीन. '

या प्रतिज्ञेच्या परिपूर्तीसाठी पुढे ते बद्धपरिकर झाले. इ. स. १८६३ मध्ये गुरूचा निरोप घेतल्यावर त्यांनी आसेतुहिमाचल संचार करून मूर्तिपूजेचे व अंध रूढींचे निर्भयपणे खंडन केले. त्यांनी वैदिक साहित्याची नव्या दृष्टिकोनातून मांडणी केली आणि शास्त्री-पंडितांशी अस्खलित संस्कृतात वादविवाद करून आपल्या मताच्या प्रतिष्ठापनेचा प्रयत्न अविरतपणे चालू ठेवला. त्यांचा संस्कृत भाषेवरील व वेदविद्येवरील अधिकार, परमतखंडनातील त्यांचा आवेश, त्यांचे अमोघ वक्तृत्व आणि आपल्या विचारांच्या प्रसारासाठी त्यांनी केलेले भ्रमण, यामुळे लोक त्यांची आद्य शंकराचार्यांशी तुलना करू लागले. इ. स. १८६९ मध्ये त्यांनी काशीतील पंडितांबरोबर शास्त्रार्थ केला; परंतु कर्मठ पंडितांनी केवळ शब्दप्रामाण्याचा आधार घेऊन, दयानंदांच्या उदार व उदात्त हेतूंची टर उडवली. त्यानंतर ते प्रयागला गेले आणि तिथून इ. स. १८७२ मध्ये कलकत्त्याला गेले. तिथे ब्रह्मसमाजाचे अध्वर्यू केशवचंद्र सेन आणि देवेंद्रनाथ ठाकूर यांनी त्यांचे स्वागत केले आणि धर्मसुधारणेसाठी आपल्या पंथाशी सहकार्य करण्याची त्यांना विनंती केली. परंतु वेदांचे अपौरुषेयत्व आणि पुनर्जन्म यांविषयीची स्वामींची मते ब्रह्मसमाजाच्या मतांविरुद्ध असल्यामुळे ही सहकार्याची कल्पना प्रत्यक्षात उतरू शकली नाही.

काही काळ कलकत्त्यात राहून दयानंद मुंबईला आले. कलकत्त्यात केशवचंद्रांशी झालेल्या चर्चेत त्यांना एक गोष्ट मात्र मनापासून पटली, की आपले विचार सामान्य जनांपर्यंत पोचवायचे असतील, तर त्यासाठी केवळ पंडितांनाच समजू शकणाऱ्या संस्कृत भाषेची कास धरून चालणार नाही. त्यासाठी सर्वसुलभ अशा हिंदी भाषेचा उपयोग करायला हवा.

मुंबईत आल्यावर त्यांनी आपल्या विचारांना सुसंघटित स्वरूप देऊन ते प्रत्यक्षात उतरविण्यासाठी इ. स. १८७५ साली आर्यसमाज नावाच्या संस्थेची स्थापना केली. तिथून पुढे त्यांनी वेदांतले ज्ञानभांडार हिंदी भाषेतून लोकांना खुले करण्यास प्रारंभ केला. 'सत्यार्थप्रकाश' आणि 'वेदभाष्य' असे दोन ग्रंथ त्यांनी त्यासाठी हिंदी भाषेत लिहिले. तेजस्वी विचारांचे हे दोन्ही ग्रंथ त्यांच्या विचारांचे संपूर्ण दर्शन घडविणारे ठरले.

त्यानंतर आर्यसमाजाच्या प्रसारासाठी स्वामीजींनी पुनश्च भारतभर संचार सुरू केला. त्यांच्या व्याख्यानांनी अनेक विद्वान व तरुण लोक प्रभावित झाले. त्यांनी देशाच्या अनेक भागांत आर्यसमाजाच्या शाखा स्थापन करून, त्या समाजाचे तत्त्वज्ञान समाजात प्रसृत करण्याचे काम सुरू केले. पंजाबात दयानंदांना विशेष साथ मिळाली. लाहोरमध्ये त्यांच्या हस्ते स्थापन झालेल्या शाखेला लौकरच मुख्य केंद्राचे स्वरूप प्राप्त झाले. त्यानंतर पंजाब, काश्मीर व वायव्य प्रांत या भागांत आर्यसमाजाच्या अनेक शाखा स्थापन झाल्या.

आपले विचार समाजाच्या मनात वाढावे, मुरावे म्हणून दयानंदांनी शिक्षणाचे माध्यम हाती घेतले. त्यांनी आर्यसमाजातर्फे वैदिक विद्यालये उघडली. अनुयायांची निःस्वार्थता, कार्यतत्परता व निष्ठा लाभल्यामुळे दयानंदांचा प्रभाव भारतात गाजू लागला. केवळ देशातच नव्हे; तर विदेशातही त्यांच्या विचारांची व कार्याची कीर्ती पसरली. इ. स. १८७८ मध्ये थिऑसफिकल सोसायटीचे संस्थापक कर्नल ऑलकॉट यांनी दयानंदांशी धर्मकार्याच्या दृष्टीने पत्रव्यवहार सुरू केला. वर्षभरातच सहारनपूर येथे त्या दोघांची भेट झाली. आर्यसमाज व थिऑसफिकल सोसायटी या दोन्ही संस्थांनी एकत्र येऊन कार्य करण्याची योजना त्या भेटीत ठरली. परंतु त्या दोन्ही संस्थांमधले सहकार्य फार काळ टिकले नाही. त्यांच्यांत मतैक्याऐवजी मतभेदच वाढत गेले व इ. स. १८८१ मध्ये त्या दोन्ही संस्थांची फारकत झाली.

दयानंदांनी आपल्या जीवनाची अखेरची दोन वर्षे राजस्थानात प्रचार करण्यात घालवली. या काळात त्यांनी चितोड, उदयपूर, शहापूर, जोधपूर, इ. संस्थानांमध्ये समाजसंघटनेचे अविरत प्रयत्न केले. पण तिथेही त्यांना वैरी व विरोधक भेटल्यावाचून राहिले नाहीत. जोधपूरच्या मुक्कामात असताना कोणीतरी त्यांच्या अन्नात विष घातले. त्यामुळे त्यांची प्रकृती बिघडली आणि त्याचमुळे इ. स. १८८३ मध्ये ३० ऑक्टोबर रोजी अजमेर येथे त्यांचे देहावसान झाले.

दयानंदांचा सत्यार्थप्रकाश हा हिंदी भाषेतील ग्रंथ आर्यसमाजाचा प्रमुख प्रमाणग्रंथ बनलेला आहे. या ग्रंथाची सर्व भारतीय भाषांत भाषांतरे झालेली आहेत. आधुनिक काळात वैदिक धर्माचे पुनरुज्जीवन घडविण्यात या ग्रंथाचा फार मोठा वाटा आहे. याचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. आपल्या या ग्रंथाचा उद्देश त्यांनी मांडला आहे, तो असा—

'मनुष्यजातीची उन्नती व्हावी, तिने शक्य तितका परोपकार करावा, तिला सत्यासत्यतेचे ज्ञान होऊन तिने सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग करावा, हाच या ग्रंथाचा मुख्य उद्देश आहे. कारण, सत्योपदेशाशिवाय उन्नती होऊच शकणार नाही.'

या ग्रंथाच्या पूर्वार्धात दहा प्रकरणे असून, उत्तरार्धात चार प्रकरणे आहेत. पहिल्या भागात स्वामीजींनी शुद्ध वैदिक धर्माचे स्वरूप स्पष्ट करून, धर्माच्या नावावर माजलेल्या पाखंडांचे, रूढींचे आणि अनेक भ्रांत व आत्मघातकी आचारविचारांचे तीव्र शब्दांत खंडन केले आहे. मुलांच्या मनावर बालवयातच इष्ट ते संस्कार घडवले पाहिजेत, या गोष्टीवर

त्यांनी भर दिला आहे. माता, पिता व आचार्य या तिघांनी बालकाच्या कोवळ्या मनावर भुताखेतांचे व भाबड्या समजुतींचे संस्कार होणार नाहीत याची काळजी घ्यायला हवी, असे त्यांचे आग्रहाचे सांगणे आहे. मुलामुलींचे विवाह तरुणपण प्राप्त झाल्यानंतरच व्हावे, बालविवाह कटाक्षाने टाळावा, प्रीतिविवाहाला प्रोत्साहन द्यावे, विधवांना योग्य परिस्थितीत पुनर्विवाहाला अनुज्ञा द्यावी, जातिभेद उखडून टाकावे, परदेश-पर्यटन करून विविध मानवसमूहांतील चांगल्या गोष्टी आत्मसात कराव्या, गृहस्थाश्रमातील कर्तव्ये योग्य रीतीने पार पाडून वानप्रस्थाश्रम स्वीकारावा आणि वानप्रस्थ व संन्यास या दोन आश्रमांत असताना आत्मकल्याणाबरोबरच आपल्या शक्तींचा परोपकारात व्यय करावा, तसेच परमेश्वर सर्वव्यापी असल्याने त्याच्या मूर्ती निर्माण करून आणि त्या मूर्तींच्या उपासनेचे सोहळे वाढवून ईश्वरविषयक यथार्थ ज्ञानाला वंचित होऊ नये, इ. विचार दयानंदांनी आपल्या प्रस्तुत ग्रंथाच्या पूर्वार्धात मांडले आहेत. उत्तरार्धात ख्रिस्ती, यहुदी व मुसलमानी धर्ममतांतील दोषांचे आविष्करण केले आहे.

दयानंदांच्या या ग्रंथातील विचारांची प्रखरता दुधारी आहे. एक तर त्यांनी हिंदू धर्मातील अनिष्टांचे कठोर परीक्षण करून, त्याला पुनश्च विशुद्ध वैदिक ज्ञानाचे अधिष्ठान मिळवून दिले आणि दुसरे म्हणजे हिंदू धर्मातील दोषाचा फायदा घेऊन त्याच्यावर वेळोवेळी अतिक्रमण करणाऱ्या विधर्मियांच्या धर्म-मतांतील दोषांवरही तीव्र प्रहार केले.

आधुनिक भारताच्या इतिहासात दयानंदांचे स्थान महनीय ठरले आहे, ते याच गोष्टीमुळे. त्यांनी सहस्रावधी लोकांना प्रभावित करून समाजसेवेच्या कार्याला लावले, तेजस्वी राष्ट्रीय शिक्षणाची चळवळ उभारली आणि हिंदी भाषेचा अखिल भारतीय अशा स्वरूपात उपयोग करून तिला राष्ट्रभाषेची प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचा पहिला प्रयत्न केला. त्यांच्या विचारांशी मतभेद निर्माण झाला असताही थिऑसफिकल सोसायटीच्या एक संस्थापिका श्रीमती ब्लॅव्हॅट्स्की यांनी दयानंदांचा पुढील शब्दांत गौरव केला आहे– 'ही गोष्ट निस्संशय खरी आहे, की शंकराचार्यांच्या नंतर भारतात दयानंदांहून अधिक योग्यतेचा संस्कृतपंडित, वक्ता आणि अत्यंत निर्भयपणे अनिष्ट गोष्टींचे खंडन करणारा दुसरा कोणी झाला नाही.'

ख्रिस्ती आणि इस्लामी धार्मिक आक्रमणांविरुद्ध उ. भारतातील हिंदूंना जागे करण्याचे श्रेयही दयानंदांकडेच जाते. त्यांच्या उदयापूर्वी हिंदूंना जणू कणाच उरला नव्हता. त्यांना कोणीही दडपले, त्यांच्या धर्माची वाटेल तेवढी निंदा–नालस्ती केली, त्यांच्या देवता मोडल्या, तोडल्या, एवढेच काय; पण त्यांचे जीवित, वित्त आणि श्रद्धा यांच्यावर आक्रमण करून त्यांना सक्तीने आपल्या धर्मात ओढले, तरी ते सर्व अन्याय हिंदू लोक निमूटपणे सहन करीत. परंतु दयानंदांनी हिंदूंचा स्वाभिमान जागवण्याचा उदंड प्रयत्न केला आणि हजारो हिंदूंच्या हृदयांत धर्मरक्षणासाठी प्रसंगी प्राणही देण्याची परंपरा फुलवली. पाहा – आर्यसमाज. [ भा. घा. पु.; सं. चा. ब.]

**दयाबाई** ( इ. स. चे १८ वे शतक ) एक हिंदी कवयित्री. हिचा जन्म मेवाड ( राजस्थान ) मधील डेहरा नामक गावी ठूसर जातीत झाला. संत चरणदास हा हिचा गुरु होय. ही आपल्या गुरूबरोबर दिल्लीत जाऊन राहिली होती. दयाबोध व विनयमालिका हे तिचे दोन ग्रंथ आहेत. दयाबोध या ग्रंथात गुरुमहिमा, नाममाहात्म्य, प्रेम, वैराग्य, साधुत्व, इ. विषय तिने विवेचिले आहेत. या ग्रंथात तिने अनेक संतमतांच्या आधारे निर्गुण ब्रह्माचे वर्णन केले आहे. गुरुमाहात्म्य सांगताना ती म्हणते –

सतगुरू ब्रह्मस्वरूप हैं, आन भाव मत जान।
देह भाव माने दया, ते हैं पशू समान ।।

अर्थ – दयाबाई म्हणते, गुरू हा ब्रह्मस्वरूप आहे. अन्य भावाने त्याला भजू नये. जो त्याच्या देहभावांनाच महत्त्व देतो, तो पशूसमान आहे.

विनयमालिका या ग्रंथात तिने विष्णूचे अनेक अवतार वर्णिले आहेत. तिचे काव्य सहजसुंदर आहे. तिची मायामय प्रपंचातील नैराश्याची चित्रे प्रत्ययकारी आहेत. [ म. हिं. क.; मे. मि. इं.]

**दयाराम** (१७६७ – १८५२ इ. स.) एक गुजराती संत-कवी. गुजराती भक्तिकाव्यपरंपरेतला हा शेवटचा पण महत्त्वपूर्ण असा दुवा मानला गेला आहे. याचा जन्म नर्मदेच्या काठी चांदोड नामक गावी त्याच्या आजोळी झाला. याच्या पित्याचे नाव प्रभुराम आणि मातेचे राजकुंवर असे होते. वयाच्या आठव्या वर्षी त्याचे गंगा नामक एका मुलीशी लग्न ठरले; पण वाङ्निश्चयानंतर दोन वर्षांनी विवाह होण्यापूर्वीच ती मुलगी मरण पावली. त्याच सुमारास त्याचे आई-बापही निवर्तले. त्यानंतर त्याला पुनश्च आजोळचा आश्रय घ्यावा लागला.

दयाराम लहानपणी फार हूड होता. वयात येईपर्यंत त्याचा हा हूडपणा चालू होता. एके दिवशी नदीवरून पाणी आणणाऱ्या एका स्त्रीच्या डोक्यावरील घडा त्याने दगड मारून फोडला. ते पाहून तिचा पती दयारामाला मारण्यासाठी धावून आला. तो मार चुकवण्यासाठी दयारामाने पळ काढला आणि

तो शेजारच्या गावी गेला. तिथे त्याला केशवानंद नामक एका साधूचा आश्रय मिळाला. त्याच्या सहवासात दयारामाचा स्वभाव पालटला आणि त्याने केशवानंदालाच आपला गुरू केले. दयारामाचे मूळ नाव दयाशंकर होते. उपदेशानंतर त्याने दयाराम हे वैष्णव नाव धारण केले. या वेळी त्याचे वय केवळ अठरा वर्षांचे होते.

पुढे वयाच्या चाळिशीपर्यंत दयारामाने भारतातल्या अनेक तीर्थयात्रा केल्या. या यात्रेत डाकोर येथे त्याला पेटलादचा इच्छारामभट्ट नावाचा साधू भेटला. त्याने दयारामाला कवि-



दयाराम

त्वाची प्रेरणा दिली. व्रजमंडळाची यात्रा करीत असता त्याला गोस्वामी वल्लभलाल नावाचा एक संत भेटला. त्याने दयारामाला वल्लभ संप्रदायाची दीक्षा दिली.

तीर्थयात्रा आटोपून तो डभोई गावी गेला व तिथेच कायमचा राहिला. तिथल्या वास्तव्यात त्याने वल्लभ संप्रदायाचे सिद्धांत स्पष्ट करणारे वल्लभनो परिवार, चौरासी वैष्णवननु ढोला, पुष्टिपथरहस्य, अनुभवमंजिरी, भक्तिपोषण, इ. ग्रंथ लिहिले. याशिवाय रसिकवल्लभ, नीतिभक्तिना पदो, सतसैया, अजामिलाख्यान, इ. काही पौराणिक आख्याने, तसेच दशमलीला, रास पंचाध्यायी, नरसिंह मेहतानी हुंडी, षड्ऋतुवर्णन असेही त्याचे अनेक ग्रंथ आहेत. त्याला व्रज, सिंधी, उर्दू व मराठी या भाषा चांगल्या अवगत होत्या. या सर्व भाषांत त्याने पद्यरचना केली आहे. राधा-कृष्णांच्या प्रेमावर तर त्याने शेकडो गीते रचली आहेत. या गीतांना गरबी गीते असे म्हणतात. या विपुल गरबी लेखनावरूनच त्याला गरबीसम्राट अशी उपाधी लागली. भक्तकवी म्हणून दयारामाची ख्याती असली, तरी राधा-कृष्णप्रीतीच्या नावावर त्याने शृंगाराचा अतिरेक केला आहे. त्याच्या शृंगारिक रचनेपैकी काही पंक्ती अशा—

मुजने अडशो मां आघा रहो, अलबेला ! छेला ! अडशो मां,
अंक भर्याना सम खाओ तो, अधर तणो रस पाऊं
कहान कुंवर काळा छो, अडता, हुं काळी थई जाऊं
तुं मुज अडतां श्याम थाश तो, हुं क्यम नही थाउं गोरो,
फरी मळतां रंग अदलाबदली, मुज मोरो तुज तोरो

अर्थ — (गोपी कृष्णाला म्हणते) मला स्पर्श करू नकोस. हे प्रिया, मला स्पर्श करू नकोस. तू मला मिठी न मारण्याची शपथ घेतलीस, तर मी तुला माझे अधरामृत पाजीन. तू काळा आहेस. त्यामुळे तुझ्या स्पर्शाने मीही काळी होईन. (यावर कृष्ण म्हणतो,) जर तुला असे वाटत असेल, की माझ्या स्पर्शाने तू काळी होशील, तर असेही नाही का घडणार, की तुझ्या स्पर्शाने मीही गोरा बनेन. त्यानंतर पुनश्च आपण परस्परांना आलिंगन दिले म्हणजे आपापला मूळचा रंग आपल्याला पुन्हा प्राप्त होऊ शकेल.

भक्तिविषयक गंभीर विचार व्यक्त करणारी रचनाही त्याने विपुल प्रमाणात केली आहे. भक्त हा बनत नाही; तर तो जन्माला यावा लागतो, अशा आशयाचे त्याचे एक गीत असे —

जे कोई प्रेम–अंशी अवतरे, प्रेमरस तेना उरमां ठरे
सिंहण केरूं दूध होय ते, सिंहणसुतने जरे
कनक पात्र पाखे सौ धातु, फोडीने नीसरे
सकटखोरनुं साकर जीवन, खरना प्राण ज हरे
क्षीरसिंधुनुं माच्छलडुं ज्यम, मीठा जळमां मरे
सोमवेली रस–पान शुद्ध, जे ब्राह्मण होय ते करे
बगळवंशीने वमन करावे, वेदवाणी उचरे
उत्तमवस्तु अधिकार विना मळे, तदपि अर्थ नवसरे
मत्स्यभोगी बगलो मुक्ताफळ, देखी चंचु ना भरे

अर्थ – जो प्रेमाच्या अंशासह जन्मास आला आहे, तोच केवळ प्रेमरस पचवायला समर्थ आहे. सिंहिणीचे दूध केवळ तिचा छावाच पचवू शकेल. ते दूध सुवर्णपात्राशिवाय अन्य पात्रांना छिन्नभिन्न करून टाकते. साखर खाणाऱ्या पाखराला साखर दिली, तर ती त्याला पोषक ठरेल; परंतु गाढवाचे मात्र ती प्राण हरण करील. खाऱ्या पाण्यात जगणारा मासा गोड्या पाण्यात मरून जाईल. जे ब्राह्मण आहेत; तेच सोमरस पान करू शकतील. इतरांनी ते केले, तर ते ओकून पडेल, असे वेदांचे म्हणणे आहे. उत्तम वस्तू पात्रता नसताना प्राप्त झाली, तर तिचा दुरुपयोगच होईल. मत्स्यभोगी बगळ्याने मुक्ताफळे पाहिली, तरी तो त्यांना चोच लावणार नाही.

दयारामाच्या मृत्यूने गुजराती साहित्यातले मध्ययुग तर समाप्त झालेच; पण त्याबरोबरच कृष्णभक्तीचे कार्यही समाप्त झाले. या युगपरिवर्तनाची काही चिन्हे दयारामाच्या

कवितेतच दिसून येतात. उपास्याविषयीची अनन्य निष्ठा आणि प्रपन्न शरणागती हे दोन गुणविशेष नरसी व मीरा यांच्या काव्यात जसे स्पष्ट दिसतात, तसे आणि तितक्या प्रमाणात ते दयारामाच्या कवितेत दिसत नाहीत. दयारामाच्या काव्यात भक्ति-प्रेमाची जागा स्वच्छंद विलासितेने घेतली आहे. म्हणूनच श्री. मुन्शी त्याच्याविषयी म्हणतात, की दयारामाचे स्थान भक्तकवींत नसून ते प्रणयकवींत आहे. दयारामाच्या भक्तीत स्त्रैणता विशेष जाणवत असल्यामुळे श्री. नान्हालाल त्याला गुजरातची गोपी म्हणतात; तर प्रा. रावल त्याला गुजरातचा जयदेव म्हणतात.

दयाराम दिसायला देखणा आणि वृत्तीने रसिक होता. या दोन गुणांच्या जोडीला संगीत आणि काव्यकला हेही दोन गुण त्याच्या ठिकाणी वसत असल्यामुळे अनेक स्त्रिया त्याच्यावर माळत. त्याच्या भोवती सदैव स्त्रियांचा घोळकाच असे. या परिस्थितीमुळे त्याच्या चारित्र्यासंबंधी अनेक प्रवाद पसरले होते. लग्न होण्यापूर्वीच त्याची वाग्दत्त वधू निवर्तली होती; पण त्यानंतर रीतसर लग्न करण्याऐवजी त्याने एका बालविधवेलाच जवळ केले. मात्र त्या दोघांचा हा संबंध अखेरच्या क्षणापर्यंत टिकून राहिला. त्या स्त्रीने दयारामाची निष्ठापूर्वक सेवा–शुश्रूषा केली. [ मा. गु. लि.; मा. सं. म.; हिं. वि. को. ]

## दयाल

(इ. स. चे १७ वे शतक) एक हिंदी कवी. हा पंजाबचा रहिवासी असून, बेदीवंशीय क्षत्रिय होता. अमेदानंद सरस्वती हे त्याचे चतुर्थाश्रमातले नाव आहे. संतसाहित्याचा मोठा अभ्यासक म्हणून पंजाबमध्ये त्याची ख्याती आहे. त्याच्याविषयी याहून अधिक माहिती मिळत नाही.

दयालने अवगतहुलास, अज्ञानबोधिनी, ज्ञानबोधिनी, अपरोक्ष अनुभव, आत्मबोध, पंचकोशविवेक, ज्ञानगीता, अष्टावक्र भाषा अथवा जन्मसाखी कबीरजीकी, इ. ग्रंथ रचले आहेत. या सर्व ग्रंथांत त्याने योग, संसाराची अनित्यता, आत्मा व परमात्मा यांचा अमेद, इ. विषय विवेचले आहेत. हे सर्व ग्रंथ आकाराने लहान असले, तरी विचारांनी प्रगल्भ आहेत.

मंगलाचरणाच्या बाबतीत या कवीने एक नवीनच प्रथा सुरू केली. मंगलाचरणात ईश्वर अथवा अन्य देवदेवता यांना नमस्कार करण्याऐवजी हा आत्म्यालाच नमस्कार करतो. उदा०

नामरूप मृगजल सबै, काकौं करौं प्रनाम ।
मेरी मुझको वन्दना, सोहं आतम राम ॥

अर्थ – हे सर्व नामरूपात्मक जग मृगजलाप्रमाणे आहे. मग मी कोणाला नमस्कार करू. मीच तो आत्माराम असल्यामुळे मी मलाच वंदन करतो.

दयालाचे सारे ग्रंथ व्रज भाषेत आहेत. त्यांवर संस्कृताचा बराच प्रभाव आहे. [ पं. हिं. सा. इ. ]

## दयाळनाथ

(१७८८–१८३६ इ. स.) एक मराठी संतकवी. याचा जन्म मूर्तिजापूर येथे मौनसगोत्री ब्राह्मण घराण्यात झाला. याचे मूळ नाव हरी होते. याच्या पित्याची मुले जगत नव्हती; म्हणून त्याने याला अगदी लहानपणी सुरजी अंजनगाव येथील नाथपंथी साधू देवनाथ याच्या पायांवर वाहिले. वयाच्या आठव्या वर्षी हरीची मुंज सुरजी अंजनगाव येथेच गुरू देवनाथ आणि परमगुरू गोविंदनाथ यांच्या उपस्थितीत झाली. त्यानंतर गुरूनेच त्याचा विवाह केला. गुरुसान्निध्यात हरीने अनेक संस्कृत व प्राकृत काव्यग्रंथ, वेदान्त, फारसी व उर्दू या भाषा आणि संगीत या विषयांचा अभ्यास केला.

हरीचा स्वभाव अत्यंत दयाशील असल्यामुळे गोविंदनाथ त्याला दयाळचा म्हणत. त्यावरूनच पुढे देवनाथांनी त्याला दयाळनाथ असे सांप्रदायिक नाव दिले. दयाळनाथाला अगदी लहानपणापासूनच थोरांचे सान्निध्य लाभल्यामुळे वयात येईपर्यंत तो कीर्तनप्रवचनांत पारंगत बनला, त्याच्या अंगी साधुत्वही बाणले आणि दीर्घ तपस्येने तेजाळलेली त्याची वाणी काव्यरचनेत रंगू लागली.

वयात येताच त्याने गुरूच्या आदेशानुसार तीर्थाटन केले, तीर्थयात्रा चालू असतानाच जागोजाग कीर्तने केली आणि आपल्या साधुत्वाने तसेच वाक्चातुर्याने अनेकांना मोहून टाकले. निझामी राज्यांतील अनेक प्रतिष्ठित लोक त्याच्या कीर्तनांना आवर्जून येत. त्याच्या चाहत्यांत दिवाण चंदूलाल, रायराजे व स्वतः निझाम यांचाही समावेश होता.

कीर्तनांच्या द्वारा भक्तीचा प्रसार करण्यात दयाळनाथाने आपले सर्व आयुष्य वेचून, वयाच्या अठ्ठेचाळिसाव्या वर्षी हैद्राबाद येथे देह ठेवला. त्याची पदे भक्तिरसाने परिपूर्ण असल्यामुळे श्रोत्यांना मुग्ध करीत असत. राधाकृष्णाची प्रीती परमार्थदृष्टचा विशद करताना त्याने काढलेले उद्‌गार असे–

आद्यदीप श्रीकृष्ण, तयाची ती राधाज्योती ।
परमपुरुष हा दयाळ श्रीहरि, त्याची ते प्रकृती ॥
हा चित्सिंधू, ते चित्सरिता ऐक्यपणे मिनती ।
खचित रवी परिपूर्ण तयाची अबाधिता दीप्ती ॥

दयाळनाथाने काही लावण्याही रचल्या आहेत. लावण्यांविषयी विशेष गोडी असणाऱ्या तत्कालीन समाजाला भक्तीकडे आकर्षित करण्यासाठीच दयाळनाथाने लावणीरचनेचे प्रयोग केले. त्याच्या एका लावणीतील काही पंक्ती अशा—

तु दिनपति मी कांति तुझी, अजि कोप कसा करिशी ?
जळाविण मीन तळमळी तशी ।।
साधन तरि कोणतें करूं मी तुझिया प्राप्तीशी,
किती म्हणुनिया अंत पाहशी ।।
मी सरिता, तूं सागर, मी चातक, तूं जलधर ।
मी तारा, तूं शितकर । आगळिक नसतांनि नजर कां
मजवरती वाकडी । सख्या, तूं जिविंचा जिवलग गडी ।।

विदर्भात दयाळनाथाची कविता आजही लोकांच्या मनीमुखी वसत आहे. दयाळनाथाला पुत्र नव्हता. त्याच्या मुलींचा वंश रामटेक-उमरेडकडे आजही नांदत आहे. सुरजी अंजनगावच्या मठात त्याच्यानंतर जयकृष्णनाथ, रामकृष्णनाथ, मालचंद्रनाथ व मारुतिनाथ हे पुरुष होऊन गेले. [ दयाळनाथांची कविता ]

**दरद** एक जमात. काश्मीर राज्याच्या वायव्य भागात या लोकांची वसती आहे, म्हणून त्या प्रदेशाला दरदिस्तान असे म्हणतात. त्यातील गुरेज, अस्तोर, ववनजी, गिलगिट, पुनिआल, हुंजा, मगर, इश्कोमन, यासीन, धिजर व कुह हे विभाग काश्मीरात असून, काही भाग काश्मीरच्या बाहेर आहे.

पुराणांत व राजतरंगिणीत दरद किंवा दारद या नावाने प्रस्तुत जमातीचा उल्लेख आढळतो. टॉलेमी वगैरे पाश्चात्य ग्रंथकारांनीही या लोकांचा उल्लेख केला आहे. त्यावरून ही जमात प्राचीन काळापासून भारतात नांदत होती, असे दिसते. हे लोक अनार्य वंशाचे आदिवासी असावे, असे काही पंडितांचे मत आहे. यांना प्राचीन काळी पिशाच असेही नाव होते. त्यांच्या रानटी चालीरीती त्यांचे अनार्यत्व दर्शवतात. परंतु काही पंडित मात्र असे मानतात, की दरद लोक मूलतः आर्य वंशाचेच आहेत. महाभारतात यांना पर्वतवासी म्हटले असून, भारतीय युद्धात हे कौरवांच्या बाजूने लढले, असेही सांगितले आहे (भीष्म. ५१·१६). आर्यांची एक शाखा इराणात वसली. कालांतराने त्यांच्यापैकी काही जमाती भारतात आल्या. त्यांपैकी काही लोक चित्रळ पर्वतावरून हिमालयाच्या दक्षिण भागात शिरले व हळूहळू उत्तरेकडे पसरून स्वात नदीच्या खोऱ्यात स्थायिक झाले. या स्वात नदीच्या खोऱ्यात वसलेल्या लोकांनाच सांप्रत दरद या नावाने ओळखतात. हे लोक आर्यांप्रमाणे सुदृढ व गोरे असून, त्यांचे केस काळे, डोळे घारे व नाक सरळ असते. गिलगिट व यासीन या भागांतील दरद स्त्रिया तर विशेष सुंदर आहेत. हे पूर्वी क्षत्रिय होते; पण उपनयनादी क्रियांचा लोप झाल्यामुळे ते शूद्र बनले, असे मनू म्हणतो ( १०.४३-४४ ). मुळीच स्वच्छंदी व निर्भय असून, लाचारीचे जीवन त्यांना आवडत नाही. अन्यायाचा प्रतिकार करायला ते सदैव सज्ज असतात. त्यांना श्रम करण्याची हौस असते व कष्टमय जीवनातही ते आपला आनंद टिकवून राहतात. पायजमा, चोगा व पातळ टोपी असा त्यांचा पोशाख असतो. ते चोगा कमरबंदाने आवळून घेतात. पादत्राणे चामड्याच्या वादीने पोटरीपर्यंत वर बांधतात.

रोनू, शीन, यशकुन, क्रेमिन व डूम अशा यांच्या उपशाखा आहेत. रोनू व शीन या उपशाखांचे लोक उच्च मानले जातात. यशकुन ही उपशाखा कमी दर्जाची समजतात. शीन पुरुष यशकुन मुलीशी लग्न करू शकतो; पण यशकुन पुरुषाला शीन मुलीशी विवाह करता येत नाही. क्रेमिन लोक आर्य व अनार्य लोकांच्या संकरामुळे उत्पन्न झाले, असे मानले जाते. डूम ही सर्वांत हलकी जमात होय. हे खरे अनार्यच; पण कोणत्या तरी काळी दरद लोकांत समाविष्ट होऊन त्याच नावाने ओळखले जाऊ लागले.

दरदिस्तानातले बहुतेक लोक आता मुसलमान झालेले आहेत. त्यांच्यांत शिया, सुन्नी व मुलाही असे तीन पंथ आहेत. हुंजा भागात आणखी एक अलीइलाही नावाचा पंथ आहे. यांच्यांत पडदा पद्धत रूढ नाही.

बाकीचे लोक हिंदू आहेत. मध्य लडाखमधील काही ठिकाणी दरद लोक आढळतात, ते बौद्धधर्मी आहेत. ते लामांना आपले आध्यात्मिक गुरू मानतात. ते दरदांची भाषाच बोलतात. त्यांना तांदुळाची व द्राक्षाची दारू फार आवडते. सर्व दरद लोक गाईला अपवित्र मानतात. ते गाईचे मांस, दूध, तूप, शेण या पदार्थांचा उपयोग करीत नाहीत. शीन जातीचे लोक कोंबडीला अपवित्र मानतात.

दरद लोक ईद, नौरोज, इ. सण पाळतात. शिन-ओ-नाओ (वर्षारंभ) हा त्यांचा सर्वात मोठा सण होय. तो बारा दिवस चालतो. यांना शिकारीचा व कुस्तीचा विलक्षण छंद असतो.

**विवाहप्रथा**– लग्न ठरवण्यासाठी मुलाचा बाप मुलीच्या बापाकडे जातो आणि कापड, दारू व एक मोठा चाकू या वस्तू त्याला भेट म्हणून देतो. मुलीच्या बापाने त्या वस्तू स्वीकारल्या, तर लग्न ठरते. लग्न वधूच्या घरी होते. त्या वेळी सर्वजण एका ओळीत बसतात. वराच्या डाव्या बाजूला वधू बसते. मग मुल्ला प्रार्थना म्हणतो व लग्न लागते. त्यानंतर नाच-गाण्याचा कार्यक्रम होतो. वधूला घेऊन घरी गेल्यानंतर वर तिच्या छातीला बाणाने स्पर्श करतो व तो बाण उडवतो.

**प्रसूतिप्रथा**– मुस्लिम दरद लोकांत मूल जन्माला येताच त्याचा बाप किंवा मुल्ला त्याच्या कानात बांग देतो. दहाव्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात. तोपर्यंत सुवेर पाळतात. सत्ताविसाव्या दिवशी बाळंतिणीला शुद्ध करून घेतात.

मृतकप्रथा – हे लोक प्रेते पुरतात. काही शतकांपूर्वी मुसलमान दरदही प्रेते जाळीत असत. त्या चालीचा अवशेष म्हणून अजूनही काही ठिकाणी प्रेत पुरल्याजागी अग्नी पेटवतात. कधी कधी त्या जागी थडगेही बांधतात. मरणानंतर तीन दिवसांनी लोकांना तूप व भाकरी वाटतात.

दरदिस्तानात पूर्वी लहान गणराज्ये नांदत होती. त्यांपैकी कांही गणराज्ये पाच-सात गावांची मिळून होती, तर काही एकाच गावापुरती होती. या गणराज्यांचा कारभार सिगास नामक जनसभेच्या द्वारे केला जात असे. सर्व पुरुष जनसभेचे सभासद असत. मात्र स्त्रियांना त्या सभेत स्थान नसे. पाच-सहा व्यक्तींचे कार्यकारी मंडळ जनसभेचे काम करीत असे.

भारतात मुसलमानी सत्ता स्थापन झाल्यानंतर हीं गणराज्ये परतंत्र झाली. मोगल वंशाची सत्ता नष्ट झाल्यानंतर काही काळ इथे स्वतंत्र राज्ये चालत होती; पण पुढे शीख लोकांनी हा प्रदेश जिंकून काश्मीरमध्ये सामील केला. [ ट्रा. ए. इं.; का. दे. सं.; इं. अँ.; म. ज्ञा. को.; श. क. ]

**दरद भाषा** आर्य भारतीय भाषांचे मुख्य तीन विभाग पडतात. पहिल्या विभागात संस्कृत व संस्कृतोद्भव भाषा येतात, दुसऱ्या विभागात मध्य आशियातील हिटाइट, इ. भाषा व इराणातील जुन्या आर्यभाषा यांचा अंतर्भाव होतो आणि तिसऱ्या विभागात दरदीय भाषांचा अंतर्भाव होतो. काश्मीर, दरदिस्तान, सिंध, स्वात, कोहिस्तान, चित्रळ व काफिरिस्तान या प्रदेशांत दरदीय भाषा बोलल्या जातात. दरदीय भाषांचे पुढील तीन वर्ग पडतात – (१) काफिर वर्ग – काफिरिस्तानात प्रचलित. (२) खोवार वर्ग – चित्रळ व त्याच्या आसपासच्या प्रदेशात प्रचलित व (३) दरद वर्ग – दरदिस्तानात प्रचलित.

दरद वर्गातही पुन्हा तीन भाषांचा समावेश होतो – (१) शीना – ही या वर्गातली सर्वांत श्रेष्ठ व शुद्ध भाषा होय. हीच दरदिस्तानातली मुख्य व प्रमाण भाषा आहे. (२) कोहिस्तानी-कोहिस्तानातील लोकांची मूळ भाषा. पण सांप्रत तिच्यावर पुश्तूचा व अन्य भारतीय भाषांचा पुष्कळ प्रभाव पडल्यामुळे ती शुद्ध स्वरूपात राहिली नाही. (३) काश्मीरी – काश्मीर खोऱ्यात प्रचलित असलेली भाषा.

या सर्व भाषांमध्ये काश्मीरी भाषाच सुसंस्कृत व साहित्यिक स्वरूपाची आहे. इतर सर्व भाषा या ग्रामीण बोली या स्वरूपातच राहिल्या आहेत. काश्मीरी भाषा जिच्यापासून उत्पन्न झाली, ती पैशाची भाषा दरदीय गटातली आहे, असे कित्येक पंडित मानतात. [ का. दे. सं.; भा. भा. स.; म. भा. उ. वि. ]

**दरबारी कानडा** एक राग. याची जाती संपूर्ण-षाडव आहे. याचा विशेष प्रस्तार मंद्र व मध्य या सप्तकांत होत असतो. वादी – ऋषभ. संवादी – पंचम. आरोह स्वर – सा, रे, ग, म, प, ध, नि, सा. अवरोह स्वर – सा, ध, नि, प, म, प, म, प, ग, रे, सा. पकड स्वर – रे, ग, ग, रे, ध, नि, सा. यात गंधार, धैवत व निषाद हे कोमल व बाकीचे सर्व स्वर शुद्ध लागतात. याच्या आरोहात गंधार वक्र असतो. गंधारावर मध्यमाच्या सूक्ष्म आघाताचे संथ व डौलदार आंदोलन असते. कानड्याच्या इतर प्रकारांमध्ये ते नसते.

हा राग अत्यंत गंभीर, भारदस्त, उदात्त व उत्तेजक आहे. जीवनात सुखदु:खांचा व निरनिराळ्या रसांचा तटस्थपणे अनुभव घेऊन जीवनाचा साररूप सिद्धान्त सांगणाऱ्या तत्त्वज्ञासारखा हा राग वाटतो. याची श्रोत्यांवर गंभीर अशी छाप पडते. गानसमय-रात्रीचा दुसरा प्रहर. हा राग तानसेनाने प्रचलित केला व तो गाऊन अकबर बादशहाला प्रसन्न केले, अशी आख्यायिका सांगतात. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**दरवेशी** भिक्षेकऱ्यांचा एक वर्ग. या वर्गातले लोक धर्माने मुसलमान असून हनफी पंथाचे आहेत. अस्वलांचे खेळ दाखवीत गावोगाव भटकणे, हा यांचा धंदा आहे. यांच्या मुख्याला सगिरो म्हणतात. काश्मीरात दरवेशी नावाची एक जात आहे.

दरवेशी हा फारसी शब्द असून, भिक्षेकरी असा त्याचा अर्थ आहे. जुन्या फारसी वाङ्मयावरून असे दिसते, की संसारापासून मुक्त झालेल्या फकीर–साधूंना दरवेशी असे म्हणत. इ. स. च्या १२ व्या शतकात अशा फकिरांचा एक संप्रदाय निर्माण झाला. या संप्रदायाने सूफी पंथाचे तत्त्वज्ञान स्वीकारले होते. अबदल कादीर व अहमद रिफा हे या संप्रदायाचे आद्य प्रवर्तक होत. भक्ती हा या संप्रदायाचा विशेष असून ते 'ला इलह इला लहू' या मंत्राचा निरनिराळ्या सुरात जप करतात. काही दरवेशी लोकांत गूढ सामर्थ्य असते, असेही म्हणतात. [ म. ज्ञा. को.; एन्सा. रि. ए.; मुं. इ. जा. ]

**दरियादास** ( इ. स. चे १८ वे शतक ) एक निर्गुणोपासक हिंदी संतकवी. याचा जन्म बिहारमधील शाहाबाद जिल्ह्यातील धरकंधा गावात एका दर्जी ( शिंपी ) घराण्यात झाला. पृथुदेवसिंह हे त्याच्या पित्याचे नाव होते. दरियादासाचा विवाह त्याच्या वयाच्या नवव्या वर्षी शांती नामक मुलीशी झाला; परंतु लग्नानंतर अकाली याला वैराग्य उत्पन्न होऊन हा संन्यस्त वृत्तीने

दरियादास मुसलमान होता, असे काही अभ्यासकांचे मत आहे. दरियाचे शिष्य मात्र त्याला हिंदू मानतात. हा दरियासाहेब या नावानेही ओळखला जातो.

दरियादास हा एक पंथप्रवर्तक म्हणून प्रसिद्ध आहे. पुढे त्याच्या या पंथाला दरियादासी संप्रदाय असे नाव मिळाले. आपल्या पंथाच्या प्रचारासाठी याने उत्तर भारतात अनेक ठिकाणी प्रवास केला. या प्रवासात तो बंगालमध्ये गेला असता तिथला नबाव त्याच्या विचारांनी प्रभावित झाला व त्याने दरियादासाला एकशे एक बिघे जमीन दिली. इतरही अनेक राजेरजवाडे व जहागीरदार याचे शिष्य बनले.

दरिया स्वतःला कबिराचा अवतार मानीत असे. कबिराप्रमाणे तो कवीही होता. त्याने कबिराच्या सर्व गोष्टींचे अनुकरण करण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला. कबिराने ज्याप्रमाणे मूर्तिपूजा, तीर्थयात्रा, जातिबंधने, कर्मकांड, इ. गोष्टींचा कठोर उपहास केला, तसाच तो दरियानेही केला आहे.



दरियादास

संत सज्जनांची सेवा केल्याने जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून सुटता येते, अशी याची श्रद्धा होती. प्रथम प्रथम दरियाला सनातनी पंडितांचा बराच विरोध सहन करावा लागला; पण शेवटी त्याचे सर्व विरोधक त्याला शिष्य म्हणून शरण आले, असे सांगतात. दरियाने गुरुभक्ती, नाममाहात्म्य, मुक्त आणि बद्ध जीव, पुनर्जन्म, पिंड–ब्रह्मांड, योग, इ. अनेक विषयांवर काव्यरचना केली आहे.

याने आपल्या काव्यात निरनिराळे चाळीस छंद वापरले आहेत. याच्या काव्यात फारसी, संस्कृत, भोजपुरी, खडीबोली, इ. अनेक भाषांचे शब्द आढळतात. शांतरस हा याच्या काव्याचा प्रधान रस आहे. हिंदी निर्गुण संतकवींमध्ये दरियाचे स्थान बरेच वरचे मानतात.

दरियाच्या ग्रंथांची संख्या वीस आहे. त्यांत एक ग्रंथ संस्कृत व एक फारसी आहे. इतर अठरा ग्रंथांची नावे अशी – अग्रज्ञान, अमरसार, भक्तिहेतू, ब्रह्मविवेक, दरियासागर, गणेशगोष्टी, ज्ञानदीपक, ज्ञानमूल, ज्ञानरत्न, ज्ञानसरोदय, कालचरित्र, मूर्ति–उखाड, निर्भयज्ञान, प्रेममूल, शब्द या बीजक, सहस्त्रानी, विवेकसार व यज्ञसमाधी. यांपैकी ज्ञानदीपक हा ग्रंथ श्रेष्ठ असून, हिंदी संतसाहित्यात त्याचे स्थान कबिराच्या बीजकाच्या खालोखाल मानले जाते. त्याच्या एका पदातील काही पंक्ती अशा–

> **निरंजन, धुंद तेरी दरबार।**
> **दुखिया दुखमें सुखिया सुखमें, नाँहि बिबेक बिचार,**
> **झूठके कोठींमें दाम भरायो, नाम ना लेत तोहार ।।**

अर्थ– हे निरंजना, तुझे राज्य अंदाधुंदीने भरलेले आहे. तुझ्या राज्यात दुःखी दुःखातच नांदतो आणि सुखी सुखात राहतो, याचा तू काहीच विचार करीत नाहीस. जो तुझे नावही घेत नाही, अशा मिथ्यावादी माणसाच्या कोठीत तू द्रव्य भरीत राहतोस.

दरिया आपल्या वयाच्या एकशेसहाव्या वर्षी मरण पावला.
[ हिं. सा. को. २; हिं. सा. बि.; सं. क. द.; उ. भा. सं. प. ]

## दरियादासी संप्रदाय

एक निर्गुणोपासक संप्रदाय. याची स्थापना दरियादास नामक संताने इ. स. च्या अठराव्या शतकात बिहारमधील धरकंधा या गावी केली. हा संप्रदाय म्हणजे कबीर पंथाची जवळजवळ प्रतिकृतीच आहे. त्यात परमतत्त्वाला सत्तपुरुष असे नाव दिले आहे. हा सत्तपुरुष कबिराच्या रामाप्रमाणेच सगुण–निर्गुणाच्या अतीत आहे. त्याच्या प्राप्तीसाठी साधकाने तीन्ही लोकांच्या पलिकडे असलेला सत्तलोक गाठायचा असतो. या सत्तलोकाला दरियादास अभयलोक अथवा अमरपूर असेही म्हणतो. या सत्तलोकाकडे जाणारा मार्ग बाहेर नसून आतच आहे. परंतु त्या

मार्गावर वाटचाल करणे कठीण असल्यामुळे साधकाला सत्त-गुरूचे मार्गदर्शन लाभणे नितांत आवश्यक असते.

दरियादासाने कुठे कुठे सत्तपुरुषाला अक्षयवृक्षाच्या स्वरूपात अनुभवले असून, त्याला सृष्टिकर्ताही मानले आहे. त्रैलोक्याची ज्योती त्याच ओंकारज्योतीपासून निर्माण झाली असून, ब्रह्माविष्णुमहेश ही त्या आदिज्योतीची केवळ प्रतीके आहेत, असे दरियादासाचे म्हणणे आहे. दरियादासी संप्रदायात दरियादास हा सत्तपुरुषाचा दूत अथवा पुत्र समजला जातो.

या संप्रदायाचा प्रचार प्रामुख्याने बिहार आणि उत्तर प्रदेशाचे पूर्वेकडील जिल्हे या भागात आहे. या संप्रदायाची प्रमुख गादी धरकंधा येथे असून, अन्य मठ तेलपा, वंशी मिर्जापूर ( सारन जिल्हा ) व मनुवाँ चौकी ( मुजफ्फरपूर जिल्हा ) या ठिकाणी आहेत. या संप्रदायाच्या अनुयायांचा मूलमंत्र 'वे वहा' असा असून, त्यांची प्रार्थनापद्धती मुसलमानांच्या नमाजाप्रमाणे आहे. या संप्रदायात हिंदू, मुसलमान, इ. सर्वांना प्रवेश मिळतो.

या संप्रदायात साधू व गृहस्थ असे दोन भेद आहेत. गृहस्थ टोपी वापरतात, तर साधू उघडया माथ्याने वावरतात. साधू लोक मातीचा हुक्का व पाणी पिण्याचे एक पात्र जवळ बाळगतात आणि 'सत्तनाम' या शब्दाचा घोष करतात. कबीर पंथाप्रमाणेच या पंथातही बाह्यावडंबर व मूर्तिपूजा यांचा निषेध केलेला आहे. [ सं. क. द.; उ. भा. सं. प. ]

**दरियानाथी** नाथ संप्रदायाचा एक पोटभेद. दरियानाथ हा या संप्रदायाचा प्रवर्तक होय. भारताच्या पश्चिम भागात या संप्रदायाची पीठे आहेत. दरियानाथ प्रथम गोरक्ष-प्रवर्तित हेठनाथी शाखेचा अनुयायी होता. पुढे त्याने स्वतंत्र पंथ निर्माण केला. सिंधमध्ये दरवर्षी या पंथाचे लोक एक मोठा उत्सव करतात. या उत्सवात हिंदू आणि मुसलमान हे दोघेही भाग घेतात. [ गो. च. प. ]

**दरिया पंथ** एक निर्गुणोपासक पंथ. दरियासाहेब मारवाडी या संताने इ. स. च्या अठराव्या शतकात याची स्थापना केली. या पंथात परमतत्त्वाला 'पूरन ब्रह्म' (पूर्णब्रह्म) अशी संज्ञा आहे. यालाच राम असेही म्हणतात. हे पूर्ण ब्रह्म पिंड–ब्रह्मांड व्यापून राहिले आहे. पिंडात त्याचा निवास त्रिकुटी–संधीच्या वर महाशून्यात असतो. साधकाला नामस्मरणाने त्याचा अनुभव घेता येतो. नामस्मरण हे सर्व मतांचे सार असून, सर्व ग्रंथांचा तोच एक निष्कर्ष आहे, असे दरियासाहेबांचे मत आहे. अनादी, अगम्य व अगोचर अशा रामाचा साक्षात्कार केवळ नामस्मरणाने होतो. ज्याप्रमाणे माळ्याने झाडाच्या मुळाला पाणी घातले, की त्याचे शाखा-पल्लव बहरतात, त्याप्रमाणे नामस्मरणाने साधकाचे सर्व जीवन संपन्न होते. नामस्मरणाने प्राप्त होणाऱ्या परमानुभवाची अभिव्यक्ती दरियासाहेबाने शेतीच्या रूपकातून केली आहे, ती अशी –

जिव्हेच्या नांगराला मन-पवनाचे बैल जोडून विरहाची भूमी नांगरली आणि तीत सद्गुरूने केलेल्या उपदेशासह रामनामाचे बीज पेरले, तर हृदयात रामरूपाचे रोप तरारल्याशिवाय राहणार नाही. या रोपाला जसजसे प्रेमजल मिळत जाईल, तसतसा त्याचा बहर अंतर्बाह्य व्यापून टाकील.

दरिया पंथात उपासनेच्या बाह्यावडंबराचा निषेध केलेला आहे. साधकाच्या अंत:शुद्धीवर त्याचा भर आहे. साधकाचा सर्व जीवनव्यापार परमार्थमय बनायला हवा, मग तो गृहस्थ असला काय किंवा साधुवेषधारी असला काय, दोन्ही सारखेच, अशी दरिया पंथाची धारणा आहे. परमार्थसाधनेसाठी घरदार सोडण्याची जरूरी नाही, असे दरियासाहेबाने आवर्जून सांगितले आहे. संतसाहित्यात अनेकवार आढळणारी स्त्रीनिंदा दरियासाहेबाच्या रचनेत आढळत नाही. एका दोह्यात त्याने स्त्रीनिंदकांवर कठोर प्रहार केला आहे, तो असा—

नारी जननी जगतकी, पाल पोस दे पोष।
मूरख राम बिसार कर, ताहि लगावै दोष॥

अर्थ – स्त्री ही जगताची जननी आहे. ती आपले पालनपोषण करून आपल्याला पुष्ट बनविते. मूर्ख लोक रामाला विसरतात आणि आपल्या दोषांचे खापर स्त्रीच्या माथी फोडतात.

दरियासाहेबाच्या अशा उदार आणि उदात्त विचारांच्या सुदृढ बैठकीवर दरिया पंथाची उभारणी झालेली आहे. पाहा- दरियासाहेब मारवाडी. [ उ. भा. सं. प. ]

**दरियापूर पर्वती** एक प्राचीन नगर. हे नगर गया जिल्ह्यात वरिसलीगंजच्या उत्तरेस सहा मैलांवर आहे. युआन च्वांगने या नगराला 'परवत' म्हणजे 'कबूतरांचा मठ' असे नाव दिले होते. या नावाच्या मागे एक आख्यायिका आहे, ती अशी –

एकदा गौतम बुद्ध या ठिकाणी प्रवचन करीत असता तिथे जवळच एका पारध्याने पक्षी पकडण्यासाठी जाळे ठेवले होते. पण त्या दिवशी त्याला एकही पक्षी मिळाला नाही. गौतमाच्या प्रवचनामुळे हे दुर्दैव आपणावर ओढवले, असे समजून तो बुद्धाला मोठमोठ्याने अपशब्द बोलू लागला. 'माझ्या भुकेल्या मुलांना आता मी काय खायला घालू ?' असा त्याने बुद्धाला सवाल केला. त्यावर बुद्ध त्याला म्हणाला, 'हे पारध्या!

तुझी मुले उपाशी राहणार नाहीत. तू अग्नी तयार कर.' गौतमाच्या सांगण्यावरून पारध्याने विस्तव पेटवला. लगोलग एक कबुतर त्या विस्तवावर येऊन पडले. पारध्याला बुद्धाचे साधुत्व पटले व तो ते कबुतर घेऊन निघून गेला.

इथल्या टेकडीच्या पठारावर मध्यभागी अवलोकितेश्वराचे एक मंदिर आहे. याशिवाय इथे अनेक प्राचीन वास्तूंचे भग्न अवशेषही दिसतात. नजिकच्या एका टेकडीवर सुमारे अठरा फूट व्यासाचा एक स्तूप असून, तोही भग्न स्थितीतच आहे.

इथे चंद सौदागर या मुसलमानाचा दरगा आहे. या दरग्या-नजिक लहान लहान खोल्यांच्या अनेक रांगा आहेत. या खोल्या बबनसुबा या राजाच्या राजवाड्याच्या असाव्यात, अशी समजूत आहे. या स्थानाशी पांडवांचा संबंध आला होता, अशीही दंतकथा सांगतात. [ गया गॅझे. ]

**दरियासाहेब मारवाडी** (१६७६ – १७५८ इ. स.) एक संतकवी. मारवाडमधील जैतारन नामक गावी धुनिया (पिंजारी) या मुसलमान जातीत याचा जन्म झाला. बिहारमधील दरियादास किंवा दरियासाहेब हा याचा समकालीन असल्यामुळे, त्याच्यापासून याचे वेगळेपण दाखविण्यासाठी याला मारवाडी असे विशेषण लावतात. हा सात वर्षांचा होताच याचा बाप वारला. त्यानंतर तो मेडता परगण्यातील रैन गावी आपल्या आजोळी गेला आणि अखेर-पर्यंत तिथेच राहिला. बिकानेर राज्यातील खियाँसर या गावचा कोणी प्रेमजी अथवा प्रेमदयाळ नामक साधू दरियासाहेबाचा गुरू होता, असे सांगतात. मारवाड प्रदेशावर राज्य करणाऱ्या बखतसिंह राजाला असाध्य रोग झाला असता, दरियासाहेबाने त्याला आपला शिष्य सुखराम याच्याकरवी रोगमुक्त केले, अशी आख्यायिका आहे. याने दरिया पंथाची स्थापना केली.

दरियासाहेब हा दादूचा अवतार मानला जातो. प्रत्यक्ष दादूनेच दरियासाहेबाच्या अवतारासंबंधी भविष्यवाणी वर्त-विली होती, अशी दरियापंथियांची श्रद्धा आहे. ही भविष्य-वाणी ग्रथित करणारा दादूच्या नावावरील एक दोहा दरिया पंथात प्रचलित आहे, तो असा–

**देह पडंतां दादू कहै , सौ बरसां इक संत ।**
**रैन नगरमें परगटै, तारै जीव अनंत ।।**

अर्थ – देह ठेवताना दादू म्हणतो, की शंभर वर्षांनी रैन नगरात एक संत प्रगटेल आणि तो अनंत जीवांना तारील.

दरियासाहेबाने काही साख्या आणि पदे रचली आहेत. त्याच्या रचनेवर कबीर आणि दादू या दोघांचाही प्रभाव आहे. परमात्म्याचे स्वरूप स्पष्ट करणारा त्याचा एक दोहा असा–

**सोई कंथ कबीरका, दादूका महराज ।**
**सब संतनका बालमा, दरियाका सिरताज ।।**

अर्थ – तोच कबिराचा कंथ (कांत) आहे, तोच दादूचा महाराज आणि सर्व संतांचा प्रियतम आहे: आणि तोच दरि-याचा मुकुटमणी आहे.

दरियाच्या रचनेवरून हे स्पष्टपणे जाणवते, की तो एक साक्षात्कारी संत होता. [ उ. भा. सं. प. ]

**दरैहान** एक जात. या लोकांची वस्ती मध्य प्रदेशातल्या बिलासपूर जिल्ह्यात आहे. हे लोक सुदृढ बांध्याचे, रेखीव चेहऱ्याचे व गौर वर्णाचे आहेत. यांचे पूर्वज काही पिढ्यांपूर्वी रायपूर जिल्ह्यातील दरगावी आले, म्हणून त्यांना दरगैहान नाव पडले, असे हे सांगतात. दरैहान हे दरगैहानचे अपभ्रष्ट रूप आहे. हे लोक स्वतःला राजपूतवंशी क्षत्रिय म्हणवतात; पण सांप्रत त्यांचा राजपुतांशी काही संबंध राहिला नाही. छत्तीसगडमधील शेतकऱ्यांची ही हलकी जात असावी आणि त्यांची मूळ उत्पत्ती राजपुतांच्या एखाद्या वंशा-तून झाली असावी, असे त्यांच्याविषयी एक मत आहे.

या जातीने चौदा प्रसिद्ध क्षत्रिय घराण्यांची नावे धारण केलेली आहेत. त्यांपैकी चंदेल, कछवाह, धांधुल व सकरवार ही घराणी इतर दहा घराण्यांपेक्षा स्वतःला श्रेष्ठ समजतात. त्या दहा घराण्यांतल्या मुली हे स्वीकारतात; पण आपल्या मुली मात्र त्यांना देत नाहीत. या जातीचे लोक ब्राह्मणांप्रमाणे कौशिक, भारद्वाज, इ. सात गोत्रे लावतात व जानवे घालतात.

**विवाहप्रथा** – यांच्यांत सगोत्र विवाह होत नाहीत; मात्र गुनरावत म्हणजे साटेलोटे करण्याची प्रथा आहे. हे लोक स्त्रियांच्या नैतिक आचरणावर कडक निर्बंध घालतात.

शेती हा यांचा प्रमुख व्यवसाय होय. मोठमोठे जमीन-दारही स्वतःच शेती करतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इ. ]

**दर्जी** एक जात. दर्ज या फारसी शब्दाचा अर्थ शिवणे असा आहे; त्यापासून हे नाव पडले आहे. यांची वस्ती प्रामु-ख्याने महाराष्ट्र, कर्नाटक, राजस्थान व उ. प्रदेश या प्रदेशांत आहे. हे कपडे शिवण्याचा व्यवसाय करतात. यांना मेराई, पिपावासी, सई, सुई, सुतार आणि शालावाडी अशीही अन्य नावे आहेत. राजपूत हे आपले पूर्वज होत, असे हे सांगतात. परशु-रामाने क्षत्रियांचा संहार आरंभिला, तेव्हा आमच्या पूर्वजांनी सुयांच्या साहाय्याने स्वतःचे रक्षण केले, अशी माहिती राज-स्थानातील दर्जी लोक आपल्याविषयी सांगतात.

दर्जी लोकांत हिंदू व मुसलमान अशा दोन्ही धर्मांचे लोक

आहेत. यांच्यांत राजदर्जी, कैथीय, व श्रीवास्तव असे पोटभेद आहेत. हिंदू दर्जीत आठ पोटभेद असून, शिवाय अनेक कुळेही आहेत.

स्वामीनारायण, रामानंद, मध्वाचार्य व माता या पंथांचे हे अनुयायी आहेत. हिंगलाज व पीठळदेवी या यांच्या कुलदेवता होत. पुष्कर्ण किंवा पोखरणा ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात.

पूर्वी दर्जी हा शब्द धंदेवाचक होतात, पण आता तो जातिवाचक झाला आहे. यांच्यांत जातपंचायत आहे. जातीतील प्रश्नांचे निवाडे जातीच्या लोकांनी निवडलेल्या पुढाऱ्यांकडून होतात आणि दंडाची रक्कम ज्ञातिभोजन घालण्यासाठी खर्च केली जाते. या लोकांत प्रौढ विवाह रूढ आहे.

दर्जी हे कुंभार व लोहार यांच्या हातचे अन्न घेत नाहीत. हे लोकमद्य-मांस निषिद्ध मानतात. [ मुं. इ. जा.; बाँ. बे. ऋा.; मै. ट्रा. का.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**दर्भ** यज्ञ, श्राद्ध. इ. धार्मिक कृत्यांत वापरायचे एक तृण. स्नान, दान, जप, तप, स्वाध्याय, पितृकर्म व संध्यावंदनादी कर्मे दर्भ हातात घेऊन म्हणजेच दर्भाचे पवित्रक बोटात घालून करावी; तसे न केल्यास केलेले कर्म विफल होते, असे आन्हिकसारात सांगितले आहे. पवित्रक सामान्यपणे ४ किंवा २ दर्भांचे करतात. शांतिकर्मासाठी ३ दर्भांचे व पौष्टिक कर्मासाठी ५ दर्भांचे पवित्रक प्रशस्त मानले आहे. श्राद्धादी कृत्यांच्या वेळी कडोसरीला खोचलेल्या व यज्ञोपवीताला बांधलेल्या दर्भांनाही पवित्रक असेच म्हणतात.

दर्भाची उत्पत्ती कशी झाली, याविषयी अथर्ववेदात सांगितले आहे, ते असे –

यत्समुद्रो अभ्यक्रन्दत् पर्जन्यो विद्युता सह ।
ततो हिरण्ययो बिन्दुस्ततो दर्भो अजायत ।
(अथर्व. १९.३०.५)

अर्थ – समुद्राने जी गर्जना केली किंवा पर्जन्याने विजेसह जो गडगडाट केला, त्यातून सुवर्णमय बिंदू खाली पडला आणि त्या बिंदूपासून दर्भाची उत्पत्ती झाली.

अथर्ववेदात दर्भाला अनुलक्षून १९.३२ व १९.३३ अशी दोन संपूर्ण सूक्ते आहेत. दर्भ हातात बांधला असता, आयुष्य वाढते, अशी कल्पना त्यात मांडलेली आहे. पाहा – कुश

**दर्श** चांद्रमासाच्या शेवटी येणारी तिथी अर्थात अमावस्या. 'दर्शः सूर्येन्दुसङ्गमः' = चंद्र–सूर्यांची युती होणे म्हणजे दर्श होय. (अमर.) दर्श याचा धात्वर्थ दिसणे असा आहे. ज्या दिवशी चंद्राला फक्त सूर्यच पाहू शकतो आणि दुसरे कोणी पाहू शकत नाहीत, तो दर्श होय, अशी याची दुसरी व्याख्या आहे. या तिथीस चंद्र–सूर्य एकमेकांना पाहतात, असे मत्स्य पुराणात म्हटले आहे. भागवतात दर्शाला मानव कल्पून, त्याला सिनीवाली व विधाता यांचा पुत्र मानले आहे (भाग. पु. ६.१८.३).

दर्श हा श्राद्धासाठी युक्त दिवस सांगितला आहे. [ श. क.]

**दर्शजननशांती** सूर्य-चंद्रांच्या युतीच्या दिवशी मूल जन्मले, तर मातापित्यांना दारिद्र्य येते, असे मानतात. या अरिष्टाच्या परिहारार्थ ही शांती करायची असते. या शांतीचा विधी असा –

संकल्पानंतर सर्वतोभद्रपीठावर ब्रह्मादी देवतांचे आवाहन करतात. त्यांची पूजा करून, पीठावर धान्य पसरून त्यावर कुंभ ठेवतात. कुंभावर पूर्णपात्र ठेवून एका सुवर्णप्रतिमेवर पितर या मुख्य देवतेचे, तिच्या दक्षिणेला रुप्याच्या प्रतिमेवर सोमाचे आणि उत्तरेला तांब्याच्या प्रतिमेवर सूर्याचे आवाहन करतात. नंतर अग्निस्थापना करून प्रधान होमापर्यंतचे कर्म अग्निमुखाप्रमाणे करतात. नंतर ग्रह, पितर, सोम व सूर्य यांच्यासाठी समिधा, चरू व आज्य यांचें हवन करतात. प्रधान होमानंतर आयुष्यसूक्त व 'हिरण्यवर्णा…', 'समुद्रज्येष्ठा…' इ. मंत्रांनी यजमान व यजमानपत्नी यांना बालकासह अभिषेक करतात. मग बलिदान व पूर्णाहुती करून शेवटी आचार्याला गायीचे दान देतात. [ सं. कौ. ]

**दर्शन** चाक्षुषज्ञान, आलोकन, ईक्षण (पाहणे), इ. दर्शन शब्दाचे अर्थ आहेत. सामान्यपणे एखाद्या देवतेच्या, साधुसत्पुरुषांच्या, तीर्थक्षेत्रांच्या, वृक्षवनस्पतींच्या, पशुपक्ष्यांच्या चाक्षुषप्रत्यक्षाला दर्शन असे म्हणतात. दर्शन हे पुण्यकारक असते. कोणाच्या दर्शनाने दर्शकाला काय फल मिळते, ते ब्रह्मवैवर्त पुराणात पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

वेदवेत्ता ब्राह्मण, वैष्णव जन आणि देवताप्रतिमा यांच्या दर्शनाने तीर्थस्नानाचे फल मिळते.

सूर्य, सती, संन्यासी, ब्रह्मचारी, गाय, अग्नी, गुरु, हत्ती, सिंह, शुभ्र अश्व, हंस, मयूर, चास, सवत्स धेनू, अश्वत्थ, पति पुत्रवती स्त्री, तीर्थयात्रेला निघालेले लोक, प्रज्वलित दीप, सुवर्ण, मोती, हिरे–माणके, तुळस, इत्यादींचे दर्शन पापनाश करणारे आहे.

फळे, शुभ्र धान्ये, तूप, दही, मध, पूर्णकुंभ, लाह्या, राजा, आरसा, जल, शुभ्र पुष्पांची माला, सरोवर, पुष्पोद्यान, शुक्ल पक्षातील चंद्र, चंदन, पताका, देवालय, गुहा, पुराणपुस्तक;

विष्णुयंत्र, समुद्र, यज्ञ, महोत्सव, गोठा, इत्यादींच्या दर्शनाने पुण्य लाभते.

कार्तिकी पौर्णिमेस राधेची प्रतिमा, आश्विनातल्या अष्टमीस दुर्गाप्रतिमा, शिवरात्रीस काशीविश्वनाथ, जन्माष्टमीस बिल्वमाधव, पौषातल्या शुक्ल पक्षात रात्रौ लक्ष्मीची प्रतिमा, द्वादशीस अन्नपूर्णा, बदरिकाश्रमात नारायण, वृंदावनात गोविंद, रथस्थ जगन्नाथ, कार्तिकी पौर्णिमेस विष्णुप्रतिमा, आषाढी पौर्णिमेस रामेश्वर, पश्चिम सागराच्या तीरावर द्वारकेत कृष्णप्रतिमा, इ. देवतांच्या दर्शनाने मनुष्याचा पुनर्जन्म टळतो.

**दर्शने** दृश् = पाहणे, या धातूपासून हा शब्द बनला आहे. या शब्दाच्या दोन व्याख्या अशा– (१) 'दृश्यते यथार्थतत्त्वम् अनेन इति।' = ज्याच्या योगाने यथार्थतत्त्व पाहिले (जाणले) जाते, ते शास्त्र म्हणजे दर्शन होय. (श. क.) (२) 'तत्त्वज्ञानसाधनं शास्त्रम्।' = तत्त्वाचे ज्ञान होण्याला साधक असे शास्त्र म्हणजे दर्शन होय. (न्या. को.) ज्या शास्त्राच्या द्वारे लौकिक व पारलौकिक तत्त्वांचे यथार्थ ज्ञान होते, त्याला जाणते लोक दर्शन असे म्हणतात.

विविध शास्त्रकारांनी आपापल्या दृष्टिकोनानुसार भिन्न भिन्न तत्त्वे प्रतिपादिली असली, तरी मुख्यत: आत्मतत्त्वाचे निरूपण करणे हेच सर्व दर्शनांचे मुख्य उद्दिष्ट आहे. हे आत्मतत्त्व विशद करून सांगत असताना त्याच्या अनुषंगाने जीव म्हणजे काय, तो कुठून आला, या दृश्य जगाचे खरे स्वरूप काय, त्याची उत्पत्ती कशी झाली, त्या उत्पत्तीचे कारण कोणते, ते जड आहे का चेतन आहे, इ. प्रश्नांचा ऊहापोह करून त्याविषयीचे निर्धारित उत्तर सांगणे, हे दर्शनांचे आनुषंगिक उद्दिष्ट होय असे मानले जाते.

जीवनाचा आणि दर्शनांचा घनिष्ट संबंध आहे. किंबहुना जीवन आणि दर्शन ही परस्परांसाठीच आहेत. त्रिविध तापाने तप्त झालेल्या जीवांना शांती व समाधान मिळवून देण्यासाठी आणि क्लेशमय संसारातून त्यांची मुक्तता करण्यासाठी भारतात विविध दर्शनांची जडणघडण झाली आहे.

दर्शन शब्दाचा संबंध अध्यात्मविद्येशी आहे. त्याचा वाच्यार्थ चाक्षुषप्रत्यक्ष अर्थात चक्षुरिंद्रियाने होणारे ज्ञान असा आहे. उपनिषदातील काही वाक्यांवरून ही गोष्ट स्पष्ट होण्याजोगी आहे. बहिरिंद्रियाच्या शक्तीचे बलाबल सांगताना बृहदारण्यकात 'चक्षुर्वै सत्यम्,' 'चक्षुर्वै प्रतिष्ठा' अशी वाक्ये आली आहेत (५. १४. ४; ६. १. ३). यांपैकी 'चक्षुर्वै सत्यम्' या वाक्यावर भाष्य करताना शंकराचार्य म्हणतात––

**तस्माद्यदिदानीं द्वौ विवदमानावेयातामहमदर्शमहमश्रौषमिति। य एवं ब्रूयादहमदर्शमिति तस्मा एव श्रद्दध्याम तद्वै तत्सत्यम्।**

भावार्थ – एखाद्या गोष्टीविषयी विवाद उत्पन्न झाला असता त्याचा निर्णय साक्षीपुराव्याच्या आधारे करावा लागतो. अशा वेळी दोन प्रकारचे साक्षीदार पुढे येतात. त्यांपैकी एकाने ती घटना पाहिलेली असते व दुसऱ्याने ऐकलेली असते. अशा स्थितीत 'मी ही घटना पाहिलेली आहे,' असे जो सांगतो, त्याच्यावर आपण विश्वास ठेवतो आणि तेच सत्य मानतो.

अशा प्रकारे अन्य इंद्रियांच्या तुलनेने चक्षूचे (डोळा) स्थान सत्याच्या अधिक जवळचे असल्यामुळे पुढे अंतिम सत्याचा शोध घ्यायला निघालेल्या अध्यात्मशास्त्राला अर्थात् आत्मानात्मज्ञानाला लक्षणेने दर्शन हा शब्द लावला जाऊ लागला.

जगत, जीव, ईश्वर व मोक्ष हे सर्व दर्शनांचे चार प्रमुख प्रतिपाद्य विषय होत. दर्शनात या प्रश्नांचा विचार लौकिक, लोकान्तर व लोकोत्तर अशा तीन दृष्टिकोनांतून केलेला असतो. दृश्यमान इहलोक ह्याच तेवढा सत्य होय, असे मानून त्या आधारावरच समस्त पदार्थांची चर्चा करणारी पद्धती, ती लौकिक दृष्टी होय. चार्वाकादी दर्शनकार या दृष्टीचे पुरस्कर्ते आहेत. जीवाच्या वर्तमान जन्माबरोबरच त्याच्या पुनर्जन्माचेही अस्तित्व मान्य करून, त्या आधारे चर्चा करणारी, ती लोकान्तर दृष्टी होय. चार्वाकाशिवाय सर्व आत्मवादी दर्शने या दृष्टीची आहेत. मोक्ष हेच जीवाचे परम साध्य मानून जो विचार केला जातो, ती लोकोत्तर दृष्टी होय. तिच्यात लौकिक व लोकान्तर हे दोन्ही दृष्टिकोन स्वीकारून लोकोत्तरत्वाच्या पातळीवर अध्यात्मचर्चा केलेली असते.

इ. स. च्या बाराव्या शतकात हरिभद्र नावाचा एक आचार्य होऊन गेला. त्याने षड्दर्शनसमुच्चय नामक एक ग्रंथ लिहिला आहे. त्यात त्याने चार्वाक, बौद्ध व जैन ही अवैदिक दर्शने आणि न्याय–वैशेषिक, सांख्य–योग व मीमांसा–वेदान्त ही वैदिक दर्शने अशा एकूण सहा दर्शनांचा विचार केला आहे. सहा दर्शनांचा वाचक म्हणून षड्दर्शने हा शब्द दार्शनिकांत रूढ आहे, पण षड्दर्शनांत कोणत्या दर्शनांची गणना करावी, याविषयी मात्र विद्वानांत मतभेद आहेत. दर्शनांची सहा ही संख्याही निश्चित नाही. ज्याला कोणाला ज्या एखाद्या विचारपद्धतीविषयी प्रेम वाटले, त्याने त्या पद्धतीला दर्शन मानले, असाच प्रकार दिसून येतो. माधवाचार्याने आपल्या सर्वदर्शनसंग्रह या ग्रंथात दर्शनांची संख्या सोळा दिली आहे. पण एवढी संख्या वाढवूनही श्रीकंठाचे शिवाद्वैत त्यातून वगळले गेले व अन्य काही दार्शनिक परंपराही सर्वदर्शनसंग्रहाच्या बाहेर राहिल्या. यावरून दर्शनांची निश्चित संख्या ठरवणे कठीण आहे, ते समजून येईल.

आस्तिक व नास्तिक दर्शने – भारतीय दर्शनांचे आस्तिक व नास्तिक असे दोन स्थूल विभाग मानले जातात. वेदांचे प्रामाण्य मानणारी ती आस्तिक व ते न मानणारी ती नास्तिक होत. त्यादृष्टीने न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, मीमांसा व वेदान्त ही दर्शने आस्तिक आणि चार्वाक, जैन व बौद्ध ही दर्शने नास्तिक समजली जातात. सर्वसामान्य व्यावहारिक भाषेत ईश्वराची सत्ता मानणाऱ्याला आस्तिक व ती सत्ता न मानणाऱ्याला नास्तिक म्हणतात. पण या प्रचलित अर्थाने हे दर्शनांचे विभाग केलेले नाहीत, हे लक्षात ठेवले पाहिजे; कारण मीमांसा हे दर्शन आस्तिक असूनही ते ईश्वर मानीत नाही. सांख्य दर्शनातही ईश्वराची आवश्यकता मानलेली नाही. प्रकृती व पुरुष यांच्या परस्पर संयोगाने सृष्टीचे उत्पत्ति–स्थिति-लय होतात, असे सांख्यांचे मत आहे.

परलोकाची सत्ता मानणारा तो आस्तिक व ती न मानणारा तो नास्तिक असे पाणिनीचे मत आहे ( अष्टा. ४.४. ६० ). पण हा अर्थ स्वीकारल्यास जैन व बौद्ध या दर्शनांची गणनाही आस्तिक दर्शनातच करावी लागेल. कारण जैन व बौद्ध यांनी वेदप्रामाण्य मानले नसले व ईश्वराचा स्वीकार केला नसला, तरी त्यांचा परलोकावर विश्वास आहे.

काही दर्शने आगम ग्रंथांच्या आधारेही निर्माण झाली आहेत. त्यांना आस्तिक म्हणावे का नास्तिक असा प्रश्न पडतो. कारण ती वेदबाह्य असली, तरी कर्मसिद्धान्त, पुनर्जन्म, मोक्ष, इ. आस्तिक दर्शनांचे सिद्धान्त मानणारी आहेत. पांचरात्र-संहिता, शैवसंहिता व शाक्तसंहिता या ग्रंथांत वैदिक व वेदबाह्य अशा अनेक सिद्धान्तांचे विचित्र मिश्रण आहे. शिवमहिम्न-स्तोत्रातल्या 'त्रयी सांख्यं योगः पशुपतिमतं वैष्णवमिति।' या श्लोकात एका वैष्णव दर्शनाचा नामोल्लेख आहे. हे दर्शनही वेदबाह्यच होय. पण तरीही ते आस्तिक दर्शनांचे पुनर्जन्मादी सिद्धान्त मानणारे आहे. यावरून वरील आगमप्रणीत दर्शनांना आस्तिक किंवा नास्तिक असे कोणतेही निश्चित विशेषण देणे कठीण होते.

भारतीय संस्कृती ही निगमागममूलक आहे. म्हणजेच तिचा एक प्रवाह निगम (वेद) मूलक असून दुसरा आगम (तंत्र) मूलक आहे. अतएव या दोन विचारधारांच्या अनुषंगानेच दर्शनांचे निरूपण करणे उपयुक्त व युक्तिसंगत ठरेल.

दर्शनांत विवेचिली गेलेली सर्व तत्त्वे मूलतः उपनिषदांमध्ये आली आहेत. मात्र ती संगतवार नसून विखुरलेल्या अवस्थेत आढळतात. तत्कालीन ऋषि-मुनींना तपस्या व चिंतन यांच्या द्वारे ज्या तत्त्वांची अनुभूती झाली, ती तत्त्वे त्यांनी उपनिषदांत व्यक्त करून ठेवली. पण त्यांच्या त्या अनुभूती व्यक्तिगत असल्यामुळे त्यांत भिन्नताही आढळते. असे असले, तरी त्या सर्व अनुभूती परम तत्त्वाविषयींच्याच आहेत. ज्यांना त्या परम तत्त्वाचा जसा अनुभव आला, तसा तो व्यक्त करून ते मोकळे झाले आहेत. त्यामुळे उपनिषदांतली तात्त्विक शंका-समाधाने एका विशिष्ट क्रमाने मिळत नाहीत. उपनिषदांतल्या कोणत्याच तत्त्वविचाराला क्रमबद्धता नाही. तत्त्व एकच असले, तरी त्याच्या स्वरूपाविषयी तिथे भिन्न भिन्न दृष्टिकोन आढळतात. त्या भिन्न भिन्न विचारांतल्या विरोधांचा परिहार करून त्यांची संगतवार मांडणी करणे आणि त्यांतून एक शास्त्र उभे करणे, हे काम पुढे दर्शनांनी केले.

प्राचीन काळापासून भारतात दार्शनिक विचारांची धारा अविच्छिन्नपणे वाहत आलेली असून, वेगवेगळ्या कालखंडात त्या धारेत अनेक नवनवीन विचारांचे प्रवाह येऊन मिळाले आहेत. दुसरी गोष्ट म्हणजे भारतीय दर्शनशास्त्र हे अंधश्रद्धेवर आधारलेले नाही. त्याने आपल्या उभारणीसाठी सर्वत्र तर्काचा आश्रय केलेला आहे. ईश्वरासारख्या महत्त्वाच्या विषयावरही विविध दर्शनांनी अस्ति–नास्तिपक्षी आपापले स्वतंत्र विचार तर्काच्या आधारेच मांडले आहेत.

सर्व दर्शने आत्मज्ञानासाठीच प्रवृत्त झालेली दिसतात. 'आत्मानं विद्धि' = आत्म्याला जाणून घे, हा दर्शनांचा मूलमंत्र आहे. आत्म्याचे ज्ञान व्हायला हवे असेल, तर सर्व अनात्म पदार्थांपासून आत्म्याला वेगळे करणे आवश्यक ठरते. यालाच आत्मानात्मविवेक असे म्हणतात. भारतीय दर्शनांनी हे आत्मानात्मविवेकाचे कार्य सर्वत्र तर्कबुद्धीचा अवलंब करून केले आहे. प्रमाणे, युक्ती, तर्क व ज्ञानी पुरुषांची अपरोक्ष अनुभूती यांच्या आधारावरच सगळ्या दर्शनांची उभारणी झालेली आहे.

भारतीय दर्शनांचा विचार करू लागले असता दोन मूलभूत सिद्धान्त दृष्टिगोचर होतात, ते असे—

(१) नाना नामरूपात्मक जगताची पारमार्थिक एकता हा तर्कमूलक सिद्धान्त असून, त्याचे विवेचन वेदान्तदर्शनात विस्ताराने केले आहे.

(२) ध्यान- धारणा-समाधी यांच्या द्वारा, या सर्वत्र अनुस्यूत असलेल्या एकतेचा मूलाधार जो परमात्मा, त्याचा साक्षात् अनुभव. हा व्यावहारिक सिद्धान्त असून, योगदर्शनात त्याचे निरूपण केलेले आहे.

या नामरूपात्मक व प्रतिक्षणी बदलणाऱ्या सृष्टीच्या मुळाशी असणारी ही आध्यात्मिक एकता प्राचीन वैदिक ऋषींनी अनुभवाने जाणली व पुढे दर्शनकारांनी तर्कशुद्ध व सप्रमाण विवेचन करून तिची प्रतिष्ठा केली. परिवर्तनशील

अशा ब्रह्मांडाच्या आतबाहेर ज्याप्रमाणे अपरिवर्तनशील असे एक तत्त्व विद्यमान आहे, त्याचप्रमाणे ते पिंडाच्या आतबाहेरही आहे. ते एकच तत्त्व पिंड-ब्रह्मांडांचे नियामकही आहे. पिंड-ब्रह्मांडांत ओतप्रोत असलेल्या या एकमेव आत्मतत्त्वाचा साक्षात्कार करून घेणे, हेच या मानवी जीवनाचे अंतिम साध्य होय, असे उपनिषदे सांगतात. हा साक्षात्कार कोणत्या उपायांनी करून घ्यावा, ते पुढील श्लोकांत सांगितले आहे —

**श्रोतव्यः श्रुतिवाक्येभ्यो मन्तव्यश्चोपपत्तिभिः ।**
**मत्वा तु सततं ध्येय एते दर्शनहेतवः ।।**

अर्थ– आत्म्याचे श्रवण श्रुतिवाक्यातून करावे, मनन तार्किक युक्तींच्या आधारे करावे आणि निदिध्यासन योगप्रतिपादित ध्यानादी उपायांच्या द्वारे करावे. आत्मदर्शनाचे हे तीन उपाय होत.

वरील तीन्ही उपायांचे स्पष्टीकरण दर्शनांनी पुढीलप्रमाणे केलें आहे—

(१) श्रवण – श्रुतिवाक्यांच्या आधारे आत्म्याचे शाब्दज्ञान करून घेणे, हे पहिले साधन होय. श्रुतींमध्ये आत्मनिष्ठ व ब्रह्मवेत्त्या पुरुषांचे आध्यात्मिक अनुभव ग्रथित झालेले आहेत. त्यांवरून साधकाला आत्मस्वरूपाचे ज्ञान होते.

(२) मनन – मनन हे आत्मानुभवाचे दुसरे साधन आहे. दर्शनांनी प्रमेय अशा आत्म्याच्या सिद्धीसाठी आपापल्या मतानुसार प्रमाणे व त्यांच्या पद्धती यांचे विवेचन केले आहे. प्रमाणमीमांसा ही मननाला अतीव उपयुक्त असल्यामुळे दर्शनात तिला बरेच महत्त्व दिले गेले आहे.

(३) निदिध्यासन – आत्मसाक्षात्काराचे निदिध्यासन (ध्यानधारणादी) हे तिसरे साधन होय. याचे निरूपण योगदर्शनात केले आहे. ध्यान-धारणादिकांच्या द्वारे जोवर आत्म्याचा अनुभव घडत नाही, तोवर पहिले दोन उपाय निरुपयोगी ठरतात. दिक्कालांनी अनवच्छिन्न, शांत व तेजःस्वरूप अशा परमात्म्याच्या सत्तेचे श्रेष्ठ प्रमाण म्हणजे आपला स्वतःचा अनुभव हे होय. म्हणूनच भर्तृहरीने त्या परमात्म्याला किंवा ब्रह्माला 'स्वानुभूत्येकमानम्' = स्वानुभूती हे एकच ज्याचे प्रमाण आहे, असे म्हटले आहे.

**इतिहास** – भारतीय दर्शनांचा इतिहास पुढील चार कालखंडांत विभागता येतो–

(१) वैदिक काल – हा काल संहितांपासून उपनिषदांपर्यंतचा आहे. या कालात ऋग्वेद व अथर्ववेद या संहितांमधून दार्शनिक सिद्धान्तांची जी मूल तत्त्वे प्रकट झाली, त्यांचा ब्राह्मणे व आरण्यके या ग्रंथांत अधिक ऊहापोह झाला व उपनिषदांनी त्यांच्या विकासाला आणखी हातभार लावला.

(२) वेदोत्तर काल – या कालात चार्वाक, जैन, बौद्ध, इ. वेदविरोधी दर्शने निर्माण झाली.

(३) सूत्रकाल– सनपूर्व ४५० ते २५० एवढ्या कालाला सूत्रकाल म्हणता येईल. या कालामध्ये उपनिषदांत आलेल्या तत्त्वांचे ग्रहण करून दार्शनिक मुनींनी आपापल्या भिन्न भिन्न मतांची स्थापना केली. न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, मीमांसा व वेदान्त या दर्शनांच्या मूल सूत्रांची रचना याच कालखंडात झाली.

(४) भाष्यकाल– इ. स. २०० ते १४५० एवढी मोठी या कालखंडाची व्याप्ती आहे. सूत्रे ही अल्पाक्षर व साररूप असल्यामुळे या काळात ती दुर्बोध होऊ लागली. अशी परिस्थिती निर्माण झाल्यांवर त्या त्या दर्शनांच्या सूत्रांवर भाष्ये, वार्तिके व टीका या ग्रंथांची रचना झाली. शबर, कुमारिल, वात्स्यायन, प्रशस्तपाद, शंकर, रामानुज, वाचस्पती व उदयन हे या कालखंडातील महान दार्शनिक भाष्यकार होत. यांनी आपल्या भाष्यादिकांच्या द्वारे पूर्वाचार्यांच्या मतातले रहस्य तर उलगडून दाखवलेच; शिवाय आपापल्या स्वतंत्र मतांचीही स्थापना केली. युक्तिवादाच्या आधारावर प्रतिपक्षाच्या मतांचे खंडन करून आपले मत प्रस्थापित करणे, हे प्रस्तुत कालखंडाचे वैशिष्ट्यच म्हणावे लागेल.

**दर्शनांचा विकास** – सत्य काय आहे ते शोधून काढणे याविषयी भारतीय तत्त्वचिंतकांचे प्रयत्न प्राचीन काळापासूनच चालू असलेले दिसून येतात. भारतीय द्रष्टयांनी सत्याच्या उपलब्धीचे विभिन्न मार्ग शोधून काढले आहेत. ऋग्वेदकालापासूनच भारतीय विचारविश्वात प्रज्ञामूलक व तर्कमूलक अशा दोन प्रवृत्ती दिसून येतात. या उभय प्रवृत्तींच्या परस्परसंमीलनातून औपनिषदिक तत्त्वज्ञानाचा जन्म झाला आणि आत्मा व परमात्मा यांचे ऐक्य सिद्ध करणाऱ्या प्रज्ञामूलक वेदान्तात त्याचे पर्यवसान झाले. शुद्ध तर्कमूलक तत्त्वज्ञानातून पुढे प्रकृति-पुरुषांचे द्वैत मानणारी सांख्य व योग ही दर्शने आणि बहुत्ववादी न्याय-वैशेषिक ही दर्शनें तयार झाली. काही दार्शनिकांनी वेदांशी असलेले आपले नाते तोडले आणि ते स्वतंत्र तर्कबुद्धीने तत्त्वांची समीक्षा करू लागले. त्यातूनच जैनांचा स्याद्वाद, बौद्धांचा शून्यवाद व विज्ञानवाद आणि चार्वाकांचा भूतात्मवाद हे दार्शनिक वाद उत्पन्न झाले.

भारतातले विविध दार्शनिक संप्रदाय उपनिषद्वाङ्मयातूनच जन्म पावले आहेत. औपनिषदिक तत्त्वज्ञानाचे पर्यवसान म्हणजे 'तत्त्वमसि' हे महावाक्य होय. या महावाक्याच्या द्वारे उपनिषदांतल्या ऋषींनी उद्घोषित केले, की 'तत् = ब्रह्म व त्वं = जीव या दोन पदार्थांमध्ये नितांत ऐक्य आहे. पण

'तत्त्वमसि' या महावाक्यातील जीवब्रह्मैक्याचा साक्षात्कार कशा प्रकारे करून घ्यावा, असा प्रश्न निर्माण झाला. काही दार्शनिक म्हणू लागले, की पुरुष व प्रकृती (जीव व भौतिक जगत) हे दोन्ही पदार्थ भिन्न गुणधर्मांचे आहेत. त्यांचे ते गुण यथार्थपणे न समजल्यामुळे ही नामरूपात्मक सृष्टी भासते. प्रकृतिपुरुषांचे यथार्थ ज्ञान झाल्यानेच तत् व त्वं यांचे ऐक्य सिद्ध होऊ शकेल. या ज्ञानाला त्यांनी सम्यक ख्याती असे नाव दिले. या ख्यातीचे प्रतिपादन करणाऱ्या दर्शनाला सांख्यदर्शन असे नाव प्राप्त झाले. पण सम्यक ख्यातीने होणारा हा ऐक्याचा साक्षात्कार केवळ बौद्धिक होय. तेवढ्याने भागत नाही. जे बुद्धीने कळले ते प्रत्यक्ष अनुभवाला आले पाहिजे. ते कसे आणायचे, याविषयी पुढे विचार सुरू झाला. या आनुभविक साक्षात्काराची गरज पुरी करण्यासाठी योग-दर्शनाचा जन्म झाला. अशा प्रकारे सांख्य व योग ही एकाच तत्त्वज्ञानाची बौद्धिक व व्यावहारिक अशी दोन अंगे ठरली आहेत.

सांख्यांनी ज्या जीव आणि जगत या पदार्थांचे विवेचन केले, त्यांचे गुण तरी काय आहेत, ते पाहण्याची व त्यांची समीक्षा करण्याची आवश्यकता त्यापुढे उत्पन्न झाली. या गुणविवेचना-तून वैशेषिक दर्शन उगम पावले. पण ज्ञानप्राप्तीची साधने तावून सुलाखून घेतलेली नसतील, तर त्यांच्या आधारे होणारे वस्तूच्या रूपाचे ज्ञान हे अयथार्थ ठरते. म्हणून मग प्रत्यक्ष, अनुमान, इ. प्रमाणांची शास्त्रीय चिकित्सा सुरू झाली. त्यातूनच न्यायदर्शनाचा जन्म झाला. पण तेवढ्यानेही भागले नाही. न्यायदर्शनात प्रमाणांचे तर्कशुद्ध विवेचन झाले खरे; पण केवळ शुष्क तर्काच्या आधारे आत्मतत्त्वाचा साक्षात्कार होऊ शकत नाही, असे जिज्ञासूंना कळून चुकले. त्यासाठी मग दार्शनिक विचारवंतांनी पुन्हा श्रुतीकडे नजर वळवली आणि वेदांतल्या कर्मकांडाचा ऊहापोह सुरू केला. त्याचेच फलित म्हणून मीमांसा-दर्शन जन्म पावले. पण मानवाच्या आध्यात्मिक प्रवृत्ती केवळ कर्मकांडाच्या आचरणाने समाधान पावेनात. कित्येक विचारवंत म्हणू लागले, की यज्ञादी कर्मकांड ही फुटकी नौका आहे; हिच्यात बसून आपल्याला भवसागराचे पैलतीर कसे गाठता येणार? अतएव विश्वप्रपंचातून तरून जायचे असेल, तर ज्ञानाचीच कास धरायला हवी. अशा लोकांनी मग ज्ञानमीमांसा सुरू केली. या मीमांसेचे पर्यवसान वेदान्तदर्शनाच्या उभारणीत झाले. तात्पर्य हे, की उपनिषदातल्या 'तत्त्वमसि' या एका महावाक्याची यथार्थ व्याख्या करण्यासाठी वरील सर्व दर्शनांनी आपापले प्रासाद उभे केले.

वरील विकासक्रम श्री. बलदेव उपाध्याय यांनी मांडला असून, तो इतिहासाच्या आधारे नव्हे; तर तर्ककल्पनेने मांडला असल्याचे लिहिले आहे.

जैन व बौद्ध या दर्शनांचाही याच संदर्भात विचार करायला हवा. ही दोन्ही दर्शने वेदप्रामाण्य मानीत नसली, तरी त्यांना उपनिषदांच्या परंपरेतून बाहेर टाकणे युक्त ठरणार नाही. औपनिषदिक परंपरेला किंवा विचारधारेला रोखून धरणारी अशी ही स्वतंत्र दर्शने नाहीत. त्यांचा उगम हा परिस्थितिजन्य आहे. वैदिक परंपरेत कर्मांचे जे अवडंबर निर्माण झाले आणि ज्या अनेक भलत्यासलत्या गोष्टी शिरल्या, त्यांचे निराकरण करण्यासाठी या दर्शनांचा जन्म आहे. ज्ञानावाचून मुक्ती नाही, हा सिद्धान्त बुद्धालाही मान्य आहे; पण आचारशुद्धीवाचून नुसत्या कोरड्या ज्ञानाने मनुष्याला मुक्तिलाभ होणे शक्य नाही, हे जाणून त्याने आचारमार्गावर विशेष जोर दिला आहे.

जैन दर्शनातही आचाराला महत्त्वाचे स्थान आहे. आचार-विषयक समस्या सोडविण्यासाठी जैनांनी आपले एक निराळे तत्त्वज्ञान निर्माण केले. सत्य हे सापेक्ष असते, हा जैन दर्शनाचा सिद्धान्त होय. जैन आचार्य म्हणतात, की सत्याचा शोध करण्यासाठी निघालेल्या सर्व दर्शनांना शेवटी सत्याचा काही अंश सापडला; संपूर्ण सत्य काही गवसले नाही. केवळ जैन दर्शन तेवढे नय आणि स्याद्वाद यांच्या रूपाने सत्याच्या समग्र स्वरूपाचे विवेचन करण्यात यशस्वी ठरले आहे. इतर दर्शने विकलादेश असून, जैन दर्शनच तेवढे सकलादेश आहे. वस्तुतत्त्व हे नानात्मक असल्यामुळे जैनांनी आपल्या सिद्धान्ताला अनेकान्तवाद असे नाव दिले. जैनांचा समस्त आचारमार्ग या अनेकान्तवादावरच आधारलेला आहे.

**आगमिक दर्शने** —— तंत्रांनाच आगम असे म्हणतात. जीवनातले भोग आणि मोक्ष हे दोन्ही पुरुषार्थ साधून घेण्याचे उपाय आगमात सांगितलेले आहेत. कर्म, उपासना व ज्ञान यांचे स्वरूप सांगणारे ते निगम व त्यांचे साधनीभूत उपाय सांगणारे ते आगम असा त्या दोहोंमधला भेद सांगितलेला आहे. सृष्टी, प्रलय, देवतार्चन, सर्वसाधन, पुरश्चरण, षट्कर्मसाधन व ध्यानयोग या सात लक्षणांनी युक्त असलेल्या ग्रंथांना आगम म्हणावे, असे त्यांचे लक्षण वाराही तंत्रात सांगितले आहे. आगमांतही वैदिक व अवैदिक असे दोन भेद आहेत. बौद्धादी आगम हे अवैदिक असून शैव, शाक्त व पांचरात्र (वैष्णव) हे आगम वेदबाह्य असले तरी वेदानुकूल आहेत.

पाशुपत, शैव, कालामुख व कापालिक हे चार संप्रदाय माहेश्वर म्हणून ओळखले जातात. त्यांच्या धार्मिक व तात्त्विक सिद्धांतांच्या मूल ग्रंथांना शैवागम म्हणतात. द्वैत, अद्वैत व द्वैताद्वैत अशी तीन्ही मते शैवागमात आढळतात.

जीवात्म्याची परमात्म्याशी अभेदसिद्धी हे शाक्त आगमांचे प्रतिपाद्य आहे. शाक्त दर्शन हे प्रामुख्याने अद्वैतवादाचा साधन-मार्ग सांगण्यासाठी आहे. शाक्तांच्या सात आचारांपैकी एक कामाचार सोडल्यास बाकीचे आचार वेदमूलकच आहेत.

पांचरात्र आगम हा सर्व वैष्णव आगमांचा प्रतिनिधीच मानलेला आहे. हा आगम उपनिषत्कालात विद्यमान होता, असे दिसते. महाभारताहून तो प्राचीन आहे, एवढे तरी मानावेच लागते. समस्त वैष्णव आगमांनी भगवान विष्णू ह्याच उपेय व उपायही मानलेला आहे. या आगमाचा शरणागतीच्या तत्त्वावर विशेष भर आहे. पांचरात्र आगमाचे मूल सिद्धांत श्रुतिप्रतिपादितच आहेत. शतपथ ब्राह्मणात पांचरात्र सत्राचे वर्णन आलेले आहे (श. ब्रा. १३.६.१). रात्र शब्दाचा अर्थ वैष्णव आगमात ज्ञान असा केलेला आहे. परम तत्त्व, मुक्ती, भुक्ती, योग व संसार या पाच विषयांचे ज्ञान सांगितलेले असल्यामुळे त्या आगमाला पांचरात्र असे नाव मिळाले आहे. पांचरात्र आगम हा जीव–ब्रह्माचे ऐक्य प्रतिपादन करतो; पण तो अद्वैत्यांचा विवर्तवाद मात्र स्वीकारीत नाही. सांख्य, योग, इ. अन्य दर्शनांनी सांगितलेल्या परिणामवादाचा तो पुरस्कर्ता आहे.

उपनिषदांच्या नंतर त्यांतील सिद्धान्तांचा ऊहापोह भिन्न-भिन्न दृष्टिकोणातून विशेष प्रमाणात होऊ लागला. त्यातूनच पुढे त्या त्या दर्शनांची सूत्रे निर्माण झाली. ही सूत्रे त्या त्या दर्शनांचे मूलग्रंथ मानले जातात. त्यात स्वमतस्थापनेबरोबरच परमताचे खंडनही आढळून येते. या दर्शनांपैकी न्यायसूत्रे गौतमाने, वैशेषिकसूत्रे कणादाने, सांख्यसूत्रे कपिलाने, योगसूत्रे पतंजलीने, मीमांसासूत्रे जैमिनीने व वेदान्तसूत्रे बादरायण व्यासाने रचली. असे असले, तरी हे सूत्रकार त्या त्या दर्शनाचे मूलप्रवर्तक मात्र नव्हेत. सूत्ररचनेच्या पूर्वी कित्येक शतके त्या त्या दर्शनांच्या सिद्धान्तांची उत्पत्ती झालेली होती.

भारतीय दर्शनांचे एक वैशिष्ट्य असे, की ती व्यावहारिक उद्देशाने निर्माण झाली आहेत. त्यांची आकांक्षा मानवाला इहजन्मी श्रेयोलाभ करून देण्याची आहे. वर्तमान आधि-व्याधिमय जीवनाविषयी असंतोष आणि सुखमय व आनंदमय अशा भविष्याची कल्पना, यांतूनच विचारशास्त्र निर्माण होत असते. भारतीय दर्शनांचे सर्व संप्रदाय याच एका उद्देशाने विचारप्रवण झाले आहेत. बुद्धाने जी चार आर्यसत्ये आपल्या समाधिस्थितीत शोधून काढली, तीच या ना त्या स्वरूपाने सर्व दर्शनांनी विवेचिली आहेत. व्यासांनीही अध्यात्मशास्त्राला चिकित्साशास्त्राप्रमाणे चतुर्व्यूहच मानले आहे–

यथा चिकित्साशास्त्रं चतुर्व्यूहम् – रोगो रोगहेतुः आरोग्यं भैषज्यमिति । एवमिदमपि शास्त्रं चतुर्व्यूहम् । तद्यथा संसारः संसारहेतुः मोक्षो मोक्षोपाय इति । (व्यासभाष्य २.१५)

अर्थ – चिकित्साशास्त्र हे चतुर्व्यूह आहे. रोग, रोगहेतू, आरोग्य व औषध हे ते चार व्यूह होत. अध्यात्मशास्त्रही याचप्रमाणे चतुर्व्यूह आहे. संसार, संसारहेतू, मोक्ष व मोक्षोपाय हे ते चार व्यूह होत.

पातंजल योगसूत्रातही याच प्रकारचे मत मांडले आहे.

भारतीय संस्कृतीने धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे मानवाचे चार पुरुषार्थ मानले आहेत. मोक्ष हा त्यांतला शेवटचा व सर्वश्रेष्ठ होय. प्राधान्येकरून सर्व दर्शनांनी या मोक्षाचाच विचार केलेला आहे. दर्शनरूपी कल्पवृक्षाचे मोक्ष हेच अमृत-फल आहे. हा मोक्ष मिळवण्याचे एकमेव साधन म्हणजे ज्ञान होय. 'ऋते ज्ञानान्न मुक्तिः' = ज्ञानावाचून मोक्ष नाही, हा सर्व दर्शनांचा एकमुखी उद्घोष आहे. मोक्षाच्या विषयात सर्वसामान्य समजूत अशी, की मोक्ष ही मरणोत्तर प्राप्त होणारी गोष्ट आहे; पण वस्तुस्थिती तशी नाही. बहुतेक दर्शनांनी मानवाला 'याची देही' मुक्तिलाभ होऊ शकतो, असे स्पष्टपणे सांगितले आहे. किंबहुना जीवन्मुक्ती हेच बहुतेक दर्शनांचे अंतिम साध्य आहे. जीवन्मुक्तीची कल्पना ही उपनिषदांनी दिलेली एक बहुमोल देणगी आहे. जीवन्मुक्ती केव्हा लाभते, याविषयी कठोपनिषद म्हणते–

यदा सर्वे विमुच्यन्ते कामा ह्यस्य हृदि स्थिताः ।
तदा मर्त्योऽमृतो भवत्यथ ब्रह्म समश्नुते ।।

(कठोपनिषद २.३.१४)

अर्थ – साधकाच्या हृदयातल्या कामना जेव्हा समूळ नष्ट होतात, तेव्हा मनुष्य हा अमर होतो व याच जन्मात त्याला ब्रह्मानुभव प्राप्त होतो (म्हणजे तो जीवन्मुक्त होतो).

दुःखनिवृत्तीसाठी कोणत्या तरी काल्पनिक परलोकाच्या मागे लागणे हे मानवी जीवनाचे ध्येय नाही. वर्तमान जीवनातच दुःखनिवृत्ती करून ब्रह्मभावाला प्राप्त होणे, अर्थात मुक्त होणे हे खरे ध्येय आहे. मोक्षाच्या या ध्येयाविषयी दार्शनिकांत मतैक्य असले, तरी त्याच्या स्वरूपाच्या संबंधात मात्र बरेच मतभेद आहेत. न्याय-वैशेषिक या दर्शनांत मोक्षावस्था ही केवळ दुःखनिवृत्ति मात्र असल्याचे मानले आहे, तर मीमांसा, वेदान्त, जैन व महायान बौद्ध यांनी मोक्षावस्थेत दुःख निवृत्तीबरोबरच आनंदाचीही उपलब्धी होते, असे सांगितले आहे.

मोक्षाच्या प्राप्तीसाठी विभिन्न दर्शनांनी विभिन्न मार्ग सुचविले आहेत. बहुतेक दार्शनिकांनी असे मानले आहे, की तर्काच्या द्वारे सिद्ध केलेले दार्शनिक सिद्धान्त केवळ ते समजले एवढ्यानेच अज्ञाननिवृत्ती होऊ शकत नाही. त्यासाठी ते तर्कगम्य सिद्धान्त मनन आणि निदिध्यास या साधनांच्या रूपाने अंत-

रात दृढपणे ठसवले पाहिजेत. आपल्या सांसारिक जीवनावर अविद्या व रागद्वेष यांचे इतके गाढ तमःपटल असते, की ज्ञान-तत्त्वाचे निरंतर चिंतन–मनन केल्यावाचून ते दूर होऊच शकत नाही. बहुतेक दर्शनांनी या गोष्टीवर अर्थात मोक्षाच्या या साधनमार्गावर विशेष भर दिला आहे.

भारतीय दर्शने भिन्न भिन्न दृष्टिकोनातून अंतिम तत्त्वाचा विचार करतांना दिसतात. पण त्यांच्यामध्ये तात्त्विक मतभेद पुष्कळ असले, तरी त्यावरोबरच एक प्रकारचे सामंजस्यही आढळून येते. त्यामुळे हे सर्व संप्रदाय एकमेकांना मारक न होता पूरकच ठरले आहेत. पाहा – तत्त्वज्ञान. [ भा. द. – उपाध्याय; भा. द. –मिश्र; भा. त. वि.; स. द. सं.–अभ्यंकर. ]

**दर्शनोपनिषद** एक नव्य उपनिषद. याचा सामवेदाशी संबंध आहे. दत्तात्रेय महायोगी आणि त्याचा शिष्य सांकृती यांच्या संवादातून हे उपनिषद विस्तारले आहे. याचे दहा खंड असून, यात अष्टांग योगाचे विवेचन आहे. पहिल्या खंडात यम-नियमादी योगाची अष्टांगे सांगून, पहिले अंग जे यम त्याची तपशीलवार व्याख्या दिली आहे. दुसऱ्या खंडात नियमांचे, तिसऱ्यात आसनांचे, चौथ्यात प्राणायामाचे, अशा रीतीने दहा खंडांत समाधीपर्यंतच्या सर्व योगांगांचे व्याख्यापूर्वक विवेचन केलेले आहे. अष्टांग योगाचा अभ्यास पूर्ण झाल्यावर तो योगी ब्रह्ममात्र अवशिष्ट उरतो, असे सांगितले आहे. त्या वेळी त्याला जो अनुभव येतो, तो पुढील श्लोकांत (१०.६–७) वर्णिला आहे —

सोऽहं ब्रह्म न संसारी न मत्तोऽन्यः कदाचन।
यथा फेनतरङ्गादि समुद्रादुत्थितं पुनः॥
समुद्रे लीयते तद्वज्जगन्मय्यनुलीयते।
तस्मान्मनः पृथङ् नास्ति जगन्माया च नास्ति हि॥

अर्थ – तो मी ब्रह्म आहे. मी संसारी नाही. माझ्याहून दुसरा कोणी नाही. ज्याप्रमाणे सागरपृष्ठावर उठलेले फेनतरंगादी पदार्थ परत समुद्रात विलीन होतात, त्याप्रमाणे जग माझ्या ठिकाणी अनुलीन होते. म्हणून मजहून वेगळी मन नावाची वस्तू नाही; जग नाही आणि मायाही नाही.

अशा प्रकारे दत्तात्रेय महायोग्याने योगविद्येचा उपदेश केल्यानंतर सांकृती स्वस्वरूपी स्थित झाला. [ दि योग उपनिषदाज ]

**दर्शपूर्णमास** एक याग. दर्श = अमावस्या + पूर्णमास = पौर्णिमा. या दोन पर्वांच्या ठिकाणी करायच्या यागाला दर्शपूर्णमास असे म्हणतात. पर्वदिवशी यागाला प्रारंभ करून दुसऱ्या दिवशी प्रधानयाग करतात. दर्श व पूर्णमास या दोन इष्टी आहेत. ज्या यागात सोम किंवा पशू यांच्या व्यतिरिक्त हविर्द्रव्य असते, त्याला इष्टी म्हणतात. अग्निहोत्र्याच्या घरी असलेल्या श्रौताग्नींवरच ही इष्टी करतात. इष्टीसाठी अध्वर्यू, ब्रह्मा, होता आणि आग्नीध्र असे चारच ऋत्विज लागतात. अग्निहोत्र ज्याने घेतले नसेल, अशा गृहस्थानेही आपल्या औपासन अग्नीवर पर्वदिवशी त्या त्या देवतांसाठी होम करायचा असतो.

इष्टी या शब्दाने उल्लेखिलेल्या सर्व यागांची दर्शपूर्णमास ही प्रकृती आहे. ज्याने अग्निहोत्र घेतले असेल, अशा यजमानाला प्रत्येक अमावस्या–पौर्णिमेस ही इष्टी करावी लागते. हे अनुष्ठान यावज्जीव किंवा तीस वर्षे किंवा अतिवार्धक्य येईपर्यंत करावे, असे आपस्तंब श्रौतसूत्रात (३.१४.११–१३) सांगितले आहे.

या दोन्ही इष्टींचे सर्व कर्म बहुतांशी सारखेच असते. त्यामुळे यांचा उल्लेख नेहमी एकत्र येतो – 'दर्शपूर्णमासाभ्यां स्वर्गकामो यजेत' = ज्याला स्वर्गाची कामना असेल, त्याने दर्शपूर्णमास इष्टीने यजन करावे. दर्श किंवा पौर्णिमा या दोन दिवसांना पर्व असे म्हणतात. पर्वदिवशी प्रथम यजमान क्षौर करतो, मग स्नान करून इष्टीचा संकल्प करतो आणि चार ऋत्विजांची नियुक्ती (वरण) करतो. या इष्टीचा विधी असा-

गार्हपत्य अग्नीतून आहवनीय व दक्षिणाग्नी यांच्या कुंडांत अग्नी आणतात. याला उद्धरण करणे, असे म्हणतात. नंतर या तीनही अग्नींचे अन्वाधान ( = अग्नी प्रज्वलित करणे ) करतात. तीन्ही अग्नी नित्य धारण केलेले असतील, तर उद्धरण करावे लागत नाही.

दर्शेष्टीमध्ये सांनाय्य हा हवी असेल, तर अन्वाधानानंतर पळसाची अथवा शमीची फांदी आणून तिने सहा वासरांना गायींपासून दूर करतात व गायींना चरायला सोडून देतात. मग दुसऱ्या दिवशीच्या यागासाठी लागणारे दर्भ व समिधा (इध्मा–बर्ही) आणून ठेवतात. २१ समिधांचा इध्मा करतात. इध्म्यामध्ये पळस किंवा खैर या झाडाच्या समिधा असतात. त्यांपैकी पंधरा सामिधेनी ऋचा म्हणताना अग्नीवर देण्यासाठी, दोन तीन अग्नीभोवती ठेवण्यासाठी (यांना परिधी म्हणतात), दोन आघारांच्या वेळी अग्नीमध्ये ठेवण्यासाठी व एक अनुयाजांच्या वेळी देण्यासाठी असतात. एका मुठीत जितके दर्भ राहतात, त्यांना मुष्टी म्हणतात. अशा तीन किंवा पाच मुष्टी तोडून आणून त्यांच्या बर्ही करतात. एका दर्भाच्या मुष्टीचा आकार वासराच्या पायासारखा करतात व त्या दर्भांची अग्रे तोडतात. याला वेद असे नाव आहे. वेदी झाडण्यासाठी या वेदाचा केरसुणीसारखा उपयोग करतात. कोणत्याही विधीच्या वेळी मंत्र म्हणताना वेद

यजमानपत्नीच्या हातात देतात. यांना वेदपरिवासन म्हणतात. यजमान सोमयाजी असेल, तर दर्शेष्टींमध्ये इंद्र अथवा महेंद्र ही देवता असते व त्या देवतेला सांनाय्य ( दूध व दही ) हा हवी असतो. सांनाय्य हा हवी असेल, तर दुसऱ्या दिवशी लागणारे दही तयार करण्यासाठी अमावस्येच्या दिवशी सायं-काळच्या होमानंतर सायं दोह नावाचा एक विधी करतात. त्यासाठी सकाळी चरायला सोडलेल्या गायी घरी आल्यानंतर त्यांची धार काढून ते दूध गार्हपत्यावर तापवतात. मग त्यात विरजण घालतात. गायींची धार काढण्यापासून तो विरजण लावण्यापर्यंतची सर्व कर्मे समंत्रक करायची असतात. अग्निहोत्र होमाच्या हविर्द्रव्यातील थोडा अंशही त्यात मिसळतात व हें भांडे उंचावर ठेवून देतात. अमावस्येच्या दिवशी दुपारी पिंड-पितृयज्ञ करतात ( पिंडपितृयज्ञ पाहा ). पूर्णमासेष्टीत तो करीत नाहीत. तसेच पूर्णमासेष्टीत सांनाय्य नसल्यामुळे सायंदोहही करावा लागत नाही. अमावस्या व पौर्णिमा या दोन्ही दिवशी यजमान दंपतीने व्रतस्थ राहायचे असते. अमावस्येच्या रात्री तर झोपही वर्ज्य सांगितली आहे. प्रधान याग दुसऱ्या दिवशी होत असल्यामुळे या दिवसास उपवसथ दिवस म्हणतात.

दुसऱ्या दिवशी सकाळी रोजचा अग्निहोत्र होम झाल्यावर इष्टीच्या अनुष्ठानास प्रारंभ करतात. त्यासाठी गार्हपत्याच्या उत्तरेस आवश्यक अशा यज्ञपात्रांची मांडणी करतात. इष्टीला सामान्यपणे तीस पात्रे लागतात. त्यानंतर ब्रह्म्याचे समंत्रक वरण करतात. एका चमसात पाणी घेऊन त्याचे उत्पवन (दर्भाच्या साहाय्याने ते तीन वेळा वर उडवणे ) करतात. मग ते पात्र आहवनीयाच्या उत्तरेस दर्भावर नेऊन ठेवतात. या पात्रातील पाण्याला प्रणीता असे म्हणतात. हवी तयार करताना प्रणीतेतील पाण्याचा उपयोग करतात.

पूर्णमासेष्टीमध्ये अग्नी व अग्नीषोम या प्रधान देवता असतात आणि प्रजापती किंवा विष्णू ही उपांशू देवता असते. उपांशू देवतेला आज्य (तूप) हे हविर्द्रव्य असते. वैमृध इंद्रासाठी पौर्णिमेच्या दिवशी स्वतंत्र इष्टी सांगितली आहे; पण सामान्यपणे ती पूर्णमासेष्टीबरोबरच करतात. म्हणजेच प्रधान देवतांबरोबर याही देवतेचा समावेश करतात. या देवतेला पुरोडाश हा हवी असतो. दर्शेष्टीमध्ये अग्नी व इंद्राग्नी या प्रधान देवता असतात. यजमान सोमयाजी असेल, तर इंद्राग्नीऐवजी इंद्र अथवा महेंद्र ही देवता घेण्यास सांगितले आहे. पुरोडाश भात किंवा यव यांच्या रव्यापासून करतात. पुरोडाशाकरिता प्रत्येक देवतेसाठी चार चार मुठी भात किंवा यव शकटावरच्या पोत्यातून घेतात: ते भात गार्हपत्याजवळ आणून त्याचे प्रोक्षण करतात. त्याच वेळी इतर पात्रांचेही प्रोक्षण करतात. उत्कराच्या ( दर्भाचे तुकडे टाकायची जागा ) पाठीमागे कृष्णाजिन पसरून त्यावर उखळ मांडतात. या उखळात ते भात कांडतात. प्रथम आग्नीध्र, नंतर यजमानपत्नी व नंतर आणखी कोणीतरी असे तिघे ते भात कांडतात. अशा प्रकारे तिसड करून ते तांदूळ पाखडतात व धुतात. पाखडताना पुढे आलेला कोंडा व तांदूळ धुवून आलेले धुवण हे राक्षसांना देतात. मग त्याच कृष्णाजिनावर पाटा मांडून त्यावर यजमानपत्नी ते तांदूळ वाटते. ज्या अग्नीवर हवी तयार करायचा, त्या अग्नीत कपाले ( खापरांचे तुकडे ) मांडतात. अग्नीसाठी आठ कपालांवर तसेच अग्नीषोम, इंद्राग्नी आणि इंद्रवैमृध यांच्यासाठी अकरा कपालांवर पुरोडाश भाजतात. कपाले मांडून झाल्यावर दर्शेष्टी असल्यास आदल्या दिवशीप्रमाणे सहा गायींची धार काढतात व ते दूध गार्हपत्यावर तापत ठेवतात. याला प्रातर्दोह असे म्हणतात. यानंतर अध्वर्यू तांदुळाचे पीठ कढत पाण्यात मिसळून त्यापासून पुरोडाश तयार करतो. तो सामान्यपणे घोड्याच्या टापेएवढा व कासवासारखा असतो. त्या त्या देवतेचे पुरोडाश कपालांवर ठेवून ते नीट भाजतात.

आहवनीयाच्या मागे यजमानाच्या उंचीइतकी लांब व दोन, तीन किंवा चार बोटे खोल अशी वेदी तयार करतात. आहवनीय व गार्हपत्य या अग्नींच्या मध्ये असल्यामुळे तिला अंतर्वेदी म्हणतात. ही वेदी दर्शेष्टीमध्ये आदल्या दिवशी करायची असते. या वेदीत जे दर्भाचे तुकडे असतात, ते मग यजुर्वेदातील मंत्र म्हणून उत्करावर टाकतात. याला स्तंबयजुर्हरण असे नाव आहे. यजमानपत्नी योक्त्र (मुंजाची दोरी) कमरेला बांधते. मग ती गार्हपत्य व देवपत्नी यांचे उपस्थान करते. आज्य दक्षिणाग्नीजवळ घेतात आणि तिला दाखवतात. नंतर ते आज्य, गार्हपत्य व आहवनीय यांच्यावर तापवून वेदीत ठेवतात. अध्वर्यू आणि यजमान आज्यावेक्षण (तुपात स्वतःचे प्रतिबिंब पाहणे) करतात. इध्मा–बर्हींचे प्रोक्षण करतात. स्रुचा वेदाने पुसून तिच्यात आज्य भरून घेतात. अंतर्वेदीत बर्ही पसरून त्यावर आज्याने भरलेल्या स्रुचा ठेवतात. मग अग्नीवर भाजण्यास ठेवलेले पुरोडाश एका पात्रीमध्ये (विशिष्ट पात्र) काढून घेतात. पुरोडाश व सांनाय्य यांवर तूप ओतून ते सर्व हवी अंतर्वेदीत आणून ठेवतात. मग काही मंत्र म्हणून यजमान त्या हवींचे अभिमंत्रण करतो.

मग होता अध्वर्यूच्या मागे अंतर्वेदीत उजवा पाय ठेवून उभा राहतो. अध्वर्यूने प्रैष (आज्ञा) दिल्यावर तो सामिधेनी नावाच्या ऋचा एकश्रुतीने (उदात्त, अनुदात्त व स्वरित हे स्वर न दाखवता) म्हणतो. या ऋचा म्हटल्या जात असता अध्वर्यू

इध्म्यातील एकेक समिधा अग्नीवर देतो. यानंतर होता इष्टीतल्या देवतांचे आवाहन करतो. अध्वर्यू दोन आघाराहुती देतो. या आहुती आज्याने नैर्ऋत्येकडून ईशान्येकडे किंवा पश्चिमेकडून पूर्वेकडे अशी एक व वायव्येकडून आग्नेयीकडे किंवा दक्षिणेकडून उत्तरेकडे अशी दुसरी, अशा द्यायच्या असतात. मग यजमानाच्या गोत्रऋषींचा नामोच्चार करतात. जुहू व उपभृत अशा दोन स्रुचा घेऊन अध्वर्यू दक्षिणेकडे जातो आणि पूर्वादी चार दिशांना एकेक आणि मध्यभागी एक अशा प्रयाजसंज्ञक पाच तुपाच्या आहुती देतो. त्यानंतर आज्यभाग नावाच्या दोन आहुती देतात. अग्नीसाठी कुंडाच्या उत्तरार्धात व सोमासाठी दक्षिणार्धात दोन आहुती देतात. हे देवतांचे नेत्र असल्याचे सांगितल्यामुळे या आहुतींना चक्षुषी असेही म्हणतात.

या दोन आहुतींच्या मध्ये प्रधान देवतांचे हवन करतात. त्यासाठी जुहूमध्ये प्रथम आज्याने उपस्तरण करतात. त्यावर हवींमधून दोन वेळा अवदान (थोडा भाग) घेतात. त्यावर आज्याने अभिघार करतात म्हणजे ते चतुरवत्त होते. पंचावदानाचा पक्ष असेल तर हवीचे अवदान तीन वेळा घेतात. सांनाय्याचे अवदान घेताना दोन वेळा तापलेल्या दुधातून (प्रातर्दोह) व दोन वेळा दह्यातून (सायंदोह) अवदान घेतात. याप्रमाणे प्रत्येक देवतेसाठी सांगितलेल्या हवींचे अवदान घेऊन त्या त्या देवतेसाठी याग करतात. हवींचे अवदान घेत असता होता पुरोनुवाक्या नावाची ऋचा म्हणतो. अध्वर्यूने 'यज' असा प्रैष दिल्यावर याज्यासंज्ञक ऋचा म्हणून शेवटी वषट्कार उच्चारतो. त्या उच्चाराबरोबर अध्वर्यू आहुती देतो. उपांशू देवतेसाठी प्रधान यागही उपांशू करतात. प्रधान याग झाल्यावर सर्व हवींतून एकेक अवदान घेऊन स्विष्टकृत याग करतात. आधी दिलेल्या प्रधान आहुतीशी संयोग न होईल अशी स्विष्टकृताची आहुती देतात. त्यानंतर सर्व हवींतून अवदाने घेऊन ब्रह्मा व यजमान यांच्यासाठी हविर्भाग बाजूला काढतात. दुसऱ्या एका पात्रात सर्व हवींतून अवदाने घेऊन ते पात्र होत्याजवळ देतात. इडा नामक देवतेचे आवाहन करून सर्व ऋत्विज तो हविर्भाग भक्षण करतात. मग दक्षिणाग्नीवर अन्वाहार्य नावाचा चरू शिजवतात. त्यामुळे दक्षिणाग्नीला अन्वाहार्यपचन असेही नाव आहे. नंतर तो चरू अंतर्वेदीत ठेवतात व त्यावर आज्याने अभिघार करतात. दर्शपूर्णमास इष्टीची दक्षिणा म्हणजे हा अन्वाहार्य चरूच होय. सर्व ऋत्विज त्या दक्षिणेचा स्वीकार करतात.

मग उपभृतीमध्ये असलेले आज्य जुहूत ओतून घेतात. आग्नीध्र एक समिध आहवनीयावर देतो. अध्वर्यू त्या समिधेवर अनुयाजसंज्ञक तीन आज्याहुती देतो. होता सूक्तवाक नावाचे आशीर्वादमंत्र म्हणत असता अध्वर्यू प्रस्तर (एक दर्भमुष्टी) अग्नीवर पेटवतो. शंयुवाकाचे पठण झाल्यावर ऋत्विज शेष हवींचे भक्षण करतात. मग गार्हपत्यावर देवपत्नींसाठी पत्नीसंयाज नावाचा याग करतात. यजमानपत्नी या वेळी अध्वर्यूला अन्वारंभ (हाताला हात लावणे) करते. मग हवी तयार करताना निघालेला कोंडा व पिठाचा काही भाग यांचा दक्षिणाग्नीवर होम करतात. यानंतर यजमानपत्नी योक्त्र सोडते. अध्वर्यू आहवनीयावर प्रायश्चित्त होम करतो समिष्टयजुसंज्ञक आहुती दिल्यावर प्रणीता पात्रातील पाणी यजमानाच्या हातावर ओततो. मग यजमान विष्णुदेवतेचे मंत्र म्हणत तीन पावले चालतो. याला विष्णुक्रम असे म्हणतात. मग यजमान याग समाप्त करून ब्राह्मणांना भोजन घालतो.

दर्श-पूर्णमास इष्टीत देवतांसाठी पुरोडाशादी हवी तयार करणे, योग्य वेळी अग्नीत त्याच्या आहुती देणे वगैरे सर्व लहान मोठ्या गोष्टी मुख्यत्वे अध्वर्यूच करतो. ब्रह्मा साऱ्या यज्ञक्रियेवर देखरेख करून अध्वर्यूच्या क्रियेला अनुमोदन देण्याचे काम करतो. देवतांचे हविर्भाग पात्रात भरून घेताना, त्यांचा याग करताना किंवा अशाच काही विशिष्ट प्रसंगी होता हा मंत्र म्हणण्याचे काम करतो. आग्नीध्र हा चौथा ऋत्विज अध्वर्यूंच्या आज्ञेने काम करतो. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**दर्शश्राद्ध** दर्शाच्या दिवशी केले जाणारे श्राद्ध. हे श्राद्ध पितृत्रयी, मातृत्रयी, मातामहत्रयी व मातामहीत्रयी यांना उद्देशून करतात. याला पार्वणश्राद्ध असेही म्हणतात. पाहा – पिंडपितृयज्ञ; पार्वणश्राद्ध.

**दऱ्हा बोंगा** उराँव आदिवासींची एक देवता. ही भूतयोनीतली आहे. भातखाचरात, नदीकिनारी किंवा विहिरीजवळ हिचे वास्तव्य असते, अशी समजूत आहे. अशा जागी उराँव लोक हिचे प्रतीक म्हणून खांब पुरतात. ही देवता रोगराई उत्पन्न करते. दर तीन वर्षांनी एक बकरा किंवा रेडा हिला बळी देऊन तो पाण्यात सोडतात.

शत्रूला मरण यावे या हेतूनेही दऱ्हा बोंगाला बळी दिला जातो. अशा वेळी काही गुप्त मंत्रही म्हणतात. ही देवता कधी बकरीचे, कधी म्हशीचे, तर कधी स्त्रीचे रूप घेते, अशी त्या लोकांची कल्पना आहे. [एन्सा. मुंडा.]

**दलपत** (इ. स. चे १७-१८ वे शतक) एक हिंदी कवी. हा राजस्थानाचा रहिवासी होता. शांतिविजय या जैन साधूकडून दीक्षा घेतल्यानंतर त्याचे नाव दौलतविजय असे

ठेवण्यात आले. खुमाणरासो हा याचा ग्रंथ होय. या ग्रंथात बाप्पा रावळापासून महाराणा राजसिंहापर्यंतच्या राजपूत राजांची चरित्रे आहेत. या सर्व राजांपैकी खुमाणाचेच वर्णन त्यात विस्ताराने आलेले असल्यामुळे प्रस्तुत ग्रंथाला खुमाणरासो असे नाव मिळाले आहे. हा ग्रंथ पिंगल भाषेत असून, याचे आठ खंड आहेत. [ रा. भा. सा.; हिं. सा. इ. ]

**दलमौ** एक प्राचीन नगर व तीर्थक्षेत्र. हे स्थान उ. प्रदेशात रायबरेलीपासून १९ मैलांवर गंगेच्या काठी उंच-वटयावर आहे. इथे एक किल्ला असून, तो दोन बौद्ध स्तूपांच्या अवशेषांचा बनलेला आहे. पुराणवस्तुसंशोधनाच्या दृष्टीने इथे विपुल सामग्री आहे. इथे कार्तिक महिन्यात गंगास्नानाचा महिमा विशेष मानला जातो. या वेळची यात्रा तीन दिवस असते. [ हि. जॉ. ए. इं.; स. भा. प्र. व. ]

**दवगर** एक जात. या लोकांची वस्ती राजस्थानात आहे. हे लोक आपली उत्पत्ती पवार, चौहान, भाटी, देवडा व खीची या राजपूत कुळांतून झाल्याचे सांगतात. हे आपल्या पूर्ववंशातील कुलदेवतांची पूजाअर्चा करतात. तूप व तेल ठेवण्या-साठी कच्च्या कातडयांचे बुधले वत्तविणे आणि ढाली तयार



दवगर स्त्री व पुरुष

करणे, हा यांचा व्यवसाय होता; परंतु आता समाजात या वस्तूंची जागा नव्या सुधारलेल्या वस्तूंनी घेतल्यामुळे तो त्यांचा व्यवसाय बंद पडला आणि हे शेतकरी बनले.

यांच्या रीतीभाती राजपुतांप्रमाणेच आहेत. यांचे पौरोहित्य ब्राह्मणांकडेच असते. हे जरी पूर्वी कातडयाचे काम करीत असले, तरी चांभार वगैरे जातींपेक्षा हे स्वत:ला श्रेष्ठ मानतात आणि त्यांच्या हातचे अन्न ग्रहण करीत नाहीत. [ रा. जा. ]

**दशग्रंथ** संहिता, ब्राह्मण, पदक्रम, आरण्यक, शिक्षा, छंद, ज्योतिष, निघंटू, निरुक्त व अष्टाध्यायी या दहा वेद-वेदांगांना दशग्रंथ असे म्हणतात. आरण्यक हे ब्राह्मण ग्रंथांत न धरता, त्याचा स्वतंत्र निर्देश केला आहे. तसेच निघंटू व निरुक्त हा एक ग्रंथ न मानता ते दोन वेगळे ग्रंथ मानलेले आहेत. व्याडीने या दशग्रंथांची नावे निराळी दिली आहेत, ती अशी— संहिता, ब्राह्मण, आरण्यक, शिक्षा, कल्प, अष्टाध्यायी, निघंटू, निरुक्त, छंद व ज्योतिष. व्याडीने हे दशग्रंथ सांगितले असल्यामुळे दशग्रंथांच्या अध्ययनाची परंपरा फार प्राचीन ठरते.

**दशदाने** गाय, भूमी, तीळ, सोने, आज्य, वस्त्र, धान्य, गूळ, रुपे व मीठ या वस्तूंच्या दानांना दशदाने म्हण-तात. मृताला स्वर्गप्राप्ती व्हावी, म्हणून अकराव्या दिवशी ही दाने देतात. पूर्वी ही दाने अभ्युदयाच्या उद्देशाने बालकाच्या जन्माच्या वेळीही देत; पण सांप्रत ही पद्धत बंद झाली आहे.

**दशधेनुदान** गुडधेनू, घृतधेनू, तिलधेनू, जलधेनू, क्षीरधेनू, शर्कराधेनू, दधिधेनू, मधुधेनू, रसधेनू व प्रत्यक्ष धेनू या दहा धेनूंना दशधेनू म्हणतात. यांतील घट्ट पदा-र्थांना गाय-वासरांचा आकार देऊन, त्यांचे दान करावे आणि पातळ पदार्थ कुंभांत भरून ते कुंभ धेनुप्रतीक आहेत, या भावनेने त्यांचे दान करावे, असे सांगितले आहे. हे दान ग्रहणादी पर्वकाळी प्रशस्त मानले आहे.

**दशपर्वतदान** धान्य, मीठ, गूळ, सुवर्ण, तीळ, कापूस, तूप, रत्न, रुपे व साखर या दहा पदार्थांचे पर्वत करून त्यांचे पर्वकाळी दान करावे; त्यामुळे दाता देवलोकी पूज्य होतो आणि त्याला पुढील जन्मी उत्तम भाग्य लाभते, असे मत्स्य पुराणात सांगितले आहे.

**दशपूर** एक प्राचीन नगर. पश्चिम विभागातील राजपुताना—माळवा लोहमार्गावर हे ठिकाण आहे. दशपूर आणि पश्चिम माळव्यातील मंदसोर ही दोन्ही ठिकाणे एकच होत, असे अभ्यासकांचे मत आहे. हे शहर उज्जयिनीपासून फार दूर नाही, असे बाणभट्ट म्हणतो. यशोधर्म राजाच्या मंदसोर येथील शिलास्तंभावरील लेखामध्ये मंदसोर अथवा दसोर अशी नोंद आहे. कुमारगुप्त पहिला याच्या शिलालेखा-मध्ये उल्लेखलेले दशपूर हे मालवगणांचे मुख्य शहर असावे.

दहा गावांचा समूह या अर्थानेही दशपूर ही संज्ञा त्याला मिळाली असेल.

क्षहरात क्षत्रप नहपान याच्या कारकीर्दीत त्याचा जावई उषवदात याने अशोकाच्या कीर्तीशी बरोबरी करण्याकरिता दशपूर येथे सार्वजनिक उपयोगाची पुष्कळ कामे केली.

विजयभट्टीच्या कुमारपालप्रशस्तीत (इ. स.चे ५ वे शतक) दशपुराचे पुढीलप्रमाणे वर्णन आहे – इथले प्रासाद अनेक दालनांचे असून, ते कैलास पर्वताप्रमाणे शुभ्र व गगनचुंबी आहेत. त्यांच्यावर फडफडणाऱ्या पताका आहेत. इथल्या घरा-घरांतून संगीताचा ध्वनी येतो. इथल्या स्त्रिया अतीव सुंदर आहेत. इथे अनेक बागबगीचे आहेत. रस्त्यांच्या कडेला कर्दळीचे ताटवे आहेत.

या प्रदेशातील स्त्रियांचे वर्णन करताना कालिदासाने पुढील श्लोक (पू. मेघ. ४७) लिहिला आहे –

तामुत्तीर्य व्रज परिचितभ्रूलताविभ्रमाणां
पक्ष्मोत्क्षेपादुपरिविलसत्कृष्णशारप्रभाणाम् ।
कुन्दक्षेपानुगमधुकरश्रीमुषामात्मबिम्बं
पात्रीकुर्वन्दशपुरवधूनेत्रकौतूहलानाम् ॥

अर्थ – (हे मेघा) त्या चर्मण्वती नदीला ओलांडून गेल्यावर नेत्रविभ्रम जाणणाऱ्या, पापण्या वर केल्यामुळे चित्रविचित्र रंगांच्या प्रभा विलसत असलेल्या व कुंदपुष्पांच्या हेलकाव्यां-बरोबर हेलकावे घेणाऱ्या भ्रमरांचे सौंदर्य चोरणाऱ्या दशपुरा-तील स्त्रियांच्या कुतूहलपूर्ण नेत्रकटाक्षांना स्वतःला पात्र करून घेत तू पुढे चालू लाग.

बृहत्संहितेतही या नगराचा उल्लेख केलेला आढळतो. [गु. सा. इ.; हि. जॉ. ए. इं.]

**दशपेय** सोमयागाचा एक प्रकार. हा सोमयाग राजसूयाच्या अंगाने करतात. यात दीक्षा व सोमक्रय या दोन्ही गोष्टी एकाच दिवशी करायच्या असतात. हा सोमक्रय (सोम विकत घेणे) दहा कालवडी देऊन करतात. यात यजमान आपल्या गळ्यात सुवर्णकमलांची माळ घालतो.

या यागात ऋत्विजांच्या खेरीज आणखी शंभर ब्राह्मण लाकडी चमसांतून सोमपान करतात. एका वेळी दहा दहा ब्राह्मण सोमपान करीत असल्यामुळे याला दशपेय असे नाव पडले आहे. पाहा – राजसूय. [म. ज्ञा. को. – वेदविद्या]

**दशफलव्रत** एक स्त्रीव्रत. श्रावण वद्य अष्टमीपासून पुढे दहा दिवस हे व्रत करतात. व्रतावधी दहा वर्षे. गोपालकृष्ण ही या व्रताची देवता होय. या व्रतात व्रतकर्ती स्त्री दहा तुलसीदलांनी कृष्णपूजा करून, दहा सुतांचा दोरा हातात बांधते व दहा ब्राह्मणांना प्रत्येकी दहा पुऱ्यांचे वायन देते. फल-ऐश्वर्य, संतती व संपत्ती यांचा लाभ. [हि. ध.]

**दशभक्ती** जैन उपासनेचा एक प्रकार. तत्त्वार्थसूत्रसंग्रहात दशभक्तीचे निरूपण केलेले आहे. सिद्धभक्ती, श्रुतभक्ती, चरित्रभक्ती, योगीभक्ती, आचार्यभक्ती, निर्वाण-भक्ती, नंदीश्वरभक्ती, चैत्यभक्ती, शांतिभक्ती व पंचगुरुभक्ती या त्या दशभक्ती होत. प्रत्येक जैनाला दशभक्तीच्या खऱ्या स्वरूपाचे ज्ञान असणे आवश्यक मानलेले आहे.

या दशभक्तींशिवाय तीर्थंकरभक्ती आणि समाधिभक्ती अशा आणखीही दोन भक्ती जैनांनी स्वीकारलेल्या आहेत. यांचा संबंध विशेषतः धर्मकृत्यांशी असतो. [हि. क. म. तु. अ.]

**दशभूमिकसूत्र** एक बौद्ध ग्रंथ. हा अवतंसक या ग्रंथाचा भाग असला, तरी तो स्वतंत्र रूपातच अधिक प्रचारात होता. याला दशभूमक अथवा दशभूमेश्वर अशीही नावे आहेत. बोधिसत्त्वाला बुद्धत्वापर्यंत पोचण्यासाठी ज्या दशभूमिकांतून जावे लागते, त्यांचे क्रमशः वर्णन या ग्रंथात केलेले आहे. बोधिसत्त्व वज्रगर्भ हा या ग्रंथाचा वक्ता आहे.

हा ग्रंथ गद्यात असून, त्याच्या प्रारंभी काही संस्कृत गाथा आहेत. महायान पंथात या ग्रंथाचे विशेष महत्त्व आहे. उत्तर-कालीन अनेक आचार्यांनी या ग्रंथातील विषयांवर ग्रंथरचना केली आहे. [बौ. द. मी.; तां. बौ. सा. सा.]

**दशभूमी** महायान बौद्ध धर्मातील एक तात्त्विक संज्ञा. दश-भूमी म्हणजे बुद्धत्वाच्या मार्गावरील दहा टप्पे. बोधिसत्त्व हा एकामागून एक अशा दहा भूमी ओलांडून बुद्धत्व प्राप्त करीत असतो. असंगाने दशभूमिशास्त्र नामक ग्रंथात या दहा भूमींचे सांगोपांग वर्णन केलेले आहे. या दहा भूमींची नावे व स्वरूपे अशी –

(१) **मुदिता** – पूर्वजन्मात शुभकर्मे केल्यामुळे बोधिसत्त्वाला बुद्धत्व प्राप्त करण्याची अभिलाषा उत्पन्न होते आणि बुद्ध व पूर्वकालीन बोधिसत्त्व यांच्या गौरवपूर्ण कार्याचे स्मरण करता करता तो आनंदित होतो. त्याच्या या अवस्थेला मुदिता म्हण-तात. या भूमीला शुद्ध करण्यासाठी श्रद्धा, दया, मैत्री, दान, शास्त्रज्ञान, लोकज्ञान, नम्रता, दृढता व सहनशीलता या दहा गुणांची आवश्यकता असते.

(२) **विमला** – या भूमीत साधक काया-वाचा-मन यांची दशविध पापे दूर करून शीलपारमितेचा अभ्यास करतो.

**(३) प्रभाकरी** – या भूमीमध्ये साधक जगतातील सर्व पदार्थांना अनित्य मानतो. या टप्प्यावर त्याला आठ प्रकारची समाधी, चार ब्रह्मविहार आणि काही सिद्धी प्राप्त होतात. त्याची कामवासना आणि देहासक्ती क्षीण होत जाते आणि तो प्रामुख्याने धैर्यपारमितेचा अभ्यास करतो.

**(४) अर्चिष्मती** – या भूमीत साधकाला जगताविषयी विराग उत्पन्न होतो, त्याचे चित्त दया व मैत्री यांनी स्निग्ध होते आणि त्याचे सर्व संशय नष्ट होतात. या वेळी तो वीर्यपारमितेचा अभ्यास करतो.

**(५) सुदुर्जया** – चित्ताची समता आणि विचारांची विशुद्धता प्राप्त केल्यामुळे साधकाचा या भूमीत प्रवेश होतो. प्राणिमात्रांविषयी वाटणाऱ्या दयाभावामुळे तो नाना लौकिक विद्यांचा अभ्यास करतो आणि जगताविषयी पूर्णपणे उदास होऊन केवळ उपदेशक बनतो. ध्यानपारमितेचा अभ्यास हे या भूमीचे वैशिष्ट्य आहे.

**(६) अभिमुक्ती** – दहा प्रकारच्या समतेमुळे ही भूमी प्राप्त होते. या अवस्थेत साधक जगतातील सर्व पदार्थांना शून्य मानतो, परंतु प्राण्यांवर दया करण्यासाठी त्या शून्य पदार्थांनाही सत्य धरून चालतो. प्रज्ञापारमितेचा अभ्यास हे या भूमीचे वैशिष्ट्य आहे.

**(७) दूरंगमा** – या भूमीपासून शून्यतेच्या उपलब्धीला प्रारंभ होतो. या अवस्थेत साधक दशविध उपायांचे ज्ञान संपादन करून सर्वज्ञ होतो.

**(८) अचला** – स्वप्नातून जागा झालेला मनुष्य ज्याप्रमाणे स्वप्नातील अनुभवांना अनित्य समजतो, त्याप्रमाणे या भूमीचा साधक सर्व जगद्व्यापाराला मायिक, भ्रांत व असत्य मानतो.

**(९) साधुमती** – या भूमीत आल्यावर साधक मनुष्यांच्या उद्धारासाठी नव्या नव्या उपायाचा अवलंब करतो, धर्माचा उपदेश करतो आणि शब्दार्थाचे विवेचन, धर्माचे विवेचन, व्याकरणाची विश्लेषणपद्धती आणि शीघ्र प्रतिपादनाची शक्ती या चतुर्विध विषयपर्यालोचनांचा अभ्यास करतो.

**(१०) धर्ममेघ** – या भूमीचे दुसरे नाव अभिषेक असे आहे. बुद्धत्वप्राप्तीच्या मार्गावरचा हा अखेरचा टप्पा आहे. या अवस्थेत साधकाला सर्व प्रकारच्या समाधींचा लाभ होतो.

या दहा भूमी उल्लंघून गेल्यावर बुद्धत्व प्राप्त होते, म्हणूनच बुद्धाला दशभूमिग अथवा दशभूमीश अशी नावे मिळाली आहेत. [ बौ. द. मी.; श. क. ]

**दशमहाविद्या** एक देवतासमूह. शाक्त संप्रदायात ज्या दहा प्रधान रूपांनी देवीची उपासना केली जाते, त्यांना दशमहाविद्या असे म्हणतात. त्यांची दहा नावे अशी– महाकाली, उग्रतारा, षोडशी, भुवनेश्वरी, छिन्नमस्ता, भैरवी, धूमावती, बगलामुखी, मातंगी आणि कमला.

यांपैकी धूमावतीला विधवा म्हणून ओळखतात आणि षोडशीला त्रिपुरसुंदरी असे दुसरे नाव आहे. निगमात या दहा विद्यांना विराटविद्या म्हणतात; तर आगमात त्यांना महाविद्या म्हणतात. [ भा. प्र. वि.; हिंदुत्व ]

**दशमानसपुत्र** मरीची, अत्री, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतू, भृगू, वसिष्ठ, दक्ष व नारद यांना ब्रह्मदेवाचे दहा मानसपुत्र मानलेले आहे.

**दशमी** एक तिथी. चंद्राच्या दहाव्या कलेने उपलक्षित होणाऱ्या कालाला दशमी असे म्हणतात. शुक्ल व कृष्ण अशा दोन्ही पक्षांतल्या दहाव्या तिथीला हे नाव आहे. ही तिथी सर्व दिशांना अतिप्रिय असल्याचे सांगितले आहे. वराह पुराणात तिच्याविषयी पुढील श्लोक आहे–

**दशमी च तिथिस्तासामतीव दयिताऽभवत् ।**
**तस्यां दध्नाशनो यस्तु सुव्रती भवते नरः ॥**

अर्थ – दशमी तिथी सर्व दिशांना अत्यंत प्रिय झाली. त्या दिवशी जो मनुष्य दही सेवन करून राहतो, तो सुव्रती होतो.

दशमीच्या दिवशी जन्म घेणारा मनुष्य विद्या-विनोदप्रिय, धनपुत्रयुक्त, लांब गळ्याचा, मदनतुल्य सुंदर, उदार, मोठ्या मनाचा व दयाळू होतो ( कोष्ठीप्रदीप ).

दशमी ही कृष्णवर्ण, महिषारूढ आणि दंड व पात्र धारण करणारी आहे, असे तिचे रूपध्यान हेमाद्रीने चतुर्वर्गचिन्तामणीच्या व्रतखंडात दिले आहे. दशमीला पूर्णा असे नाव असून, ती शुभ तिथी मानलेली आहे. [ श. क. ]

**दशयोग** मुहूर्तशास्त्रातील एक संज्ञा. हा दशयोग पुढील गोष्टींनी घडतो –

**ज्येष्ठे मासे सिते पक्षे दशम्यां बुधहस्तयोः ।**
**गरानन्दे व्यतीपाते कन्याचन्द्रे वृषे रवौ ॥**
**दशयोगे नरः स्नात्वा सर्वपापैः प्रमुच्यते ॥**

अर्थ– ज्येष्ठ मास, शुक्ल पक्ष, दशमी तिथी, बुधवार, हस्तनक्षत्र, गरकरण, आनंदयोग, व्यतीपात, कन्येचा चंद्र व वृषभेचा रवी हे दहा योग एकत्र येतात, तेव्हा त्या योगाला दशयोग म्हणतात. या योगावर माणसाने गंगास्नान केल्यास तो सर्व पापांतून मुक्त होतो. [ पु. चिं. ]

**दशरथचतुर्थी** एक व्रत. कार्तिक वद्य चतुर्थीला एका मातीच्या पात्रात दशरथाची आणि दुर्गेची मूर्ती ठेवून त्यांची पूजा करतात. हिला करकचतुर्थी (करक= करा=मातीचे भांडे ) असेही म्हणतात. फल – सर्व प्रकारच्या सुखांचा लाभ. [ हि. ध.; व्र. प. ]

**दशरथललितात्रत** एक काम्य व्रत. चंद्राची भार्या रोहिणी अर्थात ललिता ही या व्रताची प्रधान देवता असून, गणेश व चंद्र या गौण देवता आहेत. हे व्रत आश्विन शु. दशमी ते आश्विन व. चतुर्थी असे १० दिवस करावे, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. पण सांप्रत आश्विन वद्य दशमीला केवळ एकच दिवस व्रत करण्याची रूढी आहे. दशरथाने पुत्रप्राप्तीसाठी ऋष्यशृंगाच्या सांगण्यावरून हे व्रत केले, म्हणून याला दशरथललितात्रत असे नाव पडले, असे स्कंद पुराणात म्हटले आहे. याचा विधी असा–

आश्विन वद्य चतुर्थीच्या दिवशी सायंकाळी स्नान करून संकल्प व गणेशार्चन करतात आणि त्यानंतर ललितादेवीची स्थापना करतात. नंतर पुढील मंत्राने तिचे ध्यान करतात–

नीलकौशेयवसनां हेमाभां कमलासनाम् ।
भक्तानां वरदां नित्यं ललितां चिन्तयाम्यहम् ।

अर्थ– निळे रेशमी वस्त्र नेसलेली, सोन्यासारख्या कांतीची, कमळावर बसलेली आणि भक्तांना वर देणारी अशा ललितादेवीचे मी नित्य ध्यान करतो.

ध्यानानंतर देवीची षोडशोपचारे पूजा करून तिला दहा फुलाफळांचे विशेषार्घ्य अर्पण करतात. चंद्रोदयानंतर जमिनीवर गुडघे टेकून शंखोदकाने चंद्राला अर्घ्य देतात. या अर्घ्यात पंचरत्ने, फळे, गंध व पुष्पाक्षता यांचा अंतर्भाव असतो. नंतर थंड पाण्याने भरलेल्या दहा कुंभांचे ब्राह्मणाला दान देतात आणि मग देवीचे विसर्जन करतात.

हे व्रत दहा वर्षे केल्यानंतर त्याचे उद्यापन करतात. उद्यापनाच्या वेळी ललिता व गणेश यांच्या सुवर्णाच्या मूर्ती आणि चंद्राची रौप्य मूर्ती करतात. त्यांची एका कलशावर स्थापना करतात. मग त्याची यथाविधि पूजा करून, तिळांच्या एकवीस लाडवांचा नैवेद्य दाखवतात. तीळ, पायस व तिळाचे लाडू यांचे हवन करतात. त्यानंतर दहा दांपत्यांना दहा कुंभांचे दान देतात. शेवटी आचार्याला दक्षिणा व देवतांच्या प्रतिमा देऊन व्रताची सांगता करतात. [ हि. ध. ; व्रतराज ]

**दशरूपक** (१) अभिनेय काव्याला संस्कृतात रूप किंवा रूपक असे म्हणतात.' रूप्यते नाटयते इति रूपम्। रूपमेव रूपकम्' = ज्याचा अभिनय केला जातो, ते रूप; रूप म्हणजेच रूपक होय. नाटचाला दृश्य काव्य असे म्हणतात. नाटच हे दृश्य व श्राव्यही असते. नाटकाच्या प्रेक्षकांना पात्रांचा अभिनय, वेष, इ. गोष्टी व रंगभूमीची सजावट पाहायची असते आणि त्यांचे संवाद व इतर आवाज ऐकायचे असतात. त्यांपैकी जे दृश्य असते, ते प्राधान्याने अभिनेय असते. त्या अभिनेय दृश्यालाच रूपक असे म्हणतात.

रूपकाचे प्रकृती आणि विकृती असे दोन प्रकार आहेत. रूपकाच्या सर्व लक्षणांनी आणि अंगांनी युक्त असलेल्या दृश्य काव्याला प्रकृतिरूपक असे म्हणतात. नाटक हे प्रकृतिरूपक होय. प्रकृतिरूपकासारखेच पण स्वतःचे असे काही वैशिष्टय असणारे, ते विकृतिरूपक होय. अशी महत्त्वाची दहा रूपके भरताने सांगितली आहेत, त्यांची नावे अशी–

नाटकं सप्रकरणमङ्को व्यायोग एव च ।
भाणः समवकारश्च वीथी.प्रहसनं डिमः ॥
ईहामृगश्च विज्ञेयो दशमो नाटचलक्षणे ।
( ना. शा. १८.२)

अर्थ – नाटक, प्रकरण, अंक (किंवा उत्सृष्टांक), व्यायोग, भाण, समवकार, वीथी, प्रहसन, डिम व ईहामृग अशी दहा रूपके नाटचलक्षणांत जाणावी.

या दशरूपकांची व्याप्ती एका अंकापासून दहा अंकांपर्यंत असते. यातील मुख्य रस शृंगार किंवा वीर असतो. याची कथावस्तू पाच संधींत विभागलेली असते. मात्र लहान रूपकांत काही संधी गाळलेले असतात. कथानकातील मुख्य पुरुषाला नायक असे म्हणतात. मूळ कथावस्तू बांधेसूद, प्रमाणबद्ध, एकसंध व परिणामकारक होण्यासाठी, कथेची पाच मूल तत्त्वे मानलेली आहेत. त्यांना अर्थप्रकृती म्हणतात. त्यांची नावे अशी – बीज, बिंदू, पताका, प्रकरी आणि कार्य. कार्य म्हणजे कथानकातील नायकाला मिळायचे फल; फलाचे पहिले कारण ते बीज; नाटकातील उपकथानक ते पताका; नाटकात ज्या घटना घडतात त्या प्रकरी; आणि पताका व प्रकरी यांचा मूळ कथानकाशी ज्याच्यामुळे संबंध जोडला जातो तो बिंदू होय.

कथेला संविधानकाचे रूप देताना नाटककार आरंभ, यत्न, प्राप्त्याशा, नियताप्ती व फलागम अशा पाच अवस्थांची कल्पना करतो. यत्न म्हणजे इष्ट वस्तू मिळविण्याकरिता केलेला प्रयत्न. यात अडथळे आलेले पाहून इष्टप्राप्तीच्या बाबतीत जी आशा-निराशा उत्पन्न होते, ती प्राप्त्याशा. अडथळे दूर झाल्यावर फलप्राप्तीची खात्री वाटते, ती नियताप्ती आणि इष्ट वस्तूची प्राप्ती म्हणजे फलागम होय.

या पाच अवस्थांशी जुळणारे असे कथानकाचे पाच भाग

केलेले असतात, त्यांना अनुक्रमे मुखसंधी, प्रतिमुखसंधी, गर्भसंधी, विमर्शसंधी व निर्वहणसंधी अशी नावे आहेत.

कथावस्तूचे आधिकारिक व प्रासंगिक असे दोन भाग असतात. नाटकातील मुख्य फलाच्या स्वामित्वाला अधिकार आणि त्या फलाच्या अधिकाऱ्याला म्हणजे मुख्य नायकाला त्याचा प्रभू म्हणतात. त्या अधिकाऱ्याविषयीचे जे कथानक ते मुख्य म्हणजे आधिकारिक आणि मुख्य कथानकाला उठाव देण्यासाठी त्याला उपकारक असे जे गौण कथानक, ते प्रासंगिक होय.

कोणत्याही कथावस्तूचे दोन प्रकार असतात. पहिला प्रकार म्हणजे जो कथाभाग अत्यंत सरस, अभिनेय, उचित आणि आवश्यक असतो तो आणि दुसरा म्हणजे नीरस, अभिनयाला निषिद्ध, अनुचित आणि अनावश्यक असतो तो. प्रत्यक्ष युद्ध, राज्यच्युती, मृत्यू व नगराचा वेढा या घटना रंगभूमीवर दाखवू नयेत, असा भरतमुनीचा दंडक आहे. त्याशिवाय विवाह, भोजन, शाप, सुरत, चुंबन, स्नान, शयन, इ. गोष्टीही रंगभूमीवर वर्ज्य मानाव्या, असे साहित्यदर्पणकार विश्वनाथ सांगतो. परंतु काही वेळा कथानक कळण्याच्या दृष्टीने दुसऱ्या प्रकारातला काही भाग प्रेक्षकांना समजणे आवश्यक असते. असा कथाभाग आणि काही परोक्ष घटना गौण पात्रांच्या मुखाने विष्कंभ, प्रवेशक, चूलिका, अंकमुख व अंकावतार या प्रकारांतून दाखवाव्या, असे सांगितले आहे.

रूपकातील पात्रे दिव्य, अदिव्य व दिव्यादिव्य अशा श्रेणीची असतात. प्रत्येक पात्र आपल्या प्रकृत्यनुसार उत्तम, मध्यम वा अधम मानलेले आहे. या पात्रांनी कोणती बोली बोलावी, त्यासंबंधी आणि त्यांच्या परस्पर संभाषणासंबंधीही काही नियम आहेत. उत्तम पात्र संस्कृत भाषेचा उपयोग करते आणि बाकीची पात्रे विविध प्राकृत किंवा देशी भाषा बोलतात. प्रधान पात्रांच्या व्यवहाराला वृत्ती असे नाव आहे. कैशिकी, सात्वती, आरभटी व भारती अशा चार प्रमुख वृत्ती मानलेल्या आहेत. त्याचप्रमाणे देशकालानुरूप वेषभूषा, आमोदप्रमोद व नाट्यातील उपकरणांसंबंधीचे प्रायोगिक नियम, इ. गोष्टी पात्रांच्या सामाजिक दर्जावर अवलंबून ठेवाव्या, असे म्हटले आहे. नृत्य, वाद्य व संगीत यांची साथ, नैसर्गिक पार्श्वभूमी, पशुपक्ष्यांचे साहचर्य, इ. गोष्टी रूपकाचे अलंकरण म्हणून येतात. रूपकांत गद्य व पद्य या दोहोंचाही प्रयोग केला जातो. रूपकांचा मुख्य उद्देश मनोरंजन हा असला, तरी त्यावरून तत्कालीन सामाजिक स्थितीचीही थोडीबहुत कल्पना येऊ शकते. [ सं. ना. सौं.; रू. र.; म. ना.; ना. भा. प. द. ]

( २ ) धनंजयकृत एक ग्रंथ. दशरूपकांची लक्षणे व वैशिष्ट्ये प्रस्तुत ग्रंथात सांगितली आहेत. भरताचे नाट्यशास्त्र हे विस्तृत असल्यामुळे धनंजयाने नाट्यशास्त्रासंबंधीच्या उपयुक्त गोष्टी संक्षिप्त करून कारिकांच्या रूपाने आपल्या ग्रंथात मांडल्या आहेत. या बहुतेक सर्व कारिका अनुष्टुभ छंदात आहेत. संक्षिप्त असल्याकारणाने त्या समजायला अवघड जातात. म्हणून त्यांचा अर्थ स्पष्ट करण्यासाठी त्याचा भाऊ धनिक याने त्यावर अवलोक नामक वृत्ती लिहिली आहे.

या ग्रंथाचे चार प्रकाश असून, त्यांत क्रमाने वस्तू, नेता, रूपकलक्षणे व रस यांचे सविस्तर विवरण आहे. चौथ्या प्रकाशात रसास्वादनाची प्रक्रिया स्पष्ट केलेली आहे. त्यात धनंजयाने रसप्रतीती हा व्यंजनावृत्तीचा विषय न मानता वाच्यवृत्तीचा विषय मानला आहे.

धनंजय हा माळव्याच्या मुंज राजाच्या ( ९७४ ते ९९५ इ. स. ) पदरी होता. [ हिं. वि. को.; रू. र. ]

**दशलक्षणव्रत** एक जैन व्रत. हे प्रतिवर्षी चैत्र, भाद्रपद व माघ या तीन महिन्यांत शुक्ल पंचमीपासून चतुर्दशीपर्यंत दहा दिवस करतात. व्रताचा आरंभ भाद्रपद शु. पंचमीला होतो. व्रतकालात उपवास करून 'ॐ ह्रीं अर्हन्मुखकमलसमुद्‌भूतोत्तमक्षमादिदशलक्षणैकधर्माय नमः ।' या मंत्राचा त्रिकाळ जप करतात. या व्रताची कथा अशी—

पूर्वविदेहातील विशालाक्षापुरीचा राजा प्रीतंकर, त्याचा मंत्री मतिशेखर, त्या नगरातील एक शेठ मतिसागर आणि राजपुरोहित लक्षभद्र या चौघांच्या चार मुली होत्या. त्यांची नावे अनुक्रमे मृगांकरेखा, कामसेना, मदनवेगा व रोहिणी अशी होती. एकदा त्या वनक्रीडेला गेल्या असता त्यांना वनात एका शिलाखंडावर बसलेला एक मुनी दिसला. त्यांनी त्या मुनीला वंदन करून 'परस्वाधीन स्त्रीला मुक्त होण्याचा मार्ग कोणता ?' असा प्रश्न विचारला. मुनीने त्यांना दशलक्षणधर्म सांगून दशलक्षणव्रत आचरण्याचा उपदेश केला.

मुनीच्या उपदेशानुसार त्या चौघींनी यथाविधि या व्रताचे आचरण केल्यामुळे त्यांना मरणोत्तर दहाव्या स्वर्गात प्रवेश मिळाला. तिथे सर्व प्रकारच्या सुखांचा उपभोग घेतल्यानंतर त्यांनी उज्जयिनीचा राजा स्थूलभद्र याच्या घरी पुत्ररूपाने जन्म घेतला. पिता विरक्त झाल्यावर त्यांनी राजसुखाचा उपभोग घेतला आणि उत्तर वयात वैराग्याने मोक्ष मिळवला. [ जै. क.; जै. व्र. वि. सं.; व्र. ति. नि. ]

**दशहराव्रत** ज्येष्ठ शु. दशमीला दशहरा असे नाव आहे. या तिथीस भूतलावर गंगेचे अवतरण झाले, म्हणून गंगेच्या प्रीत्यर्थ हे व्रत करतात. दशहरा या नावाची

व्याख्या पुढीलप्रमाणे—

**शुक्लपक्षस्य दशमी ज्येष्ठे मासि द्विजोत्तमाः ।**
**हरते दश पापानि तस्माद्दशहरा स्मृता ॥**
( ब्रह्म. पु. ६३·१५ )

**अर्थ** – हे द्विजश्रेष्ठहो, ज्येष्ठातली शुद्ध दशमी ही दहा पापे हरण करते, म्हणून तिला दशहरा म्हटले आहे.

या दिवशी मंगळवार आणि हस्तनक्षत्र असा योग आल्यास ही तिथी सर्व पापे नष्ट करते, असे राजमार्तंडात म्हटले आहे. या व्रताची मुख्य देवता गंगा ही असून ब्रह्मा, विष्णू, महेश, सूर्य, भगीरथ व हिमाचल या गौण देवता आहेत. हे व्रत स्त्रियांना व पुरुषांनाही विहित आहे. पुष्प, धूप, दीप व नैवेद्य हे उपचार प्रत्येकी दहा संख्येने गंगेला समर्पण करणे, हा या व्रताचा विशेष आहे. याचा विधी असा –

शास्त्रोक्त पद्धतीने व्रताचा संकल्प करून गंगेत दहा बुड्या मारून स्नान करावे. गंगास्नान अशक्य असल्यास इतर कोणत्याही नदीत किंवा जलाशयात असे स्नान करावे. पाण्यात उभे राहून गंगास्तोत्राचे पठण करावे. मग तीर्थपूजा व पितृतर्पण करावे. घृतमिश्रित काळे तीळ, गूळमिश्रित सातूच्या पिठात घालून त्याचे दहा पिंड करून ते गंगेत टाकावे. सोन्याची, तांब्यांची किंवा मातीची गंगाप्रतिमा करून तीरावरच तिची पूजा करावी. सर्व उपचार पुढील मंत्राने समर्पण करावे –

**नमो भगवत्यै दशपापहरायै गङ्गायै नारायण्यै रेवत्यै**
**शिवायै दक्षायै अमृतायै विश्वरूपिण्यै नन्दिन्यै ते नमो नमः ।**

पूजा झाल्यावर दहा ब्राह्मणांना प्रत्येकी सोळा मुठी तिळांचे दान द्यावे. गोप्रदान करावे. मासा, कासवे, बेडूक व मगरी या जलचरांच्या सोन्यारुप्याच्या किंवा पिठाच्या प्रतिमा करून त्या गंगेत सोडाव्या. दहा दिवे लावून प्रवाहात सोडावे. शक्य असल्यास वर दिलेल्या उपचारमंत्राचा पाच हजार जप करून पाचशे संख्येने हवन करावे. त्यानंतर दहा ब्राह्मण व दहा सुवासिनी यांना भोजन घालावे.

ज्येष्ठ शु. प्रतिपदेपासून दशमीपर्यंत रोज गंगेची पूजा करावी व पहिल्या दिवशी एकदा, दुसऱ्या दिवशी दोनदा, अशा वाढत्या संख्येने गंगास्तोत्राचे पठण करावे, असेही काही शास्त्रकारांनी सांगितले आहे.

उत्तर प्रदेशात या दहा दिवसांत गंगातीरावर स्नानयात्रा भरते. हरिद्वार, नासिक, वाई, इ. क्षेत्री हा गंगोत्सव मोठ्या प्रमाणावर होतो. त्यासाठी घाटावर मांडव घालून तिथे गंगेची प्रतिमा स्थापन करतात. दहा दिवस नित्य कथाकीर्तने, ब्राह्मणभोजने, इ. कार्यक्रम करतात. या उत्सवात स्त्रिया दहा आंब्यांचे वायन देतात. [ हि. ध.; नि. सिं.; व्रतराज ]

## दशा

विशिष्ट काल किंवा अवस्था यांना दशा अशी संज्ञा आहे. विविध शास्त्रांत विविध दशा मानलेल्या आहेत. त्या अशा– बाल्य, यौवन व वार्धक्य अशा प्राण्याच्या तीन दशा पौराणिक मानतात. जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती अशा तीन अवस्था ( दशा ) वेदान्ती मानतात. गर्भवास, जन्म, बाल्य, कौमार, पौगंड, यौवन, पोक्तपणा, वार्धक्य, प्राणरोध व मरण अशा माणसाच्या दहा दशा आयुर्विद्येत मानल्या आहेत.

विरही स्त्री-पुरुषांना मदनबाधेने ज्या दशा प्राप्त होतात, त्यांना स्मरदशा असे म्हटले आहे. दृष्टिप्रेम, चित्तासक्ती, प्रिय व्यक्तीच्या प्राप्तीविषयी संकल्प, निद्रानाश, कृशता, विषयांची नावड, लज्जानाश, उन्माद, मूर्च्छा व मृत्यू या दहा स्मरदशा होत.

नक्षत्रांना अनुसरून सूर्यादी ग्रहांचे ज्या कालावर स्वामित्व चालते, अशा कालाला ज्योतिषशास्त्रात दशा म्हटले आहे. जातरत्नात पुढील दहा दशा सांगितल्या आहेत– योगिनी, वार्षिकी, नाक्षत्रिकी, लाग्निकी, मुकुंदा, विंशोत्तरा, त्रिंशोत्तरा, पताकी, हरगौरी व दिनदशा. [ श. क. ]

## दशादित्यव्रत

एक काम्य व्रत. रविवारी येणाऱ्या कोणत्याही शुद्ध दशमीला हे व्रत करतात. परंतु मार्गशीर्ष, माघ किंवा वैशाख या महिन्यांतील शुद्ध दशमी ही अधिक प्रशस्त मानली जाते. व्रताच्या दिवशी सकाळी जलाशयावर जाऊन प्रातःस्नानादी नित्य कर्मे करतात. त्यानंतर वेदीवर बारा पाकळ्यांचे कमळ काढतात. त्यावर सोन्याच्या सूर्यमूर्तीची स्थापना करतात. मग तिची षोडशोपचारे पूजा करतात.

सूर्याची पूजा केल्यानंतर शेणाने सारवलेल्या वेदीवर काळ्या रंगाने दुर्मुखी, दीनवदना, मलिना, सत्यनाशिनी, बुद्धिनाशिनी, हिंसा, दुष्टा, मित्रविरोधिनी, उच्चाटनकारिणी आणि दुश्चिन्ताप्रदा ही दुर्दशादेवीची दहा रूपे (पुतळ्या) रेखाटतात. आणि त्यांची पूजा करून पुढील मंत्राने त्यांचे विसर्जन करतात –

**नित्यं पापकरे पापे देवद्विजविरोधिनि ।**
**गच्छ त्वं दुर्दशे देवि नित्यं शास्त्रविरोधिनि ॥**

**अर्थ** – नेहमी पापाचरण करायला लावणारी, देवाब्राह्मणांना विरोध करणारी, सदैव शास्त्रविरोधी आचरण करणारी अशा हे पापिणी दुर्दशे देवी, तू (येथून) जा.

यानंतर सूर्याचे प्रतीक म्हणून दहा गाठी मारलेल्या दोऱ्याची पूजा करतात आणि ब्राह्मणांना दहा फळे व दक्षिणा देऊन जेवू घालतात. भोजन झाल्यावर वेदीवर चंदनाने सुबुद्धिदा, सुखकारिणी, सर्वसंपत्तिदा, इष्टभोगदा, लक्ष्मी, कांतिदा,

दुःखनाशिनी, पुत्रप्रदा, विजया आणि धर्मदायिनी ही लक्ष्मीची दहा रूपे काढतात आणि त्यांची षोडशोपचारे पूजा करून पुढील मंत्राने देवीची प्रार्थना करतात –

विशुद्धवसनां देवीं सर्वाभरणभूषिताम् ।
ध्यायेद् दशदशां देवीं वरदाभयदायिनीम् ।।

अर्थ – शुद्ध वस्त्रे परिधान करणाऱ्या, सर्व अलंकारांनी नटलेल्या, वर देणाऱ्या व अभय प्राप्त करून देणाऱ्या दशदशा देवीचे ध्यान करावे.

हे व्रत केल्याने दुर्दशा नष्ट होते असे सांगितले आहे. नल राजाने व पांडवांनी आपत्कालात हे व्रत केले होते, असे स्कंद पुराणात म्हटले आहे. [ हि. ध.; व्र. प. ]

**दशापवित्र** शेवटी दशा (टोके) असलेले लोकरीचे वस्त्र. सोमयागात अशी दोन वस्त्रे लागतात. एका वस्त्रातून आधवनीय नावाच्या घागरीतला सोमरस गाळतात. ते वस्त्र नेहमी पूतभृत नामक शुद्ध सोमाच्या घागरीवर ठेवतात. दुसरे सोमपात्राच्या तोंडापाशी बाहेरच्या बाजूने चिकटलेला सोमरस पुसण्यासाठी वापरतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**दशाराणी** एक व्रत. हे व्रत प्रामुख्याने उ. प्रदेशातल्या स्त्रिया करतात. पहिल्या वेताला गाय किंवा घोडी व्याली किंवा पहिलटकरणीला मुलगा झाला, तर ती बातमी ऐकताच या व्रताचा संकल्प करून दशाराणीचा गंडा घेतात. हा गंडा सुताचे नऊ धागे आणि व्रतकर्त्या स्त्रीच्या पदराचा एक धागा अशा दहा धाग्यांचा बनवतात. एका पानावर चंदनाने दशाराणीची मूर्ती काढतात. तिच्यावर तो गंडा दुधात भिजवून ठेवतात. हळद आणि अक्षता यांनी तिची पूजा करतात. तूप, गूळ आणि बत्तासे यांचा नैवेद्य दाखवतात. मग या व्रताची कथा ऐकतात.

कथा ऐकल्यावर सगळे पूजासाहित्य ओल्या मातीत घालून त्याचा गोळा बनवितात व तो तलावात नेऊन टाकतात. मग पारणे करतात. अशा एकूण दहा पूजा करतात. पहिल्या नऊ पूजा सायंकाळी करतात. शेवटची दहावी पूजा होईपर्यंत घरातली कोणतीही वस्तू बाहेर देत नाहीत आणि कोणालाही नैवेद्य व्हायच्या आधी जेवायला वाढीत नाहीत. दशाराणीच्या दहा कथा आहेत, त्यांतली एक अशी–

दोघी सास्वा-सुना होत्या. एके दिवशी सासूने सुनेला सांगितले, की ‘स्वयंपाक लवकर कर.’ सून विस्तव आणण्यासाठी शेजारी गेली; पण सगळ्या घरी दशाराणीचे व्रत सुरू असल्यामुळे तिला कोणी विस्तव देईना. मग सुनेला वाटले, की सगळ्या बायका जे हे व्रत करतात, ते आपणही करावे. तिने सासूला न सांगताच या व्रताचा संकल्प केला व गंडाही घेतला.



दशाराणीचे चित्र

तिने नऊ दिवस नऊ कथा ऐकल्या. दहाव्या दिवशीची पूजा सासूच्या नकळत कशी करावी, याची तिला चिंता पडली. पण दैवयोगाने त्याच दिवशी सासू शेतावर गेली. जाताना ती सुनेला म्हणाली, की ‘माझे जेवण शेतावर पाठवून दे.’ सुनेने मग न्हाऊन स्वयंपाक केला व दशाराणीची पूजा केली. मग ते पूजासाहित्य ओल्या मातीत घालून तिने त्याचा गोळा बनविला. तो गोळा घेऊन ती विसर्जनाला निघाली. एवढ्यात सासू घरी आली. त्यामुळे सुनेला भीती वाटली आणि तिने तो गोळा ताकाच्या मडक्यात सोडला. दुपारी जेवायला बसल्यावर मुलाने ताक मागितले. सासू ताक वाढायला उठली, तेव्हा तो गोळा तिच्या हाताला लागला. ती तो गोळा बाहेर काढून पाहाते; तर तो सोन्याचा बनला होता. तेव्हा सासूने सुनेला सर्व हकीकत विचारली. सुनेने सांगितलेली हकीकत ऐकून तिला वाटले, की ही दशाराणीची कृपा आहे. मग तिनेही तिचा गंडा घेतला. सास्वा-सुना जोडीने व्रत करू लागल्या आणि सुखी झाल्या.

या व्रताचे फल – संतती व संपत्ती यांची प्राप्ती.

**दशार्ण** प्राचीन सोळा महाजनपदांतील एक जनपद. यातल्या लोकांनाही दशार्ण हेच नाव होते. मध्य प्रदेशाच्या पूर्वभागात हे जनपद वसले होते. दशार्णा ( धसान ) नदीच्या पाण्याने हा सारा भूभाग भिजत असल्यामुळे याला दशार्ण असे नाव मिळाले. विदिशा ही दशार्णाची राजधानी होती.

भारतीय साहित्यात या प्रदेशाचा वारंवार उल्लेख येतो. सुग्रीवाने सीताशोधासाठी अंगदाला इथे पाठविल्याचा निर्देश रामायणात आहे (४.४१.१०). इथला क्षत्रदेव नावाचा राजा फार बलाढ्य होता व त्याने भारतीय युद्धात हत्तीवर बसून पांडवांच्या बाजूने मोठा पराक्रम केला, असा महाभारतात उल्लेख आहे. हा देश हत्तींसाठी प्रसिद्ध असल्याचे कौटिल्याने सांगितले आहे. इथल्या हस्तिदंतांची प्रशंसा पेरिप्लसनेही केली आहे. या प्रदेशाच्या निसर्गाचे वर्णन करताना कालिदासाने एक श्लोक ( पू. मेघ. २३ ) लिहिला आहे, तो असा—

पाण्डुच्छायोपवनवृतयः केतकैः सूचिभिन्नै-
र्नीडारम्भैर्गृहबलिभुजामाकुलग्रामचैत्याः ।
त्वय्यासन्ने परिणतफलश्यामजम्बूवनान्ताः
सम्पत्स्यन्ते कतिपयदिनस्थायिहंसा दशार्णाः ॥

अर्थ – ( हे मेघा, ) तू नजीक आलास म्हणजे दशार्ण नावाच्या देशातील उपवनांच्या कुंपणातील केवडयांची अग्रे फुलतील व त्यायोगे त्यांच्या कुंपणाला पांडुरका रंग चढेल. गृहबली खाणारे पक्षी चव्हाटयावरील वृक्षांवर घरटी बांधू लागल्यामुळे ते वृक्ष गजबजून जातील. वनातील जांभळे पिकल्यामुळे जांभळीची वने काळी होतील. काही दिवस तिथे हंसही राहिलेले दिसतील.

इथे तलवारी फार उत्तम होत असत, अशी या प्रदेशाची प्राचीन काळी ख्याती होती. [ हि. ध.; म. ज्ञा. को.; स्ट. जॉ. ऐं. मे. इं.; हि. जॉ. ए. इं; म. भा. इ. ]

**दशार्णा** विन्ध्यश्रेणीतल्या ऋक्ष पर्वतातून निघालेली एक नदी. धसान असा तिच्या नावाचा अपभ्रंश रूढ आहे. या नदीवर पितरांचे श्राद्ध करावे, असे सांगितले आहे. ही नदी मध्य प्रदेशातून वाहते [ हि. ध.; पु. इं. ]

**दशावतार** (१) विष्णूचे दहा अवतार. विष्णूने हे अवतार कोणत्या कारणासाठी घेतले व ते कोणत्या तिथीस झाले, त्यांची माहिती अशी–

**मत्स्य** – शंखासुराच्या वधासाठी. चैत्र शुद्ध तृतीया.

**कूर्म** – समुद्रमंथनाच्या वेळी देवासुरांनी रवीप्रमाणे वापरलेला मंदर पर्वत पाठीवर तोलून धरण्यासाठी. वैशाख पौर्णिमा.

**वराह** – हिरण्याक्षवधासाठी व जलमग्न पृथ्वीला वर काढण्यासाठी. भाद्रपद शुद्ध तृतीया.

**नरसिंह**– हिरण्यकशिपूच्या वधासाठी. वैशाख शुद्ध चतुर्दशी.

**वामन** – बळी राजाला पाताळात लोटण्यासाठी. भाद्रपद शुद्ध द्वादशी.

**परशुराम** – सहस्रार्जुन कार्तवीर्याला मारण्यासाठी व क्षत्रियांचा मद नष्ट करण्यासाठी. वैशाख शुद्ध तृतीया.

**राम**– रावणवधासाठी. चैत्र शुद्ध नवमी.

**कृष्ण**– कंसादी दुष्ट राजांच्या नाशासाठी व धर्मसंस्थापना करण्यासाठी. श्रावण वद्य अष्टमी.

**बुद्ध** – यज्ञीय हिंसेचा अतिरेक थांबवून सत्य व अहिंसा यांच्या प्रसारासाठी. आश्विन शुद्ध दशमी. सध्या हाच अवतार चालू आहे, असे मानतात.

**कल्की** – म्लेच्छांच्या नाशासाठी. चालू ( कली ) युगाच्या अखेरीला श्रावण शुद्ध षष्ठीच्या दिवशी हा अवतार होणार आहे, असे कल्की पुराणात सांगितलें आहे.

काही लोक कृष्णाच्या ऐवजी बलरामाला आठवा अवतार मानतात. उदा० जयदेवाने गीतगोविंदात प्रारंभीच्या अष्टपदीमध्ये कृष्णाच्या ऐवजी बलरामाला आठवा अवतार मानून नमन केले आहे.

भारतात अनेक ठिकाणी स्वतंत्रपणे आणि विष्णुमूर्तींच्या प्रभावळींवर दशावतारांची शिल्पे आढळतात. पाहा – अवतार.

(२) एक लोकनाटय. याचा प्रचार महाराष्ट्रात आहे. यात विष्णूच्या दहा अवतारांचे नाटयरूप दर्शन घडवले जाते, म्हणून याला दशावतार नाटय म्हणतात. हा लोकनाटयप्रकार कोकण आणि गोवा या भागांत विशेष प्रचारात आहे. हे नाटय श्री. श्यामजी नाईक काळे यांनी इ. स. १७२८ मध्ये कर्नाटकातून कोकणात आणले, असे म्हणतात. त्याचा पहिला प्रयोग अडिवरे या गावी महाकाली देवीपुढे झाला आणि तिथून ते सर्व दक्षिण कोकणात आणि गोव्यातही प्रसार पावले. आजही कोकणात प्रस्तुत नाटयाचा सूत्रधार प्रयोगाच्या प्रारंभी काळे यांना ‘ काळेबुवा, दशावतारास चला ! ’ असे कृतज्ञतापूर्वक अवाहन करतो.

दशावताराचे वाङ्‍मयीन उल्लेख दासबोधापासून मिळू लागतात. समर्थ रामदासांनी त्याविषयी म्हटले आहे, ते असे–

खेळता नेटके दशावतारी। तेथें येती सुंदर नारी।
नेत्र मोडिती कळाकुसरी। परी अवघे धटिंगण ॥
( दासबोध. ६.८.११ )

या उल्लेखावरून असे अनुमान करण्यात येते, की रामदासांच्या काळी महाराष्ट्रात दशावतार नाटय प्रचारात असावे

आणि मध्यंतरी ते लुप्त झाल्यामुळे श्री. काळे यांनी पुन्हा ते कर्नाटकातून महाराष्ट्रात आणले असावे. परंतु रामदासांचा महाराष्ट्र व कर्नाटक या दोन्ही प्रदेशांत संचार असल्यामुळे त्यांनी केलेला उल्लेख कर्नाटकातील नाट्याविषयीही असणे शक्य आहे. इ. स. च्या सातव्या शतकात विष्णुपूरच्या मल्लराजाने दशावतारी खेळांची प्रथा सुरू केली, असे सांगतात. कर्नाटकातील यक्षगान हे त्याचे मूळ रूप असून, त्यातूनच महाराष्ट्रातील दशावतार नाट्य उदय पावले आहे.

दशावतार नाट्य ग्रामदेवतांच्या उत्सवात गावोगावी होत असते. या उत्सवाचा हंगाम कार्तिकी पौर्णिमेपासून चैत्र महिन्यापर्यंत असतो. दशावतार नाट्य करणारे लोक बहुधा देवळी जातीचे असतात. ग्रामदेवतांच्या उपासकांपैकी लिंगायत आणि गुरव हेही दशावतार नाट्य करतात. त्यांना दशांत्री (दशावतारी) किंवा खेळचे (खेळिये) असे म्हणतात. या खेळातील संवाद पाठ केलेले नसतात. सूत्रधार कथासूत्र पद्यात चालू ठेवतो आणि पात्रे कथेच्या अनुरोधाने उत्स्फूर्तपणे बोलतात. या नाट्याला मृदंग व पेटी यांची साथ असते.

ग्रामदेवतेच्या मंदिरासमोरच्या मोकळ्या पटांगणात हे खेळ होतात. त्यासाठी मोठा मांडव घालतात, रंगभूमी म्हणून एक चौफाळा ठेवतात आणि त्यापुढे नृत्यासाठी थोडी जागा मोकळी



दशावतार–लोकनाट्य

ठेवतात. रंगभूमीवर पात्र येण्यापूर्वी दोन माणसे समोर चादरीचा पडदा धरतात आणि पात्राचा प्रवेश होताच तो काढून घेतात. खेळ सुरू होण्यापूर्वी प्रेक्षकांच्या भावना उत्तेजित करण्यासाठी घुमटावर किंवा मृदंगावर धुमाळी ताल वाजवतात. खेळ मध्यरात्रीच्या सुमारास सुरू होतो आणि अरुणोदयाच्या वेळी संपतो.

प्रथम सूत्रधार रंगभूमीवर येतो आणि गणपति-सरस्वतीचे स्मरण करतो. मग ऋद्धिसिद्धींसह गणपती प्रवेश करतो. त्याच्या पाठोपाठ त्याचा पुजारी येतो अणि विनोदी पद्धतीने त्याची पूजा करतो. नंतर कमरेला लाकडी मोर बांधून सरस्वती येते. ती थोडा वेळ नृत्य करते आणि सूत्रधाराला आशीर्वाद देऊन जाते. त्यानंतर दशावतारांपैकी मत्स्यावताराचा उपक्रम होतो. ब्रह्मदेव तपाला बसला आहे आणि संकासूर (शंखासुर) त्याचे वेद चोरून नेत आहे, असा प्रवेश होतो. संकासूर हे विनोदी पात्र असते. मत्स्यावतारी विष्णूशी त्याचे युद्ध होण्यापूर्वी तो अचकट-विचकट विनोद करून प्रेक्षकांना हसवतो. प्रेक्षकांच्या दृष्टीने संकासूर हे मोठेच आकर्षण असते. नंतर मत्स्यावतार व संकासुर यांचे द्वन्द्वयुद्ध होऊन त्यात संकासुराचा वध होतो.

गोव्यातल्या दशावतारी खेळात मत्स्यावतारानंतर एकदम कृष्णावतार सुरू होतो; परंतु उत्तर कोकणात मधला नरसिंहावतार दाखविण्याची प्रथा आहे. त्यात प्रथम हिरण्यकशिपू येतो. पाठोपाठ भालदार येऊन प्रल्हादाचा जन्म झाल्याची बातमी देतो. त्यावर ज्योतिषी येऊन मुलाचे भविष्य वर्तवितो. मग ज्योतिष्याला कोणती गावे इनाम द्यावी, याची चर्चा होते आणि अखेरीस त्याची एका नारळावरच बोळवण होते. नंतर एका लहान मुलाला हिरण्यकशिपूच्या मांडीवर बसवतात. पुढे सर्व आख्यान होते आणि शेवटी हिरण्यकशिपू व नरसिंह यांचे द्वंद्वयुद्ध होते. नरसिंह हिरण्यकशिपूला आडवा घालतो. नरसिंहाचे काम करणाऱ्या पात्राच्या अंगात नरसिंहाचा संचार होतो, अशी समजूत असल्यामुळे हिरण्यकशिपूच्या भूमिकेतील पात्राला धोका पोचणे संभवनीय असते. त्यामुळे लोक धावत जाऊन नरसिंहाला मागे ओढतात व नारळ फोडतात. मग प्रल्हादाला जवळ नेताच नरसिंह शांत होतो.

दशावताराचे प्रसंग संपल्यावर खेळचे उषा-अनिरुद्ध किंवा द्रौपदीस्वयंवर यांसारख्या एखाद्या पौराणिक आख्यानावर नाटक करतात. दिशा उजळू लागल्यावर हे नाटक संपते आणि शेवटी राधा–कृष्णांचे फुगडी–नृत्य होऊन दहिकाला होतो. मध्यंतरी ऋद्धिसिद्धी ही पात्रे प्रेक्षकात आरती फिरवतात. आणि प्रेक्षक यथाशक्ति त्यांना ओवाळणी टाकतात. दशावतारी नाटकात शेवटी दहिकाला होतो, त्यामुळे त्याला दशावतारी काला असेही म्हणतात. देशावर या नाटकांना बोहाडा असे नाव आहे.

या नाट्यप्रकारात भयानक वेशभूषा केलेले राक्षस, राळेच्या प्रकाशात होणारा त्यांचा भडक प्रवेश, त्यांच्या मुखीच्या अलल–डुर्रच्या प्रचंड गर्जना आणि त्यांचे देवांशी युद्ध चालू असताना होणारा शस्त्रांचा खणखणाट यांना विशेष प्राधान्य असते. त्यामुळेच आधुनिक नाटकांचा उदय झाल्यावर नवे रसिक या जुन्या नाटकांना 'ताकडधोम' नाटके म्हणून संबोधू लागले. [लो. ना. प.; रत्ना. गॅझे.; फो. डा. म.]

**दशावतारव्रत** एक काम्य व्रत. विष्णू पुराणानुसार या व्रताचा प्रारंभ मार्गशीर्ष शु. द्वादशीला करायचा असतो. ही मत्स्य या आद्य अवताराची जन्मतिथी आहे. त्यामुळे या व्रताचा आरंभ त्या दिवशी होणे उचित ठरते. भविष्य पुराणाने भाद्रपद शु. दशमी हा प्रारंभदिन सांगितला आहे. प्रत्येक महिन्यात त्याच तिथीला दशावतारांच्या मूर्तींची पूजा करून घारगे, घीवर, इ. खाद्यपदार्थांचा नैवेद्य दाखवितात. पदार्थांची संख्या तीस असते. त्यांपैकी दहा देवाला, दहा ब्राह्मणाला आणि दहा स्वतःला ठेवतात. असा क्रम दहा वर्षेपर्यंत पाळतात. फल — विष्णुलोकाची प्राप्ती. स्त्रियांनी हे व्रत केल्यास त्यांना अक्षय्य लक्ष्मी आणि अखंड पतिसुख यांचा लाभ होतो. [ हि. ध.; व्रतराज; व्र. प. ]

**दशेरक** एक प्राचीन गण आणि राज्य. याला दाशेर, दाशेरक, दशेरुक अशीही नावे आहेत. हे राज्य उत्तरेकडे असल्याचा उल्लेख ब्रह्मांड पुराणात आहे ( २.१६.५० ). त्रिकांडशेषानुसार दशेरक म्हणजे मालवदेश होय. हेमचंद्राने हे मरुदेशाचेच पर्यायनाम असल्याचे म्हटले आहे. याच्या पुष्टीसाठी शब्दकल्पद्रुमकाराने 'दशति दुःखं ददातीति' = जो दुःख देतो, तो दशेरक होय, अशी या नावाची व्युत्पत्ती दिली आहे. दशेरक म्हणजे दशपूर (सध्याच्या मंदसोरचा परिसर ) होय, असेही एक मत आहे. पद्म पुराणाच्या उत्तरखंडात ( ७०.१५ ) मरुप्रदेश हा दशेरकाहून वेगळा असून, तो दशेरकाच्या पश्चिमेला असल्याचे म्हटले आहे. मरुप्रदेश ( मारवाड ) आजही मंदसोरच्या पश्चिमेलाच आहे, ही वस्तुस्थिती दशेरकाचे दशपुराशी म्हणजे सध्याच्या मंदसोर भागाशी ऐकात्म्य दाखविणारी आहे. [ पु. इं.; ओ. नि. सं.; शृंगारहाट; ए. से. ए. इं. ]

**दष्टोद्धरणपंचमी** एक व्रत. ज्याचा एखादा आप्तस्वकीय सर्पदंशाने मृत झाला असेल, त्याने हे व्रत करायचे असते. भाद्रपद शुद्ध पंचमी ही या व्रताची आरंभतिथी होय. व्रतावधी एक वर्ष. या व्रतात सोने, चांदी, लाकूड किंवा चिकणमाती यांची पंचफणायुक्त नागप्रतिमा तयार करून तिची पूजा करतात. प्रत्येक महिन्याला नागांच्या बारा नावांपैकी एकेका नावाने ही पूजा करायची असते. फल— सर्पदंशाने मृत झालेल्या मनुष्याचा उद्धार. [ हि. ध. ]

**दसनामी** शैव गोसाव्यांचा एक पंथ. यात गिरी, पुरी, भारती, इ. द हा पोटभेद असल्यामुळे त्यांना दसनामी असे म्हणतात. हे नंगे राहत असल्यामुळे यांना नांगा साधू असेही म्हटले जाते. शंकराचार्यांनी भारतातल्या साधू संन्याशांची संघटना करण्याचे ठरवून त्यासाठी उत्तरेला (हिमालयात ) बदरी, पश्चिमेला द्वारका, दक्षिणेत शृंगेरी व पूर्वेला पुरी या चार ठिकाणी चार मठ स्थापले. या मठांना अनुक्रमे ज्योती किंवा जोशी, शारदा, शृंगेरी व गोवर्धन अशी नावे आहेत. या मठांच्या आश्रयाने राहणाऱ्या संन्याशांची वर्गवारी करून त्यांनी त्यांना अरण्य, आश्रम, भारती, गिरी, पर्वत, पुरी, सरस्वती, सागर, तीर्थ व वन अशी दहा नावे दिली, असा इतिहास आढळतो. त्यामुळे प्रत्येक संन्याशी आपल्या नावापुढे यापैकी एक कोणती तरी उपाधी लावतो. उदा० आनंदतीर्थ, तोतापुरी, दयानंदसरस्वती, विद्यासागर, माधवपुरी, इत्यादी.

आद्य शंकराचार्यांचे पद्मपाद, हस्तामलक, सुरेश्वर आणि तोटक असे चार प्रमुख संन्यासी शिष्य होते. यांपैकी पद्मपादाचे तीर्थ आणि आश्रम, हस्तामलकाचे वन आणि अरण्य, सुरेश्वराचे सरस्वती, पुरी आणि भारती आणि तोटकाचे गिरी, पर्वत, आणि सागर असे शिष्य होते. दसनामी संन्याशांच्या दहा नावांचा उगम या वरील नावांतून झाला असावा, असे काही संशोधक म्हणतात.

शंकराचार्यप्रस्थापित जोशी मठाशी गिरी, पर्वत आणि सागर यांचा; शारदामठाशी आश्रम व तीर्थ यांचा; शृंगेरी मठाशी भारती, पुरी व सरस्वती यांचा आणि गोवर्धन मठाशी अरण्य व वन या संन्याशांचा संबंध आहे.

या चार मठांची काही वैशिष्टचेही आहेत, ती अशी-

शृंगेरी मठाचे क्षेत्र आंध्र, कर्नाटक, तमिळनाड व केरळ एवढे आहे. त्याचे तीर्थस्थान रामेश्वर, वेद यजुर्वेद, महावाक्य 'अहं ब्रह्मास्मि' व गोत्र भूरिवर आहे. या मठातील महंतांना चैतन्य असे म्हणतात. जोशी मठाच्या आधिपत्याखाली कुरु, पांचाल, काश्मीर, तिबेट व कांबोज एवढा प्रदेश येत असून याचे तीर्थस्थान बदरिकाश्रम, वेद अथर्ववेद, महावाक्य 'अयमात्मा ब्रह्म' व गोत्र आनंदवर असून, इथल्या महंतांना आनंद अशी संज्ञा आहे. गोवर्धन मठाचे क्षेत्र अंग, वंग, कलिंग, मगध, उत्कल व बर्बर एवढे विस्तृत होते. याचे तीर्थस्थान पुरी, वेद ऋग्वेद, महावाक्य 'प्रज्ञानं ब्रह्म' व गोत्र भोगवर असून, येथील महंतांना प्रकाश असे नाव आहे. शारदा मठाचे क्षेत्र सिंधु, सौवीर, सौराष्ट्र व महाराष्ट्र एवढे असून, त्याचा वेद सामवेद, महावाक्य 'तत्त्वमसि' व गोत्र कीटवर आहे. याच्या महंतांना स्वरूप असे म्हणतात.

दसनामी संन्याशांच्या प्रत्येक वर्गात त्यांच्या आध्या[illegible] श्रेणीनुसार कुटीचक, बहूदक, हंस, परमहंस हे चार भेद आहे[illegible]

दसनामी नागा संन्याशांच्या संघटनेला आखाडा असे नाव आहे. सर्व दसनामी संन्यासी या सात आखाड्यांत समाविष्ट केलेले आहेत. त्या सात आखाड्यांची नावे अशी– निर्वाणी निरंजनी, जुना, अटल, आवाहन, अग्नी व आनंद. प्रत्येक आखाड्याच्या अनुयायांची जटा व पगडी बांधण्याची पद्धत वेगवेगळी असून, प्रत्येक आखाड्याची इष्ट देवताही वेगळी असते. आखाड्याच्या प्रमुखाला महंत म्हणतात.

निर्वाणी – या आखाड्याच्या नागांची संख्या सुमारे पाचशे असून, प्रयाग हे त्याचे केंद्र आहे. याशिवाय कनखल, ओंकार, काशी, त्र्यंबक, कुरुक्षेत्र, उज्जैन, उदयपूर, ज्वालामुखी, अकोला, इ. ठिकाणी त्यांच्या जहागिऱ्या व स्थावर संपत्ती आहे. कपिल हा या आखाड्याचा इष्ट देव आहे.

निरंजनी – या आखाड्यातील नागांची संख्या सुमारे पाचशे आहे. याचेही केंद्र प्रयाग हेच असून, हरिद्वार, काशी, त्र्यंबक, ओंकार, उज्जैन, इ. ठिकाणी यांची खूप संपत्ती आहे. या आखाड्याचा इष्ट देव कार्तिकेय हा आहे.

जुना – या आखाड्याचे केंद्र काशी हे आहे. यातील नागांची संख्या सुमारे तीनशे आहे. स्त्री-संन्याशिनींची संघटना हे या आखाड्याचे वैशिष्टच आहे. प्रयाग, हरिद्वार, ओंकार, त्र्यंबक, उज्जैन, इ. ठिकाणी याच्या शाखा व संपत्ती आहे. याचा इष्ट देव दत्तात्रेय हा आहे.

अटल – या आखाड्याच्या नागांची संख्या सुमारे शंभर असून, काशी हेच त्यांचे केंद्र आहे. बडोदा, हरिद्वार, त्र्यंबक, उज्जैन, इ. ठिकाणी याच्या शाखा आहेत. याचा इष्ट देव गणेश हा आहे.

आवाहन – या आखाड्याचेही काशी हेच केंद्र आहे. यातील नागांची संख्या सुमारे शंभर आहे. सांप्रत हा आखाडा निरंजनी आखाड्याशी संबद्ध आहे. या आखाड्याचे दत्तात्रेय व गजानन असे दोन इष्ट देव आहेत.

अग्नी – या आखाड्याचा अग्नी हाच इष्ट देव आहे. यात सांप्रत संन्यासी नागांच्या ऐवजी चारही पीठांतील ब्रह्मचारी राहतात. काशी हेच याचेही केंद्रस्थान आहे.

आनंद – हा आखाडा हल्ली लुप्तप्राय झाला असून, काशीत त्याचे काही संन्यासी राहतात. याचा इष्ट देव सूर्य आहे.

प्रत्येक आखाड्यात पुन्हा बावन्न पोटभाग असून, त्यांना मढी असे म्हणतात. आखाड्यातील वीर पुरुषांच्या किंवा काही प्रसिद्ध स्थानांच्या नावांवरून या मढ्यांना नावे मिळालेली आहेत. मात्र प्रत्येक आखाड्याच्या बावन्न मढ्यांना स्वतंत्र नावे आहेतच, असे नाही. याशिवाय आखाड्यांचा दावा नामक आणखी एक विभाग असतो. असे एकूण आठ दावे असून, त्यांत बावन्न मढ्यांचा समावेश होतो. दाव्यांचे पुन्हा गिरी व पुरी असे दोन भेद आहेत. गिरी दाव्यात पर्वत व सागर या दोहोंचाही समावेश असून, त्यांची संख्या चार आहे. रामदत्ती, ऋद्धिनाथी, चारमढी व दसमढी अशी त्यांची नावे आहेत.

पुरी दावे चार असून त्यांत भारती, सरस्वती, तीर्थ, आश्रम, वन व अरण्य या संन्याशांचाही समावेश होतो. वैकुंठी, सहजावत, दरियान व भारती अशी त्यांची नावे आहेत.

पंथदीक्षा – दसनामींच्या आखाड्यांत साधारणपणे सतरा ते अठरा वर्षांच्या तरुण साधूंची भरती केली जाते. आखाड्यात कोणाला दीक्षा दिली जात नाही; तर आधीच संन्यासदीक्षा घेतलेल्या साधूला त्यात प्रवेश मिळतो. त्या वेळी प्रथम उमेदवाराच्या जातीची चौकशी करतात. ज्या जाती लढाऊ म्हणून प्रसिद्ध आहेत, त्यांना प्रवेशाच्या बाबतीत अग्रक्रम देतात. काही प्रांतांतील ब्राह्मण हे प्रवेशाला अयोग्य मानले जातात .अस्पृश्यांना प्रवेश मिळत नाही. निरोगी व धडधाकट साधूच प्रवेशपात्र समजतात. मग त्याला आखाड्याच्या इष्ट देवतेसमोर पुढील आशयाच्या सहा प्रतिज्ञा घ्यायला लावतात–

(१) संपत्तीच्या बाबतीत मी कोणताही हक्क सांगणार नाही. सर्व संपत्ती जमातीच्या (फिरता संघ) मालकीची आहे, असे समजेन.

(२) गांजा, तंबाखू ओढणार नाही.

(३) एक आखाडा सोडून अन्य आखाड्यात जाणार नाही.

(४) आपसात मारामारी करणार नाही.

(५) वरिष्ठ अधिकाऱ्याची आज्ञा पाळीन.

(६) जमातीची संपत्ती चोरणार नाही.

हा शपथविधी झाल्यावर त्या साधूला वस्त्रधारी असे म्हणतात. वस्त्रधारीला भगवी वस्त्रे, विभूती व रुद्राक्षमाळा या गोष्टी धारण कराव्या लागतात. वस्त्रधारीच्या वरच्या अधिकाऱ्याला सिद्ध असे नाव असून, सिद्धाची आज्ञा पाळणे, हे वस्त्रधारीचे मुख्य कर्तव्य असते. सकाळी उठल्यावर गुरूला दातवण व पाणी देणे, त्यांची राहण्याची जागा झाडणे, आखाड्याचे उंट व घोडे यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करणे, पूजा करणे, इ. कामे वस्त्रधारीला करावी लागतात. पूर्वी वस्त्रधारीचा बराचसा वेळ तलवार बंदूक, भाला, इ. शस्त्रे चालवण्यात जात असे; पण हल्ली तसल्या शिक्षणाला फार थोडा वेळ देतात. वस्त्रधारी तीर्थयात्रा करीत असताना त्याला दिवसातून एकदाच भोजन करणे, सातच घरी भिक्षा मागणे, गावाबाहेर राहणे, जमिनीवर झोपणे, कोणालाही नमस्कार न करणे, इ. नियम पाळावे लागतात.

वस्त्रधारी आजारी पडल्यास त्याच्या सेवा-शुश्रूषेची व्यवस्था आखाड्याच्या मार्फतच होते. वृद्धपणी त्याची काशीच्या किंवा

दुसऱ्या एखाद्या ठिकाणच्या आखाड्यात राहायची सोय केली जाते. आखाड्यातील वस्त्रधारीपासून श्रीमहंतापर्यंत सर्वांना अन्न व वस्त्र समान मिळते. आखाड्यातील अधिकारपदे ही निवडणुकीने मिळतात.

वस्त्रधारीने दहा-बारा वर्षे सिद्धाच्या हुकमतीत घालवल्या-वर तो नागा म्हणजे नंगा साधू बनायला योग्य झाला, असे समजतात. मग कुंभ किंवा अर्धकुंभ पर्वणीच्या वेळी त्याला नागा बनवण्याचा समारंभ करतात. त्या वेळी उमेदवार धोतर, उत्तरीय व डोक्याला साफा असा पोषाख करतो. हा सर्व पोषाख भगव्या रंगाचा असतो. प्रथम त्याची शारीरिक तपासणी होते. कुंभपर्वणीच्या वेळी आखाड्यातील सर्व साधू मिरवणुकीने नदीस्नानासाठी निघतात. मिरवणुकीच्या अग्रभागी भगवे निशाण असलेला घोडा, याच्या मागे सूर्यप्रकाश व भैरवप्रकाश यांचे माले आणि त्यांच्या मागे दिगंबर नागा चालत असतात. त्या वेळी सर्व प्रकारच्या तपासणीत उत्तीर्ण झालेला वस्त्रधारी त्यांच्याबरोबर पाण्यापर्यंत जातो. स्नानासाठी नदीत उतरताना त्याचे सर्व कपडे काढून त्याला नग्न करतात. स्नान झाल्यानंतर त्याला पुनश्च आखाड्याच्या इष्ट देवतेसमोर मागील शपथा दोन वेळा घ्याव्या लागतात. त्यानंतर तो वस्त्रधारी विधियुक्त नागा बनतो. नागा साधूला स्त्रीविषयक आकर्षण वाटू नये म्हणून त्याच वेळी त्याला खच्ची करण्याची प्रथा एका काळी होती. त्यासाठी त्याच्या अंडकोशाच्या एका शिरेचा भेद करीत असत. सांप्रत ही पद्धत बंद झाली आहे.

आखाड्याच्या व जमातीच्या संपत्तीत इतरांप्रमाणेच नागा-लाही खाण्यापिण्याचा हक्क असतो. मात्र त्याला पंच व महंत यांच्या आज्ञेत राहावे लागते. नागा बनण्यासाठी पूर्वी हत्यारे चालवणे व युद्धात नेतृत्व करण्याची स्वाभाविक क्षमता असणे, या दोन गोष्टी आवश्यक मानल्या जात असत. पण आता तशा मानल्या जात नाहीत. जे नागा होतात त्यांना पुढे आखाडे व त्यांची गावे यांचे निरीक्षक नेमतात. नागा साधू वर चढत चढत श्रीमहंतपदापर्यंत पोचू शकतो.

**थानापती** – नागानंतरची उच्च श्रेणी म्हणजे आखाड्याच्या एखाद्या शाखेचा कार्यकर्ता बनणे, ही होय. याला थानापती असे नाव आहे. आखाड्यात असे आठ थानापती असतात. आखाड्यातील सर्व शासन लोकशाही पद्धतीने चालते. एखाद्या गोष्टीचा निर्णय घेण्याबाबत आठही थानापतींना समान अधिकार असतो. दोन कुंभपर्वांच्या मधल्या काळात नेहमी फिरत राहणारे पंचही एखाद्या गोष्टीचा निर्णय आपले श्रीमहंत व तिथे उपस्थित असलेले नागा यांच्या सल्ल्याने करतात.

या आखाड्यांच्या मालकीची खूप संपत्ती आहे. कनखल येथील बऱ्याचशा जमिनींची व घरांची मालकी निर्वाणी आखाड्याकडे आहे; तर हरिद्वार व मायापूर येथे अनेक एकर जमीन व अनेक घरे निरंजनी आखाड्याच्या अखत्यारीत आहेत. याशिवाय पन्नास गावांत त्यांची जमीनदारी आहे. अशा रीतीने कनखल व हरिद्वार येथील आखाडे कोट्याधी... आहेत. श्रीपंचांनी निवडलेले आठ थानापती या सर्व संपत्तीची व्यवस्था पाहतात. काही वेळा आठांपैकी एका थानापती-कडे ही व्यवस्था दिली जाते. अशा वेळी पंच आपली मोहोर उठवून त्याच्या नेमणुकीची लेखी सूचना देतो. ही मोहोर प्रत्येक आखाड्याची स्वतंत्र असते. मोहोर असल्याशिवाय कोणतेही कागदपत्र अधिकृत ठरत नाहीत. थानापतीच्या मृत्यू-नंतर त्याची सर्व चीजवस्तू आखाड्याच्या मालकीची होते.

**शंभुपंच** – कुंभपर्वणीच्या वेळी एकत्र जमलेल्या आखाड्यांतील सर्व साधुसंघाला शंभुपंच असे म्हणतात. आखाड्याची ही सर्व-श्रेष्ठ शासनसंस्था होय. श्रीमहंतांपासून सर्वसाधारण नागा व वस्त्रधारी या सर्वांना त्यांचा निर्णय पाळावा लागतो. आखा-ड्यातील स्थाने व व्यक्ती यांच्या भांडणाचा निकाल तेच देतात. दुसऱ्या संप्रदायातील लोकांशी युद्ध व वादविवाद करण्या-बाबतचा अखेरचा निर्णयही यांचाच असतो. यांच्याच आज्ञेवरून गेल्या चारशे वर्षांत अनेक वेळा हजारो दसनामी नागा लोकांनी प्राणार्पण केले आहे.

**श्रीपंच** – कुंभपर्वणी संपल्यावर आखाड्याचे बहुतेक नागा सदस्य आपापल्या गावी जातात. काही नागा मात्र आखा-ड्याच्या सर्वश्रेष्ठ आठ श्रीमहंतांबरोबर यात्रा करीत हिंडत राहतात. या फिरत्या साधूंच्या संघाला जमात अशी संज्ञा आहे. जमातीलाच पंच, श्रीपंच, पंचपरमेश्वर अशी अन्यही नावे आहेत. दोन कुंभपर्वांच्या मधल्या काळात आखाड्याची सर्व व्यवस्था जमात बघते.

**जुंडीमहंत** – आखाड्यातील काही नागा लहान मोठ्या तुकड्या करून देशभर फिरत असतात, त्यांना जुंडी म्हणतात. पंचांच्या संमतीने जुंडी बनते व पंचच जुंडीचे महंत नेमतात. पावसाळ्याचे चार महिने सोडून इतर आठ महिने जुंडी प्रवास करीत असते. श्रीपंचांप्रमाणे जुंडीच्याही स्वतंत्र इष्ट देवता, निशाण, भगवा झेंडा, माला, छडी, इ. वस्तू असतात; त्या पंचांकडूनच तिला मिळतात. जुंडीची स्थावर संपत्ती नसते. भक्तगण जे काही देतील तेवढ्यावर त्यांचा उदरनिर्वाह चालतो.

**श्रीमहंत व कारभारी** – कुंभपर्व संपल्यावर क्षेत्रस्थानांतून निघण्यापूर्वी शंभुपंच आखाड्याचा कारभार बघण्यासाठी श्री-पंचांच्या आठ महंतांची व आठ कारभाऱ्यांची निवड करतात.

या महंतांना श्रीमहंत असे म्हणतात. एका कुंभापासून दुसऱ्या कुंभापर्यंतच्या मधल्या काळापुरती यांची निवडणूक होते. निवडणुकीपूर्वी शंमुपंचांचा कोतवाल आठही दाव्यांत जाऊन प्रत्येकाला श्रीमहंत व कारभारी यांच्या पदासाठी एकेक नाव सुचवायला सांगतो. आठ दाव्यांकडून जी आठ नावे निवडून येतील, त्या नावांवर शंमुपंच आपली संमतिदर्शक मोहोर उठवतो. या आठही महंतांना समान अधिकार असतात. ज्या बाबतीत त्यांचे एकमत होते, ती बात पक्की समजतात आणि आखाड्यातील प्रत्येक व्यक्तीने ती मानली पाहिजे, असा नियम असतो. अखेरचा निर्णय पंचांच्या सल्ल्याने घेतात. निर्णय आठ श्रीमहंत व सर्व श्रीपंच यांच्या नावाने लिहिला जातो. श्रीमहंतांना कामात मदत करणे, हे कारभाऱ्यांचे काम असते. यांना पायी यात्रा करण्याची सक्ती नसते.

धुनीवाला – श्रीपंचांच्या बरोबर आखाड्याची इष्ट देवता, कागदपत्र, पैसा, मोहोर, छडी, इ. वस्तू असतात. त्या सांभाळण्यासाठी दोन दावे एक-दोन महिन्यांपुरता आपला एकेक नागा श्रीपंचांकडे सुपूर्त करतात. अशा नागांना जमातीचे धुनीवाले म्हणतात. आठही महंतांना मान्य असलेल्या बाबींचे ते पालन करतात.

या नागांनी जपतप करण्याऐवजी लढाऊ वृत्तीचे पोषण का केले, त्यासंबंधी उ. भारतात एक परंपरागत समजूत प्रचलित आहे ती अशी– इ. स. च्या १६ व्या शतकाच्या उत्तरार्धात वाराणसीत राहत असलेल्या मधुसूदन सरस्वती यांनी प्रथम लढाऊ नागांची एक तुकडी तयार केली. त्या काळात मुसलमान फकीर शस्त्रधारी असत व ते हिंदू सन्याशांची वारंवार कत्तल करीत. ही आपत्ती टाळण्यासाठी मधुसूदन सरस्वतींनी नागांना शस्त्रे दिली व त्रैवर्णिकांबरोबर शूद्रांनाही आखाड्यात प्रवेश दिला.

दसनामी नागांनी प्रारंभी मुसलमानांपासून स्वसंरक्षण करण्यासाठी शस्त्र हाती धरले असले, तरी नंतर त्यांनी हिंदूंविरुद्धही आपले शस्त्र चालवण्यास कमी केले नाही. ते मुसलमान नबाबांच्या सैन्यात सामील होऊन हिंदूशी लढत होते. इ. स. १७६० मध्ये हरिद्वार येथे झालेल्या संन्यासी व बैरागी यांच्या झगड्यात सुमारे अठरा हजार नागा धारातीर्थी पडले. याशिवाय मराठे, राजपूत व शीख यांच्या राजकीय युद्धांतही नागांनी अनेक वेळा भाग घेतला आहे.

नागा साधूंचा कठोर देहदंडावर फार भर असतो. उर्ध्वबाहू उभे राहणे, एका पायावर उभे राहणे, खिळ्यांवर झोपणे, पंचाग्निसाधन करणे, इ. शारीरिक पीडा देणाऱ्या गोष्टी ते आचरतात. त्यामुळे मोक्षप्राप्तीचा मार्ग सुलभ होतो, असे त्यांचे मत आहे. शूद्रादिकांची आखाड्यात भरती झाल्यामुळे त्यांना शास्त्राभ्यासापेक्षा कायक्लेशात्मक तपस्या अधिक सोयीची वाटली असावी. पण बौद्धिक साधनेचे अभावी त्यांना पुढे ख्रिश्चन मिशनऱ्यांशी लढा देणे फार अवघड जाऊ लागले. भारतीय तत्त्वज्ञानाचा अभ्यास नसल्यामुळे त्यांना ख्रिश्चन मिशनऱ्यांना वादविवादात पराभूत करता येईना. तेव्हा ही स्थिती सुधारण्यासाठी दसनामी अधिकाऱ्यांनी विद्वान परमहंसांना आपल्याला अध्यात्मादी शास्त्रे शिकवण्याची विनंती केली. ते परमहंस मग त्यांना अध्यापन करू लागले. या अध्यापक परमहंसांना मंडलेश्वर अशी उपाधी मिळाली. प्रत्येक आखाड्यासाठी स्वतंत्र मंडलेश्वराची नेमणूक होत असे. या प्रयत्नांत काही नागा साधू विद्वान झाले व पुढे स्वतः मंडलेश्वराच्या पदावरही आरूढ झाले. ज्या मंडलेश्वराचा शिष्य गुरूच्या हयातीत मंडलेश्वर बनतो, त्याला महामंडलेश्वर अशी पदवी मिळू लागली.

आखाड्यात राहणारे साधू इष्टदेवतेची पूजाअर्चा, जपजाप्य अध्ययन व शारीरिक व्यायाम यांत आपला दिवस घालवतात. पूर्वी हे साधू मद्य, अफू, गांजा, भांग, इ. मादक पदार्थांचे अतिरिक्त सेवन करीत. पण ते प्रमाण आतामर्यादित झाले आहे. [ इं. सा.; सा. नि.; हि. ध.; शंकराचार्य; हिं. वि. को. ]

## दसनामीवत

गोसाव्यांचा एक वर्ग. हे दसनामी गोसाव्यांत गणले जात नाहीत. दसनाम्यांच्या वंशावळी जपून ठेवणे, हे काम दसनामीवत साधू करतात. हे भारताच्या वायव्यभागात आढळतात. हे शिवाचे उपासक असून, सरस्वतीलाही भजतात. [ वै. शै. म. व. ]

## दसरा

आश्विन शुद्ध दशमीला हे नाव आहे. या तिथीला विजयादशमी असेही म्हणतात. दुर्गानवरात्र संपल्यानंतर लगेच हा दिवस येतो, म्हणून त्याला नवरात्राच्या समाप्तीचा दिवस असेही मानतात. काही घराण्यांतले नवरात्र नवमीच्या दिवशी, तर काहींचे दशमीच्या दिवशी विर्सजित होते. या दिवशी सीमोल्लंघन, शमीपूजन, अपराजितापूजा व शस्त्रपूजा ही चार कृत्ये करायची असतात.

सीमोल्लंघन – अपराण्हकाली गावाच्या सीमेबाहेर ईशान्य दिशेकडे सीमोल्लंघनासाठी जातात. जिथे शमी वृक्ष किंवा आपटा असेल, तिथे थांबतात. मग शमीची पूजा करतात. पुढील श्लोकांनी शमीची प्रार्थना करतात –

शमी शमयते पापं शमी लोहितकण्टका।
धारिण्यर्जुनबाणानां रामस्य प्रियवादिनी।।
करिष्यमाणयात्रायां यथाकालं सुखं मया।

**तत्र निर्विघ्नकर्त्री त्वं भव श्रीरामपूजिते ॥**

अर्थ – शमी पाप शमवते. शमीचे काटे तांबूस असतात. शमी रामाला प्रिय बोलणारी असून अर्जुनाच्या बाणांचे धारण करणारी आहे. हे शमी, रामाने तुझी पुजा केली आहे. मी यथाकाल विजययात्रेला निघणार आहे. ही यात्रा तू मला निर्विघ्न व सुखकारक कर.

आपटयाची पूजा करायची असल्यास पुढील मंत्र म्हणतात –

**अश्मन्तक महावृक्ष महादोषनिवारण ।**
**इष्टानां दर्शनं देहि कुरु शत्रुविनाशनम् ॥**

अर्थ – हे अश्मंतक महावृक्षा, तू महादोषांचे निवारण करणारा आहेस. तू मला माझ्या मित्रांचे दर्शन घडव आणि माझ्या शत्रूंचा नाश कर.

नंतर त्या वृक्षाच्या मुळाशी तांदूळ, सुपारी व सुवर्णनाणे (विकल्पाने तांब्याचे नाणे) ठेवतात. मग वृक्षाला प्रदक्षिणा करून त्याच्या बुंध्याजवळची थोडी माती व त्या वृक्षाची पाने घरी आणतात. शमीची नाही; पण आपटयाची पाने सोने म्हणून देवाला वाहतात व इष्टमित्रांना देतात. सोने हे लहानांनी मोठयांना द्यायचे असते, असा संकेत आहे.

**अपराजितापूजन** – ज्या ठिकाणी शमीची पूजा होते, त्याच ठिकाणी भूमीवर अष्टदल काढून त्यावर अपराजितेची मूर्ती ठेवतात व तिची पूजा करून पुढील मंत्राने प्रार्थना करतात –

**हारेण तु विचित्रेण भास्वत्कनकमेखला ।**
**अपराजिता भद्ररता करोतु विजयं मम ॥**

अर्थ – गळयामध्ये चित्रविचित्र हार घालणारी, जिच्या कमरेत चकाकणारी सुवर्णमेखला आहे अशी व (भक्तांचे) कल्याण करण्याच्या कामी तत्पर अशी अपराजिता देवी मला विजय देवो.

काही ठिकाणी अपराजितेची पूजा सीमोल्लंघनाला निघण्याच्या पूर्वीही करतात.

**शस्त्रपूजा** – या दिवशी राजे व सामंत सरदार हे लोक आपापली शस्त्रे साफसूफ करून ती हारीने मांडतात व त्यांची पूजा करतात. त्याचप्रमाणे शेतकरी व कारागीर हे आपापली आऊते व हत्यारे यांची पूजा करतात. काही लोक ही शस्त्रपूजा नवमीच्या दिवशीही करतात.

**राजविधान** – दसरा हा विजयाचा सण असल्यामुळे त्या दिवशी राजेलोकांना विशेष विधान सांगितले आहे, ते असे –

दसऱ्याच्या दिवशी सकाळी हत्ती, घोडे यांना स्नान घालून व वस्त्रालंकारांनी सजवून राजवाडयासमोर आणून उभे करावे. सिंहासनाची पूजा करावी. दरबार भरवावा. राजवैभवाची सर्व चिन्हे सुसज्ज करावी. ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. दुपारी चवथा प्रहर लागताना लवाजम्यानिशी सीमोल्लंघनाला निघावे. त्या वेळी ब्राह्मणांनी स्वस्तिवाचन करावे. मिरवणुकीबरोबर रणवाद्ये असावीत. राजाने शस्त्रसज्ज होऊन हत्तीवर किंवा घोडयावर बसून मिरवणुकीने जावे. जाताना मार्गावरील देवतांची पूजा करावी. शमी वृक्षाजवळ पोचल्यावर अपराजितेची पूजा करावी. नंतर हळदीने पिवळया केलेल्या वस्त्रात दूर्वा व पांढरी मोहरी बांधून तयार केलेले कंकण अभिमंत्रित करून ते उजव्या हातात बांधावे. नंतर शमीची पूजा करून तिची प्रार्थना करावी. मग हातात खड्ग घेऊन पूर्वेपासून क्रमाने अष्टदिशांना काही पावले चालावे. मग इंद्रादी देवांना नमस्कार करून चतुरंग सेनेचे संचालन करावे. नंतर जयघोष करीत राजधानीत परत यावे. महाद्वारात स्त्रियांनी ओवाळल्यानंतर वाडयात प्रवेश करावा. ब्राह्मणांचे आशीर्वाद घ्यावेत.

अशा प्रकारे जे राजे प्रतिवर्षी सीमोल्लंघनाचा विधी करतात, त्यांना विजय व ऐश्वर्य यांची प्राप्ती होते, अशी त्याची फलश्रुती सांगितली आहे.

दसऱ्याचा दिवस हा सर्व शुभ कार्यांना प्रशस्त मानतात. दशमी तिथी श्रवण नक्षत्राने युक्त असेल, तर तो दिवस अतिशुभ होय. म्हणूनच दसऱ्याला साडेतीन शुभ मुहूर्तांपैकी एक मानलेले आहे ( मु. चिं. ).

दसरा हा भारतातील एक सार्वत्रिक सण आहे. सर्व जातींचे लोक हा सण पाळतात. हा विजयाचा, पराक्रमाचा सण आहे. अर्जुनाने अज्ञातवासात शमीच्या ढोलीत ठेवलेली शस्त्रे काढून विराटाच्या गाई पळवणाऱ्या कौरवसैन्यावर स्वारी केली व विजय मिळवला, तो याच दिवशी. रामचंद्राने रावणावर विजय मिळवून त्याचा वध केला, तोही याच दिवशी, असे मानतात. या घटनांच्या संकेतामुळे या दिवसाला विजयादशमी असे नाव मिळाले आहे.

तसे पाहिले तर हा सण फार प्राचीन काळापासून चालत आलेला दिसतो. प्रारंभी तो एक कृषिविषयक लोकोत्सव होता. पावसाळयात पेरलेल्या शेतातले पहिले पीक घरात आल्यावेळी शेतकरी हा उत्सव करीत. नवरात्रात घटस्थापनेच्या दिवशी घटाखालच्या स्थंडिलावर नऊ धान्यांची पेरणी करतात व दसऱ्याच्या दिवशी त्या धान्यांचे वाढलेले अंकुर उपटून देवाला वाहतात. या गोष्टी या उत्सवाचे मूळ कृषिस्वरूप व्यक्त करणाऱ्या आहेत. कित्येक ठिकाणी शेतातल्या भाताच्या लोंब्या तोडून आणून त्या प्रवेशद्वारावर तोरणासारख्या बांधतात; ही प्रथादेखील या सणाचे कृषिविषयक स्वरूपच व्यक्त करते. पुढे याच सणाला धार्मिक स्वरूप दिले गेले आणि इतिहासकाळात तो एक राजकीय स्वरूपाचा सण ठरला.

**मराठेशाहीतला दसरा**– मराठेशाहीत व पेशवाईच्या काळात दसऱ्याच्या सीमोल्लंघनाला मोठे लष्करी महत्त्व प्राप्त झाले होते. दसऱ्यापूर्वी चार महिने पावसाळ्यात नदी-नाले भरलेले असल्यामुळे मोहिमा थांबत. सैनिक आणि सरदार यांना त्यामुळे विश्रांती लाभे. पावसाळा संपून शरदऋतू सुरू झाला, की मग त्या सर्व सरदारांच्या आणि सैनिकांच्या अंगात नवा उत्साह संचारू लागे. दसऱ्याचे सीमोल्लंघन होताच मराठे सरदार व राजपुरुष पुढच्या मोहिमांचे बेत त्याच मुहूर्तावर ठरवीत. श्री. शं. ना. जोशी यांनी पेशवाईतल्या दसऱ्याचे वर्णन केले आहे, ते असे –

पुणे येथे शनिवारवाड्यातल्या थोरल्या देवघरात व सातारयात श्री शाहूछत्रपतींच्या वाड्यात नवरात्र बसे. नवरात्राचे नऊ दिवस पूजा, पाठ, इ. गोष्टी झाल्यावर दसऱ्याच्या दिवशी उच्चैःश्रव्याच्या प्रतिमेचे पूजन होई. मग हत्ती, घोडे व उंट यांना स्नान घालून त्यांचा शृंगार करीत. मग भगवा झेंडा व जरीपटका हे जुन्याच्या जागी नवे करून त्यांची पूजा करीत व ते ईशान्य बुरुजावर उभारले जात.

सायंकाळी सीमोल्लंघनाच्या स्वारीचा थाट असे. छत्रपतींचा प्रत्येक सरदार आपापले निशाण घेऊन स्वारीत सामील होई. या मिरवणुकीत हत्ती, घोडे, उंट, तोफांचे गाडे व लहान तोफांचे रेकले असत. छत्रपतींची हुजुरातीची फौज या दसरास्वारीत आघाडीला चाले. प्रथम महार सैनिकांचे हूलपथक, त्यानंतर नौबतीचा हत्ती, त्यामागे घोडेस्वार व उंटस्वार, नंतर निशाणाचे हत्ती, त्यामागे काही हत्तीस्वार व त्यामागे छत्रपतींचा अंबारीचा हत्ती असे. पेशव्यांकडील मिरवणुकीत या हत्तीवरील अंबारीत पुढल्या गादीवर आपला शेला ठेवून अंबारीच्या मागील खवासखान्यात पेशवे व त्यांचे मुख्य दिवाण बसत. जेव्हा छत्रपतींचा हत्ती निघत नसे, तेव्हा पेशवे अंबारीत पुढच्या गादीवर बसत.

मग नगराच्या ईशान्य दिशेस विजय-मुहूर्तावर शमीपूजन होई. ते झाल्यावर छत्रपती किंवा पेशवे जवळच्या शाळूच्या शेतातील एक ताट कणसासह उपटून घेत आणि बरोबरच त्याखालची थोडी ओली मातीही घेत. त्या प्रसंगी तोफा बंदुकांच्या फैरी झडत. मग ते सर्व चतुरंग सैन्य परत फिरून निरनिराळ्या रस्त्यांनी आपापल्या गोटात जाई व त्या सैन्यावरचे अधिकारी लोक दरबारासाठी वाड्यात येत.

दसऱ्याच्या दिवशी भरणाऱ्या दरबारात कित्येकांना नवीन पदव्या दिल्या जात. दरबारात एकेक सरदार क्रमाने उठून छत्रपतींना किंवा पेशव्यांना पुतळी, मोहर किंवा होन या स्वरूपात प्रत्यक्ष सोन्याचा नजराणा देई. त्या वेळी भालदार त्या त्या सरदाराचे नाव खड्या सुरात उच्चारून ललकारी देत. दसऱ्याचा हा दरबार आटोपल्यावर आवश्यकतेप्रमाणे किंवा पूर्वयोजनेप्रमाणे मराठे वीर लगेच स्वारीवर निघत. अशा स्वारीची काही ठळक उदाहरणे पुढीलप्रमाणे––

इ. स. १६३९ चा दसरा साजरा करून शहाजीराजांनी जिजाबाई व शिवाजी यांच्यासह बंगलोरला प्रयाण केले. इ. स. १६५६ साली दसऱ्यास मोहीम करून शिवाजी महाराजांनी सुपे घेतले. शिवाजी महाराजांची बंकापुरावरील स्वारी इ. स. १६७३ च्या दसऱ्यासच निघाली. संभाजीने वऱ्हाणपुरावरील स्वारीचे प्रस्थान इ. स. १६८१ च्या दसऱ्यासच ठेवले.

दसऱ्याच्या दिवशी इष्टमित्रांना सोने वाटण्याची प्रथा महाराष्ट्रात आहे. या प्रथेलाही ऐतिहासिक महत्त्व आहे. मराठे वीर मोहिमेवर गेल्यानंतर शत्रूचा प्रदेश लुटून सोन्यानाण्यांच्या रूपाने संपत्ती घरी आणत. असे हे विजयी वीर किंवा शिलेदार मोहिमेवरून परत आले, की दारात त्यांची पत्नी किंवा बहीण त्यांना ओवाळी. मग ते परमुलुखातून लुटून आणलेल्या त्या संपत्तीतला एखादा नग त्या ओवाळणीच्या तबकात टाकीत. घरात गेल्यावर आणलेली लूट देवापुढे ठेवीत. नंतर देवाला आणि वाडवडिलांना नमस्कार करून आशीर्वाद घेत. या घटनेची स्मृती सांप्रत आपट्याची पाने सोने म्हणून वाटण्याच्या रूपाने शिल्लक उरली आहे.

**प्रांतोप्रांतींचा दसरा**– हिमालयाच्या कुशीत असलेल्या कुलू घाटीत दसऱ्याचा उत्सव पुढीलप्रमाणे साजरा करतात — या उत्सवाचा कार्यक्रम सात दिवस चालतो. कुलू घाटीची प्रमुख देवता रघुनाथ ही आहे. दसऱ्याच्या आदल्या दिवशी निरनिराळ्या गावांतील देवतांच्या पालख्या रघुनाथाच्या मंदिरापुढे येतात. दसऱ्याच्या दिवशी रघुनाथाची रथयात्रा निघते. त्या वेळी रघुनाथाच्या मुख्य पुजाऱ्याच्या अंगात देवाचा संचार होतो. मग जमलेले लोक त्याला पीक-पाण्यासंबंधी प्रश्न विचारतात. पुजारी त्या प्रश्नांची उत्तरे देतो. कित्येक लोक आपले घरगुती प्रश्नही त्याला विचारतात व तो सांगेल त्याप्रमाणे उपाय करतात.

त्या दिवशी रघुनाथाच्या समोर तिथल्या लोकांचे विविध प्रकारचे नृत्य होते. या नृत्याच्या स्पर्धाही लावल्या जातात. विजेत्या स्पर्धकांना बक्षिसे देतात. शेवटच्या दिवशी रघुनाथाचा रथ वाजतगाजत व्यास नदीच्या तीरावर आणतात. तिथे गवत व सुकी लाकडे यांनी लंका नगरी बनवतात व तिचे दहन करतात. मग रेडा, कावळा, बकरी, मासा व खेकडा या पाच प्राण्यांचा बळी देतात. हा सर्व कार्यक्रम रात्री चांदण्याच्या प्रकाशात चालतो. कुलू घाटीतले सर्व स्त्री-पुरुष या दिवशी

वस्त्रालंकारांनी नटून-थटून मोठा आनंदोत्सव साजरा करतात.

दक्षिणेत म्हैसूर शहरातला दसरा इतिहासकाळापासून प्रसिद्ध आहे. आजही तो थाटामाटाने साजरा होतो. त्या दिवशी थाटाची मिरवणूक निघते. या मिरवणुकीत नगरातले सर्व लोक भाग घेतात. म्हैसूरचे महाराज हत्तीवरच्या हौद्यात आरूढ होतात. तो गजराज सोन्या-चांदीचे अलंकार आणि पुष्पमाला यांनी सजवलेला असतो. त्याच्या आगेमागेही अनेक हत्ती असतात. हत्तींच्या पुढे सांडणीस्वार आणि घोडेस्वार असतात. महाराजांच्या मागे सैनिक, शरीररक्षक व अधिकारी चालतात. या मिरवणूकीला जंबू सवारी असे म्हणतात.

एका विशिष्ट मैदानात ही मिरवणूक आल्यानंतर महाराज तिथे शमीवृक्षाची पूजा करतात. मग केळ्यांचा घड किंवा नारळ यांच्यावर निशाणबाजी करतात. मिरवणुकीतून परत येताना महाराज हत्ती सोडून घोड्यावर स्वार होतात. त्या दिवशी राजभवनावर रोषणाई होते. तिथली चामुंडा टेकडीही विद्युद्दीपांनी आमूलाग्र झळकू लागते. म्हैसूरवासी जनतेच्या आनंदोत्सवाला जणू पूर्णिमेची भरती येते. भारताच्या विविध प्रदेशांतून अनेक लोक दसऱ्याची ही मिरवणूक व रोषणाई पाहण्यासाठी म्हैसूरला जातात.

चामुंडा देवीने महिषासुराशी युद्ध करून दसऱ्याच्या दिवशी त्याचा वध केला, अशी कथा आहे. हा महिषासुरवध म्हैसूरच्या परिसरातच झाला, अशी तिथल्या लोकांची श्रद्धा आहे.

संस्थाने विलीन होण्याच्या पूर्वी राजस्थानातही राजपूत संस्थानिक मोठ्या दिमाखाने दसऱ्याचा उत्सव साजरा करीत. आजही थोड्याबहुत प्रमाणात तो प्रचलित आहे. त्याचे स्वरूप असे – या दिवशी राजपूत राजे आपल्या गुरूचे दर्शनाला जातात. उदयपूरमध्ये या उत्सवानिमित्त शहराबाहेरच्या मैदानात तंबू उभारले जातात. दुपारी उदयपूरचे राणे आपले सरदार व मानकरी यांना घेऊन शहराबाहेर जातात. तिथे शमीची पूजा करतात. त्या वेळी तोफांची सलामी झडते. घोडदळाची प्रात्यक्षिके होतात. राण्याच्या तंबूत दरबार भरतो. सरदार, मानकरी व शेठ–सावकार राण्याला नजराणे देतात. भाट लोक मेवाडच्या पराक्रमाचे वर्णन करणारी वीरकाव्ये गातात.

**दसरानृत्य** कातकरी व ठाकूर स्त्रियांचा एक नाच. हा नाच दसऱ्याला होतो, म्हणून याला दसरानृत्य असे नाव दिलेले आहे. या नाचात स्त्रिया फेर धरून ओणव्याने नाचतात. नाचताना टिपऱ्यांनी ताल धरतात. या नृत्याची गाणी लहान तुकडेवजा असतात. एक गाणे संपले, की दुसरे गाणे सुरू करतात आणि त्या गाण्यावर दुसऱ्या प्रकारचा नाच सुरू होतो. अशा गाण्याचा एक नमुना असा—

राजा बोले परधानाला । बोलवा फांसे पारध्याला ।
फासा त्यांनी टाकला वनांत । हरण पळत सुटीला ।
जाऊन पडला फासांत । बोलवा मलारी बालाला ।
हरणाची किंमत काय बोला । हरणाचे साठ रुपये ग ।

ठाकूर स्त्रिया नाचताना दोन गट करतात. गाणे म्हणणारा गट हा प्रमुख असतो. या गटातील स्त्रिया उभ्याने गाणी म्हणत फेर धरतात. दुसऱ्या गटातील स्त्रिया थोडे वाकून नितंबभाग हलवितात. गाण्याचे एक कडवे म्हणून झाल्यावर दुसरा गट गाणे म्हणतो व पहिला गट नितंब हलवितो. ठाकूर वायका आपल्या नृत्याला टाळ्यांनी ताल देतात. [फो. डा. म.]

**दसूहा** एक नगर. पंजाबात जालंधर-पठाणकोट लोहमार्गावरील हे एक प्रसिद्ध स्टेशन असून, ते व्यास नदीच्या काठी वसले आहे. या नगराला महाभारतातील विराट राजाची नगरी समजतात. तिथले हिंदू लोक आजही भोजनापूर्वी विराटनगरी म्हणून त्याचा उच्चार करतात व नंतर घास घेतात. पांडवांनी अज्ञातवासाची तेरा वर्षे इथे काढली, असे सांगतात. दसूहामध्ये एक प्राचीन किल्ला असून, सांप्रत तो भग्नावस्थेत दिसतो. इथे एक प्राचीन तलाव आहे, त्याला पांडवतलाव असे म्हणतात. [पं. जी. सा.]

**दस्तापिंजर** एक खेळ. या खेळाला दोनपासून सात-आठपर्यंत मुले चालतात. प्रथम पाच मुले खाली बसतात. त्या पाचांना दस्ता, पिंजर, खार, कबुतर व डोळे अशी नावे ठेवतात. नंतर ही पाचही मुले आपला एक किंवा दोन्ही हात वर करून आपल्या एका अथवा दोन्ही हातांची सर्व अथवा काही बोटे जमिनीवर ठेवतात. मग जो मुलगा दस्ता बनला असेल, तो कोणत्यातरी एका मुलापासून सुरवात करून दस्ता, पिंजर, इ. पाच नावे उच्चारीत प्रत्येकाची बोटे क्रमाने मोजतो. असे करता करता शेवटच्या मुलाच्या शेवटच्या बोटावर जी संज्ञा येईल, त्या नावाचा गडी सुटतो. समजा, की शेवटच्या मुलाच्या अखेरच्या बोटावर खार संज्ञा आली, तर खार हे नाव धारण करणारा मुलगा सुटतो. पाचांपेक्षा जास्त खेळणारे असल्यास दुसरा एखादा त्याच्या जागी येऊन त्याचे नाव धारण करून बसतो. असे होता होता सर्वजण सुटून जो एकच शेवटी उरेल, त्याच्यावर राज्य येते. मग प्रथम सुटलेला गडी आपल्या डाव्या हाताची मूठ जमिनीवर ठेवून अंगठा वर करतो. त्याला घोडा म्हणतात. राज्य आलेल्या मुलाने ते परत देण्यासाठी त्या घोड्यावर आपले दोन्ही हात

एकमेकांवर चोळीत राहायचे असते. या क्रियेला 'घोड्याला पाणी घालणे' असे म्हणतात. राज्य देणारा मुलगा पाणी घालत असता, घोडेवाला मुलगा आपल्या उजव्या हाताने त्याच्या हातावर फटकारे मारतो आणि पाणी घालणारा मुलगा ते चुकवण्याचा प्रयत्न करतो. फटकारा हुकला, की मारणारा गडी बाद होतो. असे सर्वांना राज्य देऊन झाले, की या खेळाचा एक डाव संपतो. [ व्या. ज्ञा. को. ]

**दस्यू** एक वेदकालीन मानवसमूह. यास्क, सायणाचार्य व मनू यांनी दिलेल्या या शब्दाच्या व्याख्या अशा —

**दस्युर्दस्यच्च क्षयार्थादुपदस्यन्त्यस्मिन् रसा उपदासयन्ति कर्माणि ।** = दस्यू शब्द दस् = नाश करणे या क्षयार्थक धातूपासून निघाला असून, दस्यू हे रसांची हानी व कर्मांचा विध्वंस करतात (निरुक्त. ७.२३).

**अनुष्ठातॄणामुपक्षपयितारः शत्रवः ।** = कर्मानुष्ठान करणाऱ्यांना त्रास देणारे शत्रू (सायण).

**मुखबाहूरुपज्जानां या लोके जातयो बहिः ।**
**म्लेच्छवाचश्चार्यवाचः सर्वे ते दस्यवः स्मृताः ।।**
( मनु. १०.४५ )

अर्थ—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्यापैकी काही जाती क्रियालोपादी गोष्टींमुळे चातुर्वर्ण्यातून बाहेर पडल्या. अशा जातीचे म्लेच्छभाषा बोलणारे व आर्यभाषा बोलणारे जे लोक ते सगळे दस्यू होत.

ऐतरेय ब्राह्मणात ( ७. १८ ) दस्यूंविषयी लिहिले आहे, की 'वैश्वामित्रा दस्यूनां भूयिष्ठाः' = बहुतेक दस्यू विश्वामित्रापासून उत्पन्न झाले आहेत. अंध्र, पुंड्र, शबर, पुलिंद, मूतिब अशी त्यांची नावेही तिथेच दिली आहेत.

दस्यू शब्द ऋग्वेदात अनेक ठिकाणी आलेला आहे. सामान्यपणे त्याचा अर्थ मानवी शत्रू असा आहे. ऋग्वेदात दस्यूंना लावलेली विशेषणे पुढीलप्रमाणे —

अनास—नासिकाविहीन किंवा बसक्या नाकाचे (ऋ. ५.२९.१०४). श्री. गिरीशचंद्र अवस्थी यांनी अनास शब्दाची अन्+आस अशी फोड करून त्याचा अर्थ, एका ठिकाणी न राहणारे अतएव भटके, असा दिला आहे.

मृध्रवाच—बोबडे बोलणारे किंवा विरोधी भाषा बोलणारे (ऋ. ५. २९. १०). जिभेला चिरा देणारे व त्यामुळे ज्यांची वाणी बोबडी झाली आहे, असाही अर्थ काहींनी दिला आहे. इंद्राने ज्याला ठार केले, तो वृत्रही दस्यू (दास) असल्याचे म्हटले आहे. वृत्राचा अहीशी संबंध होता. अही म्हणजे नाग होय. त्यावरून दस्यू हे नागवंशी असावे आणि नागांशी संबंध दाखवण्यासाठी ते आपल्या जिभेला चिरा देत असावे, असेही काहींनी अनुमान केले आहे.

शिश्नदेव (७·२१·५) व मूरदेव (७·१०४·२४) हीही त्यांची दोन विशेषणे आहेत. पहिल्या विशेषणाचा अर्थ लिंगपूजक असा आहे. सिंधुसंस्कृतीच्या उत्खननात लिंगप्रतीके उपलब्धही झाली आहेत. दुसऱ्या विशेषणाचा अर्थ ज्यांचे देव मूढ (जारण, मारण, मूर्च्छा, इ. गोष्टी करण्याचे सामर्थ्य असलेले ?) आहेत, असा केलेला आहे. ही विशेषणे आर्यांचा धर्म आणि दस्यूंचा धर्म यांमध्ये फरक असल्याचे दाखवितात.

अव्रत (व्रते न आचरणारे), अयज्वान (यज्ञ न करणारे), अकर्मन् (कर्म न करणारे), अदेवयु (देवांबद्दल उदासीन किंवा देवनिंदा करणारे), इ. त्यांची आणखीही काही विशेषणे आहेत. ही विशेषणे आर्य व दस्यू यांच्यामधला धार्मिक भेद दर्शवितात, असे म्हणता येईल. या दस्यूंचा इंद्राने पराभव किंवा वध केला, असे ऋग्वेदात अनेक ठिकाणी म्हटले आहे.

दस्यूंना मारणे हे इंद्राचे अतिमानवी कृत्य होते, असेही म्हटले आहे. यावरून कीथ व मॅक्डोनेल यांनी दस्यू ही एक अतिमानवी योनी होती, असा तर्क केला आहे. दस्यू हे मायावी होते, अशा उल्लेखांचा आधार घेऊन काहींनी दस्यू म्हणजे आर्यांच्याच मधले जादूगिरी करणारे, चकवे किंवा चेटकी लोक होत, असे म्हटले आहे.

वरील सर्व मतमतांतरावरून दस्यू हे नेमके कोण लोक होते, हे निश्चितपणे समजणे अवघड झाले आहे; पण श्री. प्र. रा. देशमुख यांनी ऋग्वेदातील दस्युविषयक आणि दस्यु-इंद्रसंघर्षविषयक अशा सर्व उल्लेखांची छाननी करून दस्यू म्हणजे ज्यांनी सिंधुसंस्कृती निर्माण केली ते लोक होत, असे स्पष्टपणे प्रतिपादन केले आहे. मोहेंजोदडो व हडप्पा या ठिकाणच्या उत्खननात जी सुबद्ध व सभोवती खंदक आणि तटबंदी असलेली नगरे सापडली, ती या दस्यू लोकांनीच उभारली होती. ही शहरे इंद्राने नष्ट केली म्हणजेच इंद्राला सर्वश्रेष्ठ देव मानणाऱ्या आर्यांनी उद्ध्वस्त केली, असे देशमुखांचे म्हणणे आहे.

दास हा आणखी एक शब्द आर्यांचे शत्रू या अर्थानेच ऋग्वेदात वारंवार येतो. दस्यू आणि दास हे समानार्थकच शब्द होत. दास हे वर्णाने काळे होते (ऋ. १. १०१. १; २. २०. ७). दास शब्दाच्या इतिहासाविषयी डॉ. केतकरांनी पुढीलप्रमाणे विवेचन केले आहे —

आर्य आणि दास हे परस्परांचे विरोधी आहेत, ही कल्पना वेदांत तशीच अवेस्त्यातही आहे. अवेस्त्यात दहक व दहाक असे जे शब्द येतात ते दासवाचकच आहेत. त्यांचा अर्थ दंश

करणारा अतएव सर्प असा आहे. ऋग्वेदातही वृत्र हा अही म्हणजे सर्पच असल्याचे म्हटले आहे. पारशी लोकांच्या पौराणिक परंपरेत अहि-दहक हा जमशीद या राजाचा अनार्य शत्रू होता. आर्य व दस्यू हे दोन समाज विरोधी खरे; पण त्यांचा विरोध यजनविषयक आहे. जे यजन करतात ते आर्य व जे करीत नाहीत ते दस्यू अशी कल्पना ऋग्वेदात सर्वत्र आढळते. पण दास म्हणजे मात्र शत्रू असाच अर्थ दिसतो. मंत्रद्रष्टचा ऋषींच्या मनातल्या दास व दस्यू यांविषयीच्या काही कल्पना सामान्य आहेत, तर काही भिन्न आहेत. याचे कारण मंत्रद्रष्टयांच्या पूर्वजांच्या काळात पाहिले पाहिजे. वाईट आचरण करणारे व दुष्ट असे शत्रू ते दास व चांगले आचरण करणारे ते आर्य ही कल्पना घेऊनच वैदिक मंत्रद्रष्टे भारतात आले. या मंत्रद्रष्टचा लोकांना विरोध करणारा असा जो एक वर्ग त्या काळी भारतात होता, त्याला त्यांनी दास म्हटले. मात्र दास हा शब्द वर्गवाचक आहे की वंशवाचक आहे, ते उपलब्ध पुराव्यावाचून स्पष्ट होत नाही.

दास किंवा दस्यू यांचे वास्तविक स्वरूप पुढीलप्रमाणे असल्याचे श्री प्र. रा. देशमुख सांगतात--

दस्यू नावाचे आर्यांचे शत्रू होते. ते समोवती तटबंदी व खंदक असलेल्या पुर नामक शहरात राहत होते. ते फार मोठे व्यापारी असून, त्यांचा समुद्रावर दूरवर व्यापार होता. त्यांच्याजवळ सोने, रुपे, मौल्यवान दगड, गाई, घोडे आणि धान्य यांची अगणित संपत्ती होती. त्यांची उर्वर आणि क्षेत्र नावाची सुपीक शेते होती. त्यांतून ते कालव्याच्या साहचाने खूप पिके काढीत व धान्य साठवून ठेवीत. ते जलप्रवाह अडवून व वळवून त्यांचे अनेकविध उपयोग करण्यात निष्णात होते. त्यांची शहरे नद्यांच्या काठांवर वसवलेली होती. ते डोक्यावर शिंगे बांधीत व नागांशी साम्य दाखवण्यासाठी तप्त सुवर्णाने जिभेला चिरा देत असत. ते यज्ञ करणारे नव्हते. त्यांचा धर्म आणि पूजापद्धती आर्यांचा धर्म आणि पूजापद्धती यांपेक्षा सर्वस्वी वेगळी होती. ते लिंगपूजक आणि मूर्तिपूजक होते. त्यांचा तीन तोंडांचा एक देव होता. त्याला विश्वरूप म्हटले आहे. ते देवाला बळी देत होते. त्यांचा धर्म गूढ असून काहीसा शाक्त धर्मासारखा होता, म्हणून आर्य त्यांना जादूगार म्हणत.

दस्यू म्हणजे आर्यपूर्व भारतात येऊन वसलेले व ज्यांची संस्कृती त्या काळी वैदिक आर्यांच्या संस्कृतीहून उच्चतर होती, असे द्रविड लोक होत, असेही काही संशोधकांनी म्हटले आहे.

पुराणांनी आभीर व म्लेच्छ यांना दस्यू म्हटले आहे. वायू पुराणात दस्यूंचा धर्मही सांगितला आहे. ययातीने दस्यूंवर नियंत्रण ठेवले होते, असे ब्रह्मांड पुराणावरून कळते. कृष्ण निजधामाला गेल्यानंतर त्याच्या १६ हजार स्त्रियांना घेऊन अर्जुन हस्तिनापुराकडे चालला असता वाटेत त्या सर्व स्त्रियांचा दस्यूंनी अपहार केला. दस्यूंचे मुख्य शस्त्र सोटा हे असून, ते दुभत्या गाईंची हत्या करीत असत, असे वायू पुराणात म्हटले आहे. [ वे. इं.; भारतीय साम्राज्य, उत्तरार्ध, पुस्तक नववे, श्री. ना. भ. पावगी, १९००; नवभारत, जून १९६५; म. ज्ञा. को.--बुद्धपूर्वजग; हि. ध.; वेदांतील राष्ट्रदर्शन ]

**दस्से अग्रवाल** अग्रवाल वैश्यांचा एक पोटभेद. उत्तर प्रदेशाच्या पश्चिम भागात प्रामुख्याने यांची वस्ती आहे. राजा अग्रसेन हा अग्रवालांचा मूळ पुरुष असल्याची आख्यायिका आहे. या अग्रसेनाने विशानन आणि दशानन यांच्या दोन मुलींशी विवाह केला. विशाननाच्या मुलीला त्याच्यापासून झालेल्या संततीला बीसे अग्रवाल व दशाननाच्या मुलीच्या संततीला दस्सें अग्रवाल म्हणू लागले. परंतु विद्वानांना ही आख्यायिका संशयास्पद वाटते. त्यांच्या मते ज्या बीसे अग्रवालांनी अन्य जातींतील मुलींशी विवाहसंबंध केले, त्यांच्या संततीला दस्से अर्थात अर्धे अग्रवाल असे नाव पडले. [ क. अ. वि. प्र. ]

**दहरविद्या** उपनिषदांत सांगितलेली एक विद्या. या विद्येचे विवरण छांदोग्य उपनिषदाच्या आठव्या अध्यायात आलेले आहे. त्यातील 'अथ यदिदमस्मिन् ब्रह्मपुरे दहरं पुण्डरीकं वेश्म......' या पहिल्या मंत्रात दहर हा शब्द अनेकवार आलेला असल्यामुळे या विद्येला दहरविद्या असे नाव मिळाले. या विद्येचे स्वरूप असे --

दहर म्हणजे हृदयकमल. अंतराकाशरूपी ब्रह्मपुरात एक दहर (हृदयकमल) आहे. त्याच्या गाभ्यात जे आहे, त्याचा शोध करायचा आहे. तो शोध लागावा म्हणून साधकाने प्रयत्न करणे आवश्यक आहे. हे प्रयत्न योग्य दिशेने घडण्यासाठी गुरूची नितांत आवश्यकता आहे. गुरूपदेश प्राप्त केल्यानंतर त्याचे मनन व ध्यान करण्यानेच या प्रयत्नांना यश लाभू शकेल.

हृदयकमलातील अवकाशात जे अंतःकरण आहे, ते जेव्हा विशुद्ध होते, तेव्हा त्यात विज्ञानज्योतिस्वरूपाभास अशा ब्रह्माचा साक्षात्कार घडतो. ज्यांनी इंद्रियदमन केले आहे अशा योगयुक्त महात्म्यांनाच त्याचा शोध लागतो. ब्रह्म हे जरी सर्वव्यापी असले, तरी योग्याला ते आपल्या हृदयकमलातच प्रतीत होते. हे ब्रह्म म्हणजेच आत्मा असून, तो अपहतपाप्मा ( पापरहित ), विजर ( जरारहित ), विमृत्यु (अमर), विशोक ( शोकरहित ), अजिघित्स ( क्षुधारहित ), अपिपास (तृष्णारहित), सत्यकाम व सत्यसंकल्प असा आहे.

या आत्मस्वरूपाची पूर्ण ओळख झाली असेल, तर शरीर-त्यागानंतर साधक ब्रह्मस्वरूप पावतो; -त्याला संप्रसाद म्हणजेच परमानंदाची अवस्था लाभते. अशा या आत्म्याचे ज्ञान करून घेण्याचे प्रमुख साधन म्हणजे ब्रह्मचर्य हे होय

सारांश, आत्मज्ञानाची प्राप्ती हाच परमपुरुषार्थ असून, तो साधण्यासाठी ब्रह्मचर्याचे अनुष्ठान करणे आणि श्रवण–मनन-निदिध्यासनपूर्वक हृदयकमलाकाशात ब्रह्मज्योतीचा साक्षात्कार करून घेणे, म्हणजेच दहरविद्या होय. [ कल्याण – साधनाक ]

**दहाईत** एक जमात. या लोकांची वस्ती मुख्यत्वे मध्य प्रदेशात आहे. यांचे व खंगारांचे पूर्वज एकच होते, असे म्हणतात. रेवातिया, कोल, मवासिया, सोनवानी, राजवारिया, जोहारिया व पैलागिया असे यांचे पोटभेद आहेत. मवासिया हे कोरकू आहेत. सोनवानी हे मूळचे रहिवासी होत. राजवारिया हे मिर्झापूरच्या कोलांपैकी आहेत. वेळ, रुसल्लो, छेवला, इ. वृक्ष ही त्यांची देवके आहेत. लग्नाच्या वेळी या देवकांना निमंत्रण देतात. नागोतिया हे नागपूजक आहेत. सिंह, वाघ, इ. पशू ही काही कुलांची देवके आहेत. या प्राण्यांची त्या त्या कुलातले लोक शिकार करीत नाहीत.

हे लोक लग्नप्रसंगी वराच्या बापाकडून सहा रुपये आणि साखर, हळद व तिळाचे तेल या वस्तू देज म्हणून घेतात. स्त्रीला पतीच्या मृत्यूनंतर पांच वर्षे सक्तीने वैधव्य पाळावे लागते. त्यानंतर इच्छा असल्यास ती स्त्री दुसरा घरोवा करू शकते. स्त्रीने व्यभिचार केल्यास तिला शिक्षा होते. एखाद्या पर जातीतील माणसाने दहाईत स्त्रीशी व्यभिचार केल्यास त्या पुरुषाला हे लोक आपल्या जमातीत सामील करून घेतात. हे पूर्वी राजदरबारात चवऱ्या ढाळण्याचे काम करीत; सांप्रत ग्रामरक्षकाचे काम करतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; म. ज्ञा. को. ]

**दहिकाला** महाराष्ट्रातील एक नृत्योत्सव. पाहा –– काला.

**दहिमा** एक राजवंश. दहिमा हा बियाना या प्रदेशाचा राजा असून, तो पृथ्वीराजाचा मांडलिक होता. याशिवाय पृथ्वीराजाच्या दरबारीही दहिमा वंशातील तीन पुरुष मोठ्या अधिकारावर होते. त्यांपैकी एक पृथ्वीराजाचा प्रधान व चाऊंडराय हा पृथ्वीराजाचा प्रमुख सेनापती होता. मुसलमान इतिहासकारांनी या चाऊंडरायाच्या पराक्रमाची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. दहिमा पुरुषांनी राजस्थानाच्या इतिहासात मोठी कामगिरी बजावल्याचे कळून येते. पृथ्वीराजाने या वंशातील एका मुलीशी लग्न केले होते. या विवाहसोहळ्यावर चंद भाटाने एक मोठे काव्य रचले आहे. [ अं. अं. रा. ]

**दहिरिया** एक राजपूत जमात. मध्य प्रदेशातील बिलासपूर व रायपूर येथे या लोकांची वस्ती आहे. शेती हा यांचा प्रमुख व्यवसाय आहे अन्य राजपूत यांना आपल्याहून हीन दर्जाचे लेखतात. यांच्यांत पाराशर, शांडिल्य, इ. नावांच्या अनेक शाखा आहेत. या जमातीत स्त्रियांची संख्या कमी असल्यामुळे चुलतवहिणीशी लग्न करायला मोकळीक ठेवलेली आहे. यांच्यांत घटस्फोट किंवा पुनर्विवाह होत नाहीत. हे व्यभिचारी स्त्रीला जातिबहिष्कृत करतात. यांच्यांत स्त्री व पुरुष यांचे गुरू भिन्न भिन्न असतात. [ ट्रा. का. सें. प्रां. इं. ]

**दही** दुधाला विरजण लावून बनवलेला पदार्थ. दह्याचा पंचामृतात समावेश आहे. दही म्हणजे नासके दूध अशा अर्थाने ऋग्वेदात हा शब्द आढळतो. वैदिक लोक दही व सोम मिसळून दध्याशिर नावाचा पदार्थ तयार करीत ( ऋ. ८. २. ९). दह्यापासून आमिक्षाही बनवीत. दह्यात मध किंवा तूप मिसळून मधुपर्क बनवीत व तो विशिष्ट व्यक्तींची पूजा करतेवेळी त्यांना समर्पण करीत. ऐतरेय ब्राह्मणात (८. १९) दही हे इंद्रिय (इंद्राला प्रिय किंवा इंद्र ज्याची देवता आहे असे) असल्याचे म्हटले आहे.

पतंजलीच्या महाभाष्यात दध्योदनाचे उल्लेख अनेकवार आले आहेत (अष्टा. २.१.३४ वरील भाष्य). त्यावरून तत्कालीन लोकांना दही-भात अत्यंत प्रिय होता, असे दिसते. मंद ( कमी विरजलेले ), उत्तरक (पूर्ण विरजलेले) व निलीनक ( विरजून खूप आंबट झालेले ) असे दह्याचे तीन प्रकार पतंजलीने सांगितले आहेत. प्राचीन काळी सातूचे पीठ दह्यात घालून खाण्याची पद्धत होती. दह्यात भातही शिजवीत.

अनेक धार्मिक कृत्यांतही दह्याचा उपयोग सांगितला आहे. श्रावणीच्या वेळी दधि-सक्तुप्राशन ( सातूच्या पिठाची गोळी दह्याबरोबर प्राशन करणे ) करतात. श्राद्धाच्या ब्राह्मणांना जेवणाच्या शेवटी दध्योदन ( दही-भात ) वाढतात. देवाच्या पंचामृतस्नानात व पंचगव्यात दही वापरतात. घरातील व्यक्ती प्रवासाला निघाली म्हणजे ती सुखरूप परत यावी, म्हणून कुटुंबातली मोठी स्त्री त्या व्यक्तीच्या हातावर दही घालते. गणपतीच्या विसर्जनाच्या वेळीही त्याचे पुनरागमन व्हावे, म्हणून त्याच्या सोंडेवर दही घालतात. मारुतीला किंवा शिवलिंगाला दही-भाताची पूजा बांधतात. कपिला गायीच्या दुधापासून तयार केलेल्या दह्याने शिवलिंगाला स्नान घातल्यास मद्यपानाच्या पापापासून मुक्ती मिळते, असे सांगितले आहे.

पुंसवन संस्कारात पुत्रप्राप्तीच्या हेतूने हातावर दोन उडीद आणि त्यांच्यामध्ये एक सातू ठेवून त्यावर थोडे दही घालतात. मग ते सर्व गर्भिणीला खायला देतात. यातील दोन उडीद व एक सातू हे पुरुषाच्या लिंग-वृषणांचे प्रतीक असून, दही हे वीर्याचे प्रतीक असते. [ प. का. भा.; श. क.; वै. को.; वे. इं. ]

**दलेलसिंह** बिहार प्रदेशातील एक हिंदी कवी व राजा. दलसिंह हे याचे दुसरे नाव आहे. हा रामगढचा राजा होता. रामसिंह हा याचा बाप व रामभगता हा गुरू होय. हा राजा स्वतः उच्च दर्जाचा कवी असून, अनेक कवींचा व विद्वानांचा आश्रयदाता होता. पदुमनदास हा त्याच्या आश्रित कवींपैकी एक उल्लेखनीय कवी होय. रुद्रसिंह नामक आपल्या मुलासाठी याने हितोपदेशाचा अनुवाद करवून घेतला होता. रामरसार्णव, शिवसागर, राजरहस्य आणि गोविंदलीलामृत असे याचे चार ग्रंथ आहेत. भक्ती, ज्ञान आणि नीती यांचा पुरस्कार या ग्रंथांत आढळतो. [ हिं. सा. बि. ]

**दक्ष** (१) एक प्रजापती. ऋग्वेदात काही ठिकाणी याचा देवता म्हणून उल्लेख आहे. दक्ष हा अदितीचा मुलगा व अदिती ही दक्षाची मुलगी असे उलटसुलट विधान ऋग्वेदात आले आहे ( १०·७२·४ ). यास्काने आपल्या निरुक्तात हे कसे शक्य आहे, अशी शंका उपस्थित केली आहे. हे दोघे एकमेकांपासून निर्माण झाले म्हणजे दोघांनी परस्परांचे काही अंश घेतले, असा त्याचा अर्थ असणे शक्य आहे. दक्ष प्रजापतीने प्रजा समृद्ध व्हावी म्हणून यज्ञ केल्याचा उलेख कौषीतकी ब्राह्मणात आढळतो (४·४). दक्षाला पार्वति असे म्हटले आहे व त्याच्या वंशजांना यज्ञामुळे राज्य प्राप्त झाल्याचा निर्देश आला आहे (श. ब्रा. २·४·४·१). पुराणांत ज्या दक्षकथा आल्या आहेत, त्यांचे पर्याय असे–

(अ) दक्ष हा स्वायंभुव मन्वंतरात विधात्याच्या उजव्या अंगठ्यापासून जन्माला आला (विष्णु पु. १.१५; ह. वं. १.२) स्वायंभुव मनूच्या प्रसूती नामक कन्येशी दक्षाने विवाह केला. तिच्यापासून त्याला सोळा मुली झाल्या. त्यांपैकी त्याने तेरा मुली धर्मप्रजापतीला दिल्या. उरलेल्या तिघींपैकी स्वाहा अग्नीला, स्वधा अग्निष्वात्त पितरांना व सती ही शिवाला दिली (भाग. पु. ४·१). ब्रह्मदेवाच्या डाव्या अंगठ्यापासून जन्मलेली स्त्री दक्षाची पत्नी झाली व तिला पाचशे मुली झाल्या.

एकदा सृष्टिनिर्मात्या प्रजापतींनी यज्ञ चालू केला असता दक्ष तिथे गेला. त्याला पाहून शिव व ब्रह्मा यांच्याखेरीज सर्व देवांनी उत्थापन दिले. ब्रह्मा हा पिता असल्याने दक्ष त्याच्याकडून उत्थापन अपेक्षित नव्हता; पण शिवाने ते दिले नाही, याचा मात्र त्याला क्रोध आला. दक्षाने या रागाच्या भरात शिवाला शाप दिला. त्यावर नंदिकेश्वराने दक्षाला प्रतिशाप दिला. वस्तुतः दक्ष व शिव सासरे-जावई. पण या प्रसंगामुळे त्यांच्यांत वितुष्ट निर्माण झाले व ते वाढीस लागले.

काही कालाने विधात्याने दक्षाला प्रजापतींच्या अध्यक्षपदाचा अभिषेक केला. त्यामुळे दक्ष गर्वोद्धत बनला. त्याने मग अनेक यज्ञ केले; पण त्या यज्ञात शिवाला मात्र वगळले. शेवटचा यज्ञ त्याने केला तो बृहस्पतिसव हा होय. या यज्ञाची वार्ता आकाशसंचारी देवांकडून सतीला समजली. ती शिवाला म्हणाली, की 'या यज्ञाला आपण जाऊ.' शिवाने ते नाकारले. पण सतीची उत्कंठा अनावर झाली आणि ती हट्टाने आपल्या माहेरी गेली. तिच्याबरोबर नंदिकेश्वरादी काही शिवगणही गेले. पण यज्ञमंडपात तिचे कोणी स्वागत केले नाही. दक्षाने तरतिच्याकडे लक्षच दिले नाही. तो यज्ञ शिवाला वगळून होत आहे, हे पाहून सतीने आपल्या बापाची तीव्र शब्दांत कान-उघाडणी केली. मग तिने ठरविले, की अशा शिवद्रोही बापाकडून प्राप्त झालेला आपला देह नष्ट करून टाकावा. लगेच तिने अंतराग्नी प्रज्वलित केला व त्यात स्वतःला जाळून घेतले.

हे वर्तमान शंकराला समजताच त्याने वीरभद्र नावाचा एक पुरुष निर्माण केला व त्याला दक्षाचा वध करण्यास पाठवले. त्याने यज्ञमंडपात येऊन दक्षाचा वध केला. यज्ञाचा यजमानच अशा रीतीने मरण पावल्यामुळे तो यज्ञ अपुरा राहिला. मग ब्रह्मदेवाने शिवाकडे जाऊन दक्षाला जिवंत करण्याबद्दल शिवाची प्रार्थना केली. शिवाच्या आज्ञेने बोकडाचे मस्तक दक्षाच्या शरीराला जोडले जाताच दक्ष जिवंत झाला व त्याने शिवाची क्षमा मागितली.

(आ) प्राचीनबर्ही या पुरुषाला प्रचेतस नावाचे दहा पुत्र झाले. त्या सर्वांनी मारिषा या कंडू ऋषीच्या कन्येशी लग्न केले. या मारिषेला सोमाचे अर्धे व प्रचेत्यांचे अर्धे तेज अशा संयुक्त तेजापासून दक्ष नामक पुत्र झाला. हा दक्षाचा दुसरा जन्म होय. हा जन्म सहाव्या चाक्षुष मन्वंतरात झाला. या जन्मात दक्षाने वीर्यद्वारा व मनाच्या द्वारा सृष्टी उत्पन्न केली. त्याने हर्यश्व नावाचे दहा हजार व शबलाश्व नावाचे कित्येक हजार पुत्र जन्माला घातले व त्यांना प्रजा निर्माण करण्याची आज्ञा केली. पण नारदाने त्यांना त्या कार्यापासून परावृत्त करून देशोधडीस लावले. त्यानंतर दक्षाने साठ कन्या निर्माण केल्या व त्यांपैकी धर्माला दहा, कश्यपाला तेरा, चंद्राला सत्तावीस, भूत, अंगिरस व कृशाश्व या तिघांना प्रत्येकी दोन आणि तार्क्ष्य

नावाच्या कश्यपाला चार दिल्या. ( भाग. पु. ६.४–६; . ह. वं. १.३; विष्णू पु. १.१४–१५ ).

(इ) असिक्नी नावाची वीरण प्रजापतीची कन्या होती, तिचे दक्षाने पाणिग्रहण केले. त्याला तिच्यापासून पाच हजार पुत्र झाले (विष्णू पु. १.१५; ह. वं. १.३).

(ई) दक्षाला सुव्रता नावाची एक मुलगी होती. तिच्यापासून चार मनू उत्पन्न झाले. त्यांना सावर्णी हे नाव होते.

(उ) हरिवंशात दक्षाचे स्वरूप याहून थोडे निराळे दिसते. तिथे त्याला विष्णूचे एक रूप किंवा विष्णूचा अवतारच मानले आहे. या दक्षाने द्विपाद व चतुष्पाद असे अनेक प्राणी निर्माण केले. त्याने स्वतःच्याच देहापासून एक स्त्री निर्माण करून तिच्या ठिकाणी अनेक कन्या जन्माला घातल्या. या कन्यांपासून पुढे खूप प्रजावृद्धी झाली. [ श. क.; प्रा. च. को. ]

(२) एक धर्मशास्त्रकार. पाहा– दक्षस्मृती.

**दक्षसखी** (इ. स. चे १८ वे शतक) एक हिंदी कवी. हा गोस्वामी गोपालभट्टाच्या शिष्यपरंपरेतला होता, राधाकृष्ण ही त्याची इष्ट देवता होती व गुणमंजरी हा त्याचा गुरू होता असे कळते. याशिवाय याची अधिक माहिती उपलब्ध नाही.

मंगल-आरती, व्यंजनावली, वनबिहारलीला आणि अष्टकाललीला असे याचे चार ग्रंथ उपलब्ध आहेत. व्यंजनावली ग्रंथात राधा-कृष्णांच्या भोजनलीला वर्णिल्या असून, त्यात भोजनातील विविध पदार्थांची नावे आहेत. त्याचा वनबिहारलीला हा ग्रंथ शृंगारिक भक्तीचा एक नमुना समजला जातो. यात प्रियकर प्रेयसी यांच्या वनविहाराच्या कथा आहेत. अष्टकाललीला या ग्रंथात राधा-गोविंदांच्या अष्टकालिक लीलांचे सरस वर्णन आहे. दक्षसखीची ही सर्वश्रेष्ठ रचना समजतात. त्यातील एक नमुना असा–

**जयति जयति राधारमन, श्री चैतन्य कृपाल ।**
**जयति सखीगन वृंद, श्री जयति भट्ट गोपाल ।।**
**जै वृंदावनचंद, जयति जमुना पटरानी ।**
**जयति जयति गुरुदेव मंत्रपद्धतीके दानी ।।**
**जै–जै ब्रजकी रेनु, जाहि सिव-नारद जाँ चै ।**
**जयति रास रस कुंज, जहाँ राधा-वर नाँचै ।**

**अर्थ** – राधा-कृष्णाचा जयजयकार असो. श्री कृपाळू चैतन्याचा जयजयकार असो. वृंदावनवासी गोपींचा जयजयकार असो. श्री भट्ट गोपाळाचा जयजयकार असो. वृंदावनश्रेष्ठ कृष्णाचा जयजयकार असो. यमुनेचा जयजयकार असो. मंत्रपद्धतीच्या उद्गात्या श्री गुरुदेवाचा जयजयकार असो. जिथे शिवनारदाचा वास घडला, त्या वृंदावनातल्या मातीचा जयजयकार असो. जिथे राधा-कृष्णांनी रासक्रीडा केली, त्या कुंजाचा जयजयकार असो.

दक्षसखीची भाषा सहजसुंदर व सोपी आहे. त्याची काव्यरचना भक्तिरसपूर्ण आहे. [ चै. म. व्र. सा. ]

**दक्षसंघ** एक प्राचीन मानवसंघ. यांची वसती भारताच्या वायव्य व उत्तर भागांत होती. पाणिनीला पतंजलीने दाक्षीपुत्र म्हटले आहे (महाभाष्य १.१.२०) त्यावरून त्याची माता या दक्षसंघातली असावी, असे दिसते. प्राचीन उशीवरदेश (पंजाबचा शेरकोट प्रदेश) आणि गांधारदेश (झेलमच्या वायव्येकडील प्रदेश) यांच्या जवळपास कुठे तरी दक्षांचे संघराज्य असावे. काशिकेत दिलेल्या उदाहरणांवरून (४.३.११७) कळते, की दक्षांचे स्वतंत्र राज्यचिन्हही होते.

**दक्षसावर्णी** नवव्या चाक्षुष मन्वंतराचा अधिपती. याला दक्षपुत्र व काही ठिकाणी दत्तपुत्र असेही म्हटले आहे. याचे रोहित असे दुसरे नावही आढळते. याला धृतिकेतू आणि इतर अनेक पुत्र होते. या मन्वंतरात अद्भुत नावाचा इंद्र व सवन, द्युतिमान इ. सप्तर्षी होते. तसेच पार, मरीचिगर्भ व सुधर्मा असे प्रत्येकी बारा देवांचे गण होते. या मन्वंतरात विष्णूचा ऋषभ नामक अवतार झाला. [ पु. इं.; प्रा. च. को. ]

**दक्षस्मृती** एक स्मृतिग्रंथ. याज्ञवल्क्याने दक्षाची धर्मशास्त्रकारांत गणना केली आहे. त्याच्या या ग्रंथात सात अध्याय व २२० श्लोक आहेत. यात चार आश्रम, द्विविध ब्रह्मचर्य, द्विजांची नित्यकर्मे, कर्मे व विकर्मे, आश्रमधर्म, जननाशौच व मृताशौच, षडंगयोग, नऊ गोपनीय व नऊ घोषणीय कृत्ये, दान न द्यायच्या वस्तू, गृहिणीधर्म, भिक्षुकर्तव्य, इ. विषय चर्चिले आहेत.

ही स्मृती फार जुनी आहे; विश्वरूप व अपरार्क यांनीही दक्षाचे काही श्लोक उद्धृत केले आहेत. [ हिंदुत्व; हि. ध. ]

**दक्षिण दिशा** पूर्वेकडे तोंड करून उभे राहिले असता उजव्या हाताला येते, ती दक्षिण दिशा होय. हिचा अधिपती यम असल्यामुळे हिला याम्या असे म्हणतात. दक्षिण दिशा ही पितरांचीही दिशा मानतात. ती अशुभ मानली जाते. म्हणून दक्षिणेकडे तोंड करून कोणतेही धर्मकृत्य करीत नाहीत. दिवा दक्षिणेकडे तोंड (ज्योत) करून ठेवीत नाहीत. दक्षिणेकडे पाय करून झोपू नये, असाही संकेत आहे.

**दक्षिण भारत** दक्षिणापथ पाहा.

**दक्षिणा** 'यज्ञादिसम्पादकतदन्तविहितदानम्' = यज्ञादी कृत्यांचे फल प्राप्त व्हावे म्हणून यज्ञाच्या अंती दिलेल्या दानाला दक्षिणा म्हणतात (श. क.). दक्षिणा शब्द निरुक्तामध्ये पुढीलप्रमाणे व्युत्पादिला आहे — दक्ष = समृद्ध करणे, पूर्ण करणे; जे रुद्ध किंवा पूर्ण नसेल ते, म्हणजेच यज्ञयागादी कर्मे दक्षिणेने पूर्ण होतात. अर्थात ऋत्विजाला दक्षिणा दिल्यावाचून यज्ञयागादी कर्म पूर्ण होत नाही.

सर्वसाधारणपणे यज्ञाची दक्षिणा म्हणून गायी देण्याची पद्धत होती. या गायी यज्ञमंडपातील वेदीच्या दक्षिणेकडील भागाकडून उत्तरेकडे न्यायच्या असत, म्हणजे त्या गायींना एका प्रकारे वेदीला (प्र) दक्षिणा करायची असे. त्यावरूनही त्या गायींना दक्षिणा असे नाव पडले असावे. त्यावरूनच पुढे लक्षणेने यज्ञादी कृत्याच्या अंती ऋत्विजाला किंवा पुरोहिताला दिल्या जाणाऱ्या धनादी सर्व वस्तूंनाच दक्षिणा असे नाव पडले. 'दक्षिणा मघोनी' = दक्षिणा ही धनयुक्त असते, असे निरुक्तात म्हटले आहे (१·७). ऋग्वेदातील दानस्तुतीच्या सूक्तांत राजांनी पुरोहितांना दक्षिणा म्हणून घोडे, गुरे, अलंकार, इ. वस्तू दिल्याचा उल्लेख आहे. ऋग्वेदात (१०·१०७-२) दक्षिणेचे महत्त्व पुढीलप्रमाणे सांगितलेले आहे—

**उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थुर्ये अश्वदाः सह ते सूर्येण ।**
**हिरण्यदा अमृतत्वं भजन्ते वासोदाः सोम प्रतिरन्त आयुः ।।**

अर्थ – जे दक्षिणा देतात, ते अत्युच्च स्वर्गलोकी वास करतात. जे अश्वदान करतात, ते सूर्यासह संचार करतात. ज सुवर्णदान करतात त्यांना अमृतत्व मिळते. आणि जे वस्त्रदान करतात, त्यांच्या आयुष्याची वृद्धी होते.

सुवर्ण, गाय, वस्त्र व घोडा या चार दक्षिणा देण्याचे महत्त्व शतपथातही सांगितले आहे.

ऐतरेय ब्राह्मणात 'अन्नं दक्षिणा' असे म्हटले आ (६·३). दक्षिणा दिल्याने यज्ञाची प्रशंसा होते, त्याचबरोबर जो कोणी दक्षिणा घेतो त्याची स्तुती केली जाते, असे शतपथत ब्राह्मणात म्हटले आहे (९·४·१·११).

**यज्ञोऽदक्षिणो रिष्यति तस्मादाहुः**
**दातव्यैव यज्ञे दक्षिणा भवत्यल्पिकापि ।**

(ऐ. ब्रा. ६·३५)

अर्थ– दक्षिणेवाचून यज्ञ विफल होतो. म्हणून यज्ञात अल्प का होईना; दक्षिणा ही अवश्य दिली पाहिजे, असे म्हणतात.

प्रत्येक यज्ञाच्या दक्षिणेला वेगवेगळी नावे होती. जसे— आग्निष्टोमिकी, राजसूयिकी, वाजपेयिकी, नावयज्ञिकी, पाकयज्ञिकी, पाञ्चौदनिकी, दाशौदनिकी इत्यादी. ज्या यज्ञात हजार गाईंच्या दक्षिणेचे विधान आहे, त्यात एक विशिष्ट लक्षणांची गाय निवडून तिला सहस्रतमी असे नाव देत असत. मग विशिष्ट विधीने तिचे दान करीत. पशुमेधात पशूचे हनन करणाऱ्याला पशू हीच दक्षिणा मिळत असे. पुष्ट बैलही दक्षिणा म्हणून दिला जाई. याज्ञिकाला घोडा व वैय्याकरणाला हत्ती दक्षिणा म्हणून दिला जाई, असे पतंजलीच्या महाभाष्यावरून कळते (अष्टा. ६.२.५२ वरील भाष्य). खेचर, गाढव, मेंढा, बोकड, वस्त्र, साळी, यव, तीळ, उडीद, इ. वस्तूही दक्षिणा म्हणून दिल्याचे उल्लेख श्रौतसूत्रांत आढळतात.

दक्षिणा ही ऋत्विजांनाच द्यावी, इतरांना देऊ नये, असे सांगितले आहे (श. ब्रा. ४. ३ .४. ५). जेवढी दक्षिणा द्यायची ठरवली असेल, त्यातली निम्मी ब्रह्याला द्यावी व उरलेली अर्धी इतर सर्व ऋत्विजांना वाटून द्यावी, असे विधान आहे (जै. उ. ३. १७. ५). अत्री गोत्रातल्या ऋत्विजाला प्रथम दक्षिणा दिली जावी, असेही सांगितले आहे (गो. पू. ब्रा. उ. २.१७).

अशा प्रकारे दक्षिणा ही सर्व धार्मिक कृत्यांचे प्रमुख अंग बनली आहे. कृत्य पूर्ण होताच पुरोहिताला तावडतोब दक्षिणा दिली पाहिजे, असा नियम आहे. दक्षिणेची बाकी शिल्लक ठेवता कामा नये; तशी ती ठेवल्यास तिचे व्याज वाढत जाते. जो दक्षिणा देत नाही, तो पातकी व व्याधिग्रस्त होतो. त्याला अनेक कष्ट सहन करावे लागतात, त्याच्या घरची लक्ष्मी निघून जाते, त्याने दिलेला पिंड त्याच्या घरचे पितर स्वीकारीत नाहीत व त्याच्या मागच्या–पुढच्या अनेक पिढ्यांना अधोगती प्राप्त होते, असे ब्रह्मवैवर्त पुराणात म्हटले आहे.

यज्ञ किंवा यजमानाच्या घरची इतर धार्मिक कृत्ये करणाऱ्या ब्राह्मणांचे व पुरोहितांचे दक्षिणा हेच एकमेव उपजीविकेचे साधन असल्यामुळे, त्यांना दक्षिणेचे महत्त्व अशा प्रकारे वाढवणेच भाग होते. दक्षिणा न मिळाल्यास त्यांची चूलच पेटत नसे. म्हणून त्यांनी दक्षिणेविषयीचे काही नियमच बनवले आणि दक्षिणा देण्यात कंजूषपणा किंवा चुकारपणा करणाऱ्यांना सामाजिक शासन करण्याचीही व्यवस्था करून ठेवली. राजा व सत्ताधारी पुरुष यांनीही दक्षिणा चुकवता कामा नये; ती चुकवल्यास त्यांनाही धर्मशास्त्रात शिक्षा सांगितली आहे. हरिश्चंद्र व विश्वामित्र यांची कथा हे या गोष्टीचे ठळक उदाहरण होय.

यज्ञ आणि दक्षिणा यांचे असे अविभक्तपण प्रतिष्ठित झाल्यावर पुरोहितांनी दक्षिणा ही यज्ञाची पत्नीच असल्याची कल्पना केली व त्यांच्याविषयी पुढील कथा निर्माण केली –

एकदा देवांनी मोठा यज्ञ केला; पण त्याचे फल त्यांना मिळाले नाही. तेव्हा ते ब्रह्मदेवाला शरण गेले. ब्रह्मदेवाने नारायणाचे ध्यान केले. नारायणाने लक्ष्मीच्या देहापासून दक्षिणा नावाची स्त्री उत्पन्न करून ती ब्रह्मदेवाला दिली. त्याने ती यज्ञरूपी पुरुषाला समर्पण केली. यज्ञपुरुषाने तिचा पत्नी म्हणून स्वीकार केला. त्यानंतर तिला फल नावाचा पुत्र झाला आणि त्यामुळे देवांचे सर्व मनोरथ पूर्ण झाले (दे. भा. ९.४५ ).

दक्षिणा ही रुची व आकूती या दंपतीची मुलगी होय आणि सुयज्ञापासून तिला तुषित नावाचे बारा पुत्र झाले, अशीही एक कथा आहे.

यज्ञ हा दक्षिणेचा भाऊ अशीही कल्पना आहे. पण तो विष्णूचा अवतार असल्यामुळे तिचा भाऊ असूनही त्याने दक्षिणेशी लग्न केले ( भाग. पु.४.१ ).

दक्षिणेला प्रजापतीची कन्या व बारा यामदेवांची माता असे म्हटले आहे. [ वे. इं.; पु. इं.; हि. ध.; प. का. भा. ]

**दक्षिणाग्नी** गार्हपत्य व आहवनीय यांच्या दक्षिणेस याचे आयतन ( कुंड ) असते, म्हणून याला दक्षिणाग्नी असे म्हणतात. सत्तावीस अंगुळे व्यास धरून जे वर्तुळ बनेल त्याचे अर्धवर्तुळ दक्षिणाग्नीचे आयतन असते. क्वचित ते चौकोनीही करतात. त्याकुंडाला दोन मेखला असतात. याचे आधान करतेवेळी अग्नी आणायचा तो गार्हपत्यातून, चातुर्वर्णिकांच्या घरांतून, एखाद्या भट्टीतून किंवा रानातून आणावा, अन्यथा मंथन करूनही उत्पन्न करावा, असे सांगितले नामक आहे. दर्शपूर्णमास यागातला अन्वाहार्य चरू याच्यावरच शिजवतात, म्हणून याला अन्वाहार्य पचन असे दुसरेही नाव आहे. कोणतेही पितृकर्म, तसेच दर्शाच्या दिवशी करायचा पिंडपितृयज्ञ दक्षिणाग्नीवरच करतात. कोणत्याही यागात या अग्नीवरचे कृत्य फारच थोडे असते. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**दक्षिणाचार** एक तांत्रिक आचारविशेष. दक्षिण=अनुकूल किंवा चांगला. याविषयी आचारभेदतंत्रात एक श्लोक दिलेला आहे, तो असा –

स्वधर्मनिरतो भूत्वा पञ्चतत्त्वेन पूजयेत् ।
स एव दक्षिणाचार: शिवो भूत्वा शिवं यजेत् ।।

अर्थ – स्वधर्मनिष्ठ राहून ( शिवाची ) पंचतत्त्वांनी पूजा करावी. शिव होऊन (शिवाचे तत्त्व अनुभवाच्या कक्षेत आणून) शिवाचे यजन करावे. यालाच दक्षिणाचार म्हणतात.

तांत्रिक पूजेचे अनेक प्रकार आहेत. त्यांतील ज्या प्रकारात पंच मकारांचे प्रत्यक्ष सेवन केले जाते, त्याला वामाचार म्हणतात. दक्षिणाचारात मात्र या पंच तत्त्वांचे स्वरूप प्रतीकात्मक असते. शंकराचार्यांनी हा साधनामार्ग प्रचलित केला, असे म्हणतात. शैव पूजाविधी म्हणजे दक्षिणाचार व शाक्तपूजाविधी म्हणजे वामाचार, असेही एक मत आहे. दक्षिणाचार हा वामाचाराप्रमाणे कठोर व जटिल नसतो. ते शुद्ध वैदिक कर्मच असते. पाहा – वामाचार; तंत्रशास्त्र.

**दक्षिणापथ** नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेश. दक्षिणापथ म्हणजे दक्षिणेकडील मार्ग, असा याचा वाच्यार्थ आहे. लक्षणेने पुढे ' दक्षिणेकडील प्रदेश ' असा त्याचा अर्थ रूढ झाला. ऋग्वेदात ( १०. ६१.८ ) ' दक्षिणापदा ' असा प्रदेशवाचक शब्द आलेला असून, हद्दपार करायच्या लोकांना त्या भागात पाठवीत असत, असे ऋग्वेदातील उल्लेखावरून दिसते.

आर्य लोक उत्तर भारतात येऊन स्थायिक झाल्यानंतर पुष्कळ काळपर्यंत विंध्य पर्वत व नर्मदा नदी ही त्यांच्या वसाहतीची दक्षिणसीमा होती. विंध्याच्या दक्षिणेकडे अनेक गहन अरण्ये होती आणि त्यात हिंस्र पशूंची व रानटी मानवसमूहांची वस्ती असल्यामुळे आर्यांना तो प्रदेश ' दक्षिणेकडील आपदा ' ( दक्षिणापदा ) वाटणे स्वाभाविक होते. म्हणूनच कैकेयीने रामाला वनवासासाठी याच प्रदेशात धाडले; त्यात तिचा हेतू राम कधी परत येऊच नये असा असावा.

दक्षिणापथाचा प्राचीनतम स्पष्ट उल्लेख बौधायन धर्मसूत्रांत आढळतो. बौधायनाने भाल्लवींची एक गाथा उद्धृत केली आहे. तिच्यात सौराष्ट्राबरोबर दक्षिणापथाचाही उल्लेख आहे. मात्र दक्षिणापथात कोणकोणते देश समाविष्ट होते, या विषयीचा निर्णय करता येत नाही. वाल्मीकिरामायणातील दंडकारण्य दक्षिणापथाच्या मोठ्या भागाला व्यापणारे होते. पतंजलीच्या महाभाष्यात महिष्मत, चोळ, पांड्य, इ. दक्षिणेकडील राज्यांचा उल्लेख येतो. महाभारतातही दक्षिणापथाचा उल्लेख वारंवार आला आहे. सहदेव पांड्य देश जिंकून दक्षिणापथात गला, असे सभा पर्वात म्हटले आहे. अवंती व ऋक्षपर्वत ओलांडून दक्षिणापथात जावे लागत असे, असे वन पर्वातील पुढील श्लोकांवरून दिसते –

एते गच्छन्ति बहव: पन्थानो दक्षिणापथम् ।
अवन्तीमृक्षवन्तं च समतिक्रम्य पर्वतम् ।।
एष विन्ध्यो महाशैल: पयोष्णी च समुद्रगा ।
एष पन्था विदर्भाणामसौ गच्छति कोसलान् ।।
अत:परं च देशोऽयं दक्षिणे दक्षिणापथ: ।

अर्थ – ( नलराजा दमयंतीला विदर्भात माहेरी जाण्याचे

मार्ग सांगत आहे. ) अवंती आणि ऋक्षवत पर्वत यांना ओलांडून दक्षिणापथाकडे जाणारे हे अनेक मार्ग आहेत. हा महापर्वत विंध्य आणि ही समुद्राकडे जाणारी पयोष्णी नदी. हा विदर्भाकडे जाणारा रस्ता आणि हा कोसलाकडे जाणारा. इथून पुढे हा दक्षिणेकडचा दक्षिणापथ देश दिसतो आहे.

पुलिंद, शबर, चुचुक आणि मद्रक हे दक्षिणापथाचे निवासी होते, असे महाभारतात म्हटले आहे ( शांति.२०७.४२-४५ ). भीष्म पर्वात म्हटले आहे, की माहिष्मतीचा राजा नील हा दक्षिणापथातील नीलायुधाच्या सेनेसह कौरवांच्या बाजूने लढला. सोने, रत्ने, हिरे व शंख यांच्या व्यापारासाठी दक्षिणापथ प्रसिद्ध असल्याचे कौटिल्याच्या अर्थशास्त्रावरून दिसते ( अधिकरण ७ ). काही पुराणांनी चोळ, पांड्य व केरळ हे प्रदेश दक्षिणापथात असल्याचे सांगितले आहे ( मार्कंडेय ५७.४५; वायू ४५. १२४; मत्स्य ११२.४६ ). पेरिप्लसने या प्रदेशाला 'दक्षिणावदेस' म्हटले आहे, तर फाहियानने 'ता-थ्सिन' ( दक्षिण ) म्हटले आहे. फाहियानने या प्रदेशाचे वर्णन केले आहे, ते असे–

यापुढे दोन योजने दक्षिणेकडे गेल्यावर तिथे एक ता-थ्सिन नावाचा प्रदेश आहे. पूर्वीच्या बुद्धकाश्यपाचा इथे एक संघाराम असून, तो मोठा पर्वत पोखरून तयार केला आहे. या ता-थ्सिन प्रदेशात पुष्कळ डोंगरकडे आहेत आणि रस्तेही वाईट आहेत.

इ. स. च्या प्रारंभकाळापासून दक्षिणापथ हे नाव महाराष्ट्राला लावलेले आढळते. सातवाहन राजे आपणांला दक्षिणापथाचे राजे म्हणवीत असत. मध्ययुगापासून विंध्य, नर्मदा व कृष्णा यांच्यामधील प्रदेशाला दक्षिणापथ म्हणून ओळखू लागले.

दक्षिणापथाचे हे वेदकाळापासूनचे उल्लेख पाहता असे दिसते, की आर्य लोक प्रारंभी विंध्याच्या दक्षिणेकडील सर्व प्रदेशाला या नावाने ओळखीत असत. पुढे ते विंध्य ओलांडून दक्षिणेत येऊ लागल्यावर त्यांना क्रमाक्रमाने दक्षिणेकडील प्रदेशांचे विशेष ज्ञान होऊ लागले. आर्यांच्या आगमनापूर्वीपासून दक्षिणत चोळ, चेर, पांड्य, इ. द्रविड राज्ये प्रतिष्ठेने नांदत होती. नर्मदा व सेतू यांच्या मधला साडेसात लाख खेडेगावांचा मिळून झालेला जो देश तो दक्षिणापथ होय, असा स्पष्ट उल्लेख चालुक्यांच्या कोरीव लेखात आढळतो. या उल्लेखावरून हे स्पष्ट होते, की दक्षिणापथ हे नाव संपूर्ण दक्षिण भारताचे द्योतक आहे. पण आर्यांच्या दक्षिणेकडील वसाहतीला आणि संस्कृतीच्या प्रसाराला अनुकूल भूमी मिळाली, ती महाराष्ट्रातच. त्यामुळे पुढे दक्षिणापथाची व्याप्ती कमी होत गेली आणि ते नाव महाराष्ट्रभूमीला लावले जाऊ लागले.

दक्षिणापथात उतरलेला आर्य संस्कृतीचा पहिला प्रतिनिधी अगस्त्य हा होय. अगस्त्याच्या रूपाने आर्य संस्कृती दक्षिणापथात प्रविष्ट होण्यापूर्वी इथे सुसंस्कृत मानवसमूह नांदत होते. अगस्त्याने त्यांच्या परंपरांचा आस्थेने अभ्यास केला आणि त्यांतले जे जे उत्कृष्ट होते, जीवनाला पोषक होते, ते ते त्याने मुक्तपणे स्वीकारले. त्याने दक्षिणापथावर आर्य संस्कृती लादली नाही, तर आर्य व आर्येतर संस्कृती यांच्या संगमातून एका नव्या भारतीय संस्कृतीची मुहूर्तमेढ रोवली. या नव्या समन्वित आणि समन्वयशील अशा भारतीय संस्कृतीच्या घडणीत दक्षिणापथाचा वाटा फार मोठा आहे. आर्य दक्षिणापथात उतरल्यानंतर दक्षिणापथाचे आर्यीकरण न होता आर्यांचे भारतीयीकरण घडले, अशी इतिहासाची साक्ष आहे.

आर्य विजेते असल्यामुळे प्रारंभी भारतातील जनमानसावर त्यांचा काही काळ प्रभाव पडणे स्वाभाविक होते. परंतु उत्तरोत्तर आर्यांचा मूलधर्म व मूलविचार यांच्या प्रभावाला ओहोटी लागली. आर्यांच्या संहितांतील विश्वशक्तींची उपासना, ब्राह्मणांतील गुंतागुंतीचे कर्मकांड आणि उपनिषदांतील गूढतम तत्त्वज्ञान यांचे आकलन सामान्य जनांना होणे कठीण होते. त्याचमुळे भारतातील मूळनिवासी लोकांच्या धार्मिक धारणा नव्या धर्म-पंथांच्या रूपाने उफाळून आल्या आणि मूळ वैदिक धर्माची हिंदू धर्मात परिणती होण्याची प्रक्रिया सुरू झाली. या प्रक्रियेत दक्षिणापथाने महत्त्वाचा हातभार लावला.

वैदिक धर्माचे मूलस्वरूप लोकमानसात जसेच्या तसे रुजणे अशक्य आहे, हे जाणताच समाजधुरीणांनी वेदांविषयीचा आदर अबाधित राखून या भूमीतील अवैदिक धर्मश्रद्धांना प्रतिष्ठा प्राप्त करून दिली आणि त्यांच्यामागे वेदांची मान्यताही उभी केली. हे जे घडले, त्याचे उत्तम उदाहरण म्हणजे शिव ही देवता होय. शिव ही दक्षिणापथाने भारतीय संस्कृतीला दिलेली महान देणगी होय. मोहेंजोदडोपर्यंत पसरलेल्या दक्षिणापथाच्या संस्कृतीत महायोगी व पशुपती अशा शिवाचे स्थान सर्वोच्च होते. वैदिकांचा रुद्र हा आर्यपूर्वकालातील भारतीयांच्या शिवाचाच आर्य अवतार होय. पुढे तर वैदिक रुद्र हा मूळच्या शिवात पूर्णपणे विरून गेला आणि शिव आपल्या समृद्ध विशेषांनी भारतीय लोकमानसावर अधिराज्य गाजवीत राहिला. शिवाला ही अत्युच्च प्रतिष्ठा लाभत असतानाच दक्षिणेतील अनेक देव-देवता उन्नत बनून त्याही शिवपरिवारात स्वतःचे जागा मिळवून बसल्या. सिरिमा ही वेदपूर्व देवी आदिशक्तीच्या विविध रूपांत मिरवू लागली. आणि अय्यप्पन, मुरुगन, इ. दे- शिवपुत्र स्कंदाच्या भूमिकेत स्थिर झाले.

आजच्या भारतीय देवतामंडलातील बहुसंख्य देवता

दक्षिणापथातील मूल देवतांची परिणत स्वरूपे आहेत. देवतांचे मूर्तिविज्ञान आणि पूजापुरस्कार ही प्राधान्याने दक्षिणेचीच देणगी आहे. पूजा, बली आणि योग हे वेदपूर्व शिवोपासनेचेच घटक असल्याचे विद्वानांनी मान्य केले आहे. शिव आणि त्याच्या परिवारातील अनेक देवता यांच्याविषयीच्या मूलकथांनी भारतीय दैवतकथांचे भांडार समृद्ध केले आहे. शुद्ध भक्तीचा उदय दक्षिणेतच झाला, असे पद्म पुराणात सांगितले आहे. 'उत्पन्ना द्राविडे साहम्' = मी द्रविड देशात उत्पन्न झाले, असे भक्ती स्वतःच म्हणते. पुढे कविरानेही 'भक्ति द्राविड उपजी' = भक्ती द्रविड देशात उत्पन्न झाली, असे वरील विधानाला अनुमोदन दिले आहे. अद्वैत विचाराच्या अधिष्ठानावर भक्तिभावना स्थिर झाल्यानंतर दक्षिणेतील सर्व ग्रामदेवता एकाच परमेश्वराची व्यक्त रूपे म्हणून पूजिल्या जाऊ लागल्या आणि त्यामुळे धार्मिक पातळीवरून समाजाचे ऐक्य घडू शकले.

धर्माप्रमाणेच तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातही दक्षिणेचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. जैमिनीच्या मीमांसासूत्रांवरील शाबरभाष्याचे विशदीकरण करणारे कुमारिलभट्ट आणि प्रभाकर हे दोघेही महापंडित अनुक्रमे आंध्र व केरळ या प्रदेशांतील होते. चौदाव्या शतकात होऊन गेलेले सायण आणि माधव हे दक्षिणेचे दोन सुपुत्र भारतीय विचारपरंपरेचे महान शिल्पकार समजले जातात. सायणाच्या वेदभाष्यामुळेच भावी पिढ्यांना वेद आकलनीय होऊ शकला. माधव ऊर्फ विद्यारण्य याने मीमांसेचे स्पष्टीकरण केले, तसेच सर्व दर्शनांचेही मंथन केले. प्रस्थानत्रयीवर भाष्ये लिहून वेदान्तविचार सुप्रतिष्ठित करण्याचे कार्य ज्या महान आचार्यांनी केले, त्यांतले बहुतेक दक्षिणेतलेच होते. शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य व निंबार्काचार्य, अशी त्यांची नावे आहेत. शंकराचार्यांनी तर हिंदु धर्माचे पुनःसंघटन करून भारताचे सांस्कृतिक ऐक्य घडविण्याचे महत्कार्य प्रभावीपणे पार पाडले. रामानुज व मध्वाचार्य यांचा अखिल भारतीय भक्तिपरंपरेवर प्रभाव पडला. आगमांवर आधारलेला तमिळ शैव संतांचा– नायन्मारांचा – शैवसिद्धान्त आणि श्रीकंठाचा शिवाद्वैतसिद्धान्त यांनी शंकराचार्यांच्या वेदान्तविचाराचे दृढीकरण केले.

तमिळनाडमधील नायन्मार व आळवार संत; कर्नाटकातील बसवेश्वर व अल्लमप्रभू यांसारखे वीरशैव संत व पुरंदरदास, जगन्नाथदास, कनकदास यांसारखे हरिदास; पोतन्ना, त्यागराज यांच्यासारखे आंध्रसंत आणि महाराष्ट्रातील ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, इ. संत यांच्या भक्तिविचारांनी भारतीय भक्तियोग सर्वांगी समृद्ध झाला आहे. अगदी अलिकडच्या काळातही रमण महर्षींसारख्या सत्पुरुषांनी दक्षिणेची थोर वैचारिक परंपरा अद्ययावत अविच्छिन्न राखण्याची कामगिरी बजावली आहे.

संगीत आणि नृत्य या क्षेत्रांतील दक्षिण भारताची परंपराही थोर आहे. दक्षिण भारतातील संगीत हे रागप्रधान आहे. राग ही व्यक्तिगत बाब असल्यामुळे इथे संगीतशिक्षण गुरु-शिष्य परंपरेने चालत आलेले आहे. शैव संत नायन्मारांची भजने त्यांच्या काळात ज्या रागांत गायिली जात होती, त्याच रागांत ती आजही गायिली जातात. यादवांच्या काळात प्राचीन भारतीय संगीताला देशी संगीताची जोड देऊन देशी संगीताला शास्त्रीय प्रतिष्ठा मिळवून देणारे अनेक संगीतज्ञ दक्षिणापथात होऊन गेले. संगीतरत्नाकराचा कर्ता शार्ङ्गदेव आणि संगीतसमयसाराचा कर्ता पार्श्वदेव हे दोघे त्यांमधले अग्रगण्य होत. यांना यादव राजांचा आश्रय होता. त्यांच्या ग्रंथांत लोकप्रचलित अशा अनेक कलांगांचा समावेश झालेला असून, त्या निमित्ताने देशी, विशेषतः मराठी शब्दांचा परिभाषेसाठी स्वीकार केलेला आहे. संगीतरत्नाकरानंतर संगीतावरील अधिकांश ग्रंथ दक्षिण भारतातच रचले गेले. वेंकटमखीने आपल्या चतुर्दंडीप्रकाशिकेत रागांचे जे वर्गीकरण केले आहे, त्याचा प्रभाव अलिकडच्या काळातील भातखंडे आणि त्यांचे शिष्य यांच्यावरही फार मोठ्या प्रमाणात झालेला आहे. त्यागराजाने बहरास आणलेल्या कर्नाटक संगीताने तर भारतीय संगीत विशेष समृद्ध केले आहे.

संगीताबरोबरच इथे नृत्याची साधनाही अव्याहतपणे होत राहिली आहे. नागर संस्कृतीच्या वाढीबरोबर लुप्त होऊ लागलेली लोकनृत्ये एके काळी दक्षिणी नृत्यकलेच्या वैशिष्ट्यांत भर टाकीत होती. दक्षिण भारतात शास्त्रीय नृत्य देवतांच्या उपासनेत उपयोजिले जात असल्यामुळे त्याचे रक्षण प्रामुख्याने देवदासींनी केले. भरताच्या नाट्यनियमांना अनुसरून ज्याची बांधणी आणि उभारणी झालेली आहे, तो दक्षिणेतील भरतनाट्यम नामक नृत्यसंप्रदाय शास्त्रीय नृत्याच्या क्षेत्रात अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. देव आणि धर्म यांच्या अंगाने निर्माण झालेले आणि मंदिरांच्या आश्रयाने वाढलेले हे नृत्य देवदासींच्या भ्रष्ट जीवनाबरोबर भ्रष्ट होऊ लागताच विसाव्या शतकाच्या आरंभी श्री. कृष्ण अय्यर नामक कलाप्रेमिकाने त्याला सावरून धरले आणि ते देवदासींच्या घरांतून काढून घेऊन घरंदाज लोकांच्या अंगणात आणून उभे केले. चालू शतकात अनेक स्त्री-पुरुष कलावंतांनी या कलेचा कीर्तिझंकार त्रिखंडात गाजविला आहे. भरतनाट्यमच्या विकासात तमिळनाडचा वाटा सर्वांत मोठा आहे. केरळमध्ये विकास पावलेले

प्रसिद्ध कथ्थकली नृत्यही भरतनाट्यमशी संबंधित आहे.

वास्तुशिल्प आणि मूर्तिशिल्प या बाबतीतही दक्षिणापथाने अतिप्राचीन काळापासून आपले वैशिष्ट्य सिद्ध केले आहे. हडाप्पा आणि मोहेंजोदडो येथील संस्कृतीचे शिल्पकार द्रविड होते, हे बहुमान्य मत गृहीत धरल्यास दक्षिणी शिल्पकलेची प्राचीनता पाच हजार वर्षांइतकी मागे जाते. भारतीय वास्तू आणि मूर्ती या दोहोंचे प्राचीनतम नमुने डोंगरात खोदलेल्या लेण्यांत आढळतात आणि भारतातील लेण्यांपैकी नऊ दशांश लेणी दक्षिणेतच सह्याद्रीच्या कुशीत आहेत. वेरूळ आणि अजंटा येथील लेण्यांत वास्तुशिल्प आणि मूर्तिशिल्प यांच्या विकासाच्या सर्व पायऱ्या दिसून येतात. अजंटाच्या लेण्यांतील चित्रकला आणि वेरूळचे कैलास लेणे जगातील कलारसिकांना आजही मंत्रमुग्ध करीत आहे. घारापुरीची त्रिमूर्ती म्हणजे भारतीय मूर्तिकलेचे एक भूषणच होय. आंध्रातल्या अमरावती व नागार्जुनकोंडा येथील अवशेष, मामल्लपुरम येथील मंदिरे, दक्षिणेकडील गोपुरयुक्त भव्य देवालये आणि महाराष्ट्रातील हेमाडपंती शिवमंदिरे यांचे वास्तुशिल्प आणि त्यांच्या सजावटीत वापरलेले मूर्तिशिल्प पाहून आजही स्थापत्यविशारद मोहून जातात. तंजाऊर, मदुराई, तिरुचिरापल्ली, चिदंबरम, सोमनाथपूर, बेलूर, हळेबीड, ऐहोळ, वदामी, पट्टदकल, इ. ठिकाणच्या मंदिरशिल्पांची समृद्धी डोळे दिपवणारी आहे. उत्तरेकडील भरहूतचे शिल्पही दक्षिणी कलावंतांनीच घडविलेले आहे. दक्षिणेत शिलामाध्यमाप्रमाणेच धातूच्या माध्यमांचाही मूर्तींसाठी विपुल उपयोग झालेला आहे. नटराज शिव, शैव व वैष्णव साधुसंत आणि राजे–महाराजे यांच्या शेकडो कांस्यमूर्ती दक्षिणेत आढळतात. यांपैकी कित्येक मूर्ती भारतीय मूर्तिकलेची भूषणे ठरल्या आहेत.

साहित्यनिर्मितीच्या बाबतीतही दक्षिणेने वैभवशाली कामगिरी पार पाडली आहे. दक्षिणेतील द्राविड भाषाकुलातील तमिळ भाषा अत्यंत प्राचीन आहे. तमिळ साहित्याची परंपरा दोन हजार वर्षांइतकी प्राचीन आहे. असे असूनही संस्कृताचा स्वीकार केल्यानंतर तिच्या विकासाठी दक्षिणेने जे कार्य केले, ते भारताच्या इतिहासात अपूर्व असे आहे. आपस्तंब हा श्रौत, धर्म व शुल्ब अशा अनेक सूत्रांचा कर्ता गोदावरीच्या खोऱ्यातला होता. त्यानंतर वेदविषयक ग्रंथनिर्मिती करणारे जे अनेक आचार्य झाले तेही दक्षिणीच होते. दक्षिणेतील सर्व आचार्य आणि त्यांच्या परंपरेतील अनेक पंडित यांनी निर्माण केलेल्या ग्रंथांनी भारतीय विचारविश्व आणि साहित्यविश्व अनेकांगांनी भरघोस झाले आहे. उत्तरेत सातत्याने परकीयांची आक्रमणे होत राहिल्याने तिथे भारतीय परंपरांचे शुद्ध स्वरूपात रक्षण होऊ शकले नाही; परंतु दक्षिणेत मात्र संस्कृत आणि संस्कृती यांच्या रक्षणाचे व विकसनाचे सातत्य आजपर्यंत टिकले आहे. संस्कृताचा मातृभाषेसारखा वापर करणारी अनेक घराणी दक्षिणेत आजही नांदत आहेत. भारताचे धर्मपीठ असलेल्या काशीत संस्कृत विद्यांचे अध्ययन-अध्यापन करण्याचे नेतृत्व दक्षिणी पंडितांकडेच होते व आहे. शूद्रक, भवभूती, राजशेखर, जगन्नाथ पंडित, त्रिविक्रमभट्ट, इ. प्रथितयश संस्कृत साहित्यकार दक्षिणेतलेच होत. दक्षिणेतील लोकांचे वर्णोच्चार अत्यंत शुद्ध असतात. दक्षिणेत वेदपठण जितक्या शुद्ध स्वरूपात ऐकायला मिळते, तितके उत्तरेकडे मिळत नाही. थोडेसे सानुनासिक उच्चारण ही दाक्षिणात्यांची, विशेषतः तेलगू लोकांची शैली श्रुतिमधुर आहे. भारतीय आर्यभाषांच्या विकासाला पोषक ठरलेल्या महाराष्ट्री प्राकृतातील समृद्ध साहित्य प्राधान्याने महाराष्ट्रात निर्माण झाले. प्रवरसेन, गुणाढ्य, पुष्पदंत हे विनीचे प्राकृत साहित्यकार महाराष्ट्रीय होते.

दक्षिणेतल्या लोकभाषांतील साहित्याच्या परंपराही थोर आहेत. शिलप्पधिकारम, मणिमेखलै, कुरळ, इ. तमिळ ग्रंथ, आणि नायन्मार व आळवार संत, त्यागराजादी तेलुगू संत, कर्नाटकातील वीरशैव संत व हरिदास, महाराष्ट्रातील ज्ञानेश्वर-तुकारामादी संत यांनी निर्माण केलेले साहित्य भारतीय भक्तिसाहित्याचा अमोल ठेवा बनले आहे. आधुनिक भारतीय साहित्यातही बंगालीच्या खालोखाल दक्षिणी भाषांचेच वाग्वैभव मान्यता पावले आहे.

दक्षिणेत प्राचीन काळी शासनसंस्थेचा पुष्कळ विकास झालेला होता. त्याचप्रमाणे द. भारताचा अनेक परदेशांशी मोठा व्यापार पूर्वी चालत असे.

दक्षिणेची संस्कृती ही सर्वांशाने भारतीय संस्कृती आहे. आपल्या अनेक मूल वैशिष्ट्यांसह आणि प्रादेशिक प्रकृतीसह या संस्कृतीचा प्रवाह युगायुगांतून वाहत आला आहे. उत्तर भारतावरच्या परकीय आक्रमणांमुळे भारतीय संस्कृतीवर जे आघात झाले, त्या सर्व आघातांपासून तिचे रक्षण दक्षिणेने केले, हे निःसंशय होय. दक्षिणेने भारतीय संस्कृतीच्या कंठात मंगळसूत्र बांधले आणि तिच्या ललाटावर कुंकुमतिलक लावून तिचे सौभाग्य अखंड राखले. मंगळसूत्र आणि कुंकू ही सौभाग्यचिह्नेही दक्षिणेतीलच आहेत. [प्रा. म. १; हिं. वि. को.; म. ज्ञा. को.; म. भा. उ. वि.; स्ट. जॉ. ए. मे. इं.; वे. इं.; हिं सा. इं.; प्रा. म. धा. इ.; कॉं. सा. हे. इं.]

**दक्षिणामूर्ती** शिवाचे एक रूप. भक्तांना अद्वैत तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्यासाठी शिवाने हे रूप धारण

केले, अशी कथा आहे. इथे दक्षिणा शब्द बुद्धिवाचक आहे. बुद्धीच्या साहाय्याने ज्या परमेश्वराचे ज्ञान होते, त्याला दक्षिणामूर्ती म्हणतात. दक्षिणामूर्तीचे एक उपनिषद असून, त्यात हा आशय पुढील श्लोकात सांगितला आहे –

**धीमुषी दक्षिणा प्रोक्ता सा यस्याभीक्षणे मुखम् ।**
**दक्षिणाभिमुखः प्रोक्तः शिवोऽसौ ब्रह्मवादिभिः ॥**

अर्थ – बुद्धीला दक्षिणा असे म्हटले आहे. ही बुद्धी ज्याचा साक्षात्कार करून घेण्याचे प्रमुख साधन हे आहे, अशा शिवाला ब्रह्मवेत्त्यांनी दक्षिणाभिमुख (दक्षिणामूर्ती) म्हटले आहे.

दक्षिणामूर्ती म्हणजे सुंदर मूर्ती असाही त्याचा एक अर्थ होऊ शकतो. दक्षिणामूर्तीचे रूपध्यान असे–

**स्फटिकरजतवर्णं मौक्तिकीमक्षमालाम्**
**अमृतकलशविद्याज्ञानमुद्राः कराग्रैः ।**
**दधतमुरगकक्षं चन्द्रचूडं त्रिनेत्रं**
**विधृतविविधभूषं दक्षिणामूर्तिमीडे ॥**

अर्थ – ज्याचा वर्ण स्फटिक व रुपे यांच्यासारखा आहे, ज्याने आपल्या बोटांनी मोत्यांची अक्षमाला, अमृतकलश, विद्यामुद्रा व ज्ञानमुद्रा धारण केली आहे, ज्याच्या कटीला सर्पवेष्टन आहे व जटाजूटात चंद्र आहे, तसेच ज्याने विविध भूषणे धारण केली आहेत, अशा दक्षिणामूर्तीचे मी स्तवन करतो.

दक्षिणामूर्तीचे वीणाधर, योग, ज्ञान व व्याख्यान असे चार प्रकार आहेत. वीणाधरमूर्ती उभी व चतुर्भुज असते; ती भक्तांना वीणावादन शिकवते. योगमूर्ती ध्यानस्थ बसल्याप्रमाणे असते; तिच्या कृपेने योगविद्या प्राप्त होते. ज्ञानमूर्ती तत्त्वज्ञान शिकविणारी आहे. व्याख्यानमूर्ती इतर शास्त्रांचे ज्ञान देते; ही वीरासनावर असून ज्ञान, संदर्श व व्याख्यान या मुद्रा दाखवते.


दक्षिणामूर्ती

जगन्नाथपुरी येथे एक वीणाधर दक्षिणामूर्ती सापडली आहे. दक्षिण भारतात दक्षिणामूर्तीच्या शिल्पाकृती अनेक ठिकाणी दिसतात, त्या मध्ययुगीन आहेत. आद्य शंकराचार्यांनी दक्षिणामूर्तीची दोन स्तोत्रे रचली आहेत, त्यांपैकी एका स्तोत्रातला एक श्लोक पुढीलप्रमाणे–

**विश्वं दर्पणदृश्यमाननगरीतुल्यं निजान्तर्गतं**
**पश्यन्नात्मनि मायया बहिरिवोद्भूतं यथा निद्रया ।**
**यः साक्षात्कुरुते प्रबोधसमये स्वात्मानमेवाद्वयं**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥**

अर्थ – निद्रेच्या वेळी स्वप्नात भासणाऱ्या पदार्थाप्रमाणे हे सर्व विश्व ज्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणी, आरशात दिसणाऱ्या एखाद्या नगरीच्या प्रतिबिंबासारखे प्रत्ययास येते आणि आत्मसाक्षात्काररूपी जागृतीच्या क्षणी नाहीसे होते, त्या वेळी केवळ एकमेवाद्वितीय अशा आत्मस्वरूपाचाच. ज्याला साक्षात्कार होतो, त्या आत्मस्वरूपी श्रीगुरू दक्षिणामूर्तीला मी हा नमस्कार करीत आहे.

विष्णुकांची येथे योगदक्षिणामूर्ती आहे. या मूर्तीने योगपट्ट धारण केलेला असून, डाव्या हाताने वितर्कमुद्रा दाखवली आहे. या योगदक्षिणामूर्तीच्या भोवती अनेक ऋषी बसलेले असून, ते त्या मूर्तीकडून योगविद्या शिकत आहेत, असे दाखवले आहे. [डे. हिं. इ.; मू. वि.; सु. स्तो. सं.]

## दक्षिणामूर्ती उपनिषद

शिवस्तुतिपर एक नव्य उपनिषद. हे कृष्ण यजुर्वेदाशी संबद्ध आहे. ब्रह्मावर्तातील भांडीर वटवृक्षाखाली सत्रासाठी जमलेले ऋषी सत्रसमाप्तीनंतर मार्कंडेय ऋषीकडे गेले. त्यांनी मार्कंडेयाला अमरत्वाचे आणि नित्यानंदाच्या प्राप्तीचे रहस्य विचारले. त्यावर मार्कंडेयाने उत्तर दिले, की 'शिवतत्त्वाच्या ज्ञानाने अमरत्व प्राप्त होते. ज्यामुळे दक्षिणमुख शिवाचा साक्षात्कार इंद्रियांना होतो, ते तत्त्व महारहस्य होय.'

हे रहस्य या उपनिषदात पुढे उलगडून दाखवले आहे. या उपनिषदात काही मंत्र दिले आहेत, त्यांपैकी मेधादक्षिणामूर्तिमंत्र असा – 'ॐ नमो भगवते दक्षिणामूर्तये अस्मभ्यं मेधां प्रज्ञां यच्छ स्वाहा ।' यानंतर भावशुद्धीकरिता एक नवाक्षर मंत्र सांगून, त्यापुढे 'ॐ ब्लूं नमः दक्षिणपदमूर्तये ज्ञानं देहि स्वाहा ।' हा अठरा अक्षरी मंत्र सर्व मंत्रांत श्रेष्ठ असल्याचे सांगितले आहे.

दक्षिणामूर्ती या शब्दाचा अर्थ या उपनिषदात पुढीलप्रमाणे सांगितला आहे– बुद्धी हीच दक्षिणा होय. ही दक्षिणा ज्याचे डोळे व मुख आहे, तो दक्षिणामूर्ती होय. [श्री. सी. ग. देसाई]

## दक्षिणायन

दक्षिण दिशेकडे किंवा दक्षिण गोलार्धात सूर्याचे अयन = गमन ज्या काळात होत असते त्या काळाला (आषाढ मास ते पौष मास) दक्षिणायन असे म्हणतात. याविषयी विष्णू पुराणात पुढील श्लोक दिलेला आहे –

**अयनस्योत्तरस्यादौ मकरं याति भास्करः ।**
**राशिं कर्कटकं प्राप्य कुरुते दक्षिणायनम् ।।**

अर्थ– सूर्य मकर राशीत गेला, की उत्तरायण सुरू होते आणि तो कर्क राशीत गेल्यानंतर दक्षिणायनाला प्रारंभ होतो.

कर्क संक्रांती ही आषाढात व मकर संक्रांती ही पौषात येते. दक्षिणायनाचा मार्ग हा पितृयाण ( जीवाला पितृलोकी नेणारा ) आहे. त्याला धूम्रादी मार्ग असेही म्हणतात. दक्षिणायनात मृत झालेला योगी धूम्रादी मार्गाने चंद्रलोकी जातो व तिथे पुण्यांश भोगून संपल्यावर परत मृत्युलोकी येतो, असे गीतेत म्हटले आहे ( ८·२५ ). पितृयाण मार्ग स्वर्गप्रद असला तरी तो मोक्षप्रद नाही, असा याचा अर्थ आहे. म्हणूनच मोक्षाची इच्छा करणारे लोक देहपातासाठी उत्तरायणाचा काल पसंत करतात. त्यालाच अर्चिरादी मार्ग असे नाव आहे. दक्षिणायनात देव निजलेले असतात व मार्गात सर्वत्र अंधार असतो, अशी पौराणिक कल्पना आहे.

मकर संक्रांतीप्रमाणेच कर्क संक्रांतीला म्हणजे दक्षिणायनाच्या प्रारंभदिनी तीर्थस्नान, दान, श्राद्ध, इ. धर्मकृत्ये करावी, असे सांगितले आहे. दक्षिणायनात व्रतोद्यापन, संस्कार, इ. काही धार्मिक कृत्ये वर्ज्य सांगितली आहेत. पाहा– अयन; उत्तरायण; देवयान व पितृयाण. [ हि. घ. ]

## दांपत्याष्टमी

एक व्रत. कार्तिक वद्य अष्टमीला या व्रताचा प्रारंभ करायचा असतो. या व्रतात प्रत्येक महिन्यातील वद्य अष्टमीच्या दिवशी उमा–महेश्वरांच्या दर्भमूर्ती करून त्यांची पूजा करतात. त्यांना प्रत्येक महिन्यात निरनिराळ्या नावांनी निरनिराळी फुले वाहतात आणि निरनिराळे नैवेद्य दाखवितात. वर्षानंतर व्रताचे उद्यापन करतात. त्या वेळी एका ब्राह्मण दांपत्याला भोजन घालतात आणि त्याला तांबड्या रंगाची वस्त्रे व दोन सुवर्णधेनू दक्षिणा म्हणून देतात. फल – पुत्र, विद्या व शिवलोक यांची प्राप्ती. [ हि. घ. ]

## दादाभाई नौरोजी

( १८२५– १९१७ इ. स.) एक थोर राष्ट्रभक्त, समाजसुधारक आणि राष्ट्रीय सभेचे एक संस्थापक. त्यांचा जन्म मुंबई येथे एका प्रतिष्ठित पारशी घराण्यात झाला. त्यांच्या पित्याचे नाव नौरोजी पालनजी दोर्डी आणि मातेचे नाव माणकबाई असे होते. त्यांच्या वयाच्या चौथ्या वर्षीच त्यांचे वडील वारले. त्यांचे प्रारंभीचे शिक्षण नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या शाळेत झाले. कॉलेजात प्रवेश करण्यापूर्वीच वयाच्या अकराव्या वर्षी सोरावजी श्रॉफ यांची कन्या गुलबाई हिच्याशी त्यांचा विवाह झाला.

एल्फिन्स्टन कॉलेजातील प्रा. बाळशास्त्री जांभेकर नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीची शाळा तपासण्यास गेले असता, त्यांनी ज्या पाचसहा मुलांची चाचणी घेतली त्यांत दादाभाई हे होते. दादाभाईंच्या हुशारीने बाळशास्त्री प्रभावित झाले आणि त्यांनी दादाभाईंची कॉलेजशिक्षणासाठी निवड केली.

कॉलेजात विद्वान प्राध्यापकांच्या मार्गदर्शनाने दादाभाईंनी अनेक ज्ञानशाखांचा उत्तम अभ्यास केला. इ. स. १८४० मध्ये त्यांना क्लेचर शिष्यवृत्ती मिळाली आणि त्यानंतर दोन वर्षांनी त्यांना नॉर्मल स्कॉलर्स क्लासमध्ये प्रवेश मिळाला. ते विद्यार्थी व प्राध्यापक या दोघांचेही आवडते होते. प्रा. आरल्बार त्यांना म्हणत असत, की 'दादाभाई म्हणजे हिंदुस्थानची आशा आहे.'



दादाभाई नौरोजी

दादाभाई कॉलेजात शिकत असताना शिक्षणबोर्डाचे अध्यक्ष न्या. इर्स्किन पेरी यांचे लक्ष त्यांनी आपल्याकडे वेधून घेतले. न्या. पेरींनी दादाभाईंना इंग्लंडमध्ये शिकायला पाठवायचे ठरवले; परंतु घरची आर्थिक दुरवस्था आणि पारशी समाजाची कर्मठता या अडचणींमुळे त्यांना शिक्षणासाठी इंग्लंडला जाता आले नाही. कॉलेजशिक्षण पूर्ण झाल्यावर लगेच एल्फिन्स्टन कॉलेजातील प्राध्यापकांच्या आग्रहामुळे ते त्याच कॉलेजात गणिताचे प्राध्यापक म्हणून काम करू लागले.

कॉलेजात अध्यापन करीत असतानाच दादाभाईंनी मुंबईत समाजसुधारणेच्या अनेक चळवळी उभारल्या. त्यांनी स्टूडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी या नावाची संस्था स्थापून, तिच्या मराठी व गुजराती ज्ञानप्रसारक मंडळी या नावाच्या दोन प्रसिद्धिशाखा उघडल्या. मुंबईत त्यांनीच प्रथम मराठी व पारशी मुलींच्या शाळा काढल्या. तसेच बाँबे प्रेसिडेन्सी ॲसोसिएशन, इराणी फंड, पारशी जिमखाना, विडो मॅरेज ॲसोसिएशन, फ्रामजी इन्स्टिटयूट, व्हिक्टोरिया ॲंड आल्बर्ट म्यूझियम या संस्था स्थापण्यातही त्यांचा पुढाकार होता. इ. स. १८५१ मध्ये त्यांनी रास्तगोफ्तार (सत्यवादी) या नावाचे गुजराती वृत्तपत्र सुरू केले. दादाभाई या सर्व संस्थांचे आधारस्तंभ होते. त्यांची बुद्धिमत्ता, विवेकनिष्ठा आणि समाजोद्धाराची तळमळ यांमुळे त्यांच्या नेतृत्वाने मुंबईत आणि क्रमाक्रमाने भारतात सर्वत्र नवजागृती सुरू झाली.

लिव्हरपूल येथे नव्याने सुरू झालेल्या कामा घराण्याच्या व्यापारी कंपनीचे भागीदार म्हणून इ. स. १८५५ च्या जूनमध्ये दादाभाई इंग्लंडला गेले. ही भागीदारी त्यांनी तीन वर्षे सांभाळली. इंग्लंडमधील या अल्प वास्तव्यात त्यांनी ब्रिटिश राज्यपद्धतीचे सूक्ष्म निरीक्षण केले. या पार्श्वभूमीवर त्यांना भारतातील राज्यकारभारात होणारा अन्याय व चालणारी अव्यवस्था प्रकर्षाने जाणवली. त्यानंतर अगदी थोडया दिवसांसाठी ते मुंबईला परत आले. तेवढयात इथल्या चळवळींना त्यांनी पुनश्च उत्तेजित केले आणि इ. स. १८५९ च्या प्रारंभी लिव्हरपूल येथे जाऊन 'दादाभाई नौरोजी आणि कंपनी' ही व्यापारी संस्था स्थापन केली.

इंग्लंडमध्ये व्यापार करीत असता दादाभाई तिथल्या जनतेपुढे हिंदी लोकांच्या दुरवस्थेची कहाणी सतत मांडीत होते व तिथेही जनजागृतीसाठी नवनव्या संस्था उभारीत होते. इंग्लंडमध्ये पारशी व्यापारी व विद्यार्थी यांची संख्या वाढू लागल्याचे पाहून, त्यांच्यामध्ये आपल्या विचारांचा प्रसार करण्यासाठी त्यांनी 'लंडन झोरोस्ट्रियन ॲसोसिएशन' नामक संस्था स्थापन केली आणि विद्यार्थ्यांमध्ये सार्वजनिक कामाची आवड निर्माण केली.

दादाभाई इंग्लंडला गेले, त्यात त्यांचा मुख्य हेतू तेथील राज्यव्यवस्था पाहावी व तेथील लोकमत समजून घ्यावे, हा होता. इंग्लंडवर पार्लमेंटचे राज्य असले, तरी इंग्लडचे खरे राज्यकर्ते इंग्लिश लोकच आहेत, हे त्यांना लवकरच कळून आले. इंग्लंडमध्ये लोकशाही अशा रीतीने पूर्णत्वाला गेली असताना, भारतात येणारे इंग्लिश अधिकारी मात्र लोकमत सतत पायदळी का तुडवतात, असा त्यांना प्रश्न पडला. भारतात सुधारणा घडवायची असेल, तर ब्रिटनमधले लोकमत तयार केले पाहिजे, याची निकड त्यांना जाणवली. त्या दृष्टीने इ. स. १८६६ च्या अखेरीस त्यांनी वंगीय पुढारी व्योमेशचंद्र बानर्जी यांच्या साहाय्याने 'लंडन इंडियन सोसायटी' ही संस्था स्थापन केली. इंग्लिश व हिंदी लोकांना वारंवार एकत्र आणून हिंदी प्रश्नांवर चर्चा करावी, हा या संस्थेचा उद्देश होता. या संस्थेने इंग्लंडमध्ये पन्नास वर्षे भारताच्या वतीने प्रचार केला. दादाभाई हे त्या संस्थेच्या स्थापनेपासून तो इ. स. १९०७ पर्यंत सतत तिचे अध्यक्ष होते. हीच संस्था पुढे ईस्ट इंडिया ॲसोसिएशन बनली.

इ. स. १९०७ मध्ये दादाभाई कायमचे भारतात आले. तोपर्यंत त्यांचा निवास काही काळ इंग्लंडमध्ये आणि काही काळ भारतात असे. इंग्लंडमधील मुक्कामात ते भारताच्या परिस्थितीसंबंधी व्याख्याने देत. फासेट कमिटीपुढे साक्ष देताना त्यांनी भारताचे दारिद्र्य व त्यामानाने असह्य असलेला करांचा बोजा या गोष्टी कमिटीपुढे सप्रमाण मांडल्या. 'भारतात दर माणशी उत्पन्न केवळ २० रुपये आहे,' या दादाभाईंच्या विधानामुळे अनेक सरकारी अधिकारी रागावले आणि त्यांनी वाद माजवला. या वादाला उत्तर देण्यासाठी दादाभाईंनी १८७३ मध्ये 'हिंदुस्थानचे दारिद्र्य' या विषयावर एक स्वतंत्र पुस्तकच इंग्रजीत प्रसिद्ध केले. पुढे सरकारनेही स्वतंत्रपणे चौकशी करून भारतात दर माणशी उत्पन्न केवळ २७ रुपये असल्याचे जाहीर केले.

इ. स. १८७४ मध्ये दादाभाईंनी बडोदे संस्थानचे दिवाणपद स्वीकारले. त्यांनी त्या संस्थानातील अव्यवस्था व अनाचार दूर करण्याचा चंग बांधला होता; परंतु रेसिडेंटचा व स्वार्थाने लडबडलेल्या दरबारी मंडळींचा विरोध आणि खुद्द मल्हारराव गायकवाडांची चंचल वृत्ती यांमुळे त्यांचा तो हेतू विफल ठरला. शेवटी कंटाळून दादाभाईंनी इ. स. १८७५ च्या प्रारंभी ते दिवाणपद सोडले. इ. स. १८८५ पर्यंत ते मुंबई नगरपालिकेचे सदस्य होते. इ. स. १८८५ मध्ये ते मुंबई कायदेकौन्सिलचे सभासद झाले. त्याच वर्षी डिसेंबर महिन्यात राष्ट्रीय सभेच्या स्थापनेसाठी जी परिषद भरली होती, तिला दादाभाई उपस्थित होते. नंतर इ. स. १८८६ साली कलकत्ता येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष झाले. इ. स. १८९२ मध्ये ते इंग्लंडला गेले आणि ब्रिटिश पार्लमेंटचे सदस्य म्हणून निवडून आले. पार्लमेंटमध्ये त्यांनी हिंदी प्रश्नांवर भाषणे केली, अनेक प्रश्न विचारले आणि भारतातील राज्यकारभारात सुधारणा होण्यासाठी काही ठरावही मांडले. त्यांच्या या प्रयत्नांमुळे पार्लमेंटातील अनेक सदस्य भारताला अनुकूल बनले.

इ. स. १८९३ मध्ये राष्ट्रीय सभेचे अधिवेशन लाहोर येथे भरले, त्याचेही अध्यक्षपद पुनश्च त्यांनाच मिळाले. इ. स. १८९६ मध्ये वेल्बी कमिशनपुढे आणि १८९८ मध्ये इंडियन करन्सी कमिटीपुढे त्यांच्या साक्षी झाल्या. इ. स. १९०२ मध्ये त्यांनी 'पॉव्हर्टी अँड अनब्रिटिश रूल इन इंडिया' हे पुस्तक प्रसिद्ध केले. भारतातून प्रतिवर्षी तीन कोटी पौंड विनामोबदला इंग्लंडमध्ये जात असल्यामुळे भारताचे दारिद्र्य वाढत आहे, हे त्यांनी या पुस्तकात सिद्ध केले.

इ. स. १९०५ मध्ये आम्स्टरडॅम ( हॉलंड ) येथे भरलेल्या सोशल डेमोक्रॅट पक्षाच्या इंटरनॅशनल काँग्रेसला हजर राहून त्यांनी भारतातील ब्रिटिश राज्यपद्धतीचा निषेध केला. इ. स. १९०६ मध्ये कलकत्ता येथे भरलेल्या अधिवेशनात ते तिसऱ्यांदा राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष झाले. याच अधिवेशनात त्यांनी स्वराज्य, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ही इतिहासप्रसिद्ध त्रिसूत्री देशापुढे ठेवली.

इ. स. १९१६ मध्ये मुंबई विद्यापीठाने त्यांना एल्. एल्. डी. ही सन्मान्य पदवी अर्पण केली. पुढे वर्षभराने वयाच्या ब्याण्णवाव्या वर्षी कृतार्थ मनाने त्यांनी आपला देह ठेवला.

भारताच्या आधुनिक इतिहासात दादाभाईंचे स्थान फार वरचे आहे. भारतीय स्वातंत्र्याच्या सनदशीर चळवळीचे ते प्रवर्तक होते. 'आधुनिक भारताचे पितामह' म्हणून भारतीयांनी त्यांच्याविषयीची कृतज्ञता व्यक्त केली आहे. ते जसे बुद्धिमान होते, तसेच तत्त्वशील आणि प्रयत्नवादीही होते. त्यांच्या मनाला निराशा कधीच शिवली नाही. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीतही त्यांनी भारताची दुरवस्था इंग्लिश जनतेच्या निदर्शनाला आणून, स्वराज्यासाठी अनुकूल वातावरण तयार केले. त्यांच्या काळाचा संदर्भ ध्यानी घेता त्यांचे राजकारण जहालच होते, असे म्हटले पाहिजे. भारतात येणाऱ्या कापडावर जकात बसविण्याचे बिल चर्चेला आले असता, सर हेन्री जेम्स यांनी त्याला विरोध केला. त्यावरोबर दादाभाईंनी भर पार्लमेंटात ब्रिटिश सरकारला इशारा दिला, तो असा—

"हिंदुस्थान धोक्यात यावा अशी तुमची इच्छा आहे काय ? १८५७ सालचे विस्मरण होऊ देऊ नका. तसे बंड उद्याच होईल असे नसले, तरी अशा रीतीने अन्यायाच्या राशी रचू लागलात, तर त्यांचे अंतिम पर्यवसान त्यातच झाल्यावाचून राहणार नाही, हे ध्यानात ठेवा."

दादाभाईंनी आपल्या सेवामय जीवनाने भारतात निःस्वार्थी समाजसेवेचा एक आदर्शच निर्माण करून ठेवला आहे [ अ. च. को.; हि. क. इं. पी. १०; स्वराज्यमंत्रद्रष्टे दादाभाई नौरोजी– श्री. अभिराग, १९५६; सु. वि. को. ]

## दादू दयाळ

( १५४४ – १६०३ इं. स. ) उ. भारतातील एक निर्गुणोपासक संत. याचा जन्म गुजरातेतील अहमदाबाद शहरात झाला. याच्या जातीविषयी विद्वानांत मतभेद आहेत. समकालीन मुसलमान इतिहासकार मुहसन फनी याने त्याला मुसलमान धुनिया ( पिंजारी ) ठरविले आहे. संत रज्जबही त्याला 'धुनी गर्यें उत्पन्नो' ( धुनिया स्त्रीच्या पोटी जन्मलेला ) असेच म्हणतो. बंगालमधील बाऊलांच्या वंदनगीतात त्याचे मूळ नाव दाऊद असल्याचा उल्लेख मिळतो. पण दादू हा मुसलमान नसून लोदीराम नामक नागर ब्राह्मणाचा औरस पुत्र होता, असे दादूपंथी लोक मानतात.

दादूला वयाच्या अठराव्या वर्षी बाबा बुड्ढन अथवा वृद्धानंद नामक साधूकडून गुरूपदेश मिळाला. त्यापूर्वीच त्याचा विवाह झाला असावा. गुरूपदेशानंतर त्याने गुजरात, राजस्थान, उ. प्रदेश, बिहार व बंगाल या भागांत तीर्थयात्रेच्या निमित्ताने भ्रमण केले, अनेक साधूंच्या भेटी घेतल्या, त्यांचे अनुभव व विचार समजून घेतले व विविध प्रदेशांतील लोकजीवनाचे सूक्ष्म निरीक्षणही केले. पूर्व भारतात हिंडत असताना त्याचा काही नाथयोग्यांशी जवळचा संबंध आला असावा, असे त्याच्या वाणीवरील नाथपंथी संस्कारांवरून वाटते.

यात्रा संपविल्यानंतर ( इ. स. १५७४ च्या सुमारास ) तो पत्नीसह सांभर येथे राहू लागला. तिथेच दोन वर्षांनी त्याला गरीबदास नामक पुत्र झाला. याशिवाय त्याला मिस्किनदास नावाचा आणखी एक पुत्र आणि नानाबाई व माताबाई या नावाच्या दोन कन्या होत्या. सांभरला त्याचा मुक्काम सहा वर्षे होता. या काळातच त्याने ब्रह्मसंप्रदाय नामक नव्या संप्रदायाची स्थापना केली.

सांभर सोडल्यावर तो आमेर येथे राहायला आला. तिथेच इ. स. १५८६ मध्ये अकबर बादशहा त्याच्या भेटीसाठी आला होता व अकबराने दादूबरोबर चाळीस दिवसपर्यंत अध्यात्मचर्चा केली होती, असे सांगतात.

आमेरला दादूने चौदा वर्षे निवास केला. त्याच्या जीवनाचा अखेरचा काळ सांभरजवळील नरान्याच्या गुहेत गेला असावा. त्याच ठिकाणी तो मृत्यू पावला. सांप्रत तिथेच दादूपंथियांचा मुख्य दादूद्वारा आहे. त्यात दादूच्या पादुका, वस्त्र, केस आणि भोपळ्याचे भिक्षापात्र या वस्तू सुरक्षित ठेवलेल्या आहेत. त्या ठिकाणी दादूच्या पुण्यतिथिनिमित्त प्रतिवर्षी फाल्गुन शु. चतुर्थी ते पौर्णिमा या दिवसांत मोठी यात्रा भरते.

दादूची शिष्यपरंपरा मोठी आहे. त्याचे प्रमुख शिष्य एकशे बावन्न असून, त्यांतील बावन्न दादू पंथाचे आधारस्तंभ होते.

रज्जब, गरीबदास, सुंदरदास, बरवना, जनगोपाल यांसारखे प्रख्यात निर्गुणोपासक संत दादूच्या शिष्यपरिवारातलेच होत.

दादूने आपले अनुभव आणि विचार अनेक पदांत आणि साख्यांत ग्रथित केलेले आहेत. 'अनभैवाणी' आणि 'कायाबेली' ही त्याच्या काव्याची दोन संकलने प्रसिद्ध आहेत. याशिवाय त्याची शेकडो स्फुटे अद्याप संकलित व्हायची आहेत. भारतभर भटकणाऱ्या अनेक पंथांतील साधूंच्या मुखातून ती ऐकायला मिळतात.

दादूची वाणी कबिराच्या वाणीप्रमाणेच विवेकनिष्ठ विचारांनी आणि पारमार्थिक उच्च अनुभवांनी भारलेली आहे. त्याने कबिराप्रमाणेच आपल्या उपास्याला अलख, अनादी, अप्रमेय, पूर्ण, निश्चल, एकरस, निरंजन आणि निराकार



दादू दयाळ

मानले आहे. त्याच्या साधनेत वैष्णवांची अहिंसा, योग्यांचा चित्तवृत्तिनिरोध, सूफींचे प्रेम आणि पूर्वकालीन संतांचा शब्दयोग यांचा समन्वय आहे. गुरू आणि गोविंद यांची एकरूपता, नाममाहात्म्य, आत्मसमर्पणाची भावना, प्रपंचाचे मिथ्यात्व, सामान्य संसारी जीवांची बद्धता, अव्यक्ताविषयीची उत्कट प्रीती आणि त्याच्या विरहाची तीव्र वेदना, इ. विशेष त्याच्या काव्यात दिसतात. दादूच्या वाणीत त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे आगळेपणही स्पष्टपणे उमटले आहे. कबिराच्या वाणीत आत्मप्रत्ययाची प्रखरता आहे, तर दादूच्या वाणीत आत्मसमर्पणाची कोमलता आहे. त्याचे दयाळू हृदय जसे आचारांतून, तसेच शब्दांतूनही व्यक्त झाले आहे. दादू दयाळ हे नाव त्याला यथार्थत्वाने शोभते. परमेश्वर व आपण यांच्यामधला स्वामिसेवक भाव त्याने पुढील पद्यात व्यक्त केला आहे—

तूं साहिब मैं सेवग तेरा, भावै सिरि दे सूली मेरा ।।
भावै करवत सिरपरि सारि, भावै लेकर गरदन मारि ।।
भावै चहुदिसि अग्नि लगाइ, भावै काल दसौं दिसि खाइ ।।
भावै गिरिवर गगन गिराइ, भावै दरिया मांहैं बाहि ।।
भावै कनक कसोटी देहु, दादू सेवग कसि कसि लेहु ।।

अर्थ— हे प्रभो, तू माझा स्वामी आहेस आणि मी तुझा सेवक आहे. तुझी इच्छाच असेल; तर तू मला सुळावर चढव, माझ्या शिरावर करवत फिरव, माझा शिरच्छेद कर, चारही दिशांनी आग लाव अथवा दाही दिशांनी मला खाण्यासाठी काळाला पाठव. तुझी इच्छाच असेल, तर माझ्यावर डोंगर आणि आकाश कोसळू देत अथवा तू मला सागरात बुडवून टाक. दादू म्हणतो, की सोने जसे कसोटीवर कसतात, त्याचप्रमाणे तू माझी कोणत्याही प्रकारे कसोटी पाहा.

उत्तर भारतातील निर्गुणोपासनेच्या परंपरेत दादूचे स्थान कबिराच्या बरोबरीचे मानले जाते. हिंदू आणि मुसलमान यांच्या ऐक्यासाठी त्याने अपार प्रयत्न केले. त्याने ज्या पूर्वकालीन संतांच्या अनुभवांचा व विचारांचा मागोवा घेतला, त्यांत नामदेवाचे नाव कबिराच्याही आधी आहे. दादूच्या आचारविचारांनी प्रभावित झालेल्या अनेक संतांनी पुढे समाजजागृतीचे मोठे कार्य केले. [ उ. भा. सं. प.; हिं. सा. इ.; हिं. सा. को. २; संतसुधासार ]

## दादू पंथ

उत्तर भारतातील एक निर्गुणोपासक संप्रदाय. दादू दयाळ हा या संप्रदायाचा संस्थापक होय. सांभर ( राजस्थान ) येथे इ. स. १५८३ च्या सुमारास या संप्रदायाची स्थापना झाली. याचे मूळ नाव ब्रह्म संप्रदाय अथवा परब्रह्म संप्रदाय असे होते. कारण या परंपरेत परब्रह्मालाच आदिगुरू मानले जाते. रज्जब आणि सुंदरदास यांनी प्रस्तुत नावानेच दादू पंथाचा उल्लेख केला आहे. स्वतः दादूने मात्र आपल्या अनुयायांना दादूपंथी याच नावाने निर्देशिले आहे. खरा दादूपंथी कोण हे स्पष्ट करणारे त्याचे एक वचन असे—

दुर्बल देही निर्मल वाणी दादू पंथी ऐसा जाणी ।।

अर्थ – ज्याचा देह दुर्बल आणि वाणी निर्मळ आहे, तो दादूपंथी जाणावा.

दादू दयाळ याने आपल्या एका पदात आपल्या पंथाच्या तत्त्वज्ञानाचे स्वरूप थोडक्या शब्दांत स्पष्ट केले आहे, ते असे –

भाई रे, ऐसा पंथ हमारा ।
द्वैपखरहित पंथगहि पूरा, अवरण एक अधारा ।।
वादविवाद काहू सौं नाहीं, माँहि जगत थैं न्यारा ।
समदृष्टी सुभाई सहज में, आपहि आप विचारा ।। १ ।।
मैं तें मेरी यहु मति नाहीं, निर्बैरी निरकारा ।
पूरण सबै देषि आयापर, निरालंब निर्धारा ।। २ ।।
काहू के संगि मोह न ममिता, संगी सिरजन हारा ।
मन ही मन सौं समझि सयाना, आनंद एक अपारा ।।३।।
काम कल्पनां कदे न कीजै, पूरण ब्रह्म पियारा ।
इहि पंथि पहूँचि पार गहि दादू, सोतत सहजि संभारा ।।

अर्थ – हे भाई, माझा पंथ असा आहे– मी पक्षपातरहित मार्गाचे पूर्णपणे अनुसरण करतो. त्या एका भेदरहिताच्या ठायी माझा विश्वास आहे. माझा कोणाशी कसलाही झगडा नाही आणि या जगात राहूनही मी त्यापासून अलिप्त आहे. सर्वांना मी समदृष्टीने पाहतो आणि सर्वांना आत्मवत लेखतो. माझ्या मनात मी–तूपणा उरलेला नसल्यामुळे मी सर्वांशी निर्वैर भावाने वागतो. मी सर्वांच्या हृदयात एकमात्र निरालंब-निराधाराचे अस्तित्व मानतो. मला कोणाविषयीही मोह-ममता नाही. केवळ ते परमतत्त्वच माझे सांगाती आहे. सूज्ञ लोक मनोमन अपार आनंदाचा अनुभव घेतात. (म्हणून तुम्ही) कोणत्याही वासनेला आपल्या मनात थारा देऊ नका आणि पूर्ण ब्रह्माच्या ठायी प्रेमभाव दृढ करा. दादू याच मार्गाने परमतत्त्वाचा अनुभव घेऊन संसारसागर तरून गेला.

दादूने कबिराप्रमाणेच निर्गुण-निराकार ब्रह्माचा स्वीकार केला आहे. त्याने त्याला शून्य, परमपद, निर्वाण या नावांनी संबोधले आहे. सर्व जगत या ब्रह्मानेच व्यापले आहे, अशी दादूची धारणा आहे. ब्रह्माचा 'रहस्यमय विनोद' (गूढ लीला) म्हणजे हे जगत् होय, असे तो मानतो. त्याच्या मते जगताला व्यापून राहिलेल्या या परमतत्त्वाची प्रत्यक्षानुभूती हेच सर्व साधनांचे परम लक्ष्य आहे.

दादूची परमार्थसाधना सहजमार्ग या नावाने ओळखली जाते हठाने इंद्रियदमन करणारा योगमार्ग आणि सगुणोपासनेचा बाह्य बडिवार माजविणारा भक्तिमार्ग या दोहोंच्या मधला मार्ग दादूने स्वीकारला आहे. आत्मसमर्पणभावातून अहंतेचा कंद समूळ उपटून टाकणे आणि ' याचि देही याचि डोळा ' मुक्तीचा अनुभव घेणे यालाच तो सहजमार्ग म्हणतो. मरणोत्तर मुक्तीवर त्याचा विश्वास नाही. प्रेम आणि सेवा यांवर त्याचा भर आहे सहज, समर्पण, स्मरण व सेवा या चार खांबांवर या पंथाची उभारणी झालेली आहे.

उत्तर भारतात कबीर पंथाइतकाच दादू पंथ लोकप्रिय आहे. साधनेच्या क्षेत्रातील भेदाभेद आणि बाह्यावडंबर दूर करून सामान्य जनांना प्रेम आणि सेवा यांचा सहजमार्ग दाखविण्याची महान कामगिरी या पंथाने केली आहे. दादू पंथात पुढील पाच उपपंथ आहेत–



दादूपंथी साधू

**खालसा**– हे आपणांला विशुद्ध दादूपंथी म्हणवतात. अध्ययन, अध्यापन व भजन हे यांचे वैशिष्टय असते. यांचा प्रमुख दादू-द्वारा नराने येथे आहे.

**नागा** –हे अत्यल्प व साधी वस्त्रे वापरतात. हे शस्त्रविद्येत निपुण आहेत. या उपपंथाचा प्रवर्तक पहिला सुंदरदास हा होय.

**उत्तराढी**–हे वैद्यकी करतात. यांचे बावन थावे (गट)असून चौदा गाद्या आहेत.

**विरक्त** – हे भिक्षेवर निर्वाह करून गृहस्थांना धर्मोपदेश करतात. हे भगवी वस्त्रे धारण करतात व नेहमी फिरतात.

**खाकी** – हे बैरागी असून, सदैव भ्रमणशील असतात.

दादूपंथी समाज हा साधू आणि सेवक अशा दोन वर्गांत विभागलेला आहे. साधू ब्रह्मचर्य पाळतात आणि मठात राहून अथवा यात्रा करीत आपले जीवन व्यतीत करतात. साधूंच्या हाती एक स्मरणी असते आणि ते मुखाने ' सत्तराम ' अखंड जप करतात. सेवक हे गृहस्थाश्रम स्वीकारून राहतात.

उत्तरेतील निर्गुणोपासनेच्या इतिहासात दादू पंथाचे स्थान महनीय आहे. दादू दयाळ, गरीबदास, सुंदरदास, रज्जब यांच्या सारखे महान साधू या पंथात होऊन गेले. त्यांच्या वाणीने केवळ हिंदी साहित्यातच नव्हे, तर भारताच्या परमार्थसाहित्यातही मोलाची भर पडली आहे. अलिकडच्या काळात अखिल भारतात वेदान्ताचे पुनरुज्जीवन करू पाहणारा निश्चलदास हा साधू दादू पंथाचाच अनुयायी होता. दादू पंथाने उपनिषदांतील

तत्वज्ञान आणि अद्वैत वेदान्त यांची बैठक स्वीकारून, परमार्थ साधनेचे शुद्धीकरण करण्याचा बराच प्रयत्न केला आहे. [उ. भा. सं. प.; हिं. सा. को.; हिं. सं. सा.]

**दान** दा = देणे, यावरून दान शब्द बनला आहे. दानाच्या काही व्याख्या अशा –

(१) 'मूल्यग्रहणं विना स्वस्वत्वध्वंसपरस्वत्वजनकः त्यागः' = वस्तूचे मूल्य न घेता तिच्यावरची आपली मालकी नष्ट करून तिथे दुसऱ्याची मालकी उत्पन्न करणे, अशा प्रकारचा जो त्याग, त्याला दान म्हणतात (न्या. को.).

(२) 'अर्थानामुदिते पात्रे श्रद्धया प्रतिपादनं। दानमित्यभिनिर्दिष्टं' = सत्पात्र व्यक्तीला श्रद्धेने द्रव्यादी वस्तू देणे, याला दान असे म्हटले आहे (श. क.).

(३) 'दानं नाम न्यायार्जितस्य धनधान्यादेः श्रद्धया अर्थिभ्यः प्रदानम्' = न्यायाने मिळवलेल्या धनधान्यादी वस्तू श्रद्धापूर्वक गरजवंतांना देणे, याला दान असे म्हणतात (शांडिल्योपनिषद १.२.१).

दानाची पुढील सहा अंगे मानलेली आहेत –

**दाता प्रतिगृहीता च श्रद्धा देयं च धर्मयुक्।**
**देशकालौ च दानानामङ्गान्येतानि षड् विदुः॥**

अर्थ – दाता, दान घेणारा, श्रद्धा, धर्मयुक्त देयवस्तू, देश व काल ही दानाची सहा अंगे होत.

कूर्म पुराणात दानाचे चार प्रकार सांगितले आहेत, ते असे–

**नित्यं नैमित्तिकं काम्यं त्रिविधं दानमुच्यते।**
**चतुर्थं विमलं प्रोक्तं सर्वदानोत्तमं मतम्॥**

अर्थ – नित्य, नैमित्तिक व काम्य असे त्रिविध दान सांगितले आहे. (आणखी एक) चौथे दान आहे, त्याला विमल म्हणतात. ते सर्व दानांत उत्तम मानलेले आहे.

वरील चारही प्रकारांचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे — (१) कोणत्याही फलाचा उद्देश मनात न धरता प्रत्येक दिवशी जे थोडेबहुत दान दिले जाते, ते नित्य, (२) पापनाश किंवा प्रायश्चित्त या उद्देशाने ग्रहणादी पर्वकाळी जे दान देतात, ते नैमित्तिक, (३) संतती, संपत्ती, विजय, स्वर्ग, इ. गोष्टींच्या प्राप्तीसाठी जे दान देतात, ते काम्य व (४) भगवंताच्या संतोषासाठी धर्मयुक्त अंतःकरणाने व निष्काम बुद्धीने जे दान देतात, ते विमल.

गरुड पुराणात दानाचे कायिक, वाचिक व मानसिक असे तीन प्रकार सांगितले आहेत. स्वतःच्या वजनाइतके सोने–रुपे दान देणे (तुलादान) हे कायिक, आर्त व संकटग्रस्त व्यक्तीला अभय देणे हे वाचिक आणि स्वतः मंत्रादी विद्या संपादन करून तिच्या अनुष्ठानाच्या द्वारे दुसऱ्याला त्या विद्येचे फल मिळवून देणे, हे मानसिक दान होय.

दानाचे तीन प्रकार गीतेत सांगितले आहेत, ते असे – जे दान कर्तव्यबुद्धीने व परतफेड व्हावी अशी आकांक्षा न धरता देश, काल व पात्र यांच्या ठिकाणी दिले जाते, ते सात्त्विक दान होय. या ना त्या प्रकारे प्रतिफलाच्या अपेक्षेने, विशिष्ट फलाच्या उद्देशाने व मनाला क्लेश देऊन दिलेले दान ते राजस होय. अस्थानी, अवेळी व अयोग्य माणसांना, सत्कार न करता व तुच्छता बुद्धीने जे दान दिले जाते, ते तामस दान होय (गीता. १७.२०–२२).

दानवस्तू सन्मार्गाने मिळवलेली असावी. निष्काम बुद्धीने दान करावे. दान करताना पात्रापात्रविचार जागृत असावा. श्रद्धेने दान द्यावे; केवळ दिमाख मिरविण्यासाठी देऊ नये. दात्याने दान घेणाऱ्याविषयी तुच्छताबुद्धी धरू नये.

दिलेले दान परत घेता येत नाही. मात्र प्रसंगी दानवचन मागे घेता येते. राग, हर्ष, विषाद आणि वात या विकारांच्या आधीन असताना दानाचे वचन दिले आणि जर ते पाळले नाही, तर त्याबद्दल दोष लागत नाही.

जैन ग्रंथांत पात्र, करुणा, सम व अन्वय असे दानाचे चार प्रकार सांगितले आहेत. सत्पात्री दिलेल्या दानाला पात्र म्हणतात. दीन–दुःखितांना दिलेल्या दानाला करुणा म्हणतात. साधर्मी लोकांना दिलेले दान ते सम आणि आपली धनसंपत्ती उत्तराधिकारी पुरुषाकडे सोपवून देणे, हे अन्वयदान होय. आहारदान, औषधदान, मुनींना धार्मिक उपकरणांचे दान, मुनींच्यासाठी वसतिदानं, ज्ञानदान व अभयदान ही जैनांनी श्रेष्ठ मानली आहेत.

शुक्ल, मिश्रित व कृष्ण असे दानद्रव्याचे तीन भेद मानले आहेत. शास्त्र, तप, याग, परंपरा, पराक्रम व शिष्य यांपासून मिळालेले द्रव्य शुक्ल; व्याजबट्टा, कृषी व वाणिज्य यांपासून मिळालेले द्रव्य मिश्रित आणि सेवा, द्यूत व चौर्य यांपासून मिळालेले द्रव्य कृष्ण म्हटलेले आहे. शुक्ल द्रव्याच्या दानाने सुख, मिश्रितांच्या दानाने सुख–दुःखं व कृष्ण द्रव्याच्या दानाने दुःख प्राप्त होते, अशी समजूत आहे.

अशा प्रकारे मिळविलेल्या धनापैकी कितवा भाग दानासाठी खर्च करावा, याविषयी धर्मशास्त्रकारांची वेगवेगळी मते आहेत. तीन भाग कुटुंबपोषणासाठी ठेवून दोन भाग दानधर्मात खर्च करावे, असे काहींचे मत आहे; तर दोन भाग कुटुंबासाठी ठेवून तीन भाग दानधर्मात खर्च करावे, असे काहींचे मत आहे. दान करणे म्हणजे सर्वस्व देऊन टाकणे नव्हे. दानामुळे कुटुंबियांचे कोणत्याही प्रकारे हाल होता कामा नयेत आणि

कुटुंबाच्या गरजा भागवून उरेल तेच दानासाठी खर्च करावे, असा स्पष्ट इशारा याज्ञवल्क्य व बृहस्पती यांनी देऊन ठेवला आहे.

अलिकडे महर्षी विनोबांनी षष्ठांशदानाची कल्पना पुढे मांडली आहे. सामान्यतः कुटुंब पाच माणसांचे धरतात. तेव्हा प्रत्येक कुटुंबाने आणखी एक माणूस आपल्या कुटुंबात आहे, असे समजून उत्पन्नाचे सहा भाग करावे व त्यांतला एक भाग समाजाला दान करावा, असे ते सांगतात.

**महादाने** – दानांत काही महादाने असतात. त्यांची नावे अशी – सोने, घोडा, हत्ती, तीळ, दास– दासी, रथ, भूमी, घर, भार्या व कपिला गाय ही महादाने होत. ती देणाऱ्याला मोठे पुण्य लाभत असले, तरी ती घेणारा मात्र प्रायश्चित्तार्ह ठरतो.

गुप्तदान नावाचाही एक प्रकार रूढ आहे. कोहळा, वेळूची काठी, इ. वस्तू पोखरून त्यांत द्रव्य भरणे व घेणाऱ्याला त्यातील द्रव्याची कल्पना न देता त्या वस्तू दान देणे, याला गुप्तदान असे म्हणतात. हे दानही महापुण्यकारक मानलेले आहे.

सर्व दानांत अन्नदान व विद्यादान ही दोन दाने श्रेष्ठ समजतात. क्षुधिताला व पांथस्थाला शिजवलेल्या अन्नातला भाग देण्याची कल्पना पंचमहायज्ञातच समाविष्ट करून टाकलेली आहे. निःशुल्क विद्यादानही भारतात प्राचीन काळापासून प्रचलित आहे.

राजाने विद्वान ब्राह्मणांच्या निर्वाहाची सोय करावी आणि भूमिदान देऊन त्यांना तिच्यावर वसते करावे, असे अनेक स्मृतिकार आवर्जून सांगतात. तदनुसार कित्येक राजांनी ब्राह्मणांना अग्रहार दिल्याचे उल्लेख अनेक कोरीव लेखांत आढळतात.

**काम्य दाने** – विविध कामनांच्या पूर्तीसाठी आणि विविध संकटे व रोग यांच्या उपशमासाठी विशिष्ट दाने सांगितली आहेत. त्यांची नावे व हेतू पुढीलप्रमाणे –

संततिकामना – तिलदान; तेजस्वी नेत्र – दीपदान; सर्वकामना – भूमिदान; दीर्घायुष्य – सुवर्णदान; उत्तम रूप – रौप्यदान; चंद्रलोकप्राप्ती – वस्त्रदान; लक्ष्मीप्राप्ती – वृषभदान; इंद्रलोकप्राप्ती – गोदान; भार्याप्राप्ती – शय्यावाहनदान; ऐश्वर्यप्राप्ती – अभयदान; शाश्वत सौख्य – धान्यदान; पांडुरोगनाश – गोदान, भूमिदान; मधुमेहनाश – सुवर्णदान: शूलश्वासादिनाश – अन्नदान; गुल्मनाश – कन्यादान; मूत्रकृच्छ्रनाश – मीठदान; रक्तपित्तनाश – घृतमधुदान; नेत्ररोगनाश – घृतदान; नासारोगनाश – सुगंधदान; कण्डुरोगनाश – तैलदान; जिव्हारोगनाश – रसदान;

**ग्रहांसाठी दाने** – नवग्रहांची पीडा दूर होण्यासाठीही त्या त्या ग्रहाची विशिष्ट दाने सांगितली आहेत. ( ग्रह पाहा )

**दानाचे देशकाल** –– ब्रह्मावर्त, वाराणसी, कुरुक्षेत्र, प्रयाग, पुष्कर, गोकर्ण, नैमिषारण्य, सेतू, श्रीपर्वत, महाकालक्षेत्र, गंगातीर, इ. स्थाने दानासाठी पुण्यकारक सांगितली आहेत. शिवलिंग आणि शालिग्रामशिला यांच्या संन्निध केलेले दानही पुण्यप्रद मानलेले आहे. दर्श, दिनक्षय, संक्रांती, युगादी, अयने, सूर्य-चंद्रग्रहणे, व्यतीपात, इ. योगांवर केलेल्या दानाचे शतगुणित फल मिळते, असे वराह पुराणात सांगितले आहे. वैशाख, कार्तिक व माघ या महिन्यांतील पौर्णिमेस दान देणे प्रशस्त मानले आहे.

**दक्षिणा** – दानाबरोबर दक्षिणाही देणे आवश्यक असते. दक्षिणेवाचून दान निष्फल होते. सुवर्णदक्षिणा ही सर्वश्रेष्ठ होय. दान कोणत्याही द्रव्याचे असले, तरी दक्षिणा सुवर्णाची द्यावी व दानद्रव्याचे जेवढे मूल्य असेल, त्याच्या तृतीयांशाइतकी ती असावी, असे सांगितले आहे.

**प्रतिग्रह** – दाता व प्रतिग्रहीता म्हणजेच दान देणारा व घेणारा मिळून दानव्यवहार घडतो. दात्याला जशी योग्यता असावी लागते, तशीच प्रतिग्रहीत्यालाही पात्रता असावी लागते. जो ब्राह्मण वेदाध्ययन व तपाचरण करतो, तोच दान घेण्यास योग्य, असे सांगून याज्ञवल्क्य पुढे म्हणतो –

**विद्यातपोभ्यां हीनेन न तु ग्राह्यः प्रतिग्रहः ।**
**गृह्णन् प्रदातारमधो नयत्यात्मानमेव च ।।**

(याज्ञ. स्मृ. १. २०२)

अर्थ – विद्या व तप यांनी रहित अशा ब्राह्मणाने प्रतिग्रह करू नये. केल्यास त्याला स्वतःला व दान देणाऱ्यालाही अधोगती प्राप्त होते.

वेदवेत्त्या ब्राह्मणाला प्रतिग्रहाचा दोष लागत नाही. याविषयी स्कंद पुराणात पुढील श्लोक दिला आहे –

**वेदाङ्गपारगो विप्रो यदि कुर्यात् प्रतिग्रहम् ।**
**न स पापेन लिप्येत पद्मपत्रमिवाम्भसा ।।**

अर्थ– वेदवेदांगांत निष्णात असलेल्या ब्राह्मणाने जरी प्रतिग्रह केला, तरी कमलपत्राला ज्याप्रमाणे पाण्याचा लेप लागत नाही, त्याप्रमाणे त्या ब्राह्मणाला पापाचा स्पर्श होत नाही.

प्राचीन काळी प्रतिग्रह हेच मुख्यत्वे ब्राह्मणांच्या उपजीविकेचे साधन होते. म्हणूनच ब्राह्मणांच्या षट्कर्मांत प्रतिग्रहाला स्थान दिलेले आहे. कोणत्याही प्रकारचे उदरनिर्वाहाचे साधन नसलेल्या श्रोत्रिय ब्राह्मणाचे राजाने पोषण करावे, असे स्मृती सांगतात. पवित्र आणि विद्वान ब्राह्मणांना सत्पात्र समजून धार्मिक कृत्यांच्या वेळी जेवायला बोलवावे, असे आपस्तंब धर्मसूत्रात सांगितले आहे (२. ६. १५. ९–१०).

प्रतिग्रहाविषयी प्रारंभी बरेच निर्बंध होते; पण बऱ्याच

ब्राह्मणांची योग्यता कमी होऊ लागली आहे, असे दिसताच त्यांपैकी बरेच निर्बंध शिथिल करण्यात आले. केवळ ब्राह्मण जातीत जन्माला येणे, एवढी गोष्ट प्रतिग्रहाला पुरेशी ठरली. देवकृत्यात ब्राह्मणाच्या विद्वत्तेला व चारित्र्याला विशेष महत्त्व देऊ नये, असाही विचार प्रसृत करण्यात आला.

प्रतिग्रहाचे निषेध– प्रतिग्रहाविषयी काही निषेधही सांगितले आहेत, ते असे – अयोग्य माणसाकडून आणि अधार्मिक राजाकडून दान घेऊ नये. अविद्वान ब्राह्मणाने सुवर्ण, भूमी, घोडा, गाय, अन्न व वस्त्र यांचे दान घेऊ नये, पुण्यक्षेत्रात प्रतिग्रह करू नये, आपत्प्रसंगावाचून शूद्राकडचे दान स्वीकारू नये, स्वतःच्या सुखोपभोगासाठी दान घेऊ नये, नदीतीरावरचे दान आपत्काली स्वीकारायला हरकत नाही; पण घेतलेल्या दानाचा एक दशांश भाग दुसऱ्याला द्यावा. हत्ती, घोडे, रथ, कृष्णमृगाजिन, मृताची शय्या, आसन व उभयतोमुखी (प्रसूतिकाली वत्साचे मस्तक प्रथम बाहेर येते त्या वेळची ) गाय यांची दाने घेतल्यास प्रायश्चित्त आवश्यक आहे.

दानकल्पना ही प्राचीनतम अशी धर्मकल्पना आहे. ऋग्वेदातच तिचा आढळ होतो.

ऋग्वेदकालीच कर्तृत्ववान पुरुषांकडे धनसंचय होऊ लागला होता आणि ते धन ऋणाच्या किंवा दानाच्या रूपाने गरजू लोकांना मिळू लागले होते. ऋग्वेदात दानाचा केवळ उल्लेखच आहे असे नसून दानाचा गौरवही आहे –

उतो रयिः पृणतो नोपदस्यत्युतापृणन्मर्डितारं न विन्दते ।
( ऋ. १०. ११७. १ )

अर्थ– दानाने कोणाचीही संपत्ती कमी होत नाही व दान न करणाऱ्याला ( संकटकाली किंवा परलोकी ) उपयोगी पडणारा कोणी भेटत नाही.

दान देणारा मनुष्य दान न देणाऱ्या मनुष्यापेक्षा श्रेष्ठ असून, सर्व दानांत अन्नदान हे महत्त्वाचे आहे, हा विचारही वरील सूक्तात स्पष्टपणे मांडला आहे.

ऋग्वेदात दानस्तुती या विषयासंबंधी सुमारे चाळीस सूक्ते आहेत. त्यांत यज्ञकर्त्या राजांनी ऋषींना व पुरोहितांना जी दाने दिली, त्यांचे वर्णन आहे. त्यांतले दानकर्ते राजे, दान घेणारे ऋषी व दानवस्तू यांची नावनिशी पुढीलप्रमाणे –

दानकर्ते राजे – प्रस्तोक, च्यवतान, ध्वन्य, स्वनय, सोमक, त्रसदस्यू, श्रुतरथ, पुरुमीळ्ह, दिवोदास, सुदास, कुरुश्रवण, इत्यादी.

दान घेणारे ऋषी – कक्षीवान, वामदेव, बभ्रू, संवर्ण, भरद्वाज, गर्ग, वसिष्ठ, सोभरी, मेधातिथी, अवत्सार, कवष, इ.

दानवस्तू – घोडे, उंट, गायी, रथ, धन, स्त्रिया इत्यादी.

'त्रयो धर्मस्कन्धा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमः' = धर्माचे स्कंध तीन आहेत. त्यांपैकी यज्ञ, अध्ययन व दान हा पहिला स्कंध होय, असे छांदोग्योपनिषदात म्हटले आहे (२. ३३. १). गीतेने यज्ञाच्या खालोखाल दानालाच महत्त्व दिले असून, यज्ञ, दान, तप व कर्म यांचा कधीही त्याग करू नये, असे सांगितले आहे.

स्मृती व पुराणे यांच्या कालात दान देण्याच्या वस्तूंत खूप वाढ झाली. ऋग्वेदात भूमिदानाचा उल्लेख नाही; पण स्मृतीत आणि पुराणांत तो आहे.

वेदोत्तर कालात अनेक क्षत्रिय राजांच्या बाबतीत दानाच्या मागे पराक्रमाची प्रेरणा दिसून येते. प्रथम दिग्विजय करून करभाराच्या रूपाने अमाप धन मिळवायचे आणि नंतर यज्ञ करून ते सर्व धन ऋत्विजांना आणि याचकांना दान देऊन मोकळे व्हायचे, अशा वृत्तीचे राजे पुराणांतरी आपल्याला दिसतात. हरिश्चंद्र, दधीची, शिबी, इ. दाते सुप्रसिद्ध आहेत. रघुराजाने विश्वजित यज्ञ करून सर्वस्वाचे दान केल्याची कथा कालिदासाने रघुवंशात सांगितली आहे. कर्ण हा दानवीर म्हणून महाभारतात प्रसिद्ध आहे.

धर्माचे चार पाय; पण कलियुगात त्याचा एकच पाय शिल्लक उरला आणि तो म्हणजे दान होय. 'दानमेकं कलौ युगे' = कलियुगात दान हेच एकमेव श्रेष्ठ होय, असे पराशर म्हणतो ( बृ. प. सं. १·१३ ). दानाच्या बाबतीत पराशराची मते विशेष विचार करण्यासारखी आहेत, असे डॉ. केतकर म्हणतात. उत्तम दान कोणते हे सांगताना 'अभिगम्योत्तमं दानम्' = ज्याला गरज असेल, त्याच्या घरी जाऊन दिलेले दान उत्तम होय, असे तो म्हणतो ( बृ. प. सं. १·२८ ). पाश्चात्य दानपद्धतीच्या आधुनिक तत्त्वांचे बीज पराशराच्या या उक्तीत दृष्टीस पडते. कित्येक माणसे इतकी दुर्बल व असहाय्य असतात, की त्यांना दान घेण्यासाठी दात्याकडे जाण्याची सुद्धा शक्ती नसते. अशा माणसांना जे काही द्यायचे, ते त्यांच्या घरी नेऊन द्यावे लागते.

व्यक्तीच्या व समाजाच्या जीवनातील उणीवा दूर करणे, हे आधुनिक विचारसरणीप्रमाणे दानाच्या मागचे तत्त्वज्ञान आहे. दानामुळे व्यक्तीच्या व व्यक्तिसमूहाच्या तात्कालिक गरजा तर भागाव्याच; पण त्यामुळे व्यक्तीला व व्यक्तिसमूहाला स्वावलंबन व प्रयत्नवाद यांचीही प्रेरणा मिळावी; म्हणजेच दान घेणाऱ्याचे त्यामुळे सामर्थ्य वाढावे, अशी आधुनिक दानामागची विचारपद्धती आहे. त्यामुळे दान हे समाजशास्त्राचेच एक महत्त्वाचे अंग ठरले आहे. समाजाच्या गरजा किंवा उणीवा इतक्या विविध असतात, की त्यांची पूर्तता कोणत्याही प्रका-

रच्या शासनसंस्थेकडून होणे अशक्य असते. मग ती शासन-व्यवस्था साम्यवादी असो, समाजवादी असो किंवा दुसरी कोणतीही असो. विशिष्ट शासनपद्धतीने जगाची नवी घडी बसवली, तरी त्या व्यवस्थेतही काही उणीवा या राहतीलच. त्या उणीवा दूर करण्याचा प्रशासनाहूनही भिन्न असा उपाय म्हणजे दान होय. कोणतेही प्रशासन हे नियमबद्ध असते त्याला अपवादांची जाणीव नसते. म्हणून सुसंस्कृत माणसाने समाजहिताचा विचार करून, जिथे उणीव असेल, तिथे स्वतःच्या हक्कातले वस्तुद्रव्यादी स्वेच्छेने काढून द्यावे आणि ती उणीव दूर करावी, अशी शास्त्रकारांनी प्रत्येक व्यक्तीवर नैतिक जबाबदारी टाकलेली आहे.

अलिकडचा शे-पन्नास वर्षांचा काळ सोडला, तर भारताच्या गेल्या हजार–बाराशे वर्षांच्या इतिहासात या दृष्टीने म्हणजे सामाजिक पातळीवर दानाचे कसलेही प्रयत्न झालेले दिसत नाहीत. संत दानधर्माचा उपदेश करीत होते आणि लोकही त्याचे आचरण करीत होते; पण ते सारे स्वर्ग–मोक्षांच्या प्राप्तीसाठी होते. हतभागी मानवांचे जीवन सुखी व्हावे आणि मानवत्वापासून भ्रष्ट व पतित होणारे लक्षावधी लोक शुभ जीवनाच्या मार्गावर यावे, या दृष्टीने भारतीय विचारवंतांनी व धनिकांनी काहीही केले नाही. अनाथ व अपंगांना आपण जे दान करीत आहो, त्यामुळे त्यांचे दैन्य मुळातच फिटून जावे, ही दृष्टीच इथे निर्माण झाली नाही. युरोपात मात्र ज्या ज्या धर्मसंघटना निर्माण झाल्या, त्यांनी त्यांनी हीच एकमेव दृष्टी बाळगली. त्या दृष्टीने पाहता असे म्हणावे लागते, की दान-धर्माचा सामाजिक अर्थ युरोपियांनी निर्माण केला आणि आपण मात्र त्याला पारखे राहिलो.

आपल्या शास्त्रकारांनी अल्प असो वा बहुत असो, नित्यदान हे महत्त्वाचे मानलेले आहे. त्यात काही अंशी वरील विचार-सरणी दृष्टिगोचर होते; पण दान हे एक सामाजिक कर्तव्य आहे, असे काही त्या विचारसरणीतून निष्पन्न झाले नाही. मी पुष्कळ धन मिळवीन आणि मग दान करीन, अशा विचाराने कोणी थांबू नये, असेही त्यांनी सांगितले आहे. कारण माणसाला व्यवहारात त्याच्या अपेक्षेप्रमाणे धनलाभ होतोच असे नाही. म्हणून माणसाने अर्जित धनातला अल्पांश किंवा ग्रासातला अर्धा ग्रास का होईना; पण तो गरजवंताला अवश्यमेव दिला पाहिजे.

अलिकडच्या काळात महर्षी विनोबांनी ग्रामदानाची कल्पना पुढे मांडली असून, ती मात्र संपूर्णपणे सामाजिक आणि सर्वोदयी कल्पना आहे. तिला काही प्रमाणात प्रतिसादही मिळाला आहे. यात गावातल्या सर्व लोकांनी भूमीवरचा आपला मालकी हक्क विसर्जित करून ती भूमी गावाला दान करायची असते. या दानाने गावातली सर्व जमीन ही गावातल्या सर्वांच्या मालकीची बनते. अशी शेकडो ग्रामदाने भारतात सांप्रत होऊन चुकलेली आहेत. जगाच्या इतिहासात ग्रामदान हे अपूर्व आणि अद्भुत असे दान ठरेल. मूल्यपरिवर्तन करणारे, तसेच शांतिमय क्रांती करणारे हे दान आहे, असे विनोबा म्हणतात. या विषयात त्यांनी जे विचार मांडले आहेत, ते पुढीलप्रमाणे–

भूदान, ग्रामदान, संपत्तिदान वगैरेंचे जे आंदोलन चालू आहे, त्याला एक स्वतंत्र सांस्कृतिक मूल्य आहे. समाजाला आपल्या कुटुंबाचे एक अंग समजून आपल्या उत्पन्नातला हिस्सा देणे, यातूनच त्या गोष्टीचा परिणाम म्हणून ग्रामदान निघाले. भूदान, संपत्तिदान, इ. गोष्टी पूर्वी झाल्या नव्हत्या, असे नाही. पूर्वीही लोक गरीबाला दान देत व ब्राह्मणांना, तसेच मंदिरांना जमीनही देत; पण पूर्वीचे हे दान व्यक्तिगत असे. त्यामुळे त्या दानाची शक्ती मर्यादित होती. व्यक्तिगत पवित्र कार्याचा काही ना काही चांगला परिणाम झालाच असेल यात शंका नाही; पण भूदान, संपत्तिदान, ग्रामदान यांमध्ये सामूहिक साधना केली जात आहे. व्यक्तिगत साधनेत काही धोका आणि भयही असते. त्यात 'मी दिले', 'मी केले' असा अहंकार तरी राहतोच. पण तीच साधना सामूहिक झाल्यानंतर त्यातला अहंकार नाहीसा होतो. सांप्रतच्या विज्ञानयुगात व्यक्तिगत अहंकाराला स्थान नाही; कारण विज्ञानामुळे जगात व्यापक शक्ती पसरत आहे. विज्ञानाच्या बरोबरच अशा प्रकारच्या सामूहिक साधनेने आत्मज्ञानाची शक्तीही प्रकट झाली पाहिजे, तरच विज्ञानावर अंकुश राहील. अन्यथा तो राहणार नाही. ग्रामदानाचे लाभ सांगताना विनोबा म्हणतात –

ग्रामदानामुळे गावात व्यापक कौटुंबिक भावना निर्माण होईल. मग ग्रामोद्योग वाढीस लागतील. त्यामुळे गावाची संपत्ती वाढविणे सोयीचे होईल. गावाचेच कुटुंब बनल्यामुळे गावात एकमेकांबद्दल प्रेम वाढेल आणि जीवनात आनंद निर्माण होईल. गावाची नैतिक पातळी उंचावेल. जिथे जमीन आणि संपत्ती यांची मालकी नष्ट होते, तिथे मनुष्याची नीतिमत्ता सुधारलीच पाहिजे. हा एक सांस्कृतिक लाभ होय. जमीन आणि संपत्ती गावाच्या मालकीची करून टाकली, तर सर्व जगाचेच नैतिक उत्थान होण्याचा मार्ग त्यातून मिळून जाईल. मुक्तीचाही मार्ग त्यातच सापडेल. मनुष्य जेव्हा माझे घर, माझे शेत, याप्रमाणे 'माझे माझे' म्हणत राहतो, तेव्हा तो आसक्त बनतो आणि बंधनातही पडतो. आज सर्व लोकांची मने अशा बंधनात पडली आहेत. कारण 'मी-माझे' ही गोष्ट सुटत नाही. पण ग्रामदानात मी सर्वांचा आहे, सर्व माझे आहेत

आणि सर्व गावच आपले घर आहे, ही भावना वाढीस लागेल. त्यामुळे मुक्तीची युक्तीही सापडून जाईल. ( भूदानगंगा ५ )

**दानफलव्रत** एक काम्य व्रत. आश्विन पौर्णिमेपासून सुरू करून माघ शुद्ध सप्तमीपर्यंत हे व्रत करायचे असते. यात प्रत्येक रविवारी सूर्यनारायणाची पूजा करतात. व्रतावधी पाच वर्षे. या व्रतात तांदूळ, गहू, हरबरे, तीळ व उडीद या पाच वस्तू प्रत्येक वर्षी अनुक्रमे पाच प्रस्थ (१० पायल्या) दान देतात. फल– समृद्धी, पती, पुत्र, विष्णुलोक व अंती मोक्ष यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**दानव** असुरांपैकी एक वर्ग. दनू नावाच्या कश्यपाच्या भार्येपासून यांची उत्पत्ती झाली, म्हणून यांना दानव असे म्हटले आहे. ऋग्वेदात हा शब्द आला असून, तिथे वृत्राला दानव म्हटले आहे (ऋ. २.११.१०). दानव हे दृढनिश्चयी, धाडसी, कठोर, निर्दय व मंत्रविद्याप्रवीण होते. त्यांना तप करण्याचीही आवड होती. अनेक दानवांनी दीर्घकाल खडतर तप करून ब्रह्मदेवाकडून व शिवाकडून वर मिळवले होते. ते यज्ञविरोधी होते; पण त्यांच्यापैकी काही दानवांनी मानवधर्माचा स्वीकार केला होता, असे वायू पुराणात (६८.१-१६). म्हटले आहे भागवत पुराणात रसातल हा दानवांचा प्रदेश असल्याचे व तिथल्या श्वेत पर्वतावर त्याचे निवासस्थान असल्याचे सांगितले आहे (भाग. पु. २.७.१३.; ५.२४,३०). ते विष्णुद्वेष्टे होते असेही म्हटले आहे (भाग. पु. १०.४० २२). प्रमुख दानवांची नावे महाभारतात दिली आहेत, ती अशी –

बली, शाल्व, दीर्घजिह्व, दुर्जय, खर, हिरण्यकशिपू, इल्वल, मधू, कैटभ, मद, महिष, मय, नरक, पीठ, प्रल्हाद, पुलोमा, राहू, तारक, विविन्ध्यु, वृत्र, इत्यादी (म. भा. आदि. ६५).

भागवतात त्यांची संख्या एकसष्ट सांगून, त्यांतील प्रमुखांची नामावळी दिली आहे. ती अशी–

द्विमूर्धा, शंबर, अरिष्ट, हयग्रीव, विभावसू, अयोमुख, शंकुशिरा, स्वर्भानू, कपिल, अरुण, पुलोमा, वृषपर्वा, एकचक्र, तापन, धूम्रकेश, विरूपाक्ष, विप्रचित्ती व दुर्जय.

रावणाची बहीण कुंभनसी ही मधू नावाच्या एका दानवाला दिली होती. पण रावणाचे व दानवांचे एकूण वैरच होते, असे दिसते. दानव हे रामाचे पक्षपाती व रावणाचे अहित चिंतणारे होते, असे रामायणावरून कळते. लक्ष्मणाने इंद्रजिताचा वध केल्यावर दानव हर्षित झाले. रावणाने रामाला पीडा दिलेली पाहून ते अत्यंत उद्विग्न झाले. रावणवध झालेला पाहाताच ते आनंदित झाले. राम पुनश्च आपल्या मूळ विष्णुरूपाला प्राप्त होताच दानवांना अत्यंत हर्ष झाला. (वा. रा. ६.९०.८८ – ८९; १०२. ३१. १०२.४५; १०७.४६,). दानव आपल्या स्त्रियांसह विंध्यपर्वताच्या शिखरांवर क्रीडा करीत असत (वा. रा. ७.३१.१६).

असुर, राक्षस, दानव हे मूळचे निरनिराळे लोकसमाज होते; पण पुढे त्यांच्यांतला भेद दुर्लक्षित होऊन हे सारे शब्द एकाच अर्थी वापरले जाऊ लागले. दानव हे डोंगरी लोक असावेत, असे ज्ञानकोशकार म्हणतात. [ म. ज्ञा. को.; श. क.; वा. रा. को. ]

**दानशील** (इ. स. चे १० वे व ११ वे शतक) एक बौद्ध तार्किक. हा परहितभद्र, जिनमित्र, सर्वज्ञदेव व तिलोपा यांचा समकालीन होता. याने तिबेटात जाऊन संस्कृत ग्रंथांचे तिबेटी भाषांतर करण्याच्या कामी इतर पंडितांना मदत केली. याने तर्कशास्त्रावर पागोपाय नावाचा एक ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाही ; पण त्याचे तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे. [ म. च. को. ]

**दाम** एक जुनं नाणे. द्रम्म या संस्कृत शब्दावरून हा शब्द आला आहे. द्रम्म या शब्दाचा मूळ अर्थ सोने किंवा सोन्याचे नाणे असा आहे. पुढे अर्थभ्रंश किंवा अर्थसमाहार होऊन सोने-नाणे किंवा पैसा-अडका असा त्याचा अर्थ झाला. मध्ययुगात द्रम्म या नावाचे नाणे प्रचलित होते. श्री. चिं. वि. वैद्य यांच्या मते द्रम्म हा शब्द परकीय असून, ते नाणेही परकीयच होते.

कालांतराने दाम हे तांब्याचे लहानसे नाणे निर्माण झाले. अकबराच्या वेळी त्याचे वजन १ तोळा, ८ मासे व ७ रती इतके होते. ४० दामांचा एक रुपया होत असे. त्या वेळी सरकारी वसूल दामांत मोजीत असत. दाम व आणा यांचे प्रमाण निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळे ( १/३० आणा, १/१२ आणा, १/४० आणा ) होते. २६ कवड्या = १ दमडी = ३ दाम आणि २० दमड्या = १ आणा, असेही कोष्टक आहे.

**दामाजीपंत** ( इ. स. चे १५ वे शतक ) एक मराठी संत. हा बिदरच्या राज्यात सोलापूर जिल्ह्यातील मंगळवेढे येथील ठाणेदार होता. दुर्गादेवीचा दुष्काळ म्हणतात तो त्याच काळात पडला होता. त्या दुष्काळात दामाजीने परवानगीवाचून सरकारी धान्याची कोठारे लुटवली व हजारोंचे प्राण वाचवले. पण त्याच गोष्टीमुळे पातशहाची त्याच्यावर इतराजी झाली. पातशहाने त्याला महिन्याच्या आत धान्याच्या किमतीची रक्कम सरकारी खजिन्यात भरण्यास फर्मावले. दामाजीला

ती गोष्ट अशक्य होती; पण तो पांडुरंगाचा अनन्य भक्त असल्यामुळे पांडुरंगाने विठ्या महाराच्या रूपात बेदरला जाऊन सदर सर्व रक्कम भरली व दामाजीवरचे संकट निवारले, अशी कथा भक्तविजयात दिलेली आहे ( अ. ४० ).

इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांना सातारकर महाराजांच्या दप्तरात एका हुकुमाची नकल सापडली. तिच्यात महारांना पूर्वापार कोणकोणते हक्क होते याची नोंद आहे. त्यातील काही मजकूर असा –

" हे देणे पाछायाचे व दामाजीपंत याचे हातचा कागद असे विठ्या महार मंगळवेढ्याचा पाछायाचे कामी पडला म्हणोन पादशाहाणी विठ्या महारास हक करून दिल्हे. "

या हुकुमासंबंधीचा खुलासा करताना राजवाडे लिहितात – ' मंगळवेढ्यास दामाजीपंत कारमारी उर्फ कमाविसदार असताना विठ्या नावाचा महारही मंगळवेढ्यास होता. परमेश्वर महाराच्या हृदयात शिरून तद्द्वारा एका दयार्द्र गृहस्थाचा बचाव झाला ही खरी हकीकत. "



दामाजीपंताची समाधी – मंगळवेढे

दामाजी हा कवी म्हणून प्रसिद्ध नसला, तरीही त्याच्या नावावर एक पद उपलब्ध झाले आहे, ते असे–

हरहर विठ्ठल जगदुद्धार । जाहला महार मजसाठी ॥ ध्रु ॥
धन्य बेदरीचा बादशहा । त्याचा केला मी अन्याय ।
धान्य लुटण्याचा उपाय । पूर्ण अपाय मजसाठी ॥१॥
षड्गुण–ऐश्वर्य श्रीभगवान । सांडून देवपणाचा अभिमान ।
पायी घालोन तुटकी वहाण । नेसला जीर्ण-लंगोटी ॥२॥
माथा बांधूनी चिंध्याभार । काळे कांबळे स्कंधावर ।
मुखाने म्हणत असे जोहार । काळा दोरा निजकंठी ॥३॥
ऐसे का केले देवा । माझ्या सुकृताचा ठेवा ।
महार झालासि रे माधवा । लावूनी वणवा मजसाठी ॥४॥
ज्याचें धान्य लुटलें जाण । तो तरी घेता माझा प्राण ।
दामा म्हणे गुणनिधान । मज भेटी जगजेठी ॥५॥

बिदरच्या किल्ल्यात आणि गावातील एका वेशीत आजही विठ्या महाराच्या पाऊलखुणा दाखवतात. दामाजीच्या चरित्रातील कोठारे लुटवणे, या महत्त्वाच्या घटनेची स्मृती म्हणून प्रतिवर्षी या पाऊलखुणांच्या जागी बिदर येथे दामाजीचा उत्सव होत असतो.

मंगळवेढे या गावी दामाजीची समाधी आहे. त्या ठिकाणी प्रतिवर्षी वैशाखी पौर्णिमेला दामाजीची पुण्यतिथी साजरी होते. [ म. सा.; म. वा. इ. २; भा. इ. सं. मं. चतुर्थ संमेलन वृत्त, शके १८३८; श्री. संत दामाजीमहाराज यांचे चरित्र- श्री. रा. ग. करंदीकर, १९६५ ]

**दामोदर** ( इ. स. चे १६ वे शतक ) एक हिंदी कवी. बिहारमधील दरभंगा जिल्ह्यातील भौर गावचा हा रहिवासी होता. दामोदराचे सारे घराणेच विद्वत्तेबद्दल प्रसिद्ध होते. छत्तीसगड, बस्तर, दिल्ली, इ. ठिकाणच्या राजदरबारांत याच्या बंधूंनाही चांगला मान होता. दरभंगा राजवंशाचे संस्थापक महामहोपाध्याय महेश ठाकूर हे दामोदराचे धाकटे बंधू होत.

'श्री एकशे आठ विष्णु प्रतिष्ठा' हा दामोदराचा प्रमुख ग्रंथ होय. याशिवाय त्याच्या नावावर अनेक ग्रंथ आहेत. त्याने मैथिली भाषेत अनेक पदेही रचली आहेत. हा देवीभक्त दिसतो. देवीच्या प्रार्थनेचे त्याचे एक पद असे–

जगत जननि भा गोचर मोर ।
के नहिं भैल शरणागत तोर ॥ १ ॥
हमर निकल मन दशोदिश धाव ।
सब तुरित समुचित फल पाव ॥ २ ॥
की तोहि पड़ल गुरु अपराध ।
तैं भेल सकल मनोरथ बाध ॥ ३ ॥
होहु प्रसन्न भा दुँरि करू रोष ।
सहज छमिय सव बालक दोष ॥ ४ ॥
कर जोरि गोचर करु दामोदर भान ।
अपनहिं हाथ दिअ वरदान ॥ ५ ॥

अर्थ – हे देवी, तू मला दर्शन दे. तुला शरण आलेल्यांना तू दर्शन का बरे देत नाहीस ? माझे विकल मन दशदिशांना धावत आहे; म्हणून तू माझ्यावर त्वरित कृपा कर. मी तुझा मोठा अपराध केला असल्यामुळे, माझ्या मोठमोठ्या मनोरथांना बाध येत आहे. हे माते ! माझ्यावर प्रसन्न हो, मला क्षमा कर आणि माझे सर्व दोष नाहीसे कर. कवी दामोदर तुला

हात जोडून विनंती करीत आहे, की मला दर्शन दे आणि आपल्या हातांनी वरदान दे.

देवीच्या दर्शनाला उत्सुक झालेल्या दामोदराची हीच तळमळ व आर्तता इतर पदांतही दृष्टीला पडते. [ हिं. सा. वि. ]

**दामोदरकुंड** एक तीर्थस्थान. हे नेपाळातील मुक्तनाथाच्या मंदिरापासून सोळा मैलांवर आहे. या कुंडाकडे जाण्याची वाट अवघड आहे. त्या वाटेवर बर्फही असते. म्हणून त्या कुंडाच्या पुष्कळ अलिकडे त्याच नावाचे एक प्रतीकात्मक कुंड बांधलेले आहे. खऱ्या दामोदरकुंडात शाळिग्राम सापडतात. शिवरात्रीच्या यात्राप्रसंगी दामोदरकुंडाची यात्रा करण्याची पद्धत आहे. [ कल्याण—तीर्थांक ]

**दामोदरदास सेवकजी** ( इ. स. चे १६ वे शतक ) एक हिंदी कवी. जबलपूरनजीकच्या गढा नामक गावी एका ब्राह्मण कुळात याचा जन्म झाला. गुरूपदेशानंतर तो राधावल्लभ संप्रदायाचा अनुयायी बनला. जीवनाच्या अखेरीस हा वृंदावनास येऊन राहिला व तिथेच त्याने देह ठेवला.

दामोदरदासाने अनेक पदे रचली आहेत. त्यांत श्रीहितविलास, श्रीहरिवंशनामप्रताप, श्रीहितइष्टाराधन, इ. विषय आहेत. दामोदरदासाची भाषा साधी पण सिद्धान्तप्रतिपादक आहे. भक्तीची परिसीमा झाल्यावर सारी संसारबंधने आपोआप गळून पडतात, असे दामोदरदासाचे म्हणणे आहे. तत्कालीन परिस्थितीचे यथातथ्य वर्णन करणारे त्याचे एक पद असे –

**कलियुग कठिन वेद विधि रही । धर्म कहूँ नही दीखत सही ।**
**कही भली कोऊ ना करै । उदवस भयो सब देस, ।**
**धर्मरहित मेदिनी नरेस । म्लेंछ सकल पहुमी बडे ।**

अर्थ – कलियुग कठीण आहे. ते वेदविधिरहित आहे. धर्म कुठेही दिसत नाही. कोणी कोणाचे भले चिंतीत नाही. सारा देश उद्ध्वस्त झाला आहे. सारी पृथ्वी धर्मरहित झाली आहे आणि राजे म्लेंछ झाले आहेत.

दामोदराचे सारे काव्य व्रज भाषेत असले, तरी त्यावर बुंदेलखंडी भाषेचा प्रभाव आहे. राधावल्लभ संप्रदायात हा रसिक कवी म्हणून प्रसिद्ध आहे. [ रा. अ. ग्रं.; रा. सं. सि. सा. ]

**दामोदर पंडित** ( इ. स. १२५५ – १३२५ ) एक मराठी कवी. हा महानुभाव होता. याचे पूर्ववृत्त उपलब्ध नाही. महानुभाव पंथाचा आद्य आचार्य नागदेव हा आपल्या परमगुरूच्या निधनानंतर गोदावरीकाठी निंवा येथे राहत होता. काही दिवसांनी दामोदर पंडित आपली पत्नी हिराइसा हिच्यासह नागदेवाकडे आला व त्याचा शिष्य बनला. त्या दंपतीला दोन मुले होती. पण दुर्दैवाने त्यांतली मुलगी होती, ती मेली. त्या आघाताने हिराइसा विरक्त बनली आणि तिने लगेच नागदेवाचार्याकडून संन्यासदीक्षा घेतली. दामोदर पंडित मात्र एकुलत्या एक मुलासह घरीच राहिला.

मुलाचा संसार सुरू करून दिल्यानंतरही दामोदर पंडिताचे मन प्रपंचातून बाहेर निघेना. तेव्हा हिराइसेने त्याला निरोप पाठविला की 'जिये चुलींची खीर खादली, तिये चुलीची काइ राख खाल ?' हा निरोप ऐकताच दामोदराने घर सोडले आणि त्यानेही नागदेवाचार्याकडून संन्यास घेतला.

दामोदर हा श्रेष्ठ पंडित होता. नागदेवाचार्याच्या सान्निध्यात आल्यावर त्याने महानुभावतत्त्वज्ञानाचा सूक्ष्म अभ्यास केला. राघवभट व केसोबास या दोन गुरुबंधूंच्या सहवासात काव्यशास्त्रविनोद करताना दामोदर पंडिताला दिवसरात्रीचेही भान राहत नसे. त्याचे शास्त्रचर्चेतील प्रावीण्य पाहून, नागदेवाचार्य प्रतिस्पर्ध्यांचे खंडन करण्याच्या कामी त्याची योजना करीत असे. दामोदर पंडित आणि केसोबास हे दोघे आपले ज्ञानचक्षू आहेत, असे नागदेवाचार्य म्हणे.

दामोदर हा उत्तम गायक आणि कवीही होता. त्याच्या अंतःकरणातील भाव सहजपणे शब्दरूप धारण करीत. चक्रधर गायनाचा निषेध करी, त्यामुळे नागदेवाने प्रथम प्रथम दामोदराला गायनापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. पण त्यामुळे त्याचे चित्त व्यथित होत आहे, हे पाहून नागदेवाने मग त्याला गाण्याची अनुज्ञा दिली. त्याच्या संगीताच्या प्रभावामुळे कित्येक लोक महानुभाव पंथाकडे आकर्षित झाले.

पुढे गुरू आणि गुरुबंधू हे निवर्तल्यावर दामोदर पंडित जीवनाविषयी उदास बनला आणि गोदाकाठ सोडून दूर लाजीवैरागड येथे जाऊन राहिला. कालांतराने तिथेच त्याचे निधन झाले.

दामोदराने वत्साहरण हे ओवीबद्ध कथाकाव्य, ऋद्धिपूरच्या लीळांचे स्तोत्र, नामावळीस्तोत्र, साठ चौपद्या आणि आणखी काही संस्कृत-मराठी स्फुटे रचली आहेत. त्याच्या साठ चौपद्यांपैकी एकोणीस मराठी असून, बाकीच्या हिंदी आहेत.

त्याचे वत्साहरण हे काव्य भागवताच्या दशमस्कंधातील १२ ते १४ या अध्यायांवर आधारलेले आहे. त्याची ओवीसंख्या ५०३ आहे. दामोदराने हे काव्य आपला परमप्रिय गुरुबंधू केसोबास याच्या निधनाचे दुःख विसरण्यासाठी रचले आणि केसोबासाविषयीचा प्रेमभाव व्यक्त करण्यासाठी त्या

काव्याचे कर्तृत्वही केसोबासाच्याच नावावर टाकले. आपल्या काव्याची कथा ही 'जीवाला चोखाळणारी काना-मनाला निववणारी आणि भक्तिभावाला पोसणारी आहे,' असे दामोदराने म्हटले आहे. श्रीकृष्णाचे चरित्र नवरसांनी कसे भरून राहिले आहे, हे स्पष्ट करताना दामोदर म्हणतो –

जेयाचा बहुरुप खेलु खेलतां। योगीए परमसिद्धी पावतां ॥
तापत्रय निवारता। सकल जनांचे ॥ ५० ॥
जें देओ रासक्रीडा खेलिनला। तें मुर्तू शृंघारुजाला।
गौलणी विनोदें नाचविला। तें हास्यरसु ॥ ५१ ॥
यशोदा भेडंविला। तें करुणारसु उठेवला।
विखारू कालिया जिंतला। तें रौद्रु जाला ॥ ५२ ॥
माते श्रीमुख दाखविलें। तें अद्‌भुता रुप जाले।
विश्वरूप प्रकटीलें। तें भयानकु ॥ ५३ ॥
दैत्यांकरी संहारू। तें बिभछु आणिक वीरू।
सांतु तो निरंतरु। तेथचि असे ॥ ५४ ॥
ऐसे नवरस नाटक। देवो खेले जनमोहक।
निजरूप ते ब्रह्मादिकां। ठाऊकें न्हवे ॥ ५५ ॥

हे समग्र काव्य म्हणजे दामोदराच्या कृष्णभक्तीचा उत्कट आविष्कार आहे. आपली कृष्णभक्ती त्याने केवळ वेडचा-वाकुडचा बोलांनी व्यक्त केलेली नसून, विविध अलंकारांनीही भूषवली आहे. दामोदराचे हे 'वत्साहरण' आद्य महानुभावीय वाङ्मयातील सुप्रसिद्ध 'सातीग्रंथा'त (ग्रंथसप्तकात) स्थान पावले आहे. [वछाहरण – प्रस्तावना]

**दायभाग** पैतृक संपत्तीची वाटणी कशी करावी, ते सांगणारी एक पद्धती. जीमूतवाहन (इ. स. १०९०–११३०) याने लिहिलेल्या दायभाग नामक ग्रंथावर ही पद्धती आधारलेली आहे. रघुनंदनाचा दायतत्त्व हा ग्रंथही (इ. स. १५१०–१५६५) त्यासाठी प्रमाण मानला जातो. दायक्रमसंग्रह हा श्रीकृष्ण तर्कालंकार याचा एक ग्रंथही दायभागावरच आहे. बंगाल व आसाम या राज्यांत दायभागपद्धती प्रचारात आहे.

ऋग्वेदात दाय हा शब्द श्रममूल्य किंवा श्रमाबद्दल बक्षीस अशा अर्थी आलेला आहे (१०.११४.१०). पण पुढे त्याचा उपयोग वारसा अशा अर्थी केला जाऊ लागला. जीमूतवाहनाने दाय शब्दाची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे –

पूर्वस्वामिसम्बन्धाधीनं तत्स्वाम्योपरमे यत्र
द्रव्ये स्वाम्यं तत्र निरूढो दायशब्दः।

(दायभाग १.४–५)

अर्थ – ज्या द्रव्यावर एखाद्या व्यक्तीची मालकी असते त्या द्रव्यावर, ती व्यक्ती मरण पावल्यावर तिच्याशी संबंध असल्यामुळे दुसऱ्या व्यक्तीचे जे स्वामित्व येते, त्याला दाय असे म्हणतात.

संपत्तीवर अधिकार मिळवायचा असेल, तर तत्पूर्वी तिच्यावर ज्या व्यक्तीची मालकी असेल, तिची ती मालकी नष्ट झाली पाहिजे; त्याशिवाय नवी मालकी निर्माण होऊ शकत नाही. म्हणून पित्याच्या मृत्यूनंतर जेव्हा संपत्तीवरील त्याची मालकी नष्ट होते, तेव्हाच पुत्राचा अधिकार तिच्यावर स्थापन होतो; त्यापूर्वी नाही. याला उपरमस्वत्ववाद असे नाव आहे. मिताक्षरापद्धतीप्रमाणे मात्र जन्म झाल्याबरोबर त्या मुलाचा पैतृक संपत्तीवर वारसा हक्क लागू होतो.

सामायिक कुटुंबपद्धतीत पित्याचा संयुक्त संपत्तीवर पूर्ण अधिकार असतो आणि तो तिचा आपल्या इच्छेनुसार दान, विक्रय, इ. रूपाने हवा तसा विनियोग करू शकतो. स्वतःचे भरणपोषण याव्यतिरिक्त पुत्रांचा तिच्यावर काहीही अधिकार नसतो. पित्याच्या मृत्यूनंतरच पुत्रांना त्या संपत्तीतला वाटा मिळू शकतो. पुत्र जिवंत नसल्यास त्याच्या उत्तराधिकाऱ्यांना वाटा मिळतो. पुत्रच नसल्यास मृताच्या विधवेला हिस्सा मिळतो. दायभाग पद्धतीचे वैशिष्टय हे, की तिच्यात स्त्रीला संपत्तीचा वाटा ठेवलेला आहे. मिताक्षरा पद्धतीत स्त्रीला वारसाहक्कापासून वंचित केलेले आहे. संयुक्त कुटुंबाचा संचालक व अविभक्त संपत्तीचा व्यवस्थापक प्रायः पिता हाच असतो. तो नसल्यास मोठा भाऊ किंवा परिवारातील मोठा पुरुष पित्याच्या जागी काम करीत असतो. त्याला कर्ता असे म्हणतात. पित्याच्या पश्चात लहान भावंडांचे पितृवत पालन करणे हे मोठ्या भावाचे कर्तव्य होय, असे मनू (९.१०४–१०८), गौतम (२८.१–३) व नारद (१३.५) यांनी सांगितले आहे.

पित्याच्या संपत्तीवर पहिला हक्क पुत्राचा असतो. दायभागाने हा क्रम पुढीलप्रमाणे मानला आहे– (१) पुत्र, पौत्र, प्रपौत्र (२) विधवा (३) कन्या (४) कन्यापुत्र (५) पिता (६) माता (७) भाऊ (८) पुतण्या व (९) पुतण्याचा पुत्र. या सर्वांना बद्धक्रम दायाद असे नाव आहे. त्यांच्या अभावी पुढील क्रमाने उत्तराधिकार ठरतो– (१) सपिंड (२) सकुल्य (३) समानोदक (४) सपिंडांहून भिन्न बंधू (५) गुरू (६) शिष्य (७) सहपाठी व (८) राजा.

पुत्र – पित्याच्या संपत्तीवर अग्रहक्क पुत्राचा असतो. अनेक पुत्र असल्यास सर्वांना समान हिस्सा मिळतो. धर्मशास्त्रानुसार पुत्र शब्दाने तिसऱ्या पिढीपर्यंतचा म्हणजे पुत्र, पौत्र, प्रपौत्र एवढा अर्थबोध होतो. कारण पिंडदान हे तीन पिढ्यांच्या पूर्वजांना केले जाते. त्यामुळे एखादा पुत्र मृत झाला असल्यास त्याच्या पुत्राला व तोही जिवंत नसल्यास त्याच्या पुत्राला

म्हणजे कर्त्याच्या प्रपौत्रालाही संपत्तीत वाटा मिळतो. पुढील तक्त्यावरून हे समजून येईल —




स्पष्टीकरण— क हा संयुक्त कुटुंबाचा कर्ता आहे. ख, ग, घ व च हे त्याचे चार पुत्र आहेत. क मरतो तेव्हा त्याच्या मागे ख हा पुत्र, ग १ व ग २ हे पौत्र ( ग या मृत पुत्राचे दोन पुत्र ), छ १, छ २ व छ ३ हे प्रपौत्र (घ या मृत पुत्राचे पौत्र) व त हा च या मृतपुत्राचा प्रपौत्र एवढा परिवार आहे. त्यांपैकी त हा चौथ्या पिढीतला असल्यामुळे कच्या संपत्तीवर त्याचा हक्क पोचत नाही. त्यामुळे उरलेल्या सहा जणांत क ची संपत्ती वाटली जाईल. अशा वेळी कच्या संपत्तीचे तीन भाग होतील. एक भाग खला मिळेल, दुसरा भाग गच्या दोन्ही पुत्रांना मिळून व तिसरा भाग घच्या तीन प्रपौत्रांत मिळून वाटला जाईल. पित्याला मूळ स्थानी कल्पून केलेल्या या वाटणीला पितृतोविभाग अशी संज्ञा आहे.

विधवा — पुत्र, पौत्र व प्रपौत्र यांच्या अभावी विधवेला पतीच्या संपत्तीवर अधिकार मोठा झगडा केल्यानंतर मिळाला आहे. याज्ञवल्क्य व विष्णू या स्मृतिकारांनी प्रथम निपुत्रिक पुरुषाच्या विधवेला वारसा हक्क मिळाला पाहिजे, असे प्रतिपादन केले. जीमूतवाहनाने तर पुत्राला जेवढा वाटा मिळेल तेवढाच मातेलाही मिळाला पाहिजे, असे सांगितले आहे. सांप्रत इ. स. १९३७–३८ च्या एका कायद्यानुसार पुत्रांच्या बरोबरच विधवेलाही काही वारसा हक्क दिलेला आहे.

कन्या— विधवेच्या अभावी कन्येला उत्तराधिकार प्राप्त होतो आणि तिच्या अभावी तिच्या पुत्राला, तो भिन्न कुलातील असला तरीही वारसा मिळतो. याचे कारण प्राचीन काळापासून पुत्राच्या अभावी दौहित्र हा पितरांचा पिंडदाता मानलेला आहे, हे होय.

त्यानंतर पिता, माता व भाऊ यांचा क्रम लागतो. सावत्र भावाचा अधिकार सख्ख्या भावाच्या नंतर मानलेला आहे. यानंतर पुतण्या व त्याच्या अभावी त्याचा पुत्र वारसदार होतो.

सपिंड — अशा प्रकारे बद्धक्रम दायाद संपल्यावर सपिंड हे उत्तराधिकारी होतात. पिंड शब्दाचे जीमूतवाहनाने केलेले विवेचन असे—

एक पुरुष आपल्या जीवनकालात पिता, पितामह व प्रपितामह या तीन पूर्वजांना पिंड देतो. मग त्याच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र आपला पिता व पित्याचे तीन पूर्वज यांच्या नावे स्वतंत्र पिंड करून त्यांचा पुन्हा एक पिंड बनवतो व अशा प्रकारे पित्याचे सपिंडीकरण करतो. अशा रीतीने मृत पुरुष जिवंतपणी ज्या पूर्वजांना पिंड देत असे, त्यांच्याच पिंडात मृत्यूनंतर तो सहभागी होतो आणि पुत्राने दिलेल्या पिंडाचा आपला पिता व पितामह यांच्यासह उपभोग घेतो. अशा प्रकारे तो ज्यांना पिंड देतो व जे त्याला पिंड देतात, त्या अविभक्त दायादांना सपिंड असे नाव आहे. सपिंडांच्या यादीत तीन पिढ्यांतील व्यक्तींबरोबरच भिन्न कुलांतील स्त्रियांच्या द्वारे संबद्ध झालेल्या व्यक्तींचाही समावेश होतो. यात भाचा, आतेभाऊ, मामेभाऊ, मावसभाऊ इत्यादींचा अंतर्भाव आहे. ज्या व्यक्तीला अधिक पिंड देण्याचा अधिकार असतो, त्याला कमी पिंड देणाऱ्या व्यक्तीपेक्षा दायभागात वरचा क्रम मिळतो.

पण दायभाग पद्धतीत हा पिंडदानाचा सिद्धांत पूर्णपणे पाळलेला दिसत नाही. कारण त्यात दायाद व श्राद्धाधिकारी यांचा क्रमसारखा नाही. श्राद्धाच्या दृष्टीने मृताच्या भावाचे स्थान त्याच्या पित्याच्या बरेच आधी आहे. पण दायभागात त्याचा क्रम पिता व माता यांच्या नंतरच येतो.

सांप्रतच्या न्यायालयांनीही म्हटले आहे, की जीमूतवाहनाचा सिद्धांत सर्व वेळी पूर्णपणे लागू होत नाही. कदाचित दायभागाचा उद्देश भाचा, मामा, इ. संबंधियांना जादा अधिकार देण्याचा असावा.

सकुल्य — सपिंडांच्या अभावी दायभाग परिवाराची संपत्ती सकुल्यांना मिळते. आपल्या तीन पूर्वजांना पिंडदान केल्यानंतर कुशाने हात स्वच्छ करण्याची पद्धत आहे. त्या वेळी जो लेप हाताला शिल्लक राहतो, तो प्रपितामहाच्या पूर्वीच्या तीन पिढ्यांतील पितरांना देण्यात येतो. त्याचप्रमाणे प्रपौत्राच्या पुढच्या तीन पिढ्यांनाही पिंडलेप देण्याची पद्धत आहे. अशा प्रकारे चौथ्या पिढीपासून सहाव्या पिढीपर्यंतचे पूर्वज व चौथ्यापासून सहाव्या पिढीचे वंशज यांना सकुल्य असे म्हणतात.

समानोदक — सकुल्यांच्या अभावी समानोदक दायाद होतात. समानोदक म्हणजे एकाच व्यक्तीला उदक देणारे किंवा त्याच्याकडून उदक घेणारे होत. यांत वरच्या व खालच्या सात ते चौदा या पिढ्यांतील व्यक्ती येतात.

समानोदकांच्या अभावी क्रमाने सपिंडाहून भिन्न बंधू, गुरू,

शिष्य व सहाध्यायी व त्यांच्याही अभावी ब्राह्मणांव्यतिरिक्त इतरांचे धन राजाला मिळते.

आंधळे, बहिरे, क्लीब, मूर्ख, इ. शारीरिक व मानसिक व्याधींनी पीडित, पतित, जातिबहिष्कृत, इ. व्यक्ती दायभागाच्या अनधिकारी होत. मात्र त्यांना कुटुंबात पालनपोषणाचा हक्क असतो.

संयुक्त कुटुंबातील सामायिक संपत्तीवर व्यक्तीचा हक्क असला, तरी काही संपत्ती विशिष्ट व्यक्तिगत मालकीची असते आणि ती अविभाज्य राहते. त्याचे मुख्य भेद पुढीलप्रमाणे– (१) सप्रतिबंधदाय – पिता, पितामह व प्रपितामह यांच्याशिवाय अन्य व्यक्तींकडून मिळालेली संपत्ती. (२) पैतृकप्रसाद– पित्याने प्रसन्न होऊन पुत्रांना पैतृक संपत्तीपैकी दिलेला काही भाग. (३) पित्याने पुत्रांना प्रेमापोटी दिलेला संपत्तीचा काही भाग. (४) मित्रांनी दिलेले किंवा विवाहाच्या वेळी मिळालेले उपहार (अहेर वगैरे). याशिवाय, परिवाराच्या संपत्तीच्या साहाय्याशिवाय मिळवलेले विद्याधन, शौर्यधन व भार्याधन हेही या पद्धतीत अविभाज्यच मानलेले आहे. [ हि. ध.; वे. इं.; हिं. प. मी.; दायतत्त्व ]

## दायमा ब्राह्मण

एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे राजस्थानात आहे. हे आपली उत्पत्ती दधीची ऋषीपासून झाल्याचे सांगतात. आसौपा, कासेलिया, खटोड, ईनाडिया, डोबडिया, डिडवानिया, इ. त्यांच्या पोटजाती आहेत. ही सर्व नावे नागौर जिल्ह्यातल्या गावांवरून पडलेली आहेत.

देवधर्म – हे स्मार्त धर्माचे अनुयायी आहेत. दधिमक्षी ही त्यांची कुलदेवी होय. तिची मंदिरे नागौर जिल्ह्यातल्या अनेक गावीं आहेत. आश्विन मासात या देवीची मोठी जत्रा भरते. हे लोक घरात पंचायतनाची पूजा करतात.

हे लोक शिक्षित आहेत. ते वेद म्हणतात व कथाही सांगतात. यांच्या काही पोटजातींत जातपंचायत असते. हे लोक मांसमच्छर खात नाहीत व मशिदीजवळच्या विहिरींचे पाणी पीत नाहीत. यांच्या स्त्रिया हस्तिदंती चुड्याशिवाय अन्य चुडा भरीत नाहीत. [ रा. जा. ]

## दार धरणे

महाराष्ट्रीय लग्नसोहळ्यातील एक चाल. वरात घरी आल्यावर वधू-वर देवाला नमस्कार करायला घरात जात असताना नवऱ्या मुलाची बहीण दारात उभी राहते. मग भाऊ तिला विचारतो, की ‘ भेट कोणाचे ? ’ त्यावर बहीण आपल्या नवऱ्याचे नाव घेते व ‘ तुला होणारी मुलगी तू माझ्या मुलाला देण्याचे मान्य करीत असशील, तर दार सोडते ’ असे सांगते. नवरा मुलगा मग औपचारिकपणे वधूची परवानगी विचारतो व बहिणीला होकार देतो. मग ती दार सोडून बाजूला होते. हा दार धरण्याचा प्रकार रुक्मिणी-स्वयंवरावरच्या स्त्री-गीतांतही उल्लेखिलेला आहे.

## दारा शुकोह

(१६१५ – १६५९ इ. स.) शहाजहान बादशहाचा ज्येष्ठ पुत्र. जहांगीर आणि शहाजहान या पिता–पुत्रांचे संबंध ठीक नव्हते, त्यामुळे शहाजहान गादीवर येईपर्यंत दारांचा बालपणीचा काळ कष्टप्रद गेला.

शहाजहानचे दारावर अत्यंत प्रेम होते. त्याला पित्याचा सहवास बराच लाभला. एक कंदाहारची मोहीम ( इ. स. १६५२ ) सोडल्यास दाराला युद्धकलेचे शिक्षण घेण्याची संधी कधीच मिळाली नाही. त्याला राजकारणाचाही कधी अनुभव मिळाला नाही आणि त्यामुळेच औरंगजेबाच्या कारस्थानांपुढे त्याचा टिकाव लागला नाही.

दाराला हिंदू धर्माविषयी फार आस्था वाटे, तर औरंगजेब हिंदू धर्माचा अत्यंत द्वेष करी. या विरोधी स्वभावामुळे त्या दोघांत प्रेम निर्माण न होता वैरत्व निर्माण झाले.

इ. स. १६५७ मध्ये शहाजहान आजारी पडल्यावर साम्राज्य हस्तगत करण्यासाठी त्याच्या चारही मुलांत स्पर्धा सुरू झाली. शहाजहानच्या आजारपणात सर्व सत्ता दाराच्या हाती होती, त्यामुळे औरंगजेब, मुराद व शुजा हे तिघेही भाऊ दाराच्या विरुद्ध उठले. समुगड येथे दारा व औरंगजेब यांची लढाई झाली व तिच्यात दाराचा पराभव झाला.

त्यानंतर दारावर रानोमाळ भटकण्याची पाळी आली. अखेर फंदफितुरी करून औरंगजेबाने एक दिवस त्याला पकडले व ३० जून १६५९ या दिवशी खवासपूरच्या तुरुंगात त्याला क्रूरपणे ठार केले.

दारा धर्माच्या बाबतीत आग्रही वृत्तीचा नव्हता. त्याचा प्रथमपासूनच भिन्न भिन्न धर्मांच्या समन्वयाकडे कल होता. त्याने यहुदी, ख्रिस्ती आणि वैदिक वाङ्मयांचा त्या दृष्टीने अभ्यास केला होता. काशी, प्रयाग, इ. क्षेत्रांतील पंडितांशी त्याचा सतत संबंध चालू होता. काशीत राहणारे विख्यात महाराष्ट्रीय पंडित कवींद्र सरस्वती यांचा त्याला प्रदीर्घ सहवास घडला होता. पंडितराज जगन्नाथ याच्याही सहवासात तो बराच काळ होता. या पंडिताकडे त्याने गीता व उपनिषदे यांचे अध्ययन केले होते. सूफी पंथाचे तत्त्वज्ञानही त्याने अभ्यासले होते.

बाबालाल नावाच्या हिंदू साधूला तो गुरुस्थानी मानीत असे. ‘ चैतन्यस्वरूप ज्ञानमूर्ती सद्‌गुरू ’ असा त्याने बाबालालचा

उल्लेख केला आहे. हिंदू धर्माचे रहस्य जाणून घेण्यासाठी त्याने बाबालालबरोबर केलेली चर्चा 'नादिरूल नुकात' या त्याच्या ग्रंथात समाविष्ट झालेली आहे. काशीतील पंडितांच्या मार्गदर्शनाखाली त्याने उपनिषदे व भगवद्‌गीता यांचा फारसीत अनुवाद केला आणि योगवासिष्ठ व प्रबोधचंद्रोदय या ग्रंथांचा अनुवाद अन्य पंडितांकडून करविला.

उपनिषदांचा त्याने केलेला अनुवाद 'सिर्रि अकबर' (महत्तम गुह्य) या नावाने प्रसिद्ध आहे. या अनुवादात पन्नास उपनिषदांचा समावेश आहे. हे अनुवादाचे कार्य त्याने इ. स. १६५७ मध्ये दिल्ली येथील 'मंजिले निगमबोध' (निगमबोधभवन) या आपल्या राजवाड्यात पूर्ण केले. प्रस्तुत ग्रंथाच्या प्रस्तावनेत दाराने उपनिषदांचा गौरव केला आहे, तो असा—

उपनिषदे म्हणजे अद्वैताचा समुद्र होय, म्हणून मी त्यांचे भाषांतर केले. कोणत्याही तत्त्वाचा उलगडा उपनिषदांच्या द्वारे होऊ शकतो. सृष्टीतील पहिला दैवी ग्रंथ म्हणजे उपनिषदे होत. अद्वैतसागराला जलाचा पुरवठा करणारा हा अखंड झरा आहे. कुराणातील आणि उपनिषदांतील तत्त्वज्ञानांत साम्य आहे. कुराणात ज्या अपौरुषेय ग्रंथांचा उल्लेख आला आहे, ते म्हणजे उपनिषदेच होत. ते दुसरे असूच शकत नाहीत. उपनिषदांचे भाषांतर करण्यात माझा हेतू स्वतःला, स्वतःच्या मित्रांना आणि मुमुक्षूंना परमेश्वराच्या कृपेचे फळ लाभावे हाच आहे. पूर्वग्रह सोडून आणि भावनेच्या आहारी न जाता जे कोणी हे महत्तम गुह्य वाचतील, ते सर्व प्रकारच्या दुःखांपासून आणि भीतीपासून मुक्त होऊन परमेश्वरी कृपेने युक्त होतील.

दाराने इतरही लहानमोठे ग्रंथ लिहिले आहेत. त्याचा सर्वांत महत्त्वपूर्ण आणि स्वतंत्र असा ग्रंथ म्हणजे 'मजूमुअल बहरैन' हा होय. हा ग्रंथ त्याने इ. स. १६५५ च्या सुमारास लिहिला. हिंदू आणि मुस्लीम अशा उभय अध्यात्ममार्गांतील साम्ये शोधून, त्या दोन्ही मार्गांत आंतरिक एकता आहे, हे त्याने या ग्रंथात दाखवले आहे. त्याने या ग्रंथाचा संस्कृत अनुवादही करविला असून, त्या अनुवादाचे नाव समुद्रसंगम असे ठेवले आहे.

पित्याचा प्रतिनिधी म्हणून राज्यकारभार पाहत असतानाही दाराचे मन राज्यवैभवाच्या उपभोगात कधीच रमले नाही. साधुसज्जनांबरोबर तत्त्वचिंतन करण्यात आणि कविपंडितांबरोबर काव्यशास्त्रविनोद करण्यात तो खरा रंगून जात असे. त्याचे अंतःकरण त्याने रचलेल्या पुढील दोन पंक्तींत यथार्थपणे व्यक्त झाले आहे —

सल्तनत सहल अस्त खुदरा आश्नाये फक्कुन ।
कतरा ता दरिया तुवानद शुद चरा गौहर शवद ।

अर्थ— राज्यवैभव संपादन करणे सोपे आहे, पण तू त्यागाची आणि तपस्येची ओळख करून घे. अरे, जलबिंदूला समुद्र बनण्याची शक्यता असताना तो मोती बनण्याची इच्छा का धरील ?

असा हा उदार आणि उदात्त मनाचा दारा आसुरी सत्ताकांक्षा व आंधळे धर्मवेड यांना बळी पडला. समकालीन हिंदी संत त्याला सच्चा साधक मानीत. [ मणिकांचन; मु. रि.; ऐतिहासिक संकीर्ण निबंध, १—भा. इ. सं. मं., ऑक्टो. १९४३]

**दारिकपा** चौऱ्यायंशी सिद्धांपैकी एक. हा पूर्वी ओडिसाचा राजा होता. लुईपा हा सिद्ध ओडिसात गेला असता दारिकपाने आपल्या एका ब्राह्मण मंत्र्यासह (डेंगीपा) लुईपाचे शिष्यत्व पत्करले, अशी हकीकत तारानाथाने दिली आहे. सिद्धी प्राप्त होण्यासाठी कांचीपुरातील एका वेश्या दारिकेची (गणिकेच्या कन्येची) सेवा करण्याचा आदेश गुरूने याला दिला होता. गुर्वाज्ञेवरून त्याने प्रदीर्घ काळ दारिकेची सेवा करून सिद्धी प्राप्त केली, म्हणून त्याला दारिकपा असे नाव प्राप्त झाले. सिद्ध वज्रघंटापा आणि सहजयोगिनी चिंता हे त्याचे शिष्य होत. महासुखाचा अनुभव व्यक्त करणाऱ्या त्याच्या काही काव्यपंक्ती अशा —


दारिकपा

सुन करुण रे अभिनचारें काअ वाक् चिएँ
विलसइ दारिक गअणत पारिमकुलें ॥
किन्तो मन्ते किन्तो तन्ते किन्तो रे झाण बखाणे ।
अपइठान महासुहलीलें दुलक्ख परम निवाणे ॥
राआ राआ राओर अवर राअ मोहे रे बाधा ।
लुइ पाअ पए दारिक द्वादश भुअणे लाधा ॥

अर्थ — शून्य करुणेच्या अभिन्नतेमुळे दारिकपा गगनाच्या पलिकडे असलेल्या तटावर विलास करीत आहे. तो तंत्र, मंत्र, ध्यान, व्याख्यान या सर्वांना व्यर्थ मानतो. या अवस्थेत पोचल्यावरच तो खरा राजा बनला; अन्य राज्य केवळ मोहबंधन आहे. लुईपाच्या चरणांचा आश्रय घेतल्यामुळे दारिकपाने बारा भुवने प्राप्त केली.

तंजूरमध्ये त्याच्या अकरा ग्रंथांचा अनुवाद आहे. त्यांपैकी ओड्डियान विनिर्गतमहागुह्यतत्त्वोपदेश, तथतादृष्टी व सप्तम-

सिद्धांत हे तीन ग्रंथ उडिया अथवा मगही हिंदीतील वाटतात. [अ. सा.; सि. सा.; पु. त. नि.; ना. सं.]

**दारिद्र्यहरषष्ठी** एक काम्य व्रत. या व्रताचा आरंभ माघ शुद्ध षष्ठीला होतो. पुढे वर्षभर प्रत्येक महिन्यातील शुद्ध षष्ठीला ते करायचे असते. व्रताच्या दिवशी एकभुक्त राहतात, नक्तभोजन करतात, अयाचित जे मिळेल त्याचे ग्रहण करतात अथवा संपूर्ण उपवास करतात. या दिवशी स्कंदाची पूजा करून ब्राह्मणभोजन घालतात. भोजनोत्तर एका कटोऱ्यात दूध, तूप, भात व साखर घालून ते ब्राह्मणाला द्यावे, असे स्कंद पुराणात सांगितले आहे. फल – कुळाच्या दारिद्र्याचा नाश. [हि. ध.; व्र. प.]

**दारुकाचार्य** वीरशैवांचा एक प्राचीन आचार्य. याने दधीची ऋषीला शिवसिद्धांत उपदेशून आपले शिष्य बनवले. यानेच कोल्हापूरच्या महामायेचे गर्वहरण केले, देवनंदन महाराजाचे सत्त्व पाहून त्याला मोक्ष दिला आणि मल्लिकार्जुन शिवयोगी याला उत्तराधिकारी करून सिद्धेश्वरलिंगात स्वतःला विलीन केले, असे म्हणतात. [वी. शै. र.]

**दारुकावन** औंढ्या नागनाथ पाहा.

**दारुवन** हिमालयातील देवदारू वृक्षांचे वन. हे बदरीनारायणाजवळ असल्याचा उल्लेख महाभारतात आहे. हे पुष्टिदेवीचे स्थान आहे (म. भा. अनु. २५.२७). कूर्म पुराणातही या स्थानाचा उल्लेख आहे (२.३.१८, ६६). कृतयुगात या ठिकाणी अनेक ऋषी तपश्चर्या करीत असत, असे ब्रह्म पुराणात म्हटले आहे (२.२७.२-९०). ब्रह्म पुराणाने या स्थानासंबंधी एक कथा दिली आहे, ती अशी –

एकदा दारुवनात ऋषी तप करीत असता शिव नग्नावस्थेत तिथे प्रकट झाला. त्याचे हे नग्न दर्शन ऋषिस्त्रियांना मोहित करते झाले. त्यामुळे ऋषी क्रुद्ध झाले आणि शिवाचे लिंग छेदण्यासाठी धावले. पण ते काही त्यांना जमले नाही. मग त्यांनी शिवास शाप दिला, की 'तू गाढव होशील !'

शिव त्यानंतर अदृश्य झाला; परंतु ऋषींनी त्याचा अनादर केल्यामुळे जगावर नाना प्रकारची संकटे कोसळू लागली. हे ध्यानी येताच ऋषींनी शिवाच्या लिंगमूर्ती करून त्यांची पूजा सुरू केली. त्यांनी वर्षभर अशी पूजा केल्यामुळे शिव संतुष्ट होऊन त्यांच्यापुढे प्रकटला आणि त्याने त्यांच्यासाठी भस्मस्नान–विधीचे निरूपण केले. [पु. इं.; हि. ध.]

**दाल्दी** एक मुसलमान जात. हे लोक कोकणात आढळतात. इ. स. च्या सातव्या किंवा आठव्या शतकात जे अरब लोक भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर येऊन स्थायिक झाले, त्यांचे हे वंशज आहेत. यांच्यांतले काही पूर्वी हिंदू कोळी असावे आणि काही बाहेरून आलेल्या अरबांची व त्यांच्या दासींची प्रजा असावी, असे म्हणतात. दाल्दी पुरुष उंचे-पुरे, सुदृढ व नाकीडोळी नीटस असतात. बहुतेक सगळेच हिंदूंसारखा पोषाख करतात. शेती व नौकानयन हे दोन यांचे प्रमुख व्यवसाय आहेत. मुसलमान समाजात यांचे स्थान खालच्या दर्जाचे मानले जाते. हे शफी पंथाचे सुन्नी असून, यांचा कोकणी मुसलमानांशी लग्नसंबंध होतो. [मुं. इ. जा.; रत्ना. गॅझे.]

**दावंडै** तमिळनाडमधील एक वाद्य. हे वाद्य डमरूच्या आकाराचे असून, लाकडाचे बनविलेले असते. याची दोन्ही तोंडे जाड कातडयाने मढवतात व ती दोरीने ताणतात. लहान काठीने हे वाद्य वाजवतात. मरियम्माच्या मंदिरात व इतरही काही जुन्या मंदिरांत हे वाद्य वाजविण्याची प्रथा आहे. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**दावल मलिक** (इ. स. चे १५ वे शतक) एक सूफी प्रचारक. दावल मलिकाचे मूळ नाव अबू मसऊद असे असून, दावल मलिक हा 'दावर-उल्-मुल्क' या पदवीचा अपभ्रंश आहे. हा गुजरातेत राहत असे. याच्या गुरूचे नाव हजरत शाह आलम असे होते. गुरूने प्रसन्न होऊन दावल मलिकाला असा वर दिला, की 'तुला रोग्यांना बरे करण्याचे सामर्थ्य प्राप्त होईल; परंतु त्यासाठी तुला स्वतःचे बलिदान करावे लागेल.'

याने महाराष्ट्रात सर्वत्र प्रवास करून इस्लामचा प्रचार केला. अखेरीस गुजरातेतच कामरून या गावी ठाणेदाराचे काम करीत असता गिरासिया जातीच्या एका व्यक्तीने याला ठार मारले.

महाराष्ट्रात ज्या ज्या ठिकाणी त्याचा मुक्काम पडला, त्या त्या ठिकाणी त्याच्या भक्तांनी त्याचे छल्ले (स्मारके) स्थापले. तसेच अनेक ठिकाणी त्याच्या पार्थिव अवशेषांवर व त्याने वापरलेल्या वस्तूंवरही स्मारकांची उभारणी केली. महाराष्ट्रात त्याची ३६० स्मारके आहेत, असे म्हणतात. महाराष्ट्रात दावल मलिकाची उपासना इ. स. च्या सोळाव्या शतकापासून रूढ आहे. याविषयी एकनाथ आणि रामदास यांच्या वाङ्मयात उल्लेख येतात, ते असे –

दावलमलकाची पूजिती गदा ।
वर्षातून फकीर होती एकदां !

मग डोला होतां थंडा खातीं मलिदा ।
हिंदु तुर्कांचे खरकटें कीं मायबाप ।।
(श्रीएकनाथमहाराज यांची गाथा, ३८९२.३६)
कित्येक दावलमलकास जाती । कित्येक पीरांस भजती ।
कित्येक तुरुक होती । आपुले इच्छेनें ।।
(दासबोध, १४.७.३२)

खेडोपाडीचे अनेक अशिक्षित लोक अंगरोगांच्या निवारणार्थ दावल मलिकाला नवस करतात. विशेषतः ज्यांचे डोळे दुखू लागले आहेत, अशी माणसे आपणांस दावल मलिकाचे बोलावणे आले आहे, असे समजून आपल्या इष्टमित्रांसह जमावाने गावाबाहेर पडतात आणि 'दोम दोम दावल मलिक' अशा घोषणा करीत दावल मलिकाच्या स्मारकस्थानाकडे जातात. त्यांच्या हाती एक निळ्या कापडाची झोळी व एक फावडे असते. वाटेत जी गावे लागतील, तिथे भिक्षा मागत मागत हे लोक स्मारकस्थानी पोचतात. तिथे गेल्यावर एका लाकडी तिकाटण्यावर ते झोळी व फावडे ठेवतात आणि तिथल्या मुजावराला दक्षिणा देऊन व भोजन घालून संतुष्ट करतात. मुजावर भक्तांच्या तर्फे दावल मलिकाची पूजा करतो आणि त्यांना त्याच्या चमत्कारकथा सांगतो. हे रोगी आपला रोग बरा होईपर्यंत तिथे थांबतात आणि दावल मलिकाचा परत जाण्याबद्दल स्वप्नदृष्टांत झाल्यावरच तिथून परत निघतात. [श्री. न. शे. पोहनेरकर– प्रतिष्ठान, फेब्रु. १९६०; म. ज्ञा. को.]

**दावा चौथ** बंगाली लोकांचा एक सण. हा श्रावण शुद्ध चतुर्थीच्या दिवशी गौरी–गणपतींच्या प्रीत्यर्थ करतात. प्रत्येक स्त्रीच्या घरात जितके मुलगे व मुली असतील, तितक्या संख्येने पिवळ्या आणि तांबड्या रेशमाचे दोरे घेतात. त्यापैकी पिवळ्या दोऱ्यांना १६ व तांबड्या दोऱ्यांना २१ गाठी मारतात. पिवळ्या दोऱ्यांना गौरीचे व तांबड्या दोऱ्यांना गणपतीचे प्रतीक मानतात. नंतर या दोऱ्यांची पूजा करतात. पूजेनंतर पिवळे दोरे मुलींच्या व तांबडे दोरे मुलांच्या हातांना बांधतात. या दिवशी गोडाधोडाचा स्वैपाक करतात व आप्तेष्टांना मेवामिठाई वाटतात. [हिं. हाँ. से.]

**दासगणू** (१८६८–१९६२ इ. स.) एक मराठी संतकवी. यांचे मूळ नाव गणेश दत्तात्रेय सहस्रबुद्धे. नगर जिल्ह्यातील अकोळनेर या गावी यांचा जन्म झाला. श्री. वामनराव इस्लामपूरकर हे यांचे गुरू होते. गुरूपदेशानंतर ते स्वतःला दासगणू म्हणवू लागले. पुढे तेच त्यांचे नाव प्रसिद्ध झाले. हे साईनाथांचे भक्त होते.

लहानपणापासूनच दासगणूंची बुद्धी तल्लख होती. पण त्यांना शालेय शिक्षणाची मात्र कधीच गोडी वाटली नाही. नवव्या वर्षी उपनयन झाल्यावर त्यांना शाळेत घातले होते; पण इंग्रजी चौथीत असतानाच त्यांनी शाळा सोडली.

पुढे त्यांना घरच्या लोकांनी वडोद्यास पाठवले. दासगणूंनी तिथे सुमारे नऊ महिने खाजगीत नोकरी केली. इ. स. १८८३ मध्ये त्यांचे सावित्री नामक मुलीशी लग्न झाले. नंतर ते नगरला आपल्या चुलत्याकडे आले, पण तिथे फार काळ राहिले नाहीत. घरातल्या कटकटींना कंटाळून त्यांनी ते घर सोडले व श्रीगोंदे येथे येऊन, घरच्या लोकांच्या मनाविरुद्ध अवघ्या नऊ रुपयांवर पोलीसखात्यात नोकरी धरली. अकरा वर्षे त्यांनी ही नोकरी केली. त्या काळातच त्यांच्या काव्यरचनेला प्रारंभ झाला. त्यांचे पहिले काव्य शाहिरी वळणाचे होते. त्यामुळे लोक त्यांच्या नीतिमत्तेबद्दलही शंका घेऊ लागले. पण हयातखाँ या त्यांच्या निकटवर्ती स्नेह्याने त्यांच्या नैतिक शुचितेविषयी निर्वाळा दिला आणि लोकांनी तो मानला.

दासगणू प्रथम शिवभक्त होते. सोमवार, प्रदोष, शिवरात्र ही व्रते ते मोठ्या निष्ठेने करीत. त्यांनी गुरुमंत्र घेतला, तोही बेलाच्या पानावर लिहूनच. पुढे वामनराव इस्लामपूरकर यांना गुरू केल्यावर त्यांच्या आज्ञेने ते पंढरीची वारी करू लागले. एकदा तर वारीच्या पायी त्यांना नोकरीचा राजिनामा देण्याचा प्रसंग आला होता; पण ते प्रकरण कसेतरी निभावले. वामनराव पुढे काशीला गेले व तिथेच त्यांनी आपला देह ठेवला. जाताना त्यांनी दासगणूंना सांगितले. 'साईबाबा ही योग्य विभूती आहे; त्यांना तू माझेच स्वरूप मान. आम्ही दोघे एकरूप आहो. इथून पुढे तेच तुला वेळोवेळी मार्ग दाखवतील.' त्या आदेशानुसार दासगणू वारंवार साईबाबांच्या दर्शनाला जाऊ लागले. साईबाबांनीच पुढे त्यांना पोलीसखात्यातली नोकरी सोडायला लावली. नोकरीतून मुक्त झाल्यावर ते नांदेडला राहायला गले. पुढील सर्व आयुष्य त्यांनी परमार्थचिंतनात व पारमार्थिक ग्रंथांच्या निर्मितीत घालवले. त्यांना दीर्घायुष्य लाभले. वयाच्या पंचाणवाव्या वर्षी पंढरपूर येथे त्यांनी देह ठेवला.

दासगणू हे कीर्तनकार म्हणून विशेष प्रसिद्ध होते. त्यांनी कीर्तनासाठी ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव, दामाजी, सखू, इ. संतांची आख्याने रचली असून, ती रसाळ आहेत. आबालवृद्धांना सहज समजेल असा सोपा विषय, हृदयाचा ठाव घेईल अशी जिव्हाळ्याची भाषा आणि भक्तिप्रेम या विशेषांमुळे त्यांची कीर्तने श्रोत्यांच्या मनावर विशेष प्रभाव पाडीत.

दासगणूंची वृत्ती परोपकारी होती. त्यांना ऐहिक संपत्तीचा

मोह कधीच पडला नाही. श्री. वामनराव इस्लामपूरकर या त्यांच्या गुरूंनी आपली सर्व संपत्ती मृत्युपत्राद्वारे दासगणूंना



संत दासगणू

देऊन टाकली होती. परंतु वामनरावांच्या पत्नीला ती गोष्ट आवडली नाही, असे समजताच दासगणूंनी त्यांचे सर्व कागदपत्र त्यांना परत केले. गुरूंच्या पूजेतील फक्त विठ्ठलाची मूर्ती तेवढी त्यांनी स्वतःसाठी ठेवून घेतली.

संतकवी म्हणून दासगणूंची विशेष ख्याती आहे. संतकाव्याचे दृढ संस्कार आणि व्यवहाराचे सूक्ष्म निरीक्षण यांमुळे त्यांच्या काव्यात उदात्तता आणि विविधता आली आहे. समाजातील दलितांविषयी त्यांना कळवळा होता. दंभाची त्यांना चीड येई. क्षेत्रातील पंडेगिरीचा त्यांना तिरस्कार वाटे. बुवाबाजीची ते घृणा करीत. परमेश्वराची आंतरिक ओढ असल्यामुळे त्यांच्या काव्यावर भक्तिप्रेमाचा मनोहर रंग चढला आहे. प्रसाद हा तर त्यांच्या काव्याचा सर्वश्रेष्ठ गुण होय. त्यामुळे त्यांचे काव्य समाजातील सर्व थरांत पसरले व प्रिय झाले. ते आपल्या वर्ण्य विषयाला रूपकादी निवडक अलंकारांनी सजवीत. पंढरपूर येथील वारकऱ्यांच्या दिंड्यांवर त्यांनी केलेले वीरसेनेचे एक अभिनव रूपक असे —

अभिनव वैष्णवांचा मेळा । कंठी रुळे तुळशीमाळा ।
भालीं गोपीचंदन टिळा । स्कंधीं पताका फडकती ॥
उठे टाळांचा झणत्कार । मृदंगध्वनी गंभीर ।
विठ्ठलनामें पंढरपुर । गजबजून गेलें हो ॥
रूप पाहतां लोचनीं । हेंच ज्यांच्या त्यांच्या वदनीं ।
कोणी उधळती मधोनी । गुलाल बुक्का संतावर ॥
वाढती हे अवघे संत । संसाररूपी मैदानांत ।
षड्रिपु करुनी पादाक्रांत । आले विजयी होऊनी ॥
ठेवुनी विश्वासाच्या रथावरी । निश्चयाच्या तोफा भारी ।
विजेसम त्या तलवारी । सद्भक्तीच्या चालविल्या ॥
अभंगवाणी तुकयाची । जोडगोळी बंदुकीची ।
पाऊली कवाईत बहारीची । शिकले शत्रूस जिंकावया ॥

दासगणूंना आधुनिक महिपती असे म्हणतात. महीपतीप्रमाणेच त्यांनीही अनेक संतांची ओवीबद्ध चरित्रे लिहिली आहेत. संतचरित्रांच्या लेखनासाठी ते ऐतिहासिक पद्धतीचा अवलंब करीत. ज्या संताचे चरित्र लिहायचे, त्या संताच्या गावी ते जात; तिथे त्याचे वंशज, वारस, मठाधिपती यांच्याकडून त्या संताची माहिती मिळवीत; उपलब्ध होतील ती ऐतिहासिक कागदपत्रेही जमाकरून त्यांची छाननी करीत. एवढी पूर्वसिद्धता केल्यानंतरच ते चरित्रलेखनाला प्रारंभ करीत. त्यामुळे त्यांच्या चरित्रग्रंथांना ऐतिहासिक व वाङ्मयीन असे उभयविध मूल्य प्राप्त झाले आहे. भक्तिरसामृत, भक्तिलीलामृत व संतकथामृत हे त्यांचे तीन संतचरित्रात्मक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याशिवाय शंकराचार्य, ज्ञानेश्वर इ. महापुरुषांची त्यांनी स्वतंत्र चरित्रे लिहिली आहेत. संतचरित्रकारांच्या भूमिकेप्रमाणेच त्यांची भाष्यकाराची भूमिकाही तितकीच समर्थ आहे. अमृतानुभव, भावार्थमंजिरी, नारदभक्तिसूत्रबोधिनी, ईशावास्यबोधिनी हे त्यांचे प्रमुख ओवीबद्ध टीकाग्रंथ होत.

अमृतानुभवावरचे त्यांचे ओवीबद्ध भाष्य सुबोध व अर्थप्रकाशक आहे. त्यातील एक नमुना असा—

आता अज्ञानाचेनि मारें । ज्ञान अभेदें वावरे ॥
नीद साधोनि जागरे । नांदिजे जेवीं

(अमृ. ४.१)

या ओवीवरील दासगणूंची टीका अशी—

आता अज्ञानाच्या नाशेकरून । संचार करी निवळ ज्ञान ।
जैसे निद्रा गेल्या सरून । जागेपण नांदू लागे ॥
म्हणजे अज्ञानाचा नाश होतां । ज्ञानची उरे सर्वथा ।
अज्ञान लेश कांहीं उरतां । नाश म्हणणे व्यर्थचि ॥
जेव्हां कांहीं नुरे अंश । तेव्हाच म्हणावा झाला नाश ।
हेंच लक्षण विशेष । आहे नाश होण्याचे ॥
निद्रा गेल्या सरूनी । डुकल्या न येती जागेपणीं ।
निवळ जागृतिचे ठिकाणीं । अंशेंही निद्रा न उरे ॥

याशिवाय त्यांनी पौराणिक कथा, स्तोत्रे, अष्टके, सुभाषिते, प्रासंगिक स्फुट कविता, आरत्या, कीर्तनोपयोगी आख्याने

इ. विविध प्रकारची कविता रचली आहे. त्यांच्या काव्यांची संख्या दोन लाखांच्या वर भरते. [ संतकवि दासगणू महाराज, चरित्र आणि वाङ्मय– श्री. अ. दा. आठवले ]

**दास-दासी** दास हा शब्द वैदिक काळात दस्यूंचा पर्याय-वाचक होता; पण त्या शब्दाला त्याच काळात नोकर किंवा परिचारक असाही अर्थ येऊ लागला होता. यास्काने 'दासः कर्मकरः' = दास म्हणजे धन्याचे काम करणारा असाच अर्थ दिला आहे (निरुक्त खं. १७). ज्या अनार्यांना वैदिक आर्यांनी जिंकून आपल्या सेवेत राबवणे सुरू केले, त्यांना ते दास म्हणू लागले. या दासांची देवघेवही त्या काळी होत असे. पृषध्र ऋषीने इंद्राची प्रार्थना केली होती, की 'हे इंद्रा, तू मला शंभर गाढवे, शंभर बकरे व शंभर दास दे (ऋ. ८.८.३). यदुतुर्वशाने दोन आज्ञाधारक दास सेवा करण्यासाठी (कोण्या याचकाला) दान दिल्याचाही उल्लेख आहे.

पुढे मनूच्या काळापर्यंत दासांचे भिन्न भिन्न प्रकार निर्माण झाले. मनूने सात प्रकारचे दास सांगितले आहेत, ते असे––

> **ध्वजाहृतो भक्तदासो गृहजः क्रीतदत्त्रिमौ।**
> **पैत्रिको दण्डदासश्च सप्तैते दासयोनयः ।।**
>
> (मनु. ८.४१५)

अर्थ – युद्धात पकडलेला, निर्वाहाच्या मोबदल्यात सेवा करणारा, घरात उत्पन्न झालेला (दासीपुत्र), धन देऊन खरेदी केलेला, गहाण म्हणून ठेवून घेतलेला, वारसा हक्क म्हणून मिळालेला व न्यायालयात झालेला दंड भरण्यासाठी दास्य स्वीकारलेला, असे हे सात प्रकारचे दास होत.

नारदाने दासप्रकारांची ही यादी वाढवून पंधरापर्यंत नेली आहे. पाणिनीने क्रीत व परिक्रीत असे दोन प्रकारचे दास उल्लेखिले आहेत (अष्टा. १.४.४४). एखाद्याकडून गरजेसाठी रक्कम घेतल्यानंतर ती फिटेपर्यंत त्याच्या घरी चाकरी करणारा तो क्रीत आणि विवक्षित द्रव्य देऊन व विशिष्ट कालाचा अवधी ठरवून सेवेसाठी नियुक्त केलेला तो परिक्रीत होय.

धर्मशास्त्रात दासी याचा अर्थ स्त्री गुलाम असा नसून, रतिसुखासाठी विकत घेतलेली स्त्री असा आहे (स्मृतिचंद्रिका २.२९०.५). जे अनार्य पुरुष लढाईत मारले जात, त्यांच्या बायका दासी म्हणून आर्यांजवळ राहत आणि केव्हा केव्हा त्या आपल्या धन्याची कामपूर्तीही करीत. वैदिक काळात दान म्हणून द्यायच्या वस्तूंत दासींची गणना होत होती. त्रसदस्यू राजाने पन्नास वधू दासी सोभरी ऋषीला दान दिल्या, असा ऋग्वेदात उल्लेख आहे (ऋ. ८.१९.३६).

दासींचे चार प्रकार पुढीलप्रमाणे सांगितले आहेत – देवदासी, ब्रह्मदासी, स्वतंत्र दासी व शूद्र दासी. पहिल्या दोन प्रकारच्या दासींना क्षत्रिय स्त्रीचा दर्जा असे. स्वतंत्र दासी. म्हणजे वेश्या होय. शूद्र दासी केवळ कावाडकष्ट करणारी अतएव हीन समजली जाई.

परिचारिकांनाही दासीच म्हणत. या दासी गृहस्वामिनीची किंवा एखाद्या राणीची शुश्रूषा व वेणीफणी करणाऱ्या असत. पांडवांच्या अज्ञातवासाच्या काळात द्रौपदी ही विराटाची राणी सुदेष्णा हिची वेणीफणी, इ. परिचर्या करण्यासाठीच तिच्याकडे राहिली होती. शर्मिष्ठा–देवयानींच्या भांडणात शेवटी शर्मिष्ठेला एक हजार दासींसह स्वतः देवयानीची परिचारिका दासी व्हावे लागले, अशी कथा महाभारतात आली आहे (आदि. ७९).

प्राचीन काळी श्रीमंत व राजे-राजवाडे यांच्या विवाहप्रसंगी वराला दास-दासी आंदण म्हणून देण्याची पद्धत होती. याशिवाय एखाद्या ब्राह्मणाला दासीदानही देण्याचा प्रघात होता.

पाणिनीने अष्टाध्यायीत दासीभार असा शब्द वापरला आहे (अष्टा ६. २. ४८). त्या शब्दाचा अर्थ दासीच्या प्रसूतीची व्यवस्था करणे व तिला झालेल्या संततीचे पालनपोषण करणे, असा आहे. कारण घरात ठेवलेल्या दासीला होणारी संतती ही बहुधा तिच्या धन्याकडूनच झालेली असे. त्यामुळे तिचा भार वाहण्याची जबाबदारी धन्यावर टाकली गेलेली होती. दासी गर्भवती असल्यास ती प्रसूत होण्यापूर्वी किंवा तिच्या प्रसूतीची योग्य ती व्यवस्था केल्यावाचून तिची दुसऱ्या धन्याकडे रवानगी करण्यास मनाई होती.

जातककथांमध्ये तत्कालीन दास-दासींच्या जीवनावर प्रकाश टाकणारे बरेच उल्लेख इतस्ततः विखुरलेले आहेत. ते एकत्र केल्यानंतर दासजीवनाचे जे चित्र डोळ्यांपुढे उभे राहते, ते पुढीलप्रमाणे ––

दास-दासींना कोणत्याही प्रकारचे कायदेशीर हक्क किंवा सवलती नसत. त्यामुळे त्यांचे जीवन सुखी किंवा दुःखी होणे हे त्यांच्या धन्याच्या इच्छेवर अवलंबून असे. कित्येक धनी आपल्या दासांना स्नेहभावाने वागवीत. उरगजातकात एक ब्राह्मण कुटुंब वर्णिले आहे. त्यात एका दासीचीही गणना आहे. ती सर्व माणसे प्रेमाने व सलोख्याने राहत. नानकच्छंद जातकातही दासी व धनी यांचा संबंध प्रेमळपणाचा दाखवला आहे. याच्या उलट कित्येक धनी दास–दासींना मारझोड करीत, असेही काही कथांतून दिसते.

दास-दासींची सेवाकर्मे विविध प्रकारची असत. पुष्कळदा ती धन्याचा सामाजिक दर्जा व दासीची बुद्धिमत्ता, तसेच कार्यक्षमता यांवर अवलंबून असत. कटाहक नावाचा एक दास आपल्या धन्याच्या घरी कोषाध्यक्ष या हुद्यावर चढला होता.

गृहव्यवस्थेत भोजन तयार करणे, पाने मांडणे, धनी जेवत असता त्याला पंख्याने वारा घालणे, पायावर पाणी घालणे, पिकदाण्या धुणे, धन्याचे कपडे काढणे-चढवणे, त्याच्या देहस्वास्थ्याकडे लक्ष देणे, इ. कामे दास-दासींना करावी लागत.

ग्रीक व रोमन साम्राज्यातील गुलाम हे कधीच गुलामगिरी-तून मुक्त होऊ शकत नसत. भारतीय दासांची मात्र अशी स्थिती नव्हती. कित्येक धनी दासांना स्वखुषीने दास्यमुक्त करीत असत. सोननंद जातकात अशा प्रकारचा उल्लेख आहे. अशा प्रकारे मुक्त झालेले दास बहुतेक मोलमजुरी करुन उप-जीविका करीत. ज्याच्या अंगी व्यवसायाचे चातुर्य असेल, असा एखादा दास एखादा व्यवसाय पत्करून राही. पण दास्यमुक्त झालेला एखादा दास व्यापारउदीम करून मोठचा वैभवाला चढला, अशा प्रकारचा उल्लेख मात्र कुठे आढळत नाही. याचे कारण मनूने सांगितले आहे, ते असे— मुक्त झालेला दासही दास्याच्या कलंकातून मुक्त होऊ शकत नाही, कारण दास्य हे जन्मजात असून, दास्यामुळे त्याच्या स्वभावात मुरलेले काही दोष नष्ट होत नाहीत (मनु. ८.४१४). पाहा— गुलामगिरी. [ हि. ध.; म. क.; प्र. का. भा. ]

**दास दीनकृष्ण** (१६५१ – १६८६ इ. स.) एक संतकवी. हा जगन्नाथपुरीचा रहिवासी असून, जगन्नाथाचा परम भक्त होता. याचे सर्व जीवन अत्यंत विपन्ना-वस्थेत व्यतीत झाले. तशातच त्याला महारोगानेही ग्रासले आणि त्यामुळे त्याला समाजाकडून उपेक्षा व अवहेलना सहन करावी लागली.

दीनकृष्ण हा शैलीच्या दृष्टीने रीतिकवी आहे आणि आशयाच्या दृष्टीने संतकवी आहे. रसकल्लोळ हा त्याचा प्रमुख ग्रंथ असून, त्यात राधाकृष्णांच्या लीलांचे वर्णन आहे. या काव्याच्या प्रत्येक पंक्तीचे आद्याक्षर क हे आहे. या ग्रंथाशिवाय दीन-कृष्णाने रत्नगीता, रसविनोद, प्रस्तावसिंधु, नावकेली, अलंकार-केली आणि आर्तत्राणचौतीशा, इ. नऊ ग्रंथ रचले आहेत. हा कवी जगन्नाथाच्या गुणसंकीर्तनात रंगून गेलेला दिसतो.

दीनकृष्णाचे काव्य नादमधुर आणि भावकोमल आहे. त्याच्या काळात जरी त्याची उपेक्षा झाली, तरी पुढे तो उडिया जन-तेच्या प्रेमादराचा विषय बनला. [ हि. ओ. लि.; कविश्रीमाला ]

**दासपंचायतन** महाराष्ट्रातील पाच संतकवी. दास म्हणजे समर्थ रामदास. केशवस्वामी भागानगरकर, जयरामस्वामी वडगावकर, रंगनाथस्वामी निगडीकर व आनंदमूर्ती ब्रह्मनाळकर हे रामदासांचे समकालीन संत होते. रामदास वरून यांच्या समूहाला दासपंचायतन अशी संज्ञा आहे.

**दासबोध** एक मराठी ग्रंथ. विख्यात मराठी संत समर्थ रामदास हे या ग्रंथाचे कर्ते होत. दासांनी म्हणजे रामदासांनी केलेला बोध यात ग्रथित असल्यामुळे याला दास-बोध हे नाव दिले गेले आहे.

या ग्रंथाची रचना सलगपणे एका विवक्षित काळी आणि विवक्षित स्थळी झालेली नाही. रामदासांनी कृष्णातीरी आपले प्रचारकार्य सुरू केल्यापासून त्यांच्या जीवनाच्या अखेरीपर्यंत त्यांनी आपल्या शिष्यांना वेळोवेळी विविध विषयांवर जो उपदेश केला, तो या ग्रंथात संकलित केलेला आहे. वेळोवेळी उपदेशिलेल्या या २०० स्फुट समासांची विषयानुरोधाने २० दशकांत व्यवस्था लावून, हा ग्रंथ सिद्ध केलेला आहे. याची ओवीसंख्या ७७३१ आहे.

दासबोधाच्या संकलनाचे कार्य तीन टप्प्यांनी झालेले दिसते. प्रथम हा ग्रंथ केवळ एकवीससमासी होता. पुढे सातदशकी दासबोध तयार झाला आणि पूर्वीच रचलेला आठवा ज्ञानदशक त्याला जोडला गेला. सहाव्या दशकाच्या चौथ्या समासात (ओ. ७) 'चारी सहस्र सातशेंसाठी । इतुकी कलियुगाची राहाटी ।' असा कालोल्लेख आहे. त्यावरून आठदशकी दासबोध इ. स. १६५९ मध्ये तयार झाला, असे म्हणता येते. सध्याचा वीसदशकी दासबोध रामदासांच्या जीवनाच्या अखेरीला तयार झाला असावा, असे जाणत्यांचे मत आहे. सर्व दासबोध एकाच ठिकाणी बसून रचला गेलेला नाही. मात्र त्यातील पहिले सहा दशक मोरजवळच्या शिवथर घळीत रचलेले आहेत, असे म्हणतात.

दासबोध हा प्राचीन मराठी वाङ्मयातील एक अपूर्व ग्रंथ आहे. त्याला संस्कृतातील वेदान्तविचाराचा आधार असला, तरी तो अनुवादाच्या स्वरूपाचा नसून स्वतंत्र आहे. हा ग्रंथ म्हणजे रामदासांच्या समृद्ध व्यक्तिमत्त्वाचा सहस्रमुखी आवि-ष्कार आहे. या ग्रंथातील प्रतिपाद्य विषयाचे स्वरूप स्वतः रामदासांनीच विशद केले आहे, ते असे—

> ग्रंथा नाम दासबोध । गुरुशिष्यांचा संवाद ।
> येथ बोलिला विशद । भक्तिमार्ग ॥
> नवविधा भक्ति आणि ज्ञान । बोलिले वैराग्याचे लक्षण ।
> बहुधा अध्यात्मनिरोपण । निरोपिलें ॥
> भक्तीचेन योगें देव । निश्चयें पावती मानव ।
> ऐसा आहे अभिप्राव । ईये ग्रंथीं ॥
>
> (दासबोध १.१.२-४).

माया आणि ब्रह्म, प्रपंच आणि परमार्थ, चौदा ब्रह्मे आणि

निश्चळ ब्रह्म, सर्वब्रह्म आणि विमळ ब्रह्म, मायोद्भव आणि पंचप्रलय, सृष्टीची उभारणी आणि संहारणी, कुविद्या आणि सुविद्या, करंटे आणि सुदैव, बंध आणि मोक्ष, संसार आणि सायुज्य मुक्ती, त्रिगुणवर्णन आणि त्रितापवर्णन, असद्गुरू आणि सद्गुरू, बहुधा ज्ञान आणि शुद्ध ब्रह्मज्ञान, विवेकवैराग्य, महंतलक्षण, निःस्पृहलक्षण, कविकाव्यलक्षण, चातुर्यलक्षण आणि राजकारण, इ. नानाविध विषयांची चर्चा समर्थांनी या ग्रंथात अत्यंत सुस्पष्ट आणि प्रभावीपणे केलेली आहे. यात लालित्य नसले, तरी एका अनुभवसमृद्ध, चिंतनशील आणि लोकोद्धारक पुरुषाने तळमळीने केलेल्या वक्तृत्वाचा विलास पुरेपूर आहे. हे दोनशे समास म्हणजे रामदासांची दोनशे प्रभावी व्याख्यानेच आहेत. आपल्या प्रभावी शैलीविषयीचा आणि आशयाच्या सामर्थ्याचा त्यांना इतका आत्मविश्वास आहे, की 'नासे अज्ञान दुःख भ्रांति । शीघ्रचि येथे ज्ञानप्राप्ती ।' अशा शब्दांत त्यांनी या ग्रंथाची फलश्रुती सांगितली आहे.

श्री. ल. रा. पांगारकर प्रस्तुत ग्रंथाविषयी म्हणतात, की 'समर्थ एखाद्या विश्वविद्यालयातल्या नाणावलेल्या कुलगुरूप्रमाणे आपल्या विद्यार्थी शिष्यांस अध्यात्मवैराग्याची व्याख्याने देत आहेत व आपल्या विषयांच्या स्पष्टीकरणार्थ नाना ग्रंथांच्या संमती मधून मधून देत आहेत. त्यांचे बोल साधे व सप्रचीत आहेत.'

दासबोधाचे वाङ्मयीन स्वरूप रामदासांनी स्वतःच सांगितलेल्या कवित्वाच्या आदर्शाला धरूनच आहे. त्यांचा कवित्वाचा आदर्श असा आहे —

कवित्वशब्द सुमनमाळा । अर्थ परिमळ आगळा ।
तेणे संतषट्पदकुळा । आनंद होये ।।
ऐसी माळा अंतःकरणीं । गुंफून पूजा रामचरणीं ।
वोंकारतंत अखंडपणीं । खंडूंच नये ।।
परोपकाराकारणें । कवित्व अगत्य करणें ।
तया कवित्वाची लक्षणें । बोलिजेती ।।
जेणें घडे भगवद्भक्ती । जेणें घडे विरक्ती ।
ऐसिया कवित्वाची युक्ती । आधीं वाढवावी ।।
क्रियेवीण शब्दज्ञान । तया न मानिती सज्जन ।
म्हणौनी देव प्रसन्न । अनुतापें करावा ।।
देवाचेन प्रसन्नपणें । जें जें घडे बोलणें ।
तें तें अत्यंत श्लाघ्यावाणें । या नांव प्रासादिक ।।

(दासबोध १४.३.१–६)

दासबोधाला महाराष्ट्रात ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत व तुकारामगाथा यांच्या बरोबरीचे स्थान आहे. समर्थ संप्रदायात तर तो ग्रंथराज म्हणून गौरवाचे स्थान पावलेला आहे. 'आत्माराम दासबोध माझे स्वरूप स्वतःसिद्ध ।' असे रामदासांनी शिष्यांना सांगितलेले असल्यामुळे त्यांच्या संप्रदायातले लोक या ग्रंथाच्या रूपाने रामदासांचे सान्निध्य अनुभवतात. या ग्रंथात रामदासांनी प्रपंच–परमार्थाची सांगड घालून दाखवली आहे. 'उत्कट भव्य तेंची घ्यावें । मळमळीत अवघेंचि टाकावें ।' या दृष्टीने त्यांनी नित्याचे व्यावहारिक जीवनही नेटकेपणाने जगण्याचा संदेश दिला आहे. ते म्हणतात–

प्रपंच करावा नेमक । पाहावा परमार्थविवेक ।
जेणेंकरितां उभयलोक । संतुष्ट होती ।।

(दासबोध, ११.३.२)

प्रपंच मूळचाच नासका आहे, हे खरे असले, तरी तो विवेकाने नेटका केला, तर हळूहळू फिका होत जातो, असे समर्थांचे म्हणणे आहे. प्रपंच नेटका करायचा, तर त्यामागचे आध्यात्मिक अधिष्ठान ढळू न देता उदंड प्रयत्न करायला हवे, असे त्यांनी वारंवार सांगितले आहे. अध्यात्माच्या अधिष्ठानावर ऐहिक वैभव उभारण्यासाठी समाजाला उद्युक्त करण्याची रामदासांची ही वेगळी दृष्टी दासबोधात प्रकट झाली आहे आणि त्याचमुळे आधुनिक काळात समाजप्रबोधन करू पाहणाऱ्या अनेक विचारवंतांनी दासबोधाचा जिव्हाळ्याने स्वीकार केलेला दिसतो. विसाव्या शतकातल्या राष्ट्रीय आंदोलनात दासबोध हा अनेक राष्ट्रभक्तांचा मार्गदर्शक ग्रंथ बनलेला होता. [ समर्थहृदय; म. वा. इ. ३; समर्थचरित्र ]

**दासरी** द. भारतातील एक भिक्षेकरी जात. हिलाच ताडन असे दुसरे नाव आहे. हे लोक मुख्यतः वैष्णव पंथाचे आहेत. पण काही दासरी लिंगायत शैव पंथाचे आहेत. यांच्या उत्पत्तीची कथा अशी –

शूद्र जातीचा एक श्रीमंत होता. त्याला मूलबाळ नव्हते. म्हणून त्याने देवाला नवस केला, की 'मला पुत्र झाल्यास त्यांतला एक मी देवाच्या सेवेला वाहीन.' देव त्याच्या नवसाला पावला. त्याला पुढे अनेक पुत्र झाले. त्यांतल्या एकाचे नाव त्याने दासन (= दास) असे ठेवले आणि त्याला देवाच्या सेवेला वाहिले. दासनने बापाच्या संपत्तीवरचा सर्व हक्क सोडला. त्यामुळे पुढे त्याचीही मुले भिक्षा मागून निर्वाह करू लागली. दासरी हे या दासनचेच वंशज होत.

यांचे बलिज, जनप्प, पल्ली, वल्लुव, गंगेड्डू व गोल्ल असे सहा पोटभेद असून, त्यांच्यांत परस्पर रोटीबेटी–व्यवहार होत नाही.

तिरुपती व इतर काही देवस्थाने या ठिकाणी दासरींचे गुरू असतात. कित्येक शूद्र लोक त्यांच्याकडून तप्तमुद्रा घेतात आणि

दासरी बनतात. हे गीते गात गावोगाव हिंडून भिक्षा मागतात. यांच्यापैकी काहीजण नंदीबैल घेऊन फिरतात. काहीजण प्रेतयात्रेच्या प्रसंगीची गाणी गायला जातात.



दासरी

अनंतपूरमधले दासरी पुढील पाच वस्तू आपल्या जवळ बाळगतात– आगमनाची सूचना देणारा शंख, वाजवण्यासाठी एक तास, एक लामणदिवा, खांद्यावर ठेवलेले एक पितळेचे किंवा तांब्याचे भांडे आणि गळ्यात मारुतीची प्रतिमा.

तिरुपती, तिरुत्तणी, इ. प्रसिद्ध क्षेत्रांतल्या जत्रेच्या वेळी वैष्णव दासरी एकत्र जमतात व जातीच्या सामाजिक बाबींचा विचार करतात.

कर्नूल प्रांतात जेव्हा एखादी दासरी मुलगी बसवेश्वराची भक्त बनते, तेव्हा तिला देवाला अर्पण न करता तिचे लग्न करतात. त्या वेळी ती मुलगी व एक उंच दिवा यांना हारात गुंतवतात. नंतर मामा अथवा तिचा नियोजित वर तिला त्या गुंत्यातून सोडवतो.

विशाखापट्टण जिल्ह्यातील दासरी स्वतःला शंखू दासरी असे म्हणवतात. हे वीरांचे पोवाडे गाण्याविषयी प्रसिद्ध आहेत.

काही दासरी वैष्णव गुरूंचे सेवक म्हणून काम करतात व गुरूंच्या आगमनप्रसंगी तुतारी वाजवतात. हे आपल्या गुरूचे उच्छिष्ट प्रसाद म्हणून सेवन करतात. त्यामुळे सर्व रोगांचे निवारण होते व अपत्यहीनांना अपत्ये होतात, अशी त्यांची समजूत असते.

काही दासरींच्या अंगात देवाचा संचार होतो, त्या वेळी ते स्वतःला डागून, भाजून घेतात. काही दासरी आपल्या दोन्ही गालांतून चांदीची किंवा अन्य धातूची सळई आरपार घालतात. काही लोक गालांना कायमचीच छिद्रे पाडून घेतात. हे लोक मृतांना जाळतात. [ का. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. कों. ]

**दासरी तपट्टई** द. भारतातील एक वाद्य. दासरी लोक याचा उपयोग करतात. हे वाद्य डफासारखेच, पण दोन्ही बाजूंना निमुळते असते. याचे भांडे धातूचे केलेले असून, त्याच्या तोंडावर कातडे ताणून बसवतात. डाव्या हाताच्या कोपराने पोटाजवळ ते सावरून धरतात व उजव्या हाताने वाजवितात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**दासविश्रामधाम** एक मराठी ग्रंथ. या ग्रंथात समर्थ रामदासस्वामींचे चरित्र ओवी छंदात वर्णिले आहे. समर्थ संप्रदायातील एक साधू आत्मारामबुवा येक्केहाळीकर हा या ग्रंथाचा कर्ता होय. इ. स. च्या एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात हा ग्रंथ निर्माण झाला. यातील चरित्रविषयाची ओवीसंख्या १६३०२ असून, त्याशिवाय त्यात समर्थांची व त्यांच्याशी संबंध आलेल्या सत्पुरुषांची कविता आणि आपली स्वतःची कविता ग्रंथकर्त्याने प्रसंगोपात्त उद्धृत केली आहे.

या ग्रंथाचे स्वरूप असे व्यापक असल्यामुळे त्याचे महत्त्व केवळ समर्थचरित्राच्याच दृष्टीने नव्हे, तर इ. स. च्या सोळाव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंतच्या महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीनेही आहे. श्री. शं. श्री. देव यांनी या ग्रंथाला रामदासी संप्रदायाचा विश्वकोश म्हटले आहे. त्यातील काही ओव्या अशा --

**ज्याचे कृपें हें होतसे सफळ । तो कैपक्षी करा देव दयाळ ।**
**अहो प्रचीति माझी केवळ । केलें अनाथा सनाथ ॥**
**होईल कैपक्षी कवण्या युक्तीं । विचारूनियां पाहावें चित्तीं ।**
**ठसल्या सदृढतां सप्रेमभक्ती । श्रीराम स्वयें भाळेल ॥**
**जाले होतील भक्त अनेक । सर्वांसी कारण भावचि येक ।**
**अभाव हरपतां मग निष्कळंक । आत्मा स्वयेंचि प्रसन्न ॥**

(दा. वि. धा. ८.३-५)

हा ग्रंथ ओवी छंदात असला, तरी त्याची शैली गद्यप्राय आहे. [ म. सा.; म. वा. इ. ३; दासविश्रामधाम ]

**दासीघट** महापातकी मनुष्याला कुटुंबातून व समाजातूनही बहिष्कृत करण्यासाठी केला जाणारा एक विधी. कोणत्याही नवमीला संध्याकाळी अशा मनुष्याचे सपिंड व समानोदक ज्ञातिबांधव पुरोहितासह गावाबाहेर जातात आणि एका दासीला दक्षिणाभिमुख उभी करून एक जलपूर्ण कुंभ पायाने पालथा करायला लावतात. तसे केल्याने जिवंतपणीच त्या पातकी मनुष्याची अंत्यक्रिया केल्यासारखे होते व त्याच्याशी सर्वांचा संबंध तुटतो. (मनु. ११. १८३-८५). [ ह्र. कं. ]

**दासीदान** वयाने पाच वर्षांपेक्षा अधिक व चाळिशीच्या आत असलेल्या दासीचे दान करण्याची प्रथा पूर्वी होती. पर्वकाळी किंवा स्थिर नक्षत्रयुक्त बुधवारी हे दान करीत. त्या दानाचा विधी असा– ज्याला दान द्यायचे त्या ब्राह्मणाची प्रथम पूजा व वस्त्रालंकारांनी संभावना करीत. नंतर दासीला वस्त्रालंकार घालून तिचीही पूजा करीत. त्या वेळी दासीच्या मस्तकाला हात लावून, ' ही दासी मी तुला उपभोगासाठी दिली आहे; तुझे कल्याण असो.' हा दानमंत्र म्हणत. मग ब्राह्मणाची प्रार्थना करून त्याला सुवर्ण-दक्षिणा देत व त्याच्या बरोबर ग्रामसीमेपर्यंत जाऊन त्याला नमस्कार करीत. [दा. चं.]



दासरी

**दासोपंत** (१५५१– १६१५ इ. स.) एक मराठी संतकवी. बिदर परगण्यातील नारायणपेठ या गावी देश-पांडे घराण्यात याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव दिगंबरपंत आणि मातेचे नाव पार्वतीबाई असे होते. सोळाव्या वर्षी याचा विवाह झाला. याच सुमारास मोठा दुष्काळ पडला. त्या प्रसंगी याच्या पित्याने सरकारी गुदामातील धान्य आपल्या अधिकारात दुष्काळग्रस्तांना वाटून टाकले. त्यामुळे बिदरच्या बादशहाने संतप्त होऊन दिगंबरपंताला हुकूम धाडला –

'दोन महिन्यांच्या आत दोन लक्ष रुपयांचा भरणा कर. तोवर तुझ्या मुलाला माझ्याकडे ओलीस ठेव आणि पैसे भरल्यावर मुलाला घेऊन जा. नाहीतर त्याला मुसलमान केले जाईल !'

त्या आज्ञेबरहुकूम दासोपंत बादशहाच्या राजधानीत ओलीस राहिला. बादशहाने त्याला कोठडीबंद करून ठेवले. पण धान्याच्या किंमतीची रक्कम भरणे दिगंबरपंताला सर्वस्वी अशक्य होते. त्यामुळे तो चिंतेत पडला. परंतु मुदत संपण्याच्या आत कोण्या दत्ताजी पाडेवार नामक माणसाने अपेक्षित रक-मेचा भरणा करून दासोपंताला सोडविले. हा दत्ताजी पाडेवार म्हणजे साक्षात दत्तात्रेयच होय, अशी लोकांची धारणा आहे.

दोन महिन्यांची ती कैद भोगून दासोपंत परत घरी आला. पण त्या दिवसापासून त्याची वृत्ती एकदम अंतर्मुख बनली. एका रात्री कोणालाही न कळविता तो घर सोडून निघून गेला. हिलालपूर – डाकुळगी – पेंवर – नांदेड या मार्गाने त्याने माहूर गाठले. दत्त प्रसन्न व्हावा म्हणून, त्याने तिथे बारा वर्षे तप-श्चर्येत घालविली. त्यानंतर एके दिवशी त्याला दत्ताने दर्शन दिले. मग तो माहूराहून निघाला व स्वच्छंद संचारकरू लागला.

या संचारकाळात त्याला राक्षसभुवन येथे गोदावरीच्या वाळवंटात अचानक दत्तपादुका मिळाल्या. नंतर तो आंबेजोगाई-जवळच्या बाणासंगम नामक क्षेत्रात जाऊन तिथे काही दिवस राहिला.

त्या ठिकाणी राहत असताना एक नाट्यमय घटना घडून आली. दासोपंताने घर सोडल्याला आता बारा वर्षे उलटून गेली होती. तेवढ्या अवधीत घरच्या मंडळींना त्याचा थांग-पत्ता लागला नव्हता. बारा वर्षे पतीचा ठावठिकाणा कळला नाही, तर पत्नीने आपली सौभाग्यचिन्हे टाकून वैधव्य पत्क-रावे, अशी त्या काळी रूढी होती. तोच विधी पार पाडण्यासाठी दिगंबरपंत आपल्या सुनेला घेऊन बाणासंगमावर आला होता. नदीच्या ऐलतीरावर दासोपंत स्नानसंध्या करीत बसला असता, पैलतीरावर त्याला आपल्या घरची ती मंडळी दिसली. दासोपंताने आपण तिथे असल्याचे वडिलांना कळविले. मग तिथल्या बाघेश्वरमंदिरात दासोपंत आपल्या पत्नीला आणि परिवारातील अन्य मंडळींना भेटला. त्यामुळे त्या सर्व कुटुंबात आनंदी आनंद पसरला.

त्यानंतर दासोपंत आपल्या परिवारासह आंबेजोगाई येथे स्थायिक झाला. तिथल्या सितोपंत देशपांडे नामक शिष्याने त्याची सर्व व्यवस्था लावून दिली. याच ठिकाणी तो अखेर-पर्यंत राहिला. तिथून पुढे तीन तपांहून अधिक काळ त्याने ग्रंथरचनेत घालवला. त्यानंतर माघ वद्य षष्ठी शके १५३७ या दिवशी वयाच्या चौसष्टाव्या वर्षी त्याने देह ठेवला.

दासोपंताला लेखनासाठी रोज ढबू पैशाची (अर्ध्या आण्याची) शाई लागत असे, असे म्हणतात. त्याने गीतार्णव, गीतार्थचंद्रिका, ग्रंथराज, पंचीकरण, अवधूतगीताटीका, इ. तीस–पस्तीस मराठी ग्रंथ, हजारो पदे व स्तोत्रे आणि संस्कृत भाषेत दशोपनिषद्‌भाष्यादी ग्रंथ एवढी रचना केली आहे. त्याच्या गीतार्णवाची ओवीसंख्या सव्वा लाख असून, गीतार्थचंद्रिका ही लघुगीताटीका ज्ञानेश्वरीएवढी आहे. त्याचा

ग्रंथराज हा ग्रंथ रामदासांच्या दासबोधाचा पूर्वावतार समजला जातो. त्याने रचलेल्या पंचीकरण ग्रंथाचे एक वैशिष्टच असे, की तो एका मोठ्या पासोडीवर चित्राकृतींसह लिहिलेला आहे.

दासोपंताच्या ग्रंथात पाल्हाळ असला, तरी तो कंटाळवाणा नाही. त्याने मानवी स्वभावाचे आणि जीवनव्यापाराचे सूक्ष्म निरीक्षण केलेले असल्यामुळे त्याच्या पाल्हाळानेही श्रोत्याला बहुश्रुततेचा लाभ होतो. तो आपले विचार अनेक उपमा-दृष्टान्तांनी आणि कथाप्रसंगांनी सजवून श्रोत्यांना सहजपणे पटतील अशा प्रकारे मांडतो. 'स्वानुभवचि येथिचें प्रमाण। स्वानुभव हेंचि साधन।' अशी त्याच्या ग्रंथांची बैठक आहे. एकांतात बसून आत्मचिंतन करण्याऐवजी बाष्कळ गोष्टीत रस घेणाऱ्या अज्ञानी माणसाचे त्याने केलेले गीतार्णवातील वर्णन असे –

सोडोनि आपुला बोधु। जया पाहिजे जनवादु।
गोष्टीं क्रीडा विनोदु। नागरिकांसी ॥
एकांती बैसलिया न गमे। मग लोक व्यापारीं मन भ्रमे।
जनसभेमाजी रमे। जयाचें चित्र ॥
तो ज्ञाता ना भक्त जनु। मूर्ख पामरु अज्ञानु।
बहुभाषीही सुजाणु। म्हणों नये ॥
जनवादी उपजे प्रीति। जनसभे होय रति।
अधिकता जनाचिया उक्तीं। संतोषु वाटे ॥
लोकांचे आचारविचार। प्रतिघरींचे समाचार।
स्त्रिया पुरुषांचे आहार। वाखाणणें ॥
हा भला हा दुर्जनु। ऐसा मी ऐसा आनु।
सांगणें ऐकणें सीणु। परावियाचा ॥

(गीतार्णव १३.२८५६–६१)

दासोपंताच्या पदांची संख्या सव्वा लाख होती, असे सांगतात. पण आज केवळ दीड-दोन हजार पदेच उपलब्ध आहेत. दासोपंताच्या पदांत त्याच्या दत्तभक्तीची सर्व रंगरूपे उत्कटपणे व्यक्त झालेली आहेत. दत्तदर्शनाची व्याकुलता व्यक्त करणारे त्याचे एक पद असे –

बापयाकारणे मेघु वोळे अंतराळीं, घनु वोळे अंतराळीं,
तैसा मी चातकु, तरी येई यये काळीं !
पाहीन रे, वाट पाहीन रे !
न येतील तरी प्राणु देईन रे !
दिगंबरा, तुजवीण नेणे आन कांहीं,
आत्मया ! सद्गुरु ! कधी वोळसी हृदयीं ?

॥ऐसें विराट देह साकार॥ येथें सृष्ट्यादिक व्यापार॥
॥निर्माण होये चराचर॥ व्यापार योगें॥ ब्रह्मलोक्य मुख्य मासी ध
॥ता यथापूर्वम कल्पयत्॥ येणें वेदवाक्य प्रकारें॥ भूतें निर्मिलीं साकारें॥
॥लोक लोकपाळ ईश्वरें॥ कर्ता होउनि॥ ते विविधोत्पत्ति विस्तारें॥
॥विराट शरीरीं अवस्था॥ जागृती जैसी भूतां॥ स्थूल देहनिरोगें॥

दासोपंताची पासोडी

आंबेजोगाई येथे गावाबाहेर नृसिंहतीर्थावर दासोपंताचे समाधिमंदिर आहे आणि गावात त्याचे राहते घर आजही उभे आहे. त्या घराला सांप्रत देवघर म्हणतात. त्या देवघरात त्याच्या उपासनेतील एकमुखी दत्तमूर्ती, पादुका, पासोडी व अन्य ग्रंथांची त्रुटित हस्तलिखिते आहेत. या देवघरातील नित्य-नैमित्तिक उपासना दासोपंताने आखून दिलेल्या पद्धतीप्रमाणेच आजही चालते. दासोपंताच्या परंपरेत दत्तात्रेयाच्या सोळा अवतारांचे जन्मोत्सव साजरे केले जातात. या सोळा अवतारांशिवाय दासोपंत हा सतरावा सर्वज्ञावतार मानला जातो आणि त्याचा जन्मोत्सव भाद्रपद वद्य अष्टमीला साजरा केला जातो.



दासोपंताची समाधी – आंबेजोगाई

महाराष्ट्रातील दत्तोपासनेच्या आणि भक्तिसाहित्याच्या इतिहासात दासोपंताला महनीय स्थान प्राप्त झालेले आहे. [म. च. प.; म. वा. इ. २; दासोपंताची पासोडी ]

**दास्यभक्ती** नवविधा भक्तीतला एक प्रकार. श्रद्धायुक्त अंतःकरणाने आणि निःस्वार्थ बुद्धीने भगवंताचे दास्य करणे, याला दास्यभक्ती असे म्हणतात. भागवतकाराने उद्धवमुखानेच या भक्तीचे स्वरूप सांगितले आहे, ते असे—

संमार्जनोपलेपाभ्यां सेकमण्डलवर्तनैः ।
गृहशुश्रूषणे मह्यं दासवद्यदमायया ।।
(भाग. पु. ११.११.३९)

अर्थ – जो दासाप्रमाणे माझ्या घरी राहून झाडणे, सारवणे, झाडांना आळी करून पाणी घालणे, रांगोळ्या काढणे, इ. घरची ( देवालयातील ) कामे निष्कपट बुद्धीने करतो, (तो दास्यभक्ती करणारा भक्त होय).

समर्थ रामदासांनी या भक्तिप्रकाराचे तपशीलवार वर्णन केले आहे, त्यातील काही ओव्या अशा—

सातवें भजन तें दास्य जाणावें ।
पडिलें कार्य तितुकें करावें ।
सदा सन्निधचि असावें । देवद्वारीं ।।
देवाचें वैभव सांभाळावें । न्यूनपूर्ण पडोंचि नेदावें ।
चढतें वाढतें वाढवावें । भजन देवाचें ।।
(दासबोध ४.७.२–३)

नवविधा भक्तीतील ही सातवी भक्ती असून, रामायणातील हनुमान या भक्तीचा आदर्श समजला जातो. पाहा— भक्ती.

**दाक्षायण यज्ञ** एक काम्य याग. दर्श-पूर्णमास हीच या यागाची प्रकृती आहे. ज्या विधींच्या अनुष्ठानाने यजमान दक्ष म्हणजे कर्मकुशल होतो, त्या विधींना दाक्ष म्हणतात. हे विधी प्रत्येक महिन्यात चारदा करायचे असल्यामुळे वर्षभरात त्यांची अनेक अयने म्हणजे आवृत्त्या होतात. म्हणून या यज्ञाला दाक्षायण म्हटले आहे. यात पौर्णिमेला दोन व अमावास्येला दोन याग करायचे असतात. पौर्णिमेच्या दिवशी अग्नी व अग्नीषोम या देवतांसाठी तसेच दुसऱ्या दिवशी अग्नीसाठी पुरोडाश तयार करतात व इंद्रासाठी सांनाय्य बनवतात. अमावास्येच्या दिवशी प्रकृत देवतांसाठी याग करून, दुसऱ्या दिवशी इंद्राग्नींसाठी पुरोडाश आणि मित्रावरुणांसाठी आमिक्षा हे हवी तयार करतात. सर्व ऋत्विज हविःशेष व वाजिन यांचे भक्षण करतात. यात यजमानाने पौर्णिमेपासून अमावास्येपर्यंत कोरे वस्त्र नेसून व्रतस्थ राहायचे असते. या यज्ञाचा प्रारंभ फाल्गुन पौर्णिमेला करावा, असे शांखायन ब्राह्मणात सांगितले आहे (४.४). पौर्णिमेला व अमावास्येला पहिली इष्टी व्रतपती अग्नी या देवतेसाठी करावी, असे बौधायन श्रौतसूत्र सांगते (१७.५१). अशा प्रकारे हा दाक्षायण यज्ञ पंधरा वर्षे करायचा असतो. हा दर्श—पूर्णमासाच्या बदल्यात अथवा स्वतंत्र करावा, असा विकल्प आहे. दर्शपूर्णमास इष्टी करून शिवाय हा याग करावा, असेही वचन आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**दाक्षायणी विद्या** एक वैदिक विद्या. दाक्षायण (दक्ष + अयन) या शब्दाचा अर्थ 'बलाकडे जाणारा, बलासाठी प्रयत्न करणारा' असा आहे. त्यावरून दाक्षायणी विद्या म्हणजे बल प्राप्त करून घेण्याची विद्या होय. अथर्ववेदाच्या पहिल्या कांडातील ३५ व्या सूक्तात या विद्येचा विचार आलेला आहे. या सूक्तातील पहिला मंत्र असा—

यदाबध्नन् दाक्षायणा हिरण्यं शतानीकाय सुमनस्यमानाः ।
तत्ते बध्नाम्यायुषे वर्चसे बलाय दीर्घायुत्वाय शतशारदाय ।।

भावार्थ — बळ वाढविणारे आणि मनात शुभ विचारांना धारण करणारे श्रेष्ठ महात्मे पुरुष सेनासंचालकाच्या शरीरावर बलवृद्धीसाठी जी सोन्याची आभूषणे घालतात, त्याच आभूषणांनी मी तुझे शरीर सुशोभित करतो. त्यामुळे तुझे आयुष्य सुधारेल, तेज वाढेल, बल वाढेल आणि शंभर वर्षांचे पूर्ण जीवन तुला प्राप्त होईल.

या विद्येत मनःशुद्धीने प्राप्त होणाऱ्या सामर्थ्यावर विशेष भर आहे. सुवर्णाचे धारण व सेवन केल्यामुळे आरोग्य, बल व तेज प्राप्त होते, असे सांगितले आहे. [ अ. सु. अ. ४ ]

**दिंडी नृत्य** महाराष्ट्रातील वारकरी लोक आषाढी व कार्तिकी एकादशीला संतांच्या किंवा देवाच्या पालखीपुढे भजन करीत व नाचत जातात, त्याला दिंडी असे म्हणतात. दिंडी या शब्दाचे लहान दरवाजा व पताका असे दोन अर्थ आहेत. आपल्याला स्वर्गाची द्वारे उघडावी या हेतूने वारकरी लोक भजन करतात, म्हणून त्यांच्या वाटचालीला दिंडी नाव पडले, अशी एक कल्पना आहे. वारकऱ्यांच्या खांद्यावर पताका असतात, त्यावरून दिंडी हे नाव आले असावे, असेही एक मत आहे. पण श्री. सोनोपंत दांडेकर यांच्या मते भजनी मंडळातील एकजण दिंडी नावाचे वीणेसारखे एक वाद्य वाजवीत पुढे जातो व बाकीचे त्याच्या मागोमाग जातात, म्हणून त्या मंडळाला दिंडी असे म्हणतात.

दिंडीतले वारकरी दोन रांगा करून समोरासमोर उभे राहतात आणि दिंडी व मृदंग वाजवणारे त्या रांगांच्या मध्ये पुढच्या

बाजूला असतात. सर्वांच्या हाती टाळ असतात. टाळ व मृदंग यांच्या साथीवर तोंडाने भजन म्हणत व मागेपुढे पावले टाकीत ते हळूहळू मार्ग क्रमीत असतात. या भजनात संतांचे अभंग व गौळणी गायिल्या जातात. मधून मधून विठ्ठलनामाचा गजरही होतो. हा नाच साधा; पण प्रेक्षणीय असतो. वारकरी स्त्रियाही अशा प्रकारे भजन करीत नाचत जाताना दिसतात. [फो. डा. म.]

**दिक्पाल** दिशांचे संरक्षक देव. पूर्वादी अष्ट दिशांचे आठ संरक्षक देव आहेत, ते असे – पूर्व – इंद्र, आग्नेय – अग्नी, दक्षिण – यम, नैर्ऋत्य – निर्ऋती, पश्चिम – वरुण, वायव्य – मरुत, उत्तर – कुबेर, आणि ईशान्य – ईशान.

मत्स्य पुराणात चार प्रमुख दिशांचे संरक्षक म्हणून सुधर्मा, शंखपाल, केतुमान व हिरण्यरोमा अशी नावे दिली असून, गृहबलीमध्ये त्यांना आवाहन करतात, असे सांगितले आहे (६७.९-१६; ६९.३८). संस्कृत महाकाव्यात दिक्पालांचे उल्लेख वारंवार येतात. तिथे त्यांची संख्या सामान्यतः चार असली, तरी सर्वत्र ती सारखी आढळत नाही.

पुराणांत व तंत्रग्रंथांत अष्ट दिक्पालांची ध्याने पुढील-प्रमाणे आहेत –(१) इंद्र – द्विभुज, पिवळ्या वर्णाचा, ऐरावतावर आरूढ झालेला, वज्र व स्तन धारण करणारा. दिशा – पूर्व. (२) यम – कृष्ण वर्णाचा, रेड्यावर आरूढ झालेला, दंड व शूल धारण करणारा. दिशा – दक्षिण. (३) वरुण – शुभ्र वर्णाचा, द्विभुज, मगरीवर आरूढ झालेला, नागपाश व शंख धारण करणारा. दिशा – पश्चिम. (४) कुबेर – पिवळ्या वर्णाचा द्विभुज, नरवाहनावर आरूढ झालेला, अंकुश व गदा धारण करणारा. दिशा – उत्तर. (५) अग्नी – तांबड्या वर्णाचा, बोकडावर आरूढ झालेला, सूचा आणि कमंडलू धारण करणारा. दिशा – आग्नेय. (६) निर्ऋती – नीलवर्णाचा, राक्षसांचा स्वामी, शवावर आरूढ झालेला, खड्ग व खेटक (सोटा) धारण करणारा. दिशा – नैर्ऋत्य. (७) वायू – मृगावर आरूढ झालेला आणि वातपुट धारण करणारा. दिशा – वायव्य. (८) ईशान – नीलकंठ, सर्पाचे यज्ञोपवीत, जटेत अर्धचंद्र आणि हाती कपाल व त्रिशूल धारण करणारा. दिशा – ईशान्य.

बौद्धांनी वरील अष्ट दिक्पाल स्वीकारले आहेत. संस्कृत बौद्ध ग्रंथांत धृतराष्ट्र (पूर्व), विरूढक (दक्षिण), विरूपाक्ष (पश्चिम) आणि वैश्रवण (उत्तर) असे चार मुख्य दिशांचे चार दिक्पाल दिले असून, त्यांना चतुर्महाराज म्हटले आहे. याशिवाय बौद्धांच्या वज्रयान पंथात अधोर्ध्व दिशा धरून दहा दिशांचे वेगळे दश दिक्पाल मानलेले आहेत. निष्पन्नयोगावलीत त्यांची विविध रूपे वर्णिलेली आहेत. त्यांची नावे अशी –

(१) यमांतक–पूर्व. (२) प्रज्ञांतक–दक्षिण. (३) पद्मांतक–पश्चिम. (४) विघ्नांतक – उत्तर. (५) टक्किराज – आग्नेय. (६) नीलदंड – नैर्ऋत्य. (७) महाबल – वायव्य. (८) अचल – ईशान्य. (९) उष्णीष – ऊर्ध्व. (१०) सुंभराज-अधर.

हे सर्व त्रिमुखी आणि षड्भुज आहेत. यांपैकी यमांतक टक्किराज, नीलदंड, महाबल, अचल व सुंभराज यांचा वर्ण निळा असून, प्रज्ञांतकाचा शुभ्र, पद्मांतकाचा तांबडा, विघ्नांतकाचा हिरवा आणि उष्णीषाचा पिवळा आहे. या सर्वांनी आपल्या दोन मुख्य हातांनी आपापल्या शक्तीला आलिंगन दिलेले असून, त्यांच्या उरलेल्या चार हातांत वेगवेगळी आयुधे असतात, ती अशी–

यमांतक– काळे वज्रमुद्गर, खड्ग, मणी व कमळ. प्रज्ञांतक-वज्रांकित शुभ्रदंड, तलवार, मणी व कमळ. पद्मांतक – तांबडे कमळ, तलवार, मणी व चक्र. विघ्नांतक– कराल वज्र, तलवार, मणी व कमळ. टक्किराज– निळा दंड, खड्ग, मणी व कमळ. नीलदंड– निळा दंड, खड्ग, मणी व कमळ. महाबल– त्रिशूल, तलवार, मणी व कमळ. अचल – खड्ग, वज्र, मणी व कमळ. उष्णीष– पिवळे चक्र, खड्ग, मणी व कमळ. सुंभराज– वज्र, खड्ग, मणी व कमळ.

यांपैकी यमांतकाची स्वतंत्र उपासना होत असे.

दिगंबर जैनांनी अष्ट दिक्पाल जसेच्या तसे स्वीकारले आहेत. परंतु श्वेतांबर जैनांनी मात्र अष्ट दिक्पालांत आकाशलोकाचा ब्रह्मा आणि पाताल लोकाचा नाग अशा आणखी दोघांची भर घालून त्यांची संख्या दहा केली आहे. जैनांच्या दश दिक्पालांचा मूलाधार गोभिलगृह्यसूत्रांत आढळतो. त्यांत इंद्र (पूर्व), वायू (आग्नेय), यम (दक्षिण), पितर (नैर्ऋत्य), वरुण (पश्चिम), महाराज (वायव्य), सोम (उत्तर), महेंद्र (ईशान्य), वासुकी (पाताल) आणि ब्रह्मा (आकाश) असे दश दिक्पाल दिले आहेत.

बदामीच्या गुहेतील छतावर अष्ट दिक्पाल खोदलेले आहेत. तसेच, गंजिगट्टी (जि. धारवाड) येथे एक मोठा दिक्पालपट्ट उभा आहे. सिन्नर (जि. नाशिक) येथील गोंदेश्वर मंदिराच्या छतावरही अष्ट दिक्पाल खोदलेले आहेत. खजुराहोच्या मंदिरातील अष्ट दिक्पालांचे शिल्पपट्ट वैशिष्ट्यपूर्ण आहेत. पाहा– अष्ट दिक्पाल. [ श. क.; मू. वि.; पु. इं.; इं. बु. इ. ]

**दिक्पालिका** दिशांचे संरक्षण करणाऱ्या बौद्ध देवता. यांची संख्या सहा आहे. निष्पन्नयोगावली व साधनमाला या ग्रंथांत त्यांचे वर्णन दिले आहे, ते असे–

**वज्रांकुशी** – शुभ्र वर्णाची, एकमुखी, द्विभुजा आणि डाव्या

हातात शुभ्र वर्णाचा अंकुश धारण करणारी. रक्षित दिशा – पूर्व.

वज्रपाशी – पिवळ्या वर्णाची, एकमुखी, द्विभुजा आणि डाव्या हातात पाश धारण करणारी. रक्षित दिशा-दक्षिण.

वज्रस्फोटा – तांबड्या वर्णाची, एकमुखी, द्विभुजा व उजव्या हाती वज्रांकित साखळी धारण करणारी. रक्षित दिशा – पश्चिम.

वज्रघंटा – हिरव्या वर्णाची, एकमुखी, द्विभुजा आणि उजव्या हाती वज्रघंटा धारण करणारी. रक्षित दिशा – उत्तर.

उष्णीषविजया – शुभ्र वर्णाची, एकमुखी, द्विभुजा आणि उजव्या हाती चक्र धारण करणारी. रक्षित दिशा– ऊर्ध्व.

सुंभा – निळ्या वर्णाची, एकमुखी, द्विभुजा आणि उजव्या हाती नागपाश धारण करणारी. रक्षित दिशा – अधर.

या सर्वांच्या डाव्या हाताची तर्जनी उंच केलेली असते. उरलेल्या चार उपदिशांच्या देवता म्हणून पुष्पा, धूपा, दीपा व गंधा अशी चार नावे आढळतात. [ इं. बु. इ. ]

**दिक्‌शूल** एक संकेत. विशिष्ट दिशेला जायचे असल्यास त्यासाठी काही वार निषिद्ध मानलेले आहेत, त्याला दिक्‌शूल असे नाव आहे.

पश्चिमायां शुक्ररवी उत्तरस्यां बुधमङ्गलौ ।
पूर्वस्यां शनिसोमौ च दक्षिणस्यां बृहस्पतिः ॥
( ज्योतिःसारसंग्रह )

अर्थ – पश्चिम दिशेला जायचे असल्यास शुक्रवार व रविवार, उत्तरेला जायचे असल्यास बुधवार व मंगळवार, पूर्वेला जाण्यासाठी शनिवार व सोमवार आणि दक्षिणेला जायचे असल्यास गुरुवार हे वार निषिद्ध समजावे.

पण अशा वारी जायचेच असल्यास, त्यावर काही उपायही सांगितलेले आहेत, ते असे – रविवारी विडा खाऊन, सोमवारी आरसा पाहून, मंगळवारी वावडिंगे खाऊन, गुरुवारी मोहरी तोंडात टाकून, शुक्रवारी धने खाऊन आणि शनिवारी कपाळावर हळदीचा तिलक लावून जावे.

बुधवारी कोणत्याच दिशेला जाऊ नये. पण जाणे अपरिहार्यच असल्यास आदल्या दिवशी एका वस्त्रात थोडे तांदूळ, एक हळकुंड आणि दोन पैसे घालून ती पुरचुंडी घराबाहेर देवळात किंवा तुळशीवृंदावनांत ठेवावी व प्रवासाला निघतांना ती बरोबर न्यावी. याला प्रस्थान ठेवणे, असे नाव आहे. [श. क.]

**दिगंबर-श्वेतांबर** जैन धर्मातील दोन प्रमुख पंथ. चंद्रगुप्त मौर्याच्या वेळी मगधात दुष्काळ पडला असताना काही जैन लोक भद्रबाहू या आचार्यांच्या नेतृत्वाने दक्षिणेत गेले. जे मगधातच राहिले, त्यांचा नेता स्थूलभद्र याने एक परिषद भरवून जैन धर्मात काही सुधारणा करण्याचा निर्णय घेतला. कालांतराने भद्रबाहू आपल्या अनुयायांसह मगधात परत गेला. पण त्याने परिषदेचे नवे निर्णय मान्य केले नाहीत. या मतभेदामुळे जैन लोकांत दोन पंथ निर्माण झाले.

या दोन पंथांतील वेगळेपणा इ. स. च्या पहिल्या शतकात स्पष्ट दिसू लागला आणि त्यानंतर त्याला अधिक तीव्र स्वरूप प्राप्त झाले. मूळचे जैन हे दिगंबरच ( नग्न ) होते. पण स्थूलभद्राचे अनुयायी श्वेत वस्त्र परिधान करू लागले, म्हणून त्यांना श्वेतांबर म्हणू लागले.

दिगंबर व श्वेतांबर या दोन पंथांतील मुख्य भेद असे –

(१) दिगंबर जैन हे तीर्थंकरांच्या मूर्ती वस्त्रभूषणांनी सुशोभित न करता नग्न ठेवतात; श्वेतांबर जिनमूर्तींना सजवतात.

(२) श्वेतांबर बारा स्वर्ग आणि चौसष्ट इंद्र मानतात; तर दिगंबर सोळा स्वर्ग व शंभर महासम्राट मानतात.

(३) दिगंबर पंथाचे साधू करपात्रात भोजन करतात; तर श्वेतांबर साधू इतर पात्रे वापरतात.

(४) श्वेतांबर साधू काही उपकरणे वापरतात; तर दिगंबरांना त्यांची आवश्यकता नसते.

(५) स्त्रियांना संन्यास घेता येत असला तरी त्यांना केवल ज्ञान व मोक्ष प्राप्त होणे शक्य नाही, असे दिगंबर मानतात; तर श्वेतांबर तसे मानीत नाहीत.

(६) केवलज्ञानी जैन साधू अन्नावाचून जगू शकतो, असे दिगंबर मानतात; तर श्वेतांबर तसे मानीत नाहीत.

(७) श्वेतांबरांत पूजाप्रसंगी मूर्तीला फुले वाहून मिठाईचा नैवेद्य दाखविण्याची प्रथा आहे; तर दिगंबर लोक त्याऐवजी तांदूळ व सुगंधी पदार्थ वापरतात.

दिगंबर पंथाचे संस्कार व श्वेतांबर पंथाचे संस्कार यांत पुष्कळ भेद आहेत. या दोन्ही पंथांच्या प्राचीन परंपरा व साहित्य यांत फरक नव्हता; पण इ. स. च्या पहिल्या शतकापासून तसा फरक स्पष्ट दिसू लागला. श्वेतांबर जैनांना जे ४५ आगम मान्य आहेत, ते दिगंबरांना मान्य नाहीत. श्वेतांबरांचे आगम साहित्य अर्धमागधी भाषेत लिहिलेले आहे. प्राचीन साहित्य शौरसेनी भाषेत होते व ते नष्ट झाले आहे, असे दिगंबर मानतात. पाहा– जैन धर्म; जैन साहित्य. [ जै. इ.; प्रा. सा. इ.; ज. सि. भा., मार्च १९३८ व जुलै १९४६; जै. ध. ]

**दिग्गज** दिशांचा भार वाहणारे हत्ती. आठ दिशांना आठ हत्ती आपल्या मस्तकांवर पृथ्वीचा भार वाहत आहेत, अशी पौराणिक कल्पना आहे.

प्रारंभी यांची संख्या चारच म्हणजे मुख्य दिशांशी संबंधित होती. वाल्मीकिरामायणात पूर्वेचा विरूपाक्ष, दक्षिणेचा महापद्म, पश्चिमेचा सौमनस आणि उत्तरेचा भद्र अशी चार दिग्गजांची नावे दिलेली आहेत. यांपैकी कोणीही आपले मस्तक हालवले, तर भूकंप होतो, अशी कल्पना रूढ होती. पृथ्वीचे स्थैर्य यांच्यावर अवलंबून असल्यामुळे देव, दानव, राक्षस, पिशाच, पक्षी, नाग, वगैरे सर्व यांची पूजा करीत असत, असे रामायणात म्हटले आहे (१·४०·१२–२३; १·४१·७–८).

आजचे हत्ती या अष्ट दिग्गजांचेच वंशज समजले जातात. कोणत्या प्रकारचे हत्ती कोणत्या दिग्गजापासून झाले, यासंबंधीच्या अनेक समजुती उ. भारतात रूढ आहेत. पाहा – अष्ट दिग्गज. [ शा. क.; वा. रा. को.; पॉ. रि. फो. नॉ. इं. ]

**दिग्विजय** चारही दिशांच्या देशांत युद्धाने अथवा विद्येने प्राप्त केलेल्या विजयाला दिग्विजय असे म्हणतात. प्राचीन भारतात अनेक राज्ये होती. त्यांपैकी एखाद्या राज्याचा विजिगीषु राजा दिग्विजयासाठी ससैन्य बाहेर पडे आणि सर्व दिशांच्या राजांना आपले प्रभुत्व मान्य करायला लावून आणि त्यांच्याकडून करभार घेऊन राजधानीला परत येई. परत आल्यावर तो अश्वमेध अथवा राजसूय यज्ञ करी आणि त्यानंतर स्वतःला सम्राटपदसूचक असे महाराजाधिराज हे विरुद लावून घेई. रघुराजाने केलेल्या अशा दिग्विजयाचे वर्णन कालिदासाने रघुवंशात केले आहे.

अश्वमेध यज्ञ करून सम्राटपद मिळवू इच्छिणारा राजा एक यज्ञीय अश्व सोडी. मग त्या अश्वाच्या संरक्षणासाठी राजपरिवारातील एखाद्या वीराला त्या अश्वाच्या मागे सैन्यासह पाठवी. राजा स्वतः राजधानीत राहून तो अश्व परतण्याची वाट पाही. रामचंद्राने अश्वमेध केला, तेव्हा त्याने अश्वरक्षणासाठी लक्ष्मणाच्या नेतृत्वाखाली सैन्य पाठविले होते. युधिष्ठिराने अश्वमेध केला, तेव्हा दिग्विजयाचे काम भीमार्जुनादी अन्य पांडवांनीच केले होते.

राजाच्या दिग्विजययात्रेला दंडयात्रा असेही म्हणत असत. ही यात्रा पावसाळा संपल्यावर शरद्‌ऋतूच्या आरंभी सुरू होई. दिग्विजययात्रेचे प्रस्थान ठेवण्याचा एक मोठा विधी असे. प्रथम सुमुहूर्त पाहून दिवस निश्चित करीत. त्या दिवशी राजा सुवर्णकलशातील जलाने स्नान करून इष्टदेवतांची पूजा करी. पूजेनंतर गायींचे खूर आणि शिंगे सोन्याच्या पत्र्याने मढवून आणि एका सुवर्णपात्रात तीळ भरून त्या गायी व तिलपात्र ब्राह्मणांना दान देई. त्यानंतर दीड हात उंचीच्या सुवर्णासनावर व्याघ्रचर्म पसरून त्यावर बसे आणि विधिपूर्वक शस्त्रास्त्रांची पूजा करी. एवढे झाल्यावर आपल्या सर्वांगाला चंदनाचा लेप लावून, किनारीला हंसमिथुने काढलेले दुकूल परिधान करी. गळ्यात पांढऱ्या फुलांची माळ आणि कानात मरकत मण्यांची आभरणे घाली. शरद्‌ऋतूतील शुभ्र वातावरण आणि राजाचा शुभ्र वेष यांतून त्याने मिळवायच्या धवल यशाचे सूचन होत असे. रघूच्या धवल यशाचे वर्णन कालिदासाने रघुवंशात केले आहे, ते असे–

हंसश्रेणीषु तारासु कुमुद्वत्सु च वारिषु ।
विभूतयस्तदीयानां पर्यस्ता यशसामिव ॥

(रघु. ४.१९)

अर्थ – हंसश्रेणींच्या, तारकांच्या व कमलयुक्त जलाशयांच्या ठायी सर्वत्र रघूच्याच यशाचे ऐश्वर्य पसरले होतेसे दिसे.

मग राजपुरोहित राजाच्या हातात स्वस्तिवाचनपूर्वक शासनपल्लव (राजमुद्रांकित कंकण) घाली आणि राजाच्या मस्तकावर दर्भाने मंत्राभिषेक करी. प्रयाणापूर्वी राजा राजबंद्यांना मुक्त करी आणि ज्यांच्यावर पूर्वी अवकृपा केली होती, अशा सर्व लोकांना अभय देई.

राजभवनातून राजा दिग्विजयासाठी बाहेर पडू लागला, की ब्राह्मण त्याला आशीर्वाद देत, सुवासिनी स्त्रिया मंगल कलश घेऊन पुढे येत आणि राजाला तिलक लावून त्याच्यावर अक्षता आणि दहीलाह्या उधळीत. त्यानंतर प्रजेचे प्रतिनिधी जयघोष करीत. पुढे गावाबाहेर उभारलेल्या तृणकुटीत एक रात्र निवास करून दुसऱ्या दिवशी पहाटे वाद्यांच्या गजरात राजा प्रत्यक्ष दिग्विजययात्रेला आरंभ करी. या यात्रेत काही राजे आपण होऊन विजिगीषू राजाचे प्रभुत्व मान्य करीत. जे कोणी तसे करायचे नाकारीत, त्यांना युद्धात जिंकून अंकित केले जाई. अर्थात विजिगीषू राजा कोण्याही राजाचे राज्य हिरावून घेत नसे. सर्वांना आपले प्रभुत्व मान्य करायला लावायचे व त्यांच्याकडून करभार वसूल करायचा, एवढाच त्याच्या दंडयात्रेचा उद्देश असे. दिग्विजयी राजे सर्व देशांत सुस्थिती निर्माण करीत आणि चतुर्विध पुरुषार्थ साधून इतरांपुढे आपला आदर्श ठेवीत, अशा कथा पुराणांत आढळतात.

विजिगीषू राजांप्रमाणेच विजिगीषू पंडितही आपले बौद्धिक प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठी सर्वत्र यात्रा करीत आणि सर्व ठिकाणच्या पंडितांना वादात जिंकून त्यांच्याकडून जयपत्रे घेत. अशा बौद्धिक दिग्विजयाच्या क्षेत्रात शंकराचार्यांचा दिग्विजय अत्यंत प्रसिद्ध आहे. [ चिं. ग. च.; ह. च. सां. अ. ]

**दिग्व्रत** एक जैनव्रत. हे एक गुणव्रत आहे. हे व्रत घेणाऱ्याने मरेपर्यंत आपल्या राहत्या गावाची शीव ओलांडून दुसरीकडे जायचे नसते. यामुळे अहिंसा व्रताचे पूर्ण

परिपालन होते असे, समजतात. [जैनधर्मामृत; जै. ध.]

**दिङ्नाग** (इ. स. चे ५ वे शतक) एक बौद्ध नैयायिक. हा दक्षिणी ब्राह्मण होता. कांचीजवळील सिंहवक्त्र नामक गावी याचा जन्म झाला. तो प्रथम हीनयान संप्रदायांतर्गत वात्सीपुत्रीय शाखेतील नागदत्ताचा शिष्य होता. पुढे त्रिपिटकाचा सूक्ष्म अभ्यास केल्यानंतर त्याने महायान पंथात प्रवेश केला व आचार्य वसुबंधूचे शिष्यत्व पत्करले. वसुबंधूजवळ त्याने महायान पंथाच्या सर्व प्रमाणभूत ग्रंथांचे अध्ययन केले. असे सांगतात, की दिङनागावर बोधिसत्व मंजुश्रीची अपार कृपा होती आणि त्यामुळे त्याला अगम्य असे काहीच नसे. त्याच्या तीक्ष्ण बुद्धीची आणि प्रकांड पांडित्याची कीर्ती नालंदा विद्यापीठात पोचताच तिथल्या आचार्यांनी त्याला सन्मानाने निमंत्रण पाठवले. तिथे गेल्यावर त्याने सुदुर्जयनामक वैदिकधर्मीय तार्किकाला आणि अन्य अनेक वैदिक पंडितांना वादात पराभूत केले. त्याच्या या विजयामुळे त्याला तर्कपुंगव हे बिरुद आणि पंडितोष्णीष नामक शिरोभूषण प्राप्त झाले.

यानंतर दिङनागाने महाराष्ट्र व ओडिसा या प्रदेशांत संचार करून अनेक जैन पंडितांना वादात जिंकले. महाराष्ट्रातील आचार्यविहारात त्याने दीर्घकाल वास्तव्य केले होते.

दिङनागाने न्यायशास्त्रावर न्यायप्रवेश, हेतुचक्रडमरू, प्रमाणशास्त्र, आलंवनपरीक्षा, प्रमाणसमुच्चय, इ. अनेक संस्कृत ग्रंथ रचले. एका न्यायप्रवेशाशिवाय त्याचे अन्य ग्रंथ मूळ स्वरूपात उपलब्ध नाहीत. काही ग्रंथ तिबेटी अनुवादाच्या स्वरूपात आढळतात. प्रमाणसमुच्चय हा दिङनागाचा मुख्य ग्रंथ होय. हा ग्रंथ म्हणजे प्रमाणांसंबंधी वेळोवेळी रचलेल्या अनुष्टुभ छंदातील श्लोकांचा संग्रह आहे. हा ग्रंथ सहा परिच्छेदांत विभागलेला आहे–(१) प्रत्यक्ष (२) स्वार्थानुमान (३) परार्थानुमान (४) त्रिरूपहेतू (५) प्रत्यक्ष उपमान आणि शब्दखंडन व (६) जात्युत्तरविचार.

आपल्या या ग्रंथात त्याने वात्स्यायन व गौतम या पूर्वाचार्यांचे खंडन केले आहे. या ग्रंथाची रचना आंध्रमधील वेंगी नामक नगराजवळच्या एका पर्वतावरील गुंफेत झाली. दिङनागाचा प्रतिस्पर्धी ईश्वरकृष्ण नावाचा एक विद्वान होता. त्याने आपल्या मंत्रसामर्थ्याने दिङनागाच्या विहाराला आग लावली. पण त्या जळितात ईश्वरकृष्णच जळून मेला. मात्र आगीत दिङनागाचा प्रमाणसमुच्चय हा ग्रंथही भस्मसात झाला. पुढे बोधिसत्त्व मंजुश्रीच्या दैवी आदेशानुसार दिङनागाने हा ग्रंथ पुनश्च रचला, अशी आख्यायिका आहे.

दिङनागाचे दोन ग्रंथ इ. स. ५५७ ते ५६९ या कालखंडात चिनी भाषेतही अनुवादले गेले होते. प्रमाणसमुच्चयाचा तिबेटी अनुवाद हेमवर्मा नामक एका भारतीय बौद्ध पंडिताने दे–प–दों–ख नामक तिबेटी राजलामाच्या सहकार्याने केला. हे अनुवादाचे कार्य शे–पइ–गे–ने या तिबेटी विहारात पार पडले. या अनुवादित ग्रंथाचे नाव छे–म–कुंत–इ असे आहे.

दिङ्नाग हा अत्यंत वादनिपुण आणि आक्रमक प्रवृत्तीचा पंडित होता. त्याच्या नंतर झालेले उद्योतकर, वाचस्पतिमिश्र, कुमारिलभट्ट, सुरेश्वराचार्य, इ. वैदिक पंडित आणि प्रभाचंद्र, विद्यानंद, इ. जैन दार्शनिक यांनी दिङ्नागाच्या मतांचे खंडन केले आहे.

दिङ्नाग हा बौद्ध न्यायाचा संस्थापक समजला जातो. प्राचीन नैयायिकांत त्याचे स्थान अत्यंत उच्च आहे. भारतीय विद्याकेंद्रांतून दिङ्नागाच्या ग्रंथांना पाठ्यग्रंथांचे स्थान लाभले होते, असे इत्सिगाने लिहून ठेवले आहे. गंगेश उपाध्यायाच्या काळापर्यंत (इ. स. १२००) भारतीय न्यायविद्येत दिङ्नागाचेच साम्राज्य नांदले. [प्रा. पं. क.; बौ. ध. द.; पु. त. नि.; त्रि. हो. बु.; बौद्ध–धर्म के २५०० वर्ष आजकल–वार्षिक अंक, डिसेंबर १९५६; गु. सा. इ.]

**दिद्दायी** एक जमात. या लोकांची वस्ती ओडिसा व आंध्र या राज्यांच्या सीमेवर असलेल्या मचकुंद नदीच्या काठी आहे. हे लोक रानटी व मागसलेले आहेत. यांच्यांतील बहुतेक लोक झूम पद्धतीची शेती करतात. हे उत्तम शिकारीही आहेत.

या जमातीतल्या मोठ्या घराण्यांना बान्सो म्हणतात आणि लहान घराण्यांना कुंडा म्हणतात. यांच्या स्त्रिया दोन वस्त्रें वापरतात. त्यांतील एक कमरेला व दुसरे खांद्याभोवती गुंडाळलेले असते.

यांच्या वाङ्मयात रुमरोक नावाची एक व्यक्ती आढळते. या व्यक्तीला ते आपल्या जमातीचा वीरपुरुष समजतात व तो सृष्टिनिर्मिती करतो, असे मानतात. रुमरोकच्या अंगी दैवी शक्ती असते आणि तो आपल्या जमातीसाठी खूप कष्ट करतो, असे त्यांना वाटते. [ट्रा. मि. ओ.]

**दिनकरभट्ट** (इ. स. चे १७ वे शतक) एक संस्कृत धर्मनिबंधकार. याला दिवाकरभट्ट असेही म्हणतात. हा शिवाजीमहाराजांच्या आश्रयाला होता, असे सांगतात. न्याय, वैशेषिक, मीमांसा व धर्म या शास्त्रांतला हा मोठा पंडित होता. लक्ष्मणभट्ट नावाचा त्याचा भाऊ होता.

त्याने आपल्या आचाररत्न या ग्रंथात दिनकरभट्टाची स्तुती केली आहे, ती अशी —

'ज्याप्रमाणे आदिवराहाने जलात बुडालेली पृथ्वी वर काढली, त्याप्रमाणे ज्याने आपल्या कुळाची प्रतिष्ठा उच्च पदाला नेली आणि गंगेप्रमाणे (पवित्र) विद्या ज्याच्यापासून प्रसृत झाली, त्या ज्येष्ठ भ्रात्याची म्हणजे भट्ट दिवाकराची मी स्तुती करतो.'

दिनकरभट्टाने शास्त्रदीपिकेवर भाट्ट दिनकरमीमांसा किंवा भाट्ट दिनकरी, शांतिसार, दिनकरोद्योत किंवा भाट्ट दिनकरोद्योत हे ग्रंथ लिहिले आहेत. यांपैकी शेवटचा ग्रंथ त्याच्या हातून पुरा होऊ शकला नाही; तो त्याचा पुत्र गागाभट्ट याने पुरा केला, असे म्हणतात. [ मी. द.; शि. नि. १ ]

**दिनकरस्वामी** (इ. स. चे १७ वे शतक) एक मराठी संतकवी. नगर जिल्ह्यातील भिंगार गावच्या यजुर्वेदी ब्राह्मण घराण्यात याचा जन्म झाला. याचे मूळ नाव बहिणाजी. याच्या पित्याचे नाव नरहरी पाठक आणि मातेचे नाव द्वारकाबाई असे होते. नरहरी पाठक हा वेदशास्त्रसंपन्न व अध्यात्मपरायण असल्यामुळे बहिणाजीवर लहानपणीच विद्येचे व परमार्थाचे संस्कार झाले. पित्याने यथाकाल बहिणाजीचा विवाह करून दिला खरा; परंतु विवाहानंतर तो अधिकाधिक विरक्त बनत चालला. घरी साधनेला एकांत लाभणे शक्य नाही, हे ध्यानी येताच एके दिवशी त्याने गुप्तपणे घर सोडले आणि भिंगार गावाच्या पूर्वेला अठ्ठावीस मैल अंतरावर असलेल्या वृद्धेश्वराच्या डोंगरातील गुहेत बसून तप सुरू केले. या ठिकाणी आसपासच्या गावांतून मिळणाऱ्या भिक्षेवर व कंदमुळांवर निर्वाह करून त्याने बारा वर्षे घालवली. या काळात त्याने अनेक पुरश्चरणे केली आणि समाधियोगाचाही अभ्यास केला.

बहिणाजीला प्रदीर्घ तपानंतर शके १५७५ (इ. स. १६५३) मधील फाल्गुनी पौर्णिमेच्या दिवशी समर्थांचा स्वप्नबोध लाभला आणि त्यानंतर बरोबर एक वर्षाने त्याला भातवडी गावी त्यांचा प्रत्यक्ष गुरूपदेश प्राप्त झाला. मग समर्थांनी बहिणाजीचे नाव दिनकर असे ठेवले. गुरूपदेशानंतर दिनकराने भिंगार गावापासून जवळच असलेल्या तिसगावी मठ स्थापून समर्थ संप्रदायानुसार उपासना सुरू केली आणि सद्ग्रंथचिंतनात व ग्रंथरचनेत पुढील सर्व जीवन व्यतीत केले.

दिनकराने स्वानुभवदिनकर हा मोठा ओवीबद्ध ग्रंथ आणि बरीच स्फुट कविता रचलेली आहे. स्वानुभवदिनकराचे एकूण १६ कलाप आहेत. त्यात ८१ किरणे असून, ओवीसंख्या ६७५० आहे. यात वेदान्त व भक्तिमार्ग यांचे उत्तम विवेचन आहे या ग्रंथात दासबोधातील सर्व विषय आलेले आहेत. शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर औरंगजेबाने नगरला तळ देऊन महाराष्ट्रात जो धुमाकूळ मांडला होता, त्याचे चित्रणही कलिवर्णनाच्या संदर्भात दिनकराने केलेले आहे. या ग्रंथातील सत्संगमहतीच्या काही ओव्या अशा–

**असो, करावयासी मनोजय। मुख्य पाहिजे सत्संगाची सोय।**
**सत्संगे संसारवासनात्यागाचा अन्वय। सहजचि साधे ॥**
**संतीं संसार केला मोक्षरूप। संतकृपा शीतळ त्रिताप।**
**स्वानुभवें दिनकरा ऐसें पडप। सद्गुरुचिया अनुग्रहें ॥**
**संत विवेकाचे आगर सदा। सारासार विचार नित्य धंदा।**
**दृष्टिमात्रें संसारदैन्य आपदा। भाविकांची निरसिती।**

या ग्रंथावर समर्थांच्या वाणीचा प्रभाव असूनही त्याचे स्वानुभवाचे प्रखर तेज लोपलेले नाही. रामदासी वाङ्मयात या ग्रंथाचे स्थान दासबोधाच्या खालोखाल आहे.

दिनकराचे अभंग, पदे व श्लोक यांतही त्याच्या पारमार्थिक अनुभवांचे उत्कट प्रकटीकरण आहे. एकनाथ, रामदास आणि तुकाराम यांच्या साहित्यसंस्कारांनी समृद्ध बनलेली दिनकराची वाणी स्फुट रचनेत स्वानुभवाचे नानाविध रंग लीलया व्यक्त करू शकते. त्याचा एक अभंग असा–

**पडो हें आकाश पृथ्वी जावो तळा।**
**परी तो जिव्हाळा न खंडे कीं ॥**
**न खंडे अखंड चिंतन देवाचें।**
**न चिंतितां वाचे चाले नाम ॥**
**चाले नाम नित्य अवस्थां वेगळें।**
**न जाय खंडलें कोण्हा काळें ॥**
**काळातीत नाम काळाचे अंतरी।**
**मशकाभीतरी नाम तेंचि ॥**
**नामें नामातीत दिनकर जाला।**
**विश्वासतां बोला सद्गुरूच्या ॥**

दिनकराला समर्थांचे फारसे सान्निध्य लाभलेले नसतानाही त्याने गुरुग्रंथांच्या अभ्यासाने व मननाने त्यांची शिकवण आत्मसात करून व तीत स्वानुभवाची भर घालून जी ग्रंथरचना केली, ती महाराष्ट्राच्या पारमार्थिक वाङ्मयात चिरकाल टिकून राहण्याच्या योग्यतेची आहे.

तिसगाव येथील मठ समर्थांच्या १४ प्रमुख मठांपैकी एक होता. तिथे हस्तलिखितांचा मोठा संग्रह होता.

दिनकरस्वामी हा अत्यंत नरिच्छ होता. अनेकांनी देऊ केलेल्या देणग्या आणि इनामे त्याने नाकारली. त्याचा मुलगा रामचंद्र याने पित्याकडूनच गुरूपदेश घेऊन समर्थ संप्रदायाची

सेवा केली व सीता-रामसंवाद हा ग्रंथ रचला. [ म. वा. इ. ३]

**दिनक्षयादिशांती** दिनक्षय, व्यतीपात, व्याघात, विष्टी, वैधृती, शूल, गंड, अतिगंड, परिघ, यम-घंट, कालदंड, मृत्युयोग, दग्धयोग, इ. अशुभ योगांवर मूल जन्मल्यास ते अशुभ समजले जाते. त्या दोषाच्या परिहारासाठी शांती करावी, असे सांगितले आहे. तिचा विधी असा – ग्रह व देवता यांचे पूजन करावे. शिवाला अभिषेक करावा. शिवमंदिरात तुपाचा दिवा लावावा. अश्वत्थाला प्रदक्षिणा कराव्या. ऋग्वेदातील आयुष्यवर्धक सूक्तांचा जप करावा. ग्रहयज्ञ करावा. शिशूसह त्याच्या माता-पितरांना अभिषेक करावा. ब्राह्मणभोजन घालावे. [ सं. कौ. ]

**दिनिकितिया** एक सूर्योपासक पंथ. हा पंथ द. भारतात प्रचलित होता, असे कळते. इ. स. च्या दहाव्या शतकाच्या अखेरीस अबुल फरज नावाचा एक अरब प्रवासी भारतात आला होता. त्याने या पंथासंबंधीची माहिती लिहून ठेवली आहे, ती अशी –

या पंथाचे अनुयायी सूर्याला देवदूतांचा राजा समजतात. त्याची रोज निरनिराळ्या प्रकारांनी तीनदा पूजा करतात. सूर्य देव चार अश्वांच्या रथात बसून गगनसंचार करतो व त्याच्या हातात अग्निवर्णाचा सूर्यकांत मणी असतो, असे हे समजतात. सूर्यपूजेच्या वेळी बासरी व इतर वाद्ये वाजवितात.

कुष्ठरोगी व इतर त्वचारोगाने गांजलेले लोक अनेक रात्री सूर्यमंदिरात राहून उपोषण करतात. योग्य वेळी देव त्यांच्या स्वप्नात येऊन त्यांना सांगतो, की 'तुझा रोग बरा झाला आहे व तुझी इच्छा पूर्ण झाली आहे.'

सूर्याचे कुष्ठरोगनिवारक सामर्थ्य सूर्योपासनेच्या क्षेत्रात सर्वत्र मानले जाते. [ न्यू इं. अँ., सप्टेंबर, १९३९ ]

**दियेरवटू** वडील भावाची बायको, पतीचा मृत्यू झाल्यास, देवराशी म्हणजे धाकट्या दिराशी पुनर्विवाह करू शकते. या प्रथातला गुजरातेत दियेरवटू असे म्हणतात. महाराष्ट्रातही बऱ्याच जातींत ही चाल आहे. तिला इतिहासाचा आधारही आहे. धाकट्याने थोरल्याच्या मागून त्याच्या स्त्रीला भोगल्याने थोरल्याची प्रतिष्ठा कमी होत नाही; पण धाकट्याच्या मागून थोरल्याने तसे करणे मात्र प्रशस्त नव्हे, असे महाभारतात म्हटले आहे (म. भा. आदि. २१३.३२). जेठाणी व देवर सामान्यतः समवयस्क असल्यामुळे पितृप्रधान एकत्र कुटुंबांत त्यांची मैत्री सहजपणे निर्माण होते आणि त्यामुळे अशा मैत्रीचे विवाहात रूपांतर होण्यात दोघांनाही काही अवघड वाटत नाही.

केरळमधील नंपूतिरि ब्राह्मणांतही ही चाल आहे. ते प्रथम त्या भागात गेले तेव्हा त्यांच्या बरोबर असलेल्या स्त्रियांची संख्या अल्प असल्यामुळे त्यांच्यांत ही प्रथा सुरू झाली. उ. भारतात आर्यांनी प्रथम वसाहती केल्या, तेव्हाही अशीच स्थिती असावी. ज्येष्ठाची पत्नी आर्या व इतरांच्या अनार्या असाव्या. आर्यांची लोकसंख्या वाढल्यानंतर ही प्रथा बंद झाली. त्यांचे अनुकरण करणाऱ्या काही मानवसमूहांत मात्र ती चालू राहिली. पाहा– दीर भावजय. [ सह्याद्रि; म. लो. सं. ]

**दिलरुबा** एक तंतुवाद्य. सतार आणि सारंगी यांच्या मिश्रणाने हे वाद्य बनवलेले आहे. हे बनवण्यासाठी भोपळ्याऐवजी एक लंबचौकोनी ठोकळा घेतात. हा ठोकळा सहा इंच जाडीचा असतो. त्याच्यावर कातडे ताणून बसवलेले असते. या कातड्यावर घोडी व घोडीवर चार मुख्य तारा ताणून



दिलरुबा

बसवतात. याशिवाय याला आणखी बावीस तारा असतात. ठोकळ्याला एका बाजूने अर्धचंद्राचा आकार दिलेला असतो. दिलरुब्याची लांबी सुमारे तीन फूट असते. सतारीसारखेच याही वाद्याला एकोणीस पडदे असतात. दिलरुबा वाजवण्यासाठी गज वापरतात. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**दिल्ली** भारताची राजधानी. ही इतिहासप्रसिद्ध नगरी अत्यंत प्राचीन असून, अनेक राजवंशांनी इथे आपली राजधानी ठेवून राज्य केले होते. पांडवांनी आपल्या ऐन तारुण्यात ही नगरी वसवली व तिला इंद्रप्रस्थ हे नाव दिले. पांडवांचा राजसूय यज्ञ याच नगरीत झाला व त्यांनी आपले स्वतंत्र राज्य इथेच स्थापले. स्थूल मानाने इंद्रप्रस्थ व हस्तिनापूर या प्राचीन नगरांचा समावेश दिल्लीमध्ये केला जात असे; पण ती समजूत बरोबर नाही. हस्तिनापूर हे ठिकाण दिल्लीपासून बरेच दूर आहे.

इतिहास – इंद्रप्रस्थ येथे पांडवांच्या वंशजांनी सुमारे १८५० वर्षे राज्य केले, असे कळते. त्यानंतर इ. स. च्या ८ व्या शतका-

पर्यंतचा या नगरीचा इतिहास उपलब्ध नाही. इ. स. ७३६ साली तोमर वंशातील अनंगपाळ नामक पुरुषाने या नगरीच्या भोवतालच्या प्रदेशावर राज्य स्थापले व इथेच आपली राजधानी केली. पुढे इ. स.च्या ११ व्या शतकात त्याच वंशातील दुसरा अनंगपाळ याने इंद्रप्रस्थापासून काही अंतरावर एक नवीन नगरी वसवली आणि तिच्या भोवती चांगली तटबंदी केली. इंद्रप्रस्थ नगरी नामशेष झालेली असल्यामुळे अनंगपाळाने वसवलेली नगरी हीच प्राचीन दिल्ली होय.

इ. स. च्या १२ व्या शतकात चाहमान वंशातील राजा विग्रहराज याने दिल्ली जिंकून घेतली व तिथे आपली सत्ता स्थापली. त्या वंशातील पृथ्वीराज हा दिल्लीचा शेवटचा राजपूत राजा ठरला, कारण १२ व्या शतकाच्या अखेरीस मुहंमद घोरीने त्याचा पराभव केल्यानंतर, घोरीचा सेनापती कुतुबुद्दीन ऐबक याने दिल्ली जिंकून तिथे लवकरच गुलाम घराण्याचे राज्य सुरू केले. त्यानंतर खिलजी, तुगलुक, सय्यद, लोदी व मोगल या मुसलमानी वंशांनी इ. स. १८५७ पर्यंत दिल्ली येथे राज्य केले. मोगल बादशहा हुमायून याच्या कारकीर्दीत इ. स. १५४० साली शेरशहा सूर याने दिल्लीवर आपली सत्ता स्थापली होती. १५५५ पर्यंत त्या अफगाण वंशाचे राज्य दिल्लीवर टिकले. पण नंतर हुमायूनने दिल्ली परत जिंकून घेतली. त्याच्या मृत्यूनंतर इ. स. १५५६ मध्ये हिमू नामक एका हिंदू वीर पुरुषाने सुमारे एक महिनाभर दिल्लीवर राजसत्ता गाजवली.

इ. स. १७७१ पासून इ. स. १८०३ पर्यंत दिल्लीवर मराठ्यांचे वर्चस्व होते. १८०३ मध्ये इंग्रजांनी मराठ्यांचा पराभव करून तिथे आपली सत्ता स्थापली. दिल्लीचा नामधारी मोगल बादशहा बहादुरशाहा १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात सामील झाल्यामुळे इंग्रजांनी त्याला पदच्युत करून दिल्लीची मोगल पातशाही नष्ट केली व भारतावर आपली सार्वभौम सत्ता प्रस्थापित केली.




१ जुने सचिवालय, २ दुसरा अशोकस्तंभ, ३ जंतरमंतर, ४ पहिल्या महायुद्धाचे स्मारक.

**नामकरण** – या नगरीला दिल्ली हे नाव कसे मिळाले,

नावाविषयी अनेक मते प्रचलित आहेत. मुसलमानी इतिहासकार फिरिस्ता याच्या ग्रंथाधारे जनरल कनिंगहॅम याने असे अनुमान केले आहे, की दिल्ली हे नाव सनपूर्व १ ल्या शतकातील मयूर-वंशी राजा दिलू याच्या नावावरून पडले असावे. पण तोमर वंशातील राजा अनंगपाळ याच्या संबंधात दिल्लीविषयीं एक दंतकथा आहे, ती अशी——

अनंगपाळाने दिल्ली येथील प्रसिद्ध लोहस्तंभ उभारला, तेव्हा एका ब्राह्मणाने त्याला सांगितले. 'या स्तंभाचे खालचे टोक शेषाच्या मस्तकाला जाऊन भिडले असल्यामुळे तो अगदी भक्कम झाला आहे आणि जोपर्यंत तो तसा राहील तोपर्यंत तुझे राज्य अक्षयी टिकेल.'

त्या ब्राह्मणवचनाची प्रचीती पाहण्यासाठी राजाने तो स्तंभ उपटून काढण्याची आज्ञा दिली. तसे करताच स्तंभाच्या मुळाला खरोखरच रक्त लागलेले दिसले. राजा चपापला. त्याने तो स्तंभ पुन्हा उभारण्यास सांगितले. पण त्या उभारणीत तो पूर्ववत पक्का झाला नाही; तर थोडा ढिलाच राहिला. ती लोखंडी लाट (स्तंभ) ढिली राहिली म्हणून त्या स्थानाला 'ढिल्ली' असे नाव प्राप्त झाले व ढिल्लीचेच पुढे दिल्ली बनले.

तोमर घराण्याच्या पूर्वीच दिल्ली हे नाव अस्तित्वात होते, यावरून वरील दंतकथा खरी वाटत नाही. काही जुन्या शिलालेखांत 'धिल्लिका' हे नाव आढळते. प्राचीन इंद्रप्रस्थाच्या जागी जे खेडेगाव आहे, त्यात यादव वंशातील धिल्लन जाट लोकांची बरीच वसती होती, त्यावरून या नगरीला धिल्ली हे नाव मिळाले, असेही म्हणतात.

टॉलेमीच्या ग्रंथात दैदल व इंद्रवर या दोन जवळजवळ वसलेल्या नगरांचा उल्लेख आहे. त्या नावांशी दिल्ली व इंद्रप्रस्थ या नावांचे बरेच साम्य आहे. त्यावरून दिल्ली हे नाव बरेच प्राचीन असावे, असे कित्येक पुरातत्त्ववेत्यांचे मत आहे.

**दिल्लीची उपनगरे** – इंद्रप्रस्थाच्या आसमंतात गेल्या सुमारे एक हजार वर्षांच्या कालावधीत जी नगरे निर्माण झाली, त्या सर्वांचा समावेश सांप्रतच्या दिल्लीत होतो.

**कुतुबनगर** – इ. स. च्या ११ व्या शतकात अनंगपाळाने जे नगर वसवले, ते सर्वांत जुने होय. त्याने नगराभोवती उभारलेला तट लालकोट या नावाने प्रसिद्ध आहे. त्याचा परीघ सव्वादोन मैल होता व भिंतीची उंची ६० फूट होती. त्याचा काही भाग अजून शाबूत आहे; पण बुरुज मात्र बहुतेक ढासळले आहेत. पुढे पृथ्वीराज चौहान याने त्याच लालकोटाभोवती दुसरा एक विशाल कोट बांधला, त्याला रायपिठोरा किल्ला म्हणतात. त्याची लांबी साडेचार मैल होती व त्याला दहा दरवाजे होते. या किल्ल्यात हिंदू, जैन व बौद्ध यांची मिळून २७ मंदिरे होती. पण ती आता छिन्न भिन्न अवशेषांच्या रूपाने उरली आहेत.

कुतुब मिनार हा विश्वविख्यात मनोरा याच उपनगरात उभा आहे. आणि त्याच्या जवळच कुतुब मशीद आहे. भारतात मुसलमानांची सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर लगेच बांधलेली ही पहिलीच मशीद होय. त्या जागी पूर्वी एक विष्णुमंदिर होते. पण कुतुबुद्दीन ऐबक याने इ. स. ११९५ साली त्याचेच रूपांतर मशिदीत केले. आसपासच्या २७ मंदिरांचे भाग तोडून या मशिदीच्या रचनेसाठी वापरले गेले आहेत. त्यामुळे तिथे सर्वत्र उत्कृष्ट हिंदू शिल्प व नक्षीकाम दृष्टीस पडते. ही वास्तू भव्य व सुंदर असून, तिला 'कुव्वत–उल्–इस्लाम' (इस्लामची शक्ती) असे दुसरे नाव आहे. या कुतुब मशिदीमुळे हा भाग कुतुबनगर म्हणून ओळखला जातो.

कुतुब मशिदीच्या म्हणजे विष्णुमंदिराच्या प्रांगणात उभा असलेला स्तंभ हा प्राचीन भारतीय कारागिरीचा अलौकिक



विष्णुस्तंभ – कुतुबनगर

नमुना आहे. काही पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या मते तो स्तंभ लोखंडाचा आहे; पण डॉ. भाऊ दाजी म्हणतात, की तो अनेक धातू एकत्र मिसळून त्या संयुक्त धातूचा बनवलेला आहे. त्याची एकूण उंची सुमारे २५ फूट आहे. त्यांपैकी ३ फुटांचा बुंधा जमिनीत पुरलेला आहे. लोखंडी कांबीच्या आठ कैच्या लावून तो भक्कम केलेला आहे, असे म्हणतात. त्याचा व्यास जमिनीजवळ १६ इंच आणि वरच्या टोकाशी १२ इंच आहे. हा एक विष्णुस्तंभ असून, त्याच्या शिरोभागी पूर्वी गरुडाची प्रतिमा होती. त्याच्या गुळगुळीत मध्यभागावर काही संस्कृत श्लोक कोरलेले आहेत. त्यांत कोण्या एका चंद्र नामक राजाची कीर्ती गायिलेली असून, त्याने हा विष्णुध्वज विष्णुपद नामक गिरीवर उभारला, असे म्हटले आहे. हा चंद्र राजा म्हणजे चंद्रगुप्त

विक्रमादित्य ( इ. स. ३८० – ४१३ ) असावा, असे अनुमान काही पंडितांनी केले आहे.

मशिदीच्या प्रांगणाला जो भव्य व सुंदर दरवाजा आहे, त्याचे नाव अलाई दरवाजा. तो अलाउद्दीन खिलजीने बांधला. त्यावरील नक्षीकाम फारच प्रेक्षणीय आहे. मशिदीच्या वाहे-



अलाई दरवाजा – कुतुबनगर

रच्या अंगाला वायव्य कोपऱ्याजवळ इल्तमश याचा मकबरा आहे. तो सुलताना रज़िया हिने इ. स. १२३६ साली बांधला. त्याच्या रचनेत हिंदू पद्धतीचे सुंदर शिल्पकाम दृष्टीस पडते.

कुतुब मिनारापासून सुमारे २५० यार्ड अंतरावर योगमायेचे मंदिर आहे. ते लाला सिद्धुमल याने इ. स. १८२७ साली बांधले. त्याला चार बुरुज असल्यामुळे ते किल्ल्यासारखे दिसते. कुतुब मिनारापासून सुमारे दीड मैल अंतरावर नैर्ऋत्य दिशेला शेख कुतुबुद्दीन बख्तियार काकी याचा दरगा आहे. तो सुलतान इल्तमश याने बांधला. त्या जागी मोगल वंशातील काही व्यक्तींच्या कबरीही आढळतात.

सिरी– अलाउद्दीन खिलजीने इ. स. १३०४ च्या सुमारास कुतुबनगराच्या ईशान्येला ३ मैलांवर सिरी नावाचे एक शहर वसवले होते. ते वर्तुळाकार असून, त्याच्या भोवती भक्कम तट होता. त्या तटाच्या जाड भिंतींचे व त्यातील नगराचे काही अवशेष आजही तिथे दृष्टीस पडतात. त्या भागाला सांप्रत शाहपूर म्हणतात.

सिरीच्या पश्चिम सीमेजवळ हौज–इ–खास नावाचा एक विशाल तलाव होता. त्याचे क्षेत्रफळ ७० एकर होते. तो तलाव अलाउद्दीन खिलजीने इ. स. १२९५ साली बांधला व फीरुज़शाह तुघलुक याने इ. स. १३४४ मध्ये त्याचा जीर्णोद्धार केला. आता मात्र तो कोरडा पडला, असून त्याजागी शेती केली जाते. जवळच फीरुजशाहाची कबर दृष्टीस पडते. सिरीनगराच्या पूर्वेला दिल्लीपासून सुमारे आठ मैलांवर काली देवीचे मंदिर आहे. ते इ. स. १७६४ साली बांधले, असे कळते. इथे चैत्र व आश्विन शु. अष्टमीला मोठी जत्रा भरते.

तुगलुकाबाद – हे दिल्लीचे तिसरे उपनगर. हे गियासुद्दीन तुगलुक याने इ. स. १३२१ मध्ये वसवले. हे कुतुब मिनाराच्या पूर्वेला ४ मैलांवर आहे. हे नगर म्हणजे एक अष्टकोणाकृती किल्ला असून, त्याचा घेर ४ मैलांचा आहे. हा किल्ला एका विशाल खडकावर बांधलेला असून, त्याच्या भिंती खूप जाड व मजबूत आहेत. किल्ल्यापासून जवळच गियासुद्दीनाची गढीसारखी दिसणारी प्रेक्षणीय कबर आहे.

तुगलुकाबादजवळ अदिलाबाद नावाचा लहान किल्ला आहे. तो मुहंमद तुगलुकाने इ. स. १३२७ मध्ये बांधला. त्याच वर्षी त्याने कुतुब व सिरी या नगरांभोवती सुमारे ५ मैल लांबीचा व ३६ फूट जाडीचा कोट बांधून एक नवे नगर वसविले व त्याल जहाँपनाह ( विश्वरक्षक ) असे नाव दिले. त्याला एकूण १३ दरवाजे होते हे राजधानीचे चौथे उपनगर होय. याचे फारच थोडे अवशेष आता शिल्लक आहेत. त्यांतील विजयमंडळ नावाची उंच गढी, सथपला नावाचा मोठा पूल व एक सुंदर मशीद ही शिल्पकामे विशेष उल्लेखनीय आहेत.



फीरुजशाहाची कबर

फीरुज़ाबाद– फीरुज़शाहा तुगलुक याने इ.स. १३५५ साली बांधलेले हे नगर कुतुबच्या उत्तरेला ८ मैलांवर यमुनेच्या तीरापासून पश्चिमेला लांबवर पसरलेले होते. त्याच्या पूर्व भागात फीरुजशाहाने बांधलेला कोटला–फीरुजशाह नामक किल्ला अजून पाहायला मिळतो. त्याची लांबी अर्धा मैल व

रुंदी पाव मैल असून, त्याला काही भक्कम बुरुजही आहेत. त्या किल्ल्यात आता फीरुज़शाहाचा राजवाडा, जामीमशीद



अशोकस्तंभ – कोटला फीरुजशाहा

व एका तिमजली गढीवर उभारलेला अशोकस्तंभ एवढयाच गोष्टी उरल्या आहेत. हा अशोकस्तंभ फीरुज़शाहाने अंबाला जिल्ह्यातील टोपरा नामक गावाहून आणला. त्याची उंची ४२ फूट असून, तो तांबूस व सोनेरी पाषाणाचा बनवलेला आहे. त्याच्या चमकदार पृष्ठभागावर पाली भाषेतील काही वाक्ये कोरलेली दिसतात.

फीरुज़शाहाने मीरतहून दुसरा एक अशोकस्तंभ आणून फीरुज़ाबादच्या उत्तरेला एका टेकडीवर उभा केला होता. तोही अजून तिथे पाहायला मिळतो.

पुराणा किल्ला – प्राचीन इंद्रप्रस्थ नगरीच्या जागी सांप्रत इंद्रपत नावाचे खेडे असून, तिथे एक प्रचंड किल्ला आहे.



पुराणा किल्ला – दिनपनाह

त्याला पुराणा किल्ला असे म्हणतात. हा हुमायून बादशाहाने इ. स. १५३३ साली बांधला. त्याचा घेर सुमारे एक मैल आहे. त्या किल्ल्यातील इमारती शेरशाहा सूर याने बांधल्या, असे म्हणतात. त्यातील किल्ला-कोना मशीद व शेरमंडळ नावाचा महाल, या दोन इमारती फार प्रेक्षणीय आहेत. किल्ला-कोना मशीद इ. स. १५४० साली शेरशाहाने बांधली. ती तांबूस व संगमरवरी पाषाणाची असून, तिचे शिल्पकाम फार मनोहर आहे. तिच्या शिरोभागी एक मोठा घुमट आहे.

पुराणा किल्ल्याच्या उत्तरेला लाल दरवाजा नावाचा एक जुना व भक्कम दरवाजा आहे. आणि किल्ल्याच्या दक्षिणेला सुमारे एक मैल अंतरावर हुमायून बादशहाची कबर आहे. ही कबर हमिदा बानू बेगम हिने बांधली. हमिदा बानू व राजघराण्यातील कित्येक पुरुष यांच्या कबरीही तिथेच आहेत. या कबरी ज्या इमारतीत आहेत, ती मोगल शिल्पकलेचा प्रारंभीच्या काळातला उत्कृष्ट नमुना म्हणून प्रसिद्ध आहे. ती चौकोनी असून, तिच्यावर एक मोठा घुमट आहे. त्याच्या चारही बाजूंना चार अष्टकोनी मनोरे आहेत. भव्यपणा व साधेपणा यांमुळे ही कबर फार आकर्षक वाटते. तिच्या रचनेवरूनच ताजमहालाची रचना केली गेली, असे म्हणतात.

पुराणा किल्ला व त्याच्या भोवतालचा प्रदेश हे अर्वाचीन राजधानीचे सहावे उपनगर होय. त्याचे नाव दिनपनाह असे होते. हुमायून व शेरशहा यांची राजधानी इथेच होती.

हुमायुनाच्या कबरीच्या नैर्ऋत्येला सुमारे २ फर्लांग अंतरावर गियासपूर गावी शेख निजामुद्दीन अवलियाचा दरगा आहे. मुहंमदशहा तुगलुक याने त्यातली मुख्य कबर बांधली व बाकीचा भाग फीरुज़शाहाने बांधला. हा दरगा प्रेक्षणीय असून, मुसलमानांचे हे अत्यंत पवित्र क्षेत्रही आहे. दर वर्षी तिथे मोठी यात्रा जमते. या दरग्यात जमातखाना नावाची एक सुंदर मशीद आहे, ती अलाउद्दीन खिलजीचा मुलगा खिजरखान याने बांधली, असे म्हणतात. जवळच एक कुंड आहे. त्यातील पाणी रोगहारक व भूतबाधा नष्ट करणारे आहे, अशी भाविकांची श्रद्धा आहे. निजामुद्दीनच्या कबरीजवळच राजघराण्यातील अनेक व्यक्तींची थडगी दिसतात.

शहाजहानाबाद – शहाजहान बादशहाची राजधानी प्रारंभी आग्रा येथे होती. पण ती लहान वाटू लागल्यामुळे त्याने यमुनेच्या पश्चिम तीरावर, फीरुज़ाबादच्या उत्तरेला राजधानीसाठी हे नवे शहर वसवले व त्याला शहाजहानाबाद असे नाव दिले. त्याच्या एका बाजूला यमुना नदी असून, इतर तीन्ही बाजूंना एक मोठा कोट आहे. त्याची शहाजहानने बांधलेली विटांची भिंत आता नष्ट झाली आहे. त्याचा दगडी कोट इ. स. १८०३ मध्ये इंग्रजांनी बांधलेला असून, त्या कोटाला दहा दरवाजे ठेवले आहे. काश्मीरी दरवाजा, लाहोरी दरवाजा, अज-

मीरी दरवाजा, तुर्कमान दरवाजा व दिल्ली दरवाजा हे त्यांतील मुख्य दरवाजे होत. सांप्रतच्या राजधानीचे हे सातवे उपनगर असून, त्यालाच दिल्ली असे म्हणतात.



हुमायून बादशहाची कबर

लाल किल्ला– दिल्लीतील लाल किल्ला व त्यातील राजमहाल शहाजहान बादशहाने बांधले व ते बांधकाम पुरे व्हायला २० वर्षे लागली, असे म्हणतात. लाल किल्ला शहराच्या ईशान्य कोपऱ्यात, नदीकाठी असून, त्याच्या तटाचा घेर १।। मैल आहे. नदीच्या बाजूचा तट ६० फूट उंच व इतर बाजूंचा ७५ फूट उंच आहे. किल्ल्याभोवती ७५ फूट रुंद व ३० फूट खोल असा खंदक होता; पण तो आता बुजवून टाकलेला आहे. पूर्वी या किल्ल्याला 'किला–ए–मुबारक' व 'किला–ए–मुअल्ला' अशी नावे होती.

किल्ल्याच्या पश्चिम बाजूच्या तटात एक भव्य दरवाजा आहे, त्याचे नाव लाहोरी दरवाजा. त्याच्या शिरोभागी दोन्ही बाजूंना एक एक मनोरा व छत्रीदार बुरुज असून, मध्यभागी सात लहान संगमरवरी बुरुज आहेत. दुसरा दरवाजा दक्षिण बाजूच्या तटात, प्राचीन दिल्लीला सन्मुख असल्यामुळे त्याला दिल्ली दरवाजा म्हणतात. याच्या आतील अंगाला दोन प्रचंड दगडी हत्ती उभे आहेत. हे दोन्ही दरवाजे अतिशय मजबूत व प्रेक्षणीय आहेत.

लाहोरी दरवाज्यातून लाल किल्ल्यात शिरताच एक रुंद रस्ता लागतो, त्याला छत्ता चौक म्हणतात. त्याच्या शेवटी प्रशस्त गोलाकार हिरवळ असून, पुढे नौबतखाना दृष्टीस पडतो. त्याच्या पलिकडे दिवाण-इ-आम हा भव्य दरबारमहाल आहे. हा महाल लाल दगडांच्या ४ फूट उंच चवुतऱ्यावर उभा आहे. त्याच्या दर्शनी भागात व अंतर्भागातही सर्वत्र सुंदर कमानी दृष्टीस पडतात. त्या सर्व कमानी सुमारे चाळीस भव्य स्तंभांवर आधारलेल्या असून, त्यांच्या रांगांमुळे महालाचे तीन विभाग झाले आहेत. हा सर्व महाल लाल पाषाणाचा बांधलेला असून, त्यावर अस्मानी रंगाचा चमकदार मुलामा केलेला होता व त्यावर सुंदर पुष्पे कोरलेली होती. पण हा मुलामा आता बहुतेक नाहीसा झाला आहे.

या महालात जागोजागी ऐतिहासिक प्रसंगांची सुंदर चित्रे काढलेली होती. अजूनही त्यांतली काही पाहायला मिळतात.

दिवाण-इ-आमच्या एका कडेच्या भिंतीजवळ मध्यभागी १० फूट उंचीचा एक संगमरवरी चौथरा असून, त्यावर शुभ्र स्फटिकवत पाषाणाची अतिशय सुरेख मेघडंबरी आहे. त्या चौथऱ्यावर विशेष समारंभाच्या प्रसंगी मयूरसिंहासन मांडले जात असे.

दिवाण-इ-आमच्या मागील बाजूस रंगमहाल नावाची अत्यंत सुंदर इमारत आहे. पूर्वी तिथे बादशाही जनानखाना होता. या महालात सर्वत्र सुंदर वेलपत्तीचे नक्षीकाम केलेले असून, त्यात भिन्न रंगांचे व विविध फुलांच्या आकाराचे खडे बसविले आहेत, म्हणून याला रंगमहाल हे नाव मिळाले.



दिवाण-इ-आममधील तख्ताची जागा

रंगमहालाच्या एका बाजूला सुप्रसिद्ध दिवाण-इ-खास हा महाल दिसतो. दिवाण-इ-आम सारखाच हा मोकळा दरबारमंडप आहे. दोन्ही महालांची छपरे सपाट असून, त्यांच्या चारही कोपऱ्यांवर सुरेख घुमट्या आहेत. दिवाण-इ-खास मध्येही पुष्कळ स्तंभ व कमानी आहेत. त्यात एक विस्तीर्ण सभागृह व एक संगमरवरी चौथरा आहे. तिथे मयूरसिंहासन नेहमी ठेवलेले असे. हा महाल स्फटिकासारख्या शुभ्र पाषाणांचा असून, त्याच्या

आतील स्तंभ व कमानी यांवर रंगमहालाप्रमाणेच सुंदर नक्षीकाम केलेले आहे.



दिवाण-इ-खास

दिवाण-इ-खासपासून जवळच बादशहाचा खास महाल व स्नानगृहे आहेत. खास महालाचे तस्वीह खाना व ख्वाब गाह असे दोन भाग असून, त्यांच्यामधील जाळीदार दरवाज्यावर न्यायतुलेचे सोनेरी चित्र काढलेले आहे. या सर्व इमारती फार प्रेक्षणीय आहेत. तिथेच एका बाजूला औरंगजेबाने बांधलेली मोती मशीद आहे. ही वास्तू म्हणजे शिल्पकामातील एक अप्रतिम रत्न आहे. ही मशीद लहान, पण टुमदार असून, तिच्यावर साधे, पण सुबक नक्षीकाम केलेले दिसते.

लाल किल्ल्यापासून जवळच ईशान्य दिशेला यमुनेच्या पात्रात मातीचा ओबडधोबड, पण भव्य असा किल्ला दिसतो. शेरशहाचा मुलगा सलिम याने तो इ. स. १५४६ मध्ये बांधला. त्यावरूनच त्याला सलिमगड असे नाव मिळाले. राजघराण्यातील अनेक पुरुष व अनेक सरदार यांना या किल्ल्यात बंदिवास भोगावा लागला, अशी त्याची ख्याती आहे.



रंगमहालाचा अंतर्भाग

लाल किल्ल्याच्या नैऋत्येला सुमारे २ फर्लांग अंतरावर जी भव्य मशीद दृष्टीस पडते, तिला जुम्मा मशीद किंवा जामा मशीद असे म्हणतात. ही मशीद एका उंच खडकावर बांधलेली असून, तिथपर्यंत चढायला सभोवती मोकळ्या पायऱ्या आहेत. तिच्या परकोटाला उत्तर, दक्षिण व पूर्व या तीन दिशांना प्रवेशद्वारे आहेत. पूर्वेकडील दरवाजा सर्वांत मोठा आहे. त्याला बादशाही दरवाजा म्हणतात.

दरवाजातून आत शिरल्यावर एक प्रशस्त पटांगण लागते. त्याच्या मधोमध संगमरवरी दगडाचा एक मोठा हौद आहे. पश्चिम बाजूला तांबूस पाषाणाची मुख्य इमारत असून, तिच्या दर्शनी भागात मधोमध एक भव्य कमान व तिच्या दोन्ही बाजूंना ५।५ लहान कमानी आहेत. दोन्ही टोकांशी १३० फूट उंचीचे चारमजली मनोरे व शिरोभागी तीन शुभ्र संगमरवरी घुमट आहेत. मशिदीच्या आतील भागात एक प्रशस्त दालन व आणखी काही कमानी असून, दालनाच्या एका भागात सुरेख जाळीकाम केलेले आढळते. तिथे कुराणाच्या तीन जुन्या प्रती, महंमद पैगंबराच्या चर्मपादुका, त्याच्या दाढीचे केस वगैरे वस्तू ठेवलेल्या आहेत.



लाहोरी दरवाजा – लाल किल्ला

लाल किल्ल्याच्या लाहोरी दरवाज्यापासून पश्चिमेकडे फत्तेपुरी मशिदीपर्यंत जो प्रशस्त रस्ता जातो, त्याला चांदणी चौक म्हणतात. त्याची लांबी सुमारे ¾ मैल व रुंदी १५० फूट आहे. शहाजहानाची मुलगी जहांनारा बेगम हिने हा सुंदर रस्ता बनविला, असे म्हणतात. त्याच्या दोन्ही बाजूंना असलेली गर्द वृक्षराजी आणि मधून वाहणारा जलप्रवाह यांमुळे हा रस्ता अत्यंत मनोहर दिसत असे. चांदणी चौक म्हणजे चांदीचा बाजार. या रस्त्यावर जवाहिऱ्यांची दुकाने होती व अजूनही आहेत. या रस्त्यावरील जुनी कोतवाली, रोषनउद्दौल्याची मशीद किंवा सोनेरी मशीद, फत्तेपुरी मशीद व गौरीशंकराचे मंदिर ही ऐतिहासिक स्थळे फार प्रेक्षणीय आहेत.

जुम्मा मशिदीपासून काही अंतरावर धर्मपुऱ्यात एक जैन मंदिर असून, त्यात आदिनाथाची मूर्ती आहे. त्याचा सभामंडप संगमरवरी पाषाणाचा असून, आतील नक्षीकाम व सजावट फार सुरेख आहे. लाल किल्ल्यासमोरही एक जैन मंदिर आहे. त्याला लालमंदिर म्हणतात.



मोतीमशीद – लाल किल्ला

शहाजहानाबादच्या दक्षिण तटातील तुर्कमान दरवाज्याजवळ एक साधी, टुमदार मशीद आहे. ती काळ्या पाषाणांची असल्यामुळे तिला काळी मशीद असे म्हणतात. ही फीरुज़शाहा तुगलकाचा वजीर खानजहान याने इ. स. १३८६ साली बांधली. तिच्या कमानी व अर्धगोलाकृती शिरोभाग यांची रचना विलक्षण असून, तिचे दगड काही अद्‌भुत प्रकारच्या चुन्यात बसवलेले आहेत.

दिल्लीच्या अजमीरी दरवाज्यापासून दक्षिणेला सुमारे १ मैल अंतरावर असलेली जंतरमंतर ही जुनी वेधशाळा जयपूरचा राजा सवाई जयसिंह याने इ. स. १७२४ मध्ये त्या वेळचा बादशाहा महंमदशाहा याच्या विनंतीवरून निर्माण केली. तिथली सम्राटयंत्र, रामयंत्र, जयप्रकाशयंत्र, इ. वेधसाधने फार प्रेक्षणीय आहेत.

कुतुब मिनारच्या उत्तरेला ५ मैल अंतरावर एका सुंदर बगिचात सफ़दरजंगाचा मकबरा आहे. त्याचा पुत्र अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला याने तो इ. स. १७५३ साली बांधला. याच्या शिरोभागी एक मोठा घुमट असून, त्याची एकूण उंची ९९ फूट आहे. त्याचा आतील भाग निरनिराळ्या रंगांच्या पाषाणांनी विभूषित केलेला दिसतो.

नवी दिल्ली– इ. स. १८५७ मध्ये इंग्रजांनी नामधारी मोगल पातशाहीची राजधानी असलेली दिल्ली आपल्या ताब्यात घेतली; पण त्यांनी आपली राजधानी कलकत्ता येथेच ठेवली होती. इ. स. १८७७ व १९०३ साली त्यांनी जे मोठे दरबार भरविले, ते मात्र दिल्लीमध्ये भरवले. पुढे इ. स. १९११ साली पंचम जॉर्ज याच्या राज्यारोहणानिमित्त दिल्ली येथे दरबार भरला असता, त्या प्रसंगी दिल्ली ही राजधानी म्हणून घोषित करण्यात आली.

शहाजहानाबादच्या दक्षिणेला रैसिना नावाचे गाव होते, त्याच्या भोवतालच्या प्रदेशात ही नवी राजधानी वसवली गेली आहे. या नव्या दिल्लीतल्या मुख्य इमारती भव्य व सुंदर असून, त्या बांधण्यासाठी भरतपूर, जोधपूर, बडोदे, जैसलमीर, कोटा, इ. संस्थानांतून सुमारे एक लक्ष घनफूट रंगीबेरंगी संगमरवरी पाषाण आणण्यात आला होता. नव्या दिल्लीची रचना प्रमाणबद्ध व आकर्षक आहे. जागोजाग हिरवी मैदाने व नयनमनोहर उद्याने आहेत. राजरस्तेही प्रशस्त आहेत.

इ. स. १९३१ च्या फेब्रुवारी महिन्यात या नवीन राजधानीचे उद्‌घाटन झाले. तिच्या मध्यभागी व्हाइसरॉयचा भव्य राजवाडा (सांप्रतचे राष्ट्रपतिभवन), संसद्‌भवन, मुख्य न्यायमंदिर व सरकारी कार्यालय असून, भोवती इतर सरकारी इमारती आहेत. त्यांतील राष्ट्रपतिभवन ही वास्तू सर्वांत सुंदर आहे. ३३० एकर क्षेत्रफळ असलेल्या विस्तीर्ण बगिच्यात हे



जुम्मामशीद – शहाजहानाबाद

भवन बांधलेले असून, त्यासाठी शुभ्र व लाल रंगाचे दगड आणि विविध प्रकारचे संगमरवरी पाषाण वापरले आहेत. इथून जवळच गुरू तेगबहादर याची समाधी आहे.

राष्ट्रपतिभवनापासून थोड्या अंतरावर भव्य व सुंदर असे सचिवालय दृष्टीस पडते. त्याचे दोन भाग असून, प्रत्येकाच्या शिरोभागी एक मोठा घुमट दिसतो. या घुमटांची जमिनी-

पासूनची उंची २१७ फूट आहे. या इमारतीचा आतील भाग नाना प्रकारची सुरेख चित्रे काढून सजवलेला आहे.

संसद्भवनही अत्यंत भव्य व प्रेक्षणीय आहे. ते पूर्ण वर्तुळाकार असून, त्याच्या दर्शनी भागात २७ फूट उंचीचे १४४ गुळगुळीत स्तंभ उभारलेले आहेत व शिरोभागी ९८ फूट व्यासाचा घुमट बांधलेला आहे.

राष्ट्रपतिभवनाच्या उत्तरेस सुमारे दीड मैल अंतरावर श्रीमान जुगल किशोर बिडला यांनी बांधलेली मंदिरे दृष्टीस पडतात. त्यांत मध्यभागी लक्ष्मीनारायणमंदिर, उजव्या बाजूला शिवमंदिर, डाव्या बाजूला दुर्गामंदिर व मागील बाजूस बौद्ध विहार आहे. त्यातले लक्ष्मीनारायणमंदिर अत्यंत सुंदर आहे. त्याच्या जवळच गीताभवन असून, त्यावर श्रीकृष्णाची सुरेख मूर्ती बसवलेली आहे. राष्ट्रपतिभवनाच्या पश्चिमेला सुमारे एक मैल अंतरावर एका टेकडीवर बुद्धजयंतीस्मारक उद्यान निर्माण करण्यात आले आहे. तेही फार प्रेक्षणीय आहे.

शहाजहानाबादच्या पूर्वेला यमुनेच्या तीरावर, फीरुजशाहा कोटलापासून २–३ फर्लांग अंतरावर राजघाट येथे महात्मा गांधींची समाधी आहे. तिथून जवळच शांतिवन नावाचे पं. जवाहरलाल नेहरूंचे स्मारक आहे.

याव्यतिरिक्त दिल्लीमध्ये दिल्ली विद्यापीठ (जुने व्हाइसरीगल लॉज), जुने सचिवालय, रोशनारा बाग, क्रांतिस्मारक,



संसदभवन – नवी दिल्ली

कुडशिया बाग, काश्मीरी दरवाजा, सेंट जेम्स चर्च, राणीचा बाग, नॅशनल फिजिकल लॅबोरेटरी, हनुमानमंदिर, कोनॉट प्लेस, विजय चौक, विज्ञानभवन, पहिल्या महायुद्धाचे स्मारक, इ. प्रेक्षणीय स्थळेही बरीच आहेत. गेल्या १००० वर्षांच्या कालखंडात या प्रदेशावर राज्य करणाऱ्या अनेक व्यक्तींनी आपापल्या संस्कृतींची जी विविध प्रकारची शिल्परूपी स्मारके उभारून ठेवली, ती या विशाल राजधानीच्या परिसरात कत्र पाहायला मिळतात. दिल्लीची अतिप्राचीनता आणि बहुरूपता यांमुळे ती साऱ्या जगात अद्वितीय गणली जाते.

[ दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ– श्री. द. ब. पारसनीस, १९१२; देहली– प्रका. कपूरचंद प्रकाशचंद, दिल्ली; देल्ही अँड इट्स मॉन्युमेंट्स– श्री. सुरेंद्रनाथ सेन, १९४८; म. ज्ञा. को. ]

**दिल्ली पोलासी** द. भारतातील एक ग्रामदेवता. ही घरातही पुजली जाते. हिचे स्वरूप सौम्य असून, पूजा घरगुती स्वरूपाची असते. [ लो. सा. रू. ]

**दिव** विश्वाचा एक भाग. सामान्यपणे आकाशाला ही संज्ञा आहे. ऋग्वेदात पृथ्वी, अंतरिक्ष व दिव असे विश्वाचे तीन भाग कल्पिले आहेत (८.६.१५). ऋग्वेदातच अन्यत्र एका ठिकाणी पृथ्वी व दिव (स्वर्ग) एकमेकांकडे तोंड करून ठेवलेल्या दोन वाटया आहेत, असेही वर्णन आढळते (ऋ. ३. ५५.२०) पाहा – स्वर्ग. [ वे. इं.; म. ज्ञा. को. ]

**दिवस** सामान्यपणे एका सूर्योदयापासून लगतच्या दुसऱ्या सूर्योदयापर्यंत जो काळ जातो, त्याला दिवस म्हणतात. यात दिन व रात्र या दोहोंचाही समावेश असतो. प्राचीन काळी यज्ञयागासाठी या पद्धतीने दिवस मोजीत असत, म्हणून याला सावन (सवनाला अर्थात सोमरस गाळण्याला अनुलक्षून असलेला) दिवस म्हणत. पण सूक्ष्म अवलोकनाच्या दृष्टीने सूर्योदय किंवा सूर्यास्त हे दोन्ही क्षण सोयीचे नसल्यामुळे प्राचीन गणितशास्त्रात मध्यान्हापासून मध्यान्हापर्यंत किंवा मध्यरात्रीपासून मध्यरात्रीपर्यंत एक दिवस मानण्याची प्रथा निर्माण झाली. अशा दिवसाला सौर दिवस म्हणतात. मात्र हा कालावधी नेहमी समान असतोच, असे नाही. सूर्यमार्ग पृथ्वीच्या विषुववृत्ताशी कललेला आहे. म्हणून भूगोलाच्या विषुववृत्तावर एक काल्पनिक सूर्य स्थापून त्याच्या सरासरी गतीने दिवसाचे जे कालमान ठरते, त्याला मध्यम-सौर दिवस म्हणतात. हाच सांप्रत नेहमीच्या व्यवहारात वापरला जातो.

**नाक्षत्र दिवस–** एकदा एक तारा मध्यमंडळात दिसल्यापासून पुन्हा तो तिथेच दिसेपर्यंत जो कालावधी होतो, त्याला नाक्षत्र दिवस म्हणतात. परंतु एखादा तारा मध्यमंडळात दिसण्याची वेळ प्रतिदिन थोडी थोडी बदलत जाते व त्यामुळे तो तारा क्रमाने सकाळी, दुपारी, सायंकाळी व रात्री तिथे दिसतो. पुन्हा त्याच वेळी मध्यमंडळात येण्यास त्याला सुमारे एक वर्षाचा काळ लागतो. त्यामुळे नक्षत्रावरून दिवस मोजणे व्यवहाराला गैरसोयीचे ठरते. म्हणूनच ज्योतिषशास्त्रात केवळ सूक्ष्म कालमापनासाठी नाक्षत्र पद्धती वापरतात. पंचांगांची रचना करताना हा नाक्षत्र दिवसच प्रमाणभूत मानलेला असून, तदनुसार

घटिका, पळे इ. कालमानाचे गणित केलेले असते.

**दिनविभाग** – प्राचीन काळापासून दिनविभाग करण्याच्या अनेक पद्धती प्रचलित आहेत. संस्कृतात दिन या शब्दाला अह हा प्रतिशब्द आहे. ऋग्वेदात रात्रीला कृष्ण अह व दिवसाला अर्जुन अह असे म्हटलेले आहे. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतच्या दिवसाचे पूर्वाह्ण व अपराह्ण, असे दोन भाग केलेले आहेत; तर काही ठिकाणी प्रातःकाल, मध्याह्न व सायंकाल अशी विभागणी आहे. बारा तासांच्या दिवसाचे प्रातः, संगव, मध्याह्न, अपराह्ण, सायाह्न, (सायं) असे पाच विभाग करण्याचीही प्रथा आहे. हा प्रत्येक विभाग तीन मुहूर्तांचा असतो. (१ मुहूर्त = २ घटिका) स्मृतींनी दिवसाचे आठ भाग मानलेले आहेत. कौटिल्यानेही दिवस व रात्र यांचे प्रत्येकी आठ भाग कल्पिले आहेत. [ हि. ध.; पं. ज्यो. ]

## दिवाकरव्रत

हस्त नक्षत्र असलेल्या रविवारी या व्रताचा प्रारंभ करतात. हे व्रत सात रविवारी करायचे असते. या व्रताचा विधी असा –

जमिनीवर बारा पाकळ्या असलेले एक कमल काढतात. त्या बारा पाकळ्यांना प्रत्येकी सूर्य, दिवाकर, विवस्वान, भग, वरुण, इंद्र, आदित्य, सवितृ, अर्क, मार्तंड, रवी व भास्कर अशी नावे देतात. नंतर त्यांची वैदिक मंत्राने पूजा करतात. फल – सामर्थ्य, तेज व समृद्धी यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

## दिवाकीर्त्य

पितरांचा एक वर्ग. दर मासाच्या शुद्ध प्रतिपदेला यांचे श्राद्ध करावे, असे पुराणांत सांगितले आहे. या पितरांच्या दृष्टीने कृष्ण पक्ष हा दिवस आणि शुक्ल पक्ष ही रात्र असते (वायू पु. ५६·२१). [ पु. इं. ]

## दिवाळीनृत्य

हे नृत्य बुंदेलखंडात आणि महाराष्ट्रातील ठाकूर व कातकरी लोकांत दिवाळीच्या मोसमात होते, म्हणून याला दिवाळी नृत्य असे म्हणतात. महाराष्ट्रात कार्तिकस्वामीच्या प्रसन्नतेसाठी हे नृत्य करतात. हे नृत्य जिथे व्हायचे असेल, तिथे आजूबाजूच्या खेड्यांतील लोक गटा-गटाने जमा होतात आणि नाचात भाग घेतात. नाचताना म्हटली जाणारी गाणी कूटात्मक असतात. एका गटाने गाण्याच्या रूपात कोडे घातले, की दुसऱ्या गटाने त्याचे उत्तर द्यायचे असते. ज्या गटाला उत्तर देता येत नाही, तो गट पराभूत झाला, असे समजतात. या कूटस्पर्धांत विजयी होणाऱ्या गटाला गावकऱ्यांकडून मानाचे शेला-पागोटे मिळते. त्यासाठी सर्वांकडून वर्गणी जमा करतात.

बुंदेलखंडात या नृत्याचा संबंध शौर्याशी व कृषिजीवनाशी जोडला जातो. तिथे कूटात्मक सवाल-जबाब होतातच असे नाही. नाचात भाग घेणारे सर्व लोक विशिष्ट रंगाचे कपडे परिधान करतात, कमरेला घुंगराचा पट्टा बांधतात आणि हातात लहान लहान काठ्या घेऊन नाचतात. रात्रीच्या वेळी सुरू झालेले हे नृत्य सकाळी सूर्य बराच वर येईपर्यंत चालते. [ भा. लो. नृ.; उ. प्र. लो. ]

## दिव्य

सत्यासत्य – निर्णयाची एक प्राचीन पद्धती. सत्य ज्याच्या बाजूचे आहे, तो जलात बुडत नाही, त्याला अग्नी जाळीत नाही आणि विषही बाधत नाही अशी पूर्वकालीन लोकांची श्रद्धा होती. त्यामुळे खऱ्याखोट्याचा निर्णय करण्यासाठी अग्नी, विष इत्यादींचा वापर करण्याची प्रथा जगातील अनेक देशांत रूढ झाली. भारतात तर वेदकाळापासूनच दिव्यांचे उल्लेख आढळतात.

जेव्हा लेखी अथवा तोंडी पुरावा उपलब्ध होत नसे, तेव्हाच दिव्याचा उपयोग करीत. प्रमुख दिव्ये आणि त्यांच्या वापराचे प्रसंग शास्त्रकारांनी सांगितले आहेत, ते असे –

तुलाग्न्यापो विषं कोशो दिव्यानीह विशुद्धये ।
महाभियोगेष्वेतानि शीर्षकस्थेऽभियोक्तरि ।।

( याज्ञ. ७.९५ )

अर्थ – तुला, अग्नी, जल, विष व कोश ही पाच दिव्ये शुद्धीकरता म्हणजे संदिग्धतेची निवृत्ती करण्याकरिता द्यावी. ( परंतु ) ती केवळ महाभियोगामध्येच ( मोठा आरोप ) द्यावी आणि आरोपी निर्दोष ठरल्यास, खोटेपणी त्याला केला जाणारा दंड स्वतः सहन करण्यास आरोप करणारा तयार असेल, तरच द्यावी.

राजद्रोह आणि ब्रह्महत्या या आरोपांच्या बाबतीत मात्र आरोप करणाऱ्यावर दंड भोगण्याचे बंधन न घालताही आरोपीला दिव्य करायला लावता येत असे. वर सांगितलेल्या प्रमुख पाच दिव्यांचे स्वरूप पुढीलप्रमाणे –

( १ ) तुलादिव्य – आरोपीने खरेच गुन्हा केला असेल, तर अपराधाच्या भाराने त्याचे वजन वाढते, अशा समजुतीवर हे दिव्य आधारलेले आहे. यात आरोपीला तुलेच्या म्हणजे तराजूच्या एका पारड्यात बसवीत आणि दुसऱ्या पारड्यात त्याच्या भारंभार दगड-माती वगैरे घालून दोन्ही पारडी समान पातळीत आणीत. नंतर आरोपी खाली उतरून पुढील मंत्राने तुलेची प्रार्थना करी –

त्वं तुले सत्यधामासि पुरा देवैर्विनिर्मिता ।
तत्सत्यं वद कल्याणि संशयान्मां विमोचय ।।

यद्यस्मि पापकृन्मातस्ततो मां त्वमधो नय।
शुद्धश्चेद् गमयोर्ध्वं मां तुलामित्यभिमन्त्रयेत् ।।

अर्थ – हे तुले, तू सत्याचे घर आहेस. पूर्वी देवांनी तुला निर्माण केले आहे. यास्तव हे कल्याणी, खरे सांग आणि मला संशयापासून सोडव. जर मी पाप करणारा असेन, तर मला खाली ने आणि जर मी शुद्ध असेन तर हे माते, मला वर ने, अशी तुलेची प्रार्थना करावी.

अशी प्रार्थना करून आरोपी पुन्हा पारड्यात बसल्यावर जर त्याचे पारडे खाली गेले, तर तो दोषी; समान पातळीत राहिले, तर अल्पदोषी; आणि वर गेले, तर निर्दोषी होय, असे मानीत.

स्त्री, बाल, वृद्ध, अंध, पंगू, ब्राह्मण व रोगी या आरोपींच्या बाबतीत तुलादिव्याचाच उपयोग करावा, असे शास्त्रकारांनी सांगितले आहे. वारा जोराने वाहत असल्यास हे दिव्य करीत नसत. कारण वाऱ्याने तुला हालण्याचा संभव असे.

( २ ) अग्निदिव्य – अग्निदिव्य पाहा.

( ३ ) जलदिव्य – विवक्षित काळापर्यंत जलात बुडून राहण्याचा विधी. हे दिव्य पाण्याला वेग नसलेल्या नदीत, सागरात, कालव्यात, डोहात, अकृत्रिम सरोवरात, कृत्रिम तडागात अथवा सामान्य सरोवरात करीत. जिथे जलदिव्य करावयाचे, त्या जलाशयात सुसरी, जळवा, मत्स्य, गवत, चिखल किंवा शेवाळे असणार नाही, याची दक्षता घेत. शरद व ग्रीष्म या ऋतूंत हे दिव्य करीत. याचा वापर वैश्य आरोपींसाठीच असे. श्वास व कास ( दमा-खोकला ) हे विकार असलेल्या व्यक्तींना हे दिव्य वर्ज्य मानलेले आहे. याची पद्धत अशी –

बेंबीइतक्या खोल पाण्यात एक माणूस उभा राही. दुसरा एक माणूस जलाशयाच्या काठी बांधलेल्या तोरणात उभा राहून तीन बाण सोडी. त्यानंतर खुणेची टाळी वाजवली जाताच आरोपी 'सत्येन माभिरक्ष त्वं वरुण' = हे वरुणा, तू सत्याने माझे रक्षण कर, या मंत्राने वरुणाची प्रार्थना करून जलाशयातील माणसाच्या मांडयांना धरून पाण्यात बुडी मारी. त्याच वेळी तीन बाणांपैकी मधला बाण जिथे पडला असेल, तिथपर्यंत तोरणातील माणूस धावत जाई आणि तिथे पूर्वीच जाऊन उभा राहिलेला एक माणूस बाण घेऊन तोरणापर्यंत धावत येई. हा माणूस तोरणात येऊन पोचल्यावर जर त्याला आरोपी पाण्याबाहेर पडलेला दिसला, तर तो दोषी होय आणि जर त्याने त्या वेळेपर्यंत पाण्यातच दम धरला, तर तो निर्दोषी होय, असे समजले जाई.

( ४ ) विषदिव्य – या दिव्यासाठी हेमंत व शिशिर हे ऋतु योग्य मानलेले आहेत. शूद्र आरोपींसाठी या दिव्याचा वापर करीत. पित्त व श्लेष्मा यांनी युक्त अशा व्यक्तींना हे दिव्य वर्ज्य समजत. विषाचे प्रमाण ठरलेले असे. सात यवांहून जास्त विष देत नसत. ते तीस पट तुपात कालवून देत. आरोपीने 'सत्येन मव मेऽमृतम्' = हे विषा, सत्याच्या प्रभावाने तू मला अमृतासारखे सुखावह हो, अशी प्रार्थना करून विष घेतल्यावर पाचशे टाळया वाजवीपर्यंत काळ जाऊ देत. तेवढया वेळात विषाचा परिणाम न झाल्यास आरोपी निर्दोषी आणि परिणाम झाल्यास दोषी, असे मानीत. त्यानंतर विष उतरविण्याचे उपाय तत्काळ योजीत असत.

( ५ ) कोशदिव्य – हे दिव्य सोपे आहे. आरोपी ज्या देवाचा भक्त असेल, त्या देवाचे तीर्थजल त्याला प्यायला देत. त्याने तीर्थप्राशन केल्यापासून चौदा दिवसांच्या आत जर त्याला राजकीय वा दैवी स्वरूपाचे घोर दुःख भोगावे लागले, तर तो दोषी, आणि तसे न घडले, तर निर्दोषी, असे मानीत. अर्थात हे दिव्य आस्तिक व निर्व्यसनी व्यक्तींनाच योग्य मानले जाई. महापातकी, नास्तिक, कृतघ्न, नपुंसक, प्रतिलोमज व व्रात्य व्यक्तींना हे दिव्य उपयुक्त नव्हे, असे शास्त्रकारांचे स्पष्ट मत आहे.

**इतिहास** – ऋग्वेद ( १. १५८. ४ ), पंचविंश ब्राह्मण ( १४. ६. ६ ), छांदोग्य उपनिषद ( ६. १६ ) व कौशिक सूत्र ( ५२. ८ ) यांत अग्निदिव्याचा आणि शतपथ ब्राह्मणात (११. २. ७) तुलादिव्याचा उल्लेख आहे. आपस्तंबाखेरीज इतर धर्मसूत्रांत मात्र दिव्यांचा उल्लेख नाही. मनुस्मृती व याज्ञवल्क्यस्मृती यांनी दिव्यांचा विस्तृत विचार मांडलेला आहे.

सुमेरो – बाबिलोनियन संस्कृतीत कायदेशास्त्र बरेच प्रगत झालेले असल्यामुळे तिथे दिव्यांना महत्त्व नव्हते; परंतु मानवी पुरावा थिटा ठरल्यास जलदिव्याचा उपयोग करावा, असा उल्लेख हम्मुरबीच्या कायद्यात आहे. या दिव्यासाठी आरोपीला नदीत उडी घ्यायला सांगत आणि त्यातून तो वाचला, तर त्याला निर्दोष ठरवीत. रोमन कायद्यात दिव्याला स्थान नव्हते. तथापि प्राचीनतम रोमन समाजात दिव्यप्रथा चालू होती. अग्नीतून चालत जायला लावणे आणि जादूची भाकरी खायला देणे, हे दोन प्रकार विशेष प्रचारात होते. तिसरा प्रकार द्वंद्वयुद्धाचा. द्वंद्वयुद्धात जो मरेल, तो खोटा व जगेल तो खरा, असे मानीत. हा प्रकार युरोपात पंधराव्या शतकाअखेरपर्यंत चालू होता. ग्रीकांना दिव्ये माहित होती; परंतु ते न्यायदानात त्यांचा वापर करीत नसत. अवेस्ता ग्रंथात ३३ प्रकारची दिव्ये दिलेली आहेत. त्या सर्वांचा समावेश अग्निदिव्य आणि विषदिव्य या दोहोंत होऊ शकेल. कुराणपूर्वकालीन अरबांत अग्निदिव्य प्रचलित होते. अरब लोक तरवार, चमचा किंवा अन्य एखादी

धातूची वस्तू खूप तापवीत आणि ती आरोपीला जिभेने चाटायला लावीत. ज्याची जीभ भाजेल तो दोषी, असे समजत.

भारतात इंग्रजी अंमल सुरू होईपर्यंत न्यायदानात दिव्यांना स्थान होते. महाराष्ट्रात पेशवाईअखेरपर्यंत दिव्ये प्रचलित असल्याचे ऐतिहासिक कागदपत्रांवरून दिसते. ही दिव्ये सामान्यतः मंदिरे, मशिदी वा नद्यांचे संगम अशा पवित्र स्थानी होत.

महाराष्ट्रात तप्तमाषकदिव्य विशेष प्रचारात होते. नारदस्मृतीत या दिव्याचे वर्णन आहे. महाराष्ट्रात याला 'रवा (सोन्याचा गोल तुकडा) काढणे' असे म्हणतात. (तप्तमाषक पाहा.)

शिवाजीमहाराजांच्या कारकिर्दीत कुडाळचे देशकुळकर्ण व गावकुळकर्ण यांबद्दल प्रभुणे व अकलूजकर जोशी यांच्यामध्ये वाद उत्पन्न झाला असता पाली (जि. सातारा) येथे रवा काढण्याचे दिव्य झाले होते. या दिव्याचे विस्तृत वर्णन एका कागदपत्रात ग्रथित केलेले आहे, ते असे --

"या उपरि स्वामिनी दिव्याचा निर्वाह करून राजीनामे मागितले. ऐसियास आम्ही राजी जाहलो. दिव्यमुखें खरे जाहलों, तरी देशकुळकर्ण गांवकुळकर्ण दरोबस्त खाऊ. जोशी अकलूजकरास संबंध नाही. जर दिव्यमुखें खोटा जाहलों, तरी सदरहू वतनास सर्व मावांस अर्थीअर्थी संबंध नाहीं. अग्रवादी जोशी झाले. त्यांनी दिव्य करावे हा राजीनामा सही. जोशी अकलूजकर यांनी राजीनामे लिहून दिल्हे. याउपरी कसबे पाली तो उंबरज श्रीखंडेराव या स्थलीं दिव्य नेमून देऊन वादी यांस पालीचे स्थलास पाठविले. तेथें गेलियांवरि दिव्यास मुहूर्त नाहीं. याकरितां पंधरा सोळा दिवस अवलंबें तेथेंच राहिले. राजश्री कृष्णाजी बल्लाळ सुभेदार प्रांत सातारा यांनी मुहूर्त पाहिला. अप्पाजी खंडो व जानो महादेव यांचे हात धोवावयास बोलाविले. ते समई बोलिले कीं आप्पाजींचे हातास जळवात आहे. जानोबास चंद्रबळ नाहीं. तेव्हा आप्पाजी खंडो याचा धाकटा भाऊ सिवाजी खंडो यास चंद्रबल पाहून मजालस करून वैशाख ५ ला शनिवारी सिवाजीचा हात धुवून हाताची चिन्हें लेहून पिसवी घालून लाखोटा केला. दुसरे दिवशीं रविवारी षष्टी प्रातःकालि हजीर मज्यालसीस राजश्री यमाजी सिवदेव सुभेदार प्रांत व्याघ्रगड शाहाजी शिंदे देसाई तो कुडाळ व पराजी देसाई तो, मेढे सुभा व्याघ्रगड व स्थलकरी समस्त गोत देखील मजालस करून तेलतूप कोळसे मोईनप्रमाणे व रवे पात्र आणून येथारितीने दिव्य सिध करून सिवाजी खंडो यानें उचार केला कीं प्रभुने पूर्वी आपण देशकुळकर्णी व गावकुळकर्णी वतनदार ऐसे बोलोन दिव्य काढिलें. याउपरी तेच समयी मागती हातास पिसवी घालून लखोटा करून सोमवारीं सायंकाळी वरकडवादी यास वकर लेहून देऊन सातारियाचे मुक्कामीं हुजूर पाठविलें. तिसरे दिवशीं मंगळवारीं सिवाजीचा हात पहावयास आणिला. लखोटा तोडून पिशवी काढून हात पहाता अनामिके बोटास नखाशेजारल्या पेऱ्यास बाहेरल्या आंगें बोटाएवढा फोड आला व वरकड ज्यारी बोटें व नखाच्या कोंवया फुगल्या. ऐसे हाजीर मजालसींत देखोन रवा लागला खोटा जाहला."

या वर्णनावरून दिव्यांच्या विधिविधानाची आणि त्यामागच्या समजुतींची स्पष्ट कल्पना येते. [मु. वि. को.; एन्सा. रि. ए.; भा. इ. सं. मं., द्वितीय संमेलन वृत्त, शके १८३६]

## दिव्य आंगिरस

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातले १०७ वे सूक्त याच्या नावावर आहे. दक्षिणेचा महिमा हा या सूक्ताचा विषय आहे. देवांसाठी केलेल्या यज्ञात दिली जाणारी दक्षिणा ही दैवी वृत्तीची पूर्णता होय, असे हा म्हणतो.

दक्षिणेमुळे प्राप्त होणाऱ्या अनेक गोष्टी याने पुढील ऋचेत सांगितल्या आहेत –

दक्षिणावान् प्रथमो हूत एति दक्षिणावान् ग्रामणीरग्रमेति।
तमेव मन्ये नृपतिं जनानां यः प्रथमो दक्षिणामाविवाय ॥
(ऋ. १०-१०७-५)

अर्थ-- जो दक्षिणा देतो त्याचेच नाव (लोकांच्या मुखी) प्रथम येते. जो दक्षिणा अर्पण करतो, तोच आपल्या गावामध्ये पुढारी होऊन श्रेष्ठ पदवीला पावतो. ज्याने पहिल्याने भरपूर दक्षिणा दिली तोच पुरुष जनतेचा राजा आहे असे मी समजतो.

या सूक्तात शेवटी दानमाहात्म्यही वर्णिले आहे. [श्रुतिबोध]

## दिव्यकुंड

एक तीर्थ. हे कामरूप देशात (आसाम) क्षोभक नामक पर्वताच्या पूर्व भागात पुष्करिणीच्या रूपाने आहे. त्या पुष्करिणीत स्नान करून पर्वतशिखरावरच्या देवीची पूजा करावी, असे कालिका पुराणात सांगितले आहे.

## दिव्य दृष्टी

सामान्य दृष्टीला न दिसणारे असे पदार्थ ज्या दृष्टीला विनासायास दिसतात अथवा कुठल्याही प्रकारच्या अंतरायाला न जुमानता जी दृष्टी अतिदूरवरची दृश्ये पाहू शकते, तिला दिव्यदृष्टी म्हणतात. यावरून दिव्यदृष्टीचे सामर्थ्य किती मोठे आहे, ते कळून येईल. श्रीकृष्णाने अर्जुनाला आपले विश्वरूप दाखविण्याच्या प्रसंगी म्हटले, की 'माझे विश्वरूप तुला तुझ्या चर्मचक्षूंनी पाहता येणार नाही;

म्हणून त्यासाठी मी तुला दिव्यचक्षू देत आहे' (गीता ११.८). संजय हा हस्तिनापुरात धृतराष्ट्राच्या शेजारी बसून कुरुक्षेत्रावरच्या भारतीय युद्धाचा चित्रपट साध्या डोळयांनी समोर बसून पाहावा, तसा पाहत होता व त्याचे वर्णन धृतराष्ट्राला ऐकवीत होता, हाही दिव्यदृष्टीचाच प्रभाव होय. ही दिव्यदृष्टीही श्रीकृष्णानेच संजयाला दिली होती.

योगशास्त्रात या दिव्यदृष्टीचे विवेचन केले आहे, ते असे–

प्रत्येक माणसाच्या मस्तकात तीन नेत्र असतात. त्यांतले दोन उघडे व एक सदैव मिटलेला असतो. या गुप्त असलेल्या डोळयाला ज्ञानी लोक दिव्यदृष्टी व योगी शिवनेत्र म्हणतात. शिव हा त्रिनेत्र आहे. अर्थात शिवाला भ्रूमध्यात एक डोळा आहे, असे पुराणांत म्हटले आहे. पण हा तृतीय नेत्र एकटया शिवालाच नसून प्रत्येक माणसाला असतो, असे योगविद्येत सांगितले आहे. योग्याला विशिष्ट साधनेच्या द्वारे त्या दिव्य चक्षूचे उन्मीलन करता येते, एवढेच नव्हे; तर त्यातून आग अथवा पाणी बाहेर टाकता येते; कारण हा दिव्यचक्षू पंचतत्वांचे केंद्रस्थानच असते, असे योगी मानतात.

मनुष्याच्या डाव्या व उजव्या डोळयात अनुक्रमे शक्ती व काल यांचे वास्तव्य असते. तिसऱ्या शिवनेत्रात ब्रह्माचा निवास असतो. शक्ती, काल व ब्रह्म या तिहींची जी संयुक्त अवस्था, तेच परमेश्वराचे रूप होय. डाव्या डोळयाचा संबंध चंद्रमंडलाशी, उजव्याचा सूर्यमंडलाशी व शिवनेत्राचा ब्रह्ममंडलाशी आहे. डाव्यापासून क्रिया, उजव्यापासून इच्छा व शिवनेत्रापासून विचार यांची उत्पत्ती होते.

प्रत्येक शरीरात दिव्यचक्षू किंवा शिवनेत्र असतो, याला एक प्रमाणही योगविद्येत दिले आहे. ज्या वेळी माणसाला झोप लागते, त्या वेळी त्याचे दोन्ही बाह्य नेत्र मिटलेले असतात. अशा वेळी माणूस जे स्वप्न पाहतो, ते तिसऱ्या दिव्य नेत्राच्या प्रकाशामुळेच होय. जोवर विशिष्ट साधनेने तो दिव्य नेत्र उघडला जात नाही, तोवर त्याने स्वप्नात पाहिलेल्या वस्तुजाताची प्रभा बाहेर फाकत नाही. स्वप्न मनाला दिसते, असे म्हणतात, पण ते बरोबर नाही. कारण मनाच्या ठिकाणी दर्शनशक्ती नाही. म्हणून स्वप्नात जे दिसते, ते सर्व त्या दिव्यचक्षूलाच दिसते, असे म्हटले पाहिजे. या दिव्यचक्षूचे उन्मीलन करण्याचे विधान सांगितले आहे, ते असे –

पद्मासन घालून बसावे. डोळे मिटावे. जीभ टाळूला लावावी. भ्रूमध्यापासून दोन आंगळे वरच्या बाजूला लक्ष केंद्रित करावे. शिवमंत्राचा उपांशुजप करीत शिवाचे ध्यान करावे. अशी ही साधना तीव्र झाली म्हणजे दिव्य चक्षूचे अर्थात शिवनेत्राचे उन्मीलन होते, असे सांगितले आहे.

ज्यांचा दिव्य चक्षू उमललेला असतो, त्यांना जगातल्या सर्व घटना बसल्या जागी दिसू लागतात. नुसत्या बाह्य घटनाच नव्हे; तर दुसऱ्याचे मनोगतही त्यांना दिसू शकते. कुंडलिनी-जागृतीच्या संदर्भात ज्ञानेश्वरांनी या दिव्यदृष्टीविषयी पुढील ओवी लिहिली आहे–

**मग समुद्रापैलाडी देखें। स्वर्गींचा आलोचु आइके।**
**मनोगत वोळखे। मुंगियेचें॥**

(ज्ञाने. ६.२६९)

वर्तमानातल्याच नव्हे, तर भविष्यकालातल्या घटनाही त्या दिव्य दृष्टीपुढे तरळू लागतात. तिच्यामुळे साधकाचे मन हळूहळू अंतर्मुख बनून एकाग्र होऊ लागते. या दृष्टीमुळेच त्याला आपले जीवनही उदात्त करता येते. [कल्याण-साधनांक]

## दिव्य देश

आळवार संतांनी उल्लेखलेली विष्णूची एकशे आठ स्थाने दिव्यदेश म्हणून प्रसिद्ध आहेत. सर्व आळवारांनी ज्या ज्या विष्णुस्थानांची यात्रा केली, त्या सर्वांची बेरीज एकशे सहा भरते. त्यात श्रीवैकुंठ व क्षीराब्धी ही दोन स्थाने मिळवली, की ती एकशे आठ होतात.

चोळ देशात चाळीस, पांडच देशात अठरा, केरळात तेरा, मध्य प्रदेशात दोन, कांची प्रदेशात बावीस व उत्तर प्रदेशात अकरा अशी यांची देशपरत्वे विभागणी आहे. [व्रतराज]

## दिव्याची अवस

आषाढी अमावास्येला हे नाव आहे. या दिवशी सुवासिनी स्त्रिया घरातले दिवे घासून-पुसून एकत्र मांडतात, त्यांच्या भोवती रांगोळया घालतात व ते प्रज्वलित करून त्यांची पूजा करतात. पूजेत पक्वान्नांचा महानैवेद्य दाखवतात. त्या वेळी पुढील मंत्राने दिव्याची प्रार्थना करतात –

**दीप सूर्याग्निरूपस्त्वं तेजसां तेज उत्तमम्।**
**गृहाण मत्कृतां पूजां सर्वकामप्रदो भव॥**

अर्थ – हे दीपा, तू सूर्यरूप व अग्निरूप आहेस. तेजामध्ये तू उत्तम तेज आहेस. माझ्या पूजेचा तू स्वीकार कर आणि माझ्या सर्व इच्छा पूर्ण कर.

मग दिव्यांची कहाणी ऐकतात. फल– आयुरारोग्य व लक्ष्मी यांची प्राप्ती. या पूजाव्रताची कथा अशी –

तमिळ देशात पशुपती शेट्टी नावाचा एक श्रेष्ठी होता. विनीत आणि गौरी या नावांची त्याला दोन मुले होती. लहानपणीच त्या दोघांनी आपसांत असे ठरवले, की गौरीला ज्या मुली होतील, त्या तिने विनीताच्या मुलांना द्याव्या. पुढे गौरीचे लग्न होऊन तिला तीन मुली व विनीताला तीन मुलगे

झाले. गौरीच्या सर्वांत धाकट्या मुलीचे नाव सगुणा असे होते.

गौरीच्या घरी लक्ष्मी नांदत होती, पण विनीताचे मात्र दैव फिरले आणि त्याला दारिद्र्य आले. भाऊ गरीब झालेला पाहून गौरी आपले वचन विसरली व तिने आपल्या दोन मुली श्रीमंत स्थळी दिल्या. सगुणेच्या लग्नाचेही ती बेत करू लागली. गौरीने भावाला दिलेले वचन मोडले ही गोष्ट ऐकून सगुणेला वाईट वाटले. तिने विनीताच्या धाकट्या मुलाशी लग्न करायचे स्वतःच ठरवले. गौरी तिच्यावर संतापली; पण तिने आपला हेका सोडला नाही.

लग्न होऊन ती विनीताच्या घरी आली व त्याचा गरिबीचा संसार संभाळू लागली. तिच्या आई–बापांनी तिचे नाव टाकले. पुढे एके दिवशी एक चमत्कार घडला. त्या नगराचा राजा स्नानासाठी गेला असता त्याने आपली रत्नजडित आंगठी जवळच्या कट्ट्यावर ठेवली होती. एवढ्यात एका घारीने झडप घालून ती उचलली. आंगठी घेऊन घार सगुणेच्या छपरावर येऊन बसली आणि ती खाद्यवस्तू नव्हे, असे समजताच आंगठी तिथेच टाकून उडून गेली. नंतर ती आंगठी सगुणेला मिळाली. ती राजाची आहे, असे समजताच तिने ती राजाकडे नेऊन दिली. राजाने प्रसन्न होऊन तिला मोठे बक्षीस दिले. राजा म्हणाला. 'तुला आणखी काय हवे ते मागून घे.' सगुणेने मागितले, की 'येत्या शुक्रवारी राज्यात फक्त माझ्या एकटीच्याच घरी दिवे असावे आणि दुसऱ्या कोणीही आपल्या घरी दिवे लावू नयेत असा हुकूम काढा.'


दीपलक्ष्मी

राजाने तशी दवंडी दिली. मग शुक्रवार आला, तेव्हा सगुणेने दिवे आणले आणि ते घरभर लावले. त्या दिवशी राज्यात फक्त तिच्याच घरी प्रकाश उजळला. त्या दिवशी तिने उपास केला. तिन्हीसांजा तिने आपल्या दोन दिरांना पुढच्या व मागच्या दारी उभे केले. पुढच्या दारच्या दिराला सांगितले, की 'जी सवाष्ण बाई घरात येऊ पाहील, तिला शपथ घ्यायला लावा की मी या घरातून बाहेर जाणार नाही. मगच तिला आत सोडा.' मागच्या दारच्या दिराला सांगितले, की 'जी कोणी स्त्री या दाराने बाहेर जाईल, तिच्याकडून शपथ घेववा, की मी परतया घरात येणार नाही.'

तिन्हीसांजा लक्ष्मी त्या नगरात आली, तर सगळीकडे अंधार ! फक्त सगुणेचे घर तेवढे लखलखत होते. लक्ष्मी त्या घरात प्रवेश करायला आली. पुढच्या दारी उभ्या असलेल्या सगुणेच्या दिराने शपथ घेववूनच तिला आत सोडले. लक्ष्मी घरात येताच त्या घरात ठाण मांडून बसलेली अक्काबाई (दारिद्र्याची देवता) घाबरली. ती मागच्या दाराने पसार व्हायला निघाली असता, तिथे उभ्या असलेल्या दिराने तिच्याकडून परत न येण्याची शपथ घेववली.

या घटनेमुळे सगुणेच्या घरात लक्ष्मी कायमची राहिली. त्या घरात धन–धान्य महामूर झाले. राज्यातले लोक तिला लक्ष्मीचा अवतार समजू लागले. [ हिं. हॉ. से. ]

## दिशा

एक कल्पना किंवा तत्त्व. दिशेची व्याख्या अशी – 'दिशति अवकाशं ददाति इति' = अवकाश देते ती दिशा होय. पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या मुख्य दिशा होत.

दिशांच्या उत्पत्तीबद्दल वराह पुराणात एक कथा आली आहे, ती अशी –

ब्रह्मदेवाने आदिसृष्टी निर्माण केल्यावर त्याला चिंता पडली, की आता ही प्रजा कोण धारण करील ! त्या वेळी त्याच्या कानातून दहा तेजस्वी कन्या बाहेर आल्या. त्यांच्यापैकी पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, ऊर्ध्व आणि अधर या सहा मुख्य होत्या. त्यांनी प्रजापतीकडे अवकाशाची मागणी केली त्यावर 'शतकोटिप्रविस्तर (शंभर कोटी विस्तृत) अशा या ब्रह्मांडाच्या अंतर्भागी, तुम्हांला इष्ट त्या ठिकाणी तुम्ही राहा,' असे प्रजापतीने त्यांना सांगितले. नंतर प्रजापतीने इंद्रादी लोकपाल निर्माण केले आणि त्यांच्याशी या दिशांचे लग्न लावून दिले. पूर्वेचे इंद्राशी, पश्चिमेचे वरुणाशी, उत्तरेचे

कुबेराशी, दक्षिणेचे यमांशी, ईशान्येचे ईशाशी, नैर्ऋत्येचे निर्ऋतीशी वायव्येचे वायूशी, आग्नेयीचे अग्नीशी व अधोदिशेचे शेषनागाशी लग्न झाले. उर्ध्व दिशेशी प्रजापतीने स्वतः विवाह केला. तेव्हापासून त्या दिशांना ऐंद्री, आग्नेयी, इ. नावे मिळाली.

दिश् म्हणजे आकाशाचा एक भाग, या अर्थी ऋग्वेदात (१.१२४.३; ३.३०.१२) व अथर्ववेदात (३.३१.४; ११.२.१२) हा शब्द अनेकवार आला आहे. सर्वसाधारणपणे पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या चारच दिशांचा वैदिक वाङ्मयात उल्लेख येतो. पण तैत्ति. संहिता (७.१.१५), शतपथ ब्राह्मण (१.८.१.४०., ६.२.२.३४), शांखायन श्रौतसूत्र (१६.२८.२), इ. काही ठिकाणी आठ व दहा दिशांचा उल्लेख आलेला आहे. शतपथ ब्राह्मणात 'पञ्च वै दिशः'; (५.४.४.६); 'सप्त दिशः', 'नव दिशः' (६.३.१.२१); 'दश दिशः' (८.४.२.१३) असे पाच, सात, नऊ व दहा दिशांचे उल्लेख येतात. शतपथात या दिशांना शिक्याची उपमा दिलेली आहे—

दिशः शिक्यं दिग्भिर्हीमे लोकाः शक्नुवन्ति स्थातुं
यच्छक्नुवन्ति तस्माच्छिक्यम् ।

(श. ब्रा. ६.७.१.१६)

अर्थ– दिशा या शिक्याप्रमाणे आहेत. दिशांमुळेच हे लोक राहू शकतात. त्यामुळे त्यांना शिक्य असे म्हटले आहे.

भूर्भुवः स्वः किंवा स्वर्ग, मृत्यू, पाताळ हे तीन लोक प्रसिद्ध आहेत. त्यांच्या जोडीला दिशांचा एक चौथा लोकही मानलेला आहे. (जै. ब्रा. २.१७६)

पुराणे व काव्ये यांत दिशांवर मानवी भावनेचाही आरोप केलेला आहे. एखादा अवतारी किंवा पुण्यश्लोक पुरुष जन्माला येतो, तेव्हा दिशा प्रसन्न होतात आणि एखादा महापुरुष मरतो तेव्हा किंवा एखादे महान अरिष्ट यायचे असते, तेव्हा दिशा विपण्ण होतात, असे म्हटले आहे.

दिशा कशा उत्पन्न झाल्या याबद्दलचे दार्शनिक मत असे—

एते चादित्यसंयोगा येन विभुना द्रव्येणोपनीयन्ते सा दिक् इति कणादरहस्ये व्युत्पादितं विस्तरतः ।

(वैशेषिक उपस्कार २.२.१६)

अर्थ– अंतरिक्षस्थ विभुद्रव्य व सूर्यकिरण यांच्या संयोगाने दिशा उत्पन्न होतात, असे कणादरहस्यात विस्ताराने सांगितले आहे.

श्रोत्र आणि दिशा यांचा घनिष्ठ संबंध आहे. 'दिशः श्रोत्रेण चाप्नुयात् ।' = श्रोत्रापासून दिशांना प्राप्त करून घ्यावे, असे महाभारतात सांगितले आहे (शांति.३२२.५). ज्याप्रमाणे व्यापक चक्षूपासून सूर्य उत्पन्न झाला आणि सूर्यामुळेच मानवी चक्षू (जग) पाहू शकतो, त्याप्रमाणे व्यापक श्रोत्रापासून दिशा उत्पन्न झाल्या व दिशांमुळेच मानवी श्रोत्र शब्द ऐकू शकतो. दिशा कशा ओळखाव्या, त्याबद्दल अदितीने देवांना सांगितले, की 'अदिती, अग्नी, सोम व सविता यांचे अधिष्ठान ज्या ठिकाणी आहे, त्या दिशा अनुक्रमे पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर होत, असे समजावे.'

न्याय – वैशेषिक दर्शनाच्या मतानुसार दिशा हे एक नित्य द्रव्य असून, ते विभू आहे. दिशा ही सर्व जगताचा आधार व सर्व कार्याचे निमित्त कारण आहे. त्याचप्रमाणे ती दैशिक दूरत्व व अंतिकत्व (जवळीक) यांचेही कारण आहे. संख्या, परिमाण, पृथक्त्व, संयोग व विभाग हे तिचे गुण आहेत. दिशा ही एकच असून, उपाधिभेदाने तिचे प्राच्यादी भेद होतात. काल ही गत्यात्मक शक्ती आहे, तर दिशा ही त्याच्या विरुद्ध म्हणजे स्थित्यात्मक शक्तीआहे. ती विशेष स्थितीत वस्तूंना आपापल्या स्थानी स्थिर राखते. दिशेचे हे कार्य आकाशात होते. स्थितीच्या आधाराला देश असे नाव आहे. म्हणजे दिशा ही सृष्टीतली स्थितिशक्ती आहे. सृष्टिकार्यासाठी गतीबरोबर स्थितीचीही आवश्यकता असते. एखाद्या प्राण्यात जर केवळ गतीच काम करू लागेल, तर त्याचे अवयव तुटून जातील. त्याला काहीच काम करता येणार नाही. तेव्हा कामाच्या दृष्टीने प्राण्याचे अवयव एकत्र राहणे आवश्यक असून, त्यासाठी स्थितिशक्तीची गरज आहे. प्रकृती–विकृती, स्थावर-जंगम, इ. शब्दांप्रमाणे दिक्–काल हा विपरीतार्थबोधक जोडशब्द आहे.

दिशा ही एक शक्ती असून, कूटस्थ ब्रह्मात क्षोभ उत्पन्न होऊन सृष्टिप्रवर्तनासाठी ज्या शक्ती प्रकट होतात, त्यांपैकी ती एक आहे, असे भागवतात म्हटले आहे.

आपल्या इंद्रियांपैकी स्पर्श व चक्षू या दोन इंद्रियांनी दिशेचा अनुभव येत असतो. दिशेमुळे उत्पन्न होणारे लांबी, रुंदी व जाडी हे तीन गुण वस्तूंच्या ठिकाणी आपल्याला दिसतात. पण इंद्रियांना गोचर होणारे दिशेचे दृश्य रूप हे खरे नसून ते सूक्ष्म, व्यापक व शक्तिमय असे आहे.

अलिकडे विज्ञानपंडितांनी दिशा व काल यांचा पुष्कळच अभ्यास केला आहे. आइन्स्टाइनच्या सापेक्षता सिद्धान्ताने दिक्कालासंबंधीच्या जुन्या कल्पना आमूलाग्र बदलून गेल्या आहेत. आइन्स्टाइनचे म्हणणे असे– या विश्वात कोणतीही वस्तू स्थिर नाही. सर्वच वस्तूंना गती असल्यामुळे कोणत्याही वस्तूची निरपेक्ष गती ठरविणे अशक्य आहे. सर्वत्र सापेक्षतेचे साम्राज्य आहे. या दृष्टीने विचार करता विश्वात आपण समजतो, तशी दिशा नाही. सूर्य ज्या बाजूला उगवतो ती पूर्व व ज्या बाजूला मावळतो, ती पश्चिम असे आपण मानतो. पण हे

वास्तव सत्य नाही. पृथ्वी स्वत:भोवती फिरत असल्यामुळे पूर्व–पश्चिम हा भ्रम उत्पन्न होतो. सूर्याला पूर्व नाही आणि पश्चिमही नाही. समजा, सूर्य मध्यान्ही आल्याबरोबर पृथ्वीचे फिरणे थांबले, तर काय होईल ? पूर्व–पश्चिम या दिशा नाहीशा होतील आणि त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या दक्षिण व उत्तर याही दिशा नष्ट होतील. त्याचप्रमाणे, एखाद्या वेळी मध्यरात्री पृथ्वीचे फिरणे एकाएकी थांबले, तर सगळीकडे अंधार पसरेल. आकाशात तेच तेच तारे सारखे दिसत राहतील आणि आपला दिशांचा व्यवहारच खुंटेल.

सांगण्याचा मुद्दा इतकाच की विश्वात दिशा नाहीत; तर दिशांच्या आधारामुळे आपला व्यवहार यशस्वी होतो, म्हणून आपण त्या केवळ मानलेल्या आहेत. वस्तुत: त्या अस्तित्वात नाहीत. [पु. इं.; प्रसाद, जून १९५८; भा. प्र. वि.; वे. इं.; वैं. नि.; वैं. को.; श. क.; वे. वि. नि.]

## दिशाव्रतिक

जैन धर्मातील एक उपपंथ. सुत्तनिपातात याचा उल्लेख आहे. याच पंथाला भगवती सूत्रात दिसापोक्खीय असे म्हटले आहे (११.९). तिथे एका व्रतिकाचे वर्णन दिलेले आहे, ते असे –

हस्तिनापुरात गंगेच्या तटाकी शिव नावाचा एक भिक्षू राहत होता. त्याने दिसापोक्खीय मत स्वीकारले होते. तो छट्ठं व्रत (तीन दिवसांत एकदाच भोजन करणे) करीत होता. ज्या दिवशी तो भोजन करी, त्या दिवशी प्रथम पूर्व दिशेकडे जलप्रोक्षण करून सोमाची पूजा करी. नंतर कंदमुळे, फळे, फुले व भाज्या जमा करून आपल्या कुटीत परत येई. मग गंगास्नान करून वाळू व गवत यांची वेदी बनवून तिच्यावर मंथनाने अग्नी उत्पन्न करी आणि त्यात मधु-घृताचे हवन करी. त्यानंतर तो चरूने विश्वेदेव व अतिथी यांची पूजा करून मग स्वत: भोजन करी. दुसऱ्या पर्यायात तो दक्षिणेला प्रोक्षण करून यमाची पूजा, तिसऱ्या पर्यायात तो पश्चिमेचे प्रोक्षण करून वरुणाची पूजा व चौथ्या पर्यायात उत्तरेचे प्रोक्षण करून कुबेराची पूजा करी.

वाराणसीचा सोमिल नावाचा भिक्षूही दिसापोक्खीय पंथाचा अनुयायी होता, असे म्हटले आहे. [प्रा. भा. लो. ध.]

## दिशास्वामी

अष्ट ग्रह हे अष्ट दिशांचे स्वामी आहेत, अशी कल्पना ज्योतिषशास्त्रात आहे. पूर्वादी आठ दिशांचे आठ स्वामी मानले आहेत ते असे– पूर्व–सूर्य, आग्नेय–शुक्र, दक्षिण– मंगळ, नैर्ऋत्य–राहू, पश्चिम– शनी, वायव्य–चंद्र, उत्तर– बुध, ईशान्य– गुरू. [मु. चिं.; श. क.]

## दीघनिकाय

एक बौद्ध धार्मिक ग्रंथ. त्रिपिटकातील सुत्त पिटकाच्या पाच भागांपैकी हा पहिला भाग आहे. यात आकाराने दीर्घ असलेल्या सुत्तांचा (बुद्धाच्या उपदेशाचा) संग्रह आहे. त्यामुळे याला दीघनिकाय असे नाव मिळाले आहे. या ग्रंथाचे सीलक्खंध, महावग्ग आणि पाथिकवग्ग अथवा पाटिकवग्ग असे तीन भाग असून, त्यांत अनुक्रमे १३,१० व ११ अशी एकूण ३४ सुत्ते आहेत. हा सुत्तांचा संग्रह उपदेशांच्या कालक्रमाने केलेला आहे, असे नाही. त्यात अत्यंत विस्कळितपणा दिसतो; परंतु बुद्धविचारांच्या दृष्टीने हा ग्रंथ विश्वसनीय मानला जातो.

सीलक्खंधातील सुत्तांमध्ये शील, समाधी आणि प्रज्ञा यांविषयींच्या बुद्धोपदेशांचा संग्रह आहे. याशिवाय बुद्धकालीन भारतीय समाजाचे धार्मिक व सामाजिक जीवनही त्यात पूर्णपणे प्रतिबिंबित झालेले दिसते.

महावग्गातील प्रत्येक सुत्ताच्या नावारंभी महा हा शब्द आहे. या महा शब्दावरून विंटरनिट्झने असा निष्कर्ष काढला आहे, की प्रारंभी संक्षिप्त असलेल्या उपदेशांना नंतर कोणीतरी दीर्घत्व प्राप्त करून दिले असावे. परंतु भारतीय अभ्यासकांना हे मत मान्य नाही.

महावग्गात बुद्धाच्या काही पूर्वावतारांच्या कथा ग्रथित आहेत. अर्थात या कथांना ऐतिहासिक दृष्टया महत्त्व नाही. पण बुद्धजीवनातील अंतिम क्षणांचे चित्रण असलेले सुप्रसिद्ध महापरिनिब्बाणसुत्त याच भागात आहे. तिसऱ्या भागातील एका सुत्तात वर्णव्यवस्थेचे खंडन असून, मानवाचे श्रेष्ठकनिष्ठपण जन्माने न ठरता कर्माने ठरते, असे सांगितले आहे. दुसऱ्या एका सुत्तात बुद्धधर्माचा प्रधान उद्देश मानवाची चित्तशुद्धी करणे, हा असल्याचे सांगितले आहे.

इ. स. च्या पाचव्या शतकापूर्वीच या ग्रंथाचा चिनी अनुवाद झाला होता. [पा. सा. इ.; आजकल-वार्षिक अंक, १९५६]

## दीनदयालगिरी

(१८०२ – १८५८ इ. स.) एक हिंदी भक्त कवी. याचा जन्म काशीमध्ये पाठक घराण्यात झाला. लहानपणीच याला माता-पित्यांनी महंत कुशागिरी याच्या स्वाधीन केले आणि नंतर ती दोघेही मरण पावली. पुढे महंत मरण पावल्यावर हा काशीतल्या देहली विनायकाजवळील एका मठात जाऊन राहिला.

दीनदयाल हा संन्यासी असूनही सांप्रदायिक कर्मकांडापासून मुक्त होता. संस्कृत व हिंदी या दोन्ही भाषांवर त्याचे प्रभुत्व होते, असे सांगतात.

दीनदयालाचे अनुरागबाग, दृष्टान्ततरंगिणी, अन्योक्तिमाला

वैराग्यदिनेश आणि अन्योक्तिकल्पद्रुम असे पाच काव्यग्रंथ आहेत. अनुरागबाग हा मालिनी छंदात रचलेला कृष्णलीला-विषयक मधुर ग्रंथ आहे. दृष्टान्ततरंगिणीत नीतिविषयक दोहे आहेत. वैराग्यदिनेश या ग्रंथात ज्ञान-वैराग्यासंबंधीचे विवेचन, तसेच निसर्गवर्णनही आहे. अन्योक्तिकल्पद्रुम या ग्रंथातील अन्योक्ती मर्मस्पर्शी व उद्बोधक आहेत. याची भाषा संस्कृत-प्रचुर व प्रौढ आहे. तिच्यावर व्रज व अवधी या भाषांचा प्रभाव आहे. अन्योक्तिकारांत दीनदयालाचे स्थान बरेच वरचे आहे, असे मानतात. सूर्य, चंद्र, दीपक, बादल, समुद्र, नदी, कमल हे त्याचे अन्योक्तीचे विषय आहेत. त्याच्या काव्याचा एक नमुना असा—

**चरन कमल राजैं मंजु मंजीर बाजैं।**
**गमन लखि लजावैं हंसऊ नाहिं पावैं।**
**सुखद कमलछाही क्रीडते कुंजमाही।**
**लखि लखि हरि सोभा चित्त काको न लोभा ?**

अर्थ – हरीची चरणकमले शोभून दिसत आहेत. त्याच्या पायातील पैंजणांचा मधुर ध्वनी उमटत आहे. त्याची गती पाहून हंसही लज्जित होतात. कमळांनी व्यापलेल्या सुखद कुंजात तो क्रीडा करीत आहे. अशा या हरीचे रूप पाहून कोणाचे चित्त लोभावणार नाही ?

हिंदीतील नीतिकाव्याचा हा एक प्रमुख कवी मानला जातो. [ हिं. सा. को. २; हिं. सा. इ.; हिं. नी. वि. ]

## दीन दरवेश

(इ. स. चे १८ वे व १९ वे शतक) एक हिंदी संत-कवी. हा पाटण किंवा पालनपूर राज्यातील रहिवासी असावा. तो लोहार जातीत जन्मला होता व ईस्ट इंडिया कंपनीत मिस्त्री म्हणून नोकरी करीत होता. एकदा काम करीत असताना अपघात होऊन त्याचा एक हात तुटला. त्यामुळे त्याची नोकरी गेली. या घटनेमुळे त्याच्या जीवनात परिवर्तन घडून आले व तो भक्तिमार्गी बनला. त्यानंतर तो यात्रेला निघाला. यात्रेतच त्याची बाबा बालनाथ नामक एका साधूशी गाठ पडली. त्याने त्या साधूचे शिष्यत्व पत्करले. त्या साधूकडूनच त्याला कवित्वाची प्रेरणा मिळाली. त्याला अनेक हिंदू व मुसलमान साधू भेटले आणि त्यांच्याही विचारांचा त्याच्या कवित्वावर प्रभाव पडला. आयुष्याचा अखेरचा काळ याने काशीक्षेत्रीच घालविला.

दीन दरवेशाचा काव्यसंभार अफाट आहे. त्याने सुमारे सव्वा लाख कुंडल्यांची (एक रचनाप्रकार) रचना केली, असे सांगतात. परंतु त्यांचा अजून स्वतंत्र संग्रह निघालेला नाही. आपल्या कवितेत त्याने ईश्वरभक्ती, विश्वप्रेम, परोपकार, सरळ आणि स्वतंत्र जीवन, जीवनाची क्षणभंगुरता व कर्मवादाचे महत्त्व, इ. विषय विवेचिले आहेत. त्याने हिंदू-मुसलमान ऐक्यावरही भर दिला आहे. त्याची एक कुंडली पुढे दिली आहे –

**हिंदू कहैं सो हम बडे, मुसलमान कहैं सो हम्म।**
**एक मूंग दो झाड है, कुण जादा कुण कम्म।**
**कुण जादा कुण कम्म, कभि करना नहि कजिया।**
**एक भगत हो राम, दूजा रहिमान से रजिया।**
**कहैं दीन दरवेश, दोय सरिता मिल सिंधू।**
**सबका साहब एक एक मुसलिम व हिंदू॥**

अर्थ – हिंदू लोक स्वतःला मोठे समजतात आणि मुसलमानही आम्ही मोठे आहो, असे म्हणतात. एकाच बीजाची ही दोन्ही झाडे आहेत; मग त्यात श्रेष्ठ-कनिष्ठ कोणाला समजायचे ? श्रेष्ठ-कनिष्ठतेवरून कोणी केव्हाही भांडणे करू नयेत. एक रामाचा भक्त आहे व दुसरा रहिमचा पुजारी आहे. दीन दरवेश म्हणतो, अनेक नद्या मिळूनच सागर होतो. हिंदू असो; मुसलमान असो; सर्वांचा परमेश्वर एकच आहे.

या कवीची भाषा अत्यंत साधी व वाक्प्रचारयुक्त आहे. त्याची कथनशैली प्रभावी असून, तिच्या मुळाशी त्याची गंभीर अनुभूती स्फुरण पावताना दिसते. [ उ. भा. सं. प. ]

## दीनदास

( १८३५–१८९९ इ. स. ) एक निमाडी लोककवी. निमाड प्रदेशात रामभक्तीचे प्रवर्तन करणारा कवी म्हणून याची प्रसिद्धी आहे. सिराली या गावी याचा जन्म झाला. सदाशिव हे याचे मूळ नाव होय. भिक्षुकी हा याचा व्यवसाय होता; पण पुढे याला रामभक्तीचा छंद जडला आणि त्याने तो व्यवसाय सोडून दिला.

कृष्णानंद किंवा रंकनाथ हा याचा गुरू होय. गुरू कृष्णभक्त आणि शिष्य रामभक्त अशी ही जोडी होती. रंकनाथाला वाटे, की दीनदासाने कृष्णभक्ती स्वीकारावी, पण त्याला तो आग्रह सोडावा लागला. त्यासंबंधी एक प्रसंग घडला, तो असा–

एकदा रंकनाथ दीनदासाच्या घरी मुक्कामाला आला. त्यानंतर एके दिवशी दीनदास रामपूजेत तल्लीन झालेला पाहून रंकनाथ त्याला म्हणाला ‘ माझा कृष्ण परमोदार आहे. मी जे मागेन ते तो मला देतो. तुझा राम तुला काही देतो काय ? देत असल्यास तुझ्या घरचे हे दैन्य का शिल्लक राहिले असते?’ त्यावर दीनदास आपल्या गुरूला म्हणाला. ‘मी माझ्या रामाकडे निर्वाहापेक्षा अधिक काही मागतच नाही. मागितले असते, तर त्याने दिलेही असते. माझ्या संसाराला रोज एक रुपया लागतो व रामप्रभू मला तो न चुकता देतो. तुम्ही माझ्या घरी आल्यापासून या घरात सुकाळ करून टाकला आहे. त्यामुळे

मला त्या रुपयाचीही गरज पडली नाही. तुम्ही इथे आल्याला आज बावीस दिवस झाले. तेवढ्या दिवसांचे बावीस रुपये राममूर्तीच्या पायापाशी आहेत, ते तुम्ही पाहावे. रंकनाथाने ते रुपये मोजून पाहिले आणि ते बावीस भरले. ते पाहून रंकनाथाला शिष्याची योग्यता पटली आणि त्याने त्याला रामभक्तीचाच उपदेश केला.

दीनदासाची पदे दीनदासपदावली या नावाने प्रसिद्ध आहेत आणि ती सारी पदे रामभक्तीने रंगलेली आहेत. त्यांतील एक पद असे –

मन रघुबर क्यों नहि गावे, हरि छांड अवर कस भाव रे ।।
भयो कुपथकारी दुर्जन संगत, लघु लाचन-खड चाहे ।
कल्पवृक्ष सम संत समागम अवध राम रस भाव रे ।।
नहु साधन फल देतु न कलि-मूं श्रम करि वय-रव गमावे ।
नाम-सुधा-सरि त्यागी करि केऊं तू मृगजल-खड धाव रे ।।

अर्थ – हे मना ! तू रामाचे गुण का गात नाहीस ? त्याला सोडून तुला अन्य गोष्टी कशा काय आवडतात ? दुर्जनांची संगत हे कुपथ्य आहे. ती मनाला मोहवश करते. संतसमागम हा कल्पवृक्षासारखा असतो. हे मना ! तू रामाचे चिंतन कर. कलियुगात इतर सर्व साधने निष्फळ आहेत. तू वृथा त्यांच्या पायी आयुष्य गमावू नकोस. नामसुधेचे सरोवर सोडून तू मृगजलामागे धावत आहेस, हे बरे नव्हे.

निमाडी लोक दीनदासाला फार मानतात. [ नि. उ. सा. ]

**दीनार** एक प्राचीन भारतीय नाणे. हे सोन्याचे असून, त्याचे वजन सुमारे ६२ गुंजा (१२४ ग्रेन) होते. हे चंद्रगुप्त (द्वितीय) या सम्राटाच्या काळात प्रचारात आले. प्राचीन काळी पश्चिम भारतातील बहुतेक बंदरांचा रोमशी व्यापारी संबंध होता. या संबंधातून देनेरियस हे रोमन नाणे पश्चिम भारतात येत असे. चंद्रगुप्ताने इ. स. च्या ५ व्या शतकाच्या आरंभी शकांचा पराभव करून पश्चिम भारतात आपली अधिसत्ता प्रस्थापित केल्यानंतर त्याला या रोमन नाण्याचा परिचय झाला आणि त्याने त्याच आकार-प्रकाराचे व वजनाचे स्वतंत्र नाणे पाडून प्रचारात आणले. या नाण्याचे दीनार हे नावही मूळ देनेरियस् या रोमन नावाचे हिंदीकरण आहे. गुप्तांच्या कोरीव लेखांत या नाण्याचे उल्लेख अनेकवार आढळतात. गुप्त साम्राज्यानंतर अनेक शतके हे नाणे प्रचारात असावे. सम्राट हर्षाने आपला संगीत गुरू कनक याला एक लक्ष दीनार दक्षिणा म्हणून दिले, असा उल्लेख राजतरंगिणीत आहे (७.११२७). पुढे दीनार, निष्क, इ. वेगवेगळ्या नाण्यांची नावे भिन्न परंपरांची पर्यायवाची मानली जाऊ लागली. [ भा. सि.; गु. सा. इ. २ ]

**दीने इलाही** अकबराने स्थापन केलेला धर्म. याला तौहिदे इलाही असेही नाव होते. पाहा – अकबर.

**दीप** दिवा. याची व्याख्या अशी– 'दीप्यते दीपयति वा स्वं परं चेति' = स्वतः प्रकाशतो किंवा दुसऱ्याला प्रकाशित करतो, तो दीप होय (श. क.).

दिवा हा अग्नीचे किंवा तेजाचेच एक रूप आहे. अग्नीचा शोध हा मानवी प्रगतीच्या इतिहासातला एक मोठा टप्पा आहे. वैदिक काळात हा अग्नी यज्ञकुंडाच्या आश्रयाने आपले अविच्छिन्न अस्तित्व टिकवून राहत असे. नंतर दीपाच्या रूपाने तो मानवाला प्रकाश देऊ लागला व अनेक ठिकाणी संचार करू लागला. अगदी प्राथमिक अवस्थेतले दिवे हे दगडाचे किंवा शिंपांचे असत. नंतरच्या काळात मातीचे व धातूचे दिवे बनवले जाऊ लागले. रामायण व महाभारत या ग्रंथांत सोन्याच्या व रत्नाच्या दीपांचाही उल्लेख आहे.

प्रारंभी दीपपात्राचा आकार अर्घ्यपात्रासारखा असे व त्याला एका बाजूला वात पेटविण्यासाठी चोच केलेली असे. याला पणती असे नाव आहे. पण पुढे पणतीच्या आकारात कलाकुसर आली आणि त्याचे आकार-प्रकार विविध झाले. मत्स्यकूर्मादी दशावतार, शंखचक्रादी देवांची आयुधे, मोर, पोपट, हंस इ. पक्षी व सिंह, हत्ती, घोडा यांसारखे पशू यांच्या आकारांचे दिवे निर्माण होऊ लागले. दीपमाला ठेवण्यासाठी लाकडी किंवा दगडी स्तंभही तयार होऊ लागले. नंतर त्या स्तंभांवर विविध प्रकारचे नक्षीकामही करण्यात आले. त्यातूनच पुढे दीपवृक्षाची कल्पना निघाली. दीपवृक्ष म्हणजे एका स्तंभाला अनेक फांद्या निर्माण करून तयार केलेला वृक्षाच्या आकाराचा दीपगुच्छ होय.



दीपवृक्ष

आधुनिक काळात दिव्याचे अनेक प्रकार दृष्टीस पडतात. समईच्या स्तंभात आणि चाडच्यातही विविध आकार आढळतात. समई कुठे कमळासारखी असते, तर कुठे तिच्या वरच्या

भागावर देवासाठी घुमटी बनवलेली असते. कुठे तिच्या शीर्ष-स्थानी मोर, हत्ती किंवा नागही बसवलेले असतात.

आरती ओवाळण्यासाठी जे दिवे तयार करतात, त्यांतही विविध प्रकार आढळतात. अशा दिव्यांना हातात धरण्यासाठी



पंचारती – दीप

जी मूठ असते, तिचा आकार कधी नागासारखा, कधी माशा-सारखा, तर कधी एखाद्या पक्ष्यासारखा असतो. एका पंचारती दिव्यामध्ये पाच सुवासिनी हातात दिवे घेऊन उभ्या आहेत व त्यांच्या मागे एक घोडेस्वार आहे, असे दाखवलेले आहे. काही वेळा आरतीच्या दिव्याला एकाच वेळी शंभर ते दोनशे वाती लावायची सोय केलेली असते.

दीपलक्ष्मी नामक दिव्यांचा एक निराळा प्रकार आहे. ही दीपलक्ष्मी कधी सिंहावर, कधी हत्तीवर, तर कधी एकाद्या पक्ष्यावर आरूढ झालेली असते व तिच्या हाती दिवा असतो.

काही दिव्यांना टांगण्यासाठी साखळी जोडलेली असते. यांना लामणदिवे म्हणतात. या दिव्यांचेही प्रकार अनेक आहेत. हंडया व झुंबरे हे त्यांपैकीच विशेष शोभिवंत प्रकार होत.

उत्तर भारतात मोगलांच्या अमदानीत तयार झालेले दिवे प्रामुख्याने पितळेचे असून, त्यांत जाळीदार नक्षी कोरलेली असते.

प्रकाशाचे साधन या दृष्टीने दिव्याला व्यवहारात असाधारण महत्त्व आहे. त्यामुळेच त्याला धार्मिक महत्त्वही प्राप्त झाले आहे. दीपाचे माहात्म्य कालिका पुराणात सांगितले आहे, ते असे ( का. पु. ६८ )–

दीपेन लोकान् जयति दीपस्तेजोमयः स्मृतः ।
चतुर्वर्गप्रदो दीपस्तस्माद्दीपं यजेत् प्रिये ॥

अर्थ– (शिव म्हणतो ) दीपामुळे लोकांवर जय मिळवता येतो. दीप हा तेजोमय आहे. तो धर्मार्थकाममोक्षप्रद आहे. म्हणून हे प्रिये, दीप प्रज्वलित करावा.

दीपदान हे पुण्यप्रद कर्म मानलेले आहे. कार्तिक मासात विष्णूच्या समोर दिवा लावल्यास तुलादानाचे व सर्व तीर्थांत अवगाहन केल्याचे पुण्य मिळते आणि पितरांचाही उद्धार होतो. नरकचतुर्दशीला दीपदान केल्यास नरकवास भोगावा लागत नाही, असे सांगितले आहे.

हे झाले नैमित्तिक दीपदानासंबंधी. पण दीपविषयक नित्य-कर्म म्हणजे घरात देवाजवळ आणि अंगणात तुळशीवृंदावना-जवळ सांजवात लावणे हे होय. बहुतेक सुसंस्कृत कुटुंबांत स्त्रिया ही गोष्ट करतात आणि त्या वेळी पुढील श्लोक म्हणतात–

दीपज्योतिः परं ब्रह्म दीपज्योतिर्जनार्दनः ।
दीपो हरतु पापानि सन्ध्यादीप नमोऽस्तु ते ॥

दिव्याची प्रसंगनिष्ठ अशी विविध नावेही आढळतात. दिवाळीच्या वेळी आकाशात उंच लटकणाऱ्या दिव्याला आकाशदिवा म्हणतात. तो पितरांना प्रकाश देतो, अशी समजूत आहे. लग्नकार्यात एक लामणदिवा रोवळीत ठेवतात. त्याला शकुनदिवा असे नाव आहे. लग्नाच्या वेळी करवली तो दिवा हातात धरून वधूवरांच्या मागे उभी राहते. दिव्याच्या अमावास्येला कणकेचे, तांदळाच्या उकडीचे किंवा बाजरीच्या पिठाचे दिवे करून त्यांची पूजा करतात. मंगळागौरीच्या पूजेत



दीपलक्ष्मी

आणि लग्नातल्या ऐरिणीदानाच्या झालीतही कणकेचे दिवे ठेवतात. या दिव्यांना पिष्टदीप म्हणतात. देवपूजेच्या वेळी किंवा कोणत्याही मंगल विधीत साक्षी म्हणून एक दिवा तेवत

ठेवलेला असतो, त्याला स्थापितदीप म्हणतात. शंकराच्या देवालयात बारमास, अष्टौप्रहर अखंड तेवत राहणारा एक दिवा असतो, त्याला नंदादीप असे नाव आहे.



लामणदिवा

औक्षण म्हणजे आयुष्यवर्धन; या विधीसाठी दिव्याचाच उपयोग करतात. दिवाळीच्या पाडव्याला पत्नी पतीला आणि भाऊबिजेच्या दिवशी बहीण भावाला दिव्याने ओवाळते. मांगलिकात पुरंध्री वधूवरांना ओवाळतात. वाजिनीराजन विधी म्हणून घोडयांना ओवाळण्याच्या रूढीचा कालिदासाने उल्लेख केला आहे (रघु. ४.२५). पोळयाच्या दिवशी बैलांना आणि दिवाळीच्या पाडव्याला गाई-वासरांनाही ओवाळण्याची प्रथा आहे. हे सर्व औक्षणाचेच प्रकार होत.

दीप हा षोडशोपचार पूजेतला एक उपचारही आहे. हा उपचार अनेक प्रकारांनी केला जातो. विष्णूच्या किंवा पांडुरंगाच्या मंदिरात रोज रात्री शेजारती आणि पहाटे काकडारती करण्याची पद्धत आहे. काशी, प्रयाग, गया, इ. ठिकाणी यात्रेकरू संध्याकाळी गंगेच्या घाटावर जातात आणि एका द्रोणात फुले व फुलवात ठेवून ती वात पेटवतात. मग ते द्रोण नदीच्या पात्रात सोडून देतात. हे गंगेला उपचारसमर्पण होय.

देवापुढे लावायच्या दिव्यात तेल किंवा तूप यांशिवाय अन्य कोणतेही ज्वलनद्रव्य वापरू नये, असे अग्नी पुराणातील आह्निकतप नामक अध्यायात सांगितले आहे.

दिव्यातली वात पद्मसूत्र, दर्भगर्भसूत्र, वाख या द्रव्यांपासून करावी, असे सांगितले असून, दीपपात्र लाकडी, लोखंडी, मातीचे किंवा करवंटीचे प्रशस्त मानले आहे. दिवा ठेवण्यासाठी दीपवृक्ष करावा आणि त्यावर दिवा ठेवावा, तसेच जमिनीवर दिवा ठेवू नये; कारण भूमीला दिव्याचा ताप सहन होत नाही, असेही सांगितले आहे.

दिव्यासंबंधी काही निषेध ठरलेले आहेत, ते असे –

देवापुढे लावलेला दिवा चोरून नेणारा आंधळा होतो आणि फुंकर घालून दिवा विझवणारा तिरळा होतो. अतएव तसे कोणी करू नये, असे कालिका पुराणात सांगितले आहे. श्राद्धप्रसंगी दिव्यात वस्त्राची वात घालू नये. पेटलेला दिवा हातातून पडू देऊ नये.

दिव्याच्या ज्योतीच्या रंगरूपावरूनही काही शुभाशुभ संकेत ठरवलेले आहेत, ते असे –

> रूक्षैर्लक्ष्मीविनाशः स्यात् श्वेतैरन्नक्षयो भवेत् ।
> अतिरक्तेषु युद्धानि मृत्युः कृष्णशिखासु च ॥
>
> ( पुरुषोत्तममाहात्म्य )



समई

अर्थ – दिव्याच्या ज्योती रुक्ष असता धनाचा नाश, पांढऱ्या असता अन्नदुर्भिक्ष, फार तांबडया असता युद्धे व काळया असता मृत्यू होईल, (असे समजावे).

नृत्यकलेच्या प्रांतातही दिव्याने प्रवेश केला आहे. हातांत, तोंडात आणि डोक्यावर पेटत्या समया घेऊन जे नृत्य करतात, त्याला दीपनृत्य अशी संज्ञा आहे.

दीप किंवा दीपज्योत हे बुद्धीचे व ज्ञानाचे प्रतीक मानलेले आहे. 'तमसो मा ज्योतिर्गमय' = अंधारापासून मला प्रकाशज्योतीकडे ने, अशी उपनिषदांतील ऋषींची प्रार्थना आहे. कारण ज्ञान हे अज्ञानाचा अंधकार दूर करून आत्मराजाला प्रकाशित करते. शरीरातील जीवनतत्त्वाला प्राणज्योत म्हटले आहे. ही ज्योत जोवर तेवत असते, तोवरच माणसाचे जीवन असते. ती ज्योत मालवली,

की मनुष्य निप्राण होतो. [ सं. प्र.; डि. सिं.; की. पॉं.; लँप्स ऑफ इंडिया – श्री. दि. गं. केळकर, १९६१ ]



दीपनृत्य

**दीपक** एक राग. याची जाती संपूर्ण आहे. यात ऋषभ, गंधार व निषाद हे स्वर शुद्ध व कोमल असतात आणि मध्यम तीव्र असतो. हा राग काफी, केदार, बिहाग, भीमपलास व शंकराभरण या रागांपासून उत्पन्न होतो. हा राग संगीतशास्त्रातल्या हनुमन्मतातला आहे. हा सूर्यतेजापासून उत्पन्न झाला व याच्या गायनाने आपोआप दिवे लागतात, अशी आख्यायिका प्राचीन कालापासून सांगतात. गानसमय-दिवसाचा दुसरा प्रहर किंवा दिवे लागण्याची वेळ. हा राग गायला जात असता गाणाऱ्याच्या हृदयात दाह होतो, असे म्हणतात. या रागाविषयी पुढील आख्यायिका प्रचलित आहे–

एकदा अकबर बादशहाने आपल्या दरबारात तानासेनला दीपक राग गाण्याचा आग्रह केला. निरुपायाने तानसेनाने तो राग आळवला. त्यामुळे तानसेनाच्या हृदयात आग सुरू झाली व ती काही केल्या शमेना. अखेर तो दिल्ली सोडून गुजरातेत वडनगर येथे गेला. तिथे योगायोगाने तिथल्या एका नागरिकाची कन्या मल्हार राग गात होती. तो राग गायल्यावर पाऊस पडला व तानसेनाच्या हृदयातली आग शमली. तेव्हापासून तानसेनाने, दीपक राग कोणीही गाऊ नये, असा नियम घालून ठेवला. म्हणून हा राग शास्त्रात असला, तरी तो फारसा प्रचारात मात्र नाही, असे म्हटले तरी चालेल. यालाच दीपराग म्हणतात. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**दीपंकर** एक बौद्ध देव. हा गौतम बुद्धाच्या फार पूर्वी होऊन गेलेला एक बुद्ध आहे. हा दीपवती नगरीचा राजा होता. याच्या पित्याचे नाव अर्चिष्ट्र आणि मातेचे नाव सुशीला असे होते. त्याची माता प्रसूतीच्या वेळी एका तळयावर गेली असता, त्या तळयातून एक बेट वर आले आणि त्या बेटावरच याचा जन्म झाला, अशी कथा आहे. हा जन्मताच सगळीकडे दिवे लागले, म्हणून याचे नाव दीपंकर ठेवण्यात आले. जन्माच्या दुसऱ्याच दिवशी याने देव आणि मानव यांच्या कल्याणासाठी पृथ्वीवर संचार सुरू केला. हा एक लक्ष वर्षे पृथ्वीवर राहिला, अशी बौद्धधर्मियांची श्रद्धा आहे.

याचा वर्ण पिवळा असून, हा आपल्या हाताने अभयमुद्रा दाखवतो, असे याचे रूपध्यान आहे. [ गॉं. नॉं. बु. ]

**दीपंकर श्रीज्ञान** (९८२ – १०५४ इ. स.) एक बौद्ध आचार्य, धर्मप्रचारक आणि श्रेष्ठ ग्रंथकार. याचा जन्म बिहारमधल्या भागलपूर जिल्ह्यातील सहोर नामक गावी एका राजघराण्यात झाला. याच्या पित्याचे नाव कल्याणश्री आणि मातेचे प्रभावंती असे होते. दीपंकराचे मूळ नाव चंद्रगर्भ असे होते. त्याला पद्मगर्भ आणि श्रीगर्भ नामक दोन बंधू होते. चंद्रगर्भाच्या पित्याचा विक्रमशिला विहाराशी घनिष्ट संबंध होता. चंद्रगर्भाचा जन्म झाला, तेव्हा कल्याणश्री आपल्या नवजात बालकासह पाचशे रथांच्या मिरवणुकीने विक्रमशिला विहारात पूजेसाठी गेला होता, अशी आख्यायिका आहे.

चंद्रगर्भ तीन वर्षांचा होताच त्याचे शिक्षण सुरू झाले. त्याची बुद्धी अत्यंत तल्लख असल्यामुळे अकराव्या वर्षीच तो वैयाकरण बनला. त्या काळी उच्च शिक्षण केवळ विहारांतूनच मिळत असे. विक्रमशिला विहाराची विद्यापीठ म्हणून अत्यंत ख्याती होती. परंतु जितारी नामक एका विद्वान बौद्ध भिक्षूच्या आदेशाने चंद्रगर्भ पुढील शिक्षणासाठी नालंदा विहारात गेला.

नालंदा विहाराचे प्रधान आचार्य भिक्षू बोधिभद्र यांच्या जवळ चंद्रगर्भाचे उच्च शिक्षण झाले. वयाची विशी ओलांडल्याशिवाय भिक्षू होता येत नसे; म्हणून बोधिभद्राने चंद्रगर्भाला श्रामणेर दीक्षा दिली व दीपंकर श्रीज्ञान असे त्याचे नाव ठेवले.

दीपंकराची भिक्षू बनण्याची ओढ ध्यानी घेऊन, बोधिभद्राने त्याला एका वर्षानंतर राजगृह येथे आपले गुरू अवधूतिपाद अथवा मैत्रीपा यांच्याकडे नेले. मैत्रीपा ( पूर्वाश्रमीचा मैत्रीगुप्त ) हा विद्वत्तेचा मार्ग सोडून सिद्ध बनला होता.

मैत्रीपाने दीपंकराला शिष्य म्हणून स्वीकारले. दीपंकराने त्याच्याजवळ सहा वर्षे राहून धार्मिक ग्रंथांचा अभ्यास केला.

दीपंकर त्यानंतर मंत्रयान व सिद्धयान यांच्या अभ्यासासाठी विक्रमशिला विहारात गेला. तिथे अकरा वर्षे राहून त्याने नारोपा (नरोत्तमपाद) नामक सिद्धाजवळ अध्ययन केले. त्यानंतर दोन वर्षेपर्यंत त्याने वज्रासन महाविहारात महाविनयधर शीलरक्षिताजवळ विनयपिटकाचा अभ्यास केला. अशा प्रकारे एकतीस वर्षांच्या वयात दीपंकर हा त्रिपिटक आणि तंत्रशास्त्र यांच्या क्षेत्रात महापंडित बनला.



दीपंकर श्रीज्ञान

परंतु एवढ्यानेही त्याची ज्ञानपिपासा शमली नाही. विक्रमशिला विहारात कलिकालसर्वज्ञ रत्नाकरशांती आणि तर्कपंडित ज्ञानश्री यांच्या सहवासात असताना आचार्य धर्मपालाची कीर्ती त्याच्या कानी आली होती. धर्मपाल त्या वेळी सुवर्णद्वीपात (सुमात्रामध्ये) होता; परंतु संपूर्ण बौद्ध जगतात त्याच्या विद्वत्तेचा आणि धर्मशीलतेचा डिंडिम वाजत होता. म्हणून दीपंकराने त्याच्याकडे जायचे ठरवले. तो प्रथम ताम्रलिप्तीला गेला आणि तिथून चौदा महिने प्रवास करून सुमात्राला पोचला. तिथे त्याने बारा वर्षे वास्तव्य करून धर्मपालाजवळ असंगाचा अभिसमयालंकार, शांतिदेवाचा बोधिचर्यावतार, इ. अनेक धर्मग्रंथांचा अभ्यास केला.

वयाच्या चव्वेचाळिसाव्या वर्षी दीपंकर सुमात्राहून विक्रमशिलेला परत आला आणि आपल्या असाधारण विद्वत्तेच्या बळावर तिथला प्रधान विद्वान बनला. तिथे त्याच्या हाताखाली ५१ विद्वान काम करीत होते. त्या विहाराच्या स्वाधीन असलेल्या १०८ मंदिरांची व्यवस्थाही दीपंकराकडेच होती. विक्रमशिलेतील आठ महापंडितांत दीपंकराचे स्थान अनन्यसाधारण मानले जात होते.

दीपंकर विक्रमशिलेत अध्यापन करीत असतानाच त्याच्याकडे तिबेटातून एक प्रतिनिधिमंडळ आले आणि त्याने दीपंकराला विनंती केली, की 'तिबेटातील देवगुरू ज्ञानप्रभ यांची अशी उत्कट इच्छा आहे, की आपण तिबेटात यावे आणि तांत्रिक क्रियाकलापात रुतून पडलेल्या तिबेटी बौद्ध धर्माचे शुद्धीकरण करावे.' परंतु विक्रमशिलेतील कार्यभारामुळे दीपंकराने तिबेटात जाण्याचे नाकारले.

हे ज्ञानप्रभाला समजल्यावर त्याने पुनः प्रतिनिधिमंडळ पाठवण्याचे ठरवले आणि त्याच्या खर्चासाठी मानससरोवराजवळील सोन्याच्या खाणीतून सोने गोळा करण्याचे योजले. परंतु सोने गोळा करण्याच्या प्रयत्नात असताना ज्ञानप्रभ पकडला गेला आणि कारावासातच मृत्यू पावला. त्याचा पुत्र बोधिप्रभ याने पित्याचे अपुरे काम हाती घेऊन दुसरे शिष्टमंडळ दीपंकराकडे पाठवले. या शिष्टमंडळाकडून ज्ञानप्रभाच्या शोचनीय मृत्यूची वार्ता ऐकून दीपंकराचे हृदय कळवळले आणि त्याने तिबेटात जाण्याचे मान्य केले.

विक्रमसिंह नामक एका दुभाष्यासह दीपंकर नेपाळमार्गे तिबेटात गेला. त्याचा पहिला मुक्काम थुङ विहारात झाला. त्या ठिकाणी विक्रमसिंह मृत्यू पावला. पुढे दीपंकर गुगे प्रांतात प्रवेशताच देवगुरू बोधिप्रभाने त्याचे स्वागत केले आणि थो–लिन विहारात त्याला ठेवून घेतले. त्या विहारात आठ महिने राहून त्याने धर्मप्रचार केला. त्याच ठिकाणी त्याने अनेक भारतीय ग्रंथांचा तिबेटी भाषेत अनुवाद केला आणि बोधिपथप्रदीप हा प्रसिद्ध ग्रंथ रचला. या ग्रंथाचा तिबेटी अनुवाद उपलब्ध आहे.

मानससरोवर प्रांतात तीन वर्षे धर्मप्रचार केल्यावर दीपंकर पूर्वेकडील पुरङ नामक गावी गेला. त्या ठिकाणी डोम-तोनप नामक तिबेटी पुरुषाने त्याचे शिष्यत्व पत्करले. त्याने अखेरपर्यंत दीपंकराची निष्ठेने सेवा केली आणि आपल्या गुरूच्या चरित्रावर गुरुगुणधर्माकर या नावाचा ग्रंथ रचला.

यानंतर दीपंकराने तिबेटभर भ्रमण केले व जागोजाग धर्मप्रवचने केली. त्याने अनेक तिबेटी लोकांना भगवान बुद्धाच्या संदेशाचे रहस्य पटवून देऊन त्यांच्या मनांतील भ्रांत कल्पनांचे निराकरण केले; अनेक संस्कृत ग्रंथांचा तिबेटी अनुवाद केला; अनेक धर्मग्रंथांवर भाष्ये रचली आणि अशा प्रकारे तिबेटात पूर्वी गेलेल्या शांतरक्षित व कमलशील या दोन आचार्यांच्या कार्यावर कळस चढवला. दीपंकराच्या धर्मप्रसारकार्यामुळे भारत आणि तिबेट यांचे सांस्कृतिक संबंध अत्यंत जिव्हाळ्याचे बनले. संस्कृत ग्रंथांचे तिबेटी अनुवाद करण्याच्या कामात दीपंकराला तिबेटी बौद्ध भिक्षू रत्नभद्र याचे विशेष सहकार्य लाभले. हा रत्नभद्र देवगुरू ज्ञानप्रभाच्या प्रेरणेने काश्मीरात राहून संस्कृत शिकला होता. तो दीपंकराचा भक्त बनला होता.

दीपंकराने इ. स. १०५१ मध्ये येर–व नामक विहारात कालचक्रावर टीका लिहिली आणि इ. स. १०५४ मध्ये वयाच्या ब्याहत्तराव्या वर्षी तिबेटातील ने–थङ या गावी देहत्याग केला. तिबेटातील तेरा वर्षांच्या निवासकाळात दीपंकराने तिबेटी जनमानसावर एवढा प्रभाव गाजवला, की याच्या निवासाने पुनीत झालेली स्थाने तिबेटी लोक आजही वंदनीय मानतात. तिबेटात तो अतीश किंवा अतिशय या नावाने ओळखला जातो. पाहा – अतीश. [ आजकल – वार्षिक अंक, डिसेंबर, १९५६; म. च. को.; हिं. सा. वि. ]

**दीपपतनशांती** तेवत असलेला दिवा खाली पडून विझला, तर ते अशुभ समजून, त्याच्या निवारणार्थ ही शांती करतात. हिचा विधी असा —

दिवा ज्या ठिकाणीं पडला असेल, ती जागा शेणाने सारवितात आणि मग त्या ठिकाणी पंचगव्य शिंपडून ती शुद्ध करतात. नंतर तिथे अग्नीची आणि मुख्य देवतेची स्थापना करतात. तांदुळांचे अष्टदल कमळ काढून त्यावर कलश मांडतात आणि त्या कलशावर वैश्रवण देवतेची चांदीची प्रतिमा स्थापतात. त्यानंतर चार दिशांना दक्ष, हिरण्यपाणी, सर्वोत्पातशमन आणि ईश्वर या देवतांचे आवाहन करतात. मग सर्व देवतांची यथाविधि पूजा करतात. प्रधान यागाच्या वेळी मुख्य देवतेला समिधा व आज्य यांच्या १०८ आहुती देतात. इतर देवतांनाही याच द्रव्याने आहुती देतात. बलिदानाचा विधी ग्रहमखात सांगितल्याप्रमाणे करतात. देवतांची उत्तरपूजा झाल्यावर यजमानाला अभिषेक करतात.

या शांतीबरोबर ग्रहमख करावा की नाही, यासंबंधी विकल्प आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**दीपमालिका** एक जैन व्रत. आश्विन अमावस्येला प्रभातकाली स्वाती नक्षत्रावर पावापुरी येथे तीर्थंकर महावीराचे निर्वाण झाले. त्या वेळी देवांनी तिथे जाऊन निर्वाणकल्याण हा उत्सव साजरा केला आणि दीपदान केले. या पवित्र घटनेची स्मृती जागविण्यासाठी जैन लोक हे व्रत करतात. उपवास, महावीराची पूजा, दिवसभर धर्मचिंतन, 'ओं ह्रीं श्रीमहावीरस्वामिने नमः' या मंत्राचा जप व सायंकाळी घरोघर दीपाराधना असे या व्रताचे विधान आहे. [ जै. व्र. वि. सं. ]

**दीपमाळ** एक महाराष्ट्रीय शिल्प. महाराष्ट्रातील मंदिरांसमोर दिवे लावण्यासाठी जे दगडी स्तंभ उभारलेले असतात, त्यांना दीपमाळा म्हणतात. त्या दहा फुटांपेक्षा अधिक उंच असतात. त्यांचा आकार गोल, षट्कोनी किंवा अष्टकोनी असून, वर निमुळता होत गेलेला असतो. दिवे लावण्यासाठी त्यांना खालपासून वरपर्यंत क्रमाने लहान कोनाडे अथवा पायऱ्या केलेल्या असतात.



दीपदंड

मंदिरांत होणाऱ्या उत्सवांत उंच ठिकाणी दिवे लावण्याची प्रथा प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. देवळासमोर सवी हात उंचीचा दगडी स्तंभ उभारून त्यावर कापूर व ज्वालाग्राही पदार्थ जाळून आरास करावी, असे पुराणांत म्हटले आहे. असे स्तंभ प्राधान्याने शिवालयासमोर असत आणि ते शिवरूप समजले जात. अशा प्रकारचे स्तंभ दक्षिणेतील देवालयांसमोर आजही आढळतात, त्यांना दीपदंड असे म्हणतात. द. भारतातील देवालयांत समयांचे व दीपलक्ष्मींचे जे शेकडो प्रकार पाहायला मिळतात, त्यांतील काही धातूच्या, तर काही दगडीही असतात. काही समयांची उंची दहा फुटांपेक्षा अधिक असून, त्यांतील काहींना झाडासारखा आकार दिलेला असतो. या दीपवृक्षांच्या शाखेशाखेवर दिवे पाजळतात. ही दीपमाळांचीच पूर्वरूपे होत, असे म्हणता येईल.



दीपमाळ

यादवकाळापर्यंतच्या मंदिरशिल्पात दीपमाळा आढळत नाहीत. इ. स. च्या तेराव्या शतकानंतर मुसलमानांच्या मिनार- शिल्पाच्या अनुकरणातून प्राचीन दीपस्तंभांना व दीपवृक्षांना दीपमाळेचे स्वरूप लाभले असावे, असा शिल्पकलेतील काही तज्ज्ञांचा कयास आहे.

महाराष्ट्रात बहुतेक गावी मंदिरांसमोर दीपमाळ असते. विशेषतः शिवाच्या आणि देवीच्या मंदिरांसमोर दीपमाळा हमखास आढळतात. जेजुरीला टेकडी-

वरील खंडोबाच्या मंदिराकडे जाणाऱ्या रस्त्यावर पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंना साडेतीनशे दीपमाळा आहेत.

पेशवेपूर्वकाळातील बहुतेक दीपमाळा दगडी आहेत. पेशवाईत दगडी दीपमाळांबरोबरच विटांच्या दीपमाळाही बांधल्या गेल्या. त्यांची रचना अगदी मिनारांसारखी आहे. म्हणजे त्या आतून पोकळ असून, त्या पोकळीत वर जाण्यासाठी नागमोडी जिना असतो. अशा दोन दीपमाळा बीड येथे खंडोबाच्या मंदिरासमोर आजही चांगल्या स्थितीत उभ्या आहेत.

मंदिरासमोर दीपमाळा बांधणे हे पुण्यकृत्य समजले जाते. काही लोक नवस फेडण्यासाठीही दीपमाळा बांधतात. 'दीपमाळ हे महाराष्ट्राचे शिल्पवैशिष्टय. सह्याद्रीच्या एकाकी सुळक्याचे प्रात्यक्षिक. आद्य धर्मभावनेचे प्रतीक!' असे या शिल्पवैशिष्टयासंबंधी श्री. स. आ. जोगळेकर यांनी म्हटले आहे. [श्री. श्री. रा. पोतदार–'स्वराज्य,' १७ नोव्हें. १९५६]

## दीपवंश

एक बौद्ध ग्रंथ. हा पालिभाषेत आहे. यात लंकेतील बौद्ध धर्माचा इतिहास सांगण्याच्या निमित्ताने महासेन राजाच्या काळापर्यंतचा (इ. स. ३२५ – ३५२) लंकेचा प्राचीन इतिहास ग्रथित केलेला आहे. बुद्धघोषाने (इ. स. ४५०) आपल्या अट्ठकथांमध्ये याचे संदर्भ घेतले आहेत. यावरून इ. स. ३५२ ते ४५० या काळात या ग्रंथाची रचना झाली असावी, असे अनुमान करता येते. याचा कर्ता मात्र अज्ञात आहे.

सिंहली अट्ठकथांतील ऐतिहासिक अंशांच्या आधारे या ग्रंथाची रचना झालेली आहे. यात प्रथम बुद्धाच्या तीन लंकायात्रांची हकीकत देऊन, पुढे तीन्ही बौद्ध संगीतींचा इतिहास नोंदविला आहे. या बौद्ध संगीतींना समांतर असलेल्या सिंहली राजवंशाचा इतिहासही यात दिलेला आहे. विशेषत: लाटदेशीय राजपुत्र विजय याने लंकेत भारतीय उपनिवेशाची स्थापना कशी केली आणि तो लंकेचा पहिला राजा कसा बनला, याची विस्तृत हकीकत या ग्रंथात आहे. तृतीय बौद्ध संगीतीनंतर बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी अशोकाचा पुत्र महेंद्र आणि कन्या संघमित्रा ही दोघे लंकेत गेली, तेव्हा विजयाचा वंशज तिस्स हा लंकेत राज्य करीत होता. त्याने बौद्ध धर्माचा स्वीकार करून त्या धर्माच्या प्रसारासाठी सर्व प्रकारे कसा प्रयत्न केला, त्याचे वृत्त या ग्रंथात मिळते. यापुढे तिस्साच्या काळानंतर लंकेवर झालेले द्रविडांचे आक्रमण, त्या आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी दुट्ठगामणी राजाने केलेले प्रयत्न, त्याने बांधलेले महास्तूपादी स्तूप, त्याच्या वंशातील वट्ठगामणीने करविलेले त्रिपिटकाचे लेखन, इ. महत्त्वपूर्ण घटनांची हकीकत देऊन, महासेन राजाच्या कारकीर्दीच्या अखेरीला हा इतिहास संपविला आहे.

रचनादृष्टया हा ग्रंथ अव्यवस्थित व पुनरुक्तिपूर्ण असून, त्याची भाषाशैलीही नीरस व सदोष आहे. परंतु लंकेचा प्राचीन इतिहास जाणून घेण्यासाठी मात्र या ग्रंथाच्या तोडीचे दुसरे साधन उपलब्ध नाही. लंकेचा राजा धातुसेन (इ. स. चे पाचवे शतक) याने एका वार्षिक उत्सवात या ग्रंथाचे पाठ करवून त्याला राष्ट्रीय गौरव प्राप्त करून दिला. [पा. सा. इ.]

## दीपव्रत

मार्गशीर्ष शुद्ध एकादशीला या व्रताचा प्रारंभ करतात. हे व्रत एक वर्षभर करावयाचे असते. याचा विधी असा–पहाटे नदीवर स्नान करतात. नंतर वैदिक मंत्र म्हणून लक्ष्मीनारायणाला पंचामृताने स्नान घालतात. तांब्याच्या अथवा मातीच्या दिव्यात नऊ धाग्यांची वात घालून तो दिवा देवापुढे तेवत ठेवतात. उद्यापनाच्या वेळी सोन्याचा दिवा करून तो दान देतात. फल–विष्णुलोकाची प्राप्ती.

## दीपावली

एक सण व दीपोत्सव. हा भारतात सर्वत्र साजरा होतो. पावसाळा संपून नवी पिके हाती आल्यानंतर शरद ऋतूच्या ऐन मध्यभागी, आश्विन व कार्तिक या महिन्यांच्या संधिकालात हा सण येतो. आश्विन वद्य त्रयोदशी ते कार्तिक शुद्ध प्रतिपदा हे चार दिवस या सणाचे असतात.

या सणाचा उगम फार प्राचीन काळी, आर्यांचे वास्तव्य उत्तर ध्रुवप्रदेशात होते, त्या कालातच झाला असे म्हणतात. सहा महिन्यांची दीर्घ रात्र संपून सहा महिन्यांचा दिवस सुरु होताच त्या प्रदेशातील लोकांना नवजीवन प्राप्त झाल्यासारखे वाटत असावे आणि त्यासाठीच ते हा आनंदोत्सव करीत असावे. आर्यांच्या सात पाकयज्ञांपैकी पार्वण, आश्वयुजी व आग्रहायणी या तीन यज्ञांचे एकीकरण व रूपांतर होऊन दीपावलीचा उत्सव सुरू झाला असावा, अशीही कल्पना आहे. पार्वण पाकयज्ञ हा पितरांसाठी असे; आश्वयुजी हा इंद्र व कृषिदेवता सीता यांच्यासाठी असे आणि आग्रहायणी हा संवत्सरसमाप्तीचा याग असे.

काही लोकांची अशी श्रद्धा आहे, की चौदा वर्षांचा वनवास संपवून रामचंद्र सीतेसह अयोध्येला परत आला, तो याच दिवसांत. त्या वेळी अयोध्येतल्या प्रजेने दीपोत्सव केला आणि तेव्हापासून हा उत्सव दर वर्षी चालू झाला.

पुराणांत दीपावलीसंबंधी कथा आहे, ती अशी–प्राचीन काळी बळी नावाचा राजा फार बलाढ्य झाला. त्याने सर्व पृथ्वी जिंकली व लक्ष्मीसह सर्व देवांना बंदीत टाकले. मग

विष्णूने वामनावतार घेतला व बळीच्या यज्ञात जाऊन त्याच्या-कडे त्रिपादभूमीची याचना केली. बळीने त्रिपादभूमी वामनाला दिली. वामनाने दोन पावलांतच पृथ्वी व स्वर्ग व्यापला. तिसरे पाऊल कुठे ठेवू, असे विचारताच बळीने आपले मस्तक नमवून यावर तिसरे पाऊल ठेव, असे वामनाला सांगितले. वामनाने बळीच्या मस्तकी पाय ठेवून त्याला पाताळात दडपले. हे सर्व आश्विन वद्य त्रयोदशी ते अमावास्या या तीन दिव-सांत घडले. नंतर वामनाने बळीला वर मागण्यास सांगितले. तेव्हा तो म्हणाला, 'देवा, केवळ लोककल्याणासाठी मी एक वर मागतो. या तीन दिवसांत जो कोणी यमाप्रीत्यर्थं दीपदान करील, त्याला यमयातना भोगाव्या लागू नयेत आणि त्याच्या घरात निरंतर लक्ष्मीचे वास्तव्य असावे.' त्यावर वाम-नाने 'तथास्तु' म्हटले. तेव्हापासून दीपदान व दीपोत्सव करण्याची प्रथा सुरू झाली. कार्तिक शु. प्रतिपदेला बळीचा दिवस मानून लोक त्याही दिवशी आनंदोत्सव करू लागले.

जैन लोकही दीपावलीचा उत्सव वैदिक धर्मियांइतक्याच आस्थेने पाळतात. त्यांच्या हरिवंश पुराणात या उत्सवाचा प्रारंभ कसा झाला, त्याचा वृत्तांत पुढीलप्रमाणे दिला आहे–

आश्विन अमावास्येला महावीर या शेवटच्या तीर्थंकराचे निर्वाण झाले. त्या वेळी जे देव, राजे व भक्त तिथे उपस्थित होते, त्यांनी महावीराची पूजा करून दीपाराधना केली. 'ज्ञानदीप निर्वाणाला गेला आहे; आता आपण साधे दिवे लावून प्रकाश कायम ठेवू या,' असा जैनांनी विचार केला. तेव्हापासून महावीराचे भक्त दरवर्षी जिनेश्वराची पूजा करून दीपोत्सव करू लागले. जैनांनी ती तिथी महत्त्वाची मानून वीर-निर्वाण-संवत नावाचा एक नवा शक चालू केला.

दिवाळीच्या उगमासंबंधी ऐतिहासिक कल्पना अशी आहे, की सम्राट अशोकाच्या दिग्विजयाप्रीत्यर्थ हा महोत्सव सुरू झाला. दुसरी कल्पना अशी आहे, की सम्राट चंद्रगुप्त विक्रमा-दित्य याच्या राज्याभिषेकसमारंभात जो दीपोत्सव करण्यात आला, तोच पुढे दर वर्षी साजरा करण्याची प्रथा पडली.

धार्मिक स्वरूप– या उत्सवात निरनिराळ्या दिवशी जे धार्मिक विधी केले जातात, त्यांचे विस्तृत वर्णन पुराणात केलेले आहे, ते असे–

धनत्रयोदशी– आश्विन वद्य त्रयोदशी. या दिवशी यमराजाला प्रसन्न करण्यासाठी दीपदान करतात. उंच जागी तेलाचे दिवे लावतात. घरातील सोने– नाणे व अलंकार स्वच्छ करून नीट ठेवतात. उपास करून विष्णू, लक्ष्मी, कुबेर, योगिनी, गणेश, नाग व द्रव्यनिधी या देवतांचे पूजन करतात. या दिवशी अखंड दीप लावावा, पायसाचा नैवेद्य करावा आणि यथाशक्ति परोपकार करावा, असे सांगितले आहे. या व्रताची कथा अशी–

एकदा यमराजाने आपल्या दूतांना विचारले. 'तुम्ही प्राण्यांचे प्राण हरण करता त्या वेळी तुम्हाला दुःख होत नाही का? त्या मरत्या प्राण्यांची तुम्हाला दया येत नाही का?' त्यावर यमदूत म्हणाले. 'एकदा असा प्रसंग आला होता. हेमराज नामक राजाला एक पुत्र झाला. षष्ठीपूजनाच्या दिवशी सटवी देवीने येऊन त्याचे भविष्य सांगितले, की 'हा मुलगा लग्नानंतर चौथ्या दिवशी मरेल.' ते ऐकून राजाने मुलाला एका गुहेत लपवून ठेवले. पण सोळाव्या वर्षी त्याचे लग्न होताच आम्ही त्याचे प्राण हरण करायला गेलो. त्या वेळी तिथे झालेला विलाप ऐकून आमचे मन द्रवले. महाराज, आपली आज्ञा मोडणे शक्य नव्हते, म्हणूनच आम्ही त्याचा जीव काढून घेतला. पण त्या प्रसंगी आम्हांला फारच दुःख झाले. म्हणून म्हणतो, महाराज! जीवाचा अपमृत्यू टाळण्यासाठी तुम्हीच काहीतरी उपाय सांगा.' तेव्हा यमराज म्हणाला. 'धनत्रयोदशीच्या दिवशी जो दीपदान व व्रत करील, त्याला अपमृत्यू येणार नाही.'

आयुर्वेदाचा प्रवर्तक धन्वंतरी याचा जन्मही याच दिवशी झाल्याची कथा आहे, म्हणून वैद्य लोक या दिवशी त्याची जयंती साजरी करतात.

नरकचतुर्दशी– आश्विन वद्य चतुर्दशी. या दिवशी सूर्योदया-पूर्वी अंगाला तेल लावून उष्णोदकाने स्नान, स्नान करताना अपामार्ग (आघाडा) वनस्पतीने अंगावर प्रोक्षण, स्नानानंतर यमराजाला वंदन व जलांजली; दुपारी ब्राह्मणभोजन व वस्त्र-दान; प्रदोषकाळी दीपदान, शिवपूजा, महाशिवरात्रीपूजा व नक्तभोजन, असा या व्रताचा विधी आहे (पु. चिं.). काही लोक त्या दिवशी पितृतर्पणही करतात.

नरकचतुर्दशीसंबंधी पौराणिक कथा आहे, ती अशी– प्राग्ज्योतिषपुराचा राजा नरकासुर याला भूदेवीकडून वैष्ण-वास्त्र प्राप्त झाल्यामुळे तो फार बलाढ्य झाला व देवादिकांना पीडा देऊ लागला. इंद्राचा ऐरावत व घोडाही त्याने हरण केला. याशिवाय त्याने अनेक राजांच्या एकूण सोळा हजार कन्या धरून आणून आपल्या बंदिखान्यात ठेवल्या व काही राजांनाही कारागृहात डांबले. त्याच्या या अत्याचाराने सर्व लोक गांजले. मग इंद्राने कृष्णाची प्रार्थना केली. कृष्णाने नरकासुरावर स्वारी करून त्याला मारले व त्याच्या बंदीतल्या सोळा हजार कन्या मुक्त केल्या. ही गोष्ट आश्विन वद्य चतुर्दशीस घडली. मरताना नरकासुराने कृष्णाकडे वर मागितला, की 'आजच्या तिथीला जो मंगलस्नान करील, त्याला नरकाची पीडा होऊ नये.' कृष्णाने तसा वर त्याला दिला. त्यामुळे आश्विन वद्य चतुर्दशी ही नरकचतुर्दशी मानली जाऊ लागली. आणि लोक त्या

दिवशी सूर्योदयापूर्वी स्नान व आनंदोत्सव करू लागले.

लक्ष्मीपूजन– आश्विनी अमावास्या. प्रातःकाळी मंगल स्नान करून देवपूजा, दुपारी पार्वणश्राद्ध व ब्राह्मणभोजन आणि प्रदोषकाळी लतापल्लवांनी सुशोभित केलेल्या मंडपात लक्ष्मी, विष्णू, इ. देवता व कुबेर यांची पूजा असा या दिवसाचा विधी आहे. त्या दिवशी विष्णूने लक्ष्मीसह सर्व देवांना बळीच्या कारागृहातून मुक्त केले आणि त्यानंतर ते सर्व देव क्षीरसागरात जाऊन झोपले, अशी कथा आहे. त्यांच्या प्रीत्यर्थ प्रत्येकाने आपआपल्या घरी सर्व सुखोपभोगांची उत्तम व्यवस्था करावी व सर्वत्र दिवे लावावे, असे सांगितले आहे.

लक्ष्मीपूजन करताना एका चौरंगावर अक्षतांचे अष्टदल कमल किंवा स्वस्तिक काढून त्यावर लक्ष्मीच्या मूर्तीची स्थापना करतात. मग पुढील मंत्राने तिची पूजा करतात–

**नमस्ते सर्वदेवानां वरदासि हरेः प्रिया ।**
**या गतिस्त्वत्प्रपन्नानां सा मे स्यात्तव दर्शनात् ।।**

अर्थ – (हे लक्ष्मी,) तू सर्व देवांना वर देणारी व विष्णूला प्रिय आहेस. तुला शरण येणाऱ्यांना जी गती प्राप्त होते, ती मला तुझ्या दर्शनाने प्राप्त होवो.

लक्ष्मीजवळच कलशावर कुबेराची प्रतिमा ठेवून पुढील मंत्राने त्याचेही ध्यान करतात –

**धनदाय नमस्तुभ्यं निधिपद्माधिपाय च ।**
**भवन्तु त्वत्प्रसादेन धनधान्यादिसम्पदः ।।**

अर्थ – निधी व पद्म यांचा अधिपती असलेल्या कुबेरा, तुला नमस्कार असो. तुझ्या कृपेने ( मला ) धनधान्यादी संपत्ती प्राप्त होवो.

त्यानंतर लक्ष्म्यादी देवतांना लवंग, वेलची व साखर घालून तयार केलेल्या गायीच्या दुधाच्या खव्याचा नैवद्य दाखवतात. धने, गूळ, साळीच्या लाह्या, बत्तासे, इ. पदार्थ लक्ष्मीला वाहून नंतर ते आप्तेष्टांना वाटतात. मग हातातील चुडीने पितृमार्गदर्शन करतात. ब्राह्मणांना व अन्य क्षुधापीडितांना भोजन घालतात. रात्री जागरण करतात. मध्यरात्रीनंतर सुपे व दिमडी वाजवून अलक्ष्मीला हाकलून लावतात.

पुराणांत असे सांगितले आहे, की आश्विनी अमावास्येच्या रात्री लक्ष्मी सर्वत्र संचार करते व आपल्या निवासासाठी योग्य असे स्थान शोधू लागते. जिथे स्वच्छता, शोभा आणि रसिकता आढळते, तिथे तर ती आकर्षित होतेच; शिवाय ज्या घरात चारित्र्यवान, कर्तव्यदक्ष, संयमी, धर्मनिष्ठ, देवभक्त व क्षमाशील पुरुष आणि गुणवती व पतिव्रता स्त्रिया वास्तव्य करतात, त्या घरी वास्तव्य करणे लक्ष्मीला आवडते.

बलिप्रतिपदा– कार्तिक शुद्ध प्रतिपदा. या रात्री बळीची पूजा करावयाची असते. त्यासाठी जमिनीवर पंचरंगी रांगोळीने बळी व त्याची पत्नी विंध्यावली यांची चित्रे काढून त्यांची पूजा करावी, त्यांना मद्यमांसाचा नैवेद्य दाखवावा व पुढील मंत्राने बळीची प्रार्थना करावी, असे सांगितले आहे –

**बलिराज नमस्तुभ्यं विरोचनसुत प्रभो ।**
**भविष्येन्द्रासुराराते पूजेयं प्रतिगृह्यताम् ।।**
( भविष्योत्तर पु. १४०. ५४ )

अर्थ – हे विरोचनपुत्र आणि सामर्थ्यवान बलिराजा, तुला नमस्कार असो. तू भविष्यकालीन इंद्र व असुरशत्रू आहेस. ( तरी ) ही ( मी केलेली ) पूजा तू ग्रहण कर.

त्यानंतर बळीप्रीत्यर्थ दीप व वस्त्रे यांचे दान करतात.

कार्तिक शुद्ध प्रतिपदा हा विक्रम संवताचा वर्षारंभदिन मानला जातो. या दिवशी प्रातःकाळी अभ्यंग स्नान केल्यावर स्त्रिया आपल्या पतीला ओवाळतात. दुपारी पक्वान्नांचे भोजन करतात. दिवाळीतला हाच दिवस प्रमुख समजला जातो. या दिवशी लोक नवी वस्त्राभरणे लेवून सर्व दिवस आनंदात घालवतात. या दिवशी द्यूत खेळावे, असेही सांगितले आहे. पार्वतीने शंकराला याच दिवशी द्यूतात हरविले होते. त्यावरून या प्रतिपदेला द्यूतप्रतिपदा असेही नाव मिळाले आहे.

बलिप्रतिपदेच्या दिवशी गोवर्धनपूजा करण्याची प्रथा आहे. त्यासाठी शेणाचा पर्वत करून त्यावर दूर्वा– फुले खोचतात व कृष्ण, गोपाळ, इंद्र, गायी, वासरे यांची चित्रे शेजारी मांडून त्या सर्वांची पूजा करतात. गोठ्यातील गायी–बैलांना सजवून त्यांचीही पूजा करतात व मिरवणूक काढतात. (अन्नकूट पाहा) ही पर्वतपूजा केली नाही, तर कार्तिक मासातील सर्व कृत्ये निष्फल होतात, असे सांगितले आहे.

वसुबारस (गोवत्सद्वादशी) आणि भाऊबीज ( यमद्वितीया ) हे दिवस दिवाळीला जोडून येतात, म्हणून त्यांचा समावेश दिवाळीत केला जातो; पण वस्तुतः ते सण वेगळे आहेत.

दिवाळीत आकाशदिवे लावण्याची प्रथा आहे. आश्विन शुद्ध एकादशीपासून कार्तिक शुद्ध एकादशीपर्यंत शिव, विष्णू, यम, इ. देवता व पितर यांच्यासाठी आकाशदीप लावावे, त्यामुळे भाग्य व लक्ष्मी प्राप्त होते, असे पुराणात सांगितले आहे. (आकाशदिवा पाहा)

भारतीय वाङ्मयात दीपावलीचे उल्लेख अनेक भिन्न भिन्न नावांनी आलेले आहेत. वात्स्यायनाच्या कामसूत्रात यक्षरात्री नामक उत्सवाचा उल्लेख आहे. हेमचंद्राच्या मते यक्षरात्री म्हणजे दीपालिका उत्सव होय. श्रीहर्षाच्या नागानंद नाटकातील दीपप्रतिपदुत्सव म्हणजेही दीपावलीचाच उत्सव आहे. नीलमत पुराणात त्यालाच दीपमाला उत्सव

असे नाव दिले आहे. सोमदेव सूरी (इ. स. चे १० वे शतक) याच्या यशस्तिलकचंपूत दीपोत्सवाचे वर्णन केलेले आहे, ते दीपावलीच्या उत्सवाशी जुळते आहे. इ. स. च्या ११ व्या शतकातील श्रीपती नामक ज्योतिषाचार्याने आपल्या ज्योतिष-रत्नमाला या ग्रंथावरील मराठी टीकेत दिवाळी हा शब्द वापरला आहे. ज्ञानेश्वरी व लीळाचरित्र या ग्रंथांतही (इ. स. चे १३ वे शतक) दिवाळी हा शब्द अनेकदा आढळतो. यशोधराने कामसूत्रावरील टीकेत यक्षरात्री म्हणजेच सुखरात्री असे सांगून, तिचा यक्षपूजा व द्यूतक्रीडा यांच्याशी संबंध जोडला आहे. वराह पुराणातही कार्तिक शुद्ध प्रतिपदेला यक्षाची पूजा होत असल्याचा उल्लेख सापडतो. कुबेर हा यक्षांचा राजा, त्याचप्रमाणे धनदेवही मानला जातो. गुप्तयुगात वैष्णव संप्रदायाच्या प्रभावामुळे कुबेराच्या पूजेऐवजी लक्ष्मी-पूजनाचे महत्त्व वाढत गेले असावे.

**सामाजिक स्वरूप**– काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत सर्व भारतात दिवाळीच्या उत्सवाचे स्वरूप साधारणपणे सारखेच आहे. घरे स्वच्छ झाडून, सारवून, रंगवून आणि फुलांच्या माळा, पताका, तोरणे वगैरे लावून सुशोभित करणे; अभ्यंग-स्नान करून मौल्यवान वस्त्रालंकार धारण करणे; आप्ते-ष्टांसह मिष्टान्नभोजन, दिव्यांची रोषणाई, लक्ष्मीपूजन, दीप-दान, मनोरंजक खेळ, इ. कार्यक्रम सर्वत्र होतात. याशिवाय, प्रत्येक प्रदेशाची काही वेगळी वैशिष्ट्ये आहेत, ती अशी –

गुजरातेत आश्विन वद्य द्वादशीपासून दिवाळी सुरू होते. त्या दिवसाला वाघबारान असे म्हणतात. त्या दिवशी स्त्रिया सकाळी उठून सडासंमार्जन करून रांगोळ्या काढतात. त्यात वाघाचे चित्र हमखास असते. ते चित्र भाऊबीजेपर्यंत ठेवतात. धनत्रयोदशीला घरातील द्रव्य, अलंकार, इत्यादींची पूजा कर-तात. आश्विन वद्य चतुर्दशीला रूपचतुर्दशी म्हणतात. त्या दिवशी लवकर स्नान करून स्त्री–पुरुष विशेष साज–शृंगार करतात. मात्र त्या रात्री भुते–खेते सर्वत्र संचार करतात, अशी समजुत असल्यामुळे लोक सामान्यपणे रात्री घराबाहेर जात नाहीत. त्या रात्रीला काळरात्र म्हणतात. बरेच लोक त्या रात्री शेंदूर व तेल लावून हनुमानाची पूजा करतात व नारळ फोडतात. काही धाडसी साधक त्या रात्री स्मशानात जाऊन मंत्रसाधना करतात.

अमावास्या हा दिवाळीतील सर्वांत महत्त्वाचा दिवस मानतात. त्या दिवशी महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वती यांची पूजा करतात. दौत, रुपया आणि वही ही त्यांची प्रतीके मानली जातात. नवीन जमाखर्चाच्या वहीच्या तिसऱ्या पानावर श्री हे अक्षर अनेक वेळा लिहून त्यावर एक विड्याचे पान व एक रुपया ठेवतात. नंतर त्या वहीची पंचोपचार पूजा करतात. रात्रभर वही तशीच उघडी ठेवून जवळ एक दिवा तेवत ठेवतात. सर्व जण जागरण करतात. सकाळी वहीला नमस्कार करून 'लक्षलाभ' हे शब्द तीनदा उच्चारतात.

कार्तिक शुद्ध प्रतिपदेला काळभैरवाची पूजा करतात. सकाळी लहान मुले मिठाची पुरचुंडी घेऊन गावात हिंडतात. वर्षारंभाच्या शुभशकुनाप्रीत्यर्थ लोक त्यांच्याकडून मीठ विकत घेतात. रात्री मुले मशाली घेऊन हिंडतात. लोक त्यांना तेल व मिठाई देतात.

राजस्थानी लोक दिवाळीचा संबंध राम वनवासातून परत आला, त्या मंगल घटनेशी जोडतात. काही ठिकाणी लंका-दहनाचा देखावा उभा करून त्यातून शोभेची दारू उडवतात. मांजरीला लक्ष्मी मानून तिचे कौतुक करतात. तिने कितीही नुकसान केले, तरी तिला मारीत नाहीत. दिवाळीतील चतुर्दशीला रूपचौदस म्हणतात. त्या दिवशी ब्राह्मण व वैश्य स्त्रिया सूर्योदयापूर्वी स्नान करून विशेष शृंगार करतात. संध्याकाळी मुली मस्तकावर 'घुडल्या' घेऊन घरोघर फिरतात. घुडल्या म्हणजे सच्छिद्र घडा असतो व त्यात दिवा लावलेला असतो. ते घुडलेखां नावाच्या मुसलमान सरदाराचे प्रतीक असते. त्या अत्याचारी सरदाराला मारवाडी वीरांनी ठार मारून अनेक मुलींची सुटका केली होती व घुडले-खांचे शिर कापून आणून त्याला वाणांनी अनेक छिद्रे पाडली होती, अशी एक दंतकथा आहे. या वीरकृत्याची स्मृती म्हणून ही घुडल्याची मिरवणूक असते, असे म्हणतात. पण या सम-जुतीत तथ्य वाटत नाही. हा मुळात दीपपूजेचाच एक प्रकार आहे. नामसादृश्यामुळे घुडल्याचा संबंध घुडलेखांशी जोडला गेला असावा. या घुडल्याला प्रत्येक घरी मिठाई व दिव्या-साठी तेल मिळते. गावातील तरुणही मातीचे मोठे दिवे घेऊन घरोघर हिंडतात. त्यांनाही मिठाई व तेल मिळते.

अमावास्येला लक्ष्मीपूजन फार थाटाने करतात. प्रतिपदेला खेंखरा म्हणतात. त्या दिवशी गोवर्धनपूजा व अन्नकूट करतात. सायंकाळी बैलांची पूजा करतात. महाराष्ट्रातल्या बैल–पोळा सणाप्रमाणेच हा सण असतो. त्यात बैलांच्या टकरीही लावतात. बैलांना घेऊन गाणी म्हणत शेतकरी घरोघर जातात. याच दिवशी नाथद्वारा येथे मिष्टान्नाचा प्रचंड अन्नकूट करून तो गरीब लोकांकडून लुटविण्याची प्रथा आहे.

खेंखराच्या दुसऱ्या दिवशी राजदरबारी व घरोघरी दौतीची व लेखणीची पूजा होते. त्याच दिवशी नवीन वर्षासाठी नवीन वह्यांत जमाखर्च मांडण्यास प्रारंभ करतात.

पंजाबातील लोक रामराज्याभिषेकाच्या स्मृतिप्रीत्यर्थ दिवा-

ळीचा दीपोत्सव करतात. तिथले शीख लोकही अमृतसरच्या सुवर्णमंदिराच्या स्थापनेचा स्मृतिदिन म्हणून हा सण पाळतात.

उत्तर प्रदेशातील डोंगराळ भागातले लोक दिवाळीच्या दिवशी गायींची पूजा करतात व रात्री गावाच्या सीमेवर जाऊन मशालींच्या प्रकाशात नाचतात. त्या वेळी दुसऱ्या गावातला कोणी मनुष्य तिथे आला, तर त्याला शिव्या देतात; कारण तसे करणे पुण्यप्रद मानले गेले आहे. काही लोक कुबेराची पूजा करतात, तर काही लोक देवीची पूजा करून तूपभात व साखर खातात.

सिंधी लोक दिवाळीच्या रात्री गावाबाहेर मशाली लावून नृत्य करतात. नंतर तलावाच्या काठची माती आणून ते एक चबुतरा करतात व त्यावर काटेरी वृक्षाची फांदी रोवून तिची पूजा करतात. मग त्याच चबुतऱ्याची थोडी माती ते घरी नेतात. दुसऱ्या दिवशी त्या मातीचे सोने होते, अशी समजूत आहे.

बंगालमध्ये दिवाळीचा सण मोठ्या उत्साहाने होतो; पण तिकडे लक्ष्मीपूजनापेक्षा कालीपूजनाला विशेष महत्त्व मिळालेले आहे. आश्विनी अमावास्येच्या रात्री बंगाली लोक कालीची स्तोत्रे गात जागरण करतात. त्या रात्रीला ते महानिशा म्हणतात. काली हीच लक्ष्मी, सरस्वती व शक्ती होय, अशी त्यांची धारणा असते.

नेपाळमध्ये दिवाळीच्या दिवसांत द्यूतक्रीडेला विशेष उधाण येते. नेपाळी लोक लक्ष्मीपूजन तर करतातच; शिवाय कुत्रे, गायी, बैल यांचीही पूजा करतात.

गोव्यातली दिवाळी सामुदायिक आतिथ्याची असते. शेजारीपाजारी एकत्र जमून प्रत्येकाकडे जातात आणि दूधगुळाच्या पोह्यांचा फराळ करतात.

द. भारतात त्या दिवशी सूर्योदयापूर्वी केलेले स्नान गंगास्नानाइतके पवित्र मानले जाते. तमिळनाडमध्ये काही लोक नरकचतुर्दशीला सूर्योदयापूर्वी दोनदा स्नान करतात. आंध्र प्रदेशातील लोक घरासमोर एक मचाण बांधून त्यावर पणत्या लावतात व स्त्रिया त्याच्यावर बसून रात्रभर लक्ष्मीच्या स्वागताची गाणी गातात. लक्ष्मीपूजनाच्या दिवशी रेड्यांच्या टकरी लावतात. आश्विनी अमावास्येला केलेले पितृतर्पण विशेष फलप्रद मानतात. कार्तिक शुद्ध प्रतिपदा हा दिवस बलिप्रतिपदा म्हणून बळिराजाच्या स्मरणार्थ साजरा होतो. त्या दिवशी बळीची प्रतिमा तयार करून गोठ्यात ठेवतात व तिची पूजा करतात. गायी–बैलांना रंग लावून व माळा घालून सजवतात. मस्त बैल व चपळ कालवडी यांची मिरवणूक काढतात. काही ठिकाणी दिवाळीच्या दिवसांत मशाली घेऊन नाच करण्याचीही प्रथा आहे. या आनंदोत्सवाचे हे महत्त्वाचे अंग मानले जाते.

केरळमधील ओणम हा उत्सव आश्विन मासात बळीच्या स्मरणार्थच साजरा होतो.

महाराष्ट्रात काही ठिकाणी नरक चतुर्दशीच्या दिवशी नरकासुराची शेणाची आकृती करून तिच्यावर घरातील सर्व केरकचरा ओततात व त्या ढिगावर एक पैसा ठेवतात. जो अंत्यज मनुष्य ते सर्व उचलून नेतो त्याला बक्षिसी देतात. नरकासुरवधाच्या स्मरणार्थ काही ठिकाणी पायाने कारीट ठेचून त्याचा रस जिभेला लावण्याचीही चाल आहे. अमावास्येच्या दिवशी नवी केरसुणी विकत घेतात, तिला लक्ष्मी म्हणतात; कारण ती अलक्ष्मीला झाडून टाकण्याचे काम करते.

नगर जिल्ह्यात दिवाळीच्या दिवसांत गुराखी कांढळाच्या सुंदर दिवटचा विणून संध्याकाळी गुरांना ओवाळतात व गाणी म्हणतात. ठाणे जिल्ह्यात बलिप्रतिपदेच्या दिवशी अंगणात शेणाचा किंवा तांदुळाच्या पिठाचा बळिराजा काढून त्याची पूजा करतात. सूर्योदयापूर्वी त्या आकृतीजवळच कडू जिरे, झेंडू किंवा अंबाडीचे झाड लावतात.

पाताणे प्रभू बलिप्रतिपदेच्या दिवशी पुढील कार्यक्रम करतात– एक नोकर पहाटे सर्व घर झाडून स्वच्छ करतो व सगळा केर एका टोपलीत जमा करतो. मग त्या टोपलीवर जुनी केरसुणी, एक पणती व पैसा–सुपारी ठेवून ती टोपली प्रत्येक खोलीपुढे ओवाळतो. त्या वेळी तो म्हणतो. 'इडापिडा टळो, बळीचे राज्य येवो.' नंतर एक स्त्री सूप वाजवीत त्याच्या मागोमाग दरवाजापर्यंत जाते. तो मागे न पाहता बाहेर जाऊन सर्व केर रस्त्याच्या कडेला टाकतो. नंतर तो घरात येऊन कोणालाही न शिवता अंगाला तेल लावून गरम पाण्याने स्नान करतो.

बळीची अश्वारूढ प्रतिमा उंच जागी उभी करून तिच्या भोवती एकवीस दिवे मांडण्याचीही चाल आहे. बळिराजा देवांचा शत्रू असला, तरी तो दुष्ट नव्हता. अलोट दातृत्व आणि प्रजाहितदक्षता याविषयी त्याची ख्याती होती. त्याचे राज्य हे सुराज्य होते. म्हणूनच ते पुन्हा प्रस्थापित व्हावे, अशी आकांक्षा वरील लोकाचारांत प्रकट झालेली दिसते.

दिवाळीच्या दिवसांत मातीचे किल्ले बनवून त्यांच्याभोवती ऐतिहासिक देखावे व प्रसंग उभे करण्याची चाल या शतकात सुरू झाली आहे. मुलांचा उत्साह व त्यांच्यांतील कलागुण यांना अशा कामांत बराच वाव मिळतो.

दीपावली हा मुख्यत: दीपोत्सव आहे. घरातील प्रत्येक भागात, कोनाकोपऱ्यात तेलाचे लहान दिवे लावून सर्व घर प्रकाशमय केले जाते. प्रत्येक वास्तूच्या बाहेरील अंगावरही पणत्यांच्या रांगा लावून ती उजळून टाकली जाते. उंच जागी

आकाशदिवा लावून काळोख नाहीसा करण्याचा प्रयत्न असतो. मंगलस्नान, मिष्टान्नभोजन, मनोरंजक खेळ, इ. कार्यक्रमांत लोकांचा आनंद ओसंडून येतो. या आनंदाच्या वृद्धीसाठी लोक नवनवीन मार्ग शोधीत असतात. शोभेचे दारूकाम हा त्यांतलाच एक प्रकार होय. चंद्रज्योती, भुइनळे, फुलबाज्या यांच्या उपयोगामुळे दिवाळीची शोभा द्विगुणित होते. विजेच्या रोषणाईमुळे दिवाळीचा झगमगाट खूपच वाढला आहे. दारूकामासाठी दिवसेंदिवस अधिकाधिक स्फोटक व दणकेबाज वस्तू निर्माण होऊ लागल्या आहेत. त्यांच्या अतिरिक्त वापरामुळे दिवाळीचा उत्सव पूर्वीसारखा शोभनीय राहिला नाही; उलट तो आता फार त्रासदायक व धोकादायकच झाला आहे. लहान मुले व अत्युत्साही तरुण यांना दिवाळीच्या 'धडाड्धूम'मध्ये खूप मौज वाटत असली, तरी सामान्य जनांना ती नकोशी वाटते.

सर्व सणांमध्ये दीपावलीचा सण अधिक लोकप्रिय आहे; कारण तो सुख-समृद्धीचा उत्सव म्हणून साजरा केला जातो. शेतकरी असो, उद्योगपती असो किंवा व्यापारी असो; प्रत्येक जण आपल्या वर्षभरातील कष्टांच्या कमाईचा उपभोग घेण्याच्या कल्पनेने दिवाळीचे हर्षभराने स्वागत करतो. लक्ष्मीला प्रसन्न करणे, ही मानवाची मोठी आकांक्षा असते. दीपावलीच्या रूपाने ती साकार झालेली आहे. [सं. वि.; नि. सिं.; एन्सा. रि. ए.; सा. इं. फे.; प्रसाद, दीपावली-अंक, नोव्हें. १९५८; हि. ध.; व्रतचंद्रिका; व्रतराज; जै. ध.; स्ट. इं. क. हि. भाग २; मरुभारती, एप्रिल १९६०; स. सं.; हिं. व्र. त्यो.]

**दीर-भावजय** एक नाते-संबंध. दीर हा शब्द देवर या संस्कृत शब्दापासून बनलेला असून, त्याचा अर्थ पतीचा भाऊ असा आहे. भावजय (सं. भ्रातृजाया) म्हणजे भावाची पत्नी. हा संबंध भारतीय कुटुंबजीवनात वेदकाळापासून महत्त्व पावलेला दिसतो. वैदिक कवयित्री सूर्या हिने नवपरिणीतेला जो उपदेश केला आहे, त्यात देवराचा उल्लेख आहे—

सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञी श्वश्र्वां भव।
ननान्दरि सम्राज्ञी भव सम्राज्ञी अधि देवृषु॥
(ऋ. १०.८५.४६)

अर्थ -- तू घराची राणी आहेस, असे सासऱ्याला वाटू दे. तू घराची मालकीण आहेस, असे सासूला वाटू दे आणि नणंदांना व दिरांनाही तू घरातील मुख्य कारभारीण आहेस असे वाटेल, अशा पद्धतीने वाग.

यास्काने देवर शब्दाचा अर्थ 'दुसरा वर' असा दिला आहे (निरुक्त ३.१५). या अर्थाला दीर-भावजय संबंधाच्या दृष्टीने विशेष महत्त्व आहे. दीरभावजयीमधील या विशेष संबंधाचे सूचन ऋग्वेदातील एका ऋचेच्या अर्थात स्पष्टपणे घडले आहे, तो ऋचार्ध असा —

को वा शयुत्रा विधवेव देवरं
मर्यं न योषा कृणुते सधस्थ आ।
(ऋ. १०.४०.२)

अर्थ — शयूचे रक्षण करणाऱ्या हे अश्वी हो, विधवा स्त्री ज्याप्रमाणे आपल्या दिराला कुटुंबियांमध्ये सन्मान देते किंवा तरुण युवती शूर योद्धयाचे अभिनंदन करते, त्याप्रमाणे कोणता अध्वरयाग आज यज्ञमंदिरात तुमचा सन्मान करीत आहे?

विधवा स्त्री आपल्या दिराला शय्येवर आमंत्रित करते, असाही उल्लेख ऋग्वेदात आहे. पतिनिधनानंतर पतीच्या चितेत प्रवेश करू पाहणाऱ्या विधवेला तिचा धाकटा दीर अडवितो आणि मग ती त्याची पत्नी होऊन राहते, असे अथर्ववेद, बृहद्देवता आणि आश्वलायन गृह्यसूत्र या ग्रंथांत म्हटले आहे. वालीच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी तारा हिच्याशी तिच्या धाकट्या दिराने – सुग्रीवाने – विवाह केल्याची कथा रामायणात आहे. सीतेला कुटीत एकटी सोडून रामाच्या रक्षणासाठी जायला लक्ष्मण तयार होत नाही, तेव्हा सीता त्याला म्हणते, की तुझी अशी इच्छा दिसते, की राम मरावा आणि सीता आपली पत्नी व्हावी. सीतेच्या या उद्गारात दीर-भावजयसंबंधातील प्राचीन प्रथेचे स्पष्ट सूचन आहे. 'नारी तु पत्यभावे वै देवरं कुरुते पतिम्।' = पतीच्या मृत्यूनंतर स्त्री दिराशी लग्न करते, असे महाभारतात म्हटले आहे (अनु. ८.२२).

इ. स. च्या बाराव्या शतकातील विज्ञानेश्वरानेही अशा विवाहाला धर्म्य मानले आहे. त्यालाही प्राचीन धर्मवचनांचा आधार असावा. कारण त्याच्या पूर्वी मनूने अशा विवाहाला संमती दिलेली नाही. मनूच्या मते थोरल्या भावाची पत्नी ही गुरुपत्नीप्रमाणे असून, धाकट्या भावाची पत्नी ही सुनेसारखी आहे (९.२७). पती जर निपुत्रिक वारला, तर केवळ एका पुत्राच्या प्राप्तीसाठी दिराशी नियोग करण्याची अनुज्ञा मनू देतो (९.५९). मनुपूर्वीच्या बहुतेक शास्त्रकारांनी दिराशी नियोग करणे धर्म्य मानले आहे.

उत्तरकालीन शास्त्रकारांनी दीर-भावजयीचा विवाह निषिद्ध मानला असला, तरी उत्तर भारतातील अनेक जातींत पतिनिधनानंतर स्त्रीने दिराशी विवाह करण्याची प्रथा अजूनही आढळते. ज्या भागात ही प्रथा निषिद्ध मानली गेली, तिथेही अनेक सामाजिक संकेतांत प्राचीन प्रथेची स्मृती जागी राहिली आहे. महाराष्ट्रात जावयाच्या धाकट्या भावाला पाणजावई म्हणतात. तसेच, वर विवाहासाठी वधूगृहाकडे जाण्यापूर्वी त्याचा धाकटा भाऊ अथवा त्या श्रेणीचा अन्य नातेवाईक वधूगृही मिरवत

जातो. त्याला वरधावा (अवर धव = कनिष्ठ पती) म्हणतात. त्याचा वधूगृही सत्कार होऊन तो परतल्यावरच नियोजित वराशी वधूचे लग्न होते.

दीर–भावजयसंबंधांतील सामाजिक विधि–निषेधांचा हा इतिहास सोडला, तरी त्या संबंधाला भारतीय कुटुंबजीवनात एक विशेष भावनिक महत्त्व आहे. स्त्रीचे विशेषतः धाकटचा दिराशी असणारे नाते एका आगळ्या भावबंधाने दृढ झालेले आहे. त्या भावबंधात स्त्रीच्या माता, भगिनी व प्रेयसी अशा त्रिविध भूमिकांचा संगम झालेला आढळतो. भारतीय जीवनात आणि साहित्यात या संबंधाची अनेक हृद्य चित्रे पाहायला मिळतात. लोकसाहित्यातही या संबंधाची विविध रंगरूपे व्यक्त झालेली आहेत. कोकणातल्या कोळचा–भंडाऱ्यांच्या चकव्यांत याविषयी एक चकवा आहे, तो असा –

दरियांत मचवा झुलताय लाडके
सांवळा दीर तुझा येताय गो ऽ
पायांत सांकळचा आनताय लाडके
सांवळा दीर तुझा येताय गो ऽ
नाकांत मोती आनताय लाडके
सांवळा दीर तुझा येताय गो ऽ
दंडात येला आनताय लाडके
सांवळा दीर तुझा येताय गो ऽ
कागदी पलंग मागल्या दारं
काढ गोऽ चोली घाल गोऽ वारा
काढताय चोली घालताय वारा
हात लावूं नको मेल्या फजीतखोरा

सासुरवासाने गांजलेली एक स्त्री आपल्याला माहेरी पोचवण्याची विनंती धाकटचा दिराला करीत आहे, अशा आशयाचे एक भोजपुरी लोकगीत आहे, त्यातील काही पंक्ती अशा–

**देवरा हमरो ना। चलना देवर हामारा नइहारावा हो;**
**अँचरा फारिके ना। देवरा बेनिया डोलइबों हो;**
**अँचरा फारिके ना। धुमि फिरि अइब देवर,**
**गोड़वा धोई लिहलों हो। की साँझी रे बेरिया ना।**
**देवर जँतवों कडवा तेलवा हो; की साँझी रे बेरिया ना ।।**

अर्थ– हे देवरा, मला माझ्या माहेरी पोचवा. या उपकारासाठी मी माझ्या पदराचा पंखा करून तुम्हांला वारा घालीन. हे प्रिय देवर, जेव्हा तुम्ही हिंडून–फिरून याल तेव्हा मी (उष्ण पाण्याने) तुमचे पाय धुवीन आणि संध्याकाळच्या वेळी तुमच्या पायांना मोहरीचे तेल लावीन.

रामायणात सीतेने एकदा लक्ष्मणाविषयी घेतलेल्या शंकेचा अपवाद वगळला, तर सीता आणि लक्ष्मण यांचा संबंध दीर–भावजयसंबंधाचा आदर्श मानायला हवा. बुंदेलखंडाच्या इतिहासात जुझारसिंहाचा धाकटा भाऊ हरदौल याने या संबंधाचे पावित्र्य टिकवण्यासाठी आत्मार्पण केले, त्यामुळे बुंदेलखंडात हरदौल हा जनसमाजाचा देव आणि प्रत्येक स्त्रीचा देवर ठरला आहे. पाहा– दियेरवटू. [ हिं. प. मी.; भा. वि. प. ]

**दीर्घतमा** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलातील १४० ते १६४ अशा २५ सूक्तांचा हा द्रष्टा आहे. हा आंगिरसगोत्री असून उचथ्य व ममता यांचा पुत्र आहे. बृहस्पतीच्या शापाने हा जन्मतःच आंधळा झाला होता. याबद्दल बृहद्देवतेत एक कथा आली आहे, ती अशी –

उचथ्याला बृहस्पती नामक एक भाऊ होता. तो एकदा उचथ्याच्या घरी गेला असता त्याचे मन उचथ्यपत्नी ममता हिच्यावर जडले व तिच्या संमतीने तो तिच्याबरोबर रतिसुख अनुभवू लागला. त्या वेळी ममता गरोदर होती. बृहस्पती वीर्यपात करणार, इतक्यात आतला गर्भ त्याला म्हणाला, की 'मी आधीच इथे गर्भ होऊन राहिलो असल्याने तू आता इथे रेतसिंचन करून शुक्रसंकर करू नको.' उदरस्थ गर्भाचे ते भाषण ऐकून बृहस्पतीचा ऐन वेळी विरस झाला व त्याने रागावून त्याला शाप दिला, की 'तू जन्मतःच आंधळा होशील.'

पुढे ममता योग्य वेळी प्रसूत झाली. मुलगा आंधळा निपजल्यामुळे आईबापांनी त्याला दीर्घतमा असे नाव ठेवले. पण तो जन्मांध असला, तरी गर्भात असतानाच त्याला सर्व वेदविद्या अवगत झाली होती. नंतर त्याने अग्नीची प्रार्थना केली व त्याच्या कृपेने त्याला दृष्टी प्राप्त झाली.

याच्या भार्येचे नाव प्रद्वेषी होते. तिच्यापासून याला गौतमादी पुष्कळ पुत्र झाले. पण कुलाचा खूप विस्तार व्हावा, म्हणून याने गोरतिविद्या प्राप्त करून घेऊन लोकांच्या देखत स्त्रीसमागम सुरू केला, तेव्हा प्रद्वेषी दुसरा पती करायला उद्युक्त झाली. त्या वेळी याने मर्यादा घालून दिली, की 'स्त्रीला यावज्जन्म एकच पती असावा.'

पुढे मातेच्या सांगण्यावरून याच्या पुत्रांनी याला गंगेत सोडून दिले. वाहत वाहत तो अंगदेशाला पोचला. तिथल्या बली राजाने त्याला ठेवून घेतले. तिथे याच्यापासून बलीच्या दासीला कक्षीवान हा पुत्र झाला. मग राजाने आपली पत्नी सुदेष्णा हिलाही संतानप्राप्तीसाठी त्याच्याकडे पाठवले. याच्यापासून तिला अंग, वंग, कलिंग, इ. पुत्र झाले.

हा शंभर वर्षे जगला. म्हातारपणी याला सांभाळताना नोकर–चाकर त्रासले. त्यांनी हा मरावा, म्हणून याला आधी आगीत व मग नदीत टाकले. पण त्यांतूनही तो बचावला.

दीर्घतमा ऋषि ... शंवदी त्रैतन नामक एका दासाने याचे मुंडकेही तोडले. पण प्रत्येक वेळी अश्वींनी याचे रक्षण केले. पुढे तो पुरोहित झाला. त्याने भरत दौष्यंतीला यमुनेच्या काठी ऐंद्र महाभिषेक केला (ऐ. ब्रा. ८. २३; भाग. पु. ९. २०. २५). याने 'वाजिनं पक्वं सुरभिमांसम्' = घोड्याचे शिजलेले सुगंधी मांस, असे एका ठिकाणी म्हटले आहे (ऋ. १. १६२. १२). यावरून वेदकाळी घोड्याचे मांस खात असावेत, असे अनुमान केलेले आहे.

लो. टिळकांनी दीर्घतमा याचा ज्योतिर्विषयक अर्थ लावून दीर्घतमा म्हणजे दीर्घ दिवसानंतर अस्ताला जाणारा सूर्य होय, असे म्हटले आहे.

ऋग्वेदातील १. १६४ हे या ऋषीचे सूक्त अस्य वामीय सूक्त म्हणून प्रसिद्ध आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने तर हे सूक्त फार महत्त्वाचे आहे. त्यातील पुढील ऋचा प्रसिद्ध आहेत.

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥
( ऋ. १. १६४. २० )

अर्थ– सुंदर पंखांचे, एकत्र राहणारे व मित्र असे दोन पक्षी एकाच वृक्षावर बसतात. त्यांच्यापैकी एक त्या पिंपळाचे गोड फळ खातो; तर दुसरा मात्र स्वतः काही एक न खाता फक्त पाहत असतो.

या ऋचेत जीवात्मा आणि परमात्मा यांचे आलंकारिक वर्णन आहे, असे वेदान्ती लोक म्हणतात. यांतील पिप्पल (फळ) खाणारा अर्थात विषयोपभोग घेणारा तो जीवात्मा असून, निरासक्तपणे कसलाही भोग न घेता केवळ साक्षित्वाने राहतो, तो परमात्मा होय.

दीर्घतम्याने वेदांची स्तुती केली आहे, ती अशी –

ऋचो अक्षरे परमे व्योमन्
यस्मिन् देवा अधि विश्वे निषेदुः ।
यस्तन्न वेद किमृचा करिष्यति
य इत्तद् विदुस्त इमे समासते ॥
( ऋ. १. १६४. ३९ )

अर्थ– अत्युच्च अशा स्वर्लोकात राहिल्याप्रमाणेच वेदांतील ऋचांच्या अक्षरांत सर्व देवांनी वास केला आहे. असे ऋचेचे अक्षर ज्याला समजत नाही, त्याला वेदांचा तरी काय उपयोग! आणि ते ज्याला समजले, ते सर्व एकत्र (सामंजस्याने) राहतात.

डॉ. संपूर्णानंद यांनी दीर्घतम्याविषयी असे म्हटले आहे, की जीवनातील आपल्या परावलंबित्वाचा आणि इतर वाईट अनुभवांचा विचार करीत असता दीर्घतम्याच्या अंतरात क्रांतिकारी परिवर्तन झाले; तो भोगांपासून परावृत्त होऊन आत्मस्वरूपाचे चिंतन करू लागला आणि अंती निर्विकल्प समाधीप्रत पोचला. डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांच्या मते दीर्घतमा हे दीर्घकालीन अंधाराचे म्हणजे विश्वोत्पत्तीचे गूढ उकलण्याचा प्रयत्न करणाऱ्या एका तत्त्वचिंतक ऋषीचे टोपण नाव आहे; दृश्य जगताचा वैज्ञानिक आणि दार्शनिक दृष्टिकोनातून अर्थ लावणाऱ्या सर्वांचा तो प्रतिनिधी आहे. [ऋ. द.; ऋ. आ.; प्रा. च. को.; पु. इं.; डॉ. संपूर्णानंद–धर्मयुग, १६ जानेवारी १९६६; व्हिजन इन लॉंग डार्कनेस–डॉ. अग्रवाल]

## दीक्षा

**दीक्षा** कोणतेही कर्म आरंभण्यापूर्वी अथवा मंत्रोपदेश घेण्यापूर्वी त्या कृत्यासाठी योग्य तो अधिकार प्राप्त व्हावा म्हणून करायचा एक विधी. या शब्दाचे नियम, उपनयन मंत्रोपदेश, असेही अन्य अर्थ आहेत.

**यज्ञीय दीक्षा**– हिची व्याख्या अशी– 'दीक्षणीयेष्टचा सम्पन्नः संस्कारो दीक्षा' = दीक्षणीया इष्टीने युक्त असा संस्कार म्हणजे दीक्षा होय (जै. न्या. मा. ६. ५. ८). कोणताही यज्ञ करण्यापूर्वी यजमानाला दीक्षाविधी करून दीक्षित व्हावे लागते. त्याचे विधान असे – यजमान यज्ञमंडपाच्या बाहेर क्षौर करून व हातापायांची नखे काढून घेतो. औदुंबराच्या काडीने दात घासतो व पाण्यात सुवर्ण टाकून स्नान करतो. यजमानपत्नीही क्षौर वगळून बाकीची दीक्षा प्रतिप्रस्थाता या ऋत्विजाकडून घेते. ही दीक्षा अमंत्रक असते. मग अध्वर्यू यजमानाला रेशमी वस्त्र देतो. दुपारी यजमान व यजमानपत्नी तूप, दही व मध घालून भात जेवतात. यजमान दर्भाच्या दोन जुड्यांनी मुखासह सर्व अंगाला तीनदा लोणी फासतो. दर्भाच्या काडीने डोळ्यांत अंजन घालतो. अध्वर्यू दर्भाच्या तीन जुड्या यजमानाच्या अंगावर घासून त्याला पावन करतो. यजमानपत्नीही प्रतिप्रस्थात्याच्या आदेशावरून हे सगळे विधी अमंत्रक करते. मग दीक्षणीया इष्टी होते.

त्यानंतर यजमान आहवनीयाच्या दक्षिणेला वेदीवर दोन कृष्णमृगाजिने पसरून त्याच्या पश्चिम भागात उजवा गुडघा दुमडून बसतो. कमरेभोवती मेखला व डोक्याला वस्त्र गुंडाळतो. उजव्या खांद्यावर नवे वस्त्र घेतो. एक वीत लांबीचे कृष्णमृगाचे शिंग वस्त्राला बांधून त्या शिंगाने कपाळाला स्पर्श करतो. अंग खाजवायचे असल्यास याच शिंगाने खाजवतो. औदुंबराची काठी उजव्या खांद्यावर घेतो. यजमानपत्नी कमरेला योक्त्र बांधते व डोक्यावर लोकरीची जाळी घालते. अंग खाजवण्यासाठी लाकडाचा वीतभर तुकडा जवळ ठेवते. अध्वर्यू यजमानाला संभारयजुर्मंत्र म्हणायला लावतो. मग एखादा ऋत्विज देवांना मनात व जगाला मोठ्याने सांगतो,

की 'हा ब्राह्मण आता दीक्षित झाला आहे.' क्षत्रिय किंवा वैश्य यजमानाचाही ब्राह्मण म्हणूनच उल्लेख केला जातो; कारण दीक्षिताचा पुनर्जन्म होतो, अशी समजूत आहे.

हा दीक्षाविधी झाल्यावर रात्री आकाशात तारे दिसू लागेपर्यंत यजमान मौन पाळतो. यजमान व यजमानपत्नी दोन गाईंचे दूध व हविष्यान्न यांचे सेवन करून राहतात. यजमान मातीच्या भांड्यांखेरीज कुठल्याही भांड्यातून व तांब्याच्या पात्रातून अन्न सेवन करतात. ती दोघे जेवत असताना इतरांनी त्यांना पाहायचे नसते. स्त्री किंवा शूद्र यांच्याशी न बोलणे, ब्रह्मचर्य पाळणे, कोणालाही नमस्कार न करणे, हसताना तोंडावर हात ठेवणे, मृगशृंग जवळ बाळगणे इ. नियम दीक्षित यजमानाला पाळावे लागतात. लोकांनी त्याला नावाने हाक मारायची नसते, तर 'भो दीक्षित' असे संबोधायचे असते. (अग्निष्टोम पाहा)

**ब्रह्मचर्य दीक्षा** – उपनयनात गुरू बटूला गायत्रीमंत्राचा उपदेश करून दीक्षा देतो व त्याला ब्रह्मचाऱ्याचे नियम सांगतो. (उपनयन पाहा).

**तांत्रिक दीक्षा**– हिची व्याख्या तांत्रिकांनी द आणि क्ष या अक्षरांचा सांकेतिक अर्थ घेऊन केली आहे. प्रपंचसार, कुलार्णव तंत्र, शारदा तंत्र इ. तांत्रिक ग्रंथांत दीक्षेच्या अशा व्याख्या दिलेल्या आहेत, त्यांपैकी एक अशी---

**दियते विमलं ज्ञानं क्षीयते कर्मवासना।**
**तेन दीक्षेति सा प्रोक्ता मुनिभिस्तन्त्रवेदिभिः ॥**

**अर्थ**–(जी) विमल ज्ञान देते व कर्मवासनांचा क्षय करते तिला तंत्रज्ञ मुनींनी दीक्षा असे म्हटले आहे.

आगमात किंवा तंत्रशास्त्रात गुरुकडून शिष्याला मिळणाऱ्या मंत्राच्या किंवा उपासनेच्या दीक्षेला बरेच महत्त्व दिलेले आहे. दीक्षेवर आणि तिच्या विविध प्रकारांवर, तसेच दीक्षांच्या उत्तरोत्तर चढत्या श्रेणीवर तंत्रशास्त्रात खूप विचार झालेला आहे. तांत्रिक दीक्षेविषयी म. म. गोपीनाथ कविराज यांनी बरेच विवेचन केलेले आहे, त्याचा सारांश पुढीलप्रमाणे–

गुरू हा शिष्याच्या आत्म्याशी एकरूप होऊन शिष्यरूप चैतन्याच्या भोगभूमीला विशिष्ट प्रक्रियेच्या द्वारे शुद्ध करतो, यालाच दीक्षा म्हणतात. गुरूचे हे अभावात्मक कार्य आहे. ज्ञानदीक्षेच्या द्वारे शिष्याच्या अंतरात चित्, आनंद, इच्छा, ज्ञान व क्रिया या शक्तींचे उद्भावन करणे, हे गुरूचे भावात्मक कार्य होय. म्हणूनच दीक्षेची दोन मुख्य अंगे होतात. एक म्हणजे पाशांचा नाश अर्थात पृथिव्यादी तत्त्वांची शुद्धी व दुसरे म्हणजे शिवतत्त्वाशी शिष्याचा संयोग.

सामान्य आणि विशेष असे दीक्षेचे दोन मूलभूत भेद आहेत. सामान्य दीक्षेला समयदीक्षा असेही म्हणतात. ही दीक्षा विशेष दीक्षेच्या भूमिकेच्या जागी असते. या दीक्षेत दीक्षित झाल्यावर शिष्याला समयधर्माचे पालन करावे लागते. सिद्धान्त शैव मतात या समयधर्मपालनाला दासमार्ग असे म्हटले आहे. या धर्मपालनामुळे या जन्मी नाही तरी पुढील जन्मी मुक्ती अवश्य मिळते, असे शिवधर्मोत्तर तंत्रात सांगितले आहे. या दीक्षेत गुरूने शिष्याच्या मस्तकावर आशीर्वादरूपाने शिवहस्त ठेवायचा असतो. आगमात या शिवहस्ताचे लक्षण पुढीलप्रमाणे सांगितले आहे---

**ब्रह्मप्रपञ्चसंयुक्तः शिवेनाधिष्ठितः।**
**पाशच्छेदकरः क्षेमी शिवहस्तः प्रकीर्तितः ॥**

अर्थ–ब्रह्मप्रपंचाने युक्त, शिवाने अधिष्ठित, कल्याणकारक, पाशांचा छेद करणारा व क्षेमदायक असा शिवहस्त सांगितला आहे.

शिवहस्ताच्या प्रभावाने शिष्याच्या अनेकविध पाशांचे अंकुर नष्ट होतात. ही दीक्षा सर्वांना देता येते. ज्याच्या हृदयात श्रद्धा-भक्तींचा उदय होतो, असा मनुष्य या दीक्षेला पात्र ठरतो. या दीक्षेने त्याला गुरुशुश्रूषा व देवतांची पूजाअर्चा करण्याचा अधिकार प्राप्त होतो.

या दीक्षेचे विवरण प्राचीन शाक्त ग्रंथांत अनेक ठिकाणी पाहायला सापडते. समयदीक्षेनंतर शाक्तांनी यथार्थदीक्षा नामक दुसरी एक दीक्षा मानली आहे. आगममतानुसार भोग आणि मोक्ष हे दोन्ही समान योग्यतेचे पुरुषार्थ आहेत. शिष्य कोणी भोगार्थी तर कोणी मोक्षार्थी असे असतात. भोगार्थी सकाम असतात. दीक्षेच्या प्रभावाने त्यांना भोगसिद्धी प्राप्त होते. मोक्षार्थी निष्काम असतात. त्यांना केवळ मोक्ष हवा असतो.

मोक्षार्थी पुरुषांची दीक्षा सबीज आणि निर्बीज अशी दोन प्रकारची असते. बालक, मूर्ख, वृद्ध, स्त्री, व्याधिग्रस्त आणि जे शास्त्रविचारात मूढ आहेत, अशांना निर्बीज दीक्षा विहित आहे. हे लोक केवळ दीक्षेच्या प्रभावाने व गुरुभक्तीच्या बळाने मुक्त होतात. त्यांच्यासाठी गुरुभक्ती हाच समय (धर्मपालन) आहे. सबीज दीक्षा विद्वान आणि क्लेशसहिष्णू अशा शिष्यांसाठी असते. सबीज दीक्षितांना समयाचाराचे पालन आवश्यक असते. त्यात प्रमाद झाल्यास त्यांना आपदा भोगाव्या लागतात.

दीक्षेचे आगमोक्त भेद अनेक आहेत. दीक्षार्थी शिष्याच्या चित्तात अनेक प्रकारच्या वासना असल्यामुळे त्याच्या दीक्षेतही भिन्न भिन्न प्रणाली निर्माण होतात. हे आगमोक्त दीक्षाभेद पुढीलप्रमाणे आहेत–कलादीक्षा, तत्त्वदीक्षा, पददीक्षा, मंत्रवर्णभुवनदीक्षा, भुवनदीक्षा, इ. अकरा भेद होतात.

वरीलपैकी तत्त्वदीक्षेचे पुढील अवांतर भेद मानलेले आहेत–

एकतत्त्वदीक्षा–एकमेव शिवतत्त्व.

त्रितत्त्वदीक्षा–आत्मतत्त्व, विद्यातत्त्व व शिवतत्त्व.

पंचतत्त्वदीक्षा–पृथ्वी, जल, तेज, वायू व आकाश.

नवतत्त्वदीक्षा–प्रकृती, पुरुष, नियती, काल, माया, विद्या, ईश्वर, सदाशिव आणि शिव.

अष्टादशतत्त्वदीक्षा–शब्दादी पाच विषय, मन, बुद्धी, अहंकार, गुण, प्रकृती, पुरुष, नियती, काल, माया, विद्या, ईश्वर, सदाशिव आणि शक्ती.

छत्तीस तत्त्वदीक्षा–ही छत्तीस तत्त्वे सांख्य शास्त्रात वर्णिली आहेत.

वरील अकरा प्रकार आणि ज्ञानदीक्षा मिळून बारा दीक्षा मानलेल्या आहेत. सबीज, निर्बीज व सद्योनिर्वाणदायिनी या तीन भेदांनी या बारा दीक्षांचे छत्तीस प्रकार होतात. आचार्यांना विहित अशा सबीज दीक्षेचे बारा प्रकार होतात. साधक हे लोकधर्मी व शिवधर्मी असे द्विविध असल्यामुळे त्यांची बारा प्रकारची सबीज दीक्षा लोकधर्मी व शिवधर्मी या भेदाने चोवीस प्रकारची होते. समयदीक्षेचे ज्ञान व क्रिया हे दोन भेद होतात. या सर्व दीक्षांची मिळून ७४ ही संख्या होते (३६+१२+२४+२=७४)

याशिवाय आणखीही काही दीक्षा तंत्रशास्त्रात सांगितल्या आहेत, त्या अशा – अलौकिक, दैवी, चाक्षुषी, मानसी, स्पर्शवती, श्रौती, निर्वाणपद, सकल, निष्कल, अघोरेश्वरी, सामान्य, विशेष, आचार्य, शिव, योग, इत्यादी.

आगममतानुसार दीक्षा ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. दीक्षेवाचून ज्ञान, योग, इ. गोष्टींत अधिकार प्राप्त होत नाही. दीक्षेने भोग आणि मोक्ष हे दोन्ही सिद्ध होतात. पण कधी कधी ते दीक्षेने साक्षात सिद्ध होतात; तर कधी कधी दीक्षेमुळे उत्पन्न होणाऱ्या संस्कारांच्या द्वारे प्राप्त होतात. लोकधर्मी दीक्षा ही साक्षात रूपाने भोगोपाय होते, तर शिवधर्मी दीक्षा ही साक्षातरूपाने मोक्षोपाय ठरते. दीक्षेवाचूनही मोक्ष मिळू शकतो, या मताचे काही तांत्रिक लोक आहेत. काहींच्या मते शक्तिपात झाल्यावर मुक्ती निश्चित आहे, तिथे दीक्षेची अपेक्षा नाही. पण खरी गोष्ट ही आहे, की शक्तिपात झाल्यावरच दीक्षा होऊ शकते. दीक्षेचे जे विविध प्रकार आहेत, ते शक्तिपाताच्या कमी-अधिक मात्रेवर आधारलेले असतात. शक्तिपात तीव्रतम असल्यास एका क्षणात मोक्ष मिळून जातो. याविषयी एक प्रसिद्ध वचन आहे, ते असे –

तस्य दीक्षां विनैवात्मसंस्कारपरिणामतः।
सम्यग्ज्ञानं भवेत् सर्वशास्त्रेषु परिनिष्ठितम्।।

अर्थ–त्या (तीव्रतम शक्तिपात झालेल्या) पुरुषाला आत्मसंस्काराच्या परिणामाने सर्व शास्त्रांमध्ये सांगितलेले सम्यग् ज्ञान दीक्षेवाचून होते.

पण वरील श्लोकातील दीक्षा या शब्दाचा अर्थ बाह्य दीक्षा असा घेतला पाहिजे. बाह्य दीक्षा सर्वत्र आवश्यक असतेच असे नाही; पण आत्मसंस्काररूप आंतर दीक्षा मात्र सर्वांनाच आवश्यक असते. [तां. वा. शा. दृ.; भा. सं. सा. १]

**दीक्षितदंड** एक यज्ञीय उपकरण. दीक्षा घेण्याच्या वेळी यजमानाने हा दंड हाती घ्यायचा असतो. हा उंबराचा अथवा फळे येणाऱ्या कोणत्याही वृक्षाचा करतात. तो मुठीइतका जाड व यजमानाच्या तोंडाशी किंवा हनुवटीपर्यंत येईल इतका घेतात. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**दीक्षित राजचूडामणी** (इ. स. चे १७ वे शतक) एक संस्कृत टीकाकार. यज्ञनारायण या नावाने हा ओळखला जातो. जैमिनीसूत्रावर तंत्ररक्षामणी नावाची टीका, कर्पूरवार्तिक व जैमिनीच्या संकर्षकांडावर संकर्ष न्यायमुक्तावली नावाची टीका, असे तीन ग्रंथ याने रचले आहेत. याने एक संस्कृत नाटिकाही लिहिली आहे. [मी. द.]

**दीक्षित शंकर बाळकृष्ण** (१८५३ – १८९८ इ. स.) सुप्रसिद्ध ज्योतिर्गणिती आणि भारतीय ज्योतिषशास्त्राचे इतिहासकार. यांचा जन्म कोकणातील मुरूड (ता. दापोली, जि. रत्नागिरी) या गावी एका चित्पावन घराण्यात झाला. या घराण्याचे मूळचे आडनाव वैशंपायन असे होते; पण शंकररावांच्या निपणजाने यज्ञ केल्यामुळे हे घराणे दीक्षित म्हणून प्रसिद्ध झाले.

शंकर बाळकृष्णांचे प्राथमिक शिक्षण मुरूड येथेच झाले. ते चालू असतानाच त्यांनी घरी अमरकोश पाठ करून, काव्य, व्याकरण, इ. संस्कृत विषयांचा प्राथमिक अभ्यास पुरा केला. त्याच सुमाराला दापोली येथे इंग्रजी शाळा सुरू झाली होती. त्या शाळेत शंकररावांनी थोडा इंग्रजीचा अभ्यास केला आणि इ. स. १८७० मध्ये ते पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजात दाखल झाले. ट्रेनिंग कॉलेजातील शिक्षण चालू असताना त्यांनी मॅट्रिक्युलेशनचा अभ्यासही पुरा केला. आणि ट्रेनिंग कॉलेजची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर एका वर्षाने (इ. स. १८७४ मध्ये) त्यांनी मॅट्रिक्युलेशनची परीक्षा दिली. ट्रेनिंग कॉलेजच्या अंतिम परीक्षेत त्यांना पहिल्या दर्जाचे सर्टिफिकेट मिळाले.

पुढे त्यांनी अध्यापन हाच व्यवसाय पत्करला. इ. स. १८७४ ते १८८९ या काळात ते निरनिराळ्या ठिकाणी मुख्याध्यापक

होते. त्यानंतर धुळे येथे नव्याने सुरू झालेल्या ट्रेनिंग कॉलेजात शिक्षक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. तिथे अध्यापन करीत असतानाच त्यांची विशेष प्रसिद्धी झाली. इ.स.१८९४ पर्यंत धुळे ट्रेनिंग कॉलेजात काम केल्यावर त्यांची पुणे ट्रेनिंग कॉलेजात बदली झाली. तिथे अध्यापन कार्य करीत असताना वयाच्या पंचेचाळीसाव्या वर्षी ते विषमज्वराने निधन पावले.



शंकर बाळकृष्ण दीक्षित

दीक्षितांनी दरमहा पंचवीस रुपये पगारावर नोकरीस आरंभ केला आणि दरमहा पंच्याहत्तर रुपये प्राप्ती असताना ते निधन पावले. अशा परिस्थितीतही त्यांनी अव्याहत विद्याव्यासंग चालू ठेवला आणि आपल्या ज्ञानाच्या दीप्तीने पाश्चिमात्य विद्वानांनाही चकित केले. अगदी लहानपणापासूनच गणित हा दीक्षितांचा आवडता विषय होता. रेवदंड्यास असताना त्यांनी कै. विसाजी कृष्ण लेले यांचे सायनवादावरील लेख वृत्तपत्रांत वाचले आणि त्यांचे चित्त ज्योतिषशास्त्राकडे आकर्षित झाले. पुढे ठाणे येथे जनार्दन बाळाजी मोडक यांच्या सहवासात त्यांचा ज्योतिषशास्त्राचा अभ्यास विशेष वाढीस लागला. श्री. लेले यांचा सायनपक्ष पटल्यावर दीक्षित, मोडक व लेले हे तिघे मिळून सायनपंचांग प्रसिद्ध करू लागले. दीक्षितांनी मोडक व लेले यांच्यानंतरही काही काळ पदरमोड करून हे पंचांग चालविले होते.

सूक्ष्म अध्ययनामुळे ज्योतिषशास्त्राच्या क्षेत्रात दीक्षितांचा अधिकार एवढा वाढला, की डॉ. फ्लीटसारख्या पहिल्या दर्जाच्या इतिहासवेत्त्यालाही त्यांचे सहकार्य घ्यावे लागले. 'यांची मदत नसती, तर मला गुप्तांचा शककाल निश्चित करता आला नसता,' अशी स्पष्ट कबुली डॉ. फ्लीटने आपल्या गुप्त इन्स्क्रिप्शन्स या ग्रंथाच्या प्रस्तावनेत दिली आहे. दुसरे उदाहरण रॉबर्ट सेवेलचे. त्याने दीक्षितांच्या सहकार्यानेच इंडियन कॅलेंडर हा ग्रंथ निर्माण केला व तो भारतीय इतिहासाच्या संशोधनात अत्यंत उपयुक्त ठरला. या ग्रंथात पंचांगासंबंधीच्या आणि कालगणनेच्या सर्व बाबींची माहिती दिलेली असून, भारतातील प्राचीन व अर्वाचीन शकांची चर्चा केलेली आहे. इ. स. ३०० ते १९०० या सोळा शतकांतील तिथि-तारखांचा मेळ दाखविणारी सारणी हे या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. या ग्रंथाच्या निर्मितीत दीक्षितांचा वाटा मोठा आहे.

दीक्षितांनी विद्यार्थिबुद्धिवर्धिनी, सृष्टचमत्कार आणि सोपपत्तिक अंकगणित ही तीन पुस्तके शालेय विद्यार्थ्यांसाठी लिहिली. त्यांचे धर्ममीमांसा हे पुस्तक मॅक्स म्यूलरच्या गिफर्ड-व्याख्यानांचे भाषांतर आहे. भारतवर्षीय भूवर्णन या पुस्तकात त्यांनी वेद, पुराणे व इतर प्राचीन ग्रंथ यांच्या आधारे प्राचीन स्थानांची निश्चिती केली आहे.

ज्योतिर्विलास अथवा रात्रीची दोन घटका मौज हे दीक्षितांचे पुस्तक शास्त्रीय विषयावरचे असूनही कादंबरीसारखे रंजक झालेले आहे. यात आकाशस्थ ग्रहतार्‍यांची माहिती अत्यंत सुबोध शैलीत करून दिलेली आहे.

भारतीय ज्योतिषशास्त्र हा त्यांचा जगप्रसिद्ध ग्रंथ होय. या ग्रंथात दीक्षितांची वेदकालापासून भारतीय ज्योतिषशास्त्राचा विकास कसकसा होत गेला, त्याचा इतिहास सर्व मूळ ग्रंथ बारकाईने अभ्यासून मांडला आहे. या ग्रंथाच्या सिद्धतेसाठी त्यांनी पाचशेहून अधिक मूळ संस्कृत ग्रंथांचे अध्ययन केले असल्याचे कळते. अध्ययनाची परंपरा लुप्त झाल्यामुळे दुर्बोध बनलेल्या अनेक विषयांचा उलगडा त्यांनी प्रस्तुत ग्रंथात केला, पंचांगशोधन व तत्संबद्ध मतमतांतरे यांचा विस्तृत परामर्श घेतला आणि प्रस्तुत शास्त्र केवळ भारतीयांनीच सुविकसित करून जगाला दिल्याचा सिद्धान्त सप्रमाण मांडला. त्यांच्या या कार्यामुळे अनेक युरोपीय पंडितांचे भारतीय विद्येच्या क्षेत्रातील सिद्धान्त डळमळीत बनले. 'कृत्तिका पूर्वेस उगवतात; तेथून त्या चळत नाहीत' या अर्थाच्या शतपथ ब्राह्मणातील वाक्यांवरून (२.१.२.३), त्यांनी शतपथ ब्राह्मणाचा काळ सनपूर्व दोन हजार वर्षे असा ठरविला आणि त्याचे खंडन करणे युरोपीय पंडितांना अशक्य होऊन बसले. या त्यांच्या संशोधनामुळे वेदांच्या प्राचीनतेसंबंधी युरोपीयांनी घेतलेल्या शंकांचेही उन्मूलन झाले. ग्रीक ज्योतिष आणि भारतीय ज्योतिष यांत कुठेही साम्य नसल्यामुळे 'ज्योतिषाची मूलतत्त्वे ग्रीसमधून हिंदुस्थानात आली,' या थिबोच्या मतात काहीच अर्थ नाही, हे त्यांनी सविस्तर दाखवून दिले. टॉलेमीपूर्वीच्या वासिष्ठ सिद्धान्तात अंशाचे साठ भाग सापडतात, हे त्यांनी दाखवून दिले आणि 'टॉलेमीपासून हिंदूंना ज्योतिषाचे सर्वस्व मिळाले,' या बर्जेच्या प्रतिपादनाचे मूळच उद्ध्वस्त केले.

दीक्षितांचे हे कार्य भारतीय ज्योतिषातच नव्हे, तर भारतीय व पाश्चात्य विद्येच्या क्षेत्रातही अजरामर बनले आहे. आपल्या मूलगामी प्रज्ञेला अव्याहत व्यासंगाची जोड देऊन त्यांनी पाश्चिमात्य पंडितांचेही गुरुत्व भूषविले आणि आपली भाषा, आपला देश व आपली परंपरा यांचा गौरव वृद्धिंगत केला. त्यांचा ग्रंथ वाचण्यासाठी काही पाश्चात्य पंडित मराठी भाषा शिकले. परिपूर्णता आणि निश्चितता हे दीक्षितांच्या विवेचनाचे गुणविशेष होत. या गुणविशेषांमुळे हा ग्रंथ विद्वन्मान्य व जगन्मान्य बनला आहे. [अ. च. को.; सु. वि. को.; भा. ज्यो. शा.]

**दीक्षितस्वामी** (१८६६ – १९२७ इ. स.) महाराष्ट्रातील एक दत्तोपासक ग्रंथकार. यांचा जन्म नृसिंहवाडीच्या दीक्षित घराण्यात झाला. यांच्या पित्याचे नाव लक्ष्मणशास्त्री व मातेचे अहिल्याबाई असे होते. ही दोघेही परम दत्तभक्त होती.

बालपणी दीक्षितस्वामींची वृत्ती विलासी होती; परंतु इंग्रजी शाळेत शिकत असताना पित्याने केलेल्या उपदेशामुळे यांना विरक्ती प्राप्त झाली आणि इंग्रजी शिक्षण व विलास या दोन्ही गोष्टी सोडून हे शास्त्रमार्गाने वागू लागले. त्यांनी संस्कृतातील अनेक विद्यांचे अध्ययन करून वडिलांचे दत्तोपासनेचे व्रतही पुढे चालवले.

आपल्या मुलाची ही विरागी वृत्ती पाहून लक्ष्मणशास्त्र्यांनी त्यांना वासुदेवानंद सरस्वतींच्या (टेंबे स्वामींच्या) स्वाधीन केले. वासुदेवानंदांनी यांना अध्यात्मबोध केला आणि ते उत्तरयात्रेला निघून गेले. त्या उपदेशाप्रमाणे वागून गृहस्थाश्रम आचरीत असताना एकाएकी त्यांची बायको व मुले प्लेगने मरण पावली. त्यांनाही प्लेग झाला होता; परंतु त्यातून ते वाचावले. या दुर्घटनेनंतर दीक्षितांनी लगेच संन्यास घेतला. त्यानंतर काही काळाने वासुदेवानंद नरसोबाच्या वाडीला आले आणि त्यांनी आपल्या या शिष्याची भेट घेतली. दीक्षितांना आशीर्वाद देताना वासुदेवानंद सरस्वती म्हणाले, की "जें एकमेवाद्वितीय परब्रह्म भक्तोद्धारार्थ भूतलीं अवतरलें, त्याला श्रीदत्त नरसिंह सरस्वती हें नाम आहे, तेच नरसिंह सरस्वती तुम्ही आहां !"

त्या दिवसापासून दीक्षितांना नरसिंह सरस्वती हे नामाभिधान प्राप्त झाले. परंतु आद्य नरसिंह सरस्वतींपासून त्यांची वेगळी ओळख सांगण्यासाठी त्यांना लोक दीक्षितस्वामी या नावाने संबोधू लागले.

पुढे हे अयोध्येला गेले असता तिथेच समाधिस्थ झाले. त्यांनी संस्कृत भाषेत ५५ स्फुट ग्रंथ लिहिले आहेत आणि साधनेतील समस्यांची उकल करण्यासाठी गुरुशिष्यसंवाद या नावाचे एक मराठी गद्य प्रकरणही लिहिले आहे. [न. च. प.]

**दुंदुभी** एक प्राचीन चर्मवाद्य. दुम्‌दुम् असा आवाज करून भिवविते म्हणून याला दुंदुभी हे नाव मिळाले असावे. लोखंडाच्या किंवा तांब्याच्या कुंडीवर चामडे मढवून दुंदुभी तयार करीत व तो दोन काठ्यांनी वाजवीत. हे मुख्यतः एक रणवाद्य होते. याचा उल्लेख वैदिक वाङ्मयात अनेक ठिकाणी आढळतो. त्यांतला एक उल्लेख असा –

उपश्वासय पृथिवीमुत द्यां पुरुत्रा ते मनुतां विष्ठितं जगत् ।
स दुन्दुभे सजूरिन्द्रेण देवैर्दूराद्दवीयो अप सेध शत्रून् ॥
(ऋग्वेद ६.४७.२९)

भावार्थ – हे दुंदुभे, पृथ्वी व द्युलोक यांना तू आपल्या आवाजाने निनादून टाक. सर्व स्थावर–जंगम सृष्टीला तुझी रणगंभीर गर्जना ऐकू दे. हे दुंदुभी, आमच्यावर प्रेम करणारा तू, इंद्र व देव यांच्या मदतीने आमच्या शत्रूंना दूर फेकून दे.

महाभारतात, अर्थशास्त्र व पुराणे यांतही याचे वर्णन रणवाद्य म्हणूनच केलेले आहे. वीरश्रीला प्रोत्साहक व शत्रूला भयानक असा याचा ध्वनी असतो.

मकरसंक्रमणाच्या वेळी सूर्याच्या पुनरागमनाला विरोध करणाऱ्या शक्तींना भिवविण्यासाठी भूदुंदुभी नावाचे एक वाद्य वाजवीत. जमिनीत एक खळगा करून त्यावर कातडे ताणून बसवले, की ते वाद्य तयार होत असे (काठक सं. ३४.५; शां. श्रौ. सू. १७.१४.११; ऐ. आ. ५.१.५).

पृथ्वीवर एखादी आनंददायक घटना घडली असता स्वर्गात देव दुंदुभी वाजवीत, अशी वर्णने पुराणांत सापडतात. मथुरेत कृष्णाचा जन्म झाला, त्या वेळी देवांनी स्वर्गात दुंदुभी वाजवला होता. [ऋ. द.; वे इं.; क. हि. वा. पु.]

**दुःख** सुख आणि दुःख हे मानवी जीवनात प्रत्येकाच्या अनुभवाला येणारे एक द्वंद आहे. एकाचा अनुभव यायला दुसऱ्याची अनुभूती असावी लागते.

न्यायदर्शनान्वये दुःखाचे लक्षण असे –'बाधनालक्षणं दुःखम् ।' बाधना म्हणजे पीडा. पीडा हे ज्याचे स्वरूप आहे, ते दुःख होय. दुःख हा आत्म्याचा गुण आहे. दुःखाची आणखीही काही लक्षणे आहेत, ती अशी – 'प्रतिकूलवेदनीयम्' = ज्यात प्रतिकूल संवेदना आहे, ते दुःख होय (वात्स्या १.१.२). 'अधर्मजन्यं सचेतसां प्रतिकूलम्' = अधर्मापासून उत्पत्ती असल्यामुळे प्राणिमात्रांना प्रतिकूल ठरते, ते दुःख होय (भाषापरिच्छेद). 'बुद्धितत्त्वस्य परिणामविशेषः। स च रजःकार्यं इति सांख्याः'

= बुद्धितत्त्वाचा विशिष्ट परिणाम म्हणजे दुःख. हा परिणाम रजोगुणामुळे उत्पन्न होतो, असे सांख्यांचे मत आहे (सांख्य-तत्त्वकौमुदी).

मनूने स्ववशता (स्वाधीनता) हे सुखाचे व परवशता (पराधीनता) हे दुःखाचे लक्षण सांगितले आहे. काही जाणकार कामनांच्या पूर्तीला सुख व अपूर्तीला दुःख असे मानतात. नीतिशास्त्रज्ञांनी सुख व दुःख यांचा संबंध अनुक्रमे धर्म व अधर्म यांच्याशी जोडला आहे. काही लोक सुखाच्या अभावालाच दुःख असे म्हणतात.

दुःखाचे ग्रहण मनाने होत असते. प्रत्येक जीवाला दुःख आहे, असे न्यायशास्त्राने सांगितले आहे. दीनता व मुख-मालिन्य, हे दुःखाचे परिणाम होत, असे प्रशस्तपादाचार्यांनी म्हटले आहे. शरीर हे दुःखायतन असल्यामुळे दुःखरूप आहे; इंद्रिये, इंद्रियविषय आणि विषयप्रत्यक्ष ही दुःखाची कारणे आहेत; सुख हे दुःखाच्या अनुषंगाने येते; तर दुःख मात्र स्वरूपतःच असते, असेही एक मत आहे.

दुःख हे आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक असे त्रिविध मानलेले आहे. आध्यात्मिक दुःखाचे शारीरिक आणि मानसिक असे दोन भेद होतात. शारीरिक दुःख हे वात, पित्त आणि कफ या तीन धातूंच्या वैषम्यामुळे निर्माण होते. काम-क्रोधलोभादिकांमुळे मानसिक दुःखाची उत्पत्ती होते. ही सर्व दुःखे आन्तरोपायसाध्य आहेत. बाह्योपायसाध्य दुःख हे आधि-भौतिक व आधिदैविक असे द्विविध आहे. आधिभौतिक दुःख हे मनुष्य, पशू, पक्षी, सरपटणारे प्राणी, कृमिकीटक यांच्या-मुळे उत्पन्न होते; तर आधिदैविक दुःख हे यक्ष, राक्षस, विनायकग्रह, वगैरेंनी झपाटल्यामुळे होते.

पारतंत्र्य, आधी, व्याधी, मानभंग, शत्रू, प्रतिकूल भार्या, निर्धनता, कुग्रामवास, दुष्ट धन्याची सेवा, बहुकन्यात्व, वृद्धत्व, परगृहवास, वर्षाप्रवास, भार्याद्वय, वाईट सेवक व दुर्हलकरणक कृषी (वाईट नांगराने करावी लागणारी शेती) या गोष्टी दुःखकारक आहेत, असे कविकल्पलतेत सांगितले आहे.

दुःख या जीवनानुभवावर तत्त्वज्ञानाची किंवा आचार-मार्गाची उभारणी करणारा पहिला महापुरुष म्हणजे गौतम बुद्ध हा होय. त्याने आपला अष्टांगिक मार्ग चार आर्य सत्यांच्या द्वारे सांगितला आहे. दुःखाचे सर्वव्यापी अस्तित्व, दुःखाची सार्वत्रिक कारणे, संपूर्ण दुःखनिरासाची शक्यता व दुःखनिरासाचा मार्ग ही ती चार आर्य सत्ये होत. याविषयी भिक्षूंना उपदेश करताना बुद्ध म्हणतो –

भिक्षूंनो, दुःख हे एक आर्य सत्य आहे. या भूलोकातील जन्म, जरा, रोग, मृत्यू, अनिष्टसंयोग, इष्टवियोग, इच्छाविघात, इ. गोष्टी दुःखमय आहेत. तृष्णा ही दुःखाचे कारण आहे. या तृष्णेचा संपूर्ण त्याग केल्याने दुःखनिरोध होऊन मनुष्याला ज्ञान व मोक्ष मिळेल. याच मार्गाने जाऊन मला सम्यक्संबोध प्राप्त झाला.

जीवन हे स्वभावतःच दुःखमय आहे, हे सत्य उपनिषत्-कारांनी व सांख्यांनी बुद्धापूर्वीच जाणले होते. पण त्या सत्याला प्रथम स्थान देण्याचे काम बुद्धाने केले. तत्त्वज्ञानाचा प्रारंभ कुठून करावा, याचे ते उत्तम निदर्शक आहे. प्रापंचिक सुखे व सुख-साधने अस्थिर व विनाशी आहेत, म्हणून अखेरीस त्यांचा परिणाम दुःखरूपच होतो. परम सत्याशिवाय बाकी सगळे शोकालाच कारणीभूत होते, अशा विचारांचा प्रारंभ उपनिषदा-तच झालेला दिसतो. पुढील काळात या दुःखकल्पनचा बौद्ध, जैन व इतर दर्शने यांच्यावर विलक्षण प्रभाव पडलेला दिसतो. सर्व भारतीय दर्शने विश्वाची दुःखमयता उच्च स्वराने सांगत आहेत. फक्त चार्वाक दर्शन तेवढेच याला अपवाद आहे. परंतु उत्तरकालीन चार्वाकदर्शनावरसुद्धा या विचारांचा पगडा बसल्याचा पुरावा सापडतो.

अविद्या व तृष्णा यांची सर्वव्यापी बंधकता मान्य केल्यावर संसाराची दुःखमयता मान्य करणे भागच पडते. अविद्या जसजशी कमी होत जाते व ज्ञानाची प्रसन्न प्रभा जसजशी फाकत जाते, तसतसा जीवनात शांतियुक्त आनंद वाढीस लागतो. आध्यात्मिक आनंद तो हाच होय. हाच विचार माण-साला श्रेयाकडे आकर्षित करतो. श्रेय हीच परमार्थाची आणि आनंदाची परिपूर्ती आहे. धन, मान, इंद्रियसुखे, इ. गोष्टींतील आनंद हा सुखाचा किंवा आनंदाचा केवळ आभास आहे. कारण प्रकट वा अप्रकटपणे या आभासात्मक आनंदाच्या मुळाशी तृष्णेची आग धगधगत असतेच आणि तीच सकल दुःखांची जननी असते.

पुढे मध्ययुगातील संतांनीही दुःखवाद हेच आपल्या पर-मार्थाचे अधिष्ठान बनविले. किंबहुना सांसारिक दुःखांनी जो पोळतो, तोच खरा परमार्थाचा अधिकारी होतो, असे समर्थ रामदासांनी म्हटले आहे. संसाराची दुःखमयता ही एका विशाल रूपकाच्या द्वारे समर्थ रामदासांनी पुढीलप्रमाणे सांगितली आहे –

संसार म्हणिजे महापूर । माजीं जळचरें अपार ।
डंखू धावती विखार । काळसर्प ।।
आशा ममता देहीं बेडी । सुसरी करिताती तडातोडी ।
नेऊन दुःखाचे सांकडी– । माजीं घालिती ।।
अहंकारनक्रें उडविलें । नेऊन पाताळीं बुडविलें ।
तेथुनिया सोडविलें । नवचे प्राणी ।।

कामभगरमिठी सुटेना । तिरस्कार लागला तुटेना ।
मद मत्सर वोहटेना । भूलि पडिली ॥
वासनाधामिणी पडिली गळां । घालून वेंटाळें वमी गरळा ।
जिव्हा लाळी वेळोवेळां । भयानक ॥
माथां प्रपंचाचे वोझें । घेऊन म्हणे माझें माझें ।
बुडतांहि न सोडी फुंजे । कुळाभिमानें ॥
(दास. ३.१०.१–६)

अशा या दुःखमय संसारातून मुक्त होण्यासाठी बहुतेक सर्व संतांनी वैराग्यपूर्वक भगवद्‌भक्तीचा मार्ग उपदेशिला आहे. खरे पाहू जाता सुख व दुःख या एकाच मानवी जीवनाच्या दोन बाजू आहेत. पुष्कळ वेळा मानवी जीवनात सुख व दुःख ही संमिश्र स्वरूपातही आढळतात. दुःखाचा अनुभव नसेल, तर सुख सुखरूपाने प्रतीतच होणार नाही. मनुष्याला जरी सुखच हवे असले आणि दुःख नको असले, तरी त्याच्या नैतिक व पारमार्थिक विकासाला दुःखाचा अनुभव येणेही इष्टच असते. [ हिं. सा. को.; हिं. वि. को.; वै. सं. वि. ]

**दुग्धप्राशन** एक गौण संस्कार. मूल जन्मल्यापासून ३१ व्या दिवशी किंवा जन्मनक्षत्री शुभ लग्नावर मातेने ब्राह्मण व कुलदेवता यांची पूजा करून शंखाने मुलाला गाईचे दूध पाजावे, असे सांगितले आहे. [ सं. कौ. ]

**दुग्धेश्वरनाथ** एक शैव क्षेत्र. हे गोरखपूर–भटनी लोह-मार्गावरील गौरीपूर स्टेशनाच्या दक्षिणेला दहा मैलांवर रुद्रपूर या गावी आहे. महाकालेश्वराचे उपलिंग म्हणून याची ख्याती आहे. पूर्वी इथे पंचक्रोशीच्या परिक्रमेची प्रथा होती. या ठिकाणी महाशिवरात्रीच्या दिवशी आणि अधिक मासात मोठी यात्रा भरते. या मंदिराच्या परिसरात अनेक मंदिरे आहेत. [ कल्याण-तीर्थांक ]

**दुदेकुल** द. भारतातील एक जात. हे लोक धर्माने मुसलमान असून, कापूस पिंजण्याचा व्यवसाय करतात. दुदे म्हणजे कापूस व एकुल म्हणजे स्वच्छ करणे, यावरून यांना दुदेकुल ( कापूस स्वच्छ करणारे) असे नाव मिळाले आहे. हे लोक दोन्याही वळतात. दुदेकुल बहुधा बाटलेले मुसलमान आहेत. मुसलमान पुरुष व अन्यधर्मीय स्त्री यांची ही संतती आहे, असे सांगतात. हे लोक काही हिंदूंचे व काही मुसलमानांचे रीतिरिवाज पाळतात. ते मशिदीत प्रार्थना करतात, मुलांची सुंता करतात आणि हिंदूंप्रमाणे दाढीही करतात. यांचे वारशासंबंधीचे सर्व कायदे मुसलमान पद्धतीचे आहेत. अनंतपूर जिल्ह्यातील पेनुकोंडाच्या फक्रुद्दीन पीराला हे भजतात.

हे लोक तेलुगू किंवा कन्नड भाषा बोलतात. काही लोक हिंदुस्थानीही बोलतात.

यांच्यांत मूल जन्मल्याबरोबर त्याच्या कानात प्रार्थनेचे शब्द उच्चारतात. सहाव्या दिवशी त्याचे नाव ठेवतात. यांची सर्व धार्मिक कृत्ये काजी करतो.

**विवाहप्रथा** – मुलगी वयात आली की जातीच्या लोकांना बोलावून ते प्रथम मेजवानी देतात. मग तिचे लग्न ठरवतात. लग्नाच्या आदल्या दिवशी रात्री नवऱ्या मुलाच्या घरी जेवणावळ होते. लग्नाच्या दिवशी पहाटे नवरा मुलगा घोड्यावर बसून वाजत-गाजत वधूगृही जातो. मग काजीला बोलावून वधूचे देज ठरवतात आणि वधूची त्या देजाच्या द्रव्याला व लग्नाला संमती घेतात. नंतर वराच्या नातेवाईक स्त्रिया चंदनाच्या गंधात घोळवलेली मण्यांची माळ सौभाग्यचिन्ह म्हणून वधूच्या गळ्यात घालतात. ती घातल्यावर लग्नविधी पुरा होतो.

दुदेकुल स्त्रिया व पुरुष हिंदूंसारखाच पोषाख करतात. स्त्रिया गोषा पाळीत नाहीत.

अलिकडे कापूस-गिरण्यांमुळे यांचा धंदा बराच बसला आहे. म्हणून ते आता शेतीकडे वळले आहेत. [ का. ट्रा. स. इं. ]

**दुबळा** एक आदिवासी जमात. यांची वस्ती मुख्यतः गुजरातमधील सुरत, भडोच व महाराष्ट्रातील ठाणे या जिल्ह्यात आहे. ही जमात अत्यंत मागसलेली व अशिक्षित आहे.

या जातीच्या नावासंबंधी अनेक दंतकथा प्रचलित आहेत. त्यांतील दोन कथा अशा –

(१) प्राचीन काळी एकदा यांच्यावर लढाईचा प्रसंग ओढवला असता, पराजयाच्या भीतीने हे लोक शत्रूशी लढण्यास कचरले; तेव्हा त्यांच्या शत्रूने त्यांना उपहासाने म्हटले, ‘ तुम्ही दुबळे लोक आमच्याशी कसे काय लढणार ? ’ तेव्हापासून लोक त्यांना दुबळे म्हणू लागले.

(२) एकदा दुष्काळ पडल्यामुळे अन्नपाण्याच्या अभावी हे लोक अशक्त बनले आणि त्याच स्थितीत अन्यत्र गेले. ते जिथे गेले तिथल्या लोकांनी यांना दुबळे असे नाव दिले.

**शाखाभेद** – दुबळा जमातीच्या सुमारे २५ शाखा आहेत. परंतु त्यांतील तलाविया, वोहारिया व खर्चा या तीनच प्रमुख आहेत. पूर्वी या शाखांचे आपसांत रोटीबेटीव्यवहार होत नसत, पण अलिकडे ते होऊ लागले आहेत. त्यामुळे आता शाखाभेद फारसा शिल्लक राहिलेला नाही.

या लोकांना इतर जातींचे लोक हीन समजतात. तथापि हे मात्र स्वतःला उच्च मानतात. मजुरी व शेती हे यांचे

प्रमुख व्यवसाय आहेत. ज्वारी हे यांचे मुख्य अन्न होय. घोरपडीचे मांस यांना फार आवडते. यांची घरे कुडाच्या



दुबळांची झोपडी

भिंतींची व गवती छपराची असतात, त्यांना खिडक्या नसतात व त्यांची उंचीही फार कमी असते.

**विवाहप्रथा** – मुलगा १८ वर्षांचा व मुलगी १५ वर्षांची झाली, की त्यांची लग्ने करतात. प्रेमसंबंधातून जमलेल्या लग्नालाही मान्यता देतात. लग्नासाठी गणगोत्राचे बंधन मानीत नाहीत; पण ठराविक क्षेत्राच्या बाहेरील व्यक्तीशी लग्नसंबंध करीत नाहीत. लग्नाचा करार करतेवेळी जातीच्या पंचासमक्ष मुलीचे देज ठरवतात. देजाची रक्कम लगेच देतात. त्यानंतर सुमारे सहा महिन्यांनी एक समारंभ करतात. त्या प्रसंगी वरपक्ष मोठ्या संख्येने वधूगृही जातो व दोन लुगडी व पोलकी, हाताने कातलेले सूत व काही दागिने वधूला देतो. वरपक्षाला तिथे जेवण मिळत नाही. मग वराकडील लोक एक पोते तांदूळ वधूगृही पाठवितात. त्या तांदुळाचा वधूपक्षाने स्वीकार केला, तर लग्न निश्चित झाले, असे समजतात. या समारंभाला धानसमारंभ असे म्हणतात. मांडवात मध्यभागी बोहले करतात. काही ठिकाणी बोहल्याऐवजी खांब पुरतात. त्या खांबाला मुरत बेरिउन असे म्हणतात.

लग्नापूर्वी तीन दिवस वराला आणि पाच दिवस वधूला रोज हळद लावतात. हे हळद लावण्याचे काम मोठी भावजय वा मामी यांच्याकडे असते.

वधूगृही लग्नाला जाण्यापूर्वी वराला सर्वजण चंदेलो ( आहेर ) करतात. त्याच्या हाताला मिंढळ ( फळे ) बांधतात. नंतर दिवा व तांदूळ यांनी ओवाळतात. वरघोडा नसेल, तर वराला त्याचा मेहुणा ( बहिणीचा नवरा ) गावाच्या वेशीपासून वधूगृहापर्यंत खांद्यावर वाहून नेतो. या प्रकाराला अनवरिओ म्हणतात. वधूगृही गेल्यावर वराच्या डोक्यावरून एक रवी आणि ज्वारीचे धाट ओवाळतात. नंतर त्याच्या शरीराभोवती सूत गुंडाळतात. मग त्याच सुताचा हार करतात. नंतर वधू-वर ओटचावर समोरासमोर बसतात. वराच्या हाताला बांधलेले मिंढळ सोडून वधूच्या हाताला बांधतात. मग भगत निरनिराळ्या देवता, नद्या, थोर पुरुष व वधू–वर यांची नावे उच्चारून 'सावधान' म्हणतो. त्यानंतर सुताचा हार वधू-वरांच्या भोवती गुंडाळतात व त्यांच्या वस्त्रांना गाठ मारतात. मग ती दोघे अग्नीला प्रदक्षिणा घालतात. नंतर भगत काही मंत्र म्हणतो. एवढे झाल्यावर लग्नविधी पुरा होतो.

लग्नानंतर वधूची आई आहेर ( मांडीकुंडी ) देते. त्या आहेराला मामेरू असे म्हणतात. काही ठिकाणी वधू- वरांना निरोप देताना रामव्यवहार नावाचा समारंभ करतात. या समारंभाला जातपंचांना बोलावतात. जातपंचासमोर वधू-वर रामाच्या नावाने अशी शपथ घेतात, की 'आम्ही कोणत्याही परिस्थितीत एकमेकांना सांभाळू व पंचांचा अधिकार मानू.'



दुबळा स्त्रिया

**प्रसूतिप्रथा** – दुबळा स्त्रियांना सुइणीचे काम येते. प्रसूती अवघड असली, तर पेटफोडीमाता या देवीला नवस बोलतात

त्या वेळी तिला कोंबडा किंवा बकरे बळी देतात किंवा मुलाची प्रतिमा बनवून ती देवीला अर्पण करतात. सटीच्या रात्री बाळंतिणीच्या खाटेजवळ तुपाचा दिवा लावून ठेवतात. बाराव्या दिवशी मुलाचे नामकरण करतात. ज्या वारी मुलाचा जन्म झाला असेल, त्या वाराचे नाव मुलाला ठेवण्याची पद्धत आहे. तिसऱ्या किंवा चौथ्या वर्षी मुलाचे जावळ करतात. ज्या देवतेच्या कृपेमुळे मुलगा झाला असेल, त्या देवतेला तो मुलगा अर्पण करण्याचीही पद्धती आहे. जावळाच्या वेळी मुलाचे केस, नारळ व एक दिवा या वस्तू त्या देवतेला अर्पण केल्या, की मुलगा त्या देवतेकडून परत मिळतो, असे समजतात.

नृत्य- दुबळा लोक नृत्यकलेत तरबेज असतात. लयबद्ध हालचाल व सुरेल संगीत यांमुळे त्यांचे नाच फार आकर्षक होतात. त्यांच्या नाचाचे तीन प्रकार आहेत– (१) जातीनृत्य– हे केव्हाही केवळ मनोरंजनासाठी करतात, (२) जन्म, लग्न, मृत्यू, इ. प्रसंगी होणारे नृत्य व (३) उत्सव-समारंभातले



दुबळा तरुण (नृत्यवेषात)

नृत्य. या नृत्यात कोंबडा, सरडा, इ. प्राण्यांची झुंज, उसाची लागवड वगैरे हालचाली दाखवतात. त्याला ढोल व थाळी या वाद्यांची साथ असते.

उत्सव – या लोकांचा सर्वांत मोठा उत्सव म्हणजे दिवसो हा होय. हा उत्सव आषाढी अमावास्येला करतात. त्या दिवशी अविवाहित मुली बाहुला-बाहुलींची लग्ने लावतात. बाहुले पांढऱ्या कापडाचे व बाहुल्या तांबड्या कापडाच्या बनवितात. एखाद्या मुलीने एकदा बाहुला बनविला, की तिला स्वत:चे लग्न होईपर्यंत बाहुलाच करावा लागतो. त्या रात्री नाच-गाणे होते. दुसऱ्या दिवशी सर्व बाहुले आणि बाहुल्या एका शिप्तरात ठेवून व मध्ये एक दिवा ठेवून त्यांना नदीत सोडून देतात. एखाद्या मुलीने पाच वर्षे हा उत्सव केला, तर तिचा संसार चांगला होतो, अशी त्यांची श्रद्धा आहे. शीतला सप्तमीला हे लोक उपास करतात. शीतलादेवीच्या पूजेने देवी-कांजिण्या या रोगांची बाधा होत नाही, असे समजतात. त्यांच्या सर्व उत्सवांत नाच–गाण्यांचा कार्यक्रम होतो.

**देवधर्म** – पृथ्वीवर सुष्ट व दुष्ट अशा काही शक्ती आहेत आणि त्यांतील दुष्ट शक्तींमुळे रोगराई व इतर संकटे येतात अशी यांची समजूत आहे. म्हणून रोगराई आली, की हे भगताकडे जाऊन त्याला उपाय विचारतात व तो सांगेल त्याप्रमाणे नैवेद्य, बळी, मंत्र, तोडगे, इ. गोष्टी करतात.

भरमदेव हा त्यांचा मुख्य देव होय. मोठे साथीचे रोग येतील, तेव्हा याची आराधना करतात. हलिकाका हा त्यांचा देवी–कांजिण्यांचा देव होय. याला पशुबलीऐवजी ज्वारीच्या घुगऱ्यांचा नैवेद्य दाखवितात. हे आकाशीमाता, पेटफोडीमाता, खोखलीमाता, मरीमाता, वेराईमाता, इ. अनेक देवता निरनिराळ्या कारणांसाठी पुजतात. अवर्षण पडते, तेव्हा स्त्री-पुरुष गटागटाने बाहेर पडतात व मेहुलो नामक गाणी म्हणत गावोगाव फिरतात. त्या फिरण्यात जे द्रव्य मिळेल त्यातून पर्जन्य देवतेची पूजा करतात.

भगत हा त्यांचा वैद्य, मांत्रिक, पुरोहित सर्व काही असतो. रोग्याच्या मस्तकाभोवती सात वेळा फिरवून आणलेले धान्याचे दाणे पाहून तो रोगपरीक्षा करतो. या प्रकाराला दाना-बांधना असे म्हणतात.

**जातपंचायत** – यांच्यांत जातपंचायत असते. पंच व पटेल हे जमातीचा कारभार पाहतात. गावातील वयस्क, हुशार, अनुभवी आणि वजनदार व्यक्तीला पटेल म्हणून निवडतात. मग तो त्या जमातीचा ग्रामप्रमुख होतो. शिवाय गावाचे निरनिराळे भाग असतात. त्यांतूनही एक एक प्रतिनिधी निवडून दिला जातो. हे सर्व प्रतिनिधी व पटेल यांची सभा जमते, ती पंचांची सभा होय. दुबळा लोकांच्या जीवनावर पंचायतीचा बराच पगडा असतो. जमातीचे नीतिनियम, रीति-रिवाज यांचे यथायोग्य पालन होते की नाही, हे बघणे हे या पंचायतीचे प्रमुख काम असते. लग्नसंबंध ठरविणे, कौटुंबिक अडचणी दूर

करणे, भांडणे मिटविणे, गुन्हेगारांना दंड करणे, इ. कामे पटेलाकडे असतात.



दुबळांचा भगत

यांनी अलिकडे दहा बारा गावांतील दुबळा जमातीचे प्रतिनिधी मिळून बनणारे बारगामनोचोरो नावाचे एक मंडळ स्थापन करण्याची पद्धती सुरू केली आहे. जुन्या वाईट चाली बंद करून जमातीची सुधारणा करणे, हा या मंडळाचा मुख्य उद्देश आहे.

**मर्तिकप्रथा** – दुबळा लोकांना पुनर्जन्माची कल्पना माहीत आहे. पण काही माणसे मेल्यानंतर भुते होऊन लोकांना त्रास देतात, ही कल्पना त्यांच्यांत विशेष प्रबल आहे. त्यामुळे ते मरणोन्मुख माणसाला शांत व तृप्त करण्याचा खूप प्रयत्न करतात. हे लोक मृतांना जाळतात वा पुरतात. या दोन्ही पद्धतींत तांदुळाचे दाणे टाकून जागा शुद्ध करून घेतात. मृताच्या तोंडात भाताचे चार पिंड ठेवण्याची पद्धत आहे. प्रेताचे पाय दक्षिणेकडे करतात. मृताला गरम पाण्याने स्नान घालून त्याच्या अंगाला हळद लावलेले तांदूळ पाच वेळा चोळतात. त्यामुळे तो शुद्ध होतो व भुतेखेते त्याच्या जवळ येत नाहीत, असे समजतात. पुरुषाचे प्रेत पांढऱ्या कापडात व स्त्रीचे प्रेत तांबड्या कापडात गुंडाळतात. प्रेताला स्मशानाकडे नेताना अर्ध्या वाटेवर थांबून त्या ठिकाणी त्याचे जुने कपडे टाकून देतात. त्यामुळे त्याला परत घरी येण्याची इच्छा होत नाही, असे समजतात. त्यानंतर प्रेताचे डोके उत्तरेकडे करून प्रेत स्मशानात नेतात. स्मशानात चारही दिशांना पानावर भात ठेवतात. अंत्यसंस्कार झाल्यावर सर्व मंडळी स्नान करून घरी परततात.

हे लोक सात दिवस सुतक पाळतात. सुतक म्हणजे फक्त श्मश्रू न करणे, एवढाच अर्थ ते समजतात. प्रेत जाळले असेल, तर ११ व्या दिवशी त्याच्या अस्थी नदीत नेऊन टाकतात आणि पुरले असेल, तर ११ व्या दिवशी त्याची लाकडी प्रतिमा करून ती जाळतात. हे सर्व विधी भगत करतो.

दुबळा लोक चार-पाच वर्षांनी एकदा अक्षय्य तृतीयेला श्राद्ध करतात, याला पर्जन किंवा मोटो दहाडो म्हणतात. एकाच कुटुंबांतील मृत व्यक्तीपुरता तो विधी असेल, तर त्याला पर्जन म्हणतात आणि अनेक कुटुंबांनी मिळून ते कार्य करायचे असेल, तर त्याला मोटो दहाडो म्हणतात. त्या कृत्यासाठी एक स्वतंत्र झोपडी बांधतात. जितक्या मृतांचे श्राद्ध करायचे असेल, तितके तांदुळाचे ढीग करतात व त्यांवर तांब्याचे एक नाणे व सुपारी ठेवतात. श्राद्धाचा मुख्य कार्यक्रम रात्री सुरू होतो व तो उजाडेपर्यंत चालतो. [ दि दुबळाज ऑफ गुजरात– श्री. पी. जी. शहा, १९५८; मुं. इ. जा.; म. ज्ञा. को. ]

**दुरसा** ( इ. स. चे १६ वे शतक ) राजस्थानातला एक चारण कवी. या कवीला अकबरानेही पुष्कळ धन देऊन गौरविले होते, अशी आख्यायिका आहे. हा केवळ कवी नसून लढवय्याही होता. जेव्हा अकबराने सिरोहीचा राव सुरताण याच्यावर आक्रमण केले, तेव्हा हा सुरताणाच्या बाजूने अकबराच्या विरुद्ध लढला आणि लढता लढता घायाळ होऊन पडला. सुरताणाने ते युद्ध जिंकले. मग सुरताणाचे सरदार जेव्हा रणभूमीचे निरीक्षण करायला निघाले, तेव्हा दुरसा त्यांना रक्ताच्या थारोळ्यात पडलेला दिसला. तो मरणयातनांतून लवकर मुक्त व्हावा, म्हणून एक शिपाई तलवार उपसून दुरसावर अखेरचा घाव घालायला निघाला, तेव्हा दुरसाने त्याला थांबवून म्हटले. 'मला मारू नको. मी राजपूत नसून चारण आहे.' त्यावर एक सरदार म्हणाला. 'तू खरा चारण असशील, तर नुकत्याच धारातीर्थी पडलेल्या देवडा समरा या राजपूत वीरावर कविता रचून म्हण.' दुरसाने ती गोष्ट मान्य करून तशा घायाळ अवस्थेतही पुढील कविता रचून म्हटली–

**घर रावाँ जस डूंगराँ व्रद पोताँ सत्रहाण ।**
**समरै मरण सुधारियौ चहुँ भोकाँ चहुँवाण ॥**

भावार्थ – समराने राव सुरताणाच्या भूमीचे रक्षण केले, पहाडांचे यश वृद्धिगत केले, आपल्या वंशजांसाठी कीर्ती मागे

झुंजून दिली, शत्रूंची जबर हानी केली आणि आपले मरण सार्थकी लावले.

ही घटना ऐकून राव सुरताण खूष झाला. त्याने दुरसाला औषधोपचारांनी बरे केले आणि त्याला दोन गावे बक्षीस देऊन जन्मभर त्याची काळजी वाहिली.

विरुदा छहत्तरी हा याचा काव्यग्रंथ होय. याची काही फुटकळ रचनाही उपलब्ध आहे. हा राजस्थानातला लोकप्रिय कवी आहे. राजस्थानात कवितेच्या नावावर याला जेवढे मानधन मिळाले, तेवढे आजवर दुसऱ्या कोणालाही मिळाले नाही, असे म्हणतात. [ रा. भा. सा. ]

**दुरुपतिअम्म** द. भारतातील, विशेषतः तमिळनाडमधील एक ग्रामदेवता. दुरुपतिअम्म म्हणजे द्रौपदी. ही प्रेमळ देवता आहे. ही पूर्वजन्मी एका ऋषीची पत्नी होती. त्या जन्मातल्या पुण्याईने दुसऱ्या जन्मी ती दुरुपट्टम राजाची कन्या झाली व नंतर पांडवांची पत्नी झाली, अशी तिकडील लोकांची श्रद्धा आहे. ही अष्टशक्तींपैकी एक गणली जाते.

**दुरैसामी अय्यर पल्लवी** (इ. स. चे १८ व १९ वे शतक) द. भारतातील एक संगीतज्ञ व कवी. याला मध्यार्जुनम दुरैसामी अय्यर असेही म्हणतात. याचा जन्म तंजाऊर जिल्ह्यातील तिरुवैयारु या गावी झाला. हा चौतीस वर्षेच जगला. तंजाऊरच्या सरफोजी महाराजाने दरबारी गायक म्हणून याची पगारी नेमणूक केली होती. याने गोविंदशिवन व सभापती हे आपले दोन मुलगे त्यागराजाकडे संगीत शिकविण्यासाठी ठेवले होते. हा उत्तम पल्लवीरचनाकार व पल्लवीगायक म्हणून प्रसिद्ध होता. सुब्रह्मण्यम या नावाने याने तेलुगू भाषेत काही वर्ण व कृती रचल्या आहेत.

हा उत्तम चित्रकारही होता. याने दोनशेहून अधिक चित्रे काढली आहेत. ही सर्व चित्रे हातकागदावर रंगवलेली आहेत. प्रत्येक चित्राखाली चित्राच्या आशयाला धरून केलेले तेलुगू लिपीतील एकेक काव्य आहे. एका चित्रात त्याने स्वतःलाही नटराज शिवाचा भक्त म्हणून रेखाटले आहे. दुरैसामीच्या पूजेतील नटराज व शिवकामसुंदरी या दोन सोन्याच्या मूर्ती आजही त्याच्या घराण्यात दाखवितात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**दुर्ग** संरक्षक तटबंदीने युक्त असे आश्रयस्थान. 'दुःखेन गच्छत्यत्र' =( विशेषतः शत्रूला ) जिथे प्रवेश करणे कठीण असते असे स्थान, अशी या शब्दाची व्युत्पत्ती आहे. देशी भाषांत याला गड, कोट, किल्ला, इ. पर्यायनामे आहेत.

शुक्रनीतीत दुर्गांचे विस्तृत वर्गीकरण दिलेले असून, गिरिदुर्गांना सर्वोच्च स्थान दिलेले आहे ( ४.६,११,१२ ). मनुस्मृतीतही किल्ल्यांचे वर्गीकरण केले आहे, ते असे –

**धनुर्दुर्गं महीदुर्गमब्दुर्गं वार्क्षमेव वा ।**
**नृदुर्गं गिरिदुर्गं वा समाश्रित्य वसेत् पुरम् ॥**
**सर्वेण तु प्रयत्नेन गिरिदुर्गं समाश्रयेत् ।**
**एषां हि बाहुगुण्येन गिरिदुर्गं विशिष्यते ॥**

( मनु. ७.७०–७१ )

अर्थ – धनुर्दुर्ग ( सभोवार वीस कोसपर्यंत उदकरहित प्रदेशाने युक्त असा दुर्ग ), महीदुर्ग ( बारा हातांहून उंच, युद्धासाठी वरून फिरता येईल एवढा रुंद आणि आवरणयुक्त गवाक्षादिकांनी संपन्न अशा तटाने वेष्टित असा दुर्ग ), अब्दुर्ग ( अगाध जलाने सर्व बाजूंनी वेष्टित असा दुर्ग ), वार्क्षदुर्ग ( तटाबाहेर चार कोसपर्यंत मोठमोठे वृक्ष, काटेरी झाडे व जाळचा यांनी व्याप्त असलेला दुर्ग ), नृदुर्ग ( हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांनी रक्षित असा दुर्ग ). आणि गिरिदुर्ग ( ज्यावर चढण्यास एकच मार्ग, ज्यावर जलसंचय, वृक्ष व धान्य निर्माण करणारी क्षेत्रे आहेत असा दुर्ग). यांपैकी कोणत्यातरी दुर्गाचा आश्रय करून नगर रचावे. या सर्व दुर्गांत अनेक गुणांनी युक्त असलेला गिरिदुर्ग प्रशस्त होय. यास्तव प्रयत्नेकरून त्याचा आश्रय करावा.

गिरिदुर्गांवर देवांचा निवास असतो, असे मनूने म्हटले आहे. एक दुर्गस्थ योद्धा शंभर शत्रूंना जिंकू शकतो आणि शंभर दुर्गस्थ योद्धे दहा हजार शत्रूंना पराभूत करू शकतात, असा दुर्गांचा महिमा त्याने पुढे वर्णिला आहे.

भारतात संरक्षणार्थ किल्ले उभारण्याची प्रथा वैदिक आर्य भारतात येण्यापूर्वीपासून आढळते. ऋग्वेदात कडेकोट बंदोबस्त असलेल्या पुरांचे म्हणजेच किल्ल्यांचे अनेक उल्लेख आढळतात (ऋ. ५.३४.७; ७.२५.२ ). एके ठिकाणी तर चिरेबंदी कोट असलेल्या नगरांचाही उल्लेख आला आहे ( ऋ. ४.३०.२० ). सिंधुसंस्कृतीच्या शिल्पकारांनी अनेक अभेद्य दुर्ग उभारले होते. हे दुर्ग आर्यांनी नष्ट केले, असे एक मत आहे. आर्यांनी इंद्राला पुरंदर ( पुरे अर्थात किल्ले उद्ध्वस्त करणारा ) असे विशेषण दिले आहे, ते यामुळेच. पुराणवस्तुसंशोधकांनी सिंधूच्या खोऱ्यात अशी अनेक तटबंदीची नगरे शोधून काढली आहेत. रामायण व महाभारत यांतील दुर्गांची वर्णने पाहता असे दिसते, की तत्कालीन दुर्गांत तट, वेस, बुरुज, मोर्चे, गुप्त मार्ग, जलाशय, खंदक, इ. संरक्षक योजना असत.

शिशुनाग राजवंश हा भारतातील पहिला ज्ञात ऐतिहासिक राजवंश होय. त्याची गिरिव्रज ही राजधानी डोंगरी किल्ल्यां-

च्या स्वरूपाची होती. त्यानंतर मौर्य कुलातील अजातशत्रूने पाटलीपुत्र येथे शोण व गंगा यांच्या संगमावर एक किल्ला उभारला होता. मेगॅस्थिनीसने त्याचे वर्णन केले आहे, ते असे–

नऊ मैल लांब व अर्धा मैल रुंद अशा या नगराभोवती भक्कम लाकडी तटबंदी होती. या लाकडी तटाच्या आत मातीचा तट होता. तटाला चौसष्ट वेशी आणि पाचशे सत्तर बुरुज होते. तटाबाहेर सहाशे फूट रुंद व चाळीस फूट खोल एवढा, पाण्याने भरलेला खंदक होता.

उज्जयिनी येथेही एका लाकडी तटबंदीच्या फळ्या आढळल्या आहेत. भुवनेश्वरानजीकचा शिशुपालगड अलिकडेच उत्खननात सापडला असून, तो सनपूर्व ३५० ते ३०० पर्यंत वापरात होता, असे कळते. या प्राचीन दुर्गाला मातीचीच तटबंदी होती.

कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात दुर्ग या विषयाला दोन प्रकरणे दिलेली आहेत. त्याने औदिक (जलदुर्ग), पार्वत (गिरिदुर्ग), धान्वन ( मूदुर्ग ) आणि वनदुर्ग असे दुर्गांचे चार प्रकार वर्णिले आहेत. त्याच्या काळचे जलदुर्ग समुद्रातील खडकावर उभारलेले नसून, मुख्यत्वे नदीकाठी किंवा नद्यांच्या प्रवाहातील बेटांवर उभारलेले असत. त्या काळच्या किल्ल्यांची तटबंदी मातीचीच असे आणि त्याभोवती खंदक असत. तटांचे बुरुज मात्र विटांचे असत. तटांची रुंदी इतकी असे, की त्यावरून रथही जाऊ-येऊ शकत.

भारतात सर्व भागांत किल्ले असले, तरी महाराष्ट्रातल्या किल्ल्यांसारखे किल्ले अन्यत्र नाहीत. डोंगरी किल्ले हे महाराष्ट्राचे वैशिष्ट्यच आहे. कोकण, घाटमाथा व घाटमाथ्याला लागून असलेली पठाराची पहिली पट्टी या भागांत साडेतीनशेच्या वर किल्ले आहेत. यांपैकी काही किल्ले तर दीड–दोन हजार वर्षांइतके प्राचीन आहेत. दक्षिणेतील मध्ययुगीन राजधान्या डोंगरी किल्ल्यांवरच असत. चंद्रादित्यपूर (चांदूर) ही राष्ट्रकूटांची, वातापी (बदामी) ही चालुक्यांची, देवगिरी ही यादवांची व पन्हाळा ही शिलाहारांची राजधानी ही याची उदाहरणे होत. इ. स. १७ च्या शतकात शिवछत्रपतींनी आपली राजधानी सर्वस्वी डोंगरी प्रदेशात रायगडावर वसविली होती.

शिवछत्रपतींना स्वराज्यउभारणीच्या कामात महाराष्ट्रातील डोंगरी किल्ल्यांचा फार चांगला उपयोग झाला. परकीयांविरुद्ध झुंज देऊन स्वराज्याचे संपादन व संरक्षण करण्याच्या कामी दुर्गांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे, हे शिवछत्रपतींनी ओळखले होते. म्हणूनच त्यांनी जुन्या किल्ल्यांची मजबुती केली आणि अनेक नवे किल्लेही उभारले. शिवछत्रपतींच्या स्वराज्यनीतीवरील आज्ञापत्र नामक ग्रंथात गिरिदुर्गांच्या उभारणीचा, युद्धसज्जतेचा आणि संरक्षणव्यवस्थेचा विस्तृत तपशील दिलेला असून, दुर्गांचा महिमा मुक्तकंठाने गायिलेला आहे, तो असा–

" संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग. दुर्ग नसतां मोकळा देश. परचक्र येतांच निराश्रय प्रजा भग्न होऊन देश उद्ध्वस्त होतो. राज्य तरी तीर्थस्वरूप थोरले कैलासवासी स्वामींनी गडांवरूनच निर्माण केलें. गडकोटविरहित जें राज्य, त्या राज्याची स्थिति म्हणजे आभ्रपटलन्याय आहे. याकरिता ज्यांस राज्य पाहिजे त्यांणी गडकोट हेच राज्य, गडकोट म्हणजे राज्याचे मूळ, गडकोट म्हणजे खजिना, गडकोट म्हणजे सैन्याचे बल, गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी,.... गडकोट म्हणजे सुखनिद्रागार, किंबहुना गडकोट म्हणजे आपले प्राणसंरक्षक, यैसें चित्तात आणून, कोण्हाचे भरवसियावर न जातां, आहे त्याचे संरक्षण करणें व नूतन बांधणें याचा हव्यास स्वतांच करावा. "

श्री. स. आ. जोगळेकरांनी शिवछत्रपतींना दुर्गराज ही उपाधी लावली असून, त्यांचे दुर्ग ही दुर्गेच्या आराधनेची पीठे होती, असे म्हटले आहे. कालिका पुराणाच्या राजनीतिविषेपातही 'दुर्गभूमौ यजेत् दुर्गाम्' = दुर्गभूमीवर दुर्गेची पूजा करावी, असे सांगितले आहे ( अ. ८५ ). शिवछत्रपती आणि त्यांचे सहकारी यांनी महाराष्ट्रातील दुर्गांवर असुरमर्दिनी दुर्गेची जी पूजा बांधली, ती दुर्गेच्या अवतारकार्याशी सर्वस्वी सुसंगत अशीच आहे. पाहा – किल्लेकोट. [ सह्याद्रि; आज्ञापत्र; श.क.]

**दुर्गम्म** द. भारतातील एक ग्रामदेवता. हिचे तोंड मेंढीचे असून, पाय सिंहमुख असुराच्या मस्तकावर असतो. हिनेच त्या असुराला मारले. हा असुर अय्यनार या देवाने आपल्या बागेचे संरक्षण करण्यासाठी नेमला होता. त्यामुळेच तो उन्मत्त झाला होता. दुर्गम्माने त्याला मारताच लोकांनी तिला आपली संरक्षक देवता मानले. ही उग्र असून, षड्भुज आहे. दोरी, तलवार, त्रिशूल, अंकुश आणि नररुंड या वस्तू तिच्या हातांत असतात व मस्तकावर शिवलिंग असते.

वारूळ हे हिचे प्रतीक असते. गवळी हा हिचा पुजारी असतो. पौष मासात हिची जत्रा भरते, त्या वेळी हिला रेडा बळी देतात. पूर्वी या देवीच्या भक्तिणी नग्न होऊन कमरेला लिंबाच्या डहाळ्या बांधीत व देवीपुढे लोटांगणे घालीत. सांप्रत नग्नतेची चाल बंद पडली आहे. अलिकडे लुगड्यावरूनच लिंबाच्या डहाळ्या बांधतात. [ व्हि. गॉ. सा. इं.; ओ. इ. इं.]

**दुर्गा** (१) देवीचे एक सुप्रसिद्ध स्वरूप. उमा, गौरी, पार्वती, चंडी, चामुंडा, काली, कपालिनी, भवानी, विजया, इ. देवीची अनेक नावे व रूपे आहेत. प्राचीन काळापासून

भारताच्या भिन्न भिन्न प्रदेशांत भिन्न भिन्न देवी अनेक नावांनी पुजल्या जात होत्या. पुराणकारांनी त्या सर्व देवींना दुर्गेच्या ठिकाणी एकरूप केले व दुर्गेला शिवाच्या पत्नीपदावर बसविले.

देवीच्या या दुर्गास्वरूपाची व्युत्पत्ती अशी ---

दैत्यनाशार्थवचनो दकारः परिकीर्तितः ।
उकारो विघ्ननाशस्य वाचको वेदसम्मतः ।
रेफो रोगघ्नवचनो गश्च पापघ्नवाचकः ।
भयशत्रुघ्नवचनश्चाकारः परिकीर्तितः ॥

अर्थ – दुर्गा शब्दातला दकार दैत्यनाश हा अर्थ सूचित करतो. उकार हा विघ्ननाशाचा वाचक असल्याचे वेदांनी मान्य केले आहे. रेफाचा रोगहरण, ग चा पापनाशन आणि आ·चा भय व शत्रू यांचे हनन असा अर्थ सांगितलेला आहे.

दुर्ग नावाच्या दैत्याचा वध केलेला पाहून लोक तिला दुर्गा म्हणू लागले, अशीही एक व्युत्पत्ती आहे.

दुर्गेची अवयवनिर्मिती कशी झाली, त्याचे वर्णन मार्कंडेय पुराणाने दिले आहे, ते असे--

शंकराच्या तेजाने दुर्गेचे मुख उत्पन्न झाले. यमाच्या तेजाने तिच्या मस्तकावर केस निर्माण झाले. विष्णूच्या तेजाने तिला भुजा फुटल्या. चंद्राच्या तेजाने तिचे स्तन निर्माण झाले. इंद्राच्या तेजाने कटिप्रदेश निर्माण झाला. वरुणाच्या तेजाने जांघा व पिंड्या तयार झाल्या. भूमीच्या तेजाने नितंबभाग उत्पन्न झाला. ब्रह्म्याच्या तेजाने तिचे पाय, सूर्यतेजाने पादांगुली, वसूंच्या तेजाने करांगुली, कुबेरतेजाने नासिका, प्राजापत्यतेजाने दंत, अग्नितेजाने तीन डोळे, सांध्यतेजाने भुवया व वायुतेजाने कान निर्माण झाले. याशिवाय अन्य समस्त देवांचे तेजही तिच्या रूपयोजनेच्या कामी उपयोगी पडले.

दुर्गासप्तशतीत दुर्गेची पुढील तीन प्रमुख रूपे आढळतात -- महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वती. त्यांपैकी महाकाली हे रूप तमोगुणी, महालक्ष्मी हे रजोगुणी व महासरस्वती हे सत्त्वगुणी मानलेले आहे. सप्तशतीच्या पहिल्या अध्यायात महाकालीचे विशद वर्णन आहे, दोन ते चार या अध्यायांत महालक्ष्मीचे उदात्त चरित्र आहे आणि पाच ते तेरा या अध्यायांत महासरस्वतीचे दिव्य चरित्र व दार्शनिक विवेचन आहे. कोणकोणत्या नामरूपांनी, कोणकोणत्या लोकांत आपला निवास आहे, ते दुर्गादेवीने शंकराला पुढीलप्रमाणे सांगितले आहे--

वैकुंठात महालक्ष्मी, गोलोकात राधिका, शिवलोकात शिवा व ब्रह्मलोकात सरस्वती या स्वरूपांत मी राहते. वेदमाता सावित्री मीच आहे. जनककन्यका सीता, भीष्मककन्या रुक्मिणी व वृषभानुसुता राधा मीच आहे.

दुर्गेचा संबंध शैव आणि शाक्त या पंथांशी घनिष्ठपणे येतो. पण तिचे योगनिद्रा किंवा योगमाया हे एक रूप कृष्णाशी अर्थात विष्णूशी संबंधित आहे. कंसाच्या बंदिशाळेत कृष्णरूपाने जन्म घेण्यापूर्वी विष्णूने दुर्गेला यशोदेच्या पोटी जन्म घेण्यास सांगितले व तसा तो तिने घेतला. पुढे वसुदेवाने नवजात कृष्णाला गोकुळात नेऊन यशोदेच्या बाजेवर ठेवले आणि शिशुरूप योगमायेला मथुरेत कंसाच्या बंदिशाळेत आणिले.



महिषासुरमर्दिनी दुर्गा (कांगडा शैलीचे चित्र)

तिथे तिचे रडणे ऐकून कंस धावत आला व त्याने तिला बाहेर नेऊन शिळेवर आपटून मारण्याचे ठरविले. पण ती योगमाया कंसाने उगारलेल्या हातातून निसटली आणि अंतराळात अदृश्य होऊन विष्णुस्वरूपात विलीन झाली. पुढे याच योगमायेला इंद्राने विंध्य पर्वतावर वसतिस्थान निर्माण करून दिले, अशी कथा भागवत, हरिवंश व विष्णु पुराण यांत आलेली आहे.

विंध्यवासिनी देवी ती हीच होय. इंद्राने विन्ध्य पर्वतात स्थान दिल्यानंतर ती तेथील शबर, पुलिंद, बर्बर, इ. वन्य जमातींची उपास्य देवता ठरली. ते लोक तिची पूजा करू लागले व तिच्यासाठी बळीही देऊ लागले.

दुर्गेचे सर्वप्रथम वर्णन आणि स्तोत्र महाभारतात आढळते. त्यावरून महाभारतकाली दुर्गादेवी ही लोकमानसात आदराचे स्थान मिळवून बसली होती आणि भक्तांची विघ्ने, अरिष्टे

व संकटे निवारण करणारी म्हणून तिची प्रसिद्धी झाली होती, हे कळून येते. भारतीय युद्धाच्या प्रसंगी त्या युद्धात जय मिळावा, म्हणून श्रीकृष्णाने अर्जुनाला तिचे स्तोत्र म्हणायला सांगितले होते. अर्जुनाने रथावरून खाली उतरून ते म्हटले.

हे स्तोत्र म्हणताक्षणीच दुर्गादेवी अंतरिक्षात प्रकट होऊन तिने अर्जुनाला ' तू युद्धात अजिंक्य ठरशील, ' असा वर दिला (म. भा. भीष्म. २३).

कोणकोणत्या देवांनी कोणकोणत्या प्रसंगी दुर्गेची पूजा केली, ते ब्रह्मवैवर्त पुराणात पुढीलप्रमाणे सांगितले आहे – श्रीकृष्णाने वृंदावनात, गोलोकात व रासमंडळात दुर्गेची प्रथम पूजा केली. मधुकैटभ दैत्यांच्या भीतीने ब्रह्मदेवाने, त्रिपुरविजयाच्या वेळी शंकराने, दुर्वासाच्या शापाने ऐश्वर्यभ्रष्ट झालेल्या इंद्राने व त्यानंतर अनेक ऋषी, मुनी, सिद्ध, देव, मनू आणि मानव यांनी वेगवेगळ्या प्रसंगी तिची पूजा केली.

देवीमाहात्म्यात दुर्गेच्या अनेक अतुल प्रतापांचे वर्णन आहे. महिषासुर, चंडमुंड व शुंभनिशुंभ या बलदंड दैत्यांचा वध करून दुर्गादेवी ही महाशक्ती ठरली व तिने सर्व देवामानवांना अभय दिले. देवांनी स्तुती केल्यावर त्यांना अभय वचन बोलतांना ती म्हणाली–

**इत्थं यदा यदा बाधा दानवोत्था भविष्यति ।**
**तदा तदाऽवतीर्याहं करिष्याम्यरिसंक्षयम् ॥**

(मार्कं. पु. ९१.५१).

**अर्थ–** अशा प्रकारे जेव्हा जेव्हा दानवांच्याकडून (जगाला) बाधा होईल, तेव्हा तेव्हा मी अवतार घेऊन शत्रूचा क्षय करीन!

दुर्गेच्या आधिदैविक स्वरूपाच्या पलिकडे तिचे एक आध्यात्मिक स्वरूपही आहे. त्या स्वरूपात ती भक्तांचे माया-मोह निरसून त्यांना ब्रह्म पदवीवर आरूढ करते. आपल्या या आध्यात्मिक स्वरूपाचे वर्णन तिनेच स्वमुखाने सांगितले आहे, ते असे–

**सर्वे वै देवा देवीमुपतस्थुः । काऽसि त्वं महादेवि । साऽब्रवीदहं ब्रह्मस्वरूपिणी । मत्तः प्रकृतिपुरुषात्मकं जगच्छून्यं चाऽशून्यं च । अहमानन्दा नाऽऽनन्दः विज्ञानाऽविज्ञाने अहम् । ब्रह्माऽब्रह्मणी वेदितव्ये ।** (देव्युपनिषद)

**अर्थ–** सर्व देव देवीपुढे उपस्थित झाले आणि त्यांनी तिला विचारले. ' हे महादेवी, तू कोण आहेस ?' त्यावर ती म्हणाली. ' मी ब्रह्मस्वरूपिणी आहे. हे प्रकृतिपुरुषात्मक आणि शून्य-शून्यात्मक जगत मजपासूनच उत्पन्न झाले आहे. आनंद आणि निरानंद मीच आहे. विज्ञान आणि अविज्ञान मीच आहे. जाणण्यास योग्य असे ब्रह्म व अब्रह्म मीच आहे.

दुर्गेची प्रतिमा म्हणजे राष्ट्रशक्तीचे प्रतिरूपच आहे. राष्ट्राचे शरीर – मनोबल, सर्वांगीण समृद्धी आणि अध्यात्मसंपदा या तीहींचा संयोग त्या प्रतिरूपात झालेला आहे. मोहरूपी महिषासुराचे मर्दन करून ती जनांना सन्मार्ग दाखवते आणि त्यांना आधिव्याधीतून मुक्त करते. दुर्गेची शक्ती ही इच्छा, ज्ञान आणि क्रिया या रूपांनी त्रिविध आहे. सिंह हे तिचे वाहन आहे. पण तो केवळ पशू नसून साक्षात धर्म आहे. धर्म हा चराचराचे धारण करतो आणि तो स्वतः देवीचे वाहन बनून राहतो, अशी ती कल्पना आहे.

मूर्तिशिल्पात महिषासुरमर्दिनीच्या विपुल मूर्ती आढळतात. त्यांपैकी काही मूर्तींना आठ, तर काहींना दहा भुजा असतात. बिहारमधील एका मध्ययुगीन उठावचित्रात सिंहवाहिनी दुर्गेचे एक चित्र आहे. ती देवी चतुर्भुज आहे. तिने आपल्या डाव्या हाताने एका मुलाला जवळ धरून ठेवले आहे. हे दुर्गेचे मातृस्वरूप होय. या रूपातील भिन्न प्रकारच्या मूर्तीही आढळतात.



दुर्गेचे मातृस्वरूप

याशिवाय दुर्गेच्या काली, चंडी, लक्ष्मी, सरस्वती, कात्यायनी, चामुंडा, इ. अनेक रूपांच्याही मूर्ती निर्माण केल्या गेल्या आहेत.

दुर्गादेवीची उपासना भारतात सर्वत्र आढळते. तिचा उगमही फार प्राचीन आहे. श्री. मजुमदार यांच्या मते दुर्गेची उपासना ब्राह्मण काळात सुरू झाली. आणि तिचा उगम त्याही मागे ऋग्वेदातच झाला. दहाव्या मंडलात आंभृणी वाक् हिचे एक (१२५) सूक्त आहे. ती वाक् म्हणजे दुर्गेचे पूर्वरूपच समजायला हरकत नाही. त्या सूक्तात ती वाक् म्हणते. ' मी संपूर्ण जगताची स्वामिनी आहे. पूजनीय देवतांमध्ये मी प्रधान देवता आहे. संपूर्ण भूतांच्या ठिकाणी माझा प्रवेश आहे. मी आपल्या उपासकांना धनप्राप्ती करून देते. साक्षात्कार करण्यास योग्य असे परब्रह्म मीच आहे. '

दुर्गासप्तशतीत देवीच्या तोंडची जी वाक्ये आहेत, ती अगदी याच थाटाची आहेत. ऋग्वेदातल्या श्रीसूक्तात तिला अग्निवर्णा, तपस्तेजाने प्रज्वलित, सूर्यशक्तीने संपन्न आणि कर्मफल देणारी असे म्हटले आहे. यावरून पुराणकाली दुर्गेच्या नामरूपांचा जो विस्तार झाला, त्याचा उगम ऋग्वेदातच झाला आहे.

असे ठरते. तिची दार्शनिक व शक्तिमूलक रूपेही त्यात दिसतात.

आजचा भारतीय समाज हा केवळ आर्यांचा समाज नाही; तो केवळ वैदिक समाजही नव्हे. ऋग्वेदातच काही आर्येतर समाजांचे अस्तित्व आपल्याला आढळते. वेदोत्तर कालापासून स्मृतिकालापर्यंत अनेक आर्येतर समाज वैदिक समाजात दाखल होऊन सांस्कृतिक दृष्टचाही त्या समाजाशी समन्वित झाले. त्यांच्या आचारांना व संकेतांनाही वैदिक धर्मात स्थान मिळाले. वैदिक उपासनेवरही त्यांचा प्रभाव पडला. भारतातील तंत्रपरंपरा तर आर्येतरांनीच निर्माण केली आहे. या तंत्रांचा दुर्गोपासना किंवा शक्तिसाधना यांच्याशी अत्यंत घनिष्ट संबंध आहे.

दुर्गेच्या रूपविस्तारांत तिची रौद्र व सौम्य अशी दोन्ही रूपे आढळतात. रौद्र रूपात तिचा संबंध रुद्राशी आणि सौम्य रूपात शिवाशी घालून दिलेला आहे. रुद्र महादेव आहे आणि दुर्गा महादेवी आहे.

दुर्गेच्या उपासनापद्धतीत अवैदिक अशा अनेक जाती-जमातींच्या आचारांचा समावेश झाला आहे. इतकेच नव्हे, तर तशा आचारांचे समर्थनही करण्यात आले आहे. तंत्राचारातल्या बहुतेक आचारांचे कथन आणि विवरण शिवपार्वतींच्या संवादांतून होत असते. याचे कारणही त्या वेदबाह्य आचारांचे समर्थन व्हावे हेच होय. तांत्रिक आचारात पंचमकार हे अनिवार्य मानले गेले आहेत आणि ते निश्चितपणे अवैदिक आहेत. दुर्गेच्या तांत्रिक उपासनेत बलिदानही अत्यावश्यक ठरवलेले आहे. प्राचीन काळी दुर्गेला पशुबलीच नव्हे; तर नरबलीही दिला जात असे. मालती-माधव हे नाटक, समराइच्चकहा हा जैनांचा कथाग्रंथ, कालिकापुराण, इ. ग्रंथांत दुर्गेला दिलेल्या नरबलीच्या तांत्रिक विधीचे वर्णन आढळते.

दुर्गापूजेचा अधिकार सर्वच जातींना मिळालेला आहे. नट, नर्तक, वेश्या यांना, इतकेच नव्हे; तर म्लेच्छांनाही तो अधिकार नाकारलेला नाही. या पूजाप्रकारांत रात्री जागरण आणि नृत्य-गीत यांना सामूहिक स्वरूप दिलेले आहे. शबर ही भारतातली एक आदिवासी जमात होय. या शबरांची दुर्गापूजनाची एक विशिष्ट पद्धती होती. पुराणांनी त्या पद्धतीला मान्यता दिली, इतकेच नव्हे; तर तो उत्सव वर्षकृत्यातही दाखल केला. हा शबरकृत उत्सव पुराणकाली अन्य जातीतही प्रसार पावला होता आणि सार्वत्रिक झाला होता, असे पुराणांवरून कळते.

अशा प्रकारे दुर्गेच्या समस्त रूपांचे अध्ययन केल्यांती असे दिसून येईल, की भारतीय संस्कृतीच्या विकासाला दुर्गातत्त्वाने फार मोठा हातभार लावलेला आहे. दुर्गेचे स्वरूप विशिष्ट जातीपुरते मर्यादित न राहता ते जाती, देश, इ. बंधनांच्या मर्यादा उल्लंघून पैलपार गेले आहे. [ भा. प्र. वि.; श. क.; डे. हिं. इ.; एन्सा. रि. ए.; क्रि. स्ट. ले. उ; विश्वमाता दुर्गा- श्री. हरिहरनाथ त्रिपाठी– भारती, ऑक्टो. १९६१ ]

(२) एक राग. यात गंधार व निषाद हे दोन स्वर वर्ज्य असल्यामुळे याची जाती औडव आहे. याचा वादी स्वर धैवत व संवादी ऋषभ आहे. आरोह – सा रे म प ध सां. अवरोह– सां ध प म रे ध सा. पकडस्वर–म प म रे म ध सा. यातील बहुतेक चिजांचे तोंड पंचमावर असते.ध व म यास्वरांची संगती वारंवार दिसते. याचे चलन मर्दानी आहे. गानसमय– रात्रीचा दुसरा प्रहर. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

## दुर्गाचार्य

एक प्राचीन आचार्य. निरुक्ताच्या आज उपलब्ध असलेल्या टीकांमध्ये याची टीका सर्वांत प्राचीन व महत्त्वपूर्ण मानतात. मात्र दुर्गाचार्य हाच निरुक्ताचा पहिला टीकाकार नव्हे. त्याच्यापूर्वीही काही आचार्यांनी निरुक्तावर टीका लिहिल्या होत्या, हे दुर्गाचार्यांच्या टीकेवरून समजते. दुर्गाचार्याने आपल्या टीकेत स्वतःच्या विवेचनाला आधार म्हणून अनेक ठिकाणी या पूर्व टीकाकारांची वचने उद्‌धृत केली आहेत.

दुर्गाचार्याच्या जीवनाविषयी फारशी माहिती उपलब्ध नाही. तो जंबूमार्ग येथील आश्रमात राहणारा होता, असे काही ग्रंथांत म्हटले आहे. मात्र हे ठिकाण कुठे आहे, त्याचा निश्चित पत्ता लागत नाही. डॉ. लक्ष्मण स्वरूप यांच्या मते ते काश्मीरात असावे. याउलट भगवद्दत्त हे दुर्गाचार्याला गुजरातचा रहिवासी मानतात. दुर्गाचार्याच्या टीकेत मैत्रायणी संहितेतली अनेक अवतरणे येतात व प्राचीन काळी मैत्रायणी संहिता अधिकांशाने गुजरातेतच प्रचलित होती. त्यावरून त्यांनी हे अनुमान केले आहे.

दुर्गाचार्याच्या निरुक्तटीकेची उपलब्ध प्राचीन हस्तलिखित प्रत इ. स. १३८७ च्या सुमाराची आहे. त्यावरून दुर्गाचार्याचा काळ ठरवायचा, तर तो चौदाव्या शतकात येतो. मात्र वै. का. राजवाडे यांनी दुर्गाचार्य हा इ. स. च्या १० व्या किंवा ११ व्या शतकात होऊन गेला, असे म्हटले आहे. त्याची निरुक्तटीका मर्मग्राही विद्वत्तेची साक्ष देणारी आहे. [ वै. सा. सं. ]

## दुर्गानवमी

आश्विन शुद्ध नवमीस हे नाव आहे. त्या दिवशी दुर्गेच्या नावाने एका व्रताचा प्रारंभ करतात. कालावधी एक वर्ष. या व्रताचा विधी असा–

आश्विन मासापासून चार चार महिन्यांचे तीन भाग करावे आणि त्या प्रत्येक भागात दुर्गेच्या निरनिराळया रूपांची, निर-

निराळी फुले, सुगंधी द्रव्ये आणि नैवेद्यादी उपचार यांनी पूजा करावी.

हे व्रत केव्हा सुरू करावे, याविषयी भिन्न भिन्न मते आहेत. कोणत्याही नवमीला हे व्रत करावे, असेही एक मत आहे. फल– शक्ती व संपत्ती यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**दुर्गापूजा** आश्विन शुद्ध प्रतिपदा ते नवमी असे नऊ दिवस दुर्गेचे नवरात्र मानतात. नवरात्रात नित्य दुर्गापूजा करायची असते. तिचा विधी असा–

गृहस्थाने सकाळी पाण्यात पांढरे तीळ टाकून त्या पाण्याने स्नान करावे. मग सपत्नीक बसून देशकालोच्चारपूर्वक पूजेचा संकल्प करावा. मग गणपतिपूजन, स्वस्तिवाचन, इ. करून मातीच्या वेदीवर एका कलशाची स्थापना करावी. त्याच्या भोवती वेदीवर धान्यबीजे पेरावी. कलशावरच्या पूर्णपात्रात दुर्गेच्या मूर्तीची स्थापना करावी. मग षोडशोपचार पूजा करावी. पूजेनंतर पुढील मंत्राने प्रार्थना करावी–

**महिषघ्नि महामाये चामुण्डे मुण्डमालिनि ।**
**द्रव्यमारोग्यविजयं देहि देवि नमोऽस्तु ते ॥**

अर्थ – महिषासुराला मारणारी, महामाया, चामुंडा व गळचांत मुंडमाळा धारण करणारी, अशा हे देवी, मी तुला नमस्कार करतो. तू मला द्रव्य, आरोग्य आणि विजय दे.

दुर्गेजवळ अखंड दीप तेवत ठेवावा. नंतर दुर्गास्तोत्राचा पाठ करावा. दुर्गेवर फुलांची माळ बांधावी. नंतर एका कुमारीचे पूजन करून तिला भोजन घालावे. ब्राह्मणभोजनही घालावे.

दुर्गापूजेत बलिदानाला प्राधान्य असते. याविषयी व्रतकौमुदीत म्हटले आहे, ते असे–

**न तथा बलिदानेन पुष्पधूपविलेपनैः ।**
**यथा सन्तुष्यते मेषैर्महिषैर्विन्ध्यवासिनी ॥**

अर्थ– ( भाताचा ) बळी, फुले, धूप, दीप, विलेपन, इ. उपचारांनी विंध्यवासिनी तितकी संतुष्ट होत नाही, की जितकी बोकड व रेडा यांच्या बलिदानाने होते.

दुर्गेला कोणते पशू बळी म्हणून समर्पावे, त्यांची यादी कालिका पुराणात दिली आहे ती अशी–

**पक्षिणः कच्छपा ग्राह्या मत्स्या नवविधा मृगाः ।**
**महिषो गवयो गावश्छागो बभ्रुश्च शूकरः ॥**
**खड्गश्च कृष्णसारश्च गोधिका शरभो हरिः ।**
**शार्दूलश्च नरश्चैव स्वगात्ररुधिरं तथा ॥**
**चण्डिकाभैरवादीनां बलयः परिकीर्तिताः ॥**

अर्थ– पक्षी, कासव, मत्स्य, नवविध हरिण, रेडा, गवा, बैल, बोकड, मुंगूस, डुकर, गेंडा, कृष्णसार मृग, घोरपड, उंट, सिंह, वाघ, मनुष्य आणि स्वतःच्या देहातले रक्त हे चंडिका व भैरवादी गण यांचे बळी म्हणून सांगितले आहेत.

नऊ दिवस अशी पूजा करून पुढील मंत्राने दुर्गामूर्तीचे विसर्जन करावे–

**उत्तिष्ठ देवि चण्डेशि शुभां पूजां प्रगृह्य च ।**
**कुरुष्व मम कल्याणमष्टाभिः शक्तिभिः सह ॥**

त्यानंतर ब्राह्मणभोजन घालून व्रताची पारणा करावी, असे सांगितले आहे.

बंगालमधील अनेक लोक दुर्गेला आपली कुलदेवता मानून, तिची नित्य पूजा करतात. ते तिला दुर्गतिनाशिनी म्हणतात. पुराणे व अनेक तंत्रग्रंथ यांत दुर्गापूजेचे माहात्म्य वर्णिलेले आहे. [ व्रतराज; हि. ध.; तं. स्ट. रि. लि. ]

**दुर्गापूजोत्सव** हा उत्सव भाद्रपद कृष्ण नवमीपासून आश्विन शुद्ध नवमीपर्यंत करावा, आश्विन मासाच्या शुद्ध प्रतिपदेपासून नऊ दिवस करावा, सप्तमीपासून तीन दिवस करावा, अष्टमीपासून दोन दिवस करावा किंवा नवमीला एक दिवस तरी करावा, असे याचे विकल्प कालिका पुराणात सांगितले आहेत.

बंगाल, बिहार, ओडिसा, आसाम, उत्तर प्रदेश व मध्य प्रदेश या प्रदेशांत दुर्गापूजेचा उत्सव मोठ्या प्रमाणात साजरा होतो. त्यांतल्या त्यात बंगालमध्ये त्याचा प्रचार आणि लोकप्रियता विशेष आहे. बंगाली लोकांचा तो वर्षातला प्रमुख सणच आहे. प्रत्यक्ष उत्सव आश्विनात असला, तरी भाद्रपदापासूनच या उत्सवाचा मोसम सुरू होतो. सुरवातीला बांधकाम करणारे गवंडी, सुतार वगैरे लोक विश्वकर्म्यांची सार्वजनिक पूजा करतात.

उत्सवासाठी दुर्गेची मातीची दशभुज मूर्ती बनवतात. तिचे रूप सिंहारूढ महिषासुरमर्दिनीचे असते. तिच्या दोन्ही बाजूंना कार्तिक, गणेश, लक्ष्मी व सरस्वती यांच्या मूर्ती असतात. बंगालभर सर्वत्र वैयक्तिक व सार्वजनिक अशा उभयविध स्वरूपांत दुर्गेच्या मूर्ती बसवल्या जातात. सार्वजनिक मूर्ती आकाराने मोठ्या असतात आणि त्यावर खूप कलाकुसर केलेली असते.

दुर्गापूजेच्या उत्सवाची सुरुवात आश्विन शु. पंचमीला होते. त्या दिवशी संध्याकाळी बोधन नामक एक विधी करतात. त्या वेळी दुर्गेला प्रिय असणाऱ्या बेलाच्या वृक्षावर तिचे आवाहन करतात. रामरावण युद्धाच्या प्रसंगी रावणाचा वध व्हावा म्हणून ब्रह्मदेवाने बेलाच्या वृक्षावरच तिचे आवाहन केले होते, अशी कथा आहे.

षष्ठीच्या दिवशी संध्याकाळी अधिवास नामक दुसरा विधी

करतात. यात देवीच्या निरनिराळ्या अंगांना विविध पवित्र वस्तूंनी स्पर्श करतात व त्यांना पावित्र्य आणतात.

सप्तमीच्या दिवशी देवीच्या पूजेला सुरवात होते. प्रथम वेल, डाळिंब, अशोक, हरिद्रा, इ. नऊ प्रकारच्या पल्लवांची एक जुडी करतात व ती अपराजितावल्लीने बांधतात. मग त्या जुडीला स्नान घालून साडी नेसवतात. तिला कलाबहू (कदलीवधू) असे म्हणतात. ती गणपतीची पत्नी असते. उत्सवमूर्तीच्या मांडणीत गणपतीच्या शेजारी तिची स्थापना करतात.



दुर्गापूजोत्सवातील मूर्ती

त्यानंतरचा महत्त्वाचा विधी म्हणजे महास्नानाचा होय. त्या वेळी एका कलशावर आरसा ठेवतात आणि त्यात देवीचे जे प्रतिबिंब पडते, त्यावर स्नानाचे सगळे उपचार समर्पितात. देवीच्या स्नानासाठी थंड व उष्ण जल, शंखोदक, गंगाजल, समुद्रजल, इ. जले; पंचगव्य, पंचामृत आणि गोठा, चौक, वारुळ, नदीचे पात्र, इ. ठिकाणची माती आणतात.

त्यानंतर देवीची तिच्या परिवारासह पूजा करतात. मग तिला पशुबळी देतात. पूर्वी हे बलिदान फार मोठ्या प्रमाणावर होत असे; पण सांप्रत त्याचे प्रमाण घटले आहे.

अशीच पूजा दुसऱ्या व तिसऱ्या दिवशीही करतात. याशिवाय, संधिपूजा नावाची एक विशेष पूजा अष्टमी आणि नवमी या तिथींच्या संधिकाली करतात. ही पूजा दुर्गेच्या चामुंडा या रूपाची असते. त्या रात्री गायनवादन, खेळ यांच्या योगाने जागरण करतात.

चौथ्या दिवशी संध्याकाळी देवीची मिरवणूक काढून तिचे नदीत किंवा तळ्यात विसर्जन करतात.

दुर्गा ही या दिवसांत सासरहून माहेरी आलेली असते, अशी समजूत आहे. म्हणूनच बंगालमधल्या गृहिणी या माहेरवाशिणीसाठी नाना प्रकारची पक्वान्ने करतात.

अंदाजे एक हजार वर्षे तरी बंगालमध्ये हा उत्सव चालू आहे. बंगालमधूनच तो आसामात गेला व तिथून अन्यत्रही पसरला.

या उत्सवासाठी प. बंगाल सरकारच्या कचेऱ्या आठ-दहा दिवस बंद असतात. या दिवसांत बाजारामध्ये लाखो रुपयांच्या उलाढाली होतात. नवे कपडे, दागिने, इ. वस्तूंची खरेदी प्रामुख्याने याच दिवसांत होते. या पूजोत्सवात बंगाली स्त्री-पुरुष नटून थटून इष्ट-मित्रांच्या भेटीला जातात. दुर्गापूजा हा मूळचा धार्मिक सण होता; पण सांप्रत त्याला सामाजिक स्वरूप आले आहे. [तं. स्ट. रि. लि.; स्त्री– बंगाल अंक, फेब्रु. १९६१]

## दुर्गा-माधवपूजा

ओडिसा प्रदेशातील एक पूजोत्सव. दुर्गा म्हणजे देवी किंवा शक्ती आणि माधव म्हणजे पुरीचा जगन्नाथ होय. दुर्गा ही शाक्तांची उपास्य देवता आणि जगन्नाथ हा वैष्णवांचा उपास्य देव आहे. वस्तुतः दुर्गेबरोबर पूजला जायचा तो शंकर; पण ओडिसातले लोक शंकराच्या जागी जगन्नाथाची योजना करतात, हे विशेष आहे.

दक्षयज्ञात जळालेल्या सतीचे कलेवर शंकर आपल्या खांद्यावरून घेऊन जात असता पुरुषोत्तम क्षेत्रात म्हणजे जगन्नाथपुरीत सतीची मांडी गळून पडली, असा उल्लेख आहे. काही ठिकाणी मांडीच्या ऐवजी नाभीचा निर्देश आहे. सतीच्या या अवयवपातानंतर तिथे विमलादेवी नावाचे शक्तिपीठ निर्माण झाले.



दुर्गा–माधवपूजा

विमलादेवीबरोबर जगन्नाथाची पूजा इथे प्रचलित झाली, त्याचे कारण असे– ओडिसा हा मूळचा भिल्लांचा प्रदेश होता. तिथला भिल्ल राजा गाल हा विमलादेवीचा उपासक होता. सांप्रत जिथे जगन्नाथमंदिर आहे, तिथे तो या विमलादेवीचे प्रतिमापूजन करीत असे. कालांतराने त्याच ठिकाणी इंद्रद्युम्न

राजाने जगन्नाथाची स्थापना केली. मग तिथे विमला-जगन्नाथ अशी संयुक्त देवतांची उपासना सुरू झाली.

दुर्गा–माधवांचा हा पूजोत्सव आश्विन महिन्यात होतो. याशिवाय ओडिसात घरोघरी मंगल कार्यांच्या आरंभी दुर्गा-माधवांची पूजा करण्याची प्रथा आहे. [ कल्याण–भक्तिअंक ]

**दुर्गाव्रत** एक काम्य व्रत. श्रावण शुद्ध अष्टमीला या व्रताचा प्रारंभ करतात. या दिवशी प्रातःकाळी स्नानादी नित्यकर्मे आटोपून पुनः दुसऱ्यांदा स्नान करतात. व्रत करणारा स्नानापूर्वी निरनिराळ्या ठिकाणची माती आणून ती आपल्या अंगाला लावतो. प्रत्येक महिन्याला वेगळ्या ठिकाणची माती लागते. स्नानानंतर ओल्या वस्त्रानिशीच देवीची पूजा करतात. ही पूजा एक वर्षभर करायची असते. प्रत्येक महिन्याला देवीचे नाव तेवढे बदलते. पूर्वी देवीला हरिणाच्या किंवा बोकडाच्या मांसाचा नैवेद्य दाखवीत असत; हल्ली खिरीचा दाखवतात. हा नैवेद्य व्रतकर्त्याने स्वतःच भक्षण करायचा असतो. फल – आरोग्य, सामर्थ्य व दीर्घायुष्य यांची प्राप्ती. [ हि. ध.; व्र. प. ]

**दुर्मरणश्राद्ध** ज्याला हिंस्र प्राणी चावल्यामुळे अथवा विष, शस्त्र इत्यादींच्या योगाने मरण आले असेल किंवा जो ब्रह्महत्या करून मरण पावला असेल, अशा माणसा साठी हे श्राद्ध करतात. हे आश्विन कृष्ण १४ या दिवशी करतात. या श्राद्धामुळे अशा व्यक्तीच्या आत्म्याला शांती लाभते, असे म्हणतात. [ व्र. प. ]

**दुर्मित्र** एक सूक्तद्रष्टा ऋषी. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातील १०५ वे सूक्त याच्या नावावर आहे. याने इंद्राच्या अश्वांचे आणि वज्राचे सामर्थ्य वर्णिले आहे. शिवाय त्याने एक मानसशास्त्रीय विचारही प्रस्तुत सूक्तात मांडला आहे, तो असा ( ऋ. १०.१०५.३ ) –

**अप योरिन्द्रः पापज आ मर्तो न शश्रमाणो बिभीवान् ।**
**शुभे यद्युयुजे तविषीवान् ।।**

अर्थ – पातकापासून ज्या वासना ( वृत्ती ) उद्भवतात; त्यांचा नाश इंद्र करतो. कारण मर्त्य (मानव) हा असा आहे, की त्याला परिश्रम नकोत; शिवाय तो भित्राही आहे. परंतु असा हा मनुष्य जर शुभ कार्याला प्रवृत्त होईल, तर तो मोठा धैर्यशाली होईल.

याने या सूक्ताच्या ११ व्या मंत्रात आपल्या नावाचा उल्लेख केला असून, आपणांस कुत्सपुत्र म्हणवून घेतले आहे. याचे नाव दुर्मित्र असले, तरी हा गुणांनी सुमित्र होता. [ म. ज्ञा. को. ]

**दुवस्यू** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातले शंभरावे सूक्त याच्या नावावर आहे. एका धर्मपरिषदेच्या निमित्ताने एका यज्ञमंडपात या सूक्ताची रचना झाली असावी. इंद्र, सूर्य, अग्नी, धेनू, इ. देवतांची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. त्यात प्रत्येक ऋचेच्या अखेरीस 'आम्ही स्वतंत्र असावे' अशी प्रार्थना केलेली आहे. 'आम्हांला प्रतिस्पर्धी असून, ते आरडाओरड करण्यात कुशल आणि धाडसी आहेत; पण आम्ही त्यांना शरण आणूच' असा आत्मविश्वास त्यात शेवटी व्यक्त केला आहे. त्या सूक्तातली एक ऋचा अशी–

**ऊर्जं गावो यवसे पीवो अत्तनऋतस्य याः सदने कोशे अङ्ग्ध्वे ।**
**तनूरेव तन्वो अस्तु भेषजमा सर्वतातिमदितिं वृणीमहे ।।**

अर्थ – हे धेनूंनो, तृणधान्याने परिपूर्ण अशा या भूमीमध्ये तुम्ही ( चरता तेव्हा जणू काय, ) ओज आणि पुष्टी यांचेच सेवन करता आणि सद्धर्माच्या गृहात ते ओज ( दुग्धरूपाने ) निदर्शनास आणता; तर तुमचे शरीरजन्य (दुग्ध) आमच्या शरीरासाठी औषध होवो. कारण आम्ही हेच वरदान मागतो, की आमचे सर्वतोपरी मंगल होऊन आम्ही स्वतंत्र असावे.

स्वातंत्र्यप्रेम हे या सूक्ताचे वैशिष्टय आहे. [ म. ज्ञा. को. ]

**दुष्टमोहनयंत्र** एखादा दुष्ट मनुष्य आपल्या कार्याचा नाश करण्यासाठी प्रवृत्त होण्याचा संभव असेल, तर अशा वेळी त्याला प्रतिबंध करण्यासाठी या यंत्राचा प्रयोग करतात. एका भूर्जपत्रावर गाढवाच्या रक्ताने हे यंत्र काढायचे असते. मध्यभागी त्या दुष्ट मनुष्याचे नाव लिहून त्याभोवती एक वर्तुळ काढतात. त्या वर्तुळाभोवती अष्टदलात मुख्य दिशांना ॐ हे बीज व उपदिशांना सः हे बीज लिहून नंतर सभोवती दोन चतुष्कोण काढतात. अशा प्रकारे यंत्र तयार केल्यावर त्याची यथाविधि पूजा करून ते एकवीस दिवस दुधात ठेवतात. याचे आणखीही काही प्रकार आहेत. [ यं. चिं. ]

**दुष्टरजोदर्शनशांती** स्त्रीच्या प्रथम रजोदर्शनाच्या वेळी मास, तिथी, वार, नक्षत्र, योग, लग्न, इ. योग दुष्ट (वाईट) असल्यास त्यासाठी शांती करावी, असे सांगितले आहे. स्त्री ऋतुस्नात झाल्यानंतर गर्भाधान संस्कार करण्यापूर्वी ही शांती करायची असते. प्रस्तुत शांतीबरोबर ग्रहमखही करतात. भुवनेश्वरी ही या शांतीची प्रधान देवता आहे. या शांतीचा विधी असा –

कर्त्याने पत्नीसह बसून शांतीचा संकल्प करावा. ऋत्विजांचे वरण करावे. आचार्याने अग्निमुख करावे. एका कलशावर पूर्णपात्रात भुवनेश्वरी देवीची मूर्ती स्थापावी. तिच्या

उजव्या-डाव्या अंगी इंद्राणी व इंद्र यांची, तसेच ग्रहपीठावर नवग्रहांची स्थापना करावी. नंतर त्यांची पूजा करावी. कलशाला स्पर्श करून आचार्याने १०८ वेळा गायत्रीचा जप व श्रीसूक्ताचा पाठ करावा. दुसऱ्या ऋत्विजांनी रुद्रसूक्ते व 'शं न इंद्राग्नी ...' हे सूक्त म्हणावे. भुवनेश्वरीसाठी दही, मध व तूप लावलेल्या तीन तीन दुर्वांची एक एक आहुती देऊन यथाशक्ति संख्येने हवन करावे. ग्रहांसाठीही हवन करावे. दिक्पालांना बलिदान करावे. मग अग्नीला पूर्णाहुती द्यावी. आचार्याने कर्त्या दंपतीला अभिषेक करावा. मग त्या दंपतीने स्नान करून नवी वस्त्रे परिधान करावी. नंतर पीठविसर्जन, आचार्यपूजन, पीठदान व ब्राह्मणभोजन या गोष्टी कराव्या. शेवटी ब्राह्मणांकडून शांतिसूक्तांचा पाठ करवून कर्म पूर्ण करावे. [ सं. कौ. ]

**ढूंढ** एक पिशाच. याला शिर नसते. हे पिशाच रात्री घोड्यावर बसून बाहेर पडते आणि घरोघर जाऊन घरातल्या माणसांना हाक मारते. याच्या हाकेला कोणी साद द्यायची नसते. ती दिल्यास तो माणूस आजारी पडतो किंवा मरतो, अशी समजूत आहे. महाराष्ट्रात या पिशाचाला 'हाकामारी' असे म्हणतात. दारावर चुन्याच्या फुल्या काढल्या, म्हणजे हे पिशाच हाका मारीत नाही, अशी समजूत आहे. [ फो. नॉ. इं. ]

**दूत** राजाचा किंवा देशाचा परराज्यात नेमलेला प्रतिनिधी म्हणजे दूत होय. प्राचीन राज्यशास्त्रात राजा, मंत्री व पुरोहित यांच्या नंतर दूताचे स्थान मानलेले आहे. त्या त्या राष्ट्राच्या शासनसंस्थेचा तो एक महत्त्वाचा घटक असतो. यासाठीच दूतकार्यासाठी योग्य व्यक्तीची निवड मोठ्या कसोशीने करावी, असे राज्यशास्त्रवेत्ते सांगतात. भारतीय युद्धापूर्वी, ते युद्ध टळून कौरव-पांडवांचा सलोखा व्हावा, यासाठी स्वतः श्रीकृष्ण पांडवांचा दूत या नात्याने दुर्योधनाकडे गेला होता. प्राचीन काळी अशा दूतपदासाठी वेदशास्त्रपारंगत अशा ब्राह्मणाची निवड केली जात असे. वाकाटक राजा प्रवरसेन हा राज्यकारभार कसा करतो, ते बारकाईने पाहण्यासाठी विक्रमादित्याने कालिदासाला राजदूत म्हणून विदर्भात पाठविले होते, ही गोष्ट वरील विधानाची साक्ष पटवणारी आहे.

कौटिल्याने दूतांचे तीन प्रकार सांगितले आहेत, ते असे —

(१) निःसृष्टार्थ — हा पहिल्या दर्जाचा दूत होय. हा अमात्याच्या श्रेणीचा असतो. तो स्वतःच्या बुद्धीने प्रसंग पडेल त्याप्रमाणे आपल्या राष्ट्राचे दूतकार्य पार पाडतो.

(२) परिमितार्थ — हा सामान्य अधिकारश्रेणीचा दूत होय. वरिष्ठांच्या आज्ञेप्रमाणे निरोप सांगणे, हे काम तो नीटपणे बजावतो. याला स्वतःच्या बुद्धीने वागण्याची मुभा नसते.

(३) शासनहर — हा केवळ निरोप्या होय. पत्रे, खलिते, संदेश व वस्तू परराज्यात नेऊन पोचविणे, एवढेच याचे काम असते. त्याच्याकडे कोणतेही बुद्धिप्रधान काम नसते.

**दूताचे गुणविशेष** — दूताने नेहमी सत्य बोलावे आणि आपल्या राज्याच्या हिताचे कार्य तत्परतेने करावे; मग त्यामुळे प्राणसंकट आले तरी त्याची पर्वा करू नये, असे कौटिल्याने सांगितले आहे; (अर्थ. १.१२.१६.१). परदेशांत असताना त्याने तिथल्या लष्करी परिस्थितीचे सूक्ष्म निरीक्षण करावे, त्या राज्याला प्रतिकूल कोण आहे, ते पाहून त्याच्याशी संधान बांधावे आणि त्या राज्यातील लष्करी व मुलकी योजनांची माहिती मिळवावी, असे कामंदकीय नीतिसारात म्हटले आहे ( १२.२२-२३ ). दूताच्या अंगी आवश्यक असलेल्या गुणविशेषांत मत्स्य पुराणाने आणखी काही भर घातलेली आहे, ती अशी —

**यथोक्तवादी दूतः स्याद्देशभाषाविशारदः ।**
**शक्तः क्लेशसहो वाग्मी देशकालविभागवित् ॥**

( मत्स्य पु. २१४.१२ )

अर्थ — राजाचा दूत हा ठरले असेल त्याप्रमाणे बोलणारा, निरनिराळ्या देशांच्या भाषा जाणणारा, कष्ट सहन करण्याची शक्ती असलेला, उत्तम वक्ता आणि देशाचे इतिहास-भूगोल जाणणारा असा असावा.

कौटिल्याने वरील गुणविशेषांत आणखी काही गुण आवश्यक म्हणून निर्दिष्ट केले आहेत, ते असे —

**मेधावी वाक्पटुः प्राज्ञः परचित्तोपलक्षकः ।**
**धीरो यथोक्तवादी च एष दूतो विधीयते ॥**

अर्थ — बुद्धिमान, वाक्पटू, विद्वान, दुसऱ्याचे मन जाणणारा, धैर्यशाली व यथायोग्य बोलणारा असा दूत राजाने निवडावा.

ऋग्वेदाच्या काळात दूत शब्दाला राज्यशास्त्रीय व्यापकपणा आला नसला किंवा राजकारणी संकेत त्या शब्दाशी निगडित झाले नसले, तरी वर जे दूतांचे प्रकार सांगितले, त्यांपैकी निःसृष्टार्थ व शासनहर हे दोन्ही प्रकार ऋग्वेदात आढळून येतात. पहिल्याचे उदाहरण सरमेचे. सरमा ही इंद्राची दूती बनून, इंद्राच्या गायी चोरणाऱ्या पणींकडे गेली होती. तिने गाई सोडून देण्याविषयी इंद्राचा संदेश तर पणींना सांगितलाच; शिवाय इंद्राच्या पराक्रमाचे वक्तृत्वपूर्ण वर्णन करून पणींच्या मनात भयही उत्पन्न केले. सरमेने परत जाऊ नये आणि गायींचा ठावठिकाणा इंद्राला सांगू नये, म्हणून पणींनी तिला बहीण करून घेण्याचे ठरविले आणि आपल्या संपत्तीत वाटा देण्याचे प्रलोभनही दाखवले. पण सरमा त्यांच्या कोणत्याही आमिषाला भुलली नाही. ती आपले काम चोख बजावून, पणींच्या प्रदेशात

गाईचा शोध घेऊन परत निघून आली ( ऋ. १०.१०८ ).

दुसऱ्या चालनहर या प्रकाराचे उदाहरण अग्नीचे. वैदिक ऋषींनी अग्नीला देवांचा दूत मानले आहे. 'अग्निं दूतं वृणीमहे...' – आम्ही अग्नीला दूत म्हणून वरतो, असे काण्व मेधातिथी म्हणतो (ऋ. १.१२.१). अग्नीत अर्पण केलेले हविर्द्रव्य तो त्या त्या देवतेकडे घेऊन पोचवतो, अशी कल्पना असल्यामुळे अग्नी हा आदर्श दूत मानला गेला आहे.

रामाने लंकेवर स्वारी केल्यानंतर अंगदाला आपला दूत म्हणून रावणाकडे पाठवले होते. रामाचा निरोप त्याने रावणाला व्यवस्थितपणे सांगून आपले दूतकर्म उत्तम प्रकारे पार पाडले, असे रामायणात सांगितले आहे.

वैदिक युगापासून गुप्त युगापर्यंत दूतपरंपरा अविच्छिन्न चालू होती असे दिसते. नंतरच्या काळातही असे दूत किंवा राजाचे प्रतिनिधी परराज्यात पाठवले जात. इतिहासात अशा अनेक राजदूतांची नावे आढळतात. अफजलखान चालून आला असता शिवाजी महाराजांनी पंताजी गोपीनाथ या गृहस्थाला आपला वकील म्हणून वाईला त्याच्या भेटीस पाठवले होते आणि पंताजी गोपीनाथाने त्याच्यावर सोपवलेली कामगिरी उत्तम प्रकारे पार पाडली होती, हे इतिहासावरून कळते.

राजदूताचा कोणी अवमान करू नये व त्याला धोक्यात घालू नये असा संकेत प्राचीन काळापासून रूढ आहे (म. भा. शांति. ८५. २६–२७). राजे लोक आपल्या दूतांना सर्व प्रकारचे संरक्षण देत. मात्र त्यांच्या हातून प्रमाद किंवा अपराध घडल्यास फटके मारणे, मुंडन करणे, इ. प्रकारच्या शिक्षाही त्यांना करीत. राजकारणातले राजदूताचे एवढे महत्त्व लक्षात घेऊनच मनूने त्याचा पुढील श्लोकात ( मनु. ७. ६६ ) गौरव केला आहे –

दूत एव हि संधत्ते भिनत्त्येव च संहतान् ।
दूतस्तत्कुरुते कर्म भिद्यन्ते येन मानवाः ॥

अर्थ – दूत हा दोन राजांचा संधी करतो. तो संधियुक्त अशा राजांमध्ये फूटही पाडतो. ज्याच्या योगाने मानवांमध्ये भेद किंवा फुटीरपणा निर्माण होईल, अशा प्रकारचे कर्म दूत करीत असतो.

तात्पर्य युद्ध किंवा तह होणे ही गोष्ट बव्हंशी दूतावरच अवलंबून असते. [ हि. व.; पा. का. भा. ]

## दूतकाव्ये

एक संस्कृत काव्यप्रकार. दूतकाव्ये रचनादृष्ट्या गीतकाव्यांच्या श्रेणीत पडतात. विरहावस्थेतील प्रेमीजनाने आपल्या प्रियव्यक्तीला दूताकरवी पाठवलेला प्रीतिसंदेश हा या प्रकारच्या बहुतेक काव्यांचा विषय आहे.

प्रणयदूताची ही कल्पना प्रणयभावनेइतकीच प्राचीन आहे. मेघदूतापूर्वीच्या साहित्यात अशा काव्यांची अस्फुट बीजे आढळतात. अर्चनाना आत्रेयाचा पुत्र श्यावाश्व याने रथवीती दार्भ्याच्या कन्येच्या प्राप्तीसाठी ऊर्मीला ( रात्रिदेवीला ) दूती म्हणून पाठविल्याची कथा ऋग्वेदावरील सायणभाष्यात ग्रथित आहे ( ऋ. ५. ६१. १७. वरील सायणभाष्य ). दमयंतीने नलाकडे पाठविलेला हंस हे आर्ष महाकाव्यातील प्रेमदूताचे उदाहरण होय. ही उदाहरणे पुढच्या संस्कृत दूतकाव्यांना प्रेरक ठरली आहेत.

दूतकाव्यरचनेची परंपरा सुरू झाली, ती महाकवी कालिदासाच्या मेघदूताच्या प्रभावामुळे. कालिदासाने या काव्याची स्फूर्ती रामायणातून घेतली आहे, हे मेघदूतातल्या अनेक उल्लेखांवरून दिसून येते. पुढील श्लोकात तर सीतेकडे गेलेल्या हनुमानाचा स्पष्टच उल्लेख आहे –

इत्याख्याते पवनतनयं मैथिलीवोन्मुखी सा ।
त्वामुत्कण्ठोच्छ्वसितहृदया वीक्ष्य सम्भाव्य चैव ॥
श्रोष्यत्यस्मात्परमवहिता सौम्य सीमन्तिनीनाम् ।
कान्तोदन्तः सुहृदुपनतः सङ्गमात्किञ्चिदूनः ॥
( उ. मे. ४० )

अर्थ – ( यक्ष मेघाला म्हणतो, ) हे सौम्य मेघा, तू एवढे सांगितल्यावर, ज्याप्रमाणे (अशोकवनातील) सीतेने हनुमंताकडे पाहिले होते, त्याप्रमाणे माझी प्रिया मुख वर उचलून उत्कंठित हृदयाने तुझ्याकडे पाहील व तुझा सत्कार करून तुझ्या मुखातून प्रकटणारा प्रिय संदेश लक्षपूर्वक ऐकेल. कारण स्त्रियांना पतीच्या मित्राने आणलेला संदेश हा पतिमीलनाहून किंचितसाच उणा वाटतो.

मंदाक्रांता वृत्तातील या काव्याने दूतकाव्याचा आदर्श निर्माण केला आहे. कुबेराच्या शापाने अलकानगरीतून एका वर्षासाठी बहिष्कृत झालेला एक यक्ष विदर्भातील रामगिरीवर येऊन राहतो आणि विरहाचे आठ महिने उलटल्यावर आषाढाच्या पहिल्या दिवशी दिसलेल्या मेघाबरोबर आपल्या प्रियेला संदेश पाठवतो, अशी या काव्याची भूमिका आहे. पूर्वमेघ आणि उत्तरमेघ असे या काव्याचे दोन भाग आहेत. पूर्वमेघात मेघाला हिमालयातील अलकानगरीचा मार्ग सांगण्याचे निमित्त करून कालिदासाने रामगिरी ते अलकानगरी या मार्गातील निसर्गनिर्मित व मानवनिर्मित सौंदर्यस्थलांचे मनोहर चित्रण केले आहे. उत्तरमेघात यक्षाने अलकानगरीचे, तिथल्या आपल्या निवासस्थानाचे व आपल्या विरहव्यथित प्रियेचे वर्णन करून तिला सांगायचा संदेश शब्दबद्ध केला आहे. या दोन्ही भागांतील वर्णने यक्षाच्या विरहव्यथेत भिजलेली असल्यामुळे काव्यविषयाचा रसोत्कर्ष साधण्याला ती

उपकारक आहेत. मंदाक्रांतेच्या मंद चरणलहरींबरोबर वाहणारी यक्षाची विरहवेदना रसिकांच्या हृदयाची पकड घेते.

मेघदूताच्या असामान्य यशामुळे प्रभावित झालेल्या अनेक कालिदासोत्तर कवींनी दूतकाव्ये रचली. नायक, नायिका व दूत ही पात्रे, दूताला मार्ग सांगण्याच्या निमित्ताने मार्गातील सौंदर्यस्थलांची वर्णने, संदेश, तसेच मंदाक्रांता वृत्त ही बहुतेक दूतकाव्यांची अंतर्बाह्य वैशिष्ट्ये बनली. क्वचित शिखरिणी (हंसदूत – रूपगोस्वामी, मनोदूत – व्रजनाथ), वसंततिलका (हृदयदूत – हरिहर), मालिनी (चंद्रदूत – जंबू), शार्दूलविक्रीडित (पांन्थदूत – भोलानाथ), इ. अन्य वृत्ते वापरली गेली असली, तरी त्यांना मंदाक्रांतेचे वैभव लाभू शकले नाही. कालिदाससमकालीन किंवा तत्पूर्वकालीन समजल्या जाणाऱ्या घटकर्परकाव्यात मेघालाच दूत बनविले आहे; परंतु त्याचा काळ निश्चित नसल्यामुळे दूतकाव्याच्या परंपरेत त्याचा प्रभाव किती पडला, ते निश्चित सांगता येत नाही.

कालिदासाने मेघदूतात म्हटले आहे, की 'कामार्त व्यक्तींना चेतन व अचेतन यांतील निवडीचा विवेक राहत नाही.' ते लक्षात ठेवून संस्कृत कवींनी मेघ, पवन, इ. निसर्गशक्ती; चंद्र, पद्म, पत्र, तुलसी, इ. निसर्गवस्तू; मुद्गरासारखी जड वस्तू; हंस, कोकिल, शुक, चक्रवाक, इ. पक्षी; हनुमंतासारखा वानर, एवढेच नव्हे; तर मन, हृदय, भक्ती, यांसारख्या अपार्थिव गोष्टीही दूत म्हणून वापरल्या आहेत.

संस्कृत दूतकाव्यांच्या क्षेत्रात मेघदूताच्या खालोखाल धोयीच्या पवनदूताची ख्याती आहे. धोयी हा जयदेवाचा समकालीन आणि बंगालचा राजा लक्ष्मणसेन याचा सभाकवी होता. त्याने लक्ष्मणसेनालाच आपल्या काव्याचा नायक बनविले आहे. हा राजा दक्षिणदिग्विजयासाठी दक्षिणेत गेला असता, मलय पर्वतातील कुवलयवती नामक एक गंधर्वकन्या त्याच्यावर आसक्त होते आणि ती पवनाला दूत म्हणून राजाकडे पाठवते, अशी या काव्याची कथा आहे.

पवनदूत याच नावाचे आणखी एक काव्य वादिचंद्रसूरी नामक जैन कवीने रचले आहे. याशिवाय पार्श्वाभ्युदय, नेमिदूत, मेघदूत, शीलदूत, इंदुदूत, मेघदूतसमस्यालेख ही दूतकाव्ये अनुक्रमे जिनसेन, विक्रम, मेरुतुंग, चरित्र सुंदर गणी, विनय विजय गणी व मेघविजय या जैन कवींनी रचली आहेत. या जैन दूतकाव्यांचा विषय प्रेमिकांचा विरह हा नसून, जैन धर्मतत्त्वांचे विवरण हा आहे, हे विशेष होय. चैतन्यसंप्रदायी वैष्णव कवींनी उद्धवदूत, हंसदूत (रूपगोस्वामी), पदांकदूत (श्रीकृष्ण सार्वभौम), पादपदूत (गोपेंद्रनाथ गोस्वामी), इ. दूतकाव्ये रचून त्यांच्याद्वारा कृष्णभक्तीचे पोषण केले आहे. त्यांच्या काव्यांचे स्फूर्तिस्थान भागवताचा दशम स्कंध हे आहे.

केरळमधील अनेक कवींनी मेघदूताच्या धर्तीवर संस्कृतात दूतकाव्ये रचली आहेत. त्यांत केरळसंबंधी ऐतिहासिक, भौगोलिक, सांस्कृतिक अशी विविध प्रकारची माहिती आढळते. शुकसंदेश, मयूरसंदेश, हंससंदेश, भृंगसंदेश, इ. त्यांची नावे आहेत.

दूतकाव्यांची ही परंपरा केवळ संस्कृत साहित्याच्या क्षेत्रापुरतीच मर्यादित न राहता पुढे भारतीय लोकभाषांतही ती अवतीर्ण झालेली दिसते. हाल सातवाहनाच्या गाथासप्तशतीत अनेक स्फुट गाथांत प्रणयदौत्याचा विषय आलेला आहे. अपभ्रंश कवी उद्दहमाण (अब्दुर्रहमान) याचे संदेशरासक हे काव्य संस्कृतेतर भाषांतील दूतकाव्यांच्या क्षेत्रात महत्त्वाचे आहे. हिंदी महाकवी हरिऔध यांच्या प्रियप्रवास या महाकाव्यातील पवनदूत हिंदी साहित्यविश्वात अजरामर झालेला आहे. 'उद्धवा, सांतवन कर जा, त्या गोकुळवासिजनांचे' हे मध्वमुनीश्वरांचे मराठी गीत अथवा 'रुणझुणत्या पांखरा, जा माझ्या माहेरा' हे मराठी लोकगीत, ही एक प्रकारची लघुदूतकाव्येच होत. [एस्. इं.; सं. सा. सो. ह; का. के. सं. लि.; श्री. रंजन सूरिदेव – युगप्रभात, १ ऑगस्ट १९६४]

## दूतिया ओसा

ओडिसा प्रदेशातील स्त्रियांचे एक काम्य व्रत. निपुत्रिक स्त्रिया पुत्रप्राप्ती व्हावी या हेतूने हे व्रत करतात. आश्विन वद्य अष्टमीला निर्जल उपवास करणे, हा या व्रताचा मुख्य विधी आहे. दूतिवाहन ही या व्रताची देवता होय. [स्ट. ओ. फो.]

## दूती

नायिकेचे नायकाशी प्रणयमीलन घडून येण्याच्या कामी मध्यस्थी करणारी किंवा परस्परांचे संदेश पोचवणारी स्त्री म्हणजे दूती होय. 'स्त्रीपुंसो: संदेशप्रापिका' = अनुरक्त स्त्री–पुरुषांचे संदेश एकमेकांना पोचवणारी ती दूती, असे तिचे स्थूल लक्षण सांगितले आहे. काम व नाट्य या शास्त्रत दूतीची उपयुक्तता, तिने करायची कामे, इ. गोष्टींचे विवेचन असते.

शृंगारविषयात दौत्यकर्म हे नाजूकपणे साधायचे असते आणि कित्येक वेळा ते महाकठीणही असते. त्यासाठी कित्येकदा अंत:पुरातही प्रवेश मिळवावा लागतो. अशी कामे पुरुष दूताच्या आटोक्याबाहेरची असल्यामुळे त्यासाठी दूतीच आवश्यक असते. म्हणूनच कामसूत्रातील पारदारिक अधिकरणाच्या दूती या प्रकरणात वात्स्यायन सांगतो –

**दर्शितेङ्गिताकारां तु प्रविरलदर्शनामपूर्वां च दूत्योपसर्पयेत् ।**

अर्थ – जिने आपले इंगित सूचित केले आहे, परंतु जिचे दर्शन दुर्लभ झाले आहे किंवा जिच्याशी अद्याप परिचय झालेला नाही,

अशा नायिकेशी नायकाने दूतीच्या द्वारे संधान बांधावे.

या दौत्यकर्मासाठी कशा प्रकारच्या स्त्रीची निवड करावी, ते वात्स्यायन त्याच प्रकरणात पुढे सांगतो –

**विधवेक्षणिका दासी भिक्षुणी शिल्पकारिका ।**
**प्रविशत्याशु विश्वासं दूतीकार्यं च सिद्ध्यति ।**

अर्थ– विधवा, शकुन सांगणारी, दासी, भिक्षुणी व कलावती अशी स्त्री इष्टस्थानी अल्पायासाने प्रविष्ट होते व विश्वास संपादून दूतीकार्य सिद्ध करते.

वाक्चातुर्य, धिटाई, नखरे, प्रतारणाचातुर्य, अचानक संकट आले असता त्यातून निसटण्याचे समयसूचकत्व हे उत्तम दूतीचे गुण होत, असे वात्स्यायन सांगतो (काम. १.५). गाथासप्तशतीतील एक नायिका आपल्या दूतीला म्हणते–

**दूइ, तुमं विअ कुसला, कक्खडमउआइँ जाणसे वोल्लुम् ।**
**कण्डुइअपण्डुरं जह ण होइ, तह तं करेज्जासु**

अर्थ – हे दुती, तू कुशल आहेस. कठोर केव्हा बोलायचे व मृदू केव्हा बोलायचे हे तू जाणतेस. खाज सुटली तर खाजवले तर पाहिजेच, पण (ते अशा हलक्या हाताने की) व्रण होता कामा नये. तेव्हा आवश्यक ती खबरदारी घे आणि योग्य ते कर.

काही साहित्यशास्त्रज्ञांनी नायिकेची सखी हीच तिची दूती होते, असे मानून विवेचन केले आहे. [ शं. ना. ]

**दूध** सांस्कृतिक क्षेत्रात विशेषतः गायीच्या दुधाबद्दलच सर्वत्र वर्णन आहे. दुधाचे उल्लेख वेदांत अनेक ठिकाणी आढळतात. दूध हा सर्वोत्तम पुष्टिकारक पदार्थ आहे किंवा सर्व पौष्टिक अन्नांचे ते प्रतीकच आहे, अशी वेदांची धारणा आहे. दूध जसे पौष्टिक, तसेच पवित्रही मानलेले आहे. म्हणूनच वेदकाळी सोमरसात दूध मिसळीत. पायस व आमिक्षा हे पदार्थही दुधापासूनच बनवीत. सर्व गायींत काळी गाय ही दुधाळ मानली जाई. उशीनर देशातले लोक विशेष दुग्धप्रिय असल्याचे काशिका वृत्तीत म्हटले आहे (अष्टा. ८. ४. ९ या सूत्रावरची वृत्ती).

कित्येक ब्राह्मण पयोव्रतधारी असत; म्हणजे ते दूध पिऊन व्रतस्थ राहत. अदितीने आपल्याला उत्तम पुत्र व्हावा, म्हणून पयोव्रत केल्याची कथा भागवतात आहे (भाग. पु. ८.१६).

गायीच्या ठिकाणी दूध कसे निर्माण झाले, याविषयी वैदिक वाङ्मयात पुढील कल्पना आढळतात– वरुणाने गायींच्या ठिकाणी दूध उत्पन्न केले, असे ऋग्वेदात म्हटले आहे (ऋ. ५. ८५. २). दुधाला रेत म्हटले असून, हे रेत अग्नीने गायींच्या ठिकाणी सिंचित केले आणि तेच दूध बनले, असे त्याचे स्पष्टीकरण शतपथात दिले आहे (श. ब्रा. २.२.४.१५). दुधाच्या पहिल्या काही धारा उष्ण असतात, त्याचे कारण ते अग्नीचे रेत आहे हेच होय, असेही तिथे म्हटले आहे.

स्मृतिकालात दुधाविषयी बरेच विधिनिषेध निर्माण झालेले दिसतात. वासरू मेलेल्या, जुळ्या वासरांना जन्म देणाऱ्या, व्याल्यापासून दहा दिवस न झालेल्या व आचळातून आपोआप दुग्धस्राव होणाऱ्या गायीचे दूध पिऊ नये, असे बौधायनादी स्मृतिकार सांगतात. अत्रीने या विषयात आणखी काही निषेध सांगितले आहेत, ते असे –

**अजा गावो महिष्यश्च अमेध्यं भक्षयन्ति याः**
**दुग्धं हव्ये च कव्ये च गोमयं न विलेपयेत् ।।**

अर्थ– अपवित्र (घाणेरडे) पदार्थ खाणाऱ्या गायी-म्हशी-बकऱ्यांचे दूध हव्य–कव्यात वापरू नये. त्यांच्या शेणाने जमीनही सारवू नये.

निषिद्ध पशूंचे दूध प्याल्यास प्राजापत्य प्रायश्चित करावे आणि निषिद्ध गायींचे दूध प्याल्यास तीन दिवस उपवास करावा, असे बौधायन धर्मसूत्रात सांगितले आहे.

दुधाविषयी पुढील रूढी व लोकसंकेत आढळतात –

दूध हा पंचामृतातला मुख्य पदार्थ मानलेला आहे. दुधाने शिवाला अभिषेक करतात. मंडपाच्या द्वारी नवरदेवाच्या व घरात येताना लेकुरवाळीच्या पायांवर दूध व पाणी घालतात. नूतन गृहप्रवेशाच्या वेळीही यजमानदंपतीच्या पायावर दूध-पाणी घालतात. कोणी दूध प्यायला दिले, तर त्याला नकार देत नाहीत. श्रावणातल्या शुक्रवारी सवाष्णीला बोलावून दूध प्यायला देतात. दूध सांडले असले तर त्याला ओलांडून पुढे जात नाहीत. दुधाची विक्री करू नये, असेही समजतात.

**दूर्वा** एक तृण. हे तृण पवित्र समजतात. ऋग्वेदात याचे उल्लेख मिळतात (ऋ. १०.१४२.८.; १०.१३४.५). 'आपल्या मुलांच्या वाढीप्रमाणे आमच्या वंशाची वाढ कर' असे तै. संहितेत दूर्वेला प्रार्थिले आहे (४.२.९.२).

दूर्वांचा मंगल कार्यात व देवपूजेत उपयोग करतात. दूर्वांना प्रजोत्पादक व आयुष्यवर्धक मानले आहे. म्हणून गर्भाधानविधीत स्त्रीच्या नाकपुडीत (अश्वगंधा न मिळाल्यास) दूर्वांचा रस पिळतात. वंध्या स्त्रिया अपत्यप्राप्तीसाठी दूर्वांची पूजा करतात. मुलाच्या वाढदिवशी अक्षतांसह दूर्वांकुर मुलाच्या मस्तकावर ठेवतात. मुलाचे आयुष्य वाढावे, हा त्याचा हेतू असतो. मृतांच्या आत्म्याला शांती मिळावी, म्हणून दूर्वापूजा करण्याची चाल गुजरातेत आहे. दूर्वेचे वडाशी लग्न लावण्याची प्रथाही क्वचित् आढळते.

दूर्वांचा रस त्वग्रोगनाशक असून, वंध्यत्व नाहीसे करण्यासाठीही त्याचे सेवन करावे, असे आयुर्वेदात सांगितले आहे.

दूर्वा ही गणपतीला अत्यंत प्रिय आहे. २१ किंवा २१ च्या पटीत दूर्वा गणपतीला वाहिल्याने पूजक कुबेरासारखा धनाढ्य होतो, असे सांगितले आहे. जो दूर्वांकुरांनी हवन करतो, तो सर्व कार्यांत यशस्वी होतो, असे गणपती अथर्वशीर्षाच्या फलश्रुतीत म्हटले आहे. गणपती व दूर्वा यांच्या संबंधाची एक कथा आहे, ती अशी –

एकदा यमाच्या राजसभेत तिलोत्तमा नृत्य करीत असता तिच्या नृत्याने यम मोहित झाला. तत्काळ त्याचे वीर्य स्खलन पावले. त्यातून अनलासुर नावाचा दैत्य उत्पन्न झाला. त्याने सर्व देवांना जर्जर करून सोडले. मग सर्व देव गजाननाला शरण गेले. गजाननाने बालरूप घेऊन अनलासुराला गिळून टाकले. पण त्यामुळे गणपतीच्या अंगाचा दाह सुरू झाला. तेव्हा ८८ सहस्र मुनींनी तिथे जमून प्रत्येकी २१ दूर्वा गजाननाच्या मस्तकी वाहिल्या. त्यामुळे गजाननाचा दाह शमला. मग त्याने दूर्वेला वर दिला, की 'जो कोणी मला दूर्वा अर्पण करीऊ, त्याला सहस्र यज्ञांचे फळ मिळेल' (ग. पु. उ. ६४–६५).

तुळशीप्रमाणेच दूर्वेवरही महाराष्ट्रातल्या स्त्रियांनी ओव्या रचल्या आहेत. त्यांपैकी दोन ओव्या अशा–

मोरया रे देवा। तुला दूर्वांची आवडी।
एकवीसांची जुडी। बाळासाठी।
मोरया देवाला। केले दूर्वांचे आसन।
झाला मोरया प्रसन्न। भाईरायाला॥

सीता पृथ्वीच्या पोटात गडप होत असता राम तिला धरायला गेला; पण फक्त तिचे केसच रामाच्या हाती लागले. त्या केसांच्याच पुढे दूर्वा झाल्या, अशी कथा उत्तर प्रदेशातील लोकसाहित्यात आढळते.

ग्रहमखात राहूसाठी दूर्वा या समिधा म्हणून वापरतात. दूर्वांही देवता असून ती भक्तांची पापे नष्ट करते, अशी समजूत आहे. पाहा – गणपती. [श. क.; म. ज्ञा. को.]

**दूर्वागणपतिव्रत** एक काम्य व्रत. दूर्वागणपती ही व्रताची देवता आहे. याचा आरंभ सौर पुराणमते कार्तिक शुद्ध चतुर्थीस व स्कंद पुराणमते श्रावण शुद्ध चतुर्थीस करायचा असतो. व्रतावधी दोन किंवा तीन वर्षे अथवा श्रावण शु. चतुर्थीपासून माघ शु. चतुर्थीपर्यंत. रविवारी येणाऱ्या कोणत्याही शुद्ध चतुर्थीस व्रतारंभ करून ते तिथून पुढे सहा महिने करावे, असेही वचन आहे. या व्रताचा विधी असा –

कलशावर ताम्रपात्रात दूर्वा पसरून त्यावर गणपतीची सुवर्णमूर्ती स्थापावी. तिच्या भोवती रक्तवस्त्र गुंडाळावे. मग षोडशोपचारांनी गणपतीची पूजा करावी. पूजेत दूर्वा अवश्य असाव्या. नाममंत्राने गणपतीला सहा दूर्वा वाहाव्या, सहा प्रदक्षिणा व सहा नमस्कार घालावे. रविवारयुक्त चतुर्थीस एकवीस दूर्वा वाहाव्या. पुढील मंत्राने गणपतीची प्रार्थना करावी–

गणेश्वर गणाध्यक्ष गौरीपुत्र गजानन।
व्रतं संपूर्णतां यातु त्वत्प्रसादादिभानन॥

अर्थ– हे गणेश्वरा, गणाध्यक्षा, गौरीपुत्रा, गजानना, तुझ्या प्रसादाने (माझे हे) व्रत पूर्णतेला जावो.

त्या दिवशी एकभुक्त राहावे व व्रताची कथा श्रवण करावी. ही कथा स्कंद पुराणात पुढीलप्रमाणे सांगितली आहे–

एकदा कैलासावर शिव-पार्वती द्यूत खेळत असता त्या दोघांत तंटा उत्पन्न झाला. मग त्या दोघांनी चित्रनेमी या त्रयस्थाला त्या तंटयाचा निर्णय देण्यास सांगितले. चित्रनेमीने शिवाच्या बाजूने निर्णय दिला. पार्वतीला तो खोटा वाटला. तिने त्याला शाप दिला, की 'तू कावळा होशील!' मग चित्रनेमी पार्वतीला शरण गेला. 'तू सरोवराच्या काठी राहत असता तुला अप्सरांचे दर्शन होईल, तेव्हा तू शापमुक्त होशील' असा पार्वतीने त्याला उःशाप दिला.

चित्रनेमी कावळा बनून सरोवराजवळ राहू लागला. कालांतराने अप्सरा त्या सरोवराजवळ येऊन दूर्वागणपतीचे व्रत आचरू लागल्या. चित्रनेमीने ते पाहिले व त्याचे विधिविधान फलश्रुतीसह विचारून घेतले. मग त्याने स्वतः ते व्रत केले. त्या पुण्याने तो शापमुक्त झाला.

पाच वर्षे व्रत करून मग त्याचे उद्यापन करायचे असते. त्यासाठी यवांच्या पिठाचे अठरा मोदक तुपात तळून घ्यावे, गणपतीला त्यांचा नैवेद्य दाखवावा, त्यांपैकी सहा मोदक गणपतीपुढे ठेवावे, सहा ब्राह्मणाला द्यावे व सहा स्वतः खावे, असे सांगितले आहे. सौरपुराणात एकवीस दूर्वांनी नामपूजा करावी आणि दूर्वा व मोदक यांचे हवन करावे, असे सांगितले आहे. मग आचार्यपूजा, गोप्रदान व ब्राह्मणभोजन या गोष्टी करून व्रताची सांगता करतात. [व्रतराज; हि. ध.]

**दूर्वात्रिरात्रव्रत** एक स्त्रीव्रत. भाद्रपद शुद्ध त्रयोदशीला प्रारंभ करून पौर्णिमेपर्यंत हे व्रत करायचे असते. याचा विधी असा – तीन दिवस उपवास करावा. उमा, महेश्वर, धर्म आणि सावित्री यांच्या मूर्ती दूर्वांमध्ये ठेवून त्यांची पूजा करावी. रात्री जागरण करावे, सावित्रीची कथा ऐकावी व अखेरच्या दिवशी होम करून व्रताची समाप्ती करावी. फल– धन, सौख्य व पुत्र यांचा लाभ. [हि. ध.]

**दूर्वालक्षव्रत** हे पूजाप्रधान व्रत असून, दूर्वागणपती ही या व्रताची देवता आहे. पौष महिन्याशिवाय इतर कोणत्याही महिन्यात दिनशुद्धी पाहून या व्रताला प्रारंभ करतात. याचा विधी असा –

गणपतीची पूजा करावी. मग गणेशसहस्रनामाने सहस्र दूर्वा गणपतीला वाहाव्या. प्रत्येक दिवशी एक सहस्र याप्रमाणे एक लक्ष दूर्वा वाहून झाल्यावर व्रताचे उद्यापन करावे. उद्यापनाच्या दिवशी गजाननाची चतुर्भुज व एकदंत अशी सुवर्णप्रतिमा करून तिला सुवर्णाच्या सिंहासनावर बसवावे. नंतर ते सिंहासन सुवर्णाच्या दूर्वेवर स्थापन करावे. रक्त वस्त्र व रक्त पुष्पे यांनी गणपतीची पूजा करून मोदकांचा नैवेद्य दाखवावा. मग हवन, पूर्णाहुती व बलिदान करावे. आचार्य व ब्राह्मण यांना भोजन घालावे. फल – सौभाग्य व संतती यांचा लाभ. [ व्रतराज ]

**दूर्वाष्टमी** भाद्रपद शु. अष्टमीला हे नाव आहे. या दिवशी दूर्वाविषयक व्रत करावे, असे सांगितले आहे. या व्रतात दूर्वेसह गौरी, गणेश व शिव यांची पूजा करायची असते. विशेषत: अपत्यहीन स्त्रिया हे व्रत करतात. पूजा झाल्यानंतर आठ ग्रंथींनी युक्त असा दोरा डाव्या हातात बांधतात. पुढील श्लोकाने दूर्वेची प्रार्थना करतात–

त्वं दूर्वेऽमृतनामासि पूजितासि सुरासुरैः।
सौभाग्यसन्ततिं दत्वा सर्वकार्यकरी भव ॥
यथा शाखाप्रशाखाभिर्विस्तृतासि महीतले।
तथा ममापि सन्तानं देहि त्वमजरामरम् ॥

अर्थ– हे दूर्वे, अमृत हे तुझे नाव आहे. सुरासुरांनी तू पूजित आहेस. तू (मला) सौभाग्य आणि संतती देऊन सर्व कार्ये सिद्ध करणारी हो. ज्याप्रमाणे शाखाप्रशाखांनी तू पृथ्वीवर पसरतेस, त्याप्रमाणे मलाही अजरामर असे (पुत्रपौत्रादी) संतान दे. (माझा वंशवृक्ष तुझ्यासारखा शाखाप्रशाखांनी युक्त कर).

पूजा–प्रार्थना झाल्यावर कथा श्रवण करावी. भविष्योत्तर पुराणातली ती कथा पुढीलप्रमाणे आहे –

देव-दैत्य अमृतासाठी समुद्रमंथन करीत असता विष्णूने मंदर पर्वत उचलून धरला होता. तो मंदरपर्वत गरगर फिरू लागला असता त्या घर्षणाने विष्णूच्या अंगावरचे केस झडले व समुद्राच्या लाटांनी ते तीरावर नेऊन टाकले. त्या केसांच्याच दूर्वा बनल्या. मंथनातून अमृत निघाल्यावर त्याचा कुंभ त्या दूर्वांच्या आसनावर ठेवला गेला. त्यातले काही अमृतबिंदू दूर्वांवर सांडले आणि दूर्वा अमर झाल्या. मग अनेक देवपत्न्यांनी व मानवस्त्रियांनी भाद्र० शुद्ध अष्टमीस त्या दूर्वांची पूजा केली. त्यामुळे त्या सर्वांना सौभाग्य व संतती यांचा अविच्छिन्न लाभ झाला.

या व्रताचा दुसरा पर्याय आहे, तो असा–

भाद्रपद शुद्ध सप्तमीला उपवास करावा. अष्टमीच्या दिवशी व्रताचा संकल्प करून पवित्र जागी उगवलेल्या दूर्वांवर शिवलिंगाची स्थापना करावी. मग दूर्वांसह शिवलिंगाची पूजा करावी. शिवाला दूर्वा, शमी व पुष्पमाला वहाव्यात. खजूर, खोबरे व महाळुंग यांचा नैवेद्य दाखवावा. अक्षतायुक्त दह्याने अर्घ्य द्यावे. ब्राह्मणांना विविध फळांची वायने द्यावी. त्या दिवशी केवळ फलाहार करावा. उद्यापनाच्यावेळी पूजा व हवन करावे. ब्राह्मणांना व आप्तेष्टांना तिळांच्या व कणकीच्या पदार्थांचे भोजन घालावे. फल – सौभाग्य, संतती यांचा लाभ व इच्छापूर्ती. [ व्रतराज.; हि. ध. ]

**दूल्हादेव** मध्य व उत्तर प्रदेशातील आदिवासींचा एक देव. हा एक लग्नाला निघालेला नवरदेव होता. तो वाटेत मेला आणि मरून देव झाला, अशी समजूत आहे. याच्या कथेचे काही पर्याय आहेत, ते असे –

(१) वाटेत त्याच्यावर वीज पडली व तो आणि त्याचा घोडा दोघेही मरून पाषाण झाले.

(२) लग्न करून घरी आल्यावर अंगावर वरवेष असतानाच त्याने देव-दानवांच्या संग्रामात उडी टाकली व त्या लढाईत तो मेला.

(३) लग्न करून परत येताना त्याला वाघाने खाल्ले.

(४) आपल्या भावी पत्नीला पाहण्याची उत्कंठा लागल्यामुळे त्याने अवेळी तिला पाहण्याचा प्रयत्न केला व त्या प्रयत्नात तो आणि त्याची वधू दोघेही पाषाण बनली.

वरील सर्व पर्यायांचा निष्कर्ष हा, की लग्नाला चाललेल्या एका नवरदेवाला अपघाती मरण आले आणि अशा प्रकारे संसारसुखाला वंचित झालेल्या त्या मृतात्म्याने अन्य नवरदेवांना कोणत्याही प्रकारचा त्रास देऊ नये, म्हणून तिथल्या आदिवासींनी त्याला देव मानले.

दूल्हादेवाचे मूळ नाव चित्रदेव असून, तो अवंतीचा रहिवासी होता व त्याला अष्टसिद्धी प्राप्त होत्या, असे म्हणतात.

कापडाच्या चिंधीत सुपारी व खजुराची बी एकत्र बांधून, ते दूल्हादेवाचे प्रतीक म्हणून खुंटीला अडकवून ठेवतात. आदिवासींच्या लग्नात त्याची पूजा प्रथम होते. त्याच्यासाठी एक अंगरखा, पागोटे व पादत्राणे पाटावर ठेवून त्याला पक्वान्नांचा नैवेद्य दाखवतात व लग्न लागल्यावर त्याच्या प्रीत्यर्थ बोकडाचा बळी देतात. काही लोक कुऱ्हाड हे त्याचे प्रतीक मानतात.

मूल जन्माला आल्यावरही त्याच्यासाठी बोकड बळी देण्याची प्रथा आहे. त्यासंबंधी मध्य प्रदेशात प्रचलित असलेली एक लोककथा अशी –

एकदा एका लग्नप्रसंगी बळी दिलेल्या बोकडाचे अवशेष पुरण्यासाठी खड्डा खणण्यात आला. दुर्दैवाने जवळच रांगत असलेले एक मूल त्या खड्डयात पडले. खड्डयात पडलेले किंवा टाकलेले काहीही बाहेर काढावयाचे नाही, अशी त्या लोकांची समजूत असल्यामुळे बोकडाच्या अवशेषावरोबर कुटुंबप्रमुखाने ते मूलही पुरून टाकले; पण आश्चर्य असे घडले, की पुढील वर्षी खड्डा उकरला, तेव्हा ते मूल जिवंत स्थितीत आढळले.

तेव्हापासून नवजात अर्भकाला दीर्घायुरारोग्य लाभावे, म्हणून दूल्हादेवाला बोकड बळी देण्याची प्रथा पडली.

काही ठिकाणी प्रतिवर्षी माघ किंवा फाल्गुन अमावस्येला दूल्हादेवाची पूजा करण्याची पद्धत आहे. खजुराहो येथे दुल्हादेवाचे मंदिर असल्याचे कळते. [ पॉ. रि. फो. नॉ. इं. ]

**दृढबल** एक आयुर्वेदाचार्य. याच्या पित्याचे नाव कपिलबल असे होते. त्यावरून त्याला कापिलबली असेही म्हणत. हा काश्मीरमधील पंचनदपूरचा रहिवासी होता. वाग्भटाच्या पूर्वी म्हणजे इ. स. ३०० च्या सुमारास हा होऊन गेला असावा, असे वाटते. कारण वाग्भट व जेज्जट यांनी याची वचने उद्धृत केली आहेत. चरकसंहितेतील काही भाग याने पूर्ण केले असे म्हणतात. [ हिं. वि. को. ]

**दृपद** एक यज्ञीय उपकरण. हविर्द्रव्याचे पीठ करण्यासाठी जो दगडी पाटा वापरतात त्याला हे नाव आहे.

**दृषद्वती** एक प्राचीन नदी. जिच्या प्रवाहात व काठावर पुष्कळ दगड आहेत, ती दृषद्वती होय. सिरमूरच्या टेकड्यांत या नदीचा उगम झाला असल्याचे सांगतात.

ऋग्वेदात आपया व सरस्वती या नद्यांच्या उल्लेखाबरोबरच दृषद्वतीचाही उल्लेख आहे ( ऋ. ३.२४.४ ). शिवाय ब्रह्मावर्त देशाची दक्षिणेकडील व पूर्वेकडील सरहद्द म्हणूनही या नदीचे वर्णन आले आहे. कुरुक्षेत्राच्या एका सरहद्दीवर ही नदी आहे, असे महाभारतात सांगितले आहे (वन. ९०.११). कृष्णाने द्वारकेहून हस्तिनापुराला जाताना ही नदी ओलांडली, असे भागवतात वर्णन आहे ( ५.१९.१८; १०.७१.२२ ). या नदीच्या काठीच नैमिषारण्य आहे, असे वायू पुराणात म्हटले आहे( १.१४ ). कौशिकी नदी ही दृषद्वतीचा एक फाटा आहे, असे वामन पुराणात सांगितले आहे (३४). मनूने या नदीविषयी म्हटले आहे, ते असे (मनुस्मृती २.१७) –

सरस्वतीदृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम् ।
तं देवनिर्मितं देशं ब्रह्मावर्तं प्रचक्षते ॥

अर्थ – सरस्वती व दृषद्वती या दोन देवनद्या असून, त्या दोहोंच्या मधला प्रदेश देवनिर्मित आहे. त्याला ब्रह्मावर्त असे म्हणतात.

दृषद्वती नदी म्हणजे नेमकी कोणती नदी याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. सरस्वती नदीला समांतर वाहणारी चित्रांग नदी हीच दृषद्वती होय, असे एक मत आहे, तर अंबाला व सिंध या मधून वाहणारी घागर नदी म्हणजेच दृषद्वती होय व ती आता लुप्त झाली आहे, असे एल्फिन्स्टन व टॉड यांचे मत आहे. या उलट थानेश्वरच्या आग्नेय दिशेने वाहणारी राक्षी नदी म्हणजेच दृषद्वती होय, असे कनिंगहॅमने म्हटले आहे. [ हि. ध.; वै. सा.; ऋ. द.; पु. इं.; म. ज्ञा. को. ]

**दृष्ट** वैदिक साहित्यातला एक वर्ग. पाणिनीने याचा उल्लेख केला आहे ( अष्टा. ४.२.२७ ). या शब्दाचा अर्थ देताना पाणिनी म्हणतो, की जे साहित्य ऋषींनी प्रत्यक्ष पाहिले. ते दृष्ट होय. सामवेदाची गानसूक्ते दृष्ट साहित्याच्या वर्गात पडतात. उदा० कालेयसाम व वामदेवसाम. ऋग्वेदसंहितेची गणना दृष्ट साहित्यातच केली पाहिजे, कारण ऋग्वेदातले मंत्र त्या त्या ऋषींनी दृष्ट आहेत, असे म्हटले आहे.

**दृष्टबाधा** एखाद्या मनुष्याची दृष्टी पापी आणि विकार उत्पन्न करणारी असते, अशी समजूत आहे. अशी दृष्टी एखाद्या व्यक्तीवर अथवा वस्तूवर पडल्यास त्या व्यक्तीला अथवा त्या वस्तूला ती बाधते, असे म्हणतात. लहान मुले, पाळीव जनावरे व मौल्यवान् वस्तू यांना पापी नजर हटकून बाधते, अशीही सार्वत्रिक समजूत आहे. अथर्ववेदात 'घोरं चक्षुः' = दुष्ट किंवा भय उत्पन्न करणारी दृष्टी, असा उल्लेख आहे. अशा प्रकारची दुष्ट दृष्टी बाधू नये म्हणून म्हणायचे काही मंत्रही अथर्ववेदात दिले आहेत. त्यांपैकी एक मंत्र असा–

शप्तारमेतु शपथो यः सुहार्त्तेन नः सह ।
चक्षुर्मन्त्रस्य दुर्हार्दः पृष्टीरपि शृणीमसि ॥
(अथर्व. २.७.५)

अर्थ– शाप देणाऱ्याकडेच त्याचा शाप परत जावो. जो सौहार्दाने युक्त आहे, त्याच्याशी आमची मैत्री होवो. जे नजरेने वाईट खुणा करतात व जे आपसात मांडणे निर्माण करतात, त्यांच्या बरगड्यासुद्धा आम्ही मोडून टाकतो.

दृष्टबाधेवर उपाय म्हणून जंगिड वनस्पतीचा उपयोग करावा, असे अथर्ववेदात सांगितले आहे. या जंगिड वनस्पतीवर दोन स्वतंत्र सूक्तेच आहेत (अथर्व. १९.३४–३५). वाईट दृष्टी असणे, हा व्यक्तीचा दोषच मानला जातो. लग्नाच्या वेळी पती हा पत्नीला विनंती करीत असतो, की 'तू अघोर–चक्षू (शुभ व सौम्य दृष्टीची ) हो' (ऋ. १०.८५.४४).

**दृष्टीचे प्रकार व उपाय –** मूल एकाएकी आकांत करून रडू लागले व ते कोणत्याही उपायांनी थांबेनासे झाले, गाय वा म्हैस दूध देईनाशी झाली किंवा तिच्या कासेतले दूध आटले किंवा बिघडले, एखाद्या वस्तूला तडा गेला, झाडावरची फळे एकाएकी गळून पडली किंवा कुजली, माणसाची अन्नावरची वासना उडाली, की दृष्टबाधा झाली असे समजतात. एखाद्या स्त्रीचे डोहाळे पुरवले गेले नाहीत, तर तिच्या मुलाची दृष्ट लागते, अशी समजूत आहे. मनुष्य रस्त्यावरून घरी आला, तर त्याच्याबरोबर चव्हाट्यावरचे भूतही अदृश्यरूपाने येते आणि ते घरातल्या मुलांना दृष्टबाधा करते, असे समजतात. त्याला प्रतिबंधक उपाय म्हणून बाहेरून येणारा मनुष्य अंगणात पाय धुवून मग घरात प्रवेश करतो. दुष्ट दृष्टीला काळा रंग आवडत नाही, म्हणून तिच्या प्रतिबंधासाठी मुलाला, नवरदेवाला व नवऱ्यामुलीला काजळ-तीट करतात. मूल सुंदर असेल, तर दृष्टबाधा होऊ नये म्हणून त्याला खराब कपडे घालतात किंवा मुलीचा पोशाख मुलाला व मुलाचा पोशाख मुलीला घालतात. मोठी माणसे दृष्ट लागू नये, म्हणून गळ्यात व दंडात गंडा बांधतात. त्याचसाठी लहान मुलाच्या गळ्यात वाघनख बांधतात. लहान मुलाला बाहेरून घरात आणताना त्याच्यावरून पाणी व भाकरीचा तुकडा ओवाळून टाकतात. शेतावर नेल्या जाणाऱ्या न्याहारीला दृष्ट लागू नये म्हणून तिच्या टोपलीत एक तांबडा पैसा किंवा कोळशाचा तुकडा टाकतात. फळझाडांना दृष्ट लागू नये म्हणून त्यांना खापर, केरसुणी किंवा जुनी वहाण बांधून ठेवतात. नव्या घराला दृष्ट लागू नये, म्हणून त्याच्या पुढच्या चौकटीला काळी बाहुली उलटी टांगून ठेवतात. पुष्ट जनावराला दृष्ट लागू नये म्हणून त्याच्या पायात गंडा बांधतात. पैलवान लोक आपल्या डौलदार शरीराला दृष्ट लागू नये, म्हणून पायात काळा दोरा बांधतात. हे सर्व दृष्टिप्रतिबंधक उपाय होत.

दृष्ट लागल्यानंतर ती दूर करण्याचे उपाय पुढीलप्रमाणे–

(१) दृष्टबाधा झालेल्या माणसाच्या मुखावरून मीठ, मिरची व मोहऱ्या ओवाळून विस्तवात टाकतात.

(२) तुरटी ओवाळून विस्तवात टाकतात व तिची लाही दृष्ट लागलेल्या इसमाला डाव्या पायाच्या अंगठ्याने चुरडायला लावतात. लाहीचा चुरा झाला की दृष्टबाधा नष्ट होते.

(३) चुलीतली राख मुखाभोवती ओवाळून चारी दिशांना फुंकतात.

(४) लहान मुलाला दृष्ट लागल्यास पुढील मंत्र भूर्जपत्रावर लिहून, त्या भूर्जपत्राची घडी बालकाच्या दंडात बांधतात–

**रक्ष रक्ष महादेव नीलग्रीव जटाधर ।**
**ग्रहैस्तु सहितो रक्ष मुञ्च मुञ्च कुमारकम् ।।**

अर्थ– हे नीलकंठ जटाधर अशा महादेवा, रक्षण कर, रक्षण कर. ग्रहांनी युक्त होऊन रक्षण कर. कुमाराला सोडसोड.

(५) 'ओम् लुलुवस्वाहा' या मंत्राचे यंत्र बनवून ते मुलाच्या दंडात बांधतात.

(६) रामरक्षा, शिवकवच, इ. काही स्तोत्रांनी भस्म मंत्रून ते मुलाच्या अंगाला लावतात.

दृष्टबाधा झालेल्या व्यक्तीचे डोळे लाल होतात व तोंड सुकते. अशा वेळी सात घरची कुहीट ( नासके–कुजके पदार्थ) आणून ती वृद्ध स्त्रीकडून उतरून टाकल्याने दृष्टबाधा नाहीशी होते, असा उल्लेख लीळाचरित्रात ( पू. १४५) आहे.

सामान्य मानवाप्रमाणे शिशुरूप श्रीकृष्णालाही एकदा दृष्ट लागली होती व यशोदेने तिच्यावर उतारा केला होता, अशी कथा भागवतात आहे ( १०.७ ). श्रीकृष्णाला झालेल्या दृष्टबाधेवर गंगू हैबती या शाहिराने मराठीत एक पद लिहिले आहे, ते पुढीलप्रमाणे–

**रडताना हृषिकेशी बाई माझा राहिना ।**
**कडे उचलुनि सये घेतां स्तन तोंडीं घेइना ।। धृ० ।।**
**खरी झाली दृष्ट माझ्या श्रीहरीला वाटतें ।**
**डचडचकुन लेकरूं गे तीन तिनदा ऊठतें ।।**
**भय भारी जिरेल कैसें रडें म्हणुनि दाटतें ।**
**धीर देतां जीवाला ग मन शांत होइना ।। १ ।।**
**नको नेऊं हरी राधे, दूध–भात भरवुं दे ।**
**कानफाटचाहातीं सांजे अंगारा करवुं दे ।।**
**गाई–तुळशी–देवापाशी आण तान्हा फिरवुं दे ।**
**नवसाचा अजुन बाई मज ठीका येईना ।। २ ।।**

याशिवाय श्रीकृष्णाच्या दृष्टबाधेवर मराठीत अनेक स्त्रियांनीही वात्सल्यपूर्ण गीते रचलेली आहेत. [ वे. इं; ध. सिं.; लो. दं.; पाँ. रि. फो. नाँ. इं. ]

## दृष्टसहस्रचंद्रशांती

एक हजार पूर्णचंद्र ज्याने पाहिले अशा मनुष्याला पुढील आयुष्यात निरामय सुख मिळावे, यासाठी ही शांती करतात. ८० वर्षे आणि आठ महिने झाले म्हणजे हजार पौर्णिमा होतात आणि एक हजार

चंद्र पाहिले असे होते (वैखा. गृ. सू. ३.२१). अशा मनुष्याला पुण्यवान म्हटले असून, त्याचे शरीर ब्रह्मशरीर होते, असेही सांगितले आहे. या शांतीचा विधी असा—

यजमानाने संकल्पपूर्वक पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध व अग्निमुख करावे. प्रधान होमाच्या वेळी सर्व नक्षत्रे आणि त्यांच्या देवता यांच्यासाठी आज्याहुती द्याव्या. नंतर ऋत्विजांनी यजमानाच्या मस्तकावर अक्षता टाकाव्या. त्या टाकताना 'कपिल-इव' = तू कपिल मुनीसारखा आहेस, असे म्हणावे. यजमानाने नक्षत्रदेवतांना वलिदान करावे. एक हजार ब्राह्मणांना भोजन घालावे. सायंकाळी ग्रामप्रदक्षिणा करावी. मग एका स्थंडिलावर पिठाने चंद्राच्या एक हजार आकृती काढून कमलपत्रांनी त्या आकृतींची पूजा करावी. चंद्रप्रतिमांच्या दक्षिणेस रोहिणीच्या पाच तारकांचे आवाहन करावे. उत्तरेस अनावृष्टी गणाचे आवाहन करावे. या गणात अतिवृष्टी, अनावृष्टी, टोळधाड, उंदीरधाड, पोपटधाड व शेजारचे राजे या सहा गोष्टी येतात. ही पूजा झाल्यावर शक्यतेनुसार वस्त्र, रुपे, मोती व सोने यांचे दान करावे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**दृहळच्युत** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या नवव्या मंडलातील २५ व्या सूक्ताचा हा द्रष्टा आहे. दृहळच्युत अगस्त्यकुलातला आहे. याने आपल्या सूक्तात सोमप्रशस्ती गायिली आहे. त्यातली एक ऋचा अशी—

अरुशो जनयन् गिरः सोमः पवत आयुषक् ।
इन्द्रं गच्छन् कविक्रतुः ।।

अर्थ – तेजस्वी आणि काव्यस्फूर्ती देणारा सोम, मानवांचे हित करण्यासाठी इंद्राकडे जाणारा हा अत्यंत प्रतिभावान सोम पाहा कसा वाहत आहे.

सोमरस म्हणजे बुद्धिचातुर्याचे एक साधन आहे, असा या ऋषीचा आशय दिसतो. [ म. ज्ञा. को. ]

**देज** (सं. देय.) लग्नाच्या खर्चासाठी किंवा मुलीची किंमत म्हणून मुलाचा बाप मुलीच्या बापाला जी रक्कम देतो, तिला देज म्हणतात. गाय, बैल, धान्य, मध, इ. वस्तूंच्या स्वरूपातही देज दिले जाते. समाजाच्या खालच्या वर्गात देजाची प्रथा आहे. याउलट वरिष्ठ व धनिक वर्गात वधूपित्याने वराच्या बापाला द्रव्य देण्याची रूढी आहे. त्या द्रव्याला हुंडा म्हणतात.

**देढराज** (१७७१ – १८५२ इ. स.) एक हिंदी संत. हा जातीने ब्राह्मण होता. नारनौल जिल्ह्यातील धारसू या गावी याचा जन्म झाला. देढराज वयाच्या तेराव्या-चौदाव्या वर्षी आपल्या दारिद्र्याला कंटाळून आग्रा येथे गेला व तिथे शिंद्यांचा दिवाण धर्मदास याच्या घरी नोकरी पत्करून राहिला. या नोकरीच्या काळातच त्याला अनेक हिंदू व मुसलमान साधकांचा सहवास लाभला. त्यामुळे त्याने जातीपातीचे बंधन तोडले व एका वैश्याच्या मुलीशी लग्न केले. लग्नानंतर त्याने नंगी पंथ नावाचा एक पंथ सुरू केला व तो त्या पंथाचा प्रचार करू लागला. पण ही गोष्ट जाजहाराच्या नवाबाला आवडली नाही. त्याने देढराजाला कैदेत टाकले. कैदेत असताना त्याला फार हाल सोसावे लागले. पुढे जाजहारमध्ये काही अनर्थ निर्माण झाल्यामुळे सर्व कैद्यांबरोबर देढराजाचीही सुटका झाली. तिथून सुटल्यावर तो खेत्रीमधील छुरीना गावी जाऊन तिथे स्थायिक झाला. तिथे आपल्या पंथाचा प्रचार करीत त्याने सर्व आयुष्य घालवले व वयाच्या ८१ व्या वर्षी देह ठेवला.

नंगी पंथात प्रार्थनेच्या वेळी स्त्रियांनी पडदा पाळला नाही तरी चालतो. त्यावरूनच या पंथाला नंगी पंथ असे म्हणू लागले. गुरगाव जिल्ह्यातील भिवानी हे या पंथाचे मुख्य ठिकाण आहे. जाजहर, नारनौल व गुरगाव इथे या पंथाचे अनुयायी आहेत.

परमेश्वर एकच असून तो निराकार, नित्य, अनुपम आणि सर्वसाक्षी आहे, असे या पंथाचे मत आहे. या पंथाचे अनुयायी राम आणि हरी या दोन नावांनीच परमेश्वराला संबोधतात. यांना मूर्तिपूजा, जातिभेद व ग्रंथप्रामाण्य या गोष्टी मान्य नाहीत. ते साधनेच्या क्षेत्रात स्त्री–पुरुषांचा सारखा अधिकार मानतात. हिंदू आणि इस्लामी अशा दोन्ही पद्धतींनी त्यांची साधना चालते. त्यांनी रामायण व महाभारत यांतील अनेक नीतिवचने पंथातील साधकांच्या उपयोगासाठी एकत्रित केली आहेत. परंतु त्या वचनसंग्रहाला ते आपला धर्मग्रंथ मानीत नाहीत. ईश्वर हा सर्वांचा पिता असल्यामुळे ते सर्व स्त्री-पुरुषांत बंधुभगिनींचे नाते मानतात. [ मे. मि. इं. ]

**देव** (१) दिव्य देह धारण करणारा एक वर्ग. या शब्दाची व्याख्या यास्काने दिली आहे, ती अशी— 'देवः दानात् वा दीपनात् वा द्योतनात् वा । द्युस्थानो भवति इति वा । यो देवः सा देवता' = दान देणे, चकाकणे, प्रकाश देणे, अशा अर्थाच्या दा, दीप् किंवा द्युत् या धातूपासून देव शब्द बनला आहे. द्युलोकात राहतात म्हणून देव. जो देव तीच देवता होय (निरुक्त ७.१५). अग्निमीळे...' या ऋचेवरचे भाष्य लिहिताना सायणानेही देव शब्दाची व्याख्या सामान्यतः वरीलप्रमाणेच केली आहे— 'देवशब्दो दानदीपनद्योतनानामन्यतममर्थमाचष्टे' = देव हा शब्द दान, चमकणे किंवा प्रकाश देणे यांपैकी कोणतातरी अर्थ सांगतो. पाहा – देवता.

(२) (१६७३–१७६७ इ. स.) एक हिंदी महाकवी. याला देवदत्त असेही म्हणतात. हा रीतिकालातील एक प्रख्यात कवी समजला जातो. याला कोणी सनाढ्य ब्राह्मण, तर कोणी कान्यकुब्ज ब्राह्मण मानतात.

देव कवीचे आजचे वंशज आपल्याला दुबे म्हणवून घेतात. ते उ. प्रदेशातील इटावा शहरापासून तीस मैलांवर असलेल्या कुसरा गावी राहतात. हे कुसरा गावं मैनपुरी जिल्ह्यात आहे. इथेच देव कवीच्या वास्तूचे भग्नावशेष, त्याच्या पूजेतील शिवाची प्रतिमा आणि एक जुनाट लिंबाचे झाड दाखवितात. सांप्रत प्रस्तुत ठिकाणी त्याचे स्मारकही उभारले जात आहे.

देवाला कोणी कायमचा आश्रयदाता मिळाला नाही. त्यामुळे आयुष्यभर त्याला निरनिराळ्या आश्रयदात्यांच्या पदरी राहावे लागले. वयाच्या सोळाव्या वर्षीच त्याने अष्टयाम व भावविलास या दोन ग्रंथांची रचना केली. त्याने औरंगजेबाचा तिसरा मुलगा आजमशहा याला हे दोन्ही ग्रंथ वाचून दाखवले. आजमशहा त्या ग्रंथांवर बेहद्द खूष झाला आणि त्याने देवकवीला आपल्या पदरी आश्रय दिला. आजमशहा मरण पावल्यावर पुढे भवानीदत्त, कुशलसिंह, भोगीलाल, उद्योतसिंह व अकबर अलीखाँ यांच्या पदरी असताना याने भवानीविलास, कुशलविलास, रसविलास, प्रेमचंद्रिका, सुखसागरतरंग, इ. ग्रंथांची रचना केली. भोगीलालाच्या आश्रयाला असताना देवकवीची वृत्ती वैराग्याकडे झुकली व त्याने नीतिशतक व वैराग्यशतक या ग्रंथांची रचना केली, असे म्हणतात. उद्योतसिंहाच्या पदरी असताना याने प्रेमचंद्रिका या ग्रंथाशिवाय सुजानविनोद हा ग्रंथ रचला व काव्यरसायन अथवा देवमायाप्रपंच नावाचे एक नाटकही लिहिले.

देव कवीच्या एकूण ग्रंथसंख्येबाबत बरेच मतभेद आहेत. शिवसिंहाने याच्या ग्रंथांची संख्या ७२ सांगितली असून, नावे मात्र अकराच ग्रंथांची दिली आहेत. मिश्रबंधू बहात्तर अथवा बावन्न अशी ग्रंथसंख्या देऊन त्याच्या चौवीस ग्रंथांची सूची देतात. त्या सूचीत पंधरा ग्रंथ उपलब्ध व नऊ ग्रंथ अनुपलब्ध असल्याचे म्हटले आहे. लक्ष्मीधराने साऱ्या देवसाहित्याचे आलोडन करून देव कवीचे म्हणून तेरा ग्रंथ निश्चित केले आहेत.

देवकवी हा शृंगाररसाचा भोक्ता होता. त्याच्या लक्षण ग्रंथांतून शृंगाररसाचे व नायिकाभेदाचे विस्तृत विवरण आले आहे. सुखसागरतरंग हा ग्रंथ तर केवळ शृंगाररसालाच वाहिलेला आहे. काहींच्या मते हा ग्रंथ म्हणजे नायिकाभेदांचा विश्वकोशच आहे.

रसविलासाबरोबरच कवीने बऱ्याच ठिकाणी भक्तीचेही महिमान गायिले आहे. भक्तीच्या व अनुरागाच्या अधिष्ठानावर कवी कृष्णलीलांचे वर्णन मोठ्या भावमय शब्दांत करतो. वैराग्याला कारणीभूत होणाऱ्या आध्यात्मिक तत्त्वबोधाचेही विवरण त्याच्या शतकग्रंथात आढळते.

देवाच्या काव्याचा एक नमुना असा –

झहरि झहरि झीनी बूँद है परति मानों,
घहरि घहरि घटा घेरी है गगन में।
आनि कह्यो स्याम मो सौं ‘ चलौ झूलिबे को आज '
फूली ना समानी भई ऐसी हौं मगन मैं ॥
चाहत उठ्योई उठि गई सो निगोड़ी नींद,
सोय गए भाग मेरे जागि वा जगन में।
आँख खोलि देखौं तो न घन है, न घनस्याम,
वेई छाई बूँदें मेरे आँसु ह्वै दृगन में ॥

अर्थ– सर सर पाऊस पडत होता. आकाश भरून आले होते. मेघ गडगडत होते. अशा वेळी श्याम मला म्हणाला ‘आज झोके घ्यायला जाऊ. ’ मग माझा आनंद गगनात मावेनासा झाला. उठायला पाहिजे म्हणून उठले. पण काय ही निर्लज्ज झोप! मी जागी झाले; पण माझे भाग्य मात्र झोपलेले होते. डोळे उघडून पाहिले, तर ढगही नाहीत आणि घनश्यामही नाही. माझे डोळे मात्र पाण्याने भरून आले.

रीतिकालीन कवींत देवकवीचे स्थान बरेच वरचे आहे, कारण रीतिकालाचे सारे विशेष त्याच्या काव्यात एकत्रित झालेले दिसून येतात. त्याने जीवनाचे समग्र स्वरूपही प्रेमाच्या उदात्त पायावर उभे केले आहे. [ हिं. सा. को.२; हिं. सा. इ.; देव-दर्शन – श्री. हरदयालुसिंह, १९४६ ]

**देवक** एक देवकल्पना. अनेक अनार्य जाती–जमाती आणि द्रविड वंशातील काही लोक यांच्यांत पशुपक्षी, वृक्षवनस्पती व वस्तू यांची नावे आपल्या कुळांना देण्याची चाल आहे. ज्या प्राण्याचे किंवा वस्तूचे नाव कुळाला मिळाले असेल, तो प्राणी किंवा ती वस्तू त्या कुळाचे देवक मानले जाते. देवकाशी कुळाचा रक्तसंबंध किंवा काही गूढ ऋणानुबंध असावा, अशी कल्पना आहे. प्रत्येक कुळाला आपल्या देवकाविषयी आदर व भक्ती असते. ज्या प्राण्याला कुळाने देवक मानले असेल, त्याचे मांस त्या कुळातील माणसे खात नाहीत. एवढेच नव्हे; तर त्याला आपल्या उपयोगासाठी राबवूनही घेत नाहीत. तसेच देवक मानलेल्या वृक्षाची पाने, फळे, फुले व लाकूड यांचा उपयोग करीत नाहीत किंवा त्या वृक्षाच्या सावलीतही बसत नाहीत. देवक मानलेला प्राणी मरण पावला, की त्याचे सुतक पाळतात. त्याचे कातडे विशेष समारंभात अंगावर घेतात. काही लोक अशा प्राण्याची चित्रे अंगावर गोंदवून घेतात किंवा सर्व देह

त्याच्यासारखा रंगवतात. पुष्कळदा देवक हे कुलचिन्ह मानलेले असते. निरनिराळ्या वर्गांतील देवके पुढीलप्रमाणे —

(१) प्राणिदेवके — घोडा, गरुड, रेडा, नाग, हत्ती, वानर, पिवळा, डुक्कर, कासव, मोर, लांडगा, बकरा, सांबर, इत्यादी.

(२) वनस्पतिदेवके — आंबा, चिंच, बेल, निंब, बाभूळ, बोर, कदंब, शमी, वड, उंबर, इत्यादी.

(३) वस्तुदेवके — कुऱ्हाड, फुंकणी, सुरी, चिमटा, तलवार, तेलघाणा, मीठ, भात, लोखंड, इत्यादी.

खाद्य पदार्थांना देवक मानल्यावर ते पदार्थ खाता येत नाहीत. मग त्याचा पर्याय शोधून काढला जातो. भात हे ज्यांचे देवक असते, ते लोक भाताची पेज काढल्यावर तिच्यावर येणारी साय खात नाहीत. मीठ हे ज्यांचे देवक असते ते लोक नुसते मीठ खात नाहीत; तर ते इतर पदार्थांत मिसळून खातात. लोखंडाला देवक मानणारे लोक त्याला जिभेने स्पर्श करीत नाहीत.

उ. अमेरिका, ऑस्ट्रेलिया, मलेशिया, इ. देशांत देवकप्रथा विशेष प्रचलित आहे. भारतात ही कल्पना मुख्यत: द्रविड लोकांत व अनार्य जमातींत प्राचीन काळापासून आढळते. वेदांत अज, शिग्रु, मत्स्य, इ. जातिनामे आढळतात ती देवकनामेच असावी, असे काही पंडितांचे मत आहे. मात्र कौशिक, गौतम, मांडूकेय ही कुलनामेही तशीच आहेत, असा काही लोकांनी जो तर्क केला आहे, त्याला आधार मिळत नाही.

रामायणात ज्या वानरांचे वर्णन केलेले आहे, ते पशू नसून मानवच होते, वानर हे त्यांचे देवक होते, असे म्हणतात. आजही भारतात हनुमान व जांबवान यांना आपले पूर्वज मानणारे लोक आहेत. महाभारतात तर अशी असंख्य नावे आढळतात. उदा० उलूक, नाग, सुपर्ण (गरुड), काक, कर्कोटक, कुक्कुर, शृगाल, रासभ, मत्स्य, गोधा, महीषक, मूषक, प्रोष्ठ, नकुल, मातंग, रोमश, वृक, शरभ, शूकर, शकुन, बक, कोक, सुमल्लिका, हंस, तित्तिर, शशक, उरग, मिल्लिक, मशक, तालचर, शाल्व, कश्यप, दार्व, कीचक, इत्यादी. ही बहुधा देवकनामे असावी. इतर पुराणांतही अशा जातींचा व कुळांचा उल्लेख आहे.

अनेक आदिवासी जमातींत असंख्य कुलनामे किंवा गोत्रनामे निरनिराळ्या देवकांवरून घेतलेली आहेत. त्या देवकांचा धर्माशी फारसा संबंध नसून, त्यांचा उगम काही विशेष प्रसंगांत सापडतो. कुजुर वृक्षामुळे एका मनुष्याचे संरक्षण झाल्यामुळे त्याच्या कुळाला त्या वृक्षाचे नाव मिळाले. एका मुलावर नागाने फणा धरली म्हणून त्याच्या कुळाला नाग हे नाव प्राप्त झाले. कालांतराने या देवकांचा त्या लोकांच्या धार्मिक व सामाजिक जीवनावर प्रभाव पडू लागला. ज्या कुळांचे देवक समान असते, त्यांच्यांत लग्नसंबंध सगोत्रविवाहाप्रमाणेच वर्ज्य ठरले.

पुष्कळ लोक आपल्या देवकाची पूजा व उपासना करतात. उपनयन, गृहप्रवेश, विवाह, धान्याची मळणी अशा विशेष प्रसंगी देवकांची पुढीलप्रमाणे पूजा केली जाते — प्रथम घरातल्या देवाची पूजा करतात. मग एका थाळीत देवक ठेवून ते मारुतीच्या देवळात नेतात, तिथे त्याची पूजा करून मग ते घरी परत आणतात आणि मांडवाच्या खांबाला बांधतात किंवा देवापुढे ठेवतात. मंगलकार्य पूर्ण झाल्यानंतर हे देवक उठवतात.

भारतात पुष्कळ लोक पशू, वनस्पती किंवा काही वस्तू यांची पूजा करतात. मात्र ते त्यांचे देवक असतेच असे नाही. हिंदू लोक तुळस, वड, नाग, गाय, शस्त्रे यांची पूजा करतात; पण ती देवकपूजा नव्हे.

देवकाची कल्पना जगात सर्वत्र प्रचलित आहे, असे काही पंडित मानतात. केवळ आदिवासी लोकच नव्हेत; तर सेमेटिक आर्य, इजिप्शियन हे लोकही देवके मानीत होते, असे त्यांचे मत आहे. मोहेंजोदडो येथील प्राचीन अवशेषांतही देवकपूजेची लक्षणे काही शास्त्रज्ञांना आढळली आहेत. [ रे. क. इं.; एन्सा. रि. ए.; मॅ. ट्रा. का.; लौ. दं.; भा. जा. मे.; टॉ. टॅ. ]

## देवक बसवणे

विवाह, उपनयन, इ. संस्कारांच्या आरंभी, हे संस्कार निर्विघ्नपणे पूर्ण व्हावे या उद्देशाने, मंडपदेवता व अविघ्न गणपती यांची प्रतिष्ठा करण्याची पद्धत आहे; यालाच देवक बसविणे असे म्हणतात. त्यासाठी दूर्वा, शमी वगैरे वृक्षांची पाने घेऊन ती एका आंब्याच्या पानात गुंडाळतात आणि त्यावर कच्च्या सुताचे वेढे देतात. अशा सहा गुंडाळ्या करतात. त्यांतील पांचवी गुंडाळी ही मुसळाचे प्रतीक असते. त्या गुंडाळीत एक समिध बांधतात. एका गुंडाळीत शस्त्राचे प्रतीक म्हणून एक दर्भ घालतात. या सर्वांना शाखा म्हणतात. नंतर एक कोरे सूप घेऊन त्यात एका बाजूला चार साध्या शाखा, त्यांच्या उत्तरेला मुसलगर्भा (समिध घातलेली) शाखा आणि तिच्या उत्तरेला शस्त्रगर्भा (दर्भ घातलेली) शाखा ठेवतात. मग पांढरा रंग दिलेले एक मातीचे गाडगे घेऊन त्यात अक्षता, हळकुंड व सुपाऱ्या हे पदार्थ घालून, वर एक मातीचे झाकण पालथे ठेवतात व त्याला सूत गुंडाळतात. मग ते पात्र ही सुपात ठेवतात. त्याला अविघ्नकलश म्हणतात. त्याच्या शेजारी कुलदेवतेचे प्रतीक म्हणून सूत गुंडाळलेले श्रीफल ठेवतात. वरील सहा शाखांच्या ठायी दक्षिणेकडून उत्तरेकडे अनुक्रमे नंदिनी, नलिनी, मैत्रा, उमा, पशुवर्धिनी व शस्त्रगर्भा भगवती या देवतांचे आणि कलशाच्या ठायी अविघ्न गणपतीचे आवाहन करून त्यांची पूजा करतात. त्यानंतर पहिल्या पाच

देवतांची मंडपाच्या चार कोपऱ्यांतील व मध्यातील खांबांवर स्थापना करून तिथे त्यांची पूजा करतात. त्यानंतर यजमान सुपातला अविघ्न कलश उचलून तो आपल्या पत्नीच्या हाती देतो व देवतांचे सूप स्वतःच्या हाती घेतो. मग ती यजमान दंपती घराच्या ईशान्य कोपऱ्यात स्वच्छ व सुशोभित जागी किंवा घरातल्या देवाजवळ तांदुळाच्या तीन राशींवर ते सूप व कलश यांची स्थापना करतात. या सर्व विधानाच्या वेळी निरनिराळे मंत्र म्हणायचे असतात. या विधानाचे नाव मंडप-देवताप्रतिष्ठा असे आहे.

एवढे झाल्यानंतर यजमानाचे आप्त व मित्र यजमानदंपतीला वस्त्रादिकांचा अहेर करतात. मराठे व इतर काही जातीचे लोक हा विधी लग्नापूर्वी दोन दिवस करतात. दोन्ही पक्षांकडील यजमान आपले कुलदैवत (देवक) असलेल्या वृक्षाजवळ जाऊन त्याची पूजा करतात. मग त्याची लहानशी फांदी तोडून व ती एका कोऱ्या सुपात ठेवून घरी आणतात. मग ते सूप देवघरात नेऊन त्यात घरच्या देवांच्या सुपाऱ्या मांडतात आणि त्या सर्वांची पूजा करतात. त्याच वेळी परटीण येऊन पाटघाची पूजा करते. लग्नाच्या दिवशी वराला त्या पाटघावर बसवतात व त्याच्या कपाळी कुंकू लावून त्यावर अक्षता चिकटवतात. यालाच शेस धरणे, असे म्हणतात.

मंगल कार्य पूर्ण झाल्यानंतर हे देवक उठवतात. यजमान आपल्या पत्नीसह मंत्र म्हणून त्या देवतांचे विसर्जन करतो. नंतर तो मांडवाच्या खांबांना बांधलेल्या व सुपात ठेवलेल्या त्या सूत्रवेष्टित शाखांना तैलाभ्यंग करून उष्णोदकाने स्नान घालतो आणि त्या उलगडतो. मग स्वस्तिवाचन करून व ती पाने सुपात ठेवून ब्राह्मण त्यावर पाणी शिंपडतात आणि त्याच पाण्याने यजमानदंपतीला अभिषेक करतात. देवता तयार करताना वापरलेले सूत एका सुपारीला गुंडाळून ती सुपारी यजमानाच्या हाती देतात. 'दर सहा महिन्यांनी माझ्या घरी असेच शुभ कार्य होवो' अशी आकांक्षा यजमान व्यक्त करतो व ब्राह्मण त्याला तसा आशीर्वाद देतात. शेवटी देवकाचे सूप वाजवतात व कार्याचा मांडव काढतात. [ ल. वि. सो. ]

**देवकली** एक प्राचीन नगर. हे स्थान ईशान्य लोहमार्गाच्या कासगंज-लखनऊ फाट्यावर लखीमपुरखेरी स्टेशनापासून नऊ मैलांवर आहे. इथे एक मोठे सरोवर असून, सरोवराच्या काठी एक शिवमंदिर आहे. दर अमावास्येला या ठिकाणी मोठी यात्रा भरते.

जनमेजयाचे सर्पसत्र इथे झाले, अशी तिथल्या लोकांची समजूत आहे. शिवमंदिराच्या उत्तरेला एक लहानसे सरोवर असून ते या सर्पसत्राचे कुंड म्हणून दाखवतात. इथे थोडे खणल्यावर अजूनही जळलेले धान्य मिळते. हे धान्य म्हणजे यज्ञात दिलेल्या विविध प्रकारच्या आहुती होत असे सांगतात. नागपंचमीच्या दिवशी इथली थोडी माती आणून घरात सर्वत्र टाकल्यास वर्षभर त्या घरी साप निघत नाहीत, अशी तिथल्या लोकांची श्रद्धा आहे. [ कल्याण– तीर्थांक ]

**देवकार्य** वर्षातील एका ठरलेल्या दिवशी कुलदेवतेच्या नावाने महानैवेद्य करणे व ब्राह्मण-सवाण जेवायला वाढणे, याला देवकार्य असे म्हणतात. काही कुटुंबांत लग्नमुंजीच्या आधी असे देवकार्य करण्याची वहिवाट आहे.

**देवकुंड** एक तीर्थ. हे स्थान गया जिल्ह्यातील पाटणा–गया लोहमार्गावर गयेपासून सत्तावीस मैलांवर आहे. इथे च्यवन ऋषीचा आश्रम होता, असे म्हणतात. इथे देवकुंड नावाचे सरोवर आहे. त्यासंबंधी एक कथा आहे, जी अशी –

च्यवन ऋषी तपश्चर्या करीत असता त्याच्या अंगावर एक वारूळ तयार झाले. शर्याती राजाची सुकन्या नामक मुलगी फिरत फिरत तिथे गेली आणि तिने वारुळात काटे खुपसले. त्या काट्यांमुळे च्यवनाचे डोळे फुटले. तेव्हा त्याने संतापून राजाला शाप दिला. मग राजा च्यवनाला शरण गेला आणि त्याने आपली मुलगी त्याला अर्पण केली. त्या वेळी च्यवन ऋषी वृद्ध झाला होता. पुढे काही दिवसांनी अश्विनीकुमार तिथे आले. त्यांनी च्यवनाला देवकुंडात स्नान घालून त्याचे वार्धक्य नष्ट केले व त्याची दृष्टीही त्याला परत दिली. इथे च्यवनेश्वर शिव–मंदिर आहे. [ कल्याण–तीर्थांक ]

**देवकुल** विशिष्ट मूर्तिसमूहाला ही संज्ञा आहे. राजाचा मृत्यू झाल्यावर त्याची मूर्ती बनवून ती स्थापित करण्याची प्रथा प्राचीन भारतात होती. एका राजवंशातील मृत राजांच्या मूर्ती एकाच ठिकाणी बसवीत व त्या स्थानाला देवकुल म्हणत. भासाचे प्रतिमा नाटक या प्रथेवरच आधारित आहे. पाटलिपुत्र नगरात अशी अनेक देवकुले होती, असे म्हटले आहे. तिथे ज्या शिशुनाग राजवंशाच्या मूर्ती आढळून आल्या आहेत, त्याही कोणत्यातरी देवकुलाच्या अंशभूतच आहेत. सह्याद्रीच्या नाणेघाटात प्रारंभीच्या सातवाहन राजांचे असेच एक देवकुल होते. तिथे ज्या मूर्ती सापडल्या आहेत, त्यांचे पाय तेवढे शिल्लक आहेत. त्यांवर खोदलेल्या नावांवरून ती मूर्तिशिल्पे देवकुलाची असल्याचे कळून येते. [ भा. इ. रू. ]

**देवकृच्छ्र** एक व्रत व प्रायश्चित. यात यवांची कांजी, सातूचे पीठ, भाजी, दूध, दही व तूप यांपैकी एकेक पदार्थ तीन दिवस क्रमाने खाऊन राहायचे आणि शेवटी तीन दिवस वायुभक्षण करायचे असते. मरुत, वसू, रुद्र, आदित्य यांनी हे व्रत केले होते. त्याच्या प्रभावाने ते निर्दोष झाले, असे सांगितले आहे. फल – पापनाश. [ हि. ध. ]

**देवगंधार** एक राग. याची जाती संपूर्ण आहे. यात धैवत व निषाद हे स्वर कोमल लागतात. गंधार शुद्ध व कोमल असा उभयविध लागतो. वादी– धैवत. संवादी– गंधार. आरोह– सा रे म प ध ध म प ध नी सा. अवरोह– सा नी ध प म प म ग रे सा रे नी सा रे ग म प म ग रे सा, पकडस्वर– सा रे ग म म म प ध म प म ग रे सा. गानसमय– दिवसाचा दुसरा प्रहर. हा राग आसावरी अंगाचा आहे. यात दोन्ही प्रकारचे गंधार लावून याला आसावरीपासून भिन्न दाखवतात. [श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**देवगढ** (१) एक शिवस्थान. हे बिहारमध्ये संताळ परगण्यातील देवगढ तालुक्याचे मुख्य ठिकाण आहे. येथील शिवाचे नाव वैद्यनाथ असल्यामुळे या स्थानाला वैद्यनाथधाम असेही म्हणतात. उत्तर भारतातील लोक परळी–वैजनाथाऐवजी या स्थानाला बारा ज्योतिर्लिंगांत गणतात.

हे स्थान अतिशय रम्य आहे. त्याच्या उत्तरेला दाताजंगल नामक एक वन आहे; वायव्येला नंदन पहाड आहे. पूर्वेला तिऊर किंवा त्रिकूट पर्वत आहे. नैर्ऋत्य, दक्षिण व आग्नेयी या दिशांना लहान लहान टेकड्या आहेत आणि गावाजवळूनच यमुनाजोर व धरुआ या दोन लहान नद्या वाहत आहेत.

या स्थानाच्या उत्पत्तीची कथा गोकर्ण महाबळेश्वराच्या कथेसारखीच आहे. ( गोकर्ण पाहा )

वैद्यनाथाचे मंदिर पूर्वाभिमुख असून, अत्यंत साध्या बांधणीचे आहे. त्याचे उतरत्या चौकोनांचे शिखर जमिनीपासून ७२ फूट उंच आहे. मंदिरासमोर एक तोरण आहे. शिवमंदिराला लागूनच गौरीचे स्वतंत्र मंदिर आहे. शिवमंदिराच्या पिछाडीला एक पडवी आहे, तिच्यामध्ये नवस फेडणारे लोक जागरण करतात. मुख्य मंदिराच्या परिसरात राम, सूर्य, सरस्वती, मनसा, हनुमान, काळभैरव व अन्नपूर्णा या देवतांची लहान लहान मंदिरे आहेत.

वैजू नावाचा द्रविड देशातला एक धनगर इथे शिवोपासना करीत होता. तो इथल्या पंड्यांच्या भ्रष्ट वर्तनाला विटून गे. त्याने त्यांच्या वर्तनाचा निषेध म्हणून एक दिवस शिवलिंगावर काठीने आघात केला. त्यामुळे लिंगाला चीर पडली. या वैजूच्या भक्तीमुळेच येथील शिवाला वैद्यनाथ अथवा



वैद्यनाथमंदिर – देवगढ

वैद्यनाथ असे नाव पडले, अशी कथा संताळ परगण्यात प्रचलित आहे. शिवमंदिराच्या प्रवेशद्वारावर एक आणि जवळच्या मंदर पर्वतावर एक असे दोन शिलालेख इथे आहेत. त्यांत अशी माहिती मिळते, की दक्षिण भारतातील चोळ राजा आदित्यसेन, त्याची पत्नी कोपदेवी आणि कोणी एक बलभद्र नामक पुरुष यांनी या ठिकाणी अनुक्रमे विष्णुमंदिर, पुष्करिणी आणि वराहमंदिर यांची निर्मिती केली.

देवगढ हे एक शक्तिपीठही मानले जाते. या ठिकाणी सतीचे हृदय गळून पडले, असे सांगतात. [ टें. ली. वि.; एन्सा. रि. ए. ]

(२) एक प्राचीन सांस्कृतिक केंद्र. हे स्थान मध्य प्रदेशातील ललितपूरच्या पश्चिमेला २३ मैलांवर वेत्रवती (बेतवा) नदीच्या काठी आहे. देवगढ हा एक किल्ला आहे. त्याच्यावरून पायथ्याजवळच्या गावालाही देवगढ असेच म्हणतात. हे स्थान सर्व बाजूंनी गर्द वनराजीने वेढलेले आहे. या स्थानाची प्राचीनता इसवी सनाच्याही मागे जाते. इथे प्रथम सहरियांचे राज्य होते. त्यानंतर हे गौडांच्या ताब्यात गेले आणि पुढे गुप्त साम्राज्यात समाविष्ट झाले. गुप्तांच्या काळात हे भागवत धर्माचे एक महनीय केंद्र बनले होते. गुप्तांच्या ऱ्हासानंतर त्याचे आधिपत्य क्रमाने भोज आणि चंदेल या घराण्यांकडे गेले. इ. स. च्या आठव्या शतकापासून बाराव्या शतकापर्यंत हे जैनांचे एक मोठे धार्मिक केंद्र बनले होते. याच काळात देवगढावर जैनांची अनेक सुंदर मंदिरे उभारली गेली.

देवगढ गाव आज अगदी लहान आणि उजाड आहे. परंतु त्याच्या प्राचीन वैभवाच्या शेकडो खुणा इतस्ततः पसरलेल्या दिसतात. गावापासून जवळच एका गोलाकार पर्वतावर देवगढ किल्ला आहे. वर जायला पश्चिमेकडून मार्ग आहे. या पर्वताला वेत्रवती नदीने तीन बाजूंनी वेढले आहे. दक्षिणेला

नदीचा प्रवाह पर्वताच्या पायथ्याजवळून वाहत आहे. या बाजूला डोंगर खोदून दोन घाट तयार केलेले आहेत. त्यांना



अहल्योद्धार– देवगढ

राजघाट आणि नाहरघाट अशी नावे आहेत. या घाटांच्या परिसरातच काही लेणी खोदलेली दिसतात. ही लेणी शिल्प-सौंदर्याने नटलेली असून त्यांत ऐतिहासिक महत्त्वाचे असे, काही शिलालेख आहेत.

देवगढाच्या नैर्ऋत्य उतारावर वेत्रवतीच्या काठी वराह-मंदिर आणि दशावतारमंदिर ही दोन प्राचीन वैष्णव मंदिरे आहेत. ही मंदिरे गुप्तकालीन आहेत. यांतील दशावतारमंदिर हा गुप्तकालीन शिल्पकलेचा एक सुंदर नमुना आहे. मंदिराची उभारणी गुप्तसम्राट गोविंद ( इ. स. ३८० – ४५० ) याने केली, असा शिलालेखीय पुरावा मंदिरातच उपलब्ध आहे. वास्तुशिल्प आणि मूर्तिशिल्प या उभय दृष्टींनी हे मंदिर अपूर्व आहे. राम आणि कृष्ण यांच्या चरित्रातील अनेक प्रसंगांचे शिल्पांकन प्रथम याच ठिकाणी झाले. भारतीय मूर्तिकलेच्या इतिहासात या मंदिराला एवढे महत्त्व प्राप्त झाले ते यामुळे. ही दृश्ये ५६ शिलापट्टांवर कोरलेली होती. त्यांपैकी अगदी थोडे शिलापट्ट सध्या अस्तित्वात आहेत. प्रवेशद्वारावरील ललाटबिंब ( चौकटीवरील भाग ) म्हणून विष्णूची बैठी मूर्ती कोरलेली आहे. त्यातील विष्णू शेषाच्या वेटोळ्यावर बसला आहे. मंदिराच्या बाहेरच्या भिंतींवर दक्षिण, उत्तर व पूर्व या दिशांना रथिकाबिंबे आहेत. उत्तरेच्या भिंतीवर गजेंद्रमोक्षाचे भावपूर्ण दृश्य शिल्पांकित केले आहे. पूर्वेच्या भिंतीवर बदरीवनात तपश्चर्या करणाऱ्या नर–नारायणांचे दृश्य आहे, तर दक्षिणेच्या भिंतीवर शेषशायी विष्णूची मूर्ती आहे. ही तीन्ही रथिकाबिंबे अत्यंत सजीव वाटतात. या मंदिरावरचे उत्तुंग शिखर कोसळलेले आहे; परंतु अशा भग्न अवस्थेतही हे मंदिर रसिकांच्या दृष्टीला मोहून टाकते.

पश्चिमेकडील मार्गाने डोंगर चढून गेल्यावर प्रथम किल्ल्याचे तोरणद्वार दिसते. या तोरणद्वारावरील कोरीव काम अत्यंत रेखीव आहे. तिथून पुढे गेल्यावर एकाच्या आत एक असे दोन जीर्ण कोट दिसतात. या कोटांच्या आत जैनांची एकतीस मंदिरे आहेत आणि त्या मंदिरांच्या परिसरात इतर अनेक लहान मंदिरांचे अवशेष व शेकडो मूर्ती पसरलेल्या आहेत.

या जैन मंदिरांच्या समूहात शांतिनाथाचे मंदिर (क्र. १२) सर्वांत मोठे आहे. इथे छत्तीस स्तंभांवर उभारलेल्या ४२ चौरस फुटांच्या प्रशस्त मंडपात १२ फूट उंचीची शांतिनाथमूर्ती खड्गासनस्थित आहे. याच मंदिरात इ. स. च्या ११ व्या शतकातील बाहुबलीची मूर्ती आहे. या मंदिराची तोरणद्वारे,



नंद-यशोदा– देवगढ

स्तंभ आणि छते यांवरील कोरीव काम अति नाजूक आहे. काही मंदिरांपुढे कोरीव मानस्तंभही आहेत. मंदिरात विरा

मान झालेल्या आणि मंदिराबाहेर इतस्ततः पडलेल्या मूर्तींचे सौंदर्यही प्रेक्षणीय आहे. या मूर्तिसंभारात तीर्थंकर, बाहुबली,



गजेंद्रमोक्ष — देवगढ

यक्ष-यक्षिणी, द्वारपाल, अर्जिका, श्रावक, श्राविका, इत्यादींच्या मूर्ती आढळतात. या मूर्तींची विपुलता, विविधता आणि सुंदरता मूर्तिविज्ञानाच्या अभ्यासकांना मोलाची वाटावी अशी आहे.



प्राचीन जैन मंदिर— देवगढ

या स्थानाकडे सांप्रत जैनांचे लक्ष वेधले असून, त्यांनी या मंदिरांच्या जीर्णोद्धाराचे कार्य सुरू केले आहे.

या ठिकाणी दोनशेच्या वर शिलालेख आहेत. या शिलालेखांवरून देवगढच्या शिल्पनिर्मितीचा इतिहास जसा समजू शकतो, तसाच देवनागरीच्या अक्षर वटिकेचा विकासही त्यांतून निश्चित करता येतो. इथे उपलब्ध झालेला प्रतिहार सम्राट भोज याचा शके ७८४ मधील लेख महत्त्वपूर्ण आहे. गुप्त कालापासून उत्तरेत लुप्त झालेल्या शालिवाहन शकाचा वापर पाचशे वर्षांनंतर प्रथम या लेखात आढळतो. [जैं. सि. भा. जून १९३७, डिसें. १९४१ व जून १९५५; डॉ. वासुदेवशरण अग्रवाल— सा. धर्मयुग, १६ जून १९५७]

**देवगाम** एक नगर. हे नगर बिहार प्रदेशातील औरंगाबादपासून आग्नेयीस सहा मैलांवर आहे. या गावात एक प्राचीन सूर्यमंदिर आहे. सूर्य पुराणात या मंदिरासंबंधी एक कथा आहे. ती अशी — आयेल या नावाचा एक राजा होता. त्याला एकदा महारोग जडला. देवगाम येथील ब्रह्मकुंडात स्नान केल्यावर तो रोगमुक्त झाला. मग त्याने तिथल्या सूर्यमंदिराचा जीर्णोद्धार केला. त्या दिवसापासून इथे चैत्र व कार्तिक महिन्यांत मोठी यात्रा भरू लागली. या यात्रेत सूर्याच्या रथाची मिरवणूक व ब्रह्मकुंडात स्नान, हे दोन प्रमुख कार्यक्रम असतात.

या देवालयाचे बांधकाम दगडी असून, भिंतीवर निरनिराळ्या मूर्ती व इतर देखावे खोदलेले आहेत. मंदिराचा घुमट कमळाकृती आहे. मंदिरात काही शिलालेखही आहेत. तेथील शिल्पकला बुद्धगया व पुरी येथील शिल्पकलेहून प्रगत असल्याचे सांगतात.

देवगाम ही देवराजांची राजधानी होती. हे विहारमधील प्राचीन राजघराणे होते. हे राजे स्वतःला उदेपूरच्या राण्यांचे वंशज समजत. [गया गॅझे.]

**देवगिरी** (१) एक प्राचीन नगर व दुर्ग. हे स्थान महाराष्ट्रातील औरंगाबाद जिल्ह्यात औरंगाबादपासून नऊ मैल अंतरावर आहे. इथला किल्ला ज्या डोंगरावर आहे, त्याचे नाव देवगिरी असे असल्यामुळे या नगरालाही देवगिरी असेच नाव पडले आहे.

देवगिरी दक्षिणेच्या प्रवेशद्वारीच उभा असल्यामुळे दक्षिणेच्या इतिहासात त्याला फार महत्त्व मिळाले होते. उत्तरेतून होणारी आक्रमणे रोखून धरण्याच्या दृष्टीने मोक्याच्या ठिकाणी हा किल्ला आहे. किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या नगराभोवती चार मैलांहून अधिक लांबीचा एक कोट होता, त्याला अंबरकोट असे नाव होते. या नगराचे यादवकालीन अवशेष सांप्रत उपलब्ध नाहीत. तुगलुकांच्या काळातील शाही हमामखाना

(राजस्नानगृह) आणि अन्य काही वास्तूंचे अवशेष मात्र शिल्लक आहेत.

डोंगरावरील किल्ल्याच्या प्रवेशमार्गावरील खालचा भाग तीन तटांनी बंदिस्त असल्यामुळे डोंगराखाली एक प्रकारे भुई-कोट किल्लाच उभा आहे, असे दिसते. या तटांच्या भिंती मजबूत असून, त्यांना प्रचंड बुरुजांचा आधार आहे. त्यांची प्रवेशद्वारे सरळ नसून वळणावळणांची आहेत. भिंती यादवकाळानंतर पुन:पुन्हा दुरुस्त झालेल्या वा उभारल्या गेलेल्या दिसतात. कारण त्यांत यादवकालीन मंदिरांचे व प्रासादांचे अनेक सुंदर शिल्पावशेष, तसेच अनेक छिन्नभिन्न मूर्ती चिणलेल्या आढळतात.

या तीन तटांपैकी सर्वांत बाहेरच्या तटाची लांबी पावणे दोन मैल आहे. या तटाला पूर्वी सात वेशी होत्या, असे म्हणतात. दुसऱ्या तटाला महाकोट असे नाव आहे. याला दोन वेशी असून, मुख्य वेस पूर्वेकडे आहे. या वेशीचे एकापुढे एक असलेले तीन दरवाजे ओलांडून आत जावे लागते. त्यानंतर किल्ल्याभोवतीच्या अखेरच्या तटाचे महाद्वार येते. या तटाच्या आत उजव्या हाताला चांदमिनार नावाचा एक मनोरा आहे. इराणी पद्धतीचा हा मनोरा इ. स. च्या १५ व्या शतकात मुस्लीम राज्यकर्त्यांनी उभारला. याची उंची २१० फूट असून, बुंध्याचा परिघ ७० फूट आहे. त्याला एकूण चार मजले आहेत. वर जायला आतून गोलाकार जिना आहे आणि प्रत्येक मजल्यावर सज्जा आहे.

या मिनाराजवळच मोडकळीस आलेले एक प्राचीन शिवमंदिर आणि चिनीमहाल नामक एक मुसलमानी इमारत



बाहेरच्या तटातील एक वेस – देवगिरी

आहे. संभाजीच्या वधानंतर औरंगजेबाने येसूबाई व शाहू यांना याच ठिकाणी नजरकैदेत ठेवले होते, असे सांगतात. याच भागात किल्लाशिकन नावाची एक तोफ एका बुरुजावर आहे. तिच्या कान्यामागे मेंढ्याचे मुंडके असल्यामुळे तिला मेंढातोफ म्हणतात. ही तोफ औरंगजेबाची आहे, असे तिच्यावरील लेखावरून दिसते. डावीकडे काही मुसलमानी इमारती उभ्या असून,



चांदमिनार – देवगिरी

त्यापलिकडे एका प्रचंड हिंदू मंदिराचे मशिदीत परिवर्तन केलेले दिसते. हे परिवर्तन करताना सुमारे एकशे ऐंशी हेमाडपंती स्तंभांवर उभे असलेल्या मूळ मंदिराचे शिखर पाडून त्या जागी घुमट बनविलेला आहे व दर्शनी स्तंभांच्या रांगेत कमानी उभारलेल्या आहेत. इ. स. १९५० मध्ये हैदराबाद राज्य भारतीय संघराज्यात विलीन झाले, त्या वेळी लोकांनी स्वयंस्फूर्तीने या मंदिराचा ताबा घेऊन त्यात भारतमातेची मूर्ती स्थापन केली आहे.

तिसऱ्या तटाच्या आत प्राचीन अवशेषांचा अक्षरश: खच पडला आहे. भारतमाता-मंदिरासमोर हत्ती-हौद नामक उत्तम बांधणीचा शुष्क जलाशय आहे. १५० फूट लांब, १०० फूट रुंद व २३ फूट खोल एवढा हा विस्तीर्ण जलाशय पूर्वी यादवांच्या हत्तींचे क्रीडास्थान होते, असे सांगतात.

किल्ल्याचा डोंगर ६०० फूट उंचीचा आहे. त्याच्याभोवती ५० फूट रुंदीचा खोल खंदक आहे. खंदकाच्या तळापासून १५० फूट उंच कडा इतका तासून काढलेला आहे, की सापालाही वर चढून जाणे अशक्य व्हावे. पूर्वी खंदकावर ओढून घेण्याजोगा कातडी दोरांचा पूल होता. आता प्रेक्षकांच्या सोयीसाठी कायमचा लोखंडी पूल केलेला आहे. हा पूल ओलांडल्यावर

किल्ल्यात प्रवेश करता येतो. प्रवेशमार्ग खडकात खोदून काढलेला आहे. या भुयारी मार्गाच्या तोंडाशीही लहानसा चौक राखून मजबूत भिंत बांधलेली आहे. या भिंतीला जो दरवाजा आहे, त्याच्या दोन्ही बाजूंना माऱ्याच्या खोल्या आहेत. या



भुयारीमार्गाचे प्रवेशद्वार – देवगिरी

दरवाजापुढे असलेल्या चौकात उजव्या बाजूला एक उताराचे मोठे छिद्र ठेवले आहे. आत घुसलेल्या शत्रूला त्या छिद्राच्या द्वारे खंदकात लोटून देता येत असे. भुयारी मार्गाचे प्रवेशद्वार एखाद्या लेण्याच्या प्रवेशद्वारासारखे कोरीव नकशीने सजविलेले आहे. हा मार्ग तीन टप्प्यांनी वळणे घेत गेलेला आहे. या नागमोडी भुयारी मार्गावर चढत्या पायऱ्या असल्या, तरी तिथे अत्यंत अंधार आहे. तसेच त्याला मधून मधून फसवे फाटेही आहेत. त्याच्या बाजूंना माऱ्याच्या कोठड्या आणि कडेलोटाच्या गुप्त जागा आहेत. पुढे जायचा मार्ग म्हणून शत्रूचा माणूस चुकून या जागी वळला, की शंभर फूट उंचीवरून खाली खंदकात कोसळायचा.

भुयारी मार्गाची एकूण चढण दीडशे फुटांची आहे. भुयारातून बाहेर पडायला जे वरचे दार आहे, त्यावर पूर्वी एक प्रचंड लोखंडी पत्रा बसवीत आणि त्या पत्र्यामागे लाकडे जळत ठेवून तो तापवीत. हेतू हा, की त्या पत्र्याच्या उष्णतेने संपूर्ण भुयारी मार्गच गरम व्हावा आणि त्या उष्णतेच्या लोटातून सुटका करू पाहणाऱ्या शत्रूला फसव्या मार्गांनी खंदकातच कायमची विश्रांती घेण्याचा प्रसंग यावा.

भुयारी मार्ग संपल्यावर पहिल्याच टप्प्याला डावीकडे गणेश मंदिर आहे. नंतर पायऱ्यांनी चढत जाणारा रस्ता आहे. या रस्त्याने वर गेले, की बालेकिल्ला लागतो. बालेकिल्ल्याच्या पायथ्याशी उजव्या बाजूला एक खोदीव गुंफा आहे. या गुंफेतच किल्ल्यावरचे अधिकारी व एकनाथांचे गुरू असलेले जनार्दन स्वामी ध्यानाला बसत असत. तिथे त्यांच्या ध्यानाची जागा आणि दत्ताच्या पादुका दाखवतात.

बालेकिल्ल्यात बारादरी नामक उत्तम स्थितीत असलेली एक इमारत आहे. बालेकिल्ल्याला सर्व बाजूंनी भक्कम तट बांधलेला आहे. त्याच्याही वर शे-दीडशे पायऱ्यांची चढण चढल्यावर बाळकोट नावाचा सर्वांत उंच भाग लागतो. यालाही तटबंदी आहेच. या भागात बूळधाण नावाची प्रचंड तोफ आहे. बाळकोटातून भोवतालच्या अनेक मैलांचा टापू सहज दृष्टिपथात येतो.

देवगिरीच्या स्थानाचे महत्व आणि त्याच्या बांधणीतील दुर्गमता पाहता महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासात या दुर्गाने केवढी कामगिरी बजावली असेल, याची कल्पना येते. ज्याचे कडे तासून काढले आहेत असा हा प्रचंड शिवलिंगाच्या आकाराचा दुर्ग म्हणजे युद्धस्थापत्याचा एक अपूर्व नमुना आहे. याच्याविषयी श्री. रा. चिं. ढेरे म्हणतात- “ज्या कलावंतांनी वेरूळच्या सह्यशाखेवर भक्तिरसाचे विविध कोमल आविष्कार घडवून सौंदर्याने ओथंबलेले कैलास लेणे निर्माण केले आहे, त्याच कलावंतांनी वीर, रौद्र आणि भयानक या त्रिविध रसांचा साक्षात्कार देवगिरीच्या गिरिदुर्गाची निर्मिती करताना घडविला आहे. कैलास लेणे हे शिवाचे लास्य आहे; तर देवगिरी हे तांडव आहे.”



देवगिरीचा किल्ला

या दुर्गमतेमुळे फंदफितुरीचा अवलंब केल्यावाचून कोणालाही हा किल्ला जिंकता आला नाही. देवगिरी ही यादवांची राजधानी म्हणून प्रसिद्ध असली, तरी इथला किल्ला मात्र यादवांच्या उदयापूर्वी राष्ट्रकूट राजा कृष्ण याने बांधलेला

आहे. भिल्लम यादवाच्या काळात (इ. स. ११८४–११९१) हा किल्ला यादव साम्राज्याची राजधानी बनला होता. भिल्लमानंतर इथे जैत्रपाल, सिंघण, कृष्ण, महादेव आमणदेव आणि रामदेव हे यादव राजे राज्य करून गेले. रामदेवाच्या राज्यकाळापर्यंत देवगिरीचे वैभव प्रकर्षाला पोचले होते.

देवगिरी येथे रामदेव यादव राज्य करीत असतानाच अलाउद्दीन खिलजी याने देवगिरीवर स्वारी केली आणि रामदेवाचा किल्ल्यात कोंडमारा करून त्याला शरण आणले. त्याने रामदेवाला दिल्लीच्या खिलजी घराण्याचे मांडलिकत्व पत्करायला लावून देवगिरीचे अपार द्रव्य दिल्लीला नेले. पुढे रामदेवाच्या मृत्यूनंतर (इ. स. १३१०) त्याचा मुलगा शंकरदेव आणि जावई हरपाळदेव यांनी खिलजी घराण्याविरुद्ध केलेली बंडखोरी टिकली नाही आणि मुसलमानांच्या निर्घृण अत्याचारात बळी पडलेल्या या दोघाही स्वातंत्र्यभक्तांच्या रक्तात देवगिरीचे स्वातंत्र्य बुडून गेले.

खिलजी घराण्यानंतर देवगिरीवर तुगलुक घराण्याने सत्ता गाजविली. महंमद तुगलुकाने तर इ. स. १३२७ त आपली राजधानी दिल्लीहून देवगिरीला आणली. त्या वेळी दिल्लीहून केवळ सरदार-दरकदारच नव्हेत, तर सामान्य नागरिकही देवगिरीला येऊन राहिले. या स्थित्यंतरामुळे देवगिरीचा कायाकल्प झाला. महंमदाने नगराची नवी रचना करताना सैन्यातील अधिकारी, व्यापारी, कारागीर, शेख-फकीर, सरकारी नोकर, इ. वेगवेगळ्या वर्गांसाठी एकेक स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण मोहल्ला बनविला. या प्रत्येक विभागात बाजार, स्नानगृह, मशीद, परीट, रंगारी, लोहार, इ. नित्य व्यवहाराला आवश्यक त्या सर्व गोष्टींची संपूर्ण व्यवस्था होती. महंमदाने देवगिरीला दौलताबाद (भाग्यनगर) असे नवे नाव दिले.

तुगलुकानंतर बहामनी, निजामशाही, मोगल आणि निजाम या मुसलमान घराण्यांनी देवगिरीवर प्रभुत्व गाजविले. मराठ्यांच्या उत्कर्षाच्या कालातही देवगिरीची मुक्तता होऊ शकली नाही. इ. स. १९५० मध्ये स्वतंत्र भारताने निजामाचे राज्य खालसा केल्यानंतर म्हणजे जवळजवळ साडेसहा शतकांनी देवगिरीला स्वातंत्र्याचा प्रकाश लाभला.

यादवांच्या राज्यकाळात देवगिरी वैभवाच्या शिखरावर होते. त्या काळी हे नगर सर्व प्रकारच्या व्यापारासाठी प्रसिद्ध होते. इथे जवाहराचा व्यापार विशेष चालत असे. हिऱ्या-माणकांना पैलू पाडण्याचे आणि सोन्या-चांदीच्या व इतर कलाकुसरीच्या वस्तू तयार करण्याचे काम इथे मोठ्या प्रमाणावर चाले. मार्कोपोलोने इ. स. च्या तेराव्या शतकातील देवगिरीचे व्यापारी वैभव लिहून ठेवले आहे. त्या वेळी अन्यत्र न मिळणाऱ्या अपूर्वाईच्या वस्तू मिळविण्यासाठी लोक मुद्दाम देवगिरीला येत असत (गोविंदप्रभुचरित्र २९३). देवगिरीजवळ वेरूळच्या रस्त्यावर कागजपुरा हे हातकागद बनविण्याचे केंद्र आहे. पोथ्या लिहिण्यासाठी गेली तीन-चार शतके वापरला जाणारा दौलतावादी कागद इथेच तयार होतो.

यादवकाळात देवगिरी येथे ऐहिक वैभवाप्रमाणेच सांस्कृतिक वैभवही प्रकर्षाला पोचले होते. साहित्य, संगीत, नृत्य, चित्र, शिल्प, इ. ललित कला आणि तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र, ज्योतिष, वैद्यक, इ. अनेक ज्ञानशाखा यांची उपासना करणारे कलावंत आणि अभ्यासक देवगिरीच्या आश्रयाने नांदत होते. राजकार्यकुशल, धर्मपंडित व शिल्पज्ञ असा हेमाद्री; भागवताचा भाष्यकार व वैय्याकरण बोपदेव, संगीतकार शार्ङ्गदेव, प्रबंधगायक गोपालनायक, महाकवी नरेंद्र यांसारखे अनेक ख्यातनाम पुरुष देवगिरीच्या कीर्तीत भर घालून गेले आहेत.

इ. स. च्या तेराव्या शतकात देवगिरीच्या दुर्गाच्या पायथ्याशी वसलेल्या नगराचा प्रचंड विस्तार झालेला होता. त्याचे एकूण तीन भाग होते. दुर्गाला टेक असे नाव होते. त्याच्या पायथ्याशी राजकीय कचेऱ्या आणि सरकार–दरकदारांची निवासस्थाने होती आणि त्या बाहेरचा भाग नागरी वस्तीने व्यापलेला होता. त्याला कटक असे म्हणत असत. कटकात नाना प्रकारची व्यापारी उलाढाल चाले, त्याचप्रमाणे नाना कलांची आणि ज्ञानशाखांची उपासनाही चाले. या भागातील चौकाचौकात शामियाने उभारून त्यांत नृत्यसंगीताचे कार्यक्रम केले जात. यादव राजे लहर लागेल त्या क्षणी कलास्वाद घेण्यासाठी या शामियान्यांमध्ये जात असत, असे इब्न बतूताने लिहून ठेवले आहे. [सह्याद्रि; स्ट्राँ. इं.; था. का. म.; द. दे.; प्रवास]

(२) एक राग. या रागात दोन निषाद व बाकीचे सर्व स्वर शुद्ध लागतात. आरोहात मध्यम वर्ज्य असतो. जाती–षाडवसंपूर्ण (वक्ररूपाने). वादी–षड्ज. संवादी–पंचम. आरोह–सा ग रे ग प रे ग प ध नी सा. अवरोह– सा नी ध प ध नी ध प म ग रे नी रे रे ग म ग रे सा नी ध प सा. गानसमय –दिवसाचा पहिला प्रहर.

हा राग बिलावल रागाचा एक प्रकार आहे, म्हणून याला देवगिरी बिलावल असेही म्हणतात. हा राग कल्याण व बिलावल या दोन रागांच्या मिश्रणाने होतो. यात क्वचित अवरोहात निषाद लावतात. [श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे]

**देवजी** (इ. स. चे १३ वे शतक) राजस्थानात देवत्व पावलेला एक पुरुष. हा बगडावत क्षत्रिय असून, रावत भोज याचा पुत्र होता. याच्या आईचे नाव सेढां असे

होते. हा सत्यप्रतिज्ञ व सत्यवादी होता. याला अनेक सिद्धी वश होत्या, असे सांगतात.

देवजीचा मृत्यू झाल्यानंतर मेवाडच्या महाराणा संग्रामसिंह याने चितोडच्या किल्ल्यावर त्याचे मंदिर बांधले. गुजर लोक देवजीला भजतात. सेढां ही गुजर जातीची असल्यामुळे तिचा पुत्र देवजी याचे गुजरांना विशेष माहात्म्य वाटते. राजस्थानातल्या कित्येक गावांत देवजीची मंदिरे बांधलेली आहेत. त्यांतले पुजारीही गुजरच असतात. राजस्थानातल्या वीरपुरुषांत देवजीला महत्त्वपूर्ण स्थान आहे. तिथले शाहीर देवजीच्या प्रतापाचे पवाडे गातात. [ मरुभारती– जाने. १९५९ ]

**देवडिग** धंद्यावरून बनलेली एक जात. यांना मोइली असेही म्हणतात. यांची वस्ती द. कर्नाटकात आहे व हे कानडी भाषा बोलतात. देवालयातील पूजेशिवाय इतर सर्व कामे हे करतात. काही देवडिग शेती करतात, काही पोलिसात नोकरी करतात; तर काही घरगड्याचे काम करतात. यांच्या अकरा उपजाती आहेत. हे वैष्णव पंथाचे अनुयायी आहेत. यांची सर्व धार्मिक कृत्ये तुळू ब्राह्मण करतात. यांच्यांत मातृसत्ताक पद्धती रूढ आहे [ का. ट्रा. स. इं. ]

**देवणभट्ट** ( इ. स. च्या १३ व्या शतकाचा पूर्वार्ध ) एक धर्मशास्त्रनिबंधकार. हा मोठा याज्ञिक व धर्मशास्त्राचा पंडित होता. डॉ. शामशास्त्रींच्या मते हा आंध्र प्रदेशातील रहिवासी असावा.

स्मृतिचंद्रिका हा याचा धर्मशास्त्रावरचा ग्रंथ असून, तो पाच कांडांत विभागलेला आहे. यामध्ये संस्कार, आह्निक, व्यवहार, श्राद्ध, प्रायश्चित, इ. विषय आहेत. प्रस्तुत ग्रंथात त्याने बहुतेक सर्व टीकाकारांचा उल्लेख केला आहे. विज्ञानेश्वराचा तो मोठ्या आदराने निर्देश करीत असला, तरी काही ठिकाणी त्याने विज्ञानेश्वराशी मतभेदही दाखवला आहे. मुलाच्या पश्चात त्याचे आईबाप त्याच्या संपत्तीचे वारस ठरतात, हे विज्ञानेश्वराचे मिताक्षरेतील मत याला पसंत नसून, त्यावर त्याने बरीच चिकित्साही केली आहे. प्रस्तुत ग्रंथात देवणभट्टाने इतर पुष्कळ ग्रंथांची व ग्रंथकारांच्या मतांची समीक्षा करून नंतर आपले मत मांडले आहे.

दक्षिणेत याच्या ग्रंथाला न्यायखात्यामध्ये बराच मान दिला जातो. [ भा. रा. प्र.; म. च. को. ]

**देवता** जिच्या ठिकाणी दिव्य तेज अथवा सामर्थ्य असते, ती देवता होय. जी दिव्य अशी शक्ती अदृश्य रूपाने सर्वत्र संचार करते, भक्ताची श्रद्धा–भक्ती उत्कट झाल्यास जी दृश्य रूपानेही अभिव्यक्त होते, जी पूजा व बली यांचे ग्रहण करून भक्तांच्या किंवा उपासकांच्या मनकामना पूर्ण करते, जी भक्ताच्या मार्गातील अडथळे दूर करून त्याचे जीवन निर्भय व निराबाध करते, जी भक्ताच्या जवळ सदैव अदृश्य रूपाने उभी राहून त्याला संभाळीत असते, जी पूजा–बलिदान इ. न केल्यास क्रुद्ध होते व ते केल्याने प्रसन्न होते आणि जी सृष्टीतली पंच महाभूते भक्ताला अनुकूल बनवते, ती देवता होय. इंद्र, अग्नी, वरुण, शिव, विष्णू, काली, दुर्गा, गणपती, इ. या सर्व देवता आहेत.

**देवतांची कल्पना** – या चराचर भौतिक सृष्टीच्या पलिकडे अदृश्य, अव्यक्त व कल्पनारम्य अशी एक दुसरी सृष्टी कल्पिलेली आहे, तिला दैवतसृष्टी म्हणतात. दैवतसृष्टी म्हणजे देवतांचा पसारा होय. विविध शक्तींची आणि विविध नामरूपांची दैवते या सृष्टीत वास्तव्य करतात. दैवतसृष्टीचे उगमस्थान पाहायचे, तर मानवसृष्टीच्या मुळापर्यंत जावे लागेल. मानवाला त्याच्या आदिम अवस्थेतच देवतांचा साक्षात्कार किंवा प्रतीती झाली. पुढे मानव जसजसा विचाराने आणि भौतिक समृद्धीने प्रगती करू लागला, तसतशी या देवतांतूनच धर्माची उत्पत्ती झाली आणि धर्मातूनच पुढे विविध तत्त्वज्ञाने उगम पावली. देव, धर्म आणि तत्त्वज्ञान ही तीन तत्त्वे मिळून मानवी संस्कृतीची त्रिस्थळी बनते. कोणत्याही देशाच्या अथवा मानववंशाच्या संस्कृतीचा परिचय करून घ्यायचा असेल, तर या त्रिस्थळीचे दर्शन घेणे अपरिहार्य ठरते.

निकराची किंवा आत्यंतिक गरज हीच वेगवेगळ्या शोधांची जननी असते. मानवाला अगदी प्रारंभिक अवस्थेतच देवाची अपरिहार्य अशी गरज भासली आणि त्याने देव नावाचे एक तत्त्व शोधून काढले. या देवकल्पनेच्या मुळाशी कोणती भावना असू शकेल, याचा शोध घेता घेता बहुतेक संशोधक एकाच निर्णयावर आले आहेत. तो निर्णय हा, की माणसाला त्याच्या भोवतालच्या पंचमहाभूतांचे जे भय वाटले, त्या भयातूनच सर्वप्रथम देव नावाचे तत्त्व उगम पावले. भयकंपित करणारी तत्कालीन प्रत्येक निसर्गघटना त्याला देवरूपानेच प्रतीत झाली. वादळी वारे, विद्युत्पात, मेघगर्जना, भूकंप, महापूर, अतिवृष्टी, अनावृष्टी हे नैसर्गिक उत्पात पाहताना व अनुभवताना माणसाला वाटले, की या कोणीतरी प्रचंड शक्तीच्या देवता आहेत आणि आपण अल्प शक्तीची माणसे त्यांच्याशी सामना देऊ शकणार नाही. म्हणून मग त्या देवतांनी आपले अहित, अशुभ करू नये, यासाठी मानवाने त्या देवतांच्या पुढे माथा नमवला आणि त्यांची नम्रभावाने प्रार्थना केली.

**ऋग्वेदातील देवता**– ऋग्वेदातली मरुतांची सूक्तेही याच प्रकारची म्हणजे झंझावातरूपी देवालाच उद्देशून म्हटलेली प्रार्थनासूक्ते आहेत. उदा० (५.५४–५९) –

हे मरुतांनो, तुमचे सामर्थ्य अफाट आहे. तुम्ही सर्व लोकांना हलवून सोडता व कंपित करता. तुम्ही हा निबिड अंधार दूर करा. आम्हांला प्रकाश द्या. आमचे रक्षण करा...

हीच कल्पना पुढे अधिक विकसित झाली आणि भीती-बरोबरच आश्चर्य व उपयुक्तता या भावनेतूनही अनेक नव्या नव्या देवता निर्माण होऊ लागल्या.

ध्रुवप्रदेशात वास्तव्य करणाऱ्या वैदिक आर्यांच्या पूर्वजांना महिन्यामागून महिने अंधाऱ्या रात्रीत घालवल्यानंतर मग एक दिवस अचानक उषेचे दर्शन व्हायचे. उषेचा तो सोनेरी, सुंदर प्रकाश क्षितिजाखालून वर यायचा आणि क्षितिजाला धरून चक्राकार फिरत, नाचत राहायचा. महिना दीड महिना अशा प्रकारे उषेचे हे दिव्य नर्तन चालू असायचे. हे निसर्गदृश्य भीतिदायक खासच नव्हे; पण त्यात अद्‌भुताची विलक्षण जादू भरलेली असायची. म्हणूनच वैदिक ऋषींनी त्या उषेला देवता कल्पून भावभक्तीने तिला शब्दसुमने वाहिली आहेत.

**विश्वस्य हि प्राणनं जीवनं त्वे वि यदुच्छसि सूनरि।**
**सा नो रथेन बृहता विभावरि श्रुधि चित्रामघे हवम् ॥**

(ऋ. १. ४८. १०)

अर्थ – हे उषे, जेव्हा जेव्हा तू आपला प्रकाश पसरतेस, तेव्हा तेव्हा हे परोपकाररत देवते, तुझ्यापासून विश्वाला आपला प्राण– आपले चैतन्य–मिळाले, असे वाटते. हे उज्ज्वल व अलौकिक औदार्य प्रकट करणाऱ्या देवते, तू आपल्या विशाल रथात बसून आमची हाक ऐक.

तारागणांची माणके-मोत्ये आकाशाच्या पालथ्या घमेल्यात विखरून टाकणारी अंधारी रात्र, विश्वमाता अदिती, इ. अनेक देवता मानवाच्या आश्चर्यवृत्तीतूनच उगम पावल्या आहेत.

अग्नी, सोम, पृथिवी, आप, ओषधी, इ. देवता उपयुक्त-तेतून निर्माण झाल्या आहेत. पृथ्वीचे भूतधात्री हे रूप लक्षात आल्यावर एका वैदिक ऋषीने तिला पुढीलप्रमाणे प्रार्थिले –

**स्योना पृथिवि भवानृक्षरा निवेशनी ।**
**यच्छा नः शर्म सप्रथः ।।**

(ऋ. १. २२. १५)

अर्थ – हे पृथिवी, तू आम्हांवर प्रसन्न हो. तुझ्यापासून कोणा-लाही उपसर्ग पोचत नाही. तू आपल्या पृष्ठभागावर सर्वांनाच धारण करतेस. तर तू आम्हांला उत्तम सौख्य प्राप्त करून दे.

देहात आणि मनात उत्साहशक्ती भरून टाकण्यासाठी सोमरस उपयुक्त ठरतो, म्हणूनच वैदिक ऋषींनी त्याला देवत्व बहाल केले. सूर्य हा सकल जीवनाचा आधार आहे, हे जेव्हा कळून आले, तेव्हा त्याला देवता मानून 'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च' = सूर्य हा स्थावर-जंगमांचा आत्मा आहे, अशी त्याची महती गायिली गेली. पुढे पुढे मानवाच्या अंतर्बाह्य जीवनातील विविध पण अव्यक्त अशा शक्तींनाही देवपणाची पदवी प्राप्त झाली. मानवाची सर्जनशक्ती वैदि-कांत प्रजापतीच्या रूपाने आणि अवैदिकांत शिवाच्या रूपाने देवत्व पावली. वैदिकांच्या ज्ञानशक्तींचा आविष्कार बृहस्पती या देवतेच्या रूपाने झाला. त्यांची दुर्दम्य क्रियाशक्ती आणि पराक्रमशीलता इंद्राच्या रूपाने प्रकटली. त्यांची नैतिक धारणा वरुणरूपाने पाशहस्त होऊन उभी ठाकली आणि त्यांची रसिकता व सौंदर्यरुची ही श्रीच्या रूपात सालंकृत होऊन अवतीर्ण झाली.

निसर्गातल्या उत्पाती शक्तींचे नियमन करणाऱ्याही काही देवता असणे शक्य आहे, ही त्यापुढची कल्पना आहे. या नियामक देवता त्या त्या निसर्गशक्तीशी तद्रूप असत नाहीत; तर वेगळ्या राहून त्या त्या शक्तीवर नियंत्रण घालतात. वरुण, बृहस्पती, प्रजापती, अदिती, उषा या अशा प्रकारच्या देवता होत.

या सर्व देवता जोवर आकारहीन होत्या, तोवर त्यांची आणि मानवाची विशेष जवळीक झाली नव्हती. सांस्कृतिक प्रगतीच्या काळात पुढे मानवाने त्या सर्व देवतांवर मानवत्वाचा आरोप केला व त्यांचा आकारही आपल्यासारखाच कल्पिला. त्याबरोबरच देवतांमध्ये स्त्री-पुरुषभेदही निर्माण झाला. विष्णू चतुर्भुज; देवी अष्टभुजा किंवा दशभुजा; शिव त्रिनेत्र आणि पंचवक्त्र; ब्रह्मा चतुर्मुख; अग्नी द्विमुख, त्रिपाद व सप्तहस्त अशी त्यांच्या हस्तपादादी अवयवांची संख्या अधिक किंवा विषम असली, तरी या सर्व देवतांचा आकार माणसांचा आहे. 'चत्वारिशृङ्गा त्रयो अस्य पादा... ' हा अग्निमंत्र लिहून वाम-देवाने या कल्पनाविलासाचा ऋग्वेदातच पाया घातला. अशा प्रकारे हळूहळू साऱ्या देवता मानवरूपधारी झाल्या.

माणसाच्या कल्पनेतला पहिला देव केवळ कोपिष्ट होता, भयंकर होता. पुढे माणसाबरोबरच तोही परिष्कृत होऊ लागला. माणसाला वाटले, की देव रागावतो एवढेच काही खरे नव्हे; क्रोधाइतकीच त्याच्या अंतःकरणात करुणाही आहे. प्रार्थना केल्यास तो आपले अपराध पोटात घालू शकतो. शरण गेल्यास आधिव्याधी व संकटेही तो निवारतो. याच भावनेतून पुढे भक्तिमार्गाचा उदय झाला. शरणागती किंवा प्रपत्ती हे भक्ति-मार्गातले एक महत्त्वाचे तत्त्व आहे. त्या शरणागतीचे वा प्रपत्तीचे बीजही ऋग्वेदातच आढळते. वसिष्ठ ऋषी तिथे

वरुणाला शरण जाऊन त्याची करुणा भाकताना म्हणतो—
किमाग आस वरुण ज्येष्ठं यत् स्तोतारं जिघांससि सखायम्।
प्र तन्मे वोचो दूळभ स्वधावो— ऽव या वयं चकृमा तनूभिः॥
(ऋ. ७.८६.४)

अर्थ—हे वरुणा ! मी असा कोणता मोठा अपराध केला, की मी तुझा प्रेमळ भक्त असताही मला तू मारायला प्रवृत्त व्हावेस ? हे अपराजिता ! सर्वतंत्रस्वतंत्र देवा ! तो अपराध तरी सांग, म्हणजे तुला प्रणिपात करून मी त्याचे निरसन करीन आणि त्वरेने तुझ्या पायावर लोळण घेईन.



वरुण

देवतांची उत्पत्ती —ऋग्वेदातील दार्शनिक सूक्तांत देवतांची उत्पत्ती जलतत्त्वातून झाल्याचे सांगितले आहे; तर अथर्ववेदात असत्पासून झाल्याचे म्हटले आहे.

ऋग्वेदातील नासदीय सूक्ताचा भाव असा आहे, की देव हे जगताच्या सृष्टीनंतर उत्पन्न झाले (ऋ. १०.१२९). काही ठिकाणी देवांना अदितीचे, पृथ्वीचे व उषेचे पुत्र मानलेले आहे. काही ठिकाणी ब्रह्मणस्पतीला, तर काही ठिकाणी सोमाला देवांचा पिता म्हटले आहे.

देवतांचे रूप-गुणविशेष — वेदांतील देवताविषयक कल्पनांमध्ये रूपरेखेचा अनिश्चितपणा व व्यक्तित्वाची अस्पष्टता या गोष्टी जाणवतात. याचे कारण असे, की वेदांतील देवता या इतर कोणत्याही इंडो-युरोपीय लोकांच्या देवतांपेक्षा त्यांच्या पायाभूत किंवा भौतिक घटनांना अधिक जवळच्या आहेत. देवतांच्या स्वभावाविषयी यास्क सांगतो, की देवांचे जे चरित्र दिसते, त्यात मानवी गुणधर्म सापडत नाहीत (निरुक्त ७.४). वेदांतील देवतांचे विशिष्टत्वदर्शक गुण अत्यल्प असून, बहुतेक सर्व देवतांना सर्व प्रभावी गुण लावलेले दिसून येतात. द्युलोकाला आधार देणे व पृथ्वीची स्थापना करणे, ही महनीय कर्मे सर्व देवतांना सामान्यपणे लागू केलेली दिसतात. त्यामुळे त्या त्या देवतेत तिचा तिचा प्रधान विशिष्ट गुण कोणता, ते समजणे अवघड होते. त्याचप्रमाणे कोणतीही एक देवता दुसऱ्या एखाद्या देवतेशी एकरूप मानली जाण्याचाही संभव वाढतो. असा हा सामान्यपणा ऋग्वेदात वारंवार आढळून येतो. वैदिक ऋषी ज्या देवतेची स्तुती करीत असतील, त्या देवतेच्या अंगी सर्व लोकोत्तर गुण चिकटवतात आणि हे गुण वर्णन करताना परस्पर विरोध किंवा असंगती यांकडे लक्ष देत नाहीत. देवतांचा स्तुतिपाठक ऋषी किंवा पुरोहित आपल्या इष्टदेवतेचे माहात्म्य अतिशयोक्तीने वर्णितो व इतर देवतांना गौण मानतो, अशी स्थिती ऋग्वेदात सर्वत्र आहे.

देवता मर्त्य की अमर्त्य ? — ज्या अर्थी देवतांना जन्म आहे, त्या अर्थी त्यांना मरणही आहे, हे निश्चित होते. माणसांच्याप्रमाणेच देवांच्याही, सांप्रतचे देव आणि पूर्वीचे देव, अशा पिढ्या मानलेल्या आहेत (ऋ.७.२१.७). देवता या मुळात अमर नव्हत्या, हा विचार ऋग्वेदात दिसतो. शतपथ ब्राह्मण व ऐतरेय ब्राह्मण यांतही इंद्र, अग्नी व प्रजापती या मोठ्या देवांसह सर्व देवांना मर्त्यच मानले आहे (श. ब्रा. १०.४.३.३; ऐ. ब्रा. ८.१४.३.४). सवित्याने, अग्नीने व सोमाने देवांना अमरत्व दिले, असे ऋग्वेदात म्हटले आहे (ऋ. ४.५४.२; ६.७.४; ९.१०.६ व १८). ब्रह्मचर्य आणि तप यांच्या योगाने देवांनी मृत्यूवर विजय मिळविला, असे अथर्ववेदात सांगितले आहे (अथर्व. ११.५.१९).

एका अहीन सोमयागाच्या द्वारे देवांनी मृत्यूवर विजय मिळवला, असे तैत्तिरीय संहितेत म्हटले आहे (७.४.२.१). पुराणांनी देवता अमर मानल्या आहेत खऱ्या; परंतु त्यांचे ते अमरत्वही सापेक्षच आहे. कल्पांती सर्व देव-देवता नष्ट होतात, अशी पुराणांची धारणा आहे.

वैदिक ऋषींनी देवतांच्या भौतिक स्वरूपावर मानवाचे गुणधर्म आरोपित केलेले असले, तरी हे मानवत्वारोपण अत्यंत अस्पष्ट आहे. मात्र शिर, आकृती, मुख, गाल, नेत्र, केश, वक्षस्थल, भुजा, हात, इ. अवयवांचे वर्णन मुख्यत्वे इंद्र व मरुत यांच्या बाबतीत तेवढे बरेचसे स्पष्ट आहे. सूर्याच्या किरणांनाच त्याच्या भुजा म्हटलेले आहे. अग्नीच्या ज्वालांनाच त्याच्या जिह्वा म्हटले आहे. काही देवतांची वेशभूषाही वर्णिलेली आहे. उषेला उज्ज्वलवसना म्हटले आहे. इंद्र हा कवच व शिरस्त्राण धारण करतो असे सांगितले आहे. सामान्य रूपाने सर्व देव घोड्यांच्या रथांत बसून संचार करतात; पण पूषाचा रथ बकरे, मरुतांचा मृग, उषेचा गाय किंवा अश्व हे ओढतात, असे म्हटले आहे.

देवतांची कल्पना दृढ झाल्यानंतर या देवता राहतात कुठे

असा प्रश्न ओघानेच पुढे आला. देवता दिसत नाहीत, पृथ्वीवर आढळत नाहीत, त्याअर्थी त्या आकाशात राहत असाव्या अशी कल्पना साहजिकच पुढे आली. आकाशातल्या या देवतास्थानाला स्वर्ग असे नाव दिले गेले. ऋग्वेदात देवतांचे निवासस्थान तृतीय स्वर्ग लोक किंवा विष्णूचे उच्चतम पद असल्याचे म्हटले आहे. त्या ठिकाणी सर्व देवता सोमपान करून उल्लसित व आनंदपूर्ण जीवन व्यतीत करतात.



इंद्र

ऋग्वेदात व अथर्ववेदात तेहतीस देवता मुख्य मानलेल्या असून, त्यातल्या अकरा आकाशात, अकरा पृथ्वीवर व अकरा उदकामध्ये राहतात, असे म्हटले आहे (ऋ. १.१३९.११); तर काही स्वर्गात, काही अंतरिक्षात व काही पृथ्वीवर राहतात, असे सांगितले आहे (अथर्व. १०.९.१२). यास्काने पृथ्वीस्थानीय, अंतरिक्षस्थानीय व द्युस्थानीय अशी देवतांची त्रिविध वर्गवारी केला आहे. त्याही पुढे जाऊन यास्क म्हणतो, की एकच देवता आपल्या विभिन्न रूपांनी विभिन्न लोकांत वास्तव्य करू शकते. सर्व देवता सामान्यपणे मित्रत्वाने वागतात व मानवाला उपकारी व समृद्धिदायक होतात. केवळ रुद्र ही एकच देवता अशी आहे, की जिच्या ठिकाणी काही हानिकारक प्रवृत्ती दृग्गोचर होतात.



सरस्वती

वैदिक देवतांचे चारित्र्य नीतियुक्त असल्याचे मानलेले आहे. सर्व देवता सत्यवादी व कपटरहित असतात आणि त्या सत्यवादी व धार्मिक मनुष्याचे रक्षण करतात, असें मत आहे. आदित्यगण आणि मुख्यतः वरुण हे नैतिक नियमांचे प्रमुख प्रतिपालक होत. पण असे असले, तरी सत्यवादित्व आणि निष्कपटपणा या दोन गुणांपेक्षाही देवतांच्या शक्तीला व सामर्थ्यालाच ऋग्वेदात विशेष महत्त्व दिलेले आहे. देवता या शक्तिशाली असतात, सर्व जीवांवर त्यांचे साम्राज्य असते आणि मानवाच्या इष्ट कामना देवतांची कृपा झाली तरच सिद्ध होतात, असा वैदिक ऋषींचा आशय आहे. देवता या प्रामुख्याने यज्ञभोक्त्या असतात आणि म्हणून यज्ञकर्त्या यजमानांशी त्या सौहार्द बाळगतात. इंद्राच्या संबंधात ही गोष्ट विशेषत्वाने दिसून येते. देवतांनी घालून दिलेले नियम मोडण्याची कोणाचीही प्राज्ञा नाही; तसेच देवतांनी दिलेल्या आयुष्यापेक्षा कोणीही जास्त जगू शकत नाही, असेही वैदिक ऋषींनी सांगून ठेवले आहे. देवतांच्या लहानमोठेपणाचीही वैदिक ऋषींनी कल्पना केली आहे. त्यांच्या शिशू, युवा आणि वृद्ध अशा तीन अवस्था मानल्या आहेत (ऋ. १.२७.२३); पण सर्वसाधारण धारणा अशी दिसते, की देवांविषयी श्रेष्ठ-कनिष्ठत्वाची भावना धारण करणे योग्य नव्हे.

न हि वो अस्त्यर्भको देवासो न कुमारकः ।
विश्वे सतो महान्त इत् ।। (ऋ. ८. ३०. १)

अर्थ – तुमच्यामध्ये कोणीही अगदी लहान बालक नाही किंवा हे देवांनो, कोणी कुमारही नाही. तुम्ही सर्व थोर आहात.

ऋग्वेदाच्या उत्तरकाली निरनिराळ्या देवता या केवळ एका मुख्य देवाची विभिन्न रूपे आहेत, असा एकेश्वरवादही विकसित होऊ लागला होता. पुढील ऋचा हे याचे प्रसिद्ध उदाहरण होय–

इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान् ।
एकं सद् विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥
(ऋ. १. १६४. ४६)

अर्थ – त्या ईश्वरालाच इंद्र, मित्र, वरुण आणि अग्नी असे म्हणतात. देवलोकी राहणारा सुंदर पक्षी तोच. तो वस्तुतः एकच आहे, तरी ज्ञानी जन त्याला पुष्कळ प्रकारची नावे देतात. त्याला अग्नी, यम अथवा मातरिश्वा असेही म्हणतात.

एका ठिकाणी अदितीला सर्व देव-मनुष्यांची, तसेच जे उत्पन्न झाले आणि जे उत्पन्न व्हायचे आहेत, त्या सर्वांची प्रतिनिधी मानले आहे (ऋ. १. ८९. १०) प्रजापतीलाही सर्व देवांच्या वर आणि सर्वांचे सर्वस्व मानले आहे–

प्रजापते न त्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परि ता बभूव ।
यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणाम् ॥
(ऋ. १०. १२१. १०)

अर्थ – हे प्राणिमात्रांच्या अधिपते देवा! या उत्पन्न झालेल्या यच्चयावत वस्तूंना तुझ्यावाचून दुसरा कोणीही व्याप्त करू शकला नाही ( किंवा यथार्थपणे जाणू शकला नाही ). जी जी इच्छा मनात धरून आम्ही तुझ्या प्रीत्यर्थ यज्ञ करू, ती ती आमची इच्छा सफल होवो आणि आम्ही सर्व प्रकारच्या ऐश्वर्याचे धनी होऊ असे घडो.

इंद्र, अग्नी, वरुण हे सगळे देव निर्माण करणारा, द्यावा-पृथ्वी व त्याबरोबर सकल चराचर सृष्टी यांना जन्म देणारा कोणीतरी एकच मोठा देव आहे, असा विचार ऋग्वेदातच प्रगट झाला. हिरण्यगर्भ, प्रजापती, विराट असे कोणते तरी नाव वैदिक ऋषींनी त्या मोठ्या देवाला दिले.

अथर्ववेदात हे एकेश्वरी किंवा सर्वेश्वरी मत पूर्णपणे प्रतिष्ठित झालेले दिसते. स्कंभ किंवा आत्मा याच्या ठिकाणी सर्व चराचर विश्व समाविष्ट झालेले आहे, असे अथर्ववेदात सांगितले आहे ( १०.७ ).

उत्तरकालीन वैदिक वाङ्मयांत हे सर्वेश्वरी मत मुख्य प्रतिपाद्य ठरले. उपनिषदांनी त्या तत्त्वाचा सर्वभावे पुरस्कार केला. उपनिषत्कालांत हा 'एक देव' ईश्वर हे नामाभिधान पावला. ईश्वर हा सर्वतंत्रस्वतंत्र आहे, अनंत नामरूपांनी तोच नटला आहे, त्याच एका ईश्वराच्या प्रकाशाने सर्व जग आणि सर्व देव प्रकाशित झाले आहेत, असा ईश्वरविषयक विचार उपनिषदांनी व्यापकपणे मांडला. उपनिषदांचा हा विचार भारतीय संतांनी त्याहून अधिक विस्तृत आणि गोड केला. 'कल्पनेचे देव कल्पांती नासती' असे म्हणून तुकोबांनी खऱ्या देवाचा शोध घ्यायला सांगितले. ज्ञानेश्वरांनी ईश्वर हा सर्वात्मक असल्याचे अनेक प्रकारे प्रतिपादून, त्यालाच भक्तिभावाने शरण जाण्याचा उपदेश केला.

**देवतांचे प्रकार** – देवतांचा स्थानपरत्वे विचार झालेला आहे, तो पुढीलप्रमाणे–

**दिव्य देवता** – यांमध्ये द्यौः, वरुण, मित्र, सूर्य, सविता, पूषा, विष्णू, विवस्वान, आदित्यगण, उषा व अश्वी या देवता येतात. द्यौः ही आकाशतत्त्वाची देवता आहे. तिचा पृथ्वीशी संयोग घडवलेला आहे. द्यावा-पृथिवी हा शब्द विश्वाच्या माता–पितरांचा द्योतक आहे. वरुण ही ऋग्वेदातली एक महत्तम देवता आहे. वरुणाच्या व्यक्तित्वात नैतिक गुणांचा विकास झालेला दिसतो. वरुण ही फार प्राचीन देवता आहे. पर्शुभारतीय कालापासून तिचा महिमा गाजत आहे. पुढे वैदिक आर्यांनी आपल्या विजिगीषू वृत्तीला साजेशा इंद्रदेवतेची कल्पना करून तिचीच स्तुतिस्तोत्रे प्रामुख्याने गायिली. त्यामुळे इंद्राच्या या झगमगाटात वरुणाचे तेज मंद होऊन तो मागे पडला. मित्र ही देवता नेहमी वरुणाशी संबंधित असल्याचे दिसते. मित्रावरुण असे हे जोडनाव सर्वत्र आढळते. मित्र हे सूर्याचेही अन्य नाव आहे. काही संशोधकांनी मित्राला सूर्यप्रकाशाची देवता मानले आहे. सूर्य हे भौतिक सूर्याच्या गोलाकार मंडलाला दिलेले नाव आहे. तो आपल्या महानतेमुळे सर्व देवांचा दिव्य पुरोहित बनला आहे ( ऋ. ८. ९०. १२ ).



सूर्य

सविता ही एक सुवर्णदेवता आहे. हिचे नेत्र, जिह्वा व भुजा सुवर्णसदृश व सुंदर आहेत. हे सूर्याचेच एक रूप आहे. सामान्यपणे उदय होण्यापूर्वीच्या सूर्याला सविता म्हणतात. पूषा हा स्थावर-जंगमांचा अधिपती मानला जातो. संरक्षण व संपत्ती या गोष्टी मिळाव्या म्हणून पूषा देवतेची प्रार्थना केलेली आहे. विष्णू ही ब्राह्मणकालात श्रेष्ठ देवता बनली असली, तरी ऋग्वेदात ती एक चतुर्थ श्रेणीची देवता आहे. विष्णूने तीन पावलांत त्रिभुवन व्यापले, या पौराणिक कथेचा उगम ऋग्वेदातच आढळतो. उरुगाय, उरुक्रम, विक्रम, इ. विशेषणे ऋग्वे-

दात केवळ विष्णूसाठीच वापरलेली आहेत. हा वृत्रवधाच्या कामी इंद्राला साहाय्यक झाला आहे. विवस्वान हा देव अश्वी, यम व मनू यांचा पिता आहे. ऋग्वेदात अनेक ठिकाणी विवस्वानाला इंद्राशी संयुक्त केलेले असून, विवस्वानाच्या स्तुतीत इंद्राला आनंद होतो, असे म्हटले आहे. आदित्यगण हा मित्र, अर्यमा, भग, वरुण, दक्ष व अंश या सहा देवतांचा बनला आहे (ऋ. २. २७.१). मात्र ऋग्वेदाच्या अंतिम मंडलात आदित्यांची संख्या एका ठिकाणी सात, तर दुसऱ्या ठिकाणी आठ सांगितली आहे (ऋ. ९. ११४. ३; १०. ७०. ८ ). उषा ही एक प्राकृतिक घटना असून, ऋग्वेदात तिचीच सूक्ते सर्वांत अधिक काव्यमय व मनोहर आहेत. ती द्विपाद व चतुष्पाद प्राण्यांना जागृती आणून गतिशील बनवते, असे म्हटले आहे ( ऋ. ४. ५१. ५ ). अश्वी हे जुळे देव आहेत. ते कधीही विभक्त होत नाहीत. यद्यपि प्रकाशात्म देवांच्या अंतर्गत अश्वींना स्थान असले, तरी प्रकाशविषयक कोणत्या निश्चित घटनेशी अश्वींचा संबंध आहे, हे अजून नक्की उलगडलेले नाही.



यम

अंतरिक्ष देवता – इंद्र, त्रित आप्त्य, अपां नपात्, मातरिश्वा, अहिर्बुध्न्य, अज एकपाद, रुद्र, मरुद्गण, वायु-वात, पर्जन्य व आप या अंतरिक्षात वास्तव्य करणाऱ्या देवता होत. इंद्र ही वैदिक भारतीयांची राष्ट्रीय देवता आहे. ही मेघगर्जनेची देवता समजली जाते. अवर्षण अथवा अंधकाररूपी दैत्यावर विजय मिळवून पृथ्वीला वृष्टी आणि प्रकाश मिळवून देणे, हे इंद्राचे महत्तम कार्य आहे. दुसऱ्या अंगाने इंद्र हा युद्धदेवही मानलेला आहे आणि त्याचे हे रूपच वैदिकांचे विशेष आवडते आहे. त्रित आप्त्य ही विशेषत्वाने इंद्राशी संबद्ध असलेली देवता आहे. अपां नपात् हा जलांचा उज्ज्वल पुत्र असून, चहू बाजूंनी पाण्याने घेरलेला आहे. तीन दिव्य स्त्रिया याच्यासाठी अन्न धारण करीत आहेत, असे म्हटले आहे. मातरिश्वा ही अग्नी उत्पन्न करणारी आणि सदैव अग्नीबरोबर संबंध दाखविणारी देवता आहे. अहिर्बुध्न्य या देवतेला वैदिक साहित्यात लाक्षणिक रूपाने अग्नी गार्हपत्य याच्याशी संबद्ध मानलेले आहे. याची व्याख्या यास्क वायुरूपात करतो. या देवतेचा स्वभाव काहीसा हानिकारक आहे. त्यावरून मुळात तो अहिवृत्रच असावा, असे अनुमान करतात. अज एकपाद ही एक वायवीय देवता आहे. रुद्र ही मरुतांशी संबंधित अशी देवता होय. रुद्र हा मरुतांचा पिताच मानलेला आहे. रुद्र म्हणजे रडविणारा अशी त्याची व्युत्पत्ती असल्यामुळे ऋग्वेदात याच्या क्रोधाविषयी भयाची भावना व्यक्त झालेली आहे. मरुद्गणांना वैदिक देवतांत बरेच वरचे स्थान आहे. हे दीप्तिमान देव असून, यांचा प्रामुख्याने विजांच्या चमकण्याशी संबंध आहे. झंझावात निर्माण करून वृष्टी करणे, हे मरुतांचे प्रमुख कार्य आहे. वायूचा संबंध इंद्राशी जोडलेला आहे. हा विराट पुरुषाच्या श्वासांतून उत्पन्न झाला, असे सांगितले आहे (ऋ. १०. ९०. ४३). हा सोमप्रेमी असून सोमाचा रक्षकही आहे (ऋ.१०.८५.५). पर्जन्य ही वृष्टिदेवता आहे. त्याबरोबरच ती वनस्पतींची उत्पादक व पोषकही आहे (ऋ. ५.८३.४. ५ व १०). आप: या देवतांना माता, तरुण पत्नी, त्याचप्रमाणे यज्ञप्रसंगी उपस्थित होऊन वरदान देणाऱ्या देवी या स्वरूपांत मानले आहे. नैतिक अपराध, हिंसात्मक पापे आणि असत्य या दोषांतून मुक्त करण्यासाठी यांचे आवाहन केलेले आहे (ऋ. १.२३.२२).



वायू

पार्थिव देवता – नद्या, अग्नी, बृहस्पती व सोम यांना पार्थिव देवता मानतात. सिंधू, सरस्वती, गंगा, यमुना, इ. नद्यांना पावक देवता मानले आहे. या सर्वांत सरस्वतीची ख्याती विशेष आहे.

अग्नी या देवतेला ऋग्वेदात इंद्राच्या खालोखाल स्थान मिळाले आहे. अग्नीची प्रकृती तीन शिरे, तीन जिह्वा, तीन शरीरे, तीन स्थाने, त्रिगुणात्मक प्रकाश, इ. प्रकारे त्रिगुणात्मक मानलेली आहे (ऋ. १०. ८८. १०; १.१४६. १; ३. २०.२). अग्नी हा गृहातला गृहपती व अतिथीही ठरला आहे. बृहस्पती हा एक कौटुंबिक पुरोहित आहे (ऋ. २.२४.९). उच्चतम आकाशाच्या महान प्रकाशातून बृहस्पतीचा जन्म झाला असून (ऋ. ४. ५०.४), तो स्तुतिप्रिय आणि स्तुती करणाऱ्यांवर कृपा करणारा आहे. तै. संहितेत त्याला तिष्य या नक्षत्रपुंजाची देवता मानले असून, वेदोत्तर साहित्यात तो एक ग्रह बनला आहे. सोम म्हणजे सोमवल्लीचा रस होय. यज्ञात सोमसवनाला महत्त्व असल्यामुळे सोम ही एक महत्त्वाची देवता ठरली आहे. ऋग्वेदाचे संबंध नववे मंडल सोमाप्रीत्यर्थ आहे.



अग्नी

अमूर्तदेवता– ऋग्वेदात ज्या देवतांची प्रकृती अमूर्त धारणा, किंवा भाव यांच्यावर आधारित आहे, अशा देवतांचे दोन वर्ग आहेत. पहिल्या वर्गात काम, मन्यू, श्रद्धा, अदिती, दिती, इ. देवता येतात. यांचे ऋग्वेदाच्या उत्तरकालीन मंडलात मूर्तीकरणही झालेले दिसते. दुसरा वर्ग तृप्रत्ययान्त देवतांचा आहे. उदाहरणार्थ धातृ, त्वष्टृ, इत्यादी. हा वर्ग पहिल्या वर्गापेक्षा मोठा आहे.

स्त्रीदेवता– वैदिक वाङमयात विशेषत: ऋग्वेदात स्त्रीदेवतांची संख्या फार थोडी आहे. उषा या देवतेवर अनेक काव्यमय सूक्ते असली, तरी तिचे स्थानही तिसऱ्या श्रेणीतच आहे. सरस्वती, रात्री, वाक्, पृष्णी, इळा, राका, सिनीवाली, कुहू, सरण्यू, सूर्या, इंद्राणी, वरुणानी, रुद्राणी या वेदातील स्त्रीदेवता होत. यांपैकी काहींवर स्वतंत्र सूक्ते आहेत; तर काहींचा नुसता उल्लेख आहे.

युग्मदेवता– वैदिक उपासनेतील एक विशेष प्रकार म्हणजे मूळच्या दोन स्वतंत्र देवतांची एक जोडदेवता कल्पून तिची स्तुती करणे हा होय. अशा सुमारे वीस जोडदेवता ऋग्वेदात आल्या असून, कमीत कमी साठ सूक्ते या जोडदेवतांच्या स्तुतिपर आहेत. इंद्राग्नी, मित्रा-वरुण, इंद्रा-वरुण, इंद्र-वायू, द्यावा-पृथिवी, इंद्रा-सोमा, इंद्रा-बृहस्पती, इंद्रा-विष्णू, इंद्रा-पूषणा, सोमा-पूषणा, सोमा-रुद्रा, अग्नी-षोम, इंद्रा-नासत्या, इंद्रा-पर्वता, इंद्रा-मरुत, अग्नी-पर्जन्या, पर्जन्या-वाता, उषासा-नक्ता, सूर्या-चंद्रमसा अशी या जोडदेवतांची नावे आहेत.

जोडदेवतांची ही कल्पना मूळ द्यावा-पृथिवी या जोडीवरून सुचली असावी. ही कल्पना वेदपूर्वकालीन असण्याचाही संभव आहे. द्यावा-पृथिवीच्या नंतर मित्रा-वरुणांचा क्रमांक लागतो. ही जोडदेवता पर्शुभारतीय कालातली असून, अवेस्त्यात तत्सदृश अशी अहुर व मिथ्र यांची जोडी आढळते. इंद्रावरुण हे दोन विश्वाचे राजे आहेत. यांनी सर्व जलप्रवाह तयार केले व सूर्याला आकाशमार्गे आक्रमण्यास लावले. इंद्राग्नी यांची जोडी तर ऋग्वेदात जागोजागी आढळते. हिच्या वर्णनपर सूक्ते सर्वांत अधिक आहेत. इंद्रा-विष्णू या जोडीला मदपती म्हटले असून, तिला मुख्यत: सोमपानासाठी येण्यास प्रार्थिले आहे.



इंद्राणी

वेदांत दिसणाऱ्या या सहचर देवतांच्या अनुकरणावरून पुढे पौराणिक कालातही अशा काही जोड्या निर्माण केल्या गेल्या. उदाहरणार्थ, ब्रह्मा-प्रजापती, शिव-वैश्रवण, संकर्षण–वासुदेव, नर-नारायण, स्कंद-विशाख, इत्यादी. पाणिनीने अशा अनेक जोड देवतांचा उल्लेख केला आहे (अष्टा. ६.२.१४४; ६.३. २६; ४.२.३१).

देवतासंघ – वैदिक देवतांच्या पसाऱ्यात काही कमी-अधिक

स्पष्ट असे देवतासंघ असून, ते कोणत्यातरी विशिष्ट देवाशी संबंधित असतात. यांतला सर्वांत मोठा व महत्त्वाचा संघ म्हणजे मरुतांचा होय. ऋग्वेदात त्यांची संख्या २१ किंवा १८० अशी आढळते. मरुतांचा संबंध इंद्राशी व रुद्राशी आहे. रुद्रगण हाही देवतासंघ असून त्यांची संख्या ११ आहे. आदित्यसंघ हा ७,८ किंवा १२ संख्येचा असून, तो त्याची माता अदिती हिच्याबरोबर दिसतो. वसू, रुद्र व आदित्य असे तीन संघ अनुक्रमे पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्ग या ठिकाणी राहतात, असे ब्राह्मणग्रंथांत सांगितले आहे. याशिवाय, अंगिरसांचा व ऋभूंचाही असाच एक संघ आहे. ऋग्वेदात विश्वेदेवांचा आणखी एक संघ असून, तो बराच व्यापक आहे. या विश्वेदेवांप्रीत्यर्थ ऋग्वेदाची ४० सूक्ते खर्ची पडली आहेत, त्यावरून या संघाची योग्यता मोठी असल्याचे कळून येते.

**देवताज्ञान** – ऋग्वेदात जे मंत्र आहेत, त्या प्रत्येक मंत्राला त्याची अशी एखादी देवता असतेच. म्हणून मंत्राचा जप कर्तव्य असेल, तेव्हा त्याची देवता जाणून घेणे आवश्यक असते. अन्यथा मंत्र इष्टफल देऊ शकत नाही. या अर्थाचा एक श्लोक बृहद्देवतेत दिलेला आहे, तो असा–

**वेदितव्यं दैवतं हि मन्त्रे मन्त्रे प्रयत्नतः ।**
**दैवतज्ञो हि मन्त्राणां तदर्थमवगच्छति ॥**

जी गोष्ट मंत्रजपाच्या बाबतीत, तीच मंत्राने हवन करण्याबाबत समजावी.

**मन्त्राणां देवताविद्यः प्रयुङ्क्ते कर्म कर्हिचित् ।**
**जुषन्ते देवतास्तस्य हविर्नादेवताविदः ॥**

अर्थ– मंत्रांची देवता न जाणता जो कोणी अनुष्ठानकर्म आरंभतो, त्या देवता न जाणणाऱ्या माणसाचे हविर्द्रव्य देवता सेवन करीत नाहीत.

**यजुर्वेदातील देवता** – दैवतकल्पनेत ऋग्वेदापेक्षा यजुर्वेदात फारशी प्रगती झालेली दिसत नाही. ऋग्वेदातल्या देवतांनाच यजुर्वेदात हविर्भाग अर्पिलेले आहेत. मात्र देवतांच्या श्रेष्ठ–कनिष्ठत्वात काही फेरफार झालेले दिसतात. हे फेरफार प्रजापती, विष्णू व रुद्र यांच्या बाबतीत विशेषत्वाने घडले आहेत. या तीन्ही देवता ऋग्वेदात तिसऱ्या–चौथ्या दर्जाच्या होत्या; पण यजुर्वेदात त्यांना असाधारण महत्त्व लाभले. ऋग्वेदात प्रजापती ही देवता कुठेच डोळ्यात भरत नाही. पण यजुर्वेदाने प्रजापतीला सर्व देवतांत अग्रस्थान दिले आहे. प्रजापती हा अस्तित्वात असलेल्या प्राणिमात्राला व्यापून उरला आहे आणि त्याच्याहून अधिक सामर्थ्याचा दुसरा देव नाही, अशी यजुर्वेदाची धारणा आहे–

**यस्मान्न जातः परो अन्यो अस्ति य आविवेश भुवनानि विश्वा ।**
**प्रजापतिः प्रजया संरराणस्त्रीणि ज्योतींषि सचते स षोडशी ।**

(वाज. सं. ८.३६)

अर्थ– प्रजापतीपेक्षा श्रेष्ठ असा दुसरा कोणीही देव उत्पन्न झाला नाही. तो सृष्टीतील सर्व वस्तूंच्या ठिकाणी अंतर्यामी रूपाने प्रविष्ट झालेला आहे. तो षोडशकलात्मक लिंगशरीर धारण करणारा आणि प्रजेच्या रूपाने स्वतःच अखिल सृष्टीमध्ये रममाण होणारा आहे. तो भगवान प्रजापतीच अग्नी, वायू व सूर्यरूपी तीन ज्योतींना प्रकाशित करीत असतो.

कल्पांतीच्या प्रलयजलात प्रजापती ( ब्रह्मदेव ) प्रथम जन्माला आला, या पौराणिक कल्पनेचे बीजही यजुर्वेदातच आढळते (वाज. सं. २३.६३).

यजुर्वेदात रुद्र या देवतेला ऋग्वेदातल्यापेक्षा स्पष्ट व निश्चित असे रंगरूप आहे. यजुर्वेदातला रुद्र धनुष्य–बाण घेऊन पारध करणारा, चर्मवस्त्र व जटाजूट धारण करणारा, तसेच मनुष्य व पशू यांचे रोग बरे करणारा असा आहे. तो केवळ संहारक नसून उदार, दयाशील व मंगलप्रदही आहे —

**नमः शम्भवाय च मयोभवाय च नमः शङ्कराय च**
**मयस्कराय च नमः शिवाय च शिवतराय च ॥**

(वाज. सं. १६.४१)

अर्थ– ज्याच्यापासून सुख उत्पन्न होते, त्या रुद्राला नमस्कार असो. त्याचप्रमाणे संसारविषयक सुख देणाऱ्या रुद्रालाही नमस्कार असो; पारलौकिक सुख देणाऱ्या रुद्राला नमस्कार असो. शिव (कल्याणकारक) व शिवतर अशा रुद्राला नमस्कार असो.

ऋग्वेदातला विष्णू हा सर्वश्रेष्ठ इंद्राचा केवळ अनुचर व आज्ञाकारक होता; पण यजुर्वेदात त्याच्या उलट परिस्थिती आहे. इंद्राग्नींचे महिमान यजुर्वेदात खूपच घसरलेले दिसते. इंद्र हा केवळ आघाडीचा लढवय्या आणि अग्नी हा केवळ देवतांसाठी आहुती वाहून नेणारा दूत, असे यजुर्वेदाने मानले आहे.

पुराणांनी त्रिदेवकल्पना स्वीकारून ती पूर्णावस्थेला नेली; पण तिचे बीजही यजुर्वेदातच आढळते.

याशिवाय स्कंद, शुक्र, वेन, मर्क, मंथी, ऋतू, मास, दिवस अशा काही नव्या दुय्यम–तिय्यम देवता यजुर्वेदाने निर्माण केल्या असल्या, तरी ऋग्वेदातली तेहतीस ही देवतांची संख्या यजुर्वेदालाही मान्य आहे.

**अथर्ववेदातील देवता**– बऱ्याच देवता ऋग्वेद आणि अथर्ववेद यांत समान आहेत. उरलेल्या बऱ्याच नव्या आहेत. ज्ञानकोशाच्या दुसऱ्या विभागात त्यांची यादीच दिलेली आहे. इंद्र, अग्नी, वरुण, इ. महत्त्वाच्या देवतांची गुणकर्मे अथर्ववेदातही फारशी बदललेली नाहीत. अथर्ववेदात असुर, पिशाच,

गंधर्व, इ. वर्गातल्या काही व्यक्तींनाही देवत्व दिलेले आहे. उदा० अर्बुद, अलीक, ऋक्षग्रीव, किमीदिन, चित्ररथ, तक्षक, नानक इत्यादी. अथर्ववेदात काही भावनांनाही देवतारूप दिलेले आढळते. उदा० काम, निद्रा, श्रद्धा, द्रुह इत्यादी.



स्कंद

ब्राह्मण ग्रंथांतील देवता – या वाङ्मयात देववर्णने व देवांच्या कथा विपुल आढळतात.

'देवाश्च वा असुराश्च प्रजापतेर्द्वय: पुत्रा आसन्' = देव आणि असुर हे प्रजापतीचे (कश्यप) दोन पुत्र होते (तां. ब्रा. १८.१.२). देव हे कनिष्ठ व असुर हे ज्येष्ठ होते (श. ब्रा. १४.४.१.१). प्रजापतीने आपल्या मुखाने देवांना उत्पन्न केले व खालच्या प्राणाने असुरांना उत्पन्न केले (श. ब्रा. ११.१.६. ७–८). 'द्यौर्वै सर्वेषां देवानामायतनम्' = द्युलोक हे सर्व देवतांचे स्थान होय (श. ब्रा. १४.३.२.८). किंवा 'देवगृहा वै नक्षत्राणि' = नक्षत्रे ही देवांची गृहे होत (तै. ब्रा. १.५. २.६).

देव हे मुळात मर्त्यच होते आणि त्यांना मृत्यूचे भयही वाटत होते. त्या भयातून मुक्त होण्यासाठी ते प्रजापतीकडे गेले व प्रजापतीने त्यांना नवरात्रविधानाने अमृतत्व दिले, अशी कथा तांड्य ब्राह्मणात आहे (२२.१२.१).

दिवस व मासातला शुक्ल पक्ष ही देवांची आश्रयस्थाने होत (श. ब्रा. १.७.२.२२.; २.१.३.१). माणसाचे जे संवत्सर (वर्ष) तो देवांचा एक दिवस होय (तै. ब्रा. ३.९.२.२१). देव हे कधीही झोपत नाहीत (श. ब्रा. ३.२.२.२२). 'अपहतपाप्मानो देवा:' = देवांची सर्व पापे झडून गेलेली असतात (श. ब्रा. २.१.३.४).

वसू, रुद्र व आदित्य असे देवांचे तीन वर्ग सांगितले असून, तिहींची मिळून ३३ ही संख्या दिली आहे (तां. ब्रा. ४.४.११) त्यांपैकी वसू हे आठ, रुद्र हे अकरा व आदित्य हे बारा आहेत (श. ब्रा. ४.५.७.२). ही संख्या ३१ भरते. तिच्यात द्यावापृथिवी किंवा प्रजापती-वषट्कार किंवा वाक्-ईश्वर हे दोन देव मिळवल्याने ही संख्या ३३ होते. देवांचा पिता प्रजापती हा ३४ वा देव मानलेला आहे (श. ब्रा. १२.६.१.३७).

या देवांत इंद्र हा ओजिष्ठ व बलिष्ठ मानलेला आहे. काही ठिकाणी इंद्राग्नी, काही ठिकाणी विष्णू, तर एका ठिकाणी रुद्र हा देवांतला ज्येष्ठ मानलेला आहे (श. ब्रा. १४.१.१.५; कौ. ब्रा. २५.१३). बृहस्पती हा देवांचा पुरोहित व उद्गाता आहे (ऐ. ब्रा. ८.२६). वरुण हा देवांचा राजा आहे (श. ब्रा.१२.८. ३.१०). यज्ञात समर्पिलेले हविर्द्रव्य हे देवांचे अन्न असून, साम हे त्यांचे परमान्न होय (तै. ब्रा. १.३.३.२–३). यज्ञ हा देवांचा आत्मा असून, जे यज्ञ किंवा व्रत करीत नाहीत, त्यांनी अर्पिलेले अन्न देव खात नाहीत (ऐ. ब्रा. ७.११; तै. ब्रा. १.६६.४).

**देवांचे मानवीकरण**– ब्राह्मणकालात देवांचे मानवीकरण करण्याकडे अधिक प्रवृत्ती झालेली दिसते. ऋग्वेदातले देव मानवी स्वरूपाचे होते; पण त्यांना माणसाचे सगळे स्वभावगुण चिकटलेले नव्हते. ब्राह्मणकालात ती गोष्ट पूर्ण झाली. देवांचे संबंधही माणसासारखेच बहुविध बनले; त्यांना माणसांसारखीच माता, पिता, पुत्र, कन्या, बंधू, भगिनी, अशी नाती निर्माण झाली. त्यांच्यांत परस्परकलह आणि संघर्षही सुरू झाले. श्रेष्ठ-कनिष्ठत्वाबद्दलही भांडणे होऊ लागली. ते एखाद्याशी स्नेह राखीत, तर एखाद्याशी वैरही करीत. ते शत्रूशी लढत, लूट वाटून घेत व इतरही नाना प्रकारचे मानवसदृश व्यवहार करीत. ब्राह्मणांतील देवांचे हे स्वरूप पाहता तत्कालीन माणसांनी आपल्या जीवनक्रमावरून आणि जीवनानुभवावरून देवांची स्वरूपे व स्वभाव यांची कल्पना केलेली दिसते. इतकेच नव्हे; तर ब्राह्मणांनी देवांवर आपली वर्णव्यवस्थाही लादली असल्याचे कळून येते. अग्नी व बृहस्पती हे ब्राह्मण, इंद्र व वरुण हे क्षत्रिय आणि मरुत व विश्वेदेव हे वैश्य होत, असे ब्राह्मणांनी सांगितले आहे.

देव हे सत्यमय व सत्यप्रतिज्ञ असतात, असे म्हटले आहे (ऐ. ब्रा. १.६); पण कित्येक वेळा देवांच्या ठिकाणी नैतिक दुर्गुणांचाही आढळ होतो. इंद्राने अहल्येशी जारकर्म केले, ब्रह्मदेव आपल्याच कन्येचा अभिलाष धरून तिच्या मागे लागला, अग्नीने सप्तर्षींच्या स्त्रियांची अभिलाषा धरली, इ. कथा ब्राह्मणे व इतर वैदिक ग्रंथ यांत आल्या आहेत. ईर्षा, मद, मत्सर, मोह, स्वार्थ, इ. दोषांपासूनही देव अलिप्त नाहीत.

म्हणूनच 'न देवचरितं चरेत्' असे म्हटले आहे. आपल्या सुख-समृद्धीसाठी किंवा मनोरथपूर्तीसाठी देवांची उपासना करावी; पण त्यांच्या चरित्राचे अनुकरण करू नये, असा त्याचा अर्थ आहे.

**उपनिषदांतील देवता** – चैतन्ययुक्त अशी शक्तिकेंद्रे किंवा शक्तीची उद्‌गमस्थाने पिंड–ब्रह्मांडात आहेत, ती सर्व देवता-स्वरूप होत, असा उपनिषदांचा आशय आहे. या सृष्टिचक्राचे संचालन करणाऱ्या शक्ती असंख्य आहेत; पण उपनिषत्का-रांनी संघटक, प्रकाशक व कार्यकारी असे त्यांचे त्रिविध वर्गीकरण केलेले दिसते. हे वर्गीकरण ऋग्वेदातील वर्गीकरणा-पेक्षा वेगळ्या प्रकारचे आहे. प्रश्नोपनिषदाच्या दुसऱ्या प्रश्नात भार्गव ऋषीने पिप्पलाद ऋषीला पुढील प्रश्न केला आहे–

भगवन् कत्येव देवताः प्रजां विधारयन्ते कतर –
एतत्प्रकाशयन्ते कः पुनरेषां वरिष्ठः ।

अर्थ– भगवान, किती देवता प्रजेचे धारण करतात, कोणत्या देवता प्रजेला प्रकाशित करतात आणि या सर्व देवतांत कोणती देवता श्रेष्ठ ?

या प्रश्नाला पिप्पलाद ऋषीने जे उत्तर दिले, त्यात देव-तांच्या वरील त्रिविध वर्गीकरणाचा आशय प्रकट झाला आहे. संघटना म्हणजे या चराचर सृष्टीचे धारण-पोषण होय. आकाशादी पंचमहाभूते ही प्रजेचे अर्थात पिंड-ब्रह्मांडात्मक सृष्टीचे धारण-पोषण करणाऱ्या देवता होत. सृष्टीत किंवा मानवशरीरात जी व्यक्त किंवा व्यावहारिक कार्ये दिसतात, त्यांच्या मुळाशी एक अंतःशक्ती असते. तिला प्राणशक्ती असे म्हणतात. प्राण ही प्रकाशक देवता आहे. सूर्य, चंद्र, इंद्र, रुद्र या देवतांच्या रूपाने प्राणशक्तीचेच प्रकाशनसामर्थ्य व्यक्त होत असते. ज्ञातृत्व आणि ज्ञेयत्व हे धर्म उत्पन्न करणे म्हणजेच प्रकाशनसामर्थ्य होय. शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी व जीव या सर्वांच्या समुच्चयाला आत्मा म्हटले आहे. या आत्मशक्तीवरच विश्वातली सर्व कार्ये आधारित असतात. आत्मा हीच विश्वा-तली प्रमुख कार्यशक्ती होय आणि म्हणूनच तो सर्वश्रेष्ठ देव समजावा.

पिंड-ब्रह्मांडातील या देवतांची उत्पत्ती कशी व कोणत्या क्रमाने झाली, याचे वर्णन ऐ. उपनिषदात आढळते, ते असे–

परमात्मतत्त्वाच्या ठिकाणी सृष्टी उत्पन्न करण्याची इच्छा उत्पन्न झाली. या इच्छाविशिष्ट ब्रह्मालाच सगुण ब्रह्म किंवा परमेश्वर अशी संज्ञा दिली आहे. या परमेश्वराने प्रथम पृथ्वी, अंतरिक्ष व नक्षत्रलोक असे तीन लोक उत्पन्न केले. मग त्याला या त्रैलोक्याच्या व्यवस्थापनासाठी लोकपाल निर्माण करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्या वेळी त्रैलोक्याच्या खाली-वर दिव्य आप नामक विरल द्रव्य भरून राहिले होते. परमे-श्वराच्या इच्छाशक्तीने या दिव्य आपाचे घनीभवन होऊन एक तप्त तेजोमय असा पिंड निर्माण झाला. हा पिंड म्हणजेच विराट पुरुष होय. या पिंडाला मुख उत्पन्न झाले आणि मुखा-तून वाणी व वाणीतून अग्नी उत्पन्न झाला. नासिकेतून प्राण व त्यातून वायू उत्पन्न झाला. कानातून श्रवणेंद्रिय व त्यातून दिशा उत्पन्न झाल्या. हृदयातून मन आणि त्यातून चंद्र उत्पन्न झाला, इत्यादी. अशा प्रकारे निर्माण झालेल्या या देवता आपापल्या निवासस्थानी राहून आपले ईश्वरदत्त कार्य करू लागल्या ( ऐ. उ. १. २).

यज्ञसंस्थेतूनच भारतीय तत्त्वज्ञानाचा उगम झाला आहे. यज्ञयागांचा सार्वत्रिक प्रसार झाल्यानंतर कोणत्या मंत्राची कोणती देवता, याविषयी चर्चा आणि वादविवाद सुरू झाला. या वादविवादातूनच उपासनेच्या दृष्टीने कोणती देवता श्रेष्ठ हाही प्रश्न स्वाभाविकपणेच पुढे आला. या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी जे संशोधन सुरू झाले, त्याचे फलस्वरूप म्हणून ब्रह्मसिद्धान्त उत्पन्न झाला. हा ब्रह्मसिद्धान्त तत्त्वमस्यादी महा-वाक्यांतून प्रकट झालेला दिसतो. यज्ञातल्या देवताकांडातून जी तत्त्वजिज्ञासा उत्पन्न झाली, तिला उपनिषदांनी परब्रह्म पदवीपर्यंत नेऊन पोचविले. 'ब्रह्मविदाप्नोति परम्' = जो ब्रह्म जाणतो, त्यालाच परमतत्त्वाची प्राप्ती होते, असे तैत्तिरीय उपनिषदाच्या पहिल्या मंत्रात सांगितले आहे.

**पौराणिक देवता** – पुराणकालात आल्यावर कित्येक वैदिक देवता आपले मूळ ऐश्वर्य टिकवू शकल्या नाहीत. त्या कालात बऱ्याच वैदिक देवतांचा लोपच झाला आणि काही देवता आपल्या उदात्त रूपापासून च्युत होऊन सामान्य थरावर येऊन बसल्या. वरुणदेवता हे या गोष्टीचे उत्कृष्ट उदाहरण आहे. वैदिक कालात वरुण हा देवतांच्या उच्च श्रेणीत विराजमान होता; पण पुराणकालात त्याचे महत्त्व कमी होऊन तो एक सामान्य जलदेवता बनला.

वरुणासारखीच जवळ जवळ इंद्राचीही स्थिती आहे. पौरा-णिक वैष्णवधर्म प्रबल होताच इंद्राचे माहात्म्य एकदम घसरले. पौराणिक कालात इंद्रपूजा विशिष्ट उत्सवाच्या आणि विधि-विधानांच्या अनुषंगाने गौण स्वरूपातच काय ती चालू राहिली. अग्नी हा देवही त्या मानाने मागे पडला. पुराणकालात बहुतेक महत्त्वाचे वैदिक देव दिक्पाल या स्वरूपात त्या त्या दिशांचे अधिपती बनून राहिलेले दिसतात.

त्याबरोबरच वैदिक विष्णू आणि रुद्र यांचे माहात्म्य मात्र खूपच वाढले. आणि कित्येक वैदिक देवतांच्या संबंधात नव्या कल्पना उगम पावल्या. कित्येकांचे सामर्थ्य व सत्ताक्षेत्र मर्यादित झाले, कित्येक देव कोणत्या तरी मोठ्या देवात विलीन झाले,

तर कित्येक खालच्या थरातून वर जाऊन आध्यात्मिक क्षेत्रात दाखल झाले. अवताराच्या अथवा गुरूच्या रूपात देवांनी मानवाला तत्त्वज्ञानही उपदेशिले असल्याचे दिसते. भगवद्‌गीता, रामगीता, अवधूतगीता, गणेशगीता, देवीगीता, इ. ग्रंथ ही यांची उदाहरणे होत.



विष्णू

वैदिक देवता आणि पौराणिक देवता यांचे स्वभाव आणि स्वरूप या गोष्टींतही अंतर पडले. पौराणिक देवता सगुणसाकार रूप धारण करून मानवांच्या विशेष जवळ आल्या. मानवी सुखदुःखांशी त्यांनी आपला घनिष्ट संबंध दाखविला. वैदिक देवतांच्या अपेक्षेने पौराणिक देवतांनी आपल्या भक्तांशी व्यक्तिगत संबंध निर्माण केले. माणसाच्या बुद्धीची वाढ आणि त्याने घडवलेला सामाजिक व सांस्कृतिक इतिहास यांच्या अनुबंधाने देवांची स्वभाववैशिष्ट्येही बनलेली दिसतात. ऋग्वेदातला यम हा मारक नाही, पण पुराणातला यम मात्र विविध नरकांचा अधिपती व जीवांना पापपुण्यानुसार बरेवाईट भोग घडविणारा आहे. गणपती प्रथम विघ्नकर्ता होता, तो पुढे विघ्नहर्ता झाला आहे. पार्वती ही शिवपत्नी काही वेळा काली, तर काही वेळा अन्नपूर्णा ठरली आहे.

प्राचीन युगापासून चालत आलेल्या लोकसमाजात प्रचलित असलेल्या, परंतु इतस्ततः विखुरलेल्या स्वरूपात उपलब्ध होणाऱ्या उपासनापद्धती, आचार-विचारपरंपरा आणि कल्पना या सर्वांचा एक व्यापक समन्वय घडवून आणणे हे पुराणांचे महत्तम कार्य होय. पौराणिक देवतांत वैविध्य असले, तरी सामंजस्य आहे आणि नानात्व असले, तरी त्यांमध्ये ऐक्यभावना परिपुष्ट आहे. पुराणांच्या या समन्वयी भावनेतूनच अवतारवादाचा जन्म झाला आणि त्यामुळे पुराणांत कर्मकांड व ज्ञानकांड यांना दूर सारून भक्तीचे राज्य प्रस्थापित झाले.

**देवासुरयुद्धे** – असुर हे देवांचे प्रतिस्पर्धी किंवा शत्रू होत. भारतीय वाङ्मयात आढळणारे पहिले देवासुरयुद्ध म्हणजे इंद्र-वृत्रयुद्ध हे होय. त्या युद्धात इंद्राने वृत्राला मारले आणि त्याला वृत्रघ्न ही उपाधी लाभली. ऋग्वेदातील तत्त्वज्ञान हे देव (प्रकाश) व असुर (अंधःकार) यांच्यातील सनातन संघर्षावरच आधारलेले आहे. त्या देवासुरसंघर्षाला इतिहासाची बैठक नाही, हे वैदिक ऋषींना पूर्ण माहीत होते. 'हे इंद्रा, जी युद्धे तू सांप्रत आणि पूर्वी केलीस ती मृषा (मायामय किंवा खोटी) होती,' असे ऋग्वेदात एका ठिकाणी म्हटले आहे (१०.५४.२). 'हे इंद्रा, तू कोणाशी लढला नाहीस आणि तुझा कोणी शत्रू नाही,' असेही दुसऱ्या ठिकाणी म्हटले आहे. यावरून इंद्र-वृत्रयुद्ध हे वैदिक ऋषी केवळ निसर्गातील तमः–प्रकाश-संघर्षाचे प्रतीक समजत होते, हे कळून येईल. देवासुरयुद्ध म्हणजे देवांनी स्वतःमधल्या दुष्ट प्रवृत्तींशी केलेला संग्राम व त्यावर मिळवलेला विजय होय, असा त्याचा आध्यात्मिक अर्थ वैदिक ऋषींनीच सांगितला आहे.

पुढे ब्राह्मणग्रंथांपासून पुराणग्रंथांपर्यंतच्या प्रचंड वाङ्मयात देवासुरयुद्धे ही सत्य घटना किंवा दोन वर्गांमधला खराखुरा संग्राम या अर्थाने वर्णिली गेली. असुरांनी तप करून अजिक्यत्वाचे किंवा त्रैलोक्यविजयाचे वर शिवाकडून किंवा विधात्याकडून मिळवावे आणि त्यांच्या बळावर स्वर्ग पादाक्रांत करावा, असे प्रसंग पुराणांत अनेक वेळा आलेले आहेत. पुष्कळदा असुरांच्या भयाने देवांची त्रेधातिरपीट झाली आहे. इंद्रादी देव 'त्राहि भगवन्' म्हणून विष्णूला शरण गेले आहेत आणि विष्णूने अभय दिल्यावर त्या सामर्थ्याने असुरांशी लढले आहेत, असेही पुराणांवरून कळून येते. स्वर्गाचे आधिपत्य इंद्राकडे आहे, ही गोष्ट असुरांना शल्यासारखी बोचत होती. म्हणून तपश्चर्येने शक्तिसंपन्न झाल्यावर ते पहिला हल्ला स्वर्गावर चढवीत आणि मग भूलोक व पाताळही पादाक्रांत करीत. रामायण–महाभारतात व भागवत, देवीभागवत, वामन पुराण, इ. पुराणांत अशा प्रतिस्पर्धी देव–दैत्यांच्या अनेक जोड्या आढळतात. त्यांपैकी काही जोड्या पुढीलप्रमाणे –

वृत्र, अंधक, इ. – इंद्र; महिष, शुंभ – निशुंभ, चंड – मुंड, इ. – देवी; विरोचन – वरुण; मय – अग्नी; जंभ – कुबेर; सौच्छार – वायू; त्रिपुर – रुद्र; तारक – स्कंद; सिंधूर, विघ्न – गणपती; मधु– कैटभ – विष्णू; रावण – राम; नरक, धेनुक, अघ, इ. – कृष्ण.

**त्रिदेव कल्पना**– पौराणिक युगात ब्रह्मा-विष्णु-महेश या तीन देवतांना असाधारण महत्त्व प्राप्त झाले. ब्रह्मा हा सृष्टीचा निर्माणकर्ता, विष्णू हा पालनकर्ता व महेश हा संहारकर्ता या स्वरूपात हे तीन देव प्रतिष्ठित झाले. ब्रह्मा हा पुराणांनी अपूज्य ठरवला असला, तरी सृष्टि-कर्ता हा त्याचा अधिकार त्यांनी कायम ठेवला आहे. पुराणांनी विष्णू आणि शिव यांच्या उपासनेचे माहात्म्य खूपच वाढवले. त्यामुळे पुढे वैष्णव आणि शैव हे दोन भारतातले प्रमुख उपासना संप्रदाय ठरले.



शिव

विष्णू आणि शिव यांच्यांत अधिक श्रेष्ठ कोण, हा प्रश्नही पुराणांत निर्माण झाला. भृगू ऋषीने त्या प्रश्नाचे निर्णायक उत्तर दिले, की विष्णू हा सत्त्वगुणप्रधान असल्यामुळे तीन्ही देवांत श्रेष्ठ आहे. ब्रह्मा-विष्णू-महेश ही तीन्ही एका विष्णूचीच तीन कार्यांसाठी घेतलेली विभिन्न रूपे आहेत, असे वैष्णव पुराणांनी म्हटले आहे. वायू पुराणात या त्रिदेवांच्या पारस्परिक संबंधाबद्दल एक कथा आढळते, ती अशी– प्रलयान्ती केवळ एक विष्णूच अवशिष्ट उरला होता. पुढे त्याच्या नाभिकमलातून ब्रह्मयाची उत्पत्ती झाली. ब्रह्मयाने विष्णूला विचारले, की 'तू कोण आहेस ?' त्यावर विष्णू म्हणाला. 'मी चराचराचा प्रभू आहे.' तोच प्रश्न विष्णूने ब्रह्मालां विचारला. ब्रह्मा म्हणाला. 'मी आदिकर्ता प्रजापती आहे आणि माझ्या ठिकाणी सर्व काही प्रतिष्ठित आहे.' एवढ्यात शिव तिथे प्राप्त झाला. मग दोघांनी मिळून शिवाची स्तुती केली. विष्णू ब्रह्मदेवाला म्हणाला 'मी सनातन योनी आहे, तू बीज आहेस आणि शिव बीज पेरणारा आहे.' मग ब्रह्मयाने शिवाकडे वर मागितला, की 'तू माझा पुत्र हो.' विष्णूने मागितले, की 'हे शिवा, तुझ्या ठिकाणी माझी भक्ती स्थिर राहो.'

या कथेवरून विष्णूचा पुत्र ब्रह्मा आणि ब्रह्मयाचा पुत्र शिव असे या तीन्ही देवांचे परस्पर नाते कळून येते. वायू पुराणातच शिवाने विष्णूला सांगितले आहे, की 'तू माझ्या हृदयात स्थित आहेस, आपल्यामध्ये भेद नाही (२४.१.३०; २५.११.३०). अशा प्रकारे हरि–हरांच्या ऐक्याची कल्पना सांगून वायू पुराणाने शैव-वैष्णवातील तेढ वाढू न देण्याचा उपक्रम केला.

भागवताने विष्णुप्राधान्यावर भर दिला. ब्रह्मदेव विष्णूचे चरणप्रक्षालन करतो आणि तेच गंगारूपाने प्रवाहित होणारे जल शिव आपल्या मस्तकी धारण करतो, असे भागवताने सांगितले आहे (भाग. पु. १०.८९.१५; १.१८.२१). वैष्णव पुराणांनी विष्णूच्या स्वरूपात तीन्ही देवांचा समावेश करून त्यांचे ऐक्य प्रतिपादिले आहे. पुराणांची सर्वसाधारण प्रवृत्ती अशा प्रकारे ब्रह्मा-विष्णु-महेशांत ऐक्य व परस्पर सौहार्द दाखवण्याकडे दिसते. पद्म पुराणात याविषयी पुढील श्लोक आहे–

> एकमूर्तिस्त्रयो देवा ब्रह्माविष्णुमहेश्वराः।
> त्रयाणामन्तरं नास्ति गुणभेदाः प्रकीर्तिताः॥
>
> (पद्म पु. भूमि. ७१.२०)

अर्थ– ब्रह्मा-विष्णु-महेश हे तीन देव म्हणजे एकच मूर्ती आहे. त्या तिघांत अंतर नाही. (फक्त) सत्त्वादी गुण तेवढे भिन्न आहेत, असे म्हटले आहे.



ब्रह्मा

**पंचायतन कल्पना** – पुराणांनी पंचायतन या स्वरूपातही देवतांचा उपासनामार्ग प्रचलित केला. विष्णू, शिव, शक्ती, गणपती व सूर्य या पाच देवतांचा त्यात समावेश होतो. पुराणांनी विष्णूला नित्य, अजन्मा, अक्षय, अव्यय असे निर्मल परब्रह्मच मानले. विष्णुपद हे परम अर्थात सर्वश्रेष्ठ पद ठरवले. पुराणांतला विष्णू हा स्थिरचर व्यापून दशांगुळे उरला, अशा प्रकारचा आहे.

वैदिक कालात रुद्र-शिव याला जेवढे महत्त्व होते, त्यापेक्षा पुराणकालात त्याचे महत्त्व

ख्यातपटीने वाढले. सांप्रतकाली शिव ही विष्णूच्या बरोबरीने पूजिली जाणारी देवता आहे. पौराणिक शिव हा अगुण रूपात सच्चिदानंदस्वरूप आणि सगुण रूपात जगाचा उत्पत्ति-स्थिति-प्रलय कर्ता ठरला आहे. ब्रह्मा-विष्णु-महेश ही तीन्ही रूपे आणि त्यांची कार्ये एकट्या शिवाचीच आहेत, असे शैव पुराणांनी सांगितले आहे.

देवी म्हणजे शक्तिदेवता किंवा जगदंबा. मुळात ती धरित्रीचे प्रतीक या स्वरूपातच वावरत होती. तिची अनेक उग्र-भयंकर अशी रूपे होती. पुराणकालात या तिच्या सर्व रूपांसह तिचे उन्नयन झाले आणि ती पंचदेवतांत दाखल झाली.

गणपती या देवतेचे मूळ रूप ऋग्वेदात ब्रह्मणस्पतीच्या रूपाने दिसते. पुराणकाळात तो शिवाचा पुत्र म्हणून शिव-



गणपती

परिवारात दाखल झाला. विघ्नविनाशक आणि ज्ञानदाता म्हणून त्याला स्वतंत्र प्रतिष्ठाही पुराणांनी मिळवून दिली.

सूर्योपासना ही मुळात वैदिक उपासनाच आहे; पण पुढे तिच्यात शक-कुशाणांच्या अनुषंगाने तांत्रिक माग शिरला. सूर्य ही शक-कुशाणांचीही उपास्य देवता होती. भारतात आल्यावर त्यांना कळले, की इथे तांत्रिक सूर्यपूजा अवगत असलेले पुरोहित नाहीत. म्हणून मग त्यांनी ती पूजा-अर्चा अवगत असलेले मग किंवा शाकद्वीपी ब्राह्मण इराणातून आणले व इथे तांत्रिक सूर्यपूजा प्रचलित केली. पुराणांनी वैदिक सूर्योपासना व शक-कुशाणांची सूर्योपासना यांचा समन्वय घडवून आणला आणि सूर्यदेवतेला पंचदेवतांत दाखल करून घेतले.

**परिवार देवता**— मुख्य देवतेच्या अनुषंगाने असणाऱ्या आणि प्रसंगी मुख्य देवतेची परिचर्या करणाऱ्या अशा ज्या काही देवता आहेत, त्यांना परिवार देवता असे म्हणतात. विष्णूच्या परिवारात लक्ष्मी, भूदेवी, श्रीदेवी, गरुड, विष्वक्सेन आणि विष्णूच्या हातातली आयुधे यांना परिवार देवतांचा मान मिळाला आहे. शिवाच्या परिवारात स्कंद, गणेश, नंदी, चंडेश, वीरभद्र, भैरव, क्षेत्रपाळ, इ. देवता परिवार देवता म्हणून गणल्या गेल्या आहेत. देवी किंवा शक्ती हिच्या परिवारात ब्राह्मयादी सप्तमातृका व आणखीही कित्येक उग्र देवता आहेत.

**देवपत्न्या**—— देवांप्रमाणेच काही देवपत्न्याही प्रसिद्ध आहेत. यज्ञात देवांबरोबरच त्यांनाही हविर्भाग मिळतो. कित्येकदा स्वतंत्रपणेही त्यांची उपासना चालते. इंद्राणी, अग्नायी, सूर्या, इ. देवपत्न्यांना उद्देशून वैदिक ऋषींनी पुढीलप्रमाणे प्रार्थना केली आहे –

देवांच्या उत्कंठित पत्न्या आमचा धावा ऐकोत. आमच्या संततीच्या हितार्थ आणि आम्हांला सात्त्विक सामर्थ्य प्राप्त व्हावे, म्हणून त्या आमचा सांभाळ करोत. ज्या भूमीवर असतात व ज्या उदकातही असतात, त्या देवपत्न्या आमची हाक ऐकून आम्हाला सुख देवोत (ऋ. ५.४६.७).

सरस्वती, लक्ष्मी व पार्वती या अनुक्रमे ब्रह्मा, विष्णू व महेश यांच्या पत्न्या असून, पौराणिक युगात त्यांना आपल्या पतीबरोबर, तशीच स्वतंत्रही प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे.

माणसांच्या गरजा व आकांक्षा वाढल्या, की देवांची शक्तीही वाढते. वैदिक आर्यांना विरोधी शक्तींचा बीमोड करून आपल्या वसाहती स्थापायच्या होता. त्यासाठी त्यांनी इंद्र या देवाला सर्वसमर्थ केले व शेकडो स्तुतिस्तोत्रे गाऊन त्याचे माहात्म्य वाढवले, असा इतिहास आहे. समाजात सांस्कृतिक बदल होऊन माणसांची कर्तव्ये बदलली, की देवांचीही बदलतात. एखाद्या टोळीला किंवा जमातीला राजकीय उर्जितावस्था आली, की त्या टोळीचा देव तो राष्ट्रदेव बनतो. समाजाची नैतिक मूल्ये जसजशी क्षीण किंवा बलवत्तर होतात, तसतशी ती देवांचीही होतात. महान सामाजिक किंवा राष्ट्रीय आपत्तीच्या वेळी अचानक अनेक देव पुढे येतात किंवा उपेक्षित असतील ते पूजनीय ठरतात. पण त्यांची गरज संपली, की त्यांना पुनश्च अज्ञातवासात जावे लागते. तत्त्वज्ञानी पुरुषांच्या

विचारमंथनात सापडूनही अनेक देवांचे देवपण हरपते. सांप्रत ज्यांना आपण क्षुद्र दैवते म्हणतो आणि ज्यांच्याविषयी आदर-भाव बाळगीत नाही, ती क्षुद्र दैवते संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेत माणसाच्या मनावर विलक्षण अधिकार गाजवीत



लक्ष्मी

होती. माणसे त्यांना थरकाप भीत असत. आजही अशिक्षित वन्य जातीजमातींत त्या दैवतांचे राज्य अबाधित आहे. पण माणूस जेव्हा त्या आदिम अवस्थेतून वर आला, निरनिराळ्या बऱ्यावाईट घटनांचा बुद्धीच्या आधारे शोध घेऊ लागला आणि त्या त्या देवतांचे सामर्थ्य व कारकत्व साधक बाधक प्रमाणांच्या निकषावर घासून पाहू लागला, तेव्हा त्या दैवतांच्या अनिर्बंध अधिकारांची कवच-कुंडले नकळत गळून पडली. याच प्रक्रियेने तत्त्वाचा ठाव शोधीत माणूस जेव्हा परतत्त्वाला जाऊन भिडला, तेव्हा त्याला कळून आले, की देव हे स्वयंसिद्ध व स्वयंप्रकाशी नसून, त्या परमतत्त्वाच्या सत्तेवरच त्यांचे अस्तित्व अवलंबून आहे आणि त्याच्या प्रकाशानेच ते सर्व प्रकाशित झाले आहेत. विश्वरूपदर्शनाच्या प्रसंगी अर्जुनालाही देवांचे हे सत्य स्वरूप कळून आले होते. त्यामुळे तो म्हणतो —

अमी हि त्वां सुरसङ्घा विशन्ति ।
केचिद् भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ॥

( गीता ११.२१ )

अर्थ – ( हे विश्वरूप भगवंता ! ) हे देवांचे संघ तुझ्या ठायी प्रवेश करीत आहेत ( व ) काही ( देव ) भयाने हात जोडून तुला प्रार्थीत आहेत ( असे मला दिसते ).

तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात अशा प्रकारे एका सर्वसमर्थ, सर्वसाक्षी व सर्वाधीश अशा परमतत्त्वाचा स्वानुभवी साक्षात्कार झाल्यानंतर विचारी व तत्त्वचिंतक असा मनुष्य तरी देवांच्या दास्यातून मुक्त झाला.

**अतिमानवी देवता** – मानव आणि देव या दोहोंच्या मध्ये एका देवसदृश योनीची कल्पना केलेली आहे. या योनीत अनेक जातिसंघ आहेत. विद्याधर, अप्सरा, यक्ष, राक्षस, गंधर्व, किन्नर, पिशाच, गुह्यक, सिद्ध आणि भूत अशी त्या संघांची नावे आहेत. देवांपेक्षा यांचे सामर्थ्य कमी; पण मानवांपेक्षा मोठे आणि अद्भुत. म्हणून त्यांना अतिमानवी म्हटले आहे. या योनीतले हे जातिसंघ देव-मानवांच्या मध्ये राहून दोन्ही ठिकाणी आपला संबंध ठेवतात. या अतिमानवी देवतासंघांची सामान्य लक्षणे अशी—

(१) यांना दैविक आणि मायिक असे उभयविध सामर्थ्य असते. (२) बहुतेक संघ देवलोकाच्या आसपास वावरतात. (३) हे विनपंखांनी आकाशात भराऱ्या मारू शकतात. (४) कुठेही प्रकट होणे, अंतर्धान पावणे, या गोष्टी यांना सहज साध्य असतात. (५) नृत्य, गीत आणि वाद्य या ललितकलांत हे प्रवीण असतात. (६) यांतल्या स्त्री-पुरुषांचा मानवी स्त्रीपुरुषांशी प्रणयसंबंध होऊ शकतो. (७) हे रूपे पालटून पृथ्वीवर वावरू शकतात. (८) यांना रात्रिसंचार विशेष प्रिय असतो. (९) यांना औषधीवनस्पतींचे सूक्ष्म ज्ञान असते. (१०) सामान्यतः शिव हे यांचे उपास्य दैवत असते.

**ग्रामदेवता** – ग्रामदेवता म्हणजे ग्रामाच्या संरक्षक देवता होत. त्यांची नाम-रूपे अनेक आहेत. प्रत्येक देवतेच्या मागे काही तरी दंतकथात्मक इतिहास असतो आणि तो त्या विशिष्ट क्षेत्रापुरताच मर्यादित असतो. ग्रामदेवतांपैकी पुष्कळशा देवता या स्त्रीरूपी असून, त्यांपैकी बऱ्याचशा उग्र–भयंकर असतात. पशुबली देऊन त्यांचा क्रोध शमवावा लागतो. ही प्रथा बहुतेक सर्व भारतभर आढळते. जुन्या काळी या ग्रामदेवतांना नरबळी देण्याचीही प्रथा होती. सातेरी, भुमका, भगवती, पेडुम्म, दुर्गम्म, पिडारी, मरीआई, इ. त्यांची नावे आहेत. दक्षिणेतले पुरुष ग्रामदेव भैरोबा, रवळनाथ, वेताळ, अय्यनार, इ. होत. उ. भारतात बहुतेक ठिकाणी पुरुष ग्रामदेवच आढळतात. राजा लाखन,

द्वारगुसाई, भूमिया, जठेरा, घनसाम, दातनदेव, दूल्हादेव, राजा बंडोल, काशीबाबा, गंगानाथ, सेंदुवीर, गूगाजी, तेजाजी, पाबूजी, इ. त्यांची नावे आहेत.

कुलदेवता – प्रत्येक कुलाच्या ज्या विशिष्ट उपास्य देवता असतात, त्यांना कुलदेवता असे म्हणतात. विशिष्ट गोत्रांच्या खंडोबा, ज्योतिबा, तुळजाभवानी, योगेश्वरी, विजयालक्ष्मी, शांतादुर्गा, मंगेश, लक्ष्मीकेशव, व्याघ्रेश्वर, इ. कुलदेवता होत.



यक्ष – यक्षी

क्षुद्रदेवता – वैदिक आणि पौराणिक देवतांच्या कक्षेबाहेर आणि समाजाच्या खालच्या थरांत ज्या काही देवता आढळतात, त्यांना क्षुद्रदेवता म्हटले जाते. या देवता म्हणजे पूर्वजांचे अथवा वीर स्त्री-पुरुषांचे आत्मे होत, अशी लोकधारणा आहे. रोगांच्या साथी, सृष्टीतले उत्पात, इ. आपत्ती या देवतांच्या कोपामुळे येतात, असे लोकांना वाटते. त्यांचा कोप शमावा, म्हणून मग लोक पूजा-बलिदानादी गोष्टी करतात. यांच्या मूर्ती लाकडाच्या, दगडाच्या किंवा धातूंच्या असतात. काही ठिकाणी गावाच्या सीमेवर, पडक्या भिंतींवर किंवा एखाद्या शिळेवर शेंदुराने त्रिशूल काढून त्या देवतेचे स्थान दाखवलेले असते. काही ठिकाणी त्यांच्या नावाने लाकडाचे अथवा पत्र्याचे त्रिशूळ जमिनीत पुरलेले असतात. क्वचित या देवतांना लहानशा घुमटचाही केलेल्या आढळतात. अशा घुमटीत मूर्तीच्या दोन बाजूंना केरसुण्या किंवा मोरपिसांच्या चवऱ्या उभ्या करून ठेवलेल्या असतात. काही ठिकाणी या देवतांचे नुसतेच बावटे उभारलेले असतात. प्रत्येक देवतेच्या पूजेचा व बलिदानाचा दिवस ठरलेला असतो. खिचडी, तेलपोळी, भात, काकवी, रोडगा, इ. पदार्थ वेगवेगळ्या देवतांचे आवडते होत. या देवता एखाद्या भगताच्या अथवा पुजाऱ्याच्या अंगात येऊन आपल्या इच्छा त्याच्या मुखाने वदवतात. सामान्यतः आषाढ अमावस्या व नरक चतुर्दशी हे दोन दिवस या क्षुद्र देवतांच्या संभावानेचे असतात. [ वै. मा.; गा. दै.; पु. वि.; म. ज्ञा. को.–वेदविद्या; पा. का. मा.; क. हे. इं.; वे. ए.; ऋ. वि. श्रे. ]

## देवताध्याय

सामवेदाच्या पाचव्या ब्राह्मणाला हे नाव आहे. यात देवतांसंबंधी माहिती दिलेली आहे. पहिल्या अध्यायात सामवेदी देवतांचे वर्णन असून, दुसऱ्या अध्यायात वर्ण व वर्णदेवता यांचे विवेचन आहे. तिसऱ्या अध्यायात सर्व देवतांच्या निरुक्तीचा विचार केलेला आहे. [ हिंदुत्व ]

## देवतावैकृतशांती

देवतामूर्तीच्या ठिकाणी विकृती उत्पन्न होणे, यावद्दल ही शांती आहे. काही वेळा प्रतिष्ठित देवतामूर्ती नाचतात, कापतात, घामेजतात, हसतात, धूर ओकतात किंवा रक्ताळतात. याशिवायही आणखी काही विकृती त्यांच्या ठिकाणी दिसतात. या विकृती त्या गावाला अशुभसूचक समजल्या जातात. त्यासाठी पुढीलप्रमाणे शांतिविधी करावा, असे सांगितले आहे –

पुरोहिताने सुस्नात होऊन अशा देवतेवर प्रथम आच्छादन घालावे. मग त्या मूर्तीची मधुपर्काने पूजा करावी. त्यानंतर उपस्थान करावे व स्थालीपाक करावा. पुढे सात दिवस त्या देवतेच्या मंत्राचा पाठ करावा व हवन करावे. आठव्या दिवशी ब्राह्मणभोजन घालावे व गोप्रदान करावे. [ शां. क. ]

## देवदास

(१) (इ. स. चे १७ वे शतक) एक मराठी संतकवी. हा चैतन्यशिष्य असून, गिरीचा व्यंकटेश हे याचे कुलदैवत होते. हा चैतन्य कोण, कुठला, हे जसे अज्ञात तसेच देवदासाचे चरित्रही अज्ञात आहे. काही विद्वानांच्या मते हा यजुर्वेदी ब्राह्मण असावा; परंतु याला सबळ पुरावा नाही. व्यंकटेशस्तोत्र व करुणामृतस्तोत्र (संतमालिका) हे याचे दोन छोटे ग्रंथ उपलब्ध आहेत. व्यंकटेशस्तोत्र हे १०८ ओव्यांचे

असून, ते महाराष्ट्रात बहुतांच्या तोंडी आहे. हे स्तोत्र भावार्द्र असून सुबोध आहे. प्रथम केलेल्या प्रार्थनेत देवदास म्हणतो –

जयजयाजी व्यंकटरमणा । दयासागरा परिपूर्णा ।
परंज्योति प्रकाशगहना । करितों प्रार्थना श्रवण कीजे
जननीपरी त्वां पाळिले । पितयापरी त्वां सांभाळिलें ।
सकळ संकटांपासूनि रक्षिले । पूर्ण दिधलें प्रेमसुख
दीननाथा प्रेमासाठी । भक्त रक्षिले संकटीं ।
प्रेम दिधलें अपूर्व गोष्टी । भजनासाठी भक्तांच्या

अशा प्रकारे हृदयात प्रकट झालेल्या जगजेठीची पूजा व प्रार्थना केल्यावर कवीने देवाकडे एक उदात्त वर मागितला आहे, तो असा –

मजला देईं ऐसा वर । जेणे घडे परोपकार ।
हेंचि मागणे साचार । वारंवार प्रर्थितसें ।

संतमालिका अथवा करुणामृतस्तोत्र हा याचा दुसरा ग्रंथ आहे. या ग्रंथात १४६ ओव्या आहेत. अनेक संतांच्या नामावळचा यात आल्यामुळे या ग्रंथाला संतमालिका असे नाव मिळाले आहे.

देवदासाची भगवद्गीतेवर एक ओवीबद्ध टीका आहे, असे सांगतात. पण ती याचीच की अन्य कोण्या देवदासाची, ते अजून सिद्ध झालेले नाही.

देवदासाने काही मारुडेही लिहिली आहेत. त्यांतली नांद्या (नंदीबैलवाला), पिंगला, वावडी, इ. मारुडे प्रसिद्ध आहेत.

(२) (इ. स. चे १७ वे शतक) एक मराठी संतकवी. अहमदनगरपासून पूर्वेस चौदा कोसांवर दादेगाव नावाचे एक गाव असून, तिथे या देवदासाचा मठ आहे. या देवदासाला देवराव असेही म्हणत असत. हा समर्थ रामदासांचा शिष्य असून, समर्थ संप्रदायातील महंतांत समाविष्ट होता.

देवदासाच्या मठाची गादी ब्रह्मचाऱ्याची असून, त्याची शिष्यपरंपरा चालत आली आहे, ती अशी –

रामदास→देवदास→कृष्णाजीबुवा→जनार्दनबावा→दाजीबुवा→आत्मारामबावा→नारायणबावा.

साडेगाव, जळगाव, गोगलगाव, मांदलमोही वगैरे ठिकाणी देवदासाच्या परंपरेतील मठ आहेत.

देवदास हा आपला शिष्य कृष्णाजी याच्यासह काशीला गेला असता तियेच मरण पावला, अशी माहिती मठपती सांगतो. याने काशी येथे देह ठेवला असला, तरी दादेगाव येथेच याची समाधी बांधली आहे.

देवदासाची थोडीशीच स्फुट रचना उपलब्ध असली, तरी ती गुणवत्तेने श्रेष्ठ आहे. प्रखर विवेकनिष्ठा हा त्याच्या काव्याचा विशेष गुण आहे. त्याने मुसलमानांना उद्देशून लिहिलेल्या एका धर्मसमन्वयात्मक अशा स्फुटात तो म्हणतो –

तुमारा हमारा खुदा एक भाई ।
कहे देवदासो नही वें जुदाई

त्याच्या अभंगाचा एक नमुना असा –

वाराणसी क्षेत्र थोर । तेथें लोक जाती फार
परि तेथें अधिक काय । ऐसे विचारोनी पाहे
जेथें तेथें देव धोंडा । तो कां आपुले गांवी सोडा
येथें लोक तेथें लोक । अवघें एकचि उदक
देवदास म्हणे वेडें । तीर्था धांवे अवघ्यापुढें ।

याची काही कविता त्वेषपूर्ण आहे. निजामशाहीची सत्ता डळमळीत करण्यास देवदासाचे प्रयत्न बऱ्याच अंशी कारणीभूत झाले असावे, असे श्री. शं. श्री. देव म्हणतात. [ म. वा. इ. ]

## देवदासी

देवाची सेवा करून गणिका वृत्तीने राहणारी स्त्री. देवालय स्वच्छ करणे, देवमूर्तीला वारा घालणे, देवापुढे नृत्यगायन करणे, देवाच्या मिरवणुकीत अग्रभागी नाचणे, ही तिची नित्याची कामे होत. मंदिरातील देवमूर्ती म्हणजे प्रत्यक्ष देव असे मानून त्याला स्नान, गंधपुष्प, अन्नवस्त्र इ. मानवी भोग अर्पण करण्याची प्रथा देवपूजा या नावाने रूढ झाल्यावर, देवाला त्याबरोबरच शयनभोगही मिळावा, म्हणून मंदिरात दासी ठेवण्याची प्रथा मध्ययुगात सुरू झाली. त्यासाठी मंदिरांचे व्यवस्थापक गणिकांना विकत घेत किंवा काही भाविक लोक आपल्या मुली देवाला दासी म्हणून अर्पण करीत. अशा त्या देवदासी मग देवस्थानाच्या परिसरात राहून देवसेवा आणि गणिकावृत्ती यांवर आपली उपजीविका करीत. काही देवदासींना चरितार्थासाठी देवस्थानाकडून जमीनीही मिळत आणि त्यांवर त्यांना सारा द्यावा लागत नसे. इ. स. १००० च्या सुमारास तंजाऊर येथील मंदिरात अशा ४०० देवदासी होत्या, असे म्हणतात. गेल्या शतकाच्या प्रारंभी कांजीवरम येथील मंदिरात १००, तर सोमनाथपुरमच्या मंदिरात ५०० देवदासी होत्या, असें कळते.

जातके, अर्थशास्त्र, कामसूत्र वगैरे प्राचीन ग्रंथांत देवदासींचा उल्लेख आढळत नाही. पुराणांनी मात्र देवपूजेसाठी देवदासींची आवश्यकता मानली असून, त्यासाठी सुंदर मुली देवाला अर्पण कराव्या किंवा गणिका विकत घ्याव्या, असे सांगितले आहे. सूर्यलोकाच्या प्राप्तीसाठी सूर्यमंदिराला नृत्यगायनकुशल तरुणी अर्पण कराव्या, असे भविष्य पुराणात सांगितले आहे. त्यावरून मध्ययुगात देवदासी हे सूर्यमंदिराचे विशेष आकर्षण होते, असे दिसते.

दत्ता, विक्रीता, भृत्या, भक्ता, हृता, अलंकृता व गोपिका

किंवा रुद्रगणिका असे देवदासींचे सात प्रकार होते. या स्त्रिया हीन गणल्या जात नसत. समाजात यांना मान असे. कारण देवसेवेला वाहून घेतल्यामुळे त्या शुद्ध समजल्या जात.

द. भारतात देवदासीप्रथा विशेष प्रचलित होती. कालांतराने देवदासींची एक जात बनली व तिचे आचार–विचार, वारसाहक्क, यांविषयी नियम बनवले गेले. त्यांच्या पंचायतीही निर्माण झाल्या. देवदासींच्या मुलांना व मुलींना समान वारसाहक्क असतो. त्यांचे पुत्र देवदासींना नाच-गाण्यात साथ करतात व मुलींना नृत्य शिकवितात.

मध्ययुगात कर्नाटकातील काही जातीत प्रत्येक घरातली एखादी मुलगी देवाला अर्पण करीत, असे म्हणतात. तिला बसवी असे नाव असे. अशा मुलीचे देवाशी किंवा खड्गाशी लग्न लावीत. त्यानंतर ती उच्च जातीतल्या कुठल्याही पुरुषाशी संबंध ठेवायला मोकळी असे. ती अखंड सौभाग्यवती असल्यामुळे तिला दक्षिणेत ताळी बनवण्याचे, तसेच कोकणातल्या काही भागात नवोढेचे मंगळसूत्र तयार करण्याचे काम देत. बसवीला मुलगी झाल्यास तीही पुढे बसवीच होई. सर्वसाधारणपणे बसवी एकाच पुरुषाजवळ राही व तोच तिला अन्नवस्त्र देई. कोइंवतूरमधील कैकोलन जातीतही प्रत्येक कुटुंबातील एक मुलगी देवाला अर्पण करण्याची चाल होती. कैकोलन देवदासी मरण पावल्यावर देवाच्या अंगावरील फुले आणि वस्त्र काढून तिच्या देहावर घालीत आणि तिचे दहन झाल्याशिवाय देवाची पूजा करीत नसत. कारण ती देवाची पत्नी असल्यामुळे त्याला सुतक आले आहे, असे समजत.

ओडिसातील देवदासींना महारिस म्हणतात. गंग वंशातील राजांनी अनेक देवदासी त्या प्रदेशातील निरनिराळ्या देवस्थानांत देवांच्या सेवेसाठी नेमल्या होत्या. त्यांचा सर्व योगक्षेम मंदिरांच्या उत्पन्नातून चालावा, अशीही त्यांनी व्यवस्था करून ठेवली होती. केवळ हलक्या जातींतील मुलीच देवदासी बनत असे नाही; तर उच्च वर्गातील मुलीही देवाला अर्पण केल्या जात व त्याही देवदासी बनत. मूल होत नसेल वा होऊनही ते जगत नसेल, तर ‘माझे पहिले मूल तुला वाहीन’ असा नवस काही स्त्रिया करीत. अशा नवसफेडींसाठी देवाला वाहिलेल्या मुली पुढे जन्मभर देवदासी म्हणून राहत. खंडोबाच्या मुरळ्या, ज्योतिबाच्या जोगतिणी, यल्लम्माच्या जगदंबा व अंबाबाईच्या आराधिणी, या अशा प्रकारच्या देवदासी होत.

देवदासींचे स्थूल मानाने दोन वर्ग पाडता येतील, ते असे –

(१) नृत्य, गायन, वादन यांत कुशल अशा कलावंतिणी-या वर्गातल्या स्त्रिया अतिशय बुद्धिमान, सुस्वरूप, प्रामाणिक व देवभोळ्या असतात. त्यांतील काही स्त्रिया एकाच पुरुषाशी कायमचा संबंध ठेवून नैतिक दृष्टीने चांगले जीवन जगतात.

(२) देवळातील झाडलोट, सडासंमार्जन, दिवेसफाई, पालखीची व्यवस्था, देवावर चवऱ्या ढाळणे वगैरे कामे करणाऱ्या स्त्रिया – या मागसलेल्या जातींच्या असून, त्यांना भाविणी असे नाव आहे. यांची वस्ती रत्नागिरी, सावंतवाडी व गोमंतक या प्रदेशात विशेष आहे. ही तिथल्या सरदारांच्या दासींची प्रजा असल्याचे सांगतात. भाविणीही लग्न न करता राहतात व वेश्यावृत्तीने जगतात.


देवदासी

या समाजातील मुलींना देवाला वाहण्याचा जो विधी असतो, त्याला ‘शेंसविधी’ म्हणतात. तो लग्नविधीसारखाच असतो. फरक एवढाच, की शेंसविधीत मुलीचे लग्न पुरुषवेषधारी मुलीशीच लावतात. त्या वररूप मुलीच्या डोक्याला पागोटे बांधून हातांत नारळ व सुरी देतात. जिची शेंस असते, ती मुलगी त्या नारळाला माळ घालते. हा विधी झाल्याखेरीज ती मुलगी देवदासी होऊ शकत नाही. हा विधी म्हणजे मुलीला पुरुषसंबंध करण्याची दीक्षाच समजली जाते. मात्र हा विधी धर्मसंमत नाही. स्मृती व धर्मशास्त्रग्रंथ यांत त्याचा उल्लेख नाही. तो केवळ एक परंपरागत रूढ आचार होता. सांप्रत त्याला कायद्याने बंदी घालण्यात आली आहे.

देवदासीप्रथा धार्मिक श्रद्धेतून उगम पावली आहे. देवाच्या सेवेत जीवन घालवल्यामुळे पुण्य लाभून देहाचे सार्थक होईल, एवढीच भावना प्रारंभी लोकांच्या मनात होती. पण ज्याप्रमाणे देवाला अर्पण केलेले पूजोपचार त्याचा पुजारी स्वीकारतो आणि तरीही ते देवाला पावतात, त्याचप्रमाणे पुजाऱ्याची सेवा केली, तर तीही देवाला पावेल, अशी समजूत कालांतराने प्रसृत करण्यात आली. पुजाऱ्याने देवदासीचा उपभोग घेतला, तर तो देवानेच घेतला, अशी भावना पुढे हळूहळू उत्पन्न झाली. त्यामुळे देवाला अर्पण केलेल्या मुली व नर्तिका या पुजाऱ्यांच्या दासी बनल्या. राजे व सरदार यांच्या विलाससुखासाठीही त्यांचा उपयोग होऊ लागला. त्यांच्या आश्रयामुळे व प्रोत्साहनाने ही

प्रथा प्रसार पावली व दीर्घ काळ टिकून राहिली. अंधश्रद्धेला बळी पडलेल्या या कोवळ्या अजाण मुली म्हणजे सरदार, जहागिरदार, पुजारी व यात्रेकरू यांची विषयवासना तृप्त करण्याचे एक हुकमी साधन ठरले.

देवदासींची ही चाल बंद करण्याचा प्रयत्न प्रथम म्हैसूर नरेशांनी केला. या पद्धतीला धर्मशास्त्राची संमती आहे किंवा काय, हे पाहण्यासाठी त्यांनी शास्त्री-पंडितांची एक समिती नेमली. हिंदू धर्मशास्त्रात या प्रथेला मुळीच आधार नाही, असा एकमुखी निर्णय त्या समितीने दिला. मग म्हैसूर सरकारने इ. स. १९१० साली ही प्रथा कायद्याने बंदी केली. पुढे मद्रास, महाराष्ट्र, केरळ, उ. प्रदेश, इ. प्रदेशांतही तसे कायदे करण्यांत आले. [ क. स. सा.; का. ट्रा. स. इं.; संस्कृतिसंगम; कामकल्प; श्री. लक्ष्मीदास बोरकर – रंमा, फेब्रु. १९६२ ]

**देवदिवाळी** मार्गशीर्ष शु. प्रतिपदेला हे नाव असून, त्या दिवशी कुलदेवतेला पक्वान्नांचा महानैवेद्य करतात. मावळात या सणानिमित्त बैलांची झुंज लावतात.

**देवदूत** मानवाहून वरिष्ठ व ईश्वराहून कनिष्ठ अशी एक अतिमानवी योनी. हिंदू धर्मात तसेच इस्लामी, यहुदी, ख्रिस्ती व झरथुष्ट्री या प्रमुख धर्मांत देवदूत ही कल्पना मानलेली आहे. पुराणांत शिवदूत, विष्णुदूत व यमदूत सांगितले असून, ते मृताच्या जीवाला त्याच्या पुण्य-पापानुसार त्या त्या लोकी घेऊन जातात, असे म्हटले आहे. इतर धर्मांत देवदूतांचे चांगले व वाईट असे दोन प्रकार मानलेले आहेत.

पाश्चात्य देशांत देवदूतांच्या कथांचा उगम प्रथम पर्शियन धर्मात झाला. नंतर त्या कथा यहुदी धर्मात दाखल झाल्या. पुढे त्यांपैकी कित्येक कथा ख्रिस्ती धर्माने स्वीकारल्या. इ. स. च्या चौथ्या शतकानंतर ख्रिस्ती धर्मात देवदूतांची पूजा रूढ झाली व मध्ययुगीन कलेतही देवदूतांना स्थान मिळाले.

ख्रिस्ती धर्मातील देवदूतांबद्दलच्या कल्पना अशा –

देवदूत हे परमेश्वराने आपल्या सेवेकरता निर्माण केलेले शुद्ध आत्मे होत. सृष्टीच्या रचनेत जो भौतिक आणि आध्यात्मिक अंश असतो, त्यातील सारभूत भाग देवदूतांच्या ठिकाणी असतो. देवदूत अनेक असून, त्यांच्यांत उच्चनीच श्रेणी असते. देवदूतांना ईश्वराचे प्रत्यक्ष दर्शन होते व काही अलौकिक सुखेही प्राप्त होतात. ईश्वराची सेवा करणे हे त्यांना नेमून दिलेले कर्तव्य; पण काही देवदूतांनी पाप केले व ते परमेश्वराच्या ऐवजी आपल्याच सेवेत मग्न राहू लागले. त्यामुळे त्यांना परमेश्वराचे दर्शन तर दुर्लभ झालेच; शिवाय त्यांना नरकातही पडावे लागले. अशा देवदूतांना लोक राक्षस, पिशाच किंवा दुष्ट देवदूत असे म्हणू लागले.

चांगले देवदूत हे परमेश्वराची कामे करतात व त्याचे निरोप भक्तांना पोचवतात. प्रत्येक मनुष्याचा एक संरक्षक देवदूत असतो. तो त्याचे संकटापासून रक्षण करतो, त्याला मार्गदर्शन करतो आणि अंती त्याला मोक्षाप्रत नेतो, अशी समजूत आहे. मुमुक्षूंना गरज पडेल, तेव्हा परमेश्वर देवदूतांना पृथ्वीवर पाठवतो असे बायबलात सांगितले आहे. त्यामुळे ख्रिस्ती लोकांत देवदूतांची प्रार्थना करण्याची व त्यांचे उत्सव करण्याची प्रथा आहे. [ एन्सा. रि.; सु. वि. को. ]

**देवनंदी** (इ. स. चे ५ वे व ६ वे शतक) एक व्याकरणकार, आचार्य व कवी. हा जैन होता. याला जिनेंद्रबुद्धी, पूज्यपाद अशा काही उपाधी होत्या.

देवनंदीचे जैनेंद्र व्याकरण हे जैनांचे पहिले संस्कृत व्याकरण होय. या ग्रंथाची सूत्रसंख्या तीन हजार असून, अध्याय पाच आहेत. महाकवी धनंजयाने 'अपश्चिम रत्नत्रया' मध्ये या व्याकरणाची गणना केली आहे. या ग्रंथावर पाणिनीच्या अष्टाध्यायीची बरीच छाप आहे. यातील सूत्रे व संज्ञा फार संक्षिप्त असल्यामुळे हे व्याकरण कालांतराने दुर्बोध बनले. मग त्यावर श्रुतकीर्तिकृत पंचवस्तुप्रक्रिया, प्रभाचंद्रकृत शब्दांभोजभास्करन्यास व नेमिचंद्रकृत प्रक्रियावतार या टीका निर्माण झाल्या.

तत्त्वार्थसूत्रावरील सर्वार्थसिद्धी ही टीका व दशभक्ती हे देवनंदीचे अन्य ग्रंथ होत. इष्टोपदेश आणि समाधिशतक अशी दोन काव्येही त्याने रचली आहेत. वैद्यकशास्त्रावर कल्याणकारक नावाचा याचा एक संस्कृत ग्रंथ आहे. [ जै. ध.; भा. सं. जै. यो.; जै. सा. इ.; म. च. को. ]

**देवनागरी लिपी** संस्कृत, हिंदी व मराठी या भाषा ज्या लिपीत लिहिल्या जातात, तिला नागरी किंवा देवनागरी असे नाव आहे. ही लिपी उ. प्रदेश, मध्य प्रदेश, पंजाब, बिहार, गुजरात व महाराष्ट्र या प्रदेशांत आढळते. प्राचीन ब्राह्मी लिपीपासूनच देवनागरीचा उगम झाला आहे, असे सर्व पंडित मानतात.

ब्राह्मी ही भारतातील सर्वांत प्राचीन लिपी होय. अशोकाच्या काळात ती सर्व भारतात प्रचलित होती. तिच्यापासून सर्व भारतीय लिप्यांचा विकास झाला आहे. इ. स. च्या ४ थ्या शतकापासून गुप्त साम्राज्यात प्रचलित असलेली गुप्त लिपी हे ब्राह्मीचे एक अत्यंत विकसित रूप होय. इ. स. च्या ६ व्या शतकात या लिपीत आणखी परिवर्तन होऊन तिला सिद्धमातृका

हे नाव मिळाले. ही लिपी सर्वंध उत्तर भारतात धार्मिक पुस्तके लिहिण्यासाठी वापरली जात होती. 'ओम् नमः सिद्धम्' या वचनाने कोणत्याही ग्रंथलेखनाला आरंभ केला जात असे, म्हणून या लिपीला सिद्धम असे म्हणू लागले. ताडपत्रे व कागद यांवर लेखणी न उचलता लिहिता यावे या दृष्टीने या लिपीत अक्षरांचे रूप बदलले गेले. हिला कुटिल लिपी (कुटिलाक्षरा) असेही म्हणतात. हिच्यात अक्षरे व मात्रा यांची रूपे वेडीवाकडी असल्यामुळे या लिपीला हे नाव मिळाले असावे. अक्षरांच्या शिरोभागी त्रिकोण असणे, ही या लिपीची विशेषता होय. बोधगया येथे इ. स. ५८८ च्या सुमाराचा या लिपीतला एक लेख सापडला आहे. ही कुटिल लिपी इ. स. च्या ९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत उ. भारतात सर्वत्र प्रचलित होती. राजा यशोधर्मा याचा मंदसोर येथील शिलालेख (इ. स. ५३२), मेवाडचा गुहिलोतवंशी राजा शीलादित्य याच्या वेळचा एक शिलालेख (इ. स. ६४६) व प्रतीहारवंशी राजांचे इ. स. च्या ९ व्या शतकातले शिलालेख या कुटिल लिपीतच लिहिलेले

अ इ उ ए क ख ग घ च छ ज ट ड ढ ण त

थ द ध न प फ ब भ म य र ल व श ष स ह

कुटिल लिपी – जोधपूरचा लेख, इ. स. ८३७ (भारतीय प्राचीन लिपिमाला या ग्रंथावरून)

अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ ं : ×

ॐ क ख ग घ ङ च छ ज झ ञ ट ठ ड ढ ण त

थ द ध न प फ ब भ म य र ल व श ष स ह

नागरी लिपी – उज्जयिनीचा लेख, इ. स. चे ११ वे शतक (भारतीय प्राचीन लिपिमाला या ग्रंथावरून)

अ इ ए ए क ख ग घ च ज ट ठ ड ढ ण त थ

थ द ध न प भ म य र ल व श ष स ह ह त्

नागरी लिपी – ओरिआगावचा लेख, इ. स. १२०८ (भारतीय प्राचीन लिपिमाला या ग्रंथावरून)

आहेत. जपानमधील होर्युजी नामक गावी एका बौद्ध मठातही या लिपीत ताडपत्रांवर लिहिलेले ग्रंथ सापडले आहेत. या लिपीतल्या अनेक अक्षरांची रूपे सध्याच्या नागरी लिपीतल्या अक्षरांशी मिळतीजुळती आहेत.

या कुटिल लिपीचा अधिक विकास होऊनच देवनागरी लिपी निर्माण झाली. उ. भारतात हिचा वापर इ. स. च्या १० व्या शतकाच्या आरंभापासून सुरू झालेला दिसतो. कनोजचा प्रतीहारवंशी राजा महेंद्रपाल याच्या इ. स. ८९८ च्या एका दानपत्रात ही लिपी आढळते. त्यानंतरचे प्रतीहार, गुहिल, चाहमान, गाहडवाल, चौलुक्य, परमार, कछवाह, चंदेल, कलचुरी, इ. वंशातील राजांचे शिलालेख व दानपत्रे यांत या लिपीचा उपयोग केलेला आहे.

नागरी अंकांच्या रूपांचा विकासक्रम

गुप्त युगातच ब्राह्मी लिपीची एक वेगळी शैली द. भारतात प्रचलित झाली. तिला पल्लव लिपी म्हणतात. त्या लिपीतूनच इ. स. च्या ८ व्या शतकात नागरी लिपीचे दक्षिणी रूप विकसित झाले. राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग याचे सामनगड येथील दानपत्र (इ. स. ७५४), राष्ट्रकूट गोविंद (२ रा) याचे धुलिआ येथे मिळालेले दानपत्र (इ. स. ७८०), पैठण व वणी येथे मिळालेली राष्ट्रकूट गोविंद (३ रा) याची दानपत्रे (इ. स. ७९४ व ८०८), त्याचप्रमाणे कान्हेरी येथील काही शिलालेख (इ. स. चे ९ वे शतक) यांत ही लिपी वापरलेली आढळते. गुजरातेतील गुर्जरवंशी राजा जयभट (३ रा) याच्या इ. स. ७०६ मधील एका दानपत्रातही या दक्षिणी शैलीच्या नागरी लिपीत सही केलेली दिसते. यावरून ही नागरी लिपी त्यापूर्वीच निर्माण झाली असावी, असे ठरते. महाराष्ट्रात हिला बाळबोध लिपी असे नाव मिळाले आहे.

या लिपीला नागरी किंवा देवनागरी हे नाव कसे प्राप्त झाले, याविषयी विद्वानांत मतभेद आहेत. गुजराती नागर ब्राह्मणांशी संबंधित म्हणून नागरी हे नाव पडले, असे काहींचे मत; तर नागर लोक ही लिपी वापरीत म्हणून तिला नागरी नाव पडले, असे काहींचे मत आहे. नाग राजवंशाच्या प्रभावामुळे हिला नागरी हे नाव मिळाले, असे श्री. जायस्वाल म्हणतात. संस्कृत ही देवभाषा या लिपीत लिहिली जाऊ लागली, तेव्हापासून तिला देवनागरी म्हणू लागले. देवतांच्या उपासनेसाठी त्रिकोण, चक्र, इ. जी यंत्रे वापरतात, त्यांना पूर्वी देवनगर म्हणत. त्या यंत्रांत जी सांकेतिक चिन्हे काढलेली असत, ती कालांतराने अक्षरे मानली जाऊ लागली. ती अक्षरे प्रस्तुत लिपीत वापरल्यामुळे हिला देवनागरी हे नाव प्राप्त झाले, असे श्री. शामाशास्त्रींचे मत आहे. काशीला पूर्वी देवनगर म्हणत. त्यावरूनही देवनागरी हे नाव आले असावे.

नवीन संशोधनामुळे असे कळते, की चंद्रगुप्त विक्रमादित्य याचे नाव देव असे होते. पाटलिपुत्र हे नगर व चंद्रगुप्त देव हा राजा यांच्याशी संबद्ध म्हणून या लिपीला देवनागरी हे नाव मिळाले, असे डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांनी म्हटले आहे.

दक्षिणेत या लिपीला नंदिनागरी म्हणतात. वाकाटक व राष्ट्रकूट यांच्या राज्यांत नंदिन नावाचे नगर (सांप्रतचे नांदेड) होते, त्यावरून हे दुसरे नाव तिला मिळाले, असे डॉ. अग्रवाल यांचे मत आहे. भिन्न राजवंशांचे जे आलेख उपलब्ध झाले आहेत, त्यांवरून असे दिसते, की इ. स. च्या १७ व्या शतकापर्यंत दक्षिणेत ही लिपी वापरली जात होती.

या नागरी लिपीपासूनच कैथी, महाजनी, राजस्थानी, गुजराती या लिप्या उगम पावल्या आहेत. प्राचीन नागरीच्या पूर्वेकडील शाखेतून इ. स.च्या १० व्या शतकात बंगाली लिपी उगम पावली. ११ व्या शतकानंतर नागरी लिपीतूनच नेपाळी, सध्याची बंगाली, मैथिली व उडिया या लिप्या विकसित झाल्या. इ. स. च्या ८ व्या शतकापर्यंत काश्मीर व पंजाब या प्रदेशांत कुटिल लिपी प्रचलित होती. त्या लिपीतून १० व्या शतकात शारदा लिपी विकास पावली. दक्षिण भारतातील तेलुगु,

तमिळ, मल्याळम व ग्रंथ या लिप्याही अशाच प्रकारे नागरी लिपीतून विकास पावल्या आहेत.

गजनीचा महमूद, अलाउद्दीन, शेरशाहा व अकबर यांच्या शिक्क्यांवर काही शब्द देवनागरी लिपीत लिहिलेले आढळतात.

देवनागरी लिपी अत्यंत शास्त्रशुद्ध आहे. या लिपीत अक्षराचे नाव आणि उच्चारण ही अभिन्न आहेत. ही लिपी अक्षरात्म असून, कोणत्याही अक्षराचा उच्चार सदैव तोच होतो. 'राम'चा उच्चार नेहमी 'राम' असाच असतो. भाषाशास्त्र व ध्वनिशास्त्र या दोन्ही दृष्टींनी पाहता नागरी वर्णमाला अतिशय शुद्ध व आदर्शभूत आहे. याविषयी पाश्चिमात्य भाषाशास्त्रज्ञांचेही एकमत आहे (नागरी अंक और अक्षर).

प्राचीन काळी ब्राह्मी लिपीतील अक्षरांत शिरोरेखा नव्हती. पुढे ती अक्षरे सुंदर बनविण्याच्या हेतूने त्यांत जे अनेक बदल केले गेले, त्यांतून ही शिरोरेखा निर्माण झाली. शिरोरेखा हे देवनागरीचे खास वैशिष्टच होय. भारतात प्रचलित असलेल्या अन्य कोणत्याही लिपीत शिरोरेखा आढळत नाही. देवनागरीचे हे परिवर्तन कसे होत गेले, ते दर्शविणारी एक तालिका श्री. गौरीशंकर ओझा यांनी बनवली आहे. नागरी अंकांचा विकास दाखविणारे चित्रही त्यांनी केले आहे.

इ. स. च्या १० व्या शतकातील उत्तर भारतातील नागरी लिपीत अ, आ, घ, प, म, य, ष व स या अक्षरांचा माथा विभागलेला दिसतो. पण ११ व्या शतकापासून हे दोन भाग मिळून एक रेघ बनली आणि प्रत्येक अक्षराचा माथा त्याच्या रुंदीइतकाच काढू लागले. इ. स. च्या १२ व्या शतकातच नागरीचे सध्याचे रूप दिसू लागते. काही ठिकाणी मात्र ए, ऐ, ओ व औ च्या मात्रा व्यंजनाला जोडताना वेगळी पद्धत वापरलेली दिसते.

देवनागरी लिपी अत्यंत शास्त्रशुद्ध असली, तरी मुद्रण व टंकलेखन यांसाठी तिचा वापर करताना तिच्यात काही दोषही आढळतात. ही लिपी आता भारताची राष्ट्रीय लिपी मानली गेली असल्यामुळे तिचा उपयोग भारताच्या सर्व भागांत विस्तृत प्रमाणावर होऊ लागला आहे. म्हणून तिच्यातील दोष नाहीसे करून तिला मुद्रणसुलभ रूप देण्याचे प्रयत्न अनेक विद्वान सध्या करीत आहेत. अशा सुधारणांची नितांत आवश्यकता आहे, यात संशय नाही. कारण दोष नष्ट केल्यावाचून देवनागरी लिपी ही चालू मुद्रणस्पर्धेत यशस्वी होणार नाही. [ भा. प्रा. लि.; दे. लि. स्व. वि. स.; अं. यु. भा.; डॉ. अग्रवाल–युगप्रभात, १ सप्टेंबर १९६५; हिं. वि. को.; स. सं.; नागरी अंक और अक्षर–पं. गौरीशंकर ओझा व पं. मिश्र ]

## देवनाथ

**देवनाथ** (१७५४–१८२१ इ. स.) एक मराठी संतकवी. विदर्भातील अमरावती जिल्ह्यात सुरजी अंजनगाव येथे एका ब्राह्मण घराण्यात याचा जन्म झाला. त्याच्या पित्याचे नाव राजोपंत असे होते. देवनाथाचे मूळ नाव देवराव असे होते. लहानपणापासून याला तालमीत जाऊन व्यायाम करण्याची आवड होती. मारुती हे त्याचे दैवत होते. वयाच्या बाराव्या वर्षी वऱ्हाडातील जळगावच्या कोण्या कृष्णरावाच्या काशी नामक मुलीशी देवरावाचा विवाह झाला. परंतु अल्प काळातच त्याचे गृहस्थजीवन संपले असावे.

देवरावाचा पिता कमाविसदार होता, ज्येष्ठ बंधू व्यंकटेश हा रिसालदार होता आणि कनिष्ठ बंधू सुंदर हा पांडे होता. ज्येष्ठ बंधूला देवरावाचे तालमीचे वेड रुचले नाही, म्हणून त्याने आईकरवी त्याची कानउघाडणी केली. या घटनेचा त्याच्या मनावर विलक्षण परिणाम घडला आणि 'पालखीपदस्थ झाल्याशिवाय तोंड दाखवणार नाही,' अशी प्रतिज्ञा उच्चारून त्याने घराचा निरोप घेतला.

घरातून बाहेर पडला, तेव्हा देवराव वीस-बावीस वर्षांचा होता. तो सुरजी अंजनगावापासून सुमारे चाळीस मैलांवर असलेल्या बारी (ता. जळगाव, जि. अकोला) गावी गेला आणि तिथल्या हनुमंताची उपासना करू लागला. तिथे दीर्घ काळ उपासना व चिंतन केल्यावर त्याचा पारमार्थिक अधिकार वाढला आणि कवित्वाची स्फूर्ती होऊन तो कीर्तनेही करू लागला. त्याच्या साधनेची वार्ता ऐकून जवळच्याच धूसर गावचा नाथपंथी साधू गोविंदनाथ याने त्याला गुरूपदेश केला आणि त्याला आपल्या सान्निध्यात ठेवले. गोविंदनाथाने देवरावाला देवनाथ असे सांप्रदायिक नाव दिले.

काही काळ गुरुसहवासात राहिल्यावर गुरूच्या आदेशानेच देवनाथ कीर्तनांसाठी बाहेर पडला. बडोदा व पुणे येथे त्याच्या कीर्तनांचा विशेष बोलबाला झाला. पेशव्यांनी त्याचा सत्कार करून पालखी, घोडे वगैरे लवाजम्यासह त्याची गावी रवानगी केली. घरातून बाहेर पडताना त्याने केलेली प्रतिज्ञा पूर्ण झाली.

देवनाथ हा शीघ्रकवी होता. कीर्तनात उत्स्फूर्तपणे पदे रचून सहस्रावधी श्रोत्यांना मंत्रमुग्ध करण्याचे वाक्सामर्थ्य त्याच्या ठायी होते. महाराष्ट्रातील अनेक प्रतिष्ठित लोक त्याचे अनुयायी बनले होते. त्याची मराठी व हिंदी पदे सहजसुंदर असल्यामुळे रसिकांना प्रिय बनलेली आहेत. प्राचीन मराठी पदकारांत त्याचे स्थान बरेच वरचे आहे. त्याचे एक पद असे–

**अग बाई ! सांवळियाचा वेणु वाजे वृन्दावनीं ग ।। धृ ।।**
**मध्यभागीं झाली रजनी । पतिसह सुखशयनीं ।।**
**निजले मी असतां, श्रवणीं । अकल्पित पडला ध्वनी ग ।।**

रव नव्हे ग साजणी । विंधियलें कामबाणीं ॥
विठ्ठल मी अंतःकरणीं । चाल जातें अनवाणी ग ॥
देवनाथ प्रभु धनी । जनीं वनीं भरला नयनीं ॥
असनीं शयनीं गमनीं । त्याविण कोण निदानीं ग ॥

अशी लोकप्रिय पदरचना करणारा हा संतकवी ग्वाल्हेर येथे कीर्तन करीत असता मंडपाला आग लागून सातशे श्रोत्यांसह अग्निमुखी पडला असे सांगतात. त्याच्या शिष्यमंडळात दयाळनाथ हा अत्यंत प्रसिद्ध झाला. [ देवनाथाची कविता ]

## देवनाथ ठाकूर

(इ. स. चे १६ वे शतक) एक मीमांसक. हा मिथिलेचा रहिवासी होता. याचे सारे घराणेच विद्वान होते. यानें मीमांसेवर अधिकरणकौमुदी नावाचा ग्रंथ रचला आहे. मीमांसा आणि धर्मशास्त्र यांचे संबंध अभेद्य आहेत, असे याने प्रतिपादिले आहे व त्याच दृष्टीने आपल्या ग्रंथाची रचना केली आहे. [ मी. द. ]

## देवपत्तन

एक प्राचीन नगर. हे नेपाळात काठमांडूपासून तीस मैल अंतरावर वागमती नदीच्या पैलतीरावर आहे. याच्या प्राचीनतेविषयी अशी दंतकथा प्रचलित आहे, की त्रेतायुगात बोधिसत्त्व मंजुश्रीने या नगराची स्थापना केली आणि आपल्या शिष्यांना इथे राहण्याचा आदेश दिला. मंजुश्रीने स्थापन केल्यामुळे त्याला मंजुपत्तन असे नाव मिळाले. त्यानंतर त्याला ललितपत्तन अथवा ललितपूर असे म्हणू लागले. शेवटी येथील देवपाल या राजाच्या नावावरून हे देवपत्तन बनले. सध्या हे स्थान पाटण या नावाने ओळखले जाते.

सम्राट अशोक बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी नेपाळमध्ये गेला असता, ललितपुरालाही त्याने भेट दिली. त्याला ते शहर आवडले. त्याने तिथल्या देवपाल नामक राजपुत्राला आपली चारुमती नावाची कन्या दिली आणि त्या शहराशी आपला नातेसंबंध प्रस्थापित केला. अशोकाने उभारलेले पाच स्तूप आजही पाटणमध्ये अस्तित्वात आहेत. या पाटणच्या पुनर्रचनेचे काम देवपालाने सुरू केले होते; पण ते पुरे होण्याच्या आधीच त्याचा मृत्यू झाला. पुढे चारुमतीने ते कार्य पूर्ण केले.

देवपत्तन हे हिंदूंच्या मते विष्णूच्या सुदर्शनचक्रावर आधारलेले आहे, तर बौद्धांच्या मते बुद्धाच्या धर्मचक्रावर आधारलेले आहे. नगररचनेच्या दृष्टीने एके काळी देवपत्तन हे नेपाळातले सर्वोत्कृष्ट नगर मानले जात होते. त्यातील राजप्रासाद, मंदिरे, मोवतालचा तट, दरवाजे, इ. गोष्टी अत्यंत मजबूत असून, सुंदर व आकर्षक आहेत. नगरामोवतालचा तट आणि त्याची प्रवेशद्वारे यांचे अवशेष आजही आपले लक्ष वेधून घेतात. नगराचे मुख्य प्रवेशद्वार आयताकार असून, खूपच उंच आहे.

पाटणच्या दरबाराच्या प्रांगणात गगनचुंबी मंदिरांची गर्दी आहे. तिथले राधाकृष्णमंदिर अत्यंत कलापूर्ण आहे. हे मंदिर



महाबौद्धमंदिर– ललितपूर

राणा सिद्धिनृसिंह याने उभारले. ते पगोडा शैलीचे असून, त्यात दोन मंडप आहेत. त्यांपैकी पहिल्या मंडपातील भिंतींवर रामचरित्रातील प्रसंगांचे सुंदर शिल्पपट्ट आहेत. याशिवाय नारायण, कृष्ण, शिव, गणेश, भीमसेन, इ. देवांची मंदिरेही या प्रांगणात असून, ती काशी अथवा भुवनेश्वर येथील मंदिरांसारखी आहेत.

पाटण येथील राजप्रासाद हा नेपाळच्या शिल्पसौंदर्याचा उत्कृष्ट नमुना समजला जातो. दगड, विटा आणि लाकूड या तीन्ही साधनांचा कलात्मक उपयोग करून उभारलेली ही वास्तु फार प्रेक्षणीय आहे.

नगराच्या अंतर्भागात हिरण्यवर्ण महाविहाराचे मंदिर आहे. त्याच्या प्रांगणात बुद्धाचे तिमजली मंदिर असून, त्याच्या दुसऱ्या मजल्यावर एक विशाल बुद्धमूर्ती आणि प्रचंड प्रार्थनाचक्र आहे. मत्स्येंद्रनाथांचेही मंदिर इथेच आहे. या मंदिराची

उभारणी इ. स. १४०८ मध्ये झालेली असून, मत्स्येंद्रनाथाची मूर्ती रक्तचंदनाची आहे. या ठिकाणी वसंत ऋतूत मत्स्येंद्र-नाथाचा रथोत्सव मोठ्या उत्साहाने साजरा होतो.

या नगरात मिथिलेच्या हरिसिंहदेवाने उभारलेले एक तुळजाभवानीचे (तलेजदेवीचे) मंदिरही आहे. येथील सर्व मंदिरे आणि घरे शिलाशिल्प व काष्ठशिल्प यांसाठी प्रसिद्ध आहेत. ही कलावैशिष्टये इथले कारागीर अद्यापही टिकवून आहेत. [ परिषदपत्रिका, आक्टो. १९६५ ]

**देवपाडा** नवद्वीपाच्या परिसरातील एक पुण्यस्थान. याला देवपल्ली असेही म्हणतात. इथे एक नृसिंहमंदिर आहे. नृसिंहाने हिरण्यकशिपूच्या वधानंतर इथे विश्रांती घेतली, अशी तिथल्या लोकांची समजूत आहे. [ नवद्वीप ]

**देवपूजा** एखाद्या देवतेला श्रद्धायुक्त अंतःकरणाने विधियुक्त केलेले उपचारसमर्पण. पूजेची व्याख्या अशी -- 'तत्र पूजा नाम देवतोद्देशेन द्रव्यत्यागात्मकत्वाद्याग एव --' देवतेला उद्देशून द्रव्यत्याग केला जात असल्यामुळे पूजा म्हणजे यागच होय (न्या. को.). सकाळची आन्हिक कर्मे उरकल्यावर गृहस्थाने घरातल्या देवांची पूजा करावी, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. भक्त व उपासक यांनाही आपापल्या उपास्य देवतेची पूजा अशीच विहित आहे. ही पूजा देवाला सोळा उपचार समर्पून करायची असते. या पूजेसाठी त्रैवर्णिकांनी पुरुषसूक्ताचा विनियोग करावा आणि स्त्रिया व इतर यांनी पौराणिक मंत्रांचा विनियोग करावा, असे सांगितले आहे. पुरुषसूक्ताच्या ऋचा प्रत्येक उपचारासाठी एक अशा रीतीने विनियुक्त केलेल्या आहेत. या पूजेचा प्रयोग असा--

पूजकाने मृगाजिन, रेशमी वस्त्र किंवा लोकरी वस्त्र यांच्या आसनावर बसून देवावरचा निर्माल्य काढावा आणि घंटा वाजवावी. मग आचमन, प्राणायाम, इष्टदेवता, कुलदेवता, इत्यादींचे नमन व देश--कालांचा उच्चार करून 'अमुकदेवतायाः षोडशोपचारपूजां करिष्ये' असा संकल्प करावा. गणपतीचे स्मरण करावे. आसनविधी करावा. षोडशांग किंवा षडंगन्यास करावा. कलश, शंख, घंटा व दीप यांची गंधाक्षतपुष्पांनी पूजा करावी. शंखात पाणी भरून त्याने पूजासाहित्य व स्वतःचे शरीर यांचे प्रोक्षण करावे. ओंजळीत फूल घेऊन ज्या देवाची पूजा करायची असेल त्याचे ध्यान करावे. मग त्याला भक्तिपूर्वक सोळा उपचार समर्पावे:

आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, अनुलेपन, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, नमस्कार, प्रदक्षिणा व मंत्रपुष्प या षोडशोपचारांचे क्रमाने समर्पण करावे.

स्नान हा उपचार समर्पिल्यावर देवाला पंचामृताचे स्नान घालावे. त्यानंतर गंधोदकाचे व शेवटी शुद्धोदकाचे स्नान



देवपूजा

घालावे. मग पुरुषसूक्ताने अभिषेक करावा. अभिषेक करताना सच्छिद्र पात्र किंवा वनगायीचे सच्छिद्र शिंग यात पाणी घालून देवाच्या मस्तकावर संतत धार धरावी.

नैवेद्यसमर्पण झाल्यावर उदक, फूल, तांबूल व दक्षिणा हे अवांतर उपचार समर्पावे. शक्य असल्यास गीत, वाद्य, नृत्य, इ. राजोपचारही समर्पावे. मग मंगलारती व कर्पूरारती करावी. याच वेळी टाळ, मृदंग, वीणा यांच्या साथीवर किंवा नुसत्या टाळया वाजवून गणपती, शंकर, देवी, विठ्ठल, इ. देवांच्या आरत्या म्हणाव्या. मंत्रपुष्पासाठी देवे नामक मंत्र व 'राजाधिराजाय ...' इ. गद्य मंत्र म्हणावे. मंत्रपुष्पसमर्पणानंतर पुढील श्लोकांनी प्रार्थना करावी--

आवाहनं न जानामि न जानामि विसर्जनम् ।
पूजां चैव न जानामि क्षमस्व परमेश्वर ॥
मन्त्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वर ।
यत्पूजितं मया देव परिपूर्णं तदस्तु मे ॥

अपराधसहस्रं च क्रियतेऽहर्निशं मया।
दासोऽयमिति मां मत्वा क्षमस्व परमेश्वर ।।

अर्थ– मला तुझे आवाहन, विसर्जन आणि पूजा यांचे ज्ञान नाही. तरी परमेश्वरा, तू मला क्षमा कर. मी मंत्र, क्रिया व भक्ती यांनी हीन आहे. तरी हे सुरश्रेष्ठा, मी जी तुझी पूजा केली आहे, ती परिपूर्ण होवो. माझ्याकडून अहर्निश हजारो अपराध होत असतात. पण हा दास आहे, असे मला मानून, हे परमेश्वरा, तू (त्या अपराधांची) क्षमा कर.

शेवटी 'अनेन षोडशोपचारपूजनेन अमुकदेवताः प्रीयन्ताम्' असे म्हणून उदक सोडावे आणि दोनदा आचमन करून पूजा समाप्त करावी.

एखाद्या देवतेचे विसर्जन करायचे असेल, तर मंत्रपुष्पानंतर उत्तरपूजा करावी. ही पूजा पंचोपचार असते. ती झाल्यावर 'यान्तु देवगणाः...' हा श्लोक म्हणून देवतेवर अक्षता टाकाव्या. घरच्या किंवा मंदिरांतल्या देवांच्या बाबतीत विसर्जनाचा प्रश्न नसतो. नैमित्तिक पूजा–व्रतातल्या देवतेचेच विसर्जन केले जाते.

ज्याला षोडशोपचार पूजा करणे शक्य नसेल, त्याने पाद्य ते नैवेद्य या अकरा उपचारांनी व तेही शक्य नसल्यास गंध ते नैवेद्य अशा पंचोपचारांनी पूजा करावी, असे सांगितले आहे. उपचारांच्या बाबतीतही पुढील विकल्प सांगितले आहेत –

पुष्पाभावे फलं शस्तं फलाभावे तु पल्लवम् ।
पल्लवस्याप्यभावे तु सलिलं ग्राह्यमिष्यते ।
पुष्पाद्यसम्भवे देवं पूजयेत्सिततण्डुलैः ।।

(पूजाप्रकाश)

अर्थ– फूल न मिळाल्यास फल, ते न मिळाल्यास पल्लव, तोही न मिळाल्यास जल व यांपैकी कोणतीही वस्तू मिळणे शक्य नसेल, तर शुभ्र (धुतलेल्या) तांदुळांनी (अक्षता) देवाची पूजा करावी.

अक्षता या सर्व उपचारांच्या प्रतिनिधी मानलेल्या आहेत.

**पूजोपचार** – पूजेतल्या काही उपचारांसंबंधी जे संकेत किंवा नियम आहेत, ते असे –

आसन – हा उपचार समर्पिताना देवाच्या बैठकीखाली पाच फुले ठेवावी. विष्णूच्या आसनासाठी तुलसीदले अंथरावी. देवतेचे आसन उंच असावे.

अर्घ्य– अर्घ्यासाठी द्यायच्या जलात दही, अक्षता, कुशाग्रे, दूध, दूर्वा, मध, यव व पांढरी मोहरी ही द्रव्ये घालावी.

आचमन– पिण्यासाठी व चूळ भरण्यासाठी पाणी देणे म्हणजे आचमन होय. या पाण्यात लवंग, वेलदोडा, वाळा व कंकोळ ही द्रव्ये घालावी. पूजेसाठी मूर्ती ठेवलेली असल्यास हा उपचार त्या मूर्तीच्या मुखाच्या जागी द्यावा.

स्नान– तेल, उटणे इत्यादींनी अभ्यंग करून देवाला उष्णोदकाने स्नान घालावे. स्नानानंतर दूध, दही, तूप, मध व साखर या पाच द्रव्यांनी स्नान घालावे. ते शक्य नसल्यास त्याऐवजी तुलसीदलाने स्नान घातले तरी चालते. काष्ठमूर्ती, मृण्मयमूर्ती व चित्र यांना पाण्यात फूल बुडवून प्रोक्षणाच्या स्वरूपात स्नान घालावे. अभिषेकही तसाच करावा.

वस्त्र– घरच्या देवाला नित्य नवे वस्त्र समर्पिण्याची गरज नाही. नैमित्तिक देवपूजेत ते द्यावे.

यज्ञोपवीत– हे पुरुष देवतांनाच द्यावे.

अनुलेपन– देवाला गंधाची उटी लावण्यासाठी चंदन, कस्तुरी, कापूर, कुंकू व जायफळ या वस्तूंनी अनुलेपन तयार करावे.

पत्र– देवाला फुले वाहण्याच्या पूर्वी पत्री वाहायला सांगितले आहे. प्रत्येक देवतेला तिच्या भिन्न भिन्न नावांनी भिन्न भिन्न पत्री वाहावी. या पूजेला पत्रिपूजा असे नाव आहे. विष्णूला दूर्वा व तुलसी, शिवाला बेल व आघाडा आणि गणपतीला दूर्वा व शमी ही पत्रे प्रिय आहेत.

पुष्प– पत्रिपूजेप्रमाणेच देवाला निरनिराळ्या नावांनी निरनिराळी पुष्पे वाहायला सांगितली आहेत. या पूजेला पुष्पपूजा म्हणतात. वनमल्लिका, चंपक, अशोक, वासंती, मालती, कुंद व जाई ही फुले विष्णूला चढत्या श्रेणीने आवडतात. रुई, करवीर, द्रोण, कुश, धोतरा व नीलकमल ही फुले शिवाला चढत्या श्रेणीने आवडतात. विष्णूला जी फुले आवडतात, ती विष्णुपरिवारातल्या देवांना व शिवाला जी आवडतात ती शिवपरिवारातल्या देवतांना आवडतात. गणपतीला रक्त पुष्प अत्यंत प्रिय असते. उग्रगंधी, निर्गंधी व काटेरी फुले देवाला वाहायची नाहीत, असा सामान्य नियम आहे. सुवासिक, ताजी, कोणी न हुंगलेली, पायदळी न पडलेली व शुद्ध जागी उमललेली अशीच फुले देवाला वाहावी, असे सांगितले आहे.

धूप– हा सुगंधी व मन प्रसन्न करणारा असावा. धूपासाठी चंदन, गुग्गुळ, राळ, जटामांसी, इ. सुवासिक पदार्थ घ्यावे.

दीप– मुख्यत्वे तुपाचा व तिळाच्या तेलाचा दिवा प्रशस्त समजतात. या उपचारासाठी निरांजनात फुलवात घालून ती पेटवावी व डाव्या हाताने घंटानाद करीत उजव्या हाताने ते निरांजन देवाच्या मुखाभोवती प्रदक्षिणिक ओवाळावे.

नैवेद्य– आपण जे अन्न खातो, ते देवाच्या नैवेद्याला चालते. अभक्ष्य, अशुची व शिळेपाके मात्र चालत नाही. नैवेद्य दाखवताना त्याच्या खाली जलाने चौकोनी मंडळ करावे. मग हातात तुळशीपत्र घेऊन 'प्राणाय स्वाहा, अपानाय स्वाहा, व्यानाय स्वाहा, उदानाय स्वाहा, समानाय स्वाहा, ब्रह्मणे स्वाहा' हे

मंत्र म्हणत देवापुढे हात न्यावा. मग 'मध्ये पानीय' म्हणून जल द्यावे. त्यानंतर पुन्हा 'प्राणाय स्वाहा' इ. मंत्र म्हणावे. मग ते तुळशीपत्र देवाला वाहावे. नैवेद्यानंतर आचमनासाठी जल द्यावे. मग तांबूल व मुखवास द्यावा. गृह्य व धर्मसूत्रांत तांबूल व मुखवास यांचा उल्लेख नाही. इ. स. च्या प्रारंभी केव्हातरी ही प्रथा द. भारतात सुरू झाली असावी, असे म. म. काणे म्हणतात.

ब्रह्मदेवाचा नैवेद्य ब्राह्मणाला, विष्णूचा वैष्णवाला, शिवाचा भस्मधारकाला (गुरवाला), सूर्याचा मग ब्राह्मणाला किंवा मयपंथीयाला, देवीचा शाक्ताला, माता किंवा मातृका यांचा स्त्रीला व भूतप्रेतपिशाचादिकांचा दीन–दुबळ्याला द्यावा, असे सांगितले आहे. घरातल्या देवाला जो महानैवेद्य ( वरण भात, पक्वान्न, शाकभाज्या, इ. पदार्थांचा ) दाखवला जातो, तो पूजा करणाऱ्याने सेवन करावा, असा संकेत आहे.

**अनुसमय** – आपल्या इष्ट देवतेची पूजा प्रथम करून मग अन्य पूजनीय देवतांपैकी एकेका देवतेची तशाच प्रकारे वेगवेगळी पूजा करावी, असा एक संकेत आहे. याला कांडानुसमय असे म्हणतात. आपल्या इष्ट देवतेबरोबरच अन्यही देवतांची पूजा करणे व इष्ट देवतेला जो उपचार समर्पित करायचा तोच उपचार त्याच वेळी अन्य देवतांनाही समर्पणे, अशी दुसरी पद्धत आहे. हिला पदार्थानुसमय असे म्हणतात. पंचायतन पूजेत पदार्थानुसमय स्वीकारतात.

**काही निषेध** – यवांनी विष्णूची पूजा करू नये. गणपतीला तुळशी, देवीला दूर्वा, सूर्याला बेल, विष्णूला रुई व धोत्रा आणि शिवाला केवडा वाहू नये. शिव व सूर्य यांना शंखोदकाने अभिषेक करू नये. एका घरात दोन शिवलिंगे, तीन गणपती, तीन देवी, दोन शंख, दोन शाळिग्राम असू नयेत. सामान्यपणे एका देवाच्या अनेक मूर्ती घरात नसाव्या, इत्यादी.

**पूजाभेद**– साधनाभाविनी, त्रासी, दौर्बोधी, सौतकी व आतुरी असे पूजेचे पाच भेद सांगितले आहेत. त्यांचे स्पष्टीकरण असे–

साधनाभाविनी– पूजेसाठी आवश्यक त्या वस्तू न मिळाल्यामुळे केवळ जलाने व मनाने केलेली पूजा.

त्रासी– एखाद्या भय-संकटग्रस्त मनुष्याने ती आपत्ती टळावी म्हणून आयत्या वेळी जेवढी मिळेल तेवढी सामग्री घेऊन केलेली पूजा.

दौर्बोधी– अजाणता केवळ स्वतःच्या समजुतीप्रमाणे (विधिरहित) केलेली पूजा.

सौतकी– जननाशौचात विशिष्ट उद्देशाने केलेली मानसपूजा.

आतुरी– समग्र पूजा करण्यास असमर्थ असल्यामुळे रोगग्रस्त मनुष्याने देवाला नुसते फूल वाहून केलेली पूजा.

पद्म पुराणात पूजेसंबंधी पाच कर्मे सांगितली आहेत, ती अशी–

अभिगमन – देवघरातली झाड-सारव करणे. देवावरचा निर्माल्य काढणे. उपादान – पूजासाहित्य तयार करणे. योग – उपास्य देवतेचे सतत चिंतन करणे. स्वाध्याय – देवतामंत्राच्या अर्थाकडे लक्ष देऊन त्याचा जप व स्तोत्रपाठ करणे. इज्या – देवाची यथासांग पूजा करणे.

वैदिकी, तांत्रिकी व मिश्र असे आणखी तीन पूजाभेद सांगितले आहेत. त्यांपैकी वैदिकी व मिश्र या पूजा त्रैवर्णिकांसाठी असून, तांत्रिकी पूजा शूद्रांसाठी सांगितली आहे.

**पूजेची उपकरणे** – पळी-पंचपात्री, ताम्हन, गंधाचे कचोळे, पंचामृताच्या वाटया, तवक, उदवत्तीचे घर, अर्घ्यपात्र, अभिषेकपात्र, देव पुसायचे वस्त्र, कलश, शंख, घंटा, समई, धूपारती, निरांजन, हलकारती, इ. पूजेची उपकरणे होत. ही सर्व उपकरणे घासून पुसून स्वच्छ केलेली असावी. पुष्कळशी पूजेची उपकरणे विविध आकृतींनी युक्त व नक्षीदार करतात. संध्येच्या



पूजेची उपकरणे

पळयांचे प्रकार शंभराच्या वर पाहायला मिळतात. पंचपात्र्या सुमारे चाळीस प्रकारच्या आहेत. दिवे व आरत्या यांचे प्रकार तर अगणित आहेत. गडवे व तांब्ये हेही वेलबट्टयांनी नक्षीदार

करून घेतात. कित्येक कलशांवर दशावतारांची चित्रे कोरवितात. कित्येकांच्या घरी तांब्याच्या उपकरणावर चांदीच्या पत्र्याचे जडावाचे काम केलेले दिसते. देव ठेवण्यासाठी चांदीची किंवा पितळेची विविध प्रकारची आसनेही पाहायला मिळतात.

**पूजेचे अधिकारी** – सर्व वर्णांच्या स्त्री-पुरुषांना व अस्पृश्यांनासुद्धा पूजेचा अधिकार आहे. प्राणप्रतिष्ठा झालेल्या शिवलिंगाची व शाळिग्रामाची पूजा मात्र स्त्री–शूद्रांना वर्जित आहे. पूजकाने देह आणि मन यांची शुद्धी करून पूजेला बसायचे असते. कुटुंबातल्या एकट्यानेच कोणीतरी पूजा करायची असते.

वास्तविक पाहता देवपूजेचा उगम निम्न श्रेणीच्या जातीजमातींना धर्माचा व कल्याणाचा मार्ग प्राप्त व्हावा, म्हणूनच झालेला आहे. ज्यांना यज्ञकर्माचा अधिकार नाही, ते सर्व पूजेचे अधिकारी होत, असा देवपूजेमागचा मूळ संकेत आहे. आचांडाल सर्व जातींना पूजेचा अधिकार देऊन पुराणांनी एक प्रकारे धार्मिक समतावादच प्रस्थापित केला, असे म्हटले पाहिजे. देवपूजेचा हा मूळ उद्देश नृसिंह पुराणात स्पष्टपणे प्रतिपादन केलेला आहे. त्याविषयीचा एक श्लोक असा –

**ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः स्त्रियः शूद्रान्त्यजातयः ।**
**सम्पूज्य तं सुरश्रेष्ठं भक्त्या सिंहवपुर्धरम् ।**
**मुच्यन्ते चाशुभैर्दुःखैर्जन्मकोटिसमुद्भवैः ।।**

अर्थ– ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, स्त्रिया, शूद्र, अंत्यज हे सगळे त्या सिंहशरीरधारी सुरश्रेष्ठाला (नृसिंह) भक्तीने पुजतात. ते त्यामुळे कोटिजन्मांमध्ये उत्पन्न झालेल्या अशुभातून व दुःखातून मुक्त होतात.

**पूजास्थाने आणि प्रतीके** – देवपूजेची सहा स्थाने वृद्ध हारीताने पुढीलप्रमाणे सांगितली आहेत –

**अप्स्वग्नौ हृदये सूर्ये स्थण्डिले प्रतिमासु च ।**
**षट्स्थानेषु हरेः सम्यगर्चनं मुनिभिः स्मृतम् ।।**

अर्थ– जल, अग्नी, हृदय, सूर्यमंडल, वेदी व प्रतिमा या सहा स्थानांच्या ठिकाणी श्रीहरीची चांगल्या प्रकारे पूजा करावी, असे मुनींनी सांगितले आहे.

या सहा स्थानांमध्ये मूर्ती हे स्थान विशेष रूढ आहे. समाजातला फार मोठा वर्ग भाविक, पण तात्त्विक दृष्टी नसलेला असा असतो. अशा समाजाच्या श्रद्धा–भक्तीच्या पूर्ततेसाठी कोणत्यातरी देवमूर्तीचीच आवश्यकता असते. हे लक्षात घेऊनच पुढे देवपूजेत मूर्तिकरणाचा विचार निर्माण झाला. घरात व देवळात पुजायच्या मूर्ती कशाच्या कराव्या व त्यांचे प्रमाण काय असावे, याविषयी मूर्तिविज्ञान आणि मत्स्य पुराण यांत पुष्कळच विस्तृत लिहिलेले आहे. मत्स्य पुराणाचे २५७ ते २६० हे चार अध्याय मूर्तिविज्ञानासाठीच खर्ची पडले आहेत. घरच्या देवाची मूर्ती अधिकांत अधिक १२ अंगुळे उंचीची असावी आणि ती रत्न, सुवर्ण, चांदी, तांबे, पितळ, पाषाण, लाकूड किंवा माती यांची करावी, असे सांगितले आहे.

मात्र विशिष्ट देवतांच्या मूर्तीऐवजी त्यांची प्रतीकेच घेण्याची पद्धत आहे. पंचायतनपूजेत विष्णूसाठी शाळिग्राम, शिवासाठी बाणलिंग, गणपतीसाठी नर्मदेतला तांबडा गोटा व सूर्यासाठी स्फटिकमणी घ्यावा, असे सांगितले आहे. देवीसाठी बहुधा मूर्ती असते. क्वचित तिचा तांदळाही (वरवंट्यासारखा दगड) पूजला जातो. मंत्रविद्येत यंत्र हे देवतेचे प्रतीक असते. अशिक्षित आणि वन्य लोक देवाचे प्रतीक म्हणून एखाद्या वारुळाची, पशूची, दगडाची, मोरपंखी कुंचल्याची पूजा करतात.

**देवपूजेचा इतिहास** – पूजा ही आर्य संस्कृतीला द्राविड संस्कृतीकडून मिळालेली देणगी आहे. आर्यांना यजन माहीत होते; पण पूजन माहीत नव्हते. वैदिक आर्य इंद्रादी देवांना प्रसन्न करण्याठी समिधा, घृत, यव, पुरोडाश, इ. वस्तूंचे अग्नीत हवन करीत व प्रसंगी पशुयागही करीत. या यजनपद्धतीत पुष्प, पत्र, फल, अक्षता, चंदन, धूप, दीप, इ. वस्तूंना मुळीच स्थान नव्हते. ऋग्वेदात कुठे पूजा शब्दही आढळत नाही. त्या शब्दाची व्युत्पत्ती सांगताना डॉ. सुनीतिकुमार चाटुर्ज्या लिहितात –

पूजा हा शब्द आर्य भाषेतला नसून तो द्राविड आहे. फुलांनी देवाधर्माचे कृत्य संपन्न करणे असा त्याचा अर्थ आहे. द्राविड भाषांमध्ये पू चा अर्थ फूल असा आहे आणि करणे या अर्थी चेय्, शेय्, गेय्, जेय् हे धातू रूढ आहेत. पू + गेय् किंवा पू + जेय् याचा अर्थ पुष्पकर्म किंवा पुष्पालंकरण असा होतो. त्यावरूनच वेदोत्तर संस्कृत भाषेत पूज् हा धातू आणि पूजा हे नाम आले असण्याची शक्यता आहे.

द्राविड संस्कृती ही मुळापासूनच पूजक अर्थात पूजेने (पुष्पालंकरणाने) देवाला प्रसन्न करू पाहणारी आहे. आर्य व द्रविड हे समन्वित झाल्यावेळी त्यांनी ज्या एकमेकांच्या धार्मिक कल्पना स्वीकारल्या, त्यांत पूजा ही द्रविडांची देवार्चनपद्धती आर्यांनी स्वीकारली. महाभारतकाळी या पूजाप्रकाराला यज्ञकर्माबरोबरची प्रतिष्ठा प्राप्त झाली होती, असे दिसते. गीतेत भगवान श्रीकृष्ण म्हणतो, की 'मी सर्व यज्ञांचा भोक्ता तर आहेच; पण त्यावरोबर पत्र, पुष्प, फल तोय हे पूजोपचारही मला आवडतात' (गीता. ९. २४ व २६). सर्व पुराणे ही तर विविध पूजापद्धतींसाठी प्रसिद्धच आहेत. पुराणांनी पूजेचे माहात्म्य व तपशील दोन्ही गोष्टी खूप वाढवल्या आहेत.

बौद्ध धर्माच्या उत्कर्षकालात यज्ञसंस्थेचा ऱ्हास सुरू झाला. समाजातले यज्ञयाग जसजसे कमी होत गेले, तसतशी त्यांच्या

जागी देवपूजा रूढ होऊ लागली. कारण ती यज्ञयागांपेक्षा सुलभ होती व कलापूर्णही होती. तिच्यात विशेषशी गुंतागुंतही नव्हती. केवळ त्रैवर्णिकांनाच नव्हे ; तर स्त्रीशूद्रादी सर्वांनाच तिचा अधिकार मिळाला होता, हेही एक तिच्या प्रसाराचे कारण सांगता येईल.

स्मृतिकाळात तर देवपूजा हे गृहस्थाचे एक विहित कर्तव्यच ठरले. मनू व याज्ञवल्क्य यांनी देवपूजेला आश्रमधर्मात स्थान दिले आहे. सकाळचा होम दिल्यानंतर गृहस्थाने देवपूजा करावी, असा मरीची या स्मृतिकाराने तिचा क्रमही सांगितला आहे.

देवयज्ञात वैदिक मंत्रांनी आवाहन केल्या जाणाऱ्या देवता केवळ कल्पनागम्य होत्या, पण देवपूजेत त्या देवतांचे मूर्तीकरण झाले आणि त्यांना उपचार समर्पिताना पूजकाला एक वेगळेच सुख मिळू लागेल. नंतर याच देवपूजेचे वैयक्तिक व सामुदायिक असे दोन विभाग बनले. वैयक्तिक विभागात लोक आपापल्या इष्ट देवतेची मूर्ती घरात स्थापून तिची पूजा करू लागले आणि सामुदायिक पूजेसाठी देवकुले, देवगृहे किंवा देवालये निर्माण होऊ लागली. देवालयातल्या देवमूर्ती घरातल्या मूर्तीपेक्षा मोठ्या होऊन त्यांची तिथे कायमची प्रतिष्ठा होऊ लागली. या सामुदायिक पूजनीय देवतांत शिव आणि विष्णू या दोन देवांना सर्वाधिक प्रभुत्व मिळाले. त्यांच्या अनुषंगाने पुढे देवी, लक्ष्मी, गणपती, राम, कृष्ण यांचीही देवालये निर्माण होऊन त्यांची पूजाअर्चा सुरू झाली.

पूजेची व्याप्ती– गुरू, आचार्य, अतिथी, संत, महात्मे, आई, वडील, इ. विभूतींचा जो सत्कार किंवा सन्मान केला जातो, त्यालाही पूजा असेच म्हटले पाहिजे. देवपूजेत आणि अशा विभूतिपूजेत काही फरक असतो हे खरे; पण संतुष्ट करणे व कृपाप्रसाद मिळविणे अशा प्रकारचा जो पूजेचा उद्देश, तो दोन्ही ठिकाणी सारखाच असतो.

मात्र सर्वच ठिकाणी भक्ती व आदर या भावनांनी पूजा होते, असे नाही. भीती व धाक या भावनांमुळेही काही पूजा केल्या जातात. भूतपूजा ही त्या भुताखेतांनी मानगुटीवर बसू नये व उग्र देवतांची पूजा ही त्यांनी महामारी, देवी, इ. साथीचे रोग उत्पन्न करू नयेत, म्हणून केली जाते. वंशसातत्य चालावे, या उद्देशाने पितरांचीही पूजा करतात. श्राद्ध व श्राद्धसदृश कृत्ये ही पितृपूजेतच मोडतात. समाजाच्या भिन्न भिन्न थरांत त्यांच्या त्यांच्या सांस्कृतिक पातळीला अनुसरून निसर्गपूजा, यक्षपूजा, राक्षसपूजा, नागपूजा, वृक्षपूजा, इ. विविध प्रकारच्या पूजा चालतात.

गृहस्थाने घरात किंवा भक्ताने मंदिरात केलेली देवपूजा ही भक्तीचे सुख, मनःप्रसाद व आध्यात्मिक समाधान यांच्यासाठी असते; तर आदिवासी, वन्य, अशिक्षित, इ. लोकांत प्रचलित असलेल्या सर्व पूजा या व्यावहारिक जीवनातली संकटे दूर व्हावी, एवढ्याचसाठी असतात. माणसाची सांस्कृतिक उंची जशजशी वाढते, तसतशा भावना, उपचार, मंत्र, विधि–विधान, इ. सर्वच गोष्टी बदलतात. मनुष्य आध्यात्मिक क्षेत्रात प्रगत झाला, म्हणजे त्याला बाह्य पूजेपेक्षा मानस पूजा अधिक प्रिय व श्रेष्ठ वाटू लागते. आणि ज्याला अखेर सर्वात्मक सर्वाधार आणि सर्वश्रेष्ठ अशा परमेश्वराचे ज्ञान होते, तो मग प्राप्त कर्तव्य निष्काम बुद्धीने करीत राहणे, हीच खरी पूजा असे मानतो.

**देवप्रभसूरी** ( इ. स. चे १३ वे शतक ) एक जैन कवी. हा मलधारी संप्रदायाचा अनुयायी असून, तत्कालीन गुजरातच्या राजाचा आश्रित होता. याने पांडवचरित व मृगावतीचरित असे दोन ग्रंथ रचले आहेत. पांडवचरित हा ग्रंथ अठरा सर्गांत विभागला असून, त्यात महाभारताची कथा थोडक्यात दिलेली आहे. या कथेत त्याने जैन अरिष्टनेमीची गोष्टही समाविष्ट केली आहे. [ सं. सा. इ. – कीथ; सं. सा. इ.– बलदेव उपाध्याय; म. च. को. ]

**देवप्रयाग** एक तीर्थस्थान. हे हिमाचल प्रदेशातील टेहरी विभागात हृषीकेशच्या पुढे आहे. याची समुद्रसपाटीपासून उंची १५५० फूट आहे. मंदाकिनी वा अलकनंदा यांना जिथे जिथे अन्य एखादी नदी येऊन मिळाली, त्या त्या स्थानाला प्रयाग असे नाव पडले आहे. टेहरीगढवाल विभागात अशीच पाच प्रयागतीर्थे आहेत. त्यांपैकी देवप्रयाग हे केदार-



देवप्रयाग– एक दृश्य

नाथाच्या वाटेवरील पहिले आणि पवित्रतम प्रयाग समजले जाते. या ठिकाणी अलकनंदा आणि भागीरथी यांचा संगम

झालेला आहे. इथून पुढे भागीरथी ही गंगा या सुप्रसिद्ध नावाने ओळखली जाते.

देवप्रयाग हे लहानसे खेडे असून, ते या संगमाच्या काठी पहाडी भागातच वसलेले आहे. इथे रामचंद्राचे मोठे मंदिर आहे. या मंदिरातील पूजे-अर्चेची व्यवस्था तेलंगी ब्राह्मणाकडे असते. या ब्राह्मण पुजाऱ्याला स्थानिक ब्राह्मण कन्येशीच विवाह करावा लागतो. या ठिकाणी वसिष्ठकुंड व ब्रह्मकुंड अशी दोन पवित्र कुंडे आहेत. या दोन कुंडांवर यात्रेकरूंचे धार्मिक विधी होतात.

संगमात उतरण्यासाठी वरपासून घाट बांधून काढलेले आहेत इथले पाणी बर्फासारखे थंड असते. पाण्याला फार ओढ असल्यामुळे घाटाला बांधलेल्या लोखंडी साखळीला धरूनच पाण्यात उतरावे लागते. बहुतेक यात्रिक घाटाच्या पायऱ्यांवर बसूनच लोटयाने पाणी घेऊन स्नान करतात. संगमाची शोभा नितांत रम्य आहे. देवप्रयागाचे माहात्म्य स्कंद पुराणाच्या केदार खंडात वर्णिलेले आहे. [ सु. वि. को.; अलकनंदा—मंदाकिनीके दो तीर्थ— डॉ. संपूर्णानंद, १९५९ ]

**देवप्रस्थ** प्राचीन काळी भारताचे इंद्रप्रस्थ, यमप्रस्थ, वरुणप्रस्थ, कूर्मप्रस्थ व देवप्रस्थ असे पाच विभाग केलेले होते. त्यांपैकी देवप्रस्थात बंगाल, आसाम, इ. भारताचा पूर्वभाग समाविष्ट होत असे. [ स्ट. जॉ. ए. मे. इं. ]

**देवप्रासादप्रतिष्ठा** देवालयाची स्थापना ती विधिपूर्वक करायची असते. संकल्प, होम, दान व दक्षिणा अशी त्या विधीची चार अंगे आहेत. बृहत्संहितेत देवप्रासादप्रतिष्ठेचे माहात्म्य सांगितले आहे, (५६. १–२) ते असे—

कृत्वा प्रभूतं सलिलमारामान् विनिवेश्य च ।
देवतायतनं कुर्याद्यशोधर्माभिवृद्धये ।।
इष्टापूर्तेन लभ्यन्ते ये लोकास्तान् बुभूषता ।
देवानामालयः कार्यो द्वयमप्यत्र दृश्यते ।।

अर्थ— विपुल जलाची सरोवरे आणि फळाफुलांनी बहरलेल्या वृक्षांची उद्याने निर्माण करून त्या जागी यश व धर्म यांच्या वृद्धीसाठी देवालय निर्माण करावे. इष्टापूर्तामुळे ज्या स्वर्गादी लोकांची प्राप्ती होते, त्या लोकांची अभिलाषा बाळगणाऱ्या व्यक्तीने देवांचे मंदिर निर्माण करावे. (कारण) त्यामुळे (इष्ट व पूर्त) दोन्ही प्राप्त होतात.

यज्ञामुळे स्वर्गप्राप्ती होते, अशी वैदिक काळी आर्यांची धारणा होती. त्याऐवजी देवप्रासादप्रतिष्ठेमुळे स्वर्ग लाभतो, अशी श्रद्धा पुराणकाळी निर्माण झाली. मंदिर जितके स्थिर व भक्कम असेल, त्या मानाने त्याच्या निर्मात्याचा स्वर्गवास निश्चित व चिरस्थायी मानला जातो. काष्ठमंदिरापेक्षा इष्टिकामंदिर शतगुण व पाषाणमंदिर सहस्रपट पुण्यदायक असल्याचे सांगितले आहे (महानिर्वाणतंत्र १३. २४–२५). [ भा. वा. शा. हिं. प्रा. ]

**देवबंध** एक गाव. हे उ. प्रदेशातील मुझफरनगरपासून सोळा मैलांवर आहे. या गावापासून अर्ध्या मैलावर देवकुंड नावाचे एक महातीर्थ आहे. त्याच्या काठी वरीच मंदिरेही आहेत, त्यामुळे हे एक यात्रेचे ठिकाण बनले आहे.

देवबध गावाला प्राचीन काळी देववन असे म्हणत. इथे जवळच्याच एका जंगलात पुराणप्रसिद्ध जगदंबेचे मंदिर आहे. पांडवांनी वनवासातील आपला काही काळ इथे घालविला होता व त्यांनीच या देवीची स्थापना केली, अशी आख्यायिका सांगतात. [ स. भा. प्र. व. ]

**देवभद्र** (इ. स. ११५० चा सुमार) एक जैन तर्कशास्त्रज्ञ. हेमचंद्रसूरी व श्रीचंद्रसूरी हे याचे गुरू होते. याने 'न्यायावताराच्या' हरिभद्र सूरीकृत वृत्तीवर न्यायावतारटिप्पण नावाची टीका लिहिली आहे. त्याने या ग्रंथात विन्ध्यवासिन, धर्मकीर्ती, धर्मोत्तर, ज्ञानश्रीमित्र, इ. पूर्वाचार्यांचे उतारे घेतले आहेत. [ म. च. को.; भा. सं. जै. यो. ]

**देवभात** तांदुळाच्या जातीचे एक धान्य. याचा समावेश उपधान्यांत करतात. तलावाच्या काठी किंवा पाणथळ जागेत हे फार पिकते. ऋषिपंचमीच्या दिवशी हे खातात. कोणत्याही उपवासाला हे भात चालते. [ म. ज्ञा. को. ]

**देवमूर्तिप्रतिष्ठा** एखाद्या देवालयात, मठात वा अन्य कोणत्या तरी जागी देवमूर्तीची अथवा लिंगाची कायम स्थापना करण्याचा जो विधी, त्याला देवमूर्तिप्रतिष्ठा असे नाव आहे. या प्रतिष्ठेचे विधान निर्णयसिंधूत सांगितले आहे, ते असे —

मुहूर्ताच्या पूर्वदिवशी यजमानाने दहा, बारा किंवा सोळा हातांचा मंडप करून त्यात आग्नेयीस एक हात चौरस कुंड किंवा स्थंडिल करावे. त्याच्या पूर्वेस वेदी, नैर्ऋत्येस वास्तुमंडप, मध्यभागी वेदी करावी व त्या वेदीवर सर्वतोभद्रमंडल काढावे. एवढी तयारी केल्यावर संकल्प करावा. मग आचार्य व चार ऋत्विज यांचे वरण करून त्यांची पूजा करावी. आचार्याने मंडपात प्रवेश करून वेदीच्या उत्तरेकडे जलाधिवास करावा.

**जलाधिवास** – पूर्वरात्री देवाला सुवर्णावर ठेवून पंचगव्य, यव, दूर्वा, पल्लव, इ. वस्तू कलशात टाकाव्या व तो कलश उदकाने भरून त्या जलाने देवमूर्तीवर अभिषेक करावा. देवाला फळे यव आणि दूर्वा वाहाव्या. देवाच्या हातात कंकण बांधून त्याला वस्त्राच्छादित करावे. एवढे करून मूर्तीला उदकात ठेवावे.

दुसऱ्या दिवशी देवाची पुढील मंत्राने प्रार्थना करावी –

स्वागतं देवदेवेश विश्वरूप नमोऽस्तु ते ।
शुद्धेऽपि त्वदधिष्ठाने शुद्धिं कुर्मः सहस्व ताम् ।।

अर्थ – हे देवदेवेशा विश्वरूपा, तुझे स्वागत असो. तुला नमस्कार असो. तुझे मूर्तिरूप अधिष्ठान शुद्ध असताही आम्ही त्याची शुद्धी करीत आहो. ती तू सहन कर.

मग ऋत्विजांसह यजमानाने देवाला उठवून अग्न्युत्तारण करावे.

**अग्न्युत्तारण** – ऋग्वेदातले ' अग्निः सप्तिवाजम्० ' हे सूक्त सुरवातीला अग्निपदरहित व पुनश्च अग्निपदसहित म्हणावे. असे कमीत कमी २८ वेळा करावे. सूक्तपाठ चालू असता देवमूर्तीवर उदकाची धार धरावी. मग मूर्तीला १२ वेळा मृत्तिका लावून तिचे उदकाने प्रक्षालन करावे. नंतर पंचगव्याने व पंचामृताने स्नान घालावे. लिंगप्रतिष्ठा असेल, तर स्नानाच्या वेळी ' नमस्ते रुद्र मन्यव० ' या आठ ऋचा म्हणाव्या. मग मूर्ती पीठावर बसवून तिच्या भोवती आठ दिशांना आठ उदककलश स्थापावे. मग त्यांतील जलाने देवाला अभिषेक करावा. नंतर वस्त्रापासून दीपापर्यंतचे उपचार समर्पण करावे. पिठाचे आठ दिवे ओवाळावे. मध व तूप यांत एक सुवर्णशलाका बुडवून तिने मूर्तीचा प्रथम डावा व नंतर उजवा या डोळ्यांचे लेखन करावे. मग देवाच्या डोळ्यांत काजळ घालावे. नंतर आरसा दाखवून नैवेद्य समर्पण करावा. आचार्याने वेळूच्या पात्रात वरण, भात, गोड पदार्थ, इ. भोजनपदार्थ ठेवून ते पात्र देवाभोवती ओवाळून चवाठचावर नेऊन ठेवावे.

मग सर्वतोभद्रमंडलावर ब्रह्मादी मंडलदेवतांचे, तसेच नवग्रहांसह अन्य अनेक देवतांचे आवाहन व स्थापन करावे. जिची प्रतिष्ठा करायची, ती देवमूर्ती मध्यभागी ठेवावी. मंडलदेवतांच्या नाममंत्रांनी तिल आणि आज्य यांच्या दहा आहुती देऊन देवांना पुष्पांजली समर्पावी. मग मंडलाच्या उत्तरेस मंचक ठेवून त्यावर शय्या अंथरावी. मंगलवाद्यांच्या घोषात देवाला त्या शय्येवर निजवावे. विष्णुमूर्तीची स्थापना असेल, तर पुरुषसूक्ताने तिच्या सर्वांगाला स्पर्श करावा. लिंगप्रतिष्ठा असेल तर ' सर्वो वै रुद्रः ' या मंत्राने लिंगाच्या मुळाला, ' कद्रुद्राय० ' या मंत्राने मध्याला व ' नमो हिरण्यबाहवे० ' या मंत्राने अग्राला स्पर्श करावा. मग पूर्णाहुती करावी. हा पूर्वदिवशीच्या अधिवासनाचा विधी झाला.

दुसऱ्या दिवशी ज्या पीठिकेवर मूर्ती स्थापायची, त्या पीठिकेला स्नान घालावे. रात्री मंचकावर ठेवलेल्या देवाला उठवून पुरुषसूक्ताने त्याची स्तुती करावी. ' कनिक्रदत्० ' हे सूक्त म्हणत विष्णूला आणि ' सद्योजातम् ' हे पाच अनुवाक म्हणत लिंगाला देवालयात न्यावे. पीठिकेवर आठ रत्ने, सप्तधान्ये, रुपे, मनशीळ या वस्तू टाकून पायसाने मूर्तीला लेप करावा. प्रणवाने देवाचा अंगन्यास करावा. मग शुभ मुहूर्तावर ' प्रतितिष्ठ परमेश्वर ' असे उच्चारून ' अतो देवा० ' या मंत्रांनी विष्णूची आणि रुद्राध्यायाने लिंगाची स्थापना करावी. नंतर मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करावी. नंतर ' इदं विष्णुः० ' या मंत्राने विष्णुप्रतिमेच्या हाताचे व ' नमोऽस्तु नीलग्रीवाय ' या मंत्राने लिंगाचे कंकण सोडावे. मग पक्वान्नांचा नैवेद्य समर्पावा. तिलमिश्र चरूच्या अग्नीत १२ आहुती द्याव्या. लिंगप्रतिष्ठा असेल तर नैवेद्यानंतर आठ नाममंत्रांनी तिल व चरू यांचे अग्नीत हवन करावे. दुसऱ्या आठ मंत्रांनी गुडमिश्रित चरूचे हवन करावे. इतरही अनेक आहुती प्रयोगात सांगितल्याप्रमाणे द्याव्या. मग सर्व हविर्द्रव्यांनी देवमूर्तीला बलिदान करावे. हुतशेष हविर्द्रव्य अश्वत्थाच्या पानावर ठेवून देवाला प्रदक्षिणा व नमस्कार करावा. नंतर यजमानाने आचार्याला व ऋत्विजांना दक्षिणा देऊन ब्राह्मणभोजन घालून कर्म परमेश्वरार्पण करावे [ नि.सि. ]

## देवमूर्तिव्रत

एक काम्य व्रत. चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून या व्रताला प्रारंभ करतात. या व्रतात प्रत्येक महिन्यातल्या चार दिवसांत शिव, अग्नी, विरूपाक्ष व वायू या देवतांची पूजा करायची असते. व्रतावधी एक वर्ष. उद्यापनाच्या वेळी दही, तीळ, यव व तूप यांचा होम करतात. या व्रताला चतुर्मूर्तिव्रत असेही म्हणतात. [ हि. ध. ]

## देवयज्ञ

गृहस्थाने करायच्या पंचमहायज्ञांपैकी एक. ' यदग्नौ जुहोत्यपि समिधं तद्देवयज्ञः सन्तिष्ठते ' = अग्नीत समिधा अर्पण केल्याने देवयज्ञ होतो, असे तैत्तिरीय आरण्यकात म्हटले आहे (२.१०). त्याचप्रमाणे स्वाहा म्हणून अग्नीत अन्नाची आहुती किंवा समिध दिल्यास देवयज्ञ होतो, असे आपस्तंब, बौधायन व गौतम यांनी सांगितले आहे. मनूने होमालाच देवयज्ञ असे मानले आहे. ज्या देवतांना उद्देशून यज्ञ करायचा, त्यांच्या नावांबद्दल सूत्रकारांत मतभेद आहेत. आश्वलायन गृह्यसूत्रात सूर्य, अग्नी, प्रजापती, सोमवनस्पती, अग्निषोम, इंद्राग्नी, द्यावा–पृथिवी, धन्वंतरी, इंद्र, विश्वेदेव व ब्रह्मा यांना उद्देशून यज्ञ करावा, असे सांगितले आहे (१.२.२.); तर गौतमाने अग्नी, धन्वंतरी, विश्वेदेव, प्रजापती व अग्निस्विष्टकृत

या देवता होमासाठी सांगितल्या आहेत. मध्ययुगीन सूत्रकार मात्र वैश्वदेवालाच देवयज्ञ मानतात. [ हि. ध.; भा. सा. इ. ]

## देवयान-पितृयान

एक पारलौकिक कल्पना. देवयान म्हणजे देवांचा मार्ग आणि पितृयान म्हणजे पितरांचा मार्ग होय. यज्ञात अर्पण केलेला हविर्भाग ग्रहण करण्यासाठी देवगण स्वर्गातून पृथ्वीवर ज्या मार्गाने येतात आणि पुण्यवान व्यक्ती देहपातानंतर ज्या मार्गाने स्वर्गादी वरच्या लोकांत जातात, तो देवयान होय. ज्या मार्गाने पितृगण आपल्या पुत्रपौत्रांनी दिलेले पिंड स्वीकारण्यासाठी पृथ्वीवर येतात आणि ज्या मार्गाने सर्वसाधारण लोक देहपातानंतर पितृलोकात व यमलोकात जातात, त्याला पितृयान असे नाव आहे. देवयान प्रकाशमय व पितृयान अंधकारमय मानलेला आहे.

प्राचीन वैदिक वाङ्मयात देवयान शब्दाचा उल्लेख अनेकदा आला आहे. उदा० (ऋ. १. ७२. ७)–

**अन्तर्विद्वाँ अध्वनो देवयानानतन्द्रो दूतो अभवो हविर्वाट् ॥**

अर्थ– हे अग्ने, तू स्वर्ग व पृथ्वी यांच्यामधला देवयान मार्ग जाणतोस. तू देवांना वारंवार हविर्भाग पोचविण्याच्या बाबतीत आळस करीत नाहीस.

कौषीतकी उपनिषदात (१. १३) देवयान मार्गाविषयी सविस्तर वर्णन आले आहे, ते असे – आत्मा हा देवमार्गाने प्रथम अग्निलोकात आणि तिथून पुढे क्रमाने वायू, वरुण, सूर्य, इंद्र व प्रजापती यांच्या लोकांत जाऊन शेवटी ब्रह्मलोकात जातो. तिथे ब्रह्मा आपल्या सेवकांना त्याचे स्वागत करायला सांगतो. मग पाचशे अप्सरा त्याला नटवतात, सजवतात. नंतर तो तिथली विजरा नदी कल्पनेनेच ओलांडून पैलपार जातो. मग तो आपली शुभाशुभ कर्मे झुगारून देतो आणि द्वंद्वातीत होऊन मुक्त होतो.

छांदोग्य उपनिषदात हा मार्ग पुढीलप्रमाणे दिला आहे –

**तेऽर्चिषमभिसम्भवन्ति अर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान् षडुदङ एति मासांस्तान्। मासेभ्यः संवत्सरं संवत्सरादादित्यमादित्याच्चन्द्रमसं चन्द्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एनान् ब्रह्म गमयति।**

(छां. उ. ५. १०. ११)

अर्थ – वानप्रस्थ आणि संन्यासी अर्चिरभिमानिनी देवतेला प्राप्त होऊन पुढे क्रमाने दिवस, शुक्ल पक्ष, उत्तरायणाचे सहा महिने व वर्ष यांच्या देवतांप्रत जातात आणि तिथून आदित्य, चंद्र व विद्युत यांना प्राप्त होतात. तिथे जो एक अमानव पुरुष असतो, तो त्यांना ब्रह्माप्रत पोचवतो.

सर्वसाधारण लोक मात्र धूम, रात्र, कृष्ण पक्ष व दक्षिणायन यांच्या अभिमानी देवतांप्रत जाऊन मग पितृलोक, निरभ्र आकाश व शेवटी चंद्रलोक या ठिकाणी जातात. तिथे काही काळ घालवल्यावर ते पुन्हा मर्त्य लोकात परत येतात.

लो. टिळक यांच्या मते वैदिक काळात देवयान हे उत्तरायणाचे व पितृयान हे दक्षिणायनाचे नाव होते. त्यांच्या मते देवयान म्हणजे उत्तर ध्रुव प्रदेशातील दीर्घ दिवस आणि पितृयान म्हणजे त्या प्रदेशातील दीर्घ रात्र होय.

उत्तरायण, शुक्ल पक्ष या कालात मृत्यू येणे हे शुभ व दक्षिणायन, कृष्ण पक्ष या कालात मृत्यू येणे हे अशुभ मानलेले आहे. याविषयी गीतेत म्हटले आहे, ते असे –

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम्।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः॥**
**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम्।**
**तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते॥**
**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते।**
**एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः॥**

(गी. ८. २४–२६)

अर्थ– जगात शुक्ल व कृष्ण हे दोन मार्ग शाश्वत आहेत. पहिल्या मार्गाने गेल्यास पुनर्जन्म घ्यावा लागत नाही आणि दुसऱ्या मार्गाने गेल्यास पुनर्जन्म घ्यावा लागतो. अग्नी, ज्योती दिवस, शुक्ल पक्ष व उत्तरायणाचे सहा महिने या कालात मृत्यू आलेले ब्रह्मज्ञ पुरुष ब्रह्माप्रत जातात आणि धूर, रात्र, कृष्ण पक्ष व दक्षिणायनाचे सहा महिने या कालात मरण पावलेले योगी चंद्रज्योतीप्रत जाऊन परत मृत्युलोकी येतात.

चंद्रज्योती किंवा चंद्रलोक म्हणजेच पितरांचा लोक होय अशी समजूत आहे.

यासंबंधी शंकराचार्यांनी आपल्या गीताभाष्यात सांगितले आहे, की ब्रह्मज्ञानी पुरुष व ज्याचे प्राण सुषुम्ना नाडीतून उत्क्रांत झाले आहेत, असे योगी पुरुष यांना मृत्यूबाबत कालाचे काही बंधन नाही. त्यांना दिवस, रात्र, शुक्ल पक्ष व कृष्ण पक्ष दक्षिणायन वा उत्तरायण ही सर्व सारखीच आहेत. ज्यांना एखाद्या विशिष्ट लोकाच्या प्राप्तीची इच्छा असेल, त्यांच्या बाबतीतच तेवढे कालाचे काही बंधन येऊ शकेल. पण त्यासाठी शुक्ल पक्ष, उत्तरायण ही कालविभागाची नावे न घेता, त्यांच्या अतिवाहिक देवतांच्या नावांनी ते ते लोक ओळखणे योग्य होईल. शरीरापासून मुक्त झालेल्या आत्म्याला वरच्या लोकांत घेऊन जाणाऱ्या देवतांना अतिवाहिक असे म्हणतात. आपल्या कर्मानुसार जीवांना त्या त्या अतिवाहिक देवतांची भेट होते व त्यांना त्या त्या लोकाची प्राप्ती होते, असे सांगितले आहे. [आ. अा. दे.; एन्सा. रि. ए.; म. भा. उ.]

**देवयोनी** विद्याधर, यक्ष, राक्षस, अप्सरा, गंधर्व, किन्नर, इ. देवयोनी होत. पाहा – अतिमानवी योनी.

**देवरंजनी** एक राग. याची जाती औडव आहे. यात ऋषभ व गंधार हे वर्ज्य असून, धैवत व निषाद हे कोमल आणि बाकीचे स्वर शुद्ध असतात. वादी– षड्ज. संवादी– मध्यम. आरोह– सा म म प नी ध नी ध सा. अवरोह– सा नी ध नी ध प ध म म प. गानसमय – प्रात:काल. हा दाक्षिणात्य संगीतपद्धतीमधला आहे. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**देवरुखे** पंचद्राविडांतर्गत ब्राह्मण जात. यांची वस्ती प्रामुख्याने महाराष्ट्रातल्या कुलाबा व रत्नागिरी या जिल्ह्यांत आहे. रत्नागिरी जिल्ह्यातील संगमेश्वर तालुक्यात देवरुख नावाचे जे एक गाव आहे, त्या गावावरून या लोकांना देवरुखे हे नाव पडले असावे. आपण मूळचे देशस्थ; परंतु देवरुख भागात राहायला आल्यामुळे आम्हांला देवरुखे हे नाव प्राप्त झाले, असे हे सांगतात. विल्सनच्या मते हे लोक अथर्ववेदाच्या देवपिशाखेचे असावे.

स्कंद पुराणात त्यांचा देवराष्ट्रीय (देवराष्ट्रातून आलेले) म्हणून उल्लेख आलेला असून, त्यांना अपांक्त म्हटलेले आहे. पद्म पुराणाचाही आशय असाच आहे. यावरूनच यांच्या पंक्तीस बसल्याने संकटे येतात, असा एके काळी समज होता.

देवरुख्यांच्या स्थलांतरासंबंधी शतप्रश्नकल्पलता या ग्रंथात आलेली एक दंतकथाही वरील गोष्टीला पोषकच आहे. ती कथा अशी –

कोल्हापूर प्रांतातून इटगाल राजाच्या छळामुळे देवर्षी ब्राह्मण कोकणात गेले. पुढे परशुराम कोकणात आला असता त्याच्या पित्याची श्राद्धतिथी आली. त्याने श्राद्धासाठी या ब्राह्मणांना क्षण दिला; पण ते गेलेच नाहीत. म्हणून मग परशुरामाने चित्तपावन ब्राह्मण निर्माण केले व देवर्षी ब्राह्मणांना पंक्तिबाह्य ठरविले.

यांची व देशस्थांची गोत्रे बरीचशी समान आहेत. ऋग्वेदी आश्वलायन व यजुर्वेदी हिरण्यकेशी अशा दोन शाखा यांच्यामध्ये आहेत. आश्वलायन व सत्याषाढ या सूत्रांप्रमाणे त्यांची श्रौत – स्मार्त कर्मे चालतात. चित्पावनांप्रमाणेच देवरुख्यांचीही चौदा गोत्रे आहेत.

तुळजापूर व कोल्हापूर येथील देवी आणि जेजुरीचा खंडोबा ही यांची मुख्य दैवते आहेत. कै. विष्णु परशुराम पंडित यांनी 'पंचद्राविडान्तर्गत महाराष्ट्र ब्राह्मणांतील देवरुख्यांविषयी शास्त्रसंमतविचार' नामक एक ग्रंथ लिहिला आहे. त्यात देवरुख्यांना देशस्थ म्हटले आहे. हे लोक मुख्यत: शेतीवर निर्वाह करणारे आहेत.

समुद्रगुप्ताच्या प्रयाग येथील शिलालेखात (इ. स. ३५०) देवराष्ट्र देशाचा उल्लेख आढळतो. दक्षिणापथातील जे देश त्याने जिंकले, त्या देशांच्या नामावळीत देवराष्ट्राचे नाव आहे. नागपूर ते म्हैसूरपर्यंतच्या प्रदेशात मध्येच कुठेतरी हे देवराष्ट्र होते.

देवरुख्यांविषयी श्री. राजवाडे पुढीलप्रमाणे माहिती देतात –

कृष्णानदीच्या काठी कऱ्हाडजवळ कुंडलच्या पूर्वेस ४-६ मैलांवर देवराष्ट्रे नावाचे खेडे आहे. त्याच्या आसपास प्राचीन अवशेष, लेणी व देवळे आहेत. हेच पूर्वीच्या देवराष्ट्राच्या राजधानीचे शहर होय. तिथे कुबेर नामक राजा होता. त्या राजाच्या आश्रयाने या देवराष्ट्रात जे ब्राह्मण राहत असत, ते देवराष्ट्रीय अथवा देवरुखे ब्राह्मण होत.

इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या प्रारंभी सातवाहनांचे राज्य नष्ट झाले. या घटनेचा फायदा घेऊन देवराष्ट्र येथील राजांनी महाराष्ट्रात आपला जम बसविण्यास सुरुवात केली. समुद्रगुप्ताने पुढे या देवराष्ट्रिकांना आपले मांडलिक बनवले. पुढे इ. स. च्या ५ व्या शतकापर्यंत ते कधी मांडलिक, तर कधी स्वतंत्र असे राहिले. इ. स. ३०० ते ५०० या कालखंडात महाराष्ट्रात अनेक लहानमोठी राज्ये उदयास आली. देवराष्ट्राचे राज्य हे त्यांपैकीच होय. हे राज्य इ. स. च्या पाचव्या शतकाच्या अखेरीस चालुक्यांच्या अंकित झाले असावे आणि पुढे थोड्याच कालाने नष्ट झाले असावे. त्यानंतर हे देवराष्ट्रीय ब्राह्मण राजाश्रयाभावी देवराष्ट्र प्रांतातून निघून संगमेश्वर व फुणगूस यांच्या आसपास येऊन स्थायिक झाले असावे. या वेळी तिथे चित्पावन ब्राह्मणांची वस्ती होती. आचार व व्यवहार यांत भिन्नता असलेल्या या घाटावरच्या ब्राह्मणांपासून चित्पावन ब्राह्मण अलिप्त राहिले व त्यांनाही त्यांनी दूर ठेवले. [ म. ज्ञा. को.; ब्रा. भि. वि.; मुं. इ. जा. ]

**देवर्धिगणी** (इ. स. चे ५ वे शतक) एक जैन पंडित व धर्मोपदेशक. हा वलभीचा ध्रुवसेन मैत्रक (पहिला) या राजाचा समकालीन होता. कल्पसूत्र, नंदीसूत्र, अनुयोगद्वारसूत्र, इ. जैन सिद्धांतविषयक ग्रंथ याने रचले आहेत. ध्रुवसेनाचा पुत्र मरण पावला, तेव्हा त्याच्या शोकनिवारणासाठी कल्पसूत्र या ग्रंथाचे त्याने वाचन केले, अशी कथा आहे. हा वलभी विद्यापीठाचा आचार्य होता. वलभी येथे इ. स. ४५४ साली जी चौथी जैन परिषद भरली, ती याच्याच प्रेरणेने होय. त्या परिषदेचा अध्यक्षही हाच होता.

जैन धर्माच्या प्रारंभकाळात वेदांप्रमाणेच जैन धर्मग्रंथही

मौखिक परंपरेने शिकविले जात. पण ही परंपरा पुढे खंडित झाली. त्यामुळे जैन वाङ्मयाबरोबरच जैन धर्माचाही ऱ्हास होण्याची वेळ आली. ही आपत्ती टळावी म्हणून देवर्धिगणीने मौखिक परंपरेने शिल्लक असलेले सर्व धर्मग्रंथ लिहून काढण्याचे ठरविले आणि चौथ्या धर्मपरिषदेत त्या गोष्टीला जैन आचार्यांची मान्यताही मिळविली. 'जैन आगमांचे पुस्तकावरोहण' या नावाने हा प्रसंग जैन साहित्यात नमूद आहे. जैनांच्या श्वेतांबर परंपरेत हे सर्व लिखित ग्रंथ प्रमाणभूत मानतात. याच्या नंदीसूत्र ग्रंथात चौवीस तीर्थंकर व अकरा गणधर यांची माहिती आहे. त्या ग्रंथावरून दूसगणी हा देवर्धिगणीचा गुरू होता, हे कळते.

एका महान आपत्तीतून जैन धर्माला जिता-जागता ठेवण्याचे श्रेय देवर्धिगणीलाच दिले जाते. या कामगिरीमुळे त्याच्या काळापासून जैनांचे अंधकारयुग नष्ट झाले, असे समजतात. [म. च. को.; प्रा. सा. इ.; भा. सं. जै. यो.; गुजरात]

**देवर्षी** देवांमधले अर्थात स्वर्गात वास्तव्य करणारे ऋषी. हे संख्येने दहा आहेत. त्यांची नावे अशी– नारद, अत्री, मरीची, भरद्वाज, पुलस्त्य, पुलह, क्रतू, भृगू, वसिष्ठ व प्रचेता. महाभारतात (अनु. १७. १४४) शिवालाही देवर्षी म्हटले असून, तो देव व असुर यांना वर देणारा आहे.

**देवलक** ब्राह्मणांचा एक वर्ग. हा वर्ग व्यवसायावरून निर्माण झालेला आहे. या लोकांना देवल असेही म्हणतात. 'देवं लाति गृह्णाति निजजीविकार्थमिति' = जो निर्वाहासाठी देवाचा अंगीकार करतो, तो देवल होय, अशी त्या नावाची व्युत्पत्ती आहे. हे लोक वेतन घेऊन मंदिरांत पूजाअर्चा करतात. पूर्वकाळी कोणत्याही ब्राह्मणाने जर तीन वर्षेपर्यंत पूजेचे काम सवेतन केले, तर त्याची देवलकांत गणना होत असे. पुराणे आणि स्मृतिग्रंथ यांत या वर्गाविषयीचे अनेक उल्लेख आढळतात. यांना श्राद्धादी कार्यांसाठी ब्राह्मण म्हणून बोलावू नये असे मनुवचन आहे (३. १५१).

देवस्थानाच्या पैशावर जगणाऱ्या (देवकोशोपजीवी) ब्राह्मणांचाही समावेश देवलकांतच केलेला आहे. [हि. ध.; ग्लॉ. स्मृ. लि.; श. क.; पु. इं.]

**देवलस्मृती** एक स्मृतिग्रंथ. हा ग्रंथ मूळ स्वरूपात उपलब्ध नाही. या नावाचा एक नव्वद श्लोकांचा ग्रंथ छापलेला आहे; पण तो इतर स्मृतींतून प्रायश्चित्तविषयक तेवढे श्लोक निवडून त्यांचा केलेला संग्रह असावा आणि तो बराच अर्वाचीनही असावा, असे श्री. चित्रावशास्त्री म्हणतात. मिताक्षरा, हरदत्ताचा विवरण नामक ग्रंथ, स्मृतिचंद्रिका व अपरार्क या ग्रंथांत आचार, व्यवहार, श्राद्ध, प्रायश्चित्त, इ. गोष्टींसंबंधीचे देवलस्मृतीतले उतारे घेतलेले आहेत. त्यावरून देवल हा बृहस्पती, कात्यायन, इ. स्मृतिकारांचा समकालीन असावा, असे दिसते. देवलाचे सर्वत्र आढळणारे धर्मशास्त्रविषयक तीनशे श्लोक एकत्र करून त्यांचा एक संग्रह धर्मप्रदीप या ग्रंथात दिलेला आहे. त्यावरून मूळ स्मृतीच्या वैविध्याची व विस्ताराची कल्पना येते. [प्रा. च. को.; हि. ध.]

**देवलोक** देवांचे वास्तव्यस्थान. याला स्वर्ग असेही म्हणतात. भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः व सत्य हे सात देवलोक होत, असे मत्स्य पुराणात सांगितले आहे. यज्ञ, श्रम, तपस्या व आहुती या साधनांनी देवांनी स्वर्ग लोक मिळवला, असे ऐतरेय ब्राह्मणात (३. ४२) म्हटले आहे. पाहा – स्वर्ग.

**देवव्रत** एक काम्य व्रत. ज्या चतुर्दशीला मघानक्षत्री गुरु असेल, त्या तिथीला हे व्रत करायचे असते. उपवास व महेश्वराची पूजा हा याचा विधी आहे. फल – आयुष्यवृद्धी व संपत्ती आणि कीर्ती यांचा लाभ.

**देवसमाज** (१) पंजाबातील एक धर्मपंथ. श्रीशिवनारायण अग्निहोत्री यांनी या समाजाची स्थापना केली. प्रारंभी हा पंथ म्हणजे ब्राह्मसमाजाचीच एक शाखा समजली जात होती, याचे कारण देवसमाजाचे प्रवर्तक श्री. अग्निहोत्री हे सुरवातीस ब्राह्मसमाजी होते व लाहोरच्या ब्राह्मसमाजाचे एक श्रेष्ठ कार्यकर्ते होते. पण पुढे ब्राह्मसमाजाच्या इतर नेत्यांशी त्यांचे न पटल्यामुळे त्यांनी इ. स. १८८७ सालच्या फेब्रुवारी महिन्यात देवसमाजाची स्थापना केली. श्री. अग्निहोत्री यांचा दृष्टिकोनही ब्राह्मसमाजाप्रमाणेच सामाजिक व आध्यात्मिक आहे. श्री. अग्नि-



श्री. शिवनारायण अग्निहोत्री

होत्री स्वतःला सर्वश्रेष्ठ व परिपूर्ण व्यक्ती समजत. ' मी पातकाच्या अतीत असून समाज व राष्ट्र यांच्या अभ्युत्थानाचे एकमात्र साधन आणि आशा आहे, ' या शब्दांत त्यांनी आपल्या अनुयायांसमोर स्वतःचा आदर्श उभा केला होता. ते स्वतःला सर्वोच्च आत्मा समजत. म्हणूनच त्यांना त्यांचे अनुयायी सत्यदेव किंवा गुरुभगवान असे म्हणू लागले. त्यामुळेच या समाजात गुरूला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले आहे. देवसमाजाची तत्त्वे अशी –

विश्वात पदार्थ व शक्ती अशा दोनच वस्तू आहेत आणि त्या अनादी अनश्वर अशा आहेत. मानव हा स्वतःच स्वतःला निर्माण करतो. त्याच्या ठिकाणी आत्मिक विकासाची क्षमता आहे. आत्म्याला पुनर्जन्म किंवा संसारचक्रात भ्रमण नाही. या विश्वात सृष्टीचा कर्ता अथवा ईश्वर असा कोणी नाही आणि त्यामुळे मूर्तिपूजा व प्रार्थना यांचीही आवश्यकता नाही. मनुष्याने ध्यान व चिंतन यांच्या साहाय्याने नैतिक व आत्मिक जीवन विकसित करणे, हेच त्याचे श्रेष्ठ कर्तव्य आहे.

या आणि अशाच सांप्रदायिक सिद्धान्तांचे विवेचन श्री. अग्निहोत्री यांनी देवशास्त्र व देवधर्म या दोन ग्रंथांत केले आहे. याव्यतिरिक्त त्यांनी मतप्रतिपादनासाठी व विरोधकांना उत्तर देण्यासाठी अनेक छोट्या मोठ्या पुस्तिकाही लिहिल्या आहेत.

देवसमाजाचे सदस्य होण्यासाठी दहा नियमांची शपथ घ्यावी लागते. अचौर्य, कोणाचा विश्वासघात न करणे, सदाचारी राहणे, जीवहत्या न करणे, मादक द्रव्यांचे सेवन न करणे, इ. ते नियम आहेत. विद्येचा प्रसार करणे व लोकांचे दुःख निवारण करण्यासाठी झटणे हे या समाजाचे मुख्य कार्य आहे. स्त्रीशिक्षणावर समाजाचा विशेष भर आहे. समाजाने पंजाबात अनेक शाळा व विश्वविद्यालये चालविली आहेत. अस्पृश्य व गुन्हेगार लोकांसाठीही शाळा स्थापन केल्या आहेत. लाहोर हे समाजाचे मुख्य केंद्र असून, पंजाबात अनेक ठिकाणी त्याच्या शाखा आहेत. समाजाने आजवर अनेक औद्योगिक प्रदर्शनेही भरवली आहेत. सेवक, विज्ञानमूलकधर्म, सिंध उपकारक, देवधर्म, इ. पत्र-पत्रिकाही काढल्या आहेत. याशिवाय विधवासहायक सदन, निरामिषभोजी संघ व मद्यनिषेधसंघही स्थापित केले आहेत. [ हि. हिं. सि.; हि. क. इं. पी. १०; , मा. ने. हिं. से. ]

(२) देव हा शब्द पूर्वी विशिष्ट लोकांचा वाचक असावा. देव आणि मानव हे शेजारी असून, तपोबलाने देवांचा उत्कर्ष झाला, असे आपस्तंब म्हणतो. देव आणि असुर यांची भिन्न राष्ट्रे असून, त्यांची युद्धे झाल्याचे अनेक उल्लेख ब्राह्मणग्रंथांत आढळतात.

देवांना बायकामुले होती; त्यांच्या तेहतीस कुळी मानलेल्या होत्या. देव, मनुष्य व राक्षस असे तीन समाज प्राचीन काळी अस्तित्वात होते, असे प्रतिपादन श्री. ना. गो. चापेकरांनी केले आहे. पाहा– गणमैत्री. [ म. ज्ञा. को.; वै. नि. ]

**देवसी** नेपाळमधील एक सण व लोकनृत्य. दिवाळीच्या दुसऱ्या दिवशी हा सण येतो. या वेळी तरुणांचा एक जथा एका वृद्धाच्या नेतृत्वाने घरोघर जाऊन मंगल कामना व्यक्त करतो. त्या वेळी तो वृद्ध गृहस्थ गाणे गात नाचतो आणि त्याच्या बरोबरची तरुण मुले देवसी रे हे पालुपद उच्चारीत नाचतात. या तरुण मुलांना देवस्यारे असे म्हणतात. हे देवस्यारे ज्या ज्या घरी जातात, त्या त्या घरी त्यांना शकुनाचे म्हणून फराळाचे जिन्नस खायला देतात. देवसी गीत गाऊन झाल्यावर ही सर्व मंडळी यजमानाला आशीर्वाद देणारे गीत गातात.

देवसीची जी अनेक गीते आहेत, त्यांतील एक गीत असे –

झिलि मिलि, झिलि मिलि, देवसी रे,
के को फिल मिलि, देवसी रे ।
फूल को, झिलि मिलि .....
लड़्दे, पड़्दे, आये को हामी
केरा को थम्मा, चार भाई जम्मा,
हामी आफै, आये को होइना
बलि राजा ले पठाये को,
वर्ष दिन को चाड़ बाड़, आया को हामी
यहां मंत्र होइना सारा संसार घूमने परछः ।

अर्थ – आज अवघे विश्व प्रसन्न आहे. सर्वत्र लुकलुकणारे दिवे चकाकत आहेत. फुले उमलत आहेत. नाचत-खेळत आम्ही तुमच्या दारी आलो आहो. केळीचा खुंट रोवलेला आहे. त्याच्या चहूबाजूंस गावातील चार माणसे जमली आहेत. बळीराजाच्या घरी दीपोत्सव साजरा होत आहे. वर्षानंतर आम्ही आलो आहो आणि आम्हाला इतरत्रही जायचे आहे. कृपा करून आम्हाला आनंदाची भेट द्या.

देवसीतले आशीर्वादाची गीत असे –

इस घर को लक्ष्मी ले, पानी छुंदा तेले हुने
इस घर को लक्ष्मी ले, ढुंगा छुंदा द्रव्य हुने
जसको बारीमा केरा, उसे को काख मा छोरा
जरनेली बंदूक पास गरो हामी जांछू राजगरो !

अर्थ – घरच्या लक्ष्मीने पाण्याला हात लावला, तर त्याचे तेल होवो, दगडाला हात लावला, तर त्याचे द्रव्य होवो. ज्याच्या बागेत केळी आहेत, त्याच्या घरधनिणीला पुत्र होवो. आम्ही जातो. तुम्ही सुखाने राहा.

या गीतानंतर देवसीचा कार्यक्रम पूर्ण होतो. [ ए. हो. रा. ]

**देवसूनू** पितरांचा एक वर्ग. भूत, भविष्य, ज्येष्ठ व यविष्ठ असे त्याचे चार विभाग वायू पुराणात (७१. १५-१६) सांगितले आहेत. [पु. इं.]

**देवसूरी** (१०८६-११६९ इ. स.) एक जैन आचार्य. हा श्वेतांबरपंथी असून, मुनिचंद्रसूरीचा शिष्य होता. याने न्यायशास्त्रावर 'प्रमाणनयतत्त्वालोकालंकार' नावाचा ग्रंथ रचला असून त्यावर स्वतःच 'स्याद्वादरत्नाकर' नावाची टीकाही लिहिली आहे. जैन न्यायात हे ग्रंथ प्रमाणभूत मानतात. गुजरातेत अनहिलपट्टण येथे जयसिंहदेवाच्या दरबारी याचा व दिगंबरपंथी कुमुदाचार्य याचा एकदा वाद झाला. विषय होता, स्त्रियांना निर्वाणपद मिळविता येते की नाही? या वादात देवसूरीने कुमुदाचार्यांचा पराभव करून स्त्रियांनाही निर्वाणपद मिळविता येते, असे सिद्ध केले. याने इ. स. ११४७ मध्ये फलवर्धिग्राम येथे एक चैत्य बांधला व अरसाणा येथे नेमिनाथाची मूर्ती स्थापन केली. [म. च. को.; पू. म. मा.]

**देवसेन** (इ. स. चे १० वे शतक) एक जैन आचार्य. हा दिगंबरपंथी होता. हा माळव्यातील धार येथे राहत असे. याचे संस्कृत आणि प्राकृत या दोन्ही भाषांवर प्रभुत्व होते. याने संस्कृतात आलापपद्धती व प्राकृतात दर्शनसार, आराधनासार, तत्त्वसार, भावसंग्रह, सावयधम्म (श्रावकधर्म), दोहा, इ. ग्रंथ रचले आहेत. [गो. च. प.; अ. सा.]

**देवस्थान** देव जिथे स्वयंभू अथवा बसवलेला असतो, ते स्थान. देवस्थान आणि देवमंदिर यांत फरक आहे. देवस्थान हे मंदिरापेक्षा प्राचीन आहे, असे सांगतात. प्राथमिक अवस्थेतल्या मानवाने ज्या ठिकाणी वसाहत केली, त्याच ठिकाणी आपल्या संरक्षक देवतेचीही कल्पना करून तिची आराधना व बलिदान यांच्यासाठी गावाबाहेर एक जागा ठरवून टाकली. प्राचीन मानवाचे हे देव गावाबाहेर एखाद्या मोकळ्या जागी किंवा वृक्षातळी असत. क्वचित त्या देवस्थानाभोवती एखादा गडगा किंवा छप्पर असे. अद्यापही बऱ्याच ठिकाणी तशीच परिस्थिती आहे.

रामायणाच्या अरण्यकांडात अगस्त्याश्रमाचे वर्णन करताना तिथे ब्रह्मा, विष्णू, रुद्र, इ. देवतांची 'स्थाने' होती, असे म्हटले आहे (१२. १७-२१). त्यावरून असे दिसते, की त्या काळी गावचे लोक गावाबाहेर देवाच्या नावाने काही जागा राखून ठेवीत असावे.

हर्षचरितात चंडिकाकुंज, चामुंडामंडप इ. नावे आढळतात, त्यांवरूनही याच गोष्टीचे अनुमान करता येते. खेडेगावाच्या परिसरात अजूनही एखाद्या झाडीत क्वचित झेंडे उभारलेले दिसतात. ते झेंडे देवस्थानाचेच सूचक असतात. पाहा– देवालय.

**देवस्वामी** (इ. स. चे ११ वे शतक) एक संस्कृत निबंधकार. याने ऋग्वेदावर भाष्य लिहिले होते, असे विमलबोधाच्या ग्रंथावरून समजते. आश्वलायन श्रौतसूत्रावरही याचे भाष्य आहे. भट्टोजीच्या चतुर्विंशतिमत या ग्रंथावरील टीकेत देवस्वामीच्या मताचा उल्लेख आलेला आहे. व्यवहार आणि आशौच या विषयींचे याचे उतारे स्मृतिचंद्रिकेमध्ये घेतलेले आहेत. याने शाबरभाष्यावर व्याख्या लिहिल्याचाही उल्लेख मिळतो. [वै. सा.; म. च. को.; हि. ध.; मी. द.]

**देवश्रवा–देववात** सूक्तद्रष्टे. हे दोघे भरत जनातले वीर व अग्नीचे परम उपासक होते. ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलातले २३ वे सूक्त यांच्या नावावर आहे. देवश्रवा व देववात यांनी मंथनाच्या क्रियेने अग्नी उत्पन्न केल्याचे त्या सूक्तात सांगितले आहे. या दोघांनी केलेल्या अग्निस्तुतीची एक ऋचा अशी–

इळामग्ने पुरुदंसं सनिं गोः शश्वत्तमं हवमानाय साध।
स्यान्नः सूनुस्तनयो विजावाऽग्ने सा ते सुमतिर्भूत्वस्मे॥
(ऋ. ३. २३. ५)

अर्थ– हे अग्निदेवा, तुझा धावा करणाऱ्या या भक्ताकरिता त्याने सतत चालविलेली ही स्तुती सफल कर आणि तिच्यामुळे त्याच्या हातून पराक्रमाची कृत्ये घडवून, त्याला (ज्ञान) गोधनादी संपत्तीचा लाभ होऊ दे. आमच्या पुत्रपौत्रांकडून वंशविस्तार होवो आणि हे अग्निदेवा, तुझी ती सर्वप्रसिद्ध कृपादृष्टी आमच्यावर वळो.

या सूक्तात देवश्रवा व देववात अशी दोघांचीही नावे असल्यामुळे हे सूक्त त्या दोघांचेही मानले गेले आहे.

**देवहूती विद्या** एक प्राचीन विद्या. देव + हूती = देवांना आवाहन. या विद्येच्या प्रयोगाने प्रत्यक्ष देवता समोर येऊन उभ्या राहतात, असे सांगितले आहे. पांडवांची माता कुंती हिला तिचा पिता कुंतिभोज याने एकदा दुर्वासाच्या सेवेसाठी नियुक्त केले होते. कुंतीच्या सेवेने दुर्वास प्रसन्न झाला व त्याने तिला ही विद्या दिली. याच विद्येच्या बळावर कुमारी अवस्थेत तिला सूर्यापासून कर्ण हा पुत्र झाला आणि धर्मराज, भीम व अर्जुन हे तिचे पुत्रही तिला अशाच प्रकारे भिन्न भिन्न देवतांपासून प्राप्त झाले, असे म्हणतात. [पु. वि.]

**देवळी** एक जात. यांची वस्ती कोकणात व कर्नाटकात आहे. यांची उत्पत्ती सावंतवाडी किंवा मालवण येथील राजांच्या दासींपासून झाल्याचे सांगतात. हे ग्रामदेवतेच्या देवळात सेवेकरी असतात. काही देवळी वाजंत्र्याचा व्यवसाय करतात, तर काही शेती व पशुपालन करतात. पाहा– भावीण. [मुं. इ. जा.; रत्ना. गॅझे.]

**देवांग** एक जात. हे लोक विणकर असून, यांची वस्ती तमिळनाड, महाराष्ट्र व कर्नाटक या प्रदेशांत आहे. हे तेलुगू किंवा कन्नड भाषा बोलतात. यांना जादरू किंवा जाद, दंद्र, देवर, देर, सेनियन, सेदन, हटगर, साळी, विणकर, नेकार, नेगार अशीही अन्य नावे आहेत.

देवांगांच्या उत्पत्तिसंबंधी पुढील कथा सांगतात –

ब्रह्मदेवाने मनूला निर्माण केले आणि त्याला देव व मानव यांच्यासाठी वस्त्रे विणण्याचे काम दिले. मनूने बराच काळ हे



देवांग पट्टगर

काम केले व नंतर तो स्वर्गात गेला. त्याच्या नंतर दुसरा कोणीही विणकर न राहिल्यामुळे देवांना व मानवांना झाडांची पाने नेसण्याची पाळी आली. देवा–मानवांनी ही आपली परिस्थिती ब्रह्मदेवाला निवेदिली. ब्रह्मदेवाने त्यांना शिवाकडे नेले. शिवाने एक तेजस्वी पुरुष निर्माण केला व त्याला देवलान असे नाव दिले. देवांचे व माणसांचे अंग झाकण्यासाठी वस्त्रे विणण्याचे काम त्याला सांगितले. पण वस्त्रे विणायची तर सूत कुठून आणायचे हा देवलानाला प्रश्न पडला. मग शिवाने त्याला विष्णूच्या नाभिकमलातून तंतू घेण्याची आज्ञा केली. त्यासाठी देवलानाने तपश्चर्या करून विष्णूकडून तंतू मिळविले. ते घेऊन येत असता वाटेत वज्रदंत नामक असुराने त्याच्यावर हल्ला केला. तेव्हा देवलानाने चौडेश्वरी किंवा चौडनायकी देवीच्या साहाय्याने त्या असुराचा नाश केला.

त्या दिवसापासून या जातीला देवांग असे नाव पडले. चौडेश्वरी ही देवांगांची कुलदेवता बनली. ते दरवर्षी तिचा मोठा उत्सव करतात. त्या वेळी काही लोक व्रतस्थ राहून देवीच्या मंदिरात जातात. तिथे मंदिरातील पुजारी एका भांड्याच्या कडेवर एक लांब तलवार उभी करून ठेवतो. व्रतस्थ देवांग त्या तलवारीचे टोक आपल्या छातीला टोचून घेतात. देवीला कोंबड्या-बकऱ्यांचा बळी देतात. खंडोबा, बहिरोबा, जोतिबा, नरसोबा, भवानी, जोगाई, केदारलिंग अशा आणखीही काही देवतांना हे लोक भजतात.

देवांगांचे कुलाचारदावारू, सुंतसाळी, इ. एकोणतीस पोटभेद असून, त्यांचा परस्परांशी विवाहसंबंध होत नाही. कुलाचारदावारूंमध्ये जानवे व लिंग ही दोन्ही गळ्यात घालण्याची चाल आहे. सुंतसाळी लोक मुसलमानातून आलेले असून, त्यांच्यामध्ये सुंता करण्याची चाल आहे. यांच्या उपनामांवरून यांची कुळे ठरली आहेत. नाशिक जिल्ह्यातील मराठेसाळी या पोटविभागातील लोकांत आडनावांखेरीज गोत्रेही आहेत. हिरे व चिक्कुरविन या पोटभेदातील लोकांची सव्वीस गोत्रे असून, त्यांतील काही शिववाचक व काही पार्वतीवाचक आहेत.

देवांगांत देवदासींची प्रथा एका काळी होती. त्यांना जाति–बिड्डलू असे म्हणत. त्यांचे मुलगे कापडावर छाप उठविण्याचे काम करीत व काही वेळा भिक्षाही मागत. या भिक्षेकऱ्यांना सिंगम्वाड असे नाव असून, त्यांच्याविषयी पुढील दंतकथा प्रचलित आहे –

चौडेश्वरी आणि देवलान हे असुरांशी लढण्यात गुंतले असता एक असुर देवीच्या सिंहाच्या कानामागे लपला. युद्ध संपल्यावर त्याने देवीकडे अभय मागितले. देवीने त्याच्यावर दया केली आणि देवलानाला सांगितले, की याचे वंशज तुझ्या वंशजांचे सेवक होतील व तुमच्याकडून मिळालेल्या भिक्षेवर जगतील.

सिंगम्वाडाच्या जवळ नेहमी एक शिंग असते. त्या शिंगाच्या द्वारे ते मृत्यूची बातमी लोकांना कळविण्याचे काम करतात.

देवांगांच्या प्रमुखाला पट्टगर म्हणतात व त्याचा अधिकार वंशपरंपरेने चालतो.

**विवाहप्रथा** – लग्न ठरविताना देवीचा कौल घेतात. लग्न-समारंभाच्या सुरुवातीला पानसुपारी वाटतात. वधूचा मामा तिच्या गळचात बोंधू (हळदीने रंगविलेला दोरा) बांधतो. विवाहविधीच्या पहिल्या दिवशी एक स्त्री उभी करतात व वराचे चौल, उपनयन, इ. संस्कार; तसेच धान्यपूजा, काशी-यात्रा, [illegible], मांगल्यधारण, अनेक विधी करतात. लग्नाचे पौरोहित्य त्यांच्याच जातीतले पुरोहित करतात. लग्नानंतर एका भांड्यात एक चमचा व अंगठी ठेवतात. मग वधू-वर त्या भांड्यात हात घालतात. हाताला प्रथम अंगठी लागली, तर त्यांना पहिले अपत्य मुलगा होईल व चमचा लागला, तर मुलगी होईल असे समजतात.

देवांग पुरुषाच्या अनैतिक संबंधाने झालेल्या संततीला कुरसाळी म्हणतात. अशा लोकांबरोबर हे लोक अन्नोदकादी व्यवहार करीत नाहीत.

यांच्यांत जातपंचायत असते. पंचायतीच्या खर्चासाठी लग्नासारख्या समारंभातून वर्गणी वसूल करतात.

**मृतकप्रथा** – मृतांना बहुधा पुरतात. थडग्यात लिंग ठेवतात आणि और्ध्वदेहिक संस्कार पुरे होईपर्यंत रोज त्याची पूजा करतात. दर बारा वर्षांनी एकदा देवांग हे पद्मसाळी लोकांकडे जाऊन भिक्षा मागतात. पद्मसाळींनी त्यांना भिक्षा न वाढल्यास हे लोक त्यांच्या घरात शिरतात व मिळेल ती वस्तू घेऊन निघून जातात. [ कां. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. को.; मुं. इ. जा. ]

## देवातिथी

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील चौथे सूक्त याच्या नावावर आहे. या सूक्तात इंद्र-सूर्यस्तुती आहे. तुर्वश राजाच्या यज्ञात आपल्याला शंभर घोडे दान मिळाले, असे तो सांगतो.

सूर्यस्तुतीत त्याने सूर्याला एक वेगळ्याच प्रकारची प्रार्थना केली आहे, ती अशी–

सं नः शिशीहि भुरिजोरिव क्षुरं रास्व रायो विमोचन ।
त्वे तन्नः सुवेदमुस्रियं वसु यं त्वं हिनोषि मर्त्यम् ॥
(ऋ. ८.४.१६)

अर्थ – दोन्ही हातांत सुरी धरून तिला घासावे, त्याप्रमाणे आम्हांला (संकटाच्या दगडावर घासून) तीक्ष्ण कर. हे दुःख-विमोचना, आम्हांला अक्षय संपत्ती अर्पण कर. जे उषःकालाच्या कांतीप्रमाणे तेजस्वी आहे आणि जे मर्त्य मानवांकडे तू सहज विखरून देतोस, ते तुझ्याजवळचे गायींचे कळप वगैरे अक्षय धन आम्हांला लाभो.

## देवानंदस्वामी

(इ. स. चे १९वे शतक) एक गुजराती संतकवी. हा स्वामीनारायण संप्रदायाचा अनुयायी असला, तरी सांप्रदायिक बंधनातून मुक्त होता. पदकार म्हणून त्याची विशेष ख्याती आहे. गीते गात भिक्षा मागणाऱ्या भिक्षेकऱ्यांनी त्याची गीते सर्वतोमुखी केली आहेत. त्याने अनेक गरबीगीतेही रचली आहेत. सुरत-बडोदा भागातील स्त्रिया आश्विनाच्या शुक्ल पक्षातील चांदण्या रात्री ही गीते गातात. त्याच्या एका प्रसिद्ध गीतातील काही पंक्ती अशा–

कर प्रभु संगाथे दृढ प्रीतडी रे,
मरी जावुं मेली धनमाल;
अन्तकाळे सगु नहिं कोईनु रे.

अर्थ – प्रभूवर दृढ प्रीती कर. सर्व धनसंपदा सोडून मरायचे आहे. अंतकाळी कोणी कोणाचा संबंधी नाही.

देवानंद हा सुप्रसिद्ध गुजराती साहित्यिक दलपतराम त्रिवेदी यांचा काव्यगुरू होता. [ भा. गु. लि.; वि. मुं. रा. प. ]

## देवापी

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील ९८ वे सूक्त याच्या नावावर आहे. देवापी हा कुरुकुलोत्पन्न राजपुत्र असून, शंतनूचा वडील भाऊ होता. तो कुष्ठरोगाने पछाडल्यामुळे राज्यावर न बसता तपश्चर्येसाठी वनात निघून गेला आणि त्याच्यामागून शंतनू राजा झाला. मोठा भाऊ हयात असता धाकटा भाऊ राज्यावर बसला, म्हणून देव पाऊस पाडीना. तेव्हा शंतनूने देवापीला राज्य स्वीकारण्यासाठी विनंतीपूर्वक बोलाविले. पण देवापीने त्याला सांगितले, की 'मी तुझा पुरोहित होतो व तू यज्ञ कर; म्हणजे पाऊस पडेल.' त्याप्रमाणे शंतनूने वृष्टिकामेष्टी यज्ञ केला व त्यामुळे सर्वत्र पाऊस पडला. या यज्ञाच्या वेळी देवापीने जे सूक्त रचले तेच वरील सूक्त होय. त्यातील काही ऋचा अशा–

अस्मे धेहि द्युमतीं वाचमासन् बृहस्पते अनमीवामिषिराम् ।
यया वृष्टिं शन्तनवे वनाव दिवो द्रप्सो मधुमाँ आ विवेश ॥
आ नो द्रप्सा मधुमन्तो विशन्त्विन्द्र देह्यधिरथं सहस्रम् ।
(ऋ. १०.९८.३,४)

अर्थ – तुझी उज्ज्वल पवित्रवाणी (पवित्र नाद) आमच्या मुखामध्ये निरंतर असू दे. हे बृहस्पते, ती वाणी (भव) रोगनाशकच नव्हे; तर अतिशय उत्साहवर्धक आहे. तिच्या प्रभावाने शंतनू राजासाठी आम्ही उभयतांनी पर्जन्यवृष्टी घडवून आणण्याची आकांक्षा धरली आहे. (त्या इच्छेला अनुसरून) पावसाचे माधुर्ययुक्त टपोरे थेंब आकाशातून सुटून भूमीमध्ये घुसले देखील. तेच माधुर्ययुक्त बिंदू आमच्या अंतःकरणातही शिरोत (आमचे अंतकरण भक्तिरसाने भरून जावो).

त्यासाठी इंद्रा, आम्हाला सहस्रावधी महारथ्यांइतके सामर्थ्य दे. देवापीच्या चरित्रावरून तो क्षत्रिय होता असे दिसते आणि तरीही त्याने पौरोहित्य केल्याची ही कथा आहे. देवापीने आपणांस औलान असे म्हणवून घेतले आहे (ऋ. १०.९८.११). पुराणवाङ्मयात थोडयाफार फरकाने हीच माहिती मिळते. [प्रा. च. को.; ऋ. द.; म. ज्ञा. को.]

**देवार** एक द्राविड जात. या लोकांची वस्ती विदर्भात व मध्य प्रदेशात आहे. हे गाऊन भिक्षा मागतात. भिक्षेशिवाय डुकरे पाळणे, सूत काढणे, माकडांना खेळ शिकवणे, अस्वले व वाघ फिरवून पैसा मिळविणे आणि शिसे व कथील यांचे दागिने विकणे हेही यांचे व्यवसाय आहेत. यांच्या बायका गोंदण्याचे काम करतात. यांच्यांत कुळे असून, त्यांची नावे गावांवरून पडलेली आहेत. उदा० रायपुरिया, रतनपुरिया, इत्यादी. रायपुरिया लोक नारळाचा तुंबा लावलेली सारंगी वाजवितात आणि रतनपुरिया लोक वेळूला भोपळयाचा तुंबा लावून तो तांतीच्या दोरीने वाजवितात. देवाराचे अनेक वर्ग आहेत व त्या वर्गांची नावे द्राविड आहेत.

विवाहप्रथा—यांचे विवाह प्रौढ वयात होतात. वाङ्निश्चय झाल्यावर तीन चार महिन्यांनी लग्नसमारंभ करतात. उपवर मुलीला योग्य वर मिळाला नाही, तर तिचे मेहुण्याशीच (बहिणीचा नवरा) लग्न लावतात. लग्नापूर्वी मुलीच्या हातून अनैतिक संबंध घडला असला, तर विवाहसंस्कारातील बरेच विधी गाळतात. वधूचे केस धरून वराने तिला एक गुद्दा मारला व लग्नस्तंभाभोवती सात प्रदक्षिणा घातल्या, की देवाराचे लग्न पुरे होते. घटस्फोटाची पद्धत रूढ आहे; पण घटस्फोट घेणाऱ्या पुरुषाला दुसरे लग्न करता येत नाही. स्त्रीला मात्र तशी मोकळीक असते. लग्नानंतर मुलगी माहेरी आली, तर ती तिथे तिऱ्हाइतासारखी वागते. कारण ती व तिचे आईबाप यांना परस्परांचा स्वयंपाक चालत नाही. तिचे सासू-सासरे सुद्धा तिच्या हातचे जेवीत नाहीत. विभक्त कुटुंबपद्धती हे या प्रथेमागचे कारण असावे.

महामाई देवी व दूल्हादेव यांना हे लोक भजतात. यांच्यांत कृष्णभक्तीही रूढ आहे.

हे ब्राह्मणांच्या हातचे जेवीत नाहीत आणि आपल्या जातभाईंच्या हातचेही खात नाहीत. पण गोंडांच्या हातचे मात्र खातात.

मर्तिकप्रथा—हे लोक प्रेते पुरतात. यांच्यांतील श्रीमंत लोक दोन वर्षांनी पुरलेली प्रेते उकरून जाळतात आणि रक्षा नदीत टाकतात. [म. ज्ञा. को.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं.]

**देवाराम** (जन्म सुमारे १७१० इ. स.) एक हिंदी संत कवी. याचा जन्म विहार प्रदेशातील शाहाबाद जिल्ह्याच्या कर्जा नामक गावी झाला. तारा पांडेय हा याचा बाप होय. तो ज्योतिषशास्त्रात पारंगत होता. दारिद्र्याने गांजल्यामुळे त्याने सारण जिल्ह्यातील हसुआ–नगराजपूर हे आपले गाव सोडले व तो कर्जा येथे राहायला गेला.

देवाराम हा बालवयापासूनच उदास वृत्तीने वागे. लग्न झाले तर त्याची उदासीनता जाईल, अशा कल्पनेने आईवडिलांनी त्याचे लग्न केले. पुढे तो काही काळ संसारात रमलाही. पण नंतर त्याचा रतन नामक मुलगा सर्पदंशाने मरण पावला आणि त्याची मूळ प्रवृत्ती पुनश्च उफाळून आली. लगेच गृहत्याग करून तो तीर्थयात्रेला निघाला. या यात्रेतच त्याला संत नृपतिदास नावाचा गुरू भेटला. त्याच्या मार्गदर्शनाखाली देवाराम परमार्थाचा मार्ग क्रमू लागला.

देवाराम हा देवभक्त खरा; पण त्याचे विचार प्रगमनशील होते. याने अनेकांचा विरोध पत्करूनही आपल्या गावातील कालीदेवीच्या पूजेतली पशुहत्या बंद करायला लावली. आपली माता व पत्नी यांच्या आग्रहास्तव हा एकदा जगदीशपूरचा महाराजा भूपनारायणसिंह याच्या भेटीला जायला निघाला. पण वाटेतच त्याचे देहावसान झाले. भूपनारायणसिंहाला ही गोष्ट कळताच त्याने देवारामाच्या कुटुंबाला काही जमीन दान म्हणून दिली.

देवारामाने अकराशे स्फुट भजने रचली, असे सांगतात; परंतु आजतागायत त्याची फक्त एकशे पासष्ट भजनेच उपलब्ध झाली आहेत. याशिवाय त्याने आठ अष्टके, चौंतीसा, चालीसा, इ. ग्रंथांचीही रचना केली आहे. बारहमास, होळी, झूमर, सोहर, जेवनार, इ. विषयांवरील याची बरीच पदे आज तिकडील लोकांच्या नित्य पठणात आहेत. याच्या काव्यापैकी बरेच काव्य योगपर आहे, त्यावरून तो योगशास्त्रातला अनुभवी जाणकार असावा असे दिसते. [हिं. सा. वि.]

**देवालये** जिथे एखाद्या देवतेची मूर्ती किंवा प्रतीक बसवलेले असते, असे स्थान. देवालय शब्दाची व्युत्पत्ती अशी–'देवस्य देवानां वा आलय:' = देवाचे किंवा देवांचे निवासस्थान. देवालय हे केवळ भगवंताचे निवासस्थान नव्हे; तर ते भगवंताचे शरीरच आहे, असे अग्नी पुराणात म्हटले आहे—

एवमेव हरि: साक्षात् प्रासादत्वेन संस्थित:

अर्थ–अशा प्रकारे हा साक्षात श्रीहरीच प्रासाद (मंदिर)-रूपाने अवस्थित आहे, (असे समजावे).

हीच कल्पना पुढे वाढवून देवायलरूपी शरीराचे अवयव-

विभाग अग्नी पुराणात पुढीलप्रमाणे सांगितले आहेत –

शिखरं शिर इत्याहुर्गर्भगेहं गलस्तथा ।
मण्डपं कुक्षिरित्याहुः प्राकारं जानुजङ्घकम् ।
गोपुरं पाद इत्याहुर्ध्वजो जीवनमुच्यते ।

अर्थ – देवालयाचे शिखर हे शिर, गर्भगृह हा गळा, मंडप ही कूस, प्राकार हा मांड्या व पिढऱ्या, गोपुर हा पाय आणि ध्वज हे त्या शरीरातले जीवन, असे म्हटले आहे.

शिल्पशास्त्रात देवालयाच्या सामान्यतः तीन पद्धती किंवा शैली मानलेल्या आहेत. नागर, द्राविड व वेसर अशी त्यांची नावे आहेत. स्थूलमानाने या तीन पद्धतींची देवालये कशी असतात ते सुप्रभेदागमातील पुढील श्लोकात सांगितले आहे–

नागरं चतुरस्रं च अष्टास्रं द्राविडं तथा ।
वृत्तं च वेसरम् ... ।

अर्थ – नागर देवालय हे चौकोनी, द्राविड हे अष्टकोनी व वेसर हे वर्तुळाकृती दिसते.

वरील तीन्ही पद्धतींचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे करता येते–

नागर शैली –– नगर या शब्दावरून नागर शब्द बनला आहे. त्याचा संबंध पुर किंवा नगर याच्याशी आहे. कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात नगरनिर्मितीकरता देवालयांचा विचार सांगितला असून, कोणत्या देवाचे मंदिर नगराच्या कोणत्या दिशेला असावे, तेही सांगितले आहे. देवालयाची रचना पहिल्या प्रथम नगरनिर्मितीच्या अनुषंगानेच झालेली असल्याने या, पद्धतीला नागर म्हटले असण्याची शक्यता आहे.

कालिकागमात नागर मंदिराचे आठ वर्ग (विभाग) सांगितले आहेत, ते असे––(१) मूल (पाया), (२) मसूरक (चौथरा), (३) जंघा (भिंत), (४) कपोत (हे चार भाग सरळ असतात), (५) गल (छप्पर आणि भिंत यांच्या मधला भाग), (६) शिखर, (७) आमलक (रायआवळयाच्या आकाराचा भाग), (८) कुंभ (कळस) किंवा शूल (शूलसहित कलश).

भारतात बृहत्संहितेच्या काळापासून (इ. स. चे ५–६ वे शतक) किंवा त्याच्याही पूर्वीपासून नागर मंदिरांची निर्मिती बऱ्याच प्रमाणात झालेली आहे. या शैलीचे भौगोलिक क्षेत्रही बरेच विस्तृत आहे. हिमालयापासून विंध्यपर्वतापर्यंत नागर शैलीचे क्षेत्र सांगितले आहे. मध्य प्रदेश हे या शैलीचे केंद्र म्हणता येईल. पूर्वेस बंगाल व ओडिसा, आणि दक्षिणेस महाराष्ट्र इथवरही या शैलीचा प्रसार झाला होता. नागर शैली अशा प्रकारे विस्तार पावल्यानंतर केंद्रापासून दूरदूरच्या प्रदेशांत तिचे काही प्रांतीय भेद निर्माण झाले व त्यांना नावेही वेगवेगळी पडली. हिमालयात या शैलीला पर्वतीय, गुजरातमध्ये लाट व ओडिसात कलिंग म्हणतात. वराटी, पांचाली, नागर, पुष्पक, सार्वदेशिक, अशीही प्रदेशपरत्वे या शैलीची अन्य नावे आढळतात. या पद्धतीची मंदिरे सामान्यपणे पुढील प्रकारची दिसतात ––

मंदिराचा मुख्य भाग म्हणजे गर्भगृह. यात मुख्य देवता असते. त्यापुढे लंबचौकोन असा मंडप असतो. गर्भगृह व मंडप ज्या एका लहानशा भागाने जोडलेले असतात, त्याला अंतराळ असे म्हणतात. मंडपाच्या पुढल्या भागाला अर्धमंडप म्हणतात. यातूनच मुख्य मंडपात प्रवेश करायचा असतो. गर्भगृहावर निमुळते होत गेलेले उंच शिखर असते. सभोवती प्रांगण असते. त्यात मुख्य मंदिराशिवाय इतरही काही छोटी छोटी मंदिरे चौथऱ्यावर उभारलेली असतात. मंदिराच्या इतर भागावरही शिखरे असतात; पण ती मुख्य शिखराहून कमी उंचीची असतात.

मंदिरावर शिखर निर्माण करण्याच्या कल्पनेचे मूळ कशात आहे, याविषयी विद्वानांत मतभेद आहेत. काहींच्या मते सुरवातीची गुहामंदिरे पर्वताच्या कटिभागात खोदलेली असत व त्यांवर उंच पर्वतशिखर दिसत असे. या पर्वतशिखरावरून मंदिरशिखराची कल्पना निघाली असावी. अन्य काहींच्या मते रथाच्या वरच्या भागावरून, तर दुसऱ्या काहींच्या मते विष्णूच्या किरीटमुकुटावरून शिखरकल्पना सुचली असावी. देवालय या नावाने ओळखता येईल, अशी स्वतंत्र बांधणीची इमारत सनपूर्व तिसऱ्या शतकात बांधली गेली असावी, असे म्हणतात. जयपूरजवळच्या बैराट येथे या इमारतीचे अवशेष आढळतात. या बांधकामात लाकूड व विटा वापरलेल्या आहेत. त्याच्या गोलाकार मंडपाचेही अवशेष दिसतात. मात्र या प्रकारची बांधणी पुढच्या काळात पुरस्कारिली गेली नाही.

या पुढचा टप्पा म्हणजे जनदियाल या ठिकाणचे मंदिर होय. पंजावात तक्षशिला शहराच्या परिसरात हे मंदिर होते. सांप्रत त्याचे अवशेषच दिसतात. प्रांगण, सभामंडप व चौकोनी गाभारा असे याचे तीन विभाग होते. प्रवेशद्वाराच्या प्रत्येक बाजूला ग्रीक शैलीचा एकेक खांब उभा केलेला होता. हे मंदिर झरथुष्ट्री संप्रदायाचे असावे, असे म्हणतात. काश्मीरमधल्या पुढील बांधकामावर या मंदिराच्या बांधणीची छाप स्पष्टपणे दिसून येते.

काश्मीरमधल्या मंदिरांची शैली ही दिसण्यात गोथिक शैलीसारखी आहे. गोथिक शैली म्हणजे उत्तर युरोपातील ख्रिश्चनांची स्थापत्यशैली होय. दगडी भिंती, दगडी खांब, दगडी अर्धवर्तुळाकृती किंवा त्रिकोणी कमानी, दगडीच छप्पर व दगडांचाच घुमट हे गोथिक शैलीचे वैशिष्टय होय. मध्ययुगात काश्मीरमध्ये जी मंदिरे निर्माण झाली, त्यांतले स्तंभ हेलेनिक पद्धतीचे व छपरे पिरॅमिड पद्धतीची दिसतात. काश्मीरमधील

मार्तंडमंदिर हे या शैलीचे उदाहरण होय. हे मंदिर इ. स. च्या आठव्या शतकात बांधले गेले. गुप्तकालापर्यंत या भागातील मंदिरांच्या बांधकामात लाकूड, माती व विटा यांचा उपयोग केला जात असावा.


मार्तंडमंदिर – काश्मीर

गुप्तकालापासून पुढे नागर शैलीची जी मंदिरे निर्माण झाली त्यांचे बरेच नमुने पश्चिम भारतात दिसून येतात. या मंदिरांची बांधणी सामान्यपणे ठरीव ठशाची आहे. त्यांच्या खांबांवर नक्षीकाम असते व स्तंभशीर्षावर प्राण्यांचे मुखवटे कोरलेले असतात. त्यांच्या प्रवेशद्वारांवर पुराणांतील प्रसंग व काही व्यक्ती कोरलेल्या असतात. गुप्तकालातली सर्व मंदिरे आकाराने लहान असून, बहुतेकांची छपरे सपाट असतात. मंदिरांच्या आकारमानाने त्याचे वीटकाम जाडजूड वाटते. या बांधकामात चुना वापरलेला नाही. ही मंदिरे निर्माण करणाऱ्या शिल्पकारांच्या मनावर प्राचीन गुहामंदिरांच्या कारागिरीची छाप दिसून येते. गुहामंदिरांच्या बहुतेक सर्व कल्पना स्वीकारूनच त्या शिल्पकारांनी आपल्या कलेचे चातुर्य प्रकट केले आहे.

झाशीजवळ देवगढ नावाचे एक गाव आहे. तिथे इ. स. च्या ६ व्या शतकात बांधलेले एक देवालय आहे. हे देवालय अतिशय कलापूर्ण असून, ते मंदिरशिल्पातील प्रगती दर्शविणारे आहे. यात वीटकाम भक्कम राहण्यासाठी लोखंडी शिगा वापरलेल्या आहेत. गाभाऱ्यावर छोटासा कळस आहे आणि मंदिराभोवती आच्छादित असा प्रदक्षिणामार्गही बनविलेला आहे.

सहाव्या शतकापासून पुढच्या कालात जी मंदिरबांधणी झाली, तिच्यात गाभारा, सभामंडप व त्या दोहोंना जोडणारे अंतराळ असे तीन भाग सलग दिसू लागले. मंडपाच्या पुढच्या भागाला जोडून अर्धमंडप निर्माण होऊ लागला. मंदिराच्या गाभाऱ्यावर उंच असे शिखर बनू लागले. इतर भागांवरही कमीअधिक उंचीची शिखरे बनू लागली. प्रांगण चौकोनी ठेवून त्यात निरनिराळ्या चौथऱ्यावर छोटी मंदिरे बांधली जाऊ लागली.

उत्तर भारतातील प्रमुख प्रमुख शहरांत बांधलेल्या प्राचीन व मध्ययुगीन देवालयांचा बहुतांशी विध्वंस झालेला आहे. काशीतील विश्वेश्वराचे मंदिर आणि तिथली इतरही अनेक भव्य आणि सुप्रसिद्ध मंदिरे या विध्वंसापासून वाचली नाहीत. तिथली सांप्रतची मंदिरे अलिकडच्या काळात बांधलेली आहेत. त्या विस्तीर्ण प्रदेशात विधर्मी आक्रमणातून शाबूत राहिलेले एकमेव अपवादात्मक मंदिर म्हणजे गयेतील बुद्धमंदिर हे होय. याचे मुख्य शिखर इ. स. च्या ६ व्या शतकातले असावे. याच प्रकारची शिखरे इतर बौद्ध बांधणीतही असावी; पण ती सर्व विधर्मी आक्रमणाला बळी पडली आहेत. गयेतील बुद्धमंदिराचे हे शिखर दाक्षिणात्य शैलीचे आहे. या काळातील बौद्धेतर मंदिरांना उंच शिखरे मुळीच नसत. एखादे घुमटवजा बांधकाम तेवढे असे.

मध्ययुगीन नागर पद्धतीचे ओडिसा, बुंदेलखंड व गुजरातसह दक्षिण राजस्थान असे तीन उपसंप्रदाय आढळतात. याशिवाय स्थानिक स्वरूपाच्या काही बांधकामाच्या पद्धतीही दिसून येतात. कुठे कुठे काश्मीरी धाटणीही दिसते. वरील तीन्ही संप्रदायांतली देवालये अद्याप बऱ्याच प्रमाणात शाबूत आहेत.


बुद्धमंदिर – गया

**ओडिसा संप्रदाय**– या कलिंग नामक संप्रदायाची भरभराट इ. स. ची १० ते १३ शतके या कालखंडांत झाली. या संप्रदायाची महत्त्वाची मंदिरे भुवनेश्वर शहराच्या परिसरात आहेत. भुवनेश्वर येथील लिंगराजमंदिर हे या सर्वांतले सुंदर व

कलापूर्ण मंदिर होय. या मंदिराच्या भोवती जाड व उंच भिंतीचा तट असून, तो दीर्घवर्तुळाकृती आहे. याच्या प्राकारात



लिंगराजमंदिर – भुवनेश्वर

सुमारे ७० लहान लहान मंदिरे दाटीवाटीने बांधलेली आहेत. नागर शैलीच्या शिखराच्या बांधकामातला अखेरचा नमुना म्हणून या मंदिराच्या शिखराकडे बोट दाखविता येईल. या संप्रदायातील मंदिरांना एकापुढे एक अशी चार दालने असतात. पहिले अर्पणगृह, दुसरे नृत्यशाळा, तिसरे प्रार्थनागृह व चौथे गाभारा होय. यांना अनुक्रमे भोगमंदिर, नटमंदिर, जगमोहन व देऊळ असेही म्हणतात. देऊळ किंवा गाभारा यावर उंच शिखर असते. उरलेल्या तीन दालनांवर त्या मानाने लहान शिखरे असतात. त्यांची बांधणी व उंची अशी ठेवलेली असते, की पाहणाऱ्याची दृष्टी आपोआप पुढे जाऊन मुख्य शिखरावर स्थिर व्हावी. या मंदिराच्या प्राकारातही त्याच घाटणीची लहान लहान मंदिरे बांधलेली असतात.

ओडिसा संप्रदायात मंदिराच्या बाह्यांगावर कोरीव नक्षीची विपुलता दिसते. पण आंतरभागात मात्र नक्षीकाम केलेले असत नाही. मोठमोठ्या मंदिरातही बहुधा खांब नसतात. सभामंडपाचे छत खांबोळ्यावर आधारलेले असते. छताला आधार देण्यासाठी लोखंडी तुळयांचा उपयोग केलेला असतो.

पुरी येथील जगन्नाथमंदिर हे ओडिसातील श्रेष्ठ दर्जाचे मंदिर होय. अखिल भारतातही ते महत्त्वाचे समजले जाते. इ. स. च्या १३ व्या शतकाअखेर बांधलेले कोणार्क येथील सूर्य-मंदिर तर जगन्नाथमंदिरापेक्षाही भव्य होते. याचा जगमोहन (सभामंडप) तेवढा सांप्रत अवशिष्ट आहे. याचे शिखर २२७ फूट उंच होते, असे सांगतात; पण ते आता कोसळले आहे. त्याची रचना नागर शैलीच्या इतर शिखरांसारखी नसून, ते एकावर एक पायऱ्या रचल्यागत उभारलेले होते. जगमोहन व गाभारा ही एका भव्य आणि प्रशस्त चौथऱ्यावर होती. याची रचना रथाच्या आकाराची होती. याच्या चौथऱ्यावर दक्षिण-उत्तर दोन्ही बाजूंनी १० फूट व्यासाची बारा बारा रथचक्रे दगडात कोरलेली असून, ती वर्षाच्या बारा महिन्यांची प्रतीके आहेत. प्रवेशपायऱ्यांच्या दोन्ही बाजूंस गतिमान अश्व घोड्यांच्या दगडी प्रतिमा बसविलेल्या आहेत. सूर्य रथातून आकाशमार्ग आक्रमतो, ही कल्पना शिल्पकारांनी इथे साकार



मंदिरावरील नक्षीकाम– खजुराहो

केली आहे. कोणार्क येथील हे सूर्यमंदिर त्यावर खोदलेल्या स्त्री-पुरुषसंभोगाच्या मूर्तींसाठीही प्रसिद्ध आहे. खजुराहो वगैरे

ठिकाणी कोरलेल्या अशा प्रकारच्या मूर्तींपेक्षा या मूर्ती अधिक स्पष्ट व ठसठशीत आहेत.

बुंदेलखंडी संप्रदाय– इ. स. च्या १० व्या व ११ व्या शतकांत चंदेल राजांच्या कारकीर्दीत बुंदेलखंडामध्ये मंदिरशिल्पाचा एक वेगळा संप्रदाय भरभराटीस आला. खजुराहो येथे निर्माण झालेली मंदिरे याची साक्ष देतात. हा एक मंदिरसमूह आहे. ओडिसातील शैलीपेक्षा इथली रचनाशैली निराळी आहे. या मंदिरसमूहातील कंदरिया महादेवाचे मंदिर अत्युत्कृष्ट आहे. त्याला अर्धमंडप, मंडप व महामंडप अशी तीन दालने आहेत आणि ती ओडिसा शैलीप्रमाणे अलग नसून सलग आहेत. इथल्या छतावर चारी बाजूंच्या भिंतींवर, खांबांवर व गाभाऱ्याच्या दरवाज्यांवर सुंदर मूर्ती कोरलेल्या आहेत. प्रवेशद्वारावर अलंकृत तोरण आहे. शिखराची बांधणी उत्तर भारतीय पद्धतीची आहे. मंदिरांच्या मंडपांना व सभोवतीच्या ओवऱ्यांनाही शिखरे आहेत आणि ती एकाहून एक उंच अशी चढत्या श्रेणीची आहेत. या शिखररचनेवरून इथल्या कलाकारांना हिमालयाच्या चढत्या शिखरांची कल्पना अभिप्रेत असावी, असे वाटते. इथल्या मूर्तिकारीत सामान्य मनुष्याचे जीवन व त्याला पूज्य अशा देवदेवता यांचे दर्शन घडते. शिकार, नृत्ये, उत्सव, पूजा, रतिक्रीडा, युद्धे, इ. अनेकविध दृश्ये इथे साकार केलेली आहेत. ओडिसाच्या शिल्पाचा भरीवपणा इथे नाही, पण तरीही इथल्या मूर्ती नाजूकपणात व सजीवपणात ओडिसा पद्धतीपेक्षाही सरस ठरतात. इथली बरीच मंदिरे मुळात पंचायतन शैलीची होती. मुख्य मंदिराभोवती चार कोपऱ्यांत चार उपमंदिरे बांधणे, या शैलीला पंचायतन शैली म्हणतात. पण सांप्रत ही बहुतेक उपमंदिरे नष्ट झालेली आहेत.



अलंकृत स्तंभ – खजुराहो

गुजरात–राजस्थान संप्रदाय – गुजरात व राजस्थान या प्रदेशांत चालुक्य व सोळंकी या राजघराण्यांच्या अमदानीत शेकडो मंदिरे बांधली गेली. या मंदिरांवर राजे व त्या प्रदेशांतील व्यापारी यांनी अफाट द्रव्य खर्च केले आहे, असे दिसून येते. मुख्य गाभारा व त्यापुढे सभामंडप अशी त्यांना दोनच दालने असतात. त्यांची शिखररचना खजुराहो पद्धतीची असते.



सूर्यमंदिर – मोढेरा

दालनावरील छतांना घुमटाचा आकार दिलेला असतो. कदाचित मुस्लीम वर्चस्वाचाही तो प्रभाव असू शकेल. या मंदिरांचा पाया सरळ नसून तो कोनाकृती असतो व तो थोडा खांबांच्या बाहेर आलेला असतो. सभामंडपाचे खांब ठेंगणे असतात. त्यांवर छप्पर असते. मुख्य मंदिर व खांब यांवर सुंदर चित्रकारी असते. ती चित्रे जीवनाच्या सर्व क्षेत्रांतली व नवरसपूर्ण असतात. अलंकृत व विविध प्रकारची तोरणे, हे या शैलीचे वैशिष्ट्यच म्हणावे लागेल. ही तोरणे सभामंडपाच्या पुढे असतात. या बाबतीत पुढील दोन मंदिरे विशेष उल्लेखनीय ठरतात.

पहिले मोढेरा येथील सूर्यमंदिर. सांप्रत त्याची पडझड झालेली आहे; पण सभामंडप तेवढा अद्याप टिकून आहे. हा सभामंडप प्राचीन नागर शैलीचा उत्कृष्ट नमुना समजला जातो. याचे सर्व खांब नक्षीदार आहेत. मधला घुमट बाजूच्या दोन्ही दालनांवरील घुमटापेक्षा उंच आहे. हे मंदिर दिशासाधन करून बांधलेले आहे.

दुसरे देवालय सिद्धपूर येथील रुद्रमहालय हे होय. इथे एका देवालयाच्या जागी अकरा रुद्रांची मंदिरे ओळीने बांधलेली आहेत. हे मंदिर पूर्वी तिमजली होते आणि त्याच्यापुढे भव्य सभामंडप होता, असे म्हणतात. पण मुसलमानी आक्रमणात त्याची एकदा नव्हे, तर तीनदा नासधूस झाली. सांप्रत जेवढा त्याचा भाग उभा आहे, तेवढ्यावरूनच त्याच्या भव्यतेची कल्पना करावी लागते. या मंदिराच्या शिखराला सभोवती उरुशृंगे अथवा उपशिखरे होती.

अबू पर्वतावरील जैन मंदिरेही याच संप्रदायाची आहेत. त्यांचे बांधकाम पांढऱ्या संगमरवरी दगडांचे आहे. विमल-

वसही व लूणवसही ही त्यांतली दोन मंदिरे कारागिरीच्या दृष्टीने अप्रतिम आहेत. या मंदिरांतले नाजूक व कलापूर्ण मूर्तीकरण आणि नक्षीकाम पाहून मन थक्क होते. ऋषभदेवादी तीर्थंकरांच्या जीवनातील घटना इथे संगमरवरात कोरलेल्या आहेत. या मंदिरांतली तोरणे सूक्ष्म नक्षीची असून, इथल्या खांबांवरही मूर्तिचित्रणाची परमावधी झालेली आहे. इथली मूर्तिकला इतकी नाजूक आहे, की प्रत्येक मूर्तीवर प्रेक्षकाची दृष्टी खिळून राहावी. मात्र खजुराहो येथील मूर्तींचा सजीवपणा इथल्या मूर्तिकलेत प्रत्ययाला येत नाही. खजुराहो व कोणार्क येथील मंदिरांवर अंतर्बाह्य कोरीव काम आहे, तर इथल्या मंदिरांचा बाह्य भाग साधा व अनलंकृत आहे.



नक्षीदार स्तंभ – दिलवाडा (अबू)

नागर शैली व तिचे वरील संप्रदाय सांप्रत इंडो-आर्यन मंदिरशैली या नावाने ओळखले जातात.

**द्राविड शैली** – द्रविड देशात विकसित झालेल्या मंदिरशैलीला द्राविड शैली म्हणतात. या देवालयांच्या खालचा भाग चौकोनीच असतो; पण शिखराजवळ ते अष्टकोनी किंवा बहुकोनी बनते. द्राविड पद्धतीच्या देवालयाचे मुख्य चार भाग असतात, ते असे –

(१) गोपुर – प्रवेशद्वारावर उभारलेले अनेकमजली उत्तुंग शिल्प. गोपुरांचे शिखर हे कळसासारखे नसते, तर बैलाच्या डोक्यासारखे रुंद आणि दोन्ही टोकांना शृंगयुक्त असते. काही गोपुरे शिखराकारही असतात.

(२) मंडप – प्रवेशद्वारातून आत गेल्यावर देवाकडे जाण्याच्या मार्गात उभारलेले स्तंभयुक्त शिल्प. यात पुष्कळ स्तंभ असतात व ते कोरीव कामाने अलंकृत असतात.

(३) विमान – ज्यात देवमूर्ती बसवलेली असते, तो गाभारा व शिखर मिळून मुख्य देवालय होते, त्याला विमान म्हणतात.

(४) छत्र्या किंवा घुमटाचा असलेल्या स्तंभयुक्त वेदिका. गाभाऱ्यावर लांबी, रुंदी व उंची कमी कमी होत गेलेल्या मजल्यांचे निमुळते शिखर असते. गाभारा व शिखराचे मजले यांच्यामधील चारही बाजूंचा भाग थोडा थोडा बाहेर आणून त्याला गोल आकार दिलेला असतो. त्यावर चैत्य-गवाक्षांच्या धर्तीचे खोदकाम असते. प्राकाराला विशिष्ट अंतराने घातलेले व भिंतीच्या थोडेसे बाहेर आलेले असे खांब असतात. वरील सर्व गोष्टी द्राविड शैलीत ठळकपणे नजरेस भरतात. याशिवाय अशा देवालयांच्या प्राकारांत तळी, विहिरी व अग्रशाळाही असतात.

हे सर्व बांधकाम प्रारंभी विटा व चिखल यांचे असे. पण काळ जसजसा बदलत गेला, तसतशी त्यात प्रगती होत गेली. त्या भागात अनेक राजवटी बदलल्या. राजैश्वर्य भरभराटीस आले. टोलेजंग राजप्रासाद उभे झाले. त्यांची अंतर्बाह्य सजावट होऊ लागली. याचा परिणाम म्हणून दक्षिणेतील मंदिरबांधणीच्या कल्पनाही बदलत गेल्या. राजमंदिराप्रमाणेच देवमंदिरांनाही सभामंडप जोडले जाऊ लागले. त्याचप्रमाणे अंतराळ, बंदिस्त प्रवेशमार्ग, गोपुरे, देवड्या, सज्जे, सूच्यग्र कळस, विहारपंक्ती, इ. अंगोपांगांची जोड दिली गेली. बांधणीचा मालमसाला बदलला व त्यामुळे शिल्पकारांना आपले कौशल्य व कल्पनाचातुर्य दाखवण्यास अधिक वाव मिळाला. नक्षीकाम, खोदकाम, उठावाचे काम, इ. गोष्टींनी त्या शिल्पकारांनी देवमंदिरांचे सौंदर्य खूप वाढवले.

गुप्त साम्राज्याच्या उत्तरकाळात उत्तरेत जी देवालये बांधली गेली, त्यातूनच या द्राविडी पद्धतीचा उगम झाला असावा, असे म्हणतात. कारण चौकोनी गाभारा, सभोवती प्रदक्षिणामार्ग, चौकोनी प्राकार, गाभाऱ्यावरील निमुळते उंच होत जाणारे शिखर, इ. गोष्टी जशा गुप्त साम्राज्याच्या उत्तरकालीन बांधणीत आढळतात, तशाच त्या द्राविड शैलीतही आढळतात.

इ. स. च्या ७ व्या शतकापासून दक्षिणेत तमिळनाडमध्ये पल्लवांची राजवट सुरू झाली. तेव्हापासून इ. स. च्या १६ व्या शतकाच्या अखेरीपर्यंतच्या कालात द्राविड शैलीत सारखी प्रगती होत गेलेली दिसते. पल्लव राजांना मंदिरनिर्मितीची विशेष आवड होती. ते कलाकौशल्याचेही भोक्ते होते. त्यामुळे त्यांच्या राजवटीत मंदिररचनेत अनेक प्रकारचे प्रयोग केले गेले. त्या वंशातला राजा महेंद्रवर्मा याने त्या भागात गुहामंदिरे खोदण्याची प्रथा चालू केली. त्याचा मुलगा नरसिंहवर्मा मामल्ल यानेही एकसंध खडकातून मंदिरे खोदून काढली. या मंदिरांना

रथ असे म्हणतात. अशा प्रकारचे काही रथ मद्रासपासून दक्षिणेस ३२ मैलांवर मामल्लपुरम येथे दिसतात. या रथांच्या



रथमंदिर—तिरुवारूर

गाभाऱ्याचा आकार चौरसाप्रमाणेच आयताकृतीही आहे. शिखरांच्या ठिकाणी दंडगोलाकृती घुमट आहेत. त्यांच्या पार्श्वभागी असणाऱ्या भिंतीचा वरचा भाग त्रिकोणी झाला आहे. चैत्य-गवाक्षातील खोलगट भागात मानवी चेहरे उठावाने दाखवलेले आहेत. गाभाऱ्याभोवती चारही बाजूंस खांबांवर आधारलेल्या पडव्या काढलेल्या आहेत. चौरस व आयताकृती अशा दोन्ही प्रकारच्या चौथऱ्यांवर हे रथ उभारलेले आहेत.

त्यापुढच्या काळात गुहामंदिरे व रथ खोदण्याची प्रथा मागे पडली. रथाऐवजी त्यांच्यासारखीच हुबेहूब बांधणी असलेली मंदिरे मोकळ्या जागी बांधली जाऊ लागली. त्यामुळे तत्कालीन शिल्पकारांच्या एका पिढीतच त्या भागात अनेक देवालये निर्माण झाली या मंदिरनिर्मितीतली पुढील तीन मंदिरे वैशिष्ट्यपूर्ण मानतात.

(१) मामल्लपुरम येथील किनाऱ्यावरचे देवमंदिर. हे जोडमंदिर आहे व परस्पर विसदृश असे त्याचे बांधकाम आहे. त्याचे शिखर उंच, निमुळते आणि सुंदर आहे.

(२) कांचीपुरम येथील कैलासमंदिर. द्राविड शैलीतील सर्व अंगोपांगांनी पूर्णावस्थेला पोचलेले हे मंदिर आहे. या मंदिराच्या निरनिराळ्या भागांच्या रचनेत विविध कल्पनांचा मिलाफ झाला आहे. इथे निरनिराळ्या भागांचा स्पष्टपणा, त्यांची प्रमाणबद्धता, परस्पर सुसंगती, इ. गोष्टी ठळकपणे नजरेत भरतात. या मुख्य मंदिराची प्रतिकृतीच अशी छोटी छोटी बांधकामे गाभाऱ्याच्या तीन्ही बाजूंस आणि शिखराच्या प्रत्येक मजल्याच्या कडेवर आहेत. पायापासून शिखरापर्यंतची ही सर्व उभारणी अशा कलात्मक पद्धतीने केलेली आहे, की ते सगळे शिल्प एकसंध दिसावे. गाभारा व सभामंडप यांच्याशी एका रेषेत येईल, अशा रीतीने प्राकाराच्या पूर्वेकडील भिंतीत आयताकृती गोपुर उभारलेले असून, त्यावर शिखर आणि शिखरावर कळस चढविलेला आहे. गोपुराच्या दोन्ही अंगीं दोन प्रवेशद्वारे ठेवलेली आहेत.

(३) कांचीपुरम येथील वैकुंठ पेरुमल याचे मंदिर. प्राकाराच्या आतल्या अंगास लागून प्रदक्षिणामार्ग, त्यांतच ओवऱ्यांची ओळ, त्याच्या आत दुसरा प्रदक्षिणामार्ग, त्याच्या आत गाभारा, मंडप व त्या दोहोस जोडणारे अंतराळ, तसेच मंडपाच्या दुसऱ्या अंगाला प्रवेशद्वार अशी याची रचना आहे. गाभाऱ्यावर चारमजली शिखर असून, शेवटी अष्टकोनी कळस आहे. पहिल्या मजल्यावर दोन प्रदक्षिणामार्ग, दुसऱ्यावर एक प्रदक्षिणामार्ग व तिसऱ्यावर मंडप अशी याच्या शिखराची रचना असून, ती द्राविड शैलीतली वैशिष्ट्यपूर्ण रचना समजतात.

तमिळनाडमध्ये अशा प्रकारे देवालये उभारली जात असता त्या प्रदेशाच्या बाहेरही तशाच बांधणीची मंदिरे उभारली जाऊ लागली होती. याची उत्कृष्ट उदाहरणे म्हणजे चालुक्यांच्या राज्यातील ( उत्तर कर्नाटक ) पट्टदकल येथील विरूपाक्ष व संगमेश्वर यांची मंदिरे होत. महाराष्ट्रातील वेरूळ येथे



कलासमंदिर – वेरूळ

डोंगरात खोदलेले कैलास लेणेही द्राविड शैलीचेच आहे. मात्र त्याचे बांधकाम खालून वर अशा पद्धतीने केलेले नसून, ते एका प्रचंड खडकातून खोदून काढलेले आहे. द्राविड शैलीची सर्व वैशिष्ट्ये या कैलास लेण्यात स्पष्टपणे दिसून येतात.

इ. स. च्या ९ व्या शतकाच्या अखेरीस पल्लव राजवट समाप्त होऊन तिच्या जागी चोळांची राजवट सुरू झाली. चोळांनी आपल्या सुरवातीच्या काळात भव्य मंदिरे उभारली नाहीत; पण जी उभारली ती पल्लवकालीन रचनेला अनुसरूनच उभारली. नर्तमलई येथील विजयालयचोळेश्वर हे मंदिर या गोष्टीचे उल्लेखनीय उदाहरण होय. यातील सर्व अंगे द्राविड शैलीचीच असली, तरी गाभारा वाटोळा आणि त्या भोवतीचा प्रदक्षिणामार्ग चौकोनी, एवढा त्यात फरक केलेला आहे. श्रीनिवासनल्लूर येथील कोरंगनाथमंदिर ही चोळांच्या सुरवातीच्या काळातील दुसरी कलाकृती होय. हे मंदिर आकाराने फारसे मोठे नाही; पण त्याच्या रचनेत कोरीव काम व मोकळा भाग यांचे परस्पर प्रमाण काय असावे, कोणत्या ठिकाणी कोणते शिल्प कोरावे, इ. गोष्टींचा सौंदर्यवादी दृष्टिकोनातून विचार केलेला आहे. भिंतीतील दोन खांबांमधल्या खोलगट भागात मानवी आकृती उठावदारपणे कोरलेल्या आहेत. मंदिराचे स्तंभ ज्या एका सलग ओटचावर उभारलेले आहेत, त्या ओटचावर पशुशिरांचा पट्टाच्या पट्टा खोदून काढलेला आहे.

राजराज व त्याचा पुत्र राजेश्वर यांच्या कारकीर्दीत चोळांची सत्ता मध्यान्हीच्या तेजाने तळपू लागली. या दोन्ही राजांनी अनेक भव्य मंदिरे उभारली. तंजाऊरचे बृहदीश्वरमंदिर हे राजराजाने निर्माण केले. याचा एकूण विस्तार ७५०×२५० फूट असून, त्याला एकापुढे एक अशी दोन गोपुरे आहेत. याच्या शिखरांची उंची १९० फूट आहे. या मंदिराच्या अंगोपांगांत प्रमाणबद्धता उत्तम साधलेली असून, प्रवेशद्वारावरील देवडी, नंदीमंदिर व मंडप यांनी त्या समग्र शिल्पाला भव्यता आणलेली आहे. या मंदिराच्या शिखराचे तीन प्रमुख भाग दिसतात. गाभारा व त्याच्या भोवतीचा प्रदक्षिणामार्ग यांना वेढणारा घनाकृती भाग हा एक, तेरामजली शिखर हा दुसरा व शेवटी त्याला दिलेला घुमटाचा आकार हा तिसरा भाग होय. गाभाऱ्याच्या भिंतीचे आडवे दोन भाग करून दोन्ही भागांच्या सांध्यावरील भिंतीचा भाग पुढे आणलेला आहे व त्यावर कोरीव काम केलेले आहे. शिखराच्या दोन मजल्यांमधला भाग उठावदार न करता आत गेलेला दाखवला असून, त्यामुळे पायापासून शिखरापर्यंत लंबरेषेत लांबच्या लांब अनेक खोलगट पट्टे निर्माण झाले आहेत. ही सर्व वैशिष्ट्ये पाहून पाश्चात्य शिल्पकारांनी म्हटले, की 'हे बृहदीश्वरमंदिर म्हणजे द्राविड शिल्पकारांच्या कौशल्याचे उत्कृष्ट प्रतीक होय.'

राजराजाचा पुत्र राजेंद्र याने आपली राजधानी असलेल्या गंगैकोंडचोळपुरम या नगरात बृहदीश्वरमंदिराइतकेच भव्य व कलासंपन्न असे मंदिर उभारले होते. पण सांप्रत त्याची पडझड झालेली आहे. त्याच्या प्राकाराला तट असून, त्याला मधूनमधून बुरूज बांधलेले आहेत. त्यामुळे ते मंदिर एखाद्या भुईकोटासारखे दिसते. सभामंडपाला तीन दिशांनी प्रवेशमार्ग ठेवलेले आहेत. शिखराचे मजले चौकोनी न करता त्यांना गोलाकार दिलेला आहे. या मंदिरामुळे द्राविड शैलीत एक नवे उपांग निर्माण झाल्याचे दिसते.

इ. स. च्या १३ व्या शतकाच्या पूर्वार्धात चोळांची सत्ता संपुष्टात येऊन पांडच राजे सत्ताधीश बनले. त्यांच्या कारकीर्दीत दारासुरम येथे ऐरावतेश्वर व त्रिभुवनम येथे त्रिभुवनेश्वर अशी दोन महत्त्वाची मंदिरे निर्माण झाली. पण त्या काळात मंदिरनिर्मितीतला भव्यपणा कमी होऊन, त्या जागी कलाकुसर अधिक आली. मुख्य मंदिराभोवती त्याच प्राकारात अनेक छोटी मंदिरे उभारणे व गोपुरांची संख्या वाढवणे या गोष्टींना प्राधान्य आले. या काळात निर्माण झालेल्या गोपुरांचा भव्योत्तुंगपणा मुख्य मंदिरालाही मागे टाकतो.

**वेसर शैली** – विंध्यपर्वतापासून कृष्णा नदीपर्यंतच्या दक्षिणापथात वेसर शैली प्रचलित असल्याचे म्हटले आहे. वेसर शैलीची देवालये ही वर्तुळाकृती किंवा लंबवर्तुळाकृती असतात. प्राचीन काळी तमिळनाड व केरळ या भागांत याच पद्धतीची मंदिरे निर्माण होत होती, असे म्हणतात. आजही केरळात अशी देवालये अनेक आढळतात. मात्र या शैलीचा विकास नागर व द्राविड या दोन शैलींच्या पूर्ण विकासानंतर त्यांच्या मिश्रणातून झाला आहे. म्हणूनच शिल्पशास्त्रात या पद्धतीला मिश्रक असेही दुसरे नाव आढळते. चालुक्य शैली म्हणून जिचे वर्णन येते, ती शैली व वेसर शैली या दोन्ही एकच होत, असे काही विद्वान म्हणतात. ही शैली कर्नाटकात विशेष भरभराटीला आली. इ. स. च्या १२ व्या शतकापासून या शैलीची मंदिरे विशेषत्वाने निर्माण होऊ लागली.

इ. स. च्या ७ व्या व ८ व्या शतकांत आद्य चालुक्यांचा दक्षिणेवर अंमल चालू होता. त्या काळात ऐहोळ व पट्टदकल या ठिकाणी नागर व द्राविड या दोन्ही शैलींची मंदिरे शेजारी शेजारी उभारली गेली. त्याच वेळी दोन्ही शैलींतील कल्पनांची देवाणघेवाण होऊन वेसर शैलीचा पाया घातला गेला. या पद्धतीवर नागर शैलीपेक्षा द्राविड शैलीची छाप अधिक आहे. नागर शैलीचे विशेष अनुकरण दिसते ते मंदिरशिल्पाच्या

नक्षीकामात. वेसर शैलीत विमान व मंडप असे दोनच भाग असतात. विमानाचे शिखर चौरस असून, क्रमाने निमुळते होत जाणाऱ्या एकावर एक मजल्यांनी चढत गेलेले असते. त्यावर शेवटी कळस असतो. मंडप अनेक स्तंभांवर आधारलेला असून,



वेसर शैलीचे मंदिर — केरळ

त्यावर सपाट छप्पर असते. वेसर शैलीत द्राविड शैलीहून भिन्न असणाऱ्या गोष्टी पुढीलप्रमाणे होत— मंडपाच्या पुढे दुसरा एक मोकळा मंडप असणे, प्रदक्षिणामार्गाच्या भिंतीत आतल्या अंगाने ओवऱ्या नसणे, मंडपाची लांबी-रुंदी गाभाऱ्याच्या लांबी-रुंदीपेक्षा मोठी असणे आणि भिंतींची रचना नागर शैलीप्रमाणे रथाकार करून द्राविड शैलीप्रमाणे मधून मधून त्यात स्तंभ उभारणे.

वेसर शैलीचा आणखी एक विशेष म्हणजे त्यांची रचना बहुकोनी अर्थात ताराकृती जोत्यावर केलेली असते. अशा प्रकारची ताराकृती मंदिरे होयसळांच्या राजवटीत उभारली गेली. चालुक्यांच्या प्रदेशात दंभोळ येथे दोड्डबसप्पा याचे जे मंदिर आहे, त्याचा पाया तर ताराकृती आहेच; शिवाय वरचे सगळे बांधकामही ताराकृतीच आहे. त्याचा गाभारा २४ पाकळ्यांचा दिसतो, तर मंडप ३२ पाकळ्यांचा दिसतो. गाभारा व मंडप मिळून 'ळ' अशी आकृती बनते. चालुक्य पद्धतीतले स्तंभही ताराकृती पायावरच उभारलेले असतात. या मंदिरांचा दुसरा एक विशेष म्हणजे मध्यभागी मंडप व त्याला लागून दोन किंवा चार मंदिरे बांधणे, हा होय. याला मंदिरसंकुल म्हणतात. या मंदिरसंकुलावरील शिखरांचे दृश्य चित्ताकर्षक असते.

कित्येक ठिकाणी मंडपाचे स्तंभ जणू चाकावर घासून काढावे, त्याप्रमाणे अत्यंत गुळगुळीत व झिलईदार दिसतात. त्यांतील सर्वच चित्राकृतींना झिलई दिलेली असल्यामुळे मंदिराचा आंतरभाग कमी प्रकाशित असतानाही हे स्तंभ व चित्राकृती झळाळत असलेल्या दिसतात. या शैलीत भारतीय शिल्पकलेतील नानाविध अलंकृती व मानवी शोभनाकृती यांचा मनोहर संगम झालेला आहे.

आंध्रातील कुक्कनूर या गावी कल्लेश्वराचे एक मंदिर आहे. वेसर शैलीचे ते एक उत्कृष्ट उदाहरण समजतात. द्राविड शैलीप्रमाणेच याचेही विमान व सभामंडप असे दोनच भाग आहेत; पण त्या दोन भागांना जोडणारा एक अरुंद मार्ग व मंडपाच्या पुढे नंदीप्रकोष्ठ या दोन रचनांची त्यांत नवीन भर पडली आहे. त्याशिवाय भिंतींच्या दोन भागांत राहणाऱ्या मोकळ्या जागेत ठराविक अंतरावर एखादा बारीक व नाजूक स्तंभ आणि त्यावर मूळ मंदिराशी सदृश अशी छोटीशी कोरीव कलाकृती केलेली दिसते. शिखरावरील मजल्यांची उंची कमी ठेवून एकावर एक दोन कळस तयार करणे आणि प्रत्येक मजल्याच्या दर्शनी भागावर खालपासून वरपर्यंत क्रमाने एकावर एक लहान लहान होत गेलेले कोनाडे खोदणे, या गोष्टीही इथे वैशिष्ट्यपूर्ण आहेत. नंतरच्या काळात शिखरावर कलाकुसरीचे सलग पट्टे दाखविण्याची जी प्रथा रूढ झाली, तिचा उगम या कल्लेश्वर मंदिराच्या शिखरातून झालेला आहे, असे म्हणतात.

धारवाड जिल्ह्यातील लक्कुंडी या गावी जे एक जैन मंदिर आहे, तेही कल्लेश्वराच्या धर्तीवरच आहे. या मंदिराला विशिष्ट प्रकारचा काळा दगड वापरलेला असल्यामुळे शिल्पकारांना इथे आपले कसब दाखविण्यास अधिक अवसर मिळाला आहे. मंडपाच्या पुढे चारी बाजूंनी उघडा असलेला मंडप हे बांधकाम इथे कल्लेश्वरमंदिराहून अधिक आहे. या मंडपाचे स्तंभ कलाकुसरीने युक्त असून, ते कमानींनी एकमेकांना जोडलेले आहेत. तसेच छपराच्या मोकळ्या बाजूंचा पागोळीकडील भाग पुढे आणून त्याच्या कडा कंगोरेदार केलेल्या आहेत. चालुक्य पद्धतीत ही एक भरच म्हटली पाहिजे.

कर्नाटकातील इट्टगी गावी असलेले महादेवाचे मंदिर हा चालुक्य पद्धतीचा पूर्ण विकसित असा दुसरा नमुना होय. हे मंदिर लक्कुंडी येथील वर उल्लेखलेल्या मंदिरापेक्षा मोठे आहे. गाभारा, सभामंडप, त्यांना जोडणारा मधला अरुंद मार्ग, अनेक स्तंभांवर उभारलेला उघडा मंडप, तो सभामंडपाला जोडण्यासाठी मधे दालन आणि त्या दालनात नंदी, अशी याची रचना

आहे. इथल्या मंडपाच्या उभारणीत कलाकारांनी आपल्या कल्पकतेचे उत्तम प्रदर्शन केले आहे. त्याचप्रातील सर्व विभागांचा समतोलपणा, त्याचे शिखर व त्यावरील एकंदर कलाकुसर या गोष्टी उत्कृष्ट आहेत. तिथल्याच एका शिलालेखात या



महादेवाचे मंदिर– इट्टगी

मंदिराला देवालयचक्रवर्ती असे जे म्हटले आहे, ते अगदी यथार्थ वाटते. इ. स. च्या १२ व्या शतकात चालुक्य पद्धती पूर्ण विकास पावली आणि तिच्यातल्या कलाकुसरीनेही परिसीमा गाठली. या दोन्ही गोष्टींचे मनोवेधक दर्शन घडवणारी अनेक मंदिरे कर्नाटक प्रदेशात सर्वत्र आढळतात.

होयसळ पद्धती – ही पद्धती चालुक्य पद्धतीतूनच निघाली आहे. होयसळ पद्धती द्वारसमुद्रम येथे राज्य करणाऱ्या होयसळवंशी राजांच्या कारकीर्दीत उदयास आली. होयसळ पद्धतीची मंदिरे ताराकृती असतात. त्यांना २४ पासून ३२ पर्यंत कोन असलेले आढळतात. या पद्धतीत मंडपाच्या भोवती त्याला जोडून अनेक लहान मंदिरे उभारलेली असतात. चालुक्य काळातही अशी मंदिरे बांधली जात; पण त्यांची संख्या अल्प असे. या पद्धतीच्या मंदिराचा आणखी एक विशेष म्हणजे मंदिराची पायापासून शिखरापर्यंत सर्व उभारणी एकं सारखी असणे, हा होय. जोत्यांची उंची ९।१० फूट असून, त्याची पायाशी समांतर अशी अनेक पट्ट्यांत विभागणी केलेली असते. या पट्ट्यांवर हत्ती, घोडे, पक्षी, कीर्तिमुखे व पानाफुलांची चित्रविचित्र गुंफण यांची मालिका असते. पट्ट्यांचे हे कोरीव काम अप्रतिम असते. गाभाऱ्याच्या भिंतींना माथ्याजवळ मोठमोठ्या रुंद पागोळ्या ठेवलेल्या असतात. भिंतीचेही आडवे दोन भाग करून त्यामध्ये भिन्नता दाखविण्यासाठी मधला भाग पागोळीसारखा पुढे आणलेला असतो. देवळाच्या सगळ्याच भिंती पुराणांतील निरनिराळ्या प्रसंगांच्या देखाव्यांनी भरून टाकलेल्या असतात. या भिंतींवर कुठेही रिता ठाव आढळत नाही. या सगळ्या चित्रसंभारात मधे मधे ज्या ओतीव सौंदर्याकृती वसवलेल्या असतात, त्यांना मदनिका असे म्हणतात. या मदनिकांचे सौंदर्य, त्यांच्या घडणीतील कलेचा नाजूकपणा आणि त्यांची झिलई या सगळ्याच गोष्टी प्रेक्षकाला मंत्रमुग्ध करणाऱ्या आहेत. बेलूर येथील चेन्नकेशवाच्या मंदिरातल्या या मदनिका अन्य ठिकाणच्या मदनिकांहून अधिक सुरेख व ठळक आहेत.

होयसळ पद्धतीने उभारलेल्या मंदिरांची शिखरे द्राविड शैलीचीच असतात; फक्त कळस तेवढा घुमटासारखा असतो व त्यावर एक छत्र असते. होयसळ पद्धतीच्या मंदिरांची उंची लांबी व रुंदीच्या मानाने कमी असते. मंदिराच्या भोवती प्रशस्त असा प्राकार असतो. त्या प्राकारात ते मंदिर हस्तिदंताच्या पेटीत कोरीव काम केलेली एखादी डबी ठेवावी, तसे शोभून दिसते. होयसळ पद्धतीच्या कोणत्याही मंदिराचे निरीक्षण केले, तरी तिथे शिल्पकारांच्या कौशल्यापेक्षा मूर्तिकारांचे कौशल्यच अधिक उठून दिसते.

हळेबीड येथील होयसळेश्वराचे मंदिर म्हणजे चालुक्य-होयसळ पद्धतींचा योग्य मेळ घालून केलेली परमोत्कृष्ट निर्मिती होय. हे मंदिर इ. स. च्या १२ व्या शतकाच्या मध्यभागी बांधले गेले. हे एक जोडमंदिर आहे. त्यांचे पार्श्वभाग एका दालनाने परस्परांना जोडून दोन्ही मंदिरे पूर्वाभिमुख अशी बांधली आहेत. दोन्ही मंदिरांना स्वतंत्र सभामंडप असून, सभामंडपाच्या पुढे पण त्यापासून अलग आणि चारही बाजूंनी



होयसळेश्वरमंदिर – हळेबीड

उघडा असलेला मुखमंडप आहे. मंदिराचे जोते भव्य आणि उंच असून, त्याच्यावर एकावर एक असे नऊ पट्टे आहेत. प्रत्येक पट्ट्याची एकूण लांबी सातशे फूट आहे. सर्वांत खालच्या पट्ट्यावर हत्तींची रांग कोरलेली आहे. हे हत्ती नुसते ठोकळेबाज

नसून त्यांचे भाव आणि शरीरस्थिती यांत कमालीची विविधता आहे. मंदिराच्या उत्तरद्वारापासून इथे बाह्य भिंतीवरील चित्रकारीला प्रारंभ होतो. एका वीतभर पट्टीत देखाव्यामागून देखावे मांडलेले दिसतात. भैरवगण, पिशाचगायक, समुद्रमंथन, शुक्राचार्य, उमा-महेश्वर, इ. व्यक्ती, व्यक्तिसमूह व प्रसंग त्या पट्टीवर कोरून काढलेले आहेत. ईशान्येच्या अंगाला समग्र कृष्णचरित्र खोदलेले आहे. दक्षिण अंगाला महाभारतकथा चित्रित झाली आहे. तिथून पुढे रामायणातले प्रसंग साकार झाले आहेत. एकाच पट्टीतली ही सारी चित्रे होत. मंदिराच्या अंतर्भागातले स्तंभ, मंडपाचे स्तंभ, स्तंभशीर्षे, इ. भागांवर जे कलाकुसरीचे काम केलेले आहे, त्याला तर मर्यादाच नाही. त्यातील प्रत्येक आकृती मोठ्या कौशल्याने तासून, कोरून व घोटून सुस्पष्ट केलेली आहे. असे काम इतरत्र कुठेही पाहायला मिळणार नाही.

होयसळांच्या राजवटीत बांधलेली अशा प्रकारची मंदिरे म्हैसूर भागात अनेक आहेत. त्यांपैकी बऱ्याचशा मंदिरांची सांप्रत पडझड झालेली आहे. त्यांतल्या त्यात जी सुस्थितीत आहेत, त्यांपैकी दोन उल्लेखनीय म्हणजे सोमनाथपूर येथील केशवाचे व बेलूर येथील चेन्नकेशवाचे मंदिर ही होत.

केशवमंदिराच्या सभामंडपाच्या तीन अंगांना त्याला जोडून आणखी तीन मंदिरे उभारली आहेत. त्यांच्या भोवती चौकोनी भव्य पटांगण असून, त्याला तट म्हणून ओवऱ्यांची लांबच लांब



केशवमंदिर – सोमनाथपूर

मालिका उभी केली आहे. मंदिराचे जोते उंच असून सभामंडपाला जोडून पुढे आणखी एक उघडा मंडप उभारलेला आहे. त्यामुळे प्रस्तुत देवालय क्रूसाच्या आकाराचे दिसते. मुख्य मंदिराप्रमाणेच सभामंडपालगतची तीन्ही मंदिरे ताराकृती जोत्यावर उभारलेली असून, तोच आकार शिखरापर्यंत कायम ठेवलेला आहे.

चेन्नकेशवाचे मंदिर विस्ताराने मोठे आहे. त्याच्या प्राकाराची लांबी–रुंदी ४२५ × ३८० फूट असून, आत अनेक



चेन्नकेशवमंदिर – बेलूर

सुंदर मंदिरे आहेत. इथेही इतर मंदिरांप्रमाणेच भरपूर कलाकुसर आहे.

विजयनगर शैली– होयसळ पद्धतीचे वळण कायम ठेवून तिचा पुनश्च द्राविड शैलीशी संयोग करण्याची एक वेगळी पद्धत विजयनगर साम्राज्याच्या काळात (सोळावे शतक) सुरू झाली. तिला विजयनगर शैली असे म्हणता येईल. हंपी येथील विठ्ठलस्वामी व हजाराराम यांची मंदिरे ही या शैलीची उत्कृष्ट उदाहरणे होत. विठ्ठलस्वामीचे मंदिर अपूर्ण असून, हजारारामाचे मंदिर तेवढे पूर्ण झालेले आहे. विठ्ठलस्वामीच्या मंदिराची प्रदक्षिणा चौकोनी असून, ती गाभाऱ्यापेक्षा खोल आहे. प्रदक्षिणामार्ग धरून गाभाऱ्याचे शिखर बनवले आहे. शिखराच्या मुळाशी वेलपत्तीचे अलंकरण खोदले आहे. या भागाला उपानय असे शिल्पशास्त्रीय नाव आहे. शिखरमध्याला कुमुदम म्हणतात. तोही अलंकृत आहे. त्यावरचा भाग तो कंठम होय. त्यावर नृत्य करणाऱ्या गणिका व अन्य काही सामाजिक चित्रे कोरलेली आहेत. सर्वांत वर पालथे कमळ आहे. या मंदिराला सभामंडप व अर्धमंडप दोन्ही आहेत. अर्धमंडपाच्या दोन्ही अंगी प्रवेशद्वारे आहेत. महामंडपाच्या खांबांची रचना विचित्र आहे. त्यांवर राक्षसांच्या पाठीवर स्वार झालेले मनुष्य खोदले आहेत. सगळे स्तंभ एकाच दगडातून घडवलेले आहेत. याच प्राकारात आणखी एक मंडप आहे, त्याचे नाव कल्याणमंडप होय. या मंडपात पूर्वी देवाचा वार्षिक विवाहसोहळा होत असे. इथे महामंडपाच्या समोर एक विशाल रथ दगडातून कोरून काढलेला आहे. त्याची दगडी चाके अशा प्रकारे

बनवलेली आहेत, की ती अल्पशा प्रयत्नाने फिरवताही येतात.

हजाराराममंदिर वरीलप्रमाणेच आहे; पण त्याचे खांब



विठ्ठलस्वामीचे मंदिर (कल्याणमंडप) – हंपी

गोलाकार आहेत व ते सगळे कोरीव कामाने अलंकृत आहेत. याचे शिखर अत्यंत सुंदर आहे. छतावर आतून वेलपत्तीचे



पंडपाचे स्तंभ – श्रीरंगम

अलंकरण आहे. या मंदिराचे खास वैशिष्टय म्हणजे त्याच्या भिंतींच्या दगडांत कोरलेले रामचरित्र हे होय.

विजयनगर शैलीची अनेक सुंदर मंदिरे वेलोर, कुंभकोणम, कांची, ताडपत्री व श्रीरंगम या ठिकाणी आढळतात. वेलोर येथील वैकुंठपेरुमल–देवालयाचा कल्याणमंडप सर्वप्रसिद्ध आहे. त्याचे गोपुरही विशाल आहे. खांबांवरची कारागिरी व त्याची बहुकोनी घडण हे विजयनगर शैलीचे खास वैशिष्टय आहे, ते या ठिकाणीही दिसते. इथल्या खांबांवर चित्रलिपी, राक्षस व अन्य आकृत्या सुंदर ढंगाने कोरलेल्या आहेत. हे खांब म्हणजे स्वतंत्र शिल्पकृतीच समजल्या पाहिजेत. कांचीच्या वरदराजमंदिराचा मंडप एक हजार स्तंभांचा आहे. श्रीरंगम येथील मंदिर या सर्वांत आश्चर्यजनक आहे. त्याच्या गाभाऱ्यापर्यंत पोचण्यासाठी एकाच दिशेने सहा द्वारे आहेत आणि त्या प्रत्येक द्वारावर गोपुर बनविलेले आहे. याचे स्तंभ लढणाऱ्या घोड्यांच्या आकृतीसह कोरलेले आहेत. ताडपत्री येथील मंदिर गडद हिरव्या रंगाच्या पाषाणांनी बनविलेले आहे. याचे गोपुर सर्वांत अधिक सुंदर व अलंकृत आहे.

विजयनगर शैलीतले होयसळ पद्धतीचे वळण कोणते व द्राविडी पद्धतीचे वळण कोणते, ते पुढीलप्रमाणे सांगता येईल–

मंदिराच्या बाजूच्या अर्धवर्तुळाकार कमानी, कपोतांच्या रांगा, मुखमंडपाचा अभाव, मंदिराबाहेरचा चौथरा, चौकोनी खांबांच्या पायथ्याशी व कोनाड्यात जडवलेले सालंकृत हत्ती, घोडे, सिंह, इ. पशू, दुहेरी छप्पर, पायऱ्यापायऱ्यांनी निमुळते होत गेलेले शिखर व त्याचा उठावदार दर्शनी भाग हे विजयनगर शैलीतले होयसळ वळण होय.

वाटोळी प्रदक्षिणा, तिमजली शिखर, धातूचा कळस, नवरंग, मंडपाचे भव्य खांब व कुरुंदी दगडाचा वापर, हे द्राविड शैलीचे वळण आहे. या शैलीतली मंदिरे बहिर्भागी होयसळ पद्धतीवर व अंतर्भागी द्राविड पद्धतीवर अलंकृत केलेली असतात.

नायक शैली – विजयनगर शैलीतून थोडे निराळे वळण घेऊन पुढे आलेली शैली म्हणजे नायक शैली होय. नायक राजे हे मदुरेवर राज्य करीत होते. त्यांनी पुरस्कारिलेल्या या शैलीचे प्रसिद्ध उदाहरण म्हणजे मदुरेचे मीनाक्षीमंदिर हे होय. होयसळ पद्धतीप्रमाणे हे जोडमंदिर आहे. त्यांपैकी एक मीनाक्षीचे व दुसरे सुंदरेश्वराचे आहे. ८५० फूट लांब आणि ७२५ फूट रुंद असा याचा विस्तीर्ण प्राकार आहे. प्राकाराला चार द्वारे असून, त्यांवर चार उत्तुंग गोपुरे आहेत. या मंदिराला पुडुमंडपम नामक एक मोठा मंडप आहे. त्यात खांबांच्या चार ओळी आहेत. याशिवाय अर्धमंडप व नृत्तमंडप असे आणखीही दोन मंडप आहेत. अर्धमंडप धार्मिक उत्सवांसाठी व नृत्तमंडप देवदासींच्या नृत्यासाठी. या सर्व मंडपांचे खांब आपादमस्तक

कोरीव आकृतींनी भरलेले आहेत. एका खांबावर नायक राजकुलातील माणसांच्या झिलईदार पूर्णाकृती प्रतिमा कोरलेल्या आहेत. सुंदरेश्वराच्या मंदिरप्राकारात आणखीही सात उपमंदिरे आहेत.

भारतातील शिल्पी व कारागीर यांनी आपले सारे चातुर्य, सामर्थ्य आणि कसब देवालये बांधण्याच्या कामी उत्कटपणे खर्च केलेले दिसते. त्यांच्या जवळची हत्यारे फारशी सुधारलेली नव्हती. त्याचप्रमाणे रूढी आणि बांधकामाचे शिल्पशास्त्रीय नियम यांची बंधनेही त्यांच्यावर होती. पण ही बंधने पाळूनही त्यांनी आपली प्रतिभा आणि कलाकुशलता जगाच्या नजरेस आणून दिली. या सर्व देवालयनिर्मितीच्या प्रचंड व शतकानुशतके चाललेल्या व्यापामागची प्रेरणा धार्मिक स्वरूपाची होती. या शिल्पकारांना आणि त्यांच्या प्रोत्साहकांना या निर्मितीने समाजातला ईश्वरविषयक भक्तिभाव जागृत ठेवायचा होता, वाढवायचा होता. त्यामुळे ही देवालये जमिनीवर असली, तरी त्यांची झेप स्वर्गाकडे व तिथल्या देवदेवतांकडे होती, असे म्हटल्यास त्यात अतिशयोक्ती होणार नाही.

**हेमाडपंती देवालये** — देवालयांच्या बांधणीचा आणखी एक प्रकार विंध्याच्या दक्षिणेस आढळतो, त्याला हेमाडपंती देवालये असे म्हणतात. कोणतीही इमारत बांधायची, तर तिचे दगड किंवा विटा एकमेकांस घट्ट चिकटून राहाव्या म्हणून माती, चुना किंवा सीमेंट यांपैकी कशाचा तरी उपयोग करावा लागतो. पण हेमाडपंती मंदिरे याला अपवाद आहेत. या देवालयांचे चिरे त्रिकोण, चौकोन, काटकोन, वर्तुळ, अर्धवर्तुळ, इ. आकारात घडवून ते एकमेकांत इतक्या कुशलतेने बसवलेले असतात, की त्यामुळे इमारतीच्या प्रत्येक अवयवाला दुसऱ्या अवयवाचा आधार मिळून वरचे छतही विनधोक राहू शकते. अशा प्रकाराची मंदिरे विशेषत: इ. स. च्या तेराव्या शतकाच्या उत्तरार्धात व चौदाव्या शतकात बांधली गेली. हेमाद्री अथवा हेमाडपंत या पुरुषाने या पद्धतीचा पुरस्कार केला, म्हणून ही पद्धती त्याच्याच नावाने ओळखली जाते. हेमाडपंत हा देवगिरीच्या महादेवराय या राजाचा 'श्रीकरणाधिप' होता. हेमाडपंती देवालयांची रचना सामान्यपणे पुढील पद्धतीची असते —

गाभारा चौकोनी असतो, सभामंडपाला अनेक खांब असतात. तो अलंकृत करण्याकडे विशेष प्रवृत्ती असते. त्याच्या खांबांवर व छतांवर पौराणिक प्रसंगांची चित्रे कोरलेली असतात. त्यांतली काही चित्रे अश्लीलही असतात. काही ठिकाणी कमानी काढून सभामंडपाला आधार दिलेला असतो. दर्शनी भागी भोगमंडप असतो. भिंती सपाट ठेवण्यापेक्षा त्या कोनयुक्त करणे या गोष्टीला प्राधान्य असते. विशेषत: सगळे बांधकाम काळ्या दगडात केलेले असते. देवालये सामान्यपणे पूर्वाभिमुख असतात. अशा देवालयांवर प्राचीन शिलालेखही वरेच आढळतात. तलाव, विहीर, ओढा किंवा नदी यांची जवळीक धरूनच बहुधा अशी देवालये बांधलेली असतात.

आंध्र राज्यात थेर्णा नदीच्या काठी नीलांग नावाचे एक गाव आहे. तिथे एक हेमाडपंती देवालय आढळते. पण सांप्रत ते पडिक अवस्थेत आहे. त्याचे वैशिष्ट्य म्हणजे त्याला तीन गाभारे होते व त्या प्रत्येक गाभाऱ्यावर एकेक शिखर होते. प्रत्येक गाभाऱ्याचे प्रवेशद्वार कोरीव नक्षीदार असल्याचे सांप्रतही दिसते. याचा उंबरठा उंच असून, त्याला पायरी ठेवलेली आहे. प्रत्येक दरवाज्यावर वरच्या अंगी देवी व खालच्या अंगी कपालधारी शिवमूर्ती कोरलेली आहे. मुख्य गाभाऱ्यात शिवलिंग असून, उरलेल्या दोन गाभाऱ्यांत शिवमूर्ती आहेत.



गाभाऱ्याचे प्रवेशद्वार — नीलांग

नारायणपूर हे गावही आंध्रातच असून, तिथली दोन देवालये विशेष उल्लेखनीय आहेत. त्यांपैकी एका देवालयाचा सभामंडप व गाभाऱ्याचा चौथरा तेवढा उभा आहे. हे देवालय नीलांग येथील देवालयाच्या धर्तीवरच असावे, असे दिसते. दुसरे देवालय त्याहून जरा चांगल्या स्थितीत आहे. त्याच्या खांबांवर व भिंतीवर नक्षीकाम आढळते. भिंतीवरच्या चित्रकारीत अश्लील चित्रेही वरीच आहेत. याच्या सभामंडपाला तीन बाजूंनी प्रवेशमंडप होते. सांप्रत त्यांतला एक शिल्लक आहे. सभामंडपाच्या प्रत्येक कोपऱ्यात त्रिकोणाकृती चार चार चिरे बसवलेले आहेत. दरवाज्याच्या दर्शनी पट्टीवर लक्ष्मी खोदलेली असून, तिच्या चारही हातांत एकेक कमळाची कळी आहे.

नासिक जिल्ह्यातले सिन्नर हे गाव पूर्वकालीन यादवांच्या राजधानीचे शहर होते. या ठिकाणी हेमाडपंती देवालये बरीच आहेत. गोंडेश्वर, ऐश्वर्येश्वर, चितळेश्वर, नागेश्वर व विठ्ठले-

श्वर अशी त्यांची नावे आहेत. गोंडेश्वराचा सभामंडप सुरेख असून तो चार कोरीव खांबांवर उभा आहे. याचा भोगमंडपही



सभामंडपाचे छत – नारायणपूर

सुंदर आहे. विदर्भात जयपूर-कोटली, अमदापूर, शिरपूर, मेंहेकर, घोत्रा, सातगाव व लोणार या ठिकाणीही हेमाडपंती



गोंडेश्वराचे मंदिर – सिन्नर

देवालये बरीच आहेत. यांपैकी लोणार येथील दैत्यसूदनाचे दवालय विशेष उल्लेखनीय आहे. याच्या भोवताली एक पटांगण असून, त्याच्या सर्व बाजू दगडांनी बांधून काढल्या आहेत. या मंदिराची लांबी सुमारे १०० फूट असून, रुंदी सुमारे ८५ फूट आहे. याचे जोते ५ फूट उंचीचे आहे. सांप्रत या मंदिरावर कळस नाही; पण पूर्वकाळी तो होता असे म्हणतात. या देवळांच्या बाह्य भागावर पौराणिक देवदेवतांची असंख्य चित्रे कोरलेली आहेत. मुख्य मूर्ती दैत्यसूदन या नावे विष्णूची आहे.

मत्स्य पुराणात देवालयांचे आणखी काही भिन्न प्रकार सांगितले आहेत. मजल्यांची कमी अधिक संख्या, विविध संख्येचे कोन, विविध प्रकारची शिखरे, चित्रशाला, गोपुर, गच्च्या, पार्श्वमंदिरे व कमी अधिक उंची यांना अनुसरून त्या प्रकारांना नावे दिलेली आहेत.

**देवमूर्तीची पीठिका**— गाभाऱ्यात देवमूर्ती जिच्यावर बसवायची, त्या पीठिकेचे सोळा भाग करावे. एक भाग जमिनीत पुरावा. चार भागांची जगती करावी. त्यावरचा एक भाग वर्तुळाकार करावा, त्यानंतरच्या तीन भागांनी तिचा गळा करावा. तीन भागांनी गळपट्टी, दोन भागांनी त्यावरची रुंद पट्टी आणि दोन भागांनी सर्वांत वरची पट्टी करावी. अभिषेकाचे पाणी वाहून जाण्यासाठी पीठिकेला पन्हळी ठेवावी. पीठिका फार उंच अथवा फार ठेंगणी असू नये. गाभाऱ्याच्या दरवाजाची जेवढी उंची असेल, त्याच्या तीन अष्टमांश पीठिका असणे प्रशस्त समजावे. पीठिकेचे हे सामान्य लक्षण होय (मत्स्य पु. २६१).

**देवप्रतिमा**— देवालयात स्थापित करण्याची देवप्रतिमा सोने, रुपे, तांबे, पंचरस धातू, पाषाण किंवा लाकूड यांची असावी. गाभाऱ्याच्या दरवाजाची जेवढी उंची असेल, त्याच्या दोन अष्टमांश एवढी प्रतिमा असावी. मुख्य प्रतिमेच्या मागेपुढे तिच्या परिवारदेवतांच्या मूर्ती असाव्या. प्रतिमेची सर्व आयुधे तिच्या हाती असावी. इतरही तिची खास लक्षणे तिच्या अंगी असावी. ती अतिपुष्ट अथवा अतिकृश असू नये. तिचे सर्व अवयव शास्त्रात सांगितलेल्या मापाचे असावे. संपूर्णावयव आणि सुबद्ध अशी प्रतिमा ती बसवणाऱ्या यजमानाचे आयुष्य व वैभव वाढवते (मत्स्य पु. २५७).

**शिक्षणकेंद्रे**— द. भारतातील मंदिरांना सामाजिक जीवनातही फार मोठे स्थान होते. मंदिरांच्या निर्मितीत विविध कलांची जोपासना होत असे. संगीत व नृत्य या कलांची जोपासनाही दक्षिणेत देवालयसंस्थेच्या आश्रयानेच झाली. दक्षिणेतील बहुतेक मंदिरे शिक्षणाची केंद्रे बनली होती. देवस्थानांत संस्कृत पाठशाळा चालवल्या जात. हजारो विद्यार्थी तिथे वेदवेदांगे, धर्मशास्त्रे, पुराणे, महाकाव्ये, दर्शने, इ. ग्रंथांचे अध्ययन करीत. त्या विद्यार्थ्यांचा योगक्षेम मंदिरसंस्थाच चालवीत. त्यासाठी त्यांना धनिकांकडून विपुल द्रव्य दानाच्या रूपाने मिळत असे. एन्नासिरम, तिरुमुक्कुडल, बाहुर, तिरुवोरियुर, इ. नगरांतील मंदिर-पाठशाळा या दृष्टीने प्रख्यात होत्या. देवालयांशी संलग्न अशा मठांतही उच्च शिक्षण देण्याची व्यवस्था होती.

**सर्वत्र देवळेच देवळे**— भारतात सुमारे साडेपाच लक्ष खेडी आणि तीन हजार शहरे आहेत. प्रत्येक खेड्यात चार-दोन देवळे तरी असतातच. शहरात हे प्रमाण बरेच मोठे असते. एकट्या

काशीत पंधराशेच्या वर व भुवनेश्वर येथे पांचशेहून अधिक देवालये आहेत. नेपाळातल्या काठमांडू, पाटण व भटगाव या तीन ठिकाणी मिळून तर दोन हजारांहून अधिक मंदिरे आहेत. पृथ्वीच्या पाठीवर इतक्या लहान क्षेत्रात इतकी प्रचंड मंदिर-संख्या कुठेही आढळणार नाही. भारतातील या सर्व लहान-मोठ्या देवालयांची संख्या सुमारे चाळीस लक्षांवर जाईल. त्यातल्या मूर्तींची संख्या तर कोटींनीच मोजावी लागेल. भारता-तल्या तीर्थयात्रा करीत असता समर्थ रामदासांनी जिकडे तिकडे अशी देवळेच देवळे पाहून 'देव झाले उदंड। देवांचे माजले बंड' असे उद्‌गार काढले आहेत, ते काही अंशी उद्वेगाचेच वाटतात.

सामान्यतः एखाद्या गावात शिरताना सर्वप्रथम देवळांचे उंच चढत गेलेले कळस आपली दृष्टी वेधून घेतात. पूर्वी असा संकेत होता, की मंदिरापेक्षा गावातले कोणाचेही घर उंच असू नये. अशा स्थितीत एखाद्या धनाढ्य माणसाला आपल्या घरा-वर मजले चढवण्याची इच्छा झाली, तर तो आधी जवळच्या मंदिराचे शिखर उंचावीत असे. हा नियम राजांनाही लागू होता. राजप्रासादापेक्षाही राजांच्या आराध्यदेवतांची मंदिरे भव्योत्तुंग असत आणि त्यांचे शिल्पही प्रासादापेक्षा समृद्ध असे.

भारताच्या मंदिरसमूहातील शेकडो मंदिरे अशी आहेत, की ज्यांच्या उभारणीसाठी मध्ययुगीन काळातही कोटचवधी रुपये खर्ची पडले आहेत. अबूच्या पहाडावरील जैन मंदिरे, रामेश्वराचे-मंदिर, मदुरेचे मीनाक्षीमंदिर, वेरूळचे कैलास लेणे ही उभी करताना आणि त्यांच्या भोवतीचे मंडप व प्राकार विस्तारताना राजे आणि श्रीमंत भाविक यांनी धनाचा अक्षरशः वर्षाव केला असला पाहिजे. त्याचे संकलित मूल्यमापन करायचे झाल्यास खर्व-निखर्व अशाच संज्ञांचा आश्रय घेतला पाहिजे.

भारतात मंदिरसंस्थेचा हा जो प्रचंड व्याप मांडला गेला, त्यात सांप्रदायिक चढाओढही मोठ्या प्रमाणात आहे, असे दिसून येते. वैदिक, बौद्ध व जैन या संप्रदायांनी चढाओढ करून आपापल्या देवतांची मंदिरे उंच आणि विशाल केली आहेत. वेरूळ येथे या तीन्ही प्रकारची लेणी एकाच डोंगरात ओळीने कोरलेली असून, या चढाओढीत वैदिक पंथाचे मंदिर सर्वांगी वरचढ ठरल्याची ग्वाही तिथल्या जगविख्यात कैलास लेण्याने दिली आहे. ज्याला राजसत्तेचे पाठबळ मिळे, तो संप्रदाय क्वचित प्रसंगी इतरांची मंदिरे उद्ध्वस्त करी किंवा आपल्या संप्रदायाला अनुरूप असा त्यामध्ये फेरफार करी, अशीही तुरळक उदाहरणे आहेत. पण सामान्य दृष्टीने पाहिल्यास दुसऱ्याचे मंदिर न पाडता आपले मंदिर अधिक सुंदर आणि अधिक भव्यो-त्तुंग करण्याकडेच बहुतेक भारतीय संप्रदायांची प्रवृत्ती दिसून येते. या सात्त्विक चढाओढीत काही ठिकाणी जैन वा बौद्ध वरचढ ठरले, तर काही ठिकाणी वैदिक वरचढ ठरले.

मंदिराच्या रूपाने भारतीय शिल्पाला सर्वांगी बहर आला. त्यात वास्तुशिल्प आणि मूर्तिशिल्प या दोहोंचाही विकास झाला. अगस्त्य, कश्यप, मय, अग्निजित, इ. शिल्पशास्त्रज्ञ भारतात जन्माला आले. त्यांनी मंदिरशिल्पावर विविध ग्रंथांची रचना केली आणि त्यांतून अनेक शिल्पपरंपरा निर्माण झाल्या.

भव्यता, स्थिरता, प्रमाणबद्धता, सौंदर्य व मजबुती ही भार-तीय शिल्पकलेची पंचसूत्री आहे. भारतीय शिल्पकलेला दिखाऊ-पणा तर आहेच; पण टिकाऊपणा त्याहून अधिक आहे. कला-कारांच्या परिश्रम व चिकाटी या गुणांना तर तोडच नाही. आध्यात्मिकता हे भारतीय शिल्पकलेचे वैशिष्टच असून, खडक, विटा व दगड यांच्या माध्यमातून लोकांच्या धर्मभावनेला मूर्तरूप देणे, हा तिचा प्रधान उद्देश आहे.

इथल्या मंदिरशिल्पात उच्च सौंदर्यदृष्टी आहे; तशीच ऐश्वर्यपूर्ण सजावटही आहे. पंचवटी येथील काळचा रामाच्या मंदिरात दूरच्या महाद्वारातून, तसेच सभामंडपातल्या कोण-त्याही स्तंभाजवळून गाभाऱ्यातील मूर्तीचे व्यवस्थित दर्शन घडावे, असे रचनाचातुर्य त्याच्या निर्मात्यांनी दाखवले आहे. वर्षाच्या ठराविक दिवशी गाभाऱ्यातल्या मूर्तीवर उगवत्या व मावळत्या सूर्याचे किरण अचूक पडतील, अशी दिशासाधनाची हातोटी अनेक ठिकाणी प्रकट झाली आहे. मंदिरांचे किंवा खांबांचे दगड प्रतिबिंब उमटण्याइतके घोटीव व गुळगुळीत बन-



मल्लिकार्जुनमंदिर – श्रीशैलम

वण्यातली त्या कलाकारांची चिकाटी तर असामान्यच म्हटली पाहिजे. श्रीशैलावरील मल्लिकार्जुन मंदिराला लावलेली बारा फूट लांब, तीन फूट रुंद व अडीच फूट उंच अशी एकसंध दगडी

बहाले पाहिल्यावर ती वर चढविण्यासाठी साक्षात भीमच आला असावा, असे वाटते. काश्मीरमधील पट्टण, मार्तंड, इ. ठिकाणच्या प्राचीन मंदिरांतल्या दगडी तुळया तर याहूनही अवजड आहेत. ज्या पाथरवटांनी अशोकाच्या स्तंभासाठी चौदाशे मण वजनाचे एकसंध दगड खाणीतून काढून शेकडो मैलांवर वाहून नेले, तेही प्रतिभीमच म्हटले पाहिजेत. वेरूळच्या डोंगरातील काळा फत्तर फोडून त्यातून ९६ फूट उंचीचे भव्य, विशाल आणि सुंदर असे अखंड मंदिर कोरून काढणाऱ्या कलाकारांचा गौरव कोणत्या शब्दांनी करावा !

रामेश्वराच्या मंदिराचा सभामंडप एवढा अवाढव्य आहे, की त्यात एका वेळी पन्नास हजार माणसे सहज बसू शकतील.

पूर्वगोपुर – रामेश्वर

मदुरा, तिरुपती, कुंभकोणम, इ. ठिकाणची अतिभव्य मंदिरे पाहून इंग्रज लेखक आल्डुस् हक्सले बोलून गेला, की 'या भव्य मंदिरांच्यापुढे जगातील महदाश्चर्य म्हणून गाजलेला ताजमहालही कलेच्या दृष्टीने सामान्यच ठरेल !'

**देवालयांतील पुजारी**– देवालय हे व्यक्तिगत मालकीचे असो, एखाद्या संस्थेचे असो किंवा एखाद्या संप्रदायाचे असो; त्यातील देवतेची पूजा-अर्चा अखंड चालावी म्हणून एखाद्या पुजाऱ्याची नियुक्ती करणे भाग असते. देवस्थानात अनेक मूर्ती असतील किंवा भक्तजनांची तिथे दिवसभर गर्दी होत असेल, तर एकाहून अधिक पुजाऱ्यांचीही नेमणूक करावी लागते. अशा गरजेतूनच पुजारी, अभिषेकी, पंडचे, बडवे, गुरव, इ. वर्ग भारतातल्या प्रमुख देवस्थानांतून निर्माण झाले आहेत. पुष्कळ ठिकाणी हे पुजारीपण वंशपरंपरेने चालत आलेले दिसते. पुजारीपण हे अशा रीतीने वतन झाल्यामुळे समाजातील इतर अनेक वर्गातल्या दुर्गुणांप्रमाणे या पुजारीवर्गातही बरेच दुर्गुण शिरले आहेत. ते पूजा करीत असले, तरी पूजेविषयी त्यांना आस्था किंवा भक्ती कमीच असते. त्यांचे सर्व लक्ष असते, ते भक्ताकडून मिळणाऱ्या दक्षिणेवर आणि अन्य विविध मिळकतींवर ! त्यामुळे पुजारीपण ही सेवा न राहता तो एक धंदाच होऊन बसला आहे. 'नखाला माती लागू न देता देवाच्या नावावर षोडशोपचार भोगण्याचा धंदा' अशा शब्दांत गाडगेकार आत्रे यांनी या पुजारीपणाच्या वतनाचे वर्णन केले आहे. आणि एकदा एखाद्या गोष्टीला धंद्याचे स्वरूप आले, म्हणजे तिथे श्रद्धा, भक्ती, नीती यांना अवकाशच उरत नाही.

पुजारीपणाच्या धंद्यात विशेषसे शरीरश्रम न करता धनलाभ होतो, हे लक्षात येताच ब्राह्मणवर्गाच्या मागोमाग इतरही अनेक जातींचे लोक त्या धंद्यात शिरून हळूहळू देवस्थानांतले वतनदार बनले. शिवाच्या मंदिरांत गुरव, गोसावी, जंगम यांनी पुजारीपण मिळविले. वैष्णव मंदिरांत बैराग्यांनी तो अधिकार मिळवला. भुत्ये, आराधी, गोंधळी हे देवीच्या मंदिरांतले पुजारी व हक्कदार बनले. बहिरोबाच्या देवळातले पुजारीपणाचे वतन मराठी, कुणबी व माळी यांनी मिळवले. कुठे महानुभाव हे पुजारी बनले, तर कुठे महारांनीही तो अधिकार संपादला. आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही, की काही क्षेत्रांत व देवस्थानांत हिंदूंचे पूजे-अर्चेचे हे अधिकार मुसलमानांनीही हस्तगत केले आहेत.

एखाद्या ठिकाणच्या पुजारी कुटुंबाचा वंशवृक्ष वाढतो आणि त्या क्षेत्रात एकाच आडनावाची अनेक कुटुंबे पुजारी म्हणून वावरू लागतात. मग मुळातले एकट्याचे पुजारीपणाचे वतन तितक्या कुटुंबांत विभागले जाते. अशा स्थितीत पूजेच्या पाळ्या ठरवून घेणे भाग पडते. कित्येक ठिकाणी तर ५–१० वर्षांनंतर एखाद्याला पुजारीपणाची पाळी येते. काही वर्षांच्या अंतराने येणारी ही पाळी अर्थातच त्या कुटुंबाला धनलाभाची पर्वणी ठरते. मग या पर्वणीत अधिकाधिक धन मिळविण्यासाठी जे प्रकार चालतात, ते पुष्कळदा निंद्य व ओंगळवाणे असतात.

वतनाची अशी विभागणी झाल्यावर केवळ पुजारीपणावर उपजीविका चालवणे, अशा विभक्त कुटुंबांना शक्य होत नाही. त्यामुळे वतन संभाळण्याबरोबरच दुसरा कोणतातरी धंदा पत्करणे त्यांना क्रमप्राप्त होते. त्याचा परिणाम सांप्रत असा झाला आहे, की वेदाध्ययन केलेले आणि पूजे-अर्चेचे शास्त्रशुद्ध विधिविधान जाणणारे, तसेच यजमानांची धार्मिक कृत्ये यथाविधि चालवणारे पुजारी दिवसेंदिवस कमीकमी होत चालले आहेत. त्यामुळे पुजाऱ्यांची ही वतनदारी मंदिरसंस्थेला अत्यंत घातक ठरू पाहत आहे. महाराष्ट्रात गेल्या ३०–४० वर्षांत जी प्रवासवर्णने व यात्रावर्णने प्रसिद्ध झाली आहेत, त्यांत पुजाऱ्यांचे सौजन्य, संतुष्ट वृत्ती, सचोटी, टापटीप, पूजाविधीचे ज्ञान, शुद्ध

स्वच्छ मंत्रपाठ, इ. गोष्टींचा सहसा कोणी उल्लेख केलेला आढळत नाही; याउलट त्यांची लाचारी, कोडगेपणा, लवाडी, भक्तांचा व यजमानांचा छळवाद, स्वार्थीपणा, परस्परांतील भांडणे, इ. दुर्गुणांचीच उद्वेग उत्पन्न करणारी वर्णने सर्वत्र आढळतात. बहुतेकांनी या पुजारीवर्गाला 'अज्ञान व आळस यांचे चौकीदार' म्हणून निखंदिले आहे.

पुजारी मंडळीवर होणारी ही टीका वास्तव असली, तरी तेवढ्यानेच काम भागणार नाही. त्यांच्यांत सुधारणा होईल, असे काही विधायक प्रयत्नही केले पाहिजेत. देवालयसंस्था जिवंत ठेवायची असेल, तर पुजारीसंस्थाही जिवंत ठेवली पाहिजे. जाणते, पढीक, स्वच्छ व टापटीपीचे पुजारी निर्माण करण्यासाठी विशिष्ट शिक्षणक्रम तयार करावा लागेल. तो पूर्ण केल्यावाचून कोणालाही देवस्थानातील पूजेचा अधिकार प्राप्त होणार नाही, असा शक्य तर कायदाही करावा लागेल. एकदा पुजारी नेमल्यानंतर त्याची निर्वाहाची व्यवस्था अविच्छिन्न होत राहील, अशीही त्याबरोबरच खबरदारी घ्यावी लागेल. पुजारीपण वंशपरंपरेने चालू ठेवणेही बंद करणे भाग पडेल. पुजाऱ्याला सन्मानपूर्वक जीवन चालविता येईल, अशी दक्षता घेतली गेल्यास पुजाऱ्यांच्या ठिकाणी दक्षता, नेटकेपणा, कार्यक्षमता, इ. गुण वाढीस लागतात, असे काही ठिकाणचे अनुभव आहेत.

**देवालयांची श्रीमंती** – भारतात जी लक्षावधी देवालये आहेत, त्यांचा योगक्षेम समाजातल्या धार्मिक व श्रद्धावंत लोकांनी समर्पिलेल्या दानद्रव्यादी गोष्टींवर चालत असतो. याशिवाय नवसफेडीच्या स्वरूपातही देवालयांना विविध वस्तू आणि सोनेनाणे यांचा लाभ होत असतो. ज्या मानाने आकांक्षा मोठी किंवा संकट दुर्धर, त्या मानाने नवसाची देणगीही मोठी असते. नवसफेडीचे असे दाखले इतिहासातही अनेक आढळतात.

पुष्कळदा आपली दानशूर म्हणून प्रसिद्धी व्हावी, या हेतूनेही कित्येक श्रीमंत लोक देवालयांसाठी द्रव्य खर्च करतात. कोणी देवस्थानात आपल्या नावाने घंटा टांगतो, कोणी पालखी ठेवतो, कोणी दीपमाळ बांधतो, कोणी विशिष्ट उत्सवासाठी निधी ठेवतो, कोणी सभामंडप बांधतो, तर कोणी अन्य काही देतो. या दातृत्वामागे लौकिकाची हाव असली, तरी त्यात पुण्यसंपादनाचाही हेतू असतो. देवी अहल्याबाई होळकर यांनी अनेक मंदिरांचे जीर्णोद्धार केले, नवी मंदिरे निर्माण केली, मंदिरांच्या जवळ धर्मशाळा बांधल्या आणि भाविकांसाठी व यात्रिकांसाठी अनेक सुखसोयी केल्या, असे सर्वत्र आढळते. या अपार दानकर्माच्या मागे त्यांच्या अंतरातला पुण्यसंपादनाचाच सात्त्विक भाग जागृत होता, यात शंका नाही.

भक्त–भाविकांना व श्रीमंतांना या पुण्यसंपादनाच्या कामी पुराणांनी खूप प्रेरणा दिली आहे. ज्या दिवशी देऊळ बांधण्याचा विचार मनामधे येतो, त्या दिवशीच त्या माणसाची पंचमहापातके भस्म होतात, असे नरसिंह पुराण सांगते. देऊळ बांधण्यासाठी जो भूमिदान करतो, त्याला स्वर्ग मिळतो, असे विष्णू पुराण म्हणते. शिवमंदिराला शेतजमीन देणारा अनेक युगे रुद्रलोकात सुख भोगतो, असे शिवधर्मात सांगितले असून, विष्णुमंदिराला भूमिदान करणाऱ्या व्यक्तीला सात जन्म समृद्ध ऐश्वर्य लाभते, असे विष्णू पुराणाने म्हटले आहे.

पुण्यसंपादनाबरोबरच पापक्षालन हाही हेतू काही वेळा देवालयांना देणग्या देण्याच्या मुळाशी असतो. व्यापारउदीम करीत असताना ज्या अनेक सूक्तासूक्त गोष्टी कराव्या लागतात, त्यांबद्दल काहींच्या मनात पापाची टोचणी लागून राहते. ती दूर करण्याच्या हेतूने मग अशी माणसे जो दानधर्म करतात, त्यात देवालयांना देणग्या देणे हाही एक भाग असतो.

आपली राऊळे–देऊळे उद्ध्वस्त करणाऱ्या विधर्मी शत्रूला पराभूत केल्यावर त्या विजयाच्या आनंदात अनेक पराक्रमी राजांनी आणि त्यांच्या शूर सेनापतींनी भारतात कित्येक मंदिरे उभारली आणि गावेच्या गावे त्या मंदिरांच्या व्यवस्थेसाठी लावून देऊन त्यांच्या योगक्षेमाची सोय केली, अशीही उदाहरणे आहेत. बाराव्या शतकात अजमेरच्या अरुण देवरायाने मुसलमानांना पराजित करून भूमीच्या शुद्धीसाठी मोठा यज्ञ केला व तिथे एक प्रचंड मंदिर बांधले. मुसलमानांनी भ्रष्ट करून मशिदी बनवलेल्या मंदिरांच्या जागी जसवंतसिंह व बख्तसिंह या मारवाडच्या राजांनी पुनश्च त्याहून भव्य मंदिरे उभारली. विजयनगरचा सम्राट कृष्णदेवराय याने यावनी आक्रमणात भग्न झालेल्या दक्षिणेतील शेकडो मंदिरांचा जीर्णोद्धार केला.



सोमनाथाचे नवे मंदिर – सौराष्ट्र

आणखीही अशी कित्येक उदाहरणे सांगता येतील. अगदी ताजे उदाहरण म्हणजे सोमनाथाच्या जीर्णोद्धाराचे भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर थोड्याच काळात सरदार पटेलांच्या प्रेरणेने

सौराष्ट्रातील सोमनाथाची पुनःप्रतिष्ठा झाली आणि त्याचे भव्य आणि कलापूर्ण मंदिर नव्याने उभारले गेले.

अशा प्रकारे पुण्यसंचय, नवसाची फेड, कीर्तीची हौस, पापक्षालन आणि विजयोत्साह अशा विविध उद्देशांनी आजवर मंदिरांची उभारणी, त्यांचा जीर्णोद्धार व त्यांना उपयुक्त अशा वस्तूंचे समर्पण सतत होत राहिले आहे. बद्रिनारायण, काशी, डाकोर, पालिताणा, गिरनार, नाथद्वारा, तिरुपती, मदुरा, रामेश्वर, इ. ठिकाणची देवालये खूप श्रीमंत आहेत. नाथद्वारा येथील देवस्थानाचे वार्षिक उत्पन्न सुमारे वीस लक्षांच्या घरात आहे. बद्रिनारायणाच्या स्वामित्वाची गावे सुमारे साडेतीनशे आहेत. त्या देवापुढेही प्रतिवर्षी दीड ते दोन लाख रुपये जमतात. तिरुपतिमंदिराची एकूण मालमत्ता साडेनऊ कोटींच्या घरात आहे. शिखांचे कित्येक गुरुद्वारेही असेच समृद्ध आहेत.

**देवालयांची दुरवस्था** – पुण्यसंपादनाच्या हव्यासातून भारतात देवालयांची अशी भरमसाट वाढ झाली; पण सर्वत्र त्यांची देखभाल मात्र होऊ शकली नाही. त्यामुळे बहुतेक देवालयांना उपेक्षामूलक अवकळा प्राप्त झाली आहे. खेड्यांतल्या देवळांची दुर्दशा तर विचारूच नये. प्रथमतः खटकणारी गोष्ट म्हणजे मंदिरे व त्यांचा परिसर यांतली अस्वच्छता. मंदिरांवरची कौले फुटली आहेत, पाख्यांवर पालापाचोळा साठला आहे, नको त्या ठिकाणी गवत उगवले आहे, वडा–पिंपळाच्या मुळांनी भिंती ढासळण्याच्या मार्गाला लागल्या आहेत, असेच दृश्य बहुतेक खेडेगावांत आढळते. कित्येक देवालयांना दारेही नसतात. त्यामुळे रात्रीच्या वेळी कुत्री आणि गाढवे खुशाल त्यात शिरून बसतात. प्रदक्षिणेच्या मार्गात पाकोळ्या व कबुतरे यांनी वसती केलेली असते. गाभाऱ्यात एक प्रकारचा कुबट वास भरून राहिलेला असतो. ही स्थिती केवळ आजकालचीच नव्हे; तर शतकानुशतकांची आहे.

आपल्या मंदिरांची व ख्रिस्ती, मुसलमान, पारशी, इत्यादींच्या मंदिरांची या बाबतीत तुलना केल्यास आपले चित्र रंग उडून गेल्यासारखे भकास व ओंगळवाणे वाटेल. चर्चे, मशिदी व अग्यारी यांची उभारणी सामुदायिक उपासनेच्या कल्पनेवर झालेली असते. त्यांच्या वरचे स्वामित्व हे व्यवहारतः समाजातल्या सर्वांचे स्वामित्व असते. तिथे चालणाऱ्या प्रार्थनाही सामुदायिक असतात. त्यामुळे ख्रिस्त्यांना व मुसलमानांना आपल्या मंदिरांविषयी जसा आपलेपणा वाटतो, तसा तो हिंदू गावकऱ्यांना आपल्या देवळाविषयी कधीच वाटत नाही. चर्चे व मशिदी ही त्या त्या धर्मांच्या लोकांच्या सार्वजनिक जीवनाचे नियंत्रण व मार्गदर्शन करणारी प्रमुख केंद्रे असतात. त्यांच्या धर्माभिमानालाही त्याच ठिकाणी खतपाणी घातले जाते. त्यात जी सार्वजनिक प्रार्थना–प्रवचन चालतात, त्यांतूनच त्यांच्या ठिकाणची सामाजिक एकात्मता दृढ होते, वाढीस लागते. या सामाजिक ऐक्याच्या बळावरच भारतातील ते दोन्ही समाज अनेक मार्गांनी हिंदू समाजाला पोखरण्याचा अव्याहत प्रयत्न करीत असतात. त्यांच्या धार्मिक चळवळींची आखणी व कार्यवाही त्यांच्या मंदिरांच्या अंतःस्थ गोटातूनच होत असते.

हिंदूंची स्थिती याच्या उलट आहे. आपली देवालये आपल्या धर्मशिक्षणाची व धार्मिक अभिमानाची केंद्रे कधीच झाली नाहीत. आपल्या देवालयांच्या योगक्षेमाचा, व्यवस्थेचा व रक्षणाचा अंशतः तरी भाग आपणांवर आहे, अशी जाणीवही हिंदूंच्या व्यवहारात अपवादात्मकच आढळेल. यामुळेच आपल्या देवालयसंस्थेतला प्रभाव गेला आहे आणि तेज ओसरले आहे. ही स्थिती बदलायला हवी असेल आणि आपल्या देवालयांना संस्कारकेंद्र हे स्वरूप प्राप्त व्हायला हवे असेल, तर प्रथम देवालयसंस्थेतले सर्व दोष कठोरपणे दूर करायला हवे. स्वाभिमानाने भारलेला आणि धार्मिक कर्तव्यांना बद्धपरिकर झालेला असा अधिकारी, पूजक व सेवक यांचा वर्ग देवस्थानात दाखल झाल्यावाचून आपल्या देवालयसंस्थेला ऊर्जितावस्था येणार नाही आणि तिच्या हातून हिंदूंची धर्मभावना जागृत आणि संघटित करण्याचे कार्यही कधी होणार नाही.

**देवालयांची सुधारणा**–देवालयांची सुधारणा व्हायची असेल, तर त्यासाठी निष्ठावंत आणि कर्तव्यदक्ष असे नियंत्रक प्रथम लाभायला हवे. त्यांनी पहिली गोष्ट कोणती करायची असेल, तर देवालयांची अंतर्बाह्य स्वच्छता. पावित्र्याचा उगम स्वच्छतेच्या पोटीच असतो, हे लक्षात ठेवायला हवे.

त्याचप्रमाणे एकाच देवळात अनेक मूर्ती असणे, हेही शक्य तोवर टाळले पाहिजे. मोठ्या मंदिरांच्या अनुषंगाने अनेक लहान लहान मूर्तींची स्थापना केल्याने त्यांची रया राहत नाही. त्या घाऊक प्रमाणावर बसवलेल्या देवमूर्ती केविलवाण्या दिसतात. त्या पाहताना हे देवालय नसून देवमूर्तींचे संग्रहालय आहे की काय, असे वाटू लागते. द. भारतात हा प्रकार मोठ्या प्रमाणावर आढळतो. देवालयात अन्य मूर्ती बसवायच्याच तर त्या मुख्य देवतेशी संबंधित असतील अशा ठळक, सुंदर व मोजक्याच असाव्या. रामाचे मंदिर असेल, तर रामपंचायतन मांडले जावे. शिवमंदिरात पार्वती, गजानन, षडानन व नंदी यांच्याच मूर्ती असाव्या. विठोबाच्या मंदिरात राही, रखुमाई आणि गरुड यांची स्थापना करावी. हाच विवेक अन्यही देवतांच्या बाबतीत ठेवला जावा. पंढरपूर, नासिक, त्र्यंबकेश्वर, काशी, प्रयाग, इ. क्षेत्रांच्या ठिकाणी शेकडो मूर्तींच्या समोर शेकडो पुजारी

पसरलेले असतात. ते यात्रेकरूंपुढे दक्षिणेसाठी सदैव हात पसरतात. प्रसंगी भोळ्या-भावडया यात्रेकरूंवर दक्षिणा देण्याची सक्तीही करतात. मंदिरातली व त्याच्या परिसरातील मूर्तींची संख्या कमी केल्याने यात्रेकरूंवरची ही आपत्ती आपोआप टळेल. त्याबरोबर देवालयाच्या प्रवेशद्वारात जे असंख्य भिकारी ठाण मांडून यात्रेकरूंपुढे गयावया करतात आणि त्यांच्याशी किळसवाणी लगटही करतात, त्या गोष्टींचाही बंदोबस्त झाला पाहिजे. दान हे पुण्यप्रद असते आणि त्यातून दीन-दुबळचांना व अनाथ-अपंगांना दिलेले दान हे विशेष पुण्यप्रद ठरते, ही गोष्ट खरी; पण देवालयाचा परिसर ही त्या दान-धर्माची जागा नसावी.

मंदिराच्या वातावरणात गांभीर्य, पावित्र्य व सौंदर्य या तीन्ही गोष्टींचा अनुभव आला पाहिजे. त्या दृष्टीने त्याच्या परिसरात एखादी सुंदर पुष्पवाटिका असावी. सभोवती छायावृक्ष असावे. मंदिरात लावण्यात येणारी चित्रे ही त्या देवाच्या चरित्रातील प्रसंगांची असावी: रामाच्या देवळात रामायणातील प्रसंग व कृष्णाच्या देवळात महाभारतातील घटना यांचे जर कलापूर्ण



लक्ष्मीनारायणमंदिर – दिल्ली

चित्रण झाले, तर ते दर्शकांचा भक्तिभाव वाढवण्यास पोषक ठरेल. या दृष्टीने दिल्ली येथील श्रीमान बिडला शेठजी यांनी निर्माण केलेले लक्ष्मी-नारायणमंदिर आदर्श ठरण्याजोगे आहे.

देवालयात दर्शनासाठी जाताना दर्शकांनीही काही नियम अवश्यमेव पाळायला हवे. देवदर्शनासाठी केव्हाही जाण्यास प्रत्यवाय नाही; पण सकाळ व सायंकाळ या दोन वेळा त्यासाठी अनुकूल असतात. मंदिरात जाताना स्नान करून जावे, हे उत्तम; पण निदान हात, पाय, तोंड, स्वच्छ धुवून देवळात जावे. त्यामुळे शरीराचा व मनाचा शिणवठा दूर होऊन देवदर्शनाला आवश्यक असलेली प्रसन्नता प्राप्त होईल. दर्शनासाठी जाताना रिक्त हस्ताने कधी जाऊ नये. देवापुढे जे अर्पण करायचे, ते विनीत होऊन भक्तिपूर्वक अर्पण करावे. प्रत्यक्ष दर्शन घेताना आपल्या मागे कोणी उभे असतील, तर त्यांच्या दर्शनास आडकाठी उत्पन्न होईल, अशा रीतीने कोणी उभे राहू नये. साष्टांग नमस्कार घालताना मागच्या माणसांना पदस्पर्श होणार नाही व इतरांच्या प्रदक्षिणेत व्यत्यय येणार नाही, अशीही दक्षता घ्यावी. देवालयात जाण्यासाठी घरून निघाल्यापासून कौटुंबिक व अन्य विषय मनातून काढून टाकावे. आपल्या आराध्य देवतेचे स्मरण करीतच देवालयात जावे. आत गेल्यावर बरोबरच्या माणसांशी गप्पा टप्पा करू नयेत. अशा प्रकारे आपण आपल्या देवदर्शनाला शिस्त लावल्यास मनावर चांगले संस्कार होतील व ते जीवनाच्या सर्व व्यवहारांत उपयुक्त ठरतील.

**मंदिरप्रवेश** – भारतातील कोणत्याही सार्वजनिक मंदिरात सर्व सवर्ण हिंदूंना प्रवेश करण्याची व आत जाऊन देवदर्शन करण्याची मोकळीक आहे. पण हा अधिकार अस्पृश्य गणल्या गेलेल्या जातींना मात्र नाकारला गेला होता. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आता हा मज्जाव दूर झाला आहे. सार्वजनिक देवालयात अस्पृश्यांना प्रवेश दिला गेला पाहिजे, असा भारतीय संघराज्याने कायदाच करून टाकला आहे. हा कायदा करण्याजोगी परिस्थिती उत्पन्न होण्यास म. फुले, लो. टिळक, म. गांधी, स्वातंत्र्यवीर सावरकर, डॉ. आंबेडकर, साने गुरुजी, इ. अनेक थोर पुरुषांचे प्रयत्न कारणीभूत ठरले आहेत. 'अस्पृश्यता जर देवाला मान्य असेल, तर मी त्याला देव मानायलाच तयार नाही,' असे लोकमान्यांनी परखडपणे म्हटले आहे. अस्पृश्यता निवारणाच्या बाबतीत म. गांधींनी तर देशव्यापी आंदोलन उभारले. अस्पृश्यांना मंदिरप्रवेश मिळावा म्हणून त्यांनी देशभर झंझावाती दौरा केला. स्वा. सावरकरांनी रत्नागिरीस असताना श्रीमंत भागोजी कीर यांच्या हस्ते पतितपावन मंदिर बांधले व ते अस्पृश्यांनाही खुले केले. त्या समारंभप्रसंगी भाषण करताना ते म्हणाले. 'इथे अखिल हिंदू जाती, वर्णपंथनिर्विशेषपणे देवपूजा करील आणि सांघिक प्रार्थना करील. इथे पूर्वास्पृश्यांसुद्धा सर्व हिंदू जातीस पूजा-प्रार्थना-प्रवेशाचा समसमान अधिकार राहील.'

त्या काळातच मंदिरप्रवेशाच्या बाबतीत समाजानेही संघटित चळवळी केल्या. त्या सर्व चळवळींचे नेतृत्व डॉ. आंबेडकर यांनी केले. अस्पृश्यांच्या या सर्व चळवळीत देवपूजा करण्याचा

अधिकार मिळविणे हाच केवळ हेतू नव्हता; तर अस्पृश्यांच्या प्रवेशाने देवालय भ्रष्ट होत नाही व मूर्तीचे पावित्र्यही नष्ट होत नाही, हे तत्त्व प्रस्थापित करण्याचा हेतू होता. पण ती गोष्ट झटपट घडून येण्याजोगी परिस्थिती देशात नव्हती. त्यामुळे अस्पृश्यांतल्या क्रांतिवादी मंडळीत एक नवाच विचारप्रवाह उत्पन्न झाला. आपण हिंदू असलो, तरी हिंदूपासून फुटून निघावे, त्यांच्यापासून दूर जावे असे त्या क्रांतिवादी मंडळींना वाटू लागले. तसा ते प्रचारही करू लागले. 'चातुर्वर्ण्याची रूढी यापुढेही चालूच राहणार असेल, तर मंदिर-प्रवेशात मला मुळीच राम वाटत नाही,' असे डॉ. आंबेडकरही म्हणू लागले. इ. स. १९२४ ते १९३६ या बारा वर्षांच्या कालखंडात अस्पृश्यांच्या चळवळीचे स्वरूप मंदिर-प्रवेशाच्या न्याय्य मागणीपासून हिंदू मंदिरांवर संपूर्ण बहिष्कार घालण्यापर्यंत बदलत गेले.

अस्पृश्यांच्या आंदोलनाचे हे कडवे आणि उग्र रूप दिसून आल्यावर भारतात अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशाला जोराची चालना मिळाली. त्रिवांकूर संस्थानाच्या अधिपतींनी आपल्या राज्यातली १६०० मंदिरे अस्पृश्यांना खुली केली. त्यापाठोपाठ म्हैसूरच्या महाराजांनीही आपल्या संस्थानातल्या दसरा महोत्सवात सर्व अस्पृश्यांना भाग घेण्याची मोकळीक दिली. इतरही अनेक ठिकाणच्या लोकांना जाग येऊन भारतात अस्पृश्यांसाठी अनेक मोठमोठी मंदिरे धडाधडा उघडली जाऊ लागली. वारकरी-संप्रदाय हा महाराष्ट्रातला एक महान भक्तिसंप्रदाय आहे. या संप्रदायात अस्पृश्यही आहेत. त्या संप्रदायाचे आराध्य दैवत म्हणजे पंढरपूरचा श्रीविठ्ठल होय. पण अस्पृश्यांना मात्र त्याच्या मंदिरात प्रवेश नव्हता. तो मिळावा म्हणून श्री. साने गुरुजींना इ. स. १९४७ साली आमरण उपोषणाचा मार्ग पत्करावा लागला. त्यांच्या या प्रायोपवेशनाला यश मिळून पंढरपूर येथील विठ्ठलमंदिरही अस्पृश्यांना खुले झाले. सांप्रत भारतीय संघराज्याने अस्पृश्यता पाळणे, हीच गोष्ट मुळी दंडनीय ठरवली आहे. त्यामुळे आता सात कोटी पूर्वास्पृश्यांना सवर्ण हिंदूंच्या बरोबरीने देवालयांत प्रवेश करण्याचाच नव्हे, तर सर्वच क्षेत्रांत समानत्वाने वागण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे.

**देवालयभंजनाचा इतिहास** – भारतात ज्या प्रमाणात मंदिरांची अफाट वाढ झाली, त्याच प्रमाणात त्यांचा विध्वंसही झालेला आहे. आपण कुठेही गेलो, तरी या इतिहासाची साक्ष आपल्याला पटते. प्रथम बौद्ध, नंतर मुसलमान आणि त्यानंतर ख्रिस्ती या लोकांनी हा मंदिरविध्वंसाचा पराक्रम केलेला आहे. या तिहींपैकी बौद्धांनी केलेल्या विध्वंसाच्या खुणा तुरळक व पुसट आहेत. प्रारंभी या देशात एकूण मंदिरेच थोडी होती. त्यामुळे त्यांच्या भंजनालाही कमी अवसर होता. पण जिथे जिथे बौद्धांचा वरचष्मा होता, तिथे तिथे त्यांनी वैदिकांच्या मंदिरांना उपद्रव दिला, असे इतिहास सांगतो. बद्रिनारायणाच्या प्राचीन मूर्ती बौद्धांनी तिथल्या नारदकुंडात फेकून दिल्या होत्या. पुढे आद्य शंकराचार्यांनी त्या मूर्ती तिथून वर काढून त्यांची पुन:प्रतिष्ठा केली. कुशाण कालात वैदिकांनी उभारलेली मंदिरे बौद्धांनी नष्ट केली, असे अनुमान भारतीय मूर्तिकला या ग्रंथात रामकृष्णदासांनी केले आहे. पण कालांतराने भारतात बौद्धांची पिछेहाट झाली आणि हा मंदिरविध्वंसाचा प्रकारही थांबला. त्या कटु-स्मृतीही हळूहळू नष्ट झाल्या.

पण मंदिरविध्वंसाची ही प्रक्रिया इथेच थांबली नाही. खैबर खिंडीतून भारतात घुसलेल्या मुसलमानांनी भारतात आल्यावर हिंदूंच्या असंख्य मंदिरांचा उच्छेद आरंभला व त्यांतल्या मूर्तीही छिन्नभिन्न करून टाकल्या. विधर्मियांनी केलेल्या मंदिर-विध्वंसाचा हा इतिहास महंमद कासीमपासून सुरू होतो. त्याने सिंधमधील दावल गावच्या देवालयावर आक्रमण करून त्याचा विध्वंस केला आणि देवालयातल्या ब्राह्मणांची सरसहा कत्तल केली (मु. रियासत– भाग १, पृ. ५९-६०). पुढे इ. स. च्या ११ व्या शतकात याच इतिहासाची पुनरावृत्ती झाली. सौराष्ट्रातील सोमनाथाच्या मंदिरात अगणित संपत्ती आहे ही बातमी गजनीच्या महंमुदाला मिळाली आणि तो आपले कडवे विध्वंसक सैन्य घेऊन सोमनाथावर चालून आला. प्रतिकारासाठी जे पुढे आले त्यांना कंठस्नान घालीत तो सोमनाथाच्या मंदिरात घुसला. घण घालून त्याने त्या ज्योतिर्लिंगाचे चूर्ण केले. त्याचा गाभाराही फोडला. देवालयाच्या तळघरात जी त्याला अमाप संपदा मिळाली, ती लुटून त्याने आपल्या मायदेशी नेली. असे एकदा नव्हे, दोनदा नव्हे, अनेकदा घडले. मुलतान येथील देवालयही याच महंमुदाने पाडले आणि तिथल्या सुवर्णमूर्ती उचलून नेल्या. द्वारकेतली मंदिरे महंमूद बेगडा या आततायाने उच्छेदिले. १४ व्या शतकाच्या सुरुवातीस मलिक काफूर या अलाउद्दीन खिलजीच्या सेनापतीने उभ्या दक्षिणेत कहर उडवून तिथली मोठमोठी देवालये पार उद्ध्वस्त केली. त्या जागी त्याने मशीदीही बांधून काढल्या. त्याने रामेश्वर व मदुरा येथील मंदिरांची जी लुटालूट केली, तिचे वर्णन मनाला व्यथित करणारे आहे. इ. स. च्या १५ व्या शतकाच्या अखेरीस अलाव महंमदशहाने विजयनगर येथील भव्योत्तुंग मंदिरांचा विध्वंस करून तिथली अगणित संपत्ती लुटून नेली. इ. स. च्या १७ व्या शतकात औरंगजेबाने काशीतले विश्वेश्वराचे मंदिर जमीनदोस्त करून तिथे मशीद उभारली आणि मथुरेवर स्वारी करून तिथले केशवाचे भव्य मंदिर पाडले व तिथल्या मूर्ती

आऱ्यास नेऊन मशिदीच्या पायऱ्यांखाली पुरून टाकल्या. सोमनाथमंदिरही त्याच्या तडाख्यातून वाचले नाही. महंमुदाच्या आक्रमणानंतर हिंदूंनी पुनश्च उभे केलेले सोमनाथाचे मंदिर औरंगजेबाने धुळीस मिळवले आणि त्या कृत्यात कृतार्थता मानली १८ व्या शतकात अहमद अबदालीची मथुरेवर संक्रांत वळली. त्याने तिथली अनेक देवालये फोडली, लुटली आणि तिथल्या देवांना गायीच्या रक्ताने स्नान घातले.

मुसलमानांप्रमाणेच भारताच्या पश्चिम किनाऱ्यांवर उतरलेल्या पाश्चात्य ख्रिस्ती लोकांनीही इथल्या देवालयाच्या विध्वंसाचे कार्य एक धर्मकृत्य म्हणून पार पाडले. कोकणपट्टी, गोमंतक व केरळ या भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर मूर्तींचा व देवालयांचा विध्वंस करूनच त्यांनी आपला धर्म श्रेष्ठ असल्याची शेखी मिरवली. या मंदिरविध्वंसाच्या सत्रात पोर्तुगीजांचा क्रमांक वरचा लागतो. १६ व १७ या दोन शतकांत त्यांनी गोमंतकात कहर करून सोडला. त्यांच्यांत जे अनेक पंथ होते, त्यांतल्या जेसुईट पंथाचे लोक हिंदू धर्माच्या उच्छेदनात अत्यंत कडवे व निर्दय होते. गोवा बेट, सासष्टी व बारदेस या तीन तालुक्यांतली सर्व देवालये त्यांनी नष्ट केली आणि त्यांचे उत्पन्नही हिरावून घेतले. रायतूरचा किल्लेदार असलेल्या रुद्रीगिश या एका फिरंग्याने एका रात्रीत सासष्टीतील २८० देवळे पाडली, असे फिरंग्यांच्याच इतिहासात नमूद आहे.

मूर्तिभंजक विधर्मियांनी केलेल्या या आक्रमणाच्या आणि विध्वंसाच्या खुणा आजही भारतात जागोजाग दृष्टीस पडतात. कित्येक ठिकाणी तर मोडून तोडून भग्न केलेल्या शेकडो, हजारो मूर्तींचा खच पडलेला दिसतो. सांप्रत ठिकठिकाणी स्थापन झालेल्या संग्रहालयांत त्यांपैकी बरेच भग्नावशेष जतन करून ठेवलेले आहेत. संग्रहालयांतल्या त्या फुटक्या–तुटक्या बहुतांश मूर्तींवर विधर्मी मूर्तिभंजकांचा घण बसलेला आहे, असे म्हटले तरी चालेल.

उत्तर भारतातील प्रमुख प्रमुख मंदिरांना विधर्मियांचा असा उपद्रव वारंवार होत राहिल्यामुळे तिथल्या पुजाऱ्यांवर आणि व्यवस्थापकांवर मंदिरातल्या मूर्ती कधी विहिरीत, कधी कूपात, तर कधी तळघरात लपवण्याचा प्रसंग ओढवलेला आहे. काशीच्या विश्वेश्वराचे लिंग पुजाऱ्यांनी तिथल्या ज्ञानवापीत दडवलेले होते. सोमनाथाचे एका वेळेचे लिंग सौराष्ट्रातून महाराष्ट्रात आणून शिंगणापूरच्या शिखरावर स्थापण्यात आले होते. बारा ज्योतिर्लिंगांपैकी एकटचा सोमनाथालाच नव्हे, विश्वेश्वरालाच नव्हे, तर उज्जयिनीचा महांकाळ, मांधाता येथील ओंकार, औंढ्याचा नागेश या मंदिरांना आणि त्यांतल्या शिवलिंगांनाही अशाच दाहक दिव्यांतून जावे लागले आहे.

दक्षिणेत विजयनगरचे साम्राज्य स्थापन झाले नसते आणि महाराष्ट्रात शिवाजी महाराजांनी हिंदवी स्वराज्याची स्थापना केली नसती, तर भारतात सांप्रत हिंदूंची जी मोठमोठी देवालये उभी दिसतात, ती दिसली नसती. भूषण कवी तर त्याहूनही पुढे जाऊन म्हणतो –

काशी की कला जाती, मथुरा मसीत होती ।
सिवाजी न होते तो सुनति होत सबकी ।।

शिवछत्रपतींच्या काळात होऊन गेलेल्या हिंदी कवीने तत्कालीन परिस्थितीचे 'चक्षुर्वै सत्यम्' दर्शन घेऊन वरील दोहा लिहून ठेवला आहे. शिवाजी महाराजांची ही अपूर्व पुण्याई प्रत्येक हिंदूने स्मरणात जपून ठेवायला हवी ! [म. ज्ञा. को.; हिं. शि.; एन्सा. रि. ए.; हि. क. इं. पी. ५.; डे. रि. सा. इं.; ऑ. इं. ओ. कॉ.; हेमाद्रि याचे चरित्र – श्री. के. आ. पाध्ये, १९३१; मंदिरांची कथा आणि व्यथा – श्री. ना. ह. पालकर]

**देविका** एक प्राचीन नदी. ही हिमालयात उगम पावते. हिची रुंदी अर्ध योजन व लांबी पाच योजने असल्याचे म्हटले आहे (म. भा. सभा. ८२. १०७). अष्टाध्यायी (७.३. १), योगिनी तंत्र (२.५.१३९), कालिका पुराण (२४.१३७) या ग्रंथांतही हिचा उल्लेख आहे. या नदीत स्नान केल्याने यज्ञफल मिळते, असे महाभारतात सांगितले आहे (वन. ८२. १०३). देविका नदी म्हणजे अर्वाचीन देग नदी होय असे डॉ. वासुदेवशरण अग्रवाल म्हणतात. ही नदी जम्मूच्या पहाडात उगम पावते आणि सियालकोट, शेखपुरा या जिल्ह्यांतून वाहत येऊन रावी नदीला मिळते. उत्तर प्रदेशात शरयू नदीच्या दक्षिणेकडील प्रवाहालाही देवा किंवा देविका असे नाव आहे. [हि. व.; प. का. भा.; हि. जॉ. ए. इं.]

**देवी** सामान्यतः देवी शब्दाचा अर्थ स्त्रीदेवता किंवा देवपत्नी असा होतो. पण विशेषतः शिवपत्नी पार्वती हिलाच देवी हे नामाभिधान लावतात. सर्व देवांच्या ठिकाणी असलेल्या शक्तींचे दैवतीकरण होऊन त्या शक्तिरूप मूर्तीला देवी असे नाव मिळाले आणि शाक्तसंप्रदायी लोकांनी तिला सर्वश्रेष्ठ देवता, आदिमाया किंवा जगदंबा म्हणून गौरविले. महाभारतात देवीची अनेक निरनिराळी नामरूपे उल्लेखिली आहेत (म. भा. भीष्म. २३. ४–१६). पुढे पुराणकालात देवीची प्रतिष्ठा खूप वाढली, असे दिसते.

देवीची उग्र व सौम्य अशी दोन रूपे पाहायला मिळतात. उमा, गौरी, पार्वती, जगदंबा, भवानी ही देवीच्या सौम्य रूपांची नावे असून दुर्गा, काली, चंडी, भैरवी, चामुंडा ही देवीची उग्र

रूपे होत. देवीच्या उग्र रूपांना घाबरून भक्त–भाविक तिला पशुबली अर्पण करतात. शाक्त लोक तिची तांत्रिक पद्धतीने आराधना करतात. भद्रकाली, चामुंडा, महामारी, रक्तदंतिका, इ. तिची काही रूपे तर अत्युग्र व महारौद्र आहेत.

दुर्गेच्या स्वरूपात ती महिषमर्दिनी आणि सिंहारूढ आहे. कालीच्या स्वरूपात ती काळी, हिडीस, रक्तरंजित, सर्पवेष्टित, मुंडमालाधारिणी व चर्मवस्त्रा आहे. महामाया या स्वरूपात ती मनुष्यांना मोहजालात गुरफटविणारी आहे. विंध्यवासिनी या स्वरूपात ती पशुबली व प्रसंगी नरबली मागणारी आहे. जगदंबा या स्वरूपात तिचे स्तन पुष्ट असतात आणि काहीं वेळा तिने एखादे बालक स्तनाशी घेतलेले असते.



जगदंबा

देवी ही द्विभुजा, चतुर्भुजा, षड्भुजा, अष्टभुजा, दशभुजा, अष्टादशभुजा व क्वचित अष्टोत्तरशतभुजा असते. या सर्व हातांत तिने कोणते ना कोणते तरी शस्त्र धारण केलेले असते. तिचे काही हात अभय, वरद, इ. मुद्राही दाखवतात.

देवी ही ब्रह्मरूपच आहे. चराचर सृष्टी तिच्यापासून उत्पन्न होते. सर्व विश्वाची ती शास्ती आहे. यज्ञात तिला हविर्भाग ग्रहण करण्याचा अधिकार आहे. ती बाह्यतः अग्नीसारखी तेजस्विनी असून, अंतरी ज्ञानतेजाने झळाळणारी आहे. आधिदैविक रूपात असुरांचा व आध्यात्मिक रूपात अज्ञानरूपी अंधकाराचा ती नाश करते. वेद तिचे स्तवन करतात व तिला गायत्री म्हणून गौरवितात. दक्षकन्या या नात्याने तिने अनेक देवतांना जन्म दिला आहे. ब्रह्मा, विष्णू व शिव यांच्या मागची प्रेरक शिवशक्ती म्हणजे देवीच होय.

ती पाशांकुश व धनुष्यबाण धारण करते. ती त्रिनेत्र व रक्तवसना आहे. अज्ञेय व अनंत आहे. एक असूनही अनेक आहे. सर्व मंत्रसमुदायांत ती मातृका म्हणून वास्तव्य करते. ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी, चामुंडा व महालक्ष्मी या देवीच्या अष्टशक्ती होत. देवीचा प्रमुख ध्यानमंत्र आहे, तो असा–

**नमो देव्यै महादेव्यै शिवायै सततं नमः।**
**नमः प्रकृत्यै भद्रायै नियताः प्रणताः स्म ताम्॥**

अर्थ–देवी, महादेवी व शिवा हिला सतत नमस्कार असो. प्रकृती व भद्रा हिला नमस्कार असो. देवीला आम्ही नित्य प्रणत आहो.

देवीच्या अनेक पराक्रमांचे विस्तृत वर्णन चंडीमाहात्म्यात आहे. पाहा–दुर्गा, काली, शक्ती. [ क्रि. स्ट. ले. उ.; म. ज्ञा.को.]

## देवी उपनिषद्

एक नव्य उपनिषद. हे अथर्ववेदाशी संलग्न आहे. देवी आपले स्वरूप देवांना वर्णन करून सांगत आहे, असा या उपनिषदाचा प्रारंभ आहे. देवीपासून ही सर्व सृष्टी निर्माण झाली, देवीचे व दैवी वाणीचे ऐक्य आहे, असे यात सांगितले असून, तिच्या स्वरूपात शैव व वैष्णव अशा दोन्ही रूपांचा समन्वय आहे, असे म्हटले आहे. यात देवीगायत्री मंत्र दिला आहे (देवी उ. ७), तो असा–

**महालक्ष्मीश्च विद्महे सर्वसिद्धिश्च धीमहि।**
**तन्नो देवी प्रचोदयात् ।।**

या देवीमंत्राचे भावार्थ, वाच्यार्थ, संप्रदायार्थ, कौलिकार्थ, रहस्यार्थ आणि तत्त्वार्थ असे सहा प्रकारचे अर्थ नित्यषोडशिकार्णव या ग्रंथात दिले आहेत. ह्रीं हा देवीप्रणव असून, 'ऐं ह्रीं क्लीं चामुण्डायै विच्चे' हा देवीचा नवाक्षरी मंत्र आहे. प्रस्तुत उपनिषदात देवीचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे–

**हृत्पुण्डरीकमध्यस्थां प्रातःसूर्यसमप्रभाम्।**
**पाशाङ्कुशधरां सौम्यां वरदाभयहस्तकाम्।**
**त्रिनेत्रां रक्तवसनां भक्तकामदुघां भजे ।।**

( देवी उ. १५)

अर्थ–हृदयकमलाच्या मध्यभागी राहणारी, प्रातःकाळच्या सूर्याप्रमाणे कांती असलेली, पाश आणि अंकुश धारण करणारी, हातांनी सौम्य, वरद आणि अभय मुद्रा दाखवणारी, त्रिनेत्र, रक्तवस्त्र परिधान केलेली आणि भक्तांच्या इच्छा पूर्ण करणारी अशा देवीला मी भजतो.

त्यानंतर 'दुर्गे, तू माझ्या पापांचा नाश कर' अशी हिची प्रार्थना केली आहे. या उपनिषदाला देवी अथर्वशीर्ष असेही म्हणतात. त्याच्या अध्ययनाचे व पठनाचे फार मोठे फल सांगितले आहे. गाणपत्य संप्रदायात गणपती अथर्वशीर्षाला जे महत्त्व आहे, तेच महत्त्व शाक्त संप्रदायात देवी अथर्वशीर्षाला आहे. याच्या जपाने महामृत्यूवरही जय मिळवता येतो, असे सांगितले आहे. [श्री. सी. ग. देसाई]

**देवीदास** (१६७८ ते १८१३ इ. स.) एक हिंदी संतकवी. बिहारमधील बाराबंकी जिल्ह्यातील लक्ष्मणग्राम नामक गावात उमेठिया वंशाच्या क्षत्रिय घराण्यात याचा जन्म झाला. याचे घराणे संपन्न जमीनदाराचे होते; परंतु याच्या लहानपणीच याच्या मातापित्यांचा अंत झाल्यामुळे घराण्याला विपन्नावस्था आली. त्यामुळे याच्या चुलत्याला याचे पालन-पोषण करावे लागले. पुढे संत जगजीवनसाहेबाशी याची भेट झाली आणि हा त्याचा शिष्य बनला.

देवीदासाने सुखसनाथ, चरनध्यान, गुरुचरन, विनोदमंगल, भ्रमरगीत, ज्ञानसेवा, नारदज्ञान, भक्तिमंगल, वैराग्यखान, इ. अनेक ग्रंथ रचले आहेत. त्याने काही पदेही रचली आहेत. त्यांतले एक पद असे –

**धन सुमंगल घरिया, आजु मोरा धन सुमंगल घरिया ।**
**आजु मोरा अइले संत पहुनवा का ले करबि नेवतरिया ।**
**अन धन तन लेइ अरपन करबो, मातल प्रेमलहरिया ।**
**आज मोरा धन सुमंगल घरिया ॥**

**अर्थ** – माझा आजचा दिवस धन्य आणि सुमंगल बनला आहे. आज माझ्या घरी संत पाहुणे आले आहेत. मी त्यांचे स्वागत कसे करू ? त्यांच्या आगमनाने माझ्या हृदयात प्रेम-लहरी उसळल्या आहेत. मी त्यांना तन-मन–धन अर्पण करीन. माझा आजचा दिवस धन्य आणि सुमंगल बनला आहे.

काही लोक याला जगजीवनदासाचा शिष्य न मानता, त्याच्या परंपरेतील दूल्हहदासाचा शिष्य मानतात व त्याचा काल आणखी अलिकडे ओढतात. [उ. भा. सं. प.; भो. क. का.]

**देवीनृत्य** उ. प्रदेशातील एक स्त्री-प्रधान नृत्य. हे नृत्य चंडी, काली, इ. रौद्ररूपधारी देवीच्या उपासनेशी संबंधित आहे. या नृत्याच्या वेळी स्त्रिया आपले केस मोकळे सोडतात आणि हातात नग्न खड्ग घेऊन नाचतात. काही ठिकाणी पुरुषही या नृत्यात भाग घेतात. नृत्याला ढोलाची साथ असते. प्राय: हे नृत्य मोकळ्या मैदानावर होते. [सम्मेलन पत्रिका, लोकसंस्कृती–विशेषांक]

**देवीपट्टन** एक पुण्यक्षेत्र. हे ठिकाण मद्रास राज्यातील रामनाथपुरापासून बारा मैलांवर आहे. रामाने सेतू बांधायला इथून सुरुवात केली, म्हणून इथल्या सेतूला मूलसेतू असे म्हणतात. स्कंद पुराणात या तीर्थासंबंधी एक कथा आहे, ती अशी –

महिषासुराशी युद्ध झाल्यावेळी देवीच्या प्रहारांनी दैत्य घाबरला व तो इथल्या धर्मपुष्करणी नामक तीर्थात दडून बसला. त्याला शोधीत शोधीत देवी सिंहावर बसून या तीर्था-जवळ आली. सिंहाने त्या पुष्करणीतील सारे पाणी पिऊन टाकले. तेव्हा महिषासुर उघडा पडला व देवीने त्याला मारले.

ही धर्मपुष्करणी धर्माने बांधली, असे सांगतात. गालव ऋषी-चीही ही तपोभूमी असल्याचे सांगतात. राक्षसांनी त्याच्या तपाचा भंग करण्याचा प्रयत्न केला असता, विष्णूने आपल्या चक्राने त्या राक्षसांचा नाश केला. नंतर ते चक्र या तीर्थात प्रविष्ट झाले. तेव्हापासून या तीर्थाला चक्रतीर्थ म्हणू लागले.

इथे समुद्राचे पाणी फारच उथळ असून, त्यात नऊ दगडी स्तंभ आहेत. रामाने लंकेत प्रवेश करतेवेळी पूजलेले नवग्रह ते हेच, असे समजतात. या नवस्तंभांवरून त्या जागेला नवपाषाणम् तीर्थ असे म्हणतात. आजही यात्रेकरू या नवपाषाणांची प्रदक्षिणा करतात. इथल्या समुद्रजळात रामाच्या पादुका आहेत, असे सांगतात. या समुद्रतटावर वेंकटेश्वराचे एक मंदिर आहे. [कल्याण–तीर्थांक]

**देवीपाटण** एक प्राचीन पुण्यक्षेत्र. उत्तर प्रदेशातील ईशान्य लोहमार्गावरच्या बलरामपूर स्टेशनापासून चौदा मैलांवर उत्तर गोंडा जिल्ह्यात हे क्षेत्र आहे. कर्णाने परशुरामा-कडून ब्रह्मास्त्र मिळवले, ते इथेच असे सांगतात. इथे शैव पंथाचे एक प्राचीन धर्मपीठ होते. इथल्या दुर्गादेवीची स्थापना दुसऱ्या चंद्रगुप्ताने केली, अशी समजूत आहे. इ. स. च्या १५ व्या शतकाच्या सुरुवातीस रतनाथ या गोरखपंथी साधूने या दुर्गादेवीच्या मंदिराचा जीर्णोद्धार केला.

वसंत ऋतूमध्ये इथे मोठी यात्रा भरते. या यात्रेच्या वेळी इथे मोठ्या प्रमाणात पशुहत्या होत असते. [कल्याण–तीर्थांक]

**देवीपुराण** शाक्तपंथी लोकांत प्रसिद्ध असलेले हे एक उप-पुराण आहे. यात १२८ अध्याय आहेत. यात प्राधान्याने देवीचे माहात्म्य वर्णिलेले आहे. याशिवाय त्यात शाक्त मूर्तिकला, शाक्त व्रते व पूजाविधी, शैव-वैष्णव पंथ, ब्राह्मणधर्म, युद्ध, नगरे, दुर्गरचना, वेद, उपवेद, वेदांच्या शाखा, वैद्यक, ग्रंथलेखन, तीर्थक्षेत्र, दाने, इ. अनेक विषयांचे वर्णन आहे.

काही ऋषी वसिष्ठ ऋषीला प्रश्न विचारतात आणि वसिष्ठ ऋषी त्यांना माहिती सांगतो, अशी या पुराणाची भूमिका आहे. याचे एकूण चार भाग केलेले आहेत. त्रैलोक्यविजय, त्रैलोक्याभ्युदय, शुंभ-निशुंभमथन व देवासुरयुद्ध अशी त्यांची नावे आहेत. सृष्टिनिर्मितीच्या प्रारंभी देवी कशी प्रकट झाली, ते पहिल्या भागात सांगितले आहे. दुसऱ्या भागात शक्राची

कथा, दुंदुभिवध, घोराचा उदय, त्याला विष्णूकडून वरदान, त्याचे मंत्रसामर्थ्य, विंध्य पर्वतावर झालेले देवीचे अवतरण, देवांनी देवीच्या कृपेने केलेला राक्षससंहार, इ. विषय आलेले आहेत. तिसऱ्या भागात शुंभ-निशुंभांच्या वधाची हकीकत आहे. चौथ्या भागात देवासुरयुद्ध आणि कार्तिकेयाकडून तारकासुराचा वध या कथा प्रमुख आहेत.

सध्या जे देवीपुराण उपलब्ध आहे, ते प्राचीन देवीपुराणाचे संक्षिप्त रूप असून, त्यात केवळ पहिले दोनच भाग आहेत. पुराणांच्या यादीत याचा उल्लेख आढळत नसला, तरी हे तितके अर्वाचीन नाही. इ. स. च्या अकराव्या शतकातल्या आणि त्यानंतरच्या अनेक धर्मनिबंधकारांनी यातले उतारे घेतलेले आहेत. अनेक अभ्यासकांच्या मते या पुराणाची निर्मिती इ. स. च्या सातव्या शतकात झाली असावी.

या पुराणात व्यक्त झालेले शक्त्युपासनेचे स्वरूप तांत्रिक आहे. हे पुराण वेदप्रामाण्य मानीत असले, तरी याचा तंत्रावर विशेष भर आहे. तंत्रमार्गात स्त्री-शूद्रांचे स्थान विशेष असल्यामुळे या पुराणात स्त्री-शूद्रांविषयी उदार भाव प्रकट केलेला आढळतो. [ श्री. आर. सी. हाझरा न्यू इं. अँ., भा. ५, १९४२ ]

## देवीभागवत

एक उपपुराण. देवीभक्तांच्या मते अठरा महापुराणांपैकी भागवत नावाचे महापुराण ते हेच होय. परंतु हे मत समर्थनीय ठरत नाही. निरनिराळ्या पुराणांत अठरा महापुराणांची सूची आढळते. तिच्यात केवळ भागवत असा संदिग्धच नामनिर्देश असला, तरी त्यात भागवत पुराणाचे जे वैशिष्ट्य सांगितले आहे, ते श्रीमद्‌भागवतालाच लागू पडते. देवीभागवत हे श्रीमद्‌भागवताच्या प्रसिद्धीनंतर निर्माण झालेले असून, त्यावर श्रीमद्‌भागवताचा खूप प्रभाव आहे. दोहोंतही १२ स्कंध आणि १८००० श्लोक आहेत, हे त्या दोहोंतले ठळक साम्य होय. देवीभागवताचा अष्टम स्कंध म्हणजे श्रीमद्‌भागवताच्या पंचम स्कंधाचे अक्षरशः अनुकरण आहे. यावरून देवीभागवत हे महापुराण नसून उपपुराणच आहे, असे सिद्ध होते. शिवपुराणाच्या उत्तरखंडात आणि देवीयामलादी शाक्त ग्रंथांत देवीभागवताला महापुराण ठरविले आहे, केवळ सांप्रदायिक आग्रहामुळेच होय.

आद्यशक्ती असलेल्या दुर्गेचे माहात्म्य वर्णन करणे आणि तिच्या उपासनेच्या विधिविधानांचे सांगोपांग निरूपण करणे, हा या पुराणाचा प्रमुख विषय आहे. या पुराणानुसार भगवती दुर्गा हेच विश्वातील परम तत्त्व आहे. मूलप्रकृतीपासून मणिद्वीपातील भुवनेश्वरीपर्यंत अनेक देवीरूपांची वर्णने यात आहेत. गंगा, तुलसी, षष्ठी, पुष्टी, तुष्टी, संपत्ती, इत्यादींनाही दुर्गेचीच रूपे मानले आहे. या चराचर जगतात ज्या ज्या दृश्यमान शक्ती आहेत, त्यांच्या रूपाने दुर्गाच नटलेली आहे, अशी याची भूमिका आहे.

ब्रह्मा-विष्णु-महेश हे तिघेही देवीच्या प्रभावानेच प्रभावित झालेले असल्यामुळे ते विनीत भावाने देवीच्या व्यापक स्वरूपाचे स्तवन करत आहेत, असे वर्णन तृतीय स्कंधात केलेले आहे. त्यात विष्णूने केलेल्या देवीस्तुतीतील दोन श्लोक असे –

विस्तार्य सर्वमखिलं सदसद्विकारं
सन्दर्शयस्यविकलं पुरुषाय काले ।
तत्त्वैश्च षोडशभिरेव च सप्तभिश्च
भासीन्द्रजालमिव नः किल रञ्जनाय ।।
न त्वामृते किमपि वस्तुगतं विभाति
व्याप्यैव सर्वमखिलं त्वमवस्थिताऽसि ।
शक्तिं विना व्यवहृतौ पुरुषोऽप्यशक्तो
बम्भण्यते जननि बुद्धिमता जनेन ।।
(दे. भा. पु. ३. ४. ३१–३२)

अर्थ– मूर्त व अमूर्त अशी भूते व तत्परिणामरूप असलेले हे सर्व जगत उत्पन्न करून तू ते पुरुषाला स्थितिकाली अखंड दाखवीत असतेस आणि लोकरंजनाकरिता षोडशतत्त्वरूप व सप्ततत्त्वरूप होणारी तू आम्हाला खरोखर इंद्रजालाप्रमाणे भासतेस. वस्तूच्या ठायी तुझ्याशिवाय काही एक भासत नाही. तूच सर्व जगत व्यापून राहिलेली आहेस. आणि हे माते, शक्तीशिवाय पुरुषही व्यवहार करायला असमर्थ असतो, असे ज्ञानी लोक म्हणतात.



दुर्गालक्ष्मी

मुख्य विषयाच्या अनुषंगाने देवीभागवतात अनेक उपकथा आलेल्या आहेत. याच्या सप्तम स्कंधात देवीगीता आलेली आहे. ही गीता देवी-हिमालयसंवादात्मक असून, तिचे ९ अध्याय व ४३२ श्लोक आहेत. या गीतेवर भगवद्‌गीतेचा फार मोठा प्रभाव दिसतो. भगवद्‌गीतेतील श्रीकृष्णाप्रमाणेच देवीने आपले अवतारप्रयोजन तिथे स्पष्ट केले आहे, ते असे –

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भधर ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदा वेषान् बिभर्म्यहम् ॥
(दे. गी. ८. २३)

अर्थ-(देवी म्हणते) हे हिमाचला, जेव्हा जेव्हा धर्माला ग्लानी येते आणि अधर्माचे अभ्युत्थान घडते, तेव्हा तेव्हा मी शरीरधारिणी बनून अवतरते.

देवीभागवतावर नीलकंठ (इ. स. चे अठरावे शतक) नामक महाराष्ट्रीय तंत्रशास्त्रज्ञाने लिहिलेली टीका प्रकाशित झालेली आहे. त्याने देवीभागवताच्या गौड आणि द्राविड पाठांचा उल्लेख केला आहे. [ पु. वि.; भा. द.; हिं. वि. को. ]

**देवीमाहात्म्य** देवीच्या उपासकांचा एक प्रमुख ग्रंथ. हा ग्रंथ मार्कंडेय पुराणांतर्गत (अ. ८१-९३) आहे. यात ५६७ श्लोक असून. ते १३ अध्यायांत विभागलेले आहेत. या ५६७ श्लोकांचे ७०० मंत्रांत विभाजन केलेले असल्यामुळे, हा ग्रंथ सप्तशती अथवा दुर्गासप्तशती या नावाने ओळखला जातो.

देवीमाहात्म्यात महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वती या देवीच्या त्रिविध स्वरूपांची चरित्रे ग्रथित झालेली आहेत. प्रथमाध्यायात महाकालीचे चरित्र आहे. या अध्यायात ७१ ते ८७ या १७ मंत्रांत ब्रह्मस्तुती आहे. हेच पौराणिक रात्रिसूक्त होय. २ ते ४ या तीन अध्यायांत महालक्ष्मीचे चरित्र आहे. त्यात प्रामुख्याने महिषासुरवधाची कथा वर्णिलेली आहे. चौथ्या अध्यायातील पहिल्या २७ मंत्रांत देवांनी केलेली जगदंबेची स्तुती आहे. या स्तुतिमंत्रांत देवीचे विश्वव्यापक स्वरूप वर्णिले आहे. त्यांतील एक मंत्र असा :–

हेतुः समस्तजगतां त्रिगुणापि दोषै–
र्न ज्ञायसे हरिहरादिभिरप्यपारा ।
सर्वाश्रयाखिलमिदं जगदंशभूत –
मव्याकृता हि परमा प्रकृतिस्त्वमाद्या ।।
(दे. मा. ४.७)

अर्थ– तू सर्व जगाचे मूळ कारण आहेस. तू त्रिगुणात्मक असूनही त्या त्रिगुणांपासून अलिप्त आहेस. हरिहरादी देवांनासुद्धा तुझा पार लागलेला नाही. तू सर्वांना आधाररूप आहेस. हे सर्व जग तुझ्या अंशरूपाने आहे. तू अविकृतस्वरूपी अशी श्रेष्ठ आद्य प्रकृती आहेस.

शेवटच्या ९ अध्यायांत (५ ते १३) महासरस्वतीचे चरित्र आहे. या भागात प्रामुख्याने शुंभ-निशुंभांच्या वधाचे वर्णन आहे. देवीसूक्त या नावाने प्रसिद्ध असणारा मंत्रसमूह याच भागात (५. ८-२२) आहे. याच्या अकराव्या अध्यायातील पहिल्या ३५ मंत्रांच्या समूहाला नारायणी स्तुती असे म्हणतात.

देवीच्या त्रिविध स्वरूपांची ही चरित्रे सुमेधा ऋषीने सुरथ राजा आणि समाधी वैश्य यांना सांगितली आहेत. शत्रूंकडून पराभूत झालेला सुरथ राजा आणि धनलोभापायी बायकापोरांनी मारपीट करून घराबाहेर घालविलेला समाधी वैश्य हे दोघे एका अरण्यात एकमेकांना भेटतात. ते दोघेही सुमेधा ऋषीला शरण जातात. सुमेधा ऋषी त्यांना आदिशक्तीचे माहात्म्य आणि तिच्या उपासनेचा मार्ग विशद करून सांगतो. नंतर ते दोघे देवीची उपासना करतात. सुरथाला देवीच्या कृपेने राज्यप्राप्ती होते आणि समाधी वैश्याला मोक्षलाभ होतो.

सप्तशतीतील ही कथा म्हणजे प्रारंभापासून अखेरपावेतो रचलेले एक रूपक आहे. चित्ताची एकाग्रता आणि कार्यशीलता या दोन गुणांवर अनुक्रमे समाधी वैश्य व सुरथ राजा यांची व्यक्तिचित्रे उभारून, त्यांच्या मार्गात आलेल्या अडचणी सद्‌बुद्धी व विचारशक्ती यांचे प्रतीक असलेल्या सुमेधा ऋषीने निवारल्या, असे दाखविले आहे. महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वती ही त्रिविध रूपे अनुक्रमे शरीरबल, संपत्तीबल व ज्ञानबल यांची प्रतीके आहेत. या तिहींच्या उपासनेनेच व्यष्टी व समष्टी यांचे जीवन सर्वांगी समृद्ध होऊ शकेल, असा सप्तशतीचा संदेश आहे.

देवीच्या उपासनाक्षेत्रात या ग्रंथाचा महिमा विशेष आहे. 'माझे हे सर्व माहात्म्य माझे सान्निध्य प्राप्त करून देणारे आहे,' असे या ग्रंथाचे महत्त्व साक्षात देवीमुखानेच प्रकट झालेले आहे. ज्ञानेश्वरांनी भगवद्‌गीतेवर सप्तशतीचे जे रूपक केले आहे, त्यात या ग्रंथाला मंत्रभगवती म्हटले आहे. गीतेत श्रीकृष्णाने ज्याप्रमाणे अवताराचे आश्वासन दिले आहे, त्याप्रमाणेच या ग्रंथात देवीने आश्वासन दिले आहे, ते असे –

इत्थं यदा यदा बाधा दानवोत्था भविष्यति ।
तदा तदाऽवतीर्याहं करिष्याम्यरिसंक्षयम् ।।
(दे. मा. ११.५५)

अर्थ – याप्रमाणे ज्या ज्या वेळी दैत्यांपासून पीडा उत्पन्न होईल, त्या त्या वेळी मी अवतार धारण करून शत्रूंचा संहार करीन.

या ग्रंथाला संक्षेपाने चंडी असेही म्हणतात. देवीभक्त देवीची कृपा प्राप्त करून घेण्यासाठी या ग्रंथाचे पाठ करतात. पाहा – चंडीविधान. [ दे. मा.; सप्तशती; मा. प्र. वि. ]

**देवीरथयात्रा** राजाने करायचे एक काम्य व्रत. हे व्रत पंचमी, सप्तमी, नवमी, एकादशी, वद्य तृतीया किंवा

सोमवार आणि मंगळवार या दिवशी करावे, असे सांगितले आहे. व्रतविधी असा–

राजाने एक मंदिर बांधून त्यात देवीची मूर्ती स्थापावी. सोनेरी तारा, हस्तीदंती खांब, इ. वस्तूंनी रथ तयार करून तो सुशोभित करावा. त्यात देवीची मूर्ती ठेवावी. नंतर त्या रथाची मिरवणूक काढून ती राजवाड्यात आणावी. फल– सुख, कीर्ती, समृद्धी व पुत्र यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**देवीव्रत** हे व्रत कार्तिक महिन्यात करतात. व्रतकालात व्रतकर्त्याने दिवसा दुधावर आणि रात्री फक्त भाजीपाल्यावर निर्वाह करायचा असतो. दुर्गादेवीची पूजा व तिळाचा होम असा या व्रताचा विधी आहे. या व्रतात पुढील मंत्राचा जप करायचा असतो —

जयन्ती मङ्गला काली भद्रकाली कपालिनी।
दुर्गा क्षमा शिवा धात्री स्वधा स्वाहा नमोऽस्तु ते ।।

फल – पाप, रोग, भय यांच्यापासून मुक्ती.

याचा दुसरा पर्याय असा – व्रतकर्त्याने शंभू व गौरी, जनार्दन व लक्ष्मी, सूर्य व त्याची पत्नी यांच्या मूर्तींची पूजा करावी आणि घंटा व दिवा यांचे दान द्यावे. फल – पवित्र व सुंदर देहाची प्राप्ती.

तिसरा पर्याय असा – कोणत्याही पौर्णिमेला दुधावर राहून गाय दान देणे. फल – लक्ष्मीलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**देव्यांदोलन** एक काम्य व्रत. चैत्र शुद्ध तृतीयेला हे व्रत करतात. याचा विधी असा – केशर व तत्सम उपचारांनी उमामहेश्वर मूर्तींची पूजा करावी. दवणा अवश्य वाहावा. नंतर त्या मूर्ती पाळण्यात ठेवून त्यांना झोके द्यावे व त्या दिवशी रात्री जागरण करावे. फल – सौभाग्य व समृद्धी यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**देश** एक राग. याला देस असेही म्हणतात. याची जाती औडव संपूर्ण आहे. यात सर्व स्वर शुद्ध लागत.त. आरोहात गंधार व धैवत वर्ज्य असतात. अवरोहात ऋषभाला किंचित कोमल गंधार लावतात. त्यामुळे या रागाला विशेष गोडी येते. अवरोहात निषादही कोमलच लागतो. यात गंधाराला अल्पत्व आहे. वादी – पंचम. संवादी – ऋषभ. पकड स्वर – म, ग, रे, नि, सा, रे. मुख्य अंग – रे, म, प, नि, ध, प, म, ध, प, म, ग, रे; म, ग, रे, ग, नि, सा. गानसमय – रात्रीचा दुसरा प्रहर. हा राग करुण, भक्ती, वीर व हास्य या रसांना उपकारक ठरतो. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे. ]

**देशमुख गोपाळ हरी** (१८२३–१८९२ इ. स.) आधुनिक महाराष्ट्रातील एक थोर विचारवंत व समाजसुधारक. उत्तर पेशवाईत नावारूपास आलेल्या एका कोकणस्थ घराण्यात यांचा जन्म झाला. त्यांचे वडील हरिपंत हे सरदार बापू गोखल्यांचे फडणीस होते. त्यांच्या कुळाचे मूळचे आडनाव सिधये. देशमुख हे नाव त्यांना वतनावरून मिळाले. बाजीरावाची ब्रह्मावर्ताला रवानगी झाल्यानंतर एल्फिन्स्टनने हरिपंतांना बाजीरावाचा पक्ष सोडण्याचा आदेश दिला होता; पण हरिपंतांनी ती गोष्ट नाकारल्यामुळे एल्फिन्स्टनने त्यांची मालमत्ता जप्त केली. पेशवाई बुडाल्यानंतर ते बाजीरावाचे पुण्यातील वकील म्हणून काम करीत होते. गोपाळराव अशा संधिकाळात जन्मास आलेले असल्यामुळे त्यांच्या मनावर जुन्या–नव्या शिक्षणाचे व वातावरणाचे परिणाम झालेले होते.

वयाच्या सातव्या वर्षीच त्यांचा विवाह झाला होता. इ. स. १८४१ ते १८४४ या काळात त्यांनी इंग्रजीचे अध्ययन करून त्यात प्रावीण्य मिळविले. इ. स. १८४४ मध्ये त्यांना पुणे येथे सरदार–एजंट–कचेरीत भाषांतरकाराची नोकरी मिळाली. ही नोकरी करीत असतानाच त्यांनी मुन्सफीची परीक्षा दिली आणि इ. स. १८५२ मध्ये ते वाई येथे मुन्सफ म्हणून नेमले गेले. इ. स. १८५६– ६१ या काळात त्यांनी इनाम कमिशनमध्ये दुय्यम कमिशनर म्हणून उत्तम कामगिरी बजावली. या कामगिरीचे फळ म्हणून मुंबई सरकारने इ. स. १८६२ मध्ये त्यांना असिस्टंट जज्ज म्हणून नियुक्त केले; परंतु गोऱ्या अधिकाऱ्यांना ते सहन न झाल्यामुळे सरकारने त्यांना नासिक येथे स्मॉल कॉज जज्जच्या हुद्द्यावर नेमले. पुढे याच जागेवर अहमदाबाद येथे त्यांनी इ. स. १८६७–१८७६ अशी दहा वर्षे काम केले. इ. स. १८७६ मध्ये झालेल्या दिल्ली दरबारात त्यांना रावबहादुर ही बहुमानाची पदवी मिळाली. त्यानंतर दोनच वर्षांनी ते निवृत्त झाले. मुंबई विश्वविद्यालयाची फेलोशिप आणि गव्हर्नरच्या कौन्सिलचे सभासदत्व हे मानही त्यांना लाभले होते. इ. स. १८८१ मध्ये त्यांना सरकारने फर्स्ट क्लास सरदार केले. इ. स. १८८४ मध्ये त्यांनी एक वर्षभर रतलाम संस्थानची दिवाणगिरीही पत्करली होती.

देशमुखांनी आपल्या लेखनासाठी लोकहितवादी असे टोपण नाव स्वीकारले होते. लोकहिताविषयीची त्यांची तळमळ तीव्र होती, त्यामुळे त्यांचे हे नाव सार्थ ठरले.

लोकहितवादींचे व्यक्तित्व भव्य होते. ते स्वभावाने दयाळू व निगर्वी हाते. त्यांची राहणी अत्यंत साधी होती. नवनव्या ज्ञानाचा संग्रह करण्याचा त्यांना हव्यासच होता. नवे विचार

व नवे ज्ञान यांचा प्रसार करण्यासाठी त्यांनी जीवनभर लेखणी चालविली. त्यांनी भारतभर भ्रमण केले आणि ते जिथे जिथे गेले, तिथल्या तिथल्या ऐतिहासिक परंपरांचे ज्ञानही त्यांनी करून घेतले. निरनिराळ्या प्रदेशांतल्या नानाविध आख्यायिकाही त्यांनी गोळा केल्या, लोकांच्या गुणदोषांचे निरीक्षण केले आणि हे सर्व अनुभवधन आपल्या चिंतनाच्या मुशीत उजळून घेऊन लोकांपर्यंत पोचवले.

लोकहितवादींनी अनेक सामाजिक व ज्ञानोत्तेजक संस्थांच्या उभारणीत मोठा वाटा उचलला होता. काही संस्था तर स्वतः त्यांनीच निर्माण केल्या होत्या. ते स्त्रीशिक्षणाचे व विधवा-पुनर्विवाहाचे पुरस्कर्ते होते. महात्मा फुले यांनी स्त्रियांच्या व दलितांच्या शिक्षणासाठी पुण्यात सुरू केलेल्या शाळांना लोकहितवादींनी मनापासून मदत केली. इंदुप्रकाश (मुंबई), हितेच्छू (अहमदाबाद) व ज्ञानप्रकाश (पुणे) या पत्रांच्या स्थापनेत व संपादकीय व्यवस्थापनातही त्यांचा हात होता.

लोकहितवादींची धार्मिक मते एकेश्वरवादाकडे झुकणारी होती. अहमदाबादला असताना त्यांनी तिथे प्रार्थनासमाजाची स्थापना केली. आर्यसमाजाशीही त्यांचा संबंध आला होता. स्वामी दयानंदांनी त्यांना आर्यसमाजाचे एक विश्वस्त म्हणून नियुक्त केले होते.

लोकहितवादींची ग्रंथरचना भरघोस आहे. त्यांचे लेखन धार्मिक, सामाजिक, ऐतिहासिक, राजकीय, आर्थिक व संकीर्ण अशा सहा वर्गांत मोडणारे आहे. खोटी साक्ष व खोटी शपथ यांचा निषेध, गीतातत्त्व, स्वाध्याय, आश्वलायन गृह्यसूत्राचे भाषांतर व आगमप्रकाश हे त्यांचे धार्मिक ग्रंथ होत. यांपैकी स्वाध्याय हा ग्रंथ महत्त्वाचा असून, त्यात वैदिक वाङ्मयाची ओळख करून दिलेली आहे. होळीविषयी उपदेश, जातिभेद, भिक्षुक, प्राचीन आर्य विद्या व रीती, कलियुग व हिंदुस्थानातील बालविवाह, या ग्रंथांत त्यांचे सामाजिक विचार ग्रथित झालेले आहेत.

लोकहितवादींचा इतिहासाचा व्यासंग जबरदस्त होता. 'प्रत्येक नेटीव गृहस्थास स्वदेशाची माहिती असणे फार अवश्य आहे,' या हेतूने त्यांनी भरतखंडपर्व, पानिपतची लढाई, ऐतिहासिक गोष्टी (३ भाग,) हिंदुस्थानचा इतिहास (पूर्वार्ध), पृथ्वीराज चव्हाण याचा इतिहास, गुजराथ देशाचा इतिहास, लंकेचा इतिहास, सुराष्ट्र देशाचा इतिहास, उदेपूरचा इतिहास, इ. अनेक पुस्तके (स्वतंत्र आणि भाषांतरित) लिहिली.

'महाराष्ट्र देशातील कामगार लोकांशी संभाषणे' या पुस्तकात लोकहितवादींनी लाच घेण्याच्या वृत्तीवर कठोर आघात केला आहे. 'हिंदुस्थानास दरिद्र होण्याची कारणे आणि त्याचा परिहार व व्यापारविषयी विचार,' 'लक्ष्मीज्ञान,' 'स्थानिक स्वराज्य व्यवस्था,' 'स्वदेशीय राज्ये व संस्थाने ही त्यांची आर्थिक विषयांवरील अन्य पुस्तके होत. लोकहितवादींच्या संकीर्ण लेखनात अकराशे पृष्ठांचा निबंधसंग्रह महत्त्वाचा असून, त्यातच त्यांची गाजलेली शतपत्रे समाविष्ट झालेली आहेत. पुण्याला सरदार-एजंटकचेरीत काम करीत असताना त्यांनी आपल्या देशबांधवांना उद्देशून 'प्रभाकर' नामक वृत्तपत्रात ही शंभर पत्रे लिहिली; त्यांत त्यांनी आपल्या समाजाच्या धार्मिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक व शैक्षणिक अशा अनेक अंगांचे मूलभूत परीक्षण करून सुधारणेची नवी क्षितिजे उजळण्याचा प्रयत्न केला आहे. द्रष्टे विचारवंत म्हणून लोकहितवादींची ख्याती आहे, ती या शत पत्रांमुळेच होय.

भारतीय परंपरेतील सत्त्वांश जतन करून, आंग्ल विद्येच्या बळावर त्याची समृद्धी करावी, अशी लोकहितवादींची दृष्टी होती. आपल्या परंपरेतील जीर्ण जडाचा जसा त्यांनी निषेध केला, तसाच तिच्यातील सत्त्वांशाचा गौरवही केला आहे. इंग्रजी विचारांच्या रसरशीतपणाने व समाजाभिमुखतेने जरी ते भारावून गेले होते, तरी इंग्रजी सत्तेच्या अनिष्ट परिणामांचेही त्यांना पुरेपूर भान होते. 'लोकहितवादित्वाची दीक्षा स्वयमेव धारण करून लोकाज्ञानध्वंसनाचे परम साधन जी लेखणी तिचा त्यांनी अंगीकार केला,' अशी कबुली त्यांचे वैचारिक विरोधक विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी दिली आहे. 'त्यांच्या इतका अनुभव आणि इतिहासाचे व काळाचे ज्ञान आमच्यापैकी फारच थोडक्यांस होते,' असे प्रशस्तिपत्र केसरीकारांनी त्यांना दिले होते. सरकारी नोकरीत राहून देशाच्या सर्वांगीण सुधारणेला विचारांची दिशा दाखविणाऱ्या व शक्य तिथे सक्रिय साहाय्य करणाऱ्या लोकहितवादींची तुलना न्या. रानडे यांच्याशी करणे रास्त ठरेल.

गेल्या शतकात दादाभाई नौरोजी, न्या. रानडे, विष्णुशास्त्री चिपळूणकर, लो. टिळक, इ. थोर पुरुषांनी महाराष्ट्रात जी वैचारिक क्रांती घडवून आणली, तिचा पाया घालण्याचे महान कार्य जांभेकर, भाऊ महाजन, दादोबा पांडुरंग, फुले व लोकहितवादी यांनीच केले. सामाजिक क्रांती घडविण्यासाठी ज्या नवीन तत्त्वज्ञानाची व समाजरचनेच्या नवीन मूलतत्त्वांची गरज असते, त्यांचा समाजात प्रसार करण्याचे श्रेय बव्हंशी लोकहितवादींना व त्यांच्या शतपत्रांना दिले पाहिजे. इतिहासाच्या अभ्यासाने व तर्काधिष्ठित बुद्धीने प्राप्त परिस्थितीची चिकित्सा करणे आणि भौतिक दृष्टीने कार्यकारणभावाचा विचार करून आलेल्या संकटांना तोंड देणे या गोष्टींची परंपरा भारतात लुप्त झाली होती, ती लोकहितवादींनी पुनश्च सुरू केली.

अज्ञान, अंधश्रद्धा, पुराणाभिमान, शब्दप्रामाण्य, कर्मठपणा, धर्माविषयी विपरीत व भ्रामक कल्पना, या हिंदू समाजाच्या अंतर्गत व्याधींचा विचार करून लोकहितवादींनी खऱ्या धर्माची स्थापना करण्याचा प्रयत्न केला. लोकहितवादींच्या या नव्या धर्मात बुद्धिप्रामाण्य, भौतिक विद्यांची उपासना, राष्ट्राभिमान, समता, व्यक्तिस्वातंत्र्य, इ. तत्त्वांचा अंतर्भाव होतो. जातिभेद, जन्मनिष्ठ उच्चनीचता आणि स्त्री-पुरुषांतील विषमता या गोष्टी नष्ट झाल्या पाहिजेत, स्त्रीला प्रतिष्ठा प्राप्त झाली पाहिजे, सतीची चाल व बालविवाह या गोष्टी बंद झाल्या पाहिजेत, विधवाविवाहाला मोकळीक मिळायला पाहिजे, स्त्रियांना शिक्षण देऊन त्यांचे अज्ञान दूर केले पाहिजे, अशा प्रकारचे बुद्धिनिष्ठ विचार त्यांनी आपल्या शतपत्रांत निर्भयपणे प्रतिपादले आहेत.

लोकहितवादींनी शतपत्रे लिहिली, तेव्हा त्यांचे वय केवळ २५ वर्षांचे होते. या वयात समाजजीवनाच्या सर्व अंगोपांगांचे एवढे आकलन व्हावे, पाश्चात्य व पौर्वात्य संस्कृतीमधला भेद इतक्या स्पष्टपणे कळावा आणि देशोन्नतीसाठी कोणती उपाययोजना केली पाहिजे, हेही स्पष्टपणे ध्यानात यावे, इतकी भेदक प्रज्ञा त्यांना लाभली होती. इतिहासलेखनाची परंपरा त्यांनीच सुरू केली. लोकहितवादींचे बुद्धिवैभव, त्यांचा व्यासंग व त्यांची स्वदेशहिताची कळकळ या गोष्टी वादातीत असूनही त्यांच्यावर अनेक समकालीन पंडितांनी कडक टीका केली. इंग्रजांनी हिंदुस्थानचे राज्य न्यायाने घेतले आहे व ती एक ईश्वरी योजनाच आहे, अशी त्यांची विचारसरणी असल्यामुळेच मुख्यतः ते टीकास्पद ठरले. तथापि त्यांच्यातले विचारदोष व काही स्वभावदोष दृष्टीआड करून त्यांच्या कार्याचे मूल्यमापन केल्यास त्यांचे सर्व लेखन समाजसुधारणेच्या तळमळीतूनच निर्माण झालेले आहे, हे कळून येईल. समाजाविषयी अशी तळमळ बाळगणाऱ्या या थोर पुरुषाला आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासात फार उंच स्थान लाभले आहे. [ शतपत्रे; लोकहितवादी; अ. च. को.; लोकहितवादींची शतपत्रे ]

**देशमुख-देशपांडे-देसाई** मध्ययुगीन महाराष्ट्रातील महत्त्वाची वतने. देश म्हणजे परगणा (हल्लीच्या लहान तालुक्याएवढा प्रदेश) होय. त्यावर अधिकार गाजविणारी ही विविध वतने होत.

देशमुख म्हणजे देशमुख्य होय. देशाच्या अंतर्गत व्यवस्थेत तो सर्वाधिकारी असे. देशमुखी वतनाचे हे महत्त्व लक्षात घेऊन रामचंद्रपंत अमात्यांनी आपल्या राजनीतीवरील ग्रंथात त्याचे गुणगान केले आहे, ते असे —

" राज्यातील देशमुख आदिकरून यास वतनदार ही प्राकृत परिभाषा मात्र आहे. ते स्वल्पच परंतु स्वतंत्र देशनायकच आहेत. त्यांस साधारण गणावे असे नाही. हे लोक म्हणजे राज्याचे दायादच आहेत. "

देशमुखाला समाजात व राजदरबारातही मान असे. गावचा जसा पाटील तसा परगण्याचा देशमुख हा सर्वाधिकारी होता. गावसभेत पाटील व परगण्याच्या सभेत देशमुख असले तर तिथे जहागिरदार व इनामदार यांनाही पहिला मान मिळत नसे.

शेतीच्या उत्पन्नात वाढ व्हावी, नवीन जमिनी लागवडीखाली आणाव्या आणि त्यासाठी शेतकऱ्यांना उत्तेजन म्हणून त्यांना खंड माफ करावा, अशासारखे अधिकारही देशमुखाला असत. पिकांची आणेवारी ठरविणे हेही त्याचेच काम होय. परगण्यातील सर्व प्रकारचे तंटे—बखेडे मिटविणे, गावांशिवारातील बांधबंदिस्ती कायम राखणे, गावाच्या सीमा ठरविणे, पिकांवर, गुराढोरांवर आणि रयतेवर सरकारी किंवा सावकारी जुलूम होऊ न देणे, एखाद्याला इनाम किंवा मिरासीहक्क देणे, इ. सर्व कामे देशमुख हा आपल्या अधिकारात करीत असे.

देशमुखांच्या पदरी बरेच सैन्य असे. शिवाय देशपांडे, यारदी, कुलकर्णी, खासनीस, पेशवे, इ. अधिकारीमंडळही असे. स्वतःच्या नावाचे नाणे असणे ही एक गोष्ट सोडून प्रतिष्ठा, सत्ता, फौज, हाताखालचे अधिकारी हे सर्व सत्तावैभव देशमुखी या संस्थेला लाभलेले होते. देशमुखी ही वंशपरंपरागत चाले. सरदारांना व जहागिरदारांना हे सर्व वैभव असले, तरी त्यात शाश्वतपणा फारसा नसे. म्हणून देशमुखवतनदारांना 'शाश्वत अधिकारी' व इतरांना 'अशाश्वत अधिकारी' असे म्हटले जाई.

देशमुखांच्या स्वतःच्या अधिकारदर्शक मुद्रा असत. हे राजसत्तेच्या आश्रयाने काम करणारे असले, तरी राजसत्तेचे ते सेवक नसत. यांच्या शिक्क्यांवर वव्हंशी नांगर हे चिन्ह असे. राज्यकारभारातील त्यांच्या मुख्य कामाचे ते निदर्शक असावे. या सर्व गोष्टी लक्षात घेऊनच रामचंद्रपंत अमात्यांनी आपल्या आज्ञापत्रात देशमुखांना स्वतंत्र देशनायक म्हटले आहे.

देशपांडे हा देशमुखाच्या हाताखालील अधिकारी होय. ग्रामव्यवस्थेत जे स्थान कुलकर्ण्याला, तेच स्थान परगण्याच्या व्यवस्थेत देशपांड्याला असे. परगण्यातील जमाबंदीचे सर्व कागदपत्र देशपांड्याच्या स्वाधीन असत. त्याच्या हाताखाली काम करणाऱ्या कारकुनाला मोहरीर अशी संज्ञा होती. देशपांड्याला त्याच्या कामाच्या स्वरूपावरून देशकुळकर्णी असेही म्हणत असत. कोकणातील प्रभू आणि कर्नाटकातील देसाई हे दोन्ही देशपांडे—वतनाचेच प्रादेशिक पर्याय होत. कर्नाटकातील देसायांच्या गाहचर्यामुळे कोकणातील प्रभूंना प्रभुदेसाई अशी

एकार्थक जोडसंज्ञा लाभली होती. पुढे ही सर्व आडनावे झाली. देशमुख-देशपांडे हे अनेकदा आपल्याजवळील शिबंदीच्या जोरावर आसपासच्या मुलखात पुंडावा करीत आणि मध्यवर्ती सत्तेच्या दौर्बल्याचा गैरफायदा घेऊन स्वातंत्र्य पुकारीत असत. या वतनदारांच्या सर्वंकष सत्तेमुळे एकछत्री राज्य निर्माण करणे आणि सर्व प्रजेची निष्ठा एकाच मध्यवर्ती सत्तेशी निगडित बनविणे अशक्य आहे, हे ध्यानी घेऊन छत्रपती शिवाजी महाराजांनी या वतनदारांना काबूत आणण्याचा प्रयत्न केला.

देशमुख-देशपांडे हे सरकारी शेतसाऱ्यापैकी शेकडा दोन ते पाच टक्क्यांपर्यंतचा हिस्सा स्वतः घेत, त्याला रुसूम असे म्हणत. जोडा, पासोडी, तूप, तेल, इ. वस्तू बलुतेदारांप्रमाणेच त्यांनाही थोड्या अधिक प्रमाणात मिळत असत. इंग्रजी अमदानीत ही सारी वतने नष्ट झाली. आता त्या वतनांची स्मृती केवळ आडनावांच्या रूपाने टिकून आहे. [ म. स. द.; म. ज्ञा. को. ]

## देशस्थ ब्राह्मण

महाराष्ट्रातील ब्राह्मणांची एक पोटजात. पंचद्राविड ब्राह्मणांत यांचा समावेश आहे. कोकणस्थ, कऱ्हाडे या नावांप्रमाणेच देशस्थ हे नावही प्रादेशिक आहे. देशावर वसलेले ते देशस्थ होत. पण सांप्रत हे सर्व महाराष्ट्रभर आढळतात. याव्यतिरिक्त कर्नाटक, केरळ, तमिळनाड, आंध्र, इ. प्रदेशांत आणि इंदूर, ग्वाल्हेर, बडोदा, इ. ठिकाणीही यांची बरीच वसती आहे.

देशस्थांत ऋग्वेदी व शुक्ल यजुर्वेदी असे दोन मुख्य भेद आहेत. ऋग्वेदी हे शाकल शाखेचे आहेत. यजुर्वेदी ब्राह्मणांत माध्यंदिन व काण्व अशा दोन उपशाखा आहेत. काही देशस्थ ब्राह्मण कृष्णयजुर्वेदी, सामवेदी व अथर्ववेदीही होते, पण सांप्रत ते देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांत समाविष्ट झाले आहेत.

इतिहास – सर्व देशस्थ लोक महाराष्ट्र हीच आपली जन्मभूमी, पुण्यभूमी व पितृभूमी मानतात. तथापि हे लोक आर्य वंशाचे असल्यामुळे पूर्वी केव्हातरी उ. भारतातून विंध्य पर्वत ओलांडून खाली आले असले पाहिजेत. या सर्व ब्राह्मणांत देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण हे आधी आलेले आहेत. त्यांची महाराष्ट्रातील वसाहत भारतीय युद्धापूर्वी झाली, असे अनुमान करतात.

भारतीय युद्धानंतर यजुर्वेदाचे शुक्ल व कृष्ण असे दोन भेद झाले. शुक्ल यजुर्वेदाचा प्रणेता याज्ञवल्क्य याला राजाश्रय मिळाला. पण कृष्णयजुर्वेदी ब्राह्मणांना तो न मिळाल्यामुळे त्यांना दक्षिणापथाकडे स्थलांतर करावे लागले, असे अनुमान आहे. त्यांची सर्व सूत्रे दक्षिणेतच लिहिली गेली आहेत.

बुद्धोत्तर काळात उत्तर भारतात बौद्ध धर्म बलवत्तर झाला. त्यामुळे वैदिक धर्माभिमानी क्षत्रियांनी व त्यांच्या बरोबर त्यांच्या पुरोहितांनी दक्षिणापथाचा आश्रय घेतला. हे पुरोहित मुख्यतः शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मण होते. त्यांची सर्वांत जुनी वसाहत विदर्भात स्थापन झाली. काशी, मथुरा, गया, वृंदावन, ग्वाल्हेर, इंदूर, इ. मार्गातून हे लोक खाली आले होते. तिथून ते आणखी खाली आले व गोदावरीच्या तीरावर वास्तव्य करू लागले. गोदातीर हेच त्यांचे मुख्य वसतिस्थान ठरले. इ. स. ६०० पर्यंत ते गोदातीरी पूर्ण स्थायिक झाले असावे. पण पुढे दुर्गादेवीच्या दुष्काळामुळे आणि यवनांच्या आक्रमणांमुळे या लोकांनी बरीच स्थलांतरे केलेली दिसतात. त्यामुळेच या ब्राह्मणांचे भिन्न प्रादेशिक विभाग झालेले आहेत. सर्वांत मोठा विभाग नासिक, बागलाण, नगर, सातारा, सोलापूर, वऱ्हाड व मध्यप्रांत एवढ्या प्रदेशात वसलेला आहे. दुसरा विभाग खानदेश, मराठवाडा या भागांत असून, उत्तर कोकणात तिसरा विभाग आहे.

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांत अगस्त्य, अंगिरस, अत्री, कपी, काश्यप, कौशिक, गौतम, जामदग्न्य, भारद्वाज, वसिष्ठ, शांडिल्य इ. ५२ गोत्रे उपलब्ध आहेत. शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन शाखेची १३० गोत्रे आहेत. यांच्यांत उपनामे पुष्कळच आहेत. पण त्यांपैकी पुष्कळ उपनामे जोशी, कुलकर्णी, देशपांडे अशा प्रकारची व्यवसायदर्शक आणि अधिकारदर्शक आहेत. काही उपनामे त्यांच्या त्यांच्या गावांवरून पडली आहेत.

देवधर्म – देशस्थ ब्राह्मणांत स्मार्त व वैष्णव असे दोन मुख्य पंथ आहेत. स्मार्त लोक शंकराचार्यांचे अनुयायी असून, त्यांनी स्थापलेल्या मठांपैकी करवीर व संकेश्वर येथील मठांना मानणारे आहेत. या दोन्ही पीठांवर बसलेले सर्व पुरुष ऋग्वेदी ब्राह्मणच होते. शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मण शृंगेरी पीठाचे अनुशासन मानतात. वैष्णवपंथी देशस्थ ब्राह्मण मध्वाचार्यांचे अनुयायी आहेत. या पंथाच्या आचार्यांत देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांची संख्या बरीच आहे.

याव्यतिरिक्त रामदासी, दत्त, गाणपत्य व भागवत या संप्रदायांचे लोकही यांच्यांत पुष्कळ आहेत. शिव, विष्णू, राम, व्यंकटेश, नृसिंह, कोल्हापूरची महालक्ष्मी, माहूरची रेणुका, सप्तशृंगी, चतुःशृंगी, यमाई, भवानी, मारुती, शाकंभरी, खंडोबा, जोतिबा, एकवीरा, मुंजाबा, कातोबा, जानाई, जोखाई, तुकाई, नागोबा, कामाक्षी, म्हाळसा, बोल्हाई, भगवती, मांगोबा, म्हसोबा, वाघजाई, सटवाई, सातीआसरा, इ. अनेक देवता व ग्रामदेवता ही देशस्थ ब्राह्मणांची कुलदैवते होत. त्यांचे टाक घरोघर आढळतात.

या कुलदैवतांत देवीला प्रमुख स्थान आहे. बहुतेक घराण्यांत कोणतीतरी एक देवी कुलदैवत म्हणून मानलेली असते. तिचे

स्थानही ठरलेले असते. लग्न, मुंज, इ. मंगल प्रसंगी तिथे जाऊन निमंत्रण देण्याची किंवा नंतर दर्शनाला जाण्याची त्यांच्यांत प्रथा आहे. या देवीचा कुळधर्म अष्टमी, चतुर्दशी किंवा पौर्णिमा या तिथींना करतात.

देवीचा बढण नावाचा एक कुळधर्म काही घराण्यांत आढळतो. हा कुळधर्म मंगल कार्यानंतर करतात. त्यात कणकीचे विविध पदार्थ तळून व ते ताटात भरून देवीला त्यांचा नैवेद्य दाखवायचा असतो. शाकंभरी देवीला साठ भाज्या व साठ कोशिंबिरी यांचा नैवेद्य दाखवण्याची पद्धत आहे. या लोकांत देवीचा, खंडोबाचा व बहिरोबाचा गोंधळ करण्याची चाल आहे. त्याचप्रमाणे देवीचा जोगवा मागण्याची प्रथाही कुळधर्म म्हणून अनेक घराण्यांत आढळते.

**सण व उत्सव** – वर्षप्रतिपदा, चैत्रगौरी, अक्षय्यतृतीया, वटसावित्री, दिव्याची अवस, नागपंचमी, कृष्णजन्म, पिठोरी अमावस्या, हरितालिका, गणेशचतुर्थी, ऋषिपंचमी, जैष्ठागौरी, दसरा, आश्विनी, वसुबारस, दिवाळी, त्रिपुरी पौर्णिमा, वैकुंठ चतुर्दशी, मार्गशीर्ष मासात बालाजीची समाराधना, नागदिवाळी, चंपाषष्ठी, मकरसंक्रांत, रथसप्तमी, होळी व रंगपंचमी हे या लोकांचे सर्वसामान्य सण व उत्सव असतात. देवीच्या शारदीय नवरात्राप्रमाणे राम, नृसिंह, कृष्ण, व्यंकटेश, पांडुरंग, भैरवनाथ, दत्त, शाकंभरी, मोहिनीराज, इ. देवतांचीही नवरात्रे साजरी करतात. त्यात नित्य पूजा, नंदादीप, आरती, पुराणवाचन, कथाकीर्तन, ब्राह्मणसंतर्पण, इ. कार्यक्रम असतात.

हे लोक चातुर्मास्यातल्या एकादश्या विशेषेकरून पाळतात. श्रावणातील प्रत्येक सोमवारी नक्त भोजन करतात. पौर्णिमेला श्रावणी करतात. श्रावण अमावास्येला वृषभपूजन करतात. त्याला बैलपोळा असे लौकिक नाव आहे.

भाद्रपदातील ज्येष्ठागौरीचा समारंभ देशस्थ लोक विशेष थाटाने करतात. आश्विनातील वद्य अष्टमीला तांदुळांचे चक्र बनवून त्यात कुलदेवतेचे पूजन करण्याची प्रथा काही घराण्यांत असते. या पूजेला चक्रपूजा म्हणतात. माघ वद्य चतुर्दशीला महाशिवरात्रीनिमित्त उपवास व महादेवाला अभिषेक करतात.

**विवाहप्रथा** – वधू-वर सगोत्र, सप्रवर व सपिंडातले नसावे, असा धर्मशास्त्राचा साधारण नियम आहे. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांत मामेबहिणीशी व आतेबहिणीशी विवाह करण्याची चाल आहे. ही प्रथा मंत्रकालापासून प्रचलित असून, ती दाक्षिणात्यांकडून घेतलेली दिसते. मामा व भाची यांचा विवाहसुद्धां क्वचितप्रसंगी होतो. पण धर्मशास्त्रकारांनी मातुलगोत्राशी विवाहसंबंधाचा निषेध केला आहे. शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मण विवाहासाठी मातुलगोत्र वर्ज्य मानीत असल्यामुळे त्यांच्यांत मातुलकन्यापरिणय (मामाच्या मुलीशी लग्न करणे) रूढ नाही.

कुलशीलाचा विचार करून लग्नसंबंध निश्चित झाल्यानंतर पहिला कार्यक्रम सीमांतपूजन हा असतो. त्यात वराचे वधूगृही आगमन झाल्यावर त्याचा सत्कार करतात. त्यानंतर विवाहाचा संकल्प करून गणपतिपूजन, कुलदेवतापूजन, मातृकापूजन, ग्रहमख, पुण्याहवाचन, वाङ्निश्चय, मधुपर्क वगैरे विधी करतात. कन्यादान, लाजाहोम, सप्तपदी हे मुख्य विधी झाल्यानंतर ऐरिणीदान, वरात, लक्ष्मीपूजन वगैरे कार्यक्रम होतात व एवढे झाल्यावर विवाहसमारंभ संपतो.

**व्यवसाय** – पौरोहित्य व भिक्षुकी हे यांचे मूळचे मुख्य व्यवसाय असले, तरी अनेक देशस्थ ब्राह्मण शेती, सावकारी, सराफी, इ. उद्योगही करतात. कित्येक लोक इनामदार किंवा जमीनदारही आहेत. यांच्यांत वतनदार देशमुख, देशपांडे, जोशी, कुळकर्णी बरेच आहेत.

इतिहासकाली या लोकांत अनेक धर्मप्रचारक, संत, राजपुरोहित, पंडित, कवी, मुत्सद्दी व सेनापती होऊन गेले. भवभूती, हेमाद्री, नागोजीभट्ट, कमलाकरभट्ट, गागाभट्ट, नारायणभट्ट, नीळकंठभट्ट, विद्यानिधी कवींद्र, वोपदेव हे पंडित; मुकुंदराज, मुक्तेश्वर, श्रीधर, महीपती, वामनपंडित, रघुनाथपंडित, अमृतराय, राम जोशी, अनंत फंदी हे कवी; भास्कराचार्य, गणेश दैवज्ञ, जगन्नाथ जोशी (सम्राट), के. ल. दप्तरी हे ज्योतिषशास्त्रज्ञ आणि ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, मध्वमुनीश्वर, जनार्दनस्वामी, दासोपंत, नृसिंहसरस्वती, मोरया गोसावी, कृष्णदयार्णव, चांगदेव, विसोबा खेचर, हे संत देशस्थ ब्राह्मण होते. यादवांचा सेनापती खोलेश्वर, कुतुबशाहीमधील अकण्णा व मादण्णा; दादोजी कोंडदेव, मुरार जगदेव, मोरोपंत पिंगळे, अण्णाजी दत्तो, प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी नारायण, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, श्रीपतराव प्रतिनिधी, रामशास्त्री प्रभुणे, सखारामबापू बोकील, तात्या टोपे हे सर्व शूर पुरुष व मुत्सद्दी देशस्थ ब्राह्मणांतच होऊन गेले.

गेल्या शतकात अक्कलकोटचे स्वामी, गोंदवलेकर महाराज, डॉ. मुंजे, दादासाहेब खापर्डे, औंधचे बाळासाहेब पंतप्रतिनिधी, कवी चंद्रशेखर, बालकवी, इ. अनेक देशस्थ ब्राह्मण प्रसिद्धी पावले. सांप्रतही लो. अणे, श्री. राजहंस (बालगंधर्व), श्री. कृष्णराव फुलंब्रीकर, श्री. आबासाहेब मुजुमदार, इ. अनेक पुरुष भिन्न भिन्न क्षेत्रांत ख्यातनाम झालेले आहेत.

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक व राजकीय इतिहासाच्या घडणीला देशस्थ ब्राह्मणांनी बराच हातभार लावलेला आहे. वैदिक धर्माचा अभिमान, वर्णाश्रमधर्माचे पालन, पारमार्थिक शिकवण,

वेदान्त, न्याय, ज्योतिष, व्याकरण, इ. शास्त्रांचा खोल अभ्यास व पांडित्यपूर्ण ग्रंथरचना या गोष्टींची परंपरा त्यांनी प्राचीन काळापासून आजपर्यंत सतत राखली आहे. [ सरस्वती मंडल; हे. ऋ. ब्रा. प.; ब्रा. भि. वि.; बृ. शु. मा. ब्रा. इ. ]

**देशाख्य** एक राग. याला देवसाख किंवा देवसाग असेही म्हणतात. याची जाती संपूर्ण आहे. यात गंधार व निषाद हे स्वर कोमल लागतात. आरोहात गंधार व अवरोहात धैवत वर्ज्य असतो. गंधारावर न्यास असून, मूर्च्छनाही त्यावरच असते. विकल्पाने दोन्ही निषाद घेतात. काही संगीतज्ज्ञांच्या मते या रागाला धैवत अजिबात वर्ज्य आहे. वादी– षड्ज. संवादी– पंचम. आरोह– सा, म, रे, प, म, नी, प, सा. अवरोह– सा, नी, प, म, प, म, ग, म, रे, सा. गानसमय– दिवसाचा तिसरा प्रहर. हा राग वीररसाला अनुकूल आहे. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**देशी** एक राग. याला देशी तोडी असेही म्हणतात. ग्वाल्हेर घराण्यात हा राग आसावरी थाटात गायिला जातो. याची जाती संपूर्ण आहे. यात धैवत व निषाद हे दोन स्वर शुद्ध लागतात. धैवत अंशस्वर व पंचम न्यासस्वर आहे. आरोह– सा, म, रे, प, म, प, ध, म, प, सा. अवरोह– सा, प, ध, म, प, प, रे, ग, सा, रे, नि, सा. गानसमय– दिवसाचा दुसरा प्रहर. याचे स्वरूप विलासात्मक आहे. [ श्री. आबासाहेब मुजुमदार ]

**देसकार** एक राग. याची जाती औडव आहे. आरोह– सा रे, ग, प, ध, सा. अवरोह– सा, ध, प, ध, ग, प, ग, रे, सा. अवरोहात क्वचित निषादही लावतात. पकडस्वर– प, ध, ध, ग, प. गानसमय– सकाळचा दुसरा प्रहर. हा राग प्रशांत व गंभीर आहे. [ श्री. आबासाहेब मुजुमदार ]

**देह** याला शरीर, काय, तनू, मूर्ती अशी अन्यही नावे आहेत. देह अर्थात शरीर याची व्याख्या अशी–आत्मनो भोगायतनम् शरीरम्' = आत्म्याचे बरे-वाईट भोग भोगण्याचे स्थान म्हणजे शरीर होय (का. सू. १. १. ९). सर्व प्रकारच्या चेष्टांचे आश्रय, कर्मेंद्रिये व ज्ञानेंद्रिये यांचे आश्रय किंवा हस्तपादादी अवयवांनी युक्त ते शरीर, अशा शरीराच्या अन्यही व्याख्या भिन्न भिन्न दर्शनांत दिलेल्या आहेत.

मानवदेह कसा आणि कशाचा बनलेला आहे, याविषयीची जिज्ञासा प्राचीन काळापासूनच आढळते. पुराण वाङ्मयात तर त्याविषयी कथा आहेतच; पण आदिवासींच्या वाङ्मयातही मनुष्यदेह कसा व कोणी निर्माण केला, याविषयी कित्येक कथा आहेत. तसेच मानवी देहातील रक्त, अस्थी, मूत्र, इ. गोष्टी कशा निर्माण झाल्या, त्याविषयीच्याही कथा आहेत.



देसकार रागाचे सांकेतिक चित्र

ऋग्वेदात शरीर हा शब्द अनेकदा आला आहे. १० व्या मंडलात विवृहा काश्यपाचे एक सूक्त आहे. त्यात डोळे, नाक, कान, शीर्ष, मेंदू, जिह्वा, इ. बहुतेक सर्व शरीरावयवांची नावे आली आहेत (ऋ. १०. १६३). त्यावरून शरीररचना समजून घेण्याची वैदिक ऋषींची प्रवृत्ती समजून येते. अथर्ववेदाच्या एका सूक्तातही शरीराच्या पुष्कळ भागांची नावे आली आहेत (१०. २). अथर्ववेदातील अवयवनामेच पुढे चरक व सुश्रुत या आयुर्वेदाचार्यांनी घेतलेली दिसतात. मानवदेहातील अस्थींची संख्या ३६० असल्याचे शतपथात म्हटले आहे (श. ब्रा. १०. ५. ४. १२). आजचे शारीरशास्त्रही या संख्येशी सहमत आहे. वाजसनेयी संहितेत अवयवांव्यतिरिक्त त्वचा, मांस, मेद, मज्जा, हृदयावरण, स्नायू, रेत या पदार्थांची नावे आली आहेत. वैदिक वाङ्मयातील शरीरविषयक उल्लेख एकत्र केल्यास तत्का-

लीन जाणत्या लोकांना यकृत, फुफ्फुसे, पित्ताशय, मूत्रपिंड, इ. शरीरांतर्गत भागांचीही माहिती झाली होती, असे दिसते.

**देहविज्ञान** – गर्भोपनिषद नावाचे एक उपनिषद आहे, त्यात स्त्रीच्या गर्भाशयात मानवदेह कसा बनतो, ते सांगितले आहे. त्याचा सारांश असा – ऋतुकाली स्त्रीशी पुरुषसंयोग झाल्याने जी गर्भधारणा होते, तिच्यात प्रारंभी एका रात्रीनंतर कलल (गर्भकोश) बनते, सात रात्रींनंतर त्याचा बुडबुडा होतो. पंधरा दिवसांत पिंड बनतो. एका महिन्यात तो पिंड कठीण बनतो. दोन महिन्यांनी डोके बनते. तीन महिन्यांनी पायाकडचा भाग बनतो. चार महिन्यांनी जठर व त्याच्या जवळचा भाग निर्माण होतो, पाचव्या महिन्यात पृष्ठवंश बनतो, सहाव्यात नाक, कान, डोळे, तोंड, इ. अवयव निर्माण होतात, सातव्यात त्या गर्भ-शरीरात जीव दाखल होतो, आठव्यात तो सर्वलक्षणसंपूर्ण होतो, नवव्यात ज्ञानेंद्रियांत शक्ती उत्पन्न होते. मग दहाव्या महिन्यात तो गर्भ मातेच्या उदरातून बाहेर येतो.

आयुर्वेदात शरीराविषयी सांगितले आहे, ते असे – देहाच्या सर्व प्रक्रिया पंचप्राणांमुळे घडतात. रक्त-मांसादी पदार्थ व वीर्यही प्राणांतूनच निर्माण होते. वीर्यामुळे देहावर ओज येते. कफ, वात व पित्त ही तीन शरीरातली मुख्य तत्त्वे होत. कोणी कोणी रक्त हे चौथे तत्त्व मानतात. कफ, वात, पित्त यांपैकी शरीरात ज्याचे आधिक्य असेल, त्याप्रमाणे माणसाची प्रकृती बनते.

रोम, रक्त, मांस, स्नायू, अस्थी व मज्जा असे सहा कोश देहात असतात. म्हणून त्याला षाट्कौशिक असे म्हटले आहे. यांपैकी पहिले तीन कोश आईकडून व पुढचे तीन पित्याकडून प्राप्त होत असतात. 'योनेः शरीरम्' = योनीपासून शरीर-निर्मिती, हा सिद्धान्त आहे. चेतन व अचेतन या दोन सत्तांच्या संघर्षातून देह उत्पन्न होतो. लिंग व योनी या दोहोंचा परस्पर सन्निकर्ष हा त्या संघर्षाला कारण होतो. षट्चक्रे, सोळा आधार, तीन लक्ष्ये, पाच आकाशे, बारा ग्रंथी, तीन शक्ती, तीन धाम-पथ आणि नाडीचक्र एवढ्या गोष्टी देहात अवस्थित आहेत, असे योगशास्त्रात म्हटले आहे. मात्र या सर्व गोष्टी स्थूल देहात नसून सूक्ष्म देहात असतात. व्यष्टी व समष्टी अशा भेदाने देह दोन प्रकारचा आहे. व्यष्टिदेहाला पिंड किंवा पिंडांड म्हणतात व समष्टिदेहाला ब्रह्मांड म्हणतात. मानवदेह हे एक लघुब्रह्मांडच आहे. ब्रह्मांडात जे काही असते, ते सर्व अल्पांशाने पिंडातही असते. पाताललोकाच्या खाली असलेल्या गाढ अंधारापासून तो अतिऊर्ध्व आकाशातल्या चिन्मय प्रकाशापर्यंत सर्व काही देहात विद्यमान आहे. जरी देहाला पार्थिव म्हणजे पृथ्वीतत्त्वाचा म्हणतात, तरी त्याच्या ठिकाणी इतर चारही भूतांचा अंश असतोच. पंचमहाभूते पंचीकृत होऊन देहनिर्मिती करतात, असे वेदान्तशास्त्राचे सांगणे आहे. आत्म्याच्या भोग, सेवा आणि कर्म या गोष्टींसाठी जे जे आवश्यक आहे, ते ते सर्व या देहात सापडते.

वैशेषिक दर्शनात योनिज व अयोनिज असे शरीराचे दोन भेद मानलेले आहेत (वै. सू. ४.२.५). शुक्र व शोणित (बीज व रज) यांच्या संयोगातून उत्पन्न होणारे ते योनिज व ज्याला तशा संयोगाची अपेक्षा नसते ते अयोनिज होय. योनिज शरीर जरायुज (गर्भवेष्टनयुक्त) व अंडज (अंड्यातून बाहेर येणारे) असे दोन प्रकारचे आहे. मनुष्य व पशू यांचे शरीर हे जरायुज असते व पक्षी आणि सरपटणारे प्राणी यांचे शरीर अंडज असते. अयोनिज शरीराचेही स्वेदज, उद्‌भिज्ज व अदृष्टविशेषजन्य असे तीन प्रकार होतात. उवा, लिखा, इ. प्राण्यांचे शरीर स्वेदज (घामटपणातून निर्माण होणारे), वृक्ष, तृण, यांचे शरीर उद्-भिज्ज (पृथ्वीतून वर येणारे) आणि मनू, सप्तर्षी, इ. व्यक्तींचे शरीर अदृष्टविशेषजन्य (मानसभावातून निर्माण झालेले) होय.

**अयोनिज मानवदेह** – स्थूल देह हा सर्वत्र योनिज असतो हे खरे; पण तसा काही नियमच मानलेला नाही. पुराणांतरी अयोनिज व्यक्तींचा अनेक ठिकाणी आढळ होतो. सीता, द्रौपदी, धृष्टद्युम्न, ही मंडळी अयोनिसंभव आहेत. द्रोणाचार्य हे द्रोणात पडलेल्या वीर्यांतून अर्थात योनीवाचून जन्मले असे म्हटले आहे. वर उल्लेखलेले मनू, सप्तर्षी व काही देवतागणही अयोनिसंभव मानलेले आहेत. नवनाथांपैकी गोरखनाथ हा विभूतीतून जन्मला, अशी कथा आहे. अयोनिसंभव व्यक्तींच्या कथा लोकसाहित्यातही आढळतात. चंद्रहास नावाच्या राजपुत्राला विनभोगाची अर्थात अयोनिसंभव कन्या पत्नी म्हणून हवी होती आणि ती त्याला मिळाली, अशी कथा कातकऱ्यांमध्ये प्रचलित आहे. त्याच कथेचा कोकणातल्या महारांच्या कथेतला पर्याय असा, की चंद्रहास हा आपल्या अंगाची कातडी एका मडक्यात भरून ठेवतो व त्यातून जन्मलेली मुलगी पत्नी म्हणून स्वीकारतो. गोंडांच्या कथेतला लिंगो हा आद्य गोंड राजा शालवृक्षाच्या फुलातून जन्मला असे म्हटले आहे. फुलातून निघालेल्या मुला-मुलींच्या कितीतरी गोष्टी लोकसाहित्यात आढळतात. मध्य प्रदेशातल्या कीर जातीची उत्पत्ती कुश तृणापासून झाली, अशी आणखी एक कथा आहे. खैरवार जातीचा पूर्वज लक्ष्मीच्या मुलीच्या मांडीपासून जन्मला, असे त्या जातीचे लोक सांगतात. या अयोनिसंभवाची शास्त्रीय उपपत्ती म. म. गोपीनाथ कवि-राज यांनी पुढीलप्रमाणे सांगितली आहे —

जेव्हा परमाणू शुद्ध संकल्पाने आकृष्ट होऊन यथास्थानी स्थित होतात, तेव्हा ते योनिसंभवावाचूनही देह उत्पन्न करू शकतात. प्रलयानंतर सृष्टीच्या प्रारंभी जी देहनिर्मिती होते

ती अयोनिसंभवच असते. सृष्टिकर्त्याच्या संकल्पाने जे परमाणु-पुंज संघटित होतात, त्यांतून ही देहसृष्टी निर्माण होते. ऊर्ध्व, रेता पुरुषांच्या अंतःशक्तीचा प्रवाह ऊर्ध्वगतीने वाहत असतो. पण आहार्य कामाच्या प्रभावाने तो शक्तिप्रवाह काही काळ अधोमार्गानेही वाहू शकतो. अशा वेळी ते ऊर्ध्वरेते योगी-स्त्रीशी शरीरसंबंध न करता केवळ तिच्या नाभीला, हृदयाला किंवा मस्तकाला स्पर्श करून तिच्या ठिकाणी गर्भसंभव करू शकतात.

या दृष्टीने स्थूल देह हे कमी अधिक शुद्ध मानले जातात. सामान्य स्थूल देह हा अधोमार्गी वीर्याच्या द्वारे उत्पन्न होत असल्यामुळे तो सर्वांत खालच्या श्रेणीचा समजतात. तो अशु-चीही मानतात. ऊर्ध्वरेता पुरुषाच्या केवळ अंगुलिस्पर्शाने स्त्रीच्या ठिकाणी जो देह उत्पन्न होतो, तो त्याहून अधिक शुद्ध होय. कित्येक पुरुषांच्या केवळ दृष्टिक्षेपानेही स्त्रीच्या ठिकाणी गर्भधारणा झाल्याच्या कथा आहेत. साधुसंतांच्या आशीर्वादाने जी मुले होतात, ती त्या साधूच्या कृपादृष्टीतूनच झाली, असे मानतात. लोकसाहित्यातही हा कल्पनाबंध दृष्टिगर्भ या नावाने वावरतो. राजस्थानातल्या एका कथेत एका ब्राह्मण कन्येला नागपुरुषाच्या केवळ एकटक दृष्टीने गर्भधारणा झाली व तिने एका पुत्राला जन्म दिला, अशी हकीगत आहे. हा दृष्टि-संभव देह वर सांगितलेल्या देहाहून अधिक शुद्ध होय. जो देह स्त्रीपिंड किंवा स्त्रीचा गर्भाशय यांची अपेक्षा न धरता निर्माण होतो, तो सर्वाधिक शुद्ध होय. बौद्धांचा निर्माणकाय किंवा जैनांचा आहारकदेह काही अंशी याच प्रकारचा आहे, असे म. म. गोपीनाथ कविराज सांगतात. काही शास्त्रकारांनी याला औपपादिक देह असे म्हटले आहे. हा देह योगी पुरुषाच्या केवळ संकल्पप्रभावाने भौतिक कारणे एकत्र येऊन निर्माण झालेला असतो व याच्या निर्मितीला स्त्रीपिंडाची आवश्य-कताच नसते.

पण असाही आणखी एक देह आहे, की तो पुरुषपिंडाचीही अपेक्षा न धरता निर्माण होत असतो. शक्तिसिद्धान्ताचे मूल-तत्त्व हेच आहे. आद्या शक्ती ही पुरुषसंबंधाविनाच या सकल सृष्टीची उत्पत्ती करते. पुरुषसंबंध न झाल्याने विश्वोत्पत्ती करूनही ती आद्या शक्ती किंवा जगदंबा कुमारीच राहते. तंत्रशास्त्रात तिला कुमारी असे म्हटले आहे, ते त्यामुळेच. देहाचे स्थूल, सूक्ष्म व कारण असे आणखी तीन प्रकार मानले आहेत, ते असे—

**स्थूल देह**— पंच कोशांच्या परिभाषेत अन्नमय कोश म्हणजे स्थूल देह होय. हा स्थूल असल्यामुळेच दृश्य असतो. या देहा-वर अभिमान ठेवणाऱ्या जीवात्म्याला विश्व अशी संज्ञा आहे. अशा सर्व स्थूल शरीरांवर जो अभिमान ठेवतो, त्याला वैश्वानर म्हणतात. या देहाचे परिचलन शक्तीच्या द्वारे होत असते. त्याच्या मुळाशी ज्ञान-क्रियारूप शक्ती अवस्थित असते. ज्ञानेंद्रिये ही ज्ञानशक्तीने व कर्मेंद्रिये ही क्रियाशक्तीने परिचलित होतात. या दोन्ही शक्ती अंतःकरणात समान भावाने संमीलित राहतात. सर्व इंद्रिये स्थूल देहाचा आश्रय करून राहतात, असे जरी दिसत असले, तरी वास्तवात ती स्थूल देहाचे अंश नसतात. कारण मृत्यू किंवा परकायाप्रवेश या वेळी जेव्हा लिंगशरीर स्थूल देहाचा त्याग करून बाहेर जाते, तेव्हा इंद्रियेही स्थूल देहात राहत नाहीत.

स्थूल देहालाच आत्म्याचे भोगायतन म्हणतात. कारण या देहाच्या आश्रयानेच पूर्वकर्मांचा फलभोग घेतला जातो. सूक्ष्म व कारण हे देह भोगायतन नाहीत. ज्या देहाने कर्म होत असते, त्याला कर्मदेह म्हणतात. त्याचप्रमाणे ज्याच्या द्वारे भोग होत असतो, त्याला भोगदेह म्हणतात. ज्याच्या द्वारे कर्म व भोग दोन्ही होतात, त्याला उभयात्मक देह म्हणतात. हे सर्व स्थूल देहाचेच भेद होत. अस्ति (अस्तित्व), जायते (जन्म), वर्धते (वाढ), परिणमते (वार्धक्य), अपक्षीयते (ऱ्हास) व नश्यति (नाश) असे जे सहा विकार सांगितले आहेत, ते स्थूल देहालाच लागू आहेत. कौमार, यौवन व जरा या तीन अवस्थाही स्थूल देहाच्याच आहेत.

देहसंबंधावाचून जीवाचे कर्तृत्व व भोक्तृत्व ही दोन्ही निष्फल आहेत. जो जीव स्थूल देह धारण करतो, तोच कर्ता व भोक्ता होऊ शकतो. स्थूल देहाचा अभिमान असेतोवरच एका बाजूने कर्तृत्व आणि दुसऱ्या बाजूने भोक्तृत्व ही प्रकट होत असतात. त्या दोघांचा परस्पर संबंध आहे. 'मी कर्माचा कर्ता आहे' अशा प्रकारचा जो कर्तृत्वाचा अभिमान असतो, तो नष्ट झाल्या-वर त्या कर्माच्या सुख-दुःखरूप भोगाचीही आवश्यकता उरत नाही. देहाचा अभिमान धरल्यावर कर्म करावेच लागते आणि कर्मानुसार फळही भोगावेच लागते. अविद्या हे या देहाभिमानाचे मूल आहे. ज्ञानाच्या उदयाने अविद्येची निवृत्ती झाल्यावर अभिमानाचा नाश होतो आणि मग जीव हा कर्म व भोग या संसारचक्रातून मुक्त होतो.

**सूक्ष्म देह**—पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये, पाच प्राण, मन व बुद्धी अशा सतरा तत्त्वांचा मिळून सूक्ष्म देह बनतो. हा प्राण-मय, मनोमय व विज्ञानमय असा कोशत्रयात्मक असतो. याला लिंगदेह असेही म्हणतात. तेजोमय शक्तिविशेष म्हणजे लिंग होय. लिंगशरीर अशा तेजःस्फुरणाने युक्त असते. ते स्थूल देहा-बरोबर ओतप्रोत भावाने राहत असते. काष्ठात अग्नी दिसत नाही; पण सुप्त रूपात तो तिथे विद्यमान असतोच. क्रियाविशे-

पाच्या द्वारे जागृत केल्यावर तो अग्नी दृश्य होतो. त्याच-प्रमाणे लिंगात्मक तेज समस्त स्थूल देहात व्याप्त असते. संघर्षणाच्या द्वारे त्याला प्रज्वलित केल्यावर त्याच्याकडून इच्छेनुरूप काम घेता येते. हे लिंग कोणाचेही विशुद्ध नसते. नाना प्रकारचे संस्कार व वासना त्याच्या ठिकाणी संचित असतात आणि त्याला मलिन करतात. मृत्यूनंतर ते जेव्हा स्थूल देहातून बाहेर येते, तेव्हा ते सारे संस्कार आणि सूक्ष्म भूतसमूह यांचे गाठोडे त्याच्याबरोबर असते. मृत्युसमयी जे संस्कार किंवा भाव प्रबळ होतात, ते पूर्वसंचित दुसऱ्या भावांना उद्बुद्ध करून स्वतःमध्ये मिसळून घेतात. मग ते भाव पिंडीभूत होऊन प्रारब्ध कर्मांची सृष्टी करतात. जीवाला मग तदनुसारच गती प्राप्त होते.

लिंगदेहावर अभिमान ठेवणाऱ्या अविद्योपाधिक जीवात्म्याला तैजस म्हणतात. अशा प्रकारेच सर्व सूक्ष्म किंवा लिंग देहांवर अभिमान ठेवणाऱ्या आत्म्याला हिरण्यगर्भ अशी संज्ञा आहे.

**कारण देह**– वरील लिंगदेहाच्या मागे त्याचे प्रयोजन असलेला कारण देह विद्यमान असतो. यालाच अनादी अविद्या असे म्हणतात. तीच जीवांच्या स्थूल व सूक्ष्म देहांचे कारण आहे. ती ज्ञानाने नाश पावते म्हणून तिला देह म्हटले. याच्यावर अभिमान ठेवणाऱ्या जीवाला प्राज्ञ असे म्हणतात. सर्व कारण देहांवर अभिमान ठेवणाऱ्या मायोपाधिक आत्म्याला ईश्वर म्हटले आहे. कारण देह म्हणजे पंचकोशांपैकी आनंदमय कोश होय. प्रिय, मोद व प्रमोद या तीन प्रकारच्या सुखासह असणारे जे मलिन सत्त्व तेच आनंदमय कोश या नावाने ओळखले जाते.

जोवर ब्रह्मविद्येच्या प्रभावाने कारण देह नष्ट होत नाही, तोवर मोक्ष लाभत नाही.

**देहसिद्धी** – देह विकाररहित अतएव शुद्ध, निर्मल करणे याला देहसिद्धी म्हणतात. प्राचीन रसायनशास्त्रज्ञ सांगतात, की अठरा संस्कारांनी संस्कृत केलेल्या पाऱ्याच्या द्वारे देहवेध करता येतो. या देहवेधाच्या द्वारे अशुद्ध देह वज्रपंजराप्रमाणे सिद्धी प्राप्त करून घेऊ शकतो. पातंजल संप्रदायात भूतजय केल्याने कायसंपत्ती अर्थात देहसिद्धी प्राप्त होते असे म्हटले आहे. गोरखनाथादी सिद्ध व तांत्रिक बौद्ध यांनीही देहसिद्धीच्या बाबतीत अनेक उपाय सांगितले आहेत. शुक्राचार्य, जालंधरनाथ, गोविंद भगवत्पाद, इ. पुरुषांना देहसिद्धी प्राप्त झाली होती असे सांगतात. ते नित्य किशोरावस्थेत असत. त्यांना कधीही वृद्धावस्था प्राप्त झाली नाही. कोणताही विकार त्यांच्या देहांत निर्माण झाला नाही. सनत्कुमार हेही नित्य किशोरावस्थेतच होते, असे म्हटले आहे. अश्वत्थामा, बली, व्यास इ. सात पुरुषांना आणि मार्कंडेय या आठव्या पुरुषाला पुराणांनी चिरंजीव मानले आहे. पण हे चिरंजीवपद कल्पसापेक्षच समजले पाहिजे. ज्या उपादानांनी या कल्पाचा उदय झाला, तीच उपादाने मानवदेहाच्या निर्मितीमागेही असतात. कल्पक्षय झाला, की चिरंजीव पुरुषांचे देहही नाश पावतात.

सकल सृष्टी ही अग्निषोमात्मक आहे आणि म्हणूनच मानवदेहही अग्निषोमात्मकच आहे. सोमकलेने देह उत्पन्न होतो आणि अग्निरूपी काल त्याचे भक्षण करतो. जेव्हा सोमकला ही विशिष्ट सिद्धीने अग्नीपेक्षाही प्रबल होते, तेव्हा तो देह कल्पांतापर्यंतही टिकून राहू शकतो. सोमपानाने अमरत्व प्राप्त होते असे जे ऋग्वेदात म्हटले आहे, त्याचे तात्पर्य हेच आहे. मानवाला कल्पांतापर्यंत अमरत्व जरी प्राप्त झाले, तरी देहतत्त्वावर पूर्ण अधिकार मिळवल्यावाचून देहातीत व विशुद्ध अशा आत्मभावाची प्राप्ती मात्र कधीही व्हायची नाही.

देह केवळ हाडांचा सांगाडा, रक्ता-मांसाचा गोळा किंवा मूत्र-पुरीषाची खाण नसून, तो देवतांचे आयतन किंवा मंदिर आहे, अशी कल्पना यजुर्वेदात मांडली आहे. तिथे दिलेला शरीरविषयक एक मंत्र असा –

सप्त ऋषयः प्रतिहिताः शरीरे<br>
सप्तः रक्षन्ति सदमप्रमादम् ।<br>
सप्तापः स्वपतो लोकमीयु –<br>
स्तत्र जागृतोऽस्वप्नजौ सत्रसदौ च देवौ ॥<br>
(शु. यजु. ३४·५५)

अर्थ – प्रत्येक शरीरात सात ऋषी निवास करतात. हे सात ऋषी सावधपणे शरीररूपी यज्ञशालेचे रक्षण करतात. हेच सात ऋषी म्हणजे सात जलप्रवाह होत. हे जलप्रवाह निद्रा घेणाऱ्याच्या स्थानाप्रत जातात. त्या निद्रेतही दोन देव जागृत असतात आणि ते या शरीररूपी यज्ञशालेचे रक्षण करतात.

या मंत्राचे विवेचन पं. सातवळेकर यांनी पुढीलप्रमाणे केले आहे –

मनुष्यदेह हा सात ऋषींचा आश्रम आहे. दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या व एक मुख हे त्यात राहणारे सप्त ऋषी होत. हे सातही ज्ञानग्रहण करणारे असल्यामुळे त्यांना सप्तर्षी म्हटले आहे. ही ज्ञानग्रहण करणारी सात इंद्रिये या शरीराचे रक्षण करतात. त्यांना सात जलप्रवाह असेही म्हणतात. जागृतीत हे सात प्रवाह बहिर्मुख असतात व झोप लागण्याच्या वेळी ते अंतर्मुख बनतात. या अंतर्मुखतेमुळेच शरीर निद्राधीन होते. या सात प्रवाहांना अंतर्मुख करण्याने मनुष्याला सुख प्राप्त होते. निद्रेच्या वेळी जे दोन देव जागे असतात असे म्हटले आहे, ते म्हणजे प्राण व अपान होत. त्यांनी जागे राहिलेच पाहिजे. कारण त्यांचे कार्य बंद झाले तर देहाचा मृत्यूच ओढवेल.

अथर्ववेदात मानवदेहाचे वर्णन देवांची नगरी अशा स्वरूपात केले आहे, ते असे –

अष्टाचक्रा नवद्वारा देवानां पूरयोध्या ।
तस्यां हिरण्ययः कोशः स्वर्गो ज्योतिषावृतः ।।
तस्मिन् हिरण्यये कोशे त्र्यरे त्रिप्रतिष्ठिते ।
तस्मिन् यद्यक्षमात्मन्वत् तद् वै ब्रह्मविदो विदुः ।
( अथर्व १०.२.३१–३२ )

अर्थ – आठ चक्रे व नऊ द्वारे असलेली ही काया म्हणजे देवांची अयोध्या नगरी होय. या नगरीत सुवर्णमय कोश आहे, तोच तेजोव्याप्त स्वर्ग होय. तीन अरे आणि तीन आधार असलेल्या या सुवर्णमय कोशात (अर्थात तीनावर तीन म्हणजे ३३ देवता असलेल्या या देहात) आत्मारूपी यक्ष राहतो आणि ही गोष्ट सगळे आत्मज्ञानी जाणतात.

वरील मंत्रातली आठ चक्रे म्हणजे मूलाधार, स्वाधिष्ठान, इ. होत आणि नव द्वारे म्हणजे इंद्रियांची नऊ छिद्रे होत. नेत्रात सूर्य, कानात दिशा, नाकात वायू, मुखात अग्नी, हृदयात चंद्रमा अशा प्रकारे या शरीरात ३३ देवता राहतात. मानवदेहाला स्वर्गधाम म्हटले आहे, ते यासाठीच.

**चौऱ्यांयशीचा फेरा** – ' लख चौऱ्यांयशी फेरे फिरकर सुंदर नरतनु पाया ', अशा प्रकारची बहुतेक संतांची वचने आहेत. जीव हा चौऱ्यांयशी लक्ष योनींत स्थावर, उद्‌भिज्ज, स्वेदज, अंडज, इ. अवस्थांतून मार्ग क्रमीत शेवटी जरायुज श्रेणीत दाखल होतो. या श्रेणीतून पुढे जाता जाता तिच्या ऊर्ध्व टोकाला येताच त्याला मनुष्यदेह प्राप्त होतो. ज्याप्रमाणे नदीचा प्रवाह हा स्वभावतःच समुद्राकडे धावत असतो, त्याचप्रमाणे पुरुषसंसर्गासाठी क्षुब्ध झालेल्या प्रकृतीचा अंतःप्रवाहही पुरुषाकडेच प्रवाहित होत असतो. त्यामुळे जीव हा बीजरूपाने प्रकृतीच्या गर्भात प्रविष्ट होऊन क्रमशः उच्च श्रेणीकडे जात असतो. त्याला एकाहून एक उच्च प्रकारचे देह प्राप्त होत असतात. हे अधिकाधिक उच्च श्रेणीत देह प्राप्त करणे हे कृतकर्माचे फल नसते. तो प्रकृतीच्या प्रवाहाचा स्वाभाविक परिणाम असतो. जोवर अहंभावाचे स्फुरण होत नाही, तोवर जीवाला कर्माधिकार नसतो. अतएव मनुष्यदेह प्राप्त होण्यापूर्वीच्या चौऱ्यांयशी लक्ष योनीत दह धारण करीत पुढे पुढे जाणे हा केवळ प्राकृतिक व्यापार असतो. त्याच्या मुळाशी व्यक्तिगत इच्छा किंवा कर्मप्रेरणा नसते. पण मनुष्यदेह प्राप्त होताच, कर्तृत्वाभिमान जागृत होतो आणि त्यामुळे कर्माधिकारही उत्पन्न होतो. कर्माधिकाराच्या मागोमाग फलभोगही क्रमप्राप्त होतो. म्हणूनच मानवदेहात प्रकृतीच्या प्रवाहाचा प्रभाव मागे पडून त्या जागी जीव हा स्वकृत कर्मप्रवाहात सापडून ऊर्ध्व किंवा अधोलोक प्राप्त करून घेतो. प्रकृतीची गती सरळ व ऊर्ध्वमुखी असते; पण कर्माची गती वक्र, चक्राकार आणि वैचित्र्ययुक्त असते. कारण अभिमानाच्या विकासामुळे त्याच्या इच्छाही अनंत प्रकारच्या होत असतात. जीवाचा मार्ग जर सरळ व्हायला हवा असेल, तर या अभिमानाची निवृत्ती होणे आवश्यक असते. त्यासाठीच ज्ञानी पुरुषांनी योगादी साधने सांगितली आहेत.

**मानवदेहाचे श्रेष्ठत्व** – मानव देह हा पांचभौतिक अतएव नश्वर आहे, ही गोष्ट उघड आहे. तो क्षुद्र वेभरवशीही आहे. ' नाही भरवसा देहाचा ' हे सकल संतांनी या ना त्या प्रकारे लोकांच्या मनावर बिंबवले आहे. पण मानवदेह हा जरी क्षुद्र, नश्वर, बेभरवशी असला, तरी त्याच्यावाचून कोणत्याही माणसाला कोणत्याही प्रकारची साधना करता येत नाही. म्हणूनच ' शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ' = शरीर हे आद्य ( श्रेष्ठ ) धर्मसाधन आहे, असे कालिदासाने म्हटले आहे (कुमार.५.३३).

संतांनी मानवदेहाची येनकेन प्रकारेण निंदा केलेली असली, तरी या क्षणभंगुर देहाची आसक्ती धरू नये एवढ्यापुरतीच ती मर्यादित समजायला हवी. परमार्थासाठी या देहाची नितांत गरज आहे, हे सर्वांनाच मान्य आहे. समर्थ रामदासांनी आपल्या दासबोधात देहावर एक समासच लिहिला आहे. त्यात देहाची क्षुद्रता सांगून झाल्यावर ते म्हणतात –

येह लोक आणि परलोक । देह्याकरिता सकळ सार्थक ।
देहेवीण निरर्थक । सकळ काही ।।
देह सकळांमधे उत्तमू । देही राहिला आत्मारामू ।
सकळां घटी पुरुषोत्तमू । विवेकी जाणती ।।
( दास. १८.४.८ व १८ )

या नश्वर देहानेच अविनाशी असे परब्रह्म प्राप्त करून घ्यायचे असते. देहातूनच देहातीत अवस्थेला जाऊन मोक्ष मिळवायचा असतो.

तंत्रशास्त्राच्या दृष्टीने नरदेहाचे महत्त्व कशा प्रकारचे आहे, ते म. म. गोपीनाथ कविराज पुढीलप्रमाणे सांगतात –

नरदेहरूपी आधार मिळाल्यावाचून अन्य कोणत्याही आधाराने विश्वातल्या दिव्य शक्तीचा आविर्भाव होत नाही. पशुपक्ष्यादींच्या देहांत दिव्य शक्तीचे उत्थान असंभवनीय आहे. अहंभाव हे दिव्य शक्तीचे मूल स्फुरण होय. त्याचा उगम नरदेहातच होऊ शकतो आणि त्याची पूर्णताही तिथेच होऊ शकते. समस्त जड व चेतन अशी समष्टिसत्ता घनीभूत होण्यानेच मानवदेहाची निर्मिती होते. मन व अहंकार यांच्या उन्मेषासह वाक्‌शक्ती वैखरीच्या रूपाने नरदेहातच प्रथम प्रकट होते. मानवाच्या प्रज्ञेचे बीज त्या वाक्‌शक्तीतच असते. वर्णात्मक

शब्दाची क्रिया व त्याचे विलयन हे दोन्ही व्यापार याच देहात होत असतात. आपण बद्ध आहो, ही जाणीव नरदेहातच होते आणि म्हणूनच त्याची मुक्तीही याच देहात साध्य होते. कुंडलिनी शक्ती याच देहात स्थित असते. इडा, पिंगला, सुषुम्ना या नाड्या व षट्चक्रे मानवदेहावाचून अन्यत्र यथावत असत नाहीत. इंद्रियनिग्रह मानवदेहावाचून अन्यत्र घडत नाही. जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्था पशुपक्ष्यादी योनीतही आढळतात; पण तुरीय किंवा तुरीयातीत ही अवस्था मात्र मानवाच्याच ठिकाणी येऊ शकते आणि म्हणूनच आत्मोद्धारक किंवा मोक्षप्रद असा कर्म, ज्ञान व भक्ती यांचा अभ्यासही मानवदेहातच होऊ शकतो.

ज्याला दिव्यदेह असे म्हणतात, तो केवळ मनुष्यदेहाचा विकासच असतो. मानवदेहच पूर्णता प्राप्त झाल्यावर भगवत्-देहाच्या रूपात परिणत होतो. म्हणूनच महाभारतातल्या हंस-गीतेत म्हटले आहे –

गुह्यं ब्रह्म तदिदं ब्रवीमि ।
न मानुष्यात् श्रेष्ठतरं हि किञ्चित् ॥

अर्थ – गुह्य ब्रह्म (किंवा रहस्य) मी सांगतो, ते हे की (या जगात) मनुष्यत्वाहून श्रेष्ठ असे काहीही नाही.

शंकराचार्यांनीही या कथनाला दुजोरा दिला आहे, तो असा –

दुर्लभं त्रयमेवैतद्दैवानुग्रहहेतुकम् ।
मनुष्यत्वं मुमुक्षुत्वं महापुरुषसंश्रयः ॥
(विवेकचूडामणी)

अर्थ – मनुष्यत्व, मुमुक्षुत्व आणि महापुरुषाचा सहवास या तीन गोष्टी दुर्लभ असून, त्या दैवाच्या अनुग्रहानेच प्राप्त होत असतात.

पाप-पुण्यासाठी नरदेह प्राप्त होत नसतो; तर पाप-पुण्यातीत अतएव विशुद्ध अशा कर्मासाठी तो मिळालेला असतो. योगरूप कर्म म्हणजेच विशुद्ध कर्म होय. जोवर ते हातून घडत नाही, तोवर नरदेहाचे सार्थक नाही. नरदेहाची गती कर्मानुसारिणी असते. इथून ऊर्ध्वलोकातही जाता येते आणि अधोलोकातही जाता येते. विश्वात सर्वत्र जाण्याचा मार्ग नरदेहातूनच निघतो. भाग्यवशात जर माणसाला आत्म्याकडे जाण्याचा मार्ग गवसला तर त्यायोगे त्याला पूर्णावस्था प्राप्त होऊन मोक्ष मिळतो. [ तां. वा. शा. दृ.; भा. सं. सा. १; सि. सा.; श. क. ]

## देहरी-पूजन

हिमालयाच्या पायथ्याच्या पहाडी प्रदेशांतील एक लोकोत्सव. हा उत्सव लहान मुलींचा आहे. होळीनंतर हा सुरू होतो. काही ठिकाणी हा चैत्र मासात सुरू करून वैशाखात संपवितात. या प्रसंगी लहान मुली आपापल्या खोल्या सारवतात. त्यांत रांगोळ्या काढतात. दारे व कमानी फुलांनी शृंगारतात. या उत्सवात शंकरपार्वती म्हणून बाहुला-बाहुलींचीं लग्ने लावण्याची पद्धत आहे. घरातल्या मोठ्या बायका मुलींच्या या लग्नसमारंभाला सर्व प्रकारे मदत करतात. हा उत्सव आठवडाभर चालतो.

## देहवर्ती व्रत

एक काम्य व्रत. पायाच्या आंगठ्यापासून शेंडीच्या टोकापर्यंतच्या लांबीचे कापसाचे तीन धागे एकत्र वळून केलेल्या वातीला देहवर्ती अशी संज्ञा आहे. रोज एक देहवर्ती करून ती गाईच्या तुपात भिजवून प्रज्वलित करणे व तिने शिवाला आरती करणे, असा या व्रताचा विधी आहे. कार्तिक, मार्गशीर्ष किंवा माघ महिन्याच्या एकादशीला, त्रयोदशीला अथवा चतुर्दशीला उपवास करून या व्रताला प्रारंभ करतात. व्रतावधी एक वर्ष, एक महिना किंवा एक दिवस असतो. व्रतकर्त्याच्या इच्छेनुसार उद्यापनाच्या वेळी चांदीच्या दिव्यात सोन्याची वात घालून तो दिवा दान देतात. फल - स्वर्ग व मोक्ष यांची प्राप्ती. [ व्रतराज ]

## देहू

महाराष्ट्रातील एक संतक्षेत्र. हे पुण्यापासून १७ मैलांवर इंद्रायणी नदीच्या काठी वसले आहे. तुकाराममहाराजांनी इथे वास्तव्य केल्यामुळे महाराष्ट्रातील हे एक अग्रगण्य क्षेत्र बनले आहे. देहूविषयी तुकोबांच्या मनात अपार प्रेम वसत होते. आपल्या एका अभंगात हे प्रेम त्यांनी पुढीलप्रमाणे व्यक्त केले आहे –

धन्य देहू गांव पुण्यभूमि ठाव । तेथे नांदे देव पांडुरंग ॥
धन्य क्षेत्रवासी लोक ते दैवाचे । उच्चारिती वाचे नामघोष ॥
कर कटीं उभा विश्वाचा जनिता । वामांगीं ते माता रखुमादेवी ॥
गरुडपारीं उभा जोडुनिया कर । अश्वत्थ समोर उत्तराभिमुख ॥
दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर । शोभे गंगातीर इंद्रायणी ॥
लक्ष्मीनारायण बल्लाळाचे बन । तेथे अधिष्ठान सिद्धेश्वर ॥
विघ्नराज द्वारीं बहिरव बाहेरीं । हनुमंत शेजारीं सहित दोघे ॥
तेथें दास तुका करितो कीर्तन । हृदयीं चरण विठोबाचे ॥

इथे एक विठ्ठलमंदिर आहे. हे मंदिर तुकोबाचे धाकटे चिरंजीव नारायणबावा यांनी इ. स. १७२३ मध्ये बांधले. परंतु मंदिरातील विठ्ठलमूर्ती मात्र तुकारामाचे सातवे पूर्वज विश्वंभरबावा यांच्या वेळेपासूनची आहे. 'ही आमच्या पूर्वजांची मिरास आहे' असे या मूर्तीविषयी तुकोबा म्हणतात. या देवळाच्या भिंतीला लागून जो घाट आहे, त्याला देऊळघाट म्हणतात आणि तटाच्या आतील मंदिरसमूहाला देऊळवाडा म्हणतात. या देऊळवाड्यातच इनामदारांचा म्हणजे तुकोबांच्या

पूर्वजांचा वाडा आहे. विठ्ठलमंदिराच्या थोडे पूर्वेस राममंदिर आहे. त्यामागे एक उत्तराभिमुख शिवमंदिर आहे. मंदिराशेजारी एक खोली आहे. त्याला तुकारामाचे वृंदावन म्हणतात. तिथे एका शिळेवर तुकोबा चिंतन करीत बसत. या ठिकाणी तुकोबांच्या पादुका स्थापल्या असून, तुकोबांचा मुखवटाही ठेवला आहे. हे वृंदावन इ. स. १७०४ मध्ये नारायणबावा यांनी बांधले. देऊळवाड्यापासून जवळच तुकोबांचे जन्मस्थान आहे. सांप्रत तिथे तुकोबांची एक पाषाणमूर्ती करून ठेवलेली आहे. उत्तरमहाद्वारासमोर तुकोबांच्या वंशजांच्या समाधिशिळा आहेत. त्यांत नारायणबाबाचीही एक समाधी आहे. नदीकाठच्या हरिजनवस्तीत चोखामेळ्याचे मंदिर आहे. देऊळघाटाशेजारी एक मोठा डोह आहे. या डोहातील मासे मारायचे नाहीत, असा तिथला संकेत आहे. डोहाच्या जवळच गोपाळपुरा म्हणून एक भाग आहे. इथे एका अश्वत्थ वृक्षाखाली तुकोबांचे निर्याणस्थान दाखवितात.



तुकारामाचे निर्याणस्थान – गोपाळपुरा, देहू

गोपाळपुऱ्यापासून सुमारे अर्धा मैल अंतरावर इंद्रायणीचा प्रसिद्ध डोह आहे. याच डोहात तुकोबाने आपले अभंग बुडवले होते. नदीकाठी इनामदारांच्या वाड्याच्या पिछाडीस मंबाजी बुवाची वखळ आहे. सांप्रत तिथे शंकराचे लहानसे मंदिर आहे.

देहूपासून चार मैल अंतरावर भंडारा नामक डोंगर आहे आणि उत्तरेस सहा मैलांवर भामाचंद्र नावाचा डोंगर आहे. भंडाऱ्यावर जुने शिवमंदिर असून, नव्याने बांधलेल्या विठ्ठलमंदिरात तुकोबाच्या पादुका आहेत. माघ शुद्ध दशमीला तुकोबांना गुरूपदेश झाला. वारकरी मंडळी तिथे जाऊन तो दिवस साजरा करतात.

भामाचंद्र डोंगरावर एक लेणे आहे. तिथे महादेवाची पिंडी आणि तीर्थंकराची एक मूर्ती आहे. हे लेणे इ. स. ११०० च्या सुमाराचे असावे, असे पुरातत्त्ववेत्त्यांचे मत आहे. तिथल्याच एका घळीत विठ्ठल-रुक्मिणींच्या मूर्ती आहेत. तुकोबा या ठिकाणी येऊन चिंतन करीत बसत असत, असे सांगतात.

देहूमध्ये काही नित्य व काही नैमित्तिक उत्सव होत असतात. कार्तिक वद्य एकादशीला देहूची पालखी आळंदीस जाते. तुकारामाच्या गुरूपदेशाच्या दिवशी उत्सव होतो. फाल्गुन वद्य द्वितीयेपासून तीन दिवस तुकारामाच्या निर्याणदिनानिमित्त तिथे मोठी यात्रा भरते. ज्येष्ठ वद्य अष्टमीला देहूहून तुकोबाची पालखी निघून ती पुणे-सासवड-बारामती-अकलूज मार्गे आषाढ शुद्ध एकादशीला पंढरपुरी पोचते आणि आषाढ वद्य एकादशीला देहूस परत येते.

देहूतल्या देवस्थानांची पूजा-अर्चा अखंड चालू राहावी म्हणून छत्रपती संभाजी, राजाराममहाराज, पेशवे, रामचंद्र नीळकंठ व ताराबाईचा मुलगा दुसरा शिवाजी यांनी देहूला काही सरकारी वतने दिली होती व देहू गावही इनाम दिले होते. [ तु. ज्ञा. क.; ती. म. ]

**दैत्य** कश्यपापासून दितीच्या ठिकाणी उत्पन्न झालेले ते दैत्य होत. हे देवांचे शत्रू म्हणून प्रसिद्ध आहेत. प्राचीन साहित्यात दैत्यांचे उल्लेख आलेले आहेत. भगीरथाच्या रथापाठोपाठ गंगेबरोबर दैत्यगण चालत होता (वा. रा. १. ४३. ३२). अमृताच्या प्राप्तीसाठी देव-दैत्यांनी मिळून क्षीरसागराचे मंथन केले. त्यातून प्रकट झालेल्या अप्सरा व वारुणी सुरा यांचे दैत्यांनी ग्रहण न केल्यामुळे त्यांना असुर असे नाव मिळाले. अमृत मिळविण्यासाठी यांनी राक्षसांचे साहाय्य घेऊन देवांशी युद्ध केले. पण देवांनी यांचा पराभव केला. राम वनवासात गेला असता, त्याचे रक्षण करण्यासाठी कौसल्येने दैत्यांनाही आवाहन केले आहे. दैत्य हे यज्ञविध्वंसक होते; म्हणून त्यांना क्रतुद्विष असे नाव पडले आहे.

अभिजात संस्कृत वाङ्मयात असुर, दानव व दैत्य हे शब्द समानार्थीच योजलेले आढळतात. काही देवांना, त्यांनी वध केलेल्या दैत्यांवरून नावे मिळाली आहेत. उदा० विष्णूला कैटभजित व मधुसूदन; देवीला महिषासुरमर्दिनी; कृष्णाला केशिनिषूदन, इत्यादी.

दैत्य, राक्षस, दानव वगैरे शब्द प्राचीन लोकसमाजाचे वाचक आहेत, असे अलिकडच्या काही विद्वानांचे मत आहे. [ एन्सा. रि. ए.; सु. वि. को.; वा. रा. को. ]

**दैत्रवीर** (दैत्र=दैत्य, बीर=वीर) एक लोकदेव. हा देव उत्तर प्रदेशातील मिर्झापूर जिल्ह्यात आढळतो. अक्कतबीर आणि लटोराबीर हे दोघे त्याचे गोवती आहेत. हे

तिघेजण मिळून रात्री बाहेर पडतात आणि मशाली हातात घेऊन नाचतात, अशी तिकडील लोकांची समजूत आहे. इतरत्र याला ब्यौंहारबाबा असे म्हणतात. हा व्यापाऱ्यांचे संरक्षण करतो, असे म्हणतात. [ फो. नॉ. इं. ]

## दैव आणि पुरुषकार

एक तात्त्विक जोडसंज्ञा. त्यांपैकी दैव या शब्दाची व्याख्या अशी – 'देवात् नियतात् आगतम्' = देव म्हणजे कुठली तरी अचिंत्य शक्ती. तिने ठरवल्याप्रमाणे जे घडते, त्याला दैव म्हणतात. जीवनातील इष्टानिष्ट घटना कोणत्या तरी अज्ञात व अचिंत्य शक्तीच्या प्रभावाने घडतात आणि त्यांवर मानवी प्रयत्नांचे नियंत्रण चालत नाही, या विचाराला दैव अशी संज्ञा दिलेली आहे. संस्कृत भाषेत काल, विधी, नियती, अदृष्ट कर्म, भवितव्य, इ. त्याची अनेक पर्यायनावे आहेत.

पुरुषकार म्हणजे पुरुषाचे, व्यक्तीचे कर्तृत्व होय. व्यक्तीला आपल्या कर्तृत्वाने आपल्या जीवनातील अनिष्टाचे निराकरण करून इष्ट घडविता येते, या विचाराला पुरुषकार अशी संज्ञा आहे. दैव आणि पुरुषकार या उभय विचारप्रणालींचा संघर्ष प्राचीन काळापासून सतत चालू असलेला दिसतो आणि यांपैकी प्रत्येक विचाराचे पुरस्कर्ते जीवनानुभवांचा आधार देतात.

वैदिक आर्य पुरुषकाराचे पुरस्कर्ते होते. त्यांच्या विजिगीषू वृत्तीचे उन्मेष ऋग्वेदातील अनेक ऋचांतून व्यक्त झालेले दिसतात. वैदिक ऋषींचे पुढील उद्‌गार त्यांच्या प्रयत्नवादी वृत्तीचे निदर्शक आहेत–

न ऋते श्रान्तस्य सख्याय देवाः ।

(ऋ. ४.३३.११)

अर्थ– देव हे प्रयत्नशील माणसावाचून अन्य कोणाशी सख्य करीत नाहीत.

इच्छन्ति देवाः सुन्वन्तं न स्वप्नाय स्पृहयन्ति ।

(ऋ. ८.२.५८)

अर्थ – देव यज्ञकर्त्या, पुरुषार्थी माणसालाच चाहतात; आळशाला चाहत नाहीत.

भूत्यै जागरणमभूत्यै स्वपनम् ।

(यजु. ३०.१७)

अर्थ – जागृती (प्रयत्नशीलता) ही वैभव देणारी आहे; तर स्वप्न (आळस) दारिद्र्यात लोटणारे आहे.

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ।

(ईशावास्य उप. ४०.२)

अर्थ – या जगात मनुष्यमात्राने सतत कर्मे करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा धरावी.

वैदिक ऋषींनी पुरुषकाराला दिलेले महत्त्व ब्राह्मणग्रंथांतही आढळते. 'शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः ।' = झोपलेल्याचे दैव झोपते आणि चालणाऱ्याचे दैव चालते; असा दैवाच्या निरर्थकतेचा ध्वनी ब्राह्मणग्रंथांत दिसून येतो.

उपनिषत्कालात मात्र दैववादी विचारांचा प्रभाव वाढत चाललेला दिसतो. मनुष्य म्हणजे ईश्वराच्या हातातील केवळ बाहुले असून, त्याचा अभ्युदय व्हावा, असे ईश्वराच्या मनात आल्यास तो त्याच्याकडून पुण्यकर्मे करवितो व त्याचा अधःपात व्हावा असे वाटल्यास त्याच्याकडून पापकर्मे करवितो, असे कौषीतकी उपनिषदात म्हटले आहे (३.६). वाटेल त्या परिस्थितीत ठेवले, तरी त्या परिस्थितीवर आपली सत्ता चालवून, वाटेल त्या वेळी आपल्या सर्वजित निश्चयापुढे सृष्टीला वाकायला लावू, असे मनुष्याला वाटत असते; परंतु प्रत्यक्ष त्याच्या आयुष्यातील घडामोडींकडे पाहिले म्हणजे या त्याच्या कल्पना भ्रामक व फोल ठरतात, असे छांदोग्यात म्हटले आहे (८.१.६). काही उपनिषदांत मात्र पुरुषकाराचे माहात्म्य वैदिक ऋषींच्या आवेशानेच प्रतिपादिलेले आहे. उदा०–

शुभाशुभाभ्यां मार्गाभ्यां वहन्ती वासनासरित् ।
पौरुषेण प्रयत्नेन योजनीया शुभे पथि ।।

(मुक्ति. २.५.६)

अर्थ – तृष्णानदी शुभ व अशुभ या दोन तीरांमधून वाहत असते. परंतु पुरुषाने आपल्या प्रयत्नाच्या बळावर तिला शुभ मार्गाने वाहायला लावावे.

उपनिषत्काळापासून हळूहळू हिंदू समाजाच्या मनावर दैववादाचा पगडा बसू लागला. पुनर्जन्मावरील श्रद्धेशी दैवाची सांगड घातली गेली. पूर्वजन्मी केलेल्या कर्मांचे फळ या जन्मी भोगावे लागते आणि या जन्मी जसे करावे, तसे पुढील जन्मी भोगावे लागते, हा विचार क्रमशः दृढावत गेला. त्यामुळे सामान्य जनांच्या मनातून पुरुषकाराचा उल्हास मावळत गेला.

रामायणात दैवाचाच प्रभाव अधिक जाणवतो. 'दैवं चेष्टयते सर्वम्' = दैवच सर्व काही घडवीत असते, हा विचार रामायणकारांनी वेगवेगळ्या शब्दांत अनेकवार मांडला आहे. महाभारतात मात्र ठायी ठायी प्रयत्नवादाचा पुरस्कार केलेला आढळतो. दैववादी माणसे महाभारतात दिसत नाहीत असे नाही; परंतु श्रीकृष्ण, भीष्म, अर्जुन, भीम, यांसारखे महाभारतातले कर्ते पुरुष मात्र सदैव उद्योगाचीच प्रशंसा करताना दिसतात. विदुलेने आपल्या पुत्राला केलेला उपदेश पुरुषकाराच्या प्रशंसेनेच उज्ज्वल ठरला आहे. भीष्मानेही पुरुषकाराचाच संदेश दिला आहे. तो युधिष्ठिराला उपदेश करतो–

उत्थानेन सदा पुत्र प्रयतेथा युधिष्ठिर ।
न ह्युत्थानमृते दैवं राज्ञामर्थं प्रसाधयेत् ।।
(म. भा. शांति. ५६.१४)

अर्थ – हे वत्सा युधिष्ठिरा, सदैव उत्साहाने प्रयत्न करीत राहा. दैव हे राजाचे मनोरथ साधून देणारे ठरत नाही. त्यासाठी पुरुषकारच आवश्यक आहे.

महाभारतकाराप्रमाणेच कौटिल्यानेही 'उत्थान हेच राजाचे व्रत होय,' असा विचार राजधर्माच्या संदर्भात प्रतिपादिला आहे. मत्स्यपुराणकाराने या विचाराला प्रभावी भाषेत पुष्टी दिली आहे, ती अशी–

स्वमेव कर्म दैवाख्यं विद्धि देहान्तरार्जितम् ।
तस्मात् पौरुषमेवेह श्रेष्ठमाहुर्मनीषिणः ।।
नालसाः प्राप्नुवन्त्यर्थान्न च दैवपरायणाः ।
तस्मात् सदैव यत्नेन पौरुषे यत्नमाचरेत् ।।
त्यक्त्वालसान् दैवपरान् मनुष्यान्
उत्थानयुक्तान् पुरुषान् हि लक्ष्मीः ।
अन्विष्य यत्नाद् वृणुते नृपेन्द्र
तस्मात् सदोत्थानवता हि भाव्यम् ।।

अर्थ – हे राजश्रेष्ठा, आपलेच पूर्वजन्मातील कर्म म्हणजे दैव होय. म्हणूनच विचारवंतांनी पौरुषाला श्रेष्ठ ठरविले आहे. आळशी वा दैवपरायण व्यक्तींना यश लाभत नाही. म्हणून सदैव प्रयत्नांची दृढतापूर्वक कास धरावी. आळशी व दैवपरायण व्यक्तींचा लक्ष्मी त्याग करते आणि पुरुषार्थी व्यक्तींचा शोध घेऊन त्यांना वरते. म्हणून माणसांने सदैव प्रयत्नशील असावे.

वासिष्ठरामायणात म्हणजेच योगवासिष्ठातही पुरुषकाराचाच पुरस्कार आढळतो. या संदर्भातील काही वचने अशी–

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा क्वचित् ।
पौरुषेण प्रयत्नेन यन्नाप्नोति गुणान्वितः ।।
न दैवं न च कर्माणि न धनानि न बान्धवाः ।
शरणं भवभीतानां स्वप्रयत्नादृते नृणाम् ।।
(यो. वा. ४. ६२. १९; ५.१३.८)

अर्थ – पृथ्वीवर, स्वर्गात वा अन्य कुठेही अशी एकही गोष्ट नाही, की जी गुणी पुरुष स्वप्रयत्नाने प्राप्त करून घेऊ शकणार नाही. संसारभयाने ग्रस्त झालेल्या मानवांना स्वतःचा प्रयत्न सोडून दैव, कर्मे, धन, बांधव यांपैकी कशाचाही आश्रय उपयोगी पडणार नाही.

योगवासिष्ठकारांचे असे स्पष्ट मत आहे, की 'मूढैः प्रकल्पितं दैवम्' = दैव ही केवळ मूर्खांची कल्पना आहे. दैवावर भरवसा ठेवणारे मूर्ख नाश पावतात आणि पौरुषाचा आश्रय घेणारे शहाणे उत्तम पद प्राप्त करून घेतात. म्हणून दैव दूर सारून पौरुषाचाच आश्रय करावा, असा योगवासिष्ठकारांचा अखेरचा सांगावा आहे.

महाभारतकाराने स्फूर्ती देण्याच्या संदर्भात पौरुषाची जयगाथा गायिली असली, तरी अनेकवार 'दैवे च मानुषे चैव संयुक्तं लोककारणम्' = या जगातील व्यवहाराला दैव आणि पौरुष ही दोन्ही कारणीभूत आहेत, अशासारखा विचारही मांडला आहे (म. भा. उद्योग. ७९.५). याच विचाराचा पडसाद महाभारतांतर्गत गीतेतही उमटला आहे, तो असा —

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ।।
(गीता १८.१४)

अर्थ – कार्याचे स्थान, तसेच कर्ता, विविध प्रकारची साधने, व विविध प्रकारचे प्रयत्न आणि पाचवे दैव, ही पाच सर्व कर्मांच्या सिद्धीची कारणे आहेत.

सुरवातीच्या चार गोष्टी ही सर्व प्रकारच्या कर्मांच्या सिद्धीची कारणे असली, तरी पाचवे दैव हेही एक महत्त्वाचे कारण आहेच. कर्ता–करणादींची अनुकूलता असूनही दैव प्रतिकूल असेल, तर कर्माचे फल मिळणार नाही; म्हणून कर्मफलासक्तीचा त्याग करून कर्म करीत राहावे, ही गीतेची भूमिका आहे. पण लोकमानसात ती विपरीत होऊन मुरली आणि सर्व काही करूनही फलाची निश्चिती नसेल, तर कर्म कराच कशाला, निदान ते उल्हासाने करा कशाला, अशी प्रवृत्ती वाढत गेली.

मध्ययुगात उदयास आलेल्या संतांनी या दैववादी प्रवृत्तीचे भरण-पोषण केले, असा अलिकडच्या अनेक अभ्यासकांचा समज आहे. 'आलिया भोगासी असावें सादर । देवावरी भार टाकूनिया ।।'; 'जें जें होईल तें तें पाहावें । तुका म्हणे उगेंचि राहावें ।।' यासारख्या काही संतवचनांमुळे हा समज खरा आहे, असेही वाटू लागते. परंतु पूर्वग्रहरहित दृष्टीने विचार केल्यास असे दिसून येते, की संतांनी दैववादाचा पुरस्कार केलेला नाही; उलट आत्मोन्नतीच्या क्षेत्रात त्यांनी पुरुषकाराचाच पुरस्कार केलेला आहे. चतुर्विध पुरुषार्थांपैकी मोक्षाची साधना करणे हे संतांचे जीवितध्येय होते आणि त्या असाध्य ध्येयाच्या सिद्धीसाठी 'असाध्य ते साध्य करिता सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ।।' असा त्यांनी अभ्यासावर म्हणजेच पुरुषकारावर जोर दिलेला आहे. या जन्मातील सत्कर्मांनी पूर्वजन्मातील अनिष्ट कर्मांची फले धुवून टाकता येतात, असा सर्व संतांचा दृढ विश्वास होता आणि पूर्वकर्मांची बाधकता नाहीशी करण्याचे आत्मस्वातंत्र्य त्या सर्वांनी उपभोगले होते, त्यासाठी पुष्कळ सायास केले होते, हे संतचरित्रांच्या अभ्यासातून स्पष्ट होते.

लोकसंस्थेच्या रक्षणासाठी सिद्ध पुरुषांनीही उल्हासाने प्रयत्नशील राहायला हवे, याचा स्पष्ट उच्चार ज्ञानेश्वरांनी 'कर्मी भर होआवा । निराशांही,' या शब्दांत केला आहे. समर्थ रामदासांनी तर 'केल्याने होत आहे रे। आधी केलेच पाहिजे ॥' असे सांगून यत्नदेवाची उपासना करण्याचा उत्कट संदेश दिला आहे.

एकोणिसाव्या शतकात भारतात पाश्चिमात्य नव संस्कृतीच्या संपर्कातून नवविचारांचे वारे वाहू लागले आणि अनेक विचारवंत दैववादाच्या उन्मूलनासाठी पुढे आले. या नव्या विचारवंतांपैकी लोकमान्यांनी प्रतिपादिलेला आणि आचरिलेला कर्मयोग-सिद्धान्त म्हणजे पुरुषकाराचा रसरशीत आविष्कार होय. [वै. सा.; उ. र.; गी. र.; श. क.; एस्. इं.; श्री. र. भा. पावगीशास्त्री– चैतन्य, सप्टेंबर १९३७ ]

## दैवतकथा

लोकसाहित्याचे एक प्राचीनतम अंग. इंग्रजी भाषेत यांना मिथ्स् (Myths) म्हणतात. संस्कृतात आणि विशेषतः बौद्ध व जैन वाङ्मयात यांना धर्मकथा अथवा धर्मगाथा असे म्हटले आहे. हिंदीत या कथा धर्मकथा अथवा पुराणकथा या नावाने ओळखल्या जातात.

सृष्टीची उत्पत्ती कशी झाली, सृष्टीतील विविध घटकांची नानाविध वैशिष्ट्ये कशी निर्माण झाली, कोणकोणत्या शक्तींमुळे सृष्टीचा व्यवहार चालतो, यासंबंधीच्या प्राथमिक जिज्ञासेतून आदिम मानवांनी चिंतन केले आणि ते कथारूपात मांडले. या कथांना दैवतकथा असे म्हणतात. मानवसमाजाच्या आद्यतम कथा या दैवतकथा आहेत, हा लोकसाहित्यशास्त्रातला अत्यंत महत्त्वाचा निष्कर्ष आहे.

दैवतकथा जगातील सर्व भूभागात आढळतात. सुसंस्कृत समाजात, त्याचप्रमाणे वन्य समाजातही दैवतकथा आहेत. या सर्व कथांत मानवी जिज्ञासेची आणि त्या जिज्ञासेच्या तृप्तीच्या पद्धतीची एकरूपता आढळते.

दैवतकथा म्हणजे मानवजातीचा प्रारंभिक इतिहास आहे, एवढेच नव्हे; तर आधिभौतिक शास्त्रही आहे, असे अँड्र्यू लँग या पाश्चात्य शास्त्रज्ञाने म्हटले आहे. मानवाच्या भौतिक, सामाजिक व आध्यात्मिक विकासाची अनेक अंगे या कथांत सामावलेली आहेत. परंतु दैवतकथांचा काल इतका प्राचीन आहे, की अनेक निसर्गघटनांची मानवाने त्या काळी शोधून काढलेली स्पष्टीकरणे संपूर्ण अशी कुठेही सापडत नाहीत. उदाहरणार्थ, तळहातावर पूर्वी केस होते व ते का गेले, माणसाला कमरेच्या खाली दोन खळगे का आहेत, माणूस उभा राहून का चालतो, इ. अनेक प्रश्नांची उत्तरे प्रत्येक जातीच्या दैवतकथांत काही ना काही आहेतच; परंतु मानवी देहाचा व दैवी क्रियेचा, आद्य मानवाने कल्पनेने बनविलेला साद्यंत इतिहास मात्र कुठेच उपलब्ध होत नाही. तीच गोष्ट नक्षत्रांच्या, देवतांच्या व धार्मिक प्रथांच्या कथांची. अशा प्रकारे विस्मरणामुळे जे मधले दुवे निखळले, त्या दुव्यांच्या जागी उत्तरकालीनांनी नवी स्पष्टीकरणे जोडली आणि त्यांतून नवे नवे अर्थ काढले. विस्मरणामुळे संस्कृतीच्या सातत्याचा फार मोठा इतिहास लुप्त होत राहिला आणि अवशिष्ट भागांवरूनच प्राचीनतम मानवाच्या मानसिक अवस्थेविषयीची अनुमाने काढावी लागली. मानवेतिहासाचे हे प्रभावी साधन केवळ प्राथमिक मानवाच्या अविकसित कल्पकतेचे व काव्यात्मतेचे प्रतीक म्हणूनच राहिले.

दैवतकथा या प्राचीन तर आहेतच, शिवाय त्या पूज्यही मानल्या गेल्या आहेत. त्यामुळे त्यांचा सदैव धर्माशी संबंध जुळलेला आढळतो. मात्र पुष्कळ वेळा हा संबंध शिथिल व अनियमित असतो. सर्व दैवतकथा या नानादैवतवादी धर्मसंप्रदायांतूनच जन्मलेल्या आहेत. अशा तऱ्हेचे धर्म गेले, तरी काही कथा मात्र अवशेषरूपाने टिकून राहिल्या. युरोपातले ग्रीक, केल्टिक, ट्यूटॉनिक, इ. धर्मसंप्रदाय नाहीसे झाले; परंतु त्यांच्या कथा उरल्या. गतसंस्कृतीच्या निदर्शक अशा या कथा, मूळ संस्कृती व धर्म यांचा लोप झाल्यावर, नव्या धर्मात, संस्कृतीत व नित्यनैमित्तिक कर्मांत जर त्यांना वाव मिळाला नाही, तर कालांतराने दंतकथा किंवा परीकथा या अवस्थेला जातात. परीकथा या मूळच्या दैवतकथा असल्याचे अनेक लोकसाहित्यशास्त्रज्ञांनी मान्य केले आहे. विशेषतः तोंडोतोंडी चालत आलेल्या दैवतकथा परक्या समाजात गेल्यास असे हटकून होते.

धार्मिक पार्श्वभूमी आणि दैवी विषय ही दैवतकथांची प्रमुख वैशिष्ट्ये होत. एखाद्या कथेतील पात्रांचे देवत्व जोवर टिकून राहते, तोवरच ती कथा दैवतकथा म्हणून गणली जाते. त्या कथेतील पात्रांचे देवत्व अथवा दैवी स्वरूप नाहीसे झाले, की ती केवळ दंतकथा किंवा परीकथा बनते.

लोकसंस्कृतीचा विख्यात रशियन अभ्यासक मॅलिनोव्हस्की याने दैवतकथांचे जे महत्त्व सांगितले आहे, ते असे – 'आपल्या परंपरेला सुदृढ बनविणे आणि प्राचीनतम अतिप्राकृतिक, महान, नैतिक व आदर्श अशा घटनांबरोबर तिचा संबंध जोडून तिला गौरवप्राप्त करून देणे, हे दैवतकथांचे कार्य आहे.' अशा कथांतूनच जगातील आर्ष महाकाव्यांचा विकास झाला. या कथा मनुष्याच्या गहनतम अंशाला स्पर्श करून, त्याच्या आशाआकांक्षांची भव्य अभिव्यक्ती करतात. विज्ञानाच्या प्रगतीबरोबर या कथांचे महत्त्व घटत चालले, तरी अजूनही जनमानसावर त्यांचा प्रभाव फार मोठ्या प्रमाणात टिकून आहे. मानवजातीचे

विकसित केलेल्या नानाविध कलांवरही या कथांचा प्रभाव आहे. वेरूळ–अजंठ्याची लेणी, कोणार्क – खजुराहोची मंदिरे आणि युरोपातली प्राचीन चर्चे यांत अनेक दैवतकथांनी आपल्या अभिव्यक्तीसाठी शिलामाध्यम स्वीकारलेले दिसते. दैवतकथांच्या अभ्यासातूनच सांप्रत स्वतंत्र दैवतकथाशास्त्र विकास पावले आहे.

**दैवतकथाशास्त्र** – दैवतकथांच्या अभ्यासाची जाणीव प्राचीन काळापासूनच आढळत असली, तरी इ. स. च्या १८ व्या शतकापासून त्याला खरीखुरी शास्त्रप्रतिष्ठा मिळू लागली. डी. ब्रॉसिस व शीलिंग हे युरोपीय पंडित या शास्त्राचे पहिले अभ्यासक होत. यांच्या नंतर दैवतकथांच्या अभ्यासात विविध दृष्टिकोन आणि अन्य शास्त्रेही दाखल झाली. मॅक्स म्यूलरने दैवतकथांकडे भाषाशास्त्रदृष्ट्या पाहिले, टायलर लँग व फ्रेझर यांनी मानवशास्त्रदृष्ट्या त्यांचा अभ्यास केला; तर फ्राइड व युंग यांनी मानसशास्त्रातील कोडी उकलण्यासाठी त्यांचा उपयोग केला. सांप्रत हे शास्त्र अत्यंत प्रगत बनले असून, दैवतकथांच्या तौलनिक अध्ययनातून मानवजातीच्या प्रारंभिक इतिहासावर प्रकाशझोत टाकण्याचे कार्य अनेक दैवतकथाशास्त्रज्ञ करीत आहेत.

**दैवतकथांचे स्वरूप** – दैवतकथाशास्त्रज्ञांनी दैवतकथांचे विशेष सांगितले आहेत, ते असे –

(१) दैवतकथा अतिप्राचीन काळापासून परंपरेने चालत आलेल्या असतात.

(२) या कथांच्या संभारात क्रमाने भर पडत राहते. काही दैवतकथा ऐतिहासिक काळातही निर्माण झालेल्या दिसतात. अवतारी समजल्या गेलेल्या ऐतिहासिक पुरुषांविषयीच्या कथा या अशा प्रकारच्या होत.

(३) दैवतकथा ही मूलार्थाने लोककथा असली, तरी प्रारंभी ती कुणातरी व्यक्तीच्या कल्पनेतूनच उद्भवलेली असते. अर्थात त्या व्यक्तीच्या काळाचे प्रतिबिंब त्या कथेत पडणे अपरिहार्य असते.

(४) दैवतकथा ही कितीही काल्पनिक असली, तरी ज्या समाजाने तिचा परंपरेने स्वीकार केलेला असतो, त्या समाजाला तिच्यातील आशय सत्य वाटत असतो.

(५) बहुतेक दैवतकथा या निसर्गघटना, श्रद्धा, चालीरीती यांचे स्पष्टीकरण करण्यासाठी निर्माण झालेल्या असतात. या विशेष गुणांमुळे त्यांचा संबंध धर्माशी जोडला जातो. धार्मिक विधिविधानांचे स्पष्टीकरण व समर्थन करणाऱ्या दैवतकथांमुळे गेली अनेक सहस्रके जगातील बहुतेक मानवसमूहांच्या धर्मनिष्ठेचे दृढीकरण झाले आहे.

(६) दैवतकथांचा उपयोग मंत्रतंत्रांत किंवा जादूटोण्यांतही केला जातो. फरक एवढाच, की देवतांच्या ऐवजी भूते, पिशाचे किंवा राक्षस यांच्या विषयींच्या त्या कथा असतात.

(७) प्राचीन काळाचा बराच मोठा इतिहास दैवतकथांच्या रूपातच प्रकट झालेला दिसतो. अशा कथांतील काल्पनिक दैवी अंशापासून इतिहास बाजूला काढणे फार कठीण असते.

(८) प्राचीनतम विज्ञानही दैवतकथांचा वेष घेऊनच जन्मास आलेले आहे. मानवाला लागलेल्या अनेक भौतिक शोधांची ही कथात्मक स्पष्टीकरणे विज्ञानेतिहासाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण आहेत.

(९) लोकसाहित्याचा बराच भाग क्रमशः दैवतकथांचे स्वरूप धारण करीत असतो आणि बराच भाग हा दैवी अंशाला मुकलेल्या दैवतकथांपासून बनलेला असतो. दैवतकथांचा आणि लोकसाहित्याचा हा आत्मीय संबंध ध्यानी घेता लोकसाहित्यशास्त्र आणि दैवतकथाशास्त्र यांच्यांतील सीमारेषा निश्चित करणे कठीण ठरते.

**दैवतकथांचे वर्गीकरण** – दैवतकथांचे स्वरूप अत्यंत गुंतागुंतीचे असल्यामुळे त्यांचे वर्गीकरण करणे अवघड झाले आहे. परंतु अभ्यासकांनी जगातील सर्व मानवसमूहांच्या दैवतकथांचा तौलनिक अभ्यास करून त्यांतील विषयांची साम्ये हुडकून काढली आहेत. या समान विषयांच्या अनुरोधाने दैवतकथांचे वर्गीकरण केले जाते, ते असे –

(१) ऋतुचक्र आणि निसर्गघटनांतील नियतकालिक बदल यांविषयीच्या कथा– दिवस-रात्र आणि ऋतुचक्र यांविषयीच्या अनेक दैवतकथा आहेत. सूर्य आणि चंद्र यांना चेतनत्व देऊन रचलेल्या कथांत चंद्राला सूर्याची प्रिया मानलेले आहे. सूर्य-चंद्र आणि तारे यांच्या विषयींच्या कथांचा एक मोठाच वर्ग आहे.

(२) अन्य निसर्गघटकांविषयीच्या कथा – वृक्ष, नद्या, समुद्र, आकाश, पर्वत यांविषयीच्या कथा या वर्गात मोडतात. अशा कथांत या निसर्गघटकांवर चेतनागुणाचा आरोप केलेला दिसतो. भारतात गंगा-यमुनादी नद्या व हिमालयादी पर्वत यांना अनेक कथांतील पात्रे बनविले आहे. शिवमस्तकावरील गंगा ही गौरीची सवत असून, त्यांची भांडणे होत असत, याविषयीच्या अनेक कथा व गीते आहेत.

(३) विलक्षण निसर्गघटनांविषयीच्या कथा – भूकंप, वादळे, महापूर, ग्रहणे, इ. नैसर्गिक घटना कशा घडतात, ते स्पष्ट करण्यासाठी निर्माण झालेल्या कथा या गटात पडतात. सामान्यतः अशा घटनांचे कर्तृत्व राक्षसांकडे दिलेले दिसते. राहूकेतूंनी सूर्य-चंद्रांना ग्रासल्यामुळे ग्रहणे होतात, यासंबंधीच्या कथा या वर्गातच मोडणाऱ्या आहेत.

(४) सृष्टयुत्पत्तिकथा– या कथांनी दैवतकथांचा महत्त्वाचा भाग व्यापलेला आहे. जगातील प्रगत मानवसमूहांत जशा या कथा आढळतात, तशाच त्या सर्व आदिवासी समाजांतही आढळतात. या विश्वाचा कोणीतरी एक विधाता असून, तो सर्व पदार्थांची निर्मिती आणि उत्क्रांती करीत असतो, अशी कल्पना काही कथांत आढळते. विधात्याने पृथ्वी जळातून निर्माण केली, अशी कल्पना कुठे आढळते; तर पृथ्वी आणि स्वर्ग यांच्या मीलनातून सर्व वस्तुजात निर्माण झाले, अशी कल्पना दुसरीकडे आढळते.

(५) देवांच्या जन्मकथा– देव अमर मानले गेले असले, तरी त्यांचा जन्म, त्यांचे अन्य देवांशी आलेले संबंध आणि त्यांचे चढउतार यांविषयीच्या अनेक कथा जगभर आढळतात.

(६) मानव आणि अन्य प्राणी यांच्या निर्मितीच्या कथा– वनस्पती व अन्य प्राणी अगोदर निर्माण झाले, अशी धारणा अनेक ठिकाणच्या कथांत आढळते. आपले मूळ पुरुष म्हणून वनस्पती वा प्राणी यांना देवके मानण्याची प्रथा आजपर्यंत अनेक मानवसमूहांत अस्तित्वात आहे.

(७) परिवर्तनाच्या कथा– मानवाचे पशुपक्ष्यांत, वृक्षवेलींत वा अन्य वस्तूंत परिवर्तन होऊ शकते, अशी श्रद्धा अनेक प्राचीन कथांत आढळते. जादूने, शापाने किंवा अन्य प्रकारच्या शक्तीने मानवाला अन्य रूप प्राप्त होणे आणि त्याला पुनश्च मानवरूप प्राप्त होणे, या गोष्टींवर प्राचीन काळातील मानवांचा दृढ विश्वास होता. गौतमाच्या शापाने अहल्या शिलारूप पावली आणि पुनश्च रामाच्या स्पर्शाने स्त्री बनली, ही रामायणातली कथा याच वर्गातील आहे.

(८) वीरकथा, वंशकथा व देशकथा– विशिष्ट वंशातील आणि देशातील लोक आपल्या वंशाचा वा देशाचा गौरव वाढविण्यासाठी प्राचीनतम दैवी पुरुषांशी संबंध जोडणाऱ्या कथा रचतात.

(९) सामाजिक संस्था व शोध यांच्या कथा– सामाजिक संस्थांची निर्मिती, संस्कृतीच्या विकासाला गती देणाऱ्या महत्त्वपूर्ण घटना, भौतिक शोध, इ. विषयींच्या अनेकविध कथा या वर्गात समाविष्ट होतात.

(१०) मरणोत्तर जीवन व परलोक यांविषयीच्या कथा– जीवाला मरणोत्तर अस्तित्व आहे, अशी श्रद्धा जगातील सर्व मानवसमूहांत वसत असल्यामुळे जीवाच्या मरणोत्तर निवासाविषयीच्या अनेक कथा निर्माण झाल्या आहेत. जीवाच्या भल्याबुऱ्या कर्मानुसार त्याचा स्वर्गात वा नरकात वास घडतो आणि तो तिथे भलीबुरी फळे भोगतो, असे सांगणाऱ्या कथांचा प्रचंड संभार दैवतकथांच्या क्षेत्रात उपलब्ध आहे.

(११) दैत्य व अन्य भयंकर प्राणी यांविषयीच्या कथा– माणसाला अंधार आणि आणि ओसाड जागा यांविषयी प्रथमपासून भय वाटत आले आहे. या भयापोटी त्याने राक्षस आणि अन्य भयानक प्राणी यांच्या अस्तित्वाची कल्पना करून अनेक कथा रचल्या आहेत. या प्रकारच्या कथांत राक्षसांची व तत्सदृश प्राण्यांची विकट रूपे, त्यांची क्रूर कर्मे आणि त्यांच्या विनाशासाठी अवतरलेल्या दैवी पुरुषांचा पराक्रम यांची रसभरित वर्णने असतात. देवासुर-संग्रामाच्या कथा आणि अशा कथांतून सूचित होणारा सत्याचा असत्यावरील विजय हा या वर्गातील कथांचा महत्त्वाचा भाग आहे.

(१२) ऐतिहासिक व्यक्ती व घटना यांविषयीच्या कथा– ज्या ऐतिहासिक व्यक्तींच्या चरित्रांना आणि ऐतिहासिक घटनांना सबळ पुरावा उपलब्ध नसतो, त्यांच्याविषयीच्या कथांवर दैवी अद्‌भुततेचा रंग चढतो आणि त्या कथांना दैवतकथांचे स्वरूप प्राप्त होते. त्यांतील ऐतिहासिक सत्य कल्पितापासून वेगळे काढणे कठीण असते.

**दैवतकथांचे मूळ**– दैवतकथांचें स्वरूप अत्यंत गुंतागुंतीचे आहे. त्या कथांतील पात्रांच्या चरित्रांतही कालक्रमाने अनेक प्रकारच्या कल्पनांची पुटे चढलेली असतात. त्यामुळे दैवतकथांचे विश्लेषण करून त्यांचे मूळ शोधून काढण्याचे काम अभ्यासकांना कठीण होऊन बसले आहे. अनेक दैवतकथाशास्त्रज्ञांनी याविषयी अनेक प्रकारचे सिद्धांत बांधण्याचा प्रयत्न केला आहे. यांपैकी कोणत्याही एका सिद्धांताने दैवतकथांच्या उगमांचे कोडे सुटू शकत नाही. हे सर्व सिद्धान्त दैवतकथांच्या एकेका अंगाचा उलगडा करणारे असल्यामुळे समुच्चयाने त्यांचा उपयोग करून घ्यावा लागतो. हे सिद्धान्त पुढीलप्रमाणे आहेत.

(१) वातावरणशास्त्रीय सिद्धान्त– सूर्य, चंद्र, वायू, इ. निसर्गातील घटकांचे दैवतीकरण करून, यांच्या कृतींचे अद्‌भुत वर्णन करण्याची प्रवृत्ती अनेक प्राचीन कथांत आढळते. या प्रवृत्तीला प्राधान्य देऊन माक्स म्यूलरादी अभ्यासकांनी सर्वच दैवतकथांना निसर्गशक्तींची रूपके ठरविण्याचा प्रयत्न केला आहे.

(२) भौतिक सिद्धान्त– हा सिद्धान्त वरील वातावरणशास्त्रीय सिद्धान्ताशी एकरूपच आहे.

(३) विधिविधानविषयक सिद्धान्त– अनेक दैवतकथा धार्मिक अथवा आभिचारिक विधिविधानांचे स्पष्टीकरण करणाऱ्या असतात, असे मानणारा हा सिद्धान्त आहे.

(४) ऐतिहासिक अथवा युहेमीरसचा सिद्धान्त– सर्वच दैवतकथांचे नायक मुळात ऐतिहासिक पुरुष होते, अशा प्रकारचा एकांतिक सिद्धान्त प्रथम युहेमीरस या तत्त्वज्ञाने इ. स. पूर्व चौथ्या शतकाच्या अखेरीस मांडला. अलिकडच्या काळात

हर्बर्ट स्पेन्सरने 'धर्माचे मूळ पितृपूजेत आहे' असा सिद्धान्त मांडल्यामुळे युहेमीरसच्या सिद्धान्ताचे पुनरुज्जीवन झाले आहे. मात्र या सिद्धान्ताला अभ्यासकांचा फारसा पाठिंबा मिळू शकला नाही.

(५) कलामूलक सिद्धान्त– दैवतकथांवर आधारलेल्या चित्र-शिल्पादी ललितकलांमुळे दैवतकथांत भर पडते व त्यांत परिवर्तनें होतात, असे सांगणारा हा सिद्धान्त आहे. काही अंशी ही गोष्ट खरी असली, तरी त्याचा दैवतकथांच्या मुळाशी संबंध नाही. कलामूलक सिद्धान्ताचा उपयोग करून फार तर दैवतकथांच्या संक्रमणावर काहीसा प्रकाश टाकता येईल, एवढेच.

(६) नैतिक सिद्धान्त– मानवाच्या मनावर नैतिक मूल्ये आणि नैतिक आचरण ठसविण्यासाठीच दैवतकथांची निर्मिती झाली, असे या सिद्धान्ताचे पुरस्कर्ते मानतात. परंतु हा सिद्धान्त अंशतःच खरा मानता येईल.

(७) रहस्यमूलक वा रूपकमूलक सिद्धान्त– दैवतकथांत रूपकांच्या द्वारा गूढ अनुभव व विचार व्यक्त केलेले असतात, असे या सिद्धान्ताच्या पुरस्कर्त्यांचे म्हणणे आहे. बहुसंख्य अभ्यासकांनी या सिद्धान्ताला शुद्ध कल्पनारंजित मानले असून, त्याज्य ठरवले आहे.

दैवतकथांच्या स्वरूपाविषयीचे व मुळाविषयीचे हे नानाविध सिद्धान्त ध्यानी घेता त्यांच्या अभ्यासाची जटिलता स्पष्ट होते. या सर्व सिद्धान्तांचा समुच्चयाने व तारतम्याने उपयोग केल्यास दैवतकथांच्या अभ्यासातून मानवजातीच्या प्रारंभिक आशाआकांक्षांचे व तिच्या सांस्कृतिक विकासातील पहिल्या-वहिल्या पदक्षेपांचे ज्ञान होऊ शकते, एवढे मात्र खरे. [ लो. सा. रू.; लो. सा. मू.; हिं. सा. को.; एन्सा. रि. ए. ]

## दैवत ब्राह्मण

सामवेदाचे पाचवे ब्राह्मण. सामांच्या ध्रुवपदावरून सामांची दैवतवार वर्गवारी करणे, हा या ब्राह्मणाचा मुख्य विषय आहे. यात तीन खंड आहेत. त्यांपैकी पहिल्या खंडात २६ कंडिका असून, निरनिराळ्या देवतांची वर्णने आहेत. शिवाय प्रत्येक देवतेच्या सामाची ध्रुवपदे कशा प्रकारची असतात, त्याचे विवेचनही आहे. दुसऱ्या खंडात ११ कंडिका असून, देवता व त्यांचे वर्ण यांचे विशेष वर्णन आहे. तिसऱ्या खंडात २५ कंडिका आहेत. त्यात वैदिक छंदांच्या काल्पनिक व्युत्पत्ती दिल्या आहेत. हा भाग यास्काने निरुक्तात उद्धृत केला आहे. भाषाशास्त्रीय दृष्टया हा भाग महत्त्वाचा आहे. अखेरीस गायत्रीमंत्राचे गान सामात कसे असावे, त्याचे विवेचन आहे. [ म. ज्ञा. को.; वै. सा. सं. ]

## दैव विवाह

विवाहाच्या आठ प्रकारांपैकी एक. याचे लक्षण मनुस्मृतीत (मनु. ३. २८) दिले आहे, ते असे–

**यज्ञे तु वितते सम्यगृत्विजे कर्म कुर्वते ।**
**अलङ्कृत्य सुतादानं दैवं धर्मं प्रचक्षते ।।**

अर्थ– यज्ञ चालू असता त्यातले कर्म यथाविधि करणाऱ्या ऋत्विजाला पित्याने (यजमानाने) आपली कन्या सालंकृत करून (पत्नी या नात्याने) देणे, या विवाहाला दैव विवाह असे म्हणतात.

दैव विवाहाला मान्यता देण्याच्या बाबतीत धर्मशास्त्रकारांत मतभेद आहेत. यज्ञासारखे पारलौकिक कल्याणाचे कार्य चालू असता त्या ठिकाणी विवाहासारख्या ऐहिक गोष्टींचा विचार करणे, हे अप्रशस्त वाटल्यामुळे या विवाहाला बऱ्याच धर्मशास्त्रकारांनी मनमोकळी संमती दिलेली नाही.

सनपूर्व चौथ्या शतकापर्यंत भारतात यज्ञसंस्था प्रबल होती. एखादा यज्ञ सुरू झाला म्हणजे तो कमी अधिक दिवस चालू राहायचा व त्या यज्ञकालात यजमान व एखादा ऋत्विज यांचा घनिष्ठ संबंध निर्माण व्हायचा. अशा वेळी एखाद्या ऋत्विजाचे चारित्र्य, विद्वत्ता, कर्मकुशलता, इ. गुणविशेष दिसून आल्यामुळे तो ऋत्विज यजमानाला जावई करून घ्यावासा वाटला, तर त्यात नवल नाही. त्या काळी मुलीही वयाने प्रौढ असत. त्यामुळे यज्ञ चालवणारा विद्वान ऋत्विज एखाद्या मुलीच्या मनात भरणे शक्य असे. अशा स्थितीत त्या प्रेमसंबंधाला मुलीचा बाप सहजपणे संमती देई. पुढे यज्ञसंस्थेचा ऱ्हास झाल्यावर तिच्यावर आधारलेली ही विवाहपद्धतीही आपोआपच बंद झाली. [ हिं. ध.; पो. वी. हिं. सि. ]

## दैवज्ञ ब्राह्मण

सुवर्णकारांना दैवज्ञ ब्राह्मण म्हणतात. यांची वस्ती महाराष्ट्रात सर्वत्र आहे. दैवज्ञ म्हणजे देवासंबंधी (सर्व गोष्टी) जाणणारा, अर्थात देवासाठी सोन्याचांदीच्या मूर्ती, रथ, देव्हारे, दागिने, इ. करणारा होय. त्यांचा तो व्यवसाय आहे. विश्वकर्म्यापासून आपली उत्पत्ती झाली, असे हे सांगतात. यांच्यांत बारा पोटभेद आहेत.

दैवज्ञांत गोत्रे आहेत. यांचे विवाहादी संस्कार स्वज्ञातीच्या उपाध्यायाकडून होतात. आपल्या जातीचा उपाध्याय न मिळाल्यास हे त्यासाठी इतर ब्राह्मणांना बोलावतात. दैवज्ञांत विधवाविवाहाची चाल नाही.

यांच्यांत स्मार्त व वैष्णव असे दोन पंथ आहेत. नरसोबा, रामेश्वर, जोगेश्वरी, खंडोबा, मूळवीर, इ. यांच्या कुलदेवता होत.

प्रत्येक तालुक्यात या ज्ञातीच्या मालकीची एक-दोन मंदिरे

असतात. प्रत्येक देवस्थानास शेतजमिनीचे उत्पन्न असते. गोमंतकात कासारपाली येथे या ज्ञातीच्या मालकीचे देवीचे संस्थान आहे. तसेच पुणे येथील दुर्गादेवीचे मंदिरही याच ज्ञातीच्या मालकीचे आहे.

या समाजातील पुरुष पूर्वी बाराबंदी, लांब बाह्यांचा अंगरखा, धोतर, पागोटे वगैरे कपडे वापरीत. स्त्रिया तऱ्हतऱ्हेचे दागिने घालीत. परंतु अलिकडे इतर ब्राह्मण व दैवज्ञ यांच्या वेषभूषेत काही फरक उरला नाही. यांचे आचारविचार इतर ब्राह्मणांसारखेच आहेत. यांना मत्स्याहार चालतो. [ मुं. इ. जा.; म. ज्ञा. को. ]

**दोखंधिपा** चौऱ्यांयशी सिद्धांपैकी एक. यालाच द्विखंडी असे दुसरे नाव आहे. हा जातीने ब्राह्मण असून, मणिघर (वघेलखंडांतील मैहरा) येथील रहिवासी होता. हा सरहपाच्या तिसऱ्या पिढीत येतो. याने चतुरक्षरोपदेश व महायानावतार असे दोन ग्रंथ रचले आहेत [ म. च. .को. ]

**दोग्ध्र** एक यज्ञीय उपकरण. यात गायीची किंवा शेळीची धार काढून ते दूध उकळत्या तुपावर ओततात. ज्या मातीपासून महावीर तयार करतात, त्याच मातीचे दोग्ध्र करावे, असे सांगितले आहे. हे भांडे स्रुचीच्या आकाराचे असते, परंतु स्रुचीप्रमाणे त्याला लांब दांडा नसतो. काही श्रौतसूत्रांत दोग्ध्राला पिन्वन असे म्हटले आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**दोरीवाले** महाराष्ट्रातील भिक्षेकऱ्यांची एक जात. हे लोक हातात दोरी घेऊन भिक्षा मागतात, म्हणून यांना दोरीवाले असे म्हणतात. हे भिक्षेसाठी तीन–चार घरांसमोर एक दोरी धरून उभे राहतात, भिक्षा न घातल्यास शिव्या देतात व प्राणत्यागाची धमकी घालतात. काहीजण आपला हात तोंडात घालून अशा रीतीने ओकाऱ्या काढतात, की तोंडातून रक्त बाहेर पडू लागावे. या अघोरी प्रकाराला घाबरूनच लोक त्यांना भिक्षा घालतात. सांप्रत हे भिक्षेकरी फारसे आढळत नाहीत. [ वाँ. वें. क्रा. ]

**दोलारोहण** एक उपसंस्कार. दोला = पाळणा. मुलाला बाराव्या दिवशी व मुलीला तेराव्या दिवशी पाळण्यात घालावे, असे ज्योतिर्निबंधात सांगितले आहे. दहाव्या, सोळाव्या, बाविसाव्या किंवा बत्तिसाव्या दिवशीही मुलाला पाळण्यात घालण्याचा विकल्प आहे. मात्र त्या दिवशी चंद्रबळ, ताराबळ आणि मृदू, ध्रुव व क्षिप्र ही नक्षत्रे असावी. माता व कुलस्त्रिया यांनी अशा प्रसंगी प्रथम वटपत्रशायी श्रीहरीचे स्मरण करावे व मुलाचे मस्तक पूर्वेकडे करून त्याला पाळण्यात घालावे, असे सांगितले आहे. [ सं. कौ. ]

**दोलोत्सव** चैत्र शुद्ध तृतीयेपासून वैशाख शुद्ध तृतीयेपर्यंत एक महिना शिव, पार्वती, विष्णू, इ. देवांना दोल्हाऱ्यात बसवून हा उत्सव करावा, असे सांगितले आहे. त्याचा विधी असा – प्रथम देवतांची पूजा करतात. नंतर लौकिकाग्नीवर तुपाच्या एकशे आठ आहुती देऊन अष्टदिशांना चरूचे बली देतात. मग उत्सवमूर्ती दोल्हाऱ्यात किंवा पाळण्यात बसवितात आणि तिच्यावर छत्र-चामरे ढाळतात.

मथुरा, वृंदावन, अयोध्या, द्वारका, डाकोर, इ. क्षेत्रांतल्या मोठ्या मंदिरांत हा उत्सव मोठ्या प्रमाणावर साजरा होतो. दक्षिणेत याची प्रथा नाही.

निरनिराळ्या तिथींना निरनिराळ्या देवतांना दोल्हाऱ्यात बसवतात. हा उत्सव फाल्गुन चतुर्दशीला किंवा प्रतिपदायुक्त पौर्णिमेला सुरू करून पुढे तीन किंवा पाच दिवस करावा आणि त्या वेळी कृष्णाला दक्षिणेकडे तोंड करून पाळण्यात ठेवावे, असे पद्म पुराणात सांगितले आहे. [ ध. सिं.; नि. सिं.; हि. ध. ]

**दोसाध** एक जात. यांची वस्ती उत्तर प्रदेशातील औध आणि बिहारमधील सारण जिल्हा या भागांत आहे. ही जमात द्रविड वंशाची आहे. हे लोक शेतमजुरी, चौकीदारी व आचारीपण हे व्यवसाय करतात; तसेच ते डुकरांचे कळपही पाळतात. राहू हे यांचे उपास्य दैवत आहे. हे लोक गोराया, सालेश व चोअरमल या देवांना भजतात. पतित ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात. हे लोक अत्यंत मागसलेले आहेत. यांच्यात प्रेते जाळतात किंवा पुरतात. [ सारण गॅझे.; रे. क. इं. ]

**दोहा** एक छंद. हा मात्रिक अर्धसम छंद आहे. 'दोग्धि चित्तमिति दोहा' = जो चित्ताचे दोहन करतो, चित्ताला द्रवीभूत करतो, तो दोहा होय, अशी याची व्याख्या केलेली आहे. द्विपदी या शब्दावरून हे नाव आले आहे, असे मानले जाते. यात पहिल्या व तिसऱ्या चरणात १३ मात्रा व दुसऱ्या आणि चौथ्या चरणात ११ मात्रा असतात (प्राकृतपैङ्गलम् १.७८). चरणाच्या शेवटी यती असतो. विषम चरणाच्या शेवटी ज गण नसावा आणि शेवटी लघू असावा असा नियम आहे.

प्राकृत साहित्यात गाथेला जे स्थान आहे, तेच अपभ्रंश साहित्यात दोहा या छंदाला आहे. हिंदीत हा छंद अपभ्रंश

भ्रापेकडून मिळाला आहे. अपभ्रंशात आणि हिंदीत दोह्यांचे अनेक संग्रह असून मुनीयोगीन्द्र, रामसिंह, देवसेन व अनेक बौद्ध सिद्ध यांनी आपल्या रचनेत दोहा छंदाचा उपयोग केला आहे.

प्राकृतपैङ्गलम् इ. छंदोग्रंथांमध्ये भ्रमर, भ्रामर, इ. तेवीस दोहाप्रकारांचे विवेचन केले आहे. वर्णभेदामुळे दोह्याची जात बदलते, असेही म्हटले आहे. उदा० दोह्यामध्ये १२ लघू वर्ण असल्यास त्याला विप्र म्हणतात.

हिंदीतील बहुतेक सर्व प्रमुख कवींनी हा छंद वापरला आहे. दोहा हा मुक्तक काव्याचा महत्त्वाचा छंद आहे. भक्तियुगातल्या प्रबंधरचनेत दोह्याचा विपुल प्रमाणात उपयोग केलेला आढळतो. तुलसीदासांचे 'रामचरित मानस' व जायसीचे 'पद्मावत' ही याची उत्कृष्ट उदाहरणे होत. रीतिग्रंथांमध्ये लक्षण व उदाहरणे यांसाठी दोहा छंदाचा उपयोग केलेला आहे. दोह्याचे दोन नमुने पुढीलप्रमाणे—

**काम क्रोध जिनके नहीं, लगैं न भूख पियास ।**
**पलटू तिनके दरस सो, लगैं न भूख पियास ।**

अर्थ – पलटू म्हणतो, ज्यांना काम-क्रोध शिवत नाही अथवा तहान-भूक लागत नाही, अशांच्या दर्शनाने पापांचा नाश होतो.

**स्वर्ग सात असमानपर, भटकत है मन मूढ ।**
**खालिक तो खोया नहीं, उसी महलमें ढूंढ ।।**

अर्थ – हे मूर्ख मना, सप्त स्वर्गांच्या अवकाशात तू भटकतो आहेस, परंतु परमेश्वर कुठे हरवलेला नाही. तू जिथे आहेस तिथेच त्याला शोध.

थोडक्यात मोठा आशय व्यक्त करण्याचे सामर्थ्य दोहा छंदात आहे, असे मानतात.

दोहा व साखी हे शब्द समानार्थक आहेत. कबीराच्या साख्या या दोह्यासारख्याच आहेत. मात्र छंदःशास्त्राच्या दृष्टीने त्यांची रचना सदोष आहे. साखी हा साक्षी या शब्दाचा अपभ्रंश आहे. गोरखपंथी काव्याच्या प्रभावामुळे कबीरपंथी कवींनी हा छंद स्वीकारलेला दिसतो. विक्रमोर्वशीय नाटकात याचे सर्वांत प्राचीन रूप पाहायला मिळते, असे काही पंडितांचे मत आहे. सिद्ध कवी सरहपा (इ. स. चे ८ वे शतक) याने या छंदाचा प्रथम उपयोग केला, असे म्हणतात. मात्र त्यापूर्वीही हा छंद लोकप्रचलित असावा.

अपभ्रंश साहित्याच्या विकासाबरोबर दोहा छंदाचा प्रचार वाढला. सांप्रत राजस्थानी, हिंदी व गुजराती या भाषांत लक्षावधी दोहे रचले गेले आहेत. साहित्याच्या क्षेत्रातच नव्हे; तर जनमानसातही या छंदाला विशेष स्थान प्राप्त झाले असून, लिखित दोह्यांपेक्षा लोकांच्या तोंडी प्रचलित असलेल्या अलिखित दोह्यांची संख्या अधिक आहे. लोकोक्तींप्रमाणेच यांची रचनाही उत्स्फूर्तपणे होत राहिली आहे, असे दिसून येते.

जैन लोक पूजेच्या आरंभी दोहे गातात. हे दोहे विविध रागांत गायिले जातात. या छंदात विविध विषयांवर काव्ये निर्मिलेली आढळतात. सामान्य विषयांप्रमाणे आयुर्वेद, ज्योतिष या विषयांवरील ग्रंथही दोहा छंदात रचलेले आहेत.

विकानेरचा राजा अनूपसिंह याने दोहा-रत्नाकर नावाचा एक विशाल दोहासंग्रह तयार करवून घेतला होता. त्यात शेकडो कवींचे सुमारे ४५०० दोहे संकलित केलेले आहेत. [ हिं. सा. को.; क. कौ.; मरु-भारती, जाने. १९५९ व जाने. १९६० ]

**दौलतराम** (१७२०–१७७२ इ. स.) एक हिंदी भक्तकवी. हा खंडेलवाल जातीचा होता. मध्य प्रदेशातील जयपूरजवळचे बसवा हे याचे गाव होय. संस्कृत आणि हिंदी या भाषांवर याचा चांगला अधिकार होता. ऋषभदासाच्या उपदेशामुळे याने जैनधर्म स्वीकारला व त्यालाच त्याने आपला गुरू केले, असे सांगतात.

दौलतराम हा काही काळ जयपूरच्या मानसिंहाचा मंत्री होता. याने पुण्यास्त्रव कथाकोशावर भाषा टीका व वसुनंदीश्रावकाचारावर टब्बा टीका अशा दोन टीका रचल्या आहेत. याशिवाय पद्म पुराण, आदी पुराण, हरिवंश पुराण, इ. पुराणांवरही याच्या टीका आहेत. याने केलेल्या हिंदी अनुवादामुळेच जोइंदूच्या परमात्मप्रकाशाला भरपूर प्रसिद्धी मिळाली, असे टीकाकारांचे मत आहे. श्रीगोपालचरिताचाही याने हिंदी अनुवाद केला आहे. अध्यात्मबारहखडी अथवा भक्त्यक्षरमालिकाबावनीस्तवन या नावाचे याचे एक काव्य आहे. देवनागरीच्या बावन अक्षरांतील एक एक अक्षर घेऊन त्याने प्रस्तुत काव्य रचले आहे. त्याच्या अध्यात्मकाव्याचा एक नमुना असा—

नराधिपो सुराधिपो फणाधिपो तुझे भजैं
अनादिकाल के जु कर्म दास तैं परे भजैं।
तुही जु नाहिं बाल है न वृद्ध हैं युवा न हैं
अनेक एक ज्ञानरूप ईश तू निधान है ।।

अर्थ – हे परमेश्वरा ! नराधिप, सुराधिप, फणाधिप (हे सगळे) तुझे भजन करीत आहेत. दासाची अनादिकालाची कर्मे तुझ्या भजनाने नष्ट होतात. तू बाल नाहीस, तरुण नाहीस आणि वृद्धही नाहीस. तू एक आहेस व अनेकही आहेस. तू ज्ञानरूप आहेस व ऐश्वर्याचे निधान आहेस.

काही काही ठिकाणी याने तुकारामाप्रमाणेच कर्मकांडावर कडक टीका केली आहे. [ म. ज्ञा. को.; हिं. जै. भ. क. ]

**दौहित्र श्राद्ध** मातामहश्राद्ध पाहा.

**द्यानतराय** (जन्म इ. स. १६७६) एक जैन भक्तकवी. हा आग्रा येथे अग्रवाल वंशाच्या गोयल गोत्रात जन्मला. मानसिंह आणि बिहारीदास हे दोघे याचे गुरू होते. द्यानतरायाला संस्कृत, फारशी व उर्दू या तीन्ही भाषांचे उत्तम ज्ञान होते. वयाच्या पंधराव्या वर्षी याचे लग्न झाले. याने आपल्या काव्यात संसाराचे करुण चित्र रेखाटले आहे. त्यावरून याचा संसार दुःखमय झाला असावा, असा विद्वानांचा तर्क आहे. याने जैन तीर्थांची यात्रा केली व नंतर दिल्लीत येऊन वास्तव्य केले. तिथे सुखानंद नावाच्या साधूचा त्याला सहवास घडला. त्या सहवासाने त्याचे मन भक्तिमार्गाकडे वळले.

धर्मविलास हा याचा प्रमुख ग्रंथ होय. यात ३३३ पदे असून, ती अध्यात्मपर आहेत. या शिवाय देवशास्त्रगुरुपूजा, वीसतीर्थंकरपूजा, विदेहक्षेत्रपूजा आणि इतर अनेक विषयही या ग्रंथात आले आहेत.

याच्या आध्यात्मिक पदाचा एक नमुना असा —

**तुम प्रभु कहियत दीनदयालु। आपनजाय मुकति में बैठे,**
**हम जु रुलत जग जाल। तुमरो नाम जपैं हम नीके।**
**मन वच तीनों काल। तुम तो हमको कछु देत नहिं।**
**हमरो कौन हवाल। भले बुरे हम भगत तिहारे।**
**जानत हो हम चाल। और कछु नहिं यह चाहत हैं।**
**राग दोष कौं टाल॥**
**हम सौं चूक परी सो बकसो। तुम तो कृपा–विसाल।**
**द्यानत एक बार प्रभु जगतें। हमको लेहु निकाल॥**

अर्थ – हे परमेश्वरा, तुला दीन दयाळू म्हणतात. तू स्वर्गात जाऊन बसला आहेस; पण आम्ही गरीब लोक मात्र या संसारात खितपत पडलो आहो. आम्ही काया-वाचा-मने तुझे नाम जपत आहो; पण तू आम्हाला काही देत नाहीस. आम्ही भलेबुरे कसेही असलो, तरी तुझे भक्त आहो. आम्ही अपराधी आहो व तू करुणासागर आहेस. हे परमेश्वरा, आम्हाला केवळ एकदाच या भवसागरातून वर काढ.

याची भाषा अत्यंत साधी व भावप्रवण आहे. कठीण विषयही सोपा करून सांगण्याची हातोटी त्याला उत्तम साधली आहे. [ हिं जै. भ. क.; भ. ज्ञा. को. ]

**द्यावा-पृथिवी** एक वैदिक देवतायुग्म. या जोडदेवतेला उद्देशून ऋग्वेदात एकूण सहा सूक्ते आहेत. द्यावा–पृथिवी ही दिव्य मातापितरे असून, त्यांनी चराचर सृष्टी निर्माण केली, असे त्यांत म्हटले आहे. या देवतायुग्माला भव्यता, विशालता व प्रकाश यांचे प्रतीक मानले आहे. त्यांच्याविषयी काही ऋचा आहेत, त्या अशा —

**घृतवती भुवनानामभिश्रियोर्वी पृथ्वी मधुदुघे सुपेशसा।**
**द्यावापृथिवी वरुणस्य धर्मणा विष्कभिते अजरे भूरिरेतसा॥**
(ऋ. ६. ७०. १)

अर्थ – घृताने परिपूर्ण, भुवनांना आधारभूत आणि अतिवस्तीर्ण अशा या द्यावापृथिवी मधुर रसाचे दुग्ध देतात. सुस्वरूप अशा या द्यावापृथिवी वरुणाच्या धर्माने आपापल्या ठिकाणी स्थित आहेत. त्या अजर आहेत. आणि त्यांची उत्पादनशक्ती विपुल आहे.

**उरुव्यचसा महिनी असश्चता पिता माता च भुवनानि रक्षतः।**
**सुधृष्टमे वपुष्ये न रोदसी पिता यत्सीमभि रूपैरवासयत्॥**
(ऋ. १. १६०२)

अर्थ – अतिविस्तीर्ण, थोर आणि पवित्र अशी ही मातापितरे सर्व भुवनांचे रक्षण करीत असतात. यांच्या अंतराळ प्रदेशातील नक्षत्रेही अत्यंत रमणीय असून स्थिर आहेत. पित्याने सर्वांनाच मनोहर रूपाने मंडित केले आहे.

द्यावापृथिवी या जोडशब्दातील द्यौचा जेव्हा स्वतंत्र उल्लेख येतो, तेव्हा तो कोणाचा तरी पिता म्हणूनच येतो. द्यौला आदित्य, अग्नी, अंगिरस, अश्विनी, इंद्र, मरुत, पर्जन्य, सूर्य व उषा यांचा पिता मानलेले आहे.

पण ऋग्वेदातच काही ठिकाणी द्यावापृथिवींचे वर्णन यापेक्षा निराळे आढळते. द्यावापृथिवी या दोन्ही देवपुत्री (अर्थात स्त्रिया) असून, त्या यज्ञवर्धक, विशाल व आश्चर्यकारक कृत्ये करणाऱ्या आहेत, असे तिथे म्हटले आहे. त्याच्याविषयी एक ऋचा अशी —

**सङ्गच्छमाने युवती समन्ते स्वसारा जामी पित्रोरुपस्थे।**
**अभिजिघ्रन्ती भुवनस्य नाभिं द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात्॥**
(ऋ. १. १८५. ५)

अर्थ – तुम्ही दोघी नेहमी बरोबर असता. तुम्ही तरुण असून इतक्या एकत्र असता, की जणू तुम्ही बहिणी किंवा आप्तच आहा (असे वाटावे). आईबापांच्या मांडीवर खेळणारा असा जो सर्व भुवनांचा मध्यवर्ती धुरीण अग्नी, त्याचे तुम्ही प्रेमाने चुंबन घेता. तर हे द्यावापृथिवी, भयंकर संकटांपासून तुम्ही आमचे रक्षण करा.

द्यावा-पृथिवी या सुस्वरूप व अमृत धारण करणाऱ्या आहेत, असेही म्हटले आहे. शतपथ ब्राह्मणात 'इमौ वै लोकौ रेतःसिचौ' = द्यावा-पृथिवी हे दोन लोक रेतसिंचन करणारे आहेत, असे एका ठिकाणी सांगितले आहे (१.८.१.२९); तर दुसऱ्या ठिकाणी ती दोघे प्राण व उदान या वायूंसारखी आहेत, असे म्हटले आहे (४. ३. १. २२). ती दोघे धान्य धारण करणारी आहेत, असा उल्लेख कौषीतकी ब्राह्मणात आहे (४. १४).

द्यौ हा पिता व पृथिवी ही माता असल्याचे अनेक उल्लेख ब्राह्मणग्रंथांत आढळतात. पृथिवी-माता या कल्पनेतूनच मातृभूमी ही कल्पना पुढे साकार झाली. एकूण द्यावापृथिवींची ही कल्पना भव्योदात्त आहे. [ ऋ. द.; वै. मा.; अॅ. इं. ]

**द्यावापृथिव्योरयन** एक काम्य याग. पौर्णिमेला पूर्णमासेष्टी केल्यावर अमावास्येपर्यंत रोज पूर्णमासेष्टी करावी आणि अमावास्येला दर्शेष्टी झाल्यावर पौर्णिमा येईपर्यंत रोज तीच इष्टी करावी, असे आश्व. श्रौतसूत्रात याचे विधान सांगितले आहे (२. १४). फाल्गुनी किंवा चैत्री पौर्णिमेला सुरवात करून एक वर्षभर असे करायचे असते. म्हणून या यागाला हे नाव मिळाले असावे. हा एक दर्शपूर्णमासयागच आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**द्यूतक्रीडा** एक प्राचीन खेळ. हा प्राधान्याने जुगार म्हणून खेळत. या खेळातील फासे बेहडयाचे, मातीचे, दगडाचे अथवा हस्तिदंताचे करीत. द्यूतक्रीडेसाठी स्वतंत्र जागा असत, त्यांना द्यूतसभा म्हणत. तिथे जुगारी लोक जत आणि हारजीत खेळत. द्यूतसभेच्या प्रमुखाला सभिक असे म्हणत.

भारतात द्यूतक्रीडेचा प्रचार फार पुरातन कालापासून आहे. आर्यपूर्व सिंधुसंस्कृतीतही द्यूत प्रचलित असल्याचे दाखले मिळतात. परंतु द्यूत खेळणे वाईट आहे, अशी धारणा ऋग्वेदकालापासूनच आढळते. कवष ऐलूप नामक वैदिक ऋषीने एका सूक्तात द्यूताचे दुष्परिणाम अत्यंत प्रभावी भाषेत वर्णिले आहेत त्यातील काही ऋचा अशा—

प्रावेपा मा बृहतो मादयन्ति प्रवातेजा इरिणे वर्वृतानाः ।
सोमस्येव मौजवतस्य भक्षो विभीदको जागृविर्मह्यमच्छान् ।।
यदादीध्ये न दविषाण्येभिः परायद्भ्योऽव हीये सखिभ्यः ।
न्युप्ताश्च बभ्रवो वाचमक्रतँ एमीदेषां निष्कृतं जारिणीव ।।
नीचा वर्तन्त उपरि स्फुरन्त्यहस्तासो हस्तवन्तं सहन्ते ।
दिव्या अङ्गारा इरिणे न्युप्ताः शीताः सन्तो हृदयं निर्दहन्ति ।।
(ऋ. १०. ३४. १, ५, ९)

अर्थ – वाऱ्याच्या सोसाटयात पोसलेल्या ( झाडाच्या ) लाकडापासून बनलेले, पटावर घरंगळत थै थै नाचणारे फासे मला बेभान करीत आहेत. हा स्वतः जागरूक राहणारा फासा मला मात्र मौजवत पर्वतावरील सोमवल्लीच्या मधुर पेयाने गुंग झाल्याप्रमाणे गुंग करून सोडीत आहे. जेव्हा मी असा निर्धार करतो, की इतःपर या फाशांनी खेळणार नाही, तेव्हा संगत सुटलेले माझे सोबती आणि फासे माझा धिक्कार तर करतातच; परंतु एकदा का ते पिंगट रंगाचे फासे पटावर फेकले जाऊन त्यांचा खुळखुळाट सुरू झाला, म्हणजे एखादी वदकर्मी स्त्री अनिवार ओढीने संकेतस्थळी जावी, त्याप्रमाणे मीही जुगारीच्या अड्डयाकडे धावतो. हे फासे पडतात खाली, पण फुरफुरतात सर्वांच्या वर. यांना हात नाहीत, तरी हात असणाऱ्या पुरुषांना हे दीन करतात. हे पटावर टाकले, की जणू दिव्यलोकींचे निखारेच असतात. कारण हे हाताला जरी थंड लागतात, तरी काळीजच करपवून टाकीत असतात.

द्यूताचे हे सर्व दुष्परिणाम ध्यानी घेऊन अखेरीला कवष ऐलूषाने द्यूताचा नाद सोडून देऊन साधेपणाने शेती करण्याचा संदेश दिला आहे.

मनूने द्यूताचा अठरा व्यसनांत समावेश केला असून, द्यूत हे वैर निर्माण करणारे असल्यामुळे केवळ गंमत म्हणूनसुद्धा द्यूत खेळू नये, असा त्याचा निषेध सांगितला आहे (मनु. ९.२२७). कौरव-पांडव द्यूत खेळले आणि त्यात पांडव सर्वस्व हरले. पुष्करा-बरोबर द्यूत खेळल्याने नलराजाचीही तीच अवस्था झाली.

महाभारतावरून कळते, की प्राचीन काळी राजे लोक द्यूतगृहे बांधीत आणि तिथे खेळायला येणाऱ्या जुगाऱ्यांकडून कर घेत. जिंकलेल्या द्रव्यातही राजाचा ठराविक भाग असे. जे लोक राजाचा भाग चुकवीत, त्यांना डाग देऊन राज्याबाहेर घालवून दिले जाई. चोरदरोडेखोरांत जुगारीचे व्यसन मोठ्या प्रमाणात असायचे. राजाला अशा लोकांचा पत्ता द्यूतगृहातच लागत असे. चाणक्यानेही या गोष्टीचा उल्लेख केला आहे. चाणक्यानंतर अशोकाने द्यूताला संपूर्ण बंदी केली होती; परंतु ती केवळ कागदोपत्रीच राहिली, असे दिसते.

द्वारकेमध्ये द्यूत चालत असल्याचा उल्लेख भागवतात आहे. गुप्तकालातही द्यूताचा प्रचार बराच होता. मृच्छकटिकाच्या दुसऱ्या अंकात द्यूताचे अनेक उल्लेख आहेत. दंडीने द्यूताची प्रशंसा केली आहे. तो म्हणतो, की द्यूताने उदारता वाढते व हारजीत सारखी येत असल्यामुळे सुखदुःखात समवृत्तीने राहण्याचे शिक्षण मिळते.

परंपरेने शिव हा द्यूताचा प्रवर्तक मानला गेला असल्यामुळे शिव-पार्वती सारीपाट खेळत असल्याची अनेक शिल्पे भारतीय शिल्पसंभारात पाहायला मिळतात. वेरूळच्या शैव लेण्यांत अशा प्रकारचे सुंदर शिल्पपट्ट आहेत. भरहूत येथील शिल्पातही द्यूताचे दृश्य कोरलेले आहे. द्यूताची चित्रे धार्मिक भावनेने घरात लावण्याची जुनी प्रथा आहे. समाजाची द्यूतासक्ती ध्यानी घेऊन धर्मशास्त्रकारांनी कोजागरी पौर्णिमा व बलिप्रतिपदा या वर्षातल्या दोन दिवशी द्यूत खेळण्याचे विधान सांगितले आहे. त्यामुळे या दोन तिथींना अनुक्रमे द्यूतपौर्णिमा व द्यूतप्रतिपदा अशी नावे पडली आहेत. या दोन दिवसांव्यतिरिक्त केव्हाही

द्यूत खेळणे, हे मात्र धर्मशास्त्राने निषिद्ध मानले आहे.

द्यूतासंबंधी संस्कृत भाषेत ग्रंथरचनाही झालेली आहे. आचार्य शूलपाणीचा चतुरंगदीपिका हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यात बुद्धिबळांनी खेळल्या जाणाऱ्या द्यूताचे विस्तृत वर्णन आहे. पाहा – अक्षक्रीडा. [ वे. इं.; पा. का. भा.; प. का. भा; श. क.; चिं. न. च.; हि. ध.; सु. वि. को. ]

**द्यूतप्रतिपदा** कार्तिक शुक्ल प्रतिपदेला हे नाव आहे. या तिथीला द्यूत खेळण्याचे विधान धर्मशास्त्राने सांगितले आहे, म्हणून हिला द्यूतप्रतिपदा म्हणतात. कार्तिक शु. प्रतिपदेच्या दिवशी प्रातःकाळी अभ्यंग स्नान करून अत्यंत लक्षपूर्वक द्यूतक्रीडा करावी. त्यामुळे पुढील वर्ष बरे वाईट कसे जाईल त्याची ठीक कल्पना येते, असे शास्त्रवचन आहे. याविषयीची एक कथा आहे, ती अशी–

एकदा बलिप्रतिपदेच्या दिवशी शंकराने पार्वतीसह द्यूत खेळायला प्रारंभ केला. शंकर त्या खेळात सर्वस्व हरला आणि वल्कले परिधान करून गंगातीरी जाण्यासाठी घराबाहेर पडला. कार्तिकेयाला हे समजल्यावर त्याने आपल्या पित्याकडून द्यूत शिकून घेतले आणि पार्वतीबरोबर द्यूत खेळून शंकराने पणात हरवलेल्या सर्व वस्तू परत मिळवल्या व त्या शंकराला नेऊन दिल्या. त्यानंतर गणेशाने शंकर व कार्तिकेय यांच्या बरोबर द्यूत खेळून त्या वस्तू पुनःश्च जिंकल्या व आईला नेऊन दिल्या. अशा प्रकारे पुनश्च सर्वस्व हरल्यावर शंकर हरिद्वार येथे गेला. तिथे त्याने विष्णूच्या सूचनेवरून त्र्यक्षविद्या ( तीन फाशांची विद्या ) निर्माण केली. त्या तीन फाशांपैकी एका फाशाचे रूप साक्षात विष्णूनेच धारण केले होते. ही नवी द्यूतविद्या घेऊन शंकर घरी गेला आणि त्याने पार्वतीला खेळात हरवले.

शिव-पार्वतींच्या या द्यूतक्रीडेची स्मृती म्हणून या दिवशी द्यूत खेळण्याची प्रथा पडली. पाहा- द्यूतक्रीडा, दीपावली. [ व्रतराज ]

**द्यूतविजयकर यंत्र** द्यूतात नेहमी जयप्राप्ती व्हावी, म्हणून हे यंत्र बनवतात. त्यासाठी कावळ्याच्या पिसाच्या लेखणीने व काजळाच्या शाईने एरंडाच्या पानावर रात्री उभ्या आणि आडव्या नऊ नऊ रेषा काढून चौसष्ट घरे असलेला एक चौकोन काढतात. प्रत्येक घरात एकेक याप्रमाणे वरच्या बत्तीस घरांत अनुलोम पद्धतीने मे, खैं, र, क्तं, द, ये, रु, पा, क, जि, ज, तं, द, नी, च, नः, छ, दा, वीं, य, मं, त्रं, ते, ष, हे, ष्टि, वा, मो, क्षि, ण, पा आणि त्रं ही बीजाक्षरे लिहितात. पुढील बत्तीस घरांत हीच बीजाक्षरे व्युत्क्रमाने = प्रतिलोम (उलटया क्रमाने) पद्धतीने लिहितात. लेखनाच्या या पद्धतीला वाजिक्रम अशी संज्ञा आहे. [ यं. चिं. ]

**द्रविड** देश व लोक. प्राचीन काळी विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडील भारताला दक्षिणापथ किंवा द्रविड देश असे नाव होते. या प्रदेशात वसलेल्या लोकांना द्रविड म्हणत. सांप्रतचे तमिळ, तेलुगू, कन्नड, मल्याळी, तुळू, इ. दक्षिण भारतीय लोक द्रविडांचे वंशज मानले जातात.

प्राचीन वैदिक वाङ्मयात द्रविड हा शब्द आढळत नाही. या शब्दाचा उपयोग प्रथमतः महाभारतात केलेला सापडतो. तिथे त्यांना क्षत्रिय मानले आहे. मनुस्मृतीतही एक जात म्हणून द्रविडांचा उल्लेख आहे.

या शब्दाचा दुसरा अर्थ भारताचे दक्षिण टोक, असाही होत असल्याचे कळते. काही पंडितांच्या मते द्रविड हे तमिळ या शब्दाचे संस्कृतीकरण आहे; तर काहींच्या मते मूळ द्रविड शब्दाचेच तमिळ असे रूपांतर झाले आहे.

**पूर्वपीठिका** – द्रविड लोक कोण, कुठले, कोणत्या वंशाचे यासंबंधी विद्वानांत पुष्कळ मतभेद आहेत. भाषाशास्त्र, भूगर्भशास्त्र, मानववंशशास्त्र, इत्यादींच्या आधारे अनेक पंडितांनी त्यांच्याविषयी भिन्न भिन्न अनुमाने केली आहेत. त्यांतील काही अनुमाने अशी—

(१) द्रविड लोक मुळात मध्य आशियाच्या पठारावर मंगोलियाच्या आसपास कुठेतरी वसलेले होते. कालांतराने तिथून निर्गमन करून ते तिबेट व आसाम या मार्गाने भारतात आले. त्यांची पहिली शाखा ईशान्य सीमेवरून आली व उ. भारतात पसरली. त्यानंतर काही काळाने त्यांची दुसरी शाखा वायव्य सीमेवरून आली व त्या शाखेच्या लोकांनी आधी आलेल्या लोकांना जिंकून तिथे आपली सत्ता स्थापली. त्यानंतर इतर काही अनार्य लोक भारतात आले व त्यांनी या द्रविड लोकांना तिथून उठवून लावले. ते मग विंध्य ओलांडून खाली आले व दक्षिणापथात सर्वत्र पसरले. त्यानंतर अनेक शतकांनी आर्य लोकांचे भारतात आगमन झाले.

(२) द्रविड लोक हिंदी महासागरातील लेमुरिया नामक देशाचे निवासी होते. अतिप्राचीन काळी ऑस्ट्रेलियापासून द. आफ्रिकेपर्यंत एक विस्तीर्ण भूखंड पसरलेला होता. हा प्रदेश द. भारताला जोडलेला होता. संशोधकांनी त्याला लेमुरिया असे नाव दिले आहे. पुढे कोण्यातरी काळी हिंदी महासागरात प्रचंड प्रलय होऊन हा भूभाग पाण्यात बुडाला. त्या प्रलयात जे लोक जगले वाचले, ते भारतात येऊन वसले. प्राचीन तमिळ साहित्यात या कल्पनेला आधार सापडतो. पांड्य राजवंशाची प्राचीन राजधानी दक्षिण मदुरा ही सागरात बुडाली, अशी

पौराणिक कथा प्रसिद्ध आहे. या लेमुरियामध्येच प्रथम मानवप्राणी उत्पन्न झाला, असेही काही पंडितांचे मत आहे.

(३) कन्याकुमारीपासून गंगेच्या दक्षिणेकडील छोटानागपूरपर्यंत डोंगराळ व जंगली प्रदेशांत राहणारे सर्व आदिवासी लोक हे भारताचे मूळ रहिवासी होत. पुढे आर्य, शक, मंगोल, इ. बाहेरून आलेल्या लोकांशी त्यांचे मिश्रण होऊन जे लोक उत्पन्न झाले ते द्रविड होत, असे रिस्लेचे मत आहे.

(४) क्रूकच्या मते भारताचे मूळ रहिवासी म्हणजे आदिवासी लोक आफ्रिकेतून भारतात आले असावे. कारण ते ठेंगणे व काळे असून, त्यांचे केस थोडे कुरळे, डोके लांबट, नाक रुंद व चपटे असते. त्यांनाच तो द्रविड मानतो.

(५) भूमध्यसागराच्या भोवतालचा काही प्रदेश, आशिया मायनर व ईजियन द्वीपसमूह या प्रदेशांत द्रविड लोकांची मूळ वसती होती. तिथून त्यांचे दोन गट भिन्न काळी इराण, इराक, बलुचिस्तान या खुष्कीच्या मार्गे किंवा समुद्रमार्गे भारतात आले. प्रथम आलेले लोक द. भारतात वसले. नंतर आलेले लोक पंजाबात व गंगेच्या खोऱ्यात वसले. केस, डोळे, वर्ण आणि बहुतेक सर्व शरीररचना या बाबतींत द्रविड लोकांचे भूमध्यसागरी लोकांशी साम्य आहे. तसेच त्यांची संस्कृती व भाषा यांच्यांतही बरेच साम्य आहे. मातृसत्ता, धात्रीचे पूजन, देवतांचे विवाहमंगल, देवांचे राजोपचार, देवदासीप्रथा हे प्रकार भूमध्यसागरी लोकांप्रमाणे द्रविड लोकांतही आढळतात. दोन्ही प्रदेशांतील उत्खननात सापडलेल्या मातीची भांडी, लोखंडी आयुधे, डोणीसारखी प्रचंड दगडी थडगी वगैरे वस्तू सारख्या दिसतात. देवतांच्या मूर्ती, दागिने, भाताची शेती, यांतही उभयतांचे साधर्म्य आहे. इराक, इराण, इ. देशांतील गावांची नावेही तमिळ भाषेतील नावांसारखीच आहेत.

तमिळ, तेलुगू, कन्नड, मल्याळम, तुळू, कोडगू, इ. भाषांचा एक स्वतंत्र समूह असून, त्यांची मूळ भाषा सिथियन भाषेला जवळची होती, असे प्रतिपादन काल्डवेल याने आपल्या द्राविड भाषांचे तुलनात्मक व्याकरण या ग्रंथात केले आहे. या द्राविड भाषा आर्य भाषांहून वेगळ्या आहेत आणि बलुचिस्तानातील ब्राहुई भाषेशी त्यांचा निकट संबंध आहे, असे म्हणतात. त्यावरून द्रविड लोक पश्चिमेकडून भारतात येताना वाटेत बलुचिस्तानात काही काळ राहिले असावे, असा तर्क भाषाशास्त्रज्ञांनी केला आहे. आशिया मायनरमधील प्राचीन लिकी लोक स्वतःला तृम्मिली म्हणत. द्रविड लोकांचे प्राचीन नाव द्रमिझ किंवा द्रमिल असे होते, ते तृम्मिल या नावाला अगदी जवळचे वाटते. त्याचेच पुढे द्रमिड, द्रविड, दमिल, तमिळ असे रूपांतर होत गेले. या दोन शब्दांतील साम्य हीसुद्धा द्रविडांच्या पश्चिमेकडील मूलस्थानाची साक्ष ठरू शकते, असेही काही पंडितांचे मत आहे. द्रविडांचे भारतात आगमन सनपूर्व ३०००–८०० या कालखंडात झाले असावे, असे समजतात.

आर्य व द्राविड भाषांतील साधर्म्याविषयी काल्डवेलचे अनुमान असे आहे, की द्रविड लोक पंजाबात येऊन वसले व नंतर आर्य त्या भागात आले. काही काळ तिथे एकत्र राहिल्यानंतर सनपूर्व ११ व्या शतकात द्रविड लोक दक्षिण भारतात आले.

त्या काळी दक्षिणेत नाग लोकांची वसती होती. द्रविड लोक दक्षिणेत गेल्यावर नागांचा व द्रविडांचा संघर्ष झाला. मात्र कालांतराने नाग व द्रविड एकमेकांत मिसळून गेले व एकत्र नांदू लागले.

वैदिक साहित्यात ज्या दस्यूंचा निर्देश वारंवार केलेला आहे ते व द्रविड लोक एकच होत, असे काही संशोधकांचे मत आहे. हडप्पा व मोहेंजोदडो येथील उत्खननात ज्या संस्कृतींचे अवशेष सापडले आहेत, ती सिंधु-संस्कृती दस्यूंची होती, असे म्हणतात. सर जॉन मार्शलच्या मते ती द्रविड संस्कृतीच होय. सिंधु-संस्कृती, सुमेरी संस्कृती व द. भारतातील प्राचीन संस्कृती यांत पुष्कळ साधर्म्य आढळते.

(६) द्रविड लोक बाहेरून कुठूनही भारतात आलेले नसून, द. भारत हेच त्यांचे मूलस्थान होय, असा सिद्धान्तही काही पंडितांनी मांडला आहे. उत्तर पाषाणयुगीन संस्कृती सुमारे २०,००० वर्षांपूर्वी भारतात उदय पावली आणि इथूनच तिचा प्रसार असीरियापर्यंत होऊन, तिथे तिच्यातून सुमेरी संस्कृती जन्मली. द्रविड व सुमेरी लोकांत जे साम्य दिसते, त्याचे हेच कारण होय, असे श्री. पी. टी. एस. अय्यंगार म्हणतात.

द. भारतात अतिप्राचीन खडक आढळतात. पुराणाश्मयुगीन रानटी मानवापेक्षाही पुरातन मानव तिथे वसलेला होता व तोच प्राचीन तमिळ लोकांचा पूर्वज होय, असे श्री. रामचंद्र दीक्षितार यांनी प्रतिपादिले आहे. द. भारतात पुराणाश्मयुगापासून संस्कृतीचा प्रवाह अखंड चालू आहे. त्या प्रवाहात भिन्न देशांतील लोक येऊन मिसळले असतील; परंतु ते लोक द्रविड नव्हते. नवपाषाणयुगात द. भारतातील मनुष्याने निर्वाहाचे भिन्न भिन्न मार्ग अवलंबिले. त्यांत काही लोक शेती व पशुपालन करू लागले, काहींनी मासेमारी सुरू केली, तर काही लोक जंगलात राहून शिकारीवरच उदरनिर्वाह करीत राहिले. तमिळनाडमध्ये विल्लवर (शिकारी) व मीनवर (मासेमार) नावाच्या आदिवासी जमाती आजही आहेत. समुद्रकिनारी राहून मासेमारी करणारे लोक पुढे नौकानयन शिकले व परदेशांशी व्यापार करू लागले. हेच दर्यावर्दी लोक इराक, ईजिप्त व भूमध्यसागरी भूभाग या देशांत जाऊन वसले असावे.

**द्रविडसंस्कृती**– आर्य लोक भारतात येण्यापूर्वी हा देश ओसाड नव्हता. द्रविड लोक भारतात वसलेले होते. त्यांनी असंख्य गावे वसवलेली होती. शेती व पशुपालन हे व्यवसाय करून ते समृद्ध झाले होते. ते नगररचनेत कुशल होते. त्यांना विविध कलाही अवगत होत्या. त्यांची संस्कृती उच्च प्रकारची होती. सिंधु संस्कृतीचे जे अवशेष उत्खननात सापडले आहेत, त्यावरून प्राचीन द्रविड संस्कृतीची कल्पना करता येते.

तमिळ भाषा ही द्रविड भाषांमध्ये सर्वांत प्राचीन असून, तमिळ साहित्य अतिशय समृद्ध आहे. मात्र त्या साहित्याच्या निर्मितीचा काल २००० वर्षांच्या मागे जात नाही. त्यापूर्वीच आर्य व द्रविड संस्कृतींचा समन्वय पूर्ण झाला होता, असे दिसते. त्यातून निर्माण झालेल्या नव्या हिंदू संस्कृतीत आर्य संस्कृती-पेक्षा द्रविड संस्कृतीचाच अंश अधिक आहे. दाक्षिणात्यांनी ज्याप्रमाणे आर्यांची समाजव्यवस्था, त्यांच्या देवदेवता व त्यांचे तत्त्वज्ञान यांचा स्वीकार केला, त्याचप्रमाणे आर्यांनी द्रविडांच्या देवता, कला, भक्तिमार्ग इ. गोष्टी आत्मसात केल्या. तर्कशुद्ध विचारपद्धती, प्रगत वास्तुशास्त्र, नौकानयन, परदेशगमन व व्यापार ही द्रविड संस्कृतीची विशेष अंगे होती. हिंदू संस्कृतीचा भारताबाहेर प्रसार करण्याचे श्रेय तर बहुतांशी द्रविडांनाच दिले पाहिजे.

**वंशभिन्नता** – आर्य व द्रविड हे दोन भिन्न वंश असून, दोन्ही वंशांचे लोक प्राचीन काळी परदेशांतून भारतात आले, हा पाश्चात्य व काही पौर्वात्य विद्वानांचा सिद्धान्त अनेक भारतीय पंडितांना मान्य नाही. त्याचे खंडन करताना प्रा. भुसारी म्हणतात–

दक्षिणापथातील लोक भिन्न वंशाचे होते, असे वैदिक व पौराणिक वाङ्मयात कुठेही म्हटलेले नाही. महाभारत, मनुस्मृती व पुराणे यांत आंध्र, पांड्य, चोळ, केरळ, कर्नाट या राजांना क्षत्रिय मानलेले आहे. लंकेचा राजा रावण वेदपारंगत आणि वैदिक धर्माभिमानी होता.

वेदांइतके प्राचीन साहित्य द्रविडांच्या भाषेत उपलब्ध नाही. प्राचीन तमिळ साहित्यावर संस्कृत भाषेचा प्रभाव स्पष्ट दिसतो. अगस्त्य मुनी हाच तमिळ भाषेचा आद्य व्याकरणकार मानला जातो. प्राचीन तमिळ लेख व ग्रंथ ब्राह्मी लिपीत लिहिलेले आहेत. या ब्राह्मीपासूनच तमिळ, तेलुगू इ. लिप्या निर्माण झाल्या. तमिळ भाषेतील सर्वनामांचे प्रकार संस्कृतापासून निर्माण झाले असून, द्राविड भाषांतील सर्व शब्दसंपत्तीचे मूळ प्राचीन आर्य भाषांत सापडते, असे श्री. स्वामिनाथ अय्यर या तमिळ भाषापंडिताने स्पष्ट म्हटले आहे.

शरीररचनेच्या दृष्टीने विचार केला तरी असे दिसते, की खंडप्राय भारताच्या भिन्न भिन्न भागांत निरनिराळ्या प्रकारचे हवामान व वेगळी भौगोलिक परिस्थिती असल्यामुळे एकाच वंशातील लोकांच्या रंगरूपात फरक पडणे अपरिहार्य आहे. त्यावरून दक्षिणेतील लोक व उत्तरेकडील लोक भिन्न वंशांचे आहेत, असे निश्चयाने म्हणता येत नाही. (द्राविड संस्कृतीची ऐतिहासिक कुळकथा–पंचधारा, कार्तिक शके १८८०)

स्वामी विवेकानंद यांनीही भिन्न वंशांचा सिद्धान्त निराधार ठरवला आहे. यासंबंधी श्री. रामधारीसिंह दिनकर यांनी विवेचन केले आहे, ते असे– आर्य व द्राविड ही दोन वेगळी भाषाकुले मानली जातात; पण त्यांवरून आर्यभाषिक व द्राविड भाषिक मानव भिन्न वंशांचे मानणे मात्र योग्य ठरणार नाही. आर्य व द्रविड हे शब्द वंशवाचक नसून, स्थानवाचक आहेत. आर्यावर्तात राहणारे ते आर्य व द्रविड देशात राहणारे ते द्रविड असेच समजले पाहिजे. द्रविड ऋषी यज्ञाचे पौरोहित्य करीत. द्रविड पंडितांनी शास्त्रे व पुराणे रचली आहेत. तमिळ संघ-साहित्यातील काही भाग ब्राह्मणांनी रचलेला आहे. ज्या सत्य-व्रत राजाला भगवंताने वर्तमान कालातील वैवस्वत मनू बनवले, तो द्रविड देशाचा सम्राट होता, असे भागवत पुराणात सांगितले आहे.

द्रविड लोक कोण होते, यासंबंधी जी भिन्न मते प्रचलित आहेत, ती सर्व अनुमानावर आधारलेली, अतएव अनिश्चित आहेत. द्रविड लोक लेमुरियातून आले व ते भूमध्य सागरी प्रदेशातून आले या कल्पनांना थोडासा तरी आधार आहे. ते भारताचे मूळ रहिवासी होते, हेही संभवनीय वाटते. पण आर्य व द्रविड हे एकाच वंशाचे लोक आहेत, हे मत बरोबर वाटत नाही. पाहा – तमिळनाडू, तमिळ भाषा व साहित्य, दक्षिणापथ. [त. सा. सं.; एन्सा. रि. ए.; हि. सा. इं.; ओ. स्प्रे. त.; श्री. अ. स. अळतेकर– रेडिओ संग्रह, जुलै–सप्टें. १९५३; श्री. रामधारीसिंह दिनकर– युगप्रभात, १६ मार्च १९६२]

**द्रविडाचार्य** एक प्राचीन वेदान्ती. याने छांदोग्य उपनिषदावर बृहत् भाष्य लिहिले आहे. शिवाय बृहदारण्यक उपनिषदावरही याचे भाष्य असल्याचे उल्लेख मिळतात. शंकराचार्यांनी याला आगमवित् व सम्प्रदायवित् असे म्हणून गौरवले आहे. शंकराचार्यांनी कुठेही त्याच्या मताचे खंडन केलेले नाही. यावरून द्रविडाचार्यांचे सिद्धान्त शंकराचार्यांच्या सिद्धान्ताच्या विरुद्ध नसावे, असे वाटते.

रामानुज संप्रदायाच्या काही ग्रंथांत द्रविडाचार्य नामक एका प्राचीन आचार्यांचा उल्लेख आढळतो. काहींच्या मते शंकराचार्यांनी उल्लेखिलेला द्रविडाचार्य व हा द्रविडाचार्य हे भिन्न

आहेत. या दुसऱ्या द्रविडाचार्याने पांचरात्र सिद्धान्ताचा अवलंब करून तमिळ भाषेत काही ग्रंथ रचले आहेत, असे म्हणतात. [भा. सं. सा.; हिंदुत्व; शंकराचार्य]

**द्रव्यमाने** सोने, रुपे, धान्य, भूमी, इ. द्रव्ये म्हणजे पदार्थ मोजण्याची परिमाणे. ही पुढीलप्रमाणे आहेत ––

**सुवर्णमाने** – खिडकीतून सूर्याचे किरण आत आले असता, त्या प्रकाशात जे सूक्ष्म धूलिकण दिसतात, त्या प्रत्येक कणाला त्रसरेणू असे नाव आहे. त्यावर आधारित परिमाणे –

८ त्रसरेणू = १ लिक्षा;
३ लिक्षा = १ राजसर्षप (= मोहरीचा १ दाणा);
३ राजसर्षप = १ गौर सर्षप; ६ गौर सर्षप = १ यव;
३ यव = १ कृष्णल (१ गुंज); ५ कृष्णल = १ माष;
१६ माष = १ सुवर्ण; ४ किंवा ५ सुवर्ण = १ पल.

**रजतमाने** – सोन्याचे कृष्णल नावाचे जे परिमाण आहे, ते मूळ धरून केलेली परिमाणे –

२ कृष्णल = १ रौप्य माष; १६ रौप्य माष = धरण;
१० धरण = १ शतमान.

धरण या परिमाणाला पुराण अशीही संज्ञा आहे. वेगवेगळ्या ग्रंथांत सोने व रुपे यांची भिन्न परिमाणे आढळतात, ती अशी –

५ गुंजा = १ माष; १८ माष = १ कर्ष;
४ कर्ष = १ पल (बृहत्पाराशर स्मृती).
५ कृष्णल = १ माष;
६४ माष = १ पल (संस्कारेंदु, स्कंद पुराण).
२ यव = १ गुंज;
३ गुंजा = १ वल्ल; ८ वल्ल = धरण.
५ गुंजा = १ माष;
१६ माष = १ कर्ष; १२ माष = $\frac{१}{२}$ अक्ष (लीलावती).
३ यव = १ कृष्णल; ५ कृष्णल = १ माष;
१२ माष = $\frac{१}{२}$ अक्ष. ४ माष = १ सुवर्ण;
४ सुवर्ण = १ निष्क (हेमाद्री; विष्णू पुराण).
२० पले = १ वीशी; ५ वीशी = १ तुला;
२० तुला = १ भार (ब्रह्म पुराण).
८८ गौर सर्षप = १ रूप्य माषक;
१६ रूप्य माषक = १ धरण; १० धरण = १ पल;
१०० पले = १ तुला; २० तुला = १ भार.
२० रूप्य माषक = १ निष्पाव (विष्णुगुप्त).

**ताम्रमाने** – कार्षिक किंवा कार्षापण नामक एक ताम्रपरिमाण असून, त्याचे वजन पल नामक सुवर्णपरिमाणाच्या एक चतुर्थांशाइतके असते. (कार्षापण पाहा.)

लीलावती ग्रंथात तांब्याची पुढील परिमाणे दिली आहेत –

२० कवड्या = १ काकिणी; ४ काकिणी = १ पण;
१६ पण = १ द्रम्म; १६ द्रम्म = १ निष्क.

निष्क नावाचे सोन्याचे एक भारदर्शक परिमाण आहे. त्याचे वजन सुवर्णाच्या पलाइतकेच असते. रौप्य निष्कही वजनात सुवर्णाच्या पलाएवढा असतो.

**धान्यपरिमाणे** – भविष्य पुराणात धान्य मोजण्याची पुढील परिमाणे दिली आहेत ––

३ मुठी = १ पल; २ पले = १ प्रसृत;
२ प्रसृते = १ कुडव; ४ कुडव = १ प्रस्थ;
४ प्रस्थ = १ आढक; ४ आढक = १ द्रोण;
१६ द्रोण = १ खारी.

यांशिवाय, दोन द्रोणांचे एक परिमाण असून, त्याला कुंभ किंवा शूर्प असे नाव आहे. कोणी वीस द्रोणांचाही कुंभ मानतात. अशा दहा कुंभांचा एक वाह होतो. पराशराच्या मते ३२ प्रस्थांचा एक द्रोण व २ प्रस्थांचा एक आढक होतो. वराह व वायू या पुराणांत पुढील परिमाणे दिली आहेत ––

१ मूठ धान्य = १ पल; २ पले = १ प्रसृत;
४ प्रसृते = १ कुंची; ८ कुंची = १ पुष्कल;
४ पुष्कले = १ आढक; ४ आढक = १ द्रोण.

**भूमापनपरिमाणे**– त्रसरेणू हे भूमापनाचे आद्य परिमाण होय.

८ त्रसरेणू = १ रथरेणू; ८ रथरेणू = १ वालाग्र;
८ वालाग्रे = १ लिक्षा; ८ लिक्षा = १ यव;
८ यव = १ अंगुल; १२ अंगुले = १ वितस्ती.

अंगठ्याच्या टोकापासून तर्जनीच्या टोकापर्यंतच्या अंतराला प्रादेश, मध्यमेच्या टोकापर्यंतच्या अंतराला ताल, अनामिकेच्या टोकापर्यंतच्या अंतराला गोकर्ण व कनिष्ठिकेच्या टोकापर्यंतच्या अंतराला वितस्ती अशा संज्ञा आहेत.

रत्नी म्हणजे हाताची मूठ मिटली असता कोपरापासून मुठीच्या अग्रापर्यंतचे अंतर होय. हे अंतर एकवीस अंगुले मानलेले आहे.

हस्त म्हणजे कोपरापासून मध्यमेच्या अग्रापर्यंतचे अंतर होय. याची लांबी २४ अंगुले समजावी.

किष्कू किंवा अरत्नी याची लांबी ४२ अंगुले मानतात.

९६ अंगुले = १ धनुर्दंड; २ धनुर्दंड = १ नाली;
३० धनुर्दंड = १ नल्व; १००० धनुर्दंड = १ गव्यूती;
८००० धनुर्दंड = १ योजन.

एका वर्षात एका मनुष्याच्या निर्वाहासाठी जेवढ्या क्षेत्रातील धान्य लागते, तेवढ्या क्षेत्राला गोचर्म अशी संज्ञा आहे, असे विष्णुधर्मोत्तर पुराणात सांगितले आहे; तर बृहस्पतीने

दहा हात लांबीच्या काठीने तीस काठचा लांब एवढ्या त्रिज्येच्या वर्तुळात जेवढे क्षेत्र मावेल, त्याच्या दसपट क्षेत्राला गोचर्म असे म्हटले आहे. मत्स्य पुराणात दहा हातांच्या काठी-ऐवजी सात हातांची काठी घ्यावी, असे सांगितले आहे.

**द्रव्यानुयोग** जैन आगमांच्या परंपरेत जे साहित्य निर्माण झाले, त्याची विभागणी प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग व द्रव्यानुयोग अशा चार अनुयोगांत केलेली आहे. त्यांपैकी द्रव्यानुयोगात जीव, अजीव, इ. तत्त्वांचा विचार करणाऱ्या दार्शनिक, कर्मसिद्धांतविषयक आणि नय, निक्षेपादिविषयक ग्रंथांचा समावेश होतो.

जैनांच्या धार्मिक साहित्यात द्रव्यानुयोगाला प्राधान्य असून, या विभागातील ग्रंथ प्राचीन, विपुल आणि लोकप्रिय आहेत. त्यांपैकी षट्खंडागम हा सर्वांत प्राचीन ग्रंथ होय. या ग्रंथाचे सहा खंड असून, त्यांत सूत्ररूपाने जीव, कर्मबंध आणि जीव-परिणाम यांचे सूक्ष्म व विस्तृत वर्णन केलेले आहे. या ग्रंथावर अनेक टीकाही झालेल्या आहेत.

याच परंपरेतला दुसरा महत्त्वपूर्ण ग्रंथ म्हणजे पंचसंग्रह हा होय. यात जीवसमास, प्रकृति-समुत्कीर्तन, कर्मस्तव, शतक व सप्तती अशी पाच प्रकरणे आहेत.

षट्खंडागम व त्यावरील धवला टीका यांच्या आधारे नेमिचंद्राने गोम्मटसार नामक ग्रंथ रचला असून, त्याचे जीव-कांड व कर्मकांड असे दोन भाग आहेत.

याशिवाय, शिवशर्मकृत कर्मप्रकृती, गर्गर्षिकृत कर्मविपाक, जिनवल्लभगणिकृत पडशीती व ज्यांचे कर्ते अनिश्चित आहेत, असे कर्मस्तव, बंधस्वामित्व व सप्ततिका हे सर्व ग्रंथ कर्म-सिद्धांताचे वर्णन करणारे आहेत.

जिनभद्रगणीच्या विशेषणवती नामक ग्रंथात ज्ञान, दर्शन, जीव, अजीव, इ. नाना प्रकारांनी द्रव्यनिरूपण केले आहे. जिनवल्लभसूरीचा सार्वशतक हा ग्रंथ व कुंदकुंदाचार्यांचे समयसार, प्रवचनसार, पंचास्तिकाय, नियमसार, रयणसार, इ. ग्रंथ हे सर्व द्रव्यानुयोगातच अंतर्भूत होतात.

संस्कृत भाषेतही द्रव्यानुयोगविषयक काही ग्रंथ असून, त्यांचा प्रारंभ तत्त्वार्थसूत्र या उमास्वातीच्या ग्रंथाने होतो. या ग्रंथाचे दहा अध्याय असून, त्यांत रत्नत्रय, सात तत्त्वे, जीवांचे भेद, अधोलोक, मध्यलोक, देवलोक, सहा द्रव्ये, आस्रव, अहिंसादी व्रते, संवर, मोक्ष, इ. विषय चर्चिले आहेत.

न्यायविषयक ग्रंथांचाही समावेश द्रव्यानुयोगातच होतो. जैन न्यायाचा प्राकृतातील सर्वप्रथम ग्रंथ म्हणजे सिद्धसेनकृत सम्मइ-सुत्त हा होय. प्राकृतात स्याद्वाद व नय यांचे निरूपण करणारा दुसरा आचार्य देवसेन हा असून, त्याचे लघुनयचक्र व बृहन्नयचक्र असे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. आचार्य समंतभद्राने आप्तमीमांसा व युक्त्यनुशासन या दोन ग्रंथांत प्रामुख्याने अनेकांतवादाचे समर्थन केलेले आहे.

सिद्धसेनाचा न्यायावतार हा ग्रंथ संस्कृत भाषेत असून, त्यात प्रत्यक्ष, अनुमान व शब्द या तीन प्रमाणांचे विवेचन आढळते. अकलंकदेवाने जैन न्यायात बरीच भर घातली आहे. त्याचे लघीयस्त्रय, न्यायविनिश्चय, सिद्धिविनिश्चय व प्रमाणसंग्रह हे चार ग्रंथ प्रसिद्ध असून, त्यांवर टीकाही आहेत.

विद्यानंदी हाही एक मोठा जैन नैयायिक होऊन गेला. त्याने न्यायावर आप्तपरीक्षा, प्रमाणपरीक्षा, पत्रपरीक्षा व सत्यशासन-परीक्षा हे ग्रंथ लिहिले असून, इतरांच्या ग्रंथांवर टीकाही लिहिल्या आहेत.

विद्यानंदीनंतरचे उल्लेखनीय नैयायिक म्हणजे अनंतकीर्ती व माणिक्यनंदी हे होत. अनंतकीर्तीचे बृहत्सर्वज्ञसिद्धी व लघुसर्वज्ञसिद्धी हे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. माणिक्यनंदीच्या परीक्षामुख या ग्रंथात अनुमान प्रमाणासंबंधी विवेचन आहे.

याशिवाय मल्लवादीचा द्वादशारनयचक्र; हरिभद्राचार्यांचे अनेकान्तजयपताका, अनेकान्तवादप्रवेश व सर्वज्ञसिद्धी; वादि-देवसूरीचे प्रमाणनयतत्त्वालोकालंकार व स्याद्वादरत्नाकर; हेमचंद्राचे प्रमाणमीमांसा व अन्ययोगव्यवच्छेदिका; आचार्य यशोविजयाचे अनेकान्तव्यवस्था, जैनतर्कभाषा, सप्तभंगीनय-प्रदीप, नयप्रदीप, नयोपदेश, इ. ग्रंथांनी जैनांच्या न्यायविषयक साहित्यात मोलाची भर घातली आहे. [ भा. सं. जै. यो. ]

**द्राविड भाषाकुल** दक्षिण भारतातील भाषांच्या समुदायाला द्राविड भाषाकुल म्हणतात. या कुलात तमिळ, मल्याळम, तेलुगू, कन्नड, तुळू, कोडगू, तोड, कोटा व कैकाडी या भाषांचा समावेश होतो. द्रविड लोकांच्या भाषा म्हणून यांना द्राविड भाषा हे नाव मिळाले आहे. मध्य भारतातील गोंडी, कुरुख, माल्टो, कंध किंवा कुई, कोलामी या भाषाही द्राविड भाषा मानल्या जातात. छोटा नागपूर व बंगालमधील राजमहाल जिल्हा या भागांतही द्राविडभाषी लोक आढळतात.

द्राविड भाषा ज्या मूळ भाषेपासून उत्पन्न झाल्या, तिचे रूप तमिळ भाषेत काही अंशी दिसून येते. मल्याळम व कन्नड या भाषांचे तमिळशी पुष्कळ साम्य आहे. तेलुगूभाषी लोकांची संख्या सर्वांत मोठी आहे. या चार भाषांत विपुल साहित्य निर्माण झालेले आहे. बाकीच्या भाषांत लिखित साहित्य आढळत नाही. त्यांतील काही भाषा तर केवळ जंगली आदिवासी लोकांच्या बोलभाषाच राहिल्या आहेत. त्यांना साहित्याचा स्पर्श नाही.

इंग्रजी अमदानीत ख्रिस्ती मिशनरी व पंडित यांनी भारतीय भाषांचा तुलनात्मक अभ्यास करून त्यांचे मुख्य दोन वर्ग केले. संस्कृत, प्राचीन फारसी ( अवेस्ता ), ग्रीक, लॅटिन, इ. भाषांच्या वर्गाला त्यांनी आर्य भाषा आणि दक्षिण भारतीय भाषांना द्राविड भाषा अशी नावे दिली. काल्डवेल या भाषाशास्त्रज्ञाने आपल्या 'द्राविड भाषांचे तुलनात्मक व्याकरण' या ग्रंथात संस्कृत व तमिळ या भाषांतील काही फरक दाखविले आहेत, ते असे –

(१) द्राविड भाषांत मनुष्येतर प्राणी व अचेतन वस्तू यांची नावे नपुंसकलिंगी असतात.

(२) द्राविड भाषांतील नामांना विभक्तिप्रत्यय लागत नाहीत. त्याऐवजी अव्ययांचा उपयोग केला जातो.

(३) द्राविड भाषांतील नपुंसकलिंगी नामांची अनेकवचनी रूपे होत नाहीत.

(४) द्राविडी चतुर्थीचे प्रत्यय कु, की, गे असे आहेत. ते संस्कृत भाषेत नाहीत.

(५) संस्कृत भाषेत विशेषणांची रूपे विशेष्याप्रमाणे होतात, तशी द्राविड भाषांत होत नाहीत.

(६) द्राविड भाषांतील ऱ्हस्व ए व ओ हे स्वर संस्कृतात नाहीत.

यावरून द्राविड भाषा बोलणारे लोक व आर्यभाषी लोक भिन्न वंशाचे होते व त्यांची संस्कृतीही भिन्न होती, असे अनुमान या पंडितांनी केले आहे. बलुचिस्तानातील ब्राहुई भाषा द्राविड भाषावर्गातच समाविष्ट केली गेली आहे. कारण तिचे या भाषांशी पुष्कळ साम्य आहे. द्रविड लोक पश्चिमेकडून बलुचिस्तानातून भारतात आले, या तर्काला हा एक आधार मानला जातो.

वरील अनुमान निराधार आहे, असेही अनेक पंडितांचे मत आहे. यासंबंधी श्री. र. म. मुसारी यांनी केलेले विवेचन असे आहे –

ज्या काळात तमिळ भाषा उदयास आली, त्या काळात संस्कृत भाषा ही लौकिक भाषा किंवा बोलभाषा राहिली नव्हती; तर ब्राह्मण पंडित व उच्च वर्गातील लोक यांच्यापुरतीच ती मर्यादित बनली होती. बहुजन समाजाने संस्कृताच्या जागी पाली-प्राकृतांचा अवलंब केला होता. ऱ्हस्व ए व ओ हे स्वर पाली-प्राकृतांत आहेत. तसेच मराठी, हिंदी, इ. भाषांतही काही विशेषणांची रूपे विशेष्यांप्रमाणे बदलत नाहीत. विभक्तिप्रत्ययांऐवजी शब्दयोगी अव्ययांचा उपयोगही हिंदी, मराठी इ. भाषांत केला जातो. मनुष्येतर प्राणी व अचेतन वस्तू यांचा समावेश नपुंसकलिंगात करणे हा द्राविडी भाषांतील प्रकार थोडासा मराठीतही आढळतो.

संस्कृत भाषेशी संबंध नसलेले अनेक स्वतंत्र शब्द द्राविड भाषांत आढळतात, तसेच ते पाली-प्राकृत आणि हिंदी, मराठी, गुजराती या भाषांतही आढळतात. इतर अर्वाचीन भारतीय भाषांप्रमाणेच द्राविड कुलातील भाषांचा विकास घडवून आणण्यात संस्कृत भाषेचे साहाय्य झाले आहे. म्हणून द्राविड भाषांना जन्म देणारी मूळ भाषा आर्यांच्या भाषेहून अगदी निराळी होती, असे मानणे अशास्त्रीय ठरते. (पंचधारा, अंक ३–४, शके १८८१)

मुंडा भाषा बोलणारे लोक व द्रविड लोक, यांच्या शरीररचनेत साम्य असल्यामुळे मुंडा व द्राविड भाषांचा निकट संबंध असावा, असे अनुमान काही पंडितांनी केले आहे. पण त्याला काही आधार नाही. ऑस्ट्रेलियातील भाषा व द्राविड भाषा यांच्यांत काही साम्य आढळते. प्रागैतिहासिक काळात लेमुरिया नामक महाद्वीप हिंदी महासागरात होते व त्यामुळे ऑस्ट्रेलिया व भारत हे जोडलेले होते. त्यावरून या दोन भाषाकुलांचा परस्परसंबंध असण्याची शक्यता वाटते. पण तो सिद्ध करण्यासाठी अजून पुरेशी सामग्री उपलब्ध झालेली नाही. [ म. ज्ञा. को.; सा. भा. वि.; भा. भा. स. ]

**द्राविड शिल्पशैली** द. भारतातली एक शिल्पपद्धती. पाहा – देवालये, शिल्पशास्त्र.

**द्राह्यायणसूत्र** सामवेदाच्या राणायनी शाखेचे एक श्रौतसूत्र. याला वसिष्ठसूत्र असेही नाव आहे. लाटचायन श्रौतसूत्राशी याचे बरेच साम्य आहे. [ हिंदुत्व ]

**द्राक्ष** एक फल. याचे घोस असतात. शंकराला द्राक्षे अर्पण केली असता, त्या द्राक्षांच्या हजारपट संख्येइतकी वर्षे शिवलोकात सुखोपभोग मिळतात.

आश्विनमासात बागेत प्रथम आलेली द्राक्षे खाण्याचा एक विधी आहे. यासंबंधीची एक लौकिक दंतकथा अशी– देवदैत्यांनी सागरमंथन केले, तेव्हा त्यातून एक सुंदर स्त्री वर आली आणि लगेच तिचे एका वेलीत रूपांतर झाले. मग देवांनी तिला द्राक्षा असे नाव दिले. तेव्हापासून पुढे द्राक्षाभक्षणाचे विधान सुरू झाले. पहिली द्राक्षे पिकल्यावर त्या वेलीची पूजा करावी; नंतर दोन मुले व दोन वृद्ध पुरुष यांचा सन्मान व नृत्यगायनादी कार्यक्रम करावे, मग त्या वेलीची द्राक्षे आपले नातलग, ब्राह्मण व इष्टमित्र यांच्यासह भक्षण करावी असे सांगितले आहे. [ क्रि. स्ट. ले. उ.; हि. ध. ]

**द्राक्षाराम** एक प्राचीन क्षेत्र. हा शब्द दक्ष+आराम या शब्दांवरून बनला असे सांगतात. ही दक्ष प्रजापतीची यज्ञभूमी असल्यामुळे या स्थानाला दाक्षाराम (द्राक्षाराम) अशी संज्ञा मिळाली, अशी एक कथा आहे. याला सप्तगोदावरी-तीर्थ, दक्षतपोवन व दक्षिणकाशी अशी अन्यही नावे आहेत. हे गाव आंध्र प्रदेशाच्या पूर्व गोदावरी जिल्ह्यातील रामचंद्रपुरम तालुक्यात आहे. आंध्र प्रदेशात या स्थानाची विशेष ख्याती आहे. या तीर्थात स्नान केले असता मोक्ष मिळतो, अशी समजूत आहे.

इथे एक शिवमंदिर आहे. याची स्थापना पहिला चालुक्य राजा भीम याने केली, त्यामुळे याला भीमेश्वर असे नाव पडले आहे. चालुक्य व चोळ या दोन्ही शिल्पपद्धतींचा या मंदिर-निर्मितीत सुरेख संगम झाला आहे. येथील शिव-लिंगाची उंची वीस-पंचवीस फूट आहे. हे मूळ लिंग सूर्याने स्थापले व कश्यपादी सप्तर्षींनी सात नद्यांच्या जलाने त्याची पूजा केली. पुढे या लिंगाचे पाच भाग झाले. ते पाच भाग पाच स्थानी पडले व त्या स्थानांना आराम असे म्हणू लागले. त्यांतील भीमाराम हे काकीनाडमध्ये, क्षीरराम हे पश्चिम गोदावरीच्या तीरावर, अमरराम हे गुंटूर येथे आणि दाक्षाराम व कूर्माराम ही दोन स्थाने पूर्व गोदावरीच्या तीरावर आहेत.

द्राक्षारामाच्या पश्चिमेला पाकशासनालय म्हणून एक मंदिर आहे. या मंदिरासंबंधी एक आख्यायिका आहे, ती अशी—

इथे भीमेश्वरस्वामी लिंगाकारात प्रकट होत असताना सप्तर्षी त्याची पूजा करीत होते व तेहतीस कोटी देवही तिथे दर्शनाला आले होते. त्या वेळी अशी आकाशवाणी झाली, की 'जो कोणी सप्तगोदावरीतीरावर लिंगस्थापना करून त्याची पूजा करील त्याला मोक्ष प्राप्त होईल.' ती आकाशवाणी ऐकून पाकशासनाने म्हणजे इंद्राने इथे एका लिंगाची स्थापना करून त्याची पूजा केली, तेच हे पाकशासनालय होय.

इथल्या पूर्व गोपुराजवळ श्री. शंकर नारायणस्वामी, गणेश, लक्ष्मीनारायण, इ. देवतांची मंदिरे आहेत. त्यांपैकी लक्ष्मी-नारायणाचे मंदिर श्रीरामचंद्राने बांधले अशी आख्यायिका आहे. शिल्पकलेच्या दृष्टीने हे मंदिर सुरेख आहे. इथे नवरात्र, कल्याणम, महाशिवरात्र, इ. उत्सव मोठ्या प्रमाणात होतात.

इथे एकूण तीनशे एक्यांयशी शिलालेख आहेत. या शिला-लेखांत पूर्व चालुक्य, पश्चिम चालुक्य, चोळ, इ. घराण्यांतील राजांची माहिती मिळते. [ टें. ली. आं. प्र.; कल्याण-तीर्थांक ]

**द्रुह्यू** (१) वैदिक पंचजनांपैकी एक जन. हे लोक पराक्रमी व इंद्राग्नींचे उपासक होते. दाशराज्ञ युद्धात यांना फार हानी पोचली, असे वसिष्ठाने म्हटले आहे (ऋ. ७. १८). द्रुह्यूंचा प्रदेश रावीपासून झेलमपर्यंत पसरलेला होता. द्रुह्यूंच्या उत्तरेला अनू व दक्षिणेला तुर्वश राहत असावे, असा तर्क आहे. भृगू हे अनु-द्रुह्यूंचे पुरोहित होत. या तिघांनी मिळून भरत-जनातील सुदासावर आक्रमण केले; पण सुदासाने त्यांना चांगलेच झोडपून काढले. या लढाईत अनु-द्रुह्यूंचे बरेच पुढारी व हजारो सैनिक मारले गेले. [ ऋ. आ.; ऋ. द. ]

(२) शर्मिष्ठा व ययाती यांचा पुत्र. ययातीने याच्याकडे आपल्यासाठी तारुण्य मागितले; पण याने ते नाकारल्यावर ययातीने त्याला शाप दिला, की 'आयुष्यात तुला सुख किंवा राज्य न मिळता तू देशोदेशी भटकत राहशील.'

द्रुह्यूच्या चौथ्या पिढीत गांधार नामक एक राजा झाला. त्याने आपल्या नावावरून गांधार देश वसवला. त्याचप्रमाणे द्रुह्यूच्या वंशातील प्रचेतसाच्या शंभर पुत्रांनी म्लेच्छ देशांत आपली सत्ता स्थापन केली, असे मत्स्य पुराणात सांगितले आहे (४९. ९). [ पु. इं.; पु. वि. ]

**द्रोणकलश** एक यज्ञीय पात्र. 'देवपात्रं द्रोणकलशः'=द्रोण-कलश म्हणजे देवपात्र होय, असे तांड्य ब्राह्मणात म्हटले आहे (६. ५. ७.). द्रोणकलश शब्दाची व्युत्पत्ती अशी —

'द्रोणस्य द्रोणपरिमितधान्यस्य कला मात्राः कणा अस्मिन् शेरते मान्तीति द्रोणकलशः'= द्रोण (८०० तोळे) या मापाने मोजलेले धान्य ज्यामध्ये मावते तो द्रोणकलश होय. द्रोणकलशाला प्रजापती, यज्ञ, राष्ट्र व प्राण यांचे प्रतीक मानले आहे. याचा आकार डोणीसारखा असतो. हा नौकेप्रमाणे किंवा आयताकृती किंवा वर्तुळाकृती करावा, असे सांगितले आहे.

द्रोणकलश हा वारुणवृक्षाचा करावा, असे कात्यायन सूत्राच्या टीकेत सांगितले आहे (९. २. १६ वरील टीका). तो कोणत्याही पवमान ग्रह असे म्हणतात. तृतीयसवनामध्ये अगदी शेवटी यज्ञीय वृक्षाचा केला तरी चालतो, अनेक सूत्रकार सांगतात. या कलशात सोमरस असतो. या सोमरसयुक्त पात्राला उन्नेता नावाचा ऋत्विज तो द्रोणकलश डोक्यावर घेऊन त्याचा याग करतो. याला हारियोजनयाग असे म्हणतात. द्रोणकलशात ठेवलेल्या सोमरसाला शुक्र असेही नाव आहे. [ श्री. विद्याधर-शास्त्री भिडे ]

**द्रोणगिरी** (१) एक जैन क्षेत्र. जैनांच्या निर्वाणकांड नामक ग्रंथात या क्षेत्राचे वर्णन आहे, ते असे —

फलहोडीवरगामे पच्छिमभायम्मि दोणगिरिसिहरे।
गुरुदत्ताइमुणिंदा णिव्वाण गया णमो तेसिं ॥

अर्थ– फलहोडी गावाच्या पश्चिमभागी जे द्रोणगिरिशिखर आहे, त्यावर गुरुदत्तादी मुनी निर्वाणपद पावले. त्या स्थानाला नमन असो.

फलोधी अथवा फलहोडी नामक गाव सध्या जोधपूर भागात मेडत्याजवळ असून, ते श्वेतांबर संप्रदायाचे क्षेत्र आहे. परंतु त्याच्याजवळ द्रोणगिरी पर्वत मात्र नाही. तो बुंदेलखंडातील बिजावर भागात सेंदपा नामक गावाजवळ आहे. त्या गावात एक जैन मंदिर असून, द्रोणगिरीवर चौवीस जैन मंदिरे आहेत. त्यांपैकी आदिनाथाच्या मंदिरातील मूर्ती इ. स. १४९२ मध्ये स्थापली गेली, असे म्हणतात. बाकीची मंदिरे आणि त्यांतील मूर्ती तुलनेने अलिकडच्या आहेत. या ठिकाणी प्रतिवर्षी चैत्र शु. अष्टमी ते चतुर्दशीपर्यंत उत्सव असतो. [जै. सि. भा., मार्च १९३९; जै. ध.]

(२) एक प्राचीन पर्वत. हा क्षीरोदसागरात स्थित असून, त्यावर दिव्य औषधी उत्पन्न होतात, असा उल्लेख रामायणात आहे (वा. रा. ६. ५०. ३१). इंद्रजिताच्या शक्तीने लक्ष्मण मूर्च्छित पडला असता, त्याला सावध करण्यासाठी हनुमंताने हा पर्वत मुळासकट उपटून लंकेत नेला होता, अशी समजूत आहे. हा पर्वत हनुमंत लंकेकडे नेत असता, त्याचा एक तुकडा नासिक क्षेत्राजवळ गळून पडला, तोच सध्याचा सप्तशृंग पर्वत होय, असा उल्लेख महानुभावांच्या लीळाचरित्र नामक ग्रंथात आहे. [वा. रा. को.; लीळाचरित्र]

**द्रोणीमुख** नगरांचा एक प्रकार. प्राचीन काळी नगरांचे वर्गीकरण अंतर्गत रचना व सभोवतीची परिस्थिती यांवरून करीत. द्रोणीमुख याचा अर्थ नदी ज्या ठिकाणी समुद्राला मिळते, तिथे तिच्या मुखाजवळ वसलेले नगर असा आहे. मानसार या शिल्पशास्त्रीय ग्रंथात अशा नगरांना द्रोणान्तर म्हटले आहे. पुढे त्यांना द्रोणमुख अथवा द्रोणीमुख म्हणू लागले. अशा नगरांना बंदरे असत व तिथे जल व स्थल अशा उभय मार्गांनी येणारा माल उतरवून घेतला जाई. त्यामुळे अशा नगरांत व्यापार खूप मोठा चाले. परदेशातून आलेल्या व्यापाऱ्यांनीही अशा नगरांची प्रशंसा केली आहे. द्रोणीमुखाचे उत्कृष्ण उदाहरण म्हणजे ताम्रलिप्ती हे नगर होय. हे समुद्र व नदी यांच्या संगमावर वसले होते व ते आयात–निर्यातीचे एक महत्त्वाचे केंद्र मानले जात होते. [प्रा. भा. न. न. जी.]

**द्रौपती** द. भारतातील एक कृपाळू ग्रामदेवता. हिला पशुबळी देत नाहीत. हिची वार्षिक जत्रा भरते व त्या वेळी मोठी मिरवणूकही निघते. ही पांडवांची द्रौपदीच होय.

**द्रौपदी** महाभारताची नायिका. ही पंचाल देशाचा राजा यज्ञसेन द्रुपद याला यज्ञाग्नीतून लाभलेली कन्या होय. द्रुपद कुळातली म्हणून द्रौपदी, यज्ञसेन द्रुपद व पृषती यांना तिने आई-बाप मानल्यामुळे याज्ञसेनी व पार्षती, पंचाल जनांची राजकुमारी म्हणून पांचाली आणि वर्णाने सावळी असल्यामुळे कृष्णा अशी अनेक नावे महाभारतात आढळतात. परंतु या सर्व नावांत तिचे द्रौपदी हे नावच प्रसिद्ध आहे.

एकदा यज्ञसेन द्रुपदाने द्रोणाचार्यांचा अपमान केला होता. या अपमानाचे शल्य फेडण्यासाठी द्रोणाचार्यांने आपला शिष्योत्तम अर्जुन याच्याकरवी द्रुपदाचा पराभव केला आणि त्याचे अर्धे राज्य जिंकून घेतले. या पराभवामुळे संतप्त झालेल्या द्रुपदाने द्रोणाचार्यांचा नाश करू शकणारा एक तेजस्वी पुत्र आपल्याला प्राप्त व्हावा, म्हणून एक यज्ञ केला. यज्ञाच्या सांगताप्रसंगी धृष्टद्युम्न हा तेजस्वी कुमार आणि त्याच्या मागोमाग द्रौपदी ही तेजस्वी कुमारी, अशी दोन मुले यज्ञाच्या वेदीतून उत्पन्न झाली. अग्नीतून बाहेर आलेल्या या कुमारीचे सौंदर्य महाभारतकारांनी वर्णिले आहे, ते असे –

> कुमारी चापि पाञ्चाली वेदीमध्यात्समुत्थिता ।
> सुभगा दर्शनीयाङ्गी स्वसितायतलोचना ॥
> श्यामपद्मपलाशाक्षी नीलकुञ्चितमूर्धजा ।
> ताम्रतुङ्गनखी सुभ्रूश्चारुपीनपयोधरा ॥
> मानुषं विग्रहं कृत्वा साक्षादमरवर्णिनी ।
> नीलोत्पलसमो गन्धो यस्याः क्रोशात् प्रधावति ॥
> या बिभर्ति परं रूपं यस्या नास्त्युपमा भुवि ।
> देवदानवयक्षाणामीप्सितां देवरूपिणीम् ॥
> (म. भा. आदि. १६७. ४४-४७)

अर्थ– वेदीमध्यातून उत्पन्न झालेली ही पांचालांची कुमारी सुंदर असून, तिचे अंगप्रत्यंग आकर्षक होते. तिचे डोळे नीलकमलासारखे निळे व विशाल होते, वर्ण सावळा होता, केस काळेभोर व कुरळे होते, नखे तांबडी व टोकदार होती, भिवया रेखीव होत्या आणि उरोज पुष्ट होते. ती जणू मानवरूप धारण केलेली साक्षात स्वर्गीची देवताच होती. तिच्या शरीराचा गंध निळ्या कमळांच्या गंधासारखा असून, तो कोसभर दूरपर्यंत दरवळत असे. (मनुष्यच काय;) देव, दानव व यक्ष यांनीही तिचा मोह धरावा, असे तिचे अनुपम सौंदर्य होते.

द्रौपदी उपवर होताच ती अर्जुनाला द्यावी, असे द्रुपदाला वाटू लागले. अर्जुनाने त्याचा पराभव केला असला, तरी धनुर्विद्येतील त्याचे असाधारण कौशल्य पाहून द्रुपद त्याच्यावर खूष झाला होता; परंतु पाचही पांडव लाक्षागृहात जळून मेल्याची वार्ता ऐकून त्याची निराशा झाली. मात्र पांडव सहजासहजी

कौरवांच्या कारस्थानाला बळी पडणार नाहीत, असेही त्याला वाटत होते. या संदिग्ध मनःस्थितीत त्याने द्रौपदीचे स्वयंवर मांडले आणि त्यासाठी धनुर्विद्येतील कौशल्याची कसोटी पाहणारा पण लावला. त्याने वैशिष्टयपूर्ण धनुष्यबाण व एक फिरते यंत्र तयार केले आणि असे जाहीर केले, की 'जो कोणी माझे हे धनुष्य सज्य करून आणि माझे हे बाण योजून या फिरत्या यंत्रातील लक्ष्याचा वेध करील, त्यालाच माझी मुलगी माळ घालील.' अर्जुन जिवंत असेल, तर ह्या पण ऐकून स्वयंवरासाठी उपस्थित होईल, अशी द्रुपदाची कल्पना होती. प्रत्यक्ष स्वयंवरमंडपात सर्व देशांचे राजे उपस्थित झाल्यावर धृष्टद्युम्नाने आपल्या बहिणीला मंडपात आणले आणि मूळच्या पणाला एक विशेष पुरवणी जोडली, ती अशी–

**एतन्महत्कर्म करोति यो वै कुलेन रूपेण बलेन युक्तः।**
**तस्याद्य भार्या भगिनी ममेयं कृष्णा भवित्री न मृषा ब्रवीमि॥**
(म. भा. आदि. २२१.३६)

अर्थ – (फिरत्या यंत्रातील लक्ष्याचा वेध करण्याचे) हे महत्कर्म जो कोणी करील आणि जो कुल–रूपबलाने युक्त असेल, त्यालाच माझी भगिनी कृष्णा ही वरील. हे मी असत्य बोलत नाही.

धृष्टद्युम्नाने असे जाहीर करताच अनेक राजे लक्ष्यवेधासाठी पुढे सरसावले; परंतु त्यांपैकी कोणालाही त्या कामी यश आले नाही. नंतर कर्ण पुढे आला आणि त्याने धनुष्य उचलले. परंतु त्याने धनुष्याला बाण लावण्यापूर्वीच द्रौपदी उच्च स्वराने उद्गारली, 'मी सूताला वरणार नाही.'

हा उद्गार ऐकताच कर्ण अपमानित झाला व त्याने धनुष्य टाकून दिले. तो लज्जेने मान खाली घालून बाजूला झाला. त्यानंतर शिशुपाल व जरासंध यांनीही लक्ष्यवेधाचा प्रयत्न केला; पण ते अयशस्वी ठरले. शेवटी ब्राह्मणवेषातील अर्जुन पुढे आला आणि त्याने पाहता पाहता लक्ष्यवेध करून द्रौपदीला पणात जिंकले.

पांडव कुंतीसह द्रुपदाच्या राजधानीत एका कुंभाराच्या घरी उतरले होते आणि ब्राह्मणवेषाने भिक्षा मागून निर्वाह करीत होते. अर्जुन द्रौपदीला घेऊन बंधूंसह मुक्कामावर आला व कुंतीला विनोदाने म्हणाला, 'आई, पाहिलीस का आम्ही आज काय भिक्षा आणली आहे ती?' त्यावर कुंती नेहमीच्या सवयीप्रमाणे वर न पाहताच बोलून गेली. 'बाळांनो, ती भिक्षा सगळे मिळून वाटून घ्या!'

अर्जुनाने भिक्षा म्हणून आणली आहे, ती एक नववधू स्त्री आहे, हे समजल्यावर कुंतीला आपल्या उद्गाराचा पश्चात्ताप झाला. आपले हे बोलणे मुलांनी खऱ्या अर्थाने घेऊ नये, असेही तिने स्पष्ट केले. परंतु युधिष्ठिराने आईचे शब्द पाळण्याचा आग्रह धरला आणि तसे द्रुपदाला कळविले. द्रुपदाला ते पटणे शक्य नव्हते; परंतु युधिष्ठिराने व्यासांकरवी त्याला ते पटवून दिले आणि अर्जुनाने पराक्रमाने मिळविलेली द्रौपदी पाचही पांडवांची पत्नी झाली. यामुळे त्या पाचही भावांतील ऐक्य अभेद्य राहिले.

राजवैभवात वाढलेल्या या द्रुपदकन्येचा संसार सुरू झाला, तो कुंभाराच्या घरी. पांडवांचा व पांचालांचा सोयरीक–संबंध निर्माण झाल्याचे धृतराष्ट्राला समजले. या संबंधाने पांडव बलिष्ठ होणार, हेही त्याच्या लक्षात आले. तेव्हा आताच त्यांना दूर करावे असा धूर्तपणाचा विचार करून धृतराष्ट्राने खांडव नामक निर्जन वन पांडवांना दिले व तुम्ही तिथे नवे राज्य स्थापन करा, असे त्यांना सांगितले. पांडवांनी आपल्या कर्तृत्वाने त्या वनाचा कायापालट घडवून आणला व तिथे इंद्रप्रस्थ नावाची राजधानी उभारून स्वतंत्र राज्य निर्माण केले. द्रौपदी त्या राज्याची राणी बनली.

द्रौपदीच्या जीवनातील सुखाचा कालखंड हा एवढाच होय. परंतु ते सुखही निर्मळ राहू शकले नाही. एकदा चोरांनी पळविलेल्या ब्राह्मणांच्या गायी परत आणण्यासाठी घाईघाईने अर्जुन शस्त्रागारात गेला असता तिथे युधिष्ठिर द्रौपदीसह एकांतात बसला आहे, असे त्याला दिसले. असा एकांतभंग जो कोणी करील त्याने त्या अपराधाचे प्रायश्चित्त म्हणून बारा वर्षे वनवासात जावे, असा पांडवांनी नियम ठरवला होता. त्यामुळे तो वनवास अर्जुनाच्या वाट्याला आला. ज्याने आपल्या विक्रमाच्या बळावर द्रौपदीला जिंकले होते आणि द्रौपदीचेही मन ज्याच्यावर स्वयंवरापूर्वीपासूनच जडले होते, त्या अर्जुनाचा एवढा विरह आणि तोही ऐन तारुण्याच्या व वैभवाच्या काळात भोगण्याचा प्रसंग येणे ही घटना द्रौपदीच्या दृष्टीने दारुण होती.

बारा वर्षांनी अर्जुन परत आला, तो आणखी तीन स्त्रियांशी लग्ने करून आणि त्यांपैकी एकीला म्हणजे सुभद्रेला बरोबर घेऊन. त्या सुभद्रेविषयी किंचित्काल द्रौपदीला सवतीमत्सर वाटल्यावाचून राहिला नाही. परंतु सुभद्रेच्या विनम्रभावाचा प्रत्यय येताच तिने तिला बहिणीप्रमाणे वागवले.

अर्जुन परत आल्यावर त्याने व इतर भावांनी इंद्रप्रस्थाचे राज्य निष्कंटक व वैभवशाली बनविण्यासाठी दिग्विजय केले. मग युधिष्ठिराने राजसूय यज्ञ केला. तो पार पडल्यावर पांडव सम्राट बनले आणि द्रौपदी सम्राज्ञी झाली. राजसूय यज्ञाच्या निमित्ताने दुर्योधनही इंद्रप्रस्थाला आला होता. त्या प्रसंगी निर्मिलेल्या मयसभा नामक चमत्कृतिपूर्ण सभागृहात तो अनेकदा फसला व फजीत झाला, म्हणून द्रौपदी त्याला हसली. या फजितीमुळे आणि विशेषतः द्रौपदीच्या हसण्यामुळे दुर्योधन

पांडवांच्या सर्वनाशाचा विचार करीतच हस्तिनापुराला परत गेला. पूर्वी कर्णही असाच दुखावला होता. तेव्हा द्रौपदीवर सूड उगवण्याची संधी त्या दोघांनी मिळून लौकरच साधली.

कर्ण, दुर्योधन, शकुनी व दुःशासन यांनी भरीला घातल्यामुळे धृतराष्ट्राने द्यूताचे कारस्थान रचून युधिष्ठिराला द्यूताचे आव्हान दिले. युधिष्ठिर त्या चांडाळचौकडीच्या जाळचात अडकून द्यूत खेळला व सर्वस्व हरवून बसला. स्वतःसह सर्व काही पणाला लावून हरल्यानंतर त्याने अखेरीस द्रौपदीलाही पणाला लावले आणि त्यामुळे द्रौपदी कौरवांची दासी झाली. पती, दीर आणि सासरे यांच्या सभेत दुःशासनाने तिला रजःस्वला अवस्थेत केसांना धरून फरफटत आणले, कर्णाने तिचा वेश्या म्हणून अवमान केला, दुर्योधनाने तिला निर्लज्जपणाने आपली मांडी उघडी करून दाखवली आणि अखेरीस दुःशासनाने तिच्या नेसत्या वस्त्रालाच हात घातला. नाथवती असूनही अनाथवत बनलेल्या द्रौपदीचा त्या वेळचा आक्रोश ऐकूनही तिच्या शीलाच्या रक्षणासाठी त्या भरल्या सभेत कोणी पुढे आले नाही. तिने मग सुनेच्या नात्याचा बुजरेपणा टाकून सभ्यांना आवाहन केले आणि छेडलेही ! परंतु त्याचा काहीही उपयोग झाला नाही. भीष्म-द्रोणादी सभ्यांच्या उपस्थितीतही या तेजस्विनी सतीच्या अब्रूचे धिंडवडे निघायचे ते निघालेच.

कौरवांच्या त्या राजसभेत एकटचा विदुराला तेवढी द्रौपदीची ही विटंबना सहन झाली नाही. या घटनेतून पुढे महान अनर्थ ओढवेल, ही जाणीव त्याने धृतराष्ट्राला करून दिली. तेव्हा धृतराष्ट्र घाबरला. त्याने द्यूताचा निर्णय रद्द करून द्रौपदीला तीन वर मागण्यास सांगितले. तिने एका वराने धर्माला दास्यमुक्त केले, दुसऱ्या वराने इतर चौघांना मुक्त केले आणि 'माझे पती शस्त्रास्त्रांसह मुक्त झाले, एवढे मला पुरेसे आहे,' असे म्हणून, तिने तिसरा वर मागितलाच नाही. द्रौपदीची ही अविचल पतिनिष्ठा पाहून, तिच्याविषयी सूडबुद्धी बाळगणारा कर्णही उद्गारला, की 'द्रौपदीने जे केले, त्याला तोड नाही.'

पांडव अशा प्रकारे मुक्त होऊन इंद्रप्रस्थाकडे चालू लागताच धृतराष्ट्राचा बेत पुनश्च बदलला आणि त्याने वाटेतूनच त्यांना परत फिरवून पुनश्च द्यूतासाठी निमंत्रण दिले. त्यानंतर पुन्हा ते कपटद्यूत मांडले गेले आणि त्यातही पांडव हरले. जो हरेल त्याने बारा वर्षे वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास भोगावा, ही अट त्या द्यूतासाठी ठरली होती. ती पूर्ण करण्यासाठी म्हणून पांडवांना अजिने परिधान करून द्रौपदीसह हस्तिनापुराबाहेर पडावे लागले. तो प्रसंग जसा दुर्धर तसाच तो वनवासही दुर्धर होता. त्या वेळी द्रौपदीचा शोक व संताप उफाळून आला. तिने त्या वेळी अगदी तळतळून जे उद्गार काढले, ते असे –

> यत्कृतेऽहमिदं प्राप्ता तेषां वर्षे चतुर्दशे ।
> हतपत्यो हतसुता हतबन्धुजनप्रियाः ।।
> बन्धुशोणितदिग्धाङ्ग्यो मुक्तकेश्यो रजस्वलाः ।
> एवं कृतोदका भार्याः प्रवेक्ष्यन्ति गजाह्वयम् ।।
>
> ( म. भा. सभा. ८०.२०-२१ )

अर्थ– ( रक्ताने माखलेल्या मलिन वस्त्रानिशी आणि मोकळचा केसांनी पतींच्या मागे रडत जाण्याची पाळी माझ्यावर आली आहे. ) ज्यांच्यामुळे माझ्यावर हा प्रसंग गुदरला त्या कौरवांच्या बायकांनाही हे असेच भोगावे लागेल. आजपासून चौदा वर्षांनंतर त्यांचे पती, पुत्र व सर्व आप्तगण नष्ट होतील, त्यांची अंगे रक्ताने व धुळीने माखतील आणि केस मोकळे सुटतील. अशा अवस्थेत आपल्या पतींना तिलांजली देऊन त्याही ( रणभूमीवरून ) हस्तिनापुरात प्रवेश करतील.

राजकीय पातळीवरून पांडवांची प्रतिष्ठा नष्ट झाली असली, तरी नैतिक दृष्टचा त्यांचा पक्ष हा सत्पक्ष असल्याची जाणीव समाजाला असल्यामुळे वनवासातही अतिथि – अभ्यागतांची व ऋषिमुनींची वर्दळ त्यांच्या पर्णकुटीवर नेहमी असे. गृहिणी म्हणून सर्व कर्तव्ये तत्परतेने पार पाडणे, सर्व व्यथा–वेदनांचा भार सहन करून पतींचे– विशेषतः युधिष्ठिराचे धर्माधर्मनिर्णयातील करंटेपण घालवण्यासाठी प्रयत्न करणे आणि भीमार्जुनादींना सतत त्यांच्या क्षत्रियोचित कर्तव्याची जाणीव देत राहून त्यांचा स्वाभिमान धगधगत ठेवणे, हे सर्व ती अहर्निश करीत असायची.

वनवासातही द्रौपदीचे जीवन निराबाध राहू शकले नाही. त्या काळात अर्जुन अस्त्रप्राप्तीसाठी हिमालयात गेल्यावर तिला पाच वर्षे पुनश्च त्याचा विरह सहन करावा लागला. बाकीचे चार पांडव जवळ असूनही अर्जुनाविषयीच्या आगळचा प्रीतीमुळे तिला तो विरह असह्य झाला. तिने युधिष्ठिराला स्पष्टपणे सांगितले–

> तमृते पाण्डवश्रेष्ठ वनं न प्रतिभाति मे ।
> शून्यामिव प्रपश्यामि तत्र तत्र महीमिमाम् ।
> न लभे शर्म वै राजन् स्मरन्ती सव्यसाचिनम् ।।
>
> (म. भा. वन. ८०.१५)

अर्थ– हे पांडवश्रेष्ठा, अर्जुनावाचून मला या वनात करमत नाही. तो नाही म्हणजे ही पृथ्वी जणु शून्यवत वाटते. त्याची जेव्हा जेव्हा आठवण होते, तेव्हा तेव्हा मनाला (वेदना होतात) आणि सुख लाभत नाही.

परंतु एवढचानेच भागले नाही. बारा वर्षांचा वनवास आणि एक वर्षाचा अज्ञातवास या काळात तिच्या शीलावर तीन वेळा आघात झाले. पहिला प्रसंग असा– अर्जुन अस्त्रप्राप्तीसाठी दूर गेला होता आणि भीमही आश्रमात नव्हता. ब्राह्मणवेषाने

पांडवांच्या आश्रमात राहिलेल्या जटासुर नामक राक्षसाने ही संधी साधली व उरलेल्या तीन्ही पांडवांसह द्रौपदीला पळवून नेण्याचा प्रयत्न केला. परंतु ऐनवेळी भीम परत आल्यामुळे ते अरिष्ट टळले. त्याने जटासुराला द्वंद्वयुद्धात ठार करून द्रौपदीची व बंधूंची मुक्तता केली.

दुसरा आघात धृतराष्ट्राचा जावई जयद्रथ याने केला. तो त्या वनातून ससैन्य प्रवास करीत होता. त्याला कळले, की पांडव शिकारीला गेले आहेत आणि द्रौपदी आश्रमात एकटीच आहे. त्याच्या मनात द्रौपदीची अभिलाषा होतीच. ती त्याने या वेळी पुरी करून घ्यायचे ठरवले. जयद्रथ द्रौपदीच्या आश्रमात शिरला व त्याने द्रौपदीला बाहेर खेचले. तिला आपल्या रथात घालून तो पुढे निघाला. पांडव शिकारीहून परत येताच द्रौपदीच्या दासीकडून त्यांना या दुर्घटनेचे वृत्त समजले. त्यांनी तावडतोब जयद्रथाचा पाठलाग करून त्याला पकडले आणि द्रौपदीची सुटका केली.

तिसरा प्रसंग अज्ञातवासाच्या काळातला आहे. तिथे विराटाचा मेव्हणा कीचक हा तिच्या पातिव्रत्यावर घाला घालायला उठला. विराटाच्या घरी द्रौपदी ही सैरंध्री (राणीची वेणीफणी करणारी दासी) म्हणून सुदेष्णा राणीकडे राहिली होती. अर्थात दासीच्या शीलाची कदर कोण करणार! कीचकाच्या सांगण्यावरून सुदेष्णेने तिला अवेळी आणि वळजवरीने त्याच्याकडे मद्य आणण्यासाठी पाठवले. कीचक अतिप्रसंग करू लागताच त्याला हिसडा देऊन ती तिथून निसटली आणि राजगृहात धर्मराज (कंकभट या नावाने) विराट राजाबरोबर द्यूत खेळत बसला होता, त्या ठिकाणी आश्रयार्थ आली. कीचक तिथेही तिच्या मागोमाग आला. विराटाच्या देखत त्याने तिचे केस धरून तिला लाथेने खाली पाडले. कौरवसभेत झालेल्या विटंबनेचीच ही पुनरावृत्ती होती. याही वेळी तिने विराटासकट सर्व सभेचा धिक्कार केला; पण विराटराजा कीचकाला आवरू शकला नाही.

अखेर त्या रात्री तिने पाकशाळेत काम करणाऱ्या भीमाची भेट घेतली आणि त्याच्याजवळ आपली सर्व व्यथा तीव्र शब्दांत व्यक्त केली. भीमाच्या सांगण्यावरून द्रौपदीने कीचकाला दुसऱ्या दिवशी रात्री नृत्यशाळेत भेटण्यास बोलावले. ठरल्याप्रमाणे कीचक नृत्यशाळेत नटून थटून आला. परंतु द्रौपदीऐवजी भीमाने नृत्यशाळेत जाऊन कीचकाचा चेंदामेंदा केला. कीचकाच्या वधाला द्रौपदी कारणीभूत झाली, म्हणून त्याच्या शंभर अनुकीचकांनी तिला कीचकाच्या शवाबरोबर जिवंत जाळण्यासाठी फरफरा ओढीत स्मशानाकडे चालवले. परंतु भीमाने वाटेतच त्यांना गाठून सर्वांचा संहार केला.

अज्ञातवास संपल्यावर हे द्रौपदीच्या अवमानाचे दिवसही संपले; पण तरीही जीवनसंघर्षाची तीव्रता वाढतच राहिली. अज्ञातवासातून प्रकट झाल्यानंतर, युद्धात कुलक्षय होईल या भीतीने आजवर झालेले सारे अपमान गिळून केवळ पाच गावांवर कौरवांशी संधी करायला पांडव प्रवृत्त झाले. तशी शिष्टाई करण्यासाठी श्रीकृष्ण कौरवांकडे जायला निघाला. ते पाहून द्रौपदीचा इतक्या वर्षांचा संताप अनावर होऊन बाहेर पडला. कौरवसभेतल्या अपमानाचे शल्य तिच्या जिव्हारी झोंबलेले होते. दुर्योधन-दुःशासनांसारखे नराधम आता एक क्षणभर जरी जिवंत राहिले, तरी अर्जुनाचे धनुर्धारित्व आणि भीमाचे बाहुबल व्यर्थ आहे, असे तिला वाटले. शिष्टाईसाठी निघालेल्या कृष्णाच्या पुढे आपण भोगलेल्या सर्व व्यथांची कहाणी तिने सांगितली आणि अखेर आपले मृदू, काळेभोर, कुरळे व सुगंधी केस कृष्णापुढे धरून त्याला म्हटले–

अयं ते पुण्डरीकाक्ष दुःशासनकरोद्धृतः।
स्मर्तव्यः सर्वकार्येषु परेषां सन्धिमिच्छता ।।
दुःशासनभुजं श्यामं संछिन्नं पांसुगुण्ठितम् ।
यद्यहं तु न पश्यामि का शान्तिर्हृदयस्य मे ।।

(म. भा. उद्योग. ८२.३६,३१)

अर्थ – हे पुंडरीकाक्षा, कौरवांशी संधी करण्याची ज्या वेळी तुला इच्छा होईल, त्या वेळी कोणतेही कार्य करीत असता दुःशासनाने ओढलेला हा माझा केशपाश तुझ्या स्मरणात असू दे. दुःशासनाचा माझ्या केसांना स्पर्श करणारा तो काळा हात रणात तुटून रक्ताच्या थारोळ्यात धुळीत पडलेला मी जोवर पाहत नाही, तोवर माझ्या हृदयाला कुठून शांती मिळणार!

पुढे कृष्णशिष्टाई फसली. पांडवांनी कृष्णाच्या सल्ल्याने युद्धाचा निर्णय ठरवला. अठरा दिवस ते भारतीय युद्ध झाले. त्यात सर्व कौरवांचा संहार झाला. द्रौपदीच्या सगळ्या अपमानांचा सूड उगवला गेला. परंतु तरीही द्रौपदी सुखी होऊ शकली नाही. ती, तिचे पती आणि अभिमन्यूची गर्भवती पत्नी उत्तरा, एवढ्या व्यक्तींशिवाय तिचे सर्व सखेसोयरे, इष्टमित्र, मुलेबाळे यांचाही त्या युद्धात संहार घडला होता. ती पुनश्च महाराज्ञी बनली; पण बव्हंशी विधवांच्या प्रजेची. काही काळाने पांडवांचा कैवारी कृष्णही निजधामाला गेला. त्यामुळे यज्ञवेदीतून जन्मलेल्या या द्रौपदीचे जीवन अखेरच्या क्षणापर्यंत धगधगतच राहिले. तिला कधीही शांती आणि सुख लाभू शकले नाही.

अखेरीस महाप्रस्थानाच्या वाटेवर ती सर्वांआधी कोसळली व मरण पावली. भीमाने धर्मराजाला त्याविषयी कारण विचारले, तेव्हा त्याने उत्तर दिले. ‘ती प्रथम पडली याचे कारण

असे, की तिने सर्वांत जास्त प्रेम अर्जुनावर केले.' अशा प्रकारे अगदी अखेरच्या क्षणापर्यंत तिला न केलेल्या पापांची फळे भोगावी लागली. तिच्यातील मानव्य जागृत होते, स्वाभिमानही जागृत होता. भ्रांत तत्त्वज्ञानाच्या आहारी जाऊन तिने आपल्या मानवसुलभ भावभावनांना बधिरता येऊ दिली नव्हती, म्हणूनच तिला युधिष्ठिरासारखे शांतिब्रह्म बनता आले नाही. तिच्या अंतरीच्या धगधगत्या अग्नीत शेवटी दुष्टांचा संहार होऊन शाश्वत मानवी मूल्ये सुवर्णासारखी उजळून निघाली हे खरे असले, तरी त्या अग्नीत ती स्वतःही सर्वस्वानिशी होरपळून निघाली, हा नियतीचा दुर्विलासही विसरता येत नाही.

महाभारतकारांनी चित्रित केलेले द्रौपदीचें व्यक्तिमत्व विलक्षण प्रभावी आहे. ती अग्निज्वालेसारखी तेजस्विनी होती, परंतु स्त्रीहृदयाचे मार्दव तिने कधी हरवू दिले नाही. युधिष्ठिराच्या अवास्तव धर्मकल्पनांमुळे तिला अनंत व्यथा भोगाव्या लागल्या, तरीही तिची पतिनिष्ठा यत्किंचित ढळली नाही. तिचे मानवसुलभ राग–द्वेष उत्कट स्वरूपात जागे होते, परंतु जीवनाच्या अंतिम सत्याचेही तिला भान होते. त्या काळच्या अनेक प्रभावी पुरुषांपेक्षाही तिचे व्यक्तिमत्व अधिक प्रभावी होते. महाभारतकारांनी तिला 'मूर्तिमती लक्ष्मी' म्हटले आहे ( म. भा. विराट. ७१.१७ ); परंतु तिचे सर्व जीवन पाहता असे वाटते, की तिच्या रूपाने साक्षात कालीच आपल्या मुक्त विहारावर बंधने घालून व्यथित जीवन जगायला या भूमीवर अवतरली होती.

भारतीय लोकमानसाने प्रातःस्मरणीय पाच स्त्रियांत द्रौपदीची गणना करून तिची स्मृती जिती जागती ठेवली आहे, ती तिचे हे दिव्यत्व जाणूनच. [ म. भा. व्या.; म. भा. व्य.; डॉ. इरावती कर्वे– 'मौज' दिवाळी अंक १९६३ ]

**द्वंद्वयुद्ध** दोन माणसांच्या युद्धाला द्वंद्वयुद्ध म्हणतात. यात दोघांची शस्त्रे समान असतात. पूर्वी गदा किंवा खड्ग हाती घेऊन वीर पुरुष युद्ध करीत. मुष्टियुद्ध, मल्लयुद्ध (कुस्ती) ही एका प्रकारची द्वंद्वयुद्धेच होत. बाहुयुद्ध, गदायुद्ध वा खड्गयुद्ध जमिनीवर उभे राहून खेळले जात असे. अश्वारूढ वा गजारूढ योद्धेही द्वंद्वयुद्ध करीत. ही सर्व प्रकारची द्वंद्वयुद्धे धर्मयुद्धाच्या नियमांना अनुसरून होत. रामायण, महाभारत व पुराणे या ग्रंथांत अनेक द्वंद्वयुद्धांची वर्णने आलेली आहेत. त्यांतील वाली–सुग्रीव, कृष्ण–चाणूर, भीम–दुर्योधन, भीम–कीचक, भीम–जरासंध यांची द्वंद्वयुद्धे प्रसिद्ध आहेत. तानाजी मालुसरे व उदयभानू यांचे युद्ध हेही द्वंद्वयुद्धच होते.

**द्वयोपनिषद्** एक नव्य उपनिषद. गु व रु या अक्षरद्वयाचे महत्त्व यात सांगितले असल्यामुळे याला द्वयोपनिषद असे नाव मिळाले आहे. यांत गुरूचे महत्त्व पुढील श्लोकांच्या द्वारे सांगितले आहे–

आचार्यो वेदसम्पन्नो विष्णुभक्तो विमत्सरः ।
मन्त्रज्ञो मन्त्रभक्तश्च सदा मन्त्राश्रयः शुचिः ।।
गुरुभक्तिसमायुक्तः पुराणज्ञो विशेषवित् ।
एवं लक्षणसम्पन्नो गुरुरित्यभिधीयते ।।

अर्थ– वेदज्ञ, आचार्य, विष्णुभक्त, निर्मत्सर, मंत्रज्ञ, मंत्रभक्त, नेहमी मंत्राचा आश्रय करून राहणारा, शुद्ध, गुरुभक्तीने युक्त, पुराणवेत्ता आणि अनेक गोष्टींचे विशेष ज्ञान असलेला, अशा लक्षणांनी संपन्न असतो, तो गुरू म्हटला जातो.

गुरू शब्दाची व्युत्पत्ती सांगताना यात म्हटले आहे, की गु = अंधकार (अज्ञान), रु= त्याचा निरोधक, म्हणून गुरू म्हणजे अज्ञानाचा निरोधक होय. [ सी. ग. देसाई ]

**द्वात्रिंशीव्रत** एक काम्य शिवव्रत. मार्गशीर्ष, माघ किंवा वैशाख या महिन्यांच्या पौर्णिमेला या व्रताचा आरंभ करतात. आरंभ केल्यापासून बत्तीस पौर्णिमा होईपर्यंत हे व्रत करायचे असते. या व्रतातील प्रमुख देवता शिव व गौरी या होत.

व्रतदिनी शिवगौरींची षोडशोपचार पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. शिवगौरीला तांबूल व दक्षिणा दिल्यानंतर पिठाच्या दिव्याने ओवाळतात. पुढे प्रत्येक पौर्णिमेला एकेक दिवा वाढवतात. अशा रीतीने बत्तिसाव्या पौर्णिमेला बत्तीस दिव्यांनी ओवाळतात. महाराष्ट्रात हे व्रत बत्तीशीचा दिवा या नावानेच प्रसिद्ध आहे.

व्रत पूर्ण झाल्यावर त्याचे उद्यापन करतात. त्यासाठी आदल्या दिवशी उपवास करतात. उद्यापनाच्या दिवशी ब्रह्मादी मंडलदेवतांची स्थापना व पूजा केल्यावर कलशावर वेळूच्या पात्रात उमामहेश्वर व नंदिकेश्वर यांच्या सुवर्णप्रतिमा स्थापून त्यांची षोडशोपचार पूजा करतात. तिल, यव व घृत या द्रव्यांनी यथाविधि हवन करतात. एका वेळूच्या शिप्तरात बत्तीस दिवे व बत्तीस फळे घालून ते आचार्याला दान देतात. गोप्रदान करून ब्राह्मणभोजन घालतात. रात्री जागरण करतात. फल – पुत्र व सौभाग्य यांची प्राप्ती. या व्रताची कथा अशी–

कांची नगरीत धनेश्वर नावाचा एक ब्राह्मण राहत होता. त्याला रूपवती नावाची पत्नी होती. त्यांना सर्व सुखे उपलब्ध होती; पण पोटी संतान नसल्यामुळे ती दुःखी होती. अशा स्थितीत एक दिवस त्या नगरात एक जटाधारी योगी भिक्षा

मागत रूपवतीच्या दारी आला; पण तिच्याकडे पाहून त्याने तिच्या हातची भिक्षा घेण्याचे नाकारले. असे का म्हणून तिने विचारताच तो म्हणाला, की निपुत्रिकाच्या हातचे अन्नग्रहण करू नये, असे शास्त्रवचन आहे. तेव्हा धनेश्वराने त्याला पुत्रप्राप्तीचा मार्ग विचारला. त्याने धनेश्वराला चंडिकेची आराधना करायला सांगितले. त्याप्रमाणे धनेश्वर अरण्यात गेला व उपोषित राहून चंडिकेची आराधना करू लागला. सोळाव्या दिवशी चंडिकेने स्वप्नात येऊन दृष्टांत दिला तो असा– तू तुझ्या पत्नीला द्वात्रिंशी व्रत करायला सांग. एक आम्रवृक्ष दिसेल, त्यावर चढ आणि मिळेल ते फळ नेऊन तुझ्या भार्येला दे. म्हणजे तुझा मनोरथ पूर्ण होईल.

धनेश्वराने त्याप्रमाणे केले. पुढे यथाकाल त्यांना पुत्र झाला; पण एका कालसर्पाने दंश केल्यामुळे तो अल्पायुषी मरण पावला. रूपवतीने त्या वेळी गौरीची प्रार्थना केल्यावर गौरीने शिवाला म्हटले, 'त्या मुलाच्या आईने द्वात्रिंशी व्रत केले आहे. तेव्हा तुम्ही तिच्या मुलाला जिवंत करा.' शिवाने मग तसे केले व धनेश्वर आणि रूपवती हे दांपत्य सुखी झाले. [ व्रतराज ]

**द्वादश देवीविग्रह** भारतातील बारा स्थानांत असलेल्या देवीच्या मूर्तींची नावे. या संबंधांत त्रिपुरारहस्य ग्रंथात जे श्लोक दिले आहेत, ते असे–

काञ्चीपुरे तु कामाक्षी मलये भ्रामरी तथा ।
केरले तु कुमारी सा अम्बाऽऽनर्तेषु संस्थिता ।।
करवीरे महालक्ष्मीः कालिका मालवेषु सा ।
प्रयागे ललितादेवी विन्ध्ये विन्ध्यनिवासिनी ।।
वाराणस्यां विशालाक्षी गयायां मङ्गलावती ।
वङ्गेषु सुन्दरीदेवी नेपाले गुह्यकेश्वरी ।।
इति द्वादश रूपेण संस्थिता भारते शिवा ।
एतासां दर्शनादेव सर्वपापैः प्रमुच्यते ।।
अशक्तो दर्शने नित्यं स्मरेत् प्रातः समाहितः ।
तथाप्युपासकः सर्वैरपराधैर्विमुच्यते ।।

अर्थ– भगवती महाशक्ती ही काञ्चीपुरात कामाक्षी, मलयगिरीत भ्रामरी (भ्रमराम्बा), केरळात कुमारी (कन्याकुमारी), आनर्त देशात (गुजरात) अंबा, करवीरात (कोल्हापूर) महालक्ष्मी, माळव्यात (उज्जैन) कालिका, प्रयागात ललिता (अलोपी), विंध्यगिरीवर विंध्यवासिनी, वाराणसीत विशालाक्षी, गयेत मङ्गलावती, बंगालमध्ये सुंदरी आणि नेपाळात गुह्यकेश्वरी या नावाने निवास करते. ही मंगलमयी पार्वती अशा बारा रूपांनी भारतात राहिलेली आहे. त्यांच्या दर्शनाने मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. एखाद्या माणसाला या देवींचे दर्शन घेणे शक्य नसेल, तर त्याने रोज सकाळी एकाग्र मनाने यांचे स्मरण करावे. असे करणारा उपासक सर्व अपराधांपासून मुक्त होतो. [ कल्याण–तीर्थांक ]

**द्वादशधेनुदान** गुडधेनू, तिलधेनू, घृतधेनू, जलधेनू, क्षीरधेनू, मधुधेनू, शर्कराधेनू, दधिधेनू, रसधेनू, लवणधेनू प्रत्यक्ष धेनू, व सुवर्णधेनू अशा बारा धेनूंचे दान केल्याने मोक्षप्राप्ती होते, असे पद्म पुराणात सांगितले आहे ( पद्म पु. सृ. खं. २१.६७–७० ).

**द्वादशमास व्रत** प्रत्येक मासात यथाविधि स्नान, दान, देवार्चन, ब्राह्मणभोजन, इ. कर्मे आचरून हे व्रत करायचे असते. वामन पुराणात याचे विधान सांगितले आहे, ते असे– (१) चैत्र मासात एकभुक्त राहावे. (२) वैशाखात सुगंधी पुष्पांच्या माळा व गंध यांचे दान करावे. (३) ज्येष्ठ मासात उदकुंभ, सवत्स गाय, पंखा व चंदन यांचे दान करावे. (४) आषाढात एकभुक्त राहून ब्रह्मचर्याचे पालन करावे व नामस्मरण करावे. (५) श्रावणात दुधातुपाने भरलेले घडे, फळे, इ. चे दान करावे. (६) भाद्रपदात मधुघृतमिश्रित खीर व गूळभात यांचे दान करावे. (७) आश्विनात घृतदान करावे. (८) कार्तिकात चांदी, सोने, दीप, मोती, वस्त्र, इ. चे दान करावे. (९) मार्गशीर्षात एकभुक्त राहून, ब्राह्मणभोजन घालावे. (१०) पौषात ब्राह्मणभोजन घालून तूप, सोने व पात्र यांचे दान करावे आणि शेवटचे तीन दिवस उपवास करावा. (११) माघ मासात तिलधेनू, इंधन व धन यांचे दान करावे. (१२) फाल्गुनात गाय, वस्त्र, तांदूळ व कृष्णाजिन यांचे दान करावे. फल – आरोग्य, समृद्धी, सौभाग्य, पुत्रपौत्र व ईश्वरी कृपा यांची प्राप्ती आणि पापनाश. [ व्र. प. ]

**द्वादश यात्रा** पुरीच्या जगन्नाथाचे बारा महिन्यांतील एकेका महिन्यात केले जाणारे भिन्न पूजाविधी. यांची नावे स्कंद पुराणात दिली आहेत, ती पुढीलप्रमाणे–

वैशाखे चान्दनी यात्रा ज्येष्ठे स्नापन्युदीरिता ।
आषाढे रथयात्रा स्यात् श्रावणे शयनी तथा ।।
भाद्रे दक्षिणपार्श्वीया आश्विने वामपार्श्विका ।
उत्थानी कार्तिके मासि छादनी मार्गशीर्षके ।।
पौषे पुष्याभिषेकः स्यान्माघे शाल्योदनी तथा ।
फाल्गुने दोलयात्रा स्याच्चैत्रे मदनभञ्जिका ।।
एकैका मुक्तिदा सर्वा धर्मकामार्थसाधनाः ।।

अर्थ – वैशाखात (जगन्नाथाची) चांदनी, ज्येष्ठात स्नापनी,

आषाढात रथ, श्रावणात शयनी, भाद्रपदात दक्षिणपार्श्वीय, आश्विनात वामपार्श्विक, कार्तिकात उत्थानी, मार्गशीर्षात छादनी, पौषात पुष्याभिषेक, माघात शाल्योदनी, फाल्गुनात दोल आणि चैत्रात मदनभंजिका अशा बारा यात्रा असून, त्या चतुर्विध पुरुषार्थाच्यासाधक आहेत.

या यात्रांचे विधी असे –

**चांदनी यात्रा**– वैशाख शुद्ध तृतीयेला जगन्नाथाची जलात, मंडपात किंवा वनात स्थापना करून भक्त लोक त्याच्या सर्वांगी चंदनाचा व अष्टगंधाचा लेप लावतात व वेणू, वीणा इ. वाद्यांच्या साथीवर त्याची स्तोत्रे गातात.

**स्नापनी यात्रा** – ज्येष्ठ पौर्णिमेला विष्णूला नारळाचे पाणी, ताडफळाचे पाणी, पंचामृत, दूर्वाकर्पूरमिश्रित शीत जल, यवोदक व पुष्पोदक या जलांनी स्नान घालतात. त्यायोगे सर्व लहानमोठी पापे नष्ट होतात..

**रथयात्रा** – जगन्नाथाच्या सर्व यात्रांत ही यात्रा प्रमुख मानलेली आहे. आषाढ शुद्ध द्वितीयेला सुंदर व सुशोभित अशा रथात बसवून बलराम, सुभद्रा व जगन्नाथ यांची मिरवणूक काढतात. त्या वेळी मृदंग, भेरी, ढक्का, इ. वाद्ये वाजवतात. ध्वज व पताका फडकवतात. ब्राह्मण मंत्रघोष करतात. ही यात्रा सात दिवस चालते. आठव्या दिवशी पुष्पमालांनी रथ सजवितात आणि नवव्या दिवशी ती यात्रा परत येते.

**शयनी यात्रा** – श्रावण शुद्ध द्वादशीला शयनी यात्रा होते. त्यासाठी उत्तम शयनागार तयार करून त्यात मृदू वस्त्रप्रावरणांची शय्या तयार करतात. ती कर्पूरपुष्पचंदनादिकांनी सुगंधित करतात आणि रात्री तिथे जगन्नाथाला झोपवतात.

**दक्षिणपार्श्वीय यात्रा** – भाद्रपद महिन्यातल्या एकादशीला त्या शयनगृहाचे द्वार हळूच उघडून निद्रित जगन्नाथाची षोडशोपचार पूजा करतात आणि त्याला उजव्या कुशीवर झोपवतात.

**वामपार्श्विक यात्रा**– आश्विन शुद्ध एकादशीला वरील विधीनेच जगन्नाथाला डाव्या कुशीवर फिरवतात.

**उत्थान यात्रा** – कार्तिक शुद्ध एकादशीच्या दिवशी जगन्नाथाची पूजा करून त्याला झोपेतून जागृत करतात. मग वाद्यांचा गजर व जयघोष करीत त्याला नृत्यमंडपात नेतात. तिथे त्याला अभ्यंग करून विविध जलांनी स्नान घालतात आणि मग महापूजा करतात.

**छादनी यात्रा** – हिला प्रावरणयात्रा असेही नाव आहे. मार्गशीर्ष शुद्ध पंचमीच्या दिवशी सकाळी जगन्नाथाची पूजा करून रात्री त्याला सात वस्त्रे नेसवतात आणि गीते गाऊन व वाद्यांचा गजर करून ती रात्र जागवतात.

**पुष्याभिषेक यात्रा** – हिला पुष्यस्नानयात्रा असेही नाव आहे. पौष पौर्णिमेच्या आदल्या रात्री जलकुंभ भरून ठेवतात, रात्री जागरण करतात आणि सकाळी आरशातील जगन्नाथाच्या प्रतिबिंबाला त्या कुंभातील जलाने स्नान घालतात.

**शाल्योदनी यात्रा**– हिला नवशस्ययात्रा असेही म्हणतात. माघ महिन्यात नव्या भाताच्या तांदळांची खीर व वडे यांचा जगन्नाथाला नैवेद्य दाखवतात.

**दोल यात्रा** – फाल्गुन पौर्णिमेला जगन्नाथाला झूल्यावर बसवून झोके देतात. पाच दिवस हा उत्सव करतात.

**मदनभंजिका यात्रा**– चैत्र शुद्ध त्रयोदशीच्या दिवशी मदनभंजिका नामक वनस्पती (दवणा ?) मुळासकट आणून तिची देवापुढच्या मंडपात स्थापना करतात व त्या रात्री तिथे अधिवास करतात. [ श. क. ]

## द्वादशादित्य व्रत

एक काम्य व्रत. याचा विधी असा– मार्गशीर्ष शुद्ध द्वादशीला या व्रताचा आरंभ करतात आणि पुढे प्रत्येक द्वादशीला आदित्याच्या निरनिराळ्या बारा नावांनी त्याची पूजा करतात. उद्यापनाच्या वेळी सुवर्णदान देतात. फल – सवितृलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

## द्वादशाह

सोमयागाचा एक प्रकार. ज्या दिवशी सोम कुटून त्याचे हवन व सेवन केले जाते, त्या दिवसाला सुत्याह म्हणतात. एकापेक्षा अधिक सुत्याह असणाऱ्या सोमयागांना अहीन याग म्हणतात. द्वादशाह यज्ञात बारा सुत्याह असून, तो अहीन यागांतील प्रमुख याग आहे. याच्या पहिल्या दिवशी अतिरात्र, दुसऱ्या दिवशी अग्निष्टोम, नंतरच्या आठ दिवसांत रोज उक्थ्य, अकराव्या दिवशी पुन्हा अतिरात्र व बाराव्या दिवशी पुन्हा अग्निष्टोम हे याग करतात. एकंदरीत, द्वादशाह हा अतिरात्र, अग्निष्टोम व उक्थ्य या तीन ऋतूंच्या आवृत्तिसमूहाने सिद्ध होतो.

अहीन व सत्र या दोन्ही प्रकारांत द्वादशाहाचा अंतर्भाव होतो. भरतद्वादशाह या नावाचा द्वादशाहाचा एक प्रकारही काही श्रौतसूत्रांत आढळतो (आश्व. श्रौ. सू. १०. ५. ८; आप. श्रौ. सू. २१.१४.५).

द्वादशाह हा सत्राच्या स्वरूपात केला असता त्याच्या पहिल्या दिवशी प्रायणीय (अतिरात्र) हा सोमयाग करतात. त्यानंतरचे सहा दिवस पृष्ठ्य षडहाचे असतात. या सहा दिवसांत रथंतर, बृहत्, इ. पृष्ठसंज्ञक सर्व सामे म्हटली जातात. त्याचप्रमाणे वालखिल्यादी सूक्तेही निरनिराळ्या क्लृप्त्या योजून म्हटली जातात. त्यानंतर तीन दिवस छंदोम नावाचे उक्थ्य

याग करतात. त्यानंतर अत्यग्निष्टोम करतात. या दिवसाला अविवाक्य असे नाव आहे. या दिवशी कोणीही कोणाशी वादविवाद करायचा नसतो. एखाद्या ऋत्विजाशी वाद करण्याचा प्रसंग आल्यास वेदीच्या बाहेर जाऊन स्वाध्याय करावा, असे आश्वलायन श्रौत सूत्रात सांगितले आहे (८.१२.११). शेवटच्या दिवशी उदयनीय अतिरात्र हा सोमयाग करतात. द्वादशाहात सुत्याह बारा असले, तरी त्यापूर्वी बारा दिवस घर्मयाग व उपसदिष्टी आणि त्याही पूर्वी बारा दिवस दीक्षा करावी लागते.

द्वादशाहाचा प्रारंभ व शेवट अतिरात्राने होत असतो. यासंबंधी प्रश्न उपस्थित करून तैत्तिरीय संहितेमध्ये (७.२.९) एक रूपकात्मक कथा सांगितली आहे, ती अशी—

प्रजापतीने सर्वप्रथम द्वादशाह यज्ञ केला व प्रजा उत्पन्न केली. एकदा ब्रह्मवादी लोक यासंबंधी विचार करायला बसले. 'अग्निष्टोम हा पहिला सोमयाग असल्यामुळे त्याला ज्येष्ठ यज्ञ म्हटले आहे, असे असता द्वादशाहात प्रथम दिवशी तुम्ही अतिरात्राचा प्रयोग का करता ?' असे काहींनी तसा याग करणाऱ्यांना विचारले. त्यावर दुसऱ्या पक्षाने उत्तर दिले, ते असे— 'द्वादशाह हा जर एक पुरुष मानला, तर अतिरात्र हे त्याचे चक्षुर्गोलक होत व अग्निष्टोम म्हणजे त्या गोलकातील बाहुल्या होत. यासाठी यजमान जर अग्निष्टोम प्रथम करील, तर डोळयांच्या आधारावाचून भलत्याच ठिकाणी बाहुल्या बसविल्यासारखे होईल. म्हणून तसे न करता प्रथम अतिरात्ररूप चक्षुर्गोलकाचा आधार तयार करून नंतर अग्निष्टोमरूपी बाहुल्या त्यात बसवाव्या. म्हणजे प्रथम दिवशी अतिरात्र करून दुसऱ्या दिवशी अग्निष्टोम करावा.'

द्वादशाहाचे अहीन व सत्र या स्वरूपात पुढील प्रमुख भेद होतात —

(१) सत्र फक्त ब्राह्मणांनाच विहित आहे; तर अहीन याग त्रैवर्णिकांना विहित आहे.

(२) सत्र हे वर्षभर अथवा अधिक काळपर्यंतही चालते; तर द्वादशाह हा बारा दिवसात संपतो.

(३) सत्रामध्ये यजमान व ऋत्विज असा भेद नसतो, कारण सत्राची दीक्षा सर्वांनीच घेतलेली असते. अहीनात यजमान व ऋत्विज असा भेद असतो.

(४) सत्रात दक्षिणा नसते; अहीनात ती असते.

(५) अहीनात फक्त शेवटच्या दिवशी अतिरात्र असतो; तर सत्रात पहिल्या व शेवटच्या अशा दोन्ही दिवशी अतिरात्र असतो.

(६) कात्यायनाच्या मते वैदिक वाङ्मयात द्वादशाहाच्या संदर्भात जिथे जिथे 'उपयन्ति, आसते' असे बहुवचनी प्रयोग येतात, तिथे तिथे सत्राचा बोध होतो आणि जिथे 'यजेत, याजयेत्' असा एकवचनी प्रयोग होत असतो, तिथे अहीनाचा बोध होतो.

द्वादशाहात ऐंद्रवायव, मैत्रावरुण व आश्विन या तीन्ही ग्रहांना (सोमपूर्ण पात्रे) द्विदेवत्य म्हणतात. आपले वाडवडील जो आचार पाळून वागले, त्याच आचाराने आपल्या पुत्रपौत्रांनी वागावे, अशी इच्छा असल्यास यजमानानाने ऐंद्रवायव नामक ग्रह प्रथम भरावा व रोगमुक्ती हवी असेल, तरीही हाच ग्रह प्रथम भरावा असे सांगितले आहे. ज्याची वास्तविक योग्यता मोठी आहे आणि तरीही जो कनिष्ठ दर्जाचा समजला जातो, त्या यजमानाने आश्विन ग्रह प्रथम भरावा म्हणजे त्या यजमानाचा दर्जा श्रेष्ठ प्रतीचा होतो, असेही म्हटले आहे.

वैदिक परंपरेत द्वादशाह यागाला ज्येष्ठ आणि श्रेष्ठ असे म्हटले आहे. ऐतरेय ब्राह्मणात यासंबंधी पुढील कथा आढळते.

द्वादशाह हा ज्येष्ठ यज्ञ आहे. हा याग प्रथम जो करतो, तो देवांमध्ये ज्येष्ठ ठरतो. इंद्राला एकदा ज्येष्ठ व श्रेष्ठ ठरण्याची इच्छा झाली. पण देव त्याचे ज्येष्ठत्व व श्रेष्ठत्व मान्य करीनात. तेव्हा त्याने बृहस्पतीला पुरोहित करून द्वादशाह याग केला. मग सर्व देव इंद्राला ज्येष्ठ व श्रेष्ठ मानू लागले.

द्वादशाहाबरोबर अग्निचयनही करता येते.

हा याग चांद्र व सौर वर्षमानातील अंतरावर आधारलेला आहे, असे श्री. अ. ज. करंदीकर म्हणतात. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे; वै. आ. ज्यो. वै. दे. पु.]

**द्वादशाक्षरमंत्र** एक वैष्णव मंत्र. हा मंत्र असा–'ॐ नमो भगवते वासुदेवाय ।' नारदाने ध्रुवाला प्रथम या मंत्राचा उपदेश केला आणि त्या मंत्राच्या जपामुळे ध्रुवाला प्रत्यक्ष विष्णूने दर्शन दिले. तेव्हापासून वैष्णव लोकांत या मंत्राला प्रतिष्ठा प्राप्त झाली. या मंत्राच्या जपामुळे पुनर्जन्म टळतो, असे विष्णू पुराणात सांगितले आहे (१.६.४०).

**द्वादशी** बारावी तिथी. ही विष्णूची प्रिय तिथी मानलेली आहे. पंचांगात निरनिराळ्या द्वादशींना निरनिराळी नावे दिलेली आहेत, ती सर्व विष्णुपरकच आहेत.

द्वादशीचे रूपध्यान गरूडारूढ व मेघवर्ण असल्याचे हेमाद्रीने लिहिले आहे.

द्वादशीच्या दिवशी जन्मलेली व्यक्ती बहुप्रज, सर्वांवर प्रेम करणारी, राजमान्य, अतिथिप्रिय, व्यवहारदक्ष व प्रवासहीन वर्तन असते, असा फलादेश सांगितला आहे. [श. क.; च. व. चि.]

**द्वादशीव्रत** (१) मार्गशीर्ष शुद्ध एकादशीपासून या व्रताला प्रारंभ करायचा असतो. हे व्रत एक वर्ष किंवा आयुष्यभर करतात. एकादशीला उपवास व द्वादशीला वासुदेवाची पूजा हा या व्रताचा विधी आहे. फल – धनधान्यसमृद्धी व वैभवप्राप्ती.

अंबरीष राजाने एक वर्षभर हे व्रत केल्याची कथा भागवतात आहे ( भाग. पु. ९.४.२९–३० ).

पद्म पुराणात सांगितलेला या व्रताचा विधी असा – द्वादशीच्या दिवशी 'नमो नारायणाय' या मंत्राने तीर्थाचे अभिमंत्रण व तीर्थोदकाची स्तुती करावी. नंतर स्नान करून सूर्याला अर्घ्य द्यावे आणि ब्राह्मण, गाय व सुवर्ण यांना स्पर्श करावा. सूर्यप्रतिमेची पूजा करावी. ब्राह्मणभोजन घालून मग पारणे करावे. अशा प्रकारे बारा द्वादशींना हे व्रत करावे.

या व्रताची कथा अशी –

व्याधाचे एक जोडपे होते. एकदा त्यांच्या प्रदेशात दुष्काळ पडल्यामुळे त्याची उपासमार होऊ लागली. एक दिवस ती दोघे कंदमुळे शोधण्यासाठी रानात गेली असता त्यांना एका तळ्यात कमळे दिसली. ती तोडून त्यांनी शहारात विकायला नेली; पण त्यांना गिऱ्हाईक भेटले नाही. त्यामुळे ती दोघे उपाशी पोटी रात्री एका वेश्येच्या घराच्या वळचणीस आली. त्या वेळी ती वेश्या द्वादशीव्रतातली विष्णूची पूजा करीत होती. व्याधाला ती पूजा पाहून आनंद झाला व त्याने आपली सर्व कमळे त्या गणिकेला दिली. त्या पुण्याने पुढील जन्मी तो व्याध रथंतर नावाचा राजा झाला व व्याधस्त्री लावण्यवती नावाने त्याची राणी झाली. [ हि. ध. ]

( २ ) एक जैन व्रत. याचा विधी असा– प्रतिवर्षी भाद्रपद शुद्ध द्वादशीला उपवास करून 'ॐ ह्रीं अर्हद्भ्यो नमः' या मंत्राचा त्रिकाल जप करावा. व्रतावधी बारा वर्षे. पद्मावतीपूर या गावच्या नरब्रह्मा राजाची मुलगी शीलवती हिने हे व्रत केले. त्यामुळे तिला स्वर्गमोक्ष मिळाले. [ जै. व्र. वि. सं. ]

**द्वापर** कृतादी चार युगांपैकी तिसरे युग. भाद्रपद कृष्ण त्रयोदशीस गुरुवारी या युगाचा प्रारंभ झाला, असे म्हटले आहे. या युगाची लक्षणे पुढीलप्रमाणे–

या युगातील अवतार कृष्ण व बुद्ध, पुण्य अर्धे, पाप अर्धे, तीर्थ नैमिषारण्य, ब्राह्मण नाडी पाहणारा, प्राण रक्तगत, मानवदेह सप्तहस्तपरिमित, आयुष्य हजार वर्षे, भोजन ताम्रपात्रात. या युगातील राजे शाल्व, विराट, हंसध्वज, कंसध्वज, मयूरध्वज, वज्रवाहन, रुक्मांगद, जरासंध, दुर्योधन व युधिष्ठिर आणि लोक धर्माधर्मरत, प्रलापी, चपल व ज्ञाननिष्ठ असतात. या युगाचा तारकमंत्र असा आहे –

हरे मुरारे मधुकैटभारे
गोपाल गोविन्द मुकुन्द शौरे ।
यज्ञेश नारायण कृष्ण विष्णो
निराश्रयं मां जगदीश रक्ष ।।

त्रेतायुगात ज्या व्यक्तींनी सिद्धी प्राप्त करून घेतलेल्या असतात, त्यांचा द्वापरयुगात नाश होतो. या युगात वर्णाश्रमांचाही ऱ्हास होतो. श्रुती व स्मृती यांच्यामध्ये ऐकमत्य राहत नाही, त्यामुळे अर्थाचा निश्चय होत नाही आणि धर्मतत्त्वाचा बोधही होत नाही. सर्वत्र मतभेद आढळतात. धर्माचा संकर होतो. लोकांना अनावृष्टीमुळे मरण येते. नाना व्याधींनी लोक पीडित होतात. लोक अधिक लोभी, अधिक कामी व अधिक द्वेषी बनतात. द्वापर हे वैश्ययुग असून, त्यात अनेक युद्धे होतात.

द्वापरयुगाची वर्षे आठ लाख चौसष्ट हजार असतात. कौरव व पांडव यांचे युद्ध द्वापरयुग संपून कलियुग लागण्याच्या संधिकाली झाले, असे मानलेले आहे. या युगात धर्माच्या चार पायांपैकी दोन पाय गळून पडतात. [ श. क.; पु. इं.; हि. ध. ]

**द्वार** देवालयाचे किंवा घराचे दार. हे पवित्र मानलेले आहे. दाराप्रमाणेच त्याचा भाग असलेला उंबरठाही पवित्र समजतात. नववधू आपल्या सासरच्या घरात प्रथम प्रवेश करताना आधी उजवा पाय उंबऱ्याच्या आत टाकते. उंबरठा वारंवार तुडवू नये व उंबरठ्यात बसू नये; त्यामुळे दुर्भाग्य येते, अशी समजूत आहे. प्रवासासाठी किंवा कामासाठी बाहेर जाताना उंबरठ्याला ठेच लागली, तर तो अपशकुन मानतात.

भारताच्या वायव्य भागात पेरणीच्या हंगामात घराच्या दारासमोर एका मोठ्या भांड्यात गाईचे शेण ठेवतात व त्यात बी आणि पाणी घालतात. तसेच सुगीच्या वेळी पहिल्या धान्याची एक मोळी उंबरठ्याजवळ ठेवतात आणि त्यावर पाणी सोडतात. तसे केल्याने घरातला देव संतुष्ट होतो, अशी समजूत आहे.

देवालयाच्या मुख्य दारासमोर बळी देण्याची काही ठिकाणी पद्धत आहे. बहुतेक मोठ्या मंदिरांच्या प्रवेशद्वारावर द्वारपाल उभे केलेले असतात. [ एन्सा. रि. ए. ]

**द्वारका** एक प्राचीन तीर्थक्षेत्र. हे सौराष्ट्रातील उखामंडल तालुक्यात गोमतीच्या काठी आहे. हिंदूंच्या सात मोक्षदायक पुऱ्यांमध्ये आणि चार पवित्र धामांमध्ये द्वारकेची गणना होते. भगवान श्रीकृष्णाची नगरी म्हणून हिंदूंना द्वारकेविषयी प्राचीन काळापासून अपरिमित प्रेम वाटत आले आहे.

कंसवधानंतर मथुरेवर जरासंघ आणि कालयवन यांचे दुहेरी आक्रमण आल्यामुळे कृष्णाने स्वपक्षीय यादवांसह राजस्थान-मार्गे रैवतक पर्वताचा पायथा गाठला आणि तिथे सागरतीरावर विश्वकर्म्याच्या हस्ते द्वारका नगरीची उभारणी केली, असे पुराणांनी सांगितले आहे. महाभारत, हरिवंश आणि वायू, विष्णू, भागवत, वराह, स्कंद, इ. पुराणे या ग्रंथांत द्वारकेची विस्तृत वर्णने आढळतात. हिला द्वारावती, द्वारवती, द्वारमती, वनमालिनी, इ. पर्यायनामे आहेत. या नगरीभोवती असलेल्या तटाला अनेक द्वारे होती, म्हणून हिला द्वारका, द्वारावती इ. नावे मिळाली, असे अनेक पौराणिक उल्लेखांवरून दिसते. 'कृता द्वारवती नाम बहुद्वारा मनोरमा' = अनेक द्वारांनी युक्त अशी द्वारवती नावाची मनोरम नगरी निर्माण केली, असे हरिवंशात म्हटले आहे (१०.३४). 'चतुर्वर्णानां मोक्षद्वाराणि सन्ति यत्रेति ।' = जिथे चारही वर्णांची मोक्षद्वारे खुली आहेत, ती द्वारवती होय, अशीही एक व्युत्पत्ती आढळते.

हरिवंशकाराने प्राचीन द्वारकेच्या विस्ताराचे आणि अभेद्यतेचे वर्णन केले आहे, ते असे–

अप्रमेयां महोत्सेधामगाधपरिखायुताम् ।
प्राकारवरसम्पन्नां सुधापाण्डुरलेपनाम् ।।
तीक्ष्णयन्त्रशतघ्नीभिर्हेमजालैश्च भूषिताम् ।
आयसैश्च महाचक्रैर्ददर्श द्वारकां पुरीम् ।।
अष्टयोजनविस्तीर्णामचलां द्वादशायताम् ।
द्विगुणोपनिवेशां च ददर्श द्वारकां पुरीम् ।।
अष्टमार्गमहारथ्यां महाषोडशचत्वराम् ।
एकमार्गपरिक्षिप्तां साक्षादुशनसा कृताम् ।।
(हरिवंश विष्णुपर्व ९८. २४–२५ २७–२८)

अर्थ– द्वारकेभोवती विस्तीर्ण, उत्तुंग आणि चुन्याने रंगविलेले तट होते. तटांना लागून खोलच खोल खंदक होते. तटांवर आग ओकणारी तोफांसारखी अस्त्रे, लोखंडी चक्रे आणि सोन्याच्या जाळ्या होत्या. द्वारकेचा विस्तार आठ योजने रुंद आणि बारा योजने लांब एवढा होता. ती दोन प्रकारच्या उपनिवेशांनी युक्त होती. तिच्यामध्ये आठ मोठे मार्ग होते आणि सोळा मोठे चौक होते. तिला (सागराने तीन बाजूंनी वेढलेले असल्यामुळे) एकच प्रवेशमार्ग होता. ती साक्षात शुक्राने निर्माण केली होती.

पौराणिक वर्णनानुसार प्राचीन द्वारकेचा विस्तार शत योजनांपर्यंत होता. तिच्यात गगनचुंबी प्रासाद होते. त्याच्या शिखरांना सुवर्णाची झळाळी होती. त्यामुळेच तिला लोक 'सोन्याची द्वारका' म्हणत होते. आपसांतील संघर्षात यादवांचा नाश झाल्यावर श्रीकृष्णाने प्रभासक्षेत्री देहत्याग करून अवतारसमाप्ती केली आणि त्यानंतर समुद्राने द्वारकेला सर्व बाजूंनी ग्रासून टाकले, अशी पुराणकथा आहे. श्रीकृष्णाची द्वारका बुडाल्यानंतर त्याचा नातू वज्रनाभ याने सागरतीरावर नवी द्वारका उभारली, तीच सध्याची द्वारका होय, अशी पुराणांची माहिती आहे.

द्वारकेत अनेक मंदिरे आहेत. त्यांतील श्रीकृष्णाचे मंदिर गोमतीच्या काठी आहे. हे मंदिर भव्य आणि उत्तुंग आहे. याचे जोते ९० × २० फूट आहे. मंदिराची उंची १७० फूट आहे.



द्वारकाधीशमंदिर

शिखर पाचमजली आहे. सभामंडप प्रशस्त असून, तो साठ खांबांवर उभा आहे. मंदिराला चार द्वारे आहेत. प्रदक्षिणामार्ग दोन भिंतींच्या मधून जातो. गर्भगृहात चार फूट उंचीची द्वारकाधीश श्रीकृष्णाची श्यामवर्ण, चतुर्भुज अशी मूर्ती रजतपीठावर उभी आहे. त्याच्या अंगावर लाखो रुपयांचे मूल्यवान अलंकार आहेत. इथे श्रीकृष्णाला रणछोडजी म्हणतात. जरासंध आणि कालयवन यांच्या भयाने रण सोडून श्रीकृष्ण इथे आला, म्हणून त्याला हे नाव पडले आहे. रणछोडजीचे सर्व पूजोपचार रामानुजांनी आखून दिलेल्या पद्धतीप्रमाणे चालतात.

रणछोडजीच्या मंदिराच्या सभामंडपाच्या एका कोपऱ्यात बलरामाची मूर्ती आहे. वरच्या मजल्यावर अंबादेवी आहे. जवळच्याच एका वाड्यात कृष्णाच्या अष्ट नायिकांच्या मूर्ती आहेत. तिथे कुशेश्वर महादेवाचे एक मंदिरही आहे.

रणछोडजीच्या मंदिराशिवाय द्वारकेत अनेक पुरातन मंदिरे होती. परंतु इ. स. १४६० मध्ये गुजरातचा सुलतान महंमूद बेगडा याने त्या बहुतेक मंदिरांचा विध्वंस केला. वाघेर जातीचे चाचे या मंदिरांच्या आश्रयाने त्रास देतात, याचे निमित्त साधून पुढे इ. स. १८१६ मध्ये इंग्रजांनी त्या मंदिरांचा समूळच नाश केला. पुढे इंग्रजांकडून हा भाग गायकवाडांकडे आल्यावर त्यांनी मूळ मंदिरांच्या जागी नव्या मंदिरांची उभारणी केली.

द्वारकेत गोमतीच्या जलाचे स्नान, गोमयाचे लेपन, गोदान, गोपीचंदनाचा टिळा आणि गोपीनाथाचे दर्शन या पाच प्रकारांचे विशेष महत्त्व मानले जाते. गोमतीवर नऊ पक्के घाट आहेत. दंड, मुंड व दम हे इथले यात्राविधान होय. दंड म्हणजे यात्राकर भरणे, मुंड म्हणजे क्षौर करणे आणि दम म्हणजे अंगावर तप्तमुद्रा घेणे. पण ही तप्तमुद्रेची प्रथा गायकवाडांनी कायद्याने बंद केली आहे.

द्वारकेपासून सुमारे वीस मैल अंतरावर कच्छच्या खाडीत बेट द्वारका नावाचे एक स्थान आहे. या ठिकाणी रणछोडजी व शंखनारायण यांची मंदिरे आहेत. बेटावर अनेक लहान-मोठे तलाव आहेत. त्यांपैकी गोपीतलावातली माती वैष्णव लोक गोपीचंदन म्हणून आदराने कपाळी लावतात. इथली रणछोडजीची मूर्ती मातीची आहे. तिचे पूजोपचार वल्लभ पंथाच्या अर्चापद्धतीनुसार चालवतात.

आद्य शंकराचार्यांनी भारताच्या चार दिशांना जी चार धर्मपीठे स्थापन केली, त्यांपैकी शारदापीठ नामक धर्मपीठ द्वारकेत आहे. शंकराचार्यांनी आपल्या निर्याणापूर्वी एक महिना या पीठावर सुरेश्वराचार्यांची नियुक्ती केली होती. सध्याचे श्री अभिनवसच्चिदानंदतीर्थ हे या पीठावरील शहात्तरावे आचार्य होत. पश्चिम भारतात धर्मनिष्ठा जागविण्याचे व टिकविण्याचे मोठे कार्य शारदापीठाने केले आहे.

द्वारका ही यात्रिकांच्या वर्दळीने नेहमीच गजबजलेली असते. रामानुजाचार्य, मध्वाचार्य, ज्ञानेश्वर, वल्लभाचार्य, इ. अनेक महापुरुषांनी द्वारकेची यात्रा केली होती. महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधरस्वामी यांचे परमगुरू चांगदेव राऊळ हे महाराष्ट्रीय सत्पुरुष त्रेसष्ट वर्षे द्वारकेतच राहिले होते. त्यामुळे महानुभावीय लोक त्यांना 'द्वारावतीचे चांगदेव राऊळ' म्हणून ओळखतात. गुजरातचा नरसिंह मेहता हा रणछोडजीचाच भक्त होता. मीराबाईही त्याच्याच भक्तीत रंगलेली होती.

सध्याची द्वारका हीच श्रीकृष्णाची प्राचीन द्वारका आहे की नाही, याविषयी विद्वानांत मतभेद आहेत. सर्वश्री डे, आळतेकर पार्जिटर व पुसाळकर यांच्या मते सध्याची द्वारका हीच प्राचीन द्वारका होय. परंतु श्री. दुर्गाशंकरशास्त्री वगैरे अनेक विद्वानांचे असे म्हणणे आहे, की प्राचीन द्वारका गिरनारच्या



द्वारकाधीश रणछोडजी

पायथ्याशी जुनागडच्या परिसरात होती आणि ते मूळ स्थान विस्मृत झाल्यानंतरच सध्याची नवी द्वारका उभारली गेली आहे. या मताचे एक समर्थक श्री. विनायकराव करमळकर यांचे म्हणणे असे–

"यादवांनी द्वारका उभारली ती आनर्तदेशाधिपती रैवत याच्या कुशस्थली नामक नगरीच्या जागीच होय. रैवताची कुशस्थलीही रैवतक पर्वताच्या पायथ्याशीच होती. महाभारतात (सभा. १३.४९) 'रैवतेनोपशोभिता' (नजीकच्या रैवतक पर्वतामुळे शोभित असलेली) असे विशेषण द्वारकेला लावले आहे. ती देवांनाही जिंकण्यास दुराराध्य होती आणि तिच्यातील स्त्रियाही परचक्राला यशस्वीरीत्या तोंड देऊ शकत होत्या. या संदर्भावरून पर्वतावरील अभेद्य किल्ल्याचे सूचन होते. या संदर्भात सर्व आनर्तदेशात जुने रैवतक म्हणजेच आजचे गिरनार हे स्थान सोडून अन्य कोणतेही स्थान प्राचीन द्वारकेसाठी दावा सांगू शकत नाही.

यादवांच्या नाशानंतर हे स्थान उजाड बनले आणि पुढे नंद-मौर्य काळात केव्हा तरी या स्थानाची अभेद्यता लक्षात घेऊन त्याची पुनर्रचना झाली असावी आणि त्याला गिरिनगर हे नवे

नाव लाभले असावे. जुन्या द्वारकेच्या मूलस्थानाची विस्मृती घडल्यानंतरच सागरतीरावर नव्या द्वारकेची उभारणी झाली आणि त्यानंतरच मूळ द्वारका सागरात बुडाल्याच्या कथा पुराणांत समाविष्ट झाल्या. गिरनारच्या पायथ्याशी उत्खनन केले, तरच प्राचीन द्वारकेचा शोध लागू शकेल."

इ. स. १९६३ मध्ये गुजरात राज्याचा पुरातत्त्वविभाग आणि पुण्याचे डेक्कन कॉलेज यांच्या नेतृत्त्वाखाली सध्याच्या द्वारकेत द्वारकाधीशाच्या मंदिराशेजारी, तसेच बेट द्वारका, पिंडारक व सुवर्णतीर्थ या ठिकाणी उत्खनन करण्यात आले. या उत्खननात असे दिसून आले, की द्वारकेमध्ये इ. स. च्या प्रारंभाच्या पूर्वी वस्ती असावी. अगदी पहिली वसाहत समुद्रालगतच्या खडकावर सध्याच्या देवालयाच्या परिसरातच होती.

ही पहिली द्वारका बुडाली आणि त्या अवशेषांवर सुमारे वीस फूट जाड वाळूचा थर जमला. यानंतर झालेली वसाहत तात्पुरत्या स्वरूपाची असली, तरी तिचा काळ महत्त्वपूर्ण आहे. या काळातच सौराष्ट्राचा पाश्चिमात्य जगाशी संबंध आला. येथील उत्खननात या काळातील अ‍ॅम्फोटा या रोमन मद्यकुंभाचे तुकडे, तसेच उत्कृष्ट झिलईची मातीची भांडी सापडली आहेत. ही दुसरी द्वारकासुद्धा पुन्हा पाण्याखाली गेली.

इ. स. च्या सातव्या-आठव्या शतकाच्या सुमारास या अवशेषांवरच पुन्हा एकवार द्वारका नगरी प्रतिष्ठित झाली. इथे घरांच्या पायांखाली देवळांच्या भिंतींचे मोठमोठे दगड, नक्षीचे दगड आणि कळसासारखे भाग आंथरलेले आढळले आहेत. यावरून असे दिसते, की या काळापूर्वी द्वारकेत शिखरमंडित अशी देवालये निर्माण झाली होती. अशाच धाटणीची अनेक मंदिरे आजही द्वारकेच्या परिसरात दिसतात. द्वारकाधीशमंदिराच्या आवारातही एक छोटे मंदिर या प्रकारचे आहे.

या तिसऱ्या द्वारकेची मात्र उत्तरोत्तर भरभराट होत गेली. मुसलमान-काळात काहीशी उलथापालथ झाली असली, तरी मुख्य मंदिराच्या परिसरात वस्तीचे सातत्य टिकून राहिलेले दिसते. यापुढच्या काळातील घरांच्या भिंती, जमिनी, इ. एकावर एक सापडतात. इतकेच नव्हे, तर आजच्या सारखे शंखांचे एक दुकानही उत्खननात सापडले आहे.

या उत्खननाच्या पाहणीवरून द्वारकेच्या जलसमाधीची पौराणिक कथा खरी ठरली आहे. द्वारकेतील हा जलप्रलय इ. स. २०० च्या आगेमागे झाला असावा. परंतु या द्वारकेचा श्रीकृष्णाशी आणि यादव कुलाशी असलेला संबंध मात्र सध्याच्या उत्खननातून सिद्ध होऊ शकत नाही.

द्वारकेतील उत्खननावरून कळते, की तिची प्राचीनता अडीच हजार वर्षामागे जाऊ शकत नाही. त्याचमुळे असे निश्चयाने वाटू लागते, की सांप्रतची द्वारका ही श्रीकृष्णनिर्मित द्वारका नसून ती द्वारका गिरनारच्या पायथ्याशीच असावी. [ श. कृ.; पु. इं.; सु. वि. को.; इ. इं. १ ; श्री. विनायकराव करमळकर– नवभारत, फेब्रु., जून १९६१ ; डॉ. ह. धी. सांकलिया– रविवार सकाळ, २६ मे १९६३ ]

**द्वारचक्र** मुहूर्तशास्त्रातले एक चक्र. घराला नवे दार बसविण्याच्या वेळी या चक्राचा विचार करतात. सूर्यनक्षत्रापासून चार नक्षत्रे द्वाराच्या वरच्या बाजूला असतात, त्याचे फळ लक्ष्मीची प्राप्ती हे होय. त्यापुढची आठ नक्षत्रे द्वारकोणात असतात, त्याचे फळ उद्वसन म्हणजे घरात लोकांची वस्ती न होणे. त्यापुढील आठ नक्षत्रे द्वारशाखांवर म्हणजे दाराच्या दोन बाजूंवर असतात, त्याचे फळ सौख्यप्राप्ती. त्यापुढची तीन नक्षत्रे द्वाराच्या उंबरठ्यावर असतात, त्याचे फळ घरधन्यास मृत्यू येणे. त्याच्या पुढची चार नक्षत्रे द्वाराच्या मध्यभागी राहतात, त्याचे फळ सुखप्राप्ती. याप्रमाणे द्वारचक्राची फळे आहेत. या चक्रातली शुभफलदायी नक्षत्रे पाहून त्या दिवशी नवे दार बसवावे, असे सांगितले आहे. [ मु. चि.]

**द्वारदेवता** ( १ ) द्वारावर राहून त्या वास्तूचे रक्षण करणाऱ्या देवता. श्रीविद्यार्णवतंत्रात या देवता पुढीलप्रमाणे दिल्या आहेत––

**पद्मा**– ही कमलासना व चतुर्भुज आहे. तिच्या दोन हातांत पद्म असून, दोन हात वरद व अभय मुद्रेत असतात.

**भारती**– ही द्विभुज असून, तिच्या एका हातात अक्षमाला व दुसऱ्या हातात पुस्तक असते.

**दुर्गा**– ही सिंहारूढ व द्विभुज आहे.

**द्वारश्री**– ही पद्मासना व द्विभुज असून, तिचे हात वरद आणि अभय मुद्रेत. आहेत.

**विश्वसंकल्प आणि कल्पक**– हे दोघे मोती व माणिक यांच्या वर्णाचे आहेत. त्यांच्या हातात शंख व पद्म किंवा दोन रक्त कमले असतात.

**काम** – हा इक्षुचाप ( उसाच्या कांड्याचे धनुष्य) व पुष्पबाण धारण करतो.

( २ ) बौद्धातल्या वज्रयान पंथाने गृहाचें रक्षण करणारे द्वार, त्याच्या फळ्या, कुलूप, किल्ली, पडदे, इ. भागांना देवतास्वरूप मानले आहे. या सर्व देवता नग्न असून, प्रत्यालीढ नृत्यासनात दिसतात. त्यांचे रूप भयंकर असते. त्यांची वर्णने निष्पन्नयोगावलीत आहेत ती, अशी––

**तालिका** – ही गौरवर्ण असून, कुलूप हे तिचे चिन्ह आहे.

कुंची – ही पीतवर्ण असून, किल्ली हे तिचे चिन्ह आहे.
कपाटा – ही रक्तवर्ण असून, [illegible]ळो हे तिचे चिन्ह आहे.
पटधारिणी – ही नीलवर्ण असून, तिच्या हातात पडदा आहे.

**द्वारपाल** द्वारात उभे राहून त्या वास्तूचे रक्षण करणारे, ते द्वारपाल होत. हे देवसदृश योनीतले आहेत. प्रत्येक मोठ्या देवस्थानात आणि काही लेण्यांतही मुख्य प्रवेशद्वाराच्या दोही अंगी हे उभे दिसतात. चंड-प्रचंड, जय-विजय, हरभद्र-सुभद्र, चंड-महाचंड, पद्मपाणी-वज्रपाणी अशी त्यांची नावे आहेत. यांच्या मूर्ती पुढीलप्रमाणे असतात–

उजवा पाय स्वस्तिकावर ताठ, डावा पाय कुंचित म्हणजे वाकलेला आणि हात कमरेच्या खालच्या भागी किंचित वाकून विसावलेले. काही ठिकाणी ते आपल्या हातांनी गोपुराला आधार देत असलेलेही दिसतात.

शिल्पसंग्रह या ग्रंथात द्वारपालांचे मूर्तिध्यान दिले आहे, ते असे– ते द्विभुज व गदाधारी असतात. त्यांचे दात पुढे आलेले असतात आणि चेहरा कुरूप असतो. क्वचित ते चतुर्भुज असतात. शिव किंवा विष्णू यांपैकी ज्या देवाचे ते द्वारपाल असतात त्या देवाची चिन्हे ते धारण करतात. देवीच्या मंदिरात द्वारपालांच्या ऐवजी द्वारपालिका असतात.

कर्नाटकातील हळेबीड व वेलूर येथील द्वारपाल सर्वांगसुंदर आहेत. ते नखशिखान्त अलंकृत आहेत. एवढेच नव्हे; तर विविध प्रकारचे अलंकार त्यांच्या देहावर मावत नाहीत. नवरत्नांच्या हारांची जाळी नेसून व मस्तकी उभट किरीट लेवून ते द्वाररक्षणासाठी उभे आहेत. त्यांचा किरीटही सुटा नसून कमानदार आहे व त्या कमानीची दोन्ही टोके त्यांच्या कर्णकुंडलांना भेटली आहेत. हे सगळे कोरीव काम अतिबारीक, सूक्ष्म व नाजूक आहे. ते चतुर्भुज असून, त्यांपैकी कित्येकांच्या भालप्रदेशी



द्वारपालिका



अलंकृत द्वारपाल – वेलूर

तिसरा नेत्र आहे. हे तृतीय नेत्र असलेले द्वारपाल शिवगणांपैकी आहेत, असे समजतात. ते मनुष्याच्या उंचीचे आहेत व त्यांच्या मुखाभोवती सुंदर वेलपत्तीची प्रभावळही आहे. या सर्व कलावैभवामुळे ते द्वारपाल न वाटता देवच वाटतात.

शिवाच्या देवस्थानाच्या रक्षणासाठी द्वारपाल व्याघ्रचर्म पांघरून आणि हातांत त्रिशूल व पट्टिश घेऊन उभे असलेले करावे, असे ब्रह्मांड पुराणात सांगितले आहे. (३. ३२. १२–१६). [सा. इं. इ. गॉ. गॉ.; पु. इं.; कर्नाटक ]

**द्वारसमुद्र** कर्नाटकात बेलूरपासून १२ मैलांवर हळेबीड नावाचे एक गाव आहे, त्यालाच पूर्वी द्वारसमुद्र असे म्हणत. तिथे होयसळांची पर्यायी राजधानी होती. तिथे

काही सुंदर देवालये व अनेक शिलालेख आहेत. इ. स. च्या १४ व्या शतकाच्या पूर्वार्धात मुसलमानांनी हे नगर उद्ध्वस्त केले. पाहा – हळेबीड. [ म. ज्ञा. को. ]

**द्वाराहाट** कुमाऊं प्रदेशातले एक प्राचीन नगर. हे नगर अलमोड्यापासून सव्वीस मैल व राणीखेतपासून चौदा मैल अंतरावर आहे. या नगराला ऐतिहासिक व पौराणिक असे उभयविध महत्त्व आहे. मध्ययुगातल्या कत्यूरी राजांची ही राजधानी होती. याच्या परिसरात सुमारे तीस मंदिरे भग्नावस्थेत दिसतात. पण त्यांतील काही मंदिरांत अजूनही बदरीनाथ व केदारनाथ यांची पूजा होते. [ कुमाऊँ ]

**द्विकावली व्रत** एक जैन व्रत. या व्रताचा प्रारंभ कोणत्याही महिन्यापासून करता येतो. यात जोडून दोन दिवस उपवास करायचा असतो. उदा० श्रावण शुक्ल पक्षात प्रतिपदा–द्वितीया, पंचमी– षष्ठी, अष्टमी– नवमी, चतुर्दशी –पौर्णिमा व कृष्ण पक्षात चतुर्थी– पंचमी, अष्टमी– नवमी व चतुर्दशी– अमावस्या असे एकूण सात उपवास असतात.

या व्रताचाच एक लघू भेद असून, त्यात २४ बेला, ४८ एकाशन व २४ पारणा असतात. या व्रताचा अवधी १२० दिवस आहे. [ व्र. ति. नि.; जै. व्र. वि. सं. ]

**द्वितीया** एक तिथी: ती चंद्राची द्वितीयकलाक्रियारूप असते. ही अश्विनीकुमारांची जन्मतिथी मानलेली आहे. आषाढ शु. द्वितीया ही रथद्वितीया या नावाने ओळखली जाते. त्या दिवशी पुरीच्या जगन्नाथाची रथातून मिरवणूक काढतात. श्रावण शु. द्वितीयेला मनोरथद्वितीया असे म्हणतात. या दिवशी विष्णूची पूजा करतात, रात्री चंद्राला अर्घ्य देतात आणि नक्तभोजन करतात. कार्तिक शु. द्वितीया ही यमद्वितीया म्हणून प्रसिद्ध आहे. द्वितीयेचे रूपध्यान असे –

द्वितीया हंसगा शुभ्रा पात्रपुस्तकधारिणी ।

अर्थ– द्वितीया ही हंसारूढ, शुभ्र आणि पात्र व पुस्तक धारण करणारी आहे.

द्वितीयेला जन्मलेली व्यक्ती दानशील, दयाळू, शूर व कीर्तिमान निपजते, असे कोष्ठीप्रदीपात म्हटले आहे. [ श. क. ]

**द्विदलव्रत** एक काम्य व्रत. कार्तिक महिन्यात हे व्रत करतात. यात तूर, राई, उडीद, मूग, मसूर, हरभरे, कुळीथ, इ. द्विदल धान्ये आहारात वर्ज्य करायची असतात. या व्रतात तिळाचे तेल आणि बुद्धीला दूषित करणारा कोणताही पदार्थ खाऊं नये, असे पद्म पुराण सांगते. फल - आरोग्य व तीव्र बुद्धी यांची प्राप्ती. [ नि. सिं.; हि. ध. ]

**द्विपाद उत्थानपादासन** एक योगासन. याची प्रक्रिया अशी– प्रथम उताणे झोपतात. नंतर श्वास घेऊन दोन्ही पाय जमिनीपासून दोन हात वर उचलतात. मग कुंभक करून पाय जमिनीवर ठेवतात व श्वास सोडतात. डोके जड होण्याचा विकार दूर होण्यासाठी या आसनाचा उपयोग होतो. तसेच याने पाठ, कंबर व गळा यांचे स्नायूही बळकट होतात. [ उ. यो. द. ]

**द्विपाद पवनमुक्तासन** एक योगासन. याची प्रक्रिया अशी- जमिनीवर उताणे झोपतात. दोन्ही पाय गुडघ्यात वाकवून ते पोटावर व छातीवर दोन्ही हातांनी पकडून ठेवतात. मग जमिनीवरून डोके उचलून ते दोन्ही गुडघ्यांमध्ये घेतात. मोठे पोट असेल, तर गुडघे दुमडताना श्वास बाहेर सोडतात व ते लहान असेल, तर श्वास घेऊन तसे करतात. गुडघे पोटावर आणतानाच पांच वेळा श्वासोच्छ्वास करतात अथवा कुंभक करतात. मग सहाव्या वेळी श्वास घेऊन पाय सरळ जमिनीवर सोडतात व नंतर श्वास सोडतात.

अपानवायू वर चढल्याने होणारे विकार, पोटदुखी, इ. रोग या आसनाने नाहीसे होतात. [ उ. यो. द. ]

**द्विपाद भुजासन** एक योगासन. याची प्रक्रिया अशी- प्रथम दोन्ही पाय ताठ पसरून बसतात.



द्विपाद भुजासन

नंतर डावे उजवे पाय गुडघ्यापासून वळवून डाव्या उजव्या

खांद्यावर ठेवतात. दोन्ही पायांचे तळवे एकमेकांना भिडवून तोंडासमोर घेतात. दोन्ही हात जमिनीवर घट्ट ठेवतात. नंतर श्वास घेऊन हाताच्या आधारावर शरीर अधांतरी उचलण्याचा प्रयत्न करतात. दृष्टी पायांच्या आंगठ्याकडे लावतात. सर्व शरीर व हात ताठ ठेवतात. आसन सोडतेवेळी शरीर हळूहळू जमिनीला टेकवतात.

या आसनाने हात, गळा व खांदे मजबूत होतात. कानाच्या वेदना नाहीशा होतात. तसेच आळस झडतो, अन्न पचते व शरीराचा जडपणाही नाहीसा होतो. [ उ. यो. द. ]

**द्विपाद शलभासन** एक योगासन. याची प्रक्रिया अशी – प्रथम जमिनीवर पालथे पडतात. पूरक करून दोन्ही पाय हाताच्या आधारावर जमिनीवरून उचलून धरतात. पाय अधांतरी ठेवल्यानंतर कमीत कमी तीन वेळा व जास्तीत जास्त पाच वेळा श्वासोच्छ्वास करतात. नंतर श्वास फुप्फुसात घेऊन पाय हळूहळू जमिनीवर टेकवतात. या आसनात पाय सरळ व ताठ ठेवण्याचा प्रयत्न करतात. हनुवटी जमिनीला टेकवतात.

या आसनामुळे पायाची सूज उतरते, गुल्म रोग नष्ट होतो, मुतखडा, मधुमेह, मूत्राघात, इ.विकार दूर होतात. [ उ. यो. द. ]

**द्विपाद शिरासन** एक योगासन. याची प्रक्रिया अशी – प्रथम उजवा पाय पाठीमागच्या बाजूस



द्विपाद शिरासन

नेऊन डोक्याच्या पाठीमागच्या बाजूस टेकवतात. नंतर डावा पायही तसाच मागे घेऊन मानेजवळ ठेवतात. दोन्ही हात समोर जमिनीवर घट्ट ठेवतात. नंतर हाताच्या आधारावर सर्व शरीर जमिनीपासून वर उचलतात. डोक्याचा व छातीचा भाग शक्य तितका उंच ठेवतात. श्वास घेऊन शरीर वर उचलल्यावर श्वासोच्छ्वास चालू ठेवण्याचा प्रयत्न करतात. त्यानंतर श्वास घेऊन हळूहळू जमिनीवर बसतात.

या आसनाने हाताचे स्नायू बलवान होतात व पाठीच्या कण्यातील दौर्बल्य दूर होते. [ उ. यो. द. ]

**द्वीपव्रत** एक काम्य व्रत. चैत्र महिन्याच्या शुद्ध पक्षात या व्रताला प्रारंभ करतात. नंतर प्रत्येक महिन्यात सात दिवस हे व्रत करतात. व्रतावधी एक वर्ष. यात प्रत्येक दिवशी अनुक्रमे जंबू, शाक, कुश, क्रौंच, शाल्मली, गोमेद आणि पुष्कर या सात द्वीपांपैकी एकाची, अशा प्रकारे वर्षभर पूजा करायची असते. व्रतकर्त्याने व्रतकालात जमिनीवर झोपायचे असते आणि उद्यापनाच्या वेळी रुपे, फळे यांचे दान द्यायचे असते. फल – स्वर्गप्राप्ती. [ हि. ध. ]

**द्वैत दर्शन** मध्वाचार्यप्रणीत दर्शन. याला माध्वमत, ब्रह्मसंप्रदाय व पूर्णप्रज्ञदर्शन अशीही अन्य नावे आहेत. वायूकडून हे दर्शन हनुमंताला, हनुमंताकडून भीमाला व शेवटी मध्वाचार्यांना मिळाले, असे परंपरेने मानले जाते. मध्वाचार्यांनी भारतातील प्रमुख तीर्थक्षेत्रांत संचार करून आपल्या दर्शनाचा म्हणजेच द्वैत मताचा खूप प्रचार केला. आपल्या मताच्या सिद्धीसाठी त्यांनी सदतीस ग्रंथ लिहिले. ब्रह्मसूत्रभाष्य, अनुव्याख्यान, गीताभाष्य, भागवत-तात्पर्यनिर्णय, इ. त्यांतील प्रमुख ग्रंथ होत.

जयतीर्थ या प्रकांड पंडिताने मध्वाचार्यांच्या भाष्यावर विद्वत्तापूर्ण वृत्तिग्रंथांची रचना करून व त्याशिवाय प्रमाणपद्धती व वादावली असे दोन स्वतंत्र ग्रंथ लिहून द्वैत दर्शनाची प्रतिष्ठा केली.

व्यासतीर्थ हा द्वैत मताचा आणखी एक पुरस्कर्ता होय. याने न्यायामृत, तर्कताण्डव, तात्पर्यचन्द्रिका, मन्दारमञ्जरी, इ. ग्रंथ रचले असून, न्यायामृत हा त्यांपैकी सर्वश्रेष्ठ ग्रंथ मानला जातो. मधुसूदन सरस्वतींनी आपल्या अद्वैतसिद्धी या ग्रंथात त्याचे खंडन केले आहे. याच न्यायामृत ग्रंथाने द्वैत व अद्वैत संप्रदायांत घनघोर वाग्युद्धाला प्रारंभ झाला व अद्यापही ते खंडन – मंडनरूपाने चालूच आहे.

रघूत्तमतीर्थ हा माध्व ग्रंथकारांत भावबोधाचार्य किंवा भावबोधकार या नावाने प्रसिद्ध आहे. मध्वाचार्यांच्या बृहदारण्यकभाष्यावर याने परब्रह्मकाशिका नामक टीका लिहिली

असून, ती त्याची सर्वोत्तम कृती मानली जाते. त्याचे शिष्य रामाचार्य व वेदेश भिक्षू हेही माध्व मताचे विद्वान व्याख्याकार मानले गेले आहेत.

वनमाली मिश्र यानेही द्वैत मतावर विपुल ग्रंथरचना केली आहे. माध्वमुखालंकार, न्यायामृतसौगन्ध व तरंगिणीसौरभ हे त्याचे प्रमुख ग्रंथ होत.

तत्त्वविचार– माध्व मतात द्रव्य, गुण, कर्म, सामान्य,विशेष, विशिष्ट, अंशी, शक्ती, सादृश्य व अभाव असे दहा पदार्थ मानलेले आहेत. पद्मनाभाने आपल्या मध्वसिद्धान्तसार या ग्रंथात त्यांचे सविस्तर वर्णन केले आहे.

द्रव्याचे पुन्हा वीस प्रकार कल्पिले आहेत, ते असे– परमात्मा, लक्ष्मी, जीव, अव्याकृत आकाश, प्रकृती, गुणत्रय, महत्तत्त्व, अहंकारतत्त्व, बुद्धी, मन, इंद्रिय, मात्रा, भूत, ब्रह्मांड, अविद्या, वर्ण, अंधकार, वासना, काल व प्रतिबिंब.

परमात्मा- परमात्मा म्हणजे साक्षात विष्णू होय. याचे स्वरूप असे–

नित्यपूर्णाखिलगुणो निर्दोषः सर्वदैव यः।
यः स्वतंत्रः परो विष्णुर्जन्ममृत्यादिवर्जितः॥

अर्थ– जो नित्य, पूर्ण, अखिल गुणांनी युक्त, नेहमी निर्दोष, सर्वतंत्रस्वतंत्र, जन्म, मृत्यू, इत्यादिकांनी रहित आहे, तोच सर्वश्रेष्ठ विष्णू होय.

परमात्म्याच्या ठिकाणी अनंत गुण असून, ते निरवधी व निरतिशय आहेत. उत्पत्ती, स्थिती, संहार, नियमन, ज्ञान, आवरण, बंध व मोक्ष या सर्वांचा कर्ता परमात्माच आहे. म्हणून त्याला एकराट असे म्हणतात. तो सर्वज्ञ आहे. त्याचप्रमाणे जीव, जड व प्रकृती यांच्यापेक्षा विलक्षण आहे.

शरीराशिवाय परमात्म्यालाही सृष्टी उत्पन्न करता येणार नाही. म्हणून परमात्माही शरीरधारीच आहे. त्याचे शरीर नित्य, ज्ञानात्मक, आनंदात्मक व अप्राकृतिक आहे. त्याचे प्रत्येक अंग आनंदमय व चित्स्वरूप आहे. तो नित्य, एक व सर्वस्वतंत्र आहे. त्याच्यासारखा किंवा त्याच्याहून श्रेष्ठ कोणी नाही. त्याचे मत्स्यादी अवतार हे स्वयं परिपूर्ण आहेत.

लक्ष्मी – ही परमात्म्याची शक्ती आहे. 'परमात्मभिन्ना तन्मात्राधीना लक्ष्मीः' = ती परमात्म्यापेक्षा भिन्न असून, त्याच्या अधीन आहे, असे तिचे लक्षण आहे (म. सि. सा.). त्याचप्रमाणे ती विष्णूपेक्षा गुणांत थोडी न्यूनही आहे. परमात्म्याप्रमाणेच लक्ष्मी ही नित्यमुक्त व नानारूपधारिणी असून, त्याची भार्या आहे. ब्रह्मादी जीव लक्ष्मीचे पुत्र असून, प्रलयकाली ते सर्व लक्ष्मीच्या ठिकाणी लीन होतात. परमात्म्याच्या कृपेने लक्ष्मी ही एका क्षणात विश्वाची उत्पत्ती, स्थिती, लय, महाविभूती, वृत्तिप्रकाश, नियमावृत्ती, बंधन व मोक्ष या गोष्टी घडवू शकते. ती दिव्य शरीरधारी असल्यामुळे अक्षर आहे.

जीव – "अज्ञानादिदोषयुक्तत्वं जीवस्य लक्षणम्। संसारित्वमपरं लक्षणम्।" = अज्ञानादी दोषयुक्तत्व हे जीवाचे लक्षण आहे. संसारी असणे हे दुसरे लक्षण होय. जीव हे अज्ञान, मोह, दुःख, भय, इ. दोषांनी युक्त असतात. ब्रह्मा व वायू यांच्यामध्येही हे दोष असतातच. मुक्तियोग्य, नित्यसंसारी व तमोयोग्य असे जीवांचे तीन प्रकार आहेत. मुक्तीचे अधिकारी जीव हे देव, ऋषी, पितर, चक्रवर्ती व उत्तम मनुष्य, असे पाच प्रकारचे असतात. नित्यसंसारी जीव सदैव सुखदुःख भोगीत असतात. ते मध्यम मनुष्य असून, अनंत आहेत. ते नेहमी स्वर्ग, पृथ्वी व नरक यांमध्ये फिरत राहतात. त्यांना कधीच मुक्ती मिळत नाही. दैत्य, राक्षस, पिशाच व अधम मनुष्य हे चार तमोयोग्य जीव होत. अशा प्रकारे मनुष्याची गुणांच्या तारतम्यामुळे तीन श्रेणींत विभागणी होते. प्रत्येक जीवाचे व्यक्तित्व स्वतंत्र असून तो परमात्म्यापासून भिन्न असतो. मुक्तावस्थेतही ती भिन्नता तशीच कायम राहते. मुक्त जीवांच्या ज्ञानादी गुणांत भेद असतो, त्याप्रमाणेच त्यांच्या आनंदातही भेद असतो.

अव्याकृत आकाश – याला गगन, साक्षिगोचर व प्रदेश अशीही नावे आहेत. सृष्टिकाली त्यात कोणताच विकार होत नाही व प्रलयकालातही त्याचा नाश होत नाही, म्हणून त्याला अव्याकृत म्हटले आहे. हे भूताकाशापेक्षा भिन्न असून, नित्य, एक व व्यापक आहे. पूर्व, दक्षिण, इ. विभाग हे याचे स्वाभाविक अवयव आहेत. त्यामुळे सूर्य नसलेल्या वैकुंठादी लोकांतही दिशांचे ज्ञान होते. याच्या अभावी समस्त जगत एक निबिड पिंड बनले असते. लक्ष्मी ही याची अभिमानिनी देवता आहे.

प्रकृती – ही जड, नित्य, व्यापक, अव्यक्त, नानारूप, परिणामिनी व त्रिगुणांहून भिन्न आहे. ती सृष्टीचे उपादान कारण असून, रमा ही तिची अभिमानी देवता आहे.

माध्व मतातील गुणत्रयापासून भूतापर्यंतची तत्त्वे सांख्य मतांप्रमाणेच आहेत.

ब्रह्मांड – हा विकृत पदार्थ आहे. याची उत्पत्ती चौवीस उपादान तत्त्वांपासून होते. या तत्त्वांच्या द्वारा बीजरूप घेऊन विष्णू आपल्या रूपाला ब्रह्मांडरूपात परिणत करतो. ब्रह्मांड पंचवीस कोटी योजने विस्तीर्ण आहे. याचे दोन भाग असून, वरच्या सुवर्णमय भागाला आकाश व खालच्या रौप्यमय भागाला पृथ्वी अशी संज्ञा आहे. विष्णूने खाली कूर्मरूपाने व वर वायुरूपाने हे ब्रह्मांड धारण केले आहे. चतुर्मुख, शक्र, शेष, सुपर्ण, इ. याच्या अभिमानी देवता आहेत.

अविद्या – वास्तविक सूक्ष्म रूपाने अविद्या किंवा माया ही अनादी आहे. पण परमात्म्याने ब्रह्मांडाच्या बाहेर स्थूल रूपाने अविद्या उत्पन्न केली आणि चतुर्मुख ब्रह्मदेवाच्या ठायी तिची स्थापना केली. मग ब्रह्मदेवाने तिला आपल्या शरीरातून बाहेर काढले. अविद्येच्या मोह, महामोह, तामिस्र, अंधतामिस्र व तम अशा पाच श्रेणी असून, जीवाच्छादिका, परमाच्छादिका, शंबला व माया असे तिचे चार भेद आहेत.

वर्णतत्त्व – अकारादी वर्ण एकावन्न असून, ते व्यापक, अनादी व नित्य आहेत.

अंधकार – हे एक मूर्त द्रव्य आहे.

वासनातत्त्व – स्वप्नात दिसणाऱ्या गोष्टींचे उपादान कारण वासना हे आहे.

काल – आयुष्याच्या व्यवस्थापकाला काल असे नाव आहे. क्षण, लव, त्रुटी, इ. त्याची अनेक रूपे आहेत. काल प्रकृती-पासून उत्पन्न होतो व प्रकृतीतच लय पावतो. काल हा अनित्य असला, तरी त्याचा प्रवाह नित्य आहे.

प्रतिबिंबतत्त्व – बिंबाप्रमाणेच प्रतिबिंब हेही एक तत्त्व आहे. याची सत्ता व क्रिया बिंबाच्या अधीन असते. ते नित्य व अनित्य असे उभयरूप आहे. परमात्म्याशिवाय सर्व चेतन हे पर-मात्म्याची प्रतिबिंबे असून, नित्य आहेत. आरशातील मुखाचे प्रतिबिंब अनित्य आहे.

गुण – रूप, रस, गंध, स्पर्श, संख्या, परिमाण, बल, भय, लज्जा, इ. अनेक गुण आहेत.

कर्म – पुण्य व पाप यांचे साक्षात वा परंपरेने जे असाधारण कारण, ते कर्म होय. विहित, निषिद्ध व उदासीन असे कर्माचे तीन भेद आहेत.

सामान्य – नित्य व अनित्य, तसेच जाती व उपाधी असे सामान्यांचे भेद आहेत.

विशेष – सर्व पदार्थांतील भेदाचे कारण विशेष हे आहे. तो नित्य व अनित्य असा उभयविध आहे.

विशिष्ट – विशेषणाच्या संबंधाने विशेष्याला जो आकार येतो, त्याला विशिष्ट असे नाव आहे. सर्वज्ञत्वादी विशेषणांनी विशिष्ट परब्रह्म हे नित्य विशिष्ट असून, दंडादी विशेषणाने विशिष्ट दंडी वगैरे अनित्य विशिष्ट होत.

अंशी – हस्तपादादी वगळून पट, गगन इ. प्रत्यक्षसिद्ध पदार्थ हे अंशी आहेत. आकाशादी हे नित्य अंशी व पटादी हे अनित्य अंशी आहेत.

शक्ती – हिचे अचिंत्य, आधेय, सहज व पद असे चार प्रकार आहेत. अचिंत्य शक्ती अघटितघटनापटीयसी (अघटित घटना घडवण्यात पटू) असून, विष्णूतच तिचा निवास असतो. विष्णूच्या ठिकाणीच विचित्र कार्य संपादन करण्याचे अलौकिक सामर्थ्य असते. लक्ष्मी, वायू, इत्यादींच्या शक्ती परमात्म्यापेक्षा कोटिगुण न्यून आहेत. दुसऱ्याने स्थापित केलेल्या शक्तीला आधेय शक्ती असे म्हणतात. विधियुक्त प्रतिष्ठा केल्यामुळे मूर्तीत देवतेचे सान्निध्य उत्पन्न होते, त्याला आधेय शक्ती असे नाव आहे. कार्यमात्राला अनुकूल अशी स्वभावरूप शक्ती म्हणजे सहज शक्ती होय. ती सर्व पदार्थांत असते. पद व पदाचा अर्थ यांमध्ये असलेल्या वाचकवाच्य संबंधाला पदशक्ती असे म्हणतात. मुख्य व परममुख्य असे तिचे दोन भेद आहेत. इंद्र शब्दाचा पुरंदर हा अर्थ मुख्य वृत्तीने व परमेश्वर हा अर्थ परममुख्य वृत्तीने होतो.

ज्ञानविचार – सर्व ज्ञान हे परमात्म्याच्या अधीन आहे. शरीर, स्त्री, इत्यादींचे ममतारूप ज्ञान हे संसाराचे कारण असून योग्य अपरोक्षरूप ज्ञान मोक्षाचे कारण असते. ब्रह्मदेवा-पासून, उत्तम श्रेणीच्या मनुष्यापर्यंत संजीवांनाच अपरोक्ष ज्ञान होते; तमोयोग्य लोकांना ते होत नाही.

साधनमार्ग – श्रवण, मनन व ध्यान यांच्या बरोबरच तार-तम्याचे व पंचभेदांचे ज्ञान होणेही आवश्यक आहे. ज्ञान, सुख, इत्यादींचा शेवट परमेश्वरातच होतो, हे तारतम्य ज्ञान होय. पंचभेद पुढीलप्रमाणे आहेत – ईश्वर व जीव यांमधील भेद, ईश्वर व जड यांमधील भेद, जीव व जड यांमधील भेद, एका जीवाचा दुसऱ्या जीवाशी असलेला भेद व एका जड पदार्थाचा दुसऱ्या जड पदार्थाशी असलेला भेद. या भेदांचे ज्ञान हे मुक्ति-साधक आहे.

सतत शास्त्राभ्यास करणे व ध्यान करणे, असे उपासनेचे दोन भेद आहेत. ध्यान म्हणजे इतरतिरस्कारपूर्वक भगवद्-विषयक अखंड स्मृती होय. मोक्षासाठी जीव परमात्म्याच्या अधीन असतो. परमात्म्याच्या अनुग्रहाशिवाय जीवाला साधी कार्येही करता येणार नाहीत; मग मुक्तीविषयी तर बोला-यलाच नको. अपरोक्ष ज्ञानानंतर परम भक्तीचा व त्यानंतर परम अनुग्रहाचा उदय होतो. मग मोक्षप्राप्ती होते. मोक्ष चार प्रकारचा आहे. कर्मक्षय, उत्क्रान्ती, अर्चिरादी मार्ग व भोग हे ते चार प्रकार होत. भोगाचे पुन्हा सालोक्य, सामीप्य, सारूप्य व सायुज्य असे चार भेद होतात. परमेश्वराच्या स्वरूपात लीन होऊन, त्याच्याच शरीरद्वारा आनंदाचा उपभोग घेणे, याला सायुज्य मुक्ती असे म्हणतात. हिचे स्वरूप असे––

आदत्ते हरिहस्तेन हरिदृष्ट्यैव पश्यति ।
गच्छेच्च हरिपादेन मुक्तस्यैषा स्थितिर्भवेत् ॥

अर्थ – श्रीहरीच्या हाताने ग्रहण करतो, दृष्टीने पाहतो व हरीच्या पायाने चालतो, अशी मुक्त पुरुषाची स्थिती असते.

ही मुक्ती सर्व भोगांत श्रेष्ठ आहे. मुक्त झालेल्या जीवांतही आनंदाचे तारतम्य असतेच. प्रस्तुत द्वैत दर्शनाचे किंवा माध्व मताचे सार पुढील श्लोकात दिलेले आहे—

**श्रीमन्मध्वमते हरिः परतमः सत्यं जगत् तत्त्वतो**
**भेदो जीवगणा हरेरनुचरा नीचोच्चभावं गताः।**
**मुक्तिर्नैजसुखानुभूतिरमला भक्तिश्च तत्साधन -**
**मक्षादित्रितयं प्रमाणमखिलाम्नायैकवेद्यो हरिः ॥**

अर्थ – श्रीमध्वाचार्यांच्या मतात विष्णू हा सर्वश्रेष्ठ आहे. जगत सत्य आहे. जीवांमध्ये भेद आहेत. उच्च-नीच भावाला प्राप्त झालेले जीवगण हे विष्णूचे अनुयायी आहेत. मुक्ती म्हणजे आत्मसुखाची निर्मळ अनुभूती असून, शुद्ध भक्ती हे तिचे साधन आहे. प्रत्यक्ष, अनुमान व शब्द ही तीन प्रमाणे असून, विष्णू हा सर्व आम्नायांना एकमेव ज्ञातव्य आहे.

पाहा – मध्वाचार्य. [भा. द. – उमेश मिश्र; भा. द. –बलदेव उपाध्याय; मध्वाचार्य व त्यांचे तत्त्वज्ञान]

## द्वैतवन

एक प्राचीन वनप्रदेश. हे वन सरस्वतीच्या काठी होते. मत्स्य वंशातील द्वैतवन नामक राजाने या वनात द्वैत नावाचे सरोवर निर्माण केले होते, म्हणून या वनाला द्वैतवन असे नाव प्राप्त झाले. शतपथ ब्राह्मण (१३. ५. ४. ९.) आणि महाभारत (वन. ११. ६८, शल्य. ३७.२७) या ग्रंथांत याचा उल्लेख आहे. पांडव आपल्या वनवासकाळात या वनात काही काल राहिले होते. त्या वेळी या वनावर कोणाचीही सत्ता नव्हती. ईशान्येला तंगन आणि आग्नेयीला कुरुक्षेत्र व हस्तिनापूर यांच्या मध्ये हिमालयाच्या पायथ्याशी हे वन होते, असे तज्ज्ञांचे मत आहे. [ हि. जॉ. ए. इं.; हि. घ. ]

## द्वैताद्वैतदर्शन

निंबार्कप्रणीत दर्शन किंवा तत्त्वज्ञान. याला हंसमत किंवा निंबार्कमत अशीही नावे आहेत. या दर्शनाचा आचार्य हंस नारायण हा असून, तो राधाकृष्णांच्या युगलमूर्तीचे प्रतीक मानलेला आहे. त्याने या मताची दीक्षा सनत्कुमाराला, सनत्कुमाराने नारदाला व नारदाने सुदर्शन चक्राचा अवतार असलेल्या निंबार्काला दिली, अशी ही गुरुपरंपरा आहे.

निंबार्काशिवाय या मताचे काही प्रमुख आचार्य असे –

श्रीनिवासाचार्य – हा निंबार्काचा शिष्य असून, त्याने निंबार्काच्या वेदान्तपारिजातसौरभ या ग्रंथावर वेदान्तकौस्तुभ नामक विस्तृत टीका लिहिली आहे.

केशवभट्ट काश्मीरी – याने कौस्तुभप्रभा ( वेदान्तकौस्तुभावरील पांडित्यपूर्ण टीका ), तत्त्वप्रकाशिका (गीतेवरील निंबार्कमतानुसारिणी व्याख्या), तत्त्वप्रकाशिका वेदस्तुती (भागवताच्या दशम स्कंधावरील टीका) व क्रमदीपिका (पूजापद्धतीचा विवरणात्मक ग्रंथ) हे ग्रंथ लिहिले. या ग्रंथांवरून त्याची प्रगाढ विद्वत्ता समजून येते.

श्रीपुरुषोत्तमाचार्य – हा हरिव्यास देवाचार्यांचा शिष्य होता. वेदान्तरत्नमंजूषा व श्रुत्यन्त सुरद्रुम हे याचे टीकाग्रंथ फार प्रसिद्ध आहेत.

याशिवाय, अनंतरामकृत वेदान्ततत्त्वबोध, पुरुषोत्तम प्रसाद वैष्णवकृत श्रीकृष्णस्तवराज व माधवमुकुंदकृत परपक्षगिरिवज्र हे ग्रंथही प्रस्तुत दर्शनात महत्त्वाचे मानले गेले आहेत.

ब्रह्म व जीव यांचा संबंध भेदाभेदरूप किंवा द्वैताद्वैतरूप आहे, असे निंबार्कसंप्रदायी मानतात. जीव हा अवस्थाभेदाने ब्रह्मापेक्षा भिन्न व अभिन्न असतो, असा त्यांचा दार्शनिक सिद्धान्त आहे. या दर्शनात जीवात्मा, प्रकृती व परमात्मा ही तीन तत्त्वे मानलेली आहेत.

**जीवात्मा** – जीव हा अणुरूप आहे. प्रत्येक प्राण्यातील जीव भिन्न भिन्न असल्यामुळे त्यांची सुखदुःखे भिन्न असतात.

**ज्ञानस्वरूपं च हरेरधीनं शरीरसंयोगवियोगयोग्यम्।**
**अणुं हि जीवं प्रतिदेहभिन्नं ज्ञातृत्ववन्तं यदनन्तमाहुः॥**

(दशश्लोकी १)

अर्थ– जीव हा ज्ञानस्वरूप, हरीच्या अधीन, शरीराशी संयोग वा वियोग होण्यास योग्य, अणुरूप, प्रत्येक देहात भिन्न, ज्ञाता व अनंत आहे.

जीव हा द्रष्टा, भोक्ता, कर्ता व श्रोता आहे. संसारदशेत, त्याचप्रमाणे मुक्तावस्थेतही तो कर्ता असतो. जीव हा आपले ज्ञान, कर्म, मोक्ष व बंध यांसाठी ईश्वरावर अवलंबून असतो. ईश्वर हा नियंता आहे आणि जीव हा नियम्य आहे. याचे कारण जीव परतंत्र आहे आणि ईश्वर स्वतंत्र आहे.

जीव हा हरीचा अंशरूप म्हणजे शक्तिरूप आहे, असे कौस्तुभ या ग्रंथात सांगितले आहे.

जीवाचे बद्ध आणि मुक्त असे दोन प्रकार आहेत. बद्ध जीवाचे पुन्हा मुमुक्षू व बुभुक्षू असे दोन भेद होतात. क्लेशपीडित झाल्यामुळे विरक्त बनलेल्या व मुक्तीची इच्छा करणाऱ्या जीवाला मुमुक्षू म्हणतात; तर विषयात आनंद मानणाऱ्या जीवाला बुभुक्षू म्हणतात.

अनादी कर्म व वासना यांच्यामुळे जीवात्मा हा देव, मनुष्य किंवा तिर्यक या योनीत जन्म घेतो आणि त्या शरीराविषयी दृढ अभिमान बाळगतो. हाच बद्ध जीव होय.

मुक्त जीवाचेही दोन भेद आहेत. गरुड, विष्वक्सेन, श्रीकृष्णाची मुरली, इ. व्यक्ती व वस्तु या सर्व नित्य मुक्त

आहेत. हे मुक्त जीव नित्य भगवंताच्या रूपाचे दर्शन घेतात व भजनानंदात रंगून जातात.

दुसरे जीव या जन्मात सत्कर्मे करीत राहतात व पूर्वजन्मातील कर्मांचा भोग भोगून झाल्यावर मुक्त होतात. मुक्त पुरुषांच्या अनेक श्रेणी आहेत. त्यांपैकी काही ईश्वरसादृश्य प्राप्त करून घेतात, तर काही आत्म्याच्या ज्ञानमय स्वरूपावरच संतुष्ट होतात.

प्रकृती – चेतनाहीन पदार्थाला प्रकृती किंवा जड असे नाव आहे. त्याचे तीन भेद आहेत, ते पुढीलप्रमाणे–

(१) प्राकृत – महत्तत्त्वापासून महाभूतांपर्यंत प्रकृतीपासून उत्पन्न झालेले सर्व जगत हे प्राकृत होय. जगातील सर्व जड पदार्थ हे प्राकृत आहेत.

(२) अप्राकृत – प्रकृतीशी संबंध नसलेले जगत. हे प्रकाशस्वरूप आहे. भगवंताचा लोक, त्याचे शरीर, त्याचे सर्व अलंकार, त्याचे नगर, उपवन, इ. सर्व अप्राकृत होत.

(३) काल – प्राकृत व अप्राकृत या दोहोंपेक्षा कालतत्त्व भिन्न आहे. काल हा नित्य व विभू आहे. तो जगताचा नियामक आहे; पण परमेश्वराकडून नियम्य आहे. कालाचे कार्य औपाधिक आहे.

ही तीन्ही जडतत्त्वे जीवात्म्याप्रमाणे नित्य आहेत.

परमात्मा – याला ईश्वर, नारायण, भगवान, कृष्ण, पुरुषोत्तम, वैश्वानर, इ. नावे आहेत. याचे स्वरूप असे –

स्वभावतोऽपास्तसमस्तदोषम् अशेषकल्याणगुणैकराशिम् ।
व्यूहाङ्गिनं ब्रह्म परं वरेण्यं ध्यायेम कृष्णं कमलेक्षणं हरिम् ।।
(दशश्लोकी ४)

अर्थ – स्वभावतःच ज्याचे समस्त दोष (अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश) दूर झाले आहेत; जो अशेष ज्ञान, बल, इ. कल्याणगुणांचे निधान आहे; जो श्रेष्ठ, परब्रह्म व व्यूहाङ्गी (चतुर्व्यूहयुक्त) आहे; अशा त्या कमलनयन सावळ्या कृष्णाचे आम्ही ध्यान करावे.

ईश्वर हा समस्त प्राकृत दोषांनी रहित असतो. ज्ञान, शक्ती, बल, ऐश्वर्य, तेज, वात्सल्य, करुणा, इ. गुण त्याच्या ठिकाणी असतात. ईश्वर हा जगताची उत्पत्ती, स्थिती व लय यांचे कारण आहे. तो कर्मानुसार जीवांना फल देतो.

यच्च किञ्चिज्जगत्यस्मिन् दृश्यते श्रूयतेऽपि वा ।
अन्तर्बहिश्च तत् सर्वं व्याप्य नारायणः स्थितः ।।

अर्थ – या जगात जे काही दिसते किंवा ऐकू येते, त्या सर्वाला अंतर्बाह्य व्यापून नारायण राहिलेला आहे.

विश्वाला आधारभूत असलेला परमात्मा हा सर्वव्यापी, सर्वनियंता, सूक्ष्म, महान व ईश्वरांचाही ईश्वर आहे. हा स्वतः आनंदमय असून, जीवांच्या आनंदाचे कारण आहे. वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध ही चारी रूपे याचीच अंगे आहेत. मुमुक्षू लोक वैकुंठात गोपी व राधा यांच्या समवेत वसलेल्या श्रीकृष्णाची उपासना करतात. केवल शरणागतीनेही त्याचा अनुग्रह होतो.

जीवाच्या बद्ध व मुक्त अशा दोन्ही दशांत जीव हा ब्रह्मापासून भिन्न व अभिन्नही असतो. मुक्तिदशेत जीव ब्रह्माशी एकाकार होत असला तरी त्याचे स्वतंत्र व्यक्तित्व हे राहतेच, असा त्याचा अर्थ आहे.

साधनमार्ग – शरणागती हा आत्मकल्याणाचा साधनमार्ग आहे. जोंपर्यंत जीव भगवंताला शरण जात नाही, तोपर्यंत त्याचे कल्याण होत नाही. भगवंताला शरण गेल्यावरोवर भगवान जीवांवर अनुग्रह करतो. अनुग्रह झाल्यावर जीवाच्या मनात भगवंताविषयी रागात्मक भक्तीचा उदय होतो. या भक्तीमुळे भगवंताचे दर्शन घडते. मग जीव भगवंताच्या भावांनी व्याप्त होतो व क्लेशापासून मुक्ती मिळवतो. शरीराशी जीवाचा संबंध असेपर्यंत भगवद्भावापत्ती होऊ शकत नाही.

प्रस्तुत दर्शनात अन्य वैष्णव मतांप्रमाणे विदेहमुक्तीच मान्य केलेली आहे; जीवन्मुक्ती नाही.

वृंदावन व बंगाल या प्रदेशात निंबार्काच्या या द्वैताद्वैत दर्शनाचा विशेष प्रचार झालेला दिसतो. [ भा. द. – उमेश मिश्र; भा. द.– बलदेव उपाध्याय; भागवत दर्शन. ]

**धंधारी** नाथपंथी लोकांचे एक चक्र. याला गोरखधंधा असेही म्हणतात. हे लोखंडी वा लाकडी पट्ट्यांचे बनवून, त्याच्या छिद्रातून माळेसारखा दोरा ओवतात व नंतर मंत्र म्हणून तो चक्रातून सोडवितात. दोरा ओवणे व सोडवणे या दोन्ही क्रिया तांत्रिक असतात व त्या योग्य प्रकारे समजण्यासाठी गुरूकडून शिक्षण घ्यावे लागते. हा दोरा नीट सोडवता आल्याने गोरक्षनाथाची कृपा होते व संसारचक्रातून मुक्ती मिळते. असे समजतात. [ गो. च. प. ]

**ध** वर्णमालेतील एकोणिसावे व्यंजन आणि त वर्गातील चौथा वर्ण. याच्या एकूण पाच अवस्था दृष्टीस पडतात. पहिली गिरनार पर्वतावरील अशोकाच्या शिलालेखात, दुसरी मेवाडचा गुहिलवंशी राजा अपराजित याच्या काळातील (इ. स. ६६१) कुंडेश्वर येथील लेखात, तिसरी उदयादित्याच्या काळातील (इ. स. चे ११ वे शतक) उज्जयिनी येथील लेखात आणि चौथी अबूचा परमारवंशी राजा धारावर्ष याच्या वेळच्या

(इ. स. १२०८) ओरिसा येथील लेखात आढळते. याची पाचवी अवस्था सांप्रत सर्वत्र दिसून येते.

ध=DDdधध

धच्या रूपाचा विकासक्रम

कामधेनू तंत्रात याचे वर्णन केले आहे, ते असे –

धकारं परमेशानि ! कुण्डली मोक्षरूपिणी ।
आत्मादितत्त्वसंयुक्तं पञ्चदेवमयं सदा ॥
पंचप्राणमयं देवि ! त्रिशक्तिसहितं सदा ।
त्रिबिन्दुसहितं वर्णं धकारं हृदि भावय ॥
पीतविद्युल्लताकारं चतुर्वर्गप्रदायकम् ॥

अर्थ – हे पार्वती, ध हा कुंडली, मोक्षरूपी, आत्मादितत्त्व-युक्त, पंचदेवमय, पंचप्राणमय, तीन शक्तींनी (इच्छा, ज्ञान, क्रिया) युक्त व तीन बिंदूंनी युक्त असा आहे. या स्वरूपात तू त्याची भावना कर. त्याचा वर्ण पिवळ्या विजेसारसा असून, तो चतुर्वर्ग साधून देणारा आहे.

दंत हे याचे उच्चारणस्थान होय. [ म. ज्ञा. को.; श. क. ]

**धन** जीवनातील बहुतेक सर्व व्यवहार ज्या द्रव्यावर अवलंबून असतात, त्याला धन म्हणतात. धन हेच सर्व कार्यांच्या मुळाशी असते, असे नारदस्मृतीत सांगितले आहे (१. ३९). यास्काने धनाची व्याख्या 'धिनोति इति सतः' अशी केली आहे. दुर्गाचार्यांनी 'धिनोति = तर्पयति = तृप्त करते' असा त्या शब्दाचा अर्थ सांगितला आहे. महाभारतात धन शब्दाची निरुक्ती पुढीलप्रमाणे केली आहे –

धत्ते धारयते चेदमेतस्मात् कारणाद्धनम् ।
तदिदं त्रिषु लोकेषु धनं तिष्ठति शाश्वतम् ॥
(म. भा. उद्योग. ११४. २)

अर्थ – हे (जगताला) धारण करते व (जगताकडून) धारण केले जाते, म्हणून याला धन म्हणतात. त्यामुळे तीन्ही लोकांत धन हे शाश्वत राहते.

प्राचीन कालापासून सुवर्ण हे धनाचे प्रतीक मानले गेले आहे. वेदात अनेक सुवर्णसूक्ते आहेत. सुवर्ण धारण करणारा शतायुषी, तेजस्वी, बली व वर्चस्वी होतो असे अथर्ववेदातही म्हटले आहे (१. ३५).

रामायण, महाभारत; पद्म, अग्नी, गरुड, भविष्य, इ. पुराणे व चाणक्यसूत्रे यांत धनाचा महिमा वर्णिलेला असून, धनावाचून पुरुष व्यर्थ होय, असेही म्हटले आहे. धनामुळेच पुष्कळ आप्त व मित्र लाभतात, धनवान पुरुष शूर व पंडित ठरतो, त्याला धर्म, काम व स्वर्ग यांची प्राप्ती होते, असे वरील सर्व ग्रंथांत सांगितले आहे. मनुष्याला धन मिळवण्यासाठी उद्युक्त करण्याकरिता संस्कृतात शेकडो सुभाषिते निर्माण झाली आहेत. 'हिरण्यमेवार्जय निष्फला गुणाः' = धन मिळव; इतर गुण निष्फल आहेत. 'द्रव्येण सर्वे वशाः' = द्रव्याने सगळे वश होतात. 'गौरवं लाघवं वापि धनाधननिबन्धनम्' = माणसाचे गौरव किंवा लाघव हे धन किंवा दारिद्र्य यांच्याशी निगडित आहे. 'अर्थो हि लोके पुरुषस्य बन्धुः' = या जगात धन हाच माणसाचा (खरा) नातेवाईक होय. अशा धर्तीची ती सर्व सुभाषिते आहेत.

धनप्राप्तीचे दोन हेतू असतात – (१) इहलोकी सुखोपभोग मिळवणे. प्रत्येक सुखभोग हा येन केन प्रकारेण धन खर्च करूनच मिळवावा लागतो. कुटुंबाचे भरण-पोषण चांगल्या प्रकारे करता आल्यासच गृहस्थाश्रम सुखकारक होतो. (२) पारलौकिक सुख मिळविणे. मृत मनुष्याला अखंड स्वर्गवास घडावा म्हणून त्याचे श्राद्ध करायचे असते व ते धनावाचून होत नाही. दानधर्मादी कृत्ये केल्यामुळे पुण्य लाभते व त्या पुण्याने स्वर्ग मिळतो, म्हणून त्यासाठीही धनाची आवश्यकता असते.

**धनार्जन** – कर्म (उद्योग, प्रयत्न) केल्याने धन मिळते, असे कौटिल्याने सांगितले आहे (अर्थ. १. १९). मात्र अवैध मार्गांनी मिळविलेले धन हे विषसमान होय, असेही त्याने सांगून ठेवले आहे (अर्थ. ९. ७५). मनूने द्रव्यार्जनाचे शास्त्रविहित सात मार्ग सांगितले आहेत, ते असे – (१) निधी सापडणे (२) दाय (३) खरेदी (४) जिंकणे (५) कर्जावर व्याज घेणे (६) शेती, व्यापार इ. उद्योग व (७) दान घेणे (मनु. १०. ११५).

काही स्मृतिकारांनी व पुराणांनी धनाचे शुक्ल, शबल व कृष्ण असे तीन भेद सांगितले आहेत. मंत्र, जप, तप, यज्ञ इत्यादींच्या योगाने प्राप्त, देवतेच्या आराधनेमुळे मिळालेले, अध्यापनामुळे व वारसाहक्काने मिळालेले धन शुक्ल होय. या प्रकारचे धन कल्याणकारक असते व त्याची वृद्धी होते. शेती, व्यापार, सावकारी, नोकरी, कारागिरी यांमुळे मिळालेले धन शबल होय. ते मध्यम कोटीतले असते. चोरी, लूट, द्यूत, चक्रवाढ व्याज, इ. मार्गांनी मिळालेले धन कृष्ण अर्थात हीन कोटीचे होय. शुक्ल धनामुळे देवयोनी प्राप्त होते, शबल धनामुळे मनुष्ययोनी मिळते व कृष्ण धनाच्या उपयोगामुळे पक्षी–कीटकांची तिर्यक्योनी प्राप्त होते, असे त्याचे फल विष्णू धर्मसूत्रात सांगितले आहे. अन्यायाने मिळवलेले धन दहा वर्षांपेक्षा अधिक

काळ टिकत नाही, ते पूर्ण नष्ट होते; म्हणून धनप्राप्ती-साठी अन्यायाचा मार्ग अवलंबू नये, असे समस्त धर्मशास्त्रज्ञांचे मत आहे.

**धनप्राप्तीचे पुराणकथित उपाय** – लक्ष्मी, इंद्र, कुबेर, इ. देव-तांची आराधना केल्यामुळ धन प्राप्त होते. तसेच पूर्वा भाद्रपदा नक्षत्रावर, शुक्ल पक्षात अहिर्बुध्न्य, कुबेर व शुक्र यांची प्रार्थना केली असता धनलाभ होतो, असे महाभारतात म्हटले आहे ( उद्योग. ११४.३–४ ). याव्यतिरिक्त काही ऋचांचे विधान, विशिष्ट उपासना व जपजाप्य हेही धनप्राप्तीचे उपाय विविध पुराणांत सांगितले आहेत. व्रतराजादी ग्रंथांत जी शेकडो व्रते सांगितली आहेत, त्यांपैकी बहुतेक धनप्राप्तीसाठीच आहेत.

सामान्य मनुष्याच्या दृष्टीने अर्थ हाच महान पुरुषार्थ असतो. मानवाची सारी धडपड त्यासाठीच मुख्यत्वे असते. धनहीन मनुष्याला जग किंमत देत नाही, हा अनुभव पदोपदी येतो. त्यामुळे धनार्जनाचे असंख्य चांगले-वाईट मार्ग मनुष्य अनुसरू लागतो. [ हि. ध.; जानकीश– त्रिपथगा, ऑक्टो. १९६२ ]

**धनका** गुजरातमधील एक आदिवासी जमात. यांची वसती मुख्यतः पंचमहाल, भरुच व बडोदे या जिल्ह्यांत आहे. हे लोक मूळचे पावागढचे रहिवासी होते, अशी समजूत आहे. अहमदाबादचा सुलतान महंमद बेगडा याने जेव्हा पावागढच्या राजाचा पराभव केला, तेव्हा त्याचे सैनिक व प्रजाजन जंगलात पळून गेले आणि तिथे त्यांनी काही दिवस धान म्हणजे कच्चे धान्य खाऊन जीव जगवला, म्हणून त्यांना धनका असे नाव मिळाले, अशी आख्यायिका सांगतात. त्यांच्यांतील काही लोक नर्मदातटी जाऊन वसले, ते तटवी नावाने ओळखले जाऊ लागले. तडवी हे त्याचेच रूपांतर होय. ती धनकांची एक पोटजात आहे. याशिवाय तेतरिया नावाची त्यांची आणखी एक पोटजात आहे. धनुष्यक या संस्कृत शब्दापासूनही धनक या नावाची उपपत्ती लावली जाते. महाभारतात धनुष्यक नामक शूर व धनुर्धारी अशा एका जातीचा निर्देश आढळतो. ते प. भारताचे रहिवासी असून, त्यांनी भारतीय युद्धात भाग घेतला होता. ते धनुष्यक म्हणजेच धनका लोक असावे.



धनका पुरुष

**व्यवसाय** – या लोकांचा मुख्य व्यवसाय शेतमजुरी हा आहे. काही लोक जंगलातील लाकडे तोडून विकतात, तर काही डिंक, मध, इ. पदार्थ गोळा करून विकतात. पूर्वी हे लोक जंगलातून वांबू आणून त्याच्या चटया, टोपल्या इ. वस्तू बनवीत. पण आता त्यांना जंगलातील वांबू तोडायला बंदी झाल्यामुळे त्यांचा तो व्यवसाय नष्ट झाला आहे.

धनका लोक वन्य जमातीचे असले, तरी ते भिल्लांपेक्षा उजळ व देखणे असतात. त्यांची नाके वसकी किंवा ओठ फार जाड नसतात. ते दिसायला तरतरीत असतात.

**विवाहप्रथा** – या जमातीत मुलींची संख्या मुलांपेक्षा कमी असल्यामुळे वराच्या बापाला वधूसंशोधनासाठी बरेच कष्ट पडतात व वधूसाठी पुष्कळ देजही द्यावे लागते. एकाच गावातील मुलगा व मुलगी यांचे लग्न करीत नाहीत, कारण बहुधा त्यांचा रक्तसंबंध असतो. जातीच्या बाहेरील माणसाशीही लग्नसंबंध करीत नाहीत. दीर–भावजयीचे लग्न होऊ शकते. आई–वडिलांनी लग्न ठरवणे हीच नेहमीची सर्वसामान्य चाल असली, तरी सांप्रत तरुण–तरुणी पुष्कळदा स्वतःच आपल्या जोडीदाराची निवड करतात व वडील माणसे अशा संबंधाला मान्यता देतात. कारण त्यामुळे लग्नाचा खर्च बराच कमी होतो. या लोकांत बालविवाह रूढ नाही. वधूवर वयात आल्यानंतरच लग्न होते. सुमारे चाळीस वर्षांपूर्वी या लोकांचा लग्नसमारंभ अगदी साधा असे. वधू–वरांना लग्नमंडपात समोरासमोर उभे करून त्यांना गूळधान देत व तेच इतरांनाही वाटीत. त्यानंतर साधे जेवण व मद्यपान होई. शेवटी वराचा मेहुणा वराला आणि वधूचा मेहुणा वधूला खांद्यावर घेऊन नाचे. बाकीचे लोक त्या दोघांच्या भोवती नाचत. त्या वेळी एक मनुष्य एका थाळीत तांदूळ व कुंकू घेऊन नृत्यमंडलात उभा राही. नंतर वधू-वर त्यांतील तांदूळ व कुंकू घेऊन एकमेकांवर टाकीत. सांप्रत यांची विवाहपद्धती बदलली आहे.

**प्रसूतिप्रथा** – प्रसूतीनंतर नाळ पुरणे हे फार महत्त्वाचे मानतात. काही लोक घराजवळ एक खोल खड्डा खणून त्यात नाळ व तिच्याबरोबर मीठ व तांब्याचे एक नाणे पुरतात; तर काही लोक या तीन्ही वस्तू एका मडक्यात घालून ते स्मशानात नेऊन पुरतात. पाच दिवस सुवेर पाळतात व सहाव्या दिवशी बाळंतिणीला स्नान घालून सटीची पूजा करतात. चेटूक किंवा

भूतबाधा यांपासून बाळबाळंतिणींचे संरक्षण व्हावे म्हणून एखादी सुरी, विळा किंवा लोखंडाचा तुकडा खाटेवर ठेवतात. भुतेखेतें लोखंडाला भितात, अशी त्यांची समजूत आहे.

**देवधर्म** – धनका लोक वाघदिया देव, सीमादिया देव, गोप चौहान देव आणि धानदेव यांना भजतात. वाघदिया (वाघ) देव त्यांच्या पशूंचे रक्षण करतो. शेंदूर लावलेला एक दगड हे त्याचे प्रतीक असते. वर्षातून दोन-तीन वेळा त्याच्यासमोर तुपाचा दिवा लावतात व त्याला मद्य व कोंबडीचे पिलू अर्पण करतात. गावाच्या सीमेवर उंच जागी दगडांचा ढीग असतो, तो सीमादिया देवाचा होय. हा गावाचे रक्षण करतो. गोप चौहान हा सर्पदेव आहे. तो सापाचे विष उतरवतो. धानदेव पिकांचा रक्षण करतो. त्याची पूजा भाद्रपदात करतात.

धनका लोक वर्षातून दोनदा सर्व ग्रामदेवांची सामुदायिक पूजा करतात. पावसाळा सुरू होताच सर्वजण तळचाच्या काठी जमून, भरपूर पाऊस पडो, अशी प्रार्थना करतात आणि नवे पीक हाती येताच त्याचा काही भाग सर्वजण मिळून धान-देवाला अर्पण करतात.

उंचेरी माता, नीचेरी माता, खप्पर जोगिणी, कालिका, राणी काजळ या देवींनाही हे लोक निरनिराळचा वेळी भज-तात. गावाबाहेर झाडाखाली ठेवलेल्या शिळा हीच त्यांची प्रतीके असतात.

चेटुक, जादूटोणा, भुतेखेते, दृष्टबाधा यांवर धनकांची विलक्षण श्रद्धा असून, त्यांच्या जीवनावर या गोष्टींचा खूपच प्रभाव पडलेला आहे. या भुताखेतांचे आणि एखाद्या रोगाचे निदान करून त्यांवर उपाय सांगण्याचे काम वस्तीतला भगत करतो. त्यामुळे भगताला गावात खूप मान असतो.

**सण-उत्सव** – मकरसंक्रांत, महाशिवरात्र, होळी, महालक्ष्मी, गोकुळाष्टमी, दिवसो (दिव्याची अवस), नवरात्र, दसरा, दिवाळी हे सण धनका लोक पाळतात. त्यांतील दिवसो हा त्यांचा सर्वांत महत्त्वाचा सण असतो. मात्र अविवाहित मुली व तरुण मुलेच तो साजरा करतात.

नंदर्वो देवाची पूजा हा धनकांचा खास सण आहे. नंदर्वो म्हणजे नवी पालवी. तिच्या दर्शनामुळे सर्वांना जो आनंद होतो, तोच या सणात व्यक्त केला जातो. नवी पालवी किंवा गवत हेच नंदर्वो देवाचे प्रतीक असते. त्याच्या पूजेत कडु-लिंबाच्या पानांचा रस काढून त्याचा देवाला नैवेद्य दाखवतात व मग तो प्रसाद म्हणून सर्वांना वाटतात.

धनका लोक नवरात्रात आपल्या जातिदेवतांची पूजा कर-तात. होळी, दसरा व दिवाळी हे सण धार्मिक दृष्टीने न करता केवळ मौज म्हणून करतात. अशा सणासमारंभांत त्यांच्यांतल्या तरुण-तरुणींना आपले जोडीदार शोधण्याची संधी मिळते.

**राहणी** – धनका पुरुष सामान्यपणे लंगोटी नेसतो व डोक्याला काहीतरी गुंडाळतो. क्वचित प्रसंगी तो अंगरखा व धोतर वापरतो. स्त्रिया काम करताना घागरा व चोळी वापरतात. डोक्यावर चौघडी घेतात. पण सणासमारंभांच्या प्रसंगी त्या घागऱ्यावरून साडी नेसतात. पूर्वी त्या नाकात सोन्याची किंवा चांदीची काडी व कानात लोरिया नावाचा जड अलंकार घालीत, पण आता नाकात काही घालीत नाहीत व कानातही



धनका स्त्री

साधी कडी घालतात. लग्नात वराकडून त्यांना चांदीचा एक घसवशीत गोफ मिळतो, त्याला हुंसडी म्हणतात. तो नेहमी त्यांच्या गळचात असतो. त्याला मंगळसूत्राइतके महत्त्व असते. पती मरण पावल्यास त्या वेळीच तो काढून टाकतात. याशिवाय धनका स्त्रिया हातांत सोन्याच्या किंवा चांदीच्या बांगड्या घालतात.

तांदूळ, ज्वारी, बाजरी व डाळी हे यांचे मुख्य अन्न होय. भाज्या, मांस व मासे या वस्तू ते मिळतील तेव्हा खातात. दूध व तूप हे पदार्थ त्यांना दुर्मिळ असतात. जंगलात राहणारे लोक पुष्कळ वेळा जंगली फळे व कंद यांवर निर्वाह करतात. फक्त सणावारी तेवढे गव्हाचे पदार्थ व मिठाई खातात.

धनकांची जातपंचायत असते. जातीचे काही किरकोळ तंटे सोडवण्याचा अधिकार पंचांना असतो. त्यांना धनकांच्या

रोजच्या जीवनात अजून मानाचे स्थान असले, तरी त्यांचे बरेच अधिकार आता कमी झाले आहेत.

धनका लोकांत एकत्रकुटुंबपद्धती अजून चालू आहे व ती पितृप्रधान आहे. त्यांच्यांतले सुखवस्तू लोक विटा, दगड, चुना व कौले वापरून चांगली घरे बांधतात; पण बाकीचे बहुतेक लोक बांबू, गवत व माती यांच्या झोपडयांत राहतात.

**मर्तिकप्रथा –** हे लोक मृतांना जाळतात. मृत मनुष्य अविवाहित असेल, तर त्याच्या देहाला हळद व कुंकू लावतात आणि तो विवाहित असला, तर नुसते कुंकू लावतात. मग ते प्रेत नव्या वस्त्रात गुंडाळतात व बांबूच्या तिरडीवर ठेवतात. त्यावर बांबूची चटई घालून ते बांधतात. प्रेताबरोबर घरून मडक्यातून विस्तव नेतात. मृताच्या दहनासाठी वस्तीतले सर्व लोक थोडे थोडे सर्पण देतात. मृताचे आप्त त्याला धोतरे देतात व त्यांतली काही मृताबरोबर जाळली जातात. चितेवर ठेवताना मृताच्या हातात नारळ, तांदूळ, फळे व फुले ठेवतात. मृताचा मुलगा चितेभोवती प्रदक्षिणा घालून मग चितेला अग्नी देतो. हे लोक दहा दिवस सुतक पाळतात. दहाव्या दिवशी चार बांबूंची नळकांडी आणून, त्यांतील दोन दुधाने व दोन गोमूत्राने भरतात. मग ती नळकांडी व सात धान्यांची भाकरी घेऊन स्मशानात जातात. तिथे दूध व गोमूत्र राखेवर ओततात आणि वर भाकरी ठेवतात. त्याच दिवशी मृताचे आप्त क्षौर करतात. नंतर नात्यातल्या मंडळीना डाळ-भात-भाजीचे जेवण घालतात. अकराव्या दिवशी तसलेच जेवण सर्व जातभाईंना देतात. त्या वेळी गावोगावचे लोक जमून तीन रात्री भजन करतात. तेराव्या दिवशी गावजेवण असते, त्याला दहोद म्हणतात. चौदाव्या दिवशी सर्व नातेवाइकांना लाडवांचे जेवण देतात. यांच्यांत मासिक श्राद्ध व भाद्रपद वद्य चतुर्दशीला सर्व मृतांचे महालयश्राद्ध करण्याची प्रथा आहे.

पूर्वी हे लोक मृताची लाकडी प्रतिमा बनवून ती घराबाहेर ठेवीत व तिला वस्त्र, अन्न वगैरे पदार्थ अर्पण करीत. मृत मनुष्याने इतरांना त्रास देऊ नये, हा त्यातला हेतू असे. आता ही चाल बंद झाली आहे. [ द्रा. ला. गु. ]

## धनगर

**धनगर** एक जात. यांची वस्ती महाराष्ट्राच्या सर्व भागांत विखुरलेली आहे. कानडीत या जातीचे नाव दनगार असे आहे. दन म्हणजे गुरेढोरे ( गोधन ), त्यावरून दनकार→दनगार→धनगर (गुरेढोरे पाळणारा) अशा क्रमाने हा शब्द बनला. आजही कोकणात धनगर हे गाई-म्हशी पाळण्याचा व्यवसाय करतात. हे मुख्यतः मेंढया पाळतात. मेंढया पाळण्याचा त्यांचा व्यवसाय पुढे गोपालनाच्या अनुषंगाने आलेला दिसतो.

धनगरांच्या उत्पत्तीविषयी एक कथा सांगतात, ती अशी– पूर्वी एकदा वारुळातून शेळ्या-मेंढयांचे कळप निघाले आणि ते शेतीची नासाडी करू लागले. शेतकऱ्यांनी हा त्रास दूर होण्यासाठी महादेवाची प्रार्थना केली. तेव्हा महादेवाने त्या शेळ्या-मेंढ्या राखण्यासाठी धनगर निर्माण केला.

धनगरांत अहिर, अस्सल किंवा मराठा, बनजी, बरगेबंद किंवा मेठकरी, डंगे, गडगे, गवळी, धोगत्तुन्य, हटकर किंवा झेंडेवाले, होळकर, कंगर, खिक्री, खिल्लारी किंवा थिलारी, खुटे किंवा खुटेकर, कुकटेकर, लाड, मेंढे, म्हसकर, सनगर, शेगर, शिळोत्या व उटेगर असे बावीस पोटभेद आहेत. यांतील पुष्कळ पोटभेदांमध्ये कडू नावाचा अनौरस संततीपासून बनलेला एक वर्ग आढळतो. त्यांच्यांत आडनावांनी दर्शविली जाणारी अनेक कुळे आहेत. वंशशास्त्रदृष्टया धनगरांची गणना शक–द्रविडांत होते. समाजव्यवस्थेत त्यांचे स्थान शूद्र वर्णांत मानले जाते. यांची जातपंचायत असते. ती दर तीन वर्षांनी जातीचे न्यायनिवाडे करते.

**व्यवसाय–** मूलतः गोधन पाळणे हा यांचा व्यवसाय असला, तरी सांप्रत बहुतेक धनगर मेंढया पाळण्याचा आणि घोंगडया विणण्याचा व्यवसाय करतात. धनगरांच्या काही पोटजाती लोकर विणण्याच्या व्यवसायाबरोबरच शेतीचाही व्यवसाय स्वीकारून स्थायिक झालेल्या आहेत. परंतु त्यांच्यांतील खिल्लारी वगैरे अनेक पोटजाती अजूनही मेंढयांचे कळप घेऊन गावोगाव भटकत असतात. यांच्या मेंढयांच्या कळपाबरोबर उत्तम जोपासलेले आणि शिकविलेले शिकारी कुत्रे असतात. यांच्यांतली हटकर ही पोटजात लष्करी वृत्तीसाठी प्रसिद्ध आहे.

**राहणी–** स्थायिक धनगरांची घरे पडळीसारखी लांबच लांब अथवा झोपडीवजा असतात. ती गवताने शाकारलेली असतात. त्यांना एकच प्रवेशद्वार असते व खिडक्या वगैरे नसतात.

पुढे तिकोनी धडपा सोडलेली लंगोटी, डोक्याला मरड पागोटे, खांद्यावर घोंगडी, पायात वहाणा आणि हातात लांब व जाड काठी असा धनगराचा वेष असतो. स्त्रिया गुडघ्यापर्यंत बहुशः लालभडक रंगाचे लुगडे नेसतात. धनगर स्त्रियांना चांदीचे दागिने फार आवडतात. धनगर पुरुष उजव्या हातात चांदीचे कड घालतात. त्यांच्या कानांतही चांदीची लहान कडी असतात; त्यांना अंती म्हणतात. धनगरांना धातूच्या नाण्यांचे आकर्षण फार असते. त्यांच्या मुलांच्या गळयात मलिकंबरापासूनच्या रुपयांच्या माळा घातलेल्या असतात. धनगर हा स्वभावाने कष्टाळू आणि मितव्ययी असल्यामुळे पैसे राखून असतो.

**देव-धर्म –** सूर्यफूल, कमळ पाचपालवी इ. धनगरांची देवके

आहेत. खंडोबा व बिरोबा हे त्यांचे खास देव होत. जेजुरी (जि. पुणे) व आरेवाडी (जि. सांगली) ही त्या देवांची क्षेत्रे धनगर लोक महत्त्वाची मानतात. इंदूरचे इतिहासप्रसिद्ध



धनगर

होळकर घराणे हे जातीने धनगर असून, त्याची खंडोबाभक्ती सुप्रसिद्ध आहे. जेजुरीच्या खंडोबाचे वैभव वाढविण्यात होळकरांनी मोठाच वाटा उचलला आहे. यांच्यामध्ये तुळजाभवानीचीही उपासना प्रचलित आहे. हे देवीचे नवरात्र पाळतात आणि दसऱ्याच्या दिवशी देवीला नैवेद्य करून नारळ देतात.

**विवाहप्रथा** – यांच्यांत कुळ आणि देवक एकच असेल, तर विवाहसंबंध होत नाही. मामेबहिणीशी लग्न होते, पण आतेबहीण व मावसबहीण यांच्याशी होत नाही. सख्ख्या बहिणी सख्ख्या जावा होऊ शकतात. चौदा ते पंचवीस हे मुलांचे आणि चार महिने ते बारा वर्षे हे मुलींचे विवाहाचे वय मानतात. लग्नाचा मुहूर्त ब्राह्मणाकडून ठरवून घेतात. परंतु ब्राह्मण न मिळाल्यास एखाद्या सोयिस्कर दिवशी मुहूर्त ठरविण्यासाठी एक विधी करतात, तो असा–

एका जोडप्याला झोपडीच्या बाहेर बसवतात. नंतर झोपडीतून प्रथम एक गाय बाहेर सोडतात आणि तिच्या मागोमाग एक वासरू सोडतात. ते वासरू जर त्या जोडप्याच्या उजवीकडून गाईकडे धावत गेले, तर तो मुहूर्त शुभ आहे, असे समजतात आणि डावीकडून गेले तर दोन तास थांबून पुन्हा हा विधी करून पाहतात. अशा क्रमाने ते वासरू जोडप्याच्या उजवीकडून जाईपर्यंत हा विधी करीत राहतात आणि मगच लग्न लावतात.

**मर्तिकप्रथा** – हे मृतांना जाळतात अथवा पुरतात. उत्तरक्रियेसाठी ब्राह्मण पुरोहित बोलावतात. काही ठिकाणी उत्तरक्रियेसाठी कुंभार अथवा जंगम बोलावण्याचीही प्रथा आहे. यांच्यांत श्राद्धविधीची चाल आहे.

**लोकसाहित्य** – धनगरी लोकसाहित्य समृद्ध आहे. बिरोबाच्या यात्रेत अथवा एरवीही रात्रीच्या वेळी मल्या मोठ्या ढोलाच्या साथीवर धनगर आपली प्रदीर्घ लोकगीते रात्रभर गात राहतात. या गीतांतून बिरोबा देवाच्या चरित्रकथा आणि अन्य अनेक अद्भुत कथा गुंफलेल्या असतात. त्यांच्या या गीतजागराच्या प्रारंभी म्हटल्या जाणाऱ्या मंगलाचरणातील काही पंक्ती अशा –

**पहिलें माझें नमन गणपती देवाला।**
**सुंबरान मांडलं पहिलं माझं।।**
**धरतीमातेला, सुंबरान मांडलं।**
**धरतीमातेला, मेघराया पित्याला।।**
**मेघराया पित्याला, चंद्रसूर्य दोघांला।**
**चंद्रसूर्य दोघांला हो, ईश्वर-पार्वतीला।।**
**ईश्वर-पार्वतीला हो, गादीवरल्या धन्याला।**
**गादीवरल्या धन्याला हो, जन्म-दिल्या दोघांला।।**

महाराष्ट्राच्या वसाहतकारांतली ही एक प्राचीन जात आहे, हे अनेक विद्वानांनी मान्य केले आहे. [ मुं. इ. जा.; हिं. मं. लो.; म. सं.; ए. हो. रा.; श्री. प. रा. दाते ]

**धनंजय** (इ. स. चे ७–८ वे शतक) एक जैन महाकवी. याचे द्विसंधान किंवा राघव-पांडवीय हे काव्य प्रसिद्ध आहे. याचे अठरा सर्ग असून, त्यात रामायण-महाभारताची कथा सांगितली आहे. धनंजयाने ही कथा द्व्यर्थी शब्दयोजना करून सांगितली आहे. त्यांतला एक अर्थ रामपर व दुसरा कृष्णपर लागतो. या पद्धतीने लिहिलेले हे पहिलेच काव्य असावे, असे म्हणतात. म्हणूनच जैनांच्या अपश्चिम रत्नत्रयात या काव्याची गणना केली जाते. धनंजयाच्या पश्चात त्याच्या या द्व्यर्थी काव्यरचनेचे अनेक कवींनी अनुकरण केले आहे. धनंजयनिघण्टू अथवा नाममाला व विषापहारस्तोत्र अशी धनंजयाची दोन छोटी काव्येही प्रसिद्ध आहेत. [ जै. सा. इ. ]

**धनत्रयोदशी** आश्विन वद्य त्रयोदशीला हे नाव आहे. या दिवशी वस्त्रालंकारांची खरेदी करणे शुभ मानतात. उपवास करून घरातले द्रव्य व अलंकार पेटीतून काढून ते साफसूफ करतात व पुनश्च योग्य ठिकाणी ठेवतात. कुबेर, विष्णु-लक्ष्मी, योगिनी, गणेश, नाग आणि द्रव्यनिधी यांची पूजा करून पायसाचा नैवेद्य दाखवतात. यमासाठी दिवा लावतात आणि यथाशक्ति दान करतात. पाहा – दीपावली.

**धनदकलश व्रत** एक जैन व्रत. श्रावण वद्य प्रतिपदेला या व्रताचा प्रारंभ करतात व भाद्रपद पौर्णिमेला ते समाप्त करतात. या अवधीत प्रत्येक दिवशी जिनेंद्र देवाला अभिषेक व पूजा करायची असते. व्रतावधी पाच वर्षे. पाच वर्षांनंतर उद्यापन करतात. [जै. व्र. वि. सं.]

**धनदकृच्छ्र** एक प्रायश्चित्त. यात तळहातावर मावेल एवढेच अन्न एक महिनाभर खायचे असते. मात्र या अन्नात सुवर्णाचा अंश असावा लागतो. हे सुवर्ण घासून किंवा उकळून अन्नात मिसळतात. [हि. ध.]

**धनद तारा** एक बौद्ध देवता. तारेचे एक तांत्रिक रूप. ही एकमुख, चतुर्भुज व हरित वर्णाची आहे. हिचा उजवीकडील खालचा हात वरदमुद्रेत असून, वरच्या हातात माला असते. डावीकडील खालच्या हातात ग्रंथ व वरच्या हातात कमळ असते. 'ॐ तारे तुत्तारे तुरे स्वाहा' हा या देवतेचा मंत्र आहे. या मंत्रातील वर्णांपासून उत्पन्न झालेल्या आठ देवता हिच्या समोवती असतात. कोणताही प्राणी हिचे वाहन होऊ शकतो. काही ठिकाणी ती कमळात बसलेली दाखवतात. मस्तकी अमोघसिद्धीची मूर्ती असते. तिबेट व चीनमध्ये हिच्या मूर्ती आढळतात. [इं. बु. इ.]



धनद तारा



**धनपाल** (इ. स. चे १० वे शतक) एक जैन कवी आणि कोशकार. मेरुतुंगाचार्यांच्या प्रबंधचिंतामणी नामक ग्रंथात याचे चरित्र आले आहे. संकाश्य गोत्री सर्वदेव याचा हा पुत्र होता. सर्वदेव ब्राह्मण असला तरी त्याचा ओढा जैन धर्माकडे होता. पण धनपाल मात्र प्रथम जैन धर्माचा विरोधकच होता. पुढे त्याने जैन धर्माचा चांगला अभ्यास केला व शेवटी तो जैन बनला. हा भोजराजाचा दरबारी पंडित होता.

पाईलच्छीनाममाला, तिलकमंजरी, ऋषभपंचाशिका हे याचे ग्रंथ होत. पाईलच्छीनाममाला हा त्याचा प्राकृत कोश आहे. त्याने या कोशाची रचना आपली धाकटी बहीण सुंदरी हिच्यासाठी धारा नगरीत असता केली. प्राकृताचा हा एकमात्र कोश आहे. या कोशाच्या २७९ गाथा आहेत. ऋषभपंचाशिका हा ग्रंथ प्राकृत असून, तिच्यात ऋषभनाथाची स्तुती आहे. या ग्रंथाची भाषा अवघड असली, तरी उपमा- दृष्टांत चांगले आहेत.

तिलकमंजरी हा याचा संस्कृत भाषेतील ग्रंथ होय. भोजराजाला हा ग्रंथ फार आवडला आणि आपल्यालाच या ग्रंथाचे नायक करावे, असे त्याने धनपालाला सुचविले; परंतु त्याने ते मान्य केले नाही. धनपालाच्या भाषेचा गौरव करताना पंडितांनी असे म्हटले आहे, की धनपालाची सरस वचने आणि मलयगिरीवरील चंदन याने कोण संतुष्ट होणार नाही? [म. ज्ञा. को.; प्रा. भा. व्या.; प्रा. सा. इ.; वि. स्मृ. ग्रं.]

**धनमाणिक ओसा** ओडिसा प्रदेशातील एक व्रत. धनमाणिक ही धनदेवता असून, त्या प्रदेशात दर गुरुवारी घरोघरी हिची पूजा केली जाते. हिची कथा अशी—

एकदा लक्ष्मीने वृद्धा बनून एका व्यापाऱ्याच्या बायकोला दर्शन दिले व तिला हे व्रत करायला सांगितले. पण तिने ते न केल्याने तिला दारिद्र्य प्राप्त झाले. आपण लक्ष्मीचे ऐकले नाही म्हणून मग त्या स्त्रीला पश्चात्ताप झाला. नंतर तिने हे व्रत केले व तिला गतवैभव पुनश्च प्राप्त झाले. [स्ट. ओ. फो.]

**धनवार** एक जात. यांना धनुहर असेही म्हणतात. धनवार म्हणजे धनुष्य धारण करणारे. यांची वस्ती मध्य प्रदेशात आहे. हे लोक पूर्वी केवळ शिकारीवर जगत. अलिकडे शेती व मजुरी करू लागले आहेत. यांच्या उत्पत्तीसंबंधाने बऱ्याच कथा सांगतात. त्यांतील दोन कथा अशा—

(१) परमेश्वराने आपल्या धनुष्यावर टिचकी मारून प्रथम एक वीर पुरुष निर्माण केला व तोच धनवारांचा मूळ पुरुष झाला, अशी समजूत गोंड वंशातील धनवारांची आहे.

(२) एका वाघिणीने नागा लोधा व नागी लोधा अशा दोन अनाथ मुलांना आपल्या दुधावर पोसले. पुढे त्या मुलांनी लग्न केले. त्यांना बारा मुले झाली. या बारा मुलांतील करणकोट हा धनवारांचा मूळ पुरुष झाला.

कवार व गोंड यांच्या संबंधातून ही जात निर्माण झाली, असे मानववंशशास्त्रज्ञांचे मत आहे. पुढे इतर जातींच्याही रक्ताचे मिश्रण या जातीत झाले आहे.

**देवधर्म** – ठाकूरदेव व दुल्हादेव हे यांचे प्रमुख देव होत. पैकी पहिली कृषिदेवता असून दुसरी कुलदेवता आहे. मैय्या आंधियारी या देवीलाही ते भजतात व माघ मासात तिची पूजा करतात. त्या वेळी तिला शेळीचा बळी देतात. मरावासी ही मैय्या देवीची मुलगी होय. धनवार लोक तिला आपली माता मानतात. ही त्यांची शिकारदेवता आहे. हे लोक गाईला देव समजतात व ती मेल्यावर आपल्या घरातील सर्व मडकी फोडून टाकतात. गाय किंवा मांजर यांची अजाणतेपणीं हत्या झाली, घरच्या बैलाचे नाक कान नकळत तुटले, त्याच्या जखमेत किडे पडले, सरकारी अधिकाऱ्यांच्या खेरीज इतरांच्या हातचा मार खाल्ला व बायकोने नवऱ्याचे नाव घेतले, तर त्या माणसावर बहिष्कार घालतात. ज्ञातिभोजन घातल्याने, नरसिंगनाथाची यात्रा केल्याने आणि सोने बुडविलेले पाणी बांबूच्या नळकांड्यातून प्याल्याने हा बहिष्कार उठतो. गोंड किंवा बिझवार स्त्रीचा व धनवाराचा अनैतिक संबंध घडल्यास जातीतील सरपंच त्या दोघांना बकऱ्याचे रक्त पिण्यास देऊन त्यांना जातीत घेतात.

**विवाहप्रथा** – मुली वयात आल्यावर त्यांची लग्ने करतात. लग्नात बाणांचा अहेर देतात. वरात घरी आल्यावर ज्ञातिभोजन घालतात. या वेळी वधूने स्वयंपाक करून वराने स्वतः वाढायचे असते. या दिवशी सर्वांना बकऱ्याची सागोती व दारू पाजतात.

**प्रसूतिप्रथा** – मूल जन्मले म्हणजे त्याच्या रूपाने कोणता पूर्वज अपल्या घरी जन्माला आला, हे प्रथम जाणून घेतात व त्या पूर्वजाचे नाव त्या मुलाला ठेवतात. सहाव्या दिवशी घरातील सर्व पुरुष क्षौर करतात. सुवेर साडेपाच महिने पाळतात. नागा लोधा व नागी लोधा या मूळ दंपतीने प्रत्येक मुलाच्या जन्मप्रसंगी साडेपाच महिने सुवेर पाळले होते, या कथेवरून ही चाल पडली आहे.

नाव ठेवताना ते लिंगभेद मानीत नाहीत. म्हणजे ते मुलाचे नाव काशी व मुलीचे नाव मालू असेही ठेवतात. यांच्यांत गोंदण्याला फार महत्त्व आहे. गोंदलेल्या माणसाची व त्याच्या आत्म्याची ताटातूट होत नाही, अशी त्यांची श्रद्धा आहे. म्हणून ते बिनगोंदलेल्या व्यक्तीच्या हातचे पाणीही पीत नाहीत.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना पुरतात. सुतकी मंडळी तीन दिवस स्वयंपाक करीत नाहीत. या वेळी इतर लोक त्यांना बिनमिठाचे अन्न आणून वाढतात.

मृत मनुष्य पुन्हा आपल्याच वंशात जन्म घेतो, अशी यांची समजूत आहे. [ म. ज्ञा. को.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

## धनव्रत

एक काम्य व्रत. फाल्गुन शुद्ध त्रयोदशीला या व्रताचा आरंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. कुबेर ही या व्रताची देवता होय. त्याची पूजा व उपवास करणे हा या व्रताचा विधी आहे. उद्यापनाच्या वेळी ब्राह्मणास यथाशक्ति सुवर्णदान देतात. या व्रताला नंदव्रत असेही म्हणतात. मार्गशीर्ष शुद्ध एकादशीला व्रताचा आरंभ व पूजेनंतर नक्तभोजन, असाही याचा एक पर्याय आहे. फल – धनाची प्राप्ती. [ हि. ध. ]

## धनसंक्रांतिव्रत

एक काम्य व्रत. संक्रांतीच्या दिवशी या व्रताचा प्रारंभ करतात. सूर्य ही या व्रताची देवता होय. व्रतावधी एक वर्ष. या व्रताचा विधी असा--

प्रत्येक सूर्यसंक्रांतीच्या दिवशी एकभुक्त राहून व एका जलपूर्ण कलशात सूर्याची सुवर्णप्रतिमा ठेवून 'सूर्यः प्रीयताम्' म्हणून तो कलश मूर्तीसह दान देतात. उद्यापनाच्या वेळी एक सोन्याचे कमळ आणि एक गाय दान देतात. फल-दीर्घायुष्य, आरोग्य व धन यांचा लाभ. [ हि. ध.; व्रतराज ]

## धनावाप्तिव्रत

एक काम्य व्रत. श्रावण वद्य प्रतिपदेला या व्रताचा प्रारंभ करतात. व्रतावधी एक महिना. विष्णू व संकर्षण यांची निळ्या कमळांनी पूजा करणे व भाद्रपद पौर्णिमेपूर्वी तीन दिवस उपवास करणे, असा याचा विधी आहे. उद्यापनाच्या वेळी गोप्रदान करतात.

चैत्र शुद्ध प्रतिपदेला व्रतारंभ करणे, हा याचा दुसरा पर्याय आहे. या पर्यायात विष्णू, पृथ्वी, आकाश व ब्रह्मा यांची अनुक्रमे प्रतिपदा ते चतुर्थीपर्यंत पूजा करतात. व्रतावधी एक वर्ष. फल – धन, सौंदर्य व सुख यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

## धनाश्री

एक राग. हा राग भैरवी, भीमपलास व खमाज या रागांच्या अंगांनी गातात. भैरवी अंगाने गाताना ऋषभ, गांधार, मध्यम, धैवत व निषाद हे स्वर कोमल लागतात. भीमपलास अंगाने गांधार व निषाद तेवढे कोमल लागतात. खमाज अंगाने गाताना मात्र सर्व स्वर शुद्ध लागतात. याची जाती औडव संपूर्ण आहे. वादी– पंचम. संवादी– षड्ज. वैर्ज

आणि भीमपलास या दोन्ही प्रकारांचा आरोह– सा, नी, सा, म, ग, म, प, सा, नी, सा. भैरवी आणि भीमपलास या दोन्ही



धनाश्री रागाचे सांकेतिक चित्र

प्रकारांचा अवरोह– सां, नी, ध, प, म, प, म, ग, म, ग, रे, सा. खमाज प्रकारात आरोह– नि, सा, ग, म, प, नी, सा. अवरोह– सा, नी, ध, प, प, ध, म, प, ग, ग, म, ग, रे, सा. गानसमय– दुपार, सायंकाळ किंवा रात्र. [श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे.]

**धनिष्ठा** अश्विन्यादी गणनेतील तेवीसावे नक्षत्र. आकाशात याच्या पाच तारकांचा एक गुच्छ दिसतो. त्यांतल्या चार तारका मंदप्रभ असून, एक तारका जरा ठळक आहे. धनिष्ठेचे वैदिक नाव श्रविष्ठा असे आहे. यजुर्वेदात तिच्याविषयी पुढील वाक्य आहे –

**चतस्रो देवीरजरा श्रविष्ठाः**

अर्थ– श्रविष्ठा या कधीही म्हाताऱ्या न होणाऱ्या अशा चार देवी आहेत.

वेदांग ज्योतिषाच्या कालात नक्षत्रांची गणना श्रविष्ठेपासून ( धनिष्ठा ) होत होती. महाभारतात ती श्रवणापासून होऊ लागली. धनिष्ठा सोडून श्रवणापासून नक्षत्रगणना कधी सुरू झाली, हा एक विवाद्य प्रश्न आहे. महाभारतातच एके ठिकाणी आपल्या युगाच्या पूर्वी धनिष्ठादी गणना होती व त्याच्याही पूर्वी रोहिण्यादी गणना होती, असा उल्लेख असल्याचे डॉ. वासुदेवशरण अग्रवाल सांगतात. याविषयी श्री. योगेशचंद्र राय यांनी गणित करून असे दाखवले आहे, की सनपूर्व ४०५ वर्षे या कालापर्यंत धनिष्ठादी गणना चालू होती आणि त्यानंतर श्रवण नक्षत्र त्या जागी आले.

वसू ही या नक्षत्राची देवता आहे. या नक्षत्राचे पहिले दोन चरण मकर राशीत व पुढचे दोन चरण कुंभ राशीत येतात. धनिष्ठादी पाच नक्षत्रे धनिष्ठापंचक या नावाने प्रसिद्ध आहेत. हे पंचक अशुभ मानलेले आहे. घरातील एखादे माणूस या पंचकात मृत झाले, तर पाच महिने ती वास्तू सोडावी असा संकेत आहे. त्याचा पर्याय म्हणून पाच दिवस घर सोडणे किंवा निदान जिथे मृत्यू झाला असेल, ती खोली सोडणे अशी काही ठिकाणी रूढी आहे. घराच्या शाकारणीसाठी व लाकूडफाटयाचा संग्रह करण्यासाठी धनिष्ठापंचक वर्ज्य मानतात.

याचे रूपध्यान चतुर्वर्गचिंतामणीत वर्णिले आहे –

**तप्तचामीकराभासा निधिस्था पङ्कजासना ।**
**पक्वबिम्बाधरा तन्वी पीनोन्नतपयोधरा ॥**
**दीर्घवेणी सपुष्पा सा मौक्तिकाभरणान्विता ।**
**चारुनेत्रा सुवेषाढ्या द्विभुजा वसनारुणा ॥**
**वरालयान्विता सौम्या धनिष्ठा परिकीर्तिता ।**

अर्थ– ( स्त्रीरूपी ) धनिष्ठा ही सुवर्णकांतीची, द्रव्यनिधीवर बसलेली, कमलासन, पिकलेल्या तोंडल्यासारख्या ओठांची, कृशतनू, पुष्ट व उन्नत उरोज असलेली, लांब वेणी घालून तिच्यावर फुले माळलेली, मोत्यांचे अलंकार ल्यालेली, सुंदर नेत्र असलेली, सुवेष परिधान केलेली, रक्तवस्त्र, जिचे आश्रयस्थान श्रेष्ठ आहे अशी आणि सौम्य अशी सांगितलेली आहे.

या नक्षत्रावर जन्मलेला मनुष्य धनवान, शीलवान, बलवान व कीर्तिमान होतो, असे कोष्ठीप्रदीपात म्हटले आहे.

**धनुक** एक जात. हे लोक बिहार प्रदेशात, तसेच बंगालमधील मुर्शिदाबाद आणि माला या जिल्ह्यांत आढळतात. ही जात संकरजन्य असल्याचे म्हटले आहे. पद्म पुराणाच्या मते चांभार पुरुष आणि चांडाळ स्त्री यांच्या संबंधांतून ही जात उत्पन्न झाली आहे. यांचा सामाजिक दर्जा कुणब्यांप्रमाणे आहे. हे लोक व्यवसायाने शेतकरी आहेत.

यांची धार्मिक कृत्ये मैथिली ब्राह्मण करतात. हे लोक बंदी, गोराया, धर्मराज, रामठाकूर, गहीळ, इ. देवांना भजतात. वैशाखात सूर्यपूजा करतात. हे मृतांना पुरतात. [से. इं. १९५१]

**धनुरासन** एक योगासन. या आसनात शरीराला धनुष्याप्रमाणे आकार मिळतो, म्हणून याला हे नाव मिळाले आहे. याची प्रक्रिया अशी– भूमीवर पाय पसरून पालथे निजावे. दोन्ही पाय गुडघ्यांत वाकवून दोन्ही हातांनी दोन्ही

पायांचे घोटे बळकट धरावे. केवळ पोट जमिनीस टेकवून छाती, नाभीच्या खालचा भाग व पाय वर उचलावे आणि शरीर धनुष्यासारखे करावे.

या आसनामुळे पोटाचे विकार दूर होतात आणि गळा, पाठीचा कणा व कंबर यांतील स्नायू बळकट होतात. याने कुंडलिनी जागृत होते, असे म्हणतात. [ उ. यो. द. ]

**धनुर्मह** एक प्राचीन लोकोत्सव. या उत्सवात वीर पुरुष धनुष्यावर दोरी चढवून आपल्या बलाचे प्रदर्शन करीत असत, म्हणून याला धनुर्मह ( धनु = धनुष्य, मह = उत्सव) असे नाव पडले. रामायण, महाभारत, हरिवंश, इ. ग्रंथांत धनुर्महाची वर्णने आढळतात.

सीतास्वयंवराच्या प्रसंगी मिथिलेमध्ये जो उत्सव झाल्याचे वर्णन रामायणात आहे, तो धनुर्महच होय. त्या प्रसंगी रामाने शिवधनुष्य वाकवून जनकाने लावलेला पण जिंकला व सीतेने त्याला वरले. महाभारतात द्रौपदीस्वयंवरप्रसंगी धनुर्विद्येतील कौशल्य दाखविण्याचाच पण होता. यावरून असे दिसते, की प्राचीन काळी धनुर्महाच्या निमित्ताने राजपुत्रांना एकत्र बोलावून धनुर्विद्येत ज्याचे सर्वश्रेष्ठ कौशल्य दिसेल, त्याला आपली कन्या देणे, अशी प्रथा असावी.

हरिवंशात कंसाने करविलेल्या धनुर्महाचे विस्तृत वर्णन आहे. कंसाच्या आदेशानुसार अक्रूराने नंदगोपाच्या घरी जाऊन कृष्ण व बलराम यांना जो निरोप सांगितला, त्यात या उत्सवाचा स्पष्ट उल्लेख आहे–

संमृद्धस्तत्र कंसस्य भविष्यति धनुर्महः ।
तं द्रक्ष्यथ समृद्धं च स्वजनैश्च समेष्यथ ।।

(हरिवंश २. २६. ४).

अर्थ – कंसाच्या घरी धनुर्मह नामक उत्सव थाटामाटाने होणार आहे. तो तुम्ही सर्व गोपजनांसह येऊन पाहावा.

हरिवंशातील वर्णनावरून असे दिसते, की ज्या जागी हा किंवा अशा प्रकारचा उत्सव होत असे, तिला रंगवाट म्हणत असत. या जागेवर पौर व जानपद जनांना बसण्यासाठी हजारो मंच उभारीत. राजाला बसण्यासाठी एका बाजूला उंच विमानाकृती मंच उभारीत, त्याला विमान असेच नाव होते. धनुर्महाच्या प्रसंगी अनेक आमोदप्रमोदांची योजना असे. परंतु त्यात धनुष्याला दोरी लावून ते वाकवण्याच्या कौशल्याचेच मुख्यतः प्रदर्शन असे.

अतिप्राचीन काळी अनेक आदिम जमातींत असे बलप्रदर्शनाचे उत्सव प्रचलित होते. धनुर्मह म्हणजे अशा उत्सवांचेच एक परिणत स्वरूप होय. [ प्रा. भा. लो. ध.; पृथ्वीपुत्र ]

**धनुर्मास** सूर्य धनुराशीत असतो, त्या कालाला धनुर्मास असे म्हणतात. या मासात प्रत्येक दिवशी सूर्योदयापूर्वी देवाला महानैवेद्य करून ब्राह्मणांसह भोजन करावे, असे सांगितले आहे. तेवढे शक्य नसल्यास निदान एक दिवस तरी तसे करावे, असे म्हटले आहे.

दक्षिणेत तमिळ प्रदेशात मात्र हा मास अशुभ समजून त्या मासात अशुभनिवारणासाठी ते लोक ग्रहशांती व जपजाप्य करतात. धनुर्मासाची कथा आहे, ती अशी–

ब्रह्मादी देवांनी विष्णूला प्रार्थना केली की, तू आम्हांला दैत्यांच्या त्रासातून सोडव. त्या प्रार्थनेनुसार विष्णूने धनुष्य घेऊन दैत्यांचा नाश केला. ही घटना सूर्य धनुराशीत असताना घडली आणि म्हणून याला धनुर्मास ही संज्ञा मिळाली.

**धनुर्मास व्रत** एक काम्य व्रत. रोज उषःकाली विष्णूची पूजा करणे, सूर्योदयापूर्वी मुगाच्या डाळीची खिचडी व घृतपायस (तुपात भाजलेल्या तांदळाची खीर) यांचा देवाला नैवेद्य दाखवणे आणि पंक्तीला ब्राह्मण घेऊन भोजन करणे, हा या व्रताचा प्रमुख विधी आहे. काही लोक या व्रतात शीतनिवारणासाठी ब्राह्मणाला लोकरीचे वस्त्र व सूर्याला कोहळा आणि नारळ देतात.

व्रताच्या उद्यापनाच्या दिवशी श्रीकृष्णाच्या सुवर्णप्रतिमेची यथाविधि पूजा करतात. तिलौदन व आज्य या द्रव्यांनी होम करतात देवाच्या मागील बाजूला तिलौदनाचा बळी देतात. आचार्याला ती सुवर्णप्रतिमा व दोन गाई दान देतात आणि ब्राह्मणांना भोजन घालतात. फल– इहलोकी नाना प्रकारच्या सुखोपभोगांची व अंती विष्णुपदाची प्राप्ती. [ व्रतराज ]

**धनुर्विद्या** धनुष्य व बाण यांच्या संबंधी ज्ञान देणारी विद्या. प्राचीन कालापासून लोकांना धनुर्विद्येची माहिती होती. प्रपंचहृदय या ग्रंथात या विद्येचे वक्ते म्हणून ब्रह्मा, प्रजापती, इंद्र, मनू व जमदग्नी यांची नावे सांगितली आहेत. अगस्त्य व भरद्वाज हे धनुर्विद्येचे आचार्य होते, असे महाभारतात म्हटले आहे. अग्नी पुराणातील २४९ ते २५२ या चार अध्यायांत धनुर्विद्येचे सार संकलित केले आहे.

धनुष्यबाणांचा शोध नक्की केव्हा लागला, ते अज्ञात आहे; पण वैदिक काळापूर्वी धनुष्य-बाण हे आयुध प्रचारात होते, असे कळते. शिकार आणि युद्ध यांमधले ते प्रमुख आणि प्रभावी आयुध होते. त्रेतायुगात कुशल धनुर्धर होते, असे कळते. ऋग्वेदात धनुष्याचे अनेकदा उल्लेख आलेले आहेत. धनुष्याच्या सामर्थ्याविषयी भरद्वाज ऋषी म्हणतो–

धन्वना गा धन्वनाजिं जयेम धन्वना तीव्राः समदो जयेम ।
धनुः शत्रोरपकामं कृणोति धन्वना सर्वाः प्रदिशो जयेम ।।
वक्ष्यन्तीवेदा गनीगन्ति कर्णं प्रियं सखायं परिषस्वजाना ।
योषेव शिङ्क्ते वितताधि धन्वन् ज्या इयं समने पारयन्ती ।।
सुपर्णं वस्ते मृगो अस्या दन्तो गोभिः सन्नद्धा पतति प्रसूता ।
यत्रा नरः सं च वि च द्रवन्ति तत्र अस्मभ्यमिषवः शर्म यंसन् ।।
(ऋ. ६.७५.२,३,११)

अर्थ – धनुष्याच्या साहाय्याने आम्ही शत्रूचे गोधन जिंकू. धनुष्याच्या सामर्थ्याने आम्ही युद्धात जय मिळवू. धनुष्याच्या बळावर आम्ही शत्रूच्या कडव्या सैन्यावर विजय मिळवू. आमचे धनुष्य शत्रूचे सर्व मनोरथ धुळीला मिळवो. धनुष्याच्या बळावर आम्ही सर्व दिशा जिंकून घेऊ. हळूच काहीतरी सांगण्याच्या उद्देशाने धनुष्याची प्रत्यंचा, तिचा खरा प्रियकर जो वीराचा कर्ण, त्याला आलिंगन देण्यासाठी त्याच्याकडे जात आहे आणि त्यानेही प्रियेप्रमाणे तिला जवळ ओढून घेताच, धनुष्यावर चढलेली ती प्रत्यंचा त्याच्या कानात गुणगुणू लागली आहे. तीच युद्धात त्याचे रक्षण करते. ज्याच्या मुठीला हस्तिदंत आहे, अशा या बाणाला सोनेरी पिसारा लावलेला आहे. आणि तो गव्याच्या चामड्याच्या वादीने घट्ट बांधला आहे. असा हा बाण धनुष्यापासून सुटला, म्हणजे शत्रू एका ठिकाणी गोळा झालेले असोत किंवा पांगलेले असोत, त्यांच्यावर तिथल्या तिथे जाऊन आदळतो.

वैदिक काळापासून हर्षवर्धनाच्या काळापर्यंत धनुष्य-बाण हे भारतीय वीरांचे सर्वश्रेष्ठ आयुध होते.

धनुष्य-बाण हे मुक्त वर्गातील प्रमुख आयुध आहे. धनुष्याला शार्ङ्ग, कोदंड, कार्मुक, पिनाक, द्रुण, चाप, इ. अनेक नावे आहेत. धनुष्य तयार करणाऱ्याला धनुष्कार किंवा धनुष्कृत असे नाव होते (वाज. सं. ३०.७; १६.४६). बाणाला इषू, नाराच, शर, इ. नावे आहेत. ऋग्वेदात इषुकृत व इषुकार असे जे शब्द आढळतात, त्यांचा अर्थ बाण तयार करणारा असा आहे. त्यावरून बाण तयार करणाऱ्यांचा एक वर्ग समाजात त्या काळी निर्माण झाला होता, हे कळते. बाणाचे फाळ मुख्य बाणकार तयार करी व त्याचे इतर भाग त्याच्या हाताखालचे लोक तयार करीत. लक्ष्यवेधाचे सारे यश फाळावरच अवलंबून असल्यामुळे ते तयार करणे, हे कौशल्याचे काम असे.

ऐतरेय ब्राह्मणात देवांनी तयार केलेल्या देवतात्मक बाणाचे वर्णन आहे, ते असे –

इषुं वा एतां देवाः समस्कुर्वत यदुपसदस्तस्या अग्निरनीकमासीत् सोमः शल्यो विष्णुस्तेजनं वरुणः पर्णानि तामाज्यधन्वानो व्यसृजंस्तया पुरोऽभिन्दन्त ।

अर्थ– सोमयागातील उपसद देवतांनी बाण निर्माण केला. त्याच्या मुखाच्या ठिकाणी अग्निदेवतेची स्थापना केली. बाणाच्या शल्याच्या (पोलादी फाळाच्या) ठिकाणी सोम देवतेची स्थापना केली. बाणाच्या अग्राच्या ठिकाणी विष्णूची व पिसाऱ्याच्या ठिकाणी वरुणाची स्थापना केली. नंतर त्या बाणाची सज्य धनुष्यावर योजना करून त्यांनी तो असुरांच्या पुरांवर सोडून त्यांचा विध्वंस केला.

धनुष्याचे शार्ङ्ग (= शिंगाचे) व वांश (= वेळूचे) असे दोन प्रकार आहेत. शार्ङ्ग धनुष्य हे दिव्य असून, ते विष्णूचे श्रेष्ठ आयुध आहे. ते विश्वकर्म्याने तयार केले असून, त्याची उंची सात वितस्ती (विथी) आहे. पुरुषांनी वापरायचे धनुष्य साडेसहा वितस्ती उंच असते. गजारूढ आणि अश्वारूढ योद्धे प्रायः शार्ङ्ग धनुष्य वापरतात. आणि पायदळातील व रथारूढ योद्धे वांश धनुष्य वापरतात. वेळूचे धनुष्य तीन, पाच किंवा सात पेरांचे असते. नऊ पेरांचे धनुष्य हे चार प्रकारे शुभ असते.

शिंगांची धनुष्ये वनविण्यासाठी रेडा, म्हैस, गेंडा किंवा शरभ यांची शिंगे वापरीत. त्यांपैकी शरभ हा सांप्रत अस्तित्वात नाही. याशिवाय बांबू, वेत, चंदन, साल यांच्यापासूनही धनुष्ये तयार करीत. त्यांपैकी वेताचे धनुष्य सर्वश्रेष्ठ समजले जाई. क्वचित ते सोने, रुपे, तांबे किंवा एखादा मिश्रधातू यांचेही बनवीत. कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात धनुष्याचे कार्मुक, कोदंड, द्रुण व धनू असे चार प्रकार सांगितले आहेत. कार्मुक हे ताडाच्या काष्ठाचे, कोदंड वेताचे, द्रुण चंदनादी काष्ठांचे व धनू अस्थीचे किंवा शिंगाचे बनवीत. धनुष्याच्या प्रत्यंचेच्या जडपणावरून व हलकेपणावरून धनुष्याच्या जाती ठरत. कोदंडमंडन नामक ग्रंथात अशा अठरा जातींचा उल्लेख आहे. धनुष्याच्या वजनावरूनही त्याचे निरनिराळे प्रकार होत. दोन पलाशांपासून हजार पलाशांपर्यंत वजन असलेल्या धनुष्यांचे निर्देश धनुर्वेदात आढळतात. जनकाकडे असणारे शिवधनुष्य रावणासारख्या


धनुष्यबाण

वलाढ्य असुरालाही उचलता आले नाही, असे रामायणात म्हटले आहे व श्रीकृष्णाचे शार्ङ्ग धनुष्य अश्वत्थाम्याला उचलता आले नाही, असा महाभारतात उल्लेख आहे. पुष्कळदा स्वयंवरासारख्या प्रसंगी अवजड व उचलून सज्य करण्यास कठीण अशा धनुष्याची योजना करीत. द्रौपदीच्या स्वयंवरप्रसंगी मत्स्ययंत्राचा भेद करण्यासाठी असे खास धनुष्य द्रुपदाने ठेवले होते. कर्ण व अर्जुन या दोघांनाच ते धनुष्य सज्य करता आले.

धनुष्याच्या दोन्ही टोकांना शिंगाचे किंवा धातूचे बोंड बसवीत. जे धनुष्य द्वितीयेच्या चंद्रकोरीप्रमाणे दोन्ही टोकांना निमुळते आणि वजनात हलके, ते उत्तम मानीत. धनुष्याचा मध्यभाग कमानदार असे व त्याचे तीन भाग असत. धनुष्याची दोरी प्रामुख्याने गायीच्या किंवा बैलाच्या आतडयाची बनवीत. तिच्या आघाताने हाताला व मनगटाला इजा पोचू नये, म्हणून चामडयाचे मणिबंध मनगटावर व बोटावर बांधीत. हे मणिबंध घोरपडीच्या किंवा मृगाच्या चामडयाचे असत. तरीही त्या दोरीच्या आघाताचे घट्टे धनुर्धरांच्या मनगटांवर पडतच असत. धनुष्य रिकामे ठेवायचे असेल, त्या वेळी त्याची दोरी एका टोकापासून सोडून ठेवीत. प्रत्यंचा कानापर्यंत ओढून बाण सोडीत. म्हणून त्याला कर्णयोनी असे नाव पडले आहे.

बाण हा धनुष्याचा प्राण मानीत. इंद्राच्या वज्रापासून बाणाची उत्पत्ती झाली, असे शतपथ ब्राह्मणात सांगितले आहे (१.२.४.६). बाण हा संपूर्ण पोलादाचा किंवा वेताचा बनवीत. त्यासाठी वेत चांगला कमावून तयार करीत व त्याला सोनेरी रंग देत. क्वचित त्याच्यावर सोन्याचे जडाव कामही करीत. काहीजण त्यावर आपले नावही कोरीत असत. बाणाचे टोक शिंगाचे किंवा धातूचे करीत. त्याच्या मागच्या टोकाला बगळा, हंस, मोर, ससाणा, इ. पक्ष्यांची पिसे लावीत. पिसामुळे त्याचा वेग आणि टप्पा वाढत असे. बाणाला कधी ज्वालाग्राही पदार्थही माखीत. मग गतीमुळे त्याचे हवेशी घर्षण होऊन तो पदार्थ पेट घेत असे. त्यामुळे शत्रुसैन्यावर अग्निवर्षाव होई. कधी कधी बाणाच्या अग्राला विषारी पदार्थ लावीत. त्यामुळे जखमेत विष भिनून शत्रूला मृत्यू येत असे. धनुष्याचा आकार जितका व्यवस्थित तितका बाण लांब आणि उंच जाई.

धनुर्वेदात बाणाचे उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीन प्रकार सांगितले आहेत. उत्तम बाणाचा दंड बारा मुष्टी, मध्यमाचा अकरा मुष्टी व कनिष्ठाचा दहा मुष्टी लांब असे. बाण सोडताना हाताच्या अंगठ्याचे विशेष महत्त्व असे. म्हणूनच एकलव्य अर्जुनाच्या वरचढ होऊ नये, या हेतूने द्रोणाचार्यांनी त्याच्याकडे त्याच्या अंगठ्याची गुरुदक्षिणा मागितली होती.

कौटिल्याने बाणांचे वेणू, शर, दंडशर, शलाका व नाराच असे पाच प्रकार सांगितले आहेत. नाराच हा पोलादी असून, त्याला पाच अग्रे व पाच पिसे असत. नाराचाचा कौशल्याने उपयोग करणारे योद्धे श्रेष्ठ समजले जात.

प्राचीन काळी धनुर्विद्येचा आरंभ करतांना धनुर्वेदोपनयन नामक संस्कार करण्याची प्रथा होती. त्याचा विधी असा— पहिल्या दिवशी कुंडमंडप करून पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध, इ. कृत्ये करणे. वेदीवर पर्यंक ठेवून, त्यावर धनुष्यबाणांची स्थापना व पूजा करणे. नंतर होम, दान व अन्नसंतर्पण. रात्री मंत्रजागर, स्तोत्रपठण, वीरगीते व मर्दानी खेळ. दुसऱ्या दिवशी धनुर्दान हा मुख्य विधी असतो. त्यात शिष्य आचार्याला वंदन करून धनुर्वेद शिकविण्याविषयी प्रार्थना करतो. नंतर आचार्य धनुष्यबाणांचे अभिमंत्रण करून ते शिष्याला देतो व आशीर्वाद देऊन उपदेश करतो. शेवटी वाद्यांच्या गजरात हा संस्कार समाप्त होतो.

धनुर्विद्या हे शास्त्र प्राचीन काळी फार प्रगत झाले होते. धनुर्धारी पुरुष बाणाच्या वेगावर नियंत्रण तर ठेवीतच; शिवाय, ते त्याची दिशाही बदलू शकत. श्रीराम आणि अर्जुन हे धनुर्धरांत श्रेष्ठ गणलेले आहेत. प्रतिबिंब पाहून लक्ष्यवेध करणे, शब्दवेध करणे, इ. कितीतरी चमत्कार धनुर्विद्येत पारंगत असलेले वीर करून दाखवीत. दशरथाने श्रावण या कुमाराला शब्दवेधी बाणानेच मारले, अशी कथा आहे. शिहाबुद्दीन घोरीचा शब्द ऐकून अंध पृथ्वीराजाने शब्दवेधी शरसंधानाने त्याचे मस्तक उडवले, असे चंदबरदाईने आपल्या पृथ्वीराजरासो या काव्यात लिहून ठेवले आहे.

काही देव-मानवांच्या धनुष्यांना विशिष्ट नावे आहेत. अर्जुनाच्या धनुष्याचे नाव गांडीव असे होते. ते खांडववनदाहाच्या वेळी अग्नीने त्याला दिले. विष्णूच्या धनुष्याचे नाव शार्ङ्ग, रामचंद्राच्या धनुष्याचे नाव कोदंड आणि शिवाच्या धनुष्याचे नाव पिनाक असे आहे.

पूर्वी प्रेत पुरताना त्याच्याबरोबर त्याचे धनुष्यही पुरण्याची चाल होती. पण पुढे प्रेतावर माती लोटण्यापूर्वी ते काढून घेऊ लागले, असे ऋग्वेदावरून कळते (ऋ. १०.१८.९).

प्राचीन काळी असुर, इजिप्शियन, पार्थियन, इराणी, इ. लोकांतही धनुष्य-बाणांचा प्रचार होता. बंदुकी प्रचारात येईपर्यंत एक प्रभावी शस्त्र म्हणून धनुष्य-बाणालाच महत्त्व होते. सांप्रत मात्र वन्य व पहाडी लोकच त्याचा उपयोग करतात.

मूर्तिकलेत एक आयुध म्हणून धनुष्य सर्वसाधारणपणे प्रत्यंचा व बाण यांच्यासह ते मूर्तीच्या डाव्या हातात दाखवतात. काही शिल्पांत आयुधपुरुषरूपी धनुष्य आढळते. [श. कृ.; पु. वि.; वे. इं.; डे. हिं. इ.; वे. रा. द.; ऋ. द.]

**धनुर्वेद** धनुर्विद्येचे बोधक शास्त्र. धनुर्वेद हा यजुर्वेदाचा उपवेद आहे, असे चरणव्यूहात सांगितले आहे. मधुसूदनसरस्वतीने आपल्या प्रस्थानभेद नामक ग्रंथात धनुर्वेदाची माहिती पुढीलप्रमाणे दिली आहे –

हा ग्रंथ विश्वामित्राने रचला असून, त्याचे चार पाद आहेत. दीक्षापाद, संग्रहपाद, सिद्धपाद व प्रयोगपाद अशी त्यांची नावे आहेत. पहिल्या पादात धनुष्याचे लक्षण व त्याच्या अधिकाऱ्याचे निरूपण आहे. धनुः हा शब्द इथे चतुर्विध आयुधांचा वाचक आहे. मुक्त, अमुक्त, मुक्तामुक्त व यंत्रमुक्त असे आयुधांचे चार प्रकार आहेत. मुक्त म्हणजे चक्रादी, अमुक्त म्हणजे खड्गादी, मुक्तामुक्त म्हणजे शल्यादी व यंत्रमुक्त म्हणजे शरादी होय. त्यांपैकी मुक्ताला अस्त्र व खड्गाला शस्त्र असे नाव आहे. अस्त्राचे ब्राह्म, वैष्णव, पाशुपत, प्राजापत्य, आग्नेय, इ. अनेक भेद आहेत. साधिदैवत अशा चतुर्विध आयुधांवर क्षत्रिय कुमार व अनुयायी यांचा अधिकार असून, त्यांचे पदाती, रथारूढ, गजारूढ व तुरगारूढ असे चार प्रकार आहेत. या सर्व गोष्टींशिवाय दीक्षा, अभिषेक, शाकुन, मंगलकरण, इ. गोष्टीही प्रथम पादात वर्णिल्या आहेत. दुसऱ्या पादात आचार्याचे लक्षण व निरनिराळ्या अस्त्रशस्त्रांची नावे दिलेली आहेत. तिसऱ्या पादात सांप्रदायिक शस्त्रे, त्यांचा अभ्यास, मंत्र, देवता, सिद्धी, इ. गोष्टी वर्णिल्या आहेत. चौथ्या पादात देवार्चन, अभ्यास, सिद्ध अस्त्रांचा प्रयोग, इ. बाबींचे निरूपण आहे.

वैशंपायनाने लिहिलेलाही एक धनुर्वेद आहे. लोक प्रथम शस्त्र म्हणून तलवारीचा उपयोग करीत आणि धनुष्याचा प्रचार नंतरच्या काळात पृथू राजाच्या वेळी झाला, असे त्यावरून कळते.

पं. धनराज शास्त्रींनी धनुर्वेदाच्या एका ग्रंथाची श्लोकसंख्या साठ हजार असल्याचे सांगितले आहे. हाच यजुर्वेदाचा उपवेद होय, अशी त्यांची धारणा आहे. या ग्रंथाविषयी त्यांनी दिलेली माहिती अशी –

स्वायंभुव मन्वंतरातील कृतयुगात शिवाने हा ग्रंथ रचला. यात परमाणूपासून शस्त्रे व अस्त्रे कशी निर्माण करावी, ते सांगितले आहे. शब्दशक्तीने किंवा मंत्रसामर्थ्याने चालते, ते अस्त्र व जे हाताने चालवले जाते, ते शस्त्र होय. यात अनेक प्रकारची धनुष्ये, बाण, शक्ती, पट्टिश, भृशुंडी, शतघ्नी, भिंडिपाल, कुलिश, खड्ग; तसेच पाशुपत, ब्रह्म, शिव, इ. अस्त्रे अशी नाना प्रकारच्या शस्त्रास्त्रांची माहिती आहे. यात एकशे आठ अध्याय आहेत.

धनुष्प्रदीप नामक द्रोणाचार्यकृत सात हजार श्लोकांचा एक ग्रंथ असून, त्याची रचना महाभारताच्या आधी झाली, असे सांगितले आहे. याशिवाय धनुषचंद्रोदय नावाचाही साठ हजार श्लोकांचा एक ग्रंथ असून, परशुरामाने वैवस्वत मन्वंतराच्या त्रेतायुगात तो रचला, असे म्हटले आहे. हे दोन्ही ग्रंथ उपलब्ध नाहीत. धनुर्वेदासंबंधी युद्धजयार्णव, युक्तिकल्पतरू, इ. अनेक शास्त्रीय ग्रंथ उपलब्ध आहेत; पण प्रयोगाभावी ते शास्त्र हळूहळू नष्ट झाले. [श. क.; हिंदुत्व]

**धनुष्कोटी** एक तीर्थक्षेत्र. रामेश्वर बेटाच्या अगदी दक्षिणेकडील टोकाशी हे स्थान आहे. हिंदी महासागर (महोदधी) व बंगालचा उपसागर (रत्नाकर) यांचा इथे संगम होतो. इथूनच रामाने लंकेपर्यंत सेतू बांधला होता, असे म्हणतात. रावणाचा वध करून राम अयोध्येला परत निघाला असता बिभीषणाने त्याची प्रार्थना केली, की तो सेतू मोडून टाकावा; नाहीतर प्रतापी भारतीय सम्राट लंकेवर पुन्हा पुन्हा आक्रमण करण्यासाठी त्याचा उपयोग करतील. तेव्हा रामाने आपल्या धनुष्याच्या टोकाने (कोटी) तो सेतू मोडून सागरात बुडवून टाकला. म्हणून त्या स्थानाला धनुष्कोटी असे नाव मिळाले. आजही त्या जागी प्रचंड पाषाणांची एक मोठी रांग आढळते. स्कंद पुराणात या सेतूचे माहात्म्य वर्णिले आहे, ते असे – हे तीर्थ मोक्षप्रद आहे. या तीर्थात स्नान केल्यामुळे ब्रह्महत्या, सुरापान, गुरुशय्यागमन, इ. महापातकांचा नाश होतो; तसेच दारिद्र्य नष्ट होऊन सर्व कामनाही पूर्ण होतात.

भाविक लोक इथे समुद्रस्नान करून पिंडदान करतात. काही लोक सुवर्णधनुष्याचे दानही करतात. इथे छत्तीस प्रकारचा स्नानविधी सांगितला आहे. स्नानापूर्वी हातांत वाळूचा पिंड व कुशदर्भ घेऊन कृत्या नामक राक्षसीची अनुमती घ्यावी लागते आणि तिला वाळूचा पिंड अर्पण करावा लागतो. आषाढ व माघ मासांत इथे स्नान करणे विशेष पुण्यप्रद मानले आहे. सूर्यग्रहण व चंद्रग्रहण या प्रसंगी इथे स्नान केल्याने पितृऋण व देवऋण फिटते. [सी इं. (म. आं.); कल्याण-तीर्थांक]

**धनू** मेषादी गणनेतली नववी राशी. मूळ, पूर्वाषाढा व उत्तराषाढांचा पहिला चरण ही नक्षत्रे धनुराशीत येतात. वरचा भाग धनुर्धारी मनुष्य व खालचा भाग अश्व, अशी धनुराशीची मूर्ती कल्पिलेली आहे. ही राशी द्विस्वभाव, शीर्षोदय, सुवर्णवर्ण, पर्वतसंचारी व महान शब्द करणारी मानलेली आहे. गुरू हा हिचा स्वामी असून, ही पूर्व दिशेची स्वामिनी आहे. हिला अग्निराशी असेही म्हणतात. या राशीची प्रकृती उष्ण आणि पित्तमय आहे, असे मानले जाते.

या राशीत जन्म घेणारा मनुष्य रागीट, जलद बोलणारा,



धनू राशी – एक सांकेतिक चित्र

कलाकुशल, पुण्यकृत्ये करणारा, प्राज्ञ, सुखी व धनवान होतो, असे जातकचंद्रिकादी ग्रंथांत सांगितले आहे. [ श. क. ]

**धन्नाभगत** (इ. स. चे १५ वे शतक) उ. भारतातील एक संतकवी. हा जातीने जाट असून, राजस्थान मधील धुआन गावचा रहिवासी होता. शेती हा याचा परंपरागत व्यवसाय होता. त्याच्या या व्यवसायासंबंधी संतचरित्रकार नाभाजीने आपल्या भक्तमालेत एक आख्यायिका दिली आहे, ती अशी––

धन्नाने एकदा पेरणीसाठी काही धान्य खरेदी केले; परंतु घरी जाताना वाटेतच ते गरीब दुबळ्यांना वाटून टाकले. पण आश्चर्याची गोष्ट ही, की काही न पेरताच त्याच्या शेतात धान्य उगवले.

धन्ना हा मूळपासूनच संसाराविषयी विरक्त होता. कबीर, नामदेव, इ. संतांची वाणी श्रवण करून त्याला हे वैराग्य आले होते. तो सदैव भगवद्भजनात रंगलेला असे. शीखांचा एक गुरू अर्जुनदेव याने याच्या भक्तीची प्रशंसा केली आहे.

शीखांच्या ग्रंथसाहेबात याची चार पदे समाविष्ट केलेली आहेत. धन्नाच्या भाषेवर खडीबोली आणि राजस्थानी भाषा यांचा प्रभाव दिसतो. [ उ. भा. सं. प.; सू. ब्र. सा. ]

**धन्यव्रत** एक काम्य व्रत. याला धन्य प्रतिपदाव्रत असेही म्हणतात. मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला या व्रताचा प्रारंभ करतात. व्रतावधी आठ महिने. या दिवशी उपवास करून रात्री अग्नीचा प्रतिनिधी म्हणून विष्णूची पूजा व होम करतात. नंतर यवापासून तयार केलेले अन्न तुपाबरोबर खातात. कृष्ण पक्षातही असाच विधी करावा, असे सांगितले आहे. उद्यापनाच्या वेळी रक्त वस्त्र आणि रक्त पुष्पे यांनी अग्नीच्या सुवर्णप्रतिमेची पूजा करतात. मग ती मूर्ती गुणी व तेजस्वी ब्राह्मणाला दान देतात. फल – सुखसमृद्धीची प्राप्ती आणि पापनाश. [ हि. ध.; कृ. क. त. ]

**धन्व** एक प्राचीन जनपद. राजस्थानची मरुभूमी किंवा मारवाड या प्रदेशाचे प्राचीन नाव धन्व असे होते. पाणिनीने धन्व शब्दाचा अर्थ मरुभूमी किंवा वाळवंट असाच दिला आहे. धन्व प्रदेशाच्या पश्चिमेला असलेल्या सिंध प्रांताच्या पूर्व भागाला पारकर असे नाव आहे. राजस्थानच्या मरुभूमीपलीकडे असलेल्या प्राचीन सौवीर (आधुनिक सिंध) देशातून आलेल्या व्यापारी मालाला पारे धन्वक असे म्हणत असावे. पंजाबातील अटक जिल्ह्याचे प्राचीन नाव आष्टक धन्व असे होते. सांप्रत त्याला धन्नी म्हणतात. हा अपभ्रंश धन्व शब्दावरूनच झाला आहे. [ पा. का. भा. ]

**धन्वंतरी** (१) देवांचा वैद्य आणि विष्णूचा एक अवतार. समुद्रमंथनाच्या वेळी जी चौदा रत्ने समुद्रातून बाहेर आली, त्यांत धन्वंतरीचा समावेश आहे. त्याच्या उत्पत्तीविषयी वाल्मीकिरामायणात उल्लेख आहे, तो असा –

ततो निश्चित्य मथनं योक्त्रं कृत्वा च वासुकिम्।
मन्थानं मन्दरं कृत्वा ममन्थुरमितौजसः॥
अथ वर्षसहस्रेण आयुर्वेदमयः पुमान्।
उदतिष्ठत् सुधर्मात्मा सदण्डः सकमण्डलुः॥
(वा. रा. बाल. ४. १८–१९)

अर्थ– तेव्हा (देवासुरांनी क्षीरसागराचे) मंथन करण्याचे ठरवून वासुकीचा दोर आणि मंदराचलाची रवी यांच्या साह्याने क्षीरसागराचे मंथन केले. त्यानंतर एक हजार वर्षांनी (समुद्रमंथनातून) सुधर्मात्मा व आयुर्वेदमय असा पुरुष (धन्वंतरी) दंडकमंडलुसहित बाहेर आला.

वाल्मीकिरामायणात धन्वंतरी हा वैद्यराज असून, त्याच्या हातातील कमंडलू अमृताने भरलेला असतो, असे म्हटले आहे (वा. रा. बाल. ४१. २९). धन्वंतरीच्या उत्पत्तीची ही कथा महाभारत, हरिवंश, वायू पुराण, तसेच आयुर्वेदविषयक सुश्रुतादी ग्रंथ यांतही आलेली आहे.

सुश्रुताचा टीकाकार डल्हण याने धन्वंतरी या नावाची व्युत्पत्ती दिली आहे, ती अशी –

' धनुः शल्यशास्त्रं, तस्य अन्तं पारं इयर्ति गच्छतीति धन्वंतरिः ' जो शल्यशास्त्रपारंगत आहे, तो धन्वंतरी होय.

या व्युत्पत्तीच्या आधारेच पुढे शल्यतंत्रज्ञ वैद्यांना धन्वंतरी अशी संज्ञा प्राप्त झालेली दिसते. धन्वंतरीला आदिदेव,

अमरवर, अमृतयोनी, सुधापाणी, अब्ज, इ. अन्य नावेही आहेत.

याच्याच अलौकिक प्रतिभेने नाना औषधींचे सार अमृताच्या रूपाने देवांना प्राप्त झाले आणि ते जरा-मृत्युरहित बनले. त्याचमुळे त्याला देवांचे वैद्यराजपद लाभले. धन्वंतरीने चिकित्सेचे ज्ञान भास्करापासून प्राप्त केले आणि भास्कराच्या आयुर्वेद संहितेच्या आधारे चिकित्सातत्त्वविज्ञान तंत्र नामक ग्रंथ रचला, अशी पारंपारिक माहिती आहे.



धन्वंतरी (विष्णूचा अवतार)

भागवत पुराणात विष्णूच्या चौवीस अवतारांत धन्वंतरीचा समावेश केलेला आहे (१. ३. १७). विष्णूच्या अवताराची प्रतिष्ठा लाभल्यामुळे वैष्णव मूर्तिसंभारात धन्वंतरीच्या मूर्तीला स्थान मिळाले आणि शिल्पग्रंथांत त्याच्या मूर्तीची लक्षणे ग्रथित झाली. हेमाद्रीने चतुर्वर्ग चिंतामणीमध्ये याचे मूर्तिध्यान सांगितले आहे, ते असे—

धन्वन्तरिः सुकर्तव्यः सुरूपः प्रियदर्शनः ।
करद्वयगतश्चास्य सामृतः कलशो भवेत् ।।

अर्थ— धन्वंतरीची मूर्ती सुंदर दिसेल अशी करावी आणि त्याने दोन हातांत मिळून अमृताचा कलश धारण केला आहे, असे दाखवावे.

शिल्परत्न नामक ग्रंथानुसार हा तेजस्वी व चतुर्भुज असून, त्याने पीतवस्त्र परिधान केलेले असते. त्याचा एक हात अभय मुद्रेत असतो आणि उरलेल्या तीन हातांत कमल, अमृतघट व शल्ययंत्र ही आयुधे असतात. काही शिल्पग्रंथात शंख, चक्र, अमृतघट व जळू ही याची आयुधे सांगितली आहेत.

याच्यासाठी ईशान्य दिशेकडे मुख करून सायंप्रार्थना करावी, असे सांगितले आहे. [आ. इ.; हिं. मा.; पु. वि.; श. क.]

(२) एक प्राचीन वैद्य. हा आद्य धन्वंतरीचाच पुनरावतार समजला जातो. पुराणातील वंशावळीनुसार याचा जन्म काशीच्या चंद्रवंशी राजकुलात झाला. सुहोत्र-काशिक-दीर्घतपा-धन्वंतरी अशी याची वंशपरंपरा हरिवंशात दिलेली आहे (१. ३२. १८-२२). काही पुराणांत हा दीर्घतपाचा पौत्र आणि धन्वापुत्र मानलेला आहे.

हा आयुर्वेदाचा प्रवर्तक मानला जातो. याने भरद्वाजाकडून आयुर्वेदज्ञान प्राप्त करून त्याची अष्टांग विभागणी केली आणि ते ज्ञान आपल्या अनेक शिष्यांना दिले. पुराणांनी त्याला विद्वान, सर्वरोगप्रणाशन, महाप्राज्ञ, वाग्विशारद राजर्षी, इ. विशेषणांनी गौरविले आहे. याच्या नावावर चिकित्सादर्शन, चिकित्साकौमुदी, योगचिन्तामणी, सन्निपातकलिका, गुटिकाधिकार, धातुकल्प, अजीर्णामृतमंजरी, रोगनिदान, वैद्यचिन्तामणी, विद्याप्रकाशचिकित्सा, धन्वंतरीनिघंटू, वैद्यकभास्करोदय व चिकित्सासारसंग्रह हे तेरा ग्रंथ आहेत. यांपैकी काही ग्रंथ उपलब्ध झाले आहेत.



धन्वंतरी (प्राचीन वैद्य)

या धन्वंतरीचा प्रपौत्र काशीराज दिवोदास यालाही धन्वंतरी हेच बिरुद लाभले होते. पाहा—आयुर्वेद. [आ. इ.; पु. इं.]

**धम्मपद** एक सुविख्यात बौद्ध ग्रंथ. हा पाली भाषेत आहे. भगवान गौतम बुद्धाने बुद्धत्वप्राप्तीच्या क्षणापासून महापरिनिर्वाणापर्यंत वेळोवेळी अनेकांना सांगितलेल्या ४२३

गाथांचा हा संग्रह आहे. या गाथा २६ वग्गांमध्ये (वर्गांमध्ये) विभागलेल्या आहेत.

या ग्रंथात बुद्धविचारांचे सारसर्वस्व ग्रथित झालेले असल्यामुळे त्याला बौद्ध जगतात अपरिमित प्रतिष्ठा लाभलेली आहे. तसेच यातील विचारांना सर्वव्यापक आणि शाश्वत असे स्वरूप असल्यामुळे बौद्धेतर जगातही हा ग्रंथ मान्यता पावला आहे.

या छोटयाशा ग्रंथात अन्य बौद्ध ग्रंथांप्रमाणे यज्ञयागादींची आणि इतर आत्मक्लेशात्मक साधनांची निंदा केलेली असून, शीलावर जोर दिलेला आहे. हे शील समाधी आणि प्रज्ञा यांतून विकसित होत असल्यामुळे समाधी आणि प्रज्ञा या विषयांचेही वर्णन त्यात आलेले आहे.

धम्मपदाचा प्रारंभ मानसिक शुद्धीच्या विचाराने झालेला आहे. सर्व वाईट गोष्टींपासून दूर राहा, जे चांगले आहे, त्याचाच संग्रह करा आणि मन शुद्ध राखा, ही धम्मपदाची बैठक आहे (गा. १८३). मनःशुद्धीविषयीची त्यातली एक गाथा अशी –

**मनो पुब्बङ्गमा धम्मा मनो सेट्ठा मनोमया।**
**मनसा चे पसन्नेन भासति वा करोति वा।**
**ततो नं सुखमन्वेति छाया व अनपायिनी॥**

(धम्मपद २)

अर्थ – मन हे सर्व प्रवृत्तींचे पुरोगामी आहे. मनच त्यांच्यामध्ये श्रेष्ठ आहे. सर्व प्रवृत्ती मनातूनच उत्पन्न होतात. जर कोणी प्रसन्न मनाने भाषण केले अथवा कार्य केले, तर कधीही साथ न सोडणाऱ्या छायेप्रमाणे सुख त्याच्या मागून येते.

ही गाथा यमकवग्गातली आहे. हा वग्ग आत्मसंयमाची महती गाणारा आहे. अप्पमादवग्गात अप्रमादाचे महत्त्व वर्णिले आहे. याचप्रमाणे पाप, क्रोध, मल, निरय, तृष्णा, इ. विषयांवरही स्वतंत्र वग्ग आहेत. काही वग्गांची नावे काव्यमय आहेत. उदा० पुप्फवग्ग (पुष्पवर्ग). या वग्गात पुष्पाला आलंबन करून सांगितलेल्या गाथा असून, त्यांत सदाचारसुगंधाचा गौरव गायिला आहे.

बुद्धाने अनेक गाथांतून एक तत्त्व प्रभावी स्वरात सांगितले आहे, ते असे–'सर्व वस्तू क्षणिक आहेत, दुःखाने भरलेल्या आहेत. म्हणूनच त्या आपल्या नाहीत. वस्तूंच्या केवळ बाह्य रूपावर आकर्षित न होता, त्यांची दुःखद बाजूही लक्षात घ्यावी'.

तृष्णेचा म्हणजे आसक्तीचा अंत केल्यानेच दुःखाचा अंत होईल, असे बुद्धाने स्वानुभवजन्य आत्मविश्वासाने म्हटले आहे. लोभ, ईर्ष्या, भ्रांती, इ. दोष अग्नीप्रमाणे भयंकर आहेत आणि मनुष्याने जर त्यांच्यावर विजय प्राप्त केला नाही, तर त्या दोषांनी मानवी जीवनाची राखरांगोळी होऊन जाईल आणि निर्वाणाची प्राप्ती होणार नाही, असा इशारा बुद्धाने दिला आहे.

सुखी जीवनाच्या प्राप्तीसाठी बुद्धाने धम्मपदात मध्यम मार्गाचा पुरस्कार केला आहे. इंद्रियविलासांत रत होणे अथवा आत्मक्लेश करून घेणे, ही दोन्ही टोके टाळून मानवाने मध्यम मार्गाचा अवलंब करावा, असे त्याचे म्हणणे आहे.

मानव हाच स्वतःच्या जीवनाचा शिल्पकार आहे; तो स्वतःच आपले जीवन सुखी अथवा दुःखी बनवीत असतो, असे या ग्रंथात स्पष्टपणे प्रतिपादिले आहे. पापातून मुक्त होऊन साधनेच्या मार्गावर वाटचाल करण्यासाठी मानवाला त्याच्या स्वतःशिवाय अन्य कोणीही साहाय्य करणारा नाही; तसेच स्वतः बुद्धही इष्ट मार्गाकडे अंगुलिनिर्देश करण्यावाचून अन्य कसलेही साहाय्य करीत नाही, असे सांगून बुद्धाने मानवाचा आत्मविश्वास जागवण्याचा यत्न केला आहे. शांती आणि अहिंसा यांनी युक्त असे जीवन, हा धम्मपदाचा जीवनादर्श आहे. जगातील अशांती आणि हिंसा यांवर विजय मिळविण्याचा बुद्धाने जो उपाय सांगितला आहे, तो असा–

**अक्कोधेन जिने कोधं असाधुं साधुना जिने।**
**जिने कदरियं दानेन, सच्चेन अलिकवादिनं॥**

(धम्मपद २२३)

अर्थ – क्रोधाला अक्रोधाने जिंकावे, असाधूला साधुतेने जिंकावे, कृपणाला दानाने जिंकावे व असत्य भाषण करणाऱ्याला सत्याने जिंकावे.

अखेरच्या ब्राह्मणवग्गात 'ब्राह्मण कोण ? याविषयीचे विचार बुद्धाने मांडले आहेत. त्यांतील एक महत्त्वाची गाथा अशी–

**यो दुक्खस्स पजानाति इधेव खयमत्तनो।**
**पन्नभारं विसञ्ञुत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं॥**

(धम्मपद ४०२)

अर्थ – जो याच जन्मात आपल्या दुःखविनाशाचा मार्ग जाणतो, जो आपला सर्व भार उतरून टाकतो आणि जो आसक्तिरहित असतो, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतो.

धम्मपद अशा प्रकारच्या शाश्वत आणि सर्वव्यापक विचारांनी भरलेले असल्यामुळे आणि त्या विचारांची अभिव्यक्ती सहजसुंदर शैलीत केलेली असल्यामुळे त्याचे अनुवाद प्राचीन काळी चिनी, तिबेटी, इ. भाषांत आणि सांप्रत जगातील बहुतेक महत्त्वाच्या भाषांत झाले आहेत. दक्षिण आशियातील बौद्धधर्मीय देशांत प्रत्येक तरुण भिक्षू धम्मपद मुखोद्गत करतो आणि त्याचा नित्य पाठ करतो.

धम्मपदातील प्रत्येक गाथा बुद्धाने कुठे, कुणाला व कोणत्या संदर्भात सांगितली, याचे विवरण करणारा धम्मपदट्ठकथा

(धम्मपदार्थकथा) नामक ग्रंथ सिंहली भाषेत होता. त्याचा पाली अनुवाद अर्थकथाचार्य भदन्त बुद्धघोष महास्थविर याने केली आहे. त्यातील एक कथा अशी –

श्रावस्तीमध्ये चुंदसूकरिक नावाचा एक गृहस्थ राहत होता. त्याने जीवनभर सूकर (डुकरे) मारले आणि अखेरीस तो सूकराप्रमाणेच ओरडत मृत्यू पावला. त्याच्या या पापकर्मामुळे त्याला अवीची नामक नरक प्राप्त झाला. जेव्हा भिक्षूंना हे कळले, तेव्हा त्यांनी भगवान बुद्धाला त्याविषयी विचारले. बुद्ध भिक्षूंना म्हणाला, की ' हे भिक्षूंनो, प्रमत्त मनुष्य हा प्रव्रजित असो अथवा गृहस्थ असो; दोन्ही ठिकाणी तो शोकच पावतो.' एवढे बोलून बुद्धाने पुढील गाथा उच्चारली –

**इधं सोचति पेच्च सोचति पापकारी उभयत्थ सोचति ।**
**सो सोचति सो विहञ्ञति दिस्वा कम्मकिलिट्ठ मत्तनो ।।**
(धम्मपद १३)

अर्थ – (प्रमत्त मनुष्य) इहलोकात शोक करतो आणि परलोकातही शोक करतो. पापी दोन्ही ठिकाणी शोक करतो. तो आपल्या अमंगल कर्मांकडे पाहून शोक करतो आणि पीडित होतो.

धम्मपदट्ठकथेत अशा प्रकारची गाथांची कथात्मक स्पष्टीकरणे असल्यामुळे त्या ग्रंथाच्या साहाय्याने धम्मपदातील प्रत्येक गाथेचा केवळ संदर्भच नव्हे, तर आशयही सहजपणे उलगडू शकतो. [ धम्मपद; पा. सा. इ.; आजकल, डिसेंबर १९५६ ]

**धम्मपाल** (इ. स. चे ५ वे शतक) बौद्ध धर्मावर पाली भाषेत ग्रंथ लिहिणारा एक विद्वान टीकाकार. तमिळनाडमधील वदरितित्थ (वदरतीर्थ) नामक विहारात याचे वास्तव्य होते. याचा जन्म दक्षिण भारतातच झाला असावा. याचे शिक्षण लंकेत अनुराधापूर येथे झाले, असे कळते. अट्ठकथाकार म्हणून याची ख्याती आहे. बुद्धघोषाने खुद्दक निकायमधील काही विषयांवर अट्ठकथा लिहिल्या होत्या. उरलेल्या ग्रंथांवरच्या कथा लिहून धम्मपालाने बुद्धघोषाचे अपुरे कार्य तडीस नेले. उदान, इतिवुत्तक, विमानवत्थु, पेतवत्थु, थेरीगाथा व चरियापिटक या ग्रंथांवर धम्मपालाने या कथा लिहिल्या असून, त्यांना परमत्थदीपनी असे संयुक्त नाव आहे. याच्या अट्ठकथा सिंहली ग्रंथावरही आधारित असून, त्या कामी काही तमिळ ग्रंथांचाही आधार त्याने घेतला असणे संभवनीय वाटते.

धम्मपालाचे ग्रंथ धार्मिक व ऐतिहासिक या दोन्ही दृष्टींनी फार महत्त्वपूर्ण आहेत. त्याची विवेचनशैली असामान्य असून, पारिभाषिक शब्दांचे विवरण त्याने अत्यंत सरस व सोप्या भाषेत केले आहे. त्याने बुद्धघोषकृत विसुद्धिमग्ग या ग्रंथावर परमत्थमंजूसा नामक टीका, लीनत्थवण्णना, लीनत्थपकासिनी आणि बुद्धदत्तकृत मधुरत्थविलासिनीवर टीका असे ग्रंथ रचले आहेत. [ गु. सा. इ.; एन्सा. रि. ए.; पा. सा. इ.; आजकल वार्षिक अंक, डिसेंबर १९५६ ]

**धम्मसंगणी** बौद्ध अभिधम्मपिटकातील पहिला व सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ. हा प्रश्नोत्तररूपात असून, त्यात बौद्ध धर्माच्या तत्त्वांचे संकलन व संक्षिप्त विवेचन केलेले आहे. आरंभी मातिका नामक विषयसूची आहे. मुख्य ग्रंथाची चार कांडे केलेली आहेत. चित्तुप्पादकंड, रूपकंड, निक्खेपकंड व अत्थुद्धारकंड अशी त्यांची नावें आहेत. पहिल्या दोन कांडांत मानसिक व भौतिक जगताच्या विविध अवस्थांचे कुशल, अकुशल व अव्याकृत असे तीन वर्ग पाडून, त्यांचे विश्लेषण केले आहे. मातिकेत एकूण १२२ विषय दिले आहेत, त्यांतील पहिला विषय वरील दोन कांडांत आलेला आहे. त्या विवेचनाचा सारांश आणि उरलेल्या १२१ विषयांचे विवेचन तिसऱ्या व चौथ्या कांडांत आहे. अभिधम्म साहित्यात हा ग्रंथ सर्वश्रेष्ठ मानला जातो. पाहा – अभिधम्म. [ पा. सा. इ. ]

**धरणीकंप** पृथ्वीच्या पोटात काही उत्पाती घटना घडतात व त्यामुळे तिचा पृष्ठभाग हादरतो, त्याला धरणीकंप असे म्हणतात. या धरणीकंपाचे केंद्रस्थान बहुधा समुद्रात असते. अधिक भाराने जमिनीचे थर तुटतात किंवा तिच्या पृष्ठभागाचा संकोच होतो, इ. धरणीकंपाची अनेक शास्त्रीय कारणे सांगितली जातात. मात्र त्याविषयी लोकांच्या ज्या समजुती आहेत, त्या पुढीलप्रमाणे –

शेषाने आपल्या सहस्रफणांवर पृथ्वीचा भार वाहिला आहे. त्या भारामुळे त्याला थकवा येतो व तो घालविण्यासाठी तो जेव्हा अंग झाडतो, तेव्हा भूकंप होतो. शेषाची एखादी फणा हालते, एखादा केस गळून पडतो, तेव्हाही भूकंप होतो. पृथ्वीवर पाप वाढले, म्हणजेही भूकंप होतो. शेषाच्या खाली एक कासव आहे. त्यालाही एका बेडकाचा आधार आहे. हा बेडूक अंग हालवतो, तेव्हाही भूकंप होतो. नंदीच्या शिंगावर पृथ्वी राहिली आहे. तो जेव्हा तिला या शिंगावरून त्या शिंगावर घेतो, तेव्हाही भूकंप होतो.

भूकंपाच्या वेळी भाविक लोक पुढील अरिष्टाच्या शमनार्थ पृथ्वीची पूजा व दानधर्म करतात.

**धरणींद्र** जैनांचा एक शासनदेव. हा पार्श्वनाथाचा सेवक किंवा पार्श्वरक्षक आहे. अहिच्छत्रा नगरींत पार्श्वनाथ वास्तव्याला आला असता, कमठ नावाच्या दानवाने

त्याच्यावर मुसळधार पर्जन्यवृष्टी सुरू केली. त्या वेळी धरणींद्राने पार्श्वनाथाच्या मस्तकावर आपले फणाछत्र उभारून त्याचे रक्षण केले. दुसऱ्या एका प्रसंगी भूतानंद नामक असुराच्या उपद्रवापासूनही याने पार्श्वनाथाचे रक्षण केले, अशी कथा आहे.

धरणींद्र हा नागराज आहे. कृष्णवर्ण, चतुर्भुज व मस्तकावर फणाछत्र असलेली अशी याची मूर्ती करतात. परंपरागत समजुतीप्रमाणे धरणींद्र हा भैरव आहे व पद्मावती ही शासनदेवी भैरवी आहे. त्या दोघांना दंपती मानले आहे. [ जै. म. पृ. ]

**धरणीधर** (१) एक क्षेत्र. पश्चिम लोहमार्गाच्या पालनपूर-कंडला फाटयावरील भामर स्टेशनापासून या क्षेत्राला जावे लागते. प्राचीन काळी या क्षेत्राला वराहपुरी असे नाव होते. इथे वराहाची एक प्रचंड मूर्ती होती, पण मुसलमानांनी तिचा नाश केला. नंतर त्या भग्न मूर्तीच्या जागी लोक शाळिग्रामाची पूजा करू लागले. इथे जांघेश्वर नावाचे एक शिवमंदिरही आहे. तिथले शिवलिंग प्राचीन वराहमूर्तीच्या जांघेपासून बनविले आहे, अशी तिथल्या लोकांची श्रद्धा आहे. आता तिथे चतुर्भुज नारायणमूर्तीची स्थापना झाली आहे. [ कल्याण – तीर्थांक ]

(२) उ. भारतातील एक तीर्थ. हे तीर्थ मथुरेपासून अठरा मैलांवर आहे. वेसवा हे याचे वर्तमान नाव होय. हे तीर्थ म्हणजे पृथ्वीचे नाभितीर्थ होय, अशी समजूत आहे. विश्वामित्राची ही यज्ञभूमी होती, असे सांगतात. तिथल्या यज्ञकुंडाच्या जागी आता जे एक सरोवर बनले आहे, त्याला विश्वामित्र सरोवर असे म्हणतात. या यज्ञकुंडाचे खोदकाम चालू असताना तिथे अनेक शाळिग्राम, दोन मूर्ती, जळक्या सुपाऱ्या व नारळ मिळाल्याचे सांगतात.

या सरोवराच्या काठी अनेक शिवमंदिरे आहेत. शिवाय हनुमानाचेही एक प्राचीन मंदिर आहे. धरणीधरेश्वर महादेवाचे मंदिर हे इथले प्रमुख मंदिर होय. इथे एक राम मंदिर व एक कालीचे मंदिरही आहे. [ कल्याण – तीर्थांक ]

**धरणीव्रत** एक काम्य व्रत. कार्तिक शुद्ध एकादशीला या व्रताचा प्रारंभ करून उपवास करतात. त्या दिवशी चार कोपऱ्यांत चार कलश स्थापून त्यांत तीळ व सोने घालतात. त्यांच्या मध्यभागी नारायणाची मूर्ती स्थापून तिची पूजा करतात. रात्री जागरण करतात. दुसऱ्या दिवशी यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालून उद्यापन व पारणा करतात. फल – आरोग्य, समृद्धी व विष्णुलोक यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**धरणे** कर्जाऊ दिलेले द्रव्य वसूल करण्यासाठी धनकोने देणेकऱ्याच्या दारात बसून राहणे याला धरणे असे म्हणतात. ही चाल भारतात प्राचीन काळापासून चालत आली आहे. मनूने देखील तिचा उल्लेख केला आहे (८.४९).

आपल्या दोन्ही गालांत सळई खुपसून ऋणकोच्या दारात नाचणे, दारात लाकडांची रास रचून तिच्यावर आपली गाय अथवा पारडू किंवा वृद्ध माता यांना बसवून तो ढीग पेटवून देण्याची धमकी देणे, इ. अनेक उग्र प्रकार या धरण्यात असतात. या अघोरी प्रकारांना घाबरून देणेकरी धनकोचे द्रव्य परत करतो.

कथासरित्सागरात शंभर दिनार नावाची एक कथा असून, तिच्यात धरणे धरण्याचा उल्लेख आहे.

**धरणे-पारणे** एक व्रत. पाहा – धारण-पारण व्रत.

**धरतीमाता** धरित्री किंवा भूमी ही आपली माता आहे, अशी भावना प्राचीन काळापासून भारतीय जनांच्या मनात वसत आहे. मातृभूमी म्हणजे केवळ माती, दगड, झाडे, नद्या यांनी बनलेली जड वस्तू नसून, ती एक सजीव स्त्री आहे, ती सर्वांना अन्नपाणी देऊन त्यांचे पालन पोषण करते, तिच्या आधारानेच सर्व लोक जगतात, जीवनाचा उपभोग घेतात आणि मृत्यूनंतरही तीच सर्वांना आश्रय देते, अशी तिच्याविषयी सर्वांची धारणा आहे. म्हणूनच वैदिक आर्यांनी विविध प्रकारे तिचे वर्णन व स्तवन केले आहे. त्यांनी तिला देवताही मानले आहे. ऋग्वेदात मेधातिथी काण्व हा ऋषी धरतीमातेची प्रार्थना करताना म्हणतो –

हे पृथिवी, तू आम्हांवर प्रसन्न हो. तुझ्यापासून कोणालाही उपसर्ग पोचत नाही. तू आपल्या पृष्ठभागावर सर्वांचाच समावेश करतेस, तर आम्हांस सौख्यातिशय प्राप्त करून दे (ऋ. १. २२. १५).

अथर्ववेदातल्या पृथ्वीसूक्तात धरतीमातेला पुढील भावपूर्ण प्रार्थना केलेली आढळते–

हे विश्वंभरे पृथिवी, तुझे प्रिय गान आम्ही गात आहो. तू विश्वधात्री माता आहेस. तू आपल्या पुत्रांसाठी पयस्वती होऊन सदैव दुग्धधारा सोडणारी हो. हे कल्याणविधात्री, तू क्षमाशील आणि विश्वगर्भा आहेस. तू नेहमी आपल्या प्राणमय स्पर्शाने आमचे मनोभाव शुद्ध करणारी आहेस (अथर्व. १२.१).

आदिवासी लोकही धरतीला आपली माता मानतात व तिची अनेक प्रसंगी पूजा करतात. त्यांच्या जीवनात धरतीमातेला विशेष स्थान असते. घराचा पाया खणताना भूमातेला उपद्रव

होतो, म्हणून ते घरात प्रवेश करण्याच्या वेळी तिची पूजा करतात. विवाहसमारंभात तिला संतुष्ट करतात. प्रसूतीच्या वेळीही तिला शरण जातात. गुराखी लोक नवीन व्यालेल्या गाईची पहिली धार धरतीला अर्पण करतात. बैगा लोक मद्यपान करण्यापूर्वी थोडे मद्य भूदेवीला अर्पण करतात. काही आदिवासी लोक जमिनीत नांगर खुपसणे, हेही पाप समजतात.

बंगाल व आसाममध्ये धरतीमातेची जत्रा वर्षा ऋतूच्या प्रारंभी भरते. त्या वेळी ती रजस्वला असते अशी त्यांची समजूत आहे. म्हणून शेतकरी पावसाळ्याच्या प्रारंभी काही ठराविक दिवसांत आपली शेतीची सर्व कामे बंद ठेवतात. द्रविड लोक पेरणी, लावणी, कापणी, मळणी या प्रसंगी धरतीमातेचा उत्सव साजरा करतात. त्या प्रसंगी ते तिला कोंबडयाबकऱ्यांचे बळी देतात. काही आदिवासी लोकांत वसंत ऋतूच्या प्रारंभी धरतीदेवी व भूमियादेव यांचे लग्न लावण्याचीही चाल आहे.

मनुष्याची उत्पत्ती धरतीपासून झाली, ही कल्पना आदिवासींच्या अनेक कथांत आढळते. विधात्याने मातीपासून मनुष्य निर्माण केला, असे काही कथांत म्हटले आहे. मृत बालकाचा देह जमिनीत पुरला असता त्याच्या आत्म्याला धरतीपासून नवा देह प्राप्त होईल, अशी कल्पना काही लोकांत आहे. भूमीची उत्पादक शक्ती व स्त्रीची जननक्षमता यांतील साधर्म्य पाहून मनुष्याने स्त्री-पुरुषांची जननेंद्रिये व त्यांचे मीलन यांची भूमातेच्या सुफलतेशी सांगड घालण्याचा प्रयत्न केला आहे. प्रत्येक भाषेत त्यासंबंधी द्व्यर्थी शब्द व रूपके आढळतात. स्त्रीला संतती व्हावी म्हणून कृषिकर्मांचा तोडगा करतात आणि जमिनीतून भरपूर पीक यावे म्हणून लैंगिक क्रियांचा प्रयोग करतात. धरतीमातेच्या उत्सवात स्त्री-पुरुष नैतिक निर्बंध शिथिल करून वागतात, त्याच्यामागे प्रजोत्पादनाचीच आकांक्षा असते.

धरतीमातेचे अभिनंदन आणि सौंदर्यवर्णन भारतीय लोकसाहित्यात अनेक ठिकाणी केलेले आहे. ही गीते सार्वकालिक आणि सार्वलौकिक आहेत. ऋग्वेदातल्या आणि अथर्ववेदातल्या पृथ्वीसूक्तापासून त्यांचा आढळ होतो.

भारतीय लोकगीतांतून जल, स्थल, वृक्षवल्ली, फूलफळ, हिरवी शेते आणि समृद्ध धान्यलक्ष्मी, इ. प्रकारांसह धरती मातेचे वर्णन केलेले आढळते. त्याचबरोबर आई जशी मुलाला सर्वतोपरी सांभाळते, तसेच धरतीमातेनेही सर्व लेकरांना धनधान्य देऊन सांभाळावे, सुखी ठेवावे, अशीही आकांक्षा त्यात असते. ऋतुपरत्वे धरतीमातेच्या देहावर होणारे बरे-वाईट परिणामही त्यात चित्रित केलेले असतात. महाराष्ट्रात स्त्रियांनी रचलेल्या ओव्यांत वर्षा ऋतूत दृष्टिगोचर होणारे धरतीमातेचे स्वरूप पुढीलप्रमाणे चित्रित केलेले आढळते–

पाऊस पडतो । पडतो काळाकुट्ट ।
धरणीमाता हिरवा जोट । पांघुरली ।।
पाऊस पडतो । थांबेना पागोळी ।
धरणीमाय हिरवी चोळी । घालीतसे ।।
झाडे झडाडती । विजा कडाडती ।
धरणीमाये तुझा पती । येत आहे ।।

एका बुंदेली लोकगीतात धरतीमातेविषयी पुढील पंक्ती आढळतात–

धरतीमाता तो में दो भये, इक आंधी इक मेय ।
मेय के बरसे साखा भई, जा में लिपट लगे संसार ।

अर्थ– हे धरतीमाते, तुझ्यापासून दोन वस्तू उत्पन्न झाल्या– धुके आणि मेघ. मेघ बरसल्यामुळे शेती उगवते. त्यावर समस्त संसाराचे जीवन अवलंबून आहे.

धरतीच्या या उत्पादक व पोषक रूपाप्रमाणेच तिचे एक विनाशक रूपही लोकसाहित्यात दिसून येते. पृथ्वी मृतांना पोटात घेते, त्यामुळे तिच्या ठायी एक विशेष मायिक शक्ती निर्माण होत असते. ती शक्ती संहारक असून, तिचा केव्हा उद्रेक होईल याचा नेम नसतो. धरतीच्या त्या संहारक शक्तीमुळेच रोगराई उत्पन्न होते. विविध प्रकारच्या ग्रामदेवता ही तिचीच रूपे आहेत. या ग्रामदेवतांमध्ये सात बहिणींची प्रतिष्ठा सर्वत्र विशेष आहे. गोंडांच्या एका कथेत धरतीमातेची अनेक रूपे सांगितली आहेत. सफेत धरती, काळी धरती, लाल धरती, डोम धरती, डमार धरती, छुट्टुल (रजस्वला), धर्मी (मंगल करणारी), पापी, दुधिया, भूलन, चमकन, उदनी इ. त्यांची नावे आहेत. मात्र त्यांतील मंगल असे मातृरूपच अधिक लोकप्रिय आहे. पाहा – पृथ्वी. [ने. नॉ. इं.; एन्सा. रि. ए.; श्रीमती दुर्गा भागवत – नवभारत, नोव्हेंबर १९५९; ध. गा. है]

**धरनीदास** (इ. स. चे १७ वे शतक) एक हिंदी संतकवी व धरनीश्वर संप्रदायाचा प्रवर्तक. बिहार प्रदेशातल्या छापरा जिल्ह्यातील मोंझी नामक गावी एका कायस्थ कुळात याचा जन्म झाला. याचे मूळ नाव गैबी असे होते. चकिया गावातील एका कायस्थ मुलीशी याचा विवाह झाला. पित्याच्या अकाली मृत्यूने याच्या मनात वैराग्य संचारले आणि त्याने सेवानंद नामक एका योग्याकडून संन्यासदीक्षा घेतली. त्यानंतर तो गावाबाहेर एका झोपडीत राहू लागला. पण तिथेही समाधान लाभेना, म्हणून त्याने मुझफरपूर जिल्ह्यातील पाते गावी जाऊन विनोदानंद नामक एका साधूचे शिष्यत्व पत्करले.

तिथून तो परत स्वग्रामी आला व ईश्वरचिंतनात काळ घालवू लागला. शेवटी गंगा-शरयूच्या संगमावर त्याने देह ठेवला.

धरनीदासाने भोजपुरी व हिंदी भाषेत प्रेमप्रकाश, शब्द-प्रकाश आणि रत्नावली हे तीन ग्रंथ रचले आहेत. याशिवाय बोधलीला व महराई या दोन छोटया काव्यकृतीही याच्या नावावर आहेत. प्रेमप्रकाशात जीवात्मा व परमात्मा यांच्या मीलनाची कथा सूफी शैलीत सांगितली आहे. रत्नावलीत आपली गुरुपरंपरा सांगून अनेक नाथ सिद्धांचा परिचय दिला आहे. शब्दप्रकाश ही याची प्रौढ रचना आहे. यात अनेक धार्मिक सिद्धांत विवरून सांगितले आहेत.

याच्या आध्यात्मिक मतांवर कबीराचा मोठा प्रभाव आहे. सर्वत्र परमेश्वर भरून राहिला असला, तरी मनाच्या तळमळी-वाचून त्याचे दर्शन होणार नाही, असे त्याने सांगितले आहे. यात्रा, तपश्चर्या, मूर्तिपूजा, इ. बाह्याचार यांचा निषेध करताना तो म्हणतो –

**जीव समुझि परबोधहू हो, भैया जनि जानहु खेलबाड ।**
**जा दिन लेखवा पसरिहे हो, भैया करबहि कवन उपाय ।**
**मंत्र सिखाइ कवन सिधि हो, भैया जंत्र जुगुति नहि काम ।**
**नहिं षट् करम करम कटि हो, भैया अवर करम लपराई ।**
**ऐहि बिसवास बिगरव ना हो, भैया देव दहिल दहिनाय ।**
**धरनी जन गुन गावल हो, भैया भजु लेहु आतम राम ।**

अर्थ – हे मित्रा ! सर्व जीवमात्रांच्या ठिकाणी परमेश्वर आहे, असे समजून तू त्यांच्याशी वर्तन कर. कोणाला कमी लेखू नकोस. ज्या दिवशी परमेश्वर तुझ्या कर्मांचा पाढा वाचील, त्या दिवशी तू (स्वतःच्या बचावासाठी) कोणता उपाय करणार आहेस ? मंत्रामुळे तुला कोणती सिद्धी प्राप्त होणार आहे ? विज्ञान तुला मदत करणार नाही. षट्कर्मांचा आचार केल्याने तू कर्मांपासून दूर न जाता त्यातच गुरफटला जाशील. म्हणून हे मित्रा, (सर्वत्र परमेश्वर आहे) यावर तू विश्वास ठेव. तसे केल्यास परमेश्वर तुझ्या जवळच आहे. म्हणून धरनीधर म्हणतो, की हे मित्रा, तू परमात्म्याचे भजन कर.

धरनीदासाने बिहारमध्ये पारसामठ, सहानामठ, इ. अनेक मठ स्थापन केले. सकलानंद, सदानंद व शिवानंद हे त्याचे प्रमुख शिष्य होत. [ हिं. सा. वि.; सारण गॅझे.; हिं. सा. बृ. इ.; मो. क. का.; मे. मि. इं.; हिं. सा. को. २; भा. सं. म. ]

**धरसेन** (इ. स. चे २ रे शतक) एक प्रसिद्ध जैन आचार्य. सौराष्ट्रातील गिरनार पर्वताच्या चंद्रगुफा नामक गुहेत हा ध्यानधारणा करीत राहत असे. जैन धर्माच्या भवितव्याचे चिंतन करीत असता आपल्या पश्चात श्रुत ज्ञानाचा लोप होईल, अशी त्याला भीती वाटली, म्हणून त्याने महिमा नगरीच्या मुनिसंमेलनाला पत्र लिहून तिथून दोन मुनी आपल्याकडे बोलावून घेतले. पुष्पदंत व भूतबली अशी त्यांची नावे होती. त्यांच्या बुद्धीची परीक्षा करून धरसेनाने त्यांना जैनांचे सिद्धान्तग्रंथ शिकविले.

वरील गुहेत दोन खंडित शिलालेख सापडले आहेत; ते क्षत्रपवंशी रुद्रसिंह, प्रथम, याचे असावे. त्यांत कोण्या महान जैनाचार्याच्या तपस्येविषयी काही शब्द आहेत, ते धरसेनाचार्या-विषयीच असावे असे वाटते. धरसेनाने तिथेच समाधी घेतली असावी, असे अनुमान आहे. [ जै. ध.; भा. सं. जै. यो. ]

**धराव्रत** एक काम्य व्रत. पृथ्वीला उद्देशून हे व्रत करायचे असते. व्रतावधी एक वर्ष. सर्व उत्तरायणकालात केवळ दूध पिऊन राहायचे, असा याचा विधी आहे. उद्यापनाच्या वेळी पृथ्वीची सुवर्णमूर्ती करून ती दान देतात. फल – रुद्रलोक-प्राप्ती. [ हि. ध.; पु. इं. ]

**धर्म** (१) मानव्यविद्येतील एक संज्ञा. धृ = धारण करणे, या धातूपासून धर्म शब्द बनला आहे. याची व्याख्या अशी – 'धरति लोकान् ध्रियते पुण्यात्मभिः इति वा' = जो लोकांना धारण करतो किंवा जो पुण्यात्म्या पुरुषांकडून धारण केला जातो, तो धर्म होय. पण एवढया एका व्याख्येवरून धर्म म्हणजे काय, याची स्पष्ट कल्पना येणार नाही. धर्म शब्दाच्या अर्थामध्ये कालमानाप्रमाणे कित्येक परिवर्तने झाली आहेत. ही परिवर्तने व अर्थांतरे लक्षात येण्यासाठी ऋग्वेदा-पासूनच प्रारंभ करायला हवा.

ऋग्वेदात धर्म शब्द किमान छप्पन्न वेळा तरी आला आहे. कित्येक ठिकाणी तो विशेषण आहे, तर कित्येक ठिकाणी नाम आहे. धर्म शब्द आपण पुंलिंगी वापरतो; पण ऋग्वेदात तो नपुंसकलिंगीही आढळतो (ऋ. १०.९०.१६). धृ धातूचा अर्थ आधार देणे, उचलून धरणे किंवा टिकवणे असाही आहे. त्या अर्थानेही ऋग्वेदात काही मंत्र आढळतात. 'पितुं नु स्तोषं महो धर्माणं तविषीम्' = मी आता (सोमाच्या) पोषक तत्त्वाचे स्तवन करीन (ऋ. १.१८७.१). इथे धर्म शब्द 'पोषण करणे' या अर्थी आला आहे. 'धर्माणमग्निं विदथस्य साधनम्' = अग्नी हा समाजाचा पोषणकर्ता व यज्ञाचा साधक आहे (ऋ. १०.९२.२). इथे धर्म शब्द पालन करणे या अर्थी आला आहे. काही ठिकाणी धर्म शब्दाचा अर्थ नैतिक कायदे व आचार असाही आहे (ऋ. १.२२.१८.; ५.२६.६.; ८.४३.२४. इ.). धर्म म्हणजे प्राचीन नीतिनियम असाही अर्थ ऋग्वेदात आढळतो

(ऋ. ३.१७.१; ३.३.१). काही ठिकाणी आचाराची 'निश्चित तत्त्वे' असाही अर्थ धर्म शब्दाला प्राप्त झालेला असून, तो पुढील काळातील धर्मशास्त्रीय व्याख्यांना जवळचा आहे. उदा० –

**आप्रा रजांसि दिव्यानि पार्थिवा**
**श्लोकं देवः कृणुते स्वाय धर्मणे।**

(ऋ.४.५३.३)

अर्थ – याने सर्व दिव्य लोक व भूलोक व्यापून टाकले. या देवाने स्वतःच्या धर्माच्या (आचारनियमांच्या) उत्कर्षासाठी प्रार्थनास्तोत्र रचून दिले.

**द्यावापृथिवी वरुणस्य धर्मणा विष्कभिते अजरे भूरिरेतसा।**

(ऋ. ६.७०.१)

अर्थ – वरुणाच्या नीतिनियमाने (धर्मणा) द्यावा-पृथिवी जे आपापल्या ठिकाणी सावरून धरलेले आहेत, ते कधी झिजत नाहीत व त्यांची उत्पादनशक्तीही कमी होत नाही.

आचाराची निश्चित तत्त्वे किंवा नियम, असा धर्म शब्दाचा अर्थ वाजसनेयी संहितेत 'ध्रुवेण धर्मणा' या शब्दांनी स्पष्ट झाला आहे (वा. सं. २.३). अथर्ववेदातल्या एका मंत्रात 'धार्मिक आचाराने मिळणारे पुण्य' असाही त्याचा अर्थ दिला आहे (अथर्व. ११.९.१७).

छांदोग्योपनिषदात 'चार आश्रमांची विशिष्ट कर्तव्ये' या अर्थाने धर्म शब्द आलेला आहे. तो मंत्र असा –

**त्रयो धर्मस्कंधा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एवेति द्वितीयो ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयोऽत्यंन्तमात्मानमाचार्यकुलेऽवसादयन् सर्व एते पुण्यलोका भवन्ति ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेति।**

(छां. उ. २.२३)

अर्थ – धर्माचे तीन स्कंध (शाखा, खांदे) आहेत. यज्ञ, अध्ययन व दान हा पहिला स्कंध (यात गृहस्थाश्रमाचा समावेश होतो). उग्र तपश्चर्या हा दुसरा स्कंध (यात वानप्रस्थाश्रम सूचित होतो) व आचार्य कुलात राहणारा ब्रह्मचारी आणि आपल्या गुरूच्या कुटुंबात स्वतः शेवटपर्यंत वास्तव्य करणारा हा तृतीय होय. (यात ब्रह्मचर्याश्रम सूचित होतो). पुण्यवान माणसांना जे लोक प्राप्त होतात, त्या लोकात हे सर्व पुरुष जातात व जो ब्रह्मामध्ये दृढपणे वास करतो, तो अमरत्व पावतो.

धर्म शब्दाच्या अर्थाची वेदोपनिषदांच्या कालातच अनेक परिवर्तने झालेली दिसतात. सरतेशेवटी मानवाचे विशिष्ट अधिकार, कर्तव्ये आणि महत्त्वाच्या जबाबदाऱ्या, तसेच वर्णाश्रमानुसार त्या त्या मनुष्याचे आचरणाचे नियम असा त्याचा अर्थ झाला. तैत्तिरीय उपनिषदात 'सत्यं वद, धर्मं चर' असा जो उपदेश आहे, त्यात धर्म शब्दाचा वरील अर्थ अभिप्रेत आहे (तै. उ. १.११). भगवद्गीतेतल्या 'स्वधर्मे निधनं श्रेयः' (३.३५) या श्लोकात धर्म शब्दाचा अर्थ वर्णाश्रमविहित कर्तव्य असाच आहे. मनुस्मृतीत "ऋषींनी मनूला सर्व वर्णांचे धर्म सांगण्याची विनंती केली," अशा अर्थाचा जो श्लोक आहे (१.२), त्यातही धर्म म्हणजे वर्णाश्रमविहित कर्तव्य असाच अर्थ घेतला असून, याज्ञवल्क्य स्मृतीतही त्याच अर्थाचे अनुसरण आहे. तंत्रवार्तिकातही 'सर्वधर्मसूत्राणां वर्णाश्रमधर्मोपदेशित्वात्' = सर्व धर्मसूत्रांनी वर्णाश्रमांच्या धर्मांविषयी (कर्तव्यांविषयी) उपदेश करण्याची काळजी घेतली आहे, असे म्हटले आहे.

**धर्माची लक्षणे** – धर्माची लक्षणे व आधार कोणते, ते सांगताना मनू म्हणतो –

**वेदोऽखिलो धर्ममूलं स्मृतिशीले च तद्विदाम्।**
**आचारश्चैव साधूनामात्मनस्तुष्टिरेव च।।**

(मनु. २.६)

अर्थ – समग्र वेद, वेद जाणणाऱ्या मन्वादिकांनी निर्मिलेल्या स्मृती, वेदवेत्त्यांचे शील व आचार आणि धार्मिक सज्जनांचा आत्मसंतोष हे धर्माचे मूलाधार होत.

याज्ञवल्क्याने हीच धर्माची मूलस्थाने सांगितली असून, त्यात काही भर घातली आहे, ती अशी –

**श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः।**
**सम्यक्संङ्कल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतम्॥**

(याज्ञ. आचार. १.७)

अर्थ – वेद, स्मृतिसूत्रादी धर्मशास्त्रे, शिष्टांचा किंवा सज्जनांचा आचार, ज्याच्याविषयी विकल्प असेल अशा धर्मानुष्ठानात स्वतःला जे प्रिय वाटेल ते आणि उत्तम संकल्पातून निर्माण झालेला व शास्त्रविरुद्ध नसलेला काम (इच्छा) हे धर्माचे पाच मूलाधार होत.

याज्ञवल्क्य त्यापुढे जाऊन मानवमात्राचा परमधर्म कोणता तेही पुढीलप्रमाणे सांगतो –

**इज्याचारदमाहिंसादानस्वाध्यायकर्मणाम्।**
**अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम्॥**

(याज्ञ. आचार. १.८)

अर्थ – होमहवन, सदाचार, इंद्रियदमन, अहिंसा, दान, वेदशास्त्राध्ययन व शास्त्रोक्त कर्मांचे अनुष्ठान (या सर्व गोष्टी धार्मिकच आहेत.) या सर्वांमध्ये योगाने (ध्यानधारणादी गोष्टींनी चित्ताची एकाग्रता करून) साक्षात आत्मदर्शन करणे हाच सर्वोत्तम धर्म होय.

वरील दोन्ही श्लोकांचा भावार्थ पाहता असे स्पष्ट दिसते

की श्रुती, स्मृती आणि सदाचार हेच धर्माचे मुख्य आधार आहेत.

धर्माची लक्षणे सांगणाऱ्या पुरुषांमध्ये जैमिनी, व्यास व कणाद हे सुप्रसिद्ध आहेत. आपस्तंब, वसिष्ठ, बौधायन, इ. स्मृतिकारांनीही धर्मलक्षणे सांगितली आहेत; पण ती वरील तिघांनी सांगितलेल्या धर्मलक्षणांची पूरक आहेत. म्हणून त्यांचा विचार क्रमाने करणे आवश्यक आहे. त्यांतील जैमिनीने केलेले धर्मलक्षण असे—

चोदनालक्षणोऽर्थो धर्मः।

(जै. सू. १.१.२)

अर्थ – उपदेशाने, आज्ञेने किंवा विधीने ज्ञात होणारा श्रेयस्कर अर्थ (क्रिया) म्हणजे धर्म होय.

चोदना शब्दाचा प्रेरणा हा धात्वर्थ आहे. शाब्दी भावना व आर्थी भावना असे त्या प्रेरणेचे दोन प्रकार असतात. तंत्रवार्तिकात कुमारिलभट्टाने या दोन्ही प्रकारांचे व्यवस्थित विवेचन केले आहे. शाब्दी भावना म्हणजे शब्दाच्या पाठीशी असलेली आज्ञापक शक्ती. अमुक एक क्रिया तुम्ही केलीच पाहिजे किंवा करता कामा नये, असे कोणती तरी लौकिक किंवा अलौकिक वाणी सांगत असते. सामान्य मनुष्यापेक्षा ती वाणी श्रेष्ठ असते. ती अनिष्टनिवारणाचे व इष्टप्राप्तीचे आश्वासन देत असते आणि तिचा अनादर केल्यास ती दंडभयही दाखवते. मीमांसकांच्या मते अशी चोदना देणारी आज्ञापक वाणी म्हणजे वेदच असून, वेदांतील शब्दांच्या ठिकाणीच ही चोदनाशक्ती म्हणजे शाब्दी भावना वास करते. आर्थी भावना म्हणजे अमुकतमुक क्रिया केलीच पाहिजे; कारण त्यात माझे श्रेय आहे, अशा भावनेने उत्पन्न होणारी प्रवृत्ती होय. कर्तव्योन्मुखता म्हणजेच ही आर्थी भावना समजावी. धार्मिक पुरुषांच्या ठिकाणी ही आर्थी भावना वास करीत असते.

जैमिनीची वरील धर्मव्याख्या जगातील सर्व धर्मांना लागू पडण्याजोगी आहे. झरथुष्ट्र, मोझेस, कन्फ्यूशिअस, येशू ख्रिस्त व महंमद पैगंबर यांना ईश्वरी संकेताचा साक्षात्कार झाला आणि त्याप्रमाणे त्यांनी लोकांना उपदेश दिला, अशी त्या त्या धर्मसंस्थांची दृढ श्रद्धा आहे. हा दैवी उपदेश म्हणजेच चोदना होय. श्रेयस्कर आचरण कोणते, हे ठरवण्याचे काम मानवी बुद्धीचे नसून, ते केवळ दिव्य अलौकिक शक्तीचेच आहे, असे सर्व धर्म म्हणतात. या जन्मातील व परलोकातील इष्टांची प्राप्ती व अनिष्टांचा परिहार म्हणजेच श्रेय होय. धर्माने इहलोकी इष्टसिद्धी झाली नाही, तर परलोकी तरी खात्रीने होईल, असे सर्व धर्मग्रंथ माणसाला आश्वासन देतात.

व्यासांनी धर्माचे लक्षण जैमिनीने सांगितलेल्या धर्मलक्षणापेक्षा अगदी निराळ्या भूमिकेवरून केलेले आहे, ते असे –

धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मो धारयते प्रजाः।
यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः॥

(म. भा. शांति. १०९.११)

अर्थ – धारण करीत असल्यामुळे (त्याला) धर्म म्हटले आहे. धर्म हा प्रजांचे धारण करतो. जो धारणसंयुक्त असेल, तो धर्म असा निश्चय आहे.

या व्याख्येत व्यासांनी समाजधारणा हे धर्माचे मुख्य तत्त्व मानले आहे. जैमिनीच्या धर्मविचारात शब्दप्रामाण्य पराकोटीला गेलेले आहे. व्यासांनी मात्र शब्दप्रामाण्याला कित्येकदा कमी महत्त्व दिलेले आहे. ते म्हणतात –

श्रुतिधर्म इति ह्येके नेत्याहुरपरे जनाः।
न च तत्प्रत्यसूयामो न हि सर्वं विधीयते॥

(म. भा. शांति. १०९.१३)

अर्थ – कोणी म्हणतात, श्रुतीतच धर्म सांगितला आहे, तर कोणी म्हणतात, तसे नाही. या बाबतीत आम्हांला कोणत्याही पक्षाबद्दल अभिनिवेश नाही. कारण सगळेच काही श्रुतीत (वेद) सांगणे शक्य नसते.

कणादाने सांगितलेले धर्माचे लक्षण विशेष प्रसिद्ध आहे. ते असे –

यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः।

(वैशे. सू. १.१.२)

अर्थ – ज्या योगे अभ्युदय व निश्रेयस यांची प्राप्ती होते, तो धर्म होय.

ऐहिक उत्कर्ष, पारलौकिक सुख व त्याची साधने एवढे मिळून अभ्युदय समजला जातो. ज्या स्थितीत अनिष्टापेक्षा इष्टच अधिक असते, अशी स्थिती म्हणजे अभ्युदय होय. मोक्ष. शाश्वत किंवा सर्वोच्च साध्य याला निःश्रेयस म्हणतात. ज्या स्थितीत कशाचीच अपेक्षा राहत नाही वा संपूर्ण समाधान होते, अशा स्थितीला निःश्रेयस म्हणावे. ही दोन साध्ये ज्या साधनांनी प्राप्त होतात, तो धर्म समजावा.

कणाद हे वैशेषिक दर्शनाचे स्थापक आहेत. वैशेषिकांच्या मते धर्म म्हणजे प्रत्यक्ष आचरण किंवा क्रिया नव्हे; तर माणसाच्या किंवा कर्त्याच्या आत्म्यावर होणारा अदृष्ट असा शुभसंस्कार किंवा पुण्य परिणाम म्हणजे धर्म होय. याच्या उलट अधर्म म्हणजे असदाचरणाचा पापरूप अदृष्ट परिणाम समजावा. वैशेषिकांच्या या लक्षणात मानवबुद्धीला गम्य असा कर्माचा कार्यकारणभाव गृहीत धरलेला नाही. धर्मक्षेत्र हे मनुष्यबुद्धीला अदृश्य व अगम्य आहे, असेच वैशेषिकांच्या विचारांचे तात्पर्य निघते. वैशेषिकांनी विश्वाच्या स्वभावाची व कार्यकारणभावाची

बौद्धिक उपपत्ती अत्यंत व्यापक रीतीने मांडली असली व त्यामुळे धर्मचर्चेचा बौद्धिक पाया तयार झाला असला, तरी प्रत्यक्ष धर्मचर्चा करताना मात्र त्यांनी अदृष्टाचा त्याग केला नाही.

कणादाच्या वरील व्याख्येतल्या निःश्रेयस शब्दाचा विशेष विचार केला पाहिजे. श्रेयस म्हणजे उच्चतर सुख. ज्याच्याविषयी मनुष्याची आसक्ती असते ती गोष्ट, असाही याचा दुसरा अर्थ असला पाहिजे. मनुष्याची ही आसक्ती सुखाविषयीच असते. म्हणून श्रेयस याचा अर्थ उच्चतर सुख असाच घेतला पाहिजे. यावरून निःश्रेयस म्हणजे अत्यंत उच्चतर सुख असा अर्थ घ्यावा लागतो. या अर्थावरून अतिशय उच्चतर सुखाची प्राप्ती ज्यापासून होईल, ते कर्म धर्म्य असे ठरते. सुखाचा धर्माशी अशा प्रकारे संबंध दाखवणारी अनेक वचने आहेत. त्यांपैकी काही पुढीलप्रमाणे –

**सुखं वाञ्छन्ति सर्वे हि तच्च धर्मसमुद्भवम् ।**
**तस्माद् धर्मः सदा कार्यः सर्ववर्णैः प्रयत्नतः ॥**

(दक्ष स्मृती ३.२३)

अर्थ– सर्वजण सुख इच्छितात आणि ते तर धर्मापासून उत्पन्न होते. म्हणून सर्व वर्णांनी नेहमी प्रयत्नपूर्वक धर्म आचरावा.

**ततो धर्मसमायुक्तः स जीवः सुखमेधते ।**
**इह लोके परे चैव... ...**

(म. भा. अनु. १११.२६)

अर्थ– त्यामुळे धर्मयुक्त जीव इहलोकी व परलोकी सुख मिळवितो.

**अधर्मप्रभवं चैव दुःखयोगं शरीरिणाम् ।**
**धर्मार्थप्रभवं चैव सुखसंयोगमक्षयम् ॥**

(मनु. ६.६४)

अर्थ– प्राण्यांना अधर्मापासून दुःख व धर्मापासून अक्षय सुख प्राप्त होते.

निःश्रेयस कोणाचे, हा यापुढचा विचार होय. हे निःश्रेयस कर्मकर्त्याचे, असाच अर्थ घेतला पाहिजे. धर्माचें साध्य सिद्ध करण्यासाठी झटणे यालाच पुरुषार्थ म्हणतात. या पुरुषार्थाचा खरा मार्ग दाखविण्यासाठीच धर्मशास्त्राची प्रवृत्ती आहे. मनुष्य हा उच्चतर सुखाच्या प्राप्तीसाठी नीचतर सुखाचा पुष्कळ वेळा त्याग करीत असतो. तसा त्याग करावा, अशी त्याला नेहमीच इच्छा असते. त्यावरून उच्चतर सुख हा मनुष्याचा स्वभाव व पुरुषार्थ ठरतो आणि तोच पुरुषार्थ उद्दिष्ट ठरवून शास्त्रकारांनी त्याचा मार्ग दाखवला आहे.

अमके कर्म धर्म्य आणि अमके अधर्म्य याला प्रमाण काय, याचाही विचार केला पाहिजे. याविषयीचा सिद्धान्त असा– ज्याचे फल निःश्रेयस ते कर्म धर्म्य आणि ज्याचे फल दुःख किंवा नीचतर सुख, ते अधर्म्य होय. अमक्या कर्माचे फल निःश्रेयस आहे, दुःख आहे किंवा नीचतर सुख आहे, हे समजण्याचे साधन म्हणजे अनुभव, अर्थात प्रत्यक्ष प्रमाण किंवा अनुमान हेच असले पाहिजे.

प्रत्यक्ष आणि अनुमान यांनी समजणारे धर्माचे स्वरूप अनिश्चित असते. प्रमाणांच्या साहाय्याने धर्माधर्म बिनचूक ठरविण्याला बुद्धीचे जितके कुशलत्व आणि सूक्ष्मत्व लागते, तितके ते सर्वांच्याच ठिकाणी असत नाही. म्हणून अशा लोकांना आयते धर्मज्ञान दुसऱ्याकडून मिळविणे आवश्यक असते. कोणतीही क्रिया करण्याच्या वेळी पुष्कळ माणसे तात्कालिक फलाच्या लोभाने, भीतीने किंवा शक्तीने अधर्माला प्रवृत्त होत असतात. त्यांच्या या अधर्माचरणाचे परिणाम त्यांना व त्यांच्या अनुषंगाने इतरांनाही भोगावे लागतात. त्यांच्या या अधर्मप्रवृत्तीला आळा घालण्यासाठी कृत्रिम मानुषदंड आणि प्रलोभने निर्माण करण्याची व त्या दंड-प्रलोभनांची न्यायाधीशाकडून सतत अंमलबजावणीही करण्याची गरज असते. हे दोन्ही उद्देश साध्य होण्यासाठी अमके कर्म धर्म्य व अमके अधर्म्य, तसेच अमके कर्म केल्यास अमका दंड व अमके केल्यास अमके पारितोषिक, अशा प्रकारच्या निश्चित लक्षणांनी धर्माधर्म समजले पाहिजेत. धर्माचे असे निश्चित स्वरूप समजण्यास ग्रंथ हेच साधन होत, हे उघड आहे. यालाच शब्दप्रमाण असे म्हणतात.

प्रत्यक्ष आणि अनुमान यांवरून प्राप्त होणारे धर्मस्वरूप अनिश्चित असते. या अनिश्चित रूपालाच धर्माचे परोक्ष रूप असेही म्हणता येईल. धर्माच्या निश्चित रूपाला प्रत्यक्ष रूप असे म्हणावे, कारण त्यावरून अमके कर्म धर्म्य किंवा अमके अधर्म्य असे एकदम समजते. धर्माच्या प्रत्यक्ष स्वरूपाचे प्रमाण शब्द किंवा शब्दसमूह म्हणजे ग्रंथ होत. हाच आशय नारदाने पुढील श्लोकात सांगितला आहे–

**सूक्ष्मो हि भगवान् धर्मः परोक्षो दुर्विचारणः ।**
**अतः प्रत्यक्षमार्गेण व्यवहारगतिं नयेत् ॥**

(नारद स्मृ. १.४१)

अर्थ– धर्म हा सूक्ष्म, प्रत्यक्ष न दिसणारा आणि विचार करण्यास कठीण असा आहे. म्हणून धर्माच्या प्रत्यक्ष मार्गाने म्हणजेच शब्दप्रामाण्याचा स्वीकार करून धर्माला व्यवहारात आणावे.

वर ज्याला धर्माचे निश्चित अर्थात प्रत्यक्ष स्वरूप म्हटले, तोच चोदनालक्षण धर्म, असे समजावे. चोदना ही क्रियाप्रवर्तक असते. तिच्या योगे अमुक करावे किंवा न करावे, ते निश्चित रूपाने समजते.

**चोदनालक्षण धर्माचे स्वरूप** – हे सर्वशक्तिमान अशा

ईश्वराने निर्मित आहे, असे बरेच लोक समजतात; म्हणून धर्म कोणता वा अधर्म कोणता, हे तोच निश्चित सांगू शकेल, असे हे लोक मानतात. पण सर्वशक्तिमान याचा अर्थ तरी काय, त्याचा विचार केला पाहिजे. ईश्वर हा जीवनिर्मित वस्तू निर्माण करू शकत नाही, ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. धर्माचे चोदनास्वरूप शब्दाशिवाय निर्माण होऊ शकत नाही आणि शब्द हा मनुष्यनिर्मित आहे, ईश्वरनिर्मित नाही. ईश्वरनिर्मित पदार्थांचे धर्म सर्वत्र सारखे अनुभवाला येतात. त्यांचा इंद्रियांशी संबंध आल्यास प्रत्येक वेळी तोच तो अनुभव येत असतो. उदा० अग्नीचे दाहकत्व, जलाचे शीतलत्व इत्यादी. पण शब्दाचा धर्म जो अर्थ तो मात्र सर्वत्र सारखाच अनुभवाला येत नाही. कोणत्या तरी प्रकारे शब्दार्थ जाणणाऱ्याची मदत मिळाल्याशिवाय शब्दाचा अर्थ समजू शकत नाही. त्याचबरोबर नवेनवे शब्दही मनुष्य निर्माण करतो असेही दिसून येते. यावरून शब्द हा ईश्वरनिर्मित नसून मनुष्यनिर्मित आहे, असे निश्चितपणे सिद्ध होते. शब्दोच्चारासाठी विशिष्ट इंद्रियांची आवश्यकता असते. ईश्वर निरिंद्रिय असल्यामुळे तो शब्द अर्थात धर्माचे चोदनास्वरूप निर्माण करू शकत नाही.

यावर काही लोक असे सांगतात, की वेद हे ईश्वराच्या प्रेरणेने मंत्रद्रष्ट्या ऋषींना स्फुरले व ते त्यांनी इतरांना सांगितले; म्हणून चोदनालक्षण धर्म हा ईश्वरनिर्मित आहे. पण या लोकांनी ईश्वरप्रेरित शब्द कोणते व ईश्वराने अप्रेरित शब्द कोणते, हे समजण्यासाठी त्या दोन शब्दांमधील फरक, ज्याला शास्त्रीय भाषेत विशेष म्हणतात, त्याचा विचार केलेला नाही.

वेद हे धर्माचे मूलाधार असून ते अपौरुषेय व नित्य आहेत, असे म्हणणारेही काही लोक आहेत. शबरस्वामी व त्यांचे अनुयायी मीमांसक हे त्यांमधले प्रमुख होत; पण त्यांची ती खटपट व्यर्थ ठरली आहे. शब्द नित्य व अपौरुषेय ठरले तरी अनेक शब्दांचे वाक्य बनते व अनेक वाक्यांचा ग्रंथ बनतो आणि असे ग्रंथ बनविणारे लोक आपण व्यवहारात पाहतो. त्यामुळे शब्दांच्या नित्यत्वावरून व अपौरुषेयत्वावरून वेदांचे नित्यत्व व अपौरुषेयत्व सिद्ध होऊ शकत नाही. अतएव चोदनालक्षण धर्म हा वेदमूलक असला, तरी तो पुरुषनिर्मित आहे, हे सिद्ध होते. या दृष्टीने पाहता चोदनालक्षण धर्माची उत्पत्ती कशी झाली, ते इतिहासातल्या पुढील दाखल्यांवरून कळून येईल.

गौतम बुद्धाने स्वतः काही धर्मसिद्धान्त सांगितले आणि ते सत्य आहेत, असे मानणारे व तदनुसार वागणारे काही लोक निघाले. अशा रीतीने बुद्धाने सांगितले ते इतरांनी मान्य केल्यामुळे बौद्ध धर्माची उत्पत्ती झाली. यहुदी व इस्लाम हे धर्मही अशाच प्रकारे उत्पन्न झाले आहेत. फरक एवढाच, की मोझेस व मुहंमद यांनी ज्या आज्ञा आपण सांगतो, त्या ईश्वराने आपणांस दिल्या आहेत, असा आधार दिला असून, बुद्धाने तो दिला नाही. ख्रिस्ती धर्माची उत्पत्तीही याच प्रकारची आहे. मोझेस व मुहंमद यांच्यापेक्षा ख्रिस्त थोडे वेगळे सांगतो ते असे, की 'ईश्वराने मला जगदुद्धारार्थ पाठवले आहे.'

वैदिक धर्माच्या उत्पत्तीचा इतिहासही याच पद्धतीचा आहे, असे आपणांस कळून येईल. फरक एवढाच, की वरील तीन्ही धर्म एकेका प्रेषिताने सांगितले आहेत, तर वैदिक धर्म अनेक पुरुषांनी निरनिराळ्या मन्वन्तरांत कथन केला आहे.

त्यावरून असे सिद्ध होते, की जे लोक शहाणे व सत्यवक्ते असतात, त्यांची वचने किंवा जे सत्ताधारी असतात त्यांची वचने हीच चोदनालक्षण धर्माची उत्पत्ती करतात. या चोदनालक्षण धर्माचा निःश्रेयसलक्षण धर्माशी विरोध येऊ नये, याकरिता तो धर्म सांगण्याचा अधिकार शहाण्या व सत्यवक्त्या पुरुषांकडेच असला पाहिजे, हे यावरून उघड होते. जैमिनीचे मतही या विधानाला पोषक आहे, असे दिसून येते. याविषयी त्याचे एक सूत्र असे –

लोके सन्नियमात् प्रयोगसन्निकर्षः स्यात्।

(जै. सू. १.१.२६)

अर्थ – व्यवहारात संतांच्या (ऋषी किंवा सत्यवक्ते शहाणे यांच्या) नियमामुळे म्हणजे अमके शब्द प्रमाणभूत समजावे, अशी मर्यादा संतांनी ठरविल्यामुळे प्रमाणभूत चोदनावाक्यांचा (क्रियाप्रवर्तक वाक्यांचा) संग्रह व्हावा.

आपस्तंब धर्मसूत्राच्या प्रारंभी पुढील तीन सूत्रे आहेत –

(१) अथातः समयाचारिकान् धर्मान् व्याख्यास्यामः।

(२) धर्मज्ञसमयः प्रमाणम्।

(३) वेदाश्च।

अर्थ – आता इथून पुढे ज्यांचा आचार समयापासून उत्पन्न झाला आहे, असे धर्म सांगतो. धर्मज्ञांचा समय प्रमाण आहे व वेद प्रमाण आहेत.

वरील सूत्रातील समय शब्दाचा अर्थ असा – पुष्कळ लोकांनी एका ठिकाणी जमून एकमताने किंवा बहुमताने केलेला निर्णय किंवा ठराव म्हणजे समय होय. धर्मज्ञांच्या अशा समयातून उत्पन्न झालेला धर्म सांगतो, असे म्हणून धर्मज्ञसमय व वेद ही धर्माची दोन प्रमाणे आपस्तंबाने सांगितली आहेत. या दोन प्रमाणांत वेदांच्याही आधी त्याने धर्मज्ञसमयाचा निर्देश केला आहे. धर्मज्ञसमयामुळेच वेदांना प्रामाण्य उत्पन्न झाले, असे आपस्तंबाचे मत दिसते. मनुस्मृतीतील पुढील श्लोकातही आपस्तंबाचेच अनुकरण केलेले आहे, असे दिसते—

विद्वद्भिः सेवितः सद्भिर्नित्यमद्वेषरागिभिः।
हृदयेनाभ्यनुज्ञातो यो धर्मस्तं निबोधत ॥

( मनु. २.१ )

अर्थ– द्वेष व राग या दोषांनी रहित व विद्वान अशा सज्जनांनी सेवन केलेला व त्यांनी मनापासून पसंत केलेला जो धर्म तो तुम्ही ऐका.

राग-द्वेष वियुक्त अशा विद्वानांचे मत हाच धर्माचा मुख्य आधार असून, वेदांचे प्रामाण्यही अशा सज्जन विद्वानांच्या मतांवरूनच निर्माण झाले आहे; असा वरील श्लोकाचा स्पष्टार्थ आहे. यावरून चोदनालक्षण धर्म निर्माण करण्याचा अधिकार सत्यवक्ते व विद्वान असे जे संत-सज्जन त्यांच्याकडेच असला पाहिजे हे सिद्ध होते.

महाभारतातही याच सिद्धान्ताचा सविस्तर अनुवाद केला आहे, तो असा–

ये हि ते ऋषयः ख्याताः सप्त चित्रशिखण्डिनः ॥
तैरेकमतिभिर्भूत्वा यत् प्रोक्तं शास्त्रमुत्तमम् ।
वेदैश्चतुर्भिः समितं कृतं मेरौ महागिरौ ॥
आस्यैः सप्तभिरुद्गीर्णं लोकधर्ममनुत्तमम् ।
मरीचिरत्र्यङ्गिरसौ पुलस्त्यः पुलहः क्रतुः ।
वसिष्ठश्च महातेजास्ते हि चित्रशिखण्डिनः ॥
सप्त प्रकृतयो ह्येतास्तथा स्वायंभुवोऽष्टमः ।
एताभिर्धार्यते लोकस्ताभ्यः शास्त्रं विनिःसृतम् ॥
एकाग्रमनसो दान्ता मुनयः संयमे रताः ।
भूतभव्यभविष्यज्ञाः सत्यधर्मपरायणाः ॥
इदं श्रेयमिदं ब्रह्म इदं हितमनुत्तमम् ।
लोकान् सञ्चिन्त्य मनसा ततः शास्त्रं प्रचक्रिरे ॥
तत्र धर्मार्थकामा हि मोक्षः पश्चाच्च कीर्तितः ।
मर्यादा विविधाश्चैव दिवि भूमौ च संस्थिताः ॥
नारायणानुशास्ता हि तदा देवी सरस्वती ।
विवेश तानृषीन् सर्वान् लोकानां हितकाम्यया ॥

( म. भा. शांति. ३३५. २७–३३ व ३५ )

अर्थ– जे सात चित्रशिखंडी नावाचे ऋषी प्रसिद्ध आहेत, त्यांनी चार वेदांनी युक्त, मेरू नामक महापर्वतावर केलेले व सात मुखांतून निघालेले जे उत्तम शास्त्र एकमताने सांगितले, तोच लोकांचा अत्युत्तम धर्म होय. मरीची, अत्री, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतू व महातेजस्वी वसिष्ठ हेच चित्रशिखंडी होत. हे सात व स्वायंभुव आठवा या सर्वांना मिळून प्रकृती म्हणतात. त्यांच्याकडून लोकांचे धारण होते व त्यांच्यापासूनच शास्त्रे उत्पन्न होतात. दमनशील, संयमयुक्त, एकाग्र मन करून मनन करणारे ( मुनयः ), भूत, वर्तमान व भविष्य जाणणारे, सत्यधर्माचे आचरण करणारे जे हे चित्र-शिखंडी त्यांनी 'हे श्रेय आहे, हे ब्रह्म आहे, हे अत्यंत हितकर आहे,' अशा रीतीने लोकांचा ( लोकांच्या हितांचा ) मनाने विचार करून नंतर शास्त्र केले. त्या शास्त्रात धर्म, अर्थ आणि काम सांगून नंतर मोक्षही सांगितला आहे. तसेच स्वर्गात आणि पृथ्वीवर पाळायच्या मर्यादाही सांगितल्या आहेत. त्यांनी हे शास्त्र सांगितले तेव्हा नारायणाच्या आज्ञेने देवी सरस्वती लोकांचे हित करण्याच्या इच्छेने त्या सर्व ऋषींमध्ये प्रवेश करती झाली.

**चोदनालक्षण धर्माचे प्रामाण्य** – चोदनालक्षण धर्माचे प्रमाण फक्त शब्द हेच होय; पण शब्दानेच जर इतर प्रमाणांना अवकाश ठेवला असेल, तर इतर प्रमाणेही संभवतात. उदा० शब्दाने ज्या कर्माच्या धर्माधर्मत्वाबद्दल सांगितले नाही, तिथे दहा जाणत्यांचा ठराव प्रमाण मानावा, असे शब्दानेच सांगितले असेल, तर ते एक प्रमाण होऊ शकेल. त्याचप्रमाणे परंपरागत आचार, न्यायाधीशाचा निर्णय, इ. गौण प्रमाणेही संभवतील.

प्रमाणभूत अशा शब्दांमध्ये विरोध आल्यास किंवा शब्दाच्या अर्थाबद्दल संशय निर्माण झाल्यास अगर शब्दप्रमाणाने ज्याचा निर्णय होऊ शकत नाही, अशी वेळ आल्यास शब्दाने इतर प्रमाणांना अवकाश ठेवला नसला, तरी केवळ समाजाची गरज म्हणून विद्वत्परिषदेचा निर्णय वगैरे गौण प्रमाणे अस्तित्वात येतात व ती मान्य करावीच लागतात. प्रमाणभूत शब्द हे शहाण्या व सत्यवक्त्या पुरुषांकडून निर्माण झालेले असले, तरी ते मनुष्यनिर्मितच असल्यामुळे त्यांत दोष व अपूर्णता या गोष्टी थोड्याबहुत तरी असणारच. मागील काळाच्या परिस्थितीसाठी केलेले नियम पुढील काळाच्या परिस्थितीत सुखप्रद होत नाहीत, असे दिसून येईल किंवा मनुष्याचे ज्ञान जसजसे वाढत जाईल, तसतसे एकदा निर्माण करून ठेवलेल्या चोदनास्वरूपात दोष व अपूर्णत्व दिसू लागेल. दोष व अपूर्णत्व या गोष्टी वेळच्या वेळी दूर न केल्यास त्यांपासून होणारा वाईट परिणाम दिवसेंदिवस वाढतच जाईल. यासाठी नवीन नवीन प्रमाणभूत शब्दांची उत्पत्ती करणे आणि गौण प्रमाणांना अत्यल्प अवकाश ठेवणे, अशी व्यवस्था वारंवार करावी लागते. त्यामुळेच जे शब्द एकदा प्रमाणभूत ठरले ते 'यावच्चन्द्रदिवाकरौ' प्रमाणभूत ठेवणे ही चूक ठरते. हा प्रमाणविचार जगातील सर्व चोदनालक्षण धर्मांना लागू पडणारा आहे.

वैदिक धर्मालाच लागू पडतील, अशा काही धर्मप्रमाणांचा विचार करताना त्यांमध्ये असलेल्या पौर्वापर्याचाही विचार केला पाहिजे. वेद हे अलौकिक व अपौरुषेय असल्यामुळे ते सर्वांत पहिले धर्मप्रमाण होय. स्मृती यासुद्धा वेदाचा अनुवाद करणाऱ्या असल्यामुळे त्याही धर्मनिर्णयाचे साधन ठरतात. वैदिक

लोकांचे आचारही वेदमूलक असल्यामुळे प्रमाण होत, असे मीमांसक मानतात. स्मृती वेदविरुद्ध असल्यास त्या प्रमाण समजू नयेत. उदाहरणाने ही गोष्ट पुढीलप्रमाणे स्पष्ट करता येईल– मनुस्मृतीत तीन वेद शिकण्याकरिता छत्तीस वर्षेपावेतो गुरूच्या घरी ब्रह्मचर्याने राहावे, असे सांगितले आहे. हे मनुवचन 'कृष्णकेशोऽग्नीनादधीत' = केस काळे असतानाच अग्नीचे आधान करावे, या श्रुतीशी विरुद्ध आहे. कारण आठव्या वर्षी उपनयन होऊन छत्तीस वर्षे ब्रह्मचर्य आचरल्यास वयाच्या चव्वेचाळीसाव्या वर्षानंतर म्हणजे केस पांढरे व्हायला लागल्यानंतर अग्नीचे आधान करावे लागेल. यावरून छत्तीस वर्षांचे ब्रह्मचर्य सांगणारी स्मृती ही व्यामोहामुळे उत्पन्न झाली आहे, असे ठरते व ती अप्रमाण आहे, असे सिद्ध होते.

एखादे विरुद्ध कारण दिसून आल्यासही स्मृती अप्रमाण ठरते. उदा० बौधायन स्मृतीत समुद्रयात्रा केल्याने मनुष्य पतित होतो, असे म्हटले आहे. पण त्या स्मृतीपूर्वी झालेल्या वसिष्ठ व गौतम या स्मृतींत तसे काहीच सांगितले नाही. यावरून बौधायनाच्या स्मृतीला अप्रामाण्य येते. दोन श्रुती किंवा स्मृती तुल्यबल असल्यामुळे त्यांचा विरोध आल्यास विकल्प समजावा, म्हणजे स्वतःच्या मताप्रमाणे त्यांपैकी कोणतीही श्रुती किंवा स्मृती स्वीकारावी, असे गौतम म्हणतो. श्रुती आणि स्मृती यांचा विरोध आल्यास श्रुती प्रमाण समजावी. दोन स्मृतींचा विरोध आल्यास व्यवहारावरून होणारा न्याय बलवान समजावा, अर्थात परंपरागत आचारांना अनुरूप जी स्मृती असेल, ती प्रमाण मानावी, असे याज्ञवल्क्य सांगतो (याज्ञ. २.२१). दोन स्मृतींचा विरोध आल्यास जी स्मृती युक्तीला धरून असेल, ती प्रमाण मानावी, परंतु व्यवहार हा श्रुतिस्मृत्युक्त धर्मापेक्षा बलवान आहे, असे नारद सांगतो (नारद स्मृ. १.४०). 'शास्त्राद् रूढिर्बलीयसी' हे वचनही याच धर्तीचे आहे.

आता जिथे श्रुतीने, स्मृतीने किंवा रूढ आचाराने धर्मनिर्णय होऊ शकत नाही, तिथे काय करावे असा प्रश्न निर्माण होतो. धर्माचार्यांनी त्याची सोडवणूक पुढीलप्रमाणे केलेली आहे–

**अनाज्ञाते दशावरैः शिष्टैरूहवद्‌भिरलुब्धैः प्रशस्तं कार्यम् । चत्वारश्चतुर्णां पारगा वेदानां प्रागुत्तमास्त्रय आश्रमिणः पृथग् धर्मविदस्त्रयः एतान् दशावरान् परिषदित्याचक्षते । असम्भवे त्वेतेषां श्रोत्रियो वेदविद् शिष्टो विप्रतिपत्तौ यदाह, यतोऽयं प्रभवो भूतानां हिंसानुग्रहयोगेषु ॥**

(गौतम स्मृ. २९)

अर्थ– श्रुति-स्मृतींमध्ये ज्याचे धर्माधर्मत्व समजत नाही, त्याबद्दल दहा (किंवा दहापेक्षा जास्त) अलोभी, तर्कशास्त्रज्ञ, व शिष्ट यांना पसंत असेल ते करावे. चार वेदांत पारंगत असलेले चार; ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ या तीन आश्रमांतील (प्रत्येकातील एक) अत्यंत श्रेष्ठ असे तीन आणि धर्मशास्त्रज्ञ तीन या दशावरांना परिषद म्हणतात. इतके न मिळाले तर संशयाच्या वेळी वेदज्ञ, शिष्ट व श्रोत्रिय जे सांगेल ते करावे. कारण तो भूतांची हिंसा करण्यास किंवा भूतांवर अनुग्रह करण्यास अधिकारी आहे.

हाच आशय मनुस्मृतीमध्ये पुढीलप्रमाणे सांगितला आहे–

**अनाम्नातेषु धर्मेषु कथं स्यादिति चेद् भवेत् ।**
**यं शिष्टा ब्राह्मणा ब्रूयुः स धर्मः स्यादशङ्कितः ॥**
**धर्मेणाधिगतो यैस्तु वेदः सपरिबृंहणः ।**
**ते शिष्टा ब्राह्मणा ज्ञेयाः श्रुतिप्रत्यक्षहेतवः ॥**
**दशावरा वा परिषद् यं धर्मं परिकल्पयेत् ।**
**त्र्यवरा वापि वृत्तस्था तं धर्मं न विचालयेत् ॥**

(मनु. १२.१०८-११०)

अर्थ– जे धर्म सांगितले नाहीत, त्याबद्दल कसे करावे, असा प्रश्न असल्यास, शिष्ट ब्राह्मण जो सांगतील तो धर्म निःसंशय समजावा. ज्यांनी वेद व त्याची सर्व अंगे धर्माने (म्हणजे धर्मोक्त रीतीने) माहीत करून घेतली आहेत, ते श्रुती प्रत्यक्ष दिसण्यास कारणीभूत होणारे ब्राह्मण शिष्ट होत. दहा (किंवा दहापेक्षा जास्त) सदाचारसंपन्न लोकांची परिषद किंवा तीन (किंवा तीनपेक्षा अधिक) सदाचारसंपन्न लोकांची परिषद जो धर्म सांगेल, तो धर्म मोडू नये.

**निःश्रेयसलक्षण धर्माचे स्वरूप —** निःश्रेयस अर्थात उच्चतर किंवा आत्यंतिक सुख हे धर्माचे साध्य आहे, हे धर्मलक्षणात सांगितले. त्यासाठी सुखाची थोडी मीमांसा केली पाहिजे.

सुख म्हणजे वासनेचा अभाव होय. जेव्हा सुखाचा अनुभव घडतो, त्या वेळी कोणतीही वासना शिल्लक नसते. हा वासनेचा अभाव वासनेच्या पूर्तीमुळे होतो किंवा वासना कधी उत्पन्न न झाल्यामुळे होतो अथवा चित्ताच्या एकाग्रतेमुळे वासना लुप्त झाल्यामुळे होतो किंवा चित्ताचाच लोप झाल्यामुळे होतो.

या वासनेच्या अभावाचे, निद्रास्थितीतला वासनेचा अभाव आणि जागृतीतला वासनेचा अभाव असे दोन प्रकार आहेत. दोहोंपैकी जागृतीतल्या वासनाभावाची किंमत जास्त आहे. कारण निद्रेत वासनाभावामुळे सुख भासते हे खरे; पण त्या सुखाच्या वेळी 'मी सुखी आहे,' असे भान असत नाही. म्हणून हे सुख कमी प्रतीचे ठरते. जागृतीतल्या वासनाभावाच्या वेळी त्या अभावाचे भान असते. म्हणून जागृतीतला वासनाभाव निद्रेतल्या वासनाभावापेक्षा उच्च आहे आणि म्हणून तेच उच्च

सुख आणि तेच मनुष्याचे प्राप्तव्य आहे, असे ठरते. मनुष्याला हे उच्चतर सुख पुढील तीन प्रकारांनी प्राप्त होत असते—

विषयेंद्रियसंयोगाने प्राप्त होणारे — जसे गोड खाणे, सुस्वर गायन ऐकणे, इष्ट स्त्रीचा सहवास इत्यादी. या गोष्टींपासून क्षणभर का होईना, मन वासनारहित होऊन त्याला सुख प्राप्त होते.

मनातली वासना पूर्ण झाल्याने होणारे — उदा० लोकेषणा, वित्तेषणा, दारेषणा या ईषणा (इच्छा) पूर्ण झाल्याने होणारे सुख.

वासनात्यागाने होणारे — उदा० पुत्रप्राप्तीची किंवा धनप्राप्तीची ज्याला वासना आहे, त्याला त्या गोष्टींच्या प्राप्तीने जे सुख होईल, तेच त्या गोष्टींची वासना टाकून दिल्यानेही होईल. या प्रकारच्या सुखालाच आत्मसुख, नित्यसुख किंवा आनंद अशी नावे आहेत. हे आत्मसुख म्हणजेच उच्च प्रकारचे सुख होय. वासनेच्या अभावामुळेच ते प्राप्त होत असते.

पण हा वासनेचा अभाव मनुष्याला नेहमीच शक्य असतो, असे नाही. भुकेने व्याकुळ झालेल्या माणसाचे चित्त किंवा शारीरिक वेदना भोगीत असलेल्या मनुष्याचे चित्त कधीच वासनारहित होऊ शकत नाही. काही शरीरदुःखांचा परिहार केवळ चित्तनिरोधाने करता येत असला, तरी सर्वच दुःखांचा परिहार त्यामुळे करता येणे शक्य नसते. म्हणूनच गीतेत म्हटले आहे की 'फार खाणारा किंवा मुळीच न खाणारा या दोघांनाही योग (चित्तवृत्तिनिरोध) साधत नाही. तसेच अतिझोपाळू माणसाला व फार जागरण करणाऱ्यालाही तो साधत नाही. तर ज्याचा आहार–विहार माफक आहे, ज्याचे कर्माचरण बेताचे आहे आणि ज्याचे निद्रा व जागरणही परिमित आहे, त्यालाच हा दुःखनाशक योग साधतो' (गीता ६. १६–१७).

म्हणून वासनाराहित्य आणि त्याला आवश्यक असलेले शरीरस्वास्थ्य ही दोन निःश्रेयसलक्षण धर्मांची मुख्य अंगे ठरतात. ही दोन्ही प्राप्त झाल्याशिवाय आत्मसुखाचाही अनुभव येत नाही. विषयांविषयी वैराग्य हे वासनेच्या अभावाला आवश्यक असते. हे वैराग्य विषयांचा अस्थिरपणा, त्यांचे पराधीनत्व आणि आत्मसुख यांचे ज्ञान झाल्याने प्राप्त होते. शरीरस्वास्थ्य हे शरीराला आवश्यक अशा खाणे, पिणे, वस्त्र, निवारा, इ. वस्तू मिळाल्याने प्राप्त होते. या वस्तू तर कर्म केल्यावाचून मिळणे अशक्य आहे. म्हणून ज्ञान व कर्म या दोहोंच्या समुच्चयानेच उच्च सुखाचा किंवा आत्मसुखाचा अनुभव मिळविता येतो. केवळ ज्ञानाने किंवा केवळ कर्माने ही गोष्ट साध्य करून घेऊ असे म्हटले, तर ते शक्य होत नाही. हाच अर्थ ईशावास्योपनिषदात पुढीलप्रमाणे स्पष्ट करून सांगितला आहे—

या जगात जे काही आहे, ते सर्व ईश्वराच्या मालकीचे आहे. शिवाय ते विनाशी आहे. तेव्हा त्या विनाशी वस्तूंचा त्याग करून तुम्ही आत्मानंदाचा अनुभव घ्या. कर्तव्यकर्मे करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी. यावाचून (अर्थात कर्मजनित वासनांपासून) अलिप्त राहण्याचा दुसरा मार्ग नाही. जे नुसत्या कर्माचे सेवन करतात, ते गाढ अंधकारात शिरतात. तसेच जे केवळ विद्येतच रममाण होतात, ते त्याहीपेक्षा गाढतर अशा अंधकारात प्रवेश करतात. विद्या व अविद्या ही दोन्ही एकमेकांसह जाणली पाहिजेत. तशी ती जो जाणतो तो अविद्येने (कर्म) मृत्यूला तरून जातो व विद्येने (ज्ञानवैराग्य) अमृत (आत्मसुख) मिळवतो (ईश. १–११).

यावरून कर्म व ज्ञान ही दोन्ही मिळून आत्मसुखाला कारणीभूत होतात, असे ठरते. यांपैकी कर्मांना प्रवृत्ती म्हणता येईल व ज्ञान आणि तज्जनित वासना यांना निवृत्ती म्हणता येईल. हा प्रवृत्ति-निवृत्तिसंयोग हेच धर्माचे खरे रहस्य आहे. भगवद्गीतेत जे निष्काम कर्म सांगितले आहे, तोही प्रवृत्ति–निवृत्तिसंयोगच आहे.

**धर्मसिद्धांत** — चोदनालक्षण धर्म आणि निःश्रेयसलक्षण धर्म यांचे स्वरूप पाहिल्यानंतर या उभय धर्मांचे काही सिद्धांत प्राचीन आचार्यांनी सांगितले आहेत; त्यांचा विचार पुढीलप्रमाणे करता येईल—

**परार्थ कर्मे** — आता ही कर्मे मनुष्याने स्वतःच करावी किंवा त्यात एकमेकांचे साहाय्य घ्यावे किंवा एकमेकांना साहाय्य करावे, असा प्रश्न उत्पन्न होतो. स्वतःकरिता सर्व कर्मे स्वतःच करावी असे म्हटले असता माणसाला शेती करणे, शेतीची अवजारे तयार करणे, घर बांधणे, कापड विणणे, इ. अनेक कृत्ये स्वतःच करावी लागतील व त्यांपैकी एकही काम त्याला चांगल्या प्रकारे करता येणार नाही. परंतु दुसऱ्या म्हणजे परस्पर साहाय्याच्या मार्गाचे अवलंबन केल्यास प्रत्येकाने एकेकच कर्म करायचे व त्या कर्मांची फळे परस्पर विनिमयाने सर्वांनी वाटून घ्यायची अशी सोय होऊ शकेल. यात प्रत्येकाकडे एकेकच कर्म असल्यामुळे तो ते कर्म करण्यात कुशल होईल व त्याच्या कर्माचे फलही उत्तम प्रकारचे येईल.

यावरून परस्परांनी परस्परांना साहाय्य करून सर्वांचे निःश्रेयस (उच्च सुख) साधावे, हा सिद्धान्त उत्पन्न होतो. धर्माचा बहुतेक भाग याच सिद्धान्ताने व्यापलेला आहे. पति-पत्नींनी एकमेकांच्या साहाय्याने व सहकार्याने एकमेकांचे हित साधावे, हाच विवाहपद्धतीचा उद्देश आहे. पिता-पुत्रांनी किंवा भावाभावांनी परस्परांच्या स्नेहाने व सहकार्याने अभ्युदय साधावा, हाच कुटुंबपद्धतीचा उद्देश आहे. अथर्ववेदात सांमनस्य नावाचे

एक सूक्त आहे. तेही याच विचाराने निर्माण झाले आहे. त्यातले काही मंत्र असे—

अनुव्रतः पितुः पुत्रो मात्रा भवतु संमनाः ।
जाया पत्ये मधुमतीं वाचं वदतु शन्तिवाम् ।।
मा भ्राता भ्रातारं द्विक्षन्मा स्वसारमुत स्वसा ।
सम्यञ्चः सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया ।।
(अथर्व. ३. ३०. २ – ३)

अर्थ – मुलगा बापापासून त्याचे व्रत चालवणारा होवो. तो आपल्या आईशी मन मिळवणी करून राहो. स्त्री ही आपल्या पतीशी गोड व सुखपूर्ण वाणीने भाषण करो. भाऊ भावाचा द्वेष न करो. बहीण बहिणीचा द्वेष न करो. तुम्ही (सगळे) एकमेकांना अनुकूल व एकच व्रत धारण करणारे होऊन कल्याणकारक वाणीने (एकमेकांशी) बोला.

वर्णव्यवस्थेचा उद्देशही प्रत्येक वर्णाने आपापल्या कर्मात नैपुण्य मिळवून परस्परांचे हित साधावे, हाच होता. दानपुष्ट ब्राह्मणांनी आपला सर्व वेळ ज्ञानवृद्धीकडे करावा आणि आपल्या ज्ञानाचा इतर वर्णांना लाभ करून द्यावा, हाच दानाचा उद्देश होता. प्रजांनी कर देऊन राजाचे पोषण करावे आणि राजाने अधार्मिक व उपद्रवी लोकांचा निग्रह करून प्रजांचे पोषण करावे, हा राजा व प्रजा यांचा परस्पर हित-संबंध होता. गुरु-शिष्य, स्वामी-सेवक इत्यादींचे परस्पर संबंधही अशाच प्रकारचे निःश्रेयसाला उद्देशून ठरवण्यात आले होते. भगवद्गीतेत श्रीकृष्णाने हा सिद्धान्त पुढील श्लोकांत स्पष्टपणे प्रतिपादिला आहे–

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ।।
देवान् भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।
परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ।।
इष्टान् भोगान् हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ।।
(गीता ३. १० – १२)

अर्थ – पूर्वी ब्रह्मदेवाने प्रजा उत्पन्न केल्या, त्या यज्ञासह केल्या. ब्रह्मदेव प्रजांना म्हणाला, की या यज्ञाच्या योगाने तुम्ही आपला अभ्युदय साधा. यज्ञ हा तुमचे मनोरथ पूर्ण करणारा होवो. या यज्ञाने तुम्ही देवांची भावना (समृद्धी) करीत चला. ते देवही तुमची भावना (समृद्धी) करतील. याप्रमाणे परस्परांची भावना करीत दोघेही परम श्रेय प्राप्त करून घ्या.

हा परस्पर भावनेचा धर्मसिद्धान्त फारच मोलाचा आहे. हा माणसामाणसांतच लागू पडतो असे नाही, तर तो पशू व मनुष्ये; तसेच कुटुंबे, जाती आणि राष्ट्रे यांमध्येही लागू पडणारा आहे. सिद्धान्ताला अनुरूप असा आचार जसजसा वाढत जाईल, तसतशी या जगात सुखसमृद्धी अवतीर्ण होईल.

अहिंसा व परोपकार – कोणतेही कर्म परस्पर भावनेच्या तत्त्वानुरूप करीत असता अहिंसावृत्तीही अंगी बाणली पाहिजे. शरीर व मन यांचे स्वास्थ्य लाभण्यासाठी व अभ्युदयात इतरांचे सहकार्य मिळविण्यासाठी अहिंसावृत्तीचा निश्चित उपयोग होतो. त्याचबरोबर ही अहिंसा माणसापुरतीच मर्यादित ठेवता कामा नये, तर 'कोण्याही जीवाचा न घडो मत्सर' या तुकारामाच्या उक्तीप्रमाणे ती जीवव्यापी व्हायला हवी. इतर जीवांचीही शक्यतो हत्या टाळली पाहिजे. आपले स्वास्थ्य टिकायला हवे असेल, तर एकंदरीत दुसऱ्यांच्याही स्वास्थ्याचा आणि इतर जीवांच्याही हिताचा विचार करावा लागतो. इतरांचे हित केल्याशिवाय स्वतःचे हित करता येत नाही. इतरांची प्रीती संपादन केल्याशिवाय ते साधत नाही. यालाच परोपकार असे म्हणता येईल.

यावरून परस्पर भावना, अहिंसा व परोपकार असे धर्माचे तीन सिद्धान्त प्रस्थापित होतात. परस्पर भावना व परोपकार यांत फरक हा, की परस्पर भावनेत मोबदल्याचा स्पष्ट किंवा अस्पष्ट करार असतो. परोपकारात तो नसतो. अर्थात परोपकाराचाही कोणतातरी मोबदला मिळाल्याशिवाय राहत नाही. हा आत्म-परहिताचा सिद्धान्त भारतीयांना प्राचीन काळीच माहीत झाला होता. याविषयी महाभारतात पुढील श्लोक आढळतात—

सर्वेषां यः सुहृन्नित्यं सर्वेषां च हिते रतः ।
कर्मणा मनसा वाचा स धर्मं वेद जाजले ।।
(म. भा. शांति. २६२.९)

अर्थ– (तुलाधार म्हणतो) हे जाजले, जो सर्वांचा नेहमी मित्र असून, सर्वांच्या हिताकरता कर्माने, मनाने व वाणीने जो झटतो, तोच धर्म जाणतो.

यद्येकान्तिभिराकीर्णं जगत्स्यात् कुरुनन्दन ।।
अहिंसकैरात्मविद्भिः सर्वभूतहिते रतैः ।
भवेत् कृतयुगप्राप्तिराशीःकर्मविवर्जिता ।।
(म. भा. शांति ३४८. ६२ – ६३)

अर्थ– प्रवृत्तिपर धर्म पूर्णपणे आचरण करणारे, हिंसारहित आत्मवेत्ते व सर्व भूतांच्या हितासाठी झटणारे असेच लोक जर या पृथ्वीवर राहतील, तर हे कुरुनंदना, स्वार्थबुद्धीने केली जाणारी कर्मे या जगातून नाहीशी होऊन कृतयुगाची प्राप्ती होईल.

या स्व-परहिताच्या सिद्धान्तावरून ठरविण्यात आलेल्या

एक व्यावहारिक नियम महाभारतात दिला आहे, तो असा–

न तत्परस्य सन्दध्यात् प्रतिकूलं यदात्मनः ।
एष संक्षेपतो धर्मः कामादन्यः प्रवर्तते ।।
(म. भा. अनु. ११३.८)

अर्थ– आपणास जे वर्तन प्रतिकूल अर्थात दुःखदायक वाटते, ते (तसे) वर्तन दुसऱ्याशी करू नये. हे धर्माचे सार आहे. याच्या उलट व्यवहार होतो तो लोभमूलक होय.

यालाच आत्मौपम्यबुद्धी किंवा आत्मौपम्य वर्तन असे म्हणतात. या आत्मौपम्य वर्तनाचा थोडासा खुलासा करणे जरूर आहे. धर्माचरण करणाऱ्या लोकांनी अधर्माचरण करणाऱ्या लोकांना प्रतिबंध करावा का नाही, या प्रश्नाच्या उत्तराबद्दलचा तो खुलासा आहे. इतरांच्या अधर्माचरणाने आपल्याला तर दुःख होईलच; पण परिणामी त्या अधर्माचरणी मनुष्यालाही दुःखच भोगावे लागेल. यासाठी त्याच्या अधर्माचरणाचा प्रतिबंध करणेच मार्ग आहे. तसा तो न केल्यास त्याच्या अधर्माचरणाचे पाप अंशतः आपल्याही माथी येईल. हा विचार स्पष्ट शब्दात श्रीकृष्णाने जरासंधाला ऐकवला आहे, तो असा–

राजा राज्ञः कथं साधून् हिंस्यान्नृपतिसत्तम ।
तद्राज्ञः संनिगृह्य त्वं रुद्रायोपजिहीर्षसि ।।
अस्मांस्तदेनो गच्छेद्धि कृतं बार्हद्रथ त्वया ।
वयं हि शक्ता धर्मस्य रक्षणे धर्मचारिणः ।।
(म. भा. सभा. २२.९–१०)

अर्थ– हे राजश्रेष्ठा, एखादा राजा सज्जन अशा राजांची हिंसा कशी करू शकेल ? (ती तू करायला निघाला आहेस.) तू राजांना बंदीत टाकून रुद्राला त्यांचे बलिदान करू इच्छितोस. (या कामी तुला जर प्रतिरोध केला नाही, तर) हे जरासंधा, तू केलेले ते पाप आमच्या माथी बसेल. आम्ही धर्माचरणी असून धर्माच्या रक्षणासाठी समर्थ आहो.

हा प्रतिबंध शक्य तर सामाने करावा हे ठीक; पण साम निरुपयोगी ठरत असल्यास दंडही करावा, असे सांगितले आहे. अधार्मिक माणसाला असा दंड करणे म्हणजे हिंसा नव्हे. हिंसा याचा अर्थ दुःख असा न घेता अहित असा घेतला पाहिजे. अधार्मिकाला दंड करण्यात त्याला दुःख देणे हा हेतू नसतो, तर त्याचे अहित टळावे, त्याला धर्माचरणाचे उच्च सुख प्राप्त व्हावे, हाच असतो. अहिंसेचा हा अर्थ नीट लक्षात घेतल्यास हिंसा-अहिंसेचा गोंधळ होणार नाही.

याच विचाराचा दुसरा जोडविचार असा– आपण जर दुसऱ्याच्या अधर्माचरणाला प्रतिबंध व्हावा असे इच्छीत असू, तर आपण अधर्माचरण करू लागल्यास इतरांनीही आपल्याला प्रतिबंध करावा, असेच आपणही इच्छिले पाहिजे.

अहिंसा हा धर्म आहे, हे वर सांगितलेच आहे. पण आपले पूर्वज या तत्त्वाने स्तिमित होऊन जैनांप्रमाणे आत्यंतिक टोकाला गेले नाहीत. महाभारतात अहिंसेचे जसे महत्त्व सांगितले आहे, तसेच अपरिहार्य हिंसेचेही आवश्यकत्व दाखविले आहे. तुलाधार व जाजली यांच्या संवादात तुलाधार नावाचा तो खाटिक जाजली नावाच्या ब्राह्मणाला म्हणतो–

के न हिंसन्ति जीवान् वै लोकेऽस्मिन् द्विजसत्तम ।
बहु सञ्चिन्त्य इति वै नास्ति कश्चिदहिंसकः ।।
अहिंसायां तु निरताः यतयो द्विजसत्तम ।
कुर्वन्त्येव हि हिंसां ते यत्नादल्पतरा भवेत् ।।
(म. भा. वन. २०८.३३–३४)

अर्थ – हे द्विजसत्तमा, या लोकात जीवाची हिंसा कोण करीत नाहीत ? पुष्कळ विचार केला असता असे दिसते, की (या जगात) अहिंसक असा कोणीच नाही. हे द्विजश्रेष्ठा, अहिंसेच्या ठिकाणी निरत असलेले ऋषी देखील हिंसा करतातच; पण त्यांच्या ठिकाणी असलेल्या अहिंसक वृत्तीमुळे ती हिंसा अल्पतर होते, एवढेच.

यावरून एक गोष्ट कळते ती ही, की अहिंसा हे धर्मतत्त्व नसून अल्प, अत्यल्प हिंसा हे धर्मतत्त्व आहे. सरकारी कामकाजात हिंसेकडे ज्याची नेमणूक झालेली असेल, त्याला हिंसा करणे हेही कर्तव्य होऊन बसते. शेतीमध्येही हिंसा होतेच आणि मानवी जीवन चालण्याच्या दृष्टीने ती हिंसा अपरिहार्य ठरते.

वरील विचारानुसार धर्माची जी अंगे ठरतात, ती 'धर्मरहस्य' या ग्रंथात श्री. दप्तरींनी पुढीलप्रमाणे सांगितली आहेत–

रतिरात्मसुखे नित्ये तथा बाह्यसुखेऽस्पृहा ।
सर्वभूतेषूपकारवृत्तिरन्योन्यभावना ।।
हिंसाल्पत्वं दीर्घदृष्टिः सुखज्ञानं सदुद्यमः ।
सिद्ध्यसिद्ध्योः समत्वं च धर्मस्यांगानि वै नव ।।

अर्थ – नित्य अशा आत्मसुखाची आवड, बाह्य सुखाबद्दल विराग, सर्व भूतांच्या ठिकाणी परोपकार वृत्ती, परस्परांची भावना (वृद्धी करणे), हिंसा शक्य तितकी कमी करणे, पुढील सुखावर दृष्टी ठेवणे, सुखस्वरूपाचे ज्ञान, सत्प्रवृत्त उद्योग व सिद्धी-असिद्धींच्या वेळी समबुद्धी ही धर्माची नऊ अंगे होत.

श्री. दप्तरी यांनी सांगितलेली ही धर्माची नऊ अंगे मनूने सांगितलेल्या दशलक्षण धर्माला अतिशय जवळची आहेत. मनुप्रोक्त दशलक्षण धर्म असा–

धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः ।
धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ।।
(मनु. ६.९२)

अर्थ– संतोष, क्षमा, मनाचे दमन, चोरी न करणे, अंतर्बाह्य शुचित्व, इंद्रियांचा निग्रह, तत्त्वजिज्ञासू बुद्धी, आत्मज्ञान, सत्य व अक्रोध असे दशविध धर्मलक्षण आहे.

याज्ञवल्क्याने दशलक्षण धर्माऐवजी नवलक्षण धर्म सांगितला आहे, तो असा–

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः।**
**दानं दमो दया क्षान्तिः सर्वेषां धर्मसाधनम् ॥**

अर्थ– अहिंसा, सत्य, चोरी न करणे, अंतर्बाह्य शुचिता, इंद्रियनिग्रह, अन्नजलादी वस्तूंचे दान, मनाला निषिद्ध विषयांचे चिंतन करू न देणे, दीनदुबळ्यांवर दया करणे व एखाद्याने अपकार केला असताही चित्ताचा क्षोभ होऊ न देणे, ही धर्माची साधने आहेत.

वरील श्लोकात मनूने सांगितल्यापैकी तत्त्वजिज्ञासू बुद्धी व आत्मज्ञान ही दोन कमी असून, दान हे नवे धर्मलक्षण घातले आहे.

बृहस्पती, विष्णू, देवल इत्यादी स्मृतिकारही धर्मलक्षणांच्या बाबतीत मनु-याज्ञवल्क्यांनाच अनुसरले आहेत. बौद्ध साहित्यातले धर्मस्वरूप पाहिले, तरी तेही वरील श्रौतस्मार्त धर्माहून भिन्न नाही. सामान्य तत्त्वे दोन्ही धर्मांत एकच आहेत. धम्मपदातल्या बुद्धवग्गातली पुढील गाथा बौद्ध धर्माची तत्त्वे सांगते–

**अनुपवादो अनुपघातो पातिमोक्खे च संवरो ।**
**मत्तञ्जुता च भत्तस्मि पन्तञ्च सयनासनं ।**
**अधिचित्ते च आयोगो एतं बुद्धान सासनं ॥**

अर्थ – निंदा न करणे, घात न करणे, संयमाने राहणे, मिताहार, शयनासन (मित विहार), एकांतवास आणि चित्ताचा योगामध्ये लय हे बुद्धांचे अनुशासन आहे.

**धर्माधर्मविचार** — यापुढचा विचार म्हणजे परस्परविरोधी धार्मिक कर्तव्ये एकाच काळी प्राप्त झाली असता, कोणते कर्तव्य आचरावे आणि कोणते सोडावे, हा होय. या बाबतीत आपल्या धर्मग्रंथात किंवा नीतिग्रंथात विशेषसा विचार केलेला नाही. काही नियम आढळतात, परंतु ते तुरळकच आहेत. याविषयी सामान्यपणे असे सांगता येईल, की जे कर्तव्य स्वतःला जास्त दुःखकर होईल ते टाकावे. या संबंधात असा नियमही करता येईल, की धर्माच्या प्रवृत्तिरूप व निवृत्तिरूप अशा दोन अंगांपासून उत्पन्न होणाऱ्या कर्तव्यांत विरोध आला, तर प्रवृत्त्यंगापासून उत्पन्न झालेल्या कर्तव्याचा स्वीकार व निवृत्त्यंगापासून उत्पन्न झालेल्या कर्तव्याचा त्याग करावा. ईश्वराचे ध्यान, पूजन, आत्मचिंतन, इ. गोष्टी म्हणजे धर्माचे निवृत्त्यंग होय. त्या करण्याच्या वेळीच वृत्तीच्या किंवा उपजीविकेच्या साधनाचे आवश्यक कर्तव्य उपस्थित झाल्यास तेच स्वीकारावे. अशा वेळी निवृत्त्यंग काही काळ बाजूला ठेवावे, हेच उचित होय.

आता प्रवृत्त्यंगापासून निर्माण होणारी धार्मिक कर्तव्ये जर परस्पर विरुद्ध असली तर काय करावे, हा प्रश्न उपस्थित होतो. याबद्दलही पुढील दृष्टिकोन ठेवणे श्रेयस्कर होईल. या कर्तव्यांमध्ये क्षुधानिवारण हे श्रेष्ठ होय. कारण क्षुधेसारखे कोणतेच दुःख नाही. क्षुधानिवारण झाल्यासच मनुष्य जगू शकेल आणि जगला तरच धर्माचरण करू शकेल. हाच विचार ज्या एका आपत्प्रसंगी विश्वामित्राने मांडला, तो प्रसंग असा–

एकदा बारा वर्षांचे अवर्षण पडले असता सर्व प्राणिमात्र मरणाच्या पंथाला लागले. अशा वेळी विश्वामित्र ऋषी अन्नशोधार्थ हिंडत असता त्याला एका चांडालाच्या झोपडीत मेलेल्या कुत्र्याची तंगडी लोंबत असलेली दिसली. विश्वामित्राने ती चोरायचे ठरवले. त्यासाठी तो रात्रौ त्या चांडालाच्या झोपडीत शिरला असता चांडाल जागा झाला व त्याने विश्वामित्राला हटकले. विश्वामित्राने आपण भुकेने मरत असल्याचे त्याला सांगितले. त्यावर चांडाल विश्वामित्राला म्हणाला, की 'तू करू इच्छितोस हा अधर्म आहे.' विश्वामित्राने लगेच त्याला उत्तर दिले–

**यथायथैव जीवेद्धि तत्कर्तव्यमहेलया ।**
**जीवितं मरणाच्छ्रेयो जीवन् धर्ममवाप्नुयात् ॥**
(म. भा. शांति. १४१.३५)

अर्थ– (आपत्प्रसंगी किंवा जीवितच संकटात आले असता) ज्या कोणत्या गोष्टीने जगणे शक्य असेल, ती गोष्ट निःसंकोच आचरावी. कारण जीवित हे मरणापेक्षा श्रेष्ठ आहे. आणि (मनुष्य) जगला वाचला, तरच त्याच्या हातून धर्म घडेल.

यावरून क्षुधेचे तीक्ष्णत्व आणि दाहकत्व कळून येईल. तेव्हा क्षुधानिवारण हे प्रवृत्त्यंगापासून उत्पन्न होणाऱ्या धर्माचे पहिले कर्तव्य ठरते. त्यानंतर शीतोष्णनिवारण, निद्रा, रोगचिकित्सा, इ. उत्तरोत्तर कमी कमी महत्त्वाची कर्तव्ये होऊ शकतील.

धर्मप्रमाणांच्या बाबतीत जे अनेक वाद आहेत, त्यांचाही विचार करणे आवश्यक ठरते. या संबंधात दोन पक्ष अस्तित्वात असलेले दिसतात. त्यांपैकी एका पक्षाचे म्हणणे असे–

धर्म हा मानवाच्या बुद्धीला गम्य आहे. धर्म कोणता व अधर्म कोणता हे मानवबुद्धीच ठरविते. कोणतेही धर्मशास्त्र मनुष्याच्या विचारातून व अनुभवातून उदय पावते. वेद, अवेस्ता, बायबल, कुराण, इ. धर्मग्रंथ हे मनुष्याच्या बुद्धीतूनच अवतरले आहेत. कृषी, वाणिज्य, शिल्प, राज्यव्यवहार, जादूटोणा, मंत्रतंत्र हे ज्याप्रमाणे मनुष्याच्या मानसिक क्रियेतून उत्पन्न होतात; त्याचप्रमाणे सर्व धर्मही मनुष्याच्या मानसिक क्रियेतून उत्पन्न होतात. मनुष्याचे व्यावहारिक किंवा बौद्धिक

व्यापार हे जसे मानसिक असतात; त्याचप्रमाणे धार्मिक किंवा आध्यात्मिक व्यापारही मानसिकच असतात. या विचारसरणीला लौकिक प्रमाणवाद म्हणता येईल.

दुसऱ्या पक्षाचे म्हणणे असे–

धर्म किंवा अधर्म यांचे ज्ञान असाधारण किंवा अलौकिक अशा मानसिक व्यापाराने होऊ शकते. या अलौकिक मानसिक व्यापाराला दिव्य दृष्टी, अपौरुषेय शब्द, आध्यात्मिक साक्षात्कार, अतींद्रिय, यौगिक प्रत्यक्ष अथवा आर्ष प्रज्ञा असे म्हणतात. याला अलौकिक प्रमाणवाद म्हणता येईल.

बृहस्पती, चार्वाक, उशना, इ. प्राचीन तत्त्ववेत्ते पहिल्या पक्षाचे समर्थक आहेत. त्यापुढेही जाऊन त्यांच्याच पंथातले काही लोक असे प्रतिपादन करू लागले, की सगळ्या धर्मकल्पना या मनुष्याच्या भ्रम-प्रमादातून व लोकांना फसवण्याच्या इच्छेतून जन्म पावल्या आहेत. धार्मिक ग्रंथ म्हणजे अनृत, व्याघात व पुनरुक्ती यांचे जडजंबाल आहे.

पण दुसऱ्या पक्षाचे कुमारिलभट्ट व त्यांचे अनुयायी असलेले मीमांसक यांना हे मत मान्य नाही.

महाभारतातील शांती व अनुशासन या दोन पर्वांत अनेक ठिकाणी धर्मचर्चा आलेली आहे. त्या ठिकाणचे धर्मविचार वरील पहिल्या पक्षासारखेच म्हणजेच लौकिक प्रमाण मानणारे आहेत. दीर्घ कालपर्यंत सूक्ष्म दृष्टीने व तत्परतेने कार्यकारणभावांचे अवलोकन व मनन करून धर्माचा निश्चय करता येतो. वेद, अनुभव व परंपरागत आचार या तीन साधनांनी धर्माचे ज्ञान होते. ही तीन्ही साधने वेगळी दिसत असली, तरी त्यांमध्ये मूलतः फरक नाही. आचार हे केवळ परंपरेने चालत आले म्हणून प्रमाण नाहीत. त्यांच्यासुद्धा कारणांची बुद्धिनिष्ठ चिकित्सा केली पाहिजे. धर्माधर्मनिर्णयासाठी बुद्धीचाच अवलंब करणे जरूर आहे. बुद्धीच्या निकषावर खोटे ठरणारे शास्त्रवचन निरर्थक समजावे. मात्र नुसत्या बुद्धीने धर्मज्ञान होत नाही. त्यासाठी शास्त्रवचनांचाही आधार घेतला पाहिजे. कारण शास्त्रवचनांतही काही युक्तिवाद असतोच. पण नुसत्या शास्त्रवचनानेही धर्मज्ञान होणे शक्य नाही. कारण धर्मशास्त्र हे भिन्न, सम व विषम अशा परिस्थितीतील विविध धर्म सांगू शकत नाही. व्यक्तीच्या व समाजाच्या सर्व आपत्तींची गणना धर्मशास्त्राला करता येत नाही. वेदांना धरूनच धर्मनिर्णय करायचा म्हटले, तर वेद हे युगमानाप्रमाणे ऱ्हास पावत आलेले आहेत.

महाभारतातील एकंदर धर्मचर्चेचा सूर असा दिसतो, की धर्म हे साध्य नसून साधन आहे. समाजाची उन्नती हे धर्माचे साध्य आहे. ज्याच्या योगाने लोकांचा उत्कर्ष होईल, त्यालाच धर्म म्हणावे. ज्यायोगे समाजाचा किंवा राष्ट्राचा उत्कर्ष होतो ते नीतिनियम म्हणजे धर्म. ही व्याख्या एकदा पत्करली, म्हणजे ते नीतिनियम सर्व काळी, सर्व स्थळी एकाच प्रकारचे असणे शक्य नाही, हा विचार मान्य करणे क्रमप्राप्त ठरते. महाभारतातील प्रज्ञावंतांनी हा विचार अनेक ठिकाणी विस्ताराने मांडलेला आढळून येतो. कृतयुगातला धर्म निराळा, त्रेतायुगातला, द्वापरयुगातला आणि कलियुगातला धर्म निराळा असे व्यासांनी म्हटले, त्यात हाच अभिप्राय व्यक्त होतो. मोक्षधर्माचे सिद्धान्त जरी शाश्वत असले, तरी जिथे संसारधर्माचे, लौकिक व्यवहारांचे तत्त्वज्ञान सांगायचे आहे, तिथे धर्मसिद्धान्त त्रिकालाबाधित सत्य असणे शक्य नाही हे उघड आहे. हा आशय सांगणारा महाभारतातला एक श्लोक असा–

स एव धर्मः सोऽधर्मो देशकाले प्रतिष्ठितः ।
आदानमनृतं हिंसा धर्मो ह्यावस्थिकः स्मृतः ।।
(म. भा. शांति. ३६.११).

अर्थ– योग्य वेळी व योग्य स्थळी जो धर्म ठरतो, तोच अयोग्य वेळी व अयोग्य स्थळी अधर्म ठरतो. चौर्यकर्म, असत्य भाषण व हिंसा या सर्वांची गोष्ट अशीच आहे. म्हणून धर्म हा परिस्थितीनुसार ठरवावा लागतो.

याला उदाहरण म्हणून महाभारतात एक प्रसंग दिलेला आहे, तो असा–

युद्धात आपण आत्यंतिक हिंसा केली, या विचाराने युधिष्ठिराला खंत वाटू लागली. या पापाच्या निष्कृतीसाठी राज्यत्याग करून वनात जाण्याची व तपश्चर्या करण्याची भाषा तो बोलू लागला. त्या वेळी भीष्माने त्याला उपदेश करून ताळ्यावर आणले. भीष्म युधिष्ठिराला म्हणाला. 'अहिंसा हा काही सर्व स्थळीं धर्म होत नाही. धर्माचा उच्छेद टळत असेल व राष्ट्र सुखी होत असेल, तर अशा प्रसंगी हिंसा करणे हे सद्वर्तनाला बाधक नव्हे. कारण अधर्माचे कृत्य हेच एखाद्यावेळी धर्मरूप होत असते व धर्माचे कृत्यही अधर्मरूप होत असते. तेव्हा हे युधिष्ठिरा, तू शोक सोडून दे व अंतःकरण स्थिर कर.'

धर्माधर्मनिर्णयाच्या कामी श्रुतीवरच सर्वस्वी अवलंबून राहिले पाहिजे, असे महाभारतकार मानीत नाहीत. कारण श्रुतीत परस्पर विरोधी मते आढळतात; त्यामुळे गोंधळ होतो आणि कार्याकार्यनिर्णयही ठरत नाही, हेही त्यांनी लक्षात घेतले. म्हणून ज्ञानसंपन्न पुरुषाने कठिण प्रसंगी स्वतःची बुद्धी चालवून तिला पटेल त्याप्रमाणे धर्माचरण करावे, तारतम्यबुद्धी वापरावी, मुख्य म्हणजे प्रसंग ओळखावा, असे महाभारतकारांनी सांगितले आहे. शिबी राजाला धर्मसंकट प्राप्त झाले असता, ससाण्याचे रूप धारण करून, त्याच्याकडे आश्रयाला

आलेल्या कपोतपक्ष्याची मागणी करणारा इंद्र त्याला म्हणतो –

**गुरुलाघवमादाय धर्माधर्मविनिर्णये ।**
**यतो भूयांस्ततो राजन् कुरुष्व धर्मनिश्चयम् ।।**

( म. भा. वन. १३१.१३ )

**अर्थ–** राजा, धर्म कोणता व अधर्म कोणता, याचा निर्णय करताना लाघवगौरव अर्थात तारतम्य लक्षात घेऊन त्यांतल्या त्यात जे कृत्य अधिक फलदायी वाटेल, तो धर्म होय, असा तू निश्चय कर.

महाभारतातील धर्म हा विवेचक बुद्धिवादावर आधारलेला नैतिक धर्म आहे. धर्मातील श्रौतस्मार्त कर्मकांडाला गौणत्व देणारा हा विचार आहे. विश्वधर्म जन्माला येण्याचा हा महाभारताचा काळ दिसतो. विशिष्ट जमाती व राष्ट्रे यांच्या पलिकडे जाऊन मानव्याचे महत्त्व ज्या वेळी पटू लागले, त्या वेळी या विचारांना श्रेष्ठत्व आले. याच विचारांनी विश्वधर्माचा पाया घातला. ही मनुष्येतिहासातील महान संक्रमणावस्था होती. या वेळी ईश्वर, आत्मा, स्वर्ग व निःश्रेयस या पारलौकिक कल्पना नैतिक धर्माच्या सेवेकरता हजर झाल्या. या पारलौकिक कल्पनांनी नैतिक आचरणाला शाश्वत मूल्य दिले. या परलोककल्पनांच्या प्रामाण्याबद्दल स्पष्ट व तर्कशुद्ध अशी चर्चा महाभारतात आढळत नाही, तर त्या कल्पनांचे प्रामाण्य श्रद्धेने गृहीत धरले आहे. नैतिक आचरणाचा अव्यभिचारी संबंध मात्र या आध्यात्मिक व पारलौकिक तत्त्वांशी महाभारतकारांनी जोडलेला दिसतो.

**धर्माचे अनुशासन** – या बाबतीत अनुभव असा आहे, की पहिल्याच्या आचरणाने दुसऱ्याला दुःख होते, तेव्हा पहिल्याचे नियंत्रण करणारी एखादी शक्ती असावी, असे दुसऱ्याला वाटते. महाभारतात हा विचार पुढीलप्रमाणे मांडला आहे –

**रमते निर्हरन् स्तेनः परवित्तमराजके ।।**
**यदास्य तद्धरन्त्यन्ये तदा राजानमिच्छति ।**
**तदा तेषां स्पृहयते ये वै तुष्टाः स्वकैर्धनैः ।।**

(म. भा. शांति २५९.७५–७६)

**अर्थ** – अराजकाच्या परिस्थितीत चोर दुसऱ्याचे द्रव्य हरण करताना आनंद मानतो; पण त्याचे द्रव्य जेव्हा दुसरे हरण करतात, तेव्हा त्याला वाटते, की (चोर-लुटारूंचा शास्ता असा) राजा असावा व सगळ्या लोकांनी आपणास मिळालेल्या द्रव्यातच संतोष मानावा.

याचे विवेचन करताना श्री. दप्तरी लिहितात–

स्वतःच्या आचरणाचे वाईट फळ जेव्हा कोणी मनुष्य भोगतो तेव्हाही मला कोणी ते कर्म करताना नियंत्रित केले असते, तर बरे झाले असते असे त्याला वाटते. अर्थात या दोन्ही प्रकारांनी चोदनालक्षण धर्माची आवश्यकता निश्चित होते. जगाच्या आरंभी जेव्हा दोन माणसे एकत्र आली व त्यांच्या कृतीचे एकमेकांवर परिणाम होऊ लागले, तेव्हाच चोदनालक्षण धर्माची आवश्यकता त्यांना वाटली व तेव्हाच चोदनालक्षण धर्म उत्पन्न झाला असला पाहिजे.

मनुष्याच्या अधार्मिक व अनैतिक वर्तनाला आळा घालण्यासाठी चोदनालक्षण धर्माची गरज आहे, हे यावरून कळून येईल; पण हा आळा कोणत्या साधनांनी घालायचा हा प्रश्न आहे. केवळ उपदेशाने माणूस वळत नाही. त्याला वळवण्यासाठी पारितोषिकाच्या लोभाची किंवा दंडाच्या भयाची जोड द्यावी लागते. धर्मशास्त्रात किंवा पुराणांत निरनिराळ्या धार्मिक कृत्यांची फलश्रुती सांगितलेली असते. त्या फलश्रुतीतील त्या त्या गोष्टींच्या लोभाने माणसे धर्माचरण करताना दिसतात. अपप्रवृत्तीच्या लोकांवर उपदेशाची किंवा फलश्रुतीची मात्रा चालत नाही. अशांना दंडाचाच अवलंब करून धर्ममार्गावर आणावे लागते. या विषयी मनूने म्हटले आहे, ते असे–

**सर्वो दण्डजितो लोको दुर्लभो हि शुचिर्नरः ।**
**दण्डस्य हि भयात् सर्वं जगद् भोगाय कल्पते ।।**

(मनु ८.२२)

**अर्थ**– सर्व लोक दंडानेच जिकले जातात, (म्हणजे दंडामुळेच सन्मार्गाने चालतात.) स्वभावतःच शुद्ध असा मनुष्य मिळणे कठीण ! दंडाच्याच भयाने सर्व जग भोग उपभोगण्यास समर्थ होते.

दंड व पारितोषिक यांशिवाय धर्माचे अनुशासन होऊ शकत नसल्यामुळे त्यासाठी धर्माची पुढील तीन अंगे आवश्यक ठरतात –

**धर्माधर्मनिर्णय** – यात अमके कर्म अधर्म्य व त्याला अमका दंड असावा, तसेच अमके कर्म धर्म्य व त्याला अमके पारितोषिक मिळावे, या गोष्टींचा निर्णय केला जातो.

**दंड्य-पारितोष्यनिर्णय** – यालाच न्याय असेही म्हणता येईल. यात आमक्या मनुष्याने अमके-तमके कृत्य धर्म्य किंवा अधर्म्य केले आहे, म्हणून त्याला अमका-तमका दंड करावा, किंवा अमके-तमके पारितोषिक द्यावे, असे ठरवले जाते.

**शासन** – अधार्मिकाला पकडणे, त्याला दंड करणे व धार्मिकाला पारितोषिक देणे, या गोष्टी राजसंस्थेकरवी (सरकारकडून) केल्या जातात.

वरील तीन अंगांपैकी एखादे अंग जरी अस्तित्वात नसेल, तरी त्या समाजात चोदनालक्षण धर्म अस्तित्वात नाही, असेच म्हणावे लागेल. ही तीन्ही अंगे एका व्यक्तीकडे न राहता ती भिन्न व्यक्ती किंवा भिन्न संस्था याजकडे असावी. ती जर

एकाच व्यक्तीकडे, संस्थेकडे, किंवा वर्गाकडे एकवटली तर त्यापासूनही महान भय निर्माण होईल. भागवतातील वेन राजाची कथा ही याचे उदाहरण आहे. वेनाने धर्माधर्मनिर्णय व शासन ही दोन्ही कार्ये स्वतःकडे घेतली आणि त्यामुळे सर्वत्र भय आणि अस्वास्थ्य निर्माण झाले. त्या आपत्तीतून मुक्त होण्यासाठी ऋषींनी एकत्र मिळून वेन राजालाच ठार केले आणि त्याच्या जागी त्याचा पुत्र पृथू याची स्थापना केली. पुन्हा तसा प्रसंग घडू नये, म्हणून त्यांनी पृथूकडून त्या वेळी शपथही घेवली, ती अशी –

यश्चात्र धर्मो नित्योक्तो दण्डनीतिव्यपाश्रयः ।
तमशङ्कः करिष्यामि स्ववशो न कदाचन ।।

(म. भा. शांति. ५९.७)

अर्थ – दंडनीतीच्या रूपाने जो नित्यधर्म सांगितला आहे, त्याप्रमाणे मी निःसंशय आचरण करीन; स्वेच्छेप्रमाणे करणार नाही.

धर्माधर्मनिर्णय व शासन या दोन्ही गोष्टी एकाचकडे असू नयेत, हे जसे भारतीय धर्मवेत्त्यांना कळले होते, त्याचप्रमाणे दंड्य–पारितोष्यनिर्णय व शासन या दोन्ही गोष्टीही एकाचकडे असू नयेत, हेही त्यांना पुढल्या काळात केव्हा तरी कळून आले. याविषयी गौतमाचे वचन पुढीलप्रमाणे आहे–

दण्डनियोगोऽनुज्ञानं वा वेदवित्समवायवचनात् ।

(गौ. ध. सू. १२)

अर्थ– एखाद्याला दंड करणे किंवा सोडून देणे हे (राजाने) वेदवेत्त्यांच्या समुदायाने सांगितले असेल, त्याप्रमाणे करावे.

याविषयी थोडा अधिक तपशील बृहस्पती सांगतो. त्याची वचने व्यवहारमयूखात दिली आहेत, ती अशी–

लोकवेदज्ञधर्मज्ञाः सप्त पञ्च त्रयोऽपि वा ।
यत्रोपविष्टा विप्राः स्युः सा यज्ञसदृशी सभा ।।
वक्ताऽध्यक्षो नृपः शास्ता सभ्याः कार्यपरीक्षकाः ।
गणको गणयेदर्थं लिखेन्न्यायं च लेखकः ।।

अर्थ – लोकरूढी व वेद जाणणारे, तसेच धर्मशास्त्र जाणणारे सात, पाच किंवा तीन ब्राह्मण जिथे बसतात, ती सभा यज्ञसदृश होय. जो अध्यक्ष असतो, त्याचे बोलणे हे काम असते. शासन करणे हे राजाचे काम असते. कार्यपरीक्षा म्हणजे सत्यपक्ष कोणता, त्याचा निर्णय करणे, हे सभ्यांचे काम असते. हिशेब लिहिणे हे गणकाचे व झालेला न्याय लिहून काढणे, हे लेखकाचे काम होय.

चोदनालक्षण धर्माचे शासन हे अंग राजाकडे असावे, या विषयी सर्वांचे एकमत आहे. पण राजाच जर अधर्माने वागू लागला, तर काय करावे, त्याला कोणता दंड करावा, या विषयी पुष्कळ वचने आहेत. त्यांतील एक पुढीलप्रमाणे –

राज्ञाऽन्यायेन यो दण्डो गृहीतो वरुणाय तम् ।
निवेद्य दद्याद् विप्रेभ्यः स्वयं त्रिंशद्गुणीकृतम् ।।

(याज्ञ. २.३)

अर्थ – राजाने अन्यायाने जो दंड घेतला असेल, त्याच्या तीसपट दंडद्रव्य वरुणाला निवेदन करून ते ब्राह्मणांना स्वतः वाटून द्यावे.

प्रजेचे रक्षण न करणाऱ्या अधार्मिक राजाचा त्याग करण्याबद्दलही वचने आहेत (म. भा. उद्योग ३३. ७९–८०). एखादा राजा मर्यादा सोडून वागू लागल्यास ब्राह्मण व वैश्य यांनी शस्त्र हातात घेऊन त्याला मार्गावर आणावे, असेही सांगितले आहे (म. भा. शांति. १८. १८). अनुशासन पर्वात याहून अधिक स्पष्ट व कडक असे म्हटले आहे, ते असे–

अरक्षितारं हर्तारं विलोप्तारमनायकम् ।
तं वै राजकलिं हन्युः प्रजाः संनह्य निर्घृणम् ।।

(म. भा. अनु. ६१.३२)

अर्थ– प्रजेचे रक्षण न करता तिजपासून जो कर घेतो व प्रजेला सन्मार्गाला न लावता जो लुबाडतो, तो राजरुपी कली प्रजेने सज्य होऊन निष्ठुरपणे ठार मारावा.

राजाने मंत्र्यांच्या संमतीने राज्यकारभार करावा. त्याने धर्मज्ञ पुरुषांच्या सल्ल्यानुसार दंड करावा आणि राजालाही उन्मार्ग वर्तनाचे भय राहावे, म्हणून प्रजांनी आपले लढण्याचे व राजसत्तेला ताळ्यावर आणण्याचे सामर्थ्य गमावू नये, असेच सामान्यपणे चोदनालक्षण धर्माचे सार सांगता येईल.

**चोदनालक्षण धर्माचे प्रकार–** प्रस्तुत चोदनालक्षण धर्माचे प्रकार मानलेले आहेत, ते असे–

सामान्यधर्म – यालाच नीतिधर्म असे म्हणतात. तो सर्वांना सारखाच लागू असतो. सत्य व आत्मौपम्य दृष्टी ही सामान्य धर्माची दोन तत्त्वे होत. बृहदारण्यकात 'दाम्यत, दत्त, दयध्वम्' = इंद्रियांचे दमन करा, दान करा व दया करा, असा जो आदेश दिलेला आहे, तो सामान्य धर्माचाच मथितार्थ समजावा. विष्णू धर्मसूत्रात या सामान्य धर्माविषयी पुढील श्लोक आहे–

क्षमा सत्यं दमः शौचं दानमिन्द्रियसंयमः ।
अहिंसा गुरुशुश्रूषा तीर्थानुसरणं दया ।।
आर्जवं लोभशून्यत्वं देवब्राह्मणपूजनम् ।
अनभ्यसूया च तथा धर्मः सामान्य उच्यते ।।

(वि. ध. सू. २.१६–१७)

अर्थ – क्षमा, सत्य, दमन, शौच, दान, इंद्रियांचा निग्रह करणे, अहिंसा, गुरूची शुश्रूषा करणे, तीर्थयात्रा, दया, ऋजुत्व, निर्लोभ वृत्ती असणे, देवांचा व ब्राह्मणांचा सत्कार करणे आणि

कोणाचीही निंदा न करणे, हा सामान्यधर्म म्हटला जातो.

गौतम धर्मसूत्रात या वरील नीतिधर्माच्या गुणांना आत्मगुण म्हटले आहे. या सामान्यधर्मात चोदनालक्षण व अभ्युदय-निःश्रेयसलक्षण अशा उभयविध धर्माचा अंतर्भाव होतो.

**वर्णधर्म** — ज्या त्या वर्णाला लागू असलेल्या धर्माला वर्णधर्म म्हणतात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण होत. प्रत्येक वर्णाची धार्मिक कर्तव्ये कोणती, ती थोडक्यात गीतेत सांगितलेली आहेत (गी. १८. ४१-४४).

वर्ण व जाती या गोष्टी अगदी भिन्न आहेत. तथापि कित्येक ठिकाणी हे दोन्ही शब्द एका अर्थाने वापरलेले दिसतात. वेदोपनिषदांत जाती शब्द आढळत नाही. सूत्रकालापासून त्यांचा आढळ होऊ लागतो. गौतम व मनू यांनी जातिधर्माचा निर्देश केलेला आहे. गौतम म्हणतो, की जातिधर्म वेदाशी अविरुद्ध असेल, तर तो प्रमाण समजावा (११.२०). निरनिराळ्या वर्णांना व जातींना जी कर्तव्यकर्मे सांगितली आहेत, ती त्यांनी न केल्यास राजाने त्यांच्याकडून ती करवून घ्यावी व अधर्मी माणसाला चांगलाच दंड करावा, असे नारद, मनू, इ. धर्मशास्त्रकारांनी सांगितले आहे.

थोडक्यात सांगायचे, तर वर्णधर्मात समाजाचा एक घटक या नात्याने त्याचे समाजातील स्थान, तदनुसार कर्तव्ये, हक्क व जबाबदाऱ्या यांचा विचार केलेला असतो. जातिधर्म या नात्यानेही माणसाला काही कर्तव्ये धर्म म्हणून पाळावी लागतात. विवाहाच्या रूढी, घटस्फोटादी निर्बंध, जातिदैवतांची उपासना, जातीच्या सणासमारंभात व विशिष्ट धार्मिक विधीत सहभागी होणे, परंपरेप्रमाणे मृताचे और्ध्वदेहिक संस्कार करणे, इ. गोष्टींचा जातिधर्मात समावेश होतो.

**आश्रमधर्म** — हा विशिष्ट आश्रमापुरताच असतो. धर्मार्थकाममोक्ष हे भारतीय संस्कृतीने चार पुरुषार्थ मानलेले आहेत. ते साध्य करण्याचा मुख्य उपाय वैदिक धर्मात आश्रमव्यवस्थेच्या रूपात सांगितलेला आहे. कोणताही पुरुषार्थ साधायचा, तर मनुष्याच्या स्वाभाविक व अनिर्बंध अशा प्रवृत्तीला आळा घालून तिला विशिष्ट वळण लावणे व मर्यादा आखून देणे आवश्यक असते. याच हेतूने भारतीय धर्मशास्त्रात मनुष्याच्या रोजच्या व्यवहारातील बारीकसारीक गोष्टींविषयी नियम दिलेले असतात. मनुष्याच्या आयुष्यातील भिन्न भिन्न अवस्थांमध्ये त्याचे कर्तव्य कोणते ते सांगताना त्याचे आयुष्य १०० वर्षांचे कल्पिले असून त्याचे चार भाग केलेले आहेत. या प्रत्येक भागाला आश्रम असे म्हणतात. मनुष्याचे अंतिम ध्येय मोक्ष किंवा शाश्वत कल्याण हे मानलेले असून, त्याचे साक्षात साधन संन्यासाश्रम आहे व त्या साधनाची सिद्धता करण्यासाठी पहिले तीन आश्रम आहेत. चार आश्रमांचा हा असा परस्पर संबंध आहे.

**वर्णाश्रमधर्म** — हा विशिष्ट वर्णातील माणसाला विशिष्ट आश्रमातच लागू असतो. उदा० ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याने पळसाचा दंड व मृगाचे चर्म घ्यावे.

**गुणधर्म** — ज्या भूमिकेवर किंवा अधिकारपदावर मनुष्य असेल, त्याला अनुसरून करायचे कर्तव्य. राजा, मग तो कोणत्याही वर्णाचा असो, त्याने प्रजेचे पालन करावे, इत्यादी.

**निमित्तधर्म** — प्रसंगोपात्त घडलेल्या गोष्टींमुळे जे वेगळे आचरण करावे लागते, त्याला निमित्तधर्म म्हणतात. उदा० कुत्रा चावला असता त्यावर औषधोपचार करणे आणि त्याबरोबरच कुत्र्याचा स्पर्श झाला या दोषाबद्दल प्रायश्चित्त घेणे ही गोष्ट निमित्तधर्मात येते.

**आपद्धर्म** — याशिवाय आपद्धर्म नावाचा एक धर्म स्मृती व धर्मशास्त्रे यांत सांगितला आहे. चातुर्वर्ण्यपद्धतीत प्रत्येक वर्णाची धार्मिक कर्तव्ये नेमून दिलेली असतात. पण कित्येकदा दिव्य–भौम उत्पात, राज्यक्रांत्या, दुष्काळ, निर्वासन, इ. आकस्मिक कारणांनी वर्णव्यवस्था विघडते व लोकांना वर्णोचित कर्म करणे अशक्य होऊन बसते. वर्णोचित कर्म करता न आल्याने उपजीविकेला बाध येतो. अशा स्थितीत एका वर्णाने अन्य वर्णाचा धर्म अपवाद म्हणून स्वीकारायला हरकत नाही, अशी शास्त्राने सोय केली आहे. या सोयीलाच आपद्धर्म म्हणतात. आलेली आपत्ती टळून गेल्यावर किंवा समाजाची घडी नीट बसल्यावर ज्या त्या मनुष्याने ज्याचा त्याचा धर्म पुनश्च अंगीकारावा, असा नियमही धर्मशास्त्रात घालून दिलेला आहे.

**धर्माचा इतिहास**— भारतीय आर्यांनी समाज सुस्थिर राखण्यासाठी चातुर्वर्ण्यसंस्था, आश्रमकर्तव्ये, विवाहसंस्था, दायविभाग, इ. ज्या गोष्टी निर्धारित केल्या, त्या सर्वांना मिळून धर्म, सनातन धर्म किंवा वैदिक धर्म असे म्हणतात. हा आर्यांचा धर्म केव्हा उत्पन्न झाला, हे पुराणांच्या आधारेच काही अंशी सांगावे लागते. स्थूलमानाने सांगायचे तर हा धर्म श्वेतवाराह कल्पाच्या आरंभी उत्पन्न झाला, असे दिसते. हा काल सुमारे बारा हजार वर्षांपूर्वीचा आहे.

**धर्मप्रवर्तन** — त्या कल्पाच्या प्रारंभी गालव्यगोत्रोत्पन्न आनंद हा स्वतः ब्रह्मा झाला व त्याने धर्माची स्थापना केली (वायु पु. २१). पहिल्या कृतयुगाच्या आरंभी धर्माची स्थापना या ब्रह्मदेवाने केली, असे महाभारतातही म्हटले आहे (शांति. ५९.१३–३०). त्रेतायुगाच्या आरंभी हा पूर्वीचा ब्रह्मप्रचोदित धर्मच स्वायंभुव मनूने व सप्तर्षींनी पुनश्च सांगितला. आनंदप्रोक्त धर्म फक्त तेहतीस उपकल्पच चालला व पुढे अंशतः बंद

पडला. हा बंद पडलेला अंश म्हणजे वर्णाश्रमपद्धती होय. यावरून मन्वंतराच्या आरंभी मनू व सप्तर्षी हे धर्म सांगत असत, असे दिसते. याविषयी वायू पुराणातले काही श्लोक असे —

तत्र त्रेतायुगस्यादौ मनुः सप्तर्षयश्च ये ।
श्रौतं स्मार्तं च धर्मं च ब्रह्मणा च प्रचोदितम् ।।
दाराग्निहोत्रसंयोगं ऋग्यजुःसामसंज्ञितम् ।
इत्यादिलक्षणं श्रौतं धर्मं सप्तर्षयोऽब्रुवन् ।।
परंपरागतं धर्मं स्मार्तं चाचारलक्षणम् ।
वर्णाश्रमाचारयुतं मनुः स्वायंभुवोऽब्रवीत् ।।
(वायू पु. ५७.३९–४१)

अर्थ – त्रेतायुगाच्या आरंभी ब्रह्मयाने प्रचोदित श्रौत-स्मार्त धर्म सप्तर्षी व मनू यांनी सांगितला. ऋक्, यजुः, साम या नावांनी ओळखला जाणारा, तसेच स्त्री व अग्निहोत्र यांचा स्वीकार करण्याविषयी नियम सांगणारा व अन्य काही लक्षणांचा श्रौत धर्म सप्तर्षींनी सांगितला व परंपरेने आलेला तो वर्णाश्रमाचारयुक्त (स्मार्त) धर्म स्वायंभुव मनूने सांगितला.

मत्स्य पुराणात देव, पितर, ऋषी, किंवा मनू हे धर्म सांगतात, असे म्हटले आहे. हे सर्व माणसांतलेच अधिकारी होते. हा धर्म व हा अधर्म असे सांगून हे अधिकारी धर्माचे चोदनास्वरूप निर्माण करीत. स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम व तामस यांची मन्वंतरे फारच लहान होती. इतक्या थोडचा थोडचा वर्षांनी मनू, सप्तर्षी, इ. अधिकाऱ्यांना पुनःपुन्हा धर्मस्थापना करण्याची जरूरी पडली ती लोकांच्या धर्मविस्मृतीमुळे पडली, असे मानता येत नाही. धर्मात बदल करण्याची गरज वाटल्यामुळेच असे होणे शक्य आहे. यावरून मन्वन्तराच्या वेळी मनू, सप्तर्षी, इ. अधिकारी धर्मात बदल करीत, असे सिद्ध होते.

मन्वन्तराच्या आरंभी मनू, सप्तर्षी, वगैरेंची उत्पत्ती कशी होत असे, याविषयी पुढील श्लोक महत्त्वाचे आहेत—

सप्तर्षयो मनुर्देवाः पितरश्च चतुष्टयम् ।
मूलं मन्वन्तरस्यैते तेषां चैवान्तरे प्रजाः ।।
ऋषीणां देवताः पुत्राः पितरो देवसूनवः ।
ऋषयो देवपुत्राश्च इति शास्त्रविनिश्चयः ।।
(वायू पु. ६२.२०–२१)

अर्थ – सप्तर्षी, मनू, देव आणि पितर हे चार मन्वंतराचे (म्हणजे मन्वंतराच्या वेळी जे काही होते त्याचे) मूळ (कर्ते) होते. त्यांच्या वंशात प्रजा होतात. ऋषींचे पुत्र देव, देवांचे पुत्र पितर आणि ऋषी हे देवाचे (इंद्राचे?) पुत्र होत, असा शास्त्राचा निश्चय आहे.

वरील श्लोकातील पुत्र हे औरस पुत्र नसून मानसपुत्रच असले पाहिजेत हे उघड दिसते. भगवद्गीतेतही मनू व सप्तर्षी यांना मानसभावच म्हटले आहे (गी. १०.६). देवपुत्र सप्तर्षी हे प्रत्येक मन्वन्तरात सातच असत आणि मनुपुत्र दहाच असत. यावरून हे पुत्र म्हणजे मनाने निवडून पुत्राच्या रूपाने स्वीकारलेले होत, हे उघड दिसते. वायू पुराणातल्या पुढील श्लोकाने या विधानाला पुष्टी मिळते –

भूयः सप्तर्षयस्ते च उत्पन्नाः सप्त मानसाः ।
पुत्रत्वे कल्पिताश्चैव स्वयमेव स्वयंभुवा ।।
(वायू पु. ६५.१०)

अर्थ – सप्तर्षी हे सात मानसपुरुष पुनश्च उत्पन्न झाले आणि स्वयंभू ब्रह्मदेवाने त्यांना स्वतःचे पुत्र म्हणून स्वीकारले.

यावरून स्वयंभू म्हणजे आर्यावर्तातला अत्यंत बलवान राजा सप्तर्षींची नेमणूक करी, सप्तर्षी देवांची नेमणूक करीत, देव हे पितरांची नेमणूक करीत आणि हे तिघेही मिळून चोदनालक्षण धर्म निर्माण करीत, असे स्पष्ट दिसते.

ज्या अर्थी धर्म सांगण्याचा अधिकार सप्तर्षींकडे होता आणि वेद हे धर्माचे श्रेष्ठ प्रमाण मानले जात होते, त्या अर्थी वेद हेच सप्तर्षींनी निर्मिलेले धर्मग्रंथ होत, हेही उघड आहे. ब्राह्मण असलेले सप्तर्षी हे पृथ्वीवर वेदांचे प्रवर्तन करतात, असे अग्नीपुराणात स्पष्टच म्हटले आहे (१५१.२१). पहिल्या मन्वंतराच्या वेळी सप्तर्षींनी ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि ब्राह्मणे सांगितली, अशा अर्थाची वचने वायू पुराणात बरीच आहेत. महाभारततही सप्तर्षींनी चतुर्वेदयुक्त असे शास्त्र निर्माण केले, असे म्हटले आहे. यावरूनही वेद हेच सप्तर्षिप्रोक्त धर्मग्रंथ होत असे ठरते.

मन्वंतराच्या वेळी वैदिक धर्मात कोणकोणता बदल कसकसा होत गेला, हे समजणे बहुतांशी अशक्य आहे. हा बदल अंशतः समजून येण्यासाठी रामायण, महाभारत, वायू पुराण, इ. ग्रंथांवरून जी काही माहिती मिळेल, तिच्यावरच अवलंबून राहणे भाग आहे. वर उल्लेखिलेल्या आनंद नामक ब्रह्मदेवाने सांगितलेल्या धर्मात विवाह, वर्णव्यवस्था, आश्रमव्यवस्था व अग्निहोत्र (यज्ञसंस्था) ही अंगे होती.

विवाहसंस्था – त्या वेळच्या विवाहपद्धतीचे स्वरूप सांप्रतच्या पद्धतीपेक्षा काहीसे भिन्न होते, असे महाभारतातल्या पुढील कथेवरून दिसते. ही कथा पांडुराजा कुंतीला सांगत आहे. तो म्हणतो – हे कुंती, पूर्वी स्त्रिया अनियंत्रित व स्वेच्छाचारी होत्या. त्या कौमार्यावस्थेपासून मर्यादेचे अतिक्रमण करीत असूनही त्यांना अधर्म घडत नसे. कारण पूर्वी तोच धर्म होता आणि मोठमोठ्या ऋषींचीही त्याला संमती होती. परंतु थोडयाच काळापूर्वी श्वेतकेतू नावाच्या एका ऋषीने स्त्रीला मर्यादा घातली. एक ब्राह्मण श्वेतकेतूच्या आईचा हात धरून

तिला घेऊन जाऊ लागला असता ते पाहून श्वेतकेतू फार रागावला. त्यावर श्वेतकेतूचा बाप त्याला म्हणाला. 'मुला, रागावू नकोस. हा सनातन धर्म आहे. सर्व वर्णांच्या स्त्रिया अनियंत्रित असून, त्या सवर्ण पुरुषाशी विहार करण्यास स्वतंत्र आहेत.' पण श्वेतकेतूला ती गोष्ट सहन झाली नाही. त्याने त्या वेळी मर्यादास्थापना केली, ती अशी – आजपासून ज्या स्त्रिया पतीवाचून अन्य पुरुषाशी रत होतील, त्यांना भ्रूणहत्येचे पातक लागेल. तसेच पतिव्रता भार्येखेरीज अन्य स्त्रीशी रत होणाऱ्या पुरुषालाही हेच पातक लागेल.

यावरून श्वेतकेतूच्या काळापर्यंत परदारागमन सवर्ण स्त्रीच्या बाबतीत निषिद्ध नव्हते, असे दिसते. मग विवाहाचा अर्थच काय, असा प्रश्न उत्पन्न होतो; पण याचे उत्तर सोपे आहे. विवाहित स्त्रीची संतती, मग ती कोणापासूनही होवो, तिच्या पतीची ठरत असे –

**पाणिग्राहस्य तनय इति वेदेषु निश्चितम् ।**

(म. भा. आदि. १०४.६)

अर्थ – ज्याने पाणिग्रहण केले असेल त्याची ती संतती समजावी, असे वेदांत निश्चित केले आहे. (मग ती सवर्णातल्या कोणत्याही पुरुषाकडून झालेली असो.)

आनंद ब्रह्मदेवाने स्थापन केलेली विवाहपद्धती या प्रकारची होती, असे श्वेतकेतूच्या कथेवरून ठरते.

**चातुर्वर्ण्य** – मन्वंतराच्या वेळी धर्मात बदल करण्याशिवाय दुसरा एक प्रकार होत असे, तो म्हणजे वर्णविभाग होय. याविषयी वायू पुराणात म्हटले आहे, ते असे–

**एवं वर्णाश्रमाणां तु प्रविभागो युगे युगे ।**

(वायू पु. ५८.१२४)

अर्थ– याप्रमाणे प्रत्येक युगात वर्णाश्रमांचा विभाग होतो.

वर्णाश्रमांचा विभाग याचा अर्थ काही मनुष्ये एका वर्णातून दुसऱ्या वर्णात घालणे आणि काही चातुर्वर्ण्याबाहेरची माणसे चातुर्वर्ण्यात घेऊन वर्णविभाग पुनश्च करणे, हा होय.

महाभारतात नाग लोकांचे वर्णन असून, त्या लोकांना चातुर्वर्ण्यात घेतले गेले होते. आर्य लोक भारतात येण्यापूर्वी जे इथले रहिवासी होते, त्यांनाही चातुर्वर्ण्यात समाविष्ट करण्यात आले, यात संशयच नाही. पण आर्यांनंतर भारतात आलेले शक, हूण, यवन, पल्हव, हेही चातुर्वर्ण्यात घेतले गेले, असे मानणे भाग पडते. क्षत्रिय नसलेल्या चार राजांना अर्बुद पर्वतावरील यज्ञात क्षत्रिय करून घेण्यात आले, असे भविष्य पुराणात सांगितले आहे (प्रतिसर्ग ३.४).

**वर्णव्यवस्था** – वायू पुराणात ब्रह्मदेवाने काही मनुष्यांना ब्राह्मण, काहींना क्षत्रिय, काहींना वैश्य व काहींना शूद्र ठरवले आणि त्यांची कर्तव्येही निश्चित केली, असे म्हटले आहे. परंतु नवीन जन्मलेली माणसे कोणत्या वर्णाची समजायची, यावद्दल काही नियम असल्याशिवाय वर्णव्यवस्था पूर्ण होत नाही. या विषयी महाभारतातल्या वचनावरून असे म्हणता येते, की एखाद्या मुलाचे स्वामित्व ज्याच्याकडे असेल त्याचा वर्ण त्या मुलाला प्राप्त होत असे व त्याचा संस्कारही त्याप्रमाणेच होत असे. मुलाच्या स्वामीचा जो वर्ण तोच मुलाचा वर्ण असे समजले गेल्यामुळे प्रत्येक वर्णात आपोआप माणसांची भरती होऊ लागली, असे दिसते. श्वेतकेतूने परदारागमन निषिद्ध केल्यामुळे मुलाचा स्वामी व जनक हा एकच पुरुष असे. त्यातूनच पुढे जनकाचा वर्ण हाच मुलाचाही वर्ण समजावा, ही कल्पना उत्पन्न झाली. ही कल्पना जसजशी दृढ होत गेली, तसतसे वर्णांतर होणेही बंद झाले. त्यापूर्वी वर्णांतर झाल्याची अनेक उदाहरणे सापडतात. उदा० वैवस्वत मनूचा पुत्र धृष्ट याच्यापासून उत्पन्न झालेले धार्ष्ट हे कुल क्षत्रिय असूनही ब्राह्मण झाले (भाग. पु. ९.२.१७). गार्ग्य हा क्षत्रियोपन्न असूनही ब्राह्मण झाला. अजामीढाचे प्रियमेधादी वंशज ब्राह्मण झाले (भाग पु. ९.२१.३३). विश्वामित्र क्षत्रिय असूनही ब्राह्मण झाल्याची हकिकत प्रसिद्धच आहे. या वर्णांतराचा नियम असा होता –

**यस्य यल्लक्षणं प्रोक्तं पुंसो वर्णाभिव्यंजकम् ।**
**यदन्यत्रापि दृश्येत तत्तेनैव विनिर्दिशेत् ॥**

(भाग. पु. ७.२१.३५)

अर्थ– ज्या वर्णाचे जे वर्णनिर्णायक लक्षण सांगितले, ते जर जन्मामुळे भिन्न मानल्या जाणाऱ्या वर्णाच्या ठिकाणी दिसले, तर त्या लक्षणावरून दिसून येणारा वर्णच खरा समजावा.

एकंदरीत स्मृत्युक्त वर्णांतराचा नियम असा दिसतो, की उच्च वर्णातल्या पुरुषाशी विवाह केल्यामुळे किंवा वृत्तीमुळे वर्णाचा उत्कर्ष किंवा अपकर्ष वयाच्या सोळाव्या वर्षानंतर अथवा चौविसाव्या वर्षानंतर व्हावा. या नियमाने वर्णांतर हे वृत्त्यंतरामुळे आपोआप होऊ शकते. वर दिलेली ऐतिहासिक उदाहरणे याच प्रकारची आहेत. ब्रह्मदेवाच्या विवाहपद्धतीत शूद्र स्त्रीखेरीज अन्य कोणत्याही स्त्रीशी विवाह करता येत असे; मग ती खालच्या किंवा वरच्या कुठल्याही वर्णाची असो. क्षत्रिय ययाती राजाने ब्राह्मणकन्या देवयानी हिच्याशी विवाह केल्याची कथा सुप्रसिद्ध आहे. 'ब्राह्मण्यां क्षत्रियात् सूतः' = ब्राह्मणीच्या ठिकाणी क्षत्रियापासून झालेली संतती सूत होते, या अलिकडच्या धर्मशास्त्राप्रमाणे देवयानीचे पुत्र सूत ठरले असते; पण तसे न होता ते क्षत्रियच ठरले. यावरून ब्रह्मप्रोक्त धर्मात प्रतिलोम विवाहही अमान्य नव्हते, असे दिसते.

पण कालांतराने ब्राह्मण हे क्षत्रिय व वैश्य यांना आपल्यापेक्षा हलके समजू लागले व क्षत्रियही वैश्यांना हीन लेखू लागले. त्यामुळे ते आपल्या मुली खालच्या वर्णातील लोकांना देईनासे झाले आणि म्हणून प्रतिलोम विवाह हळूहळू बंद पडले. त्यानंतर प्रतिलोम संयोगाने उत्पन्न झालेली संतती वर्णबाह्य व असंस्कार्य ठरली. त्यामुळे वर्णांतर आणखी आकुंचित झाले. ज्याप्रमाणे विवाहपद्धतीत फरक झाला, त्याचप्रमाणे वर्णपद्धतीतल्या या फरकामुळे संततीच्या वर्णनिर्णयात मातेचा विचार होऊ लागला. मातेचा जो वर्ण असेल, तोच वर्ण संततीचाही समजला जाऊ लागला. त्यामुळे असवर्ण स्त्रीशी विवाह करण्याची पद्धतच बंद पडली.

पातिव्रत्याची कल्पना वाढीस लागल्यामुळे विवाहपद्धतीतही बदल होत गेला, असे दिसते. वासिष्ठ संहितेत सोळा वर्षांपेक्षा मोठी व निरोगी असलेल्या विधवेला नियोग करण्याची व ती अक्षतयोनी असल्यास तिला पुनर्विवाह करण्याची मोकळीक होती. या प्रकारची अनेक वचने गौतम स्मृती, अग्नी पुराण शातातप स्मृती यांतही आहेत. पण पुढच्या कालात पुनर्विवाह व नियोग या दोन्ही गोष्टी बंद झाल्या, हे कलिवर्ज्य प्रकरणावरून दिसून येईल. हे बदल पातिव्रत्याच्या कल्पनेच्या वाढीमुळे होत गेले हे उघड आहे. लोकसंख्येच्या वाढीमुळेही नियोग बंद पडला असावा.

नियोग व पुनर्विवाह बंद पडल्यामुळे दायादामध्येही बदल झाला असे दिसते. 'स्त्रिया निरिंद्रिय म्हणजे दुर्बलेंद्रिय आहेत व म्हणून त्यांना दाय मिळत नाही' असे बौधायनाचे वचन आहे (२.२.५३). हे मत त्या काळी प्रचलित होते. पण निपुत्रिक विधवेला गोत्रजांवर अवलंबून राहणे भाग पडावे, हे उघड उघड अन्याय्य दिसू लागल्यामुळे पुढच्या धर्मशास्त्रकारांनी विधवा जिवंत आहे, तोपर्यंत तिच्या पतीची मालमत्ता तिलाच मिळावी, असे ठरवले, असे दिसते.

यज्ञपद्धती– अग्निहोत्र हे आनंदप्रोक्त धर्मांचेच एक अंग होते. अग्निहोत्री यजमान निरनिराळे यज्ञ करीत असे. या यज्ञांविषयीची माहिती ब्राह्मण ग्रंथांतून मिळते. पण त्यावरून ब्रह्मप्रोक्त यज्ञ-यागांचे स्वरूप कसे होते, हे कळणे अशक्य आहे. वायू पुराण, भागवत, शतपथब्राह्मण, इ. ग्रंथांतील काही उताऱ्यांवरून प्राचीन यज्ञपद्धतीविषयी अल्पस्वल्प माहिती मिळू शकते.

ब्रह्मप्रोक्त यज्ञाचे ऐहिक व आमुष्मिक असे दोन भाग होते. ऐहिक म्हणजे इंद्रादी अधिकाऱ्यांची द्रव्य, पशू, इ. वस्तू देऊन पूजा करणे व आमुष्मिक म्हणजे अग्नीत हवन करणे होय. यज्ञभागभोक्ते देव यांना इंद्रिये धारण करणारे असे म्हटले आहे. अर्थात ते मनुष्याधिकारीच असले पाहिजेत. यज्ञात अशा मनुष्याधिकाऱ्यांची प्रत्यक्ष पूजा करीत व परलोकांतल्या इंद्रादी देवतांप्रीत्यर्थ अग्नीत हवन करीत असे दिसते. केवळ अग्नीत हवन करूनच पूर्ण होणारे असेही काही यज्ञ असतील. परंतु अश्वमेधासारखे यज्ञ हे ऐहिक व आमुष्मिक अशा दोन्ही कर्मांनी युक्त होते, असे वायू पुराणातील स्वायंभुव मन्वन्तराच्या वेळी झालेल्या अश्वमेधाच्या वर्णनावरून कळून येते (४३.५–३७).

पशुहिंसा – वायू पुराणातल्या यज्ञवर्णनावरून दुसरीही गोष्ट स्पष्ट दिसते, की त्रेतायुगाच्या आरंभी ज्यांनी ब्रह्मप्रोक्त यज्ञधर्म प्रकट केला, ते सप्तर्षीच यज्ञातल्या पशुहिंसेच्या विरुद्ध होते. पण त्यांचे म्हणणे तेव्हाच्या लोकांना पटले नाही आणि पुढेही पुष्कळ वर्षेपर्यंत पटले नाही, असे दिसते. कारण गौतमस्मृतीत यज्ञादी धर्मकृत्यांत पशुवधाचा निषेध केलेला नाही. वसिष्ठस्मृती व मनुस्मृती यांतही यज्ञीय हिंसा निषिद्ध ठरवलेली नाही. यावरून बौद्ध-जैन मतांचा स्मृतिकारांवर काहीच परिणाम झाला नाही, असे म्हणावे लागते. सामान्य लोकांवर मात्र बौद्ध-जैनांच्या अहिंसा तत्त्वाचा प्रभाव पडला आणि त्याचाच परिणाम म्हणून यज्ञीय पशुहिंसा कमी झाली.

वेद हे धर्माचे मूलाधार खरे; पण धर्माचरणाचे सर्व व स्पष्ट नियम वेदांत सांगितलेले नाहीत. वेदांत फक्त निरनिराळ्या धार्मिक गोष्टींच्या बाबतीत काही आकस्मिक उल्लेख आलेले आहेत. विवाहांचे प्रकार, पुत्रांचे निरनिराळे प्रकार, दायभाग, वारसा हक्क, स्त्रीधन, इ. विषयांसंबंधीचे हे उल्लेख आहेत. वेदांतल्या धार्मिक गोष्टींचे निर्देश पुढीलप्रमाणे –

अमाजू कन्या – जिला भाऊ नाही अशा कन्येला अमाजू म्हणत. अशा मुलीशी विवाह करू नये, असा नियम धर्मसूत्रांत व याज्ञवल्क्य स्मृतीत सांगितलेला आहे. या नियमाचा मूळ आधार पुढील वेदमंत्रात सापडेल –

अमाजूरिव पित्रोः सचा सती।
समानादा सदसस्त्वामिये भगम् ॥

(ऋ. २.१७.७)

अर्थ – आपल्या मातापित्यांच्या घरी वृद्ध होत जाणाऱ्या स्त्रीप्रमाणे मी तुझी धनासाठी प्रार्थना करतो.

अथर्ववेदातही अशाच प्रकारचे वचन आहे (१.१७.१).

बंधुहीन कन्येशी विवाह वर्ज्य मानला त्याचे कारण असे दिसते, की अशी कुमारिका पुत्रिका होणे शक्य असते. म्हणजे तिला होणारा पुत्र आजोळच्या घराण्यात दत्तक जाण्याचा संभव असतो. पुत्रिकाविषयक ही रूढी फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे.

ब्राह्मविवाह – विवाहाच्या आठ प्रकारांपैकी ब्राह्मविवाह हा

एक आहे. त्याविषयीची एक ऋचा पुढीलप्रमाणे आढळते –

**गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं । मया पत्या जरदष्टिर्यथासः ।**

(ऋ. १०.८५.३६)

अर्थ – तुझ्या सौभाग्याकरिता हा तुझा हात मी आपल्या हाती धरतो. तर मी जो तुझा पती त्याच्यासह तू वृद्ध हो.

पाणिग्रहण हा ब्राह्मविवाहातला महत्त्वाचा विधी आहे. वरील ऋचेवरून धर्मशास्त्रात व मनुस्मृतीत सांगितलेल्या ब्राह्मविवाहासारखाच ब्राह्मविवाह तत्त्वतः वेदकाळीही रूढ होता, असे दिसते.

आसुरविवाह – कन्या विकत घेऊन तिच्याशी लग्न करणे याला आसुरविवाह असे म्हणतात. हा प्रकार वैदिक काळातही अज्ञात नव्हता. मैत्रायणी संहितेत 'जिला पतीने विकत घेतली आहे' असा उल्लेख आहे आणि त्याला अनुसरूनच 'क्रयस्य धर्ममात्रत्वम्' = कन्या विकत घेणे हे धर्म्य आहे, असे पुढे मीमांसासूत्रात सांगितले गेले (जै. सू. ६.१.१५).

गांधर्व विवाह – याचीही रूढी असल्याचे ऋग्वेदातील पुढील ऋचेवरून सूचित होते –

**भद्रा वधूर्भवति यत् सुपेशाः । स्वयं सा मित्रं वनुते जने चित् ॥**

(ऋ. १०.२७.१२)

अर्थ – जी वधू भाग्यशालिनी, सुरूप व सालंकृत असते, ती आपला पती मानवांमधून स्वतः शोधून काढते.

पुढच्या काळात गांधर्वविवाहाला मान्यता दिली गेली, त्याचे मूळ वरील ऋचेत सापडेल.

एका पुरुषाने अनेक स्त्रिया करणे धर्मबाह्य नव्हते, असे वेदावरून कळून येते. हरिश्चंद्राला शंभर बायका होत्या, असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे. ही चाल केवळ क्षत्रियांपुरतीच नसून ती ब्राह्मणांतही होती. याज्ञवल्क्याला दोन स्त्रिया होत्या. या चालीचा निदर्शक असा सपत्नी (सवत) हा शब्द ऋग्वेदात अनेकवार येतो. एका पुरुषाला अनेक बायका असल्या तरी चालतील; पण एका स्त्रीला मात्र अनेक पती असू नयेत, असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे.

औरस पुत्र – वेदकाळातही औरस पुत्राचे विशेष महत्त्व मानले जात असे. त्यासंबंधीची एक ऋचा अशी –

**नहि प्रभायारणः सुशेवो । न्योदर्यो मनसा मन्तवा उ ॥**

(ऋ. ७.४.८)

अर्थ – अगदी परका पुत्र कितीही सौजन्ययुक्त असला, तरी त्याला कुटुंबात घेणे योग्य नव्हे. तो परक्याच्या पोटचा आहे, हे कधी तरी मनात येणारच.

वरील ऋचेत दत्तकपुत्राविषयी नाराजी दिसून येते. पण वेदात दत्तकपुत्र दिल्या-घेतल्याच्याही कथा आहेत, त्या अशा –

दत्तक पुत्र – ऐतरेय ब्राह्मणात शुनःशेपाची कथा दिलेली आहे (७.३). त्या कथेवरून असे दिसते, की जरी औरस पुत्र असला तरी दत्तक घ्यायला त्या काळी हरकत नसे. तैत्तिरीय संहितेत अत्रीने आपला एकुलता एक पुत्र दत्तक दिल्याचीही कथा आहे (७.१.८.१).

क्षेत्रजपुत्र – धर्मसूत्रात या नावाचा एक पुत्र उल्लेखिलेला आहे. अशा पुत्राचे सूचन ऋग्वेदात पुढील ऋचेत आढळते –

**को वां शयुत्रा विधवेव देवरं ।**
**मर्यं न योषा कृणुते सधस्थ आ ॥**

(ऋ. १०.४०.२)

अर्थ – शयूचे रक्षण करणाऱ्या अश्वींनो, विधवा स्त्री ज्याप्रमाणे आपल्या दिराला किंवा तरुण कुमारी आपल्या प्रेमिकाला शयनार्थ निमंत्रण करते, त्याप्रमाणे मी तुम्हांला निमंत्रण करीत आहे.

दाय विभाग – कुटुंबातला कर्ता पुरुष आपल्या हयातीतच आपल्या संपत्तीची वाटणी मुलांना करून देत असे. त्याविषयी 'मनुः पुत्रेभ्यो दायं व्यभजत्' = मनूने आपल्या पुत्रांना संपत्तीचे विभाग करून दिले, असे वचन आहे (तै. सं. ३.९.१.४). पित्याची सारी संपत्ती ज्येष्ठ पुत्रालाच मिळते, असेही एक वचन तैत्तिरीय संहितेत आहे, ते असे – 'तस्मात् ज्येष्ठं पुत्रं धनेन निरवसाययन्ति' = म्हणून लोक आपल्या ज्येष्ठ पुत्राला सर्व धन देतात. पुत्र असेल तर कन्येला दाय विभागातून वगळीत असत, असे दिसते. प्राचीन व अर्वाचीन धर्मशास्त्रकारांनी स्त्रियांना सामान्यपणे वारसा हक्कातून वगळले आहे. या गोष्टीला त्यांनी ऋग्वेदातील व तैत्तिरीय संहितेतील ज्या वचनांचा आधार घेतला आहे, ती वचने अशी – 'न जामये तान्वो रिक्थमारैक्' = बहिणीला भाऊ पितृधन देत नाही (ऋ. ३.३१.२) व 'तस्मात् स्त्रियो निरिन्द्रिया अदायादीः' = म्हणून स्त्रिया शक्तिहीन असल्यामुळे त्यांना संपत्तीत विभाग मिळत नाही (तै. सं. ६.५.८.२).

ब्रह्मचर्य – ऋग्वेदात ब्रह्मचर्याची अर्थात विद्यार्थिदशेची फार प्रशंसा केलेली आहे. त्याविषयी ऋग्वेदातील ऋचा अशी –

**ब्रह्मचारी चरति वेविषद्विषः । स देवानां भवत्येकमङ्गम् ॥**

(ऋ. १०. १०९. ५)

अर्थ – जो ब्रह्मचर्याने वागतो, तो सर्वव्यापी अशा कर्तव्यात गढून गेलेला असतो. तो देवांपैकीच एक होतो.

यावरून ब्रह्मचारी मनुष्याला वैदिक लोक देवासमान मानीत असत, असे दिसून येते. शतपथ ब्राह्मणात ब्रह्मचाऱ्याची कर्तव्ये सांगताना म्हटले आहे, की जो ब्रह्मचारी आहे त्याने मद्यप्राशन करू नये आणि रोज सायंकाळी अग्नीत समिध अर्पण करावी

(११. ५. ४. १८). ब्रह्मचाऱ्याने कडक नेमधर्माने वागले पाहिजे व रोज अग्निकार्य केले पाहिजे, हे स्मृति-सूत्रातले नियम वरील वेदमंत्रातून उगम पावले आहेत.

ऋणत्रय – भारतीय नीतिशास्त्रातली ऋणत्रय ही कल्पना मूलभूत आणि उदात्त आहे. या ऋणकल्पनेचा आश्रमव्यवस्थेशी मेळ घालून दिलेला आहे. ही कल्पना प्रथम तैत्तिरीय संहितेत आली आहे. तिथे म्हटले आहे, की जन्माला येणारा ब्राह्मण तीन ऋणांसह जन्मतो. (ही तीन ऋणे त्याने आयुष्यात फेडली पाहिजेत.) ऋषींचे ऋण ब्रह्मचर्याने, देवांचे ऋण यज्ञाने व पितरांचे ऋण प्रजोत्पादनाने फेडता येते (तै. सं. ६. ३. १०. ५). शतपथ ब्राह्मणाने या कल्पनेत सुधारणा करून मनुष्यऋण हे चौथे ऋण मागच्या तीन ऋणांच्या जोडीला दाखल केले असून, त्यातला ब्राह्मण हा शब्द वगळला आहे आणि मानवमात्राला तो सिद्धान्त लागू केला आहे (श. ब्रा. १. ७. २. १-६)

अतिथीचे स्वागत – आतिथ्य हे गृहस्थाश्रमातले एक प्रमुख कर्तव्य मानलेले आहे. या कर्तव्याचा उगम ऐतरेय ब्राह्मणातील पुढील वाक्यांवरून जाणता येतो–जेव्हा राजा किंवा इतर थोर सत्पात्र मनुष्य घरी पाहुणा म्हणून येतो, तेव्हा गृहस्थ लोक त्याला बैल किंवा गाय अर्पण करतात (ऐ. ब्रा. १. १५).

पंचमहायज्ञ– गृहस्थाने नित्य पंचमहायज्ञ केले पाहिजेत, असे मन्वादी स्मृतींत आग्रहाने प्रतिपादिले आहे. पंचमहायज्ञ कर्तव्य आहेत, असे सांगणारे वचन तैत्तिरीय आरण्यकात आले असून त्यात देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ व ब्रह्मयज्ञ अशी त्यांची नावे सांगितली आहेत.

दानस्तुती – दान हे धर्माचे एक श्रेष्ठ अंग आहे. कोणत्याही महत्त्वाच्या कृत्यात काही तरी दान हे आवश्यक असते. या दानाचा उगम ऋग्वेदात सापडतो. तिथे अनेक ठिकाणी दानाची व दानकर्त्यांची प्रशंसा केलेली दिसते. याविषयी एक ऋचा अशी –

उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थुर्ये अश्वदाः सह ते सूर्येण ।
हिरण्यदा अमृतत्वं भजन्ते वासोदाः सोम प्र तिरन्त आयुः ।।
(ऋ. १०. १०७. २)

अर्थ – जे (यज्ञपूर्तीसाठी) दक्षिणा देतात, ते (यजमान) अत्युच्च अशा स्वर्गलोकी वास करतात. जे अश्वदान करतात, ते सूर्यासह आकाशात संचार करू शकतात आणि जे वस्त्रदान करतात, ते (आपल्या आणि इतरांच्याही) आयुष्याची वृद्धी करू शकतात.

पाणपोई – इष्टापूर्त कर्मात मंदिरे उभारणे, उद्याने लावणे, तलाव खोदणे, पाणपोया ठेवणे, इ. गोष्टींचा समावेश धर्मशास्त्राने केलेला आहे. पैकी पाणपोईचा उल्लेख ऋग्वेदात आढळतो, तो असा–

धन्वन्निव प्रपा असि त्वमग्न इयक्षवे पूरवे प्रत्न राजन् ।
(ऋ. १०. ४. १)

अर्थ– निर्जल प्रदेशात जशी पाणपोई, तसा, हे पुराणपुरुषा, जगद्‌राजा अग्ने, तुझी सेवा करणाऱ्या भक्ताला तू आहेस.

या वचनाचा आधार घेऊन प्रवाशासाठी पाणपोया घालाव्या, असे विधान शबर आणि विश्वरूप यांनी केले आहे (जै. सू. १. ३. २)

स्वार्थनिंदा – निःश्रेयसलक्षण धर्मामध्ये परार्थ व परोपकार यांना श्रेष्ठ स्थान आहे. स्वार्थी इसम हा त्याच्या स्वार्थामुळेच अनेक पापे करीत असतो. तेव्हा मनुष्याने परार्थाकडे लक्ष द्यावे असे सांगताना वेदाने स्वार्थी इसमाची निंदा केली आहे. याविषयी ऋग्वेदातल्या ऋचेचा एक चरण असा–'केवलाघो भवति केवलादी' = जो केवळ स्वतःच खातो (स्वतःचाच सार्थ साधतो) तो केवळ पापभक्षण करतो (ऋ. १०. ११७. ६).

वरील संक्षिप्त विवेचनावरून असे दिसून येईल, की धर्मशास्त्रात जे नियम दिलेले आहेत, त्यांपैकी बहुतेकांची मुळे अतिप्राचीन काळातील वैदिक आचारपरंपरेत आहेत. त्यामुळे वेद हेच धर्माचे आधार आहेत, हे धर्मशास्त्रकारांचे मत ग्राह्य ठरते. पण वेद हे धर्मशास्त्राचे ग्रंथ मात्र नव्हेत. आणि वेदांतही, ते धर्मशास्त्राचे ग्रंथ आहेत, असे सांगितलेले नाही.

स्मृत्युक्त धर्मविवेचन पाहताना असे दिसते, की कृतयुगातील धर्म त्रेतायुगात व त्यापुढे कलियुगात सारखा बदलत गेला आहे आणि हा बदल मुख्यत्वे त्याच्या व्यवहारप्रकरणात झाला आहे. व्यवहारप्रकरणाची ही वाढ प्रथमतः विष्णुस्मृतीत व पुढे मनुस्मृतीत दिसून येते. त्यानंतरच्या बृहस्पती, याज्ञवल्क्य व नारद यांच्या स्मृतींत आणि त्याही पुढे निबंधग्रंथांत ती जास्त जास्त होत गेलेली आहे. वैदिक धर्मात हा बदल दोन प्रकारांनी झाला आहे. एक बदल मन्वंतराच्या वेळी मनु-सप्तर्षींनी केलेला व दुसरा बदल आचारामुळे झालेला. धर्मात काही कृत्ये अशी सांगितलेली असतात, की ती न केल्यास कोणता तरी दंड किंवा कोणते तरी दुःख मनुष्याला समाजाकडून किंवा नियतीकडून होत असते. अशा कृत्यांना नित्यकृत्ये म्हणतात. दुसरे म्हणजे उपनयन, विवाह, इ. संस्कार न केल्यास द्विजत्व, पितृत्व, इ. गोष्टी प्राप्त होत नाहीत. परंतु इतर काही कर्मे अशी असतात, की ती न केल्याने दोष लागत नाही. अशांना काम्य कर्मे असे म्हणतात. याशिवाय विधवाविवाह, असवर्णविवाह, पशुयज्ञ, श्राद्धात ब्राह्मणांना मांस वाढणे, इ. गोष्टी काही कारणामुळे कराव्याशा वाटल्या नाहीत, तर कालान्तराने त्या कमी

कमी होत जातील व शेवटी बंद पडतील. नंतर रूढीचा नियम अमलात येऊन या गोष्टी निषिद्धही मानल्या जातील. कलिवर्ज्य प्रकरणात ज्या कृत्यांचा निषेध सांगितला आहे, ती कृत्ये श्रुतिप्रतिपादित असूनही, केवळ लोकांनी त्या कृत्यांचा द्वेष केला म्हणून ती बंद पडली असे दिसते. ही कलिवर्ज्ये लोकविद्वेषातून निर्माण झाली व मगच स्मृतीत त्यांचा समावेश केला गेला. याज्ञवल्क्य म्हणतो–

**अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्ममप्याचरेन्न तु ।।**

(याज्ञ. स्मृती १.१५७)

अर्थ– स्वर्गप्राप्तीला अनुपयुक्त व लोकविद्विष्ट असा धर्मही आचरू नये.

**धर्माचे मानवी इतिहासातील स्थान** – इतिहासाला अवगत असलेल्या सर्व संस्कृतींत धर्माने मोठाच प्रभाव दाखविला आहे. प्रगल्भ स्थितीला पोचलेल्या मृत आणि वर्तमान काळातील समाजांत व राष्ट्रांत धर्महीन असे राष्ट्र किंवा समाज आढळत नाही. इजिप्त, असीरिया, इ. भूमध्य समुद्राजवळच्या देशांत नांदलेल्या लुप्त संस्कृतींचे अवशेषही त्या संस्कृतीची धार्मिकता सूचित करतात. ग्रीकांची अमर मूर्तिकला, महाकाव्ये आणि दर्शने धार्मिक भावनेनेच प्राणवान झालेली दिसतात. रोमन लोकांची धर्मसंस्था त्यांच्या साम्राज्याइतकी जरी भव्य नव्हती, तरी त्यांच्या कौटुंबिक जीवनात ती केंद्रस्थानी होती. पृथ्वीच्या पश्चिम गोलार्धाच्या इतिहासावर व्यापक परिणाम करणारे यहुदी, ख्रिस्ती आणि इस्लाम हे तीन धर्म ज्यू व अरब या लोकांच्या संस्कृतींनी निर्माण केले. इराण, भारत व चीन यांतील प्रगतीचा, पराक्रमाचा व सांस्कृतिक घडामोडींचा अर्थ समजायला तेथील धर्मसंस्थांचाच अभ्यास करावा लागतो. धर्म हा आजपर्यंतच्या मानवी इतिहासाचा एक मूलभूत घटकच ठरला आहे.

**धर्माचे उगमस्थान** – धर्म या तत्त्वाचा उगम कशात आहे, याचा बुद्धिवादी दृष्टीने विचार केल्यास असे कळते, की मनुष्याचा आत्मा हेच धर्माचे उगमस्थान आहे. बाहेर कुठेही धर्म उगम पावला नाही. देवता, ईश्वर, अतिमानवी शक्ती किंवा पारलौकिक तत्त्व यांच्यामध्येही धर्माचा उगम झाला नाही. धर्म हा मनुष्याने व्यक्तिशः आणि समुदायशः घडविला आहे. धर्माची प्राथमिक अवस्था ज्या हीन स्थितीतील मानवसंघात अद्यापि सापडते, तिथेही धर्माचे मूळ मानवी हृदयातच दडलेले दिसते. विद्यमान धर्मसंस्थांच्या इतिहासाचा अभ्यास सांप्रत देशोदेशींचे विद्वान करीत आहेत. त्यांनी निरनिराळ्या मानव समाजांच्या आचार–विचारांबरोबर त्यांच्या धार्मिक मनांची व धार्मिक अनुभवांचीही मानसशास्त्रीय तपासणी चालवली आहे. या सर्व विद्वानांनी आपल्या अभ्यासाचा निष्कर्ष सांगताना म्हटले आहे, की धर्माचे उगमस्थान मानवी अंतःकरण हेच आहे. अलौकिक, दिव्य आणि अतींद्रिय अशा शक्ती मानवी अंतःकरणानेच निर्माण केल्या आहेत. ईश्वर, स्वर्ग, नरक व मोक्ष हे मानवी मनानेच भाविले आहेत.

धार्मिकता ही मनुष्यजातीत अत्यंत खोल रुजलेली, दृढमूल व परिणामकारक अशी भावना आहे. तिने मानवी मनाला सर्वांगी घेरून टाकले आहे. समर्पक, तर्कशुद्ध व बिनतोड युक्तिवादही मनात खोलवर रुजलेल्या धर्ममूलांवर यशस्वी आघात करू शकत नाही, याचे हे एक महत्त्वाचे कारण आहे. मनाची अशी सर्वांगीण पकड धर्माला कशी घेता आली, याची कारणमीमांसा फ्रेंच समाजशास्त्रज्ञ दुरखीम याने पुढीलप्रमाणे सांगितली आहे —

तर्काच्या शुद्ध व व्यवस्थित नियमांची जाणीव ज्या अवस्थेत माणसाला असत नाही, अशा अप्रगल्भ अवस्थेत धर्म ही संस्था निर्माण झाली आहे आणि माणसांनी तशा त्या अप्रगल्भ अवस्थेतच हजारो वर्षे धर्म अंगी बाणवला आहे.

संघप्रियता ही माणसाची एक सहजप्रवृत्ती आहे. तिच्यामुळेच मानव जातीचा योगक्षेम चालतो. त्यामुळे संघाचा प्रभाव व्यक्तीवर जबरदस्त चालतो. म्हणून धर्म हा सामुदायिक विचाराच्या तत्त्वांवर मुख्यतः अधिष्ठित आहे, असे निश्चितपणे म्हणता येते. हा सामुदायिक विचार संघप्रियता या सहज प्रवृत्तीतून जन्म पावतो. जन्मापासून मृत्यूपर्यंत मानव हा संघाच्या पोटातच वावरत असल्यामुळे त्याच्या सामर्थ्याची छाप मानवी मनाच्या कणाकणावर पडलेली असते. शेतीच्या हंगामाच्या वेळचे उत्सव, बालकांच्या जन्माचे सोहळे, विवाह, अंत्यकर्म, पंचायत किंवा न्यायसभा, युद्धांची सिद्धता, इ. सामुदायिक प्रसंगांनी सामुदायिक विचार परिपुष्ट होत असतो. कौटुंबिक व सामाजिक स्वास्थ्याला आवश्यक असणारे आचारसंकेत आणि विधिनिषेध यांची महती सामुदायिक विचारानेच मनाला पटते. वरील गोष्टींबद्दल आदर आणि त्यांच्या भंगाचे भय या गोष्टीही सामुदायिक विचारांचाच परिपाक असतात.

दुरखीम याच्या वरील विचारांत पटण्यासारखा भाग बराच असला, तरी त्याच्या विचारांत एक अपूर्णता आहे. धर्माच्या उगमात व विकासात त्याने वैयक्तिक अनुभवाला गौणत्व दिले आहे, ही ती अपूर्णता होय. कला आणि विज्ञान यांच्या क्षेत्रात वैयक्तिक कर्तृत्वाला जसे महत्त्व आहे, तसेच ते धर्मोद्भव, धर्मविकास आणि नवधर्मस्थापना यांतही आहे.

प्रतिभाशाली, स्फूर्तिसंपन्न आणि मनीषी व्यक्तींनी धर्माच्या इतिहासात मोठीच कामगिरी केली आहे. त्यांच्या साक्षात्कार

समाधी, दिव्यदर्शन इ. गोष्टींनी धर्मभावनेत एक अमर्याद चैतन्य भरून राहिले आहे. तशा प्रकारचे अनुभव सामान्य माणसाला कधीही येऊ शकत नाहीत. पराक्रमी इंद्र आणि सगळ्या आकाशाला मुठीत ठेवणारा सम्राट वरुण हे आपल्या यज्ञात उपस्थित राहून सोमपान करीत आहेत, असे दर्शन ऋग्वेदातल्या ऋषीलाच होते. विश्वाच्या जनकाने स्वतः संदेश देऊन पतितांचा उद्धार करण्यासाठी मला पाठवले आहे, असे ख्रिस्तच सांगू शकतो. घागरीतील पाणी ओतायला जेवढा वेळ लागतो, तेवढ्या वेळात मुहंमद पैगंबर अल्लाच्या सर्व महालांतून फिरून येतो. बुद्धाला आपले अनेक पूर्वजन्म स्मरतात. अशी विशाल आणि प्रत्ययकारी मनोवस्था सिद्ध पुरुषांनाच लाभत असते. ऋषी, प्रेषित, अवतार, साधू आणि महात्मे यांनाच असले हे दिव्य अनुभव येत असतात. या अनुभवांनी जगातली अपूर्णता भरून निघते. अशा संत महात्म्यांच्या अनुयायांना त्यामुळे फार मोठा दिलासा मिळतो. त्यामुळे त्या अनुयायांना धैर्य आणि निर्भयताही प्राप्त होते. अशा या ऋषींना आणि संत महात्म्यांना त्यांच्या दिव्य अनुभवांमुळेच निग्रहानुग्रहांचा अधिकार प्राप्त होतो. त्यांचा हा अधिकार धर्मसंस्थेलाही उन्नत आणि समर्थ करतो. अशा साक्षात्कारी पुरुषांचेच ग्रंथ धर्माला प्रमाणभूत ठरतात.

धर्माचा अनुभवात्मक अथवा साक्षात्कारात्मक आधार वर सांगितला. त्याबरोबरच धर्माला एक बौद्धिक आधारही असतो. श्रेय आणि सत्य असे त्या बौद्धिक आधाराचे दोन भाग असतात. मनुष्याच्या जीवनात कल्याणरूप, हितकारक, इष्ट आणि मंगल असे जे जे असेल, ते ते आणि त्या गोष्टी सिद्ध करून देणारी साधने या गोष्टी श्रेय या सदरात येतात. धर्माला साध्य आणि साधन यांची एकरूपता किंवा अनुरूपता अपेक्षित असते. म्हणून धर्म हा साध्याइतकेच साधनांचेही मूल्य मानतो. या श्रेयोरूप उद्दिष्टालाच परमार्थ असे म्हणतात. मानवाची ध्येये, ध्येयसाधने आणि साध्ये असतात, तीच धर्म्य व तीच नैतिक होत, असा सिद्धांत आहे.

श्रेयाबरोबरच एक बौद्धिक सत्यही धर्म सांगत असतो. हे बौद्धिक सत्य म्हणजे विश्वाची उपपत्ती होय. दर्शने व तत्त्वज्ञाने या उपपत्तीची मांडणी कुशलतेने करीत असतात. विश्वाचे आदिकारण म्हणून ईश्वराची कल्पना धार्मिक तत्त्वज्ञानाने पुढे मांडली आहे. विश्वातील व्यवस्था, सौंदर्य व नियमबद्धता पाहून त्याच्या पाठीमागे कोणीतरी सर्वज्ञ, संकल्पयुक्त आणि सर्वशक्तिमान असा ईश्वर असला पाहिजे, असे अनुमान अध्यात्मवादी तत्त्वज्ञानाने केले आहे. विश्वरचनेसंबंधी भिन्न भिन्न धर्मांत भिन्न भिन्न उपपत्ती सांगितल्या आहेत. तत्संबंधी स्वर्ग, नरक, ईश्वर, आत्मा, जीवाची अधोर्ध्वगती यांच्या कल्पनाही प्रत्येक धर्मात भिन्न भिन्न आहेत. त्या कल्पनांच्या मांडणीत एक प्रकारचा युक्तिवाद असतो. तो हेत्वाभासरहित आणि निर्विवादपणे सिद्ध होण्यासारखा नसतो; पण तरीही त्या त्या समाजाच्या धार्मिक परंपरेला सावरून धरण्याची ताकद मात्र त्या युक्तिवादात असते.

कामना आणि श्रद्धा यांच्यावर धर्मांची उभारणी होते. बुद्धिवाद हा धार्मिक विचारसरणीच्या पोटात बीजरूपाने असतो. बुद्धिवादाची बौद्धिक सामग्री मानवाच्या संस्कृतीत फार उशीरा निर्माण झाली आहे. बुद्धिवाद प्रगल्भ दशेला प्राप्त होण्यापूर्वीच धर्म हा विशाल व व्यापक झाला आहे. धर्माला हे विशाल स्वरूप देण्याचे कार्य मानवाच्या श्रद्धेने केले आहे. जे जे मूल्यवान असे इंद्रियांच्या द्वारे आणि कल्पनेच्या द्वारे सापडेल, ते ते हृदयात जतन करून बंदोबस्तात ठेवणारी मनोवृत्ती म्हणजे श्रद्धा होय. पण श्रद्धेतही एक न्यून आहे. श्रद्धा ही धर्मभावना बळकट करते हे खरे; पण तीच ज्ञानाच्या विकासाला बंधकही ठरते. ज्ञानाला किंवा बुद्धिवादाला अगणित विचार तपासून शाश्वत मूल्यांची निवड करायची असते. बुद्धिवाद जेव्हा समृद्ध होऊ लागतो, तेव्हा तो श्रद्धेला मर्यादा घालू पाहतो. तिच्यातील अव्यवस्था, ओबडधोबड कल्पना व भाबडे विचार यांवर तो आघात करू लागतो. त्यामुळे धर्मविकासाला आणि धर्मपरिवर्तनाला मदत होते. परंतु अशा आघाताने श्रद्धेचे उन्मूलन होणेही हितकारक नसते. कारण श्रद्धा हे धर्माचे मूळ असते. ते नष्ट झाले, तर धर्मच नष्ट होतो. धर्म हा धारक आहे, असे म्हटले आहे. त्याची ही धारकशक्ती श्रद्धेतच साठवलेली आहे.

**धर्माची प्रतिज्ञा**– गेली दहा हजार वर्षे माणसाच्या मनावर धर्माने अमर्याद स्वामित्व गाजवले आहे. याला कारण धर्माची प्रतिज्ञा हे होय. धर्म माणसाला असे आश्वासन देतो, की सगळ्या जीवनाचा आणि ईश्वराचा अर्थ मी तुला उलगडून सांगेन आणि परमकल्याणही मीच तुला प्राप्त करून देईन.

**वेदांचा धर्मसंदेश**– प्राचीन असुर (असीरिया) राष्ट्राप्रमाणे भारतात अतिप्राचीन काळी संस्कृतियुक्त असे राष्ट्र सिंधू नदीच्या तीरावर वसले होते, असे अलिकडच्या उत्खननावरून दिसून येते. परंतु त्यात सापडलेल्या इष्टकांवर जे लेख लिहिलेले आहेत त्यांचा अर्थ अजून लागलेला नाही. म्हणून ऋग्वेदरूपी वाङ्मय हेच अतिप्राचीन धार्मिक इतिहास समजण्याचे एकमेव साधन मानावे लागते. ऋग्वेदापासून उपनिषदांपर्यंतच्या काळात जी आर्यसंस्कृती इथे नांदली, तिने शाश्वत मूल्यांचे तत्त्वज्ञान निर्माण करून ठेवले आहे. इजिप्त व असुर राष्ट्रे यांच्यापेक्षा नितांत

भिन्न असे आर्यसंस्कृतीचे ते वैशिष्ट्य आहे. आजच्या पाश्चात्य विद्यापारंगत अशा शिक्षितालाही जे प्रश्न आणि विचार गूढ वाटतात व ते सोडवण्यात आणि त्यांचे मनन करण्यात परमार्थसाधनेचा आनंद लाभतो, असे प्रश्न आणि विचार वैदिक तत्त्वज्ञानाने उपस्थित केले आहेत. ज्ञानाची निष्काम उपासना करण्यात मोक्ष, ज्ञानानंद हाच परमार्थ आहे आणि तत्त्वचिंतन हे एक स्वत:सिद्ध मूल्य आहे, या गोष्टींची शिकवण वैदिक तत्त्वज्ञानाने जगाला दिली.

जलचर प्राणी, गोवृषभादी पशू, अर्धपशू–अर्धमनुष्य, आकाशस्थ गोल, भूमी, नद्या, पर्वत, वृक्ष, सरोवरे, इ. प्राण्यांची व मूर्त वस्तूंची पूजा करणारे आणि त्यांच्या ठिकाणीं देवत्व कल्पून तदर्थ यज्ञ, वलिदान, इ. गोष्टी करणारे असे अनेक धर्मसंप्रदाय त्या काळी जगात पसरले होते. त्यांना हीन धर्मकल्पनांच्या बंधनातून मुक्त करणारा विचार पहिल्याप्रथम वेदांनी सांगितला. चराचर विश्व हे एकाच ईश्वराचे स्वरूप आहे, हा संदेश वेदांनी त्यांना दिला. वृषभपूजक आर्यांना आणि असुरांना त्यांनी सांगितले, की तो वृषभ म्हणजे विराट विश्वरूपच आहे. गोपूजकांना त्यांनी सांगितले, की ती पूजनीय गो म्हणजे विश्वात्मक अदितिदेवताच आहे. मानवमूर्तिधारी ईश्वराची पूजा करणाऱ्यांना त्यांनी सांगितले, की हा मानवरूपी ईश्वर म्हणजे विश्वाचा शास्ता विराट पुरुषच आहे. अशा रीतीने जगातील ईश्वरी प्रतीकांच्या सर्व उपासकांना वेदांनी सांगितले, की ही प्रतीके म्हणजे एकाच सर्वात्मक ईश्वराचे आविर्भाव आहेत. अशा रीतीने वेदांनी त्रिविधधर्मसमन्वयाचाच मार्ग सांगितला. हे समन्वयात्मक तत्त्व भारतातील अगणित परस्परविरोधी धर्म-संप्रदायांना एकत्र गुंफण्यास पुढच्या काळी समर्थ ठरले. या तत्त्वांमुळे हीन, मोळसट, अकाळविकाळ आणि मूर्खपणाच्या धर्मविचारांना काहीसा पायबंद बसला. पण हे तत्त्वज्ञान त्यापुढे जाऊन मानवी मनाला अज्ञान, दौर्जन्य आणि हृदयदौर्बल्य यांतून मात्र मुक्त करू शकले नाही; तसेच ते जटिल कर्मकांडालाही आवरू शकले नाही, हे त्याचे न्यून होय.

सर्व हीन व उच्च अशा धर्मांचा विभूतिवादाच्या तत्त्वाने संग्रह करण्याचाही वैदिक धर्माने प्रयत्न केला. त्यामुळे हीनोच्च गुणांच्या संस्कृतीचे रक्षण झाले आणि तद्द्वारा संस्कृतीच्या विविध थरांत रुतून बसलेल्या मानवगटांची एक भली मोठी उतरंड निर्माण झाली. त्यातूनच या देशातली जातिसंस्था जन्म पावली. हीन धर्मसंप्रदायाची वैशिष्ट्ये आणि हीन संस्कृतीचा वारसा या जातिसंस्थेने कायम ठेवला. त्यामुळे व्यवसायभेद हे माणसांचे नैसर्गिक भेद ठरले. धार्मिक चालीरीतींच्या परंपरा आणि व्यवसायपरंपरा या अबाधित व अनुल्लंघनीय बनल्या. त्यामुळेच भारतीय मनुष्याचे मन आणि त्याचे व्यवहार संकुचित, कृत्रिम व पोकळ अशा सांप्रदायिक बंधनात बंदिस्त झाले. त्यांमुळें येथील मनुष्याच्या विकासप्रवण शक्तीची पूर्ण कुचंबणा झाली. वैदिक धर्माच्या जाडजूड भितींनी बंदिस्त केलेल्या जुनाट वाड्यात मोकळा वारा आणि सूर्यप्रकाश यांचा मागमूसही राहिला नाही. मानवानेच निर्माण केलेले हे भेद आणि बंधने म्हणजे जणू निसर्गनियमच, असे समजणारा वैदिक धर्म हा सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक उत्कर्षाला उपयोगी न ठरता त्याच्या अवनतीलाच कारणीभूत झाला. त्यामुळेच या देशात सर्व समाजाला लागू पडेल असा व्यापक कायदा निर्माण झाला नाही. आणि त्याच कारणास्तव दीर्घकाल टिकणारे विशाल साम्राज्यही निर्माण झाले नाही. अशा या अवनत स्थितीत भारतीय समाज शतकानुशतके खितपत राहिला होता. त्याला नवा प्रकाश देणारा एक महान धर्मक्रांतिकारक सनपूर्व सहाव्या शतकात निर्माण झाला.

गौतम बुद्ध हे त्याचे नाव होय. जगातील पहिला विश्वव्यापक धर्म गौतम बुद्धाने स्थापला. त्याने सर्व धर्मांच्या मूलभूत प्रश्नांना अगदी बाजूला सारले व आधिदैविक आणि आध्यात्मिक सिद्धांतांची पूर्ण उपेक्षा केली. मुख्य स्थान दिले ते संसारदु:खाच्या प्रश्नाला ! ते संसारदु:ख दूर व्हावे, म्हणून आर्य अष्टांगिक मार्ग त्याने विश्वमानवाला उपदेशिला.

वैदिक धर्माची आणि तत्कालीन इतर धर्मांची संपूर्ण प्रतिक्रिया म्हणजे बौद्ध धर्म होय. कर्मकांडापेक्षा नैतिक वर्तन हे श्रेष्ठ असून तोच मुक्तीचा मार्ग आहे, असे त्या धर्माने सांगितले. अहिंसा, सत्य, इ. नीतिधर्म निरपवादपणे पाळण्यातच मानवाचे जीवनसाफल्य आहे, हे बौद्ध धर्माचे सार होय. त्यामुळे बौद्ध धर्म हा पाण्यातल्या तैलबिंदूप्रमाणे जगभर पसरला. त्याच्या प्रसाराच्या सीमा पाहायच्या, तर पृथ्वीचा नकाशा पुढे ठेवावा लागतो. सांप्रत जगातील एक-तृतीयांश लोक बौद्ध आहेत. तुराणी, तुर्क, मोगल, इ. भटक्या मानवसमाजांपासून सुधारलेल्या चिनी आणि जपानी लोकांपर्यंत संस्कृतीच्या सर्व थरांत बुद्धाचा धर्म शिरला, पसरला.

हिंदू धर्म, बौद्ध धर्म आणि पूर्वेकडील शिंतो, ताओ, कन्फ्यूशिअस यांचे संप्रदाय यांचे सामाजिक वैशिष्ट्य हे, की ते पश्चिमेकडील यहुदी, ख्रिश्चन आणि इस्लाम या धर्मांसारखे असहिष्णू नाहीत. पूर्वेकडील देशांतल्या धर्मसंस्थांमध्ये ही सहिष्णुता बौद्ध धर्माने आणली. हे श्रेय त्या धर्माचे आहे. हिं धर्मात जी सहिष्णुता आहे, तिचे स्वरूप संदिग्ध आहे. बौ धर्माची गोष्ट तशी नाही. त्या धर्माचा पहिला सम्राट अशो याने सर्वधर्मसहिष्णुता हीं तत्त्व म्हणून जाहीर केली. हिं

धर्मात सहिष्णुता आहे; पण विश्वव्यापनाचा प्रयत्न नाही. अत्यंत संकुचित, क्षुद्र आणि अनुदार असे विविध संप्रदाय त्याने जसेच्या तसे शतकानुशतके जपून ठेवले. इस्लामसारख्या अत्यंत असहिष्णू अशा धर्माला वाढण्यास अनुकूल अशी सामाजिक रचना हिंदू धर्माने स्वतः निर्माण करून ठेवली. मानवजातीच्या लहानमोठ्या सांस्कृतिक भेदांना विरघळून टाकून एकजीव करण्याऐवजी ते भेद दृढमूल केले. हीन, भ्रांतिमय आणि भारभूत अशा पुराणपरंपरेला उराशी कवटाळून हिंदू धर्माने तिची पूजा केली आणि समाज-संस्थेची संवादी आणि मजबूत अशी बांधणी होऊच दिली नाही. म्हणूनच इस्लाम या देशात वाढला, फोफावला आणि त्याची कटू फळे अजूनही आपणांस चाखावी लागत आहेत.

इतर धर्म — भारतामधल्या आर्यांप्रमाणेच इराणमधील आर्यांनीही सनपूर्व पाचव्या शतकाच्या सुमारास पहिले आणि मोठे साम्राज्य स्थापन केले; पण इराणी धर्माने चिरंतन टिकणारे असे फारच थोडे कार्य केले आहे. काही महत्त्वपूर्ण धर्मकल्पना मात्र इराणी आर्य धर्माने यहुदी आणि ख्रिश्चन या धर्मांना दिल्या आहेत.

ग्रीकांचा धर्म— युरोपियन आर्यांतील ग्रीसमध्ये वसाहत करून राहिलेल्या आर्यांनी मात्र मानवेतिहासात अखंड टिकणारे असे चैतन्य उत्पन्न केले. सनपूर्व आठव्या शतकापासून तो सनपूर्व तिसऱ्या शतकापर्यंत ग्रीक संस्कृती आत्मतेजाने तळपली. झेऊस हा त्यांचा श्रेष्ठ देव होय. ग्रीकांच्या महाकवींनी त्याचे माहात्म्य वर्णिले. याशिवाय इतर अनेक लहान मोठ्या देवता ग्रीकांनी मानल्या आहेत. मानवी गुणांचे उत्कर्ष या स्वरूपातच ग्रीकांनी आपल्या देवतांची कल्पना केली. देवतांना मानवरूप दिल्यामुळे त्यांच्या देवतोपासनेतूनच भव्य, रेखीव आणि प्रशस्त असे स्थापत्य जन्मले आणि अनुपम अशी मूर्तिकलाही प्रकटली. ग्रीक लोक स्वभावतःच स्वतंत्र प्रज्ञेचे असल्यामुळे त्यांनी नवे शिल्प, नवी मूर्तिकला, नवी नाटचकला आणि नवी चित्रकला निर्माण केली. ग्रीकांची बौद्धिक संस्कृती तत्कालीन जगाच्या पुढे गेली होती. त्यांच्या इतकी बौद्धिक परिपक्वता कोणत्याच प्राचीन संस्कृतीला लाभली नाही. याची कारणे अनेक आहेत. त्यांतले एक ठळक कारण असे, की धर्मविचारात श्रद्धा, भावना, गूढ अनुभव अशा कल्पनांचा फाजील पगडा त्यांनी स्वतःच्या मनावर बसू दिला नाही. त्रिकालज्ञ व सर्वज्ञ अशा ऋषींचे, अवतारांचे अथवा प्रेषितांचे अबाधित प्रामाण्य त्यांनी कधीच स्वीकारले नाही. बुद्धिवादाच्या आधारेच त्यांनी आपली धर्ममूल्ये निश्चित केली. हे सर्व खरे असले, तरी सुसंघटित अशी धर्मसंस्था मात्र त्यांना निर्माण करता आली नाही. त्यामुळे चिरस्थायी राष्ट्राची स्थापना झाली नाही.

ख्रिस्ती धर्म— मनुष्यजातीला पावन करणाऱ्या नीतीचा आणि आत्मशुद्धीचा आदेश देणारा धर्म जसा पूर्वेस बुद्धाने स्थापला, तसा तो आशियाच्या पश्चिमेस येशू ख्रिस्ताने स्थापला. त्याच्या धर्मविचाराचे सूत्र यहुदी धर्मातून निर्माण झाले होते. यहुदी धर्मातला एकेश्वरवादही त्याने स्वीकारला. ख्रिस्ताचा धर्मोपदेश साधा, उदात्त आणि कर्मकांडरहित होता. मंदिर, पूजाविधी, उत्सव, दीक्षा, गुरू, धर्मपीठ, इ. काहीही त्यात नव्हते. संपूर्ण जगाला भ्रातृभावात एकसूत्र करणारा असा ख्रिस्ताचा आदेश होता. अनन्यभक्ती, आत्मत्याग आणि मानवतेचा जिव्हाळा यांनी ख्रिस्ताचे हृदय भरलेले होते.

सेंट पॉलने या धर्माची रोमन साम्राज्यामध्ये स्थापना केली आणि धर्मसंस्थेचा परंपरागत असा सगळा साज त्या धर्मावर चढवला. इ. स. च्या पहिल्या तीन शतकांत ख्रिश्चन धर्माच्या उपदेशकांनी युरोपात आपल्या धर्मसंस्थेची मुळे खोलवर रुजवली. आशियापर्यंतसुद्धा या धर्माने त्याच काळात मजल मारली. इ. स. च्या चौथ्या शतकाच्या प्रारंभी कॉन्स्टन्टाईन या रोमन सम्राटाने ख्रिश्चन धर्माला राजमान्यता दिली.

पण ख्रिस्ताचा धर्म मूळ स्वरूपात युरोपमध्ये रूढ होऊ शकला नाही. मानवी समानता आणि भ्रातृत्व या दोन गोष्टींना सेंट पॉलनेच प्रथम मर्यादा घातली. पुढे पुढे तर त्या धर्मात परधर्मविषयक असहिष्णुतेला उधाणच आले. ख्रिस्ती लोकांनी ज्यूंची व इतरधर्मियांची देवळे पाडली, मूर्ती फोडल्या आणि त्यांना अनेक प्रकारे छळलेही. पुरोहितवर्गाचे वर्चस्व, राज्यकर्त्यांचा लोभ आणि महंतांचे मानसिक दौर्बल्य यांनी त्याची नैतिक शक्ती कमी झाली. ग्रीक चर्च आणि आशियातील व आफ्रिकेतील ख्रिश्चन धर्मपीठे यांच्यातील चिरंतन विरोधाने त्यांच्या धार्मिक श्रद्धेचा पायाच खिळखिळा झाला. ख्रिस्ताच्या एकेश्वरवादाला जीर्ण रोमन साम्राज्याच्या अधोगतीचा संपर्क होऊन, त्याच्यातही बहुदेवतावाद, मूर्तिपूजा, मठसंस्था, इ. अधोगतीची लक्षणे शिरली.

इस्लाम धर्म— त्यानंतर आणखी एकदा या एकेश्वरवादाने इ. स. ६२२ साली अरबस्तानात अवतार घेतला. त्यालाच इस्लाम असे नाव आहे.

मुहंमद पैगंबर हा इस्लामचा प्रवर्तक होय. त्याच्या अगोदर अरबस्तानात कोणताही सुसंस्कृत धर्म अस्तित्वात नव्हता. अरबांचे सुसंघटित असे राज्यही नव्हते. अरब लोक भिन्न भिन्न टोळचांत विभागलेले होते. या टोळचा उंटावरून व्यापार करीत, आपसात लढत आणि वाटमारीही करीत. मुहंमदाने अरबांची ही अवस्था पाहिल्यावर विसंघटित आणि विस्कळित

अशा सर्व अरब टोळयांना एकाच सर्वेश्वराच्या कृपाछत्राखाली आणून त्यांचे एक राष्ट्र निर्माण करावे, अशी दिव्य स्फूर्ती त्याला झाली. 'ईश्वर एकच आहे आणि तोच सर्वांचा मालक, जनक, सर्वशक्तिमान आणि दयाळू आहे,' असा संदेश त्याने सर्व अरबांना देण्यास सुरवात केली. त्याचा परिणाम होऊन हळूहळू एकेक अरब टोळी त्याच्या आधिपत्याखाली जमा होऊ लागली. मुहंमदाच्या त्या संदेशाचे राजकीय आणि धार्मिक असे महत्त्व थोडयाच काळात अरबांना कळून आले. थोडयाच काळात मुहंमदाने अरबराष्ट्राची संघटना केली आणि दिग्विजयार्थ खड्ग उपसले. 'इस्लामचा स्वीकार करा नाहीतर खंडणी द्या,' अशी घोषणा करीत शस्त्रधारी अरब लोक युरोपवर चाल करून गेले. प्रसिद्ध इतिहासकार गिबन म्हणतो, की झरथुष्ट्राच्या धर्मापेक्षा अधिक शुद्ध, मोझेसच्या धर्मापेक्षा अधिक उदार आणि ख्रिस्ताच्या धर्मापेक्षा अधिक सुसंगत असा मुहंमदाचा धर्म होता आणि म्हणूनच तो अरबांच्या यशाला कारणीभूत ठरला. मुहंमदाच्या अरब अनुयायांनी झंझावाताप्रमाणे पश्चिमेकडे आक्रमण करून इजिप्त, उ. आफ्रिका आणि स्पेन इथवर आपले स्वामित्व प्रस्थापित केले.

इस्लाममध्ये प्रारंभीच्या काळात परधर्मसहिष्णुता हा गुण वसत होता. पण नंतरच्या काळात इस्लामचे खड्ग तुर्क, मोगल अफगाणी, इ. मागसलेल्या रानटी मुसलमानांच्या हाती गेले आणि त्यांनी आपल्या कडव्या असहिष्णुतेमुळे जगात इस्लामला बदनाम केले. भारतासारख्या वैभवशाली देशावर या लोकांनी एकामागून एक स्वाऱ्या करून भारताची धूळधाण केली. तलवारीच्या जोरावर आणि जबरदस्तीने त्यांनी भारतात इस्लामचा प्रचार केला. त्यामुळे या देशात हिंदू आणि मुसलमान असे दोन समाज निर्माण झाले. आणि ते एकमेकांपासून अलगच राहिले. त्यांचे व्यवहार एकमेकांत गुंतलेले असले आणि ते एका शहरात, एका गावात नांदत असले, तरी त्यांच्यांत समरसता कधीच उत्पन्न होऊ शकली नाही.

इतिहासाला ज्ञात असलेल्या जगातील मोठया धर्मांच्या उलाढालींचा हा त्रोटक आढावा आहे.

**भिक्षुसंस्था** – धर्माची जी विविध अंगे होती व आहेत, त्यांतले एक महत्त्वाचे अंग म्हणजे भिक्षूंचा मठ किंवा संन्यासाश्रम हे होय. हिंदू, बौद्ध, यहुदी आणि ख्रिश्चन या जागतिक धर्मांमध्ये भिक्षुसंस्थेचा प्रादुर्भाव फार प्राचीन काळीच झाला आणि पुढच्या हजारो वर्षांत जगातील निरनिराळ्या देशांत ती संस्था प्रसार पावली. भारतात भारतीय युद्धोत्तर काळात या वीतराग संन्यासप्रवृत्तीचा उगम झाला. बुद्धाच्या पूर्वी अनेक शतके निर्माण झालेल्या प्राचीन अशा बृहदारण्यकोपनिषदात प्रथम संन्यासाश्रमाची तात्त्विक व सविस्तर मांडणी केलेली आढळते. जेव्हा समाजाची घडी विघडते, व्यक्तीच्या कर्तृत्वाला अवसर मिळेनासा होतो, गृहसंस्था व राज्यव्यवस्था यांच्या मोडकळीमुळे सारा संसारच हवालदिल होऊन जातो, अशा वेळी भिक्षुसंस्था ऊर्जितावस्थेला येते. भारतीय युद्धानंतर या देशात वरील सर्व गोष्टी घडल्या आणि संसार सोडून मठकत राहणारे भिक्षुसंघ भारतात सर्वत्र वळावले. त्यानंतर जन्माला आलेल्या गौतम बुद्धानेही ऐन तारुण्यात राज्य आणि संसार यांचा त्याग करून भिक्षुदीक्षा घेतली. त्यामुळे बौद्ध धर्मातही ही भिक्षुसंस्था शिरली. बुद्धाच्या भिक्षुधर्माने त्याच्या हयातीतच आपला प्रभाव दाखवायला सुरवात केली. पुढील दोन शतकांत बौद्ध धर्माला साम्राज्यासन लाभले. सम्राट अशोकाच्या काळात लक्षावधी बौद्ध भिक्षू देशभर पसरून मठस्थापना करून राहिले होते आणि लोकांनी श्रमाने मिळवलेल्या संपत्तीचे ऐदी वाटेकरी बनले होते, असे तत्कालीन वाङ्मयावरून कळते. अशोकाला बौद्ध दीक्षा देण्यासाठी बौद्ध भिक्षू उपगुप्त हा जेव्हा त्याच्याकडे आला, तेव्हा त्याच्याबरोबर त्याचे अठरा हजार भिक्षुशिष्य होते. त्या काळात निराशावाद आणि शून्यवाद यांनी समाजातील सर्व विचारवंतांची मने भारून गेली होती, असे दिसते. त्यामुळे देश दिवसेंदिवस अवनत स्थितीला जाऊ लागला. भिक्षुसंघाची ही लाट सगळया समाजाला बुडवील की काय, अशी भीती पुढील राज्यकर्त्यांच्या मनात निर्माण झाली. ही लाट थोपविण्याचे कायदेशीर प्रयत्नही मग सुरू झाले. अशोकानंतरच्या मौर्य राजांनी ऐन तारुण्यात संसार सोडून भिक्षू बनणाऱ्या लोकांना शासन करणारे कायदे निर्माण केले. त्यापुढच्या पुष्यमित्र शुंगाने भिक्षुमठांचे अधिकार काढून घेतले आणि त्यांची वतनेही खलास केली. पण हा प्रयत्न फार थोडा वेळ यशस्वी झाला. पुढच्या हर्षवर्धनाच्या साम्राज्यात भिक्षुसंस्था पुनश्च बळावली आणि तिला राजमान्यताही मिळाली. हर्षवर्धनाने बौद्ध भिक्षूंवर राज्यलक्ष्मीचा आणि वैभवाचा जणू वर्षावच केला. पुढे इ. स. च्या ११ व्या शतकात गझनीच्या महंमुदाची स्वारी होईपर्यंत भारतातील हिंदू समाजावर या भिक्षुसंस्थेचा फार मोठा प्रभाव होता, अशी इतिहासाची साक्ष आहे.

पूर्वेच्या वैराग्यप्रवण धर्मसंस्थेप्रमाणेच पश्चिमेकडेही सनपूर्व सहाव्या शतकात वैराग्यवाद उत्पन्न झाला. यहुदी धर्मातील अनेक प्रेषितांनी अरण्यात जाऊन तपश्चर्या केल्याचे उल्लेख त्यांच्या धर्मग्रंथांत सापडतात. ख्रिस्ती धर्माने तर प्रारंभापासूनच बौद्ध धर्माप्रमाणे संन्यासवादी विचारसरणीचा अंगीकार केला होता. ख्रिस्ती धर्माच्या स्थापनेपूर्वी ग्रीस देशातही विरक्तिवादाला महत्त्व आले होते. ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराबरोबर

विरक्तिवादाने भारलेल्या मठसंस्था इजिप्त आणि आशिया-मायनर या भागांत फार जोरावल्या. रोमन साम्राज्याच्या अधःपाताच्या काळात तेथील गुलामगिरीच्या संस्थेमुळे आणि चैनीला चटावलेल्या वरिष्ठ वर्गाच्या ऐदीपणामुळे सामाजिक व्यवहाराचा सगळा तोलच ढासळला. सामान्य मनुष्याला परिश्रम करून सुखासमाधानाने मीठभाकर खाणेही अशक्य ठरले. या सामाजिक दुर्गतीतूनच युरोपात मठसंस्था भरभराटीस आली. त्यामुळे लग्नसंस्थेची प्रतिष्ठा आणि गृहस्थाश्रमाचे धार्मिक पूज्यत्व लोप पावले. इंद्रियसुख आणि लैंगिक कामना ही महापातके ठरली. त्याचा परिणाम म्हणून ढोंग, दुरभिमान व गुप्त पातके यांचे पीक फोफावले. समाजाचा निरोगी व्यवहार आणि शुद्ध व्यवसाय डबघाईस आला.

विद्यमान सगळ्याच धर्मांनी ऐहिक सुखापेक्षा पारलौकिक कल्याणाला अंतिम श्रेष्ठत्व दिले आहे. माणसाला जगाच्या व्यर्थत्वाची व संसाराच्या गौणत्वाची शिकवण देण्यातच सर्व धर्मांनी कृतार्थता मानली आहे. त्यामुळे ऐहिक जीवन सुधारण्याच्या मानवी प्रवृत्तींना एक प्रकारे पायबंदच बसला. धर्माच्या या संन्यासपर विचारसरणीने सामाजिक उत्कर्षाची अणि वैयक्तिक अभ्युदयाची प्रेरणा मंदावली. एका वाक्यात सांगावयाचे, तर ऐहिक उत्कर्ष आणि पारमार्थिक ध्येय यांचा विरोध टाळणारी धर्मसंस्था आज जगात कुठेच अस्तित्वात नाही.

**मानवधर्म—** वर ज्या धर्मांचा संक्षिप्त इतिहास पाहिला, ते सारे धर्म या नावाने प्रसिद्ध असले, तरी खऱ्या अर्थाने ते धर्म नसून विशिष्ट उपासनासंप्रदाय आहेत. प्रत्येक संप्रदायाचे काही आचार-विचार असतात व त्याचे एखादे तत्त्वज्ञानही असते. पण प्रत्येक संप्रदाय हा त्या तत्त्वज्ञानाच्या भूमिकेवर उच्च व व्यापक होताना दिसत असला, तरी आचाराच्या आणि व्यवहाराच्या क्षेत्रात तो आपल्या अनुयायांपुरताच विचार करतांना दिसतो. आपल्या संप्रदायाचे अनुयायी असतील तेवढ्यांनाच जगण्याचा व समृद्धी उपभोगण्याचा अधिकार असून, स्वर्ग-मोक्ष ही त्यांचीच मिराशी आहे, असे तो मानीत असतो. त्याचबरोबर इतर संप्रदायाचे अनुयायी हे नास्तिक, पाखंडी किंवा पापी असून त्यांना स्वर्ग-मोक्ष कधीही मिळणार नाहीत आणि आपल्या संप्रदायात आल्यावाचून ते धार्मिकही ठरणार नाहीत, असे तो जाहीरपणे सांगत असतो.

जगातील संप्रदायांच्या या आग्रही व अभिनिविष्ट वृत्तीतूनच निर्दय, कठोर आणि घृणास्पद असे अत्याचार घडून आले आहेत. सामुदायिक हिंसा, कत्तली, जाळपोळ, लुटालूट, मोडतोड, संस्कृतीचा विध्वंस अशा गोष्टींनी मानवी इतिहास जो रक्ताळला गेला, त्याला हा सांप्रदायिक अभिनिवेश आणि दुराग्रहच कारणीभूत आहे. हे सर्व वाचून, ऐकून आणि अनुभवून जगातील कित्येक विचारवंत लोक धर्मालाच विटून गेलेले दिसतात. जगात धर्म, पंथ व संप्रदाय नसते तर मानवसमाजांनी असे रक्तपात आणि विध्वंस कधीच केले नसते, असे त्यांचे म्हणणे आहे. त्यामुळे जगात मुळी धर्मच नसावा अशा धारणेने ते विचार करताना दिसतात. पण वर उल्लेखिलेली सर्व हिंसक आणि घृणास्पद कृत्ये ही 'धर्मा'ने केलेली नसून ती 'संप्रदायांनी' केलेली आहेत, हे विसरता कामा नये.

खरा धर्म हा सांप्रदायिकतेच्या अतीत असतो. तो मानवमात्राच्या इहपर कल्याणाची चिंता वाहतो. तो सर्वांशाने मानवधर्म असतो. त्याच्या धार्मिकतेच्या किंवा अधार्मिकतेच्या कसोटचा या कर्मकांडावर किंवा विशिष्ट उपासनेवर आधारलेल्या नसतात; तर त्या नैतिक गुणांवर आधारलेल्या असतात. 'आत्मनः प्रतिकूलानि परेषां न समाचरेत्' = स्वतःला प्रतिकूल अर्थात अपायकारक, दुःखदायक, अवनतिकारक आणि अधोगामी असतील अशा गोष्टी आपण दुसऱ्याच्या संबंधात आचरू नयेत, हे खऱ्या धर्माचे सूत्र आहे. जर आपली कोणी चोरी करू नये, असे वाटत असेल, तर आपणही दुसऱ्याची चोरी करता कामा नये. दुसऱ्याने खोटे बोलून आपल्याला फसवू नये, असे वाटत असेल, तर आपणही खोटेपणाचा आश्रय करता कामा नये. आपली कोणी हिंसा करू नये असे वाटत असल्यास आपणही दुसऱ्याची हिंसा करण्यास प्रवृत्त होता कामा नये, असे त्या सूत्राचे स्पष्टीकरण देता येईल.

धैर्य, क्षमा, दम (मनःसंयम), अस्तेय (चोरी न करणे), शौच (अंतर्बाह्य शुचिता), इंद्रियनिग्रह, विवेक, विद्या, सत्य व अक्रोध असा मनुस्मृतीत जो दशविध धर्म सांगितलेला आहे, तो सर्व मानवांसाठी सांगितलेला धर्म आहे. या धर्मात कोणालाही निषेध नाही, कोणालाही मज्जाव नाही.

माणसाने माणसासारखे वागावे, असे व्यवहारात आपण अनेकदा म्हणतो. त्याचा अर्थ माणसाने वरील दशविध धर्म अंगी बाणवण्याचा प्रयत्न करावा, असा आहे. माणसाने माणसासारखे वागावे याबरोबरच त्याने पशूसारखे वागू नये, असेही सांगितले आहे. ही गोष्ट समजून घ्यायची तर मनुष्य व पशू यांतला भेद प्रथम लक्षात घेतला पाहिजे. तसे पाहिले तर मनुष्य व पशू यांत साम्य बरेच आहे. मनुष्यात पशुभाव आहे, हे विचारवंतांनीदेखील मान्य केले आहे. 'आहारनिद्राभयमैथुनं च' हे संस्कृत सुभाषित प्रसिद्ध आहे. आहार, निद्रा, भय, मैथुन या व अशाच काही सहज प्रेरणा मनुष्य व पशुपक्षी या सर्वांत समान आहेत, असे आजचे प्राणिशास्त्रज्ञही सांगतात. मग मनुष्य व पशू यांतला भेद नेमका कुठे

आढळतो, त्याचे उत्तर धर्म या शब्दानेच द्यावे लागते. मनुष्य हा इतर प्राण्यांपेक्षा बुद्धीने व ज्ञानाने श्रेष्ठ आहे, यात शंका नाही. या ज्ञानश्रेष्ठतेमुळेच सर्वसामान्य सहज प्रवृत्ती किंवा प्रेरणा यांच्याहून श्रेष्ठ सूक्ष्म अशा भावना स्वतःच्या ठिकाणी आहेत, हे तो जाणू शकतो. आहार-निद्रादी प्राथमिक प्रवृत्ती या मूर्त व भौतिक विषयांना धरून असतात, तर सूक्ष्म व उदात्त प्रवृत्ती या अमूर्त किंवा अभौतिक विषयाशी संबद्ध असतात. वरील मनुप्रणीत धृती, क्षमा, दम, सत्य, अहिंसा, इ. भावना या उदात्त व सूक्ष्म असून त्या माणसाच्या ठिकाणी नैसर्गिकच आहेत. त्यांचे ज्ञान व त्यांचा विकास या गोष्टी मनुष्याला साध्य आहेत. या श्रेष्ठ व उदात्त भावनांनाच नैतिक व आध्यात्मिक भावना असे म्हणतात. पशूहून मनुष्याचे वैलक्षण्य त्याच भावना दाखवतात. या श्रेष्ठ व उदात्त प्रवृत्तींचा जीवनात विकास करणे, हाच खरा धर्म होय. धर्माचा श्रेष्ठतर उद्देश मानवाची नैतिक व आध्यात्मिक उन्नती करणे हाच आहे.

मनुष्याच्या अर्थकामादी प्रवृत्ती आणि नैतिक प्रवृत्ती या विरोधी असल्या, तरी काही अंशी त्या एकमेकांना पूरक ठरू शकतात. अर्थ–कामांच्या सिद्धीसाठी मनुष्याला कष्ट व प्रयत्न करावे लागतात व हे प्रयत्न करण्याची प्रेरणा व शक्ती त्याला काही प्रमाणात नैतिक व आध्यात्मिक गुणांतून मिळू शकते. कुटुंबप्रेम, राष्ट्रप्रेम, इ. गोष्टी हे याचे उदाहरण होय. अर्थ–कामांच्या आकांक्षा थोड्यातरी तृप्त झाल्यावाचून धार्मिक प्रवृत्तींचा विकास होणे शक्य नसते, असाही अनुभव आहे. पण या अर्थ-कामप्रवृत्ती उच्छृंखल मात्र बनू देता कामा नयेत. त्या उच्छृंखल झाल्यास मनुष्य नैतिकतेची बंधने झुगारून देऊन सत्ता, संपत्ती व भोग यांच्यामागे लागतो. त्यामुळेच माणसा-माणसांत किंवा समाजासमाजांत विरोध व कलह निर्माण होतात. ही आपत्ती टाळण्यासाठीच कोणत्याही समाजात अर्थ–कामांचे नियमन करणारे नियम, कायदे किंवा संकेत निर्माण होतात. त्यांनाच धर्मनियम असे म्हणतात. समाज सुव्यवस्थित ठेवण्यासाठी ते कायदे किंवा संकेत पुरेसे होत असले, तर त्या समाजाची नैतिक व आध्यात्मिक पातळी उच्च आहे, असे म्हणता येते. नतिक प्रवृत्ती ही समाजाच्या धारणेला अत्यंत आवश्यक असते. ती ज्या गुणांच्या द्वारे प्रकट होते, त्या गुणांनाच समुच्चयाने सामान्य धर्म किंवा मानवधर्म असे म्हटले जाते. याचे तात्पर्य असे सांगता येईल, की नीतिमत्ता हे खऱ्या धर्माचे एक महत्त्वाचे अंग असून, अर्थकामप्रवृत्तीचे नियमन करणे हे तिचे स्वरूप आहे.

असा हा धर्म मानवमात्राला शरण्य आहे. तो अभ्युदय व निःश्रेयस साधून देणारा आहे. अशा धर्माहून श्रेष्ठ असा मानवाचा कोणी मित्र नाही. सर्व आप्त, इष्ट, मित्र एक दिवस माणसाला सोडून जातात; पण धर्म मात्र जीवनभर आणि जीवनाच्या अंतानंतर परलोकातही माणसाला सोबत करीत राहतो असे म्हटले आहे. 'धर्मो रक्षति रक्षितः'= धर्माचे आपण रक्षण करावे म्हणजे धर्मही आपले रक्षण करायला चुकत नाही, असे महाभारतात म्हटले आहे. व्यास महर्षी एका ठिकाणी मनुष्यमात्राला पुढील सवाल जणू तळमळून करतात–

ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति मे।
धर्मादर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते ॥

अर्थ – मी भुजा उभारून आक्रोश करतो आहे; पण माझे कोणी ऐकत नाही. (हे मानवांनो) धर्मामुळे अर्थ व काम हे दोन्ही साध्य होतात; असे असताना तुम्ही धर्माची कास का धरीत नाही ?

वेद, उपनिषदे, स्मृती, निबंध, संत, अवतारी पुरुष आणि महात्मे या सर्वांनीच इहपर कल्याणासाठी मानवाला धर्म आचरण्याचा उपदेश दिला आहे. खरी गोष्ट ही आहे, की जीवनापासून धर्म अलग केला गेला, तर जीवनातला रस आटून जाईल. धर्म हे मानवतेचे श्रेष्ठ आलंबन आहे; ते मानवतेचे रक्षण आहे. मानवता टिकायला हवी असेल, तर तिच्या हृदयातला धर्मरूपी प्राण जागता ठेवायलाच हवा. [धर्मरहस्य; हिं. ध.; हिं. ध. स ; द. आ. स्मा.; धर्मशास्त्रविचार]

(२) विष्णूचा एक अवतार. विधात्याने सृष्टी निर्माण केल्यावर तिचे रक्षण कोण करील, याविषयी त्याला चिंता पडली. त्या वेळी विधात्याच्या शरीरापासून जवळ जवळ त्याच्यासारखा दिसणारा एक पुरुष उत्पन्न झाला. विधात्याने त्याचे नाव धर्म असे ठेवले व सृष्टीचे रक्षण करण्याविषयी त्याला विनंती केली. यज्ञ, सत्य, तप व दान असे त्याला चार पाय होते. काळ, अवकाश, शौच व आत्मशुद्धी हे त्याचे चार हात होत. श्रुती, स्मृती, सदाचार व आत्म्याचे प्रिय ही त्याची चार शुभ्र वस्त्रे होत. कीर्ती, लक्ष्मी, धृती, मेधा, पुष्टी, श्रद्धा, क्रिया, मती, बुद्धी, लज्जा, शांती, क्षांती, सिद्धी आणि तुष्टी अशा त्याला चौदा स्त्रिया होत्या. हा रूपकात्मक पुरुष आहे. अनेक धर्मविषयक तत्त्वे व गुण यांचा त्या पुरुषाशी अवयवसंबंध व नातेसंबंध दाखवलेला आहे.

(३) ज्येष्ठ पांडव. याला युधिष्ठिर असेही नाव आहे. महाभारतकथेतील ही एक प्रभावी व्यक्ती आहे. हस्तिनापूरचा राजा पांडू किंदम नामक मृगरूपी सिद्धाच्या शापामुळे प्रजोत्पादनाला असमर्थ ठरल्यानंतर, कुंतीने दुर्वास ऋषीकडून प्राप्त झालेल्या मंत्रांनी क्रमशः यम, वायू व इंद्र यांना आवाहन केले आणि त्यांच्यापासून तिला अनुक्रमे युधिष्ठिर, भीम व अर्जुन

पुत्र झाले. युधिष्ठिर हा यमधर्मापासून झालेला असल्यामुळे त्याला धर्मराज अथवा धर्म असे अभिधान प्राप्त झाले आणि त्याच्या धर्मशील वृत्तीमुळे हे नाव त्याच्या बाबतीत यथार्थ ठरले.

धर्माचा स्वभाव जसा सात्त्विक तसे त्याचे रूपही सात्त्विक होते. तो उंच व सडपातळ होता. त्याचा वर्ण सुवर्णासारखा गौर आणि तेजःपुंज होता. डोळे कमलासारखे प्रफुल्ल होते. नाक पोपटाच्या चोचीसारखे सुंदर होते. आणि चालणे सिंहासारखे डौलदार होते.

पांडू अरण्यात मृत्यू पावल्यानंतर कुंती आपल्या व माद्रीच्या मुलांना घेऊन हस्तिनापुराला धृतराष्ट्राकडे गेली. तिथे द्रोणाचार्यांच्याकडे धर्माने धनुर्विद्येचे शिक्षण घेतले. मात्र पुढील आयुष्यात भीमार्जुनांप्रमाणे तो शस्त्रास्त्रविद्येत विशेष नैपुण्य कधी दाखवू शकला नाही.

धर्माचे चारित्र्य आणि प्रजेला खूष ठेवण्याची वृत्ती यांनी हस्तिनापुरातली सर्व प्रजा प्रभावित झाली होती. लोकमताच्या प्रभावामुळेच धृतराष्ट्राने धर्माला यौवराज्याभिषेक केला. त्या वेळी धर्माविषयी प्रकट झालेले लोकमत व्यासांनी पुढीलप्रमाणे व्यक्त केले आहे.

ते वयं पाण्डवज्येष्ठं तरुणं वृद्धशीलिनम् ।
अभ्यषिञ्चाम साध्वद्य सत्यकारुण्यवेदिनम् ॥
(म. भा. आदि. १४१.२७)

अर्थ– ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर वयाने तरुण असला, तरी त्याची बुद्धी वृद्धाप्रमाणे परिपक्व आहे. तो सत्यवादी, दयाशील आणि विद्वान आहे. म्हणून आपण त्यालाच आता राज्यावर बसवू या.

हस्तिनापुरातील प्रजेचे हे धर्मप्रेम पाहून धृतराष्ट्राने धर्मादी पांडवांना वारणावताला पाठवून, तिथे त्यांना लाक्षागृहात जाळून त्यांचा नाश करण्याचा घाट घातला. विदुराकडून या कारस्थानाची वार्ता कळेपर्यंत धृतराष्ट्राच्या वर्तनाविषयी धर्माला यत्किंचितही शंका आली नव्हती. कारण वैऱ्यावरही विश्वास ठेवण्याइतका त्याचा स्वभाव सात्त्विक होता.

वारणावतातील लाक्षागृहातून सुरक्षित बाहेर पडल्यानंतर धर्मादी पांडव द्रौपदीच्या स्वयंवराला ब्राह्मणवेषाने उपस्थित राहिले. त्या स्वयंवरात अर्जुनाने द्रौपदीला जिंकले. आणि नंतर तिचा पाचही पांडवांशी विवाह झाला. मग बंधू, पत्नी व माता यांच्यासह धर्मराज परत हस्तिनापुराला गेला. तो आल्याचे समजताच प्रजाजनांनी त्याचे अत्यंत उत्साहाने स्वागत केले. प्रजेच्या मनात त्याच्याविषयी ज्या भावना वसत होत्या, त्या व्यक्त करणारे आदिपर्वातील श्लोक असे–

अयं स पुरुषव्याघ्रः पुनरायाति धर्मवित् ।
यो नः स्वानिव दायादान् धर्मेण परिरक्षति ॥
अद्य पाण्डुर्महाराजो वनादिव जनप्रियः ।
आगतः प्रियमस्माकं चिकीर्षुर्नात्र संशयः ॥
किं न नाद्य कृतं तात सर्वेषां नः परं प्रियम् ।
यन्नः कुन्तीसुता वीरा नगरं पुनरागताः ॥
यदि दत्तं यदि हुतं विद्यते यदि नस्तपः ।
तेन तिष्ठन्तु नगरे पाण्डवाः शरदां शतम् ॥
(म. भा. आदि. २०७. १७-१९, २७)

अर्थ– स्वतःच्या नातलगांप्रमाणेच जो प्रजांचे परिपालन करीत असतो, तो हा धर्मज्ञ पुरुषव्याघ्र पुनश्च येत आहे. याला पाहून आम्हांला असे वाटते, की महाराज पांडूच पुनश्च वनातून आमचे प्रिय करण्यासाठी आला आहे, यात संशय नाही. वीर कुंतीपुत्र पुनश्च राजधानीत येत आहेत, यापेक्षा आमचे दुसरे काही प्रिय असू शकेल काय ? आम्ही काही दान, हवन व तप केले असेल, तर त्याच्या पुण्याने पांडव शंभर वर्षे या नगरीतच स्थिर होवोत.

प्रजेचे हे प्रेम आणि यादव–पांचालांचे पाठबळ यांमुळे धृतराष्ट्राला पांडवांचा राज्यावरील हक्क डावलणे अशक्य ठरले. मग धृतराष्ट्राने खांडववन नामक निर्जन प्रदेश पांडवांना देऊन तिथे त्यांना राज्य करायला सांगितले. धर्माने तिथे इंद्रप्रस्थ नगर वसवून सर्वार्थांनी खरे ठरणारे धर्मराज्य उभारले. मग श्रीकृष्णाने धर्माकडून राजसूय यज्ञ करविला आणि धर्माला सम्राटपदावर आरूढ केले. या वेळी राजवैभवाचा उपभोग घेत असतानाही धर्माने धर्माची रेषा ओलांडली नाही.

आपण दुष्ट हेतूने दिलेल्या खांडववनाचे पांडवांनी नंदनवन बनविले आहे, हे दुर्योधनादी कौरवांनी राजसूय यज्ञाच्या वेळी पाहिल्यावर त्यांच्या मत्सराने पुनः पेट घेतला. मग त्यांनी हस्तिनापुरात कपटद्यूताची योजना करून धर्माला द्यूताचे आव्हान दिले. युद्धासाठी आणि द्यूतासाठी कोणी आव्हान केल्यास नाही म्हणायचे नाही, अशी धर्माची आत्मघातकी प्रतिज्ञा होती. त्यामुळे कौरवांचा हेतू ध्यानी येऊनही त्याने ते द्यूताचे निमंत्रण स्वीकारले. प्रत्यक्ष द्यूताला आरंभ झाल्यानंतर शकुनी कपटद्यूत खेळत आहे, हे ध्यानी येऊनही धर्माने माघार घेतली नाही. या द्यूताचा परिणाम व्हायचा तोच झाला. इंद्रप्रस्थाचे राज्य, बंधू, स्वतः आणि द्रौपदी हे सर्व त्याने क्रमाने पणास लावले आणि कौरवांनी ते सर्व जिंकले. धर्माच्या डोळ्यांदेखत सम्राज्ञी द्रौपदीची राजसभेत विटंबना झाली. द्रौपदीने त्याला उद्देशून कटू शब्द उच्चारले; भीम त्याचे हात जाळायला निघाला; परंतु अगतिकता व शांतिप्रियता यांमुळे धर्म तटस्थ राहिला.

धृतराष्ट्राकडून मिळालेल्या वरांनी द्रौपदीने धर्माला व अन्य पांडवांना मुक्त केल्यानंतरही धर्माला स्वतःला सावरता आले नाही. मुक्त होऊन इंद्रप्रस्थाकडे जात असताना कौरवांनी पुनश्च त्याला द्यूताचे आव्हान दिले आणि त्याने ते अविचाराने स्वीकारले. या दुसऱ्या द्यूतात पराभूत झाल्यावर ठरल्याप्रमाणे त्याला बंधू व पत्नी यांच्यासह बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास पत्करावा लागला.

धर्मशीलता हा धर्माच्या जीवनाचा स्थायीभाव होता. ऐहिक लाभालाभाची कल्पनाही मनात न आणता, केवळ कर्तव्यासाठी कर्तव्य, या बुद्धीने तो धर्माचे आचरण करीत असे. वनवासात द्रौपदीने त्याला त्याच्या धार्मिक भोळेपणाबद्दल अनेकदा दूषण दिले व दुष्टांशी वागताना सौजन्य दाखविल्यामुळे जी अनेक संकटे सर्वांवर कोसळली, त्यांचीही तीव्र शब्दांत जाणीव दिली; परंतु तरीही त्याने आपल्या वृत्तीत व वर्तनपद्धतीत बदल केला नाही. आपली भूमिका पटवून देताना द्रौपदीजवळ त्याने जे उद्गार काढले, ते असे –

नाहं कर्मफलान्वेषी राजपुत्रि चराम्युत ।
ददामि देयमित्येव यजे यष्टव्यमित्युत ।।
अस्तु वाऽत्र फलं मा वा कर्तव्यं पुरुषेण यत् ।
गृहे वा वसता कृष्णे यथाशक्ति करोमि तत् ।।
(म. भा. वन. ३१.२–३)

अर्थ – हे राजपुत्री, मी जे कर्तव्य करतो, त्याच्या फळाची अपेक्षा कधीच करीत नाही. दान करणे किंवा यज्ञ करणे या गोष्टी कर्तव्य म्हणूनच मी करतो. जे पुरुषकर्तव्य आहे, त्याचे फळ मिळो वा न मिळो, ते मी घरात किंवा वनात राहून, हे कृष्णे, यथाशक्ति पार पाडतो.

धर्मराजाच्या या भाषणात त्याचे जीवनविषयक सर्व तत्त्वज्ञान व्यक्त झाले आहे. धर्मासाठी धर्म, हे त्याच्या विचारांचे सूत्र आहे. परंतु धर्माचा उदय ज्यासाठी झाला, ते समाजधारणेचे उद्दिष्टच ज्या धर्माचरणाने बाधित होते व धर्मद्रोह्यांचे बल ज्यामुळे वाढते, ते खरे धर्माचरणच नव्हे, हे धर्मराजाच्या कधीही ध्यानी आले नाही. कृष्ण, द्रौपदी व भीम यांनी त्याला अनेक वेळा सावध करण्याचा प्रयत्न केला; परंतु त्या सर्वांना त्याने त्या प्रत्येक वेळी तत्त्वज्ञानाच्या भूमिकेवरून गप्प बसवले. वस्तुस्थितीचे भान ठेवून धर्माधर्मनिर्णय करायला तो केव्हाही प्रवृत्त झाला नाही.

वनवासकाळात त्याला अनेकदा निराशेने पछाडले होते. अनेक ऋषीमुनींनी त्या त्या वेळी त्याचे सांत्वन केले आहे. पांडव द्वैतवनात असता चित्ररथ गंधर्वाने एकदा दुर्योधनादी कौरवांना पुरेपूर शासन करायचे ठरवले. त्या वेळी धर्म म्हणाला, 'आपसात संघर्ष असता कौरव शंभर आणि आम्ही पाच असलो तरी परकीयांशी लढताना आम्ही एकशे पाच आहोत.' या उदात्त भावनेनेच धर्माने कौरवांना चित्ररथाच्या तावडीतून सोडविले. ब्राह्मणवेषाने दीर्घ काळ धर्माच्या आश्रमात राहिलेल्या जटासुराने द्रौपदीला पळवून नेली, तेव्हा धर्म त्याला कृतज्ञतेचा महिमा सांगण्यापलिकडे काही करू शकला नाही. हेच पाप करणाऱ्या जयद्रथाला भीमार्जुनांनी पराभूत करून पकडून आणल्यावर धर्माने त्याच्यावर दया करून त्याला सोडून दिले. त्याच्या या सौजन्याने दुष्टांचे हृदय तर विरघळले नाहीच; उलट ते अखेरपर्यंत त्याला पीडा देत राहिले.

अज्ञातवासाच्या काळात धर्म हा कंकभट होऊन मत्स्यराज विराटाच्या राजसभेत राजाच्या मनोरंजनासाठी त्याच्याबरोबर द्यूत खेळत असे. त्या काळी विराटाचा उन्मत्त मेव्हणा कीचक याने सैरंध्रीच्या रूपाने विराटाच्या अंतःपुरात राहिलेल्या द्रौपदीवर बलात्कार करण्याचा प्रयत्न केला आणि तिला भर सभेत लाथ मारून खाली पाडले; परंतु तरीही धर्मराज शांतिब्रह्मच राहिला आणि संतापाने जळणाऱ्या द्रौपदीलाच त्याने तिथून निघून जायला सांगितले. त्या काळी भीम जर कीचकवधासाठी प्रवृत्त झाला नसता, तर धर्मराजाची धार्मिकता द्रौपदीची अब्रू वाचवू शकली नसती.

अज्ञातवास संपल्यावर राज्याच्या पुनःप्राप्तीचा विचार सुरू झाला, तेव्हा कौरवांकडून केवळ पाच गावे मिळाली तरी पुष्कळ झाले, अशा आत्मसंतुष्ट आणि महत्त्वाकांक्षाशून्य वृत्तीने त्याने कृष्णाला शिष्टाईसाठी कौरवांकडे पाठवले. कृष्णशिष्टाई असफल झाल्यानंतर त्याने युद्धाचा पर्याय स्वीकारला, तोही अनिच्छेनेच. कृष्णाने त्याच्याकरवी भीष्मद्रोणांच्या मृत्यूचे उपाय जाणून घेतले आणि त्याला असत्यभाषण करायला लावून द्रोणाचार्यांना ठार केले. परंतु या सर्व गोष्टींचा त्याला विषादच वाटत राहिला. भारतीय युद्धातही शल्यवध सोडला, तर त्याच्या हातून नाव घेण्याजोगा एकही पराक्रम घडलेला नाही. युद्धाच्या अखेरीस सर्व पांडव कृष्णासह दुर्योधनाकडे गेल्यावर धर्मराज त्याला आपल्या स्वभावाविरुद्ध पुष्कळच टोचून बोलला हे खरे; परंतु त्या प्रसंगीही त्याने पूर्वीच्या सर्व विजयांवर पाणी फिरवण्याचीच वेळ आणली होती. आमच्यापैकी कोणालाही कोणत्याही युद्धपद्धतीने तू जिंकलेस, तर आम्ही हे राज्य सोडून अरण्यात निघून जाऊ, असे भोळसटपणाचे आव्हान त्याने दुर्योधनाला दिले. कृष्णाने त्वरा करून भीमाला पुढे केले आणि दुर्योधनाच्या उद्ध्वस्त मनःस्थितीचा फायदा घेतला, म्हणूनच धर्माने उपस्थित केलेल्या या नव्या संकटातून पांडव सुटू शकले. तसे झाले नसते, तर दुर्योधन

धर्माच्या आव्हानाचा फायदा घेऊन लीलया विजयी झाला असता आणि धर्म पुनश्च वनवासी बनला असता.

दुर्योधनाचा वध करून पांडव संपूर्ण विजयी होऊन राज्याचे स्वामी बनले खरे; परंतु बांधवांच्या संहाराने काळवंडलेले वैभव भोगण्याचे धर्माने नाकारले. तो राज्याभिषेक करून घ्यायला तयारच होईना. सर्व बंधूंनी, कृष्णाने व द्रौपदीनेही नाना प्रकारे समजावून सांगितल्यावर त्याने राज्यपदाचा स्वीकार केला.

दीर्घकाळपर्यंत धर्माधिष्ठित राज्य केल्यानंतर धर्मराजाने अभिमन्यूचा पुत्र परीक्षित याच्यावर राज्य सोपवून आपले बंधू व पत्नी द्रौपदी यांच्यासह वानप्रस्थाश्रम स्वीकारला. अखेरीस महाप्रस्थानाच्या वाटेवर त्याला द्रौपदी व सर्व बंधू यांचे देहावसान पाहावे लागले. तो एकटाच स्वर्गात पोचू शकला.

धर्मराज हा जन्माने क्षत्रिय असला, तरी त्याची मनोवृत्ती एखाद्या तपःपरायण ब्राह्मणालाच साजेशी होती. दया, क्षमा, शांती, सत्य, अहिंसा, इ. मूल्यांविषयी त्याची एकांतिक निष्ठा होती. धर्माधर्मनिर्णयाच्या बाबतीत त्याचे मन सर्वस्वी असमर्थ होते. उदात्त मूल्यांविषयीच्या आपल्या निष्ठेत काही वैगुण्य असल्यामुळेच ती मूल्ये प्रत्यही चिरडली जात आहेत आणि आपल्याला त्यांचे रक्षण करता येत नाही, या वस्तुस्थितीचे त्याला केव्हाही भान उरले नाही. महाभारतातील अनेक व्यक्ती त्याला धर्मात्मा, महात्मा म्हणून गौरवतात हे खरे; परंतु तो क्षात्र धर्मात उणा पडल्यामुळेच पांडव अनेकदा पराभवाचे वाटेकरी झाले, हेही महाभारतकारांनी स्पष्ट केले आहे. वैयक्तिक पुण्याच्या बळावर तो स्वर्गात पोचू शकला असला, तरी सामाजिक दृष्ट्या त्याच्या विकृत धर्मनिष्ठेतून उद्भवणारे अनर्थ कृष्ण, भीम, अर्जुन व द्रौपदी यांच्यामुळेच दूर होऊ शकले. कृष्णाची युक्ती, भीमार्जुनांची शक्ती आणि द्रौपदीची दीप्ती यांच्या अधिष्ठानावरच धर्माची विजयपताका उभी राहिली. अन्यथा धर्माचा धर्म केव्हाच धुळीला मिळाला असता. महाभारतकारांनी धर्माची ही विशिष्ट व्यक्तिरेखा रंगवून धर्माधर्मनिर्णयाच्या क्षेत्रातला एक विलक्षण वस्तुपाठच दिला आहे. [म. भा. व्या.; म. भा. व्य.; भा. त. रा.]

## धर्म-अधर्म

जैन तत्त्वज्ञानातील दोन स्वतंत्र द्रव्ये. त्यांच्या सहा द्रव्यांपैकी धर्म व अधर्म, आकाश व काल ही चार द्रव्ये निष्क्रिय आणि जीव व पुद्गल ही दोन द्रव्ये सक्रिय आहेत. जीव-पुद्गल यांच्या गतीला धर्मद्रव्य व स्थितीला अधर्मद्रव्य साहाय्यक होते. या दोन द्रव्यांविषयी माहिती अशी —

धम्मात्थिकायमरसं अवण्णगंधं असद्दमप्फासं ।
लोगोगाढं पुठ्ठं पिहुलमसंखादियपदेसं ।।

(पंचास्तिकाय)

अर्थ— धर्मद्रव्यात रूप, रस, गंध, स्पर्श व शब्द हे गुण नाहीत. त्याने समस्त लोक व्यापलेला आहे. तसेच ते अखंडित व असंख्यातप्रदेशी आहे.

ज्याप्रमाणे जल हे माशांच्या गतीला साहाय्यक होते, त्याप्रमाणे धर्मद्रव्य हे जीव – पुद्गलांच्या गतीला साहाय्यक होते.

जह हवदि धम्मदव्वं तह तं जाणेह दव्वमधम्मक्खं ।
ठिदिकिरियाजुत्ताणं कारणभूदं तु पुढवीव ।।

(पंचास्तिकाय)

अर्थ— अधर्मद्रव्य हे धर्मद्रव्याप्रमाणेच आहे. थांबणारे जीव व पुद्गल यांना ते पृथ्वीप्रमाणे थांबायला मदत करते.

धर्मद्रव्य व अधर्मद्रव्य ही गतिस्थितीला साहाय्यक असली, तरी प्रेरक मात्र नाहीत. फक्त जैन धर्मातच ही दोन द्रव्ये मानलेली आहेत. [जै. ध.]

## धर्मकाय

एक बौद्ध संज्ञा. काय म्हणजे देह होय. बुद्धाच्या परमार्थभूत देहाला धर्मकाय असे म्हणतात. या कायाला ब्रह्मकाय व युगनद्धकाय अशीही नावे आहेत.

बुद्धाचा हा काय अनंत, अपरिमेय, सर्वव्यापक, अनिर्वचनीय व सूक्ष्म आहे. संभोगकाय व निर्माणकाय या देहांना हाच काय आधारभूत आहे. या कायामुळे जगात सद्धर्म वाढीस लागतो, अशी समजूत आहे. हा धर्मकाय निराश्रय आहे. बुद्धाच्या धर्मस्वरूपामुळेच धर्मकायाचा उद्भव झालेला आहे, असे स्पष्ट दिसते. [बौ. द. मी.; म. सा. अ.]

## धर्मकीर्ती

(इ. स. चे सातवे शतक) एक बौद्ध आचार्य आणि नैयायिक. हा मूळचा आंध्र प्रदेशातील तिरुमलै येथील रहिवासी होता. याने प्रारंभी वैदिक परंपरेतील ग्रंथांचा उत्तम अभ्यास केला होता; परंतु बौद्ध पंडितांच्या संपर्कात आल्यानंतर याने त्या धर्माचा स्वीकार केला. न्यायशास्त्रात त्याला विशेष अभिरुची असल्यामुळे त्याने सुविख्यात बौद्ध नैयायिक दिङ्नाग याचा शिष्य ईश्वरसेन याच्याजवळ बौद्ध न्यायाचा अभ्यास केला. पुढे हा नालंदा महाविहारात गेला आणि तिथे त्याने संघस्थविर विज्ञानवादी आचार्य धर्मपाल याचे शिष्यत्व स्वीकारले.

धर्मकीर्तीने ब्राह्मण तार्किकांचे खंडन करण्यासाठी अनेक ग्रंथ लिहिले. प्रमाणवार्तिक हा त्याचा सर्वश्रेष्ठ ग्रंथ होय. याशिवाय न्यायबिंदू, हेतुबिंदू, प्रमाणविनिश्चय, वादन्याय,

संबंधपरीक्षा व समान्तरसिद्धी हे आणखी सहा ग्रंथ त्याच्या नावावर आहेत. या ग्रंथांपैकी प्रमाणवार्तिक, न्यायबिंदू व वादन्याय हे तीनच ग्रंथ मूळ संस्कृत रूपात उपलब्ध असून, बाकीच्यांचे केवळ तिबेटी अनुवाद मिळाले आहेत.

बौद्ध न्यायपरंपरेत याचे स्थान दिङ्नागाच्या खालोखाल मानले जाते. इत्सिंगने आपल्या यात्रावर्णनात याचा उल्लेख केला आहे. डॉ. राहुल सांकृत्यायन यांनी तिबेटमधून याचे ग्रंथ शोधून काढण्यापूर्वी ब्राह्मण नैयायिकांच्या ग्रंथांतील नामोल्लेखांशिवाय याची काहीही माहिती उपलब्ध नव्हती. [ पू. म. भा.; आजकल वार्षिक अंक, डिसेंबर १९५६; पु. त. नि. ]

## धर्मगुप्त

(इ. स. चे ७ वे शतक.) बौद्ध धर्माचा एक प्रचारक. याचा जन्म लाट देशात झाला. धर्मप्रचारासाठी हा चीनमध्ये गेला होता. या प्रवासात त्याला अनेक संकटांना तोंड द्यावे लागले; पण त्याने आपली जिद्द सोडली नाही.

धर्मगुप्ताचे निरीक्षण सूक्ष्म होते. युआन च्वांगसुद्धा लिहू शकला नाही, अशा बारीक सारीक परंतु महत्त्वाच्या गोष्टी त्याच्या प्रवासवर्णनात आढळतात. मध्य आशियातली पुष्कळ स्थळे स्वतः पाहून, त्यांची तपशीलवार माहिती त्याने लिहून ठेवली आहे. [ बौ. सा. सां. झ. ]

## धर्मगुप्तिक

एक बौद्ध संप्रदाय. बुद्धाच्या निर्वाणानंतर शंभर वर्षांनी वैशाली येथे शृंगीलवणकल्प (जनावरांच्या पोकळ शिंगांत जरूर पडल्यास मीठ साठवायचे का नाही), ग्रामांतरकल्प (भोजन करून दुसऱ्या गावी गेल्यावर पुन्हा भिक्षा मागायची का नाही), जातरूपकल्प (सोन्याचांदीचे दान स्वीकारायचे का नाही), इ. धार्मिक विषयांच्या चर्चेसाठी द्वितीय संगीती (बौद्ध परिषद) भरली होती. त्या चर्चेच्या वेळी बौद्ध धर्मात दोन गट पडले. त्यांना अनुक्रमे स्थविर संप्रदाय व महासांघिक संप्रदाय अशी नावे मिळाली. त्यांपैकी स्थविर संप्रदायातून निघालेल्या महिशासक या संप्रदायातून धर्मगुप्तिक हा संप्रदाय निघाला आहे. बुद्धाला किंवा संघाला उपायने देणे, ही गोष्ट महिशासकांना मान्य नव्हती आणि धर्मगुप्तिकांना त्या गोष्टीचे महत्त्व वाटत होते. त्यामुळे त्यांच्यांत फूट पडली व प्रस्तुत संप्रदाय उत्पन्न झाला. बुद्धाला व संघाला उपायने देणे व स्तूपांविषयी आदरभाव धारण करणे हाच खरा धर्म होय, असे धर्मगुप्तिक संप्रदायाचे मत होते. अर्हत हा पापवासनांपासून मुक्त असतो आणि नास्तिकांना अतिमानवी सिद्धी प्राप्त होत नाहीत, अशीही त्या संप्रदायाची धारणा होती. मध्य आशिया आणि चीन या प्रदेशांत हा संप्रदाय बराच लोकप्रिय झाला होता. [ बौ. ध. बि.; आजकल वार्षिक अंक, डिसेंबर १९५६ ]

## धर्मघटदान

एक व्रत. वैशाख मासात रोज सुगंधी जलाने भरलेला घट आमान्नासह दान देणे, असा याचा विधी आहे. हा घट दान देण्यापूर्वी त्याची पूजा करतात व पुढील मंत्राने त्याची प्रार्थना करतात–

धर्म त्वं घटरूपेण ब्रह्मणा निर्मितः पुरा ।
त्वयि दत्तेऽक्षया लोका मम सन्तु निरामयाः ॥

अर्थ– हे धर्मा, ब्रह्मदेवाने तुला पूर्वी घटरूपाने निर्माण केले आहे. तुझे दान केल्याने मला अक्षय व निरामय लोकांचा लाभ होऊ दे.

हा घट ब्रह्माविष्णुशिवात्मक आहे, असे मानले आहे. व्रतावधी चार वर्षे. फल– मनोरथपूर्ती, आयुरारोग्य व ऐश्वर्य यांचा लाभ, पापनाश व अंती परमात्मलोकप्राप्ती. [ श. क. ]

## धर्मचक्रप्रवर्तन

गौतम बुद्धाच्या जीवनातील एक महत्त्वाची घटना व बौद्ध धर्माचा प्रारंभ. गौतमाला संबोधी प्राप्त झाल्यानंतर तो बोधिवृक्षाच्या तळी बसलेला असताना, ब्रह्मा व इंद्र त्याठिकाणी प्रकट झाले आणि त्याला म्हणाले. 'भगवन, मानवमात्राला दुःखमुक्त करणारे जे ज्ञान तुम्ही मिळविले आहे, त्याचा प्रसार तुम्ही अखिल विश्वात करावा'. तदनुसार बुद्ध धर्मप्रसारासाठी निघाला. वाराणसीजवळ सारनाथ येथे मृगदाव नामक एक वन होते. त्या वनात त्याने पहिले धर्मप्रवचन केले. या घटनेला बौद्ध साहित्यात धर्मचक्रप्रवर्तन असे नाव मिळाले आहे. या धर्मचक्राच्या ठायी स्वयंभू सामर्थ्य असून, साक्षात बुद्धही त्याची गती रोधू शकणार नाही, अशी बौद्धांची समजूत आहे.

बौद्ध साहित्यात धर्मचक्रासंबंधी पुढील आख्यायिका आढळते–

एक धर्मशील राजा नीतीन्यायाने राज्य करीत होता. एकदा त्याच्या राजवाड्यावर आकाशातून एक दिव्य चक्र येऊन उतरले. राजाने त्याच्यावर जलप्रोक्षण केले व त्याला सर्वत्र संचार करून आपले वर्चस्व स्थापण्याचा आदेश दिला. तेव्हा ते चक्र पूर्व दिशेकडे धावू लागले. राजाही आपल्या चतुरंग दलासह त्याच्या मागोमाग निघाला. ते चक्र त्याच प्रकारे चारही दिशांना गेले आणि राजाने त्याच्या मागोमाग जाऊन दिग्विजय केला. या दिग्विजयात जिंकलेल्या सर्व राजांना त्याने सत्य, अहिंसा, अस्तेय, इ. तत्त्वांचा उपदेश केला. अशा प्रकारे सर्वत्र धर्माचे वर्चस्व प्रस्थापित करून ते अद्भुत चक्र परत आले व त्या दिग्विजयी सम्राटाच्या राजवाड्याच्या महाद्वारात स्थिर झाले.

पुढे तो राजा जेव्हा मरण पावला, तेव्हा ते चक्र अदृश्य झाले.

वरील कथेतील चक्र हे धर्माचे प्रतीक होते, म्हणून त्याला धर्मचक्र हे नाव मिळाले. बौद्ध धर्माचा महान प्रसारक सम्राट अशोक याने या धर्मचक्राचे प्रतीक सारनाथ येथे निर्माण करून ठेवले आहे. तिथल्या अशोक-स्तंभाच्या शिरोभागी चार सिंहांच्या स्कंधांवर ते आधारित होते. ते भग्न होऊन पडलेले, उत्खननात सापडले. हे चक्र भौतिक शक्तींवर आध्यात्मिक शक्तीचा विजय दर्शविते. त्या चक्राला जे ३२ आरे आहेत ते ३२ महापुरुष-लक्षणांचे प्रतिनिधी आहेत.

सारनाथ येथील स्तंभ अशोकाचा नातू संप्रती याने उभारलेला असून, त्यावरील सिंह, बैल, घोडे व चक्रे ही जैन संस्कृतीची प्रतीके आहेत, असे काही पंडितांचे मत आहे. [ सं. प्र.; एन्सा. रि. ए.; जै. सि. भा., जून १९५० ]

**धर्मचक्रमुद्रा** मूर्तिशिल्पातील एक अवस्था. गौतम बुद्धाने सारनाथ येथे पहिले धर्मप्रवचन केले, त्या वेळी त्याच्या हातांची जी स्थिती होती, तिला धर्मचक्रमुद्रा असे म्हणतात. या मुद्रेत दोन्ही हात पोटाजवळ घेतलेले असतात. डावा हात उताणा, बोटे वाकलेली, तर्जनी व अंगठा यांची टोके जुळवलेली आणि उजव्या हाताचा तळवा उभा धरून त्याही हाताची तर्जनी व अंगठा यांची टोके जुळवलेली असतात. डाव्या हाताची ज्ञानमुद्रा व उजव्या हाताची व्याख्यान-मुद्रा या दोन्ही अवस्था मिळून ही मुद्रा बनलेली आहे. ती ज्ञान-प्रवचनसूचक आहे. [ इं. बु. इ.; डे. हिं. इ. ]



धर्मचक्रमुद्रा

**धर्मठाकूर** प. बंगाल, बिहार, ओडिसा, छोटा नागपूर, इ. प्रदेशांत पूजला जाणारा एक लोकदेव. याला कालुराय, बुदराय, कौतुकराय, सुंदरराय, यात्रासिद्धिराय, बंकुरराय अशीही अन्य नावे आहेत. ओडिसा व छोटा नागपूरमधील आदिवासी लोक या देवाला धर्मेश अथवा धर्मदेवता असे म्हणतात. ते त्याला सूर्याचे प्रतीक म्हणून भजतात. धर्मठाकुराची विशिष्ट अशी मानवी आकृती नाही, त्यामुळे त्याला बहुरूप असे म्हणतात. एखादा ओबड-धोबड दगड हेच त्याचे प्रतीक असते. पुष्कळदा त्याच्या नावे दगडांची रासही असते. तीन दगडांची रास पूजेसाठी अधिक पसंत करतात. त्यांपैकी एखाद्या दगडाला खिळे ठोकतात व ते खिळे त्या देवतेचे डोळे समजतात. कधी कधी एखाद्या भग्नमूर्तीचीही धर्मठाकूर म्हणून पूजा केली जाते. वीरभूम जिल्ह्यातील वेलेगावची धर्मठाकुराची मूर्ती हा एका भग्न देवतेचाच अवशेष आहे. बहुधा एखाद्या झाडाखाली धर्मदेवतेचे स्थान असते. काही ठिकाणी त्यासाठी मंदिरेही बांधलेली दिसतात. जेव्हा त्याची स्वतंत्रपणे मूर्ती तयार करतात, तेव्हा ती कासवाच्या आकाराची असते.

धर्मठाकूर किंवा धर्मराज हा जागृत व नवसाला पावणारा आहे, असे समजतात. निपुत्रिक स्त्रिया पुत्रप्राप्तीसाठी त्याला नवस करतात. रंजावती नामक राणीला त्याच्या सेवेमुळेच पुत्र झाल्याची कथा प. बंगालमध्ये प्रसिद्ध आहे. अवर्षण पडले असता पाऊस पडावा म्हणूनही याची पूजा करतात. त्यासाठी भरदुपारी त्याची मिरवणूक काढतात. अवर्षण उत्पन्न केल्याबद्दल ती त्याला जणू शिक्षाच असते. उन्हाचे चटके बसल्यानंतर तो पाऊस पाडतो, अशी समजूत आहे. काही ठिकाणी पाऊस पडावा म्हणून त्याला डुकरे, कोंवडे, पांढऱ्या रंगाचे बोकड, बदक, वगैरे पशूंचे बळीही देतात. याशिवाय बालकांचा अपमृत्यू व महारोग दूर करणारी देवता म्हणूनही धर्मठाकुराला भजतात. मूल चांगले चालू लागावे, म्हणून त्याला मातीचे घोडे वाहण्याचे नवस करतात. घोडा हे धर्मठाकुराचे वाहन आहे, अशी समजूत असल्यामुळे त्याच्या स्थानासमोर मातीच्या घोड्यांचा ढीग पडलेला असतो.

घोडे वाहणे व पांढरा बोकड किंवा बदक यांचा बळी देणे या गोष्टी त्याच्या मूळ सूर्यस्वरूपाच्या सूचक आहेत, असे संशोधकांचे मत आहे.

निरनिराळ्या खेड्यांतील धर्मठाकूर हे एकमेकांचे भाऊ समजले जातात. पुरंदरपूर येथील धर्मठाकूर हा त्या सर्वांतला ज्येष्ठ बंधू होय. दरवर्षी एका ठराविक दिवशी निरनिराळ्या गावांतले धाकटे भाऊ या थोरल्या भावाच्या भेटीला जातात.

डोम जातीचे लोक धर्मठाकुराचे पुजारीपण करतात. काही ठिकाणी केवट, बागडी, हाडी, इ. पूर्वास्पृश्य समाजांतील लोकही याचे पुजारी असतात. डोम पुजाऱ्यांना पंडित म्हणून संबोधतात. हे आपला दर्जा ब्राह्मणांच्या खालोखाल समजतात. इतर डोमांच्या हातचे अन्नोदक त्यांना चालत नाही. ते आपल्या उजव्या हाताच्या बोटात तांब्याची आंगठी घालतात. या आंगठी घालण्याच्या विधीला ताम्रविधी असे म्हणतात. या ताम्रविधीनंतरच त्याच्याकडे धर्मठाकुराचे पुजारीपण येते. ज्या भागात ब्राह्मणांसारख्या उच्चवर्णियांचे प्राबल्य आहे, तिथे मात्र काही खास प्रसंगी डोम पुजाऱ्याबरोबर ब्राह्मण पुजाऱ्यालाही बोलाव-

तात. देवाची वार्षिक जत्रा हा त्यांपैकी एक खास प्रसंग होय. मात्र त्या वेळीही ब्राह्मण पुजारी असला, तरी बंगाली डोमाशिवाय धर्मठाकुराची पूजा यथासांग होत नाही, अशी तिकडच्या लोकांची समजूत आहे.

धर्मठाकुराची उपासना पुढील तीन प्रकारांनी करतात–(१) घरोघरी केली जाणारी दैनिकपूजा. या पूजेत त्याला भाताचा नैवेद्य असतो. (२) वार्षिक उत्सवाच्या दिवशी केली जाणारी पूजा. (३) नवसाची पूजा. ही कोणत्याही दिवशी करतात.

धर्मठाकुराची वार्षिक जत्रा वैशाखी पौर्णिमेला म्हणजे बुद्ध पौर्णिमेला भरते. इतर पौर्णिमांनाही लहान मोठ्या जत्रा असतातच. जत्रेच्या दिवशी स्त्री-पुरुष उपोषण करतात आणि सायंकाळी देवाला पेटत्या मशाली अर्पण करण्यासाठी वाजत-गाजत देवस्थानाकडे जातात. पौर्णिमेच्या आदल्या रात्री देवाच्या भक्तांमध्ये एक लुटुपुटीची लढाई होते. या लढाईत काटेरी झाडाच्या डहाळ्यांचा शस्त्रे म्हणून वापर करतात. पौर्णिमेच्या रात्री देवाला शंभर बोकडांचा बळी देतात. त्याआधी सायंकाळी देवाला पालखीतून स्नानासाठी नजिकच्या तलावाकडे नेतात. हा स्नानविधी म्हणजे जत्रेतील एक प्रमुख विधी असतो.


धर्मठाकुराचे कूर्मरूप प्रतीक

स्नानसमयी देवाला भाताच्या टोपलीत ठेवतात. स्नानानंतर ते पाणी तीर्थ म्हणून घेतात. त्यानंतर देवाला मंदिरात नेतात. मग तिथे बळी देणे, बगाड घेणे, विस्तवावरून चालत जाणे, इ. कार्यक्रम होतात. नंतर देवाला मद्याचा नैवेद्य दाखवितात.

धर्मठाकुराचे काही भक्त नवसाचे असतात. ‘माझी मनकामना पूर्ण झाली, तर मी तुझा भक्त होईन’ असा नवस ते बोलतात. अशा लोकांना अक्षय्य तृतीयेच्या दिवशी पुजाऱ्याकडून दीक्षा घ्यावी लागते. क्षौर करून जानवे गळयात घालणे, असा तो दीक्षाविधी असतो. जत्रेच्या काळात त्याला व्रतस्थ राहून आहारात मीठ व मांस वर्ज्य करावे लागते.

संथाळ, मुंड, उरॉंव, इ. आदिवासी लोकांच्या भाषेत दुली किंवा दुरी असा एक शब्द आहे. त्या शब्दाला ओम् हा स्वार्थे प्रत्यय लागून दुलोम, दुरोम, डुरोम, असे शब्द बनले. दुरोम म्हणणे कासव होय. वरील आदिवासी लोक कासवरूपातच धर्मठाकुराची पूजा करीत. इतिहासकाळात या दुरोमचे धर्म असे संस्कृतीकरण झाले व त्या देवाचेही उन्नयन झाले.

इ. स. च्या ११ व्या शतकात रमाई पंडित या पुरुषाने या धर्मदेवतेच्या नावे एक संप्रदायच निर्माण केला. त्या संप्रदायाचे पूजा, बलिदान, इ. विधिविधानही त्याने तयार केले आणि ते एका ग्रंथात लिहून ठेवले आहे. त्यामुळे धर्मठाकुराची लोकप्रियता वाढायला खूप मदत झाली.

धर्मठाकुराच्या उपासनेविषयी मयूरभट्ट, खेलाराम, मुकुंदराम, रूपराम, इ. लेखकांचेही बरेचसे ग्रंथ आढळतात. त्यांपैकी काही ग्रंथांत पूजाविधीचे तंत्र सांगितले असून, ते कडचा किंवा धर्मपुराण या नावाने प्रसिद्ध आहेत. काही ग्रंथ धर्म-मंगलकाव्ये या नावाचे आहेत. त्यांत धर्मठाकुराची गुणगाथा गायिलेली आहे. त्याच्याविषयी कित्येक कथा–कहाण्या ही आहेत. [म. ध. सा.; ह. प्रा. लो.; म. सा. अ.; से. इं. १९५१; गो. च. प.; हि. वें. सं. लि.; बं. उ. सा.; हि. सा.; हिं. सा. को.; श्री. मित्र–ज. अं. सो. मुंबई, १९१८; फो. लो. फेब्रुवारी १९६३]

## धर्मत्रयव्रत

एक काम्य व्रत. मार्गशीर्ष शुद्ध किंवा वद्य अथवा दोन्ही दशमी तिथींना याचा प्रारंभ करतात. व्रताच्या दिवशी उपवास करून धर्मस्वरूप विष्णूचे पूजन व तुपाचे हवन करणे आणि यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालणे, असा याचा विधी आहे. फल–पापनाश व आयुरारोग्य आणि संपत्ती यांचा लाभ. [व्र. प.]

## धर्मदास

एक हिंदी कवी. हा उ. भारतातील बांधवगडचा रहिवासी असून, जातीने कसौधन बनिया होता. बालपणापासूनच याची धर्ममार्गाकडे ओढ असल्यामुळे हा तीर्थयात्रा करीत हिंडत असे. एकदा मथुरेहून परत येत असता वाटेत याला कबीराचा साक्षात्कार झाला व कबीराच्या मुखातून मूर्तिपूजा, तीर्थयात्रा, देवपूजा, इ. संबंधींचे खंडनपर विचार

ऐकून हा निर्गुणमताचा अनुयायी बनला. पुढे याला कबीराकडून सांप्रदायिक दीक्षाही मिळाली. त्यानंतर आपले सारे संचित धन गोरगरीबांना वाटून तो कबीराच्या सेवेत रुजू झाला. थोड्याच कालात कबीराच्या प्रधान शिष्यांत त्याची गणना होऊ लागली. कबीराच्या मृत्यूनंतर हाच त्याच्या गादीवर बसला. याने कबीराच्या एकेश्वरवादाचा व रहस्यवादाचा खूप प्रचार केला.

धरमदासजीकी शब्दावली व अमर सुखनिधान हे याचे ग्रंथ होत. अमर सुखनिधानात कबीराबरोबर याची अनेकवार झालेली चर्चा ग्रथित केली आहे. ही सारी चर्चा ज्ञानपर आहे. शब्दावली हा त्याच्या पदांचा संग्रह आहे. याच्या पदांची संख्या कमी असली, तरी त्यांतील चित्रण मार्मिक व अन्योक्तिवजा आहे. खंडनमंडनावर याचा फारसा जोर नसल्यामुळे याची भाषाही सरळ व सौम्य आहे. प्रेमभक्ती हाच एक भाव त्याच्या पदांत आढळतो. पाहा – कबीरपंथ. [ म. च. को.; हिं. सा. इ.; मो. उ. सा.; भा. सं. म. ]

**धर्मदिन्ना** एक बौद्ध भिक्षुणी. गौतम बुद्धाच्या भिक्षुणीसंघात धर्मकथा सांगणारी म्हणून ही प्रसिद्ध होती, असे थेरीगाथेवरून समजते. वाराणसीच्या किकी नामक राजाची ही कन्या होती आणि गौतम बुद्धाच्या वेळी धर्मदिन्ना या नावाने तिने पुनर्जन्म घेतला, असे बौद्ध ग्रंथांत म्हटले आहे.

हिने आपल्या धर्मकथांनी कित्येकांची मने बौद्ध धर्माकडे आकृष्ट केली व कित्येक भिक्षुणींना धर्मकथा सांगण्यात निष्णात केले. [ पा. वा. ते. भि. र. ]

**धर्मदेव** (९४० – १००१ इ. स.) एक बौद्ध पंडित व प्रचारक. बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी हा भारतातून चीनमध्ये गेला होता. अठ्ठावीस वर्षे तिथे राहून याने ४६ ग्रंथांचा चिनी भाषेत अनुवाद केला, असे कळते. [ नागरी प्रचारिणी पत्रिका, विक्रमांक (उत्तरार्ध) १९४४ ]

**धर्मधातुवागीश्वर** एक बोधिसत्त्व. हा अमिताभापासून उत्पन्न झाला असे समजतात. 'ॐ धर्मधातुवागीश्वरमुः' हा याचा मंत्र होय. साधनमाला या ग्रंथात याचे वर्णन केलेले आहे, ते असे—

अष्टभुज, चतुर्मुख, रक्तगौर, आठ हातांत धनुष्य, बाण, पाश, अंकुश, प्रज्ञापारमिता–पुस्तक, खड्ग, घंटा आणि वज्र या वस्तू धारण करणारा आणि ललितासनावर समाधिमुद्रेत अवस्थित. मुकुटावर अमिताभाची मूर्ती असते. [ इं. बु. इ. ]

**धर्मनाथ** जैनांचा पंधरावा तीर्थंकर. याच्या पित्याचे नाव भानू व मातेचे नाव सुव्रता असे होते. हा कुरुवंशात जन्मला होता. रत्नपूर हे याचे जन्मस्थान होय. याची माता गर्भवती असता तिने अनेक धर्मकृत्ये केली, म्हणून याचे नाव धर्मनाथ असे ठेवण्यात आले, अशी कथा आहे. याचे आयुष्य दहा लक्ष वर्षे मानतात. जन्मनक्षत्र– पुष्य, लांच्छन–वज्रदंड, ज्ञानवृक्ष–दधिपर्ण (सातवीण), मोक्षस्थान–पारसनाथ पर्वत. याचे यक्ष–यक्षिणी–किंपुरुष-सोलसा (दिगंबर मते सोलसेच्या जागी मानसी) हे होत. याचे नाव आणि हातचा वज्रदंड या दोन गोष्टींवरून पौराणिक यमधर्माशी याचे सादृश्य दिसते. नागपूरच्या मूर्ति-संग्रहालयात याच्या दोन मूर्ती सुरक्षित असून, त्या त्याच्या वर्णनाशी जुळतात. [ जै. इ. ]

**धर्मनाथी** नाथ संप्रदायाची एक शाखा. सतनाथी परंपरेतील धर्मनाथाने ही शाखा प्रवर्तित केली म्हणून या शाखेला धर्मनाथी असे नाव मिळाले आहे. धर्मनाथाचा नवनाथांतही समावेश होतो, असे म्हणतात. गोदावरीतीरावर या शाखेचे केंद्रस्थान असल्याचे कळते. कच्छमधील धीणोधरमठ हा या शाखेचा एक प्रसिद्ध मठ आहे. [ गो. च. प. ]

**धर्मपा** चौऱ्यायंशी सिद्धांपैकी छत्तिसावा सिद्ध. हा जातीने ब्राह्मण असून विक्रमशिलेचा (भागलपूर) रहिवासी होता. कण्हपा व जालंधर हे याचे गुरू होत. चाटिलपा हा याचा गुरू असल्याचे डॉ. सुकुमारसेन यांनी सांगितले आहे; परंतु त्याला आधार मात्र दिला नाही. पालनरेश विग्रहपाल व नारायणपाल यांचा हा समकालीन होता. हा डोक्यावर केस ठेवीत नव्हता व नेहमी कानापर्यंत खाली येणारी टोपी घालीत होता. कालीभावनामार्ग, सुगतदृष्टिगीतिका व हुंकारचित्तबिंदुभावनाक्रम असे याचे ग्रंथ आहेत. हा सदैव धर्मोपदेश करीत हिंडत असे. [ म. च. को.; पु. त. नि.; हिं. सा. वि.; बौ. ध. वि. ]

**धर्मपाल** (इ. स. चे ७ वे शतक) एक बौद्ध पंडित व नैयायिक. याचा जन्म तमिळनाडमध्ये कांचीपुरम येथे झाला. याला आठ भाऊ असून, हा सर्वांत थोरला होता. बालपणापासूनच याची बुद्धी तल्लख होती.

किशोरवयातच याचे मन संसारातून उडाले आणि त्याने गृहत्याग केला. हिंडत हिंडत तो नालंदा विद्यापीठात गेला. तिथे राहून त्याने बौद्ध धर्माचा अभ्यास केला. पुढे तो तिथेच आचार्य व नंतर प्राचार्यही झाला. त्या विद्यापीठाने त्याला बोधिसत्त्वविद अशी उपाधी देऊन गौरवले. प्रख्यात बौद्ध पंडित

धर्मकीर्ती हा याचाच शिष्य होय. युआन च्वांग व इत्सिंग या चिनी प्रवाश्यांनी याचा उल्लेख केला आहे.

धर्मपालाने पाणिनीच्या व्याकरणावर वेदवृत्ती नावाची एक वृत्ती लिहिली आहे. याशिवाय याचे संस्कृत भाषेतील चार बौद्ध धर्मविषयक ग्रंथ प्रसिद्ध आहेत, ते असे–(१) आलंबन-प्रत्यय-शास्त्र-व्याख्या (२) विद्यामंत्र-सिद्धिशास्त्र-व्याख्या (३) सत्‌शास्त्रवैपुल्य-व्याख्या, (४) बाली–तत्त्व-समसाह. यांपैकी तिसऱ्या ग्रंथाचे चिनी भाषेत भाषांतर झाले आहे.

कौशांबी येथे अनेक ब्राह्मण पंडितांशी शास्त्रार्थ करून व त्यांच्या मतांचे खंडन करून त्यांना याने पराभूत केले, असे सांगतात. हा योगाचार मत मानणारा दार्शनिक पंडित होता. [ म. च. को.; गु. सा. इ.; पू. म. भा.; ज. स्मा. ग्रं. ]

**धर्मपाल अनागारिक** (१८६४–१९३३ इ. स.) एक बौद्ध धर्मप्रचारक. याचा जन्म लंकेमध्ये झाला. हे कुटुंब मूळचे ख्रिस्ती होते; पण कोणत्या तरी कारणाने अनागारिकाच्या आईबापांचा कल बौद्ध धर्माकडे वळला आणि आपल्या मुलाने बौद्ध भिक्षू होऊन सिंहली जनतेचा उद्धार करावा, असे त्यांना वाटू लागले. त्याचे वडील त्याला बुद्धमूर्तीपुढे गुडघे टेकायला लावीत व पंचशीलाच्या पालनाची शपथ असलेले श्लोकही म्हणायला लावीत. नंतर काही कालाने धर्मपालाच्या वडिलांनीच त्याला बुद्ध मंदिरात नेऊन भिक्षु-दीक्षा देवविली. तिथे यदृच्छेने मिळेल ते खाऊन व दिवस-रात्रीतून फक्त दोनच तास झोप घेऊन धर्मपाल ज्ञानसाधना करू लागला. वयाच्या चौदाव्या वर्षी 'थिऑसॉफिस्ट' मासिकाचा पहिला अंक त्याला वाचायला मिळाला आणि तो थिऑसॉफीकडे वळला. पुढे तो मादाम ब्लॅव्हॅट्स्की यांच्याबरोबर पाली भाषेच्या अभ्यासासाठी अड्यार येथे गेला. तिथेच त्याला मानवजातीच्या सेवेसाठी स्वतःला वाहून घेण्याची प्रेरणा मिळाली. ती प्रेरणा घेऊनच तो कोलंबोला परत गेला.

वयाच्या बाविसाव्या वर्षी तो कोलंबोच्या शिक्षणखात्यात कारकून म्हणून काम करू लागला. पुढे थिऑसॉफिकल सोसायटीसाठी निधी जमविण्याच्या हेतूने कर्नल ऑलकॉट जेव्हा तिथे गेले, तेव्हा त्याने नोकरीचे त्यागपत्र देऊन कर्नल ऑलकॉटबरोबर सर्व देशभर पर्यटन केले. बौद्ध धर्माच्या सेवेचा एक पर्याय म्हणून सुंदरेसी नावाची एक पत्रिका तो चालवू लागला. महाबोधी नावाचे त्याने एक नियतकालिकही सुरू केले. पुढे त्याने भारतातील समस्त बौद्ध क्षेत्रांची यात्रा केली. या यात्रेत त्याला मज नामक एक योगिनी भेटली. तिचा प्रभाव पाहून त्याने तिलाच आपले गुरू केले. त्या वेळी बुद्धगयेतील बुद्धमंदिर हे एका हिंदू महंताच्या स्वामित्वाखाली होते. त्याच्याकडून ते खरेदी करण्यासाठी अनागारिकाने बुद्धगया महाबोधी-मंडळ या नावाची एक संस्था निर्माण केली.

१८९३ मध्ये शिकागो येथे भरलेल्या सर्वधर्मपरिषदेला दाक्षिणात्य बौद्धांचा प्रतिनिधी म्हणून तो उपस्थित राहिला. १८९६ नंतर तो पुनश्च अमेरिकेत गेला. तिथे महाबोधी मंडळाची स्थापना करणाऱ्या डॉ. पॉल केरस यांची व त्याची ओळख झाली. माक्स म्यूलर यांचाही परिचय घडला. त्यानंतर पॅरिस येथे भरलेल्या सर्वधर्मपरिषदेत भाग घेऊन तो सिलोनला परतला. मग त्याने संगमिताश्रम नावाची एक संस्था सिलोनमध्ये स्थापली. बौद्ध महिलांना समाजसेवेचे शिक्षण देणे, हा त्या संस्थेचा उद्देश होता. या कामी त्याला कॅनॉव्हॅन नामक एका अमेरिकन श्रीमंत बाईची खूप मदत झाली. त्यानंतर तो पुन्हा भारतात आला. मद्रास येथे त्याने लंकेतल्या महाबोधी मंडळाची एक शाखा स्थापन केली. नंतर पुन्हा एकदा अमेरिकेत जाऊन तिथे त्याने हार्वर्ड विद्यापीठात बौद्ध तत्त्वज्ञानावर व्याख्याने दिली. तिथून लंडनला येऊन त्याने तिथे ब्रिटिश महाबोधी मंडळाची स्थापना केली. त्याचबरोबर आपल्या उपकारकर्त्या व दानशूर बाईंच्या स्मरणार्थ तिथेच फॉस्टर हाऊस नामक संस्थाही सुरू केली. तिथून तो भारतात आला व भारतातच त्याने आपला देह ठेवला. [ श्री. पु. पां. गोखले– लोकराज्य, १६ सप्टेंबर, १९६४ ]

**धर्मप्राप्तिव्रत** एक काम्य व्रत. आषाढ वद्य प्रतिपदेपासून या व्रताचा प्रारंभ करतात. व्रतावधी एक महिना. यात धर्मस्वरूपी विष्णूची पूजा करायची असते. उद्यापनाच्या वेळी पौर्णिमेपासून पुढे तीन दिवस उपवास करतात आणि सुवर्णदान देतात. फल– विष्णुलोकाची प्राप्ती. [ हि. ध. ]

**धर्मप्रिय** (इ. स. चे ४ थे शतक) एक बौद्ध पंडित व धर्मप्रचारक. हा धर्मप्रचारासाठी चीनमध्ये गेला होता. तिथे त्याने अनेक बौद्ध ग्रंथांचा चिनी भाषेत अनुवाद केला, तसेच शैक्षणिक कार्यही केले. याच्या सर्व अनुवादात दशसाहस्रिका प्रज्ञापारमिता या ग्रंथाला महत्त्वाचे स्थान आहे. [ नागरी प्रचारिणी पत्रिका, विक्रमांक (उत्तरार्ध) १९४४ ]

**धर्ममित्र** (इ. स. चे ५ वे शतक) एक बौद्ध पंडित व धर्मप्रचारक. हा काश्मीरचा रहिवासी होता. याने धर्मप्रचारासाठी चीन देशाचा मार्ग धरला. तो प्रथम उत्तर चीनमधील तुन हुआंग या गावी गेला. तिथे त्याने विहाराची

स्थापना करून धर्मोपदेश करायला सुरवात केली. तिथून पुढे तो द. चीनमध्ये आला. तिथे त्याचा अठरा वर्षे मुक्काम होता. त्यांपैकी नऊ वर्षे नानकिंगच्या विहारात त्याने वास्तव्य केले. त्याचा मृत्यूही चीनमध्येच झाला.

धर्ममित्र योगशास्त्राचा जाणकार होता. या विषयावरचे अनेक ग्रंथ त्याने चिनी भाषेत अनुवादित केले आहेत.

**धर्ममूलव्रत** एक काम्य व्रत. या व्रताचे निरनिराळे पर्याय आहेत, त्यांतील दोन मुख्य असे—

(१) रविवारी येणाऱ्या शुद्ध सप्तमीला या व्रताचा प्रारंभ करतात. सूर्यपूजा व मिठाशिवाय एकभुक्त राहणे असा याचा विधी आहे. व्रतावधी— एक वर्ष.

(२) गुरुवारी शुद्ध दशमी असेल त्या दिवशी या व्रताचा प्रारंभ करतात. हे व्रत मुख्यत्वे पुत्रप्राप्तीसाठी असते. यात पुढील मंत्राचा जप करायचा असतो—

देवकीसुत गोविन्द वासुदेव जगत्पते ।
देहि मे तनयं कृष्ण त्वामहं शरणं गतः ॥

ब्रह्मचर्याने राहणे व एकभुक्त करणे हे या व्रताचे नियम आहेत. व्रतावधी— एक वर्ष. [ व्र. प ]

**धर्मयश** एक बौद्ध पंडित. हा मूळचा काश्मीरचा रहिवासी होय. वयाच्या तिसाव्या वर्षी याने काश्मीर सोडले व तो धर्मप्रचारासाठी मध्य आशियात गेला. तिथे काही वर्षे धर्मप्रचार केल्यावर पुढे तो चीनमध्ये गेला. तिथे राहून त्याने अनेक संस्कृत ग्रंथांचा चिनी भाषेत अनुवाद केला. याच्या गुरूचे नाव पुण्यपात्र असे होते.

**धर्मयुद्ध** युद्धाचा एक प्रकार. भारतीय युद्धविशारदांनी युद्धाचे कूटयुद्ध व धर्मयुद्ध असे दोन भेद मानलेले आहेत. धर्मयुद्धाची कल्पना महाभारतकालातच उदयाला आली. धर्मयुद्धाच्या कल्पनेत धर्म व दया या दोन तत्त्वांचा स्वीकार केलेला आहे. धर्मयुद्धाचे नियम न पाळणारा योद्धा हीन समजला जाई.

महाभारतात धर्मयुद्धाचे बरेच नियम सांगितले आहेत, त्यांपैकी काही असे— अंगात चिलखत न घातलेल्या व शिरस्त्राणादी आवरक वस्तूंनी सिद्ध नसलेल्या शत्रूवर क्षत्रियाने प्रहार करू नये. एका योद्धयाने एका योद्धयाशीच युद्ध करावे. युद्ध करताना 'आता तू प्रहार कर; आता मी प्रहार करतो' असे म्हणावे. शत्रू थकला असता किंवा प्रतिप्रहार करायला असमर्थ असता, त्याच्यावर प्रहार करू नये. शत्रू ससैन्य चालून आला असेल, तर आपणही त्याच प्रकारे चाल करावी. शत्रूने कपटनीतीचा अवलंब केला असता, आपणही कूटयुद्धाचा आश्रय करायला हरकत नाही. पण तो जर धर्मयुद्धाचे नियम पाळीत असेल, तर आपणही ते पाळावे. घोडेस्वाराने रथीवर प्रहार करू नये. स्वाराने स्वाराशी व रथीने रथीशीच लढावे. शत्रू संकटात असता, भयभीत झाला असता किंवा जिंकला गेला असता त्याच्यावर कधीही प्रहार करू नये. विषदिग्ध किंवा वक्र बाणांचा प्रयोग करू नये. ज्याचे कवच तुटले आहे, ज्याने शस्त्रसंन्यास केला आहे आणि जो 'मी शरण आलो आहे,' अशी हात जोडून प्रार्थना करीत आहे, अशा शत्रूला ठार मारू नये. उभय पक्ष लढत असता, त्यांच्यांत संधी घडवून आणण्याच्या इच्छेने जर एखादा ब्राह्मण मध्ये आला, तर दोन्ही पक्षांनी युद्ध थांबवावे. त्याचप्रमाणे त्या ब्राह्मणाला कसलीही इजा करू नये.

युद्धात मारल्या गेलेल्या वीराबद्दल कधीही शोक करू नये. ज्याच्याबद्दल असा शोक केला जात नाही, त्याचा स्वर्गात सन्मान होतो. असा वीर आपल्याला पती म्हणून लाभावा, या इच्छेने अनेक लावण्यवती अप्सरा त्याच्याकडे धावत येतात.

लढाईच्या वेळी आसपासच्या स्त्रिया, वृद्ध व मुले यांना मारू नये. त्याचप्रमाणे दाती तृण धरून शरण येणाऱ्या शत्रूलाही मारू नये. झोपलेले, थकलेले, तहानलेले, खानपान करीत असलेले असे जे लोक असतील, त्यांच्यावर किंवा युद्धात भाग न घेता आपापला व्यवहार करीत असलेल्या लोकांवर हल्ला करू नये.

प्रहार करणाऱ्या मनुष्यावर क्रुद्ध होऊ नये. दुःखाकुल, निर्बल, घायाळ, भग्नशस्त्र आणि ज्याचे वाहन मेले आहे अशा शत्रूवर केव्हाही हल्ला करू नये. जखमी झालेल्या शत्रूला आपल्या राष्ट्रात ठेवून घेऊन त्याच्यावर औषधोपचार करावे किंवा त्याला त्याच्या घरी नेऊन पोचवावे; त्याची जखम बरी करून मगच त्याला सोडून देणे, हा सनातन धर्म होय.

शत्रुराष्ट्र जिंकून घेतल्यावर विजयी राजाने त्या राज्यात जाऊन 'मी तुमचा राजा आहे व मी सदैव तुमचे पालन करीन. मात्र तुम्ही न्याय्य असे कर द्या.' असे तिथल्या लोकांना सांगावे. एवढ्याने ते लोक वश झाले, तर ठीकच; पण जर ते विरुद्ध गेले तर राजाने त्यांचा पुरता बंदोबस्त करावा, असे महाभारतात सांगितले आहे ( शांति ९५.२—४ ). जित लोकांचे नुकसान करू नये किंवा त्यांना त्रास देऊ नये, असाही संकेत होता. शत्रुपक्षातील सेनापती, नायक, इ. अधिकाऱ्यांना शक्यतो जिवंत पकडून आणीत आणि त्यांची विटंबना करून त्यांना सोडून देत. अशा वेळी ते विटंबित मानी पुरुष बहुधा आत्मघात

करीत. रुक्मिणीहरणाच्या प्रसंगी पाठलाग करून आलेल्या रुक्मीची श्रीकृष्णाने अशीच विटंबना करून त्याला सोडून दिले होते. त्यानंतर तो कधीही आपल्या कुंडिनपुराला परत गेला नाही. प्राचीन काळी आर्य राज्यांची आपसात युद्धे होत, त्यांत केवळ क्षत्रियांची आणि त्यांच्या सैन्याचीच लढाई होत असे. इतर प्रजेला किंवा शेतकऱ्यांना त्याचा उपसर्ग पोचत नसे.

सनपूर्व चौथ्या शतकात, चंद्रगुप्त मौर्याच्या दरबारात असलेला ग्रीक वकील मेगॅस्थेनिस याने या संदर्भात लिहून ठेवले आहे, ते असे– इतर राष्ट्रांत युद्धाच्या वेळी जमिनीची इतकी नासधूस होत असे, की ती पिकांसाठी निरुपयोगी व्हावी. पण भारतात याच्या उलट परिस्थिती आहे. इथे शेतकऱ्यांना आदरणीय मानतात. त्यामुळे शत्रुसैनिक शेतात काम करणाऱ्या शेतकऱ्यांवर हल्ला करीत नाहीत. आसपास युद्ध चालू असले, तरी शेतकऱ्यांना त्याचा काही उपसर्ग पोचत नाही. ते आपापली शेतीची कामे शांतपणे पार पाडीत असतात. शत्रूवर विजय मिळवल्यानंतर विजेता राजा शत्रूच्या प्रदेशाला आगी लावून तो बेचिराख करीत नाही किंवा त्याच्या उद्यानांचा व वनस्पति-संपत्तीचाही नाश करीत नाही.

धर्मयुद्धाविषयी महाभारतात म्हटले आहे, ते असे –

**धर्मेण निधनं श्रेयो न जयः पापकर्मणा ।**

(म. भा. शांति. ९५.१७)

अर्थ–धर्मयुद्धाचा अवलंब करून युद्धात मरण आले, तरी श्रेयस्कर; पण अधर्मयुद्धाने मिळालेला जय नको.

पण महाभारतकारांचा उपदेश काहीही असला, तरी महाभारतांतच कित्येक प्रसंगी कूटयुद्धाचा अवलंब केल्याचे दाखले मिळतात. त्यापुढील काळात शिकंदराने भारतावर स्वारी केली आणि तेव्हापासून युद्धात बरे-वाईट, सूक्तासूक्त सर्व काही चालते असा संकेत ठरला. भारतीय लोकांनी ग्रीकांपासून, युद्धात धर्माची गरज नाही, हे तत्त्व उचलले व तेव्हापासून धर्मयुद्ध हे व्यवहारातून समाप्तच झाले, असे काही विद्वान म्हणतात. [ वे. रा. द.; प्रा. भा. सां.; म. भा. उ.; प्रा. यु. वि. ]

**धर्मरक्ष** (१) ( इ. स. चे १ ले शतक) एक बौद्ध प्रचारक. हा गांधार देशाचा रहिवासी असून, तिथल्या एका राजाचा आश्रित होता. बौद्ध धर्मसूत्रांचे संकलन करण्यासाठी चिनी सम्राट मिंग ली याने एक दूतमंडळ भारतात पाठविले असता हा व काश्यप मातंग हे दोघे त्या मंडळाबरोबर चीनमध्ये गेले. धर्मरक्षाला चीनमध्ये जाण्याची त्याच्या राजाची अनुज्ञा नव्हती, तरीही तो गुप्तपणे तिकडे गेला. चीनमध्ये बौद्ध धर्म स्थिर करण्यात याचा मोठा वाटा आहे. काश्यप मातंगाबरोबर याने अनेक ग्रंथांचा चिनी भाषेत अनुवाद केला आहे. [म. च. को.; ना. प्र. प., विक्रमांक (उत्तरार्ध) १९४४]

(२) (२४०–३१८ इ. स.) याचे मूळ नाव व गाव कोणते ते कळत नाही. वयाच्या १६ व्या वर्षी हा बौद्धधर्मप्रचारासाठी चीनमध्ये गेला. याला एकूण ३६ भाषा अवगत होत्या. दोनशे दहा बौद्ध ग्रंथांचा याने चिनी भाषेत अनुवाद केला आहे. [ ना. प्र. प., विक्रमांक (उत्तरार्ध) १९४४]

**धर्मराजपरीक्षा** एक दिव्य. एखाद्याची हत्या केल्याचा आरोप आलेल्या माणसाला, आपण निर्दोषी आहो, असे सिद्ध करायचे असेल, तर त्याने हे दिव्य करावे, असे दिव्यतत्त्वात सांगितले आहे. त्याचा विधी असा –

रुप्याची व लोखंडाची एकेक पुतळी बनवून त्यांना अनुक्रमे धर्म व अधर्म अशी नावे देतात. काही वेळा भूर्जपत्रावर किंवा वस्त्रावर पांढऱ्या व काळ्या रंगाने धर्म आणि अधर्म अशी अक्षरे लिहितात. त्यांवर पंचगव्याचे प्रोक्षण करतात. पांढऱ्या फुलांनी धर्माची व काळ्या फुलांनी अधर्माची पूजा करतात. नंतर ते धर्म व अधर्म एका कुंभात ठेवतात. दिव्य करणारा देवांचे व लोकपालांचे आवाहन करतो आणि ' मी जर पापी नसेन, तर धर्म माझे रक्षण करो, ' असे म्हणून कुंभातून एक पुतळी अथवा लिहिलेली चिठ्ठी बाहेर काढतो. ती जर धर्माची असली, तर तो निर्दोष आहे, असे ठरते. [ श. क.]

**धर्मराजाध्वरींद्र** एक प्राचीन नैयायिक. द. भारतातील बोलागुली येथील वेंकटनाथ हा याचा गुरू होता. याने तत्त्वचिंतामणी या ग्रंथावरील पूर्वीच्या दहा टीकांचे खंडन करून एक नवीन टीका रचली. वेदांतपरिभाषा हा याचा मुख्य ग्रंथ होय. वेदांतविषयक विचार समजण्यासाठी या ग्रंथाचा फार चांगला उपयोग होतो. [ शंकराचार्य ]

**धर्मव्रत** एक काम्य व्रत. मार्गशीर्ष शुद्ध दशमीला या व्रताला प्रारंभ करतात. उपवास, धर्माची पूजा व तुपाचा होम असा या व्रताचा विधी आहे. व्रतावधी– एक वर्ष. उद्यापनाच्या वेळी एक दुभती गाय दान देतात. कृष्ण पक्षातही याप्रमाणेच हे व्रत करायचे असते. फल– पापनाश, तसेच दीर्घायुष्य व कीर्ती यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**धर्मशालादान** एक काम्य दान. प्रवासी लोकांना प्रवास सुखावह व्हावा, यासाठी धर्मशाला बांधून व तिथे आवश्यक त्या सर्व सोयी उपलब्ध करून ती धर्मशाला

दान करणे किंवा आपल्या घराचा काही भाग अशा लोकांच्या उपयोगासाठी राखून ठेवणे याला धर्मशालादान असे म्हणतात. दीन, अनाथ अशा लोकांची राहण्याची सोय करणाऱ्या माणसाने आणखी काही दान-धर्म करायला नको, असे भविष्य पुराणात सांगितले आहे. फल– स्वर्गमोक्षप्राप्ती. [ दा. चं. ]

**धर्मशास्त्र** धर्माधर्म व कर्तव्याकर्तव्य यांच्या निर्णयाचे जे शास्त्र त्याला धर्मशास्त्र असे म्हणतात. ऋग्वेदकालापासूनच धर्म हा शब्द आढळू लागतो. ऋग्वेदात यज्ञाला धर्म म्हटले आहे. त्यावरून यज्ञ हे वैदिक धर्माचे पूर्वीचे स्वरूप होते, असे कळते. वेदातला जो यज्ञरूप धर्म तोच मीमांसकांच्या 'चोदनालक्षणोऽर्थो धर्मः' या व्याख्येत आहे. 'ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत' = ज्याला स्वर्गाची कामना असेल, त्याने ज्योतिष्टोमाने यजन करावे, अशा विधिवाक्यांत यज्ञविषयकच चोदना असते. ब्राह्मणग्रंथांत धर्म शब्दाचा अर्थ आश्रमधर्म असा असून 'त्रयो धर्मस्कन्धाः...' या उपनिषद्वाक्यांवरून तो कळतो. धर्म शब्दाचा चौथा अर्थ वर्णाश्रमानुसार व्यक्तीकडे आलेले किंवा व्यक्तीने अंगीकारलेले कर्तव्य असा आहे. 'स्वधर्मे निधनं श्रेयः' या प्रसिद्ध गीतावचनात हाच आशय अभिप्रेत आहे.

भारतीय धर्मशास्त्रात हक्कापेक्षा कर्तव्यावरच अधिक भर दिलेला आहे. कर्तव्य म्हणजेच धर्म होय. हक्काचा संबंध कर्तव्याच्या अनुषंगाने येईल तेवढाच. भारतीय धर्मशास्त्राचा आणखी एक विशेष असा, की त्यात धर्म व नीती या दोन गोष्टी भिन्न मानलेल्या आहेत. सामान्य व विशेष असा त्यांचा संबंध आहे. उदा० 'सत्यं वद' = खरे बोल, ही सामान्य नीती झाली. पण तेवढ्यानेच भागत नाही म्हणून त्यापुढे 'धर्मं चर' = धर्माचे आचरण कर, असे सांगितले. सत्य तर बोललेच पाहिजे; पण त्याबरोबरच धर्माचेही आचरण केले पाहिजे, असा त्याचा आशय आहे.

वेदादी ग्रंथांना शास्त्र अशी संज्ञा आहे. 'शास्त्रयोनित्वात्' असे बादरायणाचे एक सूत्र आहे (ब्र. सू. १.१.२). शास्त्रयोनी म्हणजे ज्याच्यापासून शास्त्र झाले किंवा शास्त्रांमुळे ज्याचे ज्ञान होऊ शकते, ते ब्रह्म (वेद) होय, अशी त्याची फोड आहे. शासन म्हणजे नियमन करणारे ते शास्त्र होय, असा त्याचा दुसरा अर्थ आहे. ब्रह्मसूत्रावरील शांकरभाष्याच्या भामती नामक टीकेत याची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे– प्रवृत्तिर्वा निवृत्तिर्वा नित्येन कृतकेन वा। पुंसां येनोपदिश्येत।

अर्थ– प्रवृत्तीचा किंवा निवृत्तीचा नित्य अथवा नैमित्तिक साधनांनी (नित्य = वेद, अनित्य = स्मृती, सूत्रे, निबंध, इ. वाङ्मय) पुरुषांना जे उपदेश करते ते शास्त्र होय.

वैदिक आर्यांचा धर्म हा इतर धर्मांप्रमाणे काही विशिष्ट मतांचा समुच्चय नसून, ती आर्यांची जीवनपद्धती आहे. खावे, प्यावे, चैन करावी, हे कोणाला सांगावे लागत नाही. या गोष्टी माणसाला स्वाभाविकपणेच समजतात. पण माणसाच्या या स्वाभाविक प्रवृत्तीचे नियमन करून त्यांना इहपर कल्याणाचा मार्ग दाखविणे, या गोष्टीसाठी धर्मशास्त्राची प्रवृत्ती आहे.

**धर्मशास्त्रीय वाङ्मय**– याचा कालदृष्ट्या विचार करताना त्याचे पुढील तीन कालखंड स्पष्टपणे दिसून येतात–

(१) सनपूर्व ६०० ते इ. स. १०० – या कालखंडात धर्मसूत्रे व मनुस्मृती हे ग्रंथ रचले गेले.

(२) इ. स. १०० ते इ. स. ८०० – यात इतर स्मृतींची रचना झाली.

(३) इ. स. ८०० ते इ. स. १८००– या कालात स्मृतीवरच्या टीका व निबंध या स्वरूपाची ग्रंथरचना झाली.

श्रौत, गृह्य व धर्म या नावांनी तीन प्रकारची सूत्रे आहेत. या सूत्रांना वेदांगे असे म्हणतात. मात्र सर्वच वेदांना जोडणारी अशी सूत्रे उपलब्ध नाहीत. सर्वांत प्राचीन धर्मसूत्र म्हणजे गौतमधर्मसूत्र होय. ते सनपूर्व ६०० – ४०० या कालखंडात झाले असावे. वसिष्ठ, गौतम, आपस्तंब, बौधायन व हिरण्यकेशी अशी पाच धर्मसूत्रे पाहिल्यास बहुतेक धर्मशास्त्रीय विषय त्यांत आलेले दिसतात. या सूत्रांवर भाष्ये व वार्तिकेही आहेत. धर्मशास्त्राच्या इतिहासात गृह्यसूत्रांचा अंतर्भाव होत नसला, तरी त्यांतला बराच भाग धर्मसूत्रांत व स्मृत्यादी ग्रंथांत आलेला आहे. धर्मसूत्रे ही वेगवेगळ्या वैदिक शाखांशी संबद्ध असल्यामुळे त्यांचा कल त्या त्या शाखांच्या गृह्यसूत्रांकडे असतो. धर्मसूत्रे सामान्यतः गद्य स्वरूपात असतात व त्यांची भाषा आर्ष असते.

वेदांना श्रुती असे म्हटले असून, स्मृतींना धर्मशास्त्र असे म्हटले आहे. 'धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः' असे मनूचे वचन आहे (२.१०). पण धर्मशास्त्राशिवाय इतरही अनेक विषयांवरील ग्रंथांचा स्मृतींत अंतर्भाव केलेला आढळतो. पाणिनीची अष्टाध्यायी, महाभारत व पुराणे यांनाही स्मृती म्हणण्याचा परिपाठ आहे. इतकेच नव्हे; तर सांख्यादी दर्शनांवरील ग्रंथांनाही स्मृतीच म्हणतात. पण अशा सर्व स्मृतींना मान्यता दिल्यास कोणाचा कोणाशी मेळ राहणार नाही व अनवस्थाप्रसंग येईल, हे लक्षात घेऊन धर्माला आधार म्हणून मानायच्या स्मृतींना वेदमूलकत्वाची मर्यादा घालण्यात आली. मनूने वेदार्थ लक्षात आणून स्मृती लिहिली, म्हणून वेदमूलक स्मृती वेदतुल्य होत, असे ठरवण्यात आले.

उपलब्ध स्मृतिग्रंथ फार. प्राचीन नाहीत. सनपूर्व ५००

वर्षानंतरच्या त्या सर्व स्मृती आहेत, असे म. म. काणे यांचे मत आहे. पण स्मृती हा शब्द मात्र सनपूर्व ८०० पासून तरी प्रचारात आहे. तैत्तिरीय आरण्यकात तो शब्द आढळतो. (१. २. १). सर्वांत जुन्या अशा गौतमधर्मसूत्रात राजाने व्यवहार कसा करावा, ते सांगताना धर्मशास्त्र हा शब्द वापरला असून (९.२१), त्या शब्दाने स्मृतींचाच बोध होतो. सनपूर्व ३०० च्या सुमारास होऊन गेलेल्या कात्यायनाने धर्मशास्त्र हा शब्द स्मृती याच अर्थाने वापरला आहे. तात्पर्य' स्मृतिग्रंथ हे धर्मशास्त्र या नावाने या देशात सुमारे २५०० वर्षे प्रचलित आहेत, असे म्हणता येते.

उपलब्ध स्मृतींत बऱ्याच स्मृती एकमेकींचा नामनिर्देश करतात. उदा० गौतम मनूचा व मनू गौतमाचा नामनिर्देश करतो. गौतमधर्मसूत्र हे सांप्रतच्या मनुस्मृतीहून बरेच जुने आहे. तेव्हा या परस्पर निर्देशाचा उलगडा करायचा, तर सांप्रतची मनुस्मृती ही मूळ मनुस्मृतीत भर घालून तयार केलेली असून, गौतमधर्मसूत्राच्या वेळची मनुस्मृती मूळची होय, असे मानावे लागते. याज्ञवल्क्यस्मृतीत वीस स्मृतिकारांचा उल्लेख असून (१.४.५.), मनुस्मृतीतही अनेक धर्मशास्त्रांचा उल्लेख आहे (२. २३२). अपरार्काने याज्ञवल्क्याच्या वरील यादीत भर घालून छत्तीस स्मृती निर्देशिल्या आहेत, तर प्रयोगपारिजातकाराने सत्तावन्न स्मृतिग्रंथ निर्दिष्ट केले आहेत. म. म. काणे यांनी सर्व निबंधग्रंथांचे आलोडन करून सुमारे शंभर स्मृती नोंदल्या आहेत.

या स्मृतिसंभारात मनुस्मृतीला सर्वाधिक प्रामाण्य आहे. इ. स. च्या ४ थ्या शतकाच्या सुमारास झालेल्या बृहस्पतीने मनूचे प्रामाण्य सांगताना पुढील श्लोक लिहिला आहे—

वेदार्थोपनिबन्धत्वात् प्रामाण्यं तु मनुस्मृतौ ।
मन्वर्थविपरीता या स्मृतिः सा न प्रशस्यते ।।

अर्थ– वेदार्थाचे उपनिबंधन करीत असल्यामुळे मनुस्मृतीला प्रामाण्य प्राप्त झाले आहे. मनूच्या अर्थाला विरुद्ध असणारी जी स्मृती, ती प्रशस्त मानली जात नाही.

मनूच्या नंतर याज्ञवल्क्याचा अनुक्रम लागतो. पुराणांनी पुष्कळ ठिकाणी याज्ञवल्क्याचा आधार घेतला आहे. मनु–याज्ञवल्क्यांच्या खालोखाल पराशर, नारद, बृहस्पती, कात्यायन, अंगिरा, ऋष्यशृंग, कार्ष्णाजिनी, दक्ष, पितामह, पुलस्त्य, प्रचेता, लौगाक्षी, हारीत, इ. लहानमोठे स्मृतिकार येतात. धर्मसूत्रांत विषयांची व्यवस्थित मांडणी आढळत नाही; पण स्मृतीत मात्र सर्व विषय पद्धतशीरपणे मांडलेले दिसतात. सर्व स्मृती श्लोकबद्ध आहेत. टीकाकारांच्या संख्येवरून एखाद्या स्मृतीचे महत्त्व ठरवायचे असेल, तर मनुस्मृतीला जेवढे टीकाकार लाभले, तेवढे अन्य स्मृतींना लाभले नाहीत. या टीकाकारांत मेधातिथीला अग्रेसरत्व द्यावे लागेल.

युगभेदाने निरनिराळ्या स्मृती प्रमाण मानाव्या, असे पराशराने स्मृतिप्रामाण्याविषयी म्हटले आहे. कृतयुगात मनू, त्रेतायुगात गौतम आणि द्वापरयुगात शंख–लिखित यांच्या स्मृती प्रमाण होत्या. सांप्रत कलियुगामध्ये पराशरस्मृतीचे प्रामाण्य समजावे, असे तो सांगतो.

स्मृतिग्रंथांशिवाय महाभारत व रामायण यांनाही स्मृती मानले जाते. महाभारतातच त्या ग्रंथाला धर्मशास्त्र असे म्हटले आहे (आदि. २.२८३). शांती व अनुशासन या दोन पर्वांत धर्मशास्त्रात येणारे बहुतेक विषय प्रतिपादले आहेत. राजधर्म, आश्रमधर्म, आचारधर्म, आपद्धर्म, उपवास, तीर्थ, दान, दायभाग, विविध पुत्र, प्रायश्चित्त, वर्णधर्म, विवाह, श्राद्ध, इ. अनेक धर्मशास्त्रीय विषय त्या प्रतिपादनात आले आहेत. रामायणातही प्रसंगाप्रसंगाने धर्मशास्त्रातले विषय आलेले दिसतात. बरेचसे निबंधकार पुराणांचा अंतर्भाव स्मृतींतच करतात. पूजा, व्रत, दान, इष्टापूर्त, इ. कृत्यांच्या प्रारंभी आपण 'श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थम्' असाच संकल्प करीत असतो. म्हणजेच धर्माच्या क्षेत्रात श्रुती व स्मृती यांच्याबरोबर पुराणेही विचारणीय आहेत, असा त्याचा अर्थ होतो. महाभारतकारांचेही तेच मत आहे –

इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् ।
(म. भा. आदि. १.२६७)

अर्थ – इतिहास व पुराणे यांच्या साहाय्याने वेदांचे स्पष्टीकरण करावे.

धर्मशास्त्रावरचे निबंध तर असंख्य आहेत. धर्मग्रंथांच्या ज्या अनेक सूची तयार झाल्या आहेत, त्यांवर जर दृष्टिक्षेप केला, तर असे दिसून येईल, की काही महत्त्वाच्या विषयांवर निबंधांची संख्या फार मोठी आहे. उदा० श्राद्ध या विषयावर कमीत कमी १५० निबंध आहेत. त्यांत हलाहल व शूलपाणी यांचे निबंध विशेष प्रसिद्ध आहेत. दत्तक प्रकरणावर सुमारे ४० निबंध असून, त्यांत कुबेरचंद्राच्या दत्तकचंद्रिकेला महत्त्व आहे. गोत्रप्रवरावर ३५ निबंध आहेत. दानपद्धतीवर ४० आहेत. त्यांत दिवाकराची दानचंद्रिका श्रेष्ठ समजली जाते. धर्मकृत्यासाठी तिथिनिर्णय हा विषय अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळे त्यावर सुमारे ७० निबंध आहेत. बंगालमध्ये जीमूतवाहनाच्या दायभाग या निबंधाला न्यायालयातही प्रामाण्य आहे. वारसा–हक्काच्या बाबतीत याज्ञवल्क्यस्मृतीवरील विज्ञानेश्वराची मिताक्षरा ही टीका भारतभर प्रमाण मानली जाते; पण बंगाल तेवढा या गोष्टीला अपवाद आहे. बंगालमध्ये दायभाग या ग्रंथाला

आधारेच वारसा हक्क ठरविला जातो. हा ग्रंथ इ. स. च्या बाराव्या शतकाच्या पूर्वार्धात निर्माण झाला.

हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणी हा धर्मशास्त्रावरचा प्रचंड धर्मग्रंथ इ. स. च्या तेराव्या शतकाच्या उत्तरार्धात झाला. मैथिलीत चंडेश्वराने स्मृतिरत्नाकर नावाचा ग्रंथ इ. स. च्या चौदाव्या शतकात निर्माण केला. तो त्या प्रदेशात प्रमाण मानला जातो. याच काळात दक्षिणेत माधवाचार्य या पंडिताने कालमाधव व पराशर माधवीय हे दोन ग्रंथ लिहिले आणि ते तमिळनाडमध्ये प्रमाणभूत ठरले. विश्वेश्वर भट्टाचा मदनपारिजात हा निबंध आणि शूलपाणीचा स्मृतिविवेक हे दोन ग्रंथही याच काळातले आहेत. सोळाव्या शतकात ओडिसामध्ये राज्य करणाऱ्या प्रतापरुद्रदेवाने सरस्वतीविलास नामक एक निबंधग्रंथ आपल्या प्रजेसाठी मुद्दाम तयार करून घेतला. नीळकंठभट्टाचा व्यवहारमयूख हा निबंधग्रंथ प्रसिद्ध आहे. गुजरात, महाराष्ट्र, इ. प्रदेशांत त्याला विशेष प्रामाण्य आहे. नीलकंठाने मयूख नामक बारा निबंध लिहिले आहेत. मित्रमिश्राचा वीरमित्रोदय हा एक प्रदीर्घ निबंध असून, त्यात धर्मशास्त्रातले सर्व विषय अंतर्भूत झाले आहेत. हा एक प्रकारचा सारग्रंथच आहे. त्याची मते बहुंशी मिताक्षरेला धरून असली, तरी काही ठिकाणी त्याने विज्ञानेश्वराशी मतभेदही दर्शविला आहे. देवण्णभट्टाच्या स्मृतिचंद्रिका या ग्रंथाचा द. भारतात विशेष प्रचार आहे. महाराष्ट्रात धर्मसिंधू व निर्णयसिंधू यांचा विशेष प्रचार असून, त्या प्रदेशातली सर्व धर्मकृत्ये या दोन निबंधांच्या आधारे चालतात. निर्णयसिंधू हा ग्रंथ कमलाकरभट्टाने इ. स. १६१२ साली रचला. त्याने शंभर स्मृतिकार व तीनशे निबंधकार यांचा आपल्या ग्रंथात उल्लेख केला आहे. त्यानंतर इ. स. च्या १८ व्या शतकाचे अखेरीस धर्मसिंधूची रचना झाली. हा निबंधग्रंथ काशीनाथ उपाध्याय किंवा बाबा पाध्ये यांनी रचला आहे. अनंत देवाचा स्मृतिकौस्तुभ हाही महत्त्वाचा निबंधग्रंथ प्रसिद्ध आहे. नागोजीभट्ट या विद्वानाने आचारेंदुशेखर, आशौचनिर्णय, इ. अनेक धर्मशास्त्रीय निबंध लिहिले आहेत. असे हे निबंधकार भारताच्या सर्व भागांत निर्माण झाले व त्या त्या प्रदेशात कमी-अधिक प्रमाणात मान्यता पावले.

**धर्मशास्त्र व मीमांसा**– याज्ञवल्क्यस्मृतीत विद्यांची व धर्मनिर्णयांची चौदा स्थाने सांगितली आहेत, ती अशी–

पुराणन्यायमीमांसाधर्मशास्त्राङ्गमिश्रिताः ।
वेदाः स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दश ॥
(याज्ञ. १.३)

अर्थ– भागवतादी पुराणे, तर्कशास्त्र, मीमांसा, मन्वादी स्मृती व गौतमादी धर्मसूत्रे, वेदाची शिक्षाज्योतिषादी सहा अंगे व चार वेद मिळून विद्या व धर्म यांची चौदा स्थाने होतात.

यांपैकी मीमांसाशास्त्र हे धर्मशास्त्राला अत्यंत उपयुक्त आहे. 'अथातो धर्मजिज्ञासा' हे जैमिनीच्या सूत्रांतले पहिले सूत्र आहे. त्याचा अर्थ वेदाध्ययनानंतर हे शास्त्र शिकल्याने धर्म म्हणजे काय हे कळून येते, असा आहे. वाक्याचा अर्थ कसा करावा, हे सांगण्यासाठी मीमांसेची प्रवृत्ती आहे. ज्यांचा अर्थ करायचा ती वाक्ये अर्थातच वेदांतलीच असली पाहिजेत, असा नियम आहे. वेदवाक्यांपैकी एखाद्या वाक्यात एक विधी असून, दुसऱ्या एखाद्या वाक्यात त्याच्या विरुद्ध विधी सांगितला असेल, तर ते दोन्ही अर्थ विकल्पाने मानावे, असा मीमांसेचा एक नियम आहे. हा नियम धर्मसूत्रांतही अनुसरलेला आहे. उदा० 'तुल्यबलविरोधे विकल्पः।' असे गौतमाचे एक सूत्र आहे (१.५). त्याचा अर्थ दोन परस्पर विरोधी वाक्ये तुल्यबळ असल्यास दोन्हींपैकी एक कोणते तरी घ्यावे, असा आहे. प्रत्यक्ष श्रुतिवचन हे अनुमानाने चालत आलेल्या आचाराहून बलवत्तर होय, हे आपस्तंबाचे सूत्र (१.१.४.८) 'विरोधे त्वनपेक्षं स्यादसति ह्यनुमाने' या जैमिनीय सूत्राला धरूनच आहे. श्रुतिवचन व आचार यांत विरोध असेल, तर तो आचार त्याज्य; पण विरोधी श्रुतिवचन नसेल, तर त्या आचाराला नष्टश्रुती हे प्रमाण अनुमानाने मानावे, असे त्याचे स्पष्टीकरण आहे. अशा प्रकारचे वाक्यार्थाचे अनेक नियम मीमांसेत दिलेले असून, धर्मशास्त्रातही अर्थनिर्णयाच्या कामी ते स्वीकारले गेल्याचे दिसून येते. अर्थवादविधी, विधी, नियम व परिसंख्या; प्रतिषेध व पर्युदास; क्रत्वर्थ व पुरुषार्थ, इ. विषयींचे मीमांसेतले नियम कोणताही ग्रंथ लावताना अत्यंत उपयुक्त ठरतात. कायद्याच्या बाबतीत किंवा उभय पक्षांना मान्य असलेल्या लेखांचा अर्थनिर्णय करताना आजही वरील प्रकारचेच नियम लावण्यात येतात.

मीमांसेत वेदवचनांचाच अर्थनिर्णय केलेला असून, त्यात काही कल्पना गृहीतकृत्ये म्हणून धरलेल्या आहेत. वेद हे स्वयंभू, स्वतःप्रमाण, अनादी व नित्य आहेत, ही भूमिका मीमांसेतल्या सर्व नियमांच्या बुडाशी आहे. स्मृतींची गोष्ट याच्या उलट आहे. त्या पौरुषेय असल्यामुळे नित्य नव्हेत, अर्थात त्यांचे प्रामाण्य वेदांप्रमाणे निरपेक्ष नसून सापेक्ष आहे. श्रुती आणि स्मृती यांचे स्वरूपही निराळे आहे. वेद हे यज्ञासाठी आहेत. वेदांतील कर्मे साक्षात स्वर्गप्राप्तीसाठी असून, स्मृतींतील कर्मे वर्णाश्रमांना अनुसरून सांगितलेली आहेत आणि त्यांची फलेही विविध आहेत. धर्मशास्त्रातील विषयांचे साक्षात विधान श्रुतीत क्वचितच केलेले असते. तशी विधाने मुख्यत्वे स्मृतींतच केलेली असतात. स्मृती अनेक असून, त्यांत परस्पर

विरोधही पुष्कळच आढळतो. असे असल्यामुळे श्रुतिवचनांच्या मीमांसेची सर्व परिभाषा आणि तिच्यातले सर्व न्याय धर्मशास्त्रनिर्णयात लावता येणे हे शक्य व योग्य नाही, असे आपोआप ठरते. असे असताही स्मृतिकारांनंतर शेकडो वर्षांनी झालेले धर्मनिबंधकार मात्र स्मृतिवचनांना श्रुतिवचनांसारखेच मानून त्यांचा कीस काढीत बसलेले दिसतात. या निबंधकारांची बुद्धी इतकी परावलंबी का व्हावी याचे आश्चर्य वाटते, असे म. म. काणे म्हणतात. स्मृतीत मात्र अशी परावलंबी बुद्धी दिसत नाही. स्मृतिकार एकमेकांना प्रमाण न मानता आपले मतभेद स्पष्टपणे सांगतात. उदा० औरस पुत्र तेवढा मानावा, असे बौधायनाने आपल्या धर्मसूत्रात सांगितले आहे ( २.२.२३ ). त्याला इतर प्रकारचे पुत्र किंवा पुत्रप्रतिनिधी मान्य नाहीत. पण मन्वादी स्मृतिकारांनी त्याचे हे मत न मानता बारा प्रकारच्या पुत्रांना मान्यता दिली आहे.

मीमांसासूत्रातही स्मृतींना पूर्णपणे प्रामाण्य दिलेले नाही. श्रुतिस्मृतीत विरोध असेल, तर स्मृती त्याज्य होय, असे जैमिनीय सूत्रांत स्वच्छच म्हटले आहे ( १.३.३ ).

स्मृतींतल्या सर्व गोष्टींना मीमांसा ज्याप्रमाणे प्रामाण्य देत नाही, त्याचप्रमाणे ती सदाचारालाही देत नाही. सदाचाराचे कारण दृष्ट असेल, तर तो प्रमाण मानण्याचे कारण नाही; पण ते अदृष्ट असेल तर तो सदाचार प्रमाण मानावा, एवढेच जैमिनी म्हणतो. इथे एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती ही, की स्वतः मीमांसाशास्त्रात जरी वेदवचनांशिवाय दुसरे काही प्रमाण मानलेले नसले, तरी विधी व अर्थवाद असे वेदवचनांचे जे वर्गीकरण मीमांसेत केलेले आहे, ते मूळ वेदात केलेले नसून पुरुषबुद्धीनेच केलेले आहे.

काही पंडित श्रुतिस्मृतींतील विरोधी वचनांचा समन्वय केला पाहिजे, असे म्हणून त्यालाही मीमांसाशास्त्राचा आधार देतात. पण मीमांसेत सगळ्या वेदवचनांचा समन्वय करावा, असे कुठेही सांगितले नाही. एखाद्या विशिष्ट कर्माविषयी निरनिराळ्या वेदशाखांत जी वचने आली असतील, ती एकत्र करून त्यांचा एकंदर अर्थ लावावा, असे फार तर मीमांसा सांगते. मीमांसेत सांगितलेली जी निरनिराळी कर्मे आहेत, त्यांची फलेही निरनिराळी असल्यामुळे तत्संबंधी श्रुतिवचनांत समन्वय संभवतच नाही.

पण धर्मशास्त्रावरील निबंधकारांनी मात्र मीमांसेत नसलेली समन्वयपद्धती तिच्यावर लादून असा आग्रह धरला, की सर्व स्मृतींचा अविरोध किंवा एकवाक्यता केली पाहिजे. पण ही गोष्ट सुतराम अशक्य आहे. स्वतः स्मृतिकारही या समन्वयपद्धतीला अनुकूल नाहीत. ते आपसांत समन्वय न करता आपले मतभेद स्पष्ट सांगतात. ब्राह्मणादी तीन वर्णांनी शूद्र जातीची भार्या करण्यास हरकत नाही, असे पूर्वस्मृतींत सांगितले आहे; पण याज्ञवल्क्य म्हणतो, की माझे मत याच्याविरुद्ध आहे (याज्ञ १.५६). चार पुरुषार्थांपैकी श्रेष्ठ पुरुषार्थ कोणता, याविषयी भिन्न भिन्न शास्त्रकारांची मते सांगून तीन्ही पुरुषार्थ एकमेकांच्या अनुषंगाने असावे, असे मनूने आपले वेगळे मत सांगितले आहे.

सर्व स्मृतींची एकवाक्यता करण्याच्या या खटाटोपात निबंधकारांना अनेक क्लृप्त्या योजाव्या लागल्या आहेत. पण त्यामुळे घोटाळे मात्र बरेच निर्माण झाले. ज्या त्या निबंधकाराने आपापल्या मताप्रमाणे स्मृतींचा संकोच किंवा विकास केल्यामुळे सर्वत्र मतभेदांचे रान माजले. वचनांची ओढाताण करणे, प्रत्येकाने वेगवेगळ्या स्मृतीला प्रामाण्य व प्राधान्य देणे आणि कसेही करून आपापल्या काळापर्यंत चालत आलेल्या आचाराचे समर्थन करणे, याचे नाव समन्वयपद्धती, असा निबंधकारांचा आशय आहे. ही तथाकथित समन्वयपद्धती मीमांसेला मुळीच मंजूर नाही. स्मृती या प्रमाण खऱ्या; पण त्यांना निरपेक्ष प्रामाण्य कधीच नव्हते व नाही. त्या देशकालादी भिन्नतेमुळे भिन्न भिन्न गोष्टींचे प्रतिपादन करतात. धर्मनिर्णय करताना एक गोष्ट नेहमी लक्षात ठेवली पाहिजे, की भिन्न देशकालपरिस्थितीप्रमाणे स्मृतिकारांनी आचाराचे नियम बदलले आहेत. परिस्थितीप्रमाणे तसे ते बदलणेच भाग पडते, हे विसरून चालणार नाही.

**धर्मशास्त्र व वेदान्त** – वेदान्तशास्त्राला उत्तरमीमांसा असे म्हणतात. हे शास्त्र सर्व शास्त्रांचा मुकुटमणी आहे, ही गोष्ट सर्व स्मृतींनी मान्य केलेली आहे. एकच परमेश्वर सर्वत्र भरून राहिलेला आहे, धर्माचरणाने उभय लोक प्राप्त होतात, आत्मलाभापेक्षा दुसरे काहीच श्रेष्ठ नाही, इ. वेदान्तशास्त्राचे सिद्धान्त सर्व स्मृतिग्रंथांना संमत आहेत. सर्व धर्मसूत्रांनी व स्मृतींनी आत्मलाभाची थोरवी गायिलेली असून, कर्म व पुनर्जन्म या विषयीचा वेदान्ताचा सिद्धान्तही मान्य केला आहे. या विषयी विष्णुधर्मसूत्र म्हणते; ते असे —

यथा धेनुसहस्रेषु वत्सो विन्दति मातरम् ।
तथा पूर्वकृतं कर्म कर्तारं विन्दते ध्रुवम् ॥

(वि. ध. सू. २०. ४७)

अर्थ – ज्याप्रमाणे हजार धेनूंच्या कळपातही वासरू नेमके आपल्याच आईला हुडकून काढते, त्याप्रमाणे पूर्वकृत कर्म (हजारो जीवांतून) जो कर्ता असेल, त्याला नेमके हुडकून काढते.

स्वधर्माच्या अनुष्ठानाने अपरिमित सुख प्राप्त होते व पुढे उत्तम जन्म लाभून प्राणी सुखात राहतो, असे आपस्तंबाने

म्हटले आहे (आप. ध. सू. २. १. २. २-३). वेदोक्त स्वकर्म जो नित्य, निरलसपणे व यथाशक्ति आचरीत राहील त्याला परमगती प्राप्त होईल, असे मनूनेही म्हटले आहे (४. १४). अशा प्रकारे वेदान्ताचे सिद्धान्त गृहीत धरून धर्मशास्त्रात वर्णाश्रमादी गोष्टींची व्यवस्था केलेली आहे. श्रेष्ठ आत्मज्ञानी सांगेल तो धर्म, असे म्हणून धर्मशास्त्रकारांनी अध्यात्मज्ञानाला प्रामाण्य बहाल केलेले आहे.

**धर्मशास्त्र व तर्क** – वेदान्ताप्रमाणेच धर्मशास्त्रात तर्काला किंवा न्यायालाही स्थान दिलेले आहे. याज्ञवल्क्याने सांगितलेल्या १४ धर्मस्थानांत तर्काचा अंतर्भाव आहे. 'न्यायाधिगमे तर्कोऽभ्युपायः' = न्यायाचे ज्ञान करून घेण्यासाठी तर्काचा अवलंब केला पाहिजे, असे गौतमधर्मसूत्रातही म्हटले आहे. मात्र जो तर्क करायचा तो श्रुतिस्मृतींविरुद्ध नसावा, असे त्याच्यावर बंधन घातले आहे. याविषयी शंखस्मृतीतले वचन असे —

**श्रौतं स्मार्तं क्रियावाक्यं हेतुभिर्यो विघातयेत् ।**
**असच्छास्त्रमुपाश्रित्य स ज्ञेयः शिष्टनिन्दितः ॥**

**अर्थ** – असच्छास्त्राचा अवलंब करून तर्काच्या योगाने जो श्रुतिस्मृतिवचनांना बाध आणू पाहील, त्याची शिष्ट लोक निंदा करतात.

धर्मनिर्णय करणाऱ्या परिषदेत जे सभासद असतील, त्यात एक हैतुक (न्यायशास्त्रवेत्ता) व एक तर्की (तर्कशास्त्रवेत्ता) असावा, असे म्हणून मनूने तर्काचा यथायोग्य गौरव केला आहे. (मनु. १२.१११). वेदविरुद्ध तर्क करू नये, असा तर्काला धर्मशास्त्रकारांनी पायबंद घातला असला, तरी तर्कावाचून कोणालाही पुढे पाऊल टाकता येत नाही. एखादे वेदवचन विधी किंवा अर्थवाद आहे, प्रतिषेध किंवा पर्युदास (अपवाद) आहे, हे तरी तर्कानेच ठरवावे लागते. 'तत्त्वमसि' या उपनिषदातील महावाक्याचेच उदाहरण घ्या. शंकराचार्य त्याचा अर्थ 'ते ब्रह्म तूच (जीव) आहेस' असा अद्वैतपर करतात; तर मध्वाचार्य 'त्या परमेश्वराचा तू (दास) आहेस' असा करून द्वैत सिद्ध करतात. पण हे दोन्ही अर्थ खरे असणे सुतराम अशक्य आहे. तेव्हा अशी परस्परविरोधी मते असतील तिथे तर्क व बुद्धी यांचा आधार घेतल्यावाचून चालणारच नाही. तर्काला कुंपण घालणे किंवा त्याची कुचंबणा करणे या गोष्टीने अप्रामाणिकपणा मात्र वाढीस लागतो.

**धर्मशास्त्र व योग** – यम, नियम, आसन, प्राणायाम, इ. योगाची आठ अंगे पतंजलीने सांगितली आहेत. त्यांतल्या यम-नियम-प्राणायामांचा धर्मशास्त्राशी संबंध आहे. धार्मिक कर्मांचा प्रारंभ प्राणायामानेच होत असतो. प्रायश्चित्ताचा विचार करताना 'प्राणायामेन शुद्ध्यति' = प्राणायामाने सर्व पापांचा नाश होतो, असे म्हटले आहे. यम-नियमांनाही धर्मशास्त्रात महत्त्व दिलेले आढळते. याविषयी मनू म्हणतो –

**यमान् सेवेत सततं न नित्यं नियमान् बुधः ।**
**यमान् पतत्यकुर्वाणो नियमान् केवलान् भजन् ॥**

(मनु. ४. २०४)

**अर्थ** – जाणत्याने नियमापेक्षाही यमांचे पालन नित्य करावे, केवळ नियमांचे आचरण करून यमांकडे (अहिंसा, सत्य, इ.) दुर्लक्ष केल्यास मनुष्य पतित होतो.

**धर्मशास्त्रातील काल्पनिक सिद्धान्त** – कित्येक गोष्टी वास्तविक नसता त्या खऱ्या मानून चालण्याची प्रवृत्ती धर्मशास्त्रकारांत दिसून येते. अशा काल्पनिक सिद्धान्तांवर धर्मशास्त्रांतल्या कित्येक मतांची उभारणी झालेली आहे. त्यांचा पहिला सिद्धान्त 'सांप्रत कलियुग चालू आहे' हा होय. धर्मशास्त्रकार असे समजतात, की याच्या मागे सत्ययुग किंवा कृतयुग होते आणि त्या युगांत सर्व परिस्थिती आजच्याहून वेगळी होती. मौज अशी, की अगदी प्रारंभापासूनच धर्मशास्त्रावरचे ग्रंथकार असे म्हणत आले आहेत. सर्वांत प्राचीन असलेला धर्मसूत्रकार गौतमही असेच म्हणतो. आपस्तंबाने पूर्वीचे लोक व अलिकडचे लोक असे शब्द घालून वरचाच सिद्धान्त सांगितला आहे. आपण कोणत्या युगातले ते मात्र तो सांगत नाही. त्यामुळे इतरांनी त्याला कलियुगाच्या पूर्वीचा ठरवले आहे. कृत-त्रेतादी शब्द ऐतरेय ब्राह्मणापासून आढळतात. कृतयुगात धर्म चतुष्पाद म्हणजे पूर्ण होता, हे सांगताना मनू म्हणतो —

**चतुष्पात् सकलो धर्मः सत्यं चैव कृते युगे ।**
**नाधर्मेणागमः कश्चिन्मनुष्यान् प्रति वर्तते ॥**

(मनु. १. ८१)

**अर्थ** – कृतयुगात धर्म पूर्ण होता. तेव्हा ते सत्ययुगच होते. त्या वेळी माणसे अधर्माने कसलीही प्राप्ती करून घेत नसत.

पण पुढे प्रत्येक युगात धर्माचा एकेक पाद कमी झाला. म्हणून युगऱ्हासानुरूप मनुष्यांचे त्या त्या युगातले धर्म निरनिराळे होतात, असे मनूने सांगितले आहे (१.२५). महाभारताचे शांतिपर्व व पराशरस्मृती यांतही ही कल्पना स्वीकारलेली आहे. या कल्पनेमुळे जे जे वचन चालू रूढीला किंवा व्यवहाराला गैरसोयीचे दिसेल, ते ते कलिवर्ज्यप्रकरणात ढकलण्याची प्रवृत्ती पुराणकारांत व निबंधकारांत उत्पन्न झाली. तात्पर्य, प्राचीन काळ चांगला होता व आजचा काळ वाईट आहे, ही कल्पना या साऱ्याच्या बुडाशी आहे. 'दुरून डोंगर साजरे' एवढेच त्या बाबतीत म्हणायचे. ऐतिहासिक दृष्टीने पाहता सर्व स्मृतिकार कलियुगातलेच आहेत; पण निबंध-

कारांनी त्या सर्वांना कलियुगाच्या पूर्वीचे ठरवले आहे. अनुलोम विवाह, शूद्राने स्वयंपाक केला तरी चालेल, इ. काही गोष्टी स्मृतीत सांगितल्या असल्या, तरी त्या चालू व्यवहाराला विरुद्ध जाऊ लागल्यामुळे निबंधकारांनी अशी पळवाट काढली, की वरील गोष्टी कृतयुगात धर्म्य ठरत असल्या, तरी कलियुगात त्या अधर्म्यच आहेत.

सगळ्या स्मृती वेदमूलक होत, असा धर्मशास्त्रकारांचा दुसरा एक सिद्धान्त आहे. हा सिद्धान्तही बराच प्राचीन दिसतो. याविषयी आपस्तंबाचे एक सूत्र असे–

**ब्राह्मणोक्ता विधयस्तेषामुत्सन्नाः पाठाः प्रयोगादनुमीयन्ते ।**

(आप. ध. सू. १. ४. १२. १०)

अर्थ– ब्राह्मणग्रंथांत सांगितलेल्या विधींचे पाठ आता नष्ट झाले आहेत; पण ते विधी प्रत्यक्ष प्रयोगात असल्यामुळे त्या पाठांचे अनुमान करता येते.

याला उत्सन्नश्रुतिवाद म्हणतात. एखाद्या विधीला आधार वेदांत सापडत नसला, तर नष्ट झालेल्या वेदांत किंवा वेदशाखांत तो असेल, असे मानणे, असा त्याचा अर्थ आहे. पुरुषांच्या प्रमाद, आळस, इ. कारणांमुळे व ज्ञात्या पुरुषांच्या मृत्यूमुळे काही श्रुती नष्ट झाल्या आहेत, असे शास्त्रकार मानतात आणि स्मृतीत सांगितलेल्या आचारांना त्या नष्ट श्रुती प्रमाण समजाव्या, असा त्यांचा आग्रह असतो. येनकेन प्रकारेण सर्व स्मृत्युक्त आचारांना वेदप्रामाण्य मिळवून देण्याची ही खटपट आहे; पण विवेचक बुद्धीच्या निकषावर ती टिकू शकत नाही. [ धर्मशास्त्रविचार; श्री. म. दा. साठे– नवभारत ]

## धर्मषष्ठी

एक काम्य व्रत. आश्विन कृ. षष्ठीच्या दिवशी धर्मराजाची (यम) पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. फल– दीर्घायुरारोग्याची प्राप्ती. [ हि. ध. ]

## धर्मसंप्रदाय

एक धार्मिक पंथ. धर्मठाकूर ही या संप्रदायाची उपास्य देवता असल्यामुळे याला धर्मसंप्रदाय असे नाव पडले. या संप्रदायाचे निरंजनमत असे दुसरेही नाव आहे. बंगाल, ओडिसा व छोटा नागपूर या प्रदेशांत या पंथाचे अनुयायी आहेत. बौद्ध धर्माच्या ऱ्हासकाळात केव्हातरी या पंथाची स्थापना झाली असावी. पूर्वी डोम, बागदी, इ. हीन जातींत हा पंथ प्रचलित होता. इ. स. च्या ११ व्या शतकात होऊन गेलेल्या रमाईपंडित या पुरुषाने या संप्रदायाची व्यवस्थित उभारणी केली, असे कळते. पुढे सेताई, गिलाई, कंसाई, इ. पंडितांनी त्याचा प्रसार केला. उत्तर बंगालमध्ये हा संप्रदाय शिव आणि नाथ या संप्रदायांचे मूळ रूप म्हणून ओळखला जातो.

या पंथाचा प्रसार तिकडील समाजाच्या सर्व थरांत झालेला आहे. इस्लाम, बौद्ध, इ. धर्मांचे लोकही या संप्रदायाचे अनुयायी आहेत. बंगाल, बिहार या प्रदेशांमधील बौद्ध धर्माच्या ऱ्हासकाळात याची उभारणी झाली असल्यामुळे याच्यावर बौद्ध तत्त्वांचा प्रभाव तर दिसतोच; शिवाय नाथ पंथाचाही प्रभाव जाणवतो.

धर्म व नाथ या संप्रदायांच्या सृष्टयुत्पत्तिकथेत बरेच साम्य आहे. धर्मसांप्रदायिक लोक आदिनाथाचा जन्म धर्मनिरंजनापासून मानतात. त्यांच्या नित्य स्मरणात अनेक नाथसिद्धांचाही समावेश असतो.

सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे याच्यावरचा इस्लामी प्रभाव ही होय. अनेक हिंदू देवता मुसलमानी नामरूपे धारण करून या पंथात वावरताना दिसतात. इथे ब्रह्मा मुहंमद झाला आहे, तर शिव आदम बनला आहे. तसेच सारे मुनिगण फकीर झाले आहेत.

शून्य पुराण हा या संप्रदायाचा प्रमुख ग्रंथ होय. या ग्रंथात धर्माला शून्यरूप, निराकार व निरंजन असे म्हटले असून, त्याचे ध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

**शून्यरूपं निराकारं सहस्रविघ्नविनाशनम् ।**
**सर्वपरः परदेवः तस्मात्त्वं वरदो भव ।।**

अर्थ– हे निरंजना, तू शून्यरूप निराकार, सहस्र विघ्नांचा नाश करणारा आणि सर्व देवांत श्रेष्ठ असा आहेस. म्हणून तू आम्हांला इष्ट वर देणारा हो.

शून्य पुराणमते निरंजनाचा अवतार पाण्यात झाला असून, तो कूर्मस्वरूपी आहे. शून्य पुराणात एकूण ५५ अध्याय आहेत. त्यांतील पहिले पाच अध्याय सृष्टितत्त्वासंबंधी असून, इतर अध्याय पूजाविधीविषयी आहेत. 'यः शान्तं अनादिमध्यं न च करचरणम्' हा मंत्र म्हणून धर्माची पूजा करणे व 'ॐनिरञ्जनाय विद्महे अनिलपुरुषाय धीमहि । तन्नो धर्मः प्रचोदयात्' ही गायत्री म्हणून प्रार्थना करणे, अशी त्यांची पूजापद्धती आहे.

धर्मठाकुराच्या उपासनेसाठी व त्याचे माहात्म्य वाढविण्यासाठी बंगाली भाषेत कित्येक काव्ये निर्माण झाली आहेत. त्यांना धर्ममंगल काव्ये असे म्हणतात. त्या सर्वांत मयूरभट्टाचे काव्य इ. स. च्या १२ व्या शतकातले म्हणजेच सर्वांत आधीचे मानतात. त्यानंतर खेलाराम, माणिक गांगुली, रूपराम, रामचंद्र, श्याम पंडित, रामदास आदक, सहदेव चक्रवर्ती, घनराम, इ. अनेक कवींनी धर्ममंगल काव्ये लिहिली आहेत. सतराव्या शतकापर्यंत अशा काव्यांची रचना होत राहिली होती. या काव्यांत इतिहास, परंपरा, लोकश्रुती, पुराण, इ. गोष्टींचा समावेश आहे. धर्ममंगल काव्याच्या पठणाला पूर्वी चौवीस बैठका

लागत असत. दर दिवशी दोन बैठका याप्रमाणे बारा दिवसांत हे पठण संपवीत असत. सामान्यपणे हे पठण धर्मठाकुराच्या धरमरण नामक उत्सवात होत असे. [ म. ध. सा.; हृ. प्रा. लो.; म. सा. अ.; गो. च. प.; हि. वे. लैं. लिं.; बं. उ.सा.; सि. सा.; इं. फो. लो.; हिं. सा. को. २; से. इं. १९५१ ]

**धर्मसिंधू** काशीनाथ उपाध्यायकृत धर्मशास्त्रविषयक ग्रंथ. निर्णयसिंधू, पुरुषार्थचितामणी, कालमाधव, हेमाद्री, कालतत्त्वविवेचन, कौस्तुभ, स्मृत्यर्थसार, इ. ग्रंथांचा आधार घेऊन ग्रंथकाराने व्यवहारात आवश्यक असलेल्या धर्मशास्त्रातील विषयांचा यात विचार केला आहे. काही ठिकाणी त्याने स्वतःला योग्य वाटणारा वेगळा निर्णयही दिला आहे.

या ग्रंथाचे तीन परिच्छेद आहेत. पहिल्या परिच्छेदात कालाचे भेद, संक्रांतीचा पर्वकाळ, मलमास, वर्ज्यावर्ज्य कर्मे, व्रतपरिभाषा, प्रतिपदादी तिथींचा निर्णय, इष्टिकाल, इ. विषय आलेले आहेत.

दुसऱ्या परिच्छेदात चैत्रादी बारा मासांतील कृत्ये, तिथींचा निर्णय, दशावतारजयंत्या, कपिलाषष्ठी, गजच्छाया, चंद्रादी ग्रहांच्या संक्रांतीचा पुण्यकाल, ग्रहांची दाने, इ. विषयांवर विचार केला आहे.

तिसऱ्या परिच्छेदाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग असून, पूर्वार्धात गर्भाधान, पुंसवनादी संस्कार, दर्शादिशांती, पुनरुपनयन, गणविचार, राशिकूट, नाडी, गोत्रप्रवर, औपासनादी होम, नित्यदान, शूद्रसंस्कारनिर्णय, स्वप्ननिर्णय, इ. विषय विवेचिले आहेत. उत्तरार्धात श्राद्धाचे अधिकारी, श्राद्धभेद, श्राद्धाचे ब्राह्मण, इ. श्राद्धासंबंधीचे विषय असून आशौचनिर्णय, प्रेतसंस्कार, विधवाधर्म, संन्यास, यतिधर्म, इ. विषयही सांगितले आहेत. भारतात सर्वत्र या ग्रंथाला मान्यता आहे.

**धर्मसिंह** ( इ. स. चे १७ वे शतक ) राजस्थानी रीतिकालीन कवी. वयाच्या १३ व्या वर्षी याने जिनरत्न सूरीकडून जैनदीक्षा घेतली आणि धर्मवर्धन हे नाव धारण केले. याने जैन आगम, व्याकरण, न्याय, वैद्यक, इ. शास्त्रांचा; त्याचप्रमाणे राजस्थानी, संस्कृत, प्राकृत, हिंदी व गुजराती या भाषांचा अभ्यास केला होता. त्याला मागधी, पैशाची, शौरसेनी, चूलिका, अपभ्रंश व सिंधी या भाषांचेही चांगले ज्ञान होते.

याने जीवनभर धर्मप्रचार व साहित्यसेवा केली. तत्कालीन राज्यप्रशासकांनी याची खूप स्तुती केली आहे. याचे २३ लहान मोठे ग्रंथ व काही फुटकळ पद्ये उपलब्ध आहेत. त्यांपैकी गुरुशिष्यदृष्टान्त छत्तीसी, विशेष छत्तीसी, धर्म बावनी, प्रास्तविक कुंडलिया बावनी, छप्पय बावनी, इ. ग्रंथ विशेष महत्त्वाचे आहेत. याच्या फुटकळ विषयांत व्यावहारिक जीवनाचा यथायोग्य आविष्कार दिसतो. याच्या काव्याचा एक नमुना असा—

दूर ते पोसाकदार देखियत सिरदार
देखि कैं कुचील चीर ह्वै है कोड बपरा।
सुन्दर सुवेश जाणै ताको सहु बैंन मानैं,
बोलैं जो दरिद्री तो लबार कहैं लपरा।
पीतांबर देखके समुद्र आप दिनी सुता,
दीनौ विण रुद्र कुं विलोकी हाथ खपरा।
धर्मसी कहैं रे मीत ऐसी हैं संसार रीति,
एक नूर आदमी हजार नूर कपरा ।।

अर्थ – कुणी भपकेबाज पोषाख केलेला मनुष्य दिसला, की लोक त्याला लांबूनच सरदार म्हणून ओळखतात. तर कोणाचे फाटके कपडे पाहिल्यावर ‘असेल कोणी गरीब बिचारा’ असे समजतात. ज्यांने सुंदर वेष धारण केला असेल, त्याची वाणी विश्वसनीय मानतात. पण जर एखादा दरिद्री बोलू लागला, तर त्याला मात्र लबाड किंवा लुच्चा समजतात. पीतांबरधारी विष्णूला समुद्राने आपली कन्या दिली; परंतु विषप्राशनाने नीलकंठ बनलेल्या रुद्राच्या हातात खापर पाहून त्याला मात्र आपली कन्या दिली नाही. कवी धर्मसिह म्हणतो, की हे मित्रा ‘एक नूर आदमी आणि हजार नूर कपडा’ अशीच या जगाची रीत आहे.

वयाच्या ८१ व्या वर्षी याचा मृत्यू झाला. [ हिं. नी. वि. ]

**धर्मसूत्रे** धर्मविषयी निर्णय देणारे ग्रंथ. धर्मसूत्रे ही कल्पसूत्रांचा एक भाग आहेत. गृह्यसूत्रांशीही त्यांचा निकटचा संबंध आहे. उपनयन, अनध्याय, विवाह, श्राद्ध, पंचमहायज्ञ, इ. विषय दोहोंतही समान असले, तरी धर्मसूत्रांत त्यांशिवाय आर्थिक, सामाजिक, राजकीय, धार्मिक व तत्त्वज्ञानात्मक विषय अधिक आहेत.

धर्मसूत्रांचे कर्ते कोणी दिव्य ऋषी किंवा देव नसून, ती सर्वसामान्य पुरुषांनीच रचली आहेत, असे स्वतः धर्मसूत्रांच्या कर्त्यांनीच सांगून ठेवले आहे. श्रुती, स्मृती आणि निर्लोभ व निर्दोष अशा सज्जनांचा आचारधर्म या तीन प्रमुख गोष्टींवर धर्म आधारलेला आहे, असे धर्मसूत्रांचे मत आहे. त्याला धरूनच त्यांतली सगळी चर्चा आहे. धर्मसूत्रांत धर्मविषयक सर्व अंगोपांगांचा समावेश केलेला नाही. सामयाचारिक व स्मार्त धर्मच त्यांत सांगितलेला आहे. परंपरागत आचाराला स्मार्त धर्म आणि रूढीला सामयाचारिक धर्म असे नाव आहे.

धर्मसूत्रे ही धार्मिक आचारांच्या बाबतीत वेदप्रामाण्य मानतात. एखादा आचार अस्तित्वात येतो तो वेदांतील आदेशाला अनुसरूनच येतो, असे त्यांचे मत आहे. असे असले, तरी सर्व स्मार्त धर्माला वेदांत आधार आहे, असे म्हणणे बरोबर नाही. कारण वैदिक आर्यांचा समाज कालमानाने जसजसा बदलत गेला, तसतसे समाजापुढे काही नवीन प्रश्न निर्माण झाले आणि त्यांची व्यवस्था लावण्यासाठी नवीन आचार अस्तित्वात आणणे जाणत्या व अधिकारी लोकांना भाग पडले. अशा प्रकारे समाजात नवीन नवीन आचारांची भर पडत गेली. सूत्रकालापर्यंत भारतातील आर्य समाज बराच प्रगत आणि वृद्धिगत झाला होता. त्याचबरोबर त्या समाजात आचारांची संख्याही खूप वाढली होती. त्यामुळे या सर्व आचारांना व्यवस्थित रीतीने ग्रंथनिविष्ट करण्याची गरज उत्पन्न झाली. धर्मसूत्रकारांनी ते काम यथायोग्य केले आहे. इतकेच नव्हे, तर त्यांनी त्या कालातील सामाजिक, राजकीय व धार्मिक प्रश्नांचाही खोलवर विचार करून, कालमानानुसार त्यांवर उपाययोजना सुचविली आहे.

धर्मसूत्रांमध्ये जे विषय आलेले आहेत, त्यांचे स्थूल मानाने वर्णधर्म, आश्रमधर्म आणि नैमित्तिक धर्म असे तीन विभाग पडतात. गौतमधर्मसूत्राने हे विभाग मान्य केलेले आहेत (१९.१).

वर्णधर्मात जाती व संकरजाती यांची धार्मिक कर्तव्ये, व्यवसाय, नेमलेले व्यवसाय करायला असमर्थ असलेल्या व्यक्तींसाठी पर्यायी व्यवसाय, इ. माहिती दिली आहे. क्षत्रिय वर्णाच्या कर्तव्यकर्मासंबंधी विवेचन करताना राजाची कर्तव्ये, त्याचा प्रजेशी संबंध, राज्याचे कायदेकानू, राज्यकारभाराची पद्धती, करपद्धती, विशेषप्रसंगी प्रायश्चित्ताचे विधान, इ. गोष्टी सांगितल्या आहेत.

आश्रमधर्माचे विवरण धर्मसूत्रांत सविस्तर केले असून, सर्व आश्रमांत गृहस्थाची कर्तव्ये सांगताना विवाह, त्याचे प्रकार, पुत्रांचे प्रकार, वारसापद्धती, नियोगाचे नियम, पंचमहायज्ञ, श्राद्धे, इ. गोष्टींचा विचार केलेला आहे.

नैमित्तिक धर्मात निरनिराळ्या प्रकारची पापे व त्यांच्या निष्कृतीसाठी अनेक प्रायश्चित्ते, जननाशौच आणि मृताशौच यांचा काल, निषिद्ध अन्न, आत्म्याचे स्वरूप, इ. विषयांवर विचार केलेला आहे.

गौतम व वैखानस ही दोन धर्मसूत्रे संपूर्ण गद्यात असून, बाकीची गद्यपद्यात्मक आहेत. गौतमधर्मसूत्र हे सर्वांत प्राचीन समजले जाते. वास्तविक वेदाच्या प्रत्येक शाखेचे धर्मसूत्र असायला हवे होते. पण वस्तुस्थिती तशी नाही. आश्वलायनधर्मसूत्र व शांखायनधर्मसूत्र ही मुळीच उपलब्ध नाहीत. मानवधर्मसूत्राचे उल्लेख आढळतात; पण अद्याप ते उपलब्ध झालेले नाही. बौधायन, आपस्तंब व हिरण्यकेशी ही सूत्रे मात्र उपलब्ध आहेत. प्राचीन काळी निरनिराळ्या चरणांत निरनिराळ्या धर्मसूत्रांचे अध्ययन होत असे. [ इं. वे. क. सू.; वै. सा. सं.; हि. ध.; धर्मसूत्राज, सुरेशचंद्र बानर्जी, १९६२]

**धर्मसूरी** ( इ. स. चे १५ वे शतक ) आंध्र प्रदेशातील एक पंडित कवी. हा गुंतूर जिल्ह्यातील तेनाली-जवळच्या कठेवर या गावाचा रहिवासी होता. याचा जन्म वाराणसीच्या एका प्रतिष्ठित ब्राह्मण कुळात झाला. ते घराणे अलौकिक बुद्धिमत्ता व पांडित्य यांविषयी प्रसिद्ध होते. धर्मसूरीचा पितामह धर्मसुधी याने तप करून आपल्या कुळात सात पिढ्यांपर्यंत पांडित्य नांदावे, असे वरदान मिळवले होते. त्याचे तीन्ही पुत्र महापंडित होते. त्यांतील पर्वतनाथाचा पुत्र धर्मसूरी याचे तर १४ विद्यांवर प्रभुत्व होते. न्यायशास्त्रात तो विशेषच पारंगत होता.

याचा साहित्यरत्नाकर नामक ग्रंथ अत्यंत प्रसिद्ध आहे. त्याचे दहा तरंग असून, त्यांत संपूर्ण काव्यशास्त्राची चर्चा केलेली आहे. याव्यतिरिक्त याने कृष्णास्तुती व सूर्यशतक या नावांची दोन स्तोत्रे आणि बालभागवत व हंससंदेश ही दोन काव्ये रचली आहेत. याने कंसवध व नरकासुरविजय या नावांची दोन नाटकेही लिहिल्याचे कळते. [ श्री. वीर राघवाचार्य– न्यू इं. अँ. भा. २, ऑक्टोबर १९३९ ]

**धर्मस्थल** एक पुण्यक्षेत्र. हे क्षेत्र कर्नाटकातील द. कानडा जिल्ह्याच्या बेलथनगडी तालुक्यात नेत्रावती नदीच्या तीरावर आहे. इथे मंजुनाथाचे एक प्राचीन मंदिर आहे. या मंदिरातील लिंगाची स्थापना आद्य शंकराचार्यांनी केली, असे सांगतात. प्रारंभी इथली पूजा-अर्चा शांकर संप्रदायाच्या पूजापद्धतीप्रमाणे होत असे. परंतु इ. स. १६३५ मध्ये श्रीवादिराजस्वामी हे द्वैताचार्य इथे आले व तेव्हापासून ही उपासना माध्व संप्रदायाच्या पद्धतीप्रमाणे सुरू झाली.

कार्तिकातल्या वद्य (बहुला) दशमीपासून अमावास्येपर्यंत इथे मोठी यात्रा व धर्मसंमेलन भरते. यात्राप्रसंगी इथे लक्षदीप-दानोत्सवही करतात. [ कल्याणं–तीर्थांक ]

**धर्मस्वामी** ( ११९७– १२६४ इ. स. ) तिबेटातील एक बौद्ध पंडित. याने वयाच्या २९ व्या वर्षापर्यंत तिबेटात व्याकरण, तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र या विषयांचा सखोल अभ्यास केला. त्यानंतर तिबेट व नेपाळ यांच्या सीमेवरील

स्वयंभू चैत्य व धर्मधातू विहार येथे आठ वर्षे राहून त्याने रत्नरक्षित नामक गुरूजवळ तंत्रशास्त्राचे अध्ययन केले. मग नेपाळमध्ये काही दिवस राहून याने त्रिपिटकांचा अभ्यास केला.

आपण भारतात यावे अशी त्याची फार दिवसांची आकांक्षा होती; कारण बोधगया येथील बुद्धाच्या मूर्तीचे दर्शन घेतल्याने सर्व कामना पूर्ण होतात, अशी त्याची श्रद्धा होती. त्याप्रमाणे इ. स. १२३४ मध्ये तो मगध देशात आला आणि बोधगया, राजगृह, गृध्रकूट, नालंदा, इ. स्थळांना त्याने भेटी दिल्या. राजगृह येथे त्याने यशोमित्र नामक पंडिताबरोबर अनेक बौद्ध सिद्धांतांची चर्चा केली. नालंदा येथे सुमारे वर्षभर राहून त्याने राहुल श्रीभद्र नामक गुरूजवळ व्याकरणाचा अधिक अभ्यास केला. पण शास्त्राभ्यासापेक्षा त्याला भारताविषयी आध्यात्मिक आकर्षण अधिक वाटत असे.

भारतयात्रेत धर्मस्वामीवर अनेक संकटे आली; पण त्या सर्वांतून तो सुटला व इ. स. १२३६ मध्ये नेपाळात परत गेला. तिथे त्याचे खूप स्वागत झाले आणि त्याला सुवर्णादी मूल्यवान वस्तू भेटीदाखल मिळाल्या. त्यांचा विनियोग करून त्याने अनेक बुद्धमूर्ती व संस्कृत पोथ्या विकत घेतल्या. नंतर नेपाळतिबेट सीमेवरील यान-डोग मठात चार वर्षे वास्तव्य करून तो तिबेटात परत गेला. तिथे त्याने बौद्ध धर्माचा प्रचार करण्यात आपले उरलेले आयुष्य वेचले.

धर्मस्वामीने केलेल्या भारतयात्रेमुळे त्याची आध्यात्मिक कीर्ती खूप दूरवर पसरली. आणि त्याला अलौकिक सामर्थ्य प्राप्त झाले आहे व तो बुद्धाचा अवतारच आहे, असे तिबेटातील लोकांना वाटू लागले. [ श्री. अ. स. अळतेकर– बिहार, गणेशदत्त कॉलेज बुलेटिन, ४ मार्च, १९५९ ]

**धर्मांतर** एका धर्माचा त्याग करून दुसरा धर्म दीक्षापूर्वक स्वीकारणे, याला धर्मांतर असे म्हणतात. केवळ परधर्माचा अभ्यास केल्यामुळे, मिश्र विवाहामुळे, किंवा मद्यमांससेवनामुळे धर्मांतर होत नाही, अशी समजूत आहे

बुद्धिपूर्वक परधर्म स्वीकारणे, धनादिकांच्या लोभाने तसे करणे व जुलुमजबरदस्तीमुळे स्वतःच्या इच्छेविरुद्ध बाटवले जाणे, असे धर्मांतराचे भिन्न भिन्न प्रकार आहेत. त्यांतील पहिल्या प्रकारचे म्हणजे स्वेच्छेने परधर्मात जाणारे लोक थोडेच असतात. राजसत्तेच्या बळावर फैलावलेल्या धर्मात गेल्यामुळे अनेक फायदे होतात, म्हणून धनलोभाने पुष्कळ लोक स्वधर्माचा त्याग करतात. यांची संख्या पहिल्या प्रकारापेक्षा अधिक असते. बळजबरीमुळे किंवा प्राणभयाने ज्यांना परधर्म स्वीकारावा लागला, अशा माणसांची संख्या मात्र प्रचंड आहे. अशा धर्मभ्रष्टांना स्वधर्मात परत घेणे हाही धर्मांतराचाच एक प्रकार आहे; त्याला शुद्धी असे म्हणतात.

भारतात धर्मांतर सुरू झाले ते ख्रिस्ती धर्माच्या स्थापनेनंतर. इ. स. च्या १ ल्या शतकातच सेंट थॉमस भारतात येऊन त्या धर्माचा प्रसार करू लागला. तेव्हापासून इ. स. च्या १५ व्या शतकापर्यंत ख्रिस्ती धर्माचा प्रसार भारतात मंद गतीने, पण सर्वत्र चालू होता. त्यानंतर पोर्तुगीज लोक आले व त्यांनी भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील असंख्य हिंदूंना जुलमाने बाटवले.

इ. स. च्या आठव्या शतकात महंमद कासीमने भारतावर स्वारी केली आणि दाहीरचा पराभव करून हजारो हिंदू स्त्रीपुरुषांना बाटवून, गुलाम करून आपल्या देशात नेले. त्यानंतर गझनीचा सुलतान महमूद व शिहाबुद्दीन घोरी यांनी भारतावर अनेक स्वाऱ्या केल्या आणि असंख्य हिंदूंना बाटवून मुसलमान केले. त्यानंतरच्या बहुतेक सर्व मुसलमान राज्यकर्त्यांनी कोटयवधी हिंदूंना बलात्काराने आपल्या धर्मात ओढून घेतले.

प्राणभयाने किंवा धनलोभाने धर्मांतर करणाऱ्या हिंदूंची संख्याही लहान नाही. अशा धर्मभ्रष्ट लोकांनी तर अत्यंत कडवेपणाने हिंदूंच्या कत्तली केल्या व असंख्य हिंदूंना मुसलमान बनवले. अलाउद्दिनाचा सेनापती मलिक काफूर, जहांगीरचा सेनापती महाबतखान, फीरूजशहाचा वजीर मखबुलखान, अहमदाबादचा सुलतान मुझफरशहा व बंगालचा काळा पहाड हे मूळचे हिंदू होते. मुसलमान झाल्यानंतर त्यांनी हिंदू धर्मावर कठोर आघात व अनन्वित अत्याचार केले.

भारतातील बहुसंख्य मुसलमान अशा प्रकारे बाटलेल्या हिंदूंचेच वंशज आहेत. त्यांत बाहेरून आलेले अस्सल मुसलमान अगदी थोडेच असतील. आतार, कासार, कलईगार, खाटिक, खोजा, घेरमेहदी, चूडावाला, तांबोळी, धावड, नालबंद, पिंजारी, बागवान, बोहरा, भिस्ती, मकवाना, मोमीन, मोची, इ. अनेक मुसलमान जातींचे लोक पूर्वी हिंदू होते. त्यांच्यांतील जातिभेद धर्मांतरानंतरही कायम राहिला आहे. इस्लाममधल्या समानतेचा त्यांना अनुभव आला नाही. कारण बाहेरून आलेले मुसलमान स्वतःला उच्च मानतात व बाटलेल्यांना हीन मानतात. हे बाटून मुसलमान झालेले लोक अजूनही आपल्या काही जुन्या हिंदू चालीरीती पाळतात. बाटलेल्या ख्रिस्ती लोकांच्या आचारांतही त्यांचे मूळचे हिंदुत्व डोकावतेच. पाश्चात्य गोरे ख्रिस्तीही या काळ्या ख्रिस्त्यांना समानतेने वागवीत नाहीत.

**शुद्धिकर्म** – स्वधर्माचा त्याग करून परधर्माचा स्वीकार करणे, हे हिंदू धर्मात पातक मानले आहे. ते बुद्धिपूर्वक केलेले असो वा अनिच्छेने केलेले असो, त्याबद्दल प्रायश्चित्त घ्यावे

लागते व ते घेतल्यानंतर बाटलेला मनुष्य शुद्ध होऊन परत आपले वर्णाश्रमधर्मातले स्थान स्वीकारू शकतो. याविषयी मनूचे वचन आहे (११.४६), ते असे–

अकामतः कृतं पापं वेदाभ्यासेन शुद्धयति ।
कामतस्तु कृतं मोहात् प्रायश्चित्तैः पृथग्विधैः ।।

अर्थ— कोणत्याही लोभामोहावाचून ( अकामतः ) केलेले पाप वेदाभ्यासाने नष्ट होते व लोभामोहाने केलेले पाप विविध प्रकारच्या प्रायश्चित्तांनी नष्ट होते (व तो मनुष्य शुद्ध होतो.)

धर्मांतर हे एक उपपातक मानून याज्ञवल्क्याने त्यासाठी प्रायश्चित्त सांगितले आहे, ते असे –

उपपातकशुद्धिः स्यादेवं चान्द्रायणेन वा ।
पयसा वापि मासेन पराकेणाथवा पुनः ।।

अर्थ– उपपातकाची शुद्धी एक महिनाभर चांद्रायण केल्याने, महिनाभर दुधावर राहिल्याने किंवा पराक प्रायश्चित्त केल्याने होते.

एखाद्या शूद्राला म्लेंच्छांनी फसवून बाटविले, तर त्याने कृच्छ्रत्रय प्रायश्चित्त करावे, असेही सांगितले आहे.

केवळ धर्मांतरामुळेच नव्हे, तर परधर्मियांशी दीर्घकाळ अनेक प्रकारे संसर्ग झाल्यामुळेही अशा धर्मभ्रष्टांकडे हिंदू समाज तुच्छतेने पाहतो. त्याचे कारण धर्मशास्त्राचा आचारशुद्धीवर विशेष कटाक्ष आहे, हे होय. या बाबतीत देवलस्मृतीचा दृष्टिकोन बराच उदार आहे. देवलाने नाना प्रकारचे म्लेंच्छ-संसर्ग सांगून त्यांना प्रायश्चित्तेही सांगितली आहेत ( देवल स्मृती ७–२३ ). देवल स्मृती मुख्यत्वे धर्मभ्रष्टांच्या शुद्धीकरणार्थच केलेली दिसते. महंमद कासीमच्या सिंधवरील स्वारीनंतर ही स्मृती लिहिलेली आहे, असे अनेक विद्वान संशोधकांचे मत आहे. त्या वेळी धर्मभ्रष्टांच्या शुद्धीकरणाचा प्रश्न प्रथमच उत्पन्न झाला.

यावरून धर्मांतर हे अनिवार्य पातक मानलेले नाही, असे ठरते. एखादा हिंदू परधर्मात गेला, तर तो हिंदू धर्माला कायमचा मुकतो, असे धर्मशास्त्रकारांनी सांगितलेले नाही. मनूने तर बलाने लादलेले, जुलमाने भोगावे लागलेले, छलबलाने लिहून घेतलेले हे सर्व अकृत म्हणजे घडलेलेच नाही, असे म्हटले आहे ( मनु. ८.१६८ ). अर्थात अशा प्रकारे झालेल्या धर्मांतराचा दोष प्रायश्चित्ताने दूर करता येतो, असा मनूचा आशय दिसतो. पुराणांतही पापांची निष्कृती करण्याचे अनेक सोपे उपाय सांगितले आहेत. धर्मभ्रष्ट माणसे विष्णूच्या नामस्मरणाने पवित्र होतात, असे भागवत पुराणात म्हटले आहे. पण हा धार्मिक उदारपणा कालांतराने लोप पावला व पावित्र्याच्या भ्रामक कल्पना हिंदू समाजात दृढ झाल्या. गोमांसभक्षणाने व पतितांच्या संसर्गाने हिंदुत्व नष्ट होते, प्रायश्चित्तानेही धर्मभ्रष्ट मनुष्य शुद्ध होत नाही, अशा विपरीत कल्पना प्रसृत झाल्या व लोकांच्या मनात त्या दृढ होऊन बसल्या.

**शुद्धीचा इतिहास** – प्राचीन काळी काही ऋषींनी मूळच्या अहिंदूंना चातुर्वर्ण्यात समाविष्ट करून घेतल्याचे उल्लेख हरिवंश, भविष्य पुराण, इ. ग्रंथांत सापडतात. यवन, शक, कुशाण या वंशांतील अनेक व्यक्तींनी हिंदू धर्म स्वीकारल्याची माहिती शिलालेख, दानपत्रे इत्यादींवरून मिळते. त्या वंशांतील लोकांप्रमाणेच हूण, गुजर, इ. लोकांनी भारतावर अनेक आक्रमणे केली व या देशात राज्येही स्थापली. पण ते आपला धर्म भारतीय लोकांवर लादू शकले नाहीत. उलट भारतीय लोकांनीच त्यांना आत्मसात केले आणि अशा प्रकारे या सर्व संस्कृतींचा समन्वय होऊन हिंदू संस्कृती निर्माण झाली.

महंमद कासीमच्या मृत्यूनंतर सिंध प्रांतात मुसलमानांची सत्ता क्षीण झाली आणि त्यानंतर तिथल्या धर्मभ्रष्ट हिंदूंना देवलस्मृतीच्या आधारे स्वधर्मात परत घेण्यात आले. त्या वेळी तिथे वसलेल्या काही मुसलमानांनाही हिंदू करण्यात आले, असे सांगतात. जैसलमीरचा रावत चैचक, उदयपूरचा वाप्पा रावळ व मारवाडचा जगमल राठोड यांनी मुसलमान घराण्यांतील मुलींशी विवाह केले व त्यांची संतती हिंदूच मानली गेली, असे कर्नल टॉड याने राजस्थानच्या इतिहासात लिहिले आहे. त्या काळी शेकडो राजपूत सरदारांनी मुसलमान स्त्रियांशी लग्ने केली होती, असेही कळते.

साधारपणे इ. स. १००० पर्यंत धर्मभ्रष्टांना स्वधर्मात परत घेण्याचे कार्य सहजपणे चालू होते. अल्‌बिरूनी याने लिहून ठेवले आहे, की बाटलेल्या असंख्य हिंदूंना शुद्ध करून परत स्वधर्मात परत घेतले जाई. त्यासाठी गोमय व गोमूत्र वापरून त्यांची शुद्धी करीत. परंतु पुढे मुसलमानांच्या स्वाऱ्या वारंवार होऊ लागल्या आणि त्यांचे धर्मप्रसाराचे वेडही वाढले. त्यामुळे ते धर्मभ्रष्टांच्या शुद्धीकरणालाही विरोध करू लागले; एवढेच नव्हे, तर त्यात पुढाकार घेणाऱ्या ब्राह्मणांच्या घरादारांचीही राखरांगोळी करू लागले. फीरूजशहा तुगलकाच्या वेळी एक ब्राह्मण मुसलमानांना हिंदू करून घेत होता. त्याच्या या गुन्ह्याबद्दल त्याला मुसलमानांनी जिवंत जाळले, असे कळते.

त्यानंतरच्या काळातही धर्मभ्रष्टांचे शुद्धीकरण अल्प प्रमाणात का होईना, पण चालू होते. पंजाबचा राजा जयपाळ याचा नातू सुखपाळ मुसलमान झाला होता, तो इ. स. १००८ च्या सुमारास पुन्हा हिंदू झाला व हिंदूंनी त्याचा स्वीकार केला.

इ. स. १३९८ च्या सुमारास विजयनगरच्या देवरायाचा पराभव करून फीरूजशहा बहामनीच्या फौजांनी दोन हजार

ब्राह्मण कन्यांना कैद केले होते. त्यांच्या वडिलांच्या विनंतीवरून देवरायाने एक लाख होन देऊन त्यांची सुटका केली आणि हिंदू समाजाने त्यांना पुन्हा आपल्यात घेतले. इ.स. च्या १५ व्या शतकातही काश्मीरमध्ये अनेक धर्मभ्रष्ट हिंदूंना परत हिंदू करून घेण्यात आले होते. शेरशहाच्या अमदानीत रायसेन पूरणमल याने अनेक मुस्लिम स्त्रियांना हिंदू करून घेतल्याचा उल्लेख मुहंमद सादिकच्या सुभिसादिक या ग्रंथात आढळतो. शहाजहान व औरंगजेब यांच्या काळीही काही मुसलमानांना हिंदू धर्मात परत घेतल्याची उदाहरणे मुसलमान इतिहासकारांच्या ग्रंथांत सापडतात. चैतन्य प्रभूंनी डबीरखान व मलीक नावाच्या दोन मुसलमान झालेल्या हिंदूंना पुन्हा हिंदू केले आणि त्यांना सनातन व रूप अशी नावे दिली, असे म्हणतात. हे दोघे पुढे चैतन्य संप्रदायाचे प्रमुख प्रचारक झाले. प्रसिद्ध संत कबीर एका मुसलमान कुटुंबात लहानाचा मोठा झाला, तरीही रामानंदांनी त्याला आपला शिष्य मानले आणि त्या वेळच्या हिंदू समाजानेही त्याला हिंदूच मानून त्याचा आदर केला. दबिस्तान-इ-मज़ाहिब नामक ग्रंथात असंख्य मुसलमानांनी हिंदू धर्म स्वीकारल्याचे वर्णन आहे. भक्तिविजय या ग्रंथातही बहिरंभट्ट नावाच्या धर्मभ्रष्ट ब्राह्मणाला पैठणच्या ब्राह्मणांनी शुद्ध करून घेतल्याची माहिती आढळते. अशा प्रकारे अनेक व्यक्तींना हिंदू धर्मात परत घेतल्याची उदाहरणे ऐतिहासिक कागदोपत्री सापडतात. छत्रपती शिवाजीमहाराजांनी नेताजी पालकर याला व जिजाबाईने बजाजी निंबाळकर याला शुद्ध करून स्वधर्मात घेतल्याची हकीगत इतिहासात प्रसिद्ध आहे. पुढे संभाजीच्या वेळी आणि पेशवाईतही धर्मभ्रष्टांना शुद्ध करून घेतल्याची पुष्कळ उदाहरणे उपलब्ध झाली आहेत.

मुसलमान झालेल्या हिंदूंना शुद्ध करून स्वधर्मात घेतले जाई, त्याचप्रमाणे बाटून ख्रिस्ती झालेल्यांनाही शुद्ध करून घेतल्याची अनेक उदाहरणे इतिहासात आहेत. शिवाजीमहाराजांनी पोर्तुगीज प्रदेशावर स्वारी केली, तेव्हा अनेक धर्मभ्रष्ट हिंदूंना शुद्ध करून घेण्याची व्यवस्था केली होती. त्यापूर्वीच वसईच्या आसपासच्या ब्राह्मणांनी बाटग्या ख्रिस्ती लोकांना शुद्ध करून घेण्याचा सपाटा चालविला होता. त्या वेळी गोकुळाष्टमीसारख्या मोठ्या सणांच्या प्रसंगी अनेक लोकांचे सामुदायिक शुद्धीकरण करीत असत. पण पोर्तुगीज अधिकाऱ्यांना तो प्रकार समजल्यावर त्यांनी त्या ब्राह्मणांवर हल्ला करून त्यांना तिथून हुसकावून लावले.

चिमाजी अप्पांनी वसईचा किल्ला सर केल्यानंतर त्या भागातील अनेक ख्रिस्ती लोक हिंदू धर्मात परत घेतले गेले. ही शुद्धीकरणाची प्रक्रिया पेशवाई बुडेपर्यंत चालू होती.

शुद्धीकरणाची अशी अनेक उदाहरणे इतिहासात सापडत असली, तरी मुसलमानी सत्तेखाली असलेल्या प्रदेशांत ते कार्य उघडपणे करता येत नसे. पुढे धर्मभ्रष्टांची संख्या अमर्याद वाढल्यामुळे त्यांना स्वधर्मात परत घेणे पुष्कळ लोकांना अनिष्ट वाटू लागले. शुद्ध केलेल्या माणसाला जातीत घ्यावे, की नाही हा प्रश्न उपस्थित झाला. ज्यांनी आपली क्षेत्रबीजशुद्धी कायम राखली नाही, म्हणजे वाटेल त्याच्याशी विवाहसंबंध केले, अशांना पुन्हा मूळ जातीत घेण्याला समाज विरोध करू लागला. यावरून धर्मभ्रष्टांच्या शुद्धीकरणाला धर्मशास्त्र प्रतिकूल नसूनही तत्कालीन समाजव्यवस्था त्याला प्रतिकूल ठरली, असे दिसून येते. पावित्र्याच्या संकुचित कल्पनांमुळे 'एकदा बाटला तो कायमचा पतित' ही मनोवृत्ती समाजात बळावली. बहुजनसमाजाला धर्मशास्त्राचा उदार दृष्टिकोन ज्ञात नसल्यामुळे शुद्ध होऊन परत हिंदू झालेल्या माणसांशी पूर्वीप्रमाणे सर्व व्यवहार करण्यास लोक तयार होईनात. त्यामुळे शुद्ध झालेली माणसेही पुन्हा परधर्मात जाऊ लागली.

पुढे ब्रिटिश राजवटीत श्री. बाळशास्त्री जांभेकर, व्यंकटेश शेषाद्री, शंकरशास्त्री सोमण, बाळशास्त्री रानडे, भागवतशास्त्री, गजानन भास्कर वैद्य, इत्यादींनी शुद्धीकरणाचे कार्य पुन्हा सुरू केले. स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांनी धर्मभ्रष्टांच्या हिंदूकरणाला विशेष चालना दिली. दयानंदांनी आर्यसमाजाची स्थापना करून शुद्धिकार्याचा वेग वाढवला. स्वा. सावरकर यांनी अंदमानातील कारावासात अनेक मुस्लिम कैद्यांना शुद्ध करून घेतले होते. डॉ. कुर्तकोटी (शंकराचार्य) यांनी महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेच्या द्वारे इ. स. १९२० पासून या प्रश्नाला पुन्हा चालना दिली. डॉ. मुंजे यांनी मलबारातील धर्मभ्रष्टांना हिंदू करून घेण्यासाठी पराकाष्ठा केली. दयानंदांच्या प्रेरणेने स्वामी श्रद्धानंद यांनी इ. स. १९२३ साली हजारो मलकाना राजपुतांना शुद्ध करून घेतले आणि त्यानंतर लाखो मुसलमानांना हिंदू धर्मात परत आणले. त्यामुळेच त्यांचा खून झाला. इ. स. १९२८ च्या प्रारंभी श्री. विनायक महाराज मसुरकर यांनी गोव्यातील हजारो ख्रिस्ती गावड्यांना शुद्ध करून घेतले. गोव्यातील पोर्तुगीज अधिकाऱ्यांनी त्या गावड्यांचा आणि तिथल्या मसुराश्रमाच्या कार्यकर्त्यांचा खूप छळ केला हे खरे; परंतु जे एकदा हिंदू धर्मात आले ते आले. हिंदुसभा व आर्यसमाज या संस्थांनी सांप्रत हे शुद्धिकार्य भारतात सर्वत्र चालवले आहे.

**शुद्धिसंस्कार**– धर्मभ्रष्ट माणसांना शुद्ध करून हिंदू धर्मात परत घेण्यासाठी जो धार्मिक विधी धर्मशास्त्रात सांगितलेला आहे, त्याला शुद्धिसंस्कार असे म्हणतात.

हा शुद्धिकरण विधी म्हणजे प्रायश्चित्ताचाच एक प्रकार असतो. त्यात पुढील क्रिया करायच्या असतात—

(१) प्रायश्चित्तकथन (२) आचमन (३) संकल्प (४) क्षौर (५) पंचगव्यप्राशन (६) दंडप्रदान– यात कृच्छ्रत्रय प्रायश्चित्ताबद्दल ब्राह्मणाला यथाशक्ति द्रव्यदान करायचे असते. (७) जलाभिमंत्रण (८) महाभिषेक – यात सर्व देवता, सर्व ग्रह, ऋषी, गायी, वृक्ष, नाग, दैत्य, अप्सरा, नद्या, तीर्थे ही सर्व तुला अभिषेक करोत, अशा अर्थाचा मंत्र म्हणून पवित्र वृक्षांच्या पानांनी जलप्रोक्षण करायचे असते. (९) तिलकधारण (१०) इष्ट देवतेची पूजा (११) नामकरण (१२) अभिवादन– परमेश्वरास नमस्कार (१३) तीर्थप्राशन (१४) मंत्रोपदेश– आवश्यकतेनुसार (१५) पुनरुपनयन व होम.

हा विधी व्यवहाराला सुकर असून, धर्मशास्त्रज्ञांनी मान्य केलेला आहे. त्याकरिता मोठ्या पढिक याज्ञिकाची आवश्यकता नाही. तो कोणालाही करता येईल असा सोपा आहे. [ हिं. अ. मी.; म. ध. शु.; गो. शु. इ.; हिं. सं. प्र.; शुद्धिसंस्कार– म. म. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, १९२७ ]

**धर्मोत्तराचार्य** (इ. स. चे ९ वे शतक) एक बौद्ध तर्कशास्त्रज्ञ. हा कल्याणरक्षित व धर्माकरदत्त यांचा शिष्य होता. हा सौत्रान्तिक मताचा अनुयायी होता. याने प्रमाणपरीक्षा, अपोह नामक प्रकरण, परलोकसिद्धी, क्षणभंगसिद्धी, प्रमाणविनिश्चयटीका हे ग्रंथ रचले आहेत. याशिवाय याने धर्मकीर्तीच्या न्यायबिंदूवर न्यायबिंदुटीका नावाचाही एक ग्रंथ लिहिला आहे. [ म. च. को.; म. ज्ञा. को. ]

**धवड** एक मुसलमान जात. यांची वस्ती मुख्यत्वे महाराष्ट्रातील सातारा जिल्ह्यात आहे. हे लोखंडाच्या वस्तू तयार करतात. हे लोक आपल्याला हनफी सुन्नी पंथाचे समजत असले, तरी सुंता व लग्नविधी या कामांपुरतेच ते काजीला बोलावतात. या आचारांशिवाय हे कोणताही मुसलमानी आचार हे पाळीत नाहीत. हे हिंदू देवतांना भजतात व हिंदूंचे सणही पाळतात. [ मुं. इ. जा. ]

**धवलगिरी** एक पर्वत. हा पर्वत भुवनेश्वरापासून दोन मैलांवर आहे. याला अश्वत्थामा पर्वत असेही म्हणतात व तिथे अश्वत्थाम्याचे एक स्थानही दाखवतात. सम्राट अशोकाचे कलिंगराजाशी युद्ध झाले, ते रणक्षेत्र याच्या पायथ्याजवळच होते. त्या युद्धात झालेल्या अगणित मनुष्य संहाराने अशोकाचे मन युद्धपराङ्मुख झाले व इथेच त्याने बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. या पर्वतात अनेक बौद्ध विहार आहेत. [ कल्याण तीर्थांक ]

**धवळे** मराठी मंगलगीतांचा एक प्राचीन प्रकार. धवळा अथवा ढवळा हा विशिष्ट गीतवाचक मराठी शब्द धवल या संस्कृत शब्दावरून आलेला आहे. धवल ( धव–वर, ल–स्वार्थे ) म्हणजे विवाहात गायले जाणारे वरविषयक गीत होय. याची व्याख्या हेमचंद्राचार्यांनी आपल्या छंदोनुशासनात दिली आहे, ती अशी—

**‘ सुपुरिसो वण्णिज्जइ जेण तेण सो धवलो ’**

अर्थ– ज्या गीतात सुपुरुषाचे वर्णन केले जाते, त्याला धवळगीत म्हणतात.

इथे सुपुरुष या शब्दाने परमेश्वर आणि वर असे दोन्ही अर्थ अभिप्रेत आहेत. कारण धवळे जसे लौकिक विवाहप्रसंगी गायिले जात, तसेच ते भक्तांनी कौतुकाने साजऱ्या केलेल्या देवांच्या विवाहप्रसंगीही गायिले जात. महानुभाव पंथाचा संस्थापक चक्रधर याचा गुरू गुंडम राऊळ याला एकदा आपले लुटुपुटीचे लग्न करण्याची इच्छा निर्माण झाली. त्याने तसा तो सोहळा घडवून आणला व त्यासाठी महदंबा नामक भक्त स्त्रीला धवळे रचून गायला सांगितले. तिने रचलेल्या या धवळ्यांत कृष्ण-रुक्मिणीविवाहाची कथा ग्रथित केलेली आहे. सोमेश्वराच्या अभिलषितार्थचिंतामणीतही ‘ विवाहे धवलं तथा ’ = धवलगीते विवाहप्रसंगी गातात, असा धवळ्यांचा उल्लेख आहे.

छंदोनुशासन, मानसोल्लास व संगीतरत्नाकर या ग्रंथांत धवलगीतांचा उल्लेख धवलमंगल अशा जोडनावाने अनेकवार आलेला आहे. धवलांप्रमाणे मंगलगीतेही विवाहविषयकच होती. उत्तरकालीन मंगलाष्टके या मंगलगीतांतूनच उदय पावली असावी. उत्तर भारतात रुक्मिणीमंगल, जानकीमंगल, इ. प्रदीर्घ विवाहकाव्ये रचली गेली आहेत.

खास लोकगीतश्रेणीतील प्राचीन मराठी धवलगीते आज उपलब्ध नाहीत. परंतु या गीतप्रकाराचे अनुकरण करून महदंबा, एकनाथ, दासोपंत व रामदास या संतकवींनी रचलेले धवळे मात्र उपलब्ध आहेत. एकनाथ व दासोपंत यांनी या गीतप्रकाराला हळदुली असे एक पर्यायनाम वापरले आहे. महदंबेने रचलेले धवळे स्त्रीसुलभ भावनांनी रंगलेले असून, त्यांची रचना सहज सुंदर आहे. त्यांतील प्रारंभीच्या काही पंक्ती अशा –

**श्रीचक्रधराचे सोरीं धरौनिया श्रीचरणां :**
**मग धवळीं गाइनु गोविंदु राणा ॥**

जेणें रुकुमीणी हरीएली ।
तेणें जगीं पवाडे केले अती बहुतु ।
पाविजे परमा गती ।
भक्तीं आइकीतां श्रीकृष्णचरित्रु ।।

महदंबेच्या धवळचांचे छंदोविशेष स्पष्ट करण्यात अजूनही अभ्यासकांना निश्चित यश लाभलेले नाही. श्री. वा. ना. देशपांडे यांच्या मते 'धवळे सयमक असून, त्यांत दर कडव्यात चार चरण असतात. त्यांना गणमात्रांचा नव्हे, तर अक्षरसंख्येचाही निर्बंध नाही.' डॉ. ना. ग. जोशी यांचे म्हणणे असे, की 'ही विलंबितोच्चारी सरणीची चतुष्पदी गीते आहेत. त्यांत तीव्र प्रयत्न (दीर्घ) उच्चारणाचे प्राबल्य आहे व पतितपावन (चंद्रकांत) आणि लवंगलता (साकी) यांच्या रचनेला जवळची अशी ती मात्रागणी, तीव्रोच्चारी रचना आहे. दीर्घ चरणात आणखी एक मात्रिक पद्यावर्तन (अष्ट मात्रक) वाढवून रचना केलेली आहे.' प्रा. द. रा. बेंद्रे यांनी धवळचांच्या छंदाचे मूळ द्राविड अक्कर जातीच्या छंदात शोधण्याचा प्रयत्न केला आहे. हेमचंद्राने 'धवलमष्टपात्षट्पाच्चतुष्पाद्' = धवलगीत हे अष्टपाद, षट्पाद किंवा चतुष्पाद असते, असे म्हटले आहे.

एकनाथांनी शिवशक्तिविवाह व कृष्णरुक्मिणीविवाह या दोन प्रसंगावर धवळे रचले आहेत. त्या धवळचांतील धवळे या संज्ञेचा स्पष्ट उल्लेख असलेल्या पंक्ती अशा–

लग्ना येरे दिसीं उटणें मांडलें । धवळ आरंभिलें संभ्रमेंसी ।।
धवळामाजीं गाणीं गाईलें रामनाम । ऐकोनिया प्रेम वरा आलें ।।

त्यांच्या रुक्मिणीस्वयंवर नामक ग्रंथातही 'सभा बैसली निजबोधें । ढवळे गाती आनंदें ।।' असा धवळचांचा उल्लेख आहे (१६.४६.).

दासोपंतांनीही धवळे रचून प्रकृति–पुरुषांचा विवाह साजरा केला आहे. ते म्हणतात—–

प्रकृतिपुरुषें दोन्ही बोवलां स्वस्थानीं ।
चिन्मात्रीं निर्गुणीं बैसवीलीं ।।
तेथें आलिया वऱ्हाडिणी हरिद्रा घेऊनि ।
कुंकुमें मर्दुनी योगु केला ।।
धवळमंगळ गाणें उदित येणें क्षणें ।
शिव येणें शोभनें श्रोतयासी ।।
नित्यशः कल्याण वक्तयालागून ।
येणें योगें जन पावन हो कां ।।

नाथांचे आणि दासोपंतांचे हे धवळे धनाश्री रागातील आहेत; तर रामदासांनी रचलेले शिवपार्वतीविवाहविषयक धवळे डफगाण्याच्या चालीवरचे आहेत. रामभक्त रामदासांनी शिव हा नित्य रामनामाचा जप करीत असतो, या कल्पनेचा उपयोग कसा केला आहे, हे त्यांच्या धवळचांनील पुढील पंक्तींतून स्पष्ट होते—–

पुढें ढवळे गायिले । तेथें रामनाम आलें ।
प्रेम नवऱ्यासी चालिलें । गळती अश्रु ।।
म्हणती बाधा जाली वरा । कोणी धांवा पंचाक्षरा ।
रक्षा करितां संसारा । निघती ज्वाळा ।।

सांप्रत सोनकोळी जातीत विवाहप्रसंगी धवळे गाण्याची पद्धत आहे. ही गीते गाणाऱ्या स्त्रीला धवळारी असे म्हणतात.

मराठी धवळचाप्रमाणेच जुन्या गुजराती काव्यामध्येही धउल, धुल, धूल, धोळ, इ. नावांनी धवळचाचे उल्लेख आढळतात. तसेच आंध्रमध्येही धवलगीते प्रचारात होती, असे प्राचीन तेलुगू ग्रंथांतील अनेक उल्लेखांवरून दिसून येते. [ म. छं. र ; म. छं. वि.; गा. पं.; स. गा.; आं. सा. इ.; आ. म. क. म. ]

## धवित्र

एक यज्ञोपयोगी वस्तू. प्रवर्ग्यामध्ये अग्नीला वारा घालण्यासाठी जे तीन पंखे असतात, त्यांना धवित्र असे नाव आहे. केस असलेल्या कृष्णाजिनाचे तुकडे हातभर लांबीच्या कळकाच्या कामटीला बांधून धवित्र बनवितात. कळकाऐवजी उंबराची काठी चालेल, असेही सांगितले आहे. हा पंखा हातात घेऊन अध्वर्यू वगैरे तिघे जण 'मधु मधु' असे म्हणत अग्नीला वारा घालतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## धांगळी

वारली लोकांचे एक वाद्य. हे वीणेच्या आकाराचे असते. याला दोन भोपळे असतात. त्यांच्या एका बाजूस वाकड्या बोंडाची वेळूची काठी बांधलेली असते. त्या काठीला वीणेच्या खुंटचांप्रमाणे दोन खुंट्या बसवलेल्या असतात. काठीच्या वाकड्या टोकाला व खुंटचांना तारा बांधतात. नंतर हे दोन्ही भोपळे बगलेत धरून त्याच्या तारा छेडतात. मूल जन्माला आले, मळयात धान्याची रास पडली, व्यवसायात चांगले यश मिळाले, की अशा प्रसंगी हे वाद्य वाजवून नाचगाणे करतात. [ म. लो. मा. ४ ]

## धाकड

एक मजूर जात. या लोकांची वस्ती मध्य प्रदेश व राजस्थान या प्रदेशांत आहे. यांच्यांत पुरुषांपेक्षा बायकांची संख्या अधिक आहे.

धाकडांत सुराईत (मिश्र) व पुराईत (शुद्ध) असे दोन वर्ग आहेत. ब्राह्मण किंवा राजपूत पुरुष व हळवा स्त्री यांची संतती ती पुराईत आणि मुडिया, मरार, नाई व कलार स्त्रियांपासून झालेली संतती ती सुराईत होय. सुराईत हे दोन-तीन

पिढ्यांनंतर पुराईत होतात. हाच नियम धाकड पुरुष व रावत किंवा हळवा स्त्री यांच्या संततीस लागू आहे. पण धाकड पुरुष व मुडिया स्त्री यांच्यापासून झालेल्या संततीला मात्र नेहमी सुराईतच राहावे लागते. पुराईत व सुराईत हे परस्परांत रोटीव्यवहार करतात, पण बेटीव्यवहार करीत नाहीत.

यांच्यांत चिकसार नावाचा आणखी एक वर्ग आहे. या लोकांसंबंधी एक दंतकथा सांगतात, ती अशी–

चिकसारांनी एकदा शिकार करताना एका अरण्याला आग लावली व त्या आगीत जळालेल्या एका कुत्र्याचे मांस खाल्ले. राजाने त्याबद्दल शिक्षा म्हणून त्यांना दसऱ्याच्या दिवशी झोपडी शाकारण्याचे काम सांगितले. त्या दिवसापासून हे लोक तेच काम करू लागले.

इतर धाकड लोक चिकसाराच्या हातचे खात नाहीत किंवा त्यांच्या मुलीशी लग्न करीत नाहीत.

कुमारिकेला स्वजातीच्या माणसापासून गर्भ राहिल्यास, तिचे लग्न न करता ती त्या संबंधी पुरुषाला देऊन टाकतात अथवा पूर्वी ठरवून ठेवलेल्या वराची कबुली असल्यास त्याला देतात. उच्च जातीच्या माणसापासून स्त्रीला विवाहपूर्व मातृत्व आल्यास तिला जातिबहिष्कृत करीत नाहीत; पण नीच जातीच्या संबंधांतून मातृत्व आल्यास तिच्यावर बहिष्कार घालतात. मुलगी वयाने मोठी झाली असल्यास, ती आपल्या इच्छेनुसार वर निवडते. पूर्वी धाकड लोक आपल्या नातीशी लग्न करीत असत; पण आता ही पद्धती बंद झाली आहे.

एकाने दुसऱ्याला पादत्राण मारल्यास त्या मार खाणाऱ्या माणसाची जात नष्ट होते, अशी त्यांची समजूत आहे. मात्र प्रायश्चित्त घेतल्यास पुनश्च तो जातीत येऊ शकतो.

शेती व मजुरी हे यांचे प्रमुख व्यवसाय होत. हे लोहारकीचे काम मात्र कधीही करीत नाहीत.

मर्तिकानंतर ज्ञातिभोजन घातल्याशिवाय धाकडांचे आशौच संपत नाही. माणूस गरीब असल्यास जातभाई वर्गणी करून ज्ञातिभोजनाचा बेत करतात. पाण्याने भरलेल्या द्रोणात एक मासा ठेवून तो द्रोण हाती घेतल्यास आपण शुद्ध होतो, असे ते समजतात. [ म. ज्ञा. को.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**धाडी** गायकांचा एक वर्ग. हे धर्माने मुसलमान आहेत. पूर्वी हे राजांच्या व मोठमोठ्या सरदारांच्या आश्रयाला असत. लढाईवर जाताना किंवा समारंभाच्या मिरवणुकीत आपापल्या मालकांच्या पुढे हे लोक भाटांप्रमाणे त्यांची स्तुतिस्तोत्रे गात चालत. मराठ्यांच्या राज्यात शिवछत्रपती, पेशवे व सरदार यांच्या पदरी हा वर्ग होता. [ म. ज्ञा. को. ]

**धातू** (१) सोने, रुपे, इ. खनिजे. सोने, रुपे, माणिक, हरिताळ, मन:शिला, गैरिक, अंजनक, शिसे, लोखंड, हिंगुळ, गंधक, अभ्रक, इ. पदार्थांना प्राचीन वाङ्मयात धातू मानले आहे. सोने, रुपे, तांबे, लोह, कुप्य, पारद, वंग व शिसे या आठ धातूंची निर्मिती देवांपासून मानलेली आहे.

शतपथ ब्राह्मणात सांगितले आहे, की इंद्राच्या खंडित शरीरापासून धातू, सर्व प्रकारच्या जड वस्तू आणि प्राणिमात्र यांची उत्पत्ती झाली.

आप आणि तेज यांच्या संयोगापासून सोने व रुपे निर्माण झाले, असे मनूने सांगितले आहे. तांबे, सोने व रुपे कसे उत्पन्न झाले, त्याविषयीची कथा वराह पुराणात आहे, ती अशी–

गुडाकेश नावाचा एक मोठा असुर होता. तो ताम्ररूप घेऊन विष्णूची आराधना करीत होता. विष्णूने प्रसन्न होऊन त्याला 'वर माग' म्हटले. त्यावर गुडाकेशाने म्हटले, की 'तुझ्या सुदर्शन चक्राने माझा वध व्हावा.' विष्णूने 'तथास्तु' म्हटले. त्यानंतर वैशाख शुद्ध द्वादशीला विष्णूने सुदर्शन चक्र सोडून त्याचा वध केला; तेव्हा त्याच्या मांसापासून तांबे, रक्तापासून सोने आणि अस्थींपासून रुपे निर्माण झाले.

निरनिराळ्या धातूंविषयी लोकांतही अनेक समजुती प्रचलित आहेत. मणिपुरी लोकांची अशी धारणा आहे, की उमांग लाइ हा जंगलाचा देव लोखंडाच्या खाणींचे रक्षण करतो. लोखंडाचा एक चौकोनी तुकडा हे त्याचे प्रतीक असते. तो देव प्रसन्न राहावा, म्हणून खाणीत काम करण्यापूर्वी लोक त्याच्या प्रतीकाची पूजा करतात. त्याची वार्षिक जत्राही भरते. खाणीची जागा त्याच्या मालकीची असते आणि तो आपल्या इच्छेनुसार लोखंडाचे साठे इकडून तिकडे हलवतो, अशीही समजूत आहे.

सर्व धातूंमध्ये सुवर्ण आणि पोलाद यांचे गुणधर्म विशेष उल्लेखनीय असून, त्यांच्यासंबंधीही काही समजुती प्रचारात आहेत. अश्वमेधातील घोड्याला मारण्याचा सुरा सोन्याचा असावा आणि इतर यज्ञांत प्रजापतीसाठी बळी द्यायच्या पशूंचा वध पोलादी सुऱ्याने करावा, असे शतपथ ब्राह्मणात सांगितले आहे. सुवर्ण हे राजेरजवाड्यांचे, तांबे दूतांचे आणि लोखंड हे शेतकऱ्यांचे प्रतीक-मानलेले आहे. सोने हे अग्नी आणि सूर्य यांच्याप्रमाणे चकचकीत असल्यामुळे, त्याचा जीवनशक्तीशी संबंध जोडलेला आहे. सुवर्णाचे सेवन केल्यास शरीराला विषाचा स्पर्श होत नाही, असेही सांगितले आहे. प्रतिकारक्षमता हा सर्व धातूंमधील सर्वसामान्य गुणधर्म मानलेला आहे.

लोखंड हे सर्व धातूंत अधिक कठीण असल्यामुळे मंत्रतंत्रासाठी त्याचा विशेष उपयोग केला जातो. काही लोक सुतकात स्वत:जवळ किल्ली, चाकू किंवा अशीच एखादी लोखंडी वस्तू

बाळगतात. कारण त्यामुळे मयताचे भूत जवळपास फिरकत नाही, अशी समजूत आहे.

आधुनिक वैद्यकात ज्याप्रमाणे लोहाचा उपयोग करतात, त्याचप्रमाणे प्राचीन काळची माणसेही ताकद येण्यासाठी लोहयुक्त पदार्थांचे सेवन करीत.

शिशाविषयी फारशा समजुती प्रचारात नाहीत. अथर्ववेदात राक्षस आणि जादुगार यांच्याविरुद्ध एक मंत्र सांगितला आहे. त्या मंत्राची सिद्धी शिशाने करायची असते. शिसे हे मृदू, लवचिक आणि जड असल्यामुळे प्राचीन काळापासून मूर्ती बनवण्यासाठी त्याचा उपयोग करीत. एखाद्या व्यक्तीला जादूटोण्याच्या द्वारे इजा करायची असल्यास, त्याची शिशाची प्रतिमा बनवून ती छिन्नभिन्न करीत.

फलज्योतिषात धातूंना भूम्यंतर्गत ग्रह असे म्हटले आहे व धातूंची ग्रहांशी पुढीलप्रमाणे सांगड घातली आहे– रवी– सोने, चंद्र– रुपे, मंगळ – लोखंड, बुध– पारा, गुरू– कथील, शुक्र– तांबे व शनी– शिसे. फलज्योतिषात सात ग्रहांप्रमाणे धातूही सातच मानलेले आहेत. माक्षिक, मोरचूद, अभ्रक, नीळ, काजळ, शिलाजित व पारा हे सात उपधातू मानलेले आहेत. [ श. क.; डि. सि.; एन्सा. रि. ए. ]

(२) शरीरधारक वस्तूंना धातू असे म्हणतात. आयुर्वेदात कफ, वात व पित्त यांना धातू असे म्हटले आहे. पण वाग्भटाच्या सूत्रस्थानातील पहिल्या अध्यायात रस, रक्त, मांस, मेद, अस्थी, मज्जा व शुक्र असे सात धातू सांगितले आहेत. धातूंची कर्मे स्नेह, भरणपोषण, लेप, जीवन, गर्भोत्पत्ती, इ. असल्याचे आयुवदात सांगितले आहे. पाहा – आयुर्वेद. [ श. क. ]

(३) एक बौद्ध संज्ञा. सहा इंद्रिये, सहा विषय व सहा विज्ञाने मिळून अठरा धातू बौद्धांनी मानले आहेत. धातू या शक्ती असून, त्यांच्या एकीकरणातून घटनांचा एक प्रवाद निर्माण होतो, असे बौद्ध मानतात.

तांत्रिक बौद्ध मात्र चक्षुधातू, श्रोत्रधातू, घ्राणधातू, जिह्वाधातू, कामधातू व मनोधातू असे सहाच धातू मानतात. [ बौ. द. मी.; तां. बौ. सा. सा. ]

**धात्रीपूजन** आवळीपूजन पाहा.

**धात्रीव्रत** एक काम्य व्रत. शुद्ध किंवा वद्य एकादशीला आवळ्यांसह स्नान करणे, हा या व्रताचा विधी आहे. विष्णूला धात्रीफळ (आवळा) फार प्रिय आहे, म्हणून हे व्रत केले जाते. फल– पापनाश. [ हि. ध. ]

मा. सं. को. ...३९

**धाना** धाना म्हणजे यवांच्या लाह्या होत. ओले यव तापवलेल्या खापरावर भाजून या लाह्या तयार करतात. काही देवतांना हाच हवी अर्पण करावा असे सांगितले आहे (तै. ब्रा. १. ६. ८). लाह्या भाजताना त्या जळू द्यायच्या नसतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**धानुक** एक जात. यांना धानाक, धानक किंवा धानकिया असेही म्हणतात. यांची वस्ती आसाम, बंगाल, बिहार, ओडिसा, मध्यप्रदेश, विदर्भ, उ. प्रदेश व राजस्थान एवढ्या मोठ्या भूप्रदेशात आहे. शेतमजुरी हा यांचा प्रमुख व्यवसाय आहे. आसाम प्रदेशातील धानुक चहाच्या मळ्यात मजुरी करतात.

उ. प्रदेशातल्या धानुकात लउंगवारसा, बाधिक, हाझारी, कथारिया आणि तैहाल अशा पोटजाती आहेत. कानपूरकडील लउंगवारसा हे आपल्या मुली बाधिक लोकांना देतात, परंतु बाधिक लोक मात्र आपल्या मुली त्यांना देत नाहीत. आसामकडचे धानुक हे बाधिक, कथारिया व हाझारी यांच्याच मुली करतात; पण आपल्या मुली मात्र हाझारी लोकांनाच देतात. इलियटने पद्म पुराणाच्या आधारे असे मत मांडले आहे, की ही जात चांभार बाप व चांडाल आई किंवा अहीर बाप व चांभार आई यांची संतती आहे. क्रूक्सच्या मते हे मूळचे बस्तार लोक होत. परंतु पुढे त्यांनी टोपल्या विणण्याचे काम सोडून देऊन धनुष्ये तयार करण्याचे काम पत्करले व ते स्वतःही धनुर्धारी झाले, म्हणून त्यांना धानुक असे नाव पडले. हे लोधी लोकांच्या हातचे जेवण घेतात, यावरून इतिहासकाळात हे लोक लोधी सेनापतींच्या हाताखाली काम करीत असावे, असे रसेल म्हणतो.

हे आतेमामेबहिणीवरोबर लग्न करणे निषिद्ध समजतात. यांच्यांत वरपित्याकडून वधूची मागणी व्हावी लागते. लग्न वधूच्या गावी होते.

धानक बाप व लोधी किंवा कुणबी आई यांच्या संततीस हे आपल्या जातीत घेतात. धनवार लोकांचे व धानुकांचे बऱ्याच बाबतीत साम्य आहे. [ म. ज्ञा. को.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**धानुष्कयज्वा** (इ. स. चे १३ वे शतक) एक वेदभाष्यकार. याने ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन्ही वेदांवर भाष्ये लिहिल्याचे कळते. पण सांप्रत त्यांपैकी एकही उपलब्ध नाही. वेदाचार्यांच्या सुदर्शनमीमांसेत याचा अनेक वेळा त्रिवेदी भाष्यकार किंवा त्रयीनिष्ठ वृद्ध म्हणून उल्लेख आलेला आहे. हा एक वैष्णव आचार्य होता; यापेक्षा याची अधिक माहिती मिळत नाही. [ वै. सा. सं.; वै. सा. ]

**धान्य** एक जीवधारक व पोषक वस्तू. धान्याचे तृणधान्य व द्विदल धान्य असे दोन सामान्य प्रकार आहेत. तांदूळ, गहू, ज्वारी, बाजरी, इ. तृणधान्ये असून, हरमरा, तूर, मूग, उडीद, मसूर, इ. द्विदल धान्ये होत. करडई, तीळ, जवस, इ. धान्यांपासून तेल काढतात, म्हणून त्यांना तैलधान्ये किंवा गळिताची धान्ये असे म्हणतात.

वैदिक कालात कर्ण, कृष्ण, स्थविष्ठ यांसारखे हलके तांदूळ; सावे, यव, इ. तृणधान्ये; तसेच द्विदल धान्येही लोकांना माहिती होती. ऋग्वेदकालीन लोक वेगवेगळ्या धान्यांची पेरणी करीत असत. त्या काळचे प्रमुख धान्य यव हे होते. ऐतरेय ब्राह्मणात धान्याचे अंडज, जीवज, उद्भिज्ज व स्वेदज असे चार प्रकार दिलेले आहेत. कृष्ण यजुर्वेदाच्या संहितेत धान्यांची फार मोठी यादी दिलेली आहे. शतपथ ब्राह्मणात व्रीही, यव, तिल, माष, अणू (लहान साळ), प्रियंगू (राळा), गोधूम, मसूर, खल्व (वाल) व खलकुल (कुळीथ) या धान्यांचा ग्राम्य धान्य म्हणून उल्लेख केलेला आहे (१४. ९. ३. २२).

धान्याच्या कापणीसाठी पुढील दिनशुद्धी प्रशस्त मानलेली आहे– रिक्ता व अतिरिक्ता या तिथी; रवी, शुक्र, सोम, बुध व गुरू हे वार; कृत्तिका, भरणी, आश्लेषा, पूर्वाभाद्रपदा, धनिष्ठा, पूर्वाषाढा, ज्येष्ठा, चित्रा, उत्तराफाल्गुनी ही नक्षत्रे आणि वृषभ, सिंह, वृश्चिक ही लग्ने. धान्य पेरण्यासाठीही असेच काही शुभ दिवस सांगितलेले आहेत.

प्राचीन काळापासून धनाच्या बरोबरीने धान्याला मान मिळालेला आहे. कारण धान्य ही जीवधारक व जीवपोषक वस्तू आहे. यजमानाला आशीर्वाद देतानाही धनाच्या आधी धान्याचा उच्चार केलेला असतो. [म. ज्ञा. को.; श. क.]

**धान्यकटक** एक प्राचीन नगर आणि बौद्धांचे एक शिक्षण-केंद्र. हे आंध्रप्रदेशात गुंटूरपासून वीस मैलांवर आहे. धन्यकाकट, धेनुकाकट अशीही याला अन्य नावे आहेत. सांप्रत ते धरणीकोट या नावाने ओळखले जाते. अशोकाने बौद्ध धर्माच्या प्रसारासाठी महादेव नामक एका प्रचारकाला इथे पाठविले होते, तेव्हापासून द. भारतातील प्रमुख बौद्ध केंद्रांत याची गणना होऊ लागली. हाल सातवाहनाच्या काळात इथल्या विद्यालयात प्राकृत भाषेला प्राधान्य मिळाले आणि त्या विद्यालयाची भरभराट झाली.

लीलावतीकथा या ग्रंथावरून असे समजते, की हालाचा प्रसिद्ध मंत्री नागार्जुन याने इथे राहूनच शून्यवादाचा प्रचार केला. नागार्जुनानंतर मैत्रेयनाथाने इथूनच योगाचाराचा प्रसार केला. बुधरक्षित अथवा आर्यदेव हा इथल्या विद्यालयातील आचार्यांतला प्रसिद्ध आचार्य होय.

कालांतराने धान्यकटक हे महासांघिक विद्यालयाच्या गोकुलिक, एकव्यवहारिक, प्रज्ञाप्तिवाद, लोकोत्तरवाद, इ. अनेक शाखांच्या शिक्षणाचे केंद्र बनले.

युआन च्वांगच्या काळी इथे वीस संघाराम (विहार) असून, त्यांत एक सहस्र भिक्षू निवास करीत होते. याच विद्यालयात राहून युआन च्वांगने अभिधम्म पिटकाचा अभ्यास केला. बौद्ध धर्माच्या उच्च शिक्षणासाठी खुद्द मगधातून देखील इथे विद्यार्थी येत असत. तिबेटी पंडित तारानाथ याने देखील या विद्यालयाचे महत्त्व मान्य केले होते. मंजुश्री मूलकल्प या ग्रंथात इथल्या विद्यालयाची व स्तूपाची प्रशंसा केलेली आहे. इ. स. च्या आठव्या शतकात स्थापलेला अमरावतीचा प्रसिद्ध बौद्ध स्तूप इथेच तयार झाला. या स्तूपावर खोदलेल्या कलाकृती म्हणजे भारतीय मूर्तिकलेचे उत्तम नमुने होत. इथल्या विद्यालयात चित्रकलेचेही शिक्षण दिले जात असावे, असा पंडितांचा कयास आहे. अजंटाच्या चित्रलेखनात इथल्या विद्यार्थ्यांचा फार मोठा वाटा होता, असे सांगतात.

वाशिष्ठीपुत्र पुलुमायी या सातवाहन राजाच्या वेळी या नगराला राजधानीचा मान मिळाला होता. इथल्या रहिवाशांनी महाराष्ट्रातल्या कान्हेरी, कार्ले, इ. ठिकाणच्या लेण्यांना बऱ्याच देणग्या दिल्या आहेत, त्यावरून आंध्र व महाराष्ट्र यांचा त्या काळी परस्परांशी निकट संबंध होता, असे समजते. [वि. स्मृ. ग्रं.; मुसलमानपूर्व महाराष्ट्र, खंड १]

**धान्यदान** एक दान. दोन खारी म्हणजे सुमारे सहा मण धान्य ब्राह्मणाला संकल्पपूर्वक दान देणे, असा याचा विधी आहे. हे दान देताना पुढील मंत्र म्हणतात–

सर्वदेवमयं धान्यं सर्वोत्पत्तिकरं महत्।
प्राणिनां जीवनोपायमतः शान्ति प्रयच्छ मे॥

अर्थ – धान्याच्या ठिकाणी सर्व देव आहेत. धान्य सर्वांच्या उत्पत्तीचे मोठे कारण आहे. ते सर्व प्राण्यांचे जीवनाधार आहे. म्हणून हे धान्या ! तू मला शांती दे.

**धान्यधेनू** एक दान. विषुवदिनी किंवा अयन संक्रांतीला किंवा कार्तिक पौर्णिमेला धान्याची गाय करून ती दान द्यावी, असे वराह पुराणात सांगितले आहे.

या दानाचा विधी असा– चार द्रोण तांदूळ घेऊन त्याची गाय तयार करावी. धेनूच्या चतुर्थांश तांदूळ घेऊन त्याचे वासरू बनवावे. गायीची शिंगे सोन्याची, खूर चांदीचे, दात मोत्यांचे,

मुख तूप व मध यांचे, पाय उसाचे आणि पुच्छ रेशमी वस्त्राचे करावे. मग या सवत्स धेनूची पूजा करून तिला तीन प्रदक्षिणा कराव्या. मग ती ब्राह्मणाला दान द्यावी. तांदुळाऐवजी अन्य कोणतेही धान्य घेतले तरी चालते. फल– सौभाग्य, आयुरारोग्य व अंती स्वर्गलोक यांची प्राप्ती. [ श. क. ]

**धान्यशैल** एक दान. याचा विधी असा– तीर्थाच्या ठिकाणी, मंदिरात, गोठ्यात किंवा अंगणात मंडप उभारून शेणाने सारवलेल्या भूमीवर तांदळांचा मेरू पर्वत तयार करावा. त्याच्या माथ्यावर कल्पवृक्ष व चार बाजूंना मंदार, पारिजात, हरिचंदन व संतान हे वृक्ष सुवर्णाचे करून उभे करावे. त्याच्या चारही दिशांना चांदीची शिखरे करून त्यांच्या माथ्यावर मोती, हिरे, गोमेद, पुष्पराग, पाच, नीलमणी, इ. रत्ने जडवावी. चार बाजूंना ब्रह्मा, विष्णू, रुद्र आणि सूर्य यांच्या सुवर्णप्रतिमा स्थापाव्या. तसेच पक्षी व मुनी यांच्या सुवर्णप्रतिमा आणि इंद्रादी लोकपालांच्या रौप्य मुद्रा बसवाव्या.

मेरू पर्वत जितक्या द्रोणांचा केलेला असेल, त्याचा सोळावा भाग यव घेऊन त्यांचा मंदार; तेवढेच गहू, तीळ व उडीद घेऊन त्यांचे अनुक्रमे गंधमादन, विपुल व सुपार्श्व हे पर्वत चार दिशांना उभारावे. त्यांवर निरनिराळे वृक्ष, सरोवरे, फळे, फुले व वस्त्रे यांची स्थापना करावी.

एवढी सिद्धता झाल्यावर आचार्य व चार ऋत्विज यांचे वरण करावे. नंतर पूजा व होमहवनादी कृत्ये यथाविधि करून ते पर्वत आचार्यादी ब्राह्मणांना दान द्यावे. त्याबरोबरच गोप्रदानही करावे. फल– धनधान्यसमृद्धी, पुत्रपौत्रप्राप्ती, आयुरारोग्य, राजैश्वर्य, इ. ऐहिक सुखांचा लाभ; सर्वपापनाश व अंती मोक्षलाभ. [ दा. चं.; श. क. ]

**धान्यसंक्रांतिव्रत** एक काम्य व्रत. या व्रतात एक प्रस्थ (२ पायल्या) धान्य दान द्यायचे असते. व्रतावधी एक वर्ष. याचा विधी असा– मेष, कर्क, तुला किंवा मकर संक्रांतीच्या दिवशी यथाविधि स्नान करून केशराने वा कुंकवाने आठ पाकळ्यांचे एक कमळ काढतात. नंतर पूर्वेकडून आरंभ करून प्रत्येक पाकळीवर निरनिराळ्या आठ नावांनी सूर्याची पूजा व मध्यभागी कर्णिकेवर विश्वात्म्याची पूजा करतात. नंतर ब्राह्मणांना धान्याचे दान देतात. उद्यापनाच्या वेळी सुवर्णाची सूर्यप्रतिमा करून व तिला रक्त वस्त्राने आच्छादित करून तिची पूजा करतात. मग ती प्रतिमा ब्राह्मणाला दान देतात. फल– सहस्र अग्निष्टोमांचे पुण्य, धन–धान्य यांचा लाभ व रोगबाधानिवारण. [ हि. ध.; व्रतराज ]

**धान्यसप्तमी** एक काम्य व्रत. कोणत्याही महिन्याच्या शुद्ध सप्तमीला हे व्रत करतात. सूर्याची पूजा, नक्तभोजन व धान्याचे दान हा मुख्य व्रतविधी असतो. धान्याबरोबर संसाराला लागणारी भांडी व मीठ या वस्तूंचेही दान द्यावे, असे सांगितले आहे. फल–अभयप्राप्ती. [ हि. ध ; सं. कौ. ]

**धामव्रत** एक काम्य व्रत. फाल्गुनी पौर्णिमेला हे व्रत करतात. व्रतकर्त्याने व्रताला प्रारंभ करण्यापूर्वी तीन दिवस उपवास करून व्रताच्या दिवशी एक धाम म्हणजे घर दान द्यायचे असते. याला धामत्रिरात्रव्रत असेही म्हणतात. फल– समृद्धी व सूर्यलोक यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**धामी संप्रदाय** प्राणनाथाने स्थापन केलेला एक संप्रदाय. याला प्राणनाथी पंथ, प्रणामी पंथ, महाराज पंथ, मेराज पंथ, खिजडा पंथ, चकला पंथ व धाम संप्रदाय अशीही अन्य नावे आहेत. या नावांपैकी महाराज पंथ या नावावरून संप्रदायप्रवर्तकावरील निष्ठा व आदर व्यक्त होतो. मेराज हे महाराज शब्दाचेच अपभ्रष्ट रूप असावे किंवा ते मीराज म्हणजे सजीव स्वर्गयात्रा या अरबी शब्दाचे निदर्शक असावे. खिजडा हे नाव त्याला एका वृक्षावरून मिळाले आहे. प्राणनाथाचा गुरू देवचंद याचा पुत्र बिहारीदास याने इ. स. १६५५ मध्ये चकला नामक एका पंथाची स्थापना केली होती; पण हा पंथ धामी संप्रदायासारखाच असल्यामुळे धामी संप्रदायालाच पुढे चकला संप्रदाय असेही नाव मिळाले. धाम शब्द हा ब्रह्माचा वाचक आहे. आध्यात्मिक उच्च दशा किंवा विशुद्ध प्रेम असा त्याचा सांप्रदायिक अर्थ आहे.

प्राणनाथाने आपल्या कालात प्रचलित असलेल्या सर्व धर्मांचा अभ्यास केला आणि त्यांतील मौलिक तत्त्वांचा स्वीकार करून त्यांवर आधारित अशा धामी संप्रदायाची स्थापना केली. या दृष्टीने हा संप्रदाय कबीर, दादू व नानक यांच्या पंथांपेक्षा भिन्न आहे.

या संप्रदायात प्रेमतत्त्वाला प्राधान्य दिलेले आहे. ब्रह्माची मूळ शक्ती ही प्रेमस्वरूप असून, तिचा लाभ झाल्यावर जीव ब्रह्मरूप होतो, असा या पंथाचा सिद्धान्त आहे. प्रेम हे साक्षात असले किंवा त्याचा अनुभव येत असला, तरी ते शब्दातीत व अनिर्वचनीय आहे, असे प्राणनाथाचे मत आहे. मानवाच्या आध्यात्मिक उन्नतीसाठी सत्संगाची आवश्यकता त्याने प्रतिपादन केली आहे. जगत व ब्रह्म ही दोन्ही अलौकिक आनंदस्वरूप असून, विशुद्ध प्रेमाच्या द्वारे त्याचा आनंद अनुभवता येतो. हीच पुरुषार्थाची अंतिम अवस्था होय, असे प्राणनाथाने

म्हटले आहे. त्याने परमात्म्याचे नाव धाम = परमपद असेच ठेवलें होते. पण प्राणनाथाच्या नंतर धाम शब्दाचा हा अर्थ विस्मृत झाला आणि श्रीकृष्णाच्या गोलोकाप्रमाणेच धाम हा एक उच्चतम लोक आहे, असे त्या संप्रदायाचे लोक मानू लागले.

या संप्रदायाने हिंदू, मुसलमान व ख्रिस्ती हे सर्व एकच आहेत, असे म्हटले आहे. धर्माच्या नावावर लोकांत द्वेष भावनेचा प्रसार करणे बरोबर नाही, हे जाणून प्राणनाथाने आपल्या पंथाच्या द्वारे निरनिराळ्या संप्रदायांच्या अनुयायांत प्रेमाचा आणि सद्भावनेचा प्रचार केला.

सांप्रत या संप्रदायाच्या अनुयायांवर वैष्णव पंथाचा बराच प्रभाव पडलेला आहे. धामी संप्रदायाचे अनुयायी बालकृष्णाचे ध्यान करतात, गळ्यात तुळशीची माळ घालतात आणि कपाळी त्रिपुंड्र व कुंकुम लावतात. ते उपास्याच्या मूर्तीची पूजा न करता, कलजमे शरीफ या आपल्या धर्मग्रंथाचीच पूजा करतात. मद्य, मांस व जातिव्यवस्था यांचा त्यांनी निषेध केला आहे. एखाद्याला संप्रदायाची दीक्षा देताना हिंदू व मुसलमान यांचे सहभोजन करायचे, अशी त्यांची पद्धत आहे.

पन्ना हे या संप्रदायाचे प्रमुख केंद्र व तीर्थस्थान असून, दर वर्षी कार्तिक पौर्णिमेला इथे धामी लोकांची मोठी यात्रा भरते. या पंथात मुसलमानांनाही प्रवेश मिळतो. सुरतेचे पुष्कळसे कच्छी या संप्रदायाचे अनुयायी आहेत. मध्य प्रदेशातील सागर व दमोह या जिल्ह्यांत आणि सौराष्ट्रातील जामनगरच्या आसपास या पंथाचा बराच प्रचार आहे. जामनगर व सुरत इथेही त्यांची केंद्रे आहेत. सुमारे दीडशे वर्षांपूर्वी नेपाळातही या पंथाचा प्रसार झाला होता. पंथाच्या धर्मग्रंथाचे अध्ययन करण्यासाठी नेपाळातले प्राणनाथी लोक पन्ना येथे येत असत. पाहा – प्राणनाथ. [ उ. भा. सं. प.; म. हिं. क.; हिं. सा. को. ]

## धारण-पारण व्रत

एक काम्य व्रत. यात एक दिवस उपवास व एक दिवस पारणे असा क्रम चालवायचा असतो. आषाढ शुद्ध एकादशीपासून कार्तिक शुद्ध एकादशीपर्यंत म्हणजेच चातुर्मास्यभर हे व्रत करायचे असते. तेवढे शक्य नसेल, तर सुरुवातीच्या व शेवटच्या अशा दोन महिन्यांत किंवा पहिल्या अथवा शेवटच्या महिन्यात तरी ते करावे, असे सांगितले आहे. या व्रताची देवता नारायण ही आहे. याचा विधी असा–

धारणेच्या दिवशी उपवास, 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या मंत्राचा जप, पारणेच्या दिवशी 'ॐ नमो नारायणाय' या मंत्राचा जप करून १०८ अर्घ्ये देणे व एकभुक्त भोजन. उद्यापनाच्या वेळी लक्ष्मी-नारायणाच्या सुवर्णप्रतिमेची पूजा, होम-हवन, रात्रौ जागरण, पुराणश्रवण, ब्राह्मणभोजन, इ. गोष्टी करायच्या असतात. सर्व व्रतांत हे व्रत श्रेष्ठ मानले आहे. फल – ब्रह्महत्यादी पातकांचा नाश. [ व्रतराज ]

## धारणा

अष्टांग योगाचे सहावे अंग. 'देशबन्धश्चित्तस्य धारणा' = कोणत्या तरी विशिष्ट प्रदेशात मन स्थिर करणे म्हणजे धारणा होय, अशी पातंजल योगसूत्रांत धारणेची व्याख्या सांगितली आहे (३.१). धारणेत चित्ताला विशिष्ट जागी जखडून टाकायचे असते. स्वामी विवेकानंद म्हणतात – अंतःसृष्टीतील म्हणजे आपल्या देहातील विशिष्ट भागावर अथवा बाह्य सृष्टीतील एखाद्या विशिष्ट विषयावर मन जेव्हा एकसारखे चिकटून राहते, तेव्हा मनाच्या त्या अवस्थेला धारणा असे म्हणावे. ही धारणा शरीरांतर्गत षट्चक्रांवर क्रमाने करावी किंवा शरीराच्या बाहेर मूर्तीवर, तारकेवर किंवा एखाद्या वस्तूवर करावी, असे दोन्ही पर्याय संमत आहेत. याज्ञवल्क्यसंहितेत पंचमहाभूतांत पाच प्रकारची धारणा सांगितली असून, ती महाभूतस्थाने शरीरातच कुठे, कशी आहेत ते सांगितले आहे. तंत्रमार्गात पंचभूतांच्या पाच धारणांना पृथिव्यादी क्रमाने स्तंभिनी, द्राविणी, वैश्वानरी, भ्रामरी व शोषणी अशी नावे दिली आहेत. त्रैगुण्यधारणा, द्वैगुण्यधारणा, बिंदुधारणा, विदेहधारणा, महाविदेहधारणा, इ. आणखी काही धारणाप्रकार तंत्रमार्गात सांगितले आहेत.

भागवत पुराणात वैराजधारणा व अंतर्यामिधारणा असे दोन वेगळे प्रकार निर्दिष्ट केलेले आहेत. भगवंताच्या स्थूल रूपावर मन स्थिर करणे म्हणज वैराजधारणा आणि त्याच्या निर्गुण निराकार स्वरूपावर चित्त केंद्रित करणे ही अंतर्यामिधारणा होय.

धारणा सिद्ध होण्यासाठी अगोचरी, भूचरी, चाचरी व शांभवी या मुद्रांचा अभ्यास आवश्यक असल्याचे गरुड पुराणात म्हटले आहे.

बौद्ध वाङ्मयातही अनेक प्रकारच्या धारणा सांगितलेल्या आहेत.

यम, नियम, आसन, प्राणायाम व प्रत्याहार या पाच साधनांनी देह व चित्त शुद्ध व कार्यक्षम झाले म्हणजे धारणा चांगल्या प्रकारे होते. धारणेत चित्ताला इंद्रियजन्य सुखापासून दूर नेऊन ते एखाद्या पवित्र व उदात्त अशा वस्तूवर स्थिर करायचे असते. त्यामुळे चितात असलेल्या महान शक्ती प्रकट होण्यास अवकाश मिळतो. अर्थात ही धारणा गुरूपदिष्ट मार्गानेच व्हायला हवी. [श्रीगुरुदत्तयोग –श्री. खानवेलकर, १९५७]

**धारणी** जैन दैवतसमूहातली यक्षिणी. (दिगंबरमते तारा). ही अमरनाथाची सेविका आहे. निर्वाणकलिका या ग्रंथात हिचे रूपध्यान वर्णिले आहे, ते असे–

धारणीं देवीं कृष्णवर्णां चतुर्भुजां पद्मासनां ।
मातुलिंगोत्पलान्वितदक्षिणभुजां पाशाक्षसूत्रान्वितवामकराम्

अर्थ– कृष्ण वर्णाची, कमलावर बसलेली (दिगंबरमते हंसारूढ), चतुर्भुज, तसेच उजव्या हातांत मातुलिंग, नील कमल, आणि डाव्या हातांत पाश आणि माला धारण करणारी (दिगंबरमते सर्प, वज्र, मृग आणि वरदमुद्रा धारण करणारी) अशी ही धारणी देवी आहे.

**धारवत** एक प्राचीन नगर. हे नगर बिहार प्रदेशातल्या गया जिल्ह्याच्या जहानाबाद पोट विभागात बरबर टेकड्यांच्या वायव्येस होते. सांप्रत ते एक खेडे या स्वरूपात अवशिष्ट आहे. इथे गुणमती नामक बौद्ध आचार्याचा विहार होता. युआन च्वांगने या विहाराला भेट दिली होती, असे कळते.

या नगराच्या सभोवतीच्या टेकड्यांवर हिंदू व बौद्ध शिल्पांचे अनेक अवशेष आहेत. उत्तरेकडील टेकडीच्या उतारावर एका मोठ्या मठाचे अवशेष सापडले असून, तिथे बऱ्याच बौद्ध मूर्तीही सापडल्या आहेत. याच टेकडीच्या पायथ्याला साठ फूट लांबीचा एक व दोनशे पन्नास फूट लांबीचा दुसरा असे दोन चौथरे सापडले आहेत. टेकडीच्या माथ्यावर चौथ्या शतकातील एक स्तूप असून, इ. स. च्या नवव्या व दहाव्या शतकांतील दोन मंदिरे आहेत.

इथे दोन हजार फूट लांबीचा व आठशे फूट रुंदीचा चंद्रशेखर नावाचा एक तलाव आहे. तो चंद्रसेन राजाने बांधला, असे सांगतात. इथली कार्तिकानी या देवीची मूर्तीही प्राचीन असून, तिच्या आसनावर बौद्ध धर्माची तत्त्वे कोरलेली आहेत. बोधिसत्त्वाचीही एक प्राचीन मूर्ती इथे आहे. ही मूर्ती सुमारे सहा फूट उंचीची असून, एका कमळाच्या देठाखाली आहे. कमळाच्या या देठाला अनेक फाटे असून, त्यावर पुरुष, स्त्रिया व प्राणी यांच्या मूर्ती आहेत. यांतील मोठ्या मूर्तीला तिथे भैरव असे म्हणतात. या भैरवाला बारा हात आहेत. त्याच्या शिरोभागावर ध्यानी बुद्धाची बैठी मूर्ती आहे. त्याच्या मस्तकावर बौद्ध धर्माची तत्त्वे कोरलेली आहेत. [गया गॅझे.]

**धारा** एक प्राचीन नगरी. ही मध्य प्रदेशात असून, धार या नावाने प्रसिद्ध आहे. माळव्यातील परमार राजवंशाची (इ. स. ८२५ – १३०५) ही राजधानी होती. या वंशातील सातवा राजा मुंज आणि त्याचा पुतण्या भोज या दोन पुरुषांनी परमार कुलाच्या सत्तेचा विस्तार करून, धारा नगरीचे वैभव वृद्धिंगत केले. विक्रमादित्याची स्मृती जशी उज्जयिनीशी निगडित आहे, तशीच भोजाची स्मृती धारा नगरीशी आहे. त्याच्या काळात धारा नगरी वैभवाने तळपत होती. तिथे साहित्य–संगीत–शिल्पादी कलांच्या उपासनेलाही बहर आला होता. परमार कुलातील राजपुरुषांच्या आणि विशेषतः भोजाच्या कर्तृत्वाच्या अनेक खुणा आजही धारा नगरीच्या परिसरात विद्यमान आहेत.

इ. स. १३०५ मध्ये अलाउद्दीन खिलजीने धारचे परमारराज्य उद्ध्वस्त केले. परमार कुलाबरोबरच या नगरीचे प्राचीन वैभवही लयाला गेले. अलाउद्दिनाचा सेनापती मलिक काफूर, फीरूजशहा व महंमद तुगलुक, माळव्याचा सुलतान दिलावरखान, इ. मुस्लिम सत्ताधीशांच्या काळात धारमधील प्राचीन वास्तू छिन्नभिन्न केल्या गेल्या आणि त्यांच्या जागी मशिदी आणि कबरी उभ्या राहिल्या.



सरस्वतीमूर्ती–भोजशाला–धार

सुमारे चारशे वर्षांच्या पारतंत्र्यानंतर इ. स. १७०० मध्ये मराठ्यांनी माळवा जिंकला आणि धार येथे पवार घराण्याचे राज्य सुरू झाले. महाराष्ट्रातील पवार हे कुलनाम परमारचाच अपभ्रंश आहे. चारशे वर्षांनंतर धारमध्ये पुनः परमार कुलाचाच उदय व्हावा, हा योगायोग आश्चर्यकारकच म्हणावा लागेल. पवारांच्या आश्रयाला असलेल्या एका हिंदी कवीने या योगायोगासंबंधी उद्गार काढले आहेत, ते असे–

जहँ पवाँर तहँ धार, धार जहाँ परमार तहँ ।
बिन पवाँर नहिं धार, धार बिना परमार नहिं ॥

अर्थ– जिथे पवार आहेत, तिथे धार असणारच आणि जिथे धार आहे, तिथे परमार असणारच. पवारांवाचून धार नाही आणि धारेवाचून परमार नाहीत.

धारच्या पवारराज्याचा संस्थापक आनंदराव पवार हा

होय. इ. स. १९४७ नंतर संस्थानांचे विलीनीकरण झाले, तेव्हा धारचे पवारांचे राज्यही त्या वेळच्या मध्यभारतात विलीन झाले. धारा नगरीवर परमारांप्रमाणेच या पवारांचाही प्रभाव पडल्यावाचून राहिला नाही.

धारमधील प्राचीन वास्तूंमध्ये भोजशाला विशेष प्रसिद्ध आहे. या वास्तूला भारतीभवन अथवा शारदासदन असेही



भोजशालेतील स्तंभावर कोरलेला नागबंध
(विक्रम – स्मृतिग्रंथावरून)

म्हणत. यामध्ये भोजाने सरस्वतीची सुंदर मूर्ती बसविली होती. ती सध्या लंडनच्या संग्रहालयात सुरक्षित आहे. भोजशाला हे भोज राजाच्या साहित्यप्रीतीचे चिरंतन स्मारक आहे. या ठिकाणी ज्ञानाची व कलांची अखंड उपासना चालू होती. भोजशालेतील स्तंभांवर आणि भिंतींवर ग्रंथ कोरलेले होते. मुसलमानांनी केलेल्या विध्वंसातून वाचलेले काही कोरीव लेख आजही इथे पहायला मिळतात. स्तंभांवर कोरलेल्या दोन उपलब्ध नागबंधांपैकी एकात संस्कृत वर्णमाला व सुप्-तिङ्-प्रत्यय असून, दुसऱ्यात धातुप्रत्ययमाला विस्ताराने दिलेली आहे. तिथे जी एक शिला आहे, तिच्यावर भोजदेवकृत प्राकृत कूर्मस्तोत्र आणि बालसरस्वती मदन याने लिहिलेल्या पारिजातमंजरी नामक नाटिकेचे दोन अंक कोरलेले आहेत. या नाटिकेत अर्जुनवर्मदेव परमाराने जयसिंह चालुक्यावर मिळविलेल्या विजयाची कथा आहे. मुसलमानांच्या सत्ताकाळात भोजशालेचे मशिदीत रूपांतर झाले. या मशिदीपुढे कोण्या कमालमौलाची कबर असल्यामुळे सांप्रत ही भोजशाला कमालमौला मशीद म्हणून ओळखली जाते. भोजशालेच्या आवारातील पुरातन सरस्वतीकूप हा सध्या अक्कलकुई या नावाने ओळखला जातो.

धारच्या पश्चिम भागात परमारांचा राजमार्तंड नामक प्रासाद आणि त्यापुढे भोजाने उभारलेला लोखंडी विजयस्तंभ होता. प्रासादाच्या जागी माळव्याचा पहिला सुलतान दिलावरखान घोरी याने अनेक उद्ध्वस्त मंदिरांचे दगड वापरून एक मशीद उभारली, ती आजही उभी आहे. या मशिदीला लाट मशीद असे म्हणतात. लाट म्हणजे स्तंभ. मशिदीसमोर असलेल्या स्तंभामुळे हे नाव तिला पडले आहे. चेदिराज गांगेयदेव आणि चालुक्य राजा जयसिंह यांच्यावर मिळविलेल्या विजयाचे स्मारक म्हणून भोजाने हा स्तंभ उभारला होता. पुढे गुजरातचा सुलतान बहादुरशहा याने तो दिल्लीला उचलून नेण्याचा प्रयत्न केला. तो सफल तर झाला नाहीच; पण त्या प्रयत्नात स्तंभाचे तीन तुकडे मात्र झाले. मुळात तो स्तंभ ५० फूट लांब होता. त्याचे वजन ७ टन आहे, असे सांगतात.

धार येथे एक किल्ला आहे. तो महंमद तुगलुकाने इ. स. १३४४ मध्ये बांधला. या किल्ल्याच्या जागी परमारकाळात धारागिरी नावाची एक लहानशी गढी होती. या किल्ल्यात रघुनाथराव पेशव्याने आपली पत्नी आनंदीबाई हिला काही काळ ठेवले होते. दुसऱ्या बाजीरावाचा जन्म याच किल्ल्यात झाला.

धारमध्ये आणि धारच्या परिसरात आणखीही अनेक प्राचीन अवशेष आहेत. मुंजसागर, कनकसागर, वगैरे प्रेक्षणीय तलाव हे परमारकाळाची स्मृती आजही जागवीत आहेत. पवारांची कुलदेवी कालिका हिचे मंदिर एका टेकडीवर आहे. याशिवाय इथे धारेश्वर, आनंदेश्वर, दुर्गाविनायक, इ. देवांची मंदिरे आहेत. इथला पवारांचा झीराप्रासाद नामक राजवाडा भव्य आहे.

जुन्या धुळकोटाच्यावर कोण्या शहाचंगाल नामक मुसलमान अवलियाचा दर्गा आहे. हा अवलिया अखेरचा परमार राजा भोजराज (इ. स. १२८०–१३१०) याच्या काळात धारला आला आणि त्याने राजाला प्रभावित केले, असे मुसलमानी परंपरेचे म्हणणे आहे. गावापासून तीन मैल अंतरावर सिंहासन-टेकडी या नावाची एक टेकडी आहे. सिंहासनबत्तिशीमध्ये भोजासंबंधी जी कथा दिली आहे, तिच्यातील घटनेचे स्थळ हेच होय, असे सांगतात. [ म. ज. अ. ग्रं.; म. मा. नि.; म. प्र. इ.; श्री. कृ. गं. कवचाळे– ' सहविचार, ' ऑक्टोबर १९२९ ]

**धारापातनविधी** एक रोगहर उपाय. ज्वरादी रोगांनी शरीराला पीडा झाल्यास ती दूर होण्यासाठी नरसिंहाच्या मस्तकावर संततधार अभिषेक करावा, तसेच होमहवन करून ब्राह्मणभोजनही घालावे, असे नृसिह पुराणात सांगितले आहे. [ श. क. ]

**धाराव्रत** एक काम्य व्रत. चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून या व्रताला प्रारंभ करतात. यात व्रतकर्त्यांनि भांडे तोंडाला न लावता वरून धार धरून पाणी प्यायचे असते. व्रतावधी एक वर्ष. उद्यापनाच्या वेळी पाण्याचे एक नवे भांडे दान देतात. फल–सुख व ईश्वर यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**धाराशिव लेणी** महाराष्ट्रातील प्राचीन लेण्यांचा एक समूह. ही लेणी मराठवाड्यात धाराशिव (सध्याचे उस्मानाबाद) या गावाजवळ आहेत. या लेण्यांपैकी



नक्षीदार स्तंभ – धाराशिव

काही लेणी शैव असून, ती धाराशिवपासून अवघ्या तीन मैलांवर आहेत; त्यांना लोक चांभारलेणी म्हणतात. धाराशिवच्या ईशान्येला सुमारे बारा मैल अंतरावर असलेल्या डोंगरात जैन लेणी असून ती प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहेत. उत्तराभिमुखी चार आणि ईशान्याभिमुखी तीन अशी सात जैन लेणी तिथे आहेत. यांतील पहिल्या चार लेण्यांपैकी दुसरे लेणे महत्त्वपूर्ण आहे. याच्या वरचा कडा कोसळल्यामुळे या लेण्याची वरीच हानी झाली असली, तरी त्याची प्राचीन वैशिष्ट्ये आजही टिकून आहेत. याचे बाहेरचे दालन ७८ फूट × १०·४ फूट एवढे प्रशस्त आहे. या दालनात आठ स्तंभ असून, आत जाण्यासाठी पाच प्रवेशद्वारे आहेत. आतला सभामंडप ८० फूट लांब आणि ७९ ते ८५ फूट रुंद आहे. या मंडपाचे छत १२ फूट उंचीच्या ३२ स्तंभांवर आधारलेले आहे. याच्या दोन्ही बाजूंच्या भिंतींत आठ-आठ आणि मागच्या भिंतीत गर्भगृहाच्या दोन्ही बाजूंस तीन-तीन अशा बावीस खोल्या आहेत. या खोल्या सुमारे ९×९ फूट आकाराच्या आहेत. मागच्या भिंतीत मधोमध खोदलेले सुमारे १९×१५ फूट लांब-रुंद व १३ फूट उंच गर्भगृह असून, आत पार्श्वनाथ तीर्थंकराची भव्य प्रतिमा आहे.



पार्श्वनाथमूर्ती–धाराशिव

अन्य लेणी आकाराने लहान आहेत. क्र. ३ व ४ या दोन लेण्यांतही जिनप्रतिमा आहेत. क्र. ३ या लेण्यातील स्तंभ कलात्मक आहेत. या सर्व लेण्यांची अलिकडे डागडुजी झालेली आहे.

बर्जेसच्या मते ही लेणी अनुमानतः सनपूर्व ६५०–५०० या काळातील आहेत. करकंडचरिउ नामक जैन ग्रंथात या लेण्यांचे वर्णन आढळते. करकंडाला ही लेणी कशी दिसली, हे सांगताना ग्रंथकाराने लिहिले आहे ते असे–

**थोवंतरि तहिं सो चइ आम । करकंडइं दिठ्ठउ लयणु ताम ॥**
**णं हरिणा अमरवियाणु दिट्ठु । करकंडणराहिउ तहिं पविट्ठु ॥**
**सो घण्णु सलक्खणु हरियदंभु । जें लयणु कराविउ सहसखंभु ॥**

(क. च. ४. ५)

अर्थ– पर्वतावर थोडे वर चढून गेल्यानंतर, इंद्राने जसे देवविमान पाहावे, तसे करकंडाने ते लेणे पाहिले. त्यात प्रवेश केल्यावर करकंड राजाच्या मुखातून एकदम उद्गार बाहेर पडला, की ज्याने हे सहस्र स्तंभ असलेले लेणे निर्माण करविले, तो सुलक्षणी पुण्यवान पुरुष धन्य होय.

जैन परंपरेत करकंड हा पार्श्वनाथाचा समकालीन समजला जात असल्यामुळे जैन लोक धाराशिव लेण्यांना सनपूर्व नवव्या शतकाइतकी प्राचीन मानतात.

पेशवाईत या लेण्यांमध्ये हरिनारायण नामक एका सत्पुरुषाने तपश्चर्या केली होती. या लेण्यांच्या परिसरात त्या सत्पुरुषाच्या भक्तांनी एक मंदिर उभारून त्यात त्याची मूर्ती स्थापन केली आहे. याच्या संप्रदायाचा एक मठही धाराशिवमध्ये आहे. पाहा– तगर. [ भा. सं. जै. यो.; म. जि.– उस्मानाबाद ]

**धारिणी** (१) बौद्धांच्या महायान पंथाच्या वाङ्मयातील एक मंत्रसमूह. 'धार्यते अनया इति धारिणी'= जी चित्ताला (सम अवस्थेत) धारण करते ती धारिणी, अशी तिची व्याख्या आहे.

धारिणी हा एक अर्थशून्य असा वर्णसमुच्चय असतो. त्यातला एखादाच शब्द सार्थ व समजण्याजोगा असतो. धारिणीच्या पहिल्या भागात ती कोणाला व कशी प्रकट झाली त्याची प्रास्ताविक माहिती असते. धारिणीच्या मध्यावर बुद्ध, बोधिसत्त्व किंवा तारासंज्ञक देवतांपैकी एखादी देवता यांचे आवाहन असते. तिथेच मंत्र असतो. उदा० 'सर सिरे सिरे सुरु सुरु नागानां जव जव जिवि जिवि जुवु जुवु' इत्यादी. शेवटी त्या धारिणीचे माहात्म्य सांगितलेले असते.

लोकांना नेहमी आशीर्वाद व जादूटोणा यांसाठी मंत्राची गरज असते. वैदिक धर्माच्या बाबतीत ऋग्वेदातल्या मंत्रांनी, विशेषतः अथर्ववेदातील मंत्रांनी ती गरज भागवली होती. बौद्धधर्मियांची ती गरज भागवण्यासाठी या धारिणींची निर्मिती झाली. लंकेतले बौद्ध लोक पाली भाषेतील त्रिपिटक या धर्मग्रंथातील महत्त्वाच्या व मनोहर अशा सुत्तांचा पिरित्त किंवा पिरित (मंत्र) या नावाने प्रथम उपयोग करू लागले. पुढे भारतातल्या महायानी बौद्धांनीही त्रिपिटकांतील काही सुत्तांना जादूमंत्र बनवून त्यांचा तसा उपयोग सुरू केला. त्रिपिटकातील मेघसुत्त हे या प्रकाराचे उत्तम उदाहरण आहे. या सूत्राचा आरंभ असा आहे –

'याप्रमाणे आम्ही असे ऐकले आहे, की एकदा भगवान बुद्ध हा नंद आणि उपनंद या नागराजांच्या राजवाड्यात गेला.

मग नागदेवतांनी बुद्ध व बोधिसत्त्व यांची पूजा केली. त्यानंतर नागराजाने बुद्धाला विचारले. 'हे भगवन, सर्व नागांची दुःखे कशी दूर होतील व त्यांना संतोष व आनंद कोणत्या उपायाने लाभेल ?' त्यावर बुद्धाने उत्तर केले. 'तू धारिणीचा उपयोग कर. तसे केल्याने सर्व नागांची दुःखे दूर होतील. सर्वांना निर्वाण प्राप्त होईल, तसेच भारतभर यथाकाल पर्जन्यवृष्टी होईल. तिच्यायोगे वृक्ष-वनस्पती वाढतील, बियाणी रुजतील व रस वाहतील.'

धारिणीत ग्रहपीडानिवारण, विषबाधानिवारण, भूतप्रेतबाधानिवारण, रोगनाशन, आयुष्यवर्धन, युद्धविजय, सुखावती नामक स्वर्गात पुनर्जन्माची प्राप्ती, पातकनिवृत्ती, इ. विषयांवरचे मंत्र असतात. धारिणींचा विशेषेकरून अवर्षणाच्या निवारणासाठी किंवा पाऊस पडण्यासाठी उपयोग करतात. कारण पंचमहाभूतांवर धारिणींचा ताबा चालतो, अशी समजूत आहे.

वसुधारा नावाची एक धारिणी असून, ती स्वतः बुद्धाने सुचंद्र नावाच्या गृहस्थाला दिली, अशी कथा आहे. सुचंद्र हा गर्भश्रीमंत होता. पण दुर्दैवाने त्याची संपत्ती नष्ट झाली आणि आपल्या कुटुंबातल्या माणसांना गोळाभर अन्न घालणेही त्याला कठीण जाऊ लागले. अशा स्थितीत तो एके दिवशी बुद्धाकडे गेला. आपली दैन्यावस्था बुद्धाला सांगून आपली गेलेली संपत्ती परत कशी मिळेल, याविषयीचा उपाय त्याने बुद्धाला विचारला. त्यावर बुद्धाने वसुधारा धारिणी प्रकट केली व ती सुचंद्राला दिली. सुचंद्राने तिची साधना केल्यावर त्याच्या घरात धनाचा व रत्नांचा पाऊस पडला.

धारिणीचे मुख्यतः चार प्रकार आहेत– धर्मधारिणी, अर्थधारिणी, मंत्रधारिणी व धारिणी. धर्मधारिणीच्या साधनेने साधकाच्या ठिकाणी स्मृती, प्रज्ञा व बल यांचा संचार होतो; अर्थधारिणीमुळे धर्माचा आंतरिक व गूढ अर्थ उकलतो; मंत्रधारिणीमुळे पूर्णत्वाची प्राप्ती होते व धारिणीमुळे शांती लाभते.

त्रिपिटकाप्रमाणेच सद्धर्मपुंडरीक, लंकावतार व सुवर्णप्रभास या सूत्रांतही धारिणींनी प्रवेश केला आहे. धारिणींची रचना बरीच प्राचीन आहे. इ. स. च्या ४ थ्या शतकापासून धारिणींचा आढळ होतो. धारिणीमधला स्पष्टार्थक भाग हा मूळचा असावा आणि दुर्बोध किंवा अर्थहीन वर्णसमुच्चय मागाहून त्यात घुसडले गेले असावे. पुढे सूत्राच्या स्पष्टार्थापेक्षा या दुर्बोध वर्णसमुच्चयालाच मंत्र म्हणून महत्त्व आले. त्या प्रत्येक वर्णाला बीज म्हणू लागले व बीजात अद्भुत शक्ती वास्तव्य करते, अशी समजूत बळावत गेली. नेपाळमध्ये पंचरक्षा नावाचा पाच धारिणींचा एक संग्रह असून, तो तिकडे अत्यंत लोकप्रिय आहे. या पाच धारिणींची नावे व कार्ये पुढीलप्रमाणे–

(१) **महाप्रतिसरा**– रोग, पाप व इतर अनिष्ट गोष्टींपासून संरक्षण.

(२) **महासहस्रप्रमर्दिनी**– भूतपिशाचांची बाधा दूर करणे.

(३) **महामयूरी**– सर्पविष उतरविणे.

(४) **महाशीतवती**– शत्रू, दुष्ट, ग्रह, हिंस्र पशू व विषारी जंतू यांच्यापासून मनुष्याचे संरक्षण करणे.

(५) **महामंत्रानुसारिणी**– समस्त रोगांचे निवारण करणे.
या सर्व धारिणींना तांत्रिक बौद्धांनी पुढे देवता म्हणून मूर्त स्वरूप दिले. धारिणी या अमोघसिद्धी नामक ध्यानी बुद्धाच्या कुळातील आहेत, असे मानून तांत्रिक बौद्धांनी त्यांची नावे, वर्ण व चिन्हे पुढीलप्रमाणे सांगितली आहेत–

| नाव | वर्ण | चिन्ह |
|---|---|---|
| सुमती | पीत | धान्य-मंजरी |
| रत्नोल्का | रक्त | चिंतामणि-ध्वज |
| उष्णीषविजया | शुभ्र | चंद्रकांतमणि-कलश |
| मारी | पाटल | सुई-दोरा |
| पर्णशबरी | हरित | मयूरपिच्छ |
| जांगुली | शुभ्र | विषपुष्पमंजरी |
| अनंतमुखी | श्याम | महानिधि-कलश. |
| चुंदा | शुभ्र | माला-कमंडलू |
| प्रज्ञावर्धनी | शुभ्र | नील कमल |
| सर्वकर्मावरणविशोधनी | हरित | शुभ्र कमल |
| अक्षयन्यायकरंडा | रक्त | रत्नकरंड |
| सर्वबुद्धधर्मकोषवती | पीत | रत्नपेटक |

प्रत्येक धारिणी ही एकमुख व द्विभुज असून, प्रत्येकीच्या उजव्या हातात विश्ववज्र व डाव्या हाती अभिज्ञान चिन्ह असते. [ म. ज्ञा. को.; इं. बु. इ.; बौ. ध. द. ]

(२) चौदा स्त्री– देवतांचा एक समूह. अग्नी पुराणात त्यांची नावे सांगितली आहेत, ती अशी– शची, वनस्पती, गार्गी, धूम्रोर्णा, सिनीवाली, कुहू, राका, अनुमती, शुभा, आयती, नियती, प्रज्ञा, सेला व वेलो. [ श. क. ]

**धारो आठें** एक काम्य व्रत. हे गुजरातमध्ये प्रचलित आहे. भाद्रपद शुद्ध अष्टमीला धारो आठें म्हणतात. या दिवशी स्त्रिया उपवास करतात आणि गणेशाला धारो नामक गवताची पूजा बांधतात. कुणबी स्त्रिया या दिवशी गवत किंवा भाजीपाला कापीत नाहीत. अष्टमीपासून सात दिवस भागवत सप्ताह करतात. फल-- पुत्रप्राप्ती. [ सुरत गॅझे. ]

**धालो** गोमंतकातील एक नृत्योत्सव. कुणबी, भंडारी, नाईक, गावीत, गावडा, इ. स्त्रिया त्यात भाग घेतात. धालो ही मुळात राधागीते असावी. राधा→लाधा→धाला→धालो असा वर्णविपर्यय होऊन हे नाव प्रचारात आले असावे, अशी एक कल्पना आहे. मुळात ही गीते राधा-कृष्णविषयकच होती, असे दिसते. पण पुढे त्यात स्थानिक देवदेवतांच्या गीतांची भर पडली आणि कालांतराने त्यांनाच महत्त्व येऊन, मूळ राधा-कृष्णगीतांना दुय्यम स्थान मिळाले.

पौष महिन्यात हा उत्सव होतो. उत्सव सात किंवा दहा दिवस चालतो. वेगवेगळ्या ठिकाणी हे धालो वेगवेगळ्या आठवड्यात होतात. या उत्सवासाठी बायका वर्गणी गोळा करतात. उत्सवासाठी वाड्यावरच्या एखाद्या मानकऱ्याच्या घरापुढचे अंगण स्वच्छ सारवून तयार करतात. मग दोन-चार स्त्रियांसह गावातील प्रमुख पुरुष देवळात जातात आणि देवाला धाल्यांच्या कार्यक्रमाचे निमंत्रण देतात. उत्सव निर्विघ्न सिद्धीस नेण्यासाठी देवाला गाऱ्हाणेही घालतात.

धालो नृत्यासाठी रात्रीच्या वेळी बायका नटून-थटून मानकऱ्याच्या अंगणात गोळा होतात. प्रकाशासाठी मोठी समई लावतात. मग समोरासमोर तोंडे करून दोन रांगा करतात. या रांगांना पात म्हणतात. पातीत उभ्या झालेल्या बायका एकमेकींच्या गळ्याभोवती किंवा कमरेभोवती हात टाकतात. मग गीत सुरू होते. गाण्याचा एक चरण म्हणत बायकांची एक रांग चार पाच पावले पुढे टाकते, कमरेत वाकते आणि चरण पुरा करीत आपल्या जागेवर येते. मग दुसरी रांग दुसरा चरण म्हणत त्याच पद्धतीने पुढे येते व वाकून पुन्हा आपल्या जागी जाते. या वेळी म्हणायच्या गीताचा एक नमुना असा–

कापूस सूताच्यो वाती द्ये यो वळीयेल्यो वाती द्येयो
वळीयेल्यो वाती द्ये
धरतरी मायेच्या हाती द्ये वो पांचा वातींचा दिवा द्येवो
पांचा वातीचा दिवा द्ये
वळी बाये वळी द्ये यो हळदीच्यो वळी द्येयो
हळदीच्यो वळी द्ये
धरतरी माये वळी द्ये यो खेळांक आमकां मळी द्येयो
खेळांक आमकां मळी द्ये
कापूस सूताच्यो वाती द्ये यो वळीयेल्यो वाती द्येयो
वळीयेल्यो वाती द्ये
महालक्ष्मी मायेच्या हाती द्ये वो पांचा वातींचा दिवा द्येवो
पांचा वातींचा दिवा द्ये

पातीच्या वेळी गायचे एक प्रमुख गीत म्हणजे देऊळ होय. अशा गीतांत शांतादुर्गा, महालक्ष्मी, मंगेश, रवळनाथ, वाठारी, इ. देवदेवतांची देवळे सोन्याने बांधली जातात.

काही वेळा प्रत्यक्ष देवालाही चांदण्यात धालो खेळायला बोलावतात. त्या वेळी त्या देवाचे वर्णनही करतात. अशा एका गीतात नागेशाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे–

रथा तुझ्या दांडचेक साडेतीनशे गुडचो
रथात कोण देव बसे गे

रथात बसे नागेशदेव जनलोका दिसे
खेळुंक आयला मांडार गे, खेळुंक आयला मांडार

पातीमधल्या दोन्ही रांगांतील बायकांची संख्या कमीजास्ती झाली तरी चालते. पात मोडण्यापूर्वी एक स्त्री दोन्ही रांगांच्या मध्यभागी उभी राहते आणि धालो सुरू होऊन जितके दिवस झाले असतील, तितक्या रेषा बोटाने जमिनीवर ओढते. मग दोन्ही रांगा आपल्या जागा बदलून उभ्या राहतात. मग मधली स्त्री मळा शिपायचा अभिनय करते आणि पात मोडली जाते.

त्यानंतर फेरफुगडी होते. त्या वेळी डावा पाय वर्तुळात पुढे ठेवून त्याने ठेका संभाळतात आणि टाळचा वाजवीत कधी पुढे झुकून किंवा मागे वाकून किंवा ताठ उभे राहून वर्तुळात वेगाने फिरतात. फुगडीच्या वेळी जी गाणी म्हणतात, त्यांतला एक नमुना असा—

रोपी लावीऽली निंबोणीची, हाळें धरिऽले साखरीचें
शिपणे शिप्पले दुधा शिपणे, निंबू लागलें देठान् देठ
निंबू काडिलें ताठभर, निंबू धाडिले देवाभेटे

धाल्याच्या शेवटच्या रात्री इतरही अनेक खेळ खेळून रात्र जागवतात. दुसऱ्या दिवशी धाल्याचे उद्यापन करतात. त्यासाठी वाडीतली मुख्य स्त्री नवे लुगडे नेसते आणि प्रसादाचे गाडगे घेऊन घरोघर जाते. तिच्याबरोबर लिंबाचे टाळे घेतलेल्या काही मुली असतात. घरोघर जाऊन ती गूळ-खोबऱ्याचा प्रसाद आणि अक्षता वाटते. या अक्षता घराच्या चारही कोपऱ्यांत फेकल्या, की घरात लक्ष्मी येते, अशी समजूत आहे. शेवटी वाडीवर प्रसादाचे जेवण होते आणि धाल्याचा उत्सव संपतो. [ गोव्यांतील धालो– श्रीमती वसुधा माने, १९६४; श्री. रामदास प्रभू– दीपलक्ष्मी, मे १९६४ ]

## धिणोधर

कच्छमधील एक पवित्र पर्वत. याच्यासंबंधी एक आख्यायिका सांगतात, ती अशी– धर्मनाथ नावाचा एक कानफाटा जोगी होता. त्याला आपल्या पातकांचे वजन करण्याची इच्छा झाली. त्याने त्यासाठी एका पर्वतावर शीर्षासन केले. पण तो पर्वत दुभंगला. तो जोगी मग दुसऱ्या पर्वतावर गेला. पण तिथेही तसेच झाले. नंतर त्याने धिणोधर पर्वतावर जाऊन शीर्षासन केले. तो पर्वत मात्र अभंग राहिला. त्यामुळें त्याला धिणोधर (अभंग) असे नाव पडले. धर्मनाथाने मग त्या पर्वतावर एक मठ स्थापन केला. ज्या शिळेवर धर्मनाथाने शीर्षासन केले होते, ती अजून तिथे दाखवतात. तिला शेंदूर फासलेला आहे. कानफाटचा जोग्यांचा पुढारी या क्षेत्राला भेट देतो, तेव्हा तो या शिळेची पूजा करतो. अनेक भाविक लोक या पर्वताची यात्रा करतात. [ बाँबे गॅझे.; एन्सा. रि. ए. ]

## धिमाल

एक जमात. या लोकांची वस्ती आसामधल्या गोलपाडा जिल्ह्यातल्या जंगलात आहे. इ. स. १८४७ मध्ये त्यांची संख्या सुमारे पंधरा हजार होती; पण ती हळूहळू कमी होत आहे, असे म्हणतात.

शेती हा यांचा प्रमुख व्यवसाय आहे. ते झूम पद्धतीने शेती करतात. त्यामुळे एखाद्या जमिनीत दोन वर्षांपेक्षा अधिक काळ त्यांना शेती करता येत नाही. मांडलेल्या वस्तीतही ते चार-सहा वर्षांपेक्षा जास्त काळ राहत नाहीत. चार-पाच वर्षांनंतर जुन्या शेतांत जर पुन्हा जंगल वाढलेले दिसले, तर ते पुन्हा तिथे पेरणी करतात; पण जुन्या झोपड्यांत मात्र ते कधीही राहायला जात नाहीत.

पूर्वी धिमाल लोक ज्या प्रदेशात राहत, त्यावर ब्रिटिशांच्या पूर्वी नेपाळ, सिक्कीम, भूतान येथील राजांची सत्ता होती. शेती करण्याबद्दल त्यांना राजाला कर द्यावा लागे. एका औजाराबद्दल एक रुपया एवढा हा कर असे. त्याचप्रमाणे राजासाठी आणि त्याच्या स्थानिक प्रतिनिधीसाठी त्यांना वर्षांतून काही दिवस वेठबिगारही करावी लागे. सखल प्रदेशातून आलेले राजाचे सामान पहाडी भागात नेऊन पोचवणे आणि राजप्रतिनिधीला वर्षातून चारदा त्याचे शेत नांगरायला, घर बांधायला किंवा दुरुस्त करायला साहाय्य करणे आणि मेजवानीच्या प्रसंगी त्याला सरपण आणि जेवण्यासाठी पाने पुरवणे, अशासारखी ही वेठबिगारीची कामे असत. याशिवाय त्यांची जेवढी कापसाची शेते असतील, तेवढे शेर कापूस त्या राजप्रतिनिधीला दरवर्षी पोचता करणे, हा विशेष कर असे.

शेतीशिवाय धिमाल लोक कोंबड्या, डुकरे, बकरी, कबुतरे व बदके पाळतात आणि कुटुंबासाठीच त्यांचा उपयोग करतात. भात, मांस व मासे हे त्यांचे मुख्य अन्न होय. तांदुळाचें मद्य हे त्यांचे आवडते पेय आहे.

धिमाल आपले घर स्वतःच बांधतात. ते गवत व बांबू यांचे असते. त्याला खिडक्या नसतात आणि दारही एकच असते. घरातले लाकडी सामानही तेच तयार करतात. ते टोपल्याही विणतात. धिमाल स्त्री आपल्या कुटुंबियांसाठी सूत काढून कपडे विणते व ते रंगविते.

यांच्या एका वस्तीत दहा ते चाळीस घरे असतात. त्या वाडीच्या प्रमुखाला ग्रा असे म्हणतात. पूर्वी सर्वांकडून कर गोळा करून तो राजाकडे पोचता करणे, हे ग्राचे काम असे.

**विवाहप्रथा–** धिमालांत विवाह हा धार्मिक संस्कार न मानता एक करार मानतात. जातीबाहेर लग्न केल्यास त्यांना जबर दंड भरावा लागतो. लग्न झाल्यावर मुलगा वेगळा संसार मांडतो. पण सर्वांत लहान मुलाने वृद्ध आईवडिलांना सोडून

वेगळा संसार सुरू केल्यास तो मात्र दंडाला पात्र ठरतो.

मुलगा वीस ते पंचवीस वर्षांचा आणि मुलगी पंधरा ते वीस वर्षांची झाल्यावर त्यांचे लग्न करतात. लग्न वडील माणसेच ठरवतात. मुलीसाठी दहा ते पंधरा रुपये देज द्यावे लागते. देज देण्याची ऐपत नसल्यास मुलाला भावी सासऱ्याच्या घरी दोन ते पाच वर्षे जेवणावारी राबावे लागते.

लग्नविधी अगदी साधा असतो. नवरा मुलगा आपले मित्र आणि दोन स्त्रिया यांच्यासह वधूगृही जातो. तिथे त्या स्त्रिया वधूच्या भांगात शेंदूर भरतात किंवा तिच्या डोक्यावर तेल घालतात. मग वधूला घेऊन सर्वजण वरगृही परततात. पुरोहित देवांना पान आणि शेंदूर अर्पण करतो. वधू-वरांना शेजारी बसवून वराचे आईबाप त्यांचे अंगांवर एक कपडा टाकतात. त्यावर पुरोहित तीर्थजल शिंपडतो. एवढे झाल्यावर लग्नविधी पूर्ण होतो. त्यानंतर जेवणावळ होते.

**देवधर्म**– धिमाल लोक नद्यांना देवता मानतात आणि त्यांची पूजा करतात. याशिवाय चंद्र, सूर्य, धरित्री, अग्नी, इ. देवतांनाही ते भजतात. देवाप्रीत्यर्थ पशुबलीही देतात. रोगराई हा देवाचा कोप समजून मांत्रिकाकरवी त्याच्यावर बलिदानादी उपचार करतात.

कापूस पिकतो त्यावेळी आणि भाताला लोंब्या येतात त्यावेळी हे लोक नदीकिनारी जाऊन उत्सव करतात.

**प्रसूतिप्रथा**– आई मुलाची नाळ कापते. जन्मल्यावर लगेच किंवा चार-पाच दिवसांनी मुलाचे नाव ठेवतात.

**मर्तिकप्रथा**– हे लोक मृतांना पुरतात. सुतक तीन दिवस पाळतात. यांच्यांत श्राद्ध करण्याचीही प्रथा आहे. [ कोच, बोडो अँड धिमाल ट्राइब्स– बी. एच. हॉगसन, १८४७ ]

## धीरादी नायिका

नायिकांचा एक वर्ग. अन्य स्त्रीशी संबंध ठेवण्याचा अपराध करणाऱ्या नायकाशी नायिका कोणत्या प्रकारे वागते, त्यावर हे वर्गीकरण आधारलेले आहे. रसमंजरीकाराने धीरादी नायिकांची लक्षणे दिली आहेत, ती अशी–

**व्यङ्ग्यकोपप्रकाशा धीरा, अव्यङ्ग्यकोपप्रकाशा अधीरा, व्यङ्ग्याऽव्यङ्ग्यकोपप्रकाशा धीराधीरा ।**

**अर्थ**– आपला राग जी वक्रोक्तीने व्यक्त करते ती धीरा, स्पष्टपणे शब्दांनी व्यक्त करते ती अधीरा आणि कधी स्पष्टपणे, तर कधी वक्रोक्तीने व्यक्त करते, ती धीराधीरा नायिका होय.

वस्तुतः या संज्ञा प्रकृतिभेदाच्या द्योतक आहेत; परंतु आलंकारिकांनी त्या मानावस्था असल्याचे गृहीत धरले आहे. वयानुसार पडणाऱ्या नायिकाभेदांपैकी मुग्धेच्या ठायी या मानावस्था संभवत नाहीत; मध्या व प्रौढा या नायिकांत त्यांचे अस्तित्व संभवते. [ शृं. ना.; हिं. सा. को. ]

## धीवर

एक जात. हिला कैवर्त व दाश अशीही नावे आहेत. तैत्तिरीय ब्राह्मणात मात्र धीवर, कैवर्त व दाश यांचा निरनिराळा उल्लेख केलेला आहे. मासे मारणे हा यांचा व्यवसाय असून, त्या प्रत्येकाची मासे पकडण्याची पद्धत मात्र वेगवेगळी आहे.

मध्य प्रदेशात धीवर लोकांनाच धीमर, कहार, भोई, पालेवार व मछंदर अशी नावे आहेत. छत्तीसगड भागातील केवट ही यांचीच एक पोटजात आहे. याशिवाय वाघमार, ओझवा, गुरुपहचान, मिडोइया, गिढवे, कोल्हे, कस्तुरे, तुमसरे, पिंडारी, गोंधळी, कच्छवाह, अशाही यांच्या पोटजाती आहेत.

**उद्योगधंदे** – हे लोक मासे धरतात, नावा चालवतात, शिंगाडे विकतात व पालख्या वाहतात. याशिवाय, पाणी भरणे, मांडी घासणे, रेशमाचे किडे पाळणे, इ. उद्योगही ते करतात.

**विवाहप्रथा** – एकाच पोटजातीत लग्ने होत नाहीत. आते–मामे बहिणींशीही लग्न करीत नाहीत. लग्नात देज घेण्याची पद्धत आहे. लग्नाचा खर्च करण्याची ऐपत नसल्यास लग्नावाचूनच स्त्री-पुरुषांनी पति-पत्नी म्हणून एकत्र राहण्याचा प्रघात आहे. कधी काळी त्यांच्या जातीत एखादा मोठा लग्नसमारंभ होतो. आणि त्यात आजापासून नातवापर्यंत सगळ्यांची लग्ने उरकून घेतात. कारण मरायच्या आधी लग्न झालेच पाहिजे, असा त्यांच्यामध्ये दंडक आहे.

**देवधर्म** – हे दुल्हादेवाला भजतात. कदंबाच्या लाकडापासून त्याची प्रतिमा बनवतात व तिला शेंदूर फासतात. वऱ्हाडातले धीवर अन्नपूर्णा देवीला पुजतात. नावाडी लोक घटोइया नामक देवाला भजतात. बडे पुरखा (थोर पुरुष), परिहार बरमदेव, गोसाईदेव ही यांची अन्य दैवते आहेत.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना पुरतात. दहा दिवस सुतक पाळतात. विदर्भात यांचा अंत्यसंस्कार गोंडांप्रमाणेच होतो. अक्षय्य तृतीयेला मृतात्म्यासाठी थोडे अन्न अग्नीत टाकतात. [ हि. ध.; म. लो. सं.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

## धुंसर

एक जात. यांना भार्गव असेही म्हणतात. यांची वस्ती उ. प्रदेश व पंजाब या प्रदेशांत आहे. पंजाबमधील रेवारीजवळचे गुरगाव हे त्यांचे प्रमुख केंद्र होय. नारनौलमधील धोशी नावाच्या टेकडीवरून त्यांना धुंसर हे नाव मिळाले, असा समज आहे.

यांचा सामाजिक दर्जा ब्राह्मण व वाणी यांच्या मधला मान-

तात. मात्र ते स्वतः ब्राह्मणांच्या बरोबरीला येण्याचा प्रयत्न करीत आहेत. आपले पूर्वज मोठमोठ्या हिंदू राजांचे पुरोहित होते, असे हे सांगतात. काही ठिकाणी धुंसर हा वाण्यांतला एक वर्ग समजला जातो. हे लग्नाच्या वेळी मुंज करतात. ही चाल तिकडे कायस्थ, वैश्य व खत्री या लोकांमध्येही प्रचलित आहे. कारकुनी व व्यापार हे यांचे प्रमुख व्यवसाय असले, तरी काही लोक शेतकरीही आहेत. [ म. ज्ञा. को.; पं. का. ]

**धुमुरा** एक लोकनृत्य. धुमुरा म्हणजे छोटा ढोल होय. त्याच्या साथीवर हे नृत्य करतात म्हणून यालाही घुमुरा असेच म्हणतात. याला निषाण व झांज या वाद्यांचीही साथ असते. कलहंडी व कोरापुट जिल्ह्यांतील आदिवासींचे हे नृत्य आहे. नर्तक गोलाकार वा अर्धगोलाकार उभे राहून हे नृत्य करतात. त्यांतील एक पुरुष हातात मोराची पिसे घेऊन नृत्याचे दिग्दर्शन करतो. या नृत्यात शृंगार, वीर, इ. रसांची गीते गायिली जातात. [ ए. हो. रा. ]

**धुरी** एक जात. यांची वस्ती मध्य प्रदेशातल्या छत्तीसगड विभागात आहे. या जातीच्या उत्पत्तीसंबंधी एक कथा सांगतात, ती अशी –

एकदा महादेव वनात गेला असता त्याच्या पायाला चिखल लागला. त्याने तो चिखल खरवडून काढून त्यापासून एक माणूस तयार केला. तोच धुरींचा मूळ पुरुष होय. धुळीपासून तो तयार झाला, म्हणून त्याचे नाव धुरी (धुळी) पडले.

यांच्यांत राजधुरी व चेओराकुटा असे दोन वर्ग आहेत. पैकी राजधुरी हे उच्च व चेओराकुटा हे हलके समजले जातात. राजाच्या व्यक्तिगत नोकरांचे वंशज ते राजधुरी होत. चेओरा =तांदूळ; चेओराकुटा हे तांदूळ सडण्याचे काम करतात. या व्यवसायावरूनही कदाचित त्यांना हे नाव मिळाले असावे. हे लोक घरगडी म्हणूनही दुसऱ्याच्या घरी राहतात.

**विवाहप्रथा** – वधू-वरांचे वडील एकमेकांना पानसुपारी देऊन विवाह निश्चित करतात. वधूगृही नवऱ्याला सूप देतात. नंतर नवरा मुलगा आपल्या सासूला कपडे देतो. वराला दृष्ट लागू नये म्हणून त्याच्या गळयात काळा दोरा बांधतात. वरात पायीच काढतात.

यांच्यांतील काही लोक कबीरपंथी असून, काही देवीचे उपासक आहेत. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**धूप** एक सुगंधी द्रव्य. धूप हा वृक्षांचा निर्यास म्हणजे चीक असतो. श्रीचंदन, सरल, साल, कालागुरू, नमेरू, देवदार, खदिर, पारिजात, इ. अनेक वृक्षांपासून धूप काढतात. पण सामान्यतः गुग्गुळ वृक्षापासून काढलेला धूप प्रसिद्ध आहे.

धूपाचे यक्षधूप ( राळ ), वृकधूप, अनंतधूप, विजयधूप, श्रीपिष्ट, अगुरुक्षर्झर, पत्रिवाह, पिंडधूप, इ. प्रकार सांगितले आहेत. त्यांपैकी विजय हा सर्वोत्तम मानलेला आहे.

षोडशोपचार पूजेत धूपाचा अंतर्भाव आहे. धुपाटण्यात घालून तो देवापुढे जाळतात. संध्याकाळी देवाची जी आरती करतात, तिला धूपारती असे म्हणतात. धूप हा उपचार समर्पिल्यानंतर दीप व नैवेद्य हे उपचार समर्पण करायला विलंब करू नये, असा एक संकेत आहे. रोमन कॅथॉलिकांच्या चर्चमध्ये आणि मुसलमानांच्या मशिदीत व दर्ग्यात धूप जाळण्याची पद्धत आहे. धूपाच्या सुवासाने भोवतीची दुर्गंधी नाहीशी होते. त्यामुळे लाक्षणिक अर्थाने धूप हे दैत्यांना घालवून देण्याचे साधन मानलेले आहे.

अगुरू, चंदन, मुस्ता, शिलारस व कस्तूरी ही सर्व द्रव्ये सम भाग घेऊन एकत्र केली असता अमृत नामक धूप होतो, असे म्हटले आहे. त्याचप्रमाणे मध, मुस्ता, तूप, गंध, गुग्गुळ, अगुरू हरीतकी, लाक्षा, जटामांसी, इ. अनेक सुगंधी द्रव्यांपैकी काही घेऊन पंचांग, षडंग, दशांग, द्वादशांग व षोडशांग असा धूप तयार करतात. विषघ्न व सर्पनिर्मोचन असेही धूपाचे प्रकार सांगितलेले आहेत.

पितरांना संतुष्ट करण्यासाठी गुग्गुळ व तुरुष्क हा धूप जाळावा, असे वायू पुराणात सांगितले आहे (७५. ३२; १०९. ४० ).

धूप जाळण्याच्या पात्राला धूपग्रह किंवा धुपाटणे असे नाव आहे. ते धातूचे बनवलेले असून त्याला छिद्रे असतात. मातीचीही धुपाटणी करतात. त्यात पेटलेले निखारे घालतात व त्यांवर थोडा थोडा धूप टाकतात. ते पात्र मग मंडपात, मंदिरात व इष्टस्थळी समारंभाच्या पूर्वी फिरवतात. [ श. क.; सु. वि. को.; हि. ध.; पु. इं.; व्रतराज ]

**धूमकेतू** एक आकाशस्थ ज्योती. कापसासारखा विरळ व विस्तीर्ण असलेला शिरोभाग, त्याच्या आत एक तेजस्वी केंद्रबिंदू आणि अंतराळात दूरवर पसरलेला पांढरा शुभ्र पिसारा अशा स्वरूपात धूमकेतू मधून मधून आकाशात दिसतात. दुर्बिणीवाचून साध्या डोळ्यांना दिसणारे धूमकेतू थोडेच असतात. दुर्बिणीतून पाहिल्यावर मात्र दर वर्षी अनेक धूमकेतू दिसू शकतात. धूमकेतू अंतराळात अतिशय दूर असतो, तेव्हा त्याचा केवळ कापसाळ शिरोभाग तेवढा दिसतो; पण तो जेव्हा जवळ येतो, तेव्हा त्याच्या अंतर्भागातील केंद्रबिंदूही दिसू लागतो. तो

अधिक जवळ येतो, तेव्हा त्याची लांबलचक शेंडीही दिसू लागते. धूमकेतूला शेंडे नक्षत्र असे म्हणतात, ते त्याच्या या शेंडीमुळेच होय.

याच्या दर्शनामुळे पृथ्वीवर उत्पात होतात, युद्धे जुंपतात, दुष्काळ पडतो, रोगांच्या साथी सुरू होतात, राजाचा घात होतो, त्या वेळी जन्मलेली मुले दुष्ट वृत्तीची किंवा अपंग निपजतात, इ. कल्पना पूर्वी प्रचलित होत्या. अजूनही त्या काही अंशी लोकमानसात मूळ धरून आहेत. धूमकेतूचा उदय हा एक अशुभ योग असून, त्या वेळी कोणतेही कार्य करू नये असे सांगितले आहे, ते वरील कल्पनांना अनुसरूनच होय.

वैदिक वाङ्मयात, तसेच रामायण, महाभारत, पुराणे, इ. ग्रंथांत असित, देवल, गर्ग, इ. धूमकेतूंचे पुष्कळ उल्लेख आहेत. वराहमिहिराने बृहत्संहितेत केतुचार नामक एका अध्यायात अनेक धूमकेतूंचे वर्णन केले आहे. गर्ग, पराशर, असित, देवल इ. ऋषींनी वेध घेऊन त्या धूमकेतूंचा शोध लावला म्हणून त्यांना त्या त्या ऋषींची नावे दिली असावीत.

धूमकेतू हे सूर्यकुलाचे घटक मानले जातात. ग्रहाग्रहांच्या संघर्षातून किंवा ग्रहताऱ्यांच्या संयोगातून हे जन्माला येत असावे. यांचा शिरोभाग साधारण गोलाकार असून, त्याचा व्यास तीस हजार ते दीड लक्ष मैल एवढा असतो. यापेक्षा लहान किंवा मोठा शिरोव्यास असणारेही धूमकेतू आढळले आहेत. काही धूमकेतूंचा व्यास १० लक्ष मैल किंवा त्याहून अधिकही आहे. बहुतेक धूमकेतूंना केंद्र असते. तो भाग अधिक घन व तेजस्वी असतो. त्याचा व्यास ५०० ते ५००० मैल एवढा असतो. धूमकेतूच्या शिरोभागातून निघालेला आणि त्याच्या परिभ्रमणपातळीतच लांबवर पण सूर्याच्या विरुद्ध बाजूला पसरलेला पांढरा फराटा म्हणजे त्याची शेंडी होय. काही धूमकेतूंना अनेक शेंड्या असतात. कधी कधी झगझगीत फवारे किंवा तेजोवलये धूमकेतूच्या केंद्रातून निघून, त्याच्या शिरोभागाचे वेष्टण फोडून बाहेर पडतात आणि ती दूरपर्यंत पसरत जाऊन अंतराळात विलीन होतात.

प्रत्येक धूमकेतू हा बहुधा वायूंनी वेष्टिलेल्या वस्तुकणांचा एक संघ असावा, अशी शास्त्रज्ञांची कल्पना आहे. सूर्य व गुरू यांचे आकर्षण आणि सूर्यप्रकाश यांच्या प्रभावाने त्या संघाला धूमकेतूचे रूप प्राप्त होते. त्याचे वस्तुमान अत्यंत कमी म्हणजे सरासरीने पृथ्वीच्या एकदशलक्षांश एवढे असते. या विरलतेमुळे धूमकेतूच्या अंगातून पलिकडचे तारे दिसू शकतात.

एकदा येऊन गेलेला धूमकेतू पुन्हा जेव्हा आकाशात दिसू लागतो, तेव्हा त्याचे पूर्वीचे रूप बदललेले असते. म्हणून प्रत्येक धूमकेतू ओळखण्यासाठी त्याची गणिती अंगे निश्चित करावी लागतात. परिभ्रमणाचा मार्ग, त्याचा आयनिक वृत्ताशी प्रक्षेप पातबिंदू, उपसूर्यबिंदू, अपसूर्यबिंदू, वेग व पर्ययकाळ ही त्याची गणिती अंगे होत. ही ठरविताना प्रत्येक धूमकेतूवर केवळ सूर्याचेच आकर्षण आहे, असे मानावे लागते. प्रत्यक्षात मात्र सूर्यकुलातील सर्व ग्रहोपग्रहांचे कमी-अधिक आकर्षण त्याच्यावर असते. या गणिती माहितीच्या आधारे धूमकेतूंचे तीन प्रकार संभवतात –(१) सांघिक – एकाच मार्गावरून कालांतराने एका मागोमाग एक जाणारे, बहुधा एकाच धूमकेतूतून फुटून बनलेले, पण ग्रहांच्या संपर्कात न आलेले (२) कौटुंबिक– बहुधा सूर्यकुलाच्या बाहेरून येऊन एखाद्या ग्रहाच्या आकर्षणामुळे खेचले गेलेले. अशा धूमकेतूंची गुरुकुल, शनिकुल, युरेनसकुल व नेपच्यूनकुल अशी चार कुले आहेत. (३) एकांडे– आकाशात एकटेच फिरणारे. असे धूमकेतू असंख्य आहेत. ते बहुधा अनंतातून येऊन सूर्याला प्रदक्षिणा घालून परत जातात. ते पुन्हा दिसत नसावेत.

धूमकेतूंचे तेज केवळ सूर्याच्या तेजावर अवलंबून नसून, त्यांचे स्वतःचेही काही तेज असावे, असे एक मत आहे. तथापि तारे ज्याप्रमाणे स्वयंप्रभ आहेत, तसे धूमकेतू नाहीत. कारण त्यांचा प्रकाश सूर्यापासूनच्या अंतरावर अवलंबून असतो.

धूमकेतूमधील कणाकणांचे परस्परांवर आकर्षण असते, त्यामुळे ते एकत्र राहू शकतात. धूमकेतू जसजसा सूर्याजवळ येतो, तसतसे त्याच्यावरचे आकर्षण वाढत जाते. त्याच वेळी काही कारणाने धूमकेतूची घनता कमी झाली तर सूर्याच्या आकर्षणाच्या प्रभावाने धूमकेतूचा शिरोभाग द्विधा, त्रेधा किंवा अनेकधा विदीर्ण होतो आणि त्याचे लहान लहान धूमकेतू निर्माण होतात. इतर ग्रहांच्या आकर्षणामुळेही धूमकेतूंचे असे विभाजन होत असते. [ सूर्यकुल; श. क.; वे. वि. नि. ]

## धूमावती

एक तांत्रिक देवता. शाक्तसिद्धान्तानुसार हे महाशक्तीचे वृद्ध रूप आहे. तिने हे रूप धारण का केले, या संबंधाची कथा अशी–

एकदा कैलास पर्वतावर पार्वतीने शंकराला म्हटले. ‘ मला भूक लागली आहे; काही तरी खायला द्या. ’ पण शिवाने त्या मागणीकडे दुर्लक्षच केले. त्यामुळे पार्वती रागावली व तिने शंकरालाच गिळून टाकले. पण त्यामुळे पार्वतीच्या शरीरातून धूराचे लोट निघू लागले. तेव्हा शंकराने तिला आतूनच म्हटले–

एषा मूर्तिस्तव परा विख्याता बगलामुखी ।
धूमव्याप्तशरीरात्तु ततो धूमावती स्मृता ।।

अर्थ– तुझी ही परा (= आदिकारणरूप) मूर्ती बगलामुखी म्हणून प्रसिद्ध होती. पण आता तिचे सर्व शरीर धुराने झाकून

गेले अल्यामुळे ती धूमावती या नावाने प्रसिद्ध होईल.

या रूपाचे ध्यान असे आहे–

> विवर्णा चञ्चला कृष्णा दीर्घा च मलिनाम्बरा।
> विमुक्तकुन्तला रुक्षा विधवा विरलद्विजा ।।
> काकध्वजरथारूढा विलम्बितपयोधरा।
> शूर्पहस्तातिरुक्षाक्षी धूतहस्ता वरान्विता ।।
> प्रवृद्धघोणा तु भृशजटिला कुटिलेक्षणा।
> क्षुत्पिपासार्दिता नित्यं भयदा कलहास्पदा ।।

अर्थ– धूमावती देवी वर्णहीन; चंचल, काळी, उंच बांध्याची-मलिन वस्त्राची, पिंजारलेल्या केसांची, रुक्ष, विधवा, विरळ दातांची, काकध्वज असलेल्या रथावर बसलेली, लोंबत्या स्तनांची, हातात सूप धारण करणारी, रुक्ष नेत्रांची, हात हालवणारी, वरद मुद्रा दाखवणारी, मोठ्या नाकाची, केसांच्या जटा धारण करणारी, तिरळ्या डोळ्यांची, सदैव तहान-भुकेने व्याकुळलेली, भयानक व कलहकारिणी अशी आहे.

रूपाने विक्राळ असली, तरी धूमावती स्वतः नर्तकी आहे व नृत्य-नाटचांमध्ये तिचा निवास आहे, असे म्हटले आहे.

धूमावतीचा एक मंत्र आहे, तो असा – 'धूं धूं धूमावति स्वाहा' या मंत्राचा ऋषी पिप्पलाद, छंद निचृद व देवता ज्येष्ठा आहे. मंत्र सिद्ध करताना ती स्मशानवासी व काकवाहन आहे, असे तिचे ध्यान करून मग तिची पूजा करतात. नंतर स्मशानात विवस्त्र होऊन वरील देवतामंत्राचा एक लक्ष जप करतात. जपकालात साधकाला नक्तभोजी राहावे लागते. नियमित जप करून लक्ष संख्या पुरी केल्यावर मीठमोहरीने रात्री हवन करतात. हा मंत्र सिद्ध झाल्यास शत्रुनाशासाठी त्याचा उपयोग करता येतो. [ मा. प्र. वि.; मं. म.]



धूमावती

## धूर्जटी

( इ. स. चे १६ वे शतक ) आंध्र प्रदेशातला एक शिवभक्त कवी. हा भारद्वाजगोत्री नियोगी ब्राह्मण होता. याचा जन्म व वास्तव्य कालहस्ती येथे झाले. याने कालहस्तीमाहात्म्य व स्थळपुराण ही दोन काव्ये लिहून कालहस्तीश्वर या देवाला अर्पण केली आहेत. तुच्छ किंवा क्षुद्र अशा विषयांचेही वर्णन चित्ताकर्षक करण्यात या कवीचा हातखंडा आहे. त्याच्या काव्यातून भिल्ल-भिल्लिणी व त्यांच्या झोपड्या यांचे सुंदर वर्णन आढळते. याला रसिकशिरोमणी किंवा रसिकाग्रणी असेही म्हणत. [ म. ज्ञा. को.; ते. वा. ]

## धूलिवंदन

यालाच मराठीत धुळवड असे नाव आहे. हा दिवस फाल्गुन वद्य प्रतिपदेचा असतो. त्या दिवशी होळीच्या राखेची किंवा धुळीची पूजा करायची असते. पूजा झाल्यावर पुढील मंत्राने तिची प्रार्थना करतात–

> वन्दितासि सुरेन्द्रेण ब्रह्मणा शङ्करेण च।
> अतस्त्वं पाहि नो देवि भूते भूतिप्रदा भव।।

अर्थ– हे धूलि, तू ब्रह्मा-विष्णु-महेशांनी वंदित आहेस, म्हणून हे भूते देवी, तू आम्हांला ऐश्वर्य देणारी हो आणि आमचे रक्षण कर.

या धार्मिक विधीव्यतिरिक्त जे निरनिराळे लोकाचार समाजात प्रचलित आहेत, त्यांचा अंतर्भाव शिमग्याच्या सणात होतो. पाहा – शिमगा. [ निर्णयसिंधु ]

## धूळधोया

एक जात. यांना झारेकरी व जलगार असेही म्हणतात. यांची वस्ती महाराष्ट्र व गुजरात या प्रदेशांत आहे. हे सोनारांच्या भट्टीतील धूळ धुण्याचे काम करतात व त्यातून सोन्याचांदीचे कण गोळा करतात. त्यावरूनच यांना धूळधोया हे नाव मिळाले असावे. काही धूळधोया जातीचे लोक मुसलमान असून, ते सुन्नी पंथाचे अनुयायी आहेत. ते मूळचे खत्री असावे. [ मुं. इ. जा. ]

## धृतिव्रत

एक काम्य व्रत. व्रतावधी एक वर्ष. शिव ही या व्रताची देवता होय. काही ठिकाणी विष्णूलाही या व्रताची देवता मानतात. शिवलिंगाला, शिवमूर्तीला किंवा विष्णुमूर्तीला रोज पंचामृताने स्नान घालणे, असा या व्रताचा विधी आहे. उद्यापनाच्या वेळी पंचामृतासह एक गाय व शंख दान देतात. फल – शिवस्थानप्राप्ती व पुढील कल्पात राज्यप्राप्ती. [ हि. ध.; पु. इ. ]

## धृष्टी

एक यज्ञीय उपकरण. विस्तव काढून कुंडात घालण्यासाठी बनवलेले हे उपकरण असते. प्रवर्ग्यामध्ये दोन धृष्टी असतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

एक तंतुवाद्य. याला रावण हथ्था असेही म्हणतात. त्यासाठी नारळाची करवंटी चामडयाने मढवून तिच्यावर दीड फूट लांबीची वेळूची काठी बसवतात. त्या काठीला एक किंवा दोन तारा जोडतात. या वाद्यात पडद्यांच्या जागी कवडया बसवतात. धनुकलीच्या साहाय्याने ते वाजवतात. हे वाद्य किनरीसारखे वाजते. याचे स्वर कर्णकटू निघतात. जोगी किंवा गोसावी हे वाद्य वाजवून गाणी म्हणत भिक्षा मागतात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**घेंडा नाचवणे** महाराष्ट्रातल्या विवाहसोहळयातील एक लोकाचार. लग्नकार्य निर्विघ्नपणे पार पडून नवरी घरी आली, की यश मिळाले असे समजून वरपक्षाची मंडळी घेंडा नाचवतात. काही ठिकाणी नवरी मुलगी वरातीसह वराच्या घरी निघाली म्हणजे त्या वेळी घेंडा नाचवितात. या नाचात एक माणूस नवरा-नवरीस आपल्या दोन्ही खांद्यांवर घेऊन नाचतो व देवाचे गाणे म्हणतो. या गाण्यांना मंगलवाद्यांची साथ असते. 'टाळ गेला मांदळ गेला माझा घेंडा नाचू द्या' अशा पालुपदाची ही गाणी असतात.

एकनाथांनी रुक्मिणीस्वयंवर या आपल्या ग्रंथात या प्रकारावर आध्यात्मिक रूपक बसवले आहे (१७.५–७). त्यातील काही ओव्या अशा–

बोधें कृष्ण घेऊन खांदी । नाचत ऐक्यतालें तिहीं छंदीं ।
चुको नेदी समानबुद्धी । नाना छंदीं नाचत ।।
देहाभिमाने घेतली नोवरी । दावित नाना छंदकुसरी ।
द्वंद्वतालातें सांवरी । देतसे भोंवरी भवस्वर्गी ।।
बोध नाचत घेऊनि कृष्ण । नोवरी घेऊनि देहाभिमान ।
आपुलाले पक्षीं जाण । दोघेजण नाचती ।।

घेंडा नाचवण्यासाठी वधू-वरे ही लहान वयाची असली पाहिजेत. पूर्वी ती सर्रास तशी असत. त्यामुळे घेंडा नाचवणे हा एक कौतुकाचा विषय असे. सांप्रत बालविवाहाची प्रथा नाहीशी झाल्यामुळे हा सोहळाही प्रचारातून गेला आहे. [ ल. वि. सो.; म. ज्ञा. को.; ए. द. १ ]

**घेड** एक अस्पृश्य गणली गेलेली जात. या लोकांची वस्ती मुख्यत्वे महाराष्ट्र, गुजरात व राजस्थान या प्रदेशांत आहे. हे लोक स्वतःला क्षत्रिय मानतात; पण महार-मांगांप्रमाणेच हेही अनार्य असावे. राजस्थानातील घेड लोकांत चावड, चौहान वगैरे. नावे आहेत. त्यावरून ते अंशतः राजपूत बीजाचे असावे, असे वाटते. यांच्यांत चौदा पोटभेद असून, अनेक कुळे आहेत. त्यांतील मातंग कुळाचे लोक सर्वश्रेष्ठ मानले जातात.

पूर्वी हे लोक जाडेभरडे कापड विणणे, ओझी वाहणे, वाट दाखविणे, इ. उद्योग करीत. सांप्रत हे शेतात किंवा गिरणीत मजुरी करतात. मोठ्या शहरातील रस्ते झाडणे, संडास साफ करणे ही कामेही घेडच करतात. खेडेगावात मेलेली गुरे ओढून नेण्याचे कामही यांच्याकडेच असते.

**विवाहप्रथा–** यांचे विवाह प्रौढपणी होतात. एका पोटभागातील घेड दुसऱ्या पोटभागातील लोकांशी विवाहसंबंध करीत नाहीत. लग्न वधूच्या घरी लागते. त्या वेळी वराचे आईबाप तिथे जात नाहीत. लग्न लावायला गारुड जातीचे उपाध्ये असतात. वधू-वरांनी दिव्याभोवती प्रदक्षिणा घालणे, हा लग्नातला मुख्य विधी असतो. या लोकांत वधूसाठी देज घेण्याची चाल आहे.

**प्रसूतिप्रथा –** प्रसूती नीटपणे व्हावी, या हेतूने कुलदेवतेला नवस बोलण्याची प्रथा आहे. गरोदर स्त्रीच्या मस्तकाभोवती एक भांडे ओवाळून 'लवकर सुटका झाली, तर हे भांडे तुला अर्पण करू' असे देवीला म्हणतात. पण त्यांना भुताखेतांचे भय अधिक वाटत असल्यामुळे अशा वेळी ते बहुधा त्यांनाच शरण जातात. त्यासाठी चांदीचा गोफ गरोदर स्त्रीच्या मस्तकाभोवती फिरवतात. ती त्याला स्पर्श करून, त्याच्या किंमतीचे द्रव्य भुतांना अर्पण करण्याचे कबूल करते. नवस फलद्रूप झाला, तर सव्वा रुपयाचा शिरा चव्हाटयावर नेऊन ठेवतात.

मुलगा जन्माला आला, तर पितळी थाळी वाजवून शुभ वर्तमान जाहीर करतात. मुलगी झाली, तर मात्र सूप वाजवतात. नाळ कापल्यानंतर ती बाळंतिणीच्या खोलीतच बाजेच्या खुराखाली पुरतात. नाळेबरोबर एक नाणे व एक सुपारी या वस्तूही पुरतात. काही लोक घराजवळच अंगणात खड्डा खणून त्यात नाळ पुरतात आणि वर एक मोठा दगड ठेवतात. कुत्र्यामांजराने किंवा एखाद्या दुष्ट स्त्रीने नाळ पळवून खाल्ली, तर मुलाला किंवा मातेला धोका पोचतो, म्हणून त्या नाळेची एवढी काळजी घेतली जाते.

सटीच्या दिवशी बाळंतीण रंदाल मातेची पूजा करते. मग ती सात प्रकारची धान्ये व सात भाज्या जमवून तयार केलेले अन्न खाते. या दिवशी तिच्या खोलीत प्रथमच दिवा लावतात. नंतर मुलाला आंगडे घालतात. बापाला या दिवशीच प्रथम मुलाचे तोंड पाहायला मिळते.

घरातल्या माणसांचा सुवेर सातव्या दिवशी संपतो. पण बाळंतिणीला मात्र सव्वा महिना सुवेर पाळावा लागतो. तो संपल्यावर एखादा चांगला दिवस बघून तिला स्नानासाठी विहिरीवर नेतात व तिथे नारळ, सुपारी व पैसा या वस्तू ठेवतात. नारळाचे खोबरे प्रसाद म्हणून वाटतात.

प्रत्येक घेड मनुष्याला गुरू असावा लागतो. ज्याला गुरू नसेल, तो पापी होय आणि धरणीला त्याचा भार सोसत नाही, अशी त्यांची समजूत आहे. म्हणून मुलाला वयाच्या पाचव्या वर्षीच गुरुदीक्षा देतात. त्या वेळी गुरू मुलाच्या कानात फुंक मारून त्याला उपदेश करतो व आपल्या पंथाचे चिन्ह त्याच्या कपाळावर रेखून त्याला तीर्थ देतो. प्राचीन काळी अशा प्रसंगी मुलाला जानवे घालण्याची चाल होती, असे सांगतात; पण ब्राह्मणांनी विरोध केल्यामुळे ती चाल बंद झाली.

हे लोक गणपती, मारुती, नरसिंह व माता यांना भजतात. यांची देवळे गावाबाहेर असतात. यांच्यांतले बरेच लोक कबीर, रामानंद व स्वामी नारायण या पंथांचे अनुयायी आहेत.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना बहुधा पुरतात. प्रेताला प्रथम स्नान घालतात. पुरुषाचे प्रेत पांढऱ्या कापडात व स्त्रीचे लाल कापडात गुंडाळतात. तिरडीच्या प्रत्येक कोपऱ्याला नारळ बांधतात. प्रेत पुरण्यापूर्वी हे नारळ फोडतात. प्रेताचे डोके उत्तरेकडे व पाय दक्षिणेकडे ठेवतात. प्रेताबरोबर पाणी, तुळशीचे पान व एखादे लहानसे नाणे पुरतात. मूठमाती दिल्यानंतर थडगे बुजवून त्यावर फुले वाहतात व तिथे एक दिवा लावून ठेवतात. त्यानंतर सर्वजण घरी जाऊन स्नान करतात आणि कपाळाला पांढऱ्या गंधाचा टिळा लावतात. हे लोक तीन दिवस सुतक पाळतात. त्या दिवसांत मृताच्या घरी अन्न शिजवत नाहीत. तिसऱ्या दिवशी मृताचे नातेवाईक पिंडदान करतात. बाराव्या दिवशी जातीच्या सर्व लोकांना मेजवानी देतात. श्राद्धही करतात. दिवाळीच्या दिवसात मृतांसाठी कावळ्यांना अन्न घालतात. [म. ज्ञा. को.; मुं. इ. जा.; विदाउट द पेल – एम्. एम्. स्टिव्हनसन, १९३०]

## घेडा

कोकणात नवरामुलगा वधूगृही जायला निघाला, की त्याच्याहून वयाने लहान असा एक मुलगा त्याच्यासारखाच वरवेष करून त्याच्याबरोबर जात असतो, त्याला घेडा म्हणतात. वधूपिता वराची मधुपर्क पूजा करताना त्याचीही पूजा करतो व त्याला तूपसाखरेचा द्रोण व दक्षिणा देतो. त्यानंतर घेडा आपली जागा सोडून बाजूला होतो. मग नवरा मुलगा लग्नासाठी बोहल्यावर उभा राहतो.

'कुलाय कन्याप्रदानम्' = कन्या द्यायची ती कुळातल्या सर्व पुरुषांना द्यायची, अशी प्राचीन काळी रूढी होती. एकाची पत्नी ती सर्व भावांची पत्नी, अशी प्रथा काही जातींत आजही आहे. कालांतराने ज्याला मुलगी दिली, तोच पती, अशी रूढी निर्माण झाली. पण धाकटे बंधू मोठ्या भावजयीवरचा हक्क सोडायला तयार होईनात. मग त्यांना दक्षिणा देऊन, त्यांची पूजा व संभावना करून, त्यांचा वधूवरचा हक्क काढून घेण्याची प्रथा पडली. घेडा हा त्या प्रथेचाच अवशेष असावा.

## घोंडिलजग्या

महाराष्ट्रातला एक लौकिक पर्जन्यविधी. पावसाला उशीर झाला किंवा अवर्षण पडले, म्हणजे हा विधी करतात. त्यासाठी कैकाडी जातीच्या मुलाला नागवा करून त्याचा करदोटा कापतात व तो एका मातीच्या मूर्तीवर ठेवतात. मग तो मुलगा ती मूर्ती डोक्यावर घेऊन 'घोंडिलजग्या पौसजग्या' असे म्हणत गावात घरोघर हिंडतो. लोक त्या मूर्तीवर पाणी घालून त्या मुलाला धान्य देतात. या विधीमुळे पाऊस पडतो, अशी अनेकांची श्रद्धा आहे.

## घोडिया

एक आदिवासी जमात. या लोकांची मुख्य वसती ठाणे व सुरत या जिल्ह्यांत आहे. यांच्यांत इतर अनेक जातींचे लोक समाविष्ट झाले असून, अजूनही अन्य जातींच्या माणसांना हे आपल्यांत घेतात. हे लोक ठेंगणे असले, तरी अंगाने मजबूत व चपळ आहेत. पूर्वी हे फिरती शेती करीत; पण आता स्थायिक झाले आहेत. त्यांना स्वतःची अशी शेती फार थोडी असते. त्यामुळे बहुतेक जण दुसऱ्यांच्याच शेतात मजुरी करतात.

हे लोक बांबूच्या झोपड्यात राहतात. तांदूळ व वाल हे यांचे मुख्य अन्न होय. दूध, अंडी, मांस, मासळी हे पदार्थही यांच्या आहारात असतात.

यांची जातपंचायत असते. गावाचा नाईक हाच सरपंच असतो. त्याचा अधिकार वंशपरंपरेने चालतो. वयात आलेल्या सर्व माणसांना पंचायतीत बसण्याचा अधिकार असतो. यांच्यांत देवकप्रथा आहे. त्यांची काही कुलनामे देवकांवरून पडलेली आहेत.

**विवाहप्रथा** – यांच्यांत आते-मामेबहिणीशी लग्न करीत नाहीत. मुलीसाठी देज द्यावे लागते. यांची लग्ने फक्त गुरुवारीच होतात. लग्न वराच्या घरी करतात. वधूवरांच्या पदरांना गाठ मारणे, हाच मुख्य लग्नविधी असतो. जातीतल्या दोन स्त्रिया त्यांचे पौरोहित्य करतात. त्यांना वेर्णो म्हणतात. त्या दोरो नावाचा चांदीचा गोफ वधूच्या गळ्यात बांधतात.

**देवधर्म** – हे लोक भरमदेव, हरियादेव, शामळदेव, दिवाळी उनई, काकबलियो, मावली, इ. देवतांना भजतात. जखाई व जोखाई ही यांची कुलदैवते आहेत.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात अथवा पुरतात. प्रेतयात्रा वाजतगाजत नेतात. तिसऱ्या दिवशी राखेवर ताडी शिंपडून मग ती गोळा करतात. पंधराव्या दिवशी भगताच्या

हले मृताच्या नावाचा एक दगड गावाबाहेर पुरतात व त्याची पूजा करतात. दिवाळीत त्याला कोंबडे किंवा बकरे बळी देतात. दसऱ्याच्या दिवशी मृताप्रीत्यर्थ कावळ्यांना अन्न घालतात. [ म. ज्ञा. को.; मुं. इ. जा.; ट्रा. ला. गु. ]

**धोबी** भारतात सर्वत्र आढळणारी एक जात. उ. प्रदेश, बंगाल, बिहार, ओडिसा, मध्य प्रदेश व राजस्थान या भागांत, त्यांची वसती बरीच आहे. धोबी हे नाव या लोकांना त्यांच्या कपडे धुण्याच्या धंद्यावरून मिळाले आहे. यांना वरठी, वरुळा, रजक, परीट, धोबा, इ. अन्यही नावे आहेत. यांच्यांत काही मुसलमानही आहेत. मध्य प्रदेशात निरनिराळ्या प्रांतांतून जे धोबी आले, त्यांना त्या त्या प्रांतांवरून नावे मिळाली आहेत. उदा० माळवी, बुंदेलखंडी, कनौजिया, उदेपुरिया, इत्यादी. धोब्यांच्या या पोटजाती मानल्या जातात. हे लोक महार, मांग, चांभार, इ. पूर्वास्पृश्य लोकांचे कपडे धूत नाहीत. सांप्रत हे शेती वगैरे इतर व्यवसायही करू लागले आहेत.

**विवाहप्रथा**–यांच्यांत आतेमामेभावंडांचे लग्न होते. वधू-वर वयात आल्यानंतर लग्न करतात. देज घेण्याची चाल आहे, पण देज घेणे कमीपणाचे मानले जाते. मुलीचा बाप गरीब असेल, तर जातवाले वर्गणी जमवून तिचे लग्न करतात. ओडिसातील धोबी मुलींची लग्ने त्या वयात येण्यापूर्वी करतात. ते जमले नाही, तर वयात आलेल्या मुलीचा प्रथम तलवारीशी किंवा वृक्षाशी विवाह लावतात व मग जमेल तेव्हा योग्य वराशी तिचे लग्न करतात. लग्नाच्या पौरोहित्यासाठी ब्राह्मणाला बोलावतात. वधू-वरांनी होमाला प्रदक्षिणा घालणे, हा मुख्य विधी असतो. ओडिसातील धोबी लोकांचा विवाहविधी जरा वेगळा असतो. लग्नाच्या आदल्या दिवशी लग्न झालेल्या, पण वयात न आलेल्या मुली सात घरी जाऊन पाणी आणतात. लग्नाच्या दिवशी पहाटे वधू–वर त्या पाण्याने स्नान करतात. नवरा मुलगा वधूच्या हातात कंकण बांधतो. नंतर वधूचे डावे व वराचे उजवे मनगट एकत्र बांधतात. मग जमलेले लोक वधूवरांवर अक्षता टाकतात. मध्य प्रदेशातील धोब्यांच्या लग्नसमारंभात नाचगाण्यांना खूप महत्त्व असते. त्यात एखादा पुरुष वधूवेष करून नाचतो. त्यामुळे वधूला कोणाची वाईट नजर बाधत नाही, अशी त्यांची समजूत आहे.

यांच्यांत घटस्फोट व विधवाविवाह रूढ असला, तरी लोकांना ती गोष्ट फारशी आवडत नाही. विधवा आपल्या धाकट्या दिराशी लग्न करू शकते.

**प्रसूतिप्रथा**– मुलाचा सुवेर सात दिवस व मुलीचा पाच दिवस पाळतात. राजस्थानात सव्वा महिना सुवेर धरतात.

**देवधर्म** – घटोइया हा यांचा मुख्य देव होय. याचे स्थान धोबीघाटावर असते. आषाढ मासात त्याला मद्याचा नैवेद्य दाखवतात. कपडे धुण्यापूर्वी दगडाला नमस्कार करतात. सर्प, मगर यांच्यापासून रक्षण व्हावे, म्हणून त्याची व नदीचीही प्रार्थना करतात. दसऱ्याला त्या दगडाची पूजा करतात. मृत धोब्यांचे आत्मे त्या दगडाजवळ वावरतात, त्यामुळे त्यात विशेष सामर्थ्य असते, अशी धोब्यांची श्रद्धा असते.

काही धोबी विष्णूचे भक्त आहेत, तर काही कालीभक्त आहेत. होळी व दिवाळी हे यांचे मुख्य उत्सव होत.

काही उच्च जातींचे लोक विवाह-समारंभात पायघड्या घालण्यासाठी धोब्याला बोलावतात. काही लोक लग्नानंतर वधूला घेऊन धोब्याकडे जातात. तिथे धोबीण वधूला विडा देते. हा विडा फार शुभ मानतात. त्याला सोहाग असे नाव आहे. त्या प्रसंगी धोबिणीला लुगडे-चोळी व एक रुपया देतात. काही ठिकाणी न्हावी व धोबी वधू-वरांना कडेवर घेऊन नाचतात; तर कुठे धोबी वधूच्या हातात कंकण बांधतो.

धोब्यांची जातपंचायत असते. सरपंच सोनवाणी कुळातला असतो. त्याला राजा म्हणतात. निषिद्ध पशुपक्ष्यांचे मांस खाणे, हीन जातींच्या लोकांचे कपडे धुणे, जातिनियम मोडणे, अनैतिक वर्तन करणे, जनावरांशी क्रूरपणे वागणे, या कृत्यांबद्दल पंचायत धोब्यांना दंड करते. जातिबहिष्कृतांनी तीन जेवणे दिल्यावर त्यांना जातीत परत घेतात.

**मर्तिकप्रथा**– हे लोक मृतांना पुरतात किंवा जाळतात. राजस्थानात एक वर्षाच्या आतील मुलाचे प्रेत पुरतात, इतरांना जाळतात. त्यापूर्वी प्रेताला कढत पाण्याने स्नान घालतात. कुटुंबातील पुरुष नवव्या दिवशी मुंडन करतात. अकराव्या व बाराव्या दिवशी जातीला जेवण घालतात. पिंडदान व अस्थिविसर्जन करण्याचीही चाल यांच्यांत आहे. हे लोक मासिक किंवा वार्षिक श्राद्धही करतात. काही ठिकाणी फक्त तीन दिवस सुतक पाळतात. पाहा– परीट. [ म. ज्ञा. को.; का. ट्रा. स. इं.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; सो. ला. रा. ]

**धौती** हठयोगातील षट्कर्मांपैकी एक कर्म. शरीरातील आंतडी, घसा, इ. अवयव किंवा भाग स्वच्छ करण्यासाठी धौतीची क्रिया करतात. जलधौती, वासधौती व दंडधौती असे या क्रियेचे मुख्य तीन प्रकार सांगितले आहेत.

**जलधौती** – भोजन झाल्यावर किंवा प्रभातकाळी आकंठ पाणी पिऊन दृष्टी वर करणे आणि ते पाणी ओकून टाकणे हा जलधौतीचा विधी आहे. त्यामुळे शरीरातील कफ व पित्त यांमुळे उत्पन्न होणारे विकार नष्ट होतात.

**वासधौती**– वस्त्राच्या साहाय्याने केल्या जाणाऱ्या धौतीला हे नाव आहे. या विषयीचा श्लोक असा–

चतुरङ्गुलविस्तारं हस्तपञ्चदशायतम् ।
गुरूपदिष्टमार्गेण सिक्तं वस्त्रं शनैर्ग्रसेत् ॥

अर्थ–चार बोटे रुंद व पंधरा हात लांब अशी ओलसर वस्त्र-पट्टी घेऊन ती गुरूपदिष्ट मार्गाने हळू हळू गिळावी. ही पट्टी गिळीत असतांना तिचे एक टोक घट्ट धरून ठेवतात व पट्टी गिळून झाल्यावर ती हळू हळू ओढून बाहेर काढतात. या क्रियेने कासश्वासाचे दोष नष्ट होतात.


वासधौती

**दंडधौती**–हिची प्रक्रिया पुढील श्लोकात सांगितली आहे–

रम्भादण्डं हरिद्रादण्डं वेत्रदण्डं तथैव च ।
हृन्मध्ये चालयित्वा तु पुनः प्रत्याहरेच्छनैः ॥

अर्थ– केळीचा दांडा किंवा हळदीच्या पानाचा दांडा किंवा बारीक वेत घेऊन घशातून पोटात घालावा व ढवळून तो पुनश्च हळूहळू बाहेर काढावा.

या धौतीने हृद्रोग नष्ट होतात असे सांगितले आहे. सांप्रतच्या वैज्ञानिक पद्धतीने संशोधन व प्रयोग सुरू आहेत. हल्ली त्या कामी रबरी नळीचा उपयोग करतात. खाण्याचा सोडा किंवा साधे मीठ घातलेले कोमट पाणी शेर-अच्छेर जितके शक्य असेल तितके प्यायचे व रबरी नळी तोंडातून जठरात न्यायची. वक्रनलिकेच्या तत्त्वाने मग ते सर्व पाणी जोराने बाहेर पडते.


दंडधौती

घेरंडसंहितेत धौतीचे पुढील प्रकार सांगितले आहेत–

अन्तर्धौतिर्दन्तधौतिर्हृद्धौतिर्मूलशोधनम् ।
धौतिं चतुर्विधां कृत्वा घटं कुर्वन्तु निर्मलम् ॥

अर्थ– अंतर्धौती, दंतधौती, हृदयधौती व (दंतमूल, जिह्वामूल, इ.) मूलशोधन धौती अशी चतुर्विध धौती करून शरीर निर्मल करावे.

मात्र धौती, बस्ती, इ. षट्कर्मांचे प्रकार हे केवळ ग्रंथ वाचून कोणी करू नयेत; त्यासाठी योग्य गुरूचे मार्गदर्शन घ्यावे, असे हठयोगात स्वच्छपणे सांगितले आहे (हठयोग. प्र. १.१४.). [श्रीगुरुदत्तयोग-श्री. खानवेलकर, १९५७]

**ध्यान** अष्टांग योगाचे सातवे अंग. यमनियमादी अंगांचा यथावत अभ्यास केल्यानंतर ध्यानाचा अभ्यास करायचा असतो. ध्यानाची अंतिम अवस्था म्हणजे समाधी होय. ध्यान शब्दाच्या काही व्याख्या अशा–'तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्'= (ज्या ठिकाणी धारणा केली असेल,) त्या ठिकाणी प्रत्ययाची (अनुभवाची) एकतानता करणे म्हणजे ध्यान होय (पातंजल सू. ३.२). सर्वदर्शनसंग्रहाच्या पातंजल योगदर्शन प्रकरणात पौराणिकांची म्हणून एक ध्यानव्याख्या सांगितली आहे, ती वरील व्याख्येशी जुळणारी अशीच आहे.

तद्रूपप्रत्ययैकाग्र्या सन्ततिश्चान्यनिःस्पृहा ।
तद्ध्यानं प्रथमैरङ्गैः षड्भिर्निष्पाद्यते तथा ॥

अर्थ– अन्य विषयांची स्पृहा नाहीशी करून ध्येय वस्तूच्या ठिकाणी तद्रूप प्रत्यय हेच एकमेव अग्र असलेला असा बुद्धीचा धारावाही प्रवाह म्हणजे ध्यान होय. हे ध्यान पूर्वीच्या यमनियमादी सहा अंगांच्या अभ्यासाने निष्पन्न होते.

'ब्रह्मात्मचिन्ता ध्यानम्' = मी ब्रह्म आहे अशा प्रकारचे (अखंड) चिंतन करणे म्हणजे ध्यान होय, असे वेदांत्यांचे ध्यानलक्षण आहे. 'रागोपहतिर्ध्यानम्' = राग नावाच्या विकाराचा नाश होणे म्हणजे ध्यान होय, अशी सांख्यांची व्याख्या आहे (सां. सू. ३.३०).

विशिष्ट देशावर स्थिर केलेल्या चित्ताला ध्यानामध्ये कोणती तरी भावना आलंबनार्थ घ्यायची असते आणि त्या भावनेचा प्रत्यय म्हणजे अनुभव विलीन होऊ न देता पुढच्या पुढच्या क्षणात तो टिकवायचा असतो. तसा तो टिकवणे ही प्रत्ययाची एकतानता होय. ही एकतानता दृढ होऊ लागली म्हणजे त्या अवस्थेला ध्यान म्हणतात. धारणेने स्थिर झालेल्या चित्ताचा

विशिष्ट वृत्तिरूप परिणाम धारावाही पद्धतीने टिकवून धरणे ही गोष्ट ध्यानात महत्त्वाची असते.

गरुड पुराणात याच अर्थाचे विवरण करणारा एक श्लोक दिला आहे, तो असा–

**ध्येये सक्तं मनो यस्य ध्येयमेवानुपश्यति ।**
**नान्यं पदार्थं जानाति ध्यानमेतत् प्रकीर्तितम् ।**

**अर्थ**– ज्याचे मन ध्येय विषयाच्या ठिकाणी आसक्त होते, ध्येय विषयच सतत पाहत राहते आणि दुसऱ्या कोणत्याही पदार्थाला जाणत नाही, अशा अवस्थेला ध्यान म्हणावे.

सगुण ध्यान, निर्गुण ध्यान, शरीरांतर्गत चक्रावर केलेले ध्यान, एखाद्या तत्त्वावर किंवा श्लोकार्थावर केलेले ध्यान, असे ध्यानाचे अनेक प्रकार आहेत. साधकाची जी गुरुपरंपरा असेल तदनुसार त्याने ध्यानाभ्यास करायचा असतो.

ध्यानाचे विविध प्रकार निरनिराळ्या ग्रंथांत दिलेले असून, सर्व धर्मांत व पंथांत येन केन प्रकारेण ध्यानप्रक्रिया सांगितलेली असतेच. ध्यानानेच देहरूपी घरात आत्मज्ञानाचा दीप उजळतो. त्यातूनच पुढे सविकल्प किंवा निर्विकल्प, तशीच संप्रज्ञात किंवा असंप्रज्ञात समाधी साधते.

**सगुण ध्यान**–सगुण ध्यान आणि निर्गुण ध्यान हे ध्यानाचे दोन मुख्य प्रकार होत. त्यांपैकी सगुण ध्यान पाच प्रकारचे आहे. विष्णुध्यान, अग्निध्यान, सूर्यध्यान, भ्रूध्यान व पुरुषध्यान अशी त्यांची नावे आहेत. त्यांचे वर्णन याज्ञवल्क्य संहितेत पुढीलप्रमाणे केलेले आहे–

**विष्णुध्यान**– शरीरात मणिपूरचक्र (कमल) हे कंदस्थानापासून निघाले आहे. त्याला प्राणायामाने ऊर्ध्वमुख करून प्रफुल्लित करावे. त्या कमळात शंख-चक्र-गदा-पद्मधारी, नीलवर्ण, पीतांबरधारी, प्रसन्न व मंद हास्याने युक्त अशा श्रीविष्णूची स्थापना करावी आणि त्या विष्णूचे एकाग्र चित्ताने 'तो मीच आहे' अशा अभेदाने ध्यान करावे.

**अग्निध्यान**–हृदयकमलात तेजोवलयाने युक्त आणि ज्याच्या तीन शिखा (ज्वाला) निर्वातीच्या दीपाप्रमाणे निश्चल आहेत, अशा वैश्वानर नामक महाग्नीच्या ठिकाणी विराजमान असणाऱ्या अक्षर परमात्म्याला हृदयकमलात कल्पून त्याचे अभेदाने ध्यान करावे.

**सूर्यध्यान**– चतुर्भुज, सर्वलोकसाक्षी व जगाला प्रकाशित करणारा असा जो आत्मरूप भगवान सूर्य त्याला हृदयाच्या ठिकाणी कल्पून त्याचे ध्यान करावे.

**भ्रूध्यान**– देहाच्या मध्यभागापासून मस्तकापर्यंत निश्चलपणे स्थित असणाऱ्या, जगताचे कारण, अव्यक्त व प्रकाशरूप अशा आत्म्याला दोन्ही भुवयांच्या मध्ये कल्पून अभेदध्यान करावे.

**पुरुषध्यान**– दशम द्वारात सहस्र दलांनी युक्त असे एक अधोमुख कमल आहे. त्यातून अमृतधारा खाली गळत असतात. त्या धारा हृदयस्थ तेजोमय अशा पुरुषाच्या अंगावर पडत असतात. त्या अमृतधारांनी सिंचित असा तो सच्चिदानंदरूप परमपुरुष मीच आहे, अशा अभेदाने हृदयकमलात त्याचे ध्यान करावे.

घेरंड संहितेत (६.१) ध्यानाचे पुढील तीन वेगळे प्रकार सांगितले आहेत, ते असे–

**स्थूलं ज्योतिस्तथा सूक्ष्मं ध्यानस्य त्रिविधं विदुः ।**
**स्थूलं मूर्तिमयं प्रोक्तं ज्योतिस्तेजोमयं तथा ॥**
**सूक्ष्मं बिन्दुमयं ब्रह्म कुंडली परदेवता ॥**

**अर्थ**– स्थूल, ज्योती व सूक्ष्म असे ध्यानाचे तीन प्रकार आहेत. स्थूल हे मूर्तिमय, ज्योती हे तेजोमय व सूक्ष्म हे बिंदुमय असते. सूक्ष्म ध्यानाने कुंडलिनी ही श्रेष्ठ देवता जागृत होते (व ब्रह्मसाक्षात्कार घडतो.)

**निर्गुण ध्यान**– याज्ञवल्क्य संहितेत निर्गुण ध्यानाचे वर्णन केले आहे, ते असे– ज्योतिर्मय, शुद्ध, कूटस्थ, आनंदस्वरूप, अमूर्त, अज, अव्यय, अंतर्बहिस्थित, सर्वतोमुख व सर्वद्रष्टा अशा परब्रह्म परमात्म्याचे तदात्म भावनेने ध्यान करणे, याला निर्गुण ध्यान असे म्हणतात. याविषयी ध्यानबिंदूपनिषदात (२२) म्हटले आहे, ते असे–

**आत्मानमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिम् ।**
**ध्याननिर्मन्थनाभ्यासादेव पश्येन्निगूढवत् ॥**

**अर्थ**– आत्मदेहाला खालची अरणी करावी व प्रणवाला उत्तर (वरची) अरणी करावी आणि ध्यानरूप मंथनाच्या अभ्यासाने निगूढ अशा परमात्म्याचा साक्षात्कार करून घ्यावा.

**हृदयस्थ ध्यान**– आपल्या हृदयकमलाच्या ठिकाणी परमेश्वराची मूर्ती कल्पून तिचे ध्यान करणे याला हृदयस्थ ध्यान असे म्हणतात. ध्यानयोगातील अत्यंत श्रेष्ठ अशी ही विद्या आहे. ही विद्या गूढ, श्रेष्ठ, सद्यःफलदायी; पण गुरुकृपेशिवाय प्राप्त न होणारी अशी आहे. हिलाच दहरविद्या असे छांदोग्य उपनिषदात म्हटले आहे. हे ध्यान आपल्या स्थूल हृदयात करायचे नसते; तर दोन्ही स्तनांच्या मधील खळगा म्हणजेच स्थूल हृदयाच्या उजव्या बाजूस असलेल्या पोकळीत करायचे असते. ध्यानबिंदूपनिषदात (१९) याविषयी पुढील श्लोक आहे–

**हृत्पद्मकर्णिकामध्ये स्थिरदीपनिभाकृतिम् ।**
**अङ्गुष्ठमात्रमचलं ध्यायेदोङ्कारमीश्वरम् ॥**

**अर्थ**– स्थिर दीपज्योतीच्या आकाराने असलेल्या अचल, अंगुष्ठमात्र अशा ओंकारस्वरूप ईश्वराचे हृदयकमलाच्या कर्णिकेत ध्यान करावे.

'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति' = हे अर्जुना

ईश्वर हा सर्व भूतांच्या हृदयदेशात वास्तव्य करतो, असे भगवंताने म्हटले आहे (गीता १८.६१). त्याला धरून बहुतेक सर्व संतांनीही हृदयातच परमात्म्याचे ध्यान करावे आणि तिथेच त्याला पाहावे, असे सांगितले आहे. याविषयी एकनाथांचा एक अभंग आहे, तो असा–

हृदयस्थ जया नाही ठावा देव ।
पूजा करिती वाव । सर्व भावे ।।
जाणावा अंतरीं मानावा हृदयीं ।
पाहावा सर्वांतरी । परमात्मा ।।
एका जनार्दनी व्यापक सर्वांठायी ।
भरुनि उरला ठायी । जेथे तेथे ।।

ध्यानाविषयी प्रा. खानवेलकर म्हणतात, ते असे– ध्यानाचा सर्वश्रेष्ठ मार्ग म्हणजे उत्तमोत्तम पूजाद्रव्यांनी केलेली हृदयस्थ परमात्म्याची मानसपूजा होय. असे ध्यान करता करता ज्या वेळी वृत्ती तदाकार होते, त्या वेळी ध्यान सिद्ध होते आणि साधकाला अनेक दिव्य अनुभव येतात. गुरूने केलेल्या शक्तिपातामुळे कुंडलिनीजागृतिविषयक जे अनेक विपुल उत्तमोत्तम अनुभव येतात, तसाच हा प्रकार असतो.

**बौद्धांची ध्यानप्रक्रिया–** गौतम बुद्धाने आपल्या आर्य अष्टांगिक मार्गात प्राणायामाची प्राचीन पद्धती कायम ठेवली असली, तरी समाधिसाधनेत आपल्या तत्त्वज्ञानाला अनुकूल असे पुष्कळच फेरफार केले. अभिभ्वायतनांच्या योगे (नैसर्गिक स्थान किंवा देखावा) सृष्टिसौंदर्यावर ध्यान करण्याचा प्रकारही बुद्धानेच प्रचलित केला व समाधिमार्गात विविधता आणली.

बौद्ध धर्मात केवळ शुभ वस्तूवर किंवा शुभ संकल्पावरच ध्यान करण्याची पद्धत नाही. ते अमंगल वस्तू व अशुभ संकल्प, जगाची व जीवनाची अनित्यता, जरा, रोग, मृत्यू, इ. अशुभ गोष्टी यांवरही ध्यान करतात. दहा अशुभे म्हणजे मृत शरीराच्या दहा भिन्न अवस्था होत. त्यावर ध्यान करणे याला ते अशुभ भावना म्हणतात. अशा मृत शरीरांपैकी एखादे शरीर दिसले असता ते नीट पाहून घेऊन व पुढे तेच दृश्य डोळ्यांसमोर उभे करून चिंतन केले असता, अशुभ भावना साध्य होते, असे बौद्ध म्हणतात.

याशिवाय कामवासनेचा नाश होण्यासाठी भिक्षूने आपल्याला आकृष्ट करणाऱ्या तरुणीला जराजर्जर स्वरूपात व मरणप्राय अवस्थेत कल्पून किंवा तिचे प्रेत स्मशानात जळत असल्याचे कल्पून तसे ध्यान करावे, असेही काही बौद्ध ग्रंथांत सांगितले आहे. मात्र ही गोष्ट दिसायला सोपी असली, तरी परिणामाला भयावह आहे. अशुभ भावनेवर ध्यान करणारा साधक तितक्याच अधिकाराचा पाहिजे आणि त्याला मार्गदर्शक गुरूही तितकाच चांगला मिळाला पाहिजे. अन्यथा विपरीत परिणाम घडून येतात. बौद्ध वाङ्मयातच अशा विपरीत परिणामांचे उदाहरण आहे. बुद्धाने अशुभ भावनेवर ध्यान करण्यास सांगितल्यावरून अनेक भिक्षूंनी तसे केले आणि त्याचा परिणाम इतका भयानक झाला, की त्या भिक्षूंना जीवन व जगत भयाण, भकास, अमंगल व घृणास्पद वाटून त्यांनी धडाधड आत्महत्या केल्या. बुद्धाला हे समजले आणि त्याने उरलेल्या भिक्षूंची एक सभा तत्काळ भरवून त्यांना अशुभ ध्यान बंद करायला लावले आणि शुभ ध्यानाकडे प्रवृत्त केले.

बौद्धांच्या ध्यानमार्गात अनेक प्रकारची कसिणे सांगितली आहेत. कसिणे हा पाली शब्द कृत्स्न या संस्कृत शब्दापासून आला आहे. कसिण म्हणजे मोठ्या, व्यापक वस्तूची लहान प्रतिकृती किंवा तिचे प्रतीक होय. पृथ्वी, आप, तेज, वायू, नील, आलोक, परिच्छिन्नाकास, इ. अनेक कसिणे बौद्धांनी सांगितली आहेत. उदा० अकृत्रिम पृथ्वीचे ध्यान करणे शक्य नसल्यास साधकाने कृत्रिम पृथ्विमंडळ तयार करावे. ते एक वीत व चार अंगुळे व्यासाचे असावे. त्यासाठी तांबूस रंगाची माती घ्यावी. त्याच्यात गवताच्या काड्या किंवा बारीक खडे राहू देऊ नयेत. नंतर ते घासून पुसून साफ करावे.

वरीलप्रमाणे एखादे कसिण घेऊन त्यावर ध्यान करावे व हळू हळू कसिणाची मर्यादा वाढवीत विश्वमर्यादेपर्यंत ते ध्यान न्यावे, असे म्हटले आहे.

बौद्धांच्या चंद्रदीपसमाधिसूत्रात ध्यानाचे फायदे पुढीलप्रमाणे सांगितले आहेत – ध्यानाने सर्व इंद्रियांना शांती मिळते. हृदयात दयेचा प्रादुर्भाव होतो. असा साधक मग सर्व प्राणिमात्रांकडे आपली भावंडे या नात्याने पाहू लागतो. त्याच्या चित्तातले राग, द्वेष व अहंकार नष्ट होतात. ध्यानातूनच त्याला जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून सुटण्याचा मार्ग सापडतो.

**ध्यानाभ्यास –** ध्यानाभ्यास करणाऱ्या साधकाने आपले शरीर व मन योग्य प्रकारे शुद्ध करून ध्यानधारणेचा अभ्यास केला, तर त्याला उत्तम लाभ होईल. शक्य तितके पवित्र वातावरण असलेल्या खोलीत ध्यानाभ्यास करावा. आपली ध्यानाची जागा नित्य एकच असावी. त्याच जागेवर नित्य ध्यान होत असल्याने तेथे गेल्याबरोबरच आपल्या चित्तात पवित्र व गंभीर विचारांचा उदय होतो. ज्या वेळी आपण ध्यानाभ्यास करतो त्या वेळी आपल्या अंगावरचे कपडे स्वच्छ असावे. शक्यतो ते आपण स्वतः धुतलेले असावेत. ते फार घट्ट नसावे. आपले आसनही स्वच्छ, पवित्र व मृदू असावे. ध्यानाभ्यासाची वेळही ठराविक असावी. त्यामुळे ती वेळ झाली, की आपले चित्त आपणांला त्या जागेवर खेचतेच. अन्य ठिकाणी आपण बेचैन

होतो. पहाटेची वेळ ध्यानाभ्यासाला अत्यंत सुलभ; पण नच जमले तर सायंकाळी हवा थंड झाल्यावर ध्यान करावे किंवा रात्रीच्या जेवणानंतर तास–दीड तासाने ध्यानाभ्यास करावा. सात्त्विक व पवित्र असा बेताचा आहार, स्वच्छ वस्त्र, पवित्र वातावरण, पवित्र ग्रंथांचे वाचन, सत्संगती, उत्तम व उच्च विचार या साधनांची शिदोरी बरोबर घेऊन ठराविक वेळी, ठराविक जागेवर, ठराविक आसनावर योग्य स्थितीत, पाठीचा कणा ताठ राहील अशा बेताने बसावे. एखादी मंद वासाची सुवासिक उदवत्ती लावावी आणि शक्यतो अंधार करून, पण मोकळी हवा राहील, अशा बेताने दारे बंद करून स्वस्थ बसावे. मन स्थिर करण्यासाठी दहा-पाच प्राणायाम करावेत आणि सद्गुरूचे, परमेश्वराचे स्मरण करून अष्टदिशांना नमस्कार करून अष्टदिशांतील पवित्र संस्कारांना आवाहन करावे आणि अपवित्र व घातक संस्कारांना घालवून द्यावे. अशा रीतीने दिग्बंधन केल्यावर ध्यानाभ्यासाला आरंभ करावा.

**ध्यानाचे फलित** – साधकाने ध्यानाकरिता बाह्य वस्तू अंगिकारून स्थूल ध्यानाला सुरवात केली असली, तरी जसजशी त्याची वृत्ती स्थिर होऊ लागेल, तसतसे त्याचे बाह्य ध्यान सुटत जाऊन, त्याचा सूक्ष्म ध्यानात प्रवेश होऊ लागेल. संकल्प, गुण, भावना, विचार यांपैकी कशाला तरी वृत्तीच्या प्रवाहाचे केंद्र अंतरात संकल्पित स्थानी करण्याचे साधले, की अभ्यासात गती होऊ लागली असे समजावे. अनुसंधान, प्रवाहाचे सातत्य या त्यांतील मुख्य गोष्टी होत. या गोष्टी साधल्या, तर आपल्या चित्तात स्थिरता येईल, चित्त दृढ होईल. अभ्यासकाळात चित्तात अनेक शुभ भावना जागृत होत असतात. त्या भावना योग्य कर्मात परिणत झाल्या पाहिजेत. त्या परिणत झाल्याने त्यांच्याच आधाराने अन्य भावनांचाही उदय होऊन, त्या भावनाही कर्मात परिणत होऊ लागतील. अशा रीतीने सद्भावना, सत्कर्म, सद्गुण यांनी जीवन उत्तरोत्तर समृद्ध होत जाईल.

ध्यान हे मोक्षाचे कारण आहे. ध्यानयोग हा साक्षात आत्मस्वरूप अनुभविण्याचा मार्ग आहे. म्हणूनच उपनिषत्कालापासून त्याचा महिमा गाजत आहे. गीतेतही ध्येय परमात्म्याच्या ठिकाणी मनाची एकाग्रता करण्यास सांगितले आहे (६·१२). छांदोग्य उपनिषदात सनत्कुमार हे ध्यानाचे महत्त्व पुढील रोचक शब्दांत नारदाला कथन करतात– पृथ्वी, अंतरिक्ष, स्वर्ग, उदक, पर्वत, देवता, मनुष्य, इ. सगळे ध्यान करतात, म्हणून त्यांना महत्त्व प्राप्त झाले आहे. मात्र ते महत्त्व म्हणजे सर्व ध्यानाच्या फलाचा एक अंशमात्र आहे. त्याप्रमाणेच जे अधम, कलहप्रिय, दुर्जन व निंदक आहेत, ते सर्व ध्यान न केल्यामुळे तसे बनले आहेत. म्हणून हे नारदा, तू ध्यानाची उपासना कर.' ध्यानाने चित्ताच्या सर्व शक्ती जागृत होतात. चित्ताची एकाग्रत होऊन एका भव्य व मंगल संकल्पाच्या ठिकाणी त्याचा लय झाला म्हणजे त्या शांत स्थितीतूनच प्रज्ञेचा उदय होतो. ध्यान हे योगाचे तर एक महत्त्वाचे अंग आहेच; पण जप, तप, पूजा, आराधना, उपासना या सर्व साधनांतही त्याची थोडचाबहुत प्रमाणात आवश्यकता असतेच. [ श्रीगुरुदत्तयोग – श्री. खानवेलकर, १९५७; विवेक आणि साधना; मा. मा. शा. ]

## ध्यानबिंदूपनिषद

एक नव्य उपनिषद. हे कृष्ण यजुर्वेदाशी संबंधित आहे. हे पद्यमय असून, त्यात १०५ श्लोक आहेत. यात ध्यानयोगाचे माहात्म्य सांगून, ध्यानाने ब्रह्मसमाधी सिद्ध झाल्यावर पूर्वजन्मीची पातके नष्ट होतात, असे सांगितले आहे. यात ॐ या प्रणवबीजाची आणि ओंकाराच्या ध्यानाची सविस्तर माहिती दिली आहे. त्यानंतर ब्रह्मा, विष्णू, रुद्र, महेश्वर व अच्युत या पाच मूर्तींचे वर्णन आहे. मग षडंग योगाचा निर्देश असून सिद्ध, भद्र, सिंह आणि पद्म ही प्रमुख योगासने वर्णिली आहेत. नंतर योगचक्रे व नाडीचक्रे वर्णून अजपा हंसविद्या सांगितली आहे.

यानंतरच्या भागात योग्याचे आचारविचार, विविध योगबंध व योगमुद्रा यांचे वर्णन आहे. त्यापुढे बीजाक्षरे सांगितली आहेत. प्राणांचे य, अग्नीचे र, पृथ्वीचे ल, जीवाचे व आणि आकाशाचे ह हे बीजाक्षर होय. प्राण व अपान यांचा अवरोध करून प्रणवाचा उच्चार केल्यावर जो नाद होतो, तो अमूर्त, वीणादंडसमुत्थित व शंखनादयुक्त असा असतो. कपालकुहरात मध्यभागी चतुर्द्वारात सूर्याप्रमाणे चमकणाऱ्या आत्मस्वरूपाचे ध्यानाने दर्शन होते आणि तिथे मनाचा लय होऊन माहेश्वरपदरूपी बिंदूचा साक्षात्कार होतो. [ सी. ग. देसाई ]

## ध्यानमुद्रा

मूर्तिशास्त्रातली एक अवस्था. ध्यान करीत असताना पद्मासन घालून व दोन्ही हातांचे तळवे उताणे आणि बोटे किंचित पसरलेली असे दोन्ही गुडघ्यांच्या वर ठेवल्याने ध्यानमुद्रा होते. या मुद्रेला समाधिमुद्रा असेही म्हणतात. एका पायावर दुसरा पाय ठेवून उजव्या ताहाचा तळवा डाव्या हाताच्या तळव्यावर ठेवून ते पायावर ठेवले, तर या मुद्रेचा वेगळा प्रकार होतो. शिव, बुद्ध व पार्श्वनाथ यांच्या काही मूर्ती अशा अवस्थेत आढळतात. [ डे. हिं. इ.; इं. बु. इ. ]

## ध्यान संप्रदाय

बौद्ध धर्माच्या महायान शाखेचा एक पोटभेद. याला झेन संप्रदाय असेही नाव आहे. ध्यान या संस्कृत शब्दाचेच झेन हे रूपांतर आहे. ध्यान करण

हेच या संप्रदायाचे वैशिष्टय होय. बुद्धाने ध्यानाच्या गूढ रहस्यांचा उपदेश महाकश्यप या आपल्या शिष्याला केला आणि महाकश्यपाने ती विद्या आनंदाला उपदेशिली. आनंदाच्या नंतर ध्यान संप्रदायाचे सव्वीस आचार्य झाले. त्यांपैकी बोधिधर्म हा शेवटचा म्हणजे अठ्ठाविसावा आचार्य होय. यानेच चीन व जपान या देशांत जाऊन तिथे ध्यान संप्रदायाचा प्रचार केला.

बोधिधर्म हा द. भारतातील कांची येथील क्षत्रिय राजा सुगंध याचा पुत्र होता. त्याने प्रज्ञातर नामक गुरूकडे चाळीस वर्षे बौद्ध धर्माचे अध्ययन केले. तो योगातही प्रवीण झाला. पुढे तो भिक्षू बनला आणि गुरूच्या आदेशानुसार इ. स. ५२० किंवा ५२६ या वर्षी चीनमध्ये गेला. चीन मधील वेई नामक राज्यातल्या शाश्वतशांती नामक बौद्ध विहारात त्याने वास्तव्य केले. तिथे त्याने नऊ वर्षे ध्यान केले. भिंतीकडे तोंड करून ध्यान करणे हे त्याच्या ध्यानोपासनेचे वैशिष्टय होते.

बोधिधर्माच्या नंतर चीनमधे ध्यान संप्रदायाचे पाच आचार्य झाले. बोधिधर्माचा चीनमधील पहिला शिष्य हुइ–के हा होय. कनफ्यूशिअसचे तत्त्वज्ञान अभ्यासलेला हा एक महापंडित होता. बौद्ध व चीनी साहित्यातही तो निष्णात होता. बोधिधर्माची योगी अशी ख्याती ऐकून तो त्याला भेटायला गेला. त्या वेळी बोधिधर्म ध्यानमग्न होता. सात दिवसपर्यंत तो बोधिधर्माच्या द्वारी तिष्ठत राहिला; पण बोधिधर्म त्याला भेटला नाही. शेवटी हुइ–केने आपला उजवा बाहू तोडून त्याच्याकडे पाठवला. हे त्याचे दिव्य पाहिल्यावर बोधिधर्माने त्याला आत येण्यास परवानगी दिली. मग बोधिधर्माशी त्याचे जे बोलणे झाले व बोधिधर्माने त्याला जे उपदेशिले, त्याने हुइ–केच्या मनाला शांती लाभली. पुढे हुई–के हा अत्यंत साध्या वेषात राहून ध्यान संप्रदायाच्या तत्त्वांचा प्रचार करू लागला. पण त्याचे तत्त्वज्ञान तिथल्या सनातनी वृत्तीच्या मठस्थ पुजाऱ्यांना पाखंड वाटले व ते त्याचा द्वेष करू लागले. एक दिवस हुई–के लोकांसमोर प्रवचन करीत असता त्याला पकडून राजापुढे उभे करण्यात आले आणि मठस्थ पुजाऱ्यांनी त्याला राजाकडून मृत्युदंडाची शिक्षा देवविली.

मरण्यापूर्वी हुइ–केने आपले चीवर व भिक्षापात्र सेंग–त्संग नामक एका भिक्षूला दिले व त्याला आपला उत्तराधिकारी नेमले. त्याने हृदयातील श्रद्धा अशा अर्थाचे नाव असलेला एक ग्रंथ चिनी भाषेत लिहिला आहे. त्याने हृदय या शब्दाचा अर्थ मनुष्याचा मूलभूत बुद्धस्वभाव असा केला आहे. आपल्या ग्रंथात त्याने मनुष्याच्या वैयक्तिक, सान्त व परिच्छिन्न मनाचे निरपेक्ष, अनंत व अपरिच्छिन्न मनाशी अभिन्नत्व दाखवले आहे. अपरिच्छिन्न मनाला त्याने बुद्ध मन, बुद्ध चित्त किंवा चित्त असे म्हटले आहे. हा ग्रंथ चीनमध्ये लोकप्रिय असून, ध्यान संप्रदायाचे विद्यार्थी तो मुखोद्‌गत करतात.

चीनमधील ध्यान संप्रदायाचा चौथा धर्मगुरू ताओ–ह–सिन (इ. स. ५८० ते ६५१), पाचवा हुंग–जेन (इ. स. ६०१ ते ६७४) आणि सहावा व शेवटचा हुइ–नेंग (इ. स. ६३८ ते ७१३) हा होय. हुइ–नेंगच्या प्रवचनांचा एक संग्रह प्रसिद्ध असून, त्याला धर्मनिधिमंचसूत्र किंवा मंचसूत्र असे नाव आहे.

हुइ–नेंग हा एक लाकूडतोडया होता. एकदा लाकडे विकून येत असता, त्याने वज्रच्छेदिका प्रज्ञापारमिता सूत्राचा काही भाग एका भिक्षूच्या पठनातून ऐकला. त्यामुळे त्याची अंतर्दृष्टी उमलली. मग तो हुंग–जेनच्या संघारामात गेला व त्याचा शिष्य बनला. हुंग–जेनच्या आदेशानुसार तो एका तबेल्यात राहून तांदूळ कुटण्याचे आणि लाकडे फोडण्याचे काम करू लागला. आठ महिने असे गेले. या अवधीत त्याने एकदाही गुरूचे धर्मप्रवचन ऐकले नाही किंवा गुरूनेही त्याला कधी उपदेश केला नाही. पण त्याने ध्यान संप्रदायाचे मर्म प्रकट करणारी एक उत्कृष्ट गाथा रचली आणि ती ऐकून हुंग–जेन प्रसन्न झाला. हुंग–जेनने पुढे त्यालाच आपला उत्तराधिकारी नेमले.

इ. स. च्या सातव्या शतकाच्या शेवटी जपानमध्ये ध्यान किंवा झेन संप्रदायाच्या प्रचाराला सुरवात झाली. पुढे येई-साइ नामक एक जपानी भिक्षू चीनमध्ये जाऊन ध्यान संप्रदायाचे अध्ययन करून आला आणि क्योतो नगरात इ. स. ११९१ मधे त्याने एका ध्यानविहाराची स्थापना केली. जपानमधील ध्यानी संतांना तिथल्या सम्राटांचेही साहाय्य मिळाले. तिथल्या लढवय्या सामुराईंचा तर ध्यान संप्रदाय हा धर्मच बनला. आजही जपानमध्ये ध्यान संप्रदायाचे एक कोटीपेक्षा अधिक अनुयायी असून, लक्षावधी ध्यानमंदिरे आहेत. या संप्रदायाच्या भिक्षूंची संख्या सुमारे छत्तीस हजार आहे. जपानी जीवनाच्या साहित्य, कला, सामाजिक नीती, व्यक्तिगत आचरण, इ. सर्व अंगांवर ध्यान संप्रदायाचा प्रभाव आहे. जपानमधील चहापानविधी हे ध्यान संप्रदायाचेच एक अनुष्ठान आहे.

**ध्यानी साधकाचे शिक्षण** – रिचर्ड रमबोल्ट नामक एका युरोपीय लेखकाने क्योटोजवळच्या एका ध्यानविहारात शिष्य म्हणून प्रवेश मिळवला होता. त्याने त्या विहारातील शिक्षणपद्धतीविषयी लिहिले आहे, ते असे–

इथल्या विहारात मध्यभागी एक मंदिर असून, एका कोपऱ्यात एका उंच भिंतीमागे झेंडो म्हणजे ध्यानासाठी मोठी खोली आहे. झेंडोत भिंतीच्या कडेला चारही बाजूंनी ओटा आहे. त्याच्यावर बसून भिक्षू ध्यान करतात. झेंडोत फक्त बुद्धाची

मूर्ती असते. तिथली शिस्त राखण्यासाठी एक भिक्षू नेमलेला असतो. त्याला जीकीजीत्सू म्हणतात. आणि सर्व विहारावर एका पारंगत व साक्षात्कारी भिक्षूची सत्ता असते; त्याला रोशी असे म्हणतात.

साक्षात्कार हे ध्यान संप्रदायाचे मुख्य तत्त्व आहे. हा साक्षात्कार लख्खकन चमकणाऱ्या विजेच्या लोळाप्रमाणे असतो, असे मानलेले आहे, त्याला साटोरी असे म्हणतात. साटोरीची प्राप्ती व्हावी, याच उद्देशाने विहारातील सर्व कार्यक्रम आखलेले असतात. जुन्या काळी ध्यानविहारात राहणाऱ्या साधकांना कडक शिस्त पाळावी लागे. विहारातला एक नियम असा होता, की ज्या दिवशी काम नाही, त्या दिवशी जेवण नाही. त्यामुळे प्रत्येकाला भरपूर काम करावे लागे आणि रोज तीन तास ध्यानही करावे लागे.

इथल्या विहारात राहणाऱ्या प्रत्येक भिक्षूला ध्यान करावे लागते. या वेळी जीकीजीत्सू सर्वांवर लक्ष ठेवण्यासाठी एक काठी घेऊन बसतो. साधकाचे मन ध्यानापासून विचलित झाले आहे असे दिसल्यास, तो त्याच्यावर काठीने प्रहार करतो. या काठीचाही साक्षात्कारासाठी उपयोग असतो, अशी त्यांची धारणा आहे. साक्षात्कारासाठी साधकाला कधी धक्के मिळतात, तर कधी शिव्यांचाही प्रसाद मिळतो.

प्रत्येक भिक्षूला ध्यानासाठी एक समस्या देतात. तिला कोआन असे नाव आहे. या समस्यांची संख्या सुमारे एक हजार सातशे आहे. कोआनचे उत्तर कधी तर्काला धरून नसतेच. उलट शिष्याचा तार्किक विचारसरणीवरचा विश्वास नाहीसा करून साटोरीचा मार्ग मोकळा करणे, हाच त्या समस्यांचा उद्देश असतो. फुदायशी नामक एका संताची एक कोआन अशी—

मी रिकाम्या हाताने चाललो आहे. तरी पाहा, माझ्या हातात एक फावडे आहे. मी पायी चाललो आहे, तरी मी एका बैलाच्या पाठीवर स्वार झालो आहे. जेव्हा मी पुलावरून जातो, तेव्हा पाणी वाहत नसते, तर पूलच वाहत असतो.

गुरूंच्या अनुभवातून स्फुरलेल्या अशा कोआनांचे ध्यान-चिंतन करता करताच साधकाला साक्षात्कार होतो, अशी सांप्रदायिकांची श्रद्धा आहे. याशिवाय, गुरुशिष्यसंवाद म्हणजे मोंडो या प्रकारानेही साधकाला साटोरी (साक्षात्कार) प्राप्त होते, असे समजतात. गुरूने शिष्याला एखादा प्रश्न विचारताच शिष्याने तत्क्षणी त्याचे उत्तर दिले पाहिजे, असा संकेत असतो. उदा० प्रश्न – माझे आत्मतत्त्व म्हणजे काय? उत्तर– ते माझ्यासारखेच किंवा तुझ्यासारखे आहे. प्रश्न– म्हणजे यात द्वैत नाही? उत्तर– 'अठरा हजार मैल दूर.' खरे म्हणजे या प्रश्नोत्तरांचा कशास काही संबंध नाही. पण शिष्याच्या मुखातून तत्काळ उत्स्फूर्तपणे जे उत्तर बाहेर येते, तेच ध्यान संप्रदायात अपेक्षित असते. त्यावरून शिष्याच्या ध्यान मार्गातील प्रगतीची सूचना मिळते असे समजतात.

ध्यानी साधकाच्या जीवनातील प्रत्येक क्रिया ही अत्यंत गंभीर व त्याचबरोबर मोठ्या मजेची बाब असते. त्यामुळे या संप्रदायात एका बाजूला गंभीर ध्यानसाधना दिसते; तर दुसऱ्या बाजूला चहापानासारखा लौकिक विधी दिसतो. ध्यान संप्रदायात चहाचा ध्यानाशी घनिष्ठ संबंध मानलेला आहे. एका ध्यानी साधकाने म्हटले आहे, की चहाचा स्वाद व ध्यानाचा स्वाद सारखाच आहे.

त्यासाठी प्रत्येक ध्यानविहाराच्या आवारात कागदाची एक स्वतंत्र झोपडी असते. तिला शून्यताकक्ष असे म्हणतात. इथे चहा बनवतात आणि विधिपूर्वक तो साधकांना देतात. नंतर साधक ध्यानाला बसतात. ध्यान संप्रदायात कसलेच कर्मकांड नाही. असलेच तर ते या चहापानविधीत आहे. ध्यान संप्रदायाच्या इतिहासाच्या आरंभापासून चीन व जपान या देशांत चहापानप्रथा प्रचलित होती. चहाच्या पानांची उत्पत्ती एका कल्पित गाथेने बोधिधर्माशी जोडण्यात आली आहे, ती अशी—

एकदा बोधिधर्म ध्याननिमग्न असता त्याच्या डोळ्यांवर झापड आली. तेव्हा त्याने तावडतोब आपल्या डोळ्यांच्या पापण्या कापून टाकल्या. त्याच पुढे चहाच्या पानांच्या रूपाने उगवल्या. त्यामुळेच सांप्रतही जो कोणी चहा पितो, त्याच्या डोळ्यांवर झापड येत नाही.

साहित्य– लंकावतारसूत्र हा या संप्रदायाचा दार्शनिक ग्रंथ होय. याचे दहा परिच्छेद असून, तो संस्कृत भाषेत लिहिलेला आहे. या ग्रंथाचे संपूर्ण नाव आर्यसद्धर्मलंकावतार महायान-सूत्र असे आहे. चिनी, जपानी व तिबेटी भाषांत यावर अनेक टीका झालेल्या आहेत.

दुसरा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे वज्रच्छेदिका प्रज्ञापारमितासूत्र हा होय. 'रूपं शून्यता! शून्यतैव रूपम्'= रूप म्हणजे शून्यता व शून्यता म्हणजेच रूप, हे या ग्रंथाचे महत्त्वाचे सूत्र आहे.

याशिवाय प्रज्ञापारमिता हृदयसूत्र, शूरंगमसमाधिसूत्र, विमलकीर्तिनिर्देशसूत्र व समंतमुखपरिवर्त या महायान पंथाच्या ग्रंथांनाही ध्यान संप्रदायात मान्यता आहे. प्रज्ञापारमिता हृदय-सूत्राचा पाठ ध्यान संप्रदायाच्या विहारांत अनेक प्रसंगी केला जातो. त्याचप्रमाणे हुइ-नेंगच्या मंचसूत्राचेही साधक मोठ्या आदराने पठण करतात. याशिवाय ध्यानी साधकांनी अनेक गाथा रचल्या आहेत, त्यांना मोंडो, हायकू, इ. नावे आहेत. त्यांत त्यांच्या आध्यात्मिक अनुभवांचे वर्णन आहे.

भाषा, शब्द व तार्किक विचारसरणी यांवर या संप्रदायाचा विश्वास नाही. माणसाने तार्किक पद्धतीने विचार न करता स्वाभाविक रीतीने वागले पाहिजे, असे पंथाचे सांगणे आहे. शब्दापेक्षा अनुभव घेण्यावर त्याचा भर आहे. प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणी पूर्ण बुद्धत्व प्राप्त करून घेण्याची क्षमता असते आणि योग्य गुरूच्या मार्गदर्शनाने एका क्षणातही ते कार्य साध्य होते, असे ते लोक म्हणतात.

ध्यान संप्रदाय हा महायानपंथातील शून्यता तत्त्वज्ञानावर आधारित असला, तरी तो अद्वैत तत्त्वज्ञानाचेही अनुसरण करताना दिसतो. एकदा एका शिष्याने गुरूला विचारले, की 'बुद्ध काय आहे?' त्यावर गुरूने उत्तर दिले, की 'तूच तो आहेस.' 'तत्त्वमसि' या औपनिषदिक महावाक्याचाच हा अनुवाद आहे. याशिवाय, उत्तर भारतातील संतमताशीही या संप्रदायाचे बरेच साम्य आहे. [ ध्या. सं.; इंटचुइशनल फिलॉसॉफी–रोहित मेहता; बौ. सा. सां. इ.; झेनचे ओझरते दर्शन–म. ना. वानखेडे, नवभारत, एप्रिल १९६२; ध्यानसंप्रदाय–डॉ. भरतसिंह उपाध्याय, राजर्षी अभिनंदन ग्रंथ ]

## ध्यानासन

मूर्तिकलेतील एक आसनप्रकार. याला पर्यंकासन असेही म्हणतात. या आसनात डावा पाय उजव्या मांडीवर आणि उजवा पाय डाव्या मांडीवर ठेवून ताठ बसतात. शिव आणि पाच ध्यानी बुद्ध यांच्या मूर्ती या आसनात दाखवितात. पर्यंकासनात आणि या आसनात फरक एवढाच, की ध्यानासनात पायाचे तळवे वर दिसतात व पर्यंकासनात ते वर दिसत नाहीत. [ इं. बु. इ. ]

## ध्यानी बुद्ध

बौद्ध देवता. यांची संख्या पाच आहे. बौद्ध धर्मात जेव्हा महायानादी विविध पंथ निर्माण झाले, त्या काळात या ध्यानी बुद्धांची कल्पना उदय पावली. बौद्ध धर्मात पुढे ज्या अनेक देवदेवता निर्माण झाल्या, त्यांत ध्यानी बुद्ध हे प्रमुख ठरले. यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत–

(१) अमिताभ (२) अक्षोभ्य (३) वैरोचन (४) अमोघसिद्धी आणि (५) रत्नसंभव. काही ठिकाणी सहावा ध्यानी बुद्ध म्हणून वज्रसत्त्व हे एक नाव आढळते. या वज्रसत्त्वाला वरील पाचांचा समुच्चय किंवा गुरू मानतात. त्याच्या मूर्तीच्या हाती वज्र आणि घंटा ही दोन गुरुत्वदर्शक चिन्हे असतात.

ध्यानी बुद्ध हे विशेष प्रकारचे बुद्ध असून, त्यांना बोधिसत्त्वाच्या अवस्थेतून जावे लागत नाही. बुद्धाचे सर्व गुण आणि सर्व शक्ती त्यांच्या ठिकाणी असतात. ते सदैव ध्यानमग्न असतात, म्हणून त्यांना ध्यानी बुद्ध अशी संज्ञा दिली गेली.

इ. स. च्या आठव्या शतकात इंद्रभूती या उड्डीयान प्रदेशाच्या राजाच्या कारकीर्दीत ध्यानी बुद्धांची कल्पना पूर्णतेस गेली. त्यांना देवतास्वरूप देऊन त्यांच्या उपासनेचे विधिविधान निर्माण करण्याचे काम मुख्यत्वे वज्रयान पंथाने केले. कालांतराने हे ध्यानी बुद्धच विश्वजनक आदिदेव मानले गेले.

ध्यानी बुद्ध पाच आहेत, ही कल्पना कशी उगम पावली, याविषयी मतांतरे आहेत. पाच इंद्रियांच्या पाच शक्तींवरून ती कल्पना केली गेली, असे आर्यदेवाच्या चित्तविशुद्धिप्रकरणावरून कळते. रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान असे विश्वाचे पाच स्कंध किंवा पाच घटक बौद्धांनी मानले आहेत. या पाच स्कंधांनाच पुढे ध्यानी बुद्ध या रूपाने मूर्तरूप देण्यात आले असावे, असे दुसरे मत आहे. बुद्धाने विशिष्ट प्रसंगी ज्या पाच मुद्रा उपयोगात आणल्या, त्यांचा अर्थ लावतानाही ध्यानी बुद्धांची कल्पना उदित झाली असेल, असे आणखी एक मत आहे. इ. स. च्या दहाव्या शतकात नालंदा येथील बौद्ध विहारात आणखी एक मत पुढे आले, की वज्रधर किंवा आदिबुद्ध हा अनाद्यनंत असा परमेश्वर असून, त्याच्यापासूनच ध्यानी बुद्ध उत्पन्न झाले. बुद्धाच्या रश्मिमेघव्यूह नामक समाधीतून पाच ध्यानी बुद्ध निर्माण झाले, असे गुह्यसमाज या ग्रंथात सांगितले आहे. या पाच ध्यानी बुद्धांच्या स्त्री शक्तींचीही कल्पना केलेली आहे.



अमोघसिद्धी

मंत्र व मुद्रा यांचे अवतारण व प्रचार यांच्यासाठी ध्यानी बुद्धांचा उदय झाला, असे वज्रयानी साहित्यात म्हटले आहे.

अवतारक आणि उद्धारक अशा दोन्ही रूपांत ध्यानी बुद्धांची उपासना होत असते. ध्यानी बुद्ध हे कोणत्याही वेळी आवश्यकतेनुसार उपासकांसमोर अवतरतात किंवा प्रकट होतात. पद्मवज्र या सिद्धाचे मत असे, की ध्यानी बुद्धाच्या साहाय्यावाचून समाधी अवस्था प्राप्त होणे शक्य नाही. ज्ञानसिद्धी या ग्रंथात म्हटले आहे, की ज्या ज्ञानाच्या माध्यमाने निर्वाण मिळवले जाते, ते ज्ञान म्हणजे ध्यानी बुद्धांच्या व्यतिरिक्त दुसरे काहीच नाही. मंत्र, मंडल व मुद्रा या गोष्टींची प्राप्ती आणि सिद्धी या गोष्टी ध्यानी बुद्धांच्याच हाती आहेत, असेही

ज्ञानसिद्धीतच म्हटले आहे. ध्यानी बुद्ध हे महाकारुणिक, विग्रहानुग्रहसमर्थ आणि दान्त, दुर्दान्त व सौम्य अशा सर्व प्रकारच्या जीवांचे तारण करणारे आहेत, असे गुह्यसमाज या ग्रंथात म्हटलेले आहे.

बौद्धांच्या शिल्पकलेत ध्यानी बुद्धांपैकी चौघे स्तूपाच्या चार बाजूंवर कोरलेले दिसतात. तिसऱ्या वैरोचनाचे स्थान एखाद्या बौद्ध मंदिराच्या अंतर्भागी असते. अर्थात या गोष्टीला अपवादही पुष्कळ आहेत. ध्यानी बुद्धांची काही ठिकाणी स्वतंत्र मंदिरेही आहेत. [ इं. बु. इ.; म. सा. अ. ]

**ध्यानी बोधिसत्त्व** बौद्ध देवता. उ. भारतात जे बौद्ध संप्रदाय निर्माण झाले, त्यांनी पाच ध्यानी बुद्धांप्रमाणे पाच दिव्य ध्यानी बोधिसत्त्वांची कल्पना केलेली आहे. हे बोधिसत्त्व संभोगकायात आणि रूपधातू नावाच्या दिव्य लोकात असतात. प्रत्येक ध्यानी बोधिसत्त्व हा एकेका ध्यानी बुद्धाचा आध्यात्मिक पुत्र असतो. या ध्यानी बोधिसत्त्वांची नावे पुढीलप्रमाणे (१) समंतभद्र (२) वज्रपाणी (३) रत्नपाणी (४) अवलोकितेश्वर व (५) विश्वपाणी. प्रत्येक ध्यानी बोधिसत्त्व हा आदिबुद्धाकडून, पण आपापल्या आध्यात्मिक पित्याच्या द्वारे, क्रियाशील अशी सर्जनशक्ती संपादन करतो.



अवलोकितेश्वर

बोधिसत्त्वांच्या मूर्ती राजवेष अलंकार घालून बनवतात. त्यांच्या मस्तकावरच्या मुकुटाला पाच पाने असतात. त्यांतल्या मधल्या पानावर त्या त्या बोधिसत्त्वाच्या जनकाची मूर्ती कोरतात. ज्या वेळी बोधिसत्त्व स्वतःच्या विहारात किंवा मंदिरात असतात, तेव्हा ते बसलेले असतात व ध्यानी बुद्धासमवेत असतात, तेव्हा ते उभे असतात. [ गॉ. नॉ. बु. ]

**ध्रुपद** ( सं. ध्रुवपद ) हिंदुस्थानी संगीतातला एक श्रेष्ठ दर्जाचा गानप्रकार. प्रारंभी ध्रुपदांची रचना संस्कृत भाषेत होत असे. पुढे प्रादेशिक भाषांतही ती होऊ लागली. विशेषेकरून व्रज व हिंदी या भाषांत ध्रुपदांची रचना फार आहे. मराठी भाषेतही कांही ध्रुपदे आहेत. ही सर्व ध्रुपदे शुद्ध राग–रागिणींत गायिली जातात. चौताल, त्रिवट, धमार व कधी कधी सूरफाक व झंपा या तालांत ती बसवलेली असतात. याचे स्थायी, अंतरा व आभोग असे तीन अवयव असतात. काही कलाकारांनी स्थायी व अंतरा या दोन भागांतच ध्रुपदांची रचना केलेली आहे.

ध्रुपद हे प्राचीन काळापासून नाटकातही प्रयुक्त होत असे. नाटकांच्या आदी, मध्य व अंत या तिन्ही वेळा ध्रुपद गाण्याचा प्रचार होता. कधी कधी ध्रुपदांच्या द्वारे पात्रवर्णन, संदर्भकथन व देवतांचे वर्णन केले जात असे. भरताने आपल्या नाट्यशास्त्राच्या बत्तिसाव्या अध्यायात ध्रुपद या प्रकाराचे विस्तृत विवेचन केले आहे.

ध्रुपदांचे विषय प्रायः भक्ती, ईश्वरस्तुती, राजप्रशंसा, मंगलोत्सवांची वर्णने आणि संगीतशास्त्रातील श्रुती, स्वर, ग्राम, मूर्च्छना, इ. शब्दांची लक्षणे हे असतात. ध्रुपदांची रचना शृंगारादी सर्व रसांत झालेली आढळते.

ध्रुपद गाताना रागालाप, रूपकालाप, अलंकार, स्वरकरण, बोलताना या गोष्टींचा उपयोग करण्याची वहिवाट आहे. कंप, आंदोलित, इ. बहुविध गमकांचे प्रयोगही केले जातात. ध्रुपद गाण्याचा नियम असा आहे, की प्रथम गमके, अलंकार यांच्यासह रागालापाचा विस्तार करावा व त्यानंतर ध्रुपदाची चीज म्हणायला प्रारंभ करावा. अंश, ग्रह, न्यास, अपन्यास या स्वरांना त्यांच्या त्यांच्या योग्य स्थानी ठेवून शास्त्रोक्त रीतीने ध्रुपदांची रचना केलेली असल्यामुळे ध्रुपदाचे गायन लक्षपूर्वक व काहीही अदलबदल होऊ न देता करावे लागते. म्हणूनच जे गायक ध्रुपद चांगल्या प्रकारे गाऊ शकतात, ते श्रेष्ठ दर्जाचे कलावंत मानले जातात.

ध्रुपदांची रचना आणि ध्रुपद गायनाची कला यांची वाढ देवस्थानांच्या अनुषंगाने झालेली आहे. देवालयांत उत्सवप्रसंगी किंवा कीर्तनप्रसंगी ध्रुपदरचनेच्या द्वारे देवाची स्तुती करण्याची प्रथा पुरातनकालापासून चालू होती. गोपाल नायक, बैजू नायक, राजा मानसिंह, तानसेन, चिंतामणी, इ. महान संगीतज्ञ हे ध्रुपदगायक, तसेच ध्रुपदरचनाकारही होते. ग्वाल्हेर येथे राजा मानसिंह याच्या दरबारात (१४८६–१५१६ इ. स.) ध्रुपदाच्या गायकीला प्रतिष्ठेचे स्थान प्राप्त झाले.

ध्रुपदरचनेचा एक नमुना पुढे दिला आहे –

अस्ताई

परब्रह्म परमेश्वर परमात्मा परमपुरुष ।
नंदनंदन आनंदकंद जसोदानंद श्रीगोविंद ।।

अंतरा

दिनानाथ दुखभंजन पद्मनाथ जगवंदन ।
वासुदेव बनवारी जगत्पति प्रभुनंदनंदन ।।

या देशात मुसलमानांचे राज्य आल्यानंतर भारतीय संगीत हे मुसलमान सम्राट व सुलतान यांच्या सेवेत रुजू झाले. गायकांचा मुसलमानांशी आश्रयदाते या नात्याने संपर्क निर्माण झाल्यामुळे संगीतावरही मुसलमानी प्रभाव पडणे स्वाभाविक होते. तसा तो ध्रुपद गायकीवरही पडला. अकबराचा राज्यकाल हे ध्रुपदगायकीचे सुवर्णयुग मानले जाते. मुसलमान शासक हे संस्कृत भाषेला अपरिचित होते. पुढे हळूहळू गायकही तसेच झाले. गायकांना संगीतातल्या भक्ती व साहित्य या गोष्टींचीही कदर उरली नाही. त्याचप्रमाणे ध्रुपदगायकीत शब्दालाही काही महत्त्व उरले नाही.

द. भारतात तेलुगू भाषेत ध्रुपद हे दरू या नावाने प्रचलित होते. तमिळ प्रदेशातही दरूचा प्रचार झाला होता. तेलुगू व तमिळ नाटकांत दरू हे साभिनय गायिले जात असे. पण दक्षिणेतील नाटकांचा जसजसा विकास होत गेला, तसतसे त्यांतील दरूंचे गायन कमी कमी होत गेले. उत्तर भारतात ध्रुपदाने उच्च गायकीत स्थान प्राप्त करून घेतले; पण दक्षिणेत मात्र दरूला गायकी संप्रदायात स्थान मिळू शकले नाही. सांप्रत कधी कधी त्या भागात प्राचीन पद्धतीची नाटके होतात, त्या वेळीच दरूचे गायन ऐकायला मिळते. [ संगीतशास्त्र; डॉ. सुमती मुटाटकर– गुरुकुलपत्रिका, जानेवारी १९५७ ]

**ध्रुव** पृथ्वी ज्या काल्पनिक अक्षाभोवती (पृथ्वीच्या मध्यातून जाणाऱ्या रेषेभोवती) गरगर फिरत असते, त्याच्या दोन्ही टोकांना ध्रुव म्हणतात. उत्तरेकडील टोकाला उत्तर ध्रुव आणि दक्षिणेकडील टोकाला दक्षिण ध्रुव असे म्हणतात. पृथ्वीचा आस दोन्ही बाजूंना वाढवला असता, तो ज्या ठिकाणी आकाशाला भिडतो, त्या ठिकाणांना ध्रुवबिंदू म्हणतात. ध्रुवबिंदूच्या भोवती जो एक तारा लहानसे रिंगण घालून फिरताना दिसतो, त्याला ध्रुवतारा अशी संज्ञा आहे. आकाशाचा उत्तर ध्रुवबिंदू व त्याच्या जवळचा उत्तर ध्रुव तारा पृथ्वीच्या द. गोलार्धातील माणसांना दिसत नाही आणि दक्षिण ध्रुवबिंदू व दक्षिण ध्रुवतारा उत्तर गोलार्धातील माणसांना दिसत नाही.

आकाशाच्या उत्तरेकडील भागात उडत्या पतंगासारखी सात ताऱ्यांची एक आकृती दिसते, तिला सप्तर्षी असे नाव आहे. त्या सात ताऱ्यांपैकी पश्चिमेकडच्या दोन ताऱ्यांना पुलह व क्रतू म्हणतात. त्यांना जोडणारी सरळ रेषा पुढे वाढवली तर ती ज्या एका ठळक ताऱ्यापर्यंत जाते, तो ध्रुव तारा होय. ध्रुव तारा सतत तोच असतो असे नाही. भिन्न काळी वेगवेगळे तारे ध्रुवपदी येतात. मात्र एकच तारा ध्रुवबिंदूजवळ हजारो वर्षे असतो; त्यामुळे ध्रुव तारा अढळ मानला जातो. भागवत पुराणातली ध्रुवाची कथा सांप्रतच्या ध्रुव ताऱ्याशी जोडलेली आहे. ध्रुव ताऱ्याला नौकानयनात फार महत्त्वाचे स्थान आहे.

**ध्रुवदर्शन–** ध्रुव ताऱ्याच्या स्थिरतेमुळेच त्याला विवाहसंस्कारातही महत्त्व मिळाले आहे. विवाहाच्या दिवशी रात्री वधू-वरांनी ध्रुव, अरुंधती व सप्तर्षी यांचे दर्शन घ्यावयाचे असते. त्या वेळी वर वधूला म्हणतो– 'तू ध्रुव आहेस. तू माझ्याशी एकनिष्ठ राहा. तू शंभर शरदृतूपर्यंत जीवित राहा' (पार. गृ. सू. १.८.१९).

**ध्रुवप्रदेश –** पृथ्वीच्या उत्तर व दक्षिण ध्रुवांभोवतालच्या भूभागांना ध्रुवप्रदेश म्हणतात. हे प्रदेश अत्यंत थंड असल्यामुळे तिथे मनुष्यवस्ती नाही. पण सुमारे १२००० वर्षांपूर्वी उत्तर ध्रुवप्रदेशातले हवामान मनुष्यवस्तीला योग्य असे समशीतोष्ण होते, असे अनुमान भूगर्भशास्त्रज्ञांनी केले आहे. पुढे हिमप्रलयामुळे तिथली मनुष्यवस्ती खाली दक्षिणेकडे सरकली असावी. सर्व वनस्पती व जीव यांचे उत्पत्तिस्थान उत्तर ध्रुवप्रदेशात होते, असेही काही शास्त्रज्ञांचे मत आहे.

आर्य लोकांचे मूलस्थान उत्तर ध्रुवाजवळ होते, असे लो. टिळकांनी प्रतिपादले आहे. केवळ उत्तर ध्रुवप्रदेशातच ज्या घडू शकतील, अशा काही निसर्गघटनांचे निर्देश ऋग्वेदात आढळतात. त्यावरून वैदिक आर्यांचे पूर्वज त्या प्रदेशात काही काळ राहत असावे, असा तर्क त्यांनी केला आहे. उत्तर ध्रुवप्रदेशातील काही दृश्ये– (१) सूर्य दक्षिणेस उगवतो. (२) तारे उगवत नाहीत किंवा मावळत नाहीत, तर क्षितिजाला समांतर अशा पातळीत २४ तासांत एक प्रदक्षिणा पुरी करतात. (३) सहा महिन्यांचा एक अखंड दिवस व सहा महिन्यांची एक अखंड रात्र मिळून तिथले एक वर्ष होते. सूर्य वर्षातून एकदाच उगवतो, क्षितिजाला समांतर अशा प्रदक्षिणा घालतो व एकदाच मावळतो. संधिप्रकाश सतत दोन महिने असतो. (४) या प्रदेशातून दक्षिण खगोलार्ध कधीही दिसत नाही. [ म. ज्ञा. को.; ज्योतिर्वैभव; वे. रा. द. ]

**ध्रुवदास** (१५७८–१६४३ इ. स.) एक संत कवी. याचा जन्म सहारणपूर जिल्ह्यातील देवेंद्रग्राम या ठिकाणी झाला. हा कायस्थ होता. याचे आजोबा बीठलदास हे

राधावल्लभ संप्रदायाचे संस्थापक हितहरिवंश गोस्वामी याचे शिष्य होते. त्यामुळे ध्रुवदासाच्या मनावर राधावल्लभ संप्रदायाचे संस्कार बालपणापासूनच झाले. वयाच्या दहाव्या वर्षीच तो घरदार सोडून वृंदावनात गेला व अखेरपर्यंत तिथेच राहिला.

याने एकूण ४२ ग्रंथ लिहिले, असे सांगतात. ते आकाराने लहान असून, बयालीस लीला या नावाने ते एकत्र केलेले आहेत. त्यात सुनारिन लीला, मनिहारी लीला, नटीवन लीला, ब्रह्मा लीला, महादेव लीला, इ. चाळीस लीला असून, त्याशिवाय १०३ पदे व काही फुटकळ रचनाही आहेत. चौपाई, कवित्त, सवैयें, इ. महत्त्वाच्या छंदांचा त्याने आपल्या ग्रंथात वापर केला आहे. त्याचा सिद्धान्तविचार हा ग्रंथ गद्य असून, त्यात राधावल्लभ संप्रदायाच्या सिद्धान्तांचे विवरण आहे. भक्तनामावली या ग्रंथात त्याने १२४ भक्तांचा थोडक्यात परिचय करून दिला आहे. माधुर्य भक्ती हा ध्रुवदासाच्या काव्याचा स्थायीभाव असून राधा–कृष्णांच्या युगुलाची उपास्य म्हणून सेवा करणे व त्यांच्या लीला–विहारांचे दर्शन घेणे हाच उपासकाचा धर्म होय, असे तो मानीत होता. नेहमंजिरी या काव्यात तो म्हणतो

प्रेम बात कछु कही नही जाई। उलटी चाल तहाँ सब भाई।
प्रेम बात सुनी बौरो होई। तहाँ सयान रहैं नहि कोई।
तन मन प्रान तिही छिन हारैं। भली बुरी कछुवै न विचारे।
ऐसो प्रेम उपजि है जबही। हित ध्रुव बात बनैगी तबही।

अर्थ– प्रेमाबद्दल काही सांगताच येत नाही. प्रेमाची सगळी रीतच उलटी. प्रेमवार्ता ऐकून माणूस बावरून जातो. तिथे शहाणपण उरतच नाही. त्याच क्षणी तन, मन, प्राण हरपून जातात. भले, बुरे हा विचारच उरत नाही. अशा तऱ्हेच्या प्रेमाची निर्मिती होते, तेव्हाच कवी ध्रुव म्हणतो की योग्य ते होत असते.

ध्रुवदास हा हितहरिवंशाच्या ग्रंथांचा भाष्यकार म्हणून प्रसिद्ध आहे. हितशृंगारलीला, रसमुक्तावली, सभामंडल, शृंगार रस यांसारख्या त्याच्या रचना रीतिकालीन श्रेष्ठ कवींच्या तोडीच्या आहेत. हितहरिवंश गोस्वामी याच्या नंतर राधावल्लभ संप्रदायात यालाच महत्त्वाचे स्थान आहे. [ हिं. ना.; रा. सं. सि. सा.; हिं. सा. इ.; ब्र. कृ. मा. म.; हिं. सा. को. २]

**ध्रुवप्रिय** विष्णूच्या चौवीस अवतारांपैकी एक. ध्रुवाला वरदान देण्यासाठी प्रकट झालेल्या विष्णुरूपाला ध्रुवप्रिय अवतार असे म्हटले आहे. हा भगवंताचा लीलावतार होय. या अवतारात विष्णूने ध्रुवाला प्रथम राज्यपद व शेवटी अढळ पद प्राप्त होईल असा वर दिला. [ म. सा. अ. ]

**ध्रुवबेर** शिल्पशास्त्रात विष्णूच्या अचल मूर्तींना ध्रुवबेर असे म्हणतात. वैखानसागमात अशा मूर्तींचे छत्तीस विभाग कल्पिलेले आहेत. योग, भोग, वीर व आभिचारिक हे मुख्य चार विभाग होत. कामना ज्या प्रकारची असेल तदनुसार अशी मूर्ती घडवतात. वरील प्रत्येक भागाचे पुन्हा स्थानक (उभी मूर्ती), आसन (बसलेली मूर्ती) व शयन (निजलेली मूर्ती) असे तीन विभाग होतात. हे सर्व प्रकार मिळून बारा विभाग होतात. या बारा विभागांचे पुन्हा उत्तम, मध्यम व अधम असे तीन उपविभाग होतात; त्यांची संख्या छत्तीस होते. मुख्य देवतेच्या भोवती ज्या गौण देवता असतात, त्यांच्या संख्येवरून ध्रुवबेराचे उपविभाग ठरतात. [ डे. हिं. इ. ]

**ध्रुवस्थाली** यज्ञोपयोगी मातीची थाळी. प्रातःसवनामध्ये या थाळीत ध्रुव नामक ग्रह भरून घेतात. हा ग्रह घेतल्यापासून त्याचे हवन होईपर्यंत यजमानाने शौचालाही जायचे नसते (कात्या. श्रौ. ९. ६. २२). या ग्रहाचा होम तृतीय सवनामध्ये होतो. तोपर्यंत हा ग्रह हलवायचा नसतो.

**ध्रुवा** एका यज्ञीय पात्र. ही एक वेकळीच्या लाकडाची स्रुची असते. एकदा ही स्रुची वेदीत स्थापन केल्यावर याग संपेपर्यंत ती हलवायची नसते. ध्रुवेमध्ये आज्य भरून ठेवतात ते कमी होऊ देत नाहीत. होमाच्या वेळी ध्रुवेतून आज्य घेतल्यावर लगेच ध्रुवेचे पूरण करावे लागते.

**ध्रुवागीती** एक नाट्योपयुक्त गीतप्रकार. या गीतीचे प्रावेशिकी, नैष्क्रमिकी, आक्षेपकी, आन्तरा व प्रासादिकी असे पाच भेद आहेत. भरताच्या काळी रंगमंचावर स्थानसूचक किंवा कालसूचक अशा जवनिका (पडदे) नव्हत्या. त्यामुळे नाटकातील प्रसंग, स्थान व संबंधित पात्रे यांचा परिचय या गीतींतून सांकेतिक पद्धतीने करून देण्यात येई. पात्राचा रंगमंचावर प्रवेश होताना प्रावेशिकी व रंगमंचावरून निर्गमन होताना नैष्क्रमिकी गीती गायिल्या जात. आक्षेपकी, आन्तरा व प्रासादिकी या गीती रंगमंचावर पात्रांचा अभिनय चालू असता मधून मधून गायिल्या जात. सूर्योदयासंबंधीच्या गीतींतून प्रातःकालचे व नायकाच्या भावी अभ्युदयाचे सूचन होत असे.

ध्रुवागीतींचे आणखी एक वैशिष्ट्य असे, की त्यांत वर्ण्य वस्तूचे वर्णन प्रतीकरूपाने केलेले असते. नायकाच्या आगमनाची सूचना देताना हत्तीने वनात प्रवेश केला, असे वर्णन केलेले असते. ध्रुवागीती प्रथम प्रायः प्राकृत भाषांतच होत्या. त्या

वरून त्या लोकगीतांतून घेतल्या होत्या, हे कळते. त्यांची संस्कृत भाषेत रचना ही नंतरच्या काळात झाली. ध्रुवागीतींचे गायन प्रायः वाद्यवृंदाच्या साथीवर होत असे. [ ह. च. सां. अ. ]

**ध्रुवाश्वकल्प** एक यज्ञ. सप्त पाकयज्ञांमध्ये याचा अंतर्भाव आहे. या यज्ञाचे विधान केवळ मानव गृह्यसूत्रांतच (२·६) आढळत असून, ते आश्वयुजीकर्माप्रमाणेच आहे. याचे विशेष विधी सांगितले आहेत, ते असे–

आश्विन पौर्णिमेच्या दिवशी सूर्यास्तापूर्वी गावाबाहेर जाऊन पिंपळाच्या अथवा वडाच्या झाडाखाली किंवा जलाशयाजवळ याचा विधी करावा. यात भाग घेणाऱ्या ऋत्विजांनी कोरी वस्त्रे परिधान करावी. एक चौकोनी वेदी तयार करून तिच्या कोपऱ्यांवर वृक्षाच्या डहाळ्या उभ्या कराव्या. त्यांवर रंगीत ध्वज उभारावे. वेदीवर गंध, फुले, फळे, दही, मध, मोदक, इ. वस्तू पसराव्या. चार बाजूंनी चार सुवर्णयुक्त उदकुंभ व धान्याने भरलेली पात्रे ठेवावी. नंतर त्या वेदीवर अग्निस्थापना करून उच्चैःश्रवा, वरुण आणि विष्णू या देवतांकरिता तीन बोकड बळी द्यावे व त्या बोकडाच्या मांसाच्या आहुती द्याव्या. अश्विनदेवांना आणि आश्वयुजांना आज्याहुती दिल्यावर होमविधी समाप्त करावा.

मग घोड्यांना स्नान घालून त्यांच्या अंगाला सुवासिक द्रव्ये चोळावी आणि त्यांना माळा घालून सजवावे. घोड्यांना घेऊन अग्निवेदीभोवती तीन प्रदक्षिणा घालाव्या. घोड्यांना आनंदाने खिंकाळायला लावावे. त्यानंतर त्या घोड्यांना घेऊन घरी यावे. या यज्ञाची दक्षिणा म्हणून एक गाय व एक बैल आचार्याला द्यावा.

उत्तम घोडे प्राप्त व्हावेत यासाठी हा विधी करण्यास सांगितले आहे. घोड्यांच्या अभिवृद्धीसाठी नीराजनविधी म्हणून जो विधी आहे, त्याच्याशी या विधीचे पुष्कळच साम्य आहे. अन्य गृह्यसूत्रांमध्ये गोधनाच्या अभिवृद्धीसाठी आश्वयुजीकर्म या नावाने अशाच प्रकारचा यज्ञ सांगितला आहे. पाहा – आश्वयुजीकर्म. [ इं. वे. क. सू. ]

**ध्वज** राष्ट्राचे किंवा एखाद्या राज्याचे प्रमुख मानचिन्ह. उंच दंडाच्या टोकाला पताका, कमळ किंवा चक्र अशासारखे चिन्ह लावले असता ध्वज तयार होतो. 'ध्वजति, गच्छति उच्छ्रितो भवति' = जातो किंवा उंच होतो तो ध्वज होय, असा त्याचा अर्थ होतो. प्राचीन संस्कृत वाङ्मयात केतू हा ध्वजाचा समानार्थी शब्द आढळतो. याला मराठीत झेंडा किंवा निशाण अशी नावे आहेत. प्राचीन काळी ध्वजदंड बहुधा बांबूचा किंवा बकुल, शाल, पलाश, कदंब, इ. वृक्षांच्या लाकडाचा करीत. त्याची उंची दहा ते वीस हात असे.

ध्वजाची पताका सुती किंवा रेशमी वस्त्राची असून, ती तिकोनी किंवा आयताकार असते. पूर्वी आठ प्रकारच्या पताका



श्रीमती कामा यांचा तिरंगी ध्वज

बनवीत. त्यांची नावे जया, विजया, भीमा, चपला, वैजयंतिका, दीर्घा, विशाला व लौला अशी होती. जया पताकेची लांबी पाच हात व रुंदी एक हात असे. इतर पताकांची लांबी क्रमाने एकेक हात अधिक व रुंदी एक चतुर्थांश हात अधिक असे. वैजयंतिका ही सर्वोत्कृष्ट पताका मानली जात होती. ज्या पताकेवर हत्ती, हंस, मोर किंवा शुक यांचे चित्र असते, तिला सर्वमंगला असे म्हणत.

रक्त, श्वेत, पीत, नील, कृष्ण, इ. विविध रंगांच्या पताका प्राचीन काळी वापरल्या जात. श्वेत पताका विजय मिळवून देतात, पीत पताका रोगकारक असतात आणि रक्त पताका शस्त्राचाराला कारण होतात, असे वराहमिहिराने सांगितले आहे. घंटा, किंकिणी, मोरपंख, गोंडे, मोत्यांच्या माळा, इ. वस्तू लावून ध्वज सजवण्याचीही प्रथा होती. ध्वजपतीचे विशेष चिन्हही ध्वजदंडावर लावीत.

काही ध्वजांना दोन पताका लावलेल्या असत, तर काही ध्वज निष्पताक म्हणजे पताकारहित असत. निष्पताक ध्वजांवर गरुड, त्रिशूळ, कमळ, कुंभ, चक्र, इ. चिन्हे असत. आणि त्यावरून त्यांना भिन्न नावे मिळत. प्राचीन मुद्रांवर असले ध्वज अंकित केलेले दिसतात. भरहूत, सांची, मथुरा, सारनाथ, अमरावती, कुशीनगर, इ. ठिकाणच्या प्राचीन शिल्पांत व अजंटा येथील चित्रांत विविध प्रकारचे ध्वज व पताका पाहायला मिळतात.

ऋग्वेदात यूपाला यज्ञाचा ध्वज (केतू) म्हटले असून, शुभ्र वस्त्रे परिधान केल्यामुळे यज्ञस्तंभ हंसासारखा दिसतो, असेही




गुप्तांच्या मुद्रांवरील ध्वज (१) व (२) गरुडध्वज (३) द्विपताकध्वज (४) निष्पताकध्वज

सांगितले आहे (३.८.८–९). वैदिक युगापासून ध्वजाला युद्धक्षेत्रात विशेष स्थान प्राप्त झालेले आहे. ऋग्वेदात यासंबंधी काही ऋचा आहेत, त्यांतील एक अशी––

**स्पर्धन्ते वा उ देवहूये अत्र येषु ध्वजेषु दिद्यवः पतन्ति ।**
**युवं ताँ इन्द्रावरुणावमित्रान् हतं पराचः शर्वा विषूचः ।।**
(ऋ. ७.८५.२)

अर्थ – युद्धात ज्यांच्या ध्वजांवर अस्त्रे येऊन आदळतात, ते भक्तजन देवांचा धावा करूनच येथे (युद्धात) आपली पराकाष्ठा करतात. म्हणून हे इंद्रावरुणांनो, तुम्ही आमच्या शत्रूंना आपल्या आयुधांनी अशा रीतीने ठार मारा, की (बाकीचे) दशदिशांना पळून जातानाही मारले जातील.

युद्धात शत्रूच्या ध्वजावर मारा करून तो मोडणे याला महत्त्व होते; कारण ते पराभवाचे सूचक मानले जाई. त्यामुळे रणांगणात लढणारे वीर पुरुष ध्वजाच्या रक्षणासाठी आपल्या पराक्रमाची शर्थ करीत. ध्वज हे सर्व सेनेचे स्फूर्तिस्थानच असे. प्रत्येक देशाचा ध्वज वेगळा असल्यामुळे ध्वजावरून त्या त्या देशाची सेना ओळखता येत असे.

प्राचीन काळापासूनच भिन्न भिन्न मानवसमूह आपला वेगळेपणा दर्शविण्यासाठी निरनिराळी चिन्हे वापरू लागले होते. पुढे दोन समूहांचा संघर्ष सुरू झाल्यानंतर तर अशा चिन्हांची आवश्यकता तीव्रपणे भासू लागली. त्या आवश्यकतेतूनच पुढे ध्वजाची कल्पना उगम पावली.

संघसत्तेतूनच पुढे राजसत्तेचा उदय झाला. मग ध्वज हे राजचिन्ह ठरले. शांततेच्या काळात राजप्रासादांवर ध्वज फडकू लागले. या प्रासादध्वजांची लक्षणे अपराजितपृच्छा या ग्रंथात सांगितली आहेत. त्याचप्रमाणे वापी, तडाग, नगर, कोट, इ. ठिकाणी आणि मिरवणूक, उत्सव, अशा विविध प्रसंगी रथावर किंवा गजावर कशा प्रकारचे ध्वज लावावे, हेही त्यात सांगितले आहे.

कालांतराने प्रत्येक योद्धा वेगवेगळा ध्वज वापरू लागला. महाभारतात अशा अनेक ध्वजांची नावे आहेत. उदा० अर्जुनाचा कपिध्वज, कृपाचा वृषभध्वज, जयद्रथाचा वराहध्वज, दुर्योधनाचा गजध्वज, भीष्माचार्यांचा तालध्वज, भीमाचा सिंहध्वज इत्यादी. हे ध्वज बहुधा रथावर लावलेले असत. या ध्वजांवर कित्येक वीर पुरुष दुर्गेची निरनिराळी रूपे चित्रित करीत. तसे




(१) चामरध्वज (२) मणिध्वज (३) चक्रध्वज– अजंटा येथील भित्तिचित्रे

केल्याने शत्रूचा सत्वर नाश होतो, अशी समजूत होती. मौर्य सम्राटांचा मयूरध्वज व गुप्तांचा गरुडध्वज प्रख्यात आहे.

रणक्षेत्राप्रमाणे धार्मिक क्षेत्रातही ध्वजाला मानाचे स्थान प्राप्त झालेले आहे. शंकराचा ध्वज वृषभांकित असतो म्हणून




मरहूतच्या शिल्पातील ध्वज

त्याला वृषभध्वज आणि विष्णूचा गरुडांकित असतो म्हणून त्याला गरुडध्वज हे विशेषण लावले जाते. त्याचप्रमाणे दुर्गेचा सिंहध्वज, गणेशाचा कुंमध्वज किंवा मूषकध्वज, कार्तिकेयाचा मयूरध्वज, मदनाचा मकरध्वज, असे निरनिराळ्या देवांचे वेगवेगळे ध्वज सांगितले आहेत. भिन्न संप्रदायांचेही वेगवेगळे ध्वज असतात. शैव लोक वृषभध्वज, वैष्णव गरुडध्वज व शाक्त सिंहध्वज वापरतात.

काही ठिकाणी देवतांचे प्रतीक म्हणून एखादा ध्वज किंवा झेंडा उभा करतात. बिहारमधील अनेक गावांत महावीर (हनुमान) याच्या नावाने ध्वजाची पूजा करतात; तर काही ठिकाणी शाकंभरीचे प्रतीक म्हणुन ध्वजपूजा करतात. वर्षप्रतिपदेच्या दिवशी गुढी उभारतात, तीही एक प्रकारचा ध्वजच असतो. ध्वजाला देव मानून त्याचा उत्सव करण्याचीही प्रथा होती. इंद्रध्वजोत्सव हे त्याचे प्रसिद्ध उदाहरण होय. महाभारत, बृहत्संहिता व पुराणे यांत इंद्रध्वजोत्सवाचे सुंदर वर्णन केलेले आहे. यज्ञमंडपावर विविध रंगांचे ध्वज लावावे, असे कुण्डार्क या ग्रंथात सांगितले आहे.

ध्वजदान केल्यामुळे सर्व कामना पूर्ण होतात, सर्व पापांचा नाश होतो आणि स्वर्ग लाभतो, असे सांगितले आहे.

**भगवा ध्वज** – भगव्या ध्वजाची परंपरा अत्यंत प्राचीन आहे. प्राचीन वाङमयात भगव्या रंगाला अरुण, ताम्र, अरुष, काषाय, इ. अनेक नावे होती. ऋग्वेदात (६.४९.२) अरुष केतूचा आणि अथर्ववेदात (११.१०.२,७) अरुण केतूचा उल्लेख आढळतो. यावरून वैदिक युगात भगवा ध्वज वापरला जात होता, असे सिद्ध होते. रामाने रावणाचा वध केल्यानंतर लंकेवर आपला भगवा ध्वज उभारला होता. कृष्णार्जुनांचा ध्वजही भगवाच होता. यवनांचा पराभव करणारा चंद्रगुप्त मौर्य, शकांना नामोहरम करणारे सातवाहन राजे, हूणांना पिटाळून लावणारे गुप्त सम्राट यांनी भगव्या ध्वजाच्या साक्षीनेच भीमपराक्रम केले, असे इतिहास सांगतो. इ. स. च्या ६ व्या शतकात बंगालमधील पाल राजांचा ध्वज केशरी रंगाचा होता. राजस्थानातील राजपूत राजे एकलिंगजीचा प्रसाद म्हणून भगवा ध्वज वापरीत व युद्धाच्या प्रसंगी केशरी पोशाख घालीत. नेपाळचे राजे राजपूतवंशी असून, भगवा ध्वज हा त्यांचा राष्ट्रध्वज आहे. शंकराचार्यांनी स्थापन केलेल्या चारही मठांवर भगवा ध्वज फडकत असतो. संन्याशांची वस्त्रे काषाय म्हणजे भगवीच असतात आणि त्याला अनुसरूनच त्यांचे ध्वज भगवे ठेवण्यात आले आहेत. देवगिरीच्या यादवांचा ध्वज भगवा होता आणि विजयनगरच्या सम्राटांचा ध्वजही भगवाच होता, असे इतिहासावरून कळते.



भगवा ध्वज

रामदासस्वामींनी छत्रपती शिवाजीमहाराजांना एक भगवे वस्त्र देऊन त्याचा ध्वज करण्यास सांगितले आणि तेव्हापासून भगवा ध्वज हा मराठ्यांचा राष्ट्रध्वज ठरला, अशी आख्यायिका सांगतात. भोसले घराण्याचा ध्वजही भगवा होता, असे जुन्या कागदपत्रांवरून समजते. तोच भगवा ध्वज पुढे शिवछत्रपतींनी राष्ट्रध्वज ठरवला असे दिसते. पेशवाईतही तोच मराठ्यांचा राष्ट्रध्वज होता. कोणतेही ठिकाण जिंकून घेतल्यानंतर तिथे विजयी भगवा ध्वज उभारला जात असे.

सांप्रतही धार्मिक क्षेत्रांत भगव्या ध्वजाला मानाचे स्थान आहे. सर्व देवालयांवर बहुधा भगवा ध्वजच फडकत असतो. पंढरीचे वारकरीही भगवी पताकाच खांद्यावर बाळगतात. जैन साधूंचा ध्वजही भगवाच असतो.

**मुसलमानी झेंडा** – मुसलमानांचा हिरवा झेंडा गेली सातआठ शतके भारतात फडकत आहे. त्या झेंड्यावर चांदतारा (चंद्रकोर व तारका) हे चिन्ह काढलेले असते. मुहंमद पैगंबराचा झेंडा काळ्या रंगाचा होता, असे म्हणतात. इ. स. च्या आठव्या शतकात मुसलमानांच्या निरनिराळ्या पक्षांचे, काळा, पांढरा, लाल, हिरवा असे विविध रंगांचे झेंडे होते. त्यांतील हिरवा झेंडा फतिमा पक्षाचा होता व तोच पुढे इस्लाम धर्माचा झेंडा ठरला. पुढे इ. स. च्या तेराव्या शतकात तुर्की लोकांनी त्यावर चांद अंकित केला. त्यानंतर केव्हा तरी चंद्रकोरीत तारकेची भर घालण्यात आली.

**युनियन जॅक** – पेशवाई बुडून इंग्रजांनी हिंदुस्थानावर आपली सत्ता स्थापली, तेव्हापासून युनियन जॅक हा इंग्रजशासित भारताचा ध्वज ठरला. निळ्या रंगाच्या आयताकार पताकेवर एक उभा, एक आडवा आणि दोन तिरपे असे चार तांबडे पट्टे, असे त्याचे स्वरूप आहे. इ. स. १९४७ पर्यंत हाच ध्वज दिल्लीवर फडकत होता. त्यानंतर स्वतंत्र भारताचा नवा राष्ट्रध्वज तिथे फडकू लागला.

**राष्ट्रध्वज** – भारतीय राष्ट्रध्वजाची परंपरा इ. स. १९०६ पासून सांगता येते. स्वातंत्र्यासाठी जे क्रांतिकारक भारतीय तरुण युरोपात कार्य करीत होते, त्यांना आपल्या स्वतंत्र ध्वजाची नितांत आवश्यकता भासू लागली आणि श्रीमती कामा यांनी फ्रान्समध्ये असताना भारतीय स्वातंत्र्याचा जो एक ध्वज तयार केला, त्यावर केशरी, पिवळा व हिरवा या तीन रंगांचे तीन पट्टे होते. पिवळ्या पट्ट्यावर 'वंदे मातरम्' ही निळी अक्षरे, केशरी पट्ट्यावर आठ कमळे आणि हिरव्या पट्ट्यावर चंद्र व सूर्य चित्रित केलेले होते. जर्मनीतील बर्लिन येथे झालेल्या समाजवादी परिषदेत हा ध्वज प्रथम फडकवण्यात आला.

इ. स. १९२१ पूर्वी राष्ट्रीय सभेचे अधिवेशन युनियन जॅकखालीच होत असे. त्यानंतर हिरवा व तांबडा अशा दोनच पट्ट्यांचा नवा ध्वज काँग्रेससाठी तयार करण्यात आला. पुढे त्यात एक पांढरा पट्टा व चरखा यांची जोड दिली गेली. इ. स. १९३१ साली राष्ट्रीय सभेने आपल्या ध्वजाला निश्चित रूप दिले. त्याची लांबी रुंदी ३×२ या प्रमाणात असून, त्यात केशरी, पांढरा व हिरवा असे तीन पट्टे आहेत. पांढऱ्या पट्ट्यावर मध्यभागी निळ्या रंगात चरखा काढलेला असतो. त्यातला केशरी रंग धैर्य व त्याग यांचे प्रतीक मानला गेला. शुभ्र रंग शांती व सत्य यांचा द्योतक व हिरवा रंग शौर्य व श्रद्धा यांचा निदर्शक ठरला.



राष्ट्रीय सभेचा तिरंगी ध्वज

इ. स. १९४७ मध्ये भारताला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर वरील तिरंगा ध्वजच आपला राष्ट्रध्वज ठरला. मात्र त्यात चरख्याच्या जागी अशोकचक्र आले. ते चक्रही भारतीय संस्कृतीचे एक अर्थगर्भ प्रतीकच आहे.



भारतीय राष्ट्रध्वज

राष्ट्रीय ध्वज म्हणजे त्या त्या राष्ट्राच्या परंपरेचे व तेजस्वी अस्मितेचे प्रतीकच असते. त्यात राष्ट्राची सारी प्रतिष्ठा एकवटलेली असते. त्यामुळे तो राष्ट्राचा एक मानबिंदू ठरतो.

आपल्या राष्ट्रध्वजाविषयीही आपल्या मनात पावित्र्याची भावना असायला हवी. आपल्या हातून त्याचा नेहमी सन्मान व्हायला हवा. त्याच्या रक्षणासाठी दाहक दिव्य करण्याची आणि प्रसंगी प्राणार्पण करण्याचीही प्रत्येकाची सिद्धता असायला हवी. [ ना. प्र. प. – हीरक जयंती अंक, १९५३; प्रा. मा. जां.; वे. रा. द.; एन्सा. ब्रि.; हिं. वि. को.; श्री. अ. ज. करंदीकर– अग्रणी, १५ ऑगस्ट १९४७; म. ध्व. रा.; आ. मा. आ. अ. ]

**ध्वजनवमी** पौष शुद्ध नवमीला हे नाव आहे. या तिथीला शांबरी असेही म्हणतात. या दिवशी चंडिकेच्या पूजेचे विशेष महत्त्व सांगितले आहे. या पूजेत देवीला पशुबली द्यायचा असतो. पताकांनी देवीचे देऊळ सुशोभित करणे, कुमारिकांना भोजन घालणे आणि उपवास किंवा एकभुक्त करणे असा या व्रताचा विशष विधी आहे. फल– आरोग्य, शक्ती व संपत्ती यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**ध्वजनाथी** जोग्यांचा एक वर्ग. हे हातात ध्वज घेऊन हिंडतात व हनुमानाशी आपला संबंध असल्याचे सांगतात. हे पंजाबात आढळतात. पाहा– जोगी. [ गो. च. प. ]

**ध्वजव्रत** एक काम्य व्रत. चैत्र, वैशाख, ज्येष्ठ व आषाढ या चार महिन्यांत अनुक्रमे वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध या देवतांच्या ध्वजांची पूजा करावी, असे सांगितले आहे. गरुड, तालवृक्ष, मकर व हरिण हे अनुक्रमे वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध यांचे ध्वज होत. त्यांच्या वस्त्रांचा रंग अनुक्रमे पिवळा, निळा, पांढरा व तांबडा असतो. चार चार महिन्यांचे तीन भाग करून वर्षभर वरीलप्रमाणे पूजा करायची असते. उद्यापनाच्या वेळी ब्राह्मणांना ध्वजानुरूप रंगीत वस्त्रे दान देतात. भिन्न व्रतावधीप्रमाणे भिन्न लोक लाभतात. बारा वर्षे हे व्रत करणाऱ्याला सायुज्य मुक्ती मिळते व तो विष्णुरूप होतो, असे म्हटले आहे. या व्रताला चतुर्मूर्तिव्रत असेही म्हणतात. [ हि. ध. ]

**ध्वजा एकादशी** एक राजस्थानी लोकोत्सव. भाद्रपद शुद्ध एकादशीला हा उत्सव करतात. या दिवशी मंदिरांवर ध्वजा उभारतात व मंदिरामध्ये पूजा-अर्चा, भजन, अन्नदान, इ. कार्यक्रम करतात. देवालयांचे पुजारी आपापल्या देवतांना हत्तींवर किंवा पालख्यांत बसवून मिरवणुकीने जलाशयावर नेतात व तिथे त्यांना स्नान घालतात. [ राजस्थानी लोकोत्सव–श्री. गींडाराम वर्मा, १९५७ ]

**ध्वजाग्र केयूरा** एक बौद्ध देवता. ही नील किंवा पीत वर्णाची, त्रिमुख किंवा चतुर्मुख, चतुर्भुज, खड्ग, पाश, चक्र व खट्वांग ही आयुधे धारण करणारी, गळयात रुंडमाला व मस्तकी अक्षोभ्याची मूर्ती धारण करणारी, व्याघ्रचर्म नेसलेली अशी असते. मात्र ती चतुर्मुख असते तेव्हा मस्तकी अक्षोभ्य नसतो व तिची आयुधेही वेगळी असतात. ही प्रत्यालीढ आसनात उभी असते. हिची काही रूपे भयानक असतात. [ इं. बु. इ. ]


ध्वजाग्र केयूरा

**ध्वनी** काव्य, व्याकरण, इ. शास्त्रांतील एक संज्ञा. पदार्थविज्ञानात हवेतील लहरी कर्णपटलावर आदळून निर्माण होणाऱ्या संवेदनेला ध्वनी म्हणतात. परंतु संस्कृत काव्यशास्त्रानुसार ध्वनी ही एक विशिष्ट अर्थप्रतीती आहे. आनंदवर्धनाने ध्वन्यालोक नामक ग्रंथात ध्वनीची व्याख्या दिली आहे, ती अशी–

यत्रार्थः शब्दो वा तमर्थमुपसर्जनीकृतस्वार्थौ ।
व्यङ्क्तः काव्यविशेषः स ध्वनिरिति सूरिभिः कथितः॥

अर्थ– ज्या काव्यात कथित शब्द व अर्थ हे स्वतःला अप्रधान (गौण) करून व्यङ्ग्य (सूचित) अर्थाची अभिव्यक्ती करतात, त्याला विद्वान लोक ध्वनी म्हणतात.

काव्यशास्त्रज्ञांनी ही संज्ञा वैयाकरणांकडून उचलली आहे. वैयाकरणांच्या मते श्रोत्रेंद्रियापर्यंत पोचणारे शब्दाचे अथवा वर्णसमूहाचे स्वरूप अनित्य असल्यामुळे त्यापासून अर्थप्रतीती होणें अशक्य आहे. परंतु प्रत्येक शब्दाला एक सूक्ष्म प्रतिरूप असते. वर्णसमूहाच्या उच्चाराने उठणाऱ्या अनित्य नादलहरी जरी लगेच विरून जात असल्या, तरी त्याच्या सूक्ष्म प्रतिरूपाचा एकसंध ठसा मनात उमटतो. शब्दाच्या या सूक्ष्म व नित्य ध्वनिबिंबाला व्याकरणशास्त्रात स्फोट असे म्हणतात. शब्दाचा अंतिम ध्वनी उच्चारला गेल्यानंतरच स्फोट हा अर्थाची प्रतीती घडवितो. स्फोट हा ज्या वर्णांनी व्यङ्क्त (ध्वनित)

होतो, त्या व्यंजक वर्णांना भर्तृहरीने ध्वनी असे नाव दिले आहे. व्याकरणशास्त्रातील या स्फोट सिद्धान्ताच्या पायावरच ध्वनिकारांनी ध्वनिसिद्धान्ताचे मंदिर उभे केले आहे. वर्ण-समूहात्मक अनित्य शब्दांतून स्फोटात्मक नित्य शब्द व्यक्त होणे आणि सर्वसाधारण वाच्यार्थ सांगणाऱ्या शब्दातून विशे-षाभिप्रायात्मक व्यंग्यार्थ व्यक्त होणे या दोन्ही प्रक्रियांत पुष्कळच साम्य आहे. ज्याप्रमाणे शब्दातील वर्णोच्चाराने उठ-णारे पृथक पृथक् ध्वनी अर्थबोध घडवायला असमर्थ असतात आणि त्यांच्या स्फोटामुळेच अर्थाची अभिव्यक्ती होते, त्याच-प्रमाणे काव्यातील केवळ वाच्यार्थाने काव्यगत मूल सौंदर्याची प्रतीती होत नाही; तर ती सूचित (व्यंग्य) अर्थामुळेच होऊ शकते. प्रधानभूत अशा व्यंग्यार्थाची अभिव्यक्ती करण्याच्या बाबतीत उत्तम काव्यातील शब्दार्थांचे व्याकरणातील शब्दाशी साम्य असल्यामुळे, आलंकारिकांनी वैयाकरणांचे अनुकरण करून उत्तम काव्यरूप शब्दार्थांना ध्वनी असे नाव दिले. परंतु वैयाकरणांनी ध्वनी हे नाव केवळ शब्दाला दिले आहे; तर आलंकारिकांनी शब्दार्थरूप काव्याला ध्वनी म्हटले आहे. अशा शब्दार्थांना आनंदवर्धन 'महाकवीचे शब्द' असे नाव देतो.

व्यंजना–काव्यातील हा व्यंग्यार्थ अथवा ध्वन्यर्थ व्यंजना नामक शब्दशक्तीमुळे प्रतीत होत असतो. मुख्यार्थापेक्षा अधिक अर्थ प्राप्त करून देणाऱ्या शब्दशक्तीला व्यंजना अशी संज्ञा आहे. व्यंजना म्हणजे सूचना. व्यंग्यार्थ हा प्रत्यक्षपणे शब्दांनी वाच्य असा नसतो; पण त्यांनीच सूचित असा असतो. उदा० 'गतोऽस्तमर्कः' = सूर्य अस्ताला गेला. हे वाक्य उच्चार-णाबरोबर सूर्य मावळल्याचा बोध तर तत्काल होतोच; परंतु केवळ एवढाच अर्थ व्यक्त करून ते वाक्य थांबत नाही; तर ते वाक्य कोण कोणाजवळ उच्चारीत आहे, त्यावरून त्याचे अनेक सूचित अर्थ संभवतात. चोरांच्या संभाषणात त्यात चौर्य-कर्माच्या तयारीला लागण्याची सूचना आहे, तर शेतकऱ्यांच्या संभाषणात, 'काम थांबवून घरी जाण्याची वेळ झाली,' अशी सूचना आहे. कर्मठ ब्राह्मणाला त्यातून संध्यावंदनाच्या वेळेची सूचना मिळते; तर अभिसारिकेला 'आता अभिसरणाची वेळ झाली,' अशी सूचना मिळते. संदर्भभेदाने हे सारे सूचित अथवा ध्वनित अर्थ त्या तीन शब्दांचेच आहेत. हे ध्वन्यर्थ किंवा व्यंग्यार्थ व्यक्त करणाऱ्या शब्दांना व्यंजक शब्द म्हणतात आणि शब्दांना व्यंग्यार्थ व्यक्त करण्याचे सामर्थ्य प्राप्त करून देणाऱ्या शक्तीला व्यंजना म्हणतात. ध्वनीच्या मुळाशी ही व्यंजना शक्ती असल्यामुळे व्यंजक शब्द, व्यंजक अर्थ, व्यंजना-व्यापार आणि व्यंग्यकाव्य या सर्वांनाच काव्यशास्त्रात ध्वनी असे म्हणण्याची रूढी आहे. सामान्यपणे व्यंग्यार्थ म्हणजे ध्वनी होय.

**ध्वनिकाव्य** – ध्वनिकारांनी आणि ध्वनिसमर्थक आलंकारि-कांनी ध्वनिप्राधान्याच्या निकषावर अतिशयिव्यंग्य अथवा ध्वनिकाव्य, गुणीभूतव्यंग्यकाव्य आणि अव्यंग्य अथवा चित्रकाव्य असे तीन भेद सांगितले आहेत. उत्तम, मध्यम व अवम या त्या काव्यप्रकारांच्या श्रेणी होत. ज्यातील व्यंग्यार्थ स्फुट असून वाच्यार्थाहून सरस आहे, ते अतिशयिव्यंग्य अथवा ध्वनिकाव्य असून, ते उत्तम काव्य म्हणून मान्यता पावते. ज्यातील व्यंग्यार्थ स्फुट असूनही वाच्यार्थाहून कमी चमत्कारकारी आहे, त्या काव्याला गुणीभूतव्यंग्य असे म्हणतात. ते मध्यम प्रतीचे काव्य होय. तसेच, ज्यातील व्यंग्यार्थ अस्फुट असून ज्यात अलंकारां-नाच प्राधान्य आहे, ते अव्यंग्य काव्य होय. याची श्रेणी कनिष्ठ-तम असते. ज्यात व्यंग्यार्थ अथवा ध्वन्यर्थ मुळीच नाही, त्याला मम्मटादिक ध्वनिवादी काव्यशास्त्रज्ञ काव्य म्हणायलाही तयार तयार नाहीत.

या त्रिविध काव्यातील उत्तम जे ध्वनिकाव्य, त्याचे सूक्ष्म विश्लेषण करून आलंकारिकांनी अनेक प्रकार कल्पिले आहेत. ध्वनीत जे वाच्यार्थाहून व्यंग्यार्थाचे श्रेष्ठत्व असते, ते दोन प्रकारांनी संभवते–(१) जेव्हा वाच्यार्थाची विवक्षाच नसेल, म्हणजे वाच्यार्थ बोधित करून देण्याची वक्त्याची इच्छाच नसेल, तेव्हा अविवक्षितवाच्य ध्वनी निर्माण होतो आणि (२) जेव्हा वाच्यार्थाची विवक्षा असूनही तो वाच्यार्थ व्यंग्यार्थाला उपकारक किंवा सहायक होतो, तेव्हा विवक्षित-अन्यपरवाच्य-ध्वनी निर्माण होतो.

पहिल्या प्रकारात वाच्यार्थ हा एक तर व्यंग्यार्थात परिणत होतो, किंवा सर्वथा त्याज्य ठरतो. दुसऱ्या विवक्षित-अन्यपरवाच्य ध्वनीत दोन पर्याय संभवतात. ज्यात व्यंग्यार्थाची व्यंजक कारणे आणि त्यांनी व्यक्त होणारा व्यंग्यार्थ या दोहोंमधील पूर्वापर-भाव जाणवत नाही, अर्थात कार्यकारणांचा पूर्वापरक्रम न जाणवताच व्यंग्यार्थ झटकन प्रतीत होतो, तो पहिला पर्याय आणि ज्यात व्यंजक आणि व्यंग्य यांच्यामधले पौर्वापर्य जाणवते, तो दुसरा पर्याय होय. यांपैकी पहिल्या पर्यायाचे क्षेत्र रसादी व्यंग्यार्थ असून, त्याला त्याच्या उपरिनिर्दिष्ट स्वभावानुसार अलक्ष्यक्रमव्यंग्य असे शास्त्रीय नाव आहे. ध्वनिकारांनी वारंवार गौरविलेला व काव्याचा आत्मा मानलेला असा जो रसध्वनी तो हाच होय. दुसऱ्या लक्ष्यक्रमव्यंग्य या पर्यायाचे केवळ शब्द-शक्तीच्या (अर्थात अभिधेच्या), केवळ अर्थशक्तीच्या (अर्थात संदर्भादि–सापेक्ष वाक्यार्थाच्या) आणि या दोहोंच्या आश्रयाने उद्भवणारे, असे तीन प्रकार होतात. यांना अनुक्रमे शब्द-शक्त्युद्भव ध्वनी, अर्थशक्त्युद्भव ध्वनी आणि उभयशक्त्युद्-भव ध्वनी, अशी नावे आहेत. वस्तुध्वनी आणि अलंकारध्वनी हे

रसेतर स्थूल ध्वनी या तीन प्रकारातच संभवतात. या ध्वनिप्रकारांपैकी काही वाक्यांत, काही पदांत, काही पदांत आणि वाक्यात, काही पदवाक्य-प्रबंधांत, तर काही वर्ण-रचनापदैक-देशपद-वाक्य-प्रबंधांत संभवतात. या त्यांच्या संभवस्थानांवरून त्यांचे एकूण ५१ प्रकार शुद्ध स्वरूपात संभवतात आणि संकर व संसृष्टी यांच्यामुळे त्यांचेच १०,४५५ प्रकार होतात. ध्वनीचा समर्थक मम्मट याने हे सूक्ष्म परिगणन केले आहे.

उत्तम काव्याचे म्हणजे रसध्वनीचे उदाहरण म्हणून काव्यप्रकाशकार मम्मटाने अमरुशतकातला पुढील श्लोक उद्धृत केला आहे–

निःशेषच्युतचन्दनं स्तनतटं निर्मृष्टरागोऽधरो
नत्रे दूरमनञ्जने पुलकिता तन्वी तवेयं तनुः ।
मिथ्यावादिनि दूति बान्धवजनस्याज्ञातपीडागमे
वापीं स्नातुमितो गतासि न पुनस्तस्याधमस्यान्तिकम् ।।

अर्थ–(नायिका दूतीला म्हणते,) तुझ्या उभार उरोजांवरची चंदनाची उटी तर सर्वस्वी पुसून गेली आहे; अधरोष्ठावरचा लाल रंग सगळाच्या सगळा धुऊन निघाला आहे; दोन्ही डोळ्यांतले काजळ पार लोपून गेले आहे आणि तुझी ही नाजूक काया रोमांचांनी कशी बहरून आली आहे. खोटारडे दूती, आपल्या मैत्रिणीला किती कळा लागल्या आहेत, त्याची तुला जाणीवच नाही! खचित तू येथून जी गेली होतीस, ती पुष्करिणीकड स्नानाला, त्या चांडाळाकडे नव्हे!

येथे मुख्यत्वेकरून 'अधम' (चांडाळ) या पदाने 'तू त्याच्याकडेच रतिक्रीडेसाठी गेली होतीस,' असा ध्वन्यर्थ व्यक्त होतो आणि दूतीच्या सर्वांगावर उमटलेली चिन्हे ही स्नानकार्ये नसून संभोगकार्ये आहेत, असे हृद्य सूचन नायिकेच्या औपरोधिक उद्गारातून घडते. हे सूचन घडताच नायिकेची प्रियभेटीची तळमळ, विश्वासू दूतीला प्रियकराकडे पाठविल्यावर तिची वाढलेली उत्सुकता, दूतीने केलेला तिचा विश्वासघात, नायकाने केलेली तिची वंचना आणि या सर्वांचा परिणाम म्हणून तिचा वैफल्यजनित संताप, रसिकहृदयाला तत्काळ जाणवतो.

**ध्वन्यालोक** – ध्वनिसिद्धान्ताची सर्वांगीण शास्त्रीय चर्चा प्रथम आनंदवर्धनाने आपल्या ध्वन्यालोक नामक ग्रंथात केली. भरत–भामहांपासून रुद्रटापर्यंतच्या काळात हळूहळू मार्ग क्रमीत असलेल्या काव्यमीमांसेला त्याने विद्युद्वेगाने प्रगतिशिखरावर नेऊन पोचविले. त्यामुळे संस्कृत काव्यशास्त्राच्या इतिहासात आनंदवर्धन हा महान युगप्रवर्तक समजला जातो. त्याने वाच्य व लक्ष्य या पूर्वप्रसिद्ध अर्थांहून भिन्न अशा व्यंग्यार्थाची अथवा ध्वन्यर्थाची प्रतिष्ठापना अनेक प्रमाणांनी केली आणि या ध्वनीच्या निकषावर सर्व काव्यांगांचा पुनर्विचार केला. 'काव्यस्यात्मा ध्वनिः।' = काव्याचा आत्मा ध्वनी होय, असे सांगून, त्याने काव्यातील त्याच्या श्रेष्ठकनिष्ठ स्थानानसार काव्याचा श्रेष्ठकनिष्ठ क्रम दाखवून दिला. काव्यमीमांसेच्या क्षेत्रातील त्याचे हे कार्य लाखमोलाचे समजले जाते. वेदान्तशास्त्रात जे स्थान शंकराचार्यांच्या ब्रह्मसूत्रभाष्याला आहे, तेच स्थान काव्यमीमांसाशास्त्रात ध्वन्यालोकाला आहे, असे या क्षेत्रातील जाणकारांचे म्हणणे आहे.

प्रा. अर्जुनवाडकर आणि प्रा. मंगरूळकर यांनी काव्यप्रकाशाच्या उपन्यासात आनंदवर्धनाच्या ध्वन्यालोकाचे स्वरूप विशद केले आहे ते असे –

" प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या उद्द्योतात ग्रंथकाराने आपले विवेचन 'काव्यस्यात्मा ध्वनिः' या प्रतिज्ञेने आरंभिले असून, ध्वनी अर्थात व्यंग्यार्थ या तत्त्वाविषयीच्या विविध आक्षेपांचा सविस्तर परामर्श केला आहे आणि ध्वनीचे स्वतंत्र अस्तित्व आणि विवेचनक्षमत्व प्रस्थापित केले आहे. दुसऱ्या उद्द्योतात ध्वनीच्या अर्थात व्यंग्यप्रधान काव्याच्या प्रकारांचे निरूपण आहे. हे प्रकार वाच्यार्थ – व्यंग्यार्थ संबंधाच्या दृष्टीने केलेले आहेत. तिसऱ्या उद्द्योतात प्रथम ध्वनिप्रकारांचेच निरूपण आहे; पण हे प्रकार व्यंजकाच्या अर्थात् पदवाक्यादिकांच्या दृष्टीने केले आहेत. यापुढे ध्वनीच्या अस्तित्वाचा सविस्तर ऊहापोह केला असून या बाबतीत उद्भवणाऱ्या आक्षेपांचे युक्तिवादपूर्वक निराकरण केले आहे. ध्वनिकाव्याचे हे सर्व प्रकार आणि त्यांच्या अनुषंगाने आलेली चर्चा संपल्यावर गुणीभूत व्यंग्य आणि चित्र हे काव्याचे विशिष्ट मुख्य भेद निरूपिले आहेत; आणि प्रस्तुत व्यवस्थित रीतिवृत्तींचे स्थान काय, हे विशद केले आहे. राहिलेल्या चौथ्या उद्द्योतात विषय जुनेच असले, तरी कविप्रतिभेच्या आणि काव्यविषयांच्या अनंततेमुळे काव्याला नित्य नवीनता कशी येते, एका काव्याचे दुसऱ्या काव्याशी कशा प्रकारचे सादृश्य असावे – नसावे, याचा विचार करून ग्रंथाचा उपसंहार केला आहे. "

ध्वन्यालोकाचे हे स्वरूप पाहिल्यावर एक गोष्ट स्पष्ट होते, की काव्याच्या सर्व अंगांना एकत्र बांधणारे आणि त्याचबरोबर काव्यांचे मूल्य निर्धारित करणारे असे एक व्यापक तत्त्व प्रतिपादिण्यासाठी हा ग्रंथ जन्माला आला आहे.

ध्वन्यालोकापूर्वी ध्वनिसिद्धान्त अस्तित्वात होता की नाही, याविषयी निश्चयाने काही सांगता येत नाही. ध्वन्यालोकामध्ये या सिद्धान्ताचे जे समृद्ध स्वरूप आढळते, त्यावरून अभ्यासकांना असे वाटते, की आनंदवर्धनापूर्वी ध्वनिसिद्धान्ताची काही परंपरा अस्तित्वात असावी. ध्वन्यालोकाच्या पहिल्याच कारिकेत

' काव्यस्यात्मा ध्वनिरिति बुधैर्यः समाम्नातपूर्वः ' = काव्याचा आत्मा ध्वनी होय, असे बुद्धिमान लोक पूर्वीपासून म्हणत आले आहेत, असा पूर्वसूरींचा जो उल्लेख आहे, तो केवळ अर्थवादात्मक नसावा. ध्वन्यालोकावरील लोचन नामक टीकेत अभिनवगुप्ताने प्रस्तुत उल्लेखाचे स्पष्टीकरण केले आहे, ते असे—

अविच्छिन्नेन प्रवाहेण तौ एतदुक्तं, विनापि
विशिष्टपुस्तकेषु विवेचनात् ।

अर्थ — या सिद्धान्ताचे विवेचन कोणत्याहि विशिष्ट ग्रंथांतून झालेले नव्हते; तर अविच्छिन्न परंपरेने पूर्वाचार्य त्याचे प्रतिपादन करीत आले होते.

अभिनवगुप्ताने केलेल्या या खुलाशावरून असे दिसते, की आनंदवर्धनापूर्वी ध्वनिसिद्धान्त केवळ मौखिक परंपरेने काहीशा स्थूल स्वरूपात मांडला जात होता. आनंदवर्धनाने त्याला आपल्या ग्रंथात पूर्णतया सुप्रतिष्ठित केले आणि त्यानंतरच्या काळात अभिनवगुप्त व मम्मट या दोन काश्मिरी पंडितांनी आनंदवर्धनाचा वारसा अनेकांगांनी समृद्ध केला.

अभिनवगुप्त हा प्रतिभाशाली कवी, महान आचार्य आणि उच्च कोटीचा दार्शनिक असल्यामुळे त्याचे विवेचन अत्यंत प्रगल्भ बनलेले आहे. त्याने ध्वनिकार आनंदवर्धनाच्या पुढे जाऊन असे सांगितले, की ' रसेनैव जीवति सर्वं काव्यम् ' = काव्य हे केवळ रसामुळेच जगते. वस्तुध्वनी आणि अलंकारध्वनी ही ध्वनीची दोन शेष रूपे अखेरीस रसध्वनीचीच प्रतीती घडवितात, असे त्याचे म्हणणे आहे. यात त्याने रस व ध्वनी यांतील भेद नाहीसा केला. आपल्या या रस-ध्वनिविषयक विवेचनाला त्याने दार्शनिक अधिष्ठान प्राप्त करून दिले आहे. त्याचे म्हणणे असे आहे, की काव्याचा आत्मा ध्वनी आहे, हे निःसंशय; परंतु त्या ध्वनीला शब्दार्थगुणालंकारसंयुक्त अशा रसात्मकतेचे चारुत्व लाभलेले हवे. तार्किक दृष्टीने विचार केला, तर सार्वभौम असे आत्मतत्त्व या सीमित जगतातील प्रत्येक वस्तूत व्याप्त आहे; म्हणून ते घरातही व्याप्त आहे. परंतु तरीही आपण ' घरात जीव आहे, ' असे मानीत नाही, तर केवळ शरीरधारी अशांनाच आपण जीव मानतो. त्याचप्रमाणे केवळ ध्वनी नव्हे, तर रसात्मक सौंदर्याने युक्त असा ध्वनीच काव्याचा आत्मा मानला पाहिजे.

अभिनवगुप्ताच्या या दार्शनिक विवेचनामुळे रससिद्धान्त आणि ध्वनिसिद्धान्त यांचा प्रीतिसंगम घडून आला आणि ध्वनिसिद्धान्तातली एकांतिकता पूर्णतया दूर झाली.

ध्वनिसिद्धान्ताच्या व्यवस्थित स्थिरीकरणाचे श्रेय मम्मटाकडेच जाते. मम्मट हा सिद्धान्ततः ध्वनिवादी असला, तरी त्याने काव्यशास्त्रातील अन्य मतांचाही समादर केला आहे. त्याचे विवेचन परिपूर्ण आणि स्पष्ट असूनही त्यात अनावश्यक विस्तार टाळलेला आहे. त्याने वस्तुथितीचे मान ठेवून चित्र काव्याला कनिष्ठ श्रेणीचे का होईना, परंतु काव्यक्षेत्रात स्थान दिले. अर्थात अलंकारादिक वस्तू रसोपकारी असतील, तर त्यांचे महत्त्व वाढते; अन्यथा त्यांचा केवळ उक्तिवैचित्र्यात समावेश करायला हवा, हेही सांगायला तो विसरला नाही.

ध्वनिसिद्धान्ताला जसे महान समर्थक लाभले त्याचप्रमाणे त्याला कडाडून विरोध करणारेही अनेक आचार्य पुढे आले. अभिनवगुप्ताने भट्टनायक नामक एका ग्रंथकाराचा उल्लेख केला आहे. त्याने व्यंजनाशक्तीला विरोध केला असून, तिच्या ऐवजी भावकत्व व भोजकत्व या दोन नवीन शक्ती मानल्या आहेत. तो रसचर्वणाला काव्याचा आत्मा मानतो. अर्थात हा भट्टनायक ध्वनिसिद्धान्ताला पूर्णतया नाकारू शकला नाही, हेही तितकेच खरे. त्याचे म्हणणे असे, की ध्वनी हा व्याख्येचा विषय न होता केवळ स्वसंवेद्य असल्यामुळे त्याला शास्त्रप्रतिष्ठा देता येत नाही.

वक्रोक्तीलाच काव्याचे जीवित मानणाऱ्या कुंतक या आचार्याने ध्वनीचे स्वतंत्र अस्तित्व नाकारून, रसध्वनीचा प्रबंधवक्रतेत समावेश केला आहे. खरे म्हणजे कुंतकही ध्वनीला दूर सारू शकला नाही. वक्रोक्तीलाच काव्यसर्वस्व मानण्याच्या आग्रहामुळेच तो ध्वनीला विरोध करीत आहे, असे स्पष्ट दिसते. त्याने सर्व ध्वनिप्रकारांची वक्रोक्तीच्या विविध प्रकारांत व्यवस्था लावण्याचा चतुर प्रयत्न केला आहे.

कुन्तकानंतर लगेच, ध्वनिसिद्धान्त पूर्णपणे उद्ध्वस्त करणाऱ्या राजानक महिमभट्ट या काश्मिरी पंडिताने आपल्या व्यक्तिविवेक नामक ग्रंथात ध्वनिकारांच्या मताचा परामर्श घेतला आहे. व्यंजना अथवा व्यक्ती ही शब्दाची शक्ती तो मानीत नाही. त्याचे असे मत आहे, की व्यंग्यार्थाची प्रतीती शब्द आणि अर्थ यांच्या व्यंजकतेमुळे होत नसून ती अनुमानप्रक्रियेच्या द्वारा होते. त्याचमुळे ध्वनिकाराने ज्याला ध्वनी म्हटले आहे, त्याला महिमभट्ट काव्यानुमिती म्हणतो. त्याच्या मते शब्दाचे वाच्य आणि अनुमेय असे दोनच अर्थ संभवतात. अनुमेय या अर्थातच त्याने लक्ष्य आणि व्यंग्य यांचा समावेश केला आहे. अनुमेय अर्थ हा कधी वस्तूची, कधी अलंकाराची, तर कधी रसाची अनुमिती घडवितो. यांपैकी वस्तू व अलंकार वाच्यार्थाच्या रूपात प्रतीत होतीलही, परंतु रस मात्र सदैव अनुमेय असतो आणि तोच काव्याचे सर्वस्व आहे, असे त्याच्या मताचे सार आहे. काव्यमीमांसेच्या क्षेत्रात पुढे रससिद्धान्ताला साम्भावून घेऊन ध्वनिसिद्धान्ताने अव्याहत साम्राज्य गाजविले.

[ काव्यप्रकाश; हिं. सा. को.; सं. सा. शा. इ.; भा. सा. शा. ]

**नंगी पंथ** एक धार्मिक संप्रदाय. देढराज नामक हिंदी संत-कवीने याची स्थापना केली. पाहा– देढराज.

**नंदकिशोर** (१८१२–१८५५ इ. स.) बंगालमधील चैतन्य मताचा एक प्रचारक. याला केवळ ३२ वर्षांचे आयुष्य लाभले; पण तेवढ्यात एक महाविद्वान म्हणून याने लौकिक मिळवला. हा भागवतावर उत्तम प्रवचन करी. याने ब्रह्मपुरीत राधा–माधवांचे मंदिर बांधले आहे. शुकदूत नावाचे एक मोठे काव्य संस्कृत भाषेत याने रचले आहे. याशिवाय श्री गौर प्रेमोल्लास, श्री गोविंद गुणार्णव नाटक, श्रीराधा विहार-चम्पू, भागवतदर्पण, रासपंचाध्यायी, यमुनाष्टक इ. अनेक लहान मोठी संस्कृत काव्ये याने लिहिली आहेत. 'बारहखडी महिमा' हे याचे व्रजभाषेतले काव्य आहे. याने व्रजभाषेत भागवतावर टीकाही लिहिली आहे. त्याच्या बारहखडी महिमा या व्रजकाव्यातला नमुना असा –

घघा–घर घर कीर्तन कृष्णको करि करि पावन कीन ।
बाल वृद्ध बनिता सर्व, करे प्रेमरस लीन ।
नना-नाहक जन्म गमाड मति, करि ले हरि सो नेह ।
बार बार नहि बावरे, पावैगौ नर-देह ।

अर्थ– घरोघरी होणारे कृष्णाचे कीर्तन कुणाला पावन करीत नाही ! बाल, वृद्ध, स्त्रिया सगळीच प्रेमरसात लीन होतात. निष्कारण जन्म वाया घालवू नकोस. हरीवर प्रेम कर. हे वेड्या, पुन्हा पुन्हा नरदेह मिळत नसतो.

बारहखडी महिमा या काव्यातील प्रत्येक पहिली पंक्ती एकेका बाराखडीने सुरू होते. [चै. म. ब्र. सा.]

**नंदगाव** श्रीकृष्णाचा पालक पिता नंद याचे हे गांव होय. हे व्रज प्रदेशात आहे. श्रीकृष्णाचे बालपण इथेच गेले. हे गाव रुद्र टेकडीच्या भोवती वसले आहे. टेकडीवर नंदाचे मंदिर आहे. याला नंदालय अथवा नंदमहल म्हणतात. नंदगावाजवळ अनेक देवस्थाने, तीर्थे आणि धार्मिक स्थळे आहेत. त्यांपैकी बूढेबाबू, एक प्राण दो देह, नंदीश्वर, दधिमंथन का माट, विविध कुंड सरोवर, टेढ कदंब, अक्रूर बैठक, इ. प्रसिद्ध आहेत. हे एक पवित्र क्षेत्र मानले जाते. [ब्र. सां. इ.]

**नंददास** (१५३३–१५८३ इ. स.) अष्टछाप कवींपैकी एक. मथुरेच्या ईशान्येस असलेल्या रामपूर गावी एका सनाढ्य ब्राह्मणाच्या कुळात याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव जीवनराम असे होते. तुलसीदास हा याचा चुलत बंधू होता. नृसिंह पंडिताकडे याने संस्कृत भाषेचे उत्तम अध्ययन केले. एकदा तो यात्रेबरोबर मथुरेला जात असता एकटाच द्वारकेच्या रस्त्याला वळला. वाटेत सिंहनंद या गावी त्याला एक खत्री स्त्री भेटली. तिच्या रूपाने तो वेडावून गेला व तिच्या मागे मागे जाऊ लागला. पुढे दैवयोगाने त्याची गोसाई विठ्ठलनाथ यांच्याशी गाठ पडली. त्यांनी त्याला उपदेश करून ताळ्यावर आणले व पुष्टिमार्गाची दीक्षा दिली. आख्यायिका अशी आहे, की नंददासाला सूरदासाने ताळ्यावर आणले.

रामपूरला परत आल्यावर कमला नामक मुलीशी त्याचा विवाह झाला. नंतर त्याने आपल्या गावाचे रामपूर हे नाव बदलून श्यामपूर असे ठेवले. तिथे एक तलाव खोदून त्याने त्याला श्यामसर असे नाव दिले. काही दिवस असा गृहस्थाश्रम चालवल्यावर त्याला उपरती झाली. तो संसार सोडून गोवर्धन



नंददास

क्षेत्रात राहयला गेला. तिथे गंगेवर त्याचे वास्तव्य होते. तिथेच त्याने आपले उर्वरित आयुष्य श्रीनाथांचे भजन-कीर्तन व ग्रंथ-रचना यात घालवले. गंगेच्या तीरावर एका अश्वत्थवृक्षाखाली त्याने इहलोकीची यात्रा संपवली.

नंददासाने विपुल ग्रंथरचना केली आहे. नाममाला, अनेकार्थ पंचाध्यायी, रुक्मिणीमंगल, दशमस्कंध, दानलीला, मानलीला, गोवर्धनलीला, इ. ग्रंथ त्याने रचले आहेत. त्याशिवाय त्याची काही फुटकळ पदेही आहेत. त्याचा रासपंचाध्यायी हा ग्रंथ व्रजभाषेतील एक सरस ग्रंथ मानला जातो. गीतगोविंदाशी त्याची तुलना करतात. भ्रमरगीत ही त्याची रचनाही उत्कृष्ट आहे. भागवताच्या दशमस्कंधाचा त्याने केवळ शब्दशः अनुवाद केला

नाही, तर स्वतंत्र विचाराने त्याची वेगळी मांडणी केली आहे. नंददासाच्या ग्रंथांत मुख्यत्वे सखीभाव व्यक्त झालेला आहे. पुष्टिमार्गातली माधुर्यभक्ती त्याने रसाळपणे वर्णिली आहे. पुष्टिसंप्रदायात तोच महत्त्वाचा सांप्रदायिक कवी मानला जातो. पुष्टिमार्गात राधा ही रसमय कृष्णाची प्रिया मानलेली आहे. त्याला अनुसरून नंददास म्हणतो –

दूलह गिरिधर लाल छबीलो दुलहिन राधा गोरी।
जिन देखी मनमें अति लाजी ऐसी बनी यह जोरी।।

अर्थ– गिरिधरलाल श्रीकृष्ण हा सुंदरसा वर असून (त्याची) वधू राधा गोरीपान आहे. गिरिधराला पाहून राधा मनातल्या मनात लाजून चूर झाली आहे. असा हा (दोघांचा) जोडा सुरेख आहे.

राधा-कृष्णांचा विवाह निश्चित ठरल्यावर गोकुळात जो उत्सव झाला, त्याचे वर्णन त्याने पुढील प्रकारे केले आहे–

सुनति सगाई स्याम, ग्वाल सब अंगनि फूले।
नाचत गावत चले, प्रेमरसमें अनुकूले।
जसुमति रानी घर सज्यौ मोतिन चौक पुराइ।
बजति बधाई नंद कै 'नंददास' बलि जाइ
कि जोरी सोहनी।।

अर्थ– श्रीकृष्णाचा विवाह निश्चित ठरल्याचे ऐकून सर्वांना अतिशय आनंद झाला. श्रीकृष्णाचे सवंगडी गात, नाचत त्याच्या अंगणात गोळा झाले. ते जणू प्रेमरसात न्हाऊन निघाले. राणी यशोदेने घर सजवले व मोत्यांचे चौक पुरले. राधा-कृष्णांची जोडी सुंदर दिसते, म्हणून सर्वांनी त्या दोघांचे अभिनंदन केले.

नंददासाच्या काव्यातील माधुर्य व अलंकृती पाहून एक वाक्प्रचार रूढ झाला आहे–'कवि गढिया, नंददास जडिया'= नंददास हा काव्यवस्तूला शब्दरत्ने जडवणारा कवी आहे.

नंददासाचा समकालीन कवी ध्रुवदास याने त्याच्या काव्याचे रसग्रहण करणारे एक काव्य लिहिले आहे. नंददासाला त्याच्या आयुष्यात चांगली मानमान्यता मिळाली. [कृ. का. भ्र.; ब्र. कृ. मा. भ.; ब्र. सां. इ.; त. प्र. हिं. कृ.; रा. अ. ग्रं.]

**नंदनवन** इंद्राचे स्वर्गातील उद्यान आणि देवांचे विहार-स्थान. हे वन पारिजात पुष्पांसाठी प्रसिद्ध आहे. इंद्राचे आणि इतर देवांचेही या उद्यानावर विशेष प्रेम आहे. हे उद्यान स्वर्गंगेच्या तीरावर आहे, असे मत्स्य पुराणात म्हटले आहे.

वाल्मीकिरामायणात या वनाचे अनेक उल्लेख आहेत. वर्षभर फळे आणि मधुर रस देणारे वृक्ष या वनात आहेत (३. ७३. ६–७); या वनाचा रावणाने विध्वंस केला होता; रावणाबरोबर युद्ध करीत असता घायाळ झालेल्या कुबेराला या वनात आणले होते (७. १५. ३५); असे त्यात सांगितले आहे. [वा. रा. को.; हिं. सा. को. २]

**नंदनार** (इ. स. चे चौदावे शतक) द. भारतातील एक शैव संत व त्रेसष्ठ नायन्मारांपैकी एक. याचे सलग–साधार असे चरित्र मिळत नाही. दंतकथा आणि पेरिय-पुराणम या तमिळ ग्रंथाच्या आधारे त्याचे चरित्र सामान्य-पणे कळते, ते असे –

द. भारताच्या तंजाऊर जिल्ह्यातील अदनूर नामक खेड्यात एका अस्पृश्य दांपत्याच्या पोटी नंदनारचा जन्म झाला. त्याचे आई-वडील एका खोपटात राहून कसेबसे जीवन कंठीत. त्या महारवाड्यात सगळीकडे घाण होती. सगळे लोक ओंगळवाणे राहत होते. नंदनारही तशाच वातावरणात वाढत होता; पण त्याला त्या परिस्थितीची खंत वाटत होती. ती कशा प्रकारे पालटता येईल, याचा तो गंभीरपणे विचार करीत होता. अखेर त्याने सुधारणा करायची ती स्वतःपासून करा-यची, असे ठरवले.

रोज सकाळी स्वच्छ स्नान करावे, फाटके असले तरी स्वच्छ कपडे घालावे, सर्वांशी विनयाने वागावे, गोड बोलावे, अष्टौप्रहर शिवाचे नामस्मरण करावे, हे आणि असलेच अन्य नेमधर्म त्याने स्वतः आचरायला सुरवात केली. थोड्या दिव-सांत एक गुणी मुलगा म्हणून तो त्या महारवस्तीत नावाजला जाऊ लागला.

गावातल्या एका ब्राह्मणाची गुरे राखण्याची नोकरी तो करीत असे. ते काम त्याला आवडे. एके दिवशी संध्याकाळी गुरे घेऊन घरी येताना त्याने एक माणूस देवीपुढे एका बकऱ्याचा बळी देत असल्याचे भीषण दृश्य पाहिले.

घरी गेल्यावर नंदनारच्या डोळ्यांपुढे तेच ते दृश्य पुन्हा पुन्हा उभे राहू लागले. त्यामुळे तो आजारी पडला. त्याचे आईवडील घाबरून गेले. नंदनारच्या बापाने त्याचा ताप हटावा, म्हणून देवीला बलिदान करायचे ठरवले. पण बकरे विकत घ्यायला जवळ पैसे नसल्यामुळे त्याने नंदनारचे एक आवडते मेंढरू होते, तेच देवीपुढे कापले. त्यामुळे तर नंदनारवर वज्राघातच झाला. पण तो कुढत बसला नाही. सर्व समाजाचे मतपरिवर्तन करण्यासाठी त्याने दुप्पट उत्साहाने कामाला सुरुवात केली. मग त्याने त्याला भेटणाऱ्या प्रत्येक माणसाला स्वतःला पट-लेल्या तत्त्वांचा उपदेश करण्यास आरंभ केला. हळूहळू त्याच्याही विचाराचे लोक त्याच्या अवतीभवती जमू लागले. त्या सर्वांनी मिळून आपल्या समाजातील शिवाशिव, भेदाभेद,

बलिदानासारख्या कठोर चालीरीती, दारिद्र्य, अडाणीपणा, इ. गोष्टी नष्ट करायचे ठरवले. त्यासाठी ते गावोगाव जाऊन लोकांना उपदेश करू लागले; देवालयांच्या दारी देवदर्शनासाठी सत्याग्रह करू लागले.

असेच एक दिवस नंदनार व त्याचे सवंगडी तिरुपुंकर येथील महादेव मंदिराच्या दारी धरणे धरून बसले होते. त्यांना मंदिरात जाऊन देवदर्शन घ्यायचे होते; पण पुजारी त्यांना तसे करू द्यायला तयार नव्हते. ते त्यांना तिथून हुसकून द्यायला सिद्ध झाले होते. अशा स्थितीत नंदनार तिथून उठला व दूर नंदीच्या मागे जाऊन उभा राहिला. त्या क्षणी एक चमत्कार झाला. तो दगडी नंदी एकाएकी बाजूला कलला आणि त्याच्या मागे उभ्या असलेल्या नंदनारला मंदिरातल्या शिवाचे दर्शन घडले.

नंदनारला या चमत्काराचे मोठे नवल वाटले. शिवाच्या या कृपेचे आपण कसे उतराई होऊ याचा तो विचार करू लागला आणि त्याला एक उपायही सापडला. तिरुपुंकर मंदिराच्या जवळ राहणाऱ्या लोकांचे पाण्याचे फार हाल असत. नंदनारने ते दूर करायचे योजले. आपल्या साथीदारांच्या मदतीने त्याने तिथे एक विहीर खोदण्यास आरंभ केला. मुखाने शिवनामाचा घोष आणि हाताने कुदळ–फावडीचे घाव असा उद्योग चालू झाला. थोडयाच खोलीवर तिथे पाण्याचे झरे लागले व विहीर पाण्याने भरून गेली. नंदनारच्या रूपाने साक्षात शंकरच आपल्यावर प्रसन्न झाला, असे गावातल्या लोकांना वाटले. सगळ्यांनी मिळून शिवाचा आणि नंदनारचा जयजयकार केला.

त्यानंतर नंदनार परत आपल्या गावी गेला; पण आता त्याचे मन तिथे रमेना. एकदा त्याने एका पुराणिकाच्या तोंडून चिदंबरमच्या नटराज शिवाचे माहात्म्य ऐकले आणि त्याला नटराजदर्शनाचा ध्यास लागला. मग मालकाच्या परवानगीने तो चिदंबरमला निघाला. वाटेत ऊन, पाऊस, वादळ यांसारख्या अनेक आपत्तींना तोंड देत देत तो अखेर चिदंबरमला पोचला. शूचिर्भूत होऊन तो नटराजाच्या मंदिरद्वाराशी आला; परंतु तो अस्पृश्य आहे, हे कळताच त्याला मंदिरात प्रवेश मिळेना. तिथल्या धर्माधिकाऱ्यांनी आणि शास्त्री-पंडितांनी त्याला तिथून हाकून दिले. पण नंदनार रागावला नाही. तो तिथेच धरणे धरून शांतपणे बसून राहिला.

त्या रात्री आपल्या भक्ताची ती दुरवस्था पाहून नटराजाचे अंतःकरण कळवळले. त्याने त्या धर्माधिकाऱ्यांच्या स्वप्नात जाऊन नंदनारवर असा अन्याय करू नका, असे त्यांना बजावले. दुसऱ्या दिवशी त्या लोकांनी नंदनारला सांगितले, की 'तू अग्निदिव्य करून शुद्ध होशील, तर आम्ही तुला मंदिरात प्रवेश देऊ.' नंदनार त्या गोष्टीला आनंदाने सिद्ध झाला. लगेच एक चिता पेटवण्यात आली. नंदनार त्या चितेवर जाऊन शांतपणे उभा राहिला. त्याच्या भोवताली अग्निज्वाला उठू लागल्या. पण आश्चर्याची गोष्ट ही, की एकाएकी ती चिता थंड झाली आणि थोडीही इजा न होता नंदनार तिच्यावरून खाली उतरला. मग त्याचे शुद्धत्व शास्त्री-पंडितांसह सर्वांनाच पटले. मग तिथल्या ब्राह्मणांनी त्याला अक्षरशः डोक्यावर घेऊनच मंदिरात नेले. आपल्या लाडक्या भक्तराजाला पाहून नटराजाचे डोळे आनंदाश्रूंनी डबडबले आहेत, असे दृश्य लोकांना दिसले. नंदनारचे सर्व मनोरथ पूर्ण झाले.

## नंद पंडित

(१५९५–१६३० इ. स.) एक धर्मशास्त्रकार. हा विनायक पंडित या नावाने ओळखला जातो. याचे वास्तव्य काशीत होते. भारताच्या निरनिराळ्या भागातील धनिकांकडून नंद पंडिताला आश्रय मिळाला होता. याला लोक धर्माधिकारी असे समजत. याचे ग्रंथ पुढीलप्रमाणे आहेत–

विद्वन्मनोहर (पराशर-स्मृतीवरील टीका), प्रमिताक्षरा व प्रतीताक्षरा (मिताक्षरेवरील टीका), श्राद्धकल्पलता, स्मृतिसिंधू (हा ग्रंथ महेंद्र घराण्यातील मंगो राजाचा पुत्र हरिवंश वर्मा याच्या आज्ञेवरून रचला.), तत्त्वमुक्तावली, केशव वैजयन्ती किंवा वैजयन्ती (यात कर्नाटकातील विजयपूरच्या ब्राह्मण राजवंशाची माहिती आहे. हा ग्रंथ कोंडप नायकाचा पुत्र केशव नायक याच्या नावाने आहे.), नवरात्रप्रदीप, हरिवंशविलास, काशीप्रकाश, तीर्थकल्पलता, शुद्धिचंद्रिका, कालनिर्णयकौतुक, ज्योतिःसारसमुच्चय, स्मार्तसमुच्चय आणि दत्तकमीमांसा. [ हि. ध.; म. च. को.; आ. सं. मू. ]

## नंदभाषा

एक सांकेतिक भाषा. ही भाषा व्यापाऱ्यांची वा दलालांची आहे. इ. स. च्या १२ व्या शतकापासून आजतागायत ही भाषा महाराष्ट्रात काही ठिकाणी प्रचलित आहे. परंतु ही भाषा कुठून आली, कोणी आणली व हिचे मूळ कोणत्या भाषेत आहे, यासंबंधीची मात्र काहीही माहिती मिळत नाही. या भाषेत अत्यल्प शब्द आहेत व ते मुख्यत्वे अंकांबद्दल आहेत. उदा०–

केवळी=एक, आवारू=दोन, उधानू=तीन, पोकू=चार, मुळू=पाच, शेली=सहा, पवित्र=सात, मंगी=आठ, तेवसू=नऊ, अंगुळु=दहा, एकडू=अकरा, रेघा=बारा, ठेपरू=तेरा, चोपडू=चौदा, तळ=पंधरा, तान व भुरकातानतळी=सोळा,

उवातुवान तळी=अठरा, काटी=वीस, मुरकातानकाटी=एकवीस, बिटी=शंभर, टका=हजार, फाटा=एक आणा, आवारू फाटे=दोन आणे, मंगी फाटे=आठ आणे, तळी फाटे=पंधरा आणे, इ.

विसोबा खेचराचा या भाषेत एक अभंग आहे, तो असा–

मुळू वदनाचा, उधानू नेत्राचा
अंगुळू हाताचा, स्वामी माझा ।।
मुगूट तयाचा केवळचा, आगळी काटी ।
पवित्र तळवटी चरण ज्याचे ।।
ढकार वदनाचा आला वर्णावया ।
जिव्हा त्याच्या चिरल्या वर्णवेना ।।
झोली वेडावली पोकू मौनावली ।
अंगुळू मंगी थकली न कळे त्याशी ।।
सद्भावे शरण आवारू जोडून ।
खेचर वीसा म्हणे स्वामी माझा ।।

वरील अभंगात शंकराचे रूपवर्णन आहे.

विसोबाप्रमाणे महीपतीच्या भक्तविजयातही (अ. १८) या भाषेचा तुरळक वापर केलेला आहे. [ म. ज्ञा. को. ]

**नंदलाल** (इ. स. चे १७ वे शतक) एक जैन भक्तकवी. आग्र्याजवळच्या गौसुना गावाचा हा रहिवासी होता. याचा वंश अग्रवाल व गोत्र गोयल होते. याच्या पित्याचे नाव भयरौ किंवा भैरो व मातेचे नाव चंदन असे होते. याच्या विद्वत्तेने व सौजन्याने प्रभावित होऊन पंडित हेमराजाने आपली विदुषी कन्या जैनी याला दिली होती.

भट्टारक त्रिभुवनकीर्ती हा श्रुतपारंगत विद्वान नंदलालाचा गुरू होता. नंदलालाचे यशोधरचरित्र, सुदर्शनचरित्र व गूढ विनोद असे तीन ग्रंथ उपलब्ध आहेत.

यशोधरचरित्र या चौपाई छंदातील काव्यात जैन धर्माचा एक गाढा भक्त महाराज यशोधर याचे चरित्र वर्णिले आहे. याची भाषा प्रसन्न व प्रवाही आहे.

सुदर्शनचरित्र या काव्यात त्याने शेठ सुदर्शन या भक्ताचे चरित्र सांगितले आहे. त्यामुळे या काव्यात आरंभापासून अखेरपर्यंत भक्तीचा झरा झुळझुळताना दिसतो. हे काव्यही चौपाई छंदातच आहे. गूढ विनोद या काव्यात त्याची आध्यात्मिक पदे आहेत. [ हिं. जै. भ. क. ]

**नंदवंश** (सनपूर्व ४ थे शतक ). मगधातील एक राजवंश. शिशुनाग वंशातील कालाशोक (काकवर्ण) याच्या राणीचा एक प्रियकर होता. त्याने प्रथम काकवर्ण राजाचा विश्वास संपादन केला व नंतर त्याचा वध करून त्याच्या दहा पुत्रांना सिंहासनावर बसवले. तो स्वतः त्या राजपुत्रांचा पालक म्हणून राज्य चालवीत होता. पुढे दहा वर्षांत त्याने सर्व राजपुत्रांना ठार मारले व मगधाचे सिंहासन स्वतः बळकावले. हाच नंद वंशातील पहिला राजा होय. जैन व बौद्ध परंपरेनुसार तो शूद्र वर्णाचा (नापित) होता. महाबोधिवंस या ग्रंथात त्याचे नाव उग्रसेन असे दिले आहे. पुराणात त्याला महापद्म म्हटले आहे आणि तो राजा महानंदीच्या एका क्षुद्र दासीचा पुत्र होता, असे सांगितले आहे ( मत्स्य पु. १७१. १७–१८. ).

या उग्रसेनाच्या पूर्वायुष्यासंबंधीची काही माहिती महावंसटीका या ग्रंथात मिळते. तो एका दरोडेखोरांच्या टोळीचा नायक होता. त्याने अनेक राज्यांत लुटालूट केली व काही राज्येही जिंकली; शेवटी तो मगधासारख्या प्रबल देशाचाही राजा झाला, असे त्या ग्रंथात सांगितले आहे.

पुराणांत महापद्म नंदाला दुसरा परशुराम म्हणून गौरविले आहे ( भाग. पु. १२.१.७-११). कारण तो महापराक्रमी होता. त्याने ऐक्ष्वाकू, पांचाल, काशी, हैहय, कलिंग, अश्मक, कुरू, मैथिल, शूरसेन आणि वीतिहोत्र यांची राज्ये जिंकून एका छत्राखाली आणली. त्यामुळे तो पहिला ऐतिहासिक महान सम्राट ठरला आहे. तो शूद्र वर्णाचा असल्यामुळे क्षत्रियांच्या राजकीय वर्चस्वाची पुरातन परंपरा तेव्हापासून खंडित झाली. आर्यमंजुश्रीकल्प या ग्रंथावरून कळते, की महापद्म हा विद्वानांचा आश्रयदाता व विद्यांचा पुरस्कर्ता होता.

नंद वंशात नऊ राजे होऊन गेले, ते नवनंद म्हणून प्रसिद्ध आहेत. पौराणिक परंपरेप्रमाणे महापद्म नंद व त्याचे आठ पुत्र या नऊ राजांनी मगधावर राज्य केले. त्यांतील एका मुलाचे नाव सुमाल्य होते. पण महाबोधिवंस या बौद्ध ग्रंथात, ते सर्व भाऊ होते, असे सांगितले असून, त्यांची नावे दिली आहेत, ती अशी–उग्रसेन, पंडुक, पंडुगती, भूतपाल, राष्ट्रपाल, गोविषाणक, दशसिद्धक, कैवर्त व धन. महापद्म नंदानंतरच्या राजांचा इतिहास अज्ञातच आहे. मात्र शेवटचा राजा धन नंद याविषयी काही माहिती उपलब्ध आहे. शिकंदराने भारतावर स्वारी केली तेव्हा तो राज्य करीत होता. ग्रीक इतिहासकारांनी त्याच्या विशाल साम्राज्याचे व प्रचंड सामर्थ्याचे वर्णन केले आहे. त्याची सत्ता पंजाबच्या सीमेपर्यंत होती. त्याच्या सेनादलात २०,००० घोडेस्वार, २००,००० पदाती, २००० रथ व ३००० हत्ती होते.

धन नंद राजा पराक्रमी असला, तरी तो लोकप्रिय नव्हता. कारण तो अत्यंत क्रूर व लोभी होता. त्याच्या धनलोभावरूनच

त्याला घन नंद हे नाव मिळाले असावे. त्याचा क्षुद्र कुळातील जन्म व स्वैराचार यामुळे लोक त्याचा द्वेष करीत. त्यामुळेच चंद्रगुप्त मौर्य हा आर्य चाणक्याच्या साहाय्याने त्याचा सहजपणे उच्छेद करू शकला.

महापद्म नंदाने ८८ वर्षे राज्य केले, असे काही पुराणांत म्हटले आहे; पण काही पुराणांत त्याचा राज्यकाल २८ वर्षांचा सांगितला आहे. बाकीच्या आठ नंद राजांनी फक्त १२ वर्षे राज्य केले. त्यावरून नंद वंशाचा राज्यकाल सनपूर्व ३६४ ते ३२४ असा ठरतो.

नंद राजांचा कल जैन धर्माकडे होता व त्यांचे मंत्री जैन होते, असे आवश्यकसूत्र या ग्रंथावरून कळते. महापद्म नंदाचा मंत्री कल्पक व घन नंदाचा मंत्री शकटाल हे जैन होते. चाणक्याने एका जैन मनुष्याला आपला गुप्त हेर नेमले होते, असे मुद्राराक्षस या नाटकात दाखवले आहे. [ हि. क. इं. पी.; प्रा. भा. हिं. का.; प्रा. मौ. वि.; जै. ध. ]

**नंदसंवत** प्रद्योत वंशातील नंदिवर्धन राजाने हा संवत सुरू केला. तो पाटलिपुत्राचा राजा होता. याच्या संवताचे उल्लेख अनेक ठिकाणी मिळतात. खारवेल येथील हाथी-गुंफेच्या वर्णनात नंदसंवत १०३ मध्ये एक कालवा खोदल्याचा उल्लेख आहे. अल् बिरूनी याने मथुरेमध्ये नंदसंवत प्रचारात असल्याचे लिहिले आहे. अल् बिरूनी म्हणतो की, विक्रम संवतात ४०० मिळविले, की नंदसंवत मिळतो. चालुक्य विक्रमादित्य (पहिला) याने इ. स. १०७७ साली लिहिलेल्या एका शिलालेखात नंदसंवताचा उल्लेख केला आहे. [ म. भा. इ. ]

**नंदा** (१) हिमाचल प्रदेशातील एक देवता. गढवाल जिल्ह्यातील बधाण नामक विभागात नंदादेवी नावाचे पर्वत शिखर आहे, त्यावर या देवीचे स्थान आहे. दर बारा वर्षांनी भाद्रपद शु. सप्तमीला या पर्वतावर देवीचा उत्सव होतो. उत्सवाची सर्व व्यवस्था गढवालच्या राजाकडून केली जाते. उत्सवप्रसंगी चार शिंगांचा मेंढा मिरवतात. इथे रूपकुंड नावाचे एक कुंड होते आणि असुरांचा नि:पात केल्यावर नंदादेवीने त्यात स्नान केले होते, अशी कथा सांगतात. मात्र सांप्रत ते कुंड इथे आढळत नाही. [ कल्याण–तीर्थांक ]

(२) एक बौद्ध भिक्षुणी. ही गौतम बुद्धाची ज्येष्ठ बहीण होय. हिला रूपनंदा असेही नाव आहे. अल्प वयातच तिला जीविताच्या क्षणभंगुरत्वाची जाणीव झाली. बुद्धाने तिची परीक्षा घेतली व तिला अर्हंतपदाची अधिकारिणी बनवले. ध्यानसंपन्न अशा भिक्षुणीसंघात नंदेला अग्रस्थान आहे. [ पा. वा. ते. भि. र.

**नंदातिथी** प्रत्येक पंधरवड्याच्या प्रतिपदा, षष्ठी व एकादशी या तिथींना नंदा तिथी असे म्हणतात. या तिथींना श्राद्ध करू नये, कारण त्यामुळे पुत्र व धन यांचा नाश होतो, असे सांगितले आहे. पाहा– तिथी. [ हि. ध. ]

**नंदादिविधी** एक काम्य व्रत. माघ शुद्ध षष्ठीला येणाऱ्या रविवाराला नंद असे म्हणतात. त्या दिवशी हे व्रत करतात; म्हणून याला नंदादिविधी असे नाव मिळाले आहे. त्या दिवशी नक्त करून सूर्यमूर्तीला तुपाने स्नान घालणे आणि अगस्त्याची फुले वाहून त्याची पूजा करणे, असा याचा विधी आहे. उद्यापनाच्या वेळी ब्राह्मणांना घारग्यांचे भोजन घालतात. फल– दु:खदारिद्र्याचा नाश, धन, सुख, संतती व सूर्यलोक यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**नंदादिव्रतविधी** एक काम्य व्रत. कोणत्याही रविवारी किंवा ज्या रविवारी सूर्यग्रहण असेल, त्या दिवशी महाश्वेतामंत्राचा जप करणे व नंतर यथाशक्ति ब्राह्मण-भोजन घालणे, असा याचा विधी आहे. [ हि. ध. ]

**नंदानवमीव्रत** एक काम्य व्रत. भाद्रपद मासातील शुद्ध व वद्य नवमीला नंदानवमी असे म्हणतात. सप्तमीस एकभुक्त, अष्टमीस उपवास व नवमीच्या दिवशी दुर्गेची पूजा असा या व्रताचा विधी आहे. दुर्गेबरोबर शिवाचीही पूजा करतात आणि मग नंदामंत्राचा जप करतात. कुमारिकांना भोजन घालतात व रात्री जागरण करतात. फल– पापनाश आणि शिवलोकप्राप्ती. [ हि. ध.; व्र. प. ]

**नंदापदद्वयव्रत** एक काम्य व्रत. या व्रतात दुर्गेच्या सुवर्णपादुकांची पूजा हा मुख्य विधी असतो. पूजेत देवीला आंब्याची पाने व बेलाची पाने वाहतात. व्रतावधी-एक महिना. उद्यापनाच्या वेळी देवीच्या उपासकाला किंवा कुमारिकेला देवीच्या सुवर्णपादुकांचे दान देतात. फल – सर्व पापांपासून मुक्ती. [ हि. ध. ]

**नंदाव्रत** एक काम्य व्रत. या व्रताचा प्रारंभ श्रावणातील तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, अष्टमी, नवमी, एकादशी किंवा पौर्णिमा या तिथींना करतात. व्रतावधी– एक वर्ष. या व्रतात देवीची निरनिराळ्या नावांनी, निरनिराळ्या फुलांनी व निरनिराळ्या नैवेद्यांनी पूजा करावयाची असते. 'ॐ नन्दे नन्दिनि सर्वार्थसाधिनि नमः' या मंत्राचा यथाशक्ति

जप करावा, असेही सांगितले आहे. फल– पापापासून मुक्ती आणि राजपदाची प्राप्ती. दक्षकन्या सतीने शिवाच्या आराधनेसाठी एक वर्षभर हे व्रत केले होते, असे शिव पुराणात सांगितले आहे. [ हिं. ध.; शिव पुराण ]

**नंदाष्टमी** कुमाऊं प्रदेशातील लोकांचा एक सण. हा सण भाद्रपद महिन्याच्या अष्टमीला येतो. या दिवशी स्त्री-पुरुष नंदादेवी व तिची बहीण यांच्या केळीच्या सोपटाच्या मूर्ती तयार करतात आणि त्यांची पूजा करतात. पूजेनंतर त्या दोन्ही मूर्तींची पालखीतून मिरवणूक काढतात. पूर्वी नंदादेवीच्या पूजाप्रसंगी पशुबळी दिले जात; पण अलिकडे ही प्रथा कमी होत चालली आहे. या सणात नृत्याचा कार्यक्रम होतो. [ फो. लो. नॉ. इं.; सा. हिंदुस्तान, ३० ऑगस्ट १९६४ ]

**नंदासप्तमी** एक काम्य व्रत. मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीला या व्रताचा प्रारंभ करतात. व्रतावधी– एक वर्ष. सूर्य ही या व्रताची देवता होय. पंचमीला एकभुक्त, षष्ठीला नक्त भोजन व सप्तमीला उपवासपूर्वक सूर्याची पूजा, असा याचा विधी आहे. फल – धन, विद्या व यश यांची प्राप्ती. [ हिं. ध. ]

**नंदिनी** मार्गशीर्ष शु. नवमी या तिथीला नंदिनी हे नाव आहे. या दिवसापासून क्रमाने तीन रात्री देवीचे यथाविधि पूजन करून उपवास केल्याने अश्वमेधाचे फल प्राप्त होते व अंती स्वर्ग मिळतो, असे सांगितले आहे. [ व्र. प. ]

**नंदी** एक प्रमुख शिवगण. याला नंदीश, नंदीश्वर, नंदिकेश्वर अशीही अन्य नावे आहेत. शिव पुराणाच्या शतरुद्र संहितेत याची कथा दिली आहे, ती अशी–

शालंकायनाचा पुत्र शिलादमुनी याने पुत्रप्राप्तीच्या इच्छेने शिवाला प्रसन्न करून घेण्यासाठी प्रदीर्घ तप केले. त्याच्या तपाने शिव प्रसन्न झाल्यावर त्याने शिवाजवळ असा वर मागितला, की 'मला तुझ्यासारखा अयोनिज व मृत्युहीन पुत्र दे.' शिवाने 'तथास्तु' म्हटले. पुढे एकदा शिलादमुनी यज्ञासाठी अंगणातील जमीन खणीत असताना त्याला एका बालकाचा लाभ झाला. शिलादाला त्या बालकाच्या प्रथम दर्शनात त्रिनेत्र, चतुर्भुज व त्रिशूलधारी असे शिवाचे स्वरूप जाणवले आणि त्यामुळे त्याला अपार आनंद झाला. या आनंदाची स्मृती म्हणून त्याने त्या बालकाचे नाव नंदी (= आनंद देणारा) असे ठेवले.

नंदीने वयाच्या आठव्या–नवव्या वर्षीच कठोर तप सुरू करून शिवाचे सान्निध्य प्राप्त केले. शिवाने त्याला पुत्रवत मानले आणि त्याला आपल्या गणांचा प्रमुख नेमले. पुढे त्याचे सुयशा नामक मरुत्कन्येशी लग्न झाले.

रामायणात नंदीची अथवा नंदीशाची एक कथा आलेली आहे (वा. रा. उत्तर. १६). तिथे त्याला शिवस्वरूपीच मानले आहे. एकदा रावण शरवनात कार्तिकेयाच्या जन्मस्थानी गेला असता त्याला मार्गात पिंगट रंगाचा, माकडासारख्या मुखाचा आणि अतिशय बुटका असा नंदीश भेटला. रावणाने त्याच्या माकडासारख्या मुखाची थट्टा केली. त्यामुळे नंदीशाला रावणाचा राग आला आणि त्याने त्याला शाप दिला, की 'माकडासारखे तोंड असल्यामुळे तू मला चिडवितो आहेस; परंतु माकडेच तुझा सर्वनाश घडवतील.' हा शाप ऐकून रावणाला हसू आले. त्याने आपल्या शक्तीचे प्रदर्शन करण्यासाठी कैलास पर्वत दोन्ही बाहूंत धरून समूळ उपटायला प्रारंभ केला. कैलास हलू लागताच शिवपरिवार अस्वस्थ झाला. परंतु शिवाने केवळ आपल्या पायाच्या चवडयाने कैलास खाली दाबला आणि रावणाचे दोन्ही हात घट्ट दाबून धरले. त्यामुळे रावणाचा मद उतरला आणि त्याने शिवाला संतुष्ट करण्यासाठी त्याची आराधना सुरू केली.

नंदीने दक्षयज्ञाच्या विध्वंसप्रसंगी भग नामक ऋत्विजाला वद्ध केले होते. शिवाचा गौरव करणारी कोटचवधी उपनिषदे त्याने कलियुगातील अल्पमती लोकांसाठी लहान लहान परिच्छेदात संक्षिप्त केली. गोसहस्रमहादानात त्याला धर्म म्हणून संबोधले आहे. शैव लोक पारमार्थिक दृष्टया नंदी हे आनंदतत्त्वाचे प्रतीक मानतात. शिवाच्या तांडवनृत्यप्रसंगी ताल धरण्यासाठी तो उपस्थित असतो, म्हणून त्याला तांडवतालिक असेही म्हणतात.

दक्षिण भारतातील शिवमंदिरात नंदीशाच्या मूर्ती सर्वत्र आढळतात. हेमाद्रीने चतुर्वर्ग चिंतामणीच्या व्रतखंडात नंदीशाचे मूर्तिध्यान सांगितले आहे, ते असे–

नन्दी कार्यस्त्रिनेत्रस्तु चतुर्बाहुर्महाभुजः ।
सिन्दूरारुणसङ्काशो व्याघ्रचर्मपरिच्छदः ॥
त्रिशूलभिन्दिपाले च करयोस्तस्य कारयेत् ।

अर्थ– नंदी हा त्रिनेत्र, चतुर्भुज, महाबाहू, तांबूस रंगाचा, व्याघ्रचर्म परिधान केलेला आणि (मागील) दोन हातांत त्रिशूल व गोफण ही आयुधे धारण करणारा असा घडवावा.

दक्षिणेतील नंदीशमूर्ती सामान्यतः शिवालयाच्या मुख्य प्रवेशद्वाराच्या डाव्या अथवा उजव्या बाजूला असतात. त्याच्या मूर्तीचे विशेष शिवाच्या चंद्रशेखरमूर्तीशी जुळते दिसतात. त्याच्या मागील दोन हातांत परशू आणि काळवीट असतात आणि पुढील दोन हात अंजलिमुद्रेत शिववंदना करीत असतात.

त्याच्या शेजारी त्याची पत्नी सुयशा हिचीही मूर्ती असते. वल्लुवूर येथे याची एक धातुमूर्ती आहे. ती त्रिनेत्र आणि चतुर्भुज आहे, तिच्या मागच्या दोन हातांत हरिण व टंक असून, पुढील दोन हात नमस्कारासाठी जोडलेले आहेत. सुयशा त्याच्या डावीकडे आहे.



नंदिकेश्वर व त्याची पत्नी

या गणप्रमुख नंदीशिवाय शिवाचे वाहन व ध्वजचिन्ह असलेल्या वृषभस्वरूपी नंदीलाही शिवपरिवारात महत्त्वाचे स्थान आहे. शिव हा वृषभवाहन आणि वृषभध्वज कसा बनला, या विषयी महाभारतात कथा आहे, ती अशी–

ब्रह्मदेवाने दीर्घ तपानंतर रोहिणी अथवा सुरभी नामक धेनू निर्माण केली आणि एक वृषभही निर्माण केला. हा वृषभ सुरभीला पाहून कामार्त बनल्यामुळे ब्रह्मदेवाने त्याला 'मा आर्तः' = आर्त होऊ नकोस, असे म्हटले. त्यावरून त्याला मार्तंड असे नाव पडले. या सुरभी–मार्तंडांपासूनच अकरा रुद्र आणि दक्ष नामक एक वृषभ जन्माला आला. सुरभीने दक्ष हा शिवाला ध्वजासाठी दिला आणि तेव्हापासून शिव वृषभध्वज बनला–

वृषो दक्ष इति ख्यातः कण्ठे मणितलप्रभः ।
सुरभ्यनुमते दत्तो ध्वजो माहेश्वरस्तु सः ।।

अर्थ– ज्याचा कंठ दिव्य मण्यासारखा तेजस्वी आहे, असा हा दक्ष नावाने प्रसिद्ध असलेला वृषभ सुरभीच्या अनुमतीने शिवाचे ध्वजचिन्ह बनला.

स्वर्धेनूच्या वत्साच्या मुखातून अमृतरूप दुधाचा फेस रुद्राच्या अंगावर पडल्यामुळे रुद्र क्रुद्ध झाला. मग त्याला शांत करण्यासाठी ब्रह्मदेवाने त्याला एक वृषभ दिला, अशीही कथा महाभारतात आली आहे.

शिव पुराणाच्या विद्येश्वरसंहितेत, शुद्ध स्फटिकासारख्या वर्णाचा वृषभ हा धर्मरूप मानला गेला, असे म्हटले आहे.

शिवाचे वाहन या स्वरूपात नंदीचे मूळ ऋग्वेदातील रुद्रवर्णनात आढळते. ऋग्वेदात रुद्राला वृषभ म्हटले आहे (ऋ. २.३३.६, ८). सायणाचार्यांनी वृषभ या शब्दाचे व्युत्पादन वृष् धातूपासून केले असून, त्याचा अर्थ वर्षिता (वर्षाव करणारा) असा दिला आहे. वृष् धातूपासून बनलेल्या वृषभ या शब्दाचा दुसरा अर्थ अत्यधिक प्रजननशक्तीने युक्त असा आहे. ऋग्वेदातील रुद्रवर्णनात या दोन्ही अर्थांचा उपयोग आढळतो. रुद्र हा वर्षा घडवितो आणि त्याच्यामुळेच वनस्पती बहरतात, अशी स्पष्ट धारणा ऋग्वेदातील रुद्रविषयक मंत्रांत व्यक्त झालेली दिसते.

पुढे कालांतराने रुद्राचे शिवाशी ऐकात्म्य घडल्यानंतर त्याच्या प्राकृतिक स्वरूपाचा लोप होऊन त्याला 'संपूर्ण व्यक्तिमत्त्व' लाभले आणि तेव्हापासून 'वृषभ म्हणजे वर्षाव करणारा' ही त्याची भूमिकाही आपोआप विस्मृत झाली. आता 'वृषभ म्हणजे अत्यधिक प्रजननशक्तीने युक्त' हा त्याचा विशेष राहिला. या विशेषाची व्यवस्था 'वृषभवाहन' आणि 'वृषभध्वज' या नव्या विशेषणांत लावली गेली आणि जो स्वतःच वृषभ होता, त्याचे वाहन व ध्वजचिन्ह वृषभ (= बैल) हे बनले.

शिव पुराणाच्या शतरुद्रसंहितेत शंकराच्या वृषेश अवताराची कथा आहे, ती अशी – अमृताच्या वाटणीनंतर अमृतबिंदूपासून निर्माण झालेल्या सुंदर स्त्रियांवर दैत्य आसक्त झाले. त्यामुळे देव-दैत्यांचे युद्ध सुरू झाले. त्या युद्धात विष्णूने दैत्यांचा पराभव केल्यावर काही दैत्य त्या स्त्रियांसह पाताळात पळून गेले. विष्णूने तिथवर पाठलाग करून त्यांचाही



शिववाहन नंदी – मीनाक्षीमंदिर, मदुरा

पराभव केला. परंतु पुढे स्वतः विष्णूच त्या अमृतोद्भव स्त्रियांवर मोहित होऊन त्यांच्याशी रत झाला. विष्णूला त्या

शिवापासून अनेक पुत्र झाले. पुढे त्या विष्णुपुत्रांनी त्रिभुवनात उच्छाद मांडला. त्यामुळे सर्व मुनी व देव ब्रह्मदेवाकडे गेले. मग ब्रह्मदेवाने शिवाला विनंती केली. शिवाने वृषभरूप घेऊन विष्णूचा पराभव केला आणि विष्णुपुत्रांचा संहार केला. विष्णूने अखेर शिवाला ओळखले आणि तो त्याला शरण गेला. ही कथा शिवाच्या वृषभ या वैदिक विशेषणातूनच पुराण-काळात उगम पावलेली दिसते.

शिवमंदिरात गेल्यावर शिवदर्शन करण्यापूर्वी नंदीच्या वृषणाला स्पर्श करण्याची चाल कुठे कुठे आढळते. या चालीचे मूळ याज्ञिक कर्मात असावे. यज्ञात अग्निमंथनाच्या वेळी असुरांकडून अडथळा येऊ नये म्हणून घोडा किंवा वृषभ पश्चिमाभिमुख उभा करतात (कात्यायन श्रौ. सू. ४. ८. २५; श. ब्रा. २. १. ४. १५–१७). अग्नी हा बैलाचा सोयरा आहे, अशी प्राचीनांची श्रद्धा होती. सोमयागात यजमानाला दीक्षा देण्यासाठी कृष्णमृगाचे कातडे पूर्वाभिमुख अंथरावे लागते. त्या चर्माचा तीन पायांचा भाग दुमडावा, असे सांगितले आहे (श. ब्रा. ३. २. १. ४; कात्यायन श्रौ. सू. ७. ३. २१ इ.). तसेच ज्याचे पाय अशा प्रकारे दुमडलेले आहेत, अशा मृगचर्मावर बसण्यापूर्वी त्या चर्माच्या मागील वृषणाच्या जागी असलेल्या शुक्ल-कृष्ण केसांत ऋक् आणि साम यांच्या प्रतिमा आहेत, अशा श्रद्धेने त्यांना स्पर्श करावा, असाही आदेश आहे.



नंदीची प्रचंड मूर्ती – चामुंडा टेकडी, म्हैसूर

(श. ब्रा. ३. २. १. ५). शिवापुढे तीन पाय दुमडून बसलेला नंदी आणि शिवदर्शनापूर्वी त्याच्या वृषणाला स्पर्श करण्याची चाल यांचे मूळ वरील याज्ञिकी क्रियांमध्ये असण्याची शक्यता आहे.

शिवगण नंदी अथवा नंदीश आणि शिववाहन नंदी यांच्यांत कालांतराने घोटाळा झालेला दिसतो. या घोटाळ्यातूनच नंदीशाच्या काही मूर्ती वृषभमुखी घडविल्या गेल्या आहेत. या दोन्हींच्या ऐकात्म्याला वाव देणारी कथा वायू पुराणात आहे. तिथ नंदीश हा कश्यप व सुरभी (म्हणजे कामधेनू) यांचा पुत्र असल्याची नोंद आहे. त्यामुळे हा कामधेनूचा पुत्र असलेला नंदीश आणि वृषभ नंदी एकच होत, अशी लोकधारणा होत जाणे स्वाभाविकच होते.

शिववाहन नंदीचा महिमा शिवोपासनेत विशेष आहे. प्रत्येक शिवमंदिरात शिवासमोर नंदीची प्रतिमा असतेच. दक्षिणेत नंदीची स्वतंत्र मंदिरेही आहेत. बेंगळूर येथील नंदीमंदिरातली नंदीची मूर्ती सुमारे सात हात उंच आहे. म्हैसूरच्या चामुंडी टेकडीवरील नंदीही असाच प्रचंड आहे.

वीरशैव संप्रदायात शिववाहन नंदीची विशेष प्रतिष्ठा आहे. ते नंदीला बसव (= वृषभ) या नावाने ओळखतात. रामोपासनेच्या क्षेत्रात जे स्थान हनुमंताचे, तेच वीरशैवांच्या शिवोपासनेत बसवाचे आहे. वीरशैव लोक बसवेश्वराला नंदीचा अवतार मानतात. पाहा – अधिकारनंदी. [शिव पुराण; शैवमत; शिवलिंगोपासना; वा. पु. स्ट.; हि. ध.; सा. इं. इ. गॉ. गॉ.; प्रा. च. को.; सु. वि. को.; आ. ब्राँ.]

## नंदीदेवी

एक तांत्रिक देवता. श्रीविद्यार्णवतंत्रानुसार ही कृष्णवर्ण व चतुर्भुज असून, हिच्या एका हातात पानपात्र असते आणि उरलेले तीन हात अनुक्रमे वर, अभय व बंधमोचन या मुद्रांत असतात. देवी पुराणात दुर्गेचे एक रूप म्हणून हिचा उल्लेख आहे. [श. क.]

## नंदीनागरी लिपी

एक प्राचीय भारतीय लिपी. या लिपीचा वापर मुख्यत्वे द. भारतात होत असे. हिचा उगम नागरी लिपीतूनच झालेला असल्यामुळे थोडा भेद वगळल्यास या दोन लिप्यांमध्ये खूपच साम्य आहे. ब, भ हे ओष्ठ्य स्पृष्टवर्ण आणि श हा तालव्य उष्मवर्ण यांचे लेखन नंदीनागरीत वेगळे आहे. तसेच शब्दाच्या शेवटी येणाऱ्या म साठी अनुस्वार आणि वर्गीय अनुनासिकांचे लेखन ही या लिपीची वैशिष्ट्ये आहेत. दोन व्यंजनांमध्ये परसवर्णाऐवजी अनुस्वाराचा वापर त्याच ओळीत केला जातो. तेलुगू-कानडी लिपीतही अशाच प्रकारे अनुस्वार लिहिण्याची पद्धती आहे. भौगोलिक निकटतेमुळे लिपीवर असा परिणाम झालेला दिसतो.

दक्षिण भारतातील अनेक कोरीव लेखांत नंदीनागरीचा उपयोग केलेला दिसतो. तसेच, या लिपीत लिहिलेल्या अनेक पोथ्या दक्षिणेतील पोथीशाळांत उपलब्ध आहेत. विजयनगरच्या राजांची अनेक दानपत्रे या लिपीत कोरलेली आहेत. विजयनगरच्या राजघराण्याचा उदय होण्यापूर्वीच अनेक घराण्यांनी या लिपीचा वापर केलेला आहे. नरसिंह होयसळाच्या काळात एका कानडी भक्ताने बांधलेल्या मठासंबंधीचा एक शिलालेख उपलब्ध असून, त्याची भाषा कानडी आणि लिपी नंदीनागरी आहे. दि. १८ एप्रिल १५५४ या दिवशीचे कृष्णराजाचे एक दानपत्र ताम्रपटावर खोदलेले असून, त्याची भाषा संस्कृत आणि लिपी नंदीनागरी आहे. अशाच प्रकारचा आणखी एक शिलालेख २१ एप्रिल १६१३ या तारखेचा पहिल्या वेंकटपतिदेवाचा कुंदकू देणगीचा आहे. याची भाषा संस्कृत असून, लिपी नंदीनागरी आहे.

क्वचित दक्षिण भारताबाहेरही नंदीनागरीतील शिलालेख आढळतात. असा एक शिलालेख गया क्षेत्री असून, तो गौरी नावाच्या स्त्रीने आपल्या पतीच्या गयाश्राद्धाच्या वेळी खोदविलेला आहे.

ब्राह्मी, नंदीनागरी आणि तेलुगू-कानडी या लिप्यांचे परस्परसंबंध आणि त्यांचे एकमेकांवर झालेले प्रभाव हे लिपीक्षेत्रातही भारतीय संस्कृतीची मूलभूत एकात्मताच सुचवतात. [श्री. के. व्ही. राव यांचे आकाशवाणीवरील भाषण]

## नंदीपूर

एक शक्तिपीठ. पूर्व भागातील हावडा–क्यूल लोहमार्गावर सैंथिया स्टेशनपासून थोड्या अंतरावर हे स्थान आहे. या ठिकाणी एका मोठ्या वटवृक्षाखाली देवीचे मंदिर आहे. सतीचा कंठहार या ठिकाणी गळून पडला म्हणून ५१ शक्तिपीठांत याची गणना झाली आहे. [कल्याण–तीर्थांक]

## नंदीवाले

लोकरंजन करून भिक्षा मागणाऱ्या लोकांचा एक वर्ग. हे तिरुमलैच्या व्यंकटेशाचे भक्त असल्यामुळे तिरमल या नावानेही ओळखले जातात. आंध्रमध्ये यांना गंगेड्डू असे म्हणतात. हे नंदी (बैल) सजवतात, त्यांना घेऊन गावोगाव फिरतात आणि त्यांचे खेळ दाखवून भिक्षा मागतात.

महाराष्ट्रात भ्रमण करणारे बहुतेक नंदीवाले आपले गाव वडापुरी (ता. इंदापूर, जि. पुणे) असे सांगतात. पावसाळ्यात त्यांचा मुक्काम गावी असतो. या काळात त्यांची लग्नकार्ये होतात आणि जातपंचायत भरून जातीतील प्रकरणांचे निवाडे होतात.

नंदीवाल्यांची फिरतीची गावे हक्काची असतात. त्या ठरलेल्या गावी ते वर्षातून एकदा जातात आणि भिक्षेची वसुली करतात. फिरतीच्या वेळी त्यांचे बिऱ्हाड बरोबरच असते. बायकामुले, बैल, तट्टे, म्हशी, शेळ्या, कुत्री, कोंबड्या, असा सर्व सरंजाम त्यांच्याबरोबर असतो. गावाबाहेरच्या माळावर पाले ठोकून त्यांत ते उतरतात आणि तिथे एखाद्या म्हाताऱ्या माणसाला राखण ठेवून दिवसभर फिरतीवर राहतात.

नंदीवाले नंदीच्या खेळाशिवाय बैलांच्या खरेदी–विक्रीचा व्यवसायही करतात. बैल पुष्ट बनविण्याची औषधेही ते विकतात. त्यांच्या बायका गोधड्या शिवतात आणि भिक्षा मागताना सुई, दाभण, बिबे, पोतीचे मणी, इ. वस्तू विकतात.

अंगात अंगरखा, कमरेला शेल्यासारखा गुंडाळलेला पंचा व डोक्याला लाल रंगाचा फेटा असा नंदीवाल्याचा वेष असतो. नंदीच्या गळ्यात घंटांची माळ, पायात झांजरे, शिंगांना पितळी शेंब्या व रंगीबेरंगी कपड्यांचे लोंबते गोंडे, पाठीवर झूल अथवा



नंदीवाला

पडशी झाकून टाकण्यासाठी रंगीत कपडे आणि कपाळावर मारुतीचा अथवा महादेवाचा मोठा पितळी टाक असतो. असा सजवलेला नंदी घेऊन हिंडताना नंदीवाला गुबगुबी नावाच्या ढोलक्यासारख्या वाद्यावर एका बाजूने हात मारून व दुसऱ्या बाजूने धनुकलीसारखी काठी घासून 'गुबु गुबु गुबु' असा आवाज घुमवितो. नंदीवाल्याबरोबर एक साथीदार असतो.

गुबगुबीच्या आवाजाने प्रेक्षक जमल्यावर नंदीवाला नंदीचे खेळ दाखवितो. कधी नंदी रुसून थोडा दूर जाऊन उभा राहतो आणि मग नंदीवाला त्याची समजूत काढून त्याला परत बोलावतो. कधी नंदी पायांचा आवाज होऊ न देता अशा प्रकारे धावतो, की त्याच्या गळ्यातील घंटाच फक्त वाजाव्या. कधी तो जागच्या जागी नाचतो, तर कधी जमिनीवर उताणा निजलेल्या नंदीवाल्याच्या पोटावर चारही पाय ठेवून उभा राहतो.

या वेळी तो आपल्या शरीरात असे लाघव आणतो, की नंदीवाल्यावर त्याचा विशेष भार पडत नाही. नंदीच्या खेळाचा बराचसा भाग भविष्यकथनाचा असतो. नंदीवाला सर्व गावाच्या भल्याच्या दृष्टीने नंदीला काही प्रश्न विचारतो आणि त्या प्रश्नांना नंदी मान हलवून अनुकूल अथवा प्रतिकूल उत्तरे देतो. नंदीवाल्याने नंदीला अशा प्रकारे शिकवून तयार केलेले असते, की त्याने भल्या गोष्टींना अनुकूलता दर्शवावी आणि बुऱ्या गोष्टींना नकार द्यावा.

ही भविष्यसूचक प्रश्नोत्तरे उरकल्यावर नंदीचा खेळ संपतो. नंतर प्रेक्षक अनेकदा उत्स्फूर्तपणे आपली उपरणी, पटके नंदीवाल्याच्या अंगावर खुशीने फेकतात. त्यानंतर नंदीवाला नंदीला घेऊन घरोघर फिरतो व भिक्षा गोळा करतो.

नंदीवाल्यावर एकनाथांनी एक रूपक रचले आहे. त्या रूपकात ते स्वतः नंदीवाले बनले असून, त्यांनी परमेश्वरालाच नंदी मानले आहे. त्यातील काही पंक्ती अशा —

नंदी आला, नंदी आला । स्वर्ग-पाताळाहुनि नंदी आला ।
कैलासाहूनि नंदी आला । गुबु गुबु गुबु ।।
कोण्या सदैवाच्या वाडचात । नंदी चालला सांगावया मात ।
नरनारी कवतुकें पाहात । गुबु गुबु गुबु ।।
दहा अवतार घरटी करी । काशी अयोध्या मथुरेंत फेरी ।
नाचतो हरिदासाचे द्वारीं । शिव हरहर बोला ।।
विश्रांतीस आला दिंडिरवना ।
तो निजसखा पुंडलीक जाणा ।
तयाची आवड देखोनी मना । भीमातटी खेळ तसे ।।
खेळ खेळला परिपूर्ण । श्रमोनि धरिले कटिंकरचरण ।
शरण एका जनार्दन । मी तूं पण त्यजोनी ।।

ही लोकरंजक संस्था बरीच जुनी असावी. अनुयोगद्वारसूत्र या ग्रंथात या संस्थेचा पांडुरंग या नावाने उल्लेख आहे. या पांडुरंग पंथाचे लोक भस्म धारण करीत, जवळ बैल बाळगीत आणि प्रतिष्ठित मंडळींना नमस्कार कसा करावा, हे बैलास शिकवून लोकांकडून भिक्षा मिळवीत, असे त्या ग्रंथावरून कळते.

पाहा – गंगेड्डू, तिरमाळी. [म. लो. उ.; म. ग्रा. स.; गांववाडा; मुं. इ. जा.; प्रा. म. २]

**नंदीशमूर्ती** नंदीश हे एका प्रमुख शिवगणाचे नाव आहे. यालाच नंदी असेही म्हणतात. पाहा – नंदी.

**नंदीश्वर** (इ. स. चे १२ वे शतक) एक प्राचीन मीमांसक. हा केरळी ब्राह्मण होता. प्रभाकरविजय हा याचा मीमांसेवरचा ग्रंथ होय. हा ग्रंथ म्हणजे प्रभाकरमताची प्रवेशिकाच होय. त्याने आपल्या ग्रंथात शालिकनाथ व भवनाथ या पूर्वसूरींचा सादर उल्लेख केला आहे. आज या ग्रंथांची एकवीस प्रकरणे उपलब्ध आहेत. [मी. द.; पू. म. मा.]

**नंदीश्वर पंक्तिव्रत** एक जैनव्रत. हे व्रत एकशे आठ दिवसांत पुरे होते. यात छप्पन्न उपवास व बावन्न पारणी पडतात. हे व्रत करताना 'ॐ ह्रीं नंदीश्वर द्वीपे द्वापञ्चाशाञ्जनालयेभ्यो नमः' या मंत्राचा त्रिकाल जप करतात. [जै. व्र. वि. सं.; व्र. ति. नि.]

**नंदीसूत्र** जैन आगम साहित्यातील पाच मूलसूत्रांपैकी एक सूत्र. याची गणना अनुयोगद्वारसूत्राबरोबर केली जाते. इतर आगम साहित्याच्या मानाने या दोन सूत्रांची रचना अर्वाचीन कालातील आहे. दूष्यगणीचा शिष्य देववाचक याने हे नंदी सूत्र रचले आहे. यात ९० गाथा व ५९ सूत्रे आहेत. त्यात महावीर, संघ व श्रमण यांची स्तुती तसेच ज्ञानाचे सम्यक्श्रुत, मिथ्याश्रुत, गमिकश्रुत, आगमिकश्रुत, इ. भेद असे विषय आलेले आहेत. [प्रा. सा. इ.]

**नंदीक्षेत्र** एक पुण्य क्षेत्र. हे क्षेत्र काश्मीरमधील एका सखल भागात वसलेले आहे. या क्षेत्रानजीक एका दरीत कालोदक नामक एक सरोवर असून, तिथल्या पर्वतश्रेणीतील एका शिखराला हरमुख अशी संज्ञा आहे. राजतरंगिणी व नीलमत पुराण या ग्रंथांत, शिलाद नामक पुरुषाला नंदी नामक पुत्र यज्ञभूमीत मिळाला तो इथेच, असे सांगितले आहे. यालाच नंदीश्वर असे म्हणतात. पाहा – नंदी. [हि. ध.]

**नंदूरामदास** (इ. स. चे १८ वे शतक) एक बिहारी हिंदी कवी. हा ब्रह्मपुरा (मुझफ्फरपूर) गावचा रहिवासी होता. बलरामदास हा याचा गुरु होता व रघुनाथदास हा शिष्य होता. हा आपल्या निवासस्थानी राहूनच भजनपूजन करी. याच ठिकाणी याने 'शब्द-संहिता वाणीप्रमोद' या ग्रंथाची रचना केली. त्यात तो म्हणतो—

राज विराज भई पलमाहि परी यमराजसों काज तवेंजु ।
भूलि गई सब साज समाज रही कछु लाज न तेज तबेंजु ।
न कियो सतसंग न प्रेम उमंग कथा परसंग सुने न कबेंजु ।
कहे नंदू निदान चले जब प्राण कहा हरि ध्यान समान अबेंजु ।

अर्थ— राज्यवैभव क्षणार्धात निःष्प्रभ झाले. यमराजाशी गाठ पडली. साजशृंगार, समाज या गोष्टींचा विसर पडला. लज्जा उरली नाही. सतसंगती घडली नाही, की कधी प्रेमाचा

उमाळा आला नाही. कधी हरिकथा ऐकली नाही. नंदूराम म्हणतो, आता शेवटच्या घडीला तरी हरीचे स्मरण होऊ दे.

वरील ग्रंथ त्याच्या हातून पूर्ण झाला नाही. इ. स. १७५७ मध्ये त्याचा मृत्यू झाल्यावर त्याचा शिष्य रघुनाथदास याने हा ग्रंथ पूर्ण केला. [ हिं. सा. बि. ]

**नंदोत्सव** उत्तर प्रदेशातील एक उत्सव. या उत्सवात हळद मिसळलेले दही एकमेकांच्या अंगावर उडवतात. म्हणून याला दधिकांदौ असेही म्हणतात. हा उत्सव कृष्ण-जन्माच्या दुसऱ्या दिवशी होतो. दह्याबरोबरच हळद-कुंकू मिसळलेले पाणीही पिचकारीने एकमेकांच्या अंगावर उडवतात. नाचगाणीही करतात. मथुरा व गोकुळ या गावांतले लोक प्रामुख्याने हा उत्सव करतात. ' नंदके आनंद भयौ । जै कन्हैया लालकी ।। ' हा त्या दिवशीचा जयघोष असतो. [ ब्र. सां. इ. ]

**नंद्राणा ब्राह्मण** ब्राह्मणांची एक पोटजात. यांची वस्ती कच्छ व सौराष्ट्र यांमध्ये आहे. नांदी नावाच्या ऋषीपासून आपली उत्पत्ती झाली, असे हे सांगतात. यांच्या-विषयी एक दंतकथा आहे, ती अशी--

एकदा अश्वमेघात पौरोहित्य करीत असता या नांदी ऋषीला ब्रह्मदेवाच्या पत्नीने शाप दिला, की ' तुझ्या वंशाचे ज्ञान नष्ट होईल. ' तसे झाले; परंतु मारवाडमधील वाकळ या देवीच्या कृपेने ते ज्ञान त्याला पुनश्च प्राप्त झाले.

हे लोक पौरोहित्य व शेती करतात. [ मुं. इ. जा. ]

**नंपूतिरी** केरळमधील ब्राह्मण जात. यांना मलय किंवा नंबुद्री ब्राह्मण असेही म्हणतात. दक्षिणापथात आलेल्या आर्य लोकांपैकी जे केरळात वसले तेच नंपूतिरी ब्राह्मण होत. त्यांनी ज्या मूळच्या रहिवाशांना आपल्यात सामील करून घतले, तेही नंपूतिरी ब्राह्मणच ठरले आहेत. केरळातील सर्व लोकांत हे श्रेष्ठ मानले जातात. आद्य शंकराचार्य नंपूतिरी ब्राह्मण होते. परशुरामाने सांगितलेले अनेक धर्मनियम त्यांनी सुधारले व नंपूतिरी ब्राह्मणांचे चौसष्ठ ' अनाचार ' त्यांनीच रूढ केले असे म्हणतात.

ओतुळ्ळवर म्हणजे वेदाधिकारी व ओत्तिळ्ळात्तवर म्हणजे वेदाधिकार नसलेले, असे या ब्राह्मणांचे मुख्य दोन विभाग आहेत. पण संस्कारविषयक काही अधिकारांवरून या ब्राह्मणांचे दहा वर्ग झाले आहेत. त्यांतील फक्त पहिले सहा वर्ग वेदाध्ययन करू शकतात. यज्ञ करणे, वेद व सूत्रे यांचे अध्यापन, पौरोहित्य, देवालयांतील पूजा-अर्चा असे त्यांचे भिन्न भिन्न अधिकार असतात. देवालयातील पुरोहिताला १ ते ३ वर्षे ब्रह्मचर्य पाळावे लागते. मात्र हे ब्राह्मण भद्रकालीच्या देवळात पुजारीपण स्वीकारीत नाहीत. यांचा एक वर्ग संन्याशांचा आहे. अत्रैदिक वर्गांतले काही नंपूतिरी ब्राह्मण वैद्यकव्यवसाय करतात, काही



नंपूतिरी ब्राह्मण

ब्राह्मण भविष्यकथनाचा व्यवसाय करतात, काही मांत्रिक बनतात, तर काही क्षात्रवृत्तीने राहतात. त्यांची अनेक गोत्रे आहेत. हे दायविभागाचे मक्कतायम शास्त्र प्रमाण मानतात.

नंपूतिरी ब्राह्मणांनी ज्या वसाहती केल्या, त्यांना ग्राम असे नाव आहे. वसाहतीच्या प्रमुखाला ग्रामणी म्हणतात. जातींच्या समितीला स्मार्तविचारम असे नाव आहे. जातिनियमांचा भंग कोणी केला, तर त्याला शिक्षा करण्याचा अधिकार या समितीला असतो. नंपूतिरी स्त्रीने व्यभिचार केला, तर तिला जातिबाह्य ठरवतात. मग तिच्या कुटुंबातील माणसे तिला मृत समजून तिचे क्रियाकर्मांतर करतात, प्रायश्चित्त घेतात आणि नंतर जातीला भोजन घालतात.

**इल्लम**— यांच्या कुळाला इल्लम म्हणतात. मक्कतायम शास्त्रान्वये इल्लमची सर्व संपत्ती पूर्वी अविभाज्य असे. कारण-वन म्हणजे कुटुंबप्रमुख (कर्ता पुरुष) हा सर्व घटकांचे पालन-पोषण करण्याला जबाबदार असे. सर्वांच्या संमतीवाचून त्याला

इल्लमची मालमत्ता विकता येत नसे. त्याच्या मुलांपैकी सर्वांत ज्येष्ठ मुलाला वारसाहक्काने कुटुंबप्रमुखाचे स्थान मिळे. कारणवनाला फक्त एकटी मुलगी असे, तेव्हा तिचे लग्न करताना तो अट घाली, की तिचा पुत्र तिच्या माहेरच्या इल्लमचा वारस समजला जावा. लग्नात तिचे गोत्र बदलत नसे आणि तिच्या पतीचा तिच्या माहेरच्या संपत्तीवर हक्क नसे. इल्लमच्या अर्थव्यवस्थेत स्त्रीला महत्त्वाचे स्थान असे. एकटी मुलगी वारस असली, तर ती स्वतः कारणवन होत असे व तिला संपत्तीवर सर्वाधिकार मिळत असे. पण अलिकडे नंपूतिरींनाही हिंदू कायदा लागू झाल्यामुळे पूर्वीची वारसापद्धती आता रद्द झाली आहे.

इतर ब्राह्मणांप्रमाणेच या ब्राह्मणांत पुंसवन, सीमंतम, जातकर्म, नामकरण, उपनयन, इ. संस्कार केले जातात.

**विवाहप्रथा**— इल्लमच्या नियमाप्रमाणे फक्त ज्येष्ठ भावाला ब्राह्मण कन्येशी विवाह करता येतो. इतर भाऊ नायर किंवा अन्य जातीच्या मुलींशी संबंधम करू शकतात. त्यामुळे जातीतल्या अनेक मुलींना वर मिळत नाहीत व त्या जन्मभर कुंवारत्व राहतात. म्हणून पूर्वी एका नंपूतिरी पुरुषाला तीन बायका करण्याची परवानगी होती. स्वतःची बहीण दुसऱ्या पुरुषाला देऊन, त्याच्या बहिणीशी स्वतः लग्न लावण्याची प्रथा त्यामुळेच रूढ झाली होती. आता १९३३ च्या सुधारणा कायद्यामुळे सर्व भाऊ जातीतल्या मुलींशी विवाह करू शकतात.

वधू-वर वयात आल्यानंतर लग्न करण्याची चाल या लोकांत पूर्वीपासून आहे. मुलाचे लग्न समावर्तन विधीनंतर व मुलीचे लग्न ऋतुप्राप्तीनंतर होत असते. सगोत्र, सपिंड व सप्रवर विवाह करीत नाहीत. पत्रिका पाहून लग्न जुळवतात. त्यात मुलीला मत नसते. वधूपित्याकडून पुष्कळ हुंडा घेतात.

लग्नसमारंभ वधूच्या घरी होतो. तिथे वाजतगाजत जाताना वराच्या हाती सोळा पेरांचा एक बांबू असतो. त्याच्या शेंडाला एक दोरी बांधलेली असते. नवरा मुलगा दारी आल्यावर वधूच्या घरातल्या स्त्रिया त्याचे स्वागत करतात. पूर्वी या स्त्रिया पडदानशीन असल्यामुळे नायर स्त्री अष्टमांगल्य घेऊन वराचे स्वागत करीत असे.

वर आपल्याबरोबर वधूसाठी ताळी आणतो व वधूपिता शुभ मुहूर्तावर ती वधूच्या गळ्यात बांधतो. नंतर नांदीमुखश्राद्ध, कन्यादान, पाणिग्रहण, अग्नीला तीन प्रदक्षिणा, लाजाहोम व सप्तपदी हे विधी करतात. त्यांतील कन्यादान व पाणिग्रहण हे विधी मुख्य असतात.

दुसऱ्या दिवशी वराच्या घरी जाताना विवाहहोमाचा अग्नी बरोबर नेतात. तिथेही मग चार दिवस लग्नसमारंभ चालतो. त्या दिवसांत वधू-वर व्रतस्थ राहतात. चौथ्या दिवशी विधिपूर्वक वधू-वरांचा समागम होतो. लग्नानंतर एका पिपातील पाण्यात जिवंत मासे सोडतात व वधू-वर त्यांना पकडतात. माशांना संतती विपुल होत असते, म्हणून बहुसंततीसाठी हा मासे धरण्याचा खेळ करण्याची प्रथा पूर्वी होती.

या जातीत घटस्फोट व विधवाविवाह निषिद्ध मानले जात; पण आता ते होतात.

**देवधर्म**— विष्णू, शिव, पार्वती, सुब्रह्मण्य व शास्ता (शिवमोहिनींचा पुत्र) या देवतांना हे लोक भजतात. यांच्यांत नागपूजाही प्रचलित आहे. इल्लमच्या रक्षणासाठी व समृद्धीसाठी ती अत्यावश्यक मानली जाते. त्यासाठी पूर्वी प्रत्येक घराच्या आवारात सर्पकावू (नागाचे देऊळ) असे. कुंभमासात (फेब्रु.-मार्च) तांदुळाचे पीठ, गायीचे दूध, नारळाचे पाणी, केळे, तूप व केशर हे पदार्थ घालून केलेल्या खिरीचा नैवेद्य नागाला दाखवतात.

नंपूतिरी ब्राह्मण शंकराचार्यांना धार्मिक क्षेत्रात सर्वश्रेष्ठ मानतात.

**सण-उत्सव** —— विषू (वर्षप्रतिपदा), अष्टम रोहिणी (कृष्णजन्म), ओणम, सरस्वतीपूजा (नवरात्र), विजयादशमी, अयिल्यम (नागपूजा), तिरुआतिरा व पूरम हे यांचे प्रमुख सण आहेत. प्रत्येक देवालयाचा वार्षिक उत्सव थाटाने साजरा केला जातो.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात. मृत मनुष्याचा मुलगा प्रथम प्रेतावर पाणी शिंपडून त्याच्या प्रत्येक सांध्याला चाकूने स्पर्श करतो. आद्य शंकराचार्यांची आई वारल्यावर शंकराचार्य तिच्या और्ध्वदेहिकासाठी पुढे आले. संन्याशाला नात्यागोत्यातील कोण्याही माणसाचा अंत्यविधी करणे निषिद्ध आहे. त्यामुळे कोणीही ब्राह्मण शंकराचार्यांना प्रेत उचलण्यासाठी मदत करीना. सर्वांनी त्यांच्या मातेच्या अंत्ययात्रेवर बहिष्कारच घातला. मग शंकराचार्यांनी मातेच्या प्रेताचे तुकडे करून ते एकेक उचलून चितेवर ठेवले व मातेचा दाहसंस्कार केला. तेव्हापासून नंपूतिरी ब्राह्मणांत प्रेताला चाकूने स्पर्श करण्याची पद्धत चालू झाली, असे म्हणतात. प्रेताला चाकूने स्पर्श केल्यावर स्नान घालून गोपीचंदन लावतात व नवे वस्त्र गुंडाळतात. प्रेताचे दहन घराच्या आवारातच करतात. दक्षिणेकडे डोके करून प्रेत चितेवर ठेवतात. चिताशुद्धीचा विधी केल्यानंतर सर्वजण चितेला प्रदक्षिणा घालतात व मग अग्नी देतात. दहन चालू असतानाच सर्वजण स्नान करतात. मृताचा मुलगा एका सच्छिद्र मडक्यात पाणी घेऊन चितेला तीन प्रदक्षिणा घालतो व मग ते मडके पाठीवरून खाली टाकून देतो.

स्त्रिया स्मशानात जातात. तिथेच मृताच्या पत्नीचे मंगळसूत्र (ताळी) काढले जाते. मग स्नान करून ती घरी परत जाते. नंतर उदकक्रिया करून सर्व लोक परततात.

दुसऱ्या दिवशी नात्यातले पुरुष क्षौर करतात. मुलगा बाराव्या दिवसापर्यंत एक चाकू जवळ बाळगतो. रोज तर्पण व पिंडदान करतात. चौथ्या दिवशी अस्थींचे संचयन करून त्या एका मडक्यात घालून ते एका झाडाखाली पुरतात. सुतक दहा दिवस पाळतात. ११ व्या दिवशी मृताला ११ पिंड देतात. वर्षश्राद्धाच्यां वेळी मोठी मेजवानी वगैरे खर्चाचा कार्यक्रम असतो. एखादी स्त्री कुमारी अवस्थेत मेली, तर प्रेतदहनापूर्वी तिचा लग्नविधी (ताळीबंधन) करतात.

नंपूतिरी ब्राह्मण जसे बुद्धिमान तसेच कर्तबगार आहेत. केरळात स्थायिक झाल्यावर तिथल्या केवळ धार्मिक जीवनावरच आपला प्रभाव पाडून ते थांबले नाहीत; तर आपल्या बुद्धीच्या बळावर केरळच्या राजकारणातही त्यांनी प्रवेश मिळवला. शतकानुशतके राजकारणाची सूत्रे त्यांच्या हाती होती. शास्त्राप्रमाणेच शस्त्र हाती धरूनही त्यांनी आपले श्रेष्ठत्व प्रस्थापित केले. पोर्तुगीजांचा पाय केरळाला लागेपर्यंत तिथे नंपूतिरींचे वर्चस्व अबाधित राहिले होते.

नंपूतिरींच्या धार्मिक समजुती फार तीव्र आहेत. सोवळचा-ओवळ्याचे प्रस्थही त्यांच्यांत बरेच आहे. स्त्रियांच्या बाबतीत त्यांच्या कल्पना अगदी मनुप्रणीत आहेत. म्हणूनच त्यांच्या स्त्रियांना पडदा पाळावा लागतो. अजूनही त्यांचा आधुनिक संस्कृतीशी फारसा संपर्क आलेला नाही. त्यांच्यात स्त्रीच्या पातिव्रत्याची जपणूक कसोशीने केली जाते. एखाद्या स्त्रीचे पाऊल वाकडे पडलेच, तर तिला कठोर सामाजिक शिक्षा भोगावी लागते.

इ. स. १९३३ मध्ये झालेल्या सुधारणाकायद्यामुळे इल्लम या परंपरागत कुटुंबसंस्थेची बंधने शिथिल झाली आहेत. आता सर्व तरुणांना जातीतील मुलींशी विवाह करता येतो आणि संपत्तीवर समान हक्क मिळतो. सनातन वृत्तीच्या जुनाट माणसांना ही सुधारणा मान्य नसली, तरी तरुणांनी तिचे स्वागत केले आहे व त्यामुळे या जातीचा ऱ्हास थांबला आहे. [म. ज्ञा. को.; सो. चें. म.; केरळ]

**न** वर्णमालेतील विसावे व्यंजन आणि त वर्गातील पाचवा वर्ण. याच्या विकासात चार अवस्था दिसून येतात. पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार येथील लेखात आढळते, दुसरी कुशाणवंशी राजाच्या मथुरा येथील लेखात (इ. स. चे १ ले शतक), तिसरी मेवाडचा गुहिलवंशी राजा अपराजित याच्या वेळच्या कुंडलेश्वर येथील लेखात (इ. स. ६६१) आणि चौथी अवस्था हैहयवंशी राजा जाजल्लदेवाच्या वेळच्या लेखात (इ. स. १११४) आढळते. आजचा न वरील चौथ्या अवस्थेप्रमाणेच आहे.

न च्या रूपाचा विकासक्रम

याचे रूपध्यान वर्णोद्धारतंत्रात वर्णिले आहे, ते असे–

**ध्यानमस्य नकारस्य वक्ष्यते शृणु भाविनि ।**
**दलिताञ्जनवर्णाभां ललज्जिह्वां सुलोचनाम् ।**
**चतुर्भुजां कोटराक्षीं चारुचन्दनर्चचिताम् ।**
**कृष्णाम्बरपरीधानामीषद् हास्यमुखीं सदा ।।**

अर्थ– हे पार्वती, या नकाराचे ध्यान सांगतो ते ऐक. ही नकाररूपी देवता घोटलेल्या काजळाच्या वर्णाची, जिची जीभ लळलळत आहे अशी, सुलोचना, खोल डोळ्यांची, चतुर्भुज, चंदनचर्चित, कृष्ण वस्त्र नेसलेली व सदैव किंचित हास्यमुख अशी आहे.

दंत हे याचे उच्चारणस्थान आहे. [श. क.; म. ज्ञा. को.]

**नकटा नृत्य** कोकणातील एक लोकनृत्य. या नृत्यात तीन सोंगे असतात – कोळी, कोळीण व नकटा. नकटा हा मुख्य असतो व त्याच्या तोंडावर काहीसा भीतिप्रद असा मुखवटा असतो. त्याचा पोषाख किरिस्तांवासारखा असतो व हातात लाकडी तलवार असते. कोळी, कोळीण व नकटा हे तिघेही एका रांगेत उभे राहून गाणे म्हणत नाचतात. गाताना गुडघ्यात जरा वाकून पुढे झुकतात. मधेच गिरकीही घेतात. गाण्याप्रमाणे अभिनय करणे हे नकटचाचे मुख्य काम असते. मुलांना भेडसावणे व प्रेक्षकांना हसवणे, असे विदूषकी चाळेही तो करतो. या नाचाच्या वेळी गाणी गातात, त्यांतला एक नमुना असा–

**बिरामणाच्या अंगणी चाफ्याच्या लावणी हो**
**चाफे लाविले हारोहारी हो ।**
**त्या फुलांचा सुवास भारी हो ।**
**या बाइचां आंगणां चांगला हो ।**
**या बाईकडे देव आले पाव्हणे ।**

नकटा नृत्य हे मुख्यत्वेकरून शिमग्याच्या उत्सवाच्या वेळी होत असते. [फो. डा. म.; भा. लो. नृ.]

**नकटाबाबा** मध्य प्रदेशातील एक लोकदेव. याला परकाया-प्रवेश, दूरदर्शन, दूरश्रवण, इ. विद्या प्राप्त आहेत, अशी सार्वत्रिक समजूत आहे. हा मुख्यत्वे अंत्यजांचा देव असून, ते लोक त्याला सिद्ध पुरुष मानतात. नकटाबाबा-संबंधी एक दंतकथा सांगतात, ती अशी–

गझनीच्या महंमुदाने जेव्हा पंजाबवर स्वारी केली, तेव्हा हा पंजाबच्या बाजूने लढत होता. त्या युद्धात तो शत्रूच्या हाती सापडला. शत्रुपक्षीय सैन्याने त्याचे नाक व कान कापले. तेव्हा-पासून हा नकटाबाबा म्हणून प्रसिद्ध झाला.

याचे प्रतीक म्हणून एक काळा दगड बसवलेला असतो. हा पावाला झालेले कुरूप नाहीसे करतो, अशी समजूत आहे.

**नकटौरा** एक लोकनाटच. उ. प्रदेशात लग्नाच्या प्रसंगी हे लोकनाटच चालते. या लोकनाटचात नाना प्रकाराची सोंगे आणतात व प्रहसनवजा नाटके करतात. या नाटचातला विनोद बराच अश्लील असतो. या नाटचात जी गीते गायिली जातात, त्यांना नकटा असे म्हणतात. त्यांतला एक नमुना असा–

सइयाँके बोलाएसे मैं ना बोलूँ
यार के बोलाएसे बोलू जैसे मैना ।
सइयाँके इशारेसे मैं ना देखूँ
यार के इशारेसे डोले दोनों नैना ।।
सइयाँके सोवाएसे मैं ना सोऊँ
यार के सोवाएसे लिपट जाऊँ छमिया ।
पिया के खिलाएसे मैं ना खाऊँ
यार के खिलाएसे खाऊ जैसे मैना ।।

अर्थ– पती बोलला तर मी बोलणार नाही. पण प्रियकर बोलला तर मी पण मैनेसारखी बोलेन. पतीने इशारा केला, तर मी बघणारसुद्धा नाही. परंतु प्रियकराच्या इशाऱ्यावर माझे डोळे मोडायला लागतात. पतीने झोपवले तर मी झोपणार नाही. पण प्रियकराने झोपायला सांगितले तर त्याच्या छातीला लपेटून राहीन. पतीने खायला दिले तर खाणार नाही; परंतु प्रियकराने दिले, तर मात्र मैनेसारखी खुशीने खाईन.

या नकटा गीतांवरूनच संपूर्ण कार्यक्रमाला नकटौरा किंवा खोडिया असे म्हणतात. [ हिं. सा. बृ. इ. ]

**नकुलनवमी** एक काम्य व्रत. नकुल म्हणजे मुंगूस होय. मूल नसलेल्या स्त्रिया श्रावण शु. नवमीच्या दिवशी हे व्रत करतात. त्या दिवशी फक्त ज्वारीचे घिरडे खाऊन राहतात. फल – पुत्रप्राप्ती, या व्रताची कथा अशी–

एक ब्राह्मण जोडपें होते. त्यांच्या पोटी संतान नव्हते. त्यामुळे ते दुःखी कष्टी होते. पुढे त्या ब्राह्मणाने एक मुंगूस आणून पाळला. त्यानंतर सुदैवाने बाईला पुत्र झाला. एके दिवशी मुलाला पाळण्यात ठेवून आणि मुंगसाला राखणीस ठेवून ती पाण्याला गेली. एवढचात एक सर्प तिथे आला व पाळण्यात चढू लागला. ते पाहून मुंगसाने त्याच्यावर झडप घातली आणि त्याला ठार केले. बाई पाण्याहून येते, तर मुंगसाचे तोंड रक्ताने भरलेले. तिला वाटले, की मुंगसाने आपल्या बाळाला मारले. त्या शंकेच्या आहारी जाऊन तिने डोक्यावरचा हंडा मुंगसावर आदळला. नंतर बाई घरात जाऊन पाहते, तो मूल सुखरूप झोपले आहे आणि जवळच साप मरून पडला आहे. मग बाईला खूप वाईट वाटले, ते जखमी मुंगूस दह्याच्या डेऱ्यात जाऊन बसले होते. बाईला कल्पना नसल्यामुळे डेऱ्यात गरम पाणी ओतून तिने ताक घुसळले. त्या ताकावर मुंगसाचे तुकडे तरंगत असलेले पाहून बाईला पश्चात्ताप झाला. तिने प्रतिज्ञा केली, की मी मुंगसाला जिवंत करीन नाही तर मुलासह जीव देईन. मग डोईवर डेरा आणि कडेवर मूल घेऊन ती निघाली. वाटेत तिला एक म्हातारी भेटली. तिने म्हातारीच्या विनंतीवरून तिचे केस विंचरले. तिला घडलेली सर्व हकीकत सांगितली. जरा वेळाने पाहते तो ताकाच्या डेऱ्यातून मुंगूस बाहेर आले. तिने त्याला पोटाशी धरले. ती म्हातारी म्हणजे देवी होती. बाई तिच्या पाया पडली. देवी म्हणाली, 'दरवर्षी तू हे व्रत कर. गहू खाऊ नको; धान्य दळू नको, ताक करू नको, गोरस खाऊ नको म्हणजे तुझे कल्याण होईल.' मग बाई मुलाला व मुंगसाला घेऊन घरी आली.

हे व्रत मुख्यत्वे गुजरातमध्ये करतात. [कंकावटी भा. १]

**नकुलेश्वरी** एक देवी. हिचे चरित्र देवीमाहात्म्यात वर्णिले आहे. ही ललितेची मानसजात कन्या होय. ही गरुडारूढ असते. सर्पिणीचा पराभव करण्यासाठी ती निघाली असता भंड नामक दैत्याच्या पाच सेनापतींशी हिचे युद्ध झाले व त्या युद्धात हिने त्या सर्वांचा पराभव केला. [पु. इं.]

**नक्कीरर** एक तमिळ कवी व पंडित. हा कडैच्चंगम नावाच्या तिसऱ्या तमिळ संघमचा अध्यक्ष होता. तत्कालीन कवींत तो अग्रगण्य समजला जात असे.

याच्या कालाविषयी निश्चित माहिती मिळत नाही. तो ब्राह्मण का वेळ्ळाळरर याबद्दलही वाद आहे. याच्या धीरोदात्तपणाविषयी अनेक दंतकथा सांगतात, त्यांतील एक अशी–

पांड्य राजा हा याचा आश्रयदाता होय. एक दिवस राजा-राणी विश्रांतीसाठी गच्चीवर बसले असता एकाएकी तिथे

सुगंध पसरला. राजाला वाटले, की राणीने माळलेल्या फुलांचा हा सुगंध असावा. म्हणून राजाने तिच्या वेणीकडे पाहिले. पण त्या वेणीत फूलच नव्हते. तेव्हा राजाला तो एक चमत्कारच वाटला. त्या चमत्काराचा जो कोणी उलगडा करील त्याला राजाने लगेच एक हजार सुवर्णमुद्रांचे बक्षीस जाहीर केले. त्या बक्षीसाच्या आशेने अनेक पंडित तिथे आले. त्यांनी सुगंधाच्या निरनिराळ्या उपपत्ती राजाला सांगितल्या. पण त्याने राजाचे समाधान होईना.

त्याच वेळी धरुमी नावाचा गरीब ब्राह्मण तिथे आला होता. तो सुंदरेश्वराचा भक्त व पुजारी होता. त्याला वाटले, की आपण ते बक्षीस मिळवावे. म्हणून त्याने त्या बाबतीत देवालाच साकडे घातले. देवाने त्याच्या कानात राजाच्या जिज्ञासेचे उत्तर सांगितले. ब्राह्मण राजदरबारात आला व त्याने राजाला सांगितले. 'हे राजा, हा सुगंध फुलांचा नसून तुझ्या राणीच्या केसांचा आहे.' अर्थात राजा त्या उत्तराने खूष झाला. ते पाहून दरबारातील अन्य पंडितांनाही बक्षिसाच्या लोभाने त्या उत्तराला आपली संमती दर्शविली. नक्कीररही त्याच दरबारात होता. तो म्हणाला, की 'हे उत्तर साफ चूक आहे.'

नक्कीररसारखा पंडित विरोध करीत आहे, असे पाहून राजाने बक्षिसाचा हात आखडता घेतला. मग तो धरुमी ब्राह्मण हिरमुसला होऊन परत सुंदरेश्वराकडे गेला. धरुमीने सांगितलेली हकीकत ऐकून सुंदरेश्वराला अचंबा वाटला. त्याने स्वतः एका ब्राह्मणाचे रूप घेतले व तो तमिळ साहित्य संघमच्या मंडपात आला. तिथे येऊन नक्कीररशी त्याने खूप वाद केला. पण नक्कीररचे समाधान होत नाही, असे पाहून त्याने निजरूप प्रकट केले. सुंदरेश्वर म्हणजे शिव याचा तृतीय नेत्र क्रोधाने उघडण्याच्या बेतात आहे, असे नक्कीररला दिसले; तरीही नक्कीरर डगमगला नाही. तो म्हणाला. 'तू साक्षात ज्वालारूप होऊन समोर उभा राहिलास, तरी सत्य ते सत्य! सत्याला देवाचेही भय नसते.'

नक्कीररने तमिळ साहित्याची मौलिक सेवा केली आहे. तिरुमुरुग रुप्पउइ व नेडुनलवडई या नावांची याची दोन काव्ये उपलब्ध आहेत. पहिल्या काव्यात कार्तिकेयाची स्तुती आहे. दुसऱ्या काव्यात हिमरात्रीचे वर्णन असून, पांड्य राजांचा इतिहासही आहे. त्याच्या काव्याचा एक नमुना असा—

ताळ् ओनराल् पातळम् ऊडुरुवत्तण विशुम्लिल्
ताळ् ओनराल् अण्डम् कडन्दुरुवित् तोळ ओनराल
दिक्कु अनैत्तुम् पेर्क्कुम—तिरलकाळिकळति
नक्कनैत् तान् कण्ड नडम्

अर्थ— कालीमातेने प्रार्थना केल्यावरून, ईश्वराने विश्वनृत्य केले. एका पावलाने त्याने भूगर्भाचा अंत पाहिला व दुसऱ्या पावलाने अनंताचे मोजमाप केले. आपल्या बाहुबलाने त्याने दाही दिशा उद्ध्वस्त केल्या.

अहप्पोरुळ या प्राचीन ग्रंथावर नक्कीररने भाष्य लिहिले आहे व त्यात तमिळ साहित्याच्या तीन्ही संघमचा इतिहास ग्रथित करून ठेवला आहे.

नक्कीररच्या मते भक्ती हाच परमेश्वरप्राप्तीचा खास मार्ग आहे. [तमिळनाडु; त. ए. हं. इ. अं.; त. सा. सं.]

**नक्त** दिवसातला विशिष्ट काल. हा काल नेमका कोणता याविषयी मतभेद आहेत. याविषयी भविष्य पुराणातला एक श्लोक असा—

नक्षत्रदर्शनान्नक्तं केचिदिच्छन्ति मानवाः।
मुहूर्तोनं दिनं केचित् प्रवदन्ति मनीषिणः॥

अर्थ— काही लोक असे समजतात, की (सूर्यास्त होऊन) नक्षत्रे दिसू लागली, की तो काल नक्त होय. काही विद्वान म्हणतात, की दिवस मावळायला दोन घटिका शिल्लक राहिल्या असता, तो काल नक्त होय.

नक्तकाली भोजन करण्याचे महत्त्व देवी पुराणात पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

उपवासात् परं भैक्षं भैक्षात् परमयाचितम्।
अयाचितात् परं नक्तं तस्मान्नक्तेन वर्तयेत्॥

अर्थ— उपवासापेक्षा भिक्षा मागून मिळालेले अन्न सेवन करणे, त्यापेक्षा अयाचित मिळेल ते सेवन करणे आणि त्याहीपेक्षा नक्त भोजन करणे हे श्रेष्ठ होय. म्हणून (माणसाने) नक्तभोजी असावे.

एकादशीच्या दिवशी उपवास करण्यास असमर्थ असलेल्या माणसाने त्या दिवशी नक्त भोजन करावे, म्हणजे एकादशी केल्याचे फल लाभते, असे मत्स्य पुराणातल्या एकादशीमाहात्म्यात म्हटले आहे. [हि. ध.; श. क.]

**नक्तचतुर्थी** एक काम्य व्रत. मार्गशीर्ष शु. चतुर्थीला नक्तचतुर्थी म्हणतात. व्रतकर्त्याने या दिवशी विनायकाची पूजा व नक्त भोजन आणि दुसऱ्या दिवशी तिलमिश्रित अन्नाने पारणे करायचे असते. व्रतावधी एक वर्ष. फल— आरोग्य, शक्ती व बुद्धी यांची प्राप्ती. [हि. ध.]

**नक्त व्रत** एक काम्य व्रत. दिवसभर उपवास करून रात्री भोजन करणे याला नक्तव्रत म्हणतात. याचे दुसरे नाव दिवारात्रिव्रत असेही आहे.

हे दिवारात्रिव्रत असल्याने जी तिथी दिवसा व रात्री असेल त्या तिथिलाच हे व्रत करावे लागते. यती, विधवा यांनी सूर्यास्तापूर्वी नक्त भोजन करावे आणि गृहस्थाने व पुत्रवंताने रात्री नक्त भोजन करावे, असे विधान आहे. व्रतकर्त्याने हविष्यभोजन, स्नान, सत्य भाषण, अल्पाहार, व्याहृतिहोम व शयन हे सहा नियम अवश्य पाळायचे असतात.

याचे आणखी काही पर्याय आहेत, ते असे– शुक्ल, कृष्ण अष्टमी व चतुर्थी या दिवशी शिवपूजा करून नक्तभोजन करावे. प्रत्येक पर्वणीच्या दिवशी भूमीवर नक्तभोजन करावे. कृष्ण अष्टमीपासून कृष्ण चतुर्दशीपर्यंत नक्तभोजन करावे.

कार्तिक महिन्यात स्त्रियांनी नक्तभोजनव्रत करावे. अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा व अमावास्या या दिवशीही नक्त भोजन करावे. एक महिना, चार महिने, एक वर्ष आणि श्रावण ते माघ असे सात महिने नक्तभोजन करावे. फल– दीर्घायुरारोग्य व स्वर्ग यांची प्राप्ती. [ नि. सिं.; हि. ध. ]

**नखुल्या** महाराष्ट्रातल्या मुलींचा एक खेळ. त्यासाठी दोन मुली समोरासमोर उभ्या राहतात व एकमेकींच्या बोटांत बोटे अडकवून फुगडीप्रमाणे गोल फिरतात. गोल फिरताना त्या निरनिराळी गाणी म्हणतात. त्यातील एका गाण्याचा काही भाग असा–

नखूल्या बाई नखूल्या । चंदनाच्या टिकूल्या ॥
एक टिकली नासली । गंगेत नेऊन टाकली ॥
गंगेला आला लोंढा । भिजला माझा गोंडा ॥
गोंधाच्या पदरी काडी । भिजली माझी साडी ॥

या खेळामुळे हाताची बोटे मजबूत होतात, अशी समजूत आहे. [ व्या. ज्ञा. को.; सु. वि. को. ]

**नखे** केसांप्रमाणेच नखेही महत्त्वाची समजली जातात. घरात, मंदिरात किंवा पवित्र जागी नखे कापीत नाहीत. शनिवारी नखे काढणे अशुभ समजतात. नखांना इजा झाली तर माणसाच्या शरीरावरही त्याचा अनिष्ट परिणाम होतो, असे वन्य जमाती मानतात. नखांचा जादूटोण्यासाठी उपयोग करणे, ही चाल जगात सर्वत्र आहे.

**नगरकोटवारी** एक देवता. उत्तर प्रदेशात हिची सात स्थाने प्रसिद्ध असून, त्या सात ठिकाणी ती सात नावांनी वास्तव्य करते, असे समजतात. काही लोक त्यांना सात वहिणी असेही समजतात. त्यांची नावे अशी–(१) नगरकोटवारी, (२) ज्वाला– हिचे मंदिर नगरकोटाच्या पूर्व दिशेला आहे. (३) चिन्तनपूरनी– हिचे मंदिर ज्वालेच्या पूर्वेला असून तिथे तिच्या पावलांच्या दगडी खुणा आहेत. (४) बेलौनममानी (बेलौनवारी) (५) धौलागढवारी – हिच्या नावे उत्तरेत धौलागढ नावाचा पर्वत आहे. (६) केलाममानी – हिला कैलामैया असेही म्हणतात. (७) हिंगुलाजवारी– हिला आदिममानी असेही म्हणतात. [ कु. जी. व्र. श. ]

**नगरे** देवालये, प्रासाद, भिन्न प्रकारची लहान-मोठी निवासस्थाने, सभागृहे, पाठशाळा, प्रशस्त रस्ते, रमणीय उद्याने इत्यादींनी युक्त अशा विस्तीर्ण वसाहतीला नगर असे म्हणतात. 'नगा इव प्रासादादयः सन्ति यत्र' = पर्वतासारखे (उंच) प्रासाद, इ. वास्तुरचना जिथे असतात, ते नगर होय, अशी त्याची व्याख्या आहे. याला पुर, नगरी, पुरी, इ. अन्यही नावे आहेत.

नगर कशाला म्हणावे याविषयी विष्णू पुराणाच्या टीकेत श्रीधरस्वामींनी भृगूचा एक श्लोक दिला आहे, तो असा–

पण्यक्रियादिनिपुणैश्चातुर्वर्ण्यजनैर्युतम् ।
अनेकजातिसम्बन्धं नैकशिल्पसमाकुलम् ।
सर्वदैवतसम्बन्धं नगरं त्वभिधीयते ॥

अर्थ – व्यापार–उदीमात निपुण अशा चारही वर्णांच्या लोकांनी युक्त, अनेक जातींच्या लोकांनी युक्त, अनेक प्रकारच्या मंदिरे, प्रासाद, इ. शिल्पांनी भरलेले आणि जिथे अनेक देवतांची स्थाने आहेत, असे जे स्थान त्याला नगर म्हणावे.

निर्मितिभेदावरून नगरांचे मुख्य दोन वर्ग होतात, ते असे–

(१) ग्रामांचा विस्तार होऊन बनलेली नगरे – प्रत्येक गावात एखादे लहान मोठे देवालय असतेच. त्यांतल्या काही देवालयांचे विशेष माहात्म्य पुराणांत सांगितलेले असते. त्यामुळे हजारो लोक तिथल्या देवाच्या दर्शनाला जाऊ लागतात. मग ते स्थान पुण्यक्षेत्र बनते. त्यामुळे तिथला व्यापार व उद्योग यांची वृद्धी होते; वस्तीही वाढते. मग त्या गावाचे नगरात रूपांतर होते. एखाद्या मोठ्या शिक्षणकेन्द्रामुळे गावाचा विस्तार होऊन त्याचे नगर बनते. नदी, समुद्रकिनारा, मोठा राजरस्ता यांच्या सान्निध्यामुळेही काही गावांना महत्त्व प्राप्त होऊन तिथला व्यापार वाढतो व तिथे विशाल नगरे उभी राहतात.

(२) विशिष्ट हेतूने उभारलेली नगरे– स्वतःला चांगली राजधानी हवी म्हणून काही राजे नवी नगरे वसवतात. देशाचे संरक्षण, शासनाची सोय, सैन्यव्यवस्था, या दृष्टींनीही अनेक नगरे मुद्दाम वसवली जातात.

**प्राचीन नगरे** – हडप्पा व मोहेंजोदडो येथील उत्खननात सिंधुसंस्कृतीचे जे अवशेष सापडले आहेत, त्यांवरून त्या काळा-

तील नगरांची चांगली कल्पना करता येते. तीच सर्वांत प्राचीन भारतीय नगरे होत. त्यांत उभे व आडवे, रुंद व लहान, तसेच एकमेकांना काटकोनात छेदणारे रस्ते आढळतात. घरांची रचना साधी असून, दोन घरांच्यामध्ये मोकळी जागा सोडलेली



हडप्पा येथील नगराचे अवशेष

दिसते. घरे उंच चौथऱ्यावर बांधलेली असून, मोवती अंगण असते. त्यात विहीर व स्नानगृह असते. सार्वजनिक सभागृहे, स्नानगृहे व धान्याची कोठारे यांचेही अवशेष तिथे सापडले आहेत. सांडपाण्यासाठी जमिनीखालून जाणाऱ्या लहान-मोठ्या नळांचे जाळेही तिथे दिसते.



गटारांचे अवशेष– मोहेंजोदडो

लोकवस्तीपासून जवळच उंच जागी दुर्ग किंवा गढी आणि तिला तट व बुरुज अशा रचनेचे अवशेषही सापडले आहेत. नगरांच्या संरक्षणासाठी ही योजना केलेली असावी.

आर्य वीरांनी शत्रूंच्या अनेक पुरांचा व दुर्गांचा नाश केला, असे वर्णन ऋग्वेदात आहे. ती पुरे व दुर्ग म्हणजे सिंधुसंस्कृतीतली नगरेच असावी, असा तर्क अनेक पंडितांनी केला आहे. वैदिक आर्यांनी ग्रामे वसविली होती; पण नगरे मात्र बांधली नव्हती. कालांतराने त्यांनी अनेक नगरेही निर्माण केली. त्या कामी त्यांना इथल्या मूळ रहिवाशांचे साहाय्य निश्चित झाले असावे.

प्राचीन भारतीय ग्रंथांत नगरांचे आठ प्रकार सांगितले आहेत, ते असे––

राजधानी – राजाची नगरी. ही सर्वांत मोठी असते. तिच्या मोवती उंच तट असतो. त्याला चार द्वारे असतात. या नगरात प्रशस्त राजमार्ग, उपवने, सरोवरे, देवालये व सुंदर भवने असतात. नगरद्वारांजवळ सैनिकांची शिबिरे असतात. हस्तिनापूर, द्वारका, मथुरा, पाटलिपुत्र व कान्यकुब्ज या राजधान्या अशा प्रकारच्या होत्या.

पत्तन – समुद्रकिनाऱ्यावरील नगर. हे व्यापारी केन्द्र असते. कावेरीच्या तीरावरचे कावेरीपुंपट्टिनम हे नगर अशा प्रकारचे नगर होते.

द्रोणीमुख – जिथे नदी समुद्राला मिळते, तिथे असलेले व्यापारी केन्द्र. उदा० ताम्रलिप्ती, भृगुकच्छ.

पुटभेदन – मोठे व्यापारी केन्द्र असलेले नगर.

निगम – भिन्न भिन्न कारागिरांच्या वसाहती असलेले नगर.

स्थानीय – आठशे ग्रामांच्या मध्यभागी असलेल्या नगराला स्थानीय म्हटले आहे. याचा उल्लेख सर्वप्रथम अर्थशास्त्रात आढळतो. हे जिल्ह्याएवढ्या विभागाचे मुख्य ठिकाण असावे.

खर्वट– दोनशे ग्रामांच्या केंद्रस्थानी असलेले नगर. हे तालुक्यासारख्या विभागाचे मुख्य ठिकाण असावे.

खेट– सामान्य प्रतीचे नगर.

नगररचना– प्राचीन काळी नगररचना हे वास्तुकलेचे महत्त्वाचे अंग मानले जात होते. नगर निर्माण करणाऱ्या शिल्पकारांच्या समूहाला शिल्पिसंघ असे नाव होते. मुख्य शिल्पकाराला विश्वकर्मा म्हणत. प्राचीन काळी नगररचना मुख्यत्वे राजेलोकच करीत असत. त्यामुळे राजा आणि राज्य यांचे भले व्हावे, या उद्देशानेच नगररचनेची विधिविधाने केली जात. नगररचनेसाठी शुभ मुहूर्त कसा असावा, याविषयी माहिती पुढील श्लोकात आहे–

स्थिरराशिगते भानौ चन्द्रे च स्थिरभोदये ।
शुद्धे काले दिने चैव नगरं कारयेन्नृपः ।।

अर्थ– सूर्य स्थिर राशीत व चंद्र स्थिर नक्षत्रात असता शुद्ध कालीं दिनशुद्धी पाहून राजाने नगरनिर्मितीचा प्रारंभ करावा.

भूपरीक्षा– नगरस्थापनेसाठी सर्वांत उत्तम जागा नद्यांच्या संगमाजवळची होय, असे अर्थशास्त्र, अपराजितपृच्छा, इ.



नगरद्वार – अमरावतीशिल्प (इ. स. चे २ रे शतक)

ग्रंथांत म्हटले आहे. नदीच्या किनाऱ्यावर किंवा पर्वताजवळ नगर वसवणे चांगले, असेही सांगितले आहे. कारण तिथे पाणी व वृक्षवनस्पती यांची विपुलता असते आणि संरक्षणाच्या दृष्टीनेही ती जागा योग्य असते. ज्या भूमीला दुर्गंध येत असेल, जिथे काटेरी झाडे असतील किंवा जी स्मशानाजवळ असेल, अशी भूमी नगरासाठी अयोग्य मानली जात असे.

बलिविधान– नगरासाठी भूमी ठरवल्यानंतर प्रथम तिची शुद्धी करीत. त्यासाठी शुभ मुहूर्तावर ब्रह्मा, विष्णू, रुद्र, क्षेत्रपाल, दिक्पाल, इ. देवतांची पूजा करून गाय, घोडा, हत्ती, सोने, अन्न व वस्त्र यांचे दान करीत.

नगराच्या संरक्षणासाठी सभोवती एक, दोन किंवा तीन खंदक खणण्याची प्रथा होती. ते खंदक १५ फूट खोल व ५० ते १०० फूट रुंद असत. त्यात पाणी किंवा चिखल भरीत किंवा ते मोकळे ठेवीत. खंदकांना लागून तट बांधण्याची प्रथा होती. हे मातीचे, विटांचे किंवा दगडांचे बांधीत. त्यांची उंची ९ ते २० हात असे. त्यांत मोठे दरवाजे व बुरुज असत.

चौकोनी, त्रिकोनी, आयताकार, गोल, अर्धचंद्राकृती, भुजंगाकृती, अशी विविध आकाराची नगरे बांधण्याची पद्धत होती. नगर हे दीर्घ, चौकोनी, किंवा गोल असावे, असे भविष्योत्तर पुराणात म्हटले आहे. पण त्यांतल्या त्यात दीर्घ व चौकोनी नगर विशेष शुभ मानले आहे. दीर्घ नगर दीर्घकाल सुखसंपत्ती देणारे असते व चौकोनी किंवा आयताकार नगर चतुर्वर्गफल देते, अशी त्याची फलश्रुती सांगितली आहे. रामायण व महाभारत यांत जी वर्णने आहेत, त्यांवरून अयोध्या व द्वारका ही नगरे आयताकार होती, असे कळते. मयमत या ग्रंथात मात्र वृत्ताकार नगर श्रेष्ठ मानले आहे. अनेक प्राचीन ग्रंथांत अर्धचंद्राकार नगरांचे उल्लेख आढळतात. अशी नगरे शुभ व शांतिप्रद मानली आहेत (अग्नी पु. १०८.९–१०; मत्स्य पु. २१७.२७). भारतात अशी पुष्कळ नगरे होती. मथुरा नगरी अर्धचंद्राकृती होती, असे हरिवंशात सांगितले आहे. या नगरांची सामान्य रचना पुढीलप्रमाणे असे –

नगराच्या सीमेच्या आत, सभोवती एक रुंद रस्ता असे. समोरासमोरील दोन दरवाज्यांना जोडणारे रस्तेही खूप मोठे असत. ते नगराच्या मध्यभागी जिथे एकमेकांना छेदीत, तिथे प्रशस्त प्रांगणात नगराचे मुख्य देवालय किंवा सार्वजनिक



तीनमजली प्रासाद – भरहूतशिल्प

सभागृह असे. या रस्त्यांमुळे नगराचे मुख्य चार भाग होत. त्या प्रत्येक भागात अनेक लहान रस्ते असून, त्यामुळे त्याचे लहान

भाग पडत. रस्त्यांच्या दुतर्फा लोकांची घरे असत. मोठ्या रस्त्यांवर दुकाने असत. सीमेलगतच्या रस्त्यावर पाठशाळा, वाचनालये, धर्मशाळा, इ. सार्वजनिक इमारती असत. जागजागी देवालये, उद्याने, सरोवरे आणि विहिरी असत. रस्त्याच्या कडेला सांडपाण्याची गटारे असत.

अलिकडे निरनिराळ्या ठिकाणी जे उत्खनन झाले आहे, त्यात प्राचीन नगरांचे विपुल अवशेष सापडले आहेत. त्यांवरून त्या नगरांची कल्पना करता येते व ती कल्पनाचित्रे प्राचीन ग्रंथांतील वर्णनांशी बहुतांशी जुळणारी आहेत. अर्थशास्त्र, शुक्रनीतिसार, अपराजितपृच्छा, मानसार, समरांगणसूत्रधार, इ. ग्रंथांत नगररचनेचे शास्त्रीय विवेचन आढळते; तर रामाण, महाभारत, पुराणे, कादंबरी, इ. ग्रंथांत प्राचीन नगरांची सुंदर वर्णने आढळतात. त्यांवरून असे ध्यानात येते, की प्राचीन काळी भारतात नगरविन्यासाचे शास्त्र पुष्कळ विकास पावले होते. प्राचीन नगरे सुबद्ध व सुंदर असत.

**नागरिक जीवन–** नगराच्या निरनिराळ्या भागांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची वेगळी वस्ती असे. भिन्न व्यवसाय करणारे लोक वेगवेगळ्या भागांत राहत. नगरात विविध प्रकारचे उद्योग चालत. भिन्न व्यवसाय करणाऱ्या लोकांच्या भिन्न संघटना होत्या; त्यांना श्रेणी असे म्हणत. त्यांचे आर्थिक व्यवहार सुनियंत्रितपणे चालत. त्यावरच नगरांचे आर्थिक जीवन अवलंबून असे. प्राचीन काळी उद्योग व व्यापार यांमुळे सर्व नगरे समृद्ध होती व तिथले जीवन उच्च कोटीचे होते. अन्नवस्त्र, अलंकार, सुखसोयी, मनोरंजन, कला, इ. सर्व दृष्टींनी नगरातले लोक श्रीमंत व सुखी असत.

बहुतेक प्राचीन नगरे ही उच्च शिक्षणाची केंद्रे होती. तक्षशिला, वाराणसी, उज्जयिनी, नालंदा, पाटलिपुत्र, विक्रमशिला व वलभी ही नगरे त्यासाठी फार प्रसिद्ध होती. तिथे वेद, दर्शने, शिल्पशास्त्र, ज्योतिष, व्याकरण, वैद्यक, इ. विषयांचे शिक्षण दिले जात असे. अशा नगरांत पंडितांचे वादविवाद, विद्वानांच्या सभा व धार्मिक परिषदा होत. अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंतिका, पुरी व द्वारावती या सात नगऱ्यांना मोक्षदायिनी म्हटले आहे. प्रयाग, गया, रामेश्वर, कुंभकोणम, मदुरा, इ. अनेक नगरे ही पुण्यक्षेत्रे असल्यामुळे तिथले जीवन धार्मिक व पवित्र असे. तिथे साधुसंत वास्तव्य करीत व लक्षावधी यात्रेकरू येत जात.

**नगरशासन –** प्राचीन काळी प्रत्येक नगराची व्यवस्था पाहण्यासाठी एक सभा असे; तिला पौरसभा असे नाव होते. त्या सभेचे कार्य सांप्रतच्या नगरपालिकेप्रमाणेच होते. त्या व्यतिरिक्त राज्यशासन संस्थेने नेमलेले अधिकारीही असत. नगराच्या मुख्य अधिकाऱ्याला अर्थशास्त्रात नागरक म्हटले आहे. त्याच्या मदतीला पण्याध्यक्ष, सुराध्यक्ष, गणिकाध्यक्ष, इ. अनेक अधिकारी नेमलेले असत. नगरात शांतता व सुव्यवस्था राखण्यासाठी रक्षक नेमलेले असत.



वाराणसी– मध्ययुगातील नगराचे दृश्य

सुबद्ध रचना, भव्य प्रासाद, सुंदर भवने व मंदिरे, रमणीय उद्याने, मनोहर सरोवरे, स्वच्छ व प्रशस्त रस्ते, यांमुळे प्राचीन नगरे अत्यंत विलोभनीय दिसत. परंतु मध्ययुगात नगरांचे ते स्वरूप राहिले नाही. स्थापत्यशास्त्राचा लोप झाला, राजकीय परिस्थिती बिघडली, समृद्धी कमी झाली, लोकांची दृष्टी बदलली आणि अशा अनेक कारणांमुळे पूर्वीसारखी नगरे त्या काळात निर्माण झाली नाहीत. सांप्रत अस्तित्वात असलेल्या जुन्या शहरांचे रूप पाहून गेल्या हजार वर्षांतील नगरांची कल्पना करता येते. वेडेवाकडे अरुंद रस्ते, लहान मोठी, दाटीने बांधलेली बेढब घरे व अस्वच्छता असेच कळाहीन दृश्य भारतातील सर्व शहरांत आढळते. मध्ययुगीन संस्कृतीची ती प्रतीकेच मानता येतील. [ बी. सी. लॉ को. व्हॉ.; प्रा. भा. न. न. जी.; श. क.; हिं. सा. बृ. इ. ]

## नगर्जी

एक मुसलमान जात. हे लोक महाराष्ट्र व कर्नाटक या प्रदेशांत आढळतात. हे मुसलमान असूनही हिंदूंच्या देवतांना भजतात आणि हिंदूंचे सणही पाळतात. हे गोमांस खात नाहीत. एका काळी लग्नकार्यात ढोल वाजवण्याचे काम यांच्याकडे असे. [ मुं. इ. जा. ]

## नगसिया

एक आदिवासी जमात. यांची वस्ती मुख्यतः बिहार, ओडिसा, मध्यप्रदेश व छोटानागपूर या भागात आहे. हे स्वतःला किसान असेही म्हणतात. ही मुंडांची

एक शाखा असावी, कारण मुंडांना नागबासिया म्हटले जाते. यांच्यांत तेल्हा, घुरिया व सेंदुरिया असे तीन पोटभेद आहेत. लग्नसमारंभाच्या वेळी जे लोक वधूच्या कपाळी तेल, धूळ किंवा शेंदूर लावतात, त्यांना त्या प्रकारावरून वरील नावे पडली आहेत. तेल्हा व घुरिया यांच्या स्त्रिया हातांत काचेच्या बांगड्या न घालता पितळी बांगड्या घालतात. तेल्हा स्त्रिया गोंदवून घेत नाहीत व नाकातही नथ किंवा मुरणी घालीत नाहीत; सेंदुरिया स्त्रिया हातात कांचेच्या बांगड्या व दंडात वाक्या घालतात.

तेल्हा व घुरिया यांच्यांत लग्नसंबंध होतो; पण त्या दोघांचा सेंदुरियांशी होत नाही, कारण सेंदुरिया लोक स्वतःला नागवंशी म्हणून श्रेष्ठ समजतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**नगाजी** (इ. स. चे १९ वे शतक) एक मराठी संत कवी. चांदा जिल्ह्यातील वरोडा या गावापासून सुमारे बारा मैलांवर असलेल्या पारडी गावी एका न्हावी घराण्यात याचा जन्म झाला. लहानपणापासूनच त्याचे मन ईश्वरभजनाकडे होते. एकदा एका वृद्धाने त्याला मातापित्यांच्या सेवेतच परमेश्वर भेटतो, असा उपदेश केला आणि तेव्हापासून त्याने मातापित्यांच्या सेवेचे व्रत घेतले. सतत बारा वर्षेपर्यंत हे व्रत आचरल्यावर त्याला परमेश्वराचा साक्षात्कार घडला आणि त्याची कवित्वशक्ती जागृत झाली. त्याची काही हिंदी-मराठी स्फुट रचना उपलब्ध आहे. त्यातला एक मराठी अभंग असा–

अक्षर हेचि काया अक्षर ते ब्रह्म । शोधी याचे वर्म गुरुमुखे ।।
क्षमा दया शांती निवृत्तीचे अंग । विवेक स्वयंभ वसे जेथे ।।
अनुभव टेकण सुखाचें हें अंग । बोध तो स्वयंभ प्रकाशिला ।।
नगा म्हणे ज्यासी गुरुकृपा घडे । ब्रह्म डोळां उघडें नित्य त्याला ।।

नगाजीचे शिष्यमंडळ मोठे होते. त्याने पारडी येथे उभारलेल्या मंदिरातील गोपालकृष्णाची मूर्ती मनोहर आहे. या मंदिरात प्रतिवर्षी गोकुळाष्टमीचा उत्सव फार मोठ्या प्रमाणात साजरा होतो. [ म. क. च. २ ]

**नगारा** एक चर्मवाद्य. हे कढईच्या आकाराचे वाद्य असते. याची दोन भांडी असतात. लहान भांड्याला जील व मोठ्याला नर म्हणतात. ही भांडी तांबे, पितळ किंवा लोखंड यांच्या पत्र्याची असतात व त्यांवर म्हशीचे चामडे ताणून बसवतात. सर्वसाधारणपणे नगाऱ्याच्या तोंडाचा व्यास दोन ते तीन फूट असतो. मोठ्या नगाऱ्याचा व्यास पाच फूटही असतो. दोन बाकदार काठ्यांच्या साहाय्याने नगारा वाजवतात. नगारा वाजविणाऱ्यांना नगारची असे म्हणतात.

देवळात पूजेच्या वेळी, धार्मिक उत्सवाच्या प्रसंगी, युद्धप्रसंगी तसेच दिवसाच्या ठराविक वेळी काल दर्शविण्यासाठी नगारा वाजविण्याची पद्धत आहे. स्थलकालानुरूप याच्या रूपात, नावात आणि उपयोगात थोडा-फार फरकही झालेला दिसतो. लढाईत वाजविल्या जाणाऱ्या नगाऱ्याला नौबत म्हणतात.



नगारा

नगारा ठेवण्याच्या व वाजविण्याच्या जागेला नगारखाना म्हणतात. हे स्थान किल्ल्याच्या, देवळाच्या किंवा राजवाड्याच्या प्रवेशद्वारावर असते. तिथे नगाऱ्याबरोबरच चौघडाही असतो.

मोगलांच्या राजवाड्यापुढे एक नगारा ठेवलेला असे. बादशहाकडे आपली दाद मागण्यासाठी येणारा माणूस तो नगारा वाजवून आपली वर्दी देई. सूर्योदय व सूर्यास्त या वेळी शाही फर्मान ऐकवण्यासाठीही नगारा वाजवीत. सकाळच्या नगाऱ्याला नौबत-स-आदन म्हणत व संध्याकाळच्या नगाऱ्याला नौबत–मुराद असे म्हणत.

नगारा हे मुख्यत्वे रणवाद्य आहे. लढाईच्या प्रसंगी वीरांना स्फुरण देण्यासाठी नगारा वगैरे रणवाद्ये वाजवीत. कौरव-पांडवांच्या महायुद्धाच्या सुरवातीस अशी वाद्ये वाजवल्याचा उल्लेख महाभारतात आहे (भीष्म. ४४.४-९). प्राचीन काळी या वाद्याला दुंदुभी असे नाव होते. इतिहासकाळातही युद्धाच्या धामधुमीत नगारा अग्रभागी असे. हत्तीवर किंवा उंटावर चढवून तो वाजवीत. युद्धात विजय मिळाल्यावरही नगारा वाजवून तो जाहीर करीत. कित्येकदा सेनापतीचे विशिष्ट हुकूम सैन्याला कळवण्यासाठी वेगवेगळ्या प्रकारांनी नगारा वाजवीत. पाहा– दुंदुभी. [ परंपरा-लोकगीत; सु. वि. को.; हिं. सा. बृ. इ. ]

**नग्नता** मानवाच्या विवस्त्र अवस्थेला नग्नता म्हणतात. ज्याच्या शरीरावर कसलेही आवरण नाही, तो मनुष्य नग्न होय. अगदी प्रारंभी मनुष्य याच अवस्थेत राहत असे. अजूनही काही आदिवासी लोक नेहमी नग्नच असतात. वस्त्रपरिधान हे मानवी संस्कृतीच्या विकासाचे एक लक्षण मानले जाते. जंगली मनुष्य पूर्वी केवळ थंडी–वाऱ्यापासून शरीराचे संरक्षण करण्यासाठी झाडांच्या साली, चामडी, इ. वस्तूंचा उपयोग करीत असावा. कालांतराने शरीर सुशोभित करण्यासाठी तो विविध आभरणे वापरू लागला. मग त्याला आपले शरीर उघडे ठेवण्याची लाज वाटू लागली. पुढे सामाजिक जीवन सुरू झाल्यानंतर मानवाला लिंगप्रदर्शन गर्हणीय वाटू लागले. सांप्रत नग्नता या शब्दाला लिंग न झाकणे, असा मर्यादित अर्थ प्राप्त झाला आहे. शरीराचा इतर भाग उघडा राहिला, तरी ती नग्नता मानली जात नाही.

**नग्नदेवता** – शिव हा प्रथमारंभी द्रविडांचा देव होता. सिंधुसंस्कृतीच्या अवशेषांत अनेक नग्न मूर्ती सापडल्या आहेत, त्या शिवाच्या असाव्या, असे अनुमान अनेक पंडितांनी केले आहे. शिव हा प्रथमपासूनच लिंगरूपात पूजला जाणारा देव आहे. ऋग्वेदात अशा लिंगरूप देवाला भजणाऱ्यांना शिश्नदेव म्हटले आहे. कालांतराने आर्यांचा रुद्र व द्रविडांचा शिव हे एक होऊन सर्वपूज्य ठरले. महाकाव्ये व पुराणे यांत रुद्राचे वर्णनही नग्न व ऊर्ध्वलिंगी असेच केले आहे. पुराणांत शिवाची अनेक रूपे वर्णिलेली असून, त्यांतील काही नग्न आहेत. तशा मूर्तीही भारतात पुष्कळ ठिकाणी आढळतात.

शिवाप्रमाणे देवीचीही विविध रूपे असून, पुराणांत व तांत्रिक वाङ्मयात त्यांची वर्णने आहेत. त्यांतील काही रूपे नग्नावस्थेत असून, तशा अनेक मूर्ती शिल्पकारांनी निर्माण केल्या आहेत. शाक्त पंथाचे लोक अशा नग्न देवीची पूजा करतात.

बाळकृष्णाच्या मूर्ती बहुधा नग्नच असतात. कामदेवाच्याही काही नग्न मूर्ती आढळतात. तीर्थंकर हे दिगंबर असतात. आणि त्यांच्या मूर्तीही दिगंबरच असल्या पाहिजेत, अशी दिगंबर जैनांची धारणा आहे. त्यामुळे भारतात अशा नग्न जैन मूर्ती पुष्कळ ठिकाणी आढळतात. श्रवणबेळगोळ येथील बाहुबलीची नग्न मूर्ती हे याचे ठळक उदाहरण होय.

**नग्नतालक्षणे**–वस्त्रहीन शरीर हे नग्नतेचे सर्वसामान्य लक्षण असले, तरी पुराणात नग्नता ही याहून व्यापक स्वरूपात सांगितली आहे. ज्यांच्या कुळात वेदपठण, शास्त्राभ्यास व व्रतांचे पालन केले जात नाही, ते लोक नग्न होत, असे मार्कंडेय पुराणात म्हटले आहे. जो ब्राह्मण ऋग्यजुःसाम या तीन वेदांचा त्याग करतो, तो नग्न व पापी समजावा, असे विष्णू पुराणात सांगितले आहे. जो मनुष्य गृहस्थाश्रमानंतर वानप्रस्थाश्रम स्वीकारीत नाही, त्यालाही नग्न म्हटले आहे. ज्याने मलिन वस्त्र परिधान केले आहे, जो एकच वस्त्र विकच्छ नेसला आहे, ज्याने उत्तरीय घेतलेले नाही, ज्याने लाल किंवा फाटके वस्त्र परिधान केले आहे, किंवा ज्याने कोणतेही वस्त्र परिधान केलेले नाही, अशा सर्वांना नग्न समजावे, असे स्कंद पुराणाच्या प्रभास खंडात सांगितले आहे.

**विधिनिषेध** – नग्नावस्थेत श्रौत कर्मांचा नुसता विचारही करू नये, असे भृगूने सांगितले आहे. नग्न स्त्रीचे वा पुरुषाचे दर्शन घेऊ नये, नग्नावस्थेत कुठे जाऊ नये, वेदपठण करू नये, स्वतःच्या मस्तकाला हात लावू नये आणि स्नानही करू नये, असे कूर्म पुराणात म्हटले आहे. ' न नग्नः स्नानमाचरेत् ' असा मनूनेही निषेध सांगितला आहे (४.४५). मात्र तो पुरुषांपुरताच मर्यादित असावा, असे वाटते. कारण स्त्रियांनी नग्न स्थितीत स्नान करण्याची प्रथा वेदकाळापासून चालू आहे. ' आपले निर्मळ शरीर दाखवावे म्हणूनच की काय, न्हाऊन वर उठलेल्या स्त्रीप्रमाणे उषा आमच्यासमोर उभी आहे, ' असे वर्णन ऋग्वेदात आढळते (५. ८०. ५). यमुनेत जलविहार करणाऱ्या गोपींनी आपली वस्त्रे तीरावर ठेवली होती, असे वर्णन भागवत पुराणात आहे (९. १८. ८). धर्मशास्त्रात नग्नतेचा निषेध असला, तरी अनेक साधू नग्नावस्थेत राहतात. दिगंबर जैन पंथाचे साधूही वस्त्र वापरीत नाहीत.

**कलाक्षेत्रातील नग्नता** – प्राचीन संस्कृत साहित्यात विवस्त्र स्त्री-देहाची काव्यमय वर्णने काही ठिकाणी आढळतात. त्या काळी नग्नावस्था अदर्शनीय मानली जात नसावी. कलेच्या क्षेत्रात तर ती विलोभनीय रूपात साकार झालेली दिसते. नग्न स्त्री-पुरुषांची असंख्य चित्रे व शिल्पे सर्वत्र, देवालयातदेखील पाहायला मिळतात. त्यांच्या दर्शनामुळे मनुष्याचे स्खलन होईल अशी भीती त्या काळातील समाजधुरिणांना वाटत नसावी.

**मंत्र-तंत्र** – पाऊस पाडणे, भुताखेतांवर प्रभाव पाडणे, रोग बरे करणे, सापाचे विष उतरवणे, इ. गोष्टींसाठी ज्या मंत्रांचा प्रयोग केला जातो, ते मंत्र सिद्ध करण्यासाठी मांत्रिकांना नग्नावस्थेत स्मशानात जाऊन साधना करावी लागते, असे सांगतात. नग्न झाल्यावाचून मंत्रसामर्थ्य प्राप्त होत नाही, अशी समजूत आहे. मारुती, भैरव, यक्षिणी यांची कृपा संपादन करण्यासाठीही त्यांची पूजा नग्न होऊन करावी, असे विधान आहे. कित्येक रोगांवर हमखास गुणकारी ठरणाऱ्या काही औषधी खणून किंवा तोडून आणताना नग्न व्हावे लागते, अशीही समजूत आहे.

मंत्रांचा उपयोग करतानाही काही तांत्रिक विधी नग्न होऊन

करावे लागतात. अतिवृष्टी थांबावी म्हणून जुन्या काळी काही यांत्रिक नागव्या मुलाकडून जळते निखारे पावसात टाकीत किंवा आवळीच्या झाडाची फांदी चवाठ्यावर नेऊन पुरीत. पाऊस पडून चांगले पीक यावे या हेतूने हिमालयाच्या तराईत व अन्यही काही ठिकाणी शेतकऱ्यांच्या बायका रात्री नग्न होऊन नृत्य करतात, शेतात नांगर चालवतात किंवा नदीत तांदुळाचे पीठ टाकतात. विवस्त्र स्थितीत गंडा तयार करून तो आजारी माणसाला बांधला किंवा अन्न शिजवून त्याला खाऊ घातले, तर त्याचा ताप उतरतो, अशी समजूत आहे. मूल व्हावे म्हणून ग्रामीण भागातील काही स्त्रिया विवस्त्र स्थितीत विहिरीच्या काठावर बसून मांत्रिकाने सांगितलेला मंत्र म्हणतात किंवा अमावास्येच्या रात्री नग्न होऊन चवाठ्यावर जाऊन तिथे वड, पिंपळ, आंबा, इ. पाच झाडांची पाने टाकतात. गुरांचा रोग बरे करणारा मांत्रिक नग्न होऊन व हातात गवताची पेटलेली चुडी घेऊन रोगी जनावराभोवती फेऱ्या घालतो, असेही काही ठिकाणी आढळते. मुलाच्या डोळ्यात फूल पडले असता, त्याच्या मामाने नग्न होऊन अरणीच्या मण्यांची माळ त्याच्या गळ्यात घातली, तर फूल बरे होते, असे म्हणतात.

जारण-मारण, चेटूक, जादूटोणा या प्रकारांतही नग्नतेला फार महत्त्व असते. नग्न देहाचा, विशेषतः त्याच्या गुह्येंद्रियाचा अशा कर्मांत पुष्कळ प्रभाव पडतो, असे म्हणतात. नग्नावस्थेत मनुष्याच्या अंगी काही गूढ सामर्थ्य संचरते, अशी कल्पना आहे. [ लौ. द.; फो. गु. को.; तर्पण; श. क. ]

**नग्नप्रच्छादनश्राद्ध** और्ध्वदेहिक कर्मात पहिल्या दिवशी करायचे श्राद्ध. प्रेताच्या प्रेतत्वनिवृत्तीसाठी हे करतात. त्यासाठी दर्भाचा चट बनवून तो पुढे ठेवतात. मग त्याला क्षण, पाद्य, आसन, इ. उपचार 'उपतिष्ठताम्' असे म्हणून समर्पितात. मग आच्छादन म्हणून दर्भ देतात. प्रेताला परलोकमार्गात उपयोगी पडाव्या म्हणून आमान्न, सवस्त्र उदकुंभ, कौस्यपात्र, पाणी पिण्याचे भांडे, वहाणांचा जोड, इ. वस्तू ब्राह्मणाला देतात. पिंडदानाच्या वेळी कणकेचा पिंड देऊन त्यावर तिलोदक सोडतात. दाहसंस्कार झाल्यानंतर प्रेतजीवाला परलोकगमनासाठी एक नवा भोगदेह प्राप्त होत असतो, अशी कल्पना आहे. हा नवा देह जन्मताना नग्न असतो. त्याला आच्छादन घालण्यासाठी म्हणून एक सक्तुपिंड (कणकेचा पिंड) देऊन हे श्राद्ध करतात. [ ऋ. ब्र. स. ]

**नचारी** लोकगीताचा एक प्रकार. मिथिला प्रदेशात याचा विशेष प्रचार आहे. ही गीते मुख्यत्वे शिवभक्तिपर असतात. विवाहप्रसंगी, पावसाळ्यात, शेताच्या बांधावर, सकाळी व संध्याकाळी ओसरीवर बायका ही गीते गातात. भिक्षेकरी, साधू, घरोघरी जाऊनही ही गीते म्हणतात. मुख्यत्वे शिवाचा विवाहप्रसंग त्यांत वर्णिलेला असतो. शिवाचा स्वभाव, त्याचे वर्तन व चारित्र्य यांचेही चित्रण त्यांत आढळते. सभ्य असा नर्म विनोदही त्यांत अनेक ठिकाणी आढळतो. प्रस्तुत गीताचे एक उदाहरण असे–

उमा कर वर बाउरि छवि घटा
गला माल बघछाल बसन तन बूढ बयल लटपटा ॥
भसम अंग शिर गंग तिलक राशि बाल भाल पर जटा ॥
अति सुकुमारि कुमारी मोरि गिरिजा वर बुढवा पेट सटा ॥
कहत 'कारनाट' सुनिया मनाइनि काहे करत जिव खटा ॥

अर्थ– उमेचा वर बावळट आणि दिसण्यात अत्यंत कुरूप आहे. त्याच्या गळ्यात मुंडमाळा, कमरेला व्याघ्रचर्म आणि त्याचे वाहन म्हणजे म्हातारा, लडखडणारा बैल. सर्वांगावर भस्मचर्चन, शिरी गंगा, जटेत द्वितीयेचा चंद्र. त्याच्या जटा तर एखाद्या जोगड्यासारख्या आहेत. हे सखी, माझी कन्या गिरिजा किती सुकुमार ! पण तिला वर मिळाला तो असला म्हातारा व पाठीला पोट चिकटलेला. कवी 'कारनाट' म्हणतो, वऱ्हाडी मंडळीनो जरा ऐका माझं. इतके खट्टू होऊ नका. तुमच्या सगळ्या इच्छा पूर्ण होतील.

श्रमजीवी शेतकरी व मजूर यांच्या मनोव्यथांचेही सुंदर चित्र अशा गीतांत आढळते. [ मै. लो.; हिं. सा. को. ]

**नजीर** (१७३६–१८३० इ. स ) एक संत कवी. हा मुसलमान होता. याचा जन्म आग्रा येथे झाला, असे म्हणतात. नजीरचा बाप मुहंमद फरूक हा दिल्लीच्या श्रीमंत लोकांपैकी एक समजला जाई. नजीरचे मूळ नाव वली मुहंमद असे होते. हा दिसायला सुंदर होता, असे म्हणतात. जाटांनी इ. स. १७६९ मध्ये आग्रा शहर लुटले, त्यात नजीरही लुटला गेला. फारशी व हिंदी या भाषांवर त्याचें चांगले प्रभुत्व होते. मुसलमान असूनही तो कृष्णभक्त होता. तो म्हणतो–

जा पडे याद में उस शोख की जिस बस्तीमें
वही गोकुल है हमें और वही वृंदावन ॥

अर्थ– कसल्याही जागेत आम्हांला राहावे लागले, तरी आम्हांला तेच स्थळ गोकुळ-वृन्दावनासारखे वाटते.

कृष्णलीलेची अनेक पदे याने रचली असून, त्यांचे संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. हिंदू आणि मुसलमान या दोन्ही जातींचे प्रेम याला मिळाले. आग्रा शहरात दरवर्षी होळीच्या वेळी याच्या दर्ग्यापुढे यात्रा भरत असते. [ भा. सं. म. ]

**नजोमचंडी** मुंडा लोकांचे एक दुष्ट भूत. या भुताला पेटके अथवा चेटकिणी वश करून घेतात व त्याच्याकरवी जो शत्रू असेल त्याचे नुकसान करतात, अशी मुंडांची समजूत आहे. हे भूत अदृश्य असते; पण पितरांच्या अथवा सिंगबोंगाच्या कृपेने ते दिसू शकते. हे एखाद्याच्या घरात वावरू लागले, तर जेवणाऱ्याच्या पानातला भात रक्तासारखा लाल होतो, असे समजतात. [ एन्सा. मुं. ]

**नट** (१) एक जात. हे लोक राजस्थान, गुजरात, पंजाब व मध्य प्रदेश या भागांत आहेत. शरीराच्या कसरती करून दाखविणे व हात पाहून भविष्य सांगणे, हे या लोकांचे व्यवसाय आहेत.

नट ही जात प्राचीन काळापासून अस्तित्वात आहे. व्रात्य क्षत्रियापासून सवर्ण क्षत्रिय स्त्रीच्या ठिकाणी उत्पन्न झालेल्या संततीला नट म्हणतात, असे मनूने सांगितले आहे ( मनुस्मृती १०.२२). नट या जातीलाच झल्ल—मल्ल, निच्छिवी, करण, खस व द्रविड ही नावे मनूने दिली आहेत. अत्रीने नट जातीचा समावेश अंत्यज लोकांमध्ये केला आहे.



राजस्थानी नट

राजस्थानातील नट जात भटकी आहे. हे लोक वर्षातून आठ महिने फिरत असतात. दोरीवरचा नाच करण्यात व कसरत करण्यात हे पटाईत असतात. यांच्या स्त्रियाही जमिनीवर बांबू उभे करून त्यावर बांधलेल्या दोरीवर, हातांत आडवी काठी धरून चालण्याची कसरत करतात. यांच्या मुलांनाही लहानपणीच कसरतीचे शिक्षण दिले जाते. शरीर लवचिक आणि नरम होण्यासाठी हे लोक तेलाचा अंतर्बाह्य खूप उपयोग करतात.

राजस्थानातील नटांचे राजनट, दक्षिणी नट आणि भाट नट असे तीन प्रकार आहेत.

राजनट हे कसरतीची कामे करण्यात प्रवीण असतात. पूर्वी यांना राजाश्रय असे; पण सांप्रत तो नष्ट झाल्यामुळे यांची आर्थिक स्थिती फार हलाखीची झाली आहे. त्यामुळे हल्ली ते भीक मागून कसाबसा उदरनिर्वाह करतात. यांचा सामाजिक दर्जा अत्यंत निकृष्ट मानतात. त्यामुळे त्यांना गावाच्या सीमेवर राहावे लागते.

दक्षिणी नटांचे कसरतीचे कौशल्य बेताचेच असते. त्यामुळे भीक मागणे हाच यांचा प्रमुख व्यवसाय असतो. त्यांचे एकच कुटुंब फिरत असल्यास त्याला डेरा आणि दोन-तीन कुटुंबे एकत्र फिरत असल्यास त्यांना टोला असे म्हणतात.

नटांचा कोणी पुरोहित किंवा गुरू नसतो. ते स्वतःच आपल्या घरचे सर्व संस्कार पार पाडतात.

विवाहाच्या वेळी जमिनीवर दोन बांबू उभारतात आणि त्यांना तोरण बांधतात. वधू-वरांनी त्या बांबूंच्या भोवती प्रदक्षिणा घालायची असते. विधवेने पुनर्विवाह केल्यास तिच्या नवीन पतीला पूर्वीच्या नवऱ्याच्या नातेवाईकांना काही रक्कम द्यावी लागते. दिराने विधवा भावजयीशी लग्न करण्याची प्रथा आहे. गुजराती नट राजस्थानी नटांशी विवाहसंबंध करीत नाहीत.

सुवेर चाळीस दिवस पाळतात. नंतर सूर्यपूजा करतात.

नट लोक पायजमा घालतात किंवा काचा मारून धोतर नेसतात. ते गळ्यात कवड्यांच्या माळा घालतात. त्यांच्या स्त्रिया पितळेचे दागिने घालतात.

मृतांना बहुधा जाळतात. क्वचित पुरतात. श्राद्धही करतात.

पंजाबी नटांमध्ये एक राजा व राणी असते आणि त्या दोघांचा सर्व जातीवर अधिकार चालतो. हे लोक मोठ्या शहरांच्या जवळ गवताच्या तात्पुरत्या झोपड्या उभारून त्यांत राहतात. ते गवताच्या वस्तू तयार करून विकतात. यांच्यांत दोन वर्ग असून एका वर्गातील फक्त पुरुषच हा व्यवसाय करतात, तर दुसऱ्या वर्गातील स्त्रियाही त्यात भाग घेतात. त्यांना कबूतरी असे म्हणतात. त्या गोंदण्याचे कामही करतात.

बरेचसे नट हिंदू असून, काही मुसलमान आहेत. हिंदू नट देवी, हनुमान आणि शिखांचा गुरू तेग बहादुर यांना भजतात. मुसलमान नटांच्या मुली लग्न झाल्यानंतर पहिले मूल आपल्या आईला देतात. आईचा तो हक्कच मानला जातो. तो हक्क

सोडवून घ्यायचा असल्यास तिला पैसे द्यावे लागतात.

सापाचे खेळ दाखवणाऱ्या नटांना गारुडी, मदारी, नागनाथी, अशी प्रदेशपरत्वे भिन्न भिन्न नावे आहेत.

बंगालमधील नट लोक नाच-गाण्याचा व्यवसाय करतात. त्यांचे करवाल नट आणि व्रात्य क्षत्रिय नट असे दोन भेद आहेत. त्यांपैकी करवाल नटांचा गुन्हेगार लोकांत समावेश केलेला आहे.

हे लोक मुले-मुली वयात आल्यावर त्यांचा विवाह करतात. वधूसाठी त्यांना दहा ते पंधरा रुपये असे नाममात्र देज द्यावे लागते. विवाहविधी अगदी साधा असतो. [ पं. का.; रा. जा.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; राजस्थानके लोकानुरंजन– देवीलाल सामर; को. क. वे. बें. ]

(२) एक राग. हा राग बिलावल थाटातून उत्पन्न होतो. याची जाती संपूर्ण औडव आहे. वादी– मध्यम. संवादी– षड्ज. आरोह– सा रे ग म प ध नी सा. अवरोह– सा ̣नी प म रे सा. गानसमय– रात्रीचा दुसरा प्रहर. या रागात मध्यम सुटा ठेवतात. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**नट-नटी** रंगभूमीवर अभिनय करणाऱ्या पुरुषाला नट व त्याच्या स्त्रीला नटी असे नाव आहे. रंगशाळेचा व्यवस्थापक, सूत्रधार व रंगमंचावर वस्तूंची मांडणी करणारा यांनाही पूर्वी नट असेच म्हणत असत. नट हा नाटकाच्या सर्व अंगात पारंगत असावा लागतो.

नटाचा सर्वप्रथम उल्लेख तैत्तिरीय ब्राह्मणात आला आहे. तिथे पुरुषमेधातील बलींच्या यादीत शैलूष म्हणजे नट याचा समावेश आहे. एकाच माणसाने अनेक माणसांची रूपे घेऊन दाखविण्याची कला ही नाट्याची पूर्वपायरी असावी. अशी अनेक रूपे घेणाऱ्या लोकांना आज बहुरूपी अशी संज्ञा आहे. यांनाच यजुर्वेद संहितेच्या काळात विश्वरूप असे म्हणत असावे आणि त्यांनाच पुढे शैलूष हे नाव मिळाले असावे.

पाणिनीने छन्दोग, औक्थिक, याज्ञिक व बह्वृच यांच्या बरोबर नटाचा उल्लेख केला आहे. या सर्वांचे आम्नाय किंवा कुलग्रंथ होते. नटसूत्रे हा नटांचा आम्नाय होता. कृशाश्वाचे नटसूत्र नट लोकांत प्रिय होते. त्याच्या अनुयायांना कृशाश्विन किंवा कार्शाश्व असे म्हणत. नाट्यशास्त्रावर अशी सूत्रबद्ध रचना होण्यास त्याच्या आधी बरीचशी नाटके अस्तित्वात असावी, असे वाटते. नंतरच्या काळात शिलालीने दुसरे एक नटसूत्र लिहिले. त्यामुळे त्याच्या अनुयायांना शैलालिन किंवा शैलाल असे नाव मिळाले. हळूहळू शिलालीच्या संप्रदायाला अधिक मान्यता मिळाली व त्याच्या अनुयायांची संख्या कार्शाश्वापेक्षा अधिक झाली. भरताच्या नाट्यशास्त्राच्या काळी कृशाश्व शाखा लुप्तप्राय झाली असावी. कारण नाट्यशास्त्रात नटाला शैलालक हाच शब्द दिलेला आहे.

पुढे पतंजलीच्या काळात नट हे पौराणिक किंवा बोधप्रद गोष्टींचा वाचिक अभिनय करून दाखवीत, असे दिसते. पतंजलीने कंसवध व बलिबंध यांसारख्या अभिनयक्रियांचा उल्लेख केला आहे. पतंजलीने नाट्यगृहाचाही उल्लेख केला आहे. त्यावरून त्याच्या काळी नाटक पूर्णरूपाने अस्तित्वात आले होते, याबद्दल शंका राहत नाही.

पतंजलीच्या काळात नटीला मात्र फारशी प्रतिष्ठा नव्हती. त्या काळी कोणाही प्रेक्षकाला नटीबरोबर प्रेमालाप करता येत असे. कोणी जर तिला विचारले, की ‘ तू कुणाची ? ’ तर ती प्रत्येकाला ‘ मी तुमची ’ असे उत्तर देई.

कामसूत्रात नटीला ईक्षणिका असे म्हटले आहे. नाटकातील सूत्रधाराच्या पत्नीलाही नटी असेच नाव आहे. नाटकात सूत्रधाराने हाक मारल्यावर ती रंगमंचावर येते आणि त्याला नाट्यप्रयोगात साहाय्य करते. पुष्कळ वेळा प्रस्तावना आणि मुख्य नाटक यांमधील संबंध जोडायला नटी व सूत्रधार यांच्या घरगुती भाषणाचा चांगला उपयोग होतो. उदा० रत्नावली नाटकातील नटी आपल्या एकुलत्या एक मुलीचे लग्न परद्वीपस्थ तरुणाबरोबर ठरल्यामुळे उद्विग्न झालेली दिसते. त्यावर सूत्रधार तिला म्हणतो, की ‘ विधी अनुकूल असेल तर सर्व गोष्टी ठीक होतील. ’ हेच सूत्रधाराचे वाक्य घेऊन लगेच यौगंधरायण रंगभूमीवर प्रवेश करतो व रत्नावलीच्या कथासूत्राचा उपन्यास करतो.

उपलब्ध संस्कृत नाटकांत आढळणारी नटी भरतकालीन नव्हती, असे दिसते. कारण त्याने तिचा उल्लेख सूत्रधाराबरोबर कुठेच केलेला नाही.

तंत्रमार्गात पंचमकारपूज्य अशा ज्या नऊ कुलनायिका मानलेल्या आहेत, त्यांत नटीचाही समावेश आहे. [ श. क.; भ. ना. शा.; सं. ना. सौ.; बु. भा. स.; प. का. भा. ]

**नट बिलावल** एक राग. हा राग बिलावल थाटातून निघतो. याच्या आरोहात आणि अवरोहात सातही स्वर लागतात, म्हणून याची जाती संपूर्ण मानलेली आहे. वादी – मध्यम. संवादी – षड्ज. गानसमय – सकाळचा पहिला प्रहर. याच्या आरोहात नट व अवरोहात बिलावल या रागांचे मिश्रण होत असल्याने याला हे नाव मिळाले आहे. यातील ऋषभ व धैवत या स्वरांची संगती वैचित्र्य उत्पन्न करते. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**नट मल्लार** एक राग. हा राग काफी थाटातून उत्पन्न होतो. याची जाती संपूर्ण संपूर्ण आहे. वादी – मध्यम. संवादी – षड्ज. गानसमय – रात्रीचा दुसरा प्रहर. या रागाचा अवरोह वक्र असून, त्यात गांधार व मध्यम या स्वरांची संगती नेहमी दिसते. मल्लार रागात छायानट मिसळल्याने हा राग निर्माण होतो. [ श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे ]

**नटमुट्टम** केरळातील काही नंपूतिरी ब्राह्मणांच्या आणि क्षत्रियांच्या घरांच्या पुढच्या चौकांत त्यांच्या कुलदेवतांच्या मूर्ती स्थापलेल्या असतात, त्यांना नटमुट्टम असे म्हणतात. नवरात्रात या देवतांचे उत्सव करतात.

**नटराज** शिवाचे एक रूप. या रूपात शिवाने नृत्य–नाट्य कला प्रवर्तित केली, अशी पारंपरिक धारणा आहे. एखादी निश्चित घटना अथवा विषय अभिव्यक्त करण्यासाठी जे अंगचालन केले जाते, त्याला नटन अथवा नाट्य अशी संज्ञा आहे. हे नटन जो करतो तो नट होय. शिव हा आद्य नट आहे, अशी श्रद्धा असल्यामुळे त्याला नटराज हे बिरुद लाभले आहे.

ब्रह्मांड ही नटराजाची नृत्यशाला आहे. तो जसा नर्तक



नटराज (आनंदतांडव नृत्य)

आहे, तसाच त्याचा साक्षीही आहे. जेव्हा त्याचे नृत्य सुरू होते, तेव्हा त्या नृत्याच्या झंकाराने सर्व विश्वव्यापाराला गती मिळते आणि जेव्हा त्याचे नृत्य विराम पावते, तेव्हा हे चराचर विश्व आपल्यात सामावून घेऊन तो एकटाच आत्मानंदात निमग्न होऊन राहतो, अशी नटराजकल्पनेमागची भूमिका आहे. याचा स्पष्ट अर्थ असा, की नटराज हे ईश्वराच्या सकल क्रियाकलापाचे प्रतिरूप आहे. नटराजाचे नृत्य हे सृष्टी, स्थिती, संहार, तिरोभाव आणि अनुग्रह या पाच ईश्वरी क्रियांचे द्योतक मानले जाते. या नटराजाच्या नृत्याचा प्रभाव पुष्पदंताने अभिनव रीतीने वर्णिला आहे, तो असा–

> मही पादाघाताद् व्रजति सहसा संशयपदं ।
> पदं विष्णोर्भ्राम्यद् भुजपरिघरुग्णग्रहगणम् ॥
> मुहुर्द्यौर्दौस्थ्यं यात्यनिभृतजटाताडिततटा ।
> जगद्रक्षायै त्वं नटसि ननु वामैव विभुता ॥
>
> (महिम्नस्तोत्र १६)

अर्थ– (हे भगवन) तुझ्या पदाघाताने पृथ्वी जीवितसंकटात पडते. तुझ्या परिघसदृश परिपुष्ट भुजांच्या भ्रमणामुळे आकाशही संकटात पडते आणि त्यात भ्रमण करणारे ग्रहही पीडित बनतात. तटांवर वारंवार तुझ्या जटांचा आघात झाल्यामुळे द्युलोकाचीही दुरवस्था होते. तू हे नृत्य जगाच्या रक्षणासाठी करीत आहेस (तरीही हे असे घडत आहे). खरोखर तुझी विभुता ही वक्रच आहे.

नटराजाच्या नृत्याचे प्रकार अनेक आहेत. त्याच्या प्रमुख नृत्याचे नाव तांडव असे असून, त्याचे सात प्रकार आहेत. त्यापैकी संध्यानृत्य अथवा प्रदोषनृत्य हे एक प्रसिद्ध नृत्य आहे. त्रैलोक्यजननी गौरी हिला रत्नखचित सिंहासनावर बसवून शिव संध्यासमयी हे नृत्य करू लागतो आणि सकल देवगण त्याच्याभोवती जमा होऊन त्याची साथ करू लागतात.

नटराजाच्या सात्त्विक नृत्यप्रकारांत सांध्यनृत्याप्रमाणेच नादान्तनृत्यही अत्यंत प्रसिद्ध आहे. चिदंबरम येथील जगप्रसिद्ध नटराजमूर्ती याच नृत्याच्या पवित्र्यात आहे. हे नृत्य शिवाने पृथ्वीवर प्रथम तिलाईच्या म्हणजे सध्याच्या चिदंबरमच्या रंगभूमीवर केले, अशी पारंपारिक कल्पना आहे. चिदंबरम येथे प्रकट होऊन शिवाने हे नृत्य कसे केले, याविषयी एक कथाही प्रसिद्ध आहे. (चिदंबरम पाहा).

नादान्तनृत्याच्या भूमिकेतील नटराजमूर्ती केवळ चिदंबरमच्या मंदिरातच नव्हे, तर दक्षिण भारतात अनेक ठिकाणी आढळतात. या नृत्यभूमिकेतील नटराज चतुर्भुज असतो. त्याने आपला डावा पाय वर उचलून उजवीकडे धरलेला असतो. या अवस्थानाला अतिभंग म्हणतात. केशपाश माथ्यावर बांधलेला असून, तो रत्नांनी अलंकृत केलेला असतो. खाली मोकळ्या सुटलेल्या जटा नृत्याच्या लयीत भुरभुरत असतात. केशबंधात

कपाल, सर्प, गंगा, चंद्रमा आणि एक पत्रमाला शोभत असते. उजव्या कानात पुरुषाचे कर्णभूषण असून डाव्या कानात स्त्रीचे कुंडल असते. त्याच्या गळ्यात हार व यज्ञोपवीत, कंबरेला रत्न-खचित मेखला आणि बोटांत मुद्रिका शोभत असतात. कंबरेला एक कटिवस्त्र कसलेले असून, अंगावर पांघरलेले वस्त्र फडफडत असते. त्याच्या उजव्या मागच्या हातात डमरू असून, पुढचा हात अभयमुद्रेत असतो. तसेच डाव्या मागच्या हातात अग्नी असून, पुढचा हात वर उचललेल्या पायाकडे संकेत करीत खाली झुक-लेला असतो. त्याच्या उजव्या पायाखाली अपस्मार अथवा मुय-लक नामक एक बुटका पुरुष पालथा पडलेला असतो. मुयल-काच्या हाती एक कृष्णसर्प असतो. मूर्तीखाली पद्मपीठ असते. पद्मपीठावर सबंध मूर्तीला व्यापणारी लंबवर्तुळाकार एक तिरु-वशी (प्रभावळ) असते. या प्रभावळीला सर्वत्र ज्वालांचे अंकुर फुटलेले असतात. शिवाने वर उचललेला पाय व मागील दोन हात यांनी प्रभावळीला स्पर्श केलेला दिसतो.

या मूर्तीचा प्रत्येक अंगविशेष, प्रत्येक आयुध आणि प्रत्येक भूषण प्रतीकात्मक आहे. या सर्व प्रतीकांच्या समुच्चयातून एक विराट प्रतीक बनले आहे. कमलपुष्प आणि कमलकलिका यांच्या संबंधाप्रमाणे नटराजाची समग्रमूर्ती आणि त्यांची अंगो-पांगे यांच्यात प्रतीकात्मकतेचा संबंध आहे. या समग्र प्रतीकाचे स्पष्टीकरण असे—

शिवाचे नृत्यस्थान असलेले चिदंबरम हे ब्रह्मांडाचे केंद्र आहे. 'जे पिंडी ते ब्रह्मांडी' या न्यायाने प्रत्येक जीवाच्या हृदयातही चिदंबरम आहे. नटराजाच्या कानांतली विभिन्न कुंडले त्याचे अर्धनारीश्वरत्व सूचित करतात. शिव आणि शक्ती अभिन्न आहेत, हे केवळ कुंडलांच्या भेदाने दाखविले आहे. त्याच्या उजव्या मागच्या हातातल्या डमरूच्या नादातून अखिल शब्दशास्त्र विकास पावत आहे, तर डाव्या मागच्या हातातला अग्नी चराचराची शुद्धी करीत आहे, त्यात इष्ट ते परिवर्तन घडवीत आहे. उजवा पुढचा हात भक्तांना अभ-याचे वरदान देत आहे; तर डावा पुढचा हात जीवांच्या मुक्ती-साठी वर उचललेल्या डाव्या पायाकडे संकेत करीत आहे उजव्या पायाखालचा अपस्मार अथवा मुयलक दैत्य अविद्येचा किंवा अज्ञानाचा प्रतिनिधी आहे. नटराजाने आपल्या पदा-घाताने त्याचा कणाच मोडून टाकल्यामुळे भक्तांना शिवदर्शन निर्विघ्नपणाने घेता येत आहे. नटराजाच्या मोवतालची वर्तुळा-कार प्रभावळ हे मायाचक्र आहे. शिव आपल्या पदस्पर्शाने व करस्पर्शाने ते प्रवर्तित करीत आहे. मायाचक्राला फुटलेल्या ज्वालांकुरातील पाच पाच स्फुल्लिंग हे स्थूल—सूक्ष्म पंचतत्त्वांचे द्योतक आहेत. शिव जेव्हा स्पर्शमात्राने ते मायाचक्र प्रवर्तित करतो, तेव्हा माया पंचभूतात्मक सृष्टीच्या रूपाने प्रगट होते.

विश्वाच्या स्थितिगतींचे नियंत्रण करणे, तिचा ताल आणि तोल सांभाळणे आणि जीवांना इदम् (सांसारिक तुष्टी) व परम् (मुक्तीचा आनंद) असे उभयविध सुख प्राप्त करून देणे हा नटराजाच्या या नादान्त— नृत्याचा उद्देश आहे.

नटराजाच्या रूपात एवढी व्यापक प्रतीकात्मकता भरलेली असल्यामुळे मूर्तिशिल्प, नृत्य, नाट्य आणि साहित्य या ललित कला नटराजाने अनुप्राणित झाल्या आहेत. नटराज हा विषय घेऊन घडविलेल्या दक्षिणेतील अनेक कांस्यमूर्ती जगतातील कलारसिकांना मंत्रमुग्ध करीत आहेत. तमिळ शैव भक्तिसाहित्यात नट-राजाचे अंतःसौंदर्य कित्येक शिवभक्तांनी प्रस्फुटित केले आहे. चिदंबरमुम्माणी—कोवई-मधील एका स्तोत्राचा सारांश असा—



नटराज (ललिततांडव नृत्य)

हे प्रभो! दिव्य डमरू धारण करणाऱ्या तुझ्या हाताने द्यावा-पृथिवी, अनंत लोक आणि असंख्य जीवात्मे यांची सृष्टी केली आहे. तुझा ऊर्ध्व-हस्त चराचर प्रपंचाची उभारणी व सांभाळणी करीत आहे. तुझ्या हाता-तील अग्नी या लोकात परिवर्तन घडवीत आहे. भूमीवर ठेवलेला पवित्र चरण कर्म-बंधनात तडफणाऱ्या जीवांना आश्रय देत आहे, तर तुझा ऊर्ध्व-चरण त्यांना मुक्तिप्रदान करीत आहे."

तिरुमूलरने तिरुमंत्रमच्या तिरुकुट्टदर्शन (दिव्य नृत्यदर्शन) नामक नवव्या तंत्रात नटराजाचे विराट रूप वर्णिले आहे, ते असे—

आकाश हे नटराजाचे शरीर आहे. आकाशातील काळा मेघ हाच मुयलक दैत्य आहे. चंद्र, सूर्य व अग्नी या तीन ज्योती म्हणजेच त्याचे तीन नेत्र आहेत. अशा विराटरूपात तो नटराज आमच्या देहालाच चिदंबरम बनवून त्यातील हृदयाच्या कनक-सभेत नादान्त—नृत्य करीत आहे.

अशी ही व्यापक आणि उदात्त नटराजकल्पना केवळ भार-

तीय कलेचाच नव्हे, तर विश्वकलेचा एक अमर आणि अमोल ठेवा बनली आहे. पाहा– तांडवनृत्य. [ डा. शि.; भा. प्र. वि.; सं. प्र. ; यु. ए. अन्नमलाई; बृ. स्तो. र. ]

**नटरायन** द. भारतातील एक लोकदेव. याचे देऊळ कोईंब-तूर जिल्ह्यात आहे. त्याच्या शेजारी वीरभद्र व शक्ती यांची मंदिरे आहेत. वीरभद्र भूतबाधा नष्ट करतो, अशी समजूत आहे. त्यासाठी शेकडो माणसे भूतांनी पछाडलेल्या आपल्या नातेवाईकांना घेऊन तिथे येतात. तिथला भगत दर मंगळवारी मध्यरात्री सर्व पछाडलेल्या लोकांवर तीर्थ शिंपडून व भस्म टाकून त्यांना बोलते करतो. मग मंत्र–तंत्र आणि बकऱ्या-मेंढ्याचे बळी, इ. विधी होतात.

हे प्रकार चालू असता नटरायनच्या मंदिराचे दार बंद करतात. हे विधी त्याने पाहू नयेत, अशी मांत्रिकांची अपेक्षा असते. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**नटाईव्रत** एक काम्य व्रत. विशेषतः बंगालमध्ये हे व्रत प्रचलित आहे. मार्गशीर्ष महिन्यातील रविवारी हे व्रत करतात. दिवसभर उपास करून सायंकाळी नटाईदेवीची पूजा व तांदुळापासून केलेल्या मिठाईचा नैवेद्य हा या व्रताचा विधी आहे. फल– धन व सुख यांची प्राप्ती.

**नट्टुकोट्टै चेट्टीयर** द. भारतातील एक जात. नट्टुकोट्टै= गावठी किल्ला, यावरून या जातीला हे नाव मिळाले आहे. व्यापारी वर्गातील ही प्रमुख जात असून, दुकानदारी व सावकारी हा या लोकांचा मुख्य धंदा आहे. ब्रह्मदेश, मलाया, लंका, आफ्रिका यांसारख्या दूरदूरच्या देशांतही यांच्या पेढ्या आहेत. यांची राहणी साधी आणि काटकसरीची असते. हे दानधर्म मात्र सढळ हाताने करतात. मीनाक्षीमंदिर, इतर अनेक मंदिरे व गोपुरे, यांचा जीर्णोद्धार या चेट्टीयरांनी केला आहे.

इतर चेट्टीयर मात्र यांना हलक्या दर्जाचे मानतात. त्यामुळे एखाद्या मंदिरात त्यांना गाभाऱ्याच्या दरवाज्यापर्यंतच जाता येते. त्यांच्या इल्लयथ्थकुनी, मथुर, वैरवन, इरनियुर, पिल्लै-यर्पत्ती, नेमम, इप्पैकुडी, सीनैकुडी व वेलगुंडी अशा नऊ पोट-जाती आहेत. यांची जातपंचायत असते व जातीचे न्यायनिवाडे तीच करते. हे शैवपंथी असले, तरी त्यांच्या स्त्रिया इतर दुय्यम देवांनाही भजतात. यांचे अनेक धार्मिक मठ असून, त्यांपैकी पदनकुड्डी व किल येथील मठांत पुरुषांना व तुलवूर येथील मठात स्त्रियांना धर्मदीक्षा दिली जाते. त्यांच्या कानांच्या पाळ्या कृत्रिम उपायांनी लांब केलेल्या असतात. ते कमरेला सोन्याची साखळी व बोटात हिऱ्याची अंगठी घालतात. यांची राहण्याची घरे मोठाली असतात. बाप जिवंत असेपर्यंत सगळे भाऊ एकत्र राहतात.

**विवाहप्रथा** – या लोकांत आतेबहिणीशीही लग्न होते. विवाह ठरल्यावर तो होण्यापूर्वी कार्तिक महिन्यांतल्या कृत्तिका नक्षत्रावर सिप्पीदी नावाचा एक विधी करतात. त्या दिवशी वराला घोड्यावर बसवून पिल्लयरच्या देवालयात नेतात. तिथे जत्रेतल्यासारखे एक तात्पुरते दुकान करतात. वर या दुकानाला अग्नी लावतो व ते जळल्यावर त्या राखेचा अंगारा कपाळी लावतो. परत जाताना वराला प्रत्येक घरी तांदुळांच्या पिठाच्या दिव्याने ओवाळतात.

वराप्रमाणेच वधूचाही विवाहापूर्वी अरुद्रदर्शनम नामक विधी करतात. या वेळी तिला स्नान घालून तिच्या गळ्यातली मण्यांची माळ काढून त्या जागी सोन्याची घालतात. नंतर ती चांदीचे पातेले घेऊन घरोघर जाते. त्या पातेल्यात घरोघरच्या बायका भाजीपाला घालतात. वधू घरी आल्यावर तो भाजीपाला शिजवतात व सर्वांना वाटतात. लग्नाआधी वधूपक्षाची मंडळी वराच्या घरी जाऊन त्याला रेशमी रुमाल, कापड व द्रव्य देतात. या विधीला वरपरीक्षा म्हणतात. नंतर वरपक्षाची मंडळी वधूगृही जाऊन दोन नारळ, विड्याची पाने, हळद, इ. वस्तू शालीत गुंडाळून वधूला देतात. लग्नाच्या वेळी ब्राह्मण पुरोहिताकरवी होम करतात. नंतर एक लेकुरवाळा गुरव आणि वराची बहीण ही दोघे मिळून वधूच्या गळ्यात ताळी बांधतात. त्यानंतर एका टोपलीत ठेवलेल्या मिठावर ताडाच्या पानाच्या सुरळीने विवाहाचा करार लिहितात. वराची मिरवणूक वधूगृही जायला निघते, तेव्हा वाटेत प्रत्येक चेट्टीयरच्या घराशी वराला ओवाळले जाते. वधूच्या घराशी वराची बहीण वधू-वरांना एकमेकांकडे ढकलते; त्याला वर-वधूचा दर्शनविधी म्हणतात. त्यानंतर कंकणबंधन होते व वधू-वर एकमेकांच्या हातात नारळ देऊन एकमेकांना हार घालतात. या वेळी स्त्रिया शंख फुंकतात.

**प्रसूतिप्रथा** – स्त्री गरोदर असता तिची नणंद पाचव्या महिन्यात पाच जातींच्या वनस्पतींचा रस काढून गर्भवतीला पाजते. त्या वेळी तिथे जमलेल्या स्त्रिया शंख वाजवतात. या विधीला औषधप्राशनविधी म्हणतात. मुलगा जन्मल्यास चौथ्या दिवशीच त्याचे जावळ करतात. मूल दोन वर्षांचे झाल्यावर त्याच्या गळ्यात त्याचा मामा पोवळ्यांची, मोत्यांची व काचेच्या मण्यांची माळ घालतो. मग त्या मुलाला एका लाकडी थाळीत बसवून मुलाची आई व आत्या ती थाळी उचलतात व तीन

वेळा ती वाटोळी फिरवतात. या विधीला पुधुमै असे म्हणतात. मर्तिकप्रथा — घरात मर्तिक झाल्यावर जे लोक समाचाराला येतात, त्यांचे हात पसरून स्वागत करतात. मृताला सक्षौर स्नान घालून मग कपडे घालतात. मग ते प्रेत काही वेळ मांडवात ठेवतात. मृताला त्याचा पुत्र अग्नी देतो. पण दुसऱ्या दिवशी अस्थी मात्र न्हावी गोळा करतो. और्ध्वदेहिक कृत्यात मृताला फळे व अन्न देतात. सुतक संपताना ज्ञातिभोजन घालतात. सोळाव्या दिवशी ब्राह्मणांना दान-दक्षिणा देऊन क्रियाकर्मांतर संपवतात. [ मदुरा गॅझे. ]

**नट्टुवन** एक जात. यांची वस्ती तंजाऊर, कांजीवरम, मदुरा, म्हैसूर व त्रिवांकुर या भागांत आहे. यांच्यात बनजिगा व कैकोलन असे दोन पोटविभाग आहेत. बनजिगा हे वैष्णव असून, कैकोलन हे शैव आहेत. मात्र व्यंकटेश व सरस्वती या दोन देवतांना सगळेच भजतात.

देवदासींना नृत्यकला शिकविणे हा यांचा प्रमुख व्यवसाय होय. काहीजण देवदासींच्या नृत्य-गायनाला वाद्यांची साथही करतात. या गोष्टी ज्यांना जमत नसतील, ते अन्य व्यवसाय करतात. हे लोक तेलुगू व कानडी अशा दोन भाषा बोलतात. यांना मांसाहार निषिद्ध आहे. हे लोक मृतांना पुरतात व अकरा दिवस सुतक पाळतात. [ मै. ट्रा. का. ]

**नडिविढी** द. भारतातील शक्तिदेवतांपैकी एक. नडिविढी याचा अर्थ मधला रस्ता असा आहे. ही देवता गावाच्या मधोमध येऊन बसते, असे समजतात. म्हणून जत्रेच्या वेळी तिच्या पूजेसाठी गावाच्या मध्यभागी मांडव घालतात. या मांडवाचे दोन भाग असतात. आतल्या भागाला पवित्र जागा असे समजतात. तिथे बसून कुंभार तिची मूर्ती घडवतो. बाहेरच्या भागात पुजारी बसतो आणि मातीत रेघा ओढून एक आकृती काढतो. कुंभाराने आत मूर्ती तयार केली, की ती बाहेर आणून पुजाऱ्याने काढलेल्या त्या रेखाकृतीजवळ ठेवतात. मग पुजारी तिच्या प्राणप्रतिष्ठेचे मंत्र म्हणतो. त्या वेळी ढोल वाजवतात व गावचे लोक उच्चैर्घोष करतात. ही देवता सौम्य प्रकृतीची आहे. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**नथ** महाराष्ट्रीय स्त्रियांचे नासिकाभूषण पाहा — अलंकार.

**नथू कहार** उ. भारतातील ग्रामदेवतांच्या वर्गातला एक देव. हा अवध प्रदेशातील नावाड्यांचा देव आहे. हा मूळचा माणूस होता. अकबरपूर येथील किल्ला बांधतेवेळी त्याच्या पायात याचा बळी दिला गेला व तेव्हापासून त्याला देवत्व प्राप्त झाले, अशी कथा आहे. दरवर्षी या प्रदेशात याची मोठी जत्रा भरते. [ पॉ. रि. फो. नॉ. इं. ]

**नदिया** एक जात. हे लोक सुरत जिल्ह्यात आढळतात व रस्ते झाडण्याचे काम करतात. हे स्वतःला भंग्यांपेक्षा उच्च समजतात. यांच्यांत चुडासामा, चौहान, देसाई जादव, मकवाना, पटेल, परमार, राठोड, राजपूत, इ. नावांची कुळे आहेत. समान कुळांत लग्नसंबंध होत नाही. यांच्यांत रामपीराची उपासना विशेष प्रचलित आहे. हे लोक रामानंदी किंवा मूलगामी पंथाचे अनुयायी आहेत.

हे लोक मृतांना पुरतात. पुरण्यापूर्वी मृताच्या तोंडावर पाणी ओततात व त्याला मातीचा दिवा ओवाळतात. तिसऱ्या किंवा पाचव्या दिवशी मृताच्या नावाने भाताच्या पिंडाची पूजा करतात. त्या कृत्यासाठी गरोडा जातीच्या पुरोहिताला बोलावण्याची प्रथा आहे. [ सुरत गॅझे. ]

**नदी** पर्वतातून उगम पावून समुद्राला मिळणारा जलप्रवाह म्हणजे नदी होय. छंदोगपरिशिष्टात नदीची व्याख्या निषेधरूपाने दिली आहे, ती अशी—

> धनु:सहस्राण्यष्टौ च गतिर्यासां न विद्यते ।
> न ता नदी शब्दवहा गर्तास्ता: परिकीर्तिता: ।।

अर्थ — आठ हजार धनू (धनू = ४ हात) एवढा ज्यांचा गमनमार्ग नाही, त्यांना नदी शब्द लागू होत नाही. ते गर्त (खळगे) म्हटले गेले आहेत.

या व्याख्येचे तात्पर्य असे, की कमीत कमी आठ हजार धनू जिची लांबी आहे, तिलाच नदी म्हणावे.

नद्या पवित्र असतात, जो त्यांच्या जलात स्नान करील त्याला पावन करणाऱ्या असतात, अशी भावना ऋग्वेदकालापासूनच प्रचलित आहे. ऋग्वेदात आपोदेवतांची जी स्तुती आलेली आहे, त्यात त्या देवतांनी आमचे कल्याण करावे आणि आम्हांला पुनीत करावे, अशीच प्रार्थना आहे (ऋ. १०. ९.).

ऋग्वेदात एक नदीसूक्त आहे. त्या सूक्तात नद्यांची नावे दिली आहेत, ती क्रमाने अशी — गंगा, यमुना, सरस्वती, शुतुद्री, विपाशा, परुष्णी, असिक्नी, मरुद्वृधा, वितस्ता, आर्जीकीया सुषोमा, त्रिसामा, सुसर्तू श्वेती, सिंधू, कुभा, गोमती, क्रमू व मेहत्नू (ऋ. १०. ७५).

ऋग्वेदात गंगेचे नाव असले, तरी तिला महत्त्व दिलेले नाही. वैदिक आर्यांची आदरणीय नदी म्हणजे सरस्वती होय. तिला त्यांनी अंबितमा (श्रेष्ठ माता), नदीतमा (श्रेष्ठ नदी)

देवितमा (श्रेष्ठ देवी) अशा शब्दांनी गौरवले आहे. पुराणकालात सरस्वतीचे महत्त्व कमी होऊन तिची जागा गंगेने घेतली. गंगा-यमुनादी सर्वच मोठ्या नद्यांचे माहात्म्य पुराणांनी वाढवले. नद्यांच्या उत्पत्तिकथा, त्यांच्या स्नानाचे फल, त्यांच्या जलांची वैशिष्टये, त्यांचे संगम, इ. गोष्टी पुराणांनी सविस्तर वर्णिल्या आहेत. पुराणांतले नदीमाहात्म्य वाचताना पौराणिकांच्या काही मूलभूत कल्पना प्रथम लक्षात घेतल्या पाहिजेत, त्या अशा--

(१) प्रत्येक नदी ही एखाद्या सरोवरात उगम पावते. ते सरोवर कधी दृश्य किंवा कधी अदृश्य असते. ते एखाद्या पर्वताच्या पायथ्याशी असते आणि पर्वतावर पडलेल्या पावसाचे किंवा तिथल्या बर्फाचे वाहून आलेले पाणी त्या सरोवरात साचते.

(२) नद्या भूमिगत मार्गातून, पर्वतश्रेणीतून किंवा इतर काही अडथळे असल्यास ते पार करून वाहू शकतात. याचाच अर्थ असा, की मूळ सरोवरातले पाणी त्याच्या बांधातून झिरपते व उताराच्या बाजूला एकत्र जमून वाहू लागते. एकच नदी पर्वतश्रेणीतून दोन, तीन प्रवाहांनीही वाहू शकते.

(३) एखाद्या नदीला अनेक उपनद्या मिळत असल्या, तरी त्या सर्वांसह ती एकच नदी मानली जाते. मुख्य नदीचे वर्णन करताना त्या उपनद्यांचा उल्लेख होत नाही. मात्र एखाद्या विशिष्ट घटनेशी किंवा स्थळाशी उपनद्यांचा संबंध आल्यास तेवढ्यापुरता नामोल्लेख होतो. उदा० विदिशा, उज्जयिनी किंवा पांचाल देश, यांचे वर्णन करतांना वेत्रवती, शिप्रा किंवा कालिंदी यांचा स्वतंत्र नद्या म्हणून निर्देश होतो. त्या वेळी त्या चर्मण्वती किंवा गंगा यांच्या उपनद्या आहेत, असे सांगितले जात नाही.

मेरू पर्वतावरून चार मुख्य दिशांना चार प्रमुख नद्या वाहतात. स्वर्गंगा किंवा मंदाकिनी या मूळ नदीचेच हे चार प्रवाह होत. स्वर्गंगा ध्रुवताऱ्याजवळ विष्णूच्या पावलातून उगम पावते. मग ती चंद्रबिंबात प्रवेशून तिथून मेरूच्या शिखरावर पडते. तिथे तिचे चार प्रवाहांत विभाजन होते. ते प्रवाह पुढील चार सरोवरांत पडतात-- पूर्वेस अरुणोद, दक्षिणेस मानस, पश्चिमेस सितोद व उत्तरेस महाभद्र. पुढे ते चार प्रवाह चार मुख्य दिशांना वाहतात. दक्षिणेकडे वाहणारी गंगा गोमुखातून खाली पडते, म्हणून भारताला गोभूमी म्हणतात. पश्चिमेला चक्षू नदी अश्वमुखातून खाली पडते, म्हणून तिच्या आसपासच्या प्रदेशाला अश्वभूमी म्हणतात. पूर्वेकडे सीता गजमुखातून वाहते, म्हणून तिच्या तीरावरील प्रदेशाला गजप्रदेश म्हणतात. उत्तरेस भद्रसोमा सिंहमुखातून वाहते, म्हणून तिच्या काठच्या प्रदेशाला सिंहप्रदेश म्हणतात. या चारही नद्या जंबुद्वीपाच्या निरनिराळ्या भागातून वाहतात आणि शेवटी सागराला मिळतात.

भारतातील सर्व नद्या अष्टकुलपर्वतातून वाहतात, असे पुराणांनी सांगितले आहे. त्यांची नावनिशी पुढीलप्रमाणे--

(१) हिमाचल पर्वतातून उगम पावणाऱ्या नद्या-- गंगा, सरस्वती, सिंधू, चंद्रभागा (चिनाब), यमुना, शुतुद्री (सतलज), वितस्ता (झेलम), इरावती (रावी), कुहू (काबूल), गोमती, धूतपापा (शारदा), बाहुदा (राप्ती), दृषद्वती (चितंग), विपाशा (बियास), देविका (दींग), शरयू (गोग्रा), [रं]क्षू (रामगंगा), गंडकी (गंडक), कौशिकी (कोसी) त्रिस्रोता व लोहित्या (ब्रह्मपुत्र).

(२) पारियात्र पर्वतातून उगम पावणाऱ्या नद्या-- वेदस्मृती (बनास), वेदवती (बेरछ), वृत्रघ्नी (उतंगन), सिंधू (काली सिंध), वेण्या किंवा वर्णाशा, नंदिनी किंवा चंदना (साबरमती), सदानीरा किंवा सतीरापारा (पार्वती), चर्मण्वती किंवा धन्वती (चंबळ), तूपी किंवा रूपा किंवा सूर्य (गंभीर), विदिशा किंवा विदुषा (बेस), वेत्रवती किंवा वेणुमती (बेतवा), शिप्रा किंवा अवर्णी किंवा अवंती.

(३) ऋक्ष पर्वतातून उगम पावणाऱ्या नद्या-- मंदाकिनी, दशार्णा (धसान), चित्रकूटा, तमसा (तोंस), पिप्पलिश्रोणी (पैसुनी), पिशाचिका, करमोदा किंवा करतोया (कर्मनाशा), चित्रोत्पला किंवा नीलोत्पला, विपाशा किंवा विमला (बेवास), वंजुला किंवा चंचला (जम्नी), बालुवाहिनी (बघैन), सुमेरुजा किंवा सितेरजा (सोनरबीरमा), शुक्तिमती (केन), शकुली किंवा मक्षुणा (सक्री), त्रिदिवा किंवा ऱ्हदिका व क्रमू किंवा क्रमात (क्रम्ह).

(४) विंध्य पर्वतातून उगम पावणाऱ्या नद्या-- शिप्रा किंवा मद्रा (सिप्रा), पयोष्णी, निर्विंध्या (नेवुज), तापी, निषधा किंवा निषधावती (सिंद), वेण्वा किंवा वेणा (वैणगंगा), वैतरणी (बैत्रणी), सिनीवाली किंवा शितिबाहू, कुमुद्वती (स्वर्णरेखा), करतोया किंवा तोया (ब्राह्मणी), महागौरी (दामोदर) व पूर्णा, शोण (सोन), महानद (महानदी) व नर्मदा.

(५) सह्य पर्वतातून उगम पावणाऱ्या नद्या-- गोदावरी, भीमरथी (भीमा), कृष्णवेण्या (कृष्णा), वेण्या (वेणा), तुंगभद्रा, सुप्रयोगा (हगरी), बाह्या (वरदा), कावेरी व वंजुला (मंजीरा).

(६) मलय पर्वतातून उगम पावणाऱ्या नद्या-- कृतमाला (ऋतुमाला, वैगाई), ताम्रपर्णी, पुष्पजा (पुष्पवती, पंबिअर) व सत्पलावती (उत्पलावती, पेरियर).

(७) महेंद्र पर्वतातून उगम पावणाऱ्या नद्या — पितृसोमा किंवा त्रिसामा, ऋषिकुल्या, इक्षुका किंवा इक्षुला (वहुदा), त्रिदिवा किंवा वेगवती, लांगूलिनी (लांगुलिया) व वंशकरा किंवा वंशधरा.

(८) शुक्तिमत पर्वतातून उगम पावणाऱ्या नद्या — ऋषिका, कुमारी किंवा सुकुमारी (सुकतेल), मंदगा (मंड), मंदवाहिनी (महानदी), कृपा (अर्प), पलाशिनी (जोंक) व वामन (मुद्दामा).

भारतात नद्यांच्या विषयी पावित्र्याची आणि आदराची भावना परकोटीची आहे. व्यासांनी 'विश्वस्य मातरः' = विश्वाच्या माता म्हणून नद्यांना मातृपदवीच वहाल केली आहे (म. भा. भीष्म ९. ३७-३८). भारतवर्षातल्या प्राचीन कृषि-विशारदांनी देशाचे ठळक दोन भाग पाडले आणि त्यांना देवमातृक व नदीमातृक अशी नावे दिली. देव म्हणजे पर्जन्य. जिथली जमीन केवळ पावसाच्या पाण्यावर भिजते व यथाशक्ति धान्य पिकवते तो देश देवमातृक आणि जो नदी किंवा नदीचे कालवे यांच्या पाण्यावर खात्रीचे पीक देतो, तो नदीमातृक होय.

भारताचे उत्तर व दक्षिण असे दोन भाग विंध्य पर्वताने बनवले आहेत. पण आपण धार्मिक कृत्य करताना जो संकल्प म्हणतो, त्यात 'विंध्यस्य दक्षिणे' किंवा 'उत्तरे प्रदेशे' असे न म्हणता 'गोदावर्याः दक्षिणे तीरे' किंवा 'रेवायाः उत्तरे तीरे' अशा नदीपरत्वे देशविभाग करतो. देवपूजा करतेवेळी प्रथम जी कलशपूजा करतात, त्या कलशात पवित्र नद्यांनी अव्यक्तपणे प्रवेश करावा अशी त्यांची प्रार्थना असते. तो श्लोक असा—

गङ्गे च यमुने चैव गोदावरि सरस्वति।
नर्मदे सिन्धु कावेरि जलेऽस्मिन्सन्निधिं कुरु॥

अर्थ – हे गंगे, यमुने, गोदावरी, सरस्वती, नर्मदे, सिंधू, कावेरी, तू या कलशजलाचे सान्निध्य कर.

भारतवासी लोक तीर्थयात्रेला म्हणून जातात, ते मुख्यत्वे नद्यांच्या दर्शनासाठी आणि स्नानासाठीच. कारण धर्मशास्त्रात आणि पुराणांत नदीस्नानाचे विशेष महत्त्व सांगितले आहे. सोमवती अमावास्या, चंद्र-सूर्यग्रहण, संक्रांती, शिवरात्री, महोदय, अर्धोदय, इ. पर्वप्रसंगी नदीवर जाऊन स्नान करावे, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. कार्तिकस्नान, माघस्नान, वैशाखस्नान ही स्नानेही नदीच्या पाण्यातच करावी, असे शास्त्रवचन आहे. जी निरनिराळी काम्य किंवा नैमित्तिक व्रते आहेत, ती सुरू करण्यापूर्वीही नदीस्नान विहित आहे.

जिथे दोन नद्यांचा संगम होतो, त्या स्थानाला प्रयाग म्हणतात. अशा प्रयागात स्नान करणे हे अत्यंत पुण्यप्रद मानलेले आहे. नदीवर स्नानाला जायचे म्हणजे केवळ तिच्या पाण्यात बुडी मारायची असे नव्हे. त्याआधी नदीची पूजा करायची असते व स्नानानंतर तिच्याच जलाने तिलाच अर्घ्य द्यायचे असते. सुवासिनी स्त्रिया तर नदीची खणानारळाने ओटी भरतात आणि तिला सौभाग्यवायनही देतात. ही प्रथा रामायणकालापासून प्रचलित आहे. सीता जेव्हा प्रभू रामचंद्राबरोबर वनवासाला निघाली, तेव्हा नौकेत बसून गंगानदी पार करताना तिने गंगेला पुढील नवस केला. 'हे गंगे, वनवासातून जेव्हा आम्ही सुखरूप परत येऊ, तेव्हा येताना मी तुझी पूजा करीन.' (वा. रा. अयोध्या. ५२.८२-८७)

ग्रामीण लोकांत नदीपूजा ही काही निराळ्या कारणांसाठी केली जाते. कित्येक लोक नदीत नागदेवतांचे वास्तव्य असते, अशा समजुतीने, तर कित्येक लोक नदीत आसऱ्या नावाच्या जलदेवता असतात, अशा समजुतीने त्यांच्या प्रीत्यर्थ नदीची पूजा करतात. नदीत एक पिशाच असते व ते नदीला पूर आणते, अशा समजुतीने काही लोक पुराच्या वेळी नदीची पूजा करतात. नद्यांचे डोहही भुताखेतांची आश्रयस्थाने मानली जातात.

गंगा नदी ही या सर्व नद्यांत श्रेष्ठ समजली जाते. पण तिचे स्नान जर पर्वप्रसंगी घडणे शक्य नसेल, तर कोणतीही नदी गंगाच समजून तिच्यात स्नान केले तरी चालते, अशी आपली धार्मिक धारणा असते. नदीला उद्धारकर्ती आणि स्वर्गप्रद मानलेले असल्यामुळे माणसे आपल्या मृत पूर्वजांच्या अस्थी गंगेत नेऊन विसर्जित करतात किंवा ते शक्य न झाल्यास अन्य कोणत्याही नदीत टाकतात.

भारतीय संस्कृती ही मुख्यत्वे नद्यांच्या तीरावरच वाढली, विस्तारली आहे. वैदिक ऋषींची सूक्ते सप्त सिंधूंच्या प्रदेशात निर्माण झाली. अंतर्वेदीत म्हणजे गंगा यमुनांच्या दुआबात यज्ञसंस्था विस्तारली आहे. ऋषि-मुनींची तपःप्रधान संस्कृती गंगेच्या तीरावर अवतरली. यमुनेच्या तीरावर प्रथम पांडवांचे आणि इतिहासकाळात मोगलांचे राज्य उभारले गेले. भारतातला भक्तिमार्गही यमुनेच्या तीरावरच परिपुष्ट झाला. प्रयाग येथील गंगा-यमुनासंगम हा यज्ञप्रधान व पूजाप्रधान संस्कृतींचे संगमक्षेत्र झाला. नर्मदेचे सांस्कृतिक महत्त्व विशद करताना श्री. काका कालेलकर लिहितात—

नर्मदा ही जशी आपली आणि आपल्या संस्कृतीची माता आहे, तशीच ती आपले बंधु-बांधव जे आदिवासी लोक यांचीही माता आहे. नर्मदेच्या दोन्ही तटांवर या लोकांनी हजारो वर्षे राज्य केले होते, कित्येक किल्लेही बांधले होते आणि आपली एक विशाल आरण्यक संस्कृती विकसित केली होती. 'विक्रम

संवताची कालगणना आणि शालिवाहन शकाची कालगणना या दोन्ही नर्मदेच्या तीरी ऐकू येतात आणि बदलतात.

गोदावरीच्या तीरी सातवाहनांचे मोठे साम्राज्य उदयाला आले आणि खूप गाजले. महाराष्ट्र संतांच्या भक्तिसाहित्याची गंगा दुथडी भरून वाहिली ती गोदावरीच्याच तीरावर.

कृष्णा नदीविषयीचा भक्तिभाव आणि तिचे ऐतिहासिक महत्त्व श्री. काका कालेलकर पुढील शब्दांत विशद करतात--

कृष्ण आहे महाराष्ट्राची आराध्यदेवता. श्रीसमर्थ आणि शिवाजीमहाराज, शाहू व बाजीराव, घोरपडे व पटवर्धन, नाना फडणीस व रामशास्त्री– थोडक्यात सांगावयाचे म्हणजे महाराष्ट्राचे साधुत्व व वीरत्व, महाराष्ट्राची न्यायनिष्ठा व मुत्सद्दीपणा, धर्म व सदाचार, देशसेवा आणि विद्यासेवा, स्वतंत्रता व उदारता, सारे काही कृष्णेच्या वत्सल कुटुंबात वाढले आहे. खरे सांगायचे म्हणजे महाराष्ट्र, कर्नाटक व तेलंगण (आंध्र) या तीन प्रदेशांचे ऐक्य साधण्यासाठीच कृष्णा नदी वाहत आहे.

उत्तरेकडे जे महत्त्व गंगेचे, तेच दक्षिणेकडे कावेरीचे. प्राचीन काळी चोळांचे साम्राज्य कावेरीच्या तीरावर थाटले होते. पुहार ही त्या साम्राज्याची राजधानी चारही दिशांना गाजत होती. चोळांप्रमाणेच पल्लवांनीही कावेरीच्याच साक्षीने पराक्रम केले आणि आपले राज्य उदयास आणले. द्रविड संस्कृती हे कावेरीचेच अपत्य आहे. तमिळनाडमधील पुरातन कवींपैकी प्रत्येकाने कावेरीची प्रशस्ती गायिली आहे.

वैदिक संस्कृतीचा ज्वलंत अभिमान बाळगणारे विजयनगरचे साम्राज्य तुंगभद्रेच्या काठी उभे झाले. तुंगभद्रा ही दक्षिणेतील वैदिक संस्कृतीची प्रतिनिधी आहे. सायणाचार्यांनी याच नदीच्या तीरी बसून वेदांवर भाष्ये लिहिली आणि ती पुढे विश्वविख्यात झाली. तुंगभद्रेच्या काठी वसणाऱ्या ब्राह्मणांचे वेदोच्चार आदर्श आणि प्रमाणभूत मानले जातात.

अशी एकेक नदी म्हणजे संस्कृतीचा एकेक प्रवाहच! पण प्रत्येकाची खुबी वेगळी. नदीचे अखंड वाहतेपण ध्यानी घेऊन तत्त्वचिंतकांनी जीवनाला नदीचा दृष्टांत दिला आहे. जीवनही नदीसारखेच अखंड वाहत असते.

म्हणूनच ऋग्वेदातील सूक्तांपासून सर्व देशी भाषांतील लोकगीतांपर्यंत सर्वत्र या ना त्या रूपाने नदीचा महिमा गायिलेला आढळतो. सरितेचा स्वच्छ, शीतल प्रवाह अखंडपणे वाहताना पाहिल्यावर कोण्याही कवीची प्रतिभा उचंबळून आलीच पाहिजे. वैदिक ऋषी, व्यास, वाल्मीकी, शंकराचार्य, कालिदास, जगन्नाथ, इ. अनेक संस्कृत भाषेचे कवी–महाकवी यांनी नदीस्तवनासाठी आपला वाग्विलास करताना स्वतःला धन्य मानले आहे.

## नदीत्रिरात्रव्रत

एक काम्य व्रत. आषाढ महिन्यात नदीला पूर येतो, त्या वेळी हे व्रत करावयाचे असते. प्रातःकाली उठून ओळीने तीन दिवस स्नान, पहिल्या दिवशी एका काळचा मांडचामध्ये नदीचे पाणी भरून ते मांडे घरी नेणे, त्या मांडचाची पूजा करणे, त्याचबरोबर तीन दिवस नदीची व विष्णूची पूजा करणे, तीनही दिवस अखंड दिवा पाजळत ठेवणे, नदीला, वरुणाला व विष्णूला फलमिश्रित अर्घ्य देणे आणि घारग्यांचा नैवेद्य दाखवणे असा याचा विधी आहे. हे व्रत तीन वर्षे करून उद्यापन करावे व त्या वेळी विष्णू आणि वरुण यांच्या सुवर्णमूर्ती दान द्याव्या, असे सांगितले आहे. व्रताचे फल– संतती व सौभाग्य यांची प्राप्ती. [हि. ध.; पु. इं.]

## नदीव्रत

एक काम्य व्रत. चैत्र महिन्यातील शुद्ध पक्षात या व्रताला प्रारंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. हे व्रत प्रत्येक महिन्यात सात दिवस करायचे असते. व्रत करणाऱ्याने सात दिवसपर्यंत नक्तभोजी राहून नलिनी, पावनी, सिता, इक्षू, सिंधू, भागीरथी व ल्हादिनी या सात नद्यांची पूजा करायची असते. पूजेनंतर दुधाने भरलेली मांडी नदीला अर्पण करतात आणि नंतर तीच मांडी पुनश्च दुधाने भरून ब्राह्मणाला दान देतात. वर्षाच्या अखेरीस म्हणजे फाल्गुन मासात रौप्यदान करून व्रतोद्यापन करतात. फल– विद्याप्राप्ती. [हि. ध.]

## नना

एक प्राचीन देवी. सनपूर्व सहाव्या शतकाच्या पूर्वीपासून हिची उपासना असीरिया, इराण, बलुचिस्तान, सिंध व अफगाणिस्तान एवढ्या भूभागांत प्रचलित होती. बलुचिस्तानातील हिंगलाजदेवी ही मूळची नना देवीच असून, कुशाणकाळात तिला एक शक्ती म्हणून भारतात प्रतिष्ठा लाभली.

भारतातील शक व कुशाण राजे या देवीचे उपासक होते. त्यांच्या मुद्रांवर नना देवीचे ठसे असून, त्यांखाली नना अथवा ननाइआ असे तिचे नावही कोरलेले आढळते. रामदासांनी चाफळ परिसरातील क्षुद्र देवतांच्या गणनेत निनाई नामक एका देवीचा उल्लेख केला आहे, तीही नना देवीच असावी. नना हा शब्द ऋग्वेदात आलेला असून, त्याचा अर्थ माता असा आहे (९. ११२. ३). वामन पुराणात चर्चिका या नावाने हिचा उल्लेख आढळतो. [वा. पु. स्ट.; भा. कृ. क.; रा. क. १]

## नन्नयभट्ट

(इ. स. चे ११ वे शतक) एक तेलुगू कवी. हा मुद्गलगोत्री ब्राह्मण असून, वेंगीच्या चालुक्य राजांचा आश्रित होता. याने वेदशास्त्रांचे उत्तम अध्ययन केले होते व सोमादी यागही केले होते. त्याच्या काळी वैदिक

धर्माची कमान चढती होती. नन्नयाचा आश्रयदाता राजराज नरेंद्र हा तर त्या धर्माचा कट्टा पुरस्कर्ता होता. त्याने वैदिक धर्माच्या उत्कर्षासाठी आपल्या दरबारातल्या पंडितकवींकडून विरनिराळ्या विषयांवरील उत्तमोत्तम ग्रंथ लिहवून घेतले.

नन्नयाला त्याने तेलुगू भाषेत महाभारताचा अनुवाद करण्यास सांगितले. त्यावर 'सांप्रतची तेलुगू भाषा ही महाभारताच्या अनुवादासाठी असमर्थ आहे; कारण तिला सुबद्ध व्याकरण नाही व समृद्ध शब्दसंग्रहही नाहीं, असे म्हणून नन्नयाने प्रथम व्याकरणरचनेची आणि शब्दकोशाची आवश्यकता राजाला पटवून दिली.

राजाने तेही काम नन्नयावरच सोपवले. मग नन्नयाने आंध्रशब्दचिंतामणी व लक्षणसार हे ग्रंथ निर्माण केले. पाठोपाठ त्याने महाभारताच्या अनुवादालाही प्रारंभ केला. परंतु पहिली अडीच पर्वे पुरी होताच त्याला मृत्यू आला. उर्वरित अनुवादाचे काम मग तिक्कन्न सोमयाजी व यर्रा प्रगड या दोघांनी पुरे केले.

महाभारताचा अनुवाद करताना नन्नयाची दृष्टी केवळ अनुवादकाची नव्हती. म्हणून त्याने मूळ ग्रंथांतील अनेक ठिकाणची नीरसता दूर केली आहे, तर कित्येक ठिकाणी नवनव्या सौंदर्यपूर्ण प्रसंगांची निर्मितीही केली आहे. नन्नयाला स्वतःच्या प्रदेशाचा अभिमानही बराच होता. व्यासप्रणीत महाभारतात अर्जुन तीर्थयात्रेला जातो, त्या स्थळांची यादी देताना व्यासांनी द. भारतातील प्रसिद्ध तीर्थ-क्षेत्रांचे वर्णन केले आहे; पण त्यात वेंगी देशाचा उल्लेख नाही. नन्नयाला ते खटकले व त्याने आपल्या महाभारतात अर्जुन वेंगीलाही येऊन गेल्याचे लिहून टाकले. इतकेच नव्हे; तर त्या प्रदेशातील सौंदर्यस्थळांचे रसपूर्ण वर्णनही त्याने त्या प्रसंगाने केले.

नन्नयभट्ट संस्कृत, कन्नड, पैशाची, तेलुगू, इ. भाषांचा गाढा पंडित होता. त्याची भाषा ललितमधुर व अलंकारप्रचुर आहे.

पहा– तेलुगू भाषा व साहित्य. [ आंध्रभारती; श्री. लक्ष्मीरंजनम्– अजंता, ऑगस्ट १९५५; ते. वा. ]

**नबी** इस्लाम धर्मातील एक संज्ञा. या शब्दाचा अर्थ प्रेषित असा होतो. ज्याला एखाद्या देवदूताने दृष्टान्त दिला किंवा ज्याला स्वप्नात ईश्वराचा साक्षात्कार झाला किंवा ज्याच्या हृदयातच स्वयंस्फूर्त प्रेरणा झाली, अशा पुरुषाला नबी म्हटले आहे. रसूल (ज्याला देवदूताकडून पवित्र ग्रंथ लाभला आहे असा) व पैगंबर हे याच अर्थाचे शब्द आहेत. [ डि. इ. ]

**नमःप्रभेदन** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदातील १०.११२ हे सूक्त याच्या नावावर आहे. इंद्राच्या पराक्रमाची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. त्यातली एक ऋचा अशी –

**यस्य शश्वत् पपिवाँ इन्द्र शत्रूननानुकृत्या रण्या चकर्थ ।**
**स ते पुरंधिं तविषीमियर्ति स ते मदाय सुत इन्द्र सोमः ।।**
(ऋ. १०-११२-५)

अर्थ – हे इन्द्रा, ज्या रसाचा तू वारंवार आस्वाद घेतलास आणि आपल्या अप्रतिकार्य शस्त्राने तू शत्रूंना अतुलनीय पराक्रमाने धार धुळीस मिळविलेस, तो हा रस त्या तुझ्या धाडसी प्रवृत्तीला प्रोत्साहन देतो, म्हणूनच तू हर्षोत्फुल्ल होण्यासाठी आम्ही तो पिळून सिद्ध केला आहे.

या सूक्तात सोमरसाचीही स्तुती केलेली आहे.

**नमस्कार** देव, द्विज, गुरु, पूज्य व्यक्ती, साधुसंत इत्यादींच्या पुढे मस्तक नमवून व हात जोडून आपला नम्र भाव प्रकट करणे, याला नमस्कार असे म्हणतात. याला प्रणाम, प्रणती, नती, नमन असे अनेक पर्यायशब्द आहेत. नमस्काराचे कायिक, वाचिक व मानसिक असे तीन भेद आहेत. हे तीनही भेद उत्तम, मध्यम व अधम अशा पोटभेदांनी नवविध होतात. सर्व नमस्कारांत कायिक नमस्कार श्रेष्ठ होय. याला साष्टांग नमस्कार असेही म्हणतात. त्याचे लक्षण असे –

**उरसा शिरसा दृष्ट्या मनसा वचसा तथा ।**
**पद्भ्यां कराभ्यां जानुभ्यां प्रणामोऽष्टाङ्ग उच्यते ।।**

अर्थ – हृदय, मस्तक, दोन्ही पाय, दोन्ही गुडघे, दोन्ही हात जमिनीला टेकून, तसेच दृष्टीने देवाकडे पाहून, मनाने देवाचे ध्यान करून आणि वाणीने 'मी तुला नमस्कार करतो' असे म्हणून दंडवत प्रणाम करणे याला अष्टांग प्रणाम असे म्हणतात.

साष्टांग नमस्कारात केवळ शारीरिक नमनच अभिप्रेत नसून मानसिक नमनही अभिप्रेत असते. प्रकर्षाने नमन म्हणजे प्रणाम होय. साष्टांग नमस्कारात असे प्रकर्षाने नमन करायचे असते.



नमस्कार

विनय हे नमस्कारातले मूल तत्त्व होय. विनय हा एक शीलगुण आहे. ऋजुता हाही एक शीलगुणच मानलेला आहे. दंडवत साष्टांग प्रणामात या दोन्ही गुणांचे निदर्शन असते.

देवाची मूर्ती, आचार्य, साधू पुरुष व अशाच प्रकारच्या इतर वंदनीय व्यक्ती यांना साष्टांग नमस्कार केला पाहिजे

तसा तो करणे शक्य नसेल, तर गुडघे टेकून पूज्य व्यक्तीच्या चरणांवर मस्तक ठेवावे. अभिवंदनीय व्यक्तीच्या पादांगुष्ठांस स्पर्श करून त्याच हाताने आपल्या नेत्रांस स्पर्श करणे, हा प्रणामाचा त्याखालचा प्रकार होय.

आपल्या बरोबरीच्या व्यक्तींना किंवा जे चरणस्पर्श करू देणार नाहीत, अशा व्यक्तींना अंजलिसंपुट करून व मान खाली वाकवून नमस्कार करावा, असे सांगितले आहे.

आपले शरीर अशुची व अस्नात असेल अशा स्थितीत गुरुजनांना नमस्कार करण्याची वेळ आल्यास त्यांच्यासमोर मस्तक जमिनीला टेकवावे. स्नान करताना, शौचादी देहधर्म पार पाडताना, क्षौर करविताना, दंतधावन करताना व अंगाला तेल लावलेल्या अवस्थेत कोणाला नमस्कार करू नये व वंदनीय व्यक्ती तशा स्थितीत असेल तर तिलाही प्रणाम करू नये, असे सांगितले आहे. स्मशानात, कथाकीर्तनस्थली व देवाच्या मूर्तीसमोर असताना माननीय व्यक्तीला मानसिक प्रणाम करावा; शारीरिक प्रणाम करू नये. स्त्रियांनी कोणत्याही परपुरुषाला चरणस्पर्शपूर्वक नमस्कार करू नये.

कोणाला कशा प्रकारे नमस्कार करावा, याविषयी संस्कारप्रकाशात पुढील श्लोक दिला आहे–

**अजाकर्णेन विद्वांसं यतिं सम्पुटपाणिना ।**
**मूर्खं चैवेकहस्तेन कनिष्ठं नाभिवादयेत् ।।**

अर्थ – बकरीच्या कानाप्रमाणे हात जोडून विद्वानाला, अंजलिसंपुट जोडून यतीला व एक हात वर करून मूर्खाला नमस्कार करावा. आपल्याहून लहान असलेल्या माणसाला नमस्कार करू नये.

ब्रह्मवैवर्त पुराणात नमस्काराविषयी पुढील श्लोक लिहिलेले आहेत –

**देवं विप्रं गुरुं दृष्ट्वा न नमेद् यस्तु संभ्रमात् ।**
**स कालसूत्रं व्रजति यावच्चंद्रदिवाकरौ ।।**
**ब्राह्मणं च गुरुं दृष्ट्वा न नमेद् यो नराधमः ।**
**यावज्जीवनपर्यंतमशुचिर्यवनो भवेत् ।।**

अर्थ – देव, ब्राह्मण व गुरू यांना पाहून जो संभ्रमामुळे प्रणाम करायला चुकेल, तो यावच्चंद्रदिवाकरौ कालसूत्र नावाच्या नरकात जातो. ब्राह्मण व गुरू यांना पाहून जो नराधम नमस्कार करणार नाही, तो यावज्जीव अशुची व यवनरूप होईल.

नमनाचे महत्त्व विशद करताना समर्थ रामदासांनी पुढील ओव्या लिहिल्या आहेत –

**साष्टांग नमस्कारास अधिकारु । नाना प्रतिमा देवगुरु ।**
**अन्यत्र नमनाचा विचारु । अधिकारें करावा ।।**
**भक्त ज्ञानी आणि वीतरागी । माहानुभाव तापसी योगी ।**
**सत्पात्र देखोनि वेगी । नमस्कार घालावे ।।**
**जेथें दिसती विशेष गुण । तें सद्गुरूचें अधिष्ठान ।**
**या कारणे तयासी नमन । अत्यादरें करावें ।।**
**नमस्कारे लीनता घडे । नमस्कारे विकल्प मोडे ।**
**नमस्कारे सख्य घडे । नाना सत्पात्रासीं ।।**
**नमस्कारे दोष जाती । नमस्कारे अन्याय क्षमती ।**
**नमस्कारे मोडली जडतीं । समाधाने ।।**
**नमस्कारास वेचावें नलगे । नमस्कारास कष्टावें नलगे ।।**
**नमस्कारास कांहींच नलगे । उपकर्ण सामग्री ।।**

नमस्कार हा षोडशोपचार पूजेतला एक उपचार आहे; तसाच तो नवविधाभक्तीतला एक प्रकार असून, त्याला वंदन म्हणतात. तो प्राथमिक शिष्टाचारही आहे. कोणत्याही कारणाने जेव्हा एखाद्या प्रतिष्ठित व्यक्तीशी संबंध येतो, तेव्हा प्रथम त्या व्यक्तीला नमस्कार करून मगच पुढील व्यवहार सुरू करतात. नमस्कार ही अवचित भेटलेल्या माणसाला ओळख दाखविण्याचीही खूण असते. परिचित अशी श्रेष्ठ किंवा बरोबरीची व्यक्ती रस्त्यात भेटल्यास तिला नमस्कार न करता पुढे जाणे, हे उद्धटपणाचे लक्षण मानतात. [ हि. ध.; भारती, २ फेब्रु. १९५८; कल्याण–हिन्दुसंस्कृति अंक, जानेवारी १९५० ]

## नमस्कार पञ्चत्रिंशत

एक जैन व्रत. या व्रतात एकूण पस्तीस उपवास असतात. पंचमीला पाच, सप्तमीला सात, नवमीला नऊ व चतुर्दशीला चौदा अशी उपवासांची वार्षिक विभागणी असते. उपवासाच्या दिवशी पञ्चपरमेष्ठीला पूजा-अभिषेक करतात.

## नमस्कार मुद्रा

एक मुद्राप्रकार. अंजलिमुद्रेत हातांचे दोन्ही तळवे फुगीर असतात; पण तेच एकाला एक जोडून बोटे जरा पसरट केली, की नमस्कार मुद्रा होते. पुष्कळदा बोधिसत्त्व या मुद्रेत खोदलेले आढळतात. [ इं. बु. इ.]

## नमाज

इस्लामी प्रार्थनाविधी. मुसलमानांच्या धार्मिक आचारांपैकी हे एक महत्त्वाचे नित्यकर्म आहे. असे सांगतात, की प्रथम प्रतिदिनी पन्नास वेळा नमाज पढावी अशी ईश्वरी आज्ञा होती; परंतु पुढे एकदा मुहंमद पैगंबर स्वप्नात ईश्वराला भेटला व त्याने प्रतिदिनी फक्त पाच वेळा नमाज पढण्याची सवलत ईश्वराकडून मिळवली.

नमाज पढण्यापूर्वी प्रत्येकाने आपले शरीर व कपडे स्वच्छ करावे व मग शुचिर्भूत मनाने मक्केकडे तोंड करून उभे राहावे, अशी धर्माज्ञा आहे. रात्रीच्या तिसऱ्या प्रहरी एक नमाज पढ-

त्यावी मुहंमदाची प्रथा होती. आजही श्रद्धावान मंडळी ती पाळतात. एखादा मनुष्य लवकर मेला आणि त्याच्या मुक्तीला आवश्यक तेवढी नमाज त्याने पढली नसेल, तर त्याच्यावर अकृत्रिम प्रेम करणारा मनुष्य त्याच्यासाठी नमाज पढतो. तसेच एखाद्याची वाईट स्थिती सुधारून त्याला चांगले दिवस यावे, यासाठीही त्याचे सन्मित्र नमाजी करतात. नमाज कुठेही पढली तरी चालते. मात्र मशिदीत पढली, तर पुण्यसंचय अधिक होतो. या नमाजीचे विधान असे—

प्रत्येक मशिदीत मुअज्झिन नामक एक धर्मसेवक असतो. तो प्रत्येक नमाजीच्या वेळी अझान म्हणजे पुकार करून त्या त्या मशिदीच्या जवळपास राहणाऱ्या लोकांना प्रार्थनेला बोलावतो. या अझानचा मंत्र पुढीलप्रमाणे असतो—

**अल्ला–हु–अक्बर, अल्ला–हु–अक्बर ।**
**अश्हदो अल् ला इलाह इल्लिल्लाह ।**
**अश्हदो अन्न मुहम्मदर्रसूलुल्लाह ।**
**हय्या अलस्सलाह । हय्या अलल् फलाह ।**
**अल्ला–हू–अक्बर । ला इलाह इल्लिल्लाह ।**

अर्थ–परमेश्वर सर्वांत श्रेष्ठ आहे. परमेश्वराशिवाय दुसरा कोणीही पूज्य नाहीं, अशी मी ग्वाही देतो. हजरत मुहंमद हा परमेश्वराचा पैगंबर आहे, अशी मी साक्ष देतो. प्रार्थनेसाठी या. सत्कृत्यासाठी या. परमेश्वर सर्वांत श्रेष्ठ आहे. परमेश्वराशिवाय दुसरा कोणीही पूज्य नाही.

ही पुकार ऐकून सर्व लोक जमा झाले, की ते कावेशरीफकडे म्हणजे मक्केकडे तोंड करून उभे राहतात व इकामह नामक सूत्र म्हणतात. नंतर पुढीलप्रमाणे नीयत म्हणजे प्रार्थनेचा संकल्प केला जातो—

**अल्लाहुम्मा रब्बा हाजेहिद्द आवतित तारुम्मते वस्स लातिल् कायमते आते मुहम्मदन्निल् वसीलतावल् फदीलतावब् अस् हो मकामम् महमूदन्निल्लजी व अदत्तहू ।**

अर्थ – हे परमेश्वरा, या सार्वजनिक निमंत्रणाचा व सदैव होणाऱ्या नमाजीचा तू मालक आहेस. हजरत मुहंमद याला आमचा उद्धारकर्ता बनव व थोरवी दे. ज्या महमूद नावाच्या स्थळांचे तू वचन दिलें आहेस, तिथे त्यांना उठव.

मग 'तक्बीर तहरीमा' ( = ईश्वर श्रेष्ठ आहे ), हा मंत्र म्हणताना हाताचे अंगठे कानाच्या पाळचांना लावतात. नंतर सुब्हान, तआव्वुझ् आणि तस्मिया ही सूत्रे म्हणतात.

इतके झाल्यावर कुराणाचा फातिहा नामक प्रथमाध्याय म्हटला जातो. त्याशिवाय, प्रत्येकाच्या इच्छेला येतील ते एक–दोन अध्यायही म्हटले जातात; परंतु प्राधान्याने एकशे बारावा अध्यायच म्हणायची प्रथा आहे.

इथपर्यंतचा सर्व भाग ताठ उभे राहून म्हणायचा असतो. त्यानंतर 'तक्बीर–इ–रुकूं' हा पाठ म्हणताना गुडघ्यावर हात ठेवून वाकून उभे राहावे लागते. 'तस्बीह–इ–रुकूं' हाही पाठ त्याच स्थितीत म्हणतात. हे पाठ म्हणून झाले, की पुन्हा ताठ उभे राहून काही सूत्रे म्हटली जातात. त्यानंतर गुडघे, हात व



नमाज

कपाळ टेकून सिजदा म्हणजे नमस्कार करतात व तीच सूत्रे पुन्हा म्हणतात. मग गुडघे टेकवून व टाचावर ताठ बसून एक मंत्र म्हणायचा आणि पुन्हा कपाळ जमिनीला लावून सिजदा करताना सर्व सूत्रे म्हणायची असतात. अशा प्रकारें प्रार्थनेची एक रकात म्हणजे भाग झाला, की पुन्हा फातिहा म्हणतात व त्यानंतर निरनिराळी सूत्रे म्हणून दुसरी रकात पुरी करतात. दोन रकाती झाल्यावर तशहहुद किंवा कलिमए शहादत म्हणतात. नंतर मुहंमद व त्याचे वंशज यांच्यासाठी प्रार्थना करतात, तिला दरुद असे म्हणतात. त्यानंतर स्वतःसाठी दुवा म्हणजे आशीर्वाद मागतात. जेव्हा ईश्वराजवळ दुसऱ्यासाठी दयेची याचना करतात, तेव्हा त्याला सलाम म्हणतात. शेवटी मुनाजात म्हणजे देवाला शरण जाण्याचा विधी होतो. मुनाजात म्हणजे नमाजविधीचा गाभाच होय, असे मुहंमदाने म्हटले आहे.

दिवसातल्या पहिल्या नमाजीला फजर असे म्हणतात. हिची वेळ पहाटेपासून सूर्योदयापर्यंत असते. दुसरी नमाज दोन प्रहरी पढतात व तिला जोहरची नमाज म्हणतात. असर नामक तिसरी

नमाज तिसऱ्या प्रहरी होते. संध्याकाळच्या नमाजीला मगरिबची नमाज म्हणतात. सूर्यास्तानंतर संधिप्रकाश सरेपर्यंत ही नमाज पढतात. तसे पाहिले तर कोणतीच नमाज चुकविता येत नाही; पण त्यातल्या त्यात संध्याकाळची नमाज सर्वस्वी अनिवार्य असते. पाचवी नमाज संधिप्रकाश सरल्यानंतर पहाट फुटेपर्यंत केव्हाही करतात. हिला ईशाची नमाज अशी संज्ञा आहे.

या पाच नमाजींपैकी एखादी नमाज पढायची राहिल्यास पुढील नमाज पढण्यापूर्वी न पढलेल्या नमाजीतील काही भाग म्हणून मग चालू नमाज पढतात. मगरिबच्या नमाजीच्या वेळी मात्र प्रथम मगरिबची नमाज व नंतर राहिलेली नमाज पढायची असते.

याशिवाय जुम्मा म्हणजे शुक्रवारची नमाज, तसेच बकरीद, रमजान, इ. विशेष प्रसंगी पढायच्या नमाजी स्वतंत्र आहेत. जुम्म्याची नमाज ही दुपारी पढायची असते. त्या वेळी गावातले सर्व लोक जवळच्या मशिदीत जाऊन प्रथम चार रकात सुन्नत म्हणतात व मग नमाज पढतात. ही नमाज चौदा रकातांची असते. नंतर खुतबा म्हणजे प्रवचन होते.

रमजानच्या व बकरीदच्या नमाजी गावाबाहेर असलेल्या ईदगाहावर म्हणजे अशा नमाजीसाठी असलेल्या खास जागी पढतात. त्या वेळी प्रथम इमाम नामक धर्माधिकारी सुबहानकला, इ. सूरे म्हणतो व मग जमलेले लोक अल्ला–हु–अक्बर ही रकात मनात म्हणत कानापर्यंत हात नेतात. असे तीन वेळा करून रकात पूर्ण करतात. दुसरी रकात म्हणण्यापूर्वी पुन्हा अल्ला–हु–अक्बर म्हणत हात कानापर्यंत नेतात. त्यानंतर खुतबा होतो. [ मु. इं.; डि. इ. ]

**नमिनाथ** एक जैन तीर्थंकर. पाहा– तीर्थंकर.

**नम्माळवार** द. भारतातील आळवार संतांपैकी एक प्रमुख संत कवी. शठकोप, परांकुश, बकुलाभरण, मारन, इ. अन्य नावांनीही हा प्रसिद्ध आहे. याचा जन्म तमिळनाडमधील तिरुनेलवेल्ली जिल्ह्यात असलेल्या तिरुकुरुहर नामक खेड्यात झाला. हे स्थान ताम्रपर्णी नदीच्या काठीं असून, त्याला सांप्रत तिरुनगरी म्हणतात. याच्या पित्याचे नाव करिमारन व मातेचे उदयनंगै होते. करिमारन हा पांड्य राजाच्या पदरी उच्च पदाधिकारी होता. पुढे तर तो वलुदिवळैनाडू नामक राज्याचा अधिपतीही झाला होता. परंतु सांपत्तिक दृष्ट्या सुखी असणाऱ्या या दांपत्याच्या पोटी पुत्रसंतान मात्र नव्हते. करिमारनने त्यासाठी आपल्या पत्नीसह तीर्थाटन केले आणि अखेरीस श्रीविष्णूची मनोभावे पूजा करून त्याला पुत्र देण्यासाठी प्रार्थिले. विष्णूने त्याची प्रार्थना ऐकली. त्यानंतर थोड्याच वर्षांनी त्या दांपत्याला जो पुत्र झाला, तोच हा नम्माळवार होय. मात्र आख्यायिका अशी आहे, की करिमारनला झालेला हा पुत्र म्हणजे साक्षात भगवान विष्णूच होता.

जन्मल्यापासून पहिले दहा दिवस त्याने आपले डोळे तर उघडले नाहीतच; पण रडण्यासाठी किंवा स्तनपानासाठी तोंडही उघडले नाही. बाराव्या दिवशी कुणाच्या तरी सांगीवरून त्याला त्याच्या आई-बापांनी विष्णुमंदिराजवळ एका चिंचेच्या झाडाखाली नेऊन ठेवले व त्याचा त्याग केला. तिथे मात्र त्या बालकाने तोंड उघडून ओंकाराचा उच्चार सुरू केला. नंतरची सोळा वर्षे त्याने त्याच जागी समाधीचा अभ्यास केला. असे सांगतात, की या काळात त्याचे पालनपोषण विष्णूने केले. सोळा वर्षांनंतर नम्माळवाराची समाधी उतरली. त्यासंबंधी एक आख्यायिका प्रचलित आहे, ती अशी —

मधुरकवी नामक कोणी एक विद्वान ब्राह्मण उत्तर भारतातील तीर्थयात्रा करीत अयोध्येत गेला असता दक्षिणेच्या बाजूला त्याने एक ज्योतिस्तंभ पाहिला. त्याला असे वाटले, की हा स्तंभ आपणांस बोलावीत आहे. त्यामुळे तो त्या ज्योतिस्तंभाच्या दिशेने चालू लागला. वाटेत येणारी शेकडो पुण्यक्षेत्रे पार करून तो शेवटी ताम्रपर्णी नदीच्या किनाऱ्यावर असलेल्या त्या चिंचवृक्षासन्निध येऊन पोचला. तिथे पोचताच त्याला कळले, की ही ज्योती त्या वृक्षकुहरात समाधिस्थित असलेल्या नम्माळवाराच्या शरीरातून निघत आहे. कुतूहल म्हणून त्याने एक दगड त्या दिशेने भिरकावला व तो नेमका नम्माळवाराच्या समोर पडला. त्याबरोबर त्याने डोळे उघडले.

नंतर मधुरकवी आणि नम्माळवार या उभयतांत अध्यात्मचर्चा झाली आणि शेवटी मधुरकवीसारख्या त्या वयोवृद्ध विद्वान ब्राह्मणाने सोळा वर्षांच्या त्या तेजस्वी कुमाराचे शिष्यत्व पत्करले. त्यानंतर मधुरकवीने गुरुमुखातून निघणाऱ्या अनेक भक्तिपर पदांना लिपिबद्ध केले. नम्माळवाराच्या नावावर आज उपलब्ध असलेले ग्रंथ ते हेच होत. या ग्रंथांची नावे पुढीलप्रमाणे आहेत– (१) तिरुविरुत्तम (२) तिरुवाचिरियम (३) पेरिय तिरुवन्तादी व (४) तिरुवायमोळी.

तिरुविरुत्तम या ग्रंथात शंभर पदे आहेत. विष्णूला प्रियतम नायक मानून कवीने स्वतःकडे विरहिणी नायिकेची भूमिका घेतली आहे. मधुराभक्तीवरील एक उत्कृष्ट ग्रंथ म्हणूनही याचे वर्णन करतात. यात ऋग्वेदातील तत्त्वविचारांचे सार आहे, असे म्हणतात.

तिरुवाचिरियममध्ये सात पदे असून, त्यात यजुर्वेदाचे सार असल्याचे सांगितले जाते. पेरिय तिरुवंतादी या ग्रंथातील

सत्याऐंशी पदांमध्ये अथर्ववेदाचा सारभूत भाग आला आहे अशी समजूत आहे.

तिरुवायमोळी हा ग्रंथ केवळ नम्माळवाराच्याच नव्हे, तर समस्त आळवार साहित्याचा मुकुटमणी मानतात. तिरुवायमोळी म्हणजे संत-महात्म्यांच्या मुखातून निघालेली दिव्य वाणी होय. वायमोळी हा शब्द प्राचीन तमिळ साहित्यात वेदांसाठी उपयोजिला आहे. यात ११०२ पदे असून, ती विविध राग-रागिण्यांत गाण्याच्या दृष्टीने रचली आहेत. हा ग्रंथ सामवेदाचे सार असल्याचे सांगतात. यात भक्ती व गुरू यांचा महिमा वर्णिला असून, दार्शनिक विचारांचेही विवेचन केले आहे.

दक्षिणेतील आळवारांच्या अवतारकार्याचे प्रयोजन सांगताना नम्माळवार आपल्या तिरुवायमोळी या ग्रंथात म्हणतो —

**कोन्रु उयिर् उण्णुम् विशादि, पहै, पशि, तीयन, एल्लाम्**
**निन्रु इव् उलहिल् कडिवान्, नेमिप् पिरान्-तमर् पोन्दार्;**
**नन्रु इशै पाडियुम्, तुळ्ळि आडियुम्, आलम् परन्दार्;**
**शेन्रु, तोलुवु उय्म्मिन् तोण्डिर्; शिन्दैयैच् चेन्निरु त्तिये.**

अर्थ – जीवभक्षक, रोग, उपासमार, सूडबुद्धी, इ. गोष्टींनी भरलेल्या पृथ्वीला पापमुक्त करण्यासाठी आळवार या भूमीवर अवतरले आहेत. सर्व पृथ्वीतलावर नाचताना ते जी गाणी म्हणत आहेत, ती मधुर आहेत. देवभक्तांनो, पुढे व्हा आणि या दिव्य अतिथींना सामोरे जा. त्यांची शुद्ध मनाने प्रार्थना करा आणि मुक्त व्हा.

नम्माळवाराच्या काळातच मोठमोठ्या विद्वानांनी त्याची थोरवी जाणून त्याचा गौरव केला. कित्येकांनी त्याच्या प्रशस्तिपर ग्रंथही रचले आहेत. नम्माळवाराला अवघे ३५ वर्षांचे आयुष्य लाभले. पण तेवढ्या कालात त्याने पुढील कित्येक पिढ्यांना पुरेल अशी वैचारिक शिदोरी तयार करून ठेवली. [त. प्र. हिं. कृ.; अजन्ता, जून-जुलै १९५८; शी. त. म्यु.]

**नयचंद्रसूरी** (इ. स. चे पंधरावे शतक) एक जैन संस्कृत ग्रंथकार. हा कृष्णर्षिगच्छातील जयसिंह सूरीच्या शिष्यपरंपरेतील होता. हम्मीरकाव्य हा याचा प्रसिद्ध ग्रंथ होय. अलाउद्दिनाशी युद्ध करताना वीरगती पावलेल्या हम्मीराचे गौरवगान हा या काव्याचा विषय आहे. या काव्याच्या निर्मितीविषयी एक घटना स्वतः कवीने सांगितली आहे, ती अशी —

नयचंद्रसूरी एकदा तोमर वीरमच्या राजसभेत बसला असताना कोणीतरी म्हटले, की प्राचीन कवींप्रमाणे काव्यरचना करण्याची शक्ती आता कोण्याही कवीमध्ये आढळत नाही. नयचंद्राला ते म्हणणे लागले. त्याने ते आव्हान स्वीकारले आणि शृंगार, वीर व अद्‌भुत या रसांनी युक्त असे चौदा सर्गांचे काव्य लिहून वीर हम्मीराचे शौर्यशाली जीवन अमर केले. या काव्यात जैन कवी अमरचंद्राचे लालित्य आणि श्रीहर्षाची वक्रिमा हे दोन्ही गुण आहेत. [भा. सं. जै. यो.]

**नरक** पापी जीवाला मरणोत्तर प्राप्त होणारे यातनास्थान किंवा दुर्गती. 'पापभोगस्थानविशेषे नरकः'.= जिथे पापकृत्यांचा भोग भोगावा लागतो असे विशेष स्थान म्हणजे नरक होय, अशी त्याची व्याख्या आहे (न्या. को.). पुण्यफल भोगण्यासाठी जसा स्वर्ग, तसा पापफल भोगण्यासाठी नरक नावाचा लोक आहे, अशी स्मृतिशास्त्रात कल्पना केलेली आहे. मृत्यूनंतर पापी मनुष्याला पापफल भोगण्यासाठी एक देह धारण करावा लागतो, त्याला यातनादेह असे म्हणतात. याविषयी मनूचा श्लोक आहे, तो असा —

**पञ्चभ्य एव मात्राभ्यः प्रेत्य दुष्कृतिनां नृणाम् ।**
**शरीरं यातनार्थीयमन्यदुत्पद्यते ध्रुवम् ।।**

(मनु. १२. १६)

अर्थ – दुष्कृत्ये करणाऱ्या लोकांना पंचभूतांच्या अंशमात्रे यातना भोगण्यास उपयोगी असे एक निराळे शरीर निश्चयाने उत्पन्न होते.

कोणत्या प्रकारच्या वागणुकीने मनुष्य नरकात जातो आणि त्याला तिथे कोणत्या यातना भोगाव्या लागतात, त्याचे वर्णन मनूने पुढीलप्रमाणे केले आहे –

**यथा यथा निषेवन्ते विषयान्विषयात्मकाः ।**
**तथा तथा कुशलता तेषां तेषूपजायते ।।**
**तेऽभ्यासात् कर्मणां तेषां पापानामल्पबुद्धयः ।**
**संप्राप्नुवन्ति दुःखानि तासु तास्विह योनिषु ।।**
**तमिस्रादिषु चोग्रेषु नरकेषु विवर्तनम् ।**
**असिपत्रवनादीनि बन्धनच्छेदनानि च ।।**

(मनु. १२. ७३–७५)

अर्थ – जसजशी माणसे विषयांचे सेवन करू लागतात, तसतशी त्या विषयांत त्यांना निपुणता लाभते. मग ती अल्पबुद्धीची पापी माणसे पुनःपुन्हा त्या विषयांचे सेवन केल्यामुळे पशुपक्ष्यादिकांच्या योनीत जाऊन तिथे दुःखे भोगतात. तसेच तमिस्रादी व असिपत्रवनादी अशा उग्र नरकांत (इकडून तिकडे) पडून बंधन व छेदन (अवयव तोडले जाणे) अशा प्रकारची दुःखे अनुभवतात.

मनुस्मृतीमध्ये (४. ८८–९०) एकवीस प्रकारचे नरक सांगितले आहेत, ते असे— तामिस्र, अंधतामिस्र, महारौरव, रौरव, नरक, कालसूत्र, महानरक, संजीवन, महावीची, तपन,

संप्रतापन, संघात, सकाकोल, कुड्मल, प्रतिमूर्तिक, लोहशंकू, ऋजीष, पंथा, शाल्मली, असिपत्रवन व लोहदारक.

याज्ञवल्क्यानेही (३. ५. २२२–२२४) नरकांची संख्या एकवीसच दिलेली आहे; पण त्यांतली काही नावे मनुस्मृतीतल्याहून भिन्न आहेत. महारौरव, नरक, महावीची, प्रतिमूर्तिक, ऋजीष, पंथा, लोहदारक या मनुप्रोक्त नरकांच्या ऐवजी याज्ञवल्क्याने वेगळी नावे सांगितली आहेत, ती अशी–

पूतिमृत्तिक, लोहितोद, सविष, अवीची, कुंभीपाक, महानिरय व महापथ.

शंकराचार्यांच्या वेदांतसूत्रभाष्यात नरकांची संख्या सात सांगितली आहे (३. १. १५). भागवत पुराणात ती अठ्ठावीस सांगितली आहे. तंत्रवाङ्मयात एकशेचाळीस नरक सांगितले असून, त्यांतील बत्तीस प्रमुख आहेत.

सूर्यपुत्र यम हा विविध नरकांचा अधिपती असून, तो आपल्या दूतांसह संयमिनी नावाच्या नगरीत राहतो व दूतांनी बांधून आणलेल्या पापी जीवांना त्यांच्या पापाप्रमाणे यथायोग्य दंड करतो. पापी माणसाला नरकात कोणत्या आणि कशा यातना भोगाव्या लागतात, त्याविषयी भागवत पुराणात पुढीलप्रमाणे वर्णन आहे–

यमदूत पापी माणसाचा यातनादेह आगीत टाकून जाळतात. कधीकधी त्यांना स्वतःचे मांस स्वतःच तोडून खायला लावतात. कधी एक जीव दुसऱ्याच्या मांसाचे लचके तोडतो. त्याची आतडी बाहेर काढून घारी-गिधाडांना खायला घालतात.



नरक (इ. स. च्या ८ व्या शतकातील एक शिल्प)

त्याला हत्तीच्या पायांखाली चिरडतात किंवा पाण्याच्या खड्ड्यात बुडवतात. त्याचा कडेलोट करतात. अशा यातनांनी विव्हल झालेला तो जीव मग करुण स्वराने विलाप करू लागतो. आपण नरदेहात यज्ञ, दान, तप, ध्यान, पूजन, इ. काहीही केले नाही आणि आपल्याकडून साधुसंग, परोपकार, गंगास्नान यांपैकी काहीही घडले नाही; त्यामुळे आपल्याला या नरकयातना भोगाव्या लागत आहेत, असा तो पश्चात्ताप करू लागतो (भाग. पु. ५. २६). यातना भोगून झाल्यावर त्याचे पाप फिटते व मग त्याची नरकातून मुक्तता होते. त्यानंतर तो, काही पुण्यांश असल्यास, त्याचे फल भोगण्यासाठी स्वर्गात जातो किंवा मृत्युलोकी पूर्वकर्मानुसार तिर्यग्योनीत किंवा मानवयोनीत जन्म घेतो.

नरदेहात येऊन कोणती पापकृत्ये करणारे लोक नरकात जातात, त्याची विस्तृत नामावली पद्म पुराणातल्या स्वर्गखंडाच्या चौतिसाव्या अध्यायात दिलेली आहे. तिचा सारांश असा–

असत्य बोलणारे, परद्रव्याचा अपहार किंवा नाश करणारे, दुसऱ्याची वृत्ती छिनावून घेणारे, मित्रद्रोह करणारे, पाखंडी, निंदक, गृहच्छेद किंवा दानच्छेद करणारे, प्राणिहिंसा करणारे, वेदविक्रय व वेदनिंदा करणारे, केश, विष व दूध विकणारे, आश्रमबाह्य, श्रुतिबाह्य, प्रजेचे संरक्षण न करणारे राजे, श्रीमंती असून दान न देणारे धनिक, बाल, वृद्ध व दास यांना अन्न न देता स्वतः भोजन करणारे स्वार्थी पुरुष, इ. लोक नरकात जातात.

**नरक कल्पनेचा इतिहास** – ऋग्वेदात नरक असा शब्द आढळत नाही; पण तशा प्रकारची काहीतरी कल्पना ऋग्वेदकालीन लोकांच्या मनामध्ये असावी, अशी सूचना ऋग्वेदातल्या काही मंत्रांवरून मिळते. ऋग्वेदात अशा स्थानाला गहन स्थान म्हटले आहे व दुष्ट, भोंदू आणि असत्यवादी लोकांच्यासाठी ते निर्माण झाल्याचे सांगितले आहे (ऋ. ४. ५. ५). हे स्थान म्हणजे भूतलाच्या खाली अत्यंत अंधारमय असे एक गर्त (खड्डा) असून, पापी लोक यातना भोगण्यासाठी तिथे जातात, असेही उल्लेख ऋग्वेदात आढळतात (ऋ. ४. ५. ५.; ७. १०४. ३). ऋग्वेदात यमाचे नाव असून, त्याचे दोन कुत्रे असल्याचेही सांगितले आहे–

**वैवस्वतं सङ्गमनं जनानां । यमं राजानं हविषा दुवस्य ॥**
(ऋ. १०. १४. १)

अर्थ – सर्व लोकांना शेवटी एकत्र जमवणाऱ्या वैवस्वत यम राजाला हवी देऊन संतुष्ट कर.

**यौ ते श्वानौ यम रक्षितारौ चतुरक्षी पथिरक्षी नृचक्षसौ ॥**
(ऋ. १०. १४. ११)

अर्थ – हे यमा, जीवात्म्याचे संरक्षण करणारे, चार डोळ्यांचे, मार्गात पहारा करणारे आणि मानवांवर सतत दृष्टी ठेवणारे असे तुझे दोन कुत्रे आहेत.

तैत्तिरीय संहितेत यमाच्या पाशांची कल्पना आढळते, ती पुढीलप्रमाणे—

**ग्रीवबद्धमेनममुष्मिंल्लोके नेनीयेरन् ।।**

(तै. सं. ३. ३. ८. ४)

अर्थ— मानेला फास घालून याला त्या (पर) लोकी वारंवार नेण्यात येते.

दुसऱ्या एका ठिकाणी असे म्हटले आहे, की—

**यावन्तो वै मृत्युबन्धवस्तेषां यम आधिपत्यं परीयाय ।**

(तै. सं. ५. १. ८. २)

अर्थ — जे मरणधर्मी असतात, त्यांच्यावर यमाचे आधिपत्य असते.

अथर्ववेदात नारक लोक नामक एका स्थानाची कल्पना केलेली असून, तो अधोलोक आहे व तिथे राक्षसी आणि अभिचारिणी स्त्रिया वास्तव्य करीत असतात, असे म्हटले आहे (अथर्व. २. १४; ५. १९). अथर्ववेदात अधम अंधकार, कृष्ण अंधकार, अंध अंधकार असे जे शब्द वारंवार येतात, तेही नरकाचेच सूचक म्हटले पाहिजेत. नरकातल्या यातनांचेही एका ठिकाणी वर्णन आढळते (अथर्व ५. १९).

पण परलोक, यमलोक, नरकयातना, याविषयींच्या कल्पनांचा विकास मुख्यत्वे ब्राह्मणकालात झाला. प्रत्येक व्यक्तीला मृत्यूनंतर पुन्हा जन्म घ्यावा लागतो व त्या समयी त्याची पाप-पुण्ये तोलली जाऊन तदनुसार त्याला दंड अथवा पारितोपिक प्राप्त होते, असे शतपथ ब्राह्मणात म्हटले आहे (११. २. ७.). पापी व पाखंडी पुरुषांवर यमाचे आधिपत्य कसे चालते, हे कठोपनिषदात यमाच्याच तोंडून सांगितले आहे, ते असे—

**न साम्परायः प्रतिभाति बालं प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् ।**
**अयं लोको नास्ति पर इति मानी पुनःपुनर्वशमापद्यते मे ।।**

(कठ उ. १. २. ६)

अर्थ— (यम म्हणतो), परलोक नाही असे मानणारा अज्ञानी पुरुष वित्ताच्या मोहाने चुकत जातो व म्हणून तो पुनःपुन्हा माझ्या तावडीत सापडतो.

पुण्याचे फल स्वर्ग व पापाचे फल नरक ही कल्पना धर्मसूत्रांतही आढळते. गौतम म्हणतो (१३. ७)—

**स्वर्गः सत्यवचने विपर्यये नरकः ।**

अर्थ— सत्य भाषणाने स्वर्ग मिळतो व असत्य भाषणाने नरक प्राप्त होतो.

नरक पूर्वी एकच होता; पण पापसंख्या जसजशी वाढत गेली तसतशी नरकांची संख्या वाढली आणि त्यांतील यातनांचे प्रकारही वाढले. मार्कंडेय, गरुड, इ. पुराणांनी तर नरकयातनांची इतकी भयानक वर्णने केली आहेत, की ती वाचून अंगावर काटाच उभा राहतो. लोकांनी पापमार्ग सोडून पुण्यमार्गाला लागावे, हाच तसे करण्यात पुराणकारांचा उद्देश होता. पण विचारप्रतिपादनाने लोकांचे मन पुण्यमार्गाकडे वळवण्याच्या ऐवजी नरकाची दहशत घालून पुण्यमार्गाचा उपदेश करणे ही गोष्ट गौणच मानावी लागेल. [ धर्मशास्त्रविचार; वै. मा. ].

## नरकचतुर्दशी

एक काम्य व्रत. आश्विन वद्य चतुर्दशीला हे नाव आहे. या दिवशी सूर्योदयापूर्वी यथाविधि स्नान करतात आणि आह्निक झाल्यानंतर नक्तंव्रताचा संकल्प करतात. सायंकाळी नरकासुराच्या उद्देशाने चार वातींचा दिवा लावतात आणि पुढील मंत्र म्हणतात —

**अग्निर्ज्योती रविर्ज्योतिश्चन्द्रो ज्योतिस्तथैव च ।**
**सर्वेषां ज्योतिषां श्रेष्ठो दीपोऽयं प्रतिगृह्यताम् ।।**

अर्थ — अग्नी, रवी, चंद्र, इ. सर्व दिव्य ज्योतींहून श्रेष्ठ असलेल्या दीपाचा (हे देव हो, तुम्ही) स्वीकार करावा.

हा मंत्र म्हणून देवालये, वाडा, तट, उद्यान, वापी, रस्ता, घोड्याची पागा, वगैरे ठिकाणी दिवे लावतात. नंतर गवताची किंवा अन्य कशाची तरी चूड पेटवून पुढील मंत्र म्हणतात—

**अग्निदग्धाश्च ये जीवा येऽप्यदग्धाः कुले मम ।**
**उज्ज्वलज्योतिषा दग्धास्ते यान्तु परमां गतिम् ।।**

अर्थ — माझ्या कुलात जे अग्नीने अथवा उज्ज्वल ज्योतीने दग्ध होऊन मरण पावले असतील ते आणि जे मेल्यावर दग्ध झाले नसतील तेसुद्धा सर्व (या चुडीच्या प्रकाशाने) परम गतीला जावोत.

शेवटी शैव ब्राह्मणाला वस्त्रालंकार व भोजन देऊन, व्रतकर्त्याने स्वतः उडदाच्या पानांच्या भाजीने युक्त असे नक्त भोजन करायचे असते. पाहा— दीपावली. [ व्रतराज ]

## नरकपूर्णिमा

एक काम्य व्रत. या व्रताचा प्रारंभ कोणत्याही पौर्णिमेला आणि शक्यतो मार्गशीर्ष पौर्णिमेला करावा, असे सांगितले आहे. याचा व्रतावधी एक वर्ष असतो. व्रतदिनी उपवास, विष्णूची पूजा व केशवादी चौवीस नावांचा जप करायचा असतो. प्रत्येक महिन्यात किंवा उद्यापनाच्या वेळी उदकुंभ, पादत्राण, छत्री व धोतरजोडी या वस्तूंचे दान करतात. फल— सुख व स्वर्ग यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

## नरदत्ता

जैन दैवतसमूहातील एक यक्षिणी. ही मुनिसुव्रताची सेविका आहे. हिला बहुरूपिणी असेही म्हणतात. निर्वाणकलिकेत हिचे वर्णन दिले आहे, ते असे—

**नरदत्तां देवीं गौरवर्णां पद्मासनारूढां चतुर्भुजाम् ।**
**वरदाक्षसूत्रयुक्तदक्षिणकरां बीजपूरककुंभयुतवामहस्ताम् ।।**

अर्थ – नरदत्ता ही गौरवर्णाची, कमलावर बसलेली, चतुर्भुज, उजवा एक हात वरदमुद्रेत, व एका हातात अक्ष माला, डाव्या हातात मातुलिंग आणि कुंभ धारण करणारी आहे.

दिगंबरांच्या मते ही कृष्णसर्पावर बसलेली, तसेच ढोल, फल, खड्ग आणि वरद मुद्रा धारण करणारी आहे. हिचे पौराणिक शक्तीशी साम्य आहे. [ जै. इ. ]

## नरनारायण

विष्णूच्या चौवीस अवतारांपैकी जोड अवतार. नरसिंह अवताराच्या मानवी भागापासून नर व सिंहमुखापासून नारायण झाला असे कालिका पुराणात म्हटले आहे (२९). तेच दोघे पुढे चाक्षुष मन्वन्तरात धर्म व मूर्ती यांचे पुत्र झाले, असे भागवत पुराणात सांगितले आहे. भागवताने त्यांना ऋषी म्हटले आहे. जन्मल्यानंतर ते दोघे हिमालयातील बदरिकाश्रमात गेले आणि तप करू लागले. एक हजार वर्षे त्यांनी उग्र तप केले. तेव्हा इंद्र घाबरला आणि त्याने त्यांच्या तपात विघ्न आणण्यासाठी रंभादी अप्सरा त्यांच्याकडे पाठवल्या. त्यांना पाहून त्यांच्यापेक्षाही रूपाने सरस अशा अप्सरा निर्माण करण्याचे तपःसामर्थ्य आपल्या अंगी आहे, असे इंद्राला दाखवावे असे नारायणाने ठरवले. लगेच त्याने आपल्या मांडी-



नरनारायण शिल्प – देवगढ (इ. स. चे ५ वे शतक)

वर थाप मारली आणि त्या मांडीतून एक अत्यंत रूपवती स्त्री निर्माण झाली. उर्वशी नामक अप्सरा ती हीच होय. त्यानंतर इंद्राने पाठवलेल्या अप्सरांच्या सेवेसाठी नारायणाने तितक्याच म्हणजे सोळा हजार पन्नास अप्सरा निर्माण केल्या आणि उर्वशीला घेऊन स्वर्गात परत जाण्याविषयी त्याने त्या अप्सरांना सांगितले. तेव्हा त्या अप्सरांनी उलट नारायण मुनीलाच आपला स्वीकार करण्याविषयी प्रार्थना केली. त्यावर 'मी पुढच्या अवतारात तुमच्याशी विवाह करीन' असे नारायणाने त्यांना आश्वासन दिले. मग त्या सर्व अप्सरा स्वर्गलोकी परत गेल्या. हेच नरनारायण पुढे कृष्णार्जुनांच्या रूपाने अवतरले.

एक दिवस हिरण्यकशिपूचा पुत्र प्रल्हाद हा ससैन्य तीर्थयात्रा करीत असता नर-नारायणांच्या आश्रमाजवळ गेला. तिथे विविध प्रकारचे धनुष्य-बाण, भाले, इ. युद्धोपयोगी साहित्य पाहून त्याला त्या आश्रमातील मुनी हे शांत वृत्तीचे नसून दांभिक असावे, असे वाटले. त्याप्रमाणे त्याने नर-नारायणांना बोलूनही दाखविले. त्यावरून पुढे बोलाचाली सुरू झाली. तिचे रूपांतर युद्धात झाले. एक हजार दिव्य वर्षे ते घनघोर युद्ध चालले. पण कोणीही हार जाईना. तेव्हा विष्णूने प्रगट होऊन ते युद्ध थांबवले.

पुढच्या काळात या नर-नारायणांची उपासना सुरू झाली व कृष्णार्जुन हेही त्या रूपात पूजले जाऊ लागले. नर-नारायणांच्या मूर्ती कशा कराव्या, ते हेमाद्रीने चतुर्वर्ग – चिंतामणीतील पुढील श्लोकांत सांगितले आहे–

**दूर्वाश्यामो नरः कार्यो द्विभुजश्च महाबलः ।**
**नारायणश्चतुर्बाहुर्नीलोत्पलदलच्छविः ।।**
**तयोर्मध्ये तु बदरी कार्या फलविभूषणा ।**

अर्थ – दूर्वांप्रमाणे श्यामल वर्णाची, द्विभुज आणि बलाढ्य अशी नराची आकृती बनवावी. नारायण हा नील कमलाप्रमाणे कांती असलेला आणि चतुर्भुज करावा. त्यांच्यामध्ये फलयुक्त असे बोरीचे झाड उभारावे.

भागवतात नर-नारायणतत्त्वाचे विवेचन आले असून, त्यात नारायण हे अव्यक्त निर्गुण तत्त्व व नर हे व्यक्त सगुण रूप मानलेले आहे. नारायण आणि नर हे एकाच तत्त्वाचे दोन भाग आहेत, असे महाभारतात म्हटले आहे.

भागवतात नारायण शब्दाची जी व्याख्या केलेली आहे, तिला वैदिक साहित्यातही आधार मिळतो. सृष्टीच्या प्रारंभी सर्वत्र आप हे तत्त्व किंवा सलिल होते. त्यालाच तत्त्वदर्शी मुनींनी नारा असे म्हटले आहे. त्यात निवास करणाऱ्या भगवंतालाच सर्वव्यापक देव नारायण अशी संज्ञा दिली गेली. नर हा त्याचा सखा होय. नारायण किंवा पुरुष हा ब्रह्माचे आणि नर हा जीवाचे प्रतीक मानतात. पाहा – नारायण. [ प्रा. च. को.; दे. भा.; मा. पु. सां. अ.; वा. पु. स्ट.; म. सा. अ. ]

**नरनारीविद्वेषणयंत्र** पतिपत्नींमध्ये भांडण होऊन एखादी दुर्दैवी घटना घडून यावी, अशी इच्छा असल्यास सौभाग्यनाशक नरनारीविद्वेषण यंत्राचा प्रयोग करावा असे सांगितले आहे. त्यासाठी आठ कोठ्यांचा एक चौक गोरोचन व केशर यांच्या मिश्रणाने भूर्जपत्रावर बनवतात. नंतर त्या प्रत्येक कोठ्याचे वरचे व खालचे तोंड कंस काढून बंद करतात. त्या कोठ्यांच्या वरच्या अंगास 'ॐ अजिते स्वाहा' हा व खालच्या अंगास 'ॐ अपराजिते स्वाहा' हा मंत्र लिहितात. त्या सर्वांना चतुष्कोणाचे वेष्टण घालतात. नंतर उभ्या रेघांनी




नरनारीविद्वेषणयंत्र

पडलेल्या आठ कोठ्यांत प्रत्येकी एक एक अक्षर याप्रमाणे साध्यनामातील अक्षरे एकापुढे एक लिहितात. ही नामाक्षरे दोन वेळा लिहितात. कोठे कमी पडल्यास कोठ्या बाहेरही नामाक्षरे लिहितात. साध्य व्यक्ती स्त्री असेल, तर तिच्या नावापुढे दुर्भगा ही अक्षरे लिहितात. यंत्र तयार झाल्यावर नदीवर जाऊन तिच्या दोन्ही तीरांवरील माती आणतात. माती आणताना मौन धरतात. मग मातीची गणपतिप्रतिमा करून तिच्या मस्तकावर ते यंत्र ठेवतात व त्याची पूजा करतात. पूजा आटोपल्यावर त्या यंत्रासह गणेशमूर्तीला शरावसंपुटित करून संपुटावर 'अघोरेति' असे पद लिहून तो संपुट जमिनीत पुरून त्याची पूजा करतात. ज्या व्यक्तीच्या नावाने हे केले असेल, ती व्यक्ती तिच्या जोडीदाराच्या मनातून उतरते, अशी समजूत आहे. दांपत्याव्यतिरिक्त अन्यत्र त्याचा प्रयोग करीत नाहीत. हे यंत्र दुसऱ्याला दिले, तर विपरीत होते. [ यं. चिं. ]

**नरबली** एक प्राचीन बलिप्रथा. पाहा – नरमेध.

**नरमेध** मानवी संस्कृतीच्या इतिहासात महत्त्वपूर्ण स्थान पावलेला एक प्राचीनतम विधी. नर म्हणजे पुरुष आणि मेध म्हणजे बलिदान किंवा यज्ञ. ज्या यज्ञात अथवा विधीत पुरुष आपले बलिदान करतो, त्याला नरमेध अशी संज्ञा आहे. नरमेधाची प्रथा केवळ आर्यांच्या यज्ञसंस्थेशीच संबंधित नसून, तिचा आढळ वेदपूर्वकाळापासून जगभरच्या सर्व मानवसमूहांत होतो. नरमेध हा एक भयानक क्रौर्याचा विधी आहे, या समजुतीमुळे पुष्कळ अभ्यासक असे ठरविण्याचा प्रयत्न करतात, की नरमेधाची प्रथा ही केवळ असंस्कृत रानटी समाजातच रूढ होती, आर्य लोक त्या प्रथेच्या विरुद्ध होते आणि आर्यांनी केवळ त्या असंस्कृत लोकांना सामावून घेण्यासाठीच काही काळ अल्प प्रमाणात नरमेधाचा स्वीकार केला होता. परंतु हे मत पूर्वग्रहदूषित अशा अभिमानातूनच मांडले जाते. नरमेध हा बळी जाणाऱ्या व्यक्तींच्या स्वेच्छेचा, स्वयंसंकल्पाचा भाग असल्यामुळे त्यात क्रौर्याचा संबंधच येत नसे. जेव्हा व्यक्ती समूहकेंद्रित न राहता आत्मकेंद्रित बनू लागली, तेव्हा हा स्वयंसंकल्प दुर्मिळ होऊ लागला आणि मग नरमेधही मागे पडला. समूहासाठी बळी जाण्याचा स्वयंसंकल्प ढिलावल्यानंतर नरबलीला क्रौर्याचे स्वरूप येणे स्वाभाविकच होते.

ज्या यज्ञात पुरुषास बळी दिले जात असे, त्या यज्ञाला पुरुषमेध म्हणत. यजुर्वेदातील पुरुषमेधविषयक भागात व्रात्य, पुंश्चली व मागध हे बळी देण्यास योग्य होत, असे म्हटले आहे. याचा अर्थ उघड आहे, की ज्यांच्याविषयी आपल्याला आस्था किंवा प्रेम नाही, त्यांना बळी देण्याची वृत्ती या काळी निर्माण झालेली दिसते. स्वेच्छेने बळी जाणारी माणसे मिळेनाशी झाल्यावर नरमेधासाठी माणसे विकत घेण्याचा प्रकार चालू झालेला दिसतो. हरिश्चंद्राचा पुत्र रोहित याने आपल्याऐवजी बळी देण्यासाठी शुनःशेपाला शंभर गाईंच्या मोबदल्यात विकत घेतले होते. एक हजार गाई देऊन एक आत्रेय ब्राह्मण विकत घेतल्याचा उल्लेख सांख्यायन श्रौतसूत्रात आहे, तर आपस्तंबधर्मसूत्रात यज्ञासाठी नरशीर्ष विकत घेतल्याचा निर्देश आहे. विकत घेऊन अथवा सक्तीने मनुष्यबळी देणे अशक्य किंवा अनिष्ट वाटू लागल्यानंतरच पशुबली देण्याची प्रथा रूढ झालेली दिसते. एतरेय ब्राह्मणात (६.८) यज्ञातील हवीची स्थित्यंतरे पुढीलप्रमाणे वर्णिली आहेत–

**पुरुषं वै देवाः पशुमालभन्त तस्मादालब्धान्मेध उदक्रामत्‌। सोऽश्वं प्राविशत्तस्मादश्वो मेध्योऽभवत्‌ . . .**

भावार्थ– देवांना प्रथम पुरुष हाच यज्ञीय पशू म्हणून लाभला. परंतु त्याच्यातील मेध बाहेर पडून अश्वात प्रविष्ट झाला, म्हणून अश्व हा यज्ञीय पशू बनला.

पुढे मेध हा अश्वातून बाहेर पडून बैलाच्या शरीरात शिरला. याच रीतीने तो बैलातून मेंढ्यात शिरला, मेंढ्यातून भूमीत आणि अखेरीस भूमीतून तांदुळांत प्रविष्ट होऊन, तिथे

स्थिर झाला. त्यामुळे तांदूळ हेच हवी म्हणून योग्य ठरले.

यज्ञातील बळीची ही उत्क्रांती पाहता, स्वेच्छेने बळी जाणारी माणसे मिळेनाशी झाल्यामुळे नरमेध मागे पडला आणि नरमेधाचे प्रतीक म्हणून अश्व किंवा अज हा पशू अथवा पिठाचा हवी देवतेस दिला जाऊ लागला, असे ध्यानात येते.

**नरमेध हा आद्य यज्ञ–** भारतीय परंपरेत असे मानलेले आढळते, की यज्ञ हा देवांपासून किंवा देवांसाठी निर्माण झालेला नसून, उलट देवच यज्ञापासून निर्माण झालेले आहेत. विष्णूला मेधज अशी संज्ञा दिलेली आढळते. अनेक देव आणि दैवी व्यक्ती यज्ञसंभव असल्याच्या कथा आपल्या प्राचीन वाङ्मयात सर्वत्र पाहायला मिळतात. याचा अर्थ स्पष्ट आहे, की यज्ञ हा देवकल्पनेहूनही प्राचीन आहे. हा प्राचीन यज्ञ म्हणजे नरबलीचा विधी होय, हे सत्य मानवशास्त्रज्ञांनी जगभरच्या नरबलिप्रथेचा अभ्यास करून उजेडात आणले आहे. 'आपल्याला प्रिय असलेले काहीतरी हवन करून काहीतरी शक्ती अथवा इष्ट वस्तू प्राप्त करण्यासाठी कल्पिलेला विधी म्हणजे यज्ञ', अशी यज्ञाची व्याख्या स्वीकारल्यास यज्ञसंस्था ही केवळ आर्यांची संस्था होय, ही समजूतही टिकत नाही. जेव्हा मानव वर्गविरहित समूहजीवन जगत होता, अशा काळी म्हणजेच वेदांच्याही हजारो वर्षे पूर्वी, समूहाच्या भल्यासाठी समूहाचा प्रतिनिधी म्हणून कोणी तरी एक पुरुष अथवा एक मिथुन नियत काली बळी जात असे. हाच आद्य यज्ञ होय. पुढील व्यापक यज्ञसंस्था या प्राचीन नरमेधातूनच विकास पावलेली आहे.

बळी जाणारा पुरुष हा समूहमनाशी एकरूप झालेला असे, समूहासाठी बळी जाण्याच्या संकल्पात त्याला धन्यता वाटत असे आणि त्याचे विधिपूर्वक व समारंभपूर्वक घडणारे बलिदान त्याला समूहमानसात देवत्वाचे स्थान प्राप्त करून देत असे. कोणत्या तरी व्यक्तीला सक्तीने धरून बळी देणे, असा नरमेधाचा मूलार्थ नाही. बळी जाणारी व्यक्ती संपूर्णपणे स्वेच्छेने, लोककल्याणाच्या उदात्त भावनेने, समजून–उमजून प्रसन्नपणे बळी जात असे. नंतरच्या पशुयज्ञामध्येही, वेदीकडे चालविलेला पशू जर मागे सरला किंवा त्याच्या गळ्यातील दोरीला त्याच्या अनिच्छेमुळे ताण पडत आहे असे आढळले, तर त्या पशूला अमेध्य ठरवीत असत. ही वस्तुस्थिती ध्यानी घेतल्यास बळी जाणे हा सक्तीचा किंवा समूहाकडून घडणाऱ्या क्रौर्याचा विधी नसून, समूहमानसाशी तादात्म्य साधलेल्या व्यक्तीच्या स्वयंस्फूर्त त्यागाचा विधी होता, हे उघड होते. समूहासाठी स्वेच्छेने प्राणार्पण करण्यास पुढे येणाऱ्या व्यक्तीचे चित्रण आपणांस ऋग्वेदातील यमसूक्तात पाहायला मिळते. यमाने व त्याच्या बरोबर त्याच्या बहिणीने अर्थात यमीने मानवांच्या एकात्म सहजीवनासाठी आत्मबलिदान केले, मृत्यूला आपण होऊन कवटाळले आणि त्याचमुळे यम हा मृत्यूचा देव बनला.

**मेध्य पुरुष हाच राजा–** मानवजीवनाचे व्यवस्थापन करणारी आणि मानवी प्रगतीला गती देणारी राजसंस्था या आद्य यज्ञातून म्हणजेच नरमेधातून उगम पावली आहे. 'जनानां सङ्गमनाय' = लोकांच्या एकात्म सहजीवनासाठी किंवा लोककल्याणासाठी यज्ञवेदीवर बळी जाणारा पुरुषच राजा होय, हे सत्य नरमेधविषयक उल्लेख आणि जगभरच्या आदिवासी जमातींत रूढ असलेल्या नरमेधाचे स्वरूप पाहता स्पष्ट होते. हा राजा म्हणजे केवळ शासक नसे. बलिदानाच्या दृढ संकल्पामुळेच त्याला समूहाचे राजपद नियत कालपर्यंत लाभत असे. त्याने बलिदानाचा संकल्प केल्यावर त्याला राज्याभिषेक होत असे आणि मग बळी जाण्याच्या क्षणापर्यंत एक वर्ष अथवा चार वर्षे तो राज्यपदावर विराजमान होऊन राहत असे. समूहातील सर्व लोक त्याला जिवाभावाने सांभाळीत; त्याच्या रक्षणाची यंत्रणा उभारीत, त्याला सर्वांत उत्तम वस्तू अर्पण करीत, त्याच्या मनोरंजनासाठी झटत आणि त्याला सर्वाधिक आदराचा विषय बनवीत. या राजाच्या देहाचे रक्षण करणारे तेच आद्य क्षत्रिय होत, तसेच त्याच्याविषयी पूज्य भावातून उपचारांचे कर्मकांड उभारणारे तेच आद्य ब्राह्मण अथवा पुरोहित होत, असे काही मानवशास्त्रज्ञांचे म्हणणे आहे. अश्वमेधातील अश्वाच्या रक्षणासाठी क्षत्रिय कसे सज्ज असत, ते पुराणांवरून कळते. हा अश्व राजाचा प्रतिनिधी समजला जात असे. विशिष्ट कालावधीनंतर राजाला बळी देण्याच्या प्रथेचा अवशेष भारतात सतराव्या शतकापर्यंत अस्तित्वात असल्याचा पुरावा उपलब्ध आहे. केरळमधील कालिकतच्या झामोरिन राजघराण्यात ही प्रथा होती. झामोरिन राजा आपल्या बारा वर्षांच्या राजवटीनंतर सार्वजनिक ठिकाणी समारंभपूर्वक आपल्याच हाताने आपला शिरच्छेद करीत असे. ही प्रथा सतराव्या शतकापासून बंद पडली.

**नरमेध हा एक सृजनविधी–** वैदिक वाङ्मयातील नरमेधाची वर्णने पाहिली आणि कालपरवापर्यंत अनेक आदिवासी जमातींत रूढ असलेल्या नरबलीच्या विधीचे स्वरूप पाहिले, की नरमेध हा एक सृजनविधी असल्याचे स्पष्ट होते. प्राचीन मानवसमूह राजाच्या प्रजोत्पादनशक्तीशी कृषीच्या भरभराटीचा संबंध जोडीत असत. याच धारणेतून ते प्रतिवर्षी अथवा विवक्षित कालावधीनंतर राजाला विधिपूर्वक बळी देऊन, नव्या राजाला राज्याभिषेक करीत. या बळी जाण्याच्या विधीत बळी जाण्यापूर्वी राजा आणि महिषी यांची संभोगक्रिया आवश्यक मानली जाई, ती हा विधी एक सृजनविधी आहे, या धारणेमुळेच.

जेव्हा राजाऐवजी त्याचा प्रतिनिधी समजला जाणारा अन्य पुरुष बळी देण्याचा पर्याय रूढ झाला, तेव्हाही ही संभोगक्रिया अत्यावश्यक मानली गेली.

हा बळी जाणारा राजप्रतिनिधी एखाद्या वरिष्ठ कुळातील सुलक्षणी पुरुष असे. त्याची विधिपूर्वक निवड करून त्याला वर्षभर मनसोक्त विहार करण्यासाठी मोकळा सोडीत. मात्र या कालावधीत त्याला कामोपभोगाची परवानगी नसे. एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर त्याला विधिपूर्वक बळी देत असत. यज्ञमंडपात त्या पुरुषाचा गळा दाबून त्याचा बळी देत. गळा दाबून बळी दिल्यामुळे त्याचे लिंग प्रक्षुब्ध होत असे आणि तशा अवस्थेत राणी यज्ञमंडपातच बळीच्या मृत देहाशी संभोग करीत असे. अश्वमेध यज्ञातही अश्व हा राजाचा प्रतिनिधी समजून बळी दिला जात असल्यामुळेच महिषी-अश्व-संनिवेशाचा विधी यज्ञमंडपात साजरा होत असे.

अशा प्रकारे नरमेध हा एक सृजनविधी मानला गेल्यामुळे सृष्ट्युत्पत्तीही पुरुषमेधातून झाली, अशा प्रकारची कल्पना वेदवाङ्मयात प्रकट झालेली दिसते.

**मेध्य नर हा नारायणच** — आपल्या बलिदानाने कृषीची भरभराट करणारा, किंबहुना सर्व सृजनाचा आधार बनणारा मेध्य नर हा जसा सर्व समाजाचा प्रतिनिधी समजला जात असे, त्याचप्रमाणे तो परमेश्वराचाही प्रतिनिधी समजला जात असे. आदिपुरुष म्हणजे विश्वव्यापी परमेश्वर हाच मेध्य पशू असल्याची कल्पना पुरुषसूक्तात आली आहे, ती अशी—

**देवा यद्यज्ञं तन्वाना अबध्नन् पुरुषं पशुम् ।**

अर्थ— देवांनी जो यज्ञ केला, त्यात आदिपुरुषालाच मेध्य पशू म्हणून यज्ञस्तंभाला बांधले.

मेध्य नर हा नारायणस्वरूपी आहे आणि नरमेध हे नारायणाच्या उपासनेचे प्रधान अंग आहे, हा विचार शतपथ ब्राह्मणातही (१३.६.१.१) पुढीलप्रमाणे व्यक्त झाला आहे—

**पुरुषो ह नारायणोऽकामयत । (ता) अतितिष्ठेयं सर्वाणि भूतान्यहमेवेदं सर्वं स्यामिति स एतं पुरुषमेधं पञ्चरात्रं यज्ञक्रतुमपश्यत् तमाहरत् तेनायजत तेनेष्ट्वाऽत्यतिष्ठत् ।। सर्वाणि भूतानीदं सर्वं भवति ।**

अर्थ— पुरुषनारायणाने कामना केली, की आपण सर्व भूतांत श्रेष्ठ व्हावे, आपणच सर्व व्हावे. अशी कामना करून त्याने पंचरात्रव्यापी पुरुषमेधाची कल्पना आणि योजना केली. पंचरात्र यज्ञ करून तो सर्व भूतांत श्रेष्ठ झाला.

ऋग्वेदातील पुरुषसूक्ताचा द्रष्टा नारायण नामक ऋषी आहे. शतपथ ब्राह्मणातही पुरुषमेधातील मेध्य पुरुषाला पुरुषनारायण म्हणूनच निर्देशिले आहे. यावरून हे स्पष्ट होते, की मेध्य नर म्हणजे बळी जाणारा पुरुष हा आपल्या बलिदानाने म्हणजे आपल्या सर्वस्वार्पणाने नारायणस्वरूप पावतो, विराट पुरुष बनतो. 'नर करनी करे, तो नरका नारायण हो जायगा' या लोकप्रसिद्ध म्हणीचे हेही एक रहस्य मानायला हवे. पुरुषसूक्त आणि शतपथ ब्राह्मण यांत वर्णिलेले पुरुषमेधाचे स्वरूप हे भागवतधर्माचे मूळ मानले जाते ते याचमुळे. भागवताच्या पारायणापूर्वी पुरुषसूक्त म्हणण्याची प्रथा आहे, हे या संदर्भात ध्यानी घ्यायला हवे.

**वरुणाप्रीत्यर्थ नरबली**— वरुण देवतेला संतुष्ट करण्यासाठी नरबली देण्याची प्रथा अतिप्राचीन काळापासून चालत आलेली दिसते. ऐतरेय ब्राह्मण, सांख्यायन श्रौतसूत्र, महाकाव्ये आणि पुराणे यांतून कमी-अधिक विस्ताराने वर्णिलेली शुनःशेपाच्या बलिदानासंबंधीची कथा प्रस्तुत संदर्भात महत्त्वाची आहे. ती कथा अशी—

इक्ष्वाकू कुळातील हरिश्चंद्र राजाला पुत्र नव्हता. त्याने पुत्रप्राप्तीसाठी वरुणाची अशी प्रार्थना केली, की 'तू मला पुत्र दिलास तर तो पुत्र मी तुझ्यासाठी यज्ञात बळी देईन.' वरुणाने ते मानले आणि वरुणाच्या कृपेने हरिश्चंद्राला पुत्र झाला. त्याने त्या पुत्राचे नाव रोहित असे ठेवले. पुत्रजन्मानंतर लौकरच वरुणाने हरिश्चंद्राकडे पुत्राची मागणी केली; परंतु मोहवश बनलेल्या हरिश्चंद्राने नाना निमित्ते सांगून वरुणाला झुलवीत ठेवले. रोहित मोठा झाल्यावर हरिश्चंद्राने त्याला सर्व पूर्ववृत्त सांगितले. ते ऐकल्यावर रोहित भयाने अरण्यात निघून गेला. इकडे वरुणाच्या अवकृपेमुळे हरिश्चंद्राला जलोदराने ग्रासले. हे रोहिताला कळल्यावर तो अयोध्येकडे यायला निघाला. वाटेत त्याला अजीगर्त नामक एक दरिद्री ब्राह्मण भेटला. त्याच्या बरोबर त्याचा परिवारही होता. रोहिताने त्या ब्राह्मणाच्या दारिद्र्याचा फायदा घेऊन त्याचा मधला मुलगा शुनःशेप याला शंभर गाईंच्या मोबदल्यात विकत घेतले. आपल्याऐवजी शुनःशेपाचा बळी देऊन वरुणाचा रोष दूर करायचा, अशी रोहिताची कल्पना होती. परंतु प्रत्यक्ष यज्ञात विश्वामित्राने वरुणाला मंत्रांनी प्रभावित करून शुनःशेपाला सोडविले.

या कथेतील बळी जाणारा पुरुष वाचला असला, तरी अपत्यवृद्धीसाठी अथवा निपुत्रिकत्वाचा कलंक धुऊन टाकण्यासाठी वरुणाकडे पुत्र मागायचा आणि तोच पुत्र पुढे वरुणाला बळी द्यायचा, या प्रथेचा पुरावा म्हणून ही कथा महत्त्वाची आहे. आपले पहिले मूल गंगेला अर्पण केले, की गंगामाई आपल्याला पुढे भरपूर अपत्यसुख देईल, या कल्पनेने बंगालमधील स्त्रिया गंगासागरसंगमात आपले पहिले मूल बुडवीत असत. ही प्रथा गेल्या शतकापर्यंत रूढ होती. नव्या विहिरीला अथवा

तळ्याला पाणी लागावे म्हणून मनुष्य बळी देण्याची प्रथा एके काळी सार्वत्रिक असावी, असे अनेक वाङ्मयीन व ऐतिहासिक उल्लेखांवरून दिसते. महाराष्ट्रातील स्त्रियांत प्रचलित असलेली शिळासप्तमीची लौकिक व्रतकथा या प्रथेची द्योतक आहे.

जल हे जीवन आहे, जलात. क्रियाशील देवत्व आहे, अशी मानवाची प्राचीन काळापासूनची श्रद्धा असल्यामुळे तो जल-देवतांना संतुष्ट करण्यासाठी नरबली आवश्यक असल्याचे मानीत आला आहे. कित्येक जलाशयांतील अथवा जलप्रवाहांतील जलदेवता प्रतिवर्षी सक्तीने बळी घेतात, अशीही समजूत अनेक ठिकाणी आजही दिसून येते. विशिष्ट जलाशयांत अथवा जलप्रवाहांत बुडून मरण्याचे अपघात सातत्याने अनेकवार घडत राहिले, की त्या जलाशयांतील जलदेवताच बळी घेत आहेत, अशी समजूत रूढ होते. मोक्षलाभासाठी जलसमाधी घेण्याचे, तसेच त्रिवेणीसंगमासारख्या पवित्र जलराशीत शरीर झोकून देण्याचे प्रकारही जलपावित्र्याच्या भावनेशी संबंधित आहेत.

**शक्त्युपासनेतील नरबली**– तंत्रसाधना ही आदिम सृजन-विधीतूनच विकास पावलेली असल्यामुळे तिच्यामध्ये, विशेषतः शाक्त तांत्रिक साधनेमध्ये शक्तीला नरबलीने संतुष्ट करण्याचे विशेष महत्त्व मानले गेले आहे. कालिका पुराणात देवीसाठी द्यायच्या नरबलीचे तपशीलवार वर्णन आढळते. त्यात देवीला नरबली देणारा उपासक देवीची पूजा झाल्यानंतर बळीला उद्देशून म्हणतो–

"हे मानवा, माझ्या सुदैवाने तू मला बळी म्हणून प्राप्त झाला आहेस, म्हणून मी तुला नमस्कार करतो. तू चंडीला संतुष्ट करून बळी देणाऱ्याची सर्व संकटे दूर करतोस, म्हणून मी तुला अनेकदा नमस्कार करतो."

देवीला नरबली देण्यात हत्येचे पाप नसून, उलट पुण्यच आहे, या भावनेने उपासक खड्ग हाती घेतो आणि ते खड्ग म्हणजे बळीचे रक्त प्राशन करणारी चंडिकेची जिव्हाच आहे, अशा श्रद्धेने बळीच्या मानेवर खड्गाचा आघात करतो.

या सर्व प्रकारात भयानकता असली, तरी बळी जाणाऱ्या व्यक्तीविषयीच्या पूज्यभावाचे अवशेष कर्मकांडाच्या स्वरूपात टिकलेले दिसतात. भवभूतीच्या मालतीमाधव नाटकाची नायिका मालती हिला अघोरघंट व कपालकुंडला हे शक्त्युपासक चामुंडे-पुढे बळी देण्यासाठी पळवून नेतात, असा प्रसंग त्या नाटकात वर्णिलेला आहे.

तंत्रग्रंथात नरबलीचे उल्लेख वारंवार आढळतात. पूर्व आणि ईशान्य भारतात काली व कामाख्या या देवींना नरबली देत असत. तंजाऊर येथील कालीमंदिरात दर शुक्रवारी नरबली देण्याची प्रथा ब्रिटिश अंमल सुरू होईपर्यंत चालू होती. वस्तरच्या राजाने दंतेश्वरी देवीला एकाच वेळी पंचविसाहून अधिक मनुष्यबळी दिल्याचे उदाहरण नोंदले गेले आहे. जैंतिया परगण्यात बळी दिलेल्या व्यक्तीचे शिर सोन्याच्या ताटातून देवीला अर्पण करीत आणि बळीच्या रक्तात भात शिजवून तो प्रसाद म्हणून भक्षण करीत. साताऱचा राजा प्रतापगडावर देवीच्या दर्शनाला जात असे, त्या वेळी तेथील पुजारी देवीपुढे एका वृद्धेचा बळी देत असत. अशी उदाहरणे आपल्या इतिहासात शेकड्यांनी उपलब्ध होण्याजोगी आहेत.

**नरबलीचे आणखी काही प्रकार**– साथीच्या रोगांच्या निवारणासाठी, भूतबाधा दूर करण्यासाठी आणि गुप्तधनाच्या प्राप्तीसाठी नरबली देण्याचे प्रकार पूर्वी घडत असत. गुप्त धनाचे रक्षण करणाऱ्या भुतांना जर ते धन एखाद्याला देण्याची इच्छा निर्माण झाली, तर ती भुते त्या व्यक्तीला सांगतात, की 'मला तुझा मुलगा किंवा नातू किंवा अन्य कोणी बळी दिल्यास हे धन तुला मिळेल.' जर त्या व्यक्तीने त्या भुतांच्या म्हणण्याप्रमाणे बळी दिला, तर तिला ते गुप्त धन लाभते, अशी समजूत आजही खेड्यापाड्यांत आढळते. किल्ला, गढी, राज-प्रासाद, धरण अथवा यांसारखीच एखादी वास्तू बांधताना त्या वास्तूला स्थैर्य आणि संरक्षण सतत लाभावे म्हणून मनुष्य बळी देत असत. पुरंदर किल्ल्याच्या बांधकामाच्या वेळी असा एक बळी दिल्याची लोककथा तिथे ऐकायला मिळते. आदिवासी जमातींत कालपरवापर्यंत सर्रास नरबली रूढ होता आणि आजही कुठे कुठे त्याचे, अत्यल्प प्रमाणात प्रचलन आढळून येते.

खोंड नामक आदिवासींमध्ये नरबलीच्या विधीला मेरिया असे म्हणत असत. ते आपल्या तारी पेन्नू देवतेपुढे म्हणजे भूमि-देवीपुढे धनधान्याच्या विपुलतेसाठी बळी देत असत. युद्धात विजय मिळविणे, निसर्गाचा कोप टाळणे, रोगराईचे निवारण करणे, इ. आणखीही काही हेतू मेरिया विधीमध्ये असत. खोंड लोक या विधीसाठी मुले विकत घेत असत. दारिद्र्याने गांज-लेले अनेक खोंड आपली मुले अशा बलिदानासाठी विकायला तयार होत. काही लोक आपली मुले बळी देण्यासाठी स्वखु-शीने देवीला वाहत असत. ज्यांची निवड किंवा खरेदी बलि-दानासाठी केलेली असे, अशा मुलांना आदराने वागवीत आणि विशिष्ट मुदतीपर्यंत त्यांचे उत्तम प्रकारे पोषण करीत. बलि-दानाचा समारंभ सामान्यतः पेरणीचा हंगाम आटोपल्यावर होई. समारंभाच्या आदल्या दिवशी बळीला शृंगारून वाजत-गाजत देवस्थानाकडे नेत. तिथे त्याला खांबाला बांधून, त्याच्या अंगाला तेलतूप लावीत आणि त्याच्यावर गुलाल व फुले उध-ळीत. त्या सबंध दिवसभर अनेक लोक येऊन त्याचे दर्शन घेऊन जात. कित्येक भक्त बळीच्या खांबाभोवती फेर धरून नाचत

आणि देवीची अशी प्रार्थना करीत, की 'हे देवी, आम्ही तुला हा बळी अर्पण करीत आहो. तू आम्हाला आरोग्य दे आणि भरपूर पीकपाणी दे.' हा जल्लोस दुसऱ्या दिवशी दुपारपर्यंत चाले. दुपारी बळीला सोडवून त्याच्या अंगाला पुनः तेलतूप लावीत, गुलाल फाशीत आणि त्याच्या गळचात फुलांच्या माळा घालून गावातून त्याची मिरवणूक काढीत. ही मिरवणूक चालू असताना बळीजवळ अनेक लोक गर्दी करीत आणि त्याचा एखादा केस, त्याच्या गळचातील फुलांच्या माळांतील एखादी पाकळी अथवा त्याच्या अंगाला फासलेल्या गुलालाचा काही अंश मिळवण्यासाठी धडपडत. बळीशी संबंध आलेल्या या वस्तू शुभ समजल्या जात.

मिरवणूक संपल्यानंतर सर्व लोक बळीला घेऊन देवीच्या स्थानापुढे जमत. नंतर पुजारी कुऱ्हाडीने बळीला लहानशी जखम करी आणि मग त्याला लाकडी हत्तीच्या सोंडेला बांधून, तो हत्ती गरगरा फिरवून ठार करीत. नंतर सर्व लोक बळीच्या देहावर तुटून पडत आणि डोके व आतडी सोडून बाकीच्या भागांतील मांस लुटून नेत. बळीचे मांस गावोगावी नेऊन स्थानिक देवतांना अर्पण करणे आणि आपापल्या जमिनीत त्याचा काही अंश पुरणे हा मांस लुटण्यातील हेतू असे.

बलिदानाच्या दुसऱ्या दिवशी बळीचे शिर, आतडी आणि इतर अवशेष चितेत जाळून टाकीत आणि त्याची रक्षा शेतात विखरून देत. रक्षेचा काही अंश घराघरांतून जपून ठेवीत आणि काही अंश बीबियाण्याला कीड लागू नये म्हणून त्यात घालून ठेवीत. खोंड जमातीतील बलिदानाचा हा विधी नरबलीच्या अतिप्राचीन स्वरूपाची स्पष्ट कल्पना देणारा आहे.

खोंडांप्रमाणेच नागा आणि पत्कोई टेकडयांमध्ये राहणाऱ्या मोंगोलॉइड वन्य टोळयांतही याच हेतूने आणि याच पद्धतीने नरबळीचा विधी साजरा होत असे. भूमिज लोक आपल्या ठकुराणीमाईपुढे पळवून आणलेल्या मुलांना बळी देत. बंजारा जमातीचे लोक जेव्हा एका ठिकाणाहून दुसरीकडे जायला निघत, तेव्हा एका लहान मुलाला खांद्यापर्यंत जमिनीत पुरून त्याच्यावरून आपल्या बैलगाडचा नेत. यातील हेतू असा, की आपले स्थानांतर शुभदायी व्हावे.

**संस्कृतिविकासात नरमेधाचे स्थान—** तैत्तिरीय ब्राह्मणात अश्वमेधाच्या संदर्भात आलेला पुढील मंत्र नरमेधाची सांस्कृतिक बैठक स्पष्ट करणारा आहे (तै. ब्रा. ३.९.८).

**प्रजापतिः प्रजाः सृष्ट्वा प्रेम्णाऽनुप्राविशत् । ताभ्यः पुनः सम्भवितुं नाशक्नोत् । सोऽब्रवीत् । ऋध्नवदित्सः । यो मेतः पुनः सम्भरदिति । तं देवा अश्वमेधेनैव समभरन् । ततो वै त आर्ध्नुवन् । योऽश्वमेधेन यजते । प्रजापतिमेव सम्भरत्यृध्नोति । पुरुषमालभते ॥**

**अर्थ—** प्रजापतीने प्रजा निर्माण केल्यावर त्यांच्यामध्ये तो प्रेमामुळे विलीन झाला. पण नंतर त्याला बाहेर येऊन आपले भाग एकवटणे (संभरण करणे) अशक्य झाले. तो म्हणाला, 'यातून मला बाहेर आणून मला माझी पूर्वस्थिती व एकता जो प्राप्त करून येईल तो समृद्धी पावेल.' तेव्हा देवांनी अश्वमेध केला व त्यायोगे प्रजापतीचे संभरण केले. त्यामुळे देवही समृद्ध झाले.

या मंत्राच्या आनुषंगाने श्री. दि. के. बेडेकर यांनी नरमेधाचे सांस्कृतिक महत्त्व पुढीलप्रमाणे विशद केले आहे—

वरील मंत्रामध्ये यज्ञाने सावणाऱ्या संभरणाचा अर्थ स्पष्ट होतो. शक्ती किंवा तेज आपोआप विखरत जाते, क्षीण होते आणि पुनः काही प्रयत्न करून ते उजळावे व समृद्ध करावे लागते. हा क्रम चंद्राच्या वृद्धिऱ्हासात, वनस्पतींच्या व पशूंच्या जीवनात, ऋतुचक्रात, किंबहुना सर्व वस्तुजातात दिसतो. विश्वामध्ये चक्राकार गती, वृद्धी व ऱ्हास, जन्म-स्थिति—नाश यांचे साम्राज्य अबाधित चालू आहे. प्राचीन मानवाचे मन या विश्वक्रमाशी एकरूप होते. त्याचे जीवितच या एकरूपतेवर आधारलेले होते. त्याचे समूहजीवन अंतर्गत दृढतेच्या आधारावर कमी किंवा जास्त समृद्ध होत होते. ही अंतर्गत दृढता म्हणजे माणसांना एकमेकांविषयी व समूहाविषयी वाटणारी निष्ठा कमीजास्त होण्यावर प्राचीन समूहांचे व प्रत्येक व्यक्तीचे सर्वस्व अवलंबून होते.

या दृढतेसाठी, 'जनानां सङ्गमनाय' देह अर्पण करणारा यम यज्ञपुरुष झाला व मर्त्य मानवकोटीतून देवकोटीला पोचला. मृत्यूला स्वेच्छेने पत्करणारा यम मृत्यूला जिंकून अमर होतो, याचे कारण त्याने आपल्या बलिदानाने मानवांना एकत्र आणून दृढतम स्नेहबंधनाने प्रबळ केले होते; मानवसमूहाला संजीवन व अमरत्व दिले होते.

समूहाच्या अंतर्गत दृढतेला समृद्ध व तेजस्वी करण्यासाठी एका हुतात्म्याला आपला प्राण द्यावा लागतो, ही गोष्ट आजच्या जीवनातही आपल्याला अनुभवास येते; किंबहुना मानवसमाजाची प्रगती अशा हुतात्म्यांच्या बलिदानाने व त्यांना समाजाने अर्पण केलेल्या श्रद्धेनेच झालेली दिसत आहे. आज हे बलिदान राष्ट्रासाठी किंवा आंतरराष्ट्रीय मानवधर्मासाठी व्हावे लागते. प्राचीनतम मानवसमूहातही या बलिदानाची गरज होतीच. या नित्याच्या व्यवहाराला प्राचीन मानवाने एका विधीचे रूप दिले, हाच यज्ञविधीचा म्हणजे नरमेधाचा अर्थ होय.

या भाष्यावरून नरमेधाच्या प्रथेतील उदात्त आशय आणि

संस्कृतिविकासाच्या प्रक्रियेतील त्याचे अनन्यसाधारण स्थान स्पष्ट होते. यज्ञसंस्थेला व राजसंस्थेला जन्म देणाऱ्या आणि परम त्यागातून परम गती प्राप्त करण्याची महान प्रेरणा मानवाला देणाऱ्या नरमेधाचे महत्त्व विसरता येणार नाही. [ एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को.; रि. इं.; श्री. दि. के. बेडेकर, अँ. भां. ओ. रि. इं.; १९५०; नवभारत, फेब्रु. १९५५; नवभारत, नोव्हें. १९६३; श्री. सदाशिव आठवले, नवभारत, फेब्रु.–मार्च १९६०; श्री. अ. ज. करंदीकर महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ऑक्टो. –डिसें. १९६५ ]

**नरविद्यावारू** एक भटकी जात. नरविद्यावारू याचा अर्थ लोकांची प्रशंसा किंवा पसंती मिळवणारे लोक असा आहे. द. भारतात या लोकांचा आढळ होतो. हे तिकडचे डोंवारी होत. लोकांपुढे कसरतीचे प्रकार करून दाखवणे हा यांचा मुख्य व्यवसाय आहे. तीन किंवा चार लाकडी अथवा दगडी चेंडू घेऊन ते एकामागून एक असे वर फेकायचे आणि ते खांदे, छाती, अशा शरीराच्या वेगवेगळ्या अवयवांवर झेलायचे हा यांचा हातखंडा खेळ होय. यांच्यांत विप्रविनोदी नावाची एक पोटजात आहे. हे लोक फक्त ब्राह्मणांच्या घरी किंवा वस्तीत खेळ करून दाखवतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**नरसिंह** विष्णूच्या दशावतारांपैकी चौथा अवतार. वैशाख शुद्ध चतुर्दशीच्या दिवशी हिरण्यकशिपूच्या नाशासाठी देवांच्या विनंतीवरून विष्णूने हा अवतार घेतला. या अवताराचे रूप अग्नी पुराणात पुढीलप्रमाणे वर्णिले आहे –

**सिंहस्य कृत्वा वदनं मुरारिः सदा करालं च सुरक्तनेत्रम् ।**
**अर्धं वपुर्वै मनुजस्य कृत्वा ययौ सभां दैत्यपतेः पुरस्तात् ।।**

अर्थ – विष्णूने सिंहाचे विक्राळ मुख धारण केले. त्याचे डोळे लालभडक होते. त्याचे अर्धे शरीर मानवाचे होते. असे रूप घेऊन तो दैत्यराजाच्या दरबारात गेला.

विष्णूला हा अवतार का घ्यावा लागला, याबद्दल भागवत पुराणात एक कथा दिलेली आहे, ती अशी —

हिरण्यकशिपू नामक दैत्याने हजारो वर्षे तप करून ब्रह्मदेवाला संतुष्ट केले व त्याच्याकडून अमरत्व मागून घेतले. हा वर मिळाल्यावरहिरण्यकशिपू उन्मत्त झाला आणि देव, ऋषी व ब्राह्मण यांना त्रास देऊ लागला. त्याचा पुत्र प्रल्हाद हा विष्णूचा भक्त होता. म्हणून तो त्या पुत्राचाही छळ करू लागला. एक दिवस हिरण्यकशिपूने प्रल्हादाला विचारले, की 'तुझा विष्णू या दगडी खांबात आहे का ?' त्यावर प्रल्हादाने 'होय' म्हटले. त्यासरशी हिरण्यकशिपूने त्या खांबाला लाथ मारली. तत्क्षणी खांबातून विष्णू नरसिंहरूपाने प्रकट झाला आणि त्याने हिरण्यकशिपूला आपल्या तीक्ष्ण नखदंष्ट्रांनी फाडून मारून टाकले. ती वेळ सूर्यास्ताची होती.



नरसिंहावतार

हिरण्यकशिपूच्या वधाने नरसिंह बेभान झाला, तेव्हा शिवाने शरभाचा अवतार घेऊन त्याचा वध केला, असे लिंग पुराणात सांगितले आहे (१. ९५); तर हिरण्यकशिपूचा वध करून नरसिंह दक्षिणेत गौतमीच्या (गोदावरीच्या) उत्तर तीरावर आला आणि तिथे त्याने दंडकाधिपती अंबर्याचा वध केला, असे ब्रह्म पुराणात म्हटले आहे.

नृसिंहतापिनी नामक एक उपनिषद व नृसिंह पुराण नावाचे एक उपपुराणही नरसिंहाशी संबंधित आहे.

काही विद्वानांनी कथावस्तूच्या साम्यामुळे नरसिंहकथेचा संबंध वैदिक साहित्यातील इंद्र-नमुची कथेशी जोडला आहे. इंद्राने पाण्यावरील फेसाने नमुचीचे शिर छिन्नभिन्न केले, असा उल्लेख ऋग्वेदात (८. १४. १३) व शुक्ल यजुर्वेदात (१९. ७१) आहे. शतपथ ब्राह्मणात हीच कथा अधिक विस्ताराने आली आहे. तिथे नमुची इंद्राजवळ वर मागतो, की 'तू आपल्या वज्राने शुष्कही नाही, आर्द्रही नाही अशा ठिकाणी व दिवसही नाही किंवा रात्रही नाही, अशा वेळी माझे शिर उडवावेस.' भागवत पुराणातला हिरण्यकशिपूही वर मागतो, की ब्रह्मदेवाने निर्मित अशा मनुष्य, पशू, प्राणी, अप्राणी, देवता, दैत्य व नाग यांच्याकडून आपल्याला मृत्यू नसावा; त्याचप्रमाणे, आत किंवा बाहेर, दिवसा किंवा रात्री, पृथ्वीवर किंवा आकाशात अस्त्राने किंवा शस्त्राने आपल्याला मृत्यू येऊ नये.'

महादेवाने तसा वर त्याला दिला व त्या वराची मर्यादा पाळण्यासाठीच विष्णूने ना पशू, ना मनुष्य असे रूप धारण करून, ना दिवस, ना रात्र अशा वेळी म्हणजे संध्याकाळी, ना आत, ना बाहेर अशा स्थळी म्हणजे उंबऱ्यावर आणि ना अस्त्र, ना शस्त्र अशा साधनाने म्हणजे आपल्या नखांनी हिरण्यकशिपूला ठार मारले.

तैत्तिरीय आरण्यकात (१०. १) या नरसिंह अवताराविषयी उल्लेख असून, नृसिंह गायत्री नावाचा मंत्रही दिलेला आहे. तो मंत्र असा —

**वज्रनखाय विद्महे तीक्ष्णदंष्ट्राय धीमहि ।**
**तन्नो नारसिंहः प्रचोदयात् ।।**

या गायत्रीत उल्लेखिलेल्या वज्रनखांचा व तीक्ष्ण दंष्ट्रांचा भागवत पुराणाने आठव्या अध्यायातील नरसिंहवर्णनात उपयोग केलेला आहे.

कबीर, रैदास, दादू, नामदेव, तुकाराम, इ. मध्यकालीन हिंदी व मराठी संतकवींनीही नरसिंहावताराचा आपल्या काव्यात निर्देश केला आहे. गढवाल विभागात नाथपंथी साधूंच्या प्रभावाने नरसिंहाच्या रूपात बदल झालेला दिसतो. एका गढवाली गीतात त्याच्या हातात चिमटा व झोळी दिली असून, त्याला गोरखनाथाचा शिष्य बनवले आहे.

नरसिंहाचे मूर्तिध्यान कसे असावे, ते हेमाद्रीने पुढील श्लोकांत सांगितले आहे —

**पीनस्कन्धकटिग्रीवः कृशमध्यः कृशोदरः ।**
**सिंहाननो नृदेहश्च नीलवासाः प्रभान्वितः ।।**
**आलीढस्थानसंस्थानः सर्वाभरणभूषितः ।**
**ज्वालामालाकुलमुखो ज्वालाकेसरमण्डलः ।।**
**हिरण्यकशिपोर्वक्षःपाटी यन्नखरैः खरैः ।**
**नीलोत्पलाभः कर्तव्यो देवजानुगतस्तथा ।।**
**हिरण्यकशिपुर्दैत्यस्तमज्ञानं विदुर्बुधाः ।**

अर्थ – खांदे, कमरेचा खालचा भाग व मान पुष्ट असलेला, कमर व उदर कृश असलेला, सिंहाचे मुख व मानवी धड असलेला, नीलवस्त्र परिधान केलेला, तेजस्वी, आलीढ अवस्थेत बसलेला, सर्व अलंकारांनी युक्त, ज्याच्या मुखाभोवती ज्वालामाला आहेत व ज्याची आयाळही ज्वालांचीच आहे असा आणि ज्याने तीक्ष्ण नखांनी हिरण्यकशिपूचे वक्षःस्थल विदारण केले आहे असा नरसिंह करावा. त्याचप्रमाणे नीलकमलाप्रमाणे कांती असलेला आणि नरसिंहाच्या मांडीवर असलेला असा हिरण्यकशिपू दैत्य दाखवावा. तत्त्वज्ञानी लोक हिरण्यकशिपूला अज्ञान असे समजतात.

भारतात अनेक ठिकाणी नरसिंहाच्या मूर्ती आढळतात. या मूर्तींत सामान्य, कैवलवैन, गिरिजवैन, यानकवैन, स्थौणवन व विदरणशिर असे मूर्तिशास्त्रातले अनेक तांत्रिक पोटभेद आहेत.



योगनरसिंहमूर्ती – चितळपुडी

हिरण्यकशिपूचे पोट फाडणाऱ्या नरसिंहमूर्ती पुष्कळ आहेत. यानक नरसिंह वेरूळच्या लेण्यांत आढळतो. हा अष्टभुज असून, आपल्या हातांतली आयुधे उगारून व धावत जाऊन हिरण्यकशिपूला पकडीत आहे, असे दाखवलेले आहे. मध्यभारतातील मनोरा येथील नरसिंह चतुर्भुज असून, तो खालच्या डाव्या हाताने हिरण्यकशिपूचे पोट फाडीत आहे, त्याच्या वरच्या डाव्या हातात चक्र आहे व उजव्या पायाखाली आणखी एक राक्षस तुडवला गेला आहे. पेड्डमुडियम येथील शिलापट्टांत असलेला नरसिंह उभा, द्विभुज, तसेच जानवे, कंठा, मुकुट, मणिबंध, इ. अलंकार ल्यालेला व धोतर नेसलेला आहे. या शिल्पात हिरण्यकशिपू नाही. हळेबीड येथील नरसिंह हा सिंहासनावर बसलेला, पायांच्या नडग्या व कंबर योगपट्टाने आवळलेला, चतुर्भुज आणि लक्ष्मी व गरुड यांच्यासह आहे. चितळपुडी येथील योगनरसिंहमूर्ती अत्यंत सुरेख आहे. त्या शिल्पात नरसिंह योगासनात बसलेला दिसतो. सामान्य नरसिंहमूर्ती विक्रमपूर येथे आढळते. हा नरसिंह विश्वपद्मावर डाव्या पायाने राक्षसाला तुडवीत असून, खालच्या दोन हातांनी मांडीवर घेतलेल्या हिरण्यकशिपूचे पोट फाडीत आहे. वरच्या दोन

हातांनी त्यान हिरण्यकशिपूचे पाय व शेंडी धरली आहे. त्याही वरच्या दोन हातांपैकी एका हातात जंबिया आहे व दुसऱ्याची तर्जनीमुद्रा आहे. या मूर्तीला सिंहासारखी आयाळ आहे.

नरसिंहरूप हे वास्तविक विष्णूचे उग्र रूप आहे; पण वैष्णव कलाकार मात्र नरसिंह विष्णूचे रूप बहुधा प्रेमळ व सौम्य दर्शवितात. गुप्तकालातील भाजलेल्या मातीच्या मुद्रांवर असे रूप आढळते. बदामी येथील शिल्पातही तसेच रूप दिसते. देवगढ येथील गुप्तकालीन मंदिराच्या एका कोनाड्यात नरसिंहाची मूर्ती दिसते, तिची मुद्राही शांत आहे. या मूर्तीला चार हात असून, तीन हातांत चक्र, गदा व शंख ही आयुधे आहेत आणि पुढचा डावा हात डाव्या गुडघ्यावर टेकलेला आहे.



लक्ष्मी – नरसिंहमूर्ती – अहोबिलम

मद्रास येथील लक्ष्मीनृसिंहाच्या ब्राँझ प्रतिमा या क्रूर अवताराचे शांत रूप दर्शवितात. अहोबिलम येथेही एक लक्ष्मीनरसिंहमूर्ती असून, तिथे नरसिंहाच्या डाव्या मांडीवर लक्ष्मी बसलेली आहे.

लक्ष्मी–नरसिंह हे काही घराण्यांचे कुलदैवत आहे. नरसिंह हे विजयनगरच्या राजवंशाचे कुलदैवत होते. [श. क.; प्रा. च. को.; पु. इं.; म. सा. अ.; ग. लो.; मू. वि.; डे. हिं. इ.]

**नरसिंह चतुर्दशी** एक काम्य व्रत. वैशाख शुक्ल चतुर्दशीला हे नाव आहे. या दिवशी सायंकाळी सूर्यास्तसमयी प्रल्हादावर अनुग्रह करण्यासाठी नरसिंहाचा अवतार झाला, म्हणून त्या तिथीस नरसिंहजयंतीचे व्रत करतात. त्या दिवशी स्वाती नक्षत्र असल्यास तो योग विशेष शुभ मानतात.

पंचामृतस्नान, पूजा व उपवास ही या व्रताची मुख्य अंगे आहेत. या व्रताचा विधी असा– दुपारी जलाशयावर जाऊन अंगाला मृत्तिका, गोमय, आवळे व तीळ लावून स्नान करावे. सायंकाळी सारवलेल्या जमिनीवर अष्टदळ काढून त्यावर कलश स्थापावा. कलशावर लक्ष्मी-नृसिंहांची मूर्ती स्थापून तिची पूजा करावी व पुढील मंत्रांनी प्रार्थना करावी–

**नृसिंह देवदेवेश तव जन्मदिने शुभे।**
**उपवासं करिष्यामि सर्वभोगविवर्जितम् ॥**
**श्रीनृसिंह महोग्रस्त्वं दयां कृत्वा ममोपरि।**
**अद्याहं प्रविशास्यामि व्रतं निर्विघ्नतां नय ॥**

अर्थ– हे देवाधिदेवा नृसिंहा, मी तुझ्या जन्मदिवशी सर्व भोगरहित असा उपवास करीत आहे. हे नृसिंहा, तू महान उग्र आहेस. तेव्हा मजवर दया करून मी आज आचरीत असलेले व्रत निर्विघ्न समाप्तीला ने.

त्या रात्री जागरण व कथाश्रवण करावे व शक्य असल्यास सोन्याचा सिंह करून त्याचे दान द्यावे, असे सांगितले आहे. फल– इच्छापूर्ती व पापनाश. [हि. ध.; भा. व्र.; सा. इं. फे.]

**नरसिंह त्रयोदशी** एक काम्य व्रत. गुरुवारी येणाऱ्या कोणत्याही महिन्यातील त्रयोदशीला हे नाव आहे. या दिवशी उपवास करतात आणि स्नान करून अपराह्णकाळी नरसिंहाची षोडशोपचार पूजा करतात. फल– पापनाश, सामर्थ्य व राजवैभव यांची प्राप्ती आणि अंती विष्णुलोकी गौरव. [हि. ध.]

**नरसिंह द्वादशी** एक काम्य व्रत. फाल्गुन कृष्ण द्वादशीला हे नाव आहे. या दिवशी उपवास करून सोन्याची, लाकडाची अथवा बांबूची नरसिंहाची मूर्ती करावी, तिची कलशावर स्थापना व पूजा करावी आणि पूजा झाल्यावर ती मूर्ती ब्राह्मणाला दान द्यावी, असे सांगितले आहे. फल– पापनाश व ब्रह्मलोकाची प्राप्ती. [हि. ध.]

**नरसिंह पुराण** एक उपपुराण. याला नृसिंह किंवा नारसिंह पुराण असेही म्हणतात. वैष्णव उपपुराणांत हे प्राचीन आणि महत्त्वाचे पुराण आहे. यात पुढील विषय आले आहेत– नरसिंहाला परब्रह्म मानून त्याची स्तुती; ब्रह्मांडाची उत्पत्ती; कालविभाग; ब्रह्मा, रुद्र, दक्ष व मनू यांची

उत्पत्ती; मरीची, अत्री, इ. दहा ऋषींचें जन्म; दक्षाची प्रजा; संसारवृक्षाचे वर्णन; ज्ञानस्तुती; विष्णुपूजा; 'ॐ नमो नारायणाय' या मंत्राचा जप; सूर्य-सोमवंशावली; त्या वंशातील–विशेषतः नरसिंहपूजक राजांचा इतिहास; लक्ष–कोटी होम; विष्णुमूर्तिप्रतिष्ठा; वर्णाश्रमांची कर्तव्ये; वैष्णव तीर्थक्षेत्रे; व्रते, दाने व सदाचार आणि दुराचार.

वरील विषयांच्या अनुषंगाने या पुराणात पुढील कथा सांगितल्या आहेत–

मित्र व वरुण यांच्यापासून वसिष्ठ व अगस्त्य यांचा जन्म. विष्णुदूतांनी केलेले मार्कंडेयाचे रक्षण. यम-यमीसंवाद. मरुत व अश्विनीकुमार यांचा जन्म. इक्ष्वाकूची विष्णुभक्ती. नरसिंहाचा निर्माल्य ओलांडून जाण्याचा परिणाम व त्याबद्दल प्रायश्चित्त घेतल्याने होणारा लाभ, याविषयी शंतनूची कथा. ध्रुवाची कथा. स्थूलशीरा व बहुरोमा या राक्षसांची कथा. दशावतार-कथा. शुक्राचार्यांची कथा. इंद्राला स्त्रीरूप प्राप्त झाले असता ते घालवण्यासाठी त्याने अष्टाक्षरी मंत्राचा जप केला, ती कथा. पुंडलीक ब्राह्मणाची कथा इत्यादी.

हे पुराण मुख्यत्वे नरसिंहाच्या गुणगौरवासाठी रचलेले आहे. इ. स. ४०० ते ५०० या कालात हे रचले गेले आहे. याचा बराच भाग पद्यात असून, काही थोडा गद्यातही आहे. [ स्ट. उ. ]

**नरसिंहव्रत** एक काम्य व्रत. राजाने, युवराजाने अथवा शत्रूचा नाश इच्छिणाऱ्या कोणत्याही माणसाने हे व्रत करावे, असे सांगितले आहे. यात अष्टमीच्या दिवशी तांदुळाचे अथवा फुलांचे अष्टदळ बनवून त्यावर नरसिंहाच्या मूर्तीची स्थापना व पूजा करायची असते. त्यानंतर बेलाची पूजा करावी, असेही विधान आहे. [ हि. ध. ]

**नरसिंहसरस्वती** (इ. स. १३७८ – १४५८) एक दत्तावतारी संत. यांना दत्तात्रयाचे दुसरे अवतार व श्रीपाद श्रीवल्लभांचे उत्तरावतार मानतात. गुरुचरित्रात यांचे चरित्र वर्णिले आहे (११–५१).

नरसिंहसरस्वतींचा जन्म काळे उपनामक वासिष्ठगोत्री वाजसनेय ब्राह्मण घराण्यात झाला. वऱ्हाडातील लाडकारंजे हे यांचे जन्मगाव होय. यांच्या पित्याचे नाव माधव आणि आईचे अंबामवानी असे होते. जन्मतःच हे बालक ॐकाराचा उच्चार करू लागले, असे सांगतात. हे मूल विश्वाला वंद्य होईल, असे त्याच्या विषयीचे जातक ब्राह्मणांनी वर्तविले होतें. या बालकाचे नाव शालग्राम देव असे ठेवले गेले होते; पण त्याला नरहरी अशा नावाने हाक मारीत. हेच त्याचे नाव पुढे रूढ झाले.

नरहरी सात वर्षांचा होईपर्यंत बोललाच नाही. त्यामुळे आपला मुलगा मुका निघणार, अशी आई-वडिलांना भीती वाटू लागली. त्यावर उपचार म्हणून त्यांनी सातव्या वर्षीच नरहरीचे मौजीबंधन करायचे ठरवले. त्या संस्कारात गायत्रीमंत्राचा उपदेश होऊन तो जेव्हा मातेकडे भिक्षा मागण्यासाठी गेला, तेव्हा त्याने वेदवाणीचा उच्चार करून भिक्षा मागितली. तेव्हापासून त्याचे मुकेपण संपले. या चमत्काराने माता-पित्यांना परमानंद झाला; पण तो अल्पकालिकच ठरला. कारण नरहरीने आपण घर सोडणार असल्याचे त्यांना सांगितले. मातेच्या आग्रहास्तव त्याने एक वर्ष घरी राहण्याचे ठरविले. या अवधीत नरहरीला आणखी दोन जुळे बंधू झाले. हे बंधू तीन महिन्यांचे झाल्यावर पूर्व संकेतानुसार नरहरीने मातापित्यांचा निरोप घेतला.

वयाच्या केवळ आठव्या वर्षी त्याने बदरीकेदारच्या यात्रेचे प्रस्थान ठेवले. वाटेत काही दिवस तो काशीक्षेत्री राहिला. या मुक्कामात गंगेचे त्रिकाल स्नान, विश्वेश्वराची पूजा व संत–सज्जनांचा सहवास हा त्याचा दिनक्रम होता. या तेजस्वी व निग्रही बालकाचा हा नित्यक्रम पाहून कृष्णसरस्वती नामक एका वृद्ध संन्याशाच्या मनात त्याच्या विषयी सकौतुक



नरसिंहसरस्वती

आदर उत्पन्न झाला. नरहरीही त्याच्याकडे आकृष्ट झाला. पुढे नरहरीने कृष्णसरस्वतींच्या कडे संन्यास घेण्याची इच्छा व्यक्त करताच कृष्णसरस्वतींनी आपल्या मठपरंपरेप्रमाणे त्याला

संन्यासदीक्षा दिली व त्याचे नरसिंहसरस्वती असे नाव ठेवले.

संन्यासग्रहणानंतर नरसिंहसरस्वतींनी वाराणशीत काही काळ ज्ञानदानाचे कार्य केले आणि जिज्ञासूंना व मुमुक्षूंना परमार्थाची वाट दाखविली. इथेच त्यांनी काही मुनिजनांचा संघ निर्माण केला व त्या संघाला बरोबर घेऊन त्यांनी बदरी-केदाराची यात्रा आरंभली. वाटेत माधव नामक एका ब्राह्मणाने त्यांचे शिष्यत्व पत्करले. हाच त्यांचा पहिला शिष्य होय. त्याच्या-शिवाय बाळकृष्णसरस्वती, कृष्णसरस्वती, इ. आणखी सहा शिष्य त्यांना लाभले. केदारयात्रा पुरी झाल्यावर या सर्व शिष्यां-समवेत त्यांनी दक्षिणयात्रेला प्रारंभ केला.

प्रथम ते करंजनगरास आले. तिथे त्यांनी आपल्या माता-पित्यांची आणि बंधूंची भेट घेतली. तिथून त्र्यंबकेश्वर व नासिक या क्षेत्रांच्या यात्रा करून ते परळी वैजनाथ इथे गेले. इथे ते एक वर्ष एकांतवास करून राहिले. त्यानंतर चार महिने औदुंबर क्षेत्री त्यांचे वास्तव्य झाले. तिथून पुढे ते कृष्णा-पंचगंगा संगमा-वरील अमरापूर या गावी गेले. इथे त्यांचे वास्तव्य बारा वर्षे होते. त्यांच्या या प्रदीर्घ निवासामुळेच त्या स्थानाला नरसो-बाची वाडी असे नाव प्राप्त झाले. अमरापुराहून ते गाणगापुरी गेले. तिथे त्यांनी चौवीस वर्षे वास्तव्य केले. गाणगापूरच्या निवासात त्यांच्या जीवनात अनेक महत्त्वपूर्ण घटना घडल्या. तिथे त्यांनी अनेक चमत्कार केले व पुष्कळ आर्तांची दुःखे दूर केली. त्यामुळे त्यांच्या दैवी सामर्थ्याचा प्रत्यय आलेले अनेक जण त्यांची चरणसेवा करू लागले.

त्यांनी सायंदेव नामक ब्राह्मणाला यवनसेवा सोडण्यास सांगितले व अनेक अहंमन्य पंडितांचा गर्व उतरविला. याच वेळी बेदरचा अलाउद्दीन (दुसरा) याने नरसिंह सरस्वतींना आपल्या राजवाड्यात नेऊन तिथे त्यांची पूजा केली. हा यवन बादशहा म्हणजेच श्रीपाद श्रीवल्लभांनी वर दिलेला पूर्वजन्मीचा रजक होय, असे गुरुचरित्रकार सांगतात.

त्यानंतर नरसिंहसरस्वती सिंहस्थाच्या यात्रेसाठी परत नासिक-त्र्यंबकेश्वरला गेले. या यात्रेहून परत आल्यावर त्यांनी गाणगापूरच्या लोकांचा निरोप घेतला आणि आपल्या शिष्यां-सह ते श्रीशैलाकडे निघाले. इष्ट स्थळी पोचल्यावर पाताळ-गंगेत त्यांनी आपला देह विसर्जित केला.

महाराष्ट्रातील दत्तसंप्रदायाचा प्रारंभ नरसिंहसरस्वतींच्या अवतार चरित्रातून झाला, असे मानले जाते; पण गुरुचरित्रात कुठेही दत्तोपासनेला प्राधान्य दिलेले दिसत नाही. नरसिंह-सरस्वतींनी शिव, विष्णू, देवी, गणेश, नृसिंह या देवतांच्या उपासनेचा उपदेश केला; पण त्यांनी दत्तात्रेयाच्या मूर्तीची वा पादुकांची उपासना करण्याचा उपदेश कोणालाही केला नाही. ते स्वतः दत्तावतार मानले गेल्यामुळे त्यांच्याविषयीच्या भक्तिभावनेतून दत्तोपासना प्रचलित झाली.

नरसिंहसरस्वतींच्या या चरित्रावरून त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्त्वाची कल्पना येते. अल्पवयातील त्यांचे संन्यासग्रहण, त्यांनी निर्माण केलेला शिष्यसमुदाय, प्रदीर्घ काळ भ्रमण, त्यांचे दैवी सामर्थ्य व अवतारकार्य, इ. गोष्टी त्यांचे महनीयत्व सिद्ध करणाऱ्या आहेत. त्यांच्यामुळेच महाराष्ट्रात सर्वत्र दत्तोपासना लोकप्रिय झाली. त्यांच्या निवासामुळे औदुंबर, नरसोबाची वाडी, गाणगापूर ही गावे दत्तसांप्रदायिकांची तीर्थक्षेत्रे बनली. [ न. च. प.; श्रीनरसिंहसरस्वती– अप्रबुद्ध ]

## नरसी मेहता

(१४१५–१४८१ इ. स.) एक गुजराती संत-कवी. जुनागडाजवळच्या तळाजा या गावी याचा जन्म झाला. बालपणीच आई-बाप निवर्तल्यामुळे त्याला त्याच्या चुलत भावाने जुनागडला आपल्या घरी आणले. तिथेच तो वाढला. नरसी लहानपणी द्वाड होता. तो शाळेत जाऊन अभ्यासही करीत नसे आणि घरी राहून भावजयीला मदतही करीत नसे. त्यामुळे भावजयीचा त्याच्यावर राग होता. नर-



नरसी मेहता

सीला साधुसंग आणि भजन-कीर्तन आवडे. तो त्या गोष्टीत एकदा रंगला, की घरदार व तहानभूकही विसरे. अशाच एक

प्रसंगी नरसीला घरी यायला उशीर झालेला पाहून भावजय त्याच्यावर खवळली आणि तिने त्याला घरातून हाकलून दिले. नरसी घरातून निघाला, तो एका रानात पोचला. तिथे त्याला एक जुनाट शिवमंदिर दिसले. त्या मंदिरात जाऊन त्याने शंकराची आराधना सुरू केली. असे सांगतात, की सात दिवसांनंतर त्याला शिवदर्शन झाले आणि शिवाने त्याच्या आवडीनुसार त्याला वृंदावनात नेऊन तिथे चाललेली श्रीकृष्णाची रासक्रीडा दाखवून परत आणले.

त्या दिवसापासून नरसीला कृष्णाचे, त्याच्या मुरलीचे, गोप-गोपींचे आणि गोधनाचे वेडच लागले. तो सर्वांगी कृष्णमय बनला. त्यातूनच त्याला कवित्वाची स्फूर्ती झाली. तो सहजपणे हरिप्रेमाची पदे रचून गाऊ लागला.

काही दिवसांनी त्याच्या चुलत भावाने त्याला परत घरी आणून संसारात रमवण्याचा प्रयत्न केला. अखेरचा उपाय म्हणून त्याचे लग्नही करून टाकले. त्याला सुंदर व गुणवती अशी पत्नी मिळाली. पण नरसीचे हरिभक्तीचे वेड कमी करण्याच्या कामी तिचा काहीच उपयोग झाला नाही. नरसीने संसार मांडला, काही कामधंदाही सुरू केला. त्याला एक मुलगा व एक मुलगी अशी दोन अपत्येही झाली. पण संसारात त्याचा जम कधीच बसला नाही. काही कालाने त्याचा मुलगा एकाएकी निवर्तला. पुढे थोडयाच काळात पत्नीही मरण पावली. पत्नीविना नरसी एकटा व उघडा पडला. खरे म्हणजे तो त्याच्या संसारावर मोठाच आघात होता; पण नरसीला तसे वाटलेच नाही. तो म्हणाला –

**भलुं थयुं ने भांगी जंजाळ सुखे भजीशुं श्रीगोपाळ**

अर्थ– बरे झाले ! जंजाळातून सुटलो. आता सुखाने श्रीहरीचे भजन करीन.

नरसीला गुजराती भाषेचा वाल्मीकी किंवा कविसम्राट म्हणून ओळखतात. गुजराती साहित्यात भक्तियुगाचा प्रारंभ त्यानेच केला. श्यामलदासनो विवाह, हार, हुंडी, मामेरू, राससहस्रपदी, शृंगारमाला, इ. काव्ये त्याने रचली आहेत. त्याच्या काव्यात शृंगाररसाचे प्रभुत्व आहे. काही ठिकाणी तो शृंगार उत्तानही झाला आहे. पण त्याच्या त्या शृंगाराची परिणती भक्तिरसातच होते. गुजराती आख्यानकाव्यांचा तर तो जनकच आहे. त्याने वैष्णवाची लक्षणे सांगणारे एक पद रचले आहे. ते पद म. गांधींना अत्यंत आवडले होते. ते संपूर्ण पद असे आहे –

**वैष्णव जन तो तेने कहिये जे पीर पराई जाणे रे।**
**पर दुःखे उपकार करे तो थे मन अभिमान न आणे रे ॥**
**सकल लोक मां सहुने बंदे, निंदा ना करे केनी रे,**
**वाच काछ मन निश्चल राखे, धन धन जननी तेना रे ॥**
**समदृष्टि ने तृष्णा त्यागी, पर स्त्री जेने मात रे;**
**जिव्हा थकी असत्य न बोले, परधन नव झाले हाथ रे ॥**
**मोहमाया व्यापे नहि जेने, दृढ वैराग्य जेना मन माँ रे;**
**राम नाम शू ताली लागी सकल तीरथ तेना तनमा रे**
**पण लोभीने कपट रहित छे। काम क्रोध निवार्या रे;**
**भणे 'नरसैया' तेनु दर्शन करता। कुल एकोतर तार्या रे।**

अर्थ– जो परदुःख जाणतो, ते दूर करतो; पण केल्या उपकाराबद्दल मनात अहंकार धरीत नाही, त्याला वैष्णव म्हणजे विष्णुभक्त म्हणावे. जो जगात सज्जनांना व दुर्जनांनाही नमस्कार करतो, जो कोणाची निंदा करीत नाही, वाणी, कासोटा व मन जो दृढ ठेवतो, अशा पुरुषाची जन्मदात्री धन्य होय. जो सम दृष्टीने वागून तृष्णेचा त्याग करतो, ज्याला परस्त्री मातेसमान वाटते, ज्याची जिव्हा कधी असत्य बोलत नाही, जो परद्रव्याचा विटाळ लावून घेत नाही, ज्याला मोह-माया शिवत नाही, ज्याच्या मनात दृढ वैराग्य असते आणि ज्याची रामनामी टाळी लागून राहते, त्याच्या अंतरात सकल तीर्थे वास करतात. निर्लोभ असल्यामुळे जो निष्कपट असतो आणि ज्याच्या ठायी क्रोधाला जराही थारा मिळत नाही, नरसी म्हणतो, की अशा पुरुषांचे दर्शन करणाऱ्याचीही एकोत्रेएक कुळे उद्धरून जातात.

नरसीची बरीच आध्यात्मिक पदे प्रभातिया या नावाने प्रसिद्ध आहेत. प्रभातकाली ती गायिली जातात, म्हणून त्यांना ते नाव मिळाले आहे.

गुजरातइतकाच राजस्थानातही नरसी लोकप्रिय आहे. शिमग्यातल्या राजस्थानी डफगीतांत नरसीच्या प्रशंसेची गीते असतात. बायकांच्या समाजात नरसीचे हुंडी हे काव्य अतिप्रिय आहे. कोण्या रतन नामक लोककवीने माहेरा नावाचे एक काव्य लिहून त्यात नरसीचे संपूर्ण चरित्र गुंफले आहे.

जुनागढ शहरात मजेवाडी दरवाज्याजवळ नरसीचा चोरा म्हणून एक ठिकाण आहे. तिथे एक श्रीकृष्णमंदिर असून, नरसी जिची पूजा करीत असे, तीच कृष्णमूर्ती त्या मंदिरात बसवली आहे. मार्ग० शु. सप्तमीला तिथे मोठी यात्रा भरते. [ वि. मुं. रा. प.; मरुभारती, जुलै १९५५; वरदा, एप्रिल १९६१ ]

## नरसोबाची वाडी

महाराष्ट्रातील एक प्रसिद्ध दत्तक्षेत्र. मिरज–कोल्हापूर लोह–मार्गावरच्या जयसिंगपूर स्टेशनापासून आठ मैल आत कृष्णा-पंचगंगांच्या संगमावर हे क्षेत्र वसले आहे. या ठिकाणी नरसिंहसरस्वतींचा बारा वर्षे मुक्काम होता, म्हणून या स्थानाला नरसोबाची वाडी असे नाव मिळाले आहे. गुरुचरित्रात अमरापूर या नावाने या क्षेत्राचा महिमा वर्णिलेला आहे. कृष्णेच्या प्रशस्त

घाटावर दत्तपादुकांचे मंदिर आहे. या पादुकांना मनोहर पादुका अशी संज्ञा आहे. इथून गाणगापुरी जातांना योगिनींच्या आग्रहा-वरून नरसिंहसरस्वतींनी वालुकामय पाषाणाच्या दत्तपादुकांची



दत्तपादुका – नरसोबाची वाडी

स्थापना केली व वहिरंभट्ट नावाच्या एका भारद्वाजगोत्री ब्राह्म-णाची त्या पादुकांच्या पूजे-अर्चेसाठी नेमणूक केली, असे गुरु-चरित्रात सांगितले आहे.

रोज मध्यान्हकाळी या पादुकांची महापूजा होते. मंदिराच्या मागे औदुंबराचा एक पार आहे. घाटाच्या अखेरच्या टप्प्यावर श्रीवासुदेवानंद सरस्वती अर्थात टेंबेस्वामी यांचे स्मृतिमंदिर आहे. त्याच्या मागे श्री. रामचंद्रयोगी यांची समाधी आहे. हे रामचंद्र योगी नरसिंहसरस्वतींच्या समकालीन होते. या स्थानी नरसिंहसरस्वतींचा निवास होण्यापूर्वी ते इथे येऊन तप करीत राहिले होते. या समाधीच्या उजव्या हाताला नारायण-स्वामी, काशीकरस्वामी, गोपाळस्वामी, मौनीस्वामी, इ. तपो-निधींची स्मारके आहेत.

इथला कृष्णेचा घाट एकनाथमहाराजांनी बांधला, असे सांगतात. कृष्णेच्या पैलतीरावर औरवाड आणि गौरवाड या नावांची दोन गावे आहेत. ही गावे विजापूरच्या आदिलशहाने या देवस्थानाला पूजे-अर्चेसाठी इनाम दिलेली आहेत. पैलतीरा-वरचे हे औरवाड म्हणजेच जुने अमरापूर होय. येथे अमरे-श्वराचे एक प्राचीन देवालय आहे.

इथे चातुर्मास्य सोडून दर शनिवारी श्रींची पालखी निघते. इथे रोज यात्रा चालू असते. पुष्कळ लोक भूतबाधा झालेल्या माणसांना इथे श्रीगुरूच्या सेवेसाठी आणतात. संध्याकाळी आर-तीच्या वेळी धुपाचा वास दरवळला, की ही भूतबाधा झालेली माणसे घुमू लागतात. कित्येक भाविक लोक आपली मनकामना पूर्ण व्हावी, म्हणून इथे येऊन गुरुचरित्राची पारायणे किंवा सप्ताह करतात. दत्तजयंती, गुरुद्वादशी, इ. सांप्रदायिक उत्सव इथे मोठ्या प्रमाणात साजरे होतात. [ न. च. प.; ती. म. ]

**नरहड** राजस्थानमधील एक पुण्यक्षेत्र. पिलानीपासून सुमारे पाच मैलांवर हे स्थान आहे. एके काळी या गावाची गणना मोठ्या नगरांत होत असे. पण कोण्या साधूच्या शापाने हे नगर नष्ट झाले, अशी दंतकथा सांगतात.

इ. स. च्या १२ व्या शतकात या नगराचे अस्तित्व दर्श-विणारे विग्रहराज ( चौथा ) या राजाच्या काळातले काही शिलालेख उपलब्ध आहेत. इ. स. च्या १३ व्या शतकापर्यंत नरहड हे बागड प्रदेशाचे एक प्रमुख नगर होते.

इथे पाचवा तीर्थंकर सुमतिनाथ याची गुप्तोत्तर कालात बन-वलेली उत्कृष्ट मूर्ती आहे. शैव आणि वैष्णव पंथांच्याही खंडित मूर्ती इथे दिसतात. इथे एका काळी विविध धर्म-पंथांची मंदिरे होती, हे त्या खंडित मूर्तीवरून कळून येते. आजही त्यांचे सुबक कोरीव खांब तिथे दिसतात.

या क्षेत्रावर गुप्त, प्रतीहार, तोमर व चौहान या राजवंशांनी वेळोवेळी राज्य केले आहे. [ मरुभारती, ऑक्टो. १९५८ ]

**नरहरितीर्थ** (इ. सं. चे १३ वे शतक) एक वैष्णव आचार्य. हा ओडिसा प्रदेशातला रहिवासी व मध्वा-चार्यांचा समकालीन होता. याचे मूळ नाव शामशास्त्री असे होते. हा विद्वान तसाच प्रतिभावानही होता. मध्वाचार्य ओडिसाच्या यात्रेला गेले असता त्यांची आणि याची गाठ पडली. मध्वाचार्यांच्या व्यक्तिमत्त्वाने तो प्रभावित झाला आणि त्याने मध्वाचार्यांकडून द्वैतमताची दीक्षा घेतली. आचार्यांनी मग त्याचे नाव नरहरितीर्थ असे ठेवले.

नरहरितीर्थाला मध्वाचार्यांच्या संगतीने तीर्थयात्रा करण्याची इच्छा होती; पण त्यांनी त्याला अनुमती दिली नाही. काही कालाने त्याने ओडिसाच्या राजाच्या संग्रहात असलेल्या राम-सीतेच्या मूर्ती मागून घेतल्या आणि त्या उडुपी येथे नेऊन आचार्यांना अर्पण केल्या. मध्वाचार्यांनी त्यांची तिथे रीतसर स्थापना केली.

मध्वाचार्यांच्या निर्याणानंतर पद्मनाभतीर्थ हा त्यांचा शिष्य त्यांच्या गादीवर बसला. त्याच्या मागून नरहरितीर्थ हा त्या गादीवर आला. नऊ वर्षे त्याने माध्वपीठ संभाळले व नंतर समाधी घेतली.

नरहरितीर्थाने कानडीत अनेक भक्तिगीते रचली होती, असे

म्हणतात; पण त्यांपैकी केवळ दोनच उपलब्ध आहेत. आपल्या पदात तो रघुकुलतिलक अशी आपली नाममुद्रा लावतो. कर्नाटकातील हरिदासांची परंपरा याच्यापासूनच सुरू होते. याने अनेक हरिदास एकत्र जमवून त्यांची संघटना बांधली आणि भक्तीचा प्रचारा केला. [ हिं. क. भ. तु. अ.; ह. क. ]

**नरहरिदेव** (१५८३–१६८४ इ. स.) एक कृष्णोपासक संत. हा बुंदेलखंडातील गुढो गावचा रहिवासी होता. याला बाल्यावस्थेपासूनच काही सिद्धी प्राप्त होत्या आणि त्याने एका व्यापाऱ्याचे कोड घालवले होते, असे सांगतात. रात्रंदिवस हा भगवच्चिंतनात रमलेला असे. तो कृष्ण-



नरहरिदेव

लीलांवर पदे रचून तीही गात असे. अखेर त्याची कृष्णभक्ती एकांतिक अवस्थेला गेली आणि तो घरदार सोडून वृंदावनात वास्तव्याला गेला. तिथे त्याने संत सरसदेव याचे शिष्यत्व स्वीकारले आणि कृष्णभक्तीत आपले जीवन कृतार्थ केले.

**नरहरी** (१५०५–१६१० इ. स.) एक हिंदी भक्तकवी. रायबरेली जिल्ह्यातील डलमऊ तालुक्यातल्या पखरौली गावी याचा जन्म झाला. हा काश्यपगोत्री ब्राह्मण होता. लहानपणीच हा फारसी भाषा शिकला. त्याला रीवांचा राजा वीरभान, पुरीचा राजा मुकुंद यांचा तर आश्रय मिळालाच; शिवाय अकबराच्या दरबारातही तो राजकवी म्हणून मान्यता पावला. अकबराने त्याला महाकवी व महापात्र हे किताब दिले. पुढे सूरवंशीय राजांकडूनही त्याला हत्ती, पालखी, धन व जमीन या गोष्टी प्राप्त झाल्या.

अकबर व नरहरी यांचे परस्परांवर अकृत्रिम प्रेम होते. अकबराला मूल व्हावे म्हणून याने शेख चिश्तीच्या दर्ग्यात जाऊन प्रार्थना केली होती. याच्याविषयी एक आख्यायिका आहे ती अशी –

एकदा एक कसाई गाय मारायला नेत असता ती त्याच्या हातून सुटून नरहरीच्या घरी आली. पाठोपाठ तो कसाईही तिथे गेला. पण नरहरीने कसायाला गाय न देता एक छप्पय रचून गायीच्या गळ्यात बांधला आणि तो तिला घेऊन अकबरासमोर गेला. तो छप्पय वाचून अकबर इतका प्रभावित झाला, की त्याने गाईला तर सोडलेच, पण राज्यातला गोवधही बंद केला. तो छप्पय असा आहे–

अरिहुं दन्त तृन धरैं, ताहि मारत न सबल कोइ ।
हम संतत तृन चरहिं बचन उच्चरहिं दीन होइ ।।
अमृत पय नित स्रवहिं, बच्छ महि थंभन जावहि ।
हिंदु मधुर न देहिं, कटुक तरुकहि न पियावहि ।
कह कवि नरहरि अकबर सुनो, बिनवत गउ जोरे करन ।
अपराध कौन मोहि मारियत, मुयहु चाम सेवइ चरन ।।

अर्थ – दाती तृण धरून आलेल्या शत्रूला कोणीही मारू शकत नाही. आम्ही तर सतत गवतावरच राहतो. कुणी आमच्याशी कठोर बोलताच आम्ही दीन होतो. आम्ही नित्य अमृतासारखे दूध देतो. त्यासाठी आमची वासरे थांबून राहतात. आम्ही हिंदूंना मधुर दूध देतो आणि तुर्कांना कटू दूध देतो असे नाही. कवी नरहरी म्हणतो अकबरा ! ऐक, ही गाय हात जोडून तुला विनवते आहे, की मेल्यानंतर माझे चामडेसुद्धा तुमच्या पायाची सेवा करते. मग कोणत्या अपराधाबद्दल तुम्ही मला मारीत आहा ?

नरहरी अकबराचा कृपापात्र असल्याने कित्येक प्रसंगी तो अकबराला ताळ्यावर आणण्यासाठी अन्योक्ती किंवा दृष्टान्त यांचा अवलंब करून त्याला कविताबद्ध उपदेश करी. अशीच त्याची एक कविता पुढीलप्रमाणे आहे–

छत्रपति अकबर साहि सुनहु बिनती करैं नरहरि ।
जो जननि सुतहि विष देइ नाउ करिया गहि बोरैं ।
स्वै पहरु स्वै चोर प्रीति प्रीतम हठि तोरैं ।
वारि जो पेति हठि चरे साधु परधनु लेइ ।
कौन समरथ करैं धरहरि

अर्थ – हे छत्रपती अकबरा, तू नरहरीची विनंती ऐक. जर आईच मुलाला विष देऊ लागली, नाविकानेच नाव बुडवली, पहारेकरीच चोरी करू लागला, प्रेमीच जर प्रेमबंधन तोडू लागला, सज्जनच जर परधनलोलुप बनला, तर असा कोण समर्थ आहे, की जो असले हे अन्याय थांबवील ! (याचा भावार्थ असा, की सम्राटच जर अन्यायाने वागू लागला तर प्रजेचे कोण रक्षण करणार ! )

नरहरीने रुक्मिणीमंगल, छप्पय नीती व कवित्तसंग्रह हे तीन ग्रंथ लिहिले असून, शिवाय १२३ छंद, ६० छप्पय, ४० सवैये, १२ दोहे, ५ कुंडलिया, ४ कवित्त व २ सोरठे रचले आहेत. सीयस्वयंवर, बारहमासा, यांसारखी त्याची काही फुटकळ रचनाही आहे. त्याचे अधिकांश छप्पय अकबराला नीतीचा उपदेश करण्यासाठीच लिहिलेले आहेत.

गंगाकिनारी असनी गावी याचा मृत्यू झाला. याने आपल्या पखरौली गावी सिंहवाहिनी देवीची मूर्ती स्थापली होती. ती अजून तिथे दाखवतात. [ हिं. सा. को. २; क. कौ.; अ. द. हिं. क.

## नरहरी चक्रवर्ती

(इ. स. चे १८ वे शतक) एक बंगाली कवी. हा संस्कृत पंडित असून चैतन्यप्रभूचा भक्त होता. याने भक्तिरत्नाकर नामक फार मोठा ग्रंथ लिहिला आहे; त्याला वैष्णवांचा विश्वकोश असेच म्हणतात. जुन्या बंगाली साहित्यात या ग्रंथाला फार मोठे स्थान आहे. याची पंधरा प्रकरणे असून, कवीने आपला हा ग्रंथ सजवण्यासाठी वराह पुराण, भागवत, नवपद्यगोपाळचंपू, मथुराखंड, लघुतोषिणी, इ. वैष्णव साहित्याचा आधार घेतला आहे.

नरोत्तमविलास हा त्याचा ग्रंथ भक्तिरत्नाकराचाच एक भाग समजला जातो. याची बारा प्रकरणे आहेत. या ग्रंथात कवीने नरोत्तम नामक एका शूद्र संताचे चरित्र व कर्तृत्व वर्णिले आहे. एका ब्राह्मण कवीने एका शूद्राचे चरित्र वर्णावे आणि त्याचे शिष्यही व्हावे, ही गोष्ट तत्कालीन ब्राह्मण समाजाला रुचली नाही. पण नरहरी हा कोणाच्या रागा-लोभाची पर्वा करणारा नव्हता. तो जातीपातींच्या अतीत असलेले माणसाचे गुणविशेष जाणणारा होता. आपल्या या काव्यात त्याने नरोत्तमचरित्राच्या अनुषंगाने तत्कालीन रूढ अशा तांत्रिक अनाचारावर प्रहार केले असून, त्या काळच्या समाजस्थितीचेही चित्र रेखाटले आहे. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथ खूप गाजला. त्याच्या मुळेच अनेक ब्राह्मण नरोत्तमाचे अनुयायी बनले आणि केवळ ब्राह्मणांनाच देण्यात येणारी ठाकूर पदवी नरोत्तमाला लाभली.

गीतचंद्रोदय व छंद:समुद्र हे नरहरीचे दोन ग्रंथ त्याच्या पांडित्याची साक्ष पटवणारे आहेत. गौरकृष्णामृत, गौरकृष्ण भावनामृत, गौरकृष्णचरितामृत, इ. त्याची आठ प्रकरणे असून, त्यांतली सर्व पदे मुख्यत्वे चैतन्यप्रभूचे माहात्म्य विशद करणारी आहेत या व्यतिरिक्त गौरचरितचिंतामणी नावाचा त्याचा एक पद्यसंग्रह असून, त्यात पावणेचारशे पदे आहेत. इतरही अनेक लहानमोठी पद्यात्मक चरित्रे त्याने रचली आहेत. ज्या काही वैष्णव कवींनी बंगाली भाषेला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली, त्यात नरहरी चक्रवर्तीचे स्थान मोठे आहे, असे मानतात. [ वं. सा. क.; बं. सा. सं. इ.; हि. वें. लँ. लि. ]

## नरहरी मोरेश्वर

(इ. स. चे १८ वे शतक) एक मराठी कवी. हा बीड जिल्ह्यातील ईट नामक गावच्या देशपांडे घराण्यात जन्मला. मोरो नरहरी हे त्याच्या पित्याचे नाव आणि भवानी हे त्याच्या मातेचे नाव होते. बच्चाजी हे नरहरीचे लौकिक नाव होते. तुळजापूरची भवानी ही त्याची कुलदेवता होती. समर्थ संप्रदायातील भीमस्वामी नामक सत्पुरुषाचा त्याला अनुग्रह लाभला होता. त्याने मुक्तेश्वराच्या महाभारताची पूर्ती करण्याच्या हेतूने ग्रंथरचनेला आरंभ केला आणि उद्योग, भीष्म, द्रोण व कर्ण ही चार पर्वे रचली. ही चारही पर्वे उपलब्ध असली, तरी त्यांतील केवळ द्रोणपर्वच प्रसिद्ध झाले आहे. याची रचना ईट येथे इ. स. १७६८ मध्ये सांगता पावली. या पर्वाचे ३५ अध्याय असून ओवीसंख्या ४९१५ आहे. अभिमन्यूने कौरवांचा चक्रव्यूह भेदून त्यांच्या सैन्याची आणि सेनानींची कशी वाताहात केली, त्याचे नरहरीने केलेले वर्णन असे—

प्रळयकाळ भावोनि वीरीं । भयचकित पळती दूरी ।
जैसा अग्नी धडकतां वनांतरीं । श्वापदांतें आकांतु ॥
ना तो विष्णु दानवी सेना । विगत करूनि लाविली रणा ।
कीं तो महेश कैलासराणा । भ्रष्टी त्रिपुरा ज्यापरी ॥
तयावरी एकांगवीर । सौभद्र शूर रणरंगधीर ।
विचरे जैसा समीर । अरक कोठें असेना ॥
देखोनि संतप्त दुर्योधन । रोषें अधर चावोनि पूर्ण ।
लोटला जैसा पंचानन । शस्त्रधारीं ताडिल्या ॥
द्रोण बोले महींद्राप्रती । 'काय पळतां ? धरा शक्ती ।
देह मृत्यूचा सांगाती । पळतां अमर होइजे' ॥
कीर्तीनें जावें स्वर्ग धामा । हाचि क्षत्रियां धर्म तुम्हां ।
भय त्यागोनि क्रोधगरिमा । रक्षा वेगीं रायातें ॥

(द्रोणपर्व ९.१०८–११३)

नरहरीने महाभारताच्या या चारही पर्वांत वीररसाचा उठाव उत्तम रीतीने केला आहे. त्याच्या रचनेवर मुक्तेश्वराचा प्रभाव विशेष जाणवतो. [ म. क. च. २ ]

**नरहरी सोनार** (इ. स. चे १३ वे शतक) एक मराठी संतकवी. याच्या वडिलांचे नाव दीनानाथ असे होते. हा मूळचा पंढरपूरचा रहिवासी होता. तिथून तो सराफीचा व्यवसाय करण्यासाठी देवगिरीला गेला; पण थोड्याच दिवसांत पुनश्च पंढरपुरी परतला. तिथेच मग त्याने आपले सोनारकाम सुरू केले. हा प्रथम कट्टर शिवभक्त होता, परंतु पुढे वैष्णव बनून विठ्ठलभक्तीला लागला. नरहरीची ती ऐकान्तिक शिवभक्ती कशी सुटली, त्याविषयी एक दंतकथा सांगतात, ती अशी—

एका सावकाराने पंढरीच्या विठ्ठलाला नवस केला होता, की 'जर मला पुत्र झाला, तर मी तुला एक सोन्याचा कडदोरा करीन.' पुढे त्याला मुलगा झाला व पूर्वसंकल्पानुसार नवस फेडण्यासाठी तो सावकार पंढरपुरी गेला. इथे कुशल कारागीर कोण आहे, अशी चौकशी करीत असता लोकांनी त्याला नरहरीचे नाव सांगितले. सावकाराने 'नरहरीच्या घरी जाऊन त्याला सोन्याचा कडदोरा करण्यास सांगितले. त्यावर नरहरी म्हणाला, की 'तुम्ही विठ्ठलाच्या कमरेचे माप घेऊन या म्हणजे त्याप्रमाणे मी कडदोरा बनवतो.' सावकाराने मंदिरात जाऊन माप आणले. त्या मापाप्रमाणे नरहरीने कडदोरा तयार करून दिला; पण विठ्ठलाच्या कमरेला तो थोडा आखूड झाल्याचे दिसले. सावकाराने तो कडदोरा परत थोडा मोठा करून आणला; पण या वेळी थोडा सैल झाला. मग सावकार नरहरीकडे जाऊन म्हणाला, की 'तू स्वत: देवाच्या कमरेचे माप घे.' त्यावर नरहरी म्हणाला. 'मी शिवभक्त आहे, त्यामुळे शिवाशिवाय इतर देवतांचे मी दर्शन घेत नसतो.' परंतु सावकाराने फारच आग्रह केल्याने नरहरी आपले डोळे बांधून मंदिरात गेला. तिथे तो माप घेण्यासाठी चाचपडून पाहू लागला असता असा चमत्कार झाला, की ती मूर्ती विठ्ठलाची नसून शिवाची आहे, असे त्याला जाणवले. मग त्याने आपले डोळे सोडून मूर्तीकडे पाहिले, तो ती मूर्ती विठ्ठलाची आहे, असे दिसले. असे एक दोनदा घडून आल्यावर नरहरीला पश्चात्ताप झाला व त्याच्या मनातील शिव आणि विष्णू हा द्वैतभाव संपला. या साक्षात्कारानंतर नरहरीने आपले उर्वरित आयुष्य विठ्ठलभजनात घालवले.

नरहरीने बरेच अभंग लिहिले आहेत. त्यांतील त्याची हरिहरैक्याची भावना स्पष्ट करणारा एक अभंग असा—

**शिव आणि विष्णु एकचि प्रतिमा ।**
**ऐसा ज्याचा प्रेमा सदोदित ॥**
**धन्य ते संसारी नर आणि नारी ।**
**वाचे हरहरी उच्चारिती ॥**
**नाही पैं तो भेद अवघाचि अभेद ।**
**द्वेषाद्वेषसंबंध उरी नुरे ॥**
**सोनार नरहरी न देखे पैं द्वैत ।**
**अवघा मूर्तिमंत एकरूप ॥**

नरहरीच्या एका अभंगात गैवीनाथ असे त्याच्या गुरूचे नाव आढळते. नरहरी हा ज्ञानेश्वरांच्या प्रभावळीतील आहे, ही वस्तुस्थिती ध्यानात घेता ज्ञानेश्वरांचा प्रशिष्य गैवीनाथ हाच त्याचा गुरू असावा, असे वाटते. [ म. सा.; सं. का. स.]

**नरी मंगल** एक लोकोत्सव. हा उत्सव कूर्ग प्रदेशात एका काळी साजरा होत असे. जो मनुष्य वाघाची किंवा चित्त्याची शिकार करील, त्याचा सत्कार करण्यासाठी या उत्सवाची योजना असे. सत्काराचे स्वरूप लग्नसमारंभासारखे असे. शिकारी माणसाचे लग्न त्याने केलेल्या शिकारीशी होते, अशी तिकडील लोकांची समजूत होती. उत्सवाचा विधी असा—

शिकार करणाऱ्या वीराला खांद्यावर घेऊन त्याने मारलेल्या पशूभोवती तीनदा प्रदक्षिणा करीत. नंतर तो शिकारी पुन्हा त्या मृत पशूला मारण्याचा अभिनय करी. त्या वेळी तो नवरदेवाप्रमाणे नटलेला असे. समारंभ संपल्यावर मद्यपान व मांसभोजन होत असे. या सत्कारपात्र शिकाऱ्याला विशिष्ट प्रकारे मिशा वाढवायला परवानगी असे.

**नरेंद्र** (इ. स. चे १३ वे शतक) एक मराठी कवी. याचे उपनाम अयाचित असे असून, याला साल आणि नृसिंह या नावांचे दोन बंधू होते. हे तिघेही रामदेवराव यादवाच्या राजसभेतील कवी होते. एकदा साल आणि नृसिंह या दोघांनी अनुक्रमे रामायण व नलोपाख्यान ही आपली काव्ये राजसभेत वाचून दाखविली. नरेंद्र तिथे उपस्थित होताच. दोघांही बंधूंची ती काव्ये ऐकल्यानंतर तो त्यांना म्हणाला, की 'जर तुम्ही द्वारकेच्या राण्याचे वर्णन केले असते, तर तुमच्या सकल पापांचा निरास झाला असता.' हे त्याचे उद्गार ऐकून रामदेवराव म्हणाला, की 'तर मग तुम्हीच श्रीकृष्णावर काव्य रचा. तुमचे कौशल्य पाहू या.'

नरेंद्राने हे आव्हान स्वीकारले आणि कृष्णचरित्रातील रुक्मिणीस्वयंवराच्या प्रसंगावर अठराशे ओव्यांचे काव्य रचले. हे काव्य राजसभेत वाचून दाखवीत असता, ३१२ व्या ओवीपर्यंत वाचन आले आणि त्यातील काव्यसौंदर्याने मुग्ध झालेला राजा नरेंद्राला म्हणाला, 'या ग्रंथाची समाप्तिमुद्रा माझ्या नावावर टाकावी. मी तुम्हांला जितक्या ओव्या आहेत,

तेवढी सुवर्णनाणी भेट देईन.' पण नरेंद्राने ती गोष्ट मान्य केली नाही. तो स्वाभिमानाने उद्गारला, 'नाही महाराज ! असे करण्याने आमच्या कविकुळाला कलंक लागेल.'

नरेंद्राने असे उत्तर दिल्यानंतर राजाचा नाइलाज झाला. मग त्याने 'निदान हा ग्रंथ आमच्या दप्तरी तरी राहू द्या,' असा पर्याय काढला. यातील अंतस्थ हेतू ध्यानी घेऊन नरेंद्राने त्याला चतुराईने उत्तर दिले, 'हा ग्रंथ अशुद्ध आहे. तरी याचे शोधन करून मग आपल्या दप्तरी ठेवा.'

मग नरेंद्र आपल्या बंधूंसह घरी आला आणि तिघां बंधूंनी मिळून रातोरात निम्म्या काव्याची प्रत तयार केली. सकाळीच राजदूत घरी आले आणि मूळ काव्य घेऊन गेले. नरेंद्र या घटनेने विषण्ण झाला. रात्री तिघां बंधूंनी मिळून नकल-लेल्या ८७९ ओव्यांचे अपूर्ण काव्य बरोबर घेऊन तो महानुभाव पंथातले आचार्य नागदेव यांच्याकडे गेला आणि त्याने त्यांच्याकडून संन्यासदीक्षा घेतली. ही घटना इ. स. १२९२ च्या सुमारास घडली.

नरेंद्राचे रुक्मिणीस्वयंवर हे आद्य महानुभावीय काव्यांतील सर्वश्रेष्ठ काव्य असून, महानुभावांच्या पवित्र 'साती ग्रंथां'मध्ये त्याचा समावेश झालेला आहे. हे काव्य विदग्ध संस्कृत महाकाव्यांच्या श्रेणीतले काव्य आहे. त्याची कथा प्राधान्याने भागवतातील असली, तरी त्या कथेवर महाकाव्यांचा साज चढविण्यासाठी नरेंद्राने पंचमहाकाव्यांचा, विशेषतः हर्षाच्या नैषधीयचरिताचा उपयोग करून घेतला आहे. हे काव्य म्हणजे मराठीतील वैदर्भी रीतीचा आदर्शच होय. काव्यारंभी रसिक श्रोत्यांना उद्देशून नरेंद्राने लिहिलेल्या पुढील ओव्यांवरून त्याच्या शैलीची कल्पना येईल–

**श्रीकृष्णाचा गुणीं जीविनला। माझा जीवु श्रीचक्रधरा विनटला।**
**तो आंतुल आनंदु वोसंडला। कवितेचेनि मिसें ॥**
**जे विरहिणीचां मनीं वसे। ते बोलतां हो ए अनारिसें।**
**जें वाचितां ये रसडोळसें। भावलिखित ॥**
**तैसें देवाचां गुणीं विसंवतां। मी बियाळ बोले उसणतां।**
**भावो वोळखावा श्रोतां। प्रेमगर्भ ॥**

या काव्यात नरेंद्राचे विदग्ध रचना कौशल्य, प्रभावी व्यक्तिमत्त्व, त्याची तरल कल्पनाशक्ती आणि त्याचा प्रगाढ व्यासंग प्रतिबिंबित झालेला असल्यामुळे प्राचीन मराठी साहित्यात त्याला कलादृष्ट्या श्रेष्ठ स्थान प्राप्त झाले आहे. [ नरेंद्रविरचित रुक्मिणीस्वयंवर–संपादक रा. चिं. ढेरे, १९६५ ]

## नरेशपंथ

बंगालमधील एक वैष्णव पंथ. नरेशचंद्र भट्टाचारी हा या पंथाचा संस्थापक होता, म्हणून त्याला हे नाव मिळाले. नरेशचंद्र हा बरद्वानमध्ये राहत होता. प्रथम तो शाक्त होता; पण नंतर वैष्णव बनला. या पंथाचे अनुयायी जातिभेद मानीत नाहीत. हे लोक जानवे घालतात. यांच्यांत बालविवाहाला मान्यता नाही. वैशाख महिन्यात हे लोक आपले सांप्रदायिक उत्सव करतात. यांनी शाक्त व वैष्णव या पंथांत समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. [ वै शै. म. व. ]

## नरोत्तमदास

(१) (१५२८–१६११ इ. स.) एक वैष्णव संतकवी. बंगालमधील गोपालपुरा येथील राजा कृष्णानंद दत्त याचा पुत्र. पद्मा नदीच्या तीरावर खेतुरी या ठिकाणी याची राजधानी होती. हा जातीने कायस्थ होता. हा लहानपणापासूनच विरक्त वृत्तीने वागे. बारा वर्षांचा असताना एक दिवस याला श्रीनित्यानंद यांचे स्वप्नदर्शन झाले आणि याला भक्तिमार्गाची प्रेरणा मिळाली. थोडयाच दिवसांत याचा पिता निवर्तला. मोठा मुलगा असल्यामुळे नरोत्तमदास राज्याचा वारस ठरला. पण त्याला राज्य नकोच होते. त्यामुळे त्याने आपला चुलत भाऊ संतोषदत्त याच्याकडे राज्याचे अधिकार सोपवले आणि तो वृंदावनाला निघून गेला.

वृंदावनात त्याला चैतन्यसंप्रदायी आचार्य श्रीजीवगोस्वामी भेटले. त्यांच्याकडे राहून नरोत्तमदासाने भक्तिशास्त्राचे सांगोपांग अध्ययन केले. पुढे श्रीलोकनाथ गोस्वामींकडून त्याने चैतन्य संप्रदायाची दीक्षा घेतली. काही कालाने तो आपल्या राजधानीत परत आला आणि तिथून एक कोस अंतरावर त्याने एक आश्रम स्थापला. भजनटूली असे त्याने त्या आश्रमाचे नाव ठेवले. तिथे त्याने चैतन्यप्रभूंची मूर्ती स्थापून तिचा महोत्सव घडवून आणला. तिथे त्याने एक नवी कीर्तनपद्धती प्रचारात आणली.

नरोत्तमदास हा कवी आणि संगीतज्ञही होता. प्रार्थना, प्रेमभक्तिचंद्रिका, इ. ग्रंथ त्याने रचले. तो आणि त्याचे शिष्य यांनी उ. बंगालमध्ये गौडीय वैष्णव मताचा खूप प्रचार केला. वृंदावन येथे याची समाधी आहे. [ हिं. वि. को. ]

(२) (इ. स. चे १६ वे शतक) उ. प्रदेशातील सीतापूर जिल्ह्यातील बाडी या गावचा हा रहिवासी होता असे म्हणतात. याला कोणी ब्राह्मण समजतात, तर कोणी वैश्य समजतात. याच्या चरित्राविषयी अधिकृत अशी काहीच माहिती उपलब्ध नाही. हा कवी होता. सुदामाचरित हे याचे एकमेव उपलब्ध काव्य होय. हे खंडकाव्य आहे. याची कीर्ती केवळ या काव्यावरच आधारित आहे. ते अत्यंत भावपूर्ण आणि सर्वस्पर्शी आहे. त्यात एकूण १२१ छंद आहेत. कृष्ण–सुदामा यांची आदर्श मैत्री त्यात वर्णिलेली आहे. हिंदी भाषेत सुमारे पंचवीस सुदामाचरिते

लिहिली असून, त्यांत नरोत्तमदासाचे सुदामाचरित सर्वश्रेष्ठ ठरले आहे. [हिं. वि. को.]

**नर्मदा** एक महानदी. नर्म = सुख किंवा आनंद व दा = देणारी ती नर्मदा अशी तिची व्युत्पत्ती आहे. हिला रेवा, अमरजा, मेकलकन्या, रुद्रकन्या, इ. अन्यही नावे आहेत. ऋग्वेदाच्या खिलसूक्तात नर्मदेचा प्रथम उल्लेख येतो. तिथे तिचा प्रणाममंत्र दिला आहे, तो असा–

**नर्मदायै नमः प्रातर्नर्मदायै नमो निशि ।**
**नमोऽस्तु नर्मदे तुभ्यं त्राहि मां विषसर्पतः ॥**

अर्थ – नर्मदेला सकाळी नमस्कार असो, रात्री नमस्कार असो. हे नर्मदे, तुला नमस्कार असो. विष आणि सर्प यांच्यापासून (तू) माझे रक्षण कर.

विंध्य पर्वतश्रेणीच्या मेकल नामक डोंगरात नर्मदा उगम पावते व भृगुकच्छाजवळ पश्चिम सागराला मिळते. नर्मदेच्या उगमापासून सागरसंगमापर्यंतचा मार्ग सुमारे ८०० मैल लांबीचा आहे. तिच्या उगमाजवळ अमरकंटक हे तीर्थस्थान असून, ती सागराला भेटेपर्यंतच्या मार्गावर दोन्ही तीरी असंख्य तीर्थक्षेत्रे वसली आहेत. पुराणांत त्यांची संख्या दशकोटीपासून साठ सहस्र कोटीपर्यंत सांगितली आहे. कोटितीर्थ, कपिलधारा, ओंकारमांधाता, सहस्रधारा, शूलपाणी, महेश्वर, विमलेश्वर, इ. त्यांची नावे होत. तीर्थक्षेत्रांप्रमाणेच मंडला, हुशंगाबाद, हदीहंडिया, महेश्वर, भडोच (भृगुकच्छ), सिनोर, कर्नाली, गरुडेश्वर, हापेश्वर, नेमावर इ. प्रसिद्ध नगरे नर्मदाकिनारी वसली आहेत. नर्मदेच्या दोन्ही तीरांवर घनदाट जंगले पसरली आहेत, त्यांपैकी शूलपाणी, ओंकार, छोटे महारण व मोठे महारण ही चार प्रमुख होत. नर्मदेचा मार्ग खडकाळ आणि डोंगराळ भागातून गेला असल्याने अनेक जागी धबधबे निर्माण झाले आहेत. रेवा हे नर्मदेचे नावही तिच्या उडचा मारीत जाणाऱ्या प्रवाहामुळेच पडले आहे. तिचे पात्र हरणफाळ या ठिकाणी एखाद्या हरणानेही पलिकडे उडी मारून जावे इतके संकोच पावते, तर भृगुकच्छाजवळ ते एका मैलाइतके रुंदावते. नर्मदेची खोलीही अशीच विलक्षण आहे. काही ठिकाणी ती शंभर फूट खोल आहे, तर काही ठिकाणी तिची खोली अवघी वीतभरच भरते.

वाल्मीकींनी रामायणात तिचे वर्णन केले आहे, ते असे–

**चलोपलजलां पुण्यां पश्चिमोदधिगामिनीम् ॥**
**महिषैः सृमरैः सिंहैः शार्दूलर्क्षगजोत्तमैः ॥**
**उष्णाभितप्तैस्तृषितैः संक्षोभितजलाशयाम् ॥**
**चक्रवाकैः सकारण्डैः सहंसजलकुक्कुटैः ॥**
**सारसैश्च सदा मत्तैः कूजद्‌भिः सुसमावृताम् ॥**
**फुल्लद्रुमकृतोत्तंसां चक्रवाकयुगस्तनीम् ॥**
**विस्तीर्णपुलिनश्रोणीं हंसावलिसुमेखलाम् ॥**
**पुष्परेण्वनुलिप्ताङ्गीं जलफेनामलांशुकाम् ॥**
**जलावगाहसुस्पर्शां फुल्लोत्पलशुभेक्षणाम् ॥**

(वा. रा. ३१.१९–२३)

अर्थ – पश्चिम समुद्राला जाऊन मिळणाऱ्या त्या पवित्र नदीचे उदक पाषाणावर आदळून क्षुब्ध होत होते. उष्णाने तप्त होऊन तृषाक्रांत झालेले महिष, हरिण, सिंह, व्याघ्र, अस्वले व महागज यांनी तिचे जलाशय क्षुब्ध करून टाकिलेले होते. चक्रवाक, कारंडव, हंस, जलकुक्कुट आणि सर्वदा मत्त व शब्द करीत असलेले सारस पक्षी यांनी ती व्याप्त झालेली होती. प्रफुल्लित वृक्ष ही तिची कर्णभूषणे होती. चक्रवाक पक्ष्यांची जोडपी हेच तिचे स्तन होते. विस्तीर्ण वाळवंट हाच तिचा कटिप्रदेश होता. हंसपंक्तिरूप मनोहर मेखलेने ती युक्त होती. पुष्पपरागांची तिच्या शरीराला उटी लाविलेली होती. उदकफेनरूप निर्मल वस्त्र तिने परिधान केले होते. स्नानासाठी तिचा स्पर्श सुखावह होता. आणि प्रफुल्लित कमले हेच तिचे उत्कृष्ट नेत्र होते.

आद्य शंकराचार्यांचे गुरू गोविंदयती हे नर्मदाकाठी एका गुहेत राहत होते. एकदा नर्मदेला पूर येऊन तिचे पाणी गुहेत शिरले, तेव्हा आचार्यांनी नर्मदास्तुती केली व आपला कमंडलू नर्मदेजवळ ठेवला. मग नर्मदा त्या कमंडलूत शिरली व तो पूर ओसरला, अशी कथा आहे. आचार्यांनी जे नर्मदाष्टक रचले आहे, त्यातील काही पंक्ती अशा–

**महा-गभीर-नीर-पूर-पात-धूतभूतलं**
**नमत्समस्तपातकारि दारितापदाचलम् ।**
**जगल्लये महाभये मृकण्डु-सूनु-हर्म्यदे**
**त्वदीय-पादपङ्कजं नमामि देवि नर्मदे ॥**

अर्थ – आई नर्मदे, तुझे पाणी अत्यंत खोल आहे. तसेच ते भरपूर आहे. त्या पाण्याच्या पुराने तू संपूर्ण भूतलाचे पाप धुवून टाकले आहेस. तुझ्या चरणी भक्तिभावाने नमस्कार करणाऱ्या भक्त जनांच्या सर्व पातकांचा आणि संकटरूप पर्वतांचा तू नाश करतेस. महाभयंकर असा जगाचा प्रलयकाळ ओढवला असतांना मृकंड ऋषीच्या पुत्राला (मार्कंडेय ऋषीला) आश्रय देणाऱ्या अशा हे देवी नर्मदे, मी तुझ्या चरणकमलाला नमस्कार करतो.

शंकराचार्यांनी नर्मदाकिनारी राहून बराच काळ योगसाधना केली होती. पिपरिया घाटापासून सहा मैल अंतरावर नर्मदेच्या उत्तरतीरावर हरणीसंगम नामक तीर्थ आहे. इथे संगमेश्वर व हरणेश्वर नावाची दोन शिवमंदिरे आहेत. या क्षेत्रात

आचार्य राहिले होते. बेलथारी ग्राम हे बळिराजाची यज्ञभूमी असल्याचे सांगतात.

**उत्पत्तिकथा** – नर्मदेविषयीच्या काही कथा अशा–

(१) एकदा चंद्रवंशातल्या पुरूरवा राजाला नर्मदेचे माहात्म्य कळले व त्याने तिला भूमंडलावर उतरवण्यासाठी शंकराची आराधना केली. शंकर प्रसन्न झाला, पण पुरूरव्याची मागणी ही देवांनाही दुर्लभ असल्याचे त्याने सांगितले. परंतु राजा आपला हट्ट सोडीना; तेव्हा शंकराने नर्मदेला भूमंडळी उतरवले.

(२) नर्मदा ही अमरकंटक राजाची एकुलती एक रूपवती कन्या होय. अमरकंटकाने तिचे शोण राजाशी लग्न ठरवले. पण तो विवाह घडून येण्यापूर्वीच अमरकंटक मरण पावला. मरण्यापूर्वी त्याने नर्मदेला सिंहासनावर बसवून आपल्या राज्याची वारस नेमले. कालांतराने नर्मदेचे पितृनिधनाचे दुःख कमी झाले, असे पाहून शोणाने तिच्याकडे आपली अंगठी पाठवली. मग नर्मदेने दूत पाठवून विवाहतिथी निश्चित केली. मधल्या काळात तिने आपले प्रेमचिन्ह देऊन झोला नामक एका दासीला शोणाकडे पाठवले. शोणाने यापूर्वी नर्मदेला पाहिले नव्हते. त्यामुळे आलेली दासी हीच नर्मदा आहे, असे समजून त्याने तिला आपल्या रंगमहालात नेले. झोलेलाही ते बरेच वाटले.

बरेच दिवस लोटल्यावर नर्मदा वाट पाहून थकली आणि शोणाकडे आली. तेव्हा तिला तो प्रकार कळला. शोणाने आणि दासीने आपला विश्वासघात केला, हे पाहून ती संतापली आणि नदीचे रूप घेऊन वाहू लागली. प्रथम ती पूर्वाभिमुख होती ती पश्चिमाभिमुख होऊन वेगाने पश्चिम सागराकडे धावू लागली.

**इतिहास** – नर्मदेच्या इतिहासाला पाच लाख वर्षांपूर्वी प्रारंभ होतो, असे पुरातत्त्ववेत्ते सांगतात. इथल्या प्रदेशात अश्मयुगातील अनेकविध वस्तू सापडतात. सनपूर्व दोन हजार वर्षांपूर्वी इथला मानवसमाज सांस्कृतिक दृष्ट्या बराच प्रगत होता, असे या उत्खनित पुराव्यांवरून दिसते.

माहिष्मतीचा प्रतापी राजा हैहयवंशीय कार्तवीर्य सहस्रार्जुन एकदा आपल्या राण्यांसह नर्मदेत जलविहार करीत असताना लंकाधिपती रावण तिथे आला व नर्मदापूजन करून सहस्रावधी राक्षसगणांसह नर्मदेत स्नानासाठी उतरला. त्यामुळे साहजिकच ते संथ पाणी ढवळले गेले. सहस्रार्जुनाला त्याचा राग आला व त्याने आपल्या सहस्र बाहूंनी वरच्या बाजूने नर्मदाप्रवाह रोखून धरला. रावणाने ते पाहिले तेव्हा तो संतप्त झाला आणि त्याने सहस्रार्जुनाला युद्धाचे आव्हान दिले. मग दोघांचे तुंबळ युद्ध झाले. त्यात अंती रावणाचा पराभव होऊन तो माघारा गेला. मग सहस्रार्जुनाने अडवून ठेवलेला तो नर्मदाप्रवाह सोडून दिला आणि त्यासरशी नर्मदा सहस्रधारांनी उचंबळून वाहू लागली. पुढे त्या जागी सहस्रधारा नामक एक क्षेत्र निर्माण झाले.

कालांतराने सहस्रार्जुनाचे व परशुरामाचे युद्ध झाले, तेही नर्मदातीरीच. त्या युद्धात सहस्रार्जुन समूळ नष्ट झाला.

नंतरच्या काळात उत्तरेतून दक्षिणेत उतरू पाहणाऱ्या समुद्रगुप्ताला रोखण्यासाठी अहीर राजांनी याच प्रदेशात त्याच्याशी घनघोर युद्ध केले, पण दुर्दैवाने त्या युद्धात अहीर पराजित झाले व नर्मदापरिसर गुप्त साम्राज्यात समाविष्ट झाला. पुढे समुद्रगुप्ताचा नातू कुमारगुप्त याच्या कारकीर्दीत पुष्यमित्र नामक लोकांनी नर्मदेच्या काठचा काही प्रदेश स्वतःच्या स्वामित्वाखाली आणला. परंतु थोड्याच काळात स्कंदगुप्ताने त्यांचा पराभव करून पुनश्च सर्व नर्मदापरिसर गुप्तांच्या छत्राखाली आणला. शक, वाकाटक, भारशिव, अहीर, इ. राजवंशांचे उदयास्त नर्मदेच्या काठीच झाले.

सातव्या शतकात नर्मदेच्या उत्तर-दक्षिण तीरांवर दोन विशाल साम्राज्ये उभी झाली व विस्तारली. उत्तरेचा अधिपती होता हर्ष, तर दक्षिणेचा स्वामी होता पुलिकेशी. एकदा हर्षाने आपल्या सैन्यासह नर्मदा उल्लंघून दक्षिणेकडे आक्रमण सुरू केले. पुलिकेशीच्या ते ध्यानात येताच त्याने हर्षाला प्रतिरोध करण्याचे ठरवले. उभय सम्राटांचे तुमुल युद्ध झाले. त्यात हर्ष पराजित झाला. त्यानंतर राष्ट्रकूट, चोळ, परमार, इ. अनेक राजवंश उगवले व मावळले. पुढे त्रिपुरीच्या कलचुरींनी चौफेर दिग्विजय करून आपले साम्राज्य नर्मदेपासून गंगेपर्यंत वाढवले.

**नर्मदामाहात्म्य**– नर्मदेला भारतवर्षातील सात पवित्र नद्यांपैकी एक मानतात. 'नर्मदासदृशी लोके न गङ्गापि वरानने' = हे पार्वती, या जगात नर्मदेसारखी (पवित्र अशी नदी) गंगादेखील नाही, असे नर्मदेचे माहात्म्य वर्णिले आहे. 'कलौ तु नर्मदादेवी कल्पवृक्षो जनार्तिहा' = नर्मदादेवी (म्हणजे) कलियुगातील आर्तांची दुःखे हरण करणारा कल्पवृक्षच होय, असे पुराणकारांनी नर्मदेविषयी म्हटले आहे. ब्रह्मा–विष्णु–महेशादी देव, बलि–रावणादी असुर, सनक-सनातनादी ऋषिमुनी, इत्यादींची तपोभूमी व मनू, हरिश्चंद्र, रंतिदेव, इ. नृपश्रेष्ठांची यज्ञभूमी म्हणून नर्मदेचा साराच परिसर पुण्यपावन मानला गेला आहे.

नर्मदेने एकदा वाराणसीत तप करून शिवाला प्रसन्न करून घेतले. तेव्हा शिवाने नर्मदेतल्या प्रत्येक पाषाणखंडाला शिवलिंगाची प्रतिष्ठा प्राप्त होईल, असा तिला वर दिला व सांगितले –

**स्मरणाज्जन्मजं पापं दर्शनेन त्रिजन्मजम् ।**
**स्नानाज्जन्मसहस्राख्यं हन्ति रेवा कलौ युगे ॥**

अर्थ – कलियुगात नुसत्या नामस्मरणाने या जन्मात्रे, दर्शनाने

तीन जन्मांचे व (तिच्यात) स्नान केल्याने सहस्र जन्मांचे पाप रेवा नष्ट करते.

भारतातल्या अधिकांश शिवमंदिरांतल्या मूर्ती या नर्मदेतल्या पाषाणांच्या बनवलेल्या आहेत. नर्मदेच्या पुण्यप्रभावाने भारून जाऊन प्राचीन ऋषींनी तिच्यावर स्वतंत्र नर्मदापुराण लिहिले आहे. स्कंद आणि वायू या पुराणांत रेवाखंड नामक नर्मदागौरवाचे एक स्वतंत्र प्रकरणच आहे. कविराज रवी नामक कोण्या प्राचीन कवीने नर्मदालहरी नावाचा एक ग्रंथ लिहिला आहे.

कार्तिकी पौर्णिमा, सोमवती अमावास्या यांसारख्या विशेष दिवशी नर्मदातीरावरच्या अनेक शिवक्षेत्रांत मोठ्या यात्रा भरतात. नर्मदेच्या जलात औषधीगुण असल्याचे सांगतात. नर्मदेत विसर्जिलेल्या अस्थी विरघळत नाहीत, तर त्यांचे पाषाणात रूपांतर होते, असे म्हणतात. गंगा नदी वर्षातून एकदा काळ्या गायीच्या रूपाने नर्मदेत स्नान करायला येते व त्या वेळी नर्मदेत स्नान करणे हे अतिशय पुण्यप्रद असते, अशी कल्पना आहे.

**नर्मदापरिक्रमा** – नर्मदापरिक्रमा म्हणजे नर्मदाप्रदक्षिणा. नर्मदेशिवाय भारतातल्या एकाही नदीची प्रदक्षिणा केली जात नाही. ही प्रदक्षिणा करणाऱ्याने नर्मदेचा प्रवाह कुठेही ओलांडायचा नाही, असा दंडक आहे. नर्मदेच्या उगमापासून मुखाकडे चालत जायचे व त्याच मार्गाने परत यायचे. मग उगमाचा पहाड चढून खूप वर जायचे आणि दुसऱ्या तीरावर उतरून, पुन्हा मुखाकडे जाऊन त्याच मार्गाने उगमाकडे यायचे, अशी ही प्रदक्षिणेची पद्धती आहे. या प्रदक्षिणामार्गात अनंत अडचणी असतात. रानात राहणारे आदिवासी लोक अशा यात्रेकरूंना लुबाडतात, असाही अनुभव आहे. या प्रदक्षिणेत यात्रेकरूला प्रत्यही डोंगर–पहाड उल्लंघावे लागतात, दऱ्या–दरकुटे पार करावे लागतात आणि घनदाट जंगलातून वाट शोधावी लागते. प्रदक्षिणा करणाऱ्याने प्रतिदिवशी नर्मदाजल प्राशन करावे व नर्मदापरिसरातील एखाद्या देवालयात मुक्काम करावा, असा नेम आहे. त्याने मुखाने नर्मदास्तोत्रे म्हणावी व त्यांचा प्रारंभ शंकराचार्यविरचित नर्मदाष्टकाने करावा, असाही संकेत आहे.

**नर्मदामंत्र**– 'ॐ ह्रीं श्रीं नर्मदायै नमः' असा नर्मदेचा मंत्र आहे. या मंत्राने सर्पविष उतरते, अशी समजूत आहे. तशी कथाही आहे. हा मंत्र प्रणवासह नऊ अक्षरांचा होतो. ज्यांना प्रणवाचा अधिकार नाही, त्यांनी तो प्रणवरहित म्हणजे अष्टाक्षरी जपावा. या मंत्राक्षरांच्या इतक्या लक्षसंख्येने जप केल्यावर मंत्र सिद्ध होतो, असे सांगितले आहे. [ सु. स्तो. सं. २; सु. वि. को.; मा. न. क.; एन्सा. रि. ए.; भावमुद्रा ]

## नर्मसचिव

नायक–नायिका यांच्या संबंधांतला एक पुरुष. हा नायकाच्या प्रेमप्रकरणात त्याचा मदतनीस असतो. याचे चार भेद अग्नी पुराण, काव्यालंकार, शृंगारतिलक व रसमंजिरी या ग्रंथांमधून सांगितले आहेत, ते असे–

**पीठमर्द** – कोपलेल्या स्त्रीला प्रसन्न करणारा सखा.

**विट** – कामविषयक तंत्र व कला जाणणारा.

**विदूषक** – शरीर वेडेवाकडे करून हास्य निर्माण करणारा.

**चेटक** – नायक व नायिका यांची भेट घडवून आणण्यात चतुर असणारा. [ हिं. सा. को. ]

## नलकार

एक प्राचीन शूद्र जात. हिचा बौद्ध जातकांत उल्लेख आढळतो. या लोकांचा मुख्य व्यवसाय दोरखंड, चटया, टोपल्या, तसेच बांबूच्या अनेक वस्तू तयार करणे हा होता. हलकी कामे करीत असल्यामुळे समाजात यांचा दर्जा कनिष्ठ मानला जाई. दिवसेंदिवस समाज यांच्याकडे अधिकाधिक उपेक्षेने व तिरस्काराने पाहू लागला आणि शेवटी हे लोक हीन शूद्र ठरले. [ भा. सा. इ. ]

## नलहाटी

एकावन्न शक्तिपीठांपैकी एक. बंगालमधील हावडा-क्यूल लोहमार्गावर नलहाटी नावाचे एक स्टेशन आहे. तिथून नैर्ऋत्येला दोन मैलांवर एका टेकडीवर हे स्थान आहे. इथे सतीची उदर-नलिका गळून पडली असे समजतात. काहींच्या मते इथे सतीची शिरोनलिका गळून पडली म्हणून हे शक्तिपीठ ठरले आहे. [ कल्याण– तीर्थांक ].

## नल्केयव

एक जात. यांना नल्के असेही म्हणतात. या लोकांची वस्ती द. कानडा जिल्ह्यात आहे. हे लोक भूतपूजक आहेत. काही संकट आल्यास भूतपूजा करताना हे कोल, बंडी, नेम व अगेलुतंबिल या चार विधींपैकी एक विधी करतात. हे तुळू अथवा कन्नड भाषा बोलतात. हे लोक शेतमजुरी, चटया विणणे, टोपल्या व छत्र्या तयार करणे, इ. कामे करतात. यांचा एक जातिप्रमुख असतो व जातीतले तंटेबखेडे तोच सोडवतो. लग्नसमारंभात पुरोहिताचे कामही तोच करतो. त्याला गुरिकर असे म्हणतात. [ डि. क्ला. सा. कॅ. ]

## नल्लतरंग

एक सुषिर वाद्य. हे एक नळवाद्य असून, त्याला एकोणीस नळ्या असतात. हे वाद्य ऑर्गनच्या तत्त्वावर निर्मिलेले आहे. या वाद्यात हवा भरण्यासाठी भाता वापरतात आणि त्या वेळी प्रत्येक नळीचे तोंड उघडले जाईल, अशी व्यवस्था केलेली असते. [ म्यु. इं. ]

**नल्लूर** एक प्राचीन क्षेत्र. हे गाव तमिळनाडमधील तंजाऊर जिल्ह्याच्या पापनाशम रेल्वे स्टेशनपासून तीन मैल पूर्वेकडे आहे. इथे कल्याण–सुंदरेशाचें एक मंदिर आहे. शिव–पार्वतींचा विवाह होत असताना अगस्त्य ऋषीने इथूनच त्या दोघांना आशीर्वाद दिला आणि तेव्हापासून हे क्षेत्र प्रसिद्ध झाले असे सांगतात. या मंदिरासमोर एक सरोवर आहे. या सरोवरात कुंतीने स्नान केले होते, असे तिथल्या भिंतीवरील शिलालेखात लिहिले आहे.

पांडय राजा जटावर्मन सुंदर याने इथेच स्वतःला वीराभिषेक करवून घेतला होता. [ कल्यांण–तीर्थांक; मदुरा गॅझे. ]

**नवकारव्रत** एक जैन व्रत. हे व्रत सत्तर दिवसांत पुरे होते. व्रतावधीत सत्तर एकभुक्ते करतात आणि प्रतिदिन णमोकार मंत्राचा त्रिकाल जप करतात. [ जै. व्र. वि. सं. ]

**नवखंड** पुराणकारांनी भारतवर्षाचे नऊ खंडांत विभाजन केलेले आहे. मत्स्य पुराणात या नऊ खंडांची नावे सांगितली आहेत, ती अशी–

**भारतस्य च वर्षस्य नव भेदान् निबोधत ।**
**इन्द्रद्वीपः कसेरुश्च ताम्रपर्णो गभस्तिमान् ।**
**नागद्वीपस्तथा सौम्यो गन्धर्वस्त्वथ वारुणः ।**
**अयं तु नवमस्तेषां द्वीपः सागरसंवृतः ।।**

(मत्स्य पु. ११४. ७–८)

अर्थ– भारतवर्षाचे इंद्रद्वीप, कसेरू, ताम्रपर्ण, गभस्तिमान, नागद्वीप, सौम्य, गंधर्व, वारुण व सागराने वेढलेला, असे नऊ भाग आहेत, ते ऐका.

मार्कंडेय पुराणातही हीच नावे दिलेली आहेत आणि म्हटले आहे, की हे विभाग समुद्राने विभक्त असून जमिनीवरील मार्गाने अगम्य आहेत (५७.५).

मत्स्यपुराणोक्त नवव्या भागाचे नाव काय होते, याबद्दल मतभेद आहेत. राजशेखराने आपल्या काव्यमीमांसेत या भागाचे नाव कुमारीद्वीप असे सांगितले आहे. तर वामन पुराणात ते कुमारद्वीप असे आहे. काही पुराणकारांनी त्या बाबतीत मौन धरले आहे.

हा प्रदेश कुमारीपासून म्हणजे कन्याकुमारीपासून गंगेच्या प्रवाहापर्यंत पसरलेला होता. म्हणून संपूर्ण भारताला कुमारीद्वीप असे नाव मिळाले असावे.

गुप्तांच्या काळात भारतीय भाषा, साहित्य, धर्म व संस्कृती यांचा पूर्वेकडील द्वीपांत फार मोठा प्रसार झाला आणि हे सर्व द्वीपसमूह भारतवर्षाच्या भौगोलिक क्षेत्रात गणले जाऊ लागले. सांप्रतचे बृहत्तर भारत हे त्या काळात भारतवर्षाचे विस्तार-क्षेत्र मानले जाऊ लागले. तेव्हा मग मुख्य भारतभूमीसाठी कुमारीद्वीप हे नाव पुराणकारांनी शोधले. सर्वसामान्य लोकांनीही या नावाचा पुरस्कार केला. आजही रोजच्या संकल्पात ' जम्बूद्वीपे भरतखण्डे भारतवर्षे कुमारिकाखण्डे .. ' असा कुमारी किंवा कुमारिका खंडाचा उल्लेख येतो.

भारतवर्षाच्या या नऊ खंडांचा सांप्रतच्या भूगोलाशी मेळ घालण्याचा प्रयत्न काही विद्वानांनी केला आहे. त्यांच्या मते ही खंडे म्हणजे भारताच्या पूर्वेकडे पसरलेल्या द्वीपसमूहांचे भाग होत. कालिदासाच्या काळात यांना द्वीपांतर असे नाव होते व त्या भूभागावर भारतीय संस्कृतीचा मोठाच प्रभाव होता. तत्कालीन इंद्रद्वीप म्हणजे सांप्रतची अंदमान बेटे असून, नागद्वीप हा निकोबार बेटांचा समूह आहे. ताम्रपर्ण म्हणजे सिंहल किंवा लंका असून, वारुणद्वीप हा सध्याचा बोर्निओ बेटांचा भाग आहे. कसेरू म्हणजे मलयद्वीप होय.

बहुतेक पुराणांत प्रायः अशीच नावे दिलेली आहेत; पण वामन पुराणात सौम्य व गंधर्व या नावांऐवजी कटाह व सिंहल अशी नावे आढळतात. कटाहद्वीप हे मलयद्वीपाचे केडा नामक स्थान असून, कथासरित्सागरात त्याचा कटकच्छद्वीप असा उल्लेख आढळतो. सिंहलद्वीप म्हणजे लंका होय. सामान्यतः ताम्रपर्ण हे लंकेचेच नाव मानले जाते; पण त्याच यादीत सिंहल हेही नाव असल्यामुळे ताम्रपर्ण हा वेगळा भाग असावा असे वाटते.

कुमारीद्वीपाच्या ईशान्येला किरात व वायव्येला यवन लोक राहत असत, असे मत्स्य व मार्कंडेय पुराणात सांगितले आहे. यवन हे बहुधा बॅक्ट्रियातील ग्रीक लोक असावे. सनपूर्व चौथ्या शतकात ते बॅक्ट्रियात राहत होते. नंतरच्या काळात ते गंधार व काबूल या देशात येऊन वसलें. वामन पुराणात म्हटले आहे, की कुमारद्वीपाच्या दक्षिणेला आंध्र व उत्तरेला तुरुष्क लोकांची वस्ती होती. बदलत्या ऐतिहासिक परिस्थितीचा हा उल्लेख आहे. इ. स. च्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकात दक्षिणेत आंध्र–सातवाहनांचें राज्य पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत पसरले होतें आणि उत्तरेला तुरुष्क किंवा तुषारदेशीय शक हे पेशावरमध्ये राज्य करीत होते.

पण नवखंडांच्या निश्चित स्थानाबद्दल इतिहासकारांत मतैक्य नाही. अल् बिरूनीने इंद्रद्वीप म्हणजे मध्यदेश होय, असे म्हटले आहे. श्री. मंजुमदारांच्या मते इंद्रद्वीप म्हणजे ब्रह्मदेश होय. कसेरू द्वीप हे मध्यदेशाच्या पूर्वेला आहे, असे अल् बिरूनी सांगतो. मजुमदार ते मलयद्वीप असल्याचें सांगतात. इतर खंडांबाबतही अशीच मतभिन्नता आढळते. श्री. एस. मुझफर

अली यांनी तर वायू पुराणाच्या अठ्ठेचाळीसाव्या अध्यायाच्या आधारे ही नवखंडे भारतवर्षाच्या बाहेर नसून भारतवर्षातच होती, असे प्रतिपादन केले आहे. ताम्रपर्ण खंड कावेरीच्या दक्षिणेला, इंद्रद्वीप ब्रह्मपुत्रेच्या पलिकडील भागाला, कसेरू गोदावरी आणि महानदी यांच्या मधील किनाऱ्यालगतच्या प्रदेशाला, गमस्तिमान नर्मदा नदी आणि गोदावरी यांच्या-मधील डोंगराळ भागाला, सौम्य सिंधूच्या पश्चिमेकडील किनारपट्टीला, गंधर्व सिंधू नदीच्या पलिकडच्या प्रदेशाला आणि वारुण भारताच्या पश्चिमकिनार पट्टीला म्हणत असत, असे ते सांगतात.

पुराणांतील नवखंडांप्रमाणेच पराशर आणि वराहमिहिर या ज्योतिष्यांनीही भारतवर्षाचे नऊ भेद मानलेले आहेत. त्यांनी भारतवर्षाचा आकार कूर्मासारखा मानला असून, भारतवर्षाला कूर्मचक्र असे नाव दिले आहे. वराहमिहिराने भेदाला वर्ग असे म्हटले आहे. कूर्मचक्राच्या मध्यभागी पांचालदेश हा प्रमुख होता, तर मगध हा पूर्वेकडील, पुलिंद ईशान्येकडील, मद्र उत्तरेकडील, हरहौर वायव्येकडील, सिंधू पश्चिमेकडील, आनर्त नैर्ऋत्येकडील, अवंत दक्षिणेकडील आणि कलिंग हा आग्नेयकडील प्रमुख देश होता, असे म्हटले आहे.

या वर्गांचे तपशीलवार वर्णन करताना वराहमिहिराने सिंधू, सौवीर, पल्लव, व कांबोज हे देशही आनर्ताप्रमानेच नैर्ऋत्येला आहेत, असे सांगितले आहे. मार्कंडेय पुराणातही असेच वर्णन आले आहे.

काही पुराणांनी भारतर्षाचें पाच किंवा सातच खंड मानलें आहेत. [ पु. वि.; जॉ. पु.; मा. पु. सां. अ.; वा. पु. स्ट. ]

**नवखनी** बंगालमधल्या उराँव आदिवासींचा एक उत्सव भात कापणीच्या प्रसंगी म्हणजे सामान्यपणे भाद्रपद महिन्यात हा उत्सव करतात. नव्याने पिकलेल्या साळींचे तांदूळ करून ते खाणे, हे या उत्सवाचे प्रमुख प्रयोजन आहे. उत्सवाच्या दिवशी घरापुढील आंगण शेणाने स्वच्छ सारवतात व तिथे धर्मदेवाची पूजा करतात. पूजेनंतर प्रथम धर्मदेवाला व नंतर आपल्या पूर्वजांना नैवेद्य दाखवतात व कोंबड्याचा बळी देतात. आपल्याकडील नवान्न पौर्णिमा व बंगालमधील नबन्न (नवान्न) उत्सव यांच्यांशी नवखनी उत्सवाचे बरेच साम्य दिसते. [ फो. लो. — फेब्रु. १९६४ ]

**नवग्रह** रवी, सोम, मंगळ, बुध, गुरू, शुक्र, शनी, राहू व केतू हे नऊ ग्रह होत. हे ग्रह आकाशात फिरत असतात. मनुष्यावरही ते आपला भलाबुरा प्रभाव पाडीत असतात, अशी समजूत आहे. त्यामुळे महत्त्वाच्या प्रसंगी ग्रहांची शांती करण्याची पद्धत पडली आहे. त्याचप्रमाणे ग्रहांची अनुकूलता संपादण्यासाठी त्यांच्या मंत्रांचा जप करणे, त्यांना आवडणाऱ्या रत्नाची अंगठी हातात घालणे, दान देणे, इ. गोष्टीही कराव्या असे सांगितले आहे. या ग्रहांची माहिती क्रमाने अशी —

**रवी** — कश्यप व अदिती यांचा पुत्र. वर्णाने क्षत्रिय किंवा ब्राह्मण. कलिंग देशाचा राजा. तीन्ही वेदांचे व्यक्त स्वरूप, आकाशाचा आधार, मेरू पर्वताभोवती प्रदक्षिणा करणारा, कमलासन, कमलहस्त, एकचक्र आणि सात मुखांचा अश्व असलेल्या रथावर आरूढ व लगाम हाती धरणारा. संज्ञा, वडवा, स्वर्णा व सुवर्चसा या त्याच्या भार्या. रेवंत, यम आणि दोन मनू हे पुत्र व कालिंदी ही कन्या होय.

वैदिक मंत्र—

**आ कृष्णेन रजसा वर्तमानो निवेशयन्नमृतं मर्त्यं च ।**
**हिरण्ययेन सविता रथेना देवो याति भुवनानि पश्यन् ।।**

(ऋ. १. ३५. २)

पौराणिक मंत्र—

**जपाकुसुमसङ्काशं काश्यपेयं महाद्युतिम् ।**
**तमोऽरिं सर्वपापघ्नं प्रणतोऽस्मि दिवाकरम् ।।**

जपसंख्या—सात हजार. सूक्त— सौर, दानद्रव्ये— सुवर्ण, ताम्र, मणी, गहू, रक्त धेनू, गूळ, कुसुंभ व रक्त कमल. वस्त्र— कुसुंमी. वार— रविवार. सण— संक्रांती व रथसप्तमी.

**चंद्र** — अत्रिपुत्र. हा समुद्रमंथनातून वर आला. वर्णाने वैश्य, अश्विन्यादी सत्तावीस नक्षत्रे या याच्या स्त्रिया. शुभ ग्रह. शुभ्र वर्ण, शुभ्रवस्त्र, मृगवाहन व द्विभुज. एका हातात गदा व दुसऱ्या हाताची वरद मुद्रा.

वैदिक मंत्र —

**आ प्यायस्व समेतु ते विश्वतः सोम वृष्ण्यम् ।**
**भवा वाजस्य सङ्गथे ।।**

( ऋ. १. ९१. १६)

पौराणिक मंत्र—

**दधिशङ्खतुषाराभं क्षीरोदार्णवसम्भवम् ।**
**नमामि शशिनं सोमं शम्भोर्मुकुटभूषणम् ।।**

जपसंख्या— अकरा हजार. दानद्रव्ये— सुवर्ण, रौप्य, मोती तांदूळ, पांढरा बैल, घृत, श्वेत वस्त्र व श्वेत पुष्प. वस्त्र— श्वेत.

**मंगळ**— भूमी व भरद्वाज यांचा पुत्र. अवंती येथे याचा जन्म झाला. वर्णाने क्षत्रिय. पापग्रह. रक्तवस्त्रे व रक्तपुष्पे धारण करणारा. चतुर्भुज. याच्या तीन हातांत शक्ती, शूळ व गदा ही आयुधे असतात आणि चौथ्या हाताची वरदमुद्रा असते.

वैदिक मंत्र–

अग्निर्मूर्धा दिवः ककुत् पतिः पृथिव्या अयम् ।
अपां रेतांसि जिन्वति ॥

(ऋ. ८.४४.१६)

पौराणिक मंत्र–

धरणीगर्भसम्भूतं विद्युत्कान्तिसमप्रभम् ।
कुमारं शक्तिहस्तं च मङ्गलं प्रणमाम्यहम् ॥

जपसंख्या– दहा हजार. दानद्रव्ये– सुवर्ण, ताम्र, प्रवाल, मसुरा, रक्त वृष, गुड, रक्त वस्त्र व रक्त कमल. वस्त्र–रक्त.

**बुध**– चंद्रपुत्र. मगध देशात जन्म. वर्णाने वैश्य. शुभ ग्रहांबरोबर शुभ व पापग्रहांबरोबर पाप. पीत वस्त्रे व पीत पुष्पे धारण करणारा. चतुर्भुज. तीन हातांत ढाल, तलवार, गदा व चौथ्या हाताची वरदमुद्रा.

वैदिक मंत्र–

उद्बुध्यध्वं समनसः सखायः समग्निमिन्ध्वं बहवः सनीळाः ।
दधिक्रामग्निमुषसं च देवीमिन्द्रावतोऽवसे नि ह्वये वः ।

(ऋ. १०.१०१.१)

पौराणिक मंत्र–

प्रियङ्गुकलिकाश्यामं रूपेणाप्रतिमं बुधम् ।
सौम्यं सौम्यगुणोपेतं तं बुधं प्रणमाम्यहम् ॥

जपसंख्या चार हजार. दानद्रव्ये– सुवर्ण, कांस्य, पाच, मूग, हत्ती, घृत, नीलवस्त्र व सर्व पुष्पे. वस्त्र–नीलवर्ण.

**गुरू** – अंगिरसाचा पुत्र. सिंधू देशात जन्म. वर्णाने ब्राह्मण. देवांचा गुरू. शुभ ग्रह. चतुर्भुज. तीन हातात दंड, कमंडलू, अक्षमाला व चौथ्या हाताची वरदमुद्रा. पीत वस्त्र धारण करणारा.

वैदिक मंत्र–

बृहस्पते अति यदर्यो अर्हाद् द्युमद् विभाति क्रतुमज्जनेषु ।
यद्दीदयच्छवस ऋतप्रजात तदस्मासु द्रविणं धेहि चित्रम् ॥

(ऋ. २.२३.१५)

पौराणिक मंत्र–

देवानां च ऋषीणां च गुरुं काञ्चनसन्निभम् ।
बुद्धिभूतं त्रिलोकेशं तं नमामि बृहस्पतिम् ॥

जपसंख्या –एकोणीस हजार. दानद्रव्ये– सुवर्ण, कांस्य, पुष्पराग, हरभऱ्याची डाळ, साखर, घोडा, पीत वस्त्र आणि पीत पुष्प. दर्शन–दत्त. वस्त्र–पीत.

**शुक्र**– भृगुपुत्र. भोजकट देशात जन्म. वर्णाने ब्राह्मण. दैत्यांचा गुरू. शुभ ग्रह. शुभ्र वर्ण व चतुर्भुज. तीन हातांत दंड, कमंडलू अक्षमाला व चौथ्या हाताची वरदमुद्रा. पीतवस्त्र धारण करणारा.

वैदिक मंत्र–

शुक्रः शुशुक्वाँ उषो न जारः ।
पप्रा समीची दिवो न ज्योतिः ॥

( ऋ. १.६९.१ )

पौराणिक मंत्र–

हिमकुन्दमृणालाभं दैत्यानां परमं गुरुम् ।
सर्वशास्त्रप्रवक्तारं भार्गवं प्रणमाम्यहम् ॥

जपसंख्या– सोळा हजार. दानद्रव्ये– सुवर्ण, रौप्य, हिरा, तांदूळ, श्वेत अश्व, तूप, चित्र वस्त्र व श्वेत पुष्प. वस्त्र–चित्रविचित्र.

**शनी**– सूर्यपुत्र. सौराष्ट्रात जन्म. वर्णाने शूद्र. पापग्रह. नील कांतीचा. घारीवर बसणारा. चतुर्भुज. तीन हातांत धनुष्य, बाण, शूल व चौथ्या हाताची वरदमुद्रा.

वैदिक मंत्र–

शमग्निरग्निभिः करच्छं नस्तपतु सूर्यः ।
शं वातो वात्वरपा अप स्त्रिधः ॥

( ऋ. ८.१८.९ )

पौराणिक मंत्र–

नीलाञ्जनसमाभासं रविपुत्रं यमाग्रजम् ।
छायामार्तण्डसम्भूतं तं नमामि शनैश्चरम् ॥

जपसंख्या– तेवीस हजार. अभिषेकमंत्र– रुद्राध्याय (वैदिक), महिम्न (पौराणिक). तेलाचा अभिषेक. दानद्रव्य– सुवर्ण, लोखंड, नील, उडीद, म्हैस, तेल, कृष्ण कंबल व कृष्ण पुष्प. दर्शन– गणपती, मारुती, देवी व शनी. वस्त्र– काळे. वाचन– रामायण, शनिमाहात्म्य.

**राहू**– सिंहिकासुत. पैठणात जन्म. वर्णाने शूद्र. पापग्रह, काळ्या सिंहावर आरूढ, धूम्रवर्ण, द्विभुज, भयंकर.

वैदिक मंत्र–

कया नश्चित्र आ भुवदूती सदावृधः सखा ।
कया शचिष्ठया वृता ॥

( ऋ. ४.३१.१ )

पौराणिक मंत्र–

अर्धकायं महावीर्यं चन्द्रादित्यविमर्दनम् ।
सिंहिकागर्भसम्भूतं तं राहुं प्रणमाम्यहम् ॥

जपसंख्या– अठरा हजार. दानद्रव्ये– सुवर्ण, शिसे, गोमेद, तीळ, घोडा, तेल, नीलवस्त्र व कृष्ण पुष्प. वस्त्र – नील.

**केतू**– जैमिनीच्या कुळात उत्पन्न. कुशद्वीपात जन्म. वर्णाने शूद्र. पापग्रह. घारीवर बसणारा, धूम्रवर्ण, द्विभुज व भयंकर.

वैदिक मंत्र –

केतुं कृण्वन्नकेतवे पेशो मर्या अपेशसे ।
समुषद्भिरजायथाः ॥

( ऋ. १.६.३ )

पौराणिक मंत्र–

पलाशपुष्पसङ्काशं तारकाग्रहमस्तकम्
रौद्रं रौद्रात्मकं घोरं तं केतुं प्रणमाम्यहम् ॥

जपसंख्या– सतरा हजार. दानद्रव्ये– सुवर्ण, पोलाद, लसण्या, तीळ, बोकड, तेल, कृष्ण वस्त्र व धूम्रपुष्प. वस्त्र – काळे.

निरनिराळ्या वैदिक शाखांनुसार काही ग्रहांचे मंत्र भिन्न आहेत.

भारतातील कित्येक शिल्पांत नवग्रहांचे पट्ट आढळतात. गुर्गी येथील नवग्रहपट्टात मंगळाशिवाय बाकीचे ग्रह वाहनावर बसलेले दिसतात. दुसऱ्या एका शिलापट्टावर नऊही ग्रह कमळावर बसवलेले आहेत.

भारताबाहेर इंडोचायनातही नवग्रहपट्ट सापडला आहे. भारतात अनेक ठिकाणी नवग्रहांची मंदिरेही आहेत.

मध्ययुगात अनेक मंदिरांतील शिल्पकामात नवग्रहांची चित्रे कोरलेली आढळतात. मंदिर सुरक्षित राहावे, या भावनेने ती कोरली जात. सारनाथ येथील उत्तर गुप्तकाळातील एका शिल्पात बृहस्पती, शुक्र, शनी व राहू यांच्या आकृती आहेत. पहिले तिघे डौलात उभे आहेत; तर राहूची आकृती अर्धीच आहे. त्याच्या मस्तकी उंच जटाभार असून, त्याचे दात विचकलेले आणि डोळे वर आलेले आहेत. तिघांच्याही मस्तकाभोवती प्रभावलय असून, हातात माला व कलश आहेत. पूर्वी केतू वगळून बाकीच्या आठच ग्रहांची चित्रे कोरीत असत. भुवनेश्वर येथील प्राचीन शिवमंदिरांच्या द्वारावर आठच ग्रह दिसतात. गंगकाळापासून त्यांत केतूची भर पडली. नंतरच्या काळातील काही नवग्रहपट्टांत प्रथम गणपतीची मूर्ती दिसते. बंगालमधील कनकनदिघी येथे सापडलेल्या सुंदर शिल्पात सर्व ग्रह कमलपीठावर उभे असलेले दाखवले आहेत.



नवग्रहचक्र– खिचिंग

याशिवाय खिचिंग ( जि. मयूरभंज, ओडिसा ) येथील भग्नावशेषांत बारा अऱ्यांचे एक नवग्रहचक्र सापडले आहे. ते चक्र एका कमलाकृती चबुतऱ्यावर उभे असून, त्याच्या रुंद काठावर नवग्रहांच्या आकृती आहेत. वरच्या बाजूला मध्यभागी सूर्य, खालच्या बाजूला दोन्हीकडे राहू व केतू आणि मधल्या जागेत बाकीचे सहा ग्रह आहेत. चक्राच्या मध्यभागी एक त्रिमुख व चतुर्भुज आकृती पद्मासन घालून बसलेली असून, तिचे पुढील हात ध्यानमुद्रेत आहेत. या चक्राच्या काठातून ज्वाला निघताना दिसतात.



नवग्रहशिल्प– गंगैकोंडचोळपुरम

गंगैकोंडचोळपुरम येथील मंदिरातले नवग्रहशिल्प अतिशय सुंदर आहे. ते रथासारखे असून, त्याच्या मध्यभागी एक मोठे उमललेले कमल सूर्याचे प्रतीक म्हणून कोरलेले दिसते. रथाच्या चारी बाजूंवर आठ ग्रहांच्या सुरेख मूर्ती कोरलेल्या आहेत आणि पुढच्या बाजूला सात घोडे दाखवले आहेत.

भारताच्या सर्व भागांत प्राचीन काळापासून नवग्रहांची पूजा रूढ आहे. भरपूर पाऊस, समृद्धी, पुष्टी, तुष्टी, शांती, दीर्घायुष्य, इ. अनेक गोष्टींसाठी आणि सर्व संस्कार व धार्मिक कार्ये या प्रसंगी नवग्रहांची पूजा केली जाते. या ग्रहांच्या प्रतिमा अनुक्रमे तांबे, स्फटिक, रक्तचंदन, सुवर्ण, चांदी, लोह, शिसे व कासे या पदार्थांच्या बनवतात. [ मू. वि.; डे. हिं. इ.; सा. इं. इ. गॉ. गॉ.; भा. वा. शा. प्र. वि.; श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव– पुरुषार्थ, ऑगस्ट १९५८ ]

## नवग्रह-मुद्रिका

नवग्रहांची आंगठी. ही आंगठी सोन्याची करून तिच्यात पूर्वेपासून ईशान्येपर्यंत सर्व दिशांना त्या त्या ग्रहांची रत्ने पुढीलप्रमाणे बसवावी, असे सांगितले आहे– पूर्वेस शुक्राप्रीत्यर्थ हिरा, आग्नेयीस चंद्रासाठी मोती, दक्षिणेस मंगळासाठी पोवळे, नैर्ऋत्येस राहूसाठी गोमेद, पश्चिमेस शनीसाठी नील, वायव्येस केतूसाठी वैडूर्य, उत्तरेस गुरूसाठी पुष्कराज, ईशान्येस बुधासाठी पाचू आणि सर्वांच्यामध्ये रवीसाठी माणिक.

ही अंगठी बोटात वागवल्याने नवग्रहांची पीडा दूर होते, असे

सांगितले आहे. जो ग्रह अनिष्ट असेल, त्याचे रत्न बसवलेली आंगठी वापरण्याचीही प्रथा आहे. [ मु. चिं. ]

**नवजोत** पारश्यांचा एक संस्कार. हिंदूंच्या उपनयनासारखाच हा संस्कार आहे. वैदिक धर्मात उपनयनाला जेवढे पावित्र्य व महत्त्व आहे, तेवढेच ते झरथुष्ट्री धर्मात नवजोतला आहे. मुलाप्रमाणे मुलीचाही हा संस्कार करतात. नव म्हणजे नवीन आणि जोत म्हणजे धर्मातील प्रार्थना म्हणण्यासाठी ज्याला नवीनच दीक्षा मिळाली आहे, अशी व्यक्ती होय. एवंच नवजोत म्हणजे मझ्दप्रभूचा नवा उपासक, झरथुष्ट्राचा नवा अनुयायी व पारशी समाजाचा नवा घटक असा त्याचा अर्थ होतो. या संस्काराने बटूला नवा व पवित्र जन्म मिळतो, असे मानतात. हा संस्कार झाल्याशिवाय कोणत्याही मुलाला झरतुष्ट्री धर्मातील प्रार्थना म्हणण्याचा व धार्मिक कर्तव्ये करण्याचा अधिकार मिळत नाही.

हा संस्कार अगदी साधा असतो. मुलाला सदरा नामक एक पवित्र अंगरखा व कस्ती नावाची मेखला या प्रसंगी धारण करायला लावतात. सदरा या शब्दाच्या अर्थाबद्दल विद्वानांत मतभेद आहेत; परंतु सामान्यपणे त्याचा अर्थ श्रेयस्कर मार्ग असा करतात. तो सदरा त्या मार्गाचे प्रतीक असतो आणि कस्ती हे, त्या श्रेयस्कर मार्गाचा अवलंब करणे या कर्तव्याचे प्रतीक होय.

वयाच्या सातव्या वर्षी हा संस्कार करावा, असे पारश्यांचे धर्मशास्त्र आहे; परंतु काही कारणाने त्या वेळी तो करणे न जमल्यास पंधरा वर्षांपर्यंत केव्हाही तो करता येतो. या संस्काराचा विधी असा–

प्रथम मुलाला विधिपूर्वक स्नान घालतात. मग त्याच्या शेजारी एका तबकात तांदूळ, दुसऱ्यात फुले, निरांजन, गंध व सुगंधी पदार्थांनी पेटविलेला अग्नी व तिसऱ्या तबकात तांदूळ, डाळिंबाचे दाणे, बदाम व खोबऱ्याचे तुकडे यांचे मिश्रण ठेवतात. पुरोहित मुलाच्या हातात तो पवित्र सदरा देतो व पॅटेट म्हणजे प्रायश्चित्तात्मक मंत्र म्हणतो. मग बटूकडूनही ते मंत्र म्हणवून घेतो. नंतर पुरोहित उभा राहून मुलाला आपल्यासमोर उभा करतो. मग तो बटूला झरतुष्ट्री धर्माच्या प्रशंसेची काही वाक्ये म्हणायला सांगतो. नंतर अहुनवर नामक प्रार्थनामंत्र म्हणत म्हणत बटूच्या अंगात तो सदरा घालतो. मग मुलाच्या मागे उभा राहतो. सकाळची वेळ असली तर ते दोघे पूर्वेकडे व संध्याळची वेळ असली, तर पश्चिमेकडे तोंड करतात. मग दोघेही पुढील आशयाची प्रार्थना करतात–

हे सर्वव्यापक प्रभो, मला माझ्या पापांबद्दल पश्चात्ताप होतो. आजवर कायावाचामनाने माझ्याकडून ज्या वाईट गोष्टी घडल्या असतील त्यांचा मला पश्चात्ताप होतो. अहुरमझ्दाचा जयजयकार असो. अहरिमनाचा धिक्कार असो.

ही प्रार्थना म्हणत असताना पुरोहित बटूला कस्ती (मेखला) धारण करायला लावतो.

त्यानंतर बटू व पुरोहित पुढील मंत्रभाग म्हणतात–

हे सर्वशक्तिमान परमेश्वरा, मला साहाय्य कर. मी देवाचा पूजक आहे. झरथुष्ट्री धर्मावर माझी श्रद्धा आहे व त्या धर्माची मी स्तुती करतो. मी पवित्र विचार, पवित्र आचार व पवित्र शब्द यांची प्रशंसा करतो. सर्व चांगल्या गोष्टींचा उगम ईश्वरापासून होतो, असा माझा विश्वास आहे.



नवजोत– विधी

पारशी लोकांची अशी धारणा आहे की माणसाने स्वतःचा उद्धार स्वतःच करून घेतला पाहिजे. त्यासाठी त्याला स्वतःचेच चांगले विचार, चांगले आचार व चांगले शब्द उपयोगी पडतात. ही त्रयी म्हणजे झरथुष्ट्री धर्माचा गाभाच होय. त्यामुळे नवजोत संस्कारातील हा प्रार्थनेचा भाग महत्त्वाचा मानला जातो. तो पुरा झाल्यावर मग पुरोहित आशीर्वादात्मक मंत्र म्हणतो व संस्कार्य बटूला आशीर्वाद देण्यासाठी ईश्वराला आवाहन करतो.

या संस्कारसमयी वापरला जाणारा पवित्र सदरा पांढऱ्या मलमलीचा असतो. त्याच्या गळ्याच्या मध्यभागी एक खिसा असतो. या मागची कल्पना अशी, की माणूस रोज ज्याप्रमाणे धनसंग्रह करतो, त्याचप्रमाणे त्याने सत्कृत्येही करावी आणि त्याचे पुण्य त्या खिशात साठवावे.

कस्ती कोकराच्या पांढऱ्या लोकरीपासून तयार करतात. ती बहात्तर धाग्यांची बनवतात.

झरथुष्ट्री धर्माच्या माणसाने हा संस्कार झाल्यावर पुढे आमरण सदरा व कस्ती धारण केली पाहिजे, अशी धर्माज्ञा आहे. फक्त स्नानाच्या वेळी तेवढी ही वस्त्रे बाजूला ठेवली तरी चालतात. [ म. ज्ञो. शि.; मार्च ऑफ इंडिया, जून १९६२ ]

**नवदुर्गा** मातृदेवतांचा एक समूह. आगम ग्रंथांत त्यांची नावे दिली आहेत, ती अशी – शैलपुत्री, ब्रह्मचारिणी, चंडा, स्कंदमाता, कूष्मांडी, दुर्गा, कात्यायनी, कालरात्री, महागौरी व सिद्धिदायिनी. स्कंदयामलात व अग्नी पुराणात पुढील नावे आहेत– रुद्रचंडा, प्रचंडा, चंडोग्रा, चंडनायिका, चंडा, चंडवती, चंडरूपा, अतिचंडिका व उग्रचंडिका. भविष्य पुराणात त्यांची नावे महालक्ष्मी, नंदा, क्षेमकरी, शिवदूती, महारुद्रा, भ्रमरी, चंडमंगला, रेवती व हरसिद्धी अशी सांगितली आहेत. यांची आणखीही काही नावे आढळतात, ती अशी– नीलकंठी, रुद्रांश–दुर्गा, वन-दुर्गा, अग्नि-दुर्गा, जय-दुर्गा, विंध्यवासिनी-दुर्गा, रिपुमारी-दुर्गा इत्यादी.

गोमंतकात मडकई येथे नवदुर्गेचे एक मंदिर असून, त्यात तिची पाषाणमूर्ती महिषासुरमर्दिनीच्या रूपात आहे. [ रि. इं. ]

**नवद्वीप** एक पुण्यक्षेत्र. याला नवद्वीपधाम असेही म्हणतात. याचे सांप्रतचे नाव नदिया असे आहे. हावडा-बरहवा लोहमार्गावर हावड्यापासून ६६ मैलांवर हे क्षेत्र आहे. हे भागीरथीच्या पश्चिम किनाऱ्यावर वसले आहे. इथे भागीरथी व जलांगी या दोन नद्यांचा संगम होतो. आजचे नवद्वीप हे छोटेसे शहर असले, तरी प्राचीन नवद्वीप नगराचा घेर सोळा कोसांचा होता, असे सांगतात.

नवद्वीप म्हणजे संयुक्त नऊ बेटांचे क्षेत्र होय. अंतर्द्वीप, सीमंतद्वीप, गोद्रुमद्वीप, मध्यद्वीप, कोलद्वीप, ऋतुद्वीप, जन्हुद्वीप, मोदद्रुमद्वीप व रुद्रद्वीप अशी ही नऊ द्वीपे आहेत.

गौडीय मठाचे संस्थापक श्री. भक्तिविनोद ठाकूर यांच्या मते आजचे नवद्वीप हे खरे नवद्वीप नसून, गंगेच्या पलिकडच्या तीरावरील मायापूर हेच खरे नवद्वीप होय. त्यांच्या मते आजचे नवद्वीप हे पूर्वीचे रामचंद्रपूर आहे. हा अपवाद सोडल्यास चैतन्यप्रभूंचे अनुयायी मात्र वर्तमान नवद्वीपालाच नवद्वीपधाम समजतात.

**इतिहास** – बंगालमधील पाल व सेन या राजवंशांची ही राजधानी होती. लक्ष्मण सेन या राजाने इथे गंगातीरी मोठा राजवाडा बांधला होता. त्याने आपला पिता बल्लाळ सेन याच्या स्मरणार्थ इथे एक मोठा तलाव खोदलेला आहे. हल्ली त्याला पृथुकुंड म्हणतात.

नवद्वीप हे फार पूर्वीपासून एक महत्त्वाचे शिक्षणकेंद्र होते. इ. स. ११९८ ते १७५७ पर्यंत हे क्षेत्र इस्लामी सत्तेखाली होते. तरीही त्याची विद्यापरंपरा खंडित झाली नाही. ती उत्तरोत्तर वाढतच गेली व चौदाव्या व पंधराव्या शतकात नवद्वीप हे पूर्व भारतातील एक महान विद्यापीठ गणले जाऊ लागले.

नव्य न्यायाची परंपरा इथूनच सुरू होते. वासुदेव सार्वभौम या विख्यात नैयायिकाने ती सुरू केली व नवद्वीपाला नव्य न्यायाचे विद्यापीठ अशी प्रतिष्ठाही त्यानेच प्राप्त करून दिली. नवद्वीपात याने नव्य न्यायाचे अध्यापनकार्य सुरू केले, तेव्हा दूरदूरचे शिष्य मोठ्या संख्येने तिथे अध्ययनासाठी येऊ लागले. पंधराव्या शतकाचा अंत व सोळाव्या शतकाचा आरंभ हा वासुदेव सार्वभौमाचा काळ होय. या विद्यापीठात तंत्रविद्या आणि ज्योतिषशास्त्र यांचेही अध्यापन चालत असे. रघुनाथ भट्टाचार्य हा महान नैयायिक नवद्वीपातच जन्मला. चैतन्यप्रभूंचा जन्मही याच क्षेत्रात झाला. चैतन्याच्या काळात नवद्वीप विशेष ख्याती पावले. त्याच्या वेळी तिथे सुमारे ५० पाठशाळा चालत होत्या. रघुनाथ भट्टाचार्य, मथुरानाथ, रामचंद्र सार्वभौम, विद्यावागीश, महेश्वर, नीलांबर चक्रवर्ती, अद्वैताचार्य, गंगादास यांच्यासारखे सुविख्यात पंडित त्या काळी तिथे अध्यापनाचे कार्य करीत होते.

चैतन्यप्रभूंच्या अनेक लीला याच क्षेत्रात घडल्या, म्हणून चैतन्यसंप्रदायी लोकांना नवद्वीप हे प्रतिवृंदावन वाटते. चैतन्यांचा मोठेपणा आणि त्यांच्या अलौकिक लीला यांच्या स्मृती जतन करणारी अनेक पुण्य स्थळे सांप्रत नवद्वीपात आहेत. त्यांची नावे अशी– (१) धामेश्वर– हे चैतन्यप्रभूचे मंदिर आहे. इथल्या मूर्तीची स्थापना त्यांची पत्नी विष्णुप्रिया हिने केली. ही मूर्ती काष्ठनिर्मित असून माणसाच्या उंचीची आहे. (२) सोनार गौरांग या मंदिरात गौरांगाची म्हणजे चैतन्यप्रभूंची सुवर्णमूर्ती आहे. (३) शचीमाता-विष्णुप्रियामंदिर– यात गौरांगप्रभूची माता व पत्नी यांच्या मूर्ती आहेत. (४) श्रीनिवास– प्रांगण – हा चैतन्यांच्या अनुयायांचा आखाडा आहे. याशिवाय वडा आखाडा, श्री नित्यानंदमंदिर, नित्यानंद मीलन, श्रीअद्वैताचार्यमंदिर ही चैतन्यांशी संबंधित अशी अन्यही काही मंदिरे आहेत.

मायापूर, जन्हुनगर, सीमांतद्वीप, गोद्रुमद्वीप, हरिहर क्षेत्र, महावाराणशी, देवपाडा, मजिदा, चाँपाहाटी, शांतिपूर, कटवा ही नवद्वीपाच्या परिसरातली आणखी काही प्रसिद्ध स्थळे होत.

नवद्वीपावर चैतन्य प्रभूंच्या जीवनाचा फार मोठा प्रभाव असल्यामुळे तिथले सर्व महोत्सव हे त्यांच्या जीवनलीलांशी संबंधित आहेत. इथे फाल्गुनी पौर्णिमेला दोलयात्रा व गौरांगजन्मोत्सव साजरा होतो आणि कार्तिक मासात रासयात्रा उत्सव असतो. याशिवाय नित्यनैमित्तिक असे लहानमोठे उत्सव असतात, ते वेगळेच. [ श्रीचैतन्यलीलाधाम– नवद्वीप, श्री. आनंदयात्री, १९६१ कल्याण-तीर्थांक; प्रा. भा. वि.; सु. वि. को. ]

**नवनाग** अनंत, वासुकी, शेष, पद्मनाभ, कंबल, शंखपाल, धृतराष्ट्र, तक्षक व कालिय यांना नवनाग असे म्हणतात. ही नावे प्रातःस्मरणात उच्चारली जातात. सर्प-विषाची बाधा होऊ नये म्हणून नवनागांचे स्मरण करावे, अशी लोकसमजूत आहे. पाहा– अष्टनाग. [ संकेतकोश; सु. वि. को. ]

**नवनाथ** नाथ संप्रदायातील नऊ सिद्धांचा समूह. नवनाथांच्या गणनेत कोणत्या नाथांचा समावेश होतो, यासंबंधी मतभेद आहेत. नवनाथभक्तिसार या सांप्रदायिक मराठी ग्रंथात नवनाथ हे भागवताच्या एकादश स्कंधात सांगितलेल्या नवनारायणांचे अवतार मानले आहेत. हे नवनाथ व ते ज्यांचे अवतार आहेत, ते नवनारायण यांच्या जोडया नवनाथभक्तिसार या ग्रंथात सांगितल्या आहेत. त्या अशा—

(१) नारायण – मत्स्येंद्र
(२) हरी – गोरक्ष
(३) अंतरिक्ष – जालंधर
(४) प्रबुद्ध – कानीफ
(५) पिप्पलायन – चर्पटी
(६) आविर्होत्र – नाग
(७) द्रुमिल – भरथरी
(८) चमस – रेवण
(९) करभाजन – गहिनी

योगिसंप्रदायाविष्कृती या ग्रंथातही नवनारायणांच्या अवतारांची कल्पना स्वीकारलेली आहे. पण त्या ग्रंथातल्या नवनाथांत गोरक्षनाथाचा समावेश नाही.

नवनाथचरित्रमु या तेलुगू ग्रंथात, त्याचप्रमाणे गोरक्षसिद्धान्त-संग्रह, सुधाकरचंद्रिका, महार्णव तंत्र, राजाराम प्रसादीची भक्तमंजरीमाला, कदलीमंजुनाथमाहात्म्य, इ. ग्रंथांत नवनाथांची नावे आहेत; पण त्या नावांत थोडाफार फरकही आहे.

या विविध नवनाथगणनांवरून असे दिसते, की त्यांतील काही सिद्धांची नावे सर्व गणनांतून समान असली, तरी त्या गणनांत साम्य नाही. त्यामुळे आद्य नऊ नाथसिद्धांत कोणत्या सिद्धांची गणना होत होती, हे निश्चित कळायला मार्ग नाही. त्याचप्रमाणे ही नवनाथगणनेची कल्पना केव्हा सुरू झाली हेही निश्चित सांगता येत नाही. मात्र ती बरीच जुनी म्हणजे इ. स. च्या १० व्या ११ व्या शतकातली असावी, असे वाटते. कारण गोरखवानीत व महानुभाव कवी दामोदर पंडित याच्या ग्रंथात त्या संबंधीचे उल्लेख आलेले आहेत.

नवद्वारांचे अधिष्ठाते ते नवनाथ अशा विचारसरणीतून नवनाथकल्पनेचा उगम झाला असावा. पुढे ज्याला जे नाथ आदरणीय वाटले, ते नऊ या संख्येत बसवून, त्याने आपली नवनाथसूची सिद्ध केली असावी. सहा मनू, सप्तर्षी, अष्टछाप, नवनारायण, त्रेसष्ट सिद्ध (तमिळ शैव), इ. गणनांप्रमाणेच ही नवनाथगणना आहे. [ गो. च. प.; सु. वि. को. ]

**नवनिधी** (१) महापद्म, पद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील आणि खर्व असे कुबेराचे नवनिधी आहेत. हय, गज, रथ, दुर्ग, भांडार, अग्नी, रत्न, धान्य आणि प्रमदा यांनाही नवनिधी असे म्हणतात. कामधेनू, अंजन, सिद्धपादुका, अन्नपूर्णा, कल्पतरू, चिंतामणी, घुटिका, कलक आणि परिस यांचीही नवनिधीत गणना केली जाते. [ संकेतकोश; सु. वि. को. ]

**नवनीतधेनू** एक दान. कार्तिक अमावास्येला ब्रह्मा व सावित्री यांची पूजा करतात व हे दान देतात. याचा विधी असा– शेणाने सारवलेल्या भूमीवर कृष्णमृगाजिन अंथरून त्यावर एक कुंभ ठेवतात. मग त्यावर प्रस्थपरिमाण लोण्याची गाय करून ठेवतात. तिची शिंगे सोन्याची, डोळे मोत्यांचे, जीभ गुळाची, ओठ फुलांचे, दात फळांचे, आचळ लोण्याचे, पाय उसाचे, पाठ तांब्याची व खूर चांदीचे करतात. जेवढया लोण्याची गाय बनविली असेल, त्याच्या चतुर्थांश लोण्याचे वासरू करून ते तिच्या उत्तरेला ठेवतात. गायीच्या अंगावर दोन वस्त्रे घालतात. तिच्या भोवती चार दिशांना चार तिलपात्रे ठेवतात. चारही दिशांना दिवे लावतात. मग आहिताग्नी व वेदवेदांगपारंगत अशा ब्राह्मणाला ती गाय सवत्स दान देतात. फल– पापनाश व विष्णुलोकप्राप्ती. [ हि. ध.; श. क. ]

**नवपत्रिका** बंगालमध्ये दुर्गापूजेच्या उत्सवात दुर्गेचे प्रतीक म्हणून नवपत्रिकांची पूजा करण्याची प्रथा आहे. त्यासाठी कदली, दाडिमी, हरिद्रा, भात, कचू, बिल्व, अशोक, मानक व जयंती या नऊ झाडांची पाने घेऊन, ती एका तबकात ठेवतात. मग पुढीलप्रमाणे प्रार्थना करतात–

पत्रिके नवदुर्गे त्वं महादेवमनोरमे।
पूजां समस्तां संगृह्य रक्ष मां त्रिदशेश्वरि॥

अर्थ– पत्रिकारूपी नवदुर्गे, तू महादेवाची आवडती आहेस, हे त्रिदशेश्वरी देवी, तू या सर्व पूजेचा स्वीकार करून माझे रक्षण कर.

या नऊ वनस्पती मानवाचे पोषण करणाऱ्या आहेत, म्हणून त्यांना नवदुर्गा या मातृदेवतांचे प्रतीक मानलेले आहे. [ श. क.; फो. लो. जून, १९६५ ]

**नवब्रह्मे** ब्रह्मदेवाने स्थावरांपासून देवांपर्यंत सृष्टी उत्पन्न केली; पण त्या सृष्टीची पुढे वाढच होईना. म्हणून मग त्याने भृगू, पुलस्त्य, पुलह, ऋतू, अंगिरस, मरीची, दक्ष, अत्री व वसिष्ठ हे नऊ मानसपुत्र निर्माण केले. ब्रह्मदेवाप्रमाणेच हेही शक्तिशाली व अध्यात्मपंडित होते. म्हणून यांना भागवतादी पुराणांत नव ब्रह्मे असेच म्हटले आहे. ब्रह्मदेवाने मग ख्याती, भूती, इ. नऊ कन्या निर्माण केल्या आणि त्या वरील नवांना भार्या म्हणून दिल्या. या नऊ दांपत्यांपासून पुढे सृष्टीचा विस्तार झाला. [ पु. वि. ]

**नवमी** प्रत्येक मासाच्या शुक्ल व कृष्ण पक्षात येणारी नववी तिथी. ती चंद्राच्या नवमकलाक्रियारूप असते.

माघ मासातील नवमीला महानंदा असे नाव असून, त्या दिवशी केलेल्या स्नान, दान, जप, होम, देवपूजा, उपवास, इ. गोष्टी अक्षय होतात. या दिवशी दुर्गादेवीची पूजा करायची असते. दर नवमी तिथीला फक्त पिष्ट पदार्थांचेच भोजन करायचे, असे व्रत नऊ वर्षे केल्यास गौरी प्रसन्न होते.

कार्तिक शुद्ध नवमीच्या दिवशी सकाळी, दुपारी व संध्याकाळी अशी तीन वेळा दुर्गेची पूजा करावी; त्यामुळे पुत्र, आरोग्य व धन यांची प्राप्ती होते, असे माया व कात्यायनी या तंत्रांत सांगितले आहे.

नवमीला रिक्ता तिथी म्हणतात. या तिथीला जन्मणारी व्यक्ती आचारहीन, कृपण, कठोर व अपकार करणारी अशी निपजते, असे कोष्ठीप्रदीपात म्हटले आहे. [ श. क.; च. व. चिं. ]

**नवरत्ने** (१) हिरा, माणिक, मोती, इंद्रनील, पाच, प्रवाळ, गोमेद, पुष्कराज व वैडूर्य किंवा तोरमल्ली यांना नवरत्ने असे म्हणतात.

(२) भोज राजाच्या दरबारात नऊ विद्वान होते. त्यांनाही अशी संज्ञा आहे. त्यांची नावे अशी– धन्वंतरी, क्षपणक अमरसिंह, शंकू, वेतालभट्ट, घटकर्पर, कालिदास, वराहमिहिर व वररुची.

हे सर्व पंडित समकालीन नाहीत; पण आख्यायिकांत त्यांची नावे एकत्र येतात.

(३) अकबराच्या दरबारातही अशीच कवींची नवरत्ने होती. पाहा – अकबर. [ हि. ध.; सु. वि. को.; संकेतकोश ]

**नवरस** साहित्यशास्त्रात शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र आणि शांत असे नऊ रस मानलेले आहेत. त्यांचे अनुक्रमे रती, उत्साह, शोक, विस्मय, आनंद, भय, जुगुप्सा, क्रोध व शम असे स्थायीभाव आहेत. भक्ती हा दहावा रस कोणी मानतात. तुलसीदासाने अकथित रस नावाचा एक नवीन रस मानला आहे. [ संकेतकोश ]

**नवरात्रव्रत** एक काम्य व्रत. पुष्कळ घराण्यांत या व्रताला कुलाचाराचे स्वरूप असते. आश्विन शुद्ध प्रतिपदेस या व्रताचा प्रारंभ होतो. त्यासाठी घरात पवित्र जागी सोळा हातांचा मंडप उभारतात. तिथे एक वेदी तयार करतात. नंतर स्वस्तिवाचनपूर्वक त्या वेदीवर सिंहारूढ अष्टभुजा देवीची स्थापना करतात. मूर्ती नसल्यास नवार्ण यंत्राची स्थापना करतात. यंत्राशेजारी एक घट स्थापून त्याची व देवीची यथाविधि पूजा करतात. व्रतधारी व्यक्तीने नऊ दिवस उपवास किंवा नक्तभोजन करून व्रतस्थ राहायचे असते. आश्विन शु. नवमीअखेर हे व्रत चालते. या व्रतात नऊ दिवस सप्तशतीचा पाठ करतात, अखंड दीप लावतात, घटावर रोज एक किंवा चढत्या क्रमाने माळा बांधतात. क्वचित होमहवन व बलिदानही करतात. नऊ दिवस रोज कुमारीची पूजा करून तिला भोजन घालतात. शेवटी स्थापित घट व देवी यांचे उत्थापन करतात. या व्रताची एक कथा सांगतात, ती अशी –

रावणाने सीतेला पळवून नेल्यामुळे राम शोकग्रस्त झाला. मग त्याच्या सांत्वनासाठी नारद तिथे आला. त्या वेळी नारदाने रामाला सीतेच्या पूर्वजन्माची कथा पुढीलप्रमाणे निवेदन केली– पूर्वजन्मी सीता ही मुनिकन्या होती. ती एकदा तप करीत बसली असता रावणाच्या दृष्टीला पडली. रावण तिच्या रूपावर मोहित होऊन तिला म्हणाला. 'तू माझी पत्नी हो.' रावणाच्या या विनंतीचा सीतेने अव्हेर केला. त्यामुळे रावण चिडला व तिचे केस धरून तिला फरफटत नेऊ लागला. त्याच्या या कृत्यामुळे सीता क्रुद्ध झाली व तिने त्याला शाप दिला, की 'तुझा नाश करण्यासाठी पुढच्या जन्मी मी अयोनिसंभव अशी स्त्री होईन.' तीच ही आजची सीता व तुझी भार्या होय. ती आज लंकेतल्या अशोक वनात आहे. रावणाचा नाश केल्यावाचून तू तिला परत आणू शकणार नाहीस.

नंतर रामाच्या हातून रावणाचा वध व्हावा, या उद्देशाने नारदाने रामाला नवरात्रव्रत करायला सांगितले. रामाने ते केले. अष्टमीच्या मध्यरात्री देवीने रामाला दर्शन देऊन 'तुझ्या हातून रावणाचा वध होईल' असा आशीर्वाद दिला. नंतर रामाने ते व्रत पूर्ण करून दशमीच्या दिवशी लंकेवर स्वारी करण्यासाठी प्रस्थान ठेवले आणि शेवटी रावणाला ठार मारले.

देवीच्या शारदीय नवरात्राप्रमाणे रामकृष्ण, पांडुरंग, दत्त, शाकंभरी, खंडोबा, इ. देवतांचीही नवरात्रे साजरी करण्याची

प्रथा काही लोकांत आहे. ते उत्सव नवापेक्षा कमी अधिक दिवस चालत असले तरी देवीच्या नवरात्राप्रमाणेच त्यांतील कार्यक्रम असल्यामुळे त्यांनाही नवरात्र हेच नाव मिळाले आहे.

या व्रताचें फल युद्धात विजय, धन, वैभव आणि राज्य यांची प्राप्ती. पाहा – दुर्गापूजा. [ मा. व्र.; हिं. व्र. प. त्यौ. ]

**नवरेह** काश्मिरातील एक उत्सव. नवरेह म्हणजे नूतन वर्षाचा उत्सव होय. या उत्सवासाठी श्रीनगरमधील लहान थोर सर्व स्त्री-पुरुष बदामांच्या बागांमध्ये जमतात. तिथल्या पर्वताच्या उतरणीवर असलेल्या शारदामंदिरात या वेळी शारदेची महापूजा होते. हिंदू, मुसलमान व शीख असे सर्व धर्मांचे व पंथांचे लोक त्या वेळी शारदेला फुले वाहतात.

**नवरोज** पारशी लोकांचा वर्षारंभदिन. सूर्य मेष राशीत जातो तेव्हा (२० किंवा २१ मार्च) पारश्यांचे नवे-वर्ष सुरु होते. इराणात पारशी लोकांचे राज्य असताना पारशी राजे आपल्या राज्यारोहणाचा वाढदिवस करीत असत, त्यालाही नवरोज असेच म्हणत. मुसलमानांनी इराणचा ताबा घेतल्यावर त्यांनीही हा सण सुरू ठेवला होता. अकबर बादशहाने दिल्ली येथे नवरोज हा सण साजरा करण्याची प्रथा सुरू केली, ती मोगल बादशाहीच्या अखेरपर्यंत चालू होती. हा सण पाच दिवस साजरा होत असे. या दिवसांत नवी नाणी पाडण्यात येत व मीना बाजार भरवला जाई. सर्व दिवस चैनीत घालवीत असत. पारशी लोक पपेटी सणाच्या खालोखाल या सणाला महत्त्व देतात. या दिवशी नवीन गहू व इतर धान्ये, भाजीपाला, फळे, विविध खाद्य पदार्थ, गुलाबपाणी, फुलें, आरसा, इ. वस्तूंची सजावट करून, भोवती आरास करतात. पारशी लोक परस्परांच्या घरी जातात. भेटीला आलेल्या माणसांचे स्वागत करून गुलाबपाणी शिंपडतात. मग त्यांना आरसा दाखवतात. आरशात पाहिल्यावर मनुष्याला स्वाभाविकच हसू येते. वर्षभर त्याने असेच हसतमुख राहावे, ही त्या मागची कल्पना आहे. काही पारशी लोकांत या दिवशी पितरांसाठी प्रार्थना कर-ण्याची प्रथा आहे. [ म. ज्ञा. को.; सो. क. मु. ए. ]

**नवलाई–पावणाई** कोकणातील ग्रामदेवतांची जोडी. ही स्त्री भूतांची नावे आहेत, अशी समजूत आहे. पावणा म्हणजे खलाशी. खलाशाची बायको ती पावणाई असावी. नवला म्हणजे नवदुर्गा अशी एक समजूत आहे. काहींच्या मते या दोन देवता सवती असाव्यात. काही ठिकाणी यांच्या मूर्ती असतात, तर काही ठिकाणी तांदळे असतात. या दोन्ही देवतांचा नैवेद्य एकाच पानावर वाढतात. यांचा पुजारी सुतार असतो. विशिष्ट प्रसंगी यांच्या नावाने नारळ फोडतात. [ चित्पावन ]

**नवविधाभक्ती** भक्तीचे नऊ प्रकार. श्रीमद्भागवतात या नऊ प्रकारांची नावे एका श्लोकात ग्रथित केलेली आहेत, तो श्लोक असा—

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥**

(भाग. पु. ७. ५. २३)

अर्थ – विष्णूच्या लीलांचे श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन (हे भक्तीचे नऊ प्रकार होत).

या प्रकारची भक्ती करणारे प्रातिनिधिक भक्त अनुक्रमे परीक्षिती, शुकाचार्य, प्रल्हाद, लक्ष्मी, पृथू राजा, अक्रूर, हनुमान, अर्जुन व बली हे समजले जातात.

बृहदारण्यकोपनिषदात आत्मसाक्षात्काराचे श्रवणमननादी चार मार्ग सांगितले आहेत, त्यांचाच भागवतकारांनी नऊ प्रकारांत विस्तार केला आहे. वैष्णव संतकवींनी नवविधा भक्ती-वर अनेक पदे लिहिली आहेत.

तुलसीदासाने नवविधा भक्तीचे सत्संग, गुरुसेवा, प्रभुगुण-गान, मंत्रजप, दम, वैराग्य, सर्व विश्वात परमेश्वर पाहणे, यथालाभ संतोष आणि सर्वस्वी रामावर भरंवसा ठेवणे, असे थोडे निराळे नऊ प्रकार सांगितले आहेत. [ हिं. सा. को. ]

**नवव्यूहार्चन** एक वैष्णव व्रत. कोणत्याही शुद्ध एकादशीला किंवा आश्विनी किंवा फाल्गुनी एकादशीला, अथवा ग्रहणाच्या दिवशी हे व्रत करतात. या दिवशी उपवास करायचा असतो. व्रतविधी असा – ईशान्येला उतार असलेल्या जमिनीवर एक मंडप उभारतात. त्या मंडपाला आठ दरवाजे करतात. मंडपाच्या मध्यभागी कमलाची आकृती काढतात. अष्टदिशांना अष्टदिक्पालांच्या आयुधांची म्हणजे वज्र, शक्ती, दंड, खड्ग, पाश, पताका, गदा व शूल यांची चित्रे काढतात. त्याचप्रमाणे विष्णूचे व्यूह असलेल्या वासुदेव, संकर्षण, नारायण व वामन यांचीही चित्रे काढतात. मग त्यांची पूजा करून बलिप्रदान करतात. फल – पापनाश व धनप्राप्ती. [ हिं. ध. ]

**नवशीन** काश्मिरी लोकांचा एक सण. बर्फ पडायला प्रारंभ झाला, की काश्मिरी लोक ते एका लिफाफ्यात बंद करून आपल्या मित्राकडे पाठवतात. जर मित्राने तो लिफाफा फोडला, तर त्याने पाठवणाऱ्याला मेजवानी द्यावी,

असा संकेत असतो. याच वेळी नवविवाहित कन्येला तिच्या माहेराहून दागिने, कपडे व मिठाई पाठवली जाते.

**नवश्राद्ध** एकोद्दिष्ट श्राद्धाचे जे तीन प्रकार आहेत, त्यांतील पहिले श्राद्ध. हे मृत्यूनंतर दहाव्या दिवसापर्यंत करायचे असते. इतर श्राद्धांतील अनेक विधी या श्राद्धात नसतात. पिंडदानात पितर शब्दाऐवजी प्रेत शब्द योजतात. या श्राद्धाच्या वेळी धूपदीप दाखवीत नाहीत. हे अमंत्रक असते. जिथे मृत्यू झाला असेल तिथे किंवा स्मशानात किंवा जिथे पिंडदान व तर्पण केले जाते तिथे हे श्राद्ध करतात. [ हि. ध. ]

**नवस** इष्ट कामनेची पूर्ती व्हावी म्हणून देव-देवतेला दिलेले पूजोपचारांचे अभिवचन किंवा एखादा पदार्थ अर्पण करण्याची प्रतिज्ञा म्हणजे नवस होय. प्राचीन कालापासून लोकांची नवसावर श्रद्धा आहे. कोणत्याही इष्ट फलाच्या प्राप्तीसाठी देवतांना नवस करण्याची चाल फार जुनी आहे. एखादा रोग औषधोपचाराने बरा होत नसल्यास, बायका देवीची खणानारळाने ओटी भरीन किंवा एखादी वस्तू तिला अर्पण करीन, असा नवस करतात. मूल व्हावे, म्हणूनही नवस करतात. नवसाने झालेले मूल त्याच देवतेला अर्पण करण्याचाही नवस काही लोक बोलतात. जेजुरीच्या खंडोबाला अशा रीतीने वाहिलेली मुलेच पुढे वाघ्या किंवा मुरळी बनत असत. चांगदेव राउळांच्या आईने पुत्र व्हावा, म्हणून चाकणच्या चक्रपाणीला आणि पूर्णा नदीच्या तीरावरील चांगदेवाला नवस केला होता.

सत्यनारायण करणे, देवीला एखादा दागिना अर्पण करणे, देवतेची पूजा बांधणे, तुलाभार करणे, देवळाला एखादी पायरी बांधणे, यांसारख्या नवसांबरोबरच बगाड घेणे, विस्तवावरून चालत जाणे, लोटांगण घालीत देवाच्या भेटीला जाणे, यांसारखे शरीराला कष्ट देणारे नवसही लोक बोलतात व मनकामना पूर्ण झाल्यावर ते फेडतात.

**नवसर्ग** पुराणांच्या पंच लक्षणांत सर्ग हा एक वर्ण्य विषय असतो. पुराणांत सर्गाचे म्हणजे सृष्टीचे नऊ प्रकार पुढीलप्रमाणे सांगितले आहेत— प्राकृत सर्ग तीन, वैकृत सर्ग पाच व प्राकृत-वैकृत सर्ग एक. प्राकृत सर्ग हा नैसर्गिक रूपाने उत्पन्न होतो. त्यासाठी ब्रह्मदेवाला आपली बुद्धी उपयोगात आणावी लागत नाही. या उलट वैकृत सर्ग हा बुद्धिपूर्वक उत्पन्न केलेला असतो. प्राकृत सर्गात ब्रह्मसर्ग, भूतसर्ग व वैकारिक सर्ग यांचा समावेश होतो.

ब्रह्मसर्ग — महत्तत्त्वाच्या सर्गाला ब्रह्मदेवाचा प्रथम सर्ग असे म्हणतात. ब्रह्मसर्ग या शब्दातील ब्रह्म शब्दाचा अर्थ इथे महत ब्रह्म म्हणजे बुद्धितत्त्व असा आहे, असे गीतेत सांगितले आहे (१४.३). सांख्य दर्शनानुसार बुद्धी किंवा महत्तत्त्व हे प्रकृति-पुरुषसंयोगातून प्रथम उत्पन्न होते.

भूतसर्ग — पंच तन्मात्रांच्या सृष्टीला हे नाव आहे. तन्मात्रे ही पृथिव्यादी पंच भूतांच्या अत्यंत सूक्ष्म अवस्थेची द्योतक आहेत.

वैकारिकसर्ग — इंद्रियसंबंधी सृष्टीला हे नाव आहे. अहंकाराच्या सात्त्विक रूपांपासून इंद्रियांची उत्पत्ती होते. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये व मन मिळून अकरा इंद्रिये होतात.

वैकृतसर्गात पुढील सर्गांचा समावेश होतो —

मुख्य सर्ग— सर्गाच्या आरंभी ब्रह्मदेवाने चिंतन केल्यावर पंचपर्व अविद्येच्या रूपात तमोगुणी सृष्टी प्रकट झाली. तम (अज्ञान), मोह, महामोह (भोगेच्छा), तामिस्र व अंधतामिस्र (अभिनिवेश) ही ती पाच पर्वे होत. ब्रह्मदेवाने पुन्हा ध्यान केल्यावर जी सृष्टी निर्माण झाली, ती ज्ञानशून्य, अंतर्बाह्य तमोमय आणि जड पर्वतादी पाच प्रकारच्या जड पदार्थांची होती. भूतलावर चिरस्थायी राहणाऱ्या जड द्रव्यांत पर्वत मुख्य असल्यामुळे या सृष्टीला मुख्य सर्ग असे नाव मिळाले.

तिर्यक्सर्ग — मुख्य सर्ग हा पुरुषार्थ साधक नसल्यामुळे ब्रह्मदेवाने पुन्हा ध्यान केले आणि त्या ध्यानातून तिर्यक्योनीतील पशु-पक्षी उत्पन्न झाले. वायूप्रमाणे या योनीतील प्राणी तिरक्या मार्गाने जातात, म्हणून त्यांना तिर्यक् हे नाव मिळाले. हे सर्व पशुपक्षी प्रायः अज्ञानी, विवेकशून्य, अनुचित मार्गाचा अवलंब करणारे, विपरीत ज्ञानालाच यथार्थ ज्ञान मानणारे, अहंकारी, अभिमानी आणि अठ्ठावीस प्रकारच्या वधांनी (अशक्तींनी) युक्त असतात.

देवसर्ग— तिर्यक्सर्गानेही ब्रह्मदेवाला समाधान लाभले नाही. म्हणून त्याने ऊर्ध्वस्त्रोत प्राणी उत्पन्न केले. हे ऊर्ध्व लोकांत निवास करणारे सात्त्विक प्राणी आहेत. यांना विषयसुखात रस असतो. हे अंतर्बाह्य दृष्टी व प्रकाश यांनी युक्त असतात.

मानुष सर्ग — देवसर्गही पुरुषार्थसाधक नव्हता. म्हणून ब्रह्मदेवाने पृथ्वीवर भ्रमण करणारी माणसे निर्माण केली. यांच्यांत सत्त्व, रज आणि तम या तीन्ही गुणांचे प्राबल्य असल्यामुळे ते दुःखबहुल, अत्यंत क्रियाशील व बाह्याभ्यंतर ज्ञानाने युक्त असतात.

अनुग्रहसर्ग — विपर्यय, सिद्धी, शांती व तुष्टी असे याचे चार प्रकार आहेत. स्थावरांत विपर्यय, तिर्यक्योनीत शक्ती, मनुष्यांत सिद्धी व देवांत तुष्टी वास करते. सर्व प्राकृत सर्ग हा प्रकृतीच्या अनुग्रहाने होत असल्यामुळे त्याला वायू पुराणात अनुग्रह असे म्हटले आहे.

कौमार सर्ग – हा अंतिम सर्ग प्राकृत-वैकृत असा उभयविध आहे. कौमार हा शब्द इथे सनत्कुमारांना उद्देशून योजलेला आहे. त्यांची उत्पत्ती भगवद्ध्यानजन्य व भगवज्जन्यही आहे. म्हणून या सृष्टीला प्राकृत-वैकृत असे म्हटले आहे.

प्राणिसृष्टीतील निरनिराळे प्राणी कसे उत्पन्न झाले, त्याविषयीही पुराणांत माहिती दिलेली आहे. सुरुवातीला जेव्हा ब्रह्मा ध्यान करीत बसला, तेव्हा त्याच्या ठिकाणी तमोगुणाचे प्राबल्य होते. त्यामुळे त्याच्या जांघेतून प्रथम असुर उत्पन्न झाले. त्यानंतर ब्रह्म्याने आपल्या तामसी देहाचा त्याग केला आणि तो देह रात्रीरूपात परिणत झाला. नंतर ब्रह्म्याने सात्त्विक देह धारण केला आणि त्याच्या मुखापासून सात्त्विक सुरांची उत्पत्ती झाली. ब्रह्म्याने पुनश्च त्या आपल्या देहाचा त्याग केला आणि तो देह दिनरूपात परिणत झाला. नंतर ब्रह्म्याने आंशिक सत्त्वमय देह धारण केला आणि आपल्या पार्श्वभागातून त्याने पितर निर्माण केले. ब्रह्मदेवाने त्याग केलेलें ते शरीर संध्यारूप बनले. मग त्याने रजोमय देह धारण केला आणि त्यापासून रजःप्रधान मनुष्याची निर्मिती केली. ब्रह्मदेवाने त्याग केलेले शरीर प्रभातकालरूप बनलें. अशा प्रकारे असुरांचा रात्रीशी, सुरांचा दिवसाशी, पितरांचा सायंकाळाशी आणि मनुष्यांचा प्रातःकाळाशी संबंध असून, त्यांचे बळ त्या त्या विशिष्ट काळात दिसून येते.

प्राक्कल्पात प्राण्याचा जो स्वभाव किंवा प्रवृत्ती असते, तसाच स्वभाव किंवा प्रवृत्ती त्याला या जन्मातही मिळते. हिंसा-अहिंसा, मृदुता-कठोरता, धर्म-अधर्म, सत्य-अनृत ही सर्व पूर्वभावनेनुसार प्राण्याला प्राप्त होतात. म्हणजे पुराणांच्या मते कर्मानुसार सृष्टी उत्पन्न होते. त्यामुळे ब्रह्मदेवाला वैषम्य व नैर्घृण्य या दोषांबद्दल जबाबदार धरता येत नाही. [ पु. वि. ]

## नवसस्येष्टी

आग्रयण पाहा.

## नवान्नभक्षण

नवीन आलेल्या धान्याचे समारंभपूर्वक भक्षण करणे याला नवान्नभक्षण असे म्हणतात. हा समारंभ मार्गशीर्ष महिन्यात सूर्याने वृश्चिक राशीच्या चौदाव्या अंशात प्रवेश करण्यापूर्वी साजरा करतात. रेवती, अश्विनी, श्रवण, धनिष्ठा, पुनर्वसू, पुष्य, हस्त, चित्रा, रोहिणी, मृग, उत्तरा, या नक्षत्रांवर नवान्नभक्षण करावे, असे निर्णयसिंधूत सांगितले आहे. त्या दिवशी ब्रह्मा, अनंत (सर्प) व दिक्पाल यांची पूजा करावी; गायन, नृत्य, इ. कार्यक्रम करावे, असेही विधान आहे. काही ठिकाणी या समारंभाला कुलाचाराचे स्वरूप प्राप्त झाले आहे. हा समारंभ सर्व भारतभर साजरा केला जातो. पाहा– आग्रयण. [ हि. ध.; नि. सिं. ]

## नवायत

एक मुसलमान जात. यांची वस्ती कर्नाटकात आढळते. यांना सौदागर असेही म्हणतात. हे लोक इराणी मुसलमानांचे वंशज असून, हनफी पंथाचे व सुन्नी आहेत. हे शेती करतात व कापड विकतात. हे आपल्या जातीतच लग्नसंबंध करतात. [ मुं. इ. जा. ]

## नवार्णविधी

नवाक्षरी मंत्रजपाचा एक विधी. 'ऐं ह्रीं क्लीं चामुण्डायै विच्चे' याला नवाक्षरी मंत्र म्हणतात. यातील नऊ अक्षरे ही बीजे आहेत. हा मंत्र त्रैलोक्यपावक आहे. या मंत्राचा श्रद्धेने जो जप करतो, त्याला सर्व कामिनी स्त्रिया वश होतात, त्याच्यावर राजे लोक प्रसन्न होतात आणि हत्ती, सर्प, दावाग्नी, चोर, शत्रू वगैरेंपासून त्याला भय राहत नाही व चंडिकेची पूर्ण कृपा होऊन सर्व प्रकारच्या समृद्धी प्राप्त होतात, असे सांगितले आहे.

या मंत्राचे ब्रह्मा, विष्णू व महेश्वर हे ऋषी असून गायत्री, उष्णिक व अनुष्टुभ हे छंद आहेत. महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वती या त्याच्या देवता असून नंदा, शाकंभरी व भीमा या शक्ती आहेत.

या मंत्राचा चार लक्ष जप केल्याने पुरश्चरण होते. ते पुरे झाल्यावर त्याच्या दशांशाइतक्या पायसान्नाच्या आहुती देऊन हवन करतात. याचा दुसरा पर्याय म्हणजे आश्विन शुद्ध तृतीयेला प्रारंभ करून अष्टमीअखेर लक्ष जप पुरा करतात व त्याच्या दशांश संख्येनें हवन करतात. [ आचारेंदू ]

## नसतरंग

एक सुषिर वाद्य. या वाद्याचा आकार सामान्यपणे कर्ण्यासारखा असतो. याच्या वरच्या भागाला टोपी व टोपीच्या खालच्या भागाला नलको किंवा नरई म्हणतात. टोपीला एक जाळी लावलेली असते. हे वाद्य उत्तर प्रदेशात प्रचलित आहे. [ कृ. जी. ब्र. श. ]

## नहछू

उ. प्रदेशातील एक वैवाहिक सोहळा. या सोहळ्यात प्रामुख्याने नखे कापण्याचा विधी होतो. हा सोहळा कधी विवाहापूर्वी, तर कधी विवाहानंतर करतात. राम-लक्ष्मणांच्या विवाहापूर्वी त्यांची नखे कापण्याचा समारंभ झाला होता, या कल्पनेवर ही प्रथा चालू झाली असावी. राम-लक्ष्मणांच्या अनुषंगाने या सोहळ्याचे वर्णन करणारे एक लोकगीत प्रचलित आहे, ते असे–

घर घर नउनिया तौं गोतिनी बुलावैं ।
राम लछन कै नहछु सभै कोई आयो ॥
पाँच पाट कै जाजिम झारि बिछाओ ।
जेकरे जहाँ मनु होय तहाँ ते बैठो ॥
केई दीना चुटकी मूँदरिया केई दीना रूप ।
केई दीना रतन जाडऊ ता भरिगा हे सूप ॥
केकई ने चुटकी मुंदरिया कौशिल्या रानी रूप ।
सुमित्रा रानी रतन जडाऊ तौ भरिगा हे सूप ॥
पातर पातर अंगली तौ नाउनि गोरी ।
करत राम जीत्र कै नहछु तो घूँगट खोली ॥
नौआजे झगरै नउनिया से यह सब थोर ।
राम लछन जी कै नहछु लवौ मैं घोड ॥
जनि झगरौ नौआ रे जनि झगरौ यह सब थोर ।
राम ब्याहि घर लौटें तौ देबौं मैं घोड ॥

अर्थ– न्हावीण घरोघर हिंडून रामाच्या नातेवाईकांना सांगते, की आज राम-लक्ष्मणांची नखे कापण्याचा कार्यक्रम आहे, तरी सर्वांनी यावे. पाचपदरी जाजम झटकून आंथरा आणि त्यावर जिथे ज्याला बसावेसे वाटेल तिथे बसा. (न्हावीण म्हणते) मला कोणी बोटातील सोन्याची आंगठी दिली, कोणी चांदीचे दागिने दिले, कोणी रत्ने दिली; त्यामुळे माझे सूप भरले. कैकेयीने आंगठी दिली, कौसल्येने चांदीचे (रुप्याचे) दागिने दिले, सुमित्रेने रत्ने दिली, त्यामुळे माझे सूप भरले. न्हावीणीची बोटे सडपातळ आहेत. ती गौरवर्णाची आहे. आपला पडदा टाकून देऊन ती रामचंद्राची नखे कापू लागली आहे. न्हावी न्हाविणीबरोबर भांडू लागला आहे. तो तिला म्हणतो, की आत्ता जे तुला बक्षिस मिळाले आहे, ते फार कमी आहे. कारण हा राम-लक्ष्मणांची नखे कापण्याचा सोहळा आहे. मला घोडा हवा आहे. (त्यावर कौसल्या म्हणते) अरे न्हाव्या हे सर्व थोडे आहे, म्हणून भांडण करू नको. राम लग्न करून परत आला, म्हणजे मी तुला घोडा देईन.

तुलसीदासाने 'रामलला नहछू' या काव्यात रामचरित्राच्या अनुषंगाने हाच विषय वर्णिला आहे. [ ग्रा. सा. ]

**नहाल** एक जात. या लोकांची वस्ती सातपुडा पर्वताच्या सीमेवर यालवाडी, पळासनेर, सिंदवा, चिरमिरा, वीरवडा, इ. ठिकाणी आढळते. ही भिल्लांची पोटजात असावी, असा समज आहे; पण भिल्लांत व या जातीत पुष्कळच फरक आहे. हे लोक अत्यंत रानटी आहेत. यांचा वर्ण काळा, बांधा ठेंगणा व चेहरा राकट असतो. हे लोक पितळेची कर्णभूषणे घालतात. जोडे म्हणून नीलगाईचे कातडे पायाला बांधतात. कंदमुळे, फळे व बोरे यांवर त्यांचा निर्वाह असतो. हे इतर लोकांशी सहसा संबंध ठेवीत नाहीत. हे जंगलातील काही उपयुक्त वस्तू देऊन त्यांच्या मोबदल्यात कापड मिळवतात. यांच्यापैकी कित्येक जण मुसलमान आहेत; पण पुष्कळांना निश्चित असा धर्मच नाही. यांचा एक पिढीजात नायक असतो व तो जातीचे बरे-मले पाहतो. [ म. ज्ञा. को. ]

**नहुष** (१) आर्य लोकांमधील एक प्राचीन जमात. सिंधू किंवा सरस्वती नदीच्या प्रदेशात हे लोक राहत असत. या जमातीच्या मुख्याचे नावही नहुष असेच होते. ऋग्वेदातल्या दानस्तुतीत नहुष राजाच्या दानशीलतेचे वर्णन केलेले आहे. पत्र ऋषींच्या राजाला नहुष असे म्हटले आहे (ऋ. १.१२२.८). मशशरी व आयवस यांनी नहुषाच्या सहकार्याने एक मोठा यज्ञ केला होता. हे दोघे नहुषाचे आप्त किंवा मित्र असावे. ब्राह्मणयुगात ही जमात दुसऱ्या जातीत मिसळून गेली व तिचे स्वतंत्र अस्तित्व लुप्त झाले.

श्री. ना. गो. चापेकर यांच्या मते नहुष हा शब्द कृष्टीप्रमाणेच असून, नाहुष नावाची एक जमात होती व नहुष हा तिचा प्रमुख होता. नाहुषांच्या मंत्रांना कव्य अशी संज्ञा असावी. इंद्राने कृष्टींना छळले तसे नाहुषांनाही लुटले. नाहुष व कृष्टीजन हे धर्मबंधू असावे. [ वै. सा. सं.; नवभारत, एप्रिल १९५९ ]

(२) एक राजा. अग्नीने याला बलिहृत म्हणजे प्रजांकडून कर घेणारा बनवले (ऋ. १.३१.११). पुराणांत याला पुरूरव्याचा नातू व आयूचा पुत्र मानले आहे (अग्नी पु. २७४. १६; लिंग पु. १.६६). इंद्राच्या हातून ब्रह्महत्या घडली व तो इंद्रपद सोडून सैरावैरा भटकू लागला, तेव्हा देव व ऋषी यांनी नहुषाला 'तू ज्याच्याकडे पाहशील, त्याचे सर्व तेज हरण करशील' असा वर देऊन इंद्रपदी बसवले. पूर्व इंद्राची पत्नी इंद्राणी स्वर्गातच होती. तिला पाहून तो तिच्यावर मोहित झाला. इंद्राणी संकटात सापडली. तिने बृहस्पतीच्या सल्ल्याने त्याला अट घातली, की 'सप्तर्षींनी वाहिलेल्या पालखीत बसून तू माझ्याकडे येशील, तर मी तुझे मनोरथ पूर्ण करीन.' नहुष त्याप्रमाणे पालखीत बसून निघाला. वाटेत त्याने पालखी वाहणाऱ्या अगस्त्य ऋषीच्या मस्तकावर पदप्रहार करून त्याला 'सर्प, सर्प'= लवकर चल, असे म्हटले. अगस्त्याला त्यामुळे राग आला आणि त्याने नहुषाला शाप दिला, की 'तू पृथ्वीवर दहा हजार वर्षेपर्यंत सर्प होऊन पडशील.' त्याप्रमाणे नहुष सर्प झाला. पुढे द्वापर युगात युधिष्ठिराने त्याचा उद्धार केला (म. भा. वन. १७८–१८१). विरजा ही याची पत्नी व ययाती हा पुत्र होता ( मत्स्य पु. १५.२३). [ प्रा. च. को. ]

**नक्षत्रकल्प** एक शांतिग्रंथ. या ग्रंथात नक्षत्रपूजा, नर्ऋत्यकर्म व अमृतशांतीपासून अभयशांतीपर्यंत ३० महाशांतीचे भेद व निमित्ते दिली आहेत. पाहा—नक्षत्रे. [ हिंदुत्व ]

**नक्षत्रगंडांतशांती** रेवती-अश्विनी, आश्लेषा-मघा व ज्येष्ठा-मूल या नक्षत्रांच्या संधिकालात मूल जन्मले तर ते अशुभ समजतात. दिवसा, रात्री किंवा दिवस-रात्रींच्या संधिकाली जन्म झाला, तर त्याचे फल निरनिराळे सांगितले आहे, ते असे—

मित्रघ्नश्च दिवाजातो रात्रिजातस्तु मातृहा।
आत्मघ्नः सन्ध्ययोर्जातो नास्ति गण्डे निरामयः ।।

अर्थ—दिवसा जन्मल्यास मित्रनाश, रात्री जन्मल्यास मातृनाश व संधिकाली जन्मल्यास आत्मनाश होतो. (एवंच) नक्षत्रगंडावर जन्मलेल्याला निरामयत्व नाही.

अशा वेळी नक्षत्रगंडांतजनन नावाची शांती ११ व्या दिवशी किंवा ६ महिन्यांनंतर करावी, असे सांगितले आहे. या शांतीचा विधी असा—

प्रथम गोप्रसवशांती करून गोमयाने सारवलेल्या शुद्ध जागी काशाच्या भांड्यात पायस किंवा दूध भरून ठेवावे. त्यामध्ये लोण्याने भरलेला शंख ठेवावा. त्यावर रुप्याची चंद्रप्रतिमा स्थापावी. प्रतिमेच्या उत्तरेस कलश मांडून त्यावर वागीश्वराची रुप्याची प्रतिमा ठेवावी. नंतर बृहस्पतीच्या मंत्राने वागीश्वराचे आवाहन करावे. त्याच्या चारी दिशांना कलशावर वरुणाचे आवाहन करावे. या सर्व देवतांचे यथाविधि पूजन झाल्यावर अग्निस्थापना करावी. मग नवग्रहांचे आवाहन व पूजन करावे. प्रधान होम, पूर्णाहुती, बलिदान, इ. विधी अन्य शांतीप्रमाणेच करावे. मग कलशातील जलाने बालकासह यजमान दंपतीस अभिषेक करावा. शेवटी आचार्याला शंखासह चंद्रप्रतिमेचे दान द्यावे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**नक्षत्रपुरुषव्रत** एक काम्य व्रत. यात मूलादी नक्षत्रगणना स्वीकारून विष्णुप्रतिमेचे पायांपासून केसांपर्यंत पूजन करायचे असते. त्या त्या नक्षत्री विष्णुप्रतिमेच्या त्या त्या अवयवाची पूजा करतात. अशा प्रकारे सर्वांवयवपूजा झाल्यानंतर ती विष्णुप्रतिमा ब्राह्मणाला दान द्यावी, शय्यादान देऊन भोजन घालावे आणि व्रत समाप्त करावे, असे म्हटले आहे. फल—पापनाश व विष्णुलोकी निवास [ पु. इं. ]

**नक्षत्रमालाव्रत** एक जैन व्रत. अश्विनी नक्षत्रावर व्रताला प्रारंभ करतात. व्रतावधी चौपन्न दिवस असतो. एक दिवस उपवास व एक दिवस पारणे असे सत्तावीस उपवास व सत्तावीस पारणी झाल्यावर हे व्रत समाप्त होते. या चौपन्न दिवसांत प्रतिदिन त्रिकाल णमोकार मंत्राचा जप करायचा असतो. [ जै. व्र. वि. सं. ]

**नक्षत्रविधिव्रत** एक काम्य व्रत. मृगशीर्ष नक्षत्रावर या व्रताला प्रारंभ करतात. व्रतविधी असा—

पार्वतीचा प्रत्येक अवयव हा एकेका नक्षत्राचे प्रतीक समजून त्या त्या नक्षत्राच्या दिवशी पार्वतीच्या त्या त्या अवयवांची पूजा करावी. उदा० मूळ नक्षत्राचे प्रतीक पावले, रोहिणीचे प्रतीक मांडी, अश्विनीचे प्रतीक गुडघे, इत्यादी. व्रतकर्त्याने त्या त्या नक्षत्राच्या दिवशी उपवास व ते नक्षत्र संपल्यावर पारणे करायचे असते. प्रत्येक नक्षत्रावर ब्राह्मणभोजन घालावे, असेही सांगितले आहे. फल—दीर्घायुरारोग्य, सौंदर्य व सौभाग्य यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**नक्षत्रव्रते** अश्विनीपासून रेवतीपर्यंत प्रत्येक नक्षत्राशी संबंध असलेल्या व्रतांची माहिती हेमाद्रीच्या व्रतखंडात दिलेली आहे. ज्या नक्षत्री उपवास करायचा ते नक्षत्र सूर्यास्ताच्या वेळी असले पाहिजे, हा या व्रतांतला मुख्य नियम आहे. या सर्व व्रतांत त्या त्या नक्षत्रांच्या देवतांची पूजा करायची असते. फल—आयुरारोग्याची प्राप्ती.

**नक्षत्रशांती** अश्विनी, भरणी, इ. नक्षत्रांवर रोग जडला असता, नक्षत्राच्या गुणधर्माप्रमाणे त्याची मुदत किंवा तीव्रता कमीजास्त असते. अशा वेळी नक्षत्रशांती केल्याने रोगपरिहार होतो, असे सांगितले आहे. या शांतीचा विधी असा—

प्रथम संकल्प, गणपतिपूजन व आचार्यवरण झाल्यावर कलशावर पूर्णपात्रात द्वादशदल कमल काढून त्यावर नक्षत्रदेवतेच्या सुवर्णप्रतिमेची स्थापना व पूजा करावी. मग गायत्री मंत्राने दूर्वा, समिधा, तीळ, दूध व आज्य यांच्या एकशे आठ आहुती द्याव्या. शेवटी दहीभाताचे बलिदान व आचार्याला गायीसह प्रतिमेचें दान द्यावे. [ सं. कौ.; शां. क. ]

**नक्षत्रहोम** एक काम्य व्रत. रोग किंवा संकट यांच्या नाशासाठी अश्विन्यादी सत्तावीस नक्षत्रांची पूजा व नंतर होम असा याचा विधी असतो. हवन एकशे आठ आहुतींचे असते. यात अग्नीला सर्व धान्यांच्या आहुती देतात. फल—दीर्घायुरारोग्यप्राप्ती. [ हे. व्र. ]

**नक्षत्रिय प्रजापती** आकाशात हस्त नक्षत्रापासून अनुराधे-पर्यंतच्या नक्षत्रांची एक मनुष्याकृती कल्पिलेली आहे. या आकृतीला नक्षत्रिय प्रजापती असे म्हणतात. याविषयी तैत्तिरीय ब्राह्मणात पुढीलप्रमाणे म्हटले आहे –

यो वै नक्षत्रियं प्रजापतिं वेद। उभयोरेनं लोकयोर्विदुः। हस्त एवास्य हस्तः। चित्रा शिरः। निष्टचा हृदयम्। ऊरू विशाखे। प्रतिष्ठानूराधाः। एष वै नक्षत्रियः प्रजापतिः।

(तै. ब्रा. १.५.२.२)

अर्थ– जो या नक्षत्रिय प्रजापतीला जाणतो, त्याला उभय-लोक जाणतात. हस्त हा या प्रजापतीचा हात, चित्रा हे शिर, स्वाती हे हृदय, विशाखा या मांड्या आणि अनुराधा हे पाय होत. हा नक्षत्रिय प्रजापती होय.

अर्थ– जो इथे यज्ञ करतो, तो त्या लोकाला जातो (नक्षते). म्हणून नक्षत्रांचे नक्षत्रत्व. नक्षत्रे देवांची गृहे होत. जो हे जाणतो, तो गृही होतो. जी ही पृथ्वीची चित्रे, ती नक्षत्रे होत.

पाणिनीने नक्षत्र शब्दाची व्युत्पत्ती 'न क्षरति' = जे झडत नाही, क्षय पावत नाही, ते नक्षत्र अशी दिली आहे.

चंद्राच्या उत्पत्तीच्या वेळी जे अश्रू म्हणजे पाण्याचे तुषार उडाले ते नक्षत्र बनले, असे शतपथ ब्राह्मणात सांगितले आहे (६.१.२.४). चंद्राच्या प्रकाशामुळे नक्षत्रे प्रकाशित होतात, असेही तिथे म्हटले आहे. वायू पुराणाने नक्षत्रांची उत्पत्ती सूर्यापासून मानली आहे (५३.२८).

वेदांमध्ये अनेक ठिकाणी निरनिराळ्या नक्षत्रांचा साक्षात किंवा अप्रत्यक्षपणे उल्लेख आलेला आढळतो. एखादे नक्षत्र




नक्षत्रिय प्रजापती – आमची नक्षत्रे या पुस्तिकेवरून (प्रा. र. वि. वैद्य यांच्या सौजन्याने)

**नक्षत्रे** आकाशाच्या साधारणपणे पूर्वपश्चिम परिघावर एका मागून एक उगवणारे तारकापुंज म्हणजे नक्षत्रे होत. नक्षत्र शब्दाची व्युत्पत्ती सांगितली आहे, ती अशी–

न वा इमानि क्षत्राण्यभूवन्निति।
तन्नक्षत्राणां नक्षत्रत्वम्।

(तै. ब्रा. २.७.१८.३)

अर्थ– ही क्षत्रे (बलवान) नव्हती. तेच नक्षत्राचे नक्षत्रत्व होय.

यो वा इह यजते। अमुं स लोकं नक्षते। तन्नक्षत्राणां नक्षत्रत्वम्। देवगृहा वै नक्षत्राणि। य एवं वेद। गृह्येव भवति। यानि वा इमानि पृथिव्याश्चित्राणि। तानि नक्षत्राणि॥

(तै. ब्रा. १.५.२)

शुभ असताना यज्ञकर्माचा आरंभ करावा, असे सांगितलेले असते. ऋग्वेदात काही नक्षत्रांचेच केवळ प्रत्यक्ष उल्लेख आले आहेत. पितरांनी नक्षत्रांच्या साहाय्याने द्युलोक सजविला, असे ऋग्वेदात सांगितले आहे (१०.६.११). अथर्ववेदातील १९.७ या सूक्तात अभिजित या नक्षत्रासह अठ्ठावीस नक्षत्रांची नावे आली आहेत. त्याच्या पुढच्याच (१९.८) सूक्तात अठ्ठावीस नक्षत्रांचा एकदम उल्लेख आहे. नक्षत्रांच्या देवतांचा उल्लेख मात्र अथर्ववेदात आढळत नाही. तो यजुर्वेदात आढळतो. ब्राह्मणांत काही नक्षत्रांच्या फलाचाही निर्देश आहे. स्वाती नक्षत्रावर कन्येचा विवाह करावा, म्हणजे ती आपल्या पतीला अधिक आवडते, असे म्हटले आहे (तै. ब्रा. १.५.२). ब्राह्मणांतच नक्षत्रांचे दोन भाग केलेले

आढळतात. कृत्तिकेपासून विशाखेपर्यंतची चौदा नक्षत्रे ती देव-नक्षत्रे आणि अनुराधेपासून भरणीपर्यंतची नक्षत्रे ती यमनक्षत्रे होत. देवनक्षत्रे असताना केलेले कर्म पुण्यकारक होते, असेही सांगितले आहे. अग्निहोत्र घेण्याच्या वेळचे अग्न्याधान कोणत्या नक्षत्रावर करावे, हे सांगत असता, नक्षत्राबरोबरच कामनेचाही उल्लेख केलेला असून, विशिष्ट कामना पुरी होण्यासाठी विशिष्ट नक्षत्रावर अग्न्याधान करावे, असे सांगितले आहे. यजमानाला ब्रह्मतेजाची कामना असेल, तर त्याने कृत्तिका होतात व त्याला सर्वांच्या जवळ सारखे राहायला भाग पाडतात, अशी कथा तैत्तिरीय व काठक संहितेत आली आहे. यातील काही नक्षत्रांची नावे मात्र सांप्रतच्या नावांपेक्षा वेगळी आहेत.

अथर्ववेदाच्या शांतिकल्प आणि नक्षत्रकल्प या दोन परिशिष्टांतही नक्षत्रांसंबंधी माहिती आली आहे. शांतिकल्पाच्या दुसऱ्या अध्यायात नक्षत्रांचे सहा गट कल्पिले असून त्यांना ध्रुव दारुण, चर, मृदू, क्षिप्र आणि उग्र अशी नावे दिली आहेत. त्यावरून कोणती नक्षत्रे कोणत्या कर्मांसाठी योग्य ते आपोआप




नक्षत्रपट १ – आमची नक्षत्रे या पुस्तिकेवरून (प्रा. र. वि. वैद्य यांच्या सौजन्याने)

नक्षत्रावर अग्न्याधान करावे; कारण कृत्तिका नक्षत्राची देवता अग्नी आहे. सर्वांगीण उत्कर्षाची इच्छा करणाऱ्याने रोहिणी नक्षत्रावर अग्न्याधान करावे; सर्व लोकांनी यज्ञात सहकार्य करावे, या उद्देशाने अश्वमेधाच्या प्रारंभी चित्रा नक्षत्रांवर सांग्रहणी नामक इष्टी करावी, अशा प्रकारचे निर्देश तै. ब्राह्मणामध्ये येतात. त्याच ब्राह्मणात नक्षत्रसत्राचेही वर्णन आले आहे. या नक्षत्रांचे लग्न सोमाबरोबर झालेले असते. पण सोमाचे रोहिणीवर जास्त प्रेम असल्यामुळे इतर पत्न्या त्याच्यावर रुष्ट कळते. नक्षत्रकल्पाच्या नवव्या आणि दहाव्या खंडांत योग्य ते फल मिळविण्यासाठी कोणत्या नक्षत्रावर काय करावे, ते पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

आयुधीयान् बिभ्रद् राजा कृत्तिकासु न रिष्यति।
श्रविष्ठाभिः सृजेद् रसान्। गृहेषु रेवत्यां वसेत्।...

अर्थ– कृत्तिका नक्षत्रावर शस्त्र धारण करतो, त्या राजाचा पराभव होत नाही. घनिष्ठा नक्षत्रावर रस निर्माण करावे. रेवती नक्षत्रावर नव्या घरात राहायला जावे, इत्यादी.

नक्षत्रकल्पाच्या तेहतिसाव्या खंडात निरनिराळ्या नक्षत्रांचा रोगांशी संबंध दाखवला आहे. निरनिराळ्या नक्षत्रांवर ताप आला असता, तो किती दिवस टिकतो, तेही पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

रोहिण्यां विंशतिरात्रम् । शतभिषजि नवरात्रं
मासे वा कालं कुरुते... ।

अर्थ– रोहिणी नक्षत्रावर आलेला ताप वीस दिवस राहतो.




नक्षत्रपट २ – आमची नक्षत्रे या पुस्तिकेवरून (प्रा. र. वि. वैद्य यांच्या सौजन्याने)

शततारका नक्षत्रावर आलेला ताप नऊ दिवस किंवा एक महिना टिकतो, इत्यादी.

कल्पसूत्रांमध्ये नक्षत्रे आणि त्यांची फले यासंबंधी अनेक ठिकाणी उल्लेख आहेत. श्रौतसूत्रांत श्रौतयज्ञांच्या निमित्ताने नक्षत्रे व त्यांची फले यांचा उल्लेख असतो. गृह्यसूत्रांत विवाह, उपनयन, इ. संस्कारांसाठी कोणती नक्षत्रे चांगली, ते सांगितलेले असते. अनेक ठिकाणी 'पुण्ये नक्षत्रे,' 'पुण्योक्तानि नक्षत्राणि' असा सामान्य उल्लेख असतो. पुण्य दिवशी किंवा ज्येष्ठा नक्षत्रावर शेत नांगरायला सुरुवात करावी, असे पारस्कर गृह्यसूत्रांत सांगितले आहे. मृगशीर्ष नक्षत्रावर वराने वधू पसंत करण्यासाठी जावे, म्हणजे सर्व लोक त्याचे स्वागत करतात, असे आपस्तंब गृह्यसूत्रांत म्हटले आहे(२.१६).

वेदांग ज्योतिषात खगोलशास्त्राच्या दृष्टीने नक्षत्रांचा विचार केलेला आहे. कोणत्याही यज्ञाला प्रारंभ करण्याच्या वेळी नक्षत्रांची स्थिती कशी असावी, याचे वर्णन त्यात आहे. ज्योतिष चांगले माहीत असले, म्हणजेच यज्ञाचे यथार्थ ज्ञान होते, असे याजुष ज्योतिषात म्हटले आहे. यज्ञात यजमानाचे नक्षत्रनाम महत्त्वाचे असते. नक्षत्राच्या अधिष्ठात्री देवतेवरून ते मिळालेले असते व यजमानाने ते गुप्त ठेवायचे असते. अन्यथा एखाद्याला त्या नावाला धरून अभिचारकर्म करणे शक्य होते. याजुष ज्योतिषात काही नक्षत्रे उग्र व क्रूर म्हणून सांगितली असून, शुभ कर्मांच्या प्रारंभी ही नक्षत्रे टाळावी, असे म्हटले आहे. आथर्वण ज्योतिषामध्येही नक्षत्रांचे उल्लेख आहेत. नक्षत्रप्रकरण या अध्यायात

प्रत्येकी तीन नक्षत्रांचे नऊ गट कल्पिले असून या गटांना संपत्कर, विपत्कर इ. नावे दिली आहेत. जन्मनक्षत्रापासून दुसरे, अकरावे व विसावे ही तीन नक्षत्रे संपत्कर असून ती विद्यारंभ, दान व आरोग्य यांसाठी शुभ असतात, असे म्हटले आहे.

वैदिक काळात नक्षत्रगणनेची सुरवात कृत्तिका नक्षत्रापासून होत असे. याज्ञवल्क्यस्मृतीच्या काळापर्यंत ती चालू होती. यानंतर अश्विनी हे पहिले नक्षत्र मानण्यात येऊ लागले.

हितेच्या ९८ व्या अध्यायाला नक्षत्रगुण असे नाव आहे. अठ्ठावीस नक्षत्रे आणि त्यांच्या देवता तिथे दिल्या आहेत. त्याचप्रमाणे नक्षत्रांचे सात गट करून त्यांना ध्रुव, चर, इ. संज्ञा दिल्या आहेत, त्या अशा–

**ध्रुव नक्षत्रे** – रोहिणी, उत्तराफल्गुनी, उत्तराषाढा व उत्तराभाद्रपदा या नक्षत्रांवर स्थिर कर्मांचा प्रारंभ, अभिषेक व बीज, गृह, इ. धार्मिक कृत्ये करावी.




नक्षत्रपट ३ – आमची नक्षत्रे या पुस्तिकेवरून (प्रा. र. वि. वैद्य यांच्या सौजन्याने)

वेदांग ज्योतिषात श्रविष्ठा हे पहिले आणि महाभारतात श्रवण हे पहिले नक्षत्र मानले आहे.

वराहमिहिराने बृहत्संहितेत नक्षत्रे आणि त्यांची फले यांचा विचार केला आहे. त्यातील पंधराव्या अध्यायात चार–चार नक्षत्रांचे गट सांगितले असून, ती नक्षत्रे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, चांडाल, इत्यादींना हितकारक आहेत, असे म्हटले आहे. बृहत्सं-

**तीक्ष्ण नक्षत्रे** – आर्द्रा, आश्लेषा, ज्येष्ठा व मूळ. ही अभिचार, हनन, मंत्रप्रयोग, इ. कर्मांना योग्य होत.

**चर नक्षत्रे** – श्रवण, धनिष्ठा, शततारका, स्वाती व हस्त. वाहनांवर बसणे, उपवनात जाणे, इ. कर्मांसाठी ही योग्य होत.

**मृदू नक्षत्रे** – मृग, चित्रा, अनुराधा व रेवती. मैत्री व शुभ कर्मांसाठी ही चार नक्षत्रे प्रशस्त मानली जातात.

लघु नक्षत्रे – पुष्य, अश्विनी व हस्त. अध्ययनारंभ व अलंकरण यांसाठी ही तीन नक्षत्रे योग्य होत.

मृदूतीक्ष्ण नक्षत्रे – कृत्तिका व विशाखा. सामान्य कर्मासाठी ही दोन नक्षत्रे योग्य मानली जातात.




नक्षत्रपट ४ – आमची नक्षत्र या पुस्तिकेवरून (प्रा. र. वि. वैद्य यांच्या सौजन्याने)

उग्र नक्षत्रे – मघा, भरणी, पूर्वाफल्गुनी, पूर्वाषाढा व पूर्वाभाद्रपदा. शत्रुनाशन, विषप्रयोग व अभिचार या कर्मांसाठी ही पाच नक्षत्रे योग्य मानली जातात.

नक्षत्रे आणि त्यांची फले याविषयी वेदकाळापासून वराहमिहिरापर्यंत विखुरलेले अनेक उल्लेख दिसतात. वराहमिहिराचा काळ इ. स. च्या सहाव्या शतकाचा पूर्वार्ध समजला जातो.

त्याच्या पूर्वी नक्षत्रांच्या फलासंबंधी स्वतंत्र ग्रंथ आढळत नाही. त्यानंतरच्या काळात फलज्योतिषावर पुष्कळ ग्रंथरचना झाली असून, नक्षत्रफलांचाही विस्तृत विचार झाला आहे.

फलज्योतिषात प्रत्येक नक्षत्राचा एकेक स्वामी मानलेला आहे. नक्षत्रक्रमाने त्यांची नावे अशी–

(१) अश्विनी – अश्विनीकुमार (२) भरणी – यम (३) कृत्तिका – अग्नी (४) रोहिणी – धाता (प्रजापती) (५) मृग – चंद्र (६) आर्द्रा – रुद्र (७) पुनर्वसू – अदिती (८) पुष्य – गुरू (बृहस्पती) (९) आश्लेषा – सर्प (१०) मघा – पितर (११) पूर्वा – भग (१२) उत्तरा – अर्यमा (१३) हस्त – सविता (१४) चित्रा – त्वष्टा (१५) स्वाती – वायू (१६) विशाखा – इंद्राग्नी (१७) अनुराधा – मित्र (१८) ज्येष्ठा – इंद्र (१९) मूळ – निर्ऋती (२०) पूर्वाषाढा – जल (२१) उत्तराषाढा – विश्वेदेव (२२) अभिजित – ब्रह्मा (२३) श्रवण – विष्णू (२४) धनिष्ठा – वसू (२५) शततारका–वरुण (२६) पूर्वाभाद्रपदा – अजएकपाद (२७) उत्तराभाद्रपदा – अहिर्बुध्न्य व (२८) रेवती – पूषा.

याशिवाय नक्षत्रांचे आणखी काही प्रकार मानले आहेत, ते असे–

**अधोमुख नक्षत्रे** – मूळ, आश्लेषा, कृत्तिका, विशाखा, पूर्वाभाद्रपदा, मघा व भरणी. यांवर विहिरी, तळी, इ. अधोमुख कृत्ये करावी.

**ऊर्ध्वमुख नक्षत्रे** – आर्द्रा, पुष्य, श्रवण, धनिष्ठा, शततारका, उत्तराफल्गुनी, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा व रोहिणी. यांवर गृह, प्रासाद, देवालये वगैरे बांधकामे करावी.

**तिर्यङ्मुख नक्षत्रे** – मृग, रेवती, चित्रा, अनुराधा, हस्त, स्वाती, पुनर्वसू, ज्येष्ठा व अश्विनी. यांवर गाडी, रथ, नांगर, वगैरे करावे.

**अंध नक्षत्रे** – धनिष्ठा, पुष्य, रोहिणी, पूर्वाषाढा, विशाखा, रेवती व उत्तराफाल्गुनी.

**मंदाक्ष नक्षत्रे** – हस्त, उत्तराषाढा, अनुराधा, शततारका, आश्लेषा, अश्विनी व मृगशीर्ष.

**मध्याक्ष नक्षत्रे** – आर्द्रा, मघा, पूर्वाभाद्रपदा, चित्रा, ज्येष्ठा, अभिजित व भरणी.

**सुलोचन नक्षत्रे** – स्वाती, पुनर्वसू, श्रवण, कृत्तिका, उत्तराभाद्रपदा, मूळ व पूर्वाफल्गुनी.

मध्ययुगीन ग्रंथांत नक्षत्रांचे पुंनक्षत्रे, स्त्रीनक्षत्रे व क्लीबनक्षत्रे असे तीन प्रकार मानलेले आढळतात. अश्विनी, पुष्य, रोहिणी, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, हस्त, श्रवण, अनुराधा व पुनर्वसू ही नऊ नक्षत्रे पुंनक्षत्रे; मूळ, मृगशीर्ष व शततारका ही तीन नक्षत्रे क्लीब नक्षत्रे व बाकीची सर्व स्त्रीनक्षत्रे मानली जातात.

देवी भागवतात तीन नक्षत्रांचा एक याप्रमाणे नक्षत्रांचे नऊ गट पाडलेले असून, त्यांना नागवीथी, गजवीथी, ऐरावतीवीथी, आर्षभीवीथी, जारद्गवीथी, अजवीथी, गोवीथी, मार्गीवीथी व वैश्वानरीवीथी अशी नावे दिली आहेत.

आकाशाचे चार विभाग कल्पून चार नक्षत्रपट तयार केलेले आहेत. ही विभागणी केवळ समजुतीच्या सोयीसाठी केलेली आहे.

ज्या नक्षत्रावर माणूस जन्माला येतो, त्याला आद्य असे म्हणतात आद्यापासून दहाव्या नक्षत्राला कर्म, सोळाव्याला सांपत्तिक, अठराव्याला समुदाय, तेविसाव्याला वैनाशिक व पंचविसाव्याला मानस अशी नावे आहेत. याप्रमाणे प्रत्येक मानवाचा सहा नक्षत्रांशी संबंध येतो. प्राचीन काळी जन्मकाळाच्या वेळची आकाशातील नक्षत्रे पाहूनच जन्मलेल्याचे भविष्य वर्तवीत असत.

सूर्याला एक नक्षत्रविभाग क्रमण्यासाठी जो वेळ लागतो. त्याला सौर नक्षत्राचा काल किंवा नुसते सौर नक्षत्र म्हणतात, पंचांगात ही नक्षत्रे दिलेली असतात. पैकी मृग ते हस्त ही नक्षत्रे पावसाची समजली जातात.

नक्षत्रे म्हणजे आयनिक वृत्ताच्या टापूतील ठळक ठळक तारका घेऊन त्या लक्षात ठेवण्यासाठी कल्पिलेल्या आकृती होत. आयनिक वृत्ताच्या दोन्ही बाजूंना सुमारे आठ अंश रुंदीचा यांचा मार्ग आहे. या मार्गातील एखाद्या ताऱ्यापासून चंद्र निघाल्यास त्याच ठिकाणी त्याला पुनश्च येण्यासाठी सुमारे २७⅓ दिवस लागतात. पंचांगात रोजची नक्षत्रे दिलेली असतात, ती चंद्राची असतात. याचा अर्थ चंद्र त्या दिवशी त्या नक्षत्राजवळ असतो असा आहे. त्यामुळे त्यांना चंद्रनक्षत्रे किंवा दिननक्षत्रे असेही म्हणतात. चंद्राप्रमाणेच सर्व ग्रहही नक्षत्रांतून फिरतात. सूर्याला एक नक्षत्र क्रमण्यास तेरा किंवा चौदा दिवस आणि सर्व नक्षत्रांतून फिरण्यास एक वर्ष लागते. [ हि. ध.; मु. चिं.; सं. मि.; वे वि. नि.; पा. का. भा.; पं. ज्यो.; म. ज्ञा. को.; श्री. विद्याधरशास्त्री भिडे; आमची नक्षत्रे – प्रा. र. वि. वैद्य, १९६३ ]

## नक्षत्रेष्टी

कृत्तिकेपासून भरणीपर्यंत ( अभिजितासह ) २८ नक्षत्रांसाठी एकेक इष्टी सांगितली आहे. या सर्व इष्टी प्रत्यही एक अशा करायच्या असल्यामुळे या इष्टिसमूहाला नक्षत्रसत्र असेही म्हणतात. बौधायन श्रौतसूत्रांत या इष्टींना ज्योतिषामयन म्हटले आहे. या सर्व नक्षत्रेष्टींचे विधान व त्या त्या इष्टीत म्हणायचे मंत्र तै. ब्राह्मणात सांगितले आहेत ( ३. १ ). यात प्रत्येक नक्षत्रदेवतेचे हवी वेगवेगळे असतात

साधारणपणे वैशाखाच्या अमावास्येस चंद्र कृत्तिका नक्षत्रात असतो. म्हणून त्या दिवशी या अनुष्ठानास प्रारंभ करतात. त्या इष्टीत त्या त्या नक्षत्राची देवता ही प्रधान असते. प्रत्येक इष्टीत प्रधान देवतेबरोबर अग्नी व अनुमती यांच्यासाठी याग करतात. यात देवनक्षत्रे व यमनक्षत्रे असे दोन विभाग कल्पिले आहेत. कृत्तिकादी विशाखान्त ही देवनक्षत्रे व अनुराधादी भरण्यन्त ही यमनक्षत्रे होत. विशाखेची इष्टी झाल्यावर पौर्णमासी या देवतेसाठी आणि भरणीची इष्टी झाल्यावर अमावस्या या देवतेसाठी इष्टी करतात. अशा या एकूण ३० इष्टी होतात. त्यानंतर चंद्रमा, उषा, नक्षत्र, सूर्य, अदिती व विष्णू यांच्यासाठी अधिक ७ इष्टी करतात. अशा प्रकारे नक्षत्र सत्रात एकूण ३७ इष्टी होतात. कोणती इष्टी कोणत्या कामनेसाठी करावी हे सांगितले नसले, तरी त्या त्या इष्टीच्या विधिवाक्यांवरून अथवा त्या त्या इष्टीमध्ये योजिल्या जाणाऱ्या मंत्रांवरून प्रत्येक इष्टीचे फल काय असावे, ते सूचित होते. या सर्व इष्टींचे विधी दर्शपूर्णमासेष्टीप्रमाणे करतात. यजमानाचे जे जन्मनक्षत्र असेल, त्या नक्षत्रावर नक्षत्रसत्राला प्रारंभ करावा, असाही एक पर्याय आहे. नक्षत्रेष्टी केल्याने पाप नष्ट होऊन अपमृत्यूही टळतो, असे बौधायन श्रौत सूत्रात सांगितले आहे (२८.४). [श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**नांगर** भूमी उकरण्याचे एक साधन. हा शब्द संस्कृत लांगल या शब्दापासून बनला असावा. याला हल, सीर अशीही अन्य नावे आहेत.

शेतकरी नांगराला पूज्य मानतात. ते बलरामाचे शस्त्र असल्यामुळेही त्याला पावित्र्य लाभले आहे. नांगराच्या स्पर्शाने सीता भूमीतून वर आली, हेही त्याच्यां पूज्यतेचे कारण आहे.

नांगराचे उल्लेख ऋग्वेदकाळापासून मिळतात. ऋग्वेदातील एक उल्लेख असा–

**युनक्त सीरा वि युगा तनध्वं**
**कृते योनौ वपतेह बीजम् ।**

(ऋ. १०. १०१.३)

अर्थ – नांगर जोडून तयार ठेवा, बैलांची जुपी करून त्यांना ओळीने उभे करा आणि ज्या ज्या ठिकाणी नांगराने भूमीला घळ पाडली आहे, त्या त्या ठिकाणी बी पेरा.

नांगर सहज रीतीनें जमीन नांगरो व धान्यसमृद्धी होवो, अशी प्रार्थनाही ऋग्वेदात आढळते. अथर्ववेद (६. ३०.१), तै. ब्रा. (१. ७. १. २), वाजसनेयी संहिता (१८.७) यांतही नांगराचे उल्लेख आढळतात.

नांगरांच्या विविध प्रकारांचे उल्लेख प्राचीन ग्रंथांत मिळतात. मोठ्या नांगराला हली वा जित्य असे म्हणत. जित्य या शब्दापासूनच जोतणे हे क्रियापद आले आहे. कित्येक वेळा नांगरांना सहा, आठ, बारा व चौवीस बैल जुंपले जात असल्याचे उल्लेख मिळतात (अथर्व. ६. ९१. १.; काठक संहिता १५. २.; ऋ. ६. ९१. १). घरात नांगर, बैल आणि वासरे असणे, हे भाग्याचे लक्षण मानतात.

श्रावण पौर्णिमेस शेतकरी नांगराची पूजा करतात. कित्येक जातींत नवऱ्यामुलाचे मंडपाच्या दारात स्वागत करताना



नांगर

वधूची आई इतर वस्तूंबरोबर एक नांगरही घेते. गुजरातमधील काही ब्राह्मणांत मुलाची मुंज झाल्यावर बलेव नावाचा विधी करतात, त्यातही नांगराची पूजा असते. सोमवार हा शंकराचा दिवस असल्यामुळे सोमवारी नांगरणी करीत नाहीत. काही ठिकाणी अमावास्या, शनिवार, रविवार, मंगळवार या दिवशीही ती करीत नाहीत. काही ठिकाणी नांगरणी मृगारंभी किंवा गुढी पाडव्याच्या दिवशी सुरू करतात. साधारणतः पहाटे नांगर चालू करतात. नांगरणीचे पहिले पाच तास फार महत्त्वाचे मानतात. नांगरणी चालू असता मध्येच थांबवता कामा नये, असाही संकेत आहे.

नांगराच्या फाळाला संस्कृतात अष्ट्रा म्हणतात. ओदनसव नामक यज्ञात नांगराचा फाळ वैश्याला दक्षिणा म्हणून देण्याचा विधी असतो (तै. ब्रा. २. ७. ९. २). पाहा – कृषिविद्या. [ लौ. दं.; की. पॉ.; म. ज्ञा. को.– वेदविद्या; वे. इं.; प. का. मा. ]

**नांदी** नाटकाच्या प्रारंभी इष्ट देवतेच्या नमनाचे किंवा प्रार्थनेचे जे श्लोक सूत्रधार म्हणतो, त्यांना सामान्यत्वे नांदी म्हणतात. वस्तुतः नांदी हा पूर्वरंग नावाच्या पूजाविधीचा एक भाग आहे. नाट्यशास्त्राच्या ५ व्या अध्यायात भरताने या पूजाविधीचे वर्णन केले आहे. या विधीशी नाटककाराचा संबंध नसून, सूत्रधार आपल्या साहाय्यकांसह तो विधी

गार पाडीत असे. प्रस्तुत पूर्वरंगाच्या जवळ जवळ मध्यानर सूत्रधार नांदीचे पठण करी व त्यानंतर पूर्वरंगाची इतर अंगे उरकून प्ररोचना या अंगाने त्याची समाप्ती करी आणि रंगभूमीवरून निघून जाई.

नांदीची व्याख्या भरताने पुढीलप्रमाणे सांगितली आहे—

**आशीर्वचनसंयुक्ता नित्यं यस्मात् प्रयुज्यते ।**
**देवद्विजनृपादीनां तस्मान्नान्दीति संज्ञिता ॥**

(ना. शा. ५. २४)

अर्थ – ज्या अर्थी नाट्यप्रयोगाची सुरवात देव, ब्राह्मण व राजे यांच्या आशीर्वचनाने युक्त असते, त्या अर्थी तिला नांदी अशी संज्ञा दिली आहे.

नांदी ही आठ किंवा बारा पदांची असावी आणि सूत्रधाराने ती मध्यम स्वरात म्हणावी, असा प्राचीन संकेत आहे. नांदीत पुढीलप्रमाणे आशय असावा – सर्व देव–ब्राह्मणांना नमस्कार असो. गो–ब्राह्मणांचे कल्याण असो. राजा सागरान्त पृथ्वीचे राज्य सुखाने करो. राष्ट्राचा उत्कर्ष होवो. प्रेक्षक आणि नाटककार यांना यश मिळो. या पूजेने सर्व देवता संतुष्ट होवोत (ना. शा. ५.९८–१०२).

विश्वनाथानेही साहित्यदर्पणात अशीच कल्पना मांडली आहे. विघ्ननिवारणासाठी नांदी अवश्य करावी, असे तो म्हणतो (सा. द. ६.२२–२५). विद्यमान संस्कृत नाटकात प्रारंभी जे मंगल श्लोक आढळतात, त्यांना भरताच्या मताप्रमाणे नांदी म्हणता येणार नाही, कारण हे श्लोक सूत्रधार म्हणत असला, तरी ते नाटककाराने रचलेले असतात. पण हे मंगल श्लोक म्हणजेच नांदी अशी सांप्रतची कल्पना आहे.

कालिदासाने आपल्या तीन्ही नाटकांच्या नांद्यांत शिवस्तुती केली आहे. शूद्रकाने मृच्छकटिकाच्या प्रारंभी शिव–पार्वतींचे वर्णन केले आहे. भवभूतीने उत्तररामचरितात पूर्वकवी व वाग्देवता यांना नमस्कार केला आहे. भट्टनारायणाने वेणीसंहाराची नांदी करताना पहिल्या दोन श्लोकांत कृष्णाचे स्तवन व तिसऱ्यात शंकराचे वर्णन केले आहे. श्रीहर्षाने आपल्या रत्नावली नाटकाच्या नांदीत शिव-पार्वतींचेच वर्णन केले आहे. यावरून बऱ्याच संस्कृत नाटककारांना शिव हीच इष्ट देवता म्हणून मान्य होती, असे दिसते.

जुन्या मराठी व इतर देशी भाषांतल्या नाटककारांनी नांदीचा परिपाठ चालू ठेवला होता. किर्लोस्कर, देवल, खाडिलकर, गडकरी, इ. काही जुन्या मराठी नाटककारांनी नांदी लिहिलेली असून, तिच्यात शिवाचेच स्तवन केलेले आहे. यापुढील मराठी नाटककारांनी नांदींचा प्रघात मोडला.

संस्कृत नांदीचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून महाकवी कालिदासाच्या शाकुंतलाची पुढील नांदी पाहण्यासारखी आहे–

**या सृष्टिः स्रष्टुराद्या वहति विधिहुतं या हविर्या च होत्री**
**ये द्वे कालं विधत्तः श्रुतिविषयगुणा या स्थिता व्याप्य विश्वम्**
**यामाहुः सर्वबीजप्रकृतिरिति यया प्राणिनः प्राणवन्तः**
**प्रत्यक्षाभिः प्रपन्नस्तनुभिरवतु वस्ताभिरष्टाभिरीशः ॥**

अर्थ – ब्रह्माची आद्यसृष्टी (जल), विधिपूर्वक हवन केलेले हविर्द्रव्य वाहून नेणारी (अग्नी), यजमान, दिवस व रात्र धारण करणारी (चंद्र-सूर्य), आकाश, सर्व बीजांची प्रकृती (पृथ्वी) व ज्यायोगे प्राणी प्राणवान् होतात ती (वायू), अशा आठ मूर्तींनी युक्त असा शंकर तुमचे रक्षण करो.

मराठी नाटकातील नांदीचा नमुना असा–

**नमन नटवरा विस्मयकारा । आत्मविरोधी कुतूहलधरा ॥ धृ ॥**
**विवाह करुनी मदन जाळिला । मग मदनमित्र इंदु सेविला ॥**
**धनवैरागी द्यूत खेळला । गौरीचा तो अंकित झाला ।**
**परमेशाच्या ऐशा लीला । कविकृष्ण गात विस्मयकारा ॥ १ ॥**

## नांदीश्राद्ध

मंगल प्रसंगी नांदीमुख पितरांच्या तृप्तीसाठी केले जाणारे श्राद्ध. याला वृद्धिश्राद्ध किंवा आभ्युदायिक श्राद्ध असेही म्हणतात. हे श्राद्ध कोणत्या कृत्यांत प्रारंभी करावे, ते पुढील श्लोकात सांगितले आहे–

**कन्यापुत्रविवाहेषु प्रवेशे नववेश्मनि ।**
**नामकर्मणि बालानां चूडाकर्मादिके तथा ॥**
**सीमन्तोन्नयने चैव पुत्रादिमुखदर्शने ।**
**नान्दीमुखं पितृगणं पूजयेत् प्रयतो गृही ॥**

(विष्णू पु. ३.१३.५-६)

अर्थ– कन्या-पुत्रांचा विवाह, नवगृहप्रवेश, बालकांचे नामकरण व चौलादी संस्कार, तसेच सीमन्तोन्नयन व पुत्रादिकांचे मुखदर्शन या प्रसंगी गृहस्थाने प्रयत्नपूर्वक नांदीमुख पितृगणाची पूजा करावी.

नांदीमुख पितर कोणाला म्हणावे, याविषयी ब्रह्म पुराणात सांगितले आहे, ते असे–

**पिता पितामहश्चैव तथैव प्रपितामहः ।**
**त्रयो ह्यश्रुमुखा ह्येते पितरः संप्रकीर्तिताः ।**
**तेभ्यः पूर्वे त्रयो ये तु ते तु नान्दीमुखा इति ।**

अर्थ– बाप, आजा व पणजा या तिघांना अश्रुमुख पितर म्हटले आहे. यांच्या पूर्वीचे जे तीन पितर ते नांदीमुख होत.

हे श्राद्ध इतर श्राद्धांहून वेगळे असते. वाडवडिलांचे स्मरण करून त्यांना मान देणे, एवढाच याचा उद्देश असतो. यात सत्यवसू नावाचे विश्वेदेव आणि माता, पितामही, प्रपितामही, पिता, पितामह, प्रपितामह, मातामह, प्रमातामह आणि वृद्ध

प्रपितामह असे नऊ पितर असतात. यांच्या जोडीने नांदीमुख या नावाने पितृत्रयीच्या पलिकडील त्रयीचा उल्लेख करतात. कोणत्याही पितरांचा नामोच्चार करीत नाहीत. या पितरांच्या नावाने पाद्य, आसन, गंधादी उपचार आणि आमान्नाचा प्रतिनिधी म्हणून हिरण्य असे उपचार ताम्हनात उदक सोडून समर्पितात. सपत्नीक म्हणण्याच्या ऐवजी पत्नीसहित असे म्हणतात. अपसव्य करीत नाहीत. स्वधा या उच्चाराच्या ऐवजी स्वाहा असा उच्चार करतात. पूर्वाभिमुख बसतात. तिळांच्या जागी तांदूळ वापरतात. दर्भांच्या जागी दूर्वा घेतात. उपचारसमर्पणानंतर 'नान्दीमुखदेवता: प्रीयन्तां वृद्धि:' असे म्हणून उदक सोडतात. मग पितरांनी आपले मंगल करावे, म्हणून प्रार्थना करतात. श्री. ना. गो. चापेकर यांच्या मते हे अवैदिक श्राद्धाचे उघड उघड वैदिकीकरण आहे.

**नांदेड** महाराष्ट्रातील एक तीर्थक्षेत्र. हे मनमाड-सिकंदराबाद-लोहमार्गावर, गोदावरीच्या तीरी वसले आहे. हे गोदावरीच्या प्रवाहाचे नाभिस्थान मानले जात असल्यामुळे प्राचीन काळापासून या स्थानाला विशेष पावित्र्य लाभले आहे. याचे प्राचीन नाव नंदीतट असे असून, नांदेड हे वर्तमान नाव त्यापासूनच बनले आहे. गोदावरीमाहात्म्यात नंदीतट या नावाचा उल्लेख आहे, तो असा–

**आदौ पुण्योदयं क्षेत्रं पश्चात् नन्दीतटाभिधम् ।**

अर्थ– प्रारंभी या क्षेत्राला पुण्योदय क्षेत्र असे म्हणत असून, नंतर त्याला नंदीतट असे नाव प्राप्त झाले.

अनेक ऐतिहासिक कागदपत्रांतही या स्थानाचे उल्लेख 'नंदीतट महास्थळ' असे आढळतात. इथे नंदगिरी किंवा ननगिरी या नावाचा एक जुना किल्ला आहे. हा किल्ला कळंबच्या राजाने बांधला.

गोदेकाठच्या तीर्थक्षेत्रांत नांदेडचा महिमा पैठणप्रमाणेच सर्व दृष्टींनी गाजत होता. पैठणप्रमाणेच इथे संस्कृत विद्येच्या उपासनेची मोठी परंपरा होती. पैठणचे भट्ट घराणे जसे काशीतील संस्कृत विद्येच्या क्षेत्रात अग्रमान पावले होते, त्याप्रमाणे नांदेडचे शेष घराणेही काशीत अनेक शतके गाजत होते. आजही इथल्या सिद्धनाथपुरी नामक भागात 'शेषांची गढी' या नावाने शेष घराण्याचे मूलस्थान दाखवले जाते. सुविख्यात मराठी पंडितकवी वामनपंडित हा नांदेडच्याच शेष घराण्यातील होय. या घराण्यातील रघुनाथ शेषासारख्या अन्य अनेक कवींनी मराठीत उत्तम ग्रंथरचना करून नांदेडच्या सांस्कृतिक वैभवात भर टाकली.

महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधरस्वामी हे आपल्या महाराष्ट्रातील संचारात नांदेडला आले होते आणि इथल्या नरसिंहमंदिरात काही दिवस राहिले होते, असे सांगतात.

नांदेडच्या सिद्धनाथपुरीत शृंगेरी पीठाच्या परंपरेतील एक शांकर मठ होता. या मठात दत्तावतारी सत्पुरुष नरसिंहसरस्वती यांच्या परंपरेतील माधवसरस्वती नामक संन्यासी राहत असल्याचा उल्लेख अमृतकविविरचित अविनाशसंदेहहरण नामक मराठी ग्रंथात आहे. मुकुंदराज–परंपरेतील बकाजी रंगनाथ हा ग्रंथकारही नांदेडचाच.

शिखांचे तर हे धर्मक्षेत्रच आहे. त्यामुळे येथे शीख वस्तीही मोठ्या प्रमाणात आहे. गुरू गोविंदसिंघाच्या वास्तव्याने प्रसिद्धीस आलेली अनेक स्थळे येथे आहेत, ती अशी– गुरू ज्या ठिकाणी प्रथम थांबले व त्यांनी शीखसंगत भरविली ते ठिकाण संगतसाहेब गुरुद्वारमंदिर होय. बंदाबहादुराच्या नावाने प्रसिद्ध असलेलें ठिकाण म्हणजे गोदावरीचा बंदाघाट होय. ज्या ठिकाणी बहादुरशहाने दिलेला एक अमूल्य हिरा गुरूने गोदावरीत फेकला, ते ठिकाण हिराघाट गुरुद्वारमंदिर होय. ज्या ठिकाणी गुरूने गोदावरीच्या आसमंतात शिकार केली व आपली धर्मपत्नी कौरदेवी हिच्यासह ते अल्पकाल राहिले, ती ठिकाणे अनुक्रमे शिकारघाट व माताघाट गुरुद्वारमंदिरे होत. जिथे गुरूने बंडखोर पठाणांना चमत्कार दाखवून त्यांचे थकलेलें वेतन वाटले, ते ठिकाण मालटेकडी गुरुद्वारमंदिर होय. जिथे गुरूचे विशेष वास्तव्य झाले आणि संगत गुरुदरबार भरत राहिला, ते नगीनाघाट गुरुद्वारमंदिर होय. मुख्य अबचलनगर सचखंड गुरुद्वारमंदिर हे गुरूचे निर्वाणस्थल होय.



अबचलनगर सचखंड गुरुद्वारा – नांदेड

नांदेड हे गुरूंचे पूर्वजन्मी तपश्चर्येचे ठिकाण होते, असे शीख लोक मानतात. इ. स. १७०८ साली गुरूने इथे आपला देह ठेवला. मग गुरूला दहन केलेल्या भूमीवर शिखांनी एक

छोटीशी समाधी बांधली व चितेत सापडलेली कारद (शस्त्र) तिच्यावर ठेवली. हे पवित्र स्थान म्हणजेच हल्लीचा भव्य-सुंदर 'श्री हुजूर अबचलनगर सचखंड अकालतख्त श्रीगुरुद्वारा' होय. महाराणा रणजितसिंघाने हा गुरुद्वारा विशाल बनविला. इ. स. १८६७ साली सालारजंगाने हनुमंत प्रसाद नामक एका गृहस्थाला या गुरुद्वाराच्या व्यवस्थेसाठी पाठविले व त्याने त्यात अनेक सुधारणा केल्या

नांदेड हे खालसा पंथाचे चौथे तख्त मानण्यात येते. हे गाव गोदावरीच्या काठी लांबलचक वसले आहे. याची रुंदी अत्यंत लहान असून, लांबी मात्र तीन कोसांच्या वर आहे. इथे मलमल, जरीचे कापड व लुगडी चांगली बनतात. [पो. को ऱ्हों.; श्री. वि. अं. कानोले– लोकसत्ता, २० आक्टो. १९६३]

**नाईक** एक आदिवासी जमात. हे लोक गुजरात, माळवा व पंजाब या प्रदेशांत आढळतात. यांना नाईकदा, नायक, नायकडा अशी अन्यही नावे आहेत. गेल्या शतकाच्या मध्यापर्यंत हे रानटी स्थितींत होते. जंगलात राहून जवळच्या वस्तीवर हल्ले करणे, रक्तपात व लुटालूट करणे, हाच यांचा उद्योग होता. पुढे ब्रिटिश सरकारने सैन्य पाठवून त्यांचा बंदोबस्त केला. मग ते स्थायिक झाले व शेती, लाकुडतोड, मजुरी, इ. व्यवसाय करू लागले. हे बांबूच्या झोपडया बांधून त्यांत राहतात. झोपडीच्या भिंती शेणाने सारवतात आणि छप्पर गवताचे किंवा नारळाच्या झावळ्यांचे करतात.

यांची जातपंचायत असते. बहुतेक सर्व सामाजिक वादांचा निकाल लावण्याचा अधिकार तिला असतो. एखाद्याने जातीचे नियम मोडल्यास, त्याला दंडाची शिक्षा होते व दंडाच्या रकमेतून त्याला शुद्ध करून घेण्यात येते.

गुजरातेतील कोळी लोकांनाही पूर्वी नाईक असे म्हणत. पण ती जात या जातीपेक्षा वरच्या दर्जाची मानली जाते. कोळी, भिल्ल वगैरे अनेक जातींच्या लोकांना यांनी आपल्यात घेतले आहे. त्यांचा परस्पर रोटी-बेटीव्यवहार होतो. धेड, चांभार, भंगी यांच्या हातचे जेवलेल्या नायकडांना तीबाहेर टाकतात; पण जातिबांधवांना दंड व जेवण दिले, की त्यांना जातीत परत घेतात.

**देवधर्म**– हे कालिका, अंबा व महाकाली या देवतांना भजतात. पावागडावरील देवीवर यांची विशेष श्रद्धा आहे. काही ठिकाणी भुताखेतांचीही पूजा केली जाते. काही लोक शमी वृक्षाची पूजा करतात. हे वाघाला पूज्य मानून, आपल्या खरेपणाबद्दल त्याची शपथ घेतात.

होळी, अक्षय्यतृतीया, दिवसो व दिवाळी हे मुख्य सण होत.

पंजाबातील नाईक जातीचे काही लोक हिंदू व काही मुसलमान आहेत.

**विवाहप्रथा** – मुले-मुली वयात आल्यानंतर त्यांचे लग्न करतात. यांच्यांत आते-मामे-मावस भावंडांमध्ये लग्न होत नाही. सामान्यपणे आईवडील मुलामुलींची लग्ने जुळवतात. वराचा बाप मुलीच्या बापाला देज म्हणून काही द्रव्य, धान्य किंवा मांडी देतो.

लग्नमंडपात प्रथम वधू-वरांना खांद्यावर घेऊन नाच करतात. मग त्यांना मध्यभागी समोरासमोर बसवून, त्यांच्या वस्त्रांना गाठ मारतात. त्यांच्या डोक्यावर दुसरे एक वस्त्र धरतात. त्याच्या खाली वधू-वर एकमेकांना गोड पदार्थाचा घास देतात. त्यानंतर त्यांच्या डोक्यावरील वस्त्र काढतात. एवढे झाले, की लग्नविधी संपतो. काही ठिकाणी अग्नीला चार प्रदक्षिणा घालण्याची प्रथा आहे.

सोळाव्या वर्षापर्यंत जर मुलीचे लग्न आईबापांनी जमवले नाही, तर ती आपल्या पसंतीच्या पुरुषाबरोबर लग्नाविना राहू शकते. तो पुरुष मग तिच्या आईबापांना काही द्रव्य देऊन त्यांची लग्नाला संमती मिळवतो. एखाद्या मुलीचा जातीतल्या तरुणाशी विवाहपूर्व संबंध घडला, तर त्याला तिच्याशी लग्न करावेच लागते. तो लग्नाला तयार नसेल, तर जातीचे लोक जमून त्याला त्या मुलीच्या मांडीवर बसवतात, सात वेळा तिला उद्देशून आई म्हणायला लावतात व तिचे स्तनपानही करायला लावतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात. दहाव्या दिवशी अस्थी व रक्षा गोळा करून त्यांचा ढीग बनवतात व त्यावर पाण्याने भरलेले मडके ठेवतात. नंतर त्यांचे नदीत किंवा तलावात विसर्जन करतात. घरी परत आल्यावर मृताचे नातलग पुरुष क्षौर करतात. मग पिंडदान करतात. दहा दिवस सुतक पाळतात. बाराव्या दिवशी जेवणावळ घालतात. श्राद्ध करण्याची चाल या लोकांत नाही. त्याऐवजी मृत मनुष्याचा ओबड धोबड पुतळा बनवून तो अंगणात उभा करतात व त्याची पूजा करतात. काही ठिकाणी नुसता एक खांब उभा करून त्यावर एक मुखवटा लावलेला असतो. [म. ज्ञा. को.; मुं. इ. जा.]

**नाईक वारी** एक मुसलमान जात. यांची वस्ती मुख्यत्वे द. महाराष्ट्रात आढळते. हे मूळचे मराठा कुणबी होत. हे मुख्यत्वे लष्करात व पोलिस खात्यात भरती होतात. ह्यांच्यापैकी काही सुन्नी पंथाचे, तर काही वहाबी पंथाचे आहेत. हे लग्नप्रसंगी मुल्लाला किंवा ब्राह्मणालाही पौरोहित्यासाठी बोलावतात. [मुं. इ. जा.]

**नाईकस्वामी** एक संतकवी. याचा जन्म कारवार जिल्ह्यातील कुमठा तालुक्याच्या अंत्रवल्ली गावी एका सारस्वत कुळात झाला. याचे मूळ नाव शंकर मंगेश नाईक करंडे देसाई असे होते. हा एकदा सहकुटुंब गोमंतकातील श्रीक्षेत्र मंगेशी येथे आपल्या कुलदेवाच्या दर्शनाला जात असता वाटेतील काणकोणच्या जंगलात त्याची व त्याच्या कुटुंबाची चुकामूक झाली. त्याने खूप शोधाशोध केली; पण पत्ता लागेना. शेवटी खिन्न मनाने तो मंगेशाची करुणा भाकीत तिथेच बसून राहिला. इतक्यात एक अवधूतवेषधारी बैरागी त्याच्या समोर उभा ठाकला. त्याने त्याला दुःखाचे कारण विचारल्यावर शंकराने त्याला घडलेला वृत्तांत सांगितला. त्यावर बैरागी त्याला म्हणाला. 'तू या भवारण्यात वाट चुकून कित्येक जन्म भटकत आहेस. आपण कोण, कुठून आलो, कुठे जाणार, याची देखील तुला शुद्धी नाही, तर याबद्दल तुला किती दुःख व्हायला हवे!' त्याच्या या उद्‌गारांनी शंकराला उपरती झाली व तो अवधूताच्या चरणी लागला. त्यानंतर शंकराची व जंगलात चुकलेल्या त्याच्या कुटुंबीय मंडळींची गाठ पडली. मग सर्व मंडळींसह तो मंगेशीला आला व पुढे तिथेच कायम वास्तव्य करून राहिला.

एकदा शंकराने काशीयात्रेला जाण्याचा निश्चय केला. त्या रात्री त्याला असे स्वप्न पडले, की 'आपण काशीक्षेत्री गेलो असून, तिथे गंगास्नान केले आहे व तीर्थोदकाने भरलेला तांब्या घेऊन घाटावरून चाललो आहो.' स्वप्नातून जागे झाल्यावर त्याला दिसले, की स्नान केल्याप्रमाणे आपले सर्वांग भिजले आहे. त्यावरून तो समजला, की 'आपली काशी इथेच मंगेशाच्या पायाशी आहे.' मग त्याने यात्रेचा बेत रद्द केला व समाधिकालापर्यंत तो मंगेशाजवळच राहिला. त्याची समाधी मंगेशाच्या देवस्थानातच आहे. सांप्रत त्याच्या पादुका त्याच्या वंशजांकडे असून, त्याची पूजाअर्चा तेच करतात. वैशाख वद्य द्वादशीला त्याची पुण्यतिथी साजरी होते व पुण्यतिथीचा सारा खर्च मंगेशाच्या देवस्थानातून होतो.

नाईकस्वामी हा प्रासादिक कवी होता. त्याने शिवस्तुतिपर अनेक काव्ये रचली आहेत. शिवगीतेवर त्याची एक टीकाही आहे. त्याच्या काव्याचा एक नमुना असा—

हरहर मंगेश्वर तनकुश पुरनाथा।
हर विश्वंभर सुखदाता ॥
हरहर तापत्रयभवच्छेत्ता।
हरहर गाईन शिबिकोत्सव गुणगाथा ॥
प्रथमपादांगुष्ठाधार अग्नि।
ध्याता तेजोमय स्वभाव नेत्री ॥
दृश्यद्रष्टादर्शनत्रिपुटीसूत्री।
दृष्टी स्थिरता पावे चित्रविचित्री ॥

श्रीमंगेशाच्या शिबिकोत्सवात सोळा पेणी म्हणजे मुक्काम असतात. त्या वेळी प्रत्येक मुक्कामावर कलावंतिणींचे नृत्यगायन होते, त्याच्या आरंभी जी स्तुतिपर गीते (झुलवे) गायिली जातात, ती नाईकस्वामीनेच रचलेली आहेत. [सा. र.]

**नाक** शरीराचा एक अवयव. मानववंशशास्त्रात या अवयवाला फार महत्त्व आहे. संशोधक लोक माणसाच्या नाकाची उंची, रुंदी, बसकेपणा, फुगवटा, इ. गोष्टींवरून तो कोणत्या वंशाचा आहे, हे ठरवण्याचा प्रयत्न करतात.

प्राचीन भारतीय वाङ्मयात नाकाला शरीराच्या नऊ द्वारांपैकी एक किंवा मस्तकाच्या अनेक छिद्रांपैकी एक मानले आहे. या नऊ द्वारांपैकी नाभीच्या खालची द्वारे अशुद्ध आणि वरची द्वारे शुद्ध होत, असे मनुस्मृतीत म्हटले आहे (५.१३२)

काही ठिकाणी एखाद्याला अभिवादन किंवा एखाद्याचे स्वागत करताना एकमेकांचा वास घेतात किंवा नाकाला नाक घासतात. जगातील अनेक भागांत, त्याचप्रमाणे भारतातील काही आदिवासी लोकांतही ही प्रथा रूढ आहे. चितगांगच्या परिसरात असणाऱ्या डोंगराळ भागात राहणारे लोक एकमेकांना भेटण्याच्या वेळी गालाला नाक व तोंड लावून जोराने श्वास घेतात. आशीर्वाद या अर्थाने लहान मुलांच्या टाळूचे अवघ्राण करणे, अशी पद्धत प्राचीन काली भारतात रूढ होती.

नाक टोचण्याची चाल भारतात आहे, त्याप्रमाणेच ती अमेरिका, आस्ट्रेलिया, आफ्रिका, इ. अनेक देशांतही आहे. जंगली व आदिवासी लोक नाकात हाडांचा किंवा लाकडाचा तुकडा घालतात. कोणी पाखरांची पिसेही अडकवितात. काही जमातीचे पुरोहित किंवा मांत्रिक विशेष प्रकारच्या वस्तू नाकात घालतात. त्या लोकांच्या सामर्थ्याचे ते द्योतक असते. काही जमातींची अशी समजूत आहे, की नाक टोचलेले नसेल, तर मरणानंतर परलोकी यातना भोगाव्या लागतात. म्हणून ज्याचे नाक टोचण्याचे राहून गेले असेल, तो माणूस मेल्यावर अंत्यसंस्कार करण्यापूर्वी त्याचे नाक टोचतात.

नाकात अलंकार घालण्याची पद्धत भारतात विशेष विकास पावली आहे. हिंदू स्त्रिया जातिपरत्वे विविध प्रकारचे अलंकार नाकात घालतात. त्या डाव्या आणि उजव्या अशा दोन्ही बाजूंना नाक टोचतात. मुसलमान स्त्रिया ते डाव्या बाजूला टोचतात. काही आदिवासी लोक भुताखेतांविरुद्ध उपाय म्हणूनही नाकात अलंकार घालतात.

काही आदिवासींची अशी समजूत आहे, की मनुष्याचा आत्मा नाकातून किंवा तोंडातून बाहेर पडतो. त्यामुळे मरणोन्मुख मनुष्याचे नाक व तोंड बंद करून आत्म्याला बाहेर पडणे अशक्य करण्याचीही काही जमातीत चाल आहे. झोपताना नाक व तोंड बंद केल्याने आत्मा बाहेर जाऊ शकत नाही, अशीही काहींची समजूत आहे. [ एन्सा. रि. ए. ]

**नाकर** (१५००–१५७५ इ. स.) एक गुजराती कवी. हा बडोद्याचा राहणारा असून जातीने वैश्य होता. याची चंद्रहासाख्यान, हरिश्चंद्राख्यान, ध्रुवाख्यान, सुधन्वाख्यान, नळाख्यान, मृगलीसंवाद, इ. आख्याने प्रसिद्ध आहेत. याखेरीज रामायणातील काही कांडांचे व महाभारताच्या काही पर्वांचे याने भाषांतर केले आहे. संतचरित्रे वर्णन करणारे भक्तमाल हे काव्यही याचेच होय. याने ही काव्ये मुख्यत्वे कीर्तनकारांसाठी रचली होती.

नरसी मेहत्याच्या नंतर आख्यानकवी म्हणून गुजरातमध्ये यालाच मान आहे. इ. स. च्या अठराव्या शतकात झालेल्या प्रेमानंद कवीसाठी याने आख्यानकाव्यांची पूर्वपीठिका तयार करून ठेवली, असे मानले जाते. [ वि. मुं. रा. प. ]

**नागचंद्र** (इ. स. चे ११ वे शतक) एक कन्नड जैन कवी. अभिनव पंप या नावाने हा ओळखला जातो. याने मल्लिनाथ पुराण व रामचरित्र पुराण ही दोन काव्ये लिहिली. त्याच्या मल्लिनाथ पुराणात १६ व्या जैन तीर्थंकराचे चरित्र वर्णिलेले आहे.पण नागचंद्राला विशेष प्रसिद्धी रामचरित्र पुराणामुळेच मिळाली. हा ग्रंथ पंपरामायण म्हणून ओळखला जातो. त्यात जैन मताला धरून रामचरित्र ग्रथित केले आहे व ते मूळ रामायणाला सोडून लिहिलेले आहे. नागचंद्राच्या मते रामलक्ष्मण हे अवतार नाहीत, तर ते 'कारण पुरुष' आहेत. राम धर्मधुरीण आहे आणि त्याने अहिंसा व्रताची दीक्षा घेतली आहे. रावणवधासाठी तो लंकेत जातो; पण रावणाला मारीत नाही. रावणाचा वध करतो तो साहसी लक्ष्मण! राम एकपत्नीही नाही. त्याने अनेक राजकन्यांशी लग्न केले आहे. शेवटी राम जैनदीक्षा ग्रहण करतो आणि मग त्याला कैवल्य मिळते. सीता ही भूमिकन्या नसून, जनकाच्या राणीच्या गर्भातून उत्पन्न झालेली आहे. राज्याभिषेकानंतर रामचंद्र तिचा त्याग करीत नाही; तर ती स्वतःच रामाचा त्याग करते व जिनदीक्षा धारण करून संन्यासिनी बनते.

उ. भारतात जितक्या प्रेमाने तुलसीरामायण वाचले जाते, तितक्याच प्रेमाने कर्नाटकातले जैन लोक पंपरामायण वाचतात.

**नाग जमाती** आसाम व ब्रह्मदेश यांच्या सीमेवरील डोंगराळ व जंगली प्रदेशात नाग नावाचे आदिवासी लोक राहतात. हे सर्व लोक एका जातीचे नसून, त्यांच्या अनेक जमाती आहेत. त्यांची नावे अशी – अंगामी, आओ, कुबई, कचा, लेंगमी, रेंगमा, सेमा, तंगखुल, जेमी, चंग, कोन्याक, लोथा, संगताम, माओ, मारिंग, चखेसंग, फोम, घिमचुंग्र, झेलियांग, खीनमुंगन, इत्यादी. हे लोक मूळचे मंगोल वंशाचे असून, भारताच्या ईशान्य भागातील त्या दुर्गम प्रदेशात ते हजारो वर्षे वसलेले असल्यामुळे यांचा वंश इंडो-मोंगोलाइड या नावाने ओळखला जातो.

नाग हे नाव त्यांना नग = पर्वत या शब्दावरून मिळाले, असे काही पंडितांचे मत आहे. नगावर राहणारे ते नाग होत. नग्न या शब्दावरूनही नाग शब्दाची व्युत्पत्ती सांगितली जाते. पण सर्व नाग लोक पर्वतावर राहत नाहीत आणि सर्वच नाग नग्न



नाग पुरुष

नसतात. नाग हे त्यांचे कुलचिन्ह किंवा देवक होते, त्यावरून त्यांना नाग हे नाव मिळाले असावे, असेही एक मत आहे.

श्री. व्हेरियर एल्विन यांच्या मते तिबेटी-ब्रह्मी गटातील काही भाषांत नोक = लोक, असा एक शब्द आहे, त्यावरून नाग हे नाव यांना मिळाले असावे. मात्र पूर्वी हे लोक स्वत: त्या नावाचा विशेष उपयोग करीत नव्हते. कोन्याक, रेंगमा, सेमा, इ. नावेच ते वापरीत. सखल प्रदेशातील लोकांनी त्या सर्व जमातींना नाग हे नाव दिले. सांप्रत या सर्व जमातींची एक संघटना बनली असल्यामुळे त्यांना नाग हे नाव प्रिय झाले आहे.

नाग जमातींच्या चालीरीती, भाषा, राहणी, रंगरूप यांत पुष्कळ भिन्नता आढळते. काही नाग लोक, विशेषत: जमातींचे प्रमुख देखणे, उंच, सुदृढ व गव्हाळी रंगाचे असतात; त्यांचे कपाळ रुंद, डोळे घारे व दृष्टी भेदक असते; तर काही लोक लहान बांध्याचे व काळे–सावळे असून, त्यांचे नाक वसके व डोळे बारीक असतात. काही थोडया नाग तरुणी सुस्वरूप दिसत असल्या, तरी सामान्यपणे नाग स्त्रिया लठ्ठ, ठेंगण्या व



नाग सुंदरी

कुरूपच असतात. या लोकांत काही युद्धखोर व क्रूर आहेत, तर काही सौम्य वृत्तीचे व व्यापार-उदीम करणारे आहेत. जंगलाच्या अगदी अंतर्भागात राहणारे नाग स्त्री-पुरुष बहुधा नग्न किंवा अर्धनग्न राहतात; तर काही नागांना रंगीबेरंगी कपडे घालण्याची फार आवड असते. मात्र सर्व लोकांना शिंपा, कवडया, मोती व पोवळे यांच्या माळा, लाकडी किंवा हस्तिदंती कर्णभूषणे, कडो, इ. विविध अलंकारांची हौस असते. काचेचे मणी, पिसे, वांबूचे किंवा हाडांचे तुकडे यांपासून नाना प्रकारच्या वस्तू वनवूनही हे लोक आपले देह सजवतात.

नाग जमातींचे लोक अत्यंत रानटी, क्रूर व अडाणी आहेत, अशी सर्वसाधारण समजूत आहे; पण ती बरोबर नाही. त्यांच्यापैकी काही जमाती, विशेषत: घनदाट जंगलात राहणारे लोक, अजूनही मागसलेले, रानटी व क्रूर आहेत, हे खरे. त्यांना आधुनिक सुधारणेचे वारेही कित्येक शतकांत लागलेले नाही. पण गेल्या शंभर वर्षांत ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या प्रयत्नांमुळे पुष्कळ नाग लोक इंग्रजी विद्या शिकून सुधारले आहेत आणि त्यांची वेषभूषा व राहणी बदलली आहे.

दुर्गम पहाड व घनदाट जंगले यांमुळे नागांचे जीवन कठोर बनले आहे. सुसंस्कृत भारताशी फारसा संपर्क नसला, तरी ते अगदीच रानटी व अडाणी नाहीत. त्यांची परंपरा गौरव करण्याजोगी आहे. त्यांची राहणी व त्यांच्या चाली विचित्र असल्या, तरी मूलभूत स्वरूपाचे अनेक मानवी गुण त्यांच्यांत प्रकर्षाने दिसून येतात. सर्वसाधारण नाग मनुष्य प्रामाणिक, सत्यवादी, साधा व निष्पाप असतो. तो सौंदर्यप्रिय असून, त्याला नृत्य, संगीत, कलाकुसर यांची आवड असते. शौर्य, धैर्य, बुद्धिमत्ता, चपळाई हे गुणही नाग लोकांत आढळतात. हे लोक दारी आलेल्या माणसाचे खूप आदरातिथ्य करतात. ते शिस्तप्रिय, विश्वासू व कष्टाळू आहेत. सामुदायिक जीवनात सहकार्याची भावना व समाजनियमांचे पालन करण्याची वृत्ती, हे त्यांचे गुण उल्लेखनीय आहेत.

नागांच्या सर्व जमाती स्वतंत्र वृत्तीच्या असून, त्यांना परक्यांची सत्ता सहन होत नाही. ते स्वभावाने आनंदी, उत्साही, निश्चयी व करारी आहेत. त्यांना आळस व भीक मागणे आवडत नाही. त्यांच्यांतील कोणी चोरीही करीत नाही. नाग लोक ज्याला आपला मानतील, त्याच्यासाठी ते हवे ते साहस करतील; प्रसंगी प्राणही अर्पण करतील. उलट शत्रू म्हटला, की त्याच्याबद्दल नागांच्या मनात कमालीचा द्वेष असतो व त्यांची सूडभावनाही फार तीव्र असते.

**भाषा** — प्रत्येक नाग जमातीची भाषा वेगळी आहे. त्या सर्व भाषा जरी तिबेटी व ब्रम्ही या भाषांच्या मिश्रणातून उगम पावल्या असल्या, तरी त्यांच्यांत बराच फरक आहे. त्यामुळे बहुतेक जमातींना परस्परांच्या भाषा समजत नाहीत आणि व्यवहारासाठी असमिया किंवा हिंदी भाषेचा उपयोग करावा लागतो. त्यांच्या भाषा परिणत झालेल्या नसून, लोकभाषेच्या स्वरूपातच राहिल्या आहेत. त्यांत लिखित साहित्य नाही.

**गावे व घरे**—नाग जमातींची गावे बहुधा डोंगराच्या माथ्यावर वसलेली असतात. प्रत्येक जमातीचे गाव वेगळे असते.



नाग जमातीच्या गावाचा दरवाजा (व्हेरियर एल्विन यांच्या नागालँड या पुस्तकावरून)

गावाभोवती दगडी भिंत किंवा बांबूचे कुंपण असते. काही जमातींची गावे नीट आखणी करून वसवलेली दिसतात. त्यांत



नागांची घरे

सरळ रस्ते व हारीने बांधलेली घरे आढळतात. घरे बांबूची असून, ती जमिनीपासून उंच जागी, मचाणावर बांधलेली असतात. टोळीप्रमुखांची घरे खूप मोठी असतात, तर सामान्य माणसांची त्यांहून लहान पण प्रशस्त असतात. त्यांची बांधणी मजबूत असून, ती विविध प्रकारे रंगवलेली असतात. बहुतेक घरांत, विशेषतः टोळीप्रमुखांच्या घरात, दर्शनी भागी जनावरांची मुंडकी व माणसांच्या कवट्या लावून ठेवलेल्या दिसतात. त्यांच्या पराक्रमाची ती प्रतीकेच मानली जातात.

नाग लोक घराचे बहुधा तीन भाग करतात. पुढच्या खोलीत गुरेढोरे बांधतात. मधल्या मोठ्या खोलीत स्वयंपाक, जेवण, बसणे-उठणे, इ. सर्व व्यवहार करतात व मागच्या पडवीत शेतीची अवजारे व इतर सामान ठेवतात. घरात धान्य थोडेसेच ठेवतात. बाकीचे सगळे शेतावरील झोपडीत असते. ते कोणीही चोरीत नाही.



नागांचे मोरुंग (सामुदायिक शेजघर)

तरुण मुलांची व मुलींची वेगवेगळी सामुदायिक शेजघरे असतात, त्यांना मोरुंग म्हणतात. एखादी वृद्ध स्त्री तिथे त्या मुलांमुलींवर देखरेख करते. ती मुलांना जुन्या गोष्टी सांगून त्यांना वळण लावते. त्यांच्यांतल्या व्यक्तिस्वातंत्र्य, शिस्त, आत्मविश्वास, सहकार्य, इ. गुणांची जोपासना मोरुंगमध्येच होते. मुले आपल्या जन्माच्या जोडीदाराची निवडही याच ठिकाणी करतात.

घर बांधायला जागा निवडल्यावर मालकाला शुभ स्वप्न पडावे लागते. ते पडले तरच तिथे घर बांधले जाते. त्या कामी गावातील सर्व लोक त्याला मदत करतात. घरात प्रवेश

करताना पवित्र अग्नी बरोबर नेतात. जातिप्रमुखाचे घर बांधताना एक कोंबडे पायात बळी देतात.

प्रत्येक गावाचा कारभार स्वतंत्रपणे चालतो. काही जमातींत प्राथमिक स्वरूपाची लोकशाही आढळते. जमातीचे एक मंडळ असते आणि त्यात प्रत्येक घराण्याचा एकेक प्रतिनिधी असतो. अंगामी, लोथा, रेंगमा वगैरे जमातींच्या ग्रामसंस्थेत गावातील सर्वच वयस्क माणसे भाग घेतात. सेमा, चंग, इ. काही जमातींचा कारभार मात्र त्यांचे प्रमुखच चालवतात. त्यांची सत्ता वंशपरंपरागत असते. कोन्याक जमातीचे लोक आपल्या प्रमुखाला अत्यंत पूज्य मानतात.

शासनसंस्था व गावकरी यांच्यांतील दुवा म्हणून काम करण्यासाठी गावकरी गावप्रमुखाची निवड करतात. त्यांना गावबुरा असे म्हणतात. त्यांना खास अधिकार असतात व मानाचे लाल घोंगडे दिले जाते. हे लाल घोंगडे ते नेहमी अंगाभोवती लपेटून घेतात.

**व्यवसाय** – शेती हा नाग लोकांचा मुख्य व्यवसाय होय. ते भात, बटाटे, कापूस, ऊस व भाजीपाला पिकवतात. अंगामी



डाओ– नागांचे शस्त्र (व्हेरियर एल्विन यांच्या नागालँड या पुस्तकावरून )

नाग डोंगराच्या उतारावर पायऱ्यांसारखी सपाट शेते बनवून त्यांत भाताचे बी ओळी धरून पेरतात. इतरही काही जमाती आता त्यांचे अनुकरण करू लागल्या आहेत. बाकीच्या जमाती फिरती (झूम) शेती करतात. काही लोक हातांनी भात उपटतात, तर काही त्यासाठी हत्यार वापरतात. शिकार करणे हा देखील त्यांचा एक उद्योग आहे.

पूर्वी नाग लोक सर्व वस्तू स्वतःच बनवीत. ते उत्तम विणकर आहेत. ते सुरेख शाली व सुती वस्त्रे बनवतात. लोहारकामही त्यांना चांगले येते. डाओ (एक प्रकारचा परशू), भाले, बंदुकी, इ. आयुधे ते बनवू शकतात. डाओ हे हत्यार त्यांना शेती, लढाई, शिकार या सर्वच कामी उपयोगी पडते. वेताच्या व वांबूच्या विविध वस्तू बनवण्यातही ते कुशल आहेत.

**चालीरीती** – तांदूळ, सर्व प्रकारचे मांस, मासे व भाजीपाला हे नागांचे मुख्य अन्न आहे. पूर्वी ते दूध पिणे निषिद्ध मानीत; पण आता काही लोक ते पिऊ लागले आहेत. तांदुळापासून बनवलेली दारू हे त्यांचे आवडते पेय आहे. ती सौम्य व पोषक असून, तिच्यामुळे त्यांना खूप उत्साह व शक्ती मिळते.



डोंगरावरील शेते– नागभूमी (व्हेरियर एल्विन यांच्या नागालँड या पुस्तकावरून )

नागांची कुटुंबपद्धती पितृसत्ताक आहे. या लोकांत फार पूर्वीपासून विभक्त कुटुंबपद्धती रूढ आहे. लग्न झाल्याबरोबर मुलगा वेगळे बिऱ्हाड करतो. नाग स्त्रियांना कुटुंबात व समाजात बराच मान असतो. त्यांच्या संमतीवाचून पुरुष कोणतेही काम करीत नाहीत. स्त्रियाच अप्रत्यक्षपणे त्यांच्या समाजाचे



बांबूचे पेले

संचालन करतात म्हटले तरी चालेल. त्या घर संभाळून विणकामही करतात. तथापि नाग लोक एखाद्या स्त्रीने मारलेल्या पशूचे मांस मात्र निषिद्ध समजतात.

यांच्यांत विवाहित स्त्रीच्या वर्तनावर कडक निर्बंध आहेत. तिचा परपुरुषाशी अनैतिक संबंध असणे, हे मोठे पाप मानले जाते आणि त्या दोघांनाही कठोर शिक्षा केली जाते. अविवाहित मुलींना मात्र लग्न होईपर्यंत बरीच मोकळीक असते.

नवीन मूल जन्माला येणे, प्रतिष्ठित व्यक्तीचा मृत्यू, भूकंप, ग्रहण, आग, अशा प्रसंगी गावाचे सर्व व्यवहार बंद ठेवण्याची चाल या लोकांत आहे. या चालीला गेन्ना म्हणतात. अशा वेळी दुसऱ्या गावातील लोकांनाही गावात यायला बंदी असते. नवीन घरात प्रवेश केल्यावरही तीन ते पाच दिवस गेन्ना पाळतात. त्या अवधीत दुष्ट शक्तींचे उच्चाटन करण्यासाठी काही विधी केले जातात.

नाग – गृहिणी

एखादा मनुष्य बुडून, अंगावर झाड पडून किंवा वाघाच्या तडाख्यात सापडून मेला, तर त्याच्या कुटुंबातले लोक घर सोडून जातात, महिनाभर जंगलात भटकतात व दुसऱ्या जागी नवे घर बांधतात.

नाग स्त्रियांना गोंदून घेण्याची फार हौस आहे. त्या सर्व शरीरावर गोंदून घेतात. पूर्वी तर त्यांना गोंदून घेतल्याशिवाय लग्नच करता येत नसे.

**नाच–गाणे** – नाग लोक फार रसिक वृत्तीचे आहेत. त्यांना नाच–गाण्याची खूप आवड आहे. त्यांच्या भाषांमध्ये असंख्य सुंदर लोकगीते असून, नाग तरुण–तरुणी काम करताना किंवा नाचताना ती अत्यंत समरसतेने गातात. स्त्रियांचे नृत्य वेगळे असते. त्यात रंगेल हावभाव व उत्तान गाणी असतात. पुरुषांचे युद्धनृत्य म्हणजे ती लढाईच भासते. सर्वजण डाओ, भाले, ढाली, इ. शस्त्रांनी सज्ज होऊन व सुंदर शिरस्त्राणे घालून बेहोषपणे नाचतात. शिरस्त्राणे वेताची करून त्यांना काळा रंग देतात आणि ती पिसे व बकरीचे केस लावून सजवतात. मण्यांच्या माळा, हस्तिदंती किंवा लाकडी कडी, इ. विविध दागिने त्यांच्या अंगावर असतात. वस्त्र बहुधा नसते; असलेच तर काळे व निरनिराळ्या भडक रंगांचे लहानसे असते. अशा प्रकारच्या या साजशृंगारामुळे हे नर्तक भेसूर दिसतात. त्यांच्या ढाली खूप मोठ्या ५ ते ६ फूट लांबरुंद असून, त्या वेताच्या किंवा बांबूच्या असतात व त्यांवर वाघाचे किंवा अस्वलाचे कातडे मढवलेले असते. त्यांचे लाकडी ढोल एवढे प्रचंड असतात, की त्यांचा आवाज अनेक कोस दूरपर्यंत ऐकू जातो.



अंगामी नाग–नर्तक



युद्धनृत्यातील एक नर्तक

**शिरकाण** – शत्रूवर हल्ला करून त्यांच्यांतल्या अनेक माण-

शांची शिरे कापून आणणे, ही चाल इतर रानटी लोकांप्रमाणे नाग लोकांतही जुन्या काळी रूढ होती. त्या प्रथेमागे त्यांच्या काही भ्रामक समजुती आहेत. माणसाचा आत्मा त्याच्या डोक्यात असतो आणि ते डोके कापून आणून आपल्या घरात ठेवले, की त्यातील आत्म्याची शक्ती आपल्याला साहाय्य करते व आपले शरीरबल वाढवते, अशी नागांची कल्पना आहे. कवटीमुळे वंशवृद्धी होते, भरपूर पीक मिळते आणि घराचा व गावाचा उत्कर्ष होतो, असे ते मानतात. देवाला बळी देण्यासाठी काही लोक हे शिरकाण करतात, तर काही केवळ सूडबुद्धीने करतात. त्यांच्यांत नरमुंड मिळवणे हे पराक्रमाचे चिन्ह मानले जाते. ते ज्याने मिळवले नसेल, त्याच्याशी लग्न करायला नाग तरुणी पूर्वी तयार नसत.

**विवाहप्रथा**– सर्व नाग लोकांत मुलगे व मुली वयात आल्यानंतर त्यांची लग्ने होतात. तरुण–तरुणी बहुधा स्वतःच आपापले जोडीदार निवडून लग्न ठरवतात, त्याला आईवडिलांची संमती घेतात व एकत्र राहू लागतात. काही महिने नुसते एकत्र राहून वधू-वर एकमेकांची पारख करतात व स्वभाव जुळले, तर मग लग्न करतात. स्वभावभिन्नता आढळली, तर वेगळे होतात. त्या अवधीत वधू गरोदर झाली, तर मात्र त्या दोघांना लग्न करावेच लागते.

काही जमातीत वर वधूच्या आईबापांना गाई, डुकरे व दारू अशी भेट (देज) देतो. ते शक्य नसेल, तेव्हा तो एक वर्षभर मुलीच्या बापाच्या घरी कष्ट करतो. त्या कामात तो योग्य ठरला, तर मग त्या गृहस्थाची मुलगी त्याला मिळते. नातेवाईकांना कोंबडीचे जेवण देऊन भरपूर दारू पाजली, की त्यांचे लग्न पुरे होते. इतर काही विधी करावा लागत नाही.



नाग जमातीचा प्रचंड ढोल

भिन्न जमातींचे लग्नातले विधि-निषेध वेगळे आहेत. काही जातींत कोणत्याही स्त्री-पुरुषांचा विवाह होऊ शकतो. एकाच घराण्यातील स्त्री-पुरुषांचे लग्न बहुधा होत नाही. तसे लग्न केले, तर सर्व जातीवर संकट येते, अशी समजूत आहे. आईच्या घराण्यातील व्यक्तीशी लग्नसंबंध करता येतो. काही जातींत एकाच कुटुंबातील तरुण-तरुणींचे लग्न होऊ शकते; मग ती भावंडे असली, तरी हरकत नसते.

बहुतेक नाग जमातींत पुरुषाला एकच बायको करता येते. पण सेमा नाग मात्र अनेक बायका करू शकतात व करतात.



जेमी नाग युवती

या लोकांत घटस्फोट सहज मिळू शकतो व तो घेण्याची प्रथाही रूढ आहे. स्त्रीचे अनैतिक वर्तन हे त्याचे मुख्य कारण असते. पण स्वभाव न जुळणे हे कारणही पुरते. स्त्री दुर्वर्तनी असली, तर नवऱ्याने लग्नात दिलेली रक्कम त्याला परत मिळते. पुरुष दोषी असला, तर त्याला दंड भरावा लागतो ती रक्कम त्याच्या सासऱ्याला मिळते. काही ठिकाणी वाङ्निश्चयाच्या वेळी खोटी लढाई करतात आणि वधूला पळवून नेतात.

**देवधर्म**– विश्वाचा निर्माता, जगाचा शास्ता व मानवी जीवनाचा नियंता असा कोणीतरी श्रेष्ठ देव असून, त्याच्या हाताखाली अनेक देवता आहेत, अशी नागांची कल्पना आहे. सूर्य ही त्यांची मुख्य देवता होय. सेमियो व कुंचिपाई हे त्यांचे चांगले देव आहेत. सेमियो धन देतो व कुंचिपाई पिकांचे रक्षण करतो. सेमियोला रेडे, मिथुन, गायी, इ. पशू बळी देतात; तर कुंचिपाईला बकरी, कोंबडी व अंडी देतात. रूपिआवा हा त्यांचा दुष्ट देव आहे. त्याला कुत्रे व डुकरे बळी देतात. त्याचा मदतनीस कनंगआवा हा अंध, पण उग्र असा वेताळ आहे. नाग लोक भुताखेतांनाही भजतात आणि प्रेतांची पूजा करतात. भुतांना वश करण्यासाठी किंवा त्यांना हुसकावून लावण्यासाठी त्यांचे भगत मंत्रतंत्र करतात. नद्या-नाले, वृक्ष, पर्वत यांनाही देव मानून त्यांची पूजा केली जाते. युद्धदेवतेला प्रसन्न करण्यासाठी नाच करतात, त्याला केदोहोल म्हणतात. युद्धात विजय झाल्यावर हे लोक प्रेतपूजा व नृत्य करतात.

त्यांचे काही अलौकिक सामर्थ्य असलेले पुरुषही मरणानंतर देवत्व पावले आहेत.

भूकंपामुळे पृथ्वी पाण्यातून वर आली, अशी नागांची कल्पना आहे. भूकंपाची देवताच विश्व निर्माण करते व पापी माणसांना स्वर्गात जाऊ देत नाही, असे ते समजतात.

मनुष्याचा आत्मा अमर आहे, अशी सर्व नागांची समजूत आहे. पण मरणोत्तर त्याचे काय होते, यावद्दल मात्र मतभेद आहेत. काहींचा पुनर्जन्मावर विश्वास आहे. माणसाला सात वेळा पृथ्वीवर जन्म मिळतो व नंतर त्याचा आत्मा परमेश्वरात विलीन होतो, असे ते मानतात. काहींच्या मते मृत्यूनंतर मनुष्य फुलपाखराच्या योनीत जातो. स्वर्ग व नरक या कल्पनाही काही जमातींच्या धर्मात आढळतात.

सेमा नागांतील काही माणसे स्वप्ने, दृष्टांत, शकुन यांचे अर्थ लावून भविष्य वर्तवितात. अशा माणसांना थुमोमी म्हणतात.

नागांचा धर्म हा अशा प्रकारचा आहे. त्याच्यावर हिंदू धर्माचा प्रभाव पडलेला दिसून येतो. काही नागलोक स्वतःला हिंदू मानतात आणि अर्जुन व उलुपी यांचे वंशज समजतात. ते हिंदूंची आख्याने, पुराणे ऐकण्यास उत्सुक असतात. पण खेदाची गोष्ट ही, की सनातनी म्हणवणाऱ्या हिंदूंनी मात्र त्यांना अस्पृश्यांसारखे दूर ठेवले. उलट ख्रिस्ती मिशनरी तिथे जाऊन त्यांची सेवा शुश्रूषा करू लागले. त्यामुळे ख्रिस्ती धर्माचा प्रसार त्यांच्यांत बराच झाला आहे.



मिथुन – नागभूमीतील एक पशू

**सण व उत्सव–** नागांचा वर्षारंभ उन्हाळ्यात मे महिन्याच्या आरंभी येतो. त्यापूर्वी शेतात बी पेरून झालेले असते. वर्षारंभाचा सण हे लोक मोठ्या नृत्याने साजरा करतात. त्यासाठी प्रथम घरांची व गावाची साफसफाई करतात. मग नृत्यवेष, अलंकार व आयुधे साफ करतात. या उत्सवात तांदुळाची दारू पिऊन तरुण-तरुणी बेहोषपणे नाचतात आणि दोन दिवस खूप मौज करतात. या दिवसांत स्वैर वर्तनाला मुभा असते. हा सण आपल्याकडील शिमग्यासारखाच असतो.



नाग तरुणाचा उत्सवातील नृत्य-वेष

भाताची कापणी झाल्यानंतर हे लोक पौकपटूगी नावाचा उत्सव करतात. त्यात विविध खेळांचे कार्यक्रम होतात. बैल व रेडे यांना रानोमाळ पळायला लावून आडदांड पुरुष त्यांचा पाठलाग करतात व त्यांना पकडतात. या खेळात पशूंचे खूप हाल होतात. पण प्रेक्षक मात्र आनंदाने उचंबळून आरोळ्या ठोकतात.

मानाची मेजवानी हा नागांचा समारंभ काहीसा वैदिक यज्ञसमारंभासारखा आहे. त्यात मिथुन नामक पशूचा बळी दिला जातो आणि मग थाटाचे भोजन होते. विवाहित मनुष्यच हा समारंभ करू शकतो; कारण त्यात पत्नीला महत्त्वाचे स्थान असते. या समारंभामुळे यजमानाला इहलोकी प्रतिष्ठा लाभते व परलोकीही सद्गती मिळते, अशी समजूत आहे.

**मृतकप्रथा–** भिन्न नाग जमातींच्या मृतकप्रथा वेगवेगळ्या आहेत. कोणी प्रेते पुरतात, कोणी जाळतात, कोणी उघड्यावर टाकून देतात, कोणी लाकडी पेटीत घालून गावाबाहेर झाडाला टांगून ठेवतात, तर कोणी प्रेताचे तुकडे करून ते टाकून देतात.

प्रेताचे मांस झडून गेल्यानंतर उरलेली हाडे पुरण्याची किंवा जाळण्याची प्रथा काही नाग जमातींत आढळते. त्यासाठी मृताचे नातेवाईक वीरवेष करून व सर्व शस्त्रे घेऊन, घंटा व ढोल वाजवीत स्मशानात जातात, तिथे रात्रभर नाचतात व यमाला उद्देशून गाणी म्हणतात. दुसऱ्या दिवशी तरुण स्त्रिया प्रेतावर पाने व फुले टाकतात. त्यानंतर ते प्रेत (हाडांचा

झापडा) जाळतात किंवा पुरतात. मृत व्यक्ती प्रतिष्ठित असेल, तर त्याच्यासाठी दोन रेडे, अनेक डुकरे व पुष्कळ कोंबडी बळी देतात.



शिंगाचे मद्यपात्र

प्राचीन नाग लोक– प्राचीन काळी हिमालयाच्या उतारावरील डोंगराळ प्रदेशात राहणाऱ्या अनार्य लोकांना किरात असे नाव होते. मानववंशशास्त्रज्ञ त्यांनाच सांप्रत इंडो-मोंगोलाइड मानतात. शबर, पुलिंद, निषाद, भिल्ल, इ. अनार्य लोक त्या किरातांहून वेगळे होते. किरात लोक सोनेरी रंगाचे व दिसायला चांगले होते. ते गिरिजन असले, तरी मजबूत झोपड्या बांधून त्यांत वसती करीत, चर्म परिधान करीत आणि शिकार, फळे, कंदमुळे यांवर निर्वाह करीत. ते शूर व धाडसी असून, युद्धविद्येत पारंगत असत. त्यांची शस्त्रे लांबरुंद व तीक्ष्ण असत. शंकराने किराताचे रूप घेऊन अर्जुनाशी युद्ध केल्याची कथा महाभारतात आहे, ते किरात हेच लोक होत.



विणकर नागस्त्री

नाग लोक त्या किरात वंशातले आहेत, असे अनेक पंडितांचे मत आहे. संस्कृत वाङमयातील किरातांचे वर्णन नागांशी काहीसे जुळते आहे. नाग लोकांप्रमाणे किरातही वस्त्र विणण्यात कुशल होते. प्राचीन संस्कृत साहित्यात नागांचा उल्लेख जागोजाग आढळतो. त्यांची परंपरा वैदिक युगापासून सुरू झालेली दिसते. ऋग्वेदातील काही सूक्तांचे (१०. ६४ व १०. ७६) द्रष्टे नाग जातीचे होते. कित्येक ऋषींनी नागकन्यांशी विवाह केले होते. रामचंद्राचा पुत्र कुश व रावणाचा पुत्र मेघनाद यांचे विवाह नाग युवतींशी झाले होते. यादवांचा मूळ पुरुष यदू व शूरसेन प्रदेशाचा राजा उग्रसेन यांच्या राण्या नाग जातीच्या होत्या. अर्जुनाने उलूपी व चित्रांगदा या दोन नाग तरुणींशी गांधर्वविवाह केला होता. त्या नाग स्त्रिया अत्यंत लावण्यवती होत्या, असे वर्णन संस्कृत ग्रंथांत आढळते.

नाग लोकांची वसती वंग, मगध, खांडववन, कुरुक्षेत्र, हरिद्वार, केरळ, इ. भिन्न प्रदेशांत होती. ते आर्य होते की अनार्य, हे निश्चयाने सांगता येत नाही. पण ते बहुधा अनार्य असावे. कश्यप ऋषीपासून कद्रू नामक त्याच्या अनार्य पत्नीला झालेली संतती, तीच नाग जाती होय, असे पुराणांत सांगितले आहे. पुढे त्या लोकांना आर्य समाजात महत्त्वाचे स्थान मिळाले. डॉ. काशीप्रसाद जयस्वाल यांच्या मते ते वैश्य मानले गेले होते.

पुराणांत शेष, वासुकी, तक्षक, शंख, श्वेत, महापद्म, कंबल, अश्वतर, एलापत्र, कर्कोटक, धनंजय, महाबल, कुलिक, नागेंद्र, अपराजित, अनंत, इ. नाग व्यक्तींची नावे आढळतात. या नाग जातीच्या पुरुषांविषयी अनेक पौराणिक कथा प्रसिद्ध आहेत.

नाग व गरुड यांच्या संबंधात काही संशोधकांनी मत मांडले आहे, ते असे– दोघेही कश्यपपुत्रच आहेत. याचा अर्थ कास्पियन समुद्राच्या काठी वास्तव्य करणाऱ्या या दोन जमाती होत्या आणि गरुड व नाग ही अनुक्रमे त्यांची देवके होती. या दोन्ही जमाती आपल्या निर्गमनात आर्यांच्या जवळ आल्या. त्यांपैकी गरुडांनी आर्यांशी मैत्री करून त्यांच्या संस्कृतिविस्तारात त्यांना सहकार्य दिले. नाग लोक मात्र सुरवातीला आर्यांचे शत्रू म्हणून त्यांच्याशी सामना द्यायला आले. गरुड व नाग यांचे जन्मजात वैर होते. त्यामुळे आर्यांनी गरुडांना पुढे करून नागांचा संहार सुरू केला. कालांतराने नागकुलांपैकी अनंत, वासुकी, शेष ही कुले वैरभाव विसरून आर्यांच्या जवळ आली. तक्षक, कर्कोटक, कालिय ही कुले मात्र आर्यांशी सतत वैर करीत राहिली. पुराणातल्या तक्षक–कर्कोटकादी नागांच्या कथा या सरपटणाऱ्या नागांच्या कथा नसून,त्या मानवनागांच्या कथा आहेत. पुढे वैष्णव संप्रदाय वाढू लागला, त्या काळात गरुड व अनंतादी नाग यांचेही वैर शमवण्यात आले. शेष हा विष्णूची शय्या बनला आणि गरुड विष्णूचे वाहन झाला आणि ते दोघे हाडवैरी विष्णूच्या आधिपत्याखाली वैर विसरून मित्रभावाने वागू लागले. वैष्णव संप्रदायाने त्या दोन्ही

जमातींना एकत्र आणून त्यांची देवके ही संप्रदायाची चिन्हे म्हणून स्वीकारली, असा याचा अर्थ आहे. आर्य, गरुड आणि नाग यांच्या या कथा म्हणजे तीन मानव-संघांतल्याच कथा होत. भारताच्या भूमीवर त्यांच्यामध्ये संघर्षही झाला आणि अखेर समन्वय ही केला गेला.


प्राचीन नागपुरुषाचे काल्पनिक चित्र

आर्यांशी मित्रत्वाने वागून जे नाग लोक त्यांच्या समाजात राहिले, ते कालांतराने भारतीय संस्कृतीत विलीन होऊन गेले. पण जे काही असंस्कृत व रानटी नाग आर्यांची सत्ता मानण्यास तयार नव्हते, त्यांनी आर्यांशी वैर सुरू ठेवले. आर्यांनी त्यांना पराभूत केल्यामुळे त्यांनी हिमालयातील घनदाट अरण्यांचा आश्रय घेतला. त्यांच्यावर आर्य संस्कृतीचा प्रभाव पडू शकला नाही. ते लोक हजारो वर्षे आसाम व ब्रह्मदेश या प्रदेशांतील डोंगराळ भागात आपली वेगळी संस्कृती संभाळून राहिले व आदिवासी नाग या नावाने ओळखले जाऊ लागले. आपली वेषभूषा, कुटुंबव्यवस्था, शेते, गावे, ग्रामशासनपद्धती या सर्वांवर त्यांचे विलक्षण प्रेम असून, आपली अस्मिता व स्वतंत्रता यांचे रक्षण करण्यासाठी ते प्राणपणाने लढत आहेत. [ भा. इ. रू.; ने. नॉ. इं.; इं. स्ट. पा. प्रे. १ (२), जानेवारी १९६०; एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को.; नागालँड; लौ. नी.; श्री. राजेश्वरप्रसाद नारायण सिंह– आजकल, मे १९५८; श्री. राजेंद्रप्रसाद अवस्थी– धर्मयुग, १० जुलै १९६०; श्री. पंडित– केसरी दिवाळी अंक, नोव्हेंबर, १९६५; ब्र. सां. इ.; स. सा. वा. ३ ]

## नागट्टनकावू

मलबारमधील एक पवित्र वृक्षकुंज. या वृक्षांवर वेली चढवलेल्या असतात. या कुंजात नागांच्या लहान लहान पाषाणमूर्ती असतात. नाग हा मलबारी लोकांचा कुलदेव आहे, तसाच तो त्वचेच्या रोगांचाही देव समजला जातो. मलबारी लोक या वनांची फार काळजी घेतात. वर्षांतून एकदा या नागमूर्तींची ब्राह्मणाकरवी पूजा करतात व नागप्रीत्यर्थ नाचगाणीही करतात. [ मलबार गॅझे. ]

## नागदष्टोद्धरणव्रत

एक काम्य व्रत. भाद्रपद शुद्ध पंचमीला या व्रताचा प्रारंभ करतात. याचा व्रतावधी एक वर्ष असतो. या व्रताचा विधी असा–

व्रतधारी व्यक्ती चतुर्थीला एकभुक्त व पंचमीला नक्त करतात. सोने, रुपे, लाकूड किंवा माती यांची पाच फणा असलेली नागाची प्रतिमा करून तिला पंचामृताने स्नान घालतात. नंतर पंचोपचारी पूजा करतात. पूजेसाठी विशेषतः कण्हेरी, जाई व कमळे ही फुले घेतात. नंतर खीर व मोदकाचा नैवेद्य दाखवून ब्राह्मणभोजन घालतात. प्रत्येक महिन्याच्या शुद्ध पंचमीला मासपरत्वे नागांच्या निरनिराळ्या नावांनी असाच पूजाविधी करतात. उद्यापनाच्या वेळी विष्णूचे स्मरण करून सुवर्णाची नागप्रतिमा आणि सवत्स धेनू दान देतात. यथाशक्ति ब्राह्मणभोजनही घालतात. फल– सर्पदंशनिवारण. [ व्रतराज ]

## नागदा

एक प्राचीन नगर. हे राजस्थानात उदयपूरपासून १३ मैलांवर उत्तरेला कैलासपुरीजवळ आहे. सांप्रत ते अवशेषरूपानेच दिसते. संस्कृत साहित्यात या नगराचा उल्लेख नागह्रद असा येतो. ह्रद म्हणजे डोह होय. आजही या नगराजवळ एक जलाशय आहे.

हे नगर किती प्राचीन आहे, हे सांगणे कठीण आहे. परंतु ते इ. स. ११३५ च्याही पूर्वीचे आहे, हे निश्चित. सिद्धराज जयसिंहाच्या काली होऊन गेलेल्या हेमचंद्राच्या व्याकरणात त्याचे वर्णन आहे. इ. स. ११३५ चा एक जैन शिलालेखही येथील जलाशयाजवळ आहे. त्या लेखावरून हे शहर एका काळी मेवाडची राजधानी होते, असे कळते. बाराव्या शतकापर्यंत ते अत्यंत वैभवशाली शहर होते. इ. स. १२३९ त शमशुद्दीन इल्तमिशने मेवाडवर हल्ला केला, त्या वेळी हे शहर उद्ध्वस्त झाले.

येथील मंदिरांत रावलका देवरा, अद्‌भुतजी व सासबहूंचे मंदिर ही विशेष उल्लेखनीय आहेत. रावळाखूमाण रा देवरा हे एक आकर्षक जैन मंदिर आहे. रावळ खुमाणने हे इ. स. च्या आठव्या शतकात बांधले असावे. याच्या जवळच एक विशाल शिवमंदिर आहे. त्याच्या स्वरूपावरून नागदाच्या समृद्धीची व मेवाडच्या राजांच्या धर्मप्रियतेची कल्पना येते. इथले शांतिनाथाचे मंदिर हे एक प्रमुख जैन मंदिर आहे. येथील लेख महाराणा कुंभाच्या (इ. स. १४३७) काळचे आहेत. त्यावरून देवकुलपाटक असेही या नगराचे नाव होते, असे कळते. येथील

शांतिनाथाच्या दर्शनासाठी फार दुरून लोक येतात. येथील शिलालेखात शांतिनाथाच्या मूर्तीला निरुपम व अद्भुत असे म्हटले आहे. पूर्वी या शहरात जैनांची बरीच वस्ती होती. इथले सास-बहूंचे मंदिर नागर शैलीचा उत्कृष्ट नमुना आहे. सासूचे मंदिर अधिक सुंदर आहे. याचा मंडप विशाल असून, तो चार गोल स्तंभांवर आधारलेला आहे. मंडपाच्या मध्यभागी अग्निकुंड आहे. मंडपात सर्वत्र मूर्ती खोदलेल्या आहेत. चारही बाजूंना अकरा मंदिरे आहेत. शिखर सोडून हे सर्व मंदिर प्रचंड संगमरवरी शिलांनी बांधलेले आहे. दगडांची रचना अशी कौशल्यपूर्ण आहे, की एकाच दगडाचे बांधकाम केले आहे, असे भासावे. मंदिराबाहेर सज्जांवर विविध आयुधे व मंडपाच्या छतावर कमळामध्ये चार नर्तिका कोरल्या आहेत. त्या मूर्ती अत्यंत सजीव वाटतात. भावदर्शनाच्या दृष्टीनेही या नर्तिका अत्यंत आकर्षक आहेत. या मंदिराची शिल्पकला अबू येथील मंदिरशैलीची आहे. [धर्मयुग १३ जून १९५४; श्री. मनोहरसिंग सरूपरया—वीणा, एप्रिल १९५८]

## नागदिवाळी

मार्गशीर्ष शुद्ध पंचमीला हे नाव आहे. या दिवशी नागप्रतिमेची पूजा करण्याची व घरात जेवढे पुरुष असतील, त्यांतील प्रत्येकाच्या नावाचे एकेक पक्वान्न करून त्यावर दिवा लावण्याची प्रथा महाराष्ट्रात आहे. दिवा हे दीर्घायुष्याचे प्रतीक आणि नाग हे कुळाच्या मूळ पुरुषाचे प्रतीक मानतात. या मूळ पुरुषाच्या कृपेने घरातल्या हयात पुरुषांना दीर्घायुष्य लाभावे, असा यात उद्देश असतो.

## नागदेवाचार्य

(इ. स. चे १३ वे शतक) महानुभाव पंथाचा आद्याचार्य. नागदेवाच्या बापाचे नाव महादेवभट व आईचे आबाइसे असे होते. त्याची पत्नी गंगाइसा व पुत्र महेश्वर हे होत. नागदेव हा बीड जिल्ह्यातील पुरी नामक गावी राहत असे. तो ऐन तारुण्यात म्हणजे महानुभाव पंथात प्रवेश करण्यापूर्वी अनेक ढांढाळात (व्यसनात) गुंतलेला होता. तो नेहमी आडवी वेणी बांधी व मोकळा कासवटा सोडून हिंडे. पुढे रामदेव उर्फ दादोस याच्या सहवासाने तो निवळला व रामदेवामुळेच त्याची व चक्रधराची श्रीनगर ऊर्फ सिन्नर येथे भेट झाली. या प्रथम भेटीतच त्याने चक्रधराचा तांबूल-प्रसाद भक्षण केला व त्यामुळे त्याला स्थित्यानंद प्राप्त झाला. नंतर तो चक्रधराचा पट्टशिष्य बनला. चक्रधरापासूनच त्याने संन्यासदीक्षा घेतली. चक्रधराच्या निधनानंतर नागदेव गोविंदप्रभूच्या सान्निध्यात गेला. त्याने गोविंदप्रभूची मनोभावे सेवा केली. स्मृतिस्थळ या ग्रंथात प्रस्तुत नागदेवाचे चरित्र वर्णिलेले आहे.

गोविंदप्रभू नागदेवाला हरिमा असे म्हणत, तर चक्रधर त्याला वानरा म्हणे. चक्रधरासाठी गुंफा तयार करण्याकरिता हा या झाडावरून त्या झाडावर वानराच्या गतीने चढून फांद्या तोडीत होता, म्हणून त्याला हे नाव मिळाले असावे. त्याला अशी अनेक नावे कौतुकाने मिळाली असली, तरी तो मात्र स्वतःला भटो म्हणवून घेत असे. चक्रधरानंतर नागदेवाने या पंथाला विलक्षण गती दिली. त्याच्यामुळेच त्या पंथाला भटमार्ग असे म्हटले जाऊ लागले.

नागदेव स्वतः विद्वान पंडित नव्हता; तरी त्याच्या ठिकाणी माणसे जोडण्याची कला उत्तम होती. म्हाइंभट, गोपाळपंडित, दामोदरपंडित, भास्करभट्ट असे मोठमोठे विद्वान त्याने स्वतःकडे व आपल्या पंथाकडे आकर्षित केले. यावरून 'वेधवंती नागदेव' हे त्याचे विशेषण सार्थ ठरते. त्याच्या या विशेषणाचे स्पष्टीकरण देणारी एक स्मृती अशी—

भिक्षेच्या वेळी ऐकू येणाऱ्या नागदेवाच्या आवाजाने रडणाऱ्या मुलांचे रडे थांबे. कित्येक बालके स्तनपान सोडून त्याच्याकडेच एकटक पाहत राहत. दुःखित आपले दुःख विसरे. भांडणाऱ्यांचा राग नाहीसा होई. अशी त्याची वेधवंती मूर्ती होती.

नागदेवाची चक्रधरासंबंधीची भक्ती अलौकिक होती. तो मठात उंबऱ्याचे उसे करून झोपत असे. चक्रधर त्याला आपल्या पायाने उठवी, त्या वेळी तो चक्रधराचा पाय आपल्या मस्तकी धारण करून त्याचे चुंबन घेत असे. नम्रता हा नागदेवाचा एक प्रमुख गुण होता. आपले कोणी अकारण स्तोम माजवू नये, असे त्याचे प्रामाणिक मत होते. त्याच्या दर्शनाला येणाऱ्या लोकांना तो साष्टांग दंडवत घालू देत नसे किंवा पायावर डोकेही ठेवू देत नसे. एकदा एका माणसाने त्याच्या पायाचे तीर्थ घेतले, त्या वेळी नागदेव म्हणाला. 'पायवणि घ्यायचे तर देवाचे घ्या.'

नागदेवाला शिष्यांच्या अंगच्या गुणांची चांगली जाणीव होती. त्यांच्या सुखदुःखांकडे तो मातेच्या प्रेमाने पाहत असे. रामदेव नावाचा त्याचा एक शिष्य भिक्षेला निघाला असता त्याने नागदेवाला क्षेमालिंगन दिले आणि नागदेवाला त्याचे अंग गरम लागले. त्याची ती स्थिती पाहून नागदेवाचे मन कळवळले. त्याने लगेच त्याची काळजी घेण्यासाठी पंडितबास व केशोबास यांची नियुक्ती केली.

एकदा दुष्काळ पडल्यामुळे शिष्यांना भिक्षा मिळणे कठीण होऊ लागले. नागदेव भिक्षेहून परत आलेल्या प्रत्येकाची झोळी पाहत असे. आपल्याला भिक्षा मिळाली नाही म्हणून नागदेवाला वाईट वाटेल, या जाणिवेने ते शिष्य झोळीच्या तळाशी चिंध्या

घालून वर भिक्षा घेत असत. हे एकदा नागदेवाच्या लक्षात आले आणि तो बहुत कष्टी झाला. त्याने त्या महंतांना साष्टांग दंडवत घालून आपल्याकडे भिक्षा घेण्याची विनंती केली.

नागदेव हा महानुभावपंथाचा कुशल संघटक होता. तसेच त्याचे मराठी भाषेसंबंधीचे कार्य आणि प्रेमही असाधारण होते. चक्रधराच्या लीळांचे संकलन करवून नागदेवाने मराठी भाषेला एका अमोल ग्रंथाची देणगी दिली आहे. त्या ग्रंथाच्या प्रत्येक लीळेतील मजकूर त्याने स्वतः तपासून दिला आहे.

एकंदरीत नागदेव हा सामान्यातून असामान्य कोटीला गेलेला दिसतो. अनेक व्यसनांत रमणारा हा माणूस एका मोठ्या पंथाची धुरा वाहण्याइतका समर्थ झालेला पाहून मन स्तिमित होते. चक्रधराला हा माणूस मिळाला नसता, तर महानुभाव पंथ इतका मोठा झाला असता की काय, याबद्दल शंका आहे. त्याच्या काळात मुसलमानांच्या दक्षिणेत स्वाऱ्या होऊ लागल्या होत्या. त्यामुळे सर्वत्र पळापळ चालू झाली होती. अशा परिस्थितीत चक्रधराचे अनुयायीही त्याला सोडून गेले. पण हा एकटा पुरुष चक्रधराला न सोडता पंथसंघटनेचे कार्य करीत राहिला. [स्मृतिस्थळ; श्रीचक्रधरचरित्र.; म. म. वा.]

## नागनाथ

दारुकावनातील नागेशालाच नागनाथ असे म्हणतात. पाहा– औंढ्या नागनाथ.

## नागनेचियाँ

एक देवी. ही राठोड क्षत्रियांची कुलदेवी आहे. राजस्थानमधील पंचभद्र परगण्यातील नागान नामक गावात हिचे एक प्राचीन मंदिर आहे. राठोड क्षत्रिय निंबाच्या वृक्षाला नागनेचियाँचे प्रतीक समजून त्याची पूजा करतात. त्यामुळे ते झाड तोडत नाहीत व जळणासाठीही त्या लाकडाचा उपयोग करीत नाहीत. [मरुभारती; आक्टो. १९५५]

## नागपंचमी

एक सण व उत्सव. श्रावण शुद्ध पंचमीला नागपंचमी म्हणतात. या दिवशी हळदीने किंवा रक्त चंदनाने पाटावर नव नागांच्या आकृती काढून त्यांची पूजा करतात. काही ठिकाणी गृहद्वारांच्या भिंतीवरही फणायुक्त नाग काढून त्यांची पूजा करतात. दूध व लाह्या यांचा त्यांना नैवेद्य दाखवतात. या नागपंचमीच्या नागपूजेची कहाणी अशी—

एक शेतकरी होता. एका सकाळी त्याने नित्याप्रमाणे जमीन नांगरण्यास प्रारंभ केला; परंतु नांगर जमिनीत घुसताच त्याखाली असलेल्या नागाच्या वारुळातील पिलांना त्याचा फाळ लागला व त्यामुळे ती मेली. हे पाहून नागिणीला राग आला व तिने त्या शेतकऱ्याला व त्याच्या बायकामुलांना दंश करून ठार मारले. मग तिला कळले, की त्या शेतकऱ्याची एक मुलगी परगावी आहे. नागीण तिला मारण्यासाठी तिथेही गेली. पाहते तो त्या मुलीने पाटावर चंदनाने नाग काढून त्याची पूजा केली आहे व दूध–लाह्यांचा नैवेद्य दाखवून त्याची प्रार्थना चालवली आहे. ते दृश्य पाहून नागीण प्रसन्न झाली. नैवेद्याचे दूध पिऊन ती तृप्त झाली आणि तिने त्या मुलीला डोळे उघडण्यास सांगितले. मुलीने डोळे उघडले. समोर प्रत्यक्ष सळसळती नागीण पाहून ती घाबरली. नागिणीने तिला अभय दिले, झाला वृत्तांत कथन केला व मुलीच्या भक्तिभावाचे फळ म्हणून तिच्या माता–पित्यांना व भावंडांना पुनश्च जीवदान दिले.



नागदेवी–बंगाल

नागपंचमीची ही कहाणी आणि अशाच अन्य कथा–कहाण्या यांतून भारतीय लोकमानसाने काही संकेत तयार केले आहेत. नागपंचमीच्या दिवशी काहीही चिरू नये, कापू नये, तळू नये, चुलीवर तवा ठेवू नये, दिंड–मोदकासारखे उकडलेले पदार्थ करावे व कोणाचीही हिंसा करू नये, हे ते संकेत होत.

नागपंचमीच्या दिवशी संध्याकाळी स्त्रिया व मुली गावाबाहेर नागाच्या वारुळावर अगर देवळात जातात व दूध–लाह्या वाहून नागांची पूजा करतात; नागपूजा झाल्यावर त्या झिम्मा, फुगड्या, इ. खेळ मांडतात; झाडांना झोपाळे बांधून त्यांवर झोके घेतात; फेर धरून गाणीही म्हणतात. ही गाणी गद्यप्राय असून, त्यांत बाळाई, मारजा, जैता, बहुला गाय, इत्यादींच्या कथा गुंफलेल्या असतात. क्वचित त्यात सासर–माहेरची जाच–कौतुकेही शब्दबद्ध झालेली असतात. या गाण्यांपैकी नागोबाचे एक गाणे असे—

चल ग सये वारुळाला । नागोबाला पूजायाला ।।
हळद कुंकू वहायाला । ताज्या लाह्या वेचायाला ।।
जमूनिया साऱ्या जणी । जाऊ बाई न्हवणा ।।
जिथं पाय ठेवू बाई । तिथं उठलं दवणा ।।

महाराष्ट्रातील स्त्रियांच्या ओव्यांमधूनही नागराजाचे कौतुक आले आहे. त्यांतल्या काही ओव्या पुढीलप्रमाणे—

नागपंचमीला। नागा चंदनाचे गंध।
तुटती भवबंध। पुजणाऱ्यांचे ।।
नागपंचमीला। नागाला घाला दूध।
होईल बुद्धी शुद्ध। नागकृपे ।।
नागपंचमीला। नको चिरू भाजीपाला।
दया शिकवू हाताला। आज सये ।।

नागपंचमीच्या सणाला अखिल भारतीय असे महत्त्व आहे. महाराष्ट्रात तर रस्तोरस्ती मातीचे नाग करून त्यांची पूजा होते. त्या दिवशी 'नागोबाला दूध' असे ओरडत, खरेखुरे नाग



नागोबाला दूध– नागपंचमी

घेऊन गारुडी घरोघर येतात आणि बायका त्यांना दूध घालून वर दक्षिणाही देतात. बंगाल व छोटा नागपूर या प्रदेशांत या दिवशी सर्पराज्ञी मनसादेवीची पूजा करतात. राजस्थानात पीपा, तेजा, इ. पौराणिक नागराजांची पूजा प्रचलित आहे. बिहारात हीनवर्ण स्त्रिया स्वतःला नागपत्न्या समजून नागांची गीते गातात.

कर्नाटकात नागांच्या नैवेद्याला गूळ-पापडीचे लाडू करतात, त्यांना तंबीट म्हणतात. गुजरातेत नागमूर्तीपुढे तुपाचा दिवा लावतात व मूर्तीवर जलाभिषेक करतात. उ. प्रदेशात नागपंचमीच्या दिवशी पुरुष माणसे दुधाची मांडी घेऊन गावाबाहेर अथवा जंगलात जातात व नागांच्या वारुळांत ती दुग्धपात्रे रिती करून परत येतात. काशी शहरात तर या दिवशी सकाळी 'नागलो, भाई नागलो। छोटे गुरू का, बडे गुरू का, नागलो, भाई नागलो।' असे ओरडत शाळकरी मुलांच्या मिरवणुकाच निघतात. संध्याकाळी नागकुँवा नामक जलाशयावर असलेल्या नागमूर्तीचे पूजन होते, पंडितांचे वादविवाद होतात व शेवटी जमलेले लोक नागकुँव्याचे पाणी नागतीर्थ म्हणून प्राशन करून आपापल्या घरी जातात. व्याकरणकार पतंजली हा शेषावतार होता व मरणोत्तर त्याने या कुँव्यात वास्तव्य केले आहे, असे सांगतात.

प्राचीन काळी नागपंचमीच्या दिवशी कुस्त्या व नृत्य-नाटचे होत. कृष्णाने कालियामर्दन केले, तो दिवस नागपंचमीचा होता, अशी एक कल्पना आहे. नागपंचमीस नागपूजन करणाऱ्या व्यक्तीला नाग कधी डसत नाही आणि डसलाच तर त्याचे विष बाधत नाही, अशीही समजूत आहे. साडेतीन मुहूर्तांपैकी अर्धा मुहूर्त म्हणूनही काही प्रदेशांत नागपंचमीला मान्यता आहे. [ हिं. स. व्र; मा. व्र.; सं. स.; हिं. ध.; नागपंचमीवर्णन ]

## नागपंचमीव्रत

एक स्त्रीव्रत. यात श्रावण शुद्ध चतुर्थीला स्त्रिया एकभुक्त करतात. पंचमीच्या दिवशी सकाळी अभ्यंग स्नान करून चंदनाने पाच फण्यांच्या नागाचे चित्र काढतात. नागांसोबत नागपत्न्याही चितारतात. घराच्या भिंती गोमयाने सारवून त्यांवरही नागाकृती रेखतात. नंतर संकल्प करून नागांची पूजा करतात. दिवसभर उपवास व संध्याकाळी नागाला दूध–लाह्यांचा नैवेद्य दाखवून ब्राह्मणांसह खिरीचे भोजन करतात. उद्यापनाच्या वेळी पुरोहिताला गाय व सुवर्णाची नागप्रतिमा दान देतात. फल–सौभाग्य, धन, धान्य व संतती यांची प्राप्ती.

हे व्रत वर्षभर करावे, असे काही ठिकाणी सांगितले असून, प्रतिमासी क्रमाने अनंत, वासुकी, शेष, इ. द्वादश नागांचे पूजन, ब्राह्मणभोजन व वर्षान्ती व्रतोद्यापन करावे, असेही सांगितले आहे.

सौराष्ट्रात हे व्रत श्रावण वद्य पंचमीला करतात; तर अन्यत्र भाद्रपद शुद्ध पंचमीला करतात. [ हिं. ध.; व्रतराज ]

**नागपंथ** साधूंचा एक संप्रदाय. हे साधू बहुधा नग्न राहतात, म्हणून त्यांच्या पंथाला हे नाव मिळालें असावें. पण या पंथाचे सर्व अनुयायी नग्न नसतात. या पंथात शैव, वैष्णव, शीख, इ. अनेक मतांचे लोक आहेत. पूर्वी हे लोक सशस्त्र असून, लूटमार करीत हिंडत, किंवा सैन्यात भरती होत. या पंथाचे काही लोक शेती, पशुपालन, सावकारी, इ. व्यवसाय करून संसार करणारेही आहेत. पाहा— दसनामी.

**नागपूजा** भारतीय संस्कृतीत अनेक प्रकारे नागांची पूजा प्रचलित आहे. नाग म्हणजे फणाधारी सर्प. याच्या फणेवर पुढच्या बाजूने दहाच्या अंकासारखे चिन्ह असते. नागाचा वर्ण हिरवट किंवा पिवळा धमक असतो. त्याच्या तोंडात विष धारण करणारे दात असतात. नागाची जीभ दुहेरी असते. प्राचीन भारतीयांनी त्याला देवत्व देऊन आपला पूजाविषय बनवले आहे.

**नागांची उत्पत्ती** – पौराणिक कथेप्रमाणे नाग हे कश्यप व कद्रू यांचे पुत्र होत. या दंपतीला जी सर्पसंतती झाली, त्यातले प्रमुख सर्प असे – अनंत, वासुकी, तक्षक, कर्कोटक, पद्म, महापद्म, शंख व कुलिक. यांना अष्टनाग म्हणतात. अष्टनागांप्रमाणे नवनागांचीही कल्पना प्रचलित आहे. त्यांची नावे अशी —

**अनन्तं वासुकिं शेषं पद्मनाभं च कम्बलम्**
**शङ्खपालं धृतराष्ट्रं तक्षकं कालियं तथा ।।**

हे नाग प्रजेला फार उपद्रव देऊ लागले. त्यामुळे ब्रह्मदेवाने त्यांना शाप दिला, की ' सावत्र भाऊ गरुड याच्याकडून आणि जनमेजयाच्या सर्पसत्रात तुमचा नाश होईल. ' त्याप्रमाणे गरुडाने अनेक सर्पांना मारले आणि सर्पसत्रातही बरेच नाग मारले गेले.

नागांमधले काही नाग देवा-मानवांना अनुकूल व सौम्य वृत्तीचे होते; तर काही नाग हे देवा-मानवांचे कट्टर वैरी होते. अनंत, वासुकी, शेष, इ. नाग हे पहिल्या प्रकारचे उदाहरण; तर तक्षक, कर्कोटक, कालिय, हे दुसऱ्या प्रकारचे उदाहरण होय. पण नागपूजेत मात्र सौम्य व क्रूर, तसेच अनुकूल व प्रतिकूल अशा सर्वच नागांचा समावेश आहे. भारतीय संस्कृतीत नागांची पूजा, नागविषयक व्रते व दाने, नागासाठी बलिदान, इ. अनेक प्रकारे नागमाहात्म्य वाढवलेले आहे.

जगातला आदिममानव हा काही प्राण्यांची शक्ती व बुद्धी पाहून दिपून जात होता. ज्या प्राण्याच्या शक्तीपुढे आपली शक्ती तोकडी आहे असे त्याला समजून आले, त्या प्राण्याने आपले वाईट करू नये, आपल्याला त्रास देऊ नये, म्हणून तो अशा शक्तिशाली प्राण्यांची पूजा करू लागला. नाग किंवा सर्प हा अशापैकीच एक सरपटणारा प्राणी होय. सर्प हा विलक्षण चपळ असतो. त्याची गती वक्र व विचित्र असते. त्याचे शरीर आकर्षक असते.



नागशिल्प– सांची

तो आपली कात टाकून पुनश्च तरुण व सतेज होतो. नागाच्या या सर्वच गोष्टी अद्भुत असतात. त्याचा दंश आणि विळखा किती घातक असतो, ते अनेकांच्या अनुभवाचे आहे. नागांच्या या अलौकिकपणामुळे त्यांच्याविषयी माणसाच्या मनात आश्चर्य व भय या भावना उत्पन्न झाल्या आणि तो त्यांचा पूजक बनला. सर्पाच्या देहात देवाचे किंवा भुताचे वास्तव्य आहे, तो स्वयमेव देव आहे किंवा तो एखाद्या देवाचे प्रतीक आहे, अशा समजुतींनी काही मानवकुळांनी सर्प हे आपले देवक मानले आणि त्यामुळे तो त्यांना पूज्य ठरला. काही सर्प पाण्यात किंवा दलदलीच्या जागी असतात; त्यामुळे जलवृष्टीवर आणि जलाच्या समृद्धीवरही त्यांची सत्ता मानली गेली. वारुळ हे भूमिदेवतेचे प्रतीक आहे आणि सर्प हा वारुळात राहणारा आहे, म्हणून भूमीच्या उपजाऊ शक्तीशी त्याचा संबंध जोडण्यात आला. सर्पाच्या ठायी दैवी व दानवी अशी उभयविध शक्ती वास्तव्य करते, अशा श्रद्धेमुळे मांत्रिकांनी मंत्र-तंत्र, जादू-टोणा, रोगावरचे उपचार, इ. कृत्यांमध्ये सर्पाकृतींचा उपयोग सुरू केला.

भारतात जेवढ्या प्रमाणात सर्पपूजा प्रचलित आहे, तेवढ्या प्रमाणात ती जगातल्या कोणत्याही देशात नाही. भारतात सर्पांच्या असंख्य जाती आहेत व त्यांची संख्याही प्रचंड आहे.

भारतात दरवर्षी हजारो माणसे सर्पदंशाने मृत्युमुखी पडतात. साप कुठे सापडेल त्याचा नेम नसतो. त्यामुळे स्वतःच्या संरक्षणासाठी भारतीय लोकांनी सर्पपूजा फार प्राचीन काळी सुरू केलेली दिसते. काही संशोधक तर सर्पपूजेचा उगम भारतातच झाला, असे मानतात.

**नागपूजेचा इतिहास** – ऋग्वेदात नागांचा व सर्पांचा उल्लेख आहे; पण नागपूजेचा उल्लेख नाही. सार्पराज्ञी नावाच्या एका ऋषिकेचे सूक्त आहे; पण त्यात गोधनाचीच प्रशंसा आहे. मात्र इंद्राचा शत्रू वृत्र याला ऋग्वेदात अही (सर्प) असे म्हटले असून, तोच दिव्य जलांना अडवून धरतो, असे सांगितले आहे. वैदिक ऋषींनी त्याच्या मस्तकाचे, जबडयाचे व फूत्कारांचेही वर्णन केले आहे. त्यावरून वैदिक ऋषींना सर्पाच्या सामर्थ्याविषयी व त्याच्या घातकपणाविषयी पूर्ण कल्पना होती, असे दिसते. त्यातूनच पुढे नागपूजेची परंपरा निर्माण झाली असावी. तैत्तिरीय संहितेत अश्वमेधवर्णनप्रसंगी लोहिताही व वाग्यस या नागांचे पूजन करावे असे सांगितले आहे (५. ५. १३. १). अथर्ववेदात दरोडेखोरांपासून रक्षण होण्यासाठी नागाच्या कातीचे यंत्र वापरावे, असे म्हटले आहे (१२. १. ४६). यजुर्वेदात रुद्राला अहिसन्तः (सर्पाचे सांनिध्य असलेला) असे म्हटले आहे. शतपथ ब्राह्मणात नागमाता कद्रू हिला पृथ्वीचे प्रतीक मानून पूजनीय ठरवले आहे (३. ६. २. २). अथर्ववेदात सर्पनाशकमंत्र आहेत; तसे गरुड व सर्प यांच्या वैराच्या कथाही आहेत. ब्राह्मणग्रंथांत व त्यापुढे महाभारतात सर्पपूजेचा संप्रदाय बराच महत्त्व पावला, असे दिसून येते.



अनंतशयन विष्णू

पुढे पौराणिक हिंदू धर्मात नागाला महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले. शिव आणि विष्णू हे पुराणांतले दोन प्रमुख देव होत. पुराणांनी या दोघांशीही नागांची जवळीक निर्माण केली. शिव आपल्या देहावर नागभूषणे मिरवतो, तर विष्णूच्या शयनासाठी शेषनाग आपल्या देहाची शय्या करतो. शिवकवचस्तोत्रात शिवाला नागकुलभूषण म्हटले आहे, तर वैष्णव पुराणांत विष्णूला अनंतशयन किंवा शेषशायी म्हटले आहे. शिवलिंगाभोवती वेटोळे घालून बसलेले आणि त्याच्या मस्तकावर फणाछत्र धरणारे नाग मूर्तिकलेतही कल्पिले आहेत. राजस्थानातील



नागदेवी – कोणार्क

एकलिंगजीच्या प्रतिमेभोवती नागवेष्टण आहे. कृष्णाचा बंधू बलराम हा शेषाचा अवतार मानला गेला आहे.

शिवाप्रमाणेच शिवपरिवारातील देवताही नागांना जवळ करताना दिसतात. जयपूर येथे मस्तकावर नागफणी धारण करणारी काली देवी आहे. द. भारतात भद्रकाली देवीच्या शरीरावर सर्प दाखवलेले असतात. अनेक शिल्पांतून गणेशाच्या दोंदाभोवती नागबंध आवळलेला दिसतो. नाग व कालभैरव यांचाही काही संबंध मानलेला आहे. सर्पविषावरच्या कित्येक मंत्रांत कालभैरवाचे आवाहन असते.

बौद्ध व जैन या दोन्ही धर्मांच्या इतिहासातही नागाला मानाचे स्थान मिळाले आहे. बुद्धाविषयी नागांना फार आदर होता. बुद्धाच्या जन्मानंतर नंद-उपनंद नामक नागांनी त्याला स्नान घातले आणि त्याला संबोधी प्राप्त झाल्यानंतर मुचलिंद नामक नागाने त्याच्यावर आपले संरक्षक फणाछत्र धरले, अशा कथा आहेत. बोधगया, भरहूत, इ. ठिकाणी बुद्धाच्या जोडीने सर्पाकृती कोरलेल्या आढळतात, त्या वरील कथांना अनुलक्षूनच होत. हे कोरीव नाग एक, तीन किंवा पाच फणांचे असतात. बुद्धाच्या मस्तकावर नागाने फणा धरली आहे, अशा सुवर्णमूर्ती

करून त्या बौद्ध स्तूपांना अर्पण करण्याची चाल ब्रह्मदेशात आहे. बौद्ध श्रमण हे नागांची पूजा करीत, असे वर्णन चिनी प्रवाशांच्या वृत्तांतांत आढळते.

जैन तीर्थंकर पार्श्वनाथ याचे अभिज्ञानचिन्ह सर्प हेच आहे. पार्श्वनाथ एकदा एका नगरीत आला असता कमठ नामक दानवाने त्याच्यावर मुसळधार वृष्टी सुरू केली. त्या आपत्तीतून पार्श्वनाथाला वाचवण्यासाठी एका नागाने त्याच्यावर आपले फणाछत्र धरले. पार्श्वनाथ त्यामुळे सुरक्षित राहिला आणि त्या घटनेमुळे या नगरीचे नाव अहिच्छत्रा असे पडले. श्रवणबेळगोळ येथील गोमटेश्वराच्या प्रचंड मूर्तीभोवती अनेक वारुळे निर्मिलेली असून, त्यांतून सर्प बाहेर येत आहेत, असे दाखवले आहे.

काही पुरुषांच्या बाळपणी त्यांच्यावर नागाने फणाछत्र धरल्यामुळे त्यांना भावी काळात राज्यलाभ झाला यासंबंधीच्या अनेक कथा प्रचलित आहेत. जन्मताच श्रीकृष्णाला गोकुळात नेले जात असता त्याच्या मस्तकावर शेषनागाने छत्र धरले, अशी कथा विष्णू पुराणात आहे. गौतम बुद्धाविषयीही अशी कथा सांगतात. मेवाडचा राणा संग व जैसलमीरचा केहर यांना नागाच्या कृपाछत्रामुळेच राज्य मिळाले, असे सांगतात. अलिकडच्या इतिहासात मल्हारराव होळकर याच्यावर बालपणी नागाने फणा पसरून धरल्यामुळे तो राजा झाला असे सांगतात.



नागमूर्ती– खिचिंग (ओडिसा)

**शिल्पगत नाग** – मोहेंजोदडो येथील उत्खननात काही नागमूर्ती सापडल्या आहेत. त्यांतल्या बऱ्याचशा मूर्ती अर्धनाग व अर्धमानव या स्वरूपाच्या आहेत. भरहूतच्या स्तूपावरील एका शिलापट्टात एलापत्र नामक नाग बुद्धाच्या बोधिमंडपासमोर नम्र झाला असल्याचे दाखवले आहे. मथुरा येथील नागमूर्ती पूर्ण सर्पाकृती आहेत, तर गंधार, मध्य



नागशिला

प्रदेश, अमरावती येथील नाग पूर्ण मानवरूप आहेत; दर्शनी मानव व पार्श्वभागी नाग अशाही काही मूर्ती आढळतात. ओडिसातील खिचिंग येथे अशी एक मूर्ती आहे. ही मूर्ती द्विभुज असून, तिने आपल्या हाती एक हार घेतला आहे. मध्य प्रदेशातील सतना येथे एका जैन नागदेवतेची मूर्ती असून, ती संपूर्ण मानवी आहे. तिला आठ हात असून, तिच्या मागे सात फणा दाखवल्या आहेत. चित्रसृष्टीत काही नागकन्या चितारल्या जातात. त्यांचा कमरेखालचा भाग सर्पाचा असून, वरचा भाग मानव स्त्रीचा असतो. कित्येक ठिकाणी पिंपळाच्या पारावर किंवा त्याच्या आवतीभोवती अनेक दगडी नागमूर्ती

आढळतात. संतानेच्छेने नवस किंवा नागवली करणाऱ्या लोकांनी त्या शिलामूर्ती बनवून तिथें ठेवलेल्या असतात. अनेक आदिवासी जमाती नवसासाठी एक डोक्याचा व अनेक डोक्यांचा असे नाग बनवतात. डोके नागाचे व धड मानवाचे अशीं ती मूर्ती असते. अशा काही मूर्ती सांची, भरहूत येथील शिल्पांतही आढळतात. ख्मेर आदिवासी जी नागप्रतीके बनवतात, त्यांत धड नागाचे व तोंड माणसाचे अशा मूर्ती असतात. त्याचप्रमाणे धड नागाचे व तोंड सिंहाचे किंवा मगरीचे अशाही मूर्ती असतात.

**नागक्षेत्रे व पूजेचे प्रकार** – भारताच्या सर्व प्रदेशांत सर्पपूजा या ना त्या स्वरूपात प्रचलित आहे. काश्मीरमध्ये सुमारे सातशे ठिकाणी सर्पाकृती कोरलेल्या आढळतात व त्या प्रत्येक ठिकाणी त्यांची पूजा होते. पंजाबात सफीदोन या नावाचे एक ठिकाण आहे. ते पंजाबातल्या सर्पपूजेचे केंद्र आहे. जनमेजयाने जे सर्पसत्र केले, ते याच ठिकाणी असे म्हणतात. उत्तर प्रदेशातील मथुरा, अहिच्छत्रा व वाराणसी ही नागपूजेची मोठी केंद्रे होत. वाराणसीत नागेश्वर नावाचे एक शिवलिंग असून, एक नागकुआँही आहे. तिथे दरवर्षी नागपूजा होत असते. बंगालमध्यें नागमाता मनसादेवी सर्वत्र पूजिली जाते. तिची पूजा केली नाही, तर कुटुंबातील एखादी व्यक्ती सर्पदंशाने मरते, अशी तिथल्या जनांची समजूत आहे. ओडिसातले लोक अनंतदेव या नावाने नागपूजा करतात. आसाममध्ये उथेल्न नावाचा एक प्रचंड सर्प मानला जात असून, तो नरबली दिल्याशिवाय तृप्त होत नाही, अशी तिथल्या आदिवासींची धारणा आहे.



नागमूर्ती – सर्पकावू (केरळ)

महाराष्ट्र, गुजरात, काठियावाड, इ. भागांत नाग ही कुलसंरक्षक देवता मानली जाते. वऱ्हाडात मुंग्यांच्या वारुळाजवळ नागमूर्ती ठेवून तिची पूजा करतात व नागदर्शन शुभ मानतात. केरळामध्ये नायर व नंपूतिरी यांच्या घराभोवतीच्या परिसरात वायव्येच्या कोपऱ्यात सर्पकावू नावाचे एक ठिकाण असते. तिथे नागप्रतिमा ठेवून तिच्या भोवती झाडेझुडपे वाढवतात व वर्षातून एकदा त्या नागदेवाची मोठी पूजा करतात. कालिकत, म्हैसूर, वैरुपिदी (मद्रासजवळ), इ. ठिकाणी जिवंत नागांची पूजा करण्याची पद्धत आहे. त्रिवांकुर, छत्तिसगड, बिलासपूर, मूज, इ. ठिकाणी नागांची देवळेच आहेत. द. भारतात अनेक जातींच्या विवाहित स्त्रिया लग्नसमारंभात सर्पांची पूजा करतात. काही लोक लग्नसमारंभात वारुळाची पूजा करून तिथली थोडी माती घरी आणतात. नागपंचमी हा नागपूजकांचा सर्वांत मोठा सण होय. त्या दिवशी स्त्री–पुरुष विविध प्रकारे नागाला संतुष्ट करतात आणि त्याच्या कथाकहाण्या ऐकतात. अनंत चतुर्दशीला विष्णूबरोबर शेष नागाचीही पूजा करतात. काही ठिकाणी नागांचे अवतार मानलेल्या वीर पुरुषांचीही पूजा केली जाते. पंजाबमधील गूगा, होशंगाबादमधील राजवा व सोरळ, मध्य प्रदेशातील करूवा व राजस्थानातील तेजाजी, हे ते वीर पुरुष होत.

**नागविषयक संकेत व समजुती** – भारतीय लोकजीवनात नागमाहात्म्य अशा प्रकारे भरून राहिलेले असल्यामुळे अनेक श्रद्धासंकेतांचे जाळे त्यांच्याभोवती विणले गेले आहे. नाग हा जात्या शांत वृत्तीचा असून, तो सहसा लोकांना उपद्रव देत नाही. नागांचे वास्तव्य भूगर्भात असते. तिथे पाताळ नावाचा स्वतंत्र नागलोकही आहे. भूमिगत धनावर नागोबा बसलेला असतो. त्याला सुगंधाची आवड असते व त्याच्या शरीरालाही सुगंध असतो. नागाच्या मस्तकावर रत्नमणी असतो व त्याच्या प्रकाशात तो वावरतो. मृत पूर्वजांचे आत्मे सर्परूपाने वावरतात आणि नवीन मूल जन्माला येते, तेव्हा त्याच्या शरीरात ते प्रवेश करतात. सर्पाला मारू नये; मारल्यास तो मारणाऱ्याचे निसंतान करतो. नाग तळ्यात किंवा नद्यांत राहून त्यांतील प्राण्यांचे रक्षण करतो. नाग हा ब्राह्मण आहे, तेव्हा यदाकदाचित तो मारला गेल्यास त्याला तसाच न टाकता त्याचा दाहसंस्कार करण्याची पद्धती आहे. गर्भिणी स्त्रीने नाग पाहिल्यास नागाची दृष्टी जाते व ती प्रसूत झाल्यावर तिने फिरून तो नाग पाहिल्यास त्याची दृष्टी परत येते. अशा या अनेक प्रकारच्या समजुती प्रदेशपरत्वे आढळून येतात.

**नागकथा** – पुराणवाङ्मयात, कथासरित्सागरात, जातकांत आणि लोकसाहित्यात नागकथांचा संभार फार मोठा आहे. नागविषयक विविध संकेत आणि कल्पनाबंधही त्यात आढळतात. कृतज्ञ आणि कृतघ्न अशा दोन्ही प्रवृत्तींच्या नागांच्या कथाही त्यांत आहेत. कथासरित्सागरातली एक कथा अशी –

उदयन राजा रानात फिरत असता त्याला एक गारुडी साप पकडताना दिसला. राजाला त्या सापाची दया आली. तो गारुड्याला म्हणाला. ‘ तू सापाला सोडून दे. ’ त्यावर गारुडी म्हणला. ‘ साप हे माझ्या उपजीविकेचे साधन आहे. मी त्याला खेळवून माझा चरितार्थ चालवितो. ’ उदयनाला ते पटले आणि त्याने त्या गारुड्याला गळ्यातला रत्नहार देऊन त्या सापाची सुटका केली. सापाने त्या उपकाराच्या मोबदल्यात उदयनाला एक वीणा व अन्य काही अमोलिक वस्तू दिल्या.

एका तपस्व्याने एक सापाचा बच्चा पाळला होता; पण तो आपल्या पालनकर्त्यालाच चावला आणि त्यामुळे तो तपस्वी मरण पावला, अशी दुसरी कथा आहे.

महाभारतातली नळराजाची कथा अशी –

वणव्यात जळणाऱ्या कर्कोटक नामक नागाला नलाने वाचविले; पण तो नाग नलालाच चावला आणि त्याने नलाचे रूप बदलून टाकले. [ डे. हिं. इ.; प्रा. भा. लो.; एन्सा. रि. ए.; प्रा. च. को.; भा. सा.; गॉ. नॉ. बु.; रि. इं. ]

**नागवली** एक बलिदानाचा प्रयोग. या जन्मी किंवा जन्मांतरी, जाणून अथवा न जाणता, कोणाच्या हातून नागाचा वध झाला असेल, तर त्याला संतती होत नाही, असे म्हणतात. या दोषाच्या परिहारासाठी नागवळी करावा, असे पुराणांनी सांगितले आहे. हे सर्व कृत्य घरात न करता नदीच्या काठी करायचे असते. याचा विधी असा–’

आश्लेषा नक्षत्राची देवता सर्प असल्यामुळे ते नक्षत्र असता किंवा पौर्णिमा-अमावास्येच्या दिवशी या विधीला प्रारंभ करावा. प्रथम यजमानाने प्रस्तुत सर्पसंस्काराचा अधिकार प्राप्त होण्यासाठी ब्राह्मणांना विचारून योग्य ते प्रायश्चित्त करावे. नंतर एक लोहदंड ब्राह्मणाला दान द्यावा.

दुसऱ्या दिवशी स्नान करून तांदूळ, गहू अथवा तीळ यांच्या पिठाचा एक नाग करावा. तो कोऱ्या सुपात ठेवून त्याचे पुढील मंत्राने आवाहन करावे–

**एहि पूर्वं मृतसर्प ह्यस्मिन् पिष्टे समाविश ।**
**संस्कारार्थमहं भक्त्या प्रार्थयामि समाहितः ॥**

अर्थ– हे पूर्वी मृत झालेल्या सर्पा, ये. या पिष्टमूर्तीत प्रवेश कर. मीं संस्कार करण्यासाठी सावधानचित्त होऊन भक्तीने तुझी प्रार्थना करीत आहे.

मग सर्पगायत्रीने त्याची पूजा करावी. त्याला पायसबली समर्पावा. लौकिकाग्नीची स्थापना करावी. प्रधान होमाच्या पूर्वी अग्नीच्या आग्नेयीस भूमीवर उदक शिंपडून तिथे एक चिता रचावी. तिच्यावर तो पिष्टनाग ठेवावा. प्रधान होम करावा. व्याहृतीच्या तीन आज्याहुती अग्नीत देऊन चौथी आहुती सर्पाच्या मुखात द्यावी. राहिलेले आज्य सर्पाच्या अंगावर शिंपडावे. नंतर त्या चितेला अग्नी द्यावा. चितेला प्रदक्षिणा घालून जळणाऱ्या सर्पाची प्रार्थना करावी. सर्पाचे दहन झाल्यावर चितेवर पाणी शिंपडावे. मग स्नान करून घरी जावे.

त्यानंतर तीन दिवस किंवा एक दिवस आशौच पाळावे. आशौच संपल्यावर आठ ब्राह्मणांना श्राद्धविधीप्रमाणे भोजन घालावे. हे आठ ब्राह्मण सर्प, अनंत, शेषँ, कपिल, नाग, कालिक, शंखपाल व भूधर या आठ नागांचे प्रतिनिधी समजावे. ब्राह्मणभोजन झाल्यावर वर उल्लेखलेल्या नागांसाठी पायसाचे पिंड करून त्यांचे बलिदान करावे.

नंतर सुवर्णाचा एक नाग करून तो कलशावर स्थापावा. त्याची पूजा करून तो ब्राह्मणाला दान द्यावा. मग आचार्यपूजा, ब्राह्मणभोजन, आशीर्वादग्रहण, इ. कृत्ये करून कर्म पूर्ण करावे. नागबलीच्या पूर्वी नारायणबली करावा असे सांगितले आहे.

फल–सर्पभयाचा नाश, सर्पवधाच्या पातकातून मुक्ती, आरोग्यप्राप्ती, संतानलाभ आणि विष्णु-लोकप्राप्ती. [ सं. कौ. ]

**नागवंसी** आदिवासींची एक जात. यांची वस्ती राजस्थानातील झासपूर, उदयपूर, सिरगुजा, इ. ठिकाणी आहे. हे लोक राजपूत, दहारिया आणि गोंड यांच्या वंशातले आहेत, असे रसेलचे मत आहे. उदयपूर व झासपूर इथले नागवंसी हे गोंड किंवा दहारिया यांच्यासारखे दिसत नाहीत. आम्ही गोंडांचे वंशज नाही, असे ते स्वतःच सांगतात. कदाचित ही सेंदुरिया नागांची अथवा खारियांची एक शाखा असण्याची शक्यता आहे. छोटा नागपूरच्या राजाचे हे वंशज आहेत, असेही सांगितले जाते.

यांचे नाक चपटे, पसरट व किंचित वाकडे असते. ओठ लांब व मोठे असतात. हनुवटी निमुळती असते. चेहऱ्याची ठेवण चपटी असते. डोळे गालाच्या वर आलेले असतात. वर्ण पिंगट किंवा करडा असतो. झासपूरमधील नागवंसी वर्णाने निमगोरे आहेत.

**विवाहप्रथा**– यांच्यांत अठरा गोत्रे आहेत. ते सगोत्र विवाह करीत नाहीत. विवाहाच्या वेळी जानवे घालतात.

मुलीचे लग्न झाल्यावर तिला आई-वडिलांच्या घरातील भांड्यांत शिजविलेले अन्न खाता येत नाही; पण तिच्या भावाने पितळेच्या भांड्यांत केलेला स्वयंपाक मात्र खाता येतो. भावजयीच्या हातचे जेवण तिला चालत नाही.

**देवधर्म**– महादेव, दुल्हादेव आणि बडादेव ही त्यांची उपास्य दैवते होत. कार्तिक महिन्यात त्यांची खास पूजा होते. त्या वेळी

बोकडाचा बळी देतात आणि नारळ व मसाल्याचे पदार्थ देवाला अर्पण करतात. दर तीन वर्षांनी एकदा रेड्याचाही बळी देतात.

झासपूरमधील नागवंसींनी गोसावी पंथाची दीक्षा घेतलेली आहे. यांना गाईचे व डुकराचे मास चालत नाही.

मृतिकप्रथा– विवाहितांची प्रेते जाळतात आणि अविवाहितांची पुरतात. प्रेतांची डोकी उत्तरेला करतात. [ से. इं १९५१ ]

## नागबिंबादिदान

ग्रहणाच्या वेळी सुवर्णाचा नाग करून त्याचे दान केल्याने ग्रहणामुळे होणाऱ्या त्रासाचा परिहार होतो, अशी समजूत आहे. या नागावरोबर चंद्रग्रहणाच्या वेळी रुप्याचे चंद्रबिंब व सूर्यग्रहणाच्या वेळी सुवर्णाचे सूर्यबिंब दान द्यावे, असेही सांगितले आहे.

नाग बनवण्यासाठी पल, अर्धपल, एक चतुर्थांश किंवा एक अष्टमांश पल सोने घेतात (पल = ३२० गुंजा). त्याच्या फणीवर मोती बसवतात. मग तो नाग घृतपूर्ण ताम्रपात्रात किंवा कांस्यपात्रात ठेवून त्याचे दान करतात. दानमंत्र असा–

तमोमय महाभीम सोमसूर्यविमर्दन ।
हेमताराप्रदानेन मम शान्तिप्रदो भव ।।
विधुन्तुद नमस्तुभ्यं सिंहिकानन्दनाच्युत ।
दानेनानेन नागस्य रक्ष मां वेधजाद् भयात् ।।

अर्थ – हे तमोरूप, भीमकाय आणि सूर्यचंद्रांना पीडा देणाऱ्या राहो, या सुवर्णतारेच्या दानाने तू मला शांतिप्रद हो. हे सिंहिकापुत्रा, अच्युता राहो, तुला नमस्कार असो. या नागाच्या दानाने तू माझे वेधोत्पन्न भयापासून रक्षण कर.

सुवर्णाच्या नागावरोबर तीळ, वस्त्र, गाय, अश्व, रथ, भूमी यांचेही दान करावे, असे सांगितले आहे. [ नि. सिं. ]

## नागभूमी

नाग जमातींचा प्रदेश. पूर्वेला ब्रह्मदेश, उत्तरेला व पश्चिमेला आसाम आणि दक्षिणेला मणिपूर अशा याच्या चतुःसीमा आहेत. हा सारा प्रदेश डोंगराळ व दाट जंगलाने व्यापलेला आहे. यातली काही पर्वतशिखरे सहा ते दहा हजार फूट उंच आहेत. नागांची बहुतेक गावे तीन ते चार हजार फूट उंच डोंगरावर वसलेली असतात. या भागात वर्षात सुमारे १०० इंच पाऊस पडतो.

या नव्या राज्याची स्थापना एक डिसेंबर १९६३ ला झाली असून, त्यात कोहिमा, मोकोकचुंग व तुएनसांग हे तीन जिल्हे समाविष्ट आहेत. या राज्याचे क्षेत्रफळ ६,३६६ चौ. मैल असून, लोकसंख्या १९६१ मध्ये ३,६९,२०० होती. कोहिमा ही याची राजधानी आहे. ब्रह्मदेशाच्या सीमेवरील पत्‌कोई पर्वतराजीवर आणि मणिपूरच्या उत्तर भागातही काही नाग जमाती वसलेल्या आहेत, पण त्यांची लोकसंख्या अगदी थोडी आहे.



नाग जमातीचे गाव
(व्हेरियर एल्विन यांच्या नागालँड या पुस्तकावरून)

इतिहास – नाग जमाती या प्रदेशात प्राचीन काळापासून वसलेल्या असल्या, तरी त्यांचा इ. स. च्या १३ व्या शतकापूर्वीचा इतिहास अज्ञातच आहे. १३ व्या शतकाच्या प्रारंभी



नाग लोकांचे भाले
(व्हेरियर एल्विन यांच्या नागालँड या पुस्तकावरून)

ब्रह्मदेशातील शान जमातीचा प्रमुख सुखपा याने पत्कोई पर्वत व चिदविन नदी ओलांडून नागभूमीवर आक्रमण केले आणि नाग लोकांना जिंकले. त्याने नागांवर अनन्वित अत्याचार केले. पुढे त्याची सत्ता कमजोर झाल्यावर आसामच्या आहोम राजांनी तिथे आपली सत्ता स्थापली. आहोम राजे शान राजाइतके अमानुष नव्हते. ते नाग लोकांना आपले प्रजाजन मानून त्यांच्याकडून कर घेत. कापड, हस्तिदंत, भाले, गुलाम, इ. रूपांनी कराची वसुली केली जाई. आहोमांनी नाग जमातींच्या प्रमुखांना जमिनी देऊन आपले सरदार बनवले. तिथला कार-



नाग सरदार

भार मात्र आसामी अधिकाऱ्यांकडेच ठेवला. अशा प्रकारे आहोम राजे व नाग लोक यांचे संबंध काही काळ मित्रत्वाचे राहिले. पण इ. स. च्या १६ व्या शतकात त्यांच्यांत संघर्ष सुरू झाला. इ. स. १५३० साली एका लढाईत नागांनी आहोम राजाच्या सैन्याचा पराभव करून त्याच्या काही तोफा काबीज केल्या. तेव्हापासून १७ व्या शतकाच्या अखेरपर्यंत त्यांच्यांत सतत शत्रुत्व चालू राहिले. इ. स. १६९२ मध्ये नागांनी तेवीस आसामी माणसांना ठार मारले. तेव्हा आहोम राजा गदाधरसिंग याने नागभूमीवर स्वारी करून त्यांच्या एका प्रमुखाला ठार मारले आणि अनेक जमातप्रमुखांना पकडून नेले. मग राजनिष्ठेच्या शपथा घेऊन ते सुटले. त्यानंतरही पुन्हा एकदा नागांनी बंड केले; पण गदाधरसिंगाने ते मोडून काढले. त्या वेळी दोन नाग जमातप्रमुखांनी आपल्या मुली राजाला अर्पण करून त्याच्याशी सलोखा केला. त्या निमित्ताने काही नागांना आसामी सैन्यात घेण्यात आले. ते युद्धकलेत निष्णात असल्यामुळे राजाने त्यांचा गौरव केला. त्यानंतर शंभर-सव्वाशे वर्षे नागभूमीवर आहोम राजांची सत्ता चालू होती.

इ. स. १८२४ मध्ये आसामवर ब्रिटिशांची सत्ता प्रस्थापित झाल्यामुळे नागभूमीवरही त्यांची सत्ता सुरू झाली. अठराव्या शतकाच्या अखेरीपासून ब्रिटिश व ब्रह्मी लोक यांचे संघर्ष सुरू झाले आणि त्यामुळे नागांचे फार हाल झाले. आसामात ब्रिटिश राज्य सुरू झाल्यानंतर नागांना पतकोई पर्वतराजीतील सिंगफो नामक लढाऊ जमातीकडून त्रास होऊ लागला. ते लोक नागांच्या खेड्यांवर हल्ले करून त्यांना पकडून गुलाम म्हणून नेऊ लागले. मणिपूरच्या राजानेही नागभूमीवर आक्रमण सुरू केले. पण ब्रिटिशांनी त्याकडे दुर्लक्ष केले. तेव्हा नाग लोकांनी स्वसंरक्षणासाठी चंग बांधला आणि ते आजूबाजूच्या खेड्यांवर हल्ले व लूटमार करू लागले. सुमारे ३० वर्षे ब्रिटिश अधिकारी स्वस्थ बसले; पण मग मात्र ते खवळले. त्यांनी नागभूमीवर शस्त्र धरले, अनेक खेडी त्यांनी जाळून टाकली व नागांची ससेहोलपट केली. नागभूमीवर आपली सत्ता प्रस्थापित करण्यासाठी त्यांनी इ. स. १८६६ साली सामागुटिंग येथे एक ठाणे वसवले आणि तिथे एक शाळा काढली व दवाखाना सुरू केला. त्याचप्रमाणे त्यांनी नागभूमीत रस्ते बांधून व्यापारही सुरू केला. इ. स. १८७८ मध्ये कोहिमा येथे ब्रिटिश प्रशासनाचे मुख्य केन्द्र स्थापण्यात आले व त्या प्रदेशात एक पोलिसदलही उभारण्यात आले. इ. स. १८८१ मध्ये नागाहिल्स हा एक जिल्हा बनवला गेला व मोकोकचुंग येथेही एक प्रशासनकेंद्र स्थापण्यात आले.

या सर्व व्यवस्थेमुळे हळूहळू नागभूमी शांत झाली. बहुतेक नागजमातींनी नवीन राज्यव्यवस्थेचे स्वागत केले. नाग लोक शेती व उद्योगधंदे करू लागले. त्याच काळात अनेक ख्रिस्ती मिशनरी तिथे गेले व त्यांनी नाग लोकांत आपल्या धर्माचा प्रसार केला. त्याचबरोबर त्यांनी नागांच्या जीवनात सुधारणाही घडवून आणल्या. इ. स. १९०२ पर्यंत नागभूमीतील पूर्वेकडचा तुएनसांग हा भाग उपेक्षितच राहिला होता. तिथे ब्रिटिशांचे राज्य प्रस्थापित झाले नव्हते. त्या वर्षी मग एक वटहुकूम काढून तो भाग गव्हर्नर जनरलच्या अधिकारात आणला गेला.

इ. स. १९१३ साली वाकचँग येथे एक ठाणे स्थापण्यात आले. तथापि ब्रिटिशांनी नागभूमीवर प्रत्यक्ष असा राज्यकारभार कधीच केला नाही. फार कटकटी झाल्या, की सैन्याची तुकडी पाठवून तात्पुरता बंदोबस्त करायचा, एवढेच ब्रिटिशांचे धोरण होते. त्यामुळे त्या भागावर ब्रिटिशांची सत्ता नाममात्रच राहिली.

मध्यंतरी दुसऱ्या महायुद्धाच्या शेवटी जपानी सैन्य कोहिमा-पर्यंत पोचले आणि नागाहिल्स व तुएनसांग या भागांतही ते पसरले. पण नाग लोकांनी त्यांना मदत केली नाही. जपानी सैन्याने नागांचा खूप छळ केला. त्यांनी त्यांची खेडी जाळली व पुष्कळांना ठारही मारले. पण नाग लोक ब्रिटिशांशी एकनिष्ठ राहिले. जपान्यांबद्दल त्यांना द्वेष वाटत होता, हे त्याचे कारण होय.

पुढे भारत स्वतंत्र झाल्यानंतर भारत सरकारने त्या सर्व भागावर व्यवस्थित राज्यकारभार सुरू केला आणि त्या भागातील सर्व आदिवासींच्या विकासाचीही व्यवस्था केली. त्यात रस्ते बांधणे, शाळा सुरू करणे, दवाखाने उघडणे, शेतीची सुधारणा, इ. गोष्टींचा समावेश होतो. त्यामुळे बहुतेक नागजमातींना समाधान झाले आणि त्यांनी भारत सरकारला दुवा दिला. पण त्यांच्या काही पुढाऱ्यांनी मात्र नाग लोकांना चिथावून भारताची सार्वभौम सत्ता मानू नका, असा उपदेश चालवला. त्यामुळे नागभूमीत भारत-विरोधी चळवळ सुरू झाली. नव्या राज्यघटनेत नागप्रदेश हा आसाम राज्याचा एक भाग ठरवला गेला होता. पण नागांचा हा असंतोष नाहीसा व्हावा म्हणून इ. स. १९६० मध्ये नागांचे वेगळे राज्य स्थापन करण्याचे आश्वासन भारत सरकारने त्यांना दिले. त्याप्रमाणे डिसेंबर १९६३ मध्ये नाग प्रदेशाचे वेगळे राज्य निर्माण झाले. तथापि तेवढ्यानेही काही असंतुष्ट नागपुढाऱ्यांचे समाधान झालेले नाही. त्यांना परकीय व अन्य काही उपद्व्यापी लोकांची फूस मिळाल्यामुळे त्यांनी नागभूमीत जोरदार बंडाळीचा व घातपाती कृत्ये सुरू केली. या बंडखोर नागांना आपले स्वतंत्र राष्ट्र व्हावे, असे वाटते. आपण कधीच परतंत्र नव्हतो, असा दावा त्यांचे पुढारी करीत आहेत. पण वरील इतिहास पाहता, त्यांचा हा दावा फोल ठरतो. सध्याच्या परिस्थितीत ते स्वतंत्र झाले, तरी त्यांचे स्वातंत्र्य एक क्षणभरही टिकणार नाही; तो प्रदेश लवकरच चीनच्या भक्ष्यस्थानी पडेल. भारतसरकारने खंबीरपणे हे बंड मोडून काढून तिथे शांतता प्रस्थापित केली, तरच नागभूमीला सुखाचे दिवस येऊ शकतील.

पाहा– नाग जमाती.

[ नागभूमी– श्री. त्र्यं. र. देवगिरीकर, १९६६; श्री. मोहन सिंह सेंगर–आजकल, सप्टेंबर १९६३ ]




## नागमंडल नृत्य

बंगालमधील वैद्य जातीचे लोक नाग किंवा शुभराय याला प्रसन्न करण्यासाठी हे नृत्य करतात. त्यासाठी प्रशस्त जागी मांडव घालतात. त्याच्या मध्यभागी रांगोळीने महाशेष काढतात. या नृत्यासाठी हजारो लोक जमतात. नृत्याच्या रात्री त्यांना फुकट जेवण वाढतात. मध्यरात्रीनंतर नृत्याला सुरवात होते. या नृत्याला ब्राह्मण पुरोहित लागतो. तो केस पिंजारून व लाल वस्त्रे परिधान करून नृत्याच्या जागी येतो. तो आला, की त्याच्या रूपाने

नाग आला असे समजतात. त्याने प्रकृति–पुरुषांचे प्रतीक म्हणून अर्धनारीवेष केलेला असतो. मग मुख्य नर्तक त्या पुरोहितरूपी नागाला संतुष्ट करून त्याचा आशीर्वाद मिळवतो. त्यानंतर सर्व नर्तक रांगोळीच्या नागाभोवती फेर धरून मागे पुढे होत



सामुदायिक नृत्य – नागभूमी

नाचतात. या नृत्याला डमरू, झांजा व तुतान्या यांची साथ असते. पार्श्वगायक देवस्तुतिपर अशी अनेक गाणी गातात व त्यांच्या अर्थानुसार नर्तकांचे पदन्यास व हावभाव बदलतात.

**नागम्मा** आंध्र प्रदेशातील एक ग्रामदेवता. वस्तुतः ही एक व्यभिचारणी स्त्री होती. पण ज्या पुरुषाने तिला मूळची रक्षा म्हणूनठेवले होते, त्याची शेतीवाडी भरभराटली. म्हणून ती मेल्यावर त्याने तिचे एक देऊळ बांधले आणि त्यात तिची मूर्ती करून बसवली. पुढे आजूबाजूचे लोकही तिला भजू लागले. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**नागर** एक जात. यांची वस्ती बंगालमधील मुर्शिदाबाद आणि माला या जिल्ह्यांत आहे. शेती हा त्यांचा प्रमुख व्यवसाय होय. त्यांना घटस्फोट मान्य नसला, तरी विधवाविवाह मान्य आहे. यांचे बहुतेक सर्व धार्मिक विधी ब्राह्मण पुरोहिताकरवी होतात. [ से. इं. १९५१ ]

**नागरक** प्राचीन राज्यव्यवस्थेतला समाहर्त्याच्या बरोबरीचा पण केवळ राजधानीपुरते काम करणारा अधिकारी. याच्या हाताखाली स्थानिक अधिकारी असत. नगरपालिका कायद्यानुसार सांप्रत ज्या गोष्टी गुन्ह्यांत गणल्या जातात, त्या सर्वांचा नामनिर्देश आणि त्यांपैकी कोणत्या गुन्ह्यास नागरकादी अधिकाऱ्यांनी काय शिक्षा द्यावी, याची माहिती अर्थशास्त्राच्या सत्तावन्नाव्या प्रकरणात दिली आहे. नागरकाची विविध कार्यें पुढीलप्रमाणे आहेत–

संशयास्पद आरोपींना पकडणे; आग लागू नये म्हणून प्रतिबंधक उपाय योजणे; येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरूंवर नजर ठेवणे; सार्वजनिक ठिकाणी केरकचरा व इतर घाण टाकणाऱ्याला दंड करणे; अपरात्री अनुमतीवाचून फिरणाऱ्यांना अटकेत ठेवणे आणि नद्या, विहिरी, गुप्त ठिकाणे, बुरुज, तट, खंदक, इत्यादींची तपासणी करणे; कोणाच्या काही वस्तू सापडल्यास त्या सुरक्षित ठेवणे; राजाच्या वाढदिवशी, परराष्ट्रावर विजय संपादन केल्याच्या आनंदाच्या निमित्ताने, राज्यारोहणप्रसंगी अथवा युवराजाच्या जन्मकाळी किंवा अन्य काही प्रसंगी काही कैदी बंधमुक्त करणे; रोजच्या हकिकतीचे प्रतिवृत्त राजाकडे पाठविणे; परस्त्री, दासी, वेश्या इत्यादींच्या बाबतीत दुर्व्यवहार करणाऱ्यांना शिक्षा व दंड करणे, इत्यादी. [ कौ. अ. प्र.; भा. शा. शा. क.; कौ. अ.; हिं. रा. तं.–२ ]

**नागर ब्राह्मण** एक ब्राह्मण जात. यांची वसती गुजरात प्रदेशात आहे. गुजरातमधील औदीच्य ब्राह्मणांची ही एक पोटशाखा आहे. हे लोक मूळचे हिमालयाकडील राहणारे असून नंतर ते इकडे आले, असे सांगतात. हे लोक नागवंशाचे असावे, असाही अनेकांचा समज आहे. आमच्या स्त्रिया या नागकन्या आहेत, असे अनेक नागर ब्राह्मण सांगताना आढळतात. या जातीच्या उत्पत्तीविषयी अनेक आख्यायिका आहेत. त्यांतील दोन अशा–

(१) शिव-पार्वतींच्या विवाहप्रसंगी पौरोहित्य करण्यासाठी शिवाने सहा ब्राह्मण निर्माण केले आणि नंतर त्यांची सहा नागकन्यांशी लग्ने लावून दिली. त्यांची संतती म्हणजेच हे नागर ब्राह्मण होत.

(२) एकदा एका मांत्रिकाने एका नागाचा पाठलाग आरंभला. त्यामुळे नागाने घाबरून जाऊन ब्राह्मणाचे रूप घेतले आणि तो वडनगरला पळून आला. तिथे त्याने एका ब्राह्मण मुलीशी लग्न केले. तिची जी संतती तेच सांप्रतचे नागर ब्राह्मण होत.

यांच्यांत सहा पोटजाती आहेत. त्यांची नावे अशी– भारा, विशाल, चित्तौरीय, कृष्णपुरी, प्रश्नोर व साठोदरा. ही सर्व नावे त्या त्या स्थानावरून पडलेली आहेत. याशिवाय यांच्यांत बाडर नावाची आणखी एक पोटजात आहे. ज्यांनी अनागर मुलींशी लग्ने केली, ते बाटले असे समजून लोक त्यांना बाडर म्हणू लागले. भारा व साठोदरा यांच्यांत ऋग्वेदी शाखेचे लोक पुष्कळच आहेत. विशाल नागरांच्या मध्ये बहुतेक लोक यजुर्वेदी शाखेचे आहेत.

सर्व गुजराती ब्राह्मणांत नागर ब्राह्मण स्वतःला श्रेष्ठ समजतात. एका काळी इतर ब्राह्मणांच्या बरोबर हे पंक्ति-भोजन करीत नसत.



नागर ब्राह्मण

हाटकेश्वर हे त्यांचे कुलदैवत असून, अंबाजीमाता ही कुलदेवी आहे. हे लोक आचार, विचार, बुद्धी, नेटकेपणा, इ. गुणांत पुढारलेले असून, त्यांचा सामाजिक दर्जा श्रेष्ठ आहे. देवनागरी लिपी आपण निर्माण केली, असा यांचा दावा आहे. [वि. मुं. रा. प.; मुं. इ. जा.; रजःकण; भा. ब्रा. जा. प्र.]

**नागर शिल्पशैली** उ. भारतातील एक शिल्पपद्धती. पाहा– देवालये, वास्तुविद्या, शिल्पशास्त्र.

**नाग राजवंश** प्राचीन काळी मध्य देशात नाग लोक वसलेले होते. त्या लोकांत अनेक राजवंश होऊन गेले. काशीचा राजा शिशुनाग याने मगधाचे राज्य जिंकून शैशुनाग वंशाचे मोठे साम्राज्य निर्माण केले, असे पुराणांत सांगितले आहे. त्याच कालात एक नागवंश छत्तीसगडावरही राज्य करीत होता.

पुराणांत नागराजांची जी वंशावळी दिलेली आहे, तिचे दोन भाग केलेले आहेत. त्यांतला एक वंश विदिशा येथे राज्य करीत होता आणि दुसरा वंश पद्मावती येथे राज्य करीत होता. विदिशा येथे राज्य करणाऱ्या वंशात पुढील राजे होऊन गेले (स. पू. ११० ते स. पू. ३१)– (१) शेष (२) भोगिन (३) रामचंद्र (४) धर्मवर्मा व (५) वंगर. पद्मावती येथील राजे (स. पू. २० ते इ. स. ३०)– (१) भूतनंदी (२) शिशुनंदी व (२) यशोनंदी.

शकांच्या आक्रमणामुळे या वंशाची सत्ता नष्ट झाली. त्यानंतर या वंशातील लोकांनी दीर्घ काळ वनवासात काढला. इ. स. च्या दुसऱ्या शतकात या वंशातील भिन्न पुरुषांनी पद्मावती, कांतिपुरी व मथुरा येथे राज्ये स्थापन केली. हे राजे नवनाग या नावाने ओळखले जातात. त्यांनीच पुढे भारशिव हे नाव धारण केले. त्यांचा इतिहास अत्यंत गौरवशाली आहे.

प्राचीन काळी द. भारतात नागांची लहान लहान राज्ये नांदत होती. महाराष्ट्रातील नाग राजे महारठी ही पदवी धारण करीत. त्यांतील कळलाय नामक राजा सातवाहनांच्या काळात होऊन गेला. त्याचे राज्य तेलंगण, कर्नाटक व महाराष्ट्र या प्रदेशांत पसरले होते, असे दिसते. सातवाहन वंशातील सातकर्णीचा विवाह कळलाय राजाच्या नागनिका नामक कन्येशी झाला होता. तिच्या नाणेघाटातील कोरीव लेखावरून, सातवाहन वंशात नागनिकेला बरेच महत्त्वाचे स्थान मिळाले होते असे कळते.



नागराज – सांची येथील शिल्प

कळलाय राजा सातकर्णीचा मांडलिक होता. त्याने सातवाहनांचे साम्राज्य वाढविण्यास पुष्कळ साहाय्य केले. नागनिका

म्हणजे नागवंशातील स्त्री; यावरून कळलाय राजा नागवंशी होता, असे सिद्ध होते. पाहा– भारशिव, शैशुनाग, सातवाहन. [ म. भा. इ.; अं. यु. भा.; सं. मु. २ ]

**नागराळू** द. भारतातील एक जात. हे लोक पूर्वी वैदूचा धंदा करीत; परंतु अलिकडे ते शेती करू लागले आहेत. यांच्यांत बालविवाह होतात; पण विधवाविवाह होत नाहीत. हे प्रेते जाळतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**नागरीदास** (१) (१६९९–१७६४ इ. स.) एक हिंदी भक्तकवी. हा राजस्थानातील कृष्णगढाचा राजा होता. याचे मूळ नाव सावंतसिंह असे होते. राजघराण्यातील गृहकलहाने याचे मन उबगले. शेवटी आपला पुत्र सरदारसिंह याला राज्य देऊन तो वृंदावनात निघून गेला आणि भक्तिमार्गाला लागला.

नागरीदास हा वल्लभसंप्रदायी होता. त्याला संस्कृत, फारसी व व्रज या भाषा येत होत्या. वृंदावनात आल्यावर याने आपले जुने नाव सोडून नागरीदास असे नाव घेतले. त्याच नावाने तो काव्यरचना करू लागला. वृंदावनातील भक्तजनांत त्याला चांगला मान होता. त्याने एकूण ७७ ग्रंथ लिहिले; पण त्यांतील काही फारच लहान म्हणजे केवळ पाच दहा पद्यांचे आहेत. मनोहरमंजरी, सिंगारसार, गोपीप्रेमप्रकाश, फूलविलास, पावसपचीसी, रसिकरत्नावली, सुजनानंद, इ. त्याच्या ग्रंथांची नावे आहेत.



नागरीदास

याच्या काव्यात शृंगाररसाला प्राधान्य आहे. शृंगाराच्या पार्श्वभूमीवरच त्याने राधा-कृष्णांच्या लीला वर्णिल्या आहेत. निर्मळ भक्तिभाव व्यक्त करणारीही त्याची काही पदे आहेत. त्यांपैकी एक पद असे–

अंतर कुटिल कठोर भरे अभिमान सों,
तिनके घर नहिं रहै संत सनमान सों।
उनकी संगति भूलि न कबहू जाइए,
व्रजनागर नंदलाल सु निसिदिन गाइए ॥

अर्थ – ज्याचे अंतःकरण कुटिल व कठोर असून अभिमानाने भरलेले आहे, त्याच्या घरी संत सन्मानाने राहू शकत नाहीत. (हे जीवा,) ज्यांच्या घरी व्रजनागर नंदलालाचे रात्रंदिवस गुणगान होते, अशांची संगती तू कधीही सोडू नकोस.

नागरीदासाच्या हयातीतच त्याला कवी या नात्याने चांगली प्रतिष्ठा लाभली. वृंदावनातील नागरकुंजात जिथे त्याचा मृत्यू झाला, त्या जागी त्याची समाधी बांधलेली आहे. [ भा. सं. म.; क. कौ.; रा. भा. सा.; हिं. सा. इ.; चैं. म. ब्र. सा. ]

(२) (१६ वे शतक) एक कवी. हा नेही नागरीदास या नावाने बुंदेलखंडापासून वृंदावनापर्यंत सर्वत्र ओळखला जातो. स्वतःच्या काव्यात त्याने दिलेल्या आत्मपरिचयावरून तो मध्य प्रदेशातल्या सेंवढा तालुक्यातील वेरछा गावचा रहिवासी होता, असे कळते. ओरछाचा राजा चिंतामणी याची पत्नी भागमती हिचा उल्लेख तो वहिनी असा करतो, त्यावरून तो राजघराण्यातला होता, असे दिसते. हा सगळी संपत्ती घेऊन वृंदावनात गेला. व ती त्याने राधावल्लभ संप्रदायाला अर्पण केली. निष्कांचन झाल्यावर तो माधुकरी मागून राहू लागला. याच्या काव्यात राधा-कृष्णांच्या प्रेमलीलांचे वर्णन मुख्यत्वे आढळते.

श्रीहितहरिवंश हा याचा गुरू होता. त्याचेच विचार नागरीदासाच्या काव्यात व्यक्त झालेले दिसतात. याची बहुतेक कविता सगुणभक्तीचे प्रतिपादन करणारी आहे. याची पदे उत्तर प्रदेश, मध्य प्रदेश आणि राजस्थान या भागांत ऐकायला मिळतात.

असे म्हणतात, की त्याच्या हयातीतच त्याची कीर्ती इतकी वाढली, की वृंदावनातले लोक त्याचा तीव्र मत्सर करू लागले. त्या मत्सराने उबगून त्याने वृंदावन सोडून दिले व तो बरसाना येथे राहायला गेला. तिथे अजूनही मोरकुटी या नावाने त्याची झोपडी दाखवतात.

भगवंताच्या नावाचा जप केल्याने माणसाचा उद्धार होतो, असे सांगताना तो म्हणतो–

खरोई कठिन है भजन ढिग ढरिबौ
तमकि सिंदूर मेलि माथे पै,
साहस सिद्ध सती कोसौ जरिबौ ॥
रणके चाइ चाइल ज्यों घूमें मुरै न
गरूर सूर कोसौ लरिबौ ।
नागरिदास सुगन जिन जान्यौ श्री
हरिवंश पंथ पग धरिबौ ॥

अर्थ – कपाळावर मळवट भरून सतीप्रमाणे जळून जाण्याचे साहस करणे व रणांगणात माघार न घेता शूराप्रमाणे उत्साहाने लढणे एक वेळ सोपे आहे. परंतु नागरीदास म्हणतो, हरिभजनाच्या मार्गाने जाणे खरोखरच कठिण आहे.

नेही नागरीदासाची पदे वसंत, देवगांधार, धनाश्री, कल्याण अशा चौवीस रागांत गायिली जातात. [त्रिपथगा-ऑगस्ट १९६२]

(३) (१५४४–१६१४ इ. स.) हा हरिदासी संप्रदायाचा चौथा आचार्य होय. त्या वेळच्या बंगालच्या राजाचा मंत्री कमलापती याचा हा पुत्र होता.

हा गौड ब्राह्मण होता. याने वयाच्या बाविसाव्या वर्षी हरिदासी संप्रदायाची दीक्षा घेतली आणि वृंदावनात राहून ४८ वर्षे भजनपूजनात घालवली. त्याचे सारे काव्य मधुर भक्तीने ओतप्रोत आहे. श्यामाश्याम (राधा-कृष्ण) हे त्याचे उपास्य दैवत असले, तरी त्याच्या मते राधा-कृष्णांच्या नित्य विहाराची साधना सहज साध्य नाही. कारण तिच्यात थोडासा जरी प्रमाद झाला, तरी साधकाचे पतन होण्याची शक्यता असते. तो म्हणतो–

नित्य विहार सार सबको अति दुर्लभ अगमअपार
अनन्य धर्म संधि समुझे बिन माया कठिनकिवार ।

अर्थ – नित्य विहाराची साधना सर्वांना सहज साध्य नसते. ती अतिदुष्कर आहे. अद्वितीय धर्माचे मर्म कळल्याशिवाय मायेचे दार ओलांडणे कठिण असते.

नागरीदासाचे सर्व काव्य पदे, कवित्त, सवैये अशा रूपात रचलेले आहे. [ब्र. कृ. मा. भ.]

## नागर्त

एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे म्हैसूर राज्यात आढळते. पूर्वी ते कांजीवरम येथे राहत.

यांचा वर्ण काळा असून ते उंच, धडधाकट व रुंद चेहऱ्याचे असतात. हे सोने, कापूस, औषधे व धान्ये यांचा व्यापार करतात. यांच्यात वैष्णव व शैव असे दोन भेद आढळतात. शिवभक्त गळयात लिंग धारण करतात व जानवे घालतात. हे सर्व लोक शाकाहारी आहेत.

**विवाहप्रथा**– वयात येण्यापूर्वीच मुलींचा विवाह करतात. यांच्यांत विधवाविवाह रूढ नाही. बहुपत्नीकत्वाची चाल आहे. शैव व वैष्णव नागर्त लोकांत लग्नसंबंध होत नाही. शैव पंथाच्या पुरुषाने नामधारी (वैष्णवपंथी) स्त्रीशी विवाह केल्यास पूर्वी तिला जातिबहिष्कृत करीत.

**मर्तिकप्रथा**– यांच्यांत लिंगधारी मृतांना पुरतात व नामधारी मृतांना जाळतात. मृताशौच दहा ते सोळा दिवस पाळतात. [मै. ट्रा. का.; म. ज्ञा. को.; का. ट्रा. स. इं.]

## नागवर्मा

(१) (इ. स. चे १० वे शतक) एक कन्नड वैयाकरण व कवी. याचा जन्म कर्नाटकातील एका ब्राह्मण कुटुंबात झाला. हा चामुंडरायाच्या आश्रयाला होता. हा शूर योद्धाही होता. छंदोम्बुधी व कर्नाटक कादंबरी हे याचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. छंदोम्बुधी हा छंदःशास्त्रावरील ग्रंथ आहे. यांत कन्नड छंद व संस्कृत वृत्ते यांचे विवरण आहे. त्रिपदी, अक्करे, रगळे, सांगत्य आणि षट्पदी हे कन्नड कवींनी स्वीकारलेले त्याचे खास छंद होत. कर्नाटक कादंबरी म्हणजे बाणभट्टाच्या कादंबरीचा कन्नड अनुवाद होय. ही कादंबरी चंपूशैलीत लिहिली आहे. कन्नड साहित्यात या ग्रंथाला बरेच वरचे स्थान लाभलेले आहे.

(२) (इ. स. चे १२ वे शतक) एक कन्नड कवी. हा जैन ब्राह्मण होता. हा व्याकरणकार आणि साहित्यशास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्ध आहे. शब्दस्मृती, भाषाभूषण, काव्यावलोकन आणि वस्तुकोश हे याचे चार ग्रंथ होत. पहिले दोन्ही ग्रंथ व्याकरणशास्त्राचे असून, शब्दस्मृती हा कानडीत व भाषाभूषण हा संस्कृत भाषेत लिहिलेला आहे. प्राचीन व्याकरणग्रंथांत या दोन्ही ग्रंथांची गणना होते. वस्तुकोश हा एक शब्दकोश असून याची तीन कांड आणि आठशे श्लोक आहेत.

## नागव्रत

एक काम्य व्रत. याचे पुढील दोन पर्याय आहेत (१) कार्तिक शुद्ध तृतीयेस व्रतधारी व्यक्तीने उपवास करायचा असतो आणि शेष, शंखपाल व इतर नाग यांची पूजा करून त्यांना सकाळी व दुपारी दूध पाजायचे असते. फल– सर्पभयाचा परिहार. (२) कार्तिक शुद्ध पंचमीला कमळाच्या पानावर नागाची मूर्ती ठेवून त्याला पंचामृताचा अभिषेक करणे व नंतर होमहवन करणे, असा याचा विधी आहे. फल– विषबाधेपासून मुक्तता आणि भार्या, संतती व ऐश्वर्य यांची प्राप्ती. [हि. ध.; व्र. प.]

## नागसर

एक सुषिर वाद्य. हे वाद्य दोन–अडीच फूट लांबीचे असून, वर निमुळते होत गेलेले असते. उ. भारतात हे वाद्य प्रायः लाकडाचे बनवितात; तर द. भारतात ते धातूंचे बनवितात. त्याला बारा छिद्रे असतात. पैकी सात छिद्रांवर बोटे ठेवून त्यांतून स्वर काढतात. बोटांचा दाब कमी-अधिक करून कोणताही सूर त्यातून काढता येतो. या वाद्यातील विशेषतः चांदीच्या नागसरचे सूर फार मधुर असतात. भारतीय संगीतातील सर्व प्रकार या वाद्यावर वाजवता येतात. सर्व भारतभर हे वाद्य आढळते. दक्षिणेत, विशेषतः विवाह-समारंभाच्या प्रसंगी हे वाद्य वापरतात. [म्यु. इं.]

## नागसेन

(सनपूर्व २ रे शतक) एक विद्वान बौद्ध आचार्य. याचा जन्म बिहारमधील कंजगल गावी एका ब्राह्मण कुलात झाला. याच्या पित्याचे नाव सोणुत्तर असे होते. याचे शिक्षण पाटलिपुत्रातील अशोकाराम विहारात झाले. या विहाराचा प्रमुख आचार्य धर्मरक्षित हा नागसेनाचा गुरू होता. भारतातील बौद्ध धर्माच्या प्रगतीला ज्या ब्राह्मणांनी हातभार लावला, त्यांत नागसेन हा प्रमुख होता.

त्या काळी मिलिंद (मिनांडर) हा उत्तर प्रदेशापासून पेशावरपर्यंतच्या प्रदेशावर राज्य करीत होता. तो एक विद्वान तार्किक होता. एक दिवस त्याची व नागसेनाची गाठ पडली. आपल्या मनातल्या काही धर्मविषयक आशंकांचे निराकरण त्याने नागसेनाकडून करून घ्यायचे ठरवले. सागल येथील संख्येय्य परिवेण नामक बौद्ध विहारात त्या दोघांची बैठक झाली. राजाने शंका विचारावी आणि नागसेनाने तिचे निरसन करावे, असा तो प्रश्नोत्तररूप संवाद मांडला. नागसेनाने दिलेली उत्तरे ऐकून मिलिंदाचे शंकासमाधान झाले.

त्या दोघांतील हा प्रश्नोत्तरांचा संग्रह 'मिलिन्दपञ्ह' या नावाने प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ स्थविरवादी बौद्धांच्या अनु-पिटक साहित्यात अत्यंत महत्त्वपूर्ण मानला जातो. पालित्रिपिटकाच्या खालोखाल एक प्रामाणिक ग्रंथ म्हणून याचेच स्थान आहे. बौद्ध धर्माचे व्याख्याकार म्हणून ज्या चार तेजस्वी नावांचा उल्लेख होतो, त्यांपैकी एक नागसेन हा आहे.

मिलिंद राजाने पुढे बौद्ध धर्म स्वीकारला व तो त्या धर्माचा प्रचारक बनला. त्याने नागसेनाला एक विहार बांधून दिला. तो मिलिंदविहार या नावाने प्रसिद्ध आहे. [ बौ. ध. द.; बौ. ध. वि.; आजकल, वार्षिक अंक, डिसेंबर १९५६ ]

## नागा निरंकारी

(इ. स. चे १७ वे शतक) उ. भारतातील एक संत. पंजाब प्रांतातील रावी नदीच्या तीरावरील अठलीपुर नगरातील राजघराण्यात याचा जन्म झाला. तो दहा-बारा वर्षांचा असताना त्याचा बाप लढाईत मारला गेला. कुलपरंपरेनुसार त्याची आई सती गेली.

आयुष्याचा बराच काल याने जप-तप करण्यात घालवला. निर्जन अरण्यात बसून हा तप करीत असे. पहिली बारा वर्षे तो मौन धारण करून राहिला. पुढे विवस्त्र अवस्थेत भ्रमण करू लागल्यामुळे लोक त्याला नागाबाबा म्हणू लागले. काही वर्षे तपस्येत घालवल्यावर तो अयोध्येत राहायला गेला. पुढे अयोध्या सोडून फत्तेपूरजवळच्या एका वनात त्याने तप आरंभले. त्यानंतर त्याने नेपाळ, चीन व तिबेट या देशांची यात्रा केली, त्याच्या वेगवेगळ्या अवस्थांना अनुसरून त्याला हरनामदास, नागा, रामदास, 'नागागिरिधारी,' नागाबाबा व नागा निरंकारी अशी वेगवेगळी नावे मिळाली. नामजपावर त्याचा विशेष भर असे. ब्रह्मवाणी ही त्याची प्रसिद्ध काव्यरचना आहे. तिच्यात तो म्हणतो—

**अब तो चेत मुसाफिर भाई ।।**
**बार बार पाहरू जगावत, जोडत नहि अलसाई ।**
**अब तो मिलना कठिन पियाका, उलटी भसम रमाई ।।**
**घर है दूर मेरे साई को, जीव जंत सब उडि जाई ।**
**'नागा' कहें सुनो भाई संतो, सत्य नामकी करो दुहाई ।।**

अर्थ— अरे मुसाफिरा, आता तरी जागा हो. तुला वारंवार जागे करूनही तू आळस सोडीत नाहीस. तू उलटी पूजापद्धती आचरतोस. आता तर परमेश्वराची भेट होणे महा कठीण ! माझ्या प्रियकराचे (परमेश्वराचे) घर फार दूर आहे. तिथपर्यंत जीवजंतू पोचत नाहीत. नागा म्हणतो संतानो ! माझे ऐका आणि सत्य व नाम यांची कांस धरा.

उ. प्रदेशात कानपूरजवळच्या पाली या ठिकाणी याची भव्य समाधी आहे. लोकांची अशी श्रद्धा आहे, की हा महाभारतातील कर्णाचा अवतार होता. [ भा. सं. म. ]

## नागार्जुन

(१) (इ. स. चे २ रे शतक) एक महान बौद्ध आचार्य. कुमारजीवाने याचे एक चरित्र लिहिले असून, त्याचे चिनी भाषांतर उपलब्ध आहे. त्यावरून कळते, की याचा जन्म द. भारतातील एका ब्राह्मण कुळात झाला होता. अर्जुन वृक्षाखाली जन्म झाला व एका नागाने त्याला साहाय्य केले, म्हणून या दोन्ही घटनांशी जुळणारे नागार्जुन असे नाव त्याला दिले गेले, अशी दंतकथा आहे. तो वेदशास्त्रसंपन्न व मोठा मांत्रिकही होता. मंत्रविद्येच्या साहाय्याने तो अदृश्य होऊ शकत असे, असे म्हणतात. त्याची बुद्धी अत्यंत तल्लख होती. अवघ्या नव्वद दिवसांत त्याने तीन्ही बौद्ध पिटकांचा अभ्यास पुरा केला. पण तेवढ्याने समाधान होईना, म्हणून तो इतर ग्रंथांचा शोध करू लागला. पुढे त्याला हिमालयातील एका वृद्ध भिक्षूकडून महायानसूत्र प्राप्त झाले. एका नागराजाच्या साहाय्याने त्याला त्या सूत्रावरील एक टीकाही मिळाली. नंतर त्याने द. भारतात राहून त्या भागात बौद्ध धर्माचा प्रसार केला.

नागार्जुन हा सातवाहन वंशातील यज्ञश्री (इ. स. १२७-१६५) राजाचा समकालीन व मित्र होता आणि त्याचा जन्म विदर्भातील एका ब्राह्मण कुळात झाला होता, असे युआन च्वांग याने आपल्या प्रवासवर्णनात लिहून ठेवले आहे.

बौद्ध दर्शनाच्या इतिहासात नागार्जुनाने नवे युग सुरू केले,

असे मानले जाते. महायानाच्या अंतर्गत माध्यमिकशास्त्र किंवा शून्यवाद यानेच प्रवर्तित केला. याच्या माध्यमिककारिका नामक ग्रंथात महायानसूत्रांतील उपदेशांचे सार सांगितले आहे. या एकाच ग्रंथावरून नागार्जुनाची प्रगाढ विद्वत्ता, अलौकिक बुद्धिमत्ता, सूक्ष्म तर्कदृष्टी व दार्शनिक प्रज्ञा यांची चांगली कल्पना येते. बौद्ध आचार्यांत तो सर्वश्रेष्ठ मानला जातो.

नागार्जुनाने स्वतः माध्यमिकशास्त्र या आपल्या ग्रंथावर अकुतोभया नावाची टीका लिहिली आहे. या व्यतिरिक्त त्याने प्रज्ञापारमिताशास्त्र, प्रज्ञामूलशास्त्रटीका, प्रज्ञाप्रदीपशास्त्र, मूलमाध्यमिक-शास्त्र, मध्यंतानुगमशास्त्र, दशभूमिविभाषाशास्त्र, द्वादशनिकायशास्त्र, विग्रहव्यर्वात्तनीकारिका, युक्तिशतिका, शून्यतासप्तती, प्रतीत्यसमुत्पादहृदय, महायानविंशिका, इ. अनेक ग्रंथ लिहिले आहेत. तिबेटी भाषेतील प्रमाणविघटन व चिनी भाषेतील उपायकौशलहृदय हे ग्रंथही याचेच मानले जातात. नागार्जुनाने राजा यज्ञश्रीला लिहिलेले एक पत्र सुहृल्लेख या नावाने प्रसिद्ध आहे. त्यात बौद्ध धर्माचा नैतिक उपदेश असून, त्याची भाषा साहित्यिक दृष्टीने मनोरम आहे.

दार्शनिक पंडित असूनही, नागार्जुनाने व्यावहारिक ज्ञानाची उपेक्षा केली नाही. व्यवहाराचा आश्रय केल्यावाचून परमार्थाचा उपदेश करता येत नाही आणि परमार्थ-प्राप्तीवाचून निर्वाण प्राप्त होत नाही, अशी याची धारणा होती. परमार्थतत्त्व हे बुद्धिव्यापाराला अगोचर, म्हणजे ज्ञानाच्या कक्षेच्या पलिकडचे, सर्वप्रपंचनिर्मुक्त व कल्पनाविरहित असले, तरी भौतिक पदार्थांच्या साहाय्याने त्याचे ज्ञान मिळवता येते, असे त्याचे मत होते.



नागार्जुन

महायान पंथाच्या प्रसारासाठी नागार्जुनाने माळवा, ओडिसा, बंगाल, इ. प्रदेशांत पुष्कळ प्रवास केला आणि अनेक विहार स्थापले. आंध्र प्रदेशातील श्रीपर्वतावरील मठात दीर्घकाल वास्तव्य व तप करून त्याने नागार्जुनकोंड येथे महान बौद्ध धर्माचे केंद्र निर्माण केले, असे म्हणतात. पण श्री. साहू यांच्या मते बौद्ध आचार्य नागार्जन याचा श्रीपर्वताशी काही संबंध नसून, तो नागार्जुन दुसराच म्हणजे सिद्ध नागार्जुन होता.

नागार्जुनाला आर्य व बोधिसत्त्व या उपाधी मिळाल्या होत्या, त्यावरून बौद्ध जगतात त्याला केवढा मान होता, ते कळून येते. बुद्धाप्रमाणेच त्याच्याही मूर्ती कोरलेल्या आढळतात. त्याचे हात धर्मचक्र मुद्रा दर्शवितात. [ गॉ. नॉ. बु.; हिं. वि. को.; म. ज्ञा. को.; बुद्धिझम इन ओरिसा – श्री. एन्. के. साहू, १९५८.; पु. त. नि.; आजकल–वार्षिक अंक, डिसेंबर १९५६ ]

(२) (इ. स. चे ७ वे शतक) महान रसायनशास्त्रज्ञ. बौद्ध आचार्य नागार्जुन व हा एकच, अशी पूर्वी समजूत होती; पण ते दोघे भिन्न पुरुष होते, असे सांप्रतचे बहुतेक विद्वान मानतात. ही भिन्नता स्पष्ट करण्यासाठी या रसायनशास्त्रज्ञाला सिद्ध नागार्जुन म्हणतात. याचा जन्म द. भारतात कांची नगरीत झाला होता. हा तंत्रशास्त्राचाही आचार्य असून, त्याने श्रीपर्वतावर तारादेवीची उपासना व तांत्रिक साधना केली होती.

या नागार्जुनाला एका तपस्व्याने रसायनविद्या व मायूरी विद्या (सामान्य धातूपासून सोने बनविण्याची किमया) शिकवली, अशी आख्यायिका प्रचलित आहे. याला भारतीय रसायनशास्त्राचा प्रवर्तकच मानतात. कारण उपलब्ध खनिजांपासून विविध प्रकारची रसायने व शुद्ध धातू मिळविण्याच्या पद्धती याने शोधून काढल्या. पारा व इतर धातूंचे संरस (संयुक्त धातू) यानेच प्रथम तयार केले. याचा रसरत्नाकर हा ग्रंथ फार प्रसिद्ध असून, त्यात अनेक रासायनिक प्रक्रिया व उपकरणे यांची माहिती दिली आहे.

याच्याविषयी एक दंतकथा सांगतात, ती अशी – नागार्जुनाने एक सिद्धरसायन निर्माण केले होते. ते प्रचारात आले असते, तर त्याच्या सेवनाने अवघी मानवजात अमर झाली असती. पण इंद्राच्या आज्ञेवरून नागार्जुनाने ते रसायन नष्ट केले.

नागार्जुन हा नालंदा येथील विद्यापीठाचा कुलगुरू होता, असे म्हणतात. पण तो बौद्ध नागार्जुन की सिद्ध नागार्जुन, हे निश्चित सांगता येत नाही. [ वै. वि. भा. प.; हिं. वि. को.; बुद्धिझम इन ओरिसा; म. ज्ञा. को. ]

(३) (इ. स. चे ८ वे किंवा ९ वे शतक) एक आयुर्वेदाचार्य. हा पादलिप्त सूरीचा शिष्य होता, असे प्रबंधचिंतामणी या ग्रंथावरून कळते. या नागार्जुनाच्या नावाने आयुर्वेदात कित्येक योग प्रचलित आहेत. [ हिं. वि. को. ]

**नागार्जुनकोंड** आंध्र प्रदेशातील एक प्राचीन बौद्ध क्षेत्र. गुंटूर जिल्ह्यातील पलनाडू तालुक्यात, माचेर्ला गावापासून सुमारे १५ मैलांवर कृष्णा नदीच्या काठी हे स्थान आहे. नागार्जुनकोंड (नागार्जुनाचा डोंगर) हा नल्लमलै

पर्वतराजीचा एक भाग आहे. या पर्वताजवळ कृष्णा नदी ज्या सपाट प्रदेशातून वाहते, तो प्रदेश पहाडांनी घेरलेला असून,



बुद्धावतरणशिल्प – नागार्जुनकोंड

त्या पहाडांच्या मध्ये मधून मधून विटा व दगड यांचे तटही बांधलेले आढळतात. या खोऱ्यात सर्वत्र दाट जंगल पसरलेले असून, त्यात असंख्य उंचवटे आहेत. ते उंचवटे म्हणजे प्राचीन बौद्ध स्तूप, विहार व चैत्यगृहे यांच्या अवशेषांचे ढिगारे होत. इ. स. १९२५ मध्ये श्री. रंगस्वामी सरस्वती यांना त्या ठिकाणी काही शिलालेख सापडले. त्यामुळे त्या भागात उत्खनन व संशोधन सुरू झाले.

या क्षेत्रात जे प्राकृत व संस्कृत शिलालेख मिळाले आहेत, त्यांवरूनच या प्रदेशाचा प्राचीन इतिहास पुष्कळसा ज्ञात झाला. कृष्णा नदीच्या खोऱ्यात इ. स. च्या तिसऱ्या शतकात विजयपुरी नामक नगरी वसलेली होती. ती इक्ष्वाकूवंशी राजांची राजधानी होती. हे राजे प्रथम सातवाहनांचे मांडलिक होते. सातवाहनांच्या मागून तेच सार्वभौम सत्ताधीश झाले. ते वैदिक धर्माचे अनुयायी असले, तरी त्यांनी, विशेषतः त्यांच्या राण्यांनी बौद्ध धर्माच्या प्रसाराला पुष्कळ साहाय्य व प्रोत्साहन दिले. त्यांनी या भागात अनेक विहार व स्तूप बांधले. विजयपुरीतील राजप्रासादांचे अनेक सुंदर अवशेषही या क्षेत्रात सापडले आहेत.

विजयपुरीच्या पूर्वेला श्रीपर्वत किंवा सिरिपर्वत नामक डोंगर आहे. त्याला सांप्रत नल्लराल्लबोडू असे म्हणतात. त्या डोंगरावरील एका विहारात प्रसिद्ध बौद्ध आचार्य नागार्जुन याचे वास्तव्य होते व तिथेच त्याला निर्वाण प्राप्त झाले, असे तिबेटी परंपरेवरून कळते. त्या नागार्जुनामुळेच या डोंगराला नागार्जुनकोंड हे नाव मिळाले. याला नागार्जुनी कोंड असेही म्हणतात. काही पंडितांच्या मते या बौद्ध आचार्याचा श्रीपर्वताशी काही संबंध नसून, सिद्ध नागार्जुनाच्या तांत्रिक साधनेमुळे तो पर्वत प्रख्यात झाला आहे.

या प्रदेशातील सर्वांत भव्य स्तूपाला शिलालेखांत महाचैत्य हे नाव दिलेले आहे. त्याच्या अंतर्भागात चांदीचा एक लहान स्तूप असून, त्यात एका सुवर्णपेटिकेत गौतम बुद्धाच्या अस्थीचा



शक द्वारपाल – इक्ष्वाकू राजांच्या काळातील स्तूपाच्या चबुतऱ्यावरील शिल्पाकृती – नागार्जुनकोंड

तुकडा ठेवलेला आढळला. त्यामुळे या स्तूपाला धातुगर्भ मानतात. सांप्रत हा बुद्ध-धातू सारनाथ येथील मूलगंधकुटी विहारात

ठेवला आहे. हा स्तूप इक्ष्वाकूंच्या पूर्वीचा आहे. त्याचा चौथरा चक्राकार असून, त्याचा परीघ १०६ फूट आहे. चौथऱ्यांचे



नागार्जुनकोंड येथील महाचैत्य स्तूपाचे अवशेष

बांधकाम २० × १० × ३ इंच आकाराच्या विटांनी केलेले आहे. त्याच्या बाजूंवर सुंदर शिल्पाकृतींनी भरलेल्या शिला बसवलेल्या आहेत. स्तूपाची उंची सुमारे ८० फूट होती, असे अनुमान आहे. कारण हा स्तूप सांप्रत उभा नाही.

या स्तूपाच्या पूर्वेकडे एक विहार होता, त्याचे नाव अपर-महाविनसेलिय असे होते. त्यात एक चैत्यगृह व एक मंडप असून, मंडपाचे स्तंभ पाषाणाचे होते. चैत्यगृहाभोवती प्रशस्त प्रांगण, सभोवार विटांची भिंत आणि तीन बाजूंना खोल्या होत्या.



नागार्जुनकोंड येथील महाचैत्य स्तूपाचा चौथरा

असे अनेक स्तूप, चैत्यगृहे आणि संघाराम (विहार) या प्रदेशात होते. त्यांचे अवशेष सपाट भागाप्रमाणे डोंगरावरही आढळतात. हे सर्व बांधकाम विटांचे आहे. शांतिश्री चैत्यगृह, बोधिश्री चैत्यगृह, सिंहल विहार, स्वस्तिक स्तूप अशी त्या चैत्यगृहांची व विहारांची नावे आहेत. त्यांच्या भग्नावशेषांत अनेक संगमरवरी स्तंभ व शिलाफलक सापडले असून, त्यांवर सुंदर शिल्पाकृती कोरलेल्या दिसतात. या सर्व शिल्पकामात बुद्धाच्या जीवनातील विशेष प्रसंगांचे व जातककथांचे चित्रण केलेले आहे. काही ठिकाणी स्तूपाकृतीही कोरलेल्या आहेत. हे शिल्पकाम अत्यंत रेखीव आणि नक्षीने नटलेले आहे.

या भागात झालेल्या उत्खननात एका जागी तिथल्या प्राचीन विद्यापीठाचे अवशेषही सापडले आहेत. त्यांत स्तूप, चैत्य, विहार, स्तंभ, कमळावर उभी असलेली बुद्धमूर्ती, पूर्ण घट, इ. शिल्पाकृती आहेत. एका लहान खोलीत मातीच्या बाहुल्या,



चैत्यांकित शिलाफलक – नागार्जुनकोंड

तोटीची भांडी वगैरे वस्तू आढळल्या; तर दुसऱ्या खोलीत काही अपुऱ्या शिल्पाकृती मिळाल्या. त्यांतील शालभंजिकेची रूपरेखा काढलेली शिला उल्लेखनीय आहे. त्यावरून असे वाटते, की त्या ठिकाणी शिल्पकलेचे शिक्षणही दिले जात असावे.

या खोऱ्यात कृष्णा नदीच्या तीरावर अष्टभुजा देवी व सुब्रह्मण्यस्वामी यांची मंदिरे आहेत. एका टेकडीवर बौद्ध देवी हारीतीचे मंदिरही सापडले आहे. त्यातील देवीची मूर्ती इ. स. च्या पाचव्या शतकातली असावी. त्या देवळाच्या मागे एका भव्य मंदिराचे अवशेषही आहेत. या क्षेत्रात अश्वमेध यज्ञाचे एक कुंडही सापडले आहे.

नागार्जुनकोंडच्या परिसरात काही ठिकाणी रोमन नाणी मिळाली आहेत. त्यांवरून या प्रदेशाचा व्यापार रोमपर्यंत चालू होता, असे ठरते. त्याचप्रमाणे तिथल्या उत्खननात अश्मयुगातील विविध प्रकारची आयुधे, मातीची भांडी, भाले, कटयारी, मडकी, प्राण्यांचे व मानवी हाडांचे सांगाडे, इ. वस्तूही मिळाल्या आहेत. त्यांवरून या प्रदेशात प्रागैतिहासिक काळापासून मानवांचे वास्तव्य असावे, असे वाटते.

नागार्जुनकोंड येथील शिल्पकृतींमध्ये आंध्रवासी लोकांच्या धार्मिक व सामाजिक जीवनाचे सुंदर चित्रण झालेले आढळते. सुमारे १५०० वर्षांपूर्वी तिथे नांदणारी संस्कृती, तिथल्या लोकांच्या चालीरीती, त्यांची राहणी, वेषभूषा यांविषयी चांगली कल्पना त्या सर्व भग्नावशेषांवरून करता येते.



शालभंजिकेची रूपरेखा – नागार्जुनकोंड

साम्प्रत या खोऱ्यात नागार्जुनसागर नावाचे प्रचंड धरण बांधले जात आहे. नागार्जुनकोंड हे स्थान त्या जलाशयात बुडणार असल्यामुळे त्या क्षेत्रातील शक्य तेवढे भग्नावशेष तिथून उचलून उंच जागी बांधलेल्या एका संग्रहालयात सुरक्षित ठेवण्याची योजना केंद्र सरकारने आखली आहे. ज्या वस्तू व वास्तू



प्राचीन वस्तू – नागार्जुनकोंड

हलवणे शक्य नाही, त्यांच्या प्रतिकृती बनवून त्याही त्या संग्रहालयात ठेवल्या जातील. [ आर्ट ऑफ नागार्जुनिकोंड– श्री. राव,



पूर्णघट – शिल्प – नागार्जुनकोंड

१९५६; अजन्ता, मे १९५३; श्री. मलंपल्ली सोमशेखर शर्मा– दक्षिण भारत, सप्टें.–ऑक्टो. १९६१; स्वराज्य, १६ डिसेंबर १९६१; धर्मयुग, २६ जून १९६६ ]

**नागार्जुनी गुहा** गया जिल्ह्यातील सिद्धेश्वरनाथ शिखराच्या पूर्वेस अर्ध्या मैलावर नागार्जुनी नावाच्या टेकड्या असून, त्यांच्या दोन समांतर रांगा एकमेकींपासून अर्धा मैल अंतरावर आहेत. या टेकड्यांच्या रांगेत नागार्जुनी नावाच्या या तीन गुहा आहेत. गोपी गुहा, वापिका गुहा व वेदथिका गुहा अशी त्यांची नावे आहेत.

गोपी गुहेच्या प्रवेशद्वारावर एक शिलालेख आहे. त्यात दशरथ राजाने राज्यारूढ झाल्यावर ही गुहा आजीविकांना वास्तव्य करण्याकरिता 'यावच्चंद्रदिवाकरौ' अर्पण केली असल्याचा उल्लेख आहे. दुसऱ्या एका लेखात तिचा उल्लेख 'विन्ध्यभूधर-गुहा' असा आहे. जैनांच्या सप्त गर्भ-गुहांमध्ये या गुहांचा समावेश होतो.

या सर्व गुहा अशोकाचा नातू दशरथ याच्या कारकीर्दीत सनपूर्व २३१ च्या सुमारास कोरलेल्या असून, त्या सर्व आजीवकांना अर्पण केलेल्या आहेत. नंतरच्या कालातील कांही शिलालेखांवरून या गुहांमध्ये ब्राह्मण–तपस्वीही तपाचरण करीत होते असे दिसते. इ. स. च्या तिसऱ्या किंवा पाचव्या शतकाच्या सुमारास शार्दूलवर्मा व अनंतवर्मा या राजांनी या गुहांमध्ये ब्राह्मणी देवतांच्या मूर्ती स्थापन केल्या.

या गुहांना नागार्जुनी गुहा हे नाव पडण्याचे कारण यांपैकी एका गुहेत सुप्रसिद्ध बौद्ध दार्शनिक नागार्जुन वास्तव्य करीत होता हे होय, असे म्हणतात. [ भा. सं. जै. यो.; गेया गॅझे. ]

## नागावासुलू

द. भारतातील एक जात. हे लोक आंध्रातल्या विजगापट्टम जिल्ह्यात राहतात. यांचा मुख्य व्यवसाय शेती-बागाईत हा आहे. ज्या स्त्रियांची लग्ने होत नाहीत, त्या वेश्याव्यवसाय किंवा नर्तकीचा पेशा पत्करतात. हे लोक स्वतःला नायडू ही उपाधी लावतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## नागुरी

मुंडा आदिवासींची एक बोली. या बोलीचे संताळी बोलीशी साम्य आहे. ही बोली बोलणाऱ्या मुंडांनाही नागुरीच म्हणतात. हसद बोली बोलणाऱ्यांचाही नागुरीत समावेश होतो. पाहा – मुंडा. [ एन्सा. मुंडा. ]

## नागुलंचवीती

आंध्र प्रांतातील एक सण. याचा अर्थ नाग-चतुर्थी असा होतो. या दिवशी बायका दूध घेऊन नागाच्या वारुळाशी जातात व नागाला दूध घालतात. घरातली माणसे व गुरे यांना वर्षभर सापाचा उपद्रव होऊ नये, हा या सणाचा उद्देश असतो. [ तें. उ. सा. ]

## नागेबोंगा

मुंडांचा एक भूतसमूह. याला बिंदियेरा किंवा नागेयेरा असेही म्हणतात. ही भुते भातशेतांत, घळीत, लहान डबक्यात किंवा ओढ्याकाठी राहत असतात. ही स्त्रीलिंगी भुते आहेत. नागेबोंगा स्त्रीलिंगी का असावी, याचा मात्र कुणी खुलासा करीत नाही. परंतु त्यासंबंधी एक दंतकथा सांगतात, ती अशी आहे–

सिंग बोंगाने असुरांचे निर्दालन केल्यावर तो स्वर्गात जाऊ लागला असता असुर स्त्रियांनी त्याचे कपडे धरून ठेवले. थोडे वर गेल्यावर सिंग बोंगाच्या हे ध्यानी आले. तेव्हा त्याने त्या सर्व स्त्रियांना खाली झटकून टाकले. त्यामुळे त्या स्त्रिया एका घळीत पडल्या आणि मरून नागेबोंगा बनल्या.

या नागे भुतांचा समावेश ग्रामरक्षक भुतांत होतो. सर्व सणांच्या वेळी त्यांना नैवेद्य मिळतो. यांच्या वास्तव्यस्थानी कुणी मोठ्याने बोलले अथवा दुपारच्या वेळी पाणी भरले, तर नागेबोंगांना राग येतो व ती त्या माणसांना झपाटतात. जो माणूस या भुतांवर पाणी टाकील, त्याला महारोगासारखा भयंकर रोग जडतो, असे मुंडा लोक मानतात. तांदूळ, हळद किंवा कोंबडा अर्पण केला असता या भुतांचा क्रोध शमतो, अशी त्यांची समजूत आहे. [ एन्सा. मुंडा. ]

## नागेश

(इ. स. चे १७ वे शतक) एक मराठी कवी. नागेश स्वतःचा उल्लेख नागदेव, नागजोशी, नागेंद्र, इ. विविध नावांनी करतो. हा वत्सगोत्री माध्यंदिन शाखेचा यजुर्वेदी ब्राह्मण असून, त्याचे उपनाम मुळे व आराध्य दैवत त्रिमांडेश्वर असे होते. हा नगर जिल्ह्यातील भिंगार गावचा रहिवासी असल्यामुळे त्याला भिंगारकर असेही म्हणत. याच्या वडिलांचे नाव मोर जोशी असून, आईचे नाव जानकीबाई असे होते. याच्या घराण्यात ग्रामजोशाची व कुलकर्णपणाची वृत्ती होती. हा नगर प्रांती होऊन गेलेल्या यशवंतराव कोकाटे नामक श्रीमंत सरदाराचा आश्रित असावा, असे म्हणतात.

शिवकालात होऊन गेलेल्या अनेक उल्लेखनीय कवींत याची गणना करतात. याने सीतास्वयंवर, चंद्रावळीवर्णन, रुक्मिणी-स्वयंवर, रसमंजरी, शारदाविनोद इ. काव्ये रचली आहेत. या काव्यांपैकी सीतास्वयंवर व चंद्रावळीवर्णन ही काव्ये उपलब्ध असून, इतर काव्ये अनुपलब्ध आहेत. मात्र त्यांतील काही भाग संशोधकांना मिळाले असल्याचे प्रा. पंगू सांगतात.

नागेशाचे अध्ययन बरेच असावे. त्याने चंद्रावळीवर्णन हे आख्यानकाव्य अग्निपुराणाच्या आधारे रचले असून, सीता-स्वयंवरासाठी रघुवंश, हनूमन्नाटक, इ. काव्यांचा भरपूर उप-योग केला आहे. सीतास्वयंवरातील काही श्लोक सरळ हनूमन्नाटकातील काही श्लोकांचा अनुवादच आहे (सीता स्वयंवर ३२०, ३५९). राम विवाहासाठी जनकगृही जात असता, त्याची मिरवणूक पाहण्यासाठी उडालेली स्त्रियांची जी धांदल नागेशाने वर्णिली आहे, ती तर रघुवंशाच्या सातव्या सर्गातील अजराजाच्या मिरवणुकीचे निव्वळ प्रतिबिंबच आहे. याशिवाय त्याने अनेक ठिकाणी केलेल्या सांकेतिक वर्णनांवरून

व निरनिराळ्या अलंकारांवरून त्याला पंचमहाकाव्यांचा व साहित्यशास्त्राचा चांगला परिचय होता हे स्पष्ट दिसते.

सीतास्वयंवरातील त्याच्या काव्याचा एक चांगला नमुना असा (३१८–३२०)–

**द्यावा तुम्हीं सर्वहिं भार याचा।**
**रामासि द्यावा सह सारयाचा।**
**कोदंड उत्तुंग, अभंग भंगो।**
**सुरंग हा सेवररंग रंगो।**
**वर वरी जरि हा मजला, भला।**
**सुकृतराशि पहा मज लाभला।**
**धनुस हा चढवी तरि जीन मी।**
**न चढवी, तरि जीव त्यजीन मी.**
**कमठपृष्ठकठोर धनुर्महा।**
**मदनसुंदर तो रघुराम हा।**
**लघु कसा धनु लाविल, पां, गुणी।**
**अहह, हा पण दारुण, साजणी**

कित्येक वेळा नागेशाच्या रसिकतेची मजल अश्लीलतेपर्यंत अथवा बीभत्सतेपर्यंतही गेलेली आढळते. [ म. सा.; प्रा. म. क.; नागेशकृत सीतास्वयंवर, डॉ. मा. गो. देशमुख, १९४१ ]

## नागेशभट्ट

(१७४१ – १७८२ इ. स.) कर्नाटकातील एक विद्वान. याला महाबळभट्ट असेही म्हणत. कारवार जिल्ह्यातील हळदीपूर या गावी याचा जन्म झाला. हा सारस्वत ब्राह्मण होता. याच्या वडिलांचे नाव वेंकटेशभट्ट असे होते. धर्मशास्त्र, ज्योतिष, याज्ञिक, इ. विषयांत नागेशभट्ट निष्णात होता. ही विद्या त्याने आपल्या वडिलांकडून संपादन केली होती. हा वैष्णव होता.

नागेशभट्टाने धर्मशास्त्र व ज्योतिषशास्त्र यांवर मोठमोठे सहा ग्रंथ लिहिले आहेत. स्मृत्यर्थमुक्तावली, तांत्रिक-मुक्तावली, आगम ग्रंथ हे तीन त्याचे धर्मशास्त्रविषयक ग्रंथ असून, आर्यातंत्र, आर्याकौतुक, महाबलसिद्धांत हे तीन गणितविषयक आहेत. त्याची संस्कृत भाषा सुबोध होती.

नागेशभट्टाला कर्नाटकातील लोकांनी श्रौतस्मार्त कर्मांत अग्रमान दिला होता. हा मान अजूनही त्याच्या वंशजांना मिळतो. याशिवाय त्याला आसपासच्या गावांतून भूमी, वर्षासने वगैरे बऱ्याच गोष्टी मिळाल्या होत्या. [ सा. र.; म. च. को. ]

## नागेश संप्रदाय

महाराष्ट्रातील एक संप्रदाय. नागेश किंवा नागनाथ हा या संप्रदायाचा प्रवर्तक असल्यामुळे त्याला नागेश संप्रदाय किंवा नागनाथ संप्रदाय असे म्हणतात. नागेश हा सोलापूर जिल्ह्याच्या मोहोळ तालुक्यातील वडवळ गावचा रहिवासी होता; म्हणून त्याला वडवळसिद्ध नागेश असेही म्हणतात. तो अयाचित वृत्तीने राही. याच्यासंबंधी काही दंतकथा तेवढ्या उपलब्ध असून, त्या नागेशलीलामृतात आढळतात. हा इ. स. १६०० च्या सुमारास होऊन गेला असे अनुमान केले जाते.

नागेशलीलामृतकार भानजी त्रिंबक याच्या मते नागेश संप्रदाय ही चैतन्य संप्रदायाची एक शाखा आहे. आदिनाथ →नागनाथ →केशव चैतन्य →बाबा चैतन्य →तुकाराम अशी त्या शाखेची परंपरा याने दिली आहे. नागनाथ संप्रदायातील अनेक व्यक्तींची नावे चैतन्यपदान्त आहेत, त्यावरून भानजी त्रिंबकाचे म्हणणे खरे असावे, असे वाटते.

नागेशलीलामृतात या सिद्धान्ताला पुष्टी देणारी अनेक वचनें आहेत. या सांप्रदायिक ग्रंथाचे अवलोकन करता नागेशाच्या अनुयायांना हा संप्रदाय स्वतंत्र वाटत असावा, असे दिसते. नागेशलीलामृतात संप्रदाय प्रकरण या नावाने स्वतंत्र अध्यायच दिले आहेत.

नागेश संप्रदाय हा सर्वसंग्राहक व सर्वसमावेशक आहे. महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरही याचे अनुयायी आढळतात. त्यात आलमखानासारखे मुसलमान, मन्मथस्वामीसारखे वीरशैव, काही धनगर व काही ब्राह्मणही आहेत.

या संप्रदायाचे तत्त्वज्ञानही असेच समावेशक व व्यापक आहे. नाथ, चैतन्य, दत्त, लिंगायत, इ. संप्रदायांतील वैशिष्ट्यपूर्ण तत्त्वे या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानात समाविष्ट केलेली आहेत. हा अद्वैती संप्रदाय आहे. या संप्रदायाच्या संतांना सिद्ध ही उपाधी लावली जाते. नाथ संप्रदायाप्रमाणेच या संप्रदायातही योगविवरण केलेले आहे; पण त्यावर भर दिलेला नाही. अज्ञानसिद्धासारखे त्याचे अनुयायी आपल्या भक्तियोगाला शिवयोग म्हणूनच संबोधतात. या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानावर विशेषेकरून चैतन्य संप्रदायाचा ठसा आहे. 'चैतन्य सत्य एकचि' हा या पंथाचा घोष आहे. प्रस्तुत पंथाच्या तत्त्वज्ञानाची कल्पना येण्यासाठी नागनाथाचा प्रमुख शिष्य अज्ञानसिद्ध याच्या वरदनागेश या ग्रंथातील काही ओव्या अशा ( १·५५–५७ )–

**जैसी माया अविद्येमाजी जाण। एकचि व्यापक चैतन्य।**
**त्या उपाधि किंचित निरशन। तैं एकपण एकात्मता॥**
**किं पिंड ब्रह्मांड पृथक् पृथक्। पाहता दिसे भिन्नात्मक।**
**दोहीमाजी येक चालक। जे निष्कलंक निजरूप॥**

या ग्रंथात स्थूल मानाने जीव, ब्रह्म, माया, तीन अहंकार, तीन शक्ती, पंचदश तत्त्वे, पंचीकरण, समाधी, सद्‌गुरु, शिष्य, संत यांविषयी विवेचन केलेले आहे.

या संप्रदायाला अवतारकल्पना संमत आहे. भक्तांच्या रक्षणासाठी, समाजातील पापाचरण नष्ट करण्यासाठी आणि पृथ्वीवर मांगल्याचे राज्य निर्माण करण्यासाठी परमात्मा अवतार घेतो, असे हा संप्रदाय मानतो.

या पंथाला मान्य असलेला आचारधर्म हा सामान्य माणसाला पेलण्यासारखा आहे. संन्यास, कर्मकांडाचे प्राबल्य, योगावर अतिरिक्त भर या गोष्टी या संप्रदायात नाहीत. त्यांच्या आचारधर्माचे विवरण अज्ञानसिद्धकृत संकटहरणी व भानजी त्रिवक्रकृत नागेशलीलामृत या ग्रंथात आहे.

नागनाथाच्या व त्याच्या शिष्यांच्या वास्तव्याने पुनीत झालेली वडवळ, मोहोळ व देवगाव ही या संप्रदायाची तीन प्रमुख क्षेत्रे आहेत. या क्षेत्रांची यात्रा केल्यास त्रिस्थळी यात्रेचे पुण्य लाभते, अशी त्यांची समजूत आहे. याशिवाय माणूर, मार्डी, नरंदे ही स्थानेही त्यांना क्षेत्र म्हणून पवित्र वाटतात.

नागेशलीलामृत व वरदनागेश हे या संप्रदायाचे दोन मान्य ग्रंथ आहेत. अज्ञानसिद्धाचे चार शिष्य देवंजय, एकलिंग, कृष्णनाथ व दत्तचैतन्य यांचे चार मठ अनुक्रमे महागाव, वरवंड, किलारी आणि नरंदे या ठिकाणी आहेत. दर अमावास्येला वडवळ येथे पंथीय लोकांची यात्रा भरते. शिवरात्रीला तर त्यांचा मोठा उत्सवच असतो. [नागेश संप्रदाय, श्री. यू. म. पठाण]

**नागेशी** गोव्यातील एक प्रसिद्ध देवस्थान. हे फोंडे महालातील वांदिवडे या गावी आहे. नागेश हे अनेक सारस्वत ब्राह्मणांचे कुलदैवत आहे.

इथले नागेशाचे मंदिर पश्चिमाभिमुख आहे. मुख्य दरवाजापुढे देवाचे तळे आहे. त्या भागातील सर्व देवस्थानांच्या तळ्यांत हे तळे मोठे व सुप्रसिद्ध आहे. चैत्र पौर्णिमेला इथे देवाचा जलविहार होतो. दर सोमवारी देवाची पालखी निघते.

**नागोजीभट्ट** (इ. स. चे १८ वे शतक) प्रसिद्ध वैयाकरण व दार्शनिक. याच्या पित्याचे नाव शिवभट्ट व आईचे नाव सती असे होते. काळे व उपाध्ये अशी याची दोन आडनावे होती. हा महाराष्ट्रीय ब्राह्मण होता उत्तर भारतातील श्रृंगवेरचा राजा रामराजा हा याचा आश्रयदाता होता. भट्टोजी दीक्षिताचा नातू हरीदीक्षित याच्याकडे याने व्याकरणशास्त्राचे व पं. रामरामभट्टाचार्य यांच्याकडे न्यायशास्त्राचे अध्ययन केले.

व्याकरण, धर्मशास्त्र, अलंकारशास्त्र इतिहास, पुराण, काव्यशास्त्र, सांख्य-योग अशा विविध विषयांवर नागोजीभट्टाने तिसाहून अधिक ग्रंथ रचले आहेत. तीर्थेंदुशेखर, आचारेंदुशेखर, आशौचनिर्णय, तिथींदुस.र, इ. त्याचे धर्मशास्त्रावरील ग्रंथ होत परंतु पाणिनीय व्याकरणानंतर त्याने लिहिलेल्या महाभाष्यप्रदीपोद्योत, परिभाषेंदुशेखर, लघुशब्देंदुशेखर, बृहच्छब्देंदुशेखर, वैय्याकरणसिद्धान्तमंजरी या ग्रंथांनी आणि रसगंगाधर व रसतरंगिणी यांवरील भाष्य, या ग्रंथांनी त्याची कीर्ती दूरवर पसरली आहे.

आपल्या गुरूबद्दलची आदरबुद्धी व्यक्त करण्यासाठी त्याने शब्दरत्न या नावाचा ग्रंथ रचून तो त्याच्या नावे प्रसिद्ध केला. त्याने अनेक शास्त्रांवर विपुल ग्रंथरचना केली असली, तरी त्याच्या विद्वत्तेचा प्रमुख विषय म्हणजे व्याकरणशास्त्रच होय. याचे पांडित्य ज्ञानकोशाच्या स्वरूपाचे होते. पन्नास वर्षांहून अधिक काळ याने शास्त्रोपासना केली.

व्याख्याकार या नात्याने नागोजीभट्टाची योग्यता मोठी होती. त्याच्या या कार्याची अनेकांनी मुक्त प्रशंसा केली आहे. तो निष्णात आलंकारिकही होता. त्याने साहित्यशास्त्रातील व्याकरणाचे महत्त्व जसे ओळखले होते, तसेच साहित्यशास्त्रातील सिद्धान्तांचे व्याकरणदृष्टीने महत्त्वही अजमावले होते. केवळ व्याकरणाच्या आहारी जाऊन अलंकारांचे नीरस वर्गीकरण करणाऱ्या आलंकारिकांना तो जसा दोष देतो, तसाच वैयाकरणांनाही. तो साहित्यशास्त्रातील व्यंजनेचे महत्त्व समजावून सांगतो. नागेशाचे व्यंजनानिरूपण म्हणजे अलंकारशास्त्राने व्याकरणावर मिळविलेला अखेरचा विजय होय, असे श्री. ग. त्र्यं. देशपांडे यांचे मत आहे.

नागोजीला जयपूरचा राजा सवाई जयसिंह याने इ. स. १७१४ साली अश्वमेधाचे पौरोहित्य करण्यासाठी निमंत्रण केले होते. पण आपण क्षेत्रसंन्यास घेतल्याचे निमित्त सांगून त्याने ते निमंत्रण नाकारले, अशी आख्यायिका आहे. वयाच्या ६२ व्या वर्षी हा काशीक्षेत्री निवर्तला. [हि. ध.; परिषद पत्रिका एप्रिल १९६३; म. च. को.; काव्यप्रकाश; भा. सा. शा.]

**नाच गो घुमा** मुलींचे एक संघनृत्य. यातील कल्पना अशी – एका मुलीला दागिने, कपडे, इ. वस्तू नाहीत, त्यामुळे ती खिन्न झाली आहे आणि इतर मुली तिला खिन्न न होण्याबद्दल सांगत आहेत.

या नृत्यासाठी बऱ्याच मुली वर्तुळाकार उभ्या राहतात. वर्तुळाच्या मध्यभागी एक मुलगी सूप घेऊन उभी राहते. बाकीच्या मुली 'नाच गो घुमा' म्हणून तिला नाचायला प्रवृत्त करतात, पण ती म्हणते. 'माझ्यापाशी दागिने, कपडे नाहीत, तर मी नाचू कशी ?' ही तक्रार करीत असताना ती हातातले सूप खालीवर करते. तिच्या भोवतीच्या मुली हातात हात गुंफून गाण्याच्या

तालावर वर्तुळाकार नाचतात. या नाचाचे गाणे पुढीलप्रमाणे—

नाच गो घुमा । नाचू मी कशी

आलेगावचा । पालेगावचा । माळी नाही आला

वेणी नाही मला । नाचू मी कशी ?

हे नृत्य मुख्यत्वे मंगळागौरीच्या रात्री करतात. ते वास्तववादी असून, त्याचा विषय रोजच्या जीवनातील असतो.

**नाचिकेतचयन** अग्निचयन, काठकचयन पाहा.

**नाटक** दृश्य व श्राव्य असा एक वाङमयीन मनोरंजक प्रकार. पाणिनीने नाटक हा शब्द नट् = नाचणे, अभिनय करणे या धातूवरून मानला आहे. नटाचे म्हणजे अभिनयकर्त्याचे जे कृत्य ते नाटक होय. श्री. वेबर आणि मोलियर विलियम्स यांच्या मते नट् धातू हा नृत् = नर्तन करणे, याचे प्राकृत रूप आहे. मांकड याच्या मते नृत् धातू प्राचीन असून, नट् धातू त्याच्या तुलनेने अलिकडचा आहे. काहींच्या मते हे दोन्ही धातू ऋग्वेदकालापासून प्रचलित आहेत. सायणाने आपल्या ऋग्वेद-भाष्यात नट् धातूचा अर्थ व्यापणे व नृत् धातूचा अर्थ गात्र-विक्षेप (अवयवसंचालन) असा दिला आहे (ऋ. ४. १०५. २३; १०.८.३ वरील सायणभाष्य). पण कालांतराने नट् धातूचा अर्थ अधिक व्यापक बनला आणि नृत् धातूच्या अर्थाशी जवळचा असलेला अभिनय हा अर्थ त्याला प्राप्त झाला. तात्पर्य, गात्रविक्षेपण व अभिनय या दोन्ही अर्थांनी नट् धातू प्रचलित झाला. पुढे नाचणे, अभिनय करणे, रूपे बदलणे, विकारप्रदर्शन, अवस्थांचे अनुकरण, जीवन चित्रण, इ. अनेक अर्थच्छटा त्याला प्राप्त झाल्या. नाट्य म्हणजे नटाची अभिनयकला. या अर्थाची अधिक फोड भरताने नाट्यशास्त्राच्या पहिल्याच अध्यायात केली आहे. तो म्हणतो—

त्रैलोक्यस्यास्य सर्वस्य नाट्यं भावानुकीर्तनम् ।

(ना. शा. १. १०६)

अर्थ — नाट्य म्हणजे या सर्व त्रैलोक्याच्या भावभावनांचे अनुकीर्तन (अनुकरणात्मक प्रकटीकरण) होय.

सागरनंदी या आचार्याने त्रैलोक्य या शब्दाऐवजी केवळ इहलोकींच्या मानवी सुख—दुःखांवर भर देऊन म्हटले आहे —

अवस्था या तु लोकस्य सुखदुःखसमुद्भवा ।

तस्यास्त्वभिनयः प्राज्ञैः नाट्यमित्यभिधीयते ॥

अर्थ — लोकांची सुखदुःखातून उत्पन्न होणारी जी अवस्था, तिचा अभिनय करणे याला विद्वान लोक नाट्य असे म्हणतात.

लोकवृत्ताचे अनुकरण असेही भरताने नाट्याबद्दल म्हटले आहे. सुखदुःखाने युक्त असा लोकस्वभाव नाटकात अभिनयाच्या द्वारे व्यक्त करायचा असतो. निसर्ग किंवा लोकस्वभाव हा मुख्य आधार धरून चार प्रकारच्या अभिनयांनी तो अतिसुरस आणि सुंदर करून कलात्मकतेने लोकांपुढे मांडणे म्हणजे नाटक होय, ही भरताची नाटकाविषयीची कल्पना आहे. धनंजयाने आपल्या दशरूपकात ' अवस्थानुकृतिर्नाट्यम् ' = मानवी अवस्थांचे अनुकरण म्हणजे नाट्य, अशी त्याची व्याख्या दिली आहे, ती भरताच्या मताला अनुसरणारीच आहे. कालिदासाने आपल्या मालविकाग्निमित्रात नाट्याचे जे वर्णन केले आहे, तेही भरतमताला अनुसरूनच आहे. तो म्हणतो—

त्रैगुण्योद्भवमत्र लोकचरितं नानारसं दृश्यते ।

नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ॥

अर्थ — नाट्यात सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांतून उद्भवणारे आणि नाना रसांनी युक्त असे लोकव्यवहार दिसतात आणि त्यामुळे नाट्य हे वेगवेगळ्या आवडी असणाऱ्या लोकांचे एकमेव मनोरंजनाचे साधन ठरते.

सर्वसाधारण प्रेक्षकांना आनंदाची उपलब्धी करून देणे, हे नाट्याचे प्रयोजन आहे. अभिनवगुप्ताच्या मते नाटक हे अशा प्रकारचे एक दृश्य काव्य आहे, की जे प्रत्यक्ष, कल्पना व अध्यव्यवसाय यांचा विषय बनते आणि सत्यासत्याने युक्त असे एक विलक्षण रूप धारण करून सर्वसाधारण प्रेक्षकाला आनंदाची उपलब्धी करून देते.

पण केवळ मनोरंजन हेच नाटकाचे प्रयोजन नव्हे, असेही भरताने सांगितले आहे. नाटकातले मनोरंजन हे धर्म आणि यश यांना धरून असले पाहिजे आणि ते चतुर्विध पुरुषार्थाचे साधक असले पाहिजे. नाटकात सर्व प्रेक्षकांना उपयुक्त होईल, असे विविध प्रकारचे साहित्य असते. शूरांना त्यातून उत्साह मिळतो, भीरूंना धार्ष्ट्य मिळते, कामीजनांना त्यात कामविषयक तृप्ती लाभते, विद्वानांना पांडित्य अनुभवाला येते आणि दुःखार्तांना दिलासा मिळतो. नाटक हे विरंगुळा देणारे असते, तसेच ते बोधप्रदही असते (ना. शा. २२.२८४).

नाटकाला दृश्यकाव्य अशी संज्ञा आहे; कारण ते दृश्यही असते आणि श्राव्यही असते. नाटकाच्या प्रेक्षकांना पात्रांचा अभिनय, घडणारे प्रसंग आणि रंगभूमीची सजावट या गोष्टी पाहायच्या असतात आणि पात्रांचे संवाद व इतर ध्वनी ऐकायचे असतात. त्यापैकी ज दृश्य असते, ते प्राधान्येकरून अभिनेय असते, त्या अभिनेय दृश्याला मूळचे नाव रूपक असे आहे. नटांनी राम—कृष्णादिकांची रूपे घ्यायची असतात व प्रेक्षकांनी त्या नटांवर रामकृष्णादिकांच्या रूपांचा आरोप करायचा असतो. म्हणजे नाटकात रामाचे किंवा कृष्णाचे काम करणारा नट हाच राम आहे किंवा कृष्ण आहे, असे समजायचे असते

नाटक हा एक असा साहित्यप्रकार आहे, की त्याचे मूल्यमापन रंगभूमीवर व्हायचे असते. रंगभूमी ही कालमानाप्रमाणे बदलणारी वस्तू आहे. लोकांची अभिरुची आणि तत्कालीन आर्थिक व्यवस्था यांच्या आधारावर रंगभूमीची निर्मिती होत असते. त्यामुळे नाटकाचे स्वरूपही सारखे बदलत राहते.

आपल्या देशात निर्माण झालेल्या प्राचीन संस्कृत नाटकांचे प्रयोग बव्हंशी राजप्रासादातच होत असत. सामान्य जनांपर्यंत त्या वेळचे नाटक पोचू शकत नसे. त्यामुळेच बहुधा नाटकांचे नायक हे धीरोदात्त असे राजेच असत. राजांची प्रेमप्रकरणे आणि त्यांचे पराक्रम हेच बहुधा नाटचाचे विषय असत. शृंगार आणि वीर याच दोन रसांचा मुख्यत्वे त्यात परिपोष असे. रंगभूमीला असे हे स्वाभाविक बंधन पडल्यामुळे प्राचीन संस्कृत नाटकांमध्ये विशेषसे परिवर्तन होऊ शकले नाही. त्यांची चाकोरी ठराविकच राहिली. भरतमुनीने नाटकाचे जे लक्षण एकदा करून ठेवले, त्याचाच कित्ता बहुतेक सर्व नाटककार गिरवीत राहिले.

पण राजप्रासादाच्या चार भिंतींच्या बाहेरही एका प्रकारचे नाटच चालू होते आणि ते बव्हंशी नृत्यात्मक होते. जत्रा, उत्सव, सार्वजनिक यात्रा, अशा प्रसंगी त्यांचे प्रयोग होत आणि समाजाच्या सर्व थरांतली जनता ते नृत्यनाटच मोठ्या आवडीने पाही. विश्वनाथाच्या कालापर्यंत अशा विविध नाटचप्रकारांचा बराच विकास झाला होता. त्यामुळे तत्कालीन साहित्यशास्त्रज्ञांना त्यांचा विचार करणेच भाग पडले. त्यांनी मग त्या त्या नाटचप्रकारांची तपासणी करून त्यांची लक्षणे निश्चित केली आणि त्यांना रूपके म्हणून नाटचशास्त्रात स्थान दिले. त्या रूपकांचे दहा प्रकार सांगितले आहेत, ते असे–

(१) नाटक (२) प्रकरण (३) भाण (४) व्यायोग (५) समवकार (६) डिम (७) ईहामृग (८) अंक (९) वीथी व (१०) प्रहसन.

नाटक हा वरील दहा रूपकांपैकी पहिला व महत्त्वाचा प्रकार होय. नाटक कशाला म्हणावे, याविषयी भरत म्हणतो –

देवतानां मनुष्याणां राज्ञां लोकमहात्मनाम् ।
पूर्ववृत्तानुचरितं नाटकं नाम तद् भवेत् ।।

अर्थ – देवता, मनुष्य, राजे व लोकप्रसिद्ध महात्मे यांच्या पूर्ववृत्ताचे अनुकरण म्हणजे नाटक होय.

यावर काही आचार्यांनी अशी शंका घेतली, की राजे–महाराजे व ऋषि–महात्मे यांच्या चरित्रावर अधिष्ठित असेल त्यालाच जर नाटक म्हणायचे, तर मग प्रबोधचंद्रोदयादी नाटकांत श्रद्धा, मोह, विरक्ती, काम, धर्म, विद्या, अविद्या, इ. भावपदार्थ पात्ररूपाने रंगभूमीवर येतात, अशा कृतींना काय म्हणायचे ? त्यावर दुसऱ्या आचार्यांनी तोड सुचवली, की अशा नाटकांना नाटकातला गौण प्रकार समजावा. संस्कृत नाटचसृष्टीत अशी नाटकेही बरीच आहेत. अश्वघोषकृत राजपुत्री या नाटकात बौद्ध धर्माच्या सिद्धान्तांनाच नाटकीय पात्रे बनवून रंगभूमीवर उपस्थित केले असून, त्यांच्या करवी बुद्धाचे गुणगाण केले आहे. जयंतकृत आगमडंबर या नाटकात क्षपणक, कापालिक, चार्वाक, मीमांसक; इ. तार्किक आचार्यांनी पात्ररूपाने रंगभूमीवर उपस्थित होऊन आपआपल्या मताचा पुरस्कार केला आहे. मोहपराजय, संकल्पसूर्योदय, पूर्णपुरुषार्थचंद्रोदय, चैतन्यचंद्रोदय, इ. संस्कृत नाटकेही याच प्रकारची आहेत. या सर्वांना गौण नाटके समजावे, असे नाटचशास्त्रज्ञ म्हणतात.

नाटकाचे एकंदर स्वरूप कसे असावे, याविषयी साहित्यदर्पणकार विश्वनाथाने जो तपशील सांगितला आहे, तो असा–

नाटकाचे कथानक रामायण-महाभारतादी ग्रंथांच्या द्वारे लोकांना पूर्वपरिचित असावे. ते मुखादी पंच संधींनी युक्त असावे. त्यात मानवी सुख-दुःखातून उद्‌भवणारे नाना रसांचे प्रसंग असावे. त्याच्या अंकांची संख्या पाच ते दहापर्यंत असावी. नाटकाचा नायक प्रख्यात वंशातील एखादा राजर्षी असावा. तो पराक्रमी व धीरोदात्त असावा. राम-कृष्णांसारखे दिव्य पुरुषही नाटकाचे नायक असायला हरकत नाही. नाटकात नायकाव्यतिरिक्त इतर चार–पाच प्रधान पात्रे असावी. नाटकात शृंगार किंवा वीर हा प्रधान रस असावा. नाटकाचा शेवट अद्‌भुत रसात व्हावा (सा. द. ६. ७–११).

नाटच विषयात दहा रूपके सांगितली आहेत, त्याचप्रमाणे अठरा उपरूपकेही सांगितली आहेत. दोन्ही मिळून नाटचाचे अठ्ठावीस प्रकार होतात.

कथा ही नाटकातील मुख्य वस्तू होय. एखाद्या कथेवरच नाटकाची उभारणी होत असते. नाटचकथा म्हणजे इतिवृत्त होय आणि ते नाटचाचे शरीर होय, असे भरतमुनीने म्हटले आहे.

**नाटचाची उत्पत्ती** — नाटचाचा उगम सर्व जगात एक धार्मिक कृत्य म्हणून झाला, असे अनेक विद्वानांचे मत आहे. काहींच्या मतानुसार नाटकाचा उगम ऋतुपरिवर्तन किंवा वर्षबदल या प्रसंगी आदिम मानवांच्याकडून केल्या जाणाऱ्या धार्मिक नृत्यगीतांतून झाला आहे. आजही आदिम–समाजात अशा प्रकारची नृत्य–गीतनाटचे होत असतातच. दुसऱ्या काही लोकांच्या मते नाटक हे मृत पूर्वजांच्या सन्मानासाठी निर्माण झाले. काही आदिवासी लोक आपला मृत पूर्वज परलोकी अमर व्हावा आणि त्याने आपल्या आप्तेष्टांवर सदैव कृपा ठेवावी, म्हणून नाटचाचे आयोजन करीत. काही समाज देवी

भगवतीच्या संतोषासाठी तिच्या वार्षिक उत्सवात नाटक करून दाखवीत. अजूनही ही चाल दक्षिणेत बऱ्याच ठिकाणी आहे. नाटकांना कोणत्या ना कोणत्या प्रकारे धार्मिक अंग असल्यामुळे ती एखाद्या देवस्थानामध्ये होत. देवस्थानातले पुरोहित आणि त्यांचे सहकारी ही नाटके करण्यात भाग घेत.

जगातल्या सर्व संस्कृतींनी आपापल्या गरजेनुसार नाटकांची निर्मिती केली आहे. ही नाटके लोकनाटचाच्या स्वरूपाची आहेत. ती बहुंशी सांप्रदायिक असून, पद्यात्मक किंवा गद्यात्मक आहेत. त्यांचा प्रयोग काही व्यक्ती किंवा व्यक्तिसमूह यांच्या द्वारे होत असतो. कळसूत्री बाहुल्या, छायाप्रतिमा, इ. गोष्टींच्या द्वारेही नाटकाचा उद्देश सफल केला जातो. त्यांचे साहित्यिक स्वरूप सामाजिक उद्दिष्टांनी प्रभावित असते. या नाटकासाठी काही विशेष नियमांचे बंधन नसते. बहुतेक अशा प्राचीन नाटकांत जीवनाचे वास्तविक अनुकरण पाहायला मिळत नाही. त्यात जीवनानुकरणाच्या ऐवजी काल्पनिक परिस्थितीचेच चित्रण केलेले असते. त्यातले अनुकरण हे समाजात रूढ असलेल्या प्रतीकवादाने प्रेरित असते. याचे सर्वांत मोठे उदाहरण म्हणजे ग्रीक नाटच हे होय. ग्रीक नटांनी सामान्य मनुष्याचे अनुकरण करण्याचा प्रयत्न केला नाही; तर जीवनाहूनही विराट अशा कोणत्यातरी काल्पनिक वस्तूचे अनुकरण करण्यात भूषण मानले. ग्रीकांप्रमाणेच बहुतेक प्राचीन नृत्यनाटचांतले नट नकली चेहरे लावून किंवा मुखवटे घालून कृत्रिम उपायांच्या द्वारे आपले शरीर अतिमानुष दिसावे, असा प्रयत्न करतात. कथकळी नृत्य हे त्याचे उदाहरण आहे. आपल्या रूपाने एखादी अतिमानवी शक्ती रंगभूमीवर आपल्या सामर्थ्याचे प्रदर्शन करीत आहे, असे प्राचीन नटांना दाखवायचे होते. या त्यांच्या अतिमानवी अभिनयाला धार्मिक वातावरणाचेही साहाय्य मिळत असे. मध्य युगातील नाटके ही सामान्यपणे अशाच प्रकारची असत.

भारतवर्षातली नाटचपरंपराही अतिप्राचीन आहे. भारतीय नाटचाचा उगम नक्की केव्हा झाला, हे जरी निश्चित सांगता येत नसले तरी तो वेदकालाहून प्राचीन आहे एवढे सांगता येते. भारतीय नाटचाचे साहित्यिक रूप ऋग्वेदातील संवादसूक्तांतून प्रथम निदर्शनास आले. ऋग्वेदात सरमा–पणी, यम–यमी, विश्वामित्र–नदी, अग्नी–देव, पुरूरवा–ऊर्वशी यांचे नाटचानुकूल असे सुंदर संवाद आहेत. वैदिक ऋषी त्या त्या व्यक्तीचा अभिनय करून ते संवाद म्हणत असावे, असे संशोधकांचे मत आहे. दहाव्या मंडलातल्या एकशे एकोणिसाव्या सूक्तात तर इंद्र सोमपानाने धुंद होऊन एकटाच बोलत आहे, असे दाखवले आहे. याला पाहिजे तर नाटचछटा असे म्हणावे. आठव्या मंडलातल्या तेहतिसाव्या सूक्तात आसंग प्लायोगी नावाच्या स्त्रीवेषधारी पुरुषाला इंद्र म्हणतो, की 'खाली पाहा. वर पाहू नकोस; पायाचे घोटे दिसू देऊ नकोस.' यात वेषांतर करणे या नाटचांगाचा स्पष्टच उल्लेख दिसतो.

अथर्ववेदाच्या नवव्या कांडाचे १३४ वे सूक्त हे खिलसूक्त आहे. त्यात कुमारी–ब्रह्मचारी यांचा संवाद आहे. तोही नाटचात्मक संवादच आहे. यजुर्वेदातील रुद्राध्यायात रुद्राला विश्वरूप म्हटले आहे. हा विश्वरूप म्हणजे अनेकांची रूपे घेऊन लोकांची करमणूक करणारा बहुरूपीच असला पाहिजे. त्याच अध्यायात रुद्राच्या घोर व शिव अशा दोन रूपांचा उल्लेख आहे. ही दोन रूपे एकाच शिवाची होत. भारतीय नाटचाचा आरंभ या रूपे बदलण्याच्या कलेतूनच झाला असला पाहिजे, असे म्हणतात.

भारतीय यज्ञसंस्थेतही अभिनयाला पुष्कळच स्थान मिळाले होते. यज्ञात काही ठिकाणी लौकिक घटनांचे अभिनयपूर्वक अनुकरण करायचे असते किंवा काही सामाजिक घटना लाक्षणिक रूपाने अभिनयपूर्वक सुचवायच्या असतात. यज्ञात अनेक ऋत्विजांची जी विविध कार्ये असतात, त्यांतही नाटच असते. या सर्व यज्ञसंस्थेतील क्रियांचा संबंध अप्रत्यक्षपणे नाटचसंस्थेच्या उगमाशी पोचतो. सोमयागात यजमान शूद्रापासून सोम विकत घेतो आणि नंतर त्याला काठीने हाकून देतो, असे वर्णन आहे. हेही एक नाटचच होय. या प्रसंगी सोमक्रयाच्या संबंधातच यजमान, विक्रेता व अध्वर्यू यांचे साभिनय संवाद होत असत. हे सुद्धा लोकव्यवहाराचे नाटचात्मक अनुकरण होय. महाव्रतयज्ञामध्ये नृत्य, वाद्य व पद्य यांना महत्त्वाचे स्थान होते. तिथे नृत्य करण्यासाठी नट-नटींना बोलावीत असत. ही मंडळी शूद्र असत.

काही पंडित भारतीय नाटचाचा उगम ग्रीक नाटकांपासून झाला, असे प्रतिपादितात. सिकंदराच्या स्वारीबरोबर अनेक ग्रीक कलाकार भारतात आले होते आणि त्यानंतर भारताच्या सीमेवर अनेक ग्रीक राज्येही नांदत होती. भारतीय कलाकार या ग्रीकांच्या संपर्कात आल्यावर त्यांनी आपली नाटचनिर्मिती ग्रीक तंत्राप्रमाणे केली असावी, असे त्यांचे मत आहे; पण ते सर्व पंडितांना मान्य नाही. भारतीय नाटचाची सामान्य शैली ग्रीक नाटचाहून अगदी भिन्न आहे.

वैदिक वाङ्मयात आढळणारे नाटचविषयक उल्लेख वेदोत्तर वाङ्मयात अधिकाधिक स्पष्ट होऊ लागतात. वाल्मीकिरामायणात (१.१८.१८) व महाभारतात (वन. १५.१४; शांति. ६९.५१ व ६०) नाटक शब्दाचा अर्थ पौराणिक व ऐतिहासिक उपाख्यान असाही आढळतो. रामायण–महाभारतातली आख्याने व उपाख्याने सूत लोक साभिनय गात असत. ते नृत्य-गीतनाटच

या कलांमध्ये कुशल असत. म्हणूनच यज्ञयागादी प्रसंगी याज्ञिक लोक त्यांना आवर्जून बोलावीत. हरिवंशातील विष्णुपर्वामध्ये तर एका परिपूर्ण नाट्यप्रयोगाचा उल्लेख आहे. तिथे प्रद्युम्न, सांब आणि गद या यदुपुत्रांनी रंभानलकूबर हे नाटक करून दाखवले, असे म्हटले आहे. एखादा महत्त्वाचा इष्ट हेतू साध्य करायला निघत असता देवाची कृपा संपादन करण्यासाठी महाभारतकाळी एखादे नाटक करीत, असेही दिसून येते. श्रीकृष्णाने वज्रनाभ दैत्याला मारण्यासाठी आपल्या पुत्रांना पाठविले होते. त्या कामगिरीवर निघण्यापूर्वी त्यांनी रामायणातील एका प्रसंगावर नाटक केले, असे हरिवंशावरून कळते.

भरतमुनी हा नाट्यशास्त्राचा प्रणेता होय. त्याने आपल्या पूर्वीच्या अमृतमंथन व त्रिपुरदाह या दोन नाटकांचा उल्लेख केला आहे. वात्स्यायनाच्या कामसूत्रात नाटकाख्यायिकादर्शनाचा उल्लेख सापडतो. तसेच पीठमर्द, विदूषक व चेट यांचाही निर्देश आढळतो. पाणिनी व पतंजली यांच्या व्याकरणग्रंथांतही नट, नाट्य आणि नाटक यांच्या अस्तित्वांची प्रमाणे उपलब्ध होतात. पतंजलीने बलिबंध व कंसवध या दोन नाटकांचा उल्लेख केला आहे. बौद्धांच्या अवदानसाहित्यातही नाट्यकलेचे निर्देश आढळतात. सोभावतीच्या राजापुढे दाक्षिणात्य नटांनी एका बौद्ध नाटकाचा प्रयोग करून दाखविला, असे तिथे म्हटले आहे.

**नाट्याधार** – संस्कृत नाटकातील इतिवृत्ताचे किंवा कथांचे आधार पुढीलप्रमाणे आहेत – रामायण, महाभारत; विष्णू, पद्म, वायू, भागवतादी पुराणे; गुणाढ्याची बृहत्कथा आणि उपलब्ध इतिहास. यांशिवाय काही कवींनी प्रचलित लोककथांतूनही आपल्या नाट्यवस्तूची निवड केलेली दिसते. विशेषतः व्यायोग, डिम, ईहामृग, इ. रूपकांना अशा तऱ्हेच्या लोककथांचा आधार घेतलेला दिसतो. प्रकरण, नाटिका, इ. काही रूपकांत कवींना काल्पनिक कथानके रचण्याची मुभा दिलेली असली, तरी प्रायः वरील रूपकांच्या लेखकांनीहि गुणाढ्याच्या बृहत्कथेचा आधार घेतलेला आहे. वर जे ग्रंथ नाट्यकथांचे आधार म्हणून सांगितले, त्यांतून कोणी कोणी कोणकोणती नाटके लिहिली, त्याचा तपशील डॉ. के. ना. वाटवे यांनी दिला आहे, तो असा–

(१) रामायण– भासकृत अभिषेक आणि प्रतिमा; भवभूतिकृत महावीरचरित व उत्तररामचरित; यशोवर्माकृत रामाभ्युदय; मायुराजकृत उदात्तराघव; दिङ्नागकृत कुंदमाला; मुरारीकृत अनर्घराघव, हनुमन्नाटक, बालरामायण; राजशेखरकृत दूतांगद; आणि जयदेवकृत प्रसन्नराघव. याशिवाय इतर काही रूपकेही रामायणावर आधारलेली आहेत.

(२) महाभारत– भासकृत पंचरात्र, मध्यमव्यायोग, दूतवाक्य, दूतघटोत्कच, कर्णभार व ऊरुभंग; कालिदासकृत शाकुंतल; भट्टनारायणकृत वेणीसंहार; राजशेखरकृत बालभारत; क्षेमीश्वरकृत नैषधानंद. हरिवंशावर भासाचे बालचरित आधारलेलें आहे. याशिवाय काही रूपकेही भारताश्रित आहेत.

(३) बृहत्कथा– गुणाढ्याची बृहत्कथा ही अनेक नाट्यकथांची आणि काव्यांची एक समृद्ध खाणच आहे. भास हा बृहत्कथापूर्व ठरला, तर त्याची उदयनविषयक दोन नाटके– प्रतिज्ञायौगन्धरायण व स्वप्नवासवदत्त ही बृहत्कथेत आलेल्या मूळ लोककथांवरून लिहिली गेली असली पाहिजेत, असे म्हणावे लागेल. उदयनकथा कथासरित्सागरात आहे. त्यामुळे भासाच्या बाबतीत जरी हा आधार संशयित असला, तरी खालील नाटकांना मात्र बृहत्कथेचाच आधार आहे–

हर्षाचे नागानन्द, प्रियदर्शिका व रत्नावली (वंधुमतीकथासाम्य), कालिदासाचे मालविकाग्निमित्र (वंधुमतिकथासाम्य), मृच्छकटिक (अंशतः कुमुदिकाकथा साम्य), भवभूतीचे मालतीमाधव आणि विशाखदत्ताचे मुद्राराक्षस (नन्दकथा साम्य). नंदकथा बृहत्कथेतच असल्याचे दशरूपकाचा टीकाकार म्हणतो. अनंगहर्षाचे तापसवत्सराजचरित हे अभिनवगुप्ताने ध्वन्यालोकलोचनात उल्लेखिलेले नाटकही बृहत्कथेवरच आधारलेले आहे.

(५) इतिहास–प्राचीन भारतात ज्याला शुद्ध इतिहास म्हणतात त्याची साधने फारशी उपलब्ध नव्हती. सर्व पौराणिकच मानले जाई. पण हल्ली उपलब्ध झालेल्या साधनांवरून काही प्राचीन इतिहास उपलब्ध झाला आहे. त्या दृष्टीने पाहिल्यास कालिदासाचे मालविकाग्निमित्र व विशाखदत्ताचे मुद्राराक्षस आणि देवीचन्द्रगुप्त ही तीन नाटके ऐतिहासिक आधारावर रचलेली मानावी लागतील. अग्निमित्राचा पिता पुष्पमित्र याचा इतिहास उपलब्ध आहे (इ. स. पूर्वी १८३ ते १४७). तीच गोष्ट मुद्राराक्षसांतील मौर्य चन्द्रगुप्ताची (चंद्रगुप्तकाल सनपूर्व चौथे शतक). देवीचन्द्रगुप्त हे द्वितीय चंद्रगुप्ताच्या जीवनावर आहे (इ. स. ३८० ते ४१३).

(६) लोककथा – भासाची अविमारक व चारुदत्त ही दोन नाटके लोककथेवर आधारलेली आहेत–

(७) कल्पित– केवळ कल्पनेवर आधारलेली कृष्णमिश्राच्या प्रबोधचन्द्रोदयासारखी आध्यात्मिक रूपकात्मक नाटके.

इ. स. च्या पहिल्या शतकात अश्वघोष हा कवी होऊन गेला. त्याचे सारीपुत्रप्रकरण नामक एक नाटक मध्य आशियात तुर्फान येथे सापडले आहे. भास कवीचीही अशीच तेरा नाटके अलिकडे उपलब्ध झाली आहेत. काही पंडित भासाचा काळ सनपूर्व तीनशे वर्षे हा ठरवतात, तर श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

त्याला अश्वघोष व कालिदास यांच्यामध्ये बसवतात यावरून इ. स. च्या दुसऱ्या – तिसऱ्या शतकापर्यंत भारतात संस्कृत नाटक ही संस्था स्थिर झालेली होती, असे म्हणायला हरकत नाही.

**संस्कृतातील काही प्राचीन नाटककार–** ज्यांच्या नाट्यकृती उपलब्ध झाल्या आहेत, अशा नाटककारांपैकी भास हा आद्य नाटककार असे म्हटले तरी चालेल. तो कालिदासाच्या पूर्वी होऊन गेला. कालिदासही त्याचा आदरपूर्वक उल्लेख करतो. स्वप्नवासवदत्त हे त्याचे नाटक अनेक गुणांनी श्रेष्ठ व सरस गणले जाते. इ. स. १९१२ सालापर्यंत त्याचे एकही नाटक प्रत्यक्ष उपलब्ध नव्हते; पण त्या साली तिरुअनंतपुरम येथे श्री. गणपतिशास्त्री यांना ताडपत्रांवर लिहिलेली भासाची तेरा नाटके सापडली आणि विद्वान व रसिक आश्चर्यचकित झाले. भासाचे काही नाट्यगुण इतके श्रेष्ठ होते, की त्यांचा पुढील नाटककारांवर प्रभाव पडल्यावाचून राहिला नाही. शूद्रकाचे मृच्छकटिक हे भासाच्या चारुदत्तावरूनच लिहिलेले आहे. कालिदास, भवभूती आणि हर्षवर्धन या तीन्ही श्रेष्ठ नाटककारांवरही भासाची छाप पडलेली दिसते. यावरून भास हा पुढील नाटककारांचा स्फूर्तिदाताच ठरला, असे म्हणायला हरकत नाही.

कालिदास हा भासानंतरचा नाटककार असला, तरी गुणदृष्ट्या तो पहिला ठरतो. शाकुंतल, विक्रमोर्वशीय व मालविकाग्निमित्र या त्याच्या तीन नाटकांपैकी पहिली दोन नाटके प्रेम–साहसकथा या दृष्टीने उत्कृष्ट आहेत. शूरत्व व दिव्यत्व या दोन गुणांचा त्यात संगम झाला आहे. मालविकाग्निमित्र या नाटकात राजाच्या अंतःपुरातील प्रेमविषयक उलाढाली वर्णिलेल्या आहेत. भारतीय वाङ्मयात सामान्यपणे दुर्लभ असलेल्या प्रमाणबद्धतेचा आणि संयमित आविष्काराचा गुण कालिदासात उत्कटत्वाने प्रतीत होतो. समृद्ध कल्पनाविलास, नाजूक भावनांचा अविष्कार आणि निसर्गाबद्दल प्रेम या गोष्टी कालिदासाच्या नाटकांत ठायी ठायी प्रतीत होतात.

त्यानंतरचा सुप्रसिद्ध नाटककार म्हणजे शूद्रक होय. त्याचे मृच्छकटिक नाटक सार्वकालिक लोकाभिरुचीला पात्र ठरले आहे. नाट्यशास्त्राची विहित मर्यादा उल्लंघून त्याने हे नाटक रचले आहे. यातील नायिका ही गणिका असून, नायक ब्राह्मण व्यापारी आहे. त्यामुळे भरतमुनीच्या नाट्यनियमांत हे नाटक बसत नाही.

इ. स. च्या सातव्या शतकातला हर्षवर्धन हा नाटककार कनौजचा सम्राट होता. त्याने रत्नावली, प्रियदर्शिका आणि नागानंद अशी तीन नाटके लिहिली. त्याच्या रत्नावली नाटकावर मालविकाग्निमित्र या नाटकाची छाया पडली आहे. या नाटकातील स्वभावचित्रे त्याने व्यवस्थितपणे रेखाटली आहेत. त्याच्या नागानंद नाटकावर बौद्ध धर्माची खोल छाप उमटली आहे.

कालिदासाच्या जोडीने ज्याचे नाव घेतले जाते, असा प्रथितयश नाटककार म्हणजे भवभूती होय. मालतीमाधव, उत्तररामचरित व महावीरचरित ही त्याची तीन नाटके उपलब्ध आहेत. भवभूती हा गंभीर स्वभावाचा नाटककार आहे. नाजूक व सौम्य भावनांच्यापेक्षा भव्य व उदात्त भावनांचे आविष्करण त्याला प्रिय वाटते. नाटकरूप काव्य या दृष्टीने महावीरचरित व उत्तररामचरित ही दोन्ही नाटके महत्त्वाची असली, तरी त्यांत रंगभूमीला आवश्यक अशा हालचाली कमी आहेत. त्यामुळे त्यांचे प्रयोग यशस्वी ठरले नाहीत. भवभूती हा करुण रसाला अग्रमान देणारा कवी आहे. त्याच्याइतके कारुण्याचे यथार्थ स्वरूप कोणालाच प्रकट करता आले नाही.

इ. स. च्या आठव्या शतकात विशाखदत्त हा आणखी एक प्रसिद्ध नाटककार होऊन गेला. मुद्राराक्षस हे त्याचे यशस्वी आणि आकर्षक असे नाटक होय. या नाटकात प्रेमकथेला थारा नाही. यात रंगवले आहे, ते तत्कालीन राजकीय जीवन. आर्य चाणक्याने चंद्रगुप्ताच्या हितासाठी पूर्वीच्या पदच्युत नंद राजाच्या राक्षस नामक मंत्र्याला आपल्याकडे वळवण्यासाठी अनेक हिकमती कशा लढवल्या, ते या नाटकात दाखवले आहे. आरंभापासून अखेरपर्यंत मन वेधून ठेवणारे असे हे नाटक आहे.

भट्टनारायण हा वेणीसंहार नाटकाचा कर्ता आहे. महाभारतातील भीमकृत दुःशासनवधाच्या कथेवर ते नाटक आधारलेले आहे.

राजशेखर हा नाटककार इ. स. च्या दहाव्या शतकात होऊन गेला. बालरामायण, बालभारत, विद्धशालभंजिका आणि कर्पूरमंजरी ही त्याची चार नाटके प्रसिद्ध आहेत. संस्कृत, प्राकृत व त्याच्या काळी बोलल्या जाणाऱ्या इतर भाषा यांच्यावर त्याचे विलक्षण प्रभुत्व होते. त्याने विविध वृत्ते सहजपणे खेळवली आहेत. प्रादेशिक भाषांतले शब्द आणि वाक्प्रचार यांचा वापर करण्यात त्याचा हातखंडा होता.

कृष्णमिश्र या नाटककाराने लिहिलेले प्रबोधचंद्रोदय नामक नाटक अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण आहे. नाटकमय काव्य या दृष्टीने त्याचे महत्त्व आहे. हे नाटक प्रयोगक्षम नसले, तरी त्याने उच्च धार्मिक विचार आणि गंभीर तत्त्वज्ञान यांचा काव्यमय आविष्कार करण्यात मिळवलेले यश दृष्टिआड करता येत नाही. यातील पात्रे मानवी नसून भावरूप आणि प्रतीकात्मक आहेत. आध्यात्मिक भावनांना रूपकाच्या द्वारे मूर्तिमंत करून त्यांचा परस्परसंबंध या नाटकात चांगल्या रीतीने दाखवलेला आहे. विष्णुभक्तीचा महिमा स्थापित करणे, हा या नाटकाचा उद्देश आहे. कृष्णमिश्र इ. स. ११०० च्या सुमारास होऊन गेला.

नाटक हे माणसांच्या अंतर्बाह्य क्रिया-प्रतिक्रियांच्या द्वंद्वाचे दर्शन आहे, ही नाटकाविषयीची आधुनिक कल्पना पूर्वीच्या काळी नव्हती. भारतीय नाटककारांची आणि नाट्यशास्त्रज्ञांची त्याविषयीची धारणा अशी – मूळ जीवन स्थिर व अचल असून, त्यात होणारे बदल वरवरचे व तात्पुरते आहेत. नाटककाराने त्यांना महत्त्व देऊ नये. त्याने रज–तमांना दूर करून सत्त्वाचेच दर्शन घडवावे. जीवनाच्या मूलभूत आनंदमयतेचे हे दर्शन उज्ज्वल व चित्ताकर्षक करण्यासाठी सुंदर चित्रांच्या गडद पार्श्वभूमीप्रमाणे आवश्यक तेवढी दुःखे व संकटे नाटकात दाखवली म्हणजे पुरे. कारण नाट्यकला ही केवळ मनोरंजनासाठी नाही, त्याचप्रमाणे ती वास्तवाच्या नग्नप्रदर्शनासाठीही नाही. हितोपदेश हे तिचे एक महान प्रयोजन आहे. जगात सुख-दुःखांची द्वंद्वे एकमेकांवर आघात करीत असली, तरी त्यांच्या बुडाशी असलेले कूटस्थ चैतन्य अविकारी आणि आनंदमय असेच आहे. नाटककाराने हा सिद्धान्त दृष्टिआड होऊ देऊ नये. नाटक पाहिल्यावर जीवनविषयक श्रद्धा वाढावी, नैराश्य दूर पळावे, दुर्गुणांचा पराजय व्हावा, सद्गुणांचा जय व्हावा आणि नाट्यकलाकृतीचा आस्वाद घेतल्यानंतर शेवटी अंतःकरण सुप्रसन्न व्हावे, अशी अपेक्षा असते. म्हणूनच संस्कृत नाटकात अशुभनिवारणासाठी नांदीची योजना असते आणि शेवटी भरतवाक्यात समस्त लोकांच्या कल्याणांचा उच्चार केलेला असतो. पाहा– नाट्यगृह, नाट्यशास्त्र. [ सं. ना. सौं.; वै. सं. वि; . हिं. सा. को.]

**नाटी** एक लोकनृत्य. हे नृत्य कुलू खोऱ्यात प्रचलित आहे. या नृत्यात अनेक नर्तक भाग घेतात. यासाठी मोठे नृत्यांगण तयार करतात. भडक वीरवेष करून व हाती तलवार घेऊन नर्तक लोक नृत्यांगणात उतरतात. ढोल आणि नरसिंगे ही वाद्ये या नृत्याला साथ करतात. त्या वाद्यांच्या तालावर नर्तकांच्या तलवारी हवेत चमकू लागतात. प्रथम सगळे नर्तक फेर धरून नाचतात. नृत्याची लय वाढल्यावर ते दोन दलांत विभक्त होतात आणि परस्परांवर शस्त्राघात करण्याचा अभिनय करतात. काहींच्या एका हाती तलवार व दुसऱ्या हाती ढाल असते. काहींच्या दोन्ही हातांत तलवारी असतात; तर काहींनी दोन्ही हातांतील तलवारींबरोबर दातांतही एक तलवार धरलेली असते.

नृत्याचा हा पहिला भाग संपताच नर्तक आपापली शस्त्रे खाली ठेवतात आणि दोन-दोन, चार-चार असे गट करून धिम्या गतीने नाचू लागतात. या वेळी ते तोंडाने युद्धगर्जना करतात. हा या नृत्याचा दुसरा टप्पा होय.

त्यानंतर नर्तक फिरून मंडलाकार होतात. या वेळी वादक लोक रिंगणात खाली बसतात. नर्तक एकमेकांचे हात पकडून त्यांच्याभोवती विशिष्ट लयीत आपले अंग हालवीत राहतात आणि गीते गातात. हा तिसरा टप्पा होय.

चौथ्या टप्प्याला सर्व नर्तक पुनः तलवारी हाती घेतात आणि द्रुत गतीने मंडलाकार नाचतात.

पाचव्या टप्प्याच्या वेळी मध्ये बसलेले वादक उठतात आणि तेही वाद्ये वाजवीत नृत्यात सामील होतात. या वेळी काही वादक ढोल डोक्यावर घेऊन वाजवितात, तर काहीजण आवेशात आल्यासारखे करून तो वर फेकतात आणि झेलतात. मग काही वेळ वादक शांत राहतात आणि नर्तक साथीविनाच नाचत राहतात. नृत्य संपण्याच्या वेळी वादक पुनश्च वाद्ये वाजवतात आणि नर्तक एका ओळीत होऊन नृत्यांगणातून मागे जातात. [ भा. लो. नृ.; पं. जी. सा.; ए. हो. रा. ]

**नाट्यगृह** नाट्य, नृत्य, गायन, इ. कार्यक्रमासाठी बांधलेले विशिष्ट पद्धतीचे प्रेक्षागृह. याचे रंगभूमी व प्रेक्षागार असे दोन भाग असतात. याची रचना गोल, अर्धगोल, चौकोनी, त्रिकोणी अशी विविध प्रकारची असते. अभिनवगुप्ताने नाट्यगृहाचे एकूण अठरा प्रकार सांगितले आहेत.

नाटकाचा व नाट्यगृहाचा अत्यंत निकट संबंध आहे. नाटक हे एक दृश्य व श्राव्य काव्य असते. नाटकात भाषेला व अभिनयाला जितके महत्त्व असते, तितकेच देखाव्यालाही असते.



नाट्यप्रयोग

नाट्यकथेतील पुष्कळ भाग प्रेक्षकांपुढे साकार करावा लागतो. नाटक कितीही चांगले लिहिलेले असो व अभिनय कितीही

उत्कृष्ट असो; पण नाटक परिणामकारक होण्यासाठी त्यातील दृश्ये सुबद्ध अशा रंगभूमीवर उभी करावी लागतात. ते काम एखाद्या मंडपात अथवा मोकळ्या पटांगणात चांगले होऊ शकत नाही. म्हणूनच नाटक यशस्वी होण्यासाठी चांगल्या नाट्यगृहाची आवश्यकता असते.

भारतात प्राचीन काळीच सुसज्ज नाट्यगृहे बांधण्याची कला अवगत होती, असे दिसून येते. संस्कृत नाट्यविषयक ग्रंथांत नाट्यगृह, नाट्यमंडप, प्रेक्षागृह, प्रेक्षागार, इ. शब्द आढळतात. काही पाश्चिमात्य विद्वानांचे असे मत आहे, की भारताने नाट्यगृहांची कल्पना ग्रीकांपासून घेतली; कारण त्यापूर्वीची नाटके बहुधा देवालयांत किंवा राजदरबारांत केली जात. पण भरताच्या नाट्यशास्त्रात नाट्यमंडपाचे विविध प्रकार सांगितलेले असून, ते कसे बांधावे याचेही सूक्ष्म वर्णन केलेले आहे. त्यावरून भरताच्या काळातच नाट्यगृहाची कल्पना परिणत झालेली होती, असे दिसून येते. सिरगुजा संस्थानातील लक्खनपूर जिल्ह्यात राजगढ नामक डोंगरात सीताबेंगा नावाची एक गुहा आहे. त्या गुहेचा आकार अर्धवर्तुलाकृती असून, आत एकावर एक अशा चढत्या पायऱ्या आहेत. त्या गुहेची रचना आणि तिच्या जवळच्या जोगिमारा नामक गुहेतील लेख यांवरून सीताबेंगा ही गुहा नाट्यदर्शनासाठी खोदलेली होती, असे ठरते. ही गुहा सनपूर्व तिसऱ्या शतकातली आहे आणि



सीताबेंगा गुहा

ग्रीक नाट्यगृहांशी तिचे काहीही साम्य नाही. त्यापूर्वी शे-दीडशे वर्षे म्हणजे ग्रीकांचा विशेष संबंध येण्याच्या आधीच भारतात स्थावर अशी नाट्यगृहे होती, असे निश्चितपणे म्हणता येते.

**नाट्यगृहांचे प्रकार–** भरताने नाट्यगृहांचे विकृष्ट, चतुरस्र व त्र्यस्र असे तीन प्रकार आणि त्या तीन्ही प्रकारांचे प्रत्येकी ज्येष्ठ, मध्यम व कनिष्ठ असे तीन भेद सांगितले आहेत. त्यांचे वर्णन नाट्यशास्त्रात केलेले आहे, ते असे–

**विकृष्ट –** याची पूर्व-पश्चिम लांबी चौसष्ट हात व रुंदी बत्तीस हात असे. याच्या चारही कोपऱ्यांत चार मजबूत खांब उभारीत व त्यांना शुभ्र, रक्त, पीत व नील हे रंग देत. नाट्यशास्त्रात या स्तंभांना ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र म्हटले आहे. त्या त्या वर्णाच्या माणसांची त्या त्या ठिकाणी नाट्यगृहाच्या रक्षणार्थ योजना करीत, असा त्याचा अर्थ संभवतो. नाट्यगृहे पूर्वाभिमुख असून, पूर्वेकडील अर्धा भाग प्रेक्षकांसाठी असे. उरलेल्या भागाचा अर्धा भाग रंगभूमी व अर्धा भाग नेपथ्यभूमी यांसाठी राखून ठेवीत. रंगभूमीचे पुन्हा दोन सारखे भाग पाडीत. त्यांतील प्रेक्षागृहाला लागून असलेल्या भागाला रंगपीठ व मागच्या भागाला रंगशीर्ष म्हणत. रंगपीठाच्या दोन्ही बाजूंना आठ चौरस हातांची जागा सोडीत व त्या जागेच्या चारही कोपऱ्यांवर चार उंच खांब उभारून त्यांवर लहान मनोरे बांधीत. या मनोऱ्यांना मत्तवारणी म्हणत. रंगपीठ जमिनीपासून दीड हात उंच असे.




लंबचौकोनी नाट्यगृह

रंगशीर्षाच्या चारही कोपऱ्यांवर चार स्तंभ व दोन्ही बाजूंच्या मध्यावर दोन स्तंभ असत. या स्तंभांवर प्रासादाचा दर्शनी भाग, गच्ची वगैरे गोष्टी दाखवीत. नेपथ्यभूमी व रंगशीर्ष यांमध्ये भिंत असून, तीत दोन दारे असत. या दारांच्या मधल्या जागी भिंतीजवळ गायक-वादक बसण्याची सोय असे. रंगशीर्षातील लाकडी खांबावर पाने, फुले, सर्प अशी सुंदर नक्षी कोरलेली असे. भिंतीही गुळगुळीत करून रंगवलेल्या व सुंदर चित्रांनी सजवलेल्या असत.

रंगपीठ व प्रेक्षागार यांत चार हात अंतर असे. प्रेक्षागार प्रवेशद्वारापर्यंत दीड हात उंच होईल, असे चढते केलेले असे. या प्रकारातील ज्येष्ठ गृहाची लांबी एकशेआठ हात व कनिष्ठ गृहाची लांबी बत्तीस हात असावी असे म्हटले आहे.

चतुरस्र – यातील कनिष्ठ प्रकाराचे वर्णन भरताने केले आहे, ते असे– बत्तीस हातांचे चौरस क्षेत्र घेऊन त्याचे चार हात लांब रुंद असे चौसष्ट भाग करावे. अगदी मध्यमागी असलेल्या चार भागांत आठ हात लांबी-रुंदीचे रंगपीठ व त्याच्या पश्चिमेला तेवढेच रंगशीर्ष ठेवावे. त्याच्या मागे नेपथ्यगृह असावे. बाकीची रचना विकृष्ट नाट्यगृहाप्रमाणेच असावी.

त्र्यस्र– हे त्रिकोणी असून, त्याचे चौसष्ट सारखे त्रिकोणी भाग पाडावेत. मध्यभागीं असलेल्या चार त्रिकोणांचे रंगपीठ, त्याच्या पश्चिमेकडील पाच त्रिकोणांचे रंगशीर्ष आणि त्याच्या मागे सोळा त्रिकोणांचे नेपथ्यगृह ठेवावे. इतर रचना चतुरस्र गृहाप्रमाणेच असावी.

नाट्यगृहात पडदा लावण्याची पद्धती प्राचीन काळापासून आहे. संस्कृतात पडद्यासाठी जवनिका हा शब्द वापरलेला आढळतो. रंगपीठ व रंगशीर्ष यांच्यामध्ये एक पडदा असे. रंगभूमींवर उभे दोन पडदे घालून रंगभूमीचे तीन भाग करण्याची प्रथा होती. या भिन्न विभागांत निरनिराळी पात्रे असत. प्रेक्षकांना तीन्ही विभाग दिसत, पण एका भागातील पात्रांचे बोलणे चालणे दुसऱ्या भागातील पात्रांना कळत नसे. रंगशीर्ष




त्रिकोणी नाट्यगृह

व रंगपीठ यांच्या बाजूंना कक्षा असत व तिथे पडदे लावीत. त्या पडद्यांवर निरनिराळे देखावे असत. सरकत्या पडद्यांची सोयही त्या काळी केलेली असावी. कारण पडदा दूर सारून त्याच्या मागचे दृश्य प्रेक्षकांना दाखविणे, हे देखील केव्हा केव्हा आवश्यक असे.




अर्धवर्तुळाकार नाट्यगृह

प्राचीन काळी देवालये व राजप्रासाद यांना जोडून नाट्यगृहे बांधलेली असत; त्याचप्रमाणे स्वतंत्रपणेही ती बांधली जात. संगीतचूडामणी, मानसार, इ. ग्रंथांत नाट्यगृहांचे वर्णन केलेले आहे. त्यांची मोजमापे नाट्यशास्त्रातील मोजमापांहून वेगळी आहेत. त्या काळातील नाट्यगृहांच्या रचनेत ध्वनिशास्त्र, प्रकाश, वायुवीजन, सुरक्षितता, इ. सर्व अंगांचा विचार केलेला असे. [ म० ना. शा.; सं. ना. सौं.; एन्सा. हिं. आ. ]

**नाट्यरासक** नाटचाचा दशरूपकांहून भिन्न असा एक प्रकार. यात एक अंक, उदात्तनायक, पीठमर्द उपनायक, शृंगार व हास्य हे रस, नायिका वासकसज्जा आणि मुख व निर्वहण हे दोन संधी असतात. काही विद्वान यात प्रतिमुख संधी वगळून इतर चार संधी असल्याचेही मानतात. यात गेय पद, आसीन, स्थित पाठ्य, पुष्पगंडिका, प्रच्छेदक, त्रिगूठक, सैंधव, द्विगूढ, उत्तमोत्तमक व उक्त–प्रयुक्त अशा दहा अंगांची योजना असते. विलासवती, नर्मवती व भारतदुर्दशा ही नाट्यरासकांची उदाहरणे होत. [ हिं. सा. को. ]

**नाट्यशास्त्र** नाटक म्हणजे काय, त्याची अंगे कोणती, त्यातले रसभाव कोणते, त्याचे प्रकार किती, नाटकाचे प्रयोजन काय, इ. विषयांची चर्चा करणारे व नाट्यविषयक सिद्धान्त प्रस्थापित करणारे शास्त्र ते नाटशास्त्र होय.

विश्वकर्मा, शौनक, कोहल, वत्स, शांडिल्य, धूर्तिल, स्वाती,

नारद, पुष्कर, शिलाली, नंदी, धनंजय, भोज, शारदातनय, रामचंद्र – गुणचंद्र, विश्वनाथ, शिंगभूपाल, लोल्लट, शंकुक, उद्भट, भट्टनायक, अभिनवगुप्त, इ. भरतमुनीच्या मागच्या व पुढच्या साहित्यशास्त्रज्ञांनी नाटयाची चर्चा केली आहे.

पण या सर्व साहित्यशास्त्रज्ञांच्या मेळाव्यात भरतमुनी हा अग्रगण्य ठरतो. त्याचे नाटयशास्त्र हा नाटयशास्त्रावरचा प्रमाणग्रंथ मानला गेला आहे. शास्त्र या दृष्टीने नाटयाच्या सर्व अंगांचा विचार भरतमुनीने केला आहे.

नाटयशास्त्राचा उगम कसा झाला व नाटकाचा पहिला प्रयोग केव्हा झाला, याविषयी भरतमुनीने जी कथा सांगितली आहे, ती अशी –

त्रेतायुग सुरू झाले होते. लोकांत रजोगुण बळावू लागला होता. लोकांच्या मनावर काम, क्रोध, लोभ, इ. विचारांचा पगडा बसू लागला होता. त्यामुळे त्यांना सारखे सुख–दुःखाचे हेलकावे बसत होते. अशा स्थितीत एके दिवशी इंद्रादी देव ब्रह्मदेवाकडे गेले व त्याला म्हणाले. ' भगवन सध्याच्या परिस्थितीत जे दृश्य व श्राव्य असेल, असे एखादे करमणुकीचे साधन आम्हांला हवे आहे. वेद हे केवळ त्रैवर्णिकांसाठीच आहेत, म्हणून ज्याचा शूद्रांनाही अधिकार प्राप्त होईल, असा सर्ववर्णसमावेशक पाचवा वेद तुम्ही आम्हांला निर्माण करून द्यावा. ' देवांची ही विनंती ब्रह्मदेवाने मान्य केली. त्याने ऋग्वेदातून पाठय ( पात्रांनी बोलायचे संवाद ) घेतले, सामवेदातून गीत घेतले, यजुर्वेदातून अभिनय घेतला, अथर्ववेदातून रस घेतला आणि अशा प्रकारे चारही वेदांतून नाटयवेद नावाचा पाचवा वेद निर्माण केला. हा वेद सर्व लोकांच्या आचार–विचार–विकारांचा दर्शक, सर्वशास्त्रसंपन्न, सर्वशिल्पसमावेशक व मागील इतिहास सांगून पुढील लोकांना मार्गदर्शन करणारा असा ठरला.

हा नाटयवेद निर्माण झाल्यावर तदनुसार एका नाटकाचा रंगभूमीवर प्रयोग करण्याचे काम ब्रह्मदेवाने भरतमुनीकडे सोपविले. भरतमुनीला शंभर पुत्र होते. त्या सर्व पुत्रांचा त्याने नाटयप्रयोगाच्या कामी उपयोग करून घेतला. त्यासाठी भरताने शंकराकडून तांडवनृत्य मिळविले, पार्वतीकडून लास्य मिळविले व विष्णूकडून चार नाटयवृत्ती प्राप्त करून घेतल्या. भरताला त्या कामी गंधर्व–अप्सरांचेही सहकार्य मिळाले. विश्वकर्म्याने त्याला नाटयगृह निर्माण करून दिले. मग या दिव्य सामग्रीने युक्त असा पहिला प्रयोग भरताने इंद्रध्वज उत्सवाच्या वेळी केला. त्यात देवासुरांचे युद्ध दाखवून शेवटी असुरांचा पराजय दाखवला होता. सुरासुरांनी ते नाटक पाहिले. देवांना आनंद झाला; पण दैत्यांना त्यांच्या पराजयामुळे दुःख झाले. दैत्यांनी ब्रह्मदेवाकडे तक्रार केली. त्या वेळी ब्रह्मदेव त्या असुरांना म्हणाला –

' असुर हो, मला कोण्या विशिष्ट पक्षाचा जय–पराजय दाखवायचा नाही. सृष्टीत शुभही असते; अशुभही असते. चांगले असते; वाईटही असते. ते सर्व असेल तसे या नाटयात दाखविले आहे. सर्व त्रैलोक्यात आढळणाऱ्या सर्वसामान्य भाव–भावनांचे सर्वसामान्य दर्शन मला घडवायचे आहे. यात विशिष्ट किंवा वैयक्तिक काही नाही. या ठिकाणी कधी धर्म असेल, तर कधी अधर्म असेल. कधी हास्य असेल, तर कधी युद्ध असेल. कधी आनंद असेल, तर कधी दुःख असेल. अशा तऱ्हेने ज्यात सर्व लोकप्रवृत्तींचे प्रतिबिंब पडले आहे व ज्यात सर्व अवस्था समाविष्ट आहेत, असे नाटय मी सर्व लोकांकरिता निर्माण केले आहे. '

ते ऐकून दैत्यांचा राग शांत झाला व तो पहिला नाटयप्रयोग शांततेने पार पडला. त्या नाटयप्रयोगाचा असा पौराणिक थाटाचा वृत्तान्त भरताने पहिल्या अध्यायात दिला आहे. त्यात चारही वेद व ब्रह्मा, विष्णू, महेश हे तीन्ही मोठे देव यांच्याशी संबंध जोडून या पाचव्या नाटयात्मक वेदाला दिव्य स्वरूप देण्याचा त्याने प्रयत्न केला आहे.

**नाटयाची व्याख्या** – भरताने नाटयाची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे –

**योऽयं स्वभावो लोकस्य सुखदुःखसमन्वितः ।**
**सोऽङ्गाद्यभिनयोपेतो नाटयमित्यभिधीयते ॥**

( ना. शा. १.११९ )

अर्थ – या जगात सुखदुःखांनी युक्त असा लोकस्वभाव दिसून येतो. तोच अंगादी अभिनयांनी युक्त असला म्हणजे त्याला नाटय असे म्हणतात.

नाटय ही भाव आणि अवस्था यांची अनुकृती आहे. या अनुकृतीत सौंदर्यव्यापारही अभिप्रेत आहे. लोकवृत्तात दिसून येणाऱ्या भाव आणि अवस्था जेव्हा सौंदर्यव्यापारातून अभिव्यक्त होतात, तेव्हा ते नाटय होते. ही अभिव्यक्ती अभिनयाच्या साधनाने होते, हे सांगताना भरताने लोकधर्मी व नाटयधर्मी अशा दोन धर्मी सांगितल्या आहेत. लोकधर्मी ही अनुभवांच्या अभिनयाशी निगडित आहे, तर नाटयधर्मी ही नाटयगत सौंदर्यव्यापाराशी निगडित आहे.

नाटयामध्ये नट व नाटककार या दोघांचाही व्यापार असतो. नाटककार हा भावांचे अनुकीर्तन करण्यासाठी लौकिक प्रवृत्तींचे दर्शन नाटकाच्या कथानकातून घडवतो. ते कथानक मूलतः लोकप्रसिद्ध घटनेच्या किंवा व्यवहाराच्या स्वरूपाचे असते. यालाच भरताने ' लोकवार्ताक्रियोपेत ' असे म्हटले आहे.

लोकवार्ता म्हणजे लोकप्रसिद्ध प्रवृत्ती व क्रिया म्हणजे त्यांचा व्यवहार होय. नाटचामधील कथावस्तूचा जो भाग लोकवार्ता-क्रियेने युक्त असतो, त्याला लोकधर्मी म्हणायचे. पण घटना मुळात जशी घडली तशीच ती नाटकात नाटककार मांडीत नाही. तिच्यात तो आपल्या कल्पनेने काही भर घालतो किंवा काही बदलही करतो. अशा कल्पित नाटचभागाला भरताने 'अतिवाक्यक्रियोपेत' म्हटले आहे. हा कल्पित भाग म्हणजे नाटचधर्मी होय. या नाटचधर्मीने नाटचाचा फार मोठा प्रांत व्यापलेला आहे. कल्पनेच्या साहाय्याने नाटचात जेवढे काही दाखवले जाते आणि जेवढे काही ग्रहण केले जाते, त्या सगळयाचा नाटचधर्मीत अंतर्भाव होतो. सुखदुःखक्रियात्मक लोकस्वभाव जेव्हा संगीतादी अंगांनी व अभिनयाने संयुक्त होतो, तेव्हा तो नाटचधर्मीच होतो, असा व्यापक अर्थ सांगून भरत म्हणतो –

नाटचधर्मीप्रवृत्तं हि सदा नाटचं प्रयोजयेत् ।
न ह्यङगाभिनयात् किंचिदृते रागः प्रवर्तते ।।
सर्वस्य सहजो भावः सर्वो ह्यभिनयोऽर्थतः ।
अङ्गालङ्कारचेष्टा तु नाटचधर्मी प्रकीर्तितः ।।
( ना. शा. १३. ८४–८५ )

अर्थ– नाटचप्रयोग नेहमी नाटचधर्मीने युक्त असलाच पाहिजे. कारण गीतादी अंगे आणि अभिनय यांवाचून राग म्हणजे रसिकांची प्रीती किंवा आनंद उत्पन्न होणारच नाही. भाव हा सर्वांच्या ठिकाणी नैसर्गिकच असतो. नाटकातील अभिनय अर्थतः या अभिनेय भावालाच धरून असतो. म्हणून (वर्तन, गुण, लक्षणे, इ.) अंगे, उपमादी अलंकार व व्यापार (हे सगळे) नाटचधर्मीच होत.

वाणी, मन व देह यांचा रसानुकूल असा विशिष्ट व्यापार म्हणजे वृत्ती होय. वृत्ती चार असून, त्या कशा निर्माण झाल्या याविषयी भरताने एक पौराणिक कथा दिली आहे. विष्णूचे मधु–कैटभ या दोन दैत्यांशी युद्ध सुरू असता विष्णूच्या भिन्न भिन्न व्यापारांतून चार वृत्ती निघाल्या. त्यांना तो काव्यांच्या माता मानतो. भारती, सात्त्वती, कैशिकी व आरभटी अशी या वृत्तींची नावे आहेत. डॉ. के. ना. वाटवे यांनी या चारही वृत्तींचे विवरण पुढीलप्रमाणे केले आहे–

भारती– ही वृत्ती भाषेवर अवलंबून असते. तिच्यात संस्कृत पाठ्याचा उपयोग अधिक असल्याने हिचा उपयोग स्त्री-पात्रे क्वचित करतात. हिचा उपयोग मुख्यतः प्ररोचना, आमुख, वीथी व प्रहसन या चार प्रकारांत दिसून येतो. भाणात भारती असते असे विश्वनाथ म्हणतो.

सात्त्वती– जिच्यात बळाचा उपयोग, निरनिराळे शस्त्रप्रहार, हर्षयुक्त उत्कट वाणी, इ. गोष्टी असतात, ती सात्त्वती वृत्ती होय हिच्यात शोकरस नसतो. ही भाषा आणि अभिनय या दोहोंवरही अवलंबून असते. बलवान पात्रे दुसऱ्याच्या अंगात चेतना उत्पन्न करणारी भाषणे म्हणताना ही वृत्ती वापरतात. यावरून हिच्यामध्ये ओजोगुण असतो, हे दिसून येते. व्यायोगात कैशिकी-व्यतिरिक्त मुख्यतः सात्त्वती, आरभटी या वृत्ती असतात. डिमामध्येही याच वृत्ती असतात.

कैशिकी– या वृत्तीमध्ये पुरुष व स्त्रिया या दोघांचाही उपयोग होतो. यात नृत्य, गायन, शृंगार, सुंदर वेशभूषा, खेळकर विनोद, इ. गोष्टी असतात. अर्थातच ही वृत्ती शृंगार, हास्य, वत्सल, इ. मृदू रसांच्या वेळी वापरतात. यावरून हिच्यामध्ये माधुर्य हा गुण आहे, असे दिसते. रसदृष्टचा पाहायचे तर सामान्यपणे भारती वापरावी, असा भरताचा अभिप्राय दिसतो. नाटक किंवा प्रकरण यांमध्ये योग्य प्रसंगी कैशिकी वृत्ती असते. विशेषतः नाटिका या शृंगाररसपर रूपकात हिचा वापर होतो.

आरभटी– ज्या वेळी साहसी माणसे नाना प्रकारची कपटे, लबाडचा, धाडसे, खोटी भाषणे, माया, इंद्रजाल, युद्धे, मारामारी, इ. करीत असतील, त्या वेळी आरभटी वृत्ती असते. त्यावरून ही वृत्ती रौद्र, भयानक, इ. रसांना अनुकूल आहे, असे वाटते. समवकार, डिम, व्यायोग यांत ही वृत्ती प्राधान्येकरून असते.

नाटक व प्रहसन यांतील प्रसंग व रस यांना अनुलक्षून या चारही वृत्ती उपयोजिल्या जात हे स्पष्टच आहे.

**नाटचरस–** भरताने रस आठ मानले असून, प्रत्येक रसाचे विभाव, अनुभाव आणि व्यभिचारी भाव कोणते त्यांचे सविस्तर वर्णन केले आहे. नटांनी त्या त्या भावाचा अभिनय कसा करावा, हे सांगणे हा भरताचा त्यात हेतू आहे. वरील आठही रसांची नाटचगत उदाहरणे अशी–

(१) शृंगार– याचे संभोग व विप्रलंभ असे दोन प्रकार आहेत. संभोग शृंगार हा नायकनायिकांच्या मीलनाच्या वेळी होतो व त्यांचा वियोग झाल्याने विप्रलंभ शृंगार होतो. पहिल्याचे उदाहरण शाकुंतलाच्या पहिल्या व तिसऱ्या अंकातील दुष्यंत–शकुंतला यांचे मीलन हे असून, त्याच नाटकाच्या सहाव्या अंकातील त्यांचा वियोग हे दुसऱ्याचे उदाहरण आहे. स्वप्नवासवदत्त या नाटकात तर समग्र नाटकभरच विप्रलंभ शृंगार आहे.

(२) हास्य– बहुतेक संस्कृत नाटकांत विदूषक नावाचे एक पात्र घातलेले असते. हा विदूषक आपल्या शारीरिक व्यंगाने, असंबद्ध बोलण्याने किंवा खादाडपणाने हास्यरस उत्पन्न करतो.

(३) करुण– मृच्छकटिकाच्या शेवटच्या अंकात चारुदत्ताला सुळी द्यायला नेत असता करुणरसाचा परिपोष झालेला आहे. उत्तररामचरित हे समग्र नाटकच करुणरसप्रधान आहे.

(४) रौद्र– अनुचित अशा क्रोधभावनेने रौद्ररस निर्माण होतो. वेणीसंहाराच्या तिसऱ्या अंकातले अश्वत्थाम्याचे उद्‌गार हे याचे उदाहरण होय. तिथे अश्वत्थामा इतका बेफाम संतापला आहे, की तो कृष्णाबद्दलही आत्यंतिक तुच्छतेचे उद्‌गार काढतो.

(५) वीररस– वेणीसंहाराच्या पहिल्या अंकात भीमाची जी भाषणे आहेत, त्यात वीररसाचा उत्तम उठाव झालेला आहे.

(६) भयानक– शाकुंतलाच्या पहिल्या अंकात दुष्यंताच्या बाणाला घाबरलेले हरीण जीव घेऊन पळत सुटले आहे, हे याचे उदाहरण होय. मृच्छकटिकात शकार वसंतसेनेला ठार मारण्याचा प्रयत्न करीत असता आणि वेणीसंहारात भीमसेन दुःशासनाचा वध करीत असताही भयानक रस उत्पन्न होतो.

(७) बीभत्स– किळस उत्पन्न करणे हे बीभत्सरसाचे कार्य होय. याचे उत्तम उदाहरण भवभूतीच्या मालती–माधव नाटकात आहे. तिथे पाचव्या अंकात स्मशानाचे दृश्य असून, त्या ठिकाणी प्रेते सडत आहेत आणि त्यांचे कुजलेले मांस भुतेखेते खात आहेत, असे वर्णन आहे. वेणीसंहारातही रुधिरप्रिय आणि वसागंधा यांच्या प्रवेशात बीभत्सरस आहे.

(८) अद्‌भुत– अनपेक्षितपणे एखादी विस्मयदायक गोष्ट दिसली, की तिथे अद्‌भुतरस निर्माण होतो. शाकुंतलातील सातव्या अंकात दुष्यंतराजा मारीचाच्या आश्रमात आला आहे आणि तिथली अपूर्व उदात्तता पाहून विस्मयचकित झाला आहे. विशेषतः तिथल्या तपोवनभूमीत तप करणाऱ्या ऋषींचे त्याला आश्चर्य वाटते. तो म्हणतो, इतर मुनी तपश्चर्येच्या बळावर जे स्थान प्राप्त करून घेण्याची आकांक्षा बाळगतात, तिथेच हे मुनी तप आचरीत आहेत.

नाटकातील रस हा नाटककाराचे अंतःकरण, त्याचे काव्य म्हणजे नाटक, नट आणि शेवटी रसिक अशा चार ठिकाणी असतो, असे भरताचे मत आहे. त्यांपैकी रसिकाच्या ठिकाणी असलेला शेवटचा रस हा फलरूप किंवा कार्यरूप असून, पहिले तीन रस कारणरूप असतात. बीजापासून वृक्ष बनतो आणि वृक्षापासून पुष्प व फल प्राप्त होते, असे त्याविषयी भरताने सांगितले आहे (ना. शा. ६.३८).

आता काव्य आणि नटव्यापार यांच्या द्वारा रसिकांच्या मनात कार्यरूप रसनिष्पत्ती कशी होते, ते पाहायचे. यासाठी भरताने पुढील प्रसिद्ध रससूत्र दिले आहे– ' तत्र विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः । ' (ना. शा. ६.३२). याचा अर्थ ' नाटयकाव्यातील विभाव, अनुभाव व व्यभिचारी भाव यांचा (रसिकाच्या स्थायिभावाशी) संयोग होऊन रसनिष्पत्ती होते ' असा आहे.

आठही रसांच्या विभाव, अनुभाव आणि व्यभिचारी भाव या रससामग्रीने रसिकांची जी भावनात्मक चित्तवृत्ती जागृत होते, त्या स्थिरः चित्तवृत्तीला स्थायिभाव असे म्हणतात. हे स्थायिभाव किंवा भावबंध रसिकाच्या हृदयात संसारातील निरनिराळ्या अनुभावांनी बनलेलेच असतात. ते नाटयप्रयोगाच्या अवलोकनाने फक्त जागृत होतात एवढेच काय ते. रसिकांतील या सुप्त चित्तवृत्तींना स्थायिभाव असे म्हटले आहे. आठ रसांचे स्थायिभाव क्रमशः पुढीलप्रमाणे आहेत– रती, हास, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा आणि विस्मय. शकुंतलेला पाहून दुष्यन्ताच्या मनात उत्पन्न होणाऱ्या प्रेमाला शृंगारिक प्रेम असे म्हणतात. परंतु त्याला शास्त्रकारांनी स्थायिभाव अशी संज्ञा दिलेली नाही. त्या दोघांत उत्पन्न होणारी चित्तवृत्ती ही व्यवहारात उत्पन्न होणारी लौकिक चित्तवृत्ती आहे. पण त्यांचे प्रेम नाटचप्रयोगात पाहून रसिकांच्या मनात उत्पन्न होणारी चित्तवृत्ती ही मात्र कलास्वादजन्य म्हणजे अलौकिक असल्याने तिला स्थायिभाव म्हटले आहे.

विभाव म्हणजे नाटकातील पात्रांच्या मनात विशिष्ट भावना उत्पन्न करणारी कारणे. अनुभाव म्हणजे पात्रांच्या ठायी विशिष्ट भावना उत्पन्न झाली असता तिचे शरीरावर दिसणारे परिणाम. जसे– भयाने तोंड पांढरे पडणे, कोरडे होणे, अंग कापणे, रोमांच उभे राहणे वगैरे. भावना अधिक उत्कट असल्यास तिचे जे अहेतुक किंवा आपोआप होणारे शरीरावरील परिणाम त्यांना सात्त्विक भाव म्हणतात. सात्त्विक भाव हे अनुभावच आहेत; मानसभाव नव्हेत.

व्यभिचारी भाव म्हणजे मुख्य चित्तवृत्तीचा व्यापार चालू असता ती चित्तवृत्ती परिपुष्ट करण्यास परिस्थितीप्रमाणे मधून मधून येणारे आणि जाणारे अस्थिर भाव. हे व्यभिचारी भाव निर्वेद, ग्लानी, शंका, आलस्य इत्यादी तेहतीस आहेत.

दुष्यंत आणि शकुंतला यांच्या प्रथम भेटीत शकुंतलेला पाहून दुष्यंताच्या मनात शृंगारिक प्रेम (रती) उत्पन्न झाले. येथे शकुंतला ही दुष्यंताच्या रतीचा आलंबनविभाव होय. तिचे रूप, गुण तिच्या सख्यांची अनुकूलता व आश्रमातील रम्य एकांत स्थळ हे उद्दीपनविभाव. शकुंतला आपल्याला प्राप्त व्हावी, याबद्दल दुष्यन्ताला वाटणारे औत्सुक्य, ती प्राप्त होईल अशी त्याला वाटणारी आशा किंवा निराशा, प्राप्त होईल असे वाटल्याने उत्पन्न होणारा आनंद, इ. व्यभिचारी भाव होत; आणि मनात प्रेम दाटल्याने तिचे लाडिक बोलणे, तिरपे कटाक्ष, नेत्रसंकोच, रोमांच, इ. शरीरावर होणारे फरक म्हणजे अनुभाव होत. दुष्यन्त–शकुंतला यांच्या परस्पर आकर्षणामुळे जे हे सर्व प्रकार होतात, ते नटांनी केलेले पाहून रसिकाच्या मनामध्ये शृंगाररस उत्पन्न होतो.

वरील निरनिराळ्या रसांचा व भावांचा रंगभूमीवर अभिनय करणारा नट हा नाटकातील एक प्रमुख घटक असतो. एखाद्याला उत्तम नट व्हायचे असेल, तर त्याने काय केले पाहिजे, हे सांगताना भरत म्हणतो—

यथा जीवः स्वभावं स्वं परित्यज्यान्यदैहिकम् ।
परभावं प्रकुरुते परदेहं समाश्रितः ।
एवं बुधः परं भावं सोऽस्मीति मनसा स्मरन् ।
वेषवागङ्गलीलाभिश्चेष्टाभिश्च समाचरेत् ॥

(ना. शा. २६.१७–१८)

अर्थ – ज्याप्रमाणे जीव स्वतःचा स्वभाव टाकून परदेहाचा आश्रय करतो व अन्यदेहिक असा परभाव व्यक्त करतो, त्याप्रमाणे शहाण्या नटाने मी तोच आहे असे मनात स्मरत वेष, वाणी, अंगसंचालन आणि चलनवलन या गोष्टींनी दुसऱ्याच्या भावाचे आचरण करावे.

रंगभूमीवर काम करीत असताना नट जर रसानंदात मग्न होईल तर त्याला आपली भूमिका चांगल्या प्रकारे करता येणार नाही. रसास्वाद घेणारा प्रेक्षक आपल्या जागी बसून तेवढ्या वेळेपुरता आपण कुठे आहो आणि आपल्या शेजारी कोण आहे, इ. गोष्टी विसरून जातो, त्याचप्रमाणे नटालाही तशी आत्मविस्मृती झाली तर आपल्याला काय बोलायचे आहे आणि कोणता अभिनय करायचा आहे या गोष्टींची स्मृतीच राहणार नाही. म्हणून नटाने रसानंदात मग्न न होता त्या त्या भूमिकेशी तन्मय होऊन अभिनय केला पाहिजे.

अभिनय – अभिनय हा शब्द अभि + नि या धातूवरून बनला आहे. अभि = कडे व नि = नेणे असा त्याचा अर्थ आहे. प्रेक्षकांसमोर जे करून दाखवले जात असेल त्याच्या खऱ्या स्वरूपाकडे त्यांना नेणारा तो अभिनय होय (ना. शा. ८.६). प्रेक्षकांसमोर ज्या व्यक्तीबद्दलच्या गोष्टी चालल्या असतील, त्या गोष्टींवरून त्या व्यक्तीची ओळख पटवून देणारा व अमुकतमुक गोष्ट त्या विशिष्ट व्यक्तीसंबंधीची आहे, अशी खात्री करून देणारा तो अभिनय होय. अभिनयात नटाला त्या खऱ्या व्यक्तीचे अनुकरण करावे लागते. त्यामुळेच अभिनयाला अनुकरण हा दुसरा अर्थ प्राप्त झाला आहे.

एखाद्या माणसाचे हुबेहूब अनुकरण करायचे असेल, तर नटाला त्या माणसाचे, विशेषतः त्याच्या लकबींचे, अनुकरण करावे लागते. त्या व्यक्तीसारखा पोषाख, तशीच केसांची पद्धत, बसणे-उभे राहणे त्याच्याच पद्धतीचे, आवाजही त्याच्याचसारखा, या आणि अशाच कित्येक गोष्टी नटाला त्या माणसाच्या सूक्ष्म निरीक्षणातून प्राप्त करून घ्याव्या लागतात. पण हे केवळ बाह्य अनुकरण होय. अनुकरणातली आभ्यंतर आणि अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे विशिष्ट प्रसंगातली त्याची मनःस्थिती कशी असू शकेल, याचा बारकाईने अभ्यास करून त्या मनःस्थितीला अनुकूल असे चेहऱ्यावर हावभाव दाखवणे किंवा मुद्रा बदलणे, ही होय. या सर्व गोष्टी विचारात घेऊन भरताने अभिनयनाचे आहार्य, आंगिक, वाचिक व सात्विक असे चार प्रकार सांगितले आहेत.



आहार्य – ज्या व्यक्तीचा अभिनय करायचा त्या व्यक्तीची कल्पना प्रथमदर्शनी प्रेक्षकांना ज्यामुळे येऊ शकते, तो आहार्य अभिनय होय. ही कल्पना पहिल्याप्रथम येते ती त्या व्यक्तीच्या बाह्य वेषावरून. नटाला एखाद्या सार्वभौम राजाची नक्कल करायची असेल तर त्याने राजाप्रमाणेच वस्त्राभरणे घालून, डोक्यावर मुकुट ठेवून, दासदासी, अमात्य यांच्यासह मोठ्या ऐटीत रंगभूमीवर येऊन तिथे मांडलेल्या सिंहासनावर बसले पाहिजे. अशा अवस्थेत आणि वेषभूषेत नटाचा रंगभूमीवर प्रवेश झाला, की तो राजा आहे, हे प्रेक्षकांना न सांगताच कळून चुकते. इतर स्त्री-पुरुष भूमिकांच्या संबंधीही असेच समजावे. आहार्य अभिनयात वेषभूषा, अंगाला रंग देणे, विशिष्ट प्रकारची केशरचना करणे, विविध प्रकारचे अलंकार घालणे, निरनिराळे देखावे दाखवणे, इ. सर्व गोष्टींचा समावेश होतो. भरताने या अभिनयाचे पुस्त, अलंकार, अंगरचना व सज्जीव असे भेद केले आहेत.

आंगिक – अंगाने केला जाणारा अभिनय तो आंगिक होय. नटाला ज्या व्यक्तीची भूमिका घ्यायची असते, त्या व्यक्तीचे मनोविकार आपल्या मनात उत्पन्न झाले आहेत, असे दाखवण्यासाठी खऱ्या मनोविकारांच्या वेळी जसे त्याचे शारीरिक फेरफार होतील तसे आपल्या शरीरावर दाखवावे लागतात. सशरीराचे चलनवलनही त्या त्या विशिष्ट परिस्थितीला अनुसरून करावे लागते. यालाच आंगिक अभिनय असे म्हणतात. भरताने शारीर, मुखज आणि चेष्टाकृत असे त्याचे तीन भेद मानले आहेत (ना. शा. ८.११). शरीराच्या हालचालीमुळे उत्पन्न होणारा तो शारीर होय. भुवया, दृष्टी, नाक, ओठ, इ. भागांच्या फेरबदलाने होणारा तो मुखज होय. वृद्ध माणसाचा अभिनय करताना काठी टेकीत हळूहळू जाणे, दमलेल्या माणसाचा अभिनय करताना धाप लागल्यासारखे गुडघ्यावर हात टेकून हळूहळू चालणे, मद्यपी माणसाचा अभिनय करताना पायांची लडथड करीत चालणे, वेड्या माणसाचा अभिनय करताना डोळे ओढलेले, केस सुटलेले, कपडे मळलेले अशा स्थितीत शून्य दृष्टीने कमी–अधिक गतीने चालणे, इ. गोष्टींनी होणारा तो चेष्टाकृत होय. विदूषकाचा अभिनय हा विशेषेकरून आंगिक आणि त्यातही मुख्यत्वे चेष्टाकृत असतो.

वाचिक – कोणते शब्द केव्हा व कसे उच्चारावे याचा विचार वाचिक अभिनयात येतो. याविषयी विवेचन करताना श्री. गोदावरी केतकर लिहितात –

नटाला नाटक करताना आपल्या मनाने वाटेल ते शब्द वाटेल तेव्हा उच्चारावयाचे नसतात, तर त्याला आपला आत्मभाव विसरून जाऊन कवी जसे सांगेल,तसेच बोलावयाचे असते व तो सांगेल तेच शब्द अगदी काना मात्रासुद्धा उच्चारायचे असतात. म्हणून वाचिक अभिनय उत्तम तऱ्हेने खुलून दिसण्यास नुसत्या एकट्या नटालाच बंधन घालून चालत नाही; तर ती काव्यसृष्टी निर्माण करणाऱ्या निरंकुश कवीलाही त्याचे निरंकुशत्व क्षणभर बाजूस सारून बंधन घालावे लागते. कवीच्या दृष्टीनेही ह्या प्रश्नाला विशेष महत्त्व आहे. कारण नाटककाराने कोणते शब्द कोणत्या अर्थाने कोठे घालावेत, त्याने कोणत्या पात्राच्या तोंडी कोणती भाषा घालावी, पात्रांनी एकमेकांस कसे संबोधावे, इ. गोष्टी ठरवल्याप्रमाणे त्याने काव्यरचना केली, तरच ते काव्य करून दाखवताना त्या शब्दयोजनेतील अर्थ कळून त्यांचा योग्य अभिनय करता येईल व तो उठून दिसून रसिक प्रेक्षकाला खराखुरा आनंद प्राप्त होईल.

सात्त्विक – शरीरावर एकदम स्तंभ दाखवणे, घामाघूम होणे, रोमांच उभे राहणे, स्वर कंपित होणे, शरीरालाही कंप सुटणे, चेहरा एकदम फिका पडणे, अश्रुपात होणे, मरण येणे हे आठ सात्त्विक भाव नटाने त्या त्या प्रसंगी हुबेहूब वठवून दाखविणे याला सात्त्विक अभिनय म्हणतात.

**नाट्यवस्तू**– वस् = राहणे, घर करणे या धातूवरून वस्तू शब्द बनला आहे. जीवाचे राहण्याचे ठिकाण जसे शरीर त्याचप्रमाणे नाट्यवस्तू किंवा नाटकाचा कथाभाग ज्या ठिकाणी राहतो ते नाटक होय. जीवाला ज्याप्रमाणे शरीरामुळे दृश्य स्वरूप मिळते त्याचप्रमाणे नाट्याला कथानकाच्या योगाने दृश्य स्वरूप प्राप्त होते. या कथानकाला भरताने इतिवृत्त असे काही ठिकाणी म्हटले असून ते नाट्याचे शरीर असल्याचे सांगितले आहे (ना. शा. १९.१).

नाटकाला कोणत्यातरी कथानकाची अत्यंत आवश्यकता असते. हे कथानक पौराणिक, ऐतिहासिक किंवा कल्पित असे तीन प्रकारचे असते. कित्येकदा पुराणेतिहासातल्या कथांमध्ये नाटककार काल्पनिक भागही घालतो. याला मिश्र म्हणता येईल. नाटककाराला आपले कथानक कुठून सुरू करायचे आणि ते कुठे थांबवायचे याचा काळजीपूर्वक विचार करावा लागतो. आपले नाटक आरंभापासून अखेरपर्यंत चित्तवेधक कसे होईल आणि आपणांस जे काही त्या नाटकाच्या द्वारे उभे करायचे आहे किंवा प्रेक्षकांच्या मनावर ठसवायचे आहे, ते ठराविक वेळात कसे साध्य करता येईल याचाही विचार करावा लागतो. नाटक हे वाचण्यासाठी नसून मुख्यत्वे पाहण्यासाठी असते. ते एकाच बैठकीत संपेल इतकेच लहान ठेवावे लागते. ते अगदी तोकडे असूनही चालत नाही. कारण अशा तोकड्या कथानकात नाटककाराला रसाचा परिपोष करण्यास पुरेसा वाव मिळत नाही. म्हणून नाटकाचा कथाभाग, मग तो पौराणिक, ऐतिहासिक, काल्पनिक किंवा मिश्र कसाही असो; तो प्रेक्षकांना पाहण्यास व नटांना अभिनय करून दाखवण्यास कंटाळवाणा न होता आनंददायी होईल इतक्या बेताचा पाहिजे.

नाटककाराने आपली नाट्यवस्तू सुबद्ध व सुरस कशी होईल, यावद्दल काळजी घ्यावी लागते. त्यामुळे स्वीकृत कथानकातले सरस–नीरस प्रसंग कोणते ते पाहावे लागते. सरस गोष्टीचा परिपोष आणि नीरस गोष्टीचा संक्षेप करणे आणि कथानकाच्या साखळीचे दुवे तुटून ती विस्कळित होणार नाही, अशा रीतीने आपल्या कथानकाची नाट्यरूप मांडणी करणे, या गोष्टी कटाक्षाने पाळाव्या लागतात.

कथावस्तूची अशी उभारणी करीत असता नाटककाराला केवळ मनोरंजन एवढाच हेतू डोळ्यापुढे ठेवून चालत नाही. मनोरंजन करता करताच प्रेक्षकांना काहीतरी बोधात्मक तत्त्व सांगण्याची संधीही त्याने गमावता कामा नये. त्यासाठी नाटकाचे फल एकच असावे आणि ते ज्याला प्राप्त व्हायचे ती व्यक्तीही एकच असावी. एकच फल किंवा कार्य अनेक व्यक्तींना अनेक मार्गांनी मिळाल्याचे जर दाखवले, तर प्रेक्षकांचे मन एकाच फलात, एकाच व्यक्तीत आणि एकाच कथेत स्थिर होणार नाही व त्यामुळे नाटकाचा हेतूही साध्य होणार नाही. म्हणून नाटकात मुख्य पात्र एकच ठेवून ती फलप्राप्ती त्यालाच कशी होते हे दाखवले पाहिजे. याविषयी गडकऱ्यांच्या पुण्यप्रभावाचे उदाहरण देऊन श्री. गोदावरी केतकर लिहितात–

'रसिक वाचक किंवा रसिक प्रेक्षक नाटक वाचीत किंवा पाहत असता त्यात गुंगून जातो यात शंका नाही. पण यात वसुंधरा व कालिंदी यांची चित्रे इतकी काही सारखी रेखाटली आहेत, की या नाटकातील एकटीच वसुंधरा नायिका आहे म्हटले तर कालिंदीच्या दृष्टीने अन्याय होईल असे वाटते. दोघीही पातिव्रत्याच्या, पतिभक्तीच्याच जोरावर आपले कार्य करीत आहेत. एक आपले पातिव्रत्य रक्षण करण्याकरिता आपल्या पोटच्या गोळ्याचाही बळी देते, तर दुसरीही दुसऱ्या पतिव्रतेचे पातिव्रत्य राखण्याकरिता, आपल्या पतिदेवाचे अधःपतन वाचविण्याकरिता आपल्या पोटचा गोळा बळी देते. दोघींचीही बीजे एकच, मार्ग एकच व त्या बीजांची फलेही एकच, असे असल्यामुळे एकीचेच असे चित्र उठून दिसून जो काही प्रेक्षकांच्या मनावर

परिणाम व्हावयाचा तो होत नाही असे म्हणावेसे वाटते.'

नाटकाचे साध्य फल एकच असो किंवा त्याला अंगभूत असे दुसरे फल असो; ते साध्य करून घेण्यास परिश्रम हे करावेच लागतात. एखादे फल सहजासहजी माणसाच्या हाती येत नाही. त्याला काही अडथळेही असतात. परिश्रमपूर्वक ते अडथळे किंवा फलप्राप्तीच्या मार्गातली संकटे पार करण्यातच मनुष्याचे श्रेष्ठत्व आणि त्या फलाचे महत्त्व असते. माणसाच्या ध्येयमार्गात जर काही अडथळेच नसतील, तर तो मार्ग नीरस किंवा कंटाळवाणा होईल. असे अडथळे येऊन ते दूर करण्यात माणसाला जेवढा आनंद मिळतो, तेवढा तो निराबाध अशा जीवनक्रमात मिळत नाही. काळोखाशिवाय उजेडाला महत्त्व नाही, तसेच दुःखावाचून सुखालाही महत्त्व नाही. सुखाची किंमत दुःखाच्या सान्निध्यामुळेच कळून येते. हे जाणून नाटककाराने नाटकातल्या नायकावर अशी दुःखे किंवा संकटे आलेली दाखवावी, की ती निरस्त करताना नायकाच्या शौर्य, धैर्य, बुद्धिवैभव, इ. गुणांचा प्रकर्ष दिसून यावा. नायकाचे हे गुणविशेष नाटकात जर उत्तम रीतीने दाखवले गेले, तर त्याला मिळालेले फल पाहून प्रेक्षकांनाही आनंद होईल आणि ते त्या नायकाशी समरस होऊन विविध रसांचा अनुभव घेऊ शकतील.

मनुष्याला सामान्यपणे आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशी तीन प्रकारची दुःखे भोगावी लागतात. पंचमहाभूतांपासून उत्पन्न होणारे ते आधिभौतिक, दुर्दैवामुळे उत्पन्न होणारे ते आधिदैविक व मानसिक तापाच्या रूपाने होणारे ते आध्यात्मिक दुःख होय. नाटकातील नायकावरही ही तीन्ही दुःखे येऊ शकतील. पण त्यांपैकी आधिदैविक आणि आध्यात्मिक ही दोन दुःखे पूर्वसंचिताचा भाग असल्यामुळे ती सोसणाऱ्या नायकाबद्दल प्रेक्षकांना फारतर त्याची कीव येईल; पण त्याच्याबद्दल सात्त्विक प्रेम वाटणार नाही. म्हणून नाटककाराने नाटकात आधिभौतिक दुःखांचाच विशेषेकरून उपयोग करावा. त्यातही आधिभौतिक दुःखे एखाद्या व्यक्तीकडून आलेली दाखवणे, हे अधिक उचित होय. ज्या वेळी नायकाच्या दुःखाला कारणीभूत होणारी एखादी स्वार्थी, दुष्ट, अहंमन्य अशी व्यक्ती दिसेल आणि अशा त्या व्यक्तीमुळे नायक नाहक दुःखे व संकटे भोगीत आहे असे दिसेल, तेव्हा त्या नायकाबद्दल प्रेक्षकांना प्रेम व सहानुभूती वाटेल. अशा विरोधी व्यक्तीलाच खलनायक असे म्हणतात. हा खलनायक जितका अधिक दुष्ट, अधिक निर्दय आणि अधिक छळक असेल तितकी त्याच्याबद्दल चीड आणि नायकाबद्दल सहानुभूती वाढून नाटकाला क्रिया–प्रतिक्रियात्मक असा रंग भरेल.

प्रतिस्पर्धी असल्यावाचून माणसाचे तेज जागृत होत नाही आणि त्याचे व्यक्तिमत्त्वही कसोटीला लागत नाही. पण एखाद्याला नुसते सदैव संकटाखाली दावीत गेले किंवा त्याला कोणत्याही दृष्टीने कसलीही मदत लाभू न दिली, तर त्या माणसाची अवस्था अगतिक होईल. माणूस कितीही दक्ष, कुशल, शूर आणि बुद्धिमान असला तरी तो एकटाच सर्व संकटांना तोंड देऊ शकत नाही. त्याला त्या कामी इतर कोणाची तरी मदत मिळावीच लागते, हे लक्षात घेऊन नाटकात जसा प्रतिस्पर्धी खलनायक, तसाच नायकाला मदत करणाराही कोणीतरी दाखवावा लागतो. हा मदत करणारा कधी एक असतो तर कधी त्याहून अधिकही असतात. अशा स्थितीत या मदत करणाऱ्या मित्राचाही वृत्तांत प्रसंगानुसार नाटकात घालावा लागतो, याला गौण कथाभाग असे म्हणतात. हा गौण कथाभाग मुख्य कथानकाला पोषक होईल इतकाच घालणे योग्य असते. नाटकात या गौण कथाभागाचा मुख्य कथाभागाबरोबर बराचसा परिपोष झाला असेल, तर त्याला पताका म्हणतात व तो अगदी थोडक्यात सांगितला असेल, तर त्याला प्रकरी म्हणतात (ना. शा. १९. २३–२४). पताका व प्रकरी यांच्या भरात मुख्य कथानक बाजूस पडते, असे पाहून नाटककार त्याला परत जाग्यावर आणतो, तेव्हा त्याला बिंदू म्हणतात (ना. शा. १९. २२). ज्या कारणाने नायकाला फलप्राप्ती झालेली दाखवली जाते, त्या कारणाला बीज म्हणतात. अशा रीतीने पताका, प्रकरी, बिंदू, बीज व फल या पाच गोष्टींना मिळून अर्थप्रकृती अर्थात कथानकाची मूळतत्त्वे असे म्हटले आहे.

**नाट्यरचना** – कोणत्याही कथानकाच्या स्वाभाविकपणे पुढील पाच अवस्था असतात– (१) आरंभ, (२) इष्ट वस्तू मिळविण्याकरता केलेला प्रयत्न, (३) त्या प्रयत्नात आलेले अडथळे आणि त्यामुळे फल मिळण्याच्या बाबतीत होणारी आशानिराशा, (४) अडथळे दूर झालेले पाहून फलाविषयी वाटणारी खात्री व (५) फलाची प्राप्ती.

**प्रस्तावना** – नाटकाचा वरीलप्रमाणे केवळ आराखडा काढून भागत नाही. तो तयार झाल्यावर कथानकाला प्रारंभ कसा करायचा, तेही विचारपूर्वक ठरवावे लागते. शक्य तितक्या थोड्या शब्दांत पुढे दाखविल्या जाणाऱ्या कथाभागाची शक्य तितकी अधिक माहिती स्वाभाविकपणे प्रेक्षकांना देऊन त्यांना कथानकाच्या कालात घेऊन जाणे, हे काम सोपे खचित नव्हे. कोणतेही शुभ कृत्य करण्यापूर्वी ईश्वराचे नमन व स्मरण करण्याची पद्धत आहे. तिचा फायदा घेऊन या कामासाठी प्रारंभीचे मंगलाचरण व नंतरचा सूत्रधाराचा प्रवेश या गोष्टी नाटकाच्या आरंभी घालण्याची पद्धत आली आणि या पद्धतीचा नाटकाचा आरंभ करण्याच्या कामी चांगला उपयोग होतो असे दिसून आल्यामुळे बऱ्याचशा नाटककारांनी त्या पद्धतीने आपले

नाटक सुरू केल्याचे दिसून येते. या सूत्रधाराच्या प्रवेशात त्याच्या मागोमाग येणाऱ्या नाट्यकथेतल्या पात्राची सूचना सहजपणे करता येते. ती करण्याचे पुढील पाच प्रकार आहेत–

(१) प्रयोगातिशय – यात सूत्रधार बोलत असता पडद्यात मुख्य प्रवेशाला सुरुवात होते व त्यातला एखादा–दुसरा शब्द कानावर आल्याने सूत्रधाराच्या बोलण्यात अडथळा उत्पन्न होतो. मग सूत्रधार तो शब्द कोणाचा आहे, हे प्रेक्षकांना सांगून त्या मार्गाने मुख्य प्रवेशाची सूचना देतो. यात नाटककाराला फारसे कौशल्य दाखवावे लागत नाही. भासाने या प्रकाराचा विशेष उपयोग केला आहे. कालिदासाच्या विक्रमोर्वशीयाची व देवलांच्या शारदेची प्रस्तावनाही याच प्रकाराची आहे.

(२) प्रवृत्तक – कथानकातील पहिला प्रवेश ज्या ऋतूतला व दिवसाच्या ज्या कालातला असेल त्याचे वर्णन सूत्रधाराच्या तोंडी घालून त्या वर्णनानुरूप नाटकातल्या पात्राने प्रवेश करणे, याला प्रवृत्तक म्हणतात. पण या पद्धतीतील कालसाम्याचे वर्णन करणे तितकेसे सोपे नसल्याने आणि त्यात कृत्रिमताही फार असल्याने या पद्धतीचा बहुधा कोणी उपयोग केलेला नाही.

(३) अवलगित– नाटकाच्या कथेला ज्या घटनेपासून आरंभ करायचा त्या घटनेशी सदृश अशा गोष्टी सूत्रधाराने आपल्या भाषणात सांगणे व त्याप्रमाणे पात्राने रंगभूमीवर प्रवेश करणे. उदा० शाकुंतल नाटकातला सूत्रधार नटीला म्हणतो, की 'या दुष्यंताचे मन जसे हरिणाने वेधून घेतले आहे, तसे माझे मन तुझ्या गाण्याने वेधून घेतले आहे.'

(४) कथोद्घात– यात सूत्रधार आपल्या भाषणाचा ओघ असा आणतो, की त्या भाषणातील एखादे वाक्य तसेच किंवा अर्थरूपाने घेऊन मुख्य पात्राला रंगभूमीवर प्रवेश करता यावा वेणीसंहार या नाटकाची प्रस्तावना या पद्धतीची आहे. तिथे सूत्रधार 'स्वस्था भवन्तु कुरुराजसुताः समृत्याः' = आपल्या नोकरचाकरांसह कौरव स्वस्थ (सुखी) होवोत, असे म्हणतो न म्हणतो तोच त्या वाक्याचा अर्थ घेऊन संतप्त झालेला भीमसेन 'मी जिवंत असताना कौरव स्वस्थ होणार ?' असा सवाल करीतच रंगभूमीवर प्रवेश करतो.

(५) उद्घात्यक – यात सूत्रधार आपल्या संभाषणाच्या ओघात एखादे श्लेषयुक्त वाक्य उच्चारतो व त्यातला श्लिष्ट अर्थ घेऊन मुख्य पात्र प्रवेश करते. मुद्राराक्षसाची प्रस्तावना या प्रकारची आहे. तिथे सूत्रधार, चंद्रग्रहणाचा प्रसंग उत्पन्न झाला आहे, असे प्रेक्षकांना सांगत असता पुढील श्लोक म्हणतो –

क्रूरग्रहः स केतुश्चन्द्रमसं पूर्णमण्डलमिदानीम् ।
अभिभवितुमिच्छति बलात्–

अर्थ– तो क्रूर ग्रह केतू सांप्रत पूर्ण चंद्राला बलात्काराने ग्रासू पाहत आहे–

पण सूत्रधाराला तो श्लोक पुरा करू देण्यापूर्वीच चंद्र, म्हणजे चंद्रगुप्त, असा श्लिष्ट अर्थ घेऊन चाणक्य प्रवेश करतो आणि गर्जून म्हणतो– 'मी जिवंत असता चंद्रगुप्ताचा कोण पराभव करू इच्छितो तें मी पाहतो'.

नाटकातील नीरस कथाभाग सुचविण्याचे विष्कंभक, प्रवेशक व चूलिका हे तीन प्रकार आहेत. पहिल्या दोहोंत विशेषसा फरक नसतो. दोहोंतही मागे झालेल्या किंवा पुढे होणाऱ्या घटनांचा आशय थोडक्यात सांगितलेला असतो. चूलिकेमध्ये तीच गोष्ट सुचविलेली असते; पण ती एखादे पात्र रंगभूमीवर न आणता पडद्याच्या आडूनच सुचविली जाते (ना. शा. १९·१०५-१०७). उदा० महावीरचरित या नाटकाच्या चौथ्या अंकाच्या प्रारंभी पडद्यातूनच कोणीतरी 'भो भो वैमानिकाः प्रवर्तन्तां मङ्गलानि' = वैमानिकहो, मंगले सुरू होऊ द्या, असे म्हणून पुढे रामाने परशुरामावर विजय मिळविल्याची माहिती देतो.

अंक – संस्कृत नाटकात प्रस्तावना झाल्यानंतर कथानक आरंभापासूनच सरस असेल तर एकदम अंकाला सुरुवात करतात आणि कथानक आरंभापासून सरस नसेल, तर आधी विष्कंभक घालून मगच अंक सुरू करतात. या विषयाचे विवेचन श्री. गोदावरी केतकर पुढीलप्रमाणे करतात –

नाटकात एकंदर किती अंक घालावयाचे, ते कार्याच्या आरंभाचा व अवस्थांचा विचार करून ठरवीत. हरएक अंकात रसभावयुक्त असणाऱ्या कथानकाच्या भागाचा विस्तार होत गेलेला दाखवीत. प्रत्येक अंकात ज्या विशिष्ट विषयास आरंभ केला असेल, तो विषय त्या अंकाच्या शेवटी समाप्त करीत. एका अंकात एका स्थलातील एकाच दिवसातील घडलेला कथाभाग दाखवीत. अंकात नीरस गोष्टी केव्हाही घालीत नसत. मुख्य पात्राचा वध किंवा त्याची कैद, नगराचा वेढा, युद्ध, राज्यभ्रंश, मृत्यू इत्यादी भीतिजनक गोष्टी, वस्त्र बदलणे, जेवणे ह्यांसारख्या गोष्टी किंवा उत्तानशृंगारादी गोष्टी, अंकात कधीच दाखवू नयेत, तर त्या अर्थोपक्षेपक गोष्टींनी सुचवाव्यात असा भरताने नियम दिला आहे. अंकांत घालावयाच्या गोष्टींचा विचार करताना नाटक पाहण्यास स्त्री, पुरुष, लहान मुले, सुना, मुली इत्यादी येत असतात, हे लक्षात ठेवून त्या सर्वांना पाहण्यास योग्य, बोधप्रद व आनंददायक अशाच गोष्टी घालण्यास त्याने सांगितले आहे. कोणी फार दूरच्या प्रवासास निघाले असल्याचे वर्णन आल्यास अंक तेथेच बंद करीत. दोन वर्षांहून अधिक दोन अंकातील काळ नसावा, असा जरी नाट्यशास्त्रात नियम आहे तरी संस्कृत नाटककारांनी हा पाळला

आहे, असे दिसत नाही. विक्रमोर्वशीयाच्या तिसऱ्या अंकात पुरूरव्याचा व उर्वशीचा संबंध येतो व सहाव्या अंकात त्यांचा धनुर्विद्येत निष्णात झालेला निदान आठ वर्षांचा तरी असलेला पुत्र येतो. भरताच्या नियमाप्रमाणे पाहता तो मुलगा तिसरे वर्ष लागलेलाच असावयास पाहिजे होता. ह्याप्रमाणे काळाचा नियम न पाळण्याची संस्कृत नाटककारांची अनेक उदाहरणे देता येतील. अंकात एकाच दिवसात घडलेली एकच गोष्ट सांगावी. प्रसंगानुसार इतर गोष्टीही आल्यास हरकत नाही, पण मुख्यतः एकच गोष्ट असून तिला विरोध न येईल, अशा इतर गोष्टी घालाव्यात. दोन अंकातील काळ एका वर्षाहून जास्त असू नये, असे सांगितल्यावरून साधारणपणे जितके अंक असतील, फार तर तितक्याच वर्षांत घडलेले कथानक घालण्यास हरकत नसावी, असा भरताच्या सांगण्याचा रोख दिसतो. पण काळाच्या बाबतीत संस्कृत नाटकांत कोणताच नियम पाळलेला दिसत नाही.

पताकास्थान– नाटकाच्या कथावस्तूचा अशा प्रकारे विस्तार करीत असता पुढे काय होणार आहे, त्याची प्रेक्षकांना वेळोवेळी सूचना देऊन कथानक कोणत्या बाजूने झुकत आहे, कोणते वळण घेत आहे आणि पुढे काय घडणार आहे, त्याबद्दलची त्यांची उत्कंठा नाटककाराला कायम ठेवावी लागते. अशा सूचना देण्याच्या चार पद्धती भरताने सांगितल्या आहेत. सैन्य चाल करून येत आहे, हे त्याच्या उंच पताकेवरून कळते, ही गोष्ट लक्षात आणून त्या भावी सूचक गोष्टींना भरताने पताकास्थान असेच नाव दिले आहे. त्या चारही पद्धतींचे विवेचन असे–

(१) एखादी इष्ट वस्तू अनपेक्षितपणे प्राप्त झाल्यावर ती पुढेही तशीच मिळणार आहे, अशी सूचना देणे. उदा० रत्नावली या नाटकात सागरिका ही वासवदत्तेच्या वेषात गळफास लावून घेत असलेली राजाला दिसते. तो लगेच पुढे होऊन तिच्या गळयाचा फास सोडवतो. त्या वेळी त्याला कळते, कीं ही वासवदत्ता नसून आपली वल्लभा सागरिकाच आहे.

(२) या प्रकारात श्लिष्ट अर्थाने भावी गोष्ट सुचवलेली असते. उदा० वेणीसंहारात सूत्रधाराच्या तोंडून 'स्वस्था भवन्तु कुरुराजसुताः सभृत्याः' हे वाक्य ऐकून भीम संतापतो; पण त्यातील स्वस्थ पदाचा श्लिष्ट अर्थ स्वर्गस्थ नकुल त्याला समजावून देतो आणि भावी कालात होणारा कौरवांचा नाश त्या श्लिष्ट पदातूनच सुचवतो.

(३) यात द्व्यर्थी वाक्यातल्या दुसऱ्या अर्थावरून भावी गोष्टींची सूचना दिलेली असते. उदा० रत्नावली नाटकातला राजा कोणताही अन्य उद्देश नसता लतांना उद्देशून एक श्लोक म्हणतो. पण त्याच्या शेवटच्या ओळीत राणीच्या रागावलेल्या मुखमुद्रेच्या उल्लेखावरून नजीकच्या काळात तसा प्रसंग घडणार आहे, असे सूचित होते.

(४) एखादा मनुष्य विचारलेल्या प्रश्नाचे सरळ उत्तर देत असतो; पण ऐकणारा त्याचा दुसरा अर्थ घेऊन भावी गोष्ट सुचवतो. उदा० वेणीसंहारात भानुमती व दुर्योधन बोलत बसली असता कंचुकी त्याला वाऱ्याच्या झोताने रथाचा ध्वज मोडल्याचे सांगण्यासाठी येतो; पण गडबडीमुळे नुसते 'देव भग्नं भग्नम्' एवढेच म्हणतो. दुर्योधनाला त्यापासून काहीच बोध होत नाही. तो 'केन कस्य' = कोणी कोणाचे, असे विचारतो. कंचुकी पुन्हा घांदलीत 'भीमेन भवतः' = भीमाने महाराजांचे, असे अर्धवट उत्तर देतो. ते ऐकून दुर्योधन सरळ काय ते सांग म्हणून कंचुकीला दम देतो. मग कंचुकी सांगतो, 'भयानक वाऱ्याने आपल्या रथाचा ध्वज मोडला.' ते ऐकून दुर्योधनाचे शंकानिरसन होते. पण हे सर्व चालले असता प्रेक्षकांना दुर्योधनाची मांडी भग्न करण्याची भीमाने केलेली प्रतिज्ञा आठवून ती खरी होण्याची ही सूचनाच आहे, असे वाटते.

संधी –अशा रीतीने नाटकाचा प्रारंभ झाल्यानंतर मग त्याचा कथाप्रवाह बीजारंभापासून फलप्राप्तीपर्यंत मुख, प्रतिमुख, गर्भ, विमर्श व निर्वहण या पांच वळणांतून वाहवीत पुढे नेणे, कथानकाच्या परिपोषात निवडक सरस भाग विशेषत्वाने खुलवून दाखविणे आणि नीरस भाग शक्य तितक्या कमी शब्दांत सांगून सरस भागांचा सांधा बेमालूम जुळविणे, हे नाटककाराचे काम असते.

मुख संधी – यात उद्दिष्ट कार्याचे जे बीज असेल, ते व्यवस्थितपणे सांगून त्याला अंकुर फुटेपर्यंतचा भाग येतो. उदा० मृच्छकटिक नाटकातले चारुदत्त व वसंतसेना यांचे परस्परांवरील प्रेम हे बीज होय. ते प्रेक्षकांना दाखवून त्याची परिणती काय होणार, या विषयीची उत्सुकता उत्पन्न करणे हे मुखसंधीचे काम झाले. या प्रेमामुळे वसंतसेना चारुदत्ताकडे आपले अलंकार ठेव म्हणून ठेवून गेली, की हा मुखसंधी संपला असे समजायला हरकत नाही. मुख संधीत सामान्यतः पुढील बारा प्रकार दिसून येतात–

(१) उपक्षेप – नाटकातले मुख्य बीज कळून येणे.

(२) परिकर – हेच बीज अनेक प्रकारांनी वाढणे.

(३) परिन्यास – ते बीज प्रेक्षकांना उघडपणे दिसणे.

(४) विलोभन – नायक किंवा नायिका यांची प्रशंसा किंवा गुणवर्णन करणे.

(५) युक्ती – इच्छित गोष्ट साध्य होण्यासाठी काही तरी निश्चित योजना करणे.

(६) प्राप्ती – इष्ट वस्तू लाभून आनंद मिळणे.

(७) समाधान – बीजाचा पुनरुच्चार करणे.

(८) विधान – सुखदुःखमिश्रित प्रसंग उभा करणे.

(९) परिभावना – विस्मय किंवा कौतुक उत्पन्न करणे.

(१०) उद्भेद – बीज वृद्धिगत झालेले दाखविणे.

(११) भेद – बीजाची तीव्रता दाखविणे.

(१२) कारण – योग्य संधी मिळून कार्याचा प्रारंभ होणे.

प्रतिमुख संधी – हा दुसरा संधी होय. यात प्रारंभ केलेल्या कार्याच्या सिद्धीसाठी अनेक प्रयत्न दाखवायचे असतात. त्यामुळे त्यात मुख संधीप्रमाणे बीजाची एकसारखी वाढ झालेली दाखवता येत नाही. मुख्य बीजाच्या वाढीला विरोध किंवा अडथळे करणाऱ्या प्रतिनायकाच्या उद्योगांना या संधीत प्रारंभ होतो व त्यामुळे कधी बीजाची वाढ खुंटल्यासारखी दिसते, तर कधी प्रतिनायकाचे प्रयत्न विफल झाल्यासारखे वाटतात. इथे प्रतिमुख संधी पुरा होतो. यात पुढील तेरा विभाग संभवू शकतात–

(१) विलास – सुखोपभोगाची इच्छा होणे.

(२) परिसर्प – बीज कधी दिसणे व कधी न दिसणे.

(३) विधूत – एखाद्याने खुशामत केली असता चिडणे किंवा रागावणे.

(४) शम – उत्पन्न झालेल्या रागाचे शमन होणे.

(५) नर्म – चेष्टेने बोलणे.

(६) नर्मद्युती–एखाद्याने चेष्टा केली असता मनात आलेला राग बाहेर दिसू न देणे.

(७) प्रगयण – एकापुढे एक प्रश्नोत्तरे होत जाणे.

(८) निरोध – बीजाच्या वाढीत अडथळा किंवा संकट येणे.

(९) पर्युपासन – रागावलेल्या व्यक्तीचा अनुनय करणे.

(१०) पुष्प – एखाद्या गोष्टीविषयी खुबीने बोलणे.

(११) वज्र – कठोरपणाने उघड उघड टाकून बोलणे.

(१२) उपन्यास – अडथळा आला असता तो कोणत्यातरी मार्गाने दूर करणे.

(१३) वर्णसंहार – चारही वर्णांच्या लोकांचा रंगभूमीवर एकत्र प्रवेश होणे.

गर्भ संधी – प्रतिमुख संधीत प्रारब्ध कार्याचा कधी उल्लेख असतो तर कधी नसतो; पण त्यापुढच्या गर्भसंधीत ते सतत वृद्धिगत होऊन अखेरीस फलोन्मुख झालेले दाखवायचे असते. या अवस्थेला नाटकाचे कथानक येईपर्यंत त्याचे एकंदर तेरा भाग पडतात, ते असे –

(१) अभूताहरण – छद्मी भाषण.

(२) मार्ग – बीजवृद्धीकरिता कोणकोणते बेत ठरविले आहेत, ते कळणे.

(३) रूप – कोणत्यातरी आधारावरून तर्क करून बोलणे.

(४) उदाहरण – एखाद्याविषयी गौरवाने बोलणे.

(५) क्रम – इष्ट गोष्ट प्राप्त होणारच, अशी खात्री वाटणे.

(६) संग्रह – एखाद्याला गोड बोलून किंवा काही देऊ करून इष्ट वस्तू प्राप्त करून घेणे.

(७) अनुमान – एखादी गोष्ट पाहून तिच्यावरून दुसऱ्या गोष्टीची कल्पना करणे.

(८) प्रार्थना – एखाद्या गोष्टीसाठी एखाद्याची मनधरणी करणे.

(९) क्षिप्ती – परत एकदा बीज सांगणे.

(१०) तोटक – एखादा मनुष्य रागाने गोंधळून काहीतरी भाषण करतो, असे दाखवणे.

(११) अधिबल – एखाद्याला कपट करून फसवणे.

(१२) उद्वेग – एखाद्या कारणाने भय वाटून मन उद्विग्न होणे.

(१३) विद्रव – भीतीमुळे नाना तऱ्हेच्या शंका मनात येणे.

विमर्श संधी – गर्भ संधीत फलोन्मुख झालेल्या बीजांकुराची वाढ काही काळ खुंटल्यासारखी वाटते, पण लगेच ती कुंठित अवस्था संपते व कथानकाला जोरकस गती मिळून त्यामुळे फलप्राप्तीविषयी खात्री वाटू लागते. नाटकातील कथानकाच्या या भागाला विमर्श संधी म्हणतात. या संधीचे तेरा विभाग पुढीलप्रमाणे होतात–

(१) अपवाद – दुसऱ्याचे दोष उघड करून सांगणे.

(२) संफेट – संतापून बोलणे.

(३) अभिद्रव – श्रेष्ठ किंवा वडील माणसांबद्दल तिरस्कार व्यक्त करणे.

(४) शक्ती – उत्पन्न झालेला विरोध नाहीसा करणे.

(५) प्रसंग – पश्चात्तापाने बोलणे.

(६) व्यवसाय – एखाद्या गोष्टीविषयी प्रतिज्ञा करणे.

(७) विरोध – कार्याच्या विरुद्ध जाणे.

(८) प्ररोचना – उद्दिष्ट कार्य सुचविणारी गोष्ट सांगणे.

(९) विचलन – अनुमान काढून बोलणे.

(१०) आदान – बीजाचे फल जवळ आले, असे वाटणे.

(११) छेदन – एखाद्याचा अपमान करणे.

(१२) व्याहार – एखादी गोष्ट उघड उघड सांगणे.

(१३) द्युती – तिरस्काराने बोलणे.

निर्वहण संधी – मुख संधीपासून तो विमर्श संधीपर्यंत बीज व इतर ज्या ज्या गोष्टी सांगितलेल्या असतील, त्या सर्व गोष्टींचे एकीकरण करून त्या सर्वांचा समारोप ज्या भागात केलेला असतो, त्याला निर्वहण संधी म्हणतात. यातही सामान्यपणे पुढील तेरा विभाग दिसून येतात, ते असे–

(१) संधी – बीजांचा पुन्हा एकदा उल्लेख.

(२) निवोध – कार्यप्राप्ती करून घेण्याचा मार्ग दाखविणे.

(३) ग्रथन – फलप्राप्ती होणार असे सुचविणाऱ्या गोष्टींचा निर्देश करणे.

(४) निर्णय – एखाद्या झालेल्या प्रसंगाचा इतिहास सांगणे.

(५) परिभाषण – निंदायुक्त वचन बोलणे.

(६) धृती – इष्ट गोष्ट साध्य होणार या खात्रीने मनाला संतोष वाटणे.

(७) प्रसाधन – शुश्रूषादी गोष्टींच्या योगाने एखाद्याची आराधना करणे.

(८) आनंद – इष्ट वस्तू प्राप्त होणे.

(९) समय – दुःख नाहीसे होणे.

(१०) भाषण – सामदानादिपूर्वक भाषण करणे.

(११) उपगूहन – अकल्पित असे काही मिळणे किंवा ऐकू येणे.

(१२) पूर्वभाव – फलप्राप्ती पूर्णपणे दृष्टिपथात येणे.

(१३) काव्यसंहार – नायकाला वर मिळणे.

**नाट्यकाव्य** – नटाने अभिनय करून दाखवावा, या हेतूने लिहिलेले काव्य ते नाट्यकाव्य समजावे. भरताने काव्याची व्याख्या करताना 'अर्थक्रियापेक्षं काव्यम्'=अर्थक्रियेची अपेक्षा ज्याला असते ते काव्य होय, असे म्हटले आहे. मनातील भाव व शब्दांतील अर्थ ज्यात सुस्पष्ट रीतीने व्यक्त होतात, ते नाट्यगत काव्य उत्तम ठरते. याची छत्तीस लक्षणे भरताने सांगितली आहेत, ती अशी–

(१) विभूषण– अलंकार व गुण यांनी युक्त.

(२) अक्षरसंघात– थोडयाच पण श्लिष्ट शब्दांत वैचित्र्य उत्पन्न करणारे वर्णन.

(३) शोभा– प्रसिद्ध गोष्टींच्या वर्णनाबरोबरच अप्रसिद्ध गोष्टीही खुबीने सांगणे.

(४) अभिमान– निरनिराळ्या लोकांनी साधकबाधक गोष्टी सांगितल्या असताही स्वतःचे म्हणणे न सोडणे.

(५) गुणकीर्तन– विविध कार्ये घडविण्यास उपयुक्त असे विविध गुण ज्या व्यक्तीत असतील, त्यांची नामोल्लेखपूर्वक प्रशंसा करणे.

(६) विशेषण– प्रसिद्ध गोष्टीतले प्रसिद्ध गुण सांगून त्याहीपेक्षा विशेष काहीतरी सांगणे.

(७) उदाहरण– एका शब्दाचा अर्थ ध्यानात येताक्षणीच न सांगितलेल्या अनेक गोष्टींचे अर्थ ध्यानात येणे.

(८) निरुक्ती– शब्दांची व्युत्पत्ती सांगणे.

(९) गुणानुवाद– हीन व्यक्तीची श्रेष्ठ व्यक्तीशी तुलना करून त्या श्रेष्ठ व्यक्तीच्या गुणांना श्रेष्ठत्व आणणे.

(१०) अतिशय– उत्तम गोष्टीचे विशेष प्रकारे वर्णन करणे.

(११) हेतू– अनेक गोष्टींच्या अर्थातून एकच अर्थ निश्चितपणे सिद्ध करून दाखविणे.

(१२) सारूप्य– दोन सदृश गोष्टींपैकी एकीच्या अनुकरणाने दुसऱ्या परोक्ष गोष्टीची कल्पना आणून देणे.

(१३) मिथ्याध्यवसाय– कधीही न घडलेल्या गोष्टीचे तशाच प्रकारच्या एखाद्या गोष्टीवरून ती निश्चित घडली आहे, अशा प्रकारचे वर्णन करणे.

(१४) सिद्धी– कोणत्यातरी एकाच गोष्टीला महत्त्व देण्यासाठी पुष्कळशा प्रसिद्ध गोष्टींचे वर्णन करणे.

(१५) पदोच्चय– अनेक गुणवाचक गोष्टी सांगून एकाच वस्तूची प्रशंसा करणे.

(१६) आक्रंद– दुसऱ्या लोकांची उदाहरणे देऊन आपल्या माणसाला कठोर बोलणे.

(१७) मनोरथ– आपल्या मनातला भाव तशाच प्रकारच्या दुसऱ्या एखाद्या गोष्टीच्या मिषाने सुचविणे.

(१८) आख्यान– कोणी विचारले असता किंवा नसता घडलेली गोष्ट सांगणे.

(१९) याञ्चा– गोड बोलून एखाद्याला आपल्याकडे वळवून घेणे.

(२०) प्रतिषेध– एखादा मनुष्य भलतेच काही करू लागला असता त्याचा निषेध करणे.

(२१) पृच्छा– आपल्या किंवा दुसऱ्याच्या मनुष्याला एखादी गोष्ट अपूर्व तऱ्हेने विचारणे.

(२२) दृष्टान्त– सिद्ध असलेल्या गोष्टींची बरोबरी करून एखादी गोष्ट सांगणे.

(२३) भासन– अनेक वाक्यांनी युक्त असे लांबलचक भाषण करणे.

(२४) संशय– एखादी गोष्ट न कळल्याने अनेक प्रकारचे विचार उत्पन्न होऊन मनात गोंधळ निर्माण होणे.

(२५) आशी– दुसऱ्याने सांगितले असता किंवा नसता त्याचे शुभ चिंतिणे.

(२६) प्रिय– आधी क्रोध व मागाहून हर्ष निर्माण करणारे आशीर्वादयुक्त वचन बोलणे.

(२७) कपटसंघात– लबाडीने दुसऱ्या माणसाला फसवून त्याला आपल्या स्वाधीन करण्यासाठी युक्त्या योजणे.

(२८) क्षमा– एखाद्या दुष्टाने चारचौघात कठोर भाषण केले, तरी त्याचा राग न मानता ते सहन करणे.

(२९) प्राप्ती– एखादी गोष्ट अंशतः दिसली असता तिच्या वरून संपूर्ण गोष्टीची कल्पना करणे.

(३०) पश्चात्ताप– अयोग्य कृत्य केल्याबद्दल किंवा कर्तव्य टाळल्याबद्दल वाईट वाटणे.

(३१) अनुवृत्ती– स्नेहामुळे किंवा मनाच्या सरळपणामुळे एखादी गोष्ट दुसऱ्याच्या कलाने घेणे.

(३२) उपपत्ती– अंगावर आलेल्या दोषांचे निराकरण करणे.

(३३) युक्ती– जाणत्या लोकांनी एकत्र येऊन एकमताने एखादी गोष्ट ठरवणे.

(३४) कार्य– दोष दृष्टीआड करून एखाद्या गोष्टीचा गुणांशी संयोग करणे.

(३५) अनुनीती– हातून घडलेल्या अपराधाचे परिमार्जन करण्यासाठी एखाद्याला गोड बोलून खूष करणे.

(३६) परिवेदन– एखाद्या गोष्टीचे दोष मलतीकडे लावणे.

**काव्यवृत्ते** – भरताने नाट्यकाव्यातील वृत्तासंबंधानेही काही नियम सांगितले आहेत, ते असे– शृंगारात प्रायः मात्रागणाचा उपयोग करावा. वीर व रौद्र रसात एकाच प्रकारची वृत्ते वापरावी. जेव्हा एखाद्यावर बलात्कार किंवा अत्याचार दाखवायचा असेल, तेव्हा पुष्कळ गुरू अक्षरे असलेली वृत्ते वापरावी. वादविवाद दाखवायचा असता, जगती, अतिजगती अशी लांब वृत्ते वापरावी. लढाईच्या वर्णनात एकवीसअक्षरी प्रकृती जातीचे वृत्त वापरावे. बीभत्स व करुण रसात सामान्यपणे गुरू अक्षरे जास्त असलेली वृत्ते वापरावी. करुण रसात मात्र मुख्यत्वे शक्वरी व अतिद्रुती ही वृत्ते घालावी.

**नाट्यसंवाद** – नाट्यात नाटककाराला जे काही सांगायचे, ते सर्व पात्रांच्या संवादांच्या द्वारे सांगावे लागते. नाटककाराला स्वतःचे मनोगत सांगण्यासाठी त्यात मधे येण्याची सोय नसते. त्यामुळे नाटकात गद्यपद्यात्मक संवादांना अत्यंत महत्त्व आहे. भरताने ही गोष्ट ओळखून स्पष्टपणे सांगितले आहे, ते असे–

**वाचि यत्नस्तु कर्तव्यो नाट्यस्यैषा तनुः स्मृता।**
**अङ्गनेपथ्यसत्त्वानि वाक्यार्थं व्यञ्जयन्ति हि ॥**

(ना. शा. १४. २)

अर्थ– नाटकात संवादातल्या शब्दाबद्दल योग्य ती काळजी घ्यावी, कारण ते नाट्याचे शरीर आहेत. नाट्याला आधारभूत असे आंगिक, आहार्य व सात्त्विक हे तीन अभिनय वाक्यातील अर्थालाच स्पष्ट करीत असतात.

नाट्यात जे गद्य घालायचे, ते बोलणाऱ्या व्यक्तीला अनुरूप होईल असेच घातले पाहिजे. बोलणारी व्यक्ती स्त्री, मूल, अज्ञ, सुशिक्षित, भिन्नदेशीय व भिन्नभाषिक जशी असेल त्याप्रमाणे तिच्या तोंडी भाषा घातली पाहिजे, असा नियम आहे.

भाषेचा विचार करताना भरताने संस्कृत आणि प्राकृत असे भाषेचे दोन भेद सांगितले आहेत. भरताच्या वेळी राजभाषा संस्कृत होती. त्यामुळे सुशिक्षित आणि वरच्या दर्जाचे लोक संस्कृत बोलत आणि मुले, स्त्रिया, बहुरूपी, बौद्ध भिक्षू, अभिचारकर्मे करणारे इत्यादींच्या तोंडी प्राकृत भाषा असे. भरताने अभिभाषा, आर्यभाषा, जातिभाषा व जात्यंतरी भाषा असे आणखी भाषेचे चार पोटभेद सांगितले आहेत. अभिभाषा ही देवांची, आर्यभाषा ही राजांची, जातिभाषा ही म्लेच्छ शब्द मिसळून बोलणाऱ्या अनेक जातींच्या लोकांची आणि जात्यंतरी भाषा ही पशुपक्ष्यांची होय. याशिवाय भरताने पुढील सात प्राकृत भाषांचा निर्देश केला आहे– मागधी, अवंतिजा, प्राच्या, शौरसेनी, अर्धमागधी, बाल्हिका व दाक्षिणात्या. या भाषांपैकी संस्कृत नाटकात शौरसेनी व मागधी या दोन भाषांचा विशेष उपयोग केलेला दिसून येतो. भरताने दिलेल्या भाषाविषयक नियमांचे स्पष्टीकरण श्री. गोदावरी केतकर यांनी थोडक्यात सांगितले आहे, ते असे—

नाटकातील चारही प्रकारचे नायक, महाराणी, वैदिक ब्राह्मण, संन्यासी व ब्रह्मचारी यांनी नेहमी आणि राजाच्या दासींनी कधी कधी संस्कृत बोलावे. सर्व लोकांना कळण्याकरिता आणि राजाला व लोकांना ऐकण्यास बरे वाटावे म्हणून वेश्यांनी व आपापल्या कलांसंबंधी बोलताना शिल्पकारिका स्त्रियांनी संस्कृतमध्ये बोलावे. ग्रह, नक्षत्र, तारे, पक्ष्यांचा शब्द ह्यांवरून राजाला शुभाशुभ सांगावयाचे असेल, तेव्हा अथवा संधिविग्रह इत्यादींसंबंधी बोलताना नेहमी संस्कृत भाषा वापरावी.

बाकी राहिलेल्या गौण पात्रांनी प्राकृत भाषा बोलावी. अप्सरा ह्या दैवी असतात व कारणपरत्वे त्या पृथ्वीवर आलेल्या असतात, तेव्हा त्यांच्या तोंडी कधी संस्कृत व कधी प्राकृत भाषा घालण्यास हरकत नाही. त्याचप्रमाणे नायकांनी काही हेतू सिद्धीस जाण्याकरिता एखाद्या हलक्या माणसाचा वेष घेतला असेल, तर त्या वेषानुरूप त्यानेही प्राकृत भाषा बोलण्यास हरकत नाही. ऐश्वर्याने मत्त झालेल्या किंवा दारिद्र्याने वेडावलेल्या उत्तम माणसानेही प्राकृत बोलावे. लहान मुले, स्त्रिया, नीच लोक, आजारी लोक, काही मिषाने सोंगे घेतलेले लोक, बौद्ध भिक्षू, चेटकी, तपस्वी, लिंगी– आपल्या जातीची खूण जवळ बाळगणारे हलक्या जातीचे लोक– यांच्या तोंडी प्राकृत भाषा घालावी.

प्राकृताच्या खालोखाल शौरसेनीस महत्त्व आहे. नाटकात नायिका व तिच्या सख्या यांच्या तोंडी ही भाषा घालावी.

साधारणपणे शुद्ध जातीच्या हीन लोकांच्या तोंडी नाटकात शौरसेनी भाषाच घालावी. वररुचीने देखील संस्कृतापासून प्रत्यक्ष निघालेली दुसरी भाषा शौरसेनीच सांगितली आहे. धूर्त लोकांचे तोंडी आवन्ती व विदूषकाचे तोंडी प्राच्या भाषा घालावी. अर्धमागधीचा उपयोग राजाचे आवडते लोक, व्यापारी, चेट, ह्यांनी करावा. फौजेतील लोक, नगराचे रक्षण करणारे शिपाई व जुगारी लोक यांचे तोंडी दाक्षिणात्या आणि उत्तरेकडील लोकांचे तोंडी बाल्हिका भाषा घालावी. विभाषांपैकी शकारी ही शकदेशातील राहणारे व त्यांच्याच स्वभावाचे जे लोक असतील त्यांच्या तोंडी घालावी. पुक्कस लोकांचे तोंडी चाण्डाली घालावी व कोळसे विकणारे, मृगया करणारे, लाकडे विकून उपजीविका करणारे व यांत्रिक यांचे तोंडी शांबरी किंवा क्वचित प्रसंगी वानौकसी भाषा घालावी. शेळ्या, मेंढ्या, गाई, घोडे व उंट पाळणाऱ्यांचे तसेच गौळीवाड्यात राहणाऱ्यांचे तोंडी शबर किंवा आभीर भाषा घालावी. सामान्यतः जो ज्या जातीतील मनुष्य असेल, त्या जातीची भाषा त्याचे तोंडी घालावी.

भरताने भाषेबद्दल जसे सांगितले, तसेच कोणत्या पात्राने कोणत्या पात्राला कोणत्या नावाने संबोधावे हेही पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

देव, महर्षी, विद्वान, ब्रह्मचारी व संन्यासी यांना भगवन म्हणावे. देवता व तपस्विनी यांना भगवती म्हणावे. राजाला देव किंवा पार्थिव म्हणावे. तो सार्वभौम असल्यास भद्र म्हणावे. राजाने विदूषकाला वयस्य म्हणावे. विदूषकानेही राजाला तसेच म्हणावे. युवराजाला स्वामिन व इतर राजपुत्रांना भर्तृदारक म्हणावे. सर्वांनी ब्राह्मणांना आर्य म्हणावे. बौद्ध, क्षपणक, पाशुपत, नास्तिक, पाखंडी यांना भदंत म्हणावे. गुरूने शिष्याला व बापाने मुलाला वत्स, पुत्रक किंवा तात म्हणावे. मोठ्या भावाला आर्य म्हणावे. स्त्रीला पतीने इतर वेळी आर्या व शृंगारप्रसंगी प्रिया म्हणावे. हीन लोकांनी उच्च लोकांस हंहो म्हणावे इत्यादी.

**नट** – नाट्यकृती कितीही चांगली असली, तरी ती उत्तम वठविणे हे काम नटाचे असते. नटाने नाटकातले संवाद हे अर्थ जाणून आणि योग्य त्या ठिकाणी स्वर खाली–वर करून निरनिराळ्या आवाजांत व निरनिराळ्या आविर्भावांत उच्चारावे लागतात. नाटककाराला कोणत्या शब्दाचा कोणता अर्थ अभिप्रेत आहे व तो अर्थ कोणत्या स्वरात शब्द उच्चारला असता स्पष्ट होईल, त्याचा विचार करून नटाने संवाद बोलायचे असतात. या कलेलाच भरताने पाठ्यगुण असे म्हटले आहे. या पाठ्याची त्याने सहा अंगे सांगितली आहेत, ती अशी–

(१) विच्छेद – विरामामुळे झालेल्या पदांच्या किंवा वाक्यांच्या विभागावर थांबणे. कारण विरामावर व विरामावर अवलंबून असलेल्या विच्छेदावर वाक्याचा खरा अर्थ अवलंबून असतो.

(२) अर्पण – प्रेक्षकांच्या कानांत आपले भाषण गुंजत राहील, अशा प्रकारे मधुर आवाजात बोलणे.

(३) विसर्ग – वाक्यसमूह उच्चारीत असता कोणते वाक्य कोणत्या स्वरात उच्चारायचे याचा विचार करून वाक्यांची मांडणी करणे.

(४) अनुबंध – अर्थाप्रमाणे दुसऱ्या पदातला भाग तोडून तो मागच्या पदाशी जोडणे किंवा मागचे पद पुढच्या पदाशी मिळवून घेणे.

(५) दीपन – वाक्ये एकाहून एक उच्च स्वरात चढवीत नेणे.

(६) प्रशमन – स्वर उंच चढला असता तो बेसूर न होईल अशा बेताने हळूहळू उतरीत आणणे.

हास्य व शृंगार या रसांत अर्पण, विच्छेद, दीपन व प्रशमन यांचा विशेष उपयोग होतो. करुण, वीर, रौद्र व अद्‌भुत या रसांत विसर्गाशिवाय बाकीच्या अंगांचा उपयोग होतो. बीभत्स व भयानक या रसांत विसर्ग व विच्छेद हे बरेचसे उपयोगात येतात.

**नाट्यपात्रे** – भरताने सामान्यपणे स्त्री-पुरुषांत भिन्नभिन्न स्वभाव कसे दिसून येतात, त्यांच्यांत काय काय विशेष असतात, इ. गोष्टींचे विस्तृत वर्णन करून साधारणपणे नाटकात किती प्रकारची पात्रे यावी, ती कोणत्या गुणांनी युक्त असावी व त्यांचे आचार-विचार कसे असावे, यांचे विवेचन पुढीलप्रमाणे केले आहे–

नायक – नाटकातले मुख्य पात्र म्हणजे त्याचा नायक हे होय. इतर सर्व पात्रे याला आनुषंगिक असतात व त्याच्याहून गौण असतात. हा नायक उत्तम प्रकृतीचा व धीरोदात्त असा असावा. त्याच्या ठिकाणी शोभा, विलास, माधुर्य, गांभीर्य, स्थैर्य, तेज, ललित व औदार्य हे आठ सात्त्विक गुण असावे. तो सहृदय, सहिष्णू, स्वाभिमानी, उदार, शूर, काळवेळ पाहून वागणारा, पत्नीवर दृढ विश्वास ठेवणारा व स्वतःच्या सुखात दुसऱ्याला वाटेकरी करणारा असावा.

नायिका – उत्तम प्रकृतीच्या पुरुषाप्रमाणे उत्तम प्रकृतीच्या स्त्रियाच संस्कृत नाटकात नायिका म्हणून घेतल्या जातात. स्वीया, अन्या व साधारणी म्हणजेच स्वस्त्री, परस्त्री व वेश्या अशा तीन प्रकारच्या नायिका संस्कृत नाटकात दिसतात. स्वीया ही विनयादी गुणांनी युक्त, गृहकर्मरत आणि पतिव्रता असते.

या नायिकेतही मुग्धा, मध्या, व प्रगल्मा असे तीन भेद आहेत. हे भेद वय आणि जीवनाचा अनुभव यांवर कल्पिलेले दिसतात. विशेषतः शृंगारनायिकांमध्ये स्वाधीनभर्तृका, खंडिता, अभिसारिका, कलहांतरिता, विप्रलब्धा, प्रोषितभर्तृका, वासकसज्जा व विरहोत्कंठिता असे आठ प्रकार कल्पिलेले आहेत. या आठ नायिका निरनिराळ्या आहेत, असे समजण्याचे कारण नाही. एकच नायिका परिस्थितीप्रमाणे इतर नायिकांची रूपे घेऊ शकते.

प्रतिनायक – यालाच खलनायक असेही म्हणतात. तो कसा असावा, याविषयी साहित्यदर्पणात पुढील श्लोकार्ध लिहिलेला आहे –

**धीरोद्धतः पापकारी व्यसनी प्रतिनायकः**

( सा. द. ३.१३१ )

अर्थ – प्रतिनायक हा धीरोद्धत असून पापी व व्यसनी असतो.

मंत्री व न्यायाधीश – विशेषतः एखादा राजा नायक असेल, त्या वेळी त्याचे मंत्री व न्यायाधीश हे वरिष्ठ अधिकारी नाटकात दाखवावे असे सांगितले आहे. त्याचबरोबर सेनापती, राजपुरोहित, राजदूत, प्रतिहारी, वैतालिक ( भाट ) इत्यादी राजकारणातल्या उपयोगाची पात्रेही असावी.

विदूषक – विशेषतः प्रणयप्रधान नाटकात विदूषक हा नायकाचा मित्र म्हणून येतो. विदूषक कसा असावा, ते पुढील श्लोकात सांगितले आहे–

**वामनो दन्तुरः कुब्जो द्विजन्मा विकृताननः**
**खलतिः पिङ्गलाक्षश्च संविधेयो विदूषकः ॥**

( ना. शा. २४.१०६ )

अर्थ – विदूषक हा शरीराने खुजा, वाकडा, दात पुढे आलेला, तोंड वाकडे असलेला, टक्कल पडलेला, पिंगट डोळ्यांचा व जातीने ब्राह्मण असावा.

त्याचे नायकावर अकृत्रिम प्रेम असावे. तो मनाने शुद्ध, चतुर, जाणता, नायकाचे दोष झाकणारा व त्याला हरघडी मदत करणारा असावा.

विट–चेट – हीही दोन पात्रे संस्कृत नाटकात असतात. विट हा विदूषकाप्रमाणेच नायकावर प्रेम करणारा व नायकाला त्याच्या प्रेमप्रकरणात मदत करणारा असतो. तो धूर्त, कर्मकुशल, वादविवादपटू, मधुरभाषी व ऐटबाज पोषाख करणारा असावा असे सांगितले आहे. मृच्छकटिकात शकार व वसंतसेना या दोघांचेही विट आहेत. चेट हे विटाहून खालच्या दर्जाचे पात्र होय. तो साधा सेवक असतो.

शकार नावाचे आणखी एक पात्र काही संस्कृत नाटकांमधून आढळते. शकार हा विदूषकाप्रमाणे विनोदी, पण खल प्रकृतीचा असतो. शकार या पात्राविषयी अनेक मते आहेत. हे पात्र शक लोकांतून घेतलेले असावे, असे सर्वसामान्य मत आहे. शकार हा राजाचा मेहुणा ( बायकोचा भाऊ ) असतो, असाही संकेत आहे. त्यावरून असे म्हणता येते, की शकारयुक्त भाषा बोलणारे शक लोक पूर्वी भारतात येत असावे आणि इथल्या राजांना आपल्या बहिणी देऊन अधिकारपदावर चढत असावे.

अंतःपुरातील पात्रे – राजाच्या अंतःपुरात दासदासी तर असतातच; शिवाय वर्षवर ( हिजडा ), कंचुकी ( लांब झगा घालून वावरणारा ), वामन ( खुजा ), किरात ( रोडका ), कुब्ज ( कुबडा ), अशाही काही व्यक्ती असतात. अंतःपुरातील इतर पात्रे भरताने सांगितली आहेत, ती पुढीलप्रमाणे –

( १ ) महादेवी – जिला राजाबरोबर राज्याभिषेक झाला आहे अशी; अर्थात पट्टराणी. ती कुलशीलवती, ईर्षा–क्रोधरहित व क्षमाशील असते. तिचे राजावर प्रेम असते आणि ती त्याचे प्रिय करण्यासाठी सदैव झटत असते.

( २ ) देवी – अनभिषिक्त राणी. ही महादेवीपेक्षा वयाने लहान असते. हिचे प्रेम स्वार्थी असते. ती इतर राजस्त्रियांचा हेवा करते आणि राजाचे लक्ष सदैव आपल्याकडे लागावे, म्हणून नट्टापट्टा करते.

( ३ ) स्वामिनी – रूपवती, शीलगुणयुक्त, राजाची मर्जी संपादन करणारी व त्याच्याकडून सत्कार मिळवणारी स्त्री.

( ४ ) स्थायिनी – रूपयौवनयुक्त, कलाक्रीडानिपुण, मत्सरी, राजाची मर्जी संपादन करण्यात तत्पर व झोप, आळस वगैरे टाकून आपले काम बिनचूक करणारी अशी स्त्री.

( ५ ) भोगिनी – सुशील, शांत, स्वाभिमानी, तटस्थपणे विचार करणारी, अल्पसंतुष्ट व स्वभावाने मृदू अशी स्त्री.

( ६ ) शिल्पकारी – चित्रकलानिपुण व बोलण्यावागण्यात चतुर अशी स्त्री.

( ७ ) नाटकीया – वाद्ये उत्तम वाजविणारी, दुसऱ्याचे मनोगत केवळ मुद्रेवरून जाणारी, गानविद्यानिपुण व चतुर अशी स्त्री.

( ८ ) नर्तकी – नाचण्यात कुशल व रूपगर्विता अशी स्त्री.

( ९ ) अनुचारिका – राजाच्या मागे छायेसारखी असणारी स्त्री.

(१०) आयुक्ता – जिला विशिष्ट कामगिरी नेमून दिली आहे अशी स्त्री. ही कित्येकदा शस्त्रागार, वस्त्रागार, भांडागार, इ. जागी नेमलेली असते.

(११) परिचारिका – राजावर छत्रचामरे धरणारी,

त्याच्या वस्त्रभूषणांवर व पुष्पमालांवर देखरेख करणारी आणि सेवातत्पर अशी स्त्री.

(१२) संचारिणी – राजवाड्याच्या निरनिराळ्या भागांवर पहारा करणारी स्त्री.

(१३) प्रेषणकारिका – राजाचे गुप्त प्रणयविषयक निरोप नेणे-आणणे या गोष्टी करणारी स्त्री.

(१४) महत्तरा – राजाचे कल्याण व्हावे व अंतःपुर सुरक्षित राहावे, असे आशीर्वादपूर्वक चिंतिणारी स्त्री.

(१५) प्रतीहारी – राजाचे संधि-विग्रहाचे निरोप सांगून वेळीप्रसंगी पडेल ते काम करण्यास सिद्ध असणारी स्त्री.

(१६) कुमारिका – प्रणयभावनेशी परिचय नसलेली, स्वाभिमानी, विनयशील आणि ऋजू स्वभावाची मुलगी.

(१७) वृद्धा – राजवाड्यातल्या अनेक पिढ्यांच्या चालीरीती माहीत असलेली व राजाकडून पूज्य मानली गेलेली स्त्री.

(१८) आयुक्तिका – विनयशील, विचारी, मनोनिग्रही, आज्ञाधारक व राजाला हरकामी उपयुक्त ठरणारी स्त्री.

नाटकमंडळीत साधारणपणे किती माणसे कोणत्या प्रकारची कामे करण्यासाठी घेतलेली असतात, त्यांचा विचार भरताने पुढीलप्रमाणे केला आहे–

सूत्रधार– हा नाटकमंडळीतला प्रमुख असतो. याचे लक्षण पुढीलप्रमाणे–

**अस्यादित एव तावल्लक्षणज्ञता, अहीनो वाक्यसंस्कारः,**
**तथा गीतकालविधानज्ञता, स्वरवादित्रतत्त्वबोधः ।**

(ना. शा. २४.९२.९८).

अर्थ– सूत्रधाराला आरंभापासून नाट्याची सर्व लक्षणे माहीत असावी. त्याच्या भाषण-पद्धतीत किंचितही दोष नसावा. त्याला गायन-वादन कलांचे ज्ञान असावे. तसेच स्वर, वाद्य, इ. गोष्टींची शास्त्रीय तत्त्वे त्याला माहीत असावी.

सूत्रधार, हा सर्व नटांचा आचार्य असतो. तो स्वतः नाट्यतत्त्व जाणून ते इतरांना शिकवतो. ज्याला सांप्रतच्या भाषेत नाटकाचे दिग्दर्शन म्हणतात, ते काम सूत्रधाराचेच असते.

पारिपार्श्वक– हा सूत्रधाराचा मदतनीस असतो. तो सूत्रधाराहून गुणांनी कमी असतो.

विदूषक– याचे लक्षण व स्वरूप वर दिलेलेच आहे. हा विचित्र पोषाख करतो. समयोचित उत्तरे देतो व विनोदी गोष्टी बोलून आणि विनोदी चेष्टा करून प्रेक्षकांना आनंद देतो.

भरत – हा नाटकात निरनिराळ्या भूमिका ठरवतो, गायन-वादन जाणतो व सर्व नटांत प्रमुख असतो.

तौरिप – हा नर्तक-मंडळींतला प्रमुख असून, सर्व प्रकारची वाद्ये वाजविण्यात कुशल असावा लागतो.

नंदी– हा संस्कृत व प्राकृत दोन्ही भाषांत निपुण असून, नांदी म्हणणारा असतो. या नांदीत तो सर्व प्रेक्षकांची मधुर-मंगल वाक्यांनी प्रशंसा करतो.

नाट्यकर– नाटककाराला हे नाव आहे.

नायक– हा सर्व प्रकारची वाद्ये शास्त्रशुद्ध रीतीने वाजवणारा असतो.

भरताने निरनिराळ्या भूमिका घेण्याच्या पद्धतीवरून भूमिकांचे तीन भेद केले आहेत, ते असे–

अनुरूप भूमिका– म्हाताऱ्याला म्हाताऱ्याची, तरुणाला तरुणाची, स्त्रीला स्त्रीची व पुरुषाला पुरुषाची भूमिका देणे.

विरूप भूमिका– वरील भूमिकेच्या उलट म्हणजे तरुणाला म्हाताऱ्याची किंवा म्हाताऱ्याला तरुणाची भूमिका देणे.

रूपानुरूप भूमिका– पुरुषाने केलेल्या स्त्रीच्या भूमिकेला हे नाव आहे.

स्त्रिया या जात्याच कोमल असतात. त्यांना ललितकलांची आवड असते. त्यांचा आवाज मधुर असतो व रूप सुंदर असते. म्हणून अशा सर्व गुणांनी योग्य अशा स्त्रीची भूमिका स्त्रीलाच द्यावी, असे भरताने म्हटले आहे.

यावरून भरताच्या काळी बायका नाटकात काम करीत असत; इतकेच नव्हे तर प्रकरण, भाण, वीथी व अंक या रूपकभेदांत मुख्यतः बायकांची कामे बायकाच करीत, असे दिसते. यापुढे भरताने निरनिराळ्या भूमिका घेणाऱ्या नटांमध्ये कोणते गुणविशेष असावे, हे तपशीलवार पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

देवाची भूमिका करणारा नट तरुण, अव्यंग, रेखीव, मध्यम बांधाचा, तेजस्वी अंगकांतीचा, सुंदर चेहऱ्याचा व मधुर आवाजाचा असावा. राक्षस, दानव व दैत्य यांची भूमिका करणारा मनुष्य उंच व लठ्ठ असावा. त्याचा आवाज मेघगर्जनेप्रमाणे असावा आणि त्याची मुखमुद्रा भयावह असावी. सेनापती व अमात्य यांची भूमिका घेणारा नट मध्यम बांध्याचा व अव्यंग असावा आणि तो दिसण्यात प्रगल्भ असावा. कंचुकी व वेदवेत्ता ब्राह्मण यांची भूमिका करणारा नट लांब नाकाचा व पिंगट डोळ्यांचा असावा. सेवकाची भूमिका करणारा नट काणा, खुजा, लठ्ठ व नकटा असावा. ऋषीची भूमिका करणारा नट अंगाने सडपातळ असावा. चैनी माणसाची भूमिका करणारा माणूस लठ्ठ असावा. सारांश उत्तम, मध्यम व अधम अशा भूमिकेला अनुरूप अशी ज्याची बोलण्या-वागण्याची पद्धती व शरीराची ठेवण असेल, त्याप्रमाणे त्या त्या भूमिकेसाठी मनुष्य निवडावा.

**पूर्वरंग** – महत्त्वाच्या शुभ कृत्यांच्या प्रारंभी ज्याप्रमाणे गण

पतिपूजन, पुण्याहवाचन, इ. कृत्ये करतात, त्याचप्रमाणे पूर्वी नाटकाच्या प्रारंभीही काही गोष्टी धार्मिक कृत्ये या स्वरूपात करीत असत. या कृत्यसमूहाला भरताने पूर्वरंग असे म्हटले आहे. त्यातली काही कृत्ये पडद्याच्या आत होत, तर काही पडद्याच्या बाहेर होत. या पूर्वरंगाचे आठ विभाग भरताने पुढीलप्रमाणे सांगितले आहेत–

(१) प्रत्याहार–यात कुतपाची (गायक-वादकसमूह) पडद्याच्या आड नेपथ्यभूमीतून रंगभूमीवर येण्याच्या द्वारात बसण्याची व्यवस्था केली जाई.

(२) अवतरण–कुतपाची मांडणी झाल्यावर गायक व गायिका मिळून सप्त स्वरांचा आरोह–अवरोह करीत.

(३) आरंभ–यात निरनिराळ्या स्वरांचे आलाप घेऊन गाणे सुरू करीत.

(४) आश्रावणा–यात ताल देणारी सर्व वाद्ये मिळवून जुळवून घेत.

(५) वक्त्रपाणी–यात तालवाद्ये मिळवून झाल्यावर त्यातून निरनिराळे बोल काढीत.

(६) परिघट्टना–यात तंतुवाद्ये मिळवून घेत.

(७) संस्वदना–यात गायकाच्या स्वराशी तंतुवाद्यांचा सूर जुळला आहे की नाही, ते पाहत.

(८) आसारित–यात तालवाद्यांवर ज्येष्ठ, कनिष्ठ व मध्य (अतिसावकाश, अतिजलद व मध्यम) असे तालांचे तीन्ही प्रकार वाजवीत.

गीतविधी–एवढे झाल्यावर पडदा दूर होई व तो होत असता गीतविधीस प्रारंभ होई. एखाद्या देवतेच्या स्तुतिपर गीत किंवा पद्य म्हणणे म्हणजे गीतविधी होय. गीतविधीत बहुधा शिवाची स्तुती असे. या गीताचा प्रारंभ मद्रक नावाच्या काव्यजातीने होई. मद्रक म्हणजे वृत्तबद्ध नसलेला पण तालबद्ध असलेला गानयोग्य अक्षरसमूह असावा, असे श्री. गोदावरी केतकर म्हणतात.

वर्धमान–गीतविधीत पडदा उघडला म्हणजे हा विधी करीत. वर्धमानाचा प्रयोग नांदी म्हटली जात असता तिच्या प्रत्येक दोन चरणांमध्ये होई. यात तालाचा वेळ, गीतांची अक्षरे व नर्तकींची संख्या वाढवली जाई.

उत्थापनविधी–हा त्यापुढचा विधी होय. याचा आरंभ उत्थापनी नामक ध्रुवेने होई. या ध्रुवेचा प्रत्येक चरण ११ अक्षरांचा असून त्यात पहिले, दुसरे, चवथे, आठवे व अकरावे ही अक्षरे गुरु असत. ही ११ अक्षरे १६ मात्रा व ८ कला या तालपद्धतीत म्हणायची असत. या विधीचे ४ परिवर्त असत. परिवर्त म्हणजे गिरकी घेणे. प्रत्येक परिवर्तात गीताची लय बदले व सूत्रधार वेगवेगळ्या पद्धतीने गिरक्या घेई. तिसऱ्या परिवर्ताच्या वेळी तो पारिपार्श्वकाच्या हातातून जर्जर (इंद्रध्वज) घेई व तो हाती धरून चवथा परिवर्त करी.

नांदीविधी–हा त्यापुढील विधी होय. या विधीचा प्रारंभ जिच्यातील सर्व अक्षरे दीर्घ असतात, अशा विद्युल्लेखा किंवा विद्युन्माला या वृत्तातील ध्रुवेच्या गायनाने होई. ध्रुवा म्हणून झाल्यावर नांदी मध्यम स्वरात म्हणायची असे. ती अष्टपदा किंवा द्वादशपदा असे.

शुष्का व कृष्टा–हा त्यानंतरचा विधी होय. यात जर्जराची कीर्ती दर्शविणारी व जिच्यातली अक्षरे निरर्थक असतात, अशी ध्रुवा म्हटली जाई.

रंगद्वार–हा त्यानंतरचा विधी होय. यात एखाद्या देवतेची, राजाची अथवा ब्राह्मणांची स्तुती असलेला, असा एक श्लोक असे. सांप्रत उपलब्ध असलेल्या संस्कृत नाटकांत ज्याला नांदी असे समजले जाते, तो श्लोक म्हणजे रंगद्वार होय, असे साहित्यदर्पणात म्हटले आहे.

चारी–रंगद्वार झाल्यावर या नावाचा श्लोक म्हणायचा असे. त्याच्या प्रारंभी सूत्रधार पारिपार्श्वकांसह मागे जाई व असे करीत असता मध्यलयीत अड्डिता ध्रुवा म्हणे. चारीचा श्लोक शृंगारप्रधान असे. तो म्हटला जात असता सूत्रधार जर्जर आडवा-उभा करून काही पावले मागे-पुढे टाकी. शेवटी एक गिरकी घेऊन जर्जर पारिपार्श्वकाच्या हाती देई. चारीनंतर महाचारी नावाची ध्रुवा म्हटली जाई. ही द्रुतलयीत म्हणत. याही वेळी सूत्रधार गिरकी घेई.

नर्कुटक–यानंतर सूत्रधार पारिपार्श्वकांना हाक मारी. ते सूत्रधाराकडे येत असता नर्कुटक जातीचे गायन चालू होई. या गीताची रथोद्धता, उद्‌गता, वंशपत्र, मिताक्षरा, ध्वजवती व हंसास्य ही वृत्ते असत.

या सगळ्याला चतुरस्र पूर्वरंग म्हणत. यात सांगितलेला ताल ८ कलांचा असे. याशिवाय त्र्यस्र नावाचाही एक पूर्वरंग असे. त्यातला ताल ६ कलांचा असे.

एवढा सगळा पूर्वरंगविधी झाल्यावर सूत्रधार निघून जाई व मग खऱ्या नाटकाला सुरवात होई. त्या कामी सूत्रधारासारखाच पोषाख करणाऱ्या व त्याच्याच गुणांनी युक्त अशा स्थापक नावाच्या पुरुषाची योजना असे. तो रंगभूमीवर येऊन देवाब्राह्मणांची मधुर श्लोकाने तालसुरात स्तुती करी व मग नाटकाचे आणि नाटककाराचे नाव सांगून त्यापुढे कोणते पात्र रंगभूमीवर प्रवेश करणार, त्याची सूचना देऊन निघून जाई. स्थापक आणि सूत्रधार हे एकमेकांसारखे असल्यामुळे नाटकाचे व नाटककाराचे नाव स्थापकाने सांगावे का सूत्रधाराने सांगावे

याबद्दल संस्कृत नाट्यचर्चेत घोटाळा झालेला दिसतो. भरताने स्थापक हे नाव योजले असले, तरी ते नाव एकदाच उच्चारून सोडून दिले आहे. अखेर शेवटी तोही स्थापकाला सूत्रधारच म्हणतो.

**इतर ग्रंथ** – भरताच्या मागाहून झालेल्या शास्त्रकारांनी नाटचावर लिहिताना भरताच्याच ग्रंथाचा आधार घेतला आहे. अग्नी पुराणातली नाट्यचर्चा हीही भरतावरच आधारलेली आहे (अग्नी पु. ३३७–३४१). भरताच्या पश्चात नाटचाचा विकास बराच झाला. त्यामुळे नाटचचर्चा करताना पुढच्या शास्त्रकारांनी गायन, नर्तन, प्रहसन, मूकाभिनय, इ. नाटकाचे आनुषंगिक भाग नाटचापासून वेगळे केले आणि केवळ नाटकावर भर दिला. अशा प्रकारे पुढील काळात नाटक एवढचाच भागाचा प्रामुख्याने विस्तार झाल्यामुळे भरताचा ग्रंथ मागे पडला.

भरताच्या मागून झालेल्या नाटचशास्त्रविषयक ग्रंथांत दशरूपक हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. यात नाटक हाच मुख्य प्रतिपाद्य विषय असून, त्यात भरताच्या नाटचशास्त्राचा बराच उपयोग केलेला आहे. त्याचा कर्ता विष्णुपुत्र धनंजय हा असून, तो इ. स. च्या १० व्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. त्या ग्रंथावर अवलोक नावाची एक टीका आहे.

त्यानंतरचा ग्रंथ म्हणजे प्रतापरुद्रीय हा होय. याचा कर्ता विद्यानाथ नावाचा असून, त्याने आपला ग्रंथ सर्वस्वी दशरूपकाला धरूनच लिहिला आहे. त्याच्या पाचव्या भागात नाटकविषयक चर्चा असून, नमुन्यादाखल एक पाच अंकी नाटकच दिले आहे. तेराव्या शतकाच्या अखेरीस हा ग्रंथ निर्माण झाला.

साहित्यदर्पण हा ग्रंथही साहित्यशास्त्रात मूल्यवान ठरला आहे. विश्वनाथ कविराज हा याचा कर्ता होय. यात साहित्याच्या सर्व अंगांची चर्चा असून त्यातला सहावा परिच्छेद हा नाटचविषयक आहे. या ग्रंथाचा काळ चौदाव्या शतकाचा उत्तरार्ध होय, असे म. म. काणे मानतात.

या प्रसिध्द ग्रंथांशिवाय आणखीही काही ग्रंथ हस्तलिखित स्वरूपात आढळतात. [ भ. ना. शा.; सं. ना. सौं.; म. ज्ञा. को. ]

## नाडगौडा

(१) द. भारतातील एक जात. हे शेती करतात. गौडा अगर सेट्टी अशी यांची आडनावे असतात. यांची मातृभाषा तुळू असली, तरी व्यवहारात ते कानडीचा वापर करतात.

यांच्यांत एकूण वीस गोत्रे असून, मातृप्रधान कुटुंबव्यवस्था प्रचलित आहे. आजही हे बहुपत्नीप्रथा पाळतात. विवाहप्रसंगी कलशपूजा महत्त्वाची मानतात. घटस्फोटाचीही चाल आहे; मात्र त्या वेळी पतीने पत्नीला ठराविक रक्कम द्यावी लागते.

हे शिव–विष्णूंची पूजा करतात; परंतु त्यासाठी ब्राह्मणाला बोलावीत नाहीत.

हे लोक प्रेते जाळतात आणि अकरा दिवस सुतक पाळतात. हे वर्षश्राद्ध करीत नाहीत, पण भाद्रपदाच्या वद्य पंधरवडचात मृताच्या प्रीत्यर्थ दाने देतात. [ मै. ट्रा. का. ]

(२) नाडगौडा हा कानडी शब्द आहे. नाड म्हणजे प्रांत किंवा जिल्हा आणि गौडा म्हणजे त्यावरील अधिकारी. नाडगौडा हा अधिकारी महाराष्ट्रातील देशमुख–देशपांडयांच्या दर्जाचा असे. त्याला चौथाईच्या शेकडा तीन टक्के इतकी रक्कम सरकारकडून मिळे, तिला नाडगौडी असे नाव होते. नाडगौडाचा अधिकार वंशपरंपरेने मिळत नसून, तो खुद्द छत्रपतींकडून योग्य व्यक्तीला दिला जाई. [ म. ज्ञा. को. ]

## नाडी

(१) द्रव्य वाहून नेणारी एक नळी. योगशास्त्राने ज्या अंतःशरीराची कल्पना केली आहे, त्यातील ही वस्तू आहे. देहात या नाडचांचे जाळे पसरलेले असते. या सर्व नाडचा कफ, पित्त, इ. आवरक पदार्थ वाहून नेत असतात. प्राणायामाची साधना करण्यापूर्वी या सर्व नाडचांचे शोधन करणे आवश्यक असते; कारण नाडचा अशुद्ध राहिल्या, तर त्यांतून वायूला प्रवेश मिळत नाही. नाडीशुद्धीचाही स्वतंत्र अभ्यास असतो. अभ्यासाच्या योगाने नाडीशुद्धी झाल्यावर देह कृश किंवा लघू बनतो, देहावर तेज येते, जठराग्नी प्रदीप्त होतो, साधक चितारहित होतो आणि त्याला मस्तकात नाद ऐकू येऊ लागतो.

नाडीचक्रातील सुषुम्ना किंवा ब्रह्मनाडी आणि तिच्या दोन बाजूंच्या इडा व पिंगला अशा तीन नाडचा महत्त्वाच्या आहेत. याशिवाय गांधारी, हस्तिजिव्हा, अलंबूषा, पयस्विनी, कुहू, राका, सरस्वती, वारुणी, विश्वोदरी, यशस्विनी, पूया व शंखिनी याही नाडचा त्याखालोखाल महत्त्वाच्या आहेत. या सर्व नाडचा नाभिमंडलातून निघून चारही बाजूंना पसरल्या असून त्या प्राणवाहिनी आहेत. नाडीसमूह जेव्हा अधिक विस्तृत होतो, तेव्हा त्याची संख्या क्रमाने बत्तीस, बहात्तर हजार व साडेतीन कोटी होते. वास्तविक नाडचांची संख्या अनंत आहे. देहावरील प्रत्येक रोमकूपाशी नाडीचा संबंध असतो.

इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन नाडचांचा भ्रूमध्यस्थानी संगम होतो, त्याला त्रिवेणीसंगम असे नाव आहे. ज्याचा आत्मा त्या संगमातून पुढे जाऊन ब्रह्मरंध्रातून बाहेर पडतो, त्याला मोक्ष मिळतो. तसेच या नाडचांवर धारणा करून ईश्वराची उपासना केली असता योगी दुःखमुक्त होतो आणि त्याला ईश्वराचा साक्षात्कार होऊन परमानंदाचा लाभ घडतो,

असे सांगितले आहे. पाहा – इडा, पिंगला, सुषुम्ना. [ भा. सं. सा.; तां. वा. शा.; पूजातत्त्व ]

(२) वधूवरांच्या पत्रिकामेलनात नाडीचा संबंध येतो. नाडीचे आद्य, मध्य आणि अंत्य असे तीन प्रकार असून, सत्तावीस नक्षत्रे या तीन नाडयांत पुढीलप्रमाणे विभागलेली आहेत –

**आद्य नाडी**– अश्विनी, आर्द्रा, पुनर्वसू, उत्तरा, हस्त, जेष्ठा, मूळ, शततारका व पूर्वाभाद्रपदा.

**मध्य नाडी**– भरणी, मृगशीर्ष, पुष्य, पूर्वा, चित्रा, विशाखा, पूर्वाषाढा, धनिष्ठा, व उत्तराभाद्रपदा.

**अंत्य नाडी**– कृत्तिका, रोहिणी, आश्लेषा, मघा, स्वाती, विशाखा, उत्तराषाढा, श्रवण व रेवती.

वधूवरांची एकनाड असू नये; असल्यास दोघांपैकी एकाला मृत्यु येतो, असे जातकशास्त्रात सांगितले आहे. [ हि. ध. ]

## नाडोर

एक जात. या लोकांची वस्ती मुख्यत्वे कर्नाटकात आढळते. नाडू या त्यांच्या मूळ गावावरून यांना नाडोर असे नाव पडले असावे. चार शतकांपूर्वी मुसलमानांच्या छळाला कंटाळून कोच्चिनमधून आपण इकडे आल्याचे ते सांगतात. शेती हा यांचा प्रमुख व्यवसाय आहे. यांच्यांत टोर्के व उप्पू नाडोर या दोन प्रमुख पोटजाती आढळतात. त्यांच्यांत परस्पर रोटीबेटीव्यवहार चालतो. नाडोर लोक व हळवक्की वक्कल यांच्यांत भाषा, राहणी व पेहराव या बाबतीत बरेच साम्य आढळते.

या लोकांत बारा बळी म्हणजे देवक-कुळे आहेत. ते पुढीलप्रमाणे– (१) अज्जन बळी– उपास झाडाचे फळ (२) अने बळी – हत्ती (३) चेंडी बळी (४) गंगा बळी– गंगावळी नदी (५) होते बळी – शेत (६) होन्ने बळी– वृक्ष (७) नाग बळी– नागचांफा वृक्ष (८) सल्यन बळी– साळी (९) शेट्टी बळी– मासे (१०) शिंगे बळी– एक वृक्ष (११) शिरे बळी– एक वृक्ष व (१२) तोलन बळी– लांडगा. बळी हा स्त्रीवंशाकडून मानला जातो. हे लोक आपापल्या बळीला (वृक्ष किंवा प्राणी )पूज्य मानतात. उदा० नाग बळीची स्त्री नागचाफ्याचे फूल केसात घालीत नाही. अने बळीचे लोक हत्तीची पूजा करतात व त्याला नारळ देतात.

**विवाहप्रथा** – यांच्यांत लहान वयात विवाह करण्याची प्रथा आढळते. लग्न पक्के ठरवण्याच्या वेळी हुग-मुंडीसावडू (फुलांनी मस्तक सुशोभित करणे) हा साखरपुडयासारखा विधी करतात. त्या वेळी वरपिता वधूला फुलांची वेणी व मिठाईचा पुडा देतो. हविक ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात.

**देवधर्म** – वेंकटरमण किंवा तिरुपती हे यांचे कुलदैवत आहे. हे गोळीबीर, शांतप्पा, केंगल इ. ग्रामदेवतांनाही भजतात. तुळस, वड, पिंपळ, उंबर या वृक्षांची पूजा करतात. रोगराई सुरू झाली असता ते आपल्या दैवतांना कोंबडया-बकऱ्यांचे बळीही देतात.

**मर्तिकप्रथा** – हे मृतांचे दहन करतात. मुलांना किंवा देवीच्या रोगांना बळी पडलेल्या मृतांना मात्र उत्तरेकडे डोके करून पुरतात. मृताच्या अस्थी व रक्षा गोकर्ण येथील समुद्रात विर्सजित करतात. एखादी व्यक्ती अपघाताने मृत्यू पावली व तिचे शरीर हाती लागले नाही, तर त्या व्यक्तीच्या नावाने एक गवताची मूर्ती करून तिचे दहन करतात. अग्निसंस्कार केलेल्या मृताचे बारा दिवस आणि पुरलेल्या व्यक्तीचे पंचेचाळीस दिवस सुतक पाळतात. यांच्यांत श्राद्धाची प्रथा आहे. [ ट्रा. का. बाँ.; मुं. इ. जा.; म. ज्ञा. को. ]

## नाणी

विनिमयाचे एक साधन. निरनिराळया धातूंची नाणी बनविण्याची प्रथा प्राचीन काळापासून अनेक देशांत चालू आहे. काही विद्वानांचे असे मत होते, की शिकंदराच्या स्वारीनंतर ग्रीक लोकांनी नाणी पाडण्याची कला भारतीय लोकांना शिकवली आणि प्राचीन भारतीय नाणी ग्रीक नाण्यांचे अनुकरण होऊन निर्माण झाली. परंतु हे मत बरोबर नाही, असे आता सिद्ध झाले आहे. प्राचीन साहित्य आणि उत्खननात सापडलेल्या प्राचीन वस्तू व नाणी यांच्या आधारे असे निश्चितपणे ध्यानात आले आहे की, भारतीय नाणक–पद्धती अगदी स्वतंत्रपणे उदयास आली होती. लिडिया (आशिया मायनर) व चीन या देशांतही प्राचीन काळी स्वतंत्रपणे नाणी पाडण्यास प्रारंभ झाला होता.

मनुष्याचे सामाजिक जीवन सुरू झाल्यानंतर भिन्न भिन्न पदार्थांची व वस्तूंची देवघेव अदलाबदलीने होऊ लागली. शेतकरी आपल्याजवळचे जास्त धान्य देऊन हत्यारे, वस्त्रे, मडकी, इ. वस्तू मिळवू लागला. विणकर, लोहार, कुंभार, इ. कारागीरही आपल्या वस्तू दुसऱ्याला देऊन, हवी ती वस्तू घेऊ लागले. पुढे काही ठराविक वस्तू देऊन त्यांच्या किंमतीच्या प्रमाणात अन्य वस्तू किंवा पदार्थ घेण्याची प्रथा सुरू झाली. वैदिक युगात गाय हे विनिमयाचे प्रमुख साधन मानले जात होते. धान्य हे विनिमयाचे साधन जगात सर्वत्र प्रचलित होते व अजूनही खेडेगावांत धान्य देऊन काही वस्तू विकत घेण्याची पद्धत चालू आहे. काही लोक शिंपले, कवडया, इ. वस्तूंचाही उपयोग विनिमयासाठी अजून करतात.

पुढे संस्कृतीच्या विकासक्रमात मनुष्याच्या गरजा अनेक पटींनी वाढल्यामुळे विनिमयाचे एखादे सोपे साधन आवश्यक

वाटू लागले आणि लोक सोने व चांदी या मूल्यवान धातूंचा उपयोग करू लागले. प्रथम ते नैसर्गिक अवस्थेतील धातूंचे तुकडे वापरीत होते; मग धातूंचा चुरा वापरू लागले. कालांतराने धातुपिंडांचा उपयोग होऊ लागला. धातुपिंड म्हणजे शुद्ध धातूच्या लगडी होत. त्यांतूनच धातूंची नाणी उगम पावली. शुद्ध धातूचा ठराविक वजनाचा तुकडा घेऊन, तो ठोकून ठोकून चपटा केला आणि त्यावर विशिष्ट चिन्हे किंवा वर्ण उठविले म्हणजे सध्याच्या अर्थाने नाणे तयार होत असे. धातूच्या पत्र्याचे अन्यत्र कुठेही सापडलेली नाहीत, म्हणून ही भारतीय नाणी जगातील सर्व नाण्यांपेक्षा जुनी मानली जातात.

**प्राचीन काल** – ब्राह्मणग्रंथांत निष्क, शतमान कृष्णल व ही नाणेवाचक नावे आढळतात. प्रथम ती सोने तोलण्याची वजने असावी आणि पुढे तेवढ्याच वजनांच्या धातुपिंडांना ती नावे दिली गेली असावी. 'राजाने रथाच्या चाकांखाली दोन गोलाकार शतमान बांधावे' असे शतपथब्राह्मणात सांगितले आहे. यज्ञप्रसंगी पुरोहितांना दक्षिणा म्हणून शतमान ही नाणी देत,



सर्वांत प्राचीन भारतीय चिन्हाहत नाणी (प्राचीन मुद्रा – संपादक श्री. गौरीशंकर ओझा – या पुस्तकावरून)

ठराविक वजनाचे लंब – चौरस तुकडे कापून त्यांचाही नाण्यांसारखा उपयोग केला जात असे. अशा नाण्यांचा संग्रह करणे सोपे असल्यामुळे व्यापारी लोकांची पुष्कळ सोय झाली. नाण्यांची शुद्धता व त्यांचे वजन यांबद्दल एखादा श्रेष्ठी वा व्यापारी पेढी उत्तरदायी असे आणि त्या श्रेष्ठीची वा पेढीची खूण नाण्यांवर ठोकून अंकित केलेली असे. अशा प्रकारची नाणी चिन्हाहत (पंचमार्क) नाणी या नावाने ओळखली जातात. ही सनपूर्व ६०० च्या सुमारास भारतात प्रचलित होती. इतकी जुनी नाणी असे शतपथ ब्राह्मण व बृहदारण्यकोपनिषद या ग्रंथांवरून कळते. शतमान हे चांदीचे नाणे होते. पाणिनीने अष्टाध्यायीत शतमान, रूप्य, कार्षापण व निष्क या विनिमयसाधनांचा उल्लेख केला आहे. जातकग्रंथांतही निष्क, शतमान, कृष्णल, सुवर्ण व कार्षापण ही नावे आढळतात. मात्र ती नाणी चिन्हाहत नसून, केवळ धातुपिंडरूपी होती. कार्षापण हे तांब्याचे नाणे होते; पण पुढे चांदीच्या नाण्यालाही ते नाव मिळाले.

प्राचीन काळी कृष्णल नावाच्या बिया (गुंजा) सोन्याचे व

चांदीचे वजन करण्यासाठी वापरीत. त्यांनाच पुढे रत्तिका किंवा रत्ती हे नाव मिळाले. शतमान हे नाणे शंभर कृष्णल वजनाचे होते. त्याच्या चौथ्या भागाला पाद हे नाव होते. तांब्याचा व्यवहार कर्ष नामक वजनाने होत असे. कर्ष ही वाल किंवा गुंजेसारखी एक प्रकारची बी होती. कर्षावरूनच तांब्याच्या नाण्याला कार्षापण हे नाव मिळाले असावे. मनुस्मृतीस यासंबंधी जे कोष्टक दिले आहे, ते असे –

**सर्षपा षट् यवो मध्यस्त्रियवं त्वेककृष्णलम् ।**
**पञ्चकृष्णलको माषस्ते सुवर्णस्तु षोडश ।।**
**पलं सुवर्णाश्चत्वारः पलानि धरणं दश ।**
**द्वे कृष्णले समधृते विज्ञेयो रूप्यमाषकः ।।**
**ते षोडश स्याद्धरणं पुराणश्चैव राजतः ।**
**कार्षापणस्तु विज्ञेयस्ताम्रिकः कार्षिकः पणः ।।**

(मनु.८.१३४–३६)

अर्थ– सहा सर्षप (पांढऱ्या मोहरीचे दाणे) म्हणजे मध्यम आकाराचा एक यव, असे तीन यव म्हणजे एक कृष्णल, पाच कृष्णल म्हणजे एक माष, सोळा माष म्हणजे एक सुवर्ण, चार सुवर्ण म्हणजे एक पल, दहा पल म्हणजे एक धरण. दोन कृष्णल म्हणजे एक रौप्यमाषक; असे सोळा रौप्यमाषक म्हणजे चांदीचे धरण किंवा पुराण होय. तांब्याच्या कार्षिकाला कार्षापण किंवा पण असे म्हणतात.



चिन्हाहत नाणी
(श्री. उपाध्याय यांच्या भारतीय सिक्के या पुस्तकावरून)

अग्नी, मत्स्य आणि विष्णुधर्मोत्तर या पुराणांतही निष्क, कृष्णल, सुवर्ण, धरण, पुराण, द्रम, पण ही नाणीवाचक नावे आढळतात. ती नाणी विविध धातूंची व आकारांची आणि चिन्हाहत पद्धतीची होती.

शंभर रत्ती म्हणजे १८० ग्रेन या वजनाची नाणी पूर्वी भारतात प्रचलित होती. नंद व मौर्य वंशांच्या राजांनी ८० रत्ती व ३२ रत्ती वजनाची नाणी बनवली होती. पण परकीय राजांनी १२४ किंवा १२१ ग्रेनची नाणी सुरू केली. कुशाणांची सोन्याची नाणी रोमन नाण्यांप्रमाणे १२१ ग्रेनची आहेत. द्रम व अर्धद्रम ही नाणी ग्रीक राजांनी भारतात प्रचलित केली. द्रमचे वजन ६७ ग्रेन होते. अर्धद्रम ही नाणी पुष्कळ सापडली आहेत. शकांची चांदीची नाणी ३२ ग्रेनची होती. सातवाहनांचीही बरीच नाणी ३२ ग्रेनची आहेत.

द. भारतात कळंजू व मंजाडी नामक बियांचा उपयोग सोने तोलण्यासाठी केला जात असे. कळंजू बीचे वजन ५० ग्रेन असते. तेवढ्या वजनाची वराह नामक नाणी सर्वत्र प्रचलित होती. हून हे २५ ग्रेन वजनाचे नाणे होते आणि फनम हे ५ ग्रेनचे. फनम हे पणाचे अपभ्रष्ट रूप आहे. मंजाडी बीचे वजन ५ ग्रेन असते. त्याचे कोष्टक असे –

१ पुराण = १ कळंजू = १० मंजाडी.

भास्कराचार्यांनी लीलावतीत (१.२) गद्याणक या परिमाणाची माहिती दिली आहे, ती अशी–

**तुल्या यवाभ्यां कथितात्र गुञ्जा ।**
**बल्लस्त्रिगुञ्जो धरणञ्च तेऽष्टौ ।**
**गद्याणकस्तद्द्वयतुल्यमिन्द्र–**
**तुल्यैर्बल्लैस्तथैको घटक प्रदिष्टः ।।**

अर्थ – गुंज बरोबर दोन यव असे इथे म्हटले आहे. तीन गुंजा = एक बल्ल, आठ बल्ल = एक धरण, दोन धरण = एक गद्याणक आणि चौदा बल्ल = एक घटक असे म्हणतात.

यावरून गद्याणकाचे वजन ४८ रत्ती किंवा ८५ ग्रेन ठरते. या वजनाचे नाणे उत्तर व दक्षिण भारतात प्रचलित होते.

**नाणी बनवण्याच्या पद्धती** – प्राचीन भारतीय कारागिरांना नाणी बनवण्याच्या तीन पद्धती माहीत होत्या. त्यांतली चिन्हाहत (पंचमार्क) नाणी करण्याची पद्धत सर्वांत जुनी होय. धातूचे चपटे तुकडे घेऊन त्यांवर टोकदार चिन्हाकृती ठोकून खुणा अंकित करायच्या, अशी ती पद्धत होती. नाण्याचे वजन नियमित असावे, म्हणून त्या तुकड्यांचे कोपरे आवश्यकतेप्रमाणे कापले जात. प्राचीन काळातली शतमान, पुराण, कार्षापण ही नाणी अशा प्रकारे बनवली जात. ती चौकोनी, गोल, लंबवर्तुलाकृती अशी विविध आकारांची असत.

कालांतराने धातूचे पत्रे कापून त्यांवर चिन्हे अंकित करण्याची प्रथा सुरू झाली. अशी नाणी सनपूर्व २०० पर्यंत प्रचलित होती.

नाणी बनवण्याची दुसरी पद्धत ठप्पा या नावाने ओळखली जाते. या पद्धतीत धातूचे तुकडे तापवून त्यांवर हव्या त्या चिन्हांचे व अक्षरांचे ठसे दाबून ती उमटविली जात. अशी नाणी अनेक ठिकाणी सापडली आहेत; ती सनपूर्व ४०० च्या सुमाराची आहेत, असे म्हणतात. त्यांच्या एका किंवा दोन्ही बाजूंवर बोधिवृक्ष, स्वस्तिक, सिंह, हत्ती, इ. आकृती आढळतात.

दोन छापांच्या मध्ये धातूचा गरम तुकडा दाबून दोन्ही बाजू एकदम अंकित केल्या जात. कुणिंद, औदुंबर, यौधेय, इ. गण-राज्यांची अशी सुंदर गोल नाणी मिळाली आहेत. या पद्धतीने नाणी निर्माण होऊ लागल्यानंतर ठोकून खुणा करण्याची पद्धत बंद झाली.

धातूंचा रस साच्यात ओतून नाणी बनवणे, ही तिसरी पद्धत काही विद्वानांच्या मते, ठप्पा पद्धतीच्या पूर्वीची असावी. ओतीव नाणी बनवण्यासाठी मातीचे साचे वापरीत. असे साचे उत्खननात सापडले आहेत. मातीचे साचे बनवून ते भट्टीत ठेवून लाल होईपर्यंत भाजले जात. नंतर त्यांत धातूचा रस ओतला जाई. भट्टी निवल्यानंतर साचे मोडून नाणी काढून घेतली जात. अशी पुष्कळ नाणी एकदम बनवण्यासाठी मोठे साचे बनवून त्यांत नाण्यांच्या आकाराचें लहान खळगे करीत व ते पन्हळीने जोडले जात. अशी नाणी बनवण्यासाठी तांबे



ओतीव नाणी बनवण्याचा साचा ( श्री. वासुदेव उपाध्याय यांच्या भारतीय सिक्के या पुस्तकावरून)

व कासे हे धातू वापरीत. अयोध्या, मथुरा, कौशांबी, इ. जनपदांची ओतीव नाणी सापडली आहेत, ती सनपूर्व तिसऱ्या शतकातली आहेत. सनपूर्व ५०० पासून ही पद्धत भारतात चालू होती, असे श्री. ब्राउन याचे मत आहे.

प्रथम एकाच बाजूवर छाप उमटवण्याची प्रथा होती. पण पुढे परकीयांची नाणी पाहून दोन्ही बाजूंवर छाप उठवणारे साचे तयार करण्यात आले. रोहटक, सुनेत, साची, काशी, नालंदा, एरण, इ. जागी अशा प्रकारचे साचे सापडले आहेत.

**मौर्यपूर्व काळ**– शैशुनाग व नंद या राजवंशांची चिन्हाहत नाणी उत्खननात सापडली असून, त्यांवर वृक्ष, नंदी, पूर्णघट, षट्कोन, इ. आकृती आढळतात. प्राचीन काळी भारतात अनेक व्यापारी संघ होते व त्यांनी व्यापाराच्या सोयीसाठी प्रथम नाणी पाडण्यास सुरुवात केली, असे अनुमान इतिहासवेत्त्यांनी केले आहे. मौर्यकालापूर्वी अशा कित्येक व्यक्ती व संघ नवीन नाणी बनवून त्यांवर आपले चिन्ह अंकित करीत. त्यांना राजाची मान्यता मिळाल्यावर ती नाणी व्यवहारात वापरली जात. राजाच्या कोषात जी नाणी भरली जात, त्यांवर राज-चिन्ह उमटवले जाई. ही नाणी ठप्पा पद्धतीने बनवली जात. तक्षशिलेजवळ व इतरत्रही अशी जुनी नाणी सापडली आहेत.

**मौर्य वंशाची नाणी**— चंद्रगुप्त मौर्य याने एकच्छत्री साम्राज्य स्थापल्यानंतर नाणी बनवण्याचा अधिकार राज्यशासन संस्थेने स्वतःकडे घेतला. चाणक्याच्या अर्थशास्त्रात त्या व्यवस्थेचे वर्णन केलेले आहे. लक्षणाध्यक्ष हा नाणक विभागाचा प्रमुख असे. तो राजाची नाणी बनवी, त्याचप्रमाणे लोकांकडून तांबे किंवा चांदी घेऊन त्यांची नाणी बनवून देई. कर भरण्यासाठी राजाची नाणी द्यावी लागत; तर दुसऱ्या प्रकारची व्यावहारिक नाणी लोक आपसांत वापरीत. भरहूतच्या स्तूपावरील जेतवन-कथा चित्रात अशी नाणी आढळतात.

मौर्य राजांच्या नाण्यांवर सुमेरू पर्वत हे राजचिन्ह आढळते. त्याचप्रमाणे काही नाण्यांवर षट्चक्र, बीजमुद्रा, मोर, चंद्र ही चिन्हे आहेत. त्या काळातली बहुतेक नाणी गोल व चौकोनी आहेत. अशी नाणी भारतात सर्वत्र सापडली असून, अशोकाची सोन्याची, चांदीची व तांब्याची नाणी भारताबाहेरही मिळाली आहेत.

चाणक्याच्या अर्थशास्त्रात रूप हा शब्द नाणे या अर्थाने वापरला आहे. लक्षणाध्यक्ष (नाणक विभाग – प्रमुख) याने रूप्यरूप व ताम्ररूप म्हणजे चांदीची व तांब्याची नाणी बनवावी, असे अर्थशास्त्रात सांगितले आहे. कूट-रूप-कारक म्हणजे खोटी नाणी बनवणारा आणि रूपदर्शक म्हणजे नाणकपरीक्षक यांची माहितीही अर्थशास्त्रात आहे. हिरण्य हा शब्दही नाणकरूपी धन अशा अर्थी वापरलेला आढळतो. मौर्यकालीन नाणी व ती बनवण्याची पद्धती यांचेही वर्णन चाणक्याने केलेले आहे. त्या काळी धरण (पुराण), पाद, पण, माषक, काकिनी, इ. नाणी प्रचलित असून, ती अत्यंत शास्त्रशुद्ध पद्धतीने बनवली जात होती. यावरून मौर्य काळापूर्वी एक किंवा दोन शतके भारतात नाणी पाडण्याची कला विकास पावली होती, यात शंका नाही. मौर्यकाळी चिन्हाहत नाणी सर्वत्र चालू होती.

मौर्य साम्राज्याचा अंत झाल्यानंतर अनेक प्रजासत्ताक गण-राज्ये निर्माण झाली. मालव, औदुंबरायण, अर्जुनायन, यौधेय, कुणिंद, इ. गणराज्यांची चांदीची व तांब्याची नाणी उपलब्ध झाली आहेत. त्या काळातील निगम म्हणजे वणिकसंघही नाणी बनवीत होते. त्यांची व तक्षशिला, मथुरा, पांचाल, कौशांबी, कोसल या जनपदांचीही पुष्कळ नाणी सापडली आहेत. सनपूर्व दुसऱ्या शतकात राज्य करणाऱ्या शुंग वंशाची तांब्याची काही मुळे परिवर्तन झाले आहे. सातवाहन नामक राजाने या वंशाची स्थापना सनपूर्व २३० च्या सुमारास मराठवाड्यात केली होती, असे आता सिद्ध झाले आहे.

सातवाहन राजाच्या तांब्याच्या नाण्यांवर हत्ती, ध्वजचिन्ह व राजाचे नाव आणि मागील बाजूवर उज्जयिनी चिन्ह (फुली व चारही टोकांवर वर्तुळे) व नंदादीप आहे. त्याच्या शिशाच्या नाण्यांवर हत्ती, उज्जयिनी चिन्ह व चंद्रकोर या आकृती











पहिली ओळ (१) महाक्षत्रप रुद्रसिंहाचे रुप्याचे नाणे (२) महाक्षत्रप रुद्रसेनाचे रुप्याचे नाणे (३) महाक्षत्रप विजयसेनाचे रुप्याचे नाणे (४) नहपान याच्या नाण्यावर गौतमीपुत्र सातकर्णी याचे चिन्ह असलेले रुप्याचे नाणे.
दुसरी ओळ (१) क्षत्रप वीरदामनचे रुप्याचे नाणे (२) क्षत्रप विश्वसेन याचे रुप्याचे नाणे
तिसरी ओळ (१) कुशाण वासुदेव (प्रथम) – सोन्याचे नाणे (२) कुणिंद गणाचे रुप्याचे नाणे (३) यज्ञश्री सातकर्णीचे जहाजाचे चित्र असलेले नाणे.
(प्राचीन मुद्रा – संपादक श्री. गौरीशंकर ओझा – या पुस्तकावरून)

नाणी मिळाली आहेत, त्यांवर राजाचे नाव नसून वंशाचे नाव आढळते.

**सातवाहनांची नाणी**— स्वतःच्या नावाने नाणी पाडण्याची प्रथा सातवाहन राजांनी सुरू केली. सनपूर्व तिसऱ्या शतकाच्या उत्तरार्धातील सातवाहन नामक राजाची नाणी हैद्राबाद संस्थानात सापडली आहेत. त्यांवर सिरी सातवाहन अशी अक्षरे अंकित केलेली दिसतात; ती प्राकृत भाषेत आहेत. सातवाहन कुळाच्या उदयाविषयी जी मते प्रचलित होती, त्यांत या नाण्यांआढळतात. माळव्यातील बहुतेक सर्व प्राचीन नाण्यांवर फुली-वर्तुळांचे चिन्ह आढळते, म्हणून त्या चिन्हाला माळवा किंवा उज्जयिनी चिन्ह हे नाव मिळाले आहे.

सातकर्णीचे शिशाचे नाणे सापडले आहे. त्यावर नंदी, त्रिकोण-ध्वज, मागच्या बाजूवर वृक्ष व त्रिरत्न चिन्ह आहे. अशी नाणी दुर्मिळ आहेत. सातकर्णीचा सासरा कळलाय महारठी व सातकर्णी या दोघांची नावे असलेली सनपूर्व २ ऱ्या शतकातली नाणीही उपलब्ध आहेत.

विदर्भातील चांदा व अकोला या जिल्ह्यांत सातवाहनांची पुष्कळ नाणी मिळाली आहेत. त्यावरून विदर्भावर त्यांचे राज्य होते, असे कळते. गौतमीपुत्र सातकर्णी याची तांब्याची नाणी गुजरातेत सापडली आहेत; त्यावरून त्याची सत्ता गुजरातवरही असावी. जबलपूरच्या आसपासही सातवाहनांची नाणी सापडली आहेत.

प्रचलित होती. चांदी, तांबे, शिसे व पोटीन (चांदी व तांबे यांचा संयुक्त धातू) या धातूंची नाणी विपुल होती. सातवाहनांच्या नाण्यांत विशेष कलाकुसर दिसत नाही. प्रारंभीच्या सातवाहन नृपतींची नाणी महाराष्ट्रात सर्वत्र सापडतात. त्यांवर राजप्रतिमा नाहीत. उत्तरकालीन राजांची नाणी आंध्र व कर्नाटक या प्रदेशांतही सापडली आहेत. त्यांवर राजाचे चित्र असते.



कुशाण राजा कुजुल कदफिसेसचे तांब्याचे नाणे.

कुशाण राजा कनिष्काचे सोन्याचे नाणे.

कुशाण राजा हुविष्काचे सोन्याचे नाणे.



कुशाण राजा विम कदफिसेसचे सोन्याचे नाणे.



शक क्षहरात राजा नहपान याचे रुप्याचे नाणे.



गौतमीपुत्र यज्ञश्री सातकर्णीचे रुप्याचे नाणे.





औदुंबरचा राजा धरघोष याचे रुप्याचे नाणे.

यौधेय गणाचे तांब्याचे नाणे.

(सी. जे. ब्राउन यांच्या दि कॉइन्स ऑफ इंडिया या पुस्तकावरून)

सातवाहनांचे साम्राज्य चोळमंडळापासून सौराष्ट्र व माळवा येथपर्यंत पसरले होते. त्या काळी व्यापाराची खूप वृद्धी झाली होती व त्यामुळे देश समृद्ध होता. सातवाहनांची असंख्य नाणी सापडली असून, ती विविध प्रकारची आहेत. त्यांच्या साम्राज्याच्या निरनिराळ्या विभागांत भिन्न भिन्न शैलीची नाणी

शक क्षहरात वंशातील राजा नहपान याचा पराभव केल्यानंतर गौतमीपुत्र सातकर्णी याने नहपानाच्या चांदीच्या नाण्यांवर आपले चिन्ह उमटवून ती वापरात आणली; त्यामुळे ती नाणी सातवाहनांचीच समजली जातात. तशा प्रकारची नवी नाणीही सातवाहन राजांनी बनवली. त्यांवर चैत्य हे चिन्ह आणि राजाचे

चित्र व नाव आढळते. सातकर्णीची पोटीनची नाणी प. भारतात सापडली आहेत, ती आंध्र शैलीची मानली जातात. काही नाण्यांवर बोधिवृक्ष, नंदिपाद, हत्ती, स्वस्तिक ही चिन्हे आहेत; काहींवर सिंह व बोधिवृक्ष ही चिन्हे आणि ब्राह्मी अक्षरांत राजाचे नाव आहे. निरनिराळ्या सातवाहन राजांची शिशाची नाणी आंध्र प्रदेशात सापडली आहेत, त्यांवर सुमेरू पर्वत, घोडा, हत्ती, चैत्य, उज्जयिनी-चिन्ह इ. चिन्हे, आणि राजांची नावे आढळतात. यज्ञश्री सातकर्णीची नाणी माळव्यापासून चोळमंडळाच्या किनाऱ्यापर्यंत सापडली आहेत. त्याचे एक शिशाचे नाणे गुंतूर जिल्ह्यात सापडले आहे. त्यावर जहाज, मासा, शंख, उज्जयिनी चिन्ह इ. आकृती आढळतात. महाराष्ट्रात कोल्हापूरजवळ जी मोठी वाटोळी नाणी सापडली आहेत, त्यांवर चैत्य, स्वस्तिक, धनुष्यबाण ही चिन्हे व शासकांची नावे आहेत; पण ही नाणी आंध्र राजांची नसून त्यांच्या प्रशासकांची असावी, असे विद्वानांचे मत आहे. यज्ञश्री सातकर्णीच्या काही नाण्यांवर पुढे अश्व व चक्र आणि मागे उज्जयिनी चिन्ह आढळते. त्या नाण्यांचे अनुकरण पुढे सेवक वंशाने केले. मात्र त्यांच्या नाण्यांवर चैत्य किंवा पर्वत आढळतो. इक्ष्वाकू वंशाची नाणी सातवाहनांच्या गजचिन्हांकित नाण्यांसारखीच आहेत.

**परकीय राजांची नाणी** – प्राचीन काळी भारताचा व्यापार दूरच्या देशांशी चालत असे. विविध प्रकारच्या भारतीय वस्तू रोमपर्यंत पाठवल्या जात. त्यांची किंमत म्हणून मिळालेली रोमन नाणी भारतीय व्यापारी इकडे आणीत. अशी असंख्य नाणी भारतात सर्वत्र सापडली आहेत.

मौर्य साम्राज्याच्या ऱ्हासानंतर ग्रीक, पह्लव, शक, कुशाण या परकीय लोकांनी भारतावर स्वाऱ्या करून प. भारतात आपली राज्ये स्थापली आणि जित प्रदेशांत आपापल्या पद्धतीची नाणी सुरू केली. ग्रीक राजांच्या नाण्यांवर राजाचा मुखवटा, देवतेची प्रतिमा व ग्रीक अक्षरांत राजाचे नाव छापलेले असे. सनपूर्व दुसऱ्या शतकात डेमेट्रियस व अपोल्लोडोटस या इंडोग्रीक राजांनी तशा प्रकारची चांदीची व तांब्याची नाणी बनवून त्यांवर स्वतःचा मुखवटा, ग्रीक व खरोष्ठी लिपीत आपले नाव आणि नंदी हे शिवाचे चिन्ह अंकित केले. या परकीय नाण्यांचे अनुकरण पुढे मगध, अयोध्या, पांचाल, कौशांबी, इ. देशांच्या राजांनी केले.

कुशाण वंशातील राजा कुजुल कदफिसेस याची सर्व नाणी तांब्याची होती. विम कदफिसेस याने सोन्याची नाणी बनवण्यास प्रारंभ केला. ती नाणी रोमन नाण्यांसारखी आहेत. कुशाण राजे शैव मताचे असल्यामुळे त्यांच्या नाण्यांवर त्रिशूळ, नंदी, शिव या आकृती आढळतात. त्यांची तांब्याची नाणी मिळाली आहेत; पण त्यांनी चांदीची नाणी पाडलीच नाहीत, असे दिसते.

कुशाण वंशातील प्रख्यात राजा कनिष्क याच्या नाण्यांवर इराणी वेशात राजाची प्रतिमा, सूर्य, चंद्र, शिव, इ. देवता व बुद्ध, अग्निकुंड, इ. आकृती आढळतात. प्राचीन असीरिया देशातील नना नामक देवीची प्रतिमा असलेले एक नाणेही त्याने बनवले होते. त्या नाण्यावरूनच नाणक हे नाव प्रचलित झाले असावे, असे अनुमान श्री. जयचंद्र विद्यालंकार यांनी केले आहे. याज्ञवल्क्य स्मृतीत नाणक हा शब्द प्रथम आला आहे (२.२४०–४१). कनिष्क राजाची सोन्याची व तांब्याची नाणी काबूलपासून गाजीपूरपर्यंतच्या विस्तृत प्रदेशात सापडली आहेत.

शक लोकांनी भारतात तक्षशिला, मथुरा, सौराष्ट्र, गुजरात, माळवा, इ. प्रदेशांत आपली सत्ता स्थापिली होती. जित प्रदेशांत त्यांचे क्षत्रप राज्यकारभार करीत होते. कालांतराने ते क्षत्रपच राजे बनले. त्यांची असंख्य नाणी सापडली आहेत. शकांची बहुतेक नाणी इंडोग्रीक राजांच्या नाण्यांसारखी आहेत. सौराष्ट्रातील क्षत्रपांनी नाणकइतिहासात एक नवीनच प्रथा सुरू केली; ती म्हणजे नाण्यांवर शकवर्ष उमटवणे. महाक्षत्रप जीवदामन याची अशी नाणी उपलब्ध आहेत.

पह्लव वंशातील राजा गोंडोफरेज याच्या नाण्यांवर अश्वारूढ राजाची प्रतिमा आहे. त्याच्या एका नाण्यावर शिवप्रतिमाही आढळते.

शकांची चांदीची व तांब्याची नाणी अनेक शतके प्रचलित होती. त्यांवर एका बाजूला राजाचा मुखवटा व ग्रीक अक्षरे आणि दुसऱ्या बाजूला मेरू पर्वत व ब्राह्मी अक्षरांत राजा व राजपुत्र यांची नावे आढळतात.

या शक लोकांपैकी चुटू कुलातील मान नामक राजाने सातवाहनांच्या नंतर (इ. स. चे तिसरे शतक) दक्षिणेत आपले स्वतंत्र राज्य स्थापले असावे. त्याची व त्याच्या वंशजांची नाणी सापडली आहेत. त्यांतील काही सातवाहनांच्या नाण्यांसारखी आहेत; तर काही शकांच्या नाण्यांसारखी वज्र-बाण चिन्हांकित आहेत.

**गणराज्यांची नाणी** – सातवाहनांच्या कालखंडात भारतात अनेक गणराज्ये नांदत होती. त्यांची चांदीची व तांब्याची नाणी उपलब्ध आहेत. त्यांवर आलेख छापलेले आहेत. बहुतेक नाण्यांवर ब्राह्मी अक्षरे आढळतात; पण औदुंबर, कुणिंद व यौधेय या गणांनी ब्राह्मीबरोबर खरोष्ठी लिपीचाही वापर केला आहे. त्या नाण्यांवर गणांची नावे, शासकाचे व इष्टदेवतेचे नाव, तसेच शिव, कार्तिकेय, सूर्य, हत्ती, छत्र, वृक्ष, त्रिशूळ

स्वस्तिक, वृषभ, इ. आकृती आणि 'मालवानां जयः।' 'यौधेय-गणस्य जयः।' इ. आलेख आढळतात.

**गुप्तकालीन नाणी**— इ. स. च्या तिसऱ्या शतकात मगधाच्या गुप्त राजांनी कुशाणांवर प्रभुत्व मिळवले. गुप्त राजांनी प्रथम कुशाणांच्या नाण्यांप्रमाणे काही नाणी बनवली होती. पण लवकरच त्यांनी संपूर्ण भारतीय शैलीची नवी नाणी निर्माण वलेली दिसतात. पहिला चंद्रगुप्त व कुमारदेवी यांच्या विवाहाच्या वेळी पाडलेल्या नाण्यांवर राजाराणींच्या आकृती आहेत. समुद्रगुप्ताने दिग्विजयानंतर अश्वमेघ यज्ञ केला, त्या प्रसंगी बनवलेल्या नाण्यावर यज्ञाचा घोडा पताकायुक्त यूपाला बांधलेला दिसतो.

समुद्रगुप्ताला विविध प्रकारची नाणी निर्माण करण्याचा



चंद्रगुप्त दुसरा याचे तांब्याचे नाणे – छत्र व गरुडांकित



समुद्रगुप्ताचे सोन्याचे नाणे –पुढील बाजूवर यज्ञ करणारा राजा



समुद्रगुप्ताचे सोन्याचे नाणे – पुढील बाजूवर वीणावादक राजा

चंद्रगुप्त दुसरा याची नाणी – कुमारदेवी व अश्वमेघाचा अश्व ही चित्रे असलेली



चंद्रगुप्त दुसरा याचे नाणे – पुढील बाजूवर धनुर्धर राजा

चंद्रगुप्त दुसरा याचे नाणे – पुढील बाजूवर अश्वारूढ राजा

चंद्रगुप्त दुसरा याचे नाणे – वर छत्रासह राजा

कुमारगुप्त पहिला याचे सोन्याचे नाणे – वर सिंहाला मारणारा राजा

(सी. जे. ब्राउन यांच्या दि कॉइन्स ऑफ इंडिया या पुस्तकावरून)

केली. त्यांची बहुतेक नाणी शुद्ध सोन्याची आहेत. त्यांवर गरुडध्वज हे राजचिन्ह अंकित केलेले आढळते. नाण्यांवर संस्कृत भाषेत आलेख उमटवण्याची प्रथा गुप्तांनी सुरू केली. समृद्धीचे प्रतीक म्हणून लक्ष्मीचे चित्र त्यांच्या नाण्यांवर पुढील भागी असते. काही नाणी विशेष प्रसंगाचे स्मारक म्हणून बनछंद होता. त्याच्या काही नाण्यांवर काव्यपंक्ती आहेत; काहींवर त्याची शस्त्रसज्ज प्रतिमा असून, काहींवर तो सिंहावर शरसंधान करताना दिसतो आहे. एका नाण्यावर तो वीणा वाजवताना दिसतो, तर एकावर त्याची परकीय वेषभूषेतली प्रतिमा असून, तो उभा राहून यज्ञकुंडात आहुती टाकीत आहे.

चंद्रगुप्त विक्रमादित्य, कुमारगुप्त व स्कंदगुप्त यांनीही विविध प्रकारची सोन्याची, चांदीची व तांब्याची नाणी बनवली होती. त्यांतल्या काही नाण्यांवर धनुर्धारी राजाची मूर्ती दिसते, तर काहींवर राजाच्या मागे छत्रधारी सेवक दिसतो. काहींवर राजा पर्यंकासीन आहे; तर काहींवर तो सिंहाशी झुंजत आहे. एका नाण्यावर राजा अश्वारूढ आहे, तर दुसऱ्यावर गजारूढ आहे. काही नाण्यांवर विष्णुमूर्ती असून, एका बाजूला राजा स्थानमधील भरतपूर संस्थानातील नगलाछेला नामक गावी सुमारे दोन हजार नाण्यांचा संग्रह मिळाला आहे. त्यात विविध प्रकारची नाणी आहेत. स्कंदगुप्ताच्या वेळी हूणांच्या आक्रमणामुळे हा खजिना जमिनीत पुरून ठेवला गेला असावा, असे अनुमान केले जाते. गुप्तकालीन चांदीची नाणी सातारा येथें, तशीच प. भारतात अन्यत्रही सापडली आहेत.

गुप्तकाळात रोम, अरबस्तान, इराण, इ. देशांशी भार-



गुप्तसम्राट कुमारगुप्त याची सोन्याची नाणी (१) अश्वारूढ (२) सिंहाला मारणारा (३) धनुर्धारीं (४) गजारूढ राजा

( प्राचीन मुद्रा – संपादक श्री. गौरीशंकर हीराचंद ओझा – या पुस्तकावरून)







(१) कुमारगुप्त याचे सोन्याचे नाणे – गेंड्याला मारणाऱ्या राजाची प्रतिमा – (श्री. वासुदेव उपाध्याय यांच्या भारतीय सिक्के या पुस्तकावरून). (२) व (३) चंद्रगुप्त दुसरा याची सोन्याची नाणी.

उभा आहे. समुद्रगुप्ताप्रमाणे कुमारगुप्ताचीही अश्वमेधाची आणि वीणावादनाची नाणी सापडली आहेत.

गुप्तसम्राटांची सोन्याची २०० नाणी प्रथम इ. स. १८७३ साली कलकत्त्याजवळ कालीघाट येथे सापडली. त्यानंतर वाराणसीजवळ भरसार येथे एक मोठा संग्रह सापडला. पुढे बंगाल, बिहार, उ. प्रदेश या प्रांतांतील अनेक नगरांजवळच्या उत्खननात गुप्तांची सोन्याची पुष्कळ नाणी सापडली. अलिकडे राजताचा व्यापार खूपच वाढला होता. त्यामुळे रोमहून असंख्य सोन्याची नाणी भारतात आली. आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या सोयीसाठी गुप्त नरेशांनी रोमन दिनेरियस या नाण्यासारखे सोन्याचे नाणे बनवून त्याला दीनार हे नाव दिले. त्याचे वजन १२१ ग्रेन आहे. पुढे स्कंदगुप्ताने १३२ व १४६ ग्रेन वजनाची नाणी सुरू केली.

इ. स. च्या चौथ्या शतकात चंद्रगुप्त द्वितीय याने माळवा

व सौराष्ट्र हे प्रदेश जिंकले आणि तिथे शक-क्षत्रपांची जी चांदीची नाणी चालू होती, त्यांसारखी स्वतःची चांदीची नवी नाणी बनवली. त्यांवर पुढीलभागी राजाचे चित्र, ब्राह्मी अक्षरे व गुप्त संवताचे वर्ष आणि मागच्या बाजूवर गरुडाची आकृती व आलेख दिसतो. काही नाण्यांवर मोराची आकृती आहे.

प्रारंभी शुद्ध सोन्याची व चांदीची नाणी पाडली जात होती. पण इ. स. च्या सहाव्या शतकात हूणांच्या आक्रमणामुळे गुप्त वंशाची सत्ता दुबळी झाल्यानंतर त्यांच्या नाण्यांची शुद्धता कमी झाली; हिणकस सोने वापरले जाऊ लागले. त्याचप्रमाणे तांब्याच्या नाण्यांवर चांदीचे पाणी देऊनही काही नाणी बनवलेली आढळतात.

पुष्कळ चांदीची नाणी सापडली आहेत. ती क्षत्रपांच्या नाण्यांसारखी असून, त्यांवर त्रिशूळ हे चिन्ह आढळते. मात्र त्यावर शर्व या राजाचे नाव आहे. तो इ. स. ४०० च्या सुमारास होऊन गेला असावा.

**मध्ययुगातील नाणी–** गुप्तांच्या ऱ्हासकाळात त्यांनी काही थोडी सोन्याची व बरीच तांब्याची नाणी पाडली. ती विशेष चांगली नाहीत. इ. स. च्या सहाव्या शतकात मध्य भारत, माळवा व पंजाब या प्रदेशांत हूणांची सत्ता प्रस्थापित झाली होती. हूण सरदार तोरमाण व मिहिरगुल यांनी गुप्तशैलीची चांदीची व तांब्याची नाणी पाडली. काही नाण्यांवर त्यांची नावे आहेत. त्यांची बरीच नाणी सस्सनिय ढंगाची असली,








वरची ओळ– (१) शाही राजा सामंत देव याचे चांदीचे नाणे (२) विग्रहपाल-द्रम (३) कलचुरी गांगेयदेव याचे सोन्याचे नाणे
खालची ओळ–(१) विजयानगर सम्राटांचे अर्धपगोद (२) आदिवराह द्रम (३) गौडाधिपती शशांक याचे सोन्याचे नाणे.
(दि कॉइन्स ऑफ इंडिया– सी. जे. ब्राउन, प्राचीन मुद्रा– संपादक– पं. गौरीशंकर ओझा व भारतीय सिक्के– श्री. वासुदेव उपाध्याय, या पुस्तकांवरून)

गुप्तकाळात ठप्पा व ओतीव या दोन्ही पद्धतींनी नाणी बनवली जात. प्रारंभीच्या गुप्त राजांनी नाण्यांचे तोलमाप व धातूंची शुद्धता यांकडे विशेष लक्ष पुरवले. गुप्तांची नाणी कलेच्या दृष्टीनेही सुंदर व उत्कृष्ट आहेत.

वाकाटकांचे राज्य गुप्तकाळातच नांदत होते. त्या वंशातील राजांनी वेगळी नाणी पाडली नाहीत, असे दिसते. गुप्त राजांची सोन्याची नाणी वाकाटकांच्या राज्यात प्रचलित होती. त्याचप्रमाणे शक क्षत्रपांची चांदीची नाणीही तिथे चालत असावी.

गुजरात, कच्छ व काठियावाड या भागात वलभीच्या मैत्रकांची तरी त्यांवर ब्राह्मी लिपी व संस्कृत भाषेतील अक्षरे आढळतात. त्यांच्या सर्व नाण्यांवर एफथलाइट हे हूणांचे चिन्ह आहे. ती नाणी सुबक नाहीत.

गुप्तसाम्राज्य नष्ट झाल्यानंतर बंगाल, कनौज, इ. प्रदेशांतही स्वतंत्र राज्ये स्थापन झाली. प्रारंभी बंगालमध्ये गुप्तशैलीचीच नाणी पाडली गेली. इ. स. च्या सातव्या शतकात तिथे शशांक नामक प्रतापी राजा होऊन गेला. त्यानेही गुप्तांच्या नाण्यांसारखी सोन्याची नाणी बनवली; पण त्यांच्या वरच्या भागी शिव आणि नंदी यांच्या प्रतिमा चित्रित केल्या.

इ. स. च्या पाचव्या शतकात द. कोसलावर नळ वंशाचे राज्य होते. त्या राजांची सोन्याची गोल नाणी सापडली आहेत. ती ठप्पा पद्धतीची असून, त्यांच्या एका बाजूवर नंदी, चंद्रकोर व राजाचे नाव आहे.

उत्तर गुप्तकाळात कनौज येथे मौखरी वंशाचे राज्य होते. त्या वंशातील राजांची चांदीची नाणी गुप्तशैलीची आहेत. त्यांवर मोर हे चिन्ह आढळते. त्यानंतर हर्षवर्धनाचे राज्य तिथे सुरू झाले. त्याच्या चांदीच्या नाण्यांवर संवत, तिथी व शिलादित्य हे त्याचे नाव आहे. त्याच्या नंतर गुर्जर प्रतीहार वंशाने कनौजवर राज्य केले. त्या वंशातील सर्वश्रेष्ठ राजा मिहिरभोज याची चांदीची नाणी उपलब्ध झाली आहेत. त्या नाण्यांवर वराहमूर्ती, सूर्यचक्र, यज्ञकुंड या आकृती व नागरी अक्षरे दिसून येतात. ती नाणी आदिवराह या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यांना आदिवराह द्रम असेही म्हणतात. बंगालचा राजा विग्रहपाल याने त्यांचे अनुकरण करून विग्रहपाल द्रम हे नाणे बनवले होते. मध्ययुगातील बहुतेक राजांनी ६० ग्रेन वजनाचे द्रम पाडले होते. भरतपूर प्रदेशातील, इ. स. च्या आठव्या शतकातील, शूरसेन वंशाचा राजा वत्सदामन याचे वराहांकित सोन्याचे नाणे सापडले आहे. त्यावरूनच भोजाने आदिवराह बनवला असावा. वत्सदामनच्या नाण्याच्या मागील बाजूवर सवत्स गोमाता दिसते.

कलचुरी वंशाचा मूळ पुरुष कृष्णराज याची चांदीची नाणी राजस्थान, माळवा व महाराष्ट्राचे अनेक जिल्हे अशा विस्तीर्ण प्रदेशात सापडली आहेत. त्या काळातल्या चालुक्य नरेशांनी स्वतःच्या नाण्यांबरोबर कलचुरी कृष्णराजाची चांदीची नाणी आपल्या राज्यात प्रचलित होऊ दिली. ती नाणी महाराष्ट्रात इ. स. च्या सातव्या शतकाच्या अखेरपर्यंत चालू होती. त्यांच्या पुढील भागी राजाचा मुखवटा आणि मागील भागी राजाचे नाव व नंदी आहे. इ. स. च्या दहाव्या शतकात मध्य भारतात कलचुरी वंशातील प्रतापी राजा गांगेयदेव याने गुप्त सम्राटांच्या नाण्यांसारखी सोन्याची नाणी प्रचलित केली. मात्र ती वजनात हलकी असून, त्यांची बनावट कलाहीन आहे. त्यांवर वरच्या भागी राजाचे नाव आणि पृष्ठभागी लक्ष्मीची प्रतिमा आहे. त्याने चांदीची व तांब्याची नाणीही तयार केली होती. त्याच्या चांदीच्या नाण्यांवर नंदी व घोडेस्वार या आकृती दिसतात. इ. स. च्या अकराव्या शतकात रत्नपूरच्या कलचुरी शाखेतील जाजल्लदेवानेही सोन्याची व तांब्याची नाणी पाडली होती. सोन्याच्या नाण्यांवर त्याचे नाव आणि गजशार्दूल हे चिन्ह आहे; तर तांब्याच्या नाण्यांवर हनुमान आहे. त्याच्या वंशजांची नाणीही उपलब्ध आहेत.

त्याच काळात चंदेल वंशातील कीर्तिवर्मदेव यानेही गांगेयदेव-शैलीची, पण मिश्रित सोन्याची नाणी बनवली होती. त्याचा पुत्र हल्लक्षणवर्मा यानेही सोन्याचे द्रम हे नाणे बनवले होते. त्याची तांब्याची नाणीही उपलब्ध झाली आहेत. त्यांवर लक्ष्मीच्या जागी हनुमानाची प्रतिमा आढळते. मदनवर्मा याने लक्ष्मीप्रतिमांकित चांदीची नाणी पाडली होती. दुसऱ्या कोणत्याही चंदेल नृपतीची चांदीची नाणी उपलब्ध नाहीत. वीरवमा याची नाणी दुर्मिळ आहेत. त्याचे नाणे त्रिपुरी येथे मिळाले आहे, त्यावरून चंदेलांचे चेदी देशावर राज्य होते, असे दिसते. चंदेल वंशातील इतर राजांनीही सोने व तांबे या धातूंची नाणी पाडली होती व ती इ. स. च्या बाराव्या शतकात प्रचलित होती. गाहडवालच्या राठोडवंशी राजांनीही गांगेयदेव-शैलीची सोन्याची व चांदीची नाणी बनविली होती. कच्छपघात वंशातील वीरसिंहदेव याची सोन्याची नाणी त्याच प्रकारची आहेत.

पंजाब व काश्मीर या प्रदेशांत कुशाणांच्या नंतर शाही नामक परकीय राजांची सत्ता प्रस्थापित झाली होती. पुढे इ. स. च्या नवव्या शतकात त्या शाही राजांचा ब्राह्मण मंत्री कल्लर याने त्यांचे राज्य बळकावले. त्याचा वंश हिंदू शाही या नावाने प्रसिद्ध आहे. त्या वंशातील सामंतदेव, भीमदेव, जयपाल, इ. राजांनी अनेक प्रकारची चांदीची व तांब्याची नाणी बनवली होती. काही नाण्यांवर नंदी व घोडेस्वार, काहींवर गज व सिंह, तर काहींवर मोर व सिंह अशा आकृती आहेत.

काश्मीरमध्ये इ. स. च्या ६ ते ८ व्या शतकांत राज्य करणाऱ्या अनेक राजांची भिन्न प्रकारची कुशाण शैलीची नाणी सापडली आहेत. त्या नाण्यांवर प्रतापादित्य, यशोवर्मा, विनयादित्य, इ. राजांची नावे आढळतात. इ. स. च्या नवव्या शतकातील उत्पल वंशाच्या राजांनी असंख्य तांब्याची नाणी पाडली; मात्र ती कुशाण शैलीची नसून, भारतीय शैलीची आहेत. त्यानंतरच्या अनेक राजांनी बनवलेल्या तांब्याच्या नाण्यांवरही एका बाजूला राजाची प्रतिमा आणि दुसऱ्या बाजूला त्याचे नाव व लक्ष्मीची प्रतिमा असते.

मध्ययुगात मुसलमानी स्वाऱ्यांमुळे भारतात अंदाधुंदी माजली, व्यापार खूप घटला व चांदीची आयातही बंद झाली. त्यामुळे त्या काळात चांदीची नाणी फारशी निर्माण होऊ शकली नाहीत. थोडी सोन्याची व बहुतेक तांब्याची व पोटीनची नाणी आढळतात. इ. स. च्या दहाव्या शतकात राजस्थानातील तोमर व चौहान वंशाच्या राजांनी तांब्याची नंदी व घोडेस्वार असलेली नाणी बनवली. त्यांवर मागील बाजूला लक्ष्मीची प्रतिमा असते. पृथ्वीराजाने मात्र चांदीचे द्रम बनवले होते. त्या काळातील बहुतेक नाण्यांवर देवनागरी लिपीत आलेख आढळतात.

**दक्षिण भारतीय नाणी–** द. भारतात जी जुनी नाणी सापडली आहेत, ती अगदी लहान असल्यामुळे त्यांवरील अक्षरे स्पष्टपणे वाचता येत नाहीत. काही नाण्यांवर अक्षरेच नाहीत. त्यांवरील आकृतीही स्पष्ट नाहीत. तिथीचा उल्लेख कुठेच नसतो. त्यामुळे इतिहासाच्या अभ्यासासाठी ती नाणी फारशी उपयोगी पडत नाहीत. उ. भारताप्रमाणे द. भारतातही प्राचीन काळी पुराण नामक चिन्हाहत (पंचमार्क) नाणी प्रचलित होती. इ. स. च्या दुसऱ्या शतकापर्यंत अशा प्रकारची सोन्याची नाणी (चपटे गोळे व त्यांवर अस्पष्ट छाप, वजन ५२ ग्रेन) चालू होती. त्यानंतरच्या काळात द. भारताचा रोमशी व्यापार खूप वाढला होता. त्यामुळे रोमची सोन्याची नाणी द. भारतातही पुष्कळ सापडली आहेत.

कदंब वंशातील राजांनी आपल्या नाण्यांवर पद्म हे चिन्ह कोरले आहे, म्हणून ती नाणी पद्मटंक या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यांवर नागरी लिपीत लेख आहेत. होयसळ राजांची नाणी सिंहांकित असून, त्यांवर कन्नड भाषेत लेख आहेत.

पोर्तुगीज वगैरे पाश्चात्य लोकांनी द. भारतातील वराह या नाण्याला पगोद हे नाव दिले. इ. स. च्या बाराव्या शतकानंतर वराह नाण्याचे विविध प्रकार प्रचलित होते. त्यांवर एका बाजूला गरुड, नंदी, मनुष्य यांपैकी एखादी आकृती आणि दुसऱ्या बाजूला कन्नड भाषेत राजाचे नाव लिहिलेले असते. अनंतवर्मा नामक पुरुषाने ओडिसात जाऊन तिथे गंग वंशाचे राज्य स्थापले. गंग राजांनी नंदीचिन्हांकित नाणी सुरू केली. त्यांच्या नाण्यांवर तिथी व राज्यवर्ष छापलेले आढळते. काकतीय राजांनी अशीच नाणी पाडली होती.



वरची ओळ– (१) चिन्हाहत सुवर्णपिंड (२) पद्मटंक (३) पांड्य वंशाचे सोन्याचे मत्स्यांकित नाणे

खालची ओळ – (१) पूर्व चालुक्य राजराज याचे सोन्याचे नाणे (२) कोंगुदेशाचे गजांकित सोन्याचे नाणे (३) चोळ वंशाचे चांदीचे नाणे.

(सी. जे. ब्राउन यांच्या दि कॉइन्स ऑफ इंडिया या पुस्तकावरून)

चालुक्य वंशातील राजांच्या नाण्यांवर वराहाची आकृती असते. त्या वंशाची सत्ता दीर्घ काळ व विस्तृत भागावर राहिल्यामुळे द. भारतातील सोन्याची नाणी वराह या नावानेच प्रसिद्ध आहेत. चालुक्यांची नाणी पेल्यासारखी खोलगट असून, त्यांच्या एका बाजूवर वराह व दुसरे काही चिन्ह आढळते आणि दुसरी बाजू मोकळीच असते. ती नाणी ठप्पा पद्धतीने बनविलेली असावी. इ. स. च्या बाराव्या शतकातील पश्चिम चालुक्य शाखेच्या जयसिंह व त्रैलोक्यमल्ल या राजांच्या नाण्यांवर सिंहाची आकृती आढळते. पूर्व चालुक्य शाखेतील कुब्ज विष्णुवर्धन याच्या नाण्यांवर राजाचे नाव आणि लेख तेलुगू लिपीत व भाषेत छापलेले आहेत. नंतरच्या चालुक्य राजांच्या नाण्यांवर कन्नड लिपीत नावे आहेत.

तमिळ प्रदेशात पल्लव, पांड्य व चोळ या राजवंशांची सत्ता भिन्न भिन्न काळी चालू होती. त्यांतील पल्लव राजांची नाणी आंध्र सातवाहनांच्या नाण्यांप्रमाणे बनवलेली होती. त्यांच्या पगोद व फनम या नाण्यांवर सिंहाची आकृती आढळते.

पांड्य वंशातील राजांची दोन प्रकारची नाणी आढळतात. एका प्रकारची नाणी गोल व ठप्पा पद्धतीची असून, त्यांवर हत्ती हे चिन्ह असते. दुसऱ्या प्रकारची सोन्याची व तांब्याची नाणी मछलीचिन्हांकित आहेत.

इ. स. च्या नवव्या शतकात चोळ वंशाची सत्ता प्रस्थापित झाली. त्यांच्या सोन्याच्या नाण्यांवर धनुष्य, वाघ व मासा ही चिन्हे आढळतात. राजराज चोळ याच्या तांब्याच्या नाण्यांवर

पुढच्याभागी उभा मनुष्य आणि पृष्ठभागी बसलेला मनुष्य व नागरी लिपीत राजाचे नाव आहे. मदुरेच्या नायक राजांनीही अशाच प्रकारची नाणी काढली होती.

राष्ट्रकूट वंशातील राजांनी अनेक नाणी निर्माण केली होती, असे त्यांच्या निरनिराळ्या आलेखांतील निर्देशांवरून ध्यानात येते. त्यांत द्रम्म, सुवर्ण, कळंजू, गद्याणक, कासू, मंजाडी व अक्कम ही नावे आढळतात. द्रम्म हे ग्रीक शब्द ड्राम याचे रूपांतर आहे. त्या नाण्याचे वजन सुमारे ६५ ग्रेन होते. ती सोने व चांदी या दोन्ही धातूंची होती, असे दिसते. सुवर्ण हे सोन्याचे नाणे तेवढ्याच वजनाचे असावे. कळंजू, गद्याणक व कासू ही नाणीही सोन्याचीच होती. गद्याणक = २ कळंजू आणि ७ कळंजू=२० कासू असे त्यांचे प्रमाण होते. राष्ट्रकूटांची अशी काही सोन्याची नाणी अलिकडे सापडली आहेत. त्या काळी द. भारतात सोन्याची नाणीच अधिक प्रचलित होती. मलिक काफूर याने जी अमाप संपत्ती लुटून नेली, त्या लुटीतली बहुतेक नाणी सोन्याची होती.

त्यानंतर द. भारतात विजयनगरचे साम्राज्य प्रस्थापित झाले. विजयनगरच्या सम्राटांची विविध प्रकारची नाणी उपलब्ध आहेत. त्यांची सोने, चांदी, तांबे, कथिल व पोटीन या धातूंची नाणी पूर्वीच्या नाण्यांसारखीच आहेत. त्यांतील पुष्कळ नाण्यांवर नंदी व हत्ती यांच्या आकृती आहेत; काहींवर गरुड किंवा हनुमान आहे. हरिहर (प्रथम) याच्या नाण्यांवर देवीची प्रतिमा आहे, तर रामरायाच्या नाण्यांवर विष्णूची प्रतिमा आहे. कृष्णदेवरायाच्या नाण्यांवर वेंकटेश, शिव-पार्वती, बाळकृष्ण, या देवता आणि नंदी, गरुड, गंडभेरुंड ही चिन्हे आढळतात; पृष्ठभागी नागरी लिपीत राजाचे नाव असते. तिरुमल्लराय याचे एक लहानसे नाणे रामटंकी या नावाने प्रसिद्ध आहे; कारण त्यावर राम, सीता, लक्ष्मण व हनुमान यांच्या प्रतिमा आहेत. त्या नाण्याचे अनुकरण नंतरच्या अनेक राजांनी केले. ओडिसातही तशा प्रकारचे नाणे प्रचलित झाले होते. विजयनगरच्या राजांची सोन्याची अनेक नाणी वऱ्हाडात सापडली आहेत. ती मुसलमानांनी लुटून नेलेली असावी. विजयनगर साम्राज्याच्या काळातील सोन्याच्या नाण्यांना गद्याण (वराह), प्रताप, काटी, पण, कासू, हाग अशी नावे होती. तार नामक चांदीचे नाणे प्रचलित होते. तांब्याच्या नाण्यांना पण, जितल, कासू अशी नावे होती. त्या नाण्यांवर प्रारंभीच्या कालात कन्नड भाषेतील लेख आढळतात; पण उत्तरकालीन नाण्यांवर संस्कृत लेख आहेत.

विजयनगरच्या साम्राज्यात अनेक ठिकाणी टाकसाळी होत्या. मांडलिक राजांनाही नाणी पाडण्याचे अधिकार दिलेले होते. साम्राज्याचा ऱ्हास झाल्यानंतर इक्केरी, तंजाऊर व मदुरा येथील नायक राजांनी आपली तांब्याची नाणी प्रचलित केली. त्यांच्या एका बाजूवर गणेश, हनुमान, सूर्य व चंद्र यांच्या आकृती असतात आणि दुसऱ्या बाजूवर तमिळ भाषेत राजाचे नाव असते. इक्केरी वराह नामक सोन्याच्या नाण्यावर शिव-पार्वतीच्या प्रतिमा आहेत. म्हैसूर येथील वोडेयर राजांनी गजचिन्हांकित नाणी सुरू केली. त्या वंशातील कंठीरव नरसराज या राजाने इ. स. १६४५ साली श्रीरंगपट्टम येथे टाकसाळ उघडली. त्यापूर्वी राज्यातील अनेक पाळेगार स्वतंत्रपणे नाणी पाडीत होते. कंठीरव याच्या सोन्याच्या नाण्यांवर लक्ष्मीनरसिंहाची प्रतिमा आढळते. त्यांना कंठीरव हनम, वराह अशी नावे होती. त्याने तांब्याची नाणीही काढली होती. इ. स. च्या अठराव्या शतकात कृष्णराज वोडेयर याने स्वतःच्या नावाची शिव-पार्वतीची सोन्याची नाणी पाडली. त्याची तांब्याची व चांदीची नाणीही आहेत.

**मुसलमान सुलतानांची नाणी** – इ. स. च्या आठव्या शतकात महंमद कासीमने सिंध प्रदेश जिंकल्यानंतर त्याच्या अधिकाऱ्यांनी तिथे नाणी बनवण्यास प्रारंभ केला होता. ती नाणी बगदादच्या खलिफाच्या नाण्यांसारखी होती. त्यांवर टाकसाळीचे नाव, तिथल्या प्रमुखाचे नाव व कुराणातील वचने कोरलेली आहेत. ती चांदीची व तांब्याची बनवलेली असून, त्यांचा घाट सुबक आहे. मात्र सिंध व मुलतान एवढ्याच प्रदेशात ती चालू होती.

त्यानंतर गजनीच्या महंमुदाने भारतात आल्यावर जी नाणी बनविली, ती भारतीय पद्धतीची आहेत. त्यांवर पंजाबमधील शाही नाण्यांप्रमाणे नंदी व घोडेस्वार ही चिन्हे, संस्कृत भाषेत त्याचे नाव आणि अरबी भाषेत कलमा असतो; पृष्ठभागी टाकसाळीचे नावही संस्कृतात कोरलेले असते. पुढे महंमद घोरीने दिल्ली व अजमीर येथे प्रचलित असलेल्या भारतीय नाण्यांप्रमाणे नंदी व घोडेस्वार या आकृती आपल्या नाण्यांवर छापल्या असून, देवनागरी लिपीत आलेख लिहिले आहेत. त्याची सोन्याची व काही रुप्याची नाणी उपलब्ध आहेत. सोन्याच्या नाण्यांवर लक्ष्मीचे चित्र व संस्कृत लेख आहे. रुप्याची नाणी दिल्लीवाला या नावाने प्रसिद्ध आहेत.

गुलाम घराण्यातील इल्तमिश याने प्रारंभी भारतीय ढंगाची नाणी पाडली होती; पण नंतर त्याने ती बंद करून स्वतःचे नाव आणि कलमा छापलेली नाणी सुरू केली. त्यावर कसलीही आकृती नसून, दोन्ही बाजूंवर आलेख आढळतात. त्याची नाणी सोने, चांदी व रुपे या धातूंची असून, त्यांवर खलिफाचे नाव असते. पुढे बलबन याने खलिफाचे नाव नाण्यांवर छापणे बंद

केले. त्याच्या सर्व नाण्यांवर हिजरी वर्षे व टाकसाळीचे नाव आढळते. ही प्रथा पुढे सर्व मुसलमानी राज्यकर्त्यांनी अनुसरली. त्यांच्या नाण्यांच्या वजना-मापांत व धातूंच्या मिश्रणात प्रमाणबद्धता आढळते.

त्या काळात नाण्यांना टंक हे सामान्य नाव होते. तुर्क वंशातील सुलतानांनी सोन्याच्या नाण्यांना दीनार हे नाव पुन्हा चालू केले. चांदीच्या नाण्यांना दिरहम असे नाव होते. तांब्याची नाणी जितल या नावाने चालू होती.

अलाउद्दीन खिलजीने मुहंमद शाह या नावाने सोन्याची व चांदीची नाणी बनवून, त्यांवर एका बाजूला स्वतःचे नाव आणि दुसऱ्या बाजूला दुसरा शिकंदर ही पदवी व टाकसाळीचे नाव छापले आहे. त्याने देवगिरी येथे एक टाकसाळ सुरू केली होती, तिथे टंका व दीनार ही नाणी बनवली जात. मुबारक शाहाची नाणी खिलजी घराण्याच्या नाण्यांमध्ये सर्वांत सुंदर आहेत. त्याच्या नाण्यांवर लांबलचक बिरुदावली छापलेली आढळते. त्याची चांदीची व सोन्याची नाणी १७० ग्रेनची



(१) मुहंमद तुगलुक याचे सोन्याचे नाणे – दिल्ली (२) त्याचेच पोटीनचे नाणे (३) फीरूजशाहाचे पोटीनचे नाणे – दिल्ली.
(सी. जे. ब्राउन यांच्या दि कॉइन्स ऑफ इंडिया या पुस्तकावरून)

मिळाली आहेत. त्याची मिश्रित धातूची नाणी मात्र ५६ ग्रेन वजनाची आहेत. त्या दोघांची काही नाणी चौकोनी आहेत.

मुसलमान सुलतानांमध्ये मुहंमद तुगलुक हा सर्वश्रेष्ठ नाणी-निर्माता मानला जातो. त्याची विविध प्रकारची नाणी उपलब्ध असून, त्यांत सोन्याची नाणी जास्त आहेत. त्याने चांदीच्या नाण्याला अदली हे नाव दिले होते. पुढच्या काळात आर्थिक तंगीवर उपाय म्हणून त्याने तांब्या-पितळेची हजारो नाणी पाडली व त्यांवर सोन्या-चांदीच्या नाण्यांच्या किंमती छापून ती प्रचलित केली. पण त्याचा परिणाम मात्र उलटाच होऊन बादशाही तिजोरी रिती पडली. अशा निरुपयोगी नाण्यांचे ढीग तुगलुकाबादच्या गढीत सापडले आहेत. त्या नाण्यांवर कुराणातील वचने आढळतात. काही नाण्यांवर खलिफाचे नावही आढळते; त्यांना खिलाफती नाणी म्हणतात.

फीरूजशाहा तुगलुक याने अनेक प्रकारची नाणी बनवली. त्याची सोन्याची नाणीच सहा प्रकारची आहेत. त्याच्या नाण्यांवर एका बाजूला खलिफाचे नाव आणि दुसऱ्या बाजूला त्याचे नाव आढळते. त्याच प्रकारची नाणी त्याच्या नंतरच्या सुलतानांनी पाडली; पण त्यांनी फीरूजशाहाची जुनी नाणीही चालू ठेवली होती. पुढे लोदी घराण्याची सत्ता दिल्लीवर सुरू झाल्यानंतर बहलोल लोदीने बहलोली नावाची चांदी-तांबे या मिश्रित धातूंची नाणी सुरू केली. त्या नाण्यांवरही खलिफाचे नाव आहे.

**शेरशहाची नाणी**– इ. स. १५२६ साली बाबराने दिल्ली येथे मोगल वंशाचे राज्य सुरू केले. पण त्याला व हुमायूनला फारशी शांतता लाभली नाही. त्यामुळे त्या दोन्ही बादशहांनी दिरहम व बलहोली या नाण्यांसारखी रूप्याची व तांब्याची नाणी बनवूनच वेळ मारवली. त्यांवर एका बाजूला कलमा व दुसऱ्या बाजूला बादशहांची नावे आहेत. इ. स. १५४० मध्ये अफगाण सरदार शेरशहा सूरी याने दिल्लीवर स्वामित्व मिळविले. त्याने नाणक पद्धतीत नवीन प्रथा सुरू केली. त्याने नाण्यांचा आकार, वजने व धातूंची शुद्धता याविषयी नियम केले आणि शुद्ध सोन्याची नाणी बनवली. चांदी १७५ ग्रेन व तांबे ५ ग्रेन यांचे मिश्रण करून त्याने जे नाणे बनवले, त्याला रौप्य या संस्कृत शब्दावरून रुपया हे नाव दिले. तेच नाव अजूनही प्रचलित आहे. त्याचे रुपये गोल व मोठे असून, त्यांच्या एका बाजूवर कलमा व दुसऱ्या बाजूवर पदवीसह नाव, हिजरी सन व दिवस आणि धार्मिक वचन आहे.

**मोगल बादशहांची नाणी** – इ. स. १५५५ मध्ये हुमायून पुन्हा दिल्लीचा बादशहा झाला. पण त्याने शेरशाहाच्या नाणक पद्धतीत बदल केला नाही. त्यामुळे अकबरापासूनच मोगल नाणी सुरू होतात. त्याने प्रथम शेरशाहाच्या रुपयासारखेच आपले रुपये बनवले. आग्रा येथे बनवलेल्या त्याच्या नाण्यावर

रुपया हे नाव आढळते. त्याने सोन्याची मुहर नामक नाणीही निर्माण केली. त्याच्या सर्व नाण्यांवर कलमा, काही वचने, त्याचे नाव, वर्ष व टाकसाळीचे नाव अंकित केलेले आढळते. दीने–इलाही धर्माची स्थापना केल्यानंतर अकबराने आपल्या नाण्यांवर इलाही संवताचे वर्ष टाकण्यास प्रारंभ केला. अशा नाण्यांवर इलाही धर्मवचने व 'अल्लाह अकबर जल जलालु' हे शब्द आहेत. त्याच्या काही नाण्यांवर बाज पक्षाची आकृती आढळते; तर काहींवर सीतारामाची प्रतिमा दिसते. अकबराच्या मेहराबी (महिरपी आकाराच्या) मोहरा विशेष प्रसिद्ध आहेत. त्या आग्रा येथील टाकसाळीतल्या आहेत.

शेरशहाच्या दामसारखी तांब्याची नाणी अकबराने पाडली, ती पैसा किंवा फलुस या नावाने ओळखली जात. वृश्चिक, इ. आकृती कोरण्यात आल्या. अजमेर येथे बनवलेल्या मुहरवर पुढीलभागी अर्धपद्मासनात जहांगीरची आकृती व पृष्ठभागी मध्ये सूर्य व भोवती लेख आहे. काही नाण्यांवर पद्यपंक्ती आढळतात. त्याच्या काही नाण्यांवर त्याचे व अकबराचे नाव आहे, काहींवर त्याचे व नूरजहानचे नाव आहे, तर काहींवर सलीम हे नाव आहे.

शहाजहान बादशहाने मुहर व रुपया यांचे वजन पूर्वीइतके कमी केले. नाण्यांवर एका बाजूला कलमा व टाकसाळीचे नाव आणि दुसऱ्या बाजूवर बादशहाचे नाव व पदवी घालण्याची जुनी पद्धतच त्याने अंगीकारली. त्याची तांब्याची नाणी मुंबई व सोपारा येथील टाकसाळीत बनलेली आहेत. त्याची नाणी शुद्ध धातूंची बनवलेली आहेत.



(१) बाबराचे रुप्याचे नाणे (२) शेरशहाचे चांदीचे नाणे (३) अकबराचे सोन्याचे नाणे– मेहराबी मुहर (सी. जे. ब्राउन यांच्या दि कॉइन्स ऑफ इंडिया या पुस्तकावरून)

त्याचप्रमाणे निस्फी ( अर्धा दाम ), दामर ( पाव दाम ) व दमरी (दामाचा आठवा भाग) ही नाणी त्या वेळी चालू होती. पैसा व दमरी (किंवा दमडी) ही नावे दीर्घ काळपर्यंत चालू राहिली. अकबराने टंका नामक तांब्याची नवी नाणीही सुरू केली. त्यांवर 'टंका अकबर शाही, देहली' हे शब्द आढळतात.

जहांगीरच्या वेळी मोगल नाणी विशेष चांगल्या रूपात निघू लागली. त्याच्या तांब्याच्या नाण्यांवर फुले, पाने, बिंदू वगैरे नक्षी काढलेली दिसते. जहांगीरने कलमा व खलिफाचे नाव नाण्यांवर घालण्याची प्रथा पुन्हा सुरू केली. त्याची चांदीची व सोन्याची नाणी अधिक वजनाची आहेत. त्याच्या आदेशानुसार काही नाण्यांवर राशींची प्रतीके म्हणून सिंह, बैल,

जहांगीरच्या वेळेपासून निसार नामक एक नाणे प्रचलित झाले. ही नाणी दानधर्म किंवा भेट देण्यासाठी वापरली जात. राज्यारोहण, विवाह, जन्म, इ. प्रसंगी ही नाणी लोकांकडून लुटवली जात होती. अकबर, जहांगीर व शहाजहान यांची सोन्याची चौकोनी नाणी दुर्मिळ आहेत.

औरंगजेबाच्या कारकिर्दीत राज्याची आर्थिक स्थिती चांगली नसल्यामुळे रुपयाची किंमत खूप कमी झाली. त्याने बापाप्रमाणेच मुहर, रुपया, निसार, इ. नाणी बनवली व त्यांवर स्वतःचे नाव 'शाह आलमगीर बादशाह गाजी' असे टाकले. त्याची चांदीची नाणी पुष्कळ मिळाली आहेत; तांब्याची मात्र थोडी आहेत. ती सर्व मागील पद्धतीची आहेत. मात्र त्याच्या

नाण्यांवर कुराणांतील वचने नाहीत. जिजिया कर वसूल करण्यासाठी त्याने दिरहम हे नाणेंही सुरू केले. त्यानंतरच्या बादशहांनी अशीच नाणी बनवली. इ. स. १८०३ मध्ये मोगल बादशाहीवर ब्रिटिशांचे प्रमुत्व स्थापित झाल्यानंतर त्यांच्या नाण्यांत थोडी नवीनता आली. त्या नाण्यांच्या एका बाजूवर मध्यभागी लेख व भोवती गुलाबाची माळ दिसते.

मोगलांच्या आधी मुसलमानी टाकसाळी दिल्ली व दौलताबाद येथें होत्या. पण मोगलांच्या काळी आगरा, लाहोर, अहमदाबाद, अहमदनगर, सोलापूर, विजापूर आणि बंगाल व बिहारमधील अनेक शहरे या ठिकाणी टाकसाळी सुरू झाल्या होत्या.

मोगल साम्राज्य भारतात प्रस्थापित होण्यापूर्वी अनेक

गोंड राजांनी मध्य भारतात अनेक शतके राज्य केले. त्यांची इ. स. च्या सोळाव्या शतकातली सोन्याची व तांब्याची नाणी सापडली आहेत. त्यांवर 'पुलस्तवंश श्रीसंग्रामदेव' असा लेख नागरी लिपीत आहे. गोंड राजे रावणवंशी होते.

इ. स. च्या सतराव्या शतकात नेपाळच्या राजाने मोगल पद्धतीची नाणी तयार केली; त्यांवर देवनागरीत राजाचे नाव व तिथी लिहिलेली आहे. दुसऱ्या बाजूवर धार्मिक वचने आहेत. कुचविहारच्या कोच राजांची सोन्याची नाणीही सापडली आहेत.

अवध प्रांतात इ. स. च्या अठराव्या शतकाच्या अखेरीस मछलीदार रुपया प्रचलित होता. त्याच्या मागच्या बाजूवर अवध राज्याचे मासा हे चिन्ह आढळते.

वरची ओळ – अकबराची तीन नाणी
खालची ओळ – (१) जहांगिरचे चांदीचे नाणे



खालची ओळ – (२) अकबरचे तांब्याचे नाणे टंका – दिल्ली (३) अकबराचा अर्घ रुपया.

(सी. जे. ब्राउन यांच्या दि कॉइन्स ऑफ इंडिया या पुस्तकावरून)

स्वतंत्र मुसलमान राज्ये चालू होती. त्या सर्व राज्यांत दिल्लीच्या सुलतानांच्या नाण्यांसारखी नाणी प्रचलित होती. त्यांतील पुष्कळ नाणी तांब्याची आणि काही चांदीची किंवा मिश्र धातूची होती. बहमनी राज्यात सोने व चांदी या धातूंची सुंदर व मोठी नाणी पाडली गेली होती. तांब्याची नाणी तर पुष्कळच होती. ही सर्व नाणी दिल्लीच्या नाण्यांसारखीच आहेत. गुजरातमधील स्वतंत्र मुसलमान सुलतानांनी प्रथम दिल्लीच्या नाण्यांसारखीच नाणी पाडली; पण पुढे त्यांनी आपली स्वतंत्र शैली सुरू केली. त्यांच्या चांदीच्या नाण्यांवर षट्कोनात लेख कोरलेला असतो, त्यात सुलतानाचे नाव व पदव्या असतात. काही नाण्यांवर फारसी भाषेतील पद्यपंक्ती आढळतात; तर काहींवर वंशवृक्ष लिहिलेले दिसतात. गुजरातेत अनेक टाकसाळी होत्या.

हैदर व टिपू यांची नाणी विजयनगरच्या नाण्यांसारखीच होती. हैदरच्या सुवर्ण वराहावर ( बहादुरी होन ) शिवपार्वतींची प्रतिमा आढळते. मागील बाजूवर मात्र त्याने स्वतःचे चिन्ह व टाकसाळीचे नाव छापले आहे. बेदनूर, धारवाड, श्रीरंगपट्टम, नगर, कालिकत, इ. अनेक ठिकाणी त्याच्या टाकसाळी होत्या. टिपू सुलतान नाण्यांच्या बनावटीविषयी फार दक्ष होता. त्याच्या नाण्यांवर मोगल, हिंदू व फ्रेंच या नाणकपद्धतींचा प्रभाव पडलेला दिसतो. त्याच्या बारा टाकसाळी होत्या आणि तिथे सोने, चांदी व तांबे या धातूंची सुंदर नाणी बनवली जात होती. त्यांत मोहर, रुपये, पगोद, फनम, इ. अनेक प्रकार आहेत.

**मराठी राज्यातली नाणी** – यादवकाळी महाराष्ट्रात गरुडां-

कित होन हे सोन्याचे नाणे प्रचलित होते. यादवांचे चिन्ह असलेली नाणी दुर्मिळ आहेत. त्यांच्या नाण्यांवर नागरी लिपीत लेख असतात. मात्र त्यांच्या राज्यात अनेक प्रकारची नाणी चालू होती. कन्नड भाषेतील शब्द होन्नु (= सोने) यावरून होन हे नाव दिले गेले. होनाचे अनेक प्रकार होते. पातशाही, शिवराई, सणगरी, देवराई, वेळुरी, फुंदगोळी, अशी त्यांची



१. जहांगीरचे चांदीचे नाणे– लाहोर.

२. जहांगीर सोन्याचे नाणे– आग्रा.

३. जहांगीरचे सोन्याचे नाणे– अजमेर.

४. जहांगीरचे चांदीचे नाणे– आग्रा.

५. जहांगीरचे व नूरजहान यांचे सोन्याचे नाणे–सुरत.

६. जहांगीरचे चांदीचे नाणे– अहमदाबाद.

७. शाहजहानचे चांदीचे नाणे– अहमदाबाद.

८. शाहजहानचे सोन्याचे नाणे– (निसार)– शहाजहनाबाद.

९. औरंगजेबाचे सोन्याचे नाणे– ठठ्ठा.

१०. शहाशुजाचे चांदीचे नाणे– अकबरनगर.

११. औरंगजेबाचे चांदीचे नाणे– कटक.

(सो. जे. ब्राउन यांच्या दि कॉइन्स ऑफ इंडिया या पुस्तकावरून)

चालू होती; त्यांत परराज्यांतली नाणीही होती. काही सावकार व सोनार यांना नाणी बनवायला परवानगी होती. इ. स. च्या सोळाव्या शतकात महाराष्ट्रात मोहोर व होन ही नाणी नावे सभासदाच्या बखरीत दिली आहेत.

शिवपूर्व काळी महाराष्ट्रात प्राचीन राजवंशांची, विजयनगर, बहमनी, आदिलशाही, निजामशाही, इमादशाही, दिल्लीचे

सुलतान व बादशाहा या सर्वांची, त्याचप्रमाणे पोर्तुगीज, सिद्दी यांचीही नाणी प्रचलित होती. ती लोकव्यवहारात चालत. त्यांपैकी सोने, रुपे व तांबे या धातूंची भिन्न प्रकारची नाणी उपलब्ध आहेत. शिवाजीमहाराजांनी आपल्या स्वतंत्र राज्याचे द्योतक म्हणून स्वतःची नाणी पाडली व इतर नाण्यांना कायदेशीर चलन म्हणून मानणे बंद केले.

शिवाजी महाराजांनी राज्याभिषेकानंतर आपल्या नावाने

शिवछत्रपती सर्व वर्षासने होनाने देत असत. ते सोन्याचे होन क्वचितच दृष्टीस पडतात. छत्रपती शाहूने साताऱ्याला एक टाकसाळ सुरू करून आपल्या नावाने शाहूशिक्का नामक रुपये व पैसे बनवले. कोल्हापुरासही एक टाकसाळ होती, तिथे शंभुशिक्का नामक रुपये निघत.

नानासाहेब पेशव्यांच्या वेळी निरनिराळ्या सावकारांना नाणी पाडण्याची परवानगी दिली जाई आणि त्याबद्दल ते

नेपाळ–पृथ्वी नारायण याचे चांदीचे नाणे

इंदूर– यशवंतराव होळकर याचे चांदीचे नाणे

टिपू सुलतानाचे तांब्याचे नाणे

ई. इं. कंपनीचा रुपया (शाह आलम)



आसाम–गौरीनाथ सिंह याचे चांदीचे नाणे

शिखांचा रुपया अमृतसर

(सी. जे. ब्राउन यांच्या दि कॉइन्स ऑफ इंडिया या पुस्तकावरून)

सोन्याची व तांब्याची नाणी पाडली होती. त्यातील तांब्याचे नाणे शिवराई या नावाने प्रसिद्ध आहे. त्या नाण्यावर पुढील बाजूला 'श्री राजाशिव' व दुसऱ्या बाजूला 'छत्रपति' असा आलेख उमटवलेला आहे. हे नाणे गेल्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत प्रचारात होते. शिवाजी महाराजांची टाकसाळ रायगडावर होती. शिवाजीमहाराजांची नाणी (महाराष्ट्रात चालू असलेले पैसे) कर्नाटकात व तंजावरकडेही चालू होती.

पेशव्यांना ठराविक नाणी देत. अशा अनेक टाकसाळी नागोठणे, रेवदंडा, माहुली, धारवाड, इ. ठिकाणी सुरू झाल्या होत्या. ही पद्धत पुढे पेशवाईअखेरपर्यंत चालू होती. शिंदे, होळकर, नागपूरकर भोसले, आंग्रे, इ. सरदारांनीही निरनिराळ्या ठिकाणी टाकसाळी काढल्या होत्या. सरकारला पट्टी दिली, की वाटेल त्याला नाणी पाडण्याची परवानगी मिळे. सर्व ठिकाणची नाणी वेगळ्या प्रकारची होती. रुपयांची नावेही

वेगवेगळी होती. बागलकोट येथे मल्हार भिकाजी रास्ते हा पेशव्यांचा सुभेदार रुपये पाडीत असे, त्यांना मल्हारशाही रुपये हे नाव मिळाले होते. दुसऱ्या बाजीरावाच्या वेळी अंकुशी व चांदवडी या रुपयांचे विशेष महत्त्व होते; ते पुण्यात बनवले जात. पुण्याची टाकसाळ इ. स. १८२२ मध्ये बंद झाली. बागलकोट, कोल्हापूर, कुलाबा, इ. ठिकाणच्या टाकसाळी १८३४ मध्ये बंद झाल्या.

छत्रपती शिवाजी व शाहू यांच्या नाण्यांवर मराठीत नावे उठवलेली असत. पण नंतरच्या काळातील रुपयांवर फारसी अक्षरे असत. यशवंतराव होळकराने मात्र आपल्या नाण्यांवर संस्कृत छाप उठवला होता.

छत्रपती शाहू व त्यांचे पेशवे दिल्लीच्या बादशहांचे प्रभुत्व मानत असल्यामुळे, त्यांनी शिवाजीप्रमाणे केवळ स्वतःच्या नावांची नाणी पाडली नाहीत. त्यांच्या नाण्यांवर त्यांची पदवी व कुलदेवता यांच्याबरोबर बादशाहाचे नावही घातलेले आढळते.

पेशवाईत सर्व प्रकारच्या, सोने, रुपे व तांबे या तीन्ही धातूंच्या जुन्या नाण्यांचे चलन मोठ्या प्रमाणावर चालू होते. पेशवाईत अधेल्या, चवल्या व आणेल्या ही नाणीही प्रचलित होती. शिवराई हे तांब्याचे नाणे सर्व महाराष्ट्रात चालत असे. ते सर्वत्र सारखे होते.

**इंग्रजांची नाणी–** ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीने सुरत व मद्रास येथे वखारी उघडल्यानंतर मोगल बादशाहांच्या रुपया-प्रमाणे आपले रुपये पाडण्यास आरंभ केला. पुढे इ. स. १६७१ साली कंपनीची टाकसाळ मुंबई येथे सुरू झाली. तिथे तांबे व जस्त या धातूंची नाणी ते पाडू लागले. इ. स. १६७६ पासून सोने व चांदी या धातूंची नाणी त्यांनी सुरू केली. प्रथम त्यांवर चार्लस राजाचे नाव आणि चिन्ह उमटवले जात असे. पण तशी नाणी भारतात चालणे कठीण वाटल्यामुळे, त्यांनी इ. स. च्या अठराव्या शतकात मोगल शैलीची शाह आलमच्या नावाची नाणी पाडण्यास सुरवात केली. मद्रासकडे कंपनीची पगोद, फनाम, इ. तांब्याची नाणी चालू होती, ती भारतीय पद्धतीचीच होती. प्लासीच्या लढाईनंतर बंगाल, ओडिसा वगैरे प्रांतांत इंग्रजांचे वर्चस्व प्रस्थापित झाले, तरीही त्यांनी शाह आलमच्या नावानेच मुहर व रुपया ही नाणी काढणे चालू ठेवले होते. कलकत्ता येथे इंग्रजांनी टाकसाळ सुरू केली. तिथल्या मुहरला असरफी हे नाव होते. औरंगजेबाच्या मृत्यू-नंतर मोगल बादशाहीचा ऱ्हास झाला आणि अनेक प्रांतांचे सुभेदार स्वतंत्रपणे राज्य करू लागले, तरी ते मोगल बाद-शाहाच्या नावाचीच नाणी पाडीत होते. राजपूत संस्थाने आणि पोर्तुगीज, फ्रेंच व डच कंपन्यांनीही तेच धोरण संभाळले होते. त्यामुळे इ. स. च्या अठराव्या शतकात भारतात हजारो प्रका-रची मोगल शैलीची नाणी चालू राहिली. मात्र त्यांवर हिजरी सन न घालता राज्यवर्ष घातले जाई. इ. स. १८०३ मध्ये इंग्रजांनी दिल्ली जिंकल्यावरही त्यांनी मोगल बादशाहांच्या नावांनी नाणी पाडली. इ. स. १८५७ पर्यंत त्यावर बहादुर-शाहाचे नाव आढळते.

इ. स. च्या एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीही मोगली पद्धतीची नाणी सर्वत्र चालू होती. दक्षिणेतील निजाम, मध्य भारतातील राजपूत संस्थाने आणि लाहोर, मुलतान, काबूल या भागांतील दुर्रानी सुलतानही मोगली रुपयासारखी नाणी पाडीत होते. अशी ५–२५ प्रकारची सोन्याची व १००–१२५ प्रकारची रुप्याची नाणी चालू होती. त्या सर्व नाण्यांचा मेळ० घालणे सरकारी खजिनदारांना अवघड व त्रासदायक वाटे. म्हणून मग इ. स. १८३५ पासून इंग्रजांनी आपली स्वतंत्र शैलीची नाणी पाडण्यास प्रारंभ केला. त्यांवर एका बाजूला चौथ्या विल्यम राजाचा मुखवटा आणि दुसऱ्या बाजूला वाघाची आकृती आढळते. त्यानंतर सर्व जुनी नाणी बंद करण्यात आली.

**पोर्तुगीजांची नाणी –** इ. स. १५१० साली पोर्तु-गीजांनी गोवा जिंकल्यावर तिथे टाकसाळ सुरू करून सोने, चांदी व तांबे या धातूंची नाणी पाडली. ही नाणी हिंदूंच्या नाण्यांसारखीच होती. त्या वेळी गोव्यात सातवाहन, चालुक्य, शिलाहार, कदंब, होयसळ, यादव, विजयनगरचे सम्राट, मुसलमान सुलतान या सर्वांची नाणी चालू होती. अल्बुकेर्कने मुसलमानी नाण्यांवर बंदी घातली; पण हिंदू राजांची नाणी चालू ठेवली. पोर्तुगीज नाण्यांवर एका बाजूला क्रॉस हे चिन्ह व दुसऱ्या बाजूला एक वर्तुळ असे. चांदीची नाणी विविध प्रकारची व अनेक नावांची होती. त्यांत टंक व रुपया ही नावेही होती.

**फ्रेंचांची नाणी –** फ्रेंच लोकांनी द. भारतातील पगोद व फनम यांचे अनुकरण करून सोन्याची व चांदीची नाणी पाडली होती. त्यांवर विष्णू व लक्ष्मी यांच्या प्रतिमा व चंद्राची आकृती असे. इ. स. च्या अठराव्या शतकात पांडेचरी फनम मध्ये फ्रेंच नाणकशैलीचा समावेश होऊ लागला. मात्र फ्रेंच रुपये मोगली पद्धतीचेच होते. (अपूर्ण)

जगात ज्या मोठ्या मोठ्या शक्ती काम करीत आहेत, त्यांचे यथातथ्य आकलन आपणास न होणे ही गोष्ट शक्य आहे. पण एवढे तरी आपण समजून घेणे अगत्याचे आहे, की भारत म्हणजे काय आहे व त्याने आपल्या सामाजिक व्यक्तित्वाचा विकास कशा प्रकारे करून घेतला आहे ? भारताच्या विभिन्नत्वाचे पैलू कोणते आणि त्याची सुदृढता कुठे सुगुप्त आहे ? या मूलभूत गोष्टी आहेत. त्यांचे ज्ञान जर आपण मिळवले नाही, तर आपण भारत काय आहे ते जाणण्यास असमर्थ ठरू आणि जर आपण भारताला जाणू शकलो नाही, तर आमचे भाव, आमचे विचार, आमची कार्ये या सर्व गोष्टी अपूर्ण राहतील व आपण भारताची सर्वांगीण आणि प्रभावपूर्ण अशी सेवा करू शकणार नाही.

— पं. जवाहरलाल नेहरू
( 'संस्कृति के चार अध्याय' प्रस्तावना )

**भारतीय संस्कृतिकोश मंडळ, पुणे**

